# भाग सहावा

## विठ्या महार ते ज्ञेयवाद

संपादक :

यशवंत रामकृष्ण दाते, बी. ए., एल्एल्. बी.

चिंतामण गणेश कर्वे, बी. ए.

संपादक— ज्ञानकोश, शब्दकोश, वाक्संप्रदायकोश,
शास्त्रीय परिभाषाकोश, इत्यादि.

१० जून १९५१

किंमत २५ रुपये

शिलालेख-ताम्रपट, इत्यादींवर स्वतंत्र लेख आहेत. हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व जातींचा परामर्ष यांत घेतला आहे. पण ज्ञानकोशाच्या वेळचा जातिसंशोधनाचा कटु अनुभव लक्षांत घेऊन महाराष्ट्रांतील ब्राह्मणांच्या पोटजातींवर निराळे लेख लिहिले नाहींत. 'ब्राह्मण' लेखांत प्रांतवार प्रमुख जातींची यादी फक्त दिली आहे. जगांतील सर्व ठळक भाषा व त्यांतील वाङ्मय यांसंबंधीं थोडक्यांत विवेचन त्या त्या नांवाखालीं दिलेलें आहे. मोठमोठ्या साहित्यिकांचीं चरित्रें स्वतंत्र घेतलीं असल्याकारणानें या वाङ्मय-विवेचनांत त्यांच्या लेखनकार्याचा विशेष परिचय करून दिला नाहीं. अर्थशास्त्र, कायदेकानू, खेळ, ज्योतिष, तत्त्वज्ञान, पदार्थविज्ञान, प्राणिशास्त्र, यंत्रशास्त्र, रसायनशास्त्र, वनस्पतिशास्त्र, वैद्यक, शासनशास्त्र, स्थापत्यशास्त्र, इत्यादि सर्व शास्त्रांवर एकेक सर्वसामान्य लेख असून त्यांतील बहुतेक अंगोपांगांची माहिती निरनिराळ्या लेखांतून स्वतंत्र दिलेली आहे. सर्व महत्त्वाच्या वनस्पती, रसायनें, रोग, औषधें, शास्त्रीय घटना, दिवाणी-फौजदारी-लष्करी कायदे, देशी आणि विलायती खेळांचे प्रकार, भूगोलावरील व अंतरिक्षांतील सारे चमत्कार, पृथ्वीवरील पशू आणि पक्षी, तत्त्वज्ञानांतील प्रमुख पंथ, गणिताच्या सर्व शाखा, अर्थशास्त्राचे सिद्धान्त, सर्व व्यापारी जिन्नस, राज्यव्यवहारांतील खातीं व विशिष्ट अधिकार, समाजांतील पक्षोपपक्ष व संस्था, संगीतांतील सर्व राग-रागिण्या, स्थापत्यशास्त्रांतील विविध बांधकामाचे प्रकार, यांसारखे सर्व शास्त्रांतील महत्त्वाच्या बहुतेक सर्व विषयांवर या कोशांत स्वतंत्र लेख सांपडतील.

**ही ज्ञानकोशाची नुसती लघु आवृत्ति नव्हे**—हा 'सुलभ विश्वकोश' म्हणजे ज्ञानकोशाची नुसती संक्षिप्त आवृत्ति नव्हे. कारण, ज्ञानकोशांतील बहुतेक सर्व विषयांवर यांत लेख थोडक्यांत दिले असून शिवाय आणखी किती तरी नवीन लेख यांत समाविष्ट केले आहेत. सु. वि. चा नुसता पहिला विभाग पाहिल्यास जे त्यांत कित्येक नवीन लेख आढळतील त्यांपैकीं कांहींचीं नांवें पुढें दिलीं आहेत:—

ॲकेडियन वाङ्मय, ॲक्च्युअरी, अग्निहोत्र, अजाहत, सरदेशमुख, अझटेक, अड्यार, अंतर्ज्वलनयंत्र, अंदाजपत्र, अद्भुतवाङ्मय, अध्यात्मविद्या, अनियंत्रित शासनपद्धति, अपोलोनिअस, अब्राहॅम्स, अमरत्व, अमुंडसेन, अर्गनी, अलाबास्टर, अल्पजनसत्ताकराज्य, अल्मानॅक, अश्लील वाङ्मयाचा कायदा, अश्ववर्ग, अश्वशक्ति, अस्फाल्ट, अहंकार, अक्षविचलन, आकाशगंगा, आत्मचरित्र, आनंदरंग पिल्ले, ऑपेरा, आफ्रिडी, आय्. सी. एस्., आर्कराइट, आर्क्टिक महासागर, आर्द्रतामापक, आर्मेडिलो, ऑलिंपिक सामने, आलेचर्ट, आवळी कवडे, आल्हाम्रा, आशावाद, आसामी वाङ्मय, ऑस्ट्रेलियन वाङ्मय, आस्तिक्यवाद, इटीदांड्ड, इफेल टॉवर, इमारती लांकूड, ईद, ईश्वरविज्ञान, उग्रियन, उच्चारशास्त्र, उच्चोन्नत शिल्प, उझबेकिस्तान, उडिया भाषा, उत्तरमीमांसा, उत्सर्जकयंत्र, उद्देशिका काव्य, उद्यान-नगरें, उपयुक्ततावाद, उपहासात्मक लेख, उलेमा, उपवदात, उष्णतागतिशास्त्र-रसायनशास्त्र, ऊर्दू, ऊर्ध्वपातनयंत्र, ऋत्विज, एकदली वनस्पती, एकपेशी-वर्ग, एकेश्वरवाद, एनीमा, एसरी, एल्गुजे, एस्पेरॅन्टो, ओघम लिपि, ओटर, ओपवर्ण, ओरायन, ओमेंझ, ओलवण, ओशियानिया, ओस्लो, औदुंबर, औषधक्रिया, अंकोराइट, अंजनवेल, ॲटीमेनस, ॲटिपोड बेटें, अंतःसंनिवेदन, ॲबुलन्स, कचकडी, कॅटेकोच, कंटकत्वक्वर्ग, कटिप्रदेश, कंठधमनी, कणवाद, कॅथोलिक मंडळी, कंद, कॅनरी बेटें, कनिंगहॅम, कन्थाराइड, कपिलशैवाल, कमान, कॅमेरा, करमणूक कर, करवती मासा, कॅरे, करेला, कर्जखत, कर्ण सोळंखी, कर्णधार, कर्फ्यू, कर्बसंयुक्तें, कलन, कॅलिफोर्निया, कल्पनावाद, कल्पित कथा, कवडापक्षी, कसर, कस्तुरी चिचुंद्री-मृग-वृषभ, कक्षावाद्य, काकवर्ग, काकाकुवा, कांक्रीट, कांगोरी किल्ला, काजळी रोग, कांटेरी तार, काठिण्य, काडतूस, कांतीण उठणे, कॉन्स्टेबल, कान्होजी जेधे, कापडी नळ, कापणीयंत्र, काफीन, कावा, कॉव्हेन, कामगारसंघ, कायमनिधि, कायदेभंग, कायदेसंग्रह (कोड), कारकुनी, कारण, कारिकल चोल, कार्टराइट, कार्नेजी, कार्यक्षमता, इ. इ..

या एका भागावरून देखील प्रस्तुत कोशांत किती नवी माहिती दिली आहे व हा कोश कसा अद्ययावत् केला आहे याची सहज कल्पना येईल.

ज्ञानकोशांत त्या वेळीं जिवंत असणाऱ्या व्यक्तींचीं चरित्रें मुद्दाम गाळलीं होतीं. परंतु या कोशांत हयात पण विशेष महत्त्वाच्या व कांहीं वैशिष्ट्य धारण करणाऱ्या तेवढ्याच निवडक व्यक्तींचीं चरित्रें दिलीं आहेत. प्रत्येक भाग मुद्रित होईपर्यंत नवी नवी माहिती, आंकडे वगैरे जें जें कांहीं देण्यासारखें दिसलें तें तें सर्व यांत घेतलें आहे.

**आधारभूत ग्रंथ**—सुलभ विश्वकोशांतील लेख आणि चित्रें यांसाठीं ज्या ग्रंथांचा बराच उपयोग झाला त्यांचीं नांवें—

(अ) मराठी—

१. महाराष्ट्रीय ज्ञानकोश, वि. १–२३.

२. महाराष्ट्र शब्दकोश, वि. १–७.

३. महाराष्ट्र वाक्संप्रदायकोश, वि. १–२.

४. शास्त्रीय परिभाषाकोश.

५. चरित्रकोश (चित्राव), भा. १–३

४ आसामी, ५ उडिया, ६ ऊर्दू, ७ कानडी, ८ गुजराथी, ९ तामिळ, १० तेलगू, ११ नेपाळी, १२ पाली, १३ पुराण-वाङ्मय, १४ बंगाली, १५ माणिपुरी, १६ मराठी, १७ मलयालम् (मल्याळी), १८ संस्कृत, १९ सिंधी, २० हिंदी.

३. श्री. **रामचंद्र सखाराम भागवत,** ठाणें—यांचे पुढील लेख थिऑसफी विपयांतील आहेत : १ अदृश्य सृष्टीचें संशोधन, २ ईश्वरी योजना, ३ कर्म, ४ देव, ५ बेझंट (ॲनी), ६ भूत-पिशाच्च, ७ मनु, ८ महाचोहन, ९ मृत्यु, १० मेस्मेरिझम, ११ मैत्रेय, १२ मोर्य, १३ मोक्ष, १४ सिद्धसंघ.

४. **रेव्हेरेंड फादर शॉख,** संगमनेर— यांनीं ख्रिस्ती संप्रदायांतील विधी, पंथ, विचार, वगैरेंवर कांहीं लहान लहान इंग्रजी लेख लिहून दिले. त्यांचें मराठी भाषांतर करून ते लेख त्या त्या नांवाखालीं कोशांत दिले आहेत.

५. डॉ. **बा. मो. कानिटकर,** पुणें— यांनीं २६ विविध शास्त्रीय टाचणें दिलीं. तीं बहुतेक समाविष्ट केलीं आहेत.

६. डॉ. **साकरलाल याज्ञिक,** पुणें—आयुर्वेदीय औषधांची माहिती यांनीं आपल्या पुस्तकांतून दिली.

७. प्रा. **अ. या. चंद्रचूड,** पुणें—गणितशास्त्रांतील विपयांवर यांनीं लिहून दिलेले लेख कमीजास्त करून कोशांत घेतले.

८. श्री. **वा. ह. मनोहर,** मुंबई— यांनीं यंत्रशास्त्रांतील कांहीं विपयावर लेख लिहून पाठविले.

९. डॉ. **य. गं. लेले,** पुणें— यांनीं रसायनशास्त्रांतील विपयांवर लेख तयार करून दिले.

१०. श्री. **गो. वि. शिंवे,** सांगली—१ निरीक्षण (सर्व्हे), २ बांधबंधारे.

११. श्री. **लागू,** ट्रेनिंग कॉलेज, लोणी—१ कुस्ती, २ मलखांब.

१२. प्रा. **य. का. सोहनी,** पुणें— १ पोलिश वाङ्मय, २ फ्रेंच वाङ्मय.

१३. श्री. **रा. ना. नातू,** पुणें— लघुलेखन.

१४. डॉ. **वा. वि. आठल्ये,** सातारा—जीवनरसायनशास्त्र, होमिओपथी व कांहीं होमिओपथी वैद्यांचीं चरित्रें.

१५. श्री. **कृ. शं. हिंगवे,** पुणें— ग्रंथालयशास्त्र.

कचेरींतील साहाय्यकांत आमचे ज्ञानकोशांतील सहकारी श्री. **लक्ष्मण केशव भावे,** वकील (पाली) यांचा विशेष व प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. त्यांनीं एक वर्ष मुद्दाम पुण्यास राहून व कचेरींत बसून आम्हीं दिलेलें काम केलें. त्यांच्या दोघां चिरंजिवांनीं तोंडीं सांगितलेलें लिहून घेणें व नकला करणें हीं कामें केलीं. अशींच नकला करण्याची कामें श्री. **हुपरेकर,** श्री. **वा. अ. गरुड,** श्री. **मु. स. देवकुळे,** श्री. **घायगुडेबंधु,** वगैरेंनीं केलीं. श्री. **शं. रा. गोडबोले,** बी. ए., एल्‌एल्‌. बी. व श्री. **खुपेरकर,** एम्‌. ए. यांनीं भाषांतर व लेखसंक्षेप यांसारखीं कामें करून दिलीं.

वरील सर्व साहाय्यकांचे आम्ही फार फार आभार मानतों. यांखेरीज ज्यांचा उल्लेख करण्याचें राहून गेलें असेल त्यांचेहि आम्ही आभारी आहों. अशा मोठ्या ज्ञानसत्राला अनेकांचे हात लागावे लागतात. एकटे संपादक किती करणार? ज्यांना फार इच्छा असूनहि साहाय्य देतां आलें नाहीं त्यांच्याहि सहानुभूतीबद्दल आभार मानले पाहिजेत.

आणखी एका साहाय्यक वर्गाचे आभार मानावयाचे आहेत. अशा विश्वविपयव्यापी कोशाच्या संपादनासाठीं पुस्तकांचें भरपूर साहाय्य पाहिजे. हातांशीं पुस्तकें असतील तरच काम जास्त चांगलें व जलद होतें. हा अनुभव लेखकांना आहेच. आम्हांला लागणारीं सर्व पुस्तकें विकत घेणें शक्यच नव्हतें. कांहीं संदर्भग्रंथ तेवढे घेतले. बाकीचे आमच्या स्नेह्यांनीं मोठ्या आनंदानें आम्हांस वाटेल तितक्या दिवस वापरण्यास दिले. तसेंच कांहीं ग्रंथालयांचेंहि तात्काल साहाय्य मिळालें. 'चित्रमय जगत्'चे संपादक श्री. **रा. प्र. कानिटकर,** 'सह्याद्री'चे संपादक श्री. **दि. वि. काळे** व फर्ग्युसन कॉलेजचे ग्रंथपाल श्री. **पारखी** यांचाहि या ठिकाणीं साभार उल्लेख केला पाहिजे. या सर्वांचे आम्ही मनापासून आभार मानतों.

**मर्यादा व आटोप**—ज्ञानकोशाचा व्याप फार मोठा, तेव्हां साहजिकच त्याच्या संपादन-प्रकाशनाला बारा वर्षांचा काळ व चार लाख रुपये खर्च लागला. त्या वेळीं पूर्वयोजना अमलांत न येऊं शकल्यानें बरेचसें लिखाण उरलें व यावयास पाहिजेत ते लेख, पानें वाढतील या भीतीनें देतां आले नाहींत. शिवाय, त्या कोशाचें उद्दिष्ट व स्वरूप मूलगामी संशोधनाला व खोल अभ्यासाला चालना देऊन मदत करण्याचें होतें. या दृष्टीनेंच त्या मोठ्या ज्ञानकोशाकडे सादर पाहिलें पाहिजे. सुलभ विश्वकोश रचतांना आमच्यापुढें तो उद्देश नव्हता व त्यामुळें आम्हीं कामाला प्रथमच मर्यादा घालून घेतली होती. आरंभींच कोशांत घ्यावयाच्या सर्व लेखांची व चित्रांची यादी तयार केली. नंतर कोणत्या ग्रंथांवरून लेख घ्यावयाचे हें ठरवून त्या लेखांनाहि मर्यादा घालून दिली. या व्यवस्थेमुळें मागल्या अनुभवाप्रमाणें मजकूर तयार केला असून उरला असें झालें नाहीं. उलट पृष्ठें जसजशीं छापून होऊं लागलीं तसतसा लेखन-व्याप्तीचा नक्की अदमास आला व पुढील करच्या लिखाणांत कमीजास्त करणें सुलभ गेलें. शिवाय, सुसूत्र व एकहाती संपादनाचा कारभार

४ आसामी, ५ उडिया, ६ उर्दू, ७ कानडी, ८ गुजराथी, ९ तामिळ, १० तेलगू, ११ नेपाळी, १२ पाली, १३ पुराण-वाङ्मय, १४ बंगाली, १५ माणिपुरी, १६ मराठी, १७ मलयालम् (मल्याळी), १८ संस्कृत, १९ सिंधी, २० हिंदी.

३. श्री. **रामचंद्र सखाराम भागवत**, ठाणें—यांचे पुढील लेख थिऑसफी विषयांतील आहेत : १ अदृश्य सृष्टीचें संशोधन, २ ईश्वरी योजना, ३ कर्म, ४ देव, ५ बेझंट (ॲनी), ६ भूत-पिशाच, ७ मनु, ८ महाचोहन, ९ मृत्यु, १० मेस्मेरिझम, ११ मैत्रेय, १२ मौर्य, १३ मोक्ष, १४ सिद्धसंघ.

४. **रेव्हेरंड फादर शॉख**, संगमनेर— यांनीं ख्रिस्ती संप्रदायांतील विधी, पंथ, विचार, वगैरेंवर कांहीं लहान लहान इंग्रजी लेख लिहून दिले. त्यांचें मराठी भाषांतर करून ते लेख त्या त्या नांवाखालीं कोशांत दिले आहेत.

५. डॉ. **बा. मो. कानिटकर**, पुणें— यांनीं २६ विविध शास्त्रीय टाचणें दिलीं. तीं बहुतेक समाविष्ट केलीं आहेत.

६. डॉ. **साखरलाल याज्ञिक**, पुणें—आयुर्वेदीय औषधांची माहिती यांनीं आपल्या पुस्तकांतून दिली.

७. प्रा. **अ. या. चंद्रचूड**, पुणें— गणितशास्त्रांतील विषयांवर यांनीं लिहून दिलेले लेख कमीजास्त करून कोशांत घेतले.

८. श्री. **वा. ह. मनोहर**, मुंबई— यांनीं यंत्रशास्त्रांतील कांहीं विषयावर लेख लिहून पाठविले.

९. डॉ. **य. गं. लेले**, पुणें— यांनीं रसायनशास्त्रांतील विषयांवर लेख तयार करून दिले.

१०. श्री. **गो. वि. शिंत्रे**, सांगली—१ निरीक्षण (सर्व्हे), २ बांधबंधारे.

११. श्री. **लागू**, ट्रेनिंग कॉलेज, लोणी—१ कुस्ती, २ मलखांब.

१२. प्रा. **य. का. सोहनी**, पुणें— १ पोलिश वाङ्मय, २ फ्रेंच वाङ्मय.

१३. श्री. **रा. ना. नातू**, पुणें— लघुलेखन.

१४. डॉ. **वा. वि. आठल्ये**, सातारा—जीवनरसायनशास्त्र, होमिओपथी व कांहीं होमिओपथी वैद्यांचीं चरित्रें.

१५. श्री. **कृ. शं. हिंगवे**, पुणें— ग्रंथालयशास्त्र.

कचेरींतील साहाय्यकांत आमचे ज्ञानकोशांतील सहकारी श्री. **लक्ष्मण केशव भावे**, वकील (पाली) यांचा विशेष व प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. त्यांनीं एक वर्ष मुद्दाम पुण्यांत राहून व कचेरींत बसून आम्हीं दिलेलें काम केलें. त्यांच्या दोघां चिरंजिवांनीं तोंडीं सांगितलेलें लिहून घेणें व नकला करणें हीं कामें केलीं. अशींच नकला करण्याचीं कामें श्री. **डुपरेकर**, श्री. **वा. अ. गरुड**, श्री. **मु. स. देवकुळे**, श्री. **धायगुडेबंधु**, वगैरेंनीं केलीं. श्री. **शं. रा. गोडबोले**, बी. ए., एलएल्. बी. व श्री. **खुपेरकर**, एम्. ए. यांनीं भाषांतर व लेखसंक्षेप यांसारखीं कामें करून दिलीं.

वरील सर्व साहाय्यकांचे आम्ही फार फार आभार मानतों. यांखेरीज ज्यांचा उल्लेख करण्याचें राहून गेलें असेल त्यांचेहि आम्ही आभारी आहों. अशा मोठ्या ज्ञानसत्राला अनेकांचे हात लागावे लागतात. एकटे संपादक किती करणार? ज्यांना फार इच्छा असूनहि साहाय्य देतां आलें नाहीं त्यांच्याहि सहानुभूतीबद्दल आभार मानले पाहिजेत.

आणखी एका साहाय्यक वर्गाचे आभार मानावयाचे आहेत. अशा विश्वविषयव्यापी कोशाच्या संपादनासाठीं पुस्तकांचें भरपूर साहाय्य पाहिजे. हातांशीं पुस्तकें असतील तरच काम जास्त चांगलें व जलद होतें. हा अनुभव लेखकांना आहेच. आम्हांला लागणारीं सर्व पुस्तकें विकत घेणें शक्यच नव्हतें. कांहीं संदर्भग्रंथ तेवढे घेतले. बाकीचे आमच्या स्नेह्यांनीं मोठ्या आनंदानें आम्हांस वाटेल तितक्या दिवस वापरण्यास दिले. तसेंच कांहीं ग्रंथालयांचेंहि तात्काल साहाय्य मिळालें. 'चित्रमय जगत्'चे संपादक श्री. **रा. प्र. कानिटकर**, 'सह्याद्री'चे संपादक श्री. **दि. वि. काळे** व फर्ग्युसन कॉलेजचे ग्रंथपाल श्री. **पारखी** यांचाहि या ठिकाणीं साभार उल्लेख केला पाहिजे. या सर्वांचे आम्ही मनापासून आभार मानतों.

**मर्यादा व आटोप**—ज्ञानकोशाचा व्याप फार मोठा, तेव्हां साहजिकच त्याच्या संपादन-प्रकाशनाला बारा वर्षांचा काळ व चार लाख रुपये खर्च लागला. त्या वेळीं पूर्वयोजना अमलांत न येऊं शकल्यानें बरेचसें लिखाण उरलें व यावयास पाहिजेत ते लेख, पानें वाढतील या भीतीनें देतां आले नाहींत. शिवाय, त्या कोशाचें उद्दिष्ट व स्वरूप मूलगामी संशोधनाला व खोल अभ्यासाला चालना देऊन मदत करण्याचें होतें. या दृष्टीनेंच त्या मोठ्या ज्ञानकोशाकडे सादर पाहिलें पाहिजे. सुलभ विश्वकोश रचतांना आमच्यापुढें तो उद्देश नव्हता व त्यामुळें आम्हीं कामाला प्रथमच मर्यादा घालून घेतली होती. आरंभींच कोशांत यावयाच्या सर्व लेखांची व चित्रांची यादी तयार केली. नंतर कोणत्या ग्रंथांवरून लेख घ्यावयाचे हें ठरवून त्या लेखांनाहि मर्यादा घालून दिली. या व्यवस्थेमुळें मागल्या अनुभवाप्रमाणें मजकूर तयार केला असून उरला असें झालें नाहीं. उलट पृष्ठें जसजशीं छापून होऊं लागलीं तसतसा लेखन-व्याप्तीचा नक्की अदमास आला व पुढील कच्च्या लिखाणांत कमीजास्त करणें सुलभ गेलें. शिवाय, सुसूत्र व एकहातीं संपादनाचा कारभार

असल्यामुळें वायां असें कांहीं गेलें नाहीं. कोशाची संपूर्ण कच्ची प्रत तयार झाल्यानंतरच कोशाच्या छपाईस सुरुवात झाली. छपाई चालू असतांना ज्या ज्या घडामोडी होत होत्या, त्या त्या सुलभ विश्वकोशांत शक्य तों देण्यांत आल्या असून शक्य तितका हा ग्रंथ आजतागायत करण्यांत आला आहे.

**रचना-परिचय**—कोशांतील लेखांचा आद्याक्षरानुक्रम अंलेरीजकरून मराठी वर्णमालेप्रमाणेंच ठेवण्यांत आला आहे. शब्दांतील सानुस्वार अक्षरापुढें व्यंजन असल्यास ते शब्द अनुक्रम लावतांना अनुस्वार नाहीं असें समजून लावले आहेत; परसवर्णा-प्रमाणें अनुक्रम ठेवला नाहीं. उदा., 'कपडवंज' नंतर 'कंपतंतू' ...... 'काकवर्ग' ...... 'किंकेड' ...... इ.. अशा रीतीनें सानुनासिक व निरनुनासिक शब्द जवळजवळ आल्यास निरनुनासिक शब्द प्रथम घेतला आहे; उदा., 'गज' नंतर 'गंज'. अनुस्वाराप्रमाणेंच विसर्ग नाहीं असें धरून अनुक्रम लाविला आहे. अनुक्रमासाठीं इंग्रजी ॲ, ऑ या उच्चारांचीं अक्षरें अ, आसारखींच धरलीं आहेत.

संस्कृत तत्सम शब्द संस्कृत रूपाप्रमाणेंच, तसेंच ऱ्हस्व किंवा दीर्घ दिले आहेत. मात्र अनेकवचनी इकारांत व उकारांत शब्द दीर्घ केला आहे; उदा., गति–गती; पशु–पशू.

**क्षमस्व**—लेखांच्या यादीपासून तों शेवटच्या मुद्रितें पाहण्या-पर्यंत सर्व लहानमोठीं कामें संपादकांनींच केल्यामुळें ग्रंथांत सहजीं व्हावयाच्या चुका कमी झाल्या असतील असें वाटतें. तथापि, एवढ्या मोठ्या कामांत अनेक कारणांनीं अनेक प्रकारच्या चुका कळत-नकळत होत असतात. व आपल्याकडे तर त्यांचें प्रमाण फार आहे. तेव्हां प्रस्तुत कोशांत तशा कांहीं चुका आढळणारच; व त्यांबद्दल आम्हांला अतिशय खेदहि होत आहे. या कोशांतील विषयांची विविधता, अल्प साधनें आणि वेळ, ग्रंथांचा व साहाय्यकांचा तुटवडा, मुद्रणालयांतील अडचणी, वगैरे कित्येक गोष्टींमुळें कळत-नकळत चुका झाल्या व राहून गेल्या. मोठें शुद्धिपत्र देऊन त्या दुरुस्त करणें आता सोयीचें नाहीं. आंकड्यांच्या चुका सहज लक्षांत येण्याजोग्या आहेत. तसेंच, या सहा विभागांच्या कोशाला सूची जोडणें आवश्यक होतें. तथापि पृष्ठमर्यादा व खर्च यांचा विचार करतां तीहि योजना रहित केली. फक्त एका परिशिष्टांत शास्त्रीय लेखांची त्यांच्या पारिभाषिक नांवांप्रमाणें सूची दिली आहे, ती उपयुक्त वाटेल. लेखांतून शास्त्रीय परिभाषा जी वापरली आहे ती इंग्रजी संज्ञांनीं कंसांत दाखविलीच आहे.

**बृहत् विश्वकोशाची आकांक्षा**—प्रस्तुत कोशांत विषयांचें विवेचन फार थोडें असल्यानें जिज्ञासू वाचकाची तृप्ति न होणें अगदीं साहजिक आहे. पण अशा लघुकोशाचा हेतुच हा असतो कीं, थोड्या सुसंबद्ध माहितीनें वाचकामध्यें अधिक ज्ञान मिळ-विण्याविषयीं आतुरता उत्पन्न करावयाची. मग संपूर्ण व सविस्तर माहितीसाठीं त्यानें त्या त्या विषयावरचीं पुस्तकें पाहावींत; किंवा मोठा ज्ञानकोश चाळावा. सु. वि. च्या संपादकांना व प्रकाशकांना पुढें चांगली अनुकूल परिस्थिति लाभली व तीचरो-बरच आयुरारोग्य परमेश्वरानें दिलें तर 'बृहत् विश्वकोश' काढण्याची त्यांची फार दिवसांची आकांक्षा सफल होणार आहे. मग वाचकाला एकाच ग्रंथमालिकेंत सर्व विषयांचें संपूर्ण ज्ञान अगदीं सुलभ होईल. तेव्हां 'त्या विश्वात्मक देवा'जवळ 'पसायदान' हेंच मागत आहों.

शेवटीं, "न्यून तें पुरतें । अधिक तें सरतें । कल्नि घ्यावें..." अशी सर्वांची मनापासून प्रार्थना करून हें निवेदन आटोपतों.

कालाष्टमी,<br>
वैशाख शके १८७३.<br>
ता. २७ मे १९५१.

यशवंत रामकृष्ण दाते<br>
चिंतामण गणेश कर्वे

# :: प्रकाशकाचें निवेदन—

—'क्लेशः फलेन हि पुनर्नवतां विधत्ते।'

सुलभ-विश्वकोशाचा शेवटचा म्हणजे सहावा भाग आज प्रसिद्ध होत आहे. सुलभ-विश्वकोशासारखें महत्त्वाचें प्रकाशन-कार्य आज माझ्या हातून पूर्ण होत आहे याबद्दल अभिमान आणि आनंद तर मला वाटतोच आहे पण त्याच वेळीं या कार्याच्या साहाय्यार्थ मीं ज्यांना ज्यांना आवाहन केलें त्यांनीं त्यांनीं साहाय्यार्थ माझ्यामागें उभें राहून माझ्या पदरीं या मोठ्या कामाचें यश टाकलें त्यांच्या त्यांच्या आठवणीनें माझें अंतःकरण कृतज्ञतेनें भरून येत आहे.

सुलभ-विश्वकोशाचे जे आगाऊ ग्राहक झाले त्यांना सुलभ-विश्वकोश फार थोड्या रकमेंत मिळाला. नंतर कागदाचे, पुठ्ठ्याचे, कापडाचे सर्वच भाव जवळजवळ दुपटीचे झाले तरी विश्वकोश सवलतीचे किंमतींत त्यांच्या पदरीं पडला. प्रसाद-प्रकाशनानें आणखी अनेक चांगलीं चांगलीं आणि महत्त्वपूर्ण प्रकाशनें—प्रा. सोनोपंत दांडेकर यांची ज्ञानेश्वरी, श्री. स. आ. जोगळेकर यांनीं संपादन केलेली गाथासप्तशति, प्रि. आपटे यांच्या संस्कृत-इंग्रजी, इंग्रजी-संस्कृत या दोन डिक्शनऱ्या, इंग्रजींतील एव्हरी मॅन्स लायब्ररी अशा धर्तीवर "सुलभ-विश्वज्ञानमाला"—अशांसारख्या योजना हातीं घेतल्या आहेत. त्या उत्कृष्ट तऱ्हेनें आणि लौकर पार पडाव्यात याकरितां मराठी वाङ्मयप्रेमी रसिकांनीं थोडा हातभार लावणें अवश्य आहे.

आपण फक्त शंभर रुपये पाठवून प्रसाद-प्रकाशनाचे कायम ग्राहक व्हावें. प्रसाद-प्रकाशन प्रसिद्ध करीत असलेलें प्रसाद मासिक आपणांकडे तहहयात विनामूल्य देत राहील व प्रसाद-प्रकाशनाचीं सर्व प्रकाशनें आपणांस पाऊणपट किंमतीस मिळतील. सर्व प्रकाशनें आपण घेतलींच पाहिजेत असा आग्रह नाहीं. पण प्रत्येक प्रकाशनाची आपणांस फक्त एकच प्रत सवलतीनें मिळूं शकेल. अशा तऱ्हेनें शंभर रुपये आगाऊ पाठवून ग्राहक व्हावें असा विश्वास व कार्यप्रवणता मीं दाखविली आहे असा माझा समज आहे.

सुलभ-विश्वकोशाचे संपादक श्री. यशवंत रामकृष्ण दाते व श्री. चिंतामण गणेश कर्वे यांनीं विश्वकोशाचें संपादन उत्कृष्ट तऱ्हेनें करून दिलें. कोशवाङ्मयाचे युगपुरुष कै. डॉ. केतकर यांचें वाङ्मयीन स्मारक ठरावें असा हा सुलभ-विश्वकोश झाला आहे, असें अनेकांचें मत आहे आणि येवढ्या मोठ्या कामांत कोठें मत-भेदाच्या क्षुल्लक वाऱ्याचीहि झुळूक न उठतां हें काम पूर्णतेस गेलें ही अत्यंत उल्लेखनीय आणि नमूद करून ठेवण्यासारखी घटना आहे असें मला वाटतें.

सुलभ-विश्वकोशाला आतांपर्यंत एक लाख रुपयांचेवर खर्च झाला आहे. त्यांत जाहिरातखर्च, ऑफिसखर्च वगैरे धरलेला नाहीं. येवढ्या खर्चाला मी तोंड देऊं शकलों याचें कारण एकच-माझ्यावर आणि मी करीत असलेल्या कार्यावर लोभ ठेवणारीं अनेक माणसें माझ्याभोंवतीं सुदैवानें उभीं आहेत. महाराष्ट्र बँक, पुणे, यांनीं या कार्याकरितां थोडेंबहुत कर्ज दिलें. पुण्याच्या मुद्रणसाहित्यभांडारानें या दिवसांत उधारीनें कागद दिला. के. जोशी आणि कंपनी, ब्लॉकमेकर्स, पुणे, यांचा-आमचा हिशोब अद्याप व्हावयाचाच आहे. श्री. धोंडूमामा साठे, चित्रशाळेचे दामुअण्णा रानडे, कॉन्टिनेन्टलचे अनंतराव कुलकर्णी, चित्रकार जि. भि. दीक्षित, माझे स्नेही श्री. पु. स. शिंत्रे, वकील आणि इतर अनेकांचें या कामीं साहाय्य झालें आहे आणि पुन्हां लौकिक माझाच कीं, या दिवसांत लाखांचेवर रुपये खर्च करून श्री. य. गो. जोशी यांनीं विश्वकोशासारखें अत्यंत धाडसाचें प्रकाशन केलें!

सुलभ-विश्वकोशाचे मुद्रक-राजगुरु प्रेस, त्या प्रेसचा चालक-वर्ग व कामगारवर्ग-एका कुटुंबांतील माणसांसारखा त्यांचा आमचा जिव्हाळा आहे. सुलभ-विश्वकोशाची छपाई, बांधणी, इत्यादि पाहून विश्वकोशाचा ग्राहकवर्गहि त्यांचें कौतुकच करील. हाताशीं असलेल्या अपुऱ्या आणि तुटपुंज्या साधनसामुग्रींत सुलभ-विश्वकोशासारखें काम करणें यापाठीमागें जी आस्था आणि आपुलकी आहे ती खरोखरच कौतुकास्पद आहे. आज जवळ-जवळ तीन वर्षें राजगुरु प्रेसचीं १०–१५ माणसें व स्वतंत्र टाइप कोशाचे कामाकरितां निराळा राखून ठेवलेला होता. कधीं ब्लॉक वेळेवर मिळाले नाहींत तर कधीं कागद हातीं नाहीं अशा व्यवहारी कारणांनीं त्यांचा खोळंबाहि होत होता; पण काम चालू होतें—आणि लोक मला म्हणतात, "जोशीबुवा, तुमचें एवढें मोठें छपाईचें काम असतांना तुम्ही स्वतःचा छापखाना कां काढीत नाहीं?" मी त्यांना हंसून विचारतों, "मग राजगुरु प्रेस कुणाचा आहे? माझ्या लहरीप्रमाणें आणि हौशीप्रमाणें काम करून घेण्या-पुरती राजगुरु प्रेसची माझी मालकी हमखासच आहे."

राजगुरु प्रेसचे व्यवस्थापक, माझे स्नेही श्रीयुत श्री. ज. गानू—छापखान्याच्या दृष्टीनें वरून फणसासारखा पण परिणामीं आंतील गऱ्यांसारखा असा हा एक विचित्र माणूस आहे. केवळ पैशाकरितां नव्हे तर केवळ "चांगल्या कामाकरितां काम" हें एक या माणसाचें दुर्मिळ व्यसन आहे. तेव्हां उत्कृष्ट छपाईचें श्रेय राजगुरु प्रेसचें आहे. पैशाकरितां जे आधारासारखे उभे राहिले, व्यावहारिक भार त्यांचा आहे. आणि या दिवसांत इतकें अवाढव्य काम श्री. य. गो. जोशी यांनीं पार पाडलें असे गौरवाचे उद्गार मी अनेकांकडून ऐकत आहें—परमेश्वर सर्वांचें कल्याण करो!

सर्वांचा कृपाभिलाषी,<br>
**यशवंत गोपाळ जोशी**

# ६

## मध्ययुगीन व अर्वाचीन संस्कृति-विकास

### पूर्वालोचन—

आतांपर्यंत या विश्वविकासाच्या इतिहासांत आपण विश्वाच्या उत्पत्तीपासून मानवाची उत्पत्ति व त्याचें जगांतील निरनिराळ्या भागांतील परिभ्रमण, वास्तव्य व त्यानें विकसित केलेल्या जगांतील निरनिराळ्या क्षेत्रांतील संस्कृती व त्या संस्कृतींमध्यें झालेलीं आंदोलनें यांचें निरीक्षण केलें. आतांपर्यंत या जगतीतलावर भिन्न भिन्न कालीं व भिन्न भिन्न परिस्थितींत आणि क्षेत्रांत अनेक मानव-जातींनीं अवाढव्य संस्कृतिप्रसाराचें कार्य करुन त्या कार्याचीं स्मारकें निरनिराळ्या प्रदेशांत मागें ठेवलीं आहेत. या स्मारकांमध्यें कांहीं शिल्पकामाचीं स्मारकें आहेत. त्यांतील कांहीं स्मारकांकडे पाहिल्यास आजच्या सर्व आधुनिक साहित्याच्या साहाय्यानें प्रचंड शिल्पकामें करणारे शास्त्रज्ञ व शिल्पज्ञहि थक्क होऊन जातात. परंतु हीं स्मारकें आज बहुतेक भग्नावस्थेंत आहेत. ईजिप्तमधील भव्य मनोरे व अजस्त्र पुतळे, अथेन्समधील अत्यंत कौशल्यपूर्ण मंदिरें, क्रीट बेटांतील प्राचीन राजवाड्यांचे अवशेष, ट्रॉय या ठिकाणीं वसलेल्या प्राचीन नऊ शहरांचा उत्खनन केलेला भाग, रोमन बादशहांनीं बांधलेलीं मोठमोठीं क्रीडामंदिरें व पुलांवरुन जाणारे पाण्याचे कालवे व नहर, चीनची प्रचंड भिंत, अमेरिकेमधील प्राचीन लोकांनीं बांधलेलीं अजस्त्र दगडी मंदिरें, असुर लोकांचीं सात मजली मंदिरें, इराणमधील प्राचीन राजांनीं बांधलेले राजवाडे, एवढेंच नव्हे तर पॅसिफिक बेटांपैकीं कांहीं बेटांत आढळणारे अजस्त्र दगडी पुतळे, जावामधील बोरोबुदोरसारखीं व सयाममधील अंकोरथोम व अंकोरवात येथील प्रचंड दगडी खोदीव कामें व देवालयें या सर्व प्राचीन मानवकृतींकडे पाहिलें असतां मनुष्य आश्चर्यानें थक्क झाल्याशिवाय राहत नाहीं. परंतु या बहुतेक कृती करणारे लोक व त्यांच्या संस्कृती आज नामशेष झाल्या आहेत. त्यांच्या वंशजांकडे अथवा त्या देशांत राहणाऱ्या अर्वाचीन लोकांकडे पाहिलें म्हणजे यांच्या पूर्वजांनींच या कृति केल्या होत्या काय असा संशय उत्पन्न होतो व स्थित्यंतरांबद्दल मानव स्तिमित मनानें आश्चर्यमूढ बनून जातो.

परंतु प्राचीन मानवांनीं आपल्यामागें केवळ आपलीं भव्य स्मारकेंच तेवढीं ठेवलीं आहेत असें नाहीं, तर अत्यंत प्राचीन कालापासूनच मानवांनीं आपल्या ज्ञानाचें व बुद्धीचें वाहक साधन म्हणून मोठ्या कल्पकतेनें शोधून काढलेली लेखनकला हिच्या द्वारें आपले विचारहि आपल्यामागें रक्षण करुन ठेवण्याची तजवीज केली आहे. या लेखनकलेच्या द्वारानें व अत्यंत प्राचीन कालापासून निरनिराळ्या शिलास्तम्भांवर, देवालयांच्या प्राकारावर अथवा भिंतींवर, मानवी अजस्त्र पुतळ्यांवर, कडेकपाऱ्यांवर वगैरे जे अनेक शिलालेख खोदून ठेवले आहेत, तसेंच जेथें अशा शिला उपलब्ध नव्हत्या तेथें मातीच्या इटिकांवर वगैरे जे निरनिराळ्या लिपींत लेख कोरुन ठेवलेले आहेत त्यांचें जें अलीकडील विद्वानांनीं संशोधनपूर्वक वाचन करुन त्यांचा अर्थ उलगडून दाखविण्याचें कार्य आतांपर्यंत केलें आहे व जें अद्यापहि अविरत परिश्रमानें चालू आहे, त्यावरुन आपणांस हजारों वर्षांपूर्वीच्या भिन्न भिन्न मानवजातींच्या आयुष्यक्रमाचें, त्यांच्या दैनंदिन आचरणाचें, त्यांच्या भिन्न भिन्न लोकांशीं झालेल्या संघर्षांचें, त्यांनीं केलेल्या पराक्रमांचें, त्यांनीं केलेल्या लोकोपकारक कृत्यांचें, त्यांनीं संवर्धन केलेल्या ऐहिक व पारमार्थिक विचारांचें ज्ञान होण्यास आपणांस किती तरी साहाय्य होत आहे. शिला व इटिकांप्रमाणें भूर्जपत्रें, ताडपत्रें वगैरे अनेक वस्तूंवर व लेखणी, खिळे, रंगाचे कुंचे, वगैरे साधनांनीं लिहिलेले अनेक लेख व ग्रंथ आज आपणांस उपलब्ध होत आहेत व त्यांवरुन मानवाचा या जगतीतलावर निरनिराळ्या कालीं व निरनिराळ्या क्षेत्रांत कसा विकास झाला, याची माहिती आपणांस मिळत आहे. अद्यापि हिटाइट लोकांचे लेख, मिट्टनी लोकांचे लेख, मोहन जो दरो सारख्या वसाहतींतील लोकांचे लेख, अमेरिकेंतील प्राचीन लोकांचे लेख यांचें वाचन व्हावयाचेंच आहे. जसजसें या व अशाच प्रकारच्या प्राचीन व नवीन नवीन उपलब्ध होणाऱ्या लेखांचें वाचन होत जाईल, निरनिराळ्या स्थानीं अर्वाचीन संशोधकांकडून उत्खनन होत जाईल व नवीन नवीन प्राचीनावशेष उपलब्ध होत जातील तसतसा या विश्वविकासाचा इतिहास आपणांस सुसंगत रीतीनें व अधिकाधिक तपशीलवारपणें ज्ञात होत जाईल. असो.

आपण आतांपर्यंत ज्या प्राचीन संस्कृतींचें वर्णन केलें त्यांत पश्चिमेकडे ईजिप्त व असुरी संस्कृतींच्या वर्णनापासून ग्रीक व

रोमन संस्कृतींच्या ऱ्हासापर्यंत व भारतीय संस्कृतीच्या सामान्यतः हर्षकालीन स्थितीपर्यंत व चीनच्या बादशाहीच्या अन्तापर्यंत हें वर्णन आणलें आहे.

## मध्ययुगीन व अर्वाचीन जग—

यानंतर आतां पुन्हां पश्चिमेकडील जगाकडे वळलें पाहिजे. आतांपर्यंत ज्याप्रमाणें निरनिराळ्या संस्कृतींचा आपण स्वतंत्रपणें परामर्ष घेत गेलों त्याप्रमाणें आतां आपणांस भिन्न भिन्न देशांतील व प्रदेशांतील घडामोडींकडे अगदीं पृथक्‌पणें पाहणें श्रेयस्कर होणार नाहीं. आतांपर्यंत आपण सामान्यतः प्राचीन अथवा इतिहासपूर्व जगाचें अवलोकन केलें. आतां यापुढें मध्ययुगीन व अर्वाचीन जगाचें अवलोकन करावयाचें आहे. यापुढें या जगामध्यें वावरणाऱ्या व कार्य करणाऱ्या व्यक्तींचें आपणास प्रत्यक्ष ज्ञान उपलब्ध करून देणारीं साधनें आपल्या आटोक्यांत आहेत. तसेंच या मध्ययुगीन व अर्वाचीन काळांत ज्या घडामोडी झाल्या त्यांचे परिणाम केवळ स्थानिक न राहतां दूरवर पसरणारे होत गेले. यामुळें आपण आपलें अवलोकनक्षेत्र एखाद्या विशिष्ट प्रदेशापुरतें अथवा देशापुरतें मर्यादित न करतां सामान्यतः तत्तत्कालीन ज्ञात जगाकडे दृष्टि ठेवूनच वर्णन करण्याकडे लक्ष दिलें पाहिजे. तरी आतां यापुढें आपण या दृष्टीनें जगाकडे अवलोकन करावयाचा हेतु मनांत ठेवून विवेचन करण्याचें करूं.

## मानवाची शारीरिक व मानसिक उन्नति—

या पृथ्वीतलावर ज्याप्रमाणें मनुष्य निरनिराळ्या ठिकाणीं वस्ती करून आपला आयुष्यक्रम अधिकाधिक सुसंस्कृत करीत व आपलें आयुष्य सुखमय व्हावें याकरितां अनेक भौतिक गोष्टींचें संकलन, संवर्धन व संस्करण करून आपल्या शारीरिक गरजा व सुखसोयी वाढविण्याचा व निरनिराळ्या तऱ्हेचे सुखोपभोग भोगण्याचा प्रयत्न करीत होता त्याप्रमाणेंच अगदीं समाजाच्या बाल्यावस्थेपासून आपल्या मनासहि अधिक सुसंस्कृत करून आपली मानसिक वृत्तिहि अधिकाधिक प्रगल्भ करून घेण्याकडे त्याची प्रवृत्ति होत होती. या मानसिक विकासाच्या ध्येयानें प्रेरित झाल्यामुळेंच त्याच्या शारीरिक सौख्याच्या वाढीबरोबरच मानसिक सौख्यांतहि भर घालण्याचा त्याचा सारखा प्रयत्न चाललेला होता. या मानसिक उन्नतीच्या प्रवृत्तीमुळेंच निरनिराळ्या जातींत निरनिराळ्या कलांचा विकास झाला. ज्याप्रमाणें शिल्पकामांत कांहीं लोकांनीं भव्यतेकडे लक्ष दिलें, त्याप्रमाणें कांहीं लोकांनीं सौंदर्याकडे, नाजुकपणाकडेहि लक्ष देण्याचा प्रयत्न केला. यामुळें अर्थात् या क्रिया निरनिराळ्या मानवसमाजांत निरनिराळ्या प्रकारें व निरनिराळ्या अंगांनीं व निरनिराळ्या तऱ्हांनीं घडून आल्या. ईजिप्त, असीरिया, वगैरे देशांत भव्यतेस प्राधान्य देण्यांत आलें; तर ग्रीससारख्या देशांत कौशल्य, सौंदर्य व नाजुकपणाकडे अधिक लक्ष देण्यात आलें. ईजिप्तमधील भव्य मनोरे, रामेससचा भव्य पुतळा अथवा इतर अनेक भव्य जयस्तम्भ व पुतळे यांमध्यें भव्यतेस प्राधान्य देण्यांत आलें व त्यामुळें ते जगांतील आश्चर्यें म्हणून प्रसिद्धीस आले तर क्रीट बेटांतील उत्खननांत सांपडलेला व्हीनसचा पुतळा आपल्या सौंदर्य व नाजुकपणाच्या बाबतींत भग्न अवस्थेंतहि आज जगांतील आश्चर्य म्हणून पदवी पावला. याप्रमाणेंच संगीत, नृत्य, नाट्य, काव्य, इत्यादि कलांमध्यें मानसिक उन्नति करून घेण्याच्या प्रवृत्तीमुळेंच ग्रीस वगैरे देशांत एवढी प्रगति झालेली आपणांस पाहावयास सांपडते.

## पारमार्थिक उन्नति—

याप्रमाणें शारीरिक व मानसिक उन्नति करण्याकडे मानवानें ज्याप्रमाणें लक्ष दिलें त्याप्रमाणेंच या ऐहिक उन्नतीबरोबर पारमार्थिक उन्नतीकडेहि मानवाचें लक्ष प्रथमपासूनच लागलेलें आपणांस दिसून येतें. अर्थात् प्राचीन काळीं परमार्थविषयक कल्पना निरनिराळ्या प्रदेशांत भिन्न भिन्न असल्यामुळें निरनिराळ्या देशांतील परमार्थोद्यम निरनिराळ्या प्रकारांनीं परिणत होत गेले यामध्यें कांहीं आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. तथापि एकंदर प्राचीन कालीन पारमार्थिक कल्पनांच्या विकासाकडे दृष्टि दिल्यास आपणांस असे दिसून येईल कीं, सामान्यतः मनुष्यप्राण्याचा मानसिक विकास थोड्याफार फरकानें पण एका विशिष्ट दिशेनें होत गेल्याचा आपणांस प्रत्यय येतो.

## विश्वाचें कोडें—

प्राचीन काळापासून मनुष्यापुढें हें विश्वाचें कोडें उभें होतें. हें विश्व कसें उत्पन्न झालें, याचें धारण कोण करतो, या विश्वांतील निरनिराळे व्यापार कसे चालतात, या विश्वाचा सूत्रचालक कोण असावा, सूर्य, चंद्र, ग्रह, तारे कोणीं निर्माण केले, दिवस, रात्र, ऋतू वगैरे निरनिराळे प्रकार कसे निर्माण होतात, आकाशांतील मेघ, वृष्टि, वादळें, वगैरे कशीं उत्पन्न होतात, पृथ्वीवर निरनिराळ्या वनस्पती व प्राणी हे कसे निर्माण होतात, त्यांचा आयुष्यक्रम कसा मर्यादित होतो, इत्यादि प्रश्न आद्य मानवापासून एकसारखे मानवजातीपुढें असलेले दिसून येतात व या प्रश्नांचें उत्तर देण्याचा प्रयत्न मानवानें फार प्राचीन काळापासून केलेला दिसून येतो ही गोष्ट आपण प्रथम विभागाच्या प्रस्तावनेमध्यें अवलोकन केलीच आहे. आद्य अथवा प्राचीन मानवानें यासंबंधीं तत्कालीन त्याच्या ज्ञानास सुलभ अशी एक उपपत्ति या सर्व सृष्ट

चमत्कारांसंबंधीं बसविली. ती म्हणजे या सृष्टीची निर्मांती कोणी तरी अतींद्रिय अशी एखादी व्यक्ति किंवा शक्ति असावी. या कल्पनेसहि निरनिराळ्या मानवजातींत निरनिराळे फांटे फुटले. कोणीं या चमत्कारामागें एक मोठी शक्ति असून तिच्याकडून या सर्व चमत्कृतिजनक गोष्टी घडून येतात अशी समजूत करून घेतली तर कोणीं निरनिराळ्या चमत्कारांमागें निरनिराळ्या शक्ती असतात असें प्रतिपादन केलें. त्यांतहि एखादी मुख्य व इतर गौण शक्ती असाव्यात, कांहीं पुरुषरूपी तर कांहीं मानवाप्रमाणेंच स्त्रीरूपी शक्ती असाव्यात, तर कांहीं सुष्ट व कांहीं दुष्ट अशा शक्ती असाव्यात अशा नाना प्रकारच्या कल्पना निरनिराळ्या मानवांनीं पुढें मांडल्या. या सर्व शक्ती अदृश्य असून निरनिराळ्या प्रतीक रूपानें त्या मानवास दृश्य होतात असेंहि प्रतिपादन करण्यांत आलें. अर्थात् या सर्व कल्पनांस तत्कालीन बालसुलभ मानवमनानें देवत्व जोडून दिलें. हे सर्व सृष्टिचमत्कार दैवी असून हे देव लहानमोठे, पिता-पुत्र, पति-पत्नी, सेव्य-सेवक, सुष्ट-दुष्ट असे अनेक प्रकारचे कल्पून त्यांस निरनिराळ्या चमत्कारांचे कारक असें संबोधण्यांत आलें. याप्रमाणें प्राचीन कालीन मानवांच्या पारमार्थिक कल्पनांकडे आपण पाहिल्यास त्या सर्व देवतामूलक असलेल्या दिसून येतात. या देवतांसंबंधीं जशा निरनिराळ्या वृत्ती अथवा निरनिराळ्या प्रकृती, स्वभाव, लिंग, इत्यादि भिन्न भिन्न कल्पना करण्यांत आल्या तशाच त्यांच्या आकारासंबंधींहि अनेक भिन्न भिन्न प्रकारच्या कल्पना मानवांनीं निर्माण केल्या. ईजिप्तमध्यें जगप्रसिद्ध ऑसिरिस, इसिस, होरस व सेरापिस-जूपिटरच्या त्रिमूर्तींची व इतर अनेक देवतांची, विशेषतः मृत्यूनंतर मानवाच्या सुकृतदुष्कृतादींचें तोलन करण्याची कल्पना कशी विकास पावली तें आपण तेथें पाहिलें आहेच व अलेक्झांड्रिया वगैरे शहरीं अशा देवतांचें पूजन कसें चालत होतें याची कल्पनाहि पूर्वी दिलीच आहे. त्यानंतर बाबिलोनिया व असीरियामध्यें मार्डुक व तियामत आणि मोलॉक या देवतांचीं भव्य मंदिरें कशीं स्थापन झालीं होतीं तसेंच फिनिशियन लोक आपल्या टायर वगैरे शहरीं असलेल्या मुख्य देवतेस दूरदूरच्या प्रदेशांतूनहि करभार कसे पाठवीत होते, इराणी लोकांमध्यें मित्रदेवतेची उपासना प्रचलित होऊन ती पुष्कळच दूरवरपर्यंत व दीर्घकाल कशी पसरत गेली, तसेंच अशाच तऱ्हेची निरनिराळ्या प्रकारांनीं सूर्योपासना व सूर्यसंप्रदाय निरनिराळ्या लोकांत कसे प्रचलित झाले, भारतीय आर्य लोकांत मित्राप्रमाणेंच इन्द्र, वरुण, नासत्य, वगैरे देवता कशा प्रचलित झाल्या व या देवतांची उपासना भारतीय आर्य व इराणांतील पर्शुभारतीय या लोकांत किंवा तत्पूर्व हिटाइट, मित्तनी, वगैरे लोकांत अग्नीच्या मार्फत व यज्ञयागादिकांच्या मार्गानें कशी प्रचलित झाली व तिचा विस्तार किती मोठा व दूरवर झाला याचेंहि वर्णन आतांपर्यंत करण्यांत आलें आहे.

## देवतोपासना—

अर्थात् या सर्व उपासना अथवा संप्रदाय देवतामूलक होत्या. अर्थात् या देवतांची उपासना पद्धतशीर रीतीनें व योग्य प्रकारें होत गेली पाहिजे अशी तत्कालीन सर्वच लोकांची भावना असणें साहजिकच आहे. अर्थात् अशा उपासनेमध्यें विशिष्ट पद्धतिहि ओघानेंच निर्माण होत गेली असली पाहिजे. अर्थात् त्या पद्धतिमध्यें जसजसे अधिकाधिक तपशील अथवा क्रिया यांची वाढ होत गेली तसतसें या उपासनापद्धतीचें ज्ञान प्रत्येक व्यक्तिमात्रास करून घेणें कठिण होत जाऊन तें सर्वांसच प्राप्त करून घेणें अशक्य होऊं लागलें. याकरितां या उपासनापद्धतीचें पद्धतशीर ज्ञान प्राप्त करून घेणें, ती उपासना नियमित वेळीं, नियमित व ठराविक क्रिया करून पार पाडणें, त्या क्रिया करीत असतां म्हणावयाचे मंत्र अथवा करावयाच्या प्रार्थना अथवा विधि यांची अगदीं सूक्ष्म व बिनचूक माहिती असल्याशिवाय कोणत्याहि सामान्य व्यक्तीस तशी उपासना करणें कालांतरानें अवघड व अशक्य होत गेलें व या सर्व गोष्टी माहीत असणाऱ्या फक्त कांहीं व्यक्ती अथवा कुटुंबेंच प्रत्येक समाजामध्यें आढळूं लागलीं. अर्थात् अशीं कुटुंबें अथवा व्यक्ती यांचें अशा विविध देवतांच्या अथवा प्रत्येक समाजाच्या देवतेच्या उपासनेचा अभ्यास करून तशा प्रकारें ती उपासना प्रत्यहीं अथवा नियमितकालीं बजावून आणणें हें दैनंदिन एवढेंच नव्हे तर जीवित कार्य बनून गेलें. याप्रमाणें या निरनिराळ्या वर्गांत असा हा देवतोपासक म्हणून एक स्वतंत्र वर्ग बनला. अर्थात् या वर्गास साहजिकच समाजांत विशेष महत्त्व प्राप्त झालें. प्रत्येक मानवसमाजाच्या देवतेच्या कृपाप्रसादावर त्या समाजाचें स्वास्थ्य व त्याची सुरक्षितता, त्याचा जयापजय व त्याचें संरक्षण अवलंबून होतें व अर्थात् अशा देवतेस नेहमीं संतुष्ट ठेवणें हें प्रत्येक समाजांतील प्रत्येक व्यक्तीस आपलें आद्य कर्तव्य होय असें स्वाभाविकपणेंच वाटूं लागलें. अर्थात् या देवतेकरितां लागतील त्या वस्तू, लागतील ते पदार्थ, लागेल तें द्रव्य एवढेंच नव्हे तर प्रसंगीं त्या देवतेच्या तुष्टीकरितां जर बलिदान करावयाचें असेल तर त्यासाठीं लागणारे अन्य प्राणीच केवळ नव्हे तर स्वतःच्या कुटुंबांतील माणसें अथवा मुलें यांसहि अर्पण करणें हें त्या समाजांतील प्रत्येक व्यक्ति आपलें कर्तव्य आहे असें मानूं लागली. एवढेंच नव्हे तर या समजुतीचा एवढा दृढ पगडा तत्कालीन मानवसमाजाच्या मनावर बसला कीं, असें न करणें हें पातक होय व तसें पातक आपल्या हातून घडल्यास आपणांस या जगांत व नंतर परलोकांतहि हानि पोहोंचेल अशी त्यांची दृढ श्रद्धा झाली. अर्थात् ही नरबली देण्याची प्रथा ज्या

समाजामध्यें विचारांची प्रगति फारच मंदगतीनें व दीर्घकालानंतर होत गेली त्या समाजांत दीर्घ काल टिकून राहिली व अद्यापिहि ती कांहीं वन्य अवस्थेतील समाजांत आढळून येत असल्यास त्यात नवल नाहीं. नरबलीऐवजीं प्राणी बलि देण्याची पद्धति अर्थात् फारच दीर्घ-कालपर्यंत अनेक समाजांत चालू होती व ती अद्यापिहि चालू असलेली आपणास आढळून येते. फार काय पण तिचें प्रतीक म्हणून देवतेपुढें नारळ फोडून त्याचें पाणी देवतेवर शिंपडणें व खोबरें अर्पण करणें या गोष्टी आजहि आपणांस प्रत्यहीं आपणांमध्यें दिसून येतात.

अशा प्रकारें देवतोपासना जसजशी अधिकाधिक अवडंबरयुक्त अथवा अनेक क्रियांनीं युक्त व नियमित कालीं, नियमित प्रकारें झाली पाहिजे अशा स्वरूपाची बनत गेली तसतसा विशिष्ट देवतोपासक वर्ग अथवा पुरोहित-वर्ग हा निरनिराळ्या काळांत व निरनिराळ्या समाजांत तयार होत गेला. अशा या प्रगत पुरोहित-वर्गाबरोबरच अप्रगतवर्गामध्यें मंत्रतंत्रादि करून अनिष्ट बाधा अथवा शारीरिक रोग यांचा परिहार करणारा एक वर्ग प्रत्येक समाजांत अत्यंत प्राचीन कालापासून अस्तित्वांत होताच. परंतु ज्यांनीं आपल्या दैवतांस व उपासनेस अधिकाधिक भव्य, उदात्त, व अवडंबरयुक्त स्वरूप दिलें त्यांची प्रगति पुरोहित-वर्गांत झाली व जे आपल्या पूर्वींच्याच अप्रगत व क्षुद्र स्वरूपाच्या क्रियांस चिकटून राहिले ते तसेच मांत्रिकादि म्हणून समाजामध्यें उच्च दर्जा न पावतां एका कनिष्ठ प्रकारच्या अवस्थेतच राहिले.

याप्रमाणें समाजाच्या विकासाच्या प्रथमावस्थेंतच जे समाज विशेष कांहीं महत्त्वास चढले अथवा ज्यांचा विकास इतरांपेक्षां अधिक होऊन जे थोडेफार बलिष्ठ होऊन सामान्यतः मोठमोठ्या प्रदेशांस व्यापून राहिले ते सर्व दैवतप्रधानसंप्रदायमूलक असून त्या सर्व समाजांत त्या त्या देवतांच्या अनुरोधानें पुरोहित-वर्ग तयार झाला व त्या पुरोहित वर्गाकडे त्या त्या समाजाचें नेतृत्व राहिलें.

## दैवतप्रधान समाजसंघर्ष—

अशा प्रकारच्या दैवतप्रधान असलेल्या दोन मानवसमाजामध्यें जेव्हां संघर्ष होत असे व एखादा नवीन समाज एखाद्या ठिकाणीं बाहेरून येऊन तेथील समाजास पराभूत करून त्या समाजावर आपलें वर्चस्व स्थापन करीत असे त्या वेळीं अर्थातच या नवीन आक्रमक व नवागत समाजाच्या दैवतास प्राधान्य येत असे व त्या नवीन समाजाच्या दैवतांची स्थापना पूर्वींच्या दैवताच्या ठिकाणीं होत असे. अशा वेळीं बहुधा सामान्य जनतेची अशी समजूत करून देण्यांत येत असे कीं, या नवीन दैवताचें बाह्यस्वरूप जरी निराळें असलें तरी ती पूर्वींचीच देवता आहे. सामान्यतः उपासनेचे प्रकार बहुधा सारखेच असत. पूर्वींचेच वार्षिक उत्सव वगैरे चालू राहत व हळूहळू जुना समाज या नवीन परिस्थितीशीं समरस होऊन जात असे व या नवीन नांवाच्या देवतेच्या उपासनेंत सहभागी होत असे. अशा वेळीं अवतारकल्पनेची पुरोहित-वर्गास फार मदत होत असे व नवीन देवता ही जुन्या देवतेचाच नवीन अवतार आहे अशी समजूत सामान्य जनतेची करून दिली म्हणजे जनतेकडून या कल्पनेस फारसा विरोध होत नसे.

या दैवतप्रधान समाजाच्या शहरांचीहि रचना सामान्यतः अशी असे कीं, शहराच्या मध्यभागीं प्रमुख देवतेचें मंदिर असून जवळच पुरोहित-वर्गाची व त्या सभोंवार इतर लोकांची वस्ती असे. या दैवतांच्या अनुरोधानें व ऋतूप्रमाणें या देवतांचे वार्षिक उत्सव होत असत. हे उत्सव पूर्वींपासून समाज जेव्हां कृषिप्रधान असे तेव्हां बहुधा वसंतसंपातदिन अथवा वसंतोद्गम किंवा शरद्संपातदिन अथवा धान्य वगैरेंच्या हंगामाचे दिवस असे असत व त्या उत्सवप्रसंगीं मोठमोठ्या जत्रा भरून अनेक पदार्थांचा विनिमय होत असे व फार मोठ्या प्रमाणावर वस्तूंची देवघेव व व्यापार चालत असे. आसपासचे लोक आपणांस आवश्यक वस्तूंचा वार्षिक पुरवठा अशा वेळीं करून घेत व याप्रमाणें मोठी उलाढाल होऊन नगरांतील व्यापारी व दुकानदार-वर्गास मोठी किफायत होत असे. कित्येक शहरांतून अशा सर्व उत्सवाचा खर्च कोणी तरी शहरांतील व्यापारी सोसण्याची हमी घेत असे व त्या उत्सवांत त्याचा सत्कार करण्यांत येत असे. अशा रीतीनें ही वार्षिक उत्सवांची प्रथा फार दीर्घकाल चालू राहत असे व नगरामध्यें मुख्य दैवत कोणतेंहि असलें तरी त्याचा उत्सव अशा या वार्षिक ठराविक प्रसंगींच होत असे. त्यामुळें जरी नगराच्या अधिष्ठात्री दैवतांमध्यें कालमानाप्रमाणें बदल होत गेला तरी लोकांच्या दैनंदिन व वार्षिक आयुष्यक्रमांत अथवा त्यांच्या आर्थिक व इतर परिस्थितींत बदल होत नसे. त्यामुळें अशा दैवतांच्या बदलास ते फारसा विरोधहि करीत नसत.

## पुरोहितवर्ग—

कोणत्याहि समाजाचा जेव्हां कुटुंबसंस्थेपेक्षां अथवा गोत्रसंस्थेपेक्षां अधिक विकास होत गेला व त्या समाजामध्यें अनेक कुटुंबें किंवा अनेक गोत्रें अंतर्भूत होत गेलीं तेव्हां त्या समाजाचें संरक्षण करणारा असाहि एक वर्ग त्या त्या समाजांत तयार होणें अवश्य होऊं लागलें. कोणत्याहि मानवसमाजामध्यें जेव्हां समाजांतील व्यक्तींची संख्या वाढत गेली तेव्हां त्यांस उदरनिर्वाहाकरितां व उपजीविकेकरितां अधिकाधिक क्षेत्र अवश्य होऊं लागलें. जे समाज केवळ भ्रमण-वृत्तींतच राहिले त्या समाजांतील व्यक्तींची संख्या

कांहीं विशिष्ट मर्यादेच्या पुढें वाढणें हळूहळू अशक्य होऊं लागलें तेव्हां त्यांतील प्रगत समाजांनीं भ्रमण-वृत्ति टाकून देऊन कृषिप्रधान व पशुपालनप्रधानवृत्ति स्वीकारली व ते निरनिराळ्या प्रदेशांत स्थायिक होऊन आपआपली उन्नति करून घेण्याच्या मार्गास लागले व अशाच समाजांचा विकास पुढें वर वर्णन केल्याप्रमाणें दैवतमूलक अशा समाजामध्यें झाला व त्यांतच विशेष प्रगत असा पुरोहितवर्ग तयार झाला. जे समाज विशिष्ट कालानंतरहि भ्रमण-वृत्ति सोडून न देतां त्याच अवस्थेंत राहिले त्यांचा पुढें या स्थिर व प्रगत अशा स्थायिक झालेल्या समाजांशीं संघर्ष होऊन ते दऱ्या, खोरीं, पर्वत, वगैरे रुक्ष प्रदेश अथवा अरण्यें यांचा आश्रय करून कांहीं दिवस तग धरून राहिले व असे कांहीं वन्य अवस्थेंतील समाज आजहि आपणांस कोठें कोठें दृष्टीस पडतात; परंतु अशा अनेक समाजांचा प्रगत समाजांशीं झालेल्या संघर्षांत बहुतेक नाश होऊन ते पृथ्वीतलावरून नष्ट झाले. उदाहरणार्थ, टासमानियामधील मूळ वन्य लोक आज पूर्णपणें नष्ट झाले आहेत.

## क्षत्रिय अथवा राजवर्ग—

अर्थातच जे समाज स्थिर व स्थायिक होऊन कृषि व पशु-पालनादि करून आपला आयुष्यक्रम अधिकाअधिक सुसंस्कृत व विकसित करीत गेले, त्यांमध्यें वर सांगितल्याप्रमाणें दैवतमूलक व दैवतोपासक अथवा पुरोहितप्रमुख असा समाज बनत गेला. अर्थात् अशा समाजास स्थैर्य प्राप्त करून देण्याकरितां व अशा समाजास परकीय समाजांकडून संरक्षण प्राप्त करून देण्याकरितां समाजामध्यें एक बलशाली व युद्धप्रिय वर्ग हळूहळू निर्माण होत गेला. यासच आपण क्षत्रिय असें म्हणतों, अशा क्षत्रिय अथवा संरक्षक समाजास आपलें कृषिकर्म करून त्याच वेळीं पुन्हां समाजाच्या रक्षणाचें कार्य करणें असें दुहेरी कार्य कांहीं कालानें होत नाहींसें झालें. ही गोष्ट आपण ग्रीक समाजाच्या बाल्यावस्थे-मध्यें अवलोकन केलीच आहे; तेव्हां अशा समाजांत एक आयुध-जीवी वर्ग निर्माण झाला व यामुळें क्षत्रियाचें कर्म केवळ संग्राम करणें व समाजाचें रक्षण करणें एवढेंच उरलें व त्याच्या भरण-पोषणाचा भार समाजांतील इतर व्यक्तींनीं अंगीकारला. या क्षत्रिय-वर्गासहि संग्रामामध्यें अथवा विकट प्रसंगीं एखाद्या पुढाऱ्याची आवश्यकता वाटूं लागली व अर्थात् त्यांच्यामध्यें जो बलिष्ठ असेल त्याच्याकडे हें पुढारीपण आलें. त्यासच राजा ही संज्ञा प्राप्त झाली. याप्रमाणें ब्राह्मण आणि क्षत्रिय या दोन वर्गांकडे समाजाचें पुढारी-पण फार प्राचीन कालापासूनच गेल्याचें आपणांस दिसून येतें.

## गणराज्यें—

या कालांतहि कांहीं समाजांमध्यें सामुदायिक उपासना व सामुदायिक संरक्षण-कार्य चालू राहिलें, तथापि त्यांसहि या कार्याकरितां तात्पुरते का होईना पुढारी नेमावे लागले. कांहीं काल ते वैयक्तिक निवडणुकीनें नेमले जात, पण पुढें ते वंश-परंपरा नेमले जाऊं लागले. स्पार्टन समाज, रोमन समाज यांचीं उदाहरणें या बाबतींत देतां येतील; तसेंच भारतांतील गण-राज्येंहि या प्रकारचींच समजण्यास हरकत नाहीं.

## पुरोहित व राजे यांचा संघर्ष—

याप्रमाणें पुरोहित व राजे असे दोन वर्ग समाजांत पुढारी बनल्यावर या दोन वर्गांत पुढारीपणाबद्दल अथवा प्रमुख सत्ते-बद्दल कांहीं कालानें वितुष्ट येऊं लागलें. पुरोहितांचें राजावरहि वर्चस्व असण्याची स्थिति ही प्रथमपासूनची होती. हिचें प्रत्यंतर आपणांस ऋग्वेदामध्यें वसिष्ठ हा जेव्हां तृत्सू हे प्रथम एकाकी होते त्यांस आपण पुढें होऊन जय मिळवून दिला व भरतांचें यश सर्वत्र पसरलें अशी बढाई मारतो त्या वेळीं किंवा ईजिप्तमध्यें पुरोहितांपुढें अखेनटोन किंवा त्याचा वारस यासारखे कांहीं राजे कसे दुर्बल ठरले या गोष्टीकडे पाहिलें असतां दिसून येतें; परंतु कालांतरानें क्षत्रिय अथवा राजे लोकांनीं आपल्या सैन्याच्या व अधिकाराच्या सत्तेमुळें पुरोहितवर्गावरहि मात करून समाजां-तील प्रामुख्य आपणांकडे घेतलें. एवढेंच नव्हे तर राजाची व मुख्य देवतेच्या पुरोहिताची भूमिका आपणांकडेच घेतली. या-प्रमाणें ईजिप्तचे फारो हे राजे व पुरोहित या दोन्हींहि भूमिका करूं लागले. तसेंच रोमन कॉन्सल हे सेनापति व पुरोहित या मुख्य अधिकारांच्या भूमिका बळकावून बसले. परंतु ते येथेंच थांबले नाहींत तर रोमन सीझर अथवा बादशहा यांनीं स्वतःला ईश्वराचें रूप देऊन आपलीच पूजा आपल्या राज्यांत सुरू करून देवतेच्या बरोबरीचें किंबहुना देशदेवतेचेंच पद अथवा रूप धारण केलें व राज्यांतील प्रत्येक नागरिकाकडून आपलें पूजन करून घेण्याची प्रथा पाडली व सीझरिया नांवाचीं शहरें वसविलीं. ज्याप्रमाणें फारो हे ईजिप्तमध्यें देवत्व पावले त्याप्रमाणेंच रोमन बादशहांनीं म्हणजे सीझरचीं देवळें ठिकठिकाणीं बांधण्याची प्रथा रोमन साम्राज्यांत सर्वत्र रूढ झाली. या प्रथेचा वारसा मुसलमानी अमलांत आपल्या नांवचा खुतबा काजीकडून पढवून घेण्याच्या प्रथेमध्यें आतांपर्यंत आपणांस दिसून येत होता. 'ना विष्णुः पृथ्वीपतिः', 'दिल्लीश्वरो वा जगदीश्वरो वा' यांसारख्या वचनांमध्येंहि हीच कल्पना आपल्या दृष्टीस पडते.

## अनेकदैवत व एकदैवत कल्पना—

प्राचीन काळीं देवतांच्यासंबंधीं मानवाच्या ज्या कल्पना होत्या त्या बहुतेक अनेक दैवतमूलक होत्या. सामान्यतः प्रत्येक महत्त्वाच्या क्रियेची अधिष्ठात्री देवता स्वतंत्र असावी अशी कल्पना असल्यामुळें व अशा देवतांचा मानवांच्या कुटुंबाप्रमाणेंच जणुं

कांत परस्परांशीं संबंध असल्यामुळें मानवाप्रमाणें देवतांचींहि कुळें कल्पिण्यांत येत असत. तसेंच मानवांचें हित करणारे कांहीं देव असून मृत्यु, रोग, वगैरेसारखे मानवांचें अहित करणारे अथवा दुष्ट प्रवृत्तीचे कांहीं देव असतात अशीहि मानवांची कल्पना असे. या सुष्ट व दुष्ट देवतांचें युद्ध निरंतर चालू असून त्यांत दुष्ट देवतांचा पराजय होत असे. अशाहि कल्पना प्राचीन मानवांच्या असून या सदसत् द्वंद्वावर कांहीं रूपकांचीहि कल्पना मानवप्राणी करीत असे. तसेंच पाऊस पडून वृक्ष, पुष्प, फलें, धान्य, वगैरे उत्पन्न होणें व अवर्षण पडून त्यांचा नाश होणें, वगैरे नैसर्गिक चमत्कारांशींहि आद्यमानव देवतांचा संबंध जोडून या सृष्ट चमत्कारासंबंधींहि रूपकें अथवा नाटकें करीत असे. अशा तऱ्हेची प्रथा सर्व पृथ्वीवरील भिन्न भिन्न मानवसमाजांत दिसून येते. याप्रमाणें देवतांमध्यें एक प्रकारची कमीअधिक महत्त्वाची जणुं कांहीं प्रतवारी तयार होत गेली व या सर्व देवतांमध्यें प्रत्येक समाजांत विशिष्ट देवतेस प्रामुख्य मिळूं लागलें. अर्थात् अशा अनेक देवता मानण्याची प्रवृत्ति समाजांत प्रचलित असतांनाच या सर्व देवतांच्या मुळाशीं एकच देवता असून इतर अनेक देवता या केवळ तिचींच अन्य रूपें आहेत अशा तऱ्हेचे विचारहि फार प्राचीन काळापासून प्रचलित असलेले दिसून येतात. उदाहरणार्थ, ऋग्वेदामध्येंच 'इन्द्रंमित्रंवरुणमग्निमाहुरथो दिव्यः ससुपर्णो गरुत्मान्। एकं सद्विप्रा बहुधा वदन्त्यग्निंयमं मातरिश्वानमाहुः।' या मन्त्रामध्यें इन्द्र, मित्र, वरुण अग्नि, वगैरे जरी देवतांचीं निरनिराळीं नांवें असलीं तरी ज्ञाते लोक या सर्व देवता एकच परमेश्वराचीं रूपें असून त्यांस भिन्न भिन्न नांवें दिलेलीं आहेत असें मानतात. याप्रमाणें या अनेक दैवतोपासनेच्या कालांत देखील एकाच परमेश्वराची उपासना करण्याची कल्पना आभिज्ञ लोकांच्या मनांत मधून मधून प्रादुर्भूत झालेली आपणास दिसून येते. अशाच तऱ्हेचें एकेश्वरी मत केवळ विचार म्हणून नव्हे तर प्रत्यक्ष आचरणांत आणण्याचें काम एका ईजिप्ती फॅरोनें केलेलें आपणांस आढळून येतें. या फॅरोचें नांव अखेनटॉन असें होतें. या फारोचें नांव प्रथम अमेन्होटेप (चौथा) असें होतें. याचा अर्थ ॲमॉनचा प्रिय असा होतो, परंतु तें नांव त्यानें बदलून ॲटॉन या नांवानें सूर्य देवता हीच एक देवता असून आपण ॲटॉन देवतेचे प्रिय असून त्याकरितां आपलें नांव अखेनटॉन असें त्यानें बदलून घेतलें व ॲमॉन देवाच्याऐवजीं अटॉन देवाची पूजा सर्वत्र सुरू केली. एवढेंच नव्हे तर इतर सर्व देवतांच्या उपासना बंद केल्या व ॲटॉन ही एकच देवता सर्व विश्वाची चालक असून तिचीच उपासना करणें सक्तीचें केलें. याच्या कारकीर्दीत ॲमॉन देवतेचे व इतर सर्व देवतांचे सर्व पुरोहित ॲटोन देवतेची सर्व देवालयांतून पूजा करूं लागले व इतर सर्व देवतांस त्यांच्या देवालयांतून काढून टाकण्यांत आलें. या राजानें आपणाकरितां एक नवीन राजधानीचें शहर वसविलें व तेथें नवीन देवालयें बांधलीं. परंतु याच्या मागून गादीवर आलेल्या राजाच्या कारकीर्दीत पुरोहितांनीं पुन्हां परिवर्तन घडवून आणून ॲमॉन व इतर देवतांची पूजा पुन्हां सुरू केली एवढेंच नव्हे तर अखेनॉटन राजानें बांधलेल्या देवालयांचा विध्वंस केला व त्याचें नांव सर्व स्मारकांवरून खोडून काढलें. याप्रमाणें या एकेश्वरी मताच्या पहिल्या पुरस्कर्त्याच्या कार्यास त्याच्या पाठीमागून पूर्ण अपयश आलें.

त्यानंतर इस्राएल लोकांतील मोझेस यानें या एकेश्वरी मताचा पुरस्कार केला व ईश्वर हा एक असून तो सर्व शक्तिमान आहे व त्यानें घालून दिलेल्या नियमांप्रमाणें मनुष्यानें वर्तन केलें पाहिजे व त्यानें घातलेल्या दहा आज्ञांचें पालन केलें पाहिजे अशी शिकवण आपल्या लोकांस दिली. ही शिकवण मात्र इस्राएल लोकांनीं मान्य केली व त्यांनीं आपले धार्मिक नियम घालणारे ग्रंथ व आपला इतिहास जतन करून ठेवला व एका परमेश्वराची उपासना करणें सुरू केलें व मूर्तिपूजेचा व अनेक दैवतोपासनेचा त्याग केला.

## उपासना पद्धतींत सुधारणा—

परंतु या लोकांतहि या उपासना पद्धतीचें पुढें फार अवडंबर माजलें व सोंवळें-ओंवळें, पवित्र-अपवित्र, इत्यादि कल्पनांचें बंड इतकें माजलें कीं, ही एका परमेश्वराची सर्व लोकांस खुली केलेली उपासना पद्धतिहि पुढें कांहीं विशिष्ट पुरोहितवर्गाचीच एक हक्काची बाब होऊन बसली. जेरुशलेम येथील देवालयांतील उपासना ही कांहीं यहुदी कुटुंबांच्या हातांतील एक सत्ता बनली व पुरोहितवर्गाचें महत्त्व फार वाढलें व त्यामुळें सामान्य जनतेस उपासनास्वातंत्र्य राहिलें नाहीं व देवळांतील अनेक अवडंबरयुक्त व विशिष्ट वर्गाकडून होणारी उपासना तेवढी धार्मिक उपासना मानली जाऊं लागली. प्रत्यक्ष परमेश्वराची उपासना कोणाहि व्यक्तीस करतां येणें शक्य आहे ही कल्पना या पुरोहितांच्या कर्मठपणामुळें लुप्त होत चालली.

परंतु पुरोहितवर्गाच्या कर्मठपणाविरुद्ध व परमेश्वराची कृपा संपादन करण्याकरितां किंवा स्वर्गप्राप्तीकरितां अथवा उत्तम गति प्राप्त करून घेण्याकरितां यज्ञयागादीसारखी अवडंबरयुक्त उपासना करणेंच आवश्यक नसून इतर मार्गांनींहि मनुष्यास परमेश्वराची कृपा अथवा मरणोत्तर सद्गति प्राप्त होऊं शकते अशी शिकवण प्रथम भरतखंडामध्यें खिस्तपूर्व पांचव्या-सहाव्या शतकांतच भगवान् बुद्ध यांनीं देण्यास सुरुवात केली. त्यांनीं यज्ञयाग, तपश्चर्या, व्रतें, उपवास, कष्ट, वगैरे केल्यानें मनुष्य या भवचक्रांतून मुक्त होतो ही कल्पना चुकीची असून भूतदया, व नीतिमय

आचरण केल्यानें मनुष्यमात्रास मोक्ष मिळूं शकतो अशी शिकवण देण्यास आरंभ केला. आपलें आचरण विनयशील व नीतिमय ठेवल्यास मनुष्याचा उद्धार होतो अशी बुद्धाची शिकवण होती व यामुळें सामान्य जनतेस हा आत्मोद्धाराचा मार्ग फार सुलभ वाटून अवाढव्य अशा कर्मकांडापासून अनेक लोक मुक्त होऊन साध्या व सरळ मार्गानें मोक्ष प्राप्त करून घेण्याच्या मार्गास लागले व याप्रमाणें बौद्ध संप्रदायाचा प्रसार फार मोठ्या प्रमाणावर व फार विस्तृत क्षेत्रावर होत गेला.

अशाच तऱ्हेचा शुद्ध आचरण, नीतिमत्ता व भूतदया यांच्या पायावर आधारलेला परमेश्वरभक्तीचा अथवा मोक्षाचा मार्ग दाखविणारा दुसरा एक महत्त्वाचा संप्रदायप्रवर्तक म्हणजे झरथुष्ट्र हा होय. यानें शुद्ध नीतिमय आचरण व पावित्र्य या गोष्टींस व भूतदयेस फार महत्त्व दिलें आहे. यानें मित्र म्हणजे सूर्याची उपासना ही जरी मुख्य मानली असली तरी त्याच्या शिकवणीचें सार शुद्ध व पवित्र आचरण हें आहे. पातकापासून दूर असणें, अपवित्र गोष्टी अथवा विचार यांपासून दूर असणें. मानवांतील सत्प्रवृत्तीस उत्तेजन देऊन असत्प्रवृत्तींचें दमन करणें हेंच झरथुष्ट्राच्या उपदेशाचें सार आहे. त्यामुळें झरथुष्ट्राचा संप्रदायहि एका काळीं इराणच्या साम्राज्याच्याबरोबर फार मोठ्या प्रदेशावर पसरला होता. या संप्रदायाची उभारणी सत् व असत्, शुद्ध व अशुद्ध, पवित्र व अपवित्र अथवा पुण्य आणि पाप, सद्गुण व दुर्गुण या द्वंद्वांमध्यें चाललेला अविरत कलह अथवा स्पर्धा यांवर आधारलेली आहे. हीं दोन प्रतिस्पर्धी तत्त्वें जगामध्यें चिरंतन असून त्यांत नेहमीं सत्याचा जय व असत्याचा पराजय होत असतो. याकरितां मानवानें सत्याचा आश्रय करून असत्यापासून दूर असावें अशी झरथुष्ट्राची शिकवण आहे. हें सत्प्रवृत्ति व असत्प्रवृत्तीमधील द्वंद्व यापुढेंहि अनेक संप्रदायांमध्यें विशेषत्वानें आढळतें. भारतीयांमध्यें देव व असुर यांमधील द्वंद्व प्रसिद्धच आहे. गौतमबुद्धानें मारावर मिळविलेला जय हा एक महत्त्वाचा प्रसंग आहे. त्याप्रमाणेंच यहुदी लोकांच्या अगदीं प्राचीनतम दंतकथांमध्यें आद्य मानवास परमेश्वरानें सर्व सुखें अनुकूल करून दिलीं असतांहि या सदसदामधील द्वंद्वाच्या प्रभावानेंच असत्प्रवृत्तीनें आद्यमानवास मोह पाडून सत्य ईश्वरापासून दूर केलें. यहुद्यांच्या सांप्रदायिक इतिहासामध्यें व कथांमध्यें ही असत्प्रवृत्ति अथवा सैतान मानवास सद्गुणापासून परावृत्त करण्याकरितां अनेक प्रकारचे मोह त्याच्या मार्गांत आणून उभे करतो अशी समजूत व्यक्त केलेली आढळते. हीच कल्पना पुढें खिस्ती संप्रदायांत व महंमदी संप्रदायांतहि दृढमूल असल्याचें आपल्या दृष्टीस पडतें. असो.

याप्रमाणें प्राचीन संप्रदायांमध्यें जें देवतांस प्राधान्य मिळालें होतें व तदनुषंगानें कर्मठपणा, उपासनांचें अवडंबर, यज्ञयाग, बलिदान, वगैरे गोष्टी रूढ झाल्या होत्या त्यांच्याविरुद्ध फार प्राचीन काळापासूनच एक प्रकारची मानसिक व बौद्धिक स्वातंत्र्याची चळवळ चालू होती व कर्मकांडापेक्षां सदाचरणास अधिक महत्त्व देण्यांत यावें अशी शिकवण बऱ्याच प्राचीन काळापासून निरनिराळे महापुरुष देत आलेले होते.

## येशू खिस्त—

अशा महापुरुषांपैकीं ज्याप्रमाणें झरथुष्ट्र व बुद्ध हे सर्व जगात मान्यता पावले व त्यांनीं नीति व सदाचार यांच्या पायावर आधारलेले आपले नवीन संप्रदाय स्थापन केले त्याप्रमाणेंच पश्चिमेकडील आपला इतिहास व परंपरा जतन करून ठेवणाऱ्या एका प्राचीन राष्ट्रांतच अशा तऱ्हेचा एक नवीन उपदेशक अथवा प्रचारक निर्माण झाला त्याचें नांव येशू हें होय. यास पुढें ख्रिस्त हें अभिधान मिळालें. यानें यहुदी लोकांत जो कर्मठपणा व सोवळ्या-ओंवळ्याच्या व शुद्ध-अशुद्धाच्या व भक्ष्य-अभक्ष्याच्या कल्पनांचा गोंधळ झाला होता तो सर्व नाहींसा करून परमेश्वराच्या कृपेची प्राप्ति केवळ सदाचरणानें व सर्वांशीं प्रेमळपणानें वागणूक केल्यानें होऊं शकते असा उपदेश करण्यास आरंभ केला. याचा जन्म खिस्तपूर्व चार या वर्षीं झाला. यानें आपल्या वयाच्या तिसाव्या वर्षी आपल्या मतप्रचारास आरंभ केला व जुन्या सर्व उपासनापद्धतीविरुद्ध उपदेश सुरू केला. यामुळें यहुदी पुरोहितवर्गास आपलें नुकसान होईल अशी भीति वाटून त्यानें येशू हा अपप्रचार करीत आहे अशी त्याविरुद्ध ओरड सुरू केली.

यहुदी लोकांमध्यें मनुष्यास मरणोत्तर जी गति मिळावयाची ती त्याच्या पापपुण्याचा निवाडा झाल्यावर मिळावयाची व हा निवाडा एका ठराविक दिवशीं व्हावयाचा व त्यापूर्वी परमेश्वराचा एक प्रेषित पृथ्वीवर यावयाचा अशी समजूत होती. तेव्हां परमेश्वराचा जो प्रेषित तो मीच असून आतां लवकरच निवाड्याचा दिवस यावयाचा आहे व स्वर्गाचें राज्य आपणांस मिळावयाचें आहे अशी शिकवण येशू करूं लागला. तेव्हां हा राज्य मिळवूं इच्छितो म्हणून राजद्रोही आहे अशी यहुदी लोकांनीं त्याच्या विरुद्ध त्या वेळच्या रोमन अधिकाऱ्याकडे तक्रार केली व त्यानें त्यास क्रूसावर चढविलें.

येशू खिस्तानें फक्त चार वर्षें उपदेशकाचें कार्य केलें. परंतु त्या काळांत त्यास बरेच अनुयायी मिळाले. विशेषतः गरीब व अनाथ आणि पातकी मनुष्यासहि सद्गति मिळण्याची आशा आहे, पापी मनुष्यानें पातकोच्चार व पश्चात्ताप केल्यास त्याची पापापासून सुटका होते व परमेश्वर दयाळू असून तो पातक्यास

क्षमा करतो ही शिकवण सामान्य व हीन दर्जाच्या जनतेस विशेषें पटल्यामुळें व त्यानें कांहीं रोगी लोकांस बरें केल्यामुळें व अशाच तऱ्हेचे कांहीं चमत्कार केल्यामुळें त्याच्या अनुयायांची संख्या वाढत गेली.

## ख्रिस्ती संप्रदायाचा प्रसार—

ख्रिस्तास सुळी देण्याच्या वेळीं त्याचे जे निकटचे शिष्य होते त्यांतील सॅम्यूएल यास पीटर नांव देऊन त्यानें प्रमुख नेमून आपली शिकवण पुढें चालविण्याची आज्ञा दिली व स्वर्गाच्या किल्ल्या त्याच्या स्वाधीन केल्या. त्याप्रमाणें त्यानें ख्रिस्ताच्या उपदेशाचा प्रचार चालविला, परंतु या प्रचारास यहुदी पुरोहित पारुसी व साद्दूसी यांचा विरोध होता व त्यांनीं या नवीन संप्रदायाच्या लोकांचा छळ चालविला व कांहीं लोकांस दगडांनीं चेंचून मारण्याची शिक्षा दिली. परंतु या यहुदी पुरोहित-वर्गापैकींच टार्सस येथील सॉल नांवाच्या गृहस्थानें प्रथम ख्रिस्ताच्या अनुयायांचा छळ करण्यामध्यें पुढाकार घेतला, परंतु पुढें त्यास पश्चात्ताप व साक्षात्कार होऊन त्याचें मतपरिवर्तन झालें. यास पुढें पॉल असें नांव मिळालें. पॉल हा टार्सस येथील एका तंबूच्या व्यापाऱ्याचा मुलगा होता. तो बुद्धिवान् व विद्वान् होता. त्यास ग्रीक, अरेमाइक, हिब्रू, वगैरे भाषा येत असून त्याचें वाचन बरेंच झालें होतें व तो जन्मजात रोमन नागरिक होता. त्यानें स्वतः कधीं येशू ख्रिस्तास पाहिलेंहि नव्हतें. परंतु तो जेव्हां ख्रिस्ताचा अनुयायी बनला तेव्हां त्यास इतकें महत्त्व आलें कीं, येशू ख्रिस्ताच्या इतर शिष्यांनीं त्याला येशूच्या प्रथम बारा शिष्यांत (अपॉसलमध्यें) स्थान दिलें व त्यास संप्रदायप्रसाराची अनुज्ञा दिली. त्यानें आपलें कार्य केवळ यहुदी लोकांतच न करतां इतर जे विधर्मी लोक होते किंवा गुलाम होते त्यांसहि आपल्या संप्रदायांत घेण्यास सुरुवात केली. त्यामुळें या उपासनेच्या का होईना पण एक प्रकारच्या स्वातंत्र्याच्या लालसेनें त्याचा अनुयायी वर्ग हजारोंनीं वाढत गेला व त्यानें अनेक शहरांतून धर्मप्रसार केला. प्रथम तो आपलीं प्रवचनें यहुदी लोकांच्या देवळांतूनच (सिनेगॉग) करीत असे पण यहुदी लोकांनीं इतर लोकांस प्रवेश नाकारल्यामुळें त्यास इतर ठिकाणीं प्रवचनें करावीं लागलीं. याप्रमाणें ख्रिस्ती मंडळ्यांची स्थापना झाली. प्रथम पॉल यास यहुदी लोकांनीं व ख्रिस्ताच्या इतर शिष्यांनीं विरोध केला व त्याचा छळहि झाला, परंतु त्याचें धर्मप्रसाराचें कार्य सारखें वाढत गेलें व त्याच्या अनुयायांची संख्या एकसारखी वाढत गेली. पॉल यानें आपल्या अनुयायांस जीं पत्रें लिहिलीं त्यांपासूनच बायबलाच्या नवीन करारांतील लिखित भागास सुरुवात झाली. या ख्रिस्ती लोकांचा रोमन बादशहांकडूनहि छळ झाला व पॉल यास नेरो बादशहाच्या कारकीर्दीत रोम शहराला आग लागली त्या बाबतींत दोषी म्हणून देहान्ताची शिक्षा देण्यांत आली. परंतु ख्रिस्ती संप्रदायाची वाढ यामुळें न थांबतां तो संप्रदाय एकसारखा वाढतच गेला व त्यामुळे लोकांत एक प्रकारचें नवचैतन्य उत्पन्न झालें. या संप्रदायामध्यें रोमन नागरिक नसलेले लोक, यहुदी किंवा कोणत्याहि धर्माचे नसलेले लोक, गुलाम, व्यापारी, वगैरे सर्व प्रकारच्या लोकांस प्रवेश असल्यामुळें व कर्मकांडाचा लकडा मागें नसल्यामुळें या सामान्य लोकांस एक प्रकारची जीवितामध्यें आशा वाटूं लागली व आपला भविष्यकाळ उज्ज्वल करून घेण्याची संधि या संप्रदायामार्फत आपणांस मिळाली आहे असें वाटूं लागलें. यामुळें या संप्रदायाचा प्रसार जरी त्याच्या अनुयायांचा छळ दीर्घ काळ होत राहिला तरी एकसारखा चालू राहिला.

जें कार्य पूर्वेकडे बौद्ध संप्रदायानें केलें व यज्ञयागादि कर्मकांड व अवाढव्य धार्मिक विधी अथवा मतें यांच्या जंजाळांतून सोडवून सामान्य जनतेस मोक्षाचा मार्ग दाखविला तेंच कार्य पश्चिमेकडे ख्रिस्ती संप्रदायानें केलें एवढेंच नव्हे तर स्वतः ख्रिस्त कांहीं दिवस पूर्वेकडील प्रदेशांत आला असून त्यानें कांहीं बौद्ध तत्त्वांचें ज्ञान करून घेतलें होतें व त्याच्या आधारावरच आपला उपदेश चालविला होता असेंहि कांहीं विद्वानांचें मत आहे.

परंतु एवढी गोष्ट खरी कीं, ख्रिस्ती संप्रदायानें मानवी विचारामध्यें फार मोठी क्रांति घडवून आणली आणि तिचा परिणाम आजहि जगाच्या फार मोठ्या भागावर झालेला आपणांस दिसत आहे. याप्रमाणें ख्रिस्ती शकाच्या आरंभीं ही नवचैतन्याची लाट पश्चिमेकडे पसरत होती.

ख्रिस्तानें जरी आपली उपासना पद्धति अगदीं साधी व परमेश्वरप्रार्थनेच्या स्वरूपाची ठेवली तरी जे सामाजिक अथवा वार्षिक उत्सव ठिकठिकाणीं चालू होते ते त्यास बंद करतां आले नाहींत. परंतु त्यांचें कांहींसें स्वरूप बदलून ते त्याच्या अनुयायांनीं आपल्या संप्रदायांत चालू केले. उदाहरणार्थ, पूर्वी जो उत्तरायणारंभ दिनाचा उत्सव डिसेंबरच्या पंचवीस तारखेस होत असे तो यापुढें ख्रिस्तजन्म-दिनाचा उत्सव म्हणून होऊं लागला. तसेंच पूर्वी जो ईस्टरचा सण वसंतोत्सव म्हणून एप्रिलच्या सुमारास होत असे त्याच उत्सवांत ख्रिस्ताचा अंत झाल्यामुळें त्याचा मृत्युदिन (गुडफ्रायडे) म्हणून व त्यानंतर त्याचा पुनरुत्थानदिन (ईस्टर सन्डे) म्हणून करण्यांत येऊं लागला. याप्रमाणें पूर्वीच्या सामाजिक आयुष्यक्रमास नवीन स्वरूप प्राप्त झालें. याप्रमाणें ज्या रीतीनें पूर्वीच्या मानवसमाजांत नवीन नवीन देवतांची स्थापना होत गेली तरी जुने

गेली. एका मानवानें दुसऱ्या मानवावर कोणत्याहि प्रकारचें आक्रमण करणें हें निषिद्ध मानलें जाऊं लागलें. विशेषतः त्या काळीं रोमन साम्राज्यांतील रूढ असलेल्या करमणुकीकरितां चाललेल्या मानवी युद्धांविरुद्ध या शिकवणीचा फारच मोठा परिणाम घडून आला. ख्रिस्ती शकाच्या पहिल्या दोन शतकांत ख्रिस्ती संप्रदायाच्या सर्व रोमन साम्राज्यांत एक तऱ्हेची मानव-बंधुत्वाची व विशिष्ट कल्पना व आकांक्षा यांनीं युक्त अशी एक सामाजिक संघटना बनविण्यामध्यें फार मोठा उपयोग झाला. तत्कालीन कांहीं रोमन बादशहांनीं या नवीन चळवळीस विरोध केला तर कांहींनीं त्यास मुभा दिली. दुसऱ्या व तिसऱ्या शतकांत ही नवीन धर्मप्रसाराची चळवळ दडपून टाकण्याचे प्रयत्न झाले व चौथ्या शतकांत तर डायोक्लिशियन या बादशहाच्या कारकीर्दीत इ. स. ३०३ मध्यें त्यांचा भयंकर छळ करण्यांत आला. त्यांच्या देवळांची मालमत्ता जप्त करण्यांत आली. सर्व बायबल ग्रंथ व लिखाणें जप्त करून नष्ट करून टाकण्यांत आलीं. ख्रिस्ती लोकांस कायदेबाह्य ठरवून अनेकांस फांशीं देण्यांत आलें.

परंतु यामुळें ख्रिस्ती संप्रदाय दडपला गेला नाहीं. कारण कित्येक प्रांतांतील बहुतेक लोक एवढेंच नव्हे तर अधिकारी सुद्धां ख्रिस्ती होते. अखेरीस इ. स. ३१७ मध्यें जोड बादशहा गॅलेरिअस यानें माफीचा जाहिरनामा काढला एवढेंच नव्हे तर सन ३२४ या वर्षी स्वतः कॉन्स्टंटाइन या बादशहानें ख्रिस्ती संप्रदायाचा स्वीकार केला तेव्हां अर्थातच सर्व रोमन साम्राज्याचा धर्म ख्रिस्ती संप्रदाय हाच बनला. हळूहळू बाकीचे संप्रदाय मागें पडत गेले व इ. स. ३९० मध्यें थिओडोशिअस या बादशहानें अलेक्झांड्रा येथील जूपिटर सेरापिसची भव्य मूर्ति स्थानभ्रष्ट केली. पांचव्या शतकानंतर रोमन साम्राज्यांत फक्त ख्रिस्ती देवळें व पाद्री एवढेच राहिले.

### रोमन साम्राज्याचा ऱ्हास—

परंतु इसवी सनाच्या तिसऱ्या शतकामध्येंच रोमन साम्राज्यास उतरती कळा लागली होती. या साम्राज्याचा नैतिक व सामाजिक दोन्ही अंगांनीं एकसारखा अधःपात होत होता. या काळांतील रोमन बादशहा म्हणजे लष्करी एकतंत्री लढवय्ये होते आणि त्यांच्या लष्करी धोरणाप्रमाणें साम्राज्याची राजधानीहि एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं याप्रमाणें एकसारखी बदलत होती. ती कधीं इटलीमध्यें मिलान शहरीं तर कधीं सर्व्हिया देशामध्यें तिर्मिअम किंवा निश येथें तर कधीं आशिया मायनरमध्यें निकोमिडिया येथें असे. रोम शहरास आतां उतरती कळा लागली असून साम्राज्याच्या विस्ताराच्या मानानें तें मध्यभागीं नसून एका बाजूस पडत असे. या काळात सर्वत्र शांतता माथ नांदत होती व सामान्य लोक शस्त्रांशिवाय प्रवास करूं शकत असत. सर्व सत्ता सैन्यामध्यें केंद्रित झालेली होती. बादशहा या सैन्यांच्या बळावर अधिकाधिक एकतंत्री व जुलमी होत गेले. डायोक्लिशिअस हा तर मुकुट घालून पौरस्त्य बादशहांप्रमाणें उंची झगे घालून मिरवूं लागला होता.

या कालांत साम्राज्याच्या डॅन्यूब व ऱ्हाइन या नद्यांच्या दरम्यानच्या सरहद्दीवर हळूहळू शत्रुलोकांची चढाई होऊं लागली होती. ऱ्हाइन नदीपर्यंत फ्रँक व इतर जर्मन टोळ्या येऊन पोहोंचल्या होत्या. उत्तर हंगेरींत व्हँडाल आणि डेशिया अथवा रुमानियामध्यें व्हिसीगॉथ या लोकांचा धुमाकूळ चालू होता. यांच्या पाठीमागें रशियांत ऑस्ट्रोगॉथ हे लोक पुढें रेटीत होते व त्यांच्या पलीकडे व्होल्गा नदीवर ॲलन हे लोक पुढें सरकत होते. परंतु यापेक्षांहि महत्त्वाचे व विशेष विनाशक असे मंगोल पूर्वेकडून युरोपवर चाल करून येऊं लागले होते. तसेंच हूण लोक ऑस्ट्रोगॉथ व ॲलन लोकांपासून खंडणी उकळूं लागले होते व त्यांस पश्चिमेकडे रेटीत होते.

आशियामध्यें इराणांतील ससन घराण्यांतील बादशहांनीं रोमन साम्राज्यास कसें खिळखिळीत केलें होतें त्याचें वर्णन पूर्वी केलेंच आहे. रोमन साम्राज्यांत ॲलिया आणि सर्व्हिआ हा प्रदेश व्यापणारी जी दोनशें मैलांची पट्टी डॅन्यूब नदी व ॲड्रिआटिक समुद्र यांच्यामध्यें आहे हीच काय ती पूर्व व पश्चिम राज्यास एकत्र जोडणारी भूमि होती व रोमन साम्राज्याचें बल नौदल नसून मुख्यतः भूदलच होतें व ही पट्टी रोमन साम्राज्याचें मर्मस्थान होतें. यासाठींच कान्स्टंटाइन बादशहानें पूर्वेकडे बायझांटियम येथें कॉन्स्टॅंटिनोपल शहराची स्थापना करून तेथें राजधानी केली. या राजाच्या कारकीर्दीच्या अखेरीस व्हँडॉल लोकांस गॉथ लोकांपासून उपसर्ग पोंचूं लागल्यामुळें ते रोमन साम्राज्यांत सामील झाले व त्यांस डॅन्यूब नदीच्या पश्चिमेकडील सध्यां हंगेरींत अन्तर्भूत होणारा पॅनोनिया हा प्रदेश वसाहतीकरितां देण्यांत आला. या व्हँडाल लोकांच्या कांहीं लीजन्स बनविण्यांत आल्या. परंतु त्यांचे अधिकारी व्हँडाल लोकच होते व हे व्हँडाल लोक कधींच पूर्णपणें रोमन बनले नाहींत. कॉन्स्टंटाइन बादशहा साम्राज्याची पुनर्घटना करीत असतांच मृत्यु पावला. त्याच्या मागें व्हिसीगॉथ लोकांनीं कॉन्स्टांटिनोपलवर चाल केली तेव्हां व्हॅलेन्स या बादशहानें त्यांस वरील व्हँडाल लोकांप्रमाणेंच सध्यांच्या बल्गेरिया प्रांतांत वसाहत करण्यास जागा दिली. ते जरी वरून दिसावयास रोमन बादशहाचे प्रजाजन होते तरी ते वास्तविक विजेते होते. यानंतर थिओडोशिअस या बादशहाच्या कारकीर्दीत (३७९–३९५) इटली व पॅनोनिया या प्रदेशांतील सैन्यावर स्टिलिको नांवाचा व्हँडाल सेनापति होता व बाल्कनमधील गॉथ

गेली. एका मानवानें दुसऱ्या मानवावर कोणत्याहि प्रकारचें आक्रमण करणें हें निषिद्ध मानलें जाऊं लागलें. विशेषतः त्या काळीं रोमन साम्राज्यांतील रूढ असलेल्या करमणुकीकरितां चाललेल्या मानवी युद्धांविरुद्ध या शिकवणीचा फारच मोठा परिणाम घडून आला. ख्रिस्ती शकाच्या पहिल्या दोन शतकांत ख्रिस्ती संप्रदायाच्या सर्व रोमन साम्राज्यांत एक तऱ्हेची मानव-बंधुत्वाची व विशिष्ट कल्पना व आकांक्षा यांनीं युक्त अशी एक सामाजिक संघटना बनविण्यामध्यें फार मोठा उपयोग झाला. तत्कालीन कांहीं रोमन बादशहांनीं या नवीन चळवळीस विरोध केला तर कांहींनीं त्यास मुभा दिली. दुसऱ्या व तिसऱ्या शतकांत ही नवीन धर्मप्रसाराची चळवळ दडपून टाकण्याचे प्रयत्न झाले व चौथ्या शतकांत तर डायोक्लिशियन या बादशहाच्या कारकीर्दीत इ. स. ३०३ मध्यें त्यांचा भयंकर छळ करण्यांत आला. त्यांच्या देवळांची मालमत्ता जप्त करण्यांत आली. सर्व बायबल ग्रंथ व लिखाणें जप्त करून नष्ट करून टाकण्यांत आलीं. ख्रिस्ती लोकांस कायदेबाह्य ठरवून अनेकांस फांशीं देण्यांत आलें.

परंतु यामुळें ख्रिस्ती संप्रदाय दडपला गेला नाहीं. कारण कित्येक प्रांतांतील बहुतेक लोक एवढेंच नव्हे तर अधिकारी सुद्धां ख्रिस्ती होते. अखेरीस इ. स. ३१७ मध्यें जोड बादशहा गॅलेरिअस यानें माफीचा जाहिरनामा काढला एवढेंच नव्हे तर सन ३२४ या वर्षी स्वतः कॉन्स्टंटाइन या बादशहानें ख्रिस्ती संप्रदायाचा स्वीकार केला तेव्हां अर्थातच सर्व रोमन साम्राज्याचा धर्म ख्रिस्ती संप्रदाय हाच बनला. हळूहळू बाकीचे संप्रदाय मागें पडत गेले व इ. स. ३९० मध्यें थिओडोशिअस या बादशहानें अलेक्झांड्रा येथील ज्यूपिटर सेरापिसची भव्य मूर्ति स्थानभ्रष्ट केली. पांचव्या शतकानंतर रोमन साम्राज्यांत फक्त ख्रिस्ती देवळें व पाद्री एवढेच राहिले.

## रोमन साम्राज्याचा ऱ्हास—

परंतु इसवी सनाच्या तिसऱ्या शतकामध्येंच रोमन साम्राज्यास उतरती कळा लागली होती. या साम्राज्याचा नैतिक व सामाजिक दोन्ही अंगांनीं एकसारखा अधःपात होत होता. या काळांतील रोमन बादशहा म्हणजे लष्करी एकतंत्री लढवय्ये होते आणि त्यांच्या लष्करी धोरणाप्रमाणें साम्राज्याची राजधानीहि एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं याप्रमाणें एकसारखी बदलत होती. ती कधीं इटलीमध्यें मिलान शहरीं तर कधीं सर्व्हिया देशामध्यें सिर्मिअम किंवा निश येथें तर कधीं आशिया मायनरमध्यें निकोमिडिया येथें असे. रोम शहरास आतां उतरती कळा लागली असून साम्राज्याच्या विस्ताराच्या मानानें तें मध्यभागीं नसून एका बाजूस पडत असे. या कालात सर्वत्र शांतता मात्र नांदत होती व सामान्य लोक शस्त्रांशिवाय प्रवास करूं शकत असत. सर्व सत्ता सैन्यामध्यें केंद्रित झालेली होती. बादशहा या सैन्यांच्या बळावर अधिकाधिक एकतंत्री व जुलमी होत गेले. डायोक्लिशिअस हा तर मुकुट घालून पौरस्त्य बादशहांप्रमाणें उंची झगे घालून मिरवूं लागला होता.

या कालांत साम्राज्याच्या डॅन्यूब व ऱ्हाइन या नद्यांच्या दरम्यानच्या सरहद्दीवर हळूहळू शत्रुलोकांची चढाई होऊं लागली होती. ऱ्हाइन नदीपर्यंत फ्रँक व इतर जर्मन टोळ्या येऊन पोहोंचल्या होत्या. उत्तर हंगेरींत व्हँडाल आणि डेशिया अथवा रुमानियामध्यें व्हिसीगॉथ या लोकांचा धुमाकूळ चालू होता. यांच्या पाठीमागें रशियांत ऑस्ट्रोगॉथ हे लोक पुढें रेटीत होते व त्यांच्या पलीकडे व्होल्गा नदीवर ॲलन हे लोक पुढें सरकत होते. परंतु यापेक्षांहि महत्त्वाचे व विशेष विनाशक असे मंगोल पूर्वेकडून युरोपवर चाल करून येऊं लागले होते. तसेंच हूण लोक ऑस्ट्रोगॉथ व ॲलन लोकांपासून खंडणी उकळूं लागले होते व त्यांस पश्चिमेकडे रेटीत होते.

आशियामध्यें इराणांतील ससन घराण्यांतील बादशहांनीं रोमन साम्राज्यास कसें खिळखिळीत केलें होतें त्याचें वर्णन पूर्वी केलेंच आहे. रोमन साम्राज्यांत बॉस्निया आणि सर्व्हिआ हा प्रदेश व्यापणारी जी दोनशें मैलांची पट्टी डॅन्यूब नदी व ॲड्रिआटिक समुद्र यांच्यामध्यें आहे हीच काय ती पूर्व व पश्चिम राज्यास एकत्र जोडणारी भूमि होती व रोमन साम्राज्याचें बल नौदल नसून मुख्यतः भूदलच होतें व ही पट्टी रोमन साम्राज्याचें मर्मस्थान होतें. यासाठींच कान्स्टंटाइन बादशहानें पूर्वेकडे बायझांटियम येथें कॉन्स्टँटिनोपल शहराची स्थापना करून तेथें राजधानी केली. या राजाच्या कारकीर्दीच्या अखेरीस व्हँडॉल लोकांस गॉथ लोकांपासून उपसर्ग पोंचूं लागल्यामुळें ते रोमन साम्राज्यांत सामील झाले व त्यांस डॅन्यूब नदीच्या पश्चिमेकडील सध्यां हंगेरींत अन्तर्भूत होणारा पॅनोनिया हा प्रदेश वसाहतीकरितां देण्यांत आला. या व्हँडाल लोकांच्या कांहीं लिजन्स बनविण्यांत आल्या. परंतु त्यांचे अधिकारी व्हँडाल लोकच होते व हे व्हँडाल लोक कधींच पूर्णपणें रोमन बनले नाहींत. कॉन्स्टंटाइन बादशहा साम्राज्याची पुनर्घटना करीत असताच मृत्यु पावला. त्याच्या मागें व्हिसीगॉथ लोकांनीं कॉन्स्टांटिनोपलवर चाल केली तेव्हां व्हॅलेन्स या बादशहानें त्यांस वरील व्हँडाल लोकांप्रमाणेंच सध्यांच्या बल्गेरिया प्रांतांत वसाहत करण्यास जागा दिली. ते जरी वरून दिसावयास रोमन बादशहाचे प्रजाजन होते तरी ते वास्तविक विजेते होते. यानंतर थिओडोशिअस या बादशहाच्या कारकीर्दींत (३७९–३९५) इटली व पॅनोनिया या प्रदेशांतील सैन्यावर स्टिलिको नांवाचा व्हँडाल सेनापति होता व बाल्कनमधील गॉथ

सैन्यावर अलेरिक हा गॉथ सेनापति होता. हा बादशहा मेल्यानंतर त्याचे दोन पुत्र होते; या दोघांपैकीं एकेकास वरील दोन सेनापतींनीं हाताशीं धरून ॲलेरिक यानें आर्केडियस यास कॉन्स्टांटिनोपल येथें बादशहा केलें व स्टिलिकोनें ओनोरियस यास इटलीमध्यें बादशहा केलें व या दोघांचें युद्ध जुंपलें. अखेरीस ॲलेरिक यानें इटलीवर स्वारी करून सन ४१० मध्यें रोम शहर जिंकलें.

## असंस्कृत लोकांचें आक्रमण—

पांचव्या शतकाच्या पूर्वार्धांत सर्व रोमन साम्राज्यभर एवढेंच नव्हे तर बहुतेक जगाच्या पाठीवर सर्वत्र रानटी टोळ्या धुमाकूळ घालीत होत्या. फ्रान्स, स्पेन, इटली व बाल्कन द्वीपकल्प यांमधील साम्राज्यकालीं भरभराटलेलीं बहुतेक शहरें मोडकळीस आलीं होतीं. ठिकठिकाणीं स्थानिक अधिकारी सत्ता बळकावून बसले होते. ख्रिस्ती मंदिरांत पुरोहित असत तेहि बहुतेक निरक्षर असत. शिक्षणाकडे लक्ष नसे व सर्वत्र एक प्रकारच्या भीतीचें व देवभोळेपणाचें साम्राज्य पसरलेलें होतें. मात्र बहुतेक ठिकाणीं, जेथें लुटारूंनीं नाश केला नाहीं अशा ठिकाणीं, कांहीं ग्रंथ, चित्रें, पुतळे वगैरे जतन करून ठेवलेले असत.

शहरांबाहेरील जानपद भागांतील आयुष्यक्रमहि दैन्यावस्थेस पोंचला होता. अनेक भागांत युद्धें व रोगांच्या साथी यांनीं सर्व प्रदेश वैराण बनून गेला होता. सर्व रस्त्यांवर व रस्त्यांवरील जंगलांतून चोर व लुटारू यांचा दंगा चालू असे. अशा प्रदेशांतून उत्तरेकडील रानटी टोळ्यांनीं जेव्हां चाल केली तेव्हां त्यांस मार्गांत बहुतेक कोठेंच अडथळा झाला नाहीं. त्यांचे पुढारी ठिकठिकाणीं रोमन पदव्या धारण करून राजे बनले. त्यांतले कांहीं अर्धवट सुधारलेले होते त्यांनीं जिंकलेल्या प्रदेशात शांतता स्थापन करून स्थानिक लोकांशीं ते विवाहादि बंधनांनीं मिसळून गेले व लॅटिन भाषा शिकले. परंतु जूट, ॲंगल, सॅक्सन वगैरे लोकांनीं जिंकलेल्या व व्यापलेल्या प्रदेशांत आपल्याच ट्यूटन भाषांचा प्रसार केला व ते कृषिजीवी असल्यामुळें शहरांत थबकून न राहतां व्यापलेल्या सर्व देशभर पसरले. इतर टोळ्याहि अशाच सर्वत्र पसरून ठिकठिकाणीं स्थायिक झाल्या. उदाहरणार्थ, व्हँडॉल लोक हे प्रथम पूर्व जर्मनींतून बाहेर पडले व पूर्वी सांगितल्याप्रमाणें पॅनोनियामध्यें स्थायिक झाले, तेथून ते सन ४२५ च्या सुमारास स्पेनपर्यंत पसरले. तेथून ते उत्तर आफ्रिकेंत गेले व कार्थेज जिंकून त्यांनीं तेथें एक आरमार बांधलें (४३९). तेथून ते लुटालूट करूं लागले व त्यांनीं सिसिली, कॉर्सिका, सार्डीनिया इत्यादि बेटें व्यापलीं. यांची सत्ता सन ४७७ च्या सुमारास अगदीं कळसास पोंचली. हा सर्व प्रदेश पुन्हा जस्टिनिअन बादशहानें जिंकून घेतला होता. याप्रमाणेंच दक्षिण रशियांतून व्हिसीगॉथ व इतर जर्मन टोळ्यांनीं बाहेर पडून ठिकठिकाणीं संस्थानें व राज्यें स्थापन केलीं.

## मानवभ्रमणाचा क्रम—

ज्याप्रमाणें मध्य आशियाच्या पठारापासून अथवा त्याच्या आसपासच्या मानववसाहतीस अनुकूल असलेल्या हवामानाच्या प्रदेशापासून आतांपर्यंत निरनिराळे मानवसमूह इतस्ततः भ्रमण करीत. या भूगोलाच्या पाठीवर निरनिराळ्या कालांत व निरनिराळ्या स्थलीं वसाहती करून राहिल्याचें व त्यांनीं आतांपर्यंत आपल्या निरनिराळ्या संस्कृतींचा विकास केल्याचें वर्णन आपण दिलें आहे व त्यांत ईजिप्ती व सेमिटिक शाखेपैकीं सुमेरी, असुरी, बाबिलोनी, हिब्रू, फिनिशिअन व नंतर आर्यशाखेपैकीं हिटाइट, ग्रीक, रोमन वगैरे लोकांनीं व पूर्वेकडे इराणी व भारतीय लोकांनीं वसाहती स्थापन करून आपल्या संस्कृतीचा विकास कसा केला याचें वर्णन सारांशरूपानें मागील भागांत केलें आहे त्याप्रमाणेंच या मानवजन्मभूमींतून अथवा ज्यास मनुष्यजातीचा पाळणा म्हणतात अशा या मध्य आशियाच्या पठाराच्या आसपासच्या भागांतून पीतवर्णी लोक चीन देशांत स्थापित होऊन तेथें त्यांनीं आपली एक स्वतंत्र संस्कृति निर्माण केली हेंहि सांगितलें आहे. त्याप्रमाणेंच या वेळीं मंगोल नांवाचे लोक या भूभागांतून इतस्ततः नवीन प्रदेशाच्या शोधार्थ भ्रमण करूं लागले होते. हा मूळचा मानवजन्मभूमीचा प्रदेश असा आहे कीं त्याच्या स्वरूपांत व हवामानांत कांहीं कालानंतर फार मोठा फरक होतो व दीर्घकाल अवर्षण वगैरे पडून एका काळीं संपन्न व समृद्ध असलेला भूभाग अगदीं रुक्ष व मानवजातीच्या जीवनास अगदीं अयोग्य असा होऊन जातो. तसेंच कालांतरानें कोणत्याहि मानव समाजाची इतकी वाढ होत जाते कीं, त्यांची मूळ भूमि त्यांच्या भरणपोषणास अपुरी पडूं लागते. त्यामुळें त्यास आपल्या मूळ प्रदेशांतून बाहेर पडून भरणपोषणाकरितां इतस्त्र नवीन नवीन प्रदेश पाहावेच लागतात. अशा तऱ्हेनें या भूभागांतून कांहीं कालांतरानें नवीन नवीन लोक पूर्वी वसाहत केलेल्या व कृषि आदिकरून समृद्ध झालेल्या प्रदेशावर आक्रमण करूं लागतात. आतांपर्यंतच्या सर्व आक्रमणांचा इतिहास पाहिला तर असें दिसून येतें कीं, स्थायिक झालेले व संस्कृतीनें सुधारलेले व शांतताप्रिय लोक या नवीन आक्रमणास थोपवून धरण्यात असमर्थ होऊन नवीन असंस्कृत लोक त्यांस जिंकून तेथें आपली सत्ता स्थापन करतात.

## मंगोल लोकांचें आक्रमण—

अशाच प्रकारचे एका मंगोल वंशाचे लोक या वेळीं युरोप खंडावर चाल करून आले. यांनीं चीनवर व पूर्वेकडे भरतखंड

वगैरे प्रदेशाकडेहि आक्रमण केलेंच होतें तसेंच ते या वेळीं युरोप-कडे वळले. प्रथम हे मंगोल लोक आर्य अथवा उत्तरदेशीय लोकांच्या पलीकडे होते. त्यांच्यापैकीं एक लॅप नांवाची शाखा पश्चिमेकडे एका प्रदेशात जाऊन स्थायिक झाली होती व त्या प्रदेशास त्या लोकावरूनच लॅपलँड असें नाव पडलें होतें. परंतु त्यांचा संबंध इतर मानवजातीशीं अथवा युरोप किंवा इतर देशांच्या इतिहासाशीं आतांपर्यंत आलेला नव्हता. परंतु आतां चीनमध्यें हानवंशाच्या सत्तेखालीं एक बलिष्ठ साम्राज्य स्थापन झालें होतें. त्यामुळें तिकडचा रस्ता त्यांस बंद झाला होता. त्यांच्या प्रदेशांत अवर्षण पडून प्रदेश वैराण झाला होता व लोकसंख्या तर सारखी वाढत होती, त्यामुळें अर्थातच या मंगोल लोकांस पश्चिमेकडे भ्रमण करण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. याच वेळीं रोमन साम्राज्यहि आंतून पोखरून निघालें होतें यामुळें हा प्रदेश या भ्रमणवृत्ति लोकांच्या आक्रमणास अगदीं अनुकूल परिस्थितींत होता.

## सुसंस्कृत व असंस्कृत लोकांचा संघर्ष—

खिस्ती शकाच्या पहिल्या शतकांतच हूण लोकांनीं युरोपांतील रशिया देश व्यापला होता. परंतु नवव्या पांचव्या शतकापर्यंत ते फारसे प्रबल झाले नव्हते. पांचव्या शतकात त्यांनीं बहुतेक सर्व तत्कालीन ज्ञात प्रदेशांत धुमाकूळ घातला. हिंदुस्थानावर गुप्त कालानंतर त्यांनीं कसें आक्रमण केलें हें आपण पाहिलेंच आहे. इटलीमध्यें प्रथम व्हँडॉल सेनापति स्टिलिको याच्या सैन्यांत हे आढळूं लागले. पुढें व्हँडॉल लोक पॅनोनियांतून फ्रान्स वगैरे बाजूस गेल्यावर हे पॅनोनिया व्यापून बसले. पांचव्या शतकाच्या पूर्वार्धांत या हूणांचा पुढारी ॲटिला या नावाचा एक पराक्रमी पुरुष होता. याची सत्ता हूण लोकांशिवाय कांहीं जर्मन टोळ्यां-वरहि चालत होती. त्याचें राज्य ऱ्हाईन नदीपासून मध्य आशियांतील मैदानापर्यंत पसरलें होतें. चीनच्या दरबारांत त्याचा वकील असे. त्याची छावणी डॅन्यूब नदीच्या पूर्वेस असे. पण ती अर्थातच पूर्वीच्या काळच्या सैन्याच्या तळाप्रमाणें तंबू व झोंपड्या आणि मेढेकोट याची असे. या ठिकाणीं कॉन्स्टँटिनोपलहून प्रिस्कस या नांवाचा एक वकील आला होता त्यानें या छावणीचें वर्णन दिलें आहे त्यावरून आर्य लोक भ्रमणवृत्तींत व असंस्कृत स्थितींत असतांना जसे राहत असत, त्याच स्थितींत हे लोक होते असें दिसतें. यावरून सामान्यतः मानवजातीचा इतिहास म्हणजे एकाच प्रकारच्या गोष्टींची थोड्या फार फरकानें पुनरा-वृत्तीच होय ही गोष्ट स्पष्ट होते. अर्थात् यावरून हेहि लोक पुढें आर्यांप्रमाणेंच सुसंस्कृत होऊन जगाच्या संस्कृतींत त्यांनीं भर घातली असेल अशी अपेक्षा होणें स्वाभाविक आहे. परंतु आर्य लोक, भारतीय अथवा ग्रीक, हे स्वभावतः भ्रमणवृत्ति नसून कृषि-गोपवृत्ति होते. योग्य अशी भूमि सांपडल्यावर ते लागलीच कृषि व पशुसंवर्धन करावयास लागून स्थायिक होत व संस्कृतीची जोपासना करीत. ही गोष्ट आपणांस इराणी, भारतीय व ग्रीक लोकांवरून स्पष्ट दिसून येते. पण हे हूण लोक भ्रमणवृत्तीच्या पलीकडे गेलेच नाहींत. ॲटिलानें थिओडोशिअसच्या कारकीर्दींत सर्वत्र धुमाकूळ घालून कॉन्स्टँटिनोपलपर्यंत दंगल चालविली. त्यानें बालकन प्रदेशांतील ७० शहरें उद्ध्वस्त केलीं. अखेरीस बादशहानें द्रव्य देऊन त्याचा उपद्रव बंद केला व एकदां तर त्यावर मारे-करी घातले. सन ४५१ मध्यें ॲटिलानें गॉल देशावर स्वारी केली व त्याच्या उत्तर भागांतील सर्व शहरें लुटून फस्त केलीं. अखेरीस बादशहाचीं सैन्यें, व्हिसीगॉथ लोक व फ्रँक लोक या सर्वांनीं एक-जुटीनें त्यावर हल्ला केला व त्याचा ट्रॉयेस येथें पूर्ण मोड केला. तथापि पुढील वर्षी पुन्हां येऊन त्यानें ॲकिला, पदुआ व मिलान हीं शहरें लुटलीं. यावेळीं पदुआ वगैरे शहरांतून जे लोक पळून गेले त्यांनीं व्हेनिस शहराचा पाया घातला व पुढें हें मध्ययुगांत फार मोठें व्यापारी शहर बनलें. सन ४५३ मध्यें ॲटिला आपल्या एका विवाहाच्या मेजवानीनंतर एकाएकीं मरण पावला व त्याचे अनु-यायी हूण लोक यांची पांगापांग होऊन ते बहुतेक इतर आर्य-वंशी लोकांत मिसळून गेले. त्यामुळें त्यांचें यापुढें इतिहासांत नाव आढळत नाहीं. परंतु त्यांनीं केलेल्या विध्वंसामुळें लॅटिन रोमन साम्राज्याची बहुतेक इतिश्री झाली. यानंतर वीस वर्षांत रोममध्यें दहा बादशहा एकामागून एक होऊन गेले. हे बहुतेक व्हँडॉल व इतर सेनापतींच्या हातांतील बाहुलीं असत. अखेरीस सन ४५५ मध्यें कार्थेज येथून आलेल्या व्हँडॉल लोकांनीं रोम शहर लुटून फस्त केलें. सन ४७६ मध्यें रोम्युलस ऑगस्टस नांवाच्या नामधारी बादशहास ओडोॲसर या रानटी लोकांच्या पुढाऱ्यानें पराजित करून पश्चिम रोमन साम्राज्य नष्ट झालें असें कॉन्स्टँटिनोपल येथील दरबारास कळविलें. सन ४९३ मध्यें थिओडोरिक गॉथ हा रोमचा राजा झाला.

## युरोपांतील तमोयुग—

या काळांत मध्य व पश्चिम युरोपमध्यें सर्वत्र बेबंदशाही माज-लेली होती. अनेक अर्धसंस्कृत लोकांचे पुढारी ठिकठिकाणीं आपणास राजे अथवा ड्यूक वगैरे म्हणवून घेत होते. हे सर्व बाह्यतः रोमन बादशहाचे अंकित पण वस्तुतः स्वतंत्र होते. असे हजारों स्वतंत्र जवळ जवळ लुटारू लोक राजे बनले होते. गॉल, स्पेन, इटली व डेशिया या देशांत लॅटिन भाषा प्रचलित होती, परंतु तिच्याहि स्थानिक रूपांत फरक पडत चालला होता आणि ब्रिटन, व ऱ्हाइनच्या पूर्वेकडील प्रदेशांत जर्मन गटांतील बोहेमिअन व स्लाव्होनिक अथवा चेक भाषा प्रचारांत आल्या होत्या. कांहीं

उच्चदर्जाचे पुरोहित व सुशिक्षित लोक लॅटिन भाषा वाचूं व लिहूं शकत. परंतु सामान्य लोक देश्य भाषा वापरीत. सर्व सत्ता व मालमत्ता जबरदस्त लोकांच्या हातांत गेली होती व हे बलिष्ठ लोक किल्ले बांधून त्यांत राहूं लागले होते व रस्ते नादुरुस्त होत चालले होते. सहाव्या शतकाच्या प्रारंभी सर्व पश्चिम देशांतील प्रदेशाचे तुकडे तुकडे पडत चालले होते व सर्वत्र अंधकार व अज्ञान यांचें साम्राज्य माजलें होतें. या वेळीं कांहीं मठवासी व धर्मप्रचारक यांनीं जर लॅटिन विद्या कायम ठेवली नसती तर या सर्व ज्ञानाचा पूर्ण लोप झाला असता. परंतु कॅथॉलिक चर्च संप्रदायांतील पुरोहित व धर्मप्रचारक यांनीं आपले ग्रंथ व वाङ्मय जतन करून ठेवले व त्यांचा अभ्यास चालू ठेवला व आपली परंपरा कायम ठेवली. एवढेंच नव्हे तर एकीकडे रोमन साम्राज्य मोडकळीस येत होतें व त्यांतील सामर्थ्य नष्ट होत होतें अशा वेळींच या ख्रिस्ती धर्मप्रचारकांनीं व मिशनऱ्यांनीं आपलें संप्रदायप्रसाराचें काम अविरत चालू ठेवलें होतें. त्यांनीं अनेक लोकांत विशेषतः त्यांस जिंकणाऱ्या व रोमन साम्राज्य नष्ट करणाऱ्या रानटी व असंस्कृत लोकांतच आपलें संप्रदाय-प्रसाराचें कार्य निष्ठेनें केल्यामुळे या संप्रदायाचा प्रसार एकसारखा वाढत होता व अखेरीस ज्याप्रमाणें ग्रीक संस्कृतीनें विजेत्या रोमन लोकांस जिंकलें त्याप्रमाणेंच या ख्रिस्ती कॅथॉलिक धर्मोपदेशकांनींहि आपल्या विजेत्यांस अखेरीस जिंकलें व आपले अनुयायी बनविलें. ॲटिलानें जेव्हां रोमवर चाल केली तेव्हां तेथील पॅट्रिआर्चनेंच जें काम एखाद्या मोठ्या सैन्याकडूनहि होणें शक्य नव्हतें तें म्हणजे त्याला मागें परतविणें हें आपल्या केवळ शब्दांनीं केलें. यांतच ख्रिस्ती संप्रदायाचा तत्कालीन विजेत्यांवरचा विजय प्रतीत होतो.

### पूर्व रोमन साम्राज्य—

पश्चिमेकडील रोमन साम्राज्य नष्ट झालें तरी पूर्वेकडील साम्राज्यानें त्यापेक्षां थोडी अधिक चिकाटी दाखविली. पांचव्या शतकांतील धामधुमींतूनहि तें जीव धरून राहिलें. ॲटिलानें दुसरा थिओडोशिअस याला पुष्कळ त्रास दिला; तरी कॉन्स्टांटिनोपल शहर अखेरपर्यंत तग धरून राहिलें. न्यूबिअन लोकांनीं ईजिप्तवर स्वारी करून दक्षिणेकडचा प्रदेश काबीज केला, पण अलेक्झांड्रिया शहर शाबूत व भरभराटींतच राहिलें. आशिया मायनरवर ससन राजांनीं स्वाऱ्या केल्या व त्यांचा बादशहाशीं एकसारखा झगडा चालू होता, त्याचें वर्णन पूर्वी केलेंच आहे तथापि आशिया मायनरहि साम्राज्यांत टिकून राहिला. सहाव्या शतकांत पश्चिमेकडे जरी अगदीं अंधकार वाटत होता तरी पूर्वेकडील ग्रीक साम्राज्यानें या काळांत जरा उज्ज्वल केल्याचें दिसतें. त्या वेळीं गादीवर असलेला पहिला जस्टिनियन (५२७–५६५) हा कर्तबगार होता; तसेंच त्याची राणी थिओडोरा ही प्रथम नटी होती तरी मोठी कर्तबगार स्त्री होती. जस्टीनियननें व्हँडॉल लोकांपासून उत्तर आफ्रिका व गॉथ लोकांपासून इटली जिंकून घेतली व स्पेनचा दक्षिण भागहि काबीज केला. त्यानें एक विद्यापीठ स्थापन केलें व सेंट सोफाया नांवाचें एक मोठें ख्रिस्ती मंदिर बांधलें. तसेंच रोमन कायद्याची संहिता बनविली. परंतु आपल्या प्रतिपक्षांचा नाश करण्याकरितां प्लेटोची ॲकॅडमी ही एक हजार वर्षें चाललेली पाठशाळा बंद केली.

### स्वतंत्र विचारांची वाढ खुंटण्याचें कारण—

ख्रिस्ती शकाच्या तिसऱ्या शतकापासून या पूर्वेकडील साम्राज्याबरोबर इराणच्या साम्राज्याची स्पर्धा चालू होती. त्यामुळें ईजिप्त, आशिया मायनर व सीरिया यामध्यें सारखा धुमाकूळ व अस्थिरता चालू राहिली. पहिल्या शतकांत या प्रदेशांतील संस्कृति उच्च दर्जास पोंचली होती व ते देश संपन्न होते, परंतु सैन्याच्या एकसारख्या वर्दळीनें व लुटमारीनें या प्रदेशांतील सर्व शहरांचा विध्वंस झाला व शेतकरी लोकांची दैना झाली. फारसी व बायझंटाइन साम्राज्यांमधील द्वंद्वांचें वर्णन पूर्वी केलेंच आहे. यामध्यें शास्त्र, राजनीति वगैरे सर्व विद्यांचा लोप होत गेला. अथेन्स येथील अखेरच्या तत्त्वज्ञान्यांनीं, जरी त्यांस विशेष ज्ञान नसलें तरी, पूर्वीच्या त्यांच्या विद्वान् शिक्षकांचे ग्रंथ जतन करून ठेवले होते. परंतु अथेन्स येथील विद्यापीठ बंद झाल्यावर स्वतंत्रपणें धाष्टर्यानें विचार करणारा अथवा पुढें मांडणारा कोणी राहिला नाहीं. जो विद्वान् वर्ग पूर्वी दिसत असे तो सामाजिक व राजकीय वैराग्यामुळें देशोधडीस लागून नष्ट झाला. या वेळीं इराण व बायझांटियम या दोन्ही ठिकाणीं जे संप्रदाय प्रचलित होते ते आपल्या विरोधकांशीं निर्घृण वर्तन करीत असत हीहि गोष्ट स्वतंत्र विचारास मारक झाली. हीं दोन्ही साम्राज्यें विशिष्ट संप्रदायांचा पुरस्कार करणारीं असल्यामुळें स्वतंत्र विचारास वाव राहिला नव्हता. आतांपर्यंतचीं प्राचीन साम्राज्येंहि धर्मांधिष्ठितच होतीं हें आपण वर पाहिलेंच आहे. त्यांत देवता व राजदेवता यांस मान असे. अलेक्झांडर, सीझर यांस देव मानण्यांत येत असून त्यांचीं देवळें व स्थंडिलें स्थापन केलेलीं असत व रोमन साम्राज्यास निष्ठा दाखविणें म्हणजे या देवांपुढें धूप जाळणें हें आवश्यक होतें. परंतु हे धर्म अथवा संप्रदाय थोडेसे वरपांगी असत. त्यांचा मनावर ताबा नसे. त्या वेळीं हे बाह्य उपचार केले म्हणजे विचारांत बंधन नसे. परंतु ख्रिस्ती संप्रदायाचा कटाक्ष जनतेच्या मतांवर व विचारांवर बसूं लागला. यामुळें निरनिराळ्या मतमतांतरांत कडाक्याचे वाद व विरोध निर्माण झाले. सनातनी अथवा प्रचलित मताविरुद्ध मत बाळगणें हाहि मोठा दोष व पातक समजण्यांत

येऊं लागलें. ससन बादशहा पहिला अर्देशीर व कॉन्स्टंटाइन या दोघांनींहि आपली सत्ता दृढ करण्याकरितां प्रचलित संप्रदायांचा उपयोग करून लोकांच्या विचारांवर व मतांवर ताबा मिळविण्याचा प्रयत्न केला व दोन्ही साम्राज्यांत भिन्न मतप्रदर्शकांचा छळ होऊं लागला होता. अर्देशीर हा झरथुष्ट्र संप्रदायाचा कैवारी असून त्यानें ख्रिस्ती लोकांचा छळ केला व मणिसंप्रदायाच्या संस्थापकास देहदंड दिला. तसेंच कान्स्टँटिनोपल येथें ख्रिस्ती पाखंडी लोकांचा व मणिसंप्रदायी लोकांचा छळ चालू होता. अर्थात् शास्त्रीय ज्ञानाच्या वाढीस जें वैचारिक व मानसिक स्वातंत्र्य अवश्य असतें तें नष्ट झाल्यामुळें शास्त्रीय ज्ञानाची वाढ अजीबात खुंटली.

ससन व बायझंटाइन साम्राज्यांचे सत्ताधीश रानटी लोकांशीं चाललेल्या युद्धापासून फुरसद मिळाली कीं आपसांत लढून मुलूख वैराण करण्याचें कार्य करीत असत. वास्तविक या दोघांच्या सत्ता एकत्र होऊनहि नवीन दमाच्या रानटी टोळ्यांना तोंड देणें त्यांस कठिण होतें. तुर्क व तार्तर लोक हेहि या साम्राज्यांच्या यादवींत एकदां एकाचा तर एकदां दुसऱ्याचा पक्ष घेत. सहाव्या शतकांत जस्टीनियन व खुश्रू पहिला आणि सातव्या शतकांत हेराक्लिअस आणि खुश्रू दुसरा हे परस्पर प्रतिस्पर्धी होते. यांच्या युद्धांची माहिती पूर्वी दिलीच आहे. परंतु या बादशहांस पुढें येणाऱ्या भावी खळबळीची अंधुकहि कल्पना नव्हती.

## पश्चिमेकडील राज्यांचा ऱ्हास व चीनचा उत्कर्ष—

याच सुमारास म्हणजे पांचव्या, सहाव्या, सातव्या व आठव्या शतकांत मंगोल लोक हळूहळू पश्चिमेकडे आक्रमण करीत होते. ॲटिलाचे हूण लोक हे केवळ यांचे पूर्वगामी होते. हे मंगोल लोक हळूहळू फिनलंड, एस्थोनिया व हंगेरी या प्रदेशांत स्थायिक झाले व अद्यापहि त्यांचे वंशज तुर्की भाषा बोलतात. बल्गेरियन लोक हेहि मूळचे तुर्कच होत, परंतु त्यांची मूळ भाषा जाऊन तिच्या जागीं त्यांनीं आर्यकुलांतील भाषेचा स्वीकार केला आहे. ज्याप्रमाणें आर्य लोकांनीं पूर्वीच्या सेमेटिक व ईजिअन संस्कृतींवर आक्रमण करून आपल्या संस्कृतीचा प्रसार केला, तेंच कार्य आतां हे मंगोली लोक करीत होते. मध्य आशियांत पश्चिम तुर्कस्तानांत तुर्की लोक स्थायिक होऊन कांहींनीं इराणी सैन्यांत व साम्राज्यांत प्रवेश केला होता. पार्थिअन लोक आतां इराणी लोकांत पूर्णपणें मिसळून नामशेष झाले होते. आतां मंगोल लोक तेवढेच भ्रमणवृत्ती राहिले होते व हळूहळू या मंगोल अथवा तुर्की लोकांनीं आपली सत्ता चीनपासून कास्पिअन समुद्रापर्यंत पसरली. याच लोकांनीं चीनमधील हान घराण्याची सत्ता नष्ट केली, परंतु सहाव्या शतकांत चिनी लोकांनीं पुन्हां नेटाचा प्रयत्न करून यांची सत्ता झुगारून देऊन सुई घराण्याची स्थापना केली. त्यानंतर हे[illegible] अस बादशहा असतांना चीनमध्यें तंग घराणें राज्य करी[illegible] या घराण्याच्या कारकीर्दींत चीन देश संपन्नावस्थेंत [illegible] घराण्यांची माहिती पूर्वी दिलीच आहे. सातव्या, [illegible] नवव्या शतकांत चीनचें साम्राज्य हें सर्व जगांतील [illegible] मानानें अधिक सुसंस्कृत, संपन्न व भरभराट[illegible] घराण्यानें चीनची सत्ता उत्तरेकडे तर सुई[illegible] त्यांची संस्कृति दक्षिणेकडे पसरवून आजच्या [illegible] वाढ केली. मध्य आशियांतहि त्यांची सत्त[illegible] तुर्की टोळ्या त्यांच्या अंकित झाल्या होत[illegible]

या कालांत चीनमध्यें बौद्ध संप्रदा[illegible] काव्यें यांची खूपच वाढ झाली होत[illegible] कला वगैरे नवीन नवीन शोध चीनमध्यें [illegible] पूर्वी सांगितलीच आहे. ज्या कालांत पश्चिमेकडे अगदीं [illegible] होता त्या कालांत पूर्वेकडे ज्ञानाचा सूर्य तळपत होता हें या कालाच्या इतिहासावरून स्पष्ट होतें.

भरतखंडामध्येंहि चंद्रगुप्त मौर्यानंतर जीं घराणीं होऊन गेलीं, त्यांतल्या त्यांत विशेषतः गुप्त घराणें व हर्षवर्धन यांनीं भरतखंडांत ज्ञानाचा विकास अनेक अंगांनीं केलेला आपण पाहिलाच आहे. मध्यंतरीं जरी शक, हूण वगैरे लोकांनीं कांहींसें विध्वंसाचें कार्य केलें तरी इसवी सनाच्या प्रारंभींच्या अशोक, चंद्रगुप्त, समुद्रगुप्त, विक्रमादित्य, हर्ष वगैरे राजांनीं भारतीय संस्कृतीचें संवर्धन अनेक अंगांनीं कसें केलें व त्या वेळीं विद्या, कला, व्यापार, समुद्रपर्यटन, वसाहतीकरण वगैरे अनेक गोष्टींमध्यें भरतखंड कसें अग्रेसर होतें याचें वर्णन गेल्या विभागांत केलेंच आहे.

याप्रमाणें सातव्या शतकाच्या आरंभीं पश्चिम यूरोपमध्यें सर्वत्र बेबंदशाही व अंदाधुंदी माजली असून सर्वत्र अज्ञानांधकाराचें राज्य पसरलें होतें. पूर्वेकडील साम्राज्य व इराणी साम्राज्य यांत युद्धें चालू होतीं. भरतखंडांतहि प्रबळ अशी सत्ता नसून सर्वत्र लहान लहान राज्यें पसरलीं होतीं. फक्त चीन देश काय तो आपल्या वैभवाच्या शिखरावर आरूढ झालेला असून संपन्न अवस्थेंत होता. अशा वेळीं मध्य आशियांतून मंगोल लोकांचे हल्ले चारी दिशांनीं सुरू असून ते सर्व बाजूंनीं भ्रमण करीत व प्रदेश आक्रमण करीत चालले होते. अशा वेळीं साहजिकच आतां सर्वत्र मंगोल लोकांचा अमल सुरू होणार असें वाटणें स्वाभाविक होतें व तसा तो सर्व आशिया व कांहीं युरोपचा भाग यांवर सुरू झालाच; पण याच वेळीं सेमिटिक वंशांतील अरब लोकांनीं उचल केली. यांच्या संस्कृतीचें वर्णन पूर्वी एका ठिकाणीं केलेंच आहे.

## अरबांचा उदय—

या अरबांच्या उठावणीचा आरंभ अरबस्तानांत, मक्का या शहरीं एका नवीन संप्रदाय-संस्थापकाच्या मार्फत झाला व या अरबांचें साम्राज्य पूर्वेकडील देशांपासून पश्चिमेकडे स्पेन, आफ्रिका व ईजिप्तपर्यंत पसरलें. या नवीन संप्रदायाचा संस्थापक महंमद हा कुरेशी जमातींतील होता. तो धार्मिक चर्चेत वगैरे भाग घेत असे; पण त्यामध्यें विशेष अशी गोष्ट प्रथम प्रत्ययास आली नव्हती. वयाच्या चाळिसाव्या वर्षी त्यास स्फूर्ति होऊन तो आपणांस परमेश्वराचा अखेरचा प्रेषित म्हणवून घेऊं लागला. आब्राहाम व येशू हे पूर्वीचे प्रवक्ते असून आपणांस त्यांचें कार्य पूर्ण करावयाचें आहे असा तो प्रचार करी. त्यानें आपल्या सर्व-समतेच्या मताचा प्रचार सुरू केला. तो ज्या कुरेशी जमातीमध्यें अंतर्भूत होता त्या जमातील अरब लोकांत अग्रेसरत्व होतें व मक्का येथें जी वार्षिक फार मोठी हाज अथवा जत्रा भरत असे तीपासून त्यांस लाभ होत असे. महंमदानें जेव्हां एकेश्वरी मताचा पुरस्कार सुरू केला व सर्व मंदिरें, व देवता व प्राचीन धार्मिक उत्सव-समारंभ यांच्याविरुद्ध प्रचार सुरू केला तेव्हां कुरेशी लोकांकडून त्यास विरोध झाला. म्हणून तो आपला मित्र व शिष्य अबू बक्र यासह मक्केहून इ. स. ६२२ या वर्षी मदिनेस पळून गेला. तेथें गेल्यावर त्यानें आपले अनुयायी गोळा करून आपल्या प्रतिपक्षावर चढाई करण्यास सुरुवात केली. अखेरीस उत्सव व जत्रा कायम ठेवून नवीन एकेश्वरी मतानें ग्रहण करणें कुरेशी जमातीनें व मक्केच्या लोकांनीं मान्य केल्यावर त्यांच्यांत समजूत झाली व अनेक अरब महंमदाचे अनुयायी बनले. सन ६२९ या वर्षी तो मक्केस परत आला. यापूर्वीच त्यानें त्या वेळचे बादशहा हेरॅक्लिअस, ताइ सुंग व कवध यांस आपल्या नवीन संप्रदायाचा स्वीकार करावा अशीं पत्रें पाठविलीं होतीं. नंतर त्यानें आपली सत्ता प्रथम सर्व अरब-स्तानावर स्थापन केली. त्यानें आपणास परमेश्वरी साक्षात्कारानें प्राप्त झालेल्या आज्ञा म्हणून वरचेवर सांगून कुराण या धर्म-ग्रंथाची रचना केली.

## महंमदी संप्रदाय—

त्याच्या संप्रदायाचें मुख्य तत्त्व एकेश्वरी मत हें होतें. परमेश्वर हा सर्व मनुष्यजातीचा पिता आहे व तो एक आहे. परमेश्वराची उपासना करण्याकरितां देवळें व पुरोहित यांची आवश्यकता नाहीं व कोणत्याहि प्रकारच्या मूर्तिपूजेचा व अवडंबराचा पूर्ण निषेध या गोष्टी त्याच्या संप्रदायांत महत्त्वाच्या होत्या व या सर्वांवर सर्व मानवजात ही एक असून तींत बंधुत्वाचें नातें आहे व वर्ण, उत्पत्ति अथवा समाजांतील स्थान या अथवा यांपैकीं कोणत्याहि कारणानें परमेश्वर त्यांत भेद करीत नाहीं ही त्याची शिकवण सर्व लोकांस आशा व धैर्य देण्यास पुरेशी होती. यामुळें इस्लामी पंथ ही एक प्रबळ शक्ति बनली. महंमदानें इस्लामी पंथामध्यें मानसिक व ध्येयात्मक बीजाचें आरोपण केलें पण त्याचा पहिला वारस उर्फ खलीफ अबू बक्र यानेंच त्यास स्थैर्य व सामर्थ्य प्राप्त करून दिलें. महंमद याच्या मनाची अनेकदां घरसोड होत असे. परंतु अबू बक्र हा नेहमीं त्यास धीर देऊन स्थिर करीत असे व या अबू बक्रनें महंमदाच्या मृत्यूनंतर पहिला खलीफ झाल्याबरोबर सर्व जगांत या अल्लाच्या धर्माचा प्रसार करण्याचा निश्चय केला व तें कार्य केवळ तीन ते चार हजार अरब स्वारांच्या साहाय्यानें आरंभलें व जगांतील सर्व राज्यांस आव्हान दिलें.

यानंतर अरब लोकांनीं एकापाठीमागून एक मोठमोठे विजय संपादन केले. सन ६३४ मध्यें यार्मुक नदीवर त्यांनीं बायझंटाइन सैन्याचा धुव्वा उडविला. लागलीच हेरॅक्लिअस या वृद्ध व जलोदर झालेल्या बादशहाकडून त्यानें जिंकलेले सीरिया, दमास्कस, पाल्मीरा, ॲंटिऑक, जेरुसलेम, वगैरे सारे प्रांत हिसकावून घेतले. या प्रदेशांतील अनेक लोकांनीं इस्लामी धर्माचा स्वीकार केला. यानंतर ६३७ मध्यें करबेला येथील लढाईंत रुस्तुम या बलाढ्य सेनापतीच्या हाताखालीं तीन दिवस लढत असलेल्या इराणी सैन्याचा पूर्ण मोड केला. यापुढें इस्लामी साम्राज्य पश्चिम तुर्कस्तानामध्यें चीन देशापर्यंत पसरलें. ईजिप्तचाहि लवकरच पाडाव झाला व अलेक्झांड्रिया येथील ग्रंथालयाबरोबर तेथील ग्रंथ-लेखनाचा धंदा लयास गेला. यापुढें ही विजयाची लाट उत्तर आफ्रिका व जिब्राल्टर आणि स्पेन या देशांवर पसरली. ७१० मध्यें स्पेन देश आक्रमिला जाऊन ७२० मध्यें पिरिनीज पर्वत गांठण्यांत आला व ७३२ मध्यें फ्रान्स देशाच्या मध्यापर्यंत या विजयी सेना पोंचल्या. परंतु पॉइटिअर्स येथील लढाईंत मोड झाल्यामुळें त्या पिरिनीज पर्वतापर्यंत मागें हटल्या. सन ६७२ व ७१८ या वर्षी कॉन्स्टॅंटिनोपल शहर घेण्याचेहि प्रयत्न करण्यांत आले पण त्यांस यश आलें नाहीं.

## अरबांचें संस्कृतिग्रहण व मिश्रण—

अरब लोक हे राजकारणी नसून त्यांस राजनीतीचेंहि फारसें ज्ञान नव्हतें, यामुळें हें दमास्कस येथें राजधानी असलेलें व चीन-पासून स्पेनपर्यंत पसरलेलें साम्राज्य लवकरच भंग पावलें. प्रारंभा-पासून यांत मतमतांतरें होतींच व त्यांच्या बौद्धिक सामर्थ्याची वाढ ग्रीक लोकांप्रमाणें हळूहळू व स्थिरतेनें होत गेली नसून ती एक उर्मी होती. इराणमध्यें यांचा संबंध मणिसंप्रदाय, झरथुष्ट्र-संप्रदाय व ख्रिस्तीसंप्रदाय यांच्याशींच आला, पण ग्रीसमध्यें ग्रीक शास्त्रीय ज्ञान ग्रीक मार्फतच केवळ नव्हे तर सिरियन

भाषेंतहि या वेळीं भाषांतररूपानें प्रचलित होतें. ईजिप्तमध्येंहि ग्रीक भाषेंतील बरेच शास्त्रीय ग्रंथ प्रचलित होते. तसेंच बहुतेक सर्वत्र व विशेषतः स्पेनमध्यें यहुदी परंपरागत ग्रंथ प्रचारांत होते. मध्य आशियांत बौद्ध संप्रदायाचा प्रसार झालेला होता व चिनी संस्कृतीहि उच्च दर्जास पोंचली होती. भरतखंडांत भारतीय संस्कृतीचीहि पुष्कळ वाढ झाली होती. या कारणांमुळें अरब लोकांवर या सर्व गोष्टींचा परिणाम झाला व त्यांनीं निरनिराळ्या लोकांपासून अनेक प्रकारचें ज्ञान व कला यांचें ग्रहण केलें. चिनी लोकांपासून त्यांनीं कागद करण्याची कला व ग्रंथ मुद्रणाची कला उचलली तसेंच किमया व बंदुकीची दारू या गोष्टी घेतल्या. भारतीय लोकांपासून गणित, ज्योतिष, वैद्यक व तत्त्वज्ञान या विषयांचें ज्ञान ग्रहण केलें. अरबलोकांमध्यें प्रथमचें सनातनीत्व अथवा कठोर सांप्रदायिकता फारशी राहिली नाहीं व कुराणांतच सर्व ज्ञान सांठवलेलें आहे ही कल्पनाहि त्यांनीं सोडून देऊन ज्ञानाची सर्व दिशांनीं उपासना केली. आठव्या शतकांत अब्बासी खलीफांच्या कारकीर्दींत सर्व अरबी मुलखांत शैक्षणिक संस्था स्थापन झालेल्या होत्या. बगदादचा खलीफा हरून अल रशीद व त्याचा पुत्र अल मामून यांनीं भरतखंडांतून विद्वान् लोकांस पाचारण करून आपल्या दरबारांत ठेवून घेतलें होतें. नवव्या शतकांत स्पेनमधील कार्डोवा येथील विद्वान् लोकांचा कैरो, बगदाद, बुखारा व समरकंद येथील विद्वानांशीं विचारविनिमय चालू होता. यहुदी व अरब यांचें विद्यासंवर्धनाच्या कामांत बरेच साहाय्य व सहकार्य चालू होतें व ही ज्ञानार्जनाची परंपरा या लोकांत तेराव्या शतकापर्यंत चालू होती. ग्रीक लोकांनीं जें ज्ञान संपादन केलें होतें त्याची उजळणी या सेमिटिक लोकांनीं चालविली होती. ॲरिस्टॉटलच्या तत्त्वज्ञानाचा आतां पुन्हा अभ्यास सुरू झाला होता. या काळांत गणित, वैद्यक व पदार्थविज्ञान या शास्त्रांत पुष्कळ प्रगति करण्यांत आली होती. रोमन आंकडे टाकून देऊन भारतीय दशमानपद्धति व आंकडे यांचा स्वीकार करण्यांत आला. बीजगणित, भूमिति या शास्त्रांचें ज्ञान भारतीय व चिनी लोकांकडून मिळविण्यांत आलें. विशेषतः भारतीय तत्त्वज्ञानाचा फ्रान्स, इटली व इतर पाश्चात्य देश यांवर फार परिणाम झाला. किमयेच्या प्रसारामुळें रसायनशास्त्राचा उगम झाला व अनेक मिश्र धातु, अर्क, आसवें, दुर्बिणीच्या कांचा वगैरे बनविण्याच्या कला वाढीस लागल्या. या कालांत परीसाचा व अमृताचा शोध करण्याचें वेड फार लोकांस लागलें होतें. त्या वस्तू जरी प्रत्यक्ष सांपडल्या नाहींत तरी त्या श्रमामुळें रसायनशास्त्राची मात्र प्रगति बरीच झाली व प्रयोगपद्धतीस महत्त्व प्राप्त झालें.

## उमरावशाही अथवा सरंजामी पद्धति—

सहाव्या शतकाच्या आरंभीं पश्चिम युरोपमध्यें कोणतीहि प्रबल अशी सत्ता अथवा राज्य नव्हतें. सर्वत्र लहान लहान राज्यें पसरलेलीं होतीं. त्यामुळें सर्वत्र अस्थिरता पसरलेली होती. या लहान लहान राज्यांमध्यें परस्पर संरक्षणाकरितां एक प्रकारचें सहकार्य व्हावयास लागलें व यांतूनच 'फ्यूडल सिस्टिम' अथवा सरंजामी पद्धति अथवा उमरावशाहीचा जन्म झाला. या पद्धतीचा परिणाम युरोपच्या सामाजिक व राजकीय परिस्थितीवर फार महत्त्वाचा घडून आला व तिचे अवशेष अद्यापहि कांहीं ठिकाणीं आढळून येतात. या वेळीं सर्वत्र अशांतता माजलेली असल्यामुळें प्रत्येक व्यक्तीस आपल्या संरक्षणाची कांहीं तरी सोय पाहणें अवश्य होतें. याकरितां लहानसहान शेतकरी व इतर लोक आपल्या संरक्षणाकरितां आपल्या स्वातंत्र्याचा अथवा श्रमाचा कांहीं भाग देण्यास तयार असत. अर्थातच हा लहान शेतकरी एखाद्या बलिष्ठ सत्ताधाऱ्याकडून संरक्षण मिळण्याची अपेक्षा करून त्याची मदत मागत असे व त्याकरितां त्याच्याकडे लष्करी नोकरी करावयास व त्यास आपल्या उत्पन्नांतील कांहीं वांटा द्यावयास तयार असे. याच्या बदल्यांत त्याचें व त्याच्या मालमत्तेचें आणि स्थावर जमीनजुमल्याचें संरक्षण होत असे. असा एखादा उमराव त्यापेक्षां अधिक बलिष्ठ अथवा वरिष्ठ उमरावाची अधिसत्ता पत्करीत असे. अशा रीतीनें एखाद्या मोठ्या उमरावाची सत्ता बऱ्याच मोठ्या प्रदेशावर चालत असे. कांहीं शहरें व मोठमोठे मठहि आपल्या संरक्षणाकरितां त्याचे अंकित होत असत. या गोष्टी कांहीं ठिकाणीं खुषीनें तर कित्येक प्रसंगीं जबरदस्तीनेंहि घडून येत असत. अशा रीतीनें कांहीं सत्तेचीं केन्द्रें व त्यांच्या आसपास सत्ताधिष्ठित लोक व शहरें असे ठिकठिकाणीं जमाव जमून एक प्रकारची पद्धति व व्यवस्था अमलांत आली. यांतलींच कांहीं सत्तेचीं केन्द्रें राज्यें या स्वरूपास पोंचलीं. अशा रीतीनें सहाव्या शतकाच्या प्रारंभींच सध्यांचा फ्रान्स देश व नेदर्लंड्स या प्रदेशांत क्लॉव्हिस याच्या आधिपत्याखालीं एक फ्रँक लोकांचें राज्य अस्तित्वांत आलें होतें. तशींच कांहीं लॉंबर्ड व गॉथिक लोकांचींहि राज्यें बनलीं होतीं. या क्लॉव्हिस राजाच्याच वंशजाचा एक अधिकारी चार्लस मार्टेल यानें सन ७३२ सालीं पॉइटिअर्स येथें महंमदीयांचा पराजय केला होता. या चार्लस मार्टेलनें आपली सत्ता आल्प्स पर्वताच्या उत्तरेकडे पिरिनीज पर्वतापासून डोंगरांपर्यंत स्थापन केली. याचें अनेक फ्रेंच, लॅटिन, उच्च व नीच जर्मन भाषा बोलणाऱ्या उमरावांवर अधिराज्य होतें. याचा पुत्र पेपिन यानें क्लॉव्हिसच्या नाकर्त्या वंशजाची सत्ता पूर्णपणें झुगारून देऊन स्वतन्त्र राज्यपद धारण केलें. याचा नातू शार्लमेन याची सत्ता

इतक्या मोठ्या प्रदेशावर पसरली होती कीं, त्याला पूर्वीच्या रोमन बादशहांप्रमाणें आपणहि बादशहा व्हावें अशी इच्छा झाली व त्यानें इटलीवर स्वारी करून रोम शहर जिंकलें व आपणास सीझर अथवा बादशहा म्हणवून घेतलें. परंतु याच्या सत्तेखालीं असलेल्या प्रदेशांत भिन्न भिन्न सांस्कृतिक थरांतील व भिन्न भिन्न भाषा बोलणारे अनेक लोक असल्यामुळें याचें साम्राज्य एकजीव नव्हतें. उदाहरणार्थ, ऱ्हाइन नदीच्या पश्चिमेकडे असलेल्या बहुतेक जर्मन लोकांनीं लॅटिन भाषेच्या निरनिराळ्या पोटभाषा आत्मसात् केल्यामुळें त्यांची एक स्वतंत्रच व्यावहारिक भाषा बनली. हीच पुढें फ्रेंच या नांवानें वाढीस लागली. याच्या उलट ऱ्हाइन नदीच्या पूर्वेकडील जर्मन लोकांनीं आपली जर्मन भाषा कधींच सोडली नाहीं. यामुळें या पूर्वीच्या एकाच वंशापासून उद्भवलेल्या पण आतां दळणवळण तुटलेल्या व भिन्न भाषा-भाषी बनलेल्या लोकांत फूट पडणें साहजिकच होतें व त्याप्रमाणें शार्लमेन बादशहाच्या मृत्यूनंतर लागलीच ही फूट पडली. कारण फ्रँक लोकांतील रूढीप्रमाणें राजाच्या मुलांमध्यें राज्याची वांटणी करण्याची पद्धति होती. यामुळें शार्लमेनच्या मृत्यूनंतरचा इतिहास सर्व निरनिराळ्या लहान राजांमध्यें प्रमुखत्वासाठीं स्पर्धेनें भरलेला आहे. आज एका राजानें प्रमुख बनावें व उद्यां दुसऱ्यानें त्याचा पाडाव करावा याप्रमाणें हे निरनिराळे राजे, ड्यूक, बिशप व शहरांचे प्रमुख यांत एकसारखे तंटेबखेडे चालले होते व त्यामुळें या जर्मन व फ्रेंच भाषा बोलणाऱ्या लोकांमध्यें एकसारखें वैमनस्य वाढत होतें व आजपर्यंत तें तसेंच चालत व वाढत आहे ही गोष्ट आपणांस दिसून येतच आहे. या काळांत प्रत्येक बादशहा या निरनिराळ्या राजे लोकांकडून निवडण्याचा संप्रदाय होता, पण तो केवळ नाममात्रच होता. त्यामुळें प्रत्येक राजा या नामधारी रोमन बादशाहीचें पद मिळविण्याकरितां, रोम शहराचा ताबा मिळविण्याकरितां व तेथें राज्याभिषेक करून घेण्याकरितां एकसारखा धडपड करीत असलेला आपणांस दिसून येतो.

## पोपच्या सत्तेची वाढ—

याच वेळीं ख्रिस्ती चर्चचे जे अधिकारी होते त्यांची सतत धार्मिक बाबींप्रमाणें इतर ऐहिक गोष्टींतहि या निरनिराळ्या राजांपेक्षां रोम येथील पोपचीच सत्ता वरिष्ठ करण्याची व त्यालाच वस्तुतः बादशहा करण्याची धडपड चालू होती. तो प्रत्यक्षतः धार्मिक प्रमुख ( पॅांटिफेक्स मॅक्झिमस ) होताच. रोम शहरावरहि त्याचीच प्रत्यक्ष सत्ता चालू होती. जरी त्याजवळ प्रत्यक्ष सैन्य नव्हतें, तरी त्याच्या अधिसत्तेचा प्रचार करणारे हजारों पुरोहित व पाद्री सर्व लॅटिन भाषा प्रचलित असलेले देश व्यापून राहिले होते. जरी त्याची सामान्य लोकांवर राजकीय अथवा दैहिक सत्ता चालत नव्हती तरी स्वर्ग व नरक यांच्या किल्ल्या त्याच्या स्वाधीन असल्यामुळें सर्व जनतेच्या मनावर त्याचें वर्चस्व फार मोठें होतें. यामुळें ज्या ज्या राजांमध्यें प्रमुखत्वाकरितां स्पर्धा व झगडे चालत त्यांच्यापैकीं कधीं एकाचा तर कधीं दुसऱ्याचा पक्ष धरून, कधीं उघडपणें तर कधीं गुप्तपणें वगैरे कोणास तरी साह्य करून, त्यांस आपल्या कक्षेत आणण्याचा अथवा कच्छपीं लावण्याचा प्रयत्न हे पोप एकसारखे करीत होते. बहुतेक या कालांतले पोप वृद्ध गृहस्थ असत. कारण पोपचें पद प्राप्त होण्यास त्यांस दीर्घकाळ लागत असे. त्यामुळें त्यांची सत्ता अथवा कारकीर्दहि फार अल्पकाळ म्हणजे एक-दोन वर्षांपेक्षां अधिक नसे. त्यामुळें या घडामोडीहि फार वरचेवर होत असत.

## पूर्व व पश्चिम ख्रिस्ती संप्रदाय—

या सर्व घोंटाळ्यांमध्येंच आणखीहि एका गोष्टीनें भर पडत असे. ती म्हणजे रोमप्रमाणें कॉन्स्टॅटिनोपल येथेंहि एक बादशाही होती. त्या प्रदेशांत ग्रीक भाषा प्रचलित होती. शार्लमेननें जी बादशाही मिळविली ती फक्त लॅटिन भाषा चालू असलेल्या प्रदेशाची मिळविली, परंतु कॉन्स्टॅटिनोपलचे बादशहा सर्व युरोपवर आपल्या अधिराज्याचा हक्क सांगत असत. त्यामुळें या लॅटिन व ग्रीक साम्राज्यांमध्यें स्पर्धा उत्पन्न होणें साहजिकच होतें तशीच ती लॅटिन व ग्रीक ख्रिस्ती संप्रदायांमध्येंहि उत्पन्न होणें हें स्वाभाविकच होतें. रोमचा पोप हा आपण सेंट पीटर याचे उत्तराधिकारी आहों असें प्रतिपादन करी. येशू ख्रिस्तानें स्वर्गाच्या किल्ल्या आपला शिष्य सॅम्यूएल यासच पीटर ( प्रस्तर ) असें नांव देऊन त्याच्या हवालीं केल्या होत्या व याच सेंट पीटरची समाधि रोममध्यें असून तें ख्रिस्ती संप्रदायाचें केंद्र बनलें होतें. परंतु कॉन्स्टॅटिनोपल येथील बादशहा अथवा धर्मगुरु ( पॅट्रिआर्च ) रोमच्या पोपची अधिसत्ता मान्य करीत नसे. लॅटिन व ग्रीक ख्रिस्ती संप्रदायांमध्यें कांहीं सांप्रदायिक मतभेदहि होते ; अखेरीस त्रिमूर्ति ( ट्रिनिटी )च्या कल्पनेमधील मतभेद विकोपास जाऊन सन १०५४ मध्यें हे संप्रदाय पूर्ण विभक्त झाले.

## नॉर्थमेन—

अशा परिस्थितीमध्यें हीं युरोपचीं दोन्ही साम्राज्यें असतांना त्यावर उत्तरेकडून नॉर्थमेन यांनीं, पूर्वेकडून स्लाव्ह अथवा तुर्क लोकांपैकीं विशेषतः मग्यार अथवा हंगेरियन लोकांनीं व दक्षिणेकडून सारासन लोकांनीं स्वाऱ्या करण्यास प्रारंभ केला. हे नॉर्थमेन प्रथम रशियांत स्थायिक झाले व यांच लोकांस प्रथम रशियन असें नांव मिळालें. हे मोठे दर्यावर्दी असून त्यांनीं आइसलंड व ग्रीनलंडपर्यंत पर्यटनें केलीं होतीं एवढेंच नव्हे तर ते अमेरिके-

पर्यंतहि पोंचले होते. तसेंच त्यांनीं कास्पिअन व काळ्यासमुद्रापर्यंत आणि भूमध्यसमुद्रांतील सार्डिनिया व सिसिली बेटापर्यंत आक्रमण केलें होतें. यांपैकीं कांहीं लोक इंग्लंडमध्येंहि स्थाईक झाले होते. एग्बर्टचा पुत्र आल्फ्रेड दि ग्रेट याचें याच लोकांशीं युद्ध चालू होतें व यांच्यापैकींच कॅन्यूटनें (१०१६) इंग्लंड, नॉर्वे व डेन्मार्क या देशांवर सत्ता स्थापन केली होती. रॉल्फ दि गॅंगर (९१२) नांवाच्या पुढाऱ्याच्या नेतृत्वाखालीं यांच्यापैकींच कांहीं लोक उत्तर फ्रान्समध्यें नॉर्मंडींत स्थायिक झाले. हंगेरियन लोकांनीं हूण वा त्यांच्या पूर्वी होऊन गेलेल्या लोकांप्रमाणेंच सर्वत्र धुटाघूट करून ते अखेरीस हंगेरींत स्थायिक झाले.

### होली रोमन साम्राज्य—

शार्लमेन व त्याचे अनुगामी यांनीं या अशा परिस्थितींत पश्चिमेकडील रोमन साम्राज्य 'होली रोमन साम्राज्य' या नांवाखालीं टिकविण्याची खटपट चालविली होती. पूर्वेकडील साम्राज्य तर हळूहळू खिळखिळें होत जाऊन त्याची सत्ता कॉन्स्टॅंटिनोपल शहर व त्याच्या भोंवतालचा थोडासा प्रदेश सोडला तर बहुतेक लुप्तच झाली होती.

शार्लमेन बादशहास पोप लिओ तिसरा यानें सन ८०० मध्यें सेंट पीटर चर्चमध्यें ख्रिस्तजयंतीच्या दिवशीं होली रोमन साम्राज्याचा बादशहा म्हणून मुकुट अर्पण केला पण या रीतीनें आपणांवर पोपनें मात केली असें त्यास वाटत होतें व त्यानें आपल्या मुलास पोपकडून मुकुट न घेतां तो स्वतःच धारण करावा असें सांगितलें होतें. परंतु त्याचा पुत्र लुई दि पायस हा धर्मभोळा असल्यानें त्यानें पोपकडून राज्याभिषेक करवून घेतला. तो कर्तबगार नसल्यामुळें त्याच्या मृत्यूनंतर फ्रेंचभाषी फ्रॅंक लोक व जर्मनभाषी जर्मन लोक यांत तेढ वाढत गेली. यानंतर सॅक्सन लोकांपैकीं हेनरी फौलर याचा पुत्र ओटो हा एक महत्त्वाचा बादशहा होऊन गेला. याला जर्मन राजांनीं व पुरोहितांनीं ९१९ मध्यें जर्मनीचा राजा निवडलें होतें. त्यानें ९६२ मध्यें रोम शहर जिंकलें व पोपनें त्याला बादशहा म्हणून अभिषेक केला. याच्या वंशजांच्या हातांत ही साम्राज्यसत्ता अकराव्या शतकापर्यंत राहिली व नंतर दुसऱ्या जर्मन घराण्याकडे गेली. शार्लमेनच्या वंशजांच्या (कार्लोव्हिंजिअन) हातांतून साम्राज्यपद गेल्यानंतर ब्रिटन, नॉर्मंडी, फ्रान्सचा राजा वगैरे लोकांनीं नवीन बादशहांची सत्ता कधींच मान्य केली नाहीं व ते होली रोमन साम्राज्याच्या बाहेरच राहिले. सन ९६७ मध्यें फ्रान्सची सत्ता कार्लोव्हिंजिअन वंशाच्या हातांतून ह्यू कॅपेट याच्याकडे गेली व त्याचे वंशज फ्रान्सवर सोळाव्या शतकापर्यंत राज्य करीत होते. अर्थात् फ्रान्सचें राज्य प्रारंभीं लहानच होतें. इंग्लंड देश १०६६ या वर्षी नॉर्मन लोकांनीं जिंकून तेथें आपली सत्ता प्रस्थापित केली व तेव्हांपासून इंग्लंडचा संबंध स्कॅंडिनेव्हियन, ट्यूटन व रशियन लोकांपासून तुटला हें इतिहासप्रसिद्धच आहे. मात्र यापुढें फ्रेंच राजे व उमराव यांच्याशीं लढण्यांत इंग्लंडचें बळ जवळजवळ चार शतकें एकसारखें खर्च होत होतें.

### पूर्वपश्चिम संयोग—

शार्लमेन बादशहाची कारकीर्द व बगदाद येथील अब्बासी खलीफ हरून-अल्-रशीद याची कारकीर्द या समकालीन होत्या ही गोष्ट खरोखर कुतूहलजनक आहे. हरून-अल्-रशीदनें शार्लमेनकडे एका वकिलातीबरोबर एक तंबू, एक पाण्यानें चालणारें घड्याळ, एक हत्ती व जेरुशलेम येथील ख्रिस्ताच्या कबरीच्या किल्ल्या पाठविल्या होत्या असा लेख आहे. यावरून नवव्या शतकांत युरोप व मेसापोटेमिया आणि ईजिप्तमधील साम्राज्यांची या काळच्या संस्कृतीशीं तुलना करतां येते. त्या वेळीं पूर्वेकडे शास्त्र व वाङ्मय जिवंत होतें व कलांची जोपासना होत होती. मनुष्य भीति अथवा भोळेपणा सोडून स्वतंत्रपणें विचार करूं शकत होता. याच वेळीं स्पेनमध्यें जरी सारासेन लोकांची राजकीय सत्ता डळमळीत झाली होती तरी तेथें बौद्धिक जीवनक्रम अधिक उच्च दर्जाचा होता. आरिस्टॉटलच्या ग्रंथांचा अरब व यहुदी लोक अभ्यास करीत होते व शास्त्र आणि तत्त्वज्ञान यांचें अध्यापन त्यांनीं चालू ठेवलें होतें.

### खिस्ती धर्मयुद्धें—

खलीफांच्या साम्राज्याच्या पलीकडे उत्तरेकडे तुर्क लोकांच्या टोळ्यांची वस्ती होती. त्यांनीं इस्लाम धर्माचा स्वीकार केला होता, परंतु त्यांच्यामध्यें अरब किंवा फारसी लोकांइतका बौद्धिक विकास झालेला नव्हता. दहाव्या शतकांत अरबांची सत्ता दुर्बल होत चालली होती व तुर्कांची वाढत होती. अकराव्या शतकांत या तुर्कांपैकीं सेल्जुक टोळींतील लोक खालीं येऊन त्यांनीं खलीफावर आपलें वर्चस्व स्थापन केलें व आर्मेनिया प्रांत जिंकला. नंतर त्यांनीं बायझंटाइन सत्तेतून आशिया मायनर हिसकावून घेतला. सन १०७१ मध्यें बायझंटाइन सैन्याचा मेलासगिरि येथें पराजय झाला व तुर्क लोकांनीं त्यांची सत्ता आशियांतून नामशेष केली एवढेंच नव्हे तर कॉन्स्टॅंटिनोपलजवळील निसिआ हा किल्ला घेऊन प्रत्यक्ष राजधानीहि धोक्यांत आणली होती. या वेळीं बायझंटाइन शहरांत सातवा मायकेल राज्य करीत होता. त्याचें अगोदरच डुरोझोजवळ नॉर्मन लोकांशीं व डॅन्यूबजवळ पेटशेनेग नांवाच्या तुर्की लोकांशीं युद्ध चालू होतें त्यामुळें त्यानें रोम येथील पोपकडे मदतीची याचना केली. या गोष्टीवरून युरोपमध्यें त्यास मदत करील असा एकहि प्रबळ राजा नव्हता ही गोष्ट स्पष्ट होते. या

वेळीं लॅटिन व ग्रीक खिस्ती संप्रदायांत फूट पडून केवळ सुमारें पंचवीस वर्षेच लोटलीं होतीं ही गोष्ट ध्यानांत घेण्यासारखी आहे. अर्थात् रोम येथील पोपला आपल्या प्रतिस्पर्ध्यावर वर्चस्व मिळविण्याची ही उत्तम संधि आहे असें साहजिकच वाटलें. त्याचप्रमाणें युरोपमध्यें जीं लहान लहान राजांमध्यें एकसारखीं युद्धें चालू होतीं त्यास व नवीनच युद्धाचा हुरूप असलेले विशेषतः फ्रँक व नॉर्मन या नार्थमेन लोकांस या युद्धांत गुंतवून ठेवण्यास हा प्रसंग फार उत्तम आहे असेंहि त्यानें पाहिलें व तुर्कांच्याविरुद्ध जेरुशलेम शहर व खिस्ताची कबर घेण्याकरितां धर्मयुद्ध जाहीर केलें (१०९५). याच वेळीं पीटर हर्मिट नांवाचा एक धर्मोपदेशकहि ह्याच प्रचार करूं लागला. अशा तऱ्हेची सामान्य जनतेमध्यें धर्मयुद्धाची कल्पना इतकी तीव्रतेनें उत्पन्न होणें ही गोष्ट नवीनच होती. आतांपर्यंत राजे व पुरोहित यांच्याकडेच ही बाब सोंपविलेली असे, पण सामान्य जनतेनें त्यांत पडणें ही गोष्ट सामान्य जनतेच्या मानसिक वाढीची द्योतक आहे. अशा तऱ्हेची कल्पना प्राचीन यहुदी लोकांत जेरुशलेम शहराच्या बाबतींत व इस्लामी संप्रदायाच्या बाबतींत कांहीं अंशीं दिसून आली होती; यावरूनहि नवीन धर्मप्रचाराच्या पद्धतीमुळें ही मानवी मनामध्यें नवीन जागृति झाली असावी असें अनुमान होतें. या धर्मयुद्धाच्या बाबतींत लोकांनीं जी उचल केली व जे लोक पॅलेस्टाइनकडे जावयास निघाले त्यांचा बहुतेक वाटेंतच हंगेरियन वगैरे लोकांनीं निकाल लावला व त्यांच्या उत्साहाचा कांहीं उपयोग झाला नाहीं. परंतु सन १०९७ मध्यें नॉर्मन लोकांच्या पुढारीपणाखालीं व्यवस्थित सैन्यानें चाल करून ॲंटिऑक शहर वेढा देऊन घेतलें व १०९९ मध्यें एक महिन्याच्या वेढ्यानंतर जेरुशलेम शहर रक्ताचे पाट वाहवून काबीज केलें. परंतु नॉर्मन लोक हे लॅटिन पंथाचे अनुयायी असून जेरुशलेमचा पॅट्रिआर्क ग्रीक पंथी होता यामुळें त्यांची स्थिति मोठी चमत्कारिक झाली. इतक्यांत इस्लामी लोकांनीं पुन्हां उचल करून एडेसा शहर घेतल्यामुळें दुसरें धर्मयुद्ध झालें, पण तें विशेष महत्त्वाचें नव्हतें. पुन्हां इस्लामी लोकांनीं सलाउद्दिन याच्या आधिपत्याखालीं एकत्र होऊन खिस्ती लोकांविरुद्ध जिहाद पुकारून ११८७ मध्यें जेरुशलेम परत घेतलें. तेव्हां तिसरें धर्मयुद्ध पुकारलें गेलें, पण तें अयशस्वीच ठरलें. चौथ्या धर्मयुद्धामध्यें (१२०२–१२०४) लॅटिन संप्रदायी लोकांनीं व्हेनिस या व्यापारी शहराच्या पुढारीपणाखालीं तुर्कांविरुद्ध लढण्याऐवजीं सरळ कॉन्स्टॅंटिनोपलवरच मोर्चा धरला व तें शहर १२०४ मध्यें जिंकून घेतलें व फ्लांडर्सचा बाल्डविन नांवाचा मनुष्य बादशहा म्हणून जाहीर केला. परंतु १२६१ मध्यें बायझंटाइन लोकांनीं आपलें स्वातंत्र्य पुन्हां मिळविलें.

## पोपच्या सत्तेचें क्षेत्र व सामर्थ्य—

याप्रमाणें दहाव्या शतकांत नॉर्मन लोक तर अकराव्या शतकांत सेल्जुक तुर्क लोक व बाराव्या व तेराव्या शतकांमध्यें पोपची सत्ता विशेष प्रबल होती. या कालांत कांहीं पोप अगदीं दुराचारी निघाले (विशेषतः अकरावा व बारावा जॉन), परंतु एकंदर मठवासी धर्मोपदेशक यांनीं धर्माचें पालन उत्तम प्रकारें केलें. तसेंच ग्रेगरी पहिला, लिओ तिसरा, ग्रेगरी सातवा, अर्बन दुसरा, इत्यादि पोप कर्तबगार होते. या कालांत बल्गेरियापासून आयर्लंडपर्यंत व नॉर्वेपासून सिसिलीपर्यंत पोपची सत्ता चालत असे. ग्रेगरी सातवा यानें चवथा हेनरी या बादशहास शरण आणलें व ११७६ मध्यें फ्रेडरिक बार्बारोसा यानें पोप तिसरा अलेक्झांडर याची सत्ता शपथपूर्वक मान्य केली. अकराव्या शतकाच्या आरंभीं धार्मिक सत्तेचें वर्चस्व लोकांच्या मनावर व धर्मासंबंधीं त्यांस झालेल्या जाणिवेवर आधारलेलें होतें. परंतु चौदाव्या शतकाच्या सुमारास तें हळूहळू पार नाहींसें होऊन गेलें होतें. याचें पहिलें कारण म्हणजे चर्चेनें अपार संपत्ति मिळविली व ती एकसारखी वाढत गेली. बेवारसी लोकांकडून मृत्युसमयीं सर्वस्वदान घेणें, अनुतप्त लोकांकडून प्रायश्चित्तादाखल द्रव्य उकळणें वगैरे मार्गांनीं चर्चची मालमत्ता सारखी वाढत गेली. कांहीं देशांत राज्याची चौथाई जमीन चर्चच्या मालकीची बनली एवढेंच नव्हे तर ती करमुक्तहि असे. इतर लोकांस मात्र राजाचे कर भरून शिवाय चर्चला एकदशांश उत्पन्न धार्मिक कर म्हणून द्यावें लागे.

## पोप विरुद्ध राजे—

अर्थात् राजांना व उमरावांना आपल्या राज्यांतील जमीन मठांकडे जाणें पसंत नसे. शिवाय कोणत्याहि राज्यांतील धर्माधिकारी अथवा बिशप वगैरे नेमण्याची सत्ता पोपकडे असे. या अधिकाराबद्दल पोप ग्रेगरी सातवा याच्यापूर्वीपासून तंटे चाललेले होते. यामुळें राजांची सत्ता कमी होत असे. पोपची ही सत्ता अमान्य केल्यास तो राजास बहिष्कृत करीत असे, म्हणजे त्याच्या राज्यांतील सर्व धार्मिक विधि बाप्तिस्मा वगळून बंद पडत. विवाह अथवा अन्त्यसंस्कारहि होत नसे. तसेंच एखाद्या राजाच्या वारसास मान्यता देण्याचें तो नाकारीत असे व प्रजेसहि राजाशीं राजनिष्ठ राहण्यापासून परावृत्त करीत असे. अर्थात् या सत्ता अमर्याद असत व अशा सत्तांचा वापर फारच क्वचित् व विशेष आणीबाणीच्या वेळींच केला तर तो युक्त होतो. परंतु अनेक पोपनीं हा अधिकार वारंवार वापरावयास सुरुवात केली. बाराव्या शतकांत तीस वर्षांत अनुक्रमें स्कॉटलंड, फ्रान्स व इंग्लंड हे देश

वेळीं लॅटिन व ग्रीक ख्रिस्ती संप्रदायांत फूट पडून केवळ सुमारें पंचवीस वर्षेंच लोटलीं होतीं ही गोष्ट ध्यानांत घेण्यासारखी आहे. अर्थात् रोम येथील पोपला आपल्या प्रतिस्पर्ध्यांवर वर्चस्व मिळविण्याची ही उत्तम संधि आहे असें साहजिकच वाटलें. त्याचप्रमाणें युरोपमध्यें जीं लहान लहान राजांमध्यें एकसारखीं युद्धें चालू होतीं त्यास व नवीनच युद्धाचा हुरूप असलेले विशेषतः फ्रँक व नॉर्मन या नार्थमेन लोकांस या युद्धांत गुंतवून ठेवण्यास हा प्रसंग फार उत्तम आहे असेंहि त्यानें पाहिलें व तुर्कांच्याविरुद्ध जेरुशलेम शहर व ख्रिस्ताची कबर घेण्याकरितां धर्मयुद्ध जाहीर केलें (१०९५). याच वेळीं पीटर हर्मिट नांवाचा एक धर्मोपदेशकहि हाच प्रचार करूं लागला. अशा तऱ्हेची सामान्य जनतेमध्यें धर्मयुद्धाची कल्पना इतकी तीव्रतेनें उत्पन्न होणें ही गोष्ट नवीनच होती. आतांपर्यंत राजे व पुरोहित यांच्याकडेच ही बाब सोंपविलेली असे, पण सामान्य जनतेनें त्यांत पडणें ही गोष्ट सामान्य जनतेच्या मानसिक वाढीची द्योतक आहे. अशा तऱ्हेची कल्पना प्राचीन यहुदी लोकांत जेरुशलेम शहराच्या बाबतींत व इस्लामी संप्रदायाच्या बाबतींत कांहीं अंशीं दिसून आली होती; यावरूनहि नवीन धर्मप्रचाराच्या पद्धतीमुळें ही मानवी मनामध्यें नवीन जागृति झाली असावी असें अनुमान होतें. या धर्मयुद्धाच्या बाबतींत लोकांनीं जी उचल केली व जे लोक पॅलेस्टाइनकडे जावयास निघाले त्यांचा बहुतेक वाटेंतच हंगेरियन वगैरे लोकांनीं निकाल लावला व त्यांच्या उत्साहाचा कांहीं उपयोग झाला नाहीं. परंतु सन १०९७ मध्यें नॉर्मन लोकांच्या पुढारीपणाखालीं व्यवस्थित सैन्यानें चाल करून ॲंटिऑक शहर वेढा देऊन घेतलें व १०९९ मध्यें एक महिन्याच्या वेढ्यानंतर जेरुशलेम शहर रक्ताचे पाट वाहवून काबीज केलें. परंतु नॉर्मन लोक हे लॅटिन पंथाचे अनुयायी असून जेरुशलेमचा पॅट्रिआर्क ग्रीक पंथी होता यामुळें त्यांची स्थिति मोठी चमत्कारिक झाली. इतक्यांत इस्लामी लोकांनीं पुन्हां उचल करून एडेसा शहर घेतल्यामुळें दुसरें धर्मयुद्ध झालें, पण तें विशेष महत्त्वाचें नव्हतें. पुन्हां इस्लामी लोकांनीं सलाउद्दिन याच्या आधिपत्याखालीं एकत्र होऊन ख्रिस्ती लोकांविरुद्ध जिहाद पुकारून ११८७ मध्यें जेरुशलेम परत घेतलें. तेव्हां तिसरें धर्मयुद्ध पुकारलें गेलें, पण तें अयशस्वीच ठरलें. चौथ्या धर्मयुद्धामध्यें (१२०२–१२०४) लॅटिन संप्रदायी लोकांनीं व्हेनिस या व्यापारी शहराच्या पुढारीपणाखालीं तुर्कांविरुद्ध लढण्याऐवजीं सरळ कॉन्स्टँटिनोपलवरच मोर्चा धरला व तें शहर १२०४ मध्यें जिंकून घेतलें व फ्लांडर्सचा बाल्डविन नांवाचा मनुष्य बादशहा म्हणून जाहीर केला. परंतु १२६१ मध्यें बायझंटाइन लोकांनीं आपलें स्वातंत्र्य पुन्हां मिळविलें.

## पोपच्या सत्तेचें क्षेत्र व सामर्थ्य—

याप्रमाणें दहाव्या शतकांत नॉर्मन लोक तर अकराव्या शतकांत सेल्जुक तुर्क लोक व बाराव्या व तेराव्या शतकांमध्यें पोपची सत्ता विशेष प्रबल होती. या कालांत कांहीं पोप अगदीं दुराचारी निघाले (विशेषतः अकरावा व बारावा जॉन), परंतु एकंदर मठवासी धर्मोपदेशक यांनीं धर्माचें पालन उत्तम प्रकारें केलें. तसेंच ग्रेगरी पहिला, लिओ तिसरा, ग्रेगरी सातवा, अर्बन दुसरा, इत्यादि पोप कर्तबगार होते. या कालांत बल्गेरियापासून आयर्लंडपर्यंत व नॉर्वेपासून सिसिलीपर्यंत पोपची सत्ता चालत असे. ग्रेगरी सातवा यानें चवथा हेनरी या बादशहास शरण आणलें व ११७६ मध्यें फ्रेडरिक बार्बारोसा यानें पोप तिसरा अलेक्झांडर याची सत्ता शपथपूर्वक मान्य केली. अकराव्या शतकाच्या आरंभीं धार्मिक सत्तेचें वर्चस्व लोकांच्या मनावर व धर्मासंबंधीं त्यांत झालेल्या जाणिवेवर आधारलेलें होतें. परंतु चौदाव्या शतकाच्या सुमारास तें हळूहळू पार नाहींसें होऊन गेलें होतें. याचें पहिलें कारण म्हणजे चर्चनें अपार संपत्ति मिळविली व ती एकसारखी वाढत गेली. बेवारसी लोकांकडून मृत्युसमयीं सर्वस्वदान घेणें, अनुतप्त लोकांकडून प्रायश्चित्तादाखल द्रव्य उकळणें वगैरे मार्गांनीं चर्चची मालमत्ता सारखी वाढत गेली. कांहीं देशांत राज्याची चौथाई जमीन चर्चच्या मालकीची बनली एवढेंच नव्हे तर ती करमुक्तहि असे. इतर लोकांस मात्र राजाचे कर भरून शिवाय चर्चला एकदशांश उत्पन्न धार्मिक कर म्हणून द्यावें लागे.

## पोप विरुद्ध राजे—

अर्थात् राजांना व उमरावांना आपल्या राज्यांतील जमीन मठांकडे जाणें पसंत नसे. शिवाय कोणत्याहि राज्यातील धर्माधिकारी अथवा बिशप वगैरे नेमण्याची सत्ता पोपकडे असे. या अधिकाराबद्दल पोप ग्रेगरी सातवा याच्यापूर्वीपासून तंटे चाललेले होते. यामुळें राजांची सत्ता कमी होत असे. पोपची ही सत्ता अमान्य केल्यास तो राजास बहिष्कृत करीत असे, म्हणजे त्याच्या राज्यांतील सर्व धार्मिक विधि बाप्तिस्मा वगळून बंद पडत. विवाह अथवा अन्त्यसंस्कारहि होत नसे. तसेंच एखाद्या राजाच्या वारसास मान्यता देण्याचें तो नाकारीत असे व प्रजेसहि राजाशीं राजनिष्ठ राहण्यापासून परावृत्त करीत असे. अर्थात् या सत्ता अमर्याद असत व अशा सत्तांचा वापर फारच क्वचित् व विशेष आणीबाणीच्या वेळींच केला तर तो युक्त होतो. परंतु अनेक पोपनीं हा अधिकार वारंवार वापरावयास सुरुवात केली. बाराव्या शतकांत तीस वर्षांत अनुक्रमें स्कॉटलंड, फ्रान्स व इंग्लंड हे देश

बहिष्कृत केले गेले. तसेंच पोपनें एका राजाविरुद्ध दुसऱ्या राजास धार्मिक युद्ध सुरू करण्यासहि प्रवृत्त करण्यास कमी केलें नाहीं.

धर्मगुरूंनीं केवळ राजांविरुद्ध आपलें शस्त्र उगारलें असतें व जनतेस आपल्या बाजूस घेतलें असतें तर त्यांचा निभाव कदाचित् अधिक लागला असता. परंतु ही धार्मिक सत्ता वापरणारे धर्मोपदेशक व पुरोहित लोकांशींहि दर्पानें वागत. अकराव्या शतकापर्यंत रोमन धर्मोपदेशकांस विवाह करावयाची मुभा असे, परंतु सातव्या ग्रेगरीनें त्यांचेवर ब्रह्मचर्य लादलें. परंतु त्यामुळें त्यांचा लोकसमाजाशीं संबंध दुरावला. तसेंच चर्चचीं स्वतःचीं न्यायालयें असत व धर्मासंबंधींच केवळ नव्हे तर मठवासी, विद्यार्थी, धर्मयोद्धे, विधवा, पोरकीं मुलें यांसंबंधींहि सर्व प्रश्नांची चौकशी याच न्यायालयांपुढें व्हावी असें ठरलेलें असे. तसेंच मृत्युपत्रें, विवाह, शपथ, मंत्रतंत्र, पाखंड, धर्मलंडपणा, चेटूक, वगैरेसंबंधीं सर्व प्रश्न याच न्यायालयांनीं सोडवावयाचे असत. जेथें जेथें सामान्य मनुष्य व पाद्री यांचा संबंध येईल तेथें तेथें ते सर्व प्रश्न धार्मिक न्यायालयाकडे सोंपविले जात, पण राज्यावर संकट आलें व युद्धाचा प्रसंग आला म्हणजे मात्र तो सर्व भार सामान्य जनतेवर पडे व पाद्री मोकळेच राहत; अर्थातच या सर्व गोष्टींचा परिणाम सामान्य जनतेच्या मनांत या धर्मगुरूंबद्दल कटुता उत्पन्न होण्यांत होणें साहजिकच होतें.

### स्वतंत्र नवीन मतांचा उदय—

रोम येथील पोपला आपली सत्ता जनतेच्या मानासिक भूमिकेवर आधारलेली आहे या गोष्टीची जाणीव कधींच झाली नाहीं. लोकांमध्यें धर्माबद्दल उत्साह व प्रेम उत्पन्न होण्याच्याहि विरुद्ध यांचें वर्तन असे. यांचे जे ठराविक ठशाचे धार्मिक सिद्धान्त व मतें होतीं त्यांविरुद्ध कोणतीहि गोष्ट त्यांस खपत नसे. जेव्हां नैतिक भूमिकेवरून धर्मोपदेशक लोकांच्या व्यवहारांत लक्ष घालीत अथवा एखाद्यास शासन करीत तेव्हां जनतेचा त्यांस पाठिंबा असे, परंतु जेव्हां केवळ एखाद्याच्या मताबद्दल एखाद्या व्यक्तीचा छळ केला जात असे तेव्हां लोकमत त्यांच्याविरुद्ध बनत असे. दक्षिण फ्रान्समध्यें वाल्डो नांवाच्या एका मनुष्यानें ख्रिस्तासारखी साधी, शुद्ध व निर्मळ राहणी असावी व त्याच्याप्रमाणें परमेश्वरावर श्रद्धा ठेवावी असा उपदेश सुरू केला. तेव्हां तिसरा इनोसंट या पोपनें त्याच्याविरुद्ध धर्मयुद्ध पुकारलें व वाल्डोच्या अनुयायांची सरसेहोलपट करून त्यांस अग्नि, तरवार, बलात्कार व निर्घृण अत्याचार यांस बळी पाडलें. असिसिचा सेंट फ्रान्सिस (११८१–१२२०) यानेंहि ख्रिस्ताचें अनुकरण करण्याचा प्रचार चालविला व सेवा आणि निर्धनता यांमध्यें जीवित व्यतीत करावें असा उपदेश सुरू केला तेव्हां तो व त्याचे अनुयायी यांचा अनन्वित छळ करण्यांत आला. याच्या अनुयायांपैकीं चौघांस मार्सेलिस येथें जिवंत जाळण्यात आलें. याच्या उलट डॉमिनिकन पंथीयांचीं मतें (११७०–१२२१) यांच्याशीं जुळतीं असल्यामुळें तिसऱ्या इनोसंट या पोपनें त्यांस आश्रय दिला. याच डॉमिनिकन पंथीयांच्या साहाय्यानें त्यानें कुप्रसिद्ध 'इन्क्विझिशन' या भयंकर छळ करणाऱ्या संस्थेची स्थापना केली.

याप्रमाणें चर्च या संस्थेनें आपलें सामर्थ्य अतिरेकानें वापरल्यामुळें व सत्याचा मार्ग सोडून दिल्यामुळें व भरमसाट सत्ता काबीज केल्यामुळें व ती अत्यंत त्रासदायकपणानें वापरल्यामुळें लोकांच्या मनांतील सच्छ्रद्धा लोप पावली व यांची सर्व सत्ता लोकांच्या श्रद्धेवरच आधारलेली होती त्यामुळें तिचा आपोआपच हळूहळू ऱ्हास होत गेला.

### पोपच्या सत्तेस उतरती कळा—

ज्याप्रमाणें प्राचीन कालांत ब्राह्मण व क्षत्रिय, पुरोहित व सम्राट यांच्यामध्यें विरोध व द्वंद्व चालू असे व अनेकदां राजकीय व धार्मिक सत्ता एकत्र करण्याचा प्रयत्न तत्कालीन भूमिपति करीत असत त्याचप्रमाणें या वेळींहि ख्रिस्ती धर्मगुरू व राजे यांच्यामध्यें विरोध व द्वंद्व चालू होतें. धर्मगुरूंच्या ठिकाणीं प्राप्त झालेली सत्ता परंपरेनें कायम राहण्याकरितां त्यांच्या निवडणुकीमध्यें कांहीं पद्धति असणें अवश्य होतें. तसेंच धर्मप्रचारासंबंधींहि कांहीं निश्चित धोरण पाहिजे होतें व धर्मगुरूची कारकीर्द कांहीं काळ टिकणें व विशिष्ट धोरणाचा पाठपुरावा होण्याकरितां त्याचा उत्तराधिकारी निश्चित होऊन त्या धोरणांत रुळणें अवश्य होतें. पण यांपैकीं कोणतीहि गोष्ट पोपच्या बाबतींत अस्तित्वांत नव्हती. पोप कोणी निवडावा हेंहि निश्चित नव्हतें. या बाबतींत रोमचा बादशहा कीं बायझंटाइनचा बादशहा अंतिम आदेशक होता हेंहि निश्चित नव्हतें. यामुळें या दोघां बादशहांसहि लहरीप्रमाणें या गोष्टींत हस्तक्षेप करतां येत असे. हिल्डेब्रांड हा प्रसिद्ध मुत्सद्दी सातवा ग्रेगरी म्हणून पोप झाला (१,०७३–१०८५) तेव्हां त्यानें पोपची निवडणूक सर्व कार्डिनल मिळून करावी असें ठरविलें व बादशहानें केवळ संमति द्यावी असें निश्चित केलें. परंतु त्यानें उत्तराधिकाऱ्याची व्यवस्था न केल्यानें प्रत्येक निवडणुकीच्या वेळीं बादशहास हस्तक्षेप करण्याची संधि मिळे व कधीं कधीं बादशहाची संमति वर्षवर्षहि मिळत नसे व तोंपर्यंत पोपची गादी रिकामी असे.

या अव्यवस्थेचे परिणाम सोळाव्या शतकापर्यंत एकसारखे दिसून येतात. अनेक वेळां निवडणुकीच्या बाबतींत मतभेद होत व कधीं कधीं दोन दोन प्रतिस्पर्धी पोप असत. अर्थात् अशा वेळीं पोपला आपलें गाऱ्हाणें बादशहाकडे न्यावें लागे किंवा कोणा

अवस्थाकडे जावें लागे व ही परिस्थिति प्रत्येक पोपच्या मृत्यु-समयीं उत्पन्न होणें शक्य असे. अर्थात् अशा प्रसंगांचा फायदा जवळचे जर्मन राजे, फ्रेंच राजे, किंवा इंग्रज राजे घेण्यास टपून बसलेले असत व प्रत्येक जण संधि साधेल तेव्हां आपणास अनुकूल पोप निवडून घेण्यासाठीं खटपट करीत असे. यामुळें अर्थातच पोपची सत्ता दुर्बल होत चालली.

## पोप व बादशहा यांचा संघर्ष—

या बाबतींत तिसरा इनोसंट (११९८-१२१६) हा पोप व फ्रेडरिक दुसरा हा बादशहा या दोघांमधील कलह मोठा उद्बोधक आहे. या कलहामुळें फ्रेडरिकच्या वारसांकडून बादशाही गेली, पण पोपची सत्ताहि अगदीं खिळखिळी झाली. याचें मुख्य कारण असें होतें कीं, फ्रेडरिकच्या लहानपणीं त्याचे शिक्षक ख्रिस्ती धर्मगुरू-प्रमाणें मुसलमान पंडितहि होते. तो सिसिलीमध्यें राहत असे व तेथें पूर्वेकडील बरेच विद्वान् दरबारांत असत. यामुळें त्याच्या ज्ञानाची व विचाराची कक्षा आकुंचित न राहतां विशाल झाली व ख्रिस्ती धर्माप्रमाणें अन्य धर्मांतीलहि चांगल्या गोष्टींचा त्यास परिचय झाला व त्या दोहोंतील थोतांडेंहि कळलीं व त्याचें मन सर्वग्राही बनलें. यानेंच भारतीय अंकांचा प्रचार युरोपमध्यें केला व बीजगणित युरोपमध्यें आणलें. याच्या दरबारांत मायकेल स्कॉट या नांवाचा एक तत्त्वज्ञ होता त्यानें आरिस्टॉटलच्या कांहीं ग्रंथांचें व त्यांवरील कार्डोव्हाच्या अव्हेरो या अरबी पंडितानें लिहिलेल्या टीकांचें भाषांतर केलें. फ्रेडरिकनें १२३४ मध्यें नेपल्स येथें विश्व-विद्यालयाची स्थापना केली व सालेर्नो विश्वविद्यालयांतील वैद्यक विद्यालयाची वाढ केली. यानें एका प्राणिसंग्रहालयाचीहि स्थापना केली व श्येनमृगयेवर ग्रंथ लिहिला. यावरून त्यास पक्ष्यांची माहिती बरीच असावी असें दिसतें. फ्रेडरिक प्रथम पोपचा पाल्य होता. तो बादशहा झाल्यावर फ्रान्समध्यें जसा फ्रेंच राजानें वाल्डोच्या अनुयायांचा छळ केला तसा जर्मन पाखंड्यांचा यानें निग्रह करावा अशी पोपची अपेक्षा होती. पण फ्रेडरिक हा सर्वच धर्मांबद्दल उदासीन होता. पोपनें फ्रेडरिक यास धर्मयुद्ध करून जेरुशलेम घ्यावें असें सुचविलें. तें त्यानें मनावर घेतलें नाहीं. अखेरीस पोप नववा ग्रेगरी यानें त्यास बहिष्कृत केलें व त्यास एक खूप खरमरीत प्रकट पत्र लिहिलें. त्या पत्राला फ्रेडरिकनें तितकेंच तिखट उत्तर दिलें व तें युरोपच्या सर्व राजांस पाठविलें व पोप हा सर्व युरोपची सत्ता बळकावण्याचा प्रयत्न करीत असून सर्व राजांनीं एक होऊन या गोष्टीस विरोध करावा असें सुचविलें व पोपची मालमत्ता भरमसाट वाढत आहे हें दाखविलें. याच वेळीं त्यानें ईजिप्तला जाऊन तेथील सुलतानाशीं चर्चा करून त्याच्याशीं एक व्यापारी तह केला व जेरुशलेम शहर सोडवून घेतलें व स्वतःला जेरुशलेम येथें मुकुट अर्पण करून घेतला. नंतर इटलीस येऊन पोपच्या सैन्यानें त्याच्या राज्यावर चाल केली होती त्यास पिटाळून लावलें व पोपकडून बहिष्कार काढून घेतला. याप्रमाणें पोपची मानखंडना झाली. तरी जनता स्वस्थपणें पाहतच राहिली. यावरून पोप हे लोकांच्या मनांतून कसे उतरले होते हें स्पष्ट होतें. यानंतर सन १२३९ मध्यें पोप नववा ग्रेगरी यानें फ्रेडरिकबरोबर पुन्हां कलहास सुरवात केली. त्यानें फ्रेडरिकला बहिष्कृत करून त्याच्याविरुद्ध प्रचार सुरू केला.

फ्रेडरिकनें पहिल्यासारखेंच या प्रचाराला उत्तरें दिलीं. हा परस्परविरुद्ध प्रचार नवव्या ग्रेगरीनंतर चौथ्या इनोसंटनें पुढें चालविला. त्याला फ्रेडरिकनें पुन्हां खरमरीत जबाब दिला. त्या वेळीं सर्व धर्मगुरू गर्विष्ठ व फार श्रीमंत झाले होते असें प्रतिपादन करून त्यानें इतर सर्व राजांस चर्चची सर्व मालमत्ता जप्त करून टाकावी असा सल्ला दिला. ही गोष्ट अनेक राजांनीं लक्षांत ठेवून आपल्या सोयीप्रमाणें अमलांत आणली.

फ्रेडरिक बादशहापेक्षांहि पोप व फ्रान्सचा राजा यांच्यांतील कलह तर फारच उद्वेगजनक आहे. पोप आठवा बोनिफेस व फ्रेंच राजा यांमध्यें सन १३०२ मध्यें कलह सुरू झाला. पोपच्या मनांत फ्रेंच राजाला बहिष्कृत करावयाचें होतें. परंतु उलट त्यानें सन १३०३ मध्यें पोपलाच त्याच्या अनाग्नि येथील राजवाड्यांत कैद केलें. परंतु हा पोप त्याच गांवचा असल्यामुळें गांवकऱ्यांनीं त्याची लवकरच सुटका केली व तो रोमला परत आला. परंतु खुद्द रोममध्येंच फ्रेंच राजाच्या आज्ञेनें ऑर्सिनि कुटुंबांतील गृहस्थानें त्यास कैद केलें व त्यानंतर कांहीं आठवड्यांनीं हा पोप त्या तुरुंगांतच मरण पावला. परंतु या गोष्टीविरुद्ध सामान्य जनता अथवा इतर कोणीहि राजा निषेध करण्यास पुढें आला नाहीं. यावरून धर्मगुरू हे लोकसमाजापासून किती दूर गेले होते व लोकांच्या मनांतून ते कसे उतरले होते तें स्पष्ट होतें.

## पोप व प्रतिपोप—

चौदाव्या शतकभर पोपनीं आपल्या सत्तेचें पुनरुज्जीवन करण्याचा कांहीं प्रयत्न केलेला दिसत नाहीं. क्लेमंट पांचवा हा जेव्हां पोप निवडला गेला तेव्हां तो स्वतः फ्रेंच मनुष्य असल्यामुळें त्यानें रोम येथें येण्याच्याऐवजीं फ्रान्समध्येंच पोपच्या सत्तेखालीं असलेलें शहर अव्हिग्नॉन या ठिकाणींच आपलें पीठ स्थापन केलें. या ठिकाणीं ही पोपची गादी १३७७ पर्यंत राहिली. त्या वर्षी अकरावा ग्रेगरी हा पोप निवडून आला व त्यानें पुन्हां रोम शहरांत व्हॅटिकन या प्रासादामध्यें आपली गादी परत आणली. परंतु अनेक फ्रेंच धर्मगुरूंस रोमपेक्षां अव्हिग्नॉन हें अधिक पसंत होतें. याकरितां जेव्हां अकरावा ग्रेगरी १३७८ मध्यें मरण पावला

व सहावा अर्बन हा इटालियन मनुष्य पोप निवडला गेला तेव्हां फ्रेंच धर्मगुरूंनीं ती निवडणूक अमान्य केली व सातवा क्लेमंट म्हणून दुसराच एक पोप अथवा 'प्रतिपोप' निवडून अव्हिग्नॉन येथें कायम केला. या प्रसंगास ख्रिस्ती संप्रदायांतील 'मोठी फूट' (ग्रेट स्कीझम) असें म्हणतात. याप्रमाणें दोन पोप बनले व फ्रान्समधील पोपचे फ्रान्स, स्कॉटलंड, स्पेन, पोर्तुगाल, व कांहीं जर्मन राजे हे अनुयायी बनले व फ्रान्सच्या विरुद्ध असलेले बादशहा—इंग्लंड, हंगेरी, पोलंड व उत्तरेकडील राजे—रोम येथील पोपचे अनुयायी बनले. या परस्परविरुद्ध असलेल्या पोपनीं परस्परांस व त्यांच्या अनुयायांस बहिष्कृत केलें व परस्परांविरुद्ध प्रचार चालविला. अर्थातच यामुळें पोपबद्दल जर कांहीं श्रद्धा सामान्य जनतेच्या मनांत राहिली असेल तर ती या कालांत हळूहळू पार लोप पावली.

## ख्रिस्ती संप्रदायांत फूट—

तसेंच या वेळीं ख्रिस्ती संप्रदायांत नवीन नवीन पंथ निघूं लागले. यांपैकीं फ्रॅन्सिस्कन व डॉमिनिकन या पंथांस कसें तरी त्यांनीं आपणांत मिसळून घेतलें. पण इतरहि अनेक नवीन नवीन पंथ पुढें येत गेले. विशेषतः इंग्लंडमध्यें या वेळीं वायक्लिफ (१३२०–१३८४) या नांवाचा एक विद्वान् पंडित पुढें आला व त्यानें लोकांस ख्रिस्ती संप्रदायाचीं खरीं तत्त्वें कळावीं म्हणून बायबलचें इंग्रजींत भाषांतर केलें. हा ऑक्सफर्ड येथील विद्वान् पंडित असल्यामुळें त्याला मोठमोठे लोक अनुयायी मिळाले. रोम येथील पोपचा फार जळफळाट होऊन त्यानें त्यास कैद करण्याची आज्ञा दिली. परंतु तो कैद होण्यापूर्वीच स्वतंत्र स्थितींत मृत्यु पावला. पण पोपचें तेवढ्यानें समाधान न होऊन १४१५ सालीं कॉन्स्टन्स येथील एका धर्मगुरूंच्या सभेनें आज्ञा दिल्यावरून पोप पाचवा मार्टिन याच्या आज्ञेनें फ्लेमिंग येथील बिशपनें सन १४२८ मध्यें वायक्लिफचें प्रेत उकरून तें जाळून टाकलें. अर्थात् अशीं कृत्यें करणाऱ्या धर्मगुरूबद्दल सामान्य जनतेचें मत हळूहळू प्रतिकूल होत गेल्यास नवल नाहीं.

## मंगोल लोकांचा उपद्रव—

दहाव्या शतकाच्या सुमारास चीनच्या तंग घराण्याची सत्ता लोप पावून तेथें किन, सुंग व शी अशीं लहान लहान तीन राज्यें स्थापन झालीं होतीं. सन १२१४ मध्यें मंगोल लोकांचा पुढारी चेंगीझखान यानें किन राज्यावर स्वारी करून पेकिंग घेतलें. नंतर पश्चिमेकडे वळून तुर्कस्तान, इराण, आर्मेनिया, हंगेरी व सायलेशिया जिंकून लाहोरपर्यंत चाल केली. याचें साम्राज्य पासिफिक महासागरापासून नीपर नदीपर्यंत पसरलें होतें. याचा वारस ओगदइखान यानें काराकोरम येथें आपली गादी स्थापन केली. यानें बंदुकीच्या दारूच्या साहाय्यानें चेंगीझखानाची विजयाची परंपरा कायम ठेवली व कीफ शहराचा नाश करून (१२४०) सर्व रशिया मांडलिक बनविला. नंतर पोलंड पादाक्रांत करून एका पोलिश व जर्मन संयुक्त सैन्याचा यानें लिगनिट्झ येथें पराभव केला (१२४१). यानंतर या मंगोल लोकांनीं हंगेरीमधून मग्यार लोकांस जिंकून तेथेंच ते स्थायिक झाले व त्यांस त्यांनीं आत्मसात् केलें. इतक्यांत १२४२ मध्यें ओगदइखान मरण पावला. यानंतर हे मंगोल पूर्वेकडे वळले. ओगदइखानानंतर मंगुखान सत्ताधीश बनला व त्यानें आपला भाऊ कुब्लइखान यास चीनचा बादशहा केलें यानें चीनचें युआन घराणें स्थापन केलें. तें १३६८ पर्यंत टिकलें. याच वेळीं मंगुखानाचा दुसरा भाऊ हुलागुखान यानें इराण व सिरिया जिंकून घेतला. या वेळीं या मंगोल लोकांनीं महंमदी धर्माबद्दल शत्रुत्व दाखवून बगदाद शहर घेतल्यानंतर तेथील काल्व्यांचा वगैरे नाश करून सर्व मेसापोटेमिया प्रांत वैराण करून टाकला. यानंतर ईजिप्तच्या सुलतानानें हुलागूच्या सैन्याचा पॅलेस्टाइनमध्यें १२६० या वर्षी पूर्णपणें पराभव केला.

यानंतर मंगोल लोकांच्या स्वाऱ्या बंद झाल्या. त्यांपैकीं कांहीं बौद्ध धर्माचे अनुयायी बनले व कांहीं पश्चिमेकडील लोक मुसलमान झाले. चीनमध्यें मिंग घराण्यानें यांची सत्ता नष्ट केली. रशियामध्यें यांची अधिसत्ता मॉस्कोच्या ड्यूकनें झुगारून देऊन (१४८०) अर्वाचीन रशियाचा पाया घातला.

चवदाव्या शतकांत चेंगीजखानाचा वंशज तैमूरलंग यानें पुन्हा सिरियापासून दिल्लीपर्यंत स्वारी केली व एक साम्राज्य स्थापन केलें. पण तें त्याच्या मृत्यूबरोबरच लयास गेलें. पुढें याचाच वंशज बाबर यानें हिंदुस्थानवर स्वारी केली.

या मंगोल लोकांपैकींच ऑटोमन तुर्क या शाखेनें आशियामायनरमध्यें आपली सत्ता स्थापन केली व यांपैकीं सुलतान महम्मद दुसरा यानें १४५३ मध्यें कॉन्स्टॅन्टिनोपल काबीज केलें.

कॉन्स्टॅन्टिनोपल पडल्यामुळें युरोपांत मोठी खळबळ उडाली पण या वेळीं धर्मयुद्ध पुकारण्यासारखी युरोपची स्थिति नव्हती. सोळाव्या शतकांत या ऑटोमन तुर्क लोकांनीं बगदाद, हंगेरी, ईजिप्त व उत्तर आफ्रिका जिंकून घेतलीं. यांनींच व्हिएन्नावर स्वारी करून बादशहापासून खंडणी घेतली. परंतु मॉस्कोनें स्वातंत्र्य प्राप्त करून घेतल्यामुळें (१४८०) व स्पेनमधून १४९२ मध्यें फर्डिनांड व इसाबेला यांनीं ग्रानडांतून त्यांस घालवून दिल्यामुळें त्यांची युरोपमधील सत्ता नष्ट झाली. अखेरीस १५७१ मध्यें लेपांटो येथील आरमारी विजयामुळें भूमध्यसमुद्र ख्रिस्ती राष्ट्रांस मोकळा झाला.

## व्यापारवृद्धि व प्रवास यांमुळें जिज्ञासा व ज्ञानाची वाढ–

सामान्यतः बाराव्या शतकामध्यें पश्चिमेकडील देशांमध्यें एक प्रकारची नवीन घनावट होत असलेली दिसून येते. या कालांत साधारणपणें लहान लहान राज्यांतील आपसांतील युद्धें कमी कमी होत गेलीं होतीं. ख्रिस्ती धर्मयुद्धांमुळें अनेक पश्चिमेकडील सामान्य लोकांचा यात्रेच्या मिषानें अथवा धर्मयुद्धांतील सैनिक म्हणून पूर्वेकडील देशांशीं व जनतेशीं अधिकाधिक संबंध येऊं लागला होता. विशेषतः या काळांत व्यापाराची पुष्कळच वाढ झाली. या व्यापारामुळें नवीन नवीन शहरें अस्तित्वांत येऊं लागलीं होतीं. तसेंच या शहरांस अधिकाधिक सुरक्षितता लाभूं लागली होती. ख्रिस्ती व इतर धर्मप्रसारामुळें सामान्य जनतेंत शिक्षणाची वाढ होऊं लागली होती. तेराव्या व चौदाव्या शतकांत तर अधा स्वतंत्र व स्वयंपूर्ण शहरांची पुष्कळच वाढ होत गेली. व्हेनिस, फ्लोरेन्स, जिनोव्हा, लिस्बन, पॅरिस, ब्रुजिस, लंडन, अँटवर्प, हांबुर्ग, न्यूरेंबर्ग, नोव्हगोरॉड, विस्बी, बर्जेन इत्यादि शहरें याच काळांत उदयास आलीं. ज्याप्रमाणें या निरनिराळ्या शहरांत व देशांत परस्पर दळणवळण व व्यापार सुरू झाला त्याचप्रमाणें या काळांत नवीन नवीन प्रदेश पाहण्याच्या जिज्ञासेनें अनेक साहसी प्रवाशांनीं पृथ्वीच्या भूपृष्ठावर फार दीर्घकालीन पर्यटणें केलीं. लोक जेव्हां परस्परांशीं व्यापार व व्यवहार करतात, किंवा असे धाडशी प्रवाशी जेव्हां निरनिराळे देश पाहून तेथील लोकस्थितीचें, त्या देशांत होणाऱ्या जिनसांचें, तेथील रीतिरिवाजांचें व साधन-संपत्तीचें वर्णन करून आपल्या देशबांधवांस माहिती देतात तेव्हां ते लोकांमध्यें जिज्ञासा व विचाराची आणि कांहीं अंशीं धनप्राप्तीची व महत्त्वाकांक्षेची जागृति करतात. तसेंच धार्मिक बाबतींत राजे व पोप यांमध्यें चाललेली लाथाळी पाहून धर्म व राजकारण यांसंबंधीं लोकांत स्वतंत्रपणें विचार करण्याची बुद्धि साहाजिकच उत्पन्न होते. अशा काळांत ज्ञानाचा मक्ता समाजाच्या केवळ उच्च थरांतच अडकून न राहतां सामान्य जनतेंतहि ज्ञान-लालसा व जिज्ञासा जागृत होते. ख्रिस्ती धर्मांत उत्पन्न होणारीं पाखंडें, कांहीं भिन्नमतवादी लोकांचा झालेला छळ वगैरे गोष्टी पाहूनहि सामान्य मनुष्यामध्यें ऐहिक व पारलौकिक बाबतींत स्वतः विचार करून मत बनविण्याची प्रवृत्ति स्वाभाविकच वाढीस लागली. तेराव्या शतकांतच रॉजर बेकन (१२१०–१२९३) सारखा एक किमयागार का होईना परंतु तो लोकांस शास्त्रीय प्रयोग करून पाहण्यास एकसारखी टोंचणी लावीत होता. आज जरी आपणांस त्याचे प्रयोग पोरकट वाटले तरी त्या तमोयुगांत ते दीपासारखेच होते व तो सर्व पुस्तकी ज्ञानास गौण लेखून प्रयोग-मात्र शुद्ध ज्ञानास महत्त्व देत जा असें उच्च स्वरानें सांगत होता. त्यानें अधिकार, रूढी, अज्ञसमाज व गर्विष्ठ उपदेशक यांच्या मुळमास मुळींच बळी पडतां कामा नये अशी शिकवण चालविली होती. कागद करण्याची कला चीनमधून समरकंदमार्फत स्पेन-मध्यें आली व तेराव्या शतकाच्या अखेरीस इटलीमध्यें चांगल्या प्रकारचा कागद तयार होऊं लागला. चवदाव्या शतकांत ही कला जर्मनीमध्यें गेली व लवकरच जर्मनीमध्यें मुद्रणकला उगम पावली. मुद्रणकला हस्तगत होतांच प्रथम युरोपांतील लोकांस बायबलच्या प्रती सहज उपलब्ध होऊं लागल्या, तसेंच सामान्य शिक्षणास लागणारीं पुस्तकें मुबलक मिळूं लागलीं. अर्थात् लेखन व वाचन यांचा प्रसार छपाईनें होऊं लागला आणि लेखक व वाचकवर्ग वाढूं लागला. हीं नवीन नवीन होणारीं पुस्तकें केवळ पंडितांकरितां व लॅटिन भाषेंत लिहिलीं न जातां सामान्य लोकांच्या बोलभाषेंत व सामान्य जनतेकरितां लिहिण्यांत येऊं लागलीं. या प्रमाणें चवदाव्या शतकांत युरोपांत वाङ्मयाचा जन्म झाला.

## मोंगल खानांचें सांस्कृतिक कार्य—

याच सुमारास मोंगल लोकांनीं जें चीनपासून व्हिएन्नापर्यंत आक्रमण केलें व बऱ्याच मोठ्या प्रदेशावर अल्पकाळ आपली सत्ता स्थापन केली त्यामुळें लोकांमध्यें एक प्रकारची भौगोलिक जिज्ञासा व विशाल दृष्टि उत्पन्न झाली. चेंगीझखान किंवा कुबलाइ-खान हे भासविले जातात तितके रानटी किंवा अशिक्षित नव्हते; त्यांच्या दरबारांत काराकोरममध्यें पोपचे, बौद्ध लोकांचे, भारतीय, फारसी, इटालियन, चिनी, बायझंटाइन, आर्मेनियन वगैरे अनेक देशांतील, राष्ट्रांतील व पंथांतील राजदूत, वकील, धर्मगुरु, भिक्षु, पंडित, वैद्य, व्यापारी वगैरे अनेक पेशांचे आणि निरनिराळ्या प्रकारचे व प्रदेशांतील लोक होते. असें सांगतात कीं, शार्लमेन हा बादशहा स्वतः निरक्षर होता पण त्यास पंडितांचे वादविवाद ऐकणें आवडत असे. पण हे खान तर स्वतः पढलेले असत व अनेक लोकांशीं विचारविनिमय करण्यांत व चर्चा करून ज्ञान संपादन करण्यांत त्यांस जिज्ञासा वाटत असे. यामुळें या मंगोल खानांनीं जरी जगाच्या ज्ञानामध्यें नवीन भर कांहीं घातली नसली तरी जगांतील निरनिराळ्या प्रदेशांचा संबंध जुळवून आणून त्यांच्या-मध्यें आपआपल्या ज्ञानाची देवघेव होण्याच्या कामीं त्यांनीं बरेंच साहाय्य केलें व पृथ्वीवरच्या दूरदूरच्या लोकांचा व पंडितांचा संबंध जुळवून आणून लोकांची प्रादेशिक, भौगोलिक व शास्त्रीय ज्ञानाची मर्यादा वाढविण्यास व त्यामुळें एकंदर ज्ञानप्रसारास त्यांनीं मोठें सहाय्य केलें. तसेंच अनेक प्रवाशांनीं व विशेषतः त्यांपैकीं मार्को पोलो यानें व्हेनिसपासून चीनपर्यंत जो प्रवास केला व त्याचें विस्तृत वर्णन लिहून ठेवलें त्याचाहि उपयोग या ज्ञानप्रसाराच्या बाबतींत फार महत्त्वाचा समजण्यांत येतो.

## दूरदूरचे प्रवासी व ज्ञानलालसा—

याच मार्को पोलोच्या ग्रंथाच्या वाचनामुळें दोन शतकांनंतर ख्रिस्टोफर कोलंबस या नांवाच्या जिनोव्हा येथील एका खलाशास स्फूर्ति उत्पन्न होऊन पश्चिमेच्या दिशेनें समुद्रपर्यटन करून चीनला जाण्याची इच्छा त्याच्या मनांत आली. मार्को पोलोच्या प्रवासवर्णनावर समासांत कोलंबसानें खुणा केलेली एक प्रत सेव्हिल येथें अस्तित्वांत आहे. कोलंबस या जिनोव्हा येथील खलाशाच्या मनांत समुद्रमार्गानें चीनला जाण्याची उत्कंठा उत्पन्न होण्याचें दुसरें कारण असें कीं, जोंपर्यंत कान्स्टॅंटिनोपल हें शहर ख्रिस्ती लोकांच्या ताब्यांत होतें तोंपर्यंत ती एक पूर्वेकडील व पश्चिमेकडील व्यापाऱ्यांस मालाची देवाणघेवाण करण्याची खुली पेठ होती व त्या पेठेंत जिनोव्हा येथील बरेच व्यापारी व्यापार करीत असत. परंतु व्हेनिस येथील व्यापारी हे जिनोव्हाच्या व्यापाऱ्यांचे प्रतिस्पर्धी असत व त्यांनींच तुर्क लोकांस कान्स्टॅंटिनोपल घेण्यास मदत केली होती. यामुळें तुर्क लोक जिनोव्हाच्या व्यापाऱ्याच्या विरुद्ध असत. पृथ्वी गोलाकार आहे ही प्राचीन काळींच ज्ञात असलेली पण मध्यंतरीं विसरलेली कल्पना लोकांच्या मनांत पुन्हा घोळूं लागली. तसेंच आतां होकायंत्राचा शोध लागल्यामुळें खलाशांस दिशा ठरविण्याकरितां केवळ ताऱ्यांवर अवलंबून राहावें लागत नसे. तसेंच नॉर्मन, कॅटलोनियन, जिनोईज व पोर्तुगीज दर्यावर्दी आतां कॅनेरी बेटें, मदीरा व अझोर्स बेटें येथपर्यंत दूरदूरच्या सफरी करूं लागले होते. तथापि कोलंबसास कांहीं ही गोष्ट सहज करतां आली नाहीं. त्यास गलबतें व खलाशी मिळविण्याकरितां या शहराहून त्या शहरास असें अनेक दिवस फिरावें लागलें. अखेरीस फर्डिनांड राजा व इसाबेला राणी यांनीं त्यास तीन लहानशीं गलबतें मिळवून दिलीं व यांतून दोन महिने व नऊ दिवसांच्या समुद्रावरील सफरीनंतर तो सान साल्व्हाडोर या बेटांत पोंचला व याप्रमाणें अमेरिका खंडाचा शोध लागला. या कोलंबसास मिळालेल्या यशामुळेंच सन १४९७ मध्यें पोर्तुगीजांनीं आफ्रिका खंडास वळसा घालून भारतास आगमन केलें. सन १५१५ मध्यें पोर्तुगीज लोकांनीं जावा बेटांत प्रवेश केला व १५१९ मध्यें मॅगेलन यानें पृथ्वी-प्रदक्षिणेस प्रारंभ करून १५२२ मध्यें ती पूर्ण केली. त्याच्या पांच गलबतांपैकीं व्हिक्टोरिया हें एकच गलबत सुरक्षित परत आलें व त्यावरील २८० लोकांपैकीं फक्त ३१ जिवंत परत आले. स्वतः मॅगेलन फिलिपाइन बेटांत मारला गेला.

## नवीन शोधांचा व मुद्रणकलेचा परिणाम—

याप्रमाणें ग्रंथांचें मुद्रण व त्यामुळें पुस्तकांचा सुलभ प्रसार, पृथ्वी वाटोळी असून तीवर प्रवास करणें हें मानवाच्या आटोक्यांतील आहे या गोष्टीची झालेली जाणीव, नवीन शोध लागलेले प्रदेश, निरनिराळे व चित्रविचित्र प्राणी, वनस्पती, आणि भिन्न भिन्न आचारविचार व चालीरीती असलेले मानवसमूह व अशा तऱ्हेचे नवीन नवीन लागलेले अनेक शोध, यांचा मानवी मनावर विलक्षण परिणाम घडून आला. आतांपर्यंत विस्मृतींत पडलेले ग्रीक ग्रंथ आतां शीघ्रतेनें छापण्यांत येऊन प्रसृत होऊं लागले होते व त्यांचा अभ्यास सुरू झाला होता. यामुळें लोकांच्या मनाचा विकास होऊं लागला होता. प्लेटो व इतर ग्रीक तत्त्वज्ञानी यांच्या लोकसत्तेच्या व स्वातंत्र्याच्या विचारांनीं लोकांचीं मनें भारून जाऊं लागलीं होतीं. रोमन साम्राज्यानें कायदा व सुव्यवस्था यांच्या कल्पना लोकांत दृढमूल केल्या होत्या व कॅथॉलिक संप्रदायानें त्यांचें पालनहि केलें होतें. परंतु तीं विशिष्ट चौकटीमध्यें जखडून टाकलीं होतीं. परंतु तेराव्या ते सोळाव्या शतकांच्या दरम्यानच्या काळांत लोकांचीं मनें पुन्हां स्वतंत्र व सुधारणाप्रवण बनलीं व प्रगतिपथाकडे धांव घेऊं लागलीं.

## धार्मिक मतमतांतरें—

वाइक्लिफसारख्या स्वतंत्रपणें विचार करणाऱ्या लोकांच्या मतांचा प्रसार हळूहळू सर्वत्र होऊं लागला. सन १३९८ मध्यें जॉन हस नांवाच्या एका चेक धर्मगुरूनें वायक्लिफच्या मतांची शिकवण देण्यास सुरुवात केली व त्यास बेसुमार अनुयायी मिळाले. यावेळीं कॉन्स्टन्स येथें एक सभा भरून चर्चमधील दोन पंथांत समेट घडून येऊन ऐक्य प्रस्थापित झालें होतें. या सभेपुढें हस यास संरक्षणाचें अभिवचन देऊन पाचारण करण्यांत आलें व पाखंडी म्हणून जिवंत जाळण्यांत आलें (१४१५). यामुळें बोहेमियांतील लोक बंड करून उठले. त्यांच्याविरुद्ध पांच धर्मयुद्धें पुकारण्यांत आलीं, तरी त्यांच्या बंडाचा उपशम झाला नाहीं. अखेरीस हसच्या अनुयायांशीं बाझल येथें संधि करण्यांत आला. पंधराव्या शतकांत सर्व युरोपभर रोगाची सांथ पसरून लोक अगदीं हवालदील झाले होते व त्यांच्या दारिद्र्यांत भर पडत चालली होती. यामुळें जमीनदार व श्रीमंत लोक यांच्याविरुद्ध विशेषतः इंग्लंड व फ्रान्समध्यें लोकांनीं उठावणी चालविली होती. मुद्रणकलेच्या वाढीमुळें बायबलच्या प्रती सर्वत्र उपलब्ध होऊन साक्षरता व बायबलचें वाचन यांचा प्रसार सर्वत्र जोरानें होऊं लागला होता व लोक स्वतंत्रपणें विचार करूं लागले होते. एकीकडे धर्मगुरूंत फाटाफूट सुरू होती व तिचा फायदा घेण्यास राजे लोक टपून बसले होते. अशा वेळीं जर्मनीमध्यें एका मठांतून भिक्षुवृत्ति सोडून बाहेर पडलेला मार्टिन ल्यूथर (१४८३-१५४६) नांवाचा धर्मोपदेशक प्रचलित ख्रिस्ती मतें व सिद्धांत आणि आचार यांच्याविरुद्ध विटेन्बर्ग येथें प्रवचनें देऊं लागला. प्रथम

त्यानें आपलें म्हणणें लॅटिन भाषेंत मांडण्यास सुरुवात केली होती, परंतु लवकरच तो लोकभाषेंत प्रचार करूं लागला व पत्रकें छापून वांटूं लागला. प्रथम हसप्रमाणेंच त्याला दाबून टाकण्याचा प्रयत्न करण्यांत आला, परंतु त्याचीं मतें आतां फार दूरवर पसरलीं होतीं व त्याला कांहीं जर्मन राजांचें साहाय्य होतें.

## धर्मसुधारणा अथवा पुनरुज्जीवनाची चळवळ—

या राजांच्या मनांतहि आपल्या प्रजेचा रोमशीं असलेला संबंध तोडून टाकण्याची इच्छा होती व कांहींच्या मनांत स्वतःच्या राज्यांत स्वतःच धार्मिक सत्ता आपल्या हातांत घेण्याची इच्छा होती. यामुळे इंग्लंड, स्कॉटलंड, स्वीडन, नॉर्वे, डेन्मार्क, उत्तर जर्मनी व बोहेमिया या देशांनीं एकामागून एक आपला रोमशीं असलेला संबंध तोडून टाकला व ते या कालापासून स्वतंत्र झाले. यांनीं आपल्या प्रजेच्या धार्मिक बाबतींतील स्वतंत्र होण्याच्या उत्साहाचा फायदा रोमशीं संबंध तोडण्याच्या कामीं करून घेतला. परंतु तें साधल्याबरोबर लोकांवर राष्ट्रीय चर्च स्थापन करून आपली धार्मिक सत्ता प्रजेवर लादण्याचा या राजांनीं उपक्रम केला. परंतु ख्रिस्ताच्या शिकवणीचें प्रत्यक्ष ज्ञान झालेले अनेक लोक आपली अन्तःकरणाची स्वतंत्रता पोपला किंवा राजाला कोणालाहि देण्यास अथवा परमेश्वर व आपण यांत कोणीहि मध्यस्थ मानण्यास तयार नव्हते. यामुळें या काळांत अनेक स्वतंत्र ख्रिस्ती पंथ निघाले. उदाहरणार्थ, इंग्लंडमध्यें कांहीं लोक राष्ट्रीय चर्च मानण्यास तयार नव्हते त्यांस नॉन कन्फॉर्मिस्ट असें नांव मिळालें. यांनीं सतराव्या व अठराव्या शतकांत राजकारणांतहि फार महत्त्वाची कामगिरी केली व चार्ल्स राजास फांशीं देण्यापर्यंत मजल नेली ( १६४९ ). स्कॉटलंडमध्यें प्रेसबिटेरियन हा पंथहि इतकाच महत्त्वाचा बनला. अशा रीतीनें युरोप खंडाच्या उत्तरेकडील बरेच देश या नवीन धर्मसुधारणेच्या बाबतींत पुढें येऊन रोमन संप्रदायापासून स्वतंत्र झाले. यांच एकंदर चळवळीस धर्मसुधारणा अथवा पुनरुज्जीवनाची चळवळ असें म्हणतात.

## रोमन चर्चमध्यें सुधारणा—

परंतु या सुधारणांचा व विभक्तीकरणाचा परिणाम रोमन चर्चवरहि झाल्याशिवाय राहिला नाहीं. रोमन चर्चचीहि अनेक बाबतींत पुनर्घटना करण्यांत आली.

या पुनर्घटनेच्या बाबतींत विशेष पुढाकार एका इनिगो लोपेझ डि रिकाल्डे या स्पॅनिश सैनिकानें घेतला. हा पुढें सेंट इग्नेशियस लोयोला या नांवानें प्रसिद्धीस आला. याचा पूर्वायुष्यक्रम मोठा चमत्कृतिजनक होता, परंतु अखेरीस सन १५३८ मध्यें तो धर्मोपदेशक बनला व यानें 'ख्रिस्त समाज' स्थापन केला. यानें धार्मिक बाबतींतहि अगदीं सैनिकी शिस्त आणण्याचा प्रयत्न केला. यानें स्थापन केलेल्या व आज जेसुइट अथवा ख्रिस्तसेवक म्हणून ज्ञात असलेल्या या समाजानें सर्व जगांत शिक्षण व धर्मप्रसारक संस्था स्थापन करण्यांत सर्वांत अधिक व महत्त्वाचें काम केलें आहे. यांच्या संस्था भारत, चीन व अमेरिका या देशांत असून त्यांनीं रोमन संप्रदायाची उतारास लागलेली गति थांबविली. यांनीं सर्व कॅथॉलिक लोकांचा शैक्षणिक दर्जा वाढविला तसेंच त्यांच्या बुद्धिमत्तेचीहि वाढ केली आणि कॅथॉलिक मताची सर्वांच्या मनांत पुनर्जागृति केली. आज जें रोमन कॅथॉलिक चर्चचें महत्त्व टिकून आहे त्याचें श्रेय या जेसुइट लोकांच्या कामगिरीसच दिलें पाहिजे.

## राजसत्तेचा उत्कर्ष—

सोळाव्या शतकाच्या प्रारंभीं युरोपमध्यें वैयक्तिक राजसत्त अगदीं कळसास पोंचली होती. या वेळीं पांचवा चार्लस हा बादशहा होता. फ्रान्सिस पहिला हा फ्रान्सचा राजा होता. आठवा हेनरी हा इंग्लंडचा राजा होता. हिंदुस्थानांत या वेळीं बाबरनें आपल्या मोंगल वंशाची स्थापना केली होती व तुर्कस्तानवर सुलेमान मॅग्निफिसंट हा राज्य करीत होता. हे बहुतेक सर्व ऐन तारुण्यांत सत्तारूढ झालेले होते. या वेळचा पोप दहावा लिओ हाहि प्रसिद्ध होऊन गेला. या वेळच्या राजांच्या राज्य व प्रजा यांविषयींच्या कल्पना व त्यांचें ऐश्वर्य यांचा बोध होण्यास पांचवा चार्लस या बादशहाच्या चरित्राचें थोडेंसें अवलोकन केलें म्हणजे या वेळची एकंदर राजकीय परिस्थिति कशी होती तें कळून येईल म्हणून नमुन्याकरितां त्याच्या कारकीर्दीचें थोडें वर्णन करूं.

## पांचवा चार्लस बादशहा—

पांचवा चार्लस याचा आजा मॅक्झिमिलिअन पहिला हा १४५९ ते १५१९ पर्यंत बादशहा होता. पूर्वी वर्णन केलेल्या फ्रेडरिक दुसरा व पोप यांच्या कलहामुळें त्याच्या मरणानंतर नवीन बादशहाची निवडणूक होण्याच्या वेळीं पोपनें बादशहाचें पद होहेनस्टॉफेन घराण्यांतून निघून हॅप्सबर्ग घराण्याकडे जाईल अशी खटपट केली. या हॅप्सबर्ग घराण्याकडे हें बादशाहीपद पहिल्या महायुद्धाच्या अंतापर्यंत होतें. या घराण्यांतील तत्कालीन बादशहा पहिला मॅक्सिमिलियन यानें आपल्या पहिल्या विवाहामुळें नेदर्लंड्स व बर्गंडी हे प्रदेश मिळविले. ब्रिटनी प्रांतहि असाच मिळविण्याचा त्यानें प्रयत्न केला, पण तो फसला. नंतर १४९३ मध्यें बादशहा झाल्यानंतर त्यानें दुसऱ्या विवाहानें मिलानची डची संपादन केली. नंतर आपल्या मुलाचें फर्डिनांड व इसाबेला यांच्या वेडसर मुलीशीं लग्न लावून स्पेन, सार्डीनिया, सिसिली व ब्राझिल इतका मुलूख मिळविला. याप्रमाणें त्याचा

नातू पांचवा चार्ल्स हा जेव्हां बादशहा झाला (१५२०) तेव्हां त्यास मातृ-पितृगृहाकडून अमेरिकेंतील ब्राझिलचा विस्तृत प्रदेश व युरोपचा एक-तृतीयांशाहून अधिक भाग प्राप्त झाला.

या वेळीं पोपनें त्याच्या निवडणुकीस विरोधच केला होता, पण त्यानें पैसे खर्च करून बादशाही मिळविली. तेव्हां वास्तविक पोपच्या प्रतिस्पर्ध्यासच त्याने मदत करावयाची, पण त्याचें बालपण स्पेनमध्ये गेलें असल्यामुळें त्याचा कॅथॉलिक मताकडे प्रारंभापासूनच विशेष कल होता. परंतु यामुळें त्याचें प्रॉटेस्टंट राजांशीं साहजिकच वितुष्ट आलें व विशेषतः सॅक्सनीचा इलेक्टर याच्याशीं त्याचें वैमनस्य आलें. या वेळीं ल्यूथरच्या प्रचारामुळें प्रॉटेस्टंट व कॅथॉलिक यांच्यामध्यें मोठेंच रण माजलें होतें व ख्रिस्ती संप्रदायांत मोठीच फूट पटली होती. चार्ल्सनें ही फूट सांधण्याचा शक्य तो प्रामाणिकपणें प्रयत्न केला, पण त्यात यश आलें नाहीं. जर्मनीमध्यें याच वेळीं शेतकरी लोकांनीं मोठा उठाव केला. त्यामुळें या घोटाळ्यांत अधिकच भर पडली. याच वेळीं साम्राज्यावर पूर्वेकडून व पश्चिमेकडून हल्ले होत होते. पश्चिमेकडे फ्रान्सचा राजा फ्रान्सिस हा जबरदस्त प्रतिस्पर्धी होता व पूर्वेकडून तुर्क लोकांचा उपद्रव सारखा सुरू होता. तुर्क लोक हंगेरीपर्यंत आले असून खंडणीची बाकी मागत होते. चार्ल्सजवळ स्पेनचा कांहीं पैसा होता, पण जर्मनीकडून त्यास कांहीं मिळण्याची आशा नव्हती. तरी पण त्यानें फ्रान्सिसला इंग्लंडचा राजा आठवा हेन्री याच्या साहाय्यानें तोंड दिलें व तुर्कांशींहि सामना दिला. यांमधील युद्ध सेनापतींच्या नालायकीमुळें रेंगाळत बरेच दिवस चाललें. अखेरीस फ्रान्सिसनें पाव्हियाला वेढा दिला असतां तोच जर्मन सैन्याकडून कैद केला गेला. याच जर्मन सैन्यानें पगाराच्या बाकीकरितां रोम शहर लुटलें व पोपनें सेंट अँजेलो या किल्ल्यात आश्रय घेतला व अखेरीस चार लक्ष ड्युकेट देऊन जर्मन सैन्याची समजूत काढली. हें युद्ध एकंदर दहा वर्षे चाललें. त्यामुळे सर्व मुलुख उध्वस्त झाला. अखेरीस चार्ल्सचा इटलीमध्यें विजय झाला व त्याला पोपनें १५३० मध्यें बोलोना येथें राज्याभिषेक केला. अशा रीतीनें पोपकडून अभिषिक्त होणारा हा शेवटचाच बादशहा होय. एकीकडे तुर्क लोकांची पुढें चाल चालूच होती. त्यांनीं हंगेरीच्या राजाचा १५२६ मध्यें वध करून बुडापेस्ट घेतलें व व्हिएन्नावर चाल केली. परंतु कोणताहि ख्रिस्ती राजा चार्ल्सच्या मदतीस आला नाहीं. अखेरीस दक्षिण फ्रान्समध्यें त्याच्या सैन्यानें धुडगूस घातल्यावर फ्रान्सिस हा त्याच्या मदतीस आला.

परंतु जर्मनीमधील प्रॉटेस्टंट राजांनीं एक 'श्माल्काल्डिग संघ' या नांवाचा गट स्थापन केला व याच्याशीं सामना देण्यामध्यें चार्ल्सला आपली बरीच शक्ति खर्च करावी लागली. धार्मिक मतभेद मिटविण्याकरितां त्यानें अनेक प्रयत्न केले. 'नुरेंबर्गचा तह', 'रॅटिस्बनचें डाएट' या नांवाचा संधि, 'इंटेरिअम ऑफ ऑग्सबर्ग' या नांवाचा समेट असे त्यानें नाना प्रकार केले. परंतु नवीनमतवादी लोकांमध्यें जें नवीन शिक्षणाचें व सत्यजिज्ञासेचें आणि स्वतःपरीक्षणाचें वारें शिरलें होतें त्यापुढें त्याचे सर्व प्रयत्न लंगडे पडले. इंग्लंडचा आठवा हेन्री एक ग्रंथ लिहून प्रथम 'कॅथॉलिक पंथाचा संरक्षक' म्हणून पुढें आला, परंतु ॲन बोलीनच्या प्रेमपाशांत सांपडल्यावर कॅथराइनशीं घटस्फोट मिळावा म्हणून पोपच्या विरुद्ध गेला व स्वीडन, डेन्मार्क व नॉर्वे यांच्याबरोबर त्यानें प्रॉटेस्टंट पंथी राजांशीं सख्य केलें. परंतु या प्रॉटेस्टंट राजांचा चार्ल्सच्या सैन्यानें लोचौ येथें पराभव केला व हेस येथील फिलिप हा विश्वासघातानें कैद केला गेला, यामुळें हा प्रॉटेस्टंट राजांचा विरोध थंडावला व अखेरीस चार्ल्सनें तुर्कांस वार्षिक खंडणी देण्याचें कबूल करून वाटेस लावलें. १५४७ त फ्रान्सिस मृत्यु पावला. तथापि जर्मन राजांनीं १५५२ मध्यें युद्ध पुकारलें व चार्ल्सला इन्सब्रुक येथून पळून जाऊन आपला जीव वांचवावा लागला. परंतु त्याच वर्षी पॅसो येथें झालेल्या तहानें तात्पुरती शांतता प्रस्थापित झाली.

याप्रमाणें या बादशहाची बत्तीस वर्षांची कारकीर्द अनेक प्रकारच्या धामधुमींत गेली व पॅसोच्या तहानंतर त्यानें राजसंन्यास घेऊन आपलें उर्वरित आयुष्य युस्टे येथील मठांत घालविलें व आपल्या प्रदेशाची वांटणी करून सर्व जर्मनींतील प्रदेश आपला भाऊ फर्डिनांड याच्या व स्पेन आणि नेदर्लँड्स हे देश आपला पुत्र फिलिप याच्या स्वाधीन केले.

या बादशहाच्या कारकीर्दीवरून तत्कालीन युरोपमध्यें कशी अस्वस्थता व अशांतता माजली होती तें दिसून येतें.

## सोळाव्या शतकानंतर लोकमतांत क्रांति—

सोळाव्या शतकानंतरचा जगाचा इतिहास म्हणजे जगामध्यें नवीन प्रादुर्भूत झालेल्या परिस्थितीशीं आपल्या राजकीय व सामाजिक संस्थांचा समन्वय करून घेण्याची मनुष्यजातीची सतत चाललेली धडपड होय. ही धडपडहि अधिक तीव्र होण्याचें आणखी एक कारण असे आहे कीं, एकंदर परिस्थिति एकसारखी बदलत आहे. एवढेंच नव्हे तर ही बदल होण्याची गतिहि एकसारखी वाढत आहे. दुसरी एक महत्त्वाची गोष्ट अशी आहे कीं, मनुष्याचा स्वभाव असा आहे कीं, तो कोणताहि बदल घटवून आणण्याच्या बहुधा प्रतिकूल असतो. त्यामुळे नवीन नवीन परिस्थितीशीं जुळतें करून घेण्याची क्रिया सामान्यतः अजाणतः व फार सावकाशीनें होत असते. परंतु एकीकडे बदल घडून येण्याची क्रिया तर द्रुतगतीनें होत असते; त्यामुळें सोळाव्या शतका-

नंतरच्या मानवजातीच्या इतिहासाकडे पाहिलें असतां असें दिसून येतें कीं, मानवाच्या राजकीय व सामाजिक संस्था काळाच्या गतीच्या मानानें नेहमीं बहुतेक अननुकूल अशाच भासमान होतात. त्यामुळें मनुष्यास नेहमीं त्रास व कष्ट होत असतात आणि मानवी सामाजिक संस्थांची आमूलाग्र आवश्यकतेप्रमाणें व शक्यतेप्रमाणें पुनर्घटना जाणून बुजून व प्रयत्न करून घडवून आणली पाहिजे या गोष्टीची जाणीव मनुष्याला फार हळूहळू व मोठ्या नाखुषीनेंच होत जात असते.

तेव्हां पूर्वी जेथें मोटमोठीं राज्यें व साम्राज्यें मोठ्या वैभवात नांदत होतीं अशा या मानवसमाजामध्यें त्यांच्यांतील साम्राज्यें, राज्यें, धार्मिक व सांप्रदायिक बाबी, त्यांचे राजे, पुरोहित, त्यांचे व्यापारी व शेतकरी या सर्व वर्गांमध्यें असलेला समतोलपणा नाहींसा करण्यासारखा असा कोणता फरक मानवी जीवनामध्यें घडून येत आहे त्याचें अवलोकन केलें पाहिजे.

## ज्ञानाची वाढ—

त्या दृष्टीनें पाहिलें असता आपणांस असें दिसून येईल कीं, हा फरक अनेक बाबतींत व अनेक दिशांनीं घडून येत आहे. परंतु त्यांतील मुख्य व महत्त्वाची गोष्ट म्हणजे ज्ञानाची एकसारखी होत गेलेली वाढ ही होय. प्रथम सामान्यतः समाजामध्यें ज्ञानी वर्ग हा थोडकाच असे व सर्व ज्ञान या लहानशा वर्गाच्याच हातांत असे. परंतु गेल्या पांचशें वर्षांत ज्ञानाचा प्रसार फार तीव्र गतीनें व सर्व दिशांनीं एकसारखा वाढत जात आहे व तो सामान्य जनतेपर्यंत येऊन पोंचला आहे. तसेंच मानवाच्या जीविताची अथवा आयुष्यक्रमाची कल्पनाहि हळूहळू एकसारखी बदलत आहे. पूर्वीप्रमाणें केवळ प्राथमिक शारीरिक गरजा भागविणें हीच मानवी आयुष्यक्रमाची कल्पना आतां अगदीं मागें पडली आहे व अधिक विकास पावलेला आयुष्यक्रम आचरणांत आणण्याची मानवाची इच्छा अधिकाधिक प्रबल होत जात आहे. गेल्या वीस शतकांत जे नवीन धर्म प्रसार पावले त्यांची सर्वांची शिकवण वैयक्तिक जीवनाकडून सामाजिक जीवनाकडे पाहण्याकडे व आचरणांत आणण्याकडे असलेली दिसून येते. बौद्ध धर्म, खिस्ती धर्म व इस्लाम धर्म या सर्वांची शिकवण विशिष्ट मर्यादित मानवसमाजापासून विस्तृत मानवसमाजाकडे दृष्टि वळविणें हीच आढळून येते. यांची दृष्टि पूर्वीच्या सांप्रदायिक दृष्टीपेक्षां अधिक विशाल होती. प्रारंभीं सांगितलेल्या स्थानिक दैवत संप्रदायाकडून व देवळें व पुरोहित यांच्याकडून मानवसमाजास विश्वबंधुत्वाकडे नेण्याची या धर्मसंस्थापकांची खटपट होती. पूर्वीपेक्षां या कालांत मानवसमाजांतील प्रत्येक व्यक्तीस वैयक्तिक रीतीनें विश्वकुटुंबाचा घटक म्हणून त्याच्या सुखदुःखांत वांटेकरी असल्याची आत्मप्रतीति हळूहळू होत गेलेली आपल्या दृष्टीस पडते.

## संस्कृतिविकास—

प्राचीन संस्कृतींमध्यें लेखनकलेचें ज्ञान ही ज्ञानसंवर्धनांतील अगदीं पहिली पायरी होती. या लेखनकलेच्या ज्ञानामुळेंच प्राचीन काळीं मोठमोठीं साम्राज्यें व त्यांतील व्यवहार शक्य झाला. यानंतर मोठ्या प्रमाणावर दळणवळणाची सुलभता ही गोष्ट होय. ही गोष्ट घोडा हा प्राणि ज्ञात होऊन माणसाळल्यामुळें प्रथम साध्य झाली. अर्थातच घोड्यामुळें चाकें असलेल्या गाड्या व रस्ते तयार झाले. यानंतर लोखंडाचा शोध लागल्यामुळें शस्त्रांप्रमाणें उद्योगधंद्यांतील हत्यारें व उपकरणें तयार करतां येऊं लागलीं. अर्थात् मोठमोठीं सैन्यें उभारणेंहि त्यामुळें शक्य झालें. यानंतर नाण्यांच्या उपयोगामुळें परस्पर देवघेवीस व व्यापार व व्यवहारास मोठी चालना मिळाली. ऋणको व धनको या संस्था नाण्यामुळें प्रचारांत आल्या. दूरदूरच्या लोकांशीं व्यवहार करणें सुकर झालें. व्यापाराबरोबर साम्राज्यें वाढत गेलीं. त्याबरोबर मनुष्याची दृष्टि व ज्ञानाची कक्षाहि वाढत गेली. साम्राज्यामुळें स्थानिक दैवतांचें व देवतासंप्रदायांचें महत्त्व कमी कमी होत गेलें. अर्थात् यामुळें व्यापक धर्मप्रचारास चालना मिळाली. निरनिराळ्या राष्ट्रांचे व राज्यांचे इतिहास लिहिले जाऊं लागले. तसेंच भूगोलाचें ज्ञान अधिकाधिक वाढत जाऊन मनुष्यास आपल्या अज्ञानाची जाणीव होऊन ज्ञानलालसा व बुद्धिप्रामाण्ययुक्त ज्ञान यांची जिज्ञासा वाढत गेली. ग्रीस व अलेक्झांड्रिया येथें उत्पन्न झालेली ज्ञानसंवर्धनाची चळवळ कांहीं काळ मंदावली एवढेंच नव्हे तर तिची पिछेहाट झाली. ट्युटन व मंगोल लोकांच्या स्वाऱ्यांमुळें व रोगांच्या सांथीमुळें राजकीय व सामाजिक जीवनावर प्रतिकूल परिणाम घडून येऊन ज्ञानाच्या वृद्धींत अडथळे आले. परंतु या खळबळींतून पुन्हां जेव्हां विद्येचें पुनरुज्जीवन झालें तेव्हां ज्ञानाचा प्रसार फार झपाट्यानें होत गेला. या वेळीं कागदाच्या गिरण्या व मुद्रणाचे कारखाने तयार होते यामुळें ज्ञानप्राप्तीकरितां परिश्रम व शास्त्रीय पद्धतीनें ज्ञानसंवर्धन या गोष्टींस चालना मिळाली. मानवाचें बौद्धिक दास्य लयास जात चाललें व ज्ञानरवीचा प्रकाश सर्वत्र पसरूं लागला.

## शास्त्रीय ज्ञानसंवर्धन—

सोळाव्या शतकापासून ज्ञानाच्या व बुद्धीच्या विकासामुळें लोकांत शास्त्रीय पद्धतीनें विचार करण्याची प्रवृत्ति वाढली व तीमुळें नवीन नवीन शोध लागत गेले. दळणवळणाचीं साधनें वाढत गेलीं व अनेक भिन्न भिन्न विचारसरणींच्या लोकांचा संबंध येत जाऊन वैचारिक देवघेव मोठ्या प्रमाणावर होऊं लागली,

सोळाव्या शतकामध्यें प्रामुख्यानें आपल्या दृष्टीस पडणाऱ्या गोष्टी म्हणजे मुद्रित ग्रंथ व होकायंत्राच्या साहाय्यानें महासागरावर दूरवर सफर करणारीं गलबतें या होत. ग्रंथांच्या साहाय्यानें सामान्य जनतेस अनेक गोष्टींचें शिक्षण मिळणें व विद्वान् लोकांत अनेक विषयांची चर्चा होणें सुलभ झालें व गलबतांच्या सफरी-मुळें दूरदूरचे देश अधिकाधिक जवळ येत गेले. यानंतर मंगोल लोकांनीं चिनी लोकांपासून घेतलेली स्फोटक दारूची विद्या ही सर्वांत प्रभावी ठरली. या बंदुकीच्या व तोफांच्या योगानें पूर्वीच्या उमरावांचे किल्ले व गड निरुपयोगी ठरले. तोफांच्या योगानेंच तुर्क लोकांनीं कॉन्स्टॅंटिनोपल जिंकलें व मेक्सिको व पेरू देश हे तोफा व बंदुकांमुळें क्षणार्धांत काबीज करतां आले.

सतराव्या शतकांत पद्धतशीर शास्त्रीय ग्रंथ प्रकाशांत येण्यास सुरुवात झाली. याचें महत्त्व प्रारंभीं फारसें वाटलें नाहीं तरी पुढें पुढें हें पद्धतशीर ज्ञानप्रसाराचें सर्वांत प्रमुख साधन ठरलें. रॉजर बेकनप्रमाणेंच या वेळीं सर फ्रॉन्सिस बेकननें प्रायोगिक ज्ञानावर विशेष भर देऊन प्रयोगांचा पुरस्कार केला.

लवकरच इंग्लंडमधील रॉयल सोसायटी, इटलीमधील फ्लोरेंटाइन सोसायटी, व इतर अनेक राष्ट्रीय शास्त्रसंशोधन संस्था स्थापन झाल्या. यामुळें शास्त्रीय संशोधनास व ज्ञानाच्या देवघेवीस फार मोठी चालना मिळाली. या संस्थांनीं नवीन नवीन शास्त्रीय शोध लावले एवढेंच नव्हे तर लोकांच्या मनांतील दृढमूल होऊन बसलेल्या व अज्ञानावर आधारलेल्या धर्मवेडाच्या कल्पना घाल-विण्यासहि साहाय्य केलें. सतराव्या व अठराव्या शतकांत प्रायोगिक व शास्त्रीय ज्ञानाची हळूहळू एकसारखी प्रगति होत होती. तिचें फळ एकोणिसाव्या शतकांत दृश्यरूपानें प्राप्त झालें. या शतकांत भौगोलिक ज्ञानाची वाढ होऊन जगाचे नकाशे तयार करण्यांत आले. टॅस्मॅनिया, ऑस्ट्रेलिया व न्यू झीलंड इत्यादि बेटांचे शोध लागले. इंग्लंडमध्यें लोखंड गाळण्यासाठीं लाकडांच्या कोळशाऐवजीं दगडी कोळसा वापरण्यांत येऊं लागला होता त्यामुळें मोठ्या प्रमाणावर लोखंड गाळतां येऊन मोठमोठीं यंत्रें तयार करतां येऊं लागलीं.

यानंतर वाफेच्या शक्तीचा व पोलादाचा शोध लागला. अर्थात् वाफेच्या शक्तीमुळें रेल्वे व मोठमोठ्या आगबोटी चालवितां येऊं लागल्या व अनेक निरनिराळ्या वस्तू व यंत्रें वगैरे तयार करतां येऊं लागलीं. यानंतर विजेच्या शक्तीच्या शोधानें तर या सर्व गोष्टींवर कडी केली.

## राजे व मंत्री यांचा काल—

सोळाव्या शतकांत युरोपांतील कांहीं लोकांच्या, विशेषतः धर्मगुरू व राजे यांच्या, मनांत एका ख्रिस्ती सांप्रदायिक अथवा पवित्र रोमन साम्राज्याची कल्पना घोळत होती, पण तिचा कसा परिणाम झाला हें आपण पाहिलें आहे. सतराव्या व अठराव्या शतकांत राजे लोकांच्या मनांत वैयक्तिक महत्त्वाकांक्षा घोळत होती व त्या वेळच्या बहुतेक राजांनीं एकतंत्री राज्य करण्याचा अट्टाहास चालविला होता. परंतु या राजांचें समाधान केवळ आपल्या राज्यापुरत्या एक-तंत्री सत्तेनेंच न होतां शेजारच्या अन्य राजाच्या प्रदेशावर आक्रमण करून आपलें राज्य वाढविण्याची महत्त्वाकांक्षा त्या वेळच्या बहुतेक राजांमध्यें वसत होती. या राजांस त्यांच्या एखाद्या प्रमुख मंत्र्याचें किंवा धर्मगुरूचें बहुतेक साहाय्य असे. अशा तऱ्हेचीं उदाहरणें द्यावयाचीं तर पांचव्या चार्ल्स बादशहाचा पुत्र स्पेनचा राजा दुसरा फिलिप, इंग्लंडचा राजा आठवा हेन्री व त्याचा मंत्री वूल्से, इलिझाबेथ राणी व तिचा मंत्री लॉर्ड बर्ले, फ्रान्सचा राजा चौदावा लुई व त्याचे मंत्री रिशेल्यु व मॅझारिन यांचीं देतां येतील. यांतील चौदावा लुई हा तर वैभवाच्या अगदीं शिखरावर होता व त्यानें बांधलेले राजवाडे व भोगलेलें वैभव यांचें अनुकरण इतर राजे करूं लागले होते.

जर्मनीमध्यें सतराव्या शतकांत अनेक लहान लहान राज्यें असून त्यांचे परस्परांत एकसारखे कलह चालू होते. सन १६१८ ते १६४८ या कालांत चालू असलेल्या तीस वर्षांच्या युद्धामुळें जर्मनी, स्वीडन व बोहेमिया या प्रदेशांतील सर्व जर्मन प्रजेच्या शक्तींचा अपव्यय व ऱ्हास झाला. अखेरीस वेस्टफालियाच्या तहानें या युद्धाचा अंत झाला. या सुमारास प्रशियाचें राज्य पुढें आलें व तेथील राजा फ्रेडरिक दि ग्रेट हा फार महत्त्वास चढला व त्यानें आपल्या दरबारीं फ्रेंच भाषा सुरू केली. पांचव्या चार्ल्सच्या ऑस्ट्रियन शाखेकडे बादशाही राहिली व स्पेनचें स्वतंत्र राज्य त्या शाखेकडे राहिलें.

## रशियाचा उदय—

सन १४५३ मध्यें तुर्क लोकांनीं जेव्हां कॉन्स्टॅंटिनोपल जिंकलें त्यानंतर मॉस्कोचा ग्रँड ड्यूक इव्हॅन दि ग्रेट ( १४६२–१५०५ ) हा आपणास बायझंटाइन राज्याचा उत्तराधिकारी म्हणवून घेऊं लागला व त्यानें तेथील निशाण स्वीकारलें. याचा नातू इव्हॅन चौथा अथवा 'भयंकर इव्हान' ( १५३३–१५८४ ) हा आपणांस बादशहा अथवा झार म्हणवून घेऊं लागला. तथापि यांचा सतराव्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत युरोपच्या राजकारणांत फारसा संबंध आला नाहीं. परंतु पीटर दि ग्रेट ( १६८२–१७२५ ) यानें पीटर्सबर्ग येथें नवीन राजधानी स्थापन केली व प्रशियाप्रमाणें आपल्या दरबारांत फ्रेंच भाषा सुरू करून फ्रेंच राजांचें अनुकरण करण्यास सुरवात केली. या वेळीं पोलंडचें राज्य हें ऑस्ट्रिया, प्रशिया व रशिया यांच्या दरम्यान होतें व तेथील राजा निवडणुकीनें नेमला

जात असे. अर्थात् त्या देशांतील सरकार दुर्बल असल्यामुळें फ्रान्सच्या तें स्वतंत्र राखण्याच्या धडपडीस न जुमानतां या तीन राज्यांनीं आपसांत वांटून घेतलें. स्वित्झर्लंडमध्यें या वेळीं एक लोकराज्यांचा संघ होता. व्हेनिस हें स्वतंत्र लोकसत्ताक होतें. इटलीमध्यें जर्मनीप्रमाणें अनेक ड्यूक व राजे होते. पोप आपल्या मुलखाचा स्वतंत्रपणें कारभार पहात असे व तो इतर राजांच्या भानगडीपासून अलिप्त राहूं लागला होता. हीं सर्व निरनिराळीं राज्यें एकमेकांवर आक्रमण करण्याच्या उद्योगांत एकसारखीं गर्क होतीं व त्यांच्यामध्यें परस्परांत एखाद्या राजाच्या प्रियतमेच्या इच्छेकरितां किंवा एखाद्या मंत्र्याच्या लहरीमुळें अथवा स्पर्धेमुळें एकसारखीं युद्धें चालू असत. या कालाचें सुंदर चित्र व्हॉल्टेअरच्या ग्रंथांत (कॅंडिडे) दिसून येतें. मात्र आश्चर्याची गोष्ट इतकीच कीं, या सर्व भानगडींमध्यें ज्ञानाचा प्रसार व वाङ्मय एकसारखें वाढत होतें व नवीन नवीन शोध एकसारखे लागत होते. यांचा परिणाम पुढें अठराव्या शतकांत दिसून आला.

## नाविक विक्रम—

मध्य युरोपमध्यें याप्रमाणें यादवी व परस्पर युद्धें चालू असतां पश्चिम युरोपांतील विशेषतः हॉलंड, स्कॅंडिनेव्हिया, स्पेन, पोर्तुगाल, फ्रान्स व ब्रिटन यांतील लोक आपला व्याप समुद्रापलीकडे पसरीत होते. विशेषतः महासागरावर दूरवर सफरी करणारीं गलबतें साध्य झाल्यापासून हे लोक लांबवर सफरी करूं लागले. यांपैकीं डच व स्कॅंडिनेव्हिअन लोक यांचा हेतु केवळ व्यापार हा असून वसाहतींकडे त्यांचें लक्ष नसे. स्पॅनिश लोकांनीं या बाबतींत प्रथम पुढाकार घेतला. त्यांनीं सर्व अमेरिकेवर आपलें स्वामित्व जाहीर केलें. परंतु लवकरच पोर्तुगीज लोक त्यामध्यें आपला हक्क सांगूं लागले. तेव्हां पोपनें या नवीन जगाची स्पेन व पोर्तुगाल-मध्यें वांटणी करून दिली. त्यांत ब्राझिल व केपव्हर्ड बेटांपासून पश्चिमेकडे ३७० लीगच्या पलीकडील रेषेच्या पूर्वेकडील सर्व भाग पोर्तुगालास देण्यांत आला व बाकीचा सर्व भाग स्पेनचा म्हणून जाहीर करण्यांत आला (१४९४). यानंतर १४९७ मध्यें वास्को डि गामा हा कालिकत येथें पोंचला व १५१५ मध्यें पोर्तुगीज लोक जावा व मोल्क्का बेटांत प्रवेश करते झाले. आज पोर्तुगीजांच्या ताब्यांत मोझांबिक, गोवें, दीव, दमण, चीनमध्यें मकाव व टायमोर बेट व पूर्व आफ्रिकेचा कांहीं भाग इतका मुलूख आहे.

पोपनें जरी वरीलप्रमाणें नवीन जगाची विभागणी स्पेन व पोर्तुगालमध्यें केली तरी इतर राष्ट्रांनीं तीस फारसें जुमानलें नाहीं व इंग्रज, डेन्स, स्वीडिश, व डच लोकांनीं उत्तर अमेरिका, वेस्ट इंडीज वगैरे प्रदेशावर सत्ता स्थापन करण्यास आरंभ केला एवढेंच नव्हे तर कॅथॉलिक फ्रान्सनेंहि पोपच्या आज्ञेस धाब्यावर बसवून कॅनडा वगैरे उत्तर अमेरिकेच्या प्रदेशांत वसाहती स्थापन केल्या. याचा परिणाम असा झाला कीं, युरोपमध्यें युद्ध सुरू झालें कीं त्याची झळ या वसाहतींसहि लागूं लागली. स्वीडिश व डच लोक युरोपमधील भानगडींतच इतके गुंतले होते कीं, त्यांस अमेरिकेंतील वसाहतींकडे पाहणें अशक्य होतें. पूर्वेकडे वसाहतींच्या बाबतींत ब्रिटिश, फ्रेंच व डच यांमध्यें स्पर्धा चालू होती व अमेरिकेंत ब्रिटिश, फ्रेंच व स्पॅनिश यांत चुरस होती. फ्रान्सनें आपली शक्ति सर्व अठराव्या शतकांत स्पेन, इटली व जर्मनी यांशीं झगडण्यांत खर्च केली व इंग्लंडमधील धार्मिक मतभेदांमुळें अनेक इंग्लिश कुटुंबें अमेरिकेंत येऊन स्थायिक झालीं. यामुळें इंग्रज व फ्रान्स यांच्या स्पर्धेत १७५६ ते १७६० या कालांत फ्रेंचांनीं कानडा गमावला व लवकरच इंग्रजांनीं सर्व हिंदुस्थान फ्रेंच व पोर्तुगीजांपासून जिंकून घेतला. या सुमारास मोंगल सत्ता मोडकळीस आली होती व मराठ्यांचा निभाव इंग्रजांच्या नवीन शस्त्रास्त्रांपुढें फार काळ लागला नाहीं व सर्व हिंदुस्थान इंग्रजांच्या अंकित झाला.

याच कालांत चिनी लोकांनीं मंगोल घराण्याचा नाश करून चिनी मिंग वंशाची स्थापना केली व यानंतर मांचु घराणें सत्ताधिष्ठित झालें तें १९१२ पर्यंत टिकलें.

रशियानेंहि कोसॅक या पोलंड व तार्तरी यांचेमधील लोकांस आपल्या सैन्यांत दाखल करून घेऊन त्यांच्या पूर्वेकडे सैबेरिया वगैरे भागांत वसाहती करीत पासिफिक महासागरापर्यंत आपली सत्ता प्रस्थापित केली.

## वसाहतींची वाढ व स्वातंत्र्य—

कोलंबसानें जेव्हां अमेरिकेचा शोध लावला किंवा वास्को डि गामा हा जेव्हां हिंदुस्थानांत आला तेव्हां त्यांचा हेतु फक्त व्यापार वाढविण्याचा होता. त्याप्रमाणें पूर्वेकडे जे लोक आले तेथें त्यांस कांहीं तरी सुसंस्कृत लोक भेटले व त्यांच्याशीं व्यापार करून किंवा पुढेमागें त्यांचेवर राज्य करून पुष्कळ धनप्राप्ति करून घ्यावयाची व गबर होऊन स्वदेशीं परत जावयाचें हेंच त्यांचें धोरण राहिलें. परंतु जे लोक पश्चिमेकडे गेले त्यांस तेथें अगदीं हीन संस्कृतीचे लोक भेटले, परंतु तेथें त्यांस सोनें व विशेषतः चांदी मुबलक मिळूं लागली व देशांत वस्तीहि तुरळक होती याकरितां त्या प्रदेशांत त्यांनीं खाणींचा धंदा व मोठ्या प्रमाणावर शेती व मळे करण्याचा धंदा चालविला. यामुळें तेथें युरोपीय लोकांच्या वसाहती स्थापन झाल्या. या वसाहतींत वसाहत करणारे अनेक प्रकारचे लोक होते. कोणी धर्मच्छलास कंटाळून आलेले होते, कोणी ओगलेथॉर्प यानें दिवाणी तुरुंगांतून सोडवून पाठविलेल्या ऋणकरी लोकांसारखे होते व कांहीं अधिक संपन्न व्हावें याकरितां आलेले साहसी लोक होते. यामुळें युरोपिअन संस्कृतीचाच या नव्या

वसाहतींत प्रसार झाला. या वसाहती अनेक राष्ट्रांतील लोकांच्या होत्या व त्यांची शेतीची पद्धतिहि वेगवेगळी होती. व्हर्जीनिया वगैरे दक्षिणेकडील वसाहतींत मोठमोठे मळे असून नीग्रो गुलाम मोठ्या प्रमाणावर असत तर न्यू इंग्लंड या वसाहतींतील लोक स्वतःच शेती करीत. या वसाहतींत दळणवळणहि फारसें नसे. त्यामुळें यांच्यांत प्रथम फारसें ऐक्य नसे. परंतु जेव्हां इंग्लंडनें या वसाहतींवर कर बसविण्याचे कायदे केले तेव्हां त्यांस विरोध करण्याकरितां साहजिकच या वसाहती एक झाल्या व त्यांनी इंग्लंडशीं युद्ध पुकारून १७७६ मध्यें 'स्वातंत्र्याचा जाहीरनामा' काढला. याच वेळीं फ्रान्स व स्पेन यांचेहि इंग्लंडशीं युद्ध जुंपलें त्यामुळें इंग्लंडच्या दोन सेनापतींस शरण जावें लागलें व १७८३ मध्यें पॅरिसच्या तहानें अमेरिकेच्या स्वातंत्र्यावर शिक्कामोर्तब झालें. याप्रमाणें प्रथम तेरा संस्थानें मिळून अमेरिकेचीं संयुक्त संस्थानें बनलीं व १७८८ मध्ये त्यांनीं आपली घटना तयार केली. यानंतर १८१२ मध्यें पुन्हां इंग्लंडशीं एक युद्ध झालें. या वेळीं हीं संस्थानें अलग अलग असून दळणवळणाचीं साधनें नव्हतीं, परंतु लवकरच नद्यांतून व वाफेवर चालणाऱ्या आगबोटी आणि रेल्वे सुरू झाल्या. तारायंत्राची सोय झाली. यामुळें हीं संस्थानें विभक्त न होतां एकत्र राहिलीं. दक्षिण अमेरिकेंत दळणवळणाचीं साधनें न वाढल्यामुळें तेथें निरनिराळ्या वसाहती स्थापन झाल्या व त्यांचा संघ बनूं शकला नाहीं, परंतु त्यांनीं लवकरच आपला युरोपांतील मूळ देशांशीं संबंध तोडून टाकून लोकसत्ता स्थापन केली. ब्राझिल या पोर्तुगीज वसाहतींत पोर्तुगालमधील राजाच नेपोलियनच्या भीतीनें पळून येऊन राहिल्यामुळें कांहीं काल पोर्तुगाल हीच ब्राझिलची वसाहत बनली. १८२२ मध्यें ब्राझिलनें पेड्रो पहिला या राजपुत्राच्या आधिपत्याखालीं आपलें स्वतंत्र साम्राज्य जाहीर केलें. परंतु १८८९ मध्ये त्यांनीं एके दिवशीं त्यांचा राजा व त्याचें कुटुंब यास एका गलबतांत घालून सरळ पोर्तुगालला रवाना केलें. याप्रमाणें अमेरिका खंडांत राजसत्तेनें कधींच मूळ धरलें नाहीं व या स्वतंत्र वातावरणात सर्वत्र लोकशाहीच प्रस्थापित झाली. मध्यंतरीं स्पेनच्या वसाहतींच्या बाबतींत नेपोलियनच्या पाडावानंतर ऑस्ट्रियाच्या बादशहानें स्पेन देशास आपल्या दक्षिण अमेरिकेंतील वसाहती परत मिळविण्याच्या कामीं युरोपियन राष्ट्रांनीं मदत करावी अशी सूचना केली. परंतु यास अर्थातच विशेषेकरून युरोपमध्यें इंग्लंडनें विरोध दर्शविला. त्या वेळचा संयुक्त संस्थानांचा अध्यक्ष मनरो यानें १८२३ मध्यें असें जाहीर केलें कीं, कोणत्याहि युरोपियन राजानें जर आपली राजकीय सत्ता पश्चिम गोलार्धात स्थापन करण्याचा प्रयत्न केला तर संयुक्त संस्थानें तें कृत्य शत्रुत्वाचें कृत्य म्हणून मानतील व प्रतिकार करतील. याप्रमाणें या 'मनरो तत्त्वा'नें अमेरिका ही अमेरिकन लोकांकरितांच आहे हें तत्त्व मान्य करण्यांत आलें व यामुळें युरोपियन राष्ट्रांचा अमेरिकेमध्यें शंभर वर्षे हस्तक्षेप झाला नाहीं. दक्षिण अमेरिकेंतील अनेक राष्ट्रांस स्वातंत्र्य देण्याच्या कामीं जनरल बोलिव्हर यानें साहाय्य केलें यामुळें त्याचेंच नांव बोलेव्हिया या राष्ट्रास देण्यांत आलें.

यानंतर अमेरिकेच्या संयुक्त संस्थानांची एकसारखी भरभराट होत गेली. पूर्वी जेथें स्वातंत्र्ययुद्धकाळीं केवळ तेरा संस्थानें होतीं त्यांची हळूहळू वाढ होत गेली. अनेक लोक कोणी शेती करितां, कोणी खाणी खोदण्याकरिता, कोणी रॉकेल, कोणी सोनें, कोणी चांदी खाणींतून काढण्याकरितां अधिकाधिक पश्चिमेकडे जाऊं लागले. कांहीं नवीन वसाहतींचा प्रदेश विकत घेण्यांत आला. कांहीं मेक्सिकोपासून जिंकून घेण्यांत आला. याप्रमाणें हळूहळू पासिफिक महासागरापर्यंत नवीन नवीन भूभागामध्यें वसाहती होऊन संस्थानांची संख्या आज अठेचाळीसपर्यंत वाढत गेली आहे. या संस्थानांची एकता मध्यंतरीं गुलामगिरीच्या प्रश्नावर भंग पावूं पाहत होती, पण तो प्रसंग एका युद्धानें टळून ऐक्य कायम राहिलें.

## फ्रान्समधील राज्यक्रांति—

अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांस स्वातंत्र्य मिळविण्याच्या कामीं फ्रेंच सरकारनें मदत केली होती. यानंतर लवकरच फ्रेंच सरकारचीच अगदीं नादारीची स्थिति आली. गेलीं अनेक वर्षे फ्रेंच राजांनीं अवाढव्य खर्च चालू ठेवला होता व हा सर्व खर्च मध्यमवर्ग व शेतकरी यांच्यावर लादला जात होता. कारण उमराव, जमीनदार व धर्मगुरु हे करांपासून मुक्त होते. यामुळें जनता अगदीं पिळून निघालेली होती. या वेळीं सोळावा लुई हा राजा होता. यानें फ्रान्सच्या स्टेट्स जनरल या नांवाच्या इंग्लंडच्या पार्लमेंटप्रमाणें असलेल्या लोकसभेस १७८९ सालीं पाचारण केलें. या सभेचें १६१० सालानंतर आतांपर्यंत अधिवेशनच भरलें नव्हतें. या लोकसभेंत लोकांनीं आपलीं गाऱ्हाणीं व तक्रारी मांडावयास सुरवात केली व त्यांनीं इंग्लंडमधील पार्लमेंटप्रमाणें राजसत्तेवर नियंत्रणें घालण्याचा प्रयत्न चालविला. लोकांस दडपून टाकण्याकरितां राजानें सर्व प्रांतांतून सैन्य जमविण्यास सुरवात केली. तेव्हां लोकांनीं बंड करून बॅस्टाइल हा तुरुंग जमीनदोस्त केला व सर्व फ्रान्सभर बंडाळी पसरली. अनेक सरदारांचे व उमरावांचे वाडे वगैरे जाळून उध्वस्त करण्यांत आले. त्यांच्या हक्कांच्या सनदांचा व कागदपत्रांचा नाश करण्यांत आला. पॅरिसमध्यें एक तात्पुरतें सरकार स्थापन करण्यांत आलें व सर्व शहरांतून संरक्षक सेना उभारण्यांत आल्या. एक राष्ट्रीय परिषद् बोलावण्यांत आली तिनें करांपासून विमुक्ति व

भूदासांची पद्धति व उमरावी पदव्या व हक्क नष्ट करून घटनाबद्ध राजसत्ता निर्माण करण्याचा प्रयत्न चालविला. राजा व्हर्साय येथील राजवाड्यांतून निघून ट्युइलरी राजवाड्यांत राहूं लागला. दोन वर्षे राष्ट्रीय परिषदेनें कांहीं कार्य व सुधारणा केल्या. फ्रान्सची पुनर्रचना केली व राज्यांतील सर्व पदाधिकार कोणासहि योग्यतेप्रमाणें मिळणें सुलभ केलें. सर्व मठांची व चर्चेची मालमत्ता खालसा केली. शिक्षणसंस्थांखेरीज सर्व संस्था बंद केल्या व धर्मगुरू पगारी व निवडणुकीनें नेमावयाचे ठरविलें. यामुळें रोमचें वर्चस्व नाहींसें झालें. या घडामोडी पाहून राजाराणीनें आपल्या कांहीं परकीय मित्रांच्या साहाय्यावर अवलंबून पळून जाण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यांस पकडून आणून चौकशी करून १७९३ मध्यें फांशीं देण्यांत आलें.

यानंतर फ्रान्समध्यें एक अशी जोराची चळवळ सुरू झाली कीं, फ्रान्समध्यें लोकसत्ताक राज्य स्थापूनच न थांबतां सर्वत्र लोकसत्ताक राज्यें स्थापन करावयास इतर देशांतील लोकांसहि साहाय्य करावयाचें. या हेतूनें फ्रान्समधील सर्व तरुण लष्करांत सामील झाले व सर्व युरोपांतील राज्यांशीं युद्ध सुरू झालें. या युद्धानें बेल्जममधून ऑस्ट्रियाची सत्ता घालवून देण्यांत आली, व हॉलंडमध्यें लोकसत्ताक राज्य सुरू झालें. या युद्धांतच नेपोलियन बोनापार्ट हा पुढें आला व त्यानें इटलीमध्यें विजय मिळविले. फ्रान्समधील लोकसभेंत या वेळीं रॉबेस्पायरी याचें वर्चस्व होतें, परंतु यानें आपल्या प्रतिस्पर्ध्यांचें एवढ्या मोठ्या प्रमाणावर हत्याकांड सुरू केलें कीं, शेवटीं लोकांनीं त्यालाच न्यायासनापुढें खेंचून दोषी ठरवून ग्युलोटीनवर दिला (१७९४). यानंतर एक पांचांची डायरेक्टरी स्थापन होऊन त्यांनीं पांच वर्षे कारभार केला. या कालांत फ्रान्सच्या सैन्यानें हॉलंड, बेल्जम, स्वित्झर्लंड, दक्षिण जर्मनी व उत्तर इटली या देशांत सर्वत्र स्वाऱ्या व युद्धें केलीं. ठिकठिकाणच्या राजांस काढून टाकून लोकसत्ता स्थापन करण्यांत आली. परंतु या सर्व युद्धांमुळें सर्वत्र नासधूस व उध्वस्तता पुष्कळच होऊन फ्रान्सला सुद्धां द्रव्याची टंचाई पडूं लागली. या काळांत नेपोलियननें एकापाठीमागून एक विजय संपादन करून पवित्र रोमन बादशाही नष्ट केली. आतां हा बादशहा केवळ ऑस्ट्रियाचा बादशहा राहिला. नेपोलियनलाहि बादशाहीची हांव सुटली व बादशहाच्या मुलीशीं विवाह करण्याकरितां त्यानें जोसेफीन या पहिल्या पत्नीपासून घटस्फोट घेतला. १७९९ मध्यें तो प्रथम पहिला कॉन्सल म्हणून झाला व पुढें १८०४ मध्यें त्यानें आपणांस बादशहा म्हणवून घेऊन पोपकडून मुकुटाचा स्वीकार केला व त्यानें आपल्या मुलास रोमचा राजा केलें. त्यानें इटली व स्पेन जिंकलें, प्रशिया व ऑस्ट्रियाचा पराभव केला व रशियापर्यंतचा सर्व मुलूख आपल्या अंकित केला. परंतु त्यास समुद्रावर स्वामित्व मिळवितां आलें नाहीं व नेलसननें त्याच्या आरमाराचा ट्राफलगार येथें धुव्वा उडविला (१८०५). नेपोलियननें रशियावर १८१२ मध्यें स्वारी केली, परंतु त्याच्या सहा लक्ष सैन्याचा या स्वारींत पूर्ण नाश झाला.

यानंतर जर्मनी व स्वीडन यांनीं त्याच्याविरुद्ध शस्त्र उपसलें व फॉंटेनेब्लो येथें त्याचा मोड झाल्यावर तो राज्यत्याग करून एल्बा येथें राहावयास गेला. तेथून पुन्हां परत येऊन फ्रान्सवर सत्ता स्थापन करून विजय मिळविण्याचा त्यानें प्रयत्न केला, पण वाटर्लू येथें त्याचा पूर्ण मोड होऊन तो अखेरीस इंग्रजांच्या कैदेंत सेंट हेलिना येथें १८२१ त मरण पावला. इकडे व्हिएन्ना येथें एक परिषद भरविण्यांत येऊन युरोपमध्यें जवळजवळ पूर्वीची स्थिति प्रस्थापित करण्यांत आली.

## व्हिएन्नाच्या परिषदेनंतर—

व्हिएन्नाच्या परिषदेनें जरी तात्पुरती शांतता प्रस्थापित झाली तरी त्या तहामुळेंच अनेक असंतोषाचीं बीजें रोपण करण्यांत आलीं. या तहानें ज्या निरनिराळ्या राज्यांच्या हद्दी ठरविण्यांत आल्या त्या धार्मिक व भाषिक दृष्टीनें अस्वाभाविक होत्या. डचांचें प्रजासत्ताक नष्ट करून या प्रॉटेस्टंट लोकांची नेदर्लंडमधील कॅथॉलिक लोकांशीं सांगड घालण्यांत आली, व्हेनिसचें प्रजासत्ताक व उत्तर इटलीचा इटालियनभाषी प्रदेश जर्मनभाषी ऑस्ट्रियाला देण्यांत आला. फ्रेंचभाषी सॅव्हॉय प्रांत व कांहीं इटालीचा प्रदेश सार्डीनियाच्या राज्यांत घालण्यांत आला. ऑस्ट्रिया-हंगेरीमध्यें तर जर्मन, हंगेरियन, चेकोस्लोव्हाक, युगोस्लाव्ह, रुमानियन, इटालियन व पोल या भिन्न लोकांचें कडबोळें बनविण्यांत आलें. पोलंडमधील कॅथॉलिक व सुसंस्कृत लोकांस ग्रीक ऑर्थोडॉक्स चर्चच्या व असंस्कृत रशियाच्या स्वाधीन करण्यांत आलें. फिन्लंडमधील लोकांसहि रशियाच्या दडपणाखालीं ठेवण्यांत आलें. नॉर्वे व स्वीडनमधील भिन्न जनता एकत्र गोंवण्यांत आली, प्रशियामध्यें ऑस्ट्रियाप्रमाणेंच अनेक लहान लहान जर्मन राज्यें समाविष्ट करण्यांत आलीं. जर्मन संयुक्त संघांत होलस्टेनचा अधिपति, डेन्मार्कचा राजा व नेदर्लंडच्या राजाचें लुक्सेंबर्ग अंतर्भूत करण्यांत आलें.

या सर्व उलाढालींत एकभाषी लोकांचा आपसांतील व्यवहार सुलभ होऊन आर्थिक प्रगतिपर होतो व अनेक वितुष्टें टळतात ही साधी गोष्ट तत्कालीन मुत्सद्यांच्या लक्षांत आली नाहीं व आश्चर्य हें कीं, अद्यापहि ही गोष्ट कांहीं मुत्सद्यांस आकलन होत नाहीं किंवा ते हट्टानें तिच्याकडे दुर्लक्ष करतात.

याचा परिणाम असा झाला कीं, १८३० मध्यें फ्रान्समध्यें दुसरी राज्यक्रांति झाल्याची संधि साधून बेल्जममधील फ्रेंचभाषी लोकांनीं नेदर्लंडच्या सत्तेविरुद्ध बंड केलें. तेव्हां तेथें लोकसत्ताक

राज्य स्थापन होईल या भीतीनें बेल्जममध्यें सॅक्सकोबर्ग गोथा येथील पहिला लिओपोल्ड याच्या आधिपत्याखालीं एक स्वतंत्र राज्य करण्यांत आलें. जर्मनी व इटलीमध्येंहि बंडें झालीं (१८३०). तसेंच रशियन पोलंडमध्येंहि मोठें बंड झालें व वॉर्सा येथें एका प्रतिपक्षी प्रजासत्ताक सरकारनें एक वर्ष राज्य केलें. परंतु झार निकोलस पहिला यानें तें निष्ठुरपणे मोडून टाकलें व पोलिश भाषा व रोमन कॅथॉलिक चर्च बंद करण्यांत येऊन रशियन भाषा व ग्रीक चर्च हीं राजसत्तेनें प्रस्थापित करण्यांत आलीं. याच सुमारास ग्रीक लोकांनीं तुर्कांविरुद्ध बंड केलें. त्यांस ब्रिटन, फ्रान्स व रशिया यांनीं मदत करून तुर्की आरमाराचा नाव्हारिनो येथें मोड करून ग्रीस देशास ॲड्रिआनोपलच्या तहानें स्वातंत्र्य देण्यांत आले, पण त्यावर बव्हेरियाचा ऑटो हा राजा लादण्यांत आला.

## अठराव्या शतकांतील ज्ञानाची वाढ—

अठराव्या शतकांत या विश्वांतील निरनिराळे पदार्थ व गति यां-विषयींच्या कल्पनांमध्यें एकसारखी हळूहळू प्रगति होत होती. गणितशास्त्राच्या अभ्यासांत बरीच वाढ झाली होती. तसेंच सूक्ष्म-दर्शक यंत्र व दुर्बिण यांच्या साहाय्यानें निसर्गांतील अनेक गोष्टींचा सूक्ष्म अभ्यास होत गेल्यामुळें निसर्गेतिहासशास्त्रांतहि बरीच प्रगति होत होती. मानवशरीरशास्त्राचाहि अभ्यास पुष्कळच वाढला होता. आरिस्टॉटलनें ज्यास महत्त्व दिलें होतें व लिओ-नार्डो डा व्हिन्सी (१४५२–१५१९) या मध्य युगांतील एकमेव शास्त्रज्ञानें ज्याचा अभ्यास चालविला होता त्या भूस्तरशास्त्राकडे आतां शास्त्रज्ञांचें लक्ष लागून निरनिराळ्या प्रस्तरांच्या थराच्या इतिहासाचा अभ्यास सुरू झाला होता. या पदार्थविज्ञानशास्त्राच्या व भूस्तरशास्त्राच्या अभ्यासामुळें साहजिकच धातुविद्येकडे विद्वानांचें लक्ष गेलें. धातुविद्येंत प्रगति झाल्यामुळें मोठमोठीं यंत्रें बनविणें सुलभ होत गेलें व त्यामुळें औद्योगिक प्रगतीस मदत होऊं लागली.

## शास्त्रीय ज्ञानाची वाढ—

१८०४ मध्यें ट्रेव्हिथिक यानें वॅटच्या वाफेच्या इंजिनाचा पहिल्या गतिदायक इंजिनाकडे (लोकोमोटिव्ह) उपयोग केला. १८२५ मध्यें स्टॉकटन व डार्लिंग्टन या गांवांच्या दरम्यान पहिली रेल्वे सुरू झाली व स्टीफन्सच्या रॉकेट इंजिनानें चाळीस मैलांच्या गतीनें गाडी नेली. यानंतर पंचवीस वर्षांत युरोपमध्यें सर्वत्र रेल्वेचें जाळें पसरलें.

रेल्वेमुळें दूरदूरच्या देशांतील व गांवांतील अंतर कमी होऊन जेथें पूर्वीं महिनेच्या महिने प्रवासास लागत तेथें आतां ही मर्यादा दिवसांवर आली.

वाफेच्या इंजिनांमुळें आगगाड्यांपेक्षां आगबोटी प्रथम पुढें आल्या. फर्थ ऑफ क्लाइडच्या कालव्यांत सन १८०२ मध्येंच एक आगबोट (शार्लटडंडास) प्रवास करीत होती व अमेरिकेंत फुलटन नांवाच्या गृहस्थानें हडसन नदीवर १८०७ मध्यें एक आगबोट (क्लेरमॉट) चालू केली होती. उघड्या समुद्रावर पहिली सफर एका अमेरिकन आगबोटीनेंच (फिनिक्स) न्यू यॉर्कपासून फिलाडेल्फियापर्यंत केली. तसेंच अटलांटिक महासागर ओलांडणारी पहिली आगबोट (सव्हाना १८१९) अमेरिकनच होती. प्रथम या बोटी पंख्यांच्या चक्राच्या असत, पण पुढें स्क्रूची योजना झाल्यावर या बोटींची गति पुष्कळच वाढून अटलांटिक महासागर पांच दिवसांच्या आंत (१९१०) ओलांडतां येऊं लागला.

या वाहतुकीच्या साधनांच्या बरोबरच निरनिराळ्या भूप्रदेशां-तील दळणवळणास व्होल्टा, गॅल्व्हानी व फॅरेडे वगैरेंच्या वैद्युतिक संशोधनाच्या योगानें तारायंत्राचा शोध लागल्यामुळें पुष्कळच साह्य झालें. तारायंत्र प्रथम १८३५ मध्यें सुरू झालें व समुद्रतळावर १८५१ मध्यें प्रथम इंग्लंड व फ्रान्स यांच्यामध्यें तार घालण्यांत आली. लवकरच तारायंत्राचें जाळें सर्व जगभर पसरून त्वरित बातम्या पाठविण्याची सोय झाली.

## नवीन नवीन शोध—

हे आगगाड्या, आगबोटी, तारायंत्रें वगैरे शोध त्या वेळीं जरी चमत्कृतिजनक वाटले तरी हे सर्व शोध पुढें लागणाऱ्या नवीन नवीन शोधांचे केवळ पूर्वगामी होते. याच वेळीं एकीकडे जी यंत्रविद्येमध्यें व तांत्रिक विद्येमध्यें प्रगति होत होती तिचे परिणाम फार दूरगामी झाले. उदाहरणार्थ, इमारती बांधण्याचें शास्त्र घेतलें तर पूर्वीं जीं या कामास साधनें असत तीं मर्यादित असत व त्यांवरच इंजिनियरास अवलंबून रहावें लागत असे. या बाबतींत लागणारा मुख्य पदार्थ जो लोखंड तें गाळण्याची त्या वेळची कृति फार मर्यादित होती. कारण त्या वेळीं लोखंड गाळण्याकरितां लांकडी कोळसा वापरीत असत, परंतु या कामीं दगडी कोळसा व विशेषतः कोक वापरतां येऊं लागल्यापासून चांगलें, जलद व मोठ्या प्रमाणावर लोखंड गाळतां येऊं लागलें व त्यामुळें लोखं-डाचे मोठमोठे भाग ओततां येऊं लागले. तसेंच लोखंडाचे पत्रे (१७२८) व मोठमोठे गज लाटून तयार करण्यांत येऊं लागले (१७८३). नॅस्मिथचा वाफेचा हातोडा १८३८ मध्यें प्रचारांत आला. लोखंडाचे पत्रे करण्याची कला शोध होईपर्यंत फार मोठीं वाफेचीं इंजिनें तयार करतां येत नसत. परंतु १८६४ मध्यें बेस-मेर यानें पोलाद बनविण्याची नवीन कृति शोधून काढल्यानंतर व उघड्या भट्टीचा प्रसार झाल्यानंतर फार मोठ्या प्रमाणावर व पाहिजे त्या जातीचें लोखंड व पोलाद ओततां येऊं लागलें. आतां

तर विजेच्या मदतीने टनावारी लोखंडाचा दुधासारखा रस पाहून मन विस्मित होतें. याप्रमाणें पाहिजे त्या जाडीचा व शक्तीचा पत्रा तयार करतां येऊं लागल्यामुळें लोखंड व पोलाद यांची अजस्र जहाजें, अवाढव्य मोठमोठे पूल व आकाशांत उंच जाणाऱ्या पोलादी चौकटींवर बांधलेल्या उत्तुंग इमारती बांधणें शक्य होऊं लागलें. रेल्वेमध्येंहि अनेक सुधारणा घडून आल्या. एकोणिसाव्या शतकापूर्वी दोन हजार टनांहून अधिक वजन वाहणाऱ्या बोटी नव्हत्या त्या आतां पन्नास हजार टन वाहून नेऊं शकतात. अर्थात् या गोष्टी म्हणजे केवळ आकारांत झालेली वाढ या स्वरूपाच्या वरून दिसावयास दिसतात, परंतु एवढी मोठी आगबोट बांधावयाची किंवा इमारत उठवावयाची म्हणजे केवळ आकारवाढ नव्हे तर लोखंड व पोलाद यांची भार सहन करण्याची शक्ति, तोलून धरण्याची शक्ति, वांकण्याची शक्ति, तरंगण्याची शक्ति, वगैरे अनेक गोष्टींचें गणित करावें लागतें. पूर्वी बांधकामांत जें साहित्य उपयोगांत आणावयाचें त्यावर बांधकाम अवलंबून असे. आतां साहित्यावर शास्त्रज्ञानें विजय मिळविलेला असून बांधकाम पाहिजे असेल तसें साहित्य तयार करून घेतां येतें. या शास्त्रीय ज्ञानाची वाढ करण्याच्या कामीं प्रथम ब्रिटिश व फ्रेंच लोक पुढें होते, परंतु नेपोलियनच्या स्वारीनंतर लवकरच जर्मन लोक मोठ्या हिरीरीनें पुढें आले. ज्या ब्रिटिश लोकांनीं ही शास्त्रीय ज्ञानाची वाढ घडवून आणली ते युनिव्हर्सिटी अथवा तत्कालीन विद्यापीठीय विद्वानांपैकीं नसून अगदीं स्वतंत्र रीतीनें विचार व अभ्यास करणारे इंग्रज व स्कॉच लोक होते ही गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. त्या वेळीं विद्यापीठें केवळ लॅटिन व ग्रीक ग्रंथांची घोकंपट्टी करण्यांतच गुंतलीं होतीं. फ्रेंच विद्यापीठेंहि जेसुइट लोकांच्या आमिजात ग्रंथांच्या अध्ययनपरंपरेंत गुरफटलेलीं होतीं. परंतु जर्मन लोकांनीं एकजुटीनें शास्त्रीय संशोधनाचा मार्ग चिकाटीनें व निश्चयानें चोखाळण्याचा प्रयत्न सुरू केला व त्यांची संख्या जरी प्रथम थोडी होती तरी ती इंग्रज व फ्रेंच यांपेक्षां अधिक होती. तसेंच इंग्रज व फ्रेंच लोकांनीं जरी या शास्त्रीय ज्ञानाचा धन संपादन करण्याच्या कामीं उपयोग करून घेतला तरी त्यांनीं शुद्ध शास्त्रीय संशोधनाकडे फारसें लक्ष दिलें नाहीं व त्यामुळें शास्त्रीय संशोधक दरिद्रीच राहिले. एकनिष्ठेनें संशोधनामार्गे लागलेल्या व्यक्तीस सांपत्तिक लाभाकडे लक्ष देण्यास सवडच नसते. तिचें सर्व लक्ष शास्त्रीय ज्ञानाचा पाठपुरावा करण्याकडे लागलेलें असतें. त्यामुळें या व्यक्तीच्या संशोधनाचा फायदा द्रव्याच्या मार्गे लागलेल्या वनिया वृत्तीच्या माणसांसच होतो. हीच गोष्ट आपणांस या बाबतींतहि दिसून येते. व या कालांत झालेल्या सर्व शास्त्रीय संशोधनाचा आर्थिक फायदा ग्रेट ब्रिटनमधील लोकांसच मिळालेला दृष्टीस पडतो. परंतु जर्मनीमध्यें तेथील सरकार व इतर संस्था यांनीं शास्त्रीय संशोधनाकडे आपणांस मिळणाऱ्या धनाचा कांहीं अंश अधिक प्रमाणांत खर्च करण्याचें धोरण ठेवलें व त्यापासून दूरच्या काळीं होणाऱ्या लाभाकडे दृष्टि ठेवली. यामुळें जर्मनीमध्यें शास्त्रीय ज्ञानांत एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत एवढी प्रगति झाली कीं, नवीन शास्त्रज्ञास अद्यावत् शास्त्रीय ज्ञानाकरितां जर्मन भाषा शिकणें आवश्यक झालें.

साधी नदीच्या पात्रांत आढळणारी वाळू, खाणींतील कोळसा व लोखंड इत्यादि वस्तू घेऊन त्यांचें चूर्ण करून, तापवून व गाळून त्यांपासून मजबूत लोखंड व ठिसूळ कांच यांसारख्या वस्तू सुलभतेनें करून घेणें शास्त्रीय ज्ञानाच्या वाढीनें शक्य झालें आहे.

याप्रमाणें लोखंडाच्या बाबतींत या धातुविद्येमध्यें त्या वेळीं किती प्रगति झाली होती हें केवळ उदाहरणादाखल सांगितलें आहे. याचप्रमाणें तांबें, कथील आणि इतर धातूंच्याहि बाबतींत अनेक प्रकारचें संशोधन होऊन त्यांचा उपयोग विविध प्रकारें करण्यांत येऊं लागला. निकेल व अल्युमिनम या धातू तर एकोणिसाव्या शतकापूर्वी अज्ञात होत्या. अशाच अनेक धातू या कालांत शास्त्रीय ज्ञानाच्या प्रगतीमुळें अनेकविध बाबतींत उपयोगांत आणतां येऊं लागल्या. तथापि या प्रारंभीच्या कालांत या निरनिराळ्या शक्तींचा उपयोग फार मर्यादित व कांहींसा अडाणीपणानेंच करण्यांत येत होता. जसजशी ज्ञानाची कक्षा वाढत गेली तसतसा हा उपयोग अधिक जाणतेपणें होऊं लागला. तरी या क्षेत्रांत अद्यापहि पुष्कळच प्रगति व्हावयाची होती व अद्यापि चालू आहे.

**विद्युच्छक्तीचा उपयोग—**

वर दिलेल्या निरनिराळ्या शक्तींच्या उपयोगाबरोबरच विद्युच्छक्तीचा उपयोग वाढत होता. परंतु एकोणिसाव्या शतकाच्या अंतिम पादांतच विजेचा उपयोग विशेष प्रकारें होऊं लागला व त्यानंतर विजेचे दिवे, विजेनें चालणाऱ्या ट्राम व गाड्या वगैरे सुरू होऊन ही शक्ति केवळ एका तारेनें दूरवर वाहून नेण्याच्या सुलभतेमुळें व तिचें प्रकाश, गति व उष्णता या तिन्ही रूपांत इच्छेप्रमाणें रूपांतर करतां येऊं लागल्यामुळें एकंदर मानवी आयुष्यक्रमांत फारच मोठा फरक घडून आला.

**स्फोटक शक्तीचीं इंजिनें—**

विद्युच्छक्तीच्या उपयोगानंतर या शक्तिदायक यंत्रांमध्यें आणखी एका नवीन यंत्राची भर पडली. वाफेवर चालणाऱ्या इंजिनामध्यें दाबलेल्या वाफेच्या प्रसरणशक्तीचा उपयोग करून घेण्यांत येत असे, परंतु आतां धूर व हवा यांच्या मिश्रणाचा स्फोट

करून त्या स्फोटक शक्तीमुळें चालणारीं नवीन इंजिनें प्रचारांत आलीं. यांचा उपयोग प्रथम धूरगाड्या अथवा मोटारी चालविण्याच्या कामीं होऊं लागला. या इंजिनांचा आकार व वजन लहान असूनहि त्यांची शक्ति फार मोठी असे. त्यामुळें या इंजिनांचा उपयोग विमानें चालविण्याच्या कामीं सहजच करण्यांत येऊं लागला. असें स्फोटक शक्तीनें चालणारें पहिलें विमान प्रथम १८९७ सालीं स्मिथ्सोनियन इन्स्टिट्यूटमध्यें प्रो. लँग्ले यानें तयार केलें. परंतु तें मनुष्य बसण्याइतकें मोठें नव्हतें. परंतु पुढें मनुष्य बसण्याइतकींच काय पण अनेक मनुष्यें वाहून नेण्यासारखीं विमानें तयार होऊं लागलीं. याचें श्रेय डीझल अथवा अंतर्ज्वलक किंवा स्फोटक इंजिनास आहे. अर्थात् विमानांमुळें निरनिराळ्या स्थलांतील अंतर अधिकाधिक कमी होऊं लागलें व आगगाड्या व आगबोटी यांच्यापेक्षां किती तरी पटींनीं या विमानांची गति वाढली. याप्रमाणें सर्व जग एक होण्यास व तें लहान लहान भासूं लागण्यास प्रारंभ झाला. आता अलीकडे तर जेट विमानें अथवा ज्वलद्वायु नळींतून बाहेर पडण्याच्या प्रतिक्रियेच्या शक्तीनें चालणारीं अतिशय वेगवान् विमानें प्रचारांत आलीं आहेत.

### कारखानदारीचा उदय—

या यांत्रिक शक्तीच्या वाढीमुळे व निरनिराळ्या प्रकारचीं यंत्रें उत्पन्न होत गेल्यामुळे मानवी समाजरचनेंतहि हळूहळू फरक होऊं लागला व कारखानदारीचें युग सुरू झालें. वास्तविक कारखानदारी ही गोष्ट मानवी समाजास कांहीं अगदीं अपरिचित नव्हती. प्राचीन काळांतहि कारखानदारी असे, परंतु तिचें स्वरूप मात्र निराळें असे. उदाहरणार्थ, पूर्वीं जेव्हां मोठमोठीं सैन्यें तयार करावीं लागत तेव्हां त्या सैन्यांस पुरवण्याकरितां शस्त्रास्त्रें वगैरे तयार करण्यासाठीं कारखाने असतच. तसेंच जेव्हां मोठमोठ्या पिरामिडसारख्या भव्य इमारती बांधण्यांत येत असत तेव्हां खाणींतून दगड काढणें, ते घडणें, ते दूरवर ओढून नेणें या गोष्टी कांहीं अंशीं कारखानदारीच्या स्वरूपाच्याच असत, पण तेव्हा या कामाकरितां उपयोगांत आणली जाणारी शक्ति ही फक्त मानवी शारीरिक शक्ति असे. ईजिप्तमधील यहुदी लोकांकडून विटा करून घेण्याचें जें चित्र आपण पाहतों तेथें हे मजूर रखवालदारांच्या देखरेखीखालीं रावतांना आढळतात. तो तत्कालीन विटांचा कारखानाच असे. रोमन राज्यामध्यें जेव्हां मोठमोठीं गलबतें बांधून तीं पांच पांच वल्ह्यांच्या रांगांनीं वल्हवीत न्यावीं लागत तेव्हां अनेक गुलामांकडून चाबकाच्या धाकानें सुपूर्त पद्धतीनें काम करून घेणें या प्रकारचें तें एक कारखान्याचेंच रूप असे. फार काय पण ग्रंथ जेव्हां छापून निघत नसत तेव्हा ते लिहून घेण्याकरितां अनेक लेखक ओळीनें बसवून व एक ग्रंथ सांगणारा नेमून सामुदायिक रीतीनें ग्रंथ लिहून घेतले जात असत. हीं ठिकाणें म्हणजे ग्रंथांचे कारखानेच होते. अशाच तऱ्हेनें जेव्हां एखाद्या चित्राच्या अनेक प्रति तयार करून घेण्यांत येत असत तेव्हांहि अनेक भाडोत्री चित्रकार रोजंदारीनें ठेवून त्यांच्याकडून अशा स्वस्त प्रतिकृति करून घेण्यांत येत असत. याप्रमाणें कारखानदारीची पद्धति ही पूर्वीपासूनच चालू होती, पण तेव्हां उपयोगांत आणली जाणारी शक्ति केवळ मानवी स्नायूंची शक्ति असे, त्यामुळें अशा कारखानदारीची वाढ मर्यादित व विशिष्ट स्वरूपांत व विशिष्ट धंद्यांतच होऊं शकत असे.

परंतु जेव्हां वर सांगितल्याप्रमाणें यांत्रिक शक्तीचा उपयोग अनेक कामांत होऊं लागला तेव्हां अशा तऱ्हेनें जेथें केवळ मनुष्याच्या स्नायूंच्या शक्तीचा म्हणजे केवळ एकसारख्याच यांत्रिक हालचालींचा अथवा श्रमांचा उपयोग होत असे तेथे या यंत्रांचा उपयोग होऊं लागला व मनुष्याची जरूरी केवळ बौद्धिक काम अथवा असें यंत्र चालविण्याचें काम या गोष्टींपुरतीच उरली. अशा रीतीनें अनेक क्षेत्रांत मनुष्याची जागा यंत्रें घेऊं लागलीं व केवळ श्रमाचें काम यंत्रांकडे जाऊन बौद्धिक काम मनुष्याकडे राहिलें.

ही गोष्ट केवळ यांत्रिक कारखान्यांतच झाली असें नव्हे तर शेतकी वगैरे अन्य धंद्यांतहि पेरणी, कापणी, मळणी या क्रियांत हळूहळू यंत्रांचा प्रवेश होऊन त्यांमध्येंहि ही श्रमविभागणी घडून आली.

### मानवास सुशिक्षित करण्याची आवश्यकता—

पूर्वीं रोमन संस्कृतीच्या काळांत जेथें गुलामांच्या शक्तीचा उपयोग करून घेण्यांत येत होता तेथें आतां यंत्रांचा उपयोग करून घेण्यांत येऊं लागला. यामुळे मनुष्याचा उपयोग हा केवळ शक्तीच्या कामीं न होऊं लागल्यामुळें त्याची बौद्धिक पातळी वाढवून त्यास अधिक उपयुक्त करून घेण्याकडे अठराव्या व एकोणिसाव्या शतकांतील लोकांचें लक्ष लागलें. याकरितां मनुष्यास शिक्षण देण्याची आवश्यकता वाटूं लागली. मनुष्यानें जें काम करावयाचें तें आतां त्याला नीट समजणें अवश्य होऊं लागलें. याकरितां मनुष्याचें ज्ञान वाढविण्याची प्रवृत्ति हळूहळू वाढूं लागली. मनुष्यास सुशिक्षित करण्याची प्रवृत्ति यापूर्वींहि कांहीं काळ विशेषतः धर्मप्रसारकांमध्यें दिसून येऊं लागली होती. जेव्हां धर्माचें स्वरूप केवळ आज्ञापालन अथवा अनुकरण यांच्यापुढें जाऊन विशिष्ट मतधारण या स्वरूपास येऊन पोंचलें तेव्हां मनुष्यास आपलें मत बनविण्याकरितां कांहीं तरी ज्ञान देणें अवश्य होऊं लागलें व जेव्हां निरनिराळ्या धार्मिक मतांत व संप्रदायांत स्पर्धा उत्पन्न झाली तेव्हां मतप्रवर्तन व मतपरिवर्तन या क्रिया घडून येऊं लागल्या. जेव्हां नवीन नवीन स्थापन होणाऱ्या संप्रदायांच्या प्रवर्तकांस जुन्या लोकांच्या प्रथमच्या विशिष्ट मतांमध्यें

परिवर्तन घडवून आणणें आवश्यक होऊं लागलें तेव्हां मनुष्यास या नवीन मतांचें व संप्रदायांचें आकलन होण्याकरितां त्याचें ज्ञान व बौद्धिक पातळी वाढविणें अवश्य झालें. याकरितां प्रथम शिक्षणाचा प्रसार व नंतर मतप्रसार असा हा अनुक्रम बसवावा लागला. प्राचीन काळीं बौद्ध लोकांनीं जे मठ स्थापन केले त्यांत शिक्षण व ज्ञानदान हेंच प्रमुख असे. अद्यापहि ब्रह्मदेशांतील बौद्ध मठांमध्यें तेथील फुंगी अथवा भिक्षू लोक हें शिक्षणाचें कार्य करीत असतात. याप्रमाणेंच ख्रिस्ती मिशनरी लोकांनीं धर्मप्रसाराकरितां शिक्षण-प्रसार करण्यास आरंभ केला. इंग्लंडमध्यें एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीं १८३० ते १८५० या कालाच्या दरम्यान ख्रिस्ती समाजांतच जे निरनिराळे नवीन नवीन पंथ व संप्रदाय निघाले व त्यांमध्यें स्पर्धा सुरू झाली त्यांत आपल्या पंथास अनुयायी मिळावे व मुलांची लहानपणींच आपल्या संप्रदायाकडे प्रवृत्ति व्हावी याकरितां मुलांच्या शिक्षणाच्या शाळा चालविणें व त्या शाळांतच मुलांच्या मनावर आपल्या संप्रदायाच्या तत्त्वांचा ठसा उमटविणें या गोष्टी सुरू झाल्या. यामुळें या निरनिराळ्या पंथांनीं अनेक निरनिराळ्या शाळा स्थापन केल्या. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत सर्व पाश्चात्य देशांत शिक्षणाचा प्रसार फार झपाट्यानें झाला व हा प्रसार बहुतेक मध्यमवर्गीय लोकांत किंवा खालच्या दर्जाच्या लोकांत झाला. महंमदाच्या अनुयायांसहि कुराणांत काय सांगितलें आहे हें समजण्याकरितां नवीन होणाऱ्या अनुयायांस अरबी भाषेचें ज्ञान व शिक्षण देणें आवश्यक वाटूं लागलें. याकरितां बहुतेक प्रत्येक मशिदींत शाळा स्थापन करण्यांत आली. याप्रमाणें बौद्धिक कार्य करून घ्यावयाचें तर शिक्षणप्रसार अवश्य असल्यामुळें या यांत्रिक युगाबरोबर शिक्षणप्रसार हा अनुषंगानेंच वाढत गेला.

### मानवी विचारशक्तीची वाढ—

प्राचीन काळीं मानवी संस्कृतीची प्रगति फार मंदगतीनें होत होती. त्या काळांत फार दूरवरचा विचार कोणी करीत नसे. समाजव्यवस्थेचा व राजनीतीचा विकास फार हळूहळू व प्रसंगो-पात्त परिस्थितीप्रमाणें होत जात होता. ख्रिस्तपूर्व सहाव्या शतका-मध्यें आपणांस ग्रीक लोकांमध्यें व अलेक्झांड्रिया वगैरे ठिकाणीं कांहीं लोक स्वतंत्रपणें व निरपेक्षपणें विचार करीत असलेले दृष्टीस पडतात. परंतु या विचारांची फारशी वाढ न होतां रोमन अम-लाच्या काळांत व नंतर या विचारसरणीची परागतिच झालेली दृष्टीस पडते. मध्ययुगामध्यें बहुतेक हे विचार लुप्त झालेले दिसून येतात. त्यानंतर वर सांगितल्याप्रमाणें जेव्हां शिक्षणाचा प्रसार झाला, पूर्व व पश्चिम यांमधील अंतर कमी होऊन विचारांची देवाण-घेवाण सुरू झाली, प्राचीन ग्रीक वगैरे ग्रंथांचें अध्ययन पुन्हा सुरू झालें, लोक स्वतंत्रपणें विचार करूं लागले व लोकांस मानवतेची जाणीव होऊं लागली तेव्हां लोकांमध्यें एक प्रकारचें नवचैतन्य सुरू झालें. याचा परिणाम प्रथम भौतिक सुधारणा घडून येण्यांत झाला. नवीन नवीन शोध व नवीन नवीन साधनें उपलब्ध होऊन मानवाच्या जीविताचा विकास होत गेला. मानवांमधील परस्पर व्यवहार व संबंध, वैयक्तिक व सामाजिक मनोविज्ञान, शिक्षण व अर्थशास्त्र हीं शास्त्रें अधिक गुंतागुंतीचीं व सूक्ष्म विचारांतींच ग्रहण होण्यासारखीं असून त्यांचा मानवी शारीरिक शक्तींपेक्षां भावना व मानसिक शक्तींशींच अधिक संबंध येतो. यामुळें या शास्त्रांची वाढ फार हळूहळू व बऱ्याच विरोधास तोंड देत देत घडून आली. एखादा मनुष्य तारे व नक्षत्रें, अणु व परमाणु, प्रकाश व वीज, प्राणवायु व गंधक वगैरे गोष्टींसंबंधीं जर विवेचन करूं लागला तर कोणीहि तें मोठ्या आवडीनें व बिनविरोधानें ऐकून घेतो, परंतु आपल्या आयुष्यक्रमासंबंधीं, किंवा राजकारणासंबंधीं विचार कोणी बोलूं लागला तर ते निर्विकारपणें ऐकून घेण्यास फारच थोडे लोक तयार असतात. यामुळें सॉक्रेटिससारख्या लोकांस नवीन विचार व्यक्त करण्याबद्दल देहदंड द्यावा लागला व प्लेटोच्या विचारांनंतर ॲरिस्टॉटलनें संशोधनास सुरुवात केली. त्याप्रमाणेंच युरोपमध्यें राजकीय विषयांवर जेव्हां प्रथम कांहीं लोक विचार करूं लागले तेव्हां ते प्लेटोप्रमाणेंच गंधर्वनगरींतील अथवा केवळ कपोलकल्पित असेच लोकांस वाटूं लागले; एवढेंच नव्हे तर कांहीं विचार तर प्लेटोच्या रिपब्लिक या ग्रंथावरूनच लोकांस प्रथम सुचूं लागले. उदाहरणार्थ, सर टॉमस मूरचा 'यूटोपिआ' हा ग्रंथ म्हणजे प्लेटोच्याच वरील ग्रंथाचें अनुकरण होय. तसाच कॅंपेनेला या निओपॉलिटन ग्रंथकाराचा सूर्यनगरी (सिटी ऑफ धि सन) हा ग्रंथहि तशाच स्वरूपाचा होता.

### सामाजिक पुनर्रचनेबद्दल विचार—

पण मूरच्या ग्रंथामुळें निदान इंग्लंडमध्यें गरिबांकरितां 'पुअर लॉ' या कायद्याचा जन्म झाला. सतराव्या शतकाच्या अखेरीस राजकीय व सामाजिक विषयांवर बरेंच वाङ्मय प्रकाशित होऊं लागलें होतें. यांमध्यें सर्वांत पहिला लेखक जॉन लॉक हा होय. यानें प्रथम रसायन व वैद्यक या विषयांचा अभ्यास केला होता, परंतु याच्या राज्यपद्धति, उदारमतवाद, शिक्षण वगैरे विषयांवरील ग्रंथांत सामाजिक पुनर्रचनेबद्दलचे विचार दृष्टीस पडतात. याच सुमारास किंवा यानंतर लवकरच फ्रान्समध्यें मॉंटेस्क्यू (१६८९–१७५६) यानें तत्कालीन सामाजिक, राजकीय व धार्मिक संस्थांचें शोधपूर्वक पृथक्करण केलें व फ्रान्समधील एक-तंत्री राज्यपद्धतीवर सडकून टीका केली. यानंतर ज्ञानकोशकार

(एन्सायक्लोपीडिस्ट) या नांवाचा एक ग्रंथकाराचा वर्ग निर्माण झाला. यांनीं समाजाची पुनर्रचना कशी केली पाहिजे हें विशद करण्याचा प्रयत्न केला. याच सुमारास अर्थशास्त्रज्ञ (फिझिओक्रॅट) ग्रंथकारांचा एक वर्ग पुढें आला व यांनीं अन्नाचें व मालाचें उत्पादन व पुरवठा या प्रश्नाची स्पष्टपणें चर्चा केली. मोरेली या नांवाच्या ग्रंथकारानें निसर्गाचा कायदा (कोड डि ला नेचर) हा ग्रंथ लिहून खासगी मालमत्ता नष्ट करून सामुदायिक व सामाजिक राहणी केली पाहिजे असें प्रतिपादन केलें. हा तत्कालीन 'समाजवादी' ग्रंथकारांचा अग्रणी होता. परंतु समाजवादामध्येंहि अनेक प्रकार आहेत. समाजवाद म्हणजे सार्वजनिक हिताच्या दृष्टीनें स्वामित्व अथवा मालकीच्या हक्काचा विचार करण्याची क्रिया होय.

### स्वामित्वाची कल्पना—

मनुष्यप्राण्यामध्यें जी एक कलह अथवा युद्धप्रवृत्ति आहे तीमुळें स्वामित्व अथवा मालकी हक्काच्या कल्पनेचा उदय होतो. अगदीं पहिली स्वामित्वाची कल्पना म्हणजे ज्या वस्तूकरितां एखादा प्राणि युद्धास प्रवृत्त होतो त्या वस्तूवरील त्याची सत्ता होय. कुत्रा त्यास सांपडलेल्या एखाद्या हाडाकरितां किंवा एखादी वाघीण एखाद्या गुहेकरितां किंवा हरिण आपल्या कळपाकरितां युद्धास प्रवृत्त होतात अर्थात् त्या वस्तूंवर त्यांचें स्वामित्व आहे अशी भावना याच्या मुळाशीं असते. अगदीं प्राथमिक अवस्थेंतीलहि मनुष्य आपलीं हत्यारें अथवा आयुधें, आपली बायको, आपल्या मुली वगैरेंवर आपलें स्वामित्व बाळगीत असे. यांपैकीं एखाद्यावर आक्रमण झाल्यास तो शत्रूवर तुटून पडून त्यांचें रक्षण करीत असे. यानंतर कुटुंबाची कल्पना ही जेव्हां म्हातारा बाप आपल्या मुलानें केलेलीं हत्यारें अथवा दागिने किंवा त्यानें हिरावून आणलेली बायको यांवर त्या मुलाचें स्वामित्व कबूल करूं लागला तेव्हां कुटुंबाची कल्पना उद्भूत झाली व यानंतर गोत्र अथवा टोळी व त्यानंतर समुदाय अथवा समाज या कल्पना हळूहळू दुसऱ्याचें विशिष्ट वस्तूंवरील स्वामित्व मान्य झाल्यानंतर उदय पावल्या. ज्या जमिनी एकापेक्षां अधिक व्यक्तींस किंवा कुटुंबांस उपयोगी पडत व ज्या वैयक्तिक स्वामित्वाखालीं आणणें कठिण असे त्या जमिनी किंवा झाडें, मैदानें, कुरणें, वगैरे सामाजिक मालकीच्या समजण्यांत येऊं लागल्या. यावरून पहिला जो समाज निर्माण झाला तो कांहीं बाबतींत वैयक्तिक स्वामित्वाचा कांहीं व्यक्तींनीं त्याग केल्यामुळें निर्माण झाला. ही स्वामित्वाची कल्पना अगदीं प्राथमिक असून नैसर्गिक आहे.

याप्रमाणें ज्या ज्या वस्तूंकरितां मनुष्य युद्ध करण्यास प्रवृत्त होतो त्या त्या वस्तूंवर त्याचें स्वामित्व स्थापन होत गेलें. याप्रमाणें मनुष्याची स्त्री, त्यानें जिंकलेला पण जिवंत सोडलेला शत्रु अथवा गुलाम, पकडलेले व पाळलेले पशू, ताब्यांत ठेवलेली जमीन, गुहा, खाण, वगैरे सर्व गोष्टी त्याच्या मालकीच्या समजल्या जाऊं लागल्या. जसजसा समाज वाढूं लागला तसतसा परस्परांमधील युद्धास आळा बसून कांहीं कांहीं बाबतींत वैयक्तिक स्वामित्व अथवा मालकी मान्य करण्यांत येऊं लागली. ज्या वस्तू मनुष्यानें स्वतः तयार केल्या असतील किंवा प्रथम मिळविल्या असतील त्या त्याच्या मानण्यांत येऊं लागल्या. ऋणको जर ऋण परत करूं शकला नाहीं तर त्यावर धनकोची सत्ता मान्य करण्यांत येऊं लागली. नंतर एखाद्याच्या मालकीची जमीन जर त्यानें स्वतः न कसतां दुसऱ्यास कसण्याकरितां दिली तर त्याचा स्वामित्वाबद्दल खंड घेण्याचा हक्क मान्य करण्यांत आला. अशा रीतीनें हळूहळू मालकीचें क्षेत्र व्यापक होत गेलें व मालकी ही निरंतरची मानण्यांत येऊं लागली.

यानंतर फार दीर्घ कालानें व समाजास पुष्कळ स्थैर्य आल्यानंतर ही निरंतरची मालकी लोकांस गैरसोयीची वाटूं लागली. नवीन होणाऱ्या प्रजेस जिकडे तिकडे कोणाचें तरी स्वामित्व अथवा मालकी नजरेस पडूं लागली एवढेंच नव्हे तर प्रत्येक व्यक्तीवर सुद्धां कोणाची तरी मालकी अथवा हक्क दृष्टीस पडूं लागला. या कल्पना कशा वाढत गेल्या हें येथें सांगण्यास अवकाश नाहीं. परंतु उदाहरणादाखल सांगावयाचें तर कर्जाचा बोजा निरंतर वाहणें लोकांस असह्य होऊं लागलें व कर्जाकरितां ऋणकोचीं बायकामुलें किंवा ऋणकोसच धनकोनें विकणें किंवा गुलाम करणें या गोष्टी लोकांस फारच निर्घृण प्रकारच्या वाटूं लागल्या व ग्रीक लोकांतील ही चाल बंद पाडण्यांत आली. यहुदी लोकांत तर दर पन्नास वर्षांनीं ज्युबिली या सणाच्या प्रसंगीं सर्व कर्जें माफ करण्याची व जी कोणाची, घरें वगैरे मालमत्ता दुसऱ्याच्या ताब्यांत गेली असेल ती परत करण्याची वहिवाट पडली. त्याप्रमाणेंच रोमन कालांत जमिनीची अमर्याद अथवा निरंतरची मालकी हीदेखील मानवी व्यवहारास जाचक वाटूं लागली. कारण पुष्कळशी जमीन फार थोड्या लोकांकडे जाऊन बहुसंख्य जनता उदरनिर्वाहाच्या साधनास मुकूं लागली. बाबिलोनियामध्यें सुद्धां गुलामांवरील सत्तेस मर्यादा घालावी लागली होती. ख्रिस्तानें तर असा उपदेश केला होता कीं, सुईच्या नेढ्यांतून एखाद वेळ उंट पलीकडे जाऊं शकेल; पण ज्याचेजवळ मालमत्ता आहे असा मनुष्य स्वर्गाच्या द्वारांतून आंत जाऊं शकणार नाहीं. गेल्या पंचवीस-तीस शतकें मानवी स्वामित्वाच्या कल्पनेबद्दल वेळोवेळीं कुरकुर व तक्रारी केलेल्या दृष्टीस पडतात. परंतु मनुष्यावरील मनुष्याचें स्वामित्व अथवा गुलामगिरी नष्ट होण्यास एकोणिसावें शतक अर्धें उलटून जावें लागलें. तसेंच

इतर बाबतींतील मानवी स्वामित्वासहि एकोणिसाव्या शतकांत हळूहळू धक्का बसूं लागला. परंतु अठराव्या शतकाच्या अखेरीस या स्वामित्वाबद्दलच्या कल्पनेचें काय करावें हा जनतेपुढें प्रश्नच होता. राजे व उमराव, सरदार, जमीनदार, वगैरे लोकांचें मात्र जमिनीवरील स्वामित्व नष्ट करण्यांत यावें इतकी या विचारांत प्रगति झाली होती. फ्रेंच राज्यक्रांति खाजगी मालकीच्या जमिनींवरील करमाफीमुळें प्रवृत्त झाली होती, परंतु तिचा विकास सर्वच खासगी स्वामित्व नष्ट करण्यांत यावें या कल्पनेंत हळूहळू होऊं लागला होता. जेथें अनेक लोकांस उभें राहावयापुरतीहि जागा नाहीं व खावयास अन्न नाहीं तेथें मनुष्य स्वतंत्र कसा राहूं शकतो हा तत्कालीन गरीब लोक प्रश्न विचारूं लागले होते. या प्रश्नाला एका पक्षाचें असें उत्तर होतें कीं, सर्व मालमत्तेची सर्व लोकांत सारखी वांटणी करून टाकण्यात यावी. याकरितां स्वामित्व हें अजीबात नष्ट करण्यांत यावें असें साम्यवाद्यांचें म्हणणें होतें. सर्व वस्तूंवर लोकशाही राज्याची सत्ता असली पाहिजे असें त्यांचें मत होतें.

याप्रमाणें स्वामित्वाबद्दलच्या निरनिराळ्या लोकांच्या निरनिराळ्या कल्पना होत्या. याचें कारण स्वामित्व ही कल्पनाच अनेकांगी आहे. उदाहरणार्थ, मनुष्याचें शरीर व त्यास लागणाऱ्या कपडे, हत्यारें वगैरे वस्तू यांचेवरील त्याचें स्वामित्व एक प्रकारचें आहे; परंतु घरें, जमिनी, उद्यानें, रेलवे, यंत्रें, कारखाने, वगैरेंवरचें स्वामित्व फार विविध प्रकारचें आहे. यांवर वैयक्तिक व सार्वजनिक स्वामित्व कोणत्या मर्यादेपर्यंत असावें हें ठरविणें कठिण आहे. यामध्यें राजकीय प्रश्न व शासनविषयक प्रश्न उत्पन्न होतात, तसेंच सामाजिक, मानसशास्त्रीय व शैक्षणिक प्रश्नहि उत्पन्न होतात. वैयक्तिक सत्तावादी प्रत्येक गोष्ट वैयक्तिक मालकीची असून तिचा विकास करणें व्यक्तीच्या अधीन असावें असें म्हणतात; तर समाजवादी सर्व गोष्टी समाजाच्या मालकीच्या असाव्यांत असें प्रतिपादन करतात. प्रत्यक्ष व्यवहारांत या दोन आत्यंतिक टोकांपैकीं कांहीं मधल्या अवस्था दृष्टीस पडतात. पण वैयक्तिक स्वामित्ववादी सर्व करांपासून मुक्तता चाहतो तर समाजवादी कोणत्याहि वस्तूवर वैयक्तिक स्वामित्व मानीत नाहीं. सामान्यतः कांहीं गोष्टींवर वैयक्तिक स्वामित्व व शिक्षण, दळणवळण, खाणी, जमिनी, मोठ्या प्रमाणावरील उत्पादन, वगैरे गोष्टी शासनसंस्थेच्या स्वामित्वाखालीं असाव्यात असें मानण्याकडे अनेक लोकांचा कल असतो. मोठमोठ्या व्यवहारांत सामान्य शिक्षणविरहित मनुष्य योग्य प्रकारचें सहकार्य करूं शकत नाहीं तसेंच शासनसंस्थेनें मोठमोठे व्यवहार करावयाचे तर शिक्षणाचा दर्जा वाढविणें व योजनापूर्वक कार्य करणें आवश्यक असतें.

## कारखानदार व मजूर यांमधील संघर्ष व साम्यवाद—

तथापि या काळांत एकंदर उद्योगधंद्यांमध्यें गुंतलेले धनपति व कारखानदार आणि त्यांच्या कारखान्यांत काम करणारे मजूर यांच्यामध्यें, विशेषतः स्वार्थी कारखानदार व चुकार मजूर यांच्यामध्यें एक प्रकारचा संघर्ष दीर्घकाळ चालत आला. याचा परिणाम म्हणून त्या काळच्या मजूरवर्गामध्यें एक प्रकारचा साम्यवाद हळूहळू आपोआप निर्माण होत गेला. या साम्यवादाचें जनकत्व कार्ल मार्क्स या नांवाच्या लेखकाकडे दिलें जातें. कार्ल मार्क्सचें म्हणणें असें कीं, मानवाचा मानसिक विकास हा त्याच्या आर्थिक परिस्थितीवर अवलंबून असतो व सध्यांच्या काळांत पैसेवाले कारखानदार व मजूर यांच्यामध्यें संघर्ष एकसारखा चालू आहे. नवीन यांत्रिक सुधारणांमुळें मजूरवर्गास शिक्षण हें आवश्यक झाल्यानें शिक्षणाच्या वाढीबरोबर त्यांच्यामध्यें आपल्या परिस्थितीची जाणीव उत्पन्न होऊन या दोन वर्गांत असंतोष वाढत जाणें अपरिहार्य आहे. अर्थातच या मजूरवर्गास आपल्या होत असलेल्या पिळणुकीची जाणीव झाली म्हणजे हळूहळू ते आपल्या हातांत सत्ता घेण्याचा प्रयत्न केल्याशिवाय राहणार नाहींत व या सत्तेच्या जोरावर ते नवीन सामाजिक रचना घडवून आणतील. त्यांचे विरोधक म्हणतात कीं, या दोन वर्गांतील संघर्ष व असंतोष यांपासून चंडाळी व क्रांति या गोष्टी घडून येतील हें जरी मान्य केलें तरी दोघांसहि संतोषप्रदायक अशी समाजाची नवीन घडी बसेलच असें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. उलट समाजामध्यें विस्कळीतपणा मात्र उत्पन्न होईल. यांचें म्हणणें असें कीं, पुढें रशियामध्यें ज्या गोष्टी घडून आल्या—त्यांचें वर्णन पुढें येईलच—त्यावरून नवीन विधायक कार्य कांहीं घडून आलें आहे असें दिसत नाहीं.

## व्यक्तिवाद—

मार्क्सनें राजकीय विरोधाबद्दल वर्गविरोधाचें तत्त्व पुढें मांडलें. मार्क्सच्या उपपत्तीस अनुसरून यानंतर पहिली, दुसरी व तिसरी याप्रमाणें आंतरराष्ट्रीय साम्यवादी संस्था निर्माण झाल्या. तथापि पुढें तिसरी आंतरराष्ट्रीय संस्था विसर्जन करण्यांत आली. परंतु उलट व्यक्तिवादवाल्या लोकांचें मत असें आहे कीं, साम्यवादाप्रमाणें व्यक्तिवादाची परिणतिहि आंतरराष्ट्रीय विचारामध्यें व तत्त्वांमध्यें घडवून आणणें शक्य आहे. ॲडॅम स्मिथ या अर्थशास्त्रज्ञाच्या कालापासून सर्व जगामध्यें जर समृद्धि घडवून आणावयाची असेल तर सर्वत्र खुला व अप्रतिबंध व्यापार व उद्योगधंद्यांची वाढ झाली पाहिजे ही गोष्ट अनेक जणांस मान्य होऊं लागली आहे. व्यक्तिवादी हा आपल्या सरकारच्या नियंत्रणाप्रमाणें आंतरराष्ट्रीय नियंत्रणांच्याहि विरुद्ध असतो व जकाती व

सीमा यांचाहि तो निषेध करीत असतो. जरी आपणांस या दोन परस्परविरुद्ध विचारसरणी दिसत असल्या तरी दोहींचेंहि अंतिम ध्येय आजचे सर्व निर्बंध व मर्यादा रद्द करून मानवी कल्पकतेस व शक्तीस अनिर्बंध वाव द्यावा हेंच आहे. ही मात्र त्यांत विचार करण्यासारखी गोष्ट आहे. ही दृष्टि जसजसा मानवी ज्ञानाचा व नवीन नवीन शास्त्रीय विज्ञानाचा विकास होऊं लागला व मानवाचें दृष्टीचें क्षितिज विस्तृत होऊं लागलें तसतशी मानवजातीमध्यें अधिकाधिक दृष्टीस पडूं लागली. या सर्व वादांमध्यें अधिक तपशीलवारपणें पडण्यास आपणांस येथें सवड नाहीं, परंतु मानवाच्या विचाराची दिशा कशी बनत होती व त्याचें क्षेत्र किती विस्तृत होत होतें याचें येथें केवळ दिग्दर्शन करण्यांत आलें आहे.

## फ्रान्समधील दुसरी राज्यक्रांति—

नेपोलियनच्या पराभवानंतर युरोपमध्यें कांहीं काल शांतता प्रस्थापित झाली आणि नवीन पोलाद, रेल्वे, आगबोटी व यंत्रें यांच्या विकासामुळें युरोपमध्यें राजकीय बाबतींत काहीं फारसा फरक घडून आला नाहीं. परंतु शहरामध्यें जी उद्योगधंद्यांची वाढ झाली तीमुळें समाजामध्यें मात्र वर्गविरोध निर्माण झाला. याचा परिणाम फ्रान्समध्यें विशेष घडून त्या देशांत अशांततेतच दिवस गेले. सन १८३० मध्यें त्या देशांत एक राज्यक्रांति झाली व १८४८ मध्यें पुन्हां आणखी एक क्रांति झाली. नेपोलियनचा पुतण्या तिसरा नेपोलियन हा पहिल्यानें अध्यक्ष बनला व १८५२ मध्यें बादशहा बनला. यानें पॅरिस शहरांत पुष्कळच सुधारणा करून तिला सौंदर्यनगरी बनविली. तसेंच एकंदर फ्रान्स देशांतहि सुधारणा करून अर्वाचीनत्व आणलें. परंतु यानें पुन्हां निरानिराळ्या राज्यांत स्पर्धा उत्पन्न केली. याच वेळीं रशियाचा झार पहिला निकोलस हाहि तुर्कस्तानच्या दिशेनें हातपाय पसरूं लागला होता. अर्थातच याचा परिणाम युरोपमध्यें पुन्हां एक युद्ध सुंपण्यामध्यें झाला. या युद्धामागील तत्त्व शक्तिसमतोलाचें होतें. या युद्धांत इंग्लंड, फ्रान्स व सार्डिनिया यांनीं रशियाविरुद्ध तुर्कस्तानच्या रक्षणाकरितां म्हणून क्रिमियन युद्ध सुरू केलें. प्रशिया व ऑस्ट्रिया यांच्यामध्यें जर्मनीच्या पुढारीपणाबद्दल तंटा सुरू झाला. फ्रान्सनें इटलीस ऑस्ट्रियाविरुद्ध मदत करून त्या देशास स्वातंत्र्य मिळवून दिलें, पण सॅव्हॉय प्रांताची किंमत द्यावी लागली. इटलीनें हळूहळू आपल्या देशांत ऐक्य स्थापन केलें व एकराज्य बनविलें. त्या वेळीं नेपोलियननें मेक्सिकोमध्यें एक मॅक्झिमिलियन या नांवाचा बादशहा स्थापन करून अमेरिकेंत चाललेल्या यादवीचा फायदा घेण्याचा प्रयत्न केला. परंतु तो अयशस्वी झाला व त्या बादशहास मेक्झिकन लोकांनींच गोळी घालून उडवून दिला. १८७० मध्यें फ्रान्स व प्रशियामध्यें युद्ध होऊन त्यांत फ्रान्सचा पूर्ण पराजय झाला आणि अल्सेस व लॉरेन हे प्रांत गमवावे लागले व नेपोलियन यास राज्यपद गमवावें लागलें. हळूहळू प्रशियानें जर्मनीचें एकीकरण करून बादशाही स्थापन केली.

## युरोपीयांच्या वसाहती—

अठराव्या शतकाच्या अखेरीस युरोपीय देशांच्या ज्या निरनिराळ्या प्रदेशात वसाहती होत्या त्यांच्याकडे मूळ देशांचें फारसें लक्ष नसे व त्यांमधील दळणवळणहि फारसें सुलभ नव्हतें. परंतु आगबोटी, रेल्वे व तारायंत्रें यांची वाढ होऊन जेव्हां दूरदूरचें दळणवळण सुकर होऊं लागलें तेव्हां या वसाहतींस विशेष महत्त्व येऊं लागलें व त्या वसाहतींशीं मूळ देशांचा व्यापार अधिकाधिक वाढूं लागला. परंतु या वसाहती म्हणजे कच्चा माल मिळविण्याचें व पैसा गोळा करून आणण्याचें साधन या दृष्टीनेंच मूळ देश त्यांच्याकडे पहात असत. परंतु अमेरिकेंतील वसाहतींनीं हळूहळू आपले संबंध मूळ देशांशीं तोडून टाकून त्या सर्व स्वतंत्र व लोकसत्तात्मक बनल्या. संयुक्त संस्थानांचा धडा घेऊन ब्रिटननें यापुढें आपलें वसाहतींशीं धोरण अधिक सावधगिरीचें ठेवलें. संयुक्त संस्थानांच्या शेजारच्याच कॅनडा या वसाहतीस डोमिनियन असें नांव व दर्जा देण्यांत येऊन तेथील कारभार बराचसा प्रजातंत्रात्मक करण्यांत आला व रेल्वे वगैरे बांधून त्या देशांतहि दळणवळणाची सोय करण्यांत आली. इतर भागांतील वसाहतींच्या राज्यकारभारांत योग्य ते फेरफार करण्यांत आले व इंग्रजांचें समुद्रावरील दळणवळण इतर देशांपेक्षा अधिक कार्यक्षम व प्रभावी असल्यामुळें इंग्रजांस आपल्या वसाहतींवर आपलें वर्चस्व कायम ठेवतां आलें. हिंदुस्थान देश तर ईस्ट इंडिया कंपनीनें येथील राज्यकर्त्यांतील परस्पर कलहाचा फायदा घेऊन थोडक्यांत जिंकला होता. त्याचें स्वामित्व १८५७ च्या बंडानंतर इंग्लंडच्या राजाकडे देण्यांत आलें व १८७७ मध्यें व्हिक्टोरिया राणीस बादशाहीण म्हणून पुकारण्यांत आलें.

या वेळीं इंग्लंडप्रमाणें फ्रान्स, डच व पोर्तुगीज यांच्याहि कांहीं वसाहती होत्या व त्यांपासून त्या देशांस फायदाहि होत होता.

नवीन यांत्रिक प्रगतीमुळें कारखानदारी वाढून मालाचें उत्पादन वाढत होतें. तसेंच युरोपमधील लोकसंख्याहि वाढत होती. अशा वेळीं वाढत्या लोकसंख्येस राहण्यास जागा, पक्क्या मालाच्या उत्पादनाकरितां लागणारा कच्चा माल व कारखान्यांत तयार झालेल्या मालास बाजारपेठ या तीन कारणांमुळें युरोपांतील निरनिराळीं राष्ट्रें पृथ्वीच्या पाठीवर नवीन नवीन मुलूख व्यापण्याकरितां धडपड करीत होतीं. आतां फक्त आफ्रिकेमध्यें कांहीं प्रदेश

राहिलेला होता. तेथें युरोपांतील बेल्जम, जर्मनी, इटली वगैरे देशांनीं शक्य तेथें वसाहती केल्या. तसेंच चीनमध्यें जेथें कोठें थोडाफार भूभाग अथवा एखादें बेट व्यापावयास मिळालें तेथें तें व्यापण्याचाहि या राष्ट्रांनीं उपक्रम केला.

या वसाहतींच्या स्पर्धेमध्यें इंग्लंडास आफ्रिकेंत बोअर लोकांशीं एक युद्ध करावें लागलें. पण तें जिंकल्यावर इंग्लंडनें तेथें आपल्या वर्चस्वाखालीं प्रजासत्ताक राज्य निर्माण केलें.

## जपानचा उदय—

याच वेळीं पूर्वेकडे एका नवीन राष्ट्राचा उदय होत होता. तें म्हणजे जपान होय. जपानमध्यें प्रथम संस्कृतीचा प्रसार चीन व कोरियामार्फत झाला व त्याचा प्रथम पश्चिमेकडील लोकांशीं संबंध कांहीं मिशनऱ्यांमार्फत आला. हे मिशनरी जोंपर्यंत शैक्षणिक कार्य करीत होते तोंपर्यंत जपाननें त्यांस उत्तेजन दिलें. परंतु जेव्हां ते ख्रिस्ती संप्रदायप्रसाराचें कार्य करूं लागले व त्या कामांत बौद्ध लोकांचा छळ करूं लागले तेव्हां जपाननें आपले दरवाजे सर्व पाश्चात्त्य लोकांस बंद केले. ही स्थिति दोनशें वर्षें राहिली. परंतु यानंतर अमेरिकेनें आपल्या आरमाराच्या बळावर जपानी लोकांस आपल्या देशाचे दरवाजे इतर राष्ट्रांस मोकळे करण्यास भाग पाडलें. या अनुभवानें जपान देश शहाणा होऊन त्यानें फार झपाट्यानें सर्व पाश्चात्य अद्यावत् संस्कृति आत्मसात् करण्याचा निश्चय केला व आपलें सैनिक व आरमारी बल खूप वाढविलें. यानंतर जपाननें कोरिया देश व्यापला व मांचुरियाबाबत जपानचें रशियाशीं वितुष्ट येऊन जपानचें रशियाशीं युद्ध जुंपलें. त्या युद्धांत जपाननें रशियाचा पराभव केला व आपल्या सामर्थ्याची जाणीव पाश्चात्य राष्ट्रांस करून दिली. रशिया व जपान यांच्यामध्यें अखेरीस १९०५ सालीं तह झाला व त्यांत रशियानें मांचुरिया खालीं केला, कोरिया जपानास मिळाला व साखालीन बेटाचा अर्ध रशियास सोडून द्यावा लागला. यानंतर जपाननें आपला व्यापार व आपलें सामर्थ्य वाढविण्याचा कार्यक्रम अधिक जोमानें पुढें चालविला.

## पहिलें महायुद्ध—

वर सांगितल्याप्रमाणें युरोपांतील राष्ट्रांमध्यें वसाहती व व्यापार वाढविण्यामध्यें जी स्पर्धा उत्पन्न झाली तिचें एक अंग म्हणून प्रत्येक राष्ट्रानें आपलें सैन्यबल, आरमारी सामर्थ्य, दारूगोळा, तोफा व इतर साधनें यांच्यामध्यें सुधारणा व वाढ करण्याची खटपट चालविली आणि सर्व राष्ट्रांत या बाबतींतहि चुरस लागून राहिली. विशेषतः जर्मनीनें आपलें युद्धाचें सामर्थ्य पुष्कळच वाढविलें त्यामुळें जर्मनीबद्दल फ्रान्स व इंग्लंड या दोनहि देशांस काळजी वाटूं लागली. अखेरीस याचा परिणाम एका क्षुल्लक कारणावरून युद्ध पुकारण्यांत झाला व एका बाजूला इंग्लंड, फ्रान्स व रशिया हीं राष्ट्रें व एका बाजूस जर्मनी व ऑस्ट्रिया यांमध्यें १९१४ मध्यें युद्ध जुंपलें. इंग्लंडचें मित्र राष्ट्र म्हणून जपानहि त्याच्या बाजूनें युद्धांत पडलें व इटलीहि लवकरच सामील झाला. जर्मन संघास तुर्कस्तान व पुढें बल्गेरिया येऊन मिळाला. हें युद्ध त्याच्या पूर्वीच्या युद्धांच्या मानानें फार भीषण व दीर्घकाल चालणारें व अगदीं नवीन पद्धतींचें झालें. प्रथम जर्मनीची सरशी होऊन फ्रान्सचा चुराडा होतो काय असें वाटलें. परंतु रशियानें जर्मनीस तिकडे पायबंद घातल्यामुळें फ्रान्सला अवधि मिळाला व अखेरीस दोन्ही सैन्यें अनेक दिवस खंदक खणून त्यांत बसलीं व कोणासहि दुसऱ्यावर भयंकर नाशाच्या धास्तीनें हल्ला करणें जड वाटूं लागलें. या संधीस रशियाचा पराजय झाला व त्या देशांत राज्यक्रान्ति झाली व रशियानें वेगळा तह केला. जर्मनीच्या पाणबुड्यांच्या मोहिमेमुळें व लुसिटानिया ही प्रवासी बोट बुडविल्यामुळें अमेरिका युद्धांत पडली. अखेरीस पश्चिम रणांगणावर जर्मन राष्ट्राचा अमेरिकेची ताजी मदत दोस्त राष्ट्रास मिळाल्यामुळें धीर खचून त्यास तहाची मागणी करावी लागली व अमेरिकेच्या मध्यस्थीनें व्हर्साय येथें १९१८ च्या नोव्हेंबरमध्यें तह घडून आला.

पहिल्या महायुद्धांत २ कोटी लोक जायबंदी झाले. त्यांतील ७० लक्ष मेले. एकंदर खर्च ४००० कोटी पौंड झाला.

या युद्धांत पुढील नवीन राज्यें अस्तित्वांत आलीं. (१) ऑस्ट्रिया हें एक व्हिएन्नामोंवतीं प्रजासत्ताक बनलें. (२) चेकोस्लोव्हाकिया हें चेक व स्लाव्ह लोकांचें नवीन राष्ट्र निर्माण होऊन त्याची राजधानी प्राग येथें स्थापन झाली. (३) सर्व्हियामध्यें कांहीं प्रदेश सामील करून युगोस्लाव्हिया बनविण्यांत आला. (४) हंगेरी हें एक स्वतंत्र राज्य बनलें. (५) पोलंडला स्वातंत्र्य मिळालें व त्यास डॅन्झिग बंदर व त्यास जोडणारा एक जमिनीचा पट्टा देण्यांत आला. (६) बाल्टिक प्रदेशांतील प्रांतांचीं नवीन राज्यें बनलीं. (७) रशियामध्यें एस्थोनिया, लेटव्हिया, लिथुआनिया, फिनलंड व युक्रानिया, हीं नवीन राज्यें बनलीं. (८) रुमानियाचा प्रदेश वाढविण्यांत आला. याप्रमाणें नवीन ११ प्रजासत्ताक राज्यें निर्माण झालीं व चार साम्राज्यें नष्ट झालीं.

जर्मनीच्या वसाहती जाऊन तिचा प्रदेश बराच कमी झाला.

जर्मनीकडून नुकसानभरपाई म्हणून जबर रक्कम मागण्यांत आली. अर्थात् ती जर्मनीला रोख देणें शक्य नसल्यामुळें मालाच्या रूपांत देण्यांत यावी असें ठरलें. परंतु यामुळें जेत्या देशांत मंदी व बेकारी सुरू झाली. याकरितां ही भरपाई कमी करण्याकरितां

'डॉवेस' व 'यंग' अशा दोन योजना एकापाठीमागून एक करण्यांत आल्या.

व्हर्सायच्या तहांत मित्रराष्ट्रें व त्यांचे साहाय्यक यांस अनुकूल आणि जर्मनी व त्याचे साहाय्यक यांस प्रतिकूल अशा अनेक गोष्टी घालण्यांत आल्या. यामुळें युरोपांतील देशांत असंतोष माजून समाजवादी व साम्यवादी पक्षांस बळ चढलें.

रशियामध्यें साम्यवादी संघराज्य स्थापन झालें.

चीन व जपानमध्यें युद्ध सुरू झालें.

इटली व स्पेन यांमध्यें समाजवाद्यांविरुद्ध चळवळ होऊन तेथें एकतंत्री सत्ता स्थापन झाल्या. तुर्कस्तानमध्यें केमालपाशानें नवीन प्रजासत्ताक राज्य स्थापन केलें.

## रशियांतील क्रांति—

परंतु या पहिल्या महायुद्धाचा अंत होण्याच्या पूर्वीच रशियाची स्थिति फार हलाखीची झाली होती. रशियानें जरी बरेंच मोठें सैन्य जर्मनीवर पाठविलें व जरी त्यामुळें जर्मनीची पॅरिसवरची दौड थांबली तरी रशियन सैनिकांस आधुनिक शस्त्रांचा पुरवठा नव्हता. त्यांच्याबरोबर संरक्षक तोफा नव्हत्या. त्यांस पुरेसा दारूगोळा देण्यांत येत नव्हता. त्यांची सामुग्री तुटपुंजी असे. यामुळें या युद्धांत त्यांचे फार हाल झाले व त्यांच्या सोशिकपणाची मर्यादा संपली. इकडे झार हा सर्वस्वीं रासपुटीन नांवाच्या एका मठवाशाच्या जाळ्यांत सांपडलेला होता व दरबारांत सर्व गोंधळ माजला होता. अखेरीस २९ डिसेंबर १९१६ या दिवशीं एका मेजवानीच्या वेळीं रासपुटीनचा खून झाला व सर्वत्र दुर्भिक्षामुळें दंगे सुरू झाले. अखेरीस झारनें मार्च १९१७ मध्यें राज्यत्याग केला. प्रथम दुसरा एखादा झार गादीवर बसविल्यानें या बंडाळीचा उपशम होईल असें वाटलें. परंतु लोकांमध्यें असंतोष फार दूरवर पोंचला होता. त्यांस सर्व प्रकारच्या पीडेपासून मुक्तता हवी होती. प्रथम केरेन्स्की यानें एक प्रजासत्ताक राज्य स्थापन केलें. परंतु त्याच्याविरुद्ध सामाजिक क्रांतिकारक पुढाऱ्यांनीं चळवळ चालू केली. दोस्त राष्ट्रांनीं रशियास अथवा केरेन्स्कीस कोणत्याच प्रकारची मदत केली नाहीं. त्याच्या मनांत रशियन लोकांस जमिनी वांटून द्यावयाच्या होत्या. पण तीहि गोष्ट त्याला करतां येईना व रशियाच्या सरहद्दीवर अथवा पलीकडे शांतताहि प्रस्थापित होईना. उलट दोस्त राष्ट्रांकडून जर्मनीवर रशियानें पुन्हां हल्ला करावा अशी ओरड चालू झाली. अखेरीस जर्मनीनें जेव्हां रिगा बंदरावर स्वारी केली तेव्हां दोस्तांनीं कांहींच मदत केली नाहीं व रशियास एकट्यासच त्या हल्ल्यास तोंड द्यावें लागलें. या वेळीं ब्रिटिश आरमारानें बाल्टिक समुद्राकडे ढुंकूनहि पाहिलें नाहीं.

रशियन लोकांनीं कसेंहि करून युद्धाचा शेवट करण्याचें ठरविलें होतें. पेट्रोग्राडमध्यें कामगार व सैनिक यांच्या प्रतिनिधींची एक संस्था तयार झाली होती. या सोव्हिएट संस्थेनें स्टॉकहोम येथें एक समाजवाद्यांची परिषद् भरविण्याची मागणी चालविली होती. याच वेळीं बर्लिनमध्येंहि अन्नाकरितां बंडाळी सुरू होती. जर्मनी व ऑस्ट्रिया या दोन्ही देशांतील जनता युद्धास कंटाळली होती. अशा वेळीं स्टॉकहोमला जर समाजवाद्यांची परिषद भरली असती तर लोकशाहीच्या तत्त्वांवर तह घडून येणें शक्य होतें. केरेन्स्कीनें दोस्तांस अशा तऱ्हेची परिषद भरविण्यांत यावी अशी विनंति केली. परंतु दोस्त राष्ट्रांच्या नेत्यांस अशी परिषद भरल्यास सर्व जगांत समाजवाद बळावेल अशी भीति वाटत होती म्हणून त्यांनीं ब्रिटिश मजूर पक्षापैकीं कांहींची संमति असतांहि अशी परिषद् घडून येऊं दिली नाहीं. दोस्त राष्ट्रांकडून कोणत्याहि प्रकारची मदत मिळत नसतांहि केरेन्स्कीनें स्थापन केलेल्या लोकराज्यानें जुलैमध्यें पुन्हां एकदां उठावणी केली. तिला प्रारंभीं थोडें यश आलें तरी अखेरीस रशियनांचा मोड होऊन त्यांची खूप मोठी कत्तल झाली. अखेरीस रशियन सैन्याचा धीर सुटून सैनिकांत बंडाळी सुरू झाली व ५ नोव्हेंबर १९१७ रोजीं लेनिनच्या पुढारी-पणाखालीं बोल्शेविक समाजवादी लोकांच्या प्रामुख्यानें सोव्हियट पक्षानें सत्ता काबीज केली व दोस्त राष्ट्रांस न जुमानतां जर्मनीशीं तह करण्याचा निश्चय केला व त्याप्रमाणें ब्रेस्टलिटोव्हस्क येथें २ मार्च १९१८ रोजीं जर्मनी व रशिया यांचे दरम्यान तह घडून आला.

## रशिया व बोल्शेव्हिझम—

लेनिनचे अनुयायी हे केरेन्स्कीच्या अनुयायांहून अगदीं भिन्न असून ते मार्क्सवादी होते व त्यांनीं एकदम आमूलाग्र सामाजिक व राजकीय परिवर्तन घडवून आणण्यास सुरवात केली व नवीन समाजरचना सर्व जगांत पसरविण्याचा चंग बांधला. तेव्हां पाश्चात्य राष्ट्रांनीं हे लोक राक्षसी वृत्तीचे आहेत असा प्रचार सुरू केला व त्यांच्यावर स्वाऱ्या केल्या, बंडांस उत्तेजन दिलें व त्यांच्या शत्रूंत चिथावणी दिल्या. याप्रमाणें या बोल्शेविक लोकां-विरुद्ध सुष्ट-दुष्ट सर्व प्रयत्न दोस्त राष्ट्रांनीं चालू केले. १९१९ मध्यें आधींच युद्धानें जर्जर झालेले बोल्शेविक रशियन लोक ब्रिटिशांशीं आर्चेंजल येथें, जपानशीं पूर्व सैबेरियामध्यें, रुमानियन, फ्रेंच व ग्रीक लोकांशीं दक्षिणेमध्यें, रशियन ॲडमिरल कोलचाक याच्याशीं सैबेरियामध्यें व फ्रेंचांचें सहाय्य घेऊन लढणाऱ्या जनरल डेनिकिन याच्याशीं क्रिमियामध्यें एकसमयावच्छेदेंकरून लढत होते. जुलै १९१९ मध्यें तर जनरल युडेनिच याच्या हाताखालील एका सैन्यानें पीटर्सबर्गपर्यंत चाल केली. १९२० मध्यें फ्रेंचांनीं उत्तेजन दिल्यामुळें पोल लोकांनीं रशियावर चाल केली. जनरल

रँगल या रशियन सेनापतीनेंहि आपलाच देश उद्ध्वस्त करण्याचें कार्य चालविलें. मार्च १९२१ मध्यें क्रॉन्सटाड येथील खलाशांनीं बंड पुकारलें. परंतु या सर्व हल्ल्यांना लेनिनच्या प्रमुखत्वाखालीं रशियन सरकारनें तोंड दिलें. या संकटकाळीं रशियन लोकांनीं भयंकर चिकाटी दाखविली. अखेरीस १९२१ सालीं इंग्लंड व इटली या दोन्ही देशांनीं लेनिनच्या सरकारास मान्यता दिली.

याप्रमाणें लेनिनच्या बोल्शेव्हिक सरकारला बाह्य शत्रूंवर विजय मिळवितां आला. तरी देशांत पुन्हां नवी घडी बसविणें ही गोष्ट सोपी नव्हती. रशियन शेतकरी अगदीं अडाणी व आतां-पर्यंत सर्वस्वीं पिळून निघालेला होता. त्याला जरी जमीन मिळाली तरी तो पोटाला अवश्य तेवढेंच धान्य पिकवूं लागला. अधिक पिकाविण्यास त्यास प्रवृत्त करणें कठिण होतें. यामुळें खेड्यातील लोकांस खावयास मिळे, पण शहरांतील लोक उपाशी मरूं लागले. साम्यवादी तत्त्वावर उद्योगधंदे चालवून उत्पादन करणें हेंहि एकाएकीं साध्य होणें कठिण होतें. यामुळें १९२० सालीं रशिया हा अगदीं मेटाकुटीस आलेला व सर्व अर्वाचीन संस्कृति रसातळास गेल्यासारखा दिसूं लागला. रेल्वे नीट चालत नव्हत्या, शहरें ओस पडूं लागलीं होतीं व लोकांची मृत्युसंख्या एकसारखी वाढत होती. त्यांतच १९२१ मध्यें अवर्षण पडलें व आग्नेय रशियांत दुष्काळानें हजारों लोक मृत्युमुखीं पडले.

## आर्थिक योजना—

अशा परिस्थितीमध्यें सामाजिक पुनर्घटनेची कल्पना थोडी बाजूस ठेवून एक नवीन 'नवें आर्थिक धोरण' (न्यू इकॉनॉमिक पॉलिसी) स्वीकारण्यांत आलें आणि खाजगी मालकी व खाजगी उद्योगधंद्यांस बऱ्याच प्रमाणांत वाव देण्यांत आला. यामुळें उत्पादनांत थोडीशी वाढ झाली. कुलक नांवाचा कांहींसा संपन्न शेतकरी-वर्ग निर्माण झाला. लहान लहान व्यापाऱ्यांची संख्या वाढली, परंतु अशा रीतीनें साम्यवादी मार्ग सोडून जुन्याच पद्धतीनें समाजाची घडी बसविण्याची पुढाऱ्यांची इच्छा नव्हती. तेव्हां त्यांनीं १९२८ मध्यें एक पंचवार्षिक योजना आंखली. या योजनेप्रमाणें सरकारी पद्धतीनें उद्योगधंद्यांची वाढ करून विशेषतः मोठमोठ्या धंद्यांतील उत्पादनाची वाढ करावयाची व सामूहिक पद्धतीनें शेतीच्या उत्पादनांत वाढ करावयाची असें धोरण ठरविण्यांत आलें. ही योजना अमलांत आणतांना अनेक अडचणींस तोंड द्यावें लागलें. त्यांत प्रमुख म्हणजे रशियांतील सामान्य जनता अशिक्षित व अगदीं मागासलेली होती, त्यांच्या कामावर देखरेख करण्यास अथवा मार्गदर्शन करण्यास पुरेसे मुकादम तयार नव्हते, यांत्रिक साधनें वापरण्यास पुरेसे तज्ज्ञ नव्हते व एकीकडे इतर राष्ट्रें विरुद्ध प्रचार करीत होतीं. या अडचणींस न जुमानतां औद्योगिक क्षेत्रांत या योजनेंत रशियानें बरेंच यश संपादन केलें. शेतीच्या उत्पादनांत मात्र रशियास तितकी वाढ करतां आली नाहीं व १९३३–३४ मध्यें रशियांत अन्नाचा तुटवडाच होता. इतर देशां-मध्यें जुन्या खासगी मालकीच्या धंद्यांच्या पद्धतीनेंच पुनर्घटना चालू होती व ते देश रशियामधील या नव्या प्रयोगाकडे साशंक-तेनेंच पाहत होते. जुनी पद्धतिहि कांहीं विशेष यशस्वी होती असें नाहीं. त्या देशांत लोकांची क्रयशक्ति कमी कमी होत चालली होती, त्यामुळें उत्पादनावरहि परिणाम होत होता. यामुळें योजनाबद्ध उत्पादन या गोष्टीची सर्वत्र चर्चा सुरू झाली व प्रत्येक क्षेत्रांत योजना तयार होऊं लागल्या. इतकी तरी नवीन गोष्ट रशियानें जगास शिकविली.

## अमेरिकेची कामगिरी—

वर सांगितल्याप्रमाणें जर्मन लोकांनीं पाणबुड्यांचा उपयोग बेदरकारपणें केल्यामुळें व अमेरिकेचीं जहाजें बुडविल्यामुळें अमेरिकेस पहिल्या महायुद्धांत पडावें लागलें. परंतु त्या वेळचा अध्यक्ष विल्सन यानें हें युद्ध जर्मन लोकांबरोबर नसून तेथील अनिर्बंध सत्ता-धाऱ्यांविरुद्ध आहे असें घोषित केलें होतें व जान्युअरी १९१८ मध्यें अमेरिकेच्या सिनेटपुढें ज्या मुद्यांवर तह होणें शक्य आहे असे आपले प्रसिद्ध चौदा मुद्दे मांडले होते. त्यांत प्रमुख म्हणजे आंतरराष्ट्रीय गुप्त करारमदार रद्द करणें, समुद्रावरील अनिर्बंध संचाराची हमी, राष्ट्रांराष्ट्रांतील आर्थिक निर्बंध रद्द करणें, सर्व राष्ट्रांचें सैन्यबल कमी करणें, वसाहतींतील जनतेच्या म्हणण्याकडे योग्य तें लक्ष देऊन वसाहतींवरील निरनिराळ्या राष्ट्रांचे हक्क ठरविणें, हे होते. इतर मुद्यांत विशेषतः युरोपिअन राष्ट्रांस स्वाय-त्तता व आर्थिक स्वातंत्र्य यांबद्दल आश्वासन देण्यांत आलें होतें. या मुद्यांस प्रभावी करण्याकरितां एक सर्व राष्ट्रांची संस्था स्थापन करण्याचीहि घोषणा विल्सननें केली होती. अखेरीस मागें सांगितल्याप्रमाणें जर्मन सरकारनें या चौदा मुद्यांस अनुसरून तह घडवून आणण्याची विनंति विल्सन यास केली व त्याप्रमाणें ११ नोव्हेंबर १९१८ रोजीं युद्ध तहकूब करण्यांत आलें.

विल्सन यास अशी आशा होती कीं, त्याच्या मुद्यांस अनुसरून व दोन्ही पक्षांमध्यें वाटाघाट होऊन तह करण्यांत येईल. परंतु तसा रंग दिसेना व दोस्तांनीं हळूहळू आपल्या मागण्या पुढें करण्यास सुरुवात केली. तथापि विल्सन यास एक राष्ट्रसंघ स्थापण्यांत येऊन त्याच्यामार्फत यापुढील युद्धांचा अनर्थ टाळतां येईल अशी वेडी आशा होती म्हणून त्यानें कांहीं मुद्यांबाबतचें आपलें म्हणणें मागें घेण्याचा उपक्रम केला. परंतु पॅरिस येथील वाटाघाटीमध्यें त्याला आपले बहुतेक सर्वच मुद्दे सोडून द्यावे लागले. विल्सन यानें फक्त फ्यूम बंदर इटलीस देण्याच्या बाबतींत,

सर्वच ऱ्हाइनलॅंड जर्मनीकडून हिसकावून घेऊन फ्रान्सला देण्याच्या बाबतींत, तसेंच फ्रान्सनें सारथडी जोडून घेण्याच्या बाबतींत, व जर्मनीवर सर्व युद्धाचा खर्च लादला जावा या गोष्टीस विरोध करून तेवढ्या बाबी गाळल्या. परंतु बाकीच्या सर्व गोष्टी त्यास सोडून द्याव्या लागल्या व इतकेंहि करून जो राष्ट्रसंघ बनविण्याची त्याची कल्पना होती त्या राष्ट्रसंघास मिळण्याचें अमेरिकेच्या सीनेटनेंच नाकारलें व अखेरीस मार्च १९२० मध्यें सर्वच व्हर्सायच्या तहास व राष्ट्रसंघाच्या योजनेस फेटाळून लावलें.

## जागतिक मंदीस अमेरिकेनें केलेले उपाय—

पहिल्या महायुद्धानंतर सर्व जगावर एक मोठी मंदीची लाट आली. तीमुळें सामान्यतः सर्व गोष्टींच्या उत्पादनावर फार अनिष्ट परिणाम घडून आला. विशेषतः शेतीच्या उत्पन्नाचा भाव अगदीं घटून शेतकरी लोकांस शेती करणें कठिण होऊन ते अगदीं हैराण झाले. या मंदीचा परिणाम सर्वच जगावर झाला व निरनिराळ्या देशांनीं या मंदीच्या निवारणार्थ निरनिराळे उपाय योजले व कांहीं देश कांहींच न करतां जे नैसर्गिक व आपोआप परिणाम होतील त्यांकडे पाहत स्वस्थ बसले. इतर देशांप्रमाणें अमेरिकेसारख्या संपन्न देशावरहि ही मंदीची लाट आली व तेथील लोकहि हवालदिल झाले. त्या वेळीं अमेरिकेचें नेतृत्व रिपब्लिकन पक्षाकडे होतें व हूव्हर हा अध्यक्ष होता व त्याचें मत स्वाभाविकपणेंच कालांत बदल होईल असें होतें. परंतु १९३२ च्या निवडणुकींत फ्रँक्लीन रूझवेल्ट हा फार मोठ्या बहुमतानें निवडून आला व त्यानें या मंदीस तोंड देण्याकरितां सरकारनें प्रत्यक्ष कांहीं तरी हालचाल केली पाहिजे, केवळ कालावर विसंबून राहतां कामा नये असें ठरविलें व त्याने याकरितां ज्या गोष्टी केल्या त्या कोणत्याहि राष्ट्रास उद्बोधक होतील या दृष्टीनें त्यांचें येथें विहंगमावलोकन करण्याचें योजिलें आहे. त्यानें अमलांत आणलेल्या कार्यक्रमास 'न्यू डील' असें नांव मिळालें. प्रथम त्यानें ज्या बँका भक्कम होत्या अशांस हाताशीं धरलें. तसेंच प्रथम बाजारांत थोडीशी नाण्याची विपुलता निर्माण केली व तीमुळे धान्य व इतर खाद्यादि पदार्थ यांच्या किंमती वाढीस लागल्या व कर्जदारांस थोडी उसंत मिळाली. शेतकी व उद्योगधंद्यांस थोड्या सढळ हातानें कर्जाऊ रकमा मिळण्याची व्यवस्था केली. लोकांच्या सेव्हिंग खात्यातील ठेवींची पांच हजार डॉलरपर्यंत हमी घेतली व सरकारी रोख्यांच्या विक्रीवर कडक नियंत्रणें घातलीं. शेतकीसंबंधीं नवीन कायदे केले व जे शेतकरी जमिनीचा कस सुधारेल व कायम राहील अशीं पिकें काढतील किंवा लांबवर मुदतीच्या योजनांत सरकारशीं सहकार्य करतील त्यांस रोख रकमा मदतीदाखल मिळतील अशी तजवीज केली. १९४० पर्यंत या योजनेंत सुमारें साठ लक्ष लोक सामील होऊन सरकारी मदत मिळवीत होते. याप्रमाणेंच जे शेतकरी स्वतःच्या गरजेहून अधिक पिकें काढतील त्यांस कर्ज देणें, गव्हाच्या किंमतीची हमी देणें, व सरकारी कोठारांची धान्य सांठविण्याकरितां तजवीज करणें, इत्यादि गोष्टी करण्यांत आल्या. यामुळें शेतींत उत्पन्न होणाऱ्या पदार्थांच्या किंमती वाढल्या व शेतकऱ्यांच्या सांपत्तिक स्थितीस स्थैर्य आलें. जे खंडकरी शेतकरी होते त्यांसहि स्थैर्य उत्पन्न करण्याकरितां त्यांस स्वतःची शेती विकत घेण्याकरितां सरकारी मदत मिळण्याची तजवीज करण्यांत आली. तसेंच शेतकऱ्यांस तगाई देण्यांत आली व हीं कर्जें शेतकऱ्यांस सहकारी संस्थांमार्फत देण्यांत आलीं.

याच वेळीं कांहीं परदेशांशीं प्रत्यक्ष मालाच्या विनिमयासंबंधीं करार करण्यांत आले व अमेरिकन मालाऐवजीं त्यांचा माल घेण्याचे ठराव करण्यांत आले. असे ठराव कानडा, क्यूबा, फ्रान्स, रशिया व इतर वीस देशांशीं करण्यांत आले. यामुळें एका वर्षांत अमेरिकेचा व्यापार सुधारला. १९३९ सालीं शेतकीचें उत्पन्न १९३२ च्या दुप्पटीवर आलें.

## मजुरांच्या संघटना—

औद्योगिक बाबतींत सुधारणा करण्याकरितां या नवीन योजनेंत कांहीं प्रयोग करण्यांत आले. प्रथम उत्पादन कमी करून जिन्नसांच्या किंमती वाढविण्याचा प्रयत्न करण्यांत आला, पण ही गोष्ट बेकायदा ठरविण्यांत आली म्हणून ती सोडून देण्यांत आली. परंतु हळूहळू मालाच्या किंमती वाढूं लागल्या. सरकारनें बेकार लोकांस मदत देण्याकरितां, सार्वजनिक कामांकरितां व राष्ट्रीय उत्पादन-मार्गांस संरक्षण देण्याकरितां कोट्यवधि डॉलर खर्च केले. यामुळें लोकांच्या हातांत पैसा येऊन अमेरिकेमध्येंच मालाची मागणी वाढली. याच काळांत मजूरवर्गांत संघटना निर्माण झाल्यामुळें त्यांचाहि फायदा होत गेला. काँग्रेसनें कायदा करून मजूरवर्गास सामुदायिक करार करण्याचा अधिकार दिला व त्यावर देखरेख करण्याकरितां एक बोर्ड नेमलें. अमेरिकन फेडरेशन ऑफ लेबर (AFL) या संस्थेनें मजुरांची संघटना करण्याचें काम चालविलें होतें, पण तें मंदगतीनें चालत असल्यामुळें कांहीं मजुरांनीं काँग्रेस ऑफ इंडस्ट्रिअल लेबर ऑर्गनायझेशन (CIO) ही संस्था काढून मजूर-संघटनेचें कार्य जोरानें चालविलें. या दोन संस्थांमुळें १९२९ मध्यें जेथें संघटित मजुरांची संख्या चाळीस-लाख होती ती १९३९ मध्यें एक कोटी दहा लक्ष झाली व १९४८ मध्यें एक कोटी साठ लक्षांपर्यंत वाढली. यामुळें मजुरांची शक्ति केवळ उद्योगधंद्यांच्या बाबतींत वाढली एवढेंच नव्हे तर राजकीय बाबतींतहि त्यांचें महत्त्व वाढलें. परंतु बहुतेक मजूरवर्ग

स्वतंत्र मजूर पक्षाची संघटना न करतां डेमोक्रॅटिक किंवा रिपब्लिकन या पक्षांतच पण विशेषेंकरून पहिल्या पक्षांत सामील झाला. १९३५ मध्यें एक 'सामाजिक स्वास्थ्य' नांवाचा कायदा पास करून कामगारांस पासष्ट वर्षांनंतर कांहीं मासिक भत्ता मिळण्याची तजवीज करण्यांत आली व हा पैसा मजूर व कारखानदारांकडून जमविण्यांत येऊं लागला. तसेंच बेकारीविरुद्ध विम्याची तजवीज बहुतेक संस्थानांनीं केली.

सन १९३० मध्यें मोठें अवर्षण पडलें व अशीं अवर्षणें वरचेवर पडून दुष्काळ पडूं नये याकरितां मोठमोठे तलाव व बंधारे बांधण्याची व्यवस्था करण्यांत आली. तसेंच नद्यांचें व ओढ्यांचें पाणी स्वच्छ राहण्याकरितां, मासळीच्या निपजीकरितां, शिकारी प्राण्यांची वाढ होण्याकरितां, कोळशाच्या, पेट्रोलच्या, गॅसच्या व सोडा आणि हेलियम यांच्या उत्पादनाकरितां व संरक्षणाकरितां तजविजी करण्यांत आल्या. तसेंच मोठमोठीं कुरणें व जंगलें राखण्यांत आलीं.

## टेनेस्सी व्हॅली अथॉरिटि—

या सर्व योजनांमध्यें 'टेनेस्सी व्हॅली ॲथॉरिटी' (TVA) ही योजना फार मोठ्या प्रमाणावर व स्वतंत्रपणें करण्यांत आली. या योजनेखालीं येणाऱ्या प्रदेशाची सर्वांगीण उन्नति करण्याची योजना तयार करण्यांत आली. या योजनेप्रमाणें अलबामामधील म्युसेलशोल्स, नॉरिस, पिकविक, चिकामागा, वगैरे प्रचंड धरणांप्रमाणेंच अनेक लहान लहान बंधारे बांधण्यांत आले. यामुळें नदींतून नावांची वाहतूक, पुरांचें नियंत्रण, नायट्रेट्सची उत्पत्ति व विजेचें उत्पादन करण्यांत येऊं लागलें. येथून उत्पन्न होणारी वीज सरकारनें पांच हजार मैलांपेक्षां अधिक लांबीच्या तारा घालून स्वस्त दरानें लोकांस मिळण्याची तजवीज केली. या तलावाखालीं जाणाऱ्या जमिनींबद्दल लोकांस इतर ठिकाणीं जमिनी देण्यांत आल्या. तसेंच शेतकीविषयक व खतांसंबंधीं अनेक प्रयोग करण्यांत आले व या योजनेंत येणाऱ्या लोकांचें आरोग्य सुधारण्याच्या बाबतींत व त्यांस करमणुकीचीं साधनें मिळावीं म्हणून तजवीज करण्यांत आली.

या सर्व योजनांवर आरंभीं दोन्हीहि पक्षांतील लोकांकडून टीका करण्यांत आली, परंतु पुढें प्रतिपक्षासहि तिचें यश मान्य करावें लागलें.

## व्हर्सायतहाची अनिष्टता व राष्ट्रसंघाची दुर्बलता—

ज्याप्रमाणें पूर्वीच्या मोठमोठ्या युद्धांनंतर वेस्टफालिया किंवा व्हिएन्ना येथें झालेल्या तहांनीं कोणत्याच पक्षाचें समाधान झालें नाहीं त्याप्रमाणेंच व्हर्साय येथें झालेल्या तहानेंहि कोणाचेंच समाधान झालें नाहीं व दोन्हींहि पक्षांत वैमनस्याचें शल्य राहिलें. राष्ट्रसंघ जरी स्थापन झाला तरी त्याचें जनक राष्ट्र जें अमेरिका तें बाहेरच राहिलें, त्यामुळें ती संस्था बलवती होणें अशक्यच होतें. हा राष्ट्रसंघ अगदीं दुर्बल ठरला व कांहीं राष्ट्रांच्या हातांतील बाहुल्याचें त्यास स्वरूप आलें.

एकीकडे एकतंत्री राज्यांनीं आपलें सामर्थ्य व शक्ति वाढविण्याचा एकसारखा उद्योग आरंभला. जपाननें १९३१ सालीं मांचुरियावर हल्ला केला व तेथील चीनची सत्ता नष्ट करून एक आपल्या हातांतील बाहुलें म्हणून मांचुक्युओ सरकार स्थापन केलें. येथेंच न थांबतां चीनवरच आपलें अधिराज्य स्थापन करण्याकरितां युद्ध पुकारलें तरी राष्ट्रसंघानें या बाबतींत कांहीं केलें नाहीं. इटलीमध्यें फॅसिस्ट पक्ष प्रबल होऊन त्यानें लिबियामध्यें आपली सत्ता वाढवून इथिओपिया देश पादाक्रांत केला, याबद्दल राष्ट्रसंघानें फक्त कुरकुर केली व आर्थिक कोंडी पुकारली. जर्मनीमध्यें ॲडॉल्फ हिटलर यानें राष्ट्रीय समाजवादी पक्ष स्थापन करून नात्सी संघटना तयार केली व हळूहळू सर्व सत्ता आपल्या हातांत घेतली. नंतर ऱ्हाइनलँड आपल्या ताब्यांत घेऊन आपलें सैन्य व शस्त्रास्त्रबल वाढविण्यास सुरुवात केली. याविरुद्ध फ्रान्सनें तक्रार केली. पण ब्रिटनहि फ्रान्सच्या सत्तेबद्दल साशंक असल्यामुळें त्यास बलिष्ठ जर्मन प्रतिस्पर्धी उत्पन्न होणें इष्टच वाटत होतें; यामुळें ब्रिटन स्वस्थ बसलें. लवकरच हिटलरनें ऑस्ट्रिया देश जर्मन राइशच्या प्रमुखत्वाखालीं आणला व चेकोस्लोव्हाकियांतील सुडेटन प्रदेशाची मागणी चालविली व ती मागणी म्यूनिच करारानें मान्य होतांच डॅन्झिग बंदर व त्या बंदरास जाणारा पट्टा पोलंडला देण्यांत आला होता त्याची मागणी केली व अखेरीस पोलंडवर स्वारी केली व त्यानंतर डेन्मार्क, नॉर्वे, हॉलंड, बेल्जम व फ्रान्स, इत्यादि देशांवर एकामागून एक याप्रमाणें आक्रमण केलें.

## दुसरें महायुद्ध—

अमेरिका राष्ट्रसंघांतून आधींच बाहेर पडली होती. या दुसऱ्या युद्धाच्या सुरुवातीपूर्वी अमेरिकेनें १९३५–१९३७ पर्यंत तटस्थतेचे कायदे पास केले होते व युद्धमान राष्ट्रांशीं सर्व तऱ्हेचा व्यापार व व्यवहार बंद केला होता व कोणत्याहि कारणासाठीं अमेरिकेचा ज्याच्याशीं संबंध नाहीं अशा युद्धांत पडावयाचें नाहीं असा निश्चय केला होता व पृथक् अथवा अलिप्त राहण्याचें धोरण स्वीकारलें होतें.

परंतु त्या वेळीं अध्यक्ष असलेला फ्रँक्लीन रूझवेल्ट यास असें वाटत होतें कीं, या युद्धांत जर जर्मनी किंवा इटलीसारख्या एकतंत्री नात्सी व फॅसिस्ट राष्ट्रांचा जय झाला तर जगामध्यें लोकशाहीस मोठा धोका उत्पन्न होईल. याकरितां अमेरिकेची या

बाबतींत नीट समजूत करून देणें व तिची नैतिक व साधनयुक्त तयारी करणें त्यास अवश्य वाटत होतें. अमेरिकेनें जपानचें हस्तक मांच्युक्युओ हें राष्ट्र कधींच मान्य केलें नव्हतें व अमेरिकेमधील सर्व राष्ट्रांत ऐक्य व मैत्री यांचें रक्षण केलें होतें व १९३५ मध्यें अमेरिकेंतील कोणत्याहि राष्ट्रानें जबरदस्तीनें केलेलें कोणतेंहि भूमीचें आक्रमण मान्य करावयाचें नाहीं असा सर्व लॅटिन अमेरिकन राष्ट्रांमध्यें करार घडवून आणला होता. याप्रमाणें अमेरिकेची प्रथम भूमिका युरोपांतील लढ्यापासून अलिप्त राहण्याची होती, परंतु या युद्धाची झळ आपणांसहि लागून आपल्याहि स्वास्थ्यास धोका उत्पन्न होण्याचा संभव हळूहळू त्यांस वाटूं लागला. ही वृत्ति फ्रान्स पादाक्रांत होऊन इंग्लंडवर बाँब-वर्षाव होऊं लागल्यावर अधिकाधिक बळावली व अमेरिकन राष्ट्रांनीं एक संरक्षक फळी उभारली व संयुक्त संस्थानांनीं शस्त्रास्त्रांचें उत्पादन वाढविण्यास सुरुवात केली व सक्तीच्या सैन्यभरतीचा कायदा केला. इतक्यांत जपाननें सर्व आशियावर व पासिफिक महासागरावर आपलें वर्चस्व व रक्षणाची जबाबदारी आहे असें घोषित केलें व ब्रिटननें यास प्रतिकार करण्याचें सामर्थ्य नाहीं हें जाणून शांघायमधून काढता पाय घेतला व ब्रह्मी-चीन रस्ता बंद करून चीनला मदत देण्याचें बंद केलें. जपाननें फ्रान्सच्या विची सरकारकडून इंडोचीनमधले विमानतळ मिळविले व सप्टेंबर १९४० मध्यें जर्मनी व इटलीस जपान येऊन मिळालें व विची सरकारच्या संमतीनें सर्व इंडोचीन व्यापून बसलें. त्या वेळीं अमेरिकेनें सर्व जपानी मालमत्ता जप्त केली. तेव्हां जपाननें एक वकील अमेरिकेकडे बोलणें करण्याकरितां पाठवून बोलणें फिसकटल्याबरोबर अमेरिकेचें हवाई बेटांतील पर्ल हार्बर येथील आरमार ७ डिसेंबर १९४१ रोजीं नष्ट केलें व त्यानंतर अमेरिकेच्या ताब्यांतील सर्व बेटांवर बाँबचा वर्षाव केला. ८ डिसेंबर १९४१ या दिवशीं अमेरिकेनें जपानशीं युद्ध पुकारलें. त्याबरोबर जर्मनी व इटली यांनींहि अमेरिकेशीं युद्ध पुकारलें.

## अमेरिकेचें युद्धांत पदार्पण—

अमेरिका युद्धांत पडल्यानंतर युद्धास निराळी दिशा मिळाली व युद्धाचें धोरण प्रथम युरोपमधील लढाई पुरी केल्यानंतर पूर्वेकडील युद्धाकडे पाहावयाचें असें ठरलें. तथापि १९४२ मध्यें पासिफिक महासागरांतहि जपानच्या आरमाराशीं झुंज देऊन ऑस्ट्रेलिया-वरील जपानचें आक्रमण थोपविण्यांत आलें व फिलिप्पाइन बेटांतहि जपानवर जय मिळविण्यांत आले. युरोपकडे अतिशय मोठ्या प्रमाणात युद्धसाहित्य पाठविण्यांत येऊं लागलें व रशियास दारू-गोळ्याची मोठी मदत करण्यांत आली. प्रथम अमेरिकन सैन्य उत्तर आफ्रिकेंत उतरविण्यांत आलें व अमेरिकन दारूगोळ्याच्या साहाय्यानें ब्रिटिश व अमेरिकनांनीं ईजिप्तवरचा हल्ला परतवून रोमेलला युरोपमध्यें परत जावयास भाग पाडलें. १९४३ मध्यें भूमध्यसमुद्राचा दक्षिण किनारा मोकळा करण्यांत आला. त्यानंतर सिसिली बेट व इटलीवर हल्ला करण्यांत येऊन इटलीचा कांहीं भाग पादाक्रांत करण्यांत आला. तेव्हां इटलीमध्यें बोदोलिओ याच्या प्रमुखत्वाखालीं असलेल्या सरकारनें ऑक्टोबर १९४३ मध्यें युद्ध-तहकुबी जाहीर केली. एवढेंच नव्हे तर लवकरच जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारलें. यानंतर लवकरच आयसेन हॉवर या सेनापतीच्या हाताखालीं प्रचंड सैन्य व साहित्य देऊन फ्रान्समध्यें नॉर्मंडीवर स्वारी करण्यांत आली व एकामागून एक जय मिळवीत दोस्त-राष्ट्रांच्या सेना फ्रान्स व जर्मनीकडे चालून जाऊं लागल्या व मोठमोठीं सैन्यें वेढ्यांत सांपडून शरण येऊं लागलीं. २५ ऑगस्ट १९४४ रोजीं पारिस सर करण्यांत आलें. १९४५ च्या फेब्रुवारी व मार्चमध्यें जर्मनीमध्यें दोस्तांच्या सेना घुसत होत्या. अखेरीस ८ मे १९४५ रोजीं जर्मनी पूर्णपणें शरण आला. पुढें जपानी लढाई दीर्घ काळ चालेल असें वाटत होतें, परंतु हिरोशिमा व नागासाकी येथें अणुबाँब टाकण्यांत आल्यानंतर २ सप्टेंबर १९४५ या दिवशीं जपाननेंहि शरणागति दिली. याप्रमाणें या दुसऱ्या महायुद्धाचा शेवट झाला.

## अटलांटिक सनद—

हें युद्ध चालू असतांनाच व अमेरिका प्रत्यक्ष युद्धांत पडण्यापूर्वीच कांहीं आंतरराष्ट्रीय महत्त्वाच्या गोष्टी घडून येत होत्या त्यांपैकीं एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणजे न्यू फाउंडलंड बेटांतील एका बंदरांत जहाजावर घडून आलेली चर्चिल व रूझवेल्ट यांची भेट होय. या भेटींत प्रसिद्ध अटलांटिक करारावर या दोघांनीं सह्या केल्या. या अटलांटिक करारांत मुख्यतः खालील गोष्टी नमूद करण्यांत आल्या होत्या:—

(१) कोणतेंहि प्रादेशिक आक्रमण करावयाचें नाहीं. (२) लोकांच्या संमतीशिवाय कोणत्याहि प्रदेशांत (भूभागांत) बदल करावयाचा नाहीं. (३) प्रत्येक राष्ट्रास आपली राज्यपद्धति ठरविण्याचा हक्क आहे. (४) ज्यांची स्वायत्तता हिरावून घेण्यांत आली असेल त्यांची त्यांस परत करणें. (५) सर्व राष्ट्रांत आर्थिक सहकार्य घडवून आणणें. (६) सर्व लोकांस युद्ध, भीति व दुर्भिक्ष यांपासून मुक्तता मिळवून देणें. (७) समुद्रावरील स्वातंत्र्य. (८) आंतरराष्ट्रीय व्यवहारांत बलाचा उपयोग वर्ज्य करणें.

यानंतर कासाब्लांका येथें जानेवारी १९४३ मध्यें रूझवेल्ट व चर्चिल यांची दुसरी मुलाखत झाली. तेथें शत्रूशीं संपूर्ण शरणागती-शिवाय तह करावयाचा नाहीं असें ठरविण्यांत आलें. हें 'संपूर्ण

शरणागतीचें' तत्त्व रूझवेल्टनें प्रथम मांडलें. यानंतर ऑगस्ट १९४३ मध्यें क्वेबेक येथें जपानविरुद्धची मोहीम ठरविण्यांत आली व नंतर मॉस्को येथें ब्रिटन, अमेरिका व रशिया यांचे प्रतिनिधी मिळून संपूर्ण शरणागतीचें तत्त्व व युद्धोत्तर पुनर्घटना व ऑस्ट्रियाचें स्वातंत्र्य यासंबंधीं चर्चा व निर्णय करण्यांत आले. यानंतर कायरो येथें रूझवेल्ट, चार्चिल व चांग-कै-शेक यांच्यामध्यें चर्चा होऊन जपानबरोबरच्या युद्धाची दिशा ठरविण्यांत आली. युद्धानंतर पूर्वीचें भौमिक आक्रमण नष्ट करण्याचें ठरविण्यांत आलें व कोरियाचें स्वातंत्र्य मान्य करण्यांत आलें. नंतर नोव्हेंबरमध्यें तेहरान येथें रूझवेल्ट, चार्चिल व स्टालिन यांची भेट होऊन मॉस्कोचे ठराव मान्य करण्यांत आले व संयुक्त-राष्ट्र-संघ स्थापन करण्याचा निर्णय घेण्यांत आला. यानंतर १९४५ मध्यें याल्टा येथें पुन्हां रूझवेल्ट, चर्चिल व स्टालिन यांची भेट होऊन रशियानें युरोपमधील युद्ध संपल्यानंतर जपानशीं युद्ध पुकारण्याचें मान्य केलें. पोलंडची पूर्व सरहद्द कर्झन रेषा (१९१९) ठरविण्यांत आली. या वेळीं स्टालिननें जर्मनीकडून नुकसानभरपाईची मागणी केली ती प्रथम रूझवेल्ट व चर्चिल यांस मान्य नव्हती म्हणून पुढें ढकलण्यांत आली. जर्मनी देश कोणीं व्यापावयाचा हें ठरविण्यांत आलें व युद्ध-गुन्हेगारांवर खटले करण्याचें ठरलें. मुक्त झालेल्या लोकांच्या बाबतींत अटलांटिक सनदेचीं तत्त्वें अमलांत आणावयाचा ठराव करण्यांत आला. सुरक्षा समितींतील राष्ट्रांस आपणासंबंधींच्या बाबतींत नकाराचा (व्हेटोचा) हक्क असावा असें ठरलें. यानंतर १९४५च्या जुलैमध्यें पॉटसडॅम येथें ब्रिटन, अमेरिका व रशिया यांची मुलाखत झाली व जर्मनीस केवळ स्वतःच्या गरजांपुरतें औद्योगिक उत्पादन करण्याचें सामर्थ्य देण्यांत यावें असा ठराव व जर्मनी कसा व्यापावा यासंबंधीं ठराव झाले व नात्सी पुढाऱ्यांवर खटले भरण्याचें ठरलें. तसेंच रशियास जर्मनींतून कांहीं यंत्रसामुग्री नेण्यास संमति देण्यांत आली.

## संयुक्त राष्ट्रसंघाची सनद—

याच वेळीं जगांतील ५१ राष्ट्रांचे प्रतिनिधी सॅनफ्रान्सिस्को येथें जमून संयुक्त राष्ट्रसंघाची घटना तयार करीत होते व त्यांनीं दोन महिने वाटाघाटी करून ती तयार केली व संयुक्त राष्ट्रांची सनद जाहीर केली.

या सनदेचे एकूण एकोणीस अध्याय असून एकशें-अकरा अनुच्छेद आहेत. या सनदेच्या प्रारंभीं या सनदेस संमति देणाऱ्या राष्ट्रांनीं करावयाची प्रतिज्ञा दिली असून तींत आम्ही भावी पिढ्यांस युद्धाच्या संकटापासून मुक्त करण्याचा व मानवी मूलभूत अधिकार, मानवाची प्रतिष्ठा व मूल्य आणि लहानमोठ्या राष्ट्रांतील स्त्री व पुरुष यांचे समान अधिकार यांवर आमची श्रद्धा पुनर्व्यापित करण्याचा, आणि तह व सार्वराष्ट्रीय विधी यांमुळें उत्पन्न होणारीं बंधनें व न्याय यांस मान देण्यांत येईल अशी परिस्थिति निर्माण करण्याचा व पूर्ण स्वातंत्र्यामध्यें सामाजिक प्रगति व उच्च जीवनमान निर्माण करण्याचा व याकरितां निकटच्या राष्ट्रांशीं औदार्यानें व शांततेनें व चांगल्या शेजारधर्मानें वागण्याचा व सार्वराष्ट्रीय शांतता व सुव्यवस्था राखण्याचा व त्याकरितां सशस्त्र बलावांचून इतर तत्त्वें व पद्धति यांचा अंगीकार करण्याचा व सार्वराष्ट्रीय यंत्रणेचा सर्व लोकांच्या सामाजिक व आर्थिक प्रगतीच्या कामीं उपयोग करण्याचा निश्चय केला आहे असें म्हटलें आहे व याकरितां संयुक्त राष्ट्रें ही संस्था स्थापन करण्यांत येत आहे व तिच्या सनदेस मान्यता देत असून त्याकरितां सर्व संघटित प्रयत्न करण्याचा निश्चय व्यक्त केला आहे.

प्रथम अनुच्छेदांत या संघटनेचे उद्देश व तत्त्वें ग्रथित केलीं आहेत. तीं अशीं आहेत: १ सार्वराष्ट्रीय शांतता व सुरक्षा स्थापन करणें व त्याकरितां शांततेस येणाऱ्या धोक्यास व आक्रमण व शांततामंग यांस प्रतिबंध करणें व तो दूर करणें यांकरितां परिणामकारक संघटित योजना करणें आणि न्याय व सार्वराष्ट्रीय विधि यांच्या तत्त्वांस अनुसरून शांततेचा भंग करूं पाहणाऱ्या कलहांचा व परिस्थितीचा उलगडा करणें. २ लोकांचे समान अधिकार व स्वयंनिर्णय यांच्या तत्त्वांवर राष्ट्रांमध्यें मित्रत्वाचे संबंध घडवून आणणें व जागतिक शांततेस दृढ करण्याकरितां उपाय योजणें. ३ आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक अथवा माणुसकीच्या स्वरूपाच्या प्रश्नांचा उलगडा करण्याच्या कामीं सार्वराष्ट्रीय सहकार्य घडवून आणणें आणि वंश, लिंग, भाषा अथवा धर्म यांमध्यें कोणताहि भेद न मानतां मानवी अधिकार व मूलभूत स्वातंत्र्य यांसंबंधीं आदर वाढविणें व त्यांस उत्तेजन देणें. ४ हे सामान्य हेतू साध्य करून घेण्याकरितां सर्व राष्ट्रांच्या कार्यांत सुसंगतता घडवून आणणारें असें एक केन्द्र बनणें.

अनुच्छेद दोन यामध्यें ही संस्था व या संस्थेचे सभासद पहिल्या अनुच्छेदांतील हेतू साध्य करण्याकरितां पुढील तत्त्वांप्रमाणें चालतील असें म्हटलें आहे: १ ही संस्था तिच्या सर्व सभासदांस समान प्रभुत्व आहे या तत्त्वावर आधारलेली आहे. २ सर्व सभासद सभासदत्वाचे त्यांस प्राप्त होणारे अधिकार व लाभ यांचा सर्वांस फायदा मिळणें सुरक्षित होण्याकरितां या सनदेमुळें पडणारा भार सच्छ्रद्धेनें पार पाडतील. ३ सर्व सभासद आपले आंतरराष्ट्रीय विवाद शांततेनें व अशा रीतीनें सोडवितील कीं, त्यामुळें सार्वराष्ट्रीय शांतता व सुरक्षा आणि न्याय यांस धोका उत्पन्न होणार नाहीं. ४ सर्व सभासद आपल्या आंतरराष्ट्रीय संबंधांत कोणत्याहि राज्याविरुद्ध त्याचें प्रादेशिक ऐक्य अथवा राजकीय स्वातंत्र्य यांविरुद्ध व कोणत्याहि रीतीनें संयुक्त राष्ट्रांच्या

हेतूंशीं विसंगतपणें त्यात धाक घालणें अथवा शस्त्रबलाचा उपयोग करणें यापासून अलिप्त राहतील. ५ सर्व सभासद या सनदेप्रमाणें संयुक्त राष्ट्रसंस्था जी कार्यवाही करील तींत प्रत्येक प्रकारनें साह्य देतील व संयुक्त राष्ट्र-संस्था ज्या राज्याविरुद्ध प्रतिबंधक अथवा प्रभावकारक कार्यवाही करील त्या राज्यास साहाय्य करणार नाहींत. ६ संयुक्त राष्ट्र-संस्था ही जीं राज्यें या संस्थेचे सभासद नाहींत अशीं राष्ट्रें सार्वराष्ट्रीय शांतता व सुरक्षा यांच्या रक्षणाकरितां या तत्त्वांप्रमाणें आवश्यक तितकें वर्तन करतील ही गोष्ट सुनिश्चित करील. ७ या सनदेंतील कोणतीहि गोष्ट संयुक्त राष्ट्र-संस्थेस कोणत्याहि राज्याच्या मूलतः अंतर्गत क्षेत्राधिकाराच्या आंतील विषयांच्या बाबतींत हस्तक्षेप करण्यास अधिकृत करीत नाहीं व असे विषय संस्थेपुढें या सनदेप्रमाणें सादर करण्यास भाग पाडणार नाहीं.

यानंतर या सनदेंत इतर तपशिलाच्या बाबी दिल्या आहेत. याप्रमाणें आतांपर्यंत हेगच्या न्यायालयापासून आंतरराष्ट्रीय विवादांचा शांततेनें निर्णय करण्याकरितां व युद्धें टाळण्याकरितां जे अनेक प्रयत्न झाले त्यांपैकीं हा अगदीं अलीकडचा होय. या सर्व प्रयत्नांस अंशतः थोडेंफार यश मिळालें यांत शंका नाहीं, परंतु युद्धांचा अंत करण्याचें कार्य आतांपर्यंत कोणतीहि संस्था करूं शकली नाहीं व संयुक्त राष्ट्र-संघ तें कार्य यशस्वी रीतीनें करील असेंहि आज दिसत नाहीं.

### एकजगाची कल्पना—

अध्यक्ष रुझवेल्ट यानें आणखी एक महत्त्वाची गोष्ट केली ती ही कीं, अध्यक्षपदाच्या आपल्या निवडणुकींतील प्रतिस्पर्धी विंडेल विल्की यास महायुद्ध चालू असतांच विमानानें जगाची परिस्थिति व आपलीं मित्र व शत्रुराष्ट्रें यांची पाहणी करण्यास पाठविलें. ही पाहणी त्यानें विमानमार्गें व इतक्या अल्पकाळांत केली कीं, जग हें आतां किती लहान झालें आहे याचा त्यास तावडतोब प्रत्यय आला व त्यानें 'एकजग' या नांवाचें आपल्या निरीक्षणाचा वृत्तांत म्हणून पुस्तक लिहिलें. त्यामुळें सर्व जगाकडे मानववस्तीचा एक सलग प्रदेश या दृष्टीनें पाहण्याची कल्पना मानवसमाजापुढें मांडली गेली व समतेच्या व मानवतेच्या आधारावर सर्व मानवजातीचा कारभार चालविणें शक्य कोटींतील वाटूं लागलें व अनेक लोक या प्रश्नाचा विचार करूं लागले, एवढेंच नव्हे, तर अमेरिकेमध्यें एका गृहस्थानें एक जागतिक सरकार स्थापन करण्याकरितां एक संस्थाहि काढली. अर्थात् आज या गोष्टी केवळ कल्पनेंतच अस्तित्वांत आहेत, पण मानवी विचाराची गति आतां कशी वाहत आहे ही गोष्ट आपणांस यावरून दृष्टीस पडते.

### दुसऱ्या महायुद्धानंतरची राजनीति—

पहिल्या महायुद्धानंतर लवकरच व्हर्सायचा तह करण्यांत आला, परंतु दुसऱ्या जागतिक महायुद्धानंतर अद्यापहि कोणत्याहि जित राष्ट्राशीं प्रत्यक्ष तह करण्यांत आलेला नाहीं. इटलीचें राष्ट्र प्रथम जर्मनीच्या बाजूचें होतें, त्यानें पक्ष बदलून दोस्तांशीं हातमिळवणी केली व त्या राष्ट्राशीं कांहीं करार करण्यांत आला, पण इटली आज तो करार बदलून घेण्याचा विचार करीत आहे. परंतु जर्मनी व जपान या दोन राष्ट्रांशीं अद्यापि कोणत्याच प्रकारचा तह झालेला नाहीं. त्या राष्ट्रांत अद्यापि दोस्तांचें सैन्य प्रदेश व्यापून बसलें आहे. जर्मनीमध्यें फ्रान्स, इंग्लंड व अमेरिका या तीन राष्ट्रांचें सैन्य पश्चिम भागांत असून पूर्व भागांत रशिया घर करून बसलेला आहे. दोघांचेहि विचार जर्मन जनतेचें मन आपल्या राजकीय मतांत अनुकूल करून घ्यावें असे आहेत. अमेरिका व ब्रिटन लोकशाहीचा पुरस्कार करणारे असून रशिया साम्यवादी आहे यामुळें या दोन पक्षांत मतभेद वाढत जाऊन जर्मनीची कुचंबणा होत आहे. जपानमध्यें फक्त अमेरिकेचें सैन्य असल्यामुळें तेथील जनता अमेरिकेस खुश करून आपला दगडाखालीं असलेला हात सोडवून घेण्याची खटपट करीत आहे. आतां जपानशीं तह घडवून आणण्याची भाषा अमेरिकेनें सुरू केली आहे व आपल्या मतें एक खर्डा तयार केला आहे, पण रशिया त्यांत बांधा आणीत आहे. व चिनी राष्ट्रीय सरकाराशीं संबंध असेल तर ब्रिटनलाहि तो मान्य नाहीं असें त्यानें कळविलें आहे असें वृत्त आलें आहे.

गेल्या महायुद्धानंतर जर्मनी प्रबळ राहिल्यामुळें त्यास दुसरें युद्ध करतां आलें, त्या अर्थी जर्मनीस पुन्हां असें डोकें वर काढतां येणार नाहीं इतका खची करून दुर्बल करावयाचा असा दोस्तांचा विचार आहे. त्यांतहि फ्रान्सला जर्मनीची भीति वाटत असल्यामुळें जर्मनीच्या हातांत कधींच शस्त्रें पडणार नाहींत अशी तजवीज झाली पाहिजे असें फ्रान्सचें मत आहे. परंतु हा प्रश्न अनेक प्रकारें गुंतागुंतीचा होऊन बसला आहे व जगांतील एकंदर परिस्थितीवर याचा उलगडा अवलंबून आहे. आतां पश्चिम युरोपीय राष्ट्रांची एक साम्यवादविरोधी आघाडी तयार करण्याचा उपक्रम करण्यांत येत असून जर्मनीस अंशतः सशस्त्र करण्यास फ्रान्सनें संमति दिली आहे व पश्चिम युरोपीय राष्ट्रांचा एक गट बनवून त्यांचें एक सांघिक सैन्य अमेरिकन सेनापतीच्या हुकमतीखालीं तयार करण्यांत आलें असून त्यावर आयसेन हॉव्हर या सेनापतीची नेमणूक करण्यांत आली आहे. अमेरिकेलाहि या सैन्यांत आपलें सहा विभाग एवढें सैन्य सामील करावें लागलें आहे. याप्रमाणें पश्चिम युरोपीय साम्यवादविरोधी आघाडीची जबाबदारी व अग्रेसरत्व अमेरिकेकडे आलें आहे.

या दुसऱ्या महायुद्धानें जगांतील बहुतेक देशांस व राष्ट्रांस इतकी नुकसानी पोंचली कीं, त्यांची आर्थिक व्यवस्था अगदीं पार कोसळून गेली. जित व जेते या दोन्ही पक्षांसहि अगदीं निकृष्ट अवस्था प्राप्त झाली. ब्रिटनचें एवढें मोठें साम्राज्य पण तें इतःपर संभाळणें त्यांस अशक्य झालें. याकरितां भारत, ब्रह्मदेश, सीलोन या देशांस त्यांनीं एकदम स्वातंत्र्य देऊन टाकलें व इतर वसाहतींसहि अधिक स्वायत्तता दिली. यापुढें कानडाचा संबंध इंग्लंडपेक्षां अमेरिकेशीं अधिक निगडित झाला. ऑस्ट्रेलिया आपली आर्थिक घडी बसवून आपल्या संरक्षणाचीहि तजवीज पाहूं लागला. एवढेंच नव्हे तर उत्तर अटलांटिक-कराराप्रमाणें एक पासिफिक करार घडवून आणण्याच्या कामीं ऑस्ट्रेलिया व न्यू झीलंड हीं पुढाकार घेत असून फिलिपाइन्स व जपानचेंहि साहाय्य घेण्याची भाषा आतां बोलली जात आहे. दक्षिण आफ्रिका तर कोणासच जुमानीनासा झाला आहे. तरीहि ब्रिटननें एक-राष्ट्रकुलाची कल्पना काढून आपल्या सर्व अवयवांस एकत्र ठेवण्याचा उपक्रम यशस्वी रीतीनें सध्यां केलेला आहे. पण हें बंधन नाममात्रच आहे.

महायुद्ध चालू असतांच रूझवेल्टनें जेव्हां या युद्धाकडे अवलोकन केलें तेव्हां त्याच्या लक्षांत आलें कीं, जोंपर्यंत निरनिराळ्या राष्ट्रांमध्यें प्रादेशिक राष्ट्रीयत्व व साम्राज्यशाहीच्या कल्पना वावरत आहेत तोंपर्यंत युद्धांस आळा बसणें शक्य नाहीं. म्हणून त्यानें अगदीं प्रथमच व अमेरिका प्रत्यक्ष युद्धांत पडण्यापूर्वीच अटलांटिक सनद चर्चिलकडून मान्य करून घेतली व या युद्धानंतर एका राष्ट्राचें इतर लोकांवर स्वामित्व राहणार नाहीं असें जाहीर केलें. त्यानंतर कासाब्लांका येथें बेल्जमची राणी विल्हेल्मिना हिच्याकडून इंडोनेशियांतील बेटांस स्वायत्तता देण्याचें मान्य करून घेतलें. पुढें स्टालिननें मांचुरिया चीनला देण्याचें मान्य केलें व कैरो येथें चांग-कै-शेकनें कोरियाचें स्वातंत्र्य मान्य केलें. परंतु युद्धाची समाप्ति झाल्याबरोबर हीं वचनें जागच्या जागीं राहिलीं व पुन्हां डच लोकांनीं ब्रिटिशांच्या साहाय्यानें जावा व इंडोनेशियांत आपलें बस्तान बसविलें, फ्रान्सनें आपल्या सर्व वसाहतींवर व इंडोचीनवर सत्ता स्थापन केली व कोरियास स्वातंत्र्य मिळण्याच्या ऐवजीं तेथें अमेरिका व रशिया यांचीं सैन्यें व्यापून बसलीं. पुढें रशियानें उत्तर कोरियांतून आपलें सैन्य काढून घेतलें, पण अमेरिकेनें मात्र युद्ध-सल्लागार म्हणून आपले सैन्याधिकारी दक्षिण कोरियांत ठेवून दिले.

याप्रमाणें अटलांटिक सनद ही जवळजवळ हवेंत विरून गेली व स्वतः रूझवेल्ट या वेळीं नसल्यामुळें व ट्रूमन नुकताच अध्यक्ष झाल्यामुळें अमेरिकेस प्रथम कांहीं करता आलें नाहीं.

या वेळीं युरोपमधील आर्थिक घडी अगदींच विघडून गेली होती, परंतु अमेरिकेंत उत्पादनाची वाढ अतिशय झाल्यामुळें तेथें सुबत्ता नांदत होती. अशा वेळीं जॉर्ज मार्शल यानें असें सुचविलें कीं, अमेरिकेनें आर्थिक साहाय्य केल्याशिवाय युरोपमधील जनतेस शांतता व स्थिरता लाभणार नाहीं. याकरितां एक चार वर्षांची योजना आंखून त्याप्रमाणें युरोपांतील राष्ट्रांस पहिल्याच वर्षी चारशें कोटी डॉलर मदत करण्यांत आली. अर्थात् त्यांतील मोठा हिस्सा इंग्लंडलाच मिळाला. याप्रमाणें युरोपांत स्थिरस्थावर करण्याचा प्रयत्न करण्यांत आला.

इकडे रशियानें मध्यंतरीं स्थापन झालेलीं एस्थोनिया, लेटव्हिआ लिथुआनिया वगैरे राज्यें आपल्या संघांत सामील करून घेऊन फिनलंडचाहि कांहीं भाग व्यापला. तसेंच नवीन पुनःस्थापित झालेला पोलंड, रुमानिया, चेकोस्लोव्हाकिया, वगैरे देशहि साम्यवादी बनवून आपल्या कक्षेखालीं आणले. युगोस्लाव्हियावरहि हा प्रयोग करण्यांत आला, पण तेथें तितकें यश आलें नाहीं व टिटोनें आपलें स्वातंत्र्य कायम राखलें, पण तें राष्ट्र एकाकी बनलें.

## ट्रूमन तत्त्व—

याच वेळीं ग्रीस व तुर्कस्तान यांवरहि रशिया आक्रमण करील असा रंग दिसूं लागला, परंतु या वेळीं अध्यक्ष ट्रूमन यानें रशियाची सत्ता अधिक वाढत असून काळा समुद्र व बाल्कन प्रदेश यांवर जर रशियाची सत्ता स्थापन झाली तर पूर्वेकडील फार मोठ्या प्रदेशास धोका उत्पन्न होईल हें लक्षांत आणून असें जाहीर केलें कीं, ज्या राष्ट्रांवर परकीय आक्रमण होईल त्या राष्ट्रांस संरक्षण मिळण्याकरितां अमेरिकेनें मदत करणें अवश्य आहे. हें 'ट्रूमन तत्त्व' म्हणून प्रसिद्ध आहे. या तत्त्वाप्रमाणें ग्रीस व तुर्कस्तान यांस साहाय्य करून त्यांचें रशियापासून रक्षण करण्यांत आलें.

## इस्त्राएलची स्थापना—

याच वेळीं पहिल्या महायुद्धांत यहुदी लोकांस पॅलेस्टाइन ही मायभूमि म्हणून मिळवून देण्यांत येईल व तेथें इस्त्राएल या राष्ट्राची स्थापना करण्यात येईल अशी जी घोषणा करण्यांत आली होती तीस अनुसरून अनेक यहुदी लोकांनीं पॅलेस्टाइनमध्यें संपन्न वसाहती स्थापन केल्या होत्या त्यांस स्वायत्तता देऊन इस्त्राएल हें स्वतंत्र राष्ट्र म्हणून मान्य करण्याचा प्रश्न पुढें आला. त्यास अमेरिकेनें मान्यता दिली. परंतु तेथील अरब राष्ट्रांनीं या स्वतंत्र इस्त्राएल राष्ट्रास विरोध केला व तेथें युद्ध सुंपलें. इंग्लंडला अरब राष्ट्रास दुखवावयाचें नव्हतें व शक्य तर आपलें ईजिप्तवरील वर्चस्व व तेथील सैन्य कायम ठेवावयाचें होतें. म्हणून इंग्लंडची या गोष्टीस संमति नव्हती. परंतु अखेरीस यहुदी लोकांनीं लढून आपलें इस्त्राएल राष्ट्र स्वतंत्र केलें. या बाबतींत अरबस्तान, वगैरे भागांतील पेट्रोलच्या खाणी, सुएझच्या कालव्यांतील मार्ग, वगैरे

प्रश्नांची गुंतागुंत असून तें एक शल्य कायमचेंच राहणार आहे. पण आतां अरब राष्ट्रें व ईजिप्तहि जागृत झालेलें असून ईजिप्तमधून ब्रिटिश सेनाहि लवकरच काढून घ्यावी लागेल एवढेंच नव्हे तर ईजिप्तची सुदानची मागणीहि मान्य करावी लागेल असें दिसतें.

नेदर्लंड्सनीं जावा व इंडोनेशिया यांवर पुन्हां लादलेला अमलहि तेथील लोकांनीं लढा देऊन उठवून लावला व इंडोनेशियास स्वतंत्र केलें. या बेटांचें एक संघराज्य बनविण्याची प्रथम कल्पना होती, परंतु आतां तें लोकसत्ताक एकराज्यच बनलें आहे व सर्व बेटें या राज्यांत समाविष्ट करून घेण्याची खटपट चालू आहे. त्याकरितां आंबोयनावर सैन्य पाठविण्यांत आलें आहे. यामध्येंहि न्यू गिनीच्या पश्चिम भागाचा प्रश्न गुंतागुंतीचा होऊन बसला आहे व त्या भागांत ऑस्ट्रेलियास इंडोनेशियाचें वर्चस्व नको आहे.

### भरतखंड व काश्मीर—

भरतखंडास जेव्हां स्वायत्तता देण्याची घोषणा करण्यांत आली त्या वेळीं इंग्रजाच्या प्रेरणेनें उत्पन्न झालेला द्विराष्ट्रवाद येथें बळावला होता त्याचा परिणाम म्हणून १५ ऑगस्ट १९४७ या दिवशीं भारत व पाकिस्तान या दोन राष्ट्रांत भरतखंडाची फाळणी झाली; मात्र ती सलोख्यानें व शांततेनें न होतां रक्तपातयुक्त झाली. आतां भारतानें आपली घटना तयार करून तीप्रमाणें नवीन निवडणुकी करून राज्यकारभार चालविण्याचा उपक्रम सुरू केला आहे. मध्यंतरीं भारतांतील सर्व देशी संस्थानें भारतांत विलीन झाल्यामुळें तें एकजीव राष्ट्र बनलें. हैद्राबाद संस्थानांतील अव्यवस्थेमुळें तेथें पोलिस कारवाई केल्यानंतर तें विलीन झालें. मध्यंतरीं काश्मीरनें स्वतः कोणांत विलीन व्हावयाचें तें न ठरविल्यामुळें त्यावर सरहद्दीवरील टोळ्यांनीं स्वारी केली व श्रीनगरपर्यंत चाल केली तेव्हां काश्मीरचा राजा व मुख्य मंत्री यांनीं भारताशीं आपला संबंध जोडून मदतीची याचना केली तेव्हां भारतानें सैन्य पाठवून शत्रूस मागें हटविलें पण त्यात पाकिस्तानी सेना असल्यामुळें भारतानें संयुक्त राष्ट्रांकडे तक्रार केली पण तिचा अद्यापि निकाल लागला नाहीं. तो प्रश्न फार गुंतागुंतीचा होऊन अद्याप त्याचा घोळच पडला आहे व त्याच्या भवितव्याबद्दल अद्यापिहि निश्चित अंदाज करतां येत नाहीं.

### कोरियांतील लढा—

याच वेळीं दक्षिण कोरियावर उत्तर कोरियांतील साम्यवादी लोकांनीं चाल केली, म्हणून अमेरिकेनें तावडतोब मदत पाठवून हा प्रश्न संयुक्त राष्ट्रांपुढें ठेवला व संयुक्त राष्ट्रांनीं उत्तर कोरियास आक्रमक ठरवून त्याविरुद्ध सर्व राष्ट्रांनीं दक्षिण कोरियास सहाय्य करावें असें जाहीर केलें. त्याप्रमाणें तेथें दक्षिण कोरिया झाला असून आतां उत्तर कोरियाशीं लढा चालू आहे. पण त्यांत उत्तर कोरियास चिनी साम्यवाद्यांची मदत असल्यामुळें व चिनी साम्यवादी व रशियन साम्यवादी यांची गट्टी असल्यामुळें या प्रश्नांतून तिसरें महायुद्ध उत्पन्न होतें कीं काय अशी भीति सर्वांस व विशेषतः अध्यक्ष ट्रूमन यांस वाटत आहे.

जपानशीं कायमचा तह घडवून आणण्यासंबंधीं वाटाघाटी चालू आहेत. परंतु जर्मनीमध्यें अद्यापि निश्चित योजना होऊं शकली नाहीं.

### लोकशाही व साम्यवाद—

सध्यां जगामध्यें लोकशाही व साम्यवादी या दोन विचारसरणींत लढा चालू आहे. साम्यवादी विचारसरणीचा पुरस्कार रशिया करीत असून युद्धाशिवाय आपल्या मतप्रचारानें हळूहळू एक एक राष्ट्र आपल्या कक्षेखालीं आणीत आहे. लोकशाही मताचा पुरस्कार अमेरिका करीत असून तिच्याजवळ आज सैन्य व शस्त्रास्त्रें आणि पैसा मुबलक आहे. तसेंच अणुशक्तिहि तिच्या ताब्यांत आहे, त्यामुळें ती आपला प्रभाव इतर राष्ट्रांवर पाडीत आहे व प्रत्यक्ष द्रव्यसाहाय्य देऊन अनेक राष्ट्रांस आपल्या कक्षेखालीं आणीत आहे. कोलंबो येथील योजना ही या कार्यक्रमापैकींच एक आहे.

आतांपर्यंत आशियांतील राष्ट्रांस जागतिक प्रश्नांमध्यें फारसें महत्त्व नसे, पण मध्यपूर्वेतील तेल व सुएझचा मार्ग यांस महत्त्व आल्यामुळें नैर्ऋत्य आशिया हा एक राजकारणाचा आखाडा बनला आहे. त्यांतच इराणनें आपल्या तेलाच्या खाणींचें राष्ट्रीयीकरण करण्याचा निश्चय जाहीर केला आहे व आज ब्रिटनपुढें हा प्रश्न आपली इभ्रत सांभाळून कसा सोडवावयाचा हा मोठा पेंच आहे, व यामुळें इराण रशियाच्या वर्चस्वाखालीं जातो कीं काय अशी भीति ब्रिटन व अमेरिका यांस वाटत आहे.

इस्राएल व सिरिया वगैरे अरबी राष्ट्रें यांत धुसफूस चालूच आहे.

काश्मिरचा प्रश्नहि राष्ट्रसंघापुढें असून गुंतागुंतीचा होऊन बसला आहे. याप्रमाणें आज जगांत सर्वत्र अस्थिरता व अविश्वास यांचें साम्राज्य चालू आहे.

### मानवाचें भवितव्य—

मानवजातीपुढें आज जे महत्त्वाचे प्रश्न आहेत ते सोडविण्यासाठीं विचारपूर्वक व अभ्यासपूर्वक योजना ठरविली पाहिजे. एखादा राष्ट्रसंघ स्थापन करणें किंवा एखादी परिषद् भरविणें व ठराव पास करणें यांनीं कांहींहि घडून येणार नाहीं. मानवाच्या परस्पर संबंधांचा चांगला अभ्यास करून तसेंच वैयक्तिक व सामा[illegible] अभ्यासाची जोड देऊन, तसेंच निर[illegible] व त्यांचे आर्थिक प्रश्न, शिक्षण

व भौतिक शास्त्रांची वाढ या सर्व गोष्टी विचारांत घेऊन एकंदर पृथ्वीतलावरील मानवसमाजाची उन्नति कशी होईल व निरनिराळ्या मानवसमूहांत सख्य कसें निर्माण होईल यांचा विचार केला पाहिजे. पूर्वीच्या आकुंचित राजकारणाच्या कल्पना व संकुचित नैतिक व राजनैतिक नियम व मर्यादा यांचा त्याग करून एकंदर मानवजातीसंबंधीं विशाल व अनिर्बंध आचारविचारविषयक कल्पना पुढें ठेवून जागतिक समाजाची व सामाजिक संबंधाची वडी बसविली पाहिजे.

दिवसेंदिवस दळणवळणाचीं साधनें अतिशय त्वरेनें वाढत असून आतां हें जग पूर्वीच्याप्रमाणें नद्या, पर्वत, खाड्या, समुद्र यांच्या मर्यादांनीं संकुचित राहिलें नाहीं. तें अफाट असलें तरी अगदीं लहान लहान होत आहे. हजारों मैलांचें अंतर कांहीं तासांत तोडतां येणें शक्य झालें आहे. तारायंत्रें, बिनतारी यंत्रें यांनीं दूरदूरचे संदेश क्षणार्धांत पाठवितां येऊं लागले आहेत. जगाच्या एका कोंपऱ्यांत घडलेल्या गोष्टींची प्रतिक्रिया जगाच्या सर्व भागांत व दूरवर घडून येत आहे. अशा वेळीं कोणताहि मानवसमाज अलग व अलिप्त राहूं शकत नाहीं. सर्व मानवजात ही एकस्वरूपी बनत चालली असल्यामुळें व जगाची भूमि संकुचित होत असल्यामुळें जसा शरीराचा एखादा भाग रोगी असल्यास बाकीचें शरीर रोगमुक्त किंवा निरोगी राहूं शकत नाहीं त्याप्रमाणें जगांतील कोणताहि मानवसमाज यापुढें जर रोगी, मागासलेला, दरिद्री, अशिक्षित, अडाणी, वगैरे स्थितींत राहील तर त्याचा उपसर्ग जगास झाल्याशिवाय राहणार नाहीं. आज भारतांत अन्नधान्याची पडलेली तूट हा एक जागतिक प्रश्न होऊन बसला असून दूरदूरच्या देशांत याबद्दल काळजी वाटत आहे व भारतास साहाय्य करण्याची बुद्धि होत आहे. या गोष्टीवरून बाह्यतः एकाच देशाचा वाटणारा प्रश्नहि जागतिक स्वरूप कसें धारण करूं शकतो तें दृष्टीस पडतें.

याकरितां प्रगत राष्ट्रांनीं अप्रगत राष्ट्रांस साहाय्य करून त्यांची प्रगति घडून येण्यास साहाय्य केलें पाहिजे. यापुढें राज्यें, साम्राज्यें वगैरे जनतेवर अधिकार चालविणाऱ्या संस्था टिकून राहणें शक्य नाहीं. एका समाजाची पिळणूक दुसऱ्या समाजाकडून होत असली व तींत एखाद्या मानवसमाजाचें हित अथवा स्वार्थ साधत असला तर ती गोष्ट इतर मानवसमाज उघड्या डोळ्यांनीं पाहत राहून चालूं देणार नाहींत.

सर्व मानवजातीस विकासास पूर्ण वाव, आपल्या पसंतीची व सोयीची कार्यव्यवस्था, व आपली सांपत्तिक, आर्थिक, मानसिक वगैरे सर्व प्रकारची उन्नति करून घेण्यास पूर्णपणें संधि देणारी सामाजिक व राजकीय व्यवस्था प्राप्त होणें हेंच मानवजातीचें ध्येय राहील व तें साध्य करून घेण्याकडे सर्व मानवजातीची प्रवृत्ति राहील व या प्रवृत्तीस विरोध करणारे समाज जरी कांहीं काळ यशस्वी दिसले तरी अंतीं नाश पावतील व मनुष्य हा आपलें भविष्य आपण ठरविण्यास स्वतंत्र राहील.

उपसंहार—

याप्रमाणें आतांपर्यंत आपण सृष्टीच्या उत्पत्तीपासून या विश्वामध्यें मानवाची उत्पत्ति विकासशास्त्राप्रमाणें कशी झाली व मानवानें आपले समाज कसे स्थापन केले, मानवाचा या भूतलावर प्रसार कसा झाला, त्यानें अत्यंत प्राचीन काळापासून निरनिराळ्या भूभागांत तेथील नैसर्गिक परिस्थितीस अनुसरून आपल्या संस्कृतीचा विकास कसा घडवून आणला व या निरनिराळ्या प्रदेशांत उत्पन्न झालेल्या व विकास पावलेल्या संस्कृतींमध्यें वेळोवेळीं संघर्ष कसे उत्पन्न झाले व त्यामुळें एकंदर मानवाच्या प्रगतीस चालना कसकशी मिळत गेली, परस्पर मानवसमूहांत ज्ञानाची देवघेव व वाढ कसकशी होत गेली, निरनिराळ्या संस्कृती व साम्राज्यें वाढीस कशीं लागलीं व कालांतरानें त्यांचा लय कसा झाला, व या सर्व घडामोडींत मानवजातीची एकसारखी प्रगति कशी होत गेली व अर्वाचीन काळीं दळणवळणाचीं साधनें वाढत गेल्यामुळें एकंदर मानवसमाजाचा परस्पर व्यवहार कसा निगडित होत गेला व जग लहान लहान होत जाऊन मानवसमाजास एकत्वाची जाणीव कशी होत गेली व महायुद्धादि संघर्षांतून एकंदर मानवजातीच्या खाल्याच्या व शांततेनें एकत्र नांदण्याच्या व परस्परांस साहाय्य करून एकंदर जगांतील मानवसमाजाचा उत्कर्ष घडवून आणण्याच्या कल्पना कशा वाढीस लागल्या व एकमानवी कुटुंब बनविण्याची कल्पना आज जगांतील विचारी मनुष्यांपुढें कशी वाढीस लागली आहे, हें आपण पाहिलें व अशा रीतीनें मानव आपली उन्नति करून घेण्याच्या मार्गास लागला असून यापुढें या विश्वाचा विकास सर्वांगीण व शांततेच्या मार्गानें घडवून आणण्याचें मानवाचें ध्येय अधिकाधिक साध्य होण्याच्या मार्गावर आहे असें मानण्यास प्रत्यवाय नाहीं. अशा रीतीनें नराचा नारायण करण्याच्या कार्यांत मानवास सुबुद्धि प्राप्त होऊन यश प्राप्त व्हावें एवढीच आशा आपण प्रदर्शित करूं शकतों व अशा रीतीनें या विश्वविकासाच्या कथेस येथें विराम देण्यांत येत आहे.

या प्रस्तावना लिहिण्याच्या कामीं अनेक ग्रंथांचें साहाय्य घेण्यांत आलें व येथील बहुतेक सर्व ग्रंथालयांचा उपयोग करण्यांत आला; त्यांचें ऋण येथें आम्ही प्रकट करतों. सर्व ग्रंथांची यादी द्यावयाची तर ती फार मोठी होईल म्हणून त्यांचा नामनिर्देश न करतांच त्यांचे आभार मानून आम्ही आपली कृतज्ञता व्यक्त करीत आहों.

यशवंत रामकृष्ण दाते
चिंतामण गणेश कर्वे

# भाग सहावा

## व [ चालू ]

**विठ्या महार** ( १५ वें शतक उत्तरार्ध )—मंगळवेढें येथील एक महार. मंगळवेढ्यास ज्या वेळीं मोठा दुष्काळ पडला होता व अन्नाच्या अभावीं अनेक लोक त्यांत दगावूं लागले होते त्या वेळचा मंगळवेढ्याचा कमाविसदार दामाजीपंत मंगळवेढेकर हा गरिबांचा अतिशय कनवाळू असल्यानें त्यास गोरगरिबांच्या अन्नाभावीं होणाऱ्या हालअपेष्टा पाहवेनात म्हणून त्यानें सरकारी कोठारांत होतें नव्हतें तेवढें सर्व धान्य लोकांना वांटून टाकलें. ही हकिगत बादशहास कळतांच त्यानें दामाजीपंतास कैद करण्यासाठीं आपले लोक पाठवले. या वेळीं विठ्या महारानें आपल्यापाशीं असलेलें सर्व द्रव्य बादशहाकडे भरून त्याच्या धान्यनुकसानीची भरपाई करून दिली व अशा रीतीनें दामाजीपंताचा प्राण व अब्रू वचावली.

प्रत्यक्ष परमेश्वर, विठ्ठल, विठ्या महाराच्या रूपानें दामाजीपंतास सोडविण्यासाठीं आला होता अशी आख्यायिका असून ती कथा-पुराणांतून रंगविलेली असते. दामाजीपंत पाहा.

**विडंबन काव्य**—( इं. पॅरोडी ). एखाद्याच्या वाङ्मयकृतीचें उपहासात्मक अनुकरण करण्याच्या प्रकाराला हें नांव आहे. उपहास-काव्य ( सटायर ) हा प्रकार याहून कांहींसा निराळा आहे. त्यांत मुळाचें तंतोतंत अनुकरण नसतें. नक्कल ऐकून मुळांतल्या गोष्टीची आठवण व्हावी व करमणूक वाटावी एवढाच विडंबनांत हेतु असतो. ख्रि. पू. ५ व्या शतकापासून ग्रीक वाङ्मयांत हा प्रकार दिसून येतो. इंग्रजी वाङ्मयाचा आद्य कवि चॉसर यानेंहि 'टेल ऑफ सर थोपास' ही विडंबनात्मक रचना केली आहे. शेक्सपियर, बेन जॉन्सन, जॉन फिलिप, वगैरे आणखी विडंबनकार सांगतां येतील. अर्वाचीन काळांत कॅल्व्हर्ले हा प्रसिद्ध आहे. मराठींत प्र. के. अत्रे यांनीं 'मनाचे श्लोक', 'परिटा येशिल कधिं परतून', इ. कवितांतून व मा. ना. जोशी यांनीं आपल्या नाटकांतून चांगलें विडंबन दाखविलें आहे. नंतर यांचें अनुकरण करून पुष्कळ कवींनीं फाजील विडंबन आरंभिलें व त्यामुळें थोर व्यक्तींविषयीं आदराची भावना नष्ट होऊं लागली. 'उपहासिनी' ग्रंथांत अशा कवितांचा संग्रह आहे. अशा वाङ्मयकृतीला जर सात्त्विक वळण नसलें तर तिला हीन दर्जा मिळतो.

**विणकाम**—मागावर उभें-आडवें सूत किंवा दुसरें कोणत्याहि प्रकारचे तंतू एकमेकांत गुंतवून त्यांपासून वस्त्र तयार करण्याच्या कलेस विणकाम म्हणतात. विणकामामध्यें प्रथम मागावर ताणा अथवा उभे सुताचे धागे चढविण्यांत येतात. नंतर त्यांतून बाणा अथवा आडवीं सुतें धोट्यानें गुंतविण्यांत येतात. १८५० पर्यंत सर्व कापड बहुतेक हातमागावर विणण्यांत येत असे. १७४० मध्यें जॉन के यानें धांवता धोटा शोधून काढल्यामुळें विणकामांत बरीच क्रांति झाली. यामुळें विणकऱ्याला एकाच वेळीं एक इकडून व एक तिकडून असे दोन धागे उजव्या हाताच्या एका हिसक्यानें विणतां येऊं लागले. नक्षीकामाकरितां पूर्वी ड्रॉन्ड्स ( पिंजरा ) नांवाचा माग वापरण्यांत येत असे. परंतु जोसेफ मेरी जॅकार्ड यानें त्याच्याच नांवानें प्रसिद्ध असलेला नवीन माग शोधून काढल्यापासून या कलेची फारच प्रगति झाली. १७८४ मध्यें कार्टराइट यानें यांत्रिक शक्तीनें

चालणाऱ्या मार्गांचा शोध लावला. यामध्यें अलीकडे पुष्कळ सुधारणा होऊन तो पाण्याच्या वाफेच्या, वायूच्या, किंवा विजेच्या शक्तीनें चालविण्यांत येण्याची सोय झाली आहे. तथापि त्यांतील मुख्य विणण्याची पद्धति अद्यापि जुनीच आहे. कापड विणण्याचे सर्व भाग सामान्यतः एकाच प्रकारचे असतात. परंतु निरनिराळ्या तऱ्हेचें कापड विणण्याकरितां त्यांमध्यें थोडाफार फरक करण्यांत आलेला असतो.

**वितस्ता**—पंजाबांतल्या पांच नद्यांपैकीं सर्वांत पश्चिमेकडील ही नदी असून हिचा उल्लेख ऋग्वेदांत नदीस्तुतींत आलेला आहे. अलेक्झांडरच्या इतिहासकारांनीं जिला हायडॅस्पीझ असें नांव दिलें होतें तीच ही नदी होय व हिलाच टॉलेमी हा बिडॅस्पीझ असें अधिक शुद्ध नांव देतो. मुसलमानी इतिहासकार हिला बिहत् किंवा बिहत असें म्हणत असत. या नांवाची स्मृति हल्लीं काश्मिरी वेथ ह्या नांवांत अजूनहि उरली आहे. ज्या पांच नद्यांमुळें पंजाबला पंजाब हें नांव मिळालें त्या पांच नद्या : १. सिंधु, २. वितस्ता (झेलम), ३. इरावती, ४. चंद्रभागा (चिनाब), व ५. विपाशा (बियास) या असाव्यात. सध्यां झेलम व चिनाब यांचा संगम झाल्याचें दिसतें व बियत् ही नदी अगदींच वेगळी दाखविली जाते.

**विदर्भ**—पूर्वकालीन वैदिक वाङ्मयांत फक्त जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणांतच हें एका जागेचें नांव म्हणून आलेलें आहे. ह्या ठिकाणीं येथील माचल जातीचे कुत्रे वाघास ठार मारीत असा उल्लेख आलेला आहे. हाच विदर्भ आजचा वऱ्हाड प्रांत असावा असें पुष्कळ विद्वानांचें मत आहे.

लोपामुद्रा ही विदर्भराजकन्या, रुक्मिणीचा पिता भीष्मक हा विदर्भ देशाचा राजा, याप्रमाणें पुराणांतून या देशाचे उल्लेख येतात.

**विदुर**—व्यासापासून विचित्रवीर्याची पत्नी अंबिका हिच्या दासीला झालेला पुत्र. हा न्यायी, नीतिमान् व शहाणा म्हणून प्रसिद्ध आहे. श्रीकृष्णावर याची अतिशय भक्ति असे. तसेंच याची पांडवांवर प्रीति असून त्यांना विदुरानें लाक्षागृहादि संकटांतून वांचविलें. धृतराष्ट्रास विदुरानें सांगितलेली नीति विदुरनीति म्हणून प्रसिद्ध आहे. भारतीय युद्धांत यानें भाग घेतला नाहीं, तर उलट हा तीर्थयात्रेस निघून गेला. पांडव राज्यावर बसल्यानंतर हा कांहीं काळ हस्तिनापुरांत होता, पण नंतर धृतराष्ट्राबरोबर वनांत गेला, पण तेथें पुढें त्याच्या अंगांत पिशाचवृत्ति संचरली. तेव्हां युधिष्ठिरानें याला मुक्ति दिली.

**विदुर जात**—एक ब्राह्मण जात. यांच्यांत कृष्ण यजुर्वेदी व शुक्ल यजुर्वेदी पाराशर ब्राह्मण असे भेद आहेत. जातीची एकंदर लो. सं. हजार–बाराशें आहे. वस्तीचें मुख्य ठिकाण पूर्व खानदेश व पश्चिम वऱ्हाडचा कांहीं भाग. यांशिवाय माळव्यांत व निजामशाहींतहि नोकरीच्या संबंधानें गेलेली कांहीं मंडळी तेथें सुमारें १५० वर्षांपासून स्थायिक झाली आहेत. पूर्वीं स्वशाखेचे भिक्षुक कांहीं ठिकाणीं होते. आतां बहुतेक अन्य यजुःशाखीयांकडूनच त्यांचे धार्मिक संस्कार करविले जातात. कांहीं थोडीं घराणीं आश्वलायनांप्रमाणेंच आपलीं नित्यनैमित्तिक कर्में करतात. ज्ञातींतील अजमासें निम्म्या लोकांस कुलकर्णी वतनें आहेत. या जातीस मध्यप्रांत व वऱ्हाड या भागांत कृष्णपक्षी असेंहि म्हणतात.

**विदुला**—सौवीर देशाच्या राजाची स्त्री. हिचा पति मरण पावल्यामुळें व पुत्र संजय हा लहान असल्यामुळें सिंधु देशाच्या राजानें हिचें राज्य घेतलें. पुढें संजय मोठा झाल्यावर हिनें त्यास क्षात्रधर्माचा उपदेश करून रणांगणावर पाठविलें. आईच्या उपदेशाप्रमाणें संजयाच्या अंगीं वीरश्री बाणून त्यानें सिंधुराजापासून आपलें राज्य परत घेतलें. हाच विदुलेचा उपदेश कुंतीनें युधिष्ठिराला युद्धप्रवृत्तीसाठीं पढविला.

**विदूषक**—आपल्याकडे संस्कृत नाटकांतून नायकाचा गमत्या मित्र म्हणून विदूषक आढळतो. 'कुसुमवसंताद्यभिधः कर्मवपुर्वेशभाषाद्यैः । हास्यकरः कलहरतिर्विदूषकः स्यात्स्वकर्मज्ञः ॥' अशी साहित्यदर्पणकारांनीं त्याची व्याख्या दिली आहे (७९). शाकुंतल नाटकांतील विदूषक परिचित आहेच. पाश्चात्य देशांत मध्ययुगांत प्रत्येक खात्यांत एक विदूषक असे. त्याचा पोषाख ठराविक असे : डोकें तासलेलें, अंगांत विविध रंगांचा कोट व पायांत पायजमाहि दोन रंगांचा; डोक्याच्या टोपीला कोंबड्याचा तुरा व घंटा, व हातांत विचित्र मूठ असलेली लहान काठी. पहिल्या चार्लस राजापर्यंत यांची अमदानी होती. पुढें हे खाजगी घरांतून क्वचित् आढळत. आज सर्कशींत असे विदूषक पाहण्यांत येतात.

**विदेह**—हें एका लोकराष्ट्राचें नांव असून ब्राह्मण ग्रंथांच्या काळाच्या अगोदर तें कोठें आलेलें नाहीं. शतपथ ब्राह्मणांत विदेघ माधवाची जी कथा दिलेली आहे, तिजवरून विदेहांत संस्कृति आली ती पश्चिमेकडील ब्राह्मण लोकांनीं आणली व विदेहाच्या पूर्वीच कोशल देश ब्राह्मणसंस्कृतिमय झालेला होता, असा जो जनप्रवाद आहे तो खरा असल्याचें दिसतें. विदेहांतल्या लोकांना पुढें जी प्रसिद्धि मिळाली तिचें कारण त्यांचा राजा जनक ह्याची संस्कृति होय. बृहदारण्यक उपनिषदांत हा जनक राजा ब्रह्मविद्येचा प्रमुख पुरस्कर्ता होता असें म्हटलेलें आहे. बौधायन श्रौतसूत्रामध्यें ब्राह्मणी संस्कृतीच्या लोकांत विदेह लोकांचें नांव आलेलें आहे. कोसल व विदेह या देशांची मर्यादा सदानीरा म्हणजे अर्वाचीन गंडकी (ग्रीक भूगोलवेत्ते हिला कॉंडोचेटीझ असें म्हणत असत) ही नदी होती. ही नदी नेपाळमधून निघून पाटण्याच्यासमोर गंगा नदीस मिळते. विदेह देश म्हणजे जवळजवळ हल्लींचा तिरहुत देश होय.

**विद्याधर**—एक उपदेवतागण. विद्याधर पृथ्वी व आकाश यांच्या मध्यावकाशांत वास करीत असून ते स्वभावतः उपकारी असतात असा समज आहे. हे इंद्राचे अनुचर असले तरी यांच्यापैकींच कोणी राजे-राज्यकर्ते असतात. यांचा मानवांशीं संबंध असून पुष्कळदां मानव-विद्याधरांत लग्नें घडतात. यांचीं कामरूपी, खेचर, नभश्चर, प्रियंवद, वगैरे गुणदर्शक नांवें आहेत.

**विद्यानिधि कवि**—शहाजहान बादशहाच्या कालांतील एक संन्यासी पंडित. याच्या अनेक विद्वत्ताप्रचुर ग्रंथांतून यानें मिळविलेला ज्ञानसंचय दिसून येतो. याच्या वेळीं काशी व प्रयाग येथें यात्रेसाठीं जाणाऱ्या यात्रेकरूंकडून कर वसूल केला जात असे. यात्रेकरूंवर होणारा हा अन्याय यास सहन न होऊन या बाबतींत यानें शहाजहान व त्याचा मुलगा दारा शुकोह यांची भेट घेऊन हा कर बंद करवला. शहाजहाननें याच्या विद्वत्तेवर व वक्तृत्वावर खुष होऊन यास 'सर्वविद्यानिधि' अशी पदवी दिली. लोकांनींहि यास अनेक मानपत्रें देऊन याचा गौरव केला. यास मिळालेलीं मानपत्रें कलकत्त्याच्या रॉयल एशियाटिक सोसायटीनें संग्रहीत करून ठेवलीं आहेत.

**विद्यापति** (१३७५-१४५०)—एक बंगाली कवि. पुरुषपरीक्षा, विवादसार, गयापत्तन, कीर्तिलता, शैवसर्वस्वसार, दानवाक्यावली, दुर्गाभक्तितरंगिणी, वगैरे ग्रंथांचा हा कर्ता असून यानें संस्कृत भाषेंतहि काव्यरचना केली आहे. याच्या काव्याचा मुख्य विषय 'राधा-कृष्ण प्रेम' हा दिसून येतो. याच्या पित्याचें नांव गणपति. याचे आजे जयदत्त हेहि एक सदाचारी असे संस्कृत पंडित होते. त्यांना त्यांच्या सदाचारी वागणुकीमुळें योगेश्वर असें म्हणत. विद्यापति व चंडीदास हे समकालीन असून त्यांचा गाढ स्नेह होता.

**विद्यापीठ**—उच्च शिक्षणासाठीं विद्यापीठासारख्या संस्था स्थापन करण्यांत येतात. प्राचीन काळींहि आपल्या ऋषींच्या आश्रमांतून सर्व उच्च प्रकारचें विद्यादान होत असे; गुरुकुलेंहि चांगलीं चालत. बौद्धकालांत तक्षशिला, नालंदा यांसारखे विहार विद्यापीठेंच म्हणतां येतील. युरोपांत ९ व्या शतकांत सालेर्नो येथील वैद्यक विद्यापीठ अस्तित्वांत आलें. नंतर पॅरिस, ऑक्सफोर्ड, सालामान्का, वगैरे विद्यापीठें निघालीं. युरोप खंडांत बहुतेक सर्व देशांतून जुनीं विद्यापीठें आहेतच. पॅरिस विद्यापीठानें धार्मिक सुधारणा आणि राज्यक्रांति घडवून आणण्याच्या कामीं मोठें साहाय्य दिलें आहे. अमेरिकेंत हार्वर्ड विद्यापीठ सर्वांत जुनें आहे (१६३८). अमेरिकेनें विद्यापीठाचें शिक्षण समाजाच्या खालच्या थरापर्यंत व खेडेगांवांपर्यंत नेलें आहे. तथापि अमेरिकेंत विद्यापीठ या नांवाला भारदस्तपणा राहिला नाहीं. कारण एखादी पदव्या देणारी संस्थाहि आपल्याला तें नांव घेते. कांहीं उच्च शिक्षण देणाऱ्या शाळाहि स्वतःला कॉलेज न म्हणवितां विद्यापीठ म्हणवितात. तथापि तेथील कांहीं विद्यापीठें युरोपखंडांतील इतर देशांना आदर्शवत् अशींच आहेत.

इंग्लंडमध्यें ऑक्सफोर्ड आणि केंब्रिज हीं विद्यापीठें मध्ययुगांत स्थापन झालीं असून त्यांची परंपरा अगदीं निराळी आहे; जगांत तिला तोड नाहीं. नंतर १९ व्या शतकांत निघालेलीं डरहॅम व लंडन विद्यापीठें हीं नवीन प्रकारचीं होत. विसाव्या शतकांत मॅन्चेस्टर, लिव्हरपूल, बर्मिंगहॅम, लीड्स, शेफील्ड, वगैरे ठिकाणीं विद्यापीठें निघालीं. स्कॉटलंडमधील विद्यापीठें पंधराव्या शतकापासूनचीं आहेत. डब्लिनचें विद्यापीठ त्यापुढील शतकांतलें आहे.

युरोपांत इटालियन विद्यापीठें मध्ययुगांतलीं व संख्येनें अनेक आहेत. नंतर फ्रान्सचा क्रम लागतो. धर्मसुधारणेच्या काळापर्यंत पॅरिस विद्यापीठाचें युरोपांत फार महत्त्व असे. फ्रेंच राज्यक्रांतींत सर्व फ्रेंच विद्यापीठें गडगडलीं. तथापि पुढें नेपोलियननें फ्रेंच विद्यापीठांची सुव्यवस्था लावून दिली. जर्मनींत जर्मन भाषा बोलणारीं विद्यापीठें होतीं. त्यांतील सर्व विषयांचीं खातीं स्वतंत्र असत; तथापि त्यांच्यांत चांगलें सहकार्य असे. सरकारकडून विद्यापीठांना चांगली मदत मिळे. उत्तर युरोपांत अत्यंत महत्त्वाचीं विद्यापीठें म्हणजे पोलंडमधील क्रॅको (१३६४), स्वीडनमधील उप्साला (१४७७) व कोपनहेगन (१४७७) हीं होत. हॉलंडमध्यें धर्मसुधारणेच्या कालानंतर लेडन, ग्रॉनिंजेन व युट्रेक्ट येथें महत्त्वाचीं विद्यापीठें स्थापन झालीं.

भारतीय—सन १८५४ मध्यें सर चार्ल्स वुड यानें हिंदुस्थानांतील एकंदर शिक्षणासंबंधीं जो एक अहवाल प्रसिद्ध केला त्यांत विश्वविद्यालयीन शिक्षणहि समाविष्ट होतें. त्या अहवालावरून १८५७ मध्यें कलकत्ता, मुंबई व मद्रास या तीन ठिकाणीं विद्यापीठें निघालीं. नंतर १८८२ सालीं लाहोर येथें पंजाब विद्यापीठ व १८८७ सालीं अलाहाबाद विद्यापीठ निघालें. १९०२ सालीं युनिव्हर्सिटी कमिशन बसून नंतर दोन वर्षांनीं 'इंडियन युनिव्हर्सिटीज् ॲक्ट' हा कायदा करण्यांत आला. यामुळें विद्यापीठांवर सरकारी हुकूमत आली व विद्यापीठांची हुकूमत शाळा-कॉलेजांवर बसली. विद्यापीठांनीं प्रत्यक्ष शिकविण्याचें कामहि हातीं घ्यावें असें कायद्यांत सांगितलें आहे. त्याप्रमाणें कांहीं विद्यापीठांतून कॉलेजें जोडून देण्याखेरीज पदवीनंतरचेंहि कांहीं शिक्षण देण्यांत येऊं लागलें. कलकत्ता विद्यापीठ या कामीं अग्रेसर आहे. परीक्षा घेण्याखेरीजच्या कामासाठीं मध्यवर्ती सरकारकडून विद्यापीठांना मदतहि मिळूं लागली.

नंतर १९१३ सालीं हिंदुस्थान सरकारनें अभ्यास करणाऱ्या लहान विद्यापीठांची योजना आंखली. बनारस हिंदु युनिव्हर्सिटी

(१९१६) व अलिगड मुस्लिम युनिव्हर्सिटी (१९२०) हीं विद्यापीठें याच पद्धतीचीं आहेत. १९१७ सालीं नेमण्यांत आलेलें सॅड्लर कमिशन या पद्धतीचें मोठें पुरस्कर्तें होतें. डाका येथें अशा प्रकारचें विद्यापीठ नंतर (१९२१) निघालें. सॅड्लर कमिशनची एक मोठी शिफारस म्हणजे इंटरमीजिएट शिक्षणाच्या जबाबदारींतून विद्यापीठाला मोकळें करण्याविषयीं होती. त्याप्रमाणें संयुक्त प्रांतांत एक निराळें बोर्ड स्थापून त्याच्याकडे तें शिक्षण सोंपविण्यांत आलें. अलाहाबाद व लखनौ हीं विद्यापीठें एकलक्षी (युनिटरी) स्वरूपाचीं आहेत. इतर विद्यापीठेंहि त्या मार्गावर आहेत. १९४९ सालीं महाराष्ट्रासाठीं पुणें विद्यापीठ स्थापन होऊन महाराष्ट्र भाषा व संस्कृति यांना वाव मिळण्यास मोकळीक झाली. मुंबई विद्यापीठावरचा भार कमी व्हावा व त्याचप्रमाणें प्रादेशिक भाषा-संस्कृति यांच्या वाढीला अवसर मिळावा म्हणून पुणें विद्यापीठाप्रमाणेंच धारवाडला कर्नाटक विद्यापीठ व अहमदाबादेस गुजराथ विद्यापीठ निर्माण करण्यांत आलें. बडोद्यास सयाजीराव गायकवाड यांच्या स्मरणार्थ एक बडोदापुरतेंच विद्यापीठ स्थापन करण्यांत आलें आहे. डॉ. धों. के. कर्वे यांनीं १९१५ सालीं स्थापन केलेलें महिला विद्यापीठ आतां सरकारमान्य झालें आहे.

हैद्राबाद, म्हैसूर व त्रावणकोर या ठिकाणीं संस्थानांतर्फे विद्यापीठें निघालीं. हैद्राबादनें धडाडीनें त्यांत उर्दू माध्यम सुरू केलें. राजपुतान्यांत जयपूरला एक विद्यापीठ सुरू झालें आहे. याप्रमाणें देशांत सर्वत्र उच्च शिक्षणासाठीं विद्यापीठें सारखीं निघत आहेत. तथापि राष्ट्रीय वृत्तीचें शिक्षण आज विद्यापीठांतून दिलें जात नाहीं. तसेंच विद्यापीठांतून दिल्या जाणाऱ्या शिक्षणाचा फायदा सर्वांना पूर्णपणें मिळत नाहीं. विद्यापीठाचें इंटरमीजिएटपर्यंतचें शिक्षण खालीं हायस्कुलांत घेऊन विद्यापीठांत पदवीचेंच, किमानपक्षीं तीन वर्षांचें शिक्षण मिळालें पाहिजे. विद्यापीठांत शिक्षक आणि विद्यार्थी यांत दृढतर संबंध येऊन गुरुकुलांतल्याप्रमाणें अभ्यास करून घेतला गेला पाहिजे. पदवीनंतरचें शिक्षण अत्युच्च दर्जाचें व संशोधनपर असावें. चांगलीं विद्वान् माणसें आकर्षित होतील इतपत शिक्षकांना पगार मिळावा; व विद्यापीठाकडून संशोधन व इतर शैक्षणिक कार्य करीत असलेल्या संस्थांना व विद्याव्यासंगी लोकांना चांगलें साहाय्य मिळालें पाहिजे. अशा तऱ्हेचें मत वुड-ॲबट समितीनें दिलेलें आहे. यानंतर डॉ. राधाकृष्णन् यांच्या अध्यक्षतेखालीं भारत सरकारनें एक विद्यापीठचौकशीसमिति नेमिली. तिनें आपला अहवाल १९५० सालीं सादर केला. परीक्षांवर भर असूं नये; विद्यार्थ्यांच्या दैनंदिन प्रगतीवर ज्ञानाचें मापन व्हावें; देशी भाषांतून उच्च शिक्षण देण्याची हळूहळू तरतूद व्हावी, वगैरे महत्त्वाच्या शिफारशी त्यांत आहेत.

## भारतांतील विद्यापीठें

[टीप—अध्यापक = टीचिंग. संबंधक = ॲफीलिएटिंग. संघात्मक = फेडरेटिव्ह.]

| विद्यापीठ | स्थापना वर्ष | स्वरूप | विद्यार्थी-संख्या (१९४६-४७) |
|---|---|---|---|
| १ कलकत्ता | १८५७ | अध्यापक आणि संबंधक | ४५,००८ |
| २ मुंबई | १८५७ (पुनर्रचना १९२८) | ,, | ४३,०९० |
| ३ मद्रास | १८५७ (पुनर्रचना १९२३) | ,, आणि संघात्मक | २८,८८८ |
| ४ अलाहाबाद | १८८७ (पुनर्रचना १९२२) | अध्यापक | ३,५०२ (इंटर विद्यार्थी सोडून) |
| ५ बनारस | १९१६ | ,, | ५,०८३ |
| ६ म्हैसूर | १९१६ | अध्यापक आणि संबंधक | ९,३५० |
| ७ पाटणा | १९१७ | ,, | १५,४७१ |
| ८ उस्मानिया | १९१८ | अध्यापक | ४,८६२ |
| ९ अलिगड | १९२० | ,, | ४,००९ |
| १० लखनौ | १९२० | ,, | ३,८९३ (इंटर विद्यार्थी सोडून) |
| ११ दिल्ली | १९२२ | अध्यापक आणि संबंधक | ४,३११ |
| १२ नागपूर | १९२३ | ,, | ५,७३४ |
| १३ आंध्र | १९२६ | ,, | ९,४४५ |
| १४ आग्रा | १९२७ | संबंधक | ९,९३६ (इंटर विद्यार्थी सोडून) |
| १५ अन्नमलई | १९२९ | अध्यापक | १,९८१ |
| १६ त्रावणकोर | १९३७ | अध्यापक आणि संबंधक | ५,७१५ |
| १७ उत्कल | १९४३ | संबंधक | ३,६६२ |
| १८ सागर | १९४६ | अध्यापक आणि संबंधक | १,८२८ |
| १९ राजपुताना | १९४७ | संबंधक | |

| | | |
|---|---|---|
| २० पूर्व पंजाब | १९४७ | अध्यापक आणि संबंधक |
| २१ गौहत्ती | १९४७ | ,, |
| २२ पुणें | १९४८ | ,, |
| २३ रुरकी | १९४८ | अध्यापक |
| २४ काश्मीर | १९४८ | संबंधक |
| २५ बडोदें | १९४९ | अध्यापक आणि संबंधक |
| २६ गुजराथ | १९४९ | ,, |
| २७ कर्नाटक | १९४९ | ,, |

**विद्यारण्यस्वामी** (१२९६-१३८६)—शृंगेरीचे एक मठाधिपति. यांनीं १३३१ त संन्यास घेतला व ते काशीस राहिले. सन १३५६ मध्यें हे काशीस असतां बुक्करायानें शृंगेरीचे स्वामी विद्यातीर्थ यांच्या अनुज्ञेवरून यांस विजयानगरला येण्याबद्दल आग्रहपूर्वक आमंत्रण पाठवलें व यांचें आगमन होतांच यांस घेऊन तो शृंगेरीस गेला. शृंगेरीस बुक्कानें यांस मठाची व्यवस्था करून दिली व यांच्या खर्चासाठीं कांहीं जमीनहि नेमून दिली. बुक्करायानंतर त्याचा मुलगा हरिहर (२ रा) यानें यांस एक ताम्रशासन दिलें. त्यांत याच्या पूर्वजांनीं शृंगेरी मठास दिलेल्या सर्व दानपत्रांचा उल्लेख आढळतो. हीं दानपत्रें कायम करण्यांत आलेलीं होतीं. विद्यारण्य व माधवाचार्य या व्यक्ती एकच असाव्यात असें कांहींचें म्हणणें आहे. परंतु आतां उपलब्ध झालेल्या पुराव्यावरून हें म्हणणें टिकत नाहीं. माधव पाहा.

**विद्युच्चुंबक**—(मॅग्नेटो). यांत्रिक शक्तीचें विद्युच्छक्तींत रूपांतर करणारें एक यंत्र. अंतर्ज्वलन इंजिनांत पेटवणासाठीं विद्युत्स्फुलिंग उत्पन्न करण्याचें काम हीं यंत्रें करतात. मॅग्नेटोमध्यें दोन तारेचीं वेटोळीं असून तीं एका चुंबकाच्या ध्रुवांमध्यें फिरत असतात. प्रधान वेटोळ्यांतील विद्युत्प्रवाह एका स्पर्शभंजकामुळें सारखा प्रतिरोधित होतो व दुय्यम वेटोळ्यांत दुसरा प्रवाह उत्पन्न होऊन तो स्फुलिंग दट्ट्याच्या (स्पार्किंग प्लग) विद्युन्मार्गांनीं (एलेक्ट्रोड) जाऊन स्फुलिंग उत्पन्न करतो. याप्रमाणें मॅग्नेटो म्हणजे डायनॅमो आणि ट्रॅन्स्फॉर्मर यांचें संयुक्त यंत्र होय.

**विद्युच्चुंबकत्व**—(एलेक्ट्रो-मॅग्नेटिझम). विद्युत् आणि चुंबकीय क्षेत्रांच्या परस्पर संबंधाचा अभ्यास या शास्त्रामध्यें करण्यांत येतो. जेव्हां एखाद्या विद्युद्वाहक पदार्थांतून विद्युत्प्रवाह सुरू होतो तेव्हां त्या पदार्थाभोंवतीं एक चुंबकीय क्षेत्र निर्माण होतें; म्हणजे विद्युत्क्षेत्राच्या गतीमुळें चुंबकीय क्षेत्र निर्माण होतें. याप्रमाणेंच जर एखादें चुंबकीय क्षेत्र विद्युद्वाहकाशीं काटकोनांत फिरविलें तर त्या विद्युद्वाहकाच्या दोन्ही टोंकांशीं भिन्न शक्तींचा विद्युद्द्वार निर्माण होतो. म्हणजे चुंबकीय क्षेत्राच्या गतीपासून विद्युत्क्षेत्र निर्माण होतें.

जर एखाद्या चुंबकीय क्षेत्रामध्यें एखादा विद्युद्वाहक पदार्थ अशा रीतीनें ठेवला कीं, त्याची लांबी चुंबकीय रेषांशीं काटकोन करीत असेल आणि त्या विद्युद्वाहक पदार्थामध्यें विद्युत्प्रवाह सुरू केला तर त्या विद्युद्वाहकावर यांत्रिक शक्तीचें कार्य होईल; म्हणजे त्यामध्यें यांत्रिक प्रेरणा उत्पन्न होईल आणि ही प्रेरणा त्या विद्युद्वाहकाशीं आणि मूळच्या चुंबकीय रेषांशीं काटकोन करणाऱ्या रेषांमध्यें उत्पन्न होईल. सर्व चुंबकीय क्रियेचा आधार पुढें दिलेल्या तीन परिणामांवर अवलंबून असतो: (१) विद्युत्प्रवाहाच्यामुळें चुंबकीय क्षेत्र निर्माण होणें, (२) विद्युच्चुंबकीय शक्ति अथवा प्रेरणा म्हणजेच विद्युद्द्वारांतर निर्माण होणें. हें कार्य चुंबकीय क्षेत्र आणि विद्युद्वाहक यांच्या सापेक्ष गतीमुळें घडून येतें. (३) विद्युत्प्रवाह चालू असलेल्या विद्युद्वाहक आणि चुंबकीय क्षेत्र यांचें परस्परांवर यांत्रिक कार्य घडून येणें.

विद्युत्प्रवाहानें उत्पन्न होणाऱ्या चुंबकीय क्षेत्राची शक्ति विद्युद्वाहकावर तारेचे अनेक फेरे दिल्यानें वाढवितां येते. तशीच ही शक्ति विद्युद्वाहकाच्या पोटांत बिडाचा गाभा घातल्यानेंहि वाढूं शकते. जोंपर्यंत विद्युत्प्रवाह चालू असतो तोंपर्यंत लोखंडाच्या ठिकाणीं चुंबकीय गुणधर्म विशेष सामर्थ्यवान् असे प्रगट होतात. या सर्व रचनेस विद्युच्चुंबकत्व असें म्हणतात. अत्यंत तीव्र शक्तीचें विद्युत्क्षेत्र निर्माण करणारे विद्युच्चुंबक लोखंडाचे तुकडे वगैरे उचलण्याकरितां वापरण्यांत येतात व ते याराच्या आंकड्याचें काम करतात. विद्युत्प्रवाह सुरु केल्याबरोबर विद्युत्चुंबक लोखंडाचे तुकडे ओढून घेतो व तो प्रवाह बंद केल्याबरोबर ते तुकडे गळून पडतात. डोळ्यामध्यें शिरलेले लोखंडाचे बारीक कण काढण्याकरितांहि विद्युच्चुंबकाचा उपयोग करण्यांत येतो. तसेंच रासायनिक प्रयोगशाळेंत त्यांचा बराच उपयोग करण्यांत येतो. त्यांचा विशेष व्यावहारिक उपयोग विद्युद्गतिजनक यंत्रामध्यें होतो.

**विद्युत्**—(इं. एलेक्ट्रिसिटी). विद्युत्-वीज ही एक अनेक चमत्कारांची शक्ति आहे. निरनिराळ्या तऱ्हेच्या विद्युच्चमत्कारांसंबंधीं नियम आतां सर्वांस माहीत झालेले आहेत. परंतु अद्यापि या शक्तीच्या खऱ्या स्वरूपाचें ज्ञान झालें नाहीं. जरी अर्वाचीन काळांतील अनेक प्रकारच्या संशोधनामुळें (अतिपरमाणु विद्युत्कण पाहा) या विषयावर बराच प्रकाश पडला आहे, तरीहि अद्यापि हें गूढच आहे. जरी विजेच्या साहाय्यानें घडून येणाऱ्या अनेक गोष्टींचे शोध गेल्या ६०।७० वर्षांतच लागले आहेत तरी अंबर घासला असतां त्यास कांहीं हलके पदार्थ आपल्याकडे ओढून घेतां येतात ही गोष्ट एका ग्रीक तत्त्ववेत्त्यास ख्रिस्तपूर्व ६०० वर्षांच्या सुमारास माहीत झाली होती. अंबर या पदार्थास ग्रीक भाषेंत

एलेक्ट्रॉन असें नांव होतें व त्यावरून एलेक्ट्रिसिटी हा शब्द निघाला आहे. गॅल्व्हनीच्या काळापर्यंत विजेची उत्पत्ति केवळ घर्षणामुळेंच करण्यांत येत असे. परंतु १८ व्या शतकाच्या अखेरीस होऊन गेलेल्या या गॅल्व्हनी नांवाच्या शास्त्रज्ञास असें अकस्मात् आढळून आलें की, बेडकाच्या गातावर दोन धातू ठेवले असतां त्यापासून विद्युत् उत्पन्न होते. या गॅल्व्हनीच्या शोधावरून पुढे होल्टा नांवाच्या शास्त्रज्ञानें पहिली गॅल्व्हानिक अथवा व्होल्टा नांवाची विद्युद्घटमाला तयार केली. इ. स. १८३१ त फॅरेडे या शास्त्रज्ञानें असा शोध लावला कीं, चुंबकीय क्षेत्रामध्यें एखादा विद्युद्वाहक पदार्थ ठेविला असतां विद्युत्प्रेरणा अथवा विद्युद्गतिशक्ति निर्माण होते. या शोधामुळे विद्युज्जनक यंत्राचें उत्पादन व वाढ होत गेली व त्यामुळे आज विद्युत्-शक्तीचा पुरवठा करतां येणें शक्य झालें.

विद्युच्चमत्कारांचा अभ्यास करावयाचा झाल्यास तिच्या मुख्य दोन शाखा पाडण्यांत येतात : १. स्थिर विद्युत् अथवा विद्युत्स्थितिशास्त्र ( एलेक्ट्रोस्टॅटिक्स ), व २. विद्युत्प्रवाह अथवा प्रवाही विद्युत् ( करंट एलेक्ट्रिसिटी ).

विद्युत्स्थितिशास्त्र—जर दोन एबोनाइटचे दांडे लोंकरीच्या कपड्यावर घासून त्यामध्यें विद्युच्छक्ति निर्माण केली व त्यांतील एक दांडा टांगून ठेवून दुसरा त्याच्याजवळ आणला तर त्यामध्यें परस्परांस अपसारक अशी शक्ति निर्माण झाल्याचें आढळून येतें. नंतर एक कांचेचा दांडा रेशमी वस्त्रावर घासून त्यामध्यें जर विद्युच्छक्ति निर्माण केली तर त्या दांड्यामध्यें टांगलेल्या एबोनाइटच्या दांड्यास आकर्षण करण्याची शक्ति उत्पन्न झाल्याचें दिसून येतें. या प्रयोगावरून विद्युत् शक्ति ही दोन प्रकारच्या परस्परविरुद्ध जातींची असून एकाच जातीची विद्युत् त्याच जातीस अपसारक असते व विरुद्ध जातीच्या शक्तीस आकर्षक असते असें सिद्ध होतें. यावरून रेशीम आणि कांचेचा दांडा यांचें घर्षण होऊन उत्पन्न झालेल्या विद्युच्छक्तीस धनविद्युत् आणि एबोनाइट व फ्लॅनेल यांच्या घर्षणानें उत्पन्न झालेल्या विद्युच्छक्तीस ऋणविद्युत् शक्ति अशीं नांवें देण्यांत आलीं. घर्षणामुळे कोणत्याहि पदार्थामध्यें विद्युच्छक्ति निर्माण करतां येते. परंतु जे पदार्थ आपल्या शरीरांतून विद्युच्छक्तीस जाऊं देतात त्यास विद्युद्वाहक आणि जे इतक्या सुलभ रीतीनें जाऊं न देतां अडथळा करतात त्यास विद्युद्रोधक अशीं नांवें देण्यांत आलीं. विद्युद्वाहक पदार्थामध्यें विद्युच्छक्ति निर्माण करण्याकरितां त्यास विद्युद्रोधक द्रव्याची मूठ बसविणें आवश्यक असते; नाहीं तर उत्पन्न झालेली विद्युच्छक्ति निघून जाते. कूलोंब या शास्त्रज्ञानें असें सिद्ध केलें कीं, दोन पदार्थांमध्यें विद्युच्छक्ति निर्माण केली असतां त्यांच्या-मध्यें जी यांत्रिक प्रेरणा अथवा शक्ति उत्पन्न होते ती त्या पदार्थांतील विद्युच्छक्ति आणि त्यांचें परस्परांतील अंतर यांवर अवलंबून असते. फॅरेडे या शास्त्रज्ञानें ज्या माध्यमामध्यें विद्युच्छक्ति निर्माण करावयाची त्याच्या गुणधर्माकडे व महत्त्वाकडे लक्ष वेधलें. यावरून असा एक सिद्धांत प्रस्थापित करण्यांत आला की, जर परस्परांपासून कांहीं अंतरावर असलेल्या व अंतराच्या मानानें लहान आकाराच्या वस्तूमध्यें विद्युच्छक्ति निर्माण केली तर त्या विद्युच्छक्तीची यांत्रिक प्रेरणा अथवा शक्ति पुढील समीकरणानें व्यक्त करतां येते : $श = \frac{प_1 प_2}{क अ^2}$.

यामध्यें श ही विद्युत्प्रेरणा अथवा शक्ति आहे. **$प_1$** व **$प_2$** हे अ सेंटिमीटर अंतरावर असलेल्या दोन पदार्थांतील विद्युच्छक्ति-दर्शक अंक आहेत. यांतील क हा गुणकमाध्यमाचा विद्युत्-स्थिरांक असतो आणि हवा हे माध्यम असल्यास त्याची किंमत एक धरण्यांत येते. या समीकरणावरून विद्युच्छक्तीच्या मूल-मानाची अशी व्याख्या करण्यांत येते कीं, जी शक्ति आपल्या-इतक्याच व सारख्याच शक्तीनें हवेमध्यें एक सेंटिमीटर अंतरावर अपसारण करते त्या शक्तीस १ डाईन असें म्हणतात. जर धनविद्युच्छक्तीपासून ऋणविद्युच्छक्तीपर्यंत अशा रेषा काढल्या कीं, त्या रेषांस कोणत्याहि बिंदूपासून काढलेल्या स्पर्शरेषा त्या बिंदूशीं असलेल्या स्पर्शरेषा एकरूप असतील तर अशा रेषांस विद्युच्छक्तिरेषा असें म्हणतात. अशा सर्व रेषा मिळून विद्युत्क्षेत्र निर्माण होतें. जर एखादा विद्युद्-वाहक पदार्थ विद्युद्रोधक पदार्थावर हवेमध्यें ठेवला तर त्याची विद्युच्छक्ति त्या पदार्थाच्या आकारावर अवलंबून असते. जर हा विद्युद्वाहक पदार्थ पूर्ण गोलाकार असेल तर त्याच्या पृष्ठ-भागावर ती शक्ति सारखी वांटलेली असते. जर त्या पदार्थाची वक्रता निरनिराळ्या बिंदूंशीं निरनिराळी असेल तर एका प्रमाण जागेवरील विद्युच्छक्ति किंवा विद्युत्पृष्ठघनता निरनिराळ्या बिंदूंवर निरनिराळी असेल. ही वक्रता जितकी अधिक असेल तितकी ही पृष्ठघनता अधिक असते. अणुकुचीदार विद्युद्वाहक पदार्थामध्यें बहुतेक सर्व विद्युच्छक्ति टोंकाशींच असते व अशा टोंकाशीं विद्युच्छक्ति फार असल्यानें धुळीचे कण, बाष्प, वगैरे त्या ठिकाणीं जोरानें आकर्षिले जाऊन विद्युद्वाहकशक्तीमुळें त्यांच्यावर विद्युच्छक्ति स्थापन होईल व त्यामुळे लागलीच त्यांचें जोरानें अपसारण होईल व अशा रीतीनें मूळ विद्युच्छक्ति फार त्वरेनें बाहेर पडून जाईल. घरावर बसविलेल्या विद्युद्वाहकामध्यें या अणुकुचीदार पदार्थाच्या शक्तीचा फायदा घेण्यांत येऊन त्या विद्युद्वाहकावर पडलेल्या विद्युच्छक्तीचें त्वरित निस्सारण करण्यांत येतें. एका विद्युद्वाहकावर असलेल्या विद्युच्छक्तीचें जें विभाजन होतें त्यावर इतर दुसऱ्या विद्युद्वाहक पदार्थाचाहि

त्यामध्यें विद्युच्छक्ति असली किंवा नसली तरी परिणाम होतो. या गोष्टीचें कारण स्थिर विद्युत्प्रवर्तन हें होय. जर एखाद्या विद्युच्छक्तिविरहित विद्युद्वाहक पदार्थ ब हा विद्युच्छक्तियुक्त विद्युद्वाहक अ पदार्थाजवळ आणला तर ब या पदार्थाच्या अ च्या बाजूकडील भागावर विरुद्ध प्रकारच्या विद्युच्छक्तीचें प्रवर्तन होतें आणि त्याच्या उलट बाजूच्या भागावर अमध्यें असलेल्या विद्युच्छक्तीच्या समस्वरूपी असलेल्या विद्युच्छक्तीचें प्रवर्तन होतें व प्रथम या पदार्थावर कोणत्याच तऱ्हेची विद्युच्छक्ति अधिष्ठित नसल्यामुळें ही दोन्ही बाजूंकडे प्रवर्तित झालेली विद्युच्छक्ति विरुद्ध स्वरूपाची पण सारख्या प्रमाणांत असते. याप्रमाणें ब या पदार्थावर विद्युत्प्रवर्तनानें वीज उत्पन्न होते.

जर दोन विद्युद्वाहक पदार्थ विद्युच्छक्तीनें भारित असलेल्या स्थितींत एकमेकांत तारेनें जोडले तर एका पदार्थातील विद्युच्छक्तीचा प्रवाह तारेच्या द्वारें एका पदार्थाकडून दुसऱ्या पदार्थाकडे सुरू होईल. हा प्रवाह सुरू होण्याचें कारण त्या दोन प्रवाहांतील विद्युच्छक्तीच्या प्रमाणांत असलेला फरक होय. जर याप्रमाणें प्रवाह सुरू झाला नाहीं तर त्या दोन्ही पदार्थांतील विद्युद्दार सारखा आहे, असें समजावें. हा विद्युद्दार एक विद्युद्ग्राहक पदार्थापासून एक मूलमानप्रमाणाची विद्युच्छक्ति दुसऱ्या पदार्थाकडे नेण्यामध्यें जें कार्य करावें लागतें त्यावर अवलंबून असतो, व त्यावरून मोजण्यांत येतो. जर अ पदार्थातून ब पदार्थाकडे एक विद्युच्छक्तीचें मूलमान नेण्याकरितां त्या विरुद्ध शक्तीच्या उलट प्रयत्न करावा लागला तर बवरील विद्युच्छक्तीचा भार अवरील विद्युच्छक्तीच्या भारापेक्षां अधिक आहे असें समजण्यांत येतें. सामान्यतः पृथ्वीच्या ठिकाणी विद्युच्छक्तीचा भार शून्य आहे असें धरण्यांत येतें व पृथ्वीपासून एखाद्या पदार्थाकडे विद्युच्छक्ति नेण्याकरितां जें कार्य करावें लागतें त्यावरून विद्युद्दाराचें प्रमाण मोजण्यांत येतें. एका पदार्थामध्यें असलेल्या विद्युच्छक्तीचा भार त्या पदार्थाच्या सर्व भागावर सारखाच असतो; नाहीं तर त्यांच्या भागांतच विद्युत्प्रवाह सुरू होईल. आणि सर्वत्र विद्युद्दार सारखा होईल. जर एखाद्या विद्युच्छक्तीचा भार असलेल्या विद्युद्वाहक पदार्थाशीं विद्युद्रोधक केलेल्या व विद्युद्दार नसलेल्या विद्युद्वाहक पदार्थाशीं तारेनें जोडण्यांत आला तर विद्युद्भार असलेल्या पदार्थाकडून विद्युत्प्रवाहभार नसलेल्या पदार्थाकडे सुरू होऊन तो प्रवाह दोन्ही पदार्थांवर सारखा विद्युद्दार होईपर्यंत चालू राहील; व हा भार त्यांच्या विद्युद्ग्राहकशक्तीवर अवलंबून राहील. ही विद्युद्ग्राहकशक्ति विशिष्ट पदार्थावरील विद्युद्दार शून्यापासून एक मूलमानापर्यंत चढविण्याकरितां जी विद्युच्छक्ति लागते त्या प्रमाणावरून मोजतात. याप्रमाणें क हें विद्युच्छक्तीचें परिमाण असलें, व हा विद्युच्छक्तिभार असला आणि स ही विद्युद्ग्राहकशक्ति असली तर $स = \frac{क}{व}$ असें समीकरण असतें. यावरून विद्युच्छक्तिभार हा विद्युच्छक्तीच्या परिमाणाप्रमाणें व विद्युद्ग्राहकशक्तीच्या व्यस्त परिमाणाप्रमाणें बदलतो असें दिसून येतें. एखाद्या पदार्थाची विद्युद्ग्राहकशक्ति त्याच्या शेजारीं शून्य विद्युद्दार असलेला पदार्थ ठेवून वाढवितां येते. या क्रियेस विद्युत्संचयन म्हणतात व त्या पदार्थास संचायक असें म्हणतात. लेडन बरणी हें विद्युत्संचायकाचें एक उत्तम उदाहरण आहे. विद्युद्ग्राहकशक्ति विद्युद्वाहक पदार्थाच्या केवळ आकारावर आणि त्यांमधील अंतरावर अवलंबून असते. एवढेंच नव्हे तर त्या दोन पदार्थांमध्यें जो विद्युद्रोधक पदार्थ असेल त्यावरहि अवलंबून असते. एखाद्या विद्युत्संचायकाच्या विद्युद्ग्रहणशक्तीचें विशिष्ट विद्युच्छक्तिरोधक असतांना व विद्युद्रोधकाच्या ठिकाणीं हवा असतांना जें प्रमाण निघतें त्यास त्या विद्युद्रोधकाची विशिष्ट विद्युत्प्रवर्तकशक्ति असें म्हणतात. सामान्यतः एखाद्या विद्युद्विरोधकाची विशिष्ट विद्युत्प्रवर्तकशक्ति ही वर उल्लेख केलेल्या विद्युद्रोधकस्थिरांकाएवढी असते.

मोठ्या प्रमाणावर वीज उत्पन्न करण्याकरितां विम्सहर्स्टचें यंत्र वापरण्यांत येतें. हें यंत्र विद्युत्प्रवर्तनाच्या तत्त्वावर कार्य करतें आणि तें कोरडें आणि गरम असल्यास आपल्याच शक्तीनें विद्युच्छक्ति निर्माण करतें.

विशिष्ट पदार्थामध्यें विद्युच्छक्ति आहे काय व असल्यास ती धनविद्युत् आहे कीं ऋणविद्युत् आहे आणि तिचा विद्युद्दार किती आहे हें पाहण्याकरितां विद्युद्दर्शक यंत्र (एलेक्ट्रोस्कोप) वापरण्यांत येतें. या यंत्रामध्यें एका कांचेच्या दांड्यास दोन सोनेरी वर्खाचे तुकडे जोडलेले असतात व दुसऱ्या टोंकावर एक पितळेची टोपी बसविलेली असते व हें सर्व एका कांचेच्या पात्रांत बसविलेलें असतें व त्याचा खालचा थर विद्युद्वाहक पदार्थाचा बनलेला असतो व सर्व बाजूंस आंतील बाजूस कथलाचा वर्ख लावलेला असतो. वर्खांचीं पानें, कांचेचा दांडा आणि पितळेची टोपी हीं सर्व विद्युद्रोधक केलेलीं असावीं लागतात. एखादा विद्युच्छक्तीनें भारलेला पदार्थ या विद्युद्दर्शक यंत्राजवळ आणला तर त्या सोनेरी वर्खाच्या पानांत विद्युच्छक्ति प्रवर्तनानें निर्माण होते व ती त्याच जातीची विद्युच्छक्ति त्या दोन्ही पानांत उत्पन्न झाल्यामुळें तीं पानें एकमेकांपासून दूर होतात.

जेव्हां विद्युच्छक्तीचें परिमाण मोजावयाचें असेल तेव्हां विद्युन्मापक (एलेक्ट्रोमीटर) या नांवाचें यंत्र योजण्यांत येतें. हें यंत्र लॉर्ड केल्व्हिन यानें तयार केलें असून त्यामुळें सूक्ष्म परिमाणाचेंहि मापन करतां येतें. या यंत्रामध्यें एका वर्तुळाचे चार भाग पक्के बसविलेले असून त्यांच्या मध्यभागीं एक हलका विद्युद्वाहक

पदार्थ टांगलेला असतो.-या चार भागांपैकीं समोरासमोरील भाग एकमेकांस जोडलेले असतात आणि या जोड्या पुन्हां विद्युद्यंत्राच्या दोन्ही ध्रुवांशीं जोडण्यांत येतात. ज्या पदार्थाचा विद्युद्भार मोजावयाचा असेल तो या ध्रुवाशी जोडण्यांत येतो. त्यामुळें मध्ये टांगलेला विद्युद्ग्राहक पदार्थ अथवा सुईवर विशिष्ट प्रमाणांत विद्युच्छक्तीचा भार निर्माण होतो व या सुईला जोडलेल्या लहान आरशाच्या योगाने पडलेला कवडसा विशिष्ट कोनांत फिरतो, व त्या कोनावरून विद्युद्भाराचे मापन करण्यांत येते. विशेष शक्तीच्या भाराचें मापन करावयाचें असल्यास मधील सुई वर्तुळाच्या चतुर्थांशाच्या एका जोडीस जोडण्यांत येते. अशा वेळीं या यंत्राची संवेदनाक्षमता कमी होते आणि ज्या कोनांत ती फिरेल त्याच्याबरोबर विद्युच्छक्तिभाराचा वर्ग असतो. किंवा तो कोन त्या विद्युच्छक्तिभाराच्या वर्गाबरोबर असतो.

प्रवाही विद्युत् (करंट एलेक्ट्रिसिटी)—जेव्हां दोन पदार्थांमधील विद्युच्छक्तीचा भार कमी-अधिक असेल तेव्हां अधिक भार असलेल्या पदार्थाकडे विद्युच्छक्तीचा प्रवाह सुरू होईल. तसेंच एकाच विद्युद्वाहक पदार्थाच्या दोन टोंकांशी जर कमी-अधिक विद्युद्भार असेल तर त्या पदार्थांत विद्युत्प्रवाह सुरू होईल. या दोन टोंकांशी असलेल्या विद्युद्भारामधील अंतर रासायनिक क्रियेनें किंवा विद्युदुत्पादक यंत्रानें किंवा उष्णतेमुळे कायम ठेवतां येतें. अशा तऱ्हेच्या प्रवाहाची शक्ति दोन्ही टोंकांशीं असलेल्या विद्युद्भारांतील अंतर कायम ठेवल्यास त्या पदार्थाच्या विद्युद्रोधक शक्तीवरून मोजतां येते व ही विद्युद्रोधक शक्ति त्या पदार्थाच्या दोन टोंकांमधील विद्युद्भारांतील अंतर व उत्पन्न झालेला विद्युत्प्रवाह यांवर अवलंबून असते. यांचें समीकरण र म्हणजे विद्युद्रोधक शक्ति, व म्हणजे विद्युद्भारांतील अंतर आणि इ म्हणजे विद्युत्प्रवाह यांच्या पुढील समीकरणावरून काढतां येते—$र = \frac{व}{इ}$.

यालाच कांहीं प्रमाणांत ओहमचा सिद्धांत असें म्हणतात. तो सिद्धांत असा आहे कीं, विद्युद्वर्तुलामध्यें असणाऱ्या विद्युत्प्रवाहाचें प्रमाण विद्युद्गतिशक्तीस विद्युद्रोधकानें भागिलें असतां काढतां येते. जेव्हां विद्युद्गतिशक्ति प असेल व विद्युद्रोधक शक्ति र असेल तेव्हां विद्युत्प्रवाह इ हा $इ = \frac{प}{र}$ या समीकरणानें काढतां येतो. हा नियम विद्युत्प्रवाह जेव्हां सरळ व सतत असेल तेव्हां लागू पडतो. जेव्हां हा प्रवाह उलटसुलट किंवा बदलता असेल तेव्हां हें समीकरण लागू पडत नाहीं.

एखाद्या पदार्थांतील विद्युद्रोधक शक्ति ही त्या पदार्थांत असलेल्या द्रव्यावर अवलंबून असते. आणि ती पदार्थाच्या लांबीच्या सम प्रमाणांत आणि जाडीच्या किंवा छेदाच्या व्यस्त प्रमाणांत असते. याचें समीकरण असें आहे: $र = ऱ्हो \frac{ल}{अ}$; या ठिकाणीं (ऱ्हो) ही त्या द्रव्यांतील विशिष्ट रोधक शक्ति असते. ल ही त्या पदार्थाची लांबी असते; आणि अ हा त्या पदार्थाचा छेद असतो. ही रोधक शक्ति उष्णमानाप्रमाणें बदलत असते. शुद्ध धातूमध्यें ही रोधक शक्ति उष्णमानाबरोबर वाढत जाते. परंतु कांहीं मिश्र धातूंमध्यें ही वाढ इतकी अल्प असते कीं, ती हिशोबांत धरण्याचें कारण नसतें. कांहीं मिश्र धातूंमध्यें व विशेषतः कर्बो (कार्बन) मध्यें आणि विद्युद्रोधक पदार्थामध्येंहि रोधक शक्ति उष्णमान जसजसें वाढवावें तसतशी कमी होत जाते.

वर दिलेल्या $र = \frac{व}{इ}$ या समीकरणावरून अल्परोधक शक्ति असलेल्या पदार्थांची रोधक शक्ति मोजतां येते. त्यापेक्षां अधिक रोधक शक्ति असलेल्या पदार्थांची रोधक शक्ति व्हीटस्टोनब्रिज या किंवा अशाच प्रकारच्या उपकरणानें मोजतां येते.

विद्युत्प्रवाहाचे परिणाम—जेव्हां एखाद्या विद्युद्वाहक पदार्थामध्यें विद्युत्प्रवाह उत्पन्न होतो तेव्हां त्या पदार्थाचें उष्णमान वाढतें. याचें कारण त्या पदार्थांत असलेल्या विद्युद्रोधक शक्तीचें अपसारण होतें. ही अपसारित शक्ति $इ^{२}$ र वॅट इतकी असते. व या सारणीवरून प्रवाह आणि रोधक शक्ति यांचीं मापें मिळाल्यास विद्युत्प्रवाहामुळें उत्पन्न होणारी उष्णता येते. विद्युत्प्रकाशामध्यें विद्युत्प्रवाहामुळें उत्पन्न होणाऱ्या या उष्णतेचाच उपयोग करण्यांत येतो. त्याप्रमाणेंच तो स्वयंपाक करणें व इतर कार्याकरितां विद्युच्छक्तीनें उष्णता उत्पन्न करण्याच्या कामीं व विजेच्या वैद्यकीय उपचाराच्या कामीं करण्यांत येतो.

विद्युत्प्रवाह सुरू असलेल्या एखाद्या पदार्थाजवळ जर लोहचुंबकाची सुई आणली तर ती फिरते असें आढळून आलें आहे. याचें कारण विद्युत्प्रवाहाबरोबर एक चुंबकीय क्षेत्र निर्माण होतें हें होय. विद्युत्प्रवाहामुळे उत्पन्न होणारा हा लोहचुंबकीय परिणाम फार महत्त्वाचा असून त्याच्या योगानें विद्युद्गतियंत्रें निर्माण करतां येणे शक्य झालें आहे.

एखाद्या धातूच्या लवणाच्या द्रावणामधून किंवा एखाद्या वितळलेल्या धातूच्या लवणामधून विद्युत्प्रवाह जाऊं दिला तर त्या द्रावणांत रासायनिक क्रिया होते. व या द्रावणाचे विद्युत्प्रवाहविषयक गुणधर्म केवळ धातूमधून जाणाऱ्या विद्युत्प्रवाहाच्या गुणधर्मापेक्षां निराळे असल्याचें आढळून येतें व असा विद्युत्प्रवाह द्रावणांतून विद्युद्विश्लेषण होत असतांनाच फक्त जाऊं शकतो.

विद्युत्प्रवाह हा सरळ किंवा उलटसुलट असा दोन प्रकारचा असूं शकतो. जेव्हां फार दूर अंतरावर व मोठ्या शक्तीचा विद्युत्प्रवाह न्यावयाचा असेल तेव्हां उलटसुलट प्रवाह अधिक सोईचा असतो.

तसेंच विद्युत्प्रवाह देण्याकरितां विद्युद्गतियंत्रें व इतर यंत्रें चालविण्याकरितांहि उलटसुलट प्रवाह अधिक सोईचा असतो.

**विद्युत्किरण**—रॉन्टजेन यास सन १८९५ मध्यें असें आढळून आलें कीं, एका निर्वात नळीमधून विद्युद्विसर्जन केलें असतां त्या नळीच्या शेजारीं ठेवलेल्या बेरियम प्लॅटिनो सायनाइडचे स्फटिक चकाकूं लागतात. तसेंच प्रकाशलेखनाच्या कांचा जरी अपारदर्शक अशा काळ्या कागदामध्यें गुंडाळून ठेवल्या तरी त्याच्यावर परिणाम होतो. या गोष्टीत कारणीभूत होणाऱ्या किरणोत्सर्जनास रॉन्टजेन यानें 'क्ष' किरण असें नांव दिलें. यास 'रॉन्टजेन किरण' असेंहि म्हणण्यांत येतें. 'क्ष' किरण हे प्रकाशकिरणांप्रमाणेंच आपल्या उगमापासून सर्व दिशांनीं व सरळ रेषेच्या गतींत प्रसरण पावतात. प्रकाशकिरणांप्रमाणें त्यांचें परावर्तन किंवा वक्रीभवन होत नाहीं. परंतु एखाद्या पदार्थामधून जात असतांना त्यांचें विकिरण होतें. प्रकाशलेखनाच्या कांचांवर होणारा परिणाम व एखाद्या पदार्थास चकाकित करणें याखेरीज 'क्ष'किरणामुळें एखाद्या पदार्थांत जर धन किंवा ऋण विद्युच्छक्तीचा भार असेल तर तो विसर्जन पावतो. या गुणधर्मामुळें विद्युद्दर्शकाच्या साहाय्यानें 'क्ष' किरण शोधून काढणें व त्यांचें अचूक मापन करणें शक्य झालें आहे. कोणत्याहि पदार्थांतून प्रकाशकिरण पूर्णपणें बाहेर जाऊं शकत नाहींत. तसाच कोणताहि पदार्थ पूर्णपणें अपारदर्शक असूं शकत नाहीं. कागद, लांकूड, पाणी आणि मांस हे पुष्कळच पारदर्शक आहेत. त्यामुळें या पदार्थांतून किंवा मनुष्याच्या शरीरांतून किरण बाहेर पडून प्रकाशलेखनकांचेवर परिणाम करूं शकतात. शिशासारखे जड धातू फार अपारदर्शक असतात. त्यामुळें त्यांचा $\frac{1}{2}$ इंच जाडीचा पत्राहि किरणांस जवळजवळ पूर्णपणें प्रतिबंध करूं शकतो 'क्ष' किरण हे प्रकाशकिरणांप्रमाणें सरळ रेषेच्या गतीनें जात असल्यामुळें प्रकाशकिरणांप्रमाणें त्यांच्यापासूनहि छाया पडते. अलीकडे दोन-तीन इंच जाडीच्या पोलादाच्या पत्र्यांतूनहि आरपार जातील इतके तीव्र शक्तीचे किरण तयार करतां येतात. यांच्या योगानें धातूच्या ओतीव वस्तूंतील दोष शोधून काढणें सुलभ झालें आहे व ती एक धातुशास्त्राची शाखाच बनली आहे.

'क्ष' किरणांचें स्वरूप ईथरमध्यें उत्पन्न होणाऱ्या लहरी किंवा त्यांस मिळणारे धक्के यांसारखें आहे व यांच्या लहरींची लांबी प्रकाशलहरींच्या लांबीच्या $\frac{1}{10,000}$ इतकी असते. निरनिराळ्या मूलद्रव्यांतून 'क्ष' किरण आरपार नेले असतां त्यांच्यामुळें पडणारा वर्णपट त्या त्या मूलद्रव्यानुसार निरनिराळा असतो. एखाद्या मूलद्रव्यांतून प्राथमिक 'क्ष' किरण उत्सर्जन आरपार पाठविल्याच्या योगानें किंवा तो पदार्थ निर्वात नलिकेमध्यें ठेवून त्यावर योग्य गतीचे ऋणकिरण पाडल्यानें त्या पदार्थांतून किरणोत्सर्जन होऊं लागतें. निरनिराळ्या मूलद्रव्यांचे 'क्ष' किरणांच्या साहाय्यानें घेतलेले वर्णपट हे प्रकाशकिरणांमुळें पडणाऱ्या वर्णपटापेक्षां अधिक साधे असतात व त्यामध्यें दोन प्रकारच्या रेषांच्या श्रेणी असतात. त्यांपैकीं एक पारदर्शक क श्रेणी असते आणि दुसरी शोषणीय ल श्रेणी असते. या रेषांचा अभ्यास केल्यामुळें परमाणूंच्या रचनेवर पुष्कळच प्रकाश पडलेला आहे.



किरणोत्सर्जक पदार्थांपासून जे तीन निरनिराळ्या प्रकारचे किरण बाहेर पडत असतात त्यांपैकीं 'गामा' किरण हे बहुतेक 'क्ष' किरणासारखेच असतात. या तीन किरणांमध्यें त्यांच्या पारदर्शक शक्तीवरून प्रथम भेद करण्यांत आला. 'अल्फा' किरणांच्या मार्गांत $\frac{1}{50}$ मिलिमीटर जाडीचा ॲल्युमिनमचा पत्रा किंवा १० सेंटिमीटर हवा आड आली तर त्या किरणांस पूर्णपणें प्रतिबंध होतो. 'बीटा' किरणांचें शोषण यापेक्षां अधिक मंद गतीनें होतें. परंतु एक मिलिमीटरपेक्षां अधिक जाडीचा शिशाचा पत्रा त्यांच्या मार्गांत आड आला तर त्यांचा परिणाम दृष्टीस पडणें कठिण जातें. या तिघांमध्यें 'गामा' किरण हे सर्वांत अधिक पारदर्शक आहेत.

अल्फा किरण— जेव्हां 'अल्फा' किरणांचें मंद विसर्जन होत असतें तेव्हां या किरणांच्या मार्गांत असलेला व त्यांच्यामुळें चकाकित दिसणारा पडदा जर आपण सूक्ष्मदर्शक कांचेंतून तपासून पाहिला तर आपणांस त्या पदार्थावर कांहीं प्रकाशबिंदू चमकत असलेले व एकदम नाहींसे होत असलेले दृष्टीस पडतील. हा परिणाम किरणोत्सर्जक पदार्थांपासून जे सूक्ष्म कण बाहेर पडून पडद्यावर आपटत असतात त्यांच्यामुळें दृष्टीस पडतो. या अल्फा कणांचे तीव्र चुंबकीय किंवा विद्युत्क्षेत्रांच्या साहाय्यानें परिवर्तन करतां येतें. व त्यांचा वेग ऋणकिरण मोजण्याच्या पद्धतीनेंच मोजतांहि येतो. हा त्यांचा वेग दर सेकंदास नऊ हजार ते चौदा हजार मैल असतो. रूदरफोर्ड यानें असें दाखविलें आहे कीं, हे अल्फा कण म्हणजे हेलियमचे विद्युद्भारयुक्त परमाणू असतात. एखाद्या वायूंतून हे अल्फा किरण गेले असतां त्यामध्यें तीव्र अण्वीभवन उत्पन्न करतात. जेव्हां एखाद्या परमाणूवर अल्फा कणांचा प्रत्यक्ष आघात होतो तेव्हां तो इतका जोराचा असतो कीं, त्याच्या योगानें त्या परमाणूंचें पूर्णपणें विघटन होतें. अशा प्रकारें रूदरफोर्ड यानें नत्र वायूत्रे व इतर कांहीं मूल द्रव्यांचें उज्ज आणि हेलियम या वायूंमध्यें रूपांतर केलें आहे.

बीटा किरण—हे ऋणविद्युत्कणांच्या प्रवाहाच्या स्वरूपाचे असून ऋणकिरणापेक्षां यांचा वेग फार अधिक असतो. व तो कधीं कधीं प्रकाशाच्या वेगाच्या १ ते २ टक्क्यांच्या जवळ जवळ येतो. 'बीटा'-किरणांमुळें 'अल्फा' किरणांपेक्षां कमी प्रमाणांत अण्वीभवन व

चकाकी उत्पन्न होते. परंतु प्रकाश-लेखक ' कांचावर त्यांचा परिणाम अधिक होतो.

गामा किरण—' गामा ' किरण हे विद्युत् किंवा चुंबकक्षेत्रांत परिवर्तन पावत नाहींत. ते पारदर्शक असतात. यावरून ते विद्युद्भारयुक्त कणांच्या स्वरूपाचे नसून विद्युच्चुंबकीय आघातांच्या स्वरूपाचे असतात. ' गामा ' किरणांच्या लहरींची लांबी १०$^{-९}$ ते १०$^{-१०}$ इतकी सेंटिमीटर म्हणजे ' क्ष ' किरणांच्या $\frac{१}{१०}$ असते.

विद्युद्गतियंत्र—( एलेक्ट्रिक मोटर ). ज्या यंत्राच्या साहाय्यानें विजेचें गतीमध्यें रूपांतर होतें त्या यंत्रास विद्युद्गतियंत्र म्हणतात. या यंत्रामध्यें मुख्यतः दोन वर्ग आहेत : एक प्रत्यक्ष-प्रवाहगतियंत्र किंवा सरलप्रवाहगतियंत्र ( डायरेक्ट करंट मोटर ) व दुसरें उलटसुलट अथवा परावर्तित प्रवाह गतियंत्र ( अल्टर्नेटिंग करंट मोटर ). या मुख्य वर्गांचे आणखी त्यांतील रचनेप्रमाणें निरनिराळे प्रकार करण्यांत येतात.

सरलप्रवाहगतियंत्र—( डायरेक्ट करंट मोटर ). या यंत्रामध्यें चुंबक-योजना स्थिर असते व त्यांत आंतल्या बाजूस तारवलय ( आर्मेचर ) फिरण्याची तजवीज केलेली असते. व या तारवलयांतून विद्युत्प्रवाह जाण्याची तजवीज केलेली असते. दोन्ही ध्रुव आणि तारवलय यांच्यामधील हवेच्या अवकाशामध्यें जें चुंबकीय क्षेत्र निर्माण होतें त्याची प्रतिक्रिया विद्युत्प्रवाहवाहकावर होऊन यांत्रिक प्रेरणा ( टॉर्क ) निर्माण होते. याच वेळीं चुंबकीय क्षेत्रामध्यें विद्युद्वाहकास गति मिळत असल्यामुळें विद्युद्गतिशक्ति विद्युद्वाहकामध्यें निर्माण होते. या विद्युच्छक्तीची गति मूळ विद्युच्छक्तीच्या गतीच्या विरुद्ध दिशेस असते. यामुळें या विद्युद्गतिशक्तीस यंत्राची पश्चाद्विद्युद्गति असें म्हणतात. विद्युद्गतियंत्रास लागणारा प्रवाह मूळ मिळणारा प्रवाह आणि पश्चाद्विद्युद्गति यांच्यामधील अंतरास तारवलयाच्या विद्युद्रोधक शक्तीनें भागिलें असतां काढतां येतो. या अर्थी ही विद्युद्रोधक शक्ति बहुधा फार अल्प असते. आणि यंत्र चालू होण्याच्या वेळीं पश्चाद्विद्युद्गति शून्य असते. त्याकरितां विद्युत्प्रवाहाची मर्यादा ठरविण्याकरितां एखाद्या गतिदायकाची योजना केलेली असते. हा गतिदायक म्हणजे एखाद्या तारवलयाशीं मालागतीनें जोडलेला विद्युद्रोधक असतो. विद्युद्यंत्राची गति जसजशी वाढत जाते तसतशी याचीहि रोधकता कमी कमी होत शून्य होते.

सरलगतिविद्युद्यंत्राची गति सामान्यतः प्रत्येक ध्रुवाशीं असलेल्या हवेच्या अंतराच्या व्यस्त प्रमाणांत असते व मूळ गतीच्या अथवा प्रत्यक्ष पश्चाद्गतीच्या समप्रमाणांत असते. या गतियंत्रांत उत्पन्न होणारा ताण ( टॉर्क ) हा प्रत्येक ध्रुवाशीं असलेलें हवेचें अंतर आणि तारवलयांतील प्रवाह यांच्या गुणाकाराच्या प्रमाणांत असतो. यावरून सरलगतिविद्युद्यंत्रांतील ताण आणि गति हीं प्रत्येक ध्रुवाशीं असलेल्या हवेचें अंतर आणि विद्युत्प्रवाह यांच्यावर अवलंबून असतात.

विद्युद्गतियंत्रमाला—या प्रकारामध्यें चुंबकक्षेत्राचीं तारवलयें विद्युद्गतियंत्राच्या तारवलयाशीं मालारचनेंत जोडलेलीं असतात. यामुळें त्या दोहोंतून एकाच शक्तीचा विद्युत्प्रवाह वाहत असतो. यामुळें प्रत्येक ध्रुवाशीं हवेच्या अंतरामुळें उत्पन्न होणारा आघात हा या यंत्रास मिळणाऱ्या विद्युत्प्रवाहावर अवलंबून असतो. यामुळें या यंत्रावर भार कमी असल्यास त्याची गति फार वाढते व भार वाढेल तसतशी गति कमी होत जाते व भाराच्या प्रमाणांत ताण वाढत जातो. हें यंत्र सुरू होतांना मंद गति असूनहि ताण बराच असतो. ही योजना ओझें ओढण्याच्या क्रियेस चांगली असते. त्याप्रमाणें यारीसारख्या यंत्रामध्यें आणि कांहीं यांत्रिक हत्यारें चालविण्याच्या कामींहि उपयुक्त असते.

पार्श्ववाहकगतियंत्र—( शंट मोटर ). या यंत्रामध्यें चुंबकीय क्षेत्राचीं तारवलयें विद्युद्यंत्राच्या तारवलयाशीं पार्श्ववाहक पद्धतीनें जोडलेलीं असतात. यामुळें चुंबकीय क्षेत्रांतील प्रवाह मूळ प्रवाहाच्या होल्ट-शक्तीवर अवलंबून असतो आणि त्यामुळें सामान्यतः स्थिर असतो. यामुळें प्रत्येक ध्रुवाशीं होणारा हवेचा अंतराघात बहुतेक कितीहि भार पडला तरी स्थिर असतो. त्यांत विद्युत्प्रवाहाच्या तारवलयाच्या चुंबकगतिशक्तीमुळें काय थोडाफार फरक पडेल तेवढाच. यामुळें कितीहि भार पडला तरी सामान्यतः गति सारखीच असते. तिच्यामध्यें भाराच्या प्रमाणांत फारच थोडा फरक होतो. त्यामुळें भाराच्या प्रवाहाशीं सम प्रमाणांत ताण उत्पन्न होतो. जेथें कमीजास्त भार असतांहि सारखीच गति पाहिजे असेल तेथें अशा तऱ्हेच्या विद्युद्गतियंत्राचा उपयोग करतात.

उलटसुलट प्रवाहाचीं गतियंत्रें—( अल्टर्नेटिंग करंट मोटर ). या गतियंत्राच्या रचनेमध्यें अनेक तऱ्हा असून त्यांची रचना व कार्ये यांमध्येंहि बराच भिन्नपणा आढळून येतो. सामान्यतः विशेष प्रचारांत असलेला प्रकार म्हणजे ज्यामध्यें अनेक कलायुक्त प्रवर्तक गतियंत्र असतें तो होय. अशा गतियंत्रामध्यें चुंबकीय क्षेत्र आणि तारवलय या दोहोंचीहि रचना लोखंडाच्या तुकड्यावर तारेचें वेष्टण करून केलेली असते. चुंबकीय क्षेत्राच्या रचनेस स्थितिक अथवा स्थाणु ( स्टेटर ) आणि तारवलयास गतिक अथवा भ्रामक ( रोटर ) असें म्हणतात. दोहोंमध्येंहि त्यांच्या खाचकांत विद्युद्वाहक बसविलेले असतात व या विद्युद्वाहकांमध्यें बहुकलायुक्त ( पॉलिफेज ) तारवेष्टणें असतें. मूळ प्रवाह स्थाणुवेष्टणास पुरविण्यांत येतो, व यामुळें यास प्रवर्तक गतियंत्र असें म्हणतात. हें यंत्र चालू करण्याच्या वेळीं बहुकलायुक्त विद्युद्रोधक वापरला म्हणजे भ्रामक तार-वलयाचीं विद्युन्मंडलें पूर्ण होतात. ही रोधकता यंत्रास पूर्ण गति मिळत गेली म्हणजे हळूहळू शून्य होते. याकरितां सामान्य

कार्यामध्यें भ्रामक विद्युन्मंडलें बंद असतात. अनेक गतियंत्रांमध्यें, विशेषतः लहान यंत्रांमध्यें भ्रामक तारवलयें तांब्याच्या जाड तारांचीं असून त्यांच्या अखेरीस घनवलयें प्रत्येक टोंकास जोडलेलीं असतात. यामुळें कायमचें लघुविद्युन्मंडलात्मक वेष्टण तयार होतें. या यंत्रास 'खारी' (स्क्विरल) पिंजऱ्याचें गतियंत्र म्हणतात. या यंत्रास मिळणाऱ्या गतीचा प्रकार सरलगतीच्या पार्श्ववाहक गतियंत्रासारखाच असतो, व प्रवर्तक गतियंत्रांचा उपयोगहि सामान्यतः तोच असतो. प्रवर्तक विद्युद्गतियंत्रामध्यें उत्पन्न होणारा ताण त्याची गति अनुनादक मर्यादेपर्यंत येईतों वाढत असतो, व ती अनुनादक मर्यादेजवळजवळ येऊं लागली म्हणजे फार जलद जलद कमी होते. यापेक्षां इष्ट भार सहन करण्यास अधिक ताणाची जरुरी असल्यास यंत्राची गति हळूहळू कमी होते व तें अजिबात थांबतें.

अनुनादक गतियंत्रें—(सिंक्रोनस मोटर). यांचा उपयोग कांहीं विशेष कारणाशिवाय क्वचितच करण्यांत येतो. यांची रचना अनुनादक प्रवाहोत्पादक अथवा उलटसुलट प्रवाहोत्पादक यांच्या रचनेसारखीच असते, आणि बहुधा चुंबकक्षेत्र हें भ्रामक असतें. हीं यंत्रें कितीहि भार असला तरी अनुनादक गतीनें चालत असतात, व अधिक भार झाला असतां गति मंद झाल्यास तीं अजीबात थांबतात.

उलटसुलट प्रवाहपरिवर्तक गतियंत्रें—(अल्टर्नेटिंग करंट कॉम्युटेटर मोटर). हीं यंत्रें प्रवर्तक गतियंत्रासारखींच दिसावयास असतात. परंतु यांच्या भ्रामकास परिवर्तक जोडलेला असतो. व यांचें रूपांतर सरलगतियंत्रामध्यें किंवा पार्श्ववाहक गतियंत्रामध्यें करतां येतें. एककलात्मक परिवर्तक गतियंत्रांची मालाकार रचना कांहीं ठिकाणीं आगगाड्या चालविण्याकरितां उपयोगांत आणण्यांत येते.

**विद्युद्घटमाला**—(एलेक्ट्रिक बॅटरी). एक किंवा अनेक विद्युद्घटांची प्रवाह उत्पन्न होण्याकरितां केलेली रचना. जेव्हां मधून मधून व थोडा विद्युत्प्रवाह पाहिजे असेल तेव्हां थोड्या प्राथमिक विद्युद्घटांच्या मालेचा उपयोग करतात. उदाहरणार्थ, विजेची घंटा वाजविणें. जर मोठा प्रवाह पाहिजे असेल, विशेषतः प्रवाह दीर्घ काल चालू राहावयास पाहिजे असेल, तर दुय्यम घटांची योजना करतात. अशा घटमाला बहुधा शहराबाहेर लहान गांवांत असणाऱ्या एखाद्या बंगल्यांत दिव्यांची योजना करण्याकरितां वापरतात. यापेक्षां मोठ्या घटमाला सार्वजनिक दिवे लावण्याकरितां उपयोगांत आणतात.

**विद्युत्तापन**—(एलेक्ट्रिक हीटिंग). जेव्हां एखाद्या विद्युद्वाहकांतून विजेचा प्रवाह सुरू होतो तेव्हां त्या प्रवाहांतील विद्युच्छक्तीच्या कांहीं अंशाचें उष्णतेमध्यें रूपांतर होतें व त्याचें प्रमाण विद्युद्वाहक तारेंतील विद्युद्रोधकता आणि विद्युत्प्रवाहाचा वर्ग यांवर अवलंबून असतें. अशा तऱ्हेची उष्णता उत्पन्न करण्याकरितां गारेच्या किंवा दुसऱ्या एखाद्या वितळण्यास कठिण अशा पदार्थाच्या नळ्यांवर किंवा पातळ पत्र्यावर विद्युद्रोधक तारा गुंडाळून त्यांच्या विद्युद्रोधक शक्तीचा उपयोग करण्यांत येतो. या तारा लाल होईपर्यंत तापविण्यांत येतात. आणि कांहीं विशिष्ट कार्यासाठीं परवलयात्मक परावर्तक वापरण्यांत येतात. त्यामुळें उत्पन्न होणारी उष्णता इष्ट त्या विशिष्ट दिशेनें पाठवितां येते. जेव्हां केवळ उष्णता पाहिजे असून प्रकाशाची आवश्यकता नसते तेव्हां एखाद्या चौकटींत अथवा सुशोभित अशा ढवीसारख्या आकृतीमध्यें अदाह्य पदार्थाचें आवरण चढवून किंवा उघड्याच सूक्ष्म आकाराच्या तारा किंवा धातूचे तुकडे वापरण्यांत येतात. जेव्हां मोठ्या प्रमाणांत उष्णता उत्पन्न करावयाची असेल तेव्हां अशा विद्युत्प्रवाहानें तापविलेल्या तारेच्या वेटोळ्यावरील हवा अधिक गतीनें चलन पावावी म्हणून पंख्याचा उपयोग करून प्रापण (कॉन्व्हेक्शन) पद्धतीनें उष्णता उत्पन्न करण्यांत येते. विजेच्या किटलीच्या बुडामध्यें ही उष्णता उत्पन्न करण्याची योजना केलेली असते. विजेच्या भट्ट्यांमध्यें उष्णता उत्पन्न करणाऱ्या तबकड्या मधून मधून घालण्यांत येतात, व त्यांच्या योगानें आवश्यक तितकी उष्णता निरनिराळ्या कृतींकरितां उत्पन्न करतां येते. घरगुती वापरण्यांत येणाऱ्या विजेच्या उपकरणांमध्यें विजेची इस्तरी ही विशेष उपयोगांत आणण्यांत येते. अशा इस्तरीमध्यें उष्णता उत्पन्न करण्याची योजना इस्तरीच्या बुडामध्यें मुद्दाम राखून ठेवलेल्या पोकळ जागीं केलेली असते.

**विद्युद्धातुविद्या**—(एलेक्ट्रो-मेटॅलर्जी). धातू शुद्ध करण्याकरितां किंवा त्यांचें रूपांतर करण्याकरितां ज्या क्रियेमध्यें विद्युत्प्रवाहाचा उपयोग करण्यांत येतो तीस विद्युद्धातुविद्या असें म्हणतात. जेथें अत्युष्णमानाची जरूर असते तेथें विद्युत्प्रवाहाचें रूपांतर उष्णतेमध्यें करण्यांत येऊन त्याचा उपयोग करण्यांत येतो. किंवा एखाद्या संयुक्त धातूचें पृथक्करण करण्याकरितां विद्युद्विश्लेषण करणें अवश्य असतें. पहिल्या प्रकारामध्यें विद्युदुष्णताप्रक्रियेचा व दुसऱ्या प्रकारामध्यें विद्युद्विश्लेषणप्रक्रियेचा उपयोग करावा लागतो.

पहिल्याप्रमाणें अनेक उद्योगधंद्यांतून विद्युत्प्रवाहाचा उष्णता उत्पन्न करण्याकडे उपयोग केल्यानें दृष्टीस पडतें. या उष्णतेच्या योगानें दोन धातू एकत्र सांधतां येतात, धातू वितळवितां येतात, त्या शुद्ध करतां येतात किंवा त्यांस योग्य प्रमाणांत पाणी देण्यांत येतें. धातू सांधण्याच्या दोन पद्धती प्रचारांत आढळतात: पहिली विद्युत्प्रतिरोधामुळें धातू सांधण्याची होय. या क्रियेमध्यें ज्या धातू सांधावयाच्या त्या एकमेकींवर दाबून ठेवून त्यांतून विद्युत्प्रवाह सोडण्यांत येतो व त्यांच्यामध्यें असलेल्या रोधक

शक्तीमुळें प्रतिरोध उत्पन्न होतो. आणि त्या प्रतिरोधामुळें त्यांच्यामध्यें अतिशय उष्णता उत्पन्न होऊन त्या एकमेकींशीं जोडल्या जातात. दुसरी कमानी सांधण्याची पद्धत. यामध्यें ज्या धातू जोडावयाच्या त्याच धातूंचें एक मिश्रण तयार केलेलें असून तें विद्युत्प्रकाशाच्या कमानीच्या उष्णतेमध्यें वितळवून त्या धातूंच्या जोडावर त्याचा रस पाडण्यांत येतो व अशा रीतीनें ते दोन धातूंचे तुकडे जोडले जातात. धातू वितळविण्याच्या क्रियेमध्यें व त्यांचें मिश्रण बनविण्याच्या क्रियेमध्यें ज्या धातू दगडी कोळसा, कोक किंवा ज्वलनवायू, वगैरेंच्या भट्ट्यांपासून मिळणाऱ्या सुमारें २०००° शत. उष्णमानामध्यें आपल्यांतील प्राणवायु बाहेर टाकून कर्बाशीं संयुक्त होऊं देत नाहींत त्याच धातू विद्युत्प्रकाशाच्या कमानीच्या ३६००° शत. उष्णमानामध्यें हीच क्रिया सहज करूं शकतात. अलीकडे विशेष शुद्ध पोलाद किंवा पोलादाचे विशिष्ट संयुक्त धातू किंवा इतर अलोह मिश्रधातू अशा तऱ्हेच्या विद्युदुष्णतेच्या भट्ट्यांमध्यें तयार करण्यांत येतात. विद्युदुष्णतेच्या भट्ट्या हल्लीं साचें ओढ किंवा ओतीव लोखंड, पोलाद, लोह, संयुक्त धातू, पितळ, जस्त, वगैरे धातू तयार करण्याकरितां योजण्यांत येतात. तसेंच इतरहि क्रियांमध्यें धातूस उष्णता देण्याच्या कामीं या भट्ट्यांचा उपयोग होतो.

अशा भट्ट्यांचें त्यांच्या उष्णमानावरून पुढें दिल्याप्रमाणें वर्गीकरण करतां येईल : (१) सरल विद्युद्रोधक भट्टी—या प्रकारामध्यें प्रत्यक्ष धातूंतीलच विद्युद्रोधक शक्तीमुळें तिच्यामध्यें विद्युत्प्रवाह सोडून उष्णता उत्पन्न करण्यांत येते. (२) अप्रत्यक्ष विद्युद्रोधक भट्टीमध्यें निरनिराळ्या नळ्या अथवा मुशी वापरण्यांत येतात. या पात्रांच्याभोंवतीं उच्च विद्युद्रोधक धातूंच्या तारा गुंडाळलेल्या असतात. अशा धातू म्हटल्या म्हणजे प्लॅटिनम्, निकेल, क्रोम, मिश्रधातू, वगैरे. या तारांतून विद्युत्प्रवाह सोडून उष्णता उत्पन्न करण्यांत येते. (३) प्रवर्तक (इंडक्शन) भट्ट्या—यांमध्यें एक प्राथमिक तांब्याच्या तारेचें वेष्टण वापरण्यांत येतें व दुसरें ज्या धातूस उष्णता द्यावयाची तिचेंच वेष्टण योग्य आकारामध्यें वापरण्यांत येतें. या प्रकारांत प्राथमिक वेष्टणांतून प्रत्यक्ष प्रवाह सोडण्यांत येतो. व तो प्रवाह दुय्यम वेष्टणामध्यें प्रवाहाचें प्रवर्तन करून तें वेष्टण वितळवितो. या प्रकारच्या भट्टीचा उपयोग पोलाद शुद्ध करण्याकरितां व इतर अलोह धातू आणि मिश्र धातू वितळविण्याकरितां विशेष रीतीनें करण्यांत येतो. (४) सरल विद्युत्प्रकाश कमानीच्या उष्णतेची (आर्क हीटिंग) भट्टी. (५) अप्रत्यक्ष विद्युत्प्रकाश कमानीच्या उष्णतेची भट्टी. (६) प्रतिरोधक व कमानीची भट्टी यांचा संयोग करून बनणाऱ्या भट्ट्यांचा उपयोग लोहधातूंचीं मिश्रणें करण्याकरितां फार मोठ्या प्रमाणांत करण्यांत येतो.

यांच्या साहाय्यानें लोहसिकता (फेरो–सिलिकॉन), लोहक्रूम (फेरोक्रोम), लोहमंगल (फेरोमँगॅनीज) या मिश्र धातू तयार करतात. तसेंच लोखंडाच्या तुकड्यापासून पोलाद तयार करतात. तसेंच पोलाद शुद्ध करण्याकरितांहि यांचा उपयोग करतात. अशा तऱ्हेच्या भट्ट्यांचा उपयोग गेल्या महायुद्धापासून फार मोठ्या प्रमाणांत होऊं लागला आहे.

विद्युद्विश्लेषण (एलेक्ट्रोलायटिक) पद्धति—अल्युमिनम धातूच्या पद्धतीमध्यें वितळलेल्या विद्युद्विच्छेद्य पदार्थापासून धातू काढण्याच्या क्रियेचा फार मोठ्या प्रमाणावर उपयोग करण्यांत येतो. ही धातू साध्या पाण्यांतील द्रावणापासून विद्युद्विश्लेषणपद्धतीनें उत्पन्न करतां येत नाहीं. परंतु अशुद्ध अल्युमिनम संयुक्ताचें द्रावण आणि क्रायोलाइट धातूचें द्रावण यांचें मिश्रण केलें असतां विद्युद्विश्लेषणपद्धतीनें अल्युमिनम धातु एका ध्रुवाशीं जमा होतो. या वितळलेल्या द्रव्यापासून अल्युमिनम धातु काढून घेतल्यानंतर त्यामध्यें अधिक शुद्ध प्राणिदें घालण्यांत येतात. या विद्युद्विश्लेषणक्रियेंतील धनविद्युद्ध्रुव कर्बाचे तुकडे वितळलेल्या धातूंत सोडण्यांत येऊन बनविलेले असतात. आणि ऋणविद्युद्ध्रुव वितळलेल्या अल्युमिनम धातूचेच बनतात. याप्रमाणेंच कॅल्शियम्, सेरियम्, लिथियम्, मॅग्नेशियम्, पोटॅशियम्, सोडियम्, स्ट्रॉन्शियम् या धातू त्यांच्या हरिदांच्या रसाच्या द्रावणापासून विद्युद्विश्लेषणपद्धतीनें काढतां येतात. सोडियम् किंवा सिंधु हा धातु उष्ण प्राणिदाच्या आणि नत्रिताच्या रसापासूनहि मिळूं शकतो.

विद्युद्विश्लेषणपद्धतीचा विशेष उपयोग धातू शुद्ध करण्याच्या कामीं करण्यांत येतो. अलीकडे शुद्ध तांबें हें बहुतेक ताम्रगंधकिताच्या गंधकाम्ल असलेल्या विद्युद्विच्छेदक द्रव्यापासून विद्युद्विश्लेषणपद्धतीनें अशुद्ध तांब्याच्या धनध्रुवाशीं जमा करून काढण्यांत येतें. सोनें सुद्धां याच पद्धतीनें शुद्ध करण्यांत येतें. येथें विद्युद्विच्छेद्य पदार्थ म्हणून सुवर्ण हरिदाच्या द्रावणामध्यें उष्णहराम्ल घालून वापरण्यांत येतें. चांदीहि रजतनत्रिताच्या द्रावणापासून शुद्ध करण्यांत येते. या सर्व कृतींमध्यें धनध्रुव हा अशुद्ध जातीचा असतो आणि ऋणध्रुवाशीं शुद्ध धातु जमा होते. ही पद्धति धातूवर मुलामा चढविण्याच्या पद्धतीसारखीच आहे.

**विद्युत्प्रकाश**—विद्युच्छक्तीचें प्रकाशामध्यें रूपांतर केल्यामुळें जो प्रकाश मिळतो त्यास म्हणतात. असा प्रकाश उत्पन्न करण्याची सामान्य पद्धति म्हणजे एखाद्या पदार्थांतून विद्युत्प्रवाह पाठवून त्या पदार्थामध्यें इतकी उष्णता उत्पन्न करावयाची कीं, तो तापून लाल होऊन त्यांतून प्रकाश बाहेर पडूं लागतो. हा पदार्थ अथवा हें माध्यम कर्ब टुंगस्या (टुंग्स्टन)ची तार, पाऱ्याची वाफ किंवा कांहीं धातुलवणांची वाफ, इत्यादि असूं शकतात. साध्या कमानीचा विजेचा दिवा आतां मागें पडत चालला असून

त्या ठिकाणीं वायूनें भरलेले तुंगस्थाचे फार मोठ्या शक्तीचे दिवे येऊं लागले आहेत. ज्योतिर्युक्त कमानींचे दिवे उत्कृष्ट असून अद्यापहि रस्त्यावर प्रकाश पाडण्याकरितां त्यांचा उपयोग करण्यांत येतो. परंतु यांची ज्योत वरचेवर झाडावी लागत असल्यामुळें त्यांस खर्च फार येतो व याकरितां त्यांच्याऐवजीं तुंगस्थाचे दिवे वापरण्यांत येऊं लागले आहेत. पाऱ्याच्या वाफेचे दिवे चांगले असून त्यांचा फोटोग्राफीच्या कामीं फार चांगला उपयोग होतो. परंतु त्या प्रकाशांत तांबडा व नारिंगी हे प्रकाशपटांतील वर्ण नसल्यामुळें त्यांचा प्रकाश भकास दिसतो. कार्बनचे कमानी दिवे जरी अलीकडे मागें पडले असले तरी चित्रपट व शोधकदीप (सर्चलाइट) यांमध्यें त्यांचा अद्यापि उपयोग करण्यांत येतो. या दिव्यामध्यें ५० व्होल्ट शक्तीच्या विद्युत्प्रवाहाचें अंतर दोन कार्बनच्या कांड्यांमध्यें ठेवलें आणि त्या प्रथम एकमेकींस जोडून नंतर दूर केल्या तर त्यामध्यें एक प्रकाशाची कमान सारखी चालू राहते. यांतील धनविद्युत् कांडीचें उष्णतामान चार हजार अंश शतमानापर्यंत चढतें.

ज्योतिर्युक्त कमानींचे (फ्लेम आर्क) दिवे—यामध्यें वरील तत्त्वच थोडासा फेरफार करून लावण्यांत येतें. यामध्यें प्रकाशकमानीमुळेंच सर्व प्रकाश मिळतो व तो प्रकाश अधिक तीव्र स्वरूपाचा असावा याकरितां कार्बनच्या कांड्यांमध्यें कांहीं धातूंचीं लवणें मिसळण्यांत येतात. या लवणांची वाफ होऊन ती त्या कमानीमध्यें तापून प्रकाशमान होते. या लवणांच्या योगानें कार्बनच्या कमानीची विद्युद्रोधकता कमी होऊन प्रकाशाची कमान अधिक लांब करतां येते.

पाऱ्याच्या वाफेचे (मर्क्युरी व्हेपर) दिवे—या दिव्यामध्यें एका निर्वात केलेल्या नळीमध्यें पाऱ्याची वाफ भरून तींतून विद्युत्प्रवाह सोडल्यामुळें ती तापून लाल होऊन प्रकाश उत्पन्न होतो. या नळीच्या एका टोंकाशीं एक लोखंडाचा विद्युद्ध्रुव असून त्याच्याशीं धनविद्युत् टोंक जोडलेलें असतें. दुसऱ्या टोंकाला एक लहान गोलक असून त्यामध्यें कांहीं पारा असतो, व तो ऋणविद्युत् टोंकाशीं जोडलेला असतो. हा दिवा लावतांना प्रथम ही नळी थोडी वांकडी करावी लागते म्हणजे गोलकांतून पाऱ्याचा प्रवाह बाहेर पडून तो लोखंडाच्या विद्युद्ध्रुवाशीं जोडला जातो व याप्रमाणें विद्युत्प्रवाह सुरू होऊन कांहीं पाऱ्याची वाफ झाली म्हणजे नळी पुन्हां सरळ करण्यांत येते. यानंतर पाऱ्याच्या वाफेंतून प्रकाश बाहेर पडूं लागतो. लहान दिव्याकरितां कांचेची नळी वापरण्यांत येते. परंतु या दिव्याचें उष्णमान फार वाढत असल्यामुळें मोठ्या दिव्याकरितां गारेची नळी उपयोगांत आणतात. गार ही अतिनीलकिरणांसहि पारदर्शक असल्यामुळें त्या किरणांचा दुष्परिणाम टाळण्याकरितां या गारेच्या नळीसभोंवतीं दुसरी एक गारेच्या कांचेची नळी घालण्यांत येते. तींतून अतिनीलकिरण बाहेर जाऊं शकत नाहींत. अलीकडे नवीन पद्धतीनें तयार करण्यांत आलेले असले दिवे एकदम चालू करतां येतात.

प्रखरउष्णताजन्य प्रकाश (इन्कँडेसेन्ट) दिवे—हें नांव सामान्यतः एखाद्या तंतूस विद्युत्प्रकाशानें खूप तापविण्यांत आल्यामुळें त्यापासून जो प्रकाश उत्पन्न होतो तसल्या दिव्यास देण्यांत येतें. प्रकाश देणारा तंतु एका निर्वात केलेल्या किंवा दाबलेल्या अचेतन (इनर्ट) वायु भरलेल्या गोळ्यामध्यें बसविलेला असतो, व तो त्यांतून वाहणाऱ्या विद्युत्प्रकाशामुळें तापून लाल होऊन प्रकाश देऊं लागतो. अशा तऱ्हेचा उपयोगांत आलेला पहिला दिवा कार्बन तंतूचा असे. परंतु तो आतां मागें पडला असून तुंगस्था- (टुंग्स्टन)च्या तंतूचे दिवे प्रचारांत आले आहेत. प्रारंभीं तुंगस्थाचे तंतू फार ठिसूळ असल्यामुळें हे दिवे फार लवकर बिघडत; परंतु यानंतर तुंगस्थाची तार काढण्याची नवीन पद्धति शोधून काढण्यांत आली. त्यामुळें अशा तारेचे तंतू घातलेले दिवे करतां येणें शक्य झालें व ते अधिक टिकाऊ होऊं लागले. घरामध्यें प्रकाशासाठीं हल्लीं हेच दिवे वापरण्यांत येतात. जर या दिव्याच्या गोळ्यामध्यें दाबलेला अचेतन वायु भरलेला असला तर आंतील तुंगस्थाचा तंतु पुष्कळ अधिक उष्णमानापर्यंत तापवितां येतो व प्रकाशाची तीव्रता उष्णमानाबरोबरच फार जलद वाढत असल्यामुळें या दिव्यांची प्रकाशक्षमता अधिक वाढवितां येते. या नवीन शोधामुळें अलीकडे नवीन वायु भरलेले दिवे बनविण्यांत येऊं लागले आहेत, व यामुळें तुंगस्थाच्या तंतूची प्रकाशदायक शक्ति बरीच असल्यामुळें आकारानें लहान पण अधिक शक्तीचे दिवे बनविण्यांत येऊं लागले आहेत. या वायु भरलेल्या दिव्यांची प्रकाशदायकता व त्याकडे विशेष लक्ष देण्याची अनवश्यकता यांमुळें हे दिवे अधिकाधिक उपयोगांत येऊं लागले आहेत. अशा तऱ्हेचे नीऑन हा दुर्मिळ वायु भरलेले व नारिंगी किंवा नील प्रकाश देणारे नळ्यांच्या आकाराचे दिवे दुकानांतून जाहिरातीकरितां तसेंच घरांतूनहि वापरण्यांत येऊं लागले आहेत. (नीऑन प्रकाश पाहा).

**विद्युत्प्रतिबंधनियामक**—(ऱ्हेओस्टाट). एखाद्या विद्युन्मंडलांतील रोधकता वाढविण्याकरितां किंवा बदलण्याकरितां हें उपकरण वापरण्यांत येतें. विशेषतः विद्युद्गतियंत्रें सुरू करण्याकरितां व त्यांच्या गतीचें नियमन करण्याकरितां अशा तऱ्हेचे विद्युद्रोधक नियामक वापरण्यांत येतात. जेव्हां एखादें विद्युद्गतियंत्र सुरू करण्यांत येतें तेव्हां त्यांतून अतिशय मोठा प्रवाह बाहेर पडण्याच्या कामीं प्रतिबंधक शक्ति म्हणजे केवळ आर्मेचरमधील कांहीं ओव्हम प्रतिबंधक शक्ति एवढीच असते. अशा वेळीं विद्युद्गतियंत्र सुरू करतांना फार मोठा विद्युत्प्रवाह एकदम उत्पन्न होऊं नये व यंत्राच्या शक्तीच्या पलीकडचा प्रवाह त्यांतून जाऊं नये म्हणून कांहीं तरी योजना करणें आवश्यक असतें. या-

करितां आरंभच्या विद्युन्मंडलामध्यें गति सुरू करतांना एक विद्युद्रोधक घालून ठेवणें, अशा प्रकारची तजवीज केलेली असते. जसजशी यंत्राची गति वाढत जाते तसतशी ही प्रारंभींची विद्युद्रोधकता कमी कमी करण्यांत येते.

**विद्युत्प्रवाहमान**—( ॲंपीअर ). विद्युत्प्रवाहाचें व्यावहारिक मूलमान हें असें ठरविण्यांत आलें आहे कीं, विशिष्ट प्रकारच्या किंवा विशिष्ट प्रमाणांत असलेल्या रजत नत्रिताच्या ( सिल्व्हर नायट्रेट ) द्रावणांतून दर सेकंदास ०·००१११८ इतके ग्रॅम वजनाचें रुपें ज्या एका प्रमाणांत सतत वाहणाऱ्या विद्युत्-प्रवाहाच्या साहाय्यानें पृथक् होऊं शकतें त्या प्रवाहाचें प्रमाण हें मूलमान होय. ओहम, व्होल्ट पाहा.

**विद्युत्प्रवाहमापक**—( ॲमीटर ). विजेचा प्रवाह मोजण्याचें हें यंत्र आहे. या यंत्राच्या साहाय्यानें विजेचा प्रवाह किती ॲंपीअरचा आहे तें कळतें. या यंत्रांत निरनिराळे रोधक घालून एकाच यंत्राच्या साहाय्यानें निरनिराळ्या प्रमाणांचे प्रवाह मोजतां येतात.

याचे निरनिराळे प्रकार आहेत; उदा. १. विडाचा मापक. २. फिरत्या वेटोळ्याचा मापक किंवा विद्युद्गतियंत्र मापक. ३. उष्णतारमापक. ४. विद्युत्प्रवर्तक मापक.

१. साध्या लोखंडाचा अथवा विडाचा मापक हा सरळ किंवा उलटसुलट दोन्ही प्रवाह मोजण्याच्या कामीं उपयोगांत येतो. तसेंच याला खर्च फार कमी लागत असून व्यापारी कामांत याचा चांगला उपयोग होतो.

२. जेथें सरल प्रवाह मोजावयाचा असेल व जेथें सूक्ष्म मापनाची आवश्यकता असेल तेथें फिरत्या वेटोळ्याचा मापक बहुधा योजण्यांत येतो. तसेंच उलटसुलट प्रवाह असेल तेथें विद्युद्गति-यंत्रमापक उपयोगांत आणतात. या मापकानें सरल व उलटसुलट दोन्ही प्रकारचे प्रवाह मोजतां येतात.

३. जेथें विद्युत्प्रवर्तन होऊं नये अशी इच्छा असते अशा बिनतारी संदेश यंत्राच्या किंवा बिनतारी दूरध्वनि यंत्राच्या कामीं उष्णतारमापक योजतात. या मापकानें सरल किंवा उलटसुलट दोन्ही प्रवाह मोजतां येतात. आणि याचा नीट उपयोग केला तर फार सूक्ष्म प्रमाणापर्यंत मापन करतां येतें.

**विद्युत्प्रेरक**—( एलेक्ट्रोमोटिव्ह फोर्स ). विद्युन्मंडलामध्यें विद्युत्प्रवाह उत्पन्न होण्याकरितां जी प्रेरणा लागते तीस विद्युद्गतिशक्ति असें म्हणतात. या शक्तीचें मापन एकं ( युनिट ) प्रमाणांतील विद्युच्छक्तीचा विद्युन्मंडलामध्यें एक फेरा होण्यामध्यें जें कार्य होतें त्यावरून करण्यांत येतें. यावरून एक विद्युच्छक्तीचें मूलमान हें विद्युन्मंडलांतील एक अर्ग कार्य करणारे म्हणजे c. g. s. ( सेंटिमीटर-ग्रॅम-सेकंड-युनिट ) मूलमान विद्युन्मंडलामध्यें एक फेरामर नेणें हें होय. येथें विद्युन्मंडलांतील दोन बिंदूंतील शक्त्यंतर हें एका बिंदूपासून दुसऱ्या बिंदूपर्यंत एक मूलमान विद्युत् नेण्यामध्यें जें कार्य होतें तितकेंच असतें.

विद्युद्गतिशक्तीची उत्पत्ति—विद्युद्गतिशक्ति ही पुढील तीन प्रकारांची होऊं शकते :( १ ) प्राथमिक व दुय्यम विद्युद्द्रामध्यें वगैरे होणारी रासायनिक क्रिया. ( २ ) उष्णता-संचायकामध्यें वगैरे होणारी उष्णतावैद्युतिक क्रिया. ( ३ ) विद्युत्प्रवाहोत्पादक, विद्युद्गत्युत्पादक, रूपांतरक व प्रवर्तक वेष्टणें, वगैरेमध्यें होणारी विद्युत्चुंबकीय क्रिया.

विद्युद्गतिशक्तीच्या उत्पादनाचें तत्त्व सामान्यपणें पुढें दिल्याप्रमाणें सांगतां येईल. चुंबकीय रेषा जर विद्युन्मंडलाशीं संबद्ध केल्या आणि अशा तऱ्हेनें या दोन रेषांमध्यें जे परस्पर संयोग झाले असतील त्यांमध्यें जर फरक करण्यांत आला तर विद्युन्मंडलामध्यें विद्युद्गतिशक्ति निर्माण होते. या शक्तीचें प्रमाण या दोन संयोगांमध्यें करण्यांत आलेल्या फरकाच्या प्रमाणावर अवलंबून असतें. एका विद्युन्मंडलामध्यें स्थिर असलेला एक निरंतरचा चुंबक जर आपण हालविला तर किंवा एका चुंबकीय क्षेत्रामध्यें असलेल्या विद्युन्मंडलास आपण गति दिली किंवा एका तारेच्या वेष्टणांत वाहत असलेल्या विद्युत्प्रवाहामध्यें उत्पन्न होणाऱ्या चुंबकीय क्षेत्राचा दुसऱ्या वेष्टणाशीं असलेल्या संबंधांत जर आपण पहिल्या वेष्टणांतील विद्युत्प्रवाह कमीअधिक करून बदल केला तर या वरील सर्व तीनहि उदाहरणांत विद्युद्गतिशक्ति निर्माण होते. विद्युद्गतिशक्ति ही विद्युच्चुंबकापासून उत्पन्न करतां येते. या तत्त्वावरच विद्युच्छक्तीचें मोठ्या प्रमाणावर उत्पादन करणें शक्य झालें आहे.

**विद्युत्प्रतिरोध**—( एलेक्ट्रिकल रेझिस्टन्स ). विद्युत्प्रतिरोध मोजण्याचें मूलमान ओव्हम हें आहे, परंतु फार मोठ्या प्रमाणावर प्रतिरोध मोजावयाचा असल्यास तो मेघोम या मापानें मोजतात. प्रत्येक वस्तूमध्यें विद्युद्रोधकता असते. परंतु कांहीं पदार्थांच्या बाबतींत ओव्हमचा नियम लागू पडत नाहीं. कांहीं जातीच्या स्फटिकांमध्यें विद्युत्प्रवाह एका दिशेपेक्षां विरुद्ध दिशेनें पाठविल्यास अधिक शक्तीचा पाठवितां येतो. व या गुणधर्माचा उपयोग बिनतारी संदेशवाहकामध्यें प्रवाहाच्या गतींत बदल करण्याकरितां उपयोग करण्यांत येतो; म्हणजे उलटसुलट प्रवाहाची गति एका दिशेची किंवा सरलगति करतां येते.

**विद्युत्प्रवाहमापक**—( गॅल्व्हानोमीटर ). विजेच्या प्रवाहाचें अस्तित्व व त्याचें मोजमाप करण्याकरितां उपयोगी पडणारें यंत्र. विजेच्या प्रवाहाचा लोहचुंबकावर परिणाम होतो, म्हणून एक किंवा अधिक वेढे असलेले तारांच्या वळयाच्या मध्यमार्गी एक लोहचुंबकसूची मळसूत्रावर फिरेल अशा रीतीनें बसविलेली

असते. तारावलय उभें (क्षितिजाला लंब) ठेवून लोहचुंबक याम्योत्तर वृत्तांत आणावयाचे व तारांतून विजेचा प्रवाह सोडावयाचा म्हणजे स्थिर लो. सूची फिरते. जेवढ्या कोनांतून सूची फिरते त्या कोनाच्या स्पर्शज्या(टँजंट)च्या प्रमाणांत विजेच्या प्रवाहाचें बल असतें. हें 'स्पर्शज्या विद्युत्प्रवाहमापक' झालें. 'ज्या (साइन) गॅल्व्हानोमीटर', तसेंच 'हेलमोल्ट्झ् गॅल्व्हानोमीटर' वरील प्रकार सुधारून केलेले आहेत.

वलयांतील तारांचे फेरे वाढवून व कोनाचा विक्षेप (डिफ्लेक्शन) मोजण्यास आरशाचा उपयोग करून अतिशय सूक्ष्म प्रवाह मोजणारे 'दर्पण (मिरर) गॅल्व्हानोमीटर' बनविले आहेत. एक सेंटिमीटर व्यासाच्या वर्तुळाकार हलक्या आरशाच्या पाठीवर सूची रोवून ठेवतात व वलयाच्या मध्यभागीं तो आरसा रेशमाच्या धाग्यानें टांगलेला असतो. सूचीची स्थिति एका विजेच्या दिव्याच्या किरणाच्या आरशावरील परावर्तनानें दिसते व आरशाच्यासमोर सुमारें एक मीटर अंतरावर फक्त उजेड नेणारा परंतु पारदर्शक नाहीं अशा (ग्राउंड ग्लास) कांचेंत खोदलेल्या अथवा चिकटविलेल्या मापावर कोनाचा हेलकावा मोजला जातो. अतिशय सूक्ष्म प्रवाह सोडला तरी सूचीचें चलन होतें व प्रकाशाचा कवडसा मापपट्टीवर दिसतो. थॉमसननें (लॉर्ड केल्व्हिननें) अॅटलांटिक केबल घालते वेळीं हें यंत्र तयार करविले व उपयोगांत आणिलें.

'चलवलय (मूव्हिंग कॉइल) गॅल्व्हानोमीटर'मध्यें विजेचा प्रवाह टांगलेल्या वलयांतून जातो व त्यामुळें वलय लोहचुंबक बनतें आणि तें पक्क्या कायम चुंबकाच्या योगानें चळतें. 'दोरी (स्ट्रिंग) गॅल्व्हानोमीटर'मध्यें वलयाच्याऐवजीं लवचिक रौप्य कांचतंतू वापरतात. 'प्रक्षेपधारामापक (बॅलिस्टिक) गॅल्व्हानोमीटर' वरच्या प्रकाशपरावर्तन गॅल्व्हानोमीटरप्रमाणेंच असतो. फक्त फरक इतकाच कीं, चलवलय अथवा सूची बरीच जड करतात.

गॅल्व्हानोमीटरमधून वीज धाडली म्हणजे तिचें माप प्रकाशाचा कवडसा टाकून करतां येतें. डायनामो व इलेक्ट्रो-मॅग्नेटच्या पोल-गॅपमधील चुंबकक्षेत्र मोजण्याच्या कामीं या गॅ. यंत्राचा उपयोग होतो. त्याचप्रमाणें पोलादाची चुंबकशक्ति मोजण्यांत हा वापरतात. विद्युद्घटांचा (सेल) विद्युच्चालकशक्ति व विद्युत्संग्राहकां(कन्डेन्सरां)ची धारणशक्ति मोजतांना याचा उपयोग होतो.

**विद्युद्बलमापक**—(डायनॅमोमीटर). एखाद्या यंत्राची शक्ति अथवा कार्याची गति मोजण्याचें जें यंत्र असतें त्यास गतिमापक असें म्हणतात. या यंत्राचे दोन प्रकार आढळतात : (१) गत्यंतर गतिमापक, व (२) शोषक गतिमापक. याचा उपयोग सामान्यतः गतिदायक दंड किंवा पट्टे यांच्या साहाय्यानें नेण्यांत येणाऱ्या गतीची अश्वशक्ति मोजण्याकरितां करतात.

**विद्युन्मत्स्य**—हे एका जातीचे मासे असून ते विजेसारखा धक्का देऊं शकतात. हे दक्षिण अमेरिकेंत आढळतात. यांचें हें

विजेचा धक्का देण्याचें साधन त्यांच्या शेपटीखालीं असलेल्या चार अवयवांमध्यें असून त्यांचा धक्का इतका जोराचा असतो कीं, मनुष्यहि त्यानें खालीं पडतो आणि ज्या अवयवास जोराचा धक्का बसलेला असेल तो कांहीं तासपर्यंत बधिर होतो. अशीच शक्ति एका आफ्रिकेंतील मांजर-माशाच्या ठिकाणीं असते. व त्याचें हें साधन सर्व शरीरावर एका आवरणासारखें असतें.

**विद्युन्मापक यंत्र**—(एलेक्ट्रिकल मेझरिंग इन्स्ट्रुमेंट). विजेची शक्ति मोजण्याचें यंत्र. हीं यंत्रें बहुतेक विजेच्या प्रवाहामुळें चालतात. एकाच यंत्राचा विजेच्या प्रवाहाचें प्रमाण मोजण्याकरितां (व्होल्टमीटर) किंवा त्या प्रवाहाची शक्ति अथवा तीव्रता मोजण्याकरितां (अॅमीटर) उपयोग करतां येतो. मात्र प्रत्येक कृतीच्या वेळीं त्यांत थोडा फरक करावा लागतो. उदारणार्थ, प्रवाहप्रमाण मोजण्याकरितां त्यांत मालाप्रतिबंधक (सीरीज रेझिस्टन्स) घालाव्या लागतात. व तीव्रता मोजण्याकरितां त्यांत पलटांची (शंट) योजना करावी लागते. हे पलटे किंवा मालाप्रतिबंधक निरनिराळे घालून निरनिराळ्या प्रमाणांचीं विद्युन्मापकें बनविण्यांत येतात. डायनामोमीटर तऱ्हेचीं यंत्रें प्रवाहाचें बल मोजण्याच्या कामीं चांगलीं असतात व याच तत्त्वावर 'वॅटमीटर' बनविलेलीं असतात. घर्षणजन्य किंवा स्थितिजन्य विद्युन्मापक (एलेक्ट्रोस्टॅटिक व्होल्टमीटर) याची गति प्रवाहावर अवलंबून नसून दोन वस्तूंतील विजेच्या तीव्रतेच्या अंतरावर अवलंबून असल्यामुळें तें अगदीं निराळ्या प्रकारचें यंत्र आहे.

बहुतेक विद्युन्मापकें मोटारच्या धर्तीचीं असतात. यांत एक तबकडी विजेच्या प्रवाहाच्या प्रमाणांत फिरत राहते. या तबकडीचा आंस कांहीं चक्रांशीं जोडलेला असतो. त्याच्या साहाय्यानें कांटे फिरून विजेचें मापन दर्शविलें जातें.

**विद्युद्रोधक**—जो पदार्थ आपल्यामधून किंवा आपल्या पृष्ठभागावरून विद्युत्प्रवाह जाण्यास अतिशय प्रतिबंध करतो त्यास विद्युद्रोधक असें म्हणतात. विजेचीं उपकरणें व यंत्रें तयार करण्याच्या कामीं अशा विद्युद्रोधकांचें महत्त्व फार असतें. कोणताहि पदार्थ अगदीं पूर्णांशानें विद्युद्रोधक नसतो. तारायंत्राच्या तारा खांबावरून नेतांना चिनी मातीच्या पेल्याच्या आकाराचीं पात्रें विद्युद्रोधक म्हणून वापरण्यांत येतात. कांहीं जातींच्या तेलामध्यें विद्युद्रोधक शक्ति बरीच असते. कोरडी हवा ही एक उत्तम विद्युद्रोधक आहे.

**विद्युल्लता**—वातावरणांतील विजेपासून जी एकदम प्रकाशशलाका दृश्यमान् होते तीस विद्युल्लता असें म्हणतात. तिचा रंग लालसर, पांढरा किंवा निळसर असतो व ती कधीं कधीं दोन ढगांच्या दरम्यान वांकड्या-तिकड्या प्रकाशाच्या देदीप्यमान रेषेसारखी दृष्टीस पडते; किंवा पृथ्वी आणि एखादा ढग यांच्यामध्यें एक उज्वल प्रकाशशलाका जात असतांना आढळून येते. जेव्हां मेघांचा गडगडाट होत असतो त्या वेळीं कधीं कधीं विजेचा एखादा मोठा गोळा दृष्टीस पडतो. विद्युल्लता ही हवेंतून किंवा विद्युद्रोधकांतून किंवा धातूंच्या गजांतून जात असतांना अत्यंत मोठ्या प्रमाणांतील असलेले सर्व गुणधर्म प्रकट करते. विद्युल्लतेच्या योगानें *प्राणी मरण पावतात*, झाडें पिंजतात, दगड फुटतात, आणि बारीक तारा वितळून जातात. वीज चकाकली म्हणजे त्यानंतर ओझोन वायूचा विशिष्ट प्रकारचा वास सुटल्याचें आढळतें व केव्हां आपणांस वीज उत्पन्न करणाऱ्या यंत्राशेजारीं उभे आहोंत असें वाटूं लागतें. सर्वसाधारण उष्णतामान असतां ध्वनीची गति दर सेकंदास अकराशें फूट असते. त्यामुळें एक मैलावर झालेला विजेचा लखलखाट आपणांस सुमारें पांच सेकंदांत दृष्टीस पडतो.

**विद्युल्लोहमार्ग**—रेल्वेवर चालविण्यासाठीं वाफेच्याऐवजीं विजेनें चालणारीं एंजिनें वापरण्याची यांत व्यवस्था केलेली असते. या पद्धतीनें वीज एका ठिकाणीं उत्पन्न करतां आल्यामुळें ती शक्य तितक्या कमी खर्चांत तयार करतां येते. त्याचप्रमाणें नुसत्या तारांच्या योगानें ती लांबवर पाठवितां येते. या एंजिनला लागणारी वीज बहुतेक डी. सी. (सरल प्रवाह) जातीची असते. वीज जाणाऱ्या तारांपैकीं एक तार रुळांना जोडलेली असते व दुसरी तार खांबावरुन नेलेली असते. विजेनें चालणारें एंजिन चालतांना त्याचें चाक रुळावर असतें. एंजिनवरील मोटर (डायनॅमो) चालण्यासाठीं एका बाजूनें या चाकांतून वीज आंत येते व दुसऱ्या बाजूनें एंजिनवर बसविलेल्या स्प्रिंगच्या योजनेचा खांबावर बसविलेल्या तारांशीं संबंध येऊन तेथून विजेचा पुरवठा होतो. हें एंजिन चालण्यास पाणी किंवा कोळसा यांची जरूरी नसल्यामुळें त्याकरितां ठिकठिकाणीं ते भरुन घेण्यास वेळ न गेल्यामुळे त्यांत बचत होते. या एंजिनचा गाडी चालू असतांना धक्काहि कमी बसतो. उतारावरुन हें एंजिन चालत असतां गाडीच्या वजनामुळें जो आपोआप वेग येत असतो. त्यामुळें मोटरचा सारखा उपयोग करतां येऊन कांहीं शक्ति परत दिली जाते. तसेंच या योजनेचा ब्रेक्लाहि फार चांगला उपयोग होतो. यालाच उत्पादक रोधक (जनरेटिव्ह ब्रेक) म्हणतात. विशेषेंकरून जेथें रुळावर वाहतूक फार असेल अशाच ठिकाणीं विजेनें आगगाडी चालविण्यांत अधिक फायदा असतो, म्हणून अशाच ठिकाणीं ती वापरतात.

**विद्युद्विवेचक**—(एलेक्ट्रिक सॉर्टर). लोखंडाला लोहचुंबक ओढतें. इतर धातूंवर (कांहीं अपवाद वगळल्यास) लोहचुंबकाचें आकर्षण घडत नाहीं. क्लार्क नांवाच्या शास्त्रज्ञानें यासाठीं एक यंत्र तयार केलें आहे. या यंत्रानें एक धातु दुसऱ्या धातूच्या मिश्रणांतून वेगळी करतां येते. निरनिराळ्या धातूंत विद्युत्प्रवाह निरनिराळ्या वेगानें वाहतो. या गोष्टीचा उपयोग करून हें यंत्र बनवण्यांत आलें आहे. अनेक प्रकारच्या व कितीहि सूक्ष्म असल्या तरी मिश्रणामधून प्रत्येक धातु या साधनानें वेगळी होऊं शकते.

**विद्युद्विश्लेषण**—(एलेक्ट्रोलायसिस). विद्युत्प्रवाहाच्या *योगानें वितळलेली लवणें किंवा लवणांचीं द्रावणें वगैरेंचें पृथक्करण* करण्याच्या क्रियेस विद्युद्विश्लेषण असें म्हणतात. ज्या पदार्थाचें विद्युद्विश्लेषण करावयाचें असतें त्या पदार्थाला विद्युद्विश्लेष्य (इलेक्ट्रोलाइट) असें म्हणतात. हा पदार्थ एखादें अम्ल भस्म किंवा लवण असून तो वितळलेल्या किंवा विरघळलेल्या स्थितींत असतो. या विद्युद्विश्लेष्य पदार्थामध्यें धनविद्युद्ध्रुवाच्या बाजूनें (ॲनोड) विद्युत्प्रवाह प्रवेश करतो व ऋणध्रुवाच्या मार्गानें (कॅथोड) तो बाहेर पडतो. हा प्रवाह त्या द्रव्यांतून जात असतां त्या द्रव्याचें पृथक्करण होऊन हे पृथक्कृत भाग प्रवाहाच्या दोन्ही ध्रुवांशीं गोळा होतात. विद्युद्विश्लेषणाच्या अर्वाचीन उपपत्तीप्रमाणें प्रत्येक विद्युद्विश्लेष्य पदार्थामध्यें थोड्या-फार प्रमाणांत मोकळे वैद्युतिक कण (आयॉन्) असतात. हे कण रासायनिक मूलपदार्थ असून त्यावर विशिष्ट प्रमाणाचा विद्युद्भार असतो. हा विद्युद्भार त्या पदार्थांच्या स्वरूपाप्रमाणें धन किंवा ऋण विद्युताचा असतो. या वैद्युतिक कणामध्यें त्या मूळ पदार्थाचे कोणतेहि रासायनिक गुणधर्म असत नाहींत. उदा., गंधकाम्लाचें द्रावण घेतलें असतां त्यामध्यें उज्जाचे (उ२) धनविद्युद्भारित मोकळे वैद्युतिक कण असतात व गंधप्राणिदाचे ऋणविद्युद्भारित वैद्युतिक कण असतात. विद्युद्भार नसलेले गंधप्राणिदाचे विद्युद्भारविरहित मूलद्रव्याच्या कणांची पाण्यावर प्रतिक्रिया होऊन गंधकाम्ल तयार होतें आणि [illegible]
प्राणवायु मोकळा होतो. परंतु विद्युद्भारित गंधकप्राणिदाचे [illegible]
कणांचें याप्रमाणें पृथक्करण होत नाहीं. उदा [illegible]
विद्युद्भाराच्या स्वरूपाप्रमाणें ते [illegible]
आणि गंधकप्राणि [illegible]
याप्रमाणें [illegible]
विद्युद्भार टा [illegible]
गुणधर्म प्रगट [illegible]
आणि विद्युद्भाररहित [illegible]
करतो; तेव्हां प्राणवायु बा [illegible]
प्रवाहामुळें व त्यांच्यावरील धन [illegible]
द्रव्यामध्यें प्रवाह उत्पन्न होतो. [illegible]

निश्चित प्रमाणांत भार असतो. त्या अर्थी विद्युद्विश्लेषणापासून उत्पन्न होणारे पदार्थ मूळ पदार्थांच्या रासायनिक मूल्यांच्या प्रमाणांत असतात. उदा., वितळलेल्या चांदीच्या हरिदा (सिल्व्हर क्लोराइड) चें जर विद्युद्विश्लेषण केलें, तर पात्राच्या एका बाजूस प्रत्येक चांदीच्या १०८ ग्रॅम्सबरोबर दुसऱ्या बाजूस हरा (क्लोरीन) चे ३५.५ ग्रॅम बाहेर पडतात.

विद्युद्विश्लेषणाचे पुढें दिल्याप्रमाणें तीन नियम आहेत : (१) विद्युद्विश्लेषणाची क्रिया सर्व विद्युन्मंडलाच्या भागांत सारखीच चालू असते. (२) विद्युच्छक्तीच्या विशिष्ट प्रमाणांत निरनिराळ्या विद्युद्विच्छेद्य पदार्थांचें त्यांच्या रासायनिक सममूल्यांतच पृथक्करण होतें. (३) विद्युद्विच्छेद्य पदार्थांचें विश्लेषण विद्युत्प्रवाहाच्या शक्तीच्या प्रमाणांत होतें. या क्रियेचा उपयोग तांबें शुद्ध करणें, धातूवर मुलामा चढविणें, सिंधु व पालाश यांसारखे धातू उत्पन्न करणें, व विद्युत्संचय करणें इत्यादि कार्यांत होतो.

**विद्युद्वैद्यक उपकरणें**—अलीकडे रोगांचें निदान व चिकित्सा करण्याकरितां निरनिराळ्या प्रकारच्या अनेक विद्युद्यंत्रांचा उपयोग करण्यांत येतो. विद्युद्हृच्चलनलेखका (कार्डिओग्राफ) च्या साहाय्यानें हृदयाच्या क्रियेचें निरीक्षण फार सूक्ष्म रीतीनें करतां येतें. हें यंत्र म्हणजे एक रज्जुचलविद्युन्मापक (स्ट्रिंग गॅल्व्हानोमीटर) असतें व त्यांत अशी एक रचना केलेली असते कीं, एक लहानसा प्रकाशाचा कवडसा त्याच्या गतीबरोबर एका प्रकाशलेखक कांचेवर पडत राहील. यामुळें हृदयाचे ठोके पडत असतांना त्यांचा प्रत्यक्ष प्रकाशलेख आपणास पाहावयास मिळतो. दुसरें एक वैद्यकीय कार्य म्हणजे कांहीं रोगांवर उपचार करण्याकरितां कांहीं औषधें विद्युद्विच्छेदनपद्धतीनें शरीराच्या विशिष्ट भागामध्यें पोंचवितां येतात. उदा., एखादा प्रसर विद्रधि (रोडेंट अल्सर) झाला असतां त्यावर उपचार करण्याकरितां जसद गंधाकिता (झिंक सल्फेट) चे शेंकडा ५ टक्के प्रमाण असलेलें द्रावण घेऊन त्यांत भिजविलेली एक पट्टी त्या विद्रधीवर ठेवण्यांत येते. आणि त्यास विद्युत्प्रवाह जोडून जसदाचे विद्युदणू (आयॉन) त्या विद्रधीमध्यें शिरकविण्यांत येतात. या पद्धतीनें अनेक रोगांवर उपचार करतां येतो. मात्र निरनिराळ्या रोगांकरितां निरनिराळ्या तऱ्हेचे विद्युदणू वापरावे लागतात. जेव्हां मज्जातंतूस किंवा स्नायूस चेतना द्यावयाची असेल त्या वेळीं अल्पकंपयुक्त लहरींच्या प्रवर्तकविद्युत्प्रवाहाचा उपयोग करण्यांत येतो. या कामीं स्थिरविद्युताचाहि उपयोग करतां येतो. मायटिका व न्युरस्थेनिया या रोगांवर उपचार करण्याकरितां विमर्शस्राच्या यंत्राचा उपयोग करण्यांत येतो. संधिवाताच्या प्राथमिक अवस्थेमध्यें बहुकंपयुक्त लहरींच्या विद्युत्प्रवाहाचा उपयोग होतो. तसेंच कॅन्सरवर उपचार करण्याकरितांहि यांचा उपयोग करण्यांत येतो.

**विद्युच्छक्ति प्रेषण-विभाग**—(एलेक्ट्रिक पॉवर ट्रॅन्स्मिशन अँड डिस्ट्रिब्यूशन). मोठमोठ्या शहरांत विद्युच्छक्तीचा पुरवठा करण्याकरितां शक्तिकेंद्रगृहामध्यें अतिशय मोठ्या शक्तीचे उलटसुलट गतीचे विद्युत्प्रवाह उत्पन्न करण्यांत येतात व तेथून उपशक्तिगृहामध्यें हे उच्च शक्तीचे प्रवाह योग्य प्रमाणांत अल्पशक्तिप्रवाहामध्यें रूपांतरित करण्यांत येतात, व अवश्य तेथें त्यांचें रूपांतर तरलगतिप्रवाहामध्यें करण्यांत येतें. या उपशक्तिगृहामार्फत विद्युत्प्रवाह ग्राहकांस पुरविण्यांत येतो. तारांचा खर्च वांचविण्याच्या दृष्टीनें जितक्या उच्च शक्तीचा प्रवाह पाठवितां येईल तितकें फायदेशीर असतें. कांहीं ठिकाणीं तरलगतिप्रवाह वापरणें सोईचें असतें. परंतु उलटसुलट गतीच्या प्रवाहाचें रूपांतर करून घेण्यास खर्च लागतो. त्या मानानें उलटसुलट गतीचा प्रवाह वापरणें कमी खर्चाचें असतें.

**विद्युत्संदेश-तार**—(केबल). फार दूर अंतरावर विद्युत्संदेश पाठवावयाचा असला किंवा विशेषतः महासागराच्या पलीकडे विद्युत्संदेश पाठविण्याकरितां विशिष्ट प्रकारची तार समुद्राच्या आंतून घालण्यांत येते. या तारेची रचना अशी केलेली असते कीं, एक किंवा अनेक तांब्याच्या तारा गटापर्चा व राळेसारखे पदार्थ यांच्या एका विशिष्ट प्रकारें बनविलेल्या कागदाच्या वेटोळ्यांत गुंडाळलेल्या असतात. या वेष्टणास विद्युद्रोधक म्हणतात. या वेष्टणावरून पुन्हां कधीं कधीं शिशाचें वेष्टण घालण्यांत येतें; यामुळें या आंतील वेष्टणास पाणी किंवा इतर पदार्थांपासून इजा होत नाहीं. या शिशाच्या वेष्टणाभोंवतीं पुन्हां पोलादाची तार किंवा फीत वाटोळी गुंडाळण्यांत येते; यामुळें आंतील वेष्टणाचें विशेष संरक्षण होतें. या पोलादी वेष्टणाभोंवतीं ताग व इतर पदार्थांच्या मिश्रणाचे थर देण्यांत येतात, म्हणजे त्यास गंज चढत नाहीं. या तारांचा मार्ग निरनिराळ्या राष्ट्रांतून व समुद्रांतून काढण्यास व तो चालू ठेवण्यास काय श्रम पडतात व त्यांत काय संकटें येतात हें पुढील इंडिया केबलच्या इतिहासावरून कळेल.

इंडिया केबल—इंडो-युरोपियन टेलेग्राफ कंपनीचा 'इंडोलट' ता. १ मार्च १९३१ पासून बंद करण्यांत आला. कारण बिनतारी ध्वनिवाहक यंत्रामारल्या अनेक सुधारणा अस्तित्वांत आल्यामुळें या हिंदुस्थान आणि युरोप यांमधील तारेच्या मार्गाची आवश्यकता कमी झाली. या मार्गाचा इतिहास म्हणजे दळणवळणाच्या मार्गाच्या इतिहासाचाच मोठा काल होय. तेहेरान व लंडन यांमध्यें टेलेग्राफ लाइन सुरू करण्याकरितां इंडो-युरोपियन टेलेग्राफ कंपनी सन १८६८ मध्यें स्थापन झाली. हिंदुस्थान ते युरोप ही पहिलीच टेलेग्राफ सर्व्हिस असल्यामुळें हिची फार लवकर भरभराट झाली. सन १८७१ मध्यें इराणच्या अस्तानंतर

गेलेल्या सामुद्रीय तारांच्या मार्गाची व्यवस्था पाहणारे इंडो-युरोपियन टेलेग्राफ खातें मुंबई सरकारकडून काढून हिंदुस्थान सरकारने आपल्या हातीं घेतलें व नंतर इंडिया ऑफिसच्या ताब्यांत दिलें. १९०१ सालीं 'गल्फ केबल' नव्या घालणें अगर थेट इराणांतून जमिनीवरील तारांचा मार्ग सुव्यवस्थित चालू करणें अगत्याचें झालें. म्हणून इराण सरकारनें केरमान, येज्द, काशान व तेहरान यांवरून कराची ते युरोप अशी जमिनीवरून तार घालण्याची परवानगी दिली. ही तार घालण्याचें काम चालू असतांना इंडो-युरोपियन कंपनीच्या अधिकारी वर्गाला अनेक संकटांशीं झगडावें लागलें. इराणच्या पठारावरून वाहणाऱ्या बर्फाच्या वावटळीपासून 'लाइन गार्डां'चें संरक्षण करणे व तेथील धर्मवेड्या लोकांची समजूत घालून त्यांस शांत करणें हीं दोन मुख्य कामें त्यांना करावीं लागलीं. असें करतांना कांहींचे खून झाले व कांहीं तेथील हवा न मानवल्यामुळे मरण पावले. मेजर ओ. सेंट जॉन तर १८६७ सालीं काझेरुन व बुशायर यांमधील पीरीझान खिंडींत सिंहाच्या तावडींतून थोडक्यांत बचावला. सर्व स्थिरस्थावर होऊन तारेचा व्यवहार सुरक्षितपणें चालू होत आहे तोंच महायुद्ध सुरू झालें. यामुळें पुष्कळ नव्याच आपत्ती उद्भवल्या. तारेचे बरेच विभाग शत्रूच्या ताब्यांत गेले तरी दुसऱ्या मार्गांनीं दळणवळण येथील अधिकाऱ्यांनीं मोठ्या शिताफीनें चालू ठेवलें. युद्धकार्यास बरीच मंडळी गेल्यामुळें तेथील अधिकारी वर्गच जरी दुबळा झाला होता तरी मेसापोटेमियांतील सैन्य व हिंदुस्थान यांमधील संबंध त्यानें तुटूं दिला नाहीं. एम्डेन जहाजानें हिंदुस्थानच्या किनाऱ्यालगतच्या समुद्रांतून धुमाकूळ घातल्यावर त्यानें कोकोज बेटावरील ईस्टर्न केबल स्टेशनचा नाश करण्याकरितां एक बोट पाठवून दिली. तेथील बिनतारी यंत्राची सामुग्री जर्मनांच्या दृष्टीआड अगोदरच केली होती, पण बिनतारी आकाशक (वायरलेस एरियल) लांबवितांना निराळीच युक्ति योजावी लागली. आकाशक हे टेनिसची जाळी अडकविलेले टेनिस कोर्टावरील खांब आहेत अशी जर्मनांची समजूत करून ते सोडून देण्याबद्दल त्यांचे मन वळविण्यांत आलें. पुढें याच आकाशकांच्या साहाय्यानें ऑस्ट्रेलियन क्रूझरला एम्डेनची वर्दी देण्यांत आली व त्याचप्रमाणें क्रूझरनें हल्ला करून एम्डेनला जलसमाधि दिली. इंडो-युरोपियन कंपनीच्या अधिकाऱ्यांचा शत्रूशीं अगदीं निकट संबंध आला होता. प्रसिद्ध जर्मन प्रसारक वॉसमस हा जर्मनीच्या पक्षाला इराणला आणण्याचा प्रयत्न करीत होता व त्याची प्रचार करण्याची पद्धति ठराविक नव्हती. तो या मार्गाच्या आसपास गनिमी काव्याचा लढाईप्रमाणें अनेक उलाढाली करीत असे. कंपनीचे पुष्कळ अधिकारी त्याच्या हातांत सांपडले; आणि त्यापैकीं मि. पेटिग्रू शत्रूच्या कैदेंतच आहराम येथे मरण पावला व मि. विल्कुनेल शिराझ् येथे आपली जागा लढवीत असतां कामास आला.

**विद्युत्संरक्षक (दंड)**—(लाइट्निंग कन्डक्टर). आकाशांतून पडणाऱ्या किंवा दिसणाऱ्या विजेपासून होणारे अपघात व नुकसान टाळण्याकरितां घरावर व गलबतावर जो एक अणकुचीदार दांडा बसविण्यांत येतो त्यास विद्युद्दंड किंवा विद्युत्संरक्षक असें म्हणतात. याच्या योगानें ढगांत असलेली वीज किंवा विद्युल्लता ही सरळ शांतपणें जमीन किंवा पाणी यांपर्यंत नेऊन सोडण्यांत येते. याचा शोध बेंजामिन फ्रॅंकलीन यानें इ. स. १७५२ मध्यें लावला. यामध्यें एक कल्हई लावलेला लोखंडाचा दांडा असून त्याला टोंकाशीं कांहीं अणकुचीदार अग्रें असतात व खालची बाजू तांब्याच्या जाड पट्ट्यांशीं जोडलेली असते आणि त्या पट्ट्या जमिनींत बऱ्याच खोलीवर नेऊन पाणी किंवा ओली जमीन यांशीं मिळविलेल्या असतात. याशिवाय विजेचीं यंत्रें, वगैरे यांचें संरक्षण करण्याकरितां एक निराळीच योजना केलेली असते, व ती बरीच भानगडीची असते. तीस विद्युद्वारक (लाइट्निंग ॲरेस्टर) असें म्हणतात.

**विद्युत्स्फुलिंग**—जेव्हां दोन वस्तूंमध्यें मोठ्या प्रमाणांत विद्युद्भार असतो तेव्हां त्या दोन विद्युद्वाहकांच्या मध्यंतरीं जें माध्यम असतें त्यांतून त्यांतील विद्युद्रोधकतेस न जुमानतां विद्युच्छक्ति एकत्र येऊन जो प्रकाश पडतो त्यास विद्युत्स्फुलिंग असें म्हणतात. उज्न आणि हर यांसारख्या वायूंच्या मिश्रणामध्यें जर असे विद्युत्स्फुलिंग पाडले तर रासायनिक संयोग उत्पन्न होतो. अशा तऱ्हेचा विद्युत्स्फुलिंग पडण्याकरितां दोन पदार्थांमध्यें जे अंतर असेल त्या योगानें त्या दोन पदार्थांवरील विद्युच्छक्तीच्या भारामध्यें अंतर असावें लागतें, व हे भारामधील अंतर त्या वायूंत जे घनविद्युत्कण असतील त्यांच्या प्रमाणावर अवलंबून असतें. सामान्यतः कांहीं निश्चित प्रमाणापर्यंत व्होल्टेज शक्ति असलेल्या विद्युद्भारामध्यें स्फुलिंग निर्माण होतात. हवेमध्यें विद्युत्स्फुलिंग पडण्यास सामान्यतः ३४० व्होल्ट शक्ति किमान असावी लागते.

**विध्रवाधन**—(जॉइन्चर). इंग्लंडच्या कायद्यांत या शब्दाचा आरंभीं अर्थ, नवरा आणि बायको यांच्या संयुक्त नांवानें पृथक् ठेवलेली मिळकत असा होता. नंतर या शब्दाचा अर्थ कायद्यानें फक्त बायकोच्या नांवानें ठेवलेली मिळकत असा ठरविला. ही मिळकत नवरा अगोदर वारल्यास बायकोच्या पोटगीकरितां तिला तिच्या नवऱ्याच्या पश्चात् मिळावी असा कायद्याचा हेतु होता. अलीकडे १९२५ सालीं 'ॲडमिनिस्ट्रेशन ऑफ इस्टेट्स ॲक्ट' या कायद्यानें आंदण देण्याची पद्धति नष्ट केली आहे, आणि नवरा व बायको यांच्या संयुक्त नांवावर असलेल्या मिळकतीवरचा हक्क (जॉइन्चर) नष्ट केला आहे.

पारशी, खिस्ती व मुसुलमानी कायद्यांतील वारसाक्रमांत विधवेला नवऱ्याच्या इस्टेटींत वारसाहक्क ठेवलेला आहे. हिंदु स्त्रियांसंबंधीं 'स्त्रीधन' लेख पाहा.

**विधवाविवाह**—हिंदु समाजांत पूर्वी विधवेच्या विवाहाला शास्त्राची अडचण नसे. विधवेला दुसरें लग्न करावयाचें असेल तर मृत पतीपासून संतति नसली म्हणजे तिनें आपल्या दिराशीं किंवा पतीच्या अगदीं जवळच्या नातलगाशीं लग्न लावावें पण तें संतति उत्पन्न करण्यासाठींच लावावें. हाच विधवाविवाहाचा प्रथम पाया होय. ही नियोगविवाहपद्धति ज्या वेळीं विधवेला पहिल्या नवऱ्यापासून एकहि मूल झालें नसेल अशाच वेळीं प्रचारांत येत असे. अद्यापिहि हिंदु समाजांतील अगदीं खालच्या जातींतून दिराशीं पाट लावण्याचा अग्रहक्क मान्य केलेला असतो. पण या पद्धतीला पुनर्विवाह असें नांव देतां येईल कीं नाहीं याबद्दल शंका आहे. कारण पुनर्विवाह करणारा दीर अगोदरच विवाहित असे. तरी पण एक गोष्ट निश्चित आहे कीं, मागाहून झालेल्या धर्मसूत्रग्रंथांत सामान्य विधवाविवाहाला शास्त्राची संमति मिळाली.

तथापि पुराणकालीं उच्च वर्णीयांत विधवेनें विवाह करणें गौण मानण्यांत येऊं लागलें. (पुनर्विवाह पाहा). इतकेंच नव्हे तर पति निवर्तल्याबरोबर त्याच्या प्रेताबरोबर सहगमन करणें (सती जाणें) हें परम धार्मिक व उच्च पातिव्रत्याचें लक्षण मानण्यांत येऊं लागलें. ब्रिटिश अमदानींत राजा राममोहन राय यांनीं खटपट करून सती जाण्यास कायद्यानें बंदी घालून टाकली. नंतर ईश्वरचंद्र विद्यासागर, केशवचंद्र सेन, वगैरे बंगाल्यांतील सुधारकांनीं विधवाविवाहाचा कायदा संमत करून घेतला.

विधवाविवाहाचा कायदा—(हिंदु विडोज रीमॅरेज ॲक्ट, १८५६). "हिंदु विधवांना हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें विवाह करण्याचा हक्क नाहीं. आणि एखाद्या विधवेनें विवाह केल्यास तिची संतति अनौरस आणि वारसाहक्काला अपात्र ठरते, ही विधवाविवाहाच्या बाबतींतील कायदेशीर हरकत दूर करावी अशी मागणी अनेक हिंदूंनीं सरकारकडे केली; आणि हिंदुधर्मशास्त्राच्या वचनांचा अर्थ बरोबर केला गेला नाहीं म्हणून त्या हरकती कायदा मंजूर करून नाहींशा कराव्या आणि ज्यांना हिंदु समाजांतील ही रूढि बदलून विधवाविवाहाची रूढि सुरू करावी असें वाटतें, त्यांच्या मार्गांतील कायदेशीर हरकती दूर करण्याकरितां, आणि असा कायदा केल्यानें हिंदु विधवांचें नैतिक आचरण चांगलें राहण्यास मदत होईल या कारणास्तव हा कायदा करण्यांत येत आहे," असें या कायद्याच्या प्रस्तावांत म्हटलें आहे. जिचा नवरा मयत आहे अशा हिंदु स्त्रीनें पुन्हां विवाह केला तर तो विवाह बेकायदा नाहीं, किंवा तिची संतति अनौरस मानली जाणार नाहीं (कलम १). विधवेनें पुन्हां विवाह केल्यावर तिला मयत नवऱ्याच्या मिळकतींत अनवलंबाचा हक्क, वारसाहक्क, किंवा नवऱ्याच्या वारसांच्या मिळकतींत असलेला हक्क, किंवा नवऱ्याच्या मृत्युपत्रांत दिलेला मिळकतीवरील हक्क प्राप्त होणार नाहीं (कलम २). पुन्हां विवाह केल्यावर त्या विधवेची पहिल्या नवऱ्याची मुलें असल्यास त्या मुलांचा पालक मयताचे आईबाप किंवा पुरुष नातेवाईक नेमावा, असा अर्ज केल्यास कोर्टानें तसा पालक नेमावा (कलम ३). अविवाहित हिंदु स्त्रीचे विवाहविषयी विधवाविवाहाला लागू मानावे (कलम ६).

ईश्वरचंद्र विद्यासागरादि बंगाली सुधारकांच्या चळवळीनें हिंदुस्थानांत सर्व प्रांतांतून विधवाविवाहाविषयीं मतप्रतिपादन होऊं लागलें व कांहीं तुरळक विवाहहि विरोधाला न जुमानतां पार पडले. मुंबईस पहिला पुनर्विवाह १८३५ सालीं गौड सारस्वत ब्राह्मण जातींत लागला. १८६५ सालीं कोंकणस्थ ब्राह्मण जातींत लागला. विष्णुशास्त्री पंडित हे या कार्यास जणुं वाहिलेले होते. त्यांना डॉ. भांडारकर, न्या. मू. रानडे, वगैरे पुढाऱ्यांचा पाठिंबा असे. पंडितांनीं पुनर्विवाहोत्तेजक मंडळी ही संस्थाहि चालविली होती. तेव्हां विधवाविवाहाचा संपर्क लागलेल्या मंडळींस वाळींत टाकण्याचेहि उपक्रम सनातन्यांनीं सुरू केले. नंतर प्रा. धों. के. कर्वे यांनीं आपल्या उदाहरणानें विधवाविवाहोत्तेजनाचा मार्ग सुकर केला. हळूहळू सुशिक्षितांत विधवाविवाहाविषयीं बरेंच अनुकूल मत तयार झालें व अशा विवाहित कुटुंबांवरील बहिष्कार अजीबात उठला. आज ही विधवाविवाहाची बाब वैयक्तिक मानण्यांत येऊं लागली आहे; तरी पण मोठ्या प्रमाणांत विधवाविवाह घडून येत नाहींत हेंहि तितकेंच खरें आहे.

**विंध्य पर्वत**—विंध्य पर्वताचा आरंभ गुजराथेंत होतो. पुढें मध्यप्रांताच्या सागर व दमोह जिल्ह्यांच्या उत्तरेकडून तो बाघेलखंड व रेवा संस्थान यांमधून जाऊन बिहारमध्यें संपतो. विंध्य व सातपुड्याचा मिलाफ नर्मदेच्या उगमाजवळ अमरकंटक येथें झालेला असून या डोंगराळ प्रदेशाचा व नर्मदा नदीचा देखावा कित्येक ठिकाणीं आल्हादकारक तर कित्येक ठिकाणीं अतिशय भयप्रद आहे. विंध्य पर्वताचा उत्तरकडील भाग झांशी, बांदा, अलाहाबाद व मिर्झापूर जिल्ह्यांतून जातो. याची उंची समुद्रसपाटीपासून २००० फुटांहून जास्त कोठेंहि नाहीं. विंध्य शब्दाचा अर्थ संस्कृतांत पारध असा असून या प्रदेशाचा विस्तार पौराणिक मतानुसार मध्यदेशापर्यंत झाला आहे. विंध्य पर्वताची एकंदर लांबी ७०० मैल आहे.

पूर्वी विंध्य पर्वताचीं शिखरें आकाशाला भिडलेलीं असत. पण विंध्याचा गुरु अगस्त्य हा दक्षिणेकडे निघाला असतां त्यानें विंध्याला बजावलें कीं, मी परत येईपर्यंत तूं पडून राहा. त्याप्रमाणें विंध्य नम्र झाला असतां दक्षिणेशीं उत्तरेचें दळणवळण सुरू

झालें, अशी पुराणांतरीं कथा आहे. यावरून अगस्त्यानें विंध्यावरून दक्षिणेकडे मार्ग सुरू केला असें वाटतें.

**विंध्यप्रदेश संघ**—या राजसंघांत बुंदेलखंड आणि बाघेलखंड यांतील सुमारें ३५ संस्थानांचा समावेश केला आहे. क्षे. फ. २५ हजार चौ. मै. असून लोकसंख्या सुमारें ३५ लक्ष भरते. संघराज्याचें उत्पन्न सु. ३½ कोटी रुपयांचें आहे. ता. ४ एप्रिल १९४८ रोजीं या संघाचें उद्घाटन झालें. रेवाचे महाराज या संघाचे प्रमुख आहेत.

**विंध्याचल**—संयुक्त प्रांतांत मिर्झापूरपासून ७ मैलांवर हे प्रसिद्ध तीर्थस्थान गंगातटाकीं आहे. रामायणांत याचें वर्णन आहे व रामचंद्राच्या सहवासानें हे पुनीत झालेलें आहे. येथे विंध्यानिवासिनी किंवा विंध्येश्वरी देवीचें देवालय आहे. हिच्या दर्शनास यात्रा लोटते.

**विनायकराव अमृतराव पेशवे** (१७९२–१८५६)—राघोबादादाचा दत्तक पुत्र जो अमृतराव त्याचा पुत्र. अमृतरावाची सात लाखांची नेमणूक यास पुढें चालू होती. दरसाल दीड लाख रुपये हा दाक्षिणेप्रीत्यर्थ खर्च करीत असे. याचा विवाह १८०२ रोजीं संगमनेर येथें झाला. प्रथम याचें वास्तव्य काशीस असे. सन १८२९ मध्यें हा बांद्यापासून ४५ मैलांवर पयोष्णी नदीजवळील कारवी येथें वाडा बांधून राहूं लागला. यास मैनाबाई नांवाची बहीण होती. यानें आपली मुलगी जोगांच्या घराण्यांत दिली होती. ख्रिस्ती धर्माबद्दल यास कुतूहल असून मिशनऱ्यांकरवी हा ख्रिस्ती धर्माबद्दलचीं वर्णनें ऐकत असे. १८५७ च्या शिपायांच्या बंडांत याचे मुलगे सामील असल्याचा सरकारला संशय येऊन त्यांची मालमत्ता जप्त केली व त्यांना बरेलीला नेऊन ठेवलें.

**विनायकी लिपि**—एक सांकेतिक लिपि. कन्नड येथील जुना ग्रंथसंग्रह चाळीत असतां त्यांत वैद्यकावरील कांहीं ग्रंथ विनायकी लिपींत लिहिलेले धुळ्याचे संशोधक गो. का. चांदोरकर यांस आढळले. हिच्यांत देवनागरींतील एका वर्णाऐवजीं निराळेंच एक सूत्रक चिन्ह ग्रहीत धरलें आहे. यामुळे हिच्यांतील वर्णांत व देवनागरींतील वर्णांत आकृतिसाम्य मुळींच नाहीं. संयुक्त वर्णांच्या बाचनींत या लिपीचें व पूर्वकालीन अशोक लिपींचें अथवा मोडीचें अत्यंत साम्य आहे. विनायकी लिपीचा चित्रपट भारत इतिहास संशोधक मंडळाच्या शके १८३४ च्या अहवालामध्ये दिला आहे.

**विनिपेग**—हें कानडा देशांतील, विस्तारानें क्रमांकानें महत्त्वाचें शहर, मॅनिटोबा या प्रांताची राजधानी असून रक्तनदी (रेड रिव्हर) आणि ॲसिनीबोइन या दोन नद्यांच्या संगमावर आहे. हें शहर कानडा देशाच्या मध्यमार्गी असल्यामुळें यास फार महत्त्व प्राप्त झालें असून, हे जगांतील एक सर्वांत मोठी धान्याची पेठ बनलें आहे. येथून गुरें, पीठ, चीज, लोंकर, इत्यादि मालाचा मोठा व्यापार चालतो. सर्व प्रकारचे कारखाने या शहरांत वाढत आहेत. १८७७ सालीं स्थापन झालेलें विद्यापीठ येथें आहे. लो. सं. (१९४१) २,२१,९६० आहे.

**विनिमय**—(एक्स्चेंज). दूरच्या गांवचें येणें देणें जें असेल त्याची विनिमयानें वासलात लावण्याची ही व्यापारी पद्धत आहे. मुंबईच्या एखाद्या व्यापाऱ्याला न्यू यॉर्क येथे खरेदी केलेल्या मालाबद्दल जर १,००० रुपये भरावयाचे असतील तर तो ज्या कोणा न्यू यॉर्कच्या व्यापाऱ्याला मुंबईस खरेदी केलेल्या मालाबद्दल तितके रुपये भरावयाचे असतील त्याचें देणें अडत किंवा पेढी यामार्फत मुंबईस विनिमयलेखानें फेडतो. न्यू यॉर्कचा व्यापारी याच्या सावकाराला अशाच पद्धतीनें पैसे भरतो; म्हणजे न्यू यॉर्कच्या धनकोला तेथीलच ऋणकोकडून पैसे मिळतात. तसेंच मुंबईलाहि होतें. यामुळे पैसे पाठविण्याचा मोठा खर्च व त्रास वांचतो. दोन व्यापाऱ्यांमध्यें हा जसा व्यवहार होतो तसाच दोन राष्ट्रांमध्येंहि होतो. अनेक अडत-पेढ्या असे विनिमयलेख खरेदी करतात व विकतात. रोजच्या रोज विनिमयाचे दर वृत्तपत्रांतून प्रसिद्ध होत असतात. त्यांवरून परदेशांत विकलेल्या मालाचे आपल्याला किती पैसे येतील याचा नक्की अंदाज मिळतो.

**विनिमय (परस्पर)**—(रेसिप्रोसिटी). आंतरराष्ट्रीय व्यापारामधील हें एक महत्त्वाचें तत्त्व आहे. दोन राष्ट्रांमधील व्यापारी आपापसांत व्यापारी संबंध ठरवितांना एकमेकांना विशेष हक्क किंवा फायदे देण्यासंबंधीं जे विशेष करार करतात, त्या परस्पर हिताच्या व्यापारी तत्त्वाला हे नांव आहे. अशा तऱ्हेच्या व्यापारांत एकमेकांना सवलती देणारा पहिला तह १८१५ सालीं ग्रेट ब्रिटन आणि अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें यांच्यामध्यें झाला, आणि त्या तहान्वयें व्यापारी माल-वाहतुकीच्या जहाजांसंबंधीं या दोन राष्ट्रांचे जे पूर्वीं निर्बंध होते, ते सैल करण्यांत आले. त्यानंतर १० वर्षांनीं या दोन राष्ट्रांनी संरक्षक जकातींच्या बाबतींत हेंच तत्त्व अमलांत आणून एकमेकांना सवलती देण्याचें ठरविलें. १८६० सालीं फ्रान्सबरोबर इंग्लंडतर्फे कॉब्डेननें जो व्यापारी तह केला, तो याच स्वरूपाचा होता. हिंदुस्थानची फाळणी झाल्यावर भारत आणि पाकिस्तान या दोन जवळच्या राष्ट्रांना हे तत्त्व अंगीकारणें भागच पडत आहे.

**विपाक**—(फर्मेंटेशन). किण्व किंवा खमीर (फर्मेंट) नांवाच्या विशिष्ट पदार्थांच्या साहाय्यानें सेंद्रिय (ऑर्गॅनिक) पदार्थांत बदल करण्याची क्रिया. या क्रियेंत वायुरूप पदार्थहि तयार होत असल्यामुळे पाण्यावर फेंस तयार होतो. इ. स. १८६० च्या सुमारास पाश्चरनें हे सेंद्रिय पदार्थांत होणारे बदल सूक्ष्म जंतूंच्या क्रियेमुळे होतात, असा शोध लावला. त्यानंतर अशा कांहीं क्रिया आढळून आल्या कीं, त्यांत उपयोगांत आणलेले पदार्थ सजीव

नसतात. ह्या निर्जीव पदार्थांना विपाकद्रव्य ( एन्झाइम ) असें नांव आहे. तेव्हां 'फर्मेंट' चे दोन प्रकार होतात : ( १ ) सजीव, व ( २ ) निर्जीव. सजीवांत बुरशी, यीस्ट आणि जंतू ( बॅक्टेरिया ) येतात. ह्यांपैकीं यीस्ट आणि बॅक्टेरिया ह्यांचा उपयोग होतो. बॅक्टेरियाची ( उ. सिझोमिसेटीस ) क्रिया विघटनात्मक आणि प्राणिदीकारक ( ऑक्सिडाइझिंग ) होते ; त्याच्या पुष्कळ्या जाती उद्योगधंद्यांत उपयोगी पडतात. दार्वम्ल ( ॲसेटिक ), दुग्धाम्ल ( लॅक्टिक ), घृताम्ल ( ब्युटिरिक ), वगैरे अम्लें तयार करण्यास ते ते विशिष्ट सूक्ष्म जंतू ( बॅक्टेरिया ) असतात. १००° शत. ला बॅक्टेरिया मरून जातात. यीस्ट ह्याचाहि उद्योगधंद्यांत पुष्कळ उपयोग होतो. विशेषतः मद्य तयार करण्यासाठीं ह्याचा विशेष उपयोग होतो. यीस्टच्या जातीवर तयार झालेल्या मद्याची चव अवलंबून असते. निरनिराळ्या देशांत निरनिराळ्या जातींची 'यीस्ट' वापरत असल्यामुळें दारूच्या चवीवरून ती कोणत्या देशांतील आहे, हें त्या धंद्यांतील निष्णात लोक सहज सांगू शकतात. यीस्टच्या क्रियेला उष्णतामान २८° ते ३४° शत. चांगलें असतें. ७५° शत. ला 'यीस्ट' नाश पावतें. वाळलेलें यीस्ट − १३०° शत. ते + १००° शत. पर्यंत जिवंत राहूं शकतें.

निर्जीव फर्मेंट किंवा एन्झाइम हा पाण्यांत विरघळणारा पदार्थ असून त्याचें क्रियासामर्थ्य वाढत्या उष्णतेबरोबर कमी होतें. ८०° शत. ला तें निर्जीव होतें. एन्झाइमचें मुख्य कार्य म्हणजे मोठ्या परमाणुसमूहाच्या पदार्थांतील भाग वेगळे वेगळे सुटे करणें. मनुष्याच्या लाळेंत एक विशिष्ट जातीचें एन्झाइम असतें व त्याच्यामुळें पचायला कठिण असलेले पदार्थांतील निरनिराळे भाग सुटे होऊन ते पचायला हलके होतात. एन्झाइमची क्रिया नुसती प्रेरकात्मक ( कॅटॅलिस्ट ) असते व त्यामुळें शेवटपर्यंत तें अबाधित राहतें. निरनिराळ्या कामांसाठीं निरनिराळ्या जातींचीं एन्झाइम वापरतात.

**विप्रनारायण** (१८ वें शतक–उत्तरार्ध)—एक मराठी कवि. हा यजुर्वेदी माध्यंदिन शाखेचा वसिष्ठगोत्री ब्राह्मण होता. महीपतीच्या भक्तलीलामृताच्या सत्तेचाळिसाव्या अध्यायांत नारायणभट्ट नामक एका साधूचें चरित्र दिलें आहे. नारायणभट्ट हा तापी नदीच्या तीरावर असलेल्या थाळनेर या गांवीं वास्तव्य करीत असे. विप्रनारायण हाहि तापी नदीच्या तीरावरच राहत असे. यावरून नारायणभट्ट व विप्रनारायण या व्यक्ती एकच असण्याचा संभव आहे. यानें जैमिनीकृत अश्वमेध पर्वाचें मराठींत ओवीबद्ध भाषांतर केलें आहे. खानदेशांतील हाताळें क्षेत्रांत याचे पूर्वज राहत असत. येथेंच यानें आपली ग्रंथरचना पुरी केली.

**विभागणी**—( डिस्ट्रिब्यूशन ). समाजांतील प्रत्येक व्यक्तीला जमीन, संपत्ति आणि श्रमफल कशा प्रमाणांत मिळावें हा सामाजिक नीतिन्याय आणि आर्थिक बाजू यांमधील विभागणी- संबंधींचा लढा फार तीव्र आहे. अर्थशास्त्रदृष्ट्या उत्पादनाचीं साधनें तीन : श्रम, भांडवल व जमीन. यांमध्यें कामासाठीं स्पर्धा चाललेली असते. श्रमाबद्दल पगार, भांडवलावर व्याज व जमिनीबद्दल थोडें भाडें याप्रमाणें मोबदला मिळत असतो. स्पर्धा असल्याशिवाय काम व्हावयाचें नाहीं व जास्त कामाला जास्त मजुरी द्यावी, किंवा मजुरांकडून कडक शिस्त ठेवून काम करून घ्यावें. एरवीं राष्ट्राची संपत्ति वाढणार नाहीं, असें अर्थशास्त्रज्ञांचें म्हणणें पडतें ; तर ध्येयवादी सांगतात कीं, सर्व विभागणी सारखी पाहिजे, एकाला कमी व दुसऱ्याला जास्त असें असतां कामा नये ; किंवा समाज असा बनविला पाहिजे कीं, त्यांतील प्रत्येकाला आपली गरज भागवितां आली पाहिजे व त्यासाठीं त्यानें आपल्या शक्तिबुद्धीप्रमाणें काम केलें पाहिजे.

**विभाजन**—( डिसोसिएशन ). एका पदार्थाचे दोन साधे पदार्थ तयार होण्याच्या क्रियेला विभाजन म्हणतात. कांहीं पदार्थांना उष्णता दिली म्हणजे ते भंगून त्यांतून दुसरे साधे पदार्थ तयार होतात. उदा., अमोनियम क्लोराइड ( नवसागर ) तापला म्हणजे उज्जहरिकाम्ल ( हायड्रोक्लोरिक ॲसिड ) आणि अमोनिया यांचें मिश्रण तयार होतें. हें मिश्रण निवूं दिलें म्हणजे पुन्हां अमोनियम क्लोराइड तयार होतो. विघटन ( डिकॉम्पोझिशन ) हें कायम स्वरूपाचें तर विभाजन हें तात्पुरतें असतें.

**विभाज्यत्व**—( डिव्हिझिबिलिटी ). एखाद्या पदार्थाचे किंवा वस्तूचे निरनिराळे भाग पडण्याची अथवा वेगवेगळे कण होण्याची जी शक्ति त्या पदार्थाच्या ठिकाणीं असते तीस विभाज्यत्व असें म्हणतात. अशा तऱ्हेची एखाद्या पदार्थाची अत्यंत सूक्ष्म विभागणी आपणांस अशक्य वाटेल इतकी करण्यांत येत असल्याचीं उदाहरणें आपणांस अनेक आढळतील. उदा., सूक्ष्मदर्शक यंत्राखालीं जे पदार्थ तपासण्याकरितां ठेवण्यांत येतात ते ज्या कांचांवर ठेवण्यांत येतात त्या कांचांवर इतक्या सूक्ष्म प्रमाणांत रेषा आंखलेल्या असतात कीं, त्यांमध्यें एका चौरस इंचाची २,२५,००० भागांमध्यें विभागणी केलेली असते. कापसाचा इतका सूक्ष्म धागा काढण्यांत येतो कीं, एक पौंड कापसाचा धागा १,००० मैलांपेक्षां अधिक लांबीचा भरतो. सोन्याचा वर्ख करतांना त्याचा पत्रा इतक्या सूक्ष्म प्रमाणांत कुटण्यांत येतो कीं, एक ग्रेन सोन्याचा तुकडा ५२ चौरस इंच इतक्या पृष्ठभागाचा बनतो व वर्खाची जाडी इतकी सूक्ष्म असते कीं, अशा वर्खांचीं ३,६७,६०० पानें एकावर एक ठेवावीं तेव्हां त्यांची जाडी एक इंच होऊं शकते. प्लॅटिनम या धातूची तार इतकी बारीक काढण्यांत येते कीं, तिचा व्यास एका इंचाचा तीस हजारावा अंश असतो. रेशमाच्या किड्यानें काढलेल्या धाग्याची जाडी एका इंचाच्या सुमारें पांच हजाराव्या अंशाइतकी असते. परंतु कोळ्यानें

काढलेल्या तंतूचा व्यास इंचाच्या तीस-हजारांश भाग असतो. कांहीं पदार्थांची कुटून किंवा घासून इतकी बारीक पूड करण्यांत येते कीं, तिचें मोजमाप करणें आपणांस फार कठिण जातें. तसेंच घन पदार्थांचा पृष्ठभाग हळूहळू घासून इतक्या सूक्ष्म प्रमाणांत क्षीण होत जात असतो कीं, अशा झिजणाऱ्या कणांचें मापन करणें अशक्य असतें. कांहीं लवणयुक्त पदार्थांचे द्रव व तसेंच कांहीं रंगयुक्त पदार्थांचे द्रव इतक्या सूक्ष्म प्रमाणांत पदार्थांची विभागणी करतात कीं, ती आपणांस असंभाव्य वाटते. मोर्चुदाचा एक ग्रेन घेतला तर त्याच्या योगानें पांच गॅलन पाण्यास अस्मानी रंग येऊं शकतो. अशा वेळीं मोर्चुदाच्या एक ग्रेन कणाचे एक कोटी विभागांमध्यें तरी विभजन व्हावें लागतें. सुवासिक पदार्थांचें विभजनहि असेंच फार मोठ्या प्रमाणांत व्हावें लागतें. कस्तुरीच्या एका ग्रेननें एका मोठ्या खोलींत २४ तासपर्यंत सुगंध पसरवितां येतो.

**विमा**—(इन्शुअरन्स). ठराविक पैशाचे हप्ते भरून मृत्यु, आग, अपघात, इ. मुळें होणाऱ्या नुकसानीची भरपाई करण्याची विमा ही एक पद्धत आहे. सामुद्रिक विमा हा इ. स. १००० या काळापासून सुरू आहे, असें दिसतें. जलपर्यटनांत जर जहाज बुडून नुकसानी झाली तर तिची भरपाई होत असे. आतां विमे निरनिराळ्या प्रकारचे झाले आहेत. आयुष्यहानि, आग, समुद्रावरची नुकसानी, हे तर आहेतच, पण यांखेरीज यंत्रांचे विमे, विमानविद्येचे, पिकांचे, गुरांचे, हवामानाचे, मुलांची विद्या होण्याचे किंवा विद्या बुडण्याचेहि (आजारपणामुळें), गवयांच्या गळ्याचे, नर्तकींच्या हातापायांचे, इ. किती तरी विमे आहेत. आयुष्याचा विमा ठराविक रकमेचा योजून त्याचे ठराविक हप्ते ठराविक मुदतीपर्यंत भरतात. विम्याची रक्कम मृत्यूनंतर किंवा ठराविक कालावधीनंतर मिळते. वय, स्त्रीपुरुषभेद, प्रकृति, धंदा यांचा विचार करून हे हप्ते ठरविण्यांत येतात. मृत्यूनंतर वारसांना विम्याची रक्कम मिळते. विमा कर्जाला तारण लावूनहि देतां येतो.

औद्योगिक विमा हा एक स्वतंत्र भाग असून त्यासंबंधीं स्वतंत्र कायदे आहेत. या विम्यासाठीं निराळ्या संस्था निघाल्या आहेत. अपघातासाठीं मोठ्या कारखान्यांतून मजुरांचे विमे असतात. मोटारी, विमानें यांचा विमा काढण्याची सरकारी सक्तीच असते.

हिंदुस्थानांतहि पाश्चात्य देशांतल्याप्रमाणेंच वरील कांहीं विम्यांचे प्रकार आहेत व अशा विमाकंपन्या तीनशेंवर आहेत.

आयुर्विम्याचे प्रकार—(१) आजीव (होल लाइफ)—जर एखादा मनुष्य हप्ते आजन्म भरीत राहिला तर विमा कंपनी त्याच्या मृत्यूनंतर ठराविक रक्कम त्याच्या नातलगास देण्याची जबाबदारी घेते. (२) परिमित भरणा (लिमिटेड पेमेंट्स)—हप्ते एका ठराविक मुदतीपर्यंत भरावयाचे व विमा उतरणारा मनुष्य जर ह्या मुदतीनंतर हयात असेल तर त्याचें विमापत्र (पॉलिसी) पुढें हप्ते न भरतांच चालू राहील. विम्याची रक्कम मात्र त्याच्या मरणानंतर मिळेल. (३) मुदतबंद (एन्डौमेंट)—विमा उतरणाऱ्यास त्याच्या हयातींतच ठराविक मुदतीनंतर पैसे मिळावयाचे. (४) हंगामी (टेंपररी)—विम्याची रक्कम विमेदाराच्या मृत्यूनंतर देण्यास कंपनी जबाबदार राहते, पण मृत्यु एका ठराविक मुदतींत आला तरच. या मुदतीनंतर विमेदार जगला तर कंपनी कांहीं देऊं शकत नाहीं. (५) शुद्ध मुदतबंद (प्युअर एन्डौमेंट)—एका विवक्षित मुदतीपर्यंत जर विमेदार जिवंत असेल तर कंपनी विम्याची रक्कम देण्यास बांधलेली असते. विमापत्रांत जर अशी अट असेल कीं, पॉलिसी परिणत (मॅच्युअर) होण्यापूर्वी विमेदारास मृत्यु आल्यास सर्व भरलेले हप्ते कंपनी परत करील तर त्या पॉलिसीला परतीची (विथ रिटर्न) म्हणतात. नसेल तर बिनपरतीची (विदाउट रिटर्न) म्हणतात. (६) दुप्पट मुदतबंद (डबल एन्डौमेंट)—ठराविक वर्षांच्या मुदतींत मृत्यु आल्यास विम्याची रक्कम देण्यास कंपनी जबाबदार आहे; पण त्या मुदतीनंतर जर विमेदार हयात असेल तर त्या रकमेच्या दुप्पट रक्कम विमेदारास देण्यास कंपनी जबाबदार असते. (७) विलंबित (डिफर्ड)—वैद्यकीय तपासणीशिवाय लहान मुलाचा विमा उतरतात. लहानपणीं विमा उतरल्यानें हप्ता हलका बसतो व मुलगा वयांत आल्यावर कंपनीची जबाबदारी चालू होते. या वेळीं मुलगा जरी अशक्त किंवा आजारी असला तरी लहानपणींच ठरलेला हलका हप्ता स्वीकारणें कंपनीस भाग पडतें. (८) संमीलित जीवन (जॉइंट-लाइफ) आजन्म किंवा मुदतबंद दोन किंवा अधिक माणसांच्या आयुष्याचा संयुक्त विमा—नवरा-बायकोचा किंवा भागीदारांचा अशा पद्धतीनें विमा उतरतात. सगळे विमेदार हयात असेपर्यंत हप्ते भरावयाचे असतात. त्यांपैकीं एक मृत्यु पावल्यास, इतरांना विम्याचे पैसे मिळतात. (९) न्यूनऋणभाग (हाफ प्रीमियम)—ज्यांना विमा उतरण्याची इच्छा आहे, पण मोठा हप्ता भरण्याची स्थिति नाहीं, अशा लोकांना या पद्धतीनें विमा उतरतां येईल. पहिल्या ५ किंवा १० वर्षेपर्यंत हप्ता हलका बसतो, व पुढें वयाला अनुसरून जो हप्ता ठरलेला असतो तितकाच जवळजवळ भरावा लागतो. (१०) अर्धऋण (हाफ क्रेडिट)—पहिलीं ५।१० वर्षें कमी हप्ता भरावा लागतो व प्रत्येक हप्त्यापैकीं कांहीं रक्कम या मुदतींत पॉलिसीवर कर्ज म्हणून बाजूस ठेवून विम्याची रक्कम परत द्यावयाच्या वेळीं कंपनी ती वजा करून घेते. (११) सदायित्व अभिरुचिप्रमाण (गॅरंटीड ऑप्शन)—यामध्यें लिमिटेड पेमेंट होल लाइफ व प्युअर एन्डौमेंट विदाउट रिटर्न या दोन्ही पद्धतींचें मिश्रण असतें. (१२) अनुजीविताधिकार (सर्व्हायव्हरशिप किंवा कॉन्टिंजेन्ट)—यामध्यें विम्याची रक्कम

विमेदाराच्या मृत्यूनंतर मिळावयाची; पण विमेदारानें उल्लेखिलेल्या दुसऱ्या माणसाच्या हयातींत जर विमेदार मरण पावला तरच ती रक्कम मिळते. तो उल्लेखिलेला मनुष्य जर विमेदाराच्या आधीं मृत्यु पावला तर विमेदारास रक्कम मिळत नाहीं.

एखाद्या कंपनीनें विमा उतरण्यापूर्वी पुढील गोष्टींबद्दल विमा उतरणारानें आपलें समाधान करून घेतलें पाहिजे— (१) कंपनीचा कारभार व व्यवस्था तज्ज्ञांच्या हातीं असली पाहिजेत. (२) कंपनीच्या डायरेक्टरांपैकीं कांहीं विमेदारांनीं निवडलेले असावे. (३) कंपनीच्या लाइफ फंडाचें विम्याच्या रकमेशीं योग्य प्रमाण पाहिजे. (४) कंपनीनें सुरक्षित ठिकाणीं व फायदेशीर होईल अशा तऱ्हेनें रक्कम गुंतविली असली पाहिजे. (५) मूल्यगणन (व्हॅल्युएशन) योग्य तऱ्हेचें पाहिजे. (६) हप्त्याच्या उत्पन्नाशीं वटखर्चाचें प्रमाण योग्य असलें पाहिजे. (७) पॉलिसीच्या अटी कडक नसाव्या. मृताच्या वारसांना पैशाची पोंच कंपनीकडून तत्परतेनें व तावडतोब झाली पाहिजे.

**विमान**—विमान हें एक हवेमध्यें उडणारें वाहन असून त्याची उडण्याची गति व शक्ति त्यास असलेल्या पंखाच्या साहाय्यानें मिळत असते. विमान उडत असतांना त्याचे पंख हवेस

वात-नौकेचा छेद

खालीं दाबीत असतात व ते हवेंत तरंगत राहतात. ह्या पंखांमध्यें मुळापासून शेपटीपर्यंत बांक असतो. म्हणजे त्यांचा मध्य उंच असून दोन्ही टोंकें खालीं वांकलेलीं असतात. व ते क्षितिजसमांतर पातळींत पण ० ते ४ अंशांचा कोन करून बसविलेले असतात. या कोनास आगमकोण (ॲंगल ऑफ इन्सिडेन्स) असें म्हणतात. जेव्हां विमानाला पंखाच्या साहाय्यानें गति दिली जाते तेव्हां पंखाच्या पुढील भागास हवेचा आघात होतो, आणि त्या हवेचे दोन विभाग होऊन एक पंखाच्या वरील बाजूस व दुसरा खालच्या बाजूस त्याच्या पृष्ठभागाशीं जाऊन घासूं लागतो. परंतु त्यांपैकीं खालचा प्रवाह थोडा कोन करून अधिक खालच्या दिशेनें वाहूं लागतो; त्यामुळें त्याची प्रतिक्रिया होऊन पंख वर उचलला जातो. वरचा प्रवाहहि कांहीं अंतरापर्यंत थोडा वरच्या बाजूस झुकतो. यामुळें मध्यंतरींच्या भागांत वातप्रवाहभंग किंवा एक प्रकारचा भोंवरा उत्पन्न होतो, व त्यामुळें विरुद्ध दिशेचा दाब उत्पन्न होऊन विमान वर ओढलें जातें. ही गोष्ट प्रथम सर हिरॅम मॅक्झीम यानें शोधून काढली. परंतु जी. एफेल या शास्त्रज्ञानें प्रथम खालच्या पृष्ठभागावरील धनदाब आणि वरच्या पृष्ठावरील ऋणदाब यांचे परिणाम मोजून काढले व त्यावरून त्यास असें आढळून आलें कीं, आकाशयान जें वर उचललें जातें त्यामध्यें $\frac{3}{4}$ परिणाम या ऋणदाबाकडून घडून येतो. याखेरीज या पंखाकडून आकाशयानाच्या गतीस एक प्रकारचा प्रतिबंध उत्पन्न होतो. त्यास 'ओढ' (ड्रॅग) असें म्हणतात. या उचलण्याच्या क्रियेमध्यें आणि ओढीमध्ये जें प्रमाण असतें त्यावरून आकाशयानाच्या पंखांची कार्यशक्ति मोजतां येते. उत्तम प्रकारें बांधलेल्या विमानाच्या पंखाच्या कार्यशक्तीचें प्रमाण $\frac{\text{उचल}}{\text{ओढ}}$ हें ४° अंशांचा आगमकोण असतांना सुमारें १६ असतें. म्हणजे ओढीच्या १६ पट उचलण्याची शक्ति असते. पंखाची वाऱ्याच्या दिशेस काटकोन करणारी जी रुंदी असते तिला 'ताण' (स्पॅन) असें म्हणतात. आणि पुढील भागापासून मागील भागापर्यंत जी रुंदी असते तिला 'ज्या' (कॉर्ड) असें म्हणतात. या दोहोंमधील प्रमाणास 'दर्शनी प्रमाण' (ॲस्पेक्ट रेशिओ) असें म्हणतात. आकाशयानाचे महत्त्वाचे भाग म्हटले म्हणजे पंख, शरीर, पुच्छ आणि वाहन हे होत. हल्लीं प्रचारांत असलेल्या बहुतेक आकाशयानांस दुहेरी पंख असतात. म्हणजे एक पंखांची जोडी वरच्या बाजूस असून तिला जोडलेली दुसरी जोडी खालच्या बाजूस असते.

आकाशयानास प्रथम पंख्याच्या साहाय्यानें गति मिळून तें जमिनीवर चालूं लागतें व ही गति सुमारें ३५ ते ५० मैलांपर्यंत वाढली म्हणजे आकाशयानास स्वतः हवेंत तरंगण्याइतकी शक्ति उत्पन्न होऊन तें जमिनीपासून वर उचललें जातें. एकदां हवेंत चालू झाल्यावर त्यास उचालकांच्या (एलेव्हेटर्स) साहाय्यानें वर किंवा खालीं येण्याची गति देतां येते. आकाशयानाची गति एका सुकाणूच्या साहाय्यानें नियंत्रित केली जाते व हें सुकाणूं पायानें एका दांड्यावर कमी-जास्त भार घालून चालवितां येतें. पंखांच्या टोंकाशीं असलेल्या झडपांच्या साहाय्यानें विमानाचा तोल सांभाळण्यांत येतो. उत्तम प्रकारें बांधलेलें आकाशयान एंजिन बंद झालें असतां आपोआप संचारण (ग्लायडिंग) कोन करून जमिनीकडे येऊं लागतें. हा कोन पुढें जाणारी गति आणि खालीं येण्याची

गति यांच्या प्रमाणावर अवलंबून असतो व तें प्रमाण १ : १२ पासून १ : १४ हें असतें.

आकाशयान जमिनीवर असतां पंखाचें वजन 'उतार तारा' ( लँडिंग वायर्स ) तोलून धरतात, आणि 'उडत्या तारा' ( फ्लाइंग वायर्स ) तें उडूं लागलें असतां त्यास वर दुमडूं देत नाहींत. तसेंच 'प्रवाह तारा' ( ड्रिफ्ट वायर्स ) यांच्या योगानें आकाशयान उडत असतांना हे पंख मागच्या बाजूस मिटले जात नाहींत. समुद्रावर उतरणाऱ्या व समुद्राच्या पृष्ठभागापासून वर उडणाऱ्या 'आकाशयानास' समुद्रयान (सीप्लेन) असें म्हणतात. प्रारंभीं समुद्रयानास चाकांच्याऐवजीं तरते (फ्लोट्स) जोडलेले असत. परंतु नवीन तऱ्हेचीं समुद्रयानें जमिनीवर उतरूं शकतात आणि जमीन किंवा समुद्र यांपासून वर उडूं शकतात. त्यांचीं चाकें, कमानी, वगैरे साध्या आकाशयानासारख्या असतात. युद्धनौकाबरोबर अशा तऱ्हेचीं समुद्रयानें ठेवलेलीं असतात.

विमान कसें चालतें.—मोटार वळविण्यासाठीं जसें स्टिअरिंग व्हील ( सुकाणूं चाक ) असतें तसेंच विमान वळविण्यासाठीं एक काठी असते व ती फारच नाजूक असते. जात्याचा खुंटा जसा हातानें धरतात तशी ती धरावी लागते. ही काठी हाताळतांना थोडासा धरसोडपणा केला तर विमान एकदम वळतें किंवा बाजूस तरी कलतें. काठी आपल्याकडे ओढली म्हणजे विमान वर चढूं लागतें व पुढें ढकलली म्हणजे खालीं उतरूं लागतें. उजव्या बाजूस ओढली तर विमानाची उजवी बाजू कलते व डाव्या बाजूस ओढली तर डावी बाजू कलते. उजवें सुकाणूं ( रडर ) पायानें पुढें ढकललें म्हणजे विमान उजव्या बाजूकडे वळतें व डाव्या बाजूकडे ढकललें म्हणजे डावीकडे वळतें.

विमान मोटारीप्रमाणेंच जमिनीवर दर ताशीं ४५ मैलांच्या वेगानें धांवूं लागलें म्हणजे तें हवेंत तरंगूं लागतें. विमान जेव्हां जमीन सोडतें तेव्हां काठी किंचित् आपल्याकडे ओढावी म्हणजे तें हळूहळू वर चढत जातें. विमान वर चढत असतांना तें अगदीं सरळ रेषेंत चालवावें लागतें. वांकडें झाल्यास अथवा वळविण्याचा प्रयत्न केल्यास धोका खात्रीनें होण्याचा संभव असतो. वर चढवितांना व खालीं उतरवितांना चालविणाऱ्याला फार काळजी घ्यावी लागते. एखादा पेंचखिळा (स्क्रू) लांकडामध्यें, त्याच्या डोक्यावरील खाचांत पेचकस बसवून फिरविल्यास तो जसा आंत घुसतो, तद्वतच विमानांतील असलेल्या एंजिनच्या दांड्या-( शाफ्ट )ला समोरच्या बाजूस एक मळसूत्री पंखा ( स्क्रू प्रॉपेलर ) बसविलेला असतो, आणि हा पंखा पाहिजे तेवढ्या गतीनें फिरविला म्हणजे तो हवेंत घुसून विमान अधांतरीं उडूं लागतें. विमान हवेमध्यें उडविण्यासाठीं ताशीं ४० मैलांच्या वेगानें विमान चालवावें लागतें. ह्यापेक्षां कमी वेगानें चालविल्यास विमान उडणार नाहीं. विमानाचें नाक म्हणजे समोरील बाजूचे प्रॉपेलर (पंखा) हवेंत पुढें सरकत जातें व तें जेव्हां वेगानें पुढें धांवूं लागतें तेव्हां हवेच्या योगानें तें उचललें जातें आणि उडूं लागतें; आणि ह्यालाच बलसमांतरचतुर्भुज ( पॅरेलेलोग्राम ऑफ फोर्सेस ) सिद्धान्ताप्रमाणें विमान उडतें असें म्हणतात. विमान जमिनीवरून वर नेण्यापेक्षां वरून जमिनीवर आणणें फार कठिण आहे; तें तसें आणतांना विशेष काळजीपूर्वक चालवून इंग्रजी एस् अक्षराच्या आकाराचे वर्तुळाकार वळसे घेत घेत व संचरणकोण ( ग्लाइडिंग ॲंगल ) साधत साधत आणलें पाहिजे. नाहींपेक्षां धाडकन् जमिनीवर आपटण्याचा संभव असतो. कदाचित् एखाद्या प्रसंगीं विमानांतील एंजिन बंद पडलें तर फारच मोठा धोका होण्याचा संभव आहे. तथापि वर निर्देश केल्याप्रमाणें वर्तुळाकार वळसे घेत घेत व संचरणकोण साधत येतायेतां आपण गेल्यास सुरक्षित रीतीनें जमिनीवर आणतां येतें.

विमान चालविण्याचे ४।५ प्रकार आहेत ते येणेंप्रमाणें :—

( १ ) स्टीप टर्न ( चढें भ्रमण ) :—विमानाचें नाक म्हणजे समोरची बाजू क्षितिजाकडे नेहमीं ठेवून डावी बाजू जमिनीकडे व उजवी बाजू आकाशाकडे कलती अशा स्थितींत विमान चालविणें.

( २ ) लूपिंग (कोलांटी) :—विमान आकाशांत उडवीत असतांना कोलांटी उडी घेणें. लूपिंग घेतांना विमानाचा वेग ताशीं १०० मैलांप्रमाणें ठेवावा लागतो. मात्र हा वेग कमी झाला म्हणजे धोक्याची भीति असते. गोफणींतील दगड जोरानें गोल फिरविला म्हणजे दगड खालीं न पडतां गोफणींतच राहून जसा फिरत असतो तद्वतच विमान आकाशांत गोफणीसारखें गोल अतिशय वेगानें फिरवितां येतें. लूपिंग घेतांना विमान वर-खालीं नेण्यासाठीं जी काठी असते ती फार सावधगिरीनें वर-खालीं अथवा मार्गे-पुढें करावी लागते; कारण तिच्या चालविण्यावर विमानाची गति व वर-खालीं जाणें अवलंबून असतें. काठी आपल्याकडे लवकर व फार ओढली तर विमानाचा वेग कमी होऊन वर चढणार नाहीं व धोका होईल.

( ३ ) रोलिंग ( लोळणें )—विमानाचें नाक नेहमीं क्षितिजाकडे ठेवून विमानाच्या पंखयानें वर्तुळाकृति आकाशांत लोळणें.

( ४ ) स्पिनिंग ( गिरकी घेणें )—लोळतांना विमानाचें टोंक नेहमीं जमिनीकडे ठेवणें.

( ५ ) उलटें उड्डाण :—डोकें खालीं व पाय वर होणें. कंबरपट्टा बांधल्यामुळें आपण खुर्चीवर टांगलें जातों.

विमान उडत असतांना जे अपघात होतात त्यांपैकीं शेंकडा नव्वद अपघात अचानक गति कमी झाल्यामुळें होतात. विमानाची गति ताशीं ४० मैलांपेक्षां कमी असूं नये. आणि कमी झाली तर विमान हवेंत तरंगूं शकत नाहीं. विमान वर ताशीं ८० मैलांच्या

वेगानें चालत असलें व सोसाट्याचा वारा समोरून आला तर विमानाचा वेग नकळत कमी होतो. एखाद्या वेळीं विमानांत लावलेल्या वेगमापका( स्पीडोमीटर )कडे जर लक्ष नसलें तर वेग कमी झाल्याबरोबर विमान जमिनीकडे धांव घेऊं लागतें. क्वचित् प्रसंगीं जमिनीवर धाडकन् आपटतें.

इतिहास—पक्ष्याप्रमाणें मागूस उडेल व माणसांना वाहून नेणारीं विमानासारखीं वाहनें तयार करतां येतील अशा कल्पना सर्व राष्ट्रांतून फार प्राचीन काळापासून आढळतात. पण त्या प्रत्यक्ष कृतींत आल्या असतील कीं नाहीं याविषयीं विचारी माणसाला शंका वाटते. एवढें खरें कीं, शास्त्रीय शोधांचा कल या बाजूस कित्येक शतकांपासून होता. पक्षी जसे पंखांनीं उडतात त्याप्रमाणें कांहीं साधनें करून पंखांचीं विमानें प्रथम कांहीं शास्त्रज्ञांनीं केलीं. लिओनार्डो डा व्हिन्ति हा साहित्यिक कलावंत यांपैकीं एक होता. तेराव्या शतकांत रॉजर बेकन व पुढील कांहीं शतकांतील रॉबर्ट हूक (१६६४), फ्रॅन्सेस्को द लाना, वगैरे शोधकांनीं 'हवेपेक्षां हलकें' यंत्र तयार करण्याच्या युक्त्या योजल्या. त्याप्रमाणें १७८३ मध्यें फ्रान्समधील एका गांवीं पहिलें वायुविमान (बलून) उडविण्यांत आलें. हें आकाशांत दहा मिनिटें होतें. यांत मॉंटगोल्फएर बंधूंनीं उष्ण हवा भरली होती व तें हलकें केलें होतें. १७६६ त उज्ज वायूचा हवेपेक्षां हलका म्हणून शोध लागल्यावर तो वायु भरून विमानें उडविण्यांत येऊं लागलीं. अशा 'हवेपेक्षां हलक्या' विमानांतून माणसेंहि वर उडूं लागलीं. याप्रमाणें विमानानें प्रथम इंग्लिश चॅनेल-खाडी १७८५ मध्यें डॉ. जेफ्रीसनें ओलांडली. एकोणिसाव्या शतकांत वाफेच्या शक्तीनें विमान चालविण्याचे प्रयोग सुरू झाले. झेपेलिनचें नांव या बाबतींत प्रसिद्ध आहे.

आजच्यासारखें विमान तयार करण्याचा शोध सर जॉर्ज केले यानें १८०९ सालीं लावला. त्याबरहुकूम विमान १८४२ सालीं इंग्रज कारागिरांनींच तयार केलें (तें अद्यापि साउथ केन्सिंग्टन म्यूझियममध्यें पाहावयास मिळतें). पुढें द्विपक्ष (बायप्लेन) पतंगनौका (ग्लायडर) अमेरिकेच्या राइट बंधूंनीं माणूस बसवून चालवून दाखविल्या व यांत यश आलेलें पाहून १९०३ सालीं पेट्रोल मोटार या नौकेंत बसविली. यानंतर अशा विमानांचीं उड्डाणें युरोप-अमेरिकेंत सुरू झालीं. मागच्या पहिल्या युद्धांत तर या विमानांना फार तेजी आली व त्यांनीं शतकृत्यें केलीं. उत्तर आणि दक्षिण अॅटलांटिक महासागर ओलांडण्याचे विक्रम लिंडबर्गसारख्या धाडशी शिपायांनीं केले. यांत बरेच कामासहि आले. उत्तर ध्रुव प्रदेशाचें संशोधन या विमानांनीं फार सुलभ झालें. इंग्लंड ते ऑस्ट्रेलिया हा प्रवास इतकेंच नव्हे तर पृथ्वीप्रदक्षिणा जलद करतां येऊं लागल्या. आज ७५ तासांत अखंड पृथ्वीप्रदक्षिणा करण्याचा विक्रम पाहून मन थक्क होतें.

आगगाड्या आणि बोटी यांच्यापेक्षां जलद जाण्याचें साधन म्हणून विमानांचा सर्रहा उपयोग आज होत आहे. टपाल विमानानें जातें व दूरचा परदेशाचा प्रवास तर विमानमार्गानें कांहीं तासांत करतां येऊं लागला आहे.

विमानतळ—विमानें ज्या ठिकाणीं येतात व जेथून जातात ती जागा व तेथील इमारती. या तळाला विमान-स्टेशन म्हणतां येईल. या विमानतळावर बहुधा एक हँगर-विमानें ठेवण्याची जागा व विमानदुरुस्तीचा कारखाना असतो. आधुनिक विमानतळावर नीट आंखलेले व खुणांच्या दिव्यांनीं प्रकाशित असें विमानें उतरण्याचें मैदान, विमानें ठेवण्याचे गाळे, विमानदुरुस्तीचा कारखाना, सामानाची कोठी, बिनतारी यंत्रें, इ. गोष्टी पाहावयास मिळतात. उतारू जात-येत असल्यानें एक जकात-नाकें ठेवलेलें असतें. तसेंच उतारूंसाठीं बसण्याच्या जागा, फराळाचीं दुकानें, कचेऱ्या, नोकरांना राहण्याचे बंगले, वगैरे या तळावर असतातच.

सरकारी विमानखात्याची यावर देखरेख असते. महायुद्धानंतर बरेच विमानतळ बांधण्यांत आले. आतां प्रवासासाठीं विमानांचा मार्ग तयार केला गेल्यामुळें हे विमानतळ आगगाड्यांच्या स्टेशनांप्रमाणें आवश्यक झाले आहेत. लंडन येथील क्रॉयडॉन विमानतळ सर्व सोयींनीं सज्ज आहे. आंतरराष्ट्रीय विमानतळ फार व्यवस्थित ठेवावे लागतात. मुंबईस सँटाक्रूझ येथें असा तळ तयार केला आहे. दिल्लीचा पालम-तळ चांगला आहेच. कलकत्ता येथील डमडम-तळाला असेंच आंतरराष्ट्रीय महत्त्व आहे.

राज-वैमानिक दल (रॉयल एअर फोर्स)—रॉयल फ्लाइंग कोअर १९१२ सालीं अस्तित्वांत आलें, आणि १९१८ सालीं यावर आणि रॉयल नेव्हल एअर सर्व्हिसवर नियंत्रण ठेवण्याकरितां स्वतंत्र विमानमंत्र्या( एअर मिनिस्टर )चें खातें निर्माण करण्यांत आलें. नंतर हीं दोन्ही प्रकारचीं दलें एकत्र करून त्यांना 'रॉयल एअर फोर्स' असें नांव देण्यांत आलें आणि तें एअर कौन्सिलच्या ताब्यांत देण्यांत आलें. या कौन्सिलचा अध्यक्ष विमानमंत्री असतो. या वैमानिक दलांत रॉयल एअर फोर्स, एअर फोर्स रिझर्व्ह, एअर फोर्स स्पेशल रिझर्व्ह, ऑक्झिलियरी एअर फोर्स आणि टेरिटोरियल एअर फोर्स इतक्यांचा समावेश होतो. १९२८ सालीं या दलांत ३३ हजार इसम होते. याशिवाय हिंदुस्थानांत निराळें वैमानिक दल होतें. वैमानिक दलाच्या प्रत्येक स्क्वॉड्रनमध्यें १२ विमानें असतात. १९२७ सालीं आर्. ए. एफ्. मध्यें ६५ स्क्वॉड्रन होते. क्रॅनवेल येथें एअर फोर्स कॅडेट कॉलेज आहे आणि अॅन्डोव्हर येथें स्टाफ कॉलेज आहे. हॉल्टन येथें चीफ ट्रेनिंग डेपो आहे. शिवाय गोलंदाजी, विमानविद्या, फोटोग्राफी, इत्यादि शिक्षणाच्या शाळा आहेत. वैमानिक दलांत पुढील अधिकारी असतात : रॉयल एअर फोर्स मार्शल, एअर चीफ

मार्शल, नंतर एअर मार्शल, एअर व्हाइस मार्शल, एअर कॉमोडोर, ग्रुप कॅप्टन, व्हिंग कमांडर, स्क्वॉड्रन लीडर, फ्लाइट लेफ्टनंट, फ्लाइंग ऑफिसर अगर आब्झर्व्हर आणि पायलट ऑफिसर.

हिंदुस्थान—१९३३ सालीं हिंदुस्थानांत 'इंडियन एअर फोर्स' दल निघालें. आरंभीं हें लहान होतें, पण पुढें दुसऱ्या महायुद्धांत तें बरेंच वाटलें व १९४५ सालीं 'इंडियन' या संज्ञेमागें 'रॉयल' संज्ञा वापरण्याचा बादशहाकडून मान मिळाला. भारत स्वतंत्र झाल्यावर 'रॉयल' बद्दल 'नॅशनल' शब्द घालण्यांत आला. काश्मीर आणि हैद्राबाद यांवरच्या मोहिमांत या दलानें चांगलें शौर्य दाखविलें. तेव्हां भारत सरकारनें हे दल जास्त सामर्थ्यवान् व संपन्न करण्याची योजना आंखली. या दलांत तरुणांनीं शिरण्याबद्दल सरकारनें प्रचार सुरू केला. कोईमतूर, जोधपूर व अंबाला या ठिकाणीं त्यांच्या शिक्षणाची चांगली सोय केली. वैमानिकांना परदेशांत पाठवून त्यांच्या शिक्षणाची पूर्तता करण्यांत येते. आतां भारतीय वैमानिक दलांत पांच-सातच युरोपियन अधिकारी असतील. या दलांतील सर्व चिन्हेंहि परदेशी टाकून नवीन योजिलीं आहेत.

**वियोगभत्ता**—(सेपरेशन अलावन्स). जेव्हां शिपाई, वैमानिक आणि नाविक प्रत्यक्ष लढाईच्या कामांत गुंतले असतात तेव्हां त्यांच्या बायका-मुलांना सरकार ठराविक भत्ता देत असते. याला हल्लीं 'विवाहभत्ता' असें नांव आहे. राहणीच्या खर्चाप्रमाणे या भत्त्याची रक्कम देण्यांत येत असते. पण बायकोचा भत्ता दर आठवड्याला सात शिलिंगापेक्षां केव्हांहि कमी नसतो. सैन्यांतील माणसाच्या वयाला २६ वर्षें पुरीं असल्याखेरीज हा भत्ता देण्यांत येत नाहीं. सैनिकांच्या मुलांना हा चौदा वर्षें वयाचीं होईपर्यंतच मिळतो.

**विरजणाचें अम्ल**—(रेनेट). चीज तयार करतांना दूध नासविण्यासाठीं उपयोगांत येणारा द्रवरूप पदार्थ. ह्यांत प्रामुख्यानें रेनीन आणि पेप्सीन हीं दोन आसवकें किंवा विपाकद्रव्यें (फर्मेंट्स) असून त्यांच्या जोडीला मीठ, बोरिक अम्ल, वगैरे पदार्थ असतात.

**विरमगांव**—मुंबई, अहमदाबाद जिल्ह्यांतील एक तालुका. क्षे. फ. ६७५ चौ. मैल. लो. सं. (१९४१) १,४७,२१०. तालुक्यांत तीन मुख्य शहरें (विरमगांव, मंडल व पात्री) असून खेड्यांची संख्या १५६ आहे. एकंदर क्षेत्रफळाच्या अर्ध्याहून जास्त क्षेत्रफळ तालुकदारांपैकीं असून जंगली वस्ती कोळ्यांची आहे. विरमगांव हें तालुक्याचें मुख्य ठिकाण असून बी. बी. सी. आय्. रेल्वेच्या वढवाण फांट्यावर हें रेल्वे स्टेशन आहे. लो. सं. सुमारें २८,०००. या ठिकाणीं कापसाचा व अळशीचा व्यापार मोठ्या प्रमाणांत चालतो. म्यु. कमिटी १८५७ सालीं स्थापन झाली. पाण्याचा पुरवठा मनसर तलावापासून होऊन धरणाच्या आसपास लहानशींच पण प्रेक्षणीय अशी पुष्कळ देवळें आहेत. या ठिकाणीं एक कापडाची गिरणी, जिन व प्रेस हीं आहेत.

**विराट**—पूर्व मत्स्य देशाचा राजा. कैकेय राजाची कन्या सुदेष्णा ही याची स्त्री असून तिचा भाऊ महाबलाढ्य कीचक हा याचा सेनापति होता. विराटास शंख, श्वेत व उत्तर असे तीन मुलगे असून उत्तरा नांवाची एक कन्या होती. या राजाच्या घरींच पांडव अज्ञातवासांत असतांना राहिले होते. पांडवांच्या अज्ञातवासानंतर उत्तरेचा अभिमन्यूशीं विवाह झाला. भारतीय युद्धांत विराट पांडवांकडेच होता. जयद्रथवधानंतरच्या रात्रीं झालेल्या युद्धांत द्रोणाच्या हातून यास मरण आलें. मत्स्य देशाची राजधानी विराट नगरीच होती.

**विरामचिन्हें**—लिहिलेलें वाचण्यास व अर्थ समजण्यास सुलभ जावें म्हणून पाश्चात्य भाषांतून प्रथम हीं चिन्हें वापरण्यांत येऊं लागलीं. छापण्याची कला निघाल्यापासून हींत बरीच सुधारणा होत गेली. आपल्या संस्कृत पोथ्यांतून फक्त एक-दोन उभ्या रेषा विरामचिन्हासाठीं असतात. महानुभाव पोथ्यांतून 'कोलन'-प्रमाणे उभीं दोन टिंबें (:) आढळतात. आज स्वल्पविराम (,); अर्धविराम (;); द्विबिंदुचिन्ह (:); पूर्णविराम (.); प्रश्नचिन्ह (?); उद्गारचिन्ह (!); योगचिन्ह (-); कंस (( )); अवतरणचिन्हें (' '); इ. चिन्हें वापरण्यांत आहेत.

**विरूपाक्ष** (१६ वे शतक-उत्तरार्ध)—एक कानडी कवि. हा सिद्धवीरेशाचा शिष्य असून यानें 'चन्नबसवपुराण' नामक एक ग्रंथ लिहिला आहे. हा ग्रंथ अनेक राजे व कवी यांचा कालनिर्णय निश्चित करण्याच्या कामीं अत्यंत उपयुक्त असा आहे. या कवीचें भाषाशुद्धि व छंद यांकडे लक्ष कमी दिसतें. चन्नबसव पाहा.

**विरूबाई** (मृत्यु १७१९)—ही शाहूछत्रपतीची दासी असून त्याच्या फार मर्जीतील असल्यानें सर्वांवर हिचा वचक असे व ती राणीप्रमाणेंच वावरत असे. ही लिंगायत जातीची होती. हिनें शिंगणापूर महादेवाला देणगी देऊन आपलें स्मारक करून ठेविलें आहे.

**विरेचक**—(एलॅटेरियम). रानकाकडीच्या फळापासून (एक्बॅलियम ॲग्रेस्टे) या पदार्थाची उत्पत्ति होते. रानकाकडीच्या कच्च्या फळांचा रस काढून तो तसाच ठेवला असतां त्याच्या तळाशीं एक प्रकारचा हिरवा सांका बसतो. तो तुरट असून त्याला किंचित् वास येतो व तो फार तीव्र रेचक असतो. हा विषारी आहे. परंतु याचा विषार कायमचा टिकत नाहीं. यांतील औषधी द्रव्यास 'एलॅटेरियम' म्हणतात.

**विरोध**—(इंपेडन्स). विद्युच्छास्त्रामध्यें उलटसुलट विद्युत्-प्रवाह विद्युद्वाहकामध्यें अथवा उपकरणामध्यें विद्युत्-

प्रवाहाच्या मूल-मध्यम वर्गाशीं ( रूट-मीन-स्क्वेअरशीं ) विद्युत्प्रवाह-शक्ती( व्होल्टेज )च्या मूल-मध्यम वर्गाचें जें प्रमाण असतें, त्यास विरोध असें म्हणतात. एखाद्या विद्युन्मंडलांतील हा विरोध पुढील तीन गोष्टींवर अवलंबून असतो : १ विद्युद्रोधकता, २ विद्युत्प्रवर्तन ( इंडक्टन्स ), व ३ विद्युत्संचयन-पात्रता.

**विरोधी वलयें**— उलटसुलट प्रवाह ( इंपेडन्स कॉइल्स ) असलेल्या विद्युन्मंडलामध्यें विद्युत्प्रवाहास प्रतिबंध करण्याकरितां जे विरोधक वापरण्यांत येतात त्यांस विरोधक वलयें असें म्हणतात. सामान्य विद्युद्रोधक वापरल्यास ते विद्युद्रोधक कांहीं प्रवाह खर्च करतात. तसा प्रवाहाचा खर्च या विद्युद्विरोधक वलयापासून होत नाहीं. हीं वलयें अथवा वेष्टणें पुढें दिलेल्या पद्धतीनें तयार करतात : एका अंगठीच्या आकाराचा निरनिराळ्या कातळ्यांचा बनविलेला एक लोखंडाचा गाभा करतात व त्या-सभोंवतीं एका विशिष्ट पद्धतीनें तार गुंडाळण्यांत येते. ही तार असंध असून विद्युन्मंडलाशीं मालाकार ( इन् सीरीज ) रचनेनें जोडलेली असते. उलटसुलट प्रवाहाच्या योगानें उत्पन्न होणाऱ्या या लोखंडाच्या अंगठींतील चुंबकक्षेत्रप्रवर्तनक्रियेमुळें विरोधक शक्तीचा दाब उत्पन्न होतो. हें उपकरण सामान्यतः नळ्यांच्या आकाराचा पृष्ठभाग असलेल्या तेलाच्या पात्रांत ठेवतात. अशा आकाराच्या पृष्ठभागामुळें आंतील तेल थंड राहण्यास मदत होते.

**विलीनता**—( फ्यूझन ). घनांतून द्रवरूपांत आणण्याची किंवा येण्याची क्रिया. जसें, शतमानावर बर्फाचें पाणी होणें. घन द्रव्याचा विलीनतेचा बिंदु म्हणजे त्या द्रव्याचें पाणी होण्यास लागणारें उष्णतामान होय. उदा., प्लॅटिनमचा हा बिंदु ३२३१° फारेन. असतो. घनीभूत पारा-४° फारेन. उष्णतामानाला वितळतो.

**विल्किन्स, चार्लस**—एक युरोपियन प्राच्यविद्याविशारद. ह्यानें प्रथम काशीस पंडितांजवळ संस्कृत भाषेचें अध्ययन केलें ; व संस्कृत पुस्तकांवरून इंग्रजी ग्रंथ लिहिले. ह्यानें भगवद्गीता, हितोपदेश व शाकुंतल यांचीं भाषांतरें अनुक्रमें १७८५, १७८७ व १७९६ या सालीं प्रसिद्ध केलीं. त्याचें संस्कृत व्याकरण, पहिल्या प्रथमच युरोपमध्यें त्यानें तयार केलेल्या संस्कृत टाइपमध्यें प्रसिद्ध झालें ( १८०८ ). अंकित लेख शोधून त्यांचें अध्ययन व इंग्रजीमध्यें भाषांतर करणारांपैकीं पहिला हाच होय.

**विल्की, वेंडेल लुई** ( १८९२- )—हा एक अमेरिकन कायदेपंडित, व्यापारी व राजकीय पुढारी आहे. हा १९३८ मध्यें कॉमनवेल्थ आणि सदर्न कॉर्पोरेशनचा अध्यक्ष झाला. हा प्रथम डेमोक्रॅट या प्रगत लोकपक्षाचा असून १९४० मध्यें रिपब्लिकन या दुसऱ्या लोकपक्षातर्फे अध्यक्षपदाकरितां उभा राहिला. परंतु त्याचा पराभव झाला. नंतर तो विरोधी पक्षाचा पुढारी होऊन त्यानें ग्रेट ब्रिटनमधील युद्धपरिस्थितीचें स्वतः अवलोकन व निरीक्षण केलें. याचा 'एक जग' या नांवाचा ग्रंथ प्रसिद्ध आहे.

**विल्बरफोर्स, विल्यम** ( १७५९-१८३३ )—एक जनहितैषी इंग्रज मुत्सद्दी. गुलामगिरीचा व्यापार बंद करण्याचें श्रेय याला आहे. यानें १७९१ सालीं ब्रिटिश पार्लमेंटमध्यें ब्रिटिश वसाहतींत आफ्रिकन नीग्रोंची आयात ( गुलामगिरी ) बंद करावी असें बिल मांडलें आणि वर्षानुवर्षे तें बिल मंजूर होण्याकरितां खटपट चालू ठेवली. तथापि १८०७ पर्यंत त्याला यश आलें नाहीं. पण त्याच्या मृत्यूच्या पूर्वीं तीनच दिवस अगोदर त्याला असें कळवण्यांत आलें कीं, ब्रिटिश वसाहतींतील नीग्रोंची गुलाम-पद्धति पूर्णपणें बंद करावी असें बिल इंग्लंडमधील कॉमनसभेनें मंजूर केलें. मृत्यूनंतर इंग्लंडचा एक थोर पुरुष म्हणून वेस्टमिन्स्टर ॲबेमध्यें पुरण्याचा मान त्याला मिळाला.

**विल्यम राजे**—या नांवाचे इंग्लंडचे चार व जर्मनीचे दोन राजे होऊन गेले.

१. ( इंग्लंडचा ) पहिला ( १०२७-१०८७ )—याला 'कॉकरर' म्हणजे विजेता असें टोपण नांव होतें. हा नार्मंडीचा डयूक होता व इंग्लंडचा विल्यम दि कॉन्फेसर वारल्यानंतर इंग्लंडच्या गादीवर यानें हक्क सांगितला व १०६६ मध्यें इंग्लंडवर स्वारी करून तें घेतलें. यानें राज्यकारभाराची नीट घडी बसविली. पण सरदारांना सरंजाम करून दिले. राज्यांतील सर्व जमिनीची मोजणी जी यानें करून ठेविली तिचे कागद अद्यापि आहेत.

दुसरा ( १०५६-११०० )—याची कारकीर्द धर्मसंस्थेशीं झगडा सुरू केल्याबद्दल प्रसिद्ध आहे.

तिसरा ( १६५०-१७०२ )—हा हॉलंडमधील एक अधिकारी असून याची बायको मेरी हिच्या वारशामुळें याला इंग्लंडची गादी बायकोच्या जोडीनें मिळाली. याच्यापूर्वीं याचा सासरा दुसरा जेम्स गादीवर होता. पण तो कॅथॉलिक धर्माचा असून त्याला पदच्युत करण्यांत आलें होतें. याला गादीसाठीं जेम्स आणि फ्रान्सचा राजा यांशीं लढावें लागलें.

चौथा ( १७६५-१८३७ )—हा नाविकदलांत अधिकारी होता. जेव्हां याचा भाऊ चौथा जॉर्ज वारला तेव्हां याला गादी मिळाली. याच्या कारकीर्दीतील मुख्य गोष्ट म्हणजे सुधारणाकायदा मंजूर झाला.

२. ( जर्मनीचा ) पहिला ( १७९७-१८८८ )—प्रथम हा राजमुखत्यार होता व नंतर १८६१ सालीं याचा भाऊ वारल्यानंतर हा प्रशियाचा राजा झाला. याच्या कारकीर्दींत डेन्मार्क, ऑस्ट्रेलिया व फ्रान्स या राष्ट्रांशीं युद्धें झालीं. १८७१ सालीं हा जर्मनीचा बादशहा बनला.

दुसरा (१८५९–१९४२)—जर्मनीचा तिसरा फ्रेडरिक याचा हा मुलगा. बापाच्या मृत्यूनंतर १८८८ सालीं गादीवर आला. हा इंग्लंडच्या व्हिक्टोरिया राणीच्या मुलीचा मुलगा होता. यानें गादीवर बसल्यानंतर दोन वर्षांनींच बिस्मार्क या प्रसिद्ध प्रधानाला रजा देऊन आपण स्वतः सर्व कारभार पाहूं लागला. यानें जर्मनीची शक्ति हळूहळू वाढवून १९१४ सालीं फ्रान्स-इंग्लंडविरुद्ध युद्ध पुकारलें. या पहिल्या महायुद्धांत जर्मनीचा पराभव होऊन १९१८ सालीं विल्यमला गादी सोडावी लागली. तो हॉलंडमध्यें परागंदा होऊन तेथेंच मरेपर्यंत राहिला. याची युरोपचा सत्ताधीश होण्याची जबर महत्त्वाकांक्षा होती; पण ती सफल झाली नाहीं.

**विल्यम्स, मोनियर** (१८१९–१८९९)—भारतीय धर्म आणि संस्कृति यांचा एक युरोपियन अभ्यासक व ग्रंथकार. याचा जन्म मुंबईला झाला असला तरी उच्च शिक्षण इंग्लंडमध्यें झालें व तेथेंच हा प्राध्यापक होता. मोनियर विल्यम्सचे 'बुद्धिझम' (बौद्धधर्म), 'इंडियन विज्डम' (भारतीय प्रज्ञा) व 'संस्कृत–इंग्लिश डिक्शनरी' (संस्कृत-इंग्रजी कोश) हे ग्रंथ महत्त्वाचे आहेत. यानें संस्कृत भाषेचा चांगला अभ्यास करून त्या वाङ्मयाचें विशेष परिशीलन केलें होतें.

**विल्सन, थॉमस वूड्रो** (१८५६-१९२४).—अमेरिकन संयुक्त संस्थानांचा अठ्ठाविसावा अध्यक्ष. हा राजकारणांत पडण्यापूर्वी न्यायशास्त्राचा व अर्थशास्त्राचा प्राध्यापक होता. प्रथम हा पहिल्या महायुद्धांत अमेरिकेनें पडूं नये अशा विचाराचा होता. पण १९१७ सालीं याला आपलें मत बदलावें लागलें. अमेरिका युद्धांत सामील झाल्यानें जर्मनीचा पराभव लवकर झाला. १९१८ सालीं तहाच्या प्रसंगीं यानें आपलीं चौदा तत्त्वें जगापुढें जीं मांडलीं त्यांतील शेवटचें एक राष्ट्रसंघ स्थापनेबाबत होतें (राष्ट्रसंघ पाहा). पण प्रत्यक्ष तहपरिषदेंत याचें फारसें चाललें नाहीं. १९२१ सालीं तो राजकारणांतून निवृत्त झाला.

**विल्सन, हॅरेस हेमन** (१७८६— ? )—एक आंग्ल प्राच्यविद्यापंडित. हा हिंदुस्थानांत वैद्यकीची नोकरी करीत होता. याला प्राच्य भाषा आणि वाङ्मय यांची गोडी लागून यानें कांहीं संस्कृत काव्यें आणि नाटकें यांचीं भाषांतरें केलीं. हा बंगालच्या रॉयल एशियाटिक सोसायटीचा चिटणीस होता. १८३२ सालीं ऑक्सफोर्ड विद्यापीठांत हा संस्कृतचा पहिला प्राध्यापक झाला.

**विवर्तन**—(डिफ्रॅक्शन). जेव्हां प्रकाशाचे किरण एखाद्या घनपदार्थाच्या कडेच्या जवळून जात असतात तेव्हां त्यांमध्यें जी थोडी वकना येते किंवा ते थोडे खालीं वांकतात त्या क्रियेस विवर्तन म्हणतात. जेव्हां एखादा सूर्याचा किरण एखाद्या काळोखाच्या खोलींत एखाद्या अरुंद फटींतून आंत घेण्यांत येतो आणि तो एखाद्या पडद्यावर पाडण्यांत येतो तेव्हां त्या पडद्यावर एक पांढऱ्या प्रकाशाची रेघ व तिच्याआसभोंवतीं रंगीत प्रकाशाची कडा, असें दृश्य दिसतें. या रंगीत प्रकाशाच्या कडा विवर्तनामुळें उत्पन्न होतात आणि या रंगीत प्रकाशकिरणांमध्यें आपणांस असें दिसून येईल कीं, निळ्या प्रकाशकिरणांपेक्षां तांबड्या प्रकाशकिरणांमध्यें हें विवर्तन अधिक असतें.

**विवस्वत**—एक वेदकालीन देवता. सर्व देव हे विवस्वताचीं अपत्यें असें ऋग्वेदांत म्हटलें आहे. ब्राह्मण-ग्रंथांत विवस्वताला आदित्य संबोधिलें आहे. द्वादश आदित्यांपैकीं हा एक होता. याला अनेक पत्न्या होत्या, पण संज्ञा हीच प्रसिद्ध आहे. याला वैवस्वत, यम, यमुना, अश्विनीकुमार, सावर्णि, रेवत, इ. मुलें होतीं. निरनिराळ्या पुराणांतून यासंबंधीं निरनिराळ्या कथा आहेत.

**विवाह**—स्त्री आणि पुरुष यांचा कायद्यानें किंवा रूढीनें मान्य असा जो संबंध त्यास म्हणतात. मानवी समाजांत विवाहसंस्था फार आधींच अस्तित्वांत आली असली पाहिजे. कारण त्याखेरीज पितृत्वाची निश्चिति कशी करावयाची? शिवाय स्त्रीच्या हितासाठीं हा विधि अवश्य आहे. बहुपत्नीत्व किंवा बहुपतित्व ही चाल निरनिराळ्या समाजांत आहे. पण एकपत्नीत्व–पतित्व हाच आदर्श मानला जातो. फार प्राचीन काळीं संघविवाह होत असत. म्हणजे आपल्या संघांतील कोणत्याहि स्त्रीशीं किंवा पुरुषाशीं संबंध ठेवतां येत असे. विवाहाचे संस्कार निरनिराळ्या राष्ट्रांत व जातींत निरनिराळे आढळतात. बळजबरीनें वधू आणणें, पैशानें वर किंवा वधू विकत घेणें, नुसतें प्रेम जमलें कीं विवाहबद्ध होणें, वगैरे प्रकार दृष्टीस पडतात.

अगदीं प्राचीन काळीं इतर राष्ट्रांतल्याप्रमाणेंच भारतांतहि विवाहनिर्बंध नसावेत. महाभारतांत उद्दालक ऋषीच्या कथेवरून याची कल्पना येते. पुढें पुनर्विवाहाची पण नियोगपद्धति अस्तित्वांत आली असली पाहिजे. पण ही नियोगाची चाल फार प्राचीन काळींच बंद झाली असावी. आर्य स्त्रियांच्या पातिव्रत्याची कल्पना कित्येक शतकांपासून पराकोटीस पोंचलेली आढळते. महाभारतकाळीं पुनर्विवाहाची चाल लोकांत प्रशस्त नव्हती. (पुनर्विवाह पाहा). वधू प्रौढ असत. पुढें कित्येक शतकांनंतर लग्नें लहानपणीं होऊं लागलीं. वैदिक कालापासूनच पुरुषांस अनेक स्त्रिया करण्याचा अधिकार असे व त्याप्रमाणें ते करीतहि. धृतराष्ट्राला तर शंभर स्त्रिया होत्या. बहुपतित्वाच्या प्राचीन रूढीचे अवशेष क्वचित् द्रौपदीच्या रूपानें दिसतात. (बहुपतित्व, बहुपत्नीत्व पाहा).

ब्राह्मो दैवस्तथाचार्षः प्राजापत्यस्तथासुरः ।
गांधर्वो राक्षसश्चैव पैशाचश्चाष्टमः स्मृतः ॥

याप्रमाणें विवाहाचे आठ प्रकार सांगितले आहेत. यांत सर्वांत श्रेष्ठ ब्राह्म म्हणजे सत्कारपूर्वक कन्यादानाचा प्रकार होय. विवाहविधींचें मुख्य अंग सप्तपदी हें पूर्वीपासून संमत होतें. सगोत्र विवाह सर्वत्र मानीत नसत. गोत्राबरोबर प्रवरांचीहि बंदी होती.

बहुतेक समाजांतून पत्नीचा दर्जा पतीपेक्षां कमी मानलेला असतो. पुढारलेल्या राष्ट्रांतून ही विषमता काढून टाकण्याचा प्रयत्न केलेला दिसेल. पाश्चात्य समाजांत विवाहाला करारांचें कायदेशीर स्वरूप आलें आहे; त्यामुळें यासंबंधीं पवित्र आणि धार्मिक भावना उडून जाऊन पातिव्रत्य नांवाचेंच उरलें आहे. इतर समाज अद्यापि विवाहांतील धार्मिक कल्पना थोड्याबहुत टिकवून आहेत.

प्रौढ विवाह—खरें पाहतां विवाह हा मुलीचा संस्कार आहे. विवाहानें कन्येला पतिलाभ व वराला भार्यालाभ होतो. एकहि स्मृतिकार प्रौढविवाहाला संमति देत नाहीं. वैदिक कालीं प्रौढपणीं (कन्येच्या) विवाह होत यांत संदेह नाहीं. कांहीं सूत्रांत चतुर्थ कर्म सांगितलें आहे. यावरून स्मृतिकालांत सुद्धां प्रौढविवाहाचा अवशेष आढळतोच. चतुर्थ कर्म म्हणजे गर्भाधान हें लग्नाच्या चौथ्या दिवशीं करावयाचें असतें. बारा वर्षांपुढें कन्या अविवाहित ठेवूं नये ह्याविषयीं सर्व शास्त्रकारांचा कटाक्ष आहे. ऋतुदर्शनाच्यापूर्वी विवाह झाला पाहिजे.

आठ प्रकारचे विवाह स्मृतिकार सांगतात, पण तो विधि नाहीं. स्त्री-पुरुषांच्या ऐक्याचे तेव्हां रूढ असलेले हे आठ मार्ग होत. सध्यां नोंदणी कायद्यानें होणारा विवाह हा कायदेशीर असला तरी शास्त्रसंमत नाहीं. विवाहाला वधूच्या वयाची मर्यादा आहे तशी पुरुषाच्या वयाची नाहीं. वाङ्निश्चय, कन्यादान, पाणिग्रहण व भार्यात्वसिद्धि हे विवाहकर्मांतील चार टप्पे होत. वधू अज्ञान असल्यामुळें तिच्या पालकाकडून तिचें दान होतें. त्याच्यापूर्वी वधू-वरांच्या पालकांमध्यें कन्या देण्या-घेण्याचा करार होतो. तोच वाङ्निश्चय. कन्या ही वराची दानवस्तु आहे. पाणिग्रहणविधीनें तो तिचा स्वीकार करतो. ह्या दानाचा स्वीकार केला तरी त्या दोघांमध्यें नातें कोणतें तें सिद्ध होत नाहीं. विवाहहोमाचा उद्देश भार्यात्वसिद्धि हा असतो. पति-पत्नीचें नातें सिद्ध झाल्यानंतर सप्तपदीनें दोघांमध्यें मित्रत्वाचें नातें सिद्ध होतें. ही प्रणालिका अत्यंत शास्त्रशुद्ध आहे. प्रजोत्पादन हा विवाहाचा हेतु असतो. "प्रजोत्पादनाकरितां तुला ही कन्या मी देत आहें," असें मुलीचा बाप वराला बजावतो आणि ह्या मुलीसंबंधानें कोणताहि अत्याचार करणार नाहीं असें वराकडून वदवून घेतो. सगोत्र विवाह आतां कायदेशीर झाला आहे. पिढ्यांची मर्यादा मात्र कायम आहे. विवाहविषयक रूढी जातीगणिक भिन्न भिन्न आहेत. स्वयंवराची चाल पूर्वी क्षत्रियांत होती तरी तिला शास्त्रकारांनीं मान्यता दिलेली नाहीं.

लग्नासंबंधीं बंधनें—पूर्वी कोणत्या अटीवर विवाह होत असत हें निश्चित सांगणें कठिण आहे. गोभिल सूत्रांत आईच्या व बापाच्या सोळा पिढ्यांत एकमेकांशीं विवाह करणें निषिद्ध मानलें आहे. पण शतपथ ब्राह्मणांत तिसऱ्या किंवा चौथ्या पिढींत लग्न लावण्याची परवानगी दिली आहे. दाक्षिणात्य लोकांत मामाच्या मुलीशीं किंवा आतेच्या मुलाशीं लग्न लावण्याची चाल होती. त्या वेळीं वरील गोभिल सूत्रांतील निषेध विशेष मानिला जात नसे असें दिसतें. तरी पण विषमगोत्रविवाह वरेच होत असत. त्याचप्रमाणें जात ही लग्नाच्या बाबतींत विशेष गणली जात नसे. कारण धर्मसूत्रामध्येंच अन्यवर्णविवाह संमत मानिले आहेत. उदाहरणार्थ, ब्राह्मणाला खालील वर्णांपैकीं कोणत्याहि वर्णांतील स्त्रीशीं विवाह करण्याची मुभा होती. त्याचप्रमाणें क्षत्रियानें आपल्या जातींतील अथवा खालच्या वर्णांतील स्त्री विवाहास पसंत करावी आणि वैश्यानेंहि वैश्य व शूद्र या जातींतील स्त्री विवाहास पसंत करावी अशी मोकळीक होती. ही 'अनुलोम' विवाहपद्धति होय. याच्या उलट खालील जातींतील पुरुषानें वरील जातींतील स्त्रीशीं लग्न करणें ही 'प्रतिलोम' पद्धति मात्र प्रचारांत नव्हती. पुढें पुढें वरच्या वर्णांना शूद्र स्त्री पूर्णपणें विवाहास अयोग्य मानली जाऊं लागली. असे मिश्रविवाह महाभारतांत पुष्कळ झालेले आढळतात. बृहद्देवतेंत सामान्य नियम म्हणून गणले आहेत. थोरल्या भावाचें किंवा बहिणीचें लग्न झाल्याशिवाय धाकट्या भावाचें अथवा बहिणीचें लग्न होणें शिष्टसंमत गणलें जात नव्हतें.

वैवाहिक संबंध—बहुभार्यात्व जरी वैदिक कालीं प्रचारांत होतें तरी वैवाहिक संबंध सैल होते असें म्हणतां येणार नाहीं. प्रत्येक पतीला आपल्या भार्येशीं इमानानें वागावें लागत असे. पण हें एकपत्नीव्रत नीतिविषयक कल्पनांमुळेंच लोक पाळीत असत किंवा काय हें सांगतां येत नाहीं. वैदिक कालीं एकपत्नीव्रताला बराच मान असे. यावरून उच्च प्रतीच्या नैतिक कल्पना त्या लोकांत रूढ होत्या असें सिद्ध होतें. उलट पश्चीं इंडो-जर्मन लोकांमध्यें व्यभिचारी पुरुष एखाद्या स्त्रीशीं व्यभिचारकर्म करतांना पकडला गेला तर त्याला बेलाशक ठार मारावें असा सर्वप्रसिद्ध नियम होता तसा वैदिक काळच्या लोकांत होता असें दिसत नाहीं. तरी पण मागाहून झालेल्या धर्मशास्त्रांत-ग्रंथांत असा नियम आढळतो.

लग्न जमविणें—वैदिक कालीं जी समाजस्थिति होती तीवरून असें दिसतें कीं, स्त्री असो किंवा पुरुष असो दोघांनाहि विवाहसमयीं आपला जन्माचा सोबती निवडण्याची मुभा होती. निदान वयांत आलेला मुलगा किंवा मुलगी यांच्या विवाहाच्या भानगडींत आई-बाप पडत नसत. तरी पण बहुधा आई-बाप वधू-वरांचा विवाह

जुळवून आणीत असत. त्यांचे लग्न व्हावयाचें त्यांचें आपआपसांत ठरल्यावर एका मध्यस्थाच्या मार्फत—बहुतेक हा वर असावा—हें लग्न जमत असे. त्या वेळेच्या समाजांत कन्याविक्रय थोड्या प्रमाणांत असे. प्रसंगानुसार मुलींना पळवून आणून त्यांचे पाणिग्रहण करण्याची चाल होती. पण असले प्रकार म्हणजे वीरांचीं अद्भुत कृत्यें म्हणून घडत असत. मागाहून झालेले धर्मग्रंथ व महाभारत या ग्रंथांमध्ये विवाहाचे निरनिराळे प्रकार सविस्तर वर्णिले आहेत ते वर सांगितलेंच आहेत.

मिश्रविवाह—असवर्ण किंवा मिश्रविवाहाचीं कांहीं थोडीं उदाहरणें श्रुतींत आहेत. ब्राह्मण आणि सूत्रग्रंथांतून मात्र बरींच आढळतात. तथापि धर्मकार्यांत सवर्ण स्त्रियाच पसंत करीत. मनूनें मात्र असा मिश्रविवाह त्याज्य ठरविला आहे. इतर स्मृतिकारांनीहि असेंच मत दिलें आहे. पुराणांतून मिश्रविवाहाचीं उदाहरणें मधून मधून आढळतात. ऐतिहासिक दाखलेहि दाखवितां येतील. समुद्रगुप्तानें जिंकलेल्या परकीय परधर्मी राजांच्या कन्यांना वरल्याचा अलाहाबादजवळील एका स्तंभावर लेख आहे. ब्राह्मण कदंब राजांपैकी मयूरशर्म्यानें आपल्या मुली क्षत्रिय घराण्यांत दिल्या. कांहीं क्षत्रिय घराण्यांचे पूर्वज ब्राह्मण होते. कांहीं क्षत्रिय राजकन्यांनीं ब्राह्मणांना वरलें आहे. उदा., विजयानगरच्या बुक्क राजाची कन्या विरूपादेवी हिनें बोमण्ण ओडेय या ब्राह्मणाशीं लग्न केलें होतें. असे मिश्रविवाह आठव्या-नवव्या शतकापर्यंत चालू होते. नंतर बाराव्या शतकापासून कलिवर्ज्य प्रकरणामुळे अजीबात् बंद पडले.

लग्नसमारंभ—लग्नप्रसंगीं जे समारंभ होत असत ते समारंभ आणि इंडो-जर्मन व इतर लोकांतील समारंभ यांत फारच साम्य असे. हे समारंभ फार मोठे असून त्यामुळें वधू-वरांचें ऐक्य कायम होत असून सुफलदायी होत असे. या समारंभाला प्रथम सुरवात वधूच्या घरीं होई व तिच्या घरीं वर, त्याचे नातेवाईक व स्नेहीसोबती मोठ्या थाटानें जात व तेथें गेल्यावर वधूच्या नातेवाइकांची व त्यांची भेट होई. या जमलेल्या वऱ्हाडी मंडळींना मेजवानी देण्यासाठीं गाई मारल्या जात. वरानें वधूला एका दगडावर (अथवा चौहल्यावरील सहाणेवर) नेल्यावर तिचें पाणिग्रहण करून घरांतील जो मुख्य अग्नि (गृह्याग्नि) त्याच्या भोंवतीं वर वधूच्या हातास धरून प्रदक्षिणा करतो. हा विधि झाल्यावर लग्न पुरें झालें असें समजतात. तोपर्यंत तें अपूर्ण समजलें जातें. म्हणून या विधीला हस्तग्राह (पाणिग्रहण) असें नांव दिलें आहे. हे विधी आटोपल्यावर वर आपल्या विवाहित स्त्रीस मोठ्या थाटानें रथांत मिरवणूक काढून आपल्या घरीं घेऊन जाई व हा समारंभ चालू असतां कांहीं मंत्र पठण केले जात. घरीं गेल्यावर त्याच रात्रीं वधूवरांची एकशय्या होत असे.

ख्रिस्ती चाल—ख्रिस्ती मंडळींच्या नियमांप्रमाणें श्रद्धावान् लोकांच्या विवाहाच्या कराराप्रसंगीं एक विधि करण्यांत येतो. हा विधि देवळामध्ये करावयाचा असतो व तेथील धर्मोपदेशक हा मुख्य साक्षी असतो. जेव्हां धर्मोपदेशक मिळणें शक्य नसेल तेव्हां हा विधि करण्यासंबंधी विशेष नियम असतात. त्याप्रमाणेंच कांहीं अडचणी आल्या तर त्यांचा परिहार करण्यासंबंधींहि विशेष नियम केलेले आहेत : (१) विवाह हा संस्कार एकपत्नीव्रताचा द्योतक आहे. विवाहित व्यक्ति हयात असेपर्यंत दुसऱ्या व्यक्तीशीं विवाहबद्ध होतां येत नाहीं. (२) विवाह हा संस्कार अभंग आहे. विधिपूर्वक करण्यांत आलेला विवाहसंस्कार कधींहि मोडतां येत नाहीं. विशेष प्रसंगीं पति व पत्नी यांस स्वतंत्रपणे राहण्याची मोकळीक देण्यांत येते. तथापि विवाहसंस्कार नियमबाह्य ठरण्यासारखा जर एखादा अपवाद उत्पन्न झाला तर झालेला करार रद्द ठरवितां येतो. (३) विवाहाचा मुख्य उद्देश प्रजोत्पादन आणि अपत्यांचें शिक्षण हा आहे. गर्भधारणेस प्रतिबंध करणारें कोणतेंहि कृत्य हे विवाहाच्या हेतूच्या विरुद्ध असल्यामुळे ते पातक मानण्यांत येतें. भ्रूणहत्या घडवून आणणारे अथवा गर्भास अपाय करणारे कोणतेंहि कृत्य अथवा प्रयत्न हे परमेश्वराच्या नियमाच्या विरुद्ध वर्तन समजले जातें. कारण मानवी जीवाचा धनी परमेश्वर हाच आहे. (४) माता-पित्यांनीं मुलांस धार्मिक-नैतिक शिक्षण देणें हे त्यांचें अवश्य कर्तव्य समजण्यांत येतें. (५) पति व पत्नी यांनीं एकत्र व परस्परांवर प्रेम करीत राहिलें पाहिजे आणि आपलें जीवित-ध्येय साध्य करण्याकरितां परस्परांस मदत केली पाहिजे.

विवाहसंबंधी कायदे—इंग्लंडच्या कायद्यांत विवाहाचा विधि पुढीलप्रमाणें सांगितलेला आहे : (१) विवाह ठरला म्हणजे ज्या गांवांत वधू व वर राहत असतील त्या गांवांतील चर्चमध्ये रविवारीं प्रार्थनेच्या वेळीं सदर विवाह होणार आहे असें लागोपाठ तीन रविवारीं जाहीर करणे (पब्लिकेशन ऑफ बॉन्ड) व शेवटच्या रविवारीं प्रसिद्धि झाल्यावर तीन महिन्यांच्या आंत प्रत्यक्ष विवाहाचा धार्मिक विधि झाला पाहिजे, किंवा (२) ज्या विभागांत वधू-वर निदान अगोदरचे सात दिवस राहिलेले आहेत त्या विभागांतील सुपरिंटेंडेंट-रजिस्ट्रारकडे विवाहाची नोटीस देणें. अशा नोटिशीनंतर २१ दिवसांनीं रजिस्ट्रारचें सर्टिफिकेट मिळतें व नंतर चर्चमध्यें विवाह लावतां येतो, किंवा रजिस्ट्रारच्या कचेरींत तीन महिन्यांच्या आंत विवाह नोंदवितां येतो, किंवा (३) सामान्य बिशपनें लायसेन्स दिल्यानें विवाह होऊं शकतो, किंवा कँटरबरीच्या आर्चबिशपनें स्पेशल लायसेन्स दिल्यास विवाह होतो; आणि अशा विवाहाला वास्तव्याची किंवा स्थलाची कोणतीच मर्यादा नसते, किंवा २४ तासांची नोटीस दिल्यावर सुपरिंटेंडेंट-रजिस्ट्रार तो अर्जदार १५ दिवस त्या विभागांत राहत असल्यास

आणि विवाह त्याच्या कचेरींत नोंदावयाचा असल्यास लायसेन्स देतो व लगेच विवाह होऊं शकतो.

हिंदुस्थानांत हिंदु-मुसुल्मानादि समाजांत बालविवाह रूढ असल्यामुळें त्यावर निर्बंध घालण्याचा कायदा १९२९ सालीं करण्यांत आला. बाल म्हणजे १४ वर्षे वयाच्या आंतील मुलगी आणि १८ वर्षे वयाहून लहान मुलगा यांचा विवाह करणारे आईबाप किंवा पालक यास एक महिना साधी कैद, किंवा एक हजार रुपयांपर्यंत दंड, किंवा दोन्ही शिक्षा आहेत. असें लग्न लावणाऱ्या भिक्षुकास सदरप्रमाणेंच शिक्षा आहेत.

हिंदूंच्या कायद्यांत हल्लीं ब्राह्मविवाह म्हणजे वराला कन्यादान करणें, आणि आसुरविवाह म्हणजे कन्येच्या आप्तांना द्रव्य देऊन कन्या विकत घेणें व तिच्याशीं विवाह करणें, या दोनच विवाह-पद्धती प्रचलित आहेत. हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें हे दोन विवाह धार्मिक संस्कार आहेत, करार नाहींत. संस्कार म्हणजे विवाह अभंग, अभेद्य, आमरण बंधनकारक असतो; म्हणून घटस्फोट पत्नीला किंवा पतीला करतां येत नाहीं, असें हिंदुधर्मशास्त्राचें तत्त्व असून आतांपर्यंत हायकोर्टांनीं या बाबतींत निर्णय असेच दिले आहेत. त्यामुळें अलीकडे घटस्फोटाची आवश्यकता वाटूं लागली. तसेंच ब्राह्म व आसुर विवाहांत विजातीय व भिन्नधर्मीय विवाहास तसेंच सगोत्र विवाहास बंदी आहे ती दूर व्हावी, असें वाटूं लागलें म्हणून विवाहविधीचा एक नवा प्रकार 'विशिष्ट विवाहाच्या कायद्या'नें (दि स्पेशल मॅरेज ॲक्ट, १८७२) सुरू केला. या कायद्याचा उद्देश, जे इसम ख्रिस्ती, ज्यू, मुसलमान, हिंदू, पारशी, बौद्ध, शीख, किंवा जैन यांपैकीं कोणत्याहि धर्माचे नसतील तर (म्हणजे यांपैकीं भिन्नधर्मीय वरवधूला विवाहविधि 'स्पेशल मॅरेज' करतांना आम्ही सदरपैकीं कोणत्याहि धर्माचे नाहीं, अशी प्रतिज्ञा मॅरेज रजिस्ट्रारपुढें करावी लागते, किंवा जे इसम हिंदू, बौद्ध, शीख किंवा जैन असतील त्यांचा धर्मांतर्गत विधर्मीय विवाह कायदेशीर मानावा, असा आहे. भिन्नजातीय, असवर्ण, आणि सगोत्र विवाह या कायद्यानें कायदेशीर ठरतात. या कायद्यांतला विवाहविधि असा आहे कीं, (१) वरानें किंवा वधूनें विवाहाची नोटिस रजिस्ट्रारला द्यावी, (२) रजिस्ट्रारसमोर वधूवरांनीं तीन साक्षीदारांसह हजर होऊन त्यांच्या समक्ष पुढील प्रतिज्ञा करावी— "मी तुझा, माझी बायको (किंवा माझा नवरा) म्हणून स्वीकार करतों (करतें)." याप्रमाणें दोघांनीं प्रतिज्ञा करून लेखी फॉर्म लिहून त्यावर वधूवरांच्या व तीन साक्षीदारांच्या सह्या रजिस्ट्रारनें घ्याव्या (कलमें २।४।११). या विवाहविधीनें झालेल्या पतिपत्नीला घटस्फोटाचा कायदा लागू आहे, म्हणजे त्यांना घटस्फोट करतां येतो.

ब्राह्मविवाहविधींत (१) कन्यादान, (२) लाजाहोम, व (३) सप्तपदी हे तीन विधी कोर्टांनीं आवश्यक मानले आहेत. बाकीचे सीमान्तपूजन-वाङ्निश्चयादि अनेक विधी अनावश्यक आहेत. आसुरविवाहाला जातीजातींतील रूढीप्रमाणें होणारे विधी निरनिराळे आहेत. तसेंच कांहीं हिंदु जातींत रूढ असलेली घटस्फोटाची किंवा काडीमोड करण्याची किंवा सोडचिठी देण्याची चाल कायदेकोर्टांनीं मान्य केली आहे.

पारशी विवाहाचा कायदा १८६५ सालीं झाला. त्यांत विवाहाच्या शर्ती आहेत त्या—(१) वरवधू पारशी असलीं पाहिजेत; (२) नजीकचा आप्तसंबंध वरवधूंत असतां कामा नये; (३) पारशी धर्मोपाध्यायानें 'आशीर्वाद' या नांवाच्या विवाहविधीनें दोन साक्षीदारांसमक्ष विवाह लावला पाहिजे; आणि (४) वर किंवा वधू एकवीस वर्षें पूर्ण वय झालेलीं नसल्यास बापाची किंवा पालकाची संमति सदर विवाहाला दिलेली असली पाहिजे (कलम ३). कोणाहि विवाहित पारशी स्त्री-पुरुष इसमानें कायदेशीर घटस्फोट कोर्टामार्फत मिळविल्याशिवाय पुन्हां विवाह करतां कामा नये: केल्यास तो द्वितीय विवाह पीनल कोडांतला गुन्हा आहे. कलम ३ प्रमाणें विवाह झाला कीं त्याचें सर्टिफिकेट स्वतःची व वधूवरांची सही करून रजिस्ट्रारकडे नोंदवण्यास दोन रुपये फी वराकडून घेऊन पाठवलें पाहिजे (कलम ६).

१८७२ सालच्या ख्रिस्ती विवाहाच्या कायद्यांत दोन पद्धती— (१) धार्मिक, व (२) नोंदणी आहेत. धार्मिक पद्धतीचा विवाह चर्चमध्यें ख्रिस्ती धर्मोपाध्याय लावतो; व ती पद्धत इंग्लंडांतील धार्मिक विवाहपद्धतीप्रमाणें आहे (कलमें ४।५।११।१२). नोंदणी पद्धतीचा विवाह वर दिलेल्या स्पेशल मॅरेज ॲक्टमधील रीतीनें होतो.

**विवेकानंद** (१८६२-१९०२)— एक विख्यात हिंदी साधु. दत्त नांवाच्या कायस्थ घराण्यांत यांचा जन्म झाला. यांचे वडील विश्वनाथ दत्त कलकत्त्यास अटर्नी जनरल होते. लहानपणीं विवेकानंदांना वीरेश्वर म्हणत. पण शाळेंत जाऊं लागल्यापासून नरेंद्र म्हणूं लागले. त्यांची स्मरणशक्ति व बुद्धिमत्ता चांगली होती.

कॉलेजांत शिकत असतांनाच पाश्चात्य व भारतीय तत्त्वज्ञानाचा त्यांनीं अभ्यास केला व बी. ए. झाल्यानंतर ते ब्राह्मो समाजांत शिरले. पुढें विवेकानंदांनीं रामकृष्ण परमहंसांस गुरु केलें, व त्यांचेंच कार्य ते समाधिस्थ झाल्यावर त्यांनीं चालू ठेविलें. ६ वर्षेपर्यंत हिमालयांत वास्तव्य करून विवेकानंदांनीं अध्यात्माचें चिंतन केलें.

पुढें तिबेटांत जाऊन बौद्ध धर्माचा अभ्यास केला. त्यानंतर ठिकठिकाणीं व्याख्यानें देत देत त्यांनीं देशपर्यटन केलें. या वेळीं अमेरिकेंत शिकागो येथें भरलेल्या जागतिक धर्मपरिषदेला हिंदु धर्माचे प्रतिनिधि म्हणून हजर राहण्याकरितां स्वामी गेले. अमेरिकेंत यांचीं ठिकठिकाणीं हिंदु धर्मावर व्याख्यानें झालीं. तेथें त्यांना बरेच शिष्य मिळाले. पुढे इंग्लंडला जाऊन ते परत हिंदुस्थानांत आले. त्यांनीं ब्रह्मचाऱ्यांना शिक्षण देण्याकरितां एक कलकत्त्यास व एक हिमालयांत शाळा काढली. रामकृष्ण मिशनांची संघटना केली. १८८७ सालच्या एका दुष्काळांत दुष्काळी कामें काढून आपद्ग्रस्तांना मदत केली. वेदान्त सोसायटी व शांति–आश्रम या नांवाच्या दोन संस्था त्यांनीं सॅन्फ्रॅन्सिस्कोमध्यें स्थापिल्या. ता. ४ जुलै १९०२ रोजीं स्वामी समाधिस्थ झाले. राजयोग, भक्तियोग, ज्ञानयोग व कर्मयोग यांवर स्वामींचे ग्रंथ आहेत. त्यांत व त्यांच्या इतर निबंधांतून स्वामींचें सुबोध तत्त्वज्ञान कळून येतें. विवेकानंदांसंबंधीं अनेक ग्रंथ झाले आहेत. रामकृष्ण परमहंस व विवेकानंद या गुरुशिष्यांनीं भारतीयांचें अध्यात्मशास्त्र जगभर पसरविलें.

**विशाळगड किल्ला**—१. कोल्हापूर, विशाळगड जहागिरींतील एक किल्ला. हा कोल्हापूरच्या वायव्येस सुमारें पन्नास मैलांवर सह्याद्रीच्या फांट्यावर आहे. उंची ३३०० फूट, लांबी ३२०० फूट व रुंदी १०४० फूट आहे. प्राचीन नांव खिलगिल्ल आहे; मुसलमानी अमदानींत 'खिळणा' किंवा 'खेळणा' नांव पडलें व शिवाजीनें किल्ला घेतल्यावर 'विशाळगड' असें नांव दिलें. शिलाहारांच्या शिलालेखांत या किल्ल्याचा उल्लेख येतो. गडावरील भूपालतळें शिलाहार भोजानें बांधलें. पुढें यादवांकडे राज्याबरोबर गड गेला. १४६९ त महमद गवाननें जिंकून घेतला. पुढें आदिलशाहींत सामील झाला. नंतर १६५९ त शिवाजीनें हस्तगत केला. शेवटीं छत्रपतींचे प्रतिनिधि यांच्याकडे गड येऊन तेथें त्यांची राजधानी झाली, तो १८४४ पर्यंत तेथें होती. हल्लीं गड ओसाड असून १०।१५ घरें जेमतेम असतील. गडावर जाण्यास गाडीमार्ग आहे. गडावर पीरमलिक रेहाणचा दर्गा आहे. तेथें दरसाल मोठा उरूस होतो. राजाराम (शिवाजीचा मुलगा) यांच्या तिसऱ्या बायकोनें येथें ता. ५ मार्च १७०० रोजीं त्याच्या पगडीबरोबर सहगमन केलें; त्या अहिल्याबाईची समाधि आहे.

२. मुंबई, कुलाबा जिल्हा. प्रवळच्या दक्षिणेस व चौकच्या उत्तरेस तीन मैलांवर नटळ नांवाच्या खेड्यांत हा किल्ला मोडतो. या टेंकडीस जिनखोड म्हणतात. एका कोटडींत विशाळा देवीची मूर्ति बसविलेली आहे.

**विशाळगड जहागीर**—ही कोल्हापूरकर छत्रपतींच्या पंतप्रतिनिधींची आहे. विशाळगडावर पंतप्रतिनिधि हे १८४४ पर्यंत राहत होते. या सालीं बंडवाल्यांनीं किल्ला घेतला होता म्हणून तो पाडला व तेव्हांपासून प्रतिनिधि हे मलकापुरास (कोल्हापूरच्या नैर्ऋत्येस १४ कोस, शाली नदीच्या कांठीं) राहूं लागले. मलकापूर ही कोंकण व घाट येथील मालाची मोठी उतारपेठ आहे. हें घराणें परशुरामपंत प्रतिनिधींचे वंशज असून नवीन पुरुष गादीवर आला म्हणजे कोल्हापूरकरास नजर द्यावी लागे व नोकरीअंश दरसाल ५००० रु. द्यावा लागे.

**विशिष्ट उपायाचा कायदा**—(दि स्पेसिफिक् रिलीफ ॲक्ट, १८७७). या कायद्यांत (१) स्थावर मिळकतीचा गैरहक्की केलेला कबजा परत मिळविणें, (२) जंगम मिळकतीचा गैरहक्की कबजा परत मिळविणें, (३) करारांची प्रत्यक्ष अमलबजावणी, (४) दस्त-ऐवजांत दुरुस्ती करणें, (५) करारपत्रें किंवा दस्त-ऐवज रद्द करणें, (६) केवळ हक्क ज्ञापन करणें (डिक्लेरेटरी डिक्री), (७) सरकारी नोकरांना त्यांचें कर्तव्यकर्म करण्यास भाग पाडणें, (८) तात्पुरते किंवा कायमचे मनाई हुकूम किंवा ताकीद देणें, इतक्या प्रकारचे दावे लावण्यासंबंधीं तरतूद आहे.

**विशिष्टगुरुत्व**—(स्पेसिफिक् ग्रॅव्हिटी). एखाद्या प्रमाणभूत विशिष्ट पदार्थाचें विशिष्ट घनफळाच्या आकाराचें जें वजन असतें त्या वजनाशीं त्याच घनफळ आकाराच्या कोणत्याहि पदार्थाच्या वजनाचें जें प्रमाण असतें त्यास विशिष्टगुरुत्व असें म्हणतात. पदार्थाची घनता ही त्याच्या एक प्रमाणाच्या घनफळामध्यें जें द्रव्य असतें तें होय असें मानण्यांत येतें. यावरून कोणत्याहि पदार्थाची घनता आणि एखाद्या प्रमाण अशा पदार्थाची घनता यांमध्यें जें प्रमाण असेल तेंच त्याचें विशिष्टगुरुत्व होईल. याकरितां जो प्रमाणपदार्थ घ्यावयाचा तो ऊर्ध्वपातन केलेलें शुद्ध पाणी घेण्यांत येतो, व त्याचें उष्णमान ४° शत. हें मानण्यांत येतें. वायूकरितां हा प्रमाणपदार्थ हवा किंवा उज्ज वायु हा घेण्यांत येतो. वायूंची घनता नेहमीं ०° शत. या उष्णमानांत व ७६० मिलिमीटर दाबामध्यें मोजण्यांत येते. कोणत्याहि पदार्थाचें विशिष्टगुरुत्व काढावयाचें असल्यास तें पुढें दिलेल्या दोन पद्धतींपैकीं एका पद्धतीनें काढण्यांत येतें : (१) आर्किमिडीजच्या सिद्धान्ताप्रमाणें, किंवा (२) त्या पदार्थाचें वजन आणि घनफळ यांची किंमत काढून. या दुसऱ्या पद्धतीमध्यें विशिष्टगुरुत्वदर्शक बाटलीचा उपयोग करण्यांत येतो. ही बाटली कांचेची असून तिच्यामध्यें साधारण ५० घन सेंटिमीटरइतका अवकाश असतो. हिला एक छिद्र पाडलेलें बूच असून या बाटलीच्या साहाय्यानें कोणत्याहि पदार्थाचें वजन व पाण्याचें वजन हीं सारख्याच घनफळाच्या आकारांच्या मानानें काढण्यांत येतात, आणि त्यावरून विशिष्टगुरुत्व निश्चित करण्यांत येतें.

**विशिष्टाद्वैत**— रामानुजाचार्यांनीं प्रस्थापित केलेलें वेदान्त मत. श्रीशंकराचार्यांचा मायामिथ्यात्ववाद आणि अद्वैत सिद्धान्त हीं दोन्ही खरीं नसून जीव, जगत् व ईश्वर हीं तीन तत्त्वें जरी भिन्न असलीं तरी जीव (चित्) व जगत् (अचित्) हीं दोन्हीं एका ईश्वराचेंच शरीर असल्यामुळें चित्-अचित्-ईश्वर एकच होय व शरीरांतील या सूक्ष्म चित्-अचित् यापासून पुढें चित् व अचित् किंवा अनेक जीव व जगत् निर्माण होतात. ब्रह्म हें अद्वैत आहे खरें, परंतु केवळ अद्वैत नाहीं, तर विशिष्ट अद्वैत आहे.

सर्व कांहीं ब्रह्ममय आहे. परंतु या ब्रह्ममयतेंत दोन भेद आहेत. हे भेद म्हटले म्हणजे जीव आणि जड (सत् व असत्). प्राणिमात्रांत हरि (ब्रह्म) अंतर्यामी विद्यमान आहे; परंतु तें ब्रह्म (किंवा हरि) जीव व जड यांहून भिन्न आहे. अर्थात् ब्रह्माचीं तीन अंगें आहेत : हरि, चित् आणि अचित्. या तिहींनीं व्याप्त झालेलें जग ब्रह्ममय असून हीं तिन्ही तत्त्वें अद्वैत आहेत. परंतु एक दुसऱ्यापासून सर्वथैव निराळें आहे. हरि किंवा परमेश्वर याच्या अधीन जीव व जड आहे; कारण कीं, ईश्वर हा भोक्ता आणि भोग्य अर्थात् पुरुष आणि प्रकृति किंवा जीव आणि जड, या दोन्हींमध्यें अंतर्यामी विराजमान होऊन राहिलेला आहे.

अद्वैत मतानुसार असें दर्शविण्यांत येतें कीं, ब्रह्म हें ज्ञानरूपी आहे; आणि जगत् हें मायामय किंवा अविद्यारूपी आहे. ज्ञानांत अविद्येचा अंतर्भाव होणें असंभाव्य आहे. यासाठीं रामानुजाचार्यांनीं अद्वैताचा विशिष्ट परीनें स्वीकार केला आहे. परमेश्वर हाच पुरुष व सगुण असून जगाचा नियंता व मुक्तिदाता तोच आहे. मनुष्याचा जीव देखील सगुण असून मुक्त झाल्यावर ईश्वराशीं समानता त्याला प्राप्त होते; परंतु ईश्वरसाम्य पावलेल्या जीवाला जगत् निर्माण करण्याची शक्ति नाहीं. ही शक्ति खेरीजकरून इतर परीनें मुक्त जीव व परमेश्वर यांच्यांत भेद नाहीं. मुक्त जीव जसा सगुण तसें ब्रह्महि सगुण. सगुण ब्रह्म व सगुण जीव यांच्यांत ऐक्य होत नाहीं. याचें कारण जीव अज्ञानामुळें आपलें ब्रह्मसमानत्व जाणत नाहीं. परमेश्वराचें सान्निध्य प्राप्त होणें आणि सलोकता लाभणें यालाच मोक्ष हें नांव आहे. मुक्त झालेला जीव हरीच्या स्वर्गांत कायमचा वास करतो. [ हिंदुधर्मदीपिका ]

**विशेष हक्क**—सामान्य कायद्यानें जे हक्क दिलेले असतात त्यांशिवाय जो विशेष हक्क दिला जातो त्याला कायद्यांत 'प्रिव्हिलेज' म्हणतात. असा विशेष हक्क परदेशचे वकील, पार्लमेंटचे सभासद, आणि क्लर्जी (धर्माधिकारी) यांना असतो. तो विशेष हक्क असा कीं, हे इसम आपल्या अधिकारावर असेपर्यंत आणि पार्लमेंटचे सभासद, पार्लमेंटची बैठक चालू असेपर्यंत आणि बैठकीपूर्वी आणि बैठकीनंतर ४० दिवस या वरील सर्व इसमांना दिवाणी कायद्याप्रमाणें व फौजदारी कायद्याप्रमाणेंहि वॉरंट काढून कैद करतां येत नाहीं. हिंदुस्थानांतहि अशाच प्रकारचा कायदा आहे.

**विश्रामगड**—मुंबई, कुलाबा जिल्हा. मानगांवच्या आग्नेयीस १३ मैलांवर समुद्रसपाटीपासून २,००० फूट उंचीवर पुणें व कुलाबा जिल्हा आणि भोर संस्थान यांच्या सिंहद्वारावर हा किल्ला बांधलेला आहे. रस्ता निंते खेड्यावरून जातो. हा ७० फूट लांब व ३८ फूट रुंद आहे. किल्ल्याच्या तीन बाजूंस कडे आहेत व फक्त पूर्वेस भिंत आहे. किल्ल्यांत १०० फूट उंचीवर एक खोली आहे. तेथें एक सिद्ध पुरुष राहत असे, असें सांगतात. तेथें आतां जातां येत नाहीं. हा किल्ला शिवाजीनें बांधला.

**विश्वकर्मा**—१. वैवस्वत मन्वंतरांतील प्रभास नांवाच्या वसूचा पुत्र. हा देवांचा शिल्पी आहे. यास त्वष्टा असेंहि नांव आहे. यानें वृत्रवधासाठीं इंद्रास्त्र, कृष्णासाठीं द्वारका व वृंदावन, इंद्रासाठीं लंका, वगैरे नगरें निर्माण केलीं. त्रिपुरासुराला मारण्यासाठीं शंकराला रथ करून दिला. तसेंच वृत्रासुराला मारण्यासाठीं दधीचि ऋषीच्या हाडांचें इंद्राला वज्र करून दिलें. याच्या नांवावर वास्तुशास्त्रावर एक ग्रंथ आहे.

२. ऋग्वेदांत देवांचा देव असा एक विश्वकर्मा उल्लेखिलेला आहे. तो सूक्तद्रष्टा असून याचा ऐंद्र महाभिषेक करण्यांत आला होता. या सम्राटाला कश्यपानें भूमीचें दान केलें पण भूमिच त्याच्याकडे राहीना. तेव्हां यानें सर्व प्राण्यांसहित स्वतःचा होम केला.

**विश्वतापहरण**—एक आयुर्वेदीय रसायन. वाळहिरडे, पिंपळी, ताम्रभस्म, कुड्याचें बीं, जेपाळ, कुटकी, तेद, शोधलेला पारा, व शुद्ध केलेला गंधक हीं समभाग घ्यावीं. प्रथम पारा आणि गंधक यांची कज्जली करावी, नंतर त्या कज्जलींत बाकीच्या औषधांचें वस्त्रगाळ चूर्ण घालून दोन्याच्या पानाच्या रसांत एक दिवसपर्यंत खल करून दोन दोन वाल वजनाच्या गोळ्या बांधाव्या. ही गोळी आल्याच्या रसांत नित्य दोन वेळ देत जावी म्हणजे नवज्वर दूर होतो. पथ्यास मुगाचें कढण व भात खावा.

**विश्वनाथ**—चौदाव्या शतकांतील एक कवि. मूळचा हा ओरिसा प्रांतांतील असून वैष्णव होता. हा व याचा बाप चंद्रशेखर यांना 'सांधिविग्रहिक महापात्र' अशी पदवी होती व त्यावरून हे राज्याधिकारी ठरतात. विश्वनाथाची ग्रंथरचना बरीच मोठी आहे. साहित्यशास्त्राचे नियम सिद्ध करण्यासाठीं यानें स्वतःचे संस्कृत व प्राकृत श्लोक लिहिले आहेत. 'साहित्यदर्पण', 'नरसिंहविजय', 'राघवविलास' आणि 'कुवलयाश्वचरित' हीं महाकाव्यें, तसेंच 'प्रभावतीपरिणय' व 'चंद्रकला' या नाटिका, 'प्रशस्तिरत्नावली' नांवाचा सोळा भाषांतील करंभक व काव्यप्रकाशावरील 'काव्यदर्पण' नांवाची टीका हे सर्व ग्रंथ याचे आहेत.

**विश्वब्राह्मण**—एक जात. यांना पंचाल किंवा पांचाल ब्राह्मण असेंहि म्हणतात. पांचाल या जातीची मुंबई इलाख्यांत लो. सं. सुमारें ७५,००० आहे. मद्रास–म्हैसूर भागांत सुमारें ४।५ लक्षांवर असेल. या जातीचीं देवळें, चाळी, घरें, जमीनजुमला, वगैरे आहेत. या जातीचे कांहीं लोक सुवर्णादि पंचशिल्पांचा धंदा करीत असतात. तथापि पौरोहित्य या ब्राह्मणांखेरीज इतर शिल्प्यांस नाहीं. या जातीचा मूळ पुरुष देवांचा शिल्पी विश्वकर्मा असून या जातीचे लोक प्राचीन कालापासून आजपर्यंत पौरोहित्य वृत्ति व ब्राह्मण धर्मास विहित असे देव व यज्ञीय शिल्प करीत आले आहेत. विश्वब्राह्मणांत वंशपरंपरेचे पुरोहित, ज्योतिषी, अग्निहोत्री, वैदिक, पुराणिक, वगैरे असून हल्लींच्या परिस्थित्यनुरूप वैद्यकी, जोसकी, कुलकर्णें, सराफी, वगैरे उच्च दर्जाचे धंदे करणारे निघाले आहेत. या जातीचा स्वजातीखेरीज इतर कोणत्याहि जातीबरोबर अन्नोदकव्यवहार होत नाहीं. यांत पोटजाती नाहींत. या जातीचेच भिक्षुक, वैदिक, ज्योतिषी, शास्त्री, वगैरे पूर्वापार असून तेच यांचे विवाहादि सर्व संस्कार करतात. विश्वब्राह्मण जातीस वेदशास्त्रीय ग्रंथांत रथकार, ऐतश, कवी, मेधावी, स्थपति, इ. नांवें आहेत. या जातींत भृग्वंगिरसगणांतर्गत सानग, सनातन, अहभून, पत्न व सुपर्ण अशीं मुख्य ५ गोत्रें आहेत.

**विश्वमूर्तिरस**—एक आयुर्वेदीय रसायन. सोनें, शिसे व तांबें यांचा चूर ५ भाग आणि पारा ४५ भाग यांचा एकत्र खल करून तें चूर्ण घट्ट फडक्यांत बांधून जंबीराच्या रसांत व कांजींत दोलायंत्र करून दोन दिवस पचवावें. नंतर गंधक ४५ भाग व हरताळ ४५ भाग एकत्र खलून, चूर्ण करून लोखंडाच्या शरावांत अर्धे चूर्ण खालीं घालून त्याजवर दोलायंत्रांत पचविलेलें औषध ठेवावें. मग त्याजवर गंधक व हरताळ यांचें राहिलेलें चूर्ण घालून दडपून वर लोखंडाचा दुसरा शराव पालथा घालावा व त्यास कापडमाती करून मातीच्या पात्रांत खालींवर मीठ घालून मध्यें तो शराव ठेवावा व तीन दिवस मंदाग्नि देऊन पचन करावें. आपोआप थंड झाल्यावर काढून खलून ठेवावें. असें तयार झालेलें भस्म ४ गुंजा आल्याच्या रसांत अथवा रुईच्या मुळाच्या काढ्यांत मिरपूड घालून द्यावें, किंवा दशमुळाच्या काढ्यांत द्यावें. म्हणजे कंठकुब्ज सन्निपात दूर होतो.

**विश्वस्त**—(ट्रस्टी). कांहीं विशिष्ट हेतूनें किंवा कांहीं मंडळीच्या हितासाठीं जेव्हां एखादी मालमत्ता ज्याच्या हवालीं करण्यांत येते तो इसम. एखाद्यानें एकदां विश्वस्त होण्याचें कबूल केलें कीं त्याला ती जबाबदारी विश्वस्तपत्रांत तशी सवड असल्याखेरीज किंवा न्यायालयाच्या परवानगीशिवाय सोडतां येत नाहीं. विश्वस्तांनीं आपल्या ताब्यांतलि मालमत्ता खाजगी व्यवहारांत किंवा संस्थेंत गुंतवावयाची नसून सरकारी रोखे किंवा नगरपालिका, बँका, रेल्वेसारख्या कंपन्या यांचे शेअर, इ. त चांगल्या तारणावर गुंतवावयाची असते.

**विश्वामित्र**—एक वैदिक ऋषि. वेदांत हा सुदासाचा पुरोहित व ऋग्वेदाच्या तिसऱ्या मंडलाचा द्रष्टा म्हणून प्रसिद्ध आहे. हा कुशिकाचा पुत्र होता. पुराणांतून, हा सोमवंशी गाधी राजाचा पुत्र असून तपःप्रभावानें क्षत्रियाचा पुढें ब्रह्मर्षि झाला, अशाबद्दल कथा आहेत. राजा असतांना यानें वसिष्ठाची कामधेनु हरण केली, पण ब्रह्मतेजानें याचा पराभव केला. तेव्हां हा ब्रह्मत्वासाठीं तप करूं लागला. अनेक वर्षें तप केल्यानंतर इंद्रादि देव त्यास ब्रह्मर्षि म्हणूं लागले, परंतु वसिष्ठ म्हणेना. तेव्हां विश्वामित्र वसिष्ठाचा द्वेष करूं लागला. त्याकरितां वसिष्ठाचा यजमान जो हरिश्चंद्र त्याचें यानें सत्त्व पाहिलें. वसिष्ठाचे १०० पुत्र कल्माषपाद राजाकडून भक्षण करविले. शेवटीं सर्व करून थकल्यावर याचा राग शांत झाला; तेव्हां वसिष्ठहि यास ब्रह्मर्षि म्हणूं लागला. मेनका अप्सरेनें याची तपश्चर्या भंगिली होती. तिच्या पोटीं याला शकुंतला नांवाची कन्या झाली. त्रिशंकूला यानें सदेह स्वर्गी चढविण्याकरितां प्रतिसृष्टि निर्माण केली. रामायण, महाभारत व इतर पुराणें यांतून विश्वामित्रासंबंधीं निरनिराळ्या कथा आहेत. हा एक गोत्रकार ऋषि आहे.

**विश्वासराव पेशवे** (१७४२–१७६१)—बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब व गोपिकाबाई यांचा हा वडील मुलगा. मुंज १७४९ च्या मार्चांत होऊन १७५० च्या मेमध्यें दीक्षित पटवर्धनांच्या घराण्यांतील लक्ष्मीबाईशीं लग्न झालें. सर्व पेशव्यांत विश्वासराव फार सुंदर होता. हा लहानपणापासून राज्यकारभारांत पडला होता व युद्धाच्या मोहिमांवर जात असे. निजामावरील शिंदखेडच्या स्वारींत याला मुख्य सरदार करून दत्ताजी शिंद्यास याचा कारभारी नेमलें होतें. या मोहिमेंत औरंगाबादेस व शिंदखेडास मराठ्यांनीं निजामाचा सपशेल पराभव केला. या युद्धांत विश्वासराव व जनकोजी या दोघांनींहि चांगला पराक्रम गाजविला. विश्वासराव व जनकोजी शिंदे जवळजवळ सारख्याच वयाचे असल्यानें त्यांच्यांत अखेरपर्यंत मैत्री होती. उद्गीरच्या लढाईनंतर भाऊसाहेब पानपतावर निघाला. भाऊसाहेबानें दिल्ली शहर ऑगस्ट १७६० त हस्तगत केलें त्या वेळीं दरबार भरवून त्यानें सर्वांकडून विश्वासरावास मुजरा करविला. या सालचा दसरा कुंजपुऱ्यास विश्वासरावाच्या नेतृत्वाखालीं मराठ्यांनीं साजरा केला. पानपतच्या लढाईत आकस्मिक त्याला छातींत गोळी लागून तो गतप्राण झाला. विश्वासराव पडेपर्यंत मराठ्यांचाच जय होता. तो पडल्यानें भाऊसाहेब खचला व जिवावर उदार होऊन तरवार मारीत दिसेनासा झाल्यानें मराठी सैन्य फुटलें आणि गिलचे विजयी झाले. विश्वासरावाच्या शवाचा हत्ती

सुजाउद्दौल्यानें आपल्याकडे नेला; परंतु अब्दालीनें शव आपल्याकडे मागून घेतलें. अखेर एक लक्ष रु. दंड भरून गणेश वेदांती, काशीराज, वगैरे मुत्सद्द्यांनीं शव सोडवून आणलें व त्याम आणि भाऊसाहेबांचें शव शोधून काढून त्यासहि धार्मिक विधीनें अग्नि दिला. विश्वासरावानें नानासाहेबाला पानपतहून अखेरीच्या दिवसांत एक पत्र पाठविलें होतें. त्यांत म्हटलें होतें कीं, "फौज व खजिना पाठविणें. मी आपल्यासाठीं लिहीत नाहीं, माझ्यासारखे पुत्र आपल्यास आणखी आहेत व होतील; परंतु भाऊसाहेबासारखा बंधु मिळणार नाहीं." विश्वासरावाची पत्नी लक्ष्मीबाई पानपतावर गेली होती ती पुण्यास परत आल्यावर दोन वर्षांनीं वारली.

**विश्वेश्वरअय्या, सर मोक्षगुंडम्** (१८६१- )— औद्योगिक योजनांचे एक हिंदी तज्ज्ञ. यांचें शिक्षण बंगलूर येथील सेंट्रल कॉलेज व पुणें सायन्स कॉलेज यांमध्यें झालें. प्रथम हे १८८४ मध्यें मुंबई इलाख्यांत पी. डब्ल्यू. डी. मध्यें असिस्टंट इंजिनिअर होते. १९०४ मध्यें ते सुपरिंटेंडिंग इंजिनिअर झाले. १९०८ मध्यें ते सेवानिवृत्त झाले व १९०९ मध्यें निझाम सरकारचे सल्लागार एंजिनिअर म्हणून राहिले. तेथून ते म्हैसूर संस्थानांत चीफ इंजिनिअर व पब्लिक वर्क्स खात्याचे व रेल्वे खात्याचे चिटणीस म्हणून गेले. १९१२ ते १९१८ मध्यें ते म्हैसूर संस्थानचे दिवाण होते. नंतर ते मुंबई येथें टेक्निकल इंडस्ट्रिअल एज्युकेशन कमिटीचे अध्यक्ष होते व मुंबई कॉर्पोरेशनच्या काटकसर समितीचे १९२४ मध्यें अध्यक्ष होते. १९२५ सालीं हिंदुस्थानच्या आर्थिक चौकशी समितीचे अध्यक्ष होते. मुंबईच्या बँकचे चौकशी समितीचेहि अध्यक्ष होते. १९१९-२० मध्यें त्यांनीं सर्व जगाचा प्रवास केला. यांनीं 'रीकन्स्ट्रक्टिंग इंडिया' (हिंदुस्थानची पुनर्घटना) व 'प्लॅन्ड इकॉनॉमी फॉर इंडिया' हे दोन ग्रंथ लिहिले आहेत. अखिल भारतीय कारखानदार संघाचे ते अध्यक्ष असून 'प्रॉस्पेरिटी थ्रू इंडस्ट्री' (उद्योगांतून उत्कर्ष) हें पुस्तकहि यांनीं लिहिलें आहे. यांच्या व्यापक ज्ञानाचा आणि दीर्घ अनुभवाचा देशाला बराच फायदा झाला आहे.

**विश्वोत्पत्तिशास्त्र**— हें विश्व कसें उत्पन्न झालें यासंबंधीं कल्पना. निरनिराळ्या राष्ट्रांत या कल्पना निरनिराळ्या आहेत. जग हें आकार आणि द्रव्य या बाबतींत पहिल्यापासून आहे तसें आहे व पुढेंहि नेहमीं असेंच राहणार, असा एक सिद्धांत. दुसरा, जग ज्याचें बनलें आहे तें द्रव्य अक्षय्य आहे; पण जगाचा आकार तसा नाहीं. तिसरा सिद्धांत म्हणजे विश्वाचा आकार आणि द्रव्य यांचा संबंध प्रत्यक्ष एखाद्या दैवी कारणाकडे पोंचतो; जग जसें उत्पन्न झालें तसें तें नाहींसेंहि होईल. पहिल्या सिद्धांताचा पुरस्कर्ता ॲरिस्टॉटल आहे, तर दुसरा सिद्धांत बहुतेक प्राचीन समाजांत रूढ होता. फोनिशियन, बाबिलोनियन व ईजिप्शियन लोक या दुसऱ्या कल्पनेला चिकटून होते. तर तिसरा, ईश्वरानें जग शून्यांतून निर्माण केलें हा सिद्धांत बायबलांत व हिंदु पुराणांतून आढळेल.

**विष**—जे पदार्थ मनुष्याच्या जीवितास अपायकारक असतात असे औषधी रासायनिक पदार्थ, दुष्ट वायू, अन्न, शाकाहारी किंवा मांसाहारी पदार्थ या सर्वांस विष असें म्हणतात. विषबाधा ही तीव्र अथवा जीर्ण स्वरूपाची असते. जीर्ण स्वरूपाच्या विषबाधेचें उदाहरण सोमलाचें किंवा अल्कलीचें देतां येईल. हें विष अल्प प्रमाणांत पोटांत गेल्यास तें हळूहळू रक्तांत मिसळतें व तेथून सर्व शरीरांत भिनतें. असा विघार झाल्यानें मनुष्यास अरुचि उत्पन्न होते. पोटांत दुखूं लागतें व ओकारी व अतिसार उत्पन्न होऊन मधून मधून बद्धकोष्ठता उत्पन्न होते. शरीराचें पोषण होत नाहीं व वजन कमी होऊं लागतें. डोळे, नाक व तोंड यांस सर्दी आल्याप्रमाणें विकार होतो. रोग्याच्या त्वचेवर परिणाम होतो व पोटाखालचा भाग पिवळसर पिंगट दिसूं लागतो. अशाच तऱ्हेची विषबाधा शिसें, पारा, तांबें, कथिल, फॉस्फरस, मॉर्फिन, कोकेन, वगैरे पदार्थ किंवा त्यांपासून बनविलेले संयुक्त पदार्थ यांपासून होते. रोग्याच्या लक्षणांवरून सामान्यतः कोणत्या विषाची बाधा झाली आहे हें कळूं शकतें.

पोटामध्यें अधिक प्रमाणांत विषारी पदार्थ गेल्यास तीव्र विषबाधा होते. तिचा परिणाम दोन प्रकारचा होऊं शकतो: १ स्थानिक, व २ दूरचा. स्थानिक परिणाम पुन्हां दोन प्रकारचा असूं शकतो: (अ) दाहयुक्त; उदा., गंधकाम्ल वगैरेचा परिणाम तावडतोब दिसूं लागतो. व (आ) क्षोभजनक; या प्रकारामध्यें विषाचा परिणाम दिसून येण्यास अर्ध्या तासापासून एक तासापर्यंत अवकाश लागतो. विषाचा दूरचा अथवा दुय्यम परिणाम विष पोटांत जाऊन आंतड्यांत शिरल्यानंतर होऊं लागतो व एकदां विष रक्तांत मिनल्यावर त्याचा परिणाम अनेक प्रकारांनीं होऊं शकतो. क्लोरोफॉर्म, क्लोरल हायड्रेट, मॉर्फिन, अल्कोहल, वगैरे विषांपासून मेंदूचें व पृष्ठवंशरज्जूचें कार्य मंद होऊं लागून जेव्हां मध्यमेंदूचीं केंद्रें मंद होतात, तेव्हां श्वासोच्छ्वास व हृदय यांच्या स्नायूंवर त्याचा परिणाम होऊन त्यांची क्रियाहि मंद होऊं लागून हळूहळू मृत्यु येतो. हायड्रोक्षायनिक किंवा प्रुसिक अम्लाचा परिणाम या मज्जातंतुकेंद्रावर फार जलद होतो व त्यामुळें तात्काल मृत्यु येतो. स्ट्रिक्निनच्या विषामुळें शरीराला आंचके देऊन श्वासोच्छ्वास व हृदयाची क्रिया अशक्य होते आणि त्यामुळें मृत्यु येतो. पोटॅशियम क्लोरेट, नायट्राइट्स व कार्बन मोनॉक्साइड यांचा परिणाम रक्तावर होतो व डिजिटॅलिस वगैरेचा परिणाम हृदयावर होतो.

दिवस आणि रात्र सारखीं असतात. ह्याच्या पातळींत अंतरिक्षांत असेंच एक काल्पनिक खगोलमध्यवृत्त असतें. खगोलाच्या ध्रुवापासून या खगोलमध्यवृत्तावरील प्रत्येक बिंदु ९०° अंशांवर असतो. सूर्य आपल्या वार्षिक गतींत फक्त दोनदां (२१ मार्च व २३ सप्टेंबर) या मध्यवृत्तावर दिसतो. त्या दिवशीं पृथ्वीवर सर्वत्र दिवस आणि रात्र सारखीं असतात.

**विषुवांश**—(राइट असेन्शन). एखाद्या ताऱ्याची स्थिति दर्शविण्यास लागणाऱ्या दर्शकसंज्ञां(कोऑर्डिनेट्स)पैकीं एक. तारा याम्योत्तर वृत्तावर आला असतां याम्योत्तर वृत्त, खगोल-वृत्ताला ज्या ठिकाणीं छेदतें त्या छेदनबिंदूच्या मेषाच्या आरंभा-पासूनच्या अंतराला म्हणतात.

**विषौषधि**—[वर्ग-स्क्रोफ्युलारिआसी. (इं. डिजिटॅलिस)]. या जातीमध्यें सुमारें वीस रोपें येतात. या वनस्पती युरोप व पश्चिम आशिया यांमध्यें आढळतात. हीं रोपें उंच वाढतात. ब्रिटनमध्यें ज्याला जांभळा 'कोल्ह्याचा मोजा' (फॉक्स ग्लव्ह) म्हणतात तें याच जातीचें झाड आहे. औषधींमध्यें याचा उपयोग हृदयास उत्तेजक म्हणून, तसेंच रक्ताचा दाब वाढण्याकरितां, किंवा शिरांचें संकोचन दूर करण्याकरितां वगैरे करतात. याचा उपयोग करतांना तें फार वेळ न देण्याची काळजी घेतली पाहिजे.

**विष्णु**—विष्णु या परमदेवतेला ऋग्वेदांत मोठेंसें महत्त्व दिलेले दिसत नाहीं. त्याच्या पौराणिक दशावतारांपैकीं वामन व वराह या दोन अवतारांचेच उल्लेख ऋग्वेदांत आढळतात. शतपथ ब्राह्मणांत मत्स्य व कूर्म अवतारांच्या बीजकथा आहेत. ॐकारांत 'उ' कार ही दुसरी मात्रा विष्णूसाठीं आहे. महाभारतांत व पुराणांत त्रिमूर्तींपैकीं हा दुसरा देव कल्पून त्याच्यावर सत्त्वगुणाचा आरोप केलेला आहे. हा नारायणरूपानें जलप्रलयाच्या वेळीं पाण्यावर तरंगत होता व क्षीरसागरांत शेषमंचकावर निद्रिस्त असा हा सर्वांना संकटाच्या वेळीं अवतार घेऊन साहाय्य करीत होता व आहेहि, असा भारतीयांचा समज आहे. वैष्णव विष्णूला परमेश्वर समजतात व बाकीच्या देवतांना गौण मानतात. विष्णु ही जगाचें रक्षण करणारी देवता असून तिला सहस्र नामांनीं आळविलें जातें. श्री किंवा लक्ष्मी ही धनदेवता विष्णुपत्नी असून वैकुंठांत हीं दोघें वास्तव्य करतात. गरुड हें विष्णूचें वाहन आहे. विष्णु हा चतुर्बाहु असून पांचजन्य शंख, सुदर्शन चक्र, कौमोदकी गदा व पद्म या वस्तू आपल्या चारी हातांत यानें धारण केलेल्या असतात. विष्णूच्या धनुष्याचें नांव शार्ङ्ग व खड्गाचें नांव नंदक आहे. त्याच्या वक्षःस्थलावर श्रीवत्सलांछन व कौस्तुभमणि विराजत असून मनगटावर स्यमंतकमणि प्रकाशत आहे. अच्युत, अनंत, जलशायी, वगैरे याचीं विशेषणें आहेत. याचें माहात्म्य सांगणारें एक स्वतंत्र पुराण आहे.

**विष्णुपुराण**—या पुराणांत वराहकल्पापासून घडलेल्या गोष्टी सांगितल्या आहेत. या पुराणाची श्लोकसंख्या सुमारें सात हजार आहे. विष्णुपुराणांत अर्थात् विष्णुदेवतेचाच महिमा वर्णिलेला आहे.

**विष्णुक्रांता**—हीं झाडें वेलीप्रमाणें जमिनीबरोबर वाढतात. पानें बारीक लांबट असतात, व फुलें काळसर तांबूस रंगाचीं व लहान असतात. ही वेल औषधी आहे. मुळव्याधीवर मुळांचा अंगरस तुपांत देतात. काविळीवर मुळी ताकाशीं देतात.

**विष्णुदास नामा**—(नामा विष्णुदास पाहा). एक मराठी कवि. नामा शिंपी व नामा विष्णुदास अगदीं निराळे होते. पण पुष्कळांनीं ते एकच समजून बऱ्याच चुका केल्या आहेत. विष्णुदासाचे कांहीं अभंग नामदेवाच्या गाथेंत गैरसमजुतीमुळें पडले आहेत. उदा., शुकाख्यान. पण या आख्यानाच्या शेवटच्या (३७०-७१) ओव्यांमध्यें कवीचें नांव व काव्यसंपूर्णतेचा काल (शके १५१७) दिला आहे.

**विष्णुबुवा ब्रह्मचारी** (१८२५-१८७१)—ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या हिंदु धर्मावरील आक्रमणाला प्रारंभीं पायबंद घालणारे स्वतंत्र विचाराचे एक हिंदु मिशनरी. यांचें पूर्ण नांव विष्णु भिकाजी गोखले असें असून हे मूळचे ठाणें जिल्ह्यामधील राजापूर तालुक्यांतील शिरवली गांवचे होत. यांचें शिक्षण बेताचेंच होतें. पुढें कांहीं दिवस जकातनाक्यावर नोकरी व नंतर दुकान यांसारखे उद्योग यांनीं केले. परंतु नंतर उपरति होऊन हे सप्तशृंगीच्या डोंगरावर तपश्चर्या करण्यास गेले असतां यांना 'पाखंड मताचें खंडन करून वैदिक धर्माचा प्रसार करण्याचा' आदेश मिळाला. तेव्हांपासून यांनीं व्याख्यानांचा दौरा काढला व हे मुंबईस आले. मुंबईस ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या आक्षेपांना हे आपल्या व्याख्यानांतून सडेतोड उत्तरें देत असत. प्रथम बंदिस्त जागेंत यांचीं व्याख्यानें होत. परंतु लोकांची गर्दी वाढूं लागतांच हे समुद्रकिनाऱ्यावर व्याख्यान देऊं लागले. पुढें १८५७ सालच्या बंडांत यांना व्याख्यानें देण्यास बंदी केली तेव्हां यांनीं 'वेदोक्त धर्मप्रकाश' हा ग्रंथ लिहून आपलें म्हणणें सर्वांपुढें मांडलें. खाण्यापिण्याच्या बाबतींत हे जातिभेदाचा निर्बंध मुळींच पाळीत नसत. सन १८५६ मध्यें 'भावार्थसिंधु' हा ओवीबद्ध ग्रंथ यांनीं लिहिला. पुढें यांनीं भगवद्गीतेवरील सेतुबंधनी टीकेचा अठरावा अध्याय लिहिण्याची कामगिरी हातीं घेतली होती, परंतु हें काम चालू असतां हे काळपुळीनें मरण पावले. आपल्या मतप्रचारासाठीं यांनीं मद्रास, कलकत्ता या भागांतहि प्रवास केला होता.

**विष्णुस्मृति**—विष्णुस्मृति, वैष्णव धर्मशास्त्र, किंवा विष्णुसूत्र हा एक प्राचीन सूत्रांचा संग्रह आहे. विष्णुसूत्रांत विविध विषयांची चर्चा असल्यामुळें जीं कांहीं पांचसहा धर्मसूत्रें आहेत त्यांत याची प्रामुख्यानें गणना करतां येते. कठशाखा आणि

मन्वादि स्मृती यांच्याशीं या सूत्राचा निकट संबंध असल्यामुळें याचें महत्त्व विशेष आहे. गायत्री, पुरुषसूक्त, अघमर्षण, व्याहृती, त्रिसुपर्ण, ज्येष्ठसामन्, बार्हस्पत्य मंत्र, इत्यादि वेदमंत्र यांत सांपडतात. विष्णुसूत्र हें कठसूत्राइतकेंच प्राचीन असलें पाहिजे. कठशाखेचे वेदग्रंथ आणि कठसूत्र यांचा एकच काल होय. यांतील विषय मनु, याज्ञवल्क्य, आपस्तंब, गौतम व इतर कित्येक स्मृतींतील विषयांशीं जुळतो. विष्णुसूत्रांत अर्वाचीन भागहि पुष्कळ आहे. विशेषतः पहिले आणि शेवटले कांहीं अध्याय दुसऱ्या कोणीं तरी बनवले असावेत, हें त्यांच्या रचनेवरून दिसतें. विष्णुसूत्राचा समग्र मूलग्रंथ नंदपंडितानें लिहिलेल्या वैजयंती नामक टीकेसह सांपडतो. नंदपंडित हा रामपंडित धर्माधिकाऱ्याचा पुत्र असून त्यानें ही टीका काशींत १६२२ त लिहिली.

**विसनगर**—विशालनगर. बडोदें संस्थान, कडी प्रांतांतील विसनगर तालुक्याचें मुख्य ठिकाण. येथील लो. सं. सुमारें वीस हजार आहे. शहराच्या उत्पत्तीसंबंधानें बऱ्याच आख्यायिका आहेत. विशालदेव नांवाचा वाघेला राजपुत्र यानें हें शहर स्थापिलें असें कोणी म्हणतात, तर कोणी चव्हाण घराण्यांतल्या विशाल देवानें १०४६ मध्यें हें शहर स्थापिलें, असें सांगतात. नागर ब्राह्मणांचें हें मुख्य स्थान आहे. येथें कडी प्रांत-न्यायाधिशाची कचेरी, तुरुंग, दवाखाना, गुजराथी शाळा, वगैरे सार्वजनिक संस्था असून देवालयें, धर्मशाळाहि पुष्कळ आहेत. येथील चिरेबंदी तलाव प्रेक्षणीय आहे.

**विसर्जन (उष्णता)**—(रेडिएशन). एखाद्या पदार्थापासून ईथरमध्यें किंवा एखाद्या दुसऱ्या माध्यमामध्यें ज्या लहरी उत्पन्न होतात त्यांस उष्णता विसर्जन असें म्हणतात. ही संज्ञा विशेषतः उष्णता आणि प्रकाश यांच्या बाबतींत लावण्यांत येते. कोणत्याहि प्रकाशाच्या वर्णपटाचे तीन भाग पाडतां येतात; ते म्हणजे अतिनील किरण, दृश्य किरण आणि अधोरक्त किरण (इन्फ्रा-रेड) हे होत. आणि याच किरणांमुळें प्रकाशाचा किंवा उष्णतेचा छायालेखन किंवा रासायनिक क्रियांमध्यें परिणाम झालेला आपणांस आढळून येतो. उष्णतेचें विसर्जन मोजण्याकरितां आतांपर्यंत अनेक प्रकारचीं यंत्रें वापरण्यांत आलीं आहेत. त्यांपैकीं सर्वांत महत्त्वाचें म्हटलें म्हणजे लँग्ले याचें 'बोलोमीटर' (उष्णताविद्युन्मापक) हें होय. एखाद्या धातूमध्यें उष्णमानाबरोबर जी विद्युद्रोधकता उत्पन्न होते तिचें मापन या यंत्राच्या साहाय्यानें करण्यांत येतें. व त्यावरून उष्णता-विसर्जकता काढण्यांत येते. लँग्ले यानें सूर्याच्या अधोरक्त किरणांच्या वर्णपटाची आकृति किंवा नकाशा काढला, आणि असें दाखवून दिलें कीं, वर्णपटांतील दृश्य भागाप्रमाणें या अधोरक्त भागाच्या अधोरक्त किरणांच्या वर्णपटांतहि अनेक रेषा दृष्टीस पडतात. या बोलोमीटरच्या साहाय्यानें वायेन, पाश्चेन, लूमेर, प्रिंगशिंग, इत्यादि शास्त्रज्ञांनीं उष्णता-विसर्जनशक्ति आणि उष्णमान यांतील संबंधाचें बरेंच संशोधन केलें. किर्चॉफ यानें असें सुचविलें कीं, आपणांस असा एक आदर्श उष्णताविसर्जक आणि एक पूर्ण उष्णताविसर्जक बनवितां येणें शक्य आहे कीं, त्याच्याबरोबर इतर पदार्थांची तुलना करतां येईल. अशा आदर्श विसर्जकाच्या जवळ जवळ काळ्या रंगाचे पदार्थ येतात. उदा., काळ्या मखमालीमध्यें तिच्यावर पडणाऱ्या किरणांपैकीं ९९·६ टक्के इतके किरण शोषण केले जातात. यावरून पूर्ण उष्णताविसर्जकास 'कृष्णवस्तु' असें म्हणतात. यावरून लूमेर आणि प्रिंगशिंग यांनीं प्रयोगांनीं असें दाखवून दिलें कीं, एक आंतून काळा रंग दिलेलें भांडें घेतलें व त्याच्या एका बाजूला एक बारीक छिद्र पाडलें तर त्या भांड्याच्या आंतील भागांतून विसर्जन पावणारे किरण यांचें तें भांडें जसजसें ऊन किंवा थंड करावें त्या प्रमाणांत बदलतात, यावरून तें कृष्णपात्र पूर्ण विसर्जक आहे असें प्रयोगावरून आढळून येतें. बोलोमीटरच्या साहाय्यानें त्यांनीं असें दाखवून दिलें कीं, या कृष्णपात्रांतून निघणाऱ्या उष्णताविसर्जनाचें प्रमाण व त्याची लहरीची लांबी ही त्या पात्राच्या मूल उष्णमानाच्या व्यस्त प्रमाणांत असते (वायनचा नियम) तसेंच त्या पात्रापासून एका सेकंदांत होणारें उष्णताविसर्जन हें त्या पात्राच्या मूळ उष्णमानाच्या चतुर्घात प्रमाणांत असतें (स्टेफन बोल्टस्मनचा नियम).

**विसर्प पुष्पवर्ग**—[वर्ग-रोझासी; इं. अँग्रिमोनी] हीं बहुवार्षिक रोपें समशीतोष्ण प्रदेशांत आढळतात. यांचीं फुलें पिवळीं असून यांच्या फळांस वांकडीं कुसें असतात; त्यामुळें त्यांचा निरनिराळ्या प्राण्यामार्फत प्रसार होतो.

**विसर्पिका**—(सोरिआसिस). हा एक जीर्ण स्वरूपाचा व दाहकारक चर्मरोग आहे. या रोगामुळें चामडीवर तांबडे चट्टे उठतात व त्यांवर पांढऱ्या खपल्या धरतात. हा रोग सामान्यतः लहान मुलांना व वयांत येत असलेल्या मुलांना होतो व तो पुढेंहि बरेच दिवस राहतो. यावर आर्सेनिकचा चांगला उपयोग होतो. बाहेरच्या खपल्या काढून क्रिसारोबिन मलम लावल्यास चांगला उपयोग होतो असें आढळून आलें आहे. या रोगावर पोटांत व बाहेरून असा दुहेरी उपचार करावा लागतो.

**विसाजी कृष्ण विनीवाले** (मृ. १७८५)—एक शूर ब्राह्मण सरदार. याचें मुख्य ठिकाण कोंकणांत राजापूर प्रांतांत तेरवण गांव होय. हा जातीचा कऱ्हाडा ब्राह्मण, आडनांव चिंचाळकर. कर्नाटकांत कडाप्याच्या स्वारीस बळवंतराव गणपतराव मेहेंदळे याजबरोबर विसाजी कृष्ण यास पाठविलें. तेथें त्याच्या शौर्याचा लौकिक होऊन त्याची बढती झाली. स्वारीहून आल्यावर पेशव्यांनीं याजकडे बिनीचें काम सुरू केलें. तेव्हांपासून यास बिनीवाले म्हणूं लागले. नंतर त्यानें जाट व रजपूत राजे यांपासून

खंडणी गोळा करून ( १७७० ) बहुतेक सर्व दुआब प्रांत पादाक्रांत केला ( १७७१ ); नंतर शहाआलम यास दिल्लीच्या तख्तावर बसवून त्याच्या अनुमतीनेंच रोहिल्यांचें पारिपत्य केलें. माधवराव पेशव्यानें याची कर्तबगारी पाहून फार वाखाणणी केली व मोठा सन्मान केला. विंचूरकरांचा वाडा पुण्यास नाना वाड्याशेजारीं आहे.

**विसापूर**—मुंबई, पुणें जिल्हा. मळवली स्टेशनच्या दक्षिणेस हा किल्ला ३,५५० फूट उंचीवर आहे. आंत एक बालेकिल्ला आहे. यांतील एका तोफेवर ट्यूडर राजचिन्ह आहे. हा बाळाजी विश्वनाथ यानें बांधला. १८१८ त हा इंग्रजांनीं घेतला.

**विसोया खेचर** (मृ. १३०९)—एक मराठी संतकवि. हा औंढ्या नागनाथचा राहणारा. हा चाटी व सराफ असे. हा ज्ञानेश्वर व सोपानदेव यांचा शिष्य व नामदेवाचा गुरु असून याचें 'हरिश्चंद्राख्यान' नांवाचें एक लहान प्रकरण व कांहीं अभंगरचनाहि आहे. 'मुळु वदनाचा अंगुळु हाताचा।' हा प्रारंभ असलेला याचा सांकेतिक संख्यांचा अभंग प्रसिद्ध आहे (नंदभाषा पाहा). त्या अभंगांत नंदभाषेची योजना केलेली दिसते. शके १२३१ मध्यें श्रावण शुद्ध एकादशीस हा बार्शीस समाधिस्थ झाला.

**विस्कॉन्सिन**—हें अमेरिकेच्या सं. संस्थानांतील एक संस्थान मिचिगन व सुपीरिअर या दोन सरोवरांनजीक आहे. क्षे. फ. ५६,१५४ चौ. मैल व लो. सं. (१९४४) ३१,३७,५८७ असून तींत जर्मन, पोलिश, नॉर्वेजियन, रशियन, ऑस्ट्रियन, स्वीडिश, झेकोस्लोव्हाकियन, इंग्रज व नीग्रो या राष्ट्रांचे लोक आहेत. शिवाय रेड इंडियन लोक सुमारें बारा हजार असून त्यांच्याकरितां ४२५ चौ. मै. प्रदेश पृथक् ठेवलेला आहे. संस्थानांत मिसीसिपी, सेन्ट क्रोइक्स, चिपेवा, कॅक व विस्कॉन्सिन या नद्या आहेत. येथें मोठालीं वावटळें होतात. मॅडिसन (राजधानी), मिलवॉकी, रेसीन, केनोशा, सुपीरिअर, ऑश्कोश, ग्रीनबे, शेबॉयगन व लाक्रोस हीं महत्त्वाचीं शहरें आहेत. येथें शेती हा महत्त्वाचा धंदा असून मका, गहूं व इतर अन्नधान्यें आणि तमाखू हीं पिकें होतात. दूधदुभतें हा येथील मुख्य धंदा आहे. येथें जस्त व लोखंड हीं खनिज द्रव्यें मुख्यतः सापडतात. शिवाय येथील सरोवरांत मच्छीमारीचा धंदा फार मोठा चालतो. येथें प्रथम वसाहत १६७० सालीं झाली व प्रथम हा प्रदेश फ्रेंच सरकारच्या ताब्यांत होता. १७६३ सालीं ब्रिटिशांच्या ताब्यांत गेला. नंतर १८४८ सालीं सं. संस्थानांच्या संघराज्यांत हें संस्थान सामील झालें. येथला राज्यकारभार एक गव्हर्नर हा ३३ सभासदांचें सेनेट आणि १०० सभासदांची असेंब्ली यांच्या मतानुसार चालवतो. येथें शिक्षण ७ ते १४ वर्षें वयापर्यंत सक्तीचें आहे. येथें दोन विद्यापीठें व अनेक विषयांचीं कॉलेजें आहेत. ६५ व त्याहून अधिक वर्षें वयाच्या इसमांना जास्तींत जास्त द. म. ४० डॉलर आणि गरीब मुलें व अंध इसम यांना पेन्शन देण्याची सरकारी व्यवस्था आहे.

**विस्फोटक**—(इंपेटिगो). मनुष्याच्या कातडीवर एक प्रकारची तीव्र आग होऊन सपाट अशा पुटकुळ्या दिसूं लागतात व त्यांमध्यें पू उत्पन्न होतो. अशा पुटकुळ्यांस विस्फोटक असें म्हणतात. हा रोग लहान मुलांस मोठ्या माणसांपेक्षां अधिक होतो. शरीरावर एखाद्या ठिकाणीं असे फोड उठले असतां ते खाजवण्यामुळेंहि किंवा चोळण्यामुळें सर्वत्र पसरण्याचा फार संभव असतो. तसेंच संसर्गामुळेंहि हा रोग फार जलद प्रसार पावतो. इतर त्वग्रोगांमध्येंहि हा अनुषंगानें उत्पन्न होतो. याचे अनेक प्रकार आहेत. यावर उपचार केले असतां हा बहुतेक कितीहि पसरला तरी बरा होतो. फोडांच्या खपल्या पाडून टाकून त्यांवर जंतुघ्न मलम लावले असतां बहुतेक काम होतें.

**विहार**—बौद्ध संप्रदायाच्या अनुयायांना शिक्षण देण्यासाठीं हे विहार किंवा मठ असत. हल्लींच्या निवासशालांप्रमाणेंच हे विहार असून यांत राहणाऱ्या भिक्षूंना फार कडक शिस्तीनें वागावें लागे. त्यांच्या आचारधर्माविषयीं अगदीं बारीकसारीक नियमहि दिलेले बौद्ध धर्मग्रंथांतून आढळतात. झोंपड्या, गुहा, प्रासाद (मजली घरें), आराम (अगदीं सुसज्ज, सर्व सोयींचीं विस्तृत घरें), वगैरे विहारांचे प्रकार असत. अनाथपिंडक या धनाढ्य व्यापाऱ्यानें बांधून दिलेला जेतवनविहार हा सर्वोत्कृष्ट म्हणतां येईल. हा अतिशय मोठा व राजवाड्यासारखा होता. राजगृहांतील यष्टिवन, वेणुवन व शीतवन हे विहार, श्रावस्ती येथील जेतवनाखेरीज पूर्वाराम, वैशालींतील महावन, कूटागार व आम्रराजि व कपिलवस्तु येथील निग्रोधाराम हे विहार प्रसिद्ध होते. या विहारांतून धार्मिक, बौद्धिक शिक्षणाखेरीज कला आणि धंदे यांचेंहि शिक्षण मिळे. नालंदा, विक्रमशीला, मिथिला, यांसारख्या विद्यापीठांची माहिती स्वतंत्र दिलेली आहे. हे मोठे विहारच होते.

**विज्ञानेश्वर**—याज्ञवल्क्य स्मृतीवरील सुप्रसिद्ध 'मिताक्षरा' टीकेचा कर्ता. या टीकेंत प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं त्यानें आपली माहिती दिलेली आढळते. तीवरून तो भारद्वाज गोत्री पद्मनाथ भट्टोपाध्यायाचा मुलगा व उत्तमपाद नामक गुरूचा शिष्य होता असें दिसतें. हा संन्यासी होता. हैद्राबाद संस्थानांतील कल्याण नामक गांवीं प्राचीन काळीं विक्रमार्क राजा राज्य करीत असे. त्याच्या पदरीं हा होता व त्याची यानें फार स्तुति केली आहे. यावरून त्याचा काळ १०७६–११२७ या दरम्यानचा असला पाहिजे. बंगालमधील दायविभागाची बाब खेरीजकरून, तसेंच मुंबई शहर व गुजराथ हे भाग सोडून देतां हिंदुस्थानांत ही टीका प्रमाण मानली जाते. या टीकेवर बाळंभट्ट, नंद पंडित विश्वेश्वरभट्ट, मधुसूदन गोस्वामी, हलायुधभट्ट, इत्यादींनीं टीका लिहिल्या आहेत.

**वीझमन, ऑगस्ट** (१८३४–१९१४)—एक जर्मन जीवशास्त्रज्ञ. त्याचे अतिशय महत्त्वाचे ग्रंथ आहेत ते—'एसेज अपॉन हेरिडिटी अँण्ड किण्ड्रेड बायॉलॉजिकल प्रॉब्लेम्स' (आनुवंशिकता व तत्संबद्ध जीवशास्त्रीय प्रश्न यांवर निबंध); 'जर्म प्लॅझम' (बीजद्रव्य); 'ऑन जर्मिनल सिलेक्शन' (बीजावरण); 'लेक्चर्स ऑन दि थिअरी ऑफ डीसेंट' (उत्पत्तिपरंपरा–सिद्धान्तावर व्याख्यानें) आणि 'दि एव्होल्यूशन थिअरी' (विकाससिद्धान्त). आनुवंशिकता ही बीजद्रव्यसातत्यावर अवलंबून असते; तेव्हां माणसानें संपादित गुणधर्म त्याच्या वंशजांत उतरत नसतात, असा त्याचा सिद्धान्त आहे.

**वीझमन, डॉ. शेम**—नवीन इस्राएल राष्ट्राचा पहिला अध्यक्ष. हा रशियन असून याची कीर्ति त्रिखंड आहे. जेरुसलेम येथील हिब्रू विद्यापीठाचा हा बराच काळ अध्यक्ष होता व इंग्लिश झिऑनिस्ट फेडेरेशनचाहि अध्यक्ष होता. यांचें वय पाऊणशें वर्षांचें आहे.

**वीणा**—तंबोरा पाहा.

**वीणा पक्षी**—(लायर बर्ड). हा ऑस्ट्रेलियांतील एक पक्षी आहे. यांतील नरपक्षाचा पिसारा आपल्याकडील मोरासारखा उभारला जातो. पिसाऱ्याच्या आकारावरून याला वीणा किंवा सारंगी पक्षी म्हणतात. या पक्ष्याचा रंग पिंगट असून आकार लहान कोंबडीसारखा असतो. पळतांना हा आपला पिसारा आडवा पसरतो. संयोगाच्या मोसमांत नरपक्षी उन्मत्त होऊन गाऊं–नाचूं लागतो.

**वीरगळ**—वीरांचीं स्मारकें असणाऱ्या सचित्र शिलांना म्हणतात. कानडी वीरकल्ल (कल्लु म्हणजे दगड) पासून वीरगळ हा मराठी शब्द झाला. वीरांचीं स्मारकें करण्याची प्रथा फार प्राचीन आहे. सिंधु संस्कृतीच्या अवशेषांत असे दगड सांपडतात. लढायांतून पडलेले, वाघासारख्या हिंस्र पशूंशीं युद्ध करतांना मेलेले, समुद्रावरच्या लढाईंत बुडलेले, गाईंचें संरक्षण करतांना मृत्यु आलेले अशा वीरांचीं स्मारकें दगडांवर तीनचार किंवा अधिक दालनें पाडून त्यांत चित्रें कोरून करतात. गुजराथेंत यांना पाळिये म्हणतात. सतींच्या स्मारक दगडांना कानडींत मास्तिकल्ल असें नांव आहे. म्हैसूर संस्थानांत असे वीरगळ पुष्कळ सांपडतात. आपल्याकडे खेडेगांवांतून देवळांजवळ, पारांवर किंवा कोठें जुन्या वाड्यांजवळ असे वीरगळ दिसतात. यांचें संशोधकांना फार महत्त्व वाटतें.

**वीरधवल वाघेल** (तेरावें शतक पूर्वार्ध)—दुसऱ्या भीमाचा मुख्य प्रधान लवणप्रसाद याचा हा पुत्र. आपल्या बापानंतर हाहि भीमाचा प्रधान झाला. अनहिलपट्टण हें याचें ठिकाण. गुजराथच्या सोळंकींचें राज्य टिकविण्याच्या कामीं बापलेक परिश्रम कारणीभूत झाले व शेवटीं तें राज्य यांच्याच घराण्याकडे आलें.



**वीरनिर्वाणसंवत्**—जैनांचा शेवटचा तीर्थंकर जो महावीर त्याच्या निर्वाणकालापासून ज्या शकाचा आरंभ मानण्यांत येतो त्यास 'वीरनिर्वाण' असें म्हणतात. हा शक ज्यांच्यामध्यें दिला आहे, असे जे कांहीं शिलालेख उपलब्ध आहेत ते अपवाद म्हणून सोडून दिले तर जैन ग्रंथांशिवाय इतर ठिकाणीं ह्या शकाचा उपयोग केलेला क्वचितच आढळून येईल. जैन संप्रदायांतील श्वेतांबरपंथी मेरुतुंगसूरीच्या 'विचारश्रेणी' नामक ग्रंथांत वीरनिर्वाण संवत् व विक्रमसंवत् ह्या दोन शकांतील अंतर ४७० वर्षें दिलें असून त्याच पंथांतील नेमिचंद्राचार्यांच्या 'महावीरचरित' नांवाच्या प्राकृत काव्यांत 'माझ्या निर्वाणानंतर ६०५ वर्षें व ५ महिने झाल्यावर शक राजा उत्पन्न होईल' असें महावीराच्या तोंडीं घातलेले शब्द आहेत. यांपैकीं दुसरा ग्रंथ विक्रमसंवत् ११४१ म्हणजे इ. स. १०८४ मध्यें लिहिला गेला असून पहिला इ. स. १३१० च्या सुमारास रचण्यांत आला असावा. ह्या दोन ग्रंथांतील पुराव्यांवरून असें दिसून येतें कीं, विक्रमसंवतांत ४७० व इसवी सनांत ५२७ किंवा शालिवाहन शकांत ६०५ मिळविले असतां वीरनिर्वाणसंवत् निघतो.

**वीरवल्लाळ होयसळ**—वल्लाळ होयसळ पाहा.

**वीरभद्र** (राज्य. १६२९–४५)—बेदनूरचा एक राजा. मूळचा हा इक्केरीचा राजा; परंतु सन १६३७ त रणदुल्लाखान व शहाजी यांनीं इक्केरी घेतल्यामुळें हा बेदनुरास वास्तव्य करूं लागला. हा भद्रापा नायकाचा पुत्र असून बसवपट्टणाचा केंग नायक हा याचा मांडलिक होता. परंतु त्यानें पुढें याच्या वर्चस्वाचें जूं झुगारून देऊन बंडाची उभारणी केली. तेव्हां वीरभद्रानें त्याची सर्व जहागीर जप्त केली. त्यामुळें केंग नायक विजापूर दरबारच्या आश्रयास गेला व शहाजी, रणदुल्लाखान व मलिक रैहान यांच्या साहाय्यानें त्यानें परत वीरभद्राच्या बेदनूर ऊर्फ कावागिरी किल्ल्यास वेढा दिला. तेव्हां वीरभद्राचा नाइलाज होऊन त्यानें रैहानमार्फत तहाची बोलणीं केलीं. या तहांत वीरभद्रानें तीस लाख होन खंडणीदाखल देण्याचें कबूल करून त्यांपैकीं सोळा लाख होन लगेच रोख दिले व राहिलेले चौदा लाख होन तीन हप्त्यांत फेडण्याचें अभिवचन दिलें. रोख मिळालेले सोळा लाख होन रणदुल्लानें बादशाही खजिन्यांत भरल्यानें त्याच्या राजनिष्ठेचें कौतुक झालें. यानंतर दुसऱ्याच वर्षीं यानें विजापूरकरांस खंडणी देण्याची टाळाटाळ केल्यानें व केंग नायकास पुन्हां त्रास देण्यास सुरवात केल्यानें विजापूरच्या बादशहानें याजवर सैन्य पाठवून याचा सर्व मुलूख जप्त केला.

**वीरभद्ररस**—एक आयुर्वेदीय रसायन. पारा १ भाग, गंधक १, अभ्रकभस्म १, त्रिकटु (सुंठ, मिरें व पिंपळी) ३, पंचलवण (सैंधव, बिडलोण, समुद्रमीठ, टांकणखार आणि संचळखार) ५, बडीशेप १, जिरें १, शहाजिरें १, या औषधांना आल्याच्या रसाची एक दिवस भावना देऊन उडदाएवढ्या गोळ्या कराव्या. ही गोळी चित्रक, आलें, आणि सैंधव यांच्या अनुपानांत घ्यावी व पथ्यास दूधभात खावा. यानें सन्निपात रोग बरा होतो.

**वीरराजेंद्र चोल** (राज्य. १०६३–७०)—चोल घराण्यांतील राजमहेंद्र चोलाचा हा चुलता त्याच्यानंतर गादीवर आला. यानें पहिल्या सोमेश्वर (पश्चिम) चालुक्यापासून गंगवाडी प्रांत (उत्तर सरकार प्रांत) जिंकला. तसेंच आपल्याविरुद्ध सोमेश्वर चालुक्यास साहाय्य करणाऱ्या केरळ, पांड्य, गंग व नोळंब या राजांचा उलगै येथें पराभव करून त्यांना चालुक्य राजाच्या आव्हानावरून कुडळसंगम येथे पळून लावले व तेथे विजयदर्शक असा एक स्तंभ उभारला. यानेंच सोमेश्वर चालुक्यास आपला जांवई करून घेऊन त्याच्या भावाविरुद्ध लढण्यास त्यास साहाय्य दिलें. वेंगी देश जिंकून यानें तो देश आपला जांवई विक्रमादित्य याजकडे दिला. हा स्वतःस 'राजाधिराज राजराज' म्हणवीत असे. पहिल्या सोमेश्वर चालुक्याशीं यानें पांच वेळां लढाया दिल्या. तसेंच सन १०६९ मध्ये तलैंग नांवाचा ब्रह्मदेशचा दक्षिण भाग जिंकून यानें समुद्रावरहि वर्चस्व प्रस्थापित केले. दुसऱ्या सोमेश्वर चालुक्याचा गादीवरील हक्क यानें हिरावून घेतला. हा सन १०७० मध्यें मरण पावल्यावर अधिराजेन्द्र नामक याचा पुत्र गादीवर आला.

**वीसलदेव वाघेल** (राज्य. १२४३–६१)—विश्वमल्ल किंवा विश्वल या नांवांनीं प्रसिद्ध असलेला वीरधवलाचा तिसरा पुत्र व वाघेल वंशांतील पहिला राजा. गुजराथचें राज्य स्वपराक्रमावर जिंकून यानें तेथें सन १२४३ ते १२६१ पर्यंत राज्य केलें. यानें आपल्या कारकीर्दीत मेवाड व माळवा येथील राजांशीं लढाया दिल्या. याच्या पश्चात् प्रतापमल्ल नांवाच्या याच्या थोरल्या भावाचा पुत्र अर्जुनदेव हा याच्या गादीवर आला.

**वुड, रॉबर्ट विल्यम्स** (१८६८– )—हा एक अमेरिकन पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ आणि ग्रंथकार असून त्यानें नळामधील पाणी गोठलें असतां तें विद्युत्प्रवाहाच्या योगानें वितळविण्याची पद्धति शोधून काढली. १९०१ पासून हा जॉन्स हॉप्कीन्स विद्यापीठामध्यें प्रायोगिक पदार्थविज्ञानाचा प्राध्यापक होता. सवर्ण छायाचित्राबद्दल यास जॉन्स स्कॉट लीगसीचें पदक मिळालें. यानें प्रकाशाच्या उपपत्तीबद्दलहि बरेच शोध लावले. याच्या कांहीं कादंबऱ्याहि प्रसिद्ध आहेत, त्यांत 'दि मॅन हू रॉक्ड दि वर्ल्ड' (पृथ्वीस झोके देणारा मनुष्य) ही प्रसिद्ध आहे.

**वुड, (मिसेस) हेन्री** (१८१४–१८८७)—एक इंग्रज कादंबरीकर्त्री. लग्नानंतर (१८३६) ही बहुतेक फ्रान्स देशांतच राहत असे. हिच्या बऱ्याच कादंबऱ्या आहेत. त्यांत 'ईस्ट लिन' ही अतिशय प्रसिद्ध असून तिचीं अनेक भाषांत भाषांतरें झालेलीं आहेत. वुडची भाषा सोपी असून तिच्या कादंबऱ्यांची मांडणी अगदीं साधी व बाळबोध वळणावर आहे.

**वुर्टेम्बर्ग**—हें जर्मनीच्या दक्षिण भागांत एक लोकसत्ताक राज्य आहे. क्षे. फ. ७,५३४ चौ. मैल. येथील बहुतेक भाग डोंगराळ असून दक्षिण भाग सपाट आहे. लो. सं. (१९३९) २९,०७,१६६ आहे. राजधानी स्टटगार्ट असून उल्म, हीलब्रॉन, एस्लिनजेन व रूटलिनजेन हीं प्रमुख शहरें आहेत. ऱ्हाइन, नेकर व डॅन्यूब या नद्या आहेत. हवा सौम्य असून अंजीर, कलिंगडें, दारू, मका, गहूं, तमाखू व फळें येथें विपुल होतात. येथील सुमारें एकतृतीयांश भाग जंगलमय असून ओक, बीच व पाइन हे वृक्ष आहेत. लोखंड, मीठ व इतर खनिज द्रव्यें सांपडतात. येथें कापूस, लोंकर व ताग यांचें कापड, कागद, घड्याळें, वाद्यें, खेळणीं, रासायनिक द्रव्यें, वगैरेंचे कारखाने आहेत. या प्रांतावर अमल १८०६ पर्यंत ड्यूकांचा होता, नंतर त्या मूळ प्रांतांत आणखी बराच प्रदेश सामील करण्यांत येऊन ड्यूकऐवजीं राजा ही पदवी चालू झाली. १८७१ सालीं हें राज्य जर्मन साम्राज्याचा एक घटक बनलें. १९१८ सालीं हें स्वतंत्र लोकसत्ताक (रिपब्लिक) झालें. १९४५ सालीं दुसऱ्या महायुद्धांत जर्मनीचा पूर्ण मोड झाल्यावर हा प्रांत फ्रेंच झोनखालीं देण्यांत आला आहे.

**वुलविच**—इंग्लंड, लंडन कौंटीचा एक भाग. थेम्स नदीवर हें ठिकाण असून लंडनच्या पुलापासून खालीं ८ मैलांवर आहे. शस्त्रागाराविषयीं हें ठिकाण प्रसिद्ध आहे. येथें सरकारी मोठा तोफखाना असून रॉयल मिलिटरी ॲकॅडमी नांवाचें लष्करी विद्यालय आहे.

**वूलर सरोवर**—[सं. उल्लोल → उलर → वूलर]. काश्मीर संस्थानांतले एक सरोवर. हें समुद्रसपाटीपासून ५,१८० फूट उंच असून याचें क्षे. फ. १२॥ चौ. मैल आहे. उत्तरेकडून या सरोवरांत तीन नद्या, व दक्षिण बाजूनें झेलम नदी शिरते. याच्या ईशान्येस एक लहानसें बेट आहे.

**वूल्व्हरहॅम्प्टन**—हें शहर इंग्लंडमधील स्टॅफोर्डशायर परगण्यांत आहे. येथें दगडी कोळसा व लोखंड विपुल सांपडतें; व त्यामुळें या शहराला 'ब्लॅक कंट्री' ची राजधानी असें म्हणतात. येथें मुख्य धंदा, खनिज लोखंड शुद्ध करून त्याचे सर्व प्रकारचे लोखंडी जिन्नस करणें, हा आहे. शिवाय पितळ, कथील, पोलाद यांचे जिन्नस व रासायनिक द्रव्यें तयार करण्याचे कारखाने येथें आहेत. लो. सं. (१९४५) १,४६,००० आहे.

**वृहिंग**—एक प्राचीन चिनी प्रवासी. चिनझे नांवाच्या भिक्षूबरोबरच हैनानहून निघालेला वृहिंग हा एक महिन्यानें श्रीभोजात आला. पुढें तो मलायाला गेला व नंतर १५ दिवसांनीं केदाहला गेला. तेथें त्यानें हिंवाळा संपेपर्यंत मुक्काम केला, व नंतर पश्चिम दिशेनें ३० दिवस प्रवास करून नागवनन( नागपट्टण ? )ला पोंचला. पुढें दोन दिवस प्रवास केल्यावर तो सिंहपुऱ्याला ( सिंहलद्वीपाला ) आला. तेथें त्यानें पवित्र दांताची पूजा केली, आणि मग एक महिना ईशान्येस प्रवास करून ओलिकिलो ( आराकान ) देशास आला. ही हिंदुस्थानची पूर्व मर्यादा समजली जात होती.

ओलिकिलो हा तेव्हां चंपा( सयाम )चा एक भाग होता. येथें एक वर्ष राहून तो आपला मित्र चिनझे याच्याबरोबर नालन्दापासून सुमारें १०० टप्प्यांवर पूर्वेस गेला. यानंतर त्यानें मुंग देशांतील महाबोधि देवळाकडे प्रयाण केलें. मग नालंदाला येऊन योग, कोश, वगैरेंचा अभ्यास करून विनयपिटकाच्या कांहीं प्रती मिळाव्या म्हणून लरदा ( किइलोके ) मठाकडे गेला. याच्यापुढें दोन टप्प्यांवर त्याला एक मातृवृत्तीनें राहणारा शिल्पशास्त्रज्ञ भेटला. हा बोधिसत्त्व चवानें सांगितलेल्या मार्गानें पृथ्वीच्या गर्भांत जाण्याचा प्रयत्न करीत होता असें तो लिहितो. यानंतर वृहिंग हा लवकरच नालंदास जाऊन वारला. ( ही माहिती सातव्या शतकांत इत्सिंगनें दिली आहे ).

**वृकविकार**—( ल्यूपस ). हा एक कातडीस होणारा सामान्य प्रकारचा क्षयरोग आहे. हा प्रथम लहानशा पिवळ्या, पिंगट रंगाच्या चट्टयांच्या स्वरूपांत दिसूं लागतो. या चट्टयांच्या पुढें मोठमोठ्या चकदण्या होतात. हा बहुधा चेहऱ्यावर दिसूं लागतो. याचा उद्भव हळूहळू होत जातो. या रोगावर उत्तम उपाय म्हणजे क्ष–किरण किंवा रेडियमचे किरण घेणें हा होय. सूर्यस्नानानेंहि उपयोग होतो.

**वृत्तिदात्री संस्था**—( एंप्लॉयमेंट ब्यूरो ). अशा संस्थांचा मुख्य उद्देश कामगार आणि उद्योगधंद्याच्या कारखान्यांचे मालक यांची एकमेकांना माहिती करून देणें हा असतो. अशा संस्था युनायटेड किंग्डममध्यें १९०९ सालीं 'लेबर एक्स्चेंजेस ॲक्ट' हा कायदा झाल्यानंतर प्रथमच अस्तित्वांत आल्या. सदर कायद्यानें बोर्ड ऑफ ट्रेड या खात्याला लेबर एक्स्चेंजेस नांवाच्या संस्था स्थापन करण्याचा अधिकार देण्यांत आला. या कामाबद्दल बेकार इसमाकडून कांहीं मूल्य घेण्यांत येत नाहीं. १९११ सालीं नॅशनल इन्शुअरन्स ॲक्ट या कायद्यानें सदर संस्थांकडे आणखी एक महत्त्वाचें काम देण्यांत आलें तें हें कीं, बेकार मजुरांना कांहीं वेतन मिळण्याची व्यवस्था करणें. १९२० सालच्या कायद्यानें बेकार वेतनाची पद्धति बहुतेक उद्योगधंद्यांत सुरू करण्यांत आली. असें वेतन देण्याला लागणारा खर्च सरकार, उद्योगधंद्याचे मालक आणि खुद्द मजूरवर्ग या तिघांनीं मिळून करावा अशी योजना करण्यांत आली.

हिंदुस्थानांत 'नॅशनल सर्व्हिस लेबर ट्रायब्यूनल' या संस्थांकडे मालकांना चांगले नोकर व तंत्रकुशल अशा नोकरांना उद्योग देण्याचें काम आरंभापासूनच ऐच्छिक म्हणून सोंपविलें होतें, तें कायदा करून कर्तव्य या सदरांत घातलें. महायुद्धांत तर अशा स्वतंत्र खात्याची जरूरीच होती व पुढेंहि युद्ध थांबल्यानंतर बेकारी वाढूं नये म्हणून वृत्तिदात्री संस्थांचा फार उपयोग होता. १९४५ सालीं डायरेक्टर जनरल ऑफ रीसेटलमेंट अँड एंप्लॉयमेंट या अधिकाऱ्याची नेमणूक करण्यांत आली. वृत्तिविनिमय ( एंप्लॉयमेंट एक्स्चेंजेस ), शिक्षण व प्रचार या तीन विभागांत या अधिकाऱ्याचें काम वांटण्यांत येऊन ठिकठिकाणीं वृत्तिविनिमय संस्था उघडण्यांत आल्या. यांशिवाय वृत्तींची माहिती देण्यासाठीं अनेक कचेऱ्या स्थापन झाल्या. आतांपावेतों हजारों लोकांना काम लावून देण्यांत आलें आहे व आणखी कित्येक हजार लोकांचे अर्ज घेऊन ठेवले आहेत. जागा जसजशा रिकाम्या होतात किंवा नवीन तयार होतात तसतशी या कचेऱ्यांकडून नोंदलेल्या यादींतून नोकरांची निवड होते. प्रथम लष्करी नोकरींतून सुटलेल्यांनाच कामें मिळून देण्यांत येत; पण आतां इतरांनाहि या कचेऱ्यांचा फायदा मिळत असतो.

**वृत्रासुर**—हा प्रसिद्ध इंद्रशत्रु ब्राह्मण होता. हा वेदकाळांतहि उल्लेखिलेला आहे. ऋग्वेदांत वृत्राचे पराक्रम जे वर्णिले आहेत ते म्हणजे गायी पळविणें, पाणी अडवणें, सूर्य लपविणें, व उषा न होऊं देणें हे होत. याचें देवराज इंद्र याशीं युद्ध होऊन याचा पराजय होईना, तेव्हां विष्णूच्या सल्ल्यावरून इंद्रानें दधीचि ऋषीच्या हाडांचें वज्र केलें ( दधीचि पाहा ) व त्यानें वृत्रास ठार केलें. यानें इंद्रास भागवतधर्म फार सुबोध रीतीनें पढविल्याची कथा आहे ( भा. ६,९ ). कांहीं वैदिक संशोधक इंद्र-वृत्र युद्ध हें सृष्टिचमत्काराचें रूपक समजतात. ते वृत्र म्हणजे मेघ धरतात.

**वृंदसंगीत**—१. ( कोरस ). प्राचीन ग्रीक लोकांत मोठमोठ्या समारंभाच्या वेळीं एकंदर समारंभाचा थाट व उदात्तपणा वाढावा याकरितां गाणाऱ्यांचा व नाचणाऱ्यांचा ताफा ठेवण्यांत येत असे. अशा तऱ्हेच्या ताफ्याकडून जीं डायोनिसियसच्या स्तुतिपर गीतें म्हणण्यांत येत त्यांतच वास्तविक ग्रीक नाटकाचें मूळ आहे. ग्रीक शोकान्त नाटकाच्या भरभराटीच्या काळांत ( ख्रि. पू. ५००–४०० ) या ताफ्यामध्यें स्त्रिया व पुरुष गायक असत व ते सर्व खेळ पूर्ण होईपर्यंत रंगभूमीवरच असत. नाटकांतील मध्यांतराच्या वेळांत हे गायकच तेथें नाटकाच्या विषयास अनुरूप अशीं गीतें गात असत. प्रथम प्रथम या ताफ्यांत ५० पर्यंत माणसें असत; परंतु पुढें पुढें ही संख्या १५ पर्यंत

मर्यादित करण्यांत आली. ग्रीक नाटकांतील हें ताफ्याचें गायन सॅम्सन ॲगानेस्टिससारख्या खेळांत उत्तरकालींहि ग्रीक नाटकांच्या पुनरुज्जीवनामध्यें दृष्टीस पडतें.

२. (ऑर्केस्ट्रा). नाटकामध्यें संगीताचा प्रवेश ज्या वेळीं झाला त्याच वेळीं म्हणजे सतराव्या शतकाच्या प्रारंभींच युरोपमध्यें वृंदसंगीताचा हळूहळू प्रवेश होत गेला. या कलाकारांमध्यें मांटिव्हेर्डी याचें नांव प्रथम आढळतें. सध्यांच्या वादकवृंदामध्यें मुख्य चार भाग असतात. ते म्हणजे १ तंतुवाद्यें, २ लांकडी सुषीर वायुवाद्यें, ३ पितळी सुषीर वायुवाद्यें, व ४ ठोकून वाजवावयाचीं वाद्यें. यांपैकीं पहिल्या तीन भागांत मन्द्र, मध्य व तार सप्तकांतील वाद्यें असतात. तंतुवाद्यांमध्यें सोप्रानो, कॉन्ट्राल्टो, टेनॉर व बास हे मुख्य चार प्रकारचे आवाज पहिल्या व्हायोलिन्स, दुसऱ्या व्हायोलिन्स, व्हायोलास व सेलॉस आणि डबल बास या वाद्यांनीं काढण्यांत येतात आणि या एकंदर वाद्यांतून सहा सप्तकांचे सूर काढतां येतात. लांकडी सुषीर वायुवाद्यांमध्यें वरील चार आवाजांचे प्रतिनिधी म्हटले म्हणजे फ्ल्यूट, ओबोए, क्लॅरिनेट आणि बासून हे होत. नंतर पितळी सुषीर वायुवाद्यांत ट्रंपेट, हॉर्न, टॉंबोन व ट्यूबा यांचीं कामें असतात. ठोकून वाजवावयाच्या वाद्यांत ड्रम्स, झांजा, ट्रायंगल, घंटा, गॉंग, वगैरे असतात. आणि हीं वाद्यें बहुधा तालाकरितां वाजविण्यांत येतात. अशा वाद्यांपैकीं टिंपानी व घंटा यांपासून कांहीं निश्चित कंपांचे स्वर निघूं शकतात. याशिवाय फ्ल्यूटच्या वरील एक सप्तक वाजविणारें पिकोलो, ओबोएपेक्षां थोडे खालचे स्वर वाजविणारें कोर आंग्लेझ, बास क्लॅरिनेट आणि डबल बासून (मन्द्र सप्तकाखालचें सप्तक वाजविणारें) आणि सर्वांत खालचे स्वर काढणारें ट्यूबा हींहि कधीं कधीं वापरण्यांत येतात. तसेंच हार्प हेंहि वाद्य बहुतेक वृंद-संगीतांत वापरण्यांत येतें.

**वृंदावन**—संयुक्त प्रांताच्या मथुरा जिल्ह्यांतील हें मथुरेच्या उत्तरेस ९ मैलांवर एक शहर आहे. लो. सं. सुमारें १८०००. येथून मथुरेस पक्की सडक व आगगाडी आहे. हिंदूंच्या धार्मिक इतिहासांत या स्थळाला बरेंच महत्त्व आहे. याचें प्राचीन नांव कालियावर्त होतें. भागवत ग्रंथांत वर्णिलेलें श्रीकृष्णाचें बरेंच चरित्र या ठिकाणीं घडून आलें. राधाकृष्णाचें हें आवडतें ठिकाण असल्यामुळें येथें हिंदुस्थानांतील दूरच्या भागांतून यात्रेकरू येत असतात. येथे १०० च्या वर देवालयें असून त्यांत १५९० सालीं राजा मानसिंग यानें बांधिलेलें गोविंद देवाचें मंदिर फारच उत्कृष्ट आहे. कृष्णभक्तीच्या निरनिराळ्या संप्रदायांच्या वाढीबरोबर या गांवाची वाढ होत गेली आहे. या स्थानाजवळूनच यमुना नदी वाहत असून तिला मोठमोठाले घाट बांधिले आहेत व भोंवतालीं रम्य उपवनांतून अनेक साधूंच्या समाधी आहेत. येथें मोर व वानर फार आहेत. येथें १८६६ सालीं नगरपालिका स्थापन झाली.

**वृद्धपणाचें वेतन**—(ओल्ड एज पेन्शन). इंग्लंडांत १९०९ पासून ओल्ड एज पेन्शन ॲक्ट अमलांत आला, व त्यांत १९११|१९१९|१९२४|१९३६ सालीं दुरुस्त्या झाल्या. या पेन्शनचें प्रमाण दर आठवड्यास पुढीलप्रमाणें ठरलें आहे: वार्षिक उत्पन्न २६ पौंड ५ शिलिंग किंवा त्याहून कमी असेल त्या इसमाला दर आठवड्यास १० शिलिंग पेन्शन आणि ज्याचें वार्षिक उत्पन्न ४९ पौंड १७ शिलिंग ६ पेन्स असेल त्याला दर आठवड्यास १ शिलिंग पेन्शन मिळतें. आणि त्याहून अधिक उत्पन्न असेल तर मुळींच पेन्शन मिळत नाहीं. वर दिलेल्या कमाल व किमान पेन्शनच्या दरांच्या दरम्यान पेन्शनचें प्रमाण कमी कमी होत गेलें आहे. पेन्शन मिळण्याकरितां पुढील शर्ती पाळण्यांत येतात: १. वय वर्षें ७० (अंधळ्यांच्या बाबतींत ४० वर्षें). २. सदर इसम पूर्वीचीं दहा वर्षें सतत ब्रिटिश नागरिक असला पाहिजे. ३. तो जन्मतः ब्रिटिश प्रजाजन असेल तर ५० वर्षें वयापासून १२ वर्षें युनायटेड किंग्डममध्यें राहिलेला असला पाहिजे. तो जन्मानें ब्रिटिश प्रजाजन नसेल तर २० वर्षें युनायटेड किंग्डममध्यें राहिलेला असला पाहिजे. १९२० सालीं मंजूर झालेल्या ब्लाइंड पर्सन्स ॲक्ट-अंधळ्यांसाठीं कायदा-या कायद्यानें ज्या इसमाला अंधत्वामुळें काम करतां येत नसेल त्याला ५० वर्षें वयापासून वरील शर्तीवर वर दिलेल्या दराप्रमाणें पेन्शन मिळतें. १९२५ सालीं मंजूर झालेल्या 'विडोज ऑर्फन्स ॲंड ओल्डेज कॉन्ट्रिब्यूटिंग पेन्शन ॲक्ट' ह्या कायद्यानें ६५ वर्षांवरील वयाच्या इसमांना त्यांनीं विम्याच्या योजनेप्रमाणें हप्ते भरलेले असल्यास दर आठवड्यास १० शिलिंग पेन्शन मिळतें. अशा इसमांना वरील शर्ती लागू नाहींत. शिवाय १९२८ सालीं ज्यांचें वय ७० वर्षें झालें आहे त्यांना दर आठवड्यास त्यांच्या हयातीपर्यंत १० शिलिंग आणि त्या इसमाच्या बायकोला किंवा विधवेला तिच्या वयाच्या ७० व्या वर्षापासून दर आठवड्यास १० शिलिंग पेन्शन मिळतें. अमेरिकेंत सरकारी औद्योगिक खात्यांतील कामगारांचा वृद्धवेतननिधि असतो व तो विम्याप्रमाणें चालू राहतो.

**वृक्ष**—ज्या वनस्पतींस काष्ठमय खोड असून जी बहुवर्षायु असते व जिला खोडाच्या रचनेसारखीच रचना असलेल्या शाखा फुटतात तीस वृक्ष म्हणतात. वृक्ष व झुडपें यांत हा फरक असतो कीं, झुडपें बहुवर्षायु असतात, पण त्यांस वास्तविक खोड नसतें. तथापि वृक्ष व झुडपें यांच्यामधील नक्की मर्यादा ठरविणें कठिण आहे. वृक्षांमध्यें एकदल व द्विदल असे दोन्ही वर्ग आहेत. त्यांत अधिक संख्या व वर्ग द्विदल वर्गांतील आहेत. वनस्पतींमध्यें

वृक्षांचें आयुष्य सर्वांत दीर्घ असतें व तें प्राण्यापेक्षांहि पुष्कळ अधिक असतें. अरण्य, जंगल पाहा.

वड, पिंपळ यांसारख्या वृक्षांची हिंदूंमध्यें पूजा करण्यांत येते. विलायतेंत देशील 'मे-पोल' चा सण असतोच.

**वृक्षक्षीर**—(मॅन्ना). ॲश झाडाच्या जातीच्या एका झाडास [फ्रॅक्सिनस ऑर्नस] खांचा पाडून त्यांतून जो गोड रस निवतो तो थिजून घट्ट झाला म्हणजे त्याला वृक्षक्षीर (मॅन्ना) म्हणतात. हा औषधी आहे. हीं झाडें मूळ सिसिलीमध्यें आढळतात. त्याप्रमाणेंच कॅलॅब्रिया व दक्षिण युरोपमध्येंहि आढळतात. याच्या वड्या चौकोनी असून त्यांचा रंग पांढरट किंवा फिकट पिवळा असतो. त्या हलक्या, ठिसूळ, किंचित् पारदर्शक असतात. बायबलमध्यें उल्लेखिलेला मॅन्ना अथवा वृक्षक्षीर हा पदार्थ बहुधा टॅमारिक्स मॅनिफेरा या झाडापासून निवणारा शर्करायुक्त पदार्थ असावा. तवकील, वंशलोचन हेहि वृक्षक्षीरच आहेत.

**वेखंड**—हीं झाडें पाणकणसाप्रमाणें असून यांच्या मुळास वेखंड म्हणतात. याची एक पांढरी जात इराणांत होते तिला खुरासनी वेखंड म्हणतात. वेखंड फार औषधी आहे. पडशावर याचें चूर्ण हुंगतात. व अपस्मारांत मधाबरोबर पोटांत देतात. लहान मुलास श्वासोच्छ्वासाचा अवरोध झाल्यास उरावर व पाठीवर गायीच्या तुपांत वेखंड उगाळून लावतात व चोळून जिरवितात. याचा धूपहि देतात.

**वेंगी देश**—गोदावरी व कृष्णा या नद्यांमधील समुद्रापासून थोडासा आंतील प्रदेश. यास पूर्वी वेंगी देश म्हणत. यावर प्रथम पल्लव राजे राज्य करीत असत. त्यांचें राज्य चाळुक्य कुब्ज विष्णुवर्धन यानें घेतलें. बहुतकरून तें कांचीच्या राज्याचें मांडलिक असावें. विजयचंडवर्मा व त्याचा पुत्र विजयनंदिवर्मा या पांचव्या शतकांतील राजांचा उल्लेख असलेला एक शिलालेख प्रसिद्ध आहे. अमरावती येथील शिलालेखांत वेंगी राजांची पुढील कांहीं नांवें आढळतात: सिंहवर्मा, सिंहविष्णु, नन्दिवर्मा (दुसरा), अर्कवर्मा, उग्रवर्मा, महेंद्रवर्मा, इत्यादि. राजराज चोलानें हा प्रदेश पादाक्रांत केला होता.

**वेंगुर्लें**—मुंबई, रत्नागिरी जिल्ह्यांतील एक तालुका (पेटा). याचें क्षे. फ. ६५ चौ. मैल असून या तालुक्यांत एकच शहर आहे. खेड्यांची संख्या ११ असून लोकसंख्या सुमारें ५४,००० आहे. तालुक्यांत जमीन सुपीक व पाणी विपुल आहे. पाऊस दरसाल १०५ इंच पडतो. वेंगुर्लें हें तालुक्याचें मुख्य ठिकाण व बंदर आहे. लो. सं. सुमारें १८०००. वेंगुर्ल्याचें दीपगृह १८६९ सालीं बांधलेलें असून त्याची उंची २५० फूट आहे. १६३८ सालीं डच लोकांची वखार येथें होती. १८१२ मध्यें हें शहर सांवतवाडीकरांनीं इंग्रजांना दिलें; सध्यां डच वखारींत कोर्टकचेऱ्या वगैरे आहेत. येथें दोन हायस्कुलें आहेत.

**वेढण**—(टॅकल). जेव्हां एखाद्या कप्पीवरून दोरी खालीं आणून तिच्या एका टोंकास वजन लावलेलें असतें तेव्हां ती दोरी ओढली असतां वजन वर उचललें जातें. या क्रियेंत केवळ वजन उचलण्याची सोय होते. तींत यांत्रिक फायदा कांहीं मिळत नाहीं. जर एकापेक्षां अधिक कप्प्या उपयोगांत आणावयाच्या असतील तर त्यांचे दोन गट केलेले असतात व एक दोरी घेऊन एका गटांतील कप्पीवरून दुसऱ्या गटांतील कप्पीवर नेऊन पुनः पहिल्या गटांतील कप्पीवरून आणण्यांत येते. यामुळें पुष्कळच यांत्रिक फायदा मिळतो. हे कप्प्यांचे गट निरनिराळ्या प्रकारचे असतात. वेस्टन गटामध्यें खालच्या बाजूस एक कप्पी असून वरच्या बाजूस दोन कप्प्या जोडून बसविलेल्या असतात व यावरून सांखळी किंवा दोरी नेलेली असते.

**वेड**—कायद्यामध्यें वेडा मनुष्य त्याच्या कोणत्याहि कृतीबद्दल जबाबदार नसतो. परंतु कायद्याप्रमाणें एखादा मनुष्य वेडा आहे असें प्रत्यक्ष सिद्ध होईपर्यंत प्रत्येक मनुष्य शहाणा आहे असेंच धरून चालण्यांत येतें. इंग्लंडमध्यें एखादा मनुष्य गुन्हा करण्याच्या वेळीं वेडा होता असें दिसून आल्यास दोषी परंतु वेडा असा निकाल पंचांकडून देण्यांत येतो व त्यास राजाच्या मर्जीप्रमाणें अटकेंत ठेवण्यांत येतें. कायद्याप्रमाणें वेड्या लोकांच्या मालमत्तेचा ट्रस्टी राजा असतो व वेड्यांच्या मालमत्तेची व्यवस्था ट्रस्टी या नात्यानें लॉर्ड चॅन्सेलर पाहतो. जेव्हां एखाद्या मनुष्यास वेड्यांच्या इस्पितळास पाठवावयाचें असतें तेव्हां पाठविणारानें तो वेडा असल्याचा योग्य दाखला द्यावयाचा असतो. सर्व वेड्यांचे दवाखाने विशिष्ट कायद्याप्रमाणें सरकारी देखरेखीखालीं असतात. विशिष्ट व्यक्ति वेडी असून आपल्या मालमत्तेची व्यवस्था करण्यास ती अपात्र आहे असें ठरविण्याकरितां विशिष्ट न्यायाधीशाकडे अर्ज करावा लागतो व त्याची चौकशी करण्यांत येते.

मनाच्या दुरवस्थेमुळें वेडेपणाची ही स्थिति प्राप्त होत असते. प्रत्यक्ष मेंदूंत कांहीं शारीरिक बिघाड होऊनच नेहमीं वेड लागतें असें नसून त्याचीं मानसिक कारणेंहि असूं शकतात. तथापि मेंदूला प्रत्यक्ष विकार घडूनहि निरनिराळे मानसिक रोग जडतात. डोक्याच्या आवरणाला कांहीं इजा पोंचून बुद्धिभ्रंश होतोहि. उपदंशाच्या ज्यावर्तिके (लायकोचीट ऑफ सिफालिस) नेंहि पूर्णपणें बुद्धिभ्रंश झाल्याचीं उदाहरणें घडतात. या वेडाच्या पूर्वावस्थेंत रोगी भ्रमिष्ट बनतो व नाहीं त्या गोष्टींवर उधळपट्टी करीत असतो. दारू इत्यादि विषारी पेयें आणि औषधें घेण्यापासूनहि पुष्कळदां वेड लागतें. जोराच्या फेफऱ्यापासून देखील मेंदूला विकार होतो. वार्धक्यांत मस्तिष्कीय त्वचे (सेरेब्रल कॉर्टेक्स) ला जीर्णता येऊन

चेत्तभ्रंश उत्पन्न होत असतो. वेड आणि विषण्णता हीं विशिष्ट मानसिक दुरवस्थेचीं दोन भिन्न अंगें आहेत; पण भेदांत मात्र भिन्नता ओळखतां येत नाहीं.

पण बहुतेक रोगी मानसिक व्याधीनें दुबळे झालेले असतात; व ते बरे झालेले दिसले तरी त्यांच्या भावना नीट झालेल्या नसतात. त्यांना पुष्कळदां भ्रांति होत असते. वेडाला आनुवंशिक कारणेंहि असतात. तसेंच भोंवतीं जर वेडीं माणसें असतील तर मनावर तसा कांहीं थोडा परिणामहि होतो. आज या रोगाकडे विशेष लक्ष दिलें जात आहे. प्राथमिक अवस्थेंत योग्य वैद्याकडून उपचार केल्यास रोग बरा होण्याची पुष्कळ शक्यता असते. मानसिक व्याधींनीं पछाडलेल्या रोग्यांनीं आपलें हृदय उघडें करून मनमोकळेपणानें चांगल्या शहाण्या तज्ज्ञ माणसाला आपली सर्व हकीकत कळविल्यास मानसोपचारानें त्यांना बरें वाटेल.

वेडाचा मानसशास्त्रदृष्ट्या विचार श्री. ना. गो. चापेकर यांनीं केलेला असून तो असा आहे :

मानसशास्त्राच्या अभ्यासकाला स्वप्नांप्रमाणें वेडाचाहि विचार करणें भाग आहे. वेड म्हणजे काय? तें कां लागतें? ह्यांची समजूत पडल्याशिवाय मनाची ओळख पटली असें म्हणतां येणार नाहीं. साधारणपणें मनुष्य नित्य वागतो तसा वागत नाहींसा झाला—नित्याच्या वागणुकींत लक्षांत भरण्याइतका कमजास्तपणा झाला म्हणजे त्या माणसाला वेड लागलें असें आपण समजतों. माणसाच्या वासना उच्छृंखल असतात. विवेकानें तो त्या अमर्याद होऊं देत नाहीं. ह्या कारणानें मनुष्याच्या वर्तनांत समतोलपणा उत्पन्न होतो व त्या योगें समतोल वृत्ति ही माणसाची नित्याची वागणूक बनते. हा तोल सुटला कीं मनुष्य वेड्यांत जमा होतो. वासनांना लगाम घालण्याचें काम विवेकशक्ति बजावते. ही शक्ति कोणत्याहि कारणानें क्षीण झाली म्हणजे क्रियेला कारक फक्त त्याची लहर. तेव्हां लहर लागेल त्याप्रमाणें तो वागतो. तें वागणें निंद्य आहे, अनुचित आहे, हा विचार तेथें नसतो. विवेक हा बुद्धीचा धर्म आहे. ह्यावरून वेडाचें मूळ बुद्धींत आहे असें म्हणावें लागतें. बुद्धिभ्रंश हा शब्दप्रयोग ह्या दृष्टीनें अगदीं समर्पक आहे. मन असतें तसेंच असतें. तें बिघडत नाहीं.

वेडाचे अनंत प्रकार आहेत. बुद्धिभ्रंश ज्या प्रमाणांत असेल त्या प्रमाणांत वेड कमी-अधिक असतें. कित्येकदां तर वेडाच्या अस्पष्ट छटा शहाण्या माणसांच्या वागणुकींत अगर बोलण्याचालण्यांत आढळतात. बोलतां-बोलतां मध्येंच विसंगत, असंबद्ध असें वाक्य माणूस उच्चारतो—येथपासून तों वस्त्राचेंहि भान नसणें येथपर्यंत वेडाची पराकाष्ठा होते. अर्धवट बुद्धिभ्रंश होतो तेव्हां माणूस शहाणा व वेडा अशा द्विविध अवस्थेंत असतो. कांहीं बाबतींपुरतेंच माणसाचें विवेकाचें दडपण उडालेलें असतें. एरव्हीं तो मर्यादा संभाळून वागतो. माणसाच्या वासना किंवा इच्छा अनंत व नानाविध असतात. ह्या कारणानें वेड वेगवेगळ्या प्रकारांनीं प्रकट होतें. विवेक उडाल्यामुळें माणसाचे प्राकृतिक मनोविकार नंगा नाच करतात. मनुष्याचा खरा स्वभाव स्वप्नांत, वेडांत व दारूच्या धुंदींत व्यक्त होतो असें म्हणतात तें त्यामुळेंच. वेडांत एखादा मनुष्य दुसऱ्याचीं व्यंगें निर्धास्तपणें बाहेर काढतो. व्यंगें खरीं असलीं तर सद्भावनांच्या अतिरेकामुळें मनांतलें बाहेर पडतें असें समजावें; खोटीं व निराधार असल्यास मत्सर व द्वेष हें त्या वेडाचें कारण असतें. नष्ट झालेली विवेकशक्ति आपोआप पूर्वस्थळीं येते तेव्हां वेडेचार बंद पडतात. ही विवेकशक्ति कोणत्या कारणांनीं नष्ट होते व तिची पुनः प्रतिष्ठा कशी होते हें गूढ अद्यापि उकललें नाहीं. प्रथम वेड लागतें; तें कांहीं काल राहतें; नंतर जातें; पण पुनः उद्भवतें; राहतें—जातें—असा अनुभव आहे. एकदां वेड लागलें म्हणजे तें निरंतर असतेंच असें नाहीं. जो मनुष्य चांगल्या अवस्थेंत घराच्या बाहेर पडत नाहीं व कोणाशीं उगीच बोलत नाहीं तो वेडाचा झटका येतांच गांवभर हिंडूं लागतो व घरोघर जाऊन नमस्कार करीत सुटतो; तोंडाची बडबड सुरू होते. पातिव्रत्याकरितां नाणावलेल्या बायका वेडांत स्वैराचारी बनतात. डोकें जाग्यावर असलेलीं माणसेंसुद्धां एखाद्या विषयापुरतीं वायचळलेलीं आढळतात. एका स्त्रीला मी हुशार आहें अशी भावना असे. परंतु तुला अक्कल नाहीं किंवा समजत नाहीं असें कोणीं म्हणलें म्हणजे ती चवताळे; तिचें देहभान हरपे व त्यावर यथेच्छ तोंडसुख घेई. वेडाच्या उन्मत्तावस्थेंत मनुष्य खून करणें, आग लावणें अशीं अघोर कृत्यें करण्यासहि प्रवृत्त होतो. मनावरचा दाब सुटणें म्हणजेच वेड असें ह्यावरून दिसतें. परंतु कांहींना चिंध्या करण्याचें वेड असतें त्यास काय म्हणावें? हा विकृतबुद्धीचा परिणाम असावा. पदार्थ असतो एक आणि दिसतो भलताच हा जसा आपण दृष्टिविकार मानतों तद्वत् हाहि बुद्धिविकार असावा. मौल्यवान् व उपयुक्त चिंधी की सबंध वस्त्र, ह्याविषयीं भ्रम झाल्यानें कोरें वस्त्र तो फाडतो; अथवा रस्त्यांत पडलेल्या चिंध्या दक्षतेनें गोळा करून जतन करून ठेवतो. मेंदूला इजा होऊन बुद्धीमध्यें दोष उत्पन्न होतो. पण पेढी बुडाल्यानें तींत ठेवलेलें द्रव्य बुडालें हें कळतांच माणसांना वेड लागलेलें आहे. हें कशानें झालें? येथें मेंदूला प्रत्यक्ष इजा नसली तरी अप्रत्यक्षपणें मेंदूच्या शरीरांत चलबिचल होत असावी. ह्या विवेचनावरून कोणीहि असें म्हणूं शकेल कीं, निर्बुद्ध मनुष्य हा वेडाच असला पाहिजे. हें अनुमान अगदींच चुकीचें आहे असें अनुभवहि सांगणार नाहीं. वागणुकींत ज्यांचा तोल सुटला आहे असे किती तरी लोक आढळतात. ते फार नडत नाहींत एवढेंच. लोकांत विवेकपूर्वक वागणूक क्वचित् आढळते. मनांत येईल तें करणारे फार. त्यांना विचार करण्याची संवय नसते.

विचार करून चुकीचा निर्णय स्वीकारणें हें निराळें आणि मुळींच विचार न करणें हें निराळें.

मग आतां अशी शंका येईल कीं, सगळे लोक वेडे असावयास पाहिजेत तसे दिसत नाहींत. हें खरें आहे. सर्वच बेताल वागले तर समाज टिकणार नाहीं. यादवी माजून सर्वनाश होईल. परंतु लोकांची वागणूक सामान्यतः मर्यादेंत असते ह्याचें कारण मागें सांगितल्याप्रमाणें विवेकाचें नियंत्रण जरी नसलें तरी कायदा, धर्म व समाज ह्यांचें बंधन त्यांच्या मनावर असतें. ह्याच्यापुढें समाजाचें व धर्माचें बंधन सपशेल उडून जाईल आणि केवळ कायदा नियामक म्हणून शिल्लक राहील. तथापि कायदे करून माणसाची प्रत्येक हालचाल नियमित करणें शक्य नाहीं. एवढ्याकरितां विवेकशक्ति जागृत करण्याकडे विशेष भर देणें अवश्य आहे. हें काम समाज व शिक्षणसंस्था यांनीं करावयाचें असतें.

ह्याखेरीज मनुष्य बेफामपणें वागत नाहीं ह्याला दुसरें कारण असें आहे कीं, माणसाचे सर्वच मनोविकार दुर्दम्य नसतात. लोभ, मोह, मत्सर, इत्यादिकांस मनोविकार म्हणतात. त्यांपैकीं एखादा इतरांहून अधिक जोरदार असतो इतकेंच. प्रबल मनोविकार माणसाला आपल्या अंकित करतो. अमुक परिस्थितींत माणूस कसा वागेल ह्याचा अंदाज त्याचा जो प्रबल विकार असेल त्याच्यावरून करीत असतात. हा विकार प्रबल असला तरी उन्मत्त होत नाहीं. ह्याचें कारण बाह्य अगर अंतःस्थ बंधनें; त्याचप्रमाणें परिस्थितीची शृंखला हें होय. माणसाची प्रवृत्ति म्हणजे मनाची स्वाभाविक ओढ हीहि त्याच्या बलिष्ठ मनोविकारापासून उद्भवते. कोणी पैशाचा लोभी तर कोणी स्त्रीचा; तिसरा लौकिकाचा. विवाहसंस्थेमुळें स्त्रीविषयक वासना तृप्त होते त्याप्रमाणें अन्य वासना भागविण्याचे खास उपाय योजतां येत नाहींत, हें एक सामाजिक संकट आहे. राहण्याला घर व जगण्यास शेतवाडी ही प्रत्येकाला मिळणें शक्य झाल्यास मालमत्तेच्या हांवेला आळा बसण्याचा संभव आहे. हें कांहीं होवो. एवढें खरें कीं, वासनांचा उन्माद कांहीं व्यक्तींतच आढळेल. सामान्यतः माणसाच्या वासना नेमस्त असतात. हेंच समाजरक्षणाचें कवच आहे. मूलभूत वासना नैसर्गिक आहेत व त्या आवश्यक आहेत. त्या सदुपयोगी लावणें हें मनुष्याचें कर्तव्य. ह्या कामीं त्याला पूर्ण स्वातंत्र्य आहे. समाजसेवेंत स्वतः गुरफटून घेणारा मनुष्य कनक व कांता यांच्या मागें लागणार नाहीं. लोभ असले तर संपत्ति मिळवावी, पण दानशूर बनण्याची महत्त्वाकांक्षा बाळगून तिचा सदुपयोग करावा. वासना हें कांटेरी झाड नाहीं. तो कामवृक्ष आहे. मात्र वासनेचें कांटेरी झाड बनविणें अगर कामवृक्ष बनविणें हें आपल्या हातचें आहे.

वेड्यांसंबंधीं कायदा—(इंडियन ल्युनसी ॲक्ट). हा कायदा १९१२ सालीं मंजूर झाला व त्यांत १९१६, १९२०, १९२२, १९२३, १९२६ सालीं दुरुस्त्या करण्यांत आल्या. या कायद्याचीं एकंदर कलमें १०० आहेत. त्यांपैकीं महत्त्वाचीं पुढीलप्रमाणें आहेत: या कायद्याचा उद्देश, वेड लागलेल्या इसमांना अडकवून ठेवण्याकरितां व त्यांना औषधपाणी देऊन बरें करण्याकरितां वेड्यांचीं अनाथगृहें (ल्युनॅटिक असायलम) किंवा मानसिक रोगी लोकांचीं इस्पितळें (मेंटल हॉस्पिटल) स्थापणें, व त्यांत वेड्या इसमांना सांभाळणें, हा आहे. वेडा म्हणजे मेंदू बिघडलेला किंवा सर्वस्वीं बुद्धिहीन झालेला इसम असा अर्थ आहे. वेड्या इसमाला वरील संस्थेंत पाठवण्याकरितां तेथल्या मॅजिस्ट्रेटकडे अर्ज करावा. अर्जाला दोन डॉक्टरांचीं सर्टिफिकिटें जोडावीं; त्यांपैकीं एक डॉक्टर सरकारी मेडिकल ऑफिसर असावा. मॅजिस्ट्रेटनें अर्जाची चौकशी करून वेड्याला इस्पितळांत घेण्याचा हुकूम करावा. वेडा इसम फार भयंकर रीतीनें वागत असेल व त्याला मोकळा ठेवणें अनिष्ट असेल तर त्याला इस्पितळांत विनखर्चानें घेतलाच पाहिजे. परंतु वेड साधारण असेल तर अन्न-वस्त्राचा खर्च अंमलदार देणार असेल तर मॅजिस्ट्रेटनें हुकूम द्यावा (कलमें ५ ते १२). इलाख्याच्या शहरीं हायकोर्टानें सदर चौकशी करून हुकूम द्यावा. वेड्यांच्या अशा संस्था तपासण्याकरितां सरकारनें किमान तीन आवेक्षिक (व्हिजिटर) इसम नेमावे, व त्यांपैकीं एक मेडिकल ऑफिसर असावा. वेडा बरा झाला असें दिसल्यास किंवा तीन आवेक्षिकांनीं वेड्याला सोडावें असा शेरा दिल्यास त्याला इस्पितळांतून बाहेर सोडण्यांत यावें (कलमें ३१ ते ३४). या कायद्याचीं बाकीचीं कलमें वेड्याच्या इस्टेटीची व्यवस्था करण्याकरितां कोर्टानें मॅनेजर नेमणें, वेड्यांचीं इस्पितळें स्थापणें, वेड्यांच्या खाण्यापिण्याचा खर्च वसूल करणें, वगैरेबाबत आहेत. शिवाय एखादा गुन्हेगार इसम वेडा असेल तर त्याच्यावरील खटला न चालवतां त्याला दोषमुक्त करून त्याच्या नातेवाइकांच्या ताब्यांत देण्याबद्दलची व्यवस्था क्रिमिनल प्रोसीजर कोड या कायद्यांत आहे (कलमें ४६४ ते ४७५).

**वेडा राघू**—(बी-ईटर). या पांखराचा खऱ्या राघूशीं म्हणजे पोपटाशीं संबंध नाहीं. सारखेपणा थोड्या अंशीं जो आहे तो फक्त रंगांत. हा पक्षी अगदीं चिमणीएवढा असून याची निळसर काळी चोंच फार लांब असते. याचे पंख मागच्या बाजूनें विभागलेले दिसतात. मधलीं पिसें आंखूड असतात. याचा रंग गवतासारखा हिरवागार असतो. डोक्याचा रंग सोनेरी असून याच्या मानेभोंवतीं काळी रेघ असते. याचे गाल निळ्या रंगाचे असतात. व डोळे तांबड्या रंगाचे असतात. हीं पांखरें शहरांत फारशीं दिसत नसलीं तरी शेतांत कुंपणाच्या तारेवर बसलेलीं आढळतात. कीटक हें त्यांचें मुख्य भक्ष्य. मधमाशा यांना फार

आवडतात. म्हणून या पक्ष्याला 'मधमाशा खाणारा' (बी-ईटर) असें इंग्रजी नांव आहे. यांची वीण मार्च ते मे महिन्यांत होते. या पांखराचें घरटें वाळूच्या बांधांत किंवा मऊ जमिनींत असतें. हीं पांखरें प्रवासी असावींत असे वाटतें. हीं हंगामाप्रमाणें एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जातात. त्यांना उष्ण हवा मानवते. कारण तेथें भक्ष्य मुबलक व सदोदित मिळतें.

**वेणूबाई** (शक १५४८–१६००)—एक संतकवयित्री. ही समर्थ रामदासस्वामींची एक शिष्या होती. ही मिरज येथील देशपांड्यांची कन्या. लग्न लागलें त्याच दिवशीं नवरा मरून ही विधवा झाली. पुढें ही लवकरच समर्थांची शिष्या झाली व उरलेलें आयुष्य रामभजनांत व अध्यात्ममार्गांत घालविलें. शके १५७७ मध्यें हिचा मठ मिरज येथें स्थापन झाला. शके १६०० च्या चैत्र १४ स हिचें सज्जनगडास देहावसान झालें. 'कौल', 'सीतास्वयंवर' यांसारखे तिचे ग्रंथ उपलब्ध आहेत.

**वेत**—वेत हें एक ताडाच्या जातीचें झाड आहे. त्याचें लांब व बारीक जें खोड असतें त्यासच वेत म्हणतात. उष्ण प्रदेशांत, हिंदुस्थानांत, मलाया द्वीपकल्पांत, आणि सुमात्रा, जावा व दुसऱ्या आशिया खंडाच्या आग्नेय भागांतील बेटांत हें झाड जंगलांत वाढतें. याचीं खोडें १०० पासून ६०० फूटपर्यंत उंच वाढतात. उष्ण कटिबंधांतील दुसऱ्या कोणत्याहि झाडाचें खोड इतकें लांब असत नाहीं. उष्ण प्रदेशांत सर्द जागचीं जंगलें याच्या बारीक व लांब फांद्यांनीं अगदीं दाट भरलेलीं असतात. याचे वेल उंच झाडांच्या शिखरांपर्यंत चढतात व तेथून बारीक दोरांप्रमाणें लोंबत असतात. वेत उभा सहज चिरतां येतो, म्हणून वेतावरील पृष्ठभागाची लांब व बारीक वेळें काढून त्यांनीं खुर्च्या, पलंग, वगैरे विणतात व शिवाय संचळ्या, पेट्या, टोप्या, वगैरेहि विणतात. चिनी वेत या कामीं फार चांगले. वेताच्या तंतूंची चळकटी व चिवटपणा व त्याच्याबाहेरील आच्छादनाचा कठिणपणा या गुणांनीं वेत या कामास फार उपयोगी झाला आहे. जो वेत फार लांब व बारीक असून पृष्ठभागाची तकाकी न जातां वांकतो व पिवळ्या रंगाचा असतो तोच फार उत्तम समजतात. याशिवाय यास खाण्याजोगीं फळें येतात आणि वेत आडवा कापला असतां त्यांतून जो रस येतो तोहि पौष्टिक असतो व लोक तो पितात. आणि यांच्या कोंवळ्या कोंवळ्या कोंबाची भाजीहि करतात. याचा पाला छपरावर घालतात.

**वेतन**—कामाबद्दल जो मोबदला मिळतो त्यास म्हणतात. हें वेतन कामाचा काल किंवा केलेलें काम यावरून आकारतात. मागणी आणि पुरवठा या तत्त्वाप्रमाणें पगाराचे मान ठरत असतें. फार बेकारी झाली म्हणजे वेतनाची रक्कम घटत जाते व महागाईंत ती वाढते.

दरमहा व तो ठरलेल्या दिवशीं पगार मिळण्याची प्रथा लोकांतली आहे. तिकडे आठवड्याचाहि पगार दिला देण्यांत येतो. आपल्याकडे पूर्वी पेशवाईंत मोठ्या अमलदारांवर असत. कामगारांचे पगार महिन्यावर व रोजावर तथापि कांहीं लोकांचा पगार दीडमाही ठरलेला असे. पगाराची रक्कम दुमाही ठरलेली असे असेंहि आढळतें. दिवशीं पगार वांटण्याची चाल होती असें दिसतें. दीपवाळीच्या वांटणीबद्दल, अक्षय्यतृतीयेच्या वांटणीबद्दल, पंचमीच्या वांटणीबद्दल, असे निर्देश आढळतात.

बद्दल मुशाहिरा, वेतन, तैनात, रोजमरा, आसामी हे सामान्यतः एकाच अर्थानें शब्द वापरलेले आढळतात. शेरा हाहि पगारवाचक शब्द पेशवे रोजनिशींत वापरलेला आढळतो. वेगवेगळ्या नाण्यांत वेतनाची रक्कम दिली जाई. खात्याच्या पगाराच्या वराता सरकारांतून प्रांतांच्या अधिकाऱ्यांवर सुटत. कोणाच्या पगाराची वरात कोणत्या प्रांतावर अगर सुभ्यावर द्यावयाची हें आगाऊ ठरलेलें असे.

आज भांडवलदार आणि मजूर यांमध्यें वेतनासंबंधींच सारखे झगडे चालू आहेत. भांडवलदारांच्या नफ्यांतील बराचसा हिस्सा मजुरांना वेतन म्हणून मिळावा अशी समाजवाद्यांची मागणी असते.

**वेताळ**—ही एक क्षुद्रदेवता आहे. वेताळ हा भूतनाथ किंवा पिशाचांचा राजा म्हणून त्याची खालच्या लोकांतून पूजा केली जाते. वेताळाची स्वारी आपल्या गणांसह रात्रीच्या वेळीं संचाराला बाहेर पडते अशी समजूत आहे. 'वेताळ पंचविशी' नांवाचा एक जुना कथासंग्रहहि आहे. वेताळाचा सहचारी भैरव म्हणून येतो. वेताळ हा शंकराचा द्वारपाल असून पार्वतीच्या शापानें मृत्युलोकावर आला अशी कथा आहे.

**वेताळगड**—मुंबई, रत्नागिरी जिल्हा. मालवण तालुक्यांत वराड पेट्यांत पेंडुर नांवाच्या खेड्यांत एका टेंकडीवर हा किल्ला बांधलेला आहे. किल्ल्याचें क्षेत्रफळ २२ एकर आहे. पाणी-पुरवठा चांगला आहे.

**वेद**—वेद हें जगांतील विशेषतः भारतीयांचें प्राचीनतम वाङ्मय आहे. वैदिक वाङ्मयांत संहिता, ब्राह्मणें व आरण्यकें हे तिन्ही भाग येतात. तथापि मुख्य वेद चार आहेत : ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद. (या प्रत्येकावर स्वतंत्र लेख आढळतील.) आपल्या व बऱ्याच युरोपीयांच्या पूर्वजांच्या प्राचीनतम स्थितिबोधक वाङ्मयांत वेदांना अग्रस्थान आहे. हिंदूंचें ज्ञान, विचार व भावना यांना वेदांमुळेंच निश्चित स्वरूप आलें आहे. कोट्यवधि भारतीय वेदांना ईश्वरवाणी ऊर्फ अपौरुषेय मानतात. भारतीयांचें आध्यात्मिक जीवन व संस्कृति यांचें पूर्वज्ञान वैदिक वाङ्मयांत मिळतें. वेद हें मोठें थोरलें ग्रंथभांडार असून तें तयार होण्यास

कित्येक शतकें लागलीं व अनेक पिढ्या तें श्रुतिपरंपरेनें म्हणजे मुखोद्गत पाठांतरानें चालत आलें आहे; आणि 'हिंदु' शब्दाची व्याख्या लोकमान्य टिळकांनीं केली त्यांत 'प्रामाण्यबुद्धिर्वेदेषु' हें मुख्य लक्षण सांगितलें आहे.

वेदांच्या 'संहिता' या भागांत स्तोत्रें, प्रार्थना, मंत्रप्रयोग, आशीर्वादात्मक सूक्तें, यज्ञविधीसंबंधाचे मंत्र, अरिष्टशांत्यर्थ प्रार्थना, वगैरे आहेत. 'ब्राह्मणें' या भागांत देवादिकांच्या कथा, यज्ञासंबंधीं विचार, निरनिराळ्या ऋतूंतील क्रियांचें व्यावहारिक व आध्यात्मिक महत्त्व, असला प्रकार येतो. 'आरण्यकें' व 'उपनिषदें' यांत परमेश्वर, जग व मनुष्य यांसंबंधीचें प्राचीनतम तत्त्वज्ञान आहे. हा वेदांचा शेवटचा भाग (उपनिषदें) व अंतिम ज्ञानाचा संग्रह म्हणून याला 'वेदान्त' असेंहि म्हणतात. पुढें स्मृतिकालीं "पितृदेव मनुष्याणां वेदश्चक्षुः सनातनम्॥" (मनुस्मृति १२-९४) इतकें महत्त्व वेदांना प्राप्त झालें.

प्राचीनतम स्थितिबोधक वाङ्मयाचे अवशेष या नात्यानें वेदाभ्यासाचें महत्त्व आहे. वेद हे कुराणादि विशिष्ट संप्रदायांच्या ग्रंथांप्रमाणें विशिष्ट कालीं, विशिष्ट व्यक्तीनें लिहिलेले नसून वेद हें एक ग्रंथभांडार आहे. तें अपौरुषेय व नित्य आहे, असा जुना समज आहे. वैदिक वाङ्मयाचे तीन वर्ग आहेत : संहिता, ब्राह्मणें आणि आरण्यकें-उपनिषदें.

पूर्वी संहितांची संख्या बरीच मोठी होती. आज ज्यांमध्यें विशेष फरक दिसून येतो अशा ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद या चार संहिता आहेत. ब्राह्मणें, आरण्यकें व उपनिषदें यांचाहि वैदिक वाङ्मयांत समावेश होतो. वैदिक वाङ्मय श्रौतस्मार्त धर्माचा पाया आहे व ईश्वरप्रणीत आहे अशी भारतीयांची जुनी भावना आहे. हिंदुस्थानांत निघालेल्या तत्त्वज्ञानाच्या सर्व संप्रदायांस वेदांचें प्रामाण्य कबूल आहे.

वेदांमध्यें वेद आणि वेदस् अशा दोन शब्दांचे प्रयोग आढळतात. वेदस्चा पहिला अर्थ धन, नंतरचा ज्ञान व पुढें वेद शब्दाचा ज्ञान या अर्थानें प्रचार व त्यानंतर वेद या शब्दास ऋग्यजुःसामांचा समुच्चय असा अर्थ आला. ऋक्, यजुः, सामन् यांचे अर्थ मात्र पूर्वीपासून निश्चित होते. वेदस् शब्दाचा हविः व वेद शब्दाचा मार्जनी असाहि अर्थ करण्यांत आला आहे.

वेदप्रामाण्यवादी लोकांनींहि अंधश्रद्धेनें बुद्धि मंद होऊं न देतां वेदांविषयीं आपलें विचारस्वातंत्र्य कायम ठेविलें होतें. जगदुत्पत्तीबरोबरच वेदोत्पत्ति झाली असें वेदांचें श्रेष्ठत्व दर्शविणारें वर्णन ऋग्वेदांत व अथर्ववेदांत आहे. वेद व देवता यांचा अन्योन्याश्रय दाखवून वेदांचें महत्त्व अथर्ववेदांत गायिलें आहे.



अग्नि, वायु व सूर्य या तीन प्रकाशांपासून तीन वेद उत्पन्न झाले असें ब्राह्मण ग्रंथांत, उपनिषदांत व मनुस्मृतींत म्हटलें आहे. वेदांचें प्राचीनत्व दाखविण्यासाठीं, वेद सृष्टीच्याहि पूर्वीचे आहेत किंवा प्रजापतीनें ते निर्माण केले असें वर्णन ब्राह्मण ग्रंथांत, उपनिषदांत व पुराणांतहि आहे.

वेदांचें महत्त्व स्थापिल्यानंतर आपआपल्या विषयांचें महत्त्व पटविण्याकरितां, सर्व विषयांचें वेद हें आदिस्थान होय; देवांच्या व भूतमात्रांच्या कर्माला वेदांच्या द्वारांच आरंभ झाला, अशा तऱ्हेचीं वर्णनें स्मृति व पुराणग्रंथांत आहेत. वेदांचें अनंतत्व दर्शविणारी एक आख्यायिका तैत्तिरीय ब्राह्मणांत आढळते. स्मृतिपुराणादि ग्रंथांत वेदांच्या स्तुतिपर वाक्यें आहेत. त्याप्रमाणें वेदांपेक्षांहि पुराणग्रंथांचें श्रेष्ठत्व अधिक, असें म्हणणारीं व सामवेदाची निंदा करणारीं वाक्येंहि आहेत.

उपनिषद्-ग्रंथांत वेद ईश्वरप्रणीत असल्याचें मान्य केलें आहे. उपनिषदांत व भगवद्गीतेंतहि कर्मकांडविषयक वेदभाग गौण प्रतीचा मानला आहे. वेदविद्येचे परा व अपरा अशीं दोन नांवें देऊन दोन विभाग केले जातात व त्यांपैकीं 'परा' नामक भागांत अधिक महत्त्व दिलें जातें. ब्रह्मज्ञान होण्यास अडथळा करणारें वेदांतील अनेकेश्वरी मत व स्वर्गसुखाच्या इच्छेनें करावयाचे संस्कार यांबद्दल अनादर दर्शविणारीं वाक्यें उपनिषदांत व भागवत पुराणांतहि आहेत.

ब्रह्मदेवाच्या चार मुखांतून चार वेद निघाले असें वर्णन कांहीं पुराणांत आहे. उलट श्रीविष्णूंनीं वेदव्यासाचें रूप घेऊन मूळ एक असलेल्या वेदाचे चार भाग केले व ते अनुक्रमें पैल, वैशंपायन, जैमिनी व सुमंतु या चार शिष्यांना पढविले. नंतर शिष्यपरंपरा वाढतां वाढतां चार वेदांचे उपविभाग पत्रास हजारांपर्यंत शाखा निघाल्या, असें वर्णन विष्णु-वायुपुराणांत आहे. वेद जगदारंभीं ईश्वरानें निर्माण केले, पण संहिता त्रेतायुगांत रचिल्या गेल्या. यजुर्वेदाच्या ज्ञात्यांस अध्वर्यु म्हणतात. प्राचीन अध्वर्यूंचा ग्रंथ तैत्तिरीय वेद होय. अध्वर्युप्रदर्शक वचनें वाजसनेयी संहितेंत व शतपथ ब्राह्मणांत आहेत. वेद ईश्वरप्रणीत नाहींत याचा कोणी पुरावा असा देतात कीं, अमुक एक वेदांतील सूक्त अमुक एका ऋषीनें रचिलें असें वेदांच्या अनुक्रमणिकेंत सांगितलेलें असतें. या शंकेला दुसरें उत्तर असें देतात कीं, ऋषींनीं तपःसामर्थ्यानें ईश्वरप्रणीत वेदांचें ज्ञान करून घेतलें.

मीमांसक नास्तिक मताचे होते व वेदांचें ईश्वरप्रणीतत्व त्यांस मान्य नव्हतें. परंतु हे मीमांसकहि वेद प्रमाण मानीत असत. वेदान्ती म्हणतात कीं, वेद ब्रह्मापासून निघाले. मीमांसक

म्हणतात कीं, ते स्वतःसिद्ध आहेत. पण कालांतरानें सूत्रें, ब्राह्मणें व उपनिषदें यांत दिसून येणारीं वेदांविषयींचीं विरोधी मतें मागें पडून वेद अपौरुषेय व निर्दोष आहेत असें मानण्यांत येऊं लागलें. नैयायिकांच्या मतें ध्वनि नित्य नाहीं तेव्हां वेद खोटे आहेत, त्यांत विसंगतपणा आहे, वगैरे हे त्यांनीं केलेले आरोप गौतमानें आपल्या न्यायसूत्रांत खोडून काढले आहेत. कांहीं वैशेषिक सूत्रें म्हणतात कीं, वेद देवानें आपल्या मुखानें उच्चारिले व ते कोणा तरी बुद्धिमान् प्राण्यानें लिहिले. कपिल म्हणतो कीं, देवच नाहीं तर त्याच्यापासून वेद कोठून निघणार? तेव्हां जैमिनीप्रमाणें कपिलाचेंहि मत असें आहे कीं, वेद स्वतःसिद्ध आहेत. पूर्वमीमांसाकार ऊर्फ कर्ममीमांसाकार आणि उत्तरमीमांसाकार ऊर्फ ब्रह्ममीमांसाकार ऊर्फ वेदान्ती आणि सांख्यसूत्रकार या सर्वांनीं वेदांचे स्वमतपोषक असे निरनिराळे अर्थ लावलेले आहेत व त्यांत कित्येक वेळां जमीन-अस्मानाचें अंतर दिसून येतें.

पाणिनीकालापासून प्रत्यक्ष वेद व वेदांवर उभारणी करून लिहिलेले इतर ग्रंथ म्हणजे दर्शनें, स्मृती, पुराणें व इतिहास. या दोहोंमध्यें फरक करून फक्त वेदच 'प्रमाण' मानण्याची पद्धत पडली. तथापि इतर 'ग्रंथकर्ते' म्हणजे मनूसारखे स्मृतिकार व इतर पुराणऋषी हे ब्रह्मज्ञानी व अतींद्रिय द्रष्टे असल्यामुळे त्यांच्या स्मृत्यादि ग्रंथांनाहि वेदांच्या खालोखाल समाजांत मान मिळूं लागला. तथापि कपिलासारखे कांहीं दर्शनकार अतींद्रियज्ञानी नव्हते. म्हणून त्यांचे ग्रंथ 'प्रमाण' नाहींत अशी त्यांची शंकराचार्यांनीं निंदा केली आहे. अलीकडे निरनिराळे दर्शनकार मागें पडून वेदान्तांतील मत विशेष श्रेष्ठ, असें लोक मानूं लागले आहेत. सांख्य तत्त्वज्ञानांतहि निरीश्वरवादाचा पुरस्कार केलेला असल्यामुळें त्यांतील तेवढा भाग गौण मानतात.

वेदांतील यज्ञ व पशुहनन या गोष्टी जैनांच्या अहिंसातत्त्वास विरोधी असल्यामुळें वेदांविषयीं जैनांची वृत्ति निश्चित नव्हती व त्यामुळें त्यांच्या ग्रंथांत वेदांविषयीं परस्परविरोधी वचनें आढळतात. जैनांच्या हरिवंश पुराणांत वेदविषयक वादांत ब्राह्मणांस जिंकल्याच्या गोष्टी आहेत व ब्राह्मणांचे वेद खोटे असून जैनांचे ग्रंथ तेच खरे वेद, असें प्रतिपादन केलें आहे.

याप्रमाणें पैतृक ग्रंथ व ज्ञानाचें मूळ या दृष्टीनें वेद सर्व भारतीयांस पूज्य आहेत. त्यांच्या अपौरुषेयत्वाबद्दल मतभेद असला तरी आपले वेद हे जगांतील अत्यंत प्राचीन भाषेचे, प्राचीन धर्माचे व प्राचीन समाजस्थितीचे द्योतक आहेत म्हणून त्यांबद्दल अभिमानपूर्वक महत्त्व सर्व हिंदूंस सतत वाटणार; इतकेंच नव्हे तर वेदांचें ऐतिहासिक व समाजशास्त्रीय महत्त्व सर्व जगासच पटलेलें आहे.

वेदांगें—वेदांगें ऊर्फ कल्पसूत्रें हा वेदांचाच गद्यात्मक भाग आहे व त्यांचा विषय धार्मिक विधी व संस्कार हा आहे. (१) श्रौतसूत्रें–यांत तीन किंवा अधिक अग्नींवर होणाऱ्या यज्ञांच्या प्रयोगांचे नियम दिले आहेत. हे यज्ञ पुष्कळ दिवस चालणारे असून त्यांना ऋत्विज पुष्कळ लागतात. (२) गृह्यसूत्रें–यांत एका अग्नीवर करावयाचीं स्मार्तकर्में–जन्म, विवाह, मृत्यु, इत्यादि संस्कार व नित्याचें होमहवन–यांचे नियम दिले आहेत. (३) धर्मसूत्रें–यांत आचारविषयक नियम दिले असून हा भारतीयांचा अत्यंत प्राचीन असा कायद्यांचा संग्रह आहे. प्रत्येक वेदाचे श्रौतसूत्रें, गृह्यसूत्रें व धर्मसूत्रें असे तिन्ही प्रकारचे सूत्रग्रंथ आहेत. वेदांगामध्यें सूत्रांखेरीज शिक्षा, व्याकरण, निरुक्त, छंदस् व ज्योतिष येत असून अशीं एकंदर सहा वेदांगें आहेत.

शिक्षा याचा अर्थ शिकणें किंवा पठण करणें (संथा घेणें) म्हणजे स्पष्ट उच्चार करून आवात म्हणजे स्वरयुक्त संहिता म्हणणें. शब्द व त्यावरील आघात (स्वर), पदप्रमाण किंवा शब्दावयव व त्यांवरील आघात, आणि स्वरमाधुर्य व शब्दसंधि असे शिक्षाग्रंथांचे सहा भाग आहेत. या संहितापाठाशिवाय 'पदपाठ' हा निराळा भाग असून त्यांत प्रत्येक शब्द निरनिराळा लिहिला आहे. पदपाठावरून संहितापाठ कसे तयार करावयाचे, यासंबंधी नियम 'प्रातिशाख्यें' या नांवाच्या जुन्या ग्रंथांत दिले आहेत.

निरुक्त या यास्काचार्यांच्या ग्रंथांत तत्पूर्वींच्या शब्दकोशावर टीका केलेली आहे. 'निघण्टु' हा कोश यास्कानें केलेला असावा व त्यांत वेदांतील शब्द आणि त्यांचे समानार्थक शब्द देऊन वेदसूक्तांचें स्पष्टीकरण केलें आहे. छंदःशास्त्रांत वेदांतील वृत्तांची माहिती दिली आहे. ज्योतिषशास्त्रांत सूर्य, चंद्र व सत्तावीस नक्षत्रें यांचीं स्थानें व पौर्णिमा व अमावास्या यांविषयीं गणिताचे नियम दिले आहेत. व्याकरणावरील जुनीं वेदांगाचीं पुस्तकें उपलब्ध नाहींत. परंतु पाणिनीचें अतिप्राचीन व सर्वोत्कृष्ट पुस्तक उपलब्ध आहे; त्यांत वेदभाषेचा विचार केला आहे.

वेदकालनिर्णय—वेदकालाबद्दल विद्वानांत अतिशय मतभेद आहेत. मॅक्समुल्लरनें ऋग्वेदाचा काल खि. पू. १२०० वर्षें, श्रॉडरनें खि. पू. २०००, याकोबीनें ज्योतिर्विषयक माहितीच्या मदतीनें हा काल खि. पू. ४५०० ठरवला आहे. लो. टिळकांनीं हा काल खि. पू. ६००० वर्षें इतका मागें नेला आहे. वैदिक वाङ्मयांत संस्कृत भाषेचें अतिप्राचीन स्वरूप असून पौराणिक वाङ्मयांत अतिप्राचीन कथा दिलेल्या आहेत. प्राचीन कथांत रामरावणयुद्ध, दाशराज्ञयुद्ध व कुरुयुद्ध हे अत्यंत महत्त्वाचे कथाभाग होत. सर्व ऋग्मंत्रांपूर्वी दाशराज्ञयुद्ध झालें; आणि दाशराज्ञयुद्धापूर्वी अनेक शतकांची देश्य आर्य अशी सूतसंस्कृति असावी.

तसेंच वेदकालापूर्वी 'पर्शुभारतीय काल' म्हणजे इराणांतील व हिंदुस्थानांतील आर्य इराणांत एकत्र राहत असल्याचा काल, आणि तत्पूर्वीचा 'मूलगृहकाल' म्हणजे युरोपीय आर्य आणि भारतीय आर्य यांचे पूर्वज उत्तर ध्रुवानजीक व मध्य आशियांत एकत्र राहत होते तो काल होय. ऋग्वेदसंहितेंतील सूक्तांवरून वरील तिन्ही कालांवर प्रकाश पडतो, व म्हणून वेदांच्या सूक्ष्म अभ्यासास अतिशय महत्त्व आहे. हें जाणूनच डॉ. केतकर यांनीं महाराष्ट्रीय ज्ञानकोशाच्या 'वेदविद्या' व 'बुद्धपूर्व जग' या दोन विभागांत वेदांची अतिशय सविस्तर व चिकित्सायुक्त माहिती दिली आहे.

वेदान्त—वेदांचा अन्त तो वेदान्त (उपनिषदें). वेदान्तशास्त्रांत आत्मानात्मविचाराला प्राधान्य आहे. उत्तरमीमांसाशास्त्र असें ह्या शास्त्राचें दुसरें नांव आहे. जीवात्मा व परमात्मा हे भिन्न कीं अभिन्न, त्यांचे गुणधर्म, इ. चें विवेचन करणारें हें शास्त्र आहे. ब्रह्मसूत्र हा ह्या शास्त्राचा मुख्य आधार. ह्या सूत्रावर निरनिराळ्या आचार्यांचीं भाष्यें आहेत व प्रत्येकानें निराळा अर्थ केला आहे. त्या कारणानें अद्वैत, द्वैत, शुद्धाद्वैत व विशिष्टाद्वैत अशा चार विचारप्रणाली रूढ झाल्या. अद्वैतांत जीवब्रह्मैक्य असून जग हा केवळ भास आहे, असें प्रतिपादन केलें आहे. द्वैतवादी जीवात्मा व परमात्मा भिन्न मानून जगाचें सत्यत्व प्रतिपादितात. शुद्धाद्वैती वल्लभाचार्य जीव, जगत् व परमात्मा ह्यांचें पूर्ण ऐक्य मान्य करतात, पण ते आपल्या ब्रह्माला मायेचा स्पर्शहि करूं देत नाहींत. मायारहित असें जगत्–ब्रह्माचें ऐक्य स्थापू बघतात. विशिष्टाद्वैतवादी जीव, जगत् व ईश्वर हीं भिन्न व सत्य मानतात. तथापि त्यांच्या मतें जीव व जगत् हीं तत्त्वें एका ईश्वराचेंच शरीर आहेत आणि त्या दृष्टीनें त्यांचें ऐक्य आहे.

मुख्यत्वेंकरून प्रत्यक्ष, अनुमान व शब्द (श्रुति) हीं तीन प्रमाणें तत्त्वसिद्धीकरितां ह्या शास्त्रांत योजतात. शंकराचार्यांच्या अद्वैतवादाला विवर्तवाद असेंहि म्हणतात. कणादांचा आरंभवाद, बौद्धांचा संघातवाद व सांख्यांचा परिणामवाद असे दुसरे वाद आहेत. ह्यांचें खंडन शंकराचार्यांनीं केलें आहे.

वेदि—(आल्टर). देवताप्रीत्यर्थ करावयाच्या यज्ञांत एक उंच ओट्यासारखी रचना करतात ती. ग्रीक आणि रोमन लोकांत देवळांत यज्ञ असेल तेव्हां वेदि देवतामूर्तीपुढें तयार करीत. ज्यू लोकांत तर वेदीचें फार महत्त्व असून सर्व धार्मिक विधी वेदीवर होत. ख्रिस्ती लोकांत प्रभुभोजन ज्यावर केलें जातें त्या टेबलालाच वेदि म्हणण्याचा वहिवाट आहे. मोठ्या ख्रिस्ती देवस्थानांतून पुष्कळ वेदी असतात. मुख्य वेदि अगदीं पूर्वेकडे असते. भारतीयांत यज्ञकुंडाला वेदि म्हणतात. या यज्ञकुंडांचे अनेक प्रकार असतात. आपल्याकडील बहुलें (विवाह–मौंजीबंधन विधींत घालतात तें) ही एक वेदिच आहे.

वेद—या जातीची वस्ती विशेषतः म्हैसूर संस्थानांत असून एकंदर लो. सं. (१९११) २,६८,४५४ आहे. वेदा, वेदरु हा शब्द व्याध या शब्दाचा अपभ्रंश आहे. सध्यां हे लोक शिकारीचा धंदा करीत असून बहुतेक लोक शेतकरी, म्हारकरी, मजूर व सरकारी कचेऱ्यांतून चपराशी आहेत. त्यांच्या एकंदर काटकपणावरून त्यांना विजयानगरच्या राज्यांत सैन्यांत सामील केलें होतें. ते मूळचे तेलगू भाषा बोलणारे लोक होते,

पण कानडी मुलखांत बरेच दिवस राहिल्यामुळें ते पुढें कानडी बोलूं लागले. यांच्यांत सहा मुख्य वर्ग आहेत. या जातींत बहुपत्नीत्व, प्रौढविवाह व विधवाविवाह रूढ आहे. एखाद्यास मुलगा नसल्यास तो आपल्या सर्वांत वडील मुलीस 'बसवी' करतो. ती जन्मभर आपल्या बापाच्या घरीं राहते व मुलास असलेले सर्व अधिकार तिला असतात. वरिष्ठ जातीच्या लोकांस कांहीं विशिष्ट विधीनंतर जातींत घेतात. हे लोक बहुतेक वैष्णव आहेत. गंगम्मा, मरम्मा, काळेलम्मा, वगैरे त्यांच्या प्रमुख देवता आहेत. हे सर्व लोक मुनीश्वर म्हणून एका साधूच्या आत्म्याची पूजा करतात. हा आत्मा एका झाडांत असतो अशी त्यांची समजूत आहे.

वेधशाळा—आकाशस्थ ग्रहनक्षत्रांचे व हवामानाचे वेध घेण्यासाठीं मुद्दाम तयार केलेली इमारत. युरोपमध्यें अशी पहिली वेधशाळा न्युरेंबर्ग येथें १४७२ सालीं बांधण्यांत आली. पुढील शतकांत प्रसिद्ध ज्योतिषशास्त्रज्ञ टायको ब्राहे याची वेधशाळा कोपनहेगनजवळ निघाली. ब्रिटिश साम्राज्यांत आज तीन मोठ्या वेधशाळा आहेत: ग्रीनिच, एडिंबर्ग व केप ऑफ गुडहोप या ठिकाणीं. यांखेरीज आणखी ३० निरनिराळ्या ठिकाणीं आहेत. उत्कृष्ट वेधशाळा संयुक्त संस्थानें (अमेरिका) यांतून सांपडतात. कॅलिफोर्नियांतील लिक वेधशाळेंत जगांत सर्वांत शक्तिमान असी दुर्बीण आहे. ग्रेट ब्रिटनमध्यें हवामानासंबंधीं ८ वेधशाळा आहेत. सरकारी कामांना उपयोगी अशा वेधशाळा ग्रीनिच, ओटावा व वॉशिंग्टन येथें आहेत. वॉशिंग्टनला नाविक वेधशाळा आहे.

प्राचीन भारतीयांना वेधज्ञान होतें असें ग्रंथांवरून सिद्ध करतां येतें. भास्कराचार्यानें नक्र, चाप, तुरीय या वेध घेण्यास उपयोगी

असलेल्या यंत्रांची माहिती यंत्राध्यायांत दिली आहे. निरनिराळ्या प्रांतांतून राजेरजवाड्यांच्या आश्रयाखालीं वेधशाळा बांधलेल्या होत्या; व त्यांतून ज्योतिषी वेध घेण्याचें काम करीत. जयसिंहानें दिल्ली, जयपूर, मथुरा, काशी व उज्जयिनी येथें वेधशाळा बांधलेल्या अद्यापि त्यांच्या तेथील अवशेषांवरून पाहतां येतात.

**वेन**—एक प्राचीन राजा. हा अंगराजाचा पुत्र असून सर्व ऋषींनीं यालाच त्याच्यामागून गादीवर बसविलें. पण हा गादीवर आल्यावर वेदविरोधी बनून ऋषींच्या यज्ञकर्मांत अडथळे आणूं लागला. तेव्हां ऋषींनींच याला ठार केलें; अशी पुराणांतून कथा आहे. हा मेल्यावर ऋषींनीं त्याच्या अंगांतील पाप मंथन करून काढून टाकलें. तेव्हां निष्पाप होत्साता हा विष्णूपासक बनला. पृथूची उत्पत्ति वेनापासून आहे. वेन हा प्राचीन काळचा जैन धर्माचा पुरस्कर्ता असावा.

**वेबर, आल्बर्ट**—एक युरोपियन प्राच्यविद्याविशारद. ह्यानें भारतीय वाङ्मयाचा संपूर्ण इतिहास लिहिला आहे (१८५२). भारतीय वाङ्मयाच्या निरनिराळ्या भागांत तेथपर्यंत केलेल्या संशोधनांचें एकीकरण 'भारतीय आर्य तत्त्वज्ञान आणि पुराणवास्तुशास्त्र यांची रूपरेषा' अशा नांवाच्या जर्मन ग्रंथांत बुल्हर व मागाहून किल्हॉर्न ह्यांच्या नेतृत्वाखालीं वेबरनें केलें (१८९७). 'पाली टेक्स्ट सोसायटी' ह्या नांवाची संस्था टी. डब्ल्यू. डेव्हिड्सनें स्थापिली (१८८२). त्यानें बौद्ध वाङ्मयाच्या संशोधनाच्या कामीं बरीच मदत केली. आल्बर्ट वेबरनें जैन लोकांच्या पवित्र ग्रंथांवर एक मोठा प्रबंध लिहून वाङ्मयाची एक नवी दिशा दाखविली (१८८३-८५).

**वेब्स्टर, जॉन** (सु. १५८०-१६२५)—एक इंग्रज नाटककार. त्यानें १६०२ ते १६२४ या कालांत आपलीं नाटकें लिहिलीं. प्रथम त्यानें 'सीझर्स फॉल' आणि 'दि टू हार्पीज' हीं दोन नाटकें लिहिण्यांत मिडल्टन व इतर नाटककार यांशीं सहकार्य केलें. नंतर 'लेडी जेन' हें नाटक लिहिण्याला डेकर-हेवुड-वेंटवर्थ स्मिथ या तिघांना मदत केली; आणि डेकरच्या सहकारितेनें त्यानें 'वेस्टवर्ड हो' आणि 'नॉर्थवर्ड हो' हीं दोन नाटकें लिहिलीं. यानंतर त्यानें स्वतः एकट्यानें दुःखान्त नाटकें लिहिलीं, तीं पुढील होत–'दि व्हाइट डिव्हेल' (त्याला 'व्हिटोरिया कोरोंबोना' हेंहि नांव आहे.) आणि 'दि डचेस ऑफ मालफी.' शेक्सपिअरच्या दुःखान्त नाटकांच्या खालोखाल या दोन नाटकांचा दर्जा लागतो. करुण व भयानक या दोन रसांचा परिपोष विविध प्रकारांनीं करण्यांत वेब्स्टर याचें उत्तम कौशल्य या दोन नाटकांत दिसून येतें.

**वेब्स्टर, डॅनिएल** (१७८२-१८५२)—एक प्रसिद्ध अमेरिकन मुत्सद्दी. युद्धविरोधी पक्षाचा प्रतिनिधि म्हणून प्रथम कॉंग्रेसमध्यें निवडून गेला (१८१२). लवकरच उत्कृष्ट वक्ता व पंडित म्हणून त्याची ख्याति झाली. कांहीं काळ पुढें राजकारणांतून निवृत्त झाला. १८४१ त तो सेक्रेटरी ऑफ स्टेट या हुद्द्यावर होता. या वेळीं त्यानें इंग्लंडशीं दोन्ही देशांना हितावह असा तह घडवून आणला. १८५० त तो परराष्ट्र-मंत्री झाला.

**वेब्स्टर, नोहा** (१७५८-१८४३)—एक अमेरिकन शब्दकोशकार. त्यानें १८०६ सालीं आपला आठ विभागांचा इंग्रजी कोश प्रसिद्ध केला; व नंतर १८२८ सालीं त्यानें आपली सुप्रसिद्ध 'अमेरिकन डिक्शनरी ऑफ दि इंग्लिश लँग्वेज' (इंग्रजी भाषेचा अमेरिकन कोश) या कोशाची पहिली आवृत्ति प्रसिद्ध केली. वेब्स्टरची शेवटची मोठी कामगिरी म्हणजे बायबलच्या भाषांतरांतील चुका दुरुस्त करून हा धार्मिक ग्रंथ सुधारणें, ही होय. त्यानें १७८४ सालीं लिहिलेलें 'स्पेलिंग बुक' शाळांतून फार उपयुक्त झालें व त्याच्या सहा कोटींवर प्रती खपल्या. त्याच्या कोशावरून पुढें 'वेब्स्टर्स इंटरनॅशनल डिक्शनरी' हा अधिकृत कोश करण्यांत आला.

**वेरूळ**—हैद्राबाद संस्थानांतील औरंगाबाद तालुक्यांत औरंगाबादेच्या वायव्येस १५ मैलांवर असलेलें एक गांव. लो. सं. सुमारें २,०००. हा गांव भिक्षुकांचा आहे. भोसल्यांचे पूर्वज या गांवीं राहत असत म्हणून हें गांव इतिहासप्रसिद्ध आहे. घृष्णेश्वर नांवाचें बारा ज्योतिर्लिंगांपैकीं एक ज्योतिर्लिंग या गांवापासून पाऊण मैलावर आहे. वेरूळचीं प्रसिद्ध लेणीं गांवापासून एक मैलावर दौलताबादच्या वाटेवर आहेत. हीं लेणीं ३४ असून सव्वा मैल पसरलेलीं दिसतील. बौद्ध (१२), ब्राह्मणी (१७), व जैन (५) असे या लेण्यांचे तीन वर्ग पडतात. ब्राह्मणी लेण्यांत दशावतार, रामेश्वर व डुमाळ लेणें हीं महत्त्वाचीं आहेत. बौद्ध लेण्यांपैकीं चैत्य (क्र. १०) व दोन ताल व तीन ताल हीं तीन महत्त्वाचीं आहेत. जैन लेणीं हीं बौद्ध व ब्राह्मणी लेण्यांनंतरचीं आहेत. जैनांनीं आपल्याहि धर्माचें वर्चस्व दाखविण्याकरितां हीं कोरलेलीं दिसतात. ब्राह्मणी किंवा हिंदु लेण्यांतून नक्षीचें व मूर्तिशिल्पाचें काम अतिशयच दिसेल. कैलास लेणें तर जगप्रसिद्ध आहे. हिंदुस्थानांत इतकें दुसरें मोठें लेणें नाहीं. ज्या चौकांत हें आहे तो चौक १५४ फूट रुंद, २७६ फूट लांब व मागच्या

वृंदावन — जुनें देवालय (पृ. २३५४)

वृंदावन — गोविंददेवमंदिर (पृ. २३५४)

श्रवण बेळगोळ — गोमटेश्वराचा पुतळा (पृ. २४५९)

बाजूस १०७ फूट उंच कडा आहे. या लेण्यांचा काल निदान एक हजार वर्षांपूर्वीचा तरी असावा.

**वेल**—ज्या झाडांचीं किंवा रोपांचीं खोडें बळकट नसतात व त्यामुळें ज्यांना जमिनीपासून वर येण्याकरितां दुसऱ्या कोणत्या तरी सभोंवतींच्या वस्तूंचा आधार घ्यावा लागतो त्या रोपांस वेली म्हणतात. वेलींचे मुख्यतः चार प्रकार आहेत : (१) चढणाऱ्या—दुसऱ्या वनस्पतींस टेकून त्यांच्या खांबांच्या वगैरे आधारानें आपलींच वेटाळीं वगैरे करून पुन्हां खालीं पडणार नाहीं अशा तऱ्हेनें हळूहळू आपला मार्ग वर काढणाऱ्या वेली (डेस्मोनियस). (२) तंतूंनीं चढणाऱ्या—या जातीच्या वेलींस हातांसारखे दुसऱ्या वस्तूस गुंडाळतां येतील असे संवेदनक्षम तंतू असतात. ते वर चढण्याकरितां एखाद्या वस्तूला वेढे घालतात. व त्यांच्या आधारानें वर जातात. हे तंतू म्हणजे एक प्रकारचीं पानेंच असतात. (उदा., काकडी, भोपळा, वगैरेंचे वेल). (३) वेढणाऱ्या, वळसा घालणाऱ्या—या जातीच्या वेली एखाद्या झाडाच्या खोडास वगैरे वळसा घालून त्याच्या आधारानें वर चढतात. या तऱ्हेचे अनेक वेल असतात. ही वर उंच वाढण्याची प्रवृत्ति जमिनीपासून दूर जाण्याच्या वृत्तीचा एक भाग आहे (जिओट्रॉपिझम). (४) मुळांनीं चढणाऱ्या—या जातीच्या वेलींस मधून मधून पेऱ्या-पेऱ्यावर लहान मुळें फुटतात व तीं मुळें निरनिराळ्या वस्तूंचा आधार घेऊन त्यांत रुतून बसतात व अशा रीतीनें हे वेल वर जातात. उदाहरणार्थ, पानवेल, आयव्ही, वगैरे वेली या जातीच्या होत.

अ—फळाचा छेद.
ब—फळ. क—फूल.
ड—बिया.

**वेलदोडे**—[वर्ग-सिटामिनी]. पश्चिम व दक्षिण हिंदुस्थान, सिलोन व ब्रह्मदेश या भागांत वेलदोडे होतात. आल्याच्या जातीचीं हीं झाडें असतात. लहान किंवा मलबारी आणि मोठी म्हैसूरी जात अशा वेलदोड्याच्या दोन जाती आहेत. जंगली एलची जात डोंगरांत आपोआप उत्पन्न होते. हीस नर एलची म्हणतात. वेलदोडे भुईमुगाच्या शेंगांसारखे जमिनींत मुळांस लागतात. वेलदोड्याच्या लागवडीस ओलसर किंवा जीतून पाणी झिरपत असतें अशी जमीन चांगली. मलबार व कुर्ग प्रांतांतहि यांची बरीच लागवड होते. वेलदोड्याच्या विकास सर्द जमीन व थंड हवा यांची जरूर आहे. वेलदोडे व मिरीं या दोन पिकांची लागवड मुंबई इलाख्यांतील उत्तर कारवार जिल्ह्यांत होते. वेलदोड्याच्या झाडांच्या मुळाचे तुकडे लावून अगर बियांपासून रोपें करून त्यांची लागवड करतात. आठ फूट लांब व चार फूट रुंद वाफ्यांत दोन तोळे बीं पेरतात, व इतकें एक एकर जमिनीस पुरें होतें. रोपांचें दोन वेळां स्थलांतर करतात. हीं रोपें अठरा महिन्यांचीं झालीं म्हणजे दुसऱ्यानें पोफळीच्या बागेंत लावतात. लावण्याच्या वेळा दोन आहेत : एक मार्च-एप्रिल व दुसरी सप्टेंबर-ऑक्टोबर. एकरीं सुमारें ३००-४०० झाडें लागतात. वेलदोड्याचीं झाडें बोरूसारखीं ५।६ फूट उंच वाढतात. दर झाडास सुमारें ३।४ तोळे वेलदोडे येतात. व दर एकरीं अजमासें १५०-२५० पौंडांपर्यंत उत्पन्न येतें. हिंदुस्थानांत वेलदोडे फार खपतात. पक्वान्नें व औषधें यांत वेलदोडे घालतात. वांतीवर वेलदोड्याचीं सालें जाळून ती राख मधाशीं चाटवितात.

**वेलर्योडी**—हिचे वेल असतात. ते बियांपासून व वेलाच्या कांड्यांपासून होतात व अनेक वर्षें टिकतात. वेलाचे ताणे व पानांचे देठ जांभळे असतात. फुलें बारीक असतात. फळें पिकल्यावर जांभळीं होतात व त्यांत जांभळा रस असतो. फळें खाण्यास गोड असतात. हिच्या पाल्याची घट्ट अथवा पातळ भाजी करतात. भाजी अळूच्या अथवा चाकवताच्या भाजीसारखी होते व रुचकर लागते. उन्हाळ्यांत पडलेल्या बियांपासून अनेक वेल पावसाळ्याच्या आरंभीं उगवतात.

**वेलस्ली, रिचर्ड कोले (मार्किस)** (१७६०-१८४२)—

हिंदुस्थानचा एक गव्हर्नर-जनरल. हा १७९८ त ग. जनरल होऊन इकडे आला. आल्याबरोबर यानें म्हैसूरच्या टिपूचा पाडाव करण्याची मोहीम आंखून ती यशस्वी करून दाखविली. नंतर बाजीरावाशीं वसईचा तह, शिंदे-होळकर-भोसले यांच्याशीं तह व त्यांच्यावर तैनाती फौज लादणें या गोष्टी करून वेलस्लीनें लार्ड क्लाइव्ह आणि वॉर्न हेस्टिंग्ज यांनीं ब्रिटिश साम्राज्याचा जो पाया घातला तो भक्कम करून त्यावर इमारत चढविण्यास सुरुवात केली. तंजावर, कर्नाटक, अयोध्या, वगैरेसारखीं राज्यें त्यानें संपुष्टांत आणलीं. देशी

राजांनीं इंग्रजी फौज आपल्या खर्चानें बाळगण्याची त्याची युक्ति मोठी अजब होती. तीमुळें आपोआप इंग्रजी सत्ता वाढली. या वेळीं युरोपांत नेपोलियनशीं इंग्रजांचें युद्ध चालू असल्यानें इंग्रज मुत्सद्यांना वेलस्लीच्या चढाईच्या धोरणाची भीति वाटली. त्याला परत बोलावण्यांत आलें व परराष्ट्रीय मंत्र्याची जागा त्याला दिली. १८१२ त त्याला मुख्य प्रधान होण्यास सांगितलें, पण त्याला सहकारी मिळेनात. नंतर तो आयर्लंडमध्यें लॉर्ड लेफ्टनंटच्या जागेवर बरींच वर्षे होता. ड्यूक ऑफ वेलिंग्टन हा याचा भाऊ होय.

**वेलिंग्टन**—हें शहर न्यू झीलंडची राजधानी आहे. येथें मुख्य इमारती आहेत त्या म्हणजे—सरकारी कचेऱ्या, विधिमंडळें व वरिष्ठ न्यायालयें. येथे लोकरीच्या गिरण्या, बर्फ करण्याचे कारखाने व इतर कारखाने आहेत. येथील बंदरांत मोठमोठालीं जहाजें येऊं शकतात. लो. सं. १,७२,८८७. वेलिंग्टन प्रांताचें क्षे. फ. १०,८७७ चौ. मै. आणि लो. सं. ३,०७,४७७ आहे.

**वेलिंग्टन, ड्यूक ऑफ (अर्थर वेलस्ली)** (१७६९–१८५२)—एक ब्रिटिश सेनानी व मुत्सद्दी. हा १८ व्या वर्षीच सैन्यांत शिरला व परदेशांत गेला. याचा भाऊ हिंदुस्थानांत गव्हर्नर-जनरल असतांना यानें लढायांतून पराक्रम गाजविले. असई येथील लढाईत (१८०४) याच्याकडे सेनाधिपत्य होतें. १८०८त इंग्लंडच्या नेपोलिनशीं चाललेल्या युद्धांत याला पोर्तुगॉलच्या मोहिमेवर पाठविण्यांत आलें. नंतर १८०९–१८१४ या कालांतील स्पॅनिश द्वीपकल्पीय युद्धांत यानें इंग्लंडची बाजू राखली. तेव्हां याच्यावर मानसन्मानांचा वर्षाव सुरू झाला. वॉटर्लूच्या लढाईत यानें नेपोलियनला पार चीत केल्यामुळें तर इंग्लंडची जनता याच्यावर बेहद्द खुष होती. याला मंत्रिमंडळांत जागा देण्यांत आली व तो टोरी पक्षाचा एक प्रमुख बनला. १८२७ त त्याला ब्रिटनच्या सेनेचा सरसेनापति नेमण्यांत आलें. व पुढील सालीं तो मुख्य प्रधान झाला. पण पार्लमेंटरी सुधारणा-योजनेला त्याच्या पक्षाचा विरोध असल्यामुळें त्याचें मंत्रिमंडळ फार काळ टिकलें नाहीं. नंतर तो प्रत्यक्ष राजकारणांतून निवृत्तच झाला.

**वेलोर**—१. मद्रास, उत्तर अर्काट जिल्हा, एक तालुका. याचें क्षे. फ. ४२२ चौरस मैल आहे. लो. सं. सुमारें अडीच लक्ष. तालुक्यांत एकंदर १४९ खेडीं असून अंबूर व वेलोर हीं दोन शहरें आहेत. वेलोर शहर हें तालुक्याचें मुख्य ठिकाण पालार नदीकांठीं आहे. लो. सं. ७१,५०२. वेलोरला सरकारी कचेऱ्या पुष्कळ आहेत. पोलिस-शिक्षण शाळा, मिशन शाळा व एक उच्च शिक्षणाची शाळा आहे. येथें धान्याचा फार मोठा व्यापार चालत असून उत्तम सुवासिक फुलांचे बगिचे पुष्कळ आहेत. प्रेक्षणीय स्थळ म्हटलें म्हणजे किल्ला व त्यांतील देवालय हीं होत.

शिवाजीनें दक्षिण हिंदुस्थानच्या मोहिमेंत वेलोरचा किल्ला जिंकून तेथें लष्करी तळ ठेवला (१६७७). १८०६ मध्यें ईस्ट इंडिया कंपनीच्या हिंदी शिपायांनीं येथें बंड केलें होतें, पण तें लवकरच मोडण्यांत आलें.

२. एलोर. मद्रास, पश्चिम गोदावरी जिल्हा. कृष्णा जिल्ह्याच्या उत्तर सरहद्दीकडील एक तालुका. क्षे. फ. ७६६ चौ. मैल. लो. सं. सुमारें अडीच लाख. यांत एक गांव व २०६ खेडीं आहेत. उत्तर भागांत जंगल व टेंकड्या आहेत. तालुक्याच्या दक्षिण सरहद्दीलगत कोलेर तलाव आहे. वेलोर हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. लो. सं. (१९४१) ६४,९११. एलोरच्या उत्तरेस ८ मैलांवर पेड्डुवेंगी येथें बरेच पुराणावशेष आहेत. १५७२ मध्यें एलोर हें गोवळकोंडा सरकारचें मुख्य ठिकाण करण्यांत आलें. येथील हवा फार उष्ण आहे. गांवांत धान्याचा मोठा व्यापार चालतो. एलोरचे गालिचे सुप्रसिद्ध आहेत. येथें एक हायस्कूल व एक इस्पितळ आहे.

**वेल्लाळ**—मद्रासकडील एक शेतकरी जात. यांची एकंदर वस्ती २६ लाख आहे; पैकीं २५ लाखांवर मद्रास इलाख्यांत व बाकीचे कोचीन-त्रावणकोर संस्थानांत आहेत. धार्मिक विधींत हे फार कडवे आहेत. हे लोक मांसमच्छर किंवा दारू याला बिलकुल शिवत नाहींत. यांचे चार मुख्य भेद आहेत: (१) तोंडामंडलम्, (२) चोशिय, (३) पांड्य, व (४) कोंगा. बालविवाह व प्रौढविवाह या दोन्हीहि चाली यांच्यांत आहेत. नाचिनाथ वेल्लाळ हे फक्त त्रावणकोरमध्येंच आढळतात.

**वेल्स**—ग्रेट ब्रिटनचा, इंग्लंडच्या पश्चिमेचा, एक विभाग. याच्या उत्तरेस व पश्चिमेस आयर्लंडचा समुद्र व दक्षिणेस ब्रिस्टलची खाडी आहे. पूर्वभागाकडे तो इंग्लंडला लागून आहे. उत्तर व दक्षिण वेल्समध्यें प्रत्येकीं ६।६ प्रमाणें १२ परगणे आहेत. क्षेत्रफळ ७४६७ चौ. मैल आहे. लो. सं. २१,५८,३७४. सृष्टिसौंदर्य, वनशोभा यांकरितां वेल्स प्रसिद्ध आहे. येथें एक विद्यापीठ आहे. या देशांत कोळसा, लोखंड, तांबें हीं खनिज द्रव्यें विपुल सांपडतात. कार्डिक हें बंदर कोळशाच्या व्यापाराविषयीं प्रसिद्ध आहे. लोकरीचें कापड वेल्समध्यें चांगलें होतें.

केल्ट या नांवाचे लोक यांत पुरातनकाळीं राहत. रोमन व नॉर्मन लोकांनीं त्यांना जिंकलें होतें. रोमन लोकांनीं त्यांना ख्रिस्ती धर्माची दीक्षा दिली होती. शेजारच्या इंग्रजांशीं त्यांनीं दीर्घकाल वैर चालू ठेवलें होतें. शेवटीं इंग्लंडचा राजा पहिला एडवर्ड यानें त्यांना जिंकलें व आपल्या थोरल्या मुलाला वेल्सचा राजा

(प्रिन्स ऑफ् वेल्स) केलें. तेव्हांपासून ती प्रथा तशीच चालू आहे. म्हणजे इंग्लंडचा युवराज हा नेहमीं 'प्रिन्स ऑफ् वेल्स' असतो. यानंतरच्या काळांत स्थानिक राज्यकर्ते नाहींसेच झाल्यामुळें परगणे पाडून सर्व मुलुखाची व्यवस्था लावण्यांत आली. १५३६ मध्यें पार्लमेंटनें कायदा करुन इंग्लंडला वेल्स कायमचा जोडला. इंग्लंडचे सर्व कायदे वेल्सला लागू केले आणि इंग्लंडच्या पार्लमेंटमध्यें वेल्सचे प्रतिनिधी जाऊं लागले.

भाषा-वाङ्मय—वेल्सच्या लोकांना व त्यांच्या भाषेला वेल्श म्हणतात. वेल्श भाषेंतहि वेल्स लोकांचें वाङ्मय आहे. ही इंडोयुरोपीय भाषावर्गीतील व केल्टिक कुळांतील आहे. वेल्श वाङ्मयाचे प्राचीन अवशेष ९ व्या शतकांतील आहेत. टॅलिसिन, ॲन्युरिन, मर्लिन व लिवर्च हेन हे पांचव्या शतकांतील भाट होत. त्यांचीं बरींच कवनें उपलब्ध आहेत. डॅफिड विलिम (१२९३-१३५६) याला वेल्सचा ओव्हिड म्हणण्यांत येतें. अठराव्या शतकांत राष्ट्रीय वैशिष्ट्याची व भावनेची पुनर्जागृति झाली व ती ईस्टेडफोड या नांवानें दरसाल भरणाऱ्या शाहिरी मेळाव्यानें निरंतर जिवंत ठेवली जाते. हा मेळावा मागें १५६७ व १७७१ सालीं भरल्याचें आढळतें, परंतु १८१९ पासून वरप्रमाणें तो दरसाल भरतो. 'माबिनोजिअन' हा मोठा गोष्टींचा संग्रह आहे. अलीकडे धर्मशास्त्र, चरित्रें व इतिहास यांवर ग्रंथ तयार होतात.

**वेल्स, सम्नर** (१८९२- )—अमेरिकन सं. संस्थानांतील एक राजकारणी पुरुष. यांचें शिक्षण हार्वर्ड युनिव्हर्सिटींत झाल्यावर ते १९१५ सालीं परराष्ट्र-खात्यांत नोकरी करूं लागले, व टोकियो व ब्यूनॉस आयरीस येथें अमेरिकन वकिलातींत त्यांनीं काम केलें. १९२० सालीं स्टेट डिपार्टमेंटच्या लॅटिन अमेरिकन डिव्हिजन या शाखेंत ॲसिस्टंट चीफ या जागेवर, व १९२१-१९२२ सालीं चीफ या जागेवर ते होते. पुढें १९२३-१९२९ या काळांत मध्य अमेरिकेंतल्या निरनिराळ्या डिप्लोमॅटिक कमिशन्समध्यें त्यांनीं काम केलें. १९३० सालीं ते ॲसिस्टंट स्टेट सेक्रेटरी, आणि १९३७ सालीं अंडर-सेक्रेटरी ऑफ स्टेट या अधिकारावर नेमले गेले. त्या वेळीं वेल्स हे डेमॉक्रॅट पक्षाचे असून अमेरिकेंतील तिसऱ्या क्रमांकाचे पुढारी होते. प्रेसिडेंट रूझवेल्ट आणि स्टेट सेक्रेटरी कॉर्डेल हल या पुढाऱ्यांच्या जोडीला वेल्स हा परराष्ट्रीय राजकारणांत भाग घेणारा इसम असे. १९४० सालीं अध्यक्षानें वेल्सना महायुद्धाची प्रत्यक्ष परिस्थिति व तह होण्याची संभाव्यता निरीक्षण करण्याकरितां युरोपांत पाठविलें, व वेल्स लंडन, पॅरिस, रोम व बर्लिन या चार शहरीं जाऊन आले.

**वेल्स, हर्बर्ट जॉर्ज** (१८६६-१९४६)—एक ब्रिटिश कादंबरीकार. याच्या कादंबऱ्या जशा अद्भुतरम्य आहेत तशाच शास्त्रीय स्वरूपाच्याहि आहेत. त्यांत सामाजिक, राजकीय आणि शैक्षणिक प्रश्नांचा ऊहापोह असतो. त्याचे कांहीं ग्रंथ पुढील होत :—'दि टाइम मशीन' (वेळायंत्र); 'दि इन्व्हिजिबल मॅन्' (अदृश्य माणूस); 'दि वॉर ऑफ दि वर्ल्ड्स' (जागतिक युद्ध); 'लव्ह ॲण्ड मिस्टर लेवीशॅम' (१९००); 'ॲन्टिसिपेशन्स (अपेक्षा)'; 'ए मॉडर्न युटोपिया'; 'किप्स'; 'टोनो-बंगे'; 'ॲन व्हेरोनिका'; 'दि हिस्टरी ऑफ मिस्टर पोली'; 'दि न्यू मॅकेव्हेली'; 'मॅरेज' (लग्न); 'जोन ॲण्ड पीटर' (१९१८); 'दि अनडाइंग फायर (अमर ज्वाला)'; 'ॲन आउटलाइन ऑफ हिस्टरी (इतिहासाची रूपरेषा)'; 'दि वर्ल्ड ऑफ विल्यम क्लिसोल्ड'; 'दि शेप ऑफ थिंग्स टु कम' (भावी गोष्टींची रूपरेषा)'. त्यानें लिहिलेला जगाचा इतिहास हा एक उत्कृष्ट व आधारभूत ग्रंथ आहे.

**वेश्या**—पैसा घेऊन शरीरविक्रय करणाऱ्या स्त्रियांस वेश्या म्हणतात. अत्यंत प्राचीन कालापासून शरीरविक्रय करणाऱ्या स्त्रियांचा वर्ग समाजांत आढळतो. वैदिक वाङ्मयांतहि पुंश्चली, महानग्नी, वगैरे शब्द एतद्वाचक आढळतात. ग्रीस देशांत वेश्यांस फार महत्त्व असे. रोमन लोकांतहि सुशिक्षित स्त्रिया वेश्या असत व राजकारणांतहि त्यांचें प्रस्थ फार असे. देवतांच्या सेवेकरितां आयुष्य वाहून घेणाऱ्या स्त्रिया बहुधा प्रच्छन्न वेश्या असतात. असा वर्गहि ग्रीस, रोम, वगैरे देशांत प्राचीन कालापासून असून भरतखंडांतहि मुरळी, भाविणी, बसवी, देवळी, वगैरे जाती याच प्रकारच्या आहेत. हिंदुस्थानाप्रमाणें वेश्याव्यवसाय करणाऱ्या जाती इतर देशांत नाहींत.

वेश्याव्यवसाय करण्याची प्रवृत्ति स्त्रीमध्यें उत्पन्न होण्यास (१) उद्योग मिळणें कठिण होणें, (२) अतिशय श्रम व प्राप्ति कमी असा व्यवसाय, (३) कौटुंबिक छळ, (४) दाटीची वस्ती, (५) कारखाने, (६) चैनीची चटक व द्रव्य, (७) अनीतिकारक वाङ्मय, (८) व्यसनी व दुराचारी लोकांचें कपट, हीं कारणें असतात.

वेश्याव्यवसायास धंद्याचें स्वरूप आल्यामुळें वेश्यागारें व तीं चालविणारा धंदेवाईक वर्ग निर्माण झाला व वेश्या हा त्यांचा विक्रीचा माल बनला. अर्थात् तो मिळविण्याकरितां व त्यापासून शक्य तितकी अधिक प्राप्ति करून घेण्याकरितां हे धंदेवाईक लोक वाटेल ते उपाय करूं लागले व त्यांत कोणत्याहि प्रकारचीं बंधनें पाळण्यांत येईनाशीं झालीं. विशेषतः मोठमोठ्या शहरांत हा धंदा जोरांत चालू लागला व त्याकरितां देशाच्या निरनिराळ्या भागांतून हरएक उपायानें, लोभानें, मोहानें, फूस देऊन, धाक देऊन व पळवून स्त्रिया आणण्यांत येऊं लागल्या. युद्धकाळांत तर या धंद्यास फारच ऊत येतो. धंदेवाईक स्वरूपामुळें व जबरदस्तीमुळें एका स्त्रीस अनेकांची-दिवसास तीसचाळीस लोकांची-कामवासना तृप्त करण्याची पाळी येते.

(४) विष्णूचे अवतार, (५) आश्रम व आश्रमधर्म, (६) वैदिक विवाहविधि, वगैरे ग्रंथ यांनीं लिहिले.

**वैद्य, चिंतामण विनायक** (१८६१–१९३८)—एक महाराष्ट्रीय पंडित. यांचें शिक्षण एल्फिन्स्टन हायस्कूल व कॉलेज यांमध्यें मुंबईस झालें. प्रथम त्यांनीं कांहीं दिवस पुणें येथें वकिली केली. पुढें ते उज्जयिनी येथें प्रांत जज्ज व ग्वाल्हेर येथें मुख्य न्यायाधीश झाले (१८९६ ते १९०५). हे लोकमान्य टिळक यांचे सहकारी होते. पुढें हे काँग्रेस चळवळींत विशेष लक्ष घालूं लागले. वैदिक संशोधन मंडळामार्फत ऋग्वेदाची आवृत्ति काढण्याच्या कामीं यांनीं बरेच परिश्रम घेतले. महाभारताच्या गाढ अभ्यासावरून यांना भारताचार्य असें म्हणत.

यांनीं मराठींत व इंग्रजींत बरीच ग्रंथरचना केली आहे; उदा., 'रिडल ऑफ दि रामायण', 'महाभारत, ए क्रिटिसिझम', 'हिस्टरी ऑफ मीडीव्हल हिंदु इंडिया', 'हिस्टरी ऑफ संस्कृत लिटरेचर', 'महाभारताचा उपसंहार', 'अवलोनति लेखमाला', 'मध्ययुगीन भारत', 'शिवाजी', वगैरे. यांची 'दुर्दैवी रंगू' ही कादंबरी पानपतच्या युद्धप्रसंगावर आहे. यांचा इतिहासाचा व्यासंगहि जबर होता. हे भारत इतिहास संशोधक मंडळाचे बरींच वर्षें अध्यक्ष होते.

**वैद्यकशास्त्र**—फार प्राचीन काळापासून प्रत्येक देशामध्यें रोगांवर औषधें देण्याची कोणती तरी पद्धति अस्तित्वांत असल्याचें दिसून येतें. प्राथमिक अवस्थेंतील समाजामध्यें पुरोहित, जादूगार आणि वैद्य या सर्वांचे धंदे एकाच वर्गांतील मनुष्यें करीत असत. या वेळीं, मंत्रतंत्र अथवा जादू यांयोगें अवर्षण, दुष्काळ, रोग व मृत्यु हीं घडवितां येतात, अशी समजूत असे. व त्यांवर चांगल्या मंत्रतंत्रांचीच उपाययोजना करण्यांत येत असे. तेव्हां साहजिकच प्रथमतः सर्व उपायांस मंत्रतंत्राचेंच स्वरूप असे. या वेळच्या समाजांतील कांहीं लोकांस कांहीं वनस्पतींच्या गुणधर्मांचें व कांहींस शस्त्रक्रियेचें ज्ञान असे, व याच गोष्टींची हळूहळू वाढ होऊन ईजिप्त, इराण, मेसापोटेमिया, हिंदुस्थान आणि चीन यांतील वैद्यकशास्त्राची प्रगति होत गेली.

ग्रीक लोकांनीं आपलें वैद्यकशास्त्र रोगांचीं लक्षणें व चिन्हें यांचें निरीक्षण करून त्यांवर आधारलें. कॉस बेटावर ख्रि. पू. ६०० या वर्षाच्या सुमारास एक वैद्यकाची शाळा स्थापन होऊन ती अनेक वर्षें चालू होती. याच विद्यालयांतून हिपोक्रॅटीस हा पाश्चात्य वैद्यकविद्येचा जनक तयार झाला. ख्रि. पू. चौथ्या शतकांत वैद्यकशास्त्राची बरीच वाढ झालेली दिसून येते. यानंतर पुढील पांच शतकांत ग्रीक वैद्यकाची हळूहळू वाढ होत गेली. परंतु इ. सनाच्या दुसऱ्या शतकांत या वाढीची गति खुंटली. परंतु या सुमारास रोम शहरामध्यें गालेन नांवाचा वैद्य पुढें आला. यानें वैद्यकशास्त्रावर बरेच ग्रंथ लिहून ठेवले आहेत. परंतु त्यांत हिपोक्रॅटीसच्या निश्चित निरीक्षण पद्धतीच्याऐवजीं तत्त्वज्ञानाचें अवडंबर फार माजविल्यामुळें युरोपमधील वैद्यकशास्त्राची पुढें सुमारें १४ शतकें फारशी प्रगति होऊं शकली नाहीं.

मध्ययुगांत युरोपमध्यें अनेक विद्यापीठें अस्तित्वांत असूनहि या शास्त्राची प्रगति फारशी झाली नाहीं. पण विद्यापुनरुज्जीवनकालामध्यें या शास्त्राच्या अभ्यासासहि चालना मिळून १६ व्या शतकांत चार व्यक्ती उदयास आल्या. पॅरॅसेल्सस या स्विस वैद्यानें रासायनिक औषधास महत्त्व प्राप्त करून दिलें. व्हेसॅलिअस यानें अर्वाचीन शारीरशास्त्राचा पाया घातला. पारे या फ्रेंच व हंटर आणि लिस्टर या इंग्रज शस्त्रवैद्यांनीं शस्त्रवैद्यकाचा दर्जा वाढविला. लिओनॉर्डो दा व्हिन्सी हा कलावंतहि या कालांतील एक श्रेष्ठ शास्त्रज्ञ होता. ७ व्या शतकांत रुधिराभिसरणाची क्रिया स्पष्टपणें निदर्शनास आणणारा विल्यम हॉर्वे हा मोठा वैद्य होऊन गेला. या शतकांत शारीरशास्त्र, इंद्रियविज्ञानशास्त्र आणि नेत्रवैद्यक यांची विशेष प्रगति झाली. याच सुमारास स्वीडन देशांत लिनीयस हा प्रसिद्ध वनस्पतिशास्त्रज्ञ गाल्व्हानी आणि व्होल्टा हे विद्युच्छास्त्रज्ञ, प्रीस्टले आणि लाव्हाझिए हे रसायनशास्त्रज्ञ, व जॉन हंटर हा प्रसिद्ध शस्त्रवैद्य होऊन गेला. याचाच शिष्य जेन्नर यानें देवी टोंचण्याची पद्धति प्रचारांत आणली. यानंतर डार्विन, हेल्महोल्झ आणि विर्चौ हे फार मोठे शास्त्रज्ञ होऊन गेले. १९ व्या शतकामध्यें शस्त्रवैद्यकाची फारच प्रगति झाली. २० व्या शतकांत अनेक रोगांवर प्रतिबंधक उपाय शोधून काढण्यांत आले. १९११ मध्यें मंजूर झालेला विम्याचा कायदा कामगारांच्या बाबतींत रोगप्रतिबंधक म्हणून फार महत्त्वाचा धरला आहे. सूक्ष्मजंतुशास्त्रांतील संशोधनामुळें, तसेंच वैद्यकीय मानसशास्त्राची वाढ झाल्यामुळें व रेडियमचा शोध लागल्यामुळें एका नवीन युगाची सुरुवात झाली आहे.

बाबिलोनी व असुरी वैद्यक—प्राचीन बाबिलोनी व असुरी लिखाणांत मंत्रतंत्र व जादूटोणा आणि इतर खुळ्या समजुती ह्यांचाच भरणा फार आहे, तरी ख्रि. पू. २२०० च्या सुमारास होऊन गेलेल्या खामुरबी राजाच्या उपलब्ध झालेल्या कायदेकानूंवरून बाबिलोनी लोकांचें शस्त्रक्रियाज्ञान बरें होतें, असें दिसतें.

भारतीय वैद्यक—ऋग्वेद व तदनंतरचे ग्रंथ यांत भिषज् हा शब्द पुष्कळ वेळां येतो. पूर्वीच्या ग्रंथांतून वैद्याचा धंदा कमी दर्जाचा मानलेला कोठेंहि आढळत नाहीं. अश्विन, वरुण आणि रुद्र हे सारे वैद्य म्हणून प्रसिद्ध आहेत. परंतु धर्मशास्त्रांत हा धंदा अगदीं तुच्छ लेखिला आहे. यजुर्वेदसंहितेसारख्या प्राचीन ग्रंथांतहि ही तुच्छता दृष्टीस पडते. ऋग्वेदांत एका ऋचेंत वैद्य आपल्या वनस्पती व त्यांचें बरें करण्याचें सामर्थ्य यांची फार स्तुति करीत आहे. शिवाय अश्विनांनीं

आश्चर्यकारक व चमत्कारयुक्त इलाज केल्याचें वर्णन आलेलें आहे ( उदाहरणार्थ, लोकांची दृष्टि आणणें किंवा लंगडणाऱ्याला नीट करणें, तसेंच, पुरंध्रीचा नवरा व च्यवन यांना तारुण्य आणणें व विदपलेला लोखंडी पाय लावणें, इ. ). वेदकालीन आर्यांची शस्त्रविद्येंत प्रवीणता होती असें समजलें असतां मोठी चूक होईल असें युरोपीय पंडित म्हणतात. कारण ते म्हणतात कीं, साध्या जखमेवर औषधें बांधण्याची कला त्यांना अवगत होती, परंतु त्यांना शस्त्रकलेचें ज्ञान मात्र अगदीं जेमतेम प्राथमिकच होतें. अथर्ववेदांत वैद्यकीसंबंधीं जो मजकूर येतो त्यावरून वेदकालीन लोक औषधांबरोबर मंत्रतंत्राची योजना करीत असत व त्याचप्रमाणें जलोपचार( जलाष )हि करीत असत असें वाटतें; परंतु त्यांत अर्थ नव्हता. ही जलोपचाराची पद्धत मात्र त्यांनीं इंडो-युरोपीय कालांतील म्हणजे जेव्हां युरोपीय व हिंदुस्थानांत आलेले 'आर्यन्' या लोकांचे पूर्वज एके ठिकाणीं होते तेव्हांची चालू ठेवलेली आहे. परंतु शारीरशास्त्र( शवच्छेदनशास्त्र )बद्दल त्यांनीं जरी अल्प माहिती दिली आहे तरी ती फार महत्त्वाची आहे. ही माहिती यज्ञीय पशु फाडूनच झालेली असावी. वैद्यक हा पूर्वी ऋग्वेदकालींहि धंदा होता, असें ऋग्वेदावरून दिसून येतें. यजुर्वेदसंहितेंत दिलेल्या पुरुषमेधप्रसंगींच्या बळींच्या यादींत एका वैद्याच्या नांवाचा उल्लेख येतो. यावरून पूर्वी हा धंदा होता ही गोष्ट सिद्ध होते.

ज्योतिषाप्रमाणें वैद्यकशास्त्रहि अतिप्राचीन असून त्याचा जन्म मनुष्येतिहासाबरोबर झाला आहे. आजचें सुधारलेलें पाश्चात्य वैद्यक हें भारतीय वैद्यकापासूनच अरबी वैद्यकाच्या द्वारें विकास पावलें; आजचें मराठी किंवा दुसऱ्या अर्वाचीन भाषांतील वाङ्मय पाश्चात्य व भारतीय या दोन्ही वैद्यक पद्धतींचें संग्राहक आहे. व एकोणिसाव्या व अठराव्या शतकांत आतंकतिमिरभास्कर, आयुर्वेदप्रकाश, योगतरंगिणी, भैषज्यरत्नावली, राजवल्लभीय-द्रव्यगुण, प्रयोगामृत, वैद्यकामृत व रसबोध; १७ व्या शतकांतील वैद्यविलास, वैद्यरहस्य, चिकित्सारत्नावली, वृत्त-रत्नावली, योगसंग्रह, योगरत्नाकर व वैद्यजीवन; आणि १६ व्या शतकांतील भावप्रकाश, गुणरत्नमाला, आयुर्वेदसौख्य, योग-चिंतामणि व वैद्यकसारसंग्रह हे मुख्य मुख्य ग्रंथ होत. मध्ययुगांतील उत्तरकालांत धातूंचीं रसायनें देण्याची चाल असून त्यामध्यें पाऱ्यास महत्त्व असे. या कालांतील रसरत्नसमुच्चय, रसप्रदीप, रत्नप्रदीप, रसामृत, रसेंद्रचिंतामणि, वगैरे प्रसिद्ध ग्रंथ आहेत. याच काळांत नाडीपरीक्षेचें विवेचक, त्याचप्रमाणें सन्निपातज्वरासारखे रोग, बालचिकित्सा, नेत्ररोग, विष, कुष्ठ, कावीळ, वगैरेसंबंधीं चर्चा करणारे बोपदेवकृत शतश्लोक, सोमहणविलास, ज्वरतिमिरभास्कर, ज्ञानभास्कर, वीरसिंहावलोकन, चिकित्साकलिका, इत्यादि ग्रंथ झाले. वैद्यकांतील प्रमुख ग्रंथ वंगसेनाचा चिकित्सासारसंग्रह, चक्रपाणीचा चिकित्सासारसंग्रह, सिद्धयोग, माधवनिदान, आत्रेय-हारित हे असून, वाग्भट, सुश्रुत व चरक हे तर आर्यवैद्यकाचे तीन आधारस्तंभच आहेत. आयुर्वेदाचा प्रारंभ ब्रह्म्यापासून दाखविणारीं अनेक कथानकें असून आयुर्वेद वाङ्मयांत औषधें तयार करण्या-विषयींचे धन्वन्तरिनिघंटु, राजनिघंटु, मदनपालनिघंटु, इत्यादि कोशग्रंथ सुप्रसिद्ध आहेत.

पशुवैद्यकावर व वृक्षायुर्वेदावरहि कांहीं थोडे ग्रंथ उपलब्ध आहेत; बॉवरच्या मध्य आशियांतील हस्तलेखाचें भारतीय वैद्य-काच्या इतिहासांत हें महत्त्व आहे कीं, त्यावरून भारतीय वैद्यक इ. स. च्या ४ थ्या व ५ व्या शतकांत अस्तित्वांत असल्याचें सिद्ध होतें. वैदिक वैद्यक व वेदोत्तरकालीन वैद्यक यांमधील संस्कार, आरोग्य, गर्भविज्ञान, शारीर, पुनर्जन्मतत्त्व या बाबींतील साम्या-वरून वैद्यकाची परंपरा अत्रुटित राहिली हें सिद्ध होतें; तिबेट, सिंहलद्वीप, ब्रह्मदेश, इराण, अरबस्तान, ग्रीस, इत्यादि देशांतील वैद्यकावर भारतीय वैद्यकाचा बराच परिणाम झालेला दिसतो. परंतु शस्त्रक्रियेंत बहुधा ग्रीकांचेंच भारतीयांवर वर्चस्व असावें.

वैद्यकशास्त्रीय ग्रंथांमध्यें गुरुशिष्यांतील आवश्यक गुण, वैद्याची योग्यता व धंदा, रोगनिदान, साध्यासाध्यविचार, इत्यादि गोष्टी असून यांतील औषधांचे ( १ ) रसायनें, व ( २ ) वाजीकरणें असे दोन मुख्य भेद आहेत. औषधींचे रसविषयक गुण स्वादु, अम्ल, लवण, तिक्त, कटु व कषाय हे सांगितले असून (१) वमन, (२) विरेचन, (३.) बस्ति, (४) तैलबस्ति व (५) नस्य हीं शरीरशुद्धयर्थ पंचकर्में सांगितलीं आहेत. औषधींचे उपयोग, स्वरूप, संख्या, प्रमाण यांबद्दलहि बरेंच विवेचन आहे. पारा आणि अफू यांची औषधांत योजना करण्याची कल्पना अरबस्तानांतून आली. आयुर्वेदांतील शस्त्रवैद्यकाचे शल्यतंत्र व शालाक्यतंत्र हे दोन विभाग असून शस्त्रक्रियेचे छेदनादि आठ प्रकार आहेत; शस्त्र-क्रियेच्या उपकरणांचे यंत्रें व शस्त्रें असे दोन प्रकार असून त्यांचे पोटप्रकारहि आहेत. क्षार, डाग, जळवा यांची अनुशस्त्रांत गणना होते; याशिवाय शरीरपुष्टि, दिनचर्या, वगैरे गोष्टींचें विवेचन वैद्यकग्रंथांत असून एकंदर आर्यवैद्यकाची तात्त्विक दृष्ट्या उभा-रणी कफवातपित्तात्मक त्रिदोषांवर झाली असल्याचें मानलें आहे. शरीराचे रसादि सात प्रमुख शारीरघटक मानले आहेत. आर्य-वैद्यकाच्या शारीरशास्त्रामध्यें मानवशरीरांतील हाडें, सांधे रक्त-वाहिन्या, स्नायू, इत्यादिकांचें वर्णन असून त्यांनीं मुळांत सांख्यांची प्रक्रिया स्वीकारली आहे व रोगनिदान त्रिदोषपद्धतीवर केलें आहे.

मिसरदेशीय वैद्यक— मिसरदेशांतील जादुटोणा व मंत्रतंत्र यांपासून औषधिज्ञानाचा विकास झाला; त्यांचें शारीरज्ञान मात्र

जतन करून ठेवण्याच्या प्रघातापासून उद्भूत झालें व त्यांत नाडीयुक्त काळजासंबंधीं अंधुकशी कल्पना आलेली दिसते.

**वैमानिक छत्री**—वैमानिक छत्री ही बहुधा रेशमी कापडाची केलेली असून तिचा व्यास २८ फूट असतो. तिच्या परिघास दोऱ्या जोडलेल्या असून त्या वैमानिकाच्या अंगावरील पोशाखाशीं जोडलेल्या दोरीस बांधलेल्या असतात. तिच्या मध्यभागीं एक छिद्र ठेवलेलें असतें. त्यांतून हवा बाहेर जाऊं शकते व त्यामुळें हेलकावे बसत नाहींत. यामुळें व दोऱ्यांस थोडाफार बांक आल्यामुळें या छत्रीचा व्यास सुमारें २० फूट भरतो. तेव्हां १५४ पौंड वजन असणाऱ्या मनुष्याचें वजन त्या छत्रीवर प्रत्येक चौरस फुटास अर्धा पौंड याप्रमाणें वांटलें जातें. त्यामुळें ही छत्री घेऊन खालीं उतरणारा मनुष्य दर सेकंदास सुमारें १६ फूट अथवा सरासरी दर तासास ११ मैल या गतीनें खालीं येतो. या गतीमुळें त्यास जमिनीवर उतरतांना ४ फूट उंचीच्या भिंतीवरून उडी मारण्या-इतकाच धक्का बसतो. ही छत्री वैमानिकानें उडी टाकल्यापासून सुमारें पाच किंवा सहा सेकंदांत अथवा १०० फूट खालीं येई-पर्यंत उघडते. या छत्रीची कल्पना प्रथम लिओनॉर्डो दा व्हिन्सी यानें काढली असें म्हणतात. अशी छत्री घेऊन विमानांतून पहिली उडी १६९७ मध्यें गार्नेरिन या फ्रेंच मनुष्यानें मारली. गेल्या महायुद्धांत या वैमानिक छत्र्यांचा उपयोग शत्रूच्या प्रदेशांत सैन्य उतरण्याच्या कामींहि करण्यांत आला.

**वैरल्यमापक**—(मॅनोमीटर). द्रव पदार्थांतील दाब मोजण्या-करितां हें यंत्र वापरण्यांत येतें. याचा अगदीं साधा आकार म्हणजे एक यू आकाराची कांचेची नळी असून ज्या द्रवाचा दाब मोजा-वयाचा असेल त्याचा भार तोलून धरण्याकरितां पाण्याची अथवा पाऱ्याची योजना केलेली असते. व त्याबरोबरच त्या पाण्यावर किंवा पाऱ्यावर वातावरणाचा दाब राहण्याची किंवा न राहण्याची योजना केलेली असते.

**वैराटगड**—मुंबई, सातारा जिल्हा, वांई तालुका. वांईच्या नैर्ऋत्येस ६ मैलांवर हा ३० फूट उंचीच्या कड्यावर बांधलेला असून ७ फूट उंच भिंत आहे. किल्ल्यांत पांच तळीं आहेत. हा कोल्हापूरचा शिलाहार दुसरा भोज यानें बांधला असें सांगतात.

**वैवस्वत मनु**—विवस्वताचा पुत्र. श्वेतवाराहकल्पांत ब्राह्म-वर्षाच्या तिसऱ्या दिवशीं सातव्या मुहूर्तांत हा मनु झाला. हा क्षत्रिय मंत्रकार होय. वाराहकल्पांत सहा मनू व मन्वंतरें होऊन गेलीं असून सातवा मनु व मन्वंतर वैवस्वत आहे. यानंतर आणखी सात मनू होऊन हें कल्प संपेल. मनु पाहा.

**वैवाहिक हक्क**—(कॉन्ज्युगल राइट्स). कायद्यानें पति-पत्नींना परस्परांचा सहवास, सुख आणि प्रेम मिळण्याचा हक्क आहे. म्हणून कोणी पति किंवा पत्नी एकत्र राहण्याचें नाकारीत असल्यास इंग्लंडमध्यें डायव्होर्स कोर्टांत दावा लावून हा हक्क प्रस्थापित करतां येतो (सूट फॉर रेस्टि-ट्यूशन ऑफ कॉन्ज्युगल राइट्स). हिंदुस्थानांत वैवाहिक हक्क पति-पत्नी या दोघांना असून तो हक्क प्रतियोगी आहे; म्हणजे पत्नीला चांगल्या रीतीनें वागविण्याची व तिचें भरणपोषण करण्याची जबाबदारी पतीवर आहे, आणि पतीला वैवाहिक सुख लाभूं देणें, ही जबाबदारी पत्नीवर आहे. या हक्कांना बाध आल्यास कोर्टामार्फत आपल्या हक्काची शाबिती दिवाणी कोर्टामार्फत दोघेहि करूं शकतात. तथापि पति जातिपतित झाला, त्यानें धर्मांतर केलें, अगर एखादी विधर्मी स्त्री घरांत रखेली ठेवली, किंवा पत्नीच्या जीविताला धोका पोंचेल इतक्या निर्दयतेनें वागूं लागला, किंवा पतीला घाणेरडे रोग असतील तर पत्नीला पती-जवळ राहण्याची सक्ती कायदा करीत नाहीं. उलट पत्नी वरील कारणास्तव विभक्त राहिल्यास तिला अन्नवस्त्र दिवाणी कोर्टांत दावा लावून मिळवतां येतें. शिवाय त्वरित उपाय म्हणजे 'क्रिमिनल प्रोसीजर कोड' कलम ४८८ प्रमाणें फिर्याद करून अन्नवस्त्र मिळवतां येतें. कांहीं कारण नसतां पति पत्नीला बाळगणार नाहीं, किंवा पत्नी पतीबरोबर राहणार नाहीं, तर वैवाहिक हक्क-शाबिती (रेस्टिट्यूशन ऑफ कॉन्ज्युगल राइट्स्) कोर्टामार्फत करतां येते. पत्नी विनाकारण विभक्त राहील तर तिला अन्नवस्त्र कोर्ट देवविणार नाहीं.

**वैशंपायन**—व्यासाच्या चार शिष्यांतील संपूर्ण यजुर्वेद पढलेला शिष्य. हा याज्ञवल्क्य ऋषीचा मातुल असून यजुर्वेदांतील एका प्रमुख शाखेचें अध्ययन करण्याच्या संबंधांत गुरुहि होता. याचे ८६ शिष्य होते त्या सर्वांना त्यानें एकेक वेदशाखा दिली. याज्ञवल्क्यानें याची शाखा परत केली. तीच यजुर्वेदाची तैत्तिरीय शाखा होय. हा पुराणिक म्हणून प्रख्यात आहे. यानें जनमेजयास महाभारत कथन केलें. पितृतर्पणांत याचा उल्लेख येतो. याच्या नांवावर एक संहिता, स्मृति व नीतिसंग्रह आहे. भृगुकुलांतील गोत्रकार म्हणूनहि वैशंपायनाचें नांव येतें.

**वैशाली-विशाला**—गंडकीच्या पूर्वेस बेसार म्हणून एक खेडें आहे तेंच वैशाली (विशाला) नगर असावें. ह्युएनत्संगानें या नगराचा घेर ८३३ मैल दिला आहे. बेसार गांवाचा उल्लेख अबुलफजल यानें केला आहे, यावरून अकबराच्या वेळीं तें प्रसिद्ध असावें. व्रजदेशांतील वैशाली हा एक भाग असावा. बुद्धाच्या वेळीं व पुढेंहि वैशालीच्या लोकांस लिच्छवी असें म्हणत असत.

वैशाली प्रांतांत शेंकडों बौद्ध विहार होते, पण ह्युएनत्संग तेथें गेला तेव्हां त्यांपैकीं तीनचारच काय ते चांगल्या स्थितींत होते व सम्मतीय शाखेचे थोडे भिक्षू त्यांतून शिकत होते. वैशाली मठांतून महायान पंथाच्या ग्रंथांचें अध्ययन होत असे.

वेरूळ — कैलास लेणें (पृ. २३६२)

वेरूळ शिल्प — रावण कैलास उचलीत आहे. (पृ. २३६२)

शेरशहाची कबर — सहस्राराम (पृ. २८९१)

**वैशेषिक दर्शन**—षड्दर्शनांपैकीं एक. न्यायदर्शनाच्या बरोबर याचा उल्लेख येतो. या दर्शनाचा प्रवर्तक कणाद ऋषि आहे. (कणाद पाहा). संसार दुःखमय आहे आणि दुःखनिवृत्ति होण्यास किंवा निःश्रेयसाची प्राप्ति होण्यास तत्त्वज्ञानाचा अवलंब करावा, असें या दर्शनांत सांगितलें आहे.

परमाणूंस (ॲटम) संबंधून असलेल्या पदार्थमात्रास 'विशेष' असें जें नांव देण्यांत आलें आहे त्यावरून वैशेषिक मत असें नांव या तत्त्वज्ञानाच्या मार्गास पडलें. कणादानें असें गृहीत धरलें आहे कीं, या जगाची रचना (घटना) मूलतः आणखी विभाग करतां येत नाहींत अशा परमाणूंपासून झाली आहे. यासच आत्मा ही संज्ञा देण्यांत आली आहे. जड पदार्थाचें ज्ञानानुशीलन करणें हें अत्यंत आवश्यक असल्याचें वैशेषिक दर्शनकारांनीं प्रतिपादन केलें आहे. वैशेषिकांना 'पीलुपाकवादी' म्हणतात. 'पीलुपाक' म्हणजे अणूंचा पाक. याच्याउलट नैयायिकांना 'पीठरपाकवादी' म्हणतात. वैशेषिकांचें मत सांख्यांनीं व वेदान्त्यांनीं खोडून काढलें आहे.

**वैश्य**—वैश्य हा शब्द विश्‌पासून झालेला असून त्याचा अर्थ मनुष्य, लोक, प्रजा असा होतो; स्त्रीलिंगी अर्थ द्रव्य असाहि होतो. जुन्या संस्कृतांत विश् याचा अर्थ अन्न देणें असा होतो. वेदांत विश्पति म्हणजे खेड्याचा मुख्य असा शब्द येतो. आर्यांच्या चातुर्वर्ण्यांत या जातीचें स्थान तिसरें असून तिचा समावेश द्विजात होतो. या जातीचा धंदा कृषि-गोरक्षण-वाणिज्य हा प्राचीन काळापासून चालत आला आहे. आर्य लोक हिंदुस्थानांत येण्यापूर्वी त्यांच्यांत हा वर्ग होता. शूद्राच्या वरच्या वर्गांतील परंतु ब्राह्मण व क्षत्रिय वर्गांतील लोकांहून भिन्न लोकांना हा शब्द लावूं लागले. हिंदुस्थानांत वैश्य संज्ञक लोकांची संख्या पुष्कळ आहे, परंतु ते लोक हल्लीं आपल्याला निरनिराळ्या जातिनामांनीं संबोधूं लागल्यामुळें हल्लीं एकूण वैश्य लोकांची संख्या जी खानेसुमारीच्या अहवालांत दिसून येते ती कमी आहे. वैश्य या नांवानें खानेसुमारींत समाविष्ट होणारी एकंदर लोकसंख्या (१९११) ४०,०६७ आहे. त्यांत म्हैसूर व मध्यप्रांतांत ती जास्त आहे.

**वैश्य सोनार**—वऱ्हाड व खानदेशांत वैश्य सोनार म्हणून प्रसिद्ध असलेली जात सोनार नसून वैश्य आहे. परंतु त्यांचा धंदा सोनारीचा आहे. जातीचीं देवळें, घरें, वगैरे स्थावर-जंगम मालमत्ता मुळींच नाहीं. ब्राह्मणांखेरीज कोणत्याहि जातीशीं अन्नोदकव्यवहार नाहीं. सर्व संस्कार माध्यंदिन यजुर्वेदी भिक्षुक करतात. मूळची ही जात महाराष्ट्रांतून तीनचारशें वर्षांत मध्यप्रांतांत आली. राखींपासून झालेल्या मुलांची निराळी जात बनली आहे.

**नार्वेकर वैश्य**—यांचें मूळ ठिकाण गोव्रें प्रांतांतील नार्वे गांव होय. पोर्तुगीजांच्या छळानें हे घाटावर आले. सांप्रत मुख्य वस्ती बेळगांव येथें असून, तेथें त्यांची मुख्य पंचायत आहे व एक सनादेवीचें (जातीचें) देऊळ आहे. विवाहादि संस्कार द्रविड ब्राह्मण चालवितात. पुनर्विवाह रूढ नाहीं.

**वैष्णव संप्रदाय**—हिंदुस्थानांतील एक प्रसिद्ध हिंदु धर्मसंप्रदाय. विष्णु देवतेला निरनिराळ्या स्वरूपांत भजणारा हा संप्रदाय असल्यानें याला वैष्णव संप्रदाय असें नांव मिळालें आहे. याच्याच जोडीचा व तोडीचा दुसरा धर्मसंप्रदाय म्हणजे शैव संप्रदाय होय. हिंदु धर्मीयांत हेच दोन मोठे धर्मपंथ असून बहुतेक सर्व हिंदू या दोहोंत मोडतात. ऋग्वेदकाळीं विष्णु हो श्रेष्ठ देवता मानण्यांत येत नव्हती. ब्राह्मणकाळीं विष्णुदेवतेला प्राधान्य येत चाललें. पुढें महाभारतकालीं व पुराणकाळीं विष्णु म्हणजेच परब्रह्म असें मानण्यांत येऊं लागलें. वैष्णव संप्रदाय हा मूळ भक्तिप्रधान एकेश्वरी धर्म होय. उपनिषदुत्तरकाळीं धर्मसुधारणेची मोठी चळवळ उत्पन्न झाली; त्या चळवळींतून बौद्ध अगर जैन धर्मांप्रमाणेंच हा एकान्तिक धर्म उदयास आला. या धर्माच्या बुडाशीं वासुदेव कृष्णानें सांगितलेली भगवद्गीता ही होती. या एकान्तिक ऊर्फ भागवत धर्मात वासुदेवाची भक्ति हें मुख्य तत्त्व होतें. पुढें विष्णु हा परब्रह्म मानण्यांत येऊं लागल्यानंतर नारायण धर्म, वासुदेवभक्तिसंप्रदाय व विष्णुभक्तिसंप्रदाय या तिन्ही पंथांचें एकीकरण होऊन त्याचा वैष्णव संप्रदाय बनला. रामानुजाचार्यांनीं वैष्णव धर्माचें पुनरुज्जीवन करण्यास सुरवात केली; त्याच सुमारास उत्तर हिंदुस्थानांत निंबार्कानेंहि वैष्णव संप्रदायाच्या पुनरुद्धारार्थ कसून प्रयत्न केले. अद्वैतमताचा पाडाव करून भक्तिमार्गाची पूर्णपणें स्थापना करण्याची कामगिरी मध्वाचार्यांनीं बजाविली. रामानंदांच्या मागून कबिरानेंहि या एकेश्वरी भक्तीचाच उपदेश सर्वांना केला. १६ व्या शतकांत वल्लभाचार्यांनीं बाळकृष्ण व राधा यांच्या उपासनेचा संप्रदाय सुरू केला. पण त्यांच्या संप्रदायांत पुढें शृंगारिक गोष्टींचा अतिरेक होऊं लागला. महाराष्ट्रांत वैष्णव धर्माची ध्वजा रोवण्यास नामदेवानें सुरवात केली व तुकारामानें तो धर्म लोकप्रिय करून टाकिला. वैष्णव धर्माच्या इतिहासांत अवतारकल्पनेवर बराच भर दिलेला दृष्टीस पडतो. नारायणी आख्यानांत विष्णूचे सहा अवतार मानले आहेत, तर वायुपुराणांत विष्णूचे अवतार बारा सांगितले आहेत. तथापि राम व कृष्ण यांचेंच महत्त्व अतिशय मानण्यांत आलें आहे. वैष्णव संप्रदायाचे पोटभेद बरेच आहेत : उदा., भागवत, मराठी भक्तिसंप्रदाय, मध्व, रामानुज, निंबार्क, चैतन्य, वल्लभ, राधावल्लभ, पांचरात्र, रामानंद व कबीर संप्रदाय इ. होत. विष्णुस्वामी, हरिदासी, मानभाव, नरसिंह, शीखपंथ, दादूपंथ, लाडदासी, रामानंदी, चरणदासी, इत्यादि पंथ वैष्णव संप्रदायांतच मोडतात.

**वोडहाउस, पेल्हॅम ग्रेनव्हिल** ( १८८१- )—एक इंग्रज विनोदी ग्रंथकार. याचें शिक्षण डल्विच येथें झालें. हा कांहीं दिवस 'ग्लोब' च्या संपादकवर्गांत होता. यानें पुष्कळ लोकप्रिय लघुकथा लिहिल्या आहेत. ह्याच्या गोष्टींत जीव्हज् नांवाचा आचारी हें एक प्रमुख पात्र असतें. याचीं तिसाच्यावर नाटकें आहेत.

**व्यंकटगिरी**—मद्रास इलाखा, नेल्लोर जिल्ह्यांतील एक जमीनदारी. क्षे. फ. ४२७ चौरस मैल. लो. सं. सुमारें पाऊण लाख. गांवें १५२. मुख्य गांव व्यंकटगिरी ( लो. सं. १५ हजार ). हल्लींच्या जहागिरदारांचें घराणें १२ व्या शतकापासूनचें आहे, असें म्हणतात. मूळ पुरुषाचें नांव चव्विरेड्डी असून तो वेलम जातीचा होता. हें घराणें विजयानगरकरांचें मांडलिक होतें. या घराण्यांतील पुरुषांनीं मुसलमानांशीं हिंदु राजांतर्फे लढाया मारल्या होत्या.

**व्यंकटनरसी**—पेशवाईंतील एक सुप्रसिद्ध नर्तिका. ही शेवटच्या बाजीरावाच्या वेळची असून बाजीरावानें हिचा तीन दिवस अहोरात्र नाच करवून त्याबद्दल हिला सव्वीस हजार रुपये बिदागी दिली. 'विश्वगुणादर्शचंपू' या काव्याचा कर्ता व्यंकटाध्वरी (पाहा) यानें हिच्या नर्तनांतील कांहीं दोष दाखवून हिला मार्गदर्शन केल्यानें ही त्याची शिष्या झाली व त्याचेंच नांव आपल्या मूळच्या नरसी या नांवामागें जोडूं लागली, अशी जी आख्यायिका आहे ती कालदृष्ट्या चुकीची दिसते.

**व्यंकटपति आरविडु** ( १५८६-१६१४ )—विजयानगरचा एक राजा. तिरुमल्ल आरविडूचा हा पुत्र पहिल्या श्रीरंगरायानंतर विजयानगरच्या गादीवर आला. सदाशिवरायाच्या खुनाचा वहीम याजवर असल्यानें लोकमत यास प्रतिकूलच होतें. यास पेनुगोंडा येथें असलेली आपली राजधानी विजापूरकरांच्या स्वारीमुळें सन १५९२ मध्यें चंद्रगिरीस न्यावी लागली. चंद्रगिरीसच यास राज्याभिषेक झाला होता. पुढें वेलोरच्या बंडखोर नायकास आपल्या काबूंत आणून सन १६०६ मध्यें यानें वेलोरला राजधानीचें महत्त्व प्राप्त करून दिलें. पोर्तुगीजांना इकडे स्थिर होण्यास याच्या साहाय्याचा बराचसा उपयोग झाला. यानें आपल्या पदरीं कांहीं युरोपियन चित्रकारहि ठेवले होते. गोवळकोंड्याचा मुहम्मद कुली कुत्बशहा व दुसरा इब्राहिम आदिलशहा यांना यानें पराभूत केलें. यास संतति नव्हती. आपल्या राम नामक भावाच्या पुत्रासच जवळ करून यानें त्यास चिक्कराय युवराज अशी पदवी दिली. शेवटीं याचा सासरा ओबराज व मेहुणा जगराय यांनीं त्याच्यासह त्याच्या सर्व घराण्याचा निःपात केला. त्यांतून तिसरा श्रीरंग हा याचम्मा नायकाच्या साहाय्यामुळें वांचला. याच्या आज्ञेवरूनच अप्पय्या दीक्षितानें 'कुवलयानंद' व 'लक्षणरत्नावली' हे दोन ग्रंथ लिहिले. हा तातात्रार्याचा शिष्य व व्यंकटेशाचा भक्त होता. विजयानगरचा सम्राट् म्हणून यानें सन १६१२ मध्यें ओडेयरच्या म्हैसूर राज्याच्या स्वातंत्र्यास मान्यता दिली. विजयानगरचा हा शेवटचा सम्राट् होय.

**व्यंकटराव घोरपडे** ( मृत्यु १७४५ )—इचलकरंजीचा अधिपति व कोल्हापूरचा सचिव नारोपंत घोरपडे याचा पुत्र. बाळाजी विश्वनाथ पेशवे याची कन्या अनूबाई यास दिली होती. कोल्हापूरचें सचिवपद यास न मिळाल्यानें हा शाहूस मिळाला. पुढें शाहू व संभाजी यांच्यांत एकोपा झाल्यावर शाहूनें यास कोल्हापूरच्या राज्यांत जहागीर देवविली. सन १७३९ मध्यें गोव्यावर स्वारी करून यानें पोर्तुगीजांचा पराभव केला. यास नारायण व वेणूबाई अशीं दोन मुलें होतीं. वेणूबाईचें लग्न त्रिंबकराव मामा पेठे याच्याशीं झालें. यानें इचलकरंजीस तट बांधला. साताऱ्यास असलेला व्यंकटपुरा याची स्मृति आणून देतो.

**व्यंकटाध्वरी** ( १६ व्या शतकाचा पूर्वार्ध )—हा एक वैष्णव कवि होता. हा सुमारें २५० वर्षांपूर्वी होऊन गेला. हा कांचीमंडलामध्यें फार प्रख्यात विद्वान् होता. त्यानें वाजपेयादिक मोठाले यज्ञ केले. व्यंकटाध्वरी हा लक्ष्मीचा उपासक होता. त्यानें नीति, अन्योक्ति, राजवर्णन, इत्यादि विषयांवर बरेच काव्यग्रंथ केले आहेत. त्यांत त्याचे तीन ग्रंथ फार प्रसिद्ध आहेत : ते विश्वगुणादर्श, लक्ष्मीसहस्र व हस्तिगिरिचंपू हे होत. या ग्रंथांत उत्प्रेक्षा, श्लेष, शब्दसौंदर्य, अनुप्रास, इत्यादि उत्तम काव्याचे गुण विशेष आढळतात.

**व्यंकोजी** (१६३१-१६८५)—तंजावरच्या भोंसले घराण्याचा संस्थापक. (तंजावरचें राजघराणें पाहा.) हा शहाजीची दुसरी बायको तुकाबाई हिचा पुत्र असून याचें बालपण बंगळूरास शहाजीजवळ गेलें. यानें शहाजीच्या मृत्यूनंतर १६७४ त तंजावरास स्वतंत्र गादी स्थापिली. १६८२ त यानें बंगळूर वडेयर राजाला विकून टाकून तिकडचा संबंध ठेवला नाहीं. शहाजीनें मद्रास-तंजावरकडे मोहिमा नेल्याच होत्या. तेव्हा व्यंकोजीला तेथें आपलें बस्तान बसविण्यास सोपें गेलें. पण आदिलशाहीशीं हा एकनिष्ठ राहत असल्यानें शिवाजीच्या विरुद्ध बाजूनें मुसलमानांस मदत करी. तेव्हां शिवाजीनें याची कानउघाडणी होऊन समज मिळावी म्हणून कर्नाटकाची मोहीम काढली. प्रथम व्यंकोजी त्याच्याशीं चांगल्या रीतीनें वागला, पण शिवाजीनें मुद्दामच वांटणीची गोष्ट काढतांच व्यंकोजी निघून गेला. तेव्हां शिवाजीनें त्याचा मुलूख ताब्यांत घेऊन आपल्या सरदार-मुत्सद्यांच्याकडे कारभारासाठीं दिला. शिवाजी गेल्यावर व्यंकोजीनें मुलूख परत मिळविण्यासाठीं शिवाजीच्या माणसांशीं लढाया केल्या, पण त्यांत त्याला यश आलें नाहीं. शिवाजीनेंच मागाहून समजुतीचें पत्र लिहून त्याचे तंजावरचें राज्य परत दिलें.

त्याची राणी दीपाबाई ( पाहा ) फार शहाणी असे. तिच्यामुळेंच व्यंकोजीचें राज्य टिकलें. व्यंकोजी हा स्वतः विद्वान् व विद्वानांचा चहाता असे. त्याच्या दरबारीं अनेक प्रसिद्ध मराठी व तामिळी पंडित असत. ( तंजावरचे राजे पाहा ).

**व्यक्तिवाद**—( इण्डिव्हिज्युअॅलिझम ). हा एक शास्त्रीय सिद्धान्त आहे. त्याचा अर्थ असा कीं, व्यक्ति या घटकाचें महत्त्व निरनिराळ्या व्यक्तिमात्रांच्या घटकांनीं बनलेला जो समाज त्या समाजापेक्षां अधिक आहे. नीतिशास्त्रांत व्यक्तिवादाचे म्हणणें असें कीं, प्रत्येक व्यक्तीनें, आपल्या स्वतःपुरतें पाहणें, हेंच ध्येय ठेवावें. कारण व्यक्तिमात्राच्या जीवनाशीं तुलना करतां समाज-जीवनाला मुळींच महत्त्व नाहीं, म्हणून प्रत्येक व्यक्तीनें आपलें स्वतःचें सुख, हित व कल्याण यांपेक्षां समाजहित गौण मानावें. राज्यशास्त्र आणि अर्थशास्त्र यांमध्यें व्यक्तिवाद हा समाजहितवादाचा विरोधी सिद्धान्त मानला जातो. सरकार हें व्यक्तीच्या हक्कांचें पालनकर्तें होय, आणि व्यक्तीच्या आशा-आकांक्षा पुऱ्या करण्याचें साधन सरकार आहे. अर्थशास्त्रांत व्यक्तिवाद्यांचें म्हणणें असें कीं, अर्थोत्पादनाचीं साधनें, उत्पादन, विनिमय व व्यय या सर्व बाबतींत सरकारनें बिलकुल हस्तक्षेप करूं नये; व्यक्तिमात्राला संपूर्ण स्वातंत्र्य असावें. याप्रमाणें किमान मजुरी, समाजसत्तावाद, व्यक्तिस्वातंत्र्यावर सरकारी कायद्याचें नियंत्रण या सर्वांना व्यक्तिवाद्यांचा विरोध आहे. हा व्यक्तिवाद १८ व्या शतकांत विकास पावला, आणि थोडक्यांत 'लेसे फेअर' ( आहे तसेंच असूं द्या ) या सुप्रसिद्ध शब्दप्रयोगानें मँचेस्टर पंथीय अर्थशास्त्रज्ञांनीं व्यक्तिवादाचा पुरस्कार आणि सरकारी हस्तक्षेपाला विरोध सुरू केला. अॅडॅम स्मिथ, बेंथाम, रिकार्डो, थोरला मिल, आणि विशेषतः हर्बर्ट स्पेन्सर हे इंग्लंडांतील, आणि बॅस्टियट हा फ्रान्समधील या सिद्धान्ताचा पुरस्कर्ता होय.

**व्यंगचित्रें**—( कॅरिकेचर ). हा एक चित्रांचा प्रकार आहे. यांमध्यें ज्या वस्तूचें अथवा व्यक्तीचें चित्र काढावयाचें तिचें सामान्यतः पूर्णपणें साम्य चित्रांत दाखविण्यांत येतें, परंतु त्या व्यक्तीच्या चांगल्या गुणांकडे किंवा चांगल्या विशेषांकडे लक्ष न देतां त्यांतील व्यंगें अथवा दोष अधिक खुलवून व स्पष्टपणें दाखविण्यांत येतात. हा व्यंगचित्रांचा प्रकार ईजिप्तमधील चित्रांमध्येंहि आढळतो व त्यानंतर ग्रीक व रोमन चित्रांतहि हा प्रकार प्रामुख्यानें दृष्टीस पडतो. मध्ययुगांत हा चित्रांचा प्रकार सर्व देशांत प्रचलित होता. सध्यां वर्तमानकालीं हा प्रकार वर्तमानपत्रांतून सर्वत्र आढळतो. या कलेंतील प्रमुख चित्रकार होगार्थ, गिलरी, रौलंडसन, बनबेरी, जॉन डॉयले, लीच, रिचर्ड डॉयले, क्रूकशांक, टेनिएल, वगैरे होत. इंग्रजींतील 'पंच' व 'व्हॅनिटी फेअर' या पत्रांत हा प्रकार विशेष आढळतो. आपल्याकडे ठाणें येथें निघणाऱ्या 'हिंदु पंच' या पत्रानें हा प्रकार सुरू केला होता. अलीकडे कांहीं पत्रांतून अशा प्रकारचीं चित्रें आढळतात. दिल्लीला 'शंकर्स वीकली' म्हणून एक नियतकालिक निघतें त्यांत अशींच सर्व गमतीदार व्यंगचित्रें असतात.

**व्यभिचार**—विवाहित पुरुषानें आपल्या बायकोखेरीज इतर स्त्रीशीं, किंवा विवाहित स्त्रीनें आपल्या नवऱ्याखेरीज इतर पुरुषाशीं संभोग करणें, याला व्यभिचार म्हणतात. विवाहाची चाल रूढ असलेल्या समाजांत स्त्रियांचा परपुरुषसंबंध न होऊं देण्याबद्दल पुरुषवर्ग दक्ष असतो, त्यामुळें बहुतेक रानटी जातींत या गुन्ह्याला वध, अवयवच्छेदन, वगैरे कडक शिक्षा रूढ असलेल्या आढळतात. प्राचीन ग्रीक लोकांत जारकर्मी स्त्री व पुरुष दोघांनाहि गुन्हेगार धरीत, व कुमारिकांशीं किंवा विधवांशीं बदकर्म करणें, हा गुन्हा मानीत. मोझेसच्या कायद्यांत जारकर्माला दगड मारून ठार करण्याची शिक्षा सांगितली आहे. इस्लामी कायद्यांत जारकर्माबद्दल शंभर फटक्यांची शिक्षा द्यावी, असें कुराणांत आहे. पारशी कायद्यांतहि जारकर्म हा भयंकर गुन्हा मानतात; कारण त्यामुळें खुनाकडे प्रवृत्ति होते; जारकर्मी स्त्रिया गर्भपात करतात, पुरुषाला जारज संतति पोसणें भाग पडतें, व औरस संतति बिघडते, व सर्व समाजाला कीड लागत जाते. जुन्या हिंदु कायद्यांत मनूनें जारकर्मी स्त्री व पुरुष दोघांनाहि घोर शिक्षा सांगितली आहे; इतकेंच नव्हे तर, परस्त्रीसंभाषण, अंगस्पर्श, वगैरेंनाहि दंड सांगितला आहे.

इंग्लंडांत १८५८ पासून व्यभिचार हा गुन्हा न मानतां, फक्त तें घटस्फोट मागण्यास एक कारण मानलें असून १९२३ पासून स्त्रियांना जारकर्मी पुरुषाविरुद्ध घटस्फोट मागण्याचा हक्क दिला आहे. हिंदुस्थानांतील चालू कायद्यांत व्यभिचारी पुरुषाला शिक्षा सांगितली आहे, पण स्त्रीला या गुन्ह्याबद्दल शिक्षा नाहीं. कारण हिंदूंत बहुभार्यापद्धति, जरठ-कुमारीविवाह, वगैरे रूढी वैवाहिक नीतिमत्ता शिथिल करणाऱ्या आहेत, असें प्रतिपादन पीनल कोटकारांनीं केलें आहे ( इंडियन पीनल कोड कलम ४९७ पाहा ).

**व्यवसाय**—देशाचा व्याप जेवढा असतो त्या मानानें व्यवसाय कमी-अधिक असतात. व्यवसायांचें शिक्षण पूर्वी घरगुती परंपरेनें मिळे. नंतर शाळा निघाल्या. पाश्चात्य देशांत सर्व व्यवसाय शिकविले जातात. कांहीं व्यवसायांच्या उच्च शिक्षणसंस्था विद्यापीठांना जोडलेल्याहि आहेत. उदाहरणार्थ, इंग्लंडांत अनेक प्रकारच्या उद्योगधंद्यांचें शिक्षण देणाऱ्या संस्था आहेत. ज्या पालकांना आपले मुलगे व मुली हीं चांगलीं विद्वान् होऊन उच्च प्रकारच्या उद्योगधंद्यांत शिरावीत असें वाटत असेल त्या पालकांनीं आपल्या मुलांना १६ व्या, १७ व्या वर्षापर्यंत सामान्य शिक्षण देऊन नंतर विशिष्ट उद्योगधंद्यांच्या शिक्षणसंस्थेंत दाखल केलें पाहिजे. त्याकरितां प्रथम प्रवेशपरीक्षा घेण्यांत येते. उद्योगधंद्यांच्या शिक्षणसंस्था इंग्लंडांत आहेत त्या—

दि चर्च—चर्चमध्यें म्हणजे इंग्लंडांतील धार्मिक खात्यांत ज्याला वरिष्ठ हुद्याची नोकरी करावयाची असेल त्याला सहा वर्षें उच्च शिक्षण घ्यावें लागतें. त्यांपैकीं तीन वर्षें आर्ट्स फॅकल्टीमध्यें आणि तीन वर्षें डिव्हिनिटीमध्यें शिक्षण घ्यावें लागतें. या शिक्षणक्रमांत पुष्कळ चर्चमार्फत विद्यार्थ्यांकरितां शिष्यवृत्ती ठेवलेल्या आहेत.

कायदा—(१) बॅरिस्टर-इंग्लंडांतील न्यायकोर्टांत वकिली करण्याची सनद मिळविण्याकरितां अगोदर पुढील प्रकारचें शिक्षण घ्यावें लागतें. कायद्याच्या शिक्षणाकरितां इनर टेंपल, मिडल् टेंपल, लिंकन्स इन्, किंवा ग्रेज इन् यांपैकीं एका संस्थेंत ४० पौंड फी भरून चार टर्म हजर राहावें लागतें. एक टर्म म्हणजे सदर संस्थेच्या हॉलमध्यें रात्रीं सहा वेळां भोजन करणें. याप्रमाणें चार टर्म भरल्यावर आणखी १०० पौंड डिपॉझिट द्यावें लागतें. नंतर प्रत्यक्ष सनद मिळविण्याकरितां आणखी १०० पौंड फी भरावी लागते.

(२) सॉलिसिटर या धंद्यांत शिरणाराला सॉलिसीटरच्या फर्ममध्यें ८० पौंड स्टॅंप ड्यूटी आणि शिवाय १०० पौंड भरून नोकरी पांच वर्षें करावी लागते. पण युनिव्हर्सिटीच्या पदवीधर इसमाला फक्त तीन वर्षें नोकरी करावी लागते. नंतर परीक्षेची फी, आणि सनदेची फी मिळून ७० पौंड द्यावे लागतात.

वैद्यकी (मेडिसिन)—या विद्यार्थ्याला पांच वर्षें मेडिकल स्कूलमध्यें शिक्षण घ्यावें लागतें, आणि त्या संपूर्ण शिक्षणाची फी २५० पौंड सामान्यतः असते.

दंतवैद्यकी—या धंद्याला अलीकडे फार तेजी आली आहे. या शिक्षणाकरितां निदान दोन वर्षें डेंटल स्कूलमध्यें जावें लागतें. त्याची फी १००।१५० पौंड असते.

शिक्षकाचा धंदा—प्राथमिक शाळांतील शिक्षकांना ट्रेनिंग स्कूलमध्यें निदान दोन वर्षें शिक्षण घ्यावें लागतें. माध्यमिक ऊर्फ हायस्कुलांतील शिक्षकांना आर्ट्स किंवा सायन्स विषयाची ऑनर्स डिग्री मिळवावी लागते. शिवाय एक वर्ष अध्यापनशास्त्राचें शिक्षण घ्यावें लागतें.

सिव्हिल सर्व्हिस—हायर सिव्हिल सर्व्हिस म्हणजे वरिष्ठ सरकारी नोकरींत प्रवेश होण्याकरितां युनिव्हर्सिटीची ऑनर्स डिग्री मिळविणें जरूर असतें. खालच्या प्रतीच्या म्हणजे कारकुनाच्या नोकरींत शिरण्याकरितां प्रवेशपरीक्षा द्यावी लागते, व त्याकरितां विशेष प्रकारचें शिक्षण घ्यावें लागतें.

इंजिनियरिंग आणि तत्संबंधीं इतर धंदे—इंजिनियरिंग कॉलेजमध्यें जाणाऱ्या विद्यार्थ्याला अगोदर एखाद्या इंजिनियरिंग वर्क्समध्यें प्रवेश मिळवावा लागतो. नंतर कॉलेजचें शिक्षण पुरें करून इन्स्टिट्यूशन ऑफ सिव्हिल इंजिनियर्स या संस्थेचा सभासद झाल्यावर त्याला चार्टर्ड सिव्हिल इंजिनियर असें स्वतःला म्हणवितां येतें.

शेतकी—या धंद्याच्या मुख्य दोन शाखा आहेत : (१) शेती, व (२) दूधदुभतें. या धंद्याची विद्यापीठाची पदवी बी. एस्सी. (ॲग्रि.) ही होय.

याशिवाय जंगलशास्त्र, पशुवैद्यक, भैषजविज्ञान, अधिकृत हिशेबनवीसी (चॅर्टर्ड अकौन्टन्सी), इत्यादि धंदे व त्यांबद्दलच्या परीक्षा इंग्लंडांत आहेत.

हिंदुस्थानांतहि धार्मिक शिक्षणाखेरीज वरील सर्व प्रकारचें शिक्षण देण्याची प्रत्येक प्रांतांत व संस्थानांतून व्यवस्था आहे. शेतकी (९), व्यापारी (१५), स्थापत्य (७), कायदेविषयक (१५) व वैद्यकी (१५) या शिक्षणाचीं कॉलेजें असून कलाविद्यालयें १८, यांत्रिक-औद्योगिक शाळा ६३३, व्यापारी शाळा ३०५ व वैद्यकी शाळा ३२ आहेत. डेहराडूनला जंगलशास्त्राची शिक्षण-संशोधनसंस्था आहे. लष्करी व नाविक शिक्षणासाठीं निरनिराळ्या दर्जाचें शिक्षण देण्याची सोय आहे. आतां व्यवसाय बरेच वाढले असल्यानें त्यांचें शिक्षण देणारीं सरकारी व खाजगी शाळा-कॉलेजें निघत आहेत.

**व्यवहारज्ञान पंथ**—(कॉमन सेन्स). एका स्कॉटिश तत्त्वज्ञानपंथाचें नांव. हा पंथ थॉमस रीड (१७१०-१७९६) या तत्त्ववेत्त्यानें स्थापला. त्यानें असें प्रतिपादन केलें कीं, आपल्या स्वतःखेरीज निराळें कायमचें जग आहे. व हें सिद्ध करण्यास अशा जगाच्या अस्तित्वाबद्दल मानवजातीनें दिलेली मान्यता हा पुरावा पुरेसा आहे. फ्रान्समध्यें या पंथाचा पुरस्कर्ता रोयर कोलार्द (१७६३-१८४४) हा होय. बर्कले व ह्यूम या तत्त्ववेत्त्यांनीं जो आदर्शवाद (आयडिॲलिझम) प्रतिपादिला, त्याला विरोधात्मक जी प्रतिक्रिया सुरू झाली, तींतील एक अवस्था या व्यवहारज्ञानपंथानें दर्शविली जाते.

**व्याकरणशास्त्र**—विद्यमानकाळीं प्रमाणभूत असें शुद्ध बोलण्याचीं व लिहिण्याचीं तत्त्वें शिकविणारें हें शास्त्र आहे. प्रत्येक सुधारलेल्या राष्ट्राच्या भाषेला तिचें व्याकरण असतेंच व त्यांत शब्दांचे उपयोग व शब्दांमधील परस्परसंबंध यांविषयींचे नियम दिलेले असतात. काळाप्रमाणें जशी भाषा बदलते तसें तिचें व्याकरणहि बदलतें. कांहीं शतकांपूर्वीं जे प्रयोग शुद्ध समजले जात होते ते आज तसे समजले जातीलच असें नाहीं. तेव्हां व्याकरणशास्त्र जिवंत असून त्यांत कालमानाप्रमाणें विकार होतं असतात.

आपणांस शुद्ध बोलावयास व लिहावयास पाहिजे असेल तर व्याकरणांतील नियमांकडे लक्ष दिलें पाहिजे. मनुष्य व्याकरण शिकल्यावांचूनहि शुद्ध बोलूं शकतो; तथापि अमुक चूक, अमुक

बरोबर हें समजून घेणें अवश्य आहे. बहुतेक अर्वाचीन व्याकरणकार शब्दव्युत्पत्ति व वाक्यरचना या दोन भागांतच व्याकरणाची विभागणी करतात.

भारतीयांचा व्याकरणशास्त्रावरील अभ्यास अत्यंत पूर्णतेस पोहोंचलेला आहे, व भाषाविज्ञानाचा विकास तैत्तिरीय संहितेपासून थोडाबहुत प्रातिशाख्य–ब्राह्मणादि ग्रंथांत शोधतां येतो. यास्काचें निरुक्त ( ख्रि. पू. सातवें शतक ), व पाणिनीची अत्यंत नीटनेटकी व संक्षिप्त स्वरूपाची अष्टाध्यायी ही व्याकरणशास्त्राची पूर्णावस्था दर्शविते. ऐंद्र संप्रदाय हा पाणिनीच्या मागाहूनचा होय. कात्यायनाची अष्टाध्यायीवरील टीका ( ख्रि. पू. ५०० ) व पतंजलीचें महाभाष्य हीं महत्त्वाचीं आहेत. मध्यंतरींच्या कालांत प्राकृत भाषांची वाढ चाललेली दिसते. पुनः दोनतीन शतकांनंतर चंद्रगोमिन्‌पासून संस्कृतपरंपरा सुरू होते. चंद्रगोमिन् याचें व्याकरण, जयादित्य व वामन यांची काशिका, भर्तृहरीचा वाक्यपदीय ग्रंथ व कैयटाचा प्रदीप मिळून पाणिनी संप्रदायाच्या दुसऱ्या कालखंडाची अखेर होते. भट्टोजी दीक्षिताची सिद्धांतकौमुदी व तिचे सारग्रंथ, धातुपाठ, गणपाठ, लिंगानुसार उणादिपाठ, परिभाषेवरील ग्रंथ हे सर्व व्याकरणाच्या अभ्यासांत येतात. चांद्र संप्रदायांतील उपग्रंथांचा अफाट विस्तार असला तरी त्याच्या ऱ्हासाचें कारण या संप्रदायाचें बौद्ध सांप्रदायिक स्वरूप हें होय. चांद्रसंप्रदायाचा विशेष प्रसार तिबेट व सिंहलद्वीप यांमध्यें झाला. जैनेंद्र व्याकरणाचा कर्ता देवनंदी हा असून तो शके ६५१ च्या सुमारास होऊन गेला. जैनेंद्र व्याकरण अत्यंत कमी दर्जाचें दिसतें. जैनेंद्र संप्रदायाचें वाङ्मय म्हणजे अभयनंदी व सोमदेव यांच्या दोन टीका होत. शाकटायन व हेमचंद्र हे यानंतर आले. शाकटायन जैन असून यास अभिनव शाकटायन म्हणतात. त्याचे शब्दानुशासन व अमोघवृत्ति हे दोन ग्रंथ आहेत. हेमचंद्राचें शब्दानुशासन ( ११ वें शतक ) प्रसिद्धच आहे. यापूर्वी स्वतंत्र व्याकरणाच्या शाखा निघाल्या. कातंत्र शाखा बंगाल, काश्मीर, वगैरे प्रांतांतून प्रसार पावली. तिचा प्रस्थापक शर्ववर्मा होय ( इ. स. १ लें शतक ). सारस्वत शाखेची सुरुवात इ. स. १२५० च्या सुमारास झाली असून हिचा संस्थापक नरेंद्राचार्य हा असावा. बोपदेवाचा संप्रदाय वरील संप्रदायांपेक्षां अर्वाचीन आहे. बोपदेवाचा 'मुग्धबोध' नांवाचा ग्रंथ आहे. त्यावर अनेक टीका झाल्या. सौपद्म शाखा पद्मनाथ दत्त यानें काढली. या सौपद्म व्याकरणावर टीका व उपग्रंथ आहेत. अर्वाचीन व्याकरणसंप्रदायांतील पुस्तकें लहान लहानच आहेत.

भाषाशास्त्र म्हणजे व्याकरण व निरुक्त या बाबतींत भारतीयांच्या विशेइतकी प्रगति प्राचीन जगांत दुसऱ्या कोठेंहि झाली नाहीं. भाषाशास्त्राचा युरोपांत अभ्यास ग्रीक व रोमन काळांत थोडाबहुत झाला होता, पण तौलनिक भाषाशास्त्राची उत्पत्ति अर्वाचीन आहे. युरोपांतील भाषाशास्त्रविषयक मतभेद स्वरूपविषयक व नाममूलक आहेत. व अलेक्झांड्रियनपासून अर्वाचीन कालापर्यंतचा विचार सुसंगत आहे. आपल्या मराठींतील भाषाशास्त्रविषयक प्रयत्न अगदीं अपुरे आहेत. भाषाशास्त्राच्या ऐतिहासिक अभ्यासाच्या दृष्टीनें राजवाडे यांचे ग्रंथ महत्त्वाचे आहेत. ( भाषाशास्त्र पाहा ).

मराठी भाषेचें अगदीं जुनें व्याकरण महानुभावी आहे. आनंदराज व्यास यांचें 'लक्षणरत्नाकर' व भीष्माचार्य यांचें 'पंचवार्तिक' हे ग्रंथ प्रसिद्ध झाले असून अभ्यसनीय आहेत. नंतर इंग्रजी अमदानीपर्यंत व्याकरणावर महत्त्वाचा विचार कोणीं केलेला आढळत नाहीं. अर्वाचीन व्याकरणकार व्याकरणाचे तीन भाग करतात : १. वर्णविचार, २. शब्दविचार, व ३. वाक्यरचना. इंग्रजी भाषेच्या व्याकरणांत वर्णविचार–ऑर्थोग्रफी, शब्दविचार–एटिमॉलोजी, वाक्यविचार–सिन्टॅक्स, आणि पद्यविचार–प्रॉसोडी असे चार भाग केले जातात. आणि त्यांपैकीं शब्दविचारांत व्युत्पत्ति व पदविचार–ॲक्सिडेन्स ह्या दोन्ही प्रकरणांचा समावेश केला जातो. संस्कृत भाषेच्या व्याकरणांत ह्या व्याकरणापैकीं व्युत्पत्तिप्रकरणाचा समावेश निरुक्तांत आणि पद्यविचारांचा समावेश पिंगलांत म्हणजे छंदःशास्त्रांत होतो. इंग्रजी अमदानी सुरू झाल्यापासून या विषयावर आजपर्यंत पुढील पुस्तकें प्रसिद्ध करण्यांत आलीं—

( १ ) गंगाधरशास्त्री फडके यांचें लहानसें व्याकरण ( १८३६ ). ( २ ) बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर यांचें 'प्रश्नोत्तररूपी बालव्याकरण'. ( ३ ) दादोबा पांडुरंग यांचें मोठें व्याकरण—'महाराष्ट्र भाषेचें व्याकरण'. दादोबांची पद्धत घेऊन गंगाधर रामचंद्र टिळक यांनीं एक लघु व्याकरण लिहिलें. तें बरींच वर्षे शाळांत चालू होतें.

सरकारनें दादोबांकडून 'मराठी लघु व्याकरण' सन १८६५ त तयार करविलें, तें बरींच वर्षे शाळांतून चालू होतें. याच सुमारास कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं दादोबांच्या व्याकरणावर टीका करून ती 'शालापत्रकां'त निबंधरूपानें प्रसिद्ध केली. कृष्णशास्त्री गोडबोले यांनीं एक 'नवीन मराठी व्याकरण' तयार केलें. चिपळूणकरकृत निबंध आणि गोडबोलेकृत नवीन व्याकरण यांच्या योगानें व्याकरणरचनेस नवीन वळण लागलें यांत शंका नाहीं.

इ. स. १८७८ मध्यें 'लेखनशुद्धि' हें लहानसें पुस्तक रामचंद्र भिकाजी गुंजीकर यांनीं लिहिलें आहे. याशिवाय गुंजीकरांनीं निरनिराळ्या व्याकरणग्रंथांवर परीक्षणरूपानें 'विविधज्ञानविस्तार' या मासिक पुस्तकांत मार्मिक निबंध लिहिले आहेत. 'वाक्यमीमांसा आणि वाक्याचें पृथक्करण' हा ग्रंथ कै. गोपाळ गणेश आगरकर यांनीं लिहिला ( १८८२ ). नंतर 'प्रौढबोध व्याकरण' हें रामचंद्र भिकाजी जोशी यांनीं रचलें. त्यांत वर्णविचार, शब्दविचार व वाक्यविचार दिला असून वाक्यपरिच्छेद ह्या प्रकरणांत

पृथक्करण ( ॲनॅलिसिस ) हें प्रकरण विशद करून सांगितलें आहे. कारकविचार, विरामचिन्हें, वगैरे उपयुक्त विषयांचाहि परामर्श घेतला आहे.

'बालबोध मराठी व्याकरण' व 'शिशु मराठी व्याकरण' त्यांनींच केलें. 'मराठी भाषेची लेखनपद्धति' हें पुस्तक काशीनाथ नारायण साने, रामचंद्र परशुराम गोडबोले आणि शंकर रामचंद्र हातवळणे या तिघांनीं मिळून रचलें. हें महत्त्वाचें आहे.

इ. स. १९१२ मध्यें 'शास्त्रीय मराठी व्याकरण' मोरो केशव दामले यांनीं लिहून या शास्त्रांत चांगली भर घातली. हा ग्रंथ सुमारें १००० पृष्ठांचा आहे. वर्णविचार, शब्दविचार व वाक्यविचार असे व्याकरणशास्त्राचे तीन भाग करून प्रत्येक भागाचें विवेचन उत्कृष्ट रीतीनें केलें आहे. हा ग्रंथ विचारात्मक असल्यामुळें फार महत्त्वाचा व उपयोगी आहे.

यानंतर मराठी व्याकरणावर चांगला मोठा ग्रंथ झाला नाहीं, असें खेदानें म्हणावें लागतें. आज शाळा-कॉलेजांतून या विषयाकडे फार दुर्लक्ष झालें आहे. त्यामुळें चांगल्या सुशिक्षितांनाहि शुद्ध लिहितां-बोलतां येत नाहीं. इंग्रजीच्या भ्रासंगानें मराठी भाषा अशुद्ध व अपभ्रष्ट बनून गेली आहे. तेव्हां नवीन व्याकरण रचण्याची वेळ आली आहे, यांत शंका नाहीं. महाराष्ट्र साहित्य परिषदेनें एक समिति नेमून कांहीं निर्णय प्रसिद्ध केले आहेत. १९३६ सालीं पुण्यास एक व्याकरण परिषद् भरली होती.

**व्याज**—उसने दिलेल्या पैशाचें भाडें असें व्याजाला म्हणतां येईल. ऋणकोची गरज आणि पैशाच्या तारणाची स्थिति यांवर व्याजाचा दर अवलंबून असतो. पूर्वी व्याजाचा दर फार असे. पेशवाईत तर एकोत्र्यानें रकम सररहा देण्या-घेण्याची वहिवाट असे. व्याजबट्ट्याचा व्यवहार करून उपजीविका करणें पूर्वी कमी दर्जाचें समजलें जाई. पण आतां औद्योगिक चढाईच्या काळांत व्याज देणें-घेणें हा व्यापाराचा, नफ्याचा भाग समजला जातो. 'डिव्हिडंड' हे व्याज नव्हे, तथापि व्याजाच्या हिशेबानें मागींत भांडवल गुंतविण्यांत येतें. मोठें भांडवल जमविणें व शिलकी पैसा उत्पादक करणें यांसाठीं व्याज द्यावें-घ्यावें लागतें. हा सरळ व्यवहार आहे. व्याजावर व्याज तें चक्रवाढ व्याज होय.

**व्याध नक्षत्र**—( सिरिअस ). याला श्वा किंवा लुब्धक असेंहि म्हणतात. हा बृहल्लुब्धक ( कॅनिस मेजर ) तारापुंजांत असून याचा प्रकाश आपणांकडे पोंचण्यास सु. ८½ वर्षें लागतात. हा सूर्याहून तीस पट अधिक प्रकाश देत असला पाहिजे. पण हा फार लांब असल्याकारणानें आकाशांत अत्यंत तेजस्वी तारा म्हणून फक्त ओळखला जातो.

**व्याधिहरण रस**—एक आयुर्वेदीय औषध. यांत पारागंधककज्जली व रसकापूर हीं मुख्य औषधें आहेत. हें उपदंशावरील एक मुख्य औषध आहे. नवीन रोगावर याचा चांगला उपयोग होतो. हे औषध अतिशय तीक्ष्ण आहे. त्यामुळें त्वचेवर येणारे फोड, तोंड येणें, सांधे दुखणें, डोळे येणें, वृषण सुजणें, इत्यादि लक्षणांवर या औषधाचा अतिशय उत्तम उपयोग होतो. १⁄४ ते १ गुंज, तूपसाखर, मध, दूधसाखर किंवा महामंजिष्ठादि काढा यांतून दिवसांतून २ वेळां घेतात.

**व्यापार**—परदेशांशीं होणाऱ्या मालाच्या देवघेवीला हा शब्द लावण्यांत येतो. आपल्या देशांत जो माल जास्त होतो तो, ज्याची वाण आहे त्या मालाच्या बदला घेऊन देणें हा मुख्यतः व्यापाराचा हेतु असतो. आज आंतरराष्ट्रीय व्यापार दोन मुख्य हेतू धरून चाललेला आहे : जो माल ज्या देशांना अतिशय सुलभ रीतीनें व स्वस्त असा काढतां येतो, त्या देशांना त्या मालाच्या बाबतींत वैशिष्ट्य प्राप्त करून घेतां येण्यास मदत करणें व अशा रीतीनें जगाची आणि व्यक्तिशः राष्ट्रांची उत्पादनशक्ति आणि संपत्ति वाढविण्यास साहाय्य करणें हा एक हेतु; व दुसरा म्हणजे एखाद्या देशाची सर्व नैसर्गिक साधनें सुरक्षित ठेवून त्यांची वाढ करणें; यापासून राष्ट्रीय स्वास्थ्याचीच शेवटीं वाढ होत असते.

व्यापाराचें महत्त्व, व्याप्ति व प्रकार या गोष्टी एखाद्या शहराचें भौगोलिक स्थान व तेथें असलेल्या वाहतुकीच्या सोयी यांवर अवलंबून असतात. यामुळें ज्या नद्यांतून नावा, गलबतें, वगैरे चालू शकतात, जेथून रेल्वेचे व रस्त्यांचे अनेक फांटे निघालेले असतात व जें ठिकाण बंदर म्हणून सोयीचें असतें त्या ठिकाणास व्यापारी महत्त्व साहजिकच येतें. व्यापारवृद्धीच्या बाबतींत देशांतील राजकारण, सार्वराष्ट्रीय संबंध, वाहतुकीची सुरक्षितता व दळणवळणाचे मार्ग या गोष्टींस फार महत्त्व असतें. तसेंच मालाची जलद उठावणी करण्याच्या सोयी, मालाचा प्रसार त्वरित करण्याचीं साधनें, आणि हुंडणावळीच्या सोयी व त्यांतील त्वरित व्यवहार याहि गोष्टी लक्षांत घ्याव्या लागतात. समुद्रावरील सत्ता आणि व्यापारवृद्धि यांचा अगदीं निकटचा संबंध आहे. कार्थेज, पोर्तुगॉल, स्पेन व हॉलंड या देशांचा व्यापार त्यांच्या समुद्रावरील सत्तेबरोबरच लय पावल्याचें आपणांस इतिहासावरून दिसून येतें. समुद्रावरून होणाऱ्या व्यापाराचें महत्त्व फार वाढलें आहे; त्या मानानें रेल्वे रस्त्यांच्या वाढीमुळें कालवे व नद्या यांच्या मार्गानें होणाऱ्या व्यापारामध्यें घट झालेली आहे. अलीकडे केवळ मालवाहू प्रचंड बोटींच्या साहाय्यानें पुष्कळच माल इकडून तिकडे नेतां-आणतां येतो व आतां अधून मधून जाणाऱ्या प्रवासी किंवा फिरत्या गलबतांवर अवलंबून राहावें लागत नाहीं. जगांतील फार मोठ्या प्रमाणावर मालवाहतुकीचा धंदा आतांपर्यंत ब्रिटन करीत असे. निरनिराळ्या देशांत व्यापार-व्यवहार होण्याच्या बाबतींत हुंडीच्या व्यवहाराची वाढ हें एक मोठें व्यापार-वाढीस अनुकूल असें एकोणिसाव्या

शतकांत घडून आलेलें वैशिष्ट्य आहे. गेल्या महायुद्धामध्यें ह्या हुंडीव्यवहारास व व्यापारास मोठाच धोका उत्पन्न झाला होता.

याप्रमाणें व्यापाराचे मुख्य उद्देश म्हणजे (१) ज्या देशांत जी वस्तु अथवा माल उत्कृष्ट होत असेल तोच माल त्या देशांत बनवून जगाच्या उत्पादनशक्तींत व संपत्तीमध्यें भर घालणें; व (२) देशांतील नैसर्गिक शक्तींचा अधिकांत अधिक उपयोग करणें व त्यांचा व्यर्थ व्यय होऊं न देणें, हे होत. यांतच देशाची समृद्धि, अभिवृद्धि, उत्कर्ष, स्थैर्य आणि स्वास्थ्य हीं सांठविलेलीं असतात.

चेंबर ऑफ कॉमर्स—मोठाल्या व्यापारी शहरांतून व्यापारी हित पाहण्यासाठीं व्यापारी मंडळींनीं अशा संस्था स्थापन केलेल्या असतात. इंग्लंडांत प्रथम ग्लासगो येथें १७८३ सालीं असें मंडळ स्थापण्यांत आलें. आज सर्व राष्ट्रांतून मोठमोठ्या शहरीं व्यापारी संघ आहेत. हिंदुस्थानांत युरोपियन, मुसलमान, मराठा, मारवाडी, वगैरे जातवार व्यापारमंडळेंहि आहेत. तसेंच निरनिराळीं मंडळें एकत्र आणण्यासाठीं कांहीं मध्यवर्ती मंडळें निघालीं आहेत.

हिंदुस्थानचा प्राचीन व्यापार—हा खुष्कीचा व दर्यावर्दीहि होता. इंडियन अँटिक्वेरी पु. ८ मधील एका लेखांत प्राचीन काळीं हिंदुस्थानांतून निर्गत होणाऱ्या व बाहेरून येथें येणाऱ्या मालाची यादी खालीलप्रमाणें दिली आहे :

निर्गत माल—(१) गुलाम बायका, (२) तूप, (३) चिनी कातडीं (केंस असलेलीं), (४) हस्तिदंत, (५) शिंगें, (६) लाख, (७) रेशमी दोरा, (८) गुग्गुळ, (९) तेंदू (एबोनी), (१०) तिळाचें तेल, (११) नीळ, (१२) डिकेमाली, (१३) कापूस, (१४) सावर, (१५) दालचिनी, (१६) जटामांसी अथवा नलद, (१७) कुष्ठ अथवा पुष्करमूळ, (१८) रूज्ञट, (१९) कुटज अथवा करचाला, (२०) मलमल, (२१) तांदूळ, (२२) मिरीं, (२३) चंदन, (२४) लोखंड, पोलादी तरवारी, (२५) माणिक, (२६) हिरे, (२७) गोमेद, (२८) चिनीमातीसारख्या मातीचीं भांडीं, (२९) नीलमणि, (३०) हिंगसिंथ, (३१) खांद्यावरून घालण्याचे पट्टे व कमरपट्टे.

आयात माल—(१) सुरेख मुली (बरगुझा म्हणजे भडोच येथें आणीत), (२) गुलाम (बरगुझा म्हणजे भडोच येथें आणीत), (३) चिनी कापूस, (४) प्रवाळ, (५) मोती, (६) शुक्ति (शिंपले), (७) कांसवाची पाठ, (८) श्रीवास, (९) विड्याचीं पानें, (१०) मध (मेलिलट), (११) बोळ, (१२) नारळ, (१३) मलमल, (१४) दारू, (१५) कचीं द्राक्षें, (१६) चंद्रस धूप, (१७) शिलारस, (१८) खारका, (१९) चांदीचीं भांडीं, (२०) सोमल, (२१) रोमन नाणें दिनारी (किं. ८½ पेन्स; याची भडोच येथील नाण्यांशीं अदलाबदल होत असे), (२२) कथील, (२३) शिसें, (२४) पितळ—याचा नाण्याकडेहि उपयोग होत असे. (२५) सुरमा, (२६) तांबें व तांब्याचीं भांडीं, (२७) सोनें, (२८) कल्याण नांवाचा लाख, (२९) संगमरवरी दगड, (३०) चिनीमातीसारखी माती, (३१) कांच, (३२) पुष्पराग, (३३) निरनिराळ्या तऱ्हेचे पुरुषांचे व बायकांचे कपडे, (३४) फुलें काढलेले अगर कांठाचे कमरपट्टे, (३५) फुलें काढलेले कपडे, (३६) मूर्ती, इत्यादि कारागिरीचे पदार्थ, (३७) वाद्यें.

हिंदुस्थानच्या परकीय देशांशीं होणाऱ्या व्यापाराविषयीं अनेक परकीय प्रवाशांनीं वर्णनें लिहून ठेवलीं आहेत. पुढें दिलेल्या माहितीवरून हिंदुस्थानांतून युरोप वगैरे मधील पश्चिम देशांत कोणकोणते जिन्नस जात आणि कोणतीं व्यापाराचीं ठिकाणें होतीं याची थोडीशी कल्पना येईल.

(१) हिंदुस्थानच्या पूर्वेकडील थिना (सिनाई) येथून रेशीम कच्चें आणि पक्कें, तसेंच रेशमी कापड हे जिन्नस बॅक्ट्रियामधून बरुगझ बंदराकडे खुष्कीच्या मार्गानें अथवा गंगामार्गानें लिमुरिके म्हणजे तामीळ देशांत आणिले जात असत. (२) कमर (कावेरीपट्टम्), पोदौके (पांदिचेरी किंवा पुलिकत) यांचा व्यापार लिमुरिकेशीं व तसाच गंगा आणि क्रूसे या प्रदेशांशीं होता. येथें ईजिप्तमधील मालाची आयात होऊन लिमुरिके म्हणजे तामिळ प्रदेशांतल्या मालाची निर्गत होत असे. (३) ईजिप्तपासून थेट तामिळ प्रांतांतील मौझिरीस (मुचिरी) पर्यंत जलमार्गानें, (४) पैठण, तगर (तुळजर) या मार्गानें दक्षिणेकडील प्रांतांचा, व उज्जयिनीच्या मार्गानें उत्तरेकडील प्रांतांचा व्यापार पश्चिम हिंदुस्थानांतील मुख्य बंदर बरुगझ (भडोच) यांच्याशीं चालत असे. (५) परदेशांतील जहाजें, अरबस्तानांतील मौझा, टिओटोरस (पेरिम), युडाइमान (एडन), कने, टिऑस कोरिडिस (सोकोत्रा; संस्कृत द्वीपसुखाधार), ओमानच्या आखातांतील मोसव (सध्यांचें ऑमेरा), इराणी आखातांतील बसरा व युफ्रेटीस नदी यांच्यामधील आपोलोगास, सिंधु नदीच्या प्रांतांतील बरबेरिका व मिनागर, इरिनान म्हणजे कच्छचें रण, त्यानंतर बरुगझ (भडोच) येथें येत. पश्चिम हिंदुस्थानांतील सर्वांत महत्त्वाचें हें बंदर होय. येथून पुढें कोंकणपट्टींतील लहान बंदरें सोडून तामिळ प्रांतांतील मुख्य बंदर नेल्कुंद (बहुधा त्रावणकोरमधील कनेटी आणि कोलम यांच्यामध्यें असलेलें) येथें जात.

हिंदुस्थानांतील प्राचीन व्यापाराचीं ठिकाणें—पूर्वेकडील प्रदेश :—(१) थिना शहर :—कच्चें आणि पक्कें रेशमी कापड; (२) गंगा नदी :—विड्याचीं पानें, जटामांसी, मोतीं, उत्तमोत्तम मलमल; (३) क्रूसे (मलाया) :—शिंपा, सर्वोत्कृष्ट कांसवाच्या पाठी; (४) मसालिया (संस्कृत मौसल) :—मलमल; (५)

पलैसिमौदन (संस्कृत ताम्रपर्णी–सिलोन बेट) :–मोतीं, पारदर्शक मौल्यवान् खडे, मलमल, कांसवाच्या पाठी, वगैरे.

दक्षिणेकडील प्रदेश :—(६) कमर (कावेरीपट्टम) (७) पोदौके पुलिक्त (पांदिचरी), (८) सूपत्न (संस्कृत सूपत्न). या तीन ठिकाणचे व्यापारी पडावांतून किनाऱ्या-किनाऱ्यानें म्रिमुरिके (तामिळ) पर्यंत जात व तसेंच गंगा व खूसेपर्यंत जात. (९) नेलकुंद (हें त्रावणकोरमधील कनेट्टी व कोलम् यांच्यामध्यें असावें) याचा संबंध बकरे (सध्यांचें मरकरी) या नदीमुखाजवळील खेडेगांवाशीं होता. हें दक्षिणेकडील मुख्य बंदर असून यांत व्यापाराचे जिन्नस बहुतेक सर्व होते; (१०) मौझिरिस (मुयिरी) येथें अरिकके व इजिनकडील जहाजें येत येत; (११) नौरा (होनावर असून तामिळ प्रांतांत); (१२) तुंदिस (तुंडी, तामिळ प्रांतांत).

पश्चिमेकडील प्रदेश :—लहान बंदरें (स्थानिक व्यापाराच्या जागा)–(१३) अकबरान: (१४) सौप्पर (वसईजवळ सूपारा); (१५) कलिएन (कल्याण); (१६) सेमुल्ल (चौल); (१७) मंदगोर (राजापूर); (१८) पलैपत्यै (बाणकोट); (१९) मेलिझिगर (जयगड), (२०) बुझटियन (विजयदुर्ग अथवा यशवंतगड); (२१) तोपरन (देवगड); (२२) तुरनस बोअस (बंदा अथवा तिरकल नदी अथवा अचरे); (२३) अगिडिआई (गोआ); (२४) कैनिताई (सेंट जॉर्ज बेट); या सर्व किनाऱ्यावर चांचेगिरी होती. (२५) सर्वांत महत्त्वाचें व्यापारी बंदर बरुगझ (भडोच); (२६) ओझिनी (उज्जैन) शहर; याचा व्यापार बरुगझशीं चालत होता. (२७) पैठण; (२८) तगर (जुन्नर); पैठण व तगर यांचाहि बरुगझशीं व्यापार चालू होता. (२९) मिनागर–सुराष्ट्राची राजधानी (इंदुराजवळ) याचा व्यापार बरुगझशीं चालत होता; (३०) सिंध प्रांतांतील बरबरिके हेंहि एक मोठें बंदर होतें. (३१) सिंधु प्रांतांतील मिनागर (ठठ्ठा, बक्कर अथवा मनसुर).

महाराष्ट्रांतील व्यापारी मार्ग–महाराष्ट्रांत पूर्वी दळणवळणाचे मार्ग पुढीलप्रमाणें होते : कोंकणांतील चौल, कल्याण, सोपारे, ठाणें व दक्षिणेंतील जुन्नर, नाशिक, पैठण यांचा प्राचीन इतिहास पाहिला असतां पुणें जिल्ह्यांतून बरेच व्यापारी मार्ग होते, असें दिसतें. ख्रिस्ती शकापूर्वीच्या पहिल्या शतकांत जुन्नरहून समुद्रकिनाऱ्यावर जाण्याकरितां माळसेज घाटांतून एक व नाणेघाटांतून एक असे दोन मुख्य रस्ते होते. या दोन्ही रस्त्यांवर त्या काळचे शिलालेख, पायऱ्या, हौद, इत्यादि गोष्टी अद्यापि अस्तित्वांत आहेत. त्याच-प्रमाणें वेडसें, भाजें व कार्लें येथील बौद्धांच्या वेळचीं लेणीं व इतर स्थानें यांचा काळ लक्षांत घेतां ख्रिस्ती शकापूर्वी १०० पासून इ. स. ६०० पर्यंत बोरघाट हा देखील एक व्यापारी मार्ग होता असें दिसतें. शिवनेरीवर असलेल्या एका हौदावरून देव-गिरीच्या यादवांच्या वेळेस जुन्नर हें एक व्यापाराचें ठिकाण होतें असें दिसतें. पुढें पेशव्यांची राजधानी पुणें शहर झाल्यावर पेश-व्यांनीं नाणे, माळसेज, भीमाशंकर, आणि कसूर हे घाट बरेच सोयीचे केले होते असें दिसतें.

मुसलमान लोक हे व्यापाराच्या निमित्तानें परदेशीं फार प्रवास करीत. त्यांच्या राजवटींत परराष्ट्रीय व्यापाऱ्यांना फार सवलती दिल्या गेल्यामुळेंच युरोपियन व्यापाऱ्यांचे पाय हिंदुस्थानांत चांगलेच रोंवले गेले. तो इतिहास सुविदितच आहे.

पेशवाईत अरबस्तानचे व्यापारी कोंकणांत स्थायिक होण्यास सरकारचें उत्तेजन असे. तिकडील घोडे इकडे येत त्यांवर जकात माफ असे. असाच व्यापारी सवलती युरोपियन व्यापाऱ्यांस देण्यांत आल्या होत्या. मोठाल्या शहरांतून बाहेरचे व्यापारी येऊन स्थायिक व्हावेत म्हणून शहराबाहेर जमिनी व वतनें देण्यांत येत, व त्यांवर ते व्यापारी इमले व दुकानें बांधीत. तथापि मुसलमान राजांना किंवा मराठ्यांच्या राज्याधिकाऱ्यांना व्यापारी दूरदृष्टि नव्हती असें म्हणावें लागतें.

"राज्य घेण्यापूर्वी इंग्रजांनीं मराठ्यांचा बाजार जिंकला. हाताचा व्यापार जात चालला त्याची मराठी राज्यांत एकानेंहि फिकीर केली नाहीं. व्यापार हस्तगत केल्यानें इंग्रजांनीं पैसा तर मिळ-विलाच, पण शिवाय मराठ्यांमध्यें देशाभिमान नाहीं व दूरदृष्टिहि नाहीं हें त्यांस कळून चुकलें. ह्या अनुभवाचा त्यांनीं पुरेपूर उपयोग करून घेतला. इ. स. १७४५ पासून आमच्या बाजारांत सर्वत्र इंग्रजी माल खेळूं लागला. कापड, कागद, लोखंडी सामान (सुऱ्या, कुलपें, मेखा वगैरे), कांचेचें सामान (आरसे, फाणस, तावदान, वगैरे), तसेंच घड्याळें, चहादाण्या, इत्यादि पदार्थांनीं बाजार फुलून गेले. ज्योतिषी पंचांगें इंग्रजी कागदावर लिहूं लागले. इनामपत्रें लिहिण्यास विलायती कागदांवांचून अडूं लागलें. घरांतील मोडलेली विळी दुरुस्त करण्यास 'इंग्रज' (पोलाद) येऊन बसला. इंग्रजी पोलादाशिवाय तोफांचे कानें भरणें अशक्य झालें. बायकापुरुष परदेशी छिटी कापडानें आपलीं शरीरें विभूषित करूं लागलीं. त्याबरोबर मांजरपाट, जगन्नाथी हे शब्दहि आमच्या तोंडांत ठाणें मांडून बसले. सोप (साबण) बाजारांत आलाच, पण भारतेंहि घुसला. त्या प्रकारें इंग्रजांनीं आमचा बाजार काबीज केला." असें मार्मिक विवेचन 'पेशवाईच्या सावलींत' या पुस्तकांत केलेलें आढळेल.

ब्रिटिश अमदानींत आयात–निर्यात व्यापारांत ब्रिटिशांचाच सर्वस्वीं हात असून निर्यात मालापेक्षां आयात माल अतिशयच जास्त येई. शेतकीचा व कच्चा माल काय तो बाहेर जात असे. सर्वच यांत्रिक सामान बाहेरून येई. कापडाच्या गिरण्यांखेरीज येथें मोठे

कारखानेच नसंत. पण गेल्या दोन महायुद्धांमुळें हिंदुस्थानची व्यापारी परिस्थिति सुधारत चालली. नवे नवे उद्योगधंदे सुरू झाले. येथील जिनसांना बाहेर फार मागणी येऊं लागली व त्यामुळें भारताचें परदेशचें कर्ज फिटून उलट मोठी शिल्लक ब्रिटिश सरकारजवळ राहिली. तथापि या युद्धांमुळेंच हिंदुस्थानसारख्या कृषिप्रधान देशाला आज अन्नधान्य बाहेरून आणण्याची पाळी आली आहे. अन्नोत्पादनाची मोहीम सुरू असल्यामुळें तेलासारख्या धनोत्पादक पिकांची लागवड कमी होत आहे. बाहेरून आणल्या जाणाऱ्या अन्नधान्यासाठीं खर्च भरमसाट होत आहे व शिल्लक घटत चालली आहे. पूर्वी ग्रेट ब्रिटनशींच व्यापारी संबंध होते, ते आतां कानडा, अमेरिका, ऑस्ट्रेलिया, आदि नवीन नवीन परराष्ट्रांशीं सुरू झाले आहेत. परदेशी व्यापाराच्या दृष्टीनें भारताचें जगांत पांचवें स्थान आहे.

भारतीय व्यापाराची ऑगस्ट १९५० मधील स्थिति पुढील-प्रमाणें होती. समुद्र व विमान या मार्गांनीं झालेला व्यापार—

(१) निर्यात माल ४१,११,००,००० रुपये.
(२) पुनर्निर्यात ,, १,६५,००,००० ,,
(३) आयात माल ५१,९०,००,००० ,,
एकूण व्यापार ९४,६६,००,००० ,,

यामध्यें जडजवाहीर, सोनें, चांदी, नाणीं, इ. ची आयात-निर्यात विशेष नाहीं. चलनी नोटा १५ लाख रुपयांच्या निर्यात व १ कोटी ६१ लाख रुपयांच्या आयात झाल्या.

**व्यापारचिन्ह**—(ट्रेड मार्क). ज्या चिन्हाच्या योगानें एका व्यापाऱ्याचा माल व तसल्याच तऱ्हेचा दुसऱ्या व्यापाऱ्याचा माल यांतील फरक ध्यानांत येतो, अथवा अमुक माल अमुक कारखान्यांत तयार झाला आहे हें सांगतां येतें, त्या चिन्हास 'ट्रेड मार्क' म्हणतात. ट्रेड मार्कमध्यें चित्र, छाप, शीर्षक, लेबल, तिकिट, नांव, सही, शब्द, अक्षर, आंकडा ह्यांपैकीं कोणतेंहि एक अथवा ह्यांपैकीं कांहींचें एकीकरण यांचा समावेश होतो.

ज्या ट्रेड मार्कच्या योगानें लोकांची फसवणूक होईल, लोकांच्या मनांत गोंधळ उडेल किंवा ज्याला कोणत्याहि कोर्टांत संरक्षण मिळण्याची शक्यता नसेल, असा ट्रेड मार्क नोंदविण्यांत येत नाहीं; तसेंच लोकांच्या धार्मिक भावना दुखविल्या जातील, अशा तऱ्हेचा ट्रेड मार्क नोंदवितां येत नाहीं.

जेणेंकरून नीतीचा बाध येईल अथवा कोणताहि चालू कायद्याचा भंग होईल, असा ट्रेड मार्कहि नोंदविला जात नाहीं. तसेंच दुसऱ्या व्यापाराच्या ट्रेड मार्कसारखा असलेला ट्रेड मार्क साधारण-पणें नोंदीत नाहींत. मूलभूत रासायनिक द्रव्याच्या नांवाचा औषधें वगैरेसारख्या पदार्थांसाठीं ट्रेड मार्क म्हणून उपयोग करतां येत नाहीं; राजचिन्हाचा, तसेंच कोणत्याहि राष्ट्राच्या चिन्हांचा उपयोग परवानगीवांचून करतां येत नाहीं. मुकुट, राजदंड, राष्ट्र-ध्वज व अशोकचिन्ह यांचा उपयोग खास परवानगीशिवाय करतां येणार नाहीं.

हिंदुस्थानांत १९४० चा ट्रेड मार्क्स ॲक्ट व १९४२ चा ट्रेड मार्क्स रूल यांप्रमाणें ट्रेड मार्क नोंदविण्यांत येतात. या कामासाठीं मुंबई येथें ट्रेड मार्क्स रजिस्ट्री व कलकत्ता येथें ब्रँच रजिस्ट्री उघडण्यांत आल्या आहेत.

ट्रेड मार्कच्या अर्जाचा तक्ता भरून संपूर्ण माहिती दिल्यास व कायद्याच्या चौकटींत बरोबर बसत असल्यास तो ट्रेड मार्क 'ट्रेड मार्क जर्नल' मध्यें प्रसिद्ध करण्यांत येतो. प्रसिद्धीनंतर विरोध करणाऱ्यांना चार महिन्यांचा अवधि देण्यांत येतो. त्या-नंतर प्रत्यक्ष नोंदणीचा तक्ता अर्जदाराकडे पाठविण्यांत येतो. तो भरून पाठविल्यावर लवकरच ट्रेड मार्क नोंदला गेल्याचा दाखला देण्यांत येतो. [व्यापार-उद्योग, ऑगस्ट १९४८.]

आपल्या ट्रेड मार्कचा दुसऱ्यानें उपयोग केल्यास, आपला ट्रेड मार्क नोंदविला असल्यास, आपल्या ट्रेड मार्कला कोर्टाकडून संरक्षण दिलें जातें व तो कोणालाहि विकण्याचा अधिकार येतो व वंशपरंपरेनेंहि वापरतां येतो. डिफेन्सिव्ह ट्रेड मार्क घेऊन आपल्या प्रसिद्धीचा उपयोग दुसऱ्यास विकत नसलेल्या मालाला होऊं न देण्याची पण सोय आहे.

ट्रेड मार्कमुळें मालाची विक्री वाढविण्यास व इतरांनीं स्पर्धा केली तर विक्री घटूं नये म्हणून वेगवेगळ्या तऱ्हेनें मालाची जाहिरात करावी लागते. ती करण्यास यामुळें फार सोयीचें होतें. १९४० सालीं ट्रेड मार्कचा कायदा झाला तेव्हां सुमारें १,५८,००० नोंदी झाल्या.

१९४८ सालीं नमुन्यांच्या नोंदणीसाठीं ४९४ अर्ज आले होते. बहुतेक अर्ज कापडाच्या नमुन्यांसंबंधीं होत व यांतील ९० टक्के भारतांतील कारखानदारांकडून करण्यांत आले होते.

**व्यापारी तह**—दोन देशांमध्यें व्यापारी संबंध सुधारावे व वाढावे या हेतूनें केलेल्या तहांना म्हणतात. यांपैकीं प्रत्येक देश असें कबूल करतो कीं, सदर एका देशांत उत्पन्न होणारा जो माल दुसऱ्या देशांत जावयाचा असेल त्या मालाच्या उत्पादनावर सदर दोन देशांत ठरेल तितकाच कर बसवावा. अशा प्रकारच्या तहांत मालाची वाहतूक कशी करावी, माल उतरवयाच्या बंदरांत कोणकोणत्या सवलती घ्याव्या, या आणि दोन देशांना सदर व्यापारी दृष्ट्या जरूर अशा इतर सर्व बाबींचा अंतर्भाव करण्यांत येतो. हे तह कांहीं ठराविक मुदतीचे करतात, आणि पुढें परिस्थिति बदलेल त्याप्रमाणें त्या मूळच्या तहांत फेरबदल करण्यांत येतो. असा व्यापारी तह इंग्लंडनें १२१७ सालीं नॉर्वे देशाबरोबर केला. नंतर फ्लँडर्सबरोबर १२७४ व १३१४ सालीं,

पोर्तुगॉलबरोबर १३०८, १३५२ व १३८६ सालीं, फ्रान्सबरोबर १४७१, १४९७ व १५१० सालीं तह केले. अलीकडच्या काळांत अतिशय प्रसिद्ध व्यापारी तह १८६० सालीं रिचर्ड कॉब्डेन आणि तिसऱ्या नेपोलियनचे मंत्री यांनीं सदर दोन राष्ट्रांमध्यें केला, आणि तो तह दोन्ही राष्ट्रांच्या फायद्याचा झाला. पहिल्या महायुद्धानंतर असले व्यापारी तह पुष्कळ होऊं लागले. शत्रुदेशांबरोबर पुन्हां व्यापार सुरू करतांना अगोदर असा तह करणें जरूरीचें असतें.

हिंदुस्थान—हिंदुस्थान १९४७ सालीं स्वतंत्र झाल्यावर त्याला अनेक देशांशीं व्यापारी दळणवळण ठेवण्यासाठीं बोलणीं करावीं लागलीं व लागत आहेत. शेजारचा पाकिस्तान देश व आपला भारत यांच्यामध्यें तर व्यापारी तहाची फार आवश्यकता होती. तेव्हां आयात-निर्यात मालासंबंधानें या दोन राष्ट्रांमध्यें सारख्या वाटाघाटी चालल्या आहेत. पूर्वीचा स्वयंपूर्ण हिंदुस्थान कसा तरी दुभंगल्यामुळें एकीकडे जें आहे तें दुसरीकडे मुळींच नाहीं अशी स्थिति झाली आहे. तेव्हां सामोपचारानेंच तहाची भाषा होत असल्यास योग्यच म्हणतां येईल.

**व्यापारी नांव**—व्यापारी नांव ही संज्ञा दोन अर्थांनीं वापरण्यांत येते: (१) एखाद्या वस्तूचें विशिष्ट नांव. हें नांव व्यापाऱ्यानें मुद्दाम योजून दिल्यावर त्या वस्तूचा चांगला खप होऊं लागला तर लोकांच्या तोंडीं, तो पदार्थ इतर कोणींहि बनविला तरी तेंच नांव राहतें. अन्य नांवानें ती वस्तु विकल्यास तितका खप होत नाहीं. तेव्हां साहजिक मूळव्यापारी या नांवाचा उपयोग दुसऱ्यास करूं देणार नाहींत. (२) ज्या नांवानें व्यापार चालतो तें नांव. एखादी व्यक्ति स्वतःच्या नांवानें किंवा आपल्या दुकानाला कांहीं नांव देऊन व्यापार करते; दोन अथवा अधिक भागीदार मिळून व्यापार करतांना सर्वांचीं नांवें येतील अशा रीतीनें अथवा ज्येष्ठ भागीदाराचें नांव व मंडळी अथवा कांहीं तरी आकर्षक नांव घेण्यांत येतें. कंपनीच्या नांवाच्या बाबतींत असा नियम आहे कीं, दुसऱ्या कंपनीला एका कंपनीच्या नांवासारखें नांव ठेवतां येत नाहीं. कंपनीचें नांव रजिस्ट्रार ऑफ कंपनीजकडे नोंदवावें लागतें. भागीदारांचीं नांवेंहि तेथेंच नोंदविलीं जातात.

इतर हक्कांच्या नोंदणीप्रमाणें दुकानच्या वस्तूच्या मालकी हक्कांची घोषणा स्थानिक सब्-रजिस्ट्रारकडे नोंदवितां येते व त्याचा पुरावा म्हणून उपयोग होतो. आपला व्यापारी माल कोणी नकलूं नये म्हणून त्याची रचना (डिझाइन) सरकारकडे पाठवून त्यावर मालकी प्रस्थापित करतात.

रचना—'डिझाइन' शब्दांत आकाराच्या अंगाचा, विशिष्ट मोडणीचा, नक्षीकामाचा अथवा मालाची शोभा वाढविणाऱ्या साधनांचा समावेश होतो. उदाहरणार्थ, एखाद्या चाकूचा चदकाच्या चोंचीसारखा आकार, पातळावरील खडीकाम, साड्यांचे कांठ, फोटो फ्रेमवरील नक्षीकाम. हा आकार, नक्षीकाम, वगैरे गोष्टींनीं मालाला आलेलें स्वरूप कायम आहे तोंपर्यंत ती रचना (डिझाइन) मूळ कल्पकाचीच आहे व ही रचना सरकारांत नोंदली गेली असल्यास दुसऱ्यालाहि अन्य मार्गांचा अवलंब करून तसा आकार किंवा नक्षीकाम त्या अथवा तसल्या पदार्थांपासून त्या अथवा तशा वस्तूंत निर्माण करतां येणार नाहीं.

[व्यापार-उद्योग, जानेवारी १९४९].

ही मालाची विशिष्ट रचना (डिझाइन) पेटंट ॲक्ट डिझाइनच्या कायद्याप्रमाणेंच कलकत्ता येथील कंट्रोलर ऑफ पेटंट ॲण्ट डिझाइन्सकडे नोंदवितां येतात. रचनावरील हक्क पांच वर्षे चालतो; तो आणखी पांच व क्वचित् दहा वर्षे वाढवितां येतो. तो एका विशिष्ट वर्गातील वस्तूसाठींच चालू शकतो. उदाहरणार्थ, फण्या धातूच्या अथवा लांकडाच्या व तत्सम पदार्थांच्या होऊं शकतात, म्हणून विशिष्ट आकाराच्या वा नक्षीकामाच्या फणीची डिझाइन दोन भिन्न वर्गासाठीं नोंदावयास पाहिजे.

**व्यापारी वारे**—हे नित्य वाहणारे वारे असतात. व्यापाऱ्यांना आपलीं जहाजें वाऱ्याच्या दिशेनें नेण्यास हे उपयोगी पडतात म्हणून 'व्यापारी वारे' म्हणतात. उत्तर गोलार्धांत हे विषुववृत्ताकडे ईशान्येकडून व दक्षिण गोलार्धांत आग्नेयेकडून वाहतात. हे ॲटलांटिक आणि पॅसिफिक महासागरांत आढळतात व पाऊस आणि हवा यांवर यांचा परिणाम झालेला दिसतो. या वाऱ्यांच्या उलट दिशेनें प्रतिव्यापारी वारे उत्तर गोलार्धांत नैर्ऋत्य व दक्षिण गोलार्धांत वायव्य दिशेकडून विषुववृत्तापासून ध्रुवाकडे वाहत असतात.

**व्यापारी संघ**—(गिल्ड). एखादा हस्तव्यवसाय, उद्योग किंवा व्यापार करण्यासाठीं स्थापन झालेलें मंडळ. असे संघ युरोपांत फार जुन्या काळापासून चालले होते. हे संघ इतके प्रबल झाले होते कीं, त्यांत शिरल्यावांचून कोणाहि व्यापाऱ्याला, इतकेंच नव्हे तर नागरिकालाहि गत्यंतर नसे. नगराचा कारभार या संघाकडे असे; पण १६ व्या शतकापासून व विशेषतः औद्योगिक क्रांति सुरू झाल्यापासून हे संघ नष्ट होत चालले. फक्त लंडनमध्यें आज सुमारें ७७ संघ 'लिव्हरी कंपनी' या स्वरूपांत दिसतील; पण त्यांचें मूळचें कार्य गेलें.

हिंदुस्थानांत विशिष्ट व्यवसाय करणाऱ्या जुन्या जातीच आहेत. पण त्या आतां मोडत चालल्या आहेत व वाटेल तो धंदा वाटेल त्यानें उचलावा असें झालें आहे.

**व्यापारी-संघसत्तावाद**—(गिल्ड सोशिआलिझम). पुनर्घटना करण्याबाबतची ही एक महत्त्वाची योजना आहे. समाजांतले मुख्य दोन वर्ग: एक उद्योगधंद्यांचे कारखानदार व दुसरा वर्ग

गिल्डदरांचा. मालाच्या उत्पादनाचीं साधनें, त्या मालाच्या व्यापाराचीं साधनें आणि मालाच्या विनिमयाचीं साधनें या तिन्ही प्रकारच्या साधनांची मालकी एका विशिष्ट सामाजिक संघाकडे (कम्यूनल ओनरशिप) असावी व हा संघ अनेक व्यापारी संघांचा बनलेला एक संघ असावा असें या संघसत्तावाद्यांचें म्हणणें आहे. हा पंथ निघण्याचें कारण, सर्व उद्योगधंद्यांचीं साधनें सरकारी मालकीचीं करावीं, या समाजसत्तावादाला (स्टेट सोशॅलिझम) प्रतिकार करणें, आणि विस्कळीत असलेल्या व्यापारी संघाबद्दल असंतोष व्यक्त करणें, असें दुहेरी होतें. म्हणून या पंथानें असें सुचविलें कीं, समाजाची पुनर्घटना द्विसत्तात्मक असावी. हल्लींचें सरकार हें गिल्डदारांच्या प्रतिनिधींचें बनलेलें असावें; आणि त्यांच्या तोडीचें दुसरें सत्तेचें केंद्र व्यापारी संघांची कॉंग्रेस हें असावें, आणि उद्योगधंद्यांच्या हितसंबंधाच्या संरक्षणाची सर्व सत्ता ही कॉंग्रेसच्या हातीं असावी. या दोन सत्तांचे परस्पर संबंध कसे असावे, याचा उलगडा या पंथानें केलेला नसल्यामुळें ही या पंथाची योजना अपूर्ण आहे. सर्व प्रकारच्या उद्योगधंद्यांवर लोकशाही सरकारी नियंत्रण असावें, या प्रकारचा हा प्रयत्न आहे. अलीकडे इंग्लंडांत इमारती बांधण्याचा धंदा करणारांचे संघ स्थापन झाले असून त्यांच्या एकत्रित प्रयत्नानें सरकारी नियंत्रणाखालीं इमारती कमी खर्चांत पण मजबूत व सोईस्कर बांधल्या जात आहेत. हिंदुस्थानांतहि अशा ठेकेदार संस्था निघाल्या आहेत.

**व्यापारी स्पर्धा**—व्यापारधंद्यांत स्पर्धा चांगली असें प्रतिपादन करणारा एक अर्थशास्त्रज्ञवर्ग आहे. माल घेणारांना अशी स्पर्धा फायदेशीर असते. त्यांना चांगल्या-वाईट मालांत निवड करुन कमी किंमतीनें माल घेतां येतो. कारखानदारांमध्यें चढाओढ लागली म्हणजे ते मजुरीचे दर वाढवितात. अशा रीतीनें माल घेणारे व मजुरी करणारे या दोघांना स्पर्धेचा फायदा मिळतो. समाजवाद्यांच्या मतें खुली स्पर्धा उपयोगी नाहीं. तिच्यामुळें संपत्तीची सारखी विभागणी होत नाहीं. लहान व्यापारी बुडतात व शेवटीं माल घेणारांनाहि कारखानदार मागतील त्या भावानें माल घ्यावा लागतो. तेव्हां सरकारनें कायद्यानें अशी स्पर्धा चालू देऊं नये. आंतरराष्ट्रीय स्पर्धा बंद करण्यासाठीं व देशांतहि घातुक स्पर्धा होऊं नये म्हणून कायदे केलेले आहेत. तथापि युरोप आणि अमेरिका यांमध्यें ज्या आर्थिक चळवळी चालू आहेत त्यांच्या मुळाशीं ही खुली स्पर्धा आहे यांत शंका नाहीं.

**व्यायाम**—या शब्दाचे अवयव वि + आ + यम् असे असून त्यांचा एकंदर अर्थ 'शरीरास ताण देणें' असा होतो. शरीर निरोगी राहावें यासाठीं शरीराच्या स्नायूंचें विशिष्ट प्रकारें चलनवलन करणें अवश्य असतें. याकरितां कांहीं गोष्टी शरीर स्वतः होऊनच करीत असतें. उदाहरणार्थ, श्वासोच्छ्वासाची क्रिया सतत होत असते. परंतु त्याच श्वासोच्छ्वासास कांहीं पद्धति लावली (उदाहरणार्थ, प्राणायाम क्रियेप्रमाणें पूरक, कुंभक, रेचक या गोष्टी नियमित कालांतरानें केल्या) म्हणजे तोच व्यायाम होतो. त्याचप्रमाणें आपण कांहीं खेळ खेळतों ते करमणुकीकरितां खेळतों. पण तेच नियमितपणें, नियमित वेळीं खेळलों म्हणजे त्यांपासून आपणांस व्यायामाचें श्रेय मिळतें.

व्यायामाचे मुख्यतः तीन प्रकार असतात: १. साधनयुक्त, २. असाधन, व ३. करमणूक. यांपैकीं तिसरा प्रकार हा निरनिराळे खेळ खेळण्यामध्यें दिसून येतो. पहिला प्रकार म्हटला म्हणजे जोडी, मल्लखांब, वगैरे; व दुसऱ्या प्रकारांत जोर, बैठका, नमस्कार, कुस्ती, वगैरे प्रकार; हे आपणांस परिचित आहेत. यांपैकीं खेळांची माहिती स्वतंत्र दिली आहे. मल्लखांब करण्याचेहि अनेक प्रकार आहेत व त्यामुळें शरीराच्या निरनिराळ्या स्नायूंस व्यायाम मिळतो. असाधन व्यायामामध्यें कुस्ती हा एक महत्त्वाचा व्यायामप्रकार आपल्या देशांत प्रचलित आहे. या प्रकारामध्यें प्रतिस्पर्ध्याला जमिनीवर पाडून त्याची पाठ जमिनीस लावावयाची असते. याकरितां निरनिराळ्या प्रकारचे डाव करण्यांत येतात, त्यांस पेंच असें म्हणतात व अशा डावांतून निसटून जाण्याचेहि प्रकार असतात त्यांस तोड म्हणतात. या व्यायामप्रकाराची वाढ महाराष्ट्रांत विशेषतः पेशवाईच्या अमदानींत बरीच झाली होती. त्यानंतर बडोदें व कोल्हापूर या ठिकाणीं कुस्तीच्या व्यायामास बरेंच प्रोत्साहन मिळत होतें. पंजाबमध्येंहि कांहीं संस्थानांत कुस्तीस उत्तेजन मिळत असे.

पाश्चात्य देशांतहि व्यायाम करण्याचे निरनिराळे प्रकार फार प्राचीन काळापासून प्रचलित असत. ग्रीक लोकांमध्यें व्यायामशाळा असत. सार्वजनिक सामने होत असत. त्यांकरितां खेळाडू तयार करण्यांत येत असत. ग्रीक देवतांच्या उत्सवप्रसंगीं असे सामने भरविण्यांत येत असत. याकरितां सामन्यांचे व खेळांचे नियम, वगैरेहि तयार करण्यांत आले होते. प्राचीन ग्रीसमध्यें व्यायामशाळा अथवा जिम्नाशियम या फार महत्त्वाच्या संस्था होत्या. स्पार्टामध्यें तर व्यायामसंस्थांस फारच महत्त्व देण्यांत येत असे. रोममध्यें जरी शरीरबलसंवर्धनाकडे लक्ष असे तरी त्या देशांत व्यायामसंस्था स्थापन करण्यांत आल्या नव्हत्या व रोमन लोकांचें मत अशा संस्थांबद्दल अनुकूल नव्हतें. मध्ययुगांत या विषयाकडे फारसें कोणी लक्ष दिलेलें दिसत नाहीं.

सोळाव्या शतकानंतर आवणांस या विषयांत प्रगति होऊं लागल्याचें आढळतें. या वेळीं व्यायामाचें साधन म्हणजे डंबेल्स हें दृष्टीस पडतें. या व्यायामपद्धतीची परिणति यूजेन सँडो यानें

केली. यानंतर उडी मारण्याची काठी, घोडा, सिंगलबार, पॅरॅलल बार, ट्रॅपीझ, रिंग, वगैरे व्यायामाचीं साधनें प्रचारांत आलीं.

एकोणिसाव्या शतकांत वैद्यकशास्त्रदृष्ट्या व्यायामाचें महत्त्व तत्कालीन वैद्यांच्या लक्षांत येऊं लागलें व तेव्हांपासून शारीरिक व्यंगें अगर दोष घालविण्याकरितांहि कांहीं निरनिराळे व्यायामाचे प्रकार रूढ झाले. युरोपांतील अनेक देशांत शिक्षणपद्धतींत व्यायाम हा विषय आवश्यक असतो.

पुरुषाप्रमाणे स्त्रियांकरितांहि हल्लीं व्यायामाचे निरनिराळे प्रकार नवीन नवीन निघत आहेत व स्त्रियांच्या चावर्तीतहि व्यायामाचें महत्त्व लोकांत पटूं लागलें आहे.

भारतीय हवामानपद्धतीस व शारीरिक रचनेस अनुसरून नवीन नवीन व्यायामप्रकार रूढ होत आहेत. तसेंच मोकळ्या मैदानांतील खेळांमध्येहि व्यवस्थितपणा व नियमबद्धता येत चालली आहे. याकरितां जुने खेळहि पुन्हां प्रचारांत आणण्याचें काम चालू आहे. आट्यापाट्या, खो खो, व विशेषतः हुतुतु हे खेळ अधिकाधिक लोकप्रिय होत चालले आहेत. तसेंच स्त्रियांकरितांहि लंगडी, हुतुतु, उड्या मारणें, वगैरे खेळांस उत्तेजन देण्यांत येऊन त्यांचे सामने भरविण्यांत येऊं लागले आहेत व शारीरिक शिक्षणाकडे अलीकडे अधिकाधिक लक्ष देण्यांत येऊन त्याकरितां संस्था स्थापन होत आहेत.

**व्यावहारिक यंत्रशास्त्र**—(अप्लाइड मेकॅनिक्स). शिल्पशास्त्रांतील जे निरनिराळे विषय व प्रमेये असतात त्यांस गतिशास्त्र, वगैरेंचे नियम लागू करणें या गोष्टीस व्यावहारिक यंत्रशास्त्र असें म्हणण्यांत येतें. याचें वर्गीकरण पुढें दिल्याप्रमाणें निरनिराळ्या विषयांत करतां येईल; (१) वस्तुशक्ति (स्ट्रेंथ ऑफ मटीरिअल); (२) यंत्रांची उपपत्ति (थिअरी ऑफ मशीन्स); (३) रचनेची उपपत्ति (थिअरी ऑफ स्ट्रक्चर्स); (४) जलशास्त्र (जलशास्त्र व जलयंत्रें). शिल्पशास्त्रज्ञ जीं मापें व परिमाणें वापरतात तीं शुद्ध शास्त्रीय मापें व परिमाणें असतात असें नाही. शिल्पशास्त्रज्ञाचें वजनाचें प्रमाण एक पौंड हें असतें. अर्थात् त्याचें महत्त्व स्थानिक अक्षांश आणि समुद्रसपाटीपासून उंची, वगैरे गोष्टींमुळें बदलण्याचा संभव असतो.

**व्यास**—प्राचीन वेदशाखाप्रवर्तक व पुराणकार. हा पराशर ऋषि व धीवरकन्या सत्यवती यांचा पुत्र. याचा जन्म यमुनाद्वीपांत झाला म्हणून याला द्वैपायन व बोरीच्या वनांत झाला म्हणून बादरायण म्हणतात. प्रत्येक द्वापरयुगांत एकेक व्यास उत्पन्न होतो. हल्लीच्या वैवस्वत मन्वंतरांतील कृष्ण द्वैपायन हा अठ्ठाविसावा व्यास आहे. कौरव आणि पांडव यांची उत्पत्ति व्यासापासून झाली. यानें अठरा पुराणें व आठ व्याकरणें रचिलीं. व्यासाची शिष्यपरंपरा फार मोठी होती. पैलानें याच्यापासून ऋग्वेद, वैशंपायनानें याच्यापासून यजुर्वेद, जैमिनीनें सामवेद व सुमंतूनें अथर्ववेद मिळविला व या सर्वांनीं शाखाविस्तार केला.

महाभारत व त्यांतील भगवद्गीता हीं व्यासाचें नांव सर्वतोमुखीं चिरकाल ठेवण्यास समर्थ आहेत.

**व्युत्पत्तिशास्त्र**—भाषेंतील शब्दाचा (उगमापासून अगदीं अलीकडल्या रूपाचा आणि अर्थाचा) इतिहास देणारें हें शास्त्र भाषाशास्त्राची एक शाखा आहे. आपल्याकडे 'यास्काचें निरुक्त' हा ग्रंथ प्राचीन व्युत्पत्तिशास्त्रावरचाच असून त्याच्या अनुरोधानें इतर संस्कृत ग्रंथ तयार झाले. पाश्चात्य देशांत प्लेटो व इतर ग्रीक पंडित यांनीं या विषयाचा बराच ऊहापोह केलेला आहे. तथापि आर्यन भाषा आणि जगांतील दुसरे भाषावंश यांचा तौलनिक अभ्यास गेल्या शतकांत सुरू झाल्यापासूनच या शास्त्राला पद्धतशीर वळण लागलें. मराठींत राजारामशास्त्री भागवत व वि. का. राजवाडे यांनीं या विषयांत प्रथम लक्ष घातलें. नुकताच प्रा. कृ. पां. कुलकर्णी यांनीं मराठीचा मोठा व्युत्पत्तिकोश तयार केला आहे. भाषाशास्त्र पाहा.

**व्योमिंग**—अमेरिका, संस्थान संघांतील एक पश्चिम भागाचें संस्थान. क्षेत्रफळ ९७,९१४ चौ. मै. व लो. सं. २,५०,७४२. मुलूख डोंगराळ असून समुद्रसपाटीवर सामान्यतः ६,००० फूट उंच आहे. सर्वोच्च पर्वतशिखर १३,७८५ फूट आहे. नद्यांचें पाणी कालव्यांनीं शेतीच्या कामासाठीं सर्वत्र खेळवलें आहे. हवा नेहमीं कोरडी परंतु शीतोष्ण काळ तीव्रतेनें जाणवतो. शेती, जनावरें व मेंढ्या वाढवणें, लोंकरीचो पैदास व व्यापार हे मोठे धंदे आहेत. खनिज धंद्यास पुष्कळ वाव आहे. संस्थानांतील हवापाणी व विशेषतः शेतकी जीवन हीं सर्वोत्कृष्ट असल्यानें त्यांचा आस्वाद घेण्याकरितां किती तरी फिरस्ते येथें येतात. राजधानी चेयेन आहे. संस्थानांत कांहीं ठिकाणीं ऊन पाण्याचे झरे आहेत; त्यांचा शोध १७४३ मध्यें लागला. १९ व्या शतकांत व्यापारी केंद्रें स्थापन झालीं. १८३४ सालीं येथें पहिली वसाहत झाली. कालिफोर्नियांतील सोन्यामुळें भोंवतालीं नव्या वसाहतकारांची लाट आली त्यामुळें येथलीहि लोकसंख्या एकदम वाढली. १८६८ मध्ये टेरिटरीचा दर्जा प्राप्त झाला व १८९० मध्यें हें संस्थान युनियनमध्यें दाखल झालें.

**व्रत**—हा शब्द फार प्राचीन आहे व त्याचा अर्थ सामान्यपणें 'कोणतीहि एक गोष्ट नियमानें करणें,' असा आहे. वैदिक काळांत अग्नीची उपासना हें एक व्रतच समजलें जाई. ऋग्वेदामध्यें 'त्वमग्ने व्रतपा असि' (हे अग्ने, तू व्रताचें संरक्षण करणारा आहेस) असें वर्णन अग्नीला अनुलक्षून आढळतें. नियमानें वेदाध्ययन करावयाचें हेंच कोणी एक व्रत व या व्रताच्या आचरणासंबंधीं जो आरंभक विधि करावयाचा तो 'व्रतबंध' किंवा उपनयन संस्कार

होय. भागवतामध्यें कात्यायनी व्रत, पुंसवनव्रत, कश्यपानें अदितीला उपदेशिलेलें पयोव्रत, वगैरे फार थोड्या व्रतांचा उल्लेख आला आहे. महाभारतांत चांद्रव्रत, चांद्रायणव्रत, एकभुक्तव्रत, द्वादशद्वादशीव्रत, इत्यादि व्रतांचा उल्लेख असून रामायणांत कुबेरानें केलेल्या रौद्रव्रताचा फक्त उल्लेख आहे. पद्मपुराणांत जयविजयाजयंतीव्रत, राधाष्टमीव्रत, गुरुवारव्रत, गौरीव्रत, सारस्वतव्रत, अशून्यशयनव्रत, रोहिणीचंद्रशयनव्रत, नवग्रहव्रत, तुळशी-शिवरात्रव्रत, वैतरणीव्रत, मासोपवासव्रत, प्रबोधिनीव्रत, इत्यादि ३८ व्रतें येतात. अनंगत्रयोदशीव्रत, उमामहेश्वरव्रत, दुर्गागणपतिव्रत हीं व्रतें सौरपुराणांत व शिवव्रत, विष्णुव्रत, मूलगौरीव्रत, वगैरे व्रतें अग्निपुराणांत सांगितलेलीं आहेत. व्रतराज हा ग्रंथ धर्मसिंधूप्रमाणें महाराष्ट्रांत व्रतविषयक बाबतींत प्रमाणग्रंथ मानितात. हा ग्रंथ संगमेश्वरकर विश्वनाथ दैवज्ञ (जोशी) यानें तयार केला आहे. यादवकालीन मुत्सद्दी व विद्वान् पंडित हेमाद्रि यानें जो चतुर्वर्गचिंतामणि नांवाचा ग्रंथ रचला त्याचा एक खंड व्रतखंड या नांवाचा असून त्यांत वर्षांतील निरनिराळ्या दिवशीं करावयाच्या व्रतांचें वर्णन केलें आहे.

**व्रात्य**—यजुर्वेदांत पुरुषमेधप्रसंगीं बलि दिल्या जाणाऱ्यांच्या यादींत हें नांव आलेलें आहे. परंतु तेथें या नांवाबद्दल जास्त खुलासा नाहीं. तो अथर्ववेद व पंचविंश ब्राह्मण या ग्रंथांत आढळतो. अथर्ववेदांत व्रात्यांसाठीं एका विधीचें सविस्तर वर्णन आलेलें आहे. या व्रात्यांचा एकच वर्ग असावा असें वाटतें. ते अनार्य असतील हें शक्य नाहीं. कारण पंचविंश ब्राह्मणांत असा स्पष्ट उल्लेख आहे कीं, जरी ते स्वतः असंस्कृत होते तरी ते सुसंस्कृत लोकांचीच भाषा बोलत असत. यावरून ते आर्य किंवा द्राविड असावे अशी एक कल्पना आहे. या लोकांनीं एक विशिष्ट व्रताचरण केलें असतां त्यांना ब्राह्मण समाजांत प्रवेश करतां येत होता. परंतु व्रात्यांचा पोषाख व जीवनक्रम यांविषयीं कांहीं माहिती पंचविंश ब्राह्मणांत मिळते तीवरून त्यांचीं तत्त्वें ब्राह्मण लोकांच्या विरुद्ध होतीं, तेव्हां ते अनार्य असावेत असें वाटतें. ज्यांना सुधारतां येणें शक्य नव्हतें त्यांना ते मारीत असत. त्यांचा गृहपति डोक्यावर नेहमीं उष्णीष (शिरस्त्राण, पागोटें) धारण करी; त्याच्या हातांत एक चाबूक व धनुष्य (ज्याऱ्होड) असे; तो कृष्णवस्त्र परिधान करी व त्याच्या अंगावर काळें व पांढरें कातडें पांघरलेलें असे. त्याची एक चौचाकी गाडी असून त्या गाडीवर चार फळ्या असत. एखाद्या पुढाऱ्याच्या अनुशासनाखालीं असलेल्या लोकांचीं वस्त्रें तांबड्या कांठाचीं असत व ते अंगावर घेत तें कापडें दोन ठिकाणीं दुमडलेलें असे. तसेंच त्या लोकांच्या पायांत जोडे (उपानह) असत व त्यांच्या पुढाऱ्याला निष्क नामक अलंकार धारण करण्याची फार आवड असे. हे व्रात्य लोक कोठें राहत असत याविषयीं नक्की माहिती सांगणें कठिण आहे. पण ज्या अर्थी ते नेहमीं भटकत असत त्या अर्थी ते सरस्वती नदीच्या पलीकडे राहत असावेत अशी कल्पना आहे. कदाचित् ते पूर्वेकडे मगध देशांत राहत असावे.

व्रात्यस्तोम—तांड्य ब्राह्मणांत यज्ञांसंबंधीं पुष्कळच तपशीलवार वर्णन असल्याचें दिसतें. इतकेंच नव्हे तर, ह्यांतील बहुतेक यज्ञ सरस्वती आणि दृषद्वती नद्यांवर, अथवा त्यांच्या अंतर्वेदींत किंवा त्यांच्याजवळ आसपासच्या प्रदेशांत, शेवटास गेल्याचें चांगलें व्यक्त होतें. ह्याशिवाय व्रात्यस्तोम देखील येथेंच होत असावेसें वाटतें. हा व्रात्यस्तोम केवळ व्रात्यांकरितांच होय. व्रात्य म्हणजे आर्य शाखेंतले जे कित्येक जण, वैदिक धर्माविरुद्ध वागूं लागले ते. तेव्हां, ह्या व्रात्यांस आपल्या अविहित कर्माबद्दल पश्चात्ताप होऊन, किंवा आर्यांच्या कळपाबाहेर अदक्त राहिल्यामुळेंच वाईट वाटून ज्यांनीं पुनश्च आर्य समाजांत येण्याविषयींची आपली इच्छा प्रदर्शित केली, त्यांना या व्रात्यस्तोमानें फिरून ब्राह्मण धर्मांत घेत. तथापि आर्येतरांस व अराजकांतहि या विधीनें आर्यांत प्रवेश मिळत असावा असें दिसतें.

**व्हॅटिकन**—रोम येथील पोपचें निवासस्थान. जगांत याच्या इतका मोठा दुसरा राजवाडा नसेल. हा ११५१'×७६७' इतक्या क्षेत्रफळावर वसलेला असून यांत ४००० खोल्या आहेत. १३७७ त पोप (९ वा) ग्रेगरी यानें हें आपलें निवासस्थान केल्यापासून त्याच्यामागूनचे सर्व पोप येथेंच राहत. त्यामुळें रोमन कॅथॉलिक चर्च या धार्मिक संस्थेचें हें मुख्य पीठ बनलें. या राजवाड्यांत नामांकित चित्रकारांच्या कृती आहेत व ग्रंथालयाचा सज्जा तर ¾ मैल लांबीचा आहे. त्यांतील ग्रंथसंग्रह सुमारें सव्वादोन लक्ष पुस्तकांचा असेल.

**व्हॅंडॉल लोक**—हे प्राचीन ट्यूटॉनिक ऊर्फ जर्म्यानिक जातीचे लोक गॉथ लोकांसारखे होते. इ. स. ४०६ मध्यें त्यांनीं जर्मन जातीच्या टोळ्यांशीं संगनमत करून गॉल प्रांत उध्वस्त केला व तेथून ते स्पेन देशांत शिरले. तेथें त्यांनीं गॉथ व रोमन या लोकांच्या एकत्रित सैन्याचा पराभव केला, आणि सेव्हिले व कार्थेजेना हीं शहरें जिंकून घेतलीं. नंतर हे लोक समुद्र ओलांडून आफ्रिकेंत गेले. तेथें त्यांनीं रोमन गव्हर्नरचा पराभव केला (४२९) आणि आपलें राज्य स्थापलें. त्यांचें हें राज्य इ. स. ५३४ मध्यें पूर्व रोमन साम्राज्याचा बादशहा जस्टीनियन याचा सेनापति बेलीसेरीयस यानें नष्ट केलें.

**व्हॅनोलिन**—हें मेंढीच्या लोंकरीपासून तयार करण्यांत येतें, व तें मलम करण्याकरितां उपयोगी पडतें. जेव्हां शरीराच्या कातडीवर औषध लावावयाचें असेल तेव्हां व विशेषतः पाऱ्याचें औषध लावावयाचें असल्यास व्हॅनोलिनवर लावून तें शरीरास

ठेवण्यांत येतें. व्हॅनोलिन् हें लोंकरीच्या नमद्यापेक्षां नरम असतें व तें अंगावरील सुरकुत्या घालविण्याकरितां किंवा इतर त्वचारोगामध्यें वापरण्यात सोईचें असतें.

**व्हर्जिन बेटें**—१. ( ब्रिटिश )—वेस्ट इंडीजमधलीं कांहीं बेटें इंग्लंडच्या ताब्यांत आहेत. त्यांपैकीं वरीचशीं ओसाड, रेताड व खडकाळ आहेत. कांहीं जमीन लागवडीखालीं आलेली आहे. त्यांत मका, कॉफी, कापूस, साखर व नीळ हीं होतात. रोडटाउन येथील वसाहत मुख्य आहे. कोलंबसानें यांचा १४९४ मध्यें शोध लावला. यांचें क्षेत्रफळ ६७ चौरस मैल आहे. लीवर्ड बेटा-( पाहा )च्या राज्यकारभारांत यांचा एक प्रांत म्हणून समावेश केला आहे. लो. सं. सुमारे ७,०००.

२. ( अमेरिकन )—वेस्ट इंडीजमधलीं कांहीं बेटें. हीं पूर्वी डेन्मार्कचीं होतीं. तीं १९१७ सालीं डेन्मार्कपासून अमेरिकेनें अडीच कोटी डॉलरांना खरेदी घेतलीं. सेंट जॉन, सेंट थॉमस, सेंट क्रॉइक्स् हीं तीन बेटें मुख्य आहेत. शिवाय सुमारें ५० लहानमोठीं बेटें आहेत. एकूण क्षेत्रफळ १३३ चौरस मैल. लो. सं. सुमारें २५,०००. १९२७ सालीं अमेरिकन कायद्यानें येथील रहिवाशांस अमेरिकन नागरिकत्व दिलें. मुख्य व्यापार साखरेचा व रम् आणि बे रम् या दारूंचा.

**व्हर्जिनिया**—अमेरिकन संयुक्त संस्थानें, दक्षिण ॲटलांटिक महासागराच्या बाजूचें एक संस्थान. क्षेत्रफळ ४२६२७ चौ. मैल. पूर्वेस ॲटलांटिक महासागराच्या बाजूस चेसॅपीक उपसागराच्या कांठीं संस्थानाचा प्रदेश वेडावांकडा गेलेला आहे. याला 'टाइड-वॉटर-व्हर्जिनिया' असें म्हटलें जातें. मध्यमार्गी 'पेडमॉट प्लेटो' हें मैदान आहे. पांच मुख्य नद्या उपसागराला जाऊन मिळतात. पश्चिम भागांत ५,७०० फूट उचीपर्यंत पर्वतशिखरें गेलीं आहेत. शेनानदोहा दरी अत्यंत सुपीक आहे. येथें तीव्र शीतोष्ण सोडून सर्व प्रकारचें हवामान आढळतें. रिचमंड हें मुख्य ठिकाण व सर्वांत मोठें शहर आहे. नॉरफोक हें त्याच्या खालोखाल येईल. शेती हाच प्रधान उद्योग. जनावरांची, विशेषतः दुग्धव्यवसायोपयोगी जनावरांची पैदास व जोपासना हाहि एक महत्त्वाचा उद्योग आहे. मासेमारीचा व्यापारधंदाहि जोरांत चालतो. ऑयस्टर माशाच्या बाबतींत अमेरिकेमध्यें हें संस्थान अग्रेसर आहे. इतर उद्योगधंद्यांत कापसाचें कापड, तंबाखू, लांकूड, कागद, खतें हे जिन्नस महत्त्वाचे आहेत. खनिज उत्पादनांत कोळसा, तांबें, शिसें, लोखंड व जस्त हीं येतात. हॅम्पटनरोड हे विख्यात बंदर आहे. संस्थानची लो. सं. २६,७७,७७३.

व्हर्जिनिया हें इंग्लंडच्या मूळ वसाहतींपैकीं आहे. जॉर्ज वॉशिंग्टनचा गांव मौंट व्हर्नान हा याच संस्थानांत आहे. येथून वॉशिंग्टन अवघ्या १५ मैलांवर आहे. उन्हाळी ( हॉट् स्प्रिंग ) म्हणून राखून ठेवलेली जागा यांतच आहे. 'नॅशनल पार्क'—राष्ट्रीय उद्यान म्हणून आरोग्याकरितां वगैरे हवापालट करण्याचें हें ठिकाण असून यांत औषधी गुणांचे ४० उष्णोदकाचे झरे आहेत. त्यांवरूनच 'हॉट् स्प्रिंग' हे नांव या भागास प्राप्त झालें. हॉट् स्प्रिंग क्षेत्र ९०० चौरस मैलांचें आहे. अमेरिकन संस्थानांच्या अध्यक्षांपैकीं ८ जणांच्या जन्मभूमी याच संस्थानांत आहेत. जेम्स-टाउन हें आद्यवसाहतीचें ठिकाण यांतच (जेम्सटाउन बेटांत) आहे. व्हर्जिनियानें स्वातंत्र्य-युद्धांत मुख्य व मोठा भाग उचलला होता. पॅट्रिक हेन्री, थॉमस जेफरसन, जॉर्ज वॉशिंग्टन, आणि रिचर्ड हेन्री ली हे चौघे स्वातंत्र्यवीर याच संस्थानांतले. १७८४ व १७९२ सालीं या संस्थानानें आपल्यापैकीं कांहीं प्रदेश मध्यवर्ती सरकारला दिला व त्यांतूनच पुढें केन्टकी संस्थान निर्माण करण्यांत आलें. १८६३ मध्यें यादवी युद्धाच्या वेळीं पश्चिम व्हर्जिनिया यांतून फुटून निघाला आणि युनियनमध्यें स्वतंत्र संस्थान म्हणून सामील झाला ( पश्चिम व्हर्जिनिया पाहा ). खुद्द व्हर्जिनियाहि १७८८ मध्यें घटना-दुरुस्तीनें एक स्वतंत्र संस्थान झालें.

वॉशिंग्टन आणि ली विद्यापीठ लेक्सिंग्टन येथें आहे. संस्थानांत ८ ते १२ वर्षे वयापर्यंत मुलांना शिक्षण सक्तीचें व मोफत आहे. स्त्रियांसाठीं एक स्वतंत्र कॉलेज आहे.

**व्हर्जिल** ( ख्रि. पू. ७०–१९ )—इटलीचा एक महाकवि. याला लहानपणापासूनच कविता करण्याचा छंद होता. त्याचे दोन प्रमुख काव्यग्रंथ म्हणजे 'जॉर्जिक्स' आणि 'एनीड' हे होत. यांच्या रचनेला अनुक्रमे सात व बारा वर्षे लागलीं. आपले एनीड काव्य चांगलें परिपूर्ण करण्यासाठीं ग्रीस आणि आशिया या भागांत प्रवास करण्याचा त्याचा विचार होता; पण आरंभींच्या प्रवासांतच तो वारला. त्याचें जॉर्जिक्स हें काव्य जगांतील वर्णनपर काव्यांत अत्युत्कृष्ट ठरतें. सर्व दृष्टींनीं तें सुंदर आहे. त्याच्या पहिल्या खंडांत शेतकी, दुसऱ्यांत वृक्षसंवर्धन, तिसऱ्यांत गुराढोरांची निगा व चौथ्या खंडांत मधुमक्षिकापालन हे विषय आहेत. एनीड हें काव्य तर अत्यंत विख्यात असून होमरच्या दोन काव्यांची छटा त्यांत दिसून देते. रोम शहर आणि ऑगस्टस बादशहा यांचा इतिहास यांत त्यानें सुंदर रीतीनें मांडला आहे. जगांतील महाकाव्यांत एनीडची गणना होते. व्हर्जिलनें इतरहि कांहीं किरकोळ काव्यें रचिलीं आहेत.

**व्हार्नियर मोजपट्टी**—ही मोजपट्टी पायेर व्हार्नीएर या फ्रेंच शास्त्रज्ञानें १६३१ मध्यें शोधून काढली. ही सामान्य मोजपट्टीस साहाय्यक म्हणून वापरण्यांत येते. या पट्टीवर मांडलेले विभाग सामान्य मोजपट्टीपेक्षां एक-दशांशानें कमी किंवा अधिक असतात. थिओडोलाइट किंवा बॅरोमीटर यांच्या पक्क्या

घसरविलेल्या मापनपट्टीला समांतर अशी ही व्हर्नियर पट्टी असते. व हिचा उपयोग अपूर्णांकांचें गणित करण्याकडे होतो.

**व्हर्मांट**—हें संस्थान अमेरिकन सं. संस्थानांपैकीं एक असून तेथल्या ग्रीन माउंटन्स या पर्वताच्या नांवावरून व्हर्मांट हें नांव या संस्थानाला देण्यांत आलें आहे. या पर्वतावरून पूर्व बाजूला व पश्चिम बाजूला नद्या वाहून जातात. मॉंट पेलियर हें शहर या संस्थानची राजधानी असून बर्लिंग्टन हें महत्त्वाचें शहर व बंदर आहे. शेतकी हा येथील मुख्य धंदा असून येथील ७० टक्के लोक खेडेगांवांत राहतात. येथें सर्व प्रकारचीं अन्नधान्यें, बटाटे व फळें होतात. गुरें पाळणें आणि दूध व लोणी तयार करणें हेहि महत्त्वाचे धंदे आहेत. येथें मोठालीं अरण्यें असून इमारती लांकूड आणि कागद तयार करण्याचे येथें मोठाले कारखाने आहेत. संगमरवरी दगडाच्या खाणी आहेत. कापसाचें कापड, यंत्रें, पीठ, वगैरे तयार करण्याचे कारखाने व गिरण्या येथें आहेत. क्षे. फ. ९६०९ चौ. मैल व लो. सं. ३,५९,२३१ असून यांत फ्रेंच, इंग्रज, इटालियन, आयरिश, स्कॉटिश या राष्ट्रांचे लोक आहेत. येथें प्रथम वसाहत १७२४ सालीं होऊन १७९१ सालीं हें संस्थान युनिअनमध्यें सामील झालें. येथला राज्यकारभार एक गव्हर्नर ३० सभासदांचें सिनेट व २४६ सभासदांची प्रतिनिधी-सभा यांच्या मताप्रमाणें चालवतो. येथें ७ ते १६ वर्षांपर्यंत शिक्षण सक्तीचें आहे. येथें व्हर्मांट युनिव्हर्सिटी (१७९१) व नॉर्विच युनिव्हर्सिटी (१८३४) व अनेक विषयांचीं कॉलेजें आहेत.

**व्हर्सायें**—हें शहर फ्रान्समध्यें पॅरिसपासून १० मैलांवर असून तें युरोपांतील एक अत्यंत सुंदर शहर म्हणून प्रसिद्ध आहे. हें शहर फ्रान्सच्या अनेक राजांनीं विशेषतः १४ वा लुई या राजानें आपल्या देखरेखीखालीं बांधविलें. शिवाय स्वतःकरितां एक मोठा भव्य राजवाडा तेथें बांधला, आणि तो राजा आपला दरबार तेथें भरवूं लागला. लुई फिलिप यानें त्या राजवाड्याचें राष्ट्रीय पदार्थ-संग्रहालय (नॅशनल म्यूझियम) यामध्यें रूपांतर केलें. १८७० सालीं जर्मन लोकांनीं आपलें मुख्य ठाणें येथें केलें. १८७१ ते १८७९ पर्यंत फ्रेंच सरकारची राजधानी येथें होती. पहिल्या महा-युद्धानंतर १९१९ सालीं येथें तह होऊन त्यावर सह्या झाल्या. लो. सं. (१९३६) ७३,८३९.

**व्हॅलेटा**—ही माल्टा बेटाची राजधानी ईशान्य किनाऱ्यावर असून हें बंदरहि चांगलें व मोठें आहे. येथें एक कॅथेड्रल व एक युनिव्हर्सिटीची इमारत आहे. त्या कॅथेड्रलमध्यें 'नाइट्स ऑफ सेंट जॉन' यांचीं थडगीं आहेत. हें शहर भूमध्यसमुद्रांतील ब्रिटिशांचें मुख्य आरमारी ठाणें आणि आगबोटींना कोळसा घेण्याचें ठिकाण आहे. या बंदरांत अतिशय मोठाल्या बोटी व लढाऊ जहाजें येऊं शकतात. येथें जहाजें बांधण्याचे व इतर अनेक प्रकारचे कारखाने आहेत. येथून धान्य, दारू, फळफळावळ, कापसाचें कापड, दगडी कोळसा, वगैरेंचा व्यापार चालतो. लो. सं. (१९४४) २,७१,१८७ आहे.

**व्हॅलेन्शिया**—हें शहर स्पेनमधील व्हॅलेन्शिया प्रांताची राजधानी असून गॉडेलाव्हिव्हियर नदीच्या कांठीं समुद्रापासून ३ मैल अंतरावर आहे. येथें एक कॅथेड्रल, एक राजवाडा, एक बुलरिंग (बैलांच्या झुंजींचा आखाडा) व एक युनिव्हर्सिटीची इमारत (१४११) ह्या प्रसिद्ध इमारती आहेत. येथें मुख्य कारखाने रेशीम, ताग, कांच, सिगार, कागद आणि साबण यांचे आहेत आणि येथून फळफळावळ, दारू, रेशमी कापड, वगैरे माल परदेशीं जातो. येथील बंदर फार चांगलें असून, २६ फूट खोल पाणी लागणाऱ्या बोटी येथें येऊं शकतात. लो. सं. २,५६,२६३ आहे.

**व्हल्कन**—रोमन पुराणांतील एक देवता. धातुकर्म आणि अग्नि यांची ही अधिष्ठात्री देवता असून हेफीस्टस या ग्रीक देवतेशीं हिचें पुष्कळ साम्य आहे. हा ज्यूपिटर आणि ज्यूनो यांचा लंगडा मुलगा होता.

**व्हॅसेलिन**—मलमें तयार करण्याच्या कामीं वापरण्यांत येणारें एक अर्धवट घट्ट आणि तेलकट द्रव्य. हें उज्ज-कर्बांचें (हायड्रो-कार्बन्स) मिश्रण असतें. पेट्रोलियमच्या ऊर्ध्वपातनापासून हें निघतें.

**व्हाइट क्रॉस**—(शुभ्र क्रूस). ही एक अनेक बाबतींत 'रेड क्रॉस' सारखीच संस्था असून त्या संस्थेवरूनच हिचें आपलें नांव बनविलें आहे. रेड क्रॉस ही संस्था जगव्यापी आहे, तर व्हाइट क्रॉस या संस्थेचें क्षेत्र अमेरिकेपुरतें मर्यादित आहे. या संस्थेची स्थापना १८९८ मध्यें ऑरेगॉन संस्थानांतील पोर्टलंड येथील मिसेस जेम्स ग्रीटन या नांवाच्या स्त्रीनें केली. ही या संस्थेची पहिली अध्यक्ष होती. या संस्थेचें चिन्ह म्हणजे रजतवर्ण पृष्ठभागावर पांढऱ्या क्रूसाचें चिन्ह असून त्यासभोंवतीं निळ्या रेषेचें वेष्टण असतें. तें आकाशाचें प्रतीक आहे व हे तीन रंग संघाचे द्योतक आहेत. या संघाचें ब्रीदवाक्य सत्य (ट्रुथ), परोपकार (चॅरिटी) आणि दया (फिलॅन्थ्रॉपी) हें आहे. संघाचा उद्देश केवळ जखमी अमेरिकन सैनिक व नाविक लोकांस मदत करणें एवढाच नसून विधवा, पोरकीं मुलें यांस व जे लोक रोग अथवा अपघात यांनीं मरतात त्यांच्या वारसांसहि मदत करण्याचा असतो.

**व्हाइट रशिया**—(श्वेत रशिया). हें युरोप खंडांतील रशियांतलें एक लोकराज्य आहे. व तें सोव्हिएट संघराज्याचें एक घटक आहे. क्षे. फ. १,२६,७९० चौ. मै., लो. सं. (१९३९) ५५,६७,९७६. १९३९ सालीं पश्चिम बायलो-रशियन प्रांत

रशियाला जोडण्यांत आला, त्यामुळें १,०८,००० चौ. किलोमीटर इतकें क्षेत्रफळ वाढलें आणि ४८,००,००० इतकी लो. सं. वाढली. येथें तीन विद्यापीठें आणि अनेक विषयांचीं कॉलेजें आहेत. येथें अन्नधान्यें, जवस, ताग, बटाटे हीं पिकें होतात. घोडे, गुरें, मेंढया व बकऱ्या, आणि डुकरें पाळण्याचा मोठा धंदा चालतो. येथें कुजलेल्या झाडांचें सरपण (पीट) आणि खनिज मीठ विपुल सांपडतें. येथें बायलो-रशियन यांची मुख्य वस्ती असून, शिवाय ज्यू, युक्रेनियन व पोल या जातींचे लोक राहतात. राजधानी मिन्स्क हें शहर आहे. व्हिटेबस्क व गोमेल हीं महत्त्वाचीं शहरें आहेत.

**व्हाइट हाउस**—(श्वेतगृह). वॉशिंग्टन (डी. सी.)शहरामध्यें संयुक्त संस्थानांच्या अध्यक्षाच्या निवासस्थानास हें नांव दिलेलें आहे. याचें कारण त्यास पांढरा रंग दिलेला असतो हें होय. हें पेन्सिल्व्हॅनिया रस्त्यावर कॅपिटोलपासून दीड मैल अंतरावर आहे. याची बांधणी १७९२ सालीं सुरू झाली व १८०० सालीं ती पूर्ण झाली. यांत जॉन ॲडॅम्स हा अध्यक्ष प्रथम येऊन राहिला. ब्रिटिशांनीं १८१४ मध्यें वॉशिंग्टन काबीज करून श्वेतगृह व कॅपिटोल आणि इतर इमारती जाळून टाकल्या; परंतु त्याच्या पुढल्याच वर्षी कॉंग्रेसनें श्वेतगृह पुन्हां बांधण्याचा कायदा केला व १८१८ सालीं तें पुन्हां बांधून झालें; व तेव्हांपासून तेथें अध्यक्षाचा निवास असतो. याचा सर्व खर्च संयुक्त सरकार चालवितें व तो दरवर्षास ६ लक्ष डॉलरपर्यंत येतो.

**व्हॅंकुव्हर**—१. हें बेट पॅसिफिक महासागरांत, कानडा देशांतील ब्रिटिश कोलंबिया प्रांताच्या पश्चिम किनाऱ्यानजीक आहे. या बेटाची लांबी २५० मैल आणि क्षे. फ. १६,४०० चौ. मैल आहे. हें बहुतेक बेट पर्वतमय असून तेथें मोठालीं जंगलें आहेत, पण दक्षिण व पूर्व भागांत जमीन सुपीक असून, तेथें धान्यें व फळफळावळ होतात. येथें मुख्य खनिज द्रव्यें सोनें, तांबें, लोखंड व दगडी कोळसा हीं व इतर अनेक खनिज द्रव्यें सांपडतात. येथें घोडे, गुरें आणि मेंढ्या पाळण्याचा धंदा मोठा आहे. सालमन व इतर जातींचे मासे यांचा मच्छीमारीचा धंदाहि मोठा चालतो. येथून मासे व लोंकर हा माल परदेशीं जातो. या बेटांत वस्ती आग्नेय भागांत मुख्यतः आहे व व्हिक्टोरिया हें ब्रि. कोलंबियाच्या राजधानीचें शहर याच भागांत आहे. या बेटाची लो. सं. (१९४१) १,२१,९३३ आहे.

२. हें शहर ब्रि. कोलंबियामध्यें जॉर्जिया सामुद्रधुनीनजीक बुराड खाडींत आहे व तें उत्तम बंदर असून, तेथें अतिशय मोठाल्या बोटी जाऊं शकतात. सी. पी. आर्. आणि सी. एन्. आर्. या दोन्ही रेल्वे लाइनचें तें शेवटचें स्टेशन (टर्मिनस) आहे आणि येथून पृथ्वीवरील सर्व भागांशीं मोठा व्यापार चालतो. येथें लांकूड, जहाजें बांधणें, कागद वगैरे अनेक प्रकारचे कारखाने असून मच्छीमारीचा धंदाहि महत्त्वाचा आहे. लो. सं. २,९०,८१२ आहे.

**व्हानब्रुग, सर जॉन** (१६६४–१७२६)—एक इंग्रज नाटककार व शिल्पकार. याचें पहिलें सुखान्त नाटक 'दि रिलॅप्स ऑर् व्हर्च्यू इन् डेंजर' (सद्गुणांवर संकट) हें १६९६ सालीं प्रसिद्ध झालें व त्याचे पुष्कळ प्रयोग झाले. त्याचें 'दि प्रव्होक्ड वाइफ' (चिडविलेली पत्नी) हें सर्वोत्कृष्ट नाटक असून, त्यांतील सर जॉन ब्रूट हें पात्र सर्वोत्कृष्ट वठलें आहे. त्याचीं आणखी नाटकें आहेत तीं : 'ए कंट्री हाउस'; 'दि कॉन्फेडरसी'; 'स्क्वायर ट्रेल्बी' आणि 'दि मिस्टेक'. व्हानब्रुग ह्याला १७०२ सालीं कंट्रोलर ऑफ दि रॉयल वर्क्स या हुद्यावर नेमण्यांत आलें आणि त्यानें कॅसल हॉवर्ड ह्याचें बांधकाम केलें. ब्लेनहीम पॅलेस ही त्याची मुख्य शिल्पकलाकृति होय.

**व्हायकॉर**—एका नव्या प्रकारच्या कांचेचें नांव. पायरेक्सपेक्षां अनेक दृष्टींनीं ही सरस आहे. टिकाऊपणा, हलकेपणा, पारदर्शकपणा या दृष्टींनीं हिची बरोबरी करणारा पदार्थ नाहीं. १६००° शत. उष्णमानावरहि ही कांच टिकाव धरते; वितळत नाहीं. या कांचेवर कोणतीच रासायनिक क्रिया घडत नाहीं. ही जवळजवळ पूर्ण पारदर्शक आहे. प्रकाशकिरणांचा एक-नऊशें सत्तेचाळिसांशच काय तो या कांचेमुळें अडतो. ही गरम असतांना हिच्यावर पाणी ओतलें तरी फुटत, तडकत नाहीं.

**व्हायकिंग्ज**—नॉर्थमेन. हे लोक समुद्रावर लूटमार करणारे मूळचे स्कँडिनेव्हियन द्वीपकल्पांतले असून पुढें ते ८ व्या शतकापासून १३ व्या शतकापर्यंत फ्रान्स, फ्लँडर्स आणि ब्रिटिश बेटें या प्रदेशांत वसाहत करून राहिले. फ्रान्सच्या उत्तर भागांत या लोकांची पहिली मोठी वसाहत रोल्फ या नांवाच्या पुढाऱ्याच्या नेतृत्वाखालीं चार्लस दि सिंपल या राजाच्या कारकीर्दींत झाली व पुढें नॉर्मंडी हा सर्व प्रांत त्यांनीं व्यापला. ७९४ सालापासून या लोकांनीं स्कॉटलंडच्या पश्चिम किनाऱ्यावर हल्ले करण्यास सुरवात केली व लवकरच तेथें त्यांनीं वसाहती स्थापल्या. ऑर्कनी व शेटलंड या बेटांवरहि त्यांनीं वसाहती केल्या. या वसाहतींवर कित्येक शतकें नॉर्वेच्या राजांचें आधिपत्य होतें. या लोकांनीं आइसलंड बेटांत आणि ग्रीनलंड बेटाच्या कांहीं भागांत वसाहती केल्या आणि तेथून ते लोक उत्तर अमेरिकेंत शिरले. या लोकांच्या कांहीं वसाहती रशिया देशांतहि झाल्या आणि कॉन्स्टॅंटिनोपल येथें व्हॅरँगर गार्डमध्यें हे लोक असत.

**व्हायोलिन**—हें एक तंतुवाद्य आहे. अशा तऱ्हेचें वाद्य प्रथम १५ व्या शतकांत प्रचारांत आलें व तें सुमारें २०० वर्षे लोकप्रिय राहिलें. याचे पूर्वी निरनिराळे चार प्रकार असत व त्यांस सामान्यतः सहा तारा असत. यांचा सूर बहुधा चौथा

असे आणि तिसऱ्या व चौथ्या तारांच्या दरम्यान एक तिसऱ्या सुरांत बसविलेली तार असे. या वाद्याचा आकार हळूहळू बदलत जाऊन त्याच्या तारांची संख्या चारावर आली. आणि तें पांचव्या सुरावर आधारलेल्या सुरांत लावण्यांत येऊं लागलें. हें नवीन तऱ्हेचें वाद्य प्रथम १६ व्या शतकाच्या मध्यांत इटलीमध्यें तयार करण्यांत आलें. या वाद्याच्या कारागिरांचें महत्त्वाचें ठिकाण इटलींतील क्रेमोना हें गांव होतें. त्या ठिकाणीं आमाटी कुटुंबामध्यें चार पिढ्यांत ही कला चालू होती. या वाद्यांत पुढें ग्वानिॅरी आणि स्ट्राडीव्हरी यांनीं सुधारणा करून तें पूर्णत्वास आणलें. यानंतर या वाद्यांत फारसा बदल झाला नाहीं व ४०० वर्षांच्या पूर्वीसारखेंच आजचेंहि वाद्य आपणांस आढळतें. हें वाद्य वाजविण्यास लागणारा गज पूर्वी ओबडधोबड असे. परंतु फ्रँका तूर्त (१७४७-१८३५) यानें त्यांत बरीच सुधारणा करून तो पूर्णतेस नेला.

**व्हालपेरेसो**—हें चिली देशांतलें शहर व बंदर असून, तें दक्षिण अमेरिकेंतील पश्चिम किनाऱ्यावरचें सर्वांत मोठें व महत्त्वाचें बंदर आहे. हें शहर समुद्रानजिकच्या टेंकड्यांवर वसलेलें आहे आणि या बंदरांत अतिशय मोठालीं जहाजें येऊं शकतात. येथें एक औद्योगिक विद्यापीठ १९२० सालीं स्थापन झालेलें आहे. अनेक देशांत जाणाऱ्या बोटी या बंदरांतून सुटतात. येथें अनेक प्रकारचे लहान लहान कारखाने आहेत. हें शहर १५३६ सालीं स्थापन झालें. पण भूकंपामुळें अनेक वेळां या शहराला आपत्ती भोगाव्या लागल्या आहेत. लो. सं. (१९४०) २,१५,६१४ आहे.

**व्हिएन्ना**—ऑस्ट्रियाची राजधानी. हें युरोपांतील प्रसिद्ध शहर डॅन्यूब नदीच्या कांठीं वसलें आहे. जुन्या शहराभोंवतीं नवीन भाग तयार होऊन शहर अफाट पसरलें आहे. प्रेटर ही सार्वजनिक बाग युरोपांत अत्युत्कृष्ट म्हणून समजली जाते. येथें अनेक जुनीं चर्च-देवस्थानें दिसतील. जुना राजवाडा, पार्लमेंट सभागृह, न्यायालय, पदार्थसंग्रहालयें, ऑपेरा हाउस, इ. इमारती प्रेक्षणीय आहेत. येथील विद्यापीठ १३६५ त स्थापन झालेलें आहे. रेशीम, लोंकरी व सुती कापड, यंत्रें, सायकली, शास्त्रीय उपकरणीं, वाद्यें, लांकडी सामान, कलावस्तू, रसायनें, दारू, कृत्रिम फुलें, इत्यादि येथें तयार होतात. आगगाडीनें व नदीनून वाहतूक चालते. मध्य युरोपांतलें हें प्रमुख व्यापारी केंद्र आहे. लो. सं. १९३४ सालीं १८,७४,१३०. होती पण १९४५ सालीं सुमारें चार लाखांनीं कमी झाली.

हें शहर फार प्राचीन आहे. रोमन-ऑस्ट्रोगॉथ-हूण यांच्या ताब्यांतून हें शार्लमेनकडे गेलें (७९१). १२३७ त हें साम्राज्य नगर झालें व १२७६ पासून हें हॅप्सबुर्ग राजघराण्याकडे जें होतें तें १९१८ त ऑस्ट्रियन बादशाही नष्ट होईपर्यंत. दुसऱ्या महायुद्धानंतर चार राष्ट्रांच्या आधिपत्याखालीं हें आहे.

**व्हिक्टोरिया** (१८१९-१९०१)—ग्रेटब्रिटन आणि आयर्लंड या देशांची राणी व हिंदुस्थानची पहिली आंग्ल सम्राज्ञी. इंग्लंडचा राजा चौथा विल्यम वारल्यानंतर १८३७ सालीं गादीला वारस ही झाली. पण स्त्री असल्यामुळें हॅनोव्हरचें राज्य हिच्या चुलत्याला मिळालें. राज्यावर बसल्यानंतर लग्न होईपर्यंत मुख्य प्रधान लॉर्ड मेलबोर्न याच्या तंत्रानें ही चाले.

पुढें १८६१ त नवरा वारल्यावर हिचें लक्ष राज्यकारभारांत फारसें राहिलें नाहीं. ती लंडनमध्यें फार करून राहत नसे. हिला नऊ मुलें झालीं. वडील मुलगी जर्मनीची सम्राज्ञी झाली व मुलगा युवराज एडवर्ड हिच्यामागून गादीवर बसला. १८८७ व १८९७ या सालीं हिच्या राज्याभिषेकाचे सुवर्ण व हीरक महोत्सव सर्व ब्रिटिश साम्राज्यांत झाले. नंतर लगेच बोअर युद्ध सुरू झालें. पण तें हिच्या जिवंतपणींच यशस्वी झालें. हिची कारकीर्द फार मोठी असली तरी साधारण स्वास्थ्याची व सुधारणांची म्हणतां येईल. शरीरानें बळकट, मनानें खंबीर, धार्मिक प्रवृत्तीची, स्वतंत्र विचारांची पण सनदशीर मार्गांचा अवलंब करणारी अशी ही थोर व्यक्ति इंग्लंडच्या राजघराण्यांत होऊन गेली.

**व्हिक्टोरिया क्रॉस**—हें वीरश्रीचें पदक देण्याची सुरुवात क्रिमियन युद्धानंतर १८५६ पासून करण्यांत आली. युद्धामध्यें विशेष शौर्याचें कृत्य करणाऱ्या सैनिकाला हें पदक देण्यांत येतें. हें पदक ब्राँझ धातूचें केलेलें असून त्यावर क्रॉसचें चिन्ह आहे. सेबास्टपूल येथें हस्तगत केलेल्या एका तोफेच्या धातूचें हें पदक बनवलेलें आहे. १९१८ पूर्वी या पदकाला जी फीत लावीत असत त्या फितीचा रंग नाविक दलांतील वीरांच्याकरितां निळा आणि इतर लष्करी वीरांकरितां तांबडा असे. पण हल्लीं तिन्ही प्रकारच्या दलांतील वीरांकरितां तांबडा रंगच असतो. १९१८ सालापासून व्हिक्टोरिया क्रॉसचीं लहान आकाराचीं पदकें देण्यास सुरुवात झाली. हिंदी लष्करांतील हिंदी अधिकारी व सैनिक यांनाहि व्हिक्टोरिया क्रॉस मिळण्यास लायक १९१२ पासून ठरवण्यांत आलें. १८५६ पासून १९१४ पर्यंत सुमारें ५२२

व्हिक्टोरिया क्रॉस देण्यांत आले. पहिल्या महायुद्धांत ५८१ व्हिक्टोरिया क्रॉस देण्यांत आले.

पहिला हिंदी व्हि. क्रॉ. मिळविणारा शिपाई खुदादादखान (१२९ ड्यूक ऑफ कॅनॉट्स ओन बलुचीज आतां ४।१० बलुची युनिट) होता. दुसऱ्या महायुद्धांत पहिला हिंदी व्हि. क्रॉ. मिळविणारा सेकंड लेफ्टनंट (नंतर मेजर) प्रेमींद्रसिंघ भगत (रॉयल चांबि सॅपर्स अँड मायनर्स) होता. अगदीं लहान वयाचा व्हि. क्रॉ. मिळविणारा शिपाई कमलराम (वय २० वर्षें) १८ व्या पंजाब रेजिमेंटमधील आहे.

युनायटेड किंग्डमच्या खालोखाल ब्रिटिश साम्राज्यांत हिंदुस्थाननेंच जास्त व्हि. क्रॉ. मिळविले आहेत.

**व्हिक्टोरिया धबधबा**—आफ्रिका, ऱ्होडेशिया, झांबेझी नदीवरचा धबधबा. हा १८५५ त लिव्हिंग्स्टननें शोधून काढला. या ठिकाणीं सुमारें एक मैल रुंदीची नदी ३४० फुटावरून खालीं पडते. येथें नदीवर मोठा आगगाडीचा पूल बांधला आहे.

**व्हिक्टोरिया सरोवर**—व्हिक्टोरिया निआंझा. हें पूर्व आफ्रिकेंत हिंदी महासागरापासून आंत सुमारें ४०० मैलांवर आहे. याचें क्षे. फ. २६,८२८ चौ. मै. व समुद्रसपाटीपासून उंची ३,८०० फूट आहे. आल्बर्ट सरोवराशीं व्हिक्टोरिया नाइल या नदीप्रवाहामुळें हें जोडलें गेलें असून श्वेत नाइल नदीला यापासून पाणी मिळतें. या सरोवरांत पुष्कळ बेटें आहेत. यावर मालकी ब्रिटिश आफ्रिकेची आहे.

**व्हिक्टोरिया संस्थान**—हें संस्थान ऑस्ट्रेलियन कॉमनवेल्थमध्यें आग्नेय बाजूस पॅसिफिक महासागराजवळ आहे. क्षे. फ. ८७,८८४ चौ. मैल व लो. सं. (१९४४) १९,९७,८०४ आहे. त्याशिवाय सुमारें ४,००० चिनी आणि ५०० आदिवासी लोक आहेत. राजधानीचें शहर मेलबोर्न येथें एकंदर लोकसंख्येपैकीं निम्म्याहून अधिक वस्ती आहे. शिवाय बालारात, गीलाँग व बेंडिगो हीं प्रमुख शहरें आहेत. येथें ऑस्ट्रेलियन आल्प्स (अत्युच्च शिखर माउंट बोगोंग ६,५०८ फूट), दि ग्रेट डिव्हायडिंग रेंज आणि ग्रॅम्पीयन्स हे पर्वत; आणि मिटा-मिटा, ओव्हेन्स, गौलबर्न, स्नोई, यारा, मिचेल व ग्लेनेलग या नद्या आहेत. येथें सुमारें ५५ लाख एकर जमीन जंगलमय आणि १४० लाख एकर शेतीची जमीन आहे. येथें गहूं, ओट, बार्ली, साखरबीट, द्राक्षें व इतर फळें होतात. गुरे व मेंढ्या पाळण्याचा धंदा फार महत्त्वाचा आहे व येथें दरसाल ५० लाख पौंड किंमतीची लोंकर आणि १६ कोटी पौंड किंमतीचें लोणी तयार होतें. येथून सोनें, लोंकर, अन्नधान्यें, लोणी, कातडीं, गोठवलेलें मांस, इत्यादि माल परदेशीं जातो. येथें प्रथम वसाहत १८३४ सालीं झाली व १८५५ पासून येथें जबाबदार राज्यपद्धति सुरू झाली. हल्लीं येथील राज्यकारभार गव्हर्नर ३४ सभासदांचें कौन्सिल व ६५ सभासदांची असेंब्ली यांच्या मतानुसार चालवतो. येथें एक युनिव्हर्सिटी व निरनिराळ्या विषयांचीं कॉलेजें आहेत. शिक्षण ६ ते १४ वर्षांपर्यंत सक्तीचें व मोफत आहे. स्त्रियांकरितां स्वतंत्र कॉलेज आहे. १९४४ सालीं या संस्थानचें एकंदर उत्पन्न ३,६४,२७, ८१४ पौंड आणि खर्च ३,५८,०७,५०३ पौंड झाला.

**व्हिग पक्ष**—हें नांव प्रथम प्रेस्बिटेरियन पंथापैकीं अत्यंत कट्टर गटाला तिरस्कारपूर्वक देण्यांत आलें होतें. नंतर राजाचा ईश्वरी हक्क (डिव्हाइन राइट ऑफ किंग्ज) या तत्त्वाला विरोध करणारा जो पक्ष होता, त्याला उपहासपूर्वक हें नांव देण्यांत आलें. या व्हिग पक्षानें ड्यूक ऑफ यॉर्क (२ रा जेम्स) याला राजा मान्य करण्याऐवजीं दुसरी वारसपरंपरा मान्य केली. पहिला जॉर्ज हा इंग्लंडचा राजा झाल्यावर हा व्हिग पक्ष अधिकारारूढ झाला आणि तो अधिकार या पक्षाकडे कायम राहणार असें दिसूं लागलें. एक व्हिग पक्षाचें प्रधानमंडळ मोडलें तर दुसरें याच पक्षाचें प्रधानमंडळ राजा बनवीत असे. याचप्रमाणें व्हिग पक्षाच्या मंडळांची परंपरा ३ रा जॉर्ज या राजाच्या कारकीर्दीपर्यंत चालली. त्या राजाच्या कारकीर्दींत ह्या व्हिग पक्षांत अनेक उपपक्ष व लहान लहान गट निर्माण होऊन, तो पक्ष फुटला. १८३२ सालचा रिफॉर्म ॲक्ट व्हिग प्रधानमंडळानें मंजूर केला. यानंतर लवकरच व्हिग हें नांव जुनें म्हणून मागें पडून ह्याच पक्षाला लिबरल हें नवें नांव देण्यांत आलें.

**व्हिटमन, वॉल्ट** (१८१९-१८९२)—एक अमेरिकन कवि. त्याचें मुख्य पद्यलेखन आहे तें: 'लीव्हज् ऑफ ग्रास' (गवताचीं पानें) आणि 'ड्रम टॅप्स'. त्याचें गद्यलेखन आहे तें: 'डेमोक्रॅटिक व्हिस्टाज'; 'स्पेसिमेन डेज ॲण्ड कलेक्ट' आणि 'नोव्हेंबर बौज'. याची लेखनशैली फार बोजड व वेंधळी होती तरी तींत त्याचें व्यक्तिमत्त्व उठून दिसे.

**व्हिन्सी, लिओनार्डो डा** (१४५२-१५१९)—हा इटालियन चित्रकार, शिल्पकार, खोदकलाकार, सिव्हिल व मिलिटरी एंजिनिअर आणि शास्त्रीय संशोधक होता. १४८२ सालीं मिलनच्या ड्यूकनें त्याला एंजिनियरचीं कामें करणें व चित्रें काढणें या दोन प्रकारच्या नोकरीवर नेमलें. पुढे १४९९ सालीं १२ वा लुई यानें मिलन शहर काबीज केल्यावर लिओनार्डो हा फ्लॉरेन्स येथें राहूं लागला. १५०२ सालीं त्याला पोपच्या सैन्याचा मुख्य एंजिनियर व शिल्पकार (आर्किटेक्ट) नेमण्यांत आलें. त्याचीं सुप्रसिद्ध चित्रें आहेत तीं : 'लास्ट सपर', 'लॉ गिओकोंडा', वगैरे. त्याचे ग्रंथ आहेत त्यांपैकीं 'ट्राटाटो डेला पिट्युरा' हा १६५१ सालीं छापला गेला; त्यांत चित्रकलेचीं तत्त्वें प्रतिपादन करून शिवाय चित्रें काढण्याची व्यावहारिक माहिती दिली आहे.

१७९७ सालीं त्याच्या गणितविषयक ग्रंथांचे कांहीं भाग पॅरिस येथें प्रसिद्ध करण्यांत आले, व त्यामुळें लिओनार्डोबद्दल फार कुतूहल निर्माण झालें. हवामानशास्त्रविषयक (एरोनॉटिक्स) संशोधन करणारा लिओनार्डो हा एक आद्य संशोधक म्हणतां येईल.

**व्हिर्चौ, रुडोल्फ** (१८२१–१९०२)—एक जर्मन शास्त्रज्ञ. त्यानें वैद्यक शास्त्रांत पुष्कळ उपयुक्त भर घातली. विशेषतः शोथघ्न, व्रण, क्षय, वगैरे बाबतींत त्यानें केलेलें संशोधन अतिशय उपयुक्त आहे. शिवाय त्यानें दवाखान्यांची सुधारणा व आरोग्यशास्त्र या विषयांतहि स्वतःच्या वजनानें पुष्कळ सुधारणा घडवून आणली. त्यानें पुष्कळ महत्त्वाचे ग्रंथ लिहिले. त्यांपैकीं पेशीय रोगनिदान (सेल्युलर पॅथॉलॉजी) हा ग्रंथ फार महत्त्वाचा आहे.

**व्हिलोजिसीझ (पहिला)**—एक इराणी बादशहा. इराणचें रोमशीं प्रत्यक्ष युद्ध पहिल्या व्हिलोजिसीझच्या वेळीं (इ. स. ५१–७७) सुरू झालें. यानें आपला भाऊ टिरिडेटिझ यास आर्मीनियाच्या गादीवर बसविलें होतें. कांहीं काळपर्यंत युद्ध होऊन इ. स. ६३ मध्यें या दोन राष्ट्रांत तह झाला. या तहान्वयें आर्मीनियावर रोमची सत्ता प्रस्थापित झाली, तथापि टिरिडेटिझ यास आर्मीनियाचा राजा म्हणून मान्यता मिळाली. दाइ व साकि शक लोकांच्या हल्ल्यामुळें व्हिलोजिसीझला रोमविरुद्ध केलेल्या लढाईंत फार अडथळा झाला. हिर्केनिया देश स्वतंत्र झाला. यानंतर लवकरच दक्षिण रशियांतील ॲलन नांवाचे इराणी लोक–सध्यांच्या ओसेट लोकांचे पूर्वज–यांनीं कॉकेशस पर्वताच्या घाटांतून येऊन मीडिया व आर्मीनिया हे देश उध्वस्त केले व पुढील शतकांत यांनीं वारंवार स्वाऱ्या केल्या. येणेंप्रमाणें पूर्वेकडील प्रदेशांत व्हिलोजिसीझची बरीच नुकसानी झाली. याच राजाच्या कारकीर्दींत ग्रीक संस्कृतीविरुद्ध पौरस्त्य संस्कृतीच्या प्रतिक्रियेस जोर आला. दुसरा आर्टाबेनस (इ. स. १०) व त्याच्यामागून जे आर्सेसिडी राजे होऊन गेले त्यांचें पूर्वीच्या राजांप्रमाणें पौरस्त्य रिवाजांकडेच जास्त लक्ष होतें. सिल्यूशिआ शहराच्या ग्रीक संस्कृतीस प्रतिस्पर्धी म्हणून टेसिफॉन, व्हिलोजीसॉर्टा (वालाष्कर्ट), व्हिलोजिसिअस हीं शहरें वसविण्यांत आलीं.

**व्हिल्ना**—(व्हिलिनिअस). हें शहर लिथुआनिआची राजधानी व्हिलिका व व्हिलिया या दोन नद्यांच्या संगमावर वसलेलें आहे. लो. सं. (१९३१) २०,७५,०५० असून, त्यापैकीं पुष्कळसे लोक ज्यू आहेत. येथें तमाखू, हातमोजे व इतर विणलेले कपडे करण्याचे कारखाने आहेत. येथून धान्यें व इमारती लांकूड यांचा मोठा व्यापार चालतो. व्हिल्ना शहर १३२२ ते १७९५ पर्यंत लिथुआनिआची राजधानी होतें. पुढें लिथुआनिआ हा देश रशियन साम्राज्यांत सामील करण्यांत आला. पहिलें महायुद्ध संपल्यानंतर रशियन साम्राज्य नष्ट झालें. आणि या शहरावर पोल लोक आणि लेट लोक हे दोघेहि हक्क सांगूं लागले. १९२० सालीं पोल लोकांनीं या शहराचा ताबा घेतला, तेव्हां राष्ट्रसंघानें या शहराबद्दलचा तंटा मिटविण्याचे अनेक प्रयत्न केले, पण ते निरर्थक ठरले. १९२३ सालीं हें शहर अँबॅसडर्सच्या कौन्सिलनें पोलंडला दिलें. परंतु लिथुआनिआ सरकारनें तो निर्णय केव्हांहि मान्य केला नाहीं.

**व्हिशी**—हें फ्रान्समधील एक शहर असून तें तेथील क्षार जलाकरितां (थर्मल अल्कलाइन स्प्रिंग्ज) प्रसिद्ध आहे. हें पाणी बाहेर बरेंच पाठविलें जातें. या ठिकाणीं दरसाल सुमारें अर्धा लाख लोक येऊन जातात. लो. सं. २२,२०७ आहे.

**व्हीनस देवता**—ही रोमन लोकांची प्रेमदेवता आहे. हिलाच ग्रीक लोक आफ्रोडायटे असें म्हणत असत. ही देवता झ्यूस व डायोने या दोन देवतांची कन्या असें तिचें वर्णन, होमरच्या ईलियडमध्यें आहे. ही देवता यूरेनस देवतेचें अपत्य आहे असें हेसीइड यानें प्रतिपादिलें आहे. ही देवता इतर सर्व देवतांहून अधिक सुंदर आहे, आणि त्यामुळें पॅरिस राजानें अत्यंत सौंदर्यवानाला अर्पण करण्याचें ॲपल फळ या देवतेला अर्पण केलें. ही देवता समुद्रामधून उत्पन्न झाली, या कल्पनेला अनुसरून फिडीयस या सुप्रसिद्ध मूर्तिकारानें ऑलिम्पिया येथें झ्यूस देवदेच्या मूर्तीच्या बैठकीवर व्हीनस देवतेचें तशा प्रकारचें चित्र काढलें आहे. अशाच प्रकारचें चित्र आपेलस या चित्रकारानें काढलें असून तेंहि अतिशय प्रसिद्ध आहे.

**व्हेनिस**—इटली, एक प्रमुख बंदर. हें ॲड्रियाटिक समुद्राच्या वायव्येकडील बेळक्यांत आहे. लहान लहान बेटांवर हें वसलें असून, एका मोठ्या आगगाडीच्या पुलानें मुख्य जमिनीला जोडलें गेलें आहे. शहरांत कालव्यांचे अनेक फांटे असून त्यांवर ३०० पेक्षां जास्त पूल आहेत. शहराचा मुख्य भाग म्हणजे पिआझा होय. सेंट मार्कचें देवस्थान १० व्या शतकांत बांधलेलें आहे. अनेक राजप्रासाद व सरकारी इमारती आहेत व त्यांवरचें शिल्प प्रेक्षणीय आहे. लोकरीचें कापड, जरतारी कापड, मखमल, रंगीबेरंगी कांचा, जवाहीर, वगैरे येथें तयार होतात. परदेशांशीं मोठा व्यापार चालतो. बंदर फार विस्तृत आहे. लो. सं. (१९३६) २,६४,०२७. येथें एक विद्यापीठ आहे.

हें शहर पांचव्या शतकांत ॲटिलाच्या निर्वासितांनीं स्थापन केलें. धर्मयुद्धामुळें नौकानयन वाढलें व लोकांना खूप पैसा मिळाला. व्हेनिसचें आरमार फार पराक्रमी असे. १५ व्या शतकाच्या अखेरीस हें सबंध युरोपचें व्यापारी केंद्र होतें. पुढें व्हेनिसची राजसत्ता कमी होऊं लागली. नेपोलियनच्या सत्तेखालीं तें ऑस्ट्रियन साम्राज्यांत ढकललें गेलें. गेल्या शतकाच्या उत्तरार्धांत इटलीच्या राज्याशीं हें जोडण्यांत आलें तें अद्याप आहेच.

**व्हेनेझुएला**—दक्षिण अमेरिकेंतील अगदीं उत्तरेचें लोकसत्ताक संस्थान. याच्या उत्तरेस व पूर्वेस कॅरिबिअन समुद्र व अॅटलांटिक महासागर असून दक्षिणेस व पश्चिमेस ब्राझील व कोलंबिया हीं संस्थानें आहेत. दक्षिणेकडील अधो प्रदेश अरण्यमय आहे व मध्यभागीं गवताचीं विपुल मैदानें आहेत. उत्तरेकडील डोंगराळ प्रदेशांत अत्यंत सुपीक व दाट लोकवस्तीचीं खोरीं आहेत. सर्व प्रकारची हवा देशाचे विविध भागांतून आढळते. कॉफी, कोको, ऊंस, मका व कापूस यांची लागवड होते. रबर, बटाटा, व्हॅनिला, वगैरे जंगलापासून मिळणाऱ्या पदार्थांत मुख्य आहेत. चराऊ कुरणांची विपुलता आहे. खनिज पदार्थांत पेट्रोलिअम्, अस्फाल्ट, सोनें व तांबें हे महत्त्वाचे आहेत. मोत्यांचीहि पैदास कांहीं ठिकाणीं होते. भाषा स्पॅनिश असून वस्ती युरोपिअन, इंडिअन व निग्रो लोकांची आहे. इ. स. १५२७ पासून हें स्पेनच्या अमलाखालीं होतें. १८३० पासून स्वतंत्र आहे. क्षेत्रफळ ३,५२,१७० चौ. मै. व लो. सं. ३८,२९,७४७.

**व्हेरोनाल**—मॅलो-युरियाचें व्यापारी नांव. हें पांढरें शुभ्र स्फटिकमय असून पाण्यांत विरघळतें. हृदयाच्या विकारानें किंवा अन्य कारणानें निद्रानाश झाला असल्यास त्यावर हें देतात.

**व्हेलचरबी**—(स्पर्मासेटी). ही एका जातीच्या व्हेल माशाच्या कवटीमध्यें असते. हा मासा जिवंत असेपर्यंत ही चरबी एका प्रकारच्या तेलासारख्या द्रवामध्यें विद्रुत असते. त्या माशाच्या कवटींतून बाहेर काढल्यावर हवा लागून ती घट्ट बनते व त्या तैल द्रवापासून वेगळी होते. या चरबीपासून मेणबत्त्या तयार करतात.

**व्हेलास्केझ, डाएगो रॉड्रिगेझ डा सिल्व्हा** (१५९९–१६६० )—एक स्पॅनिश चित्रकार. तो ४ था फिलिप राजा याच्या दरबारीं चित्रकार होता; व त्यानें स्पॅनिश राजाचीं अनेक चित्रें काढलीं; त्यांपैकीं दोन चित्रें नॅशनल गॅलरींत आहेत. १६२९ सालीं इटलींत जाऊन त्यानें टिटियन, टिटोरेटो, व मायकेलेंजेलो या प्रसिद्ध चित्रकारांच्या चित्रकलेचा अभ्यास केला; आणि १६३१ सालीं स्पेनला परत येऊन ४ था फिलिप राजा व राणी यांचीं अश्वारूढ चित्रें काढलीं. १६४९ सालीं रोम शहरीं त्यानें १० वा इनोसंट पोप याचें उत्तम चित्र काढलें. त्याशिवाय त्याचीं अनेक उत्तम चित्रें आहेत.

**व्हेसुव्हियस**—दक्षिण इटली, एक ज्वालामुखी पर्वत. हा नेपल्सच्या आग्नेयीस दहा मैलांवर एका २३०० फूट उंचीच्या टेंकडीच्या मध्यभागीं आहे. या शंक्वाकार ज्वालामुखी पर्वताची उंची या मैदानापासून १,९०० फूट आहे. हा पर्वत शंकु २,००० फूट व्यासाचा व ५०० फूट खोलीचा भरेल. याच्यापलीकडे उत्तरेस एक उभा डोंगराचा कडा असून दोहोंमध्यें एक खोल दरी आहे. हा ज्वालामुखी अगदीं मागें म्हणजे इ. स. ६३ मध्यें जागृत झाल्याची नोंद आहे. इ. स. ७९ मध्यें तर हर्क्युलानियम आणि पॉंपी हीं शहरें यानें गडप करून टाकिलीं. १६३१ सालीं १८,००० लोकांचे जीव घेतले. यानंतर १९०६ पर्यंत अनेक वेळां आजच्याप्रमाणें यानें आपलें तोंड उघडलें आहे. तारेवरील आगगाडीनें याच्या तोंडापर्यंत जाण्याची सोय झालेली आहे.

**व्होरोनोफ, डॉ. सर्ज** (१८६७–      )—हा एक रशियन इंद्रियविज्ञानशास्त्रज्ञ असून ग्रंथिप्रस्थापनेमध्यें अग्रगण्य समजला जातो. पशूंच्या ग्रंथींचें प्रस्थापन करून मानवी शरीरामध्यें स्थित्यंतर घडवून आणणें व वेडेपणा वगैरे विकार दूर करणें या बाबतींत यानें केलेलें संशोधन प्रसिद्ध आहे.

**व्होल्गा नदी**—ही युरोपांतील सर्वांत लांब नदी रशियांत असून ती व्हाल्डाई टेकड्यांमध्यें उगम पावून कास्पियन समुद्राला सुमारें ७० मुखांनीं मिळते. हिची लांबी २,४०० मैल आहे. तिला कामा व ओका व इतर अनेक लहान लहान नद्या मिळतात. या नदीपासून अनेक कालवे काढलेले असून त्यामुळें ही नदी काळा समुद्र, कास्पियन समुद्र, आणि उत्तर ध्रुव समुद्र यांना जोडली गेली आहे. या नदींत सालमन, स्टर्जन, पाईक व कार्प या जातींचे फार मोठाल्या आकाराचे मासे विपुल सांपडतात. या नदींतून लहान लहान बोटी तिच्या अगदीं उगमापर्यंत जातात.

**व्होल्ट**—विजेची शक्ति अथवा विजेचा दाब मोजण्याचें जें व्यवहारांतील मूलमान आहे त्यास व्होल्ट असें म्हणतात. याचा संबंध विद्युत्प्रवाहाचें मूलमान (अॅम्पीयर) आणि विद्युत्प्रतिरोधाचे मूलमान (ओव्हम) यांच्याशीं असतो. तेव्हां १ व्होल्ट विद्युद्दाव म्हणजे १ ओव्हम प्रतिरोध असतां १ अॅम्पीयर विद्युत्प्रवाहाची गति हा होय. यांचें प्रमाण $\frac{1}{10}$, १०⁸ आणि १०⁹ असें मूल प्रमाणाशीं असतें.

**व्होल्ट घट-पात्र**—(व्होल्टाइक सेल). रासायनिक शक्तीचें विद्युच्छक्तीमध्यें प्रत्यक्ष रूपांतर करण्याकरितां जें उपकरण वापरण्यांत येतें त्यास व्होल्ट घट असें म्हणतात. यामध्यें जस्त आणि तांबें यांसारख्या दोन भिन्न धातूंचे तुकडे असतात. व ते एका गंधकाम्लासारख्या विद्युद्वाहकामध्यें बसविलेले असतात. या धातूंच्या पत्र्यांचीं टोकें तारेनें जोडल्याबरोबर विद्युन्मंडलांत विद्युत्प्रवाह सुरू होतो. व त्याची दिशा अम्लामध्यें जस्ताकडून तांब्याकडे असते. विद्युत्प्रवाह सुरु झाला म्हणजे जस्त द्रव पावतें आणि तांब्याच्या पत्र्याशीं उज्ज वायूचे बुडबुडे दिसूं लागतात. लॅकलँच याच्या घटामध्यें विद्युद्वाहक म्हणून अम्र हरिद (अमोनियम क्लोराइड) वापरण्यांत येतें व त्यांत एक जस्ताचा दांडा ठेवण्यांत येतो. व तांब्याच्या पत्र्याऐवजीं कर्बाचा दांडा योजून त्याच्याभोंवतीं मंगल द्विप्राणिद (मॅंगॅनीज पेरॉक्साइड)

एका सच्छिद्र पात्रांत बसविलेलें असतें. डॅनियलच्या घटामध्यें ताम्रगंधकिताच्या द्रवांत तांब्याचा पत्रा आणि गंधकाम्लामध्यें किंवा जसद गंधकिताच्या द्रावणामध्यें जस्ताचा पत्रा बसविलेला असतो व त्यामध्यें एक सच्छिद्र विभाजक पडदा असतो. त्यामध्यें ताम्रगंधकिताचा पुरवठा चालू राहिला असतां ऋण ध्रुवाजवळ उज्ज वायूच्याऐवजीं तांबें जमत राहतें.

**व्होल्टा, अलेसांड्रो** (१७४५–१८२७)— एक इटालियन पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. यानें विद्युत्स्फुरक (एलेक्ट्रोफोरस) व विद्युद्दर्शक (एलेक्ट्रोस्कोप) यंत्राचा शोध लावला व इतर अनेक विजेचीं साधनें यानें तयार केलीं. १८०० मध्यें केलेला विद्युद्राशीचा शोध याच्याच नांवानें प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणें 'व्होल्टिक बॅटरी'ची गोष्ट सांगतां येईल.

**व्होल्टेअर, फ्रान्स्वा मारी** (१६९४–१७७८)—प्रख्यात फ्रेंच लेखक. लहानपणीं हा पॅरिसमध्यें होता व पुढें तीन वर्षे (१७२६–२९) इंग्लंडमध्यें राहिला. नंतर सिरेलरेन व पॉट्सडॅम येथें कांहीं वर्षे काढून १७५४ नंतर तो स्वित्झर्लंडमध्येंच कायमचा जाऊन राहिला. पॉट्सडॅम येथें तो फ्रेडरिक दि ग्रेट बादशहाचा पाहुणा होता. त्याच्या ओळखी युरोपभर मोठमोठ्या साहित्यिकांशीं आणि राजपुरुषांशीं होत्या. काव्य, नाट्य, कादंबरी, इतिहास, तत्त्वज्ञान व शास्त्रेंदेखील त्याच्या लेखनांतून सुटलीं नाहींत. समाजांतील धर्मवेड आणि पुराणप्रियता यांवर त्याचा मोठा कटाक्ष असे. त्याच्या खोंचदार लिहिण्यामुळें धार्मिक लोक आणि उपाध्याय–वर्ग दुखावला जात असे. फ्रेंच राज्यक्रांतीला त्यानें आपल्या जाज्वल्य सुधारकी लेखनानें वाट करून दिली असें सांगण्यांत येतें. 'झाडिग', 'कान्दीद', 'लॅन्जेन्यु' या त्याच्या तत्त्वज्ञानी कादंबऱ्या, 'चौदाव्या लुईचें युग', 'बाराव्या चार्लसचा इतिहास' यांसारखीं ऐतिहासिक पुस्तकें, त्याचीं पत्रें, काव्यें इ. वाङ्मयानें त्याला चिरंजीव कीर्ति मिळवून दिली. त्याची लेखनशैली डौलदार व व्याजोक्तिपूर्ण असे. 'हानरिआद' हें त्याचें महाकाव्य फार परिणामकारक झालें.

**व्लाडिव्होस्टॉक**—हें पूर्व सायबेरियांतलें मुख्य बंदर आहे. पूर्वी येथें पॅसिफिक महासागरांतील रशियन आरमाराचें मुख्य ठाणें होतें. यूसुरी रेल्वे व मांचूरियन रेल्वे ह्यांचें हें शेवटलें स्टेशन आहे. हें बंदर निसर्गतःच फार भव्य व मोठें आहे. १९२६ सालीं हें बंदर 'फ्री पोर्ट' बनवण्यांत आलें. ट्रॅन्स–सायबेरियन रेल्वे येथें संपते. लो. सं. सुमारें दोन लाख आहे.

---

## श

**श**—या वर्णाच्या पांच अवस्था आढळतात. पहिली अशोकाच्या खालसी शिलालेखांत; दुसरी इ. स. १ल्या शतकांतील मथुरा लेखांत; तिसरी इ. स. ५३२ च्या मंदसोर लेखांत; चौथी जपानांत मिळालेल्या ताडपत्री लेखांत (६ वें शतक) व पांचवी इ. स. ६६१ च्या कुंडेश्वर लेखांत प्रतीत होते.

**शक**—हे मूळचे अनार्य असून त्यांना से किंवा सिथियन असेंहि म्हणतात. यांची माहिती हिरोडोटसनें दिली आहे. हे चीनपर्यंतहि गेले होते. यांचा मूळ प्रदेश वूसूनचा पश्चिम भाग व जक्झार्टिस (सीरदर्या) नदीची उत्तर थडी होय. त्यांनीं आपला हा मूळ प्रदेश खिस्तपूर्व १६० या वर्षी सोडला. कारण त्यांना तेथून यूएची या दुसऱ्या अनार्यांनीं हांकलून दिलें. एका शक घराण्यानें सुराष्ट्रांत (काठेवाडांत) जें राज्य स्थापिलें तें दुसऱ्या चंद्रगुप्तानें इ. स. ३९० मध्यें बुडवीपर्यंत टिकलें होतें. या शकांनीं ब्राह्मणी धर्मास व संस्कृत वाङ्मयास चांगलें उत्तेजन दिलें होतें. या वंशास पाश्चात्य विद्वान् पाश्चात्य सत्रप (क्षत्रप) असें म्हणतात. तक्षशिला, मथुरा, वगैरे ठिकाणीं या सुमारास जे अनेक अनार्य सत्रप राज्य करीत होते, त्यांपैकीं कांहीं शकजातीय असावेत. तसेंच पार्थियन राजांचा व या शकांचाहि या वेळीं परस्पर संबंध असे. पुराणांत आंध्रांच्यानंतरच्या अनेक अनार्य राजवंशांच्या नामावलींत शकांचेंहि नांव येतें. मारवाड्याच्या हर्ष नांवाच्या एका राजानें पुष्कळशा शकांना हांकलून दिल्याचें ऐकण्यांत येतें. शकांचा सर्वांत मोठा राजा म्हणजे गोंडोफेरीज होय. याच्याच कारकीर्दीत थॉमस या प्रेषितानें खिस्ती धर्म हिंदुस्थानांत रुजविला असें म्हणतात.

**शंकरमिश्र** (१५ वें शतक)—एक संस्कृत टीकाकार. दरभंग्यांत सरिसव गांवीं याचा जन्म झाला. हा भवनाथमिश्र ऊर्फ अयाची दुबे याचा मुलगा व जीवनाथाचा पुतण्या. रघुदेव उपाध्याय अथवा कणाद व महेश ठक्कर हे याचे गुरु. वर्धमान उपाध्याय हा याचा शिष्य. नरेंद्रसिंहराय व शंकरमिश्र हे समकालीन होत. पुढील टीका यानें रचल्या आहेत: (१) पंडितविजय, (२) वुद्धाधिकार, (३) वेदिविनोद, (४) अभेदधिक्कार, (५) आत्मतत्त्वविवेककल्पलता (उदयनाचार्याच्या वादविवादाच्या ग्रंथावरील टीका), (६) तत्त्वचिंतामणिमयूख (गंगेशाच्या तत्त्वचिंतामणीवर टीका), (७) आनंदवर्धन (श्रीहर्षकृत 'खण्डनखण्डखाद्य' या ग्रंथावरील टीका), (८) न्यायलीलावतीकण्ठाभरण (वल्लभाचार्याच्या 'न्यायलीलावती' वर टीका), (९) त्रिसूत्रिनिबंधव्याख्या (गौतमाच्या पहिल्या तीन सूत्रांवर उदयनाचार्यांनें लिहिलेल्या टीकेवर टीका), (१०) भेदप्रकाश किंवा

भेदरत्नप्रकाश (अद्वैत वेदांतावरील टीका), (११) वैशेपिक-सूत्रोपस्कार (कणादसूत्रांवर टीका). 'गौरीदिगंबरप्रहसन' या शंकर व पार्वती यांच्या विवाहप्रसंगांवर आधारलेलें एक नाटकहि यानें रचलें आहे.

**शंकरा**—हा राग विलावल थाटांतून उत्पन्न होतो. याच्या आरोहावरोहांत मध्यम स्वर वर्ज्य असल्यानें याची जाति पाडव-पाडव आहे. वादी स्वर गांधार व संवादी निषाद आहे. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर आहे. आरोहांत अल्प ऋषभ ठेवितात. या रागाचा दुसरा एक प्रकार असा कीं, ऋषभ व मध्यम हे दोनहि स्वर वर्ज्य करतात. त्यामुळें याची जाति औडुव-औडुव होते. या प्रकारांत वादी षड्ज व संवादी पंचम ठेवितात. या रागाचें सामान्य स्वरूप विहाग रागासारखें दिसतें; पण विहागांत मध्यम स्वर स्पष्ट असल्यानें रागभेद उघड भासतो.

**शंकराचार्य** (७८८-८२०)—भारतीय तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत शंकराचार्यांइतकें दुसऱ्या कोणत्याहि तत्त्वज्ञाचें नांव प्रसिद्ध नाहीं. शंकराचार्यांचा जन्म केरळ (मलबार) प्रांतांत कालाटी या गांवीं झाला. यांच्या पित्याचें नांव शिवगुरु व आजाचें नांव विद्याधिराज असें विद्यारण्यानें दिलें आहे. वयाच्या आठव्या वर्षीच त्यांनीं वेदवेदांगांचें अध्ययन करून त्यांत प्रावीण्य संपादन केलें. त्यानंतर त्यांनीं संन्यास घेतला. नंतर गोविंद नामक आपल्या गुरूच्या आज्ञेनुसार काशी येथें जाऊन तेथें त्यांनीं ब्रह्मसूत्रांवर आपलें सुप्रसिद्ध भाष्य लिहिलें. प्रयागास त्यांची व कुमारिलभट्टाची गांठ पडली. त्यानंतर माहिष्मती येथें मंडनमिश्राचा व त्यांचा बरेच दिवस वादविवाद होऊन मंडनमिश्राचा पराजय झाला व त्यानें शंकराचार्यांचें शिष्यत्व पत्करलें. नंतर शंकराचार्यांनीं हिंदुस्थानभर प्रवास करून निरनिराळ्या धर्मसंप्रदायांच्या आचार्यांशीं वादविवाद करून आपल्या केवलाद्वैत मताची स्थापना केली. या प्रवासांत हस्तामलक, तोटक, पद्मपाद, इत्यादि प्रसिद्ध पंडितांनीं त्यांचें शिष्यत्व पत्करिलें. काश्मीर येथें जाऊन त्यांनीं शारदेच्या देवालयांतील सर्वज्ञपीठावर आरोहण केलें व अशा रीतीनें आपलें अलौकिकत्व सिद्ध केलें. आपल्या वयाच्या ३२ व्या वर्षी ते समाधिस्थ झाले. उपनिषदांत सांगितलेल्या तत्त्वज्ञानाची सर्व हिंदुस्थानभर स्थापना करणें हें शंकराचार्यांचें प्रमुख कार्य होतें. त्यांनीं शृंगेरी, द्वारका, बद्रिकाश्रम व पुरी या चार ठिकाणीं चार स्वतंत्र मठांची स्थापना केली. या पीठांवरील आचार्यांना पुढें धर्मशास्त्रनिर्णयासंबंधीं आदेश देण्याचें व हिंदु धर्म रक्षण करण्याचें कार्य करावें लागलें. आद्य शंकराचार्यांचे प्रमुख ग्रंथ म्हणजे ब्रह्मसूत्रभाष्य, दशोपनिषद्भाष्य, गीताभाष्य, उपदेशसाहस्री, अपरोक्षानुभूति, विवेकचूडामणि, इत्यादि होत. शंकराचार्यांनीं प्रतिपादन केलेलें अद्वैत मत व त्याचा जागतिक तत्त्वज्ञानावर झालेला परिणाम यांसंबंधीं 'अद्वैत' लेख पाहा.

**शंकराजी नारायण पंतसचीव** (१६५८-१७०७)—एक शिवकालीन मुत्सद्दी. पैठणकडील गांडापूरच्या देशपांडे घराण्यांत याचा जन्म झाला. मांगदरी येथील शामाजीपंत महाशब्दे याची कन्या येसूबाई यास दिली होती. शंकराजीचे वडील नारो मुकुंद हे इकडे येऊन पाइटगांवच्या जोशी-कुलकर्ण्यांचें काम पाहूं लागले. यानंतर शिवाजीनें मोरप किल्ला आपल्या ताब्यांत घेतल्यावर नारो मुकुंद यास मोरप व सुधागड किल्ल्यांचा सबनीस नेमलें. याच वेळीं शंकराजी मोरोपंत पिंगळ्याच्या पदरीं लागला. संभाजीच्या कारकीर्दींत यानें अनेक महत्त्वाचीं कामें तडीस नेल्यानें यास राज्यकारभाराचा चांगला अनुभव आला. त्यामुळें राजारामानें यास आपलें राजाज्ञापद दिलें. सन १६९० मध्यें तर हा अष्टप्रधानांतील सचीव झाला. राजाज्ञापदावर असतांना यास 'मदारुलमहाल' म्हणजे 'राज्याधार' अशी पदवी असे. यानें मोंगलांकडून प्रतापगड, राजगड व तोरणा हे किल्ले परत मिळवले. तसेंच साताऱ्यास वेढा घालणाऱ्या सर्जेखानाकडून लाख रुपये घेऊन त्यास सोडून दिलें. औरंगजेबाच्या स्वारीमुळें मराठी राज्यावर आलेल्या संकटपरंपरेंतून मराठेशाहीस वांचविण्याचें कार्य रामचंद्रपंत अमात्य व शंकराजी नारायण यांनींच हातीं घेऊन तें तडीस नेलें. राजारामानें या कामासाठीं धनाजी जाधव यास यांच्या हाताखालीं दिलें होतें. या वेळीं यांनीं जिंजीपासून साताऱ्यापर्यंतचा मुलूख शत्रूच्या मगरमिठींपासून अलित राखून व आपलें लष्करी दळणवळण याच भागांतून चालवून औरंगजेबास यशस्वी रीतीनें तोंड दिलें व जिंजीचा वेढा उठवला. पुढें शंकराजी नारायण हा ताराबाईच्या पक्षास मिळाला. बादशहाच्या कैदेतून सुटून आलेल्या शाहूस त्यानें मानलें नाहीं. शाहूकडून यास भेटावयास निमंत्रण आलें असतां हा गेला नाहीं. तेव्हां स्वतः शाहूच यास भेटण्यास आला असतां यानें हिरकणी गिळून आत्महत्या केली म्हणतात. याच्या पश्चात् याचा औरस पुत्र नारो शंकर हा अल्पवयी असल्यानें याची पत्नी येसूबाई हिनेंच सर्व कारभार पाहिला व पुढें ही शाहूस मिळाली. नंतर नारो शंकर यास सचिवपद मिळालें.

**शॅकल्टन, सर अर्नेस्ट हेन्री** (१८७४-१९२२)—ध्रुवप्रदेशाचा एक ब्रिटिश संशोधक. १९०१ सालीं स्कॉटच्या नॅशनल ॲन्टार्क्टिक एक्सपिडिशनमध्यें तो सामील झाला. १९०७ ते १९०९ सालीं ब्रिटिश ॲन्टार्क्टिक एक्सपिडिशन या सफरीचा तो कमांडर होता. व त्यानें दक्षिणध्रुवप्रदेशांत इतका ध्रुवानजीक प्रवास केला कीं, तेथून उत्तर ध्रुव तारा ९७ मैल अंतरावर राहिला होता. १९१४ ते १९१७ सालीं 'एन्डयुअरन्स' या

संशोधक बोटीचा तो कमांडर होता. १९२१ सालीं 'क्वेस्ट' नांवाच्या बोटीचा कमांडर होऊन त्यानें सफर सुरू केली, परंतु हृदयशूलाच्या रोगाला तो बळी पडला. त्याच्या ग्रंथांपैकीं 'हार्ट ऑफ दि ॲण्टार्क्टिक, अण्ड साउथ' हा प्रसिद्ध आहे.

**शंकुच्छेद**—( कोनिक सेक्शन ). एक वर्तुळ काढून त्याच्या मध्यांतून जाणाऱ्या अक्षावर एक बिंदु घ्यावा व त्यांतून जाणारी रेषा वर्तुळावरून फिरवावी; म्हणजे शंकु तयार होतो. अक्ष हा वर्तुळाला लंब असला तर त्याला काटकोन शंकु म्हणतात. अशा काटकोन शंकूच्या अक्षाला लंबछेद घेतल्यास वर्तुल, अक्षाला तिरका छेद घेतल्यास दीर्घ वर्तुल, अक्षाला समांतर छेद घेतल्यास अतिपरवलय ( हायपरबोला ), व कोणत्याहि शिरोबिंदूतून निघून वर्तुळाला छेदणाऱ्या रेषेला समांतर छेद घेतल्यास परवलय ( पॅरॅबोला ) येतो. ( आकृति पाहा ).

१. परवलय. २. अतिपरवलय. ३. दीर्घवर्तुल. ४. वर्तुल.

बिंदूंचे मार्ग ( लोसाय ) असे असले कीं त्यांचें एका स्थिर बिंदूपासून अंतर एका सरळ स्थिर रेषे( डिरेक्ट्रिक्स )पासूनच्या अंतराशीं नेहमीं १ च प्रमाण( रेशिओ ) ठेवील, तर ते मार्ग शंकुच्छेदांतील वक्रें म्हणतां येतील. जर हें प्रमाण १ संख्येहून अधिक असेल तर तें वक्र अतिपरवलय; जर १ हून कमी असेल तर तें वक्र दीर्घ वर्तुल; जर हें प्रमाण बरोबर १ असेल तर तें वक्र परवलय होईल.

**शकुंतला**—मेनका नामक अप्सरेपासून विश्वामित्रास झालेली कन्या. लहानपणीं आईनें अरण्यांत टाकून दिली असतांना पक्ष्यांनीं कांहीं काळ हिचें रक्षण केलें म्हणून हिला शकुंतला हें नांव मिळालें. पुढें कण्व ऋषींनीं तिचें पालन केलें. हिचा दुष्यंताशीं गांधर्व विवाह कण्वाश्रमांत झाला होता. पण कण्वानें तिला त्याच्याकडे पत्नी या नात्यानें पोंचविली असतां दुष्यंतानें लोकापवादास्तव तिचा प्रथम स्वीकार केला नाहीं, पण नंतर आकाशवाणीनें सांगितल्यावर केला. शकुंतलेचा पुत्र भरत होय. महाकवि कालिदासानें दुष्यंत-शकुंतलेची प्रेमकथा नाटकरूपानें उत्कृष्ट रंगविली असून तें 'अभिज्ञान शाकुंतल' नाटक सर्वमान्य झालेलें आहे व त्याचीं निरनिराळ्या भाषांतून भाषांतरें व रूपांतरेंहि झालेलीं आहेत.

**शकुन**—भविष्यकाळीं होणाऱ्या शुभाशुभ गोष्टींचें आगाऊ ज्ञान मिळविण्यासाठीं फलज्योतिष, हस्तसामुद्रिक, कौल, इ. कांहीं प्रकार आहेत. कांहीं प्राणी व पक्षी यांचें दर्शन, स्वर, हालचाली, वगैरेवरूनहि शुभाशुभ ठरवितात. ऋग्वेदांत देखील शकुन नांवाचा पक्षी शुभाशुभसूचक म्हणून येतो. चंद्र पाहून बाबिलोनी लोक भविष्य वर्तवीत. शकुनाचे कांहीं खडे असतात. शिंकाशकुन, पालीचे शकुन यांनारखें फल सांगणारें कांहीं वाङ्मयहि आहे.

**शकुनि**—गांधार देशाधिपति सुबलराजाचा पुत्र. हा गांधारीचा भाऊ होता. स्वभावानें पराकाष्ठेचा दुष्ट असून कपटद्यूत खेळण्यांत मोठा प्रवीण होता. यानेंच पांडवांच्या नाशार्थ दुर्योधनाला अनेक कपटविद्या शिकविल्या. भारतीय युद्धांत हा सहदेवाच्या हातून मृत्यु पावला.

**शक्ति ( संस्थान )**—मध्यप्रांत, जुन्या छत्तिसगड मांडलिक संस्थानांतील एक संस्थान. क्षे. फ. १३८ चौरस मैल. यांत पावसाची सरासरी ६२ इंच असून हवा साधारणपणें बिलासपूर जिल्ह्यासारखी आहे. येथील राजघराणें राजगोंड जातीचें आहे. लो. सं. ( १९४१ ) ५४,५१७. संस्थानांतील लोकांचा धंदा मुख्यत्वेंकरून शेतकीचा असून लोक छत्तिसगडी हिंदी भाषा बोलतात. सर्व वस्ती हिंदूंची ( गोंड ) असून मुसलमान लोक फारच थोडे आहेत. येथील मुख्य पीक भाताचें होय. कोशाचें व सुती विणकाम व बांबूच्या टोपल्या व चटया तयार करणें हे संस्थानांतील उद्योगधंदे होत. या भागांतील जंगल फारसें महत्त्वाचें नाहीं व खनिज संपत्तीचा अजून कोणीं शोध केला नाहीं. या संस्थानांतून बंगाल-नागपूर रेल्वे जात असून शक्ति गांव रेल्वेचें स्टेशन आहे. संस्थानचें उत्पन्न २,३८,५०० रु. आहे. आतां हें संस्थान मध्यप्रांतांत विलीन झालें आहे.

**शक्तिकुमार गुहिलोत** (राज्य. ९७७–९३ )—शालिवाहनानंतर हा मेवाडच्या गादीवर आला. आटपूर ( आहाड ) या वैभवसंपन्न शहरांत याची राजधानी होती. नरवाहन राजाचा अक्षपटलिक श्रीपति याचे पुत्र मत्तट व गुंदल यांचें यास साहाय्य मिळालें होतें. शिवाय हा स्वतःहि शूर होता. माळव्याच्या मुंजानें मेवाडवर स्वारी करून चितोड व त्याच्याआसपासचा प्रदेश जिंकून आहाड या राजधानी शहराची लूट केली त्या वेळीं मेवाडच्या गादीवर हाच असावा. याच्या पश्चात् याच्या गादीवर अंबाप्रसाद हा आला. याच्या वेळच्या वि. सं. १०३४ ( सन ९७७ ) च्या एका शिलालेखांत गुहदत्त( गुहिल )पासून याच्यापर्यंत पुरी वंशावळ मिळते.

**शक्तिप्रेपण**—( पॉवर ट्रॅन्स्मिशन ). शक्तीचें स्थानांतर निरनिराळ्या प्रकारांनीं करतां येतें; उदा., यांत्रिक, वैद्युतिक, जलप्रावाहिक, दाबित हवायुक्त प्रकार. या निरनिराळ्या प्रकारांमध्यें आर्थिक दृष्ट्या निरनिराळ्या पद्धतींच्या शक्तीचें उत्पादन निर-

निराळ्या पद्धतींत कांहीं विशिष्ट दृष्टीनें फायदेशीर पडतें. विशिष्ट ठिकाणीं नैसर्गिक गोष्टींच्या किंवा योग्य जागेच्या अभावामुळें आपणांस फायदेशीर रीतीनें शक्ति उत्पादन करतां येत नाहीं. उदा., पाण्याच्या प्रवाहाच्या शक्तीपासून वीज तयार करून ती दूरच्या शहरीं पुरवितां येते. या बाबतींत जेथें उंच जागेवर पाण्याचा पुरवठा असेल तेथेंच विजेचें उत्पादन करणें आवश्यक असतें. सामान्य औद्योगिक किंवा रासायनिक कारखान्यांत यांत्रिक शक्तीचें स्थलांतर करावें लागतें. अशा ठिकाणीं एंजिन किंवा विजेची मोटार यांपासून मिळणाऱ्या शक्तीनें एक मुख्य दांडा-लाट फिरविली जाते व तीपासून पट्टे व कप्प्या यांच्या साहाय्यानें निरनिराळीं यंत्रें चालविण्यांत येतात. अशा ठिकाणीं पक्क्या केलेल्या व मोकळ्या ठेवलेल्या कप्प्यांच्या साहाय्यानें विशिष्ट यंत्र चालू किंवा बंद करतां येतें. कापडाच्या गिरण्यांत दोऱ्यांचे पट्टे वापरतात. तथापि सांखळ्यांचे पट्टे अधिक चांगले असून त्यांची कार्यक्षमता अधिक असते. अशा तऱ्हेनें दांड्यापासून पट्ट्यांच्या साहाय्यानें शक्तीचें स्थानांतर करणें विजेच्या शक्तीच्या स्थानांतरापेक्षां फार कमी कार्यक्षम असतें. यांचें प्रमाण ४०:६५ असें असतें.

फार पूर्वी वाफेच्या यंत्रापासून डायनामोच्या साहाय्यानें कमी दाबाची वीज तयार करण्यांत येत असे. त्यानंतर जलद चालणारीं वाफेचीं यंत्रेंच अधिक उपयुक्त वाटूं लागलीं. परंतु जेव्हां वाफेच्या चक्रांच्या साहाय्यानें वीज तयार करण्यांत येऊं लागली तेव्हां पुन्हां या बाबतींत क्रांति झाली. पूर्वी तांब्याच्या तारांतून कमी दाबाची वीज पाठविण्यांत येत असे. तिच्याऐवजीं तीन तारांतून निरनिराळ्या दाबाची वीज पाठविण्यांत येऊं लागली. या तारा जमिनीच्या खालून नेण्यांत येऊन निरनिराळ्या ठिकाणीं वीज पुरविण्यांत येते. कांहीं ठिकाणीं या उलटसुलट प्रवाहापासून सरळ (डायरेक्ट) प्रवाह रूपांतरित करण्यांत येतो. सध्यां बहुतेक विजेचे प्रवाह उलटसुलट (अल्टर्नेटिंग) पद्धतीचे असतात. जहाजें चालविण्याकरितां जेव्हां शक्तीचा उपयोग करण्यांत येतो तेव्हां शक्ति-उत्पादक यंत्र फार जोराच्या गतीनें चालवावें लागतें, परंतु जहाजास गति देणारीं यंत्रें कमी वेगानें चालवावीं लागतात. याकरितां निरनिराळ्या वेगाची गति उत्पन्न करण्याकरितां निरनिराळ्या गतिचक्रां(गिअरिंग)ची योजना करावी लागते. अशा तऱ्हेचें गति बदलणारें दुसरें साधन म्हणजे जलशक्तिरूपांतरपद्धति (हायड्रॉलिक ट्रॅन्सफॉर्मर) होय. या यंत्राचे दोन भाग असतात : एका भागांत दोन केंद्रोत्सारी (सेंट्रिफ्यूगल) पंप बसविलेले असतात. यांच्यापासून दुसऱ्या भागांत पाण्याचा पुरवठा होतो. आणि त्या पाण्यापासून मुख्य गतिदायक दांड्यास गति मिळते. बाष्पचक्रांचे डायनामोच्या किंवा उलटसुलट गति उत्पन्न करणाऱ्या यंत्राच्या साहाय्यानें विजेच्या मोटारीनें मुख्य गतिदायक दांड्यास गति देण्याची योजनाहि कांहीं ठिकाणीं केलेली आढळते. ती पद्धति अमेरिकेच्या युद्धनौकांमध्यें दृष्टीस पडते.

**शक्तिहानि**—वाफेच्या इंजिनामध्यें प्रत्यक्ष उपयोगांत येणाऱ्या वाफेचें परिमाण, जें तद्दर्शक यंत्रावरील आंकड्यावरून दृष्टीस पडतें व प्रत्यक्ष त्या वाफेचें पाणी झाल्यामुळें किंवा मोजमापानें जें परिमाण दिसून येतें, या दोन परिमाणांत जें अंतर पडतें त्यास शक्तिहानि (मिसिंग क्वांटिटी) असें नांव देण्यांत येतें. ही हानि बहुतेक पडद्यांच्या(उघडझांप करणाऱ्या)जवळून जी वाफ झिरपून बाहेर पडते तीमुळें झालेली असते.

**शंकाकार वृक्ष**—(कोनिफेरेल, कोनिफर). हा एक अनावृत बीज अथवा नग्नबीज जातीच्या वृक्षांचा मोठा संघ आहे. यांचा आकार शंकूसारखा वर निमुळता होत गेलेला असतो; म्हणून यास हें नांव पडलें आहे. हे काष्ठमय असून उंच वाढतात व बहुतेक वर्षभर हिरवेगार असतात. फक्त कांहीं जातींचीं (उदा., लार्च) पानें दरवर्षी गळून पडतात. हीं झाडें समशीतोष्ण व उत्तरेकडील प्रदेशांत होतात. यांचीं मोठमोठीं अरण्यें हिमालयांत व उत्तर अमेरिकेंत पॅसिफिक महासागराकडील उतारावर आढळतात. यांचें लांकूड इतर द्विदल वृक्षांप्रमाणेंच पण त्यापेक्षां सरळ व एकजीव असतें. पानें बहुतेक सूच्याकार असतात. यांचें बीं वाऱ्याबरोबर उडून जाऊन यांचा प्रसार होतो. इमारतीच्या उपयोगी पडणाऱ्या लांकडांमध्यें या झाडांचा क्रमांक पहिला आहे.

**शंख**—१. एक बलाढ्य असुर. हा समुद्रपुत्र असून यानें सर्व देवांना भयभीत करून सोडलें होतें व वेदांचें हरण करण्यासहि हा उद्युक्त झाला तेव्हां ते लपून राहिले. तेव्हां देवांनीं विष्णूला योगनिद्रेंतून जागें करून मत्स्यावतार घ्यावयास लाविलें. विष्णूनें कार्तिक शुद्ध एकादशीस शंखाला मारून वेद प्रकट केले.

२. एक ऋषि. याच्या भावाचें नांव लिखित असें होतें. एक शंखस्मृति व दुसरी शंखलिखितस्मृति असे दोन स्मृतिग्रंथ यांच्या नांवावर आहेत.

**शंखद्रावरस**—एक आयुर्वेदीय रसायन. सैंधव ५ तोळे, सौवर्चल ५ तोळे, बिडलोण ५ तोळे, सांबरी मीठ ५ तोळे, मीठ ५ तोळे, मोरचूद १८ तोळे, फटकी ९ तोळे, नवसागर ४॥ तोळे, हिराकस २। तोळे, टांकणखार २। तोळे, सज्जीखार २। तोळे, आणि सोरा १८ तोळे, हीं सर्व एकत्र करून ऊर्ध्वनलिका यंत्रानें अर्क काढावा. तो गुल्म, उदर, शूल, अश्मरी, मूत्रकृच्छ्र, ग्रहणीरोग, अग्निमांद्य, इत्यादिकांवर गुणकारी आहे. यांत मांसजनक गुण आहेत.

**शंखभस्म**—एक आयुर्वेदीय औषध. पोटांत दुखणें, संग्रहणी, करपट ढेकर येणें, मंदाग्नि, यकृद्वृद्धि, यौवनपिटिका,

इत्यादि विकारांवर याचा अतिशय उपयोग होतो. १ ते ३ गुंजा आल्याचा रस, मध, दाडिमावलेह यांत देतात.

**शंखवटी**—एक आयुर्वेदीय औषध. यांत मुख्य औषधें चिंचाक्षार, सैंधव, पादेलोण, बिडलोण, सांबरलोण, मीठ, मिरें, सुंठ, पिंपळी, हिंग व शंखभस्म हीं असून लिंबाच्या रसांत खल करतात. अजीर्ण व शूल यांवरील हें एक प्रमुख औषध आहे. अन्नाचें पचन न होणें, पोट जड वाटणें, शौचाला साफ न होणें, इत्यादि लक्षणांवर हें औषध घेतल्यानें तावडतोब बरें वाटतें. १ ते २ गोळ्या लिंबाचा रस, आर्द्रकावलेह, अगर गरम पाणी यांत घेतात.

**शंख वाद्य**—समुद्रांत जे शंख सांपडतात त्यांपैकीं नारळा-एवढ्या आकाराचे वाद्याच्या उपयोगी असतात. शंखास वेढे पड-ण्यास जेथून आरंभ होतो त्या ठिकाणीं एक भोंक पाडतात; ह्यामुळे ह्या भोंकाचा शंखाच्या पोकळ भागाशीं संबंध येतो. ह्या भोंकावर शिलेची चौकट बसवितात व त्या चौकटींत शिंगांत जसें वाज-विण्याचें तोंड असतें तसें तोंड शंखास पाडलेल्या भोंकास जोडून बसवितात. ह्यामुळें शंख सहज फुंकतां येतो. जंगम लोक शंख वाजविण्यांत मोठे पटाईत असतात.

पुराणकालांत वीरांजवळ शंख असत व त्यांना कांहीं नांवें दिलेलीं असत; उदा., कृष्णाचा पांचजन्य, अर्जुनाचा देवदत्त, इ.. देवांपुढें शंख आणि घंटा ठेवून त्यांची पूजा करतात. घंटानाद पूजेच्या वेळीं करतात. पण शंखाचा उपयोग फक्त अभिषेकाच्या वेळीं देवावर पाणी घालण्यासाठींच करतात.

**शंखवेलवर्ग**—[ लॅ. कॉन्व्होलव्हुलासी ]. निशोत्तरवर्ग. हा एक अविभक्त पुष्पमुकुट असलेल्या द्विदल वनस्पतींचा मोठा वर्ग आहे. यामध्यें ७०० जाती आहेत. यांपैकीं निशोत्तर ही सर्वांत परिचित जात आहे.

**शंखशास्त्र**—( कॉन्चॉलॉजी ). अनेक मृदुकाय प्राण्यांच्या अंगावर जीं शिंपांसारखीं कवचें असतात त्यांचा अभ्यास ज्या प्राणिशास्त्राच्या शाखेंत केलेला असतो तीस शंखशास्त्र असें म्हणतात. या शास्त्रामध्यें बहुतेक शंखांचे तीन वर्ग पाडण्यांत येतात व ते जितक्या तुकड्यांचे बनलेले असतात त्यांवरून पाडण्यांत आलेले असतात. ते म्हणजे एकद्वारक, द्विद्वारक आणि बहुद्वारक हे होत.

**शंखाहुली**—शंखपुष्पी, शंखावली, सांखवेल. हिचें झाड लहान असतें. त्यास शंखासारखीं पांढरीं फुलें येतात. तांबडीं व निळीं फुलें येणारींहि झाडें असतात. उन्माद, ओकारी, सन्निपातोदर या रोगांत याचा रस निरनिराळ्या अनुपानांत देतात.

**शंगतिह**—एक चिनी बौद्ध प्रवासी. हा पिंग्याऊचा राहणारा असून निष्ठावंत उपदेशक होता. पश्चिम स्वर्गीय आनंदाचा अनुभव घेण्यास सांपडावा अशी त्याची उत्कट इच्छा होती. तेथें जन्म यावा म्हणून बुद्धाच्या नांवाचा जप करीत तो आपलें आयुष्य धार्मिक रीतीनें घालवूं लागला. त्यानें सर्वच प्रज्ञासूत्र म्हणजे १०,००० प्रकरणें लिहून काढावयाचा निश्चय केला होता. पवित्र वस्तूंचें दर्शन घेण्याच्या इच्छेनें व त्या स्वर्गांत जन्म व्हावा म्हणून आस्त पुण्याच्या संग्रहाकरितां तो नऊहि प्रांतांमधून लोकांना आपल्या संप्रदायाची दीक्षा देत आणि धर्म-पुस्तकें लिहीत फिरला. नंतर किनाऱ्यावर येऊन तो कलिंगास जाण्याकरितां जहाजांतून निघाला. तेथून पुढें जलमार्गानें मलाया देशास जाण्यास निघाला. या देशांतून तो पुन्हां हिंदुस्थानास जाण्याच्या इच्छेनें एका व्यापारी जहाजांत बसून येत असतां जहाज वादळांत सांपडून तो बुडून मरण पावला. या प्रसंगाची अशी एक गोष्ट सांगतात कीं, खलाशी व व्यापारी जवळच एक नाव होती ती गांठण्यासाठीं धडपडूं लागले. जहाजाचा नायक हा भाविक बौद्ध असल्यामुळें तो ह्या उपदेशकास वांचविण्या-करितां त्याला मोठ्यानें हांका मारूं लागला. पण शंगतिह म्हणाला, "मी येणार नाहीं, बाकीच्या लोकांना वांचीव." शंगतिह याचें बुद्धाच्या ठिकाणीं मन गुंतल्यामुळें, आयुष्याच्या राहिलेल्या थोड्या मुदतींतच आनंद मानून पश्चिमेकडे तोंड करून सुस्वरानें 'अमित ! अमित !' असा पवित्र नामाचा उच्चार करीत जहाजा-बरोबर त्यानें जलसमाधि घेतली. त्याचा एक अनुयायीहि अमित बुद्धाचें नांव उच्चारीत त्याच्याबरोबर मरण पावला.

**शंतनु**—सोमवंशीय जन्हु राजाचा पुत्र. याला गंगा व सत्यवती अशा दोन स्त्रिया होत्या. यास गंगेपासून भीष्म व सत्यवतीपासून चित्रांगद व विचित्रवीर्य हे पुत्र झाले. याला सत्यवतीशीं लग्न करतां यावें म्हणून भीष्मानें आमरण ब्रह्मचर्य पाळण्याची व राज्य-त्याग करण्याची थोर प्रतिज्ञा करून ती पाळली. ( गंगा, भीष्म पाहा ).

**शतपथ ब्राह्मण**—हा शुक्लयजुर्वेदाचा प्रमुख ब्राह्मण-ग्रंथ आहे. ह्याचे १०० अध्याय आहेत म्हणून ह्याला 'शतपथ' असें नांव पडलें. सर्व ब्राह्मण ग्रंथांत हा फार महत्त्वाचा व प्रसिद्ध असा ग्रंथ आहे. वाजसनेयी संहितेप्रमाणें ह्या ब्राह्मणाच्याहि दोन शाखा आहेत : एक काण्व व दुसरी माध्यंदिन. माध्यंदिन-शाखीय ब्राह्मणांत १०० अध्यायांचीं १४ कांडें आहेत. पहिल्या नऊ कांडांत वाजसनेयी संहितेंतील १८ व्या अध्यायांत सांगितलेल्या कर्मानुष्ठाना-वर सविस्तर विवेचन केलेलें आहे. हीं पहिलीं नऊ कांडें येथल्या पांच कांडांपेक्षां जुनी आहेत यांत शंका नाहीं. यांतील पहिलीं पांच कांडें एकमेकांशीं बरींचशीं संबद्ध आहेत. त्यांत वारंवार याज्ञवल्क्याला आचार्य असें संबोधून त्याचें म्हणणें प्रमाणभूत मानलें आहे. चौदाव्या कांडाच्या शेवटीं त्याला अखिल शतपथ ब्राह्मणाचा कर्ता असें म्हटलें आहे. तेंच ६ ते ९ कांडांत

याज्ञवल्क्याचें नुसतें नांवसुद्धां दृष्टीस पडत नाहीं. त्याच्याऐवजीं अग्निचयनादि कर्मासंबधानें शांडिल्य हाच प्रमाणभूत मानून त्याचे आधार दाखविले आहेत. दहाव्या कांडांतल्या अग्निरहस्याचा प्रख्यापक तो हाच शांडिल्य. ११ ते १४ हीं कांडें मागील भागाला परिशिष्टासारखीं असून शिवाय ह्यांत कांहीं अध्याय साधारणतः ब्राह्मण-ग्रंथांत न येणाऱ्या अशा विषयांवर आहेत. उदाहरणार्थ, उपनयन हा विषय; यांत विद्यार्थ्याला धार्मिक ग्रंथांचें गुरुजवळ अध्ययन करावयाचें असतें (११,५,४). स्वाध्याय हा ब्रह्मदेवाप्रीत्यर्थ यज्ञ म्हणून मानला जाई (११,५, ६-८). १३ व्या कांडांत उत्तराक्रिया व समाधि बांधणें, अश्वमेध, पुरुषमेध व सर्वमेध हे विषय आहेत व १४ व्यांत प्रवर्ग्यसंस्कार आहे. ह्या विस्तृत ग्रंथाचा शेवट जुन्या पण महत्त्वाच्या बृहदारण्यक उपनिषदामध्यें झाला आहे.

**शतावरी**—हीं कांटेरी झाडें कमरेइतकीं वाढतात. पानें सुरूच्या पानांसारखीं असतात. या वेलीस शंभरापर्यंत मुळें असतात तीं ओलीं असतांनाच काढून, सोलून सुकवितात. शतावरीस कोंकणांत 'सितावचरी' किंवा 'असली' म्हणतात व देशावर 'दिवस मावळी' असें दुसरें नांव आहे. जनावरांस दूध जास्त येण्यास याच्या मुळ्या खावयास घालतात. मुळ्यांचा रस ज्वरावर दुधांतून जिऱ्याची पूड घालून देतात. पित्तप्रदरावर रस मधांतून देतात. शक्तीसाठीं शतावरीचें चूर्ण देतात. शतावरीघृत आम्लपित्तावर गुणकारी आहे.

**शत्रुघ्न**—दशरथ व सुमित्रा यांचा पुत्र व रामाचा सावत्र बंधु. याची बायको श्रुतिकीर्ति. राम वनवासास गेल्यानंतर यानेंच १४ वर्षे अयोध्येचें राज्य केलें. रामाच्या आज्ञेवरून ऋषींना त्रास देणाऱ्या लवणासुरास यानें मारलें. यानें शूरसेन देश स्थापिला असें म्हणतात. रामानें अश्वमेध यज्ञ केला त्या वेळीं अश्वाच्या संरक्षणार्थ शत्रुघ्न गेला होता. त्या वेळीं तो अनेक देश फिरला. यानें रामाबरोबरच गोप्रतार तीर्थी देह ठेवला.

**शत्रुंजय**—या टेंकड्या काठेवाडांत पालिठाण्याजवळच आहेत. शत्रुंजयाला सिद्धगिरि किंवा सिद्धाचल असेंहि म्हणतात. श्वेतांबर जैनांचें हें प्रमुख तीर्थक्षेत्र आहे. डोंगरशिखरांवर अनेक देवळें असून त्यांत आदीश्वर भगवानाचें जास्त प्रसिद्ध आहे. बाहुबलीच्या मूर्तीच्या जागीं अनेक जैन साधूंनीं मुक्ति (निर्वाण) घेतली आहे. शत्रुंजयावर अनेक लेख कोरले असून त्यांचा उपयोग इतिहासाच्या कामीं फार होतो.

**शनि**—सूर्यमालेंतील गुरूच्या खालोखाल मोठा ग्रह. हा पृथ्वीपेक्षां ७०० पट मोठा आहे. हा सूर्यापासून ८८ कोटी ६० लक्ष मैल दूर आहे व १०,७५९ दिवसांत सूर्याभोंवतीं एक प्रदक्षिणा करतो. हा द्रवरूप असावा असें वाटतें. यांत एक विचित्रपणा म्हणजे शन्याभोंवतीं तीन मोठालीं कडीं दिसतात. तीं उल्कांचीं किंवा उपग्रहांचीं बनलेलीं असावींत. गांतलें एक कडें कांहींसें पारदर्शक आहे. या कड्यांच्या संचाचा व्यास १,७०,००० मैलांचा भरतो. यांची जाडी फारच कमी दिसते. शनीवर निरनिराळ्या रंगांचे पट्टे व ठिपके दिसतात. याला निदान ९ चंद्र असल्याचें माहीत आहे. हा सूर्याभोंवतीं ३० वर्षांनीं एक प्रदक्षिणा करतो. म्हणजे एकेका राशीला अडीच वर्षे घेतो. फलज्योतिषांत हा अनिष्ट ग्रह गणला जातो. याची साडेसाती फार बाधते. ती बाधूं नये म्हणून शनिवारचा उपवास, शनिमाहात्म्य वाचणें, शनीला तेलाचा अभिषेक करणें, वगैरे गोष्टी भाविक करतात.

**शपथ**—१. कोणती एखादी गोष्ट प्रतिज्ञेवर सांगण्यास, तिचा खरेपणा दाखविण्यास कांहीं आणभाक घेत असतात. नेहमींच्या बोलण्यांत हा प्रकार फार चालतो. मुलांच्या खेळांतहि शपथ घालतात व सोडतात. शपथेवर सांगितलेली गोष्ट खोटी ठरली किंवा शपथ मोडून एखादी गोष्ट केली तर त्यामुळें ईश्वरी कोप होतो अशी पूर्वीपासून पुष्कळ लोकांची समजूत आहे.

जुने शपथ घेण्याचे प्रकार पुढीलप्रमाणें आहेत—देवावरचा बेल अगर फूल अगर तुळस काढणें अगर उचलणें; गाईचें शेपूट धरणें; ब्राह्मणाच्या पायांवर हात ठेवणें; कढईंतून पैसा काढणें, रवा काढणें; गीता-गंगाजळी घेणें; माझीं लेंकरेंबाळें मरोत म्हणणें; मुलावर हात ठेवून बोलणें; अर्ध्या गंगेंत उभें राहून बोलणें; भरल्या आड्याखालीं बोलणें; अग्नीवर हात ठेवून बोलणें; गाईचा चारा डोक्यावर घेऊन बोलणें; बेलभंडार घेणें; रक्ताची आण, विद्येची आण, अन्नाची आण, देवाची आण, तुमच्या पायाची आण, कृष्णाबाईची आण, गळ्याची आण, इत्यादि.

२. कायद्यांत या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, 'देवाची शपथ घेऊन खरें सांगेन, खोटें सांगणार नाहीं!' अशी प्रतिज्ञा न्याय-कोर्टांत जबानी देतांना आरंभीं करणें. इंग्लंडांत कायद्यानें सरकारी प्रमुख अधिकाऱ्यांना, न्यायाधीशांना, पार्लमेंटच्या सभासदांना, व इतर कांहींना राजनिष्ठेची शपथ घ्यावी लागते. ज्यूरर लोकांना, 'आम्ही आमचें काम प्रामाणिकपणानें करूं' अशी शपथ घ्यावी लागते. इंग्लंडांत १८८८ सालापासून या शपथेच्या बाबतींत महत्त्वाचा फरक करण्यांत आला. त्याचें कारण असें कीं, कित्येक इसम, "आम्ही कोणत्याच धर्माचे नाहीं," आणि "आम्ही ईश्वराचें अस्तित्व मानीत नाहीं," असें प्रतिपादन करूं लागले; आणि त्यामुळें सदर प्रतिज्ञेंतील 'देवाशपथ' या शब्दांना तसेंच बायबल ग्रंथावर हात ठेवण्याला त्यांनीं हरकत घेतली. म्हणून सदर शपथेच्या कायद्यांत दुरुस्ती करून 'खरें बोलेन, खोटें सांगणार नाहीं!' तसेंच 'मी राजनिष्ठ राहीन,' इत्यादि शब्द कायम ठेवून 'देवाशपथ' हे शब्द प्रतिज्ञेंतून गाळण्यांत आले. १९०९

पर्यंत इंग्लंडमध्यें न्यायकोर्टांत अशी पद्धत होती कीं, शपथ घेतांना न्यू टेस्टॅमेंट ( बायबल ) या धर्मग्रंथाला ओठांनीं स्पर्श ( किस ) करावा लागे. परंतु त्या सालीं 'ओथ्स ॲक्ट' दुरुस्त करून सदर धर्मग्रंथ नुसता हातांत घ्यावा, ही पद्धति कायद्यानें सुरू करण्यांत आली.

हिंदुस्थान—हिंदुस्थानांत ब्रिटिश अमदानींत सामान्य शपथेसंबंधीं वरील स्वरूपाचाच कायदा आहे. शिवाय 'विशेष शपथे'-संबंधीं स्वतंत्र कायदा ( दि इंडियन ओथ्स ॲक्ट ) १८७३ सालीं मान्य झालेला आहे. त्या कायद्यांत, दिवाणी कोर्टांतील दाव्यांचा निर्णय पुरावा वगैरे विचारांत न घेतां, वादी किंवा प्रतिवादी यांपैकीं कोणीहि दाव्याच्या विषयासंबंधीं विशेष शपथ घेईल तर तदनुसार कोर्टानें करावा, अशीं कलमें आहेत. प्रमुख सरकारी अधिकाऱ्यांना व विधिमंडळांतील सभासदांना, सरकारशीं व लोकांशीं निष्ठेनें व प्रामाणिकपणें वागेन, अशी शपथ घ्यावी लागते.

**शंबर**—१. एक वैदिक असुर. हा इंद्रशत्रु असून ऋग्वेदांत याच्यासंबंधीं बरेच उल्लेख आहेत. याचे शंभर किल्ले किंवा नगरें होतीं. इंद्रानें नव्याण्णव पाडून शंभरावें राहण्यायोग्य केलें. दिवोदास अतिथिग्वानें याला ठार केलें.

२. एक पौराणिक असुर. हा कश्यप दनूचा मुलगा. यानें प्रद्युम्नाला सात दिवसांचा असतांनाच चोरून आणून मायावतीच्या स्वाधीन केलें. मायावतीनें प्रद्युम्नाला वाढवून मोठा पराक्रमी केलें. त्यानें नंतर शंबराचा वध केला. प्रद्युम्न व मायावती पाहा.

**शबरी**—ही मातंग ऋषीच्या आश्रमांतील भिल्ल जातीची परिचारिका होती. राम-लक्ष्मण त्या बाजूस गेले असतांना हिनें त्यांची चांगली सेवा केली व आजूबाजूंचीं प्रसिद्ध ठिकाणें त्यांना दाखविलीं. रामाला स्वादिष्ट बोरें मिळावींत म्हणून ही प्रथम तीं चाखून पाही अशी कथा आहे. हिची भक्ति पाहून तशीं उष्टीं बोरेंहि राम आवडीनें खात असे. या प्रसंगावर कांहीं आख्यानेंहि आहेत.

**शंबूक**—एक शूद्र जातीचा ऋषि. यानें रामराज्यांत चातुर्वर्ण्याचे नियम न पाळतां, म्हणजे शूद्र यातीनें त्रैवर्णिकांची सेवा करावी ती न करतां, हा तपाचरण करूं लागला. त्यामुळें एका ब्राह्मणाचा सोळा वर्षांचा मुलगा अकालीं वारला. याचें खापर त्या ब्राह्मणानें रामाच्या अधर्मी राज्यावर फोडलें. तेव्हां रामानें या गोष्टीबद्दल शोध केला असतां, त्याला शंबूकाचें दुर्वर्तन आढळून आलें. त्यामुळें रामाला शंबूकाचा वध करावा लागला.

**शब्दकोश**—( डिक्शनरी ). अकारविल्हानें लाविलेले शब्द किंवा विषय ज्यांत विवेचिले आहेत असा ग्रंथ. हिंदुस्थानांत वैदिक निघण्टु हा अत्यंत प्राचीन कोश म्हणतां येईल. त्यानंतर अमरकोशादि अनेक संस्कृत कोश रचले गेले. त्यांचें सविस्तर वर्णन 'महाराष्ट्र शब्दकोशा'च्या पहिल्या विभागाच्या प्रस्तावनेंत सांपडेल. इंग्रजींत डॉ. जॉनसनच्या कोशापूर्वी सव्वाशें वर्षांपासून कोशरचनेचे थोडे प्रयत्न चालले होते, पण जॉनसनचें नांव पहिला आंग्ल कोशकार म्हणून अजरामर झालें. १८२८ त वेब्स्टरनें प्रकाशित केलेला इंग्रजी भाषेचा शब्दकोश पहिला मोठा अमेरिकन कोश म्हणतां येईल. रिचर्डसनच्या कोशांत अवतरणें चांगलीं आहेत. ऑजिल्व्हीच्या 'इंपीरियल इंग्लिश डिक्शनरी' या कोशाच्या बऱ्याच आवृत्त्या आल्या. त्याला ज्ञानकोशीय स्वरूप आहे. कॅसेलचा ज्ञानकोशीय शब्दकोश ( १८७९–१८८८ ) चांगला विस्तृत प्रयत्न म्हणतां येईल. 'सेंचरी डिक्शनरी' व 'स्टॅन्डर्ड डिक्शनरी' हे अमेरिकन शब्दकोश खंडात्मक आहेत. तथापि ऐतिहासिक तत्त्वावर आधारलेला मरे आदि संपादकांचा 'ऑक्सफोर्ड कोश' सर्वांत मोठा व महत्त्वाचा म्हणावा लागेल. तो १८८४ ते १९२८ पर्यंत छापला जात होता. त्याचे दहा भाग असून शब्दसंख्या चार लाखांवर आहे. जर्मन भाषेचा अवाढव्य बृहत्कोश ग्रिमबंधूंनीं रचिला आहे.

मराठी भाषेंत मराठी–मराठी कोश इ. स. १८२९ पासून तयार होऊं लागले. 'महाराष्ट्र भाषेचा कोश,' 'हंसकोश', 'सुबहकोश', 'शब्दरत्नाकर', 'सरस्वती कोश' व 'महाराष्ट्र शब्दकोश' अशीं आजवरच्या महत्त्वाच्या कोशांचीं नांवें घेतां येतील. 'महाराष्ट्र शब्दकोश' हा उपलब्ध कोशांत अलीकडचा व सर्वांत मोठा आहे. याचे सात विभाग असून शब्दसंख्या एक लाखावर आहे. याची एक पुरवणीहि नुकतीच ( १९५० ) निघाली आहे. इंग्रजी–मराठी आणि मराठी–इंग्रजी असे दोन मोठे कोश मोल्सवर्थ–कँडी या आंग्ल पंडितांनीं गेल्या शतकांत रचिले. त्यानंतर मराठी–इंग्रजी किंवा उलट अशा कोशांच्याबाबतींत मोठे प्रयत्न आलेले नाहींत. रानडे यांचा इंग्रजी–मराठी कोश हा जो पस्तीस वर्षांपूर्वी बाहेर पडला तोच आज सर्वांत मोठा कोश म्हणावा लागेल. यांत बरीच भर घालून अद्ययावत् इंग्रजी–मराठी बृहत्कोश करण्याची फार जरूरी भासत आहे, यांत शंका नाहीं. ( कोशवाङ्मय पाहा ).

हिंदीमध्यें 'हिंदीशब्दसागर' हा हिंदी बृहत्कोश झाला आहे. बंगाली, गुजराथी, तामिळ, उर्दू, उडिया या भाषांचे असेच बृहच्छब्दकोश तयार करण्याचीं कामें चालू आहेत.

**शंभूसिंग जाधव ( मालेगांवकर )** ( मृत्यु १७६० )—एक मराठा सरदार. धनाजी जाधवाचा मुलगा व चंद्रसेन जाधवाचा धाकटा भाऊ. धनाजीच्या पश्चात् शाहूनें चंद्रसेन जाधवास आपला सेनापति नेमून शंभू त्याचा मुतालिक नेमलें. पुढें चंद्रसेनाचें शाहूशीं बिनसल्यामुळें तो शाहूस सोडून गेला व त्याजबरोबर शंभूहि गेला. परंतु हा परत शाहूस येऊन मिळाला. शाहूस कोल्हापूरच्या संभाजीवरील पन्हाळगडच्या स्वारीच्या वेळीं याची

चांगलीच मदत झाली. त्यामुळें खुष होऊन सन १७३२ मध्यें शाहूनें यास मालेगांवच्या इनामाची सनद दिली. सन १७३९ मध्यें कर्नाटकच्या स्वारींत फत्तेसिंग भोसल्यास यानें साहाय्य केलें. यास अमरसिंग नांवाचा एक मुलगा होता. जाधव घराणीं पाहा.

**शमी**—हिचीं झाडें मोठीं असतात. पानें आंवळीच्या पानांसारखीं असतात. शमी ही पवित्र व हवनीय द्रव्यांपैकीं मानलेली आहे. अथर्ववेद व मागाहून झालेले ग्रंथ यांमध्ये शमीचा उल्लेख आहे. अथर्ववेदामध्ये केसाला अपायकारक मद उत्पन्न करणारें व रुंद पानाचें (झाड) असें याचें वर्णन आलेले आहे. शमीच्या लांकडापासून, यज्ञांतला अग्नि उत्पन्न करण्याकरितां ज्या अरणीचा उपयोग होत असे त्या अरणीचा खालचा भाग बनवीत व वरचा भाग अश्वत्थाच्या लांकडापासून तयार करीत. या शमीच्या फळाला शमीधान्य असे नांव आहे.

विजयादशमीला शमीची पूजा करतात. ही औषधीहि आहे. आगपेणीवर पाला गाईच्या दह्यांत वांटून लावतात. प्रमेह, धुपणी, कडकी, इ. वर शमीच्या तुवऱ्या वांटून देतात.

**शम्सुद्दिन अल्तमश** (राज्य. १२१०-३६)—एक दिल्लीचा बादशहा. याचा जन्म खानदानी घराण्यांत झाला असून हा हुशार, देखणा व बुद्धिमान होता. हे याचे सद्गुण याच्या भावांच्या डोळ्यांत सरूं लागल्यानें त्यांनी द्वेषबुद्धीनें यास गुलाम म्हणून विकलें. नंतर याच्या धन्यानें यास शिक्षण देऊन कुतुबुद्दिनला विकलें. कुतुबुद्दिनच्या पदरीं राहिल्यावर आपल्या सद्गुणांनीं हा त्याचा अत्यंत आवडता बनला. इतका कीं, कुतुबुद्दिननें यास आपली मुलगी दिली व आपला सेनापति नेमून 'अमीरशिकार' अशी पदवी दिली. ऐबकचा पुत्र आरामशहा यास पदच्युत करून हा दिल्लीचा बादशहा झाला. याचें मूळचें नांव अल्तमश. 'शम्सुद्दिन' हा यानें गादीवर बसतांना धारण केलेला किताब होय. यानें बऱ्याच लढायांत आपलें शौर्य गाजविलें. अरबी नाणीं यानेंच प्रथम हिंदुस्थानांत सुरू केलीं. याच्या वंशास गुलामवंश म्हणतात. गुलाम घराणे पाहा.

**शरंड**—(सालामांडर–बेडूकवर्ग). हें नांव भूजलचर प्राण्यांपैकीं अनेक जातींच्या प्राण्यांस, उदा., बेडूक, वगैरेंस देण्यांत येतें. यांस शेपटी असते. यांतील कांहीं प्राणी जमिनीवर राहतात व कांहीं पाण्यावर राहणारे असतात. युरोपांत आढळणारे या जातीचे प्राणी सात इंच लांब असून त्यांवर ठिपके असतात. हे फक्त रात्रीचे किंवा पाऊस पडत असतां बाहेर पडतात. यांच्या युरोप, आशिया व अमेरिका यांमध्ये कांहीं जाती आढळतात.

**शरभ**—१. अथर्ववेद व मागाहून झालेले ग्रंथ यांत एका रानटी जनावराचें हें नांव आलेलें आहे. उत्तरकालीन काव्यग्रंथांत हा एक काल्पनिक आठ पायांचा, हिमाच्छादित डोंगरांत राहणारा आणि सिंह व हत्ती यांचा शत्रु असलेला पशु म्हणून आला आहे. टीकाकार महिधर याच्या मतानें वाजसनेयी संहितेमध्यें या शब्दाचा हाच अर्थ आहे; पण तो असा अर्थ करण्याचें कारण देत नाहीं. हा प्राणी चकन्याप्रमाणें असतो, असेहि एके ठिकाणीं म्हटलें आहे. कदाचित् हा प्राणी एक प्रकारचा हरिण असावा असें वाटतें.

२. हिरण्यकशिपूचा वध करणाऱ्या नृसिंहानें वधानंतर जेव्हां जगाचा संहार चालविला तेव्हां शंकरानें शरभाचें रूप घेऊन नृसिंहाला नामोहरम केलें, अशी एक कथा आहे. हा शंकराचा शरभावतार होय.

**शरभंग**—गौतमकुलांतील एक ब्रह्मर्षि. हा दंडकारण्यांत गोदावरीच्या तीरीं तप करीत असे. आपल्या तपामुळे त्यानें ब्रह्मलोकीं जाण्यास पात्रता मिळविली होती व प्रत्यक्ष इंद्र त्यास तिकडे न्यावयासहि आला होता. पण रामाचें आतिथ्य केल्याशिवाय जाण्याचे त्यानें नाकारलें व राम भेटला असतां आतिथ्यपूर्वक त्याला ब्रह्मलोकाचें पुण्य देऊं केलें. पण रामानें, मी स्वतःच तपाचरणानें आपल्याप्रमाणें ब्रह्मलोक मिळवीन, आपण फक्त मार्गदर्शन करा, असें सांगून तें नाकारलें. नंतर शरभंगानें आपला देह अग्नींत समर्पण केला.

**शरभेश्वर रस**—एक आयुर्वेदीय रसायन. १ पारा, १ गंधक, १ वत्सनाभ, हिंगुळ, व १ टांकणखार या औषधांत चित्रकाच्या काढ्याची भावना द्यावी. वाळल्यावर शरावांत घालून वालुका यंत्रांत ठेवून दोन प्रहर अग्नि द्यावा. नंतर चूर्ण करून त्रिकटूची (सुंठ, मिरे व पिंपळी यांची) भावना द्यावी; म्हणजे हें तयार होतें. याच्या योगानें वातपित्तकफजनितज्वर व सन्निपातज्वर दूर होतात.

**शरयु**—ऋग्वेदामध्यें तीनदां सरयु अशी संज्ञा नदीचें नांव म्हणून आलेली आहे. सरयु नदी ओलांडून तुर्वश व यदु लोक यांनीं चित्ररथ व अर्ण यांचा पराजय केला, असें वर्णन आलेलें आहे. सरयु किंवा सर्जु म्हणजेच सुप्रसिद्ध शरयु नदी होय. ही अयोध्येवरून पुढें गंगेस मिळते. परंतु सरयु ही नदी पंजाबच्या बाजूस असावी हेंच जास्त संभवनीय आहे. कारण ऋग्वेदांत पंजाबाशिवाय इतर भागांतील नद्यांचा उल्लेख नाहीं म्हटलें तरी चालेल. शिवाय त्या नदीचा उल्लेख ज्या स्थलीं आला आहे त्यावरूनहि सामीप्यानें उच्चारलेल्या नद्यांच्या आसपासच ती कोठें तरी असली पाहिजे. झेंद ग्रंथांतहि एक हरयु नदी आलेली आहे व ती आणि ही एकच असावी.

शरयु ही घोग्रा नदीला मिळणारी एक उपनदी आहे. नेपाळांतून निघून वायव्येकडे चाळीस मैल वाहत जाऊन ही अयोध्या प्रांतांत शिरते. नंतर उत्तरेकडून दक्षिणेकडे सुमारें १२०

मैल वाहत जाऊन ही घोग्रा नदीला मिळते. अयोध्या व रामचंद्र यांच्या सान्निध्यामुळें हिला महत्त्व प्राप्त झालें आहे.

**शरीफजी भोंसले** (१६०३–१६२४)—शहाजीचा धाकटा भाऊ व शिवाजीचा चुलता. मालोजीला शहा–शरीफ या मुसलमान साधूच्या कृपेनें दोन पुत्र झाले व त्यांची शहाजी व शरीफजी अशींच नांवें ठेवलीं, ही आख्यायिका शिवभारतांत देखील आहे. दौलताबादेस सन १६०६ मध्यें शरीफचें लग्न झालें. प्रथम हा व शहाजी निजामशाहींत नोकरींत होते. याच्या ताब्यांत चाकण-चौऱ्यांशीं परगणा होता. भातवडीच्या लढाईंत हा पडला. याचा मुलगा त्रिंबकजी राजे व नातू बाबाजी असून याचे वंशज दौलताबादला राहत असत.

**शरीर-उष्णता**—(ॲनिमल हीट). ज्या प्राण्यामध्यें नेहमीं विशिष्ट उष्णमान एकसारखें स्थिर असतें असे प्राणी म्हटले म्हणजे पक्षी व सस्तन प्राणी होत. पक्ष्यांचें उष्णमान सामान्यतः ३५.४° पासून ४३.९° शत. असतें, आणि मनुष्याचें ३५.५° पासून ४०.५° शत. पर्यंत असतें. सामान्यतः मनुष्याचें सरासरी उष्णमान ९७.५° ते ९९° फा. असतें व निरोगी मनुष्याच्या बाबतींत हें बहुधा बदलत नाहीं. परंतु ताप आला असतां तें १०५° पर्यंत चढतें. यापेक्षांहि तें एकदोन अंश वर गेल्यास बहुधा मृत्यु येतो. सामान्यतः प्राण्यांचें उष्णमान ते ज्या परिस्थितींत राहतात तींवर अवलंबून असतें.

**शरीरजन्य विषनाशक**—(ॲन्टी-टॉक्सिन). रोग उत्पन्न करणाऱ्या कांहीं सूक्ष्म जंतूंचा नाश करण्याचा अथवा त्यांचें विष निरुपद्रवी करण्याचा गुण असणाऱ्या कांहीं जंतूंस विषघ्न जंतू म्हणतात. अशा तऱ्हेचे जंतू वस्त्रेवर जर एखाद्या घोड्यासारख्या प्राण्याच्या शरीरांत घालण्यांत आले आणि त्यानंतर कांहीं दिवसांनीं त्या घोड्याच्या शरीरांतील रक्त घेऊन त्याची लस तयार केली तर त्या लसीच्या योगानें पहिले विषारी जंतू मरण पावतात. घटसर्प, धनुर्वात, फुप्फुसदाह, रक्तविषार, वगैरेसारख्या सूक्ष्म जंतूंपासून उत्पन्न होणाऱ्या रोगांमध्यें अशा तऱ्हेची लस प्राण्यांच्या शरीरांत टोंचण्यांत येऊन असे कृमिघ्न जंतू जिवंत अथवा मृतस्थितींत त्या प्राण्याच्या शरीरांत घालण्यांत येतात. व त्या योगानें त्याचा रोगापासून बचाव करण्यांत येतो. गेल्या महायुद्धांत अशा तऱ्हेची लस टोंचून अनेक रोगांचा प्रतिबंध करण्यांत आला होता.

**शरीरवृद्धिग्रंथि**—(थायमस ग्लँड). शरीराच्या मध्यरेषेमध्यें ही एक रक्तवाहिनीविरहित ग्रंथि असते. हिची वाढ जन्माच्या सुमारास होऊन मनुष्य वयांत येईपर्यंत तिची सारखी वाढ होत राहते. त्यानंतर तिचा आकार हळूहळू कमी होत जातो. हिच्या पुढील भागीं उरोस्थि असून श्वासनलिकेच्या पुढें आणि बाजूला ती असते.

**शरीरशोषण**—(ॲट्रोफी). सुका रोग. उपासमारीनें किंवा शरीराच्या पोषणक्रियेमध्यें कांहीं बिघाड झाल्यामुळें मनुष्याच्या शरीराचें मांस हळूहळू एखाद्या विशिष्ट भागापुरेसें किंवा सर्व शरीरभर झडून जाऊं लागतें, तेव्हां त्यास शरीरक्षय असें म्हणतात. अस्थिव्रण, क्षय, मधुमेह, ताप, वगैरे रोग झाले असतां शरीराचा क्षय होत जातो. तसेंच शरीरांतील बऱ्याचशा पेशींची झीज झाली किंवा कांहीं गात्रें बरोबर क्रिया करीत नाहींशीं झालीं म्हणजेहि अशी अवस्था होते. आयोडिन, शिसें, वगैरेच्या विषारामुळेंहि हा विकार होतो. वृद्धावस्थेमध्यें किंवा लहान मुलांमध्यें उरोवृद्धि (थायमस) ग्रंथी लहान झाल्या असतांहि शरीर झिजूं लागतें.

**शर्करा(गुरुत्व)मापक**—(सॅकॅरिमीटर). साखरेच्या द्रावणाची तीव्रता मोजण्याकरितां या यंत्राचा उपयोग करण्यांत येतो. साखरेच्या द्रावणाच्या अंगीं प्रकाशाच्या ध्रुवताल (प्लेन ऑफ पोलरिझेशन) भ्रमण करण्याचा गुणधर्म असतो. व ज्या प्रमाणांत विशिष्ट द्रावणाची तीव्रता असेल त्या प्रमाणांत या तालाचें भ्रमण होतें. प्रकाशाचा किरण एका त्रिपार्श्वांतून साखरेच्या द्रावणावर पडून त्यांतून तो दुसऱ्या त्रिपार्श्वांतून बाहेर पाडण्यांत येतो, व या भ्रमणकोनावरून द्रावणाची तीव्रता मोजण्यांत येते. याप्रमाणें साखरेसारख्याच सेंद्रिय पदार्थांवर प्रकाशाचा परिणाम होत असतो, व त्यांच्या या गुणधर्मामुळेंच या पदार्थांच्या अंतर्गत रचनेचें व रासायनिक घटनेचें ज्ञान उपलब्ध झालें आहे.

**शर्करासंयुक्तें**—(ग्लुकोसाइड). द्राक्षशर्करा आणि इतर सेंद्रिय संयुक्तें यांच्या संयोगानें तयार झालेले वनस्पतिपदार्थ. कांहीं विशिष्ट फेनक द्रव्यें वापरून किंवा सौम्य अम्लांच्या योगें जलभेदन करून त्यापासून द्राक्षशर्करा व इतर वस्तू बाहेर काढण्यांत येतात. बदामांतील वातामक (ॲमिगडॅलिन), चेरी लॅरेलचीं पानें, सॅलिसिन (विलोच्या सालापासून काढलेला पदार्थ) हीं शर्करासंयुक्तांचीं उदाहरणें होत.

**शर्मा, नेकीराम** (१८८७– )—एक सार्वजनिक कार्यकर्ते. हे संस्कृत व हिंदी भाषेचे पंडित आहेत. यांनीं होमरूल लीग चळवळींत प्रथम भाग घेतला व १९२० मध्यें बिगारीच्या जुलमाविरुद्ध जोराची चळवळ केली. यांस त्या वेळीं १५२ अ कलमाखालीं ८ महिन्यांची सक्त मजुरीची शिक्षा झाली. १९३० मध्यें मिठाच्या सत्याग्रहांत १२ महिन्यांची व १९३२ मध्यें पुन्हां तिसऱ्या ऑर्डिनन्सअन्वयें तीन महिन्यांची व क्रि. प्रो. कोडच्या १०८ व्या कलमाखालीं १२ महिन्यांची अशा [illegible] है

चांगलीच मदत झाली. त्यामुळें खुष होऊन सन १७३२ मध्यें शाहूनें यास मालेगांवच्या इनामाची सनद दिली. सन १७३९ मध्यें कर्नाटकच्या स्वारींत फत्तेसिंग भोसल्यास यानें साहाय्य केलें. यास अमरसिंग नांवाचा एक मुलगा होता. जाधव घराणीं पाहा.

**शमी**—हिचीं झाडें मोठीं असतात. पानें आंवळीच्या पानां-सारखीं असतात. शमी ही पवित्र व हवनीय द्रव्यांपैकीं मानलेली आहे. अथर्ववेद व मागाहून झालेले ग्रंथ यांमध्यें शमीचा उल्लेख आहे. अथर्ववेदामध्यें केसाला अपायकारक मद उत्पन्न करणारें व रुंद पानाचें (झाड) असें याचें वर्णन आलेलें आहे. शमीच्या लांकडापासून, यज्ञांतला अग्नि उत्पन्न करण्याकरितां ज्या अरणीचा उपयोग होत असे त्या अरणीचा खालचा भाग बनवीत व वरचा भाग अश्वत्थाच्या लांकडापासून तयार करीत. या शमीच्या फळाला शमीधान्य असे नांव आहे.

विजयादशमीला शमीची पूजा करतात. ही औषधीहि आहे. आगपेणीवर पाला गाईच्या दह्यांत वांटून लावतात. प्रमेह, धुपणी, कडकी, इ. वर शमीच्या तुवऱ्या वांटून देतात.

**शम्सुद्दिन अल्तमश** (राज्य. १२११–३६)—एक दिल्लीचा बादशहा. याचा जन्म खानदानी घराण्यांत झाला असून हा हुशार, देखणा व बुद्धिमान होता. हे याचे सद्गुण याच्या भावांच्या डोळ्यांत सलूं लागल्यानें त्यांनीं द्वेषबुद्धीनें यास गुलाम म्हणून विकलें. नंतर याच्या धन्यानें यास शिक्षण देऊन कुतुबुद्दिनला विकलें. कुतुबुद्दिनच्या पदरीं राहिल्यावर आपल्या सद्गुणांनीं हा त्याचा अत्यंत आवडता बनला. इतका कीं, कुतुबुद्दिननें यास आपली मुलगी दिली व आपला सेनापति नेमून 'अमीरशिकार' अशी पदवी दिली. ऐबकचा पुत्र आरामशहा यास पदच्युत करून हा दिल्लीचा बादशहा झाला. याचें मूळचें नांव अल्तमश. 'शम्सुद्दिन' हा यानें गादीवर बसतांना धारण केलेला किताब होय. यानें बऱ्याच लढायांत आपलें शौर्य गाजविलें. अरबी नाणीं यानेंच प्रथम हिंदुस्थानांत सुरू केलीं. याच्या वंशास गुलामवंश म्हणतात. गुलाम घराणे पाहा.

**शरंड**—(सालामांडर–बेडूकवर्ग). हें नांव भूजलचर प्राण्यां-पैकीं अनेक जातींच्या प्राण्यांस, उदा., बेडूक, वगैरेस देण्यांत येतें. यांस शेपटी असते. यांतील कांहीं प्राणी जमिनीवर राहतात व कांहीं पाण्यावर राहणारे असतात. युरोपांत आढळणारे या जातीचे प्राणी सात इंच लांब असून त्यांवर ठिपके असतात. हे फक्त रात्रीचे किंवा पाऊस पडत असतां बाहेर पडतात. यांच्या युरोप, आशिया व अमेरिका यांमध्यें कांहीं जाती आढळतात.

**शरभ**—१. अथर्ववेद व मागाहून झालेले ग्रंथ यांत एका रानटी जनावराचें हें नांव आलेलें आहे. उत्तरकालीन काव्य-ग्रंथांत हा एक काल्पनिक आठ पायांचा, हिमाच्छादित डोंगरांत राहणारा आणि सिंह व हत्ती यांचा शत्रु असलेला पशु म्हणून आला आहे. टीकाकार महिधर याच्या मतानें वाजसनेयी संहितेमध्यें या शब्दाचा हाच अर्थ आहे; पण तो असा अर्थ करण्याचें कारण देत नाहीं. हा प्राणी बकऱ्याप्रमाणें असतो, असेंहि एके ठिकाणीं म्हटलें आहे. कदाचित् हा प्राणी एक प्रकारचा हरिण असावा असें वाटतें.

२. हिरण्यकशिपूचा वध करणाऱ्या नृसिंहानें वधानंतर जेव्हां जगाचा संहार चालविला तेव्हां शंकरानें शरभाचें रूप घेऊन नृसिंहाला नामोहरम केलें, अशी एक कथा आहे. हा शंकराचा शरभावतार होय.

**शरभंग**—गौतमकुलांतील एक ब्रह्मर्षि. हा दंडकारण्यांत गोदावरीच्या तीरीं तप करीत असे. आपल्या तपामुळें त्यानें ब्रह्म-लोकीं जाण्यास पात्रता मिळविली होती व प्रत्यक्ष इंद्र त्यास तिकडे न्यावयासहि आला होता. पण रामाचें आतिथ्य केल्या-शिवाय जाण्याचें त्यानें नाकारलें व राम भेटला असतां आतिथ्य-पूर्वक त्याला ब्रह्मलोकाचें पुण्य देऊं केलें. पण रामानें, मी स्वतःच तपाचरणानें आपल्याप्रमाणें ब्रह्मलोक मिळवीन, आपण फक्त मार्ग-दर्शन करा, असें सांगून तें नाकारलें. नंतर शरभंगानें आपला देह अग्नींत समर्पण केला.

**शरभेश्वर रस**—एक आयुर्वेदीय रसायन. १ पारा, १ गंधक, १ वत्सनाभ, हिंगुळ, व १ टांकणखार या औषधांत चित्रकाच्या काढ्याची भावना द्यावी. वाळल्यावर शरावांत घालून वालुका यंत्रांत ठेवून दोन प्रहर अग्नि द्यावा. नंतर चूर्ण करून त्रिकटूची (सुंठ, मिरें व पिंपळी यांची) भावना द्यावी; म्हणजे हें तयार होतें. याच्या योगानें वातपित्तकफजनितज्वर व सन्निपातज्वर दूर होतात.

**शरयु**—ऋग्वेदामध्यें तीनदां सरयु अशी संज्ञा नदीचें नांव म्हणून आलेली आहे. सरयु नदी ओलांडून तुर्वश व यदु लोक यांनीं चित्ररथ व अर्ण यांचा पराजय केला, असें वर्णन आलेलें आहे. सरयु किंवा सर्जु म्हणजेच सुप्रसिद्ध शरयु नदी होय. ही अयोध्येवरून पुढें गंगेस मिळते. परंतु सरयु ही नदी पंजाबच्या बाजूस असावी हेंच जास्त संभवनीय आहे. कारण ऋग्वेदांत पंजाबाशिवाय इतर भागांतील नद्यांचा उल्लेख नाहीं म्हटलें तरी चालेल. शिवाय त्या नदीचा उल्लेख ज्या स्थलीं आला आहे त्या-वरूनहि सामीप्यानें उच्चारलेल्या नद्यांच्या आसपासच ती कोठें तरी असली पाहिजे. झेंद ग्रंथांतहि एक हरयु नदी आलेली आहे व ती आणि ही एकच असावी.

शरयु ही घोग्रा नदीला मिळणारी एक उपनदी आहे. नेपाळांतून निघून वायव्येकडे चाळीस मैल वाहत जाऊन ही अयोध्या प्रांतांत शिरते. नंतर उत्तरेकडून दक्षिणेकडे सुमारें १२०

मैल वाहत जाऊन ही घोग्रा नदीला मिळते. अयोध्या व रामचंद्र यांच्या सान्निध्यामुळें हिला महत्त्व प्राप्त झालें आहे.

**शरीफजी भोंसले** (१६०३-१६२४)—शहाजीचा धाकटा भाऊ व शिवाजीचा चुलता. मालोजीला शहा-शरीफ या मुसलमान साधूच्या कृपेनें दोन पुत्र झाले व त्यांचीं शहाजी व शरीफजी अशींच नांवें ठेवलीं, ही आख्यायिका शिवभारतांत देखील आहे. दौलताबादेस सन १६०६ मध्यें शरीफचें लग्न झालें. प्रथम हा व शहाजी निजामशाहींत नोकरींत होते. याच्या ताब्यांत चाकणचौऱ्यांशीं परगणा होता. भातवडीच्या लढाईंत हा पडला. याचा मुलगा त्रिंबकजी राजे व नातू बाबाजी असून याचे वंशज दौलताबादला राहत असत.

**शरीर-उष्णता**—(ॲनिमल हीट). ज्या प्राण्यामध्यें नेहमीं विशिष्ट उष्णमान एकसारखें स्थिर असतें असे प्राणी म्हटले म्हणजे पक्षी व सस्तन प्राणी होत. पक्ष्यांचें उष्णमान सामान्यतः ३९.४° पासून ४३.९° शत. असतें, आणि मनुष्याचें ३५.५° पासून ४०.५° शत. पर्यंत असतें. सामान्यतः मनुष्याचें सरासरी उष्णमान ९७.५° ते ९९° फा. असतें व निरोगी मनुष्याच्या बाबतींत हें बहुधा बदलत नाहीं. परंतु ताप आला असतां तें १०५° पर्यंत चढतें. यापेक्षांहि तें एकदोन अंश वर गेल्यास बहुधा मृत्यु येतो. सामान्यतः प्राण्यांचें उष्णमान ते ज्या परिस्थितींत राहतात तीवर अवलंबून असतें.

**शरीरजन्य विषनाशक**—(ॲन्टी-टॉक्सिन). रोग उत्पन्न करणाऱ्या कांहीं सूक्ष्म जंतूंचा नाश करण्याचा अथवा त्यांचें विष निरुपद्रवी करण्याचा गुण असणाऱ्या कांहीं जंतूंस विषघ्न जंतू म्हणतात. अशा तऱ्हेचे जंतू वस्त्रेवर जर एखाद्या घोड्यासारख्या प्राण्याच्या शरीरांत घालण्यांत आले आणि त्यानंतर कांहीं दिवसांनीं त्या घोड्याच्या शरीरांतील रक्त घेऊन त्याची लस तयार केली तर त्या लसीच्या योगानें पहिले विषारी जंतू मरण पावतात. घटसर्प, धनुर्वात, फुप्फुसदाह, रक्तविषार, वगैरेसारख्या सूक्ष्म जंतूंपासून उत्पन्न होणाऱ्या रोगांमध्यें अशा तऱ्हेची लस प्राण्यांच्या शरीरांत टोंचण्यांत येऊन असे कृमिघ्न जंतू जिवंत अथवा मृतस्थितींत त्या प्राण्याच्या शरीरांत घालण्यांत येतात. व त्या योगानें त्याचा रोगापासून बचाव करण्यांत येतो. गेल्या महायुद्धांत अशा तऱ्हेची लस टोंचून अनेक रोगांचा प्रतिबंध करण्यांत आला होता.

**शरीरवृद्धिग्रंथि**—(थायमस ग्लँड). शरीराच्या मध्यरेषेमध्यें ही एक रक्तवाहिनीविरहित ग्रंथि असते. हिची वाढ जन्माच्या सुमारास होऊन मनुष्य वयांत येईपर्यंत तिची सारखी वाढ होत राहते. त्यानंतर तिचा आकार हळूहळू कमी होत जातो. हिच्या पुढील भागीं उरोस्थि असून श्वासनलिकेच्या पुढें आणि बाजूला ती असते.

**शरीरशोषण**—(ॲट्रोफी). सुका रोग. उपासमारीनें किंवा शरीराच्या पोषणक्रियेमध्यें कांहीं बिघाड झाल्यामुळें मनुष्याच्या शरीराचें मांस हळूहळू एखाद्या विशिष्ट भागापुरेसें किंवा सर्व शरीरभर झडून जाऊं लागतें, तेव्हां त्यास शरीरक्षय असें म्हणतात. अस्थिव्रण, क्षय, मधुमेह, ताप, वगैरे रोग झाले असतां शरीराचा क्षय होत जातो. तसेंच शरीरांतील चलनवलनाच्या पेशींची झीज झाली किंवा कांहीं गात्रें बरोबर क्रिया करीत नाहींशीं झालीं म्हणजेहि अशी अवस्था होते. आयोडिन, शिसें, वगैरेंच्या विषारामुळेंहि हा विकार होतो. वृद्धावस्थेमध्यें किंवा लहान मुलांमध्यें उरोवृद्धि (थायमस) ग्रंथी लहान झाल्या असतांहि शरीर झिजूं लागतें.

**शर्करा(गुरुत्व)मापक**—(सॅकॅरिमीटर). साखरेच्या द्रावणाची तीव्रता मोजण्याकरितां या यंत्राचा उपयोग करण्यांत येतो. साखरेच्या द्रावणाच्या अंगीं प्रकाशाच्या ध्रुवताल (प्लेन ऑफ पोलरिझेशन) भ्रमण करण्याचा गुणधर्म असतो. व ज्या प्रमाणांत विशिष्ट द्रावणाची तीव्रता असेल त्या प्रमाणांत या तालाचें भ्रमण होतें. प्रकाशाचा किरण एका त्रिपार्श्वांतून साखरेच्या द्रावणावर पडून त्यांतून तो दुसऱ्या त्रिपार्श्वांतून बाहेर पाडण्यांत येतो, व या भ्रमणकोनावरून द्रावणाची तीव्रता मोजण्यांत येते. याप्रमाणें साखरेसारख्याच सेंद्रिय पदार्थांवर प्रकाशाचा परिणाम होत असतो, व त्यांच्या या गुणधर्मामुळेंच या पदार्थांच्या अंतर्गत रचनेचें व रासायनिक घटनेचें ज्ञान उपलब्ध झालें आहे.

**शर्करासंयुक्तें**—(ग्लुकोसाइड). द्राक्षशर्करा आणि इतर सेंद्रिय संयुक्तें यांच्या संयोगानें तयार झालेले वनस्पतिपदार्थ. कांहीं विशिष्ट फेनक द्रव्यें वापरून किंवा सौम्य अम्लांच्या योगें जलभेदन करून त्यापासून द्राक्षशर्करा व इतर वस्तू बाहेर काढण्यांत येतात. बदामांतील वातामक (ॲमिगडॅलिन), चेरी लॉरेलचीं पानें, सॅलिसिन (विलोच्या सालापासून काढलेला पदार्थ) हीं शर्करासंयुक्तांचीं उदाहरणें होत.

**शर्मा, नेकीराम** (१८८७-    )—एक सार्वजनिक कार्यकर्ते. हे संस्कृत व हिंदी भाषेचे पंडित आहेत. यांनीं होमरूल लीग चळवळींत प्रथम भाग घेतला व १९२० मध्यें बिगारीच्या जुलमाविरुद्ध जोराची चळवळ केली. यांस त्या वेळीं १५३ अ कलमाखालीं ८ महिन्यांची सक्त मजुरीची शिक्षा झाली. १९३० मध्यें मिठाच्या सत्याग्रहांत १२ महिन्यांची व १९३२ मध्यें पुन्हां तिसऱ्या ऑर्डिनन्सअन्वयें तीन महिन्यांची व क्रि. प्रो. कोडच्या १०८ व्या कलमाखालीं १२ महिन्यांची अशा शिक्षा झाल्या. हे

सनातनी असूनहि प्रगतिपर मताचे आहेत व अस्पृश्योद्धारास अनुकूल आहेत. यांनीं मारवाडी आगरवाल सभेची स्थापना केली.

**शर्मिष्ठा**—असुरराज वृषपर्व्याची कन्या. ही आपल्या असुरवर्गाच्या कल्याणार्थ देवयानीची दासी झाली. पुढें देवयानीपति ययाति याच्याशीं तिचें चोरून लग्न झालें व ती त्याची आवडती राणी होती. तिचा एक मुलगा पुरु यानेंच बापाची जरा स्वीकारली.

**शर्याति**—एक प्राचीन सम्राट्. वैदिक ग्रंथांत याचे शर्यात असे उल्लेख आहेत. हा वैवस्वत मनूचा पुत्र असून हा जसा शूर तसाच वेदवेदांगपारंगत होता. एका सत्रांत यानें स्वतः पौरोहित्य केलें होतें. विश्वामित्र हा याचा पुरोहित होता. यानें अश्वमेध केला व देवांच्या यज्ञांतहि गृहपति होण्याचा मान मिळविला.

**शर्ले, जेम्स** (१५९६–१६६६)—एक इंग्रज नाटककार व कवि. त्याने १६२५ ते १६४२ पर्यंत सुमारें तीस नाटकें लिहिलीं. त्याच्या दुःखान्त नाटकांपैकीं उत्तम नाटकें आहेत तीं—'दि ट्रेटर', 'दि मेड्स रिव्हेंज' आणि 'दि कार्डिनल'. त्याच्या सुखान्त नाटकांपैकीं फार प्रसिद्ध नाटकें आहेत तीं—'हाइड पार्क', 'दि गेमस्टर' आणि 'दि विटी फेअर वन'. शर्ले हा फार मोठ्या दर्जाचा नाटककार नाहीं, परंतु त्या काळांतील थोर नाटककारांच्या मालिकेंतील तो शेवटला नाटककार होय. त्यानें कांहीं कविताहि लिहिल्या आहेत. त्यांपैकीं त्याचें भावगीत "दि ग्लोरीज ऑफ अवर ब्लड ॲन्ड स्टेट" हें अतिशय प्रसिद्ध आहे.

**शल्य**—मद्राधिपति व माद्रीचा भाऊ अर्थात् पांडवांचा मातुल. हा युद्धसमयीं पांडवांच्या बाजून जात असतां दुर्योधनानें त्यास फसवून आपणांकडे वळवून घेतलें. कर्ण सेनापति असतांना यानें त्याचें सारथ्य केलें. पण त्या वेळीं त्यानें कर्णाचा तेजोभंग केला. १८ व्या दिवशीं यानें कौरवांचें सेनापतित्व स्वीकारलें होतें. त्याच दिवशीं त्यास युधिष्ठिराच्या हातून मरण आलें. हा फार शूर व विशेषतः गदायुद्धांत प्रवीण होता. 'शल्य–कर्ण संवाद' प्रख्यात आहे.

**शवरक्षण**—(एम्बामिंग). मृत मनुष्याचें शरीर न कुजतां बरेच दिवसपर्यंत टिकावें अशाकरितां त्यांत सुगंधी पदार्थ व कृमिनाशक औषधें भरण्याची क्रिया करतात. ईजिप्तमध्यें अशा रीतीनें मसाला भरून प्रेतें बरेच दिवस राखून ठेवीत असत. (ममी पाहा.) अर्वाचीन पद्धतीमध्यें शव स्पिरिटमध्यें ठेवणें ही एक पद्धति आहे. त्याच्याखालोखाल प्रेतें राखून ठेवण्याची महत्त्वाची पद्धति म्हणजे त्यांत पारदहरिद (मर्क्युरी क्लोराइड) पुरवणें ही होय. त्याप्रमाणेंच प्रेताच्या रक्तपेशींमध्यें जशद गंधाकित (सल्फेट ऑफ झिंक) टोंचून घालणें, या पद्धतीनेंहि रक्षणाचें काम होतें. इतरहि कांहीं सुगंधी द्रव्यांचा उपयोग करण्यांत येतो.

**शवोपजीवी वर्ग**—(सॅप्रोफाइट्स). कांहीं वनस्पती प्राण्यांच्या मृत शरीरावर किंवा मृत सेंद्रिय द्रव्यांवर उपजीविका करतात, त्यांस शवोपजीवी वनस्पती म्हणतात. अशा जातीच्या कांहीं वनस्पती–विशेषतः बुरशी वगैरे–कोणतेंहि कुजणारें द्रव्य आत्मसात् करून घेऊं शकतात. परंतु कांहीं वनस्पती विशिष्ट द्रव्य भक्षण करतात; उदा., देवदाराच्या कुजणाऱ्या पानावरच कांहीं विशिष्ट प्रकारच्या भूछत्र्या किंवा अळंबी आढळून येतात. एका तऱ्हेच्या अळंबी फक्त गाईच्या शेणावरच उगवतात व दुसऱ्या एका प्रकारच्या फक्त उंदरांच्या लेंड्यांवरच आढळतात. तसेंच कांहीं जातींचें शेवाळ फक्त विशिष्ट ठिकाणींच आढळतें.

**शस्त्रक्रिया**—(सर्जरी). शस्त्रवैद्यक फार प्राचीन आहे. त्याचा मागोवा सहा हजार वर्षांपर्यंत मागें काढतां येतो. मिसरी, ग्रीक, अरब या लोकांमध्यें या वैद्यकाचें जसें ज्ञान आढळतें, तसें आपल्याकडेहि दिसून येतें. आर्यवैद्यकाच्या मुख्य भागामध्यें 'शल्य' व 'शालाक्य' या दोन शस्त्रक्रियाविषयक भागांचा अंतर्भाव आहे. शल्यतंत्र किंवा मोठी शस्त्रक्रिया जी असते तींत शरीरांतील विजातीय द्रव्यें शस्त्रांच्या योगानें काढण्याचा प्रकार असतो. शालाक्यतंत्र किंवा लहान शस्त्रक्रिया यांत नेत्र आणि मस्तक यांना होणाऱ्या रोगांवर शस्त्रक्रिया करण्यासंबंधीं विवेचन आहे.

छेदन, भेदन, लेखन, वेदन (व्याधन), एषण, आहरण, विश्रावण व सीवन हे शस्त्रक्रियेचे आठ प्रकार आयुर्वेदकांत सांगितले आहेत. शस्त्रक्रियेच्या उपकरणांत यंत्रें (बोथट हत्यारें) व शस्त्रें (तीक्ष्ण हत्यारें) असे दोन वर्ग केले आहेत. यंत्रांत पुन्हां स्वस्तिक, संदंश, ताल, नाडी, शलाका व अनुयंत्र असे प्रकार असून उपकरणांत वीस प्रकार वर्णिले आहेत. कांहीं रोगांवर प्रत्यक्ष शस्त्रक्रिया न करतां क्षार, डाग, जळवा, इत्यादि सौम्य उपचार करण्यांत येतात, त्यांस अनुशस्त्रें म्हटलें आहे.

पाश्चात्य देशांत हिपोक्रॅटीज हा पहिला शस्त्रवैद्यक होय. जरी ग्रीक लोकांमध्यें आयोनिया व कोस या देशांमध्यें शस्त्रक्रिया प्रचलित होती तरी या विद्येचा विशेष उपयोग अलेक्झांड्रिया येथें ख्रि. पू. ३०० च्या सुमारास विशेष आढळून येतो. या शहरापासून या विद्येचा प्रसार सीरिया देशांत व युरोप खंडांत झाला. युरोप खंडांतील विद्यापुनरुज्जीवनाच्या कालीं व विशेषतः शारीरशास्त्राचें ज्ञान जसजसें वाढत गेलें तसतसें शस्त्रवैद्यकास अधिकाधिक चालना मिळाली; कारण त्यामुळें शस्त्रवैद्यांस शरीररचनेचें ज्ञान अधिक झाल्यामुळें त्यांचें कार्यक्षेत्र निश्चित होऊन त्यांस अधिक आत्मविश्वास उत्पन्न झाला. तथापि १९ व्या शतकांत गुंगी आणणाऱ्या औषधांचा शोध लागेपर्यंत शस्त्रक्रिया फार धोक्याची व अतिशय दुःखदायक असल्यामुळें ती करून घेण्यास सहसा कोणी तयार होत नसे. गेल्या शतकांत शस्त्रवैद्यकाची इतकी वाढ

झाली आहे कीं, सर जेम्स यंग सिंप्सन व लॉर्ड लिस्टर यांनीं क्लोरोफॉर्मचा शोध लावून एका नवीन विवेचाच पाया घातला असें म्हटलें पाहिजे. तसेंच त्या प्राचीन काळीं शस्त्रक्रिया शक्य तितक्या जल्द पूर्ण करून घेण्याकडे प्रवृत्ति असल्यामुळें आजच्या-प्रमाणें सर्व तंत्रें नीट सांभाळलीं जात नसत.

अलीकडे शस्त्रक्रियेंत जंतुघ्न पद्धतीच्या ऐवजीं जंतुरहित पद्धतीचा उपयोग करण्यांत येतो. या पद्धतींत संसर्गकारक जंतूंचा नाश करणाऱ्या प्रयत्नाऐवजीं शक्य तों जखम संसर्गविरहित ठेवण्याचा प्रयत्न करण्यांत येतो. याकरितां शस्त्रवैद्य व त्याचे साहाय्यक आपलीं हत्यारें व हात वगैरे सर्व गोष्टी जंतुरहित करण्याची क्रिया करतात. शस्त्रक्रिया करण्याची स्वतंत्र जागा, स्वतंत्र कपडे व बुरखे यांमुळें संसर्गाचा शक्य तों प्रतिबंध करतात. गुंगी आणणारीं औषधें व जंतुविरहित शस्त्रक्रिया या दोन साधनांमुळेंच अलीकडे शस्त्र-वैद्यकाची अतिशयच प्रगति झाली आहे. अर्वाचीन शस्त्रवैद्य शरीराची अथवा मेंदूची पोकळी उघडून त्यांतील कितीहि खालच्या थरांत असलेलें गळूं किंवा अपायकारक भाग कापून काढूं शकतो. तो पित्ताशय अथवा मूत्रपिंड यांतून खडे काढून टाकूं शकतो, किंवा पोटांतील आंतड्यांतील वगैरे अनिष्ट वाढ झालेला भाग कापून काढूं शकतो. किंवा आंतड्याचा कांहीं भाग अथवा गर्भाशय आणि त्याचे आनुषंगिक भाग काढून टाकूं शकतो. तसेंच मेंदूमध्यें झालेल्या गळवांस छिद्र पाडून कवटींतील उठाणूं नाहींसें करूं शकतो. तो पृष्ठवंशीय प्रणाली उघडून पृष्ठवंशमज्जातंतूवरील अथवा पृष्ठवंशमज्जारज्जूवरील दाब कमी करूं शकतो. तसेंच शरीरांतील कांहीं इंद्रियें (गर्भाशय, मूत्रपिंड) स्थानच्युत झाल्यास त्यांस आधार देऊन मूळ स्थानावर आणूं शकतो. या सर्व क्रियांमध्यें त्यास चाकूच वापरावा लागतो असें नाहीं. तो मोडलेलीं हाडें पुन्हां बसवून देतो, किंवा निखळलेले सांधे परत जोडून देतो व अशा वेळीं त्यास चाकू वापरावा लागत नाहीं.

शस्त्रवैद्यकाची एक मोठी शाखा विकृत अंगास सरळ करणें ही असते. अशा विकृती जन्मापासूनच्या असतात किंवा मागाहूनहि झालेल्या असतात. दंतवैद्यक ही एक याच शास्त्राची बरीच परिणतावस्थेस गेलेली शाखा आहे. या शाखेमध्यें दांतांची वक्रता किंवा अनियमितपणा दूर करून त्यांची योग्य स्थानीं स्थापना करणें हें कार्य असतें. शस्त्रवैद्यकाचें मुख्य कार्य शरीररक्षणाचें असून विकृति न होऊं देणें हें त्याचें ध्येय असतें. सध्यां प्रत्येक वैद्यास थोडेंफार शस्त्रवैद्यकाचें ज्ञान अवश्य असतें.

मेलनकारी शस्त्रक्रिया (प्लॅस्टिक सर्जरी)—गेल्या महायुद्धांत जे हजारों लोक जखमी होऊन शरीरानें विद्रूप बनले, त्यांतले इंग्लंडमधील एकट्या क्वीन्स हॉस्पिटलमधून १०,००० इसम पूर्ववत् होऊन बाहेर पडले. याचें सर्व श्रेय मेजर गिलीज व त्याचे सहकारी डॉक्टर यांस आहे. यांनीं हाडास हाड, मृदु अस्थीस मृदु अस्थि, चरबीस चरबी, जखम झालेल्या ठिकाणीं बसवून शरीराला मूळचा आकार व रूप आणून देण्याचें काम केलें व शंभर वर्षांत झाली नसती इतकी प्रगति गेल्या महायुद्धाच्या प्रसंगानें मेलनकारी शस्त्रक्रियेंत करून दाखविली आहे. या कौशल्यांतील अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणजे नष्ट झालेला भाग नवीन पदार्थांचा करून न बसवितां सजीव प्राण्याच्या शरीरां-तीलच हाड, मृदु अस्थि, कातडें, वगैरे भाग घेऊन तयार करण्यांत येतो. या युक्तीनें ओठ, गाल, नाक, डोळा, जबडा, वगैरे हरएक अवयव नवा बनवून चेहरा पूर्ववत् केलेले शेंकडों शिपाई इंग्लंडांत जिवंत आहेत. जादूच्या खेळांतल्यासारख्या ह्या अद्भुत गोष्टी ऐकून साधारण मनुष्य आश्चर्यानें थक्क होतो.

**शहर**—पुर हा शब्द ऋग्वेद व तदुत्तर ग्रंथ यांमध्यें वारंवार आलेला असून त्याचा अर्थ तट, बळकट किल्ला किंवा मार्याचें ठिकाण असा आहे. हे तट कांहीं प्रसंगीं बऱ्याच मोठ्या आकाराचे असले पाहिजेत. मेगॅस्थिनीझनें व पाली ग्रंथकारांनीं वर्णन केल्या-प्रमाणें पाटलिपुत्र शहरासारखीं मेढेकोट व पुढें खंदक ह्यांनीं युक्त शहरें त्या वेळीं असणें, हें शक्य आहे. पण याला स्पष्ट पुरावा नाहीं. शिवाय नगर हा शब्द बऱ्याच नंतर प्रचारांत आला ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. वैदिक काळीं शहरांतील राहणी विशेष प्रचारांत येऊन प्रगति झाली होती असें दिसत नाहीं. महाभारतांत नगर, ग्राम, घोष हे शब्द आलेले आहेत. वैदिक वाङ्मयांत ग्राम ह्याच्या पलीकडे लोकांची फारशी मजल गेली नव्हती, असें दिसतें. या ग्रामाची निरनिराळीं रूपें पुढें प्रचारांत आलीं असतील एवढेंच.

ख्रि. पू. सातव्या शतकांत हिंदुस्थानांत अयोध्या, वाराणशी, चंपा, कांपिल्य, कौशांबी, मथुरा, मिथिला, राजगृह, रोरुक, सागल, साकेत, उज्जयिनी, वैशाली, वगैरे शहरें होतीं. मौर्य-काळीं पाटलिपुत्र ही राजधानी म्हणजे ९ मैल पसरलेलें मोठें शहर होतें.

मुसलमानी अमदानींत दिल्ली, आग्रा, अहमदाबाद, सुरत, विजापूर यांप्रमाणें कांहीं मोठीं शहरें होतीं. पेशवाईत पुण्याला राजधानीचें स्वरूप व वैभव होतें. त्यामुळें पुण्याकडे लोकांची फार जा-ये असे. काशी हें प्रमुख क्षेत्र असल्यानें तेथें यात्रेकरूंची रीघ असे. तथापि त्या शहराला राजकीय महत्त्व नव्हतें. आजच्यासारखीं शहरें ब्रिटिश अमदानीपूर्वी नव्हतीं. तसेंच शहर आणि खेडें यांत आजच्याइतकी तफावत नव्हती. सर्वच गांवें चांगलीं वसलेलीं व समृद्ध असत. एकाच शहरांत सर्व गोष्टी केंद्रित केलेल्या नसत.

कोणत्या प्रकारच्या गांवाला शहर म्हणावें हें कोठें निश्चित ठरलेलें नसतें. कांहीं ठिकाणीं नगरपालिका असेल तें गांव शहर या संज्ञेस पात्र होतें. तर इंग्लंड–फ्रान्ससारख्या देशांत जेथें

विराप राहतो तें गांव शहर या दर्जाचें होतें. कांहीं राजांनीं वसविलेलीं शहरें असतात. अमेरिका आणि कानडा या देशांत ठराविक लोकसंख्येनंतर तें गांव शहर या पदास पोंचतें. आपल्याकडेहि आतां असेंच दिसून येतें. सरकारी कोर्ट-कचेऱ्या, दुय्यम शाळा व कॉलेजें, कांहीं उद्योगधंदे व व्यापार हीं जेथें असतील तें गांव साहजिक मोठें होतें. कांहीं शहरें राजधानी, कारखाने, गिरण्या, व्यापार, इ. मुळें फारच अवाढव्य बनतात.

आधुनिक काळांत खेड्यांकडून मोठाल्या शहरांकडे माणसांचा ओघ सारखा वाहत आहे. त्या कारणानें शहरें भरमसाट वाढत आहेत व खेडीं ओस पडत आहेत. शहरांत सर्व सुखसोयी, शिक्षणाचीं व उद्योगधंद्यांचीं साधनें भरपूर असतात; व व्यापार-उलाढाल फार चालते. पण याचा एक परिणाम म्हणजे नैतिक ऱ्हास आणि दारिद्र्यवृद्धि हा होय. रोगराई, स्पर्धा-मत्सर, गुन्ह्यांकडे प्रवृत्ति हीं शहरांत वाढत जातात व यांना टक्कर देण्याचें मोठें अवघड काम सरकारला करावें लागतें. नगरपालिका, नगररचना पाहा.

## जगांतील मोठीं शहरें

| शहरांचीं नांवें | लोकसंख्या | शहरांचीं नांवें | लोकसंख्या | शहरांचीं नांवें | लोकसंख्या |
|---|---|---|---|---|---|
| लंडन ( इंग्लंड ) | ८६.५ | नागुया ( जपान ) | १२.२ | ॲम्स्टरडॅम ( हॉलंड ) | ७.९ |
| न्यूयॉर्क ( अमेरिकन सं. संस्थानें ) | ७९.८ | बार्सिलोना ( स्पेन ) | ११.८ | मॉंटेव्हिडेव्हे ( युरुग्वे ) | ७.७ |
| पॅरिस ( फ्रान्स ) | ६६.५ | माद्रिद ( स्पेन ) | ११.७ | इस्तंबुल ( तुर्कस्तान ) | ७.४ |
| बर्लिन ( जर्मनी ) | ४२.९ | कियोटो ( जपान ) | ११.५ | सिंगापूर ( मलाया ) | ७.१ |
| शांघाय ( चीन ) | ४२.७ | ग्लासगो ( स्कॉटलंड ) | ११.२ | बाकू ( रशिया ) | ७.०९ |
| मॉस्को ( रशिया ) | ४१.४ | साओपावलो ( ब्राझील ) | ११.२ | सेउल ( कोरिया ) | ७.०६ |
| शिकॅगो ( सं. सं. ) | ३३.७ | मिलन ( इटली ) | ११.१ | लिस्बन ( पोर्तुगाल ) | ७. |
| ओसाका ( जपान ) | ३३.५ | बुडापेस्ट ( हंगेरी ) | ११.१ | मद्रास ( हिंदुस्थान ) | ६.४७ |
| टोकिओ ( जपान ) | ३२.७ | चुंकिंग ( चीन ) | १०.२ | बुखारेस्ट ( रुमानिया ) | ६.४३ |
| लेनिनग्राड ( रशिया ) | ३१.९ | बार्मिंगहॅम ( इंग्लंड ) | १० | ड्रेस्डेन ( जर्मनी ) | ६.४२ |
| ब्यूनॉस एरिस ( अर्जेंटिना ) | ३१.५ | कोबे ( जपान ) | ९.८ | सॉंटियागो ( चिली ) | ६.९ |
| याकोहामा ( जपान ) | २६.५ | प्राग ( झेकोस्लाव्हाकिया ) | ९.५ | अलेक्झांड्रिया ( ईजिप्त ) | ६.८ |
| रायो-द-जानेरिओ ( ब्राझील ) | २३.५ | स्टॉकहोम ( स्वीडन ) | ९.५ | पा. पिट्स्बर्ग ( सं. सं. ) | ६.६ |
| कलकत्ता ( हिंदुस्थान ) | २१.८ | बँगकॉक ( सयाम ) | ९.२ | लोड्झ् ( पोलंड ) | ६.६ |
| फिलाडेल्फिया ( सं. सं. ) | २० | मार्सेलस ( फ्रान्स ) | ९.१ | वॉशिंग्टन ( सं. सं. ) | ६.६ |
| डेट्रॉइट ( सं. सं. ) | १९.५ | क्लीव्हलँड ( सं. सं. ) | ९ | इसेन ( जर्मनी ) | ६.५ |
| व्हिएन्ना ( ऑस्ट्रिया ) | १९ | कॅंटन ( चीन ) | ८.६१ | जिनोआ ( इटली ) | ६.३ |
| मेल्बोर्न ( ऑस्ट्रेलिया ) | १९ | ब्रुसेल्स ( बेल्जम ) | ८.९ | सॅनफ्रान्सिस्को ( सं. सं. ) | ६.३ |
| हॅम्बुर्ग ( जर्मनी ) | १६.८ | कोपेन हेगेन ( डेन्मार्क ) | ८.९ | टोरोंटो ( कॅनडा ) | ६.३ |
| पेकिंग ( चीन ) | १६ | लिव्हरपूल ( इंग्लंड ) | ८.९ | ट्यूरिन ( इटली ) | ६.२ |
| मॉंट्रिआल ( कॅनडा ) | १५.१९ | नेपल्स ( इटली ) | ८.६ | ब्रेस्लॉ ( जर्मनी ) | ६.२ |
| मुंबई ( हिंदुस्थान ) | १४.८ | सेंट लुई ( सं. सं. ) | ८.२ | चांगशा ( चीन ) | ६.०६ |
| रोम ( इटली ) | १४.८ | बाल्टिमोर ( सं. सं. ) | ८ | रॉटरडॅम ( हॉलंड ) | ६.०५ |
| मेक्सिको ( मेक्सिको ) | १४.६ | बोस्टन ( सं. सं. ) | ७.८१ | मिलवाकी ( सं. सं. ) | ५.७८ |
| सिडने ( ऑस्ट्रेलिया ) | १३.९ | हॅंकोन ( चीन ) | ७.७७९ | बफेलो ( सं. सं. ) | ५.७३ |
| कैरो ( ईजिप्त ) | १३.५ | कोलोन ( जर्मनी ) | ७.५६ | लिऑन ( फ्रान्स ) | ५.७० |
| टिएंटसीन ( चीन ) | १३ | मॅंचेस्टर ( इंग्लंड ) | ७.३६ | फ्रॅंकफुर्ट ( जर्मनी ) | ५.५५ |
| वॉर्सा ( पोलंड ) | १२.५ | म्यूनिक ( जर्मनी ) | ७.३५ | शेफील्ड ( इंग्लंड ) | ५.१८ |
| लॉस एंजल्स ( सं. सं. ) | १२.३ | लाइप्झिक ( जर्मनी ) | ७.१३ | निझ्नी नोव्हगोराड ( रशिया ) | ५.१२ |

| शहरांचीं नांवें | लोकसंख्या | शहरांचीं नांवें | लोकसंख्या | शहरांचीं नांवें | लोकसंख्या |
|---|---|---|---|---|---|
| हॅवाना ( क्युबा ) | ५.६ | हैद्राबाद ( हिंदुस्थान ) | ४.६६ | हेग ( हॉलंड ) | ४.९ |
| डॉर्टमंड ( जर्मनी ) | ५.४ | मिनीएपोलिस ( सं. सं. ) | ४.६४ | डब्लिन ( आयर्लंड ) | ४.९ |
| नानकीन ( चीन ) | ५.२ | न्यू ऑर्लिन्स ( सं. सं. ) | ४.५८ | रेसिफी ( ब्राझिल ) | ४.७ |
| दिल्ली ( हिंदुस्थान ) | ५.२ | सिनसिनाटी ( सं. सं. ) | ४.५१ | डि. हॅम्बुर्ग ( जर्मनी ) | ४.४ |
| लीड्स ( इंग्लंड ) | ४.९१८ | व्हिक्टोरिया ( हॉंगकॉंग ) | ४.४७ | बेलफास्ट ( आयर्लंड ) | ४.३ |
| एडिंबर्ग ( स्कॉटलंड ) | ४.६८५ | हॅनोव्हर ( जर्मनी ) | ४.४३ | लाहोर ( हिंदुस्थान ) | ४.२ |
| डुसेल डार्फ ( जर्मनी ) | ४.९८ | न्यू यॉर्क ( सं. सं. ) | ४.४२ | वूपरताल ( जर्मनी ) | ४.०८ |
| ओडेसा ( रशिया ) | ४.९७ | स्टटगार्ट ( जर्मनी ) | ४.१५ | रंगून ( ब्रह्मदेश ) | ४ |
| तास्कंद ( रशिया ) | ४.९१ | पालेर्मो ( सिसिली ) | ४.११ | अथेन्स ( ग्रीस ) | ३.९ |
| | | | | अँटवर्प ( बेल्जम ) | २.७ |

[ टीप—लोकसंख्येचे आंकडे लाखांचे असून सुमारें १९३१ ते १९४५ सालांपर्यंतचे आहेत. ]

**शहाअलम** ( राज्य. १७५९–१८०६ )—दिल्लीचा एक मोंगल बादशहा. दिल्लीच्या मोंगल घराण्यांतील दुसऱ्या अलमगिराचा खून झाल्यावर त्याचा हा मुलगा 'शहाअलम' असें नांव धारण करून दिल्लीचा बादशहा झाला. दिल्ली ताब्यांत नसल्यानें हा प्रथम इंग्रजांच्या आश्रयास गेला. इंग्रजांना सन १७६५ मध्यें यानें बंगाल, बिहार व ओरिसा या प्रांतांच्या दिवाणीच्या सनदा दिल्या. यानंतर सन १७७० मध्यें मराठ्यांनीं यास दिल्लीस आणलें. सन १७८८ मध्यें नजीबखानाचा नातू गुलाम कादर यानें याच्या बायकामुलांचे हाल करून याचे डोळे काढले. तेव्हां यानें महादजी शिंद्याच्या साहाय्यानें गुलाम कादरचा वध करवला. या वेळेपासून सर्व मोंगली साम्राज्यावर व बादशहावर मराठ्यांचें वर्चस्व बसलें. वयाच्या ८६ व्या वर्षी हा मरण पावला. यास राजकारणांतील अंग नव्हतें. मात्र हा सज्जन व पापभीरु होता.

**शहाजहान** ( १५९३–१६६६ )—पांचवा मोंगल बादशहा. शहाबुद्दीन महंमद किरान ऊर्फ शहाजहान हा जहांगीर सेलिमचा जोधपूर राजकन्येपासून झालेला पुत्र होय. नूरजहान व असफखान यांच्या खटपटीमुळें यास राज्य मिळालें. बाप जिवंत असतां यानें दोनतीनदां बंड केलें होतें. पण तें अयशस्वी झालें. राज्यावर आल्यावर यानें सर्व आप्तांना ठार केलें. १६३७ त शहाजीचा पराभव करून अहमदनगरचा सर्व मुलूख यानें आपल्या ताब्यांत घेतला. युरोपियन लोकांनीं हिंदुस्थानांत न यावें याकरितां तो विशेष खबरदारी घेई व धार्मिक बाबतींत तो त्यांना हात घालूं देत नसे. असफखानाची मुलगी मुम्ताज ही शहाजहानची बायको. तिच्यापासून त्याला ८ पुत्र व ६ कन्या अशीं १४ अपत्यें झालीं. या मुम्ताजच्या स्मरणार्थ जगप्रसिद्ध ताजमहाल कबर त्यानें आग्र्यास बांधली. वृद्धपणीं वडील पुत्र दारा याच्या हातीं त्यानें राज्यकारभार दिला होता. पण पुढें औरंगजेबानें बापाला कैदेंत टाकून व सर्व भावांचा पराभव करून राज्य मिळविलें ( १६५८ ). शहाजहाननें ८ वर्षे मुलाचा कारागृहवास सोसला व तो त्यांतच मृत्यु पावला. त्याची कारकीर्द शांततेची गेली व मोंगल अमदानीचा भरभराटीचा कळस त्याच्या कारकीर्दीत झाला. हा मोठा विलासी व रंगेल असे. हल्लींचें दिल्ली शहर यमुनेच्या तीरीं त्यानेंच वसविलें. ताजमहालखेरीज जुम्मा मशीद, मोती मशीद, दिवाण-इ-आम, दिवाण-इ-खास, वगैरे यानें बांधलेल्या इमारती प्रेक्षणीय आहेत. यानें दानधर्महि बराच केला.

**शहाजिरें**—फारसी नांव जिरेसियाह. शहाजिरें जिऱ्यापेक्षां बारीक असतें व याचा उपयोग गरम मसाल्यांत करतात. लाहोर, पश्चिम हिमालय प्रदेश, रशिया, वगैरे भागांत हें होतें. हें औषधीहि आहे.

**शहाजी** ( १६०१–१६६४ )—मराठी साम्राज्याचा संस्थापक शिवाजी याचा पिता व एक शूर मराठा राजा. हा मालोजीस दीपाबाईच्या पोटीं शहा-शरीफ साधूच्या कृपेनें झाला, म्हणून याचें शहाजी असें नांव ठेवलें. मालोजी वारला तेव्हां हा पांच वर्षांचा होता. तेव्हां याचें पालन चुलता विठोजी यानें केलें. याचें लग्न १४ व्या वर्षी निजामशाहींतील मोठा सरदार लुकजी जाधव याच्या मुलीबरोबर झालें.

१६२१ च्या सुमारास लुखजी हा मोंगलांस मिळाला, व त्यानें शहाजीसहि आपल्याकडे बोलाविलें. पण शहाजी निजामशाहीशीं

बेइमान झाला नाहीं. यामुळें सासऱ्या-जांवयांत वैर वाढलें. मलिकअंबरचा शहाजीवर फार विश्वास होता, म्हणून त्यानें त्याला मुख्य सेनापति केलें. लगेच शहाजीनें मोंगलांचा व त्याबरोबरच सासऱ्याचा भातवडीच्या लढाईंत मोठा पराभव केला. पुढें मलिकअंबराशीं वितुष्ट आल्यानें तो विजापूरकरांकडे गेला. मलिकअंबर वारल्यावर पुन्हां हा निजामशाहींत आला व मोंगल-निजाम यांमध्यें युद्ध सुरू झालें. शहाजी व शहाजहान यांच्यांतील अनुक्रमें निजामशाही बुडविण्याची व तारण्याची ही झटापट ९ वर्षे चालू होती आणि यामुळेंच राधामाधवविलासचंपूकारानें उत्तरेंत शहाजहान व दक्षिणेंत शहाजी यांची तुलना केली व गागाभट्टानें शहाजीस क्षत्रिय धर्माचा नवा अवतार म्हटलें आहे. कांहीं दिवस हा मोंगलांकडेहि होता. नंतर शहाजीनें निजामशाहीच्या कुळांतील एका पोरास पेमगिरी येथें तक्तावर बसवून त्याच्या नांवानें, गेलेला निजामशाही मुलूख जिंकण्याचा सपाटा लावला. तेव्हां खुद्द शहाजहान पाऊण लाख फौज घेऊन दक्षिणेंत आला. या प्रसंगींहि खुद्द शहाजहानास शहाजीनें गनिमी लढाईनें पुष्कळ महिने दाद दिली नाहीं. शाहिस्तेखानाच्या सैन्यानें जुन्नर घेतलें. पण मोंगलांचा शिवनेर घेण्याचा प्रयत्न शहाजीनें चालूं न देतां बोरघाटांत त्यानें त्यांचा फार नाश केला. विजापूरकरांच्या मध्यस्थीनें निजामशहा व सहा किल्ले त्यानें मोंगलांच्या हवालीं करून आपण आदिलशहाचा मनसबदार बनला. यानंतर स्वतःला मिळालेल्या कर्नाटकच्या जहागिरीची व्यवस्था लावण्यांत त्यानें आपले दिवस घालविले आणि स्वराज्यस्थापनेचें काम शिवाजीवर सोंपविलें. शहाजीची फूस शिवाजीला आहे असें कळल्यावर आदिलशहानें शहाजीला मुस्तफाखान व बाजी घोरपडे यांच्याकडून विश्वासघातानें कैद करविलें व ठार मारविण्याची शिक्षा दिली. तेव्हां शिवाजीनें मोंगलांकडून आदिलशहाला प्रेप लावून बापाची सुटका केली. अफजलखानाच्या वधानंतरहि शिवाजी आपल्याला आटोपत नाहींसें पाहून आदिलशहानें शहाजीसच तह करविण्यासाठीं म्हणून त्याच्याकडे पाठविलें. बाप-लेकांची ही भेट जेजुरीस झाली. जिजाबाईला शहाजीपासून ६ मुलें झालीं, त्यांत ४ अल्पायु होतीं, पांचवा संभाजी व सहावा शिवाजी होय. दुसरी बायको मोहित्यांकडील तुकाबाई हिला एक व्यंकोजी हा मुलगा झाला. शहाजीस शिकारीचा फार नाद होता. एकदां तो हरणाची शिकार करीत असतां हेद्देगिरी (म्हैसूर संस्थान) या नजीकच्या गांवीं घोड्यावरून पडून त्याचा अंत झाला. या ठिकाणीं त्याचें वृंदावन असून पेशवाईअखेर त्याला उत्पन्न चालू होतें. शहाजी हा शिवाजीप्रमाणेंच स्वाभिमानी व पराक्रमी होता. त्या वेळच्या देशपरिस्थितीमुळे त्याला स्वतंत्र राज्य स्थापतां आलें नाहीं. तथापि दक्षिण हिंदुस्थानांत त्यानें बऱ्याच उलाढाली केल्या, व हिंदु राज्यें बुडूं दिलीं नाहींत.

**शहाजी भोसले** (सन १६८४–१७११)—तंजावरचा एक राजा. एकोजीचा हा वडील पुत्र. याच्या कारकीर्दींत यास अनेकवार लढाया घ्याव्या लागल्या. परंतु याचे भाऊ, आई दीपाबाई व याच्या वडिलांच्या वेळचे अनुभवी मुत्सद्दी यांच्या मदतीमुळें व सल्लयामुळें या अडचणींतून हा सुखरूप बाहेर पडला. अनेक कवींना यानें आश्रय दिला होता. ख्रिश्चन मुलांना आपल्या राजवाड्यांत आश्रय देऊन यानें त्यांच्या शिक्षणाची सोय केली. तसेच यानें शिवकथेवर 'चंद्रशेखरविलास' नांवाचें एक नाटकहि लिहिलें. याच्या पत्नीचें नांव चिमाबाई. यास पुत्र नसल्यानें याच्यानंतर याचा भाऊ सरफोजी हा गादीवर बसला.

**शहाणा**—हा राग काफी थाटांतून उत्पन्न होतो. याच्या आरोहांत धैवत वर्ज्य व अवरोह सर्व स्वरांचा आहे. म्हणून याची जाति षाडव–संपूर्ण आहे. वादी स्वर पंचम व संवादी षड्ज आहे. गानसमय मध्यरात्र सर्वसंमत आहे. या रागाचें स्वरूप कानडा व मेघ या रागांच्या मिश्रणानें बनलेलें दिसतें. या रागाच्या अवरोहांत धैवत स्वर दुर्बलच असतो. हा आधुनिक व यावनिक राग आहे. हा एक कानड्याचा प्रकार आहे.

**शहानवाझ, बेगम जहाँ आरा**—एक मुसलमान राजकारणी महिला. या सर महंमद शफी यांच्या कन्या व मियां शहानवाझ, बॅरिस्टर (लाहोर) यांच्या पत्नी होत. यांचें शिक्षण लाहोर येथें क्वीन मेरी कॉलेजमध्यें झालें. या लहानपणापासून व पडद्यांत असतांच सार्वजनिक कार्यांत भाग घेऊं लागल्या. १९१७

मध्यें यांच्या आग्रहानेंच अ. भा. मुसलमान स्त्री-परिषदेमध्यें अनेक-पत्नीत्वाविरुद्ध ठराव संमत करण्यांत आला. १९२० मध्यें यांनीं पडदा टाकून दिला व तेव्हांपासून या शैक्षणिक व सामाजिक गोष्टींत विशेष भाग घेऊं लागल्या. या अनेक इस्पितळें व प्रसूतिगृहें यांसंबंधीं स्थापलेल्या समितींच्या सभासद आहेत. १९२६ पासून या पंजाबच्या फिल्म सेन्सॉर बोर्डाच्या सभासद आहेत. अ. भा. मुस्लिम लीगच्या कौन्सिलमध्यें स्त्री-सभासदांच्या तर्फे या पहिल्या प्रतिनिधि होत. १९२९ मध्यें या प्रथमच लाहोर येथें समाजसुधारणा-परिषदेच्या उपाध्यक्ष निवडल्या गेल्या. १९३० मध्यें यांचे वडील साम्राज्य-परिषदेकरितां गेले असतां या त्यांच्या चिटणीस म्हणून गेल्या. गोलमेज परिषदेच्याहि या स्त्री-प्रतिनिधि असून नंतर 'जॉइंट पार्लमेंटरी' समितीच्याहि सभासद होत्या (१९३०-३४). राष्ट्रसंघाच्या बैठकीसहि या सभासद म्हणून गेल्या होत्या. या मध्य पंजाब, पश्चिम पंजाब व दिल्ली येथील स्त्रियांच्या परिषदांच्या अध्यक्ष होत्या. १९३५ मध्यें राष्ट्र-संघाच्या प्रोटेक्शन अॅण्ड वेल्फेअर ऑफ चिल्ड्रेन (बालसंगोपन) याकरितां नेमलेल्या सल्लागार मंडळाच्या त्या स्त्री-प्रतिनिधि होत्या.

**शहाबुद्दीन घोरी** (राज्य. ११७३-१२०६)—एक मुसलमान बादशहा. हा अल्लाउद्दिनाचा पुतण्या महंमद घोरी या नांवानेंहि ओळखला जातो. हा ग्यासुद्दिननंतर घोरचा राजा झाला (१२०३). त्यापूर्वी हा गझनीचा सुभेदार होता. शहाबुद्दिनानें उत्तर हिंदुस्थान बराचसा जिंकून घेतला तेव्हां हिंदु राजांच्या पोटांत धडकी भरली व ते एकत्र झाले. ११९१ त कर्नाळ्याजवळ हिंदु आणि मुसलमान सैन्यांमध्यें लढाई झाली व तींत मुसलमानांचा चांगलाच पराभव झाला. पुढल्या वर्षी त्याच जागीं महंमद घोरीनें हिंदूंचा पराभव केला. या लढाईत त्यांचा पुढारी पृथ्वीराज धरला गेला (पृथ्वीराज चव्हाण पाहा). नंतर पृथ्वीराजाची राजधानी दिल्ली ही मुसलमानी सत्तेचें केंद्रस्थान बनली. यानंतर घोरींची सत्ता पश्चिम आणि दक्षिण बाजूंना पसरली. बंगालहि ताब्यांत आला. या विजयानें चढून जाऊन महंमदानें खिवावर मोहीम नेली. पण तींत त्याचा धुव्वा उडाला. त्याचा सिंधु नदीच्या कांठीं छावणींत कांहीं गख्खर लोकांनीं खून केला. शहाबुद्दिनानें गझनीच्या महंमदाप्रमाणें स्वाऱ्या करून तीस वर्षे हिंदुस्थानला जर्जर करून सोडलें व या देशांत मुसलमानी सत्ता स्थापित केली.

**शहामृग**—हा एक धांवणारा पक्षी आहे. हा आफ्रिकेंतील व अरबस्तान-मेसापोटेमियांतील वाळवंटांत राहतो. हा सर्वांत मोठा पक्षी आहे. याची उंची सहापासून आठ फुटांपर्यंत असते. याच्या शरीरावरील पिसें सामान्यतः काळीं असून पंख व शेपटीवरील पिसें पांढरीं असतात. याचे पाय फार बळकट असतात. मांड्यांवर पिसें नसतात.

याचे पंख आखूड असून उडण्याच्या उपयोगी पडत नाहींत. परंतु हे पक्षी घोड्यापेक्षां जलद धांवतात. हे बहुधा कळप करून राहतात. याच्या अंड्याचें वजन सरासरी ३ पौंड असतें. दक्षिण अमेरिकेमध्यें या पक्ष्यासारखे कांहीं पक्षी आहेत, त्यांस 'अमेरिकन शहामृग' म्हणतात; पण ते दुसऱ्या जातीचे आहेत. त्यांच्या डोक्यावर पिसें असून त्याच्या पायास तीन बोटें व नखें असतात. शहामृगाचीं, विशेषतः त्याच्या पाठीवरचीं पिसें मौल्यवान् समजतात व पोषाखांत वापरतात. या पक्ष्याचीं उत्तम पांढरीं पिसें ट्रिपोली, ईजिप्त, ट्यूनिस व आल्जिअर्स यांमधून बाहेर पाठविलीं जातात. केप कॉलनीमध्यें शंभर वर्षांपासून शहामृग बाळगण्यांत येत असून तेथून इंग्लंडमध्यें पिसें पाठविण्यांत येतात.

**शॉ, जॉर्ज बर्नार्ड** (१८५६-१९५०)—एक विख्यात ब्रिटिश नाटककार, कादंबरीकार व टीकाकार. हा आयरिश असून याचें लहानपण डब्लिनला गेलें. १८७३ सालीं लंडनला येऊन यानें वृत्तपत्रलेखकाचा धंदा कसाबसा नऊ वर्षे केला. १८७९ ते १८८३ या काळांत त्यानें पांच कादंबऱ्या लिहिल्या.

त्यांत 'कॅशेल बायरन्स प्रोफेशन्स' (१९०३ सालीं या कादंबरीचें नाटक बनवण्यांत आलें.) आणि 'ॲन अनसोशल सोशिॲलिस्ट' (नुटक वागणारा समाजवादी) या कादंबऱ्या आहेत. नंतर तो समाजवादी पक्षांत काम करूं लागला. व त्याच वेळीं कांहीं नियतकालिकांतून टीकात्मक लेख देऊं लागला. यथा

म्हणूनहि गणला गेला. त्यानें कांहीं नाटकें लिहिलीं तीं म्हणजे 'विडोअर्स हौसेस'; 'मिसेस वॉरन्स प्रोफेशन' (या नाटकाला प्रथम सरकारमनाई होती, पण अखेर १९०२ सालीं तें रंगभूमीवर आलें); 'सीझर ॲण्ड क्लिओपाट्रा'; 'आर्म्स ॲण्ड दि मॅन'; 'यू नेव्हर कॅन टेल'; 'मॅन ॲण्ड सुपरमन'; 'पिगमेलियन'; 'बॅक टू मेथूसेलाह' (हीं एकंदर पांच नाटकांची माला आहे १९२८); आणि 'सेंट जोन ऑफ आर्क' हीं होत. याच्या नाटकांच्या प्रस्तावनेंत सामाजिक आणि धार्मिक गोष्टींची चर्चा असे. नाटकांतील संवाद खोंचदार व विडंबनात्मक असत. १९२५ सालीं त्याला नोबेल पारितोषिक मिळालें. 'समाजवाद आणि भांडवलशाही यांसंबंधीं सुज्ञ महिलेला मार्गदर्शिका' या नांवाचें त्याचें पुस्तक फार लोकप्रिय झालें.

शॉ हा विक्षिप्त म्हणून ओळखला जाई. शॉचे विचार अगदीं स्वतंत्र असून तो ते अतिशय निर्भीडपणे सांगत असे. समाजांतील ढोंगीपणावर तो कोरडे ओढी. तथापि त्याला विधायक तत्त्वज्ञानी किंवा विचारवंत म्हणतां येणार नाहीं.

**शाई**—शाई ही दोन प्रकारची उपयोगांत आणतात: एक लिहिण्याच्या कामीं—ही पातळ द्रव स्थितींत असते व दुसरी छापण्याच्या वगैरे कामीं—ही जरा घट्ट असते. इ. स. पूर्वींच्या अडीच हजार वर्षांपासून पापीरसच्या पुस्तकांकरितां शाई वापरलेली आढळते. प्रथम शाई काजळापासून करीत. तींत माक्याचा रस, गोंद, साखर वगैरे टाकून ती पक्की करीत. परंतु लोखंडाच्या गंजाची शाई जी आज वापरण्यांत येते ती अकराव्या शतकापूर्वी आढळत नाहीं. निळीकाळी व काळी या शाया फार प्रचारांत आढळतात. ही शाई बहुधा हिराकस (लोहगंधकित) व हिरड्यासारखी कांहीं —पति अथवा झाडाची अळंबी यांपासून बनविण्यांत येते.

शाई बहुधा पाण्यामध्यें एक टक्का कोसाइन विरघळवून त्यांत एखादे जंतुनाशक द्रव्य घालून बनवितात. पूर्वी हिंदुस्थानांत तांबडी शाई अळित्यापासून तयार करीत व तो अळित्याचा रंग आल नांवाच्या झाडापासून काढीत. तांबड्या शाईकरतां डांबरी रंगहि वापरण्यांत येतात. हिरवी शाई बहुधा नीळ व पिवडी यांचें मिश्रण किंवा डांबरी रंगापासून बनवितात. व्हायोलेट शाईहि अशाच एका डांबरी रंगापासून तयार करतात. निळी शाई निळीपासून तयार करीत; पण अलीकडे डांबरी रंगापासूनच बनविण्यांत येते.

लिहिण्याच्या शाईंतच थोडी साखर, ग्लिसरीन, गोंद किंवा डेक्स्ट्रिन घालून नकला करावयाची शाई (कॉपिंग इंक) तयार करतात. कपड्यावर नांव घालण्याची शाई बिब्या वगैरेसारख्या फळांपासून बनवीत असत. पण अलीकडे एखाद्या रुप्याच्या क्षारापासून बनवितात. रबरस्टॅंपची शाई एखादा डांबरी रंग पाणी व ग्लिसरीन यांच्या मिश्रणांत विरघळवून तयार करतात. ग्लिसरीनमुळें ही शाई लवकर वाळत नाहीं.

चिनी शाई फार प्राचीन काळापासून प्रसिद्ध असून अद्यापिहि ती लिहिण्याच्या व चित्रकलेच्या कामीं उपयोगांत आणतात. ही काजळ, गोंद, सरस किंवा व्हार्निश यांच्या मिश्रणापासून बनवितात. छापण्याची शाई निरनिराळ्या प्रकारचे रंग बारीक दळून त्यांत अळशीचें उकळलेलें तेल, राळ व साबण यांचें मिश्रण घालून दळून तयार करतात. साबणामुळें शाई टाइपापासून सुटून कागदास लागते.

**शाकटायन**—१. एक वैदिक वैयाकरण. यास्क आणि पाणिनि यांनीं याचा उल्लेख केला आहे. सर्व शब्द धातुज आहेत असें याचें मत होतें. याच्या नांवावर एक स्मृति व एक व्याकरण आहे.

२. सुप्रसिद्ध जैन वैयाकरण. 'शाकटायनप्रक्रियासंग्रह' हा ग्रंथ लिहून यानें स्वतःच आपल्या या ग्रंथावर 'अमोघवृत्ति' नांवाची टीका लिहिली आहे. 'अमोघवृत्ति' हें नांव यानें अमोघवर्ष राष्ट्रकूटाच्या स्मरणार्थ म्हणून ठेवलें. हा नवव्या शतकाच्या उत्तरार्धातला दिसतो.

**शाकल, शाकल्य**—एक वैदिक ऋषि. उपलब्ध ऋग्वेदसंहिता शाकल शाखेचीच आहे. शाकलानें ऋग्वेदसंहितेचा पदपाठ केला व या संहितेचें स्पष्टीकरण आपल्या अनेक शिष्यांना करून सांगितलें. म्हणून या संहिताशाखेस शाकलशाखा हें नांव पुढें पडलें असावें. पाणिनि, कात्यायन, पतंजलि प्रभृति वेदपंडितांनीं शाकलाचें ऋण मान्य केलेलें आहे. प्रातिशाख्यांतहि अनेक ठिकाणीं शाकलाचा उल्लेख येतो. शाकलाच्या नांवावर एक स्मृतिग्रंथ आहे.

**शाकाहार**—जगामध्यें कांहीं भागांत सतत शाकाहार करणारे लोक आहेत. परंतु सर्व देशांमध्यें बहुसंख्य लोक मांसाहारीच आढळतात व अशा मांसाहारी देशांमध्यें शाकाहाराविषयीं प्रचार करणें आवश्यक असतें. इंग्लंडमध्यें ही शाकाहाराची चळवळ १८४७ मध्यें सुरू झाली. हिचा उद्देश आपल्या अनुयायांस सर्व प्रकारच्या मांसाहारापासून निवृत्त करणें हा होता. या चळवळींतील कांहींच्या मतें लोणी, दूध व अंडीं यांच्यापासून कोणत्याहि प्राण्याची हिंसा होत नसल्यामुळें त्यांचा समावेश शाकाहारांत करण्यांत येतो. याचा पुरस्कार अहिंसेच्या तत्त्वावर आणि फळें, भाजीपाला, वगैरे खाल्ले असतां रोगांच्या जंतूंचा प्रवेश शरीरांत होण्याचा संभव कमी असतो, म्हणून केला जातो. तसेंच शाकाहारी भोजनापासून मितव्यय होतो आणि एकंदर शरीरावर आरोग्यकारक आणि नैतिक परिणाम चांगले होतात. हिंदु समाजांत ब्राह्मणवर्ग निवळ शाकाहारी आहे. कांहीं गौड

ब्राह्मण मत्स्याहार करतात; तो त्यांना निषिद्ध नाहीं. पंचद्राविड मात्र मत्स्यमांसाहार निषिद्ध समजतात. मांसाहार पाहा.

**शाक्त संप्रदाय**—हिंदूंमधील एक धर्मपंथ. शिवपत्नी काली ही शाक्त प्रधान देवता मानतात. तीच शक्ति होय. जगांतील स्त्रीतत्त्व यांस पूज्य आहे. यांची वामाचार पद्धति रुढ सामाजिक नीतितत्त्वांस मान देत नाहीं. कुलार्णव, गुप्तसाधनतंत्र, निरुत्तरतंत्र, शामारहस्य, प्राणतोषिनी, वगैरे ग्रंथांत वामाचाराचें वर्णन आहे. यांत कोणत्याहि प्रकारचा जातिनिर्बंध नाहीं. अस्पृश्य मानलेल्या वर्गांतहि समानता प्राप्त होते. या शाक्त पंथाशिवाय भैरवपंथ, शीतलापंथ, मार्गी, मातापंथी, कुंडा, वगैरे पंथाचे लोक वामाचारी असतात. हे भगवें वस्त्र, रुद्राक्ष व त्रिशूल धारण करतात. तंत्रवाङ्मय हा शाक्तांना वेदाप्रमाणें प्रमाणभूत आहे. बंगाल्यांत शाक्तपंथी बरेच आहेत.

**शाक्यकुल**—हा मगधांतील एक सधन व स्वाभिमानी समाज दिसतो. याच कुलांत गौतम बुद्धाचा जन्म झाला. प्रसेनजितानंतर गादीवर बसलेल्या विरुधकानें या कुलाचा नाश केला. गौतमकालीं या समाजांत दहा लाखपर्यंत लोक असून ते आपला राजा निवडीत. यांचीं निरनिराळ्या शहरीं सभागृहें असत. हे मुख्यतः शेतकी करून राहत. शाक्यांत लिच्छवी, मल्ल, नाग, वालि व कोळी यांचा समावेश असे, असें जातकांवरून कळतें. हा समाज प्रथम आर्येतर किंवा परदेशचा असावा अशा तऱ्हेचे कांहीं तर्क संशोधकांनीं केलेले आहेत.

**शांघाय**—चीन, एक मोठें बंदर. हें एका नदीवर आहे. १८४३ च्या पूर्वी हें एक लहान तटबंदी गांव होतें, पण त्या वर्षी झालेल्या नानकिंगच्या तहामुळें परदेशी व्यापारास हें खुलें होऊन येथें प्रथम ब्रिटिश वसाहत स्थापन झाली. नंतर फ्रेंच, जर्मन व अमेरिकन वसाहती होऊन मोठा जागतिक व्यापार सुरू झाला. आतां प्रत्येक राष्ट्राचे वकील तेथें आहेत. याचा आतां विस्तार इतका झाला आहे कीं, जगांतलें हें सातवें प्रमुख शहर बनलें आहे. बाहेरून कापडी माल, धातू, पेट्रोल, यंत्रें, अनेक लहानसान जिनस बंदरांत येतात. व रेशीम, चहा, तांदूळ, तेलें, सूत, कातडीं, लोकर, इ. माल बाहेर रवाना होतो. ब्रिटिश व्यापाऱ्यांच्या हातीं या व्यापाराचीं बहुतेक सूत्रें असत. पण दुसऱ्या महायुद्धामुळें परिस्थिति बदलली आहे. खुद्द शांघायमध्यें सुताच्या आणि रेशमाच्या गिरण्या आहेत व तंबाखूचे कारखाने चालतात. बंदरांत बोटी बांधण्याचें कामहि चालतें. चिनी लोकांची वस्ती जुन्या भागांत पंधरा लाखांवर आहे व युरोपियनांच्या भागांत १२,००० वर परकीय लोक आहेत. दोन वर्षांपूर्वी राष्ट्रीय चिनी सरकार आणि कम्युनिस्ट पक्ष यांच्यांत घनघोर युद्ध झालें तेव्हां शांघायचा फार नाश झाला. आतां हें विद्यमान कम्युनिस्ट चिनी सरकारकडे आहे.

**शॅाट, डॉ. हाल्मार होरेस ग्रीले** (१८७७– )—हा जर्मन अर्थशास्त्रज्ञ व राजकारणी पुरुष कील येथें जन्मला. प्रथम बँकर होऊन तो ब्रेमेन येथील एका बँकेचा मॅनेजर व नंतर भागीदार बनला. पहिल्या महायुद्धानंतर तो जर्मन डेमोक्रॅटिक पक्षांत सामील झाला. १९२३ सालीं जर्मन चलनी नाण्यांची अनोनात वाढ झाली तेव्हां त्याला टिकाऊ स्वरुप देण्याची योजना शॅाटनें आंखली, व जर्मन नॅशनल बँकेचा तो अध्यक्ष झाला. त्या जागेवर तो १९२९ पर्यंत होता. पुढें डेमोक्रॅट पक्षांतून तो फुटून निघाला. जर्मनीवर लादलेल्या नुकसानभरपाईविरुद्ध शॅाटनें पुष्कळ विरोधी लेख लिहिले, आणि परकीय भांडवल कर्जाऊ घेऊन जर्मनीची उन्नति करण्याच्या धोरणाला आळा घालण्याचा प्रयत्न केला. १९३१ सालीं तो नाझी पक्षांत शिरला, व हिटलरनें त्याला जर्मन नॅशनल बँकेचा अध्यक्ष व अर्थमंत्री १९३३ सालीं नेमलें, व जर्मनीच्या आर्थिक धोरणाचा तो 'डिक्टेटर' बनला. चलनी नाण्यांची वाढ मर्यादित करून नाझी लष्कराच्या पुनर्घटनेला भरपूर पैसा पुरवण्याकरितां यानें नव्या आर्थिक योजना व नव्या युक्त्याप्रयुक्त्या योजिल्या, त्यांपैकीं वर्क क्रिएशन बिल्स, डिलिव्हरी नोट्स, व ब्लॉक्ड मार्क्स या युक्त्या विशेष प्रसिद्ध आहेत; व या कामगिरीबद्दल हिटलरनें शॅाटला १९३६ सालीं सुवर्णपदक देऊन मोठा गौरव केला.

शॅाट हा अर्थशास्त्रांतील जुन्या तत्त्वांना चिकटून राहणारा आणि मोठ्या प्रमाणावरील उद्योगधंद्यांचा पुरस्कर्ता होता. १९३६ नंतर अमर्याद लष्करी खर्च करण्याच्या धोरणाला आळा घालण्याचा त्यानें प्रयत्न केला; तसेंच चतुर्वार्षिक योजनेला आणि ज्यू जात नष्ट करण्याच्या धोरणाला त्यानें विरोध केला. चतुर्वार्षिक कार्यक्रमाचा पुरस्कर्ता गोअरिंग यानें आर्थिक बाबतींत शॅाटचें वर्चस्व कमी करून तो अधिकार स्वतःच्या हातीं घेतला. १९३८ सालीं शॅाटला फडणिशी खात्यांतून काढून टाकून त्याच्या जागीं डॉ. फंकची नेमणूक करण्यांत आली. नंतर जर्मन नॅशनल बँकेचें अध्यक्षपद शॅाटला सोडावें लागलें. १९३९ सालीं शॅाट हिंदुस्थानांत आला होता, पण लवकरच महायुद्ध सुरू झाल्यामुळें जर्मनींत परत गेला; आणि महायुद्धांतील आर्थिक धोरणाबाबत शॅाट हिटलरचा सल्लागार बनला, असें म्हणतात. महायुद्धानंतर त्याला युद्धकैदी म्हणून डांबून ठेवण्यांत आलें. पण पुढें न्यायालयांत चौकशी होऊन तो सुटला.

**शाट-अल-अरब**—ही नदी अरबस्तानांत युफ्रेटीस व टायग्रिस या दोन नद्यांच्या संगमानें बनली आहे. ती इराणच्या आखाताला मिळते. तिची लांबी १०० मैल आहे. ही नदी रुंद

व खोल असल्यामुळें मोठाल्या बोटी या नदींतून बसरा शहरापर्यंत जातात.

**शांडिल्य**—एक गोत्रऋषि. हें अनेक व्यक्तींचें पैतृक नांवहि आहे. शांडिल्य हा आश्वलायन सूत्रांतील गोत्रांच्या यादींत असून शांडिल्य सूत्रें भक्तिज्ञानाविषयीं आहेत. एक स्मृति, धर्मसूत्र व तत्त्वदीपिका शांडिल्याच्या नांवावर आहे.

**शातकर्णी आंध्र** ( ख्रि. पू. दुसरें शतक–उत्तरार्ध )—आंध्रांपैकीं कृष्णानंतर गादीवर आलेला शिमुकाचा पुत्र. यानें अश्वमेध केल्याचा उल्लेख आढळतो. शातकर्णी हें आंध्र राजांचें दुसरें एक नांव आहे (आंध्र पाहा). ख्रि. पू. १७० मध्यें यानें कलिंग देशावर स्वारी केली, त्या वेळीं खारवेलनें याचा पराभव केला. यास कुमार वेदिसिरी व कुमार हकुसिरी असे दोन पुत्र होते. नाणेघाटांत याचा पुतळा आहे. हा व पुष्यमित्र शुंग हे समकालीन होत.

**शांततावाद**—( पॅसिफिझम ). युद्धें कधींहि होऊं नयेत, याकरितां जी चळवळ चालू असते, तिला हें नांव आहे. हा शब्दप्रयोग २० व्या शतकांत उपयोजिला जाऊं लागला आहे. शांततावादी संस्था ब्रिटन, अमेरिका, जर्मनी, फ्रान्स व इतर कित्येक देशांत स्थापन झाल्या असून आन्तरराष्ट्रीय शांतता परिषदाहि भरूं लागल्या आहेत. या शांततावादी चळवळींत क्वेकरपंथी लोकांनीं फार महत्त्वाचें कार्य केलें आहे. या शांततावादी संस्थांचे सभासद संख्येनें फार नसले तरी या चळवळीचा अप्रत्यक्ष परिणाम बराच झालेला आहे. पहिलें महायुद्ध १९१४ सालीं सुरू होण्यापूर्वी जी आंतरराष्ट्रीय शांतता परिषद भरली त्या परिषदेच्या कार्यावर या चळवळीचा फार परिणाम झाला. आणि त्यामुळें युद्धें कायमचीं बंद व्हावीं म्हणून अनेक प्रकारचे प्रयत्न करण्यांत आले ते येणेंप्रमाणें :—( १ ) राष्ट्रसंघाचा करारनामा; ( २ ) हेग येथें स्थापलेलें कायमचें आंतरराष्ट्रीय न्यायालय; ( ३ ) केलॉग पॅक्ट; व ( ४ ) शस्त्रसंन्यास परिषद्. पण या प्रयत्नांचा कांहींहि उपयोग न होतां दुसरें महायुद्ध सुरू झालेंच. १९३६ सालीं राष्ट्रसंघामार्फत शांततावादाचा पुरस्कार करण्याकरितां एक आंतरराष्ट्रीय शांततावादी मोहीम काढण्याची व्यवस्था करण्यांत आली आणि बेल्जिअममधील ब्रुसेल्स शहरीं शांतता परिषद् ( पीस कॉंग्रेस ) भरविण्यांत आली. या परिषदेला ५८० ब्रिटिश प्रतिनिधी २०० शांततावादी संस्थांतर्फे हजर होते. या सर्व परिषदा आणि शांततेसंबंधीं करार हें केवळ तात्त्विक स्वरूपाचें कार्य झालें. युद्धाला प्रत्यक्ष विरोध करण्याकरितां १९२८ सालीं 'वॉर रेझिस्टर्स इंटरनॅशनल' या नांवाची संस्था स्थापण्यांत आली. हा शांततावाद इंग्लंड आणि अमेरिका या दोन देशांत जोरदार आहे. आणि सक्तीच्या लष्करभरतीला प्रामाणिकपणानें हरकत घेणारे इसम कायद्यानें गुन्हेगार ठरवलेले नाहींत. हुकूमशाही देशांत मात्र या शांततावादाचा निषेध करण्यांत येतो. आणि शांततावादाचा पुरस्कार करणाऱ्या इसमांचा छळ करण्यांत येतो.

म. गांधी हे शांततावादाचे मोठे पुरस्कर्ते होते व त्यासाठीं त्यांना जगांतील मोठे मुत्सद्दी फार मानीत. त्यांना नोबेल पारितोषिकहि देऊं केलें होतें. त्यांची शांततावादाची भूमिका आजच्या भारत सरकारनें स्वीकारली आहे. पण या शांतता परिषदांचा युद्धें थांबविण्याच्या कामीं विशेष उपयोग नाहीं असा अनुभव आहे.

**शांतरक्षित**—तिबेटांत बोधिसत्त्व या नांवानें प्रसिद्ध असलेला एक बौद्ध तर्कशास्त्रज्ञ. लाहोरच्या राजकुलांत हा जन्मास आला. नालंदा विश्वविद्यालयांत हा पंडित होता. पुढें तिबेटच्या राजाच्या आमंत्रणावरून हा तिकडे गेला. तिबेटांत हा सन ७६२ पर्यंत म्हणजे एकूण तेरा वर्षें राहिला. यानें 'वादन्यायवृत्तिविपंचितार्थ' ( धर्मकीर्तीच्या वादन्यायावरील टीका ) व 'तत्त्वसंग्रहकारिका' असे दोन ग्रंथ लिहिले असून त्यांचीं फक्त तिबेटी भाषांतरेंच उपलब्ध आहेत.

**शांताराम, व्ही.** ( जु. १९००–    )—एक सुप्रसिद्ध हिंदी कलावंत व ध्येयवादी चित्रपट-दिग्दर्शक. यांचें समग्र नांव शांताराम राजाराम वणकुद्रे असें असून हे मूळचे कोल्हापूरचे होत. प्रख्यात चित्रकार श्री. बाबूराव पेंटर यांच्या तालमींतून कै. विष्णुपंत दामले, शेख फत्तेलाल, केशवराव धायबर, वगैरे जी गुणी मंडळी निर्माण झाली त्यांपैकीं हे एक होत. या कलावंतांच्या एकीकरणांतून व श्री. कुलकर्णी यांच्या आर्थिक साहाय्यानें प्रभात फिल्म कंपनीची स्थापना झाली. प्रथम या कंपनीनें श्री. व्ही. शांताराम यांच्या दिग्दर्शनाखालीं 'अयोध्येचा राजा' ( सन १९३२ ), 'सिंहगड', 'अमृतमंथन' असे एकाहून एक सरस बोलपट काढून पैसा व लोकप्रियता हीं दोन्ही संपादन केलीं. यानंतर कंपनीनें सामाजिक बोलपट काढण्याचें धोरण आंखलें व त्याप्रमाणें 'कुंकू', 'माणूस' व 'शेजारी' या बोलपटांचें चित्रीकरण करण्यांत आलें. या तिन्ही बोलपटांत व्ही. शांताराम यांनीं जें दिग्दर्शनकौशल्य दाखवलें तें त्यांच्या कलापूर्ण दृष्टीची पुरेपूर जाणीव करून देतें. विशेषतः यांचा 'माणूस' हा बोलपट सर्वोत्कृष्ट समजला जातो. यानंतर १९४१ सालीं त्यांनीं प्रभात फिल्म कंपनी सोडली व मुंबईस राजकमल कलामंदिराची स्थापना केली. राजकमल कलामंदिरांतून यांनीं 'शकुंतला', 'डॉ. कोटनीस', 'पर्वतपे अपना डेरा', 'दहेज' यांसारखे यशस्वी बोलपट निर्माण करून या धंद्यांत आघाडी मारली आहे. 'डॉ. कोटनीस' या बोलपटात कोटनिसांची भूमिका

यांनीं स्वतंत्र केली आहे. ज्या कलावंतांच्यामुळें हिंदी चित्रपट-सृष्टीला उज्ज्वलता लाभली अशांपैकीं व्ही. शांताराम हे एक होत.

**शांतिचंद्र**—एक जैन पंडित. हा हीरविजयसूरीनंतर म्हणजे सन १५८४ नंतर अकबराच्या दरबारीं होता. यानें आपल्या 'कृपारस-कोश' या ग्रंथांत अकबर बादशाहाच्या सत्कृत्यांचें वर्णन करून त्याची प्रशंसा केली आहे.

**शांतिपा**—चौऱ्यायशीं सिद्धांपैकीं चारावा सिद्ध. हा मगध देशांतील ब्राह्मण असून महीपाल राजाच्या वेळेस होता. जालंदर हा याचा गुरु होता. प्रथम विहारजवळील उदंतपुरीच्या विहारामध्यें सर्वास्तिवादसंप्रदायांत शिरून अध्ययन केल्यावर हा विक्रमशिला विहारमध्यें महापंडित जनारिकें याजकडे गेला. पुढें आपल्या विद्येस पूर्णत्व आल्यावर यानें सोमपुरी विहारांमधील महंताची जागा स्वीकारली. यानंतर कांहीं वर्षें यानें माळव्यांत व मंगल देशांतील विक्रमशिला या गांवीं घालविल्यांवर सीलोनच्या राजाच्या आग्रहावरून तिकडे गेला व तेथें यानें सहा वर्षें धर्मप्रसाराचें काम केलें. नंतर तिकडून परत आल्यावर राजा महीपालनें यास विक्रमशिलाच्या पूर्वद्वारचा महापंडित नेमलें. सर्व सिद्धांमध्यें हा कर्तृत्ववान् होता. यास 'कलिकाल-सर्वज्ञ' असेंहि म्हणत. यानें दर्शनविषयावर नऊरोंहून अधिक ग्रंथ व तंत्रावर तेवीस ग्रंथ लिहिले असून छंदःशास्त्रावर 'छंदोरत्नाकर' नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. याशिवाय चर्यागीतीमध्यें याच्या गीतोहि आढळून येतात. रत्नाकरशान्ति या नांवानेंहि हा प्रसिद्ध आहे.

**शांतिवाद**—(क्वाएटिझम). हा गूढवादांतील एक प्रकार असून त्याचा उद्देश, परमेश्वराचें शुद्ध ध्यान करून मानवाची उन्नति करणें, हा आहे. ध्यानमार्गानें मनुष्याला आपला आत्मा ईश्वराशीं एकरूप करतां येईल, आणि त्यामुळें स्वर्गीय तेज प्राप्त होईल. युरोपमध्यें कॅथॉलिक धर्मपंथांत निघालेली ही गूढवादी चळवळ होती. १८ व्या शतकाच्या आरंभीं ही चळवळ युरोपांत सुरु झाली. तिचा उगम मोलिनॉसच्या 'दि स्पिरिच्युअल गाइड' यासारख्या पुस्तकामुळें झाला. फ्रान्समध्यें या शांतिपंथाचा पुरस्कार मादाम ग्युयोन हिनें केला, आणि तिच्या मताचा व ग्रंथांचा प्रचार फेनेलोन यानें केला.

**शातोब्रिआंद, फ्रान्स्वा ऑग्युस्त** (१७६८-१८४८)—एक फ्रेंच ग्रंथकार आणि राजकारणी. त्यानें कांहीं काळ सैन्यांत व आरमारांत नोकरी केल्यावर तो उत्तर अमेरिकेंत गेला आणि १६ वा लुई राजा पळून गेल्यावर तो फ्रान्समध्यें परत आला. पुढें थिओनव्हिली येथील वेढ्यांत तो जखमी झाला, आणि पुष्कळ हालअपेष्टा सोसल्यानंतर तो लंडनला गेला. तेथें त्यानें १७९७ मध्यें आपलें ऐतिहासिक निबंधांचें पुस्तक प्रसिद्ध केलें. १८०० मध्यें फ्रान्सला परत येऊन पुढील सालीं त्यानें आपली 'आताला' या नांवाची अद्भुतरम्यात्मक कादंबरी प्रसिद्ध केली. नंतर पुढील सालीं त्यानें आपला सुप्रसिद्ध ग्रंथ 'ल जानी दु क्रिश्चिआनिस्म' प्रसिद्ध केला; त्यांत त्यानें ख्रिस्ती धर्माचें फार उत्तम चित्र रंगविलें आहे. नेपोलियन बादशहाच्या वेळीं त्यानें कांहीं काळ परराष्ट्र वकील म्हणून काम केलें; आणि नंतर त्यानें पूर्वेकडील देशांत प्रवास केला. तिकडून परत आल्यावर आपले 'ले मार्तीर' (१८०९) आणि 'इतिनरेर द पारी आ जेरुसालेम' (१८११) हे ग्रंथ प्रसिद्ध केले. १८ वा लुई राजा फ्रान्समध्यें सिंहासनारूढ झाला, त्या वेळीं यानें त्याचें मोठ्या उत्साहानें स्वागत केलें, म्हणून त्याला प्रथम बर्लिनला व नंतर लंडनला परराष्ट्र वकील नेमण्यांत आलें. पण पुढें १८२४ मध्यें त्याला या जागेवरून बडतर्फ करण्यांत आलें. १८३० मध्यें राज्यक्रांति होऊन लुई फिलिप फ्रान्सचा राजा झाला, तेव्हां शातोब्रिआंदनें राजनिष्ठेची शपथ घेण्याचें नाकारलें. त्यानें आठवणी लिहिल्या आहेत, त्यांत तत्कालीन घडामोडी व व्यक्ती यांच्यावर कडक शेरे मारले आहेत.

**शान संस्थानें**—ब्रह्मदेशाच्या पूर्व सरहद्दीवरील हा एक संस्थानांचा समूह आहे. एकंदर क्षेत्रफळ ६२,३३५ चौरस मैल असून लो. सं. सुमारें बारा लक्ष आहे. ब्रह्मदेशाच्या हद्दीबाहेर बरींच शान संस्थानें आहेत. पण तीं चीनचीं मांडलिक आहेत. ब्रिटिश शान संस्थानें ब्रह्मदेश खालसा केला तेव्हां त्याबरोबर ब्रिटिशांकडे आलीं. १८९८ च्या कायद्यान्वयें प्रत्येक संस्थानला दिवाणी, फौजदारी व मुल्की अधिकार देण्यांत आला. उत्तर विभागाकरितां एक सुपरिंटेंडेंट व दक्षिण विभागाकरितां एक सुपरिंटेंडेंट आहे. प्रत्येक संस्थानाचा कारभार वंशपरंपरागत येथील राजाकडे चालतो. शान लोकांची भाषा 'थई' असून ती लेखनिविष्ट आहे. येथील मुख्य उत्पन्न तांदूळ आहे. गहूं व बटाटे हीं फायद्याचीं पिकें आहेत. शान जात ही बौद्ध धर्मानुयायी थई वंशाची चिनी जात आहे. यांची एकंदर संख्या आठ लक्ष आहे. हे लोक शांत स्वभावाचे व उद्योगी आहेत. तरुण-तरुणींच्या परस्परसंमतीनें प्रथम गांधर्वविवाह होतो व मग मातापितरांना सांगून लग्नविधि करण्यांत येतो.

**शापुर (पहिला)**—एक ससॅनियन राजा. अर्देसर यानें आपल्या कारकीर्दीच्या शेवटीं आर्मेनिया प्रदेशावर पुन्हां नव्यानें चाल केली, व त्याचा मुलगा पहिला शापुर (२४१-२७२) यानें निसिबिस व करी हे प्रदेश काबीज करून सीरियांत प्रवेश केला. परंतु तिसरा गॉर्डिअन या रोमन बादशहानें २४३ मध्यें त्याचा पराजय केला. तथापि पुढें लवकरच रोमन साम्राज्यास उतरती कळा लागली व या गोष्टीचा फायदा घेऊन शापूरनें आर्मेनिया घेतला, अँटिऑक शहर लुटलें व व्हॅलेरिअन रोमन बादशहाचा इतका

येथें पराभव करून (२६०) त्याला कैद केलें. यानंतरच्या इराणी सैन्यानें कॅप्पाडोशियावर चाल केली, परंतु येथून त्यांना मागें हटावें लागलें. ही संधि साधून पाल्मायराच्या राजानें बंड करून शापूरचा पराभव केला व दोन वेळ (२६३ व २६५) टेसिफॉनवर चाल्न आला. या पराभवामुळें झालेलें नुकसान शापूरला शेवट-पावेतों भरून काढतां आलें नाहीं व आर्मेनिया देशहि त्याला ताब्यांत ठेवतां येईना. याकारणानें सस्सन साम्राज्याचा विस्तार आर्सेसिडी साम्राज्याइतकाच होता. तरी देखील पहिल्या शापूरनें 'इराणी व इराणी नसलेल्या लोकांचा शहानशहा' अशी पदवी धारण करून आपला आसमुद्रक्षितीशत्वाचा हक्क प्रगट केला. त्याच्या वारसांनींहि ही पदवी पुढें धारण केली; परंतु मेसा-पोटेमियाच्या वाळवंटापर्यंतचा तैग्रिस व युफ्रेटीझ नद्यांमधील प्रदेशच फक्त या साम्राज्याच्या अमलाखालीं होता. पश्चिम व उत्तर मेसापोटेमिया रोमन लोकांच्या ताब्यांत होता.

**शापुर (दुसरा)** (मृ. ३७९)—दुसऱ्या शापूरच्या वेळीं अवेस्ता ग्रंथ पुरा होऊन इतर सर्व संप्रदाय बेकायदेशीर ठर-विण्यांत आले. झरथुष्ट्री पंथ सोडणारास देहान्त शासन होत असे; व विशेषतः ख्रिस्ती संप्रदायानुयायांचा छळ होत असे. सारांश, रोमन व सस्सन राजांमधील युद्धाबरोबर ख्रिस्ती व झरथुष्ट्री या दोन संप्रदायांमध्येंहि युद्ध जुंपलें. अशा स्थितींत लढाई टाळणें शक्य नव्हतें. इ. स. ३३७ मध्यें शापूरनें लढाई सुरू करून आमायडा (३५९), सिंगारा (३६०), वगैरे किल्ले घेतले. या युद्धास दरवर्षी पुन्हां पुन्हां तोंड लागत असे (३५३–३५८). इ. स. ३६३ मध्यें जूलिअन नांवाच्या रोमन बादशहानें इराणी राज्यावर स्वारी करून टेसिफॉनवर चाल केली, परंतु तो स्वतःच जखमी होऊन मरण पावला. त्याच्यामागून जोव्हिअनला इराणशीं तह करावा लागला (३६३). या तहानें रोमनें तैग्रिसचा प्रदेश, निसिबिसचा किल्ला व आर्मीनिया सस्सन राज्यास देऊन आपल्या आश्रयाखालच्या तिसऱ्या आर्सेसीझ नांवाच्या आर्सेसिटी राजास इराणी लोकांच्या स्वाधीन केलें.

शापूरनें आर्मेनिया पादाक्रांत करण्याचा व त्या देशांत झरथुष्ट्र पंथाचा प्रसार करण्याचा प्रयत्न केला. त्यानें तिसऱ्या आर्स-सीझला आत्महत्या करावयास लावलें. परंतु आर्मेनियन सरदारांनीं बंड करून आर्सेसीझचा मुलगा पॅप यास गादीवर बसविलें व रोमन लोकांची गुप्तपणें मदत घेतली; यामुळें रोमशीं पुन्हां युद्ध उपस्थित झालें. परंतु ३७४ मध्यें व्हॅलेन्झ या रोमन बादशहानें पॅपचा टार्ससमध्यें खून करविला. ३७५ मध्यें व्हॅलेन्झ हा ॲड्रिआनोपल येथें गॉथ लोकांशीं झालेल्या लढाईंत मारला गेला. यानंतर रोमन लोकांची ढवळाढवळ बंद झाली.

**शांपोलिऑं, जीन फ्रान्स्वा** (१७९०–१८३२)—एक फ्रेंच प्राचीनवस्तुसंशोधक. त्यानें ईजिप्तमधील रोझेटा दगडावर खोदलेल्या ३ भाषेंतील शिलालेखाच्या मदतीनें आणि डॉ. थॉमस यंग यानें केलेल्या सूचनांच्या आधारानें प्राचीन मिसरी लिपीचा व भाषेचा उलगडा करण्याची किल्ली शोधून काढली. या संशोधन-विषयावर त्यानें एक ग्रंथ सरकारी खर्चानें १८२४ मध्यें प्रसिद्ध केला. त्याचे ईजिप्तसंबंधीं आणखी ग्रंथ आहेत.

**शामराज नीलकंठ (पारसनीस रोझेकर)**—शिवाजीचा एक पेशवा. हा सन १६६१ ते १६६२ या कालांत शिवाजीचा पेशवा होता. मूळचा हा दौलताबादजवळील रोझें या गांवचा कुलकर्णी. शहाजीनें यास जिजाबाईबरोबर पाठवलें होतें. प्रथम हा सबनीस म्हणून होता. पुढें सन १६६१ त हा शिवाजीचा पेशवा झाला. शिवाजीनें सन १६६२ मध्यें यास जंजिऱ्यांच्या शिद्दीवर पाठवलें असतां त्या मोहिमेंत हा अपयश घेऊन माघारीं आला. त्यामुळें शिवाजीनें त्याजकडून पेशवेपद काढून घेऊन तें मोरोपंत पिंगळे यास दिलें. शामराज नीलकंठ याच्या आडनावाचा उल्लेख रांझेकर किंवा करंजकर असाहि आढळतो.

**शामॉय हरण**—हा एक हरणवर्गांतील बोकडासारखा दिसणारा प्राणी असून याचीं शिंगें आंखूड असतात व याच्या केंसांचा रंग हवामानाप्रमाणें बदलतो. हा युरोपांत व पश्चिम आशियाच्या डोंगराळ भागांत आढळतो. हे प्राणी कळप करून राहतात. हें हरण साधारण २ फूट उंच असतें. हें फार चपळ असून त्याचें घ्राणेंद्रिय फार तीक्ष्ण असतें. याचें कातडें फार मृदु असून पॉलिश करण्याच्या वगैरे कामीं वापरतात. या कातड्याचे हातमोजेहि करतात. पण हल्लीं अशा तऱ्हेचें कातडें कृत्रिम रीत्या तयार करता येतें.

**शामाराध्य**—एक कवि. याचे (१) 'आश्वलायन प्रश्नमाला', (२) 'कैवल्योपनिषद्भाष्य', (३) नित्यानित्य-विचार', व (४) 'ज्ञानोदयसिंधु' या नांवाचे ग्रंथ आहेत. यांशिवाय सन १६५९ मध्यें यानें गीतेवर 'पदार्थमाला' नांवाची टीका लिहिली आहे. ज्ञानेश्वरींतील कठिण शब्दांचा अर्थ सांगणारा कोशहि यानें तयार केला होता. याचे सर्व ग्रंथ अप्रसिद्धच राहिले. याचें नांव शामजी. 'आराध्ये' हें याचें उपनांव होतें.

**शारीरशास्त्र**—(ॲनाटोमी). शरीरांतील निरनिराळ्या भागांची स्थिति, त्यांची रचना व त्यांचें कार्य यांचा अभ्यास करण्याकरितां शरीराचें निरीक्षण व विच्छेदन करण्याच्या शास्त्रास शारीरशास्त्र असें म्हणतात. या शास्त्राचा पाया पश्चिमेकडे प्रथम धाकट्या हिपोक्रॅटिस (खि. पू. ४६० ते ३७७) यानें घातला.

व्हेनिस — रिआल्टो पूल ( पृ. २३८९ )

शिल्पशास्त्र — सार्गनच्या राजवाड्याचा भव्य दरवाजा, खोर्साबाद, इराक ( पृ. २४३० )

शांघाय — फारंज चौक, बंड ( पृ. २४०७ )

शिकागो — औद्योगिक आणि शास्त्रीय पदार्थसंग्रहालय ( पृ. २४२० )

यानंतर आरिस्टॉटल, अलेक्झांड्रिया येथील हिरोफिलस आणि एरासिस्ट्रेटस, सेल्सस, गालेन, वगैरेंनीं या शास्त्रांत बरीच प्रगति केली. यानंतर विद्यापुनरुज्जीवनकालापर्यंत या शास्त्राची प्रगति स्थगित झाली होती. सन १३१५ मध्यें बोलोना येथील मांडिनो या प्राध्यापकानें प्रथम सार्वजनिक रीत्या शरीरविच्छेदन केलें, आणि शारीरशास्त्रावर एक ग्रंथ रचिला. त्याचें अध्ययन इटलीमध्यें २०० वर्षेंपर्यंत चालू होतें. १६ व्या शतकांत पदुआ येथील फॅलोपिओ, व्हेनिस येथील युस्टॅचो, ब्रुसेल्स येथील व्हेसॅलियस, बोलोना येथील व्हॅरोली यांनीं या शास्त्रांत बरेच शोध लाविले. १७ व्या शतकामध्यें हार्वे यानें रुधिराभिसरणक्रियेचा शोध लाविला. अॅसेलियस यानें अन्नपचन होऊन शरीराचें पोषण कसें होतें हें दाखविलें. ढेन टी वार्टोलाइन यानें लसिकावाहिनीचा शोध लावला. यानंतर अनेक शारीरशास्त्रज्ञ होऊन गेले त्यांपैकीं माल्पिघी, बोएरहाव, विल्यम व जॉन हंटर, धाकटा मेकेल, बिशॉट, रोझेनम्युलर, क्रेन, सर ए कूपर, सर सी. बेल, कॅरस, मुल्लर, गेगेनबॉवर, ओवेन आणि हक्स्ले हे प्रसिद्ध आहेत.

वैदिक काळच्या आर्यांचें लक्ष प्रथमपासून शारीरशास्त्राकडे होतें असें दिसतें. उदाहरणार्थ, अथर्ववेदांतील एका सूक्तांत शरीराच्या निरनिराळ्या भागांचीं नांवें बरींच शुद्ध व व्यवस्थित रीतीनें आलीं आहेत. हीं जीं अथर्ववेदामध्यें शरीराच्या भागांच्या नांवांची यादी आलेली आहे ती यादी व चरकसुश्रुतामध्यें आलेली यादी यांमध्यें बरेंच साम्य आहे. मेदस् हा शब्द प्राचीन वैद्यकांत नाहीं. चरकांत शतपथांतील संख्येइतकी म्हणजे तीनशें-साठ हाडांची संख्या दिली आहे. सुश्रुतांत ती तीनशेंच सांगितली आहे. चरक व शतपथ ब्राह्मण यांतील संख्या जरी जुळती आहे तरी दोहोंचा तपशील जुळत नाहीं. मानेंतील पंधरा (हाडें) व वक्षःस्थलांत सतरा ही संख्या दोहोंत एकच आहे.

यजुर्वेदसंहितेंत जीं शरीराच्या भागांचीं नांवें आलीं आहेत तीं सर्व वैद्यकांत आहेत. वेदांतील हाडांसंबंधीं व शरीरावयवांसंबंधीं आलेलीं कित्येक नांवें वैद्यकांत नाहींत.

आर्यवैद्यकांत एकंदर शरीराचें पृथक्करण करून त्याचे ६ अंगें, ५६ प्रत्यंगें, ६।७ त्वचेचीं आवरणें, ५ इंद्रियें, ७ आशय, १५ अंतःस्थ अवयव, इत्यादि विभाग पाडलेले आहेत. त्यांचें वर्णन वैद्यकग्रंथांतून असतें. मृतदेहाची तपासणी कशी करावी यासंबंधीं कांहीं माहिती सुश्रुतांत दिली आहे.

ईजिप्तमध्यें भारतांतल्याइतकेंहि शारीरज्ञान नव्हतें. मृतदेह दीर्घकालपर्यंत जतन कसा करून ठेवावा एवढेंच त्यांना माहीत होतें. जादूटोण्यांवर यांचा व बाबिलोनियनांचा फार विश्वास असे.

**शार्क मासा**—हे एका जातीचे मासे आहेत. यांच्या शरीरांतील कवचें कूर्चामय असतात व यांच्या मेंदूचा कवटीच्या दिवणी नसतात. हे आकारानें फार मोठे व अतिशय खादाड असतात. यांचें शरीर लांब असून शेपटी जाड व मांसल असते. यांचें तोंड मोठें असून त्यांत तीक्ष्ण दांत असतात.

शार्क (हातोडी डोक्याचा)

सर्व माशांमध्यें हा फार भयंकर असतो. हा समुद्रांतील सर्व जातींच्या प्राण्यांस व सांपडल्यास मनुष्यासहि भक्षण करतो. याचीं पंधरा निरनिराळीं कुलें आहेत, परंतु त्यांपैकीं कांहीं आतां नष्ट झालीं आहेत. यांच्यापैकीं मोठ्या जातीचा मासा ४० फूटपर्यंत लांब असतो. हे सर्व उष्ण प्रदेशांतील समुद्रांत राहतात. यांतील निळ्या जातीचा मासा सुमारें ३० फूट लांब असून सर्वत्र आढळतो. यांपैकीं कांहीं माशांचें डोकें हातोड्यासारखें असतें.

**शार्ङ्गधर**—एक आर्यवैद्यक-ग्रंथकार. हा दामोदराचार्याचा मुलगा. यानें सुमारें शके १००० मध्यें आपल्या नांवाचा एक वैद्यकविषयावर ग्रंथ लिहिला. हें पुस्तक चिकित्सा करण्यास वैद्य लोकांत चांगलें उपयोगी पडतें. या पुस्तकांत निदानांचीच काय ती उणीव आहे. यांत फक्त संख्यासंप्राप्ति सांगितली असल्यामुळें रोगांच्या संप्रेषणीकडे कांहीं समजत नाहीं. नाडी-परीक्षेच्या संबंधानें पाहतां, या ग्रंथांत ती चांगल्या प्रकारानें व थोडक्यांत सांगितली आहे. हें पुस्तक होण्याच्या अगोदर कोणत्याहि वैद्यकपुस्तकांत नाडीपरीक्षेचा उल्लेख केलेला आढळत नाहीं; व यावरून नाडीपरीक्षा शार्ङ्गधरानेंच पहिल्याप्रथम प्रचारांत आणली असावी असें म्हणण्यास हरकत नाहीं. नाडीपरीक्षेप्रमाणेंच रसायनें तयार करण्याचा प्रकार आहे. सुश्रुत वगैरे ग्रंथांतून सोनें, रुपें, लोह, इत्यादि निरिंद्रिय पदार्थांचा उपयोग औषधांत करण्यास सांगितला आहे. परंतु त्यांचीं भस्में तयार करण्याचे प्रकार व त्यांचें देण्याचें मान वगैरे गोष्टी शार्ङ्गधरानें यथायोग्य पद्धतीनें सांगितलेल्या असल्यामुळें रसायनप्रकरणाची उत्पत्तिहि याच पुरुषानें केली असावी, असें म्हणतां येईल. एकंदरीत शार्ङ्गधराच्या काळापर्यंत वैद्यकशास्त्राचें पाऊल पुढें होतें असें म्हणण्यास अडचण आहे, असें दिसत नाहीं.

**शार्लेमान** (७४२-८१४)—हा प्रथम फ्रँक लोकांचा राजा असून नंतर पश्चिम युरोपचा बादशहा झाला. त्याचा बाप

पेपिन दि शॉर्ट, हा फ्रँक लोकांचा राजा होता. तो ७६८ मध्यें मरण पावल्यावर शार्लेमानला राजमुकुट अर्पण करण्यांत आला. त्याचें पहिलें मोठें पराक्रमाचें कृत्य हें कीं, त्यानें सॅक्सन लोकांवर ७७२ मध्यें स्वारी केली आणि सतत लढाई चालू ठेवून ८०३ मध्यें सॅक्सन लोकांवर पूर्ण वर्चस्व स्थापलें. सॅक्सन लोकांबरोबरच्या युद्धांत तो गुंतला असतांना पोप ॲड्रियन यानें लॉंबार्ड लोकांचा राजा डेसिडेरियस याच्याविरुद्ध मदत करण्याबद्दल शार्लेमानला विनंति केली, म्हणून शार्लेमान तात्काळ फौजेसह इटलींत गेला. पाव्हिआ शहर जिंकून त्यानें डेसिडेरियसचा पूर्ण पराभव केला, म्हणून शार्लेमानला लोंबार्डीचा राजा म्हणून एक लोखंडी राजमुकुट अर्पण करण्यांत आला. याप्रमाणे शार्लेमानची सत्ता वाढत गेल्यानें त्यानें पश्चिम रोमन साम्राज्य पुन्हां स्थापन करण्याचा घाट घातला. पोपला मदत केल्यामुळें सन ८०० च्या ख्रिसमसच्या दिवसांत पोप ३ रा लिओ यानें शार्लेमानला सीझर व ऑगस्टस अशा पदव्या देऊन राज्याभिषेक केला. तो ता. २८ जानेवारी ८१४ रोजीं मरण पावला. तो विद्येचा आणि पंडितांचा चाहता होता. त्याचें साम्राज्य फ्रान्स, कॅटॅलोनिआ, नाव्हारे, आरॅगॉन, नेदर्लंड्स, एल्ब नदीपर्यंत जर्मनीचा भाग, उत्तर व मध्य इटली आणि स्लाव्हानिया इतक्या विस्तृत प्रदेशावर पसरलें होतें.

**शालग्राम**—शालग्राम शिला ही वैष्णव लोक प्रत्यक्ष विष्णुमूर्ति मानितात, तिचें तीर्थ घेतात व तीस नैवेद्य दाखवितात. पुराणांत शालग्रामाच्या परीक्षेवर पुष्कळ अध्याय आहेत, त्यांवरून त्याच्या मूर्ती कोणत्या प्रकारच्या आहेत याची परीक्षा करतात व त्याचीं चक्रें व मुखें मोजून त्यांवरून त्याचा निश्चय होतो. नेपाळांत पशुपतिनाथ आहे त्यापासून वर १५० कोसांवर मुक्तनाथ म्हणून शिवस्थान आहे. तेथें गंडकी नदींत हे पाषाण सांपडतात. तेथें या पाषाणाचा मोठा पर्वतच असून त्याचे दगड आणून त्यांच्या मूर्ती करतात व त्यांजवर यंत्रें कोरतात. शिवाय त्या पाषाणाचे खल होतात व सोन्याच्या कसोटीलाहि हाच दगड उपयोगी पडतो. शालग्रामास स्त्रिया व शूद्र यांनीं स्पर्श करूं नये असें शास्त्रमत आहे. परंतु हें बैराग्यांनीं गुंडाळून ठेवून ते वाटेल त्यास शालग्रामाची पूजा करूं देतात. वैष्णवांमध्यें शालग्रामपूजा श्रेष्ठ धरिली आहे. व इतर ब्राह्मण जे प्रायश्चित्तार्थ पंचगव्य घेतात त्याबद्दल वैष्णव हे शालग्रामावर पाणी घालून त्याचें तीर्थ घेतात. या दगडावर सोन्याच्या बारीक रेषा असतात, त्यांवरून ते सोन्याच्या खाणीशीं संलग्न असणारे दगड असावे असें अनुमान होतें.

**शालिवाहन राजे**—आंध्र राजांनाच शातवाहन किंवा शालिवाहन असें म्हटलेलें आहे. या घराण्याचें मूलस्थान गोदावरी आणि कृष्णा या नद्यांच्या मुखाजवळील प्रदेश असून तेथें ते प्रबल होते. यांची राजधानी धनकटक होती. नंतर गोदावरीच्या उगमापर्यंत यांचा राज्यविस्तार झाला. तेव्हां महाराष्ट्रांतले पहिले राजे शालिवाहनच होत. शिलालेखांतून यांच्यांतील पुळुमायी, यज्ञश्री, चतुष्पर्ण, माठरीपुत्र या राजांचा विशेष उल्लेख येतो. यांचीं नाणीं महाराष्ट्रांत सांपडतात. कऱ्हाडच्या उत्खननांत शातवाहनकालीन नाण्यांचे ठसे व कांहीं नाणीं आढळलीं. महाराष्ट्रांतील शातवाहनांची राजधानी जुन्नर दिसते.

शालिवाहन राजांचा कारभार चांगला सुधारलेला असे. बौद्ध आणि हिंदू सारखेच वागविले जात. महारठी, महाभोज, महासेनापति यांसारखे प्रांतिक अधिकारी असत. व्यापारी, सावकार व धंदेवाईक लोक, तसेंच कारागीर-वर्गांतील लोक सुखानें नांदत. शहराच्या व्यवस्थेसाठीं निगमसभा असत. पैठण व तगर या मोठ्या बाजारपेठा होत्या. यांचा स्वतःचा शक असे. शालिवाहनासंबंधानें अनेक विचित्र आख्यायिका आहेत.

**शालिवाहन शक**—शालिवाहन शक कोणीं सुरू केला, याविषयीं जुन्या ग्रंथांत जे उल्लेख आले आहेत ते केवळ परस्परभिन्नच नाहींत तर परस्परविरोधीहि आहेत. बहुतेक लोकांची अशी समजूत आहे कीं, दक्षिणेंतील प्रतिष्ठानपूर ऊर्फ पैठण येथील शालिवाहन (सातवाहन हाल) राजानें हा शक सुरू केला. कोणी कोणी, शालिवाहनाच्या जन्मापासूनच ह्या शकाचा आरंभ होतो असें मानितात (मुहूर्तमार्तंड, अलंकार श्लोक ३). या शकाचे गुन्यांत जुने शिलालेख ५२ पासून १४३ पावेतोंच्या सालांतील असून ते पश्चिमेकडील क्षत्रपांनीं खोदविले आहेत. शके ४२७ मध्यें पहिल्याप्रथम संस्कृत वाङ्मयांत ह्या शकाचा 'शककाल' या नांवानें उल्लेख केला आहे. मराठीमध्यें संवत्सर या सामान्य अर्थी प्रचारांत असलेला 'शक' शब्द ह्या लेखांतील शक शब्दाहून भिन्न आहे हें विसरतां कामा नये. यावरून असें दिसतें कीं, इसवी सनाच्या सहाव्या शतकाच्या आरंभापासून चौदाव्या शतकाच्या मध्यापर्यंत, कोणत्या तरी शक राजाच्या राज्याभिषेकापासून ह्या शकाचा आरंभ झाला आहे, अशी सर्वसाधारण समजूत होती. निदान शिलालेखांत वा ताम्रपत्रांत तरी शके १२६२ पर्यंत शालिवाहन नांवाचा ह्या शकाशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध असलेला आढळून येत नाहीं. संस्कृत वाङ्मयांत ह्या शकाचा व शालिवाहन राजाचा संबंध इ. स. १३०० च्या सुमारास लिहिलेल्या जिनप्रभसूरींच्या 'कल्पप्रदीपां'तच प्रथम जोडलेला आहे. असें संभवनीय वाटतें कीं, उत्तरेकडील लोक आपल्या संवताच्या मागें विक्रमाचें नांव लावूं लागलेलें पाहून इसवी सनाच्या चौदाव्या शतकाच्या सुमारास दक्षिणेंतील विद्वानांनींहि शालिवाहन राजाचा आपल्या शकाशीं संबंध जोडला असावा.

शालिवाहन हा शब्द सातवाहन शब्दाचें रूपांतर असून (प्रबंधचिंतामणि, पा. २८) पुराणांतील आंध्रभृत्य ऊर्फ आंध्र-वंशाकरितां शिलालेखांत सातवाहन शब्दाचा प्रयोग केलेला आढळतो. सातवाहन व शातकर्णी हे एकच होत. आंध्रभृत्य राजांनीं खिस्तपूर्व दुसऱ्या शतकापासून खिस्तोत्तर २२५ सालापावेतों दक्षिणेंत राज्य केलें, असें प्रख्यात इतिहासकार व्हिन्सेंट स्मिथ म्हणतो. गोदावरीतीरीं असलेलें प्रतिष्ठाननगर म्हणजे अर्वाचीन पैठण शहर ही त्यांची राजधानी होती व त्यांच्यामध्यें सातवाहन (शातकर्णी, हाल) नांवाचा प्रसिद्ध राजाहि होऊन गेला होता. तेव्हां दक्षिणेंतील पंडितांनीं त्याचेंच नांव आपल्या शकाला लाविलें असणें संभवनीय आहे. खुद्द शातवाहन वंशांतील कोणींहि राजानें हा शक सुरू केला नाहीं, ही गोष्ट मात्र निश्चित आहे.

कलियुगाचीं ३,१७९ वर्षें होऊन गेल्यावर शालिवाहन शकाचा आरंभ झाला असें मानण्यांत येतें. म्हणजे इसवी सनाच्या वर्षांतून शेवटच्या तीन महिन्यांत (वस्तुतः जानेवारीच्या आरंभापासून फाल्गुनअखेरपर्यंत) ७९ व इतर महिन्यांत ७८ वजा केले असतां शालिवाहन शकाचें गतवर्ष निघतें. तिन्नवेल्ली व मलबार प्रदेश सोडून साऱ्या दक्षिण हिंदुस्थानांत हा शक प्रचलित असून उत्तर हिंदुस्थानांतहि पंचांगांत जन्मपत्रिकेंत व वर्षफलांत विक्रम संवताबरोबर हा शक दिलेला असतो. सिलोनांतील अलीकडील राष्ट्रीय भावनेच्या हिंदू व खिस्ती लोकांनीं याच शकास पुन्हां सुरवात केली आहे. उत्तर हिंदुस्थानांतील शिलालेखादि प्राचीन लेखांत मात्र हा शक फारसा आढळून येत नाहीं. ज्या ठिकाणीं सौरमान प्रचलित आहे तो भाग वगळून बाकी सर्व हिंदुस्थान देशांत याचा आरंभ चैत्र शुद्ध प्रतिपदेपासूनच मानण्यांत येतो. परंतु उत्तर हिंदुस्थानांत याचे महिने पौर्णिमान्त व दक्षिण हिंदुस्थानांत अमान्त असतात. सौरमानांत मात्र या शकाचा आरंभ मेष संक्रांतीपासून करण्यांत येतो. करणग्रंथाच्या आधारें पंचांग तयार करणारे हिंदुस्थानांतील सर्व ज्योतिषी याच शकाचा उपयोग करतात. पंचांगांत या शकाचीं गतवर्षेंच देत असतात, परंतु शिलालेखांत मात्र कधीं कधीं वर्तमान वर्षेंहि दिलेलीं सांपडतात.

**शाली**—शाली अंगावर घेण्याकरितां वापरण्यांत येतात; परंतु अलीकडे त्यांचा प्रघात कमी झाला आहे. तिबेटमधील बकऱ्यांच्या पोटाखालील मऊ लोकरीपासून उत्कृष्ट शाली काश्मीरमध्यें तयार होतात. स्कॉटलंडमधील पेझले येथें बनावट शाली मोठ्या प्रमाणावर तयार होतात. त्यांचें प्रमाण वर्षास दहा लक्ष पौंडांपर्यंत काढलें होतें. सध्या हॉलंड बेटांतहि शाली तयार होतात.

ऐने-इ-अकबरींत आलेला (१५९०) काश्मिरी शालींचा उल्लेख सर्वांत प्राचीन होय. यानंतर बर्नियर यानें आपल्या प्रवासवर्णनांत माहिती दिलेली आहे. तो म्हणतो कीं, पाटणा, आग्रा आणि लाहोर या ठिकाणीं अतिशय परिश्रम केले जातात तरी काश्मीरसारख्या शाली होत नाहींत. आकार, लांबी, रुंदी अथवा उपयोग ह्यांवरून काश्मिरी शालींचे दोन वर्ग केले जातात; परंतु त्यांच्यावर जें कलाकौशल्याचें काम केलेलें असतें तें दोन रीतींनीं करतात: तिलि अथवा कानिकर आणि अम्लिकर. पहिल्या रीतींत मागाचा व दुसऱ्या रीतींत सुयांचा उपयोग करितात. तिसरी तऱ्हा म्हणजे मागांवर काढलेल्या शालींतील कमीपणा हातानें काम करून काढून टाकणें किंवा भरून काढणें ही होय. शालींचें अंग उत्तम शुद्ध पश्मीनाचें असून बाजू एकच तुकड्याची केली असेल तर त्या शालीला खलिमतन, अथवा निरनिराळ्या रंगांच्या पश्मीनाच्या केल्या असतील तर चार-चमन असें म्हणतात. शालीच्या मध्यभागीं जर फुलांचें पदक असेल तर तिला चांद आणि कोंपऱ्यांत फुलें काढिलीं असतील तर कुंज असें म्हणतात. एका बाजूला दुसरीपेक्षां जास्त खुलावट नक्षीकाम केलें असून दोन्ही टोंकें बाजूच्या पट्ट्यांपेक्षां जास्त रुंद असलीं तर त्या शालीला शहापसन्द अथवा पल्लेदार असें म्हणतात. अमृतसर, सियालकोट लुधियाना, गुरुदासपूर आणि लाहोर या ठिकाणीं काश्मिरी शाली तयार होतात. हिंदुस्थानच्या प्राचीन राजेरजवाड्यांकडून शालींची फार मागणी असे. आणि एखाददुसरी अशी बिनमोल शाल जवळ असणें हें मोठेपणाचें लक्षण समजलें जाई. अशा उंची शाली अद्यापि मोठमोठ्या घराण्यांत दृष्टीस पडतात. फ्रेंच उमरावशाहीकडून जेव्हां या शालींची मागणी होऊं लागली आणि फ्रान्समधील लोकांच्या आवडीप्रमाणें येथील कारखानदार शालींच्या तऱ्हेंत फरक करूं लागले त्या वेळीं काश्मिरी लोकांची कला नाहींशी झाली. आणि फ्रँको-प्रशियन युद्धानंतर तर युरोपमधील मागणीहि बंद झाली; त्यामुळें काश्मीरच्या शालींचा व्यापार बुडाला.

**शाल्व**—१. एक पौराणिक राजा. भीष्मानें काशिराजाच्या ज्या तीन मुली हरण केल्या त्यांतील अंबेनें याला मनानें वरलें होतें. भीष्मानें याचा पराभव केल्यानंतर त्याला अंबेचें शाल्वावरील प्रेम समजलें, म्हणून त्यानें तिला शाल्वाकडे पाठविलें; पण शाल्व परद्वन म्हणून तिला स्वीकारीना. पुढें हा भारतीय युद्धांत कौरवांच्या बाजूस होता. त्याला सात्यकीनें मारलें.

२. हा शिशुपालाचा भाऊ व जरासंधाचा मित्र होता. कृष्णाला मारण्याचे यानें बरेच प्रयत्न केले. कृष्णानें याचा पराभव करून रुक्मिणी-हरण केल्यावर यानें शंकराची आराधना करून एक अभेद्य व मायावी विमान मिळविलें; व द्वारकेवर चाल केली. कृष्णाशीं झालेल्या घनघोर युद्धांत यानें कपटमाया बरीच दाखविली, पण कृष्ण फसला नाहीं. त्यानें सुदर्शनचक्रानें याचा वध केला.

शासनशास्त्र—शारीरिकदृष्ट्या मनुष्य पूर्णावस्थेला पोंचल्यानंतर तो एकटा राहत असल्याचें उदाहरण सांपडत नाहीं. ह्याचें कारण उघड आहे. केव्हांहि पुरुष व स्त्री एकत्र राहणार. व स्त्रीपुरुषांच्या संगतींत संतति निर्माण होणार. अशा रीतीनें कुटुंब हा समाजाचा एक घटक बनतो. परंतु ह्या एका कुटुंबाला सुद्धां एकटेंच एक राहणें शक्य नाहीं. एकोदरांत लग्न होण्याचें बंद झाल्यावर मुलीकरितां दुसरें कुटुंब जवळ करावेंच लागतें. कन्याप्रदानानें दोन कुटुंबांचा घरोबा बनतो. ह्या दोन कुटुंबांतून दुसरीं अनेक कुटुंबें बनूं लागतात आणि ह्या सर्व कुटुंबांचा मिळून एक पुंज बनतो. हीच जात व हाच समाज. ह्यांतील व्यक्ती आर्थिक व सांस्कृतिक रीत्या संबद्ध होतात. त्यांच्यांत समान रूढी व आचार प्रस्थापित होतात. अशा रूढींविषयीं प्रत्येकाच्या मनांत प्रथम आदर व नंतर हळूहळू अभिमान उत्पन्न होतो. कालांतरानें समाज संख्येनें मोठा झाला कीं त्याला हा निर्माण झालेला एकवटा विघटूं नये म्हणून वागणुकीचे नियम ठरवावे लागतात आणि ओघानेंच ते नियम पाळण्याची सक्ती करावी लागते; तसेंच नियम मोडणाराला शासन करण्याची आवश्यकता भासते. नंतर हें शासन कोणीं करावयाचें हा प्रश्न उत्पन्न होतो. हें काम अर्थातच हुशार व लायक माणसांवर सोंपविण्यांत येतें. अशा रीतीनें शासनसंस्थेचा उदय होतो. ह्या शासनसंस्थेचा प्रकार लोकशाही स्वरूपाचा असतो, हें सांगावयास नकोच. ह्यावरून हा शासनप्रकार स्वाभाविक, मूळचा किंवा आद्यतन होय असें म्हणावयास हरकत नाहीं. राजशाही किंवा बलशाही मूळची असावी असें वाटत नाहीं. राजसंस्था युद्धांमुळें अस्तित्वांत आल्याचें इतिहास सांगतो.

गणराज्य—अशा प्रकारच्या लोकशाहीला गणराज्य म्हणून संबोधीत असत. हीं राज्यें हिमालयाच्या पायथ्याच्या प्रदेशांत असून त्यांचें अस्तित्व सुमारें तीनशें वर्षें असावें. ख्रिस्ती शकपूर्व ३२५ सालानंतर त्यांचा लोप झाला. पाली व जैन ग्रंथांत गोमती नदीच्या कांठीं वसलेल्या शाक्य-मौर्यादि अकरा गणराज्यांचा उल्लेख आहे. ह्याच शाक्य कुलांत बुद्धाचा जन्म झाला. महाभारतांत यादव वंशांतील वृष्णि, अन्धक, भोज, इत्यादि शाखांचीं गणराज्यें असल्याचा निर्देश आहे. यादव हे सौराष्ट्रांत वास्तव्य करून राहिलेले. हे गण म्हणजे कौलिक जमाती होत. जमातीच्या प्रमुखाला राजा ही संज्ञा असे. गौतम बुद्धाचा बाप असाच एक राजा होता. निरनिराळ्या जमातींचा संघ बने व त्याला संघराज्य म्हणत. अनेक माणसें एकत्र राहूं लागलीं व त्यांचे आर्थिक व सामाजिक हितसंबंध परस्परांत गुंतलेले असले कीं घटना करावी लागते. तेव्हां ह्या गणराज्य शासनाचे नियम असणार हें सांगावयास नको. हे गण आपणांस क्षत्रिय म्हणवीत; परंतु ते वैदिक परंपरेंतले नसण्याचा संभव बराच दिसतो. अन्तर्गत कलह व गणागणांतील युद्धें ह्यांमुळें हीं गणराज्यें क्षीण झालीं.

वैदिकांनीं गणराज्यांना कधींच उत्तेजन दिलें नाहीं. ऋग्वेदांत राजसंस्था दृढमूल झालेली दिसते. १० व्या मंडलांतील १७३ वें सूक्त अभिषिक्त राजाच्या स्तुतिपर आहे. राजाला प्रजा कर देते असा स्पष्ट उल्लेख आहे (७–६–५). वर्णाश्रमधर्मांत तर क्षत्रियाला राजपद कायमचें देऊन टाकिलें आहे. वैदिकांच्या दृष्टीनें राजपद ही एक धार्मिक बाब समजली पाहिजे. ऋग्वेदकाळीं झालेल्या दाशराज्ञ युद्धांत क्षत्रियच राजे असल्याचें वर्णन आहे. आजपर्यंत तग धरून राहिलेल्या जातिसंस्था हीं छोटीं गणराज्यें म्हणावयास हरकत नाहीं. जातीजातींची अलिखित घटना आहे. निरनिराळीं कामें करणारे त्यांचे अधिकारी आहेत. त्यांचा एक नायक अथवा प्रमुख असतो. जातीचे तंटे जातगंगा तोडते. जातीचा अधिकार प्रत्येक जण मान्य करितो. पण सुधारलेल्या यांत्रिक युगांत अशीं गणराज्यें टिकणें शक्य नाहीं.

ऐतरेय ब्राह्मणांत साम्राज्य, भौज्य, स्वाराज्य व वैराज्य असे चार राज्यप्रकार वर्णिले आहेत. त्यांच्या अर्थासंबंधीं मतभेद आहेत म्हणून सायणानें वरील चार शब्दांचा सांगितलेला अर्थ समजून घेणें अवश्य आहे. त्याच्या मतें साम्राज्य म्हणजे 'धर्मेण पालनम्'. भोगसमृद्धीच्या अथवा ऐश्वर्याच्या दृष्टीनें ज्या राज्याकडे बघतात त्याला भौज्य ही संज्ञा लावतात. स्वतंत्र राज्य हें स्वाराज्य होय. परकी लोकांची सत्ता असली कीं त्याला वैराज्य म्हणतात. ५१ लाख ते १ कोटी उत्पन्नाचा राजा स्वराट् व दोन ते दहा कोटी उत्पन्नाचा राजा विराट्, असेंहि एके ठिकाणीं सांगितलेलें आढळतें (शुक्रनीतिसार). उत्तर कुरु व उत्तर मद्र ह्या देशांचे राजे होते व अभिषेकानंतर त्यांस विराट् ही संज्ञा प्राप्त होई असें सायणाचार्यांचें म्हणणें आहे. वैराज्य म्हणजे राजा नाहीं तें राज्य, असें निदान सायण समजत नाहीं.

ऋग्वेदकालीं राजसंस्था दृढमूल झाली होती ह्यांत शंका नाहीं, तथापि ती बलशाही नव्हती. ऋग्वेदांतील राजा म्हणजे लुप्त झालेल्या गणराज्यांतील राजाची विकास पावलेली आवृत्ति होय. ह्या नवीन राजपदाला प्रजेच्या मान्यतेचा आधार असे. ह्या राजसत्तेचें बीज आक्रमक सत्तेंत पेरलेलें नव्हतें. ह्यास्तव राजा प्रजेचा प्रतिनिधि समजला जाई. राजा म्हणजे प्रजेच्या आशाआकांक्षांचें पूर्तिस्थान. प्रजेचें सुख तेंच राजाचें सुख. राजानें स्वतःच्या हिताकडे दुर्लक्ष करून प्रजेचें हित साधलें पाहिजे. राजाचे बंधु म्हणजे प्रजा—"प्रजाभिस्तु बंधुमन्तो राजानः न ज्ञातिभिः।" गर्भिणी स्त्री ज्याप्रमाणें स्वतःच्या सुखावर पाणी सोडून गर्भाचें हित साधते त्याप्रमाणें राजानें केलें पाहिजे. ह्यावरून आमच्या शास्त्रकारांनीं राजसत्तेला जरी उचलून धरलें असलें तरी ती सत्ता अनियंत्रित, छांदिष्ट,

उपद्रवी अगर तापदायक नव्हती. ह्याचें कारण राजसत्तेला आटो-क्यांत ठेवणारी आणखी एक प्रबल अशी धर्मसत्ता होती. "तूं प्रजेला मारूं नको पण धर्माला तरी मानशील ना?" असा लोकांचा राजाला सवाल असे. धर्म म्हणजे न्याय, धर्म म्हणजे नीति, धर्म म्हणजे शिष्ट वर्तन; अशा या धर्मनिष्ठेचें फळ पारलौकिक हित ठरल्यामुळें निर्दोष वागणुकीचें सातत्य राखलें गेलें. "धर्माय राजा भवति न कामकारणाय" हा सिद्धांत असे.

राजधर्म—परचक्र, चौर्य व जबरदस्तीनें केला जाणारा अन्याय ह्यांपासून प्रजेला भय असतें. ह्या त्रिविध संकटापासून प्रजेचें रक्षण करणें हें राजाचें पहिलें कर्तव्य. ह्यानंतर सज्जनांचा सन्मान (सुजनस्य पूजा) करणें हा राजाचा धर्म अशीनें प्रतिपादला आहे. ह्यालेरीज, सभागृहें, जलशाला, तळीं, देवळें, इ. बांधणें हीं कामें राजधर्मांत घालून शास्त्रकारांनीं राजधर्माचें चित्र पुरें केलें आहे. विशेष म्हणजे दरिद्री, अंध, पंगु, मुके, व्यंगी ह्यांचा योगक्षेम राजांनीं चालविला पाहिजे, असें पुराणकार निक्षून सांगतात.

मुलूखगिरी करून जबरदस्तीनें परराज्यें जिंकणाऱ्या राजाला लोभविजयी राजा असें आमचे शास्त्रकार म्हणतात. कित्येक शत्रूंच्या स्त्रियांचें हरण करतात ते असुरविजयी राजे होत. धर्म-विजयी राजा फक्त आपलें वर्चस्व मान्य करावयाला लावतो. विजयी राजांचें हें वर्गीकरण मार्मिक आहे. कात्यायनाचें बोध-वचन 'दुष्टस्यापि नरेन्द्रस्य तद्राज्यं न विनाशयेत्। न प्रजानुमतो यस्मादन्यायेषु प्रवर्तते।' हें आजहि अनुकरणीय आहे. राजाच्या दुष्टपणाला प्रजेची अनुमति असते असें मानतां कामा नये.

राजपदाला लोकांची संमति आवश्यक असली तरी त्यामुळें तो प्रजेकडून निवडला जाई असें म्हणतां येणार नाहीं. राज्याभिषेकांत प्रजेची संमति प्रकट होणे ही फार महत्त्वाची गोष्ट आहे. अनभिषिक्त राजशाही ही धींगेशाही होय. राजाला राज्यारोहणाच्या वेळीं शपथ घ्यावी लागते. अभिषेकानें त्याचें जन्मांतर होतें. कारण अभिषेकोत्तर पूर्वीचें नांव सोडून नवीन नांव धारण करण्याची वहिवाट आहे. अभिषेक म्हणजे स्नान. विद्या, यज्ञ ह्यांच्या नंतर स्नान विहित आहे; पण राज्यारोहणांत हें अगोदर आहे.

वरील विवेचनावरून असें स्पष्ट दिसून येईल कीं, हिंदु राजा हा प्रजेचा प्रतिनिधि होता. हें त्याचें स्वरूप तो वेतनी नोकर आहे असें म्हणून नारदानें विशद केलें आहे. राजाला कर देतात तें त्याचें वेतन होय—'बलिः स तस्य विहितः प्रजापालनवेतनम्।' लढाईवर जातांना सैनिकांना उद्देशून राजा भाषण करी तेव्हां "तुमच्यासारखाच मी नोकर आहें. हें राज्य तुम्हीं व मीं मिळून उपभोगावयाचें आहे" (तुल्यवेतनोस्मि। भवद्भिः सहभोग्यमिमम् राज्यम्।) असें म्हणत असे.

राजा हा कायद्याची अंमलबजावणी करणारा अधिकारी. कायदा करणें हें त्याचें काम नव्हे; तें धर्मज्ञांचें. राजाला वचन द्यावी लागे कीं, मी दण्डनीतिशास्त्राला अनुसरून धर्मांप्रमाणें वागेन; माझ्या लहरीप्रमाणें वागणार नाहीं—'यश्चात्र धर्मो नीत्युक्तो दण्ड-नीतिव्यपाश्रयः। तमशङ्कः करिष्यामि स्ववशो न कदाचन॥' राजाचा पुरोहित जितेंद्रिय, अर्थशास्त्रज्ञ व धर्मज्ञ हवा असा शास्त्रकारांचा आग्रह आहे. राजाचा पुरोहित बहुधा मोठा अर्थ-शास्त्रज्ञ होता.

राज्याचा वारसा—राजपद वंशपरंपरा चाले. ज्येष्ठ पुत्र गादीचा वारस होई. त्याच्या ठिकाणीं व्यंग असेल तरच त्याच्या धाकट्याला गादी मिळे. पुरुष राजा पाहिजे हा सामान्य नियम. तथापि स्त्रिया गादीवर बसल्याचीं उदाहरणें आहेत. शांतिपर्वांत तर त्याला आधार सांपडतो—"कुमारो नास्ति येषां च कन्यास्तत्राभिषेचय।"—पुत्राच्या अभावीं कन्या राज्यासनावर येई. राज्याच्या वारसहक्काचा सामान्य नियम नीतिवाक्यामृतकार देतात तो असा—"सुत-सोदरसापत्नपितृव्यकुल्यदौहित्रागन्तुकेषु पूर्वपूर्वाभावे भवत्युत्तरस्य राज्यपदावाप्तिः।" ह्या वाक्यांत वारसांचा क्रम दिला आहे तो असा: पुत्र, सोदर, सापत्न बंधु, चुलता, कुळांतील पुरुष, मुलीचा मुलगा व आगंतुक (बाहेरचा). हा शेवटला वारस लोकांच्या पसंतीचा असो किंवा नसो.

राज्याला वारसदार ठरल्यामुळें राजाची निवड करण्याचा प्रश्न उद्भवत नाहीं. वैदिक काळांत राजा निवडला जाई ह्याला आधार म्हणून अथर्ववेदांतील "त्वां विशो वृणतां राज्याय त्वामिमाः प्रदिशः पञ्चदेवीः" (३-४-२) हा मंत्र पुढें आणतात. परंतु पराजित होऊन राज्याबाहेर गेलेल्या राजाला उद्देशून म्हटलेला हा मंत्र आहे हें समजल्यावर शंका येण्याचें कारण नाहीं. शिवाय वृ धातूचा अर्थ वरणें अथवा भजणें असा आहे. कन्या वराला वरते असें आपण म्हणतों; तेव्हां त्याला अधिक मतें मिळालीं तो मुलगा ती स्वीकारते असें समजत नाहीं. गणराज्यासंबंधानें लिहि-तांना आमच्या इतिहासकारांची प्रवृत्ति बौद्ध व जैन ग्रंथांतील माहिती अक्षरशः स्वीकारण्याची दिसून येते. परंतु ते ग्रंथकार आमच्या पुराणकारांप्रमाणें अतिशयोक्ति, कल्पनातरंग, अनुमान-धपका व कांहीं ठरलेले संकेत ह्या दोषांपासून मुक्त होते, असें मानण्याचें कारण नाहीं. एखाद्या गांवाची वस्ती ८४,००० आहे असें वर्णन प्राचीन ग्रंथांतून आढळतें. अशी ८४,००० होते असें पौराणिक वाङ्मयांतहि लिहिलेलें आहे. हें सर्व अक्षरशः खरें आहे, असें मानणें योग्य होणार नाहीं.

अवनतीचीं कारणें—धर्मशास्त्राप्रमाणें राजा व त्याचे मंत्री न्याय देत तोंपर्यंत येथपर्यंत वर्णन केलेली शासनपद्धति कोणालाहि प्रशंसनीय अशीच वाटेल. परंतु ती सर्व काळ टिकून नाहीं. मध्यांत

**शासनशास्त्र**—शारीरिकदृष्ट्या मनुष्य पूर्णावस्थेला पोंचल्यानंतर तो एकटा राहत असल्याचें उदाहरण सांपडत नाहीं. ह्याचें कारण उघड आहे. केव्हांहि पुरुष व स्त्री एकत्र राहणार. व स्त्रीपुरुषांच्या संगतींत संतति निर्माण होणार. अशा रीतीनें कुटुंब हा समाजाचा एक घटक बनतो. परंतु ह्या एका कुटुंबाला सुद्धां एकटेंच एक राहणें शक्य नाहीं. एकोदरांत लग्न होण्याचें बंद झाल्यावर मुलीकरितां दुसरें कुटुंब जवळ करावेंच लागतें. कन्याप्रदानानें दोन कुटुंबांचा घरोबा बनतो. ह्या दोन कुटुंबांतून दुसरीं अनेक कुटुंबे बनूं लागतात आणि ह्या सर्व कुटुंबांचा मिळून एक पुंज बनतो. हीच जात व हाच समाज. ह्यांतील व्यक्ती आर्थिक व सांस्कृतिक रीत्या संबद्ध होतात. त्यांच्यांत समान रूढी व आचार प्रस्थापित होतात. अशा रूढींविषयीं प्रत्येकाच्या मनांत प्रथम आदर व नंतर हळूहळू अभिमान उत्पन्न होतो. कालांतरानें समाज संख्येनें मोठा झाला कीं त्याला हा निर्माण झालेला एकवटा बिघडूं नये म्हणून वागणुकीचे नियम ठरवावे लागतात आणि ओघानेंच ते नियम पाळण्याची सक्ती करावी लागते; तसेंच नियम मोडणाराला शासन करण्याची आवश्यकता भासते. नंतर हें शासन कोणी करावयाचें हा प्रश्न उत्पन्न होतो. हें काम अर्थातच हुशार व लायक माणसांवर सोंपविण्यांत येतें. अशा रीतीनें शासनसंस्थेचा उदय होतो. ह्या शासनसंस्थेचा प्रकार लोकशाही स्वरूपाचा असतो, हें सांगावयास नकोच. ह्यावरून हा शासनप्रकार स्वाभाविक, मूळचा किंवा आयतन होय असें म्हणावयास हरकत नाहीं. राजशाही किंवा बलशाही मूळची असावी असें वाटत नाहीं. राजसंस्था युद्धांमुळें अस्तित्वांत आल्याचें इतिहास सांगतो.

गणराज्य—अशा प्रकारच्या लोकशाहीला गणराज्य म्हणून संबोधीत असत. हीं राज्यें हिमालयाच्या पायथ्याच्या प्रदेशांत असून त्यांचें अस्तित्व सुमारें तीनशें वर्षें असावें. खिस्ती शकपूर्व ३२५ सालानंतर त्यांचा लोप झाला. पाली व जैन ग्रंथांत गोमती नदीच्या कांठीं वसलेल्या शाक्य-मौर्यादि अकरा गणराज्यांचा उल्लेख आहे. *ह्याच शाक्य कुलांत बुद्धाचा जन्म झाला.* महाभारतांत यादव वंशांतील वृष्णि, अन्धक, भोज, इत्यादि शाखांचीं गणराज्यें असल्याचा निर्देश आहे. यादव हे सौराष्ट्रांत वास्तव्य करून राहिलेले. हे गण म्हणजे कौलिक जमाती होत. जमातीच्या प्रमुखाला राजा ही संज्ञा असे. गौतम बुद्धाचा बाप असाच एक राजा होता. निरनिराळ्या जमातींचा संघ बने व त्याला संघराज्य म्हणत. अनेक माणसें एकत्र राहूं लागलीं व त्यांचे आर्थिक व सामाजिक हितसंबंध परस्परांत गुंतलेले असले कीं घटना करावी लागते. तेव्हां ह्या गणराज्य शासनाचे नियम असणार हें सांगावयास नको. हे गण आपणांस क्षत्रिय म्हणवीत; परंतु ते वैदिक परंपरेंतले नसण्याचा संभव बराच दिसतो. अन्तर्गत कलह व गणागणांतील युद्धें ह्यांमुळें हीं गणराज्यें क्षीण झालीं.

वैदिकांनीं गणराज्यांना कधींच उत्तेजन दिलें नाहीं. ऋग्वेदांत राजसंस्था दृढमूल झालेली दिसते. १० व्या मंडलांतील १७३ वे सूक्त अभिषिक्त राजाच्या स्तुतिपर आहे. राजाला प्रजा कर देते असा स्पष्ट उल्लेख आहे (७-६-५). वर्णाश्रमधर्मांत तर क्षत्रियाला राजपद कायमचें देऊन टाकिलें आहे. वैदिकांच्या दृष्टीनें राजपद ही एक धार्मिक बाब समजली पाहिजे. ऋग्वेदकाळीं झालेल्या दाशराज्ञ युद्धांत क्षत्रियच राजे असल्याचें वर्णन आहे. आजपर्यंत तग धरून राहिलेल्या जातिसंस्था हीं छोटीं गणराज्यें म्हणावयास हरकत नाहीं. जातीजातींची अलिखित घटना आहे. निरनिराळीं कामें करणारे त्यांचे अधिकारी आहेत. त्यांचा एक नायक अथवा प्रमुख असतो. जातीचे तंटे जातगंगा तोडते. जातीचा अधिकार प्रत्येक जण मान्य करितो. पण सुधारलेल्या यांत्रिक युगांत अशीं गणराज्यें टिकणें शक्य नाहीं.

ऐतरेय ब्राह्मणांत साम्राज्य, भौज्य, स्वाराज्य व वैराज्य असे चार राज्यप्रकार वर्णिले आहेत. त्यांच्या अर्थासंबंधीं मतभेद आहेत म्हणून सायणानें वरील चार शब्दांचा सांगितलेला अर्थ समजून घेणें अवश्य आहे. त्याच्या मतें साम्राज्य म्हणजे 'धर्मेण पालनम्'. भोगसमृद्धीच्या अथवा ऐश्वर्याच्या दृष्टीनें ज्या राज्याकडे बघतात त्याला भौज्य ही संज्ञा लावतात. स्वतंत्र राज्य हें स्वाराज्य होय. परकी लोकांची सत्ता असली कीं त्याला वैराज्य म्हणतात. ५१ लाख ते १ कोटी उत्पन्नाचा राजा स्वराट् व दोन ते दहा कोटी उत्पन्नाचा राजा विराट्, असेंहि एके ठिकाणीं सांगितलेलें आढळतें (शुक्रनीतिसार). उत्तर कुरु व उत्तर मद्र ह्या देशांचे राजे होते व अभिषेकानंतर त्यांस विराट् ही संज्ञा प्राप्त होई असें सायणाचार्यांचें म्हणणें आहे. वैराज्य म्हणजे राजा नाहीं तें राज्य, असें निदान सायण समजत नाहीं.

ऋग्वेदकालीं राजसंस्था दृढमूल झाली होती ह्यांत शंका नाहीं, तथापि ती बलशाही नव्हती. ऋग्वेदांतील राजा म्हणजे लुप्त झालेल्या गणराज्यांतील राजाची विकास पावलेली आवृत्ति होय. ह्या नवीन राजपदाला प्रजेच्या मान्यतेचा आधार असे. ह्या राजसत्तेचें बीज आक्रमक सत्तेंत पेरलेलें नव्हतें. ह्यास्तव राजा प्रजेचा प्रतिनिधि समजला जाई. राजा म्हणजे प्रजेच्या आशाआकांक्षांचें पूर्तिस्थान. प्रजेचें सुख तेंच राजाचें सुख. राजानें स्वतःच्या हिताकडे दुर्लक्ष करून प्रजेचें हित साधलें पाहिजे. राजाचे बंधु म्हणजे प्रजा—"प्रजाभिस्तु बंधुमन्तो राजानः न ज्ञातिभिः।" गर्भिणी स्त्री ज्याप्रमाणें स्वतःच्या सुखावर पाणी सोडून गर्भाचें हित साधते त्याप्रमाणें राजानें केलें पाहिजे. ह्यावरून आमच्या शास्त्रकारांनीं राजसत्तेला जरी उचलून धरलें असलें तरी ती सत्ता अनियंत्रित, छांदिष्ट,

उपद्रवी अगर तापदायक नव्हती. ह्याचें कारण राजसत्तेला आटो-क्यांत ठेवणारी आणखी एक प्रबल अशी धर्मसत्ता होती. "तूं प्रजेला मानूं नको पण धर्माला तरी मानशील ना?" असा लोकांचा राजाला सवाल असे. धर्म म्हणजे न्याय, धर्म म्हणजे नीति, धर्म म्हणजे *शिष्ट वर्तन; अशा या धर्मनिष्ठेचें फळ पारलौकिक हित* ठरल्यामुळें निर्दोष वागणुकीचें सातत्य राखलें गेलें. "धर्माय राजा भवति न कामकारणाय" हा सिद्धांत असे.

राजधर्म—परचक्र, चौर्य व जबरदस्तीनें केला जाणारा अन्याय ह्यांपासून प्रजेला भय असतें. ह्या त्रिविध संकटापासून प्रजेचें रक्षण करणें हें राजाचें पहिलें कर्तव्य. ह्यानंतर सज्जनांचा सन्मान (सुजनस्य पूजा) करणें हा राजाचा धर्म ऋषींनीं प्रतिपादला आहे. ह्याखेरीज, सभागृहें, जलशाला, तळीं, देवळें, इ. बांधणें हीं कामें राजधर्मांत घालून शास्त्रकारांनीं राजधर्माचें चित्र पुरें केलें आहे. विशेष म्हणजे दरिद्री, अंध, पंगु, मुके, व्यंगी ह्यांचा योगक्षेम राजांनीं चालविला पाहिजे, असें पुराणकार निक्षून सांगतात.

मुलूखगिरी करून जबरदस्तीनें परराज्यें जिंकणाऱ्या राजाला लोभविजयी राजा असें आमचे शास्त्रकार म्हणतात. कित्येक शत्रूच्या स्त्रियांचें हरण करतात ते असुरविजयी राजे होत. धर्म-विजयी राजा फक्त आपलें वर्चस्व मान्य करावयाला लावतो. विजयी राजांचें हें वर्गीकरण मार्मिक आहे. कात्यायनाचें बोध-वचन 'दुष्टस्यापि नरेन्द्रस्य तद्राज्यं न विनाशयेत्। न प्रजानुमतो यस्मादन्यायेषु प्रवर्तते।' हें आजहि अनुकरणीय आहे. राजाच्या दुष्टपणाला प्रजेची अनुमति असते असें मानतां कामा नये.

राजपदाला लोकांची संमति आवश्यक असली तरी त्यामुळें तो प्रजेकडून निवडला जाई असें म्हणतां येणार नाहीं. राज्याभिषेकांत प्रजेची संमति प्रकट होते ही फार महत्त्वाची गोष्ट आहे. अनभिषिक्त राजशाही ही धांदेशाही होय. राजाला राज्यारोहणाच्या वेळीं शपथ घ्यावी लागते. अभिषेकानें त्याचें जन्मांतर होतें. कारण अभिषेकोत्तर पूर्वीचें नांव सोडून नवीन नांव धारण करण्याची वहिवाट आहे. अभिषेक म्हणजे स्नान. विद्या, यज्ञ ह्यांच्या नंतर स्नान विहित आहे; पण राज्यारोहणांत हें अगोदर आहे.

वरील विवेचनावरून असें स्पष्ट दिसून येईल कीं, हिंदु राजा हा प्रजेचा प्रतिनिधि होता. हें त्याचें स्वरूप तो वेतनी नोकर आहे असें म्हणून नारदानें विपद केलें आहे. राजाला कर देतात तें त्याचें वेतन होय—'बलिः स तस्य विहितः प्रजापालनवेतनम्।' लढाईवर जातांना सैनिकांना उद्देशून राजा भाषण करी तेव्हां "तुमच्यासारखाच मी नोकर आहे. हें राज्य तुम्हीं व मीं मिळून उपभोगावयाचें आहे" (तुल्यवेतनोस्मि। भवद्भिः सहभोग्यमिमम राज्यम्।) असें म्हणत असे.

राजा हा कायद्याची अंमलबजावणी करणारा अधिकारी. कायदा करणें हें त्याचें काम नव्हे; तें धर्मज्ञांचें. राजाला शपथ घ्यावी लागे कीं, मी दण्डनीतिशास्त्राला अनुसरून धर्माप्रमाणें वागेन; माझ्या लहरीप्रमाणें वागणार नाहीं—'यश्चात्र धर्मो नीत्युक्तो दण्ड-नीतिव्यपाश्रयः। तमशङ्कः करिष्यामि स्ववशो न कदाचन॥' राजाचा पुरोहित जितेंद्रिय, अर्थशास्त्रज्ञ व धर्मज्ञ हवा असा शास्त्रकारांचा आग्रह आहे. रामाचा पुरोहित मुख्यत्वा मोठा अर्थ-शास्त्रज्ञ होता.

राज्याचा वारसा—राजपद वंशपरंपरा चाले. ज्येष्ठ पुत्र गादीचा वारस होई. त्याच्या ठिकाणीं व्यंग असेल तरच त्याच्या धाकट्याला गादी मिळे. पुरुष राजा पाहिजे हा सामान्य नियम. तथापि स्त्रिया गादीवर बसल्याचीं उदाहरणें आहेत. शांतिपर्वांत तर त्याला आधार सांपडतो—"कुमारो नास्ति येषां च कन्यास्तत्राभिषेचय।"—पुत्राच्या अभावीं कन्या राज्यासनावर येई. राज्याच्या वारसहक्काचा सामान्य नियम नीतिवाक्यामृतकार देतात तो असा—"सुत-सोदरसापत्नपितृव्यकुल्यदौहित्रागन्तुकेषु पूर्वपूर्वाभावे भवत्युत्तरस्य राज्यपदावाप्तिः।" ह्या वाक्यांत वारसांचा क्रम दिला आहे तो असा: पुत्र, सोदर, सापत्न बंधु, चुलता, कुळांतील पुरुष, मुलीचा मुलगा व आगंतुक (बाहेरचा). हा शेवटला वारस लोकांच्या पसंतीचा असो किंवा नसो.

राज्याला वारसदार ठरल्यामुळें राजाची निवड करण्याचा प्रश्न उद्भवत नाहीं. वैदिक कालांत राजा निवडला जाई ह्याला आधार म्हणून अथर्ववेदांतील "त्वां विशो वृणतां राज्याय त्वामिमाः प्रदिशः पञ्चदेवीः" (३-४-२) हा मंत्र पुढें आणतात. परंतु पराजित होऊन राज्याबाहेर गेलेल्या राजाला उद्देशून म्हटलेला हा मंत्र आहे हें समजल्यावर शंका येण्याचें कारण नाहीं. शिवाय वृ धातूचा अर्थ वरणें अथवा भजणें असा आहे. कन्या वराला वरते असें आपण म्हणतों; तेव्हां त्याला अधिक मतें मिळालीं तो मुलगा ती स्वीकारते असें समजत नाहीं. गणराज्यासंबंधानें लिहि-तांना आमच्या इतिहासकारांची प्रवृत्ति बौद्ध व जैन ग्रंथांतील माहिती अक्षरशः स्वीकारण्याची दिसून येते. परंतु ते ग्रंथकार आमच्या पुराणकारांप्रमाणें अतिशयोक्ति, कल्पनातरंग, अनुमान-धपका व कांहीं ठरलेले संकेत ह्या दोषांपासून मुक्त होते, असें मानण्याचें कारण नाहीं. एखाद्या गांवाची वस्ती ८४,००० आहे असें बऱ्याच प्राचीन ग्रंथांतून आढळतें. कशी ८४,००० होतें असें पौराणिक वाङ्मयांतहि लिहिलेलें आहे. हें सर्व अक्षरशः खरें आहे, असें मानणें योग्य होणार नाहीं.

अवनतीचीं कारणें—धर्मशास्त्राप्रमाणें राजा व त्याचे मंत्री न्याय देत तोंपर्यंत येथपर्यंत वर्णन केलेली शासनपद्धति कोणालाहि प्रशंसनीय अशीच वाटेल. परंतु ती सर्व काळ टिकत नाहीं. राज्यांत

कोठेंहि भुकेला मनुष्य उपेक्षिला जात नसे, अशा तऱ्हेची स्तुति एका राजाची राजतरंगिणीकारांनीं केली आहे. तथापि ही स्थिति लवकरच पालटते आणि महीपति म्हणतो ( कुणबी पिकविति जैसी धरणी । आयताची राजा दंड करूनि । होतसे धनी वांटिया ॥ ) त्याप्रमाणें होते. आणि अनुशासनपर्वकारांनीं प्रजेचें रक्षण करीन असें म्हणून तसें न करणाऱ्या राजाची हत्या करण्याची परवानगी दिली असली ( "अहं वो रक्षितेत्युक्त्वा यो न रक्षति भूमिपः । स संहत्य निहन्तव्यः श्वेव सोन्माद आतुरः ॥ " ) तरी अखेरीस राजा प्रजेला गुंडाळून ठेवूं शकतो. ह्याच कारणानें लोकराज्यें निर्माण होतात.

आमचें प्राचीन राजकीय चित्र फार मोहक दिसतें. राजा न्यायी, दयाळू व प्रजालोभी असला तर मनुष्यकृत आपत्तींतून लोक बरेचसे बचावतात; सुखासमाधानानें राहतात हें खरें; तथापि वर वर्णन केलेली शासनपद्धति प्रगतिपर नव्हती हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. लोक सुस्त व मद्द होऊं लागले. सांचलेलें पाणी कालांतरानें बिघडतें, तशी लोकांची स्थिति झाली. त्या पद्धतींत शांततेनें जगण्याचें बीज होतें पण सुधारण्याचें नव्हतें. विकासशीलतेचा पूर्ण अभाव होता. ज्ञानाची व्याप्ति अत्यंत संकुचित होती. स्वतंत्र बुद्धीला वाव नव्हता. धर्मशास्त्रांनीं कौटिल्याच्या अर्थशास्त्रासारखीं व्यवहारशास्त्रें मारून टाकलीं. पेशवाईअखेरपर्यंत ही स्थिति होती. आजच्या हिंदु समाजाची सर्व बाजूंनीं जी हीन स्थिति दिसत आहे ते आजपर्यंतच्या राज्यव्यवस्थेचें फल होय.

शासनशास्त्रीय वाङ्मय—शासनशास्त्र या विषयाचा समावेश भारतीय ग्रंथकार अर्थशास्त्र या विषयामध्यें करीत असत. अर्थशास्त्र यास एक उपवेद मानीत व शासनशास्त्रास दंडनीति असें म्हणत. चंद्रगुप्तकालीन चाणक्याचें अर्थशास्त्र आतां उपलब्ध झालें असून तत्कालीन शासनशास्त्रविषयक कल्पनांचा विकास किती झाला होता याचें त्यावरून अनुमान काढतां येतें. चाणक्यानेंहि पूर्वीच्या कांहीं अर्थशास्त्रविषयक ग्रंथांचा उल्लेख केला असून कांहीं ठिकाणीं आपला मतभेदहि व्यक्त केला आहे. याखेरीज बार्हस्पत्य अर्थशास्त्र, शुक्रनीति, वगैरे ग्रंथांचाहि उल्लेख आढळतो. परंतु त्या नांवानें प्रस्तुत उपलब्ध असलेले ग्रंथ तेच होत असें खात्रीनें सांगतां येत नाहीं. मनुस्मृति वगैरे स्मृति-ग्रंथांतहि शासनशास्त्र या विषयाचा कांहीं उहापोह केलेला आपणांस आढळून येतो व राजानें शिष्टांच्या सभेंत बसून राज्यकारभार कसा चालवावा याविषयीं विवेचन केलेलें आढळतें. राजप्रमुख शासनसंस्थेप्रमाणें त्या वेळीं कांहीं गणराज्येंहि होतीं व त्या प्रदेशांत लोकांतील शिष्ट जनांच्या आदेशानुसार राज्यकारभार चालत असे असें दिसून येतें. हीच शासनप्रणाली दीर्घकाल भरतखंडांत अस्तित्वांत होती. अष्टप्रधानयुक्त राजशासनपद्धति परंपरागत दीर्घकालापासून चालत आलेली असून तींतूनच पुढें शिवाजीच्या राज्यशासनपद्धतीचा उगम झाला. किंबहुना मोंगलांनींहि याच पद्धतीचा थोड्याबहुत फरकानें अंगीकार केला असें म्हणावयास हरकत नाहीं. मराठशाहीमध्यें ' अमात्यांची राजनीति ' म्हणून एक नीतिग्रंथ प्रचलित होता. नाना फडणिसानेंहि 'नारायणव्यवहारशिक्षा' म्हणून एक लहानसा ग्रंथ तयार केला होता व सवाई माधवरावाकरितांहि अशा तऱ्हेचा एक ग्रंथ टिपणवजा तयार करण्यांत आला होता.

राज्यविभाग—राज्यकारभाराच्या सोयीसाठीं राज्याचे लहानमोठे विभाग पाडीत; व त्यांना कांहीं नांवें देत. आज प्रांत, जिल्हे, तालुके, पेटे, शहरें, गांवें यांसारखीं देशविभागाचीं नांवें आपण ऐकतोंच. पेशवाईंत राज्यकारभाराच्या सोयीकरितां राज्याचे विभाग पाडून अशा प्रत्येक विभागावर अधिकारी नेमलेला असे. ह्या विभागांतील अखेरचा घटक म्हणजे मजरें, मौजें व कसबा मजरें म्हणजे अगदीं लहान गांव. प्रत्येक महालांत देहें म्हणजे गांव यांची संख्या देतांना अमुक कसबें, अमुक मौजें व अमुक मजरें असें लिहिण्याची वहिवाट होती. कसबा, मौजें व मजरें मिळून महाल बनविला जाई. महाल, तरफ, तर्पे व कर्यात हे निरनिराळ्या वेळीं एकाच अर्थानें वापरलेले शब्द होत. अनेक तरफ मिळून सामला, परगणा, तालुका ह्या नांवाचा विभाग होई. सुभा, प्रांत, सरकार हा सर्वांत मोठा विभाग असावा. नुसत्या गांवाचा निर्देश करीत नसत; जवळचा गांव असल्यास तरफ नांव लावीत, दूरचा असल्यास परगणा, प्रांत किंवा तालुका लावीत, असें वाटतें. कसब्याचा गांव असल्यास कसबें अमुक म्हणून लिहीत आणि तोच परगणा असेल तर कसबें ......—परगणे मजकूर, असे लिहीत. संमत आणि तर्फ ह्यांत फरक नाहीं. एकाच काळीं संमत हवेली व तर्फ हवेली असें लिहिलेलें आढळतें. तथापि तर्फापेक्षां संमत फारच कमी वापरलेला आढळतो. त्याचप्रमाणें सरकार व प्रांत ह्यांत भेद नाहीं. सरकार जुन्नर किंवा प्रांत जुन्नर असें दोन्ही तऱ्हेनें लिहीत असत. परगणा म्हणजे तालुका. कोंकणांत तालुका शब्द विशेष प्रचारांत होता. कदाचित् वतनी व मुलकी नांवें निरनिराळीं असावीं., तर्फ, संमत व परगणा हीं वतनी, आणि तालुका, सरकार, जिल्हा हीं मुलकी नांवें, असा भेद एक वेळ करीत. वतनी विभाग वेगळा व मुलकी म्हणजे सरकारी विभाग वेगळा. ह्या संज्ञांत पुढें सरमिसळ झालीच. गांवावर मुख्य अधिकारी मोकदम असे. तर्फेच्या अधिकाऱ्याला हवालदार म्हणत. तालुक्याच्या अमलदारास मामलेदार अथवा सुभेदार ही संज्ञा होती. ह्यांच्यावरील अधिकाऱ्याला सरसुभा म्हणत. कमाविसदार हा सामान्य शब्द आहे. कमाविसदार म्हणजे मामलेदार किंवा सुभेदार. परगण्याच्या अमलदाराला सुभेदार व कमाविसदार म्हणत असल्याचें दिसतें. तर्फेच्या अधिकाऱ्यांना सामान्यतः

महालकरी म्हणत असावेत. सर हवालदार म्हणून एक अधिकारी असे. ह्याची नेमणूक तालुक्याला असून जमाबंदी करणें व न्यायाधीशाला मदत करणें हीं त्याचीं कामें होतीं. कोणतीं कामें कोणाच्या मार्फत पाठवावयाचीं, कोणीं कोणतीं कामें स्वतंत्र करावयाचीं ह्यांचे नियम होते. पाटलासारख्या वतनदाराला शाश्वत अधिकारी म्हणत. मामलेदार-कमाविसदार हा अशाश्वत अधिकारी होय.

पाश्चात्य पद्धति—आतां पाश्चात्यांतील या शास्त्रावरचे विचार काय होते तें पाहूं. पाश्चात्य देशांत पहिला राजनीतिशास्त्रावरील ग्रंथ म्हटला म्हणजे आरिस्टॉटल याचा होय. प्लेटोच्या लेखसंग्रहांतहि राजकारणविषयक बरेच विचार ग्रथित केलेले आढळतात. त्याचा 'रिपब्लिक' हा ग्रंथ कल्पनाप्रचुर तर आरिस्टॉटलचा 'पॉलिटिक्स' हा व्यवस्थित लिहिलेला दिसतो. यानेंच प्रथम नीतिशास्त्र व शासनशास्त्र हीं दोन पृथक् केलीं. यानें बुद्धिप्रधान लोकांकडेच शासनसत्ता असावी असें प्रतिपादन केलें आहे व संस्थानें लहानच असावीं असें म्हटलें आहे. रोमन लोक हे जास्त व्यावहारिक असून तात्त्विक चर्चा करण्याच्या भानगडींत फारसे पडत नसत. पोलिबियस आणि सिसरो यांनीं या विषयावर कांहीं विचार व्यक्त केले आहेत. पण त्यांनीं शासनशास्त्रीय विचारांत फारशी भर घातली नाहीं.

मध्ययुगांतील शासनशास्त्रीय विचार प्रामुख्यानें मांडणारे दोन विद्वान् म्हणजे सेंट थॉमस अक्वायनस व डान्टे हे होत. पहिल्यानें पारमार्थिक गोष्टींस महत्त्व देऊन चर्चच्या सत्तेचें समर्थन केलें आहे, तर दुसऱ्यानें राजसत्तेचा पुरस्कार केला आहे. या दोन विचारप्रणालींतून नियंत्रित राज्यपद्धतीचा उगम झाला. याच सुमारास मॅकिऑव्हेली यानें आपल्या 'प्रिन्स' या ग्रंथांत आपल्या कुटिल नीतीचें विवेचन करून राजानें आपली सत्ता कशी प्रस्थापन करावी व ती कायम कशी राखावी याचें वर्णन केलें आहे.

पश्चिमेकडील धार्मिक सुधारणेच्या चळवळीनंतर या विषयाला नवीन वळण लागलें. नवीन लेखकांनीं मानवाचे वैयक्तिक हक्क व जबाबदारी या गोष्टींकडे लक्ष वेधलें. याच वेळीं नैसर्गिक स्थिति, सामाजिक करार, राजकीय सत्ता अथवा शासनसंस्था म्हणजे सरकार यांच्यासंबंधीं चर्चा सुरू झाली. जर्मनीमध्यें याच सुमारास राज्यनीतिशास्त्रावर बरेंच लेखन प्रसिद्ध झालें. या शास्त्रामध्यें राज्याचें उत्पत्ति व त्याची व्यवस्था या विषयाचा खल केलेला असे. याच वेळीं सार्वदेशीय कायदेशास्त्र अथवा आंतरराष्ट्रीय व्यवहार यासंबंधींहि कांहीं नियम तयार झाले.

परराष्ट्रीय राजकारण—परदेशांशीं राजकारण कसें चालवावें, यासंबंधींच्या शास्त्राला किंवा विद्येला 'डिप्लोमसी' म्हणतात. हा शब्द फ्रेंच भाषेंतून घेतलेला असून त्याचा उपयोग इंग्रज मुत्सद्दी बर्क यानें प्रथम १७९६ सालीं केला. कार्डिनल द रिशेल्यू हा अलीकडे परराष्ट्रीय राजकारणशास्त्राचा उत्पादक मानला जातो; तथापि मॅकिऑव्हेली याला या शास्त्राचा आद्य जनक मानणें उचित होय. तथापि या परराष्ट्रीय राजकारणाला शास्त्राचें ऊर्फ नियमबद्धतेचें स्वरूप १८१५ सालीं व्हिएन्नाच्या काँग्रेसमध्यें आणि १८१८ सालच्या एलाशापेलच्या कॉंग्रेसमध्यें देण्यांत आलें. आजच्या राजकारणांत परराष्ट्रांच्या राजधानींतून आपले वकील ठेवणें अवश्यक झालें आहे. स्वतंत्र भारतानें असे वकील परराष्ट्रांत पाठविले आहेत व त्यांचेहि दिल्लींत आहेत.

**शासनादेशित प्रदेश**—(मँडेटेड टेरिटरीज). पहिल्या महायुद्धानंतर त्या युद्धांत जर्मनीचा आणि तुर्कस्तानचा पराभव झाल्यावर जर्मन वसाहती व प्रदेश, आणि तुर्की वसाहती व प्रदेश, त्यांच्यावरील जर्मनीचा व तुर्कस्तानचा अमल नष्ट करून, राष्ट्रसंघ (लीग ऑफ नेशन्स) या महासंस्थेकडून, निरनिराळ्या देशांच्या हुकमतीखालीं देण्यांत आले. सदरहू प्रदेशावर या हुकमत करणाऱ्या देशांचा अधिकार व अमल यांच्या मर्यादा राष्ट्रसंघानें ठरवून दिल्या, आणि अशी हुकमत चालवणाऱ्या प्रत्येक देशाला आपल्या कारभाराचा वार्षिक अहवाल राष्ट्रसंघाकडे धाडावा लागत असे. मॅण्डेट पद्धतीबद्दलचे नियम, राष्ट्रसंघाच्या कॉव्हेनंटमध्यें (आर्टिकल २२) आणि व्हर्सायच्या तहामध्यें (आर्टिकल २२) नमूद केलेले आहेत. अशा मॅण्डेटेड प्रदेशांचे ए, बी व सी असे तीन वर्ग केलेले आहेत. ए वर्गांत आटोमन साम्राज्यापासून तुटक असलेल्या प्रदेशाचा समावेश होतो. हा प्रदेश चांगला सुधारलेला व स्वतंत्रपणें राज्यकारभार चालवण्यास समर्थ असल्यामुळें या प्रदेशाला सल्लामसलत व साहाय्य देणें इतकेंच काम, या प्रदेशावर हुकमत चालवणाऱ्या राष्ट्राकडे दिलें होतें. बी वर्गांत मध्य आफ्रिकेंतील आणि पूर्व आफ्रिकेंतील पूर्वीच्या जर्मन अमलाखालील प्रदेशांचा समावेश करण्यांत येऊन, त्या प्रदेशांना संरक्षित वसाहती (प्रोटेक्टेड स्टेट्स) असा दर्जा देण्यांत आला. आणि सी वर्गांत जो प्रदेश घालण्यांत आला तो, त्यावर हुकमत चालवणाऱ्या राष्ट्राचा एक भाग असें मानून त्या हुकमतवाल्या राष्ट्राच्या कायद्याप्रमाणें तेथील राज्यकारभार चालवण्यांत येऊं लागला. अशा प्रकारें निरनिराळ्या राष्ट्रांच्या हुकमतीखालीं तीन निरनिराळ्या वर्गांतले प्रदेश होते ते—

ए वर्गांतील हुकमतीखालचा प्रदेश—इराक (मेसापोटेमिया) आणि पॅलेस्टाइन ट्रान्सजॉर्डानियासह ग्रेट ब्रिटनच्या हुकमतीखालीं; व सीरिया व लेबॉनॉन फ्रान्सच्या हुकमतीखालीं.

बी वर्गांतील हुकमतीचा प्रदेश—टोगोलँडचा व कामेरूनचा कांहीं भाग फ्रेंच हुकमतीखालीं; टोगोलँडचा आणि कामेरूनचा उरलेला भाग आणि टँगानिका टेरिटरी हे ग्रे. ब्रिटनच्या हुकमती-

खालीं; पूर्वींच्या जर्मन ईस्ट आफ्रिकेचा कांहीं भाग बेल्जिअमच्या हुकमतीखालीं.

सी वर्गांतील हुकमतीचा प्रदेश—दक्षिण पॅसिफिकमधील पूर्वींचा जर्मन प्रदेश ऑस्ट्रेलियाच्या हुकमतीखालीं; सामोआ बेट न्यू झीलंडच्या हुकमतीखालीं; नाऊरू बेट ऑस्ट्रेलिया, न्यू झीलंड, व ग्रेट ब्रिटन यांच्या हुकमतीखालीं; उत्तर पॅसिफिक महासागरांतील पूर्वींचा जर्मन प्रदेश जपानच्या हुकमतीखालीं; व पूर्वींचा जर्मन नैर्ऋत्य आफ्रिका दक्षिण आफ्रिकन युनियन सरकारच्या हुकमतीखालीं.

**शास्त्री, व्ही. एस्. श्रीनिवास** (१८६९-१९४६)—एक प्रागतिक राजकारणी मुत्सद्दी व वक्ते. यांचें शिक्षण कुंभकोणम् येथें झालें. प्रथम हे शिक्षक होते; नंतर १९०७ मध्यें हे भारत-सेवक-समाजाचे सभासद झाले व १९१५ मध्यें त्याचे अध्यक्ष झाले. १९१५ ते १९१६ मध्यें मद्रास कायदे मंडळाचे हे सभासद होते. १९१६ ते १९२० मध्यें हे मध्यवर्ती कायदे मंडळांत निवडून गेलेले प्रतिनिधि होते. हे साउथ बरो कमिटी, इंडियन रेल्वे कमिटी व १९२१ सालीं भरलेल्या इंपीरिअल कॉन्फरन्सचे सभासद होते. राष्ट्र-संघ-परिषद् व वॉशिंग्टन येथें १९२१ मध्यें भरलेल्या नाविक निःशस्त्रीकरण परिषद् यांचे हे सभासद होते. १९२१ मध्यें प्रिव्ही कौन्सिलर झाले व यांस लंडन शहराचें नागरिकत्व मिळालें. १९२२ मध्यें हे डोमिनियन ऑफ कॅनडामध्यें सरकारच्या वतीनें दौरा करून आले. १९२१ मध्यें हे कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें गेले. कलकत्ता युनिव्हर्सिटीनें यांस 'हिंदी नागरिकांचे हक्क व कर्तव्यें' या विषयावर कमला-व्याख्याते नेमलें. दक्षिण आफ्रिकेमध्यें हे १९२७ ते १९२९ पर्यंत हिंदुस्थान सरकारचे वकील होते. १९२९ सालीं नेमलेल्या बादशाही मजूर कमिशनचे ते सभासद होते. १९३०-३१-३२ सालीं ते गोलमेज परिषदेचे सभासद होते व १९३३ मध्यें जॉइंट पार्लमेंटरी कमिटीचे सभासद होते. १९३६ मध्यें मलायामधील मजुरांच्या स्थितीची पाहणी करण्याकरितां त्यांस हिंदुस्थान सरकारनें प्रतिनिधि म्हणून पाठविलें होतें. यांना ब्रिटिश साम्राज्याचे 'रुपेरी वक्ते' म्हणतात. कॉंग्रेसच्या स्वराज्यविषयक चळवळीला यांचा पाठिंबा असे. वेळ-प्रसंगीं ब्रिटिश राज्यपद्धतीवर ते स्पष्ट व निर्भीड टीका करीत. ना. गोखल्यांच्यानंतर भारत-सेवक-समाजाला यांनीं मोठी प्रतिष्ठा आणून दिली. यांनीं तामिळमध्यें आत्मचरित्र लिहिलें आहे. यांना शेवटपर्यंत शिकविण्याची फार हौस असे.

**शाहसाहेब, मौलवी उमर अली** (१८८६- )—एक कवि, संस्कृत पंडित व तत्त्ववेत्ते. यांनीं वाङ्मय व तत्त्वज्ञान यांचा अभ्यास केला. हे संस्कृत व अभिजात तेलगू भाषांचे विद्वान् पंडित बनले व त्यांनीं जुन्या काव्याच्या धर्तीवर तेलगूमध्यें अनेक काव्यें केलीं. यांनीं हिंदु-मुसलमान संस्कृतींवर अनेक व्याख्यानें दिलीं आहेत. यांनीं उमर खय्यामच्या ९०० रुबायतांचें तेलगू कवितांत भाषांतर केलें आहे. त्याचप्रमाणें कुराण व भगवद्गीता यांचें भाषांतर केलें आहे. आंध्र युनिव्हर्सिटीमध्यें हे तेलगू अभ्यास-क्रम समितीचे सभासद आहेत. मद्रास येथें भरलेल्या १९२४ मधील प्राच्य विद्यापरिषदेमध्यें यांनीं कांहीं यौगिक प्रयोग करून दाखविले. यांस पंडित ही पदवी देण्यांत आली आहे व फ्रान्समधील आरां येथील युनिव्हर्सिटीनें यांस हिंदु-मुसलमानी संस्कृतीचे प्रोफेसर अशी पदवी दिली आहे. १९२१ मध्यें हे कॉंग्रेसला मिळाले. हे कांहीं वर्षें अ. भा. कॉंग्रेस कमिटीचे सभासद होते. १९२४ सालीं यांनीं कोकोनाडा येथें अखिल भारतीय खिलाफत भरविली व तिचे जनरल सेक्रेटरी होते. १९३५ मध्यें हे मध्यवर्ती असेंब्लीमध्यें उत्तर मद्रास मुसलमानांतर्फे निवडून आले.

**शाह सुलेमान, सर मुहंमद** (१८८६-१९४१)—एक जगप्रसिद्ध गणितज्ञ व संशोधक. जोनपूर हें यांचें जन्मठिकाण. बी. ए. च्या परीक्षेत शिष्यवृत्ति मिळवून हे केंब्रिजला गेले व डॉक्टर ऑफ लॉज् होऊन १९११ सालीं स्वदेशीं परत आले. सन १९१२-२० या कालांत वकिलीचा धंदा केल्यानंतर यांना न्यायाधीश करण्यांत आलें. अलाहाबाद हायकोर्टाचे प्रमुख व फेडरल कोर्टाचे एक न्यायाधीश होण्याचा मानहि यांना लाभला. गणित व पदार्थविज्ञान या विषयांकडे पहिल्यापासूनच यांचा ओढा असे. गणितशास्त्रांतील नवसापेक्षता (न्यू रिलेटिव्हिटी) या तत्त्वाचा शोध लावून या विषयावर १९३९ सालीं यांनीं इंग्लंडमध्यें व्याख्यानें दिलीं. क्षीणमाण उपपन्न (रिटार्डेड पोटेन्शिअल) च्या तत्त्वाचें प्रमाण न्यूटनच्या गुरुत्वाकर्षणाच्या सिद्धान्ताला लावून यांनीं नवीन समीकरण तयार केलें व तें आइन्स्टाइनच्या सूर्याच्या ग्रहमालेच्या समीकरणाशीं जुळवून दाखविलें. प्रवाही पदार्थांतून जाणाऱ्या प्रकाशकिरणांच्या गतीचें जें मूल्य आइन्स्टाइननें काढलें तेंच न्यूटनच्या सिद्धान्तांत दुरुस्ती करून यांनीं काढून दाखवलें. गुरुत्वाकर्षणालाहि गति असते या यांच्या शोधामुळें न्यूटनच्या सिद्धान्ताच्या पुढील संशोधनाचा मार्ग खुला झाला आहे.

सन १९३८-४० या कालांत अलिगड मुस्लिम युनिव्हर्सिटीच्या कुलगुरुपदाचा मान व नॅशनल ॲकॅडेमी ऑफ सायन्स ऑफ इंडिया संस्थेच्या अध्यक्षपदाचा मान यांना देण्यांत आला.

**शाहामीर** (राज्य. १३३४-४९)—काश्मीरचा एक मुसलमान राजा. हा प्रथम तेथील राजा सोनदेव याजकडे साधा नोकर म्हणून होता. पुढें सोनदेव राजाचा मुलगा रणचंद याच्या वेळीं हा काश्मीरचा दिवाण झाला. यानंतर काश्मीरच्या गादीवर येणाऱ्या आनंददेवाचा खून करून व त्याच्या कवलदेवी ऊर्फ कोटा नामक पत्नीशीं लग्न लावून शम्सुद्दिन या नांवानें हा

काश्मीरच्या गादीवर आला व काश्मीरला मुसलमानी राजघराण्याची यानें प्रस्थापना केली.

**शाहामुनि**—मुसलमान जातीचा एक मराठी कवि. वेदान्त विषयावरील 'सिद्धान्तबोध' या सुरस मराठी ग्रंथाचा हा कर्ता होय. या ग्रंथाचे पन्नास अध्याय असून सातारा जिल्ह्यांतील पठारी मंडळ या गांवीं शाहामुनीनें या ग्रंथाची रचना केली (शके १७००). याचें घराणें मूळचें प्रयागकडील. याचा आजा जानाजी. याच्या बापाचें नांव मनासिंग असें होतें. शाहामुनीची ईश्वरावर दृढ श्रद्धा होती.

**शाहिस्तेखान** (मृ. १६९४)—एक मोंगल सरदार. याचें मूळ नांव अबू तालिब असें होतें. हा आसफखान वजिराचा मुलगा. बापाच्या मृत्यूनंतर हा वजीर झाला (१६४१). त्यापूर्वी तो १६३८ मध्यें वऱ्हाडचा सुभेदार होता. १६५२ त तो गुजराथकडे होता. १६५९ सालीं औरंगजेबानें याला दक्षिणचा सुभेदार नेमलें. पुण्यास तळ देण्यापूर्वी यानें सत्त्याहत्तर हजार सैन्यानिशीं चाकणचा किल्ला आपल्या ताब्यांत आणला. शिवाजीस आपल्या काबूंत आणण्यासाठीं यानें पुण्यास राहून भोंवतालीं हल्ले सुरू केले. शिवाजीचें बळ अत्यल्प असूनहि त्यानें याच्या हल्ल्यांना दाद दिली नाहीं व उलट खानालाच पळतां भुई थोडी केली.

पुण्यास खान शिवाजीच्या लाल महालांत राहिला होता. एके दिवशीं शिवाजी सिंहगडाहून येऊन रात्रीं त्याच्या गोटांत शिरला व खानाला मारणार इतक्यांत गडबड होऊन खान पळून गेला. त्याचीं बोटें मात्र तुटलीं (१६६३). हा प्रसंग अनेक ठिकाणीं अनेक तऱ्हांनीं वर्णिला आहे. यानंतर लगेच खानानें आपला तळ हालवून तो अहमदनगरला निघून गेला. खानाच्या नालायकीमुळें औरंगजेबानें त्याला व जसवंतसिंगाला परत बोलावून घेतलें. पुढें शाहिस्तेखानाची बंगालच्या सुभ्यावर नेमणूक झाली. तेथें त्यानें चांचांचा मोड करून चांगलें आरमार तयार केलें.

**शाही घराणें**—हें काबूलचें हिंदु राजघराणें सुमारें चारशें वर्षें नांदत होतें. गिझनी हेंच त्या राज्यांतील मोठें शहर होतें. हें कुशानांपैकीं असावें. अरबांनीं सिंध व पंजाब घेतल्यावर या शाही राजावर स्वारी करून त्यास बाटविलें (६६३); पण पुढें यानें व याच्या वंशजांनीं इ. स. ९०० पर्यंत गनिमी कावा चालवून राज्य स्वतंत्र राखलें. या वेळीं ब्राह्मण वर्णाच्या ललियानें ओहिंद येथें नवीन घराणें स्थापलें. ९७५ सालीं अरबांनीं शाही राजास मांडलिक बनविलें होतें. शेवटीं महमूद गिझनी यानें १०२१ त काबूलचें हें राज्य खालसा करून हिंदु आणि बौद्ध लोकांना मुसलमान करून सोडलें. हें हिंदु क्षत्रिय घराणें स्वतःस शाह ही पदवी लावीत असे.

**शाहू (थोरला)** (१६८२–१७४९)—साताऱ्याचा एक छत्रपति. हा संभाजी व येसूबाई यांचा पुत्र. याचें मूळ नांव शिवाजी; पण औरंगजेबानें शाहू नांव ठेवलें अशी दंतकथा आहे. रायगड औरंगजेबाच्या हातीं लागला (१६९०) तेव्हां त्यांत शाहू व येसूबाई त्याच्या ताब्यांत आलीं. यापुढें १७ वर्षें शाहूला मुसलमानांच्या नजरकैदेंत राहावें लागलें. औरंगजेबाच्या एका मुलीनें शाहू व येसूबाई यांची अखेरपर्यंत उत्तम बरदास्त ठेवली. राजारामानें त्याच्या सुटकेचा प्रयत्न दोन–तीनदां केला, पण तो निष्फळ झाला. जनान्यांत कोंडल्यामुळें शाहूचा स्वभाव शांत व आरामप्रिय आणि दिल्लीच्या पातशाहीविषयीं आदर धरणारा बनला, व राजकारणाचें शिक्षणहि त्याला बरेंच मिळालें. औरंगजेबानें शाहूचें लग्न १६९९ च्या सुमारास मोठ्या थाटानें केलें व त्याला पांच परगणे जहागीर दिले. त्या वेळच्या शाहूच्या दोन बायका अंबिकाबाई व सावित्रीबाई होत. याशिवाय विरूबाई (पाहा) नांवाची दासी होती तिच्यावर त्याचा फार लोभ होता.

औरंगजेब मेल्यावर अजिमशहानें मराठ्यांत फूट पाडण्याकरितां शाहूला सोडलें (एप्रिल १७१७). शाहूला दक्षिणेंत सर्व मराठे लोकांनीं हरप्रकारें मदत केली. पण ताराबाईनें शाहू हा तोतया आहे, असें उठवून त्याच्यावर परशुरामपंत प्रतिनिधि व धनाजी जाधव यांस बऱ्याच सैन्यानिशीं धाडलें. पण शाहू तोतया नाहीं, अशी खात्री पटून धनाजी शाहूस एकदम मिळाला; तेव्हां शाहूनें किल्ले घेत घेत अखेर सातारा किल्ला घेतला व स्वतःस राज्याभिषेक करवला (जानेवारी १७०८). बाळाजी विश्वनाथानें शाहूस गादीवर बसवण्यांत बरीच मदत केली, म्हणून शाहूनें त्याला पेशवा नेमलें. बाळाजीनें मराठ्यांचें लक्ष मुलूखगिरीकडे वळविलें व चौथाईच्या निमित्तानें स्वराज्याचा विस्तार पुष्कळ केला. बाळाजीच्या पश्चात् शाहूनें त्याचा मुलगा बाजीराव याला पेशवेपद दिलें, व बाजीरावानंतर त्याचा मुलगा बाळाजी ऊर्फ नानासाहेब यास पेशवा नेमलें. या दोन पेशव्यांनीं उत्तरेकडे व दक्षिणेकडे मराठी राज्याचा विस्तार करून मराठ्यांचा वचक सर्वत्र बसवला. त्यामुळें शाहूच्या ऐश्वर्याचा कळस झाला. शाहूनें बाळाजी विश्वनाथ व त्याचे पुत्र-पौत्र यांची कर्तबगारी व त्याचप्रमाणें राजमंडळांतील इतर सरदार-मुत्सद्यांची नालायकी पूर्णपणें जाणून पेशवाई या भट घराण्यांतच चालू ठेविली; हाच मार्ग त्याच्या शहाणपणाचा वाटला व तो चूक ठरलाहि नाहीं.

शाहूच्या पहिल्या दोन राण्या दिल्लीस ओलीस राहिल्यामुळें शाहूनें दक्षिणेंत आल्यावर आणखी दोन लग्नें केलीं. त्या दोन राण्या सगुणाबाई व सकवारबाई होत. शाहूच्या वृद्धपणीं यांचें नेहमीं भांडणें होत. त्यामुळें शाहू फार त्रासला व पुत्र नसल्यामुळें फार उदासीन झाला. त्या वेळीं शाहूनें दत्तक घेण्याबद्दल अनेक

व्यक्तींनीं अनेक खटपटी केल्या. पण शाहूनें आपल्या हातचा लेख करून पेशव्यांस मराठे राज्याचा सर्वाधिकार दिला व आपल्यामागें रामराजास गादीवर बसण्यास सांगितलें. नंतर लवकरच सातारा येथें शाहूचा अंत झाला. त्याची अंत्यक्रिया संगम माहूलीस झाली. तेथें त्याची समाधि आहे. त्याची थोरली राणी त्याच्याबरोबर सती गेली.

शाहूचा स्वभाव फार मायाळू व भावडा असे. तो वेळेला रागें भरे, पण लगेच ममता दाखवी. त्यामुळें त्याच्याविषयीं सर्वांना पितृतुल्य प्रेम वाटे. त्याला शत्रु नसत. आपला मान कसा ठेवून घ्यावा हें तो चांगलें जाणत असे. मराठ्यांचें साम्राज्य त्याच्या काळीं एवढें वाढलें त्याला एक कारण त्याचें आकर्षक व्यक्तिमत्त्व हें आहे.

**शाहू (दुसरा)** (राज्य. १७७७–१८०८)—साताऱ्च्या छत्रपति रामराजाचा हा दत्तक पुत्र. त्र्यंबकजी भोसले वावीकर याचा हा मुलगा गादीवर बसला तेव्हां साधारण १८ वर्षें वयाचा होता. हा पेशव्यांच्या कारभारावर मुळींच संतुष्ट नसे. त्यानें कोल्हापूरकरांच्या मदतीनें १७९८ मध्यें पेशव्यांविरुद्ध उठावणी केली. पण तिचा शेवट परशुरामभाऊ पटवर्धनानें लाविला. शहाजीच्या मागून त्याचा थोरला मुलगा प्रतापसिंह गादीवर बसला.

**शाहू (महाराज)** (१८७६–१९२२)—कोल्हापूरचे एक छत्रपति. हे कागल संस्थानचे अधिपति जयसिंगराव घाडगे यांचे औरस पुत्र होत. कोल्हापूरचे महाराज शिवाजी राजे यांस पुत्रसंतान नसल्यामुळें १७ मार्च १८८४ रोजीं यांस दत्तक घेण्यांत आलें. यांचा विवाह श्रीमंत गणपतराव गायकवाड, बडोद्याचे महाराज, यांच्या घराण्यांतील लक्ष्मीबाईसाहेब यांच्याशीं झाला. यांना श्रीमंत राजाराम महाराज हे पुत्र असून श्रीमती अक्कासाहेब (देवासच्या राणीसाहेब) या यांच्या कन्या होत. शाहूमहाराजांचें शिक्षण खाजगी रीतीनें मि. एस्. एम्. फ्रेजर या युरोपियन शिक्षकाच्या देखरेखीखालीं व राजकोटच्या राजकुमार कॉलेजांत झालें. २ एप्रिल १८९४ पासून हे कोल्हापूर संस्थानचा राज्यकारभार पाहत होते. उत्तम राज्यव्यवस्था व राजनिष्ठा आणि छत्रपतींच्या घराण्याला मान म्हणून यांना ब्रिटिश सरकारनें २१ तोफांच्या सलामीचा मान दिला होता. हे मराठा व अस्पृश्य समाजाच्या उद्धारासाठीं व शिक्षणासाठीं चळवळ करणारांत प्रमुख होते. विद्येची यांना गोडी असल्यामुळें हे डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे व इतर शिक्षणसंस्थांचे अध्यक्ष होते. यांनीं कांहीं मराठा पुढाऱ्यांना उत्तेजन देऊन सत्यशोधक समाज स्थापन केला होता. हे मुंबई येथें वारले.

**शिकागो**—अमेरिकन सं. संस्थानांतील इलिनॉइस या संस्थानांत हें शहर मिचिगॉन सरोवराकांठीं आहे, व त्याच्या सभोंवार सुंदर आणि सुपीक प्रदेश पसरलेला आहे. हें अमेरिकेंत दुसरें मोठें शहर आहे. शिकागो नदी आणि तिच्या दोन शाखा यांमुळें या शहराचे तीन भाग झाले असून ते एकमेकांना अनेक पुलांनीं आणि नदीखालून काढलेल्या दोन बोगद्यांनीं जोडलेले आहेत. येथें १८९२ मध्यें स्थापन झालेली एक युनिव्हर्सिटी आणि अनेक कॉलेजें आणि शाळा आहेत. मिचिगॉन सरोवरांतील पाण्याचा आणि आर्टिझन विहिरींच्या पाण्याचा पुरवठा या शहराला केलेला आहे. येथून अनेक रेल्वे सं. संस्थानांतील निरनिराळ्या भागांत गेल्या आहेत. व त्यामुळें शिकागोला कारखान्यांपेक्षां व्यापारी शहर म्हणून अधिक महत्त्व आहे. मोठमोठ्या बोटी येतील अशा गोद्या येथें बांधलेल्या आहेत. येथें लोखंडाचें ओतीवकाम, दारू, कमावलेलें कातडें, टोप्या, साखर, तमाखू, शेतीचीं हत्यारें व वाफेचीं यंत्रें यांचे कारखाने आहेत. धान्य आणि इमारती लांकूड यांचीं सर्वांत मोठी पेठ हें शहर आहे. १८७१ सालीं मोठी आग लागून एक लाखावर लोकांचीं घरें जळालीं. लो. सं. ३३,९६,८०८ आहे.

**शिकार**—हा एक करमणुकीचा खेळ असून फार प्राचीन काळापासून चालत आलेला आहे. प्रारंभीं माणूस तर शिकारीवरच आपला उदरनिर्वाह करी. पुढें शिकारीसंबंधीं कायदे झाले; व कांहीं प्राण्यांची शिकार करूं नये, किंवा विशिष्ट काळीं व स्थळीं ती करूं नये, वगैरे निर्बंध घालण्यांत आले. दारूचीं शस्त्रें आल्यापासून तर बंदुकीनें शिकार करण्याची प्रथा सर्वत्र पडली. सिंह, वाघ, डुकरें या हिंस्र प्राण्यांपासून तों गरीब हरणें, ससे, पांखरें, वगैरेंची शिकार करण्यांत येत असते. शिकारीसाठीं कुत्रीं बाळगून तयार करण्यांत येतात. लांबून शिकार करण्यापेक्षां जवळून करणें जास्त कौशल्याचें व पराक्रमाचें मानलें जातें.

मृगयु म्हणजे पारधी हा शब्द अथर्ववेदांत आणि ब्राह्मणांत क्वचित् प्रसंगीं आलेला आहे. वाजसनेयी संहितेंत आणि तैत्तिरीय ब्राह्मणांत पुरुषमेधाच्या प्रसंगीं बळी दिल्या जाणारांची यादी आली आहे. सर्वांत जुन्या वैदिक कालीं देखील कोणत्याहि जातीचा 'शिकार' हा उपजीविकेचा मुख्य धंदा असणें असंभाव्य आहे. पशुपालवृत्ति आणि कृषि हेच निःसंशय जीवनाचे मुख्य धंदे होते. परंतु करमणुकीखातर कळपाचें संरक्षण करण्यासाठीं शिकार मुळींच करीत नव्हते, असें मानणें अयोग्य होईल. मुख्यतः ऋग्वेदावरून मृगयेसंबंधीं माहिती मिळते. मृगयेंत बाणांचा उपयोग कधीं कधीं होत असे, परंतु अति प्राचीन काळच्या मनुष्याच्या परिपाठाचीं अशीं जाळीं, चोरखळीं हीं जीं सावज धरण्याचीं साधनें त्यांचाच उपयोग सर्वसाधारणतः होत असे. ग्रीकांच्याप्रमाणें आर्य लोक कदाचित् पाळीव हत्तीच्या मार्यांकडून हत्ती पकडीत असतील. कुत्र्याच्या साहाय्यानें

वराहांनाहि पकडीत असतील; नाहीं तर पारध्यांकडून ठार मारीत असतील. असरट अशा एका उतान्दावरून सिंहांना दवा धरून किंवा कदाचित् गुप्त रीतीनें खड्डा करून पकडीत असतील असें दिसतें. मासे धरण्यासंबंधीच्या निरनिराळ्या तऱ्हांची माहिती फारच थोडी आहे.

पुराणकाळीं राजेलोकांच्या शिकारीचे उल्लेख भरपूर आहेत. दुष्यन्त राजाला शिकारीच्या मोहिमेंतच शकुंतलेची गांठ पडली. दशरथाच्या शिकारींत श्रावणाला बाण लागून त्याच्या पित्याचा शाप मिळाला. हिंदु समाजांत शिकारीचा धंदा करणाऱ्या कित्येक जाती आहेत.

आधुनिक शिक्षणानें प्राण्यांकडे सौंदर्याच्या व उपयुक्ततेच्या दृष्टीनें पाहण्याची पुष्कळांना संवय लागलेली आहे व अशा प्राण्यांचें संरक्षण व संगोपन करण्याकडे लक्ष वेधलें आहे. अहिंसेचें तत्त्वहि प्रभावी होत आहे. पण जोंपर्यंत खाण्यासाठीं मांस लागतें व वस्त्रप्रावरणासाठीं पिसें, लोंकर, लव, इ. लागतात तोंपर्यंत शिकार बंद पडणार नाहीं; व पारधी वर्ग राहीलच. पण करमणुकीचा खेळ म्हणून हिचा फारसा अवलंब होणार नाहीं.

**शिकारीचे कायदे**—इंग्लंडांत ज्यानें इन्लंड रेव्हेन्यू लायसेन्स घेतलेलें आहे अशा कोणाहि इसमाला शिकार करण्याचा हक्क असतो. मात्र ही शिकार दुसऱ्याच्या मालकीच्या जमिनींत करावयाची असल्यास त्या मालकाची परवानगी घ्यावयास पाहिजे, असा कायदा आहे. शिकार करण्यायोग्य प्राणी म्हणजे ससे, कबुतरें, फेसंट पक्षी, ग्राऊज, वगैरे होत. शिवाय निरनिराळ्या प्राण्यांच्या शिकारीकरितां निरनिराळा काळ कायद्यानें ठरविलेला आहे. उदा., पार्ट्रिज प्राणी फेब्रुवारी २ ते ३१ ऑगस्टपर्यंत मारूं नये. लायसेन्सशिवाय शिकार केल्यास २० पौंड दंड होतो. ज्यानें शिकारीचें लायसेन्स काढलेलें आहे त्याला निराळें बंदुकीचें लायसेन्स घ्यावें लागत नाहीं.

हिंदुस्थानांत रानपक्षी व प्राणी यांच्या संरक्षणाचा (दि वाइल्ड बर्ड्स अँड ॲनिमल्स ॲक्ट हा) कायदा १९१२ सालीं झाला आहे. त्या कायद्याप्रमाणें प्रांतिक सरकारला, विशिष्ट प्रदेशांतील जंगली पक्षी व पशु पकडूं नये, ठार मारूं नये, त्यांची खरेदी-विक्री करूं नये, किंवा त्यांना बाळगूं नये, अशी सर्व वर्षभर किंवा कांहीं महिनेपर्यंत बंदी करण्याचा अधिकार आहे (कलम ३); आणि हा हुकूम मोडणारास रु. ५० पर्यंत दंड आहे (कलम ४). याला अपवाद हा कीं, जंगली जनावरांपासून स्वतःला किंवा दुसऱ्या कोणा इसमाला धोका असेल तर शरीरसंरक्षणार्थ, आणि अशा जंगली पक्ष्यांपासून किंवा पशूंपासून आपल्या पीक वगैरे मालमत्तेला धोका असेल तर संरक्षणार्थ, अशा पशुपक्ष्यांना पकडणें किंवा ठार मारणें गुन्हा नाहीं (कलम ८). कायद्याच्या शेवटीं परिशिष्टांत पशुपक्ष्यांची यादी आहे.

**शिकारी कुत्रा**—(ग्रे हाउंड). एक कुत्र्याची जात. हा कुत्रा सडपातळ, लांबलचक अंगाचा, लांब मुस्कटाचा व बारीक आणि लांब पायांचा प्राणी आहे. याचें कपाळ सपाट, ओठ आंखूड व पोट आंत गेलेलें असतें. आयरिश, स्कॉटिश, रशियन, इटालियन,

वगैरे याच्या अनेक पोटजाती आहेत. शिकारी कुत्रा अतिशय जलद धांवणारा असतो. ससा दिसला कीं जलद धांवून त्याला गांठतो. कुत्रा पाहा.

**शिकेकाई**—हिचीं झाडें मोठीं असतात पण पानें बारीक असतात. लांब चपट्या शेंगा येतात. या शेंगांना शिकेकाई म्हणतात. शेंगा भिजवून त्यांचें पाणी, किंवा कुटून त्याची पूड अंगास, वस्त्रास लावतात. साबणाचा जो उपयोग तोच शिकेकाईचा आहे. आपल्याकडे विशेषतः बायका केसांच्या स्वच्छतेसाठीं न्हातांना शिकेकाई वापरतात. ही औषधीहि आहे. विंचवाच्या विषावर बियांतून खावयास देतात. कफ पातळ होण्यास हिचें पाणी पाजतात. पोटांतील गुल्मावरहि हाच उपचार करतात.

**शिक्क्याची लाख**—साधी कृमिजन्य लाख घेऊन ती शुद्ध करण्यांत येते व नंतर त्या टर्पेन-व्हेनिस टर्पेंटाइन तेल व व्हर्मिलियन रंग मिसळण्यांत येतो व या प्रकारें शिक्क्याची लाख तयार करण्यांत येते. कमी प्रतीची लाख राळ व तांबडा रंग (रेड लेड) यांची बनविण्यांत येते.

**शिखंडी**—द्रुपदाच्या कांहीं उपासनानें झालेली ही कन्या होय. पण हिचें पालन पुत्र म्हणूनच करण्यांत आलें. ही पूर्वजन्मीं अंबा होती व भीष्मावर सूड उगविण्याकरितां द्रुपदाच्या पोटीं आली होती. हिनें तपश्चर्येनें एका यक्षापासून पौरुषत्व मिळविलें. हा पुरुष शिखंडी द्रोणापासूनच धनुर्विद्या शिकला. व भारतीय युद्धात पांडवांकडे एक अक्षौहिणी सैन्याचा अधिपति होता. भीष्मास युद्धात मारण्यास

हा शिखंडीच कारण झाला. कारण स्त्री म्हणून भीष्म यावर शस्त्र उगारीत नव्हता. तेव्हां यास पुढें करून अर्जुनानें भीष्माला जर्जर केलें. अश्वत्थाम्यानें अनेक वीर मारले, त्यांत हाहि मारला गेला.

**शिंग**—१. बहुतेक रवंथ करणारे प्राणी—उदाहरणार्थ, बैल, गाय, रेडे, बकरे, शेळ्या, हरण यांचीं शिंगें एका शृंगी या विशेष द्रव्याचीं बनलेलीं असतात. बैल, गाई, हरण, वगैरे प्राण्यांचीं शिंगें शंकाकृती असून कांहींशीं वक्र असतात. शिंगाच्या मध्यमागीं एक हाडाचा सुळका असतो, तो डोक्यावरील हाडापासून निघालेला असतो. या सुळक्यास शिरा व धमन्या असतात. त्याच्या योगानें त्यासभोंवतीं जें शिंग किंवा जो आवरणासारखा शृंगीभाग असतो, त्यास पोषक द्रव्यें मिळून तो वाढतो.

गुरांमध्यें बहुधा सर्वांस शिंगें असतात. तथापि कांहीं शृंगविहीन गुरेंहि आहेत. निरनिराळ्या प्राण्यांचीं शिंगें निरनिराळ्या प्रकारचीं असतात. उदाहरणार्थ, सांबराचें शिंग अस्थिमय असतें. व तें नियमित काळानें गळून पडतें. जिराफाचें शिंग हें एक स्वतंत्र हाड असतें व त्यावर कातडीचें आच्छादन असून त्या कातडीवर केंसहि असतात. बैल वगैरेंच्या शिंगांत मध्यमागीं थोडा अस्थिमय भाग असून वर शृंगमय आच्छादन असतें. गेंड्याचें शिंग मात्र केवळ शृंगमय पदार्थाचें बनलेलें असतें. गाय, बैल, वगैरेंचीं शिंगें गळून पडत नाहींत. कांहीं सांबरासारख्या प्राण्यांत नरालाच फक्त शिंगें असतात.

कलाकौशल्यांत शिंगाचा फार उपयोग होतो. बैल व गायी या जातीच्या जनावरांपासून शिंगें पुष्कळ मिळत असून रशिया, केप ऑफ गुड होप, हिंदुस्थान आणि दक्षिण अमेरिका या देशांतून पुष्कळ शिंगें बाहेरदेशीं व विलायतेस विकावयास जातात. शिंगाचीं अनेक तऱ्हेचीं वाद्यें पूर्वी करीत व त्यावरूनच कित्येक वाद्यांस शिंग हें नांव पडलेलें अद्याप राहिलें आहे. परंतु तीं हल्लीं पितळेचीं किंवा दुसऱ्या द्रव्याचीं करतात. म्हैस, रेडे व बैल यांच्या शिंगांचे जे तुकडे पडतात- त्यांचा उपयोग खताप्रमाणें करतात, किंवा प्रशियन ब्लू या नांवाचा सुंदर निळा रंग तयार करण्यासहि घेतात. तेव्हां त्या शिंगांच्या तुकड्यांसहि किंमत येते.

बैलाचे खूर शृंगासारख्याच द्रव्याचे बनलेले असतात, म्हणून बटणें व फण्या करण्यास त्यांचाहि पुष्कळ उपयोग करतात. चाकू, छऱ्या, काव्या, वगैरेंच्या मुठी शिंगाच्या करतात. भिंतीवर शोभेसाठींहि चायझन बैलांचीं शिंगें टांगतात. विलायतेंतील एका फणी करण्याच्या कारखान्यांत १००।१५० खंडी बैलाचे खूर या कामीं लावतात.

आपल्या देशांत फार प्राचीन काळापासून शिंगास अपवित्र मानीत आल्यामुळें त्यांचा पदार्थ वगैरे करण्यास फारसा उपयोग करीत नव्हते. परंतु गव्याच्या शिंगास पवित्र मानून त्याचीं अभिषेकपात्रें, कमळें, संपुटें, निरांजनें, वाट्या, वगैरे पदार्थ करीत. शिंगास नरम कसें करावें, चपटें कसें करावें, त्याचें जोडकाम कसें करावें, वगैरे सर्व इकडील कारागिरांस माहीत होतें, व अद्यापहि गव्याच्या शिंगाचें पुष्कळ काम इकडील कारागीर करतात.

२. हें वाद्य पितळेचें केलेलें असतें. सुमारें पांचसहा नळकांडीं, प्रत्येक सुमारें फूटभर लांब अशीं एकांत एक बसतीं केलेलीं असतात. ह्यांतील सर्वांत मोठ्या नळकांड्याचें तोंड सुमारें सहा इंच व्यासाचें ठेवितात. शेवटच्या नळकांड्याचें दुसरें टोंक सुमारें अर्ध्या इंचाच्या व्यासाचें ठेवितात. त्यावर गोल पितळेची चकती बसविलेली असून तिच्या वरच्या अंगास नळीचें भोंक काढलेलें असतें; ह्यामुळें ही नळी तोंडांत धरल्यावर ओठ त्या चकतीवर बसतात व फुंकावयास जोर सांपडतो. हें वाद्य लग्नादि समारंभांत, देवादिकांच्या उत्सवांत, तसेंच राजेरजवाडे ह्यांच्या स्वारीच्या समारंभांत वाजवितात. ह्या वाद्याचा आवाज मैलभर लांबीवर ऐकूं जातो. मद्रास व नेपाळ येथील पितळी शिंगांची फार प्रसिद्धि आहे. ह्या वाद्यांत कोणतेंहि गीत वगैरे वाजत नसून फक्त स्वरांचा झोत निघतो. पूर्वी रेड्याचें शिंग वाजविण्यांत येत असे, त्यावरूनच ह्या वाद्याचा आकार निघाला असून नांवहि तेंच पडलें असावें.

हें वाद्य शुभप्रसंगीं आनंददायक म्हणून, कांहीं इशारा करण्याकरितां सूचक म्हणून व रणवाद्य म्हणून फुंकून वाजविण्याची प्रथा फार प्राचीन काळापासून अस्तित्वांत आहे. यास रणशिंग असेंहि म्हणतात. यासारखेंच दुसरें एक मोठें सरळ वाद्य आहे, त्यास कर्णा किंवा भेरी म्हणतात. फ्रेंच शिंग हें दहा फूट लांबीचें व निमुळतें पण अनेक कड्यांमध्यें वांकविलेलें असतें. हें ओठानें फुंकून वाजविण्यांत येतें व ओठांच्या हालचालीनें कमीजास्त वारा फुंकण्यानें वगैरे याचा आवाज कमीजास्त करण्यांत येतो. याचा आवाज तीन सप्तकांपर्यंत चढउताराचा असतो.

**शिंगाडा**—हिंदुस्थान व सिलोन यांच्या सर्व भागांत तळीं, सरोवरें व डबकीं यांतून पाण्याच्या पृष्ठभागावर हें झाड वेलासारखें वाढतें. याची फळांकरितां लागवड करितात. फळांना कांट्यासारखीं टोंकें असतात. हिंदुस्थानांत फार प्राचीन काळापासून शिंगाड्याची लागवड होत आहे. कांहीं ठिकाणीं गुलाल करण्याकरितां शिंगाड्याचा उपयोग करतात. पित्तप्रकोप, हगवण व अतिसार यांवर शिंगाड्याचें पीठ खावयास दिल्यास त्याचा फार उपयोग होतो. खाण्याकरितां काश्मीर, संयुक्त प्रांत व मध्यप्रांत इकडे याची लागवडहि केली जाते. शिंगाड्यांत पिष्टसत्त्व बरेंच

असतें. हिंदु लोक उपवासाला शिंगाड्याचे निरनिराळे पदार्थ करून खातात. ओले शिंगाडे उकडून अथवा कचेहि खातात.

**शिंतो संप्रदाय**—हा एक धर्मपंथ असून जपानमध्यें परवां-पर्यंत हा राष्ट्रधर्म म्हणून मानला जाई. पण जेत्या राष्ट्रांच्या जपान-वरच्या सत्ताधिकाऱ्यांनीं शिंतो धर्माचा राजाश्रय काढून घेतला. 'मी तुमचा आतांपावेतों मानला गेलों त्याप्रमाणें पृथ्वीवरचा देव नाहीं' असें जपानच्या बादशहानें जाहीर केलें ! या धर्माचें प्राचीन स्वरूप सृष्टि( वस्तु )पूजेप्रमाणें होतें, पण पुढें पूर्वजपूजेंत त्याचें रूपांतर झालें. १९३७ सालीं शिंतो देवस्थानांची (लहानमोठीं धरून) संख्या सुमारें एक लाख होती व उपाध्याय १५,८७३ होते. शिंतो धर्माचे लोक सुमारें अडीच कोटी आहेत.

**शिदनाक महार**—मराठेशाहींतील एक महार सरदार. औरंगजेबानें संभाजीचा अमानुषपणें वध केल्यानंतर ज्या लोकांचीं मनें या कृत्याबद्दल चेतलीं गेलीं, त्यांपैकीं हा एक होय. यानें या वेळीं महार लोकांचें एक पथक उभारून बंडाळीस सुरवात केली. मराठे लोकांना याचें बहुमोल साहाय्य झालें. पुढें शाहू मोंगलांच्या कैदेंतून सुटून आल्यावर त्याला जे सरदार मिळाले त्यांत हाहि होता. शाहू गादीवर आल्यावर त्यानें याचें साहाय्य ध्यानांत घेऊन यास सातारा जिल्ह्यांतील तासगांव तालुक्यांतील कळंबी हा गांव इनाम दिला. अजूनपर्यंत हा गांव याच्या घराण्याकडे आहे.

**शिंदे घराणें**—मुख्य शिंदे घराणें ग्वाल्हेरच्या राजवंशाचें होय. त्याचा आद्य पुरुष राणोजी ( पाहा ) हा साताऱ्याच्या पूर्वेस १५ मैलांवर कण्हेरखेड नांवाच्या खेड्यांत राहणारा. हें घराणें बहामनी राज्याच्या काळापासून शिलेदार म्हणून प्रसिद्ध होतें. कण्हेरखेडचे शिंदे हे औरंगजेबाच्या पदरचे मनसबदार असून बादशहानें शाहूशीं त्यांची सोयरीक करून दिली होती. शाहूची ही बायको शाहू मोंगलांकडे ओलीस असतां मरण पावली. राणोजी शिंदे बाळाजी विश्वनाथाच्या पदरीं एक बारगीर होता. माळव्यांतील बाजीरावानें केलेल्या लढायांत राणोजीनेंहि पराक्रम गाजविल्यामुळें माळव्यांतील चौथाई-सरदेशमुखी गोळा करण्याचें काम बाजीरावानें पवार, होळकर व शिंदे या तीन सरदारांकडे दिलें. राणोजी शिंदे १७४५ च्या सुमारास निवर्तला. त्याला जयाप्पा, दत्ताजी व ज्योतिबा असे तीन औरस पुत्र आणि तुकोजी व महादजी असे दोन दासीपुत्र होते. यांची माहिती स्वतंत्र लेखांत दिलेलीच आहे. कण्हेरखेडच्या शिंद्यांपैकीं मानाजी फाकडे ( पाहा ) हाहि होता. शिवाजीच्या काळांतील नेमाजी शिंदे (पाहा) यानेंहि नांव केलें आहे.

**शिंदे, माधवराव महाराज** ( १८७६–१९२५ )—ग्वाल्हेर संस्थानचे माजी अधिपति. हे जुन्या मराठी साम्राज्याबद्दल अभिमान बाळगणारे असत. राज्यकारभार व्यवस्थित चालविण्याबाबत यांचा विशेष कटाक्ष असे. त्यासाठीं यांनीं तज्ज्ञ माणसांची निवड केली होती व त्यांच्या सहकार्यानें हे राज्यकारभारांत स्वतः जातीनें लक्ष घालीत असत. युद्धशास्त्राची यांना विशेष आवड असे व त्याकरितां इतर खात्यांवर होणाऱ्या वार्षिक खर्चापेक्षां हे युद्ध-खात्यावर अधिक खर्च करीत. यांचें सैन्य ब्रिटिश सैन्याच्या तोडीचें असे. १९०० सालीं चीनमध्यें व सन १९१४ सालच्या महायुद्धांत फ्रान्समध्यें हे स्वतः हजर होते. पुण्यास श्रीशिव-छत्रपतींचें स्मारक उभारण्याच्या कामीं यांनींच पुढाकार घेतला. पुण्यास भरलेल्या पाटील परिषदेचें अध्यक्षस्थान यांना देण्यांत आलें होतें त्या वेळीं सर्वांशीं खेळीमेळीनें वागून यांनीं लोक-प्रियता मिळविली. पुण्याजवळ वानवडी येथें असलेल्या महादजी शिंदे यांच्या छत्रीला प्रेक्षणीय स्वरूप प्राप्त करून देण्याच्या कामीं यांनीं बरेंच लक्ष घातलें. हे फ्रान्समध्यें पॅरिसजवळील शातो-स्यु-मादिद येथें मरण पावले. यांचे पूर्वींचे खाजगी चिटणीस सर कैलासनारायण हक्सर यांनीं यांच्या मृत्यूनंतर यांचें विस्तृत चरित्र प्रसिद्ध केलें आहे.

**शिंदे, विठ्ठल रामजी** ( १८७३–१९४४ )—एक अस्पृश्यो-द्धारक मराठे कार्यकर्ते. यांचें घराणें जमखंडीचें. यांचें शिक्षण फर्ग्यु-सन कॉलेजमध्यें झालें व नंतर ते ऑक्सफर्ड येथील मँचेस्टर कॉलेज-मध्यें तुलनात्मक धर्मशास्त्राच्या अभ्यासासाठीं होते. हे ब्राह्मो समाजाचे आजन्म प्रचारक होते. मुंबईच्या प्रार्थना समाजाचेहि सभासद होते. यांनीं मद्यपानबंदीचीहि चळवळ फार जोरानें केली. पुढें अस्पृश्यतानिवारणाच्या चळवळींत यांनीं जन्मभर वाहून घेतलें होतें. पुणें येथील डिप्रेस्ड क्लासेस मिशनचे ते संस्थापक व चालक होते. अखिल भारतीय निराश्रित साहाय्यकारी मंडळी या संस्थेची स्थापना यांनीं केली (१९०६) व तिचें कार्य देशभर फैलावलें. अस्पृश्यांसाठीं यांनीं शिक्षणसंस्था व वसतिगृहें काढविलीं. नंतर ते काँग्रेसच्या राजकीय चळवळींत पडले, व कांहीं काळ त्यांनीं तुरुंगवासहि पत्करला. त्यांचा भाषाशास्त्र, समाजशास्त्र व इतिहास या विषयांचा व्यासंग दांडगा असे. त्यांनीं कांहीं ग्रंथ व निबंध लिहिले आहेत. त्यांचें आत्मचरित्र मोठें उद्बोधक आहे. त्यांचें आचरण ऋषितुल्य असल्यानें त्यांना महर्षि म्हणत.

**शिंप**—लिबलिबीत शरीराच्या द्विकवचधर (विद्दल्व) प्राण्यां-पैकींच शिंपा हे प्राणी आहेत. हे सर्वस्वीं जलचर असतात. शिंपा गोड्या पाण्यांत (तळीं, कालवे, नद्या, वगैरेंच्या पात्रांत) तसेंच समुद्रांतहि सांपडतात. यांचें मऊ शरीर दोन्ही बाजूंनीं झांकलेलें असतें. प्रत्येक बाजूच्या टणक झांकणास शिंप म्हणतात. हीं झांकणें किंवा शिंपा एकास एक जुळल्या म्हणजे त्यांचें एक संपुट किंवा पेटी तयार होते.

या प्राण्याचें शरीर दोन्ही बाजूंनीं चापटलेलें असून गोगलगायीप्रमाणें यांना जबडा, डोळे, वगैरे अवयव नसतात. हे नेहमीं चिखलांत अथवा रेतींत रुतून राहत असल्यामुळें यांच्यामध्यें चपलता नसते. गोगलगायीप्रमाणें या प्राण्यांच्याहि पायांपासून चिकट पदार्थ निघतो व त्यामुळें शिंपा इतर पदार्थांस चिकटून राहतात. यांना त्वचावरण दोन्ही बाजूंनीं असतें. आपल्या दोन्ही कल्ल्यांच्या हालचालींनीं पाणी आंत घेऊन त्यांतील प्राणवायु शोषून घेतात, व पाणी बाहेर टाकतात. या प्राण्यांच्या अंगावरचें कवच (शिंपला) चुनखडीच्या द्रव्याचें असतें. हें द्रव्य शिंप आपल्या अंगातून तयार करतो. हा प्राणी मोठा होत असतां त्याच्या शिंपल्यावरहि पुटें चढतात. या पुटांवरून प्राण्याचें वयोमानहि ठरवितां येतें. शिंपल्याच्या आंतील थर नेहमीं चकचकीत मोत्यासारखा दिसतो. व बाह्य अंग हिरव्या काळ्या रंगाचें दिसतें. शिंपल्यांतील उंचवटा (तोंडाच्या उजव्या बाजूस असतो तो) हा शिंपल्याचा मुख्य केंद्र होय. शिंपल्याची वाढ या केंद्राभोंवतीं होते.

शिंपांत नर-मादी निरनिराळीं असतात. मादी अंडीं घालते. त्यांची वाढ कांहीं वेळ तिच्याच कल्ल्यांतील जागेंत होते. पिलांची वाढ होत असतां त्यांचें रूपांतरहि होत असतें. अशा रीतीनें वाढलेल्या व रूपांतर झालेल्या पिलांस धागे असून वरील कोंवळ्या कवचास कांटे असतात. अशा वेळीं हीं पिलें शिंपमातेच्या उदरांतून पाण्याबरोबर रेचक छिद्रांतून बाहेर पडून पाण्यांत पोहणाऱ्या माशांच्या पंखांना किंवा शेपट्यांना चिकटून राहतात. याप्रमाणें लोंबत असतांच दीडदोन महिनेपर्यंत त्यांची वाढ चालू असते. नंतर वाढ पूर्ण झालेले शिंप प्राणी पाण्याच्या तळाशीं जाऊन पडतात.

मोत्याचे शिंप (पर्ल आयस्टर) हे सुद्धां शिंपाच्या जातीचे प्राणी होत. हे हिंदी महासागरांत विशेषतः सिलोनजवळील मानारच्या आखातांत व इराणच्या आखातांत किनाऱ्यालगत सांपडतात. हे गोळा करण्याचा हंगाम मार्चमध्यें सुरू होतो. तो चारसहा आठवडे चालतो. समुद्राच्या तळापासून हे शिंप काढण्याचा मोठा धंदा आहे (मोती पाहा). या शिंपाच्या मृदु अंगावर एक प्रकारचे जंतू अथवा कृमी येतात व त्यांस गुरफटून मारण्यास म्हणून शिंप प्राणी त्याच्याभोंवतीं चुनखडीच्या द्रव्याचें वेष्टण घालतो. हेंच पुढें मोती बनतें. शिंपल्यांचीं बटणें व निरनिराळ्या मौल्यवान् वस्तू तयार करितात. मौक्तिक भस्म शिंपांपासूनच करतात. शुक्ती (मसेल), काल्वे, खाऱ्या पाण्यांतील शिंपा, वगैरे प्राणी शिंपल्याच्या जातीचेच होत.

**शिंपी**—एक धंदेवाईक जात. या जातींत भावसार (बाहुसार), नामदेव शिंपी, वैष्णव शिंपी, नामदेव क्षत्रिय, वगैरे जातींचा अंतर्भाव होतो. या समाजाच्या शिंपी या रूढ नांवावरून समाजाचा मुख्य धंदा कापडाचा व्यापार व शिवणकाम हा समजला जातो. तथापि या समाजांत पूर्वकालीं रंगाचीं वगैरेहि कामें करणारीं कित्येक कुटुंबें होतीं. शिवाय हिंदु रंगाऱ्याचा समावेश शिंपी जातींतच करण्यांत येतो. नामदेव शिंपी, बाहुसार व भावसार क्षत्रिय या सर्व शाखा पूर्वी एक असाव्यात व देशकालपरत्वें त्यांच्या चालीरीतींत फेरबदल होऊन त्या शाखा तुटकपणें वागूं लागल्या असें दिसतें. महाराष्ट्रीय संत नामदेव हा शिंपी जातीचा होता. तेव्हांपासून या मंडळींनीं आपल्या ज्ञातिनामामागें नामदेव हें उपपद जोडलें असावें. कित्येक शीख पंथी लोक आपल्याला नामदेवपंथी अथवा नामदेवानुयायी दर्जी वगैरे म्हणवून घेतात.

भावसार हें नांव भाव वनस्पतीवरून पडलें, असें कांहीं म्हणतात. भाव नांवाची एक प्रकारची रंग तयार करण्यास उपयोगी पडणारी वनस्पति आहे. गुजराथेंत भावसार हे रंगारीच आहेत. भावसार समाज हा प्रथम शक्त्युपासक होता. पुढें या समाजांत नामदेवाचा जन्म झाल्यावर हे भक्तिमार्गी वारकरी पंथाचे अनुयायी बनले. पण कांहीं मंडळी पूर्वीप्रमाणेंच हिंगळा देवीची उपासना करीत राहिले. त्यामुळें भावसार शिंपी व नामदेव शिंपी असे दोन भेद पडले. नामदेव शिंपी हा समाज दक्षिण हिंदुस्थानांत खानदेशापासून कर्नाटक-कारवारपर्यंत पसरला आहे. दक्षिणी संस्थानांतहि यांची वस्ती बरीच आहे. महाराष्ट्र व देशी संस्थानें मिळून यांची लोकसंख्या ८० हजारांपर्यंत आहे. नामदेव शिंपी व इतर शाखांतील शिंपी यांमध्यें उपनांवें, धंदे, लग्नकार्यें, वगैरे बऱ्याच बाबतींत साम्य आहे. नामदेव शिंपी समाजाचा मुख्य धंदा कापड विकणें व शिवणें हा आहे. कांहीं लोक शेतकीचा व किराणा वगैरे वाणीपणाचा धंदा करणारे आहेत. सगोत्र अथवा एका उपनांवाच्या घराण्यांत शरीरसंबंध होत नाहींत.

**शिंपी पक्षी**—हा पक्षी आपलें घरटें झाडाचीं पानें एकत्र शिवून तयार करतो म्हणून यास हें नांव देण्यांत येतें. हा हिंदुस्थानांत व पूर्वेकडील द्वीपसमूहांत आढळतो. हा पक्षी चिमणीसारखा असतो. याचा रंग वरच्या बाजूस हिरवट व खालीं पांढरा असतो. कपाळ तांबडें असून मानेवर एक काळा पट्टा किंवा ठिपका असतो. हे किडे-मुंग्या खातात. यांचीं घरटीं पानें शिवून केलेलीं असून मजेदार वाटतात. घरटीं बहुधा मादी बांधते.

**शिबि**—ययाति राजाचा दौहित्र. हा अत्यंत उदार होता म्हणून याची ख्याति आहे. याच्या औदार्याची परीक्षा पाहण्याकरितां इंद्रानें श्येनाचें रूप घेऊन कपोतरूपी अग्नीचा पाठलाग चालविला. कपोतानें शिबि राजाचा आश्रय घेतला तेव्हां त्याला वांचविण्याकरितां शिबीनें त्या कपोताच्या वजनाइतकें आपल्या अंगाचें मांस श्येनाला दिलें, अशी कथा आहे.

**शिमाझकी टोसोन** (जन्म १८७२)—हा अर्वाचीन जपानी वाङ्मयकार आहे. त्यानें बऱ्याच कादंबऱ्या लिहिल्या असून उत्कृष्ट भावगीतकार म्हणूनहि त्याचें नांव मागें राहील. ग्रामीण जीवन व समाजशास्त्रीय विषय त्यानें आपल्या कादंबऱ्यांतून रंगविले आहेत. नववास्तववाद, नवध्येयवाद, स्वाभाविकता आणि अद्‌भुतता हीं त्याच्या लेखनांत चांगल्या प्रकारें आढळतात. त्याचें व्यक्तित्व ओबडधोबड व त्याची राहणी अगदीं साधी असली तरी वास्तववादांतील नवीन नवीन अर्थ शोधण्यामुळें त्याला मोठेपणा प्राप्त झाला आहे.

**शिमुक**—एक आंध्र राजा. अशोकाच्या मृत्यूनंतर यानें आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें. जुन्नर येथील नाणेघाटच्या शिलालेखांत याचा उल्लेख सीम्रक, सिंधुक, सिशुक, वगैरे नांवांनीं केलेला आढळून येतो.

**शिया पंथ**—इस्लामी धर्मामधील दोन मोठ्या धर्मपंथांपैकीं हा एक पंथ आहे; आणि दुसरा पंथ सुनी हा आहे. १२ खलीफांपैकीं पहिले तीन खलीफा (अबू बकर, उमर आणि उस्मान) तोतये आहेत आणि अली (अलीबेन अबू तलीब) व त्याची बायको फातीमा (महंमद पैगंबराची मुलगी) यांचे वंशज हे खरे खलीफ आहेत, असें शिया मुसलमान मानतात. कुराण हा धर्मग्रंथ ते मान्य करतात, परंतु सुन्ना ऊर्फ परंपरागत दंतकथा ते मानीत नाहींत. अली याची योग्यता महंमद पैगंबर यांच्याखालोखाल आहे असें शिया पंथीय लोकांचें मत असून अलीचा मुलगा हसन याचें थडगें जें करबेला (इराक) येथें आहे तें त्यांचें मुख्य पवित्र क्षेत्र आहे. त्यांचीं आणखी पवित्र ठिकाणें आहेत, तीं म्हणजे नेजेफ (नाजाफ) आणि कुफा होत.

**शिरका**—(व्हिनेगर). स्वयंपाकांत आंबटपणा येण्यासाठीं व पदार्थ टिकण्यासाठीं शिरका वापरतात. शिरका निरनिराळ्या पदार्थांपासून करतात. ग्रेट ब्रिटनमध्यें माल्टेड बार्लीपासून, तर अमेरिकेंत सिडरपासून करतात. आपल्याकडे निरा (ताजी ताडी), उंसाचा रस, द्राक्षें, वगैरे फळांचा रस यांपासून बनवितात. बरण्यांत हा रस धरून उन्हांत ठेवतात व रस चांगला आंबला म्हणजे गाळून उकळवितात. नंतर मुरविण्यासाठीं ठेवून देतात. याप्रमाणें ५ महिन्यांत शिरका तयार होतो. शिरक्यांत चव येण्यासाठीं लसूण, तिखट, दालचिनी, पेपरमिंट, वगैरे घालतात.

**शिरगांवचा किल्ला**—मुंबई, माहिमच्या उत्तरेस तीन मैलांवर शिरगांव नांवाच्या खेड्यांत समुद्रकिनाऱ्यावर हा किल्ला आहे. लांबी २०० फूट, रुंदी १५० फूट व तटाची उंची ३० फूट व जाडी १० फूट आहे. एक गोड्या पाण्याची विहीर आहे. पूर्वी गांव व किल्ला यांत अंतर होतें, परंतु आतां गांव किल्ल्यास मिळलें आहे. १७३९ त चिमाजीआप्पानें डहाणू, तारापूर, वगैरेबरोबर हाहि किल्ला घेतला.

**शिरगोळा**—(कॅल्साइट). हा एक खटकर्बिता (कॅल्शम-कार्बोनेट) चा अगदीं सामान्यपणें आढळणारा प्रकार आहे. याचे त्रिपार्श्व स्फटिक असतात. पण त्यांचे अनेक प्रकारचे आकार असतात. याचे स्फटिक पाण्याच्या प्रवाहामुळें खडकांच्या भेगांत किंवा थंड पाण्याच्या खनिज झऱ्यांमध्यें बनतात. तसेंच मोठमोठ्या दऱ्यांमध्यें हे आढळतात. बरेचसे चुनखडींचे दगड व संगमखरी दगड शिरगोळ्यापासून बनलेले असतात व त्यांत असलेल्या इतर अशुद्ध द्रव्यांमुळें त्यांस निरनिराळे रंग येतात. खडू हा शुद्ध चुनखडीचा बनलेला असतो व तो बहुतेक शिरगोळ्यापासून तयार होतो. आपल्याकडे शिरगोळ्यापासून रांगोळी तयार करतात.

**शिरदोडी**—या वेलास 'मोठी कावळी' किंवा 'वाकाडी' असेंहि म्हणतात. पानें जाड असून तोडलीं कीं आंतून पांढरा चीक गळतो. हीस टोंकदार जोडफळें येतात. फळांतून 'म्हाताऱ्या' निघतात. या रेशमाप्रमाणें असणाऱ्या तंतूंचें वस्त्र विणतां येईल. हा कापूस फार थंड असतो. मूळ औषधी आहे. खोकला, परमा, विषबाधा, इ. वर उगाळून देतात. हिचें पान हुंगलें कीं शिंका येतात.

**शिरपूर**—मुंबई, पश्चिम खानदेश जिल्हा, एक तालुका. क्षे. फ. ५९७ चौ. मैल. लो. सं. (१९४१) ७९,११४. यांत एक मोठें गांव (शिरपूर) व १३० खेडीं आहेत. शिरपूर गांव हें धुळ्याच्या उत्तरेस ३० मैलांवर सुमारें १३,००० लोकवस्तीचें आहे. या गांवाचें १८७५ सालीं पुरानें फार नुकसान झालें. पूर्वीं हें होळकरांच्या ताब्यांत होतें. येथें नगरपालिका आहे. एक जिन व प्रेस चालतो.

**शिरवळ**—मुंबई, पुणें जिल्हा, भोर संस्थानांतील एक मोठें गांव. विचित्रगड तालुक्याचें ठाणें येथें असतें. येथें एक गढी असून तिचें नांव सुमानमंगल आहे. जवळून निरा नदी वाहते. गांव गढीच्या दक्षिणेस आहे. सातारला जाणाऱ्यायेणाऱ्या मोटारी शिरवळला थांबत असल्यानें गांव प्रसिद्ध झालें आहे. पूर्वी सैन्याचे तळ येथें पडत. येथेंच शिवाजीच्या सैन्यानें फत्तेखान या विजापूरच्या सरदाराचा पाडाव केला. शिवभारतांत या लढाईचें वर्णन आहे.

**शिरवाडकर, वि. वा. (कुसुमाग्रज)** (१९१२- )—एक आधुनिक मराठी कवि. यांच्या कविता 'ज्योत्स्ना' मासिकांत 'कुसुमाग्रज' या टोपण नांवानें प्रसिद्ध होऊं लागल्यावर यांच्या काव्यप्रतिभेची साहित्यिकांना कल्पना आली. भावनांची उत्कटता व कल्पनावैभव याबरोबरच शुद्ध व सुंदर भाषाशैली हे

यांच्या काव्याचे विशेष होत. गरिबांचें कष्टमय जीवन रेखाटण्यामुळें यांचा मोठा ओढा मानवतेकडे आहे, हें दिसून येतें. 'क्रांतीचा जयजयकार' करून यांनीं आपलें नांव सर्वत्र केलें. जें जें उज्ज्वल आहे त्याचे हे पूजक आहेत, तथापि कसल्याचेच प्रचारक नाहींत. त्यांनीं 'उपास्वप्ना'सारखीं उत्कृष्ट प्रेमगीतेंहि केलीं आहेत. 'ताजमहाल' या कवितेंत त्यांची वर्णनाची हातोटी दिसून येते. 'जीवनलहरी' व 'विशाखा' हे त्यांच्या कवितांचे संग्रह आहेत. हे गद्यकाव्येंहि सुंदर रचतात.

**शिरस्त्राण**—युद्धामध्यें सैनिक, खेळामध्यें खेळगडी, व खाणीमध्यें मजूर यांच्या शिरःसंरक्षणाकरितां शिरस्त्राण वापरण्यांत येतें. मध्ययुगीन कालांत बहुतेक शिरस्त्राणें धातूंचीं केलेलीं असून त्यांचे आकार निरनिराळे होते. रोमन लोकांतील मल्ल (ग्लॅडिएटर) जीं शिरस्त्राणें वापरीत त्यांमुळें त्यांचा चेहरा पूर्णपणें झांकला जात असे. १५ व्या व १६ व्या शतकांत नर्मयुद्धामध्यें जीं शिरस्त्राणें वापरीत त्यांतूनहि तें धारण करणाऱ्यास केवळ कांहीं छिद्रांतून बाहेर पाहतां येत असे. मध्यंतरीं शिरस्त्राणाऐवजीं कांहीं जाड, घट्ट टोप्या वापरण्यांत येत व त्यांसहि शिरस्त्राण म्हणत. अलीकडे विमानहल्ल्यापासून रक्षण करण्याकरितां शिरस्त्राणांचा प्रचार पुन्हां वाढत चालला होता. हिंदुस्थानांत मुसलमानी अमदानीपासून जिरेटोप वापरीत. चिलखताला हा जोडून असे. बखरी-पोवाड्यांतून याचे उल्लेख येतात.

**शिरहट्टीचा किल्ला**—मुंबई, बेळगांव जिल्हा. हा किल्ला खानगवंडे देसाई यांनीं किंवा लक्ष्मेश्वर येथील अंकुशखान यानें बांधला असावा. यास १५ बुरूज आहेत. १८५८ मध्यें कांहीं तट व बुरूज पाडून टाकण्यांत आले. तटाची उंची १९ फूट व रुंदी १५ फूट आहे. एक वीरभद्र या नांवाचा बुरूज अष्टकोनी आहे. सभोंवतीं १२ फूट खोल व ८० ते १०० फूट रुंद खंदक आहे. १६८६ मध्यें येथें सावनूरच्या नबाबाचा अमल होता. १७५६ त सावनूरकरांकडून तो पेशव्यांकडे आला. १७६४ त लक्ष्मेश्वर परगणा गोविंद हरि पटवर्धन यास देण्यांत आला. १८०१ मध्यें तो सांगलीकरांच्या वांटणींत गेला.

**शिराझ**—इराण, फारसिस्तान प्रांताची राजधानी. अत्यंत सुंदर शहर म्हणून याची प्राचीन काळापासून ख्याति आहे. तैमूरलंगानें १४ व्या शतकाच्या अखेरीस हें जिंकून घेतलें होतें. याची प्रसिद्धि दारूसाठीं आहे. या ठिकाणीं जडावाचें काम उत्कृष्ट होतें. १९११ आणि १९१५ सालीं हें शहर ब्रिटिशांच्या ताब्यांत होतें. हल्लीं येथें बिनतारी ठाणें करण्यांत आलें आहे. लो. सं. (१९४०) १,२९,०००.

**शिरालपक्ष**—(न्यूरोप्टेरा). हा एक कीटकांचा वर्ग असून त्यांचें अर्धवट रूपांतर होतें. यांना चार पूर्ण वाढ झालेले अंतस्त्वचामय पंख असतात. हे चारहि पंख बहुधा जवळजवळ सारख्याच आकाराचे असतात. या वर्गांत ड्रॅगन माश्या, कॅडिस माश्या व इतर अनेक प्रकारच्या मे महिन्यांतील माश्यांसारख्या माश्या मोडतात. तसेंच या वर्गांत 'पिपीलिका-सिंह' (मिर्मेलीऑनटिडी), 'किनारपक्षी माश्या' (हेमेरोबिइडी), वाळवी (टर्मिटिडी), हे कीटकहि येतात.

**शिराळशेट**—एक धर्मनिष्ठ व सार्वजनिक हितबुद्धीचा लिंगायत वाणी. १३९६ सालीं दक्षिणेंत दुर्गादेवीचा एक भयंकर दुष्काळ पडला. हा दुष्काळ बारा वर्षेपर्यंत होता. या मुदतींत शिराळशेटीनें गुजराथ व महाराष्ट्र या देशांमध्यें हजारों बैल फिरते ठेवून धान्याचा पुरवठा केला व लोकांचा दुवा मिळवला. याची ही कर्तव्यनिष्ठा पाहून बादशहानें यास आपल्या बेदर या राजधानींत बोलावून याचा सन्मान केला व "तुला काय हवें तें मागून घे", असें सांगितलें. तेव्हां यानें पैसाअडका किंवा वतनजहागिरी यांपैकीं कांहीं न मागतां आपणास साडेतीन घटका बादशहाचा अधिकार मिळावा, अशी विनंति केली. तेव्हां तिला बादशहानें लगेच संमति देऊन तो आपल्या तख्तावरून खालीं उतरला. परंतु यानें परत विनंति केली कीं, माझी बादशाही तख्तास पाय लावण्याचीहि योग्यता नाहीं, तरी बादशहानें साडेतीन घटका आपला शिक्काच तेवढा माझ्या स्वाधीन करावा व मी जें कांहीं करीन तें मंजूर करावें. बादशहानेंहि हें सारें कबूल केलें. यानंतर या साडेतीन घटकांत शिराळशेटीनें, बहामनी राजांकडून हिंदु धर्मासंबंधींच्या ज्या देणग्या व इनामें, तसेंच देवस्थानच्या जमिनी खालसा करण्यांत आल्या होत्या त्या सर्व खुल्या केल्या. इतकेंच नव्हे तर कांहीं देवस्थानांना नवीन जमिनी नेमून दिल्या. यानें स्वतःकरितां मात्र कांहींच घेतलें नाहीं. तेव्हां बादशहानें याच्या जनहितैषी व निरपेक्षबुद्धीमुळें खुष होऊन याच्या नकारास न जुमानतां याच्या मुलांस सरदारी दिली. शिराळशेटीच्या या अल्पकालीन राज्याची गोष्ट श्रावण शुद्ध ६ ला घडली. याच्या स्मरणार्थ अद्यापि महाराष्ट्रांत श्रावण शु॥ ६ स शिराळशेट बसवितात. पण त्याचें हें विडंबन कीं काय असें वाटतें. माणदेशांतील बंडाळी मोडण्यासाठीं आलेला नामशेटी नांवाचा सरदार याच्याच वंशांतील. म्हसवडपासून चार कोसांवर असलेल्या वरकुटें नांवाच्या गांवाजवळ त्याच्या फौजेचा तळ पडला होता. म्हणून गांवास 'नामशेटीचें वरकुटें' असें नांव पडलें आहे.

**शिरीष**—[वर्ग—लेग्युमिनोसी]. शिरस ही बाभळीच्या जातीचीं झाडें व झुडपें असून यांचीं पानें दुहेरी चिंचेच्या पानांसारखीं असतात. यांचीं फुलें पांढरीं, पिवळीं किंवा तांबडीं असून त्यांना बाटोळा डोक्यासारखा भाग असतो. यांच्या शेंगा

रुंद, सरळ व सपाट असतात. विषयावेवर साल व बी उपयुक्त आहे. फुलें ज्वरावर देतात.

शिरूर—मुंबई, पुणें जिल्ह्याचा एक तालुका. क्षे. फ. ५७८ चौरस मैल. मोठीं गांवें दोन (घोडनदी–मुख्य ठिकाण व तळेगांव–ढमढेरे) व खेडीं ७६ आहेत. लो. सं. (१९४१) ८४,२६५. कुकडी, घोडा, वेळ व भीमा या चार नद्या तालुक्यांतून वाहतात. कांहीं भागांत जमीन सुपीक आहे. तालुक्यांत बागाईत पुष्कळ असून बटाटे, मुईमूग, ऊंस, मिरची, वगैरे जिन्नस चांगले पिकतात. पाऊस सुमारें २२ इंच पडतो.

शिलर, जोहान फ्रेडरिक (१७५९–१८०५)—एक थोर जर्मन कवि आणि नाटककार. गोएटेच्या खालोखाल जर्मन वाङ्मयांत याला स्थान आहे. हा प्रथम लष्करांत वैद्य असे. १७८१ मध्यें यानें 'चोर' या अर्थाची एक शोकान्तिका प्रसिद्ध केली. तिच्यामुळें मान्या साहित्यिकांचें त्याच्याकडे लक्ष वेधलें. नंतर तो नाटकसंस्थेचा कवि म्हणून राहिला व 'फिएस्को' व 'कावाल अँड लव्ह' हीं नाटकें लिहिलीं. पुढें १७८५ त लाइप्झिग आणि ड्रेस्डेन येथें राहून त्यानें इतिहासाचा अभ्यास केला व नेदर्लंड्सच्या बंडाचा इतिहास लिहिला. गोएटेच्या स्नेहामुळें त्याला जेना येथें प्राध्यापकाची जागा लामली व त्यानें आणखी ऐतिहासिक ग्रंथ लिहिले. पण पुन्हां तो काव्याकडे वळला व त्यानें सुंदर गीतें आणि शाहिरी कवनें केलीं. त्याच्या नाटकांपैकीं 'विल्यम टेल' हें सर्वोत्कृष्ट आहे. १८०२ मध्यें त्याला उमराव करण्यांत आलें.

शिलांग—आसाम, खासी डोंगर जिल्हा, प्रांताची राजधानी. येथें गुरख्यांची तुकडी असते. शहर फार वाढलें तरी मागें १८९७ सालच्या भूकंपानें याचा बराच नाश झाला होता व आतां १९५० सालच्या भूकंपानेंहि याला हानि पोंचली आहे. शहर डोंगरावर पाइन वृक्षांच्या मध्यें वसलें आहे. समुद्रसपाटी-पासून ४,९०० फूट उंचीवर असल्यानें उन्हाळ्यांत राहावयास चांगलें वाटतें. या राजधानींत आधुनिक सुखसोयी सर्व प्रकारच्या आहेत. पाऊस सारा ८० इंच पडतो. लो. सं. ५,०००.

शिलाजतु—(बिटयुमेन). राळेसारखा एक खनिज पदार्थ. केव्हां केव्हां द्रव रूपांतहि हा सांपडतो. हा मुख्यतः उज्जकर्ब-(हायड्रोकार्बन)चा बनलेला असून त्यांत कर्ब ८५% व उज्ज १५% असतो. हा जळूं लागला म्हणजे मोठी ज्योत होते व पुष्कळसा धूर तयार होतो. डांबरी रस्ते तयार करण्यासाठीं, घरांचीं छपरें गळत असतील तर गळती बंद करण्यासाठीं, वगैरे अनेक कामीं याचा उपयोग होतो.

शिलाजित—सर्व रोगावर चालणारें एक रामबाण औषध. हें रक्तशुद्धिकारक असून पौष्टिक आहे. तांबडा, निळा, काळा व पांढरा अशा याच्या चार जाती आहेत. याचे रेतीसारखे पांढऱ्या रंगाचे कण असतात. त्यांस गोमूत्रासारखा वास येतो. रुचि खारट असते. हा सध्यां दुर्मिळ आहे. काळा शिलाजित चिकट, गुळगुळीत असून गुग्गुळासारखा दिसतो. हिमालय, विंध्य, सह्याद्रि हे पर्वत मे–जून महिन्यांत उन्हानें तापले म्हणजे खडकांतून चिकाप्रमाणें शिलाजित बाहेर पडतो. शिलाजित नेहमीं अशुद्ध स्थितींत सांपडतो. मग तो शुद्ध करून घेतात. शिलाजित विस्तवावर ठेवला असतां अथवा कढविला असता त्याच्या अंगचे औषधी धर्म नाहींसे होतात. शिलाजित चांगला शुद्ध केलेला असल्यास तो पाण्यांत विरघळला पाहिजे. शिलाजिताच्या अंगीं पदार्थ नासूं न देण्याचाहि गुण आहे. पाय मुरगळला असतां तेथें शिलाजिताचा लेप दिला असतां चांगला उपयोग होतो. अग्नि-मांद्य, यकृद्विकार, दमा, स्वप्नावस्था, मूतखडा, इत्यादि विकारांवर शिलाजित देतात.

शिला-ताम्रपट-लेखन—दगड, धातु, लांकूड, मातीचीं भांडीं, इ. वर प्राचीन काळीं जे लेख कोरलेले आहेत त्यांचा अभ्यास करून त्यावरून इतिहासज्ञान मिळवितात. हिंदुस्थान, ईजिप्त, अरब-स्तान, ग्रीस, इटली, इंग्लंड, स्कॅन्डिनेव्हिया, डेन्मार्क, इ. देशांतून असे निरनिराळया वस्तूंवर कोरलेले लेख सांपडतात. या लेखांच्या लिपीहि त्या त्या देशाच्या प्राचीन पद्धतीप्रमाणें निराळ्या आहेत. ईजिप्तमध्यें चित्रलिपि तर बाबिलोन-असीरियामध्यें पाचरी लिपि, वायव्य युरोपांत प्युनिक लिपि तर भरतखंडांत ब्राह्मी-खरोष्ठी लिपी याप्रमाणें भिन्नता आढळेल. या चिरंजीव लेखांचें लिपि-शास्त्रसंशोधकांनीं नीट वाचन केलें असून त्यायोगें प्राचीन इतिहासज्ञानांत भर पडली आहे. महत्त्वाच्या प्रसंगांच्या नोंदी, दानें दिल्याबद्दल सनदा, करार, पावत्या, इतिहास, नाटकें, आज्ञा, शासनें, इ. प्रकारचा मजकूर या शिलालेख–ताम्रपटांतून आढळतो. हिंदुस्थानांत तर कांहीं संबंध ग्रंथ दगडावर कोरलेले सांपडलेले आहेत.

शिलालेख दोन प्रकारचे असतात : एक दगडांत खोदलेलीं अक्षरें ज्यांवर आहेत तो व दुसरा उठावदार अक्षरें ज्यांवर आहेत तो. अरबी-फारसी लेख उठावदार अक्षरांचे असतात. हिंदुस्थानांत सर्वांत प्राचीन महत्त्वाचे शिलालेख म्हणजे अशोकाच्या धर्माज्ञा. खि. पू. तिसऱ्या शतकांत अशोकानें खडक व स्तंभ यांवर आपल्या आज्ञापत्रें कोरवलेलीं हिंदुस्थानांतील बहुतेक भागांतून आज दिसून येतात. ग्रीक हेलिओडोरसनें भागवतधर्म स्वीकारल्याचा पुरावा बेसनगर येथील गरुडस्तंभावर आहे. नाशिकच्या लेण्यांतून शकराजा उषवदात यानें हजारों गायी दान दिल्याचा उल्लेख आहे. राजाज्ञांसाठीं ताम्रपटांचाहि सर्रास उपयोग केलेला आहे. दानपत्रें ताम्रपटांवरच बहुधा असतात. वेदांवरील सायणभाष्य ताम्रपटांवर

यांच्या काव्याचे विशेष होत. गरिबांचें कष्टमय जीवन रेखाटण्यामुळें यांचा मोठा ओढा मानवतेकडे आहे, हें दिसून येतें. 'क्रांतीचा जयजयकार' करून यांनीं आपलें नांव सर्वत्र केलें. जें जें उज्ज्वल आहे त्याचे हे पूजक आहेत, तथापि कसल्याचेच प्रचारक नाहींत. त्यांनीं 'उषास्वप्ना'सारखीं उत्कृष्ट प्रेमगीतेंहि केलीं आहेत. 'ताजमहाल' या कवितेंत त्यांची वर्णनाची हातोटी दिसून येते. 'जीवनलहरी' व 'विशाखा' हे त्यांच्या कवितांचे संग्रह आहेत. हे गद्यकाव्येंहि सुंदर रचतात.

**शिरस्त्राण**—युद्धामध्यें सैनिक, खेळामध्यें खेळगडी, व खाणीमध्यें मजूर यांच्या शिरःसंरक्षणाकरितां शिरस्त्राण वापरण्यांत येतें. मध्ययुगीन कालांत बहुतेक शिरस्त्राणें धातूंचीं केलेलीं असून त्यांचे आकार निरनिराळे होते. रोमन लोकांतील मल्ल (ग्लॅडिएटर) जीं शिरस्त्राणें वापरीत त्यांमुळें त्यांचा चेहरा पूर्णपणें झांकला जात असे. १५ व्या व १६ व्या शतकांत नर्मयुद्धामध्यें जीं शिरस्त्राणें वापरीत त्यांतूनहि तें धारण करणाऱ्यास केवळ कांहीं छिद्रांतून बाहेर:पाहतां येत असे. मध्यंतरीं शिरस्त्राणाऐवजीं कांहीं जाड, घट्ट टोप्या वापरण्यांत येत व त्यांसहि शिरस्त्राण म्हणत. अलीकडे विमानहल्ल्यापासून रक्षण करण्याकरितां शिरस्त्राणांचा प्रचार पुन्हां वाढत चालला होता. हिंदुस्थानांत मुसलमानी अमदानीपासून जिरेटोप वापरीत. चिलखताला हा जोडून असे. बखरी–पोवाड्यांतून याचे उल्लेख येतात.

**शिरहट्टीचा किल्ला**—मुंबई, बेळगांव जिल्हा. हा किल्ला खानगवंडे देसाई यांनीं किंवा लक्ष्मेश्वर येथील अंकुशखान यानें बांधला असावा. यास १५ बुरूज आहेत. १८५८ मध्यें कांहीं तट व बुरूज पाडून टाकण्यांत आले. तटाची उंची १९ फूट व रुंदी १५ फूट आहे. एक वीरभद्र या नांवाचा बुरूज अष्टकोनी आहे. सभोंवतीं १२ फूट खोल व ८० ते १०० फूट रुंद खंदक आहे. १६८६ मध्यें येथें सावनूरच्या नबाबाचा अमल होता. १७५६ त सावनूरकरांकडून तो पेशव्यांकडे आला. १७६४ त लक्ष्मेश्वर परगणा गोविंद हरि पटवर्धन यास देण्यांत आला. १८०१ मध्यें तो सांगलीकरांच्या वांटणींत गेला.

**शिराझ**—इराण, फारसिस्तान प्रांताची राजधानी. अत्यंत सुंदर शहर म्हणून याची प्राचीन काळापासून ख्याति आहे. तैमूरलंगानें १४ व्या शतकाच्या अखेरीस हें जिंकून घेतलें होतें. आज याची प्रसिद्धि दारूसाठीं आहे. या ठिकाणीं जटावाचें काम उत्कृष्ट होतें. १९११ आणि १९१५ सालीं हें शहर ब्रिटिशांच्या ताब्यांत होतें. हल्लीं येथें बिनतारी ठाणें करण्यांत आलें आहे. लो. सं. (१९४०) १,२९,०००.

**शिरालपक्ष**—(न्यूरोप्टेरा). हा एक कीटकांचा वर्ग असून त्यांचें अर्धवट रूपांतर होतें, यांना चार पूर्ण वाढ झालेले अंतस्त्वचामय पंख असतात. हे चारहि सारख्याच आकाराचे असतात. या वर्गांत ड्रॅ... माश्या व इतर अनेक प्रकारच्या मे महिन्यांतील माश्या मोडतात. तसेंच या वर्गांत 'पिपीलिका–सिंह' (मायर्मेलिऑनटिडी), 'किनारपक्षी माश्या' (हेमेरोबिइडी) (टर्मीटिडी), हे कीटकहि येतात.

**शिराळशेट**—एक धर्मनिष्ठ व सार्वजनिक हितबुद्धीचा लिंगायत वाणी. १३९६ सालीं दक्षिणेंत दुर्गादेवीचा एक भयंकर दुष्काळ पडला. हा दुष्काळ बारा वर्षेपर्यंत होता. या मुदतींत शिराळशेटीनें गुजराथ व महाराष्ट्र या देशांमध्यें हजारों बैल फिरते ठेवून धान्याचा पुरवठा केला व लोकांचा दुवा मिळवला. याची ही कर्तव्यनिष्ठा पाहून बादशहानें यास आपल्या बेदर या राजधानींत बोलावून याचा सन्मान केला व "तुला काय हवें तें मागून घे", असें सांगितलें. तेव्हां यानें पैसाअडका किंवा वतनजहागिरी यांपैकीं कांहीं न मागतां आपणास साडेतीन घटका बादशहाचा अधिकार मिळावा, अशी विनंति केली. तेव्हां तिला बादशहानें लगेच संमति देऊन तो आपल्या तख्तावरून खालीं उतरला. परंतु यानें परत विनंति केली कीं, माझी बादशाही तख्तास पाय लावण्याचीहि योग्यता नाहीं, तरी बादशहानें साडेतीन घटका आपला शिक्काच तेवढा माझ्या स्वाधीन करावा व मी जें कांहीं करीन तें मंजूर करावें. बादशहानेंहि हें सारें कबूल केलें. यानंतर या साडेतीन घटकांत शिराळशेटीनें, बहामनी राजांकडून हिंदु धर्मासंबंधींच्या ज्या देणग्या व इनामें, तसेंच देवस्थानच्या जमिनी खालसा करण्यांत आल्या होत्या त्या सर्व खुल्या केल्या. इतकेंच नव्हे तर कांहीं देवस्थानांना नवीन जमिनी नेमून दिल्या. यानें स्वतःकरितां मात्र कांहींच घेतलें नाहीं. तेव्हां बादशहानें याच्या जनहितैषी व निरपेक्षबुद्धीमुळें खुप होऊन याच्या नकारास न जुमानतां याच्या मुलांस सरदारी दिली. शिराळशेटीच्या या अल्पकालीन राज्याची गोष्ट श्रावण शुद्ध ६ ला घडली. याच्या स्मरणार्थ अद्यापि महाराष्ट्रांत श्रावण शु॥ ६ स शिराळशेट बसवितात. पण त्याचें हें विडंबन कीं काय असें वाटतें. माणदेशांतील बंडाळी मोडण्यासाठीं आलेला नामशेटी नांवाचा सरदार याच्याच वंशांतील. म्हसवडपासून चार कोसांवर असलेल्या वरकुटें नांवाच्या गांवाजवळ त्याच्या फौजेचा तळ पडला होता. म्हणून गांवास 'नामशेटीचें वरकुटें' असें नांव पडलें आहे.

**शिरीष**—[वर्ग–लेग्युमिनोसी]. शिरस ही बाभळीच्या जातीचीं झाडें व झुडुपें असून यांचीं पानें दुहेरी चिंचेच्या पानांसारखीं असतात. यांचीं फुलें पांढरीं, पिंवळीं किंवा तांबडीं असून त्यांना वाटोळा डोक्यासारखा भाग असतो. यांच्या शेंगा

रुंद, सरळ व सपाट असतात. विषचाधेवर साल व बी उपयुक्त आहे. फुलें ज्वरावर देतात.

**शिरूर**—मुंबई, पुणें जिल्ह्याचा एक तालुका. क्षे. फ. ५७८ चौरस मैल. मोठीं गांवें दोन (घोडनदी–मुख्य ठिकाण व तळेगांव–ढमढेरे) व खेडीं ७६ आहेत. लो. सं. (१९४१) ८४,२६५. कुकडी, घोडा, वेळ व भीमा या चार नद्या तालुक्यांतून वाहतात. कांहीं भागांत जमीन सुपीक आहे. तालुक्यांत बागाईत पुष्कळ असून बटाटे, भुईमूग, ऊंस, मिरची, वगैरे जिन्नस चांगले पिकतात. पाऊस सुमारें २२ इंच पडतो.

**शिलर, जोहान फ्रेडरिक** (१७५९–१८०५)—एक थोर जर्मन कवि आणि नाटककार. गोएटेच्या खालोखाल जर्मन वाङ्मयांत याला स्थान आहे. हा प्रथम लष्करांत वैद्य असे. १७८१ मध्यें यानें 'चोर' या अर्थाची एक शोकान्तिका प्रसिद्ध केली. तिच्यामुळें साऱ्या साहित्यिकांचें त्याच्याकडे लक्ष वेधलें. नंतर तो नाटकसंस्थेचा कवि म्हणून राहिला व 'फिएस्को' व 'काबाल अँड लव्ह' हीं नाटकें लिहिलीं. पुढें १७८५ त लाइप्झिग आणि ड्रेस्डेन येथें राहून त्यानें इतिहासाचा अभ्यास केला व नेदर्लँड्सच्या बंडाचा इतिहास लिहिला. गोएटेच्या स्नेहामुळें त्याला जेना येथें प्राध्यापकाची जागा लाभली व त्यानें आणखी ऐतिहासिक ग्रंथ लिहिले. पण पुन्हां तो काव्याकडे वळला व त्यानें सुंदर गीतें आणि शाहिरी कवनें केलीं. त्याच्या नाटकांपैकीं 'विल्यम टेल' हें सर्वोत्कृष्ट आहे. १८०२ मध्यें त्याला उमराव करण्यांत आलें.

**शिलांग**—आसाम, खासी डोंगर जिल्हा, प्रांताची राजधानी. येथें गुरख्यांची तुकडी असते. शहर फार वाढलें तरी मागें १८९७ सालच्या भूकंपानें याचा बराच नाश झाला होता व आतां १९५० सालच्या भूकंपानेंहि याला हानि पोंचली आहे. शहर डोंगरावर पाइन वृक्षांच्या मध्यें वसलें आहे. समुद्रसपाटी-पासून ४,९०० फूट उंचीवर असल्यानें उन्हाळ्यांत राहावयास चांगलें वाटतें. या राजधानींत आधुनिक सुखसोयी सर्व प्रकारच्या आहेत. पाऊस सारा ८० इंच पडतो. लो. सं. ५,०००.

**शिलाजतु**—(बिट्युमेन). राळेसारखा एक खनिज पदार्थ. केव्हां केव्हां द्रव रूपांतहि हा सांपडतो. हा मुख्यतः उज्जकर्ब-(हायड्रोकार्बन)चा बनलेला असून त्यांत कर्ब ८५% व उज्ज १५% असतो. हा जळूं लागला म्हणजे मोठी ज्योत होते व पुष्कळसा धूर तयार होतो. डांबरी रस्ते तयार करण्यासाठीं, घरांचीं छपरें गळत असतील तर गळती बंद करण्यासाठीं, वगैरे अनेक कामीं याचा उपयोग होतो.

**शिलाजित**—सर्व रोगावर चालणारें एक रामबाण औषध. हें रक्तशुद्धिकारक असून पौष्टिक आहे. तांबडा, निळा, काळा व पांढरा अशा याच्या चार जाती आहेत. याचे रेतीसारखे पांढऱ्या रंगाचे कण असतात. त्यांस गोमूत्रासारखा वास येतो. रुचि खारट असते. हा सध्यां दुर्मिळ आहे. काळा शिलाजित चिकट, गुळगुळीत असून गुग्गुळासारखा दिसतो. हिमालय, विंध्य, सह्याद्रि हे पर्वत मे–जून महिन्यांत उन्हानें तापले म्हणजे खडकांतून चिकाप्रमाणें शिलाजित बाहेर पडतो. शिलाजित नेहमीं अशुद्ध स्थितींत सांपडतो. मग तो शुद्ध करून घेतात. शिलाजित विस्तवावर ठेवला असतां अथवा कढविला असता त्याच्या अंगचे औषधी धर्म नाहींसे होतात. शिलाजित चांगला शुद्ध केलेला असल्यास तो पाण्यांत विरघळला पाहिजे. शिलाजिताच्या अंगीं पदार्थ नासूं न देण्याचाहि गुण आहे. पाय मुरगळला असतां तेथें शिलाजिताचा लेप दिला असतां चांगला उपयोग होतो. अग्नि-मांद्य, यकृद्विकार, दमा, स्वप्नावस्था, मूतखडा, इत्यादि विकारांवर शिलाजित देतात.

**शिला-ताम्रपट-लेखन**—दगड, धातु, लांकूड, मातीचीं भांडीं, इ. वर प्राचीन काळीं जे लेख कोरलेले आहेत त्यांचा अभ्यास करून त्यावरून इतिहासज्ञान मिळवितात. हिंदुस्थान, ईजिप्त, अरब-स्तान, ग्रीस, इटली, इंग्लंड, स्कँडिनेव्हिया, डेन्मार्क, इ. देशांतून असे निरनिराळ्या वस्तूंवर कोरलेले लेख सांपडतात. या लेखांच्या लिपीहि त्या त्या देशाच्या प्राचीन पद्धतीप्रमाणें निराळ्या आहेत. ईजिप्तमध्यें चित्रलिपि तर बाबिलोन-असीरियामध्यें पाचरी लिपि, वायव्य युरोपांत ऱ्युनिक लिपि तर भरतखंडांत ब्राह्मी-खरोष्ठी लिपी याप्रमाणें भिन्नता आढळेल. या चिरंजीव लेखांचें लिपि-शास्त्रसंशोधकांनीं नीट वाचन केलें असून त्यायोगें प्राचीन इतिहासज्ञानांत भर पडली आहे. महत्त्वाच्या प्रसंगांच्या नोंदी, दानें दिल्याबद्दल सनदा, करार, पावत्या, इतिहास, नाटकें, आज्ञा, शासनें, इ. प्रकारचा मजकूर या शिलालेख–ताम्रपटांतून आढळतो. हिंदुस्थानांत तर कांहीं संबंध ग्रंथ दगडावर कोरलेले सांपडलेले आहेत.

शिलालेख दोन प्रकारचे असतात: एक दगडांत खोदलेलीं अक्षरें ज्यांवर आहेत तो व दुसरा उठावदार अक्षरें ज्यांवर आहेत तो. अरबी-फारसी लेख उठावदार अक्षरांचे असतात. हिंदुस्थानांत सर्वांत प्राचीन महत्त्वाचे शिलालेख म्हणजे अशोकाच्या धर्माज्ञा. खि. पू. तिसऱ्या शतकांत अशोकानें खडक व खांब यांवर आपल्या आज्ञापत्रें कोरवलेलीं हिंदुस्थानांतील बहुतेक भागांतून आज दिसून येतात. ग्रीक हेलिओडोरसनें भागवतधर्म स्वीकारल्याचा पुरावा बेसनगर येथील गरुडस्तंभावर आहे. नाशिकच्या लेण्यांतून शकराजा उषवदात यानें हजारों गायी दान दिल्याचा उल्लेख आहे. राजाज्ञांसाठीं ताम्रपटांचाहि सर्रास उपयोग केलेला आहे. दानपत्रें ताम्रपटांवरच बहुधा असतात. वेदांवरील सायणभाष्य ताम्रपटांवर

कोरून ठेवलें असल्याचें सांगतात. शिलालेख-ताम्रपटांवरील लिपि-वाचन करण्याचा अभ्यास कांहीं विद्वान् करतात. गौरीशंकर ओझा यांचें 'भारतीय प्राचीन लिपिमाला' हें पुस्तक अशा अभ्यासासाठीं फार उपयुक्त आहे. मराठींतील शिलालेख-ताम्रपट कै. राजवाडे यांच्या प्रयत्नानें पुढें आले. मराठी भाषेच्या वाढीचा इतिहास समजावून घेण्यास त्यांची फार मदत होते.

मराठी लेख—प्राचीन मराठी भाषेचें अस्तित्व व विकास दर्शविण्यासाठीं जुने कोरलेले शिलालेख व ताम्रपट हें एकमेव साधन आहे. आतांपर्यंत वेगवेगळ्या संशोधकांनीं जमविलेली ही साधन-सामुग्री मुद्रित स्वरूपांत पुष्कळच प्रसिद्ध झाली आहे. परंतु त्यापैकीं बरेंचसें साहित्य पुष्कळ ठिकाणीं विखुरलेलें आहे. बहुतेक उपलब्ध असलेले असे लेख अवजड अशा शिलाखंडांवर वा ताम्रपटांवर कोरलेले आहेत. ज्या लेखांतील भाषा निश्चितपणें मराठी आहे असे सुमारें ४५ लेख महाराष्ट्रांत व महाराष्ट्राबाहेर सध्यां उपलब्ध आहेत.

कालदृष्ट्या विचार केला तर सर्वांत प्राचीन मराठी लेख इ. स. ९०० पासून पुढें उपलब्ध होऊं लागतात. जों जों मागच्या काळांत जावें तों तों ही सामुग्री जास्त दुर्मिळ, व बहुधा दोन लेखांचे कालांत बऱ्याच वर्षांचें अंतर असलेली अशी मिळूं शकते. तथापि यादव व शिलाहार राजवटीपासून सामान्यपणें अधिकाधिक लेख मोठ्या प्रमाणावर सांपडण्यास सुरुवात होते. शिलाहार राज-घराण्यांच्या आतांपर्यंत ज्ञात असलेल्या ५२ शिलालेख-ताम्रपटांपैकीं सुमारें २० लेखांतून मराठी वाक्प्रचार व शब्द आलेले आहेत. यादवांचेहि लेख बहुसंख्य प्रमाणांत उपलब्ध असुन त्यांच्या भाषेचें स्वरूप अर्ध-संस्कृत, अर्ध-मराठी असें संमिश्र आहे. उत्कीर्ण लेखां-व्यतिरिक्त याच काळांतील ज्ञानेश्वरी आदि ग्रंथ, तसेंच महानु-भावीय पंथाचें वाङ्मयहि हळूहळू उजेडांत येऊं लागल्यामुळें, त्यावरून भाषेचें निश्चित स्वरूप कळण्यास पुष्कळच मदत झालेली आहे.

कालदृष्ट्या सर्वांत प्राचीन मराठी लेखाचा अग्रमान म्हैसूर संस्थानांतील श्रवणबेळगोळा येथील गोमटेश्वराच्या प्रचंड मूर्तीखालीं असलेल्या लेखाकडे जातो. या लेखांत "श्री चावुण्डराजें करवियलें" एवढेंच वाक्य आहे. ह्या लेखांत कालनिर्देश स्पष्ट नाहीं, तथापि त्यांत आलेल्या गंग घराण्यांतील राचमल्ल राजाच्या पदरीं असलेला त्याचा दिवाण चावुण्डराज ह्याच्या उल्लेखावरून हा लेख शके ९०५ (इ. स. ९८३) च्या सुमारास कोरविला गेला असें समजण्यांत येतें. गोमटेश्वराच्या देवालयांतील प्राकार बांधून झाल्यावर इ. स. १११७ च्या सुमारास राचमल्ल राजानें कोरलेल्या "श्री गंगराजें सुत्तालें करवियलें" असा दुसराहि लेख ह्या मूर्तीखालीं उत्कीर्ण झालेला आढळतो.

यानंतरचा लेख मंगळवेढें येथील हवळागिरीवरील एका शिले-वर कोरलेला असून तो मराठी व कानडी अशा दोन भाषांत लिहिलेला आहे. हा लेख श्री. ग. ह. खरे यांनीं 'सह्याद्रींत प्रसिद्ध केला असून त्यांत "स्वस्ति जोगमराणेण दिंनलि वै भूमि पेर्मा-डिदेवे राणेण लक्ष होमचा प्रारंमि दिनलिं भूमि कलेस्वरिहि निवर्तण पंनास ५० " अशीं वाक्यें आहेत. त्यांतील पेर्माडिदेवाच्या (कलचूरी) उल्लेखावरून हा लेख शके १०५४ च्या सुमाराचा असावा असें वाटतें. शके १०६० ते १११४ पर्यंतच्या काळांत सुमारें ११ मराठी लेख उपलब्ध आहेत; त्यांपैकीं सुमारें ८ शिलाहार राजांचे आहेत; शिलाहार मल्लिकार्जुनाच्या शके १०७८ मधील चिपळूण शिलालेखांत "मूपया दंडाधिपति केला। तेया प्रसाद दत्त। पनलेचे नगर मुख्य करून व्येउअ पुत्रेन वेंक्रे" (ओळ ७-८), अशीं मराठी वाक्यें आहेत. बाकीचा लेख संस्कृतमध्यें आहे.

फलतदेव (दौण्ड) येथील राजवाडे यांनीं वाचलेला लेख पुष्कळांना परिचित आहे. हा लेख दोनच ओळींचा असून त्यांत "श्री चंगदेव दंडनाके विग्रह केलें। ईश्वर संवछरी नीफलें" अशीं वाक्यें आहेत. त्या लेखांतील पूर्वी नीट न लागलेला भाग आतां उपलब्ध असलेल्या ठशावरून "प्रासादीं वसवण कवडा तेहाचे पुत्त भाईया। चंमा निष्पत्ती।" असा सुधारून वाचतां येतो व वाचनांतील इतरहि कांहीं प्रमाद टाळतां येतात. हा लेख शके १०७९ मधील आहे.

श्री. ग. ह. खरे यांनीं संपादलेला तेर येथील शिलालेख (शके १०८६) अत्यंत महत्त्वाचा आहे. त्यांतील २ ते ७ ओळी संपूर्ण मराठींतच आहेत. कदंब मारडदेवाच्या सावरगांव येथील शके १०८६ मधील लेखांत अंबाबाईच्या देवळासाठीं कांहीं विसोवे (प्रचलित लहान नाणें) दान दिल्याचा उल्लेख आहे. शिलाहार अपरादित्याच्या वेहरली येथील लेखांत (शके ११०६) मराठी वाक्यप्रयोग आले आहेत. हा लेख डॉ. मो. गं. दीक्षित यांनीं प्रसिद्ध केला आहे. यानंतरचा लेख मुंबईत कुर्ल्याजवळ माहवली म्हणून गांव आहे तेथील आहे. तो सामान्यतः परळचा शिलालेख म्हणून ओळखला जातो. ह्या लेखाचा काल शके ११०७ असा असून त्यांत लेखाच्या शेवटीं—"॥ अथतु जो कोणहुवि ए शासन लोपी तेया श्री वैद्यनाथ देवाची माल सकुटुंबीआ पडे॥ तेहाची माय गाडवे झविजे ॥" अशी शपथ घातली आहे.

ह्यानंतरचा शिलालेख शके ११२४ मधील असून तो चाळिस-गांवानजिक पाटण येथील देवीच्या देवळांत आहे. ह्या लेखांत "इया पाटणी जे केणे उघटे" वगैरे मराठी भाषेच्या अभ्यासकांना चांगला परिचित असलेला मजकूर मराठी भाषेंत आहे. त्याचा समाधानकारक अर्थ कै. राजवाडे ह्यांनीं प्रथम लावला.

ह्यानंतरचा महत्त्वाचा शिलालेख खोलेश्वराचें आंबें येथील शके ११५० मधील आहे. हा लेख श्री. ग. ह. खरे यांनीं संपादिला असून, त्यांत आंबें येथील सकलेश्वराच्या देवालयास दिलेलीं दानें "तदेव महाराष्ट्रभाषया लिख्यते" असें सांगून नमूद केलीं आहेत.

ह्या लेखानंतरचा शिलालेख नेवासें येथील शके ११६१ मधील आहे. ह्या लेखाचा श्री. खरे ह्यांनीं उत्कृष्ट ठसा मिळविला आहे. हा लेखहि पूर्ण मराठी असून त्यांत आलेल्या नेवासें येथील कर्णेश्वराच्या देवाल्याचा उल्लेख तत्कालीन महानुभाव वाङ्मयांतहि येतो हें विशेष होय (लीला–चरित्र, उत्तरार्थ, पृ. ६६.). शके ११७४ मधील एक मराठी लेख कर्नाटकांत राणेबेन्नूर येथें सांपडला आहे. दुर्दैवानें हा लेख अंशतः खंडित आहे. यानंतरच्या काळांतले, शके ११८१ व ११८२ मधील शिलाहार सोमेश्वराचे अनुक्रमें रानवड व चांजे येथील शिलालेख उपलब्ध आहेत. त्यांत सामाइ = सोमे, वासुदेव भट्ट, लेऊन, खंडप्त्या, स्थानिचा भाग १, दामोदर भटाचे भाऊआ, अकर ति दिन्हली, असे मराठी शब्द आले आहेत.

शके ११८२ च्या चांजे लेखांत "सातु ठाकुराची वृत्ति, साटा विष्णुन्हाची वृत्ति, राजमार्गु," हीं मराठी वाक्यें आहेत. या लेखा-नंतरचे बहुतेक सर्व लेख यादव राजवटींतले असून, त्यांतील पंढरपूर येथील ८४ चा लेख म्हणून ओळखल्या जाणाऱ्या लेखांत वेगवेगळे रकाने पाडून त्यांत देवालयास दिल्या गेलेल्या देणग्यांचा उल्लेख आहे. हा लेख कै. राजवाडे यांनीं प्रथम प्रसिद्ध केला असून त्याचा काल शके ११९५–९९ असा आहे. यानंतरचा लेख शके १२०७ मधील असून तो सासवडजवळ पूर येथें सांपडला. ह्या लेखाची मूळ शिलाच भा. इ. सं. मंडळांत विद्यमान आहे. तो श्री. खरे ह्यांनीं प्रसिद्ध केलेला असून तो बराचसा त्रुटित आहे. यादव रामचंद्राचा शके १२१० मधील एक लेख भिवंडीजवळ कालवार येथें मिळाला होता तो डॉ. दीक्षित ह्यांनीं संपादिला आहे. यादव रामचंद्राच्या वेळचा शके १२११ मधील उनकेश्वर येथील अठरा ओळींचा शिलालेख डॉ. य. खु. देशपांडे यांनीं भा. इ. सं. मंडळाच्या त्रैमासिकांत प्रथम छापला असून त्यांतहि पुष्कळ मराठी शब्द आले आहेत. शके १२२२ मधील तीन शिलालेख उपलब्ध आहेत, त्यांतील दोन सोलापूर जिल्ह्यांत वेळापूर येथें सांपडले असून, एक कल्याण तालुक्यांत अगासन येथें आढळला. शके १२२३ मधील यादव रामचंद्राचा लेख निजामहद्दींत हातनुर येथें आहे. तो 'पराग' च्या जानेवारी १९४८ च्या अंकांत प्रो. सुतारी ह्यांनीं प्रसिद्ध केला आहे. शके ११२७ मधील वेळापूर येथील आणखी एक ३५ ओळींचा लेख श्री. खरे यांनीं मिळविला आहे, तो तर पूर्णपणें मराठींत आहे. [भा. इ. सं. मंडळ, उत्कीर्ण लेखपरिचय]. (मराठी भाषा व वाङ्मय पाहा).

याप्रमाणें मराठींत ग्रंथरचना होण्यापूर्वी मराठी भाषेचें रूप काय होतें हें स्पष्ट होतें. शिलालेख-ताम्रपटांचें वाचन करण्यास प्राचीन लिपिशास्त्राचा अभ्यास लागतो, तो महाराष्ट्रांत फार थोड्या विद्वानांनीं केला आहे. विद्यापीठांतून अशा अभ्यासाला प्रोत्साहन मिळाल्याखेरीज नवीन संशोधक तयार होणार नाहींत.

**शिलाहार राजे** (इ. स. ९०९–१२०५)—हे राष्ट्रकूटांचे मांडलिक राजे होते. शिलाहारांचीं तीन घराणीं होतीं. ते आपली उत्पत्ति विद्याधर गंधर्वांपासून मानीत. एक वंश तगर येथें राज्य करीत होता. हें शहर पूर्वी फार विख्यात होतें. वरील तीन वंश, उत्तर कोंकणांत पुरी येथें, दक्षिण कोंकणांत खारे पाटणनजीक, व कोल्हापूर येथें असे तीन ठिकाणीं राज्य करीत होते. ह्या सर्वांमध्यें कोल्हापूरचा वंश विशेष भरभराटींत होता. पद्मनाल्दुर्ग-पन्नाल्दुर्ग—म्हणजे पन्हाळा हें शिलाहारांचें राहण्याचें मजबूत ठिकाण होतें. भोज शिलाहारानें हा स. १२०० त बांधला. उत्तर कोंकणच्या अरिकेसरि शिलाहारानें दक्षिण कोंकणच्या शिलाहारांना जिंकून हीं दोन्ही शिलाहार राज्यें एक केलीं (९३९), इ. स. १२६० मध्यें महादेव यादवानें उत्तर कोंकण प्रांत शिलाहारांपासून जिंकून घेतला. शिलाहार कोल्हापूरच्या महालक्ष्मीचे उपासक होते. 'श्रीमहालक्ष्मीलब्धवरप्रसाद' ही पदवी शिलाहार राजे आपल्या नांवास जोडीत असत. शिलाहार हेच हल्लींचे शेलार होत. शेलारवाडी गांव मूळचें शिलाहारांचें असावें, असें त्याच्या नांवा-वरून दिसतें. करोळी गांव कऱ्हाडे जातीच्या भागवतांस शिलाहारांनीं अग्रहार म्हणून दिला होता.

**शिलेदारी**—(शिव्हलरी). मध्ययुगीन काळांतील (इ. स. ५०० ते १५००) युरोपांतील शिलेदारांची (नाइट्स) ही सुप्रसिद्ध संस्था होय. ही संस्था १२ व्या शतकांत व्यवस्थितपणें स्थापन झाली. १४ व्या शतकांत ती पूर्ण प्रगल्भावस्थेस गेली आणि पुढें हळूहळू ऱ्हास पावून १६ व्या शतकाच्या अखेरीस पूर्ण लयास गेली. ही संस्था सरंजामपद्धतींतून (फ्यूडल सिस्टीम) निर्माण झाली होती. या संस्थेचें वैशिष्ट्य असें— लढाऊ बाणा; स्त्रियांबद्दल उच्च दाक्षिण्य वृत्ति; साहस वृत्ति; आणि दुर्दम्य कीर्तिलालसा. या शिव्हलरीच्या काळांत प्रत्येक सरदाराचें शिक्षण पुढीलप्रमाणें होत असे: वयाच्या १२ व्या वर्षी 'पेज' (पोऱ्या) म्हणून कोणा तरी सरदाराच्या पदरीं शिलेदार ऊर्फ सरदार (नाइट) होणाऱ्या मुलांना राहावें लागे. तेथें ह्या मुलांना घोड्यावर बसण्याचें आणि हत्यारें वापरण्याचें युद्धोप-योगी शिक्षण देण्यांत येत असे. हा असा शिकाऊ मुलगा वयानें मोठा झाल्यावर त्याला ढालाइताचें (शील्ड बेअरर) काम करावें

लागे. आणि वयाला २१ वर्षे पुरीं झाल्यावर शिलेदार (नाइट) हा दर्जा त्याला देण्यांत येत असे.

**शिल्पशास्त्र**—मूर्तिशिल्प व वास्तुशिल्प पाहा. विशेष प्रकारच्या शिल्पांवर स्वतंत्र लेख आहेत.

**शिव**—हिंदूंची एक प्रमुख देवता. शिव या नांवानें वेदांत या देवतेचा उल्लेख नाहीं. पण रुद्र या क्रूर व संहारक देवतेचें वर्णन वेदांत असून शंकर किंवा शंभु हीं कल्याणकारी अर्थाचीं विशेषणें वापरलेलीं आहेत. उपनिषदांत रुद्र–शिवाची भक्ति करण्याचा उपदेश आहे. पुराणांत अनेक शिवकथा आहेत. भागवत पुराणांत शिव–उमा यांचा विवाह, दक्षाचें शिवाशीं वैर हा कथाभाग आहे. शैव पुराणांत शिवाचें माहात्म्य पराकोटीला नेलें आहे. शिव हाच परमेश्वर आणि इतर देव त्याचे अंश असें वर्णन आहे. काली ही शिवाची पत्नी भयंकर स्वरूपाची असून कालीपासून शाक्त पंथाचा उगम आहे. शिवाला महायोगी, भैरव, दिगंबर, धूर्जटी, भूतेश्वर, वगैरे नांवें असून गोसावी व वैरागी या शिव-स्वरूपाची आराधना करतात. शिवाच्या नृत्याला तांडव असें नांव आहे. शिवाच्या स्वरूपाचें वर्णन येणेंप्रमाणें— गोरा वर्ण, पांच तोंडें, चार हात, कपाळावर तिसरा नेत्र, त्याच्यावर चंद्र-कोर, जटेंत गंगा, गळ्यांत नररुंडमाळा व नागांचे विळखे, हलाहल विष प्याल्यामुळें कंठ निळा, एका हातांत त्रिशूळ आणि बाकीच्या तीन हातांत अजगव धनुष्य, डमरू व खट्वांग आणि अंगावर व्याघ्रचर्म, याप्रमाणें शिवाची मूर्ति असून भोंवतीं भूत, राक्षस, पिशाचें उभीं असतात. शिवाचें राहण्याचें ठिकाण कैलास पर्वत. शिवपार्वती यांचे दोन पुत्र कार्तिकस्वामी व गणपति हे होत. काशीविश्वेश्वर हें सर्व हिंदूंचें अत्यंत पूज्य शिवक्षेत्र होय.

**शिवकर्ण (सोकोर्नो), डॉ. अहमद (१९०२–     )**—

(शिवकर्ण नांवाचें अपभ्रष्ट रूप सोकोर्नो असें रुढ झालें आहे.) इंडोनेशिया लोकराज्याचे पहिले अध्यक्ष. हे जावांतील बॅण्डोएंग येथील कॉलेजांतून सिव्हिल इंजिनियर झाले. १९२९ ते १९४२ पर्यंत यांच्या राजकीय चळवळीमुळें यांना अनेकदां कैद व हद्दपारी पत्करावी लागली. जपाननें जावा घेतल्यावर यांना बंधमुक्त केलें. यांनीं डॉ. हाटा यांच्यासह १७ ऑगस्ट १९४५ रोजीं स्वातंत्र्य पुकारलें. तेव्हां डच सरकारशीं पुन्हां जोराचा लढा सुरू झाला. अखेर १९४९ च्या अखेरीस इंडोनेशियाला स्वातंत्र्य लाभलें व डॉ. शिवकर्ण हे त्याचे अध्यक्ष झाले.

**शिवकल्याण**—एक मराठी कवि. हा जोगाईच्या आंब्याचा राहणारा. यानें भागवताच्या दशमस्कंधावर सुमारें एक लाख ओंव्यांचा ग्रंथ लिहिला, असे उल्लेख आहेत; पण या ग्रंथाचीं चार प्रकरणेंच (पंचाध्यायी, रासपंचाध्यायी, ब्रह्मस्तुति व वेदस्तुति) उपलब्ध आहेत. नित्यानंद हा याचा पिता व गुरु. ज्ञानदेवाच्या अमृतानुभवावर याची 'नित्यानंदैक्यदीपिका' नांवाची उत्कृष्ट टीका आहे. या ग्रंथाचा काळ शके १५५७ हा आहे. शिवकल्याण हा पंढरीच्या विठोबाचा भक्त होता.

**शिवगंगा जमीनदारी**—मद्रास, दुरा जिल्हा, रामनाड विभाग. क्षे. फ. १६८० चौ. मैल असून लोकसंख्या सुमारें ५ लाख आहे. येथील जमीनदार इंग्रज सरकारला सुमारें ३ लाख रुपये पेश्कश देत असत. शिवगंगा हें मुख्य ठिकाण असून तेथें पितळेचीं भांडीं व मूर्ती उत्कृष्ट होतात. शिवगंगा जमीनदारी ही पूर्वी राम-नाडच्या सेतुपतीच्या राज्यांत मोडत असे. कुत्तलेवर ऊर्फ कुमार मुत्तुविजय रघुनाथ सेतुपति यांच्या कारकीर्दीत रामनाडच्या राज्याचे पांच भाग झाले. पैकीं दोन भाग शशिवर्ण ऊर्फ मुत्तुविजय रघुनाथ पेरिय वडैयारतेवर याजकडे आले, व हीच शिवगंगा येथील जमीन-दारी झाली. तेथील लोक या जमीनदारीस शिन्न वाडगइ म्हणतात.

**शिवण**—हीं झाडें मोठीं असून यांचीं पानेंहि मोठीं व गोल असतात. लांकूड सुतारकामास चांगलें उपयोगी पडतें. फुलें पिंवळ्या रंगाचीं व फळें लहान असून लांबट असतात. दशमुळांत शिवणीचें मूळ एक असतें. पित्तज्वरावर मुळ्यांचा काढा देतात. मूत्राघातावर मुळी उगाळून लावतात.

**शिवण्याचीं यंत्रें**—प्रथम कातडें शिवण्यासाठीं १७९० त टॉमस सेंट यानें एक यंत्र बनविलें. नंतर सन १८३० मध्यें थिमो-नियर व फेरँद यांनीं एक सांखळीची शिवण घालणारें यंत्र शोधून काढलें. त्यानंतर १८४१ मध्यें एलियस हावे यानें सध्यां-च्यासारखें शिवण्याचें यंत्र बनविलें. यामध्यें एक दोरा सुईच्या नेढ्यांतून जाण्याची व एका लहानशा धोट्यांतून येण्याची तजवीज केलेली होती. १८५४ मध्यें आय्. एम्. सिंगर यानें दर आठव्या टांक्यास एक गांठ मारली जाईल असें शिवण्याचें यंत्र तयार केलें. सध्यां प्रचलित असलेल्या यंत्रांत अनेकांचे शोध समाविष्ट करण्यांत आले आहेत. तसेंच तुरपणें, झालर करणें, वगैरे अनेक गोष्टी सध्यांच्या यंत्राच्या साहाय्यानें करतां येऊं लागल्या आहेत. हें यंत्र हातानें किंवा पायांनीं फिरवितां येतें, किंवा त्यास विजेच्या यंत्रानेंहि गति देतां येते.

महाराष्ट्रांत १९२१ सालीं श्री. विनायक महादेव वैद्य यांनीं टाक्यांबरोबरच गांठी बसतील असें शिवण्याचें यंत्र बनवून त्याचें पेटंट घेतलें.

**शिवथर घळ**—मुंबई, कुलाबा जिल्हा. हें लेणें शिवथर गांवाजवळच्या डोंगराच्या पायथ्याशीं आहे. घळ लेण्याप्रमाणें खडकांत कोरली असून आंत खोल्या आहेत. घळईच्या शेजारीं वरून पाण्याचा झोत पडत असतो. वर डोंगरावर चंद्रराव मोऱ्याच्या वाड्याचे अवशेष आहेत. या घळींतल्या सुंदर मठांत बसून रामदासस्वामींनीं 'दासबोध' लिहिला, असे समर्थवाङ्मयांत उल्लेख आहेत. १९३० सालीं ही घळ उकरून साफ करण्यांत आली. (हिचें चित्र सु. विश्वकोशाच्या ५ व्या भागांत दिलें आहे).

**शिवदीनबावा** (शके १६२० ते १६९६)—एक मराठी कवि. हा केसरीनाथाचा शिष्य म्हणून यास शिवदीन केसरी म्हणतात. हा पैठणचा राहणारा, जातीचा वाजसनेयी ब्राह्मण, आडनांव जोशी. जर्जरीबक्ष नांवाच्या एका अवलियानें याला दीन (धर्म) ही पदवी दिल्यावरुन शिवनाथाचा शिवदीन झाला अशी कथा आहे. पैठणच्या शहा दावलवर याचें पद आहे. 'विवेकदर्पण', 'ज्ञानप्रदीप' व 'भक्तिरहस्य' असे शिवदीनाचे ग्रंथ असून बरींच भक्तिपर व प्रासंगिक पदें आहेत. शके १६४४-४८ पर्यंत शिवदीनबावानें हिंदुस्थानभर प्रवास केला. बावांचा शिष्यसंप्रदाय फार मोठा असे. नरहरिनाथ हा याचा पुत्र असून त्याचीहि कविता उपलब्ध आहे.

**शिवधातु**—(ओपल). हा एक सिलिकापासून बनलेला परंतु स्फटिकमय स्वरूप नसलेला ठिसूळ खनिज पदार्थ असून यामध्यें शेंकडा दहा टक्के पाणी असतें. याच्या रंगावरून याला दुग्धस्फटिक, क्षीरस्फटिक, क्षीरधातु, इ. नांवें मिळालीं आहेत. याचें हिंदी नांव दुधिया पत्थर असें आहे. याच्या मुख्य जाती सात आहेत: (१) मौल्यवान् (नोबल)—याचा रंग हिरवा, निळा, पिवळा आणि तांबडा असा बदलत असतो व तो सतेज असतो. (२) औदार्कीन (फायर)—याचा रंग तांबडा असतो. (३) सामान्य—याचे रंग पांढरा, हिरवा, पिवळा आणि तांबडा हे असतात. पण याचे रंग बदलत नाहींत. (४) अर्थ (सेमी)—हा अपारदर्शक असतो. (५) जलदर्शक (हायड्रोफेन)—हा पाण्यांत टाकला असतां पारदर्शक बनतो. (६) दुग्धवर्णरत्न (हियालाइट)—हा पारदर्शक परंतु निर्वर्ण आणि लहान असतो. (७) मेनिलाइट—हा अपारदर्शक असून याचा आकार अनियमित असतो.

खि. पू. ५०० पासून या रत्नाचे उल्लेख सांपडतात. प्लिनी याची प्रशंसा करतो. १७ व्या शतकापासून याला अशुभ रत्न समजूं लागले. याच्या तेजांत फरक होतात, हें एक कारण असावें. हिंदुस्थान आणि सिलोन या देशांत मात्र या रत्नास फार मानतात व याच्या अंगीं कांहीं दैवी गुण आहे असें समजण्यांत येतें. न्यू साउथ वेल्समध्यें या रत्नाच्या खाणी सांपडल्या (१८८९). ओपलच्या अंगठ्या, मुठी, गुंड्या, वगैरे करतात. किंमत एका रत्तीला ३० रुपयांवर पडते.

**शिवनेरी किल्ला**—मुंबई, पुणें जिल्हा. हा जुन्नरच्या पश्चिमेस अर्ध्या मैलावर आहे. पायथ्यापासून याची उंची १००० फूट आहे व लांबी एक मैल आहे. आकार त्रिकोणाकृति आहे. यांत बौद्धकालीन कांहीं अवशेष दिसतात. पायथ्याशीं सोमतवाडी नांवाचें एक ओसाड खेडें आहे. किल्ल्यावर जाण्यास एकंदर ५ दरवाजे लागतात. शेवटच्या दरवाजास शिवाबाईचा दरवाजा म्हणतात. आंत शिवाबाईचें देवालय आहे. किल्ल्यांत कमान टांकें, गंगाजमना टांकें, मोती टांकें, वगैरे बावन टांकीं आहेत.

हा प्रथम यादवांच्या ताब्यांत असावा; त्यानंतर बहामनी सरदार मलिक उत्तुजार यानें तो घेतला. १४७० मध्यें अथनाशियन निकिटिन नांवाचा प्रवासी येथें आला होता. १४८५ मध्यें मलिक अहमद यानें तो घेतला व जुन्नर येथें निजाम उल्मुल्क बहिरी म्हणून स्वतंत्र राज्य करूं लागला. १५२९ मध्यें दुसरा बुऱ्हाण निजाम याचा गुजराथचा बहादुरशहा यानें पराभव केल्यामुळें तो येथें आला होता; तसाच तिसरा राजा हुसेन निजामशहा हाहि विजयानगरच्या रामराजानें पराभव केल्यामुळें येथें आला होता. १५६५ त मूर्तिजा निजामशहा यानें आपला भाऊ शहा कासीम यास या किल्ल्यांत कैदेंत ठेवलें होतें. याच किल्ल्यांत शिवाजीचा १६३० सालीं जन्म झाला. १६५७ मध्यें शिवाजीनें जुन्नर लुटलें व १६७० व १६७५ मध्यें शिवनेरी घेण्याचा प्रयत्न केला. सन १७१६ मध्यें शाहूनें हा मोंगलांपासून घेतला. १७६२ त राघोबादादानें हा निजामास दिला होता. १७९३ त नाना फडणिसानें बाजीराव व चिमणाजीआपा यांस येथें कैदेंत ठेवलें होतें. १८१८ त हा इंग्रजांनीं घेतला. १८४१ त येथें कांहीं चिनी कैद्यांस आणून ठेवलें होतें. १८४५ त राघोजी भांगऱ्याच्या बंडाच्या वेळीं येथें एक फौजेची टोळी ठेवण्यांत आली होती. हा अद्यापि बऱ्या स्थितींत आहे. शिवाजीच्या जन्मदिवशीं येथें उत्सव होतो.

**शिवभट साठे**—मराठेशाहींतील एक ब्राह्मण वीर. सन १७५६ पासून पुढील आठ वर्षें यानें नागपूरकर भोसल्यांच्या ओरिसा प्रांताचा सुभेदार म्हणून काम केलें. हा ओरिसाचा सुभेदार असतांना तो प्रांत उध्वस्त झाला होता. तेव्हां यानें त्या प्रांताची पूर्ववत् व्यवस्था लावली व प्रांताच्या उत्पन्नांत वाढ केली. एकंदरीत याची कारकीर्द तेथील प्रजेस सुखावह झाली. जानोजी व मुधोजी यांच्या तंट्यांत हा जानोजीच्या पक्षांत होता. परंतु पुढें माधवराव पेशवे व जानोजी यांच्यामधील भांडणाच्या वेळीं यानें

माधवरावाची बाजू घेतली. बंगालचे नवाब मीर कासीम व मीर जाफर यांच्या साहाय्यानें यानें इंग्रजांचा बंगालमध्ये प्रवेश होऊं न देण्यासाठीं केलेले प्रयत्न निष्फळ ठरून यास १७६४ सालीं सुभेदारीला मुकून कैदेंत पडावें लागलें. मीर कासीम व मीर जाफर हे इंग्रजांस मिळाल्यानें यास चौथाई मिळेना. दिल्लीच्या बादशहानेंहि बंगाल व ओरिसा या प्रांतांची सनद इंग्रजांना दिली व त्यामुळें इंग्रजांचें वर्चस्व वाढलें. यानें इंग्रजांशीं लढा देण्याचा प्रयत्न केला; पण त्यांत हा अपयशी ठरला. जानोजीनें याजपासून कटक प्रांत घेण्यासाठीं म्हणून भवानी काळूस पाठवलें. तेव्हां हा इंग्रजांस जाऊन मिळाला. यानंतर हा शिवभट्ट पेशव्यांच्या नोकरीस राहिल्याचा उल्लेख सांपडतो.

**शिवभैरव**—हा भैरव थाटाचा जन्य राग आहे. याच्या आरोहावरोहांत सातहि स्वर लागत असल्यानें याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी स्वर धैवत व संवादी ऋषभ आहे. गानसमय प्रातःकाळ मानितात. या रागाच्या आरोहांत गांधार व निषाद हे स्वर तीव्र व अवरोहांत तेच कोमल लागत असल्यामुळें आरोहांत भैरवीची छाया उत्पन्न होते. व अवरोहांत तोडीची झांक असते. हा एक भैरवप्रकार आहे.

**शिवरामभट्ट चित्राव** (मृत्यु १७९१)—पेशवाईतील एक सत्पुरुष. पुणे येथील चित्राव (तबीब) घराण्यांतील वासुदेवभटाचा पुत्र. याच्यावर पेशवे मंडळी, नागपूरकर भोसले, बाबूजी नाईक बारामतीकर, पंतसचिव, इत्यादि मंडळींची भक्ति असे. यानें अनेक देवळांचे जीर्णोद्धार केले व तसेंच उद्धरचा रामेश्वर, पुण्याच्या गणेशखिंडींतले गणपति-मंदिर व पुण्याचें ओंकारेश्वर-मंदिर, हीं मंदिरें बांधलीं. पाषाणच्या शिवलिंगाची स्थापना शिवराममटानेंच केली. तेथें सोमेश्वराच्या दर्शनास जाण्याचा याचा रोजचा नेम असे. एकदां याला गणेशखिंडींत विपुल भूमिगत द्रव्य मिळालें. अशा द्रव्यावर राजाचा अधिकार असतो म्हणून यानें तें पेशव्यांना देऊन टाकलें. पेशव्यांनींहि या रकमेचें व्याज म्हणून याला सालिना १,८८८ रु. देण्याचें ठरवलें. तेव्हांपासून हे पैसे अद्यापपर्यंत चालू आहेत. व या द्रव्याचा विनियोग पाषाण व पुणें येथे अतिरुद्राचे स्वाहाकार करण्याकडे केला जातो. यानें संन्यासी होऊन पाषाण येथें जिवंत समाधि घेतली. ओंकारेश्वराचें मंदिर याच्याच घराण्याच्या ताब्यांत असून देवाच्या पूजेअर्चेसाठीं सरकारकडून नेमणूक चालू आहे.

**शिवरामस्वामी**—एक मराठी कवि. हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण होता. वडिलांचें नांव नारायण. यानें गंडिकाख्यान, नानासाहेब पेशवे यास उपदेश, वगैरे तेरा ग्रंथ लिहिले असून त्यांपैकीं बरेचसे अप्रसिद्ध आहेत. याचा ग्रंथसंग्रह येकेहाळी व आपचंद येथील मठांत आहे. शिवरामस्वामीचा मठ निजामहद्दींतील कल्याणी येथें आहे. हा १८ व्या शतकाच्या पूर्वार्धात होऊन गेला.

**शिवस्कंदवर्मा पल्लव**—पूर्व पल्लव घराण्यांतील एक राजा. कांचीस याची राजधानी होती. हा मूळचा हिंदु धर्माचा नव्हता तरी यानें त्या धर्माला बरेंच उचलून धरलें. यानें अग्निष्टोम, वाजपेय व अश्वमेध (इ. स. १५०) असे तीन यज्ञ केले. अग्निगोत्री गोळशर्मन् या ब्राह्मणास यानें एक गांव बक्षीस दिला. याच्या घराण्यांतील राजांना स्कंदवर्मन् म्हणत असत. परंतु हा मात्र शिववर्मन् या नांवानें ओळखला जातो. यानें आपणांस 'धर्म-महाराजाधिराज' ही पदवी घेतली होती. पल्लव घराणें पाहा.

**शिवाजी** (१६३०-१६८०)—महाराष्ट्राचें नांव प्रथमच इतिहासांत पुढें आणणारा व महाराष्ट्रांत स्वराज्य स्थापन करणारा भोसले घराण्यांतील अत्यंत थोर राजपुरुष. शिवाजीचा पिता शहाजी (पाहा) हा निजामशाहीच्या वतीनें मोंगलांशीं लढण्यांत गुंतला असतांना त्यानें आपलें कुटुंब शिवनेरीस ठेवलें होतें. तेथेंच शके १५५१ फाल्गुन वद्य ३ (ता. १९ फेब्रुवारी १६३०) रोजीं शिवाजीचा जन्म झाला. नंतर लवकरच शहाजी मोंगलांकडे चाकरीस राहिला व जुन्नर परगण्याचें काम पाहूं लागला. तेव्हां १६३६ पर्यंत शिवाजीचें बालपण या भागांतच गेलें. शिवाजीची माता जिजाबाई (पाहा) ही निजामशाहीतील मोठा सरदार लुखजी जाधव याची मुलगी. ती फार हुशार व मानी होती. शिवाजीचें बरेंचसें शिक्षण तिनें केलें. या वेळीं शहाजी वैभवाच्या शिखरावर होता. तेव्हां हें बालपण मोठ्या ऐश्वर्यांत गेलें असल्यास नवल नाहीं. नंतर वयाच्या सहाव्या वर्षापासून बौद्धिक शिक्षणाबरोबरच मर्दानी-मैदानी शिक्षणाचे धडे त्यास मिळूं लागले.

शहाजी १६३६ नंतर आदिलशहाचा सरदार बनला व रणदुल्लाखानाच्या हाताखालीं कर्नाटकच्या मोहिमेस गेला. तिकडे त्याच्याजवळ शिवाजी कांहीं काळ बंगळूरास होता, पण पुढें दादाजी कोंडदेव याच्या देखरेखीखालीं आईसह तो पुण्यास राहूं लागला. दादाजीनें शिवाजीला जहागिरीचा कारभार व इतर व्यवहाराच्या गोष्टी शिकविल्या. १६४४ त शहाजी महाराष्ट्रांत आल्यावेळीं शिवाजीचें लग्न करून देऊन त्याच्याकडे कारभार सोंपविलेला दिसतो. 'प्रतिपच्चंद्रलेखेव' हा त्याचा शिक्का हेंच

दाखवितो. नंतर तीनचार वर्षांनीं दादाजी कोंडदेव (पाहा) वारल्यावर सर्व मुखत्यारी शिवाजीकडेच आली.

शहाजीच्या विरुद्ध अफझलखान, मुस्ताफा, वगैरे कांहीं विजापूरचे सरदार होते. शहाजी हा शत्रूस मदत करतो असा आरोप ठेवून १६४८ त त्याला जिंजीस पकडलें व विजापुरास आणलें. तेव्हां शहाजींचे दोन शूर पुत्र संभाजी व शिवाजी यांनीं आदिलशाहीशीं टक्कर देण्याची तयारी केली. शिवाजीवर फत्तेखान चालून आला असतां शिवाजीनें त्याच्या सैन्याचा शिरवळ येथें पराभव केला. नंतर फत्तेखानानें पुरंदराला वेढा घातला असतां शिवाजीच्या लोकांनीं किल्ला मोठ्या शौर्यानें लढविला व खानाला पळावयास लाविलें. पण वेळप्रसंग पाहून या दोघां सुपुत्रांनीं पडतें घेऊन शहाजीची सुटका करविली. आदिलशाहीविरुद्ध कागाळी शिवाजीनें दिल्लीपतीकडेहि पोंचविली होती. शहाजी इकडे कांहीं दिवस राहून परत कर्नाटकांत गेला. त्याचा प्रतिनिधि म्हणून शिवाजीनें आपल्या मुलुखांतील बेशिस्त व स्वराज्यद्रोही मराठे सरदारांना चरेच वंगविले व हळूहळू विजापूरकरांचें जूंहि फेंकून देण्याची चांगली तयारी त्यानें केली. मोंगलांची मनसबदारी पत्करण्याचा त्यानें औरंगजेबापुढें टाकलेला डाव यांतीलच एक प्रकार होता.

पण मनसुबींतील अटींबद्दल मतभेद होऊन शिवाजीला मोंगलांचेंहि शत्रुत्व पत्करावें लागलें. जंजिऱ्याच्या सिद्दीवर त्यानें स्वारी केली व कोंकणांतील मोंगलांच्या बंदरांत लुटालूट केली. त्यामुळें औरंगजेब चिडला; पण त्याला दिल्लीला बादशाही हस्तगत करण्यासाठीं जावें लागल्यानें मोंगलांचा या वेळचा विरोध शिवाजीला फारसा जाणवला नाहीं. उलट शिवाजीनें दिल्लीला वकील पाठवून इकडे आदिलशाही नेस्तनाबूद करण्याचा सपाटा चालविला.

विजापूरकरांनीं अफझलखानासारख्या शहाजीशीं पूर्वापार वैर धरलेल्या बड्या सरदाराला शिवाजीवर पाठविलें असतां शिवाजीनें मोठ्या मुत्सद्देगिरीनें व लष्करी डावपेंच टाकून अफझलला ठार केलें (१६५९). तेव्हां आदिलशहानें शिवाजीचा बंदोबस्त करण्यासाठीं मोंगलांची मदत मागितली. मोंगल बादशहानें सिद्दी जोहार व शाहिस्तेखान या मोठ्या सरदारांना मोठ्या सैन्यानिशीं दक्षिणेंत पाठविलें. पन्हाळ्यास जोहारनें शिवाजीला कोंडला असतां तो तेथून युक्तीनें निसटला व नंतर शाहिस्तेखानाच्या मागें लागला. उंबरखिंडीच्या लढाईत त्याच्या एका तुकडीचा धुव्वा उडवून कोंकणांत दाभोळ, चिपळूण, राजापूर, वगैरे ठिकाणीं शिवाजीनें लुटालूट आरंभिली. इंग्रजांनीं मोंगलांना मदत दिली म्हणून त्यांच्या वखारी शिवाजीनें मुद्दाम लुटल्या. सूर्यराव सुर्व्याचा पराभव करून शृंगारपूर घेतलें (१६६१). या वेळीं आदिलशाहीनें शिवाजीपुढें हात टेकून अंतःस्थ तह केला असावा.

नंतर पुण्याकडे परत येऊन शिवाजीनें शाहिस्तेखानाला आपल्या लालमहालांतून नामुष्कीनें पळून जाण्यास लाविलें. तेव्हां औरंगजेबानें जसवंतसिंग या मोठ्या नामवंत सरदाराची शिवाजीचें पारिपत्य करण्यासाठीं नेमणूक केली. इकडे शिवाजीनें त्याला न जुमानतां सुरत लुटली व अतोनात संपत्ति मिळविली. नंतर जसवंतसिंगालाहि कोंडाण्याचा वेढा उठवून जाण्यास भाग पाडलें. आतां जयसिंग व दिलेरखान या दुसऱ्या दोघां बड्या सरदारांना मोठ्या जमावानिशीं दिल्लीहून दक्षिणेंत पाठविण्यांत आलें. याच वेळीं विजापूरकरहि तह मोडून शिवाजीवर उलटले. पण शिवाजीनें कुडाळ प्रांताच्या स्वारींत खवासखानाला पिटाळून लाविलें व फिरुनी बाजी घोरपड्याला ठार केलें. वेंगुर्लें व हुबळी हीं शहरें लुटून नंतर शिवाजी बसनूरला गलबतांतून गेला व गोकर्ण–कारवारवरून परत आला (१६६५).

इकडे जयसिंग–दिलेरखान यांनीं पुरंदरच्या भागांत मोठा तळ देऊन शिवाजीला अगदीं नेस्तनाबूद करण्याचा घाट घातला. हा घाट तिढीस जाईल असें पाहून शिवाजीनें नमतें घेऊन त्यांशीं तहाचें बोलणें केलें. तहाप्रमाणें बरेच किल्ले परत केले व जयसिंगाच्या सांगण्याप्रमाणें आग्र्यास औरंगजेबाच्या भेटीस जाण्याचें पत्करलें. आग्र्यास संभाजीसह गेला असतां, तेथें दरबारांत बादशहानें अपमान केला म्हणून शिवाजी चिडून कांहीं बोलला. तेव्हां औरंगजेबानें त्याला नजरकैदेंत ठेवलें. या नजरकैदेंतून त्यानें कशी सुटका करून घेतली हें सुपरिचित आहेच. या अद्‌भुत प्रसंगावर अनेक नाटकें व आख्यानें झालीं आहेत.

रायगडास परत आल्यावर शिवाजीनें बादशहाशीं सलोखा केला; पण पुढें औरंगजेब ठरल्याप्रमाणें वागला नाहीं म्हणून पुन्हां मोंगलांशीं युद्धास सुरवात झाली. तेव्हां शिवाजीनें मोंगलांना दिलेले किल्ले परत घेतले. सिंहगड घेतांना त्याचा अत्यंत शूर सरदार तानाजी मालुसरे पडला. त्यानें पुन्हां सुरत लुटली व मोंगल सरदारांना ठिकठिकाणीं जेरीस आणलें. तेव्हां शिवाजी हा मोंगल बादशहाचा वरचढ प्रतिस्पर्धी असें जाणून गोवळकोंडेकरांनीं मोंगलांविरुद्ध त्याच्याशीं तह केला (१६७२). विजापूरकरांनीं पुन्हां डोकें वर काढलें तेव्हां त्यांनाहि चांगला हात दाखविला. याप्रमाणें दक्षिणेंत तो अजिंक्य बनला.

या अजिंक्यपदाची खूण म्हणून त्यानें आपणास रायगडीं ज्येष्ठ शु. १३, शके १५९६ (६ जून १६७४) या दिवशीं राज्याभिषेक करवून घेतला. जिजाबाईनें मुलाचें सम्राट्‌पद पाहिल्यानंतर लवकरच देह ठेवला. यानंतर खानदेश, गोंवें, कारवार या प्रांतांवर अंमल बसविण्यासाठीं स्वाऱ्या करून तो कर्नाटकाच्या मोहिमेवर निघाला (१६७६). कुत्बशहानें त्याचा मोठा सत्कार केला. पुढें जिंजी घेऊन त्यानें आपला सावत्र भाऊ व्यंकोजी नीट वागत नाहीं हें

पाहून, धाकासाठीं त्याच्याजवळ राज्याचा हिस्सा मागितला. त्याची समजूतहि केली, तथापि तो कपटानें पळून गेला; तेव्हां आपल्या कांहीं सरदारांना त्याच्या बंदोबस्तासाठीं ठेवून शिवाजी परत आला. तो इकडे पुन्हां दिलेरखान हा मोंगल सरदार चाल्न आलेला दिसला. पण शिवाजीनें दाक्षिणात्यांची एकजूट करावी या हेतूनें विजापूरकरांच्या बाजूनें मोंगलांशीं सामना दिला. पुत्र संभाजी मोगलांकडे पळून गेला होता तो परत आला. राजारामाची मुंज व लग्न करून टाकून आपल्यामागें राज्याची कांहीं व्यवस्था करण्याच्या विचारांत शिवाजी असतांनाच दूषित तापानें त्याचा रायगडीं अंत झाला ( चैत्र पौर्णिमा, शके १६०२; ३ एप्रिल १६८० ).

शिवाजीला त्या वेळच्या चालीरीतीप्रमाणे बऱ्याच बायका होत्या. पण मुलगे दोनच होते : संभाजी व राजाराम. पांचसहा मुली होत्या, पण त्या फारशा प्रसिद्ध नाहींत. शिवाजीच्या जिवाला जीव देणारे शूर सरदार व मुत्सद्दी, तसेंच रामदासस्वामीसारखे गुरु यांचीं चरित्रें या कोशांत स्वतंत्र दिलेलींच आहेत. तसेंच त्याच्या राज्यकारभाराचें स्वरूप ठिकठिकाणीं दिग्दर्शित केलेलेंच आहे. शिवाजीची अतुलनीय अशी कर्तबगारी, हुशारी व उज्ज्वल चारित्र्य महाराष्ट्राला तरी विशेष सांगण्याचें कारण नाहीं. लहानपणापासूनच मुलांना त्यांची माहिती असते. महाराष्ट्राचें राजकीय दैवतच शिवाजी आहे. त्याची ओळख महाराष्ट्र विसरूं शकणें असंभवनीयच आहे. उलट आतांच्या पुन्हां लाभलेल्या स्वराज्यकालांत या श्रेष्ठतम नेत्याची स्मृति जागृत ठेवणेंच अत्यंत इष्ट आहे.

शिवाजीच्या एकंदर चरित्रावरून त्याचे अलौकिक गुण चांगले दृष्टोत्पत्तीस येतात. योद्धा म्हणून त्याच्या तोडीचा त्या काळांत दुसरा कोणी दिसत नाहीं. अगदीं आणीबाणीच्या प्रसंगींहि तो पुढें असे व आलेल्या संकटांतून मोठ्या युक्तीनें मार्ग काढी. तो सर्व देशभर हिंडला व सर्व मुलुखाची त्यानें माहिती करून घेतली. तो मातृपितृभक्त होता, एवढेंच नव्हे तर सर्व स्वजनांची तो चिंता वाही. आपला धर्म त्याला अत्यंत प्रिय असून त्याच्या प्रतिष्ठेसाठीं तर त्यानें तरवार हातीं धरली होती. तथापि तो परधर्मांतील साधूंचा व पुण्यक्षेत्रांचा मान ठेवी. त्यांना त्यानें देणग्याहि दिलेल्या आहेत. त्याची बुद्धिमत्ता तर विलक्षण होती. राज्यव्यवस्थेचे त्याचे नियम पाहतां आजहि त्यांचें यथार्थत्व पटतें. त्याची अष्टप्रधान संस्था व महसूलपद्धति ही अगदीं नवीनच होती. तसेंच त्यानें उभारलेलें लष्कर लहानसेंच पण मोठें कार्यक्षम असे. भारताच्या इतिहासांत त्याच्या लष्करी कारभारास तोड मिळणार नाहीं; त्याची तुलना अर्वाचीन पाश्चात्य कारभाऱ्यांशींच करावी लागेल. किल्ल्यांचें महत्त्व ओळखून त्यानें बरेच नवे किल्ले बांधले व जुने दुरुस्त केले. त्यानें चांगलें आरमारहि तयार ठेवलें होतें. तसेंच त्यानें विद्या आणि कला यांनाहि उत्तेजन दिल्याचें आढळेल. त्याच्या हयातींतच परमानंद कवीनें 'शिव-भारत' रचिलें आहे. त्याच्या दरबारीं भूषणासारखा हिंदी कविहि होता. परिभाषेचा फारसी-संस्कृत कोश त्यानें तयार करविला. अग्न्यस्त्रांचें महत्त्व ओळखून पुरंदरला त्यानें तोफा ओतण्याचा एक कारखानाहि काढला होता.

शिवाजीच्या व त्याच्या पूर्वींच्याहि काळांत महाराष्ट्रांतील लोकांत देशासाठीं त्याग आणि सेवा करण्याची मुळींच भावना नव्हती. जो पोटाला देईल त्याच्याशीं एकनिष्ठ व प्रामाणिक राहावयाचें एवढेंच त्यांना माहीत. त्यामुळें शिवाजीचे बरेच ज्ञातभाई मुसलमानांच्या चाकरींत असून ते शिवाजीच्या स्वराज्य-स्वातंत्र्य-स्थापनेच्या कार्याला मोठा विरोध करीत होते. तेव्हां शिवाजी आणि रामदास यांनीं मराठ्यांत राष्ट्रीयत्व निर्माण केलें व महाराष्ट्रधर्माची त्यांना शिकवण दिली. ही शिवाजी-रामदास यांनीं चेतवून दिलेली राष्ट्रीय भावना, औरंगजेबानें संभाजीच्या वधानंतर महाराष्ट्राचें स्वातंत्र्य बुडविण्याचा आटोकाट प्रयत्न केला असतांहि तें टिकलें, यांत उत्कटत्वानें दिसून येते. वीरवृत्तीची जोपासना शिवाजीनें जी केली ती पुढे साम्राज्यास उपयोगी पडली. मराठ्यांनीं अटकेवर झेंडे नेले ते यामुळेंच. स्वधर्म आणि स्वराज्य यांच्या स्थापनेमुळें महाराष्ट्राला भारतांत पूर्वीं नव्हतें तें श्रेष्ठ स्थान लाभलें व त्याचा फायदा अद्यापिहि होत आहे, यांत संशय नाहीं.

**शिवाजी ( धाकटा )** ( १६९६-१७१२ )—कोल्हापूरचा पहिला छत्रपति. हा राजारामाचा मुलगा. राजारामाच्या मृत्यूनंतर गादीवर बसला. पण १७०७ मध्यें शाहू परत आल्यावर याला तुरुंगांत टाकून याचा सावत्र भाऊ संभाजी याला पन्हाळ्यास दुसरी गादी स्थापून तींवर बसविण्यांत आलें. हा कैदेंतच १७१२ सालीं वारला. हा वारला तेव्हां याची राणी भवानीबाई गरोदर होती. तिच्या पोटीं जो मुलगा झाला तोच ( रामराजा ) पुढें शाहूनंतर साताऱ्याच्या गादीवर बसला.

**शिवाजी विठ्ठल विंचूरकर** ( मृ. १७९४ )—पेशवाईंतील एक सरदार व प्रसिद्ध विठ्ठल शिवदेवाचा पुत्र. सन १७६७ मध्यें यास सरदारकीचीं वस्त्रें मिळालीं. यानंतर सन १७६९ मध्यें यानें इतर सरदारांच्या साहाय्यानें उत्तर हिंदुस्थानांत जाऊन रोहिल्यांचा पराभव केला. सन १७८३ मध्यें महादजी शिंद्याचा रजपुतांशीं लढा झाला त्यांत महादजीस माघार घ्यावी लागली व रजपुतांनीं महादजीच्या सैन्याचा पाठलाग सुरू केला. या वेळीं महादजीनें यास आपल्या मालकाच्या कीर्तीस पराभवाचा कलंक लागूं पाहत आहे, तो टाळण्यासाठीं आपलीं खाजगी वितुष्टें बाजूस ठेवून मदत द्यावी, अशी विनंति केली. यानें ती मान्य करून रजपुतांचा हल्ला परतवला. या प्रसंगापासूनच या दोघांमधील गैरसमज दूर झाले. महादजी यास काका या नांवानें हांक मारीत असे. यानें प्रयागला

यमुनेच्या पलीकडे रामेश्वराच्या नजीक वेणीमाधवाचें मंदिर, मथुरेस राधामाधवाचें मंदिर व नरसिंगपुरला नरसिंहाच्या देवालयाचा गाभारा बांधला.

**शिशाचें विष**—( लेड-पॉयझनिंग ). शिसें व शिशाचीं संयुक्त द्रव्यें यांचें काम करणाऱ्या कामगारास हा रोग होतो. सामान्यतः यापासून पुढील विकार उत्पन्न होतात: रक्तक्षय, अशक्तता, पोटदुखी, मूत्राशयविकार, मज्जातंतुरोध, वगैरे. यामध्यें हिरड्यांवर एक प्रकारची निळी रेघ दिसूं लागते. हा विषार होऊं नये म्हणून अलीकडे कायदे करण्यांत आले आहेत.

**शिशुकाव्य**—"शिशूच्या भावना, त्याची मनोरचना लक्षांत घेऊन, केव्हां त्याच्या भाषेंत, केव्हां प्रौढ भाषेंत मांडून प्रौढालाहि त्याविषयीं विचार करावयाला लावील, किंवा त्याच्या खोल भावनांना जागृत करील असें काव्य उच्च 'शिशुकाव्य' म्हणतां येईल", अशी व्याख्या प्रा. रा. श्री. जोग यांनीं 'गेल्या तीस वर्षांतील मराठी काव्य' या लेखांत केली आहे ( मराठी साहित्य, १९१४ ते १९४४ ). लहान मुलांच्यासाठीं म्हणून निघणाऱ्या मासिकांतून व पुस्तकांतून जीं अनेक बालगीतें म्हणून दिलेलीं असतात तीं बहुधा बालांच्या उपयोगी नसतात. बरींच अभिनयगीतेंहि शिशुकाव्यांत बसणार नाहींत. पण प्रा. माधवदेव या शिशुकाव्यलेखनांत अग्रेसर आहेत. श्री. भ. श्री. पंडित, श्री. ग. ह. पाटील व दुसरे कांहीं कवीहि या क्षेत्रांत प्रसिद्ध आहेत. तथापि, अद्यापि शिशुकाव्याची प्रथमावस्था आहे असें म्हणावें लागतें. पाश्चात्य देशांत शिशुकाव्याला मोठें महत्त्व देऊन बालशिक्षणमंदिरांतून त्याचे पाठ देतात. शिशुकाव्यांत यमक-प्रास या अलंकारांबरोबरच गतिदर्शक व ध्वन्यनुकारी शब्दांचें बाहुल्य लागतें. हीं मुलांचीं गाणीं छोटीं छोटीं असून त्यांच्या नेहमींच्या जीवनांतील गोष्टी त्यांत आल्या पाहिजेत. क्लिष्ट शब्दयोजना व अपरिचित घटना मुळींच उपयोगी नाहींत. ( बालवाङ्मय पाहा ).

**शिशुपाल**—दमघोष राजाचा पुत्र व चेदि देशाचा राजा. कृष्णाच्या आतेचा हा मुलगा. कृष्णाच्या हातून हा मृत्यु पावेल असें याचें भविष्य होतें. तेव्हां त्याच्या आईच्या विनंतीवरून कृष्णानें याचे शंभर अपराध क्षमा करण्याचें तिला वचन दिलें होतें. यालाच रुक्मिणी द्यावयाची असें तिच्या भावानें ठरविलें होतें. पण कृष्णानेंच तिचें हरण केलें. हा कौरवांकडे असे. धर्माच्या राजसूययज्ञाच्या वेळीं कृष्णानें यास शंभर अपराध भरले असें दाखवून सुदर्शन चक्रानें ठार केलें.

**शिसव**—हें उत्कृष्ट इमारती लांकडाचें झाड आहे. शिसव जून होण्यास चाळिसांवर वर्षें लागतात. पण जून झालें म्हणजे लोखंडासारखें मजबूत होतें. लांकडाचा रंग काळा असून या लांकडास वाळवी लागत नाहीं. कांतीव काम यावर चांगलें होतें. याच्या खुर्च्या, कपाटें, पाट, पलंग, वगैरे करतात. फार महाग पडत असल्यानें बांधकामासाठीं फारसें वापरीत नाहींत.

छोटा नागपूर, अयोध्या, मध्यप्रदेश, सह्याद्रि प्रदेश व दक्षिण हिंदुस्थान या भागांतून हीं झाडें होतात. या झाडाची उंची सरासरी ८० फूट असून त्याच्या बुंध्याचा परिघ १२ ते १५ फूट असतो. हें लांकूड कर्नाटक, मलबार, त्रावणकोर येथील अरण्यांतून मुंबई, काठेवाड, कच्छ, कराची, लंडन, हार्वे, हॅंबर्ग व चिनी बंदरांतहि नेण्यांत येतें. हिंदुस्थानांत या लांकडाचें फळ्या, तजविरीच्या चौकटी, पेट्या, खोदीव खुर्च्या, टेबलें, वगैरे सामान करतात.

**शिळाछाप**—( लिथोग्राफी ). दगडावर ठसे उठवून त्यांपासून कागद वगैरेवर छापण्याच्या कलेस शिळाछाप म्हणतात. यामध्यें प्रथम एखादी आकृति शिळेच्या पृष्ठभागावर चरबीयुक्त द्रव्याच्या साहाय्यानें उठविण्यांत येते. या आकृतीच्या रेषांवर विशिष्ट रीतीनें तयार केलेली शाई चिकटून राहते. नंतर या शिळेवर पाणी टाकण्यांत येतें. त्यामुळें ज्या भागावर चरबीयुक्त द्रव्याच्या रेषा नसतात त्या भागावर शाई चिकटून राहत नाहीं व तो स्वच्छ राहतो. यानंतर या शिळेवर कागद ठेवून तो दाबांत घालून दाबण्यांत येतो; त्यामुळें ती शाई कागदास चिकटून येते. शिळाछापाचे उत्तम दगड बव्हेरियामधील केल्हीम येथें सांपडतात. शिळाछापाची शाई मेण, पांढरा साबण, चरबी, लाख, (मॅस्टिक), गोंद किंवा राळ व काजळी यांपासून बनविलेली असते. प्रथम शिळेवरच आकृति काढीत असत, पण अलीकडे कागदावर आकृति काढून ती शिळेवर उठविण्यांत येते.

**शिक्षण आणि शिक्षणशास्त्र**—शिक्षण दोन प्रकारांनीं मिळत असतें: एक शाळांतून व दुसरें आयुष्यांतील अनुभवांनीं. दुसरें हें सर्वांनाच आपोआप मिळतें, पण पहिलें मिळण्यास शाळा असणाऱ्या सुधारलेल्या देशांत असावें लागतें. अनुभवांनीं शहाणा झालेल्याला जर शालेय शिक्षण मिळालें असलें तर तो नुसत्या अनुभवी माणसापेक्षां जास्त वाक्चतुर व हुशार होतो, हें स्पष्टच आहे. तेव्हां माणसाच्या सुशिक्षणासाठीं शाळा या आवश्यक आहेत. व त्यांचा उपयोग चांगलाच होतो, हें सिद्ध झालेलें आहे. आज आढळून येणारी पाश्चात्य देशांतली बहुजनसमाजाची साक्षरता शाळांखेरीज दिसलीच नसती. जनतेत अत्यंत अल्प प्रमाणांतच निरक्षरता असणें हें बऱ्याच सुधारलेल्या व पुढारलेल्या राष्ट्रांचें वैशिष्ट्य असतें. झारशाहींत रशिया, बादशाही अमदानींत चीन व आतांपावेतों हिंदुस्थान हीं मोठमोठीं राष्ट्रें देखील शिक्षणाभावीं निरक्षरच म्हणावीं लागतील. आतां कोठें शिक्षणाचा प्रसार आपल्या अवाढव्य जनतेंत करण्याचा हीं राष्ट्रें प्रयत्न करीत आहेत. यांत रशिया बहुतेक यशस्वी झाला आहे.

लोकशाही वळणाचें शिक्षण देण्याकडे पहिल्या महायुद्धापासून प्रवृत्ति वाढत आहे. इंग्लंड आणि अमेरिका यांनीं या गोष्टींत विशेष लक्ष घातलें आहे. आज शिक्षणाचा दर्जा फार वाढला आहे. पूर्वी प्राथमिक शिक्षण घेतलेल्यांस पोटास भरभूर मिळत असे; पण आज त्यासाठीं जास्त शिकावें लागतें. जास्त जास्त शिकल्यानें जास्त जास्त पैसा मिळतो, असा अनुभव आहे. तेव्हां चैनींत राहण्यासाठीं अधिकाधिक शिक्षण घेण्याची माणसांत लालसा वाढत चालली आहे. पण या व्यावहारिक उपयोगासाठींच अधिक शिक्षण घ्यावयाचें नसतें. उच्च शिक्षणानें मानव संस्कृतीचीं नवीं क्षेत्रें अवलोकनांत येतात व सुशिक्षित आणि सुसंस्कृत माणूस आयुष्यांतील तथ्यांश असणाऱ्या गोष्टींचा उपभोग घेण्यास चांगला समर्थ होतो.

व्यक्तींतील सर्व शक्तींचा विकास शिक्षणानें होतो, त्यामुळें आजच्या कांहीं शाळांतून बौद्धिकाबरोबरच शारीरिक शिक्षणाचीहि तरतूद करण्यांत येत असते. विद्यार्थ्यांची निरनिराळ्या रोगांच्या वैद्यांकडून चांगली तपासणी होते व रोगी मुलांना उपचार करण्यांत येतात. कांहीं मोठाल्या शहरांतून गरीब विद्यार्थ्यांच्या खाण्यापिण्याचीहि फुकट किंवा थोडक्या पैशांत सोय केलेली असते. खेळण्याचीं मैदानें व व्यायामशाळा याहि गोष्टी अद्ययावत् सुधारलेल्या शाळांच्या व्यवस्थेंत येतात.

शिक्षणाच्या आधुनिक वळणांत व्यावहारिक आणि उपयुक्त अभ्यासक्रमावर फार भर दिलेला असतो. धंदेशिक्षणाच्या व विविध विषयांच्या शाळा, रात्रीच्या शाळा, बहिऱ्या-मुक्या-अंधळ्यांच्या शाळा, अध्यापनशाळा, इ. अनेक प्रकारच्या शिक्षणसंस्था निघाल्या आहेत. हे शिक्षणक्षेत्र आज जसें विस्तृत झालें आहे तसेंच विशिष्ट प्रकारांनींहि संपन्न आहे. त्यामुळें ज्ञानाच्या मार्गांत प्रत्येकाला वाट मिळते आहे. नसली तर मिळाली पाहिजे.

शिक्षण हे एक शास्त्र आहे, अशी समजूत प्रथम ग्रीक तत्त्वज्ञान्यांची दिसते. राज्य करण्यासाठीं माणूस तयार झाला पाहिजे, अशी प्लेटो, आरिस्टॉटल प्रभृति आचार्यांनीं शिक्षणपद्धति योजिली, याचें बहुंशीं कारण ग्रीक नगरराज्यें हीं गुलामांचीं राष्ट्रें होतीं. त्या वेळीं व्यायामाखेरीज व्याकरण आणि संगीत हीं प्राथमिक शिक्षणांत येत. यापुढे साहित्यशास्त्र, तर्कशास्त्र, गणित, ज्योतिष हे विषय आले. ग्रीक शिक्षणपद्धतीचा हेतु माणसाला तत्त्वज्ञानप्रवण करण्याचा असे, तर रोमन शिक्षणाचा हेतु माणसाला एकदम कार्यप्रवण करण्याचा असे. रोमन शाळा ओसरीवर भरत व मुलेंमुली एकत्रच बसत. सिसेरो, सेनेका आणि क्विन्टिलियन हे शिक्षणासंबंधीं लिहिणारे प्रमुख लेखक होत. पुढें ख्रिस्ती धर्म आणि उत्तरेकडील रानटी टोळ्यांची धाड येऊन रोमन साम्राज्य आणि त्यांतील चांगल्या गोष्टी नष्ट झाल्या. मठवासी संप्रदायाची शिकवण परमेश्वराशीं तादात्म्य पावण्याची असे. पुढें शार्लेमाननें पश्चिम युरोपांत रोमन पद्धतीवर शाळा सुरू केल्या. मध्ययुगांत पंडितो शिक्षणावरच भर फार; तर्कशास्त्र आणि अध्यात्मविद्या हे शिक्षणाचे विषय असत. तथापि या 'स्कूलमेन' तत्त्वज्ञानाच्या काळांतहि बिशप ग्रॉसेटेस्ट आणि रॉजर बेकन (१२१४–१२९४) सारखे भौतिक शास्त्रज्ञ आणि विश्वविद्यालयें उत्पन्न झालीं होतीं. ज्याप्रमाणें धर्मांत सुधारणा करण्याची चळवळ युरोपांत निघाली, त्याचप्रमाणें नुसत्या शाब्दिक शिक्षणाविरुद्धहि चळवळ फ्रान्समध्यें मॉन्टेन्य, इंग्लंडांत ब्रिन्स्ले आणि हूल, व इतर राष्ट्रांत राट्के आणि कॉमेनिअस यांनीं सुरू केली. मिल्टननें 'ट्रॅक्टेट' हा अत्यंत नांवाजलेला शिक्षणावरचा ग्रंथ प्रसिद्ध केला. १६९३ मध्यें लॉकचा 'शिक्षणासंबंधीं विचारां'चा ग्रंथहि बाहेर पडला. त्यानें शिक्षणासंबंधी नवे विचार मांडले व ते फ्रान्समध्यें रूसोनें उचलून 'एमिल' सारखे शैक्षणिक ग्रंथ लिहिले. त्याच्या लिहिण्याचा परिणाम फार झाला व पेस्टॅलोझी या स्विस शेतकरी शिक्षकासारखा शिष्यसंप्रदाय वाढला. फ्रोबेल हा पेस्टॅलोझीचा भक्त, त्यानें अगदीं लहान मुलांसाठीं बालोद्यानपद्धति (किंडरगार्टन) काढली. हर्बर्ट या जर्मन तत्त्वज्ञान्यानें पेस्टॅलोझीच्या प्रसिद्ध ग्रंथावर भाष्यें लिहून शिक्षणामध्यें निरीक्षणशक्तीचें असलेलें महत्त्व पटवून दिलें. त्याची 'ईस्थेटिक रिव्हिलेशन ऑफ दि वर्ल्ड' आणि 'जनरल पेडॅगॉजी' हीं पुस्तकें निघालीं. १९ व्या शतकांत राष्ट्रांच्या राज्यकर्त्यांनाहि शिक्षणशास्त्राची उपयुक्तता पटून शिक्षणांत सुधारणा होऊं लागल्या. सक्तीच्या शिक्षणाचे कायदे झाले व मोठमोठ्या शिक्षणसंस्था निघाल्या. गेल्या शतकाच्या उत्तरार्धांत निघालेल्या शिक्षणावरील महत्त्वाच्या ग्रंथांत हर्बर्ट स्पेन्सर आणि प्रो. बेन यांच्या ग्रंथांना प्रमुख स्थान द्यावें लागेल. अलीकडे मानववंशशास्त्र, शारीरशास्त्र आणि मानसशास्त्र यांच्या प्रायोगिक आणि सैद्धान्तिक अभ्यासांत जी वाढ झाली तीमुळें शिक्षणशास्त्राच्या प्रयोगांना आणि सिद्धान्तांनाहि मोठा जोर सांपडला. बालमानसशास्त्राचे प्रयोग डार्विनसारख्यांनीं चालविले व नवीन शिक्षणपद्धती शोधून काढल्या. 'ह्युरिस्टिक पद्धती'त मुलेंच आपली मूळ संशोधक बनून शिकतात. याला 'क्रीडापद्धति' असेंहि नांव मिळालें आहे.

फ्रोबेलचीं अभ्यासाचीं खेळणीं बालोद्यानपद्धतींत देणग्या म्हणून दिसतात, तर डॉ. मॉंटेसोरीनें बालमानसशास्त्रानुसार मुलांना स्वतःचेच शिक्षक बनविलें आहे. अमेरिकेंत मुलांचें बौद्धिक सामर्थ्य किती हें काढण्याची युक्ति बिनेटनें शोधून काढली. डाल्टन पद्धतींत, शाळेचें वेळापत्रक निरुपयोगी ठरलें आहे, व विद्यार्थ्यांनीच आपले कच्चे विषय केव्हां पक्के करावयाचे हें ठरवावें व वाटेल त्या वेळांत त्यांचा अभ्यास करावा, असें सांगितलें आहे. शिक्षकानें फक्त

विद्यार्थ्याला जरूर लागेल तेव्हां साहाय्य करावें. याप्रमाणें शिक्षणशास्त्रांत पद्धतीसंबंधीं नवे नवे विचार येत आहेत. शिक्षकानें कसें शिकवावें या संबंधींहि अध्यापनशास्त्र (पाहा) तयार झालें आहे.

हिंदुस्थान—हिंदुस्थानांत पूर्वी ब्राह्मणवर्गालाच फक्त अध्ययन आणि अध्यापन हीं दोन कर्मे करावीं लागत. तथापि शिक्षणशास्त्रावर प्रत्यक्ष ग्रंथ असा नाहीं. शिक्षण दोन प्रकारचें : सांस्कृतिक आणि व्यावसायिक. दुसरें (व्यावसायिक) ब्राह्मणेतर वर्गांत परंपरेनें दिलें जाई. मंत्रद्रष्टे ऋषी, ऋत्विज्, सूत्रकार, स्मृतिकार, व्याकरणकार, भाष्यकार, इ. शिक्षकच होत. आपल्या गुरुकुलांत ते शिष्य घेऊन शिकवीत. पाठांतरपद्धति प्रमुख होती. तिच्यानंतर प्रश्नोत्तरपद्धति सांगतां येईल. नंतर पृथक्करणपद्धति, नंतर मीमांसापद्धति, व कथन-कीर्तन-पुराण-याज्ञिक (प्रायोगिक) यांसारख्या शिक्षणपद्धती दिसून येतात. प्राचीन काळीं विद्यापीठेंहि अनेक होतीं. तक्षशिला, वाराणशी, नालंदा, इ. चीं नांवें प्रसिद्ध आहेत. (विद्यापीठ पाहा).

औद्योगिक शिक्षण त्या त्या जातींतून परंपरेनें मिळे. बौद्ध कालांत धंदेशिक्षण वाढलेलें दिसतें. पुढें कलांची संख्या ६४ पर्यंत गेली. क्षत्रियांना लष्करी शिक्षण मिळे. पुराणकालीं गुरुगृहीं राहून त्रैवर्णिकांच्या मुलांना शिक्षण मिळे. हें शिक्षण धार्मिक आचरणाचाच एक विषय म्हणून देण्यांत येई. धंदेशिक्षण धंदेवाईक जातींच्या मुलांना घरींच अनुभवानें मिळे व धंद्याचें उच्च शिक्षण ब्राह्मण त्यांना ग्रंथांवरून देत. स्त्रीशिक्षण महाभारतकालापर्यंत बरेंच सुधारलेलें होतें, असें गार्गी, मैत्रेयी, वाचक्नवी, इ. विदुषींच्या उदाहणांवरून दिसून येईल. स्त्रियांनाहि ललितकलांचें शिक्षण मिळे.

मुसलमानांमध्यें शिक्षण मशिदींत मौलवींकडून मिळे. पण तें बहुधा धार्मिक असे. मुसलमानी बादशहा बहुतेक चांगले बहुश्रुत व शिक्षणाची आवड असलेले दिसतील. शहाजहानचा मुलगा दारा हा तर चांगला ग्रंथकार होता. औरंगजेबहि कमी विद्वान् नव्हता.

मराठेशाहींत शहाजी–शिवाजी यांच्या दरबारीं चांगले पंडित असत, हे 'राधामाधवविलासचंपू', 'शिवभारत', इ. ग्रंथांवरून दिसून येईल. शिवाजी निरक्षर होता हें आतां इतका पुरावा पुढें आला असतां कोणीहि म्हणूं शकणार नाहीं. शाहूच्या कारकीर्दीचा उत्तरार्ध म्हणजे बाळाजी विश्वनाथ, थोरला बाजीराव व नानासाहेब पेशवा यांच्या कारकीर्दीचा अत्यंत महत्त्वाचा काळ. हे तिन्ही पुरुष शौर्यशाली व राजकारणकुशल असून त्यांना विद्याभिरुचिहि चांगली होती. त्यामुळें त्यांच्या हातून विद्वान् लोकांस चांगलें उत्तेजन मिळून एकंदर लोकसमाजामध्यें विद्येविषयीं बरीच गोडी उत्पन्न झाली, आणि राजदरबारांतहि समशेरीप्रमाणेंच लेखणीचेंहि महत्त्व वाढलें. त्यामुळें रणशूर योद्ध्याप्रमाणेंच लेखनकुशल कारकूनहि प्रसिद्धीस येऊं लागले. अर्थात् ही स्थिति घडवून आणण्यास पुष्कळांशीं राजाश्रय हाच कारण झाला. (फड पाहा).

पेशव्यांच्या कारकीर्दीपासून उत्तम हस्ताक्षर हा कारकुनांचा मुख्य गुण बनल्यामुळें सर्व पांढरपेशा लोकांचीं मुलें लिहिण्यावाचण्यांत विशेष तरबेज झालीं. त्यामुळें या कालापासून लोकसमाजाची प्रवृत्ति विद्यासंपादनाकडे अधिक होऊं लागली; आणि मराठी लेखनपद्धति व भाषा यांवर त्याचा इष्ट परिणाम घडून आला. खुद्द पेशव्यांचीं मुलें हीं बहुश्रुत व चाणाक्ष निपजून त्यांनाहि विद्येची गोडी उत्पन्न झाली.

थोरला बाजीराव पेशवा हा स्वतः विद्वानांचा चहाता होता व त्यानें गुणी पुरुषांचा परामर्ष चांगला घेतला. त्याच्या आश्रयानें निरंजन माधव नामक एक कर्नाटकांतील कवि प्रसिद्धीस आला. ह्या कवीनें आपल्या एका काव्यामध्यें बाजीराव पेशव्याची कृतज्ञ अंतःकरणानें स्तुति केली आहे.

बाजीरावाचा थोरला पुत्र नानासाहेब हाहि चतुर, राजकारणप्रवीण आणि रसिक होता. यानेंहि आपल्या कारकीर्दीत विद्वानांचा परामर्ष घेतला. नानासाहेबाप्रमाणें त्याच्या वेळचे राजे लोक व संस्थानिक हेहि गुणग्राही होते, असें निरंजन माधवानें अनुभवानें लिहिलें आहे. नानासाहेबाच्या कारकीर्दीमध्यें पुष्कळ विद्वान् पुरुष आणि कवी उदयास आले. त्यांत मोरोपंताचा उल्लेख करणें अवश्य आहे. मोरोपंत हा बाबूजी नाईक बारामतीकर याच्या आश्रयानें आपल्या अपूर्व काव्यरसाचा महाराष्ट्रीयांस लाभ देण्यास समर्थ झाला. त्यानें आपल्या ह्या रसिक व गुणग्राही यजमानाची आपल्या ग्रंथांमध्यें केलेली स्तुति प्रसिद्धच आहे.

थोरला माधवराव व सवाई माधवराव यांच्या कारकीर्दीत विद्वान्, पंडित, कवि, शाहीर, वगैरे अनेक लोक निर्माण झाले; व त्यांनीं आपल्या वाणीच्या दिव्य प्रभावानें आणि विद्वत्तेच्या अपूर्व तेजानें महाराष्ट्र देशास सुप्रकाशित केलें. पेशवे, त्यांचे सरदार व त्यांचे मुत्सद्दी यांच्याकडून बुद्धिमान लोकांस पुष्कळ उत्तेजन मिळालें. त्यांच्या आश्रयामुळें महाराष्ट्रांत विद्या व वाङ्मय यांची चांगली अभिवृद्धि झाली, असें मानण्यास कोणतीच हरकत नाहीं.

पेशव्यांच्या कारकीर्दीत विद्योत्तेजनाचें कार्य अनेक प्रकारांनीं व अनेक रूपांनीं सिद्धीस गेलें. त्यांमध्यें मुख्यत्वेंकरून श्रावणमासाची दक्षिणा ही पुरातन संस्था विद्वान् पंडितांस व शास्त्री लोकांस उत्तेजन देण्यास विशेष कारणीभूत झाली. या दक्षिणेचा मुख्य उद्देश विद्योत्तेजन हाच होता. लांबलांबचे पंडित व गुणी जन या दक्षिणेसाठीं पुण्यास येत व राहत. या दक्षिणेची रक्कम कित्येक लाखांपर्यंत चढली होती. पेशवाईनंतर एल्फिन्स्टननें या दक्षिणानिधीचा उपयोग संस्कृत कॉलेज काढण्यासाठींच केला, हें योग्यच झालें. पुढें ब्रिटिश अमदानींत सरकारनें पाश्चात्य शिक्षण खातें उघडलें व शिक्षणाच्या पद्धतींत अनेक प्रयोग केले. पण जनतेंत साक्षरता फारशी वाढली राष्ट्रोन्नतीला पोषक असें शिक्षण मिळालें नाहीं.

शिक्षणाच्या पद्धतीचा अंगीकार केला आहे, पण तिला अद्यापि चांगलें मूळ धरलें गेलें नाहीं.

**शिक्षा**—हा वेदांग ग्रंथ अगदीं लहान आहे. त्यांत साठ श्लोक आहेत. हा पाणिनीच्या मतास अनुसरून रचलेला आहे. पण हा ग्रंथ बराच अर्वाचीन असावा, असें दिसतें. शिक्षेंत वर्णोच्चार कसे करावेत, ह्याविषयीं नियम व माहिती दिली आहे. स्वर आणि व्यंजनें मिळून वर्ण होतात. स्वर हे अनुदात्त, उदात्त किंवा स्वरित असतात. हा भेद त्यांच्या उच्चारावर अवलंबून आहे. त्याचप्रमाणें स्वर उच्चारण्यास जो काळ लागतो त्यावरून ते ऱ्हस्व, दीर्घ, किंवा लुप्त होतात. यावरूनच त्या स्वरांत मात्रा किती आहेत, हें समजतें. वर्णांचे निरनिराळे वर्ण यांत सांगितले आहेत. ह्यालाच प्रयत्न म्हणतात. भरभर, अडखळत, अस्पष्ट उच्चार करणें, रेंगाळणें, हेल काढणें, मान हालवणें, इत्यादि उच्चारणांतील दोष सांगून माधुर्य, अक्षरांचा स्पष्टोच्चार, इत्यादि गुण सांगितले आहेत. याप्रमाणें वर्णोच्चाराविषयीं माहिती शिक्षेंत दिली आहे. याचे अकरा अध्याय आहेत. विषयप्रतिपादनावरून ह्याचीं पांच खंडें होतात. शिक्षा ग्रंथ सर्व वेदांस साधारण आहे, तथापि प्रत्येक वेदासंबंधानें या विषयावर दुसऱ्या मुनींनीं प्रतिशाख्यें लिहिलीं आहेत.

**शिक्षा**—फौजदारी खटल्यांत गुन्हेगाराला जें शासन होतें त्याला शिक्षा म्हणतात. या शिक्षांचे प्रकार आणि प्रमाण फौजदारी कायद्यांत सांगितलेले असते. इंग्लंडांत फौजदारी गुन्ह्यांना शिक्षा होतात त्या—(१) फांशी, (२) सक्त मजुरीची कैद, (३) साधी कैद, (४) एकांतवासाची कैद, (५) रेफर्मेटरी किंवा इंडस्ट्रियल स्कूलमध्यें बालगुन्हेगारांना ठेवणे, व (६) दंड, आणि फटके मारणें. पूर्वी हद्दपारीची शिक्षा (ट्रॅन्स्पोर्टेशन) देत असत. पण १८५७ पासून ती रद्द करण्यांत आली. त्याऐवजीं हल्लीं हयातीपर्यंत सक्तमजुरी (पीनल सर्व्हिट्यूड) ही शिक्षा देण्यांत येते. कैदेच्या शिक्षेचे तीन प्रकार आहेत—(१) पहिल्या वर्गीतील कैद्यांना त्यांचें स्वतःचें खाद्यपेयपदार्थ व कपडे घेण्याची परवानागी असते. व त्यांचा स्वतःचा नेहमीचा उद्योगधंदा करण्याची त्यांना परवानगी असते. (२) साधी कैद–या वर्गीतील कैद्यांना दररोज ८॥ तास सुतारकी वगैरे कांहीं काम करावें लागतें. आणि सशक्त कैद्यांना खडी फोडणें वगैरे कामें करावीं लागतात. (३) सक्तमजुरीची शिक्षा भोगणाऱ्या कैद्यांना दररोज १० तास काम पहिले २८ दिवस करावे लागतें. दुसऱ्या व तिसऱ्या वर्गीतील प्रत्येक कैद्याला निरनिराळ्या खोलींत ठेवण्यांत येतें. फटक्यांची शिक्षा करतांना १६ वर्षांच्या आंतील गुन्हेगाराला बर्च नांवाच्या झाडाच्या काठीनें फटके मारण्यांत येतात, आणि २५ फटक्यांहून अधिक फटके मारण्याची मनाई असते. १६ वर्षांहून अधिक वयाच्या गुन्हेगारांना जास्तींत जास्त ५० फटके मारतां येतात. ही शिक्षा सांगतांना न्यायाधीशाला फटक्यांची संख्या व फटके मारण्याचें साधन निकालपत्रांत नमूद करावें लागतें.

हिंदुस्थान—इंडियन पीनल कोडांत फांशी, जन्मठेप कैद, सक्तमजुरीची कैद, साधी कैद, दंड आणि फटके इतके शिक्षांचे प्रकार आहेत. १९०९ सालच्या फटक्यांच्या कायद्याप्रमाणे १६ वर्षें वयाहून कमी वयाच्या गुन्हेगाराला १५ फटक्यांहून अधिक फटके मारूं नये (कलम ७); व अशा गुन्हेगाराला इतर शिक्षांऐवजीं फटक्यांची शिक्षा द्यावी (कलम ५). अधिक वयाच्या गुन्हेगारांना जबरी संभोग, अनैसर्गिक गुन्हा, दरोडा, वगैरे गुन्ह्यांकरितां, इतर शिक्षा देऊन शिवाय फटक्यांची शिक्षा द्यावी (कलम ४). १८९७ सालचा 'रेफर्मेटरी स्कूल्स ॲक्ट' झाला आहे. तदनुसार १५ वर्षें वयाच्या आंतील बालगुन्हेगारांना कैदेऐवजीं अशा शाळेंत किमान तीन वर्षें व कमाल ७ वर्षें ठेवण्याचा हुकूम कोर्टानें करावा (कलम ८). अशा रेफर्मेटरी शाळा प्रांतिक सरकारनें चालवाव्या (कलम ५).

**शीअरर नॉर्मा** (१९०४–    )—ही कानडा देशांतील एक नटी अमेरिकन संयुक्त संस्थानांत येऊन पुष्कळच प्रसिद्धि पावली. तिनें अनेक चित्रपटांत कामें केलीं असून त्यांपैकीं 'दि बॅरेट्स ऑफ दि विम्पोल स्ट्रीट', 'इडियट्स डिलाइट', 'मेरी आन्त्वानेत', आणि 'दि वीमेन' हे प्रसिद्ध आहेत.

**शीख**—हिंदुस्थानांतील एक धर्मपंथ. या धर्माचे अनुयायी मुख्यतः पंजाब, संयुक्तप्रांत, सिंध, जम्मू, काश्मीर, इत्यादि प्रांतांत आहेत. यांची संख्या (१९२१ साल) सुमारें २९ लक्ष आहे. शीख या शब्दाचा मूळ अर्थ शिष्य असा आहे. या पंथाचा उत्पादक नानक (पाहा) यानें हें नांव या पंथाला दिलें. (१) सर्वांचा एकच देव असून हिंदूंचा देव निराळा, मुसलमानांचा निराळा, हें म्हणणें खोटें आहे; (२) मूर्तिपूजा गर्ह्य आहे; (३) परमेश्वरप्राप्तीला जातिभेद आड येत नाहीं; इत्यादि शिकवण नानकानें लोकांना दिली. नानकाच्यामागून शीख धर्माचे एकंदर ९ गुरु झाले ते—अंगद, अमरदास, रामदास, अर्जुनमल्ल, हरगोविंद, हरराय, हरकिशन, तेघबहादर व गुरुगोविंदसिंघ. अंगदनें गुरुमुखी लिपि तयार केली; रामदासनें अमृतसर येथें सुवर्णमंदिर बांधलें (१५७७). हेंच शिखांचें धर्मक्षेत्र आहे. गुरु अर्जुनानें नानकाची व आपल्यामागील धर्मगुरूंचीं सर्व वचनें एकत्र करून ग्रंथसाहेब उर्फ शीख धर्माची गीता तयार केली. जहांगीर, शहाजहान व औरंगजेब यांनीं शीखांना त्रास दिल्यामुळें हरगोविंद गुरूनें आपलें शीख सैन्य बनवून मोंगल बादशहांना मोठ्या धैर्यानें टक्कर दिली. तेव्हांपासून शीखधर्म क्षात्रप्रधान बनला.

कोणाहि माणसाला पंथाची दीक्षा घेऊन शीख होतां येतें. पण असे दीक्षा घेतलेले कित्येक लोक जुनेच धार्मिक आचार पाळतात. या पंथांत बरेच पोटभेद आहेत (अकाली, उदासी पाहा). राजकीय सत्ता वाढवण्याच्या हेतूनें काढलेल्या या संप्रदायाला खालसा म्हणजे शुद्ध हें नांव दिलें आहे. या संप्रदायामध्यें केश, कच्छ, कर (लोखंडी बांगडी), खंड (खंजीर) व खंज (फणी) हीं पांच प्रत्येकानें बाळगावीं लागतात व आपल्या नांवापुढें सिंघ (सिंह) हें शौर्यदर्शक उपपद लावावें लागतें. १८ व्या शतकांत शीख संप्रदायांत बरेच तट पडले, त्यामुळें नादिरशहानें पंजाबची धूळधाण उडवली. १७५७ नंतर शीखांचीं स्वतंत्र छोटीं छोटीं संस्थानें उदयास आलीं. रणजितसिंगाच्या कारकीर्दीत शीखांच्या सत्तेचा कळस झाला. १८५७ सालच्या बंडांत शीखांनीं ब्रिटिशांना महत्त्वाची मदत केली व अद्यापिहि हिंदुस्थानी सैन्यांत शीखांचा भरणा अधिक असतो. हल्लीं पत्याळा, नाभा, झिंद, इत्यादि बरींच संस्थानें शीखांचीं आहेत. खालसा दिवाण ही शीखांची अमृतसर येथें एक मध्यवर्ती संस्था असून तिच्या शाखा सर्व पंजाबभर पसरल्या आहेत. अमृतसर येथें शीखांचें खालसा कॉलेज आहे आणि तरणतारण व गुजराणवाला या ठिकाणीं धार्मिक विद्यापीठें आहेत. उपवर मुलींच्या शाळा, अनाथगृहें, खालसा यंग मेन्स असोसिएशन, अनेक वृत्तपत्रें, शीख बँक, इत्यादि समाजसुधारणेचीं साधनें या पंथाचीं स्वतंत्र आहेत.

१९४७ त झालेल्या हिंदुस्थानच्या फाळणीला शीखांच्या वतीनें सरदार बलदेवसिंग यांनीं मान्यता दिली होती; पण पुढें शीख जमातीला विशेष हक्क भारताच्या घटनेंत न मिळाल्यामुळें शीखांमध्यें दोन तट पडले : एक काँग्रेसच्या बाजूचा व दुसरा विरोधी. विरोधी पक्षाचे नेते मास्टर तारासिंग आहेत. शीखांची बरीच मालमत्ता व देवस्थानें पाकिस्तानी पंजाबांत गेल्यामुळें व बरेचसे शीख पूर्व पंजाबांत निर्वासित म्हणून आपत्तींत दिवस काढीत असल्यानें विरोधी पक्ष काँग्रेस सरकारवर साहजिकच रुष्ट आहे. युद्धकालांत ब्रिटिश सरकारनें वजनदार अल्पसंख्याक समाज म्हणून शीखांना जे विशेष हक्क दिले होते, ते नवीन भारत सरकारांत फारसे मानले जात नाहींत, हें एक शीखांमधील असंतोषाचें कारण आहे. त्यांचा मुख्य वस्तीचा पंजाब प्रांत दुभंगला गेला व त्यांना कोठल्याच बाजूला वजन राहिलें नाहीं. तथापि भारत लष्कराचे मंत्री बलदेवसिंग असल्यानें लष्करी खात्यांत तरी त्यांचे हितसंबंध पूर्वीप्रमाणेच पाळले जात आहेत.

**शीघ्रवहनपद्धति**—(टेलफेरेज). कारखान्यामध्यें एका ठिकाणाहून कांहीं जड वस्तू दुसऱ्या ठिकाणीं त्वरेनें न्यावयाच्या असल्यास या साधनाचा उपयोग करतात. यामध्यें विजेच्या तारांची व पाळण्याची व्यवस्था केलेली असते; किंवा एखादा मोठा लोखंडी तुळईला पाळणा टांगलेला असतो, व तो विद्युत्प्रवाहानें किंवा अन्य तऱ्हेनें गति देऊन त्वरित एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं नेला जातो व तेथून परत येण्याची व्यवस्था केलेली असते. या एकरुळी गाडीच्या (टेल्फर लाइन) प्रकारांत वाहून नेण्याचा माल गाडी आणि रूळ यांच्याखालीं लोंबत राहतो.

**शीड**—गलबताला ज्या कापडाच्या अवजाराच्या साहाय्यानें गति मिळते त्यास शीड म्हणतात. एका गलबतावर अनेक शिडें असतात व तीं ज्या डोलकाठ्यांना ज्या ठिकाणीं बांधलेलीं असतात त्यांवरून त्यांस निरनिराळीं नांवें दिलेलीं असतात. मुख्य डोलकाठीस बांधलेल्या शिडास मुख्य शीड म्हणतात. अगदीं तोंडावर असणाऱ्या लहान शिडास कलमी म्हणतात. कांहीं शिडें त्रिकोनी तर कांहीं शिडें चौकोनी असतात. हीं बहुधा तागाच्या जाड कापडांच्या पट्ट्यांचीं शिवून तयार करण्यांत येतात, व त्यांत काठ्यांशीं दोऱ्या शिवलेल्या असतात. शिडाच्या मागच्या बाजूस (काठीजवळच्या) दमान म्हणतात. व पुढील भागास (नाळीकडील) वोस म्हणतात.

**शीतकरण**—(रेफ्रिजरेशन). कोठेंहि थंडी उत्पन्न करण्याची जी व्यवस्था केलेली असते तिला शीतकरण असें म्हणतात. हें करण्याचे अनेक प्रकार आहेत. अगदीं जुन्या पद्धतीमध्यें नुसती हवा बरीचशी दाबून ती थंड झाल्यावर ती जर पसरूं दिली तर या पसरलेल्या क्रियेमुळें ती एकदम थंड होते. परंतु हल्लीं ही पद्धति फारशी उपयोगांत आणली जात नाहीं. बहुतेक सर्व वायू कांहीं एका ठराविक प्रमाणांत दाबले गेले व त्यांचें कांहीं ठराविक उष्णतामान असलें तर ते त्या वेळेस द्रवरूप होतात, असा सर्वसाधारण नियम आहे. या द्रवरूप वायूवरील दाब कमी केला असतां त्याचें रूपांतर पुनः वायूमध्यें होऊं लागतें. असें रूपांतर होण्यासाठीं जी उष्णता लागते ती जवळच्या वस्तूपासून घेतली गेल्यामुळें ती वस्तु थंड होते. पुष्कळ वायू अतिशय कमी उष्णतामानावर म्हणजे पाण्याचें बर्फ होण्यास जें उष्णतामान लागतें त्याहूनहि बऱ्याच कमी उष्णतामानावर वायुरूप होत असतात; याच त्यांच्या गुणधर्मांचा उपयोग शीतकरणासाठीं म्हणजे बर्फ तयार करणें, खोली थंड करणें किंवा दुसरी कोणतीहि वस्तु थंड करणें, यासाठीं केला जातो. वर जरी सर्व वायू द्रवरूपांत आणतां येतात असें सांगितलें तरी सर्वच वायूंचा उपयोग करीत नाहींत. हल्लीं प्रचारांत असलेल्यापैकीं ॲमोनिया, कर्बद्विप्राणिद (कार्बन डाय ऑक्साइड), फ्रिऑन, द्विक्लिहरिद (मेथिल क्लोराइड), तसेंच गंधकद्विप्राणिद (सल्फर डाय ऑक्साइड), इ. वापरले जातात. अगदीं सुरुवातीला ईथर वायूचाहि उपयोग बर्फ तयार करण्यासाठीं केला जात असे. पण हा ज्वालाग्राही असल्यानें हल्लीं कोठेंहि वापरला जात नाहीं.

बर्फ तयार करीत असतांना किंवा थंड खोल्या वापरावयाच्या असल्यास द्रवीभूत वायु कांहीं नळ्यांतून किंवा नळ्यांच्या वेटोळ्यामधून सोडला जातो. येथें त्याचें प्रसरण होतें. वायुरूप होत असतांना त्याला लागणारी उष्णता तो शेजारच्या हवेमधून घेत असतो. त्यामुळें खोल्यांतील हवा थंड होत जाते. हवा आंतून बाहेर अगर बाहेरून आंत जाणार नाहीं, अशा तऱ्हेनें या खोल्या बंद कराव्या लागतात. त्याचप्रमाणें बाहेरील उष्णतेचा आंतील थंड झालेल्या हवेवर परिणाम होऊं नये म्हणून भिंतीवर उष्णता-निरोधक किंवा शीत-निरोधक ( इन्सुलेटर ) वापरावा लागतो. याची जाडी आंत गारवा ठेवण्याच्या प्रमाणावर अवलंबून असते. हा निरोधक बहुधा बुचाचा केलेला असतो.

एकदां वापरलेल्या वायूचा पुनः उपयोग करण्यासाठीं त्याला द्रवरूपांत नेणें भाग असतें. या कामासाठीं यंत्रें लागतात. हे वायू दाबका( कॉंप्रेसर )मध्यें दाबले जातात. वायू दाबले जात असतांना ते अतिशय गरम होतात. हे गरम झालेले वायू थंड करण्यासाठीं ते शीतका(कंडेन्सर)मधून नेले जातात. तेथें पाण्याच्या योगानें ते थंड होतात. अशा तऱ्हेनें जरूर तो दाब व उष्णतामान मिळाल्यामुळें त्या वायूचें द्रवरूप बनतें व पुनः तें वापरतां येतें. बर्फ तयार करीत असतांनाहि यंत्रें व त्यांची क्रिया ही सर्व वरीलप्रमाणेंच होत असते. परंतु बर्फ करण्यासाठीं वर सांगितलेलीं नळ्यांचीं वेटोळीं एका टांकींत बसविलेलीं असतात. या टांकींत मिठाचें किंवा खटहरिद ( कॅल्शिअम क्लोराइड ) व पाणी यांचें मिश्रण भरलेलें असतें. पाण्यांत अशा तऱ्हेने मीठ किंवा इतर पदार्थांचें मिश्रण केलें असतां त्याचे गोठण्याचें उष्णतामान पाण्याच्या उष्णतामानाहून बरेंच खालीं जातें. यामुळें पाण्याच्या गोठण्याच्या उष्णतामानापेक्षां या मिश्रणाचें उष्णतामान बरेंचसें खालीं नेतां येतें. या अशा कमी उष्णतामानाच्या मिश्रणामध्यें पाणी भरलेलीं भांडीं ठेवल्यास त्यांतील पाणी थिजून त्याचें बर्फ होतें.

**शीतक स्तंभ**—( कूलिंग टॉवर ). अनेकदां निरनिराळ्या कारणांनीं होणाऱ्या कृतींमध्यें पदार्थ निववावे लागतात. हें निवविणें विशेषतः पाण्याच्या योगानें होत असतें. यासाठीं जर पाणी फार लागत असेल तर प्रत्येक वेळीं थंड पाणी मिळूं शकत नाहीं. तेव्हां एकदां वापरून गरम झालेलें पाणीच निववून पुनः वापरावें लागतें. हें पाणी निवविण्यासाठीं जो उंच मनोऱ्यासारखा स्तंभ बांधला जातो त्याला शीतक स्तंभ ( कूलिंग टॉवर ) असें म्हणतात. यामध्यें निवविण्याचें पाणी स्तंभाच्या वरील भागांत नेऊन खालीं सोडलें जातें. स्तंभ सर्व बाजूंनीं बंद असतो. पाणी खालीं पडत असतां तें शक्य तितकें फुटून बारीक बारीक तुषार होऊन पडावें, अशी योजना केलेली असते. स्तंभाच्या खालील बाजूनें एखाद्या भात्याच्या ( फोअरच्या ) साहाय्यानें हवा आंत सोडण्यांत येते. ही हवा स्तंभामधून वर जात असतां तिचा पाण्याशीं संबंध येऊन कांहीं पाण्याची वाफ होऊन जाते व पाणी थंड होतें.

**शीतारिरस**—एक आयुर्वेदीय रसायन. ताम्रभस्म, गंधक, टांकणखाराची लाही, बचनाग, मोरचूद, पारदभस्म, कलखापरी, हरताळभस्म, हीं शुद्ध केलेलीं औषधें घेऊन कारलीच्या पानांच्या रसांत एक घटिकापर्यंत खलावीं; नंतर त्याच्या गुंजांप्रमाणें गोळ्या कराव्या. या रसायनाचें सेवन जिरें व खडीसाखर यांबरोबर करावें, म्हणजे ऐकाहिकादिक ज्वर शांत होतात.

**शीर्षनेत्र प्राणी**—( एड्रिओफ्थालमाटा ). हा एक कवचधर प्राण्यांचा मोठा वर्ग आहे. या वर्गांत ज्या प्राण्याचे डोळे सुटे नसून डोक्यांतच असतात असे सर्व प्राणी मोडतात. यांचे मुख्यतः दोन वर्ग करण्यांत येतात : १ ॲम्फीपोडा ( भूजलपाद )—यामध्यें समुद्रावरील वाळूंतील टोळ व गोड्या पाण्यांत आढळणारे शिंप नांवाचे प्राणी मोडतात. २ इसोपोडा ( समपाद )—यामध्यें परोपजीवी मत्स्य, जल—भूमि काउयुका, वगैरे प्राणी येतात.

**शीर्षपाद**—( सेफॅलोपोडा ). ही एक मृदुशरीर वर्गातील प्राण्यांची जात असून त्यांस संवेदना व गति यांचीं इंद्रियें असतात. हीं गात्रें त्यांच्या डोक्यास शिंगासारखीं जोडलेलीं असून त्यांस शोषक शक्तिहि असते. गोगलगाय वगैरे प्राणी या वर्गांत मोडतात. यांचे चतुःशृंगी व द्विशृंगी असे दोन वर्ग करण्यांत येतात.

**शीलभद्र** ( सातवें शतक, पूर्वार्ध )—बौद्धांच्या सुप्रसिद्ध नालंदा विद्यापीठाचा एक प्रमुख. याचा जन्म बंगालमधील ढाका जिल्ह्यांतील रामपाल गांवीं एका ब्राह्मण राजकुलांत झाला. याचें लक्ष राजपदाकडे नव्हतें. वयाच्या सोळाव्या वर्षींच हा ज्ञानार्जनासाठीं नालंदा विद्यापीठांत गेला व तेथें धर्मपाल या महापंडिताजवळ अध्ययन करून हा ज्ञानी झाला. सन ५५४ मध्यें दक्षिणेंतील एक महापंडित धर्मपालाशीं वाद करण्यासाठीं आला असतां यानेंच त्यास वादांत पराभूत केलें. याचें पहिलें नांव दंतदेव असें होतें. परंतु याच्या उच्च आचारविचारांमुळें लोक यास शीलभद्र असें म्हणूं लागले. ह्युएनत्संग हा याची भेट घेऊन गेला होता. धर्मपालानंतर हा नालंदा विद्यापीठाचा मुख्य झाला. नालंदा पाहा.

**शीसें**—एक प्रमुख धातु. परमाणुभारांक २०७·२. वि. गु. ११·४ व द्रवणबिंदु ३२७° शत. . याचें मुख्य खनिज म्हणजे गंधित ( सल्फाइड ), गॅलेना व सेन्युसाइट होत. हा धातु फार मऊ व विस्तार पावणारा असतो, पण यांत चिवटपणा फार कमी. शिशाच्या कांहीं खनिजांत सोनेंरुपेंहि सांपडतें. शिशाचे पत्रे, नळ, टांकी, इ. करतात. मुद्रणाचे ठसे ( टाइप ) करण्यासाठीं यांत ॲंटिमनी धातु मिसळतात. कथील मिसळून कासें तयार होतें. शिशाचें जगांत वार्षिक उत्पादन सुमारें १५ लाख टन आहे. निम्में अमेरिका देतें.

ऑस्ट्रेलिया, कानडा, जर्मनी व स्पेन या ठिकाणीं प्रत्येकीं सुमारें एक लाख टन निघतें.

शीसें या अर्थी 'सीस' हा शब्द प्रथम अथर्ववेदांत आला असून त्याचा उपयोग ताइताकडे होतो असें म्हटलें आहे. पुढील ग्रंथांत हा शब्द नेहमीं येतो. कोष्टी या शिशाच्या वजनामारखा उपयोग करतो, असें वाजसनेयी संहितेंत (१९.८०) व इतरत्र उल्लेखिलेलें आहे.

शीसपेन्सिल—पेन्सिल पाहा.

शुक—कृष्णद्वैपायन व्यासापासून, शुकीचें रूप घेतलेल्या घृताची अप्सरेस झालेला पुत्र. हा उपजतांच ज्ञानी होता. रंभा अप्सरेनें याला मोहित करण्याचे प्रयत्न केले होते, पण ते निष्फळ ठरले. रंभाशुकसंवादावर अनेक कवींची रचना आहे. कडकडीत ब्रह्मचर्याचा व वैराग्याचा आदर्श म्हणून शुकाचें उदाहरण देण्यांत येतें. परीक्षित राजास यानेंच भागवत कथन केलें.

शुक्र—सूर्यमालेंतील एक अत्यंत तेजस्वी ग्रह. हा बुध आणि पृथ्वी यांच्यामध्यें आहे. हा सूर्याच्या पश्चिमेस असेल तेव्हां सूर्योदयापूर्वी दिसतो. व सूर्याच्या पूर्वेकडे असेल तेव्हां सूर्यास्तानंतर दिसतो. हा जास्तींत जास्त तीन तास क्षितिजावर दिसतो. याच्यावर मेघयुक्त वातावरण आहे. या ग्रहाचा व्यास ७,७०० मैल असून सूर्यापासून अंतर ६,७२,००,००० मैल आहे. हा एकदां २२५ दिवसांत आपल्या आंसाभोंवतीं फिरतो. या ग्रहाची सूर्याशीं युति होतांना दिसते. अशी युति १८७४ व १८८२ सालीं पाहतां आली व पुढें २००४ व २०१२ या सालीं दिसेल.

फलज्योतिषांत शुक्र हा शुभग्रह सुख आणि संपत्ति यांचा कारक म्हणून सांगितला आहे. हा एका राशींत एक महिना असतो. जन्मराशीपासून पहिला, दुसरा, चौथा, पांचवा, सातवा, नववा व अकरावा याप्रमाणें आला असतां हा शुभ फळ देतो. शुक्राचें प्रिय रत्न हिरा आहे.

शुक्र—वारुणि भृगूस पुलोमा स्त्रीपासून झालेल्या सात पुत्रांतील पांचवा पुत्र. हा असुरांचा गुरु असून इंद्रानें आपली कन्या जयंती यास दिली होती. तिच्या ठायीं यास देवयानी कन्या झाली. शिवाराधनानें याला संजीवनी विद्या येत असून ती मिळविण्याचा देवांनीं कचाच्या द्वारें प्रयत्न केल्याची कथा प्रसिद्ध आहे. (कच व देवयानी पाहा).

बलीनें वामनाच्या हातावर त्रिपादभूमिदानाचें उदक सोडूं नये म्हणून हा बळीच्या झारींत जाऊन बसला. पाणी पडेना म्हणून वामन दर्भाग्रानें झारीचें तोंड मोकळें करीत असतांना याचा डोळा फुटला. यानें जालंधरास संजीवनी विद्या दिली होती.

शुक्रनीति—एक विविध माहितीनें भरलेला संस्कृत ग्रंथ. हा फार प्राचीन दिसत नाहीं. शुक्रनीतींतील कित्येक विषय फारच महत्त्वाचे असून उपयुक्त आहेत. त्यांवरून भारतीय आर्यांनीं कोणकोणत्या दिशेनें, कशा प्रकारचे, आणि किती दीर्घ परिश्रम केले होते, हें लक्षांत येतें.

ह्यांतील मुख्य विषय म्हटले म्हणजे खालीं लिहिल्याप्रमाणें होतः— १ राजाची इतिकर्तव्यता. २ भूमिमापन. ३ नगर्यादि प्रतिष्ठान, म्हणजे नगरें वसविणें. ४ गृहादि क्लृप्तिकल्पन म्हणजे घरें बांधणें. ५ युवराज व प्रधानादिकांची कामें व त्यांचीं लक्षणें. ६ सेवक जनांचें वेतन. ७ जमाखर्च ठेवणें. ८ न्यायपरिवर्तन, म्हणजे सर्व लोकांनीं न्यायानें वागणें. ९ सुहृदाचें लक्षण. १० गजाश्वादिपरीक्षण. ११ रत्नधातुपरीक्षा. १२ प्रजाभागहरण. १३ कलाविद्याप्रभेदन. १४ श्रमविभागवर्णन. १५ धर्मपरिकल्पन. १६ ग्रामरक्षानिवेदन. १७ प्रासादादिप्रकल्पन म्हणजे महाल वगैरे बांधणें. १८ मूर्ति घडविणें. १९ व्यवहारचातुर्य. २० किल्ले बांधणें. २१ सैन्य ठेवणें. २२ रथ तयार करणें. २३ मनुष्याच्या आयुष्याचें मान. २४ यात्राप्रकल्पन. २५ यंत्रलक्षण. २६ अग्निचूर्णक्रिया म्हणजे दारूगोळा तयार करणें. २७ यंत्रप्रपात, म्हणजे निशाण लावणें. २८ शस्त्रास्त्रक्रिया. २९ षड्गुणलक्षण. ३० व्यूहप्रकल्पन म्हणजे सैन्यरचना आणि कवाईतचातुर्य. ३१ कायस्थकरण; इत्यादि.

शुक्रपिंडव्याधि—मनुष्याच्या साठाव्या वर्षाच्या सुमारास त्याच्या शुक्रपिंडाची वृद्धि होऊन मूत्रावरोध होतो. त्यामुळें लघवीस त्रास होऊन थोडी थोडी लघवी वरच्यावर होते. पुढें मूत्रपिंडाचाहि दाह होऊं लागतो. व त्यामुळें अपाय होतो. यास उपाय म्हणजे नळीनें मूत्र वरच्यावर काढणें व मूत्राशय जंतुघ्न औषधांनीं पिचकारीनें धुणें हा होय. यावर दोन्ही वृषण काढून टाकण्याची शस्त्रक्रियाहि करतात. पण त्यांत धोका असल्यामुळें शुक्रनलिका कापून बांधून ठेवल्यास वृषण सुकून जातात व शुक्रपिंडहि शुष्क होऊन लघवी साफ होऊं लागते. शुक्रग्रंथीहि शस्त्रक्रियेनें कापून काढतात.

शुक्ल, पं. रविशंकर (१८७७- )—मध्यप्रदेशाचे प्रधान मंत्रि. हे प्रथम रायपूर येथील एक प्रसिद्ध वकील होते. हे तेथील जिल्हा कौन्सिल व जिल्हा कॉंग्रेस कमिटी यांचे अध्यक्ष होते. १९३० व १९३२ मध्यें यांस अटक होऊन दोन वर्षांची शिक्षा झाली. चळवळींत अंगठ्याचा ठसा घेतल्याबद्दल यांनीं पुढाऱ्यांनीं अमलदारांवर फिर्याद केली होती. हे नागपूर युनिव्हर्सिटी कोर्टाचे सभासद होते. यांस शिक्षण विषयाची गोडी असून शिक्षणांत सुधारणा करण्याची इच्छा आहे. १९२३ पासून हे मध्यप्रांत कायदे

मंडळाचे सभासद होते. १९३७ मध्यें कॉंग्रेसतर्फे मध्यप्रांत ॲसेंब्ली- मध्यें हे निवडून आले व शिक्षणमंत्री झाले. पुढें डॉ. खरे यांनीं मुख्य-प्रधानपदाचा राजीनामा दिल्यानंतर हे प्रधान मंत्री झाले. यांनीं 'विद्या मंदिर' नांवाची बौद्धिक व औद्योगिक शिक्षण एकत्र देण्याची एक योजना केली होती. पण ती यशस्वी झाली नाहीं. नंतर १९४७ सालीं कॉंग्रेस पक्ष अधिकारारूढ झाल्यावर हे पुन्हां मध्यप्रांताचे प्रधान मंत्री झाले. यांचें आचरण शुद्ध व सात्त्विक असल्यानें यांच्याविषयीं सर्वांना आदर वाटतो.

**शुक्ल, रामचंद्र चंद्रबली** (१८८४–१९४०)—हिंदी वाङ्मयांतील उत्तम कवि व लेखक. बस्ती जिल्ह्यांतील अगोना गांवीं यांचा जन्म झाला. मिर्झापूर मिशन स्कूलमध्यें प्रवेशपरीक्षेपर्यंतचें शिक्षण झाल्यावर सन १९०१ मध्यें हे तेथेंच शिक्षक झाले. यानंतर नागरी प्रचारिणी सभेच्या निमंत्रणावरून हे १९०८ सालीं हिंदी कोशाचे सहसंपादक म्हणून बनारसला गेले व कांहीं काल यांनीं त्या सभेच्या पत्रिकेच्या संपादकाच्या जागीं काम केल्यावर हिंदु विश्वविद्यालयांत हिंदीचे प्राध्यापक म्हणून यांची नेमणूक झाली. हिंदी भाषेंतील उच्च शिक्षणासाठीं यांचे लेख फार उपयोगी पडतात. करुणा, क्रोध, वगैरे मनोविकारांवर यांनीं 'चिंतामणि' नांवाचा लेखसंग्रह प्रसिद्ध केला असून त्यास हिंदी साहित्य संमेलनाचें बाराशें रुपयांचें मंगलाप्रसाद पारितोषिक मिळालें आहे. 'हिंदी साहित्य का इतिहास' या यांच्या दुसऱ्या ग्रंथालाहि हिंदुस्थानी ॲकेडमी (प्रयाग) कडून पांचशें रुपयांचा पुरस्कार लाभला आहे. यांच्या काव्यांतील करुणरसाची योजना मोठी कौशल्यपूर्ण अशी असते. (१) हास्यगोविंद (नाटक), (२) राधाकृष्णदासका जीवनचरित्र, (३) शशांक, (४) गोस्वामी तुलसीदास; काव्यें–(५) शिशिरपथिक, (६) वसन्त, (७) प्रकृतिबोध; वगैरे विविध प्रकारचें वाङ्मय यांनीं निर्माण केलें आहे.

**शुक्लबिलावल**—हा राग बिलावल थाटांतून निघतो. ह्याचे आरोह व अवरोह सातहि स्वरांनीं होतात म्हणून याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी स्वर मध्यम आहे व संवादी षड्ज आहे. गानसमय सकाळचा पहिला प्रहर युक्त मानितात. आरोहांत ऋषभ स्वर दुर्बल ठेवितात व अवरोहांत कोमल निषाद धैवतासंगतीं घेतलेला आढळतो. या रागांत शुद्ध मध्यम सुटा सोडतात. हा एक बिलावल-प्रकार आहे.

**शुंग घराणें** (खि. पू. १८५–७३)—उत्तर हिंदुस्थानांतील मौर्यांनंतरचें एक प्राचीन राजघराणें. यांत पुष्यमित्र ते देवभूती- पर्यंत बारा राजे होऊन गेले. पुष्यमित्रानें बृहद्रथ मौर्याला मारून त्याचें राज्य बळकावलें. याच्या वेळीं ग्रीकांची हिंदुस्थानवर स्वारी झाली होती; पण ती यशस्वी झाली नाहीं. यानें दिग्विजय करून अश्वमेध यज्ञ केला. या यज्ञाला प्रसिद्ध वैयाकरण पतंजलि उपस्थित असावा. शुंग राजांनीं बौद्ध धर्माला मुळींच थारा दिला नाहीं. पुष्यमित्रानंतरचे राजे अल्पायुषी व दुर्बल निघाले. नववा राजा भागवत यानें मात्र ३२ वर्षे राज्य केलें. खि. पू. ७२ च्या सुमारास शुंग राजाचा ब्राह्मण मंत्री कण्व यानें राजाला ठार करून आपण गादीवर बसला. पण हेंहि घराणें फार काळ टिकलें नाहीं. (कण्व राजघराणें पाहा).

**शुजा** (१६१६–१६६०)—मोंगल बादशहा शहाजहान याचा दुसरा मुलगा. हा अजमीर येथें जन्मला. इराणच्या राज- घराण्यांतील मिर्झा रुस्तुम सफवी याच्या मुलीशीं याचें लग्न झालें होतें. शहाजहाननें याला बंगालचा सुभेदार नेमिलें होतें. सुभेदार असतांना याचें प्रजेशीं वर्तन फार न्यायाचें व दयाळूपणाचें असे. औरंगजेबाशीं लढतांना खजवा येथें याचा पराभव होऊन (१६५८) हा पळत सुटला. शेवटीं त्यानें आराकान गांठलें. तेथेंच त्याचा अज्ञात अवस्थेंत व हालअपेष्टेंत अंत झाला. आरा- कानच्या राजानें याला कुटुंबांतील मंडळीसह बोटींत बसवून नदींत बुडवून टाकलें. औरंगजेबाचा मुलगा महंमद याला शुजाची मुलगी दिली होती.

**शुजा-उद्दौला** (१७३१–१७७५)—अयोध्येचा एक नवाब. याच्या बापाचें नांव मनसूरअलीखान. त्याच्या मृत्यूनंतर १७५३ मध्यें हा गादीवर आला. पानपतच्या युद्धांत हा मोठ्या नाखुषीनें मराठ्यांच्या विरुद्ध बाजूस लढत होता. सदाशिवरावभाऊ व अब्दाली यांमध्यें सलोखा करावा, अशी याची इच्छा होती. नंतर याला शहाअलमनें वजीर नेमलें. इंग्रजांबरोबर झालेल्या बक्सा- रच्या लढाईंत याला हार खावी लागली (१७६४) व ५० लाखांची ठोकर बसली. हा मोठा दिलदार असे. हा फैजाबाद येथें वारला, तेव्हां याची प्रजा फार हळहळली. याच्यानंतर असफ- उद्दौला गादीवर बसला.

**शुंडाधारी प्राणी**—(प्रोबोसिडी). हा एक सखुर सस्तन प्राण्यांचा पोटवर्ग असून सोंड असणें हा याचा एक विशेष आहे. या जातीच्या प्राण्यांपैकीं आज फक्त हत्ती हा प्राणी अस्तित्वांत आहे. परंतु या वर्गांतील अनेक नष्ट प्राण्यांच्या जातींचे अवशेष आढळून आले आहेत. त्यांपैकीं मॅमथ आणि मॅस्टोडन या दोन प्रमुख आहेत. (प्रचंड हत्ती पाहा).

**शुतुद्रि**—ऋग्वेदांत हा शब्द दोनदां आलेला असून या शब्दावरून पंजाबमधल्या अगदीं पूर्वेकडील भागांत असलेल्या नदीचा बोध होतो. या नदीला अर्वाचीन कालांत सतलज म्हणतात, व टॉलेमी व ॲरियन यांच्या काळांत झरॅड्रास असें म्हणत असत. वैदिक कालाच्या नंतरच्या कालांत या नदीचें नांव बदलून तिला शतद्रु (शंभर मार्गांनीं वाहणारी) असें नांव मिळालें. ऐतिहासिक कालांतहि या सतलज नदीचा मार्ग अनेकदां

बदललेला आहे. शुतुद्रि (सतलज) ही पूर्वी कच्छच्या आखातांत मिळत असे, पण पुढें ती सिंधूंत मिळूं लागली असें दिसतें. कदाचित् कच्छच्या आखातास मिळणाऱ्या भागास 'सरस्वती' व सिंधूस मिळणाऱ्या भागास 'शुतुद्रि' (सतलज) असें म्हणूं लागले असावेत.

**शुद्धकल्याण**—हा राग कल्याण थाटांतून उत्पन्न होतो. याच्या आरोहांत मध्यम व निषाद हे स्वर वर्ज्य आहेत. व अवरोह सात स्वरांनीं होतो. म्हणून याची जाति औडुव-संपूर्ण आहे. वादी स्वर गांधार व संवादी धैवत आहे. गानसमय रात्रीचा पहिला प्रहर मानितात. या रागाचें सामान्य स्वरूप भूपाळी रागासारखें भासतें. हा राग गंभीर प्रकृतीचा आहे.

**शुद्धमल्हार**—हा राग काफी थाटांतून निघतो. या रागांत गांधार व निषाद हे स्वर वर्ज्य आहेत म्हणून याची जाति औडुव-औडुव आहे. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर मानितात. मध्यम व ऋषभ या स्वरांची संगति वैचित्र्योत्पादक आहे. या रागांत निरनिराळ्या रागांचें मिश्रण करून याचे अनेक प्रकार झालेले प्रचारांत दिसतात.

**शुद्धसामंत**—हा राग भैरवी थाटांतून निघतो. याच्या आरोहांत गांधार व निषाद हे स्वर वर्ज्य आहेत. व अवरोहांत निषाद वर्ज्य आहे; म्हणून याची जाति औडुव-षाडव आहे. वादी स्वर षड्ज व संवादी मध्यम आहे. गानसमय दिवसाचा पहिला प्रहर मानितात.

**शुद्धसारंग**—हा राग काफी थाटांतून उत्पन्न होतो. यांत गांधार स्वर वर्ज्य आहे; म्हणून याची जाति षाडव-षाडव आहे. वादी स्वर ऋषभ व संवादी पंचम आहे. गानसमय मध्याह्न सर्वसंमत आहे. ह्या रागांत दोन्ही मध्यमांचा प्रयोग दृष्टीस पडतो.

**शुद्धाद्वैत**—(पुष्टिमार्ग पाहा). या तत्त्वज्ञानाचे प्रवर्तक वल्लभाचार्य (पाहा) होत. वल्लभाचार्य विष्णुभक्त होते. परंतु ते रामानुजाचार्यांप्रमाणें विशिष्टाद्वैती किंवा मध्वाचार्यांप्रमाणें द्वैतमतानुयायी नव्हते. त्यांनीं अद्वैत मतच ग्रहण केलें.

परमात्मा साकार आहे. ही सृष्टि दोन प्रकारची म्हणजे जीवात्मक आणि जडात्मक आहे. जीव व जड यांच्या संयोगानें सृष्ट्युत्पत्ति होते किंवा चैतन्य आणि प्रकृति यांचा संयोग हेंच सृष्ट्युत्पत्तीचें कारण आहे. वस्तुमात्र कांहीं काल दृष्टीस पडतें आणि कांहीं काल त्याचा लोप होतो इतकेंच. तें संपूर्णपणें कधींच नष्ट होत नाहीं. ब्रह्मांडांतील परमाणूंचा नाश होत नाहीं, त्यांचें रूपांतर मात्र होतें, असें या तत्त्वज्ञानी पंथाचें मत आहे. या सृष्टीनें कार्यकारणरूप जें ब्रह्म तें शुद्ध आहे. आणि मायेशीं याचा कोणत्याहि प्रकारें संबंध नाहीं. 'इदयादस्य जगत् सारी ईश्वराची लीला आहे. तेव्हां इदयादस्य जगाला शुद्ध ब्रह्म मानून गोपींप्रमाणें श्रीकृष्णास भक्तिद्वारां आत्मसमर्पण केलें असतां जीवास मुक्ति लाभते, असें या मार्गांत सांगितलें आहे.

**शुद्धीकरण**—धर्मांतर झाल्यानंतर पुन्हां पहिल्या धर्मांत येणें किंवा घेणें याला म्हणतात. मागें अनेक शतकांपर्यंत 'कृण्वन्तो विश्वमार्यम्' हें तत्त्व हिंदु समाज आचरणांत आणीत होता. वैदिक काळ सोडला तर ऐतिहासिक काळांतहि त्याचीं अनेक उदाहरणें दिसून येतात. ख्रि. पूर्व चौथ्या, तिसऱ्या व दुसऱ्या शतकांमध्यें हिंदुस्थानवर ग्रीक लोकांच्या स्वाऱ्या आल्या होत्या. तिसऱ्या व दुसऱ्या शतकांत पंजाब-अफगाणिस्तानामध्यें अनेक छोटीं छोटीं ग्रीक राज्येंहि कांहीं शतकें अस्तित्वांत होतीं. सुमारें पन्नास हजार ग्रीक लोक तरी हिंदुस्थानांत येऊन स्थायिक झाले असावेत असें दिसतें. ग्रीक राज्यें लयास गेल्यावर ते अखेर बौद्ध किंवा हिंदू बनून हिंदु समाजांत मिसळून गेले. ग्रीक राजांपैकीं कांहीं मिनांडर (मिलिंद)-हर्मिअसप्रमाणें बौद्ध झाले.

नासिक, कार्ले, वगैरे ठिकाणीं जीं अनेक लेणीं आहेत त्यांपैकीं कांहीं ग्रीक बौद्धांनीं खोदविलीं आहेत. ते आपणांस तेथील लेखांमध्यें 'धर्मयवन' असें संबोधितात. पण त्या वेळीं बौद्ध लोकच तेवढे विधर्मीयांना प्रवेश देत होते, असें नसून हिंदु धर्महि तसेंच करीत होता, हें बेसनगर शिलालेखानें स्पष्ट होत आहे. ग्रीक वकील हेलिओडोरस विदिशा येथें राहत असतां वैष्णव धर्मांतील भक्तिमार्गाची छाप त्यावर पडली व त्यानें अखेर त्याचा स्वीकार केला. निष्ठावंत वैष्णवाप्रमाणें तो आपणांस परमभागवत म्हणवूं लागला.

इ. स. पू. पहिल्या शतकापासून इ. स. तिसऱ्या शतकापर्यंत हिंदुस्थानवर इराणी, शक, कुशान, आदि लोकांनीं स्वाऱ्या केल्या व आपलीं राज्यें निरनिराळ्या प्रांतांत स्थापन केलीं. पण हेहि लोक एकदोन पिढ्यांतच हिंदू किंवा बौद्ध बनले. गुजराथ-माळव्यामध्यें जें शक घराणें होतें त्यामध्यें पहिल्या एकदोन पिढ्यांमध्येंच चष्टन, घ्समोटक, दयमद अशीं विदेशी नांवें आढळतात. तिसऱ्या पिढीचा राजा रुद्रदामन् हें हिंदु नांव धारण करतो. केवळ नांवानेंच नाहीं तर संस्कृतीनेंहि तो हिंदु बनला होता. त्याच्या एका नातीचें लग्न आंध्र देशांतील इक्ष्वाकु घराण्याच्या राजपुत्राशीं झालें होतें.

कुशान वंशांतील दुसरा राजा विमकडफिसेस याचें नांव विदेशी आहे, पण तो धर्मानें शैव झाला होता. त्याचीं सोन्याचीं नाणीं सांपडलीं आहेत, त्यांवर त्रिशूलहि शिवाशिवाय दुसरी देवता आढळून येत नाहीं; इतकेंच नव्हे तर नाण्यांवरील लेखांतहि तो आपणांस परममाहेश्वर असें विशेषण लावून घेतो. (कुशान पाहा.) त्याच्यामागून कनिष्क आला. त्यानें बौद्ध धर्म स्वीकारून त्या

धर्माची घडी बसवण्यास एक स्थविरसभा बोलाविली होती. पुढें पांचव्या-सहाव्या शतकांत उत्तर हिंदुस्थानांत हूण लोकांच्या स्वाऱ्या झाल्या, पण तेहि अखेर हिंदू बनून हिंदु समाजांत पूर्ण मिसळून गेले. त्यांचा दुसरा राजा मिहिरकुल कट्टा शैव होता.

' मुसलमानांना हिंदु करण्याचें जरी आपल्या समाजास त्या वेळीं सुचलें नाहीं, तरी धर्मभ्रष्टांना पुनः हिंदू बनवणें अत्यावश्यक आहे, हे मात्र आपल्या समाजानें अचूक ओळखलें. व त्याप्रमाणें वागण्यासहि सुरुवात केली. धर्मभ्रष्टांच्या शुद्धीकरणाचा प्रश्न प्रथम स्वाभाविकपणें सिंधमध्येंच उद्भवला व तेथील लोकांनीं तो ताचडतोब सोडविलाहि. त्याकरितां आपल्या सिंधी हिंदूंनीं एक स्मृति तयार केली. कारण या प्रश्नावर निर्णय देणारीं वचनें पूर्वीच्या स्मृतींत स्वाभाविकच नव्हतीं. मन्वादिकांच्या वेळीं कोणी हिंदु कधीं जबरदस्तीनें परधर्मी बनविलाच जात नसे. देवलस्मृति सिंधमध्यें सिंधु नदीच्या तीरीं रचली गेली. तिचा मुख्य विषय धर्मभ्रष्टांचें शुद्धीकरण हाच होता. म्लेंच्छांनीं कैद केल्यामुळें ज्या लोकांना अभक्ष्यभक्षण, अपेयपान, अगम्यागमन, वगैरे करावें लागलें, आपल्या मेखला-यज्ञोपवीतादिकांना मुकावें लागलें, गोहिंसा करावी लागली, म्लेंच्छोच्छिष्ट भक्षण करावें लागलें, म्हणजे जे सर्वस्वीं धर्मभ्रष्ट झाले त्यांची शुद्धि कशी करावी, याबद्दल प्रथम देवल ऋषीनें निर्णय दिला आहे. त्यानें सांगितलेलीं प्रायश्चित्तें हीं क्षौर, उपवास, गंगास्नान यांसारखीं साधींच आहेत.

देवलानें स्त्रियांनाहि शुद्धीकरण शक्य आहे, हें स्पष्ट सांगितलें आहे. ज्या स्त्रियांना केवळ म्लेंच्छस्पर्शच झाला अगर अभक्ष्यभक्षण करावें लागलें त्यांनाच तेवढें नव्हे, तर ज्यांच्यावर बलात्कार झाला त्यांना देखील देवल ऋषीनें शुद्धि सांगितली आहे. म्लेंच्छाकडून जरी गर्भ राहिला तरी देखील स्त्रिया पुन्हां विशुद्ध करून घ्याव्यात, असें देवलानें स्पष्ट सांगितलें आहे (दे. स्मृ. ४९-५०). वीस वर्षांपर्यंत केव्हांहि शुद्धि करतां येते, असें देवलाचें मत होतें.

देवल स्मृतीची ही व्यवस्था त्या वेळीं समाजास मान्य होती. समाज त्याप्रमाणें वागत होता. यास पुष्कळच पुरावा व तोहि मुसलमानी इतिहासकारांचा आहे. दहाव्या शतकांतील अलबिलादुरी हा इतिहासकार लिहितो, "आठव्या शतकाच्या अखेरीस सिंधमध्यें मुसलमानी सत्तेस ओहोटी लागली. इतकेंच नव्हे, तर मुसलमानी धर्मासहि चांगलाच पायबंद बसला. कारण बाटलेले सर्व हिंदू पुन्हां मूर्तिपूजक बनले व त्यामुळें मुसलमानांची संख्या घटली." पुढे पंजाबमध्यें जेव्हां मुसलमानांच्या स्वाऱ्या सुरू झाल्या तेव्हां पंजाबी हिंदूंनीहि धर्मभ्रष्टांचें शुद्धीकरण सुरू केलें. त्याचें एक उदाहरण उतबी नामक इतिहासकारानें दिलें आहे.

पण अकराव्या शतकांत धर्मभ्रष्टांचें शुद्धीकरण हळूहळू रूढींतून जाऊं लागलें. ब्राह्मणवर्ग शुद्धीकरणाच्या उलट होऊं लागला होता. पण ब्राह्मणेतर त्यास अद्याप अनुकूल होते. बाराव्या शतकापासून पुढें धर्मभ्रष्टांचें शुद्धीकरण अधिकाधिक लुप्त होऊं लागलें. एक तर मुसलमानी अमलांत बाटलेल्या हिंदूस मुसलमान धर्म सोडणें शक्यच नव्हतें. कारण धर्मांतर करणें हा मुसलमानी धर्माप्रमाणें मोठा गुन्हा आहे व त्यास प्राणांतिक शिक्षा सांगितली आहे.

शिवाजीचा दृष्टिकोन या बाबतींत उदार होता, हें सांगण्याची जरूरी नाहीं. निंबाळकर घराण्यांतील एका सरदारास (बजाजीस) शुद्ध करून घेऊन त्यानें त्याच्या मुलास आपली मुलगीहि दिली. नेताजी पालकर हा आग्र्यास मागें राहिला व औरंगजेबाच्या हातीं सांपडला. त्यानें त्यास मुसलमान करून पेशावरकडे पाठविलें व तेथें त्यानें एका पठाण स्त्रीशीं लग्नहि केलें. पुढें ज्या वेळीं संधि साधून नेताजी सहकुटुंब परत आला त्या वेळीं त्यास शिवाजीनें पुन्हां सहकुटुंब स्वधर्मांत घेतलें. शिवाजीचें हें धोरण तंजावरच्या भोसल्यांनीं चालू ठेवलें. तेथें जेसुइट लोकांच्या कारवायांमुळें अनेक लोक ख्रिस्ती बनून गोंधळ उडूं लागला. मनूची नांवाच्या प्रवाशानें लिहिलें आहे कीं, सर्व घोटाळा थांबण्याकरितां तंजावरच्या राजानें एक दिवस वटहुकूम काढून सर्व ख्रिस्त्यांना हिंदू होण्यास फर्मावलें व हिंदू करून टाकलें.

पण पेशवाईंत हें धोरण राहिलें नाहीं. थोरल्या बाजीरावास मस्तानीस अगर तिच्या मुलांस हिंदू करतां आलें नाहीं. पानपतच्या लढाईंत नरहर रहाळकर नांवाचा पैठणकर ब्राह्मण कैदेंत सांपडला व तेथें त्यास मुसलमान व्हावें लागलें. बारा वर्षांनीं तो युक्तिप्रयुक्तीनें निसटला व पैठणास परत आला. तेथें आल्यावर साहजिकच त्यानें हिंदु धर्मांत परत येण्याची इच्छा दर्शविली व पैठणकर ब्राह्मणांनीं उदारपणा दाखवून त्यास शुद्ध करून घेतलें. पण रहाळकराचे शत्रु पुण्यांत होते; त्यांनीं हा वृत्तान्त पेशव्यांच्या कानीं घातला व पुण्याहून फर्मान सुटलें कीं, रहाळकरानें मुसलमानच राहिलें पाहिजे ('सह्याद्रि', जानेवारी १९४७).

तथापि पेशवाईंतहि शुद्धीकरणाचीं बरींच उदाहरणें कागदपत्रांतून आढळतात. त्यासंबंधीं चिकित्सा मात्र फार असे. निर्मळ क्षेत्रांतल्या ब्राह्मणांनीं फिरंग्यांनीं बाटविलेल्या लोकांस शुद्ध करून घेतलें. अशा शुद्धीच्या खर्चासाठीं मराठ्यांनीं एक कर बसविला होता, असें वसईचा डॉ. कुन्हा म्हणतो.

ब्रिटिश अमदानींत ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं असंख्य हिंदू बाटविले असतां त्यांच्या शुद्धीची चळवळ कोठेंच फारशी दिसली नाहीं. मधून मधून कोणी धर्मभ्रष्टांना शुद्ध करून घेत; पण त्याबद्दल फार गवगवा होई. एकंदर हिंदु समाज शुद्धीकरणाच्या

विरुद्धच होता. पण आर्यसमाजानें हा शुद्धीकरणाचा प्रश्न प्रथम निटेनें हातीं घेतला. श्रद्धानंदांनीं पूर्वी मुसल्मान धर्मांत गेलेल्या हजारों मलकाना रजपुतांना शुद्ध करून घेतलें. दक्षिणेंत हिंदु मिशनरी सोसायटी व मसुरच्या ब्रह्मचर्याश्रम यांनींहि हें कार्य हातीं घेतलें. मसूराश्रमानें गोव्यांतील हजारों गावड्यांचें शुद्धीकरण केलें. नंतर हिंदुमहासभेनें याकडे लक्ष दिलें. आतां विधवाविवाहाप्रमाणें शुद्धीकरणहि सर्वमान्य झालेलें दिसतें. त्याबद्दल लोकांचा फारसा विरोध नसतो किंवा शुद्धीकरणानंतर वाळींत पडण्याचीहि भीति उरली नाहीं; मात्र शुद्धीकृत मागूस एकदम कोठल्याहि जातींत पडत नाहीं. कालांतरानें दर्जाप्रमाणें एखाद्या जातींत विवाहसंबंध होऊन त्याचा त्या जातींत शिरकाव होतो, किंवा असे शुद्धीकृत लोक स्वतंत्र हिंदू म्हणून वावरतात.

हिंदुस्थानच्या फाळणीपूर्वी व नंतर बंगाल्यांत व पंजाबांत जेव्हां भयंकर कत्तलाकत्तली झाली व स्त्रियांवर अत्याचार झाले तेव्हां सनातनी शास्त्रीमंडळींनीं आणि शंकराचार्यांनींहि अशा शुद्धीकरणास मान्यता दिली, हें लक्षांत घेण्यासारखें आहे.

**शुनःशेप**—अजीगर्ताचा एक पुत्र. हरिश्चंद्रानें पुत्रप्राप्तीसाठीं वरुणाला नवस केला होता कीं, पुत्र झाल्यास बळी देईन. नंतर पुत्र झाला. तेव्हां नवस फेडण्याची तो टाळाटाळ करूं लागला. त्यामुळें त्याला उदररोग झाला. तेव्हां हरिश्चंद्र राजाच्या रोहिताबद्दल याला वरुणाला बळी देण्यास बापाकडून विकत घेतलें; पण विश्वमित्रानें यास वांचविलें. म्हणून हा विश्वामित्राचा पुत्र मानला जातो. याची कथा ऐतरेय ब्राह्मणांत आढळते. हा पुढें मोठा मंत्रद्रष्टा झाला.

**शुंभ-निशुंभ**—हे दोघे असुरबंधु शिवोपासक असून यांच्यापासून देवांनाहि पीडा होऊं लागली. वरामुळें पुरुषापासून यांना मृत्यु नव्हता. तेव्हां देवांच्या प्रार्थनेवरून दुर्गा देवीनें यांस मारलें. चंड व मुंड हे यांचेच सेनापती होते.

**शून्यवाद**—( निहिलिझम ). हा पारिभाषिक शब्द १९ व्या शतकाच्या उत्तरार्धांतील रशियन क्रांतिवादी समाजसत्तावाद्यांच्या सिद्धान्ताला अनुलक्षून प्रचारांत आला. हा शब्द प्रथम तुर्गेनीव्ह या कादंबरीकारानें आपल्या 'फादर्स अँड सन्स' नामक कादंबरींत १८६२ सालीं योजला, आणि अशा विध्वंसनवादी क्रांतिकारकाचा उत्तम नमुना म्हणून त्या कादंबरींत एक पात्र रंगविलें. आरंभींचे विध्वंसनवादी पुढारी चांगले विद्वान् तत्त्ववेत्ते असून सुखवादाचा आणि परहितवादाचा पुरस्कार करणारे ( अल्ट्रुइस्ट ) होते. त्यांचे पुढारी त्चेर्निशेव्हस्की, पिसारेव्ह, लाव्हरोव्ह व इतर हे चांगले बुद्धिमान् आणि शांततावादी होते. परंतु झारशाहीनें त्यांना तुरुंगवास, हद्दपारी, सक्तमजुरीची कैद, वगैरे हालअपेष्टा भोगाव्या लागल्या. अशा प्रकारें त्यांच्या शांततामार्गी प्रचारकार्याला यश न आल्यामुळें या पंथाच्या लोकांनीं दहशतवादी मार्गाचा अवलंब केला. १८८० च्या सुमारास 'निहिलिझम' हा शब्द बाँब, डायनामाइट, दहशत आणि हत्या यांचा निदर्शक बनला. व्हेरा झासौलित्श्नें पोलिसखात्याच्या मुख्याधिकाऱ्यावर सेंट पीटर्सबर्ग ( लेनिनग्रॅड ) येथें १८७१ सालीं गोळी झाडली, आणि निहिलिस्टांनीं दुसऱ्या अलेक्झांडर झारवर १८८८ सालीं बाँब टाकून त्याला ठार मारलें. त्यामुळें राजकीय अत्याचारी गुन्हेगारांविरुद्ध अतिशय कडक उपाय योजण्यांत आले, आणि हा निहिलिस्ट पंथ नामशेष करण्यांत आला. तथापि नंतर नव्या क्रांतिकारक संस्था निर्माण झाल्या, आणि त्यांचा स्वातंत्र्याचा लढा १९१७ च्या राज्यक्रांतीनें यशस्वी झाला.

**शूरजी वल्लभदास**—हे एक मुंबईचे प्रमुख व्यापारी आहेत. यांचा रंगाच्या व रासायनिक द्रव्यांचा फार मोठा व्यापार आहे. अनेक जर्मन व अमेरिकन कंपन्यांच्या अडती (एजन्सी) यांच्याकडे आहेत. अलीकडे हे स्वदेशी उद्योगधंद्यांकडे विशेष लक्ष घालूं लागले आहेत व त्यांनीं केवळ स्वदेशी मालाचा एक मोठा बाजार स्थापन केला आहे. हे मुंबईंतील अनेक गिरण्या व मुंबई व मुंबईबाहेरील अनेक कंपन्यांचे डायरेक्टर आहेत. हे कच्छ प्रजा परिषदेचे पहिले अध्यक्ष होते. कच्छ संस्थानानें प्रजेच्या गाऱ्हाण्यांची चौकशी करण्याकरितां एक समिति नेमली होती, तिचे तेथील प्रजेतर्फे हे एकमेव प्रतिनिधि होते. यांनीं सर्व कच्छ संस्थानांत खेडोपाडीं लोकांची परिस्थिति अवलोकन करण्यासाठीं दौरा काढला. १९३० व १०३२ मध्यें यांस तुरुंगवासाची शिक्षा झाली. युरोपमध्यें यांनीं दोनदां प्रवास केला आहे. यांनीं अनेक शिष्यवृत्त्या दिल्या आहेत. मुंबई व इतर अनेक ठिकाणच्या धर्मादाय संस्था व दवाखाने यांचे हे ट्रस्टी आहेत. यांनीं मुंबई व इतर ठिकाणीं मोफत दवाखाने चालविले आहेत. कच्छमधील एका मोठ्या शिक्षणसंस्थेचे हे चिटणीस आहेत. या संस्थेच्या कच्छमधील खेड्यांतून ६० शाळा आहेत. यांनीं गुजराथी, हिंदी व इंग्रजी भाषेंत अनेक पुस्तकें व पत्रकें प्रसिद्ध केलीं आहेत.

**शूर्पणखा**—रावणाची भगिनी. रावणाच्या हातूनच हिचा पति मारला गेला होता. दण्डकारण्यांत राम आल्यानंतर त्याचें रूप पाहून ही भाळली व रामास म्हणाली 'आपली भार्या कर' असें विनवूं लागली. रामानें नकार दिल्यावर ती सीतेस मारण्यास निघाली. तेव्हां रामाच्या आज्ञेवरून लक्ष्मणानें तिचे नाक-कान कापून तीस विद्रूप केलें. तेव्हां चिडून जाऊन रावणाला सीताहरणाच्या कामीं हिनें उद्युक्त केलें. सीता अशोकवनांत असतां ही रावणाला वरण्याविषयीं तिचें मन वळवीत असे.

**शूलगव**—हा एक पशुयाग आहे. शूलधारी शंकर ही यागदेवता. हा शरदृतु किंवा वसंतऋतु ह्यांमध्यें आर्द्रा नक्षत्रावर गांवाबाहेर पूर्वेस अगर उत्तरेस अर्धरात्रीनंतर करतात. ह्यांत एक विशिष्ट रंगाचा गोन्हा स्नान घालून बळी द्यावयाचा असतो. धन, कीर्ति, पुत्र, पशु, आयुष्य ह्यांचा लाभ हें ह्या यागाचें फळ सांगितलें आहे.

**शूलपाणि** ( १३७५–१४६० )—बंगालमधील एक संस्कृत धर्मशास्त्रकार. वल्लाळसेनाच्या वेळीं उदयास आलेल्या राधियांतील 'साहुडियाल' या पोटजातींतील हा बंगाली ब्राह्मण होता. रघुनंदनानें यास महामहोपाध्याय असें म्हटलेलें आहे. हा बंगालच्या लक्ष्मणसेन राजाचा न्यायाधीश असावा. यानें याज्ञवल्क्य स्मृतीवर 'दीपकलिका' नांवाची एक टीका लिहिली आहे. याशिवाय यानें स्मृतिविवेक, तिथिविवेक, दत्तकविवेक, श्राद्धविवेक, असे चौदा विवेकग्रंथ लिहिले आहेत.

**शूस्निग, डॉ. कुर्ट फॉन** ( १८९७– )—माजी ऑस्ट्रियन चॅन्सेलर. तो ऑस्ट्रियांतील अनेक मंत्रिमंडळांत मंत्री होता, आणि १९३४ सालीं डॉलफसचा खून झाल्यावर त्याच्या जागीं शूस्निग चॅन्सेलर झाला. कॅथॉलिक धर्मपंथीयांचें वजन शूस्निगवर असल्यामुळें त्यानें हॅप्सबर्ग राजघराण्याला पुन्हां राजपदारूढ करण्याचा प्रयत्न केला, पण हिटलरनें ऑस्ट्रिया देश जर्मनीला जोडण्याची मागणी केल्यामुळें शूस्निगपुढें मोठा पेंचप्रसंग निर्माण झाला. त्यानें हिटलरच्या मागणीला विरोध सुरू केला; पण हिटलरनें आपल्या निवासस्थानीं त्याला बोलावलें, आणि धमक्या देऊन एका करारनाम्यावर त्याची सही घेतली, व त्या करारनाम्यानें ऑस्ट्रियांत नाझी पंथाचा प्रसार करण्याचा मार्ग मोकळा झाला. शूस्निगनें ऑस्ट्रियांत परत आल्यावर सार्वमत हिटलरविरुद्ध तयार करण्याचा प्रयत्न केला, परंतु १९३८ च्या मार्च १२ तारखेस जर्मन सैन्य ऑस्ट्रियांत शिरल्यामुळें शूस्निगचा प्रयत्न फसला, व ऑस्ट्रिया जर्मनीला जोडला गेला. त्या वेळीं शूस्निगला कैद करण्यांत आलें.

**शृंखलाकार रोगजंतू**—( स्ट्रेप्टोकॉकस ). हे एक प्रकारचे वाटोळे सूक्ष्म जंतू असून त्यांच्या मालिका किंवा सांखळ्या असतात. यांच्या योगानें घांवरें हा रोग होण्याचा संभव असतो आणि बहुधा शरीराचा दाह करण्याच्या क्रियेमध्यें यांचा भाग असतो. या वर्गांतील एका जातीचे जंतू दूध विरजण्याच्या आणि मलई तयार करण्याच्या कामीं उपयुक्त असतात.

**शृंगचंचू पक्षी**—( हॉर्नबिल ). हे किंग फिशर किंवा हुप्पूसारखे एका जातीचे पक्षी आहेत. यांची चोंच फार मोठी असून तिच्या टोंकाशीं शृंगमय वेष्टन असतें. यांच्यापैकीं गोड्यासारखा एक पक्षी मलाया द्वीपकल्प व त्याच्या आसपास आढळतो. हा काळा असून त्यावर पांढरे ठिपके असतात. याला एक लांब मोठी चोंच असून ती थोडीशी बांकदार असते. याची मादी अंड्यावर बसावयाची झाली म्हणजे तिला झाडाच्या ढोलींत बसवून त्या ढोलीचें तोंड चिखलानें बंद करण्यांत येतें व एक छिद्र ठेवून त्यांतून नर तिला तितके दिवस खाऊं घालतो.

**शृंगद्रव्य**—( चिटिन ). किड्यांचे पंख, खेकड्याप्रमाणें कवचधारी प्राण्यांचीं कवचें यांच्या धातुघटनेंतील ( टिशूफॉर्मिंग ) एक प्रमुख द्रव्य. हें पारदर्शक असतें व रासायनिक साधनांना दाद देत नाहीं, पण तीव्र धात्वम्लांत हें विरघळतें.

**शृंगभस्म**—एक आयुर्वेदीय औषध. हृदयाचा अशक्तपणा, हृदयांतून कळा निघणें, मेंदूच्या श्रमामुळें आलेला अशक्तपणा, खोकला, छातींत कफ सांठणें, इत्यादि विकारांवर या भस्माचें चाटण दिल्यानें फार फायदा होतो. १ ते ३ गुंजा, मध, दूध–खडीसाखर, लोणी–खडीसाखर यांबरोबर देतात.

**शृंगाभास धातु**—( हॉर्नब्लेंड ). 'ॲंफिबोल' वर्गांतील एक प्रस्तरधातु. यांत मग्न सिकितें, चुना, लोखंड, व आल्मा ( ॲल्युमिना ) हीं द्रव्यें असून अग्न्युत्पन्न खडकांतून खे किंवा स्फटिक या आकारांत पुष्कळ सांपडतो. याचा रंग काळा किंवा हिरवट काळा असतो. कांहीं शृंगाभास पारदर्शक ( पारगासाइटसारखे ) तर बहुतेक अपारदर्शक असतात.

**शृंगेरी**—म्हैसूर, कडूर जिल्हा, कोप्पा तालुक्यामध्यें ही एक जहागीर आहे. लो. सं. सुमारें वीस हजार. या जहागिरींत एक मोठें गांव व २५९ खेडीं आहेत. तुंगभद्रा नदी हींतून वाहते. दरसाल पाऊस सुमारें १५० इंच पडतो. जगद्गुरु आद्य श्रीमच्छंकराचार्य यांनीं इ. स. ८०० च्या सुमारास येथें मठ स्थापन केला. विजयानगरचा पहिला राजा जो हरिहरराय त्यानें ही जहागीर या मठाप्रीत्यर्थ दिली आहे. ती अद्याप मठाकडेच चालत आहे.

**शेअर बाजार**—ज्या ठिकाणीं व्यापारी लोक सट्टे करतात तें ठिकाण किंवा सट्टे करणारांची संस्था. मुंबई, कलकत्ता यांसारख्या मोठ्या शहरीं असे बाजार असतात. या सट्ट्याच्या संस्थेचे सभासद होण्यास हजारांनीं वर्गणी भरावी लागते. सभासद झाल्यावर प्रत्यक्ष खरेदी-विक्रीचा व्यवहार करतां येतो. आंतरराष्ट्रीय व्यापारांत ज्या जिनसा देवघेवीच्या असतात, त्यांचेच सट्टे होतात ( उदा., कापूस, गहूं ). शेअर बाजारांतील व्यापारी भावी तेजीमंदी अजमावून सौदे करतात; त्यांत कधीं नफा तर कधीं नुकसान होतें. कंपनीचे भाग ( शेअर्स ) देखील या सौद्यांत येतात. कंपनीची आर्थिक स्थिति ताळेबंदावरून समजून त्याप्रमाणें भागाच्या भावाची चढउतार होते. भाव चढेल म्हणणारा 'बुल' व उतरेल म्हणणारा 'बेअर' अशा संज्ञा आहेत. या बुल–बेअरमध्यें चढाओढ लागत असते. या खरेदी-विक्रीच्या

वेळीं प्रत्यक्ष जिनसा किंवा शेअर्स देण्याघेण्यांत येत नसतात. फक्त वायदा पटविण्याच्या वेळीं फरकाची रक्कम भरावी लागते. सराफा पाहा.

**शेक्सपियर, विल्यम** ( १५६४–१६१६ )—एक जगद्विख्यात इंग्रज कवि व नाटककार. शिक्षण प्राथमिकच झालें. याचें लग्न अठराव्या वर्षीच त्याच्याहून आठ वर्षांनीं मोठ्या असलेल्या बाईशीं झालें. पण पांच वर्षांनींच स्ट्रॅटफोर्डचें घरदार सोडून तो लंडनला गेला व नाटककंपनींत राहिला. अगदीं हलक्या शिपायाच्या कामापासून चढत चढत शेवटीं प्रसिद्ध नट व नाट्यकवि बनला; इतकेंच नव्हे तर मोठ्या नाटककंपनीचा भागीदार झाला. त्याच्या समकालीनांत तो अग्रेसर होता. बेन जॉन्सन, ग्रीन, मार्लो, इ. बड्या साहित्यिकांना त्यानें मागें टाकलें. हें तर झालेंच पण इंग्लंड आणि इतर युरोपियन राष्ट्रें यांत मागें देखील इतक्या योग्यतेचा कोणी नाटककार झाला नव्हता. त्याचें भाषाप्रभुत्व, नाट्यलेखनकौशल्य आणि मानवी स्वभावाचें सूक्ष्म ज्ञान कोणालाहि नव्हतें. त्यानें ३७ नाटकें, २ खंडकाव्यें, १५४ सुनीतें ( सॉनेट्स ) व कित्येक लहानसहान कविता केलेल्या नमूद आहेत. नाटकांपैकीं, १७ हास्यरसप्रधान, १० शोकरसप्रधान व १० ऐतिहासिक आहेत. 'व्हीनस अँड ॲडोनिस' व 'रेप ऑफ ल्युक्रेस' हीं दोन खंडकाव्यांचीं नांवें आहेत. त्याच्या ऐतिहासिक नाटकांतून इंग्लंडचा तीनशें वर्षांचा इतिहास डोळ्यांपुढें खेळवला आहे. हॅम्लेट, ऑथेलो, मॅक्बेथ व किंग लियर हीं त्याचीं नाटकें जागतिक वाङ्मयांत बहुमानाचीं गणलीं गेलीं आहेत. 'ॲज यू लाइक इट्', 'ए मिड् समर नाइट्स ड्रीम', 'मर्चंट ऑफ व्हेनिस' 'कॉमेडी ऑफ एरर्स', इ. हास्यरसाचीं नाटकें फार मजेदार व चांगली करमणूक करणारीं आहेत. 'व्यासोच्छिष्टं जगत्सर्वम्' याप्रमाणें शेक्सपियरनें असा कोणताहि संसारांतील आणि मानवी स्वभावांतील भाग शिल्लक ठेवला नाहीं कीं, ज्याचें चित्र त्यानें आपल्या नाटकांत उठविलें नाहीं. एलिझाबेथ राणी व पहिला जेम्स यांकडून त्याचा योग्य तो मानसन्मान झाला. त्यानें चांगलें ऐश्वर्यहि भोगलें. नंतर १६१२ पासून तो लेखणी खालीं ठेवून आपल्या गांवीं जाऊन स्वस्थ सुखानें राहिला. त्याचीं अनेक स्मारकें झालेलीं आहेत. त्याच्या नाटकांचीं भाषांतरें जगांतील बहुतेक मोठ्या भाषांतून झालीं असून रंगभूमीवर नाटकेंहि चालतात.

सु. वि. भा. ६–९८

**शेख**—शेख या शब्दाचा अर्थ विद्वान् असा आहे. व आरंभीं तो अरबस्तानांतून आलेल्या पुण्यवान् लोकांस लावीत असत. पण नंतर मुसलमान झालेल्या हिंदूंसहि शेख म्हणूं लागले. शेख जातींत १,०६८ पोटजाती आहेत. त्यांपैकीं कांहीं महत्त्वाच्या जाती येणेंप्रमाणेः—क्युरेशी, फरुकी, अनसारी, महाजरीन, क्युरेशी सादिकी, क्युरेशी हश्मी, इत्यादि. यांची एकंदर लोकसंख्या १९११ सालीं २,२१,३१,२४२ होती. पैकीं बंगालमध्यें २,२३,५२,९४४, आसाममध्यें १७,६१,६६६, बिहार-ओरिसा प्रांतांत १७,०८,९३२ व सं. प्रांतांत १३,१४,८२८ होते. हे सर्व प्रांतांतून आढळतात.

**शेख अहमद खट्टू गंज बक्ष ( मघाबी )**—एक सालेज घराण्यांतील मुसलमान साधु. अहमदाबादला साबरमतीपासून अडीच मैल अंतरावर या प्रसिद्ध साधूचें थडगें आहे. शेखचा जन्म दिल्लीस इ. स. १३३६ त झाला. तो वयाच्या १११ व्या वर्षीं सार्केज येथें मरण पावला. याचें थडगें अतिशय मोठें व भव्य आहे. त्याच्या मध्यावर मोठें घुमट व आणखी पुष्कळ लहान घुमट आहेत. थडग्यासभोंवतीं पितळेच्या नक्षीदार खिडक्या आहेत. जमिनीवर रंगीत संगमरवरी फरशी आहे, आणि थडग्यावर एक लांब चांदीची सांखळी आहे. या साधूच्या दर्ग्याच्या दक्षिणेस त्याचा शिष्य शेख सलाहूद्दीन याचें थडगें आहे.

**शेख चंदनवाझ ( १३२१–१४९२ )**—एक मुसलमान साधु. निजामच्या राज्यांत गुलबर्गा येथें याचा दर्गा आहे. फिरोझशहाच्या कारकीर्दीत १४१२ मध्यें हा साधु तेथें आला. चोर घुमट ही चोरांची राहण्याची इमारत म्हणून प्रसिद्ध आहे. ती इ. स. १४२० मध्यें एका श्रीमान् व्यापाऱ्यानें बांधिली व शेख चंदनवाझ यास देणगी म्हणून दिली. परंतु ती त्यानें सावकारीच्या पैशावर बांधलेली होती म्हणून शेखनें घेण्याचें नाकारलें. इ. स. १६४० मध्यें शेख चंदनवाझचें थडगें त्याच्या नातलगांनीं बांधलेलें आहे. ही कबर अतिशय प्रेक्षणीय आहे. फिरोझशहाचा भाऊ अहमदशहा वली यानें या साधूस पुष्कळ मौल्यवान् आहेर व जहागिऱ्या दिल्या.

**शेख महंमद**—एक मुसलमान मराठी कवि. हा जातीनें मुसलमान होता तरी भागवतधर्मी बनला होता. चांभारगोंदापासून आठ कोसांवर असलेल्या सर्देवाडिरें या गांवीं हा राहत असे. 'भक्तिविजया'त शेख महंमदाचें सुरस आख्यान आहे. यानें 'योगसंग्राम', 'निष्कलंक बोध' व 'पवनविजय' असे तीन अभंगग्रंथ केले आहेत.

**शेख सलीम चिस्ती**—एक मुसलमान साधु. याचा दर्गा आग्र्याजवळील फत्तेपूर शिक्री येथें आहे. फत्तेपूर पूर्वी लहानसें खेडें होतें तेव्हां अकबरानें या साधूची भेट घेतली. अकबरास मुलगा होईल असें या साधूनें भविष्य वर्तविलें होतें. तेव्हां अकबरास मुलगा झाला तेव्हां त्यानें तेथें एक मोठें सुंदर शहर वसविलें, व त्यास

'फत्तेपूर शिक्री' म्हणजे 'विजयनगरी' असें नांव दिलें. त्या शहराची लांबी नऊ मैल असून तिन्ही बाजूंस तट होते व त्यास नऊ मोठे दरवाजे होते. अकबरानें तें शहर वसविण्यापूर्वी दगड-फोड्यांनीं एक मशिद या साधूसाठीं बांधिली होती. शेख सलीम यानें जमिनीवरून व समुद्रावरून हिंदुस्थानपासून मक्का व मदीना या दोन यात्रेच्या ठिकाणीं दोन वेळां प्रवास केला, असें अल्-बदाउननें लिहिलें आहे. एकंदर तो बावीस वेळां मक्केस व मदीनेस गेला. आणि तेथें तो शेख-ई-हिंद म्हणून प्रसिद्धीस आला.

चौकोनी दर्ग्यांत याचें थडगें आहे. ही जागा ४३०×३६० फूट आहे. या थडग्यास शुभ्र संगमरवरी दगड लावले आहेत. थडग्यावर मोत्यांनीं मढविलेली अशी एक छत्री आहे. या थडग्यावर पुढील अक्षरें खोदलेलीं आहेत : "ईश्वर या शेख सलीम दर्ग्याचें रक्षण करो." मूल नसलेल्या स्त्रिया थडग्याभोंवतीं जमून मूल व्हावें म्हणून या साधूची प्रार्थना करतात.

**शेख सादी** (११८४-१२९२)—एक फारसी कवि. याचें पूर्ण नांव शेख मुस्लिकदिन सादी-अल्-शिराज असें होतें. एका लढाईंत हा कैदी होऊन पडला असतां त्याची बुद्धिमत्ता एका गृहस्थाच्या नजरेस आली, यामुळें त्यानें त्याची कैदेंतून सुटका केली व त्यास आपली मुलगी दिली. यानें चौदा वेळां मक्केची यात्रा केली होती. हा फारसी भाषेंतील लोकोत्तर कवि होऊन गेला. 'गुलिस्तान' (गुलाबाची बाग) व 'बोस्तान' (फळबाग) हीं याचीं उत्कृष्ट काव्यें आहेत. गुलिस्तान हा एक नीतिपर ग्रंथ असून यांत अनेक कथा, आख्यायिका, विचार, इ. गद्यपद्यमय भाग गोविले आहेत. बोस्तानमध्यें पद्यांत ऐतिहासिक गोष्टी व नैतिक कथा दिल्या आहेत. या ग्रंथांचीं भाषांतरें अनेक भाषांत झालीं आहेत.

**शेगांव**—वऱ्हाड, बुलढाणा जिल्हा, खामगांव तालुका, एक शहर. हे जी. आय्. पी. रेल्वेचें स्टेशन भुसावळ-नागपूर फांट्यावर आहे. रेल्वे सुरू होण्यापूर्वी यास फारसें महत्त्व नव्हतें. परंतु नंतर भरभराटीस आलें. लो. सं. सुमारें वीस हजार. येथें कापसाचा व्यापार बराच चालत असून बरेच सरकी काढण्याचे आणि रुई दाबण्याचे कारखाने आहेत. येथें बाजार दर मंगळवारीं भरत असून धान्य व गुरें यांचा व्यापार चालतो.

**शेझी, अँतोन लिओनार्द द** (१७७३-१८३२)—एक फ्रेंच प्राच्यवाङ्मयविशारद. १७९९ त राष्ट्रीय ग्रंथसंग्रहालयाच्या प्राच्य शाखेत त्याला नोकरी मिळाली. १८०३ पासून तो संस्कृतचा अभ्यास करूं लागला. त्या वेळीं संस्कृत भाषेचें व्याकरण किंवा कोशहि त्याला उपलब्ध नव्हता. तेव्हां मोठ्या प्रयासानें यानें प्राच्य भाषेचें बेताचें ज्ञान करून घेऊन तींत तो कविताहि करूं लागला. कालेज द फ्रान्समध्यें नेमलेला (१८१५) पहिला संस्कृतचा प्रोफेसर शेझीच होय. त्यानें फारसींतले कांहीं ग्रंथ व कांहीं संस्कृत वाङ्मयावरील ग्रंथ रूपांतरित केले आहेत. 'शाकुंतल' नाटकाची पहिली आवृत्ति त्यानें सटीक छापून काढली.

**शेठ अमृतलाल दलपतराम** (१८८५- )—एक हिंदी वृत्तपत्रकार व सार्वजनिक कार्यकर्ते. यांनीं आपल्या आयुष्य-क्रमास वकिली करण्यापासून प्रारंभ केला. लवकरच त्यांची लिंबडी संस्थानांत जज्ज म्हणून नेमणूक झाली. परंतु १९२१ मध्यें असहकारितेच्या चळवळींत मिळण्याकरितां त्यांनीं ही नोकरी सोडून दिली. व अहमदाबाद जिल्ह्यांत धंदुका येथें सार्वजनिक कार्य कर-ण्यास प्रारंभ केला. अहमदाबाद येथून ते स्वराज्य पक्षातर्फे कायदे मंडळांत निवडून आले. परंतु १९३० मध्यें त्यांनीं सत्याग्रहाच्या चळवळींत पडण्याकरितां राजीनामा दिला. पुन्हां त्यांनीं धंदुका तालुक्यात कार्य करण्यास प्रारंभ केला. तेव्हां त्यांस अडीच वर्षें कारागृहाची शिक्षा झाली. त्यांतून सुटका झाल्यावर १९३३ मध्यें त्यांनीं पुन्हां सत्याग्रहांत भाग घेतला व त्यांस पुन्हां शिक्षा झाली. १९३१ सालीं दुसऱ्या गोलमेज परिषदेमध्यें संस्थानी प्रजेचें गाऱ्हाणें मांडण्याकरितां ते गांधीजींबरोबर इंग्लंडला संस्थानी प्रजेचें शिष्टमंडळ घेऊन गेले. १९२८ मध्यें ते राजस्थान संस्थानी प्रजापरिषदेचे अजमेर अधिवेशनाचे अध्यक्ष होते. १९३२ मध्यें ते पूर्व आफ्रिकेंतील हिंदी राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाचे अध्यक्ष होते. हे अनेक वर्षें संस्थानी प्रजापरिषदेचे मुख्य मंत्री होते. यांनीं राणपूर येथें 'सौराष्ट्र' पत्र चालवून संस्थानी प्रजेबद्दल चळवळ चालविली होती. पुढें 'सन्' या नांवाचें इंग्रजी दैनिक सुरू केलें होतें तें बंद पडल्यावर १९३४ मध्यें यांनीं 'जन्मभूमि' हें आज अत्यंत लोकप्रिय असणारें गुजराथी दैनिक मुंबईमध्यें चालू केलें. व हल्लीं 'लोकमान्य' या मराठी दैनिकाचेहि तेच मालक आहेत. 'लोकशक्ती'चीहि व्यवस्था कांहीं काळ त्यांच्याकडेच होती. अ. भा. कॉंग्रेस कमिटीचे हे कांहीं दिवस सभासद होते. 'स्टेट्स पीपल लिमिटेड' या संस्थेचे ते मॅनेजिंग डायरेक्टर आहेत.

**शेडबाळ**—मुंबई, बेळगांव जिल्हा, अथणीच्या पश्चिमेस सुमारें २० मैलांवर हा एक लहान गांव आहे. वस्ती बहुतेक जैनांची आहे. येथें बसवाचें जुनाट देऊळ असून त्यांत शिला-हारांचा इ. स. ११५६ चा शिलालेख आहे. येथें दर महाशिव-रात्रीस जत्रा भरते. लो. सं. ५,७२८.

**शेणकिडा**—१. (डंग-बीटल). हे किडे आपलीं अंडीं उकिरडा, शेण, वगैरेंमध्यें घालतात म्हणून यांस शेणकिडे म्हणतात. यांच्या अनेक जाती आहेत.

२. (स्कॅरॅबीन). शेणकिड्यांच्या जातींचे हे अनेक प्रकारचे प्राणी आहेत. यांच्या एकंदर सुमारें १३,००० निरनिराळ्या जाती आहेत. यांतील एका जातीस ईजिप्तमध्यें फार पवित्र मानीत असत.

शेतकी—इराणी लोकांपासून भारतीय आर्य अलग होण्याच्या पूर्वीच आर्य वंशांतील लोकांना जमिनीची लागवड करणें माहीत होतें. कारण जमिनींत बीं पेरणें आणि धान्य उत्पन्न करणें यांविषयीं ऋग्वेदांतील यवम कृष, सस्य या शब्दांच्या अर्थाचे अवेस्तांतील शब्द यवकरेष व हह्य हे आहेत. अथर्ववेदांत पृथु वैन्य हा कृषिकर्माचा आद्य प्रवर्तक असल्याचा उल्लेख (८-१०-२४) आहे. ऋग्वेदांतहि आश्विन् नांगराच्या साहाय्यानें बीं पेरीत असत, असा उल्लेख आहे. पुढील संहिता आणि ब्राह्मणग्रंथ यांतहि कृषिकर्माचा बराच उल्लेख आला आहे. ऋग्वेदांत देखील कृषिकर्माला महत्त्व दिलेलें आढळतें. पंचविंश ब्राह्मणांत ब्राह्मणी सत्तेच्या बाहेर असलेले व्रात्य लोक जमीन नांगरीत नसत असा उल्लेख आहे. नांगरलेल्या जमिनीला उर्वरा अथवा क्षेत्र म्हणत. खताचा (शकन्, करीष) उपयोग करीत असत आणि पाटबंधाऱ्याचा (खनित्र)हि उपयोग केला जात असे. शतपथ ब्राह्मणांतील शेतकीचीं कृत्यें म्हणजे नांगरणें, पेरणें, कापणी करणें आणि मळणें (कृषतः, वपन्तः, लुवन्तः, मृणन्तः) हीं आढळतात. धान्य पिकलें म्हणजे कोयत्यानें (दात्र सृणी) कापीत, गठ्ठे (पर्ष) बांधीत आणि कोठाराच्या जमिनींत (खल) मळीत असत. धान्य चाळणीनें अथवा सुपानें चाळून त्यांतील कचरा काढून टाकीत असत. व नंतर एका सांठवणांत (ऊर्दर) भरून ठेवीत असत. वैदिक काळांतील लोक फळझाडांची लागवड करीत किंवा तीं आपोआप उगवत असत, हें समजत नाहीं. परंतु कर्कन्धु, कुवल, बदर, इत्यादि फळांचा उल्लेख येतो. तैत्तिरीय संहितेंत (७-२,१०,२) शेतीचे हंगाम कोणते ते सांगितले आहेत. यव हें धान्य हिंवाळ्यांत पेरून उन्हाळ्यांत काढीत असत; पावसाळ्यांत पेरलेलें धान्य शरदृतूंत निघे. वाटाणे आणि तीळ हीं धान्यें ग्रीष्मऋतूंत पेरून हिंवाळ्यांत काढीत. तैत्तिरीय संहितेंत आणखी एका स्थलीं (५-१,७,३) पिकाचे वर्षांतून दोन हंगाम असत असा उल्लेख आहे. हिंवाळ्यांत पेरलेलें धान्य चैत्रांत निघत असे, असा कौषीतकी ब्राह्मणांत उल्लेख आहे. शेतीच्या कामांत शेतकऱ्यांना फार त्रास पडत असे. उंदीर बीं खात, पक्षी आणि निरनिराळे सरपटणारे प्राणी (उपक्वस्, जम्य, तर्द, पतंग) पिकाचे कोंवळे अंकुर तोडीत असत, आणि अवर्षण व अतिवृष्टि यांमुळें पिकांचा नाश होत असे. हीं सर्व विघ्नें टळण्यासाठीं अथर्ववेदांत (६, ५०, १४२; ७, ११) मंत्र सांगितले आहेत.

चीनसारख्या प्राचीन राष्ट्रांतून शेतकी प्राचीन आहे. ईजिप्तमधील शेतीच्या पद्धती युरोपांत सुरू झाल्या. ग्रीक लोकांत शेतीचीं हत्यारें फार थोडीं होतीं; कांहीं खतें वापरीत. रोमन लोकांनीं शेतीकामांत सुधारणा केल्या; पाटपाण्याचीहि व्यवस्था केली. रोमन लोकांनीं ब्रिटनमध्यें हें शेतकीचें ज्ञान प्रसृत केलें. एलिझाबेथ राणीच्या कारकीर्दींत कृषिवाङ्मयहि तयार झालें. अठराव्या शतकांत पिकांचा बदल केल्यानें जमिनीचा कस जात नाहीं हें समजून आलें. फ्रेंच राज्यक्रांतीच्या काळांत (१७९९–१८१५) शेतीच्या उत्पन्नाचा भाव फार वाढल्यामुळें सर्व ब्रिटनभर शेतीची सुधारणा झाली. पुढील शतकांत शेतकी शाळा आणि कॉलेजें निघालीं. रॉयल ॲग्रिकल्चरल सोसायटीसारख्या मोठ्या संस्था स्थापन झाल्या. मंत्रिमंडळांत एक शेतकी-मंत्रि नेमला जाऊं लागला.

मनुष्यप्राण्याची संस्कृति धान्य पिकवून खाण्यापर्यंत जेव्हां पोंचली तेव्हांपासून म्हणजे लोहयुगापासून १९ व्या शतकापर्यंत शेतीच्या कामांत फारशी प्रगति झाली नाहीं; यांचें आश्चर्य वाटेल. परंपरेनें माणसें त्याच त्याच औतांनीं तींच तींच शेतीचीं कामें उरकीत. नांगर आणि कोयता कांहीं सुटला नाहीं. पण १९ व्या शतकांत शास्त्रीय आणि यांत्रिक शोधांमुळें ही परिस्थिति बदलली. वाफेच्या इंजिनानें पेरणी आणि कापणी झपाझप होऊं लागली. पुढें वीज आणि पेट्रोल यांनीं या प्रगतीवर मात केली. विजेनें जमिनीचा मगदूरहि बदलतां येऊं लागला. कृत्रिम रासायनिक खतें व जनावरांचीं खाद्यें यांचे शोध पुढें आले. प्राण्यांचें आणि वनस्पतींचें बीज लागेल त्या सामर्थ्याचें बनवितां येऊं लागलें. पाटबंधाऱ्यांच्या योगानें पाण्याची मुबलक सोय झाली. अल्पभूमिकृषि (इन्टेन्सिव्ह), निर्जल कृषि (ड्राय फार्मिंग) व इतर आधुनिक कृषिपद्धती अमलांत आल्या. सरकारी प्रयोगक्षेत्रांच्या द्वारें आणखी नवे शोध लागण्याला मोठी मदत झाली.

सुधारलेलीं सरकारें आज शेतकी आणि शेतकरी यांना पुष्कळ साहाय्य देऊं लागलीं आहेत. मजूरवर्गाच्या उन्नतींत शेतकऱ्यांचा प्रश्नहि गोंवला गेला आहे. सहकारी मंडळ्या शेतकऱ्यांच्या हितासाठीं सर्वत्र स्थापन झाल्या आहेत. बाहेरून येणाऱ्या धान्यांना बंदी किंवा त्यांवर जास्त कर यामुळें देशांतील धान्यांचे भाव स्थिर होण्याला मदत होत आहे. विसाव्या शतकाच्या आरंभीं सुधारलेल्या राष्ट्रांतून शेतकीचा असा इतिहास बनलेला दिसतो.

शेतकीमध्यें मुख्य तीन गोष्टी येतात: १. धान्यें, साखर, चहा व इतर खाद्यपदार्थ तयार करणें. २. दूधदुभत्यासाठीं गुरें आणि अंड्यांसाठीं कोंबड्या यांचें संवर्धन करणें. ३. फळें आणि भाज्या यांचें उत्पादन करणें. यांच्या जोडीचे इतर कांहीं धंदे येतात. जगांतील मोठे शेतीचे प्रदेश म्हणजे (१) अमेरिकन संयुक्त संस्थानें आणि कानडा; (२) रशियाचें मैदान, पोलंड आणि हंगेरी; (३) चीन; व (४) हिंदुस्थान. युरोपांतील औद्योगिक राष्ट्रें आपआपल्या पुरतें धान्य पिकवितात.

हिंदुस्थान हा कृषिप्रधान देश आहे यांत शंका नाहीं. हिंदुस्थानांतील तीन-चतुर्थांश लोक शेतकीवर अवलंबून आहेत. येथल्या-

इतका ऊंस व शेंगा दुसरीकडे कोठें होत नाहीं व तांदुळाच्या व अळशीच्या उत्पन्नाच्या बाबतींत याचा अनुक्रम जगांत दुसरा लागतो. कापसाच्या बाबतींत हा अमेरिकेच्या खालोखाल येईल. ताग आणि लाख यांची मक्तेदारी हिंदुस्थानकडेच आहे. चीनच्या खालोखाल येथें चहा पिकतो.

भारतांत आज १७,०८,००० एकर जमीन लागवडींत आहे व ६,२४,१३,००० एकर जमीन पडीत आहे. या पडीत जमिनीचा उत्पादनास उपयोग करण्याचे सरकारचे प्रयत्न चालू आहेत. कृषिविषयक शास्त्रीय संशोधन १८८९ सालापासून सुरू आहे. १९०५ सालीं लॉर्ड कर्झननें पुसा येथें इंपीरियल ॲग्रिकल्चरल रीसर्च इन्स्टिट्यूट या कृषिसंशोधनसंस्थेचा पाया घातला. ही पुढे दिल्लीला नेण्यांत आली. सरकारने नुकतेंच दिल्लीला एक मध्यवर्ती शेतकी कॉलेज सुरू केलें आहे. १९२६ सालच्या बादशाही शेतकी कमिशननें यंत्रसामुग्रीवर फार भर दिला, व अखंड संशोधन चाललें पाहिजे असा सल्ला दिला. त्याप्रमाणें कृषियंत्रांची आवक परदेशांतून होत आहे.

खरीप आणि रब्बी हे शेतकीचे हंगाम असतात. तांदूळ, गहूं, बाजरी, जोंधळा, डाळी, ऊंस, मसाल्याचीं धान्यें हीं खाण्याचीं पिकें होत. ताग, रेशीम, अंबाडी हीं तंतुमय; व अळशी, मोहरी, भुईमूग, नारळ, एरंडी, तीळ, इ. तेलाचीं पिकें होत. अफू, तंबाखू, चहा, कॉफी, नीळ, वगैरे औषधी व पेयांबाबतचीं पिकें आहेत.

**शेती-वाटप-पद्धति**—(ॲलॉटमेंट सिस्टिम). ही पद्धति अशी आहे कीं, शेतमजुरांना किंवा इतर कामकऱ्यांना त्यांचे नेहमीचे काम संभाळून त्यांना व त्यांच्या कुटुंबीयांना शेती करतां येईल अशी थोडी जमीन (एक एकर किंवा त्याहूनहि कमी) द्यावयाची. ही पद्धति इंग्लंडांत १८८७ सालच्या 'ॲलॉटमेंट ॲक्ट' या कायद्यानें सुरू केली, आणि स्थानिक आरोग्यखात्यांतील अधिकाऱ्यांना असा अधिकार दिला कीं, त्यांनीं आपल्या हद्दींतील स्थानिक मजुरांना अशी जमीन शेतकीकरितां मिळवून द्यावी. प्रत्येक इसमाला एक एकरापेक्षां अधिक जमीन देऊं नये, आणि त्या जमिनीचा खंड योग्य प्रमाणांत त्या आरोग्यखात्याच्या अधिकाऱ्यानें वसूल करावा. अशा शेतीच्या जमिनीवर इमारत बांधूं नये, फक्त शेतकीचीं औतें व जनावरें वगैरेकरितां लहान झोपडें बांधावें. पुढे १८९४ सालीं या कायद्यांत दुरुस्ती होऊन चार एकरपर्यंत जमीन प्रत्येकाला द्यावी असें ठरलें; आणि १९०७ च्या कायद्यानें ही मर्यादा पांच एकरपर्यंत वाढविली.

**शेंदणी**—हिचा वेल असून तो जमिनीवरच पसरतो. फळें भाद्रपदाच्या सुमारास धरतात. फळांस शेंदण्या म्हणतात. कोवळीं फळें असतांना फळें कडू लागतात, पण नंतर आंबूस लागतात. याचें लोणचें घालतात व भाजीहि करतात.

**शेंदाड**—या वेलांत कडू व गोड अशा दोन जाती आहेत. फळ नारळाएवढे असतें. खाण्यास गोड लागतें. याची शिकरण चांगली होते. शेंदाड उष्ण आहे.

**शेंदूर**—शिशापासून प्रत्यक्ष प्राणिदीकरणानें (ऑक्सिडेशनने) हा काढतात. ही तांबडी रवाळ पूड असते. ही फार तापविल्यास प्राणवायु बाहेर पडतो. नळ्या जोडण्यास लुकण म्हणून, रंग देण्यास, व तेलें घट्ट करण्यास शेंदराचा उपयोग करतात. आपल्याकडे शेंदूर हा कांहीं देवतांना प्रिय म्हणून वाहतात. गणपति, मारुति, ग्रामदेवता यांना शेंदूर फासतात.

**शेंदेलोण**—एक खनिज; सिंधु हरिद (सोडियम क्लोराइड); खाणीचें मीठ; सैंधव. हा १०० किंवा जास्त फूट जाडीच्या खडकांतून घनाकृति आढळतो. हा पाण्यांत विरघळतो. प्राचीन काळचीं सरोवरें कोरडीं पडून त्यापासून हा पदार्थ तयार झाला असला पाहिजे. मृतसमुद्र व उटाहाचें मोठें क्षार सरोवर यांतून आज हा तयार होत असतो. पंजाबांत कोहाट खाणी आहेत; जर्मनी, पोलंड व गॅलिशिया या देशांत सैंधवाचे खडक आहेत.

**शेनिए, आन्द्रे मारी** (१७६२–१७९४)—एक फ्रेंच कवि. १७९० सालीं तो रिपब्लिकन पक्षांपैकीं मवाळ गटाला सामील झाला, त्यामुळें रॉयलिस्ट व जॅकोबिन या दोन्ही पक्षांनाहि तो अप्रिय झाला. क्रांतिकारकांच्या न्यायालयांत त्याची चौकशी होऊन त्याला गुन्हेगार ठरवून त्याचा शिरच्छेद करण्यांत आला. यानें केलेलीं शोकगीतें आणि बोधपर लघुकाव्यें चांगलीं असून त्यांपैकीं 'ला जन कापिव्ह' हें त्यानें तुरुंगवासांत असतांना केलेलें काव्य सर्वांत उत्तम आहे.

**शेपू**—१. [ वर्ग-उंबेलि फेरी. इं. ॲनिस ]. हें वर्षायु रोप असून भूमध्यसमुद्राच्या आसपासच्या देशांत होतें. याची लागवड स्पेन व दक्षिण रशिया यांमध्ये करतात व याचें बी बडीशेप म्हणून बाजारांत येतें. बडीशेपांचा उपयोग कांहीं पदार्थांत वासाकरितां व खोकल्याच्या वगैरे औषधांतहि करतात.

२. याच्या झाडास जे तुरे येतात त्यांत बी असतें. त्यास शेपा किंवा बाळंतशेप म्हणतात. शेपूची भाजी वातहारक आहे. तेव्हां अंगांतील वात जाण्यासाठीं ही नेहमीं खावी.

**शेफील्ड**—इंग्लंड, यॉर्कशायर परगण्यांतील एक महत्त्वाचें औद्योगिक शहर. येथें सेंट पीटर्सचें देऊळ, कटलर्स हॉल, विद्यापीठ यांच्या इमारती प्रेक्षणीय आहेत. लोखंड, पितळ व पोलाद या धातूंचीं कामें, यंत्रें, हत्यारें, वगैरेसाठीं हें शहर प्रसिद्ध आहे. सर्व प्रकारचीं लोखंडी कामें व नेत्रवैद्यकीय उपकरणें येथे होतात.

चांदीचा मुलामा चढविण्याचा येथील धंदा फार जुना आहे. येथील लो. सं. पावणेपांच लाख आहे.

शेफील्ड मुलामा—अलीकडे निरनिराळ्या धातूंच्या भांड्यांवर ज्याप्रमाणें विजेच्या साहाय्यानें चांदीचा मुलामा चढविण्यांत येतो, त्याप्रमाणें पूर्वी ज्या पद्धतीनें हा मुलामा चढवीत असत त्या पद्धतीस 'शेफील्ड प्लेट' असें म्हणत. ही पद्धति शेफील्ड येथील थॉमस बोल्सोहर यानें १७४२ मध्यें शोधून काढली. प्रथम या पद्धतीनें १७७० पर्यंत तांब्याच्या भांड्यांवर मुलामा चढविण्यांत येत असे. नंतर जर्मन सिल्व्हरवर मुलामा चढविण्यांत येऊं लागला. अलीकडे ही पद्धति मागें पडली आहे.

शेर—हें जंगली झाड कुंपणाच्या उपयोगी येतें. याला चीक असतो तो फार उष्ण आहे. अंगाला लागल्यास उठतो व फोड येतात. चीक औषधीहि आहे. विंचवाच्या विषावर लावतात. खोकल्यावर लोण्यांतून थोडा पोटांत देतात.

**शेरगिल, अमृता** (१९१२–१९४१)—एक हिंदी महिला चित्रकार. वडील श्रीमंत शीख गृहस्थ असून संस्कृत आणि वेदान्त यांत प्रवीण होते. आई हंगेरियन असून चांगल्या हुशार कलाभिज्ञ घराण्यांतील होती. अमृताचें बालपण हंगेरींत गेलें. पॅरिसमध्यें ती प्रख्यात कलाविद्यालयांत कला शिकली. शिल्लींची सौंदर्यभावना घेऊन ती १९३४ सालीं हिंदुस्थानांत आली व गोरखपूर जिल्ह्यांतील सराया गांवीं राहिली. प्राचीन चित्रकलेंतील चैतन्य तिनें आत्मसात् केलें. आकृति आणि रंग यांची विशिष्ट रचना करण्यांत तिनें प्रावीण्य मिळविलें. सुमारें तीस चित्रांत तिचें कौशल्य प्रतीत होतें. अजंठा, महाबलीपुरम्, इ.तील शिल्पकृतींवरून विशेषतः तिनें प्राचीन कलेचें मर्म ओळखलें. त्यांचें नुसतें अनुकरण तिनें केलें नाहीं. 'नवरीचा शृंगार', 'बाजाराला जाणारे दक्षिण हिंदुस्थानांतील गांवकरी', 'ब्रह्मचारी', 'गोष्टी सांगणारी', 'उंट', इ. तिच्या चित्रांतून मोंगल चित्रकला आणि बशोली चित्रकला यांतील वैशिष्ट्यें दिसतील. भावनादर्शक आकृति आणि रंग यांकडेच तिनें लक्ष पुरविलें. तिचें चित्र-माध्यम प्रमुखत्वानें तेलाचें असे. तिच्या हयातींतच तिच्या चित्रपद्धतीवर बरीच टीका झाली. तथापि तिनें आपलें वैशिष्ट्य राखलें व अत्यंत कडक शिस्तीनें आणि भक्तीनें कलेची सेवा केली.

शेरणी—हीं झाडें पाण्याच्या कडेला होतात. हीं कमरेइतकीं उंच होत असून तुरे सुरुच्या झाडासारखे दिसतात. यांचीं बेटें माजतात. मोठ्या पानांचीहि कोंकणांत एक जात आहे. शेरणीचे खराटे करतात. शूलयुक्त प्रदरावर पानांचें चूर्ण तुपाशीं देतात. प्रमेहावर रस पोटांत देतात.

**शेरशहा सूर** (राज्य. १५४०–१५४५)—एक दिल्लीचा बादशहा. याचें पहिलें नांव फरीदखान परंतु यानें वाघ म्हणजे शेर मारल्यानें यास शेरखान म्हणूं लागले. अफगाणांपैकीं हसनखान हा याचा बाप. जोनपूर येथें आपल्या भावांशीं न पटल्यानें यानें दौलतखान लोदीकडे आग्र्यास नोकरी धरली. यास मोंगलांनीं घालवलेली बादशाही अफगाणांकडे पुन्हां यावी अशी तीव्र इच्छा होती. बिहारवर आपला अमल बसवून यानें चुनारगडचा बंदोबस्त केला. हुमायूनच्या पहिल्या स्वारींत हा त्यास शरण गेला. परंतु पुढें आपलें सामर्थ्य वाढवून यानें बंगालवर आपली सत्ता प्रस्थापित केली. तसेंच हुमायूनचाहि पराभव करून यानें बादशाही मिळवली (सन १५४०). ग्वाल्हेर, रणथंभोर हे किल्लेहि यानें घेतले. मात्र कालिंजरचा किल्ला घेण्याच्या खटपटींत असतां झालेल्या दारूच्या स्फोटांत हा मरण पावला. मुसलमानांतील लोकहिततत्पर राजांत याची गणना केली जाते. यानें अनेक कालवे, धर्मशाळा, विहिरी बांधून लोकांच्या सोयी केल्या; तसेंच वसूल, वजनें, मापें या बाबतींतहि यानें महत्त्वाच्या सुधारणा केल्या. यास आदिलखान व जलालखान असे दोन पुत्र होते.

**शेरिंग्टन, सर चार्लस स्कॉट** (१८६१–     )—एक ब्रिटिश इंद्रियविज्ञानशास्त्रज्ञ. त्याचें शिक्षण केंब्रिज येथें झाल्यावर तो लिव्हरपूल येथें इंद्रियविज्ञानशास्त्राचा प्रोफेसर १८९५ ते १९१३ पर्यंत होता. नंतर तो ऑक्सफर्ड येथें त्याच विषयाचा प्रोफेसर झाला. १९२० सालीं त्याला रॉयल सोसायटीचा अध्यक्ष निवडण्यांत आलें आणि १९२४ सालीं 'ऑर्डर ऑफ मेरिट' हा बहुमान त्याला मिळाला. त्यानें मेंदू व मज्जातंतुसंस्था (नर्व्हस सिस्टिम) यांचा विशेष अभ्यास केला होता. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते–'दि इन्टेग्रेटिव्ह ॲक्शन ऑफ दि नर्व्हस सिस्टिम' (मज्जातंतुसंस्थेची संघटक क्रिया) आणि 'मॅमेलियन फिजिऑलजी' (सस्तन प्राण्यांचें इंद्रियविज्ञान). त्यानें कांहीं कविताहि लिहिल्या आहेत.

**शेरिडन, फिलिप हेन्री** (१८३२–१८८८)—एक अमेरिकन जनरल. १८५३ सालीं हा मिलिटरी ॲकेडमींतून पदवी घेऊन बाहेर पडल्यावर यानें टेक्सस आणि ओरेगॉन यांमधील लष्करांत नोकरी केली. अमेरिकन यादवी युद्ध झालें तेव्हां नैर्ऋत्य मिसूरीमध्यें याला क्वार्टर मास्टर नेमण्यांत आलें. १८६४ मध्यें पोटोमॅक लष्कराचें आधिपत्य याला मिळालें व यानें जनरल लीच्या विरुद्ध हल्लाबोलांत जनरल ग्रँटला फार मदत केली. नंतर

याला निरनिराळ्या सेनांचें आधिपत्य देण्यांत आलें. याच्याच युद्धकौशल्यामुळें लीला शरण यावें लागलें. १८७२ ते १८८८ पर्यंत हा संयुक्त संस्थानांच्या सेनेचा अधिपति (कमांडर) होता.

**शेरिडन, रिचर्ड ब्रिन्स्ले** (१७५१-१८१६)—एक अँग्लो-आयरिश नाटककार व राजकारणी. त्यानें लिहिलेलें पहिलें सुखान्त नाटक (कॉमेडी) 'दि रायव्हल्स' हें १७७५ सालीं कॉव्हेंट गार्डन नाटकगृहामध्यें होऊं लागलें, व तें अतिशय लोकप्रिय होऊन शेरिडन हा उच्च दर्जाचा लेखक गणला गेला. या नाटकांतील पात्रें सर्वसामान्य आहेत, पण त्यांतील संवाद ओजस्वी, आणि कथानकाची रचना कौशल्यपूर्ण आहे. त्याचें दुसरें नाटक 'सेंट पॅट्रिक्स डे' १७७५ सालींच रंगभूमीवर आल्यानंतर त्यानें संगीत नाटकें (कॉमिक ऑपेरा) लिहिलीं तीं—'दि डुएना', 'ए ट्रिप टु स्कारबरो', 'दि स्कूल फॉर स्कँडल' आणि 'दि क्रिटिक, ऑर ए ट्रॅजेडी रिहर्स्ड.' हीं सर्व नाटकें त्यानें २८ वर्षे वयापर्यंत लिहिलीं; व नंतर तो राजकारणांत शिरला. तो १७८२ सालीं दुय्यम परराष्ट्रमंत्री आणि १७८३ सालीं फडणीस खात्याचा चिटणीस झाला. वॉरन हेस्टिंग्ज या हिंदुस्थानच्या गव्हर्नर-जनरलवरील सुप्रसिद्ध खटल्यांत त्यानें 'दि बेगम्स ऑफ औध' (अयोध्येच्या बेगमा) यांच्यासंबंधींच्या आरोपाबद्दल सहा तास भाषण केलें व तें इंग्रजी भाषेंतलें एक सर्वोत्कृष्ट भाषण मानलें जातें. त्याचें उत्तर वय शरीराच्या अस्वास्थ्यामुळे आणि कर्ज फार झाल्यामुळें फार दुःखांत गेलें. त्याची कीर्ति त्याच्या हयातींत व नंतर कांहीं काळ अतिशय होती; पण पुढें ती ओसरूं लागली. कारण तो फार मोठा प्रतिभावान् लेखक (क्रिएटिव्ह जीनियस) नव्हता; फक्त ओजस्वी संवाद, चटकदार विनोद, आणि नाट्यप्रयोग उठावदार करण्याचें उत्तम कौशल्य हे त्याचे मुख्य नाट्यगुण आहेत.

**शेल दगड**—भूस्तरशास्त्रामध्यें पांढऱ्या मातीच्या थरांस ही संज्ञा लावतात. हे थर एका पातळींत व समुद्रामध्यें उकलतात. यांची एक जात तेलयुक्त किंवा डांबरयुक्त असते. ती पेट घेते. व तिची ज्वाला निघते. हीपासून मेण (पॅराफिन) तयार होतें. ज्या थरांत सुवर्णमाक्षिक ठिसूळ स्थितींत असतें अशा या थरांपासून तुरटी काढतात.

**शेल पिंपळगांव**—मुंबई, पुणें जिल्हा, खेड तालुका. भमेच्या तीरावर हें गाव आहे. गांवास कुसूं आहे व उत्तरेच्या दरवाजाबाहेर एक मराठी शिलालेख दिसतो. या गांवाजवळ मेंडजोगी यांनीं एक घाट बांधला आहे. त्याच्यासमोर आढवले यांचें शिवालय आहे. गांवांत मोहिते मंडळी वरीच आहेत.

**शेले, पर्सी बायशे** (१७९२-१८२२)—एक प्रसिद्ध इंग्रज कवि. कॉलेजांत शिकत असतांनाच 'नास्तिक्याची आवश्यकता' या अर्थाच्या लहान पुस्तकाच्या प्रकाशनामुळें त्याला पुढील अभ्यासाला मुकावें लागलें. नंतर एका खानावळणबाईच्या मुलीबरोबर त्यानें चोरून लग्न लाविलें. पण लवकरच तिला टाकून देऊन दुसऱ्याच एका मुलीबरोबर राहूं लागला. नंतर त्यानें इंग्लंड सोडून दिलें व इटलींत जाऊन राहिला. तेथें एका जलप्रवासांत बुडून मेला. अशा रीतीनें या भावनाप्रधान साहित्यिकाचा अंत झाला.

लहानपणापासून सामाजिक निर्बंधाविरुद्ध त्यानें बंड पुकारलें होतें. ज्यांत विवाहसंस्था आणि मालमत्ता यांना गौणस्थान दिलें जातें अशा आदर्श समाजाची स्थापना व्हावी, असें त्याचें मत असे. 'क्वीन मॅब', 'दि रिव्होल्ट ऑफ इस्लाम', 'प्रॉमेथिअस अनबाउंड' यांसारख्या काव्यांतून त्यानें आपले हे विचार स्पष्ट मांडले आहेत. इंग्लंडचा सुप्रसिद्ध भावगीतकार म्हणून त्याची प्रसिद्धि आहे. 'पश्चिमवाऱ्याचें स्तोत्र', 'मेघ', 'स्वातंत्र्याचें स्तोत्र', 'चंडोलाचें स्तोत्र', 'निशेस—', इ. अर्थाच्या कवितांतून पदलालित्य, सौंदर्य आणि कोमल भाव उत्कटतेनें प्रतीत होतात. 'सेन्सी' ही शोकान्तिका एलिझाबेथच्या काळानंतर सर्वोत्कृष्ट म्हणतां येईल. 'दि डिफेन्स ऑफ पोएट्री' (काव्याच्या तर्फेनें) या गद्य प्रबंधांत त्याची कल्पकता आणि चिकित्सात्मक दृष्टि उठून दिसते.

**शेवगा**—झाड बरेंच मोठें वाढतें. पानें बारीक असतात. पाल्याची, फुलांची व शेंगांची भाजी करतात. शेंगांचें पिठलें चांगलें होतें. शेंगांना एक प्रकारचा स्वाद असतो. शेवगा सर्व अंगांनीं औषधी आहे. नेत्ररोगावर पाल्याचा रस मधांत घालून अंजन करतात. उचकीवर मुळांचा काढा देतात. कान फुटला असल्यास फुलें सांवलींत वाळवून त्यांचें चूर्ण कानांत घालतात. नारूवर साल कुटून बांधतात. सर्व प्रकारच्या वायूंवर रानशेवग्याच्या कांद्याचा रस देतात.

**शेंवडा**—(पॅन्युलिरस). हा मासा समुद्रांत सांपडतो. हा खेकड्यांच्या जातीचाच कवचधारी प्राणी असून आकारानें लांबट असतो. डोकें धडास खेकड्याप्रमाणेंच चिकटलेलें असतें. याच्या शरीराचे मुख्यतः दोन भाग दिसतात. डोक्याच्या भागास शिंगासारख्या दोन लांब जोड्या असतात. पोट सात भाग एकामागें एक

असे कौलांप्रमाणें जोडून बनलेलें असतें. हा प्राणी रागावला असतां किंवा यास कोणीं त्रास दिला असतां शिंगें एकावर एक घांसून किंवा शेंपूट पोटावर आपटून आवाज करतो. शेंपटाचा त्यास सुकाणूंसारखा उपयोग होतो. ह्या प्राण्यास चालण्याचे व पोहण्याचे पाय खेंकड्याप्रमाणेंच निरनिराळे असतात. शेवडे असंख्य अंडीं घालतात. अंडीं घडाप्रमाणें पायांस चिकटलेलीं असतात. शेवड्याचें मांस पुष्कळ लोक मोठ्या आवडीनें खातात.

**शेवंती**—[वर्ग–कांपोझिटी. इं. क्रिसॅन्थेमम्]. संयुक्त पुष्प असलेल्या वनस्पतींची ही एक जात आहे. या जातींत कांहीं वनस्पती व कांहीं झुडपें असतात. यांच्या देंठावर एक फूल येतें. व तें बहुधा पिवळें असतें. कांहींचीं फुलें फार लहान असतात. कांहीं कांहीं फुलांतील लहान पाकळ्या पांढऱ्या असतात. बागेंत होणारीं शेवंतीचीं झाडें बहुधा प्रथम चीन देशांतून प्रसार पावलीं असावीं. शेवंतीचीं फुलें माळा, हार, गजरे, वगैरे करण्याच्या कामीं फार मोठ्या प्रमाणावर वापरण्यांत येतात.

**शेवरी**—ह्या झाडाचीं पानें वर्षांतून एकदां पूर्ण गळून पडतात. पण जेव्हां तें बहरतें तेव्हां त्याच्या पर्णहीन फांद्यांवरील लाल फुलांचे घोंस देदीप्यमान दिसतात. जानेवारी ते मार्चपर्यंत फुलांचा बहर असतो आणि मार्च महिन्याच्या अखेरीस फुलें गळून पडतात आणि शेंगा बाहेर येतात. ह्या शेंगांत 'म्हाताऱ्या' असतात. त्या कापसाप्रमाणें दिसतात; पण त्याचे दोरे आंखूड आणि अतिशय नरम असल्यामुळें त्यांचें सूत काढतां येत नाहीं. पण त्यांचा उशा, गिरद्या, वगैरे करण्यास उपयोग होतो. ह्या झाडाचें लांकूड फार मऊ असतें त्यामुळें हलकें खोकें आणि कोळ्याच्या जाळ्यांचें मेंड करण्यास तें वापरतात. हें झाड मलबारच्या किनाऱ्यावर आढळतें.

**शेवालिए, मिशेल** (१८०६–१८९७)—एक फ्रेंच अर्थशास्त्रज्ञ. याचे अर्थशास्त्रावर कांहीं महत्त्वाचे ग्रंथ आहेत. त्यानें 'खुला व्यापार' (फ्री ट्रेड) या धोरणाचा पुरस्कार जोरानें केला, आणि 'चलन' (करन्सी) या विषयांतहि तो चांगला तज्ज्ञ होता.

**शेवाळ**—१. (आल्जी). हा एक अपुष्प वनस्पतींचा वर्ग आहे. या वनस्पती समुद्रांत किंवा गोड्या पाण्यांत आणि दलदलीच्या व दमट ठिकाणीं होतात. यांचा वर्ण निळसर, हिरवा, पिंगट किंवा तांबडा असतो. यांच्या सर्व पृष्ठभागापासून यांचें पोषण होतें. यांचा आकार सूक्ष्मदर्शक यंत्रांतूनच केवळ दिसेल इतका बारीक व मोठमोठ्या जंगली झाडांइतकाहि मोठा असतो व कांहींचीं पानें ताडाच्या पानांएवढीं असतात. हीं काष्ठ द्रव्याच्या पेशींचीं बनलेलीं असतात व यांपैकीं बरींच खाण्यासारखीं व पौष्टिक असतात. यांच्या कांहीं जातींपासून केल्प, आयोडिन व ब्रोमीन हीं द्रव्यें मिळतात.

२. [मुस्की; मॉसेस]. शैवालसदृश (ब्रायोफायटा) जातीच्या वनस्पतींतील एक मुख्य पोटवर्ग. या वनस्पती लहान असून थंड व दमट जागीं एकत्र पुंजरूपानें उशीसारख्या किंवा चटईसारख्या पसरलेल्या आढळतात. यांना पानासारखे अंकुर फुटतात. परंतु वास्तविक अथवा खरीं फुलें नसतात. परंतु त्यांऐवजीं सुतासारखे तंतू असतात व त्यांची संख्या पुष्कळ असते. जननेंद्रियांच्या ठिकाणीं नरपिंडकोश व स्त्रीपिंडकोश असतात.

शेवाळांचें भागदर्शन

१. 'पॉलिट्रायचम कॉम्यून'; डाव्या बाजूकडील रेणुकोश (बोंड) हा उजव्या बाजूस उघड्या पडलेल्या आवरणकोश—(टोपी)नें झांकला गेला आहे. २. पूर्वीच्या अवस्थेंतील हें शेवाळ. ३. या शेवाळाचा झांकणासहित रेणुकोश. ४. झांकण गळून पडल्यानंतरची त्याची स्थिति. ५. 'ब्रायम सीरिटिसिअम.' ६. आवरण कोशासहित या शेवाळाचा रेणुकोश. ७. आवरणकोश काढल्यानंतरची त्याची अवस्था. ८. झांकण काढल्यानंतर दिसणारे त्याचे दांत (पेरिस्टोम). ९. दांतांचा एक भाग (दुर्बिणीनें विवृद्ध केल्यावर दिसणारा). १०. 'ब्रायम सीरिटिसिअम'चा नरपिंडकोश (ॲन्थेरिडिआ), स्त्रीपिंडकोश (आर्चेगोनिआ) व सहवासी परतंतू (पॅराफायसेस). ११. 'हायलोकोमिअम स्प्लेंडेन्स'. १२. या शेवाळाचा रेणुकोश. १३. 'हेड्वीगिआ सिलिएटा'; उकललेल्या रेणुकोशासहित. १४. 'स्फॅग्नम सिंबिफोलिअम', रेणुकोश अद्यापि अस्फुट अशा स्थितींत आहे.

३. (स्फॅग्नम). ही पाण्यांत वाढणारी शेवाळाच्या जातीची वनस्पति आहे. ही समशीतोष्ण प्रदेशांत सर्वत्र आढळते. हिचा रंग फिकट असतो. यांच्या शाखा लहान लहान असून पुंजक्यांनीं

फुटतात व फांद्यांनाच वाटोळसर बोंडें येतात. यांच्या पानांची रचना फार चमत्कारिक असते. गेल्या महायुद्धांत शेवाळाचा उपयोग जखमेवर बांधण्याकरितां करण्यांत आला होता.

**शेष**—कश्यपास कद्रूपासून झालेल्या नागांतील प्रमुख. यास अनंत असेंहि नांव आहे. यास सहस्र फणा आहेत. हा निरंतर पातालांत राहतो व याची एक कला क्षीरसमुद्रीं असून तिच्यावर विष्णु आपल्या एका कलावतारानें सर्वदा शयन करीत राहिला आहे. शेषानें तपश्चर्या करून ब्रह्मयापासून पृथ्वी धारण करण्याचें वरदान मिळविलें, अशी एक कथा आहे. ज्या ज्या वेळीं विष्णु अवतार घेतो, त्या त्या वेळीं शेषहि त्याच्या सहकाऱ्याचा अवतार घेतो. उदा., रामावतारांत लक्ष्मण व कृष्णावतारांत बलराम.

**शैव संप्रदाय**—हिंदुस्थानांतील एक प्रमुख धर्मसंप्रदाय. शिव देवतेची निरनिराळ्या स्वरूपांत भक्ति करणाऱ्या लोकांचा हा संप्रदाय होय. वैष्णव संप्रदायाइतकाच महत्त्वाचा हा संप्रदाय असून या संप्रदायाचे असंख्य अनुयायी आहेत. या संप्रदायाचा उगम वैदिक काळापासून दृष्टोत्पत्तीस येतो. वैदिक काळीं सृष्टीच्या भयानक स्वरूपाच्या देवतेला रुद्र हें नांव देण्यांत आलें व त्याची पूजा केली असतां तो भक्तांवर दया करतो म्हणून तो शिव आहे, शंकर आहे, असें रुद्राचें वर्णन करण्यांत येऊं लागलें. पुढें हळूहळू रुद्र देवतेला प्राधान्य येत जाऊन, उपनिषत्काळीं रुद्र ही सर्वश्रेष्ठ देवता मानली जाऊं लागली. श्वेताश्वेतरोपनिषदांत या रुद्र-शिवाचें सर्वश्रेष्ठ देव म्हणून वर्णन केलें आहे. अथर्वशिरस् उपनिषदांतहि रुद्रशिवाचें महात्म्य वर्णन करण्यांत आलें आहे.

पुराणांपैकीं विष्णुपुराणांत शिवाचें वर्णन अवैदिक देवता या अर्थी केलेलें आढळतें. त्यामुळेच दक्षानें त्याला यज्ञीय हवि दिला नाहीं. शिवाला तेथें स्मशानवासी व अनार्यांचा देव असें सामान्यपणें म्हटलें आहे. अनार्यांच्या देवतांचा समावेश ज्या वेळीं निरुपायानें ब्राह्मणी धर्मांत करणें भाग पडलें व ब्राह्मणी धर्माचें रूपांतर जेव्हां विस्तृत अशा हिंदु धर्मांत झालें, त्या वेळीं क्रमाक्रमानें शिवाला वरच्या पायरीचें देवत्व देण्यांत आलें. ब्राह्मणी धर्माच्या काळींहि शिवाला जे सजीव बळी देण्याचे अनार्यांचे बहुविध प्रकार होते, ते समूळ नष्ट झाले नव्हते. त्या वेळीं शिवाला जरी आर्यदेवतांत समाविष्ट केलें होतें, तरी त्याची पूजाअर्चा खालच्या वर्गांच्या समाजांतच विशेष होत होती व त्याला अनुसरून शिवाची स्त्री काली अथवा भवानी ( हीहि मूळची अनार्यांचीच देवी होय ) हिलाहि देवत्व लाभलें होतें. या कारणामुळें अद्यापिहि कांहीं ( दक्षिणेंतील ) ठिकाणीं शंकराच्या देवळांत खालच्या ( परियासारख्या ) जातीचे पुजारी आढळतात. हिंदु धर्माचा जसा जास्त प्रसार झाला तसें शंकराचें अनार्य व हिडिस स्वरूप जाऊन त्याला आर्य व सुंदर स्वरूप मिळालें व त्याचा समावेश हिंदूंच्या मुख्य देवतांमध्यें होऊं लागला; एवढेंच नव्हे तर हिंदूंच्या प्रसिद्ध त्रैमूर्तींतील एक स्थान त्याला मिळालें. शैव धर्मावर बौद्ध धर्माचा परिणाम होऊन शंकराला देण्यांत येणारे सजीव बळी समूळ नाहींसे झाले; पण पुढें हिंदु धर्माच्या प्रसाराच्या वेळीं व सांप्रतहि खालच्या जातींना सजीव बळी देण्यास आडकाठी नव्हती. दक्षिण हिंदुस्थानांत शैव मत व संप्रदाय फार आहे. तिकडे वारुळाची पूजा करणें हेंहि या संप्रदायांतील एक अंग मानतात. वीर अथवा साधुपुरुष यांच्या समाधीवर प्राचीन काळीं जो खुणेचा अथवा पूजेचा दगड बसवीत, तो शंकराच्या लिंगासारखा असे. त्याची खूण म्हणून पुढें शंकराच्या देवळांत मूर्तीऐवजीं ( शाळुंकेसहित ) लिंगस्थापना होऊं लागली. महायान पंथांतील स्तूपपूजा हीच पुराणकालांतील प्रचलित झालेली लिंगपूजा होय. वास्तविक लिंग व शाळुंका म्हणजे जगांतील आद्यपुरुषप्रकृतींचीं एक प्रकारचीं ( इंद्रियविषयक ) स्मारकें होत. बंगाल्यांत शक्ती( शंकराची स्त्री )-ची पूजा जास्त असून दक्षिणेंत लिंगपूजा ( लिंगायत वगैरे जातींत ) जास्त आहे. कापालिक, कालामुख, नकुलीश, पाशुपत, इत्यादि प्राचीन शैव पंथ होते.

काश्मीरमधील शैव संप्रदायाच्या दोन प्रमुख शाखा अगर पंथ आहेत : पहिल्या पंथाचें नांव स्पन्दशास्त्रपंथ व दुसऱ्याचें नांव प्रत्यभिज्ञापंथ असें आहे. या दोन्ही पंथांमध्यें प्राणायाम, योगसाधन, इत्यादिकांवर भर दिला जात नाहीं; व त्यामुळें पाशुपत अगर कापालिक पंथाप्रमाणें हा पंथ अघोर वाटत नाहीं. शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाचा काश्मीरमधील शैव संप्रदायांवर बराच परिणाम झालेला आढळतो.

अकराव्या शतकाच्या उत्तरार्धांत कर्नाटक प्रांतांत वीरशैव अगर लिंगायत पंथ उदयास आला. वीरशैव पंथाचा प्रवर्तक बसव हा होय, अशी समजूत आहे. तथापि बसवापूर्वींहि हा पंथ अस्तित्वांत असून बसवानें फक्त या पंथाला भरभराटीला आणलें, असें अलीकडच्या शोधांवरून सिद्ध झालें आहे.

सहाव्या शतकामध्यें तामिळ देशांत शैव पंथ चांगल्या स्थितींत उत्कर्ष पावत होता, असें कांचीपूर येथील देवालयांतील शिलालेखांवरून दिसतें. त्यानंतरच्या काळांतहि तामिळ देशांत शैव संप्रदाय फोफावतच गेला. तामिळ देशांतील शैव संप्रदायाचें वाङ्मयहि विपुल आहे. या वाङ्मयाचे अकरा संग्रह प्रसिद्ध आहेत.

अशा रीतीनें हिंदुस्थानांतील निरनिराळ्या भागांत शैव संप्रदाय आढळून येतो. शैव संप्रदायाचे साधारणतः दोन पोटवर्ग पडतात : पहिला पाशुपतशैव व दुसरा आगमशैव. पहिल्या वर्गांत नकुलीश, पाशुपत, कापालिक, नाथ, गोरक्षनाथ व रसेश्वर

या पंथांचा समावेश होतो. दुसऱ्या वर्गात शैव सिद्धान्तवादी तामिळ शैव, काश्मीर शैव व वीरशैव या पंथांचा अंतर्भाव होतो.

**शोकाची भिंत**—जेरुसलेम शहरांतील सालोमनच्या देवळाच्या बाहेरील आवाराच्या पश्चिमेकडील भिंतीच्या अवशेषांस हें नांव देण्यांत येतें. ही भिंत जुन्या जेरुसलेम शहराच्या बाजारामध्यें उभरलें माउंट मोरिया यावर बांधलेल्या मशिदीच्या शेजारीं आहे. या मशिदीच्या ठिकाणींच पूर्वीचें देऊळ होतें. या भिंतीची लांबी १५६ फूट असून उंची १६० फूट आहे. तीमध्यें मोठमोठ्या दगडांच्या नऊ रांगा आहेत. यांपैकीं पहिल्या पांच रांगा प्राचीन देवळांपैकीं असून वरील चार रांगा हेरोडनें बांधलेल्या देवळाच्या आहेत असें मानतात. अरब लोकांच्या कालांत लहान लहान दगडांच्या ११ रांगा वर चढविण्यांत आल्या. अलीकडे केलेल्या खोदकामावरून या नऊ रांगांच्या खालीं आणखी एकोणीस रांगा बांधलेल्या आढळून आल्या. सर्व जगांतील यहुदी लोक या ठिकाणीं मुद्दाम यात्रेकरितां येऊन देवळाच्या नाशाबद्दल शोक करीत बसतात. या गोष्टीवरून या भिंतीस 'शोकाची भिंत' असें नांव पडलें आहे.

**शोकान्तिका**—( ट्रॅजेडी ). ज्या नाटकाचा शेवट शोककारक परिणामांत होतो त्यास शोकान्तिका असें म्हणतात. हा शब्द सुखान्तिक नाटकाच्या विरुद्ध किंवा प्रतियोगी म्हणून वापरण्यांत येतो. ट्रॅजेडी शब्दाची मूळ उत्पत्ति ग्रीस देशांत झाली व तेथें शोकान्तिक नाटकें करणारे लोक बकऱ्याच्या कातड्याचे कपडे वापरीत असत किंवा अशा नाट्यप्रकाराबद्दल त्यांस बोकड बक्षीस देण्यांत येत असे; म्हणून 'ट्रॅजेडी' ( बोकडगीत ) हें नांव त्यास देण्यांत येऊं लागलें ( नाट्य पाहा ).

एस्किलस, सोफोक्लीस व युरिपिडीज हे प्रमुख शोकान्तिक नाट्याचे लेखक होत. भीति आणि दया यांची जागृति करून विकारांचें शुद्धीकरण करणें हें शोकान्तिक नाटकाचें कार्य आहे, असें ग्रीक लेखक समजत. नाट्याची जेथें जेथें भरभराट झाली तेथें तेथें शोकान्तिकेला महत्त्वाचें स्थान मिळालें आहे. हॅम्लेट, मॅक्बेथ, ऑथेल्लो, ज्यूलिअस सीझर व किंग लिअर हीं इंग्रजी वाङ्मयांतील शोकान्तिकेचीं उत्कृष्ट उदाहरणें आहेत. जर्मन वाङ्मयांतील 'फौस्ट' असेंच आहे. खाडिलकरांचें 'विद्याहरण', गडकऱ्यांचें 'एकच प्याला' यांसारखीं मराठी नाटकें शोकान्तिक प्रकाराचीं उदाहरणेंच होत. ( नाटकें पाहा. )

**शोणभद्रा**—उत्तर हिंदुस्थानांतील ही एक मोठी नदी आहे. हिलाच रामायणादि पुराणांत सुवर्णनदी असें नांव आहे. हिचें उगमस्थान नर्मदा नदीजवळच अमरकंटक पहाडांत असून, ही प्रथम उत्तरेकडे व नंतर पूर्वेकडे वाहत जाऊन दिनापूरच्या पलीकडे १० मैलांवर गंगा नदीस मिळते. हिची लांबी सरासरी ४८७ मैल आहे. हिंदु लोक ही नदी फार पवित्र समजतात. हिचें पाणी शहाबाद, पाटणा, इत्यादि ठिकाणीं कालव्यांच्या योगानें नेलें आहे. हिचें ऐतिहासिक महत्त्वहि बरेंच आहे. कारण पाटलिपुत्र म्हणजे हल्लींचें जें पाटणा शहर तें पूर्वी हिच्याच कांठीं होतें, असें ग्रीक भूगोलवेत्त्यांचें म्हणणें आहे.

**शोधन**—( रेक्टिफिकेशन ). पुन्हां पुन्हां उत्पातन ( डिस्टिलेशन ) करून शुद्ध करण्याची क्रिया. साधारणपणें एथिल अल्कोहोल ( मद्यसार ) शुद्ध करण्याच्या पद्धतीस हें नांव देतात. अशा रीतीनें शुद्ध केलेल्या अल्कोहोलला 'रेक्टिफाइड स्पिरिट' म्हणतात.

**शोपेनहाअर, अर्थर** (१७८८–१८६०)—एक जर्मन तत्त्ववेत्ता. इच्छा हीच जगांत सत्य आणि सर्वस्व असून, मूळ जगण्याच्या इच्छेसाठीं सर्व गहाणरण खर्च होत असतें. प्रतिभावान् माणसें मात्र हें इच्छेचें वर्चस्व झुगारून देतात. सृष्टि आणि मानव यांच्यांतील इच्छाशक्ति प्रज्ञाहीन असून ती असमाधान आणि दुःख देते. या परिस्थितींतून मुक्तता होण्याचीहि आशा दिसत नाहीं. पण जर संन्यस्त वृत्तीनें जगण्याची इच्छा मारून टाकिली, वासना आणि त्यांच्या पूर्तीसाठीं प्रयत्न यांना थारा दिला नाहीं, तर जगांतील दुःखापासून आपली सुटका होऊन सौंदर्यानंदाच्या चिंतनांत आपणांस आराम मिळेल. या प्रकारचें त्याचें तत्त्वज्ञान आहे. 'दृष्टि आणि रंग', 'सृष्टीची इच्छा', 'नीतिशास्त्रांतील दोन मूलभूत प्रश्न' या आशयाचे त्याचे ग्रंथ आहेत. पण त्याला कीर्ति मिळवून दिलेला ग्रंथ म्हणजे 'दि वर्ल्ड ॲज विल् ॲंड आयडिया' ( जग म्हणजे इच्छा आणि कल्पना ) हा होय.

**शोषकरंध्र कृमि**—( ट्रेमाटोडा ). हा एक सपाट कृमींचा वर्ग असून त्यांमध्यें यकृत्कीटक ( डिस्टोमा ) व त्यासारखे कृमी येतात. ( पट्टकृमि पाहा ).

**शौकतअल्ली, मौलाना** (१८७३–१९३८)—एक हिंदी मुसलमान पुढारी. यांचा जन्म रामपूर संस्थानांत झाला. मौ. महंमदअल्लींचे हे बंधु. यांचें शिक्षण अलिगड येथील एम. ए. ओ. कॉलेजमध्यें झालें. यांनीं १७ वर्षे सरकारी अबकारी खात्यांत नोकरी केली. हे अलिगड माजी विद्यार्थ्यांच्या सभेचे प्रवर्तक व चिटणीस होते. नंतर एम. ए. ओ. कॉलेजचे हे विश्वस्त झाले होते. यांनीं अलिगड विद्यापीठाकरितां वरील वर्गणी जमविली. पहिल्या महायुद्धांत यांस अटकेंत ठेवण्यांत आलें होतें. १९१९–२० मध्यें झालेल्या खिलाफत चळवळीमध्यें हे एक महत्त्वाचे पुढारी होते. त्या वेळीं यांनीं सत्याग्रहाच्या चळवळींतहि भाग घेतला होता. हे मध्यवर्ती खिलाफत समितीचे चिटणीस होते. यांनीं खुद्दाम इ-काबा नांवाची संस्था स्थापन केली व तिचे हे चिटणीस होते. हे मुसलमानांचे प्रतिनिधि म्हणून गोलमेज परिषदेला गेले

होते. यांनीं मुसलमानी देशांत प्रवास करून जगांतील मुसलमानांची संघटना करण्याचा प्रयत्न केला, व जागतिक मुस्लिम परिषद् भरविण्याच्या कामीं मदत केली. यांनीं ईजिप्त, पॅलेस्टाइन, सीरिया, इराक, इमेन व हेजास या देशांस भेटी दिल्या. यांस अमेरिकेमधून 'हिंदुस्थानांतील मुसलमान' या विषयावर १९३३ मध्यें व्याख्यानें देण्याचें आमंत्रण आलें होतें. हे अलीबंधु पुढें काँग्रेसच्या विरुद्ध जाऊन मुस्लिम लीगला मिळाले होते.

**शौक्तिक भस्म**—एक आयुर्वेदीय औषध. शौक्तिकाचे गुण जवळजवळ भस्मासारखे आहेत. हातापायांची आग होणें, जीर्णज्वर, खोकला, नेत्ररोग, इत्यादि रोगांमध्यें या औषधाचा शामक म्हणून उपयोग होतो. शौक्तिक भस्म पाचक व दीपक सुद्धां आहे. त्यामुळें पित्तप्रधान अशा सर्व विकारांवर हें उपयोगी आहे. १ ते ३ गुंजा आल्याचा रस, आर्द्रकावलेह, दाडिमावलेह यांबरोबर घेतात.

**शौनक**—हें व्यक्तिनाम व पैतृकनामहि आहे. शुनकाचा मुलगा तो शौनक. या नांवाचे अनेक ऋषी झाले असावेत. गृत्समद शौनक, स्वैदायन शौनक, इंद्रोत शौनक, वगैरे सांगतां येतील. विष्णुपुराणांत यास चातुर्वर्ण्याचा प्रवर्तक म्हटलें आहे. ऋग्विषयक पुढील ग्रंथांचा कर्ता शौनक आहे असें भागवतकार सांगतात. शौनकाच्या नांवावर पुढील ग्रंथ मोडतात—ऋक्प्रातिशाख्य, छन्दोनुक्रमणी, ऋग्विधान, सूक्तानुक्रमणी, कथानुक्रमणी, बृहद्देवता, स्मृति, चरणव्यूह, इत्यादि. आश्वलायनानें ग्रंथारंभीं याला नमस्कार केला आहे. म्हणजे हा किती योग्यतेचा होता हें दिसून येतें. यानें द्वादशवार्षिक सत्र केलें त्या वेळीं सौतीनें महाभारत सांगितलें. महाभारतांत शौनकाचे उल्लेख आहेतच.

**श्याम**—हा राग कल्याण थाटांतून उत्पन्न होतो. याच्या आरोहांत धैवत स्वर वर्ज्य आहे व अवरोह सात स्वरांचा होतो म्हणून याची जाति षाडव-संपूर्ण आहे. वादी स्वर ऋषभ व संवादी पंचम आहे. गानसमय रात्रीचा पहिला प्रहर मानितात. या रागांत दोन्ही मध्यमांचा प्रयोग होतो. परंतु प्राधान्य शुद्ध मध्यमासच दिलेलें आहे. हा राग कामोद-अंगानें गाईला जातो; परंतु कामोदांत निषाद व गांधार हे स्वर दुर्बल असतात, म्हणून या रागाची भिन्नता स्पष्ट राहूं शकते. ऋषभ व पंचम, तसेंच ऋषभ व मध्यम या स्वरांच्या संगती यांत रक्तिदायक होतात. हमीर, गौड आणि केदार या रागांचें या रागांत मिश्रण झालेलें असतें.

**श्याम धातु**—(सीझिअम). रुप्यासारखा एक पांढरा धातु. रुबदा (रुबिडियम) बरोबर हा सांपडतो. क्षार धातूंच्या मालिकेंतील हा एक आहे. इ. स. १८६० मध्यें वर्णपटविश्लेषणा (स्पेक्ट्रम ॲनॅलिसिस) च्या पद्धतीनें ह्याचा शोध लागला.

**श्यामजी कृष्णवर्मा, पंडित** (१८५७-१९३०)—हे इंग्लंडमधील जनतेस हिंदी राजकारणाची ओळख करून देणारे सुप्रसिद्ध राजकारणी असून, तेथील हिंदी विद्यार्थ्यांचे आधार झाले होते व तसेच धडाडीचे क्रांतिकारक होते. हे भनसाळी जातीचे असून काठेवाडांतील मांडवी या गांवीं जन्मले. मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजमधून व खाजगी रीतीनें संस्कृत मार्फत अध्ययन करून हे इंग्लंडला गेले व बॅरिस्टर होऊन स्वदेशीं परत आले. सन १८८१ त व सन १८८३ मध्यें बर्लिन व लंडन येथें ज्या प्राच्यविद्या परिषदा भरविण्यांत आल्या होत्या त्यांत भारतमंत्र्यांच्या विनंतीवरून हिंदी प्रतिनिधी म्हणून हे हजर राहिले होते. सन १८८५ नंतर रतलाम, उदेपूर व जुनागड या संस्थानांचे दिवाण होते व तेथून निवृत्त होतांच जहाल राजकारणांत भाग घेण्यास यांनीं सुरुवात केली. या कार्यासाठीं सुरक्षिततेच्या दृष्टीनें यांनीं इंग्लंडमधील वास्तव्य पसंत केलें व १८९७ सालीं हे तिकडे राहण्यास गेले.

नवीन शिष्यवृत्त्या निर्माण करून हिंदी विद्यार्थ्यांच्या उन्नतीस साहाय्य करावयाचें असें यांचें धोरण असे. त्याप्रमाणें हर्बर्ट स्पेन्सर ट्रॅव्हलिंग फेलोशिप व दयानंद सरस्वती या स्वतःच्या व राणा प्रताप व शिवाजी या श्री. सरदारसिंग राणा यांच्या अशा शिष्यवृत्त्या निर्माण करून यांनीं आपल्या नियोजित कार्यास सुरुवात केली. हेंच कार्य वाढीला लावण्याच्या दृष्टीनें यांनीं ता. १ जुलै १९०५ रोजीं 'इंडिया हाउस' ची स्थापना केली. या इमारतीमध्यें हिंदी विद्यार्थ्यांच्या राहण्याची सोय असे. तसेंच त्यांच्या उपयोगासाठीं वाचनालय, सभागृह, इत्यादि सोयीहि यांत करण्यांत आल्या होत्या. या वेळीं भाई परमानंद, निसेस कामा, (सेनापति) बापट, बॅ. सावरकर, वगैरे मंडळी या इमारतींत राहत असत. त्यामुळें या 'हाउस' ला क्रांतिकारकांच्या छावणीचें स्वरूप आलें होतें. हिंदी विद्यार्थ्यांना क्रांतीचे धडे देण्याचें काम श्यामजींनीं अव्याहत दहा वर्षें केलें. १९०५ सालीं यांनीं इंडियन होमरूल लीगची स्थापना केली. याच वेळीं 'इंडियन सोशॅलिस्ट' हें पत्र यांनीं सुरू केलें. पुढें धिंग्रा-प्रकरण निर्माण झालें असतां (धिंग्रा पाहा), सावरकर इंडिया हाउस सोडून गेले. तेव्हां या हाउसची जरूरी नाहीं असें वाटल्यावरून यांनीं तें बंद केलें. परदेशांशीं संबंध असणाऱ्या हिंदुस्थानांतील क्रांतिकारक चळवळींचीं सूत्रें याच इंडिया हाउसमधून हालविलीं जात असत. पुढें त्यांच्या जहाल क्रांतिकारक धोरणामुळें इंग्लंड अगर फ्रान्स येथील वास्तव्य यांना धोक्याचें वाटूं लागल्यामुळें हे स्वित्झर्लंडमध्यें गेले व तिकडेच जिनेव्हा येथें मृत्यु पावले.

**श्यामरजत**—( पायरॅर्जिराइट ). ही एक जांभळ्या रंगाची सुंदर रुप्याची अशुद्ध धातु आहे. रासायनिक दृष्ट्या ही रुप्याचें आंजनिद ( अँटीमोनाइड ) आणि गंधकिद ( सल्फाइड ) आहे. चांदी काढण्याच्या कामीं या धातूचें फार महत्त्व आहे.

**श्यामशास्त्री, आर्.** ( १८६८–१९४४ )—एक हिंदी प्राच्यविद्याविशारद व संशोधक. कावेरी नदीच्या तीरावरील रुद्रपाटण या गांवीं यांचा जन्म झाला. म्हैसूरच्या महाराजा संस्कृत कॉलेजमधून यांनीं बी. ए. पदवी मिळवली ( सन १८९९ ). यानंतर यांनीं 'कौटिलीय अर्थशास्त्रा'चा अभ्यास करून त्याचें इंग्रजींत भाषांतर करण्याची महत्त्वाची कामगिरी केली. सन १९२१ मध्यें हा ग्रंथ म्हैसूर ओरिएंटल लायब्ररी सीरीजमध्यें प्रसिद्ध करण्यांत आला होता. बंगलोरच्या गव्हर्मेंट कॉलेजचे प्रिन्सिपॉल, म्हैसूरच्या ओरिएंटल लायब्ररीचे क्युरेटर व कलकत्ता युनिव्हर्सिटीचे परीक्षक म्हणून यांनीं कांहीं काल काम केलें. कलकत्ता युनिव्हर्सिटींत हिंदी राजनीति या विषयावर यांनीं दिलेलीं व्याख्यानें अतिशय महत्त्वाचीं असून यांच्या या विषयावरील ज्ञानभांडाराचीं साक्ष देणारीं आहेत. तसेंच यांनीं विविध विषयांचा अभ्यास करून त्यांवर अभ्यासपूर्ण असे बरेच लेख लिहिले आहेत. यांनीं केलेल्या अमोल कार्याबद्दल सरकारनें महामहोपाध्याय ही पदवी देऊन यांचा गौरव केला. वैदिक देवता, ग्रहणें, शिलालेख वांसारख्या विषयांवर यांनीं ग्रंथ लिहिले आहेत.

**श्यामसुंदरदास** ( १८८५–१९४५ )—हिंदी भाषेचे एक साहित्यिक. हे बनारसच्या नागरी प्रचारिणी सभेचे एक संस्थापक, हिंदी भाषा व देवनागरी लिपि यांचे पुरस्कर्ते व बनारस हिंदु विश्वविद्यालयांतील हिंदी विभागाचे अध्यक्ष होते. हे खत्री घराण्यांतील असून यांचा जन्म काशी येथें झाला. बी. ए. पर्यंतचें शिक्षण झाल्यावर कांहीं काल यांनीं छापखाना व शाळा या ठिकाणीं कामें केलीं. यानंतर मात्र बनारसच्या हिंदु विश्वविद्यालयांत यांना हिंदी विभागाचे अध्यक्ष नेमण्यांत आलें. या जागेवर असतांना यांनीं हिंदी माध्यम ठरवून अभ्यासक्रमासाठीं लागणारीं पुस्तकें हिंदी भाषेंत लिहिलीं. याशिवाय भाषा, विज्ञान, समालोचना व प्राचीन ग्रंथसंशोधन या विषयांचाहि यांनीं अभ्यास करून त्यांवर अभ्यासपूर्ण असें लिखाण केलें. यांना सरकारकडून रावसाहेब आणि रायबहादूर, व हिंदी संमेलनाकडून 'वाचस्पति' या पदव्या मिळाल्या. हिंदी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरहि यांची निवड झाली होती. ( १ ) साहित्यालोचन, ( २ ) मेरी आत्मकथा, ( ३ ) गोस्वामी तुलसीदास, ( ४ ) भारतेंदु हरिश्चंद्र, वगैरे ग्रंथ यांनीं केले आहेत. हिंदी शब्दसागर व हिंदी वैज्ञानिक कोश यांचें संपादन करण्याची कामगिरी यांनींच केली.

**श्येन**—ससाणा पाहा.

**श्रद्धानंद, स्वामी** ( १८५६–१९२६ )—आर्य समाजाचे एक निष्ठावंत कार्यकर्ते व गुरुकुल विश्वविद्यालयाचे संस्थापक. हे क्षत्रिय असून यांचा जन्म पंजाबांतील जालंदरजवळील तळवन या गांवीं झाला. यांचें मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण काशीस झालें. याच वेळीं स्वामी दयानंदसरस्वतींच्या व्याख्यानांचा यांच्या मनावर परिणाम होऊन हे पक्के आर्यसमाजी बनले ( सन १८८५ ). पुढें लाहोर येथें वकिली करीत असतांना यांनीं 'सद्धर्मप्रचारक' साप्ताहिक सुरू केलें. प्रथम हें साप्ताहिक उर्दू भाषेंत निघत असे. परंतु नंतर हेंच हिंदी भाषेंत काढण्यांत येऊं लागलें. याच काळांत यांनीं स्त्रीशिक्षण, विधवाविवाह व अनाथसंरक्षण यांसारख्या सामाजिक प्रश्नांवर आपले विचार मांडले व लोकांना प्रत्यक्ष कार्याची दिशा दाखवून दिली. आर्यसमाजातर्फे आधुनिक शिक्षणाच्या प्रसारासाठीं जें दयानंद अँग्लो-वैदिक कॉलेज उघडण्यांत आलें होतें त्यांत हे प्रथम होते. परंतु नंतर त्या संस्थेंतून बाहेर पडून यांनीं प्राचीन गुरुकुल पद्धतीच्या धर्तीवर नवें गुरुकुल काढण्याचें ठरवलें. त्यासाठीं मोठ्या चिकाटीनें तीस हजार रुपये जमवून यांनीं हरिद्वारजवळ गंगेच्या किनाऱ्यावर प्रथम झोंपड्या बांधून सन १९०२ च्या मार्च महिन्यांत गुरुकुलाची स्थापना केली. सरकार व जनता यांच्या विरोधाला टक्कर देऊन, अगदीं नवीन पद्धतीवर सुरू केलेलें हें शिक्षणकार्य यांनीं यशस्वी करून दाखविलें. या संस्थेच्या पुढें अनेक शाखा निघून तिला आतां विश्वविद्यालयाचें स्वरूप प्राप्त झालें आहे.

रौलट ॲक्टच्या विरोधी चळवळींत यांनीं दिल्लीस जमावावर गोळ्या झाडणाऱ्या गुरखा पलटणीस रोखलें म्हणून यांच्यावर बंदुका रोखण्यांत आल्या. तेव्हां यांनीं निर्भयपणें एके ठिकाणीं उभें राहून आपलें स्थान विचलित होऊं दिलें नाहीं. हे हिंदु असूनहि दिल्लीच्या जुम्मा मशिदीनें एकदां यांना आपली प्रार्थना चालविण्याचा मान दिला. परधर्मांत गेलेल्या हिंदूंना शुद्ध करून परत हिंदु धर्मांत आणण्यासाठीं यांनीं केलेले प्रयत्न अतिशयच मोलाचे आहेत. बादशाही अमदानींत मूळचे हिंदु असणाऱ्या, परंतु बाटविल्यामुळें मुसलमान झालेल्या अशा दिल्लीजवळच्या हजारों रजपुतांना शुद्ध करून यांनीं हिंदु धर्मांत घेतलें. मलबारांतहि मोपल्यांनीं हिंदूंना बाटविल्याची बातमी यांना समजतांच हे तिकडे गेले व तिकडील हिंदु लोकांना धीर देऊन यांनीं त्यांना परत स्वधर्मांत घेतलें.

यांच्या या विविध प्रकारच्या समाजकार्यामुळें यांना जनतेकडून 'महात्मा' ही पदवी देण्यांत आली. यांच्या शुद्धीकरणाच्या अचाट कार्यामुळें मात्र मुसलमान समाजाला यांच्याबद्दल राग होता. दिल्लीस हे आजारांतून बरे होत असतां, अब्दुल रशीद नांवाच्या एका धर्मांध मुसलमानानें चर्चा करण्याच्या निमित्तानें यांच्या

निवासस्थानांत प्रवेश करून गोळी घालून यांचा अमानुष खून केला. यांच्या मृत्यूनंतर ठिकठिकाणीं यांच्या स्मरणार्थ अनाथ लोक व महिला यांच्याकरितां आश्रम काढण्यांत येऊन व यांचें समाजकार्य पुढें चालवून लोकांनीं यांच्या श्रमांचें चीज केलें.

**श्रद्धोपचार**—( फेथ-हीलिंग ). या उपचारपद्धतीचा मुख्य आधार म्हणून तिच्या पुरस्कर्त्यांकडून येशू खिस्तानें मृत मनुष्यास जिवंत करणें, रोग्यास बरें करणें, अंधास दृष्टि देणें, वगैरे जे चमत्कार केले त्यांचा दाखविण्यांत येतो. यानंतर खिस्ताच्या शिष्यांनीं व त्यांच्यानंतर होऊन गेलेल्या साधूंनीं जे चमत्कार केले त्यांची परंपरा आजतागायत आणून भिडविण्यांत येते. श्रद्धोपचार करणारे लोक या उपचारांचे गुण अतिमानुष अथवा दैवी शक्तीपासून येतात असें मानतात, तर अर्वाचीन शास्त्रज्ञ त्यांतील सूचनांस गुणांबद्दलचें श्रेय देतात. अशा तऱ्हेचे श्रद्धोपचार अनेक प्रकारचे आहेत. त्यांमध्यें कांहीं रोगांवर राजस्पर्श करून घेणें, कांहीं साधूंच्या स्मृतिचिन्हांचा उपयोग करणें, तीर्थांत स्नान करणें, कांहीं पवित्र स्थळीं वास करणें, वगैरे प्रकार येतात. भरतखंडांत मंत्रतंत्र, अंगारा देणें, फुंकर घालणें, झाडपणें, पाणी देणें, वगैरे अनेक प्रकार सर्वपरिचित आहेत. उपचारावर रोग्याची श्रद्धा असल्यास, उपचारसाधनें कशीं का असेनात, गुण येतो, असा अनुभव आहे. मानसोपचाराचाच हा एक भाग आहे.

**श्रमविभाग**—हें एक अर्थशास्त्रांतील तत्त्व आहे. मालाच्या उत्पादनांतील निरनिराळ्या क्रिया निरनिराळ्या माणसांकडून करून घेण्यानें खर्च कमी येतो, वेळ वांचतो व कामकऱ्याला कुंवतहि फार लागत नाहीं. एकाकडे मोठ्या कामांतील एकच लहान भाग असल्यानें त्याला तो लवकर करतां येतो, त्यांत चपळाई व बुद्धिमत्ता दाखवितां येते व यांत्रिक शोधहि निघतात. यांत कांहीं तोटेहि आहेत. एकच एक काम करण्यानें कामकरी हरहुन्नरी राहत नाहीं व त्याचें कामांतील लक्ष कमी होण्याचा संभव असतो.

**श्रमिक संघवाद**—( सिंडिकॅलिझम ). 'सिंदिकात' या फ्रेंच शब्दाचा अर्थ कामगार संघ ( इं. सिंडिकेट ) असा आहे. हा शब्द कामगारांच्या क्रांतिकारक चळवळीला व त्या चळवळींतून व्हावयाची सामाजिक क्रांति व भावी समाजसत्ताक समाजव्यवस्था याना उद्देशून योजिला जातो. या चळवळीचा निकट संबंध अराजकवादाशीं असल्यामुळें या चळवळीला 'अनार्को-सिंडिकॅलिझम' असेंहि म्हणतात. बाकूनिन व सोरेल या विद्वानांच्या सिद्धान्तांचा अवलंब हे संघवादी करतात, म्हणून मजूरपक्ष ( लेबर पार्टी ) ही राजकारणी संस्था आहे, ही भूमिका ते नाकारतात. राजकारण व पार्लमेंटरी कार्यक्रम हे सनदशीर मार्ग त्याज्य ठरवून, सरकारी अधिकारी वर्गाचें उच्चाटन करून सर्व सत्ता कामगार-संघाच्या हातीं घेण्याकरितां प्रत्यक्ष ( डायरेक्ट ) किंवा उद्योगाचा ( इण्डस्ट्रियल ) मार्ग ते सुचवितात. संप करणें हें त्यांचें मुख्य शस्त्र आहे; आणि बैठा संप किंवा कामांत थंडपणा असे संपाचे निरनिराळे अभिनव प्रकार त्यांनीं रूढ केले आहेत. निरनिराळ्या उद्योगधंद्यांतील कामगारसंघांचे संप होतां होतां अखेर सर्वांचा मिळून एक सार्वत्रिक संप एकाच वेळीं घडवून आणणें व त्या सार्वत्रिक संपांतून राज्यक्रांति ऊर्फ अधिकारक्रांति यशस्वी करणें, असा या पक्षाचा कार्यक्रम आहे. अशी क्रांति झाल्यानंतरचा मार्क्सवाद्यांचा व श्रमिक संघवाद्यांचा कार्यक्रम अगदीं भिन्न भिन्न आहे. मार्क्सवादी पक्ष राजसत्ता स्वतःच्या हातीं घेऊं इच्छितो, तर उलटपक्षीं संघवादी पक्ष सर्व कारखाने कामगार-संघाच्या हातीं घेऊन ते कारखाने समाजसत्तावादाच्या तत्त्वानुसार चालवावे, असें म्हणतो; आणि सरकार ही संस्थाच नष्ट करून कामगार-संघाच्या फेडरेशनच्या हातीं सर्व सत्ता द्यावी, अशी या पक्षाची अखेरची योजना आहे. पार्लमेंटरी पद्धतीनले प्रादेशिक मतदारसंघ रद्द करून त्याऐवजीं औद्योगिक मतदारसंघ स्थापून त्या संघांनीं निवडून दिलेल्या सभासदांचीं प्रतिनिधिमंडळे बनतील, अशी ही आणि यांची सत्ता प्रस्थापित करण्याची योजना आहे.

ही सिंडिकॅलिझमची चळवळ मुख्यतः लॅटिन प्रदेशात २० व्या शतकाच्या प्रारंभीं फार यशस्वी झाली; परंतु पहिल्या महायुद्धामुळें १९१४ सालीं तिचा प्रसार बंद पडला. या चळवळीचा मार्ग क्रांति हा असल्यामुळें सुधारणावादी पार्लमेंटरी पद्धतीला या संघवाद्यांचा विरोध असे. पहिल्या महायुद्धानंतर कम्यूनिस्ट पक्षानें हींच मतें व मार्ग अंगीकारल्यामुळें ही चळवळ नष्ट होत गेली, आणि या पक्षाचे बहुतेक इसम कम्यूनिस्ट बनले. फ्रान्समध्यें १८८७ पासून सिंडिकॅलिझमची चळवळ सुरू होऊन एकंदर कामगार संघां( ट्रेड-युनियन्स )पैकीं निम्म्यावर तिचें नियंत्रण युद्धापूर्वी होतें; पण १९२४ सालीं या पक्षाचे फक्त ५०,००० सभासद उरले; इटलींत १९१३ सालीं ५ लाख सभासद होते, ते १९२० सालीं फक्त १,२०,००० बाकी राहिले; आणि जर्मनींत ४ लाख सभासदांपैकीं १९२५ सालीं २५,००० शिल्लक होते. स्पेनमध्यें मात्र सिंडिकॅलिझम युद्धोत्तर काळांतहि जोरदार बनून त्या पक्षाचे सभासद यादवी युद्धांत फ्रँकोचा विजय होईपर्यंत १० लाखांपर्यंत होते. यू. एस्. अमेरिकेंत आय्. डब्ल्यू. डब्ल्यू. नांवाचा सिंडिकॅलिझमचाच एक विशिष्ट प्रकारचा पक्ष होता. अर्जेंटाइन व मेक्सिको या देशांतील कामगारांच्या चळवळीवर सिंडिकॅलिझमच्या मतांचा परिणाम झाला होता. ग्रेट ब्रिटनमध्यें चार्टिस्ट पंथाच्या चळवळींतून सिंडिकॅलिझम उगम पावून क्लाइड व वेल्स भागांत मिळून ६०,००० सभासद झाले, व त्यांच्या प्रचाराचा परिणाम गिल्ड सोशालिझमवर, १९११-१२

श्रीनगर—होड्या, घरें, मशीद (पृ. २४५९)

श्रीरंगम्—सहस्त्रस्तंभी सभामंडप (पृ. २४६१)

श्रीरंगपट्टण—टिपूच्या राजवाड्यांतील दर्यादौलत महाल (पृ. २४६०)

निवासस्थानांत प्रवेश करून गोळी घालून यांचा अमानुष खून केला. यांच्या मृत्यूनंतर ठिकठिकाणी यांच्या स्मरणार्थ अनाथ लोक व महिला यांच्याकरितां आश्रम काढण्यांत येऊन व यांचें समाज-कार्य पुढें चालवून लोकांनीं यांच्या श्रमांचें चीज केलें.

**श्रद्धोपचार**—( फेथ-हीलिंग ). या उपचारपद्धतीचा मुख्य आधार म्हणून तिच्या पुरस्कर्त्यांकडून येशू ख्रिस्तानें मृत मनुष्यास जिवंत करणें, रोग्यास बरें करणें, अंधास दृष्टि देणें, वगैरे जे चमत्कार केले त्यांचा दाखविण्यांत येतो. यानंतर ख्रिस्ताच्या शिष्यांनीं व त्यांच्यानंतर होऊन गेलेल्या साधूंनीं जे चमत्कार केले त्यांची परंपरा आजतागायत आणून भिडविण्यांत येते. श्रद्धोपचार करणारे लोक या उपचारांचे गुण अतिमानुष अथवा दैवी शक्तीपासून येतात असें मानतात, तर अर्वाचीन शास्त्रज्ञ त्यांतील सूचनांस गुणांबद्दलचें श्रेय देतात. अशा तऱ्हेचे श्रद्धोपचार अनेक प्रकारचे आहेत. त्यांमध्यें कांहीं रोगांवर राजस्पर्श करून घेणें, कांहीं साधूंच्या स्मृतिचिन्हांचा उपयोग करणें, तीर्थांत स्नान करणें, कांहीं पवित्र स्थळीं वास करणें, वगैरे प्रकार येतात. भरतखंडांत मंत्रतंत्र, अंगारा देणें, फुंकर घालणें, झाडपणें, पाणी देणें, वगैरे अनेक प्रकार सर्वपरिचित आहेत. उपचारावर रोग्याची श्रद्धा असल्यास, उपचारसाधनें कशीं का असेनात, गुण येतो, असा अनुभव आहे. मानसोपचाराचाच हा एक भाग आहे.

**श्रमविभाग**—हें एक अर्थशास्त्रांतील तत्त्व आहे. मालाच्या उत्पादनांतील निरनिराळ्या क्रिया निरनिराळ्या माणसांकडून करून घेण्यानें खर्च कमी येतो, वेळ वांचतो व कामकऱ्याला कुंवतहि फार लागत नाहीं. एकाकडे मोठ्या कामांतील एकच लहान भाग असल्यानें त्याला तो लवकर करतां येतो, त्यांत चपळाई व बुद्धिमत्ता दाखवितां येते व यांत्रिक शोधहि निघतात. यांत कांहीं तोटेहि आहेत. एकच एक काम करण्यानें कामकरी हरहुन्नरी राहत नाहीं व त्याचें कामांतील लक्ष कमी होण्याचा संभव असतो.

**श्रमिक संघवाद**—( सिंडिकॅलिझम ). 'सिंदिकात' या फ्रेंच शब्दाचा अर्थ कामगार संघ ( इं. सिंडिकेट ) असा आहे. हा शब्द कामगारांच्या क्रांतिकारक चळवळीला व त्या चळवळींतून व्हावयाची सामाजिक क्रांति व भावी समाजसत्ताक समाजव्यवस्था याना उद्देशून योजिला जातो. या चळवळीचा निकट संबंध अराजकवादाशीं असल्यामुळें या चळवळीला 'अनार्को–सिंडिकॅलिझम' असेंहि म्हणतात. बाकूनिन व सोरेल या विद्वानांच्या सिद्धान्तांचा अवलंब हे संघवादी करतात, म्हणून मजूरपक्ष ( लेबर पार्टी ) ही राजकारणी संस्था आहे, ही भूमिका ते नाकारतात. राजकारण व पार्लमेंटरी कार्यक्रम हे सनदशीर मार्ग त्याज्य ठरवून, सरकारी अधिकारी वर्गाचें उच्चाटन करून सर्व सत्ता कामगार–संघाच्या हातीं घेण्याकरितां प्रत्यक्ष ( डायरेक्ट ) किंवा उद्योगाचा ( इण्डस्ट्रियल ) मार्ग ते सुचवितात. संप करणें हें त्यांचें मुख्य शस्त्र आहे; आणि बैठा संप किंवा कामांत थंडपणा असे संपाचे निरनिराळे अभिनव प्रकार त्यांनीं रूढ केले आहेत. निरनिराळ्या उद्योगधंद्यांतील कामगार-संघांचे संप होतां होतां अखेर सर्वांचा मिळून एक सार्वत्रिक संप एकाच वेळीं घडवून आणणें व त्या सार्वत्रिक संपांतून राज्यक्रांति ऊर्फ अधिकारक्रांति यशस्वी करणें, असा या पक्षाचा कार्यक्रम आहे. अशी क्रांति झाल्यानंतरचा मार्क्सवाद्यांचा व श्रमिक संघवाद्यांचा कार्यक्रम अगदीं भिन्न भिन्न आहे. मार्क्सवादी पक्ष राजसत्ता स्वतःच्या हातीं घेऊं इच्छितो, तर उलटपक्षीं संघवादी पक्ष सर्व कारखाने कामगार–संघाच्या हातीं घेऊन ते कारखाने समाजसत्तावादाच्या तत्त्वानुसार चालवावे, असें म्हणतो; आणि सरकार ही संस्थाच नष्ट करून कामगार–संघाच्या फेडरेशनच्या हातीं सर्व सत्ता द्यावी, अशी या पक्षाची अखेरची योजना आहे. पार्लमेंटरी पद्धतींतले प्रादेशिक मतदारसंघ रद्द करून त्यांऐवजीं औद्योगिक मतदारसंघ स्थापून त्या संघांनीं निवडून दिलेल्या सभासदांचीं प्रतिनिधिमंडळें बनतील, अशी ही आणि यांची सत्ता प्रस्थापित करण्याची योजना आहे.

ही सिंडिकॅलिझमची चळवळ मुख्यतः लॅटिन प्रदेशात २० व्या शतकाच्या प्रारंभीं फार यशस्वी झाली; परंतु पहिल्या महायुद्धामुळें १९१४ सालीं तिचा प्रसार बंद पडला. या चळवळीचा मार्ग क्रांति हा असल्यामुळें सुधारणावादी पार्लमेंटरी पद्धतीला या संघवाद्यांचा विरोध असे. पहिल्या महायुद्धानंतर कम्यूनिस्ट पक्षानें हींच मतें व मार्ग अंगीकारल्यामुळें ही चळवळ नष्ट होत गेली, आणि या पक्षाचे बहुतेक इसम कम्यूनिस्ट बनले. फ्रान्समध्यें १८८७ पासून सिंडिकॅलिझमची चळवळ सुरू होऊन एकंदर कामगार संघां( ट्रेड–युनियन्स )पैकीं निम्म्यावर तिचें नियंत्रण युद्धापूर्वी होतें; पण १९२४ सालीं या पक्षाचे फक्त ५०,००० सभासद उरले; इटलींत १९१३ सालीं ५ लाख सभासद होते, ते १९२० सालीं फक्त १,२०,००० बाकी राहिले; आणि जर्मनींत ४ लाख सभासदांपैकीं १९२५ सालीं २५,००० शिल्लक होते. स्पेनमध्यें मात्र सिंडिकॅलिझम युद्धोत्तर काळांतहि जोरदार बनून त्या पक्षाचे सभासद यादवी युद्धांत फ्रँकोचा विजय होईपर्यंत १० लाखांपर्यंत होते. यू. एस. अमेरिकेंत आय्. डब्ल्यू. डब्ल्यू. नांवाचा सिंडिकॅलिझमचाच एक विशिष्ट प्रकारचा पक्ष होता. अर्जेंटाइन व मेक्सिको या देशांतील कामगारांच्या चळवळींवर सिंडिकॅलिझमच्या मतांचा परिणाम झाला होता. ग्रेट ब्रिटनमध्यें चार्टिस्ट पंथाच्या चळवळींतून सिंडिकॅलिझम उगम पावून क्लाइड व वेल्स भागांत मिळून ६०,००० सभासद झाले, व त्यांच्या प्रचाराचा परिणाम गिल्ड सोशालिझमवर, १९११–१२

श्रीनगर — होड्या, घरें, मशीद (पृ. २४११)

श्रीरंगम् — सहस्रस्तंभी सभामंडप (पृ. २४६१)

श्रीरंगपट्टण — टिपूच्या राजवाड्यांतील दर्यादौलत महाल (पृ. २४६०)

साळच्या संपचळवळीवर, आणि ब्रिटिश कामगार संघावर झाला. ब्रिटनमध्यें युद्धोत्तर काळांत सिंडिकॅलिझमला महत्त्व आलें नाहीं.

सिंडिकॅलिझम हें क्रांतिवाद ( अनार्किझम ) आणि मार्क्सवाद व कामगार-संघवाद ( ट्रेड यूनियनिझम ) या तिहींचें मिश्रण आहे. या पंथाचा क्रांतिवाद, प्रचारतंत्र आणि शब्दप्रयोग कम्यूनिझमवाल्यांनीं स्वीकारले, आणि फॅसिस्ट पंथाच्या संघराज्या( कार्पोरेट स्टेट )ची कल्पनाहि सिंडिकॅलिझमच्या मतप्रणालींतूनच उद्भवली.

**श्रवण बेळगोळ**—म्हैसूर संस्थानांतील हसन जिल्ह्यांत चन्नरायपट्टण या नांवाचा एक तालुका आहे. त्या तालुक्याचें मुख्य ठिकाण चन्नरायपट्टण हें आहे. श्रवण म्हणजे श्रमण (जैन यति); बेळगोळ शब्द कानडी भाषेंतील असून, तो बेळे म्हणजे पांढरे व गोळ म्हणजे तळें या दोन शब्दांपासून झालेला आहे. याला 'गोमटपूर' असेंहि म्हणतात. येथें गांवांतील व पर्वतावरील मिळून एकंदर ३० मंदिरें आहेत. व त्यांत सोन्याचांदीच्या व रत्नांच्या असंख्य मूर्ती आहेत. येथें चारुकीर्ति भट्टारकांचा प्राचीन मठ असून त्यांत ताडपत्रावर लिहिलेल्या प्राचीन जैन ग्रंथांचा मोठा संग्रह आहे. दक्षिणेकडील 'विंध्यगिरि' पहाडावर गोमटेश्वराची एक विशाल अशी मूर्ति आहे. तिची उंची ५७ फूट आहे. ही मूर्ति प्राचीन काळची असून तिची प्रतिष्ठा 'चामुण्डराय' नांवाच्या जैन राजानें इ. स. ९८३ मध्यें केली असें शिलालेखावरून समजतें. येथें अनेक प्राचीन लेख आहेत. येथील मराठी शिलालेख हा पहिला असल्यानें याचें फार महत्त्व आहे. ( शिला-ताम्रपट-लेखन पाहा ).

**श्रवणयंत्र**—( ऑडिफोन ). बहिऱ्या लोकांस ऐकूं येण्याकरितां जें साधन वापरतात त्यास श्रवणयंत्र म्हणतात. यामध्यें मुख्यतः एक पंख्याच्या आकाराचा घट्ट केलेला-कच्च्या रबराचा पत्रा असतो. हें यंत्र वापरतांना याचा कांठ पुढील वरच्या दांतांशीं दाबला जातो, व त्यामुळें प्रत्यक्ष बाह्य कानाशीं संबंध न येतां ध्वनि श्रावक-मज्जातंतूंकडे पोंचविला जातो व त्यामुळें ऐकूं येऊं लागतें.

**श्राद्ध**—( पितृपूजा पाहा ). हिंदु समाजांतील श्राद्ध ही पितृपूजा आहे. पितृपूजा हा पितरनामक समाजाचा धर्म होता. ह्या समाजांत नित्यश्राद्ध करीत. वेदधर्मीयांनीं श्राद्धविधीचा स्वीकार करून पितर समाजाला आपणांमध्यें समाविष्ट करून घेतलें. स्वाहा आणि स्वधा किंवा हव्य आणि कव्य हे भिन्न धर्मपंथ होते. श्राद्धाला बसणारा वैदिक ब्राह्मण प्रायश्चित्त घेऊन पितृधर्माचें भिन्नत्व सूचित करतो. पिंडदान हा श्राद्धाचा प्राचीनतम प्रकार; ब्राह्मणभोजन हा दुसरा. पितृस्थानीं बसावयाचा ब्राह्मण अत्यंत शुचिर्भूत असावा लागतो. पितृकर्माला अपराह्ण हा काळ विहित आहे. अपराह्ण म्हणजे तिसरा प्रहर अथवा मध्यान्हानंतरचा काळ. पितरांची दिशा दक्षिण असल्यामुळें दक्षिणेकडे तोंड करून अपसव्यानें पितृकर्मे करतात. जमदग्नीनें प्रथम श्राद्ध सुरू केलें, असें आश्रमपर्वांत सांगितलें आहे. श्राद्धाच्या दिवशीं देवकार्य करावयाचें नसतें. श्राद्धाला निदान दोन ब्राह्मण तरी लागतात. पार्वण आणि एकोद्दिष्ट असे श्राद्धभेद आहेत.

**श्री**—हा राग पूर्वी थाटांतून उत्पन्न होतो. याच्या आरोहांत गांधार व धैवत हे स्वर वर्ज्य आहेत व अवरोह सात स्वरांनीं होतो; म्हणून या रागाची जाति औडुव-संपूर्ण आहे. वादी स्वर ऋषभ व संवादी पंचम आहे. गानसमय सूर्यास्त मानतात. संध्याकाळच्या रागांत या रागाचें स्वरुप अगदीं स्वतंत्र आहे. याची प्रकृति गंभीर आहे.

**श्रीधरस्वामी** ( मृ. १७३० )—एक मराठी कवि. याचें मूळ घराणें मोंगलाईंतील खडकीचें. याच खडकीचें पुढें औरंगाबाद शहर झालें. श्रीधराचे पूर्वज राघोपंत खडके १५ व्या शतकांत नाझरें येथें गेले. तेथील देशपांडेपणाची वृत्ति विजापूर दरबारांतून त्यांस मिळाली होती. त्यांच्या अश्वपरीक्षेच्या गुणावरून घोडके आडनांव मिळालें. श्रीधर नाझरेकर हा देशस्थ यजुर्वेदी ब्राह्मण; गोत्र वसिष्ठ व संप्रदाय आनंद होता. रंगनाथस्वामी निगडीकर श्रीधराचे चुलत चुलते. श्रीधराची सुमारें १। लक्ष कविता आहे. यापैकीं बरीचशी ओंवीबद्ध आहे. 'हरिविजय', 'रामविजय', 'वेदान्तसूर्य', 'पांडवप्रताप', 'जैमिनी अश्वमेध' व 'शिवलीलामृत' हे त्याचे मोठे ग्रंथ आहेत. यांतील 'वेदान्तसूर्य' सोडून बाकींचे मागील पिढीपर्यंत आबाल-वृद्धांच्या परिचयाचे होते. 'शिवलीलामृत' तर पूर्वी बायकामुलांच्या रोजच्या पठणांतील ग्रंथ होता. त्याचा अकरावा अध्याय स्त्रिया तोंडपाठ म्हणत. श्रीधराचें काव्य शब्दालंकारांनीं आणि पद्रसांनीं नटलेलें असून, कथाभाग सांगण्याची त्याची हातोटी अप्रतिम आहे. संवादचातुर्य, स्वभावपरिपोष, सुलभ विवेचन आणि प्रासादिक वाणी या गुणांमुळें मराठी कवींत श्रीधराला मोठी लोकप्रियता लाभली. ६७ व्या वर्षी पंढरपुरास हा श्रीधरकवि समाधिस्थ झाला.

**श्रीनगर**—हिंदुस्थान, काश्मीर संस्थानची राजधानी. हें शहर झेलमच्या दोन्ही तीरांवर वसलेलें असून त्याची समुद्रसपाटीपासून उंची ५,२५० फूट आहे. १९४१ सालीं या शहराची लो. सं. सुमारें दोन लक्ष होती. श्रीनगरमध्यें व त्याच्या आसपास प्रेक्षणीय स्थळें बरींच आहेत. श्रीनगरच्या आसपास शालीमार, निशात, बादशाही बाग, वगैरे सुंदर बागा आहेत. नदीच्या डाव्या तीरावर शेरगढी म्हणजे डोग्रा राजांचा अर्वाचीन राजवाडा व नदीवर्लीकडे सुंदर घाट व वसंत बाग आहे. नूरजहाननें बांधलेली दगडी मशीद, हरिपर्वताच्या खालच्या बाजूला असलेले महदूमसाहेबाचें थडगें, व पीर दस्तगीर आणि नक्षबंदी यांचीं थडगीं पाहण्यासारखीं

आहेत. मार्तंडाचें देऊळ प्राचीन आहे. आसपासचा प्रदेश अत्यंत सुपीक आहे. येथें एके काळीं प्रख्यात असलेला शाली तयार करण्याचा धंदा हल्लीं नाममात्र राहिला आहे. चांदीचीं, तांब्याचीं व पितळेचीं भांडीं, गिलिटाचें काम, लांकडी कातकाम हीं कामेंहि येथें चांगलीं होतात. येथील कातडी पाकिटें फार टिकाऊ असतात. काश्मीरचे कागद एके काळीं प्रसिद्ध असून सर्व हिंदुस्थानांत त्यांना मागणी येत असे. लाखकाम व लांकडावरील नक्षीकाम हीं येथें चांगल्यापैकीं होतात.

**श्रीपतराव प्रतिनिधि** ( मृत्यु १७४६ )—प्रतिनिधि घराण्यांतील एक कर्तबगार पुरुष. परशुरामपंत प्रतिनिधीचा हा मुलगा. यास श्रीनिवासराव असें दुसरें नांव होतें. याच्या चुलत्यानें यास दत्तक घेतलें होतें, परंतु हें दत्तविधान शाहूनें खोटें ठरवून यास आपणांकडे घेतलें व सन १७१४ मध्यें प्रतिनिधिपद दिलें. शाहू व कोल्हापूरचा संभाजी यांच्यावर याचें चांगलें वजन होतें. बाजीरावाशीं मात्र याचें जमलें नाहीं. शाहू व संभाजी हे एक होण्यापूर्वी त्यांच्यांत जें युद्ध झालें त्या वेळीं यानें संभाजीच्या स्त्रिया व त्याचे इतर सरदार यांना पकडून साताऱ्यास शाहूकडे आणलें. यानें व्यंकटराव घोरपड्यास कैद केलें असतां बाजीरावानें दहा हजार रुपये दंड भरून त्यास याजपासून सोडविलें. आपल्या वडिलांच्या सांगण्यावरून यानें खटावकराशीं लढा दिला. सिद्दीशीं झालेल्या युद्धांत याचा हात होताच. निजामानें यास वऱ्हाडांत जहागीर दिली. यास पुत्र नसल्यानें शाहूनें याच्या धाकट्या भावास प्रतिनिधिपद दिलें.

**श्रीपति**—एक प्राचीन ज्योतिषी. हा शके ९६१ च्या सुमारास होऊन गेला. हा आर्यपक्षाचा अभिमानी असून त्याचे 'सिद्धान्तशेखर' आणि 'धीकोटिदकरण' असे दोन ज्योतिषगणितग्रंथ आहेत. 'रत्नमाला' म्हणून मुहूर्तग्रंथ आहे आणि 'जातकपद्धति' म्हणून जातकग्रंथ आहे. याचे पाटीगणित आणि बीजगणित यांवरहि ग्रंथ होते, असें मुनीश्वरकृत लीलावती-टीकेंत त्याच्या ग्रंथांतले उतारे आहेत, त्यांवरून दिसतें. वर सांगितलेल्या ग्रंथांशिवाय 'रत्नावली' व 'रत्नसार' हे दोन मुहूर्तग्रंथ श्रीपतीचे म्हणून दिले आहेत. 'धीकोटिदकरणा'च्या सांप्रत उपलब्ध असलेल्या चंद्रसूर्यग्रहणाच्या प्रकरणांवर एक लहानशी टीका आहे, तीवरून शके १५९३ पावेतों तें करण कांहीं प्रांतांत प्रचारांत असावें, असें दिसतें. 'रत्नमाला' व 'जातकपद्धति' या ग्रंथांवर 'महादेवी' नांवाची एक टीका आहे.

**श्रीप्रकाश** ( १८९०- )—एक हिंदी गव्हर्नर. हे डॉ. भगवानदास यांचे चिरंजीव होत. यांचें शिक्षण प्रथम बनारस येथें सेंट्रल हिंदु स्कूल व कॉलेज यांमध्यें झालें. नंतर केंब्रिज व ग्रेज इन यांमध्यें झालें. १९१४ ते १९१७ पावेतों हे सेंट्रल हिंदु कॉलेजमध्यें इतिहासाचे प्राध्यापक होते. १९१७-१८ मध्यें हे 'लीडर' पत्राचे उपसंपादक होते. १९१९ मध्यें अलाहाबाद येथील 'इंडिपेंडंट' पत्राचे संपादक होते. १९१९ मध्यें यांनीं कांहीं मित्रांच्या साहाय्यानें सेवा समितीची स्थापना केली व तिचे ते आरंभींचीं कांहीं वर्षे चिटणीस होते व पुढें उपाध्यक्ष झाले. १९१६ मध्यें हे काँग्रेसमध्यें दाखल झाले व १९१८ ते १९३५ पर्यंत अ. भा. काँग्रेस कमिटीचे सभासद होते. १९२० मध्यें सुरू झालेल्या 'आज' या पत्राचे ते पहिले संपादक होत. १९२१ मध्यें स्थापन झालेल्या काशी विद्यापीठाचे हे व्हाइस प्रिन्सिपॉल होते. बनारस शहरांतील काँग्रेसच्या कार्यांशीं यांचा नेहमीं निकट संबंध असे व ते शहर किंवा जिल्हा काँग्रेस कमिटी हिचे बहुधा अध्यक्ष असत. १९२१ मध्यें हे म्युनिसिपल बोर्डाचे सभासद निवडले गेले व पुन्हां तेथें १९२३ मध्यें निवडून आले. १९२८ ते १९३१ मध्यें हे संयुक्त प्रांतीय काँग्रेस कमिटीचे जनरल सेक्रेटरी होते व १९२९ ते १९३१ मध्यें राष्ट्रीय सभेचे जनरल सेक्रेटरी होते. १९३० मध्यें यांस मिठाच्या सत्याग्रहांत ७ महिने तुरुंगवासाची शिक्षा झाली. १९३१ च्या डिसेंबरमध्यें इटावा येथें संयुक्त प्रांतीय राजकीय परिषद् भरावयाची होती तिचे हे अध्यक्ष निवडले गेले होते; परंतु तीस सरकारनें मनाई केली. परंतु इटावा परिषद दिन साजरा केल्यामुळें यांस अटक होऊन १९३२ मध्यें एक वर्षाची शिक्षा झाली व ५०० रु. दंड झाला. १९३४ मध्यें हे मध्यवर्ती असेंब्लीमध्यें निवडून आले. व पुन्हां १९३४ मध्यें इटावा येथील संयुक्त प्रांतीय परिषदेचे अध्यक्ष झाले. १९३६ मध्यें भरलेल्या राष्ट्रीय सभेचे हे स्वागताध्यक्ष होते. १९४२ च्या चळवळींत यांना शिक्षा झाली होती. १९४७-४९ या कालांत ते पाकिस्तानांत हायकमिशनर होते. आतां आसामचे गव्हर्नर आहेत.

**श्रीमंतगड**—मुंबई, बेळगांव जिल्हा. यास पूर्वी सीमांतगड असें म्हणत. हा किल्ला शिरहट्टीच्या दक्षिणेस १० मैलांवर आहे. हा मिरजकरांकडे होता. हा साताऱ्याच्या राजांनीं बांधला असें म्हणतात. तटाची उंची ३० फूट व रुंदी ८ फूट आहे. १८५८ मध्यें याचा कांहीं भाग पाडून टाकण्यांत आला. यास तीस बुरूज असून आंत ५ तळीं आहेत.

**श्रीरंगपट्टण**—म्हैसूर संस्थान, म्हैसूरजवळील एक गांव. हें म्हैसूरपासून ९ मैलांवर आहे. कावेरी नदी याच्या दोहों बाजूंनीं वाहत असल्यानें हें बेटासारखें झालें आहे. येथें रंगनाथाचें प्रसिद्ध देवालय आहे. होयसळ राजांचे यावर लेख आहेत. विजयानगरच्या सुमारास हें प्रसिद्ध ठिकाण होतें. मराठ्यांनीं यावर हैदर-टिपूच्या अमदानींत हल्ले केलेले आहेत. अर्वाचीन इतिहासांत श्रीरंगपट्टणच्या मोहिमा गाजलेल्या आहेत. १७९१ सालीं येथेंच टिपूला वेढा देऊन लॉर्ड कॉर्नवालिसनें नामुष्कीचा तह करावयास

लावला व याच ठिकाणीं १७९९ त टिपू लढतां लढतां पडला. यानंतर म्हैसूर राजांची राजधानी म्हैसूरला गेल्याकारणानें देवस्थान म्हणूनच याचें महत्त्व उरलें.

या ठिकाणीं अनेक ऐतिहासिक अवशेष आहेत. जुनी मशिद, कोट, तळघरें, जुना राजवाडा, रंगनाथ देवस्थान, दर्यादौलत नांवाचा टिपूचा महाल, वगैरे प्रेक्षणीय स्थळें आहेत. दर्यादौलतमधील भिंतींवर लढायांचीं चित्रें आहेत. श्रीरंगाच्या देवळांत रंगनाथाची निजलेली मूर्ति सु. दहा फूट आहे.

**श्रीरंगम्**—मद्रास, त्रिचनापल्ली जिल्ह्यांतील एक गांव. हें कावेरी नदींत बेट असून त्रिचनापल्लीपासून २ मैलांवर आहे. गांवांतील रंगनाथ विष्णूचें देवालय फार प्रसिद्ध आहे. दक्षिण हिंदुस्थानांत त्याच्याएवढें मोठें दुसरें देवालय नाहीं. या देवालयांत एकामध्यें एक असे सात प्राकार असून सर्वांत बाहेरच्या प्राकाराची लांबी १,०२४ यार्ड व रुंदी ८४० यार्ड आहे. सर्वांच्या आंतल्या प्राकारांत मध्यभागीं शेषशायी रंगनाथस्वामीची मूर्ति आहे. शिलालेखांवरून हें देवालय ९ व्या शतकांत बांधलें गेलें असावें असें दिसतें. देवळाचें उत्तरेकडचें गोपुर १५२ फूट उंच आहे.

**श्रीरंजनी**— हा राग काफी थाटाचा जन्यराग आहे. याच्या आरोहांत ऋषभ व पंचम हे स्वर वर्ज्य आहेत व अवरोहांत पंचम वर्ज्य आहे; म्हणून याची जाति औडुव–षाडव आहे. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय दिवसाच्या तिसऱ्या प्रहराचा प्रारंभ मानितात. हा राग बागेसरीसारखा भासतो. परंतु बागेसरीच्या अवरोहांत पंचम स्वर घेण्यांत येतो, म्हणून या दोन रागांमधील भेद स्पष्ट आहे.

**श्रीवास्तव, सर ज्वालाप्रसाद** ( १८८९- )—एक हिंदी व्यापारी. यांचें शिक्षण कानपूर व अलाहाबाद येथें झालें. १९०८ मध्यें हे हिंदुस्थान सरकारची शिष्यवृत्ति घेऊन विलायतेस गेले व तेथें मँचेस्टर येथें यांनीं यांत्रिक शिक्षण घेऊन पदवी संपादन केली. नंतर युरोपमध्यें प्रवास करून हे हिंदुस्थानास परत आले व संयुक्तप्रांत सरकारांत औद्योगिक-रासायनिक तज्ज्ञ म्हणून नोकरीस राहिले. गेल्या महायुद्धांत इंडियन डिफेन्स फोर्स व म्युनिशन्स बोर्ड यांवर यांनीं फार उपयुक्त कामगिरी केली. नंतर यांनीं सरकारी नोकरी सोडून खासगी धंदा सुरू केला. अनेक कंपन्यांमध्यें हितसंबंध ठेवण्यासाठीं भाग खरेदी केले व नवीनहि कंपन्या स्थापन केल्या. १९२६ मध्यें हे संयुक्त प्रांतीय कायदे मंडळांत अविरोध निवडून आले. १९२८ मध्यें हे संयुक्त प्रांत सायमन कमिटीचे अध्यक्ष होते. तीन वर्षें कानपूर इंप्रूव्हमेंट ट्रस्टचे अवैतनिक अध्यक्ष होते. १९३१-३७ मध्यें हे संयुक्त प्रांताचे शिक्षणमंत्री होते. नंतर हिंदुस्थान सरकारचे अन्नमंत्री होते. १९३२ मध्यें यांनीं 'पायोनिअर' हें वर्तमानपत्र विकत घेतलें. कानपूरमधील हे एक प्रमुख व्यापारी आहेत व औद्योगिक व व्यापारी प्रगतियोजनेमध्यें हे नेहमीं प्रामुख्यानें भाग घेत असतात. यांनीं अनेक लेख लिहिले आहेत.

**श्रीविश्ववैष्णवराज सभा**— काशी क्षेत्रीं असलेल्या गौडीय मठाच्या विद्यमानें ही सभा संस्थापित झाली असून सध्यां तिचे आचार्य 'श्रीमद्भक्तिसिद्धान्तसरस्वती गोस्वामी' हे आहेत. या मठाच्या शाखा सीतापूर, कलकत्ता, कटक, पुरी, ढाका, बरद्वान, वगैरे ३५ ठिकाणीं असून इतर ठिकाणीं मठ स्थापन करण्याचें काम चालू आहे. या मठाचें मुद्रणालय असून त्यांत 'भागवत' व इतर मासिकें व पुस्तकें ( संस्कृत, हिंदी, बंगाली ) प्रसिद्ध होतात. श्रीकृष्ण चैतन्य यांनीं निवेदिलेल्या शुद्ध विष्णुभक्तीचा फैलाव करणें, लुप्तप्राय झालेल्या तीर्थस्थानांचा पुनरुद्धार करणें, या व परदेशांत उपदेशक पाठवून चैतन्यांचा भक्तिरसप्रधान धर्म लोकांस समजावून देणें, अहिंसा धर्माचा प्रचार करणें, वैष्णवांत शिरलेले निषिद्धाचार काढून टाकण्याविषयीं प्रयत्न करणें, वगैरे हेतु साध्य करण्यासाठीं या सभेची स्थापना झाली आहे. ( हिंदुधर्मदीपिका ).

**श्रीवैकुंठम्**—मद्रास, तिनेवेल्ली जिल्ह्यांतील एक तालुका. क्षे. फ. ३६१ चौ. मैल. लो. सं. सु. अडीच लक्ष. तालुक्यांत १३४ खेडीं आहेत. ताम्रपर्णीच्या खोऱ्याचा प्रदेश अत्यंत सुपीक आहे. यांत ख्रिस्ती लोकांची बरीच संख्या आहे. तिरुच्चेन्दूर येथें सुप्रसिद्ध शैव मंदिर आहे. येथें मुसलमान लब्ब लोकांची संख्या पुष्कळ आहे. अलवार तिरुनगरी येथें दोन प्रसिद्ध वैष्णव देवालयें आहेत. कायल व कोलकई हीं पांड्य घराण्यांच्या वेळचीं राजधानींचीं शहरें आहेत. आदिचनल्लूर ही दक्षिण हिंदुस्थानांतील इतिहासप्रसिद्ध स्मशानभूमि आहे.

**श्रीशैल्य**—मद्रास, कर्नूल जिल्हा, नंदीकोट्टूर तालुक्यांतील एक डोंगरावरचें देवस्थान. येथील मल्लिकार्जुनाच्या देवळाची लांबी ६६० फूट आहे व रुंदी ५१० फूट आहे. सर्व भिंतींवर रामायण व महाभारत यांतील प्रेक्षणीय प्रसंग उत्तम रीतीनें रेखाटले आहेत. देवालयाच्या मध्यभागीं मल्लिकार्जुनाची स्थापना केली आहे. या देवालयाची व्यवस्था पुष्पगिरीचे श्रीशंकराचार्य यांच्याकडे आहे. बारा ज्योतिर्लिंगांपैकीं हें एक असून येथें दरवर्षी शिवरात्रीनिमित्त मोठी यात्रा भरते. या भागांत भिल्ल व लुटारू यांची वस्ती फार व यात्रा बरीच कष्टाची आहे. पण यात्रा देणारे यात्रेकरू स्थानमाहात्म्यामुळें कष्टाची पर्वा करीत नाहींत. बाराव्या शतकांतील एका तेलगू काव्यांत निरनिराळ्या यात्रेकरूंच्या भाषांत देवाची स्तुति दिली आहे; यांत मराठी यात्रेकरूहि दिसतात.

**श्रीहर्ष परमार ( दुसरा )** ( बारावें शतक, उत्तरार्ध )—'नैषधीयचरितम्' या संस्कृत काव्याचा कर्ता. या श्रीहर्षाच्या

'गौडोर्वीकुलप्रशस्तिः', 'विजयप्रशस्तिः' (जयचंद्र गाहडवाल प्रशस्तिः), 'छिंदप्रशस्तिः' (हें गयेचें छिंद घराणें आहे) व वेदान्तविषयक 'खंडनखंडखाद्यम्' हेंहि याचे ग्रंथ सुप्रसिद्ध होत. मम्मटाचा हा समकालीन होय. हा हीर व मामल्लदेवी यांचा पुत्र. हा जयचंद्र गाहडवालाच्या पदरीं होता. हा गुणवान् असल्यानें इतर राजांच्या दरबारींहि यास मान मिळे. जयचंद्राच्या 'विजयप्रशस्तिः' खेरीज यानें अर्णवराज चालुक्य राजावर 'अर्णववर्णनम्' व गयेच्या छिंद घराण्यावर 'छिंदप्रशस्तिः' या प्रशस्त्या लिहिलेल्या दिसून येतात.

**श्रेढी**—(प्रोग्रेशन). १, ३, ५, ७, इत्यादि विषम अंक. सामान्यतः अ, अ + ब, अ + २ ब, अ + ३ ब, इत्यादि पदें गणितश्रेढींत आहेत. ह्यांतील कोणतेंहि पद पुढच्या पदांतून वजा केलें असतां बाकी कायम राहते. ५ − ३ = ७ − ५ = २. अ + ३ ब − (अ + २ ब) = ब. प्रथम पद व शेवटचें पद यांची बेरीज करून त्या बेरजेला पदांच्या संख्येच्या निमपटीनें गुणल्यास गणितश्रेढींतील पदांची बेरीज येते.

$\frac{१००}{२}$ {१ + (१ + २ × ९९)} = १००$^{२}$. ही १०० विषम अंकांची बेरीज आहे.

१, २, ४, ८, १६, हीं पदें अथवा अ, अ + ग, अ × ग$^{२}$, इत्यादि पदें भूमितिश्रेढींत आहेत. कोणत्याहि पदाला मागच्या पदानें भागलें असतां गुणोत्तर कायम राहतें.

१, $\frac{१}{२}$, $\frac{१}{३}$, $\frac{१}{४}$, इत्यादि पदें अथवा सामान्यतः

$$\frac{१}{अ}, \frac{१}{अ + ब}, \frac{१}{अ + २ ब}, \frac{१}{अ + ३ ब}, \cdots\cdots$$

अशी माला स्वर (हार्मोनिक) श्रेढींत आहे. हींच पदें उलट करून मांडलीं तर गणितश्रेढी येते.

**श्रेढी व्यवहार**—(सीरीज). गणितामध्यें एखाद्या पदांच्या मालिकेस श्रेणी अथवा श्रेढी असें म्हणतात. उदा. $अ_१$, $अ_२$, $अ_३$……$अ_न$ यास न संख्येचें फल असें म्हणतात. व नची किंमत माहीत असल्यास या श्रेढीचें फल काढतां येतें. श्रेढी सान्त किंवा अनन्त अशी तिच्यामधील पदांची संख्या मर्यादित किंवा अमर्यादित असेल त्याप्रमाणें असते. अनन्त श्रेढी ही परिच्छिन्न (कॉन्व्हर्जंट) किंवा अपरिच्छिन्न अशा दोन स्वरूपाची असूं शकते. न ही संख्या अनन्तपर्यंत वाढत गेली असतां मर्यादेपर्यंत पोंचते तेथें जेव्हां मर्यादा असेल तेव्हां ती मर्यादा हीच त्या श्रेढीची बेरीज असते. जेव्हां अशी मर्यादा नसते तेव्हां त्या श्रेढीस अपरिच्छिन्न (डायव्हर्जंट) असें म्हणतात. अगदीं साध्या प्रकारच्या श्रेढी म्हटल्या म्हणजे गणितश्रेढी, भूमितिश्रेढी, वगैरे होत.

**श्लेगेल, ऑगस्ट विल्हेल्म** (१७६७–१८४५)—एक जर्मन कवि, टीकाकार व प्राच्यविद्यापंडित. यानें अनेक गीतें आणि शाहिरी कवनें केलीं असून शेक्सपियर आणि काल्डेरॉन यांचीं नाटकें जर्मन भाषेंत भाषांतरिलीं आहेत. यानें शेझी (पाहा) नांवाच्या प्राध्यापकाजवळ संस्कृतचा अभ्यास केला. व पहिला जर्मन संस्कृत प्राध्यापक म्हणून बॉन विद्यापीठांत नेमला गेला (१८१८). यानें बरेंच प्राच्य वाङ्मय जर्मन भाषेंत आणलें. १८२३ त भगवद्गीतेची लॅटिन भाषांतरासह एक आवृत्ति काढली; व रामायणाचें पहिलें कांड प्रसिद्ध केलें.

**श्लेगेल, कार्ल विल्हेल्म फ्रेडरिक** (१७७२–१८२९)—जर्मनीचा वाङ्मयीन इतिहासकार, टीकाकार व सौंदर्यशास्त्रलेखक. 'प्राचीन आणि अर्वाचीन वाङ्मयाचा इतिहास', 'जीवनाचें तत्त्वज्ञान', 'इतिहासाचें तत्त्वज्ञान' व 'भाषेचें तत्त्वज्ञान' या आशयाचे त्याचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. याचाच भाऊ ऑगस्ट श्लेगेल होय.

**श्लेष्मा**—(*म्युकस*). *प्राण्याच्या श्लेष्मल अंतस्त्वचेपासून* निघणारा एक चिकट द्रव. याचा ओलावा आणण्याकरितां किंवा संरक्षणाकरितां उपयोग होतो. शरीराच्या अंतस्त्वचेचे जे भाग उघडे असतात किंवा बाहेरच्या बाजूस उघडतात, त्यांच्या अंतस्त्वचेवर हा आवरणासारखा पसरलेला असतो (उदा., तोंड, नाक, फुप्फुसें, आंत्रनलिका, मूत्रवाहिनी, वगैरे).

**श्वासकुठार**—एक आयुर्वेदीय औषध. यांत पारागंधक कज्जली, मनशीळ, बचनाग, टांकणलाही, सुंठ, मिरे, पिंपळी, हीं मुख्य औषधें असून आल्याच्या रसांत खल करतात. दम्याच्या विकारावर या औषधाचा उत्तम उपयोग होतो. श्वास जोरानें चालणें, कोणत्याहि अवस्थेंत चैन न पडणें, कफ लवकर न सुटणें, रोग्याची आसन्नमरण झाल्यासारखी स्थिति होणें, इत्यादि विकारांवर हें एक चांगलें औषध आहे. रोग नवीन असला तर याचा उपयोग लवकर होतो. जुनाट रोगांमध्यें याचा फारसा उपयोग होत नाहीं. १ ते २ गुंजा आल्याचा रस, मध, आर्द्रकावलेह यांबरोबर देतात.

**श्वासोच्छ्वास**—(रेस्पिरेशन). घ्राणेंद्रियाच्या वाटे शरीरामध्यें हवा आंत घेऊन ती बाहेर सोडणें, या क्रियेस श्वासोच्छ्वास असें म्हणतात. हें एक शरीरांतील इंद्रियांचें फार महत्त्वाचें कार्य असून त्यामुळें शरीरांतील रक्त शुद्ध होण्याची क्रिया होत असते. कारण श्वसनेंद्रियांच्या योगानें रक्तांतील कर्बाम्लवायु नाहींसा होऊन त्या जागीं हवेंतील प्राणवायु येऊन रक्तास पुन्हां ताजेपणा व जीवन मिळतें. मनुष्य व इतर वरिष्ठ दर्जाचा प्राणी यांमध्यें श्वसनक्रिया फुप्फुसांच्या द्वारें होते. श्वसनेंद्रियाच्या योगानें रक्त विशिष्ट वाहिन्यांच्या द्वारां हृदयाच्या उजव्या बाजूमध्यें जें येतें तें शुद्ध करण्यांत येतें. उजव्या बाजूंतील फुप्फुसांचें पक्षी व सस्तन प्राणी

यांच्यामध्यें हेंच कार्य असतें. फुप्फुसांतून निघणाऱ्या श्वासनलिकांतून एकसारखा रक्ताचा प्रवाह फुप्फुसांतील प्राणवायु असलेल्या वायुपेशींकडे नेला जातो व तेथें प्राणवायूच्या संयोगानें तें रक्त शुद्ध होत असतें. याप्रमाणें श्वसनक्रियेंतील मुख्य क्रिया म्हणजे रक्तांतील कर्बाम्ल वायूच्या ठिकाणीं प्राणवायूची स्थापना करणें, ही फुप्फुसामध्यें होत असते व तेथें शिरांतून येणारें निळसर रक्त लालभडक होऊन शुद्धरक्तवाहिन्यांत जातें.

श्वासोच्छ्वासक्रियेमध्यें श्वास आंत घेणें व बाहेर सोडणें या मुख्य दोन क्रिया असतात. या दोन्ही क्रिया आपोआप होत असतात. त्यांत प्राण्याच्या इच्छेप्रमाणें त्यांत थोडाफार फरक करतां येतो. सामान्यतः प्राणी मिनिटास १४ पासून १८ पर्यंत श्वासोच्छ्वास करतो, व या क्रियेमध्यें निरोगी प्रौढ अवस्थेंतील मनुष्य ३० घन इंच हवा आंत घेऊन तिच्यापेक्षां थोडी कमी बाहेर टाकतो. आंत घेतलेल्या हवेंतून ४॥ ते ५ टक्के प्राणवायु शरीरांत घेतला जातो व त्यापेक्षां थोडा कमी कर्बाम्ल वायु बाहेर टाकला जातो. या बाहेर टाकलेल्या कर्बाम्ल वायूचें प्रमाण निरनिराळ्या परिस्थितींत निरनिराळें असतें. मारल्यास वयांतील स्त्रियांपेक्षां पुरुष अधिक प्रमाणांत कर्बाम्ल वायु बाहेर टाकतो. तसेंच आठव्या वर्षापासून चाळिसाव्या वर्षापर्यंत हें प्रमाण बाल्य आणि वृद्ध अवस्थेपेक्षां अधिक असतें. सामान्यतः एक निरोगी प्रौढ मनुष्य २४ तासांत आठ औंस कर्ब बाहेर टाकतो. मनुष्य व इतर वरच्या दर्जाच्या प्राण्यांमध्यें श्वासोच्छ्वासाची क्रिया जशी फुप्फुसाकडून होते, तशी माशामध्यें ही क्रिया त्यांचे कल्ले करीत असतात. एकपेशीमय प्राण्यांमध्यें विशिष्ट असें श्वसनेंद्रिय आढळत नाहीं; परंतु त्यांच्या जीवनरसामध्येंच हवेंतील नवीन पोषक द्रव्यें ग्रहण करून निरुपयोगी द्रव्यांचा उत्सर्ग करण्याचें सामर्थ्य असलें पाहिजे. कांहीं प्राण्यांमध्यें हें कार्य त्यांच्या कातडीच्या किंवा शरीराच्या पृष्ठभागाच्या द्वारें होत असतें.

श्वेतकरण—(एटिओलेशन; ब्लँचिंग). पांडुरकी रोग. सूर्याची उष्णता पुरेशी न मिळाल्यास झाडें फिक्ट पांढरीं दिसूं लागतात. कारण उष्णतेच्या कमतरतेमुळें त्यांत हिरवा रंग पुरेसा उत्पन्न होत नाहीं. 'सेलेरी' वगैरे झाडांच्या (भाजीच्या) बाबतींत ही शुभ्रता कृत्रिम रीतीनें त्या झाडाच्या खोडाभोंवतीं मातीचा ढीग करून झांकून टाकून उत्पन्न करण्यांत येते. कांहीं झाडांचीं पानें एकत्र एका जागीं बांधून ठेवतात, त्यामुळें आंतील पानांत ऊन न पोंचल्यामुळें तीं पांढरीं होतात. कांहीं झाडें मडकीं, टोपल्या, पेट्या, वगैरेमध्यें झांकून ठेवून शुभ्र करण्यांत येतात. कांहींना काळोखांत ठेवण्यांत येतें. अशा तऱ्हेच्या शुभ्र केलेल्या झाडांमध्यें इतरहि कांहीं अस्वादात्मक गुण उत्पन्न होतात.

सु. वि. भा. ६–२०

श्वेत बलक—(अल्ब्युमिन). ऐंद्रिय रसायनशास्त्रांतील प्रोटीनविशेष. ह्याचे घटक कर्ब, उज्ज, नत्र, प्राणवायु आणि थोड्या प्रमाणांत गंधक असून प्राणिजन्य पदार्थ (दूध, रक्त, स्नायु) आणि वनस्पतिजन्य (झाडांचे रस, बिया, धान्यें) पदार्थ यांत हा सांपडतो. अंड्यांतील पांढरा बलक हें अल्ब्युमिनचें नित्य व्यवहारांतील उदाहरण दाखवितां येईल. उष्णता दिली असतां अल्ब्युमिन घट्ट होतें. पाण्याच्या बिघावर त्याचा उपयोग होतो. रक्तांतील अल्ब्युमिनचा उपयोग साखर शुद्ध करण्याकडे होतो.

वनस्पतिशास्त्रांत बीजगर्भा(एम्ब्रायो)च्या भोंवतीं असणाऱ्या परागमय पदार्थाला अल्ब्युमिन ही संज्ञा आहे.

श्वेतांबर जैन—जैनांत श्वेतांबर व दिगंबर असे दोन पंथ आहेत. (दिगंबर पाहा). महावीराच्या काळापासूनच हे दोन भेद अस्तित्वांत असावेत. या दोहोंतील धर्मग्रंथांत फारसा फरक नाहीं. श्वेतांबरांत स्थानकवासी व देवावासी असे पुन्हां दोन पोटभेद आहेत. या पोट्यांतील फरक केवळ तात्त्विक आहेत. यांमध्यें परस्परविवाहसंबंध होऊं शकतात. ओसवाल, पोरवाल व श्रीमाळी या श्वेतांबर जाती आहेत. गुजराथ, काठेवाड यांसारख्या उत्तरेकडील प्रांतांतून श्वेतांबरांची वस्ती आहे. जैन संप्रदाय पाहा.

श्वेताश्वेतरोपनिषद्—उपनिषदांपैकीं एक. हें उपनिषद् कृष्ण यजुःशाखेचें आहे. यांतील तत्त्वज्ञान अद्वैतपर आहे. यांत रुद्रदेवतेची परब्रह्म या नात्यानें उपासना करण्यास सांगितलें आहे.

---

# ष

ष—या वर्णाच्या चार अवस्था दिसतात. पहिली ख्रि. पू. दुसऱ्या शतकांतील घोसुंडी शिलालेखांत, दुसरी कुशानवंशी राजांच्या वेळच्या (इ. स. १–२ रें शतक) लेखांत, तिसरी इ. स. ५३२ च्या मंदसोर लेखांत व चौथी तोरमाण लेखांत आढळून येते.

षट्कर्में—(अ) ब्राह्मणांचीं—अध्ययन, अध्यापन, दान, प्रतिग्रह, यजन आणि याजन.

(आ) वैश्यांचीं—यजन, अध्ययन, दान, कृषि, गोरक्ष आणि वाणिज्य.

षट्चक्रें—मूलाधार, लिंग, नाभि, हृत्, कंठ व मूर्ध. योगशास्त्रांत हीं देहाच्या नाडीवर असतात.

षड्ऋतु—वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद्, हेमंत आणि शिशिर.

षड्गुण—ऐश्वर्य, धर्म, यश, श्री, ज्ञान आणि वैराग्य.

षड्दर्शनें—(अ) सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, मीमांसा व वेदान्त.

(आ) सौर, शाक्त, गाणपत्य, शैव, वैष्णव व स्कांद.

**षड्भाव**—सहा विकृती-जायते, अस्ति, वर्धते, विपरिणमते (प्रौढ होणें), अपक्षीयते (जरा येणें) व विनश्यति (मरणें).

**षड्रस**—मधुर, कटु, कषाय, आम्लक, क्षार व तिक्त.

**षड्राग**—मालव, मल्लार, श्रीराग, वसंत, हिंदोल व कर्नाट.

**षड्रिपू**—काम, क्रोध, मोह, लोभ, मद व मत्सर.

**षडंगें**—(अ) शरीराचीं-२ हात, २ पाय, मस्तक व कटि.

(आ) वेदांचीं—शिक्षा, कल्प, व्याकरण, ज्योतिष, छंदस् व निरुक्त.

**षडक्षरदेव**—या सुप्रसिद्ध कानडी कवीचा जन्म मळवळ्ळि ताल्लुक्यांतील दनुगुरु गांवीं झाला. वयाच्या अकराव्या वर्षापासूनच हा काव्यरचना करूं लागला. यानंतर यानें 'राजशेखरविलास', 'शबरशंकरविलास', 'वसवराजविजय' व 'वीरभद्रक' हे ग्रंथ लिहिले. 'कविकर्णरसायन' व 'वीरभद्रौदारणगद्य' हे याचे संस्कृत ग्रंथ होत. कंदपद्य छंदांतील काव्यरचनेबद्दल याची विशेष ख्याति आहे. दनुगुरु गांवच्या मठाचा स्वामी जो चिक्कवीर देशिक त्याचा हा शिष्य. शेवटीं हा यळंदूर मठाचा स्वामी झाला व तेथेंच यानें आपला देह ठेवला. हा कवि सतराव्या शतकाच्या उत्तरार्धांतील दिसतो.

**षडूर्मी**—शोक, मोह, क्षुधा, तृष्णा, जन्म व मरण.

**षष्ठांश यंत्र**—(सेक्स्टंट). या यंत्राच्या साहाय्यानें कोनाचें मापन करण्यांत येतें. तसेंच हें यंत्र विशेषतः समुद्रावरून दूर दिसणाऱ्या वस्तूंची उंची मोजण्याकरितां वापरतात. हें यंत्र म्हणजे एका वर्तुळाच्या परिघाचा षष्ठांश भागापेक्षां थोडा मोठा भाग (डक) असतो. म्हणूनच त्यास षष्ठांश यंत्र म्हणतात. या वर्तुळाच्या (य) मध्यभागीं एक पितळेचा कांटा (इअ) बसविलेला असतो. आणि परिघावर प्रमाणशीर खुणा केलेल्या असतात. या कांट्यावर एक आरसा (इ) बसविलेला असतो. तो या वर्तुळाच्या पातळीशीं लंब पातळींत असतो. आणि कांट्याच्या रेषेंत त्याची मध्यरेषा असते. या यंत्राच्या दोन्ही बाजूंस दोन सिरपे दांडे असतात. एका दांड्यावर एक कडी (न) बसविलेली असते, व दुसऱ्या दांड्यावर एक आरसा (म) बसविलेला असतो व त्याचा फक्त खालचा अर्धा भागच पाऱ्यानें मढविलेला असतो. याला क्षितिज आरसा म्हणतात. आणि तो अशा रीतीनें बसविलेला असतो कीं, जेव्हां कांटा शून्य चिन्हावर असेल तेव्हां हा आरसा मध्यबिंदूशीं असलेल्या आरशाशीं समांतर असतो. जेव्हां एखाद्या ताऱ्याची उंची मोजावयाची असेल तेव्हां हें यंत्र उभें धरण्यांत येतें व त्यांतील कांटा अशा तऱ्हेनें फिरविण्यांत येतो कीं, त्या ताऱ्यांची प्रतिमा मध्यबिंदूंत असलेल्या आरशांतून परावर्तित होऊन दांड्यावरील आरशांत पडून पुन्हां परावर्तित होऊन क्षितिजावर त्या आरशावरील अर्ध्या भागांतून दिसूं लागेल. अशा रीतीनें ती प्रतिमा क्षितिजावर दिसूं लागली म्हणजे कांट्यानें दाखविलेली उंची ही त्या ताऱ्याची उंची ठरते.

**षोडष कला**—चंद्राच्या-शंखिनी, पद्मिनी, लक्ष्मी, कामिनी, पयोष्णी, ऐश्वर्यवर्धिनी, आश्चर्यदा, आल्हादिनी, व्यापिनी, मोदा, मोहिनी, प्रभाप्रदा, क्षीरवर्धिनी, वेगवर्धिनी, विकासिनी व सौमिनी.

**षोडष महादानें**—तुलापुरुष, हिरण्यगर्भ, ब्रह्मांड, कल्पवृक्ष, गोसहस्र, हिरण्यकामधेनु, हिरण्याक्ष, हिरण्याश्वरथ, पंचलांगलक, धरा, विश्वचक्र, कल्पलता, सप्तसागर, रत्नधेनु, महाभूतघट व कामधेनु.

**षोडशोपचार**—आवाहन, आसन, पाद्य, अर्घ्य, आचमन, स्नान, वस्त्र, यज्ञोपवीत, गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, दक्षिणा, प्रदक्षिणा व मंत्रपुष्प.

---

# स

**स**—या वर्णाची पहिली अवस्था अशोकाच्या गिरनार लेखांत (ख्रि. पू. ३ रें शतक), दुसरी ख्रि. पू. पहिल्या शतकाच्या सुमारच्या मथुरेच्या एका जैन लेखांत, तिसरी करडांड लेखांत (इ. स. पांचवें शतक), चौथी त्याच काळच्या बिलसद येथील स्तंभलेखांत व पांचवी किंवा शेवटची ६ व्या शतकांतल्या 'उष्णीषविजयधारिणी' ग्रंथांत आढळून येते.

**सईबाई** (मृ. १६५९)—छत्रपति शिवाजीची थोरली राणी. ही मुधोजी निंबाळकर याची मुलगी. लग्न इ. स. १६४० त विजापुरीं झालें. हिला संभाजी हा मुलगा व सकवार, राणू आणि अंबिका अशा तीन मुली होत्या.

**सकंटकतनु वर्ग**—कंटकत्वक् वर्ग पाहा.

**सकंटक वनस्पति वर्ग**—(अकॅन्थासी). हा एक वनस्पतींचा वर्ग आहे. याचीं लहान झुडपें किंवा रोपें असतात. यांस दोन गर्भपर्णे असतात. यांचीं पानें समोरासमोर असतात. यांचा फुलवरा एकपर्णी असतो. हीं झाडें उष्ण प्रदेशांत होतात. अकॅन्थस हें या वर्गाचें विशेष परिचित झाड आहे.

**संकरज प्रजा**—( हायब्रिड ). दोन जातींच्या निरनिराळ्या सेंद्रिय वस्त्रांपासून उत्पन्न झालेल्या प्रजेस संकरज म्हणतात. संकरज प्रजा बहुतेक संततिहीन असते. संकरज प्रजेचे मुख्यतः पांच वर्ग करण्यांत येतात : ( १ ) मातापित्यांच्या अवस्थांच्या मध्यंतरींच्या अवस्थेंत असलेली प्रजा; उदा., मुर्डो व फिंच आणि क्रिनेरी यांचा संकर होऊन झालेली प्रजा. ( २ ) माता व पिता या दोहोंचेहि गुणधर्म एकत्र मिश्र न होतां ते एकाच वेळीं अस्तित्वांत असणारी प्रजा; उदा., पायबाल्ड्स व फ्लेट फलांच्या अनेक संकर जाती. ( ३ ) एकाच पूर्वजाच्या गुणधर्माकडे प्रवृत्ति असलेली किंवा पुन्हां तीकडे परत फिरणारी संकरज प्रजा. ( ४ ) दोन्ही पूर्वजांपासून भिन्न गुणधर्म असणारी संकरज प्रजा; उदा., अंडालुसियामधील कोंबड्या. ( ५ ) विशिष्ट गुणधर्मांमध्ये एका पूर्वजाशीं साम्य असलेली संकरज प्रजा; उदा., मेण्डेलियन संकर ( मेण्डेल सिद्धान्त पाहा ). अलीकडे विशेषतः मेण्डेलियन पद्धतीप्रमाणें अनेक वनस्पतींचे संकर तयार करण्यांत आले आहेत. व त्यांचा उपयोग मुख्यतः पिकें सुधारण्याकरितां किंवा पिकांवरील कांहीं रोग दूर करण्याकरितां करण्यांत आला आहे. उदा., गव्हावरील तांबेरा हा रोग घालविण्याकरितां या पद्धतीचा उपयोग करण्यांत आला आहे. रासबेरी व ब्लॅकबेरी यांचा संकर करून लोगनबेरी नांवाचें नवीन फळ तयार करण्यांत आलें आहे. प्राण्यांचे संकर केल्यानें विशेष उपयोग होत नाहीं. खेचर हा मात्र त्यास अपवाद आहे. गुरेंढोरें, मेंढ्या, डुकरें, कोंबड्या, वगैरेंचे संकर करून त्यांच्या जाती सुधारण्याचे अनेक प्रयत्न चालू आहेत. व त्या कामीं मेण्डेलच्या पद्धतीचा उपयोग करण्यांत येतो.

**सॅकरिन**—सक्रीन. याचा शोध फाल्बर्ग यानें लावला व तें १८८७ मध्यें बाजारांत आलें. हें टोल्यूनपासून तयार करतात व तें गंधक आणि नत्र यांचें बनलेलें असतें. हें उंसाच्या साखरेच्या ३०० पट गोड असतें. रासायनिक दृष्ट्या हें साखरेपासून अगदीं भिन्न असलें तरी याची चव अतिशय गोड असते. व हें साखरेऐवजीं वापरण्यांत येतें. पण याच्या अंगीं अन्नासारखा पौष्टिक धर्म नाहीं. याचा उपयोग मधुमेहामध्यें करण्यांत येतो. ज्या वेळीं साखरेचा तुटवडा असतो, त्या वेळीं सॅकरिनचा फार वापर होत असतो; याचा ताजा अनुभव आहेच.

**सकलातवाला, शापुरजी** ( १८७४– )—एक हिंदी कम्यूनिस्ट पुढारी. शिक्षण मुंबई ( सेंट झेवियर कॉलेज ) व लंडन येथें झालें. टाटा कंपनींत नोकरी करून यांनीं तीन वर्षें लोखंडाचें संशोधन केलें. व टाटांच्या कारखान्याची स्थापना करण्यास मदत केली. पुढें हे कामगार चळवळींमध्यें शिरले व थर्ड इंटरनॅशनल ( रशिया ) चे सभासद झाले. ब्रिटिश कम्यूनिस्ट पार्टीचेहि हे सभासद होते. यांनीं वर्कर्स ऑफ इंडिया लीग नांवाची संस्था स्थापन केली. हे एक लोकप्रिय वक्ते आहेत. १९२७ सालीं हे हिंदुस्थानांत आले त्या वेळीं यांचा अपूर्व सत्कार झाला. १९२२ ते १९२४ या काळांत हे ब्रिटिश पार्लमेंटचे सभासद होते. यांनीं कांहीं राजकारणविषयक ग्रंथ लिहिले आहेत.

**सकवारबाई**—१. शिवछत्रपतींची एक राणी. ही गायकवाड-कुळांतील होती, असें कोणी म्हणतात. हिला एक मुलगी होती. तिचें नांव कमळा.

२. शिवाजीची सईबाईपासून झालेली मुलगी. हिचें नानूबाई असेंहि नांव आहे. हिचें लग्न फलटणच्या महादजी निंबाळकर यांजबरोबर झालें. महादजी हा प्रसिद्ध बजाजी ( पाहा ) याचा मुलगा.

३. शाहूची थोरली राणी. ही रामोजी शिर्के याची मुलगी. ही सती गेली. ही शाहूच्या राज्यकारभारांत फार लक्ष घालीत असे. त्याची मालमत्ता दत्तक घेण्याची हिची खटपट होती.

**संकेश्वर**—मुंबई, बेळगांव जिल्हा, चिकोडी तालुक्यांतील हुकेरीच्या वायव्येस सुमारें आठ मैलांवरील एक गांव. येथें गूळ फार होतो व सूत, धान्य व्यापार चालतो. येथील देऊळ शंकराचार्यानें बांधलें असा समज आहे. महाशिवरात्रीस तीन दिवस येथें मोठी जत्रा भरते. जगद्गुरु शंकराचार्यांचा एक मठ येथें आहे. या मठास ३० गांवें इनाम आहेत. इ. स. १८८८ मध्यें कोंकणचा वहामनी सुभेदार बहादुर गिलानी यानें बंड उभारून बेळगांव व गोवें काबीज करून संकेश्वरास आपलें मुख्य ठिकाण केलें होतें. इ. स. १६५९ मध्यें शिवाजीनें संकेश्वर सर केलें. लो. सं. ( १९४१ ) ११,१७२.

**सक्कर**—पाकिस्तान, सिंध, एक जिल्हा. क्षे. फ. ५,५५० चौ. मैल. या जिल्ह्याचा बहुतेक भाग सपाट व नदीच्या गाळानें बनलेला असून फक्त सक्कर व रोहरी येथें चुनखडीच्या लहान लहान टेकड्या आहेत. एके काळीं सिंधु नदी या टेकड्यांमधून वाहत असे. हवा उष्ण व रुक्ष आहे. पाऊस ४-५ इंच पडतो. या जिल्ह्यांत ६ मोठीं गांवें व ७०६ खेडीं असून एकंदर लो. सं. ( १९४१ ) ६,९१,५५६ आहे. फाळणीपूर्वी शें. ९६ लोक सिंधी भाषा बोलत. तांदूळ, गहूं, ज्वारी, बाजरी, कडधान्यें व गळिताचीं धान्यें हीं या जिल्ह्यांतील मुख्य पिकें होत. मातीचीं व धातूचीं भांडीं, गोटेंमढें कापड, आणि चामड्याचे जिनस या जिल्ह्यांत तयार होतात. सक्कर शहर हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे. लो. सं. ६६,४६६. सिंधु नदीवर या ठिकाणीं लॉईड धरण बांधलें आहे. रोहरी, मीरपूर व शिकारपूर असे या जिल्ह्याचे तीन पोटविभाग आहेत.

**सकींची लष्करी नोकरी**— देशांतील जे नागरिक हत्यारें वापरण्यास समर्थ असतील त्या सर्व इसमांस सैन्यांत दाखल

होण्याची सक्ती करणें, याला म्हणतात. साधी सैन्यभरती (रिक्रुटिंग) आणि सक्तीची लष्करभरती यांमध्यें फार महत्त्वाचा फरक आहे. फ्रान्समध्यें १८७२ सालीं आणि त्यानंतर सक्तीच्या लष्करी भरतीबद्दल कायदे करण्यांत येऊन २० वर्षांवरील वयाच्या आणि शारीरिक दृष्ट्या नालायक नसलेल्या सर्व पुरुषांनीं लष्करांत शिरलें पाहिजे, अशी सक्ती करण्यांत आली. अशा लष्करी नोकरीची मुदत १९०५ सालीं दोन वर्षे ठरविण्यांत आली. पण १९१३ सालीं ही मुदत तीन वर्षें करण्यांत आली. सार्वत्रिक सक्तीच्या लष्करी नोकरीचा कायदा इटली, डेन्मार्क, नॉर्वे, ग्रीस, जपान, व इतर अनेक देश यांत आहे. ग्रेट ब्रिटनमध्यें १९१६ सालीं 'मिलिटरी सर्व्हिस ॲक्ट' या कायद्यानें लष्करी नोकरी सक्तीची करण्यांत आली, व हा कायदा १८ ते ४० वर्षे वयाच्या पुरुषांना लागू करण्यांत आला. १९१८ सालीं हें वय ५० वर्षेपर्यंत वाढविण्यांत आलें. १९२० सालीं हा कायदा रद्द करण्यांत आला. नंतर पुन्हां १९३९ सालीं असा कायदा अमलांत आला. महायुद्धाच्या वेळीं अशी सक्ती करावी लागते. हिंदुस्थानांत अद्यापि असा कायदा झालेला नाहीं.

**संक्रमण**—संक्रमण किंवा याम्योत्तर गमन म्हणजे एखाद्या स्थळाच्या याम्योत्तरावरून एखाद्या आकाशस्थ ग्रह-ताऱ्यानें जाणें. या संक्रमणाची माहिती यंत्राच्या साधनानें बरोबर होते व ज्योतिषी अशा निश्चित संक्रमणकालांवरून विषुवांशांमधील अंतरें काढतात; अचल ताऱ्यांचीं सापेक्ष स्थानें ओळखतात व आकाशस्थ विषुववृत्ताशीं समांतर असणाऱ्या सूर्य व ग्रह यांच्या गती सिद्ध करतात.

**संक्रमणयंत्र**—(ट्रॅन्झिट सर्कल). या महत्त्वाच्या यंत्रानें याम्योत्तर वृत्तावरून एखादा तारा किंवा ग्रह बरोबर केव्हां जातो हें काढतात व किती उंचीवरून हें संक्रमण झालें हेंहि निश्चित करतात. कांहीं यंत्रांत उन्नतांश काढण्याचें साधन नसतें, त्यामुळें फक्त संक्रमणकालाचा बोध होतो.

**संक्रांति**—अयन पाहा.

**सॅक्सन लोक**—हे ट्युटॉनिक मानववंशांतले लोक असून त्यांचा उल्लेख टॉलेमीनें केला आहे (इ. स. २ रें शतक). व त्यांत हे लोक ईडर, एल्ब व ट्रेव्ह या तीन नद्यांच्यामधील प्रदेशांत राहतात असें लिहिलें आहे. ५ व्या शतकांत या लोकांच्या मोठ्या टोळ्यांनीं ब्रिटनमध्यें प्रवेश केला. आणि तेथें इसेक्स ऊर्फ पूर्व सॅक्सन, ससेक्स ऊर्फ दक्षिण सॅक्सन, इत्यादि आपलीं निरनिराळीं राज्यें स्थापन केलीं. या लोकांचा इंग्लंडमधील मानववंश आणि भाषा यांची वाढ होण्याच्या कामीं फार परिणाम झाला. जर्मनींत सॅक्सनी प्रदेशाला यांचेंच नांव आहे. सॅक्सन लोकांनीं मोठा संघ तयार करून शार्लेमानबरोबर मोठी टक्कर दिली. पुढें या लोकांचा पराभव होत जाऊन ते ख्रिश्चन बनले. अँग्लो-सॅक्सन, अँग्लो-सॅक्सन भाषा पाहा.

**सॅक्सन शिल्प**—ब्रिटनमध्यें जी सर्वांत जुनी शिल्पपद्धति प्रचलित होती तिला सॅक्सन शिल्पपद्धति असें नांव देण्यांत येतें. ही पद्धति ख्रिस्ती संप्रदायाचा इंग्लंडमध्यें प्रवेश झाल्यानंतर नॉर्मन विजयापर्यंत प्रचलित होती. या पद्धतीनें बांधलेल्या इमारती ओबडधोबड पण मजबूत असत. यांच्या भिंती बऱ्याच जाड व ओबडधोबड असून त्यांस बुरूज नसत व दगड हेरिंग माशाच्या हाडाप्रमाणें उलटसुलट तिरप्या थरांत बसविलेले असत. यांतील खांब व मनोरे उंचीच्या मानानें फार जाड असत.

**सॅक्सनी**—हें लोकसत्ताक राज्य जर्मन साम्राज्याचा एक घटक असून याची कांहीं सरहद्द बोहेमियाला (झेकोस्लोव्हाकियाला) लागून आहे. क्षे. फ. ९,७५७ चौ. मै. व लो. सं. (१९३९) ५२,०६,८६१ आहे. येथें ओडर, एल्ब व एल्बला मिळणाऱ्या मूल्ड व एल्स्टर या नद्या आहेत; व एर्झगेबर्झे आणि लौझिट्झेर-गेबर्झे हे पर्वत आहेत. येथें गहूं, राय, ओट, बार्ली व बटाटे, आणि द्राक्षें, ॲपल, प्लम, वगैरे फळें होतात. मेंढ्या व गुरें पाळण्याचा धंदा फार मोठा आहे. कथील, लोखंड, तांबें, जस्त, निकेल, कोबाल्ट, बिसमथ, आर्सेनिक, दगडी कोळसा, लिग्नाइट, वगैरे खनिज द्रव्यें सांपडतात. येथें साखर, दारू, तमाखू, कांच, चिनी मातीचीं भांडीं व यांत्रिक सामान यांचे कारखाने आहेत. येथें सर्व लोक प्रॉटेस्टंट पंथी आहेत. लाइप्झिग युनिव्हर्सिटी असून ग्रंथ-मुद्रण व प्रकाशन यांचें हें केंद्र आहे. १९१८ सालीं सॅक्सनीचें स्वतंत्र लोकराज्य स्थापन झालें; आणि १९२० च्या राज्यघटनेनुसार येथला राज्यकारभार एक अध्यक्ष कायदेमंडळा (डाएट)च्या मतानुसार चालवतो. १९४५ सालीं दुसरें महायुद्ध संपल्यावर हा प्रदेश रशियन झोनमध्यें अन्तर्भूत झाला आहे.

**सक्सिनिक अम्ल**—एक द्विक्षाराम्ल. पूर्वी ॲंबरचें निर्जळ उत्पातन करून हें तयार करीत असत. आतां तें साधारणपणें अमोनियम टार्टरेटपासून आसवनानें (फर्मेंटिंग) तयार करतात. त्याचे मोठे पांढरेशुभ्र स्फटिक तयार होतात. १८५° शत. ला हें वितळतें. रासायनिक पृथक्करणांत आणि दुर्मिळ मृत्तिकांपैकीं कांहीं अलग करण्यासाठीं ह्याचा उपयोग होतो.

**सक्सेना, मोहनलाल** (१८९६– )—एक हिंदी राजकारणी व सार्वजनिक कार्यकर्ते. यांचें शिक्षण लखनौ व अलाहाबाद येथें झालें. १९१९ मध्यें यांनीं लखनौ येथें वकिली सुरू केली व त्याच वेळी हे इसाबेला थॉबर्न कॉलेजमध्यें प्राध्यापकाचें काम करीत होते. हे सामाजिक शिक्षणकार्यामध्यें भाग घेत असत. यांनीं हिंदु पाठशाळा नांवाची संस्था स्थापन केली; तिचें रूपांतर पुढें गिरधरसिंग हायस्कूलमध्यें झालें. १९२१ मध्यें यांनीं वकिली

सोडून दिली व असहकारितेच्या चळवळींत पडले. लखनौ शहर व जिल्हा काँग्रेस कमिटी यांचे हे कार्यकर्ते सभासद आहेत. तसेंच हे संयुक्त प्रांताच्या प्रांतिक काँग्रेस कमिटीचे व अखिल भारतीय काँग्रेस कमिटीचे सभासद आहेत. वर्किंग कमिटीचेहि हे सभासद आहेत. यांनीं सायमन कमिशनवरील बहिष्कारामध्यें भाग घेतला होता व त्यांत लखनौ येथें हे लाठीमारांत सांपडले होते. काँग्रेस चळवळींत यांस आठ वेळां तुरुंगवासाची शिक्षा झाली होती. १९२३ ते १९२५ मध्यें हे लखनौ म्युनिसिपालिटीचे सभासद होते. १९२४ ते १९२६ मध्यें हे संयुक्त प्रांतीय कायदेमंडळाचे सभासद होते. स्वराज्य पक्षाचे हे मुख्य प्रतोद होते. १९२४ मध्यें हे मध्यवर्ती असेंब्लीमध्यें निवडून गेले होते. यांनीं मध्यंतरीं वकिली सुरू केली होती व काकोरी कटाच्या खटल्यांत आरोपींच्या बाजूनें हे मुख्य वकील होते. कांहीं दिवस यांनीं पंडित मोतिलाल नेहरू यांचे मदतनीस म्हणून काम केलें होतें. १९३० मध्यें सत्याग्रहांत भाग घेण्यासाठीं यांनीं पुन्हां वकिली सोडून दिली. बिहार भूकंप-दुःखनिवारणाच्या कार्यांत यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला होता. हे घटनासमितीचे सभासद व १९४८ सालीं निर्वासित-मंत्री होते. नंतर १९५० त यांनीं राजीनामा दिला.

**सखारामबापू बोकील** ( १७१६–१७८१ )—पेशवाईतील एक प्रसिद्ध मुत्सद्दी. यांचें पूर्ण नांव सखाराम भगवंत बोकील. हा हिंवऱ्याचा कुलकर्णी होता. सखारामबापू आरंभीं महादजीपंत पुरंदरे याच्या पदरीं कारकून होता. बापूंनीं राघोबादादाच्या दिवाणगिरीच्या जागेवर योजना करून, नानासाहेब पेशव्यानें त्याला आपल्या बंधूबरोबर उत्तर हिंदुस्थानांत पाठविलें. निजामाच्या मदतीनें पुतण्याच्या फौजेचा मोड करून पुण्यास आल्यावर, राघोबानें सखारामबापूस आपला कारभारी करून त्यास ९ लाखांची जहागीर दिली. इ. स. १७६४ त सखारामबापूनें आग्रह धरून हैदरअल्लीवरील पहिल्या स्वारीचें आधिपत्य राघोबादादाकडून माधवराव पेशव्यासच देवविलें. या स्वारींत पेशव्यानें सखारामबापूस आपल्याबरोबर घेतलें होतें, व तो युद्धाच्या हालचालीसंबंधांत याचाच सल्ला घेऊन त्याप्रमाणें चालत होता. सखारामबापूचें अनिष्ट वजन व लांच घेण्याची त्यास जडलेली खोड या दोन गोष्टींमुळें माधवराव पेशव्यास आपल्या मनाप्रमाणें राज्य करण्यास पदोपदीं हरकत येऊं लागली. इ. स. १७६८ मध्यें राघोबास अटकेंत ठेवल्यावर त्यानें बापूस कारभाऱ्याच्या जागेवरून दूर केलें. परंतु त्याची जहागीर मात्र पूर्ववत् त्याजकडेच चालू ठेवली. नारायणरावास गारद्यांकडून कैद करविण्याचें जें राघोबानें कारस्थान रचिलें त्यांत हा सामील होताच. पण नारायणरावाचा अकस्मित खून झालेला पाहून तो राघोबाच्या विरुद्ध पक्षाचा पुढारी झाला. व बारभाईचें कारस्थान त्याच्या तंत्रानें कांहीं काळ चाललें. पण पुढें याची तिजोरी हस्तांत घेऊन बडग्यांच्या तहानंतर नाना फडणविसानें यास कैद करून सिंहगडावर पाठविलें ( १७७९ ). तेथून त्याची पुढें उचलबांगडी होऊन त्याला प्रतापगडावर ठेवण्यांत आलें. बापसाणें यानें पळून जाऊं नये किंवा कारस्थान करूं नये म्हणून, त्याची अटकेची जागा वेळोवेळीं बदलण्यांत येत होती. शेवटीं रायगड किल्ल्यावर अटकेंत असतांना या थोर मुत्सद्दी पुरुषाचें देहावसान झालें. साडेतीन शहाण्यांपैकीं हा एक होता. नारायणरावाच्या वधानंतरची याची सोज्ज्वळ वृत्ति कायम टिकती तर हा दौलतीचा अद्वितीय पुरुष म्हणून गाजला असता.

**सखाराम हरि गुप्ते** ( १७२०–७९ )—पेशवाईतील एक सरदार व राघोबादादाचा एक विश्वासू मदतनीस. हा जातीनें प्रभु असून प्रथम थोरल्या बाजीरावाच्या कारकीर्दींत उदयास आला. पुढें हा रघुनाथरावाच्या पक्षास मिळाला. राक्षसभुवनच्या लढाईत यानें निजामाच्या सैन्यांत सळो कीं पळो करून सोडलें. दादाच्या पक्षाचा असल्यानें बारभाईची याजवर अवकृपा असणें साहजिकच होतें. नारायणरावाचा खून झाल्यावर यास कैद करून याची सर्व मालमत्ता जप्त करण्यांत आली. तरी मरेपर्यंत हा दादाशीं एकनिष्ठ राहिला. वराचसा हालअपेष्टा भरल्यावर याच्या पत्नीस याला तुरुंगांत भेटण्याची परवानगी देण्यांत आली. परंतु ती येण्यापूर्वीच यानें लोखंडी गजांवर डोकें आपटून ऐन प्राण सोडला. बखरकार मल्हार रामराव चिटणीस हा याचा जांवई. यांचें घराणें आंबेगांवकर या आडनांवानेंहि ओळखलें जातें.

**संख्या**—व्यवहारांत हिशेब करण्याची अडचण पडूं लागल्यामुळें मनुष्यास प्रथम अंक व नंतर साधारण मोठ्या संख्या लिहिण्याकरितां एखादी सोपीशी संख्यालेखन-पद्धति तयार करण्याची जरुरी भासली असावी. ही पद्धति हातावरून बनविली असली पाहिजे. हाताचा उपयोग करून हिशेब करण्याची पद्धत फार प्राचीन आहे. ईजिप्शियन चित्रलिपींत त्यांनीं सोपे हात व हाताचीं बोटें यांच्या चित्रांनींच दाखवीत. चिनी लोक एका हाताच्या पांच बोटांचा उपयोग करून १०,००० पर्यंत हिशेब करतात. आपल्याकडे व्यापारी लोक आपसांत मालाचे भाव ठरवितांना बोटांनींच गुप्तपणें संकेत करतात.

संख्या दर्शविण्यासाठीं चिन्हांचा उपयोग करणें ही कल्पना लेखनकलेहूनहि प्राचीन आहे. एक या संख्येसाठीं एक रेघ काढावी असें प्रथम सहज सुचलें असेल. ईजिप्शियन चित्रलिपींत अशीं दहा लक्षांपर्यंतहि चिन्हें आढळतात. हिंदुस्थानांत अशोकाच्या शिलालेखांतून संख्याचिन्हें दिसतात. खाशिलालेखांत अंकहि शिलालेखांत पहावयास मिळतात. यामध्यें एक गोष्ट लक्षांत घेतें कीं, लहान अंक मोठ्या अंकाच्या उजव्या बाजूस लिहिला

असतां तो तेवढी अधिक संख्या दर्शवितो, पण डाव्या बाजूस लिहिला तर तो मोठ्या अंकाच्या पटीचा निदर्शक होतो.

दशन् (दहा) हा शब्द वैदिक काळच्या आर्य लोकांचा व एकंदरींत सर्व आर्य लोकांचा संख्यावाचनपद्धतीचा मूळ पाया होता. पण हिंदुस्थानांतल्या आर्य लोकांचा हा विशेष लक्षांत ठेवण्यासारखा आहे कीं, फार प्राचीन काळापासून या लोकांना अतिशय मोठमोठे आंकडे ठाऊक होते. पण इतर देशांच्या आर्य लोकांना हजारापर्यंतच संख्यावाचन करतां येत असे. वैदिक वाङ्मयांत कांहीं थोडे अपूर्णांकहि आलेले आहेत. अर्ध, पाद, शफ, व कला या $\frac{१}{२}$, $\frac{१}{४}$, $\frac{१}{८}$, $\frac{१}{१६}$ असें दर्शवितात. पण यांपैकीं $\frac{१}{२}$ व $\frac{१}{४}$ या नेहमींच्या प्रचारांतल्या आहेत. तृतीय याचा अर्थ एक-तृतीयांश असा होतो.

पाणिनीच्या "कर्णे लक्षणस्याविष्टाष्टपञ्चमणिभिन्नच्छिद्रस्त्रुवस्वतिकस्य।" (अष्टाध्यायी ६–३–११५) या सूत्रावरून पाणिनीच्या काळीं संख्याचिन्हें–अंक–यांचा उपयोग करीत असत हें स्पष्ट दिसते. "समासामध्ये कर्ण शब्द उत्तरपद असतां चिन्हवाचक शब्दाला दीर्घ करावा असें सांगून विष्ट, अष्ट, पंच, मणि, छिद्र, स्त्रुव व स्वतिक या चिन्हवाचक शब्दांना मात्र दीर्घ करूं नये," असें सांगितलें आहे. यांतील अष्ट व पंच हे संख्यावाचक शब्द महत्त्वाचे आहेत. कर्णशब्द उत्तरपद असतां चिह्नवाचक अष्ट व पंच या संख्यावाचक शब्दांना दीर्घ करूं नये, असें सांगितलें आहे. यावरून अष्ट व पंच इत्यादि संख्यावाचक शब्दांना चिन्हें होतीं हें निश्चित झालें. याहीपेक्षां अत्यंत प्राचीन कालीं संख्याचिन्हे उपयोगांत आलीं असल्याचे जगांतील अत्यंत प्राचीन जो ऋक्संहिता ग्रंथ त्यांतील "सहस्रं मे ददतो अष्टकर्ण्यः श्रवो देवेष्वक्रत।" (अष्टक ८, अध्याय २, वर्ग १) या ऋचेवरून स्पष्ट दिसत आहे. पाणिनिकालीं संख्याचिन्हें होतीं हें सर्वसंमत ठरतेच. वाल्मीकिप्रणीत रामायण या आदिकाव्यांत युद्धकांडांत २८ व्या सर्गांत शुक प्रधान रावणाला रामचंद्राचें वानरसैन्य इत्यादिकांचें विस्तारशः वर्णन करून सांगतो. त्यांत सुग्रीवाच्या हाताखालील सैन्याची जी संख्या सांगितली आहे, तीवरून तीं स्थानें–संख्यास्थानें–साठ होतात. व त्रेपन्न संख्यास्थानांपर्यंतचीं नांवेहि त्यांत दिलीं आहेत. ती येणेंप्रमाणें—

| | |
|---|---|
| १०० लक्ष = १ कोटी | १ वर ७ शून्यें. |
| १ लक्ष कोटी = १ शंकु | १ वर १२ शून्यें. |
| १ लक्ष शंकु = १ महाशंकु | १ वर १७ शून्यें. |
| १ लक्ष महाशंकु = १ वृंद | १ वर २२ शून्यें. |
| १ लक्ष वृंद = १ महावृंद | १ वर २७ शून्यें. |
| १ लक्ष महावृंद = १ पद्म | १ वर ३२ शून्यें. |
| १ लक्ष पद्म = १ महापद्म | १ वर ३७ शून्यें. |
| १ लक्ष महापद्म = १ खर्व | १ वर ४२ शून्यें. |
| १ लक्ष खर्व = १ समुद्र | १ वर ४७ शून्यें. |
| १ लक्ष समुद्र = १ महौघ | १ वर ५२ शून्यें. |

यावरून संख्याचिन्हें अनादिकालापासून प्रचारांत आलीं असून संख्यास्थानें त्रेपन्नपर्यंत होतीं हें सिद्ध होतें.

प्राचीन कालीं निरनिराळ्या राष्ट्रांत संख्यावाचक चिन्हांसाठीं अक्षरांचा उपयोग करीत असत. हीब्रू, ग्रीक, रोमन, इ. राष्ट्रांत उपयोगांत असणारीं अशीं अक्षरांकचिन्हें आजपर्यंत टिकूनहि आहेत. शंभर, हजार यांसाठीं सेंटम व मिल्ले या शब्दांचीं आद्याक्षरें C आणि M हीं आपण पाहतोंच. मोठमोठ्या संख्या लिहिण्यास अडचण उत्पन्न झाल्यावर कांहीं अक्षरांचा उपयोग करण्याची युक्ति सुचणे साहजिक होतें. स्थानभेदाप्रमाणें अंकांची किंमत बदलते, हें ज्ञान त्याच वेळीं आलें असलें पाहिजे. दशांश-पद्धतीचा वापर ग्रीक गणितज्ञ करीत होतेच.

हिंदुस्थानांतहि सांकेतिक शब्दांचा संख्या दर्शविण्यासाठीं केलेला उपयोग वाङ्मयांतून सर्रहा दिसून येतो. ब्राह्मणग्रंथांतून चार संख्येसाठीं 'कृत' येतो. २४ संख्येसाठीं 'गायत्री' व ४८ साठीं 'जगती' हे शब्द सूत्रग्रंथांतून आढळतात. छंदःसूत्रांत असे शब्दांक अनेक दिसतात. शिलालेख–ताम्रपटांतून संख्यानिदर्शक शब्द योजलेले आपणांस परिचित आहेतच. उदा., 'आकाशपंचवसुपक्षः' म्हणजे २८५० ही संख्या येते. हे शब्दांक म्हणजे व्यवहारांतील निरनिराळ्या वस्तूंचीं किंवा कल्पनांचीं नांवें होत. एकाच संख्येसाठीं अनेक शब्द वापरीत. उदा., शून्यासाठीं ख, गगन, आकाश, नभ, पूर्ण, रंध्र, इ. शास्त्रीय ग्रंथांमध्यें अक्षरांकांचा पद्धतशीर उपयोग पहिल्या व दुसऱ्या आर्यभटांनीं केलेला आहे. क–वर्गापासून प–वर्गापावेतोंचीं पंचवीस अक्षरें पहिल्या पंचवीस अंकांसाठीं वापरलीं आहेत. त्यापुढील आठ वर्णांचा ३० ते १०० हे अंक दाखविण्यासाठीं उपयोग केला आहे.

प्राचीन कालीं ग्रीक आणि रोमन लोकांत अबकस किंवा स्थानरेषापट हिशोबासाठीं वापरण्यांत येत असे. एका पाटीवर एकावर एक अशा समांतर रेषा आंखून सर्वांत खालच्या ओळीवर एकमूचे, तिच्या वरच्या ओळीवर दहमूचे, नंतर वरच्या ओळीवर शतमूचे, याप्रमाणें आंकडे लिहीत जाण्याची ही रीत असावी. यावरून शून्याची कल्पना अस्तित्वांत येण्यापूर्वी अंकांना स्थानीय किंमत देऊन निरनिराळीं संख्याचिन्हें शक्य तितकीं कमी करण्याचा हा शोध असला पाहिजे, असें वाटतें. पुढें स्थानरेषापट मागें पडून सांप्रतची शून्यान्वित नऊ अंकी संख्यालेखन-पद्धति

उदयास आली. आपल्याकडील पंचांगांतील अवकहडा चक्र हें अवकसचेंच रूपांतर दिसतें.

आजच्या पूर्णावस्थेस आलेल्या शून्यान्वित नऊ अंकी संख्यालेखन-पद्धतीचा उदय हिंदुस्थानांत पूर्वींच झाला असून आठव्या शतकाच्या अखेरीस अरब लोकांनीं ती उचलली असली पाहिजे. बाराव्या शतकांत युरोप खंडांतील लोक ती अरबांपासून शिकले, असें आतां सिद्ध झालेलें आहे.

**संग (राणा)**—संग्रामसिंह गुहिलोत पाहा.

**संगजिरें**—(इं. टॅल्क). पांढरा मोत्याप्रमाणें तकाकणारा व हाताला तेलकट मऊ लागणारा हा खनिज पदार्थ मग्नसिकिताचा बनलेला असतो. याचे पातळ तक्ते पारदर्शकहि असतात. अभ्रकाच्या कांहीं प्रकारांना हें नांव देतात. 'फ्रेंच चॉक' (फ्रेंच खडू) हाहि संगजिऱ्याचाच एक प्रकार असून, लांकूड, कापड, इ. वर रेघा काढण्यासाठीं खडूऐवजीं उपयोग करतात. याचा आज बराचसा उपयोग तोंडाला लावण्याची पूड (फेस पावडर) म्हणून होतो.

**सगनभाऊ** (१७७८–१८४०)—एक सुप्रसिद्ध मराठी शाहीर. जातीनें हा शिकलगार मुसलमान असून गुरुनाथ सिद्धाचा शिष्य होता. "दक्षिणच्या पेशव्यास घाला नव्हता आला। गंगाधरशास्त्र्यांवरून राज्याचा नाश झाला॥" हा याचा एक प्रसिद्ध पोवाडा आहे. विलासप्रसंगांवर जशा यानें अनेक शृंगारिक लावण्या रचल्या, त्याचबरोबर परमार्थावरहि रचल्या. याच्या फडांत यास विविजान, येमा, बाळा, राघू व रामा यांचें साहाय्य असे. पेशवाई गेल्यानंतर सातारच्या प्रतापसिंहाच्या अखेरीपर्यंत याचें वास्तव्य साताऱ्यासच होतें. याच्या लावण्या फार थोड्या प्रसिद्ध झाल्या आहेत. ठिकठिकाणीं पडलेल्या जमवून त्यांचा संग्रह केल्यास तो बराच मोठा होईल. पुण्यास याची पुण्यतिथि श्रावण महिन्यांत निरनिराळे फड याचीं कवनें म्हणून साजरी करतात.

**संगम घराणें** (१३३६–१४५६)—विजयानगरचें एक राजघराणें. संगम हा मूळ पुरुष. याला हरिहर, बुक्क, इ. पांच पुत्र होते. संगम घराण्याचा बुक्क यानें इ. स. १३७४ च्या सुमारास चीनच्या मिंग घराण्यांतील तैत्सु बादशाहाकडे आपले वकील रवाना केले होते. या राजाचा बहुतेक काळ इ. स. १३४७ त तुंगभद्रेच्या उत्तरेस स्थापन झालेल्या बहामनी राज्याच्या सुलतानांशीं युद्धें करण्यांत खर्च झाला. दुसऱ्या देवरायाच्या कारकीर्दींत (१४२४–१४४७) संगम घराणें वैभवाच्या शिखरास पोंचलें होतें. याच राजाच्या कारकीर्दीच्या आरंभीं निकोलो कॅंटी हा इटालियन प्रवासी व अखेरीस (इ. स. १४४३) अबदुर रझाक हा मुसलमान प्रवासी विजयानगरच्या राज्यांत येऊन गेला. दुसऱ्या देवरायानंतरच्या संगम घराण्यांतील सर्व राजे कमकुवत होते. या देवरायाचा पुत्र मल्लिकार्जुन याचा नरसिंह नामक कोणी एक कारभारी होता, तोच पुढें सत्ताधीश होऊन त्यानें १४५६ त संगमाच्या वंशजास पदच्युत केलें.

**संगमनेर**—मुंबई, अहमदनगर जिल्ह्याचा एक तालुका. क्षे. फ. ७०४ चौ. मैल. यांत एक शहर संगमनेर (तालुक्याचें मुख्य ठिकाण) व १५१ खेडीं आहेत. १९४१ मार्चीं लो. सं. ७१,८२० होती. प्रवरा व तिचे फाटे या तालुक्यांतून वाहतात. संगमनेर गांव हें अहमदनगरपासून ७४ मैलांवर वायव्येस वसलेलें आहे. याची लोकवस्ती सु. चौदा हजार आहे. येथें १८६० मध्यें म्युनिसिपालिटी स्थापन झालेली आहे. सूत, तांदूळ, ज्वारी, चणे, धातू, किराणा माल, मीठ, रेशीम यांचा येथें पुष्कळ व्यापार चालतो व येथें पुष्कळसे हातमाग आहेत. एक जुनें हायस्कूल आहे.

**संगमरवर**—हा एक चुनखडीच्या दगडाचा प्रकार असून त्याला उत्तम झिलई देतां येते. पांढरा संगमरवर हा एक शुद्ध स्फटिकमय खिरगोळ्याचाच प्रकार आहे. संगमरवरी दगडाच्या अनेक जाती आहेत. कांहीं जाती एकरंगी असतात, तर कांहींमध्यें चित्रविचित्र रंग असतात. कांहींमध्यें अभ्रकाच्या रेघा असतात. कांहीं संगमरवराचे दगड निरनिराळ्या जातींचे कोनाकृति तुकडे एकत्र सांधले जाऊन बनलेले असतात. या दगडांत कर्बाचें कांहीं प्रमाण मिसळल्यामुळें त्यास काळा रंगहि येतो. हा दगड पुष्कळ ठिकाणीं सांपडतो. तथापि इटलींत कॅरारा येथील दगड फार प्रसिद्ध आहे. मूर्तीसाठीं हा वापरतात. दोन हजार वर्षांपासून या खाणींतून दगड काढला जात आहे. जबलपुराजवळ भेडा घाटांत संगमरवरी दगडाचे डोंगरच आहेत. ५०–६० फूट खोलीवरून यांतून नर्मदा वाहते. अमेरिकेंत रटलंड कौंटीमध्यें फार मोठ्या खाणी आहेत. पाश्चात्य देशांत यांत्रिक पद्धतीनें दगड काढला जातो; त्यामुळें सुरुंग लावून उडविल्यामुळें जो नाश होतो तो टळतो. मूर्तींखेरीज मोठाल्या प्रासादांतून कोनें, फरशी, टेबलें, वगैरेबद्दल हे दगड वापरतात. हवेचा परिणाम न होऊं दिल्यास हा दगड फार काळ टिकतो.

**संगमेश्वर**—मुंबई, रत्नागिरी जिल्ह्याच्या आंतल्या अंगास असलेला एक तालुका. क्षे. फ. ५७६ चौ. मैल. यांत फक्त १९० खेडीं आहेत. स. १८७८ पासून देवरुख खेडें त्याचें मुख्य ठिकाण आहे. लो. सं. १,३५,०००. यांत असलेल्या 'शास्त्री' नदीच्या खोऱ्यांतील जमीन उत्तम प्रकारची व सपाट असून तींत तांदूळ, कडधान्यें हीं पिकें चांगलीं होतात. या तालुक्यांत उष्ण पाण्याचे झरे बरेच आहेत. पावसाचें सरासरी वार्षिक मान १४३ इंच आहे. संगमेश्वर हें पूर्वी तालुक्याचें मुख्य ठिकाण होतें. शास्त्री, अलकनंदा व वरुणा यांच्या संगमावर गांव वसलेलें आहे.

तेथें धान्य, बारीकसारीक वस्तू व खारे मासे यांचा व्यापार चालतो. येथील धूतपापतीर्थ व कर्णेश्वर देवालय प्रसिद्ध आहे. मोंगलांनीं छत्रपति संभाजीला येथेंच पकडलें.

**सगर**—१. इक्ष्वाकु वंशांतील एक राजा. याला प्रभा व भानुमती अशा दोन स्त्रिया असून प्रभेला साठ हजार व भानुमतीला एक (असमंजा) पुत्र होता. हा मोठा पराक्रमी राजा असून यानें बरेच यज्ञ केले होते. सगराच्या मुद्रा मोहेंजोदारोच्या उत्खननांत सांपडल्याचें कांहीं वेडेलसारखे संशोधक सांगतात.

२. गुजराथेंतील एक जात. लो. सं. सुमारें दहा हजार. हे आपली उत्पत्ति सगर राजापासूनची म्हणून सांगतात. यांचा धंदा शेतकीचा असून हे शाकाहारी आहेत.

**संगीतशास्त्र**—जगांत प्राचीन काळापासून प्रत्येक ठिकाणीं संगीताचा उपयोग ईश्वरोपासनेकडे केलेला आढळून येईल. भारतांतील सामवेद म्हणजे अत्यंत प्राचीन संगीतशास्त्र, किंवा बरोबर व्याख्या करावयाची म्हणजे यज्ञान्तर्गत संगीतयोजनाज्ञान अशी करतां येईल. सामवेदाचा अभ्यास करण्याच्या पद्धती तीन आहेत. सामसंहितेची योजना यज्ञप्रसंगीं कशी करावयाची हें विवेचन करणारे सामवेदाचे ब्राह्मणग्रंथ (१) प्रौढ (तांड्य), महाब्राह्मण किंवा-पंचविंश ब्राह्मण, (२) षड्विंश, (३) सामविधान, (४) आर्षेय, (५) दैवत, (६) उपनिषद्, (७) संहितोपनिषद् व (८) वंश हे होत. सामवेदाच्या ब्राह्मणग्रंथांतील परंपरा व पुष्कळ सामप्रवर्तकांचें ब्राह्मणें व सूत्रें या ग्रंथांत आलेले उल्लेख यांचा इतिहास-संशोधनास प्रत्यक्ष उपयोग नसला तरी एकंदर शास्त्रप्रसाराची व्याप्ति कळण्यास तीं अत्युपयुक्त आहेत. ब्राह्मण-ग्रंथांतून सामांचीं नांवें दिलेलीं आहेत. सामसंगीताचें यथार्थ स्वरूप व त्यावरून अर्वाचीन संगीताचा विकास कसा झाला याचा इतिहास अज्ञात आहे.

भारतीय संगीताच्या इतिहासाचें स्थूल स्वरूप म्हणून सप्तस्वर, राग, ताल, मूर्च्छना, मिंड, आरोहावरोह, श्रुति, इत्यादिकांचा विकास द्यावा लागतो. भारतीय संगीताच्या मर्यादा (१) सांघिक (या गायनाचा मंत्रपुष्पाखेरीज इतरत्र अभाव आहे), (२) सप्तकत्रयांतर्वर्तित्व, (३) एकस्वरमालिकायुक्तत्व, व (४) रागव्यवस्था अशा आहेत. संहितीकरणापूर्वी थोडें तरी शास्त्रीकरण व्हावें लागतें व तशा प्रकारचा प्रथम प्रयत्न म्हणजे सामांतील विकार, विश्लेष, विकर्षण, अभ्यास, विराम व स्तोम हीं होत. एकस्वरी गायनापासून ऋग्वेदकालीन तीन स्वरी गायन, व नंतर सहा स्वरीपासून सप्तस्वरात्मक संगीताचा विकास होत गेला. सात स्वरांचें प्राचीनत्व सिद्ध आहे. स्वरमापनाचें अगदीं प्रथमावस्थेतील साधन गात्रवीणा असून हाताच्या निरनिराळ्या बोटांवर स्वरमापन अद्यापहि करण्याचा प्रघात आहे. साममंत्रलेखनाचें स्वरूप अत्यंत घोटाळ्याचें असून भिन्न हस्तलिखितांत भिन्न चिन्हें आढळतात. स्तोम म्हणजे गाण्याकरितां केलेलीं काव्यें किंवा गायनोपयुक्त फरक केलेले मंत्र होत. भारतीय संगीतावर ग्रीक व पाश्चात्य संगीताचा कांहीं परिणाम दिसत नाहीं. मुसलमानी संगीताचा अगदीं अलीकडच्या गायनावर परिणाम झालेला दिसतो व द्राविडी संगीताचा संबंध व परिणाम अनिश्चित आहेत.

संगीतेतिहासाचे सामसंगीतयुग, मार्गसंगीतयुग, देशी संगीताचा उपःकाल व देशी संगीताचा उत्कर्षकाल असे चार विभाग पाडतां येतात. संगीतशास्त्रांतील प्राचीन ग्रंथ म्हणजे भरतनाट्यशास्त्र होय. भक्तिमार्गाच्या उदयाचा दक्षिणी संगीतावर बराच परिणाम झाला आहे. नारदशिक्षा, जयदेवाचें गीतगोविंद, शार्ङ्गदेवाचा संगीतरत्नाकर, पुंडरीक विठ्ठलाचे ग्रंथ, राम-अमात्याचा स्वरमेलकलानिधि, सोमनाथ पंडिताचा रागविबोध, वेंकट मखीची चतुर्दंडीप्रकाशिका, उत्तरेकडील संगीतपद्धतींतील दामोदरमिश्राचा संगीतदर्पण, हे महत्त्वाचे ग्रंथ आहेत. चौदाव्या व पंधराव्या शतकांमध्यें मुसलमानी अमदानींत हिंदी संगीतांत इराणी तत्त्वांचा प्रवेश झाला. तानसेन व त्याचे अनुयायी यांचें 'रबाबियर' व 'बीनकार' हे दोन वर्ग पडतात.

शहाजहान व औरंगजेब यांच्या कारकीर्दींत संगीताचा अनुक्रमें उत्कर्ष व अपकर्ष झाला. अहोबलाचा संगीतपारिजात म्हणजे १२ स्वरांचें वर्णन वीणावाद्याच्या तारांच्या लांबीच्या प्रमाणांत देणारें पहिलें पुस्तक आहे. मोंगलाईच्या अखेरच्या काळांतील संगीतांत कांहीं नवीन गाण्याचे प्रकार आले. त्यांत हिंदी-फारसी मिश्रण दिसेल. ब्रिटिश अमदानींत संगीत व्हासाच्या स्थितींत होतें. तंजावरमध्यें संगीताची धुगधुगी उरली होती. या सुमारास तयार झालेला संगीतसार ग्रंथ चांगला आहे. दक्षिणेतील त्यागराज (पाहा). पंथ प्रसिद्ध आहे. निरनिराळ्या ग्रंथांतील स्वर व श्रुति यांच्या संज्ञेंत जरी साहश्य असलें तरी त्यांच्या ध्वनींमध्यें साम्य नसल्यामुळें त्या स्वरांपासून बनणारे राग सारखे नाहींत. यामुळें संस्कृतमधील संगीत ग्रंथांचे (१) मुखारी अगर कनकांगी मेळाचे ग्रंथ, (२) काफी शुद्ध मेळाचे ग्रंथ, व (३) बिलावली शुद्ध मेळाचे ग्रंथ, असे तीन वर्ग झाले.

हिंदी संगीत व पाश्चात्य संगीत यांमधील कांहीं फरक असे सांगतां येतील :—(१) हिंदी संगीताचा प्रमुख घटकावयव आलाप आहे तर पाश्चात्याचा स्वरसंवाद (हार्मनी) आहे. (२) हिंदी संगीतांत सम तालाच्या साहाय्यानें साधतात तर पाश्चात्यांत या कामीं रंगभेदाचा उपयोग करतात. (३) हिंदी संगीतांत स्वरांमधील वादी-संवादी प्राचीन परंपरेनें ठरवून टाकलेले आहेत. पाश्चात्यांतील प्रमुख स्वर स्वरसंवादावरून होणाऱ्या क्षणिक परिणामावरून

ठरतो. (४) हिंदी संगीतांत गमकाला प्राधान्य फार असतें. तसेंच कोमल स्वरांच्या योजनेमुळें व शास्त्रशुद्ध स्वरसप्तक कायम ठेवल्यामुळें फार माधुर्य येतें. पाश्चात्य संगीतांत स्वरसप्तक मध्यम पद्धतीनें (टेंपर्ड) बसविलेलें असतें. त्यामुळें युरोपियन कानांना हिंदी शुद्ध स्वरसप्तक चमत्कारिक लागतें. (५) हिंदी संगीतांत निरनिराळ्या तालांची योजना असते, तर पाश्चात्यांत स्वराघातांची असते. (६) सर्वांत मोठा फरक म्हणजे पाश्चात्य संगीतांत आवाजाला फार महत्त्व देतात, तर हिंदी संगीतात शास्त्रीय ज्ञानालाच विशेष महत्त्व आहे.

संगीत हें शास्त्र कीं कला हा वादच आहे. शास्त्राचें ध्येय व्यवस्थित मांडणी व कलेचें मनोरंजन होय. आज दोहोंची सांगड घालून संगीत लोकप्रिय करण्याचें धोरण असावें, हें योग्य होय.

भारतीय संगीत दोन प्रकारचें आहे : १. मार्ग, व २. देशी. मार्गसंगीत देवादिकांचें असून त्यांत बदल करतां येत नाहीं. लोकाभिरुचीची त्याला अपेक्षा नाहीं. देशी संगीत म्हणजे निरनिराळ्या देशांत लोकाभिरुचिपरत्वें जें संगीत प्रचलित झालें तें. देशींत दक्षिण किंवा कर्नाटकी आणि उत्तर किंवा हिंदुस्थानी अशा दोन पद्धती आहेत.

आतां पाश्चात्य राष्ट्रांतील या शास्त्राचा इतिहास पाहूं जातां जुना आणि नवा असा भेद पडतोच. प्राचीन काळीं अर्वाचीन पद्धतीचा स्वरसंवाद (हार्मनी) नव्हताच. त्याचप्रमाणें विशिष्ट स्वरमर्यादेचीहि कल्पना नव्हती. खि. पू. ४०० वर्षांपूर्वी ईजिप्त देशांतील वाद्यांची माहिती मिळते, पण त्यामुळें या कलेची प्रगति समजत नाहीं. हीब्रू, असुरी–बाबिलोनी, वगैरे प्राचीन लोकांनीं संगीताचा उपयोग साहाजिकच ईश्वरोपासनेसाठीं केला, कलेसाठीं नव्हे. ग्रीकांनीं मात्र या बाबतींत आघाडी मारली. संगीताची काव्याशीं अविभाज्य संगति जोडून लयबद्धतेकडेहि लक्ष पुरविलें. संगीताचें कायमचें स्वरलेखन (नोटेशन) करण्याचाहि त्यांनीं प्रयत्न केला. 'लायर' हें त्यांचें प्रमुख वाद्य होतें. पुढें रोमन लोकांनीं या अभ्यासांत थोडी भर टाकली. पण त्यांचें महत्त्वाचें कार्य विशेषतः 'ऑर्गन' व 'बॅगपाइप' हीं वाद्यें तयार करण्याचें होय. पुढील टप्पा म्हणजे खिस्ती धर्माच्या उदयाबरोबरचा सांगतां येईल. ग्रेगरी दि ग्रेट यानें तयार केलेला राग अद्यापि रोमन कॅथॉलिक चर्चमधून ऐकूं येतो. नंतर सॅरासेनांची गाण्याची भावनाप्रधान ढब पश्चिमेकडील संगीतांत शिरली. उत्तरेकडील केल्ट आणि सॅक्सन लोकांनीं संगीताची आवड सर्वत्र उत्पन्न करण्याचें मोठें कार्य केलें. संगीतलेखक बरेच पुढें आले. 'ऑपेरा' तयार होऊं लागले व स्वरसंवादा (हार्मनी) ची कल्पना वाढीस लागली. सोळाव्या शतकांत प्रसिद्ध मार्टिन ल्यूथरनें चर्चमध्यें म्हणण्यासाठीं सुंदर गीतें तयार केलीं. पॅलेस्ट्रिना हा इटलीतील श्रेष्ठ संगीतज्ञ होता. नंतर संगीताला कल्पकता आणि आत्मा यांनी पाहिजे असलेली जोड मिळून तें लोकप्रिय होऊं लागलें. या वेळीं वाद्यें तयार होत होतीं व वादक देखील तज्ज्ञता दाखवूं लागले. प्रत्येक राष्ट्राच्या गरजेप्रमाणें संगीतांत निरनिराळे गुणधर्म येऊं लागले. उदा., जर्मनांना शास्त्रीयता, तर इटालियनांना सौंदर्य, पावित्र्य व गानमुग्धता पाहिजे होती. फ्रेंच संगीतज्ञांनीं जोरदार विकारांना प्राधान्य दिलें.

गायकांचे धंदे—प्राचीन काळीं आजच्याप्रमाणेंच लोकांना संगीत प्रिय असे व संगीतकलेला चांगला आश्रय असे. आज ज्याप्रमाणें मैफली, चित्रपटांत काम, रेडिओवर गाणें, गाणीं रचून देणें, इत्यादि धंदे संगीतज्ञांस आहेत, त्याप्रमाणेंच प्राचीन काळींहि पुढील कांहीं प्रकारचे धंदे संगीतज्ञ करीत : (१) निष्कला–सकला या तंतुवाद्याच्या साथीनें गायनाचे कार्यक्रम गायक करीत. वादकांचे स्वतंत्र कार्यक्रम पुढें झाले व संववादन सुरू झालें. (२) आडंबर, पटह, आनक, भेरि, दुंदुभि, तुर्य, शंख, इ. रणवाद्यें वाजविणारे असत. सैन्य कूच करतांना रणवाद्यांची साथ असे, असें रामायणावरून दिसतें. कांहीं धार्मिक विधींतहि गायनवादन करवीत. (३) राजदरबारीं गायक नेमलेले असत. बौद्ध जातककथेंत असा गुत्तिल गायक आढळतो. राजवराण्यांत संगीत शिकविणारे शिक्षक नेमीत; सूत, मागध व बंदीजन हे भाट राजस्तुति गात. दिवसकाळ समजण्यासाठीं प्रहराप्रहराला वाद्यें वाजत. राजांच्या मिरवणुकीबरोबर गायकांचा ताफा असे. (४) सामान्य जनांकडे संगीत शिकविण्यासाठीं गवयी ठेवलेले असत. (५) देवस्थानांतून प्रार्थनागीतें म्हणण्यास 'सामग' असत. या सामगांना नेमणुका मिळत. दक्षिण हिंदुस्थानांतील मंदिरांतून कांहीं विशिष्ट विधींच्या प्रसंगीं ३२ प्रमुख वाद्यें वाजविलीं जात. (६) पुराणिक कथाप्रसंगांत गाऊन दाखवी. (७) हरदासाप्रमाणें गायन-वादनासहित कथा करणारे त्या वेळीं होते. (८) प्राचीन काळीं तंतुवाद्यांना पडदे नसत, त्यामुळें गायकाला कंप, मुरक्या, वगैरे गळ्यांतून काढावे लागत. पुढें नवीं नवीं वाद्यें तयार करणारे निघाले. 'ज्याकार' वीणा मध्ययुगाच्या अखेरीस आला. (९) नृत्य करतांना संगीताची जोड लागे. पुष्कळ नृत्यकार संगीतज्ञ असत. (१०) नाटकांतून गायक–नटांना काम मिळे. (११) गायनप्रकारांचें स्वरलेखन करून देणारे त्या काळींहि होते. (१२) संगीतविषयक मूर्ती तयार करण्याचाहि धंदा होता. प्राचीन शिल्पकलाकृतींत गाण्यासंबंधीं चित्रें आहेत. (१३) गाण्यानें रोग बरे करणारे संगीतवैद्य असावेत. (१४) गांवोगांवीं फिरणारे हलके गवयी होते. कळसूत्री बाहुल्यांच्या खेळांतून गाणीं म्हणण्यास गवयी लागत. याप्रमाणें प्राचीन काळीं संगीतावर जगणारा मोठा वर्ग होता खास.

संगीताभिनय—ही एक शिक्षणपद्धति आहे. हिच्या योगानें मुलांमध्यें संगीताला साथ देण्याची आवड उत्पन्न होते व नाचाचें

शिक्षण मिळतें. वादन ऐकून मुलें त्याप्रमाणें हावभाव करतात व गाण्यांतील विषय डोळ्यांपुढें उभा करतात. माणसामध्यें संगीताला साथ किंवा ताल देण्याची जी स्वाभाविक प्रवृत्ति असते, ती पद्धतशीर वाढविण्यासाठीं हें शिक्षण देण्यांत येतें. ही पद्धत जिनेव्हाच्या एमिले जाकीझ-डाल्क्रोझ यानें तयार केली.

संगीतांतील निरनिराळे राग, ताल आणि वाद्यें यांवर स्वतंत्र लेख दिलेले आहेत.

**संगीन**—( बेयोनेट ). सतराव्या शतकामध्यें फ्रान्समध्यें बेयोन शहरीं एका फ्रेंच मनुष्यानें हें शस्त्र प्रचारांत आणलें. हें सरळ लांब असून याचें टोंक तीक्ष्ण असतें. प्रथम हें बंदुकीच्या तोंडास रुतून बसवीत; म्हणजे तिचा भाल्यासारखा उपयोग करतां येत असे. लवकरच त्याला एक शेंबी बसवून तिच्या साहाय्यानें संगीन बोलटानें बंदुकीच्या तोंडाबाहेर बसविण्यांत येऊं लागली. यामुळें बंदुकीची गोळी उडविण्याच्या कामीं व संगिनीचा टोंचण्याच्या कामीं असे दोन्ही उपयोग करता येऊं लागले. १६९० मध्यें भाल्याच्या ऐवजीं संगीन वापरण्यांत येऊं लागली. हिची लांबी, आकार व वजन यांमध्यें वेळोवेळीं पुष्कळच फरक करण्यांत आले आहेत. सध्यां ब्रिटिश सैन्यांत वापरण्यांत येणारी संगीन लहान तलवारीसारखी असून दीड फूट लांब आणि एक पौंड वजनाची असते. लढाईमध्यें संगिनीचा हल्ला हा एकंदर युद्धांत यशस्वी होण्यास आवश्यक समजला जातो.

**सगुणवाद**—( मूर्तिपूजा पाहा ). 'ॲन्थ्रोपोमॉर्फिझम' हा एक पाश्चात्य तत्त्वज्ञानांतला पंथ आहे. या पंथाचें मत असें कीं, ईश्वर हा मानवी रूपानें या जगांत अवतार घेतो, आणि त्याला मानवी गुण व विकार असतात. मानवरूपाप्रमाणें मानवाहून अगदीं हलक्या जातीच्या प्राण्याच्या रूपानेंहि ईश्वर अवतार घेतो, व त्या ईश्वरी अवताराला मानवाप्रमाणें बौद्धिक व मानसिक शक्ती व गुण असतात. ईश्वर साकार व सगुण बनून मानवाचें व इतर कोणत्याहि प्राण्याचें रूप घेऊन या जगांत प्रकट होतो. असेंच हिंदु धर्मांत सगुणवादाचें फार महत्त्व आहे.

**सगुणाबाई**—१. छत्रपति शिवाजी याची एक राणी. हिच्या माहेरचें आडनांव निश्चित सांगतां येत नाहीं. कोणी इंगळे सांगतात. हिला एक मुलगी ( राजकुंवर ) होती. राजकुंवर पाहा.

२. शाहूची एक राणी. हिला धाकटी धनीण म्हणत. ही चन्हाणजी मोहित्याची मुलगी होती. ही जेजुरी येथें शके १६७० त वारली. हिला राजसबाई नांवाची मुलगी होती.

३. पहिल्या बाजीरावाचा मुलगा जनार्दन याची बायको. ही रामाजी अनंत भिडे याची मुलगी. हिला लहानपणीं वैधव्य आलें असतांहि ही आपल्या गोड व सच्छील वर्तनानें सर्वांना आदरार्ह असे. ही काशीस गेली होती. हिच्याजवळ पोथ्यांचा संग्रह मोठा असे. ही जलालपूर येथें शके १७०५ मध्यें वारली.

**संग्रामसिंह गुहिलोत** ( १४८२–१५२८ )—( संगराणा ). मेवाडचा एक शूर राणा. हा रायमल्लाचा पुत्र. यास राजमल्ल व पृथ्वीराज हे दोन वडील भाऊ होते. या दोन भावांस एका ज्योतिषानें, संग्रामसिंहास राज्य मिळेल असें सांगितल्यावरून ते याचा द्वेष करूं लागले व त्यांच्या कारवायांमुळें यास बरेच दिवस अज्ञानवासांत घालवावे लागले. दिल्लीच्या इब्राहिम लोदीशीं झालेल्या लढाईंत याचा उजवा हात तुटला व एका पायानें हा क़ायमचा लंगडा झाला. मोहिनीरायानें याच्या साहाय्यानें माळव्या सुलतान महंमद ( दुसरा ) वर स्वारी केली असता महंमद याच्या हातीं लागला. तो जखमी स्थितींत असल्यानें त्याला बरें करून व त्याचें अर्धें राज्य परत करून यानें त्यास सोडून दिलें. परंतु हे उपकार न स्मरतां महंमदनें मालिक अयाजला याजविरुद्ध मदत केली.

सन १५२६ मध्यें बाबरनें इब्राहिम लोदीस ठार करून दिल्लीचें तख्त बळकावलें. त्यानंतर या पराक्रमी संगराण्यास जिंकण्यासाठीं त्याचे प्रयत्न सुरू झाले. परंतु प्रत्येक लढाईंत यासच विजयश्रीनें माळ घातली. जसजशी याची चढाई वाढूं लागली तसतसें बाबरचें सैन्य भिऊन कच खाऊं लागलें. तेव्हां बाबरनें सैनिकांच्या मद्यपानावर बंदी बसवून व त्यांच्याकडून कुराणावर हात ठेवबून जिवांत जीव असेपर्यंत लढण्याच्या शपथा घेवविल्या. नंतर ता. १७ मार्च १५२७ रोजीं आपल्या तोफखान्याच्या साहाय्यानें याजवर निकराचा हल्ला चढवला. मुसल्मानांनीं चोहो बाजूंनीं रजपुतांना वेढलें. संगराणा हा हत्तीवर स्वार होऊन युद्ध चालवीत होता. शत्रूच्या तोफखान्यापुढें व याजजवळ त्याचा अभाव असल्यामुळें याचें कांहीं चालेनासें झालें. रणांगणावरून मूर्च्छित स्थितींत यास बसवा गांवापाशीं आणल्यावर हा शुद्धीवर आला. परंतु युद्धभूमीवरून आपणांस परत आणलें याबद्दल त्याला फार खेद झाला. बाबरनें अजून याची पाठ सोडली नव्हती. मेदिनीरायावर हल्ला करण्यास बाबर चंदेरीपर्यंत आला आहे असें कळतांच यानें इरिच गांवीं असतांनाच युद्धाची तयारी सुरू केली. तेव्हां कांहीं युद्धविरोधी रजपुतांनीं यास विषप्रयोग करून ठार केलें. काल्पीस हा मरण पावला.

खुद्द बाबरनें याजविषयीं जी हकीगत लिहून ठेवली आहे तीवरून असें दिसतें कीं, हा अत्यंत शूर असून माळवा, गुजराथ किंवा दिल्ली येथील सुलतानांना अजिंक्य असा झाला होता. यानें दोनशें शहरांतील मुसलमानांच्या मशिदींची नासधूस केली व

हजारों मुसलमानांना चंदीत टाकलें. यास सात राजे, नऊ राव, १०४ छोटे सरदार व एक लक्ष सैन्य यांचें साहाय्य होतें. याचे तिन्ही उत्तराधिकारी जर कर्तबगार असते तर मोंगलांना हिंदुस्थानांत राज्य स्थापन करण्याची आशाच नव्हती.

**संघक्रिया**—(मास ॲक्शन). रासायनिक क्रियेंत भाग घेणाऱ्या पदार्थांच्या प्रमाणांवर त्या क्रियेचा वेग अवलंबून असतो असें गुल्डबर्ग आणि वाग यांनीं शोधून काढलें. या सिद्धान्तामुळें रासायनिक क्रियेचा समग्र बदल कसा होतो, याचा संपूर्ण इतिहास मिळतो.

**संघनियम**—(आर्टिकल्स ऑफ असोसिएशन). हे नियम एखाद्या कंपनीच्या किंवा संघाच्या स्वतःच्या कारभारासाठींच असतात. हे नियम कंपनी स्वतःच बनविते किंवा कंपनीच्या कायद्यांत पहिल्या यादींत (शेड्यूलमध्यें) 'अ' तक्त्यांत जे दिलेले असतात, तेच सर्व किंवा जरूर तितके घेते. स्वतःचे नियम केले असल्यास ते छापून संघपत्रका (मेमोरँडम ऑफ असोसिएशन)-बरोबर सरकारांत नोंदवावे लागतात. हे संघनियम केवळ अंतर्गत व्यवहाराविषयीं असून कंपनी आणि सभासद यांनाच बंधनकारक असतात.

**संघवर्मा**—एक चिनी प्रवासी. हा समरकंदचा रहिवासी असून तो वाळूचें मैदान ओलांडून चीन देशांत गेला व नंतर वाकिलाबरोबर बोधिमंदिराहून वज्रासनाकडे आला. तेथें त्यानें सात दिवस व रात्री नंदादीप लावून ठेविले होते. त्यानें अशोक वृक्षाखालीं एक बुद्धाची व क्वान-त्से-त्साईची (अवलोकितेश्वराची) अशा दोन मूर्ती बोधीच्या सभामंडपांत कोरल्या. तेथून तो चीनमध्यें परत आला. त्यानंतर त्याला क्वाई चाउ (कोचीन चीन) येथें पाठविण्यांत आलें. तेथें दुष्काळ होता म्हणून हा रोज गरीब लोकांस धान्य वगैरे वांटीत असे. तेथें पोरक्या पोरांकडे पाहून हा द्रवून दुःखाश्रू गाळीत असे म्हणून त्याचें नांव 'रोदनशील' बोधिसत्त्व असें पडलें होतें. त्याचा तेथेंच कांहीं सांसर्गिक रोगानें वयाच्या साठाव्या वर्षी अंत झाला.

**संघसंस्था**—'कार्पोरेशन' या अर्थाची ही संज्ञा येथें विवेचिली आहे. कायद्यांत या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, ज्या मुलकी किंवा राजकीय संस्थेला कांहीं विशिष्ट हक्क किंवा विशेष अधिकार कायमचे दिलेले असतात, अशा संस्थेला 'कार्पोरेशन' म्हणतात. अशी संस्था एकच इसम व तिचे वारस यांची बनलेली असते तेव्हां तिला 'कार्पोरेशन सोल' म्हणतात (उदा., ब्रिटनचा राजा); आणि अनेक इसमांची असते तेव्हां अशा संस्थेला 'कार्पोरेशन ॲग्रीगेट' म्हणतात. अशा संस्था राजानें दिलेल्या सनदेनें, किंवा पार्लमेंटच्या कायद्यानें, किंवा वहिवाटीच्या हक्कानें बनलेल्या असतात. जॉइंट-स्टॉक कंपन्या ह्या अशा प्रकारच्या संस्था होत. मोठ्या शहरांच्या म्युनिसिपालिट्यांना कार्पोरेशन म्हणतात; व इतर म्युनिसिपालिट्यांपेक्षां त्यांना जादा अधिकार असतात. यांची माहिती स्थानिक स्वराज्य या लेखांत दिली आहे. हिंदुस्थानांत मुंबई, मद्रास, कलकत्ता, कराची, अहमदाबाद व पुणें या शहरांची व्यवस्था कार्पोरेशन पाहतें. नागपूर व जबलपूर हीं शहरें कार्पोरेशनच्या दर्जाचीं होत आहेत.

**संचायक**—(कन्डेन्सर). १. विद्युत्संचायक–विद्युच्छक्तीचा संचय करून ठेवण्याचें यंत्र. यामध्यें धातूंच्या तबकड्यांचे दोन संच एकमेकांपासून एखाद्या विद्युद्रोधक माध्यमानें परस्परांपासून विभक्त केलेले असतात. या माध्यमास विद्युद्रोधक किंवा अवद्युतिक असें म्हणतात. या दोन संचांपैकीं एक तबकड्यांचा संच धनविद्युदुत्पादकाशीं जोडलेला असतो आणि दुसरा ऋण ध्रुवाशीं किंवा जमिनीशीं जोडलेला असतो. बिनतारी विद्युत्संदेशवाहकांमध्यें निरनिराळ्या शक्तींचे विद्युत्संचायक वापरण्यांत येतात. व त्यामध्यें हा विद्युद्रोधक म्हणून योजण्यांत येतो.

२. दृक्शास्त्रीय संचायक—मॅजिक लँटर्न (जादूच्या दिव्या)मध्यें प्रकाशाच्या उद्गमाच्याजवळ जी भिंगांची रचना केलेली असते, तिला संचायक म्हणतात. या संचायकामुळें प्रकाशाचे सर्व किरण चित्रावर केन्द्रीभूत करण्यांत येतात.

३. यांत्रिक संचायक—सामान्यतः पांच तऱ्हेचे बाष्पसंचायक उपयोगांत आणण्यांत येतात: (१) पृष्ठसंचायक–यामध्यें एका बंद भांड्यामध्यें कांहीं नळ्या असतात. त्यांवर वाफ सोडली म्हणजे तिचें पाणी होतें. या नळ्यांतून थंड पाणी खेळविण्यांत येतें व तें वाफेंतील उष्णता शोषून घेतें. (२) धारासंचायक–यामध्यें एक बिडाचें पात्र असून त्यांत वाफ आणून सोडलेली असते व त्या पात्रांत एका छिद्रें पाडलेल्या नळींतून किंवा हजाऱ्यांतून थंड पाणी फवाऱ्यासारखें उडविण्यांत येतें. हें पाणी त्या पात्राच्या तळाशीं जमतें व तेथून तें हवेसह पंपानें काढून घेण्यांत येतें. याच्याच दुसऱ्या एका प्रकारामध्यें संचायक खालच्या बाजूस असून त्यांत निर्वातपद्धतीनें पाणी आणून सोडण्यांत येतें. हा उंचावर असल्यास पंपाच्या साहाय्यानें त्यांत पाणी आणून सोडावें लागतें. धारासंचायकामध्यें १५ फूट उंचीवरून पाणी सोडण्यांत येतें. व त्यामुळें नळीच्या बारीक छिद्रांतून बाहेर पडतांना त्यास मोठी गति मिळते. बाहेर पडणारी वाफ अनेक उतरत्या तोंडांतून जोरानें बाहेर पडते व या धारांशीं तिचा संयोग होऊन तिचें पाणी होतें. यामुळें त्या पाण्यास जोर येऊन तें जोरानें बाहेर उडत असतें. दुसरा एक तऱ्हेचा बाष्पक शीतक असतो; त्यामध्यें लोखंडाच्या खोबणीसारख्या नळ्या असतात. व त्या बाहेरून उघड्या असल्यामुळें त्यास बाहेरची हवा लागते व त्या हवेमुळें

आंतील वाफेचें पाणी होतें. हें पाणी थेंबाथेंबानें बाहेर पडतें व त्यांतील कांहीं पाण्याची वाफ होऊन हवेंत जाते.

**संचित मतदान**—( क्युम्युलेटिव्ह व्होट ). ज्या मतदान-पद्धतींत प्रत्येक मतदाराला जितके सभासद त्या मतदारसंघांत निवडावयाचे असतील तितकीं मतें देण्याचा हक्क असतो, आणि तीं सर्व मतें एकाच उमेदवाराला देतां येतात, किंवा विभागून इच्छेस वाटेल तितक्या उमेदवारांना देतां येतात, त्या पद्धतीला संचितमतदानपद्धति म्हणतात. ही पद्धति इंग्लंडांत प्रथम १८७० च्या एलेमेंटरी एज्युकेशन ॲक्ट या कायद्यानें स्कूल बोर्डांच्या निवडणुकींना लागू करण्यांत आली.

**सचित्र ग्रंथ**—मुद्रणकला येण्यापूर्वींहि हस्तलिखित ग्रंथांतून चित्रें घातलेलीं असत. जुन्या सचित्र पोथ्या बऱ्याच सांपडतात. मुद्रणकलेचा प्रसार झाल्यानंतर पुस्तकांतील विषयास अनुसरून त्यांत चित्रें व आकृति घालण्याचा प्रघात पडला. हीं चित्रें प्रथम लांकूड किंवा धातु यांच्यावर आकृति कोरून त्यांचे ठसे बनवून छापण्यांत येत. याप्रमाणें प्रथम पुस्तकांत चित्रें घालण्यास सुरुवात होऊन एकोणिसाव्या शतकापर्यंत या कलेंत चित्रकलेच्याच धर्तीनें वाढ होत गेली व हळूहळू त्यांत वास्तवता येऊं लागली. यानंतर सचित्र नियतकालिकें निघूं लागलीं. या कलेंतहि बऱ्याच निरनिराळ्या लोकांनीं प्रावीण्य संपादन केलें. त्यांतील इंग्लिश चित्रकारांचीं कांहीं नांवें द्यावयाचीं तर सर जॉन टेनिएल, सर जॉन गिल्बर्ट, बर्केट फॉस्टर, मॅडॉक्स, ब्राउन, मिलैस, रोझेटी, वगैरे होत. यानंतर इंग्लंडमध्यें 'पंच' हें साप्ताहिक निघाल्यापासून एक नवीनच पद्धति प्रचारांत आली. हिचे प्रणेते जॉन लिच, जॉर्ज डुमॉरिएल, चार्लस कीन, वगैरे होत. अलीकडे या चित्रकलेमध्यें यांत्रिक व तांत्रिक ज्ञानांत अनेक प्रकारची भर पडल्यामुळें व चित्रें काढण्याच्या, ठसे बनविण्याच्या व छापण्याच्या पद्धतींत अनेक नवीन नवीन प्रकार निघत गेल्यामुळें या कलेस अगदीं निराळेंच स्वरूप प्राप्त झालें आहे. तसेंच जगांतील जपानी वगैरे निरनिराळ्या देशांतील चित्रकलांशीं परिचय वाढल्यामुळेंहि या कलेंत नवीन नवीन पद्धती व तऱ्हा उत्पन्न होत आहेत. नवीन नवीन शास्त्रीय पद्धतींची व मुद्रणकलेची जसजशी वाढ होत जाईल तसतसें या कलेंतील खऱ्या कलाकाराचें स्थान पुष्कळच बदलत जाईल व विषयांमध्यें व पद्धतीमध्येंहि अनेक फेरबदल होत जातील, हें स्पष्ट दिसत आहे.

**सचिव**—सुरनीस. अष्टप्रधानांतील एक पद. याची राज्याच्या एकंदर वसुलावर देखरेख असे. सनदांची चाळनिशी हा करी. शिवाजीच्या वेळीं सचिवाला सालीना पंधरा हजार होन तनखा असे. त्याकरितां स्वतंत्र मुलूख तोडून दिलेला नसे. आपला दरक संभाळून राज्याचें रक्षण करणें व मुलूखगिरीवर जाणें हीं कामें त्याला करावीं लागत. पूर्वीं फारसी नांव सुरनीस असे तें शिवाजीनें बदलून 'पंतसचिव' केलें.

रामचंद्र निळकंठानंतर शंकराजी नारायण याला सचिवपद मिळालें. हें पद या घराण्यांत वंशपरंपरेनें चालू राहिलें. (भोर संस्थान पाहा).

**सचीन**—मुंबई, सुरत जिल्हा, एक संस्थान. सुरत जिल्हा व बडोदें संस्थान यांच्या सीमेपर्यंत ह्याचा विस्तार आहे. संस्थानचें क्षे. फ. ४९ चौ. मैल व लो. सं. ( १९४१ ) २६,२३१. कापूस व सुताचें कापड येथें तयार होतें. ह्या संस्थानांत दोन फौजदारी कोर्टें असून एक तुरुंग आहे. सचीनचे नबाब हबशी वंशांतील आहेत. हें घराणें जंजिऱ्याच्या नबाबांपैकींच आहे. याचा मूळ पुरुष सिद्दी अब्दुल करीम महंमद याकूतखान आहे. अहमदनगर आणि विजापूर येथील राजाजवळ हे नबाब आरमाराच्या नोकरींत होते. यांनीं मराठे व इंग्रज ह्यांच्याशीं अनेक उलाढाली केल्या. हिज हायनेस नबाब सिद्दी महंमद हैदर महंमद याकूतखान हे आज सचीनच्या गादीवर आहेत. १९३० सालीं हे गादीवर आले. संस्थानचें उत्पन्न सु. पांच लाख रु. चें आहे. सचीन ही कायमची राजधानी आहे, पण उन्हाळ्यांत डुमास येथें ती हालविली जाते. हें संस्थान आतां मुंबई प्रांतांत विलीन झालें आहे.

**सच्छिद्रकवचप्राणिवर्ग**—( फोरॅमिनिफेरा ). हा एक अतिशय खालच्या जातीच्या प्राण्यांचा वर्ग आहे. याच्या शरीरावर एक साधें किंवा संयुक्त कवच असून त्यास छिद्रें असतात, त्यावरून त्यास हें नांव देण्यांत येतें. हे साधे एकपेशीमय प्राणी आहेत. परंतु त्यांच्या शरीरावरील कवचामुळें त्यांस मृदुकाय प्राण्यांच्या वर्गांत घालण्यांत येत असे. हे प्राणी अत्यंत प्राचीन भूस्तरकालामध्यें आढळतात. पांढरा खडू हा या प्राण्यांच्या शरीरापासूनच बहुतेक तयार झालेला आहे.

**सजन**—एक संत. सजन कसाई या नांवानें महाराष्ट्रांत व सधना या नांवानें उत्तर हिंदुस्थानांत हा संत प्रसिद्ध आहे. पण याची माहिती फारशी नाहीं. नाभाजीच्या श्रीगुरुभक्तमालेंत याच्या कथा दिलेल्या आहेत व आपल्याकडील भक्तलीलामृतांतहि याचे उल्लेख सांपडतात. हा रामानंदाचा शिष्य होता, अशी आख्यायिका आहे. ग्रंथसाहेबांत याचें एक पद्य आहे. हा प्रयागचा राहणारा असावा.

**संजय**—१. या नांवाच्या अनेक व्यक्ती होऊन गेल्या; पण प्रसिद्ध व्यक्ति म्हणजे धृतराष्ट्र राजाचा संजय नांवाचा एक सारथी होय. भारतीय युद्धांतील सर्व वृत्त घरबसल्याच यास व्यासप्रसादानें कळे आणि तो तें जसेंच्या तसेंच धृतराष्ट्रास सांगे. कृष्णानें अर्जुनास सांगितलेली गीता ही याच्या मुखांतूनच बाहेर

आली. युद्धानंतरहि हा धृतराष्ट्राजवळ असे. पण त्याच्याप्रमाणें हा वणव्यांत सांपडला नाहीं.

२. सौवीर राजपुत्र. याचें राज्य सिंधु राजानें बळकावलें असतां हा रणांगणावर जाईना. तेव्हां याची आई विदुला हिनें उपदेश करून व प्रोत्साहन देऊन यास युद्धास प्रवृत्त केलें.

**सज्जनगड**—मुंबई, सातारा जिल्हा. याला परळीचा किल्ला असेंहि म्हणतात. पठारापासून १,०४५ फूट उंच असून घेर १,८२४ यार्ड आहे. किल्ल्यांत दोन तळीं आहेत व एक मशीद आहे. तळीं शिलाहार अमदानी व मशीद मुसलमान अमदानी दाखवितें. किल्ला रामदासस्वामी शके १५७२ पासून वास्तव्यास आल्यापासून महत्त्व पावला. किल्ल्याचें नांव शिवाजीनें सज्जनगड असें ठेविलें. स्वामी येथेंच शके १६०३ माघ व॥ ९ स समाधिस्थ झाले. तेव्हांपासून दासनवमीला येथें यात्रा भरते व महाशिवरात्रीसहि भरते. सज्जनगडाची व्यवस्था रामदासांचे बंधु गंगाधरबावा यांच्या वंशजांकडे असते. सध्यां सज्जनगडाचा जीर्णोद्धार करण्याचें काम चालू आहे.

**सज्जीखार**—( सोडिअम कार्बोनेट-सिंधुकर्बनित ). सोडा पद्धतीनें किंवा 'सॉल्वे' पद्धतीनें हा तयार करतात. या पद्धतींत मिठाच्या विद्रावांत अमोनिया घालून नंतर कर्बद्विप्राणिद ( कार्बन डायॉक्साइड ) सोडतात. प्रथम सिंधुद्विकर्बनित ( सोडियम बायकार्बोनेट ) तयार होऊन तळाशीं बसतो व अमोनियम क्लोराइड विद्रावांत राहतें. सिंधुद्विकर्बनित ( सोडियम बायकार्बोनेट ) तापविल्यावर कर्बनित तयार होतो. सॉल्वेची पद्धत सुरू होण्यापूर्वी ला ब्लॅंकच्या पद्धतीनें सिंधुकर्बनित तयार करीत असत. ह्या पद्धतींत मीठ आणि गंधकाम्ल ( सल्फ्युरिक ॲसिड ) ह्यांचें मिश्रण चांगलें भाजतात. त्यामुळें सिंधुगंधकित ( सोडियम सल्फेट ) तयार होतें. तें नंतर चुना आणि कोळसा ह्यांत मिसळून पुन्हां चांगलें भाजतात. शेवटीं तयार झालेला सिंधुकर्बनित पाण्यांत विरघळवून निराळा काढतात. ला ब्लॅंकची पद्धत आतां मागें पडली आहे. सज्जीखार-सिंधुकर्बनिताचा कांच, साबण आणि सिंधू( सोडियम )चीं इतर लवणें तयार करण्यासाठीं उपयोग होतो.

**सँटोनाइन**—( जंतांचें पूड ). हें एक आर्टेमिसिया मारिटिमा नांवाच्या वनस्पतीच्या कळ्यांपासून काढलेलें स्फटिकमय द्रव्य असतें. याचा जंतांचा नाश करण्याकडे उपयोग करण्यांत येतो. याचा इतर आंतड्यांतील परोपजीवी जंतूंवर उपयोग होत नाहीं.

**सँढर्स्ट**—हें शहर इंग्लंडमध्यें बर्कशायर परगण्यांत ब्लॅक वॉटर नदीच्या कांठीं आहे. येथें रॉयल मिलिटरी कॉलेज हें ब्रिटिश साम्राज्यांतील उच्च लष्करी शिक्षणाचें विद्यालय असल्यामुळें प्रसिद्ध आहे.

**सणवार**—धार्मिक कृत्यें, देवता-जयंती, सामाजिक किंवा सार्वजनिक व्यवहार करण्याचे ठराविक दिवस. प्रत्येक धर्मानें हे दिवस असतात. ईस्टर, नाताळ, वगैरे ख्रिस्ती सण; मोहरम, बारावफत, खोरदादसाल, इ. मुसलमानी; व गहमबर, नवरोझ, पपेटी हे पारशी सण आहेत. रामजयंती, गोकुळाष्टमी, नवरात्र, दसरा, दिवाळी, वगैरे सण हिंदू पाळतात. या सणांची माहिती त्या त्या नांवाखालीं दिलेली आहे.

**सतत गति**—ज्याप्रमाणें परिस किंवा अमृत यांचा शोध करण्यामध्यें अनेक लोकांनीं कित्येक वर्षेपर्यंत संशोधन चालविलें होतें त्याप्रमाणें एखाद्या यंत्रास सतत अथवा अविरत गति कशी देतां येईल या कल्पनेच्याहि पाठीमागें बरेच संशोधक आतांपर्यंत लागलेले आहेत. परंतु वास्तविक या प्रश्नाचें स्वरूप थोडेंसें निराळें आहे. हा प्रश्न असा आहे कीं, असें एखादें यंत्र तयार करतां येईल काय कीं, ज्यापासून आपणांस खर्च होणाऱ्या शक्तीपेक्षां अधिक शक्ति प्राप्त करून घेतां येईल, व अशी शक्ति तें चिरकाल देत राहील. अर्वाचीन शास्त्रीय दृष्ट्या अशा तऱ्हेनें सतत गति मिळणें अशक्य आहे. कारण तें शक्तिनित्यत्वाच्या सिद्धान्ताच्या विरुद्ध आहे. मार्क्विस ऑफ वोर्स्टर यानें ( सु. १६५५ ) एका अशा यंत्राचें वर्णन केलें आहे कीं, त्यामध्यें एक चक्र असून त्याला त्रिज्येच्या दिशेनें खोबणी ठेवलेल्या असतात व त्याच्या मध्यभागीं गोळ्या ठेवलेल्या असून त्या गोळ्या तें चक्र आपल्या आंसाभोंवतीं फिरूं लागलें कीं बाहेर पडतात व खालीं येतांना अधिक तरफेची शक्ति ( लीव्हरेज ) घेऊन खालीं येतात. जरी अशा तऱ्हेचें सतत गति देणारें यंत्र प्रत्यक्ष बनवितां आलें नाहीं तरी नैसर्गिक ज्या शक्ति आहेत त्यांचा सतत उपयोग करून चालणारीं व शक्ति देणारीं यंत्रें तयार करणें शक्य आहे. उदाहरणार्थ, पॅरिसमध्यें अशा तऱ्हेचें एक घड्याळ बनविण्यांत आलें होतें कीं, दररोज दिवस व रात्र यांच्यामध्यें जो उष्णमानामध्यें फरक पडतो तेवढ्या फरकामुळें त्याला किल्ली मिळून तें चालू राहावें. हें घड्याळ बरींच वर्षें चालू होतें.

**सतलज**—पंजाबच्या पांच मुख्य नद्यांपैकीं एक. वेदांत हिला शतद्रू असें नांव आहे. ( शुतुद्रि पाहा ) ही नदी तिबेटांत मानस सरोवराच्या पश्चिमेस १५,२०० फूट उंचीवर उगम पावते. बशहर संस्थान, मंडी संस्थान, सिमल्याचीं टेंगरी संस्थानें व बिलासपूर संस्थान या संस्थानांतून ही वाहत जाते. कपुरथळा संस्थानच्या नैर्ऋत्य कोपऱ्याजवळ बीन व बियास ह्या नद्या सतलजला मिळतात. येथून पुढें हा एकत्र झालेला प्रवाह उत्तरेस भारी हुआंव व दक्षिणेस फेरोझपूर व बहावलपूरचीं संस्थानें यांच्यामधून बहुतेक एकसारख्या नैर्ऋत्य दिशेनें वाहत जातो व सत्वाल येथें त्याला चिनाब नदी मिळाल्यावर मुझफरगड जिल्ह्यांत मिठाणकोट येथें

सिंधु नदीला मिळतो. सतलज नदीची लांची एकंदर ९०० मैल आहे. या नदीला बरेच कालवे असून कांहीं १८ व्या शतकापासूनचे आहेत.

**संताजी घोरपडे** ( मृत्यु १६९७ )—एक पराक्रमी मराठा सेनापति. म्हाळोजी नांवाच्या बाजी घोरपड्याच्या चुलतभावाचा हा मुलगा. शिवाजीच्या वेळीं हा उदयास आला. सन १६९१ मध्यें राजारामानें यास सेनापतिपद दिलें. याचें व धनाजी जाधवाचें पटत नसे. सन १६९६ मध्यें राजारामानें संताजीस सेनापतिपदावरून कमी करून त्याच्या जागीं धनाजीस नेमलें. त्यामुळें या दोघांतील विरोध वळावला. म्हसवडच्या नागोजी मान्याच्या भावास यानें हत्तीच्या पायीं देऊन ठार केल्यानें नागोजी मान्यानें आपल्या बायकोच्या साहाय्यानें याचा पाठलाग करून, एका ओढ्याच्या कांठीं हा स्नान करीत असतां याचें मस्तक उडवलें. हें मस्तक तोबऱ्यांत घालून नागोजी धनाजी जाधवाकडे नेत असतां तें रस्त्यांत पडलें व एका मुसलमान शिपायानें हें मुंडकें औरंगजेबास सादर केलें. या कृत्याबद्दल खुष होऊन औरंगजेबानें त्या शिपायास खुषखबरखान अशी पदवी देऊन त्याचा गौरव केला. संताजीस राणोजी व पिराजी असे दोन पुत्र होते.

**संतानम्, पंडित के.** (१८८५-        )— उद्योगधंद्याचे एक तज्ज्ञ व भारत सरकारचे वाहतूक-मंत्री. यांचें शिक्षण मद्रास येथील प्रेसिडेन्सी कॉलेजमध्यें झालें. १९०६ मध्यें हे इंग्लंडला गेले व आय्. सी. एस्. परीक्षेस बसले. यांस कॉलनीमध्यें ऑडिट खात्यांत नोकरी देऊं केली होती ती त्यांनीं नाकारली व बॅरिस्टर झाले. १९११ मध्यें यांनीं लाहोरमध्यें वकिली सुरू केली. १९१९ मध्यें पंजाबमधील गाऱ्हाण्यांची चौकशी करण्याकरितां कॉंग्रेसनें जी एक बिनसरकारी सभासदांची समिति नेमली होती तिचे हे मंत्री होते. १९२० मध्यें असहकारितेच्या चळवळींत यांनीं वकिली सोडून दिली. १९२१ ते १९२३ मध्यें हे लाहोर म्युनिसिपालिटीचे कमिशनर होते. १९२६ मध्यें अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटीचे हे एक मंत्री होते. १९२४ मध्यें यांनीं लक्ष्मी इन्शुअरन्स कंपनी स्थापन केली. १९२८-२९ मध्यें यांनीं इंडियन लाइफ ॲशुअरन्स ऑफिस असोसिएशन स्थापन करून ते तिचे चिटणीस झाले व १९३५-३६ मध्यें अध्यक्ष झाले. लाहोर इन्शुअरन्स सोसायटीचे ते अध्यक्ष होते. हिंदुस्थान सरकारनें नेमलेल्या विमा सल्लागार समितीचे एक सभासद ( १९४४-४५ ) होते. १९४८ पासून हे भारत सरकारचे एक मंत्री आहेत.

**सताप**—याचीं झाडें हरबऱ्यासारखीं असतात. पानांस दर्प येतो. हीं पर्जन्यकाळीं बगीच्यांत होतात. याचें बीं खसखशीहून बारीक व काळसर असतें. पाला औषधी आहे. जंतांवर धण्याच्या पाण्यांत त्याचा रस देतात. सर्दीच्या विकारांवर गळ्यांत बांधतात. पाल्याचा रस अंगास लावल्यास ताप निघतो. खोकल्यावरहि रस मधांतून देतात.

**सतार**—एक वाद्य. तंबोऱ्यास भोपळा व दांडी असते त्याचप्रमाणें सतारीस असते. दांडी दोनपासून तीन-सव्वातीन फूट लांब असते व रुंदी साडेतीन इंचांपर्यंत असते. ही दांडी वरच्या अंगानें सपाट व खालून कांहींशी निमगोल असते. हिच्या दांडीवर दोन अटी बसविलेल्या असतात; आणि भोपळ्यावर बसविलेल्या पाटीवर घोडी असते. सतारीला एकंदर सात खुंट्या बसविलेल्या असतात. खुंट्यांस तारा लावून त्या अटींतून व अटीवरून घोडीवर चढवून तारदानांत बसविलेल्या असतात. पहिली तार ‘ बाज ’ ची ही पक्की पोलादी असते व हिच्यांत मणी ओंविलेला असून तो घोडीखालीं खेळता ठेवितात. या तारेच्या मागील दोन तारांत जोडाच्या तारा म्हणतात. या षड्ज स्वरांत मिळवितात. या पितळेच्या कच्च्या असतात. चौथी तार पक्की पोलादी असते. पाचवी पितळेची कच्ची असते. सहावी तार पक्की पोलादी असते. ती षड्ज स्वरांत ठेवितात. सातवी तार पक्की पोलादी असून ती दुपटीच्या षड्जांत ठेवितात. सतार जुळल्यानंतर मध्यसप्तकांतील मध्यम, पंचम व षड्ज, तसेंच तारसप्तकांतील षड्ज, आणि खरज सप्तकांतील पंचम इतके स्वर वाजतात. केव्हां केव्हा या वाद्यास तर्फा लाविलेल्या दृष्टीस पडतात. या तर्फांमुळें वाद्याच्या आवाजास जोराची आंस सांपडते. दांडीवर जाड दाभणाएवढ्या जाडीचे अठरा पितळी पडदे तांतीनें बांधिलेले असतात. हें वाद्य फार गोड व लोकप्रिय आहे. हल्लींचें स्वरूप सात तारांचें आहे, पण पूर्वीचें तीन तारांचें होतें.

**संताळ**—मुंडावंशांतील एक जात. लो. सं. सु. वीस लाख आहे. बिहारमध्यें पंधरा लाखांवर आहेत; व बंगालमध्यें साडेतीन लाखांवर आहेत. उरलेले ओरिसा व छत्तीसगड भागांतहि आहेत. संताळ हें नाव मिदनापूर ( बंगाल ) जिल्ह्यांतील सावंत गांवावरून पडलें म्हणतात. मुंडारी व संताळ या लोकांत बरेंच साम्य आहे. यांच्या देवदेवता हिंदूंप्रमाणेंच साधारणपणें आहेत. प्रमुख असे सहा देव आहेत.

**संताळ परगणे**—बिहार, भागलपूर विभागांतील दक्षिणेकडील जिल्हा. क्षे. फ. ५,४८०. हा जिल्हा साधारणतः डोंगराळ आहे. गंगा नदी उत्तर सरहद्दीवरून व पूर्व सरहद्दीवरून थोडीशी वाहत जाते. देवगड येथील लहानशी कोळशाची खाण व राणीगंजच्या कोळशाच्या खाणीचा उत्तर भाग हीं ह्या जिल्ह्यांत आहेत. नद्यांच्या निरुंद अशा खोऱ्यांत विशेषतः तांदूळ फार पिकतो. सबंध जिल्ह्यांत साल जातीचीं झाडें फार आहेत. १८५५

साली ह्या संताळ लोकांनीं बंड उभारलें, पण थोड्याशा रक्तपातानंतर तें दबलें व सरकारनेंहि चांगली चौकशी करून त्यांचीं दुःखें निवारण केलीं. १९४१ सालीं ह्या जिल्ह्याची लो. सं. २२,३४,४९७ होती. यांत मधुपूर, देवगड व साहिबगंज हीं तीन शहरें आहेत. ह्या जिल्ह्यांत एकंदर (१९०१) ६,६३,००० लोक संताळ जातींचे आहेत. दामोदर कोळशाच्या खाणीजवळच्या जामतारा खाणींतून उत्तम कोळसा निघतो. देवगड पोटविभागांत बैहरकी येथें तांबें आणि सांकरा टेंकडी, तुरीपहार, बेहेरकी व पांचपहार ह्या ठिकाणीं शिसें सांपडतें. शें. ३ लोक साक्षर आहेत.

**सती**—पूर्वी पति निधन पावल्यावर त्याची स्त्री आपल्या खुषीनें अथवा नातलगांनीं आग्रह केल्यावरून आपणास त्याच्या प्रेताबरोबर जाळून घेत असे, याला सहगमन किंवा सती जाणें असें म्हणत. ही चाल अस्तित्वांत होती याबद्दल अथर्ववेदांत उल्लेख आहे, परंतु ऋग्वेदांत ही चाल नसून उलट विधवेनें आपल्या दिराशीं विवाह करावा, असें मं. १० सू. १८ वरून अनुमान निघतें. ही सतीची चाल विशेषतः क्षत्रिय लोकांत असलेली आढळते, ही गोष्ट कोणी इंडो-जर्मन लोकांचा इतिहास वाचील त्याला कळून येणार आहे. इतर वर्गांत विधवा स्त्रियांनीं नवऱ्याच्या पश्चात् जिवंत राहणें हेंच अधिक इष्ट होतें. विधवाविवाहाची चाल कांहीं धर्मग्रंथांत निषिद्ध मानलेली असली तरी ऋग्वेदांत तिचा कांहींसा भास होत आहे. यावरून ऋग्वेदकालीं ती रूढ होती, असें म्हणण्यास हरकत नाहीं. जेथें जेथें ब्राह्मणवर्गाचें वर्चस्व होतें, त्या त्या प्रदेशांत, विशेषतः गंगाकांठीं, बंगाल, संयुक्तप्रांत, राजपुताना या प्रांतांतून सतीची चाल सहाव्या शतकापासून वाढत गेली. पंजाब व दक्षिण हिंदुस्थान यांत बहुधा ही चाल रूढ नव्हती.

कालिदासानें सतीची चाल कुमारसंभवांत रतीच्या कथेंत व रघुवंशांत कुशाच्या कथेंत उल्लेखिली आहे. सहाव्या शतकांतील बृहत्संहितेंत स्त्रियांची थोरवी वर्णन करतांना (बृ. सं. ७४,१६) व बाणभट्टानें हर्षाची माता यशोमती सती गेली असतां हर्षाचा आत्यंतिक शोक वर्णितांना दिलेल्या या चालीविषयीं माहिती मिळते. इ. स. ५१० तील एरण येथील गोपराजाच्या शिलास्तंभावरील लेखांत त्याची राणी सती गेल्याचें समजतें. शके ९७९ तील बेल्तुर (म्हैसूर) शिलालेखांत सती गेलेल्या एका शूद्र स्त्रीबद्दल वीरगळ उभारल्याचें वर्णन आहे. कमलाकर भट्टाची आई उमा सती गेली होती.

सहगमन म्हणजे पतीबरोबर परलोकीं गमन करणें. पतीच्या प्रेताबरोबर पत्नीनें अग्निप्रवेश करून स्वतःला मारून घेणें. ह्या क्रियेला पत्नी सती गेली असें म्हणतात. पतिनिधनोत्तर पत्नी सती गेली असतां तिला अश्वमेधाचें फल प्राप्त होतें; स्वर्ग लोकांत तिला पूज्यत्व लाभतें, असें कांहीं शास्त्रकार सांगतात.

मनु, याज्ञवल्क्य ह्यांच्यासारखे स्मृतिकार स्त्रियांना सहगमन सांगत नाहींत. व्यास, शंख, आंगिरस, हारीत, त्याचप्रमाणें दक्ष-पाराशर व बृहद्विष्णु ह्यांनीं सहगमनाचा पुरस्कार केला आहे. तथापि हें काम्यव्रत आहे. स्वर्गादि विशिष्ट फल हवें असेल तर तें स्त्रीला सहगमनानें प्राप्त करून घेतां येईल. सहगमन वैकल्पिक आहे : "मृते भर्तरि ब्रह्मचर्यं तदन्वारोहणं वा।" (बृ. विष्णु २५-१४)

आतां सहगमनाचा प्रकार पाहिला तर तो चितारोहणाचा दिसतो; पण सर्व जातींत प्रेतसंस्कार दहनयुक्त होतो असें नाहीं. पुष्कळ जातींत प्रेतें पुरतात. ब्राह्मणांत संन्याशाचें प्रेत पुरतात. फक्त कुटीचक संन्याशाला दहन करितात. देवीनें मनुष्य मृत झाल्यास त्याचेंहि प्रेत पुरण्याची प्रथा आहे. अशा प्रसंगीं पत्नीला पतीबरोबर पुरण्याचें कोणी सांगत नाहीं. सहगमनासंबंधीं लिहितांना बहुतेक सर्व स्मृतिकार हुताशनान्वारोहण अशासारखी भाषा वापरतात. संकल्प सुद्धां "श्रीलक्ष्मी-नारायणप्रीतिद्वारा पतिचितान्वारोहणं करिष्ये।" असा आहे. याला एकचिति विधि म्हणतात. पतिपत्नींचें एकाच चितेवर दहन करणें हा एकचिति विधि. हा विधि चारी वर्णांना विहित आहे. ह्याशिवाय पृथक्चितिविधि निबंधकार क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांना विहित असल्याचें सांगतात. ब्राह्मणांना हा विधि पति अन्य देशीं मयत झाला असेल तरच अंगीकारतां येईल. ह्या विधींत पत्नी पतीच्या पादुका उरावर ठेवून अग्नींत प्रवेश करते. ह्यावरून पतीला पुरलें असलें तरी पत्नीला सहगमनाचें पुण्य मिळवावयाचें असेल तर अग्निप्रवेशच करावा लागणार असें दिसतें. संन्यासी समाधिस्थ झाल्यानंतर त्याच्या पत्नीला सती जावयाचें झाल्यास ह्याच प्रकाराचा अवलंब करावा लागेल. सहगमनाच्या वेळीं पत्नीला अग्नीची प्रार्थना करावी लागते; तो मंत्र असा : "त्वमग्ने सर्वभूतानामन्तश्चरसि साक्षिवत्। त्वमेव देव जानीषे न विदुर्यानि मानुषाः॥ अनुगच्छामि भर्तारं वैधव्यभयपीडिता। सत्त्वमार्गप्रदानेन नय मां भर्तुरन्तिकम्॥" ह्यावरूनहि चितारोहणावांचून सहगमन नाहीं असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. पतिव्रता स्त्रीयाच सती जातां येतें; इतरांनीं म्हणजे पतित, व्यभिचारिणी, कजाग स्त्रियांनीं सहगमन करण्यांत कोणतेंहि फल मिळण्यासारखें नाहीं. त्याचप्रमाणें पत्नी गर्भार असल्यास, मूल लहान असल्यास, अथवा रजोदर्शन झालें नसल्यास शास्त्रानें सहगमन निषिद्ध मानलें आहे.

सहगमनाला श्रुतीचा आधार मिळेल असें वाटत नाहीं. संकल्पांत "पुराणोक्तानेकफलप्राप्त्यै" असें आहे. त्यांत श्रुतीचा

वेगळलें आहे हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. शूद्र स्त्रियांनासुद्धां हा अधिकार निबंधकार देतात. (धर्मसिंधूंत पृथक्चिति शूद्रांना सांगितली आहे, परंतु शूद्र कमलाकर सहगमनाची गोष्टहि काढीत नाहीं. तो फक्त विधवाधर्म सांगतो.) रूढिसुद्धां तशी आहे. शाहूची बायको सकवारबाई सती गेल्याचें इतिहासकार लिहितात. ग्रीक इतिहासकारांनीं हिंदुस्थानांतील सतीच्या चालीचा उल्लेख केला आहे त्या अर्थी सतीची चाल महाभारतापूर्वीची असली पाहिजे, असें चिंतामणराव वैद्य म्हणतात. तसेंच त्यांनीं भारताच्या उपसंहारांत केटीयस ह्या क्षत्रिय सेनापतीच्या स्त्रिया सती गेल्याचें उदाहरण दिलें आहे. ह्यास्तव क्षत्रियांत ही रूढि प्रचलित असावी असें म्हणतां येईल. तथापि ही चाल सररहा नसावी. भारतांतच माद्री सती गेल्याचें सांगितलें आहे, पण कौरवांच्या स्त्रिया सती गेल्याचा उल्लेख नाहीं. माद्री पंजाबांतील होती. ऋषींच्या बायका सती गेलेल्या दिसत नाहींत. ह्यास्तव कांहीं विशिष्ट जातींत सती जाण्याची चाल रूढ असावी असें दिसतें. म्हणून कांहीं स्मृतिकारांनीं तिचा पुरस्कार केला असावा. वैदिक चाल असती तर मनूनें तिचा उल्लेख केला असता. ब्राह्मण स्त्रियांनीं सती जाऊं नये अशीं वचनेंहि आढळतात; पण तीं सतीच्या गौरवापुढें मागें पडलीं. असलें एक वचन धर्मसिंधुकारांनीं दिलें आहे तें हें—

या स्त्री ब्राह्मणजातीया मृतं पतिमनुव्रजेत्।
सा स्वर्गमात्मघातेन नात्मानं न पतिं नयेत्॥

अनुगमन करणारी ब्राह्मण स्त्री आत्मघात करते. ती स्वतः स्वर्गाला जात नाहीं व पतीलाहि स्वर्ग मिळवून देत नाहीं, असा वरील वचनाचा अर्थ आहे. पण अशा वचनांची वासलात लावण्यांत जुने पंडित वाकबगार होते.

पतिमरणसमयीं स्त्री विटाळशी असल्यास पतीचें अमंत्रक दहन करून चौथ्या दिवशीं म्हणजे पत्नीच्या शुद्धीनंतर पतीच्या अस्थींबरोबर स्त्रीनें अग्निप्रवेश करावा. पतीच्या चितेवरच आपलें दहन व्हावें असा पत्नीचा आग्रह असल्यास तसेंहि तिला करतां येईल. शुद्धतेचा प्रकार असा—एक द्रोणभर भात तिनें मुसळानें कुटावें. ह्या कुटण्यानें रजोनिवृत्ति होते असें समजावयाचें. अशा रीतीनें शुद्धि प्राप्त करून घेऊन सहगमन करावें. रजोप्रवृत्त होऊन जितके दिवस झाले असतील तितक्या दर दिवसामागें दहा गाईप्रमाणें गाईचें दानहि शुद्धीकरतां करावें लागतें. पण हें मत बहुसंमत झालें नाहीं.

सती जाण्यापूर्वी सौभाग्य-वायनें सुवासिनींना देऊन स्त्री आपल्या ओच्यांत पांच रत्नें व सुरमा बांधून घेते; तोंडांत मोती ठेवते आणि नंतर अग्नीसमीप उभी राहून अग्नीची प्रार्थना करते.

पेशवाईंत चिमणाजी आप्पाची स्त्री व माधवराव पेशव्याची स्त्री रमाबाई या सती गेल्याचें प्रसिद्ध आहे व त्यांचीं वृंदावनेंहि आहेत. पेशवाई गेल्यानंतर पुण्यास रॉबर्टसन साहेबानें शास्त्रीमंडळींची समजूत घालून, कोणा विधवेवर सती जाण्याची निदान बळजबरी तरी न करण्याविषयीं कळकळीनें सांगितलें. सती जाण्याच्या प्रसंगांचीं अनेक उदाहरणें परकीयांनीं नमूद केलेलीं आढळतात.

विधवांनीं स्वतः जाळून घेण्याची चाल ब्रिटिश हिंदुस्थानांत १८२९ सालीं बेकायदा ठरविण्यांत आली. इंडियन पिनल कोडमध्यें असें कलम आहे कीं, जें कोणी माणूस आत्महत्या करण्याचा प्रयत्न करील आणि आत्महत्येचा गुन्हा करण्याकरितां एखादें कृत्य करील त्याला एक वर्षपर्यंत कैदेची शिक्षा होईल. तसेंच जें कोणी माणूस सती जाण्याच्या कृत्याला उत्तेजन देईल किंवा त्याचा गौरव करील त्याला पिनल कोडाप्रमाणें आत्महत्येच्या साहाय्यक गुन्ह्याचा मानलें जाईल.

**संतोला**—एक व्यायामप्रकार. हें एक वाढतीं वजनें उचलून शरीरसामर्थ्य वाढविण्याचें देशी साधन आहे. संतोल्याचा मेहनतीचा प्रकार आज फारसा माहीत नाहीं. संतोला या शब्दाचा अर्थ 'सम' म्हणजे सारखा व 'तोला' म्हणजे तोल असा आहे. दोन्ही बाजूंस सारखें वजन असलेला असा याचा अर्थ आहे. बाभळीसारख्या मजबूत लांकडाचा ३ फूट लांबीचा तुकडा घेऊन तो तासून गोल करावा. या ठोकळ्याचा घेर दोन फुटांचा ठेवावा. नंतर या तुकड्याच्या दोन टोकांस चार चार इंच जागा सोडून त्यांत ६ इंच लांबीचे खळगे लांकूड कोरून करतात. हे खळगे करतांना त्यांत हातांत धरतां येतील अशा जाड मुठी ठेवून त्याचे खालील भाग कोरून काढतात. ह्या मेहनतीचा कुस्ती खेळण्याच्या कामीं बराच उपयोग होतो. तालमींतील उकरलेली माती सारखी करण्यासाठीं ५।६ फूट लांबीच्या जड वजनाच्या संतोल्याचा चांगला उपयोग होतो. ह्या संतोल्याच्या मुठीस मजबूत दोरी बांधून व ती दोरी कमरेभोंवतीं अगर खांद्यावरून घेऊन संतोला मातींतून ओढतात. म्हणजे माती सारखी होऊन ओढणारास चांगली मेहनत होते.

**संतोषगड**—मुंबई, कुलाबा जिल्हा. हा किल्ला माण तालुक्याच्या ईशान्य कोपऱ्यांत दहिवडीच्या उत्तरेस वीस मैलांवर व फलटणच्या वायव्येस १२ मैलांवर आहे. डिकसळपासून रस्ता आहे. ताथवडें गांवांत किल्ला असून वस्ती ७००। ८०० आहे. तीन बाजूंनीं १५ फूट उंच व २० फूट रुंद तट आहे. बालेकिल्ल्याभोंवतीं दुसरा एक तट आहे व आंत २० एकर जागा आहे. तळ्यांत नेहमीं पाणी असतें. ताताेबा महादेवाचें एक देवालय आहे. व त्यावरून गांवास नांव मिळालें. १६६६ त हा किल्ला फलटणचा बाळाजी नाईक निंबाळकर याच्या ताब्यांत होता तो शिवाजीनें घेतला. पुढें विजापूरकरांनीं घेतल्यानंतर १६७३ त शिवाजीनें तो पुन्हां घेतला. पुढें १७२० त

बादशहानें तो शाहूस दिला. १८२७ त उमाजी नाइकानें याचा आश्रय घेतला होता.

**सत्नामी पंथ**—उत्तर हिंदुस्थानांतील एक पंथ. सत्नामी नांवाचे तीन वर्ग आहेत. जगजीवन नांवाच्या क्षत्रियानें एका वर्गाची सु. १७५० त स्थापना केली. या पंथाचे लोक ईश्वरास सत्नाम असें म्हणतात. अयोध्या प्रांतांत कोट्या या ठिकाणीं या पंथाचें मुख्य पीठ आहे. हे निर्गुण ब्रह्माची उपासना करतात. जगजीवनानें रचलेले 'ज्ञानप्रकाश', 'महाप्रलय', वगैरे ग्रंथ यांस प्रमाण आहेत. मद्यमांसाचें सेवन यांस वर्ज्य आहे. सत्नामी लोक उजव्या मनगटांत काळ्या-पांढऱ्या रेशमाचा गंडा बांधतात; त्यास 'आदु' म्हणतात.

मध्यप्रांतांत सत्नामींचा दुसरा वर्ग आढळतो. यांत बहुतेक चांभार आहेत. घासीराम चांभारानें गेल्या शतकाच्या पूर्वार्धांत हा स्थापन केला. हा वर्ग आपल्याला रामदासींचा पोटवर्ग म्हणवितो. या लोकांना रोहिदासी असेंहि नांव आहे. लो. सं. सुमारें चार लाख आहे.

**सत्पंथ**—हा एक गुजराथ-महाराष्ट्रांतील धर्मपंथ आहे. सत्पंथी लोकांची वस्ती काठेवाड, गुजराथ इकडे पुष्कळच आहे. १४४९ सालीं इमामशहा नांवाचा एक महात्मा साधु इराण देशांतून इकडे गुजराथेंत आला. हा या पंथाचा प्रवर्तक होय. त्याचा अमदाबादेच्या दक्षिणेस ९ मैलांवर गीरमथा गांवाजवळ एका टेंकडीवर मुक्काम होता. बावानें बरेच चमत्कार दाखविल्यामुळें त्याच्यावर लोकांची भक्ति बसली. बावाचे ५ मुख्य शिष्य होते: (१) हाजरबेग, (२) मामाराम, (३) नागाकाका, (४) ताराकाका, व (५) चिचिबाई (मामारामाची बहीण). इराण येथें बावाची मुख्य गादी आहे. तेथें दरवर्षी मोठा उरूस भरतो. बावाचे शिष्य मुख्यत्वें ब्राह्मण, वाणी, लेवा व कडवा कुणबी हेच आहेत. इमामशाही शाखेच्या गादीवर ब्रह्मचारी असतो व तो लेवे पाटीदार जातीचा असतो. हल्लीं खानदेशांत लेवा पाटीदारांची बरीच वस्ती असून त्यांत स्वामीनारायण, सत्पंथ, मानभाव, माळकरी, वगैरे अनेक पंथ चालू आहेत. खानदेशांत यावल तालुक्यांतील फैजपूर गांवीं या सत्पंथी लोकांचें मंदिर आहे. भगवद्गीता, भागवत, रामायण, वगैरे ग्रंथ सत्पंथीय लोक पवित्र मानतात. सत्पंथीय लोकांचा गुरुमंत्र 'शिवोऽहं' (मी शंकर आहें) असा आहे व ते या मंत्राचा जप करतात. शंकराचार्यांसहि ते मानतात. मौंजीबंधन, शिखासूत्र, चार वर्ण, चार आश्रम हे या पंथास मान्य आहेत. ते अभक्ष्य-भक्षण व अपेयपान करीत नाहींत. सत्पंथीय समाजांत विधवाविवाह प्रचलित आहे.

**सत्यकाम जाबाल**—एक वैदिक ऋषि. पूर्वी गुरुगृहीं अध्ययनास गेल्यावर गुरुजवळ गोत्र सांगणें अवश्य असे. सत्यकाम जबाला नामक स्त्रीचा पुत्र होता. जबाला पतिगृहीं अतिथिअभ्यागतादिकांच्या सेवेमध्यें व पतीच्या कामांत अत्यंत व्यग्र असे. ऐन तारुण्यांत सत्यकामाचा जन्म झाला. परंतु पति लवकरच मरण पावला. त्यामुळें जबालेला आपलें गोत्र काय आहे हें पतीला विचारावयाचें राहिलें. सत्यकामानें ही गोष्ट गौतम गुरूस सांगितली. गुरूनें तूं सत्यभाषण करणारा आहेस त्या अर्थी तूं ब्राह्मणच आहेस म्हणून त्याचें उपनयन केलें. सत्यकामानें गुरुगृहीं एकनिष्ठ सेवा करून श्रद्धेनें विद्या संपादन केली. तेथें त्याला ब्रह्मज्ञान प्राप्त करून घेतां आलें. जाबाल पाहा.



**सत्यपाल, डॉ.** (१८८५–    )—पंजाबचे एक देशभक्त. यांनीं वैद्यकीय पदवी घेतल्यानंतर प्रथम गेल्या महायुद्धामध्यें आय्. एम्. एस्. खात्यांत नोकरी केली. १९१९ सालीं पंजाबमध्यें झालेल्या दंग्यांत यांस जन्मठेप हद्दपारीची शिक्षा झाली. पुढें डिसेंबर १९१९ मध्यें यांची सुटका झाली. असहकारितेच्या चळवळींत यांस १ वर्ष सक्त मजुरीची शिक्षा झाली. १९२९ मध्यें पुन्हां दोन वर्षांची शिक्षा झाली. हे अखिल भारतीय काँग्रेस कमिटीचे व वर्किंग कमिटीचे सभासद होते. १९३० मध्यें तीन वर्षें तुरुंगवासाची शिक्षा झाली व पुन्हां १९३१ मध्यें शिक्षा झाली. १९३४ मध्यें राजद्रोहाच्या आरोपावरून २ वर्षांची शिक्षा झाली व १२४ अ कलमाखालीं आणखी १ वर्षाची शिक्षा झाली. हे नामांकित डॉक्टर असून टॅटल आफ्थाल्मिक कॉलेज व मेडिकल अकॅडमी यांचे प्रिन्सिपॉल आहेत.

**सत्यभामा**—कृष्णाच्या अष्टनायिकांतील एक. ही सत्राजित राजाची कन्या होती व हिला १० पुत्र होते. ही फार मानी असे, पण कृष्णानें तिचे लाड पुरविले व पुष्कळ वेळां पाणउताराहि केला. पारिजात वृक्ष इंद्राकडून आणून हिच्या दारीं कृष्णानें लावल्याची कथा प्रसिद्ध आहे. कृष्णनिधनानंतर हिनें सहगमन केलें असें कांहीं ठिकाणीं, तर उर्वरित आयुष्य तपाचरणांत घालविलें असें अन्य ठिकाणीं लिहिलें आहे.

**सत्यमूर्ति, एस्.** (१८८७–१९४३)—एक राजकारणी कार्यकर्ते व वक्ते. यांचे वडील टॉ. सुंदरशास्त्रीगळु हे पदुकोट्टयास वकील होते. यांचें शिक्षण पदुकोट्टा येथील राजपुत्रांचें कॉलेज व मद्रास येथें झालें. हे मद्रास येथें वकिली करीत असत. सुमारें तीन वर्षें हे राजकारणांत प्रत्यक्ष भाग घेणारे कांग्रेसभक्त होते. १९१९ मध्यें हे काँग्रेसच्या प्रतिनिधिमंडळांत व १९२५ मध्यें स्वराज्य पक्षातर्फे इंग्लंडमध्यें गेले होते. यांनीं सर्व हिंदुस्थानांत व सिलोनमध्यें काँग्रेसच्या कार्याकरितां प्रवास केला असून बहुतेक प्रत्येक भागांत तामिळ प्रांतांत व्याख्यानें दिलीं. मद्रास युनिव्हर्सिटीमध्यें हे सिनेट, सिंडिकेट, अॅकॅडमिक कौन्सिल, बोर्ड ऑफ स्टडीज (कायदा व संगीत) यांचे

समासद असून 'फॅकल्टी ऑफ फाइन आर्ट'चे अध्यक्ष होते. हे युनिव्हर्सिटीतर्फे दोन वेळां मद्रास कायदे मंडळांत निवडून गेले होते. हे हौशी नट असून सुगुणविलास सभेशीं व संगीत व संस्कृत अकॅडमीशीं यांचा निकटचा संबंध होता. मद्रास महाजन सभेचे व मद्रास पोर्टसमेन युनियनचे उपाध्यक्ष होते. तसेंच अखिल भारतीय काँग्रेस कमिटीचे हे सभासद होते. १९२२ मध्यें यांनीं जातिभेद-समितीपुढें मद्रासच्या वकीलसभेतर्फे साक्ष दिली होती. याप्रमाणेंच करसमिति व सँढर्स्ट समिति यांपुढेंहि साक्षी दिल्या होत्या. मद्रास म्युनिसिपल कॉर्पोरेशनचे हे सभासद होते. व स्टँडिंग कमिटी, करसमिति व फायनान्स कमिटी यांचे हे समासद होते. मद्रास जिल्हा व तामीळनाड प्रांतिक काँग्रेस कमिटीचे हे अध्यक्ष होते. १९३१ व १९३५ सालीं मद्रास येथें भरलेल्या अखिल भारतीय स्वदेशी प्रदर्शनाचे हे स्वागताध्यक्ष होते. मद्रास येथील युनायटेड इंडिया ॲशुअरन्स कंपनीचे हे डायरेक्टर होते. काँग्रेसच्या आज्ञेनुसार यांनीं मद्रास कायदेमंडळाचा राजीनामा दिला व सत्याग्रहाच्या चळवळींत प्रमुख भाग घेतला. यांस जानेवारी व मार्च १९३१ मध्यें अटक व शिक्षा झाली. पुन्हां १९३२ मध्यें ऑर्डिनन्सअन्वयें १८ महिन्यांची शिक्षा झाली. १९३४ मध्यें हे मध्यवर्ती असेंब्लींत निवडून आले. व तेथें काँग्रेस पक्षाचे प्रतोद होते.

**सत्यवती**—उपरिचरवसु राजाची कन्या. हिला कौमार दशेंत पराशर ऋषीपासून कृष्णद्वैपायन पुत्र झाला. हीच पुढें शंतनु राजाची स्त्री झाली. हिला चित्रांगद आणि विचित्रवीर्य असे दोन मुलगे होते. पण ते अल्पवयी निघाले. तेव्हां हिनें पहिला मुलगा व्यास याच्यापासून सुनांना पुत्रदान देवविलें.

**सत्यवान्**—शाल्व देशाचा राजा द्युमत्सेन याचा पुत्र. यास बाल्यावस्थेंत अश्वांची फार प्रीति असल्यामुळें यास चित्राश्व असें लोक म्हणत. हा अश्वपति राजाची कन्या सावित्री हिचा पति असून, तिच्या पातिव्रत्यानें हा अल्पायु असतां दीर्घायु झाला. सावित्री पाहा.

**सत्यशोधक समाज**—महाराष्ट्रांतील एक सामाजिक पंथ. ज्योतिराव फुले यांनीं पुणें येथें इ. स. १८६८ मध्यें हा समाज ब्राह्मणेतरांसाठीं स्थापिला. परमेश्वर निराकार आहे; तो अवतार घेत नसतो; भक्तीनें मुक्ति प्राप्त होते; मूर्तिपूजा करूं नये; वेदपुराणांवर विश्वास ठेवूं नये; जातिभेद खोटा आहे; भटजींचा वर्ग निंद्य आहे; सर्व समान आहेत; इत्यादि तत्त्वांवर या समाजाची उभारणी असून फुल्यांच्या 'गुलामगिरी' या ग्रंथांत या समाजाचीं तत्त्वें ग्रथित केलीं आहेत. महाराष्ट्र व वऱ्हाड यांत या समाजाचे बरेच अनुयायी आहेत. पंचवीस वर्षांपूर्वी या समाजानें वऱ्हाडांत आणि दक्षिण महाराष्ट्रांत ब्राह्मणवर्गाच्या वर्चस्वाविरुद्ध मोठी चळवळ केली. सरकारी नोकरींत ब्राह्मणेतर वर्गांतील लोक बहुसंख्येनें घेण्याचें सरकारी धोरण या समाजाच्या खटपटीनेंच ठेवण्यांत आलें. मुसलमान व अस्पृश्य याप्रमाणेंच ब्राह्मणेतरांनाहि विशिष्ट जागा विधिमंडळांतून व वरिष्ठ नोकऱ्यांतून राखून ठेवण्यांत आल्या. काँग्रेसच्या बहुजनहितासाठीं आंखलेल्या उद्दिष्टामुळें या सत्यशोधक समाजाला पुढें वेगळें कार्य उरलें नाहीं.

**सत्याश्रय चालुक्य**—पुलकेशी पाहा.

**संत्रा**—(नारिंग पाहा). संत्रीं-मोसंबीं वर्गांत बऱ्याच प्रकारचीं फळें येतात. उदा., पपनस, महाळुंग, ईडलिंबू, लिंबू, मोसंबी, संत्रा, लाइम, कवला, इ. संत्र्याची साल अगदीं सुटी असते. रंग तांबूस पिवळा असतो. याचें झाड उभें वाढतें. फळ आंबट गोड असतें. झाडें पंचवीस वर्षेपर्यंत टिकतात. नागपूरकडील संत्रीं प्रसिद्ध आहेत.

**संथ**—मुंबई, जुन्या रेवाकांठा पोलिटिकल एजन्सीमधील एक संस्थान. याचें क्षे. फ. ३९४ चौ. मै. आहे. लो. सं. १,१४,०४७. येथें राज्य करणारे पवार किंवा परमार, माळव्याच्या प्रसिद्ध घराण्यांपैकींच आहेत. पवार घराणें उज्जयिनीहून हांकून दिलें गेलें असतां या घराण्यांतील झालमसिंग नांवाच्या पुरुषानें पंचमहालमध्यें आपली सत्ता स्थापन केली. पुढें या घराण्यांतील पांचव्या झालमसिंग नांवाच्या राजाच्या मुलीच्या अप्रतिम सौंदर्याचें वर्णन ऐकून बादशहानें तिची मागणी केली. पण राजानें ती नाकारल्यामुळें बादशहानें त्याच्यावर हल्ला करून त्याला ठार मारलें. त्याचा मुलगा राणा संथ स्वसंरक्षणार्थ सुंह नांवाच्या भिल्लाच्या मदतीनें जंगलांत पळून गेला. पुढें १२५५ मध्यें राणा संथ यानें भिल्लांचा पराभव करून पूर्वीची राजधानी ब्रह्मपुरी ताब्यांत घेतली. त्याचें नांव बदलून संथ असें ठेविलें. हें संस्थान कांहीं दिवस अहमदाबाद येथील सुल्तानांच्या ताब्यांत व पुढें शिंद्यांच्या ताब्यांत होतें. गहूं व गळिताचीं धान्यें होतात. हातमाग बरेच असून कापड, सतरंज्या, वगैरे होतात. संस्थानचें उत्पन्न बारा लक्ष रुपये आहे. राजधानी सन्त्रामपूर आहे. हल्लींचे महाराज प्रवीणसिंह १९४६ सालीं गादीवर आले. हें संस्थान आतां मुंबई राज्यांत विलीन झालें आहे.

**संथर**—मध्य हिंदुस्थानांतील जुन्या बुंदेलखंड पोलिटिकल एजन्सीतील एक संस्थान. क्षे. फ. १७८ चौ. मै.. संथर हें नांव सम्थोरगड ह्या त्याच्या राजधानीच्या नांवाचा अपभ्रंश असावा. जमीन साधारण सुपीक असून पावसाची वार्षिक सरासरी ३० इंच आहे. रणजितसिंगानंतर छतरसिंग हा फार चांगला राज्यकर्ता झाला. सध्यां त्याचा मुलगा वीरसिंग हा गादीवर आहे. त्याला सर, हिज हायनेस व राजा हे किताब व ११ तोफांची सलामी आहे. ह्या संस्थानची लो. सं. सुमारें पन्नास हजार आहे. येथील मुख्य जाती म्हणजे चांभार, ब्राह्मण, कच्छी, गुरव

व गदरिया ह्या होत. संथर ही राजधानी आहे. शें. ३३ लोक शेतकीवर व शें. १७ इतर धंद्यांवर आपली उपजीविका करतात. एकंदर क्षेत्रफळापैकीं फक्त ८५ चौ. मैल जमीन काय ती शेतकीच्या उपयोगांत आहे. संस्थानाचें उत्पन्न सुमारें पांच लक्ष रुपये आहे. हें संस्थान आतां विंध्यप्रदेश राज्यसंघांत सामील झालें आहे.

**संदर्भग्रंथ**—(बिब्लिऑग्रफी). ग्रंथांचें अंतरंग-बाह्यरंग यासंबंधीं माहिती देणारा ग्रंथ किंवा सूची. ग्रंथाचा कर्ता, प्रकाशक, मुद्रक, मुद्रणालय, आवृत्ति, सन, आकार, इ. बाह्यांगांचें परीक्षण व ग्रंथांतील विषय यांची माहिती ग्रंथसूचींत दिलेली असते; तर दुसऱ्या प्रकारानें म्हणजे संदर्भग्रंथ देतांना विशिष्ट विषयावरचे कोणकोणते ग्रंथ उपलब्ध आहेत याची यादी पुरविलेली असते. इंग्रजी ‘बिब्लिऑग्रफी’ या संज्ञेनें वरील दोन्ही प्रकार दर्शविले जातात. संदर्भ ग्रंथ देतांना सामान्य, देशिक आणि विशेष असे तीन भाग पाडतात. व पुन्हां प्रत्येकाचे बाह्य (मटीरियल) आणि अंतर (लिटररी) असे पोटविभाग होतात.

फ्रान्स देशांत ही ग्रंथसूचीची पद्धति प्रथम निघाली व पुढें सतराव्या शतकाच्या अखेरीस ती इंग्लंडनें उचलली. आज ‘नॅशनल बायॉग्रफीज्’सारख्या सूची झाल्या आहेत. मराठींत ‘वाङ्मयसूची’ आणि ‘मराठी ग्रंथसूची’ याच धर्तीवर रचल्या गेल्या आहेत. मोठाल्या ग्रंथांतून व लेखांतून संदर्भग्रंथ देण्याची प्रथा बरीच पडली आहे. संदर्भग्रंथाचा दुसरा एक अर्थ कोशस्वरूपी विविध माहिती देणारा ग्रंथ (रेफरन्स बुक) असा आहे. ज्ञानकोश, शब्दकोश, चरित्रकोश, इ. या दृष्टीनें संदर्भग्रंथच होत.

**संदला**—(स्को). भिंतीचा पृष्ठभाग साफ व गुळगुळीत दिसावा म्हणून त्यावर जो पातळ गिलाव्याचा हात देतात त्यास संदला म्हणतात. याचा उपयोग इमारतीच्या आंतील बाजूस गिलाव्यांतील चित्रें वगैरे काढण्याकरितांहि करण्यांत येतो. अशा तऱ्हेचा संदला संगमरवरी दगडांची पूड, शिरगोळा व पाणी यांच्या मिश्रणानें तयार करतात. बाहेरच्या बाजूस थावयाचा संदला यापेक्षां खरचरीत असतो.

**सदानंद** (१६६४-१७२९)—एक महाराष्ट्रीय संतकवि. यानें आपल्या ग्रंथांत आत्मचरित्र थोडेंसें दिलें आहे. खानदेशांत धरणगांवीं मधुसूदन चिंतामणि धर्माधिकारी होता त्याचा पुत्र सदाशिव; हाच पुढें गुरुकृपेनें सदानंद नांवानें प्रसिद्धीस आला. याचे ग्रंथ आनंदबोध, पराविद्या, आनंदप्रकाश, भूगोलवर्णन, आत्मसारप्रकाश, संतमालिका, पड्रसादि प्रकरण, आनंदसार, वेदान्तसार, इत्यादि आहेत.

**सदाशिवगड**—मुंबई, सातारा जिल्हा, कऱ्हाडच्या आग्नेयीस ४ मैलांवरील एका टेंकडीवर हा किल्ला शिवाजीनें बांधला. माथ्याचें क्षेत्र २२ एकर आहे. यावर एक महादेवाचें देवालय असून शिवरात्रीस जत्रा भरते.

**सदाशिव नायक** (१५१३-१५६०)—इक्केरी राजघराण्याचा संस्थापक. सदाशिव नायक हा रामराय आरविदु या विजयानगरच्या राजाचा सेनापति असून त्यानें बुऱ्हाण निजामशहा व इब्राहिम आदिलशहा यांचा पराभव केला होता. यानें केळडी येथें आपली राजधानी केली होती.

**सदाशिव माणकेश्वर** (मृ. १८१६)—दुसऱ्या बाजीरावाचा एक कारभारी. हा देशस्थ ब्राह्मण टेंभुर्णी गांवच्या देशपांड्याच्या कुळांत जन्मला होता. गोविंदराव पिंगळ्याच्या पदरीं चाकरीस राहण्यापूर्वी हा कथा करून आपलें पोट भरीत असे. टिपूशीं इंग्रजांचें जें शेवटचें युद्ध झालें तें चालू असतां शिंदे व बाजीराव यांनीं निजामाला आपल्यामध्यें सामील होऊन इंग्रजांशीं लढण्यास तयार करण्याकरितां माणकेश्वरास त्याच्याकडे वकील म्हणून पाठविलें होतें. बाजीरावानें इंग्रजांशीं १८०२ सालच्या अखेरीस जो तह केला तो याला बिलकुल पसंत नव्हता. वसईच्या तहानंतर इंग्रजांच्या रेसिडेंटशीं पेशव्यांचा होणारा सर्व व्यवहार सदाशिवभाऊमार्फत होऊं लागला. त्रिंबकजीचें चस्तान बसल्यानंतर भाऊचें बाजीरावाजवळचें वजन अगदीं कमी झालें. पुढें त्रिंबकजी डेंगळ्यास इंग्रजांच्या स्वाधीन केल्यावर बाजीरावानें सदाशिव माणकेश्वरास पुन्हां आपल्या सल्लागारमंडळांत घेतलें (१८१६). पण पुढें हा लवकरच वारला. पुण्यास किर्लोस्कर नाटकगृहाच्या जागेवर याचा वाडा होता.

**सदाशिवरावभाऊ पेशवे** (१७३०-१७६१)—हा चिमाजीआप्पाचा मुलगा. चिमाजी वारला तेव्हां हा दहा वर्षांचा होता. याचें संगोपन याची आजी राधाबाई व नानासाहेब पेशवा यांनीं केलें. हा लहानपणापासून हुशार व कर्तबगार. त्यामुळें नानाची यावर फार मर्जी असे. १७४६ त याला कर्नाटकाच्या मोहिमेवर पाठविलें. ती मोहीम यशस्वी करून, यमाजी शिवदेवाचें बंडहि यानें मोडलें. पेशवाईतील प्रसिद्ध मुत्सद्दी रामचंद्रबाबा शेणवी (पाहा) याच्या तालमींत भाऊ तयार झाला. फडाच्या कामाची यानें उत्तम व्यवस्था लावली. कांहीं दिवस हा कोल्हापूरकरांचा कारभारी होता; पण लवकरच १७५० त पेशव्यांचा कारभारी बनला. मोहिमांत हा पेशव्यांबरोबर असे. पुढें राघोबादादावर कर्जाचा ठपका यानें ठेवल्यानें राघोबानें मोहिमांवर जाण्याचें नाकारलें. तेव्हां भाऊ व विश्वासराव मोहिमेवर निघाले. प्रथम उदगीर येथें त्यांनीं निजामाचा चांगलाच पराभव केला (१७६०). नंतर अब्दालीला पायबंद घालण्यासाठीं उत्तर हिंदुस्थानच्या मोहिमेवर भाऊ मोठ्या सैन्यानिशीं निघाला. या अखेरी मोहिमेची हकीकत ‘पानपतचें युद्ध’ या लेखांत विस्तारानें दिली आहे.

भाऊ पानपतावर झालेल्या युद्धांत धारातीर्थी पडला ( १४ जानेवारी १७६१ ). याचा जबर धक्का पेशव्यांस व सबंध मराठेशाहीस बसला. पुढें तोतया भाऊसाहेब ( पाहा ) निघाला व त्यानेंहि बारभाईस बराच त्रास दिला. भाऊची साध्वी स्त्री पार्वतीबाई ( पाहा ) नवरा जिवंत असून कधीं तरी भेटेल या आशेवर दिवस कंठीत राहिली होती. भाऊचे गुणदोष निःपक्षपातीपणानें पाहून त्याचें मराठे साम्राज्यांतील थोर पुरुषांत स्थान ठरविलें पाहिजे. तो पराक्रमी व मुत्सद्दी होता यांत शंकाच नाहीं.

**संदेशवाहन**—( सिग्नलिंग ). रणक्षेत्रावर सैन्य असतांना त्या सैन्याच्या निरनिराळ्या भागांस किंवा इतर साहाय्यक तुकड्यांस निरोप पोंचविण्याचें कार्य म्हणजे संदेशवाहन होय. हें करण्याचीं साधनें व क्रिया अनेक प्रकारच्या असतात. त्यांमध्यें तारायंत्र, दूरध्वनियंत्र, बिनतारी संदेशवाहक, निरीक्षणपद्धतीनें निरोप पोंचविण्याच्या योजना, विमानांस संदेश देण्याची पद्धति, वगैरे सर्व गोष्टींचा अंतर्भाव होतो. प्रत्येक सैन्याबरोबर एक संदेशवाहक तुकडी देण्यांत आलेली असते. संदेशवाहनाचीं साधनें पुढील प्रकारचीं असतात : ( १ ) निशाणें, ( २ ) प्रकाशपरावर्तक किंवा आरसे, ( ३ ) दिवे, व ( ४ ) झडपे. निशाणें दोन प्रकारचीं असतात. एक तीन फूट चौरस व दुसरें दोन फूट चौरस. या निशाणांनीं खुणा करण्याच्या पद्धतीहि दोन प्रकारच्या आहेत : ( १ ) तारायंत्रांत वापरण्यांत येणारी बिंदु व रेषा यांची मोर्स नांवाची पद्धति ; व ( २ ) सेमॅफोर पद्धति. यामध्यें अक्षरें एक किंवा दोन निशाणें परस्परांशीं विशिष्ट कोन करून धरलीं असतां दर्शविण्यांत येतात. पहिल्या पद्धतीनें निशाणांच्या साहाय्यानें पांच मैलपर्यंत संदेश पोचवितां येतो. दुसऱ्या पद्धतीनें सुमारें दीड मैलपर्यंत संदेश पाठवितां येतो. प्रकाशपरावर्तनानें पाठवावयाचे संदेश सूर्यप्रकाश व आरसा यांच्या साहाय्यानें पाठवितां येतात व तें दृश्य ७० मैल अंतरापर्यंत दिसूं शकतें. दिव्यांचा प्रकाश दिवसा चार मैल व रात्रीं आठ मैल दिसूं शकतो. झडपें लहान अंतराकरितां वापरण्यांत येतात. त्यांचा पृष्ठभाग काळा असून तो बदलून पांढरा करण्यांत येतो. प्रत्येक युद्धनौकेवर संदेशवाहक यंत्र बसविलेलें असतें आणि त्याकरितां प्रकाशस्रोताचा उपयोग करतात.

रेल्वे स्टेशनमध्यें गाड्या आंत घेण्यासाठीं अगर त्या बाहेर जाण्यासाठीं जे आडवे-उभे होणारे हात बसविलेले असतात किंवा निरनिराळ्या रंगांच्या दिव्यांची योजना केलेली असते. त्यांस स्टेशनपासून जरूर तेवढ्या अंतरावर खांब उभे करून त्यांवर हे हात बसविलेले असतात. त्यांनाच एका बाजूला रंगाच्या कांचा बसविलेल्या असतात. हे खालीं-वर होण्यासाठीं लोखंडाच्या तारा व लीव्हर यांचा उपयोग करण्यांत येतो. बहुधा सर्व ठिकाणीं माणसाकडूनच हें काम करून घेण्यांत येतें. परंतु मोठमोठ्या स्टेशनवर जेथें विजेचा पुरवठा भरपूर असतो व कामहि ज्या ठिकाणीं बरेंच असतें तेथें विजेच्या दिव्यांच्या साहाय्यानें संदेशवाहनाचें काम करून घेतलें जातें.

**संदोवे**—दक्षिण ब्रह्मदेशाच्या आराकान भागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ३,७८४ चौ. मैल. ह्या जिल्ह्यांतील बहुतेक सर्व जमीन पहाडी आहे. जंगलहि फार आहे. ह्यांतील मुख्य नद्या मै, तनल्वे, तौंगुप व संदोवे ह्या होत. ह्या जिल्ह्याची हवा विशेष रमणीय व आरोग्यकारक आहे. स. १८२६ त यॅंडाबूच्या तहानें ब्रिटिश अमलाखालीं आराकान आला. संदाव, अंदाव व नंदाव हीं तीन मंदिरें आहेत. हीं स. ७६१-८४ च्या दरम्यान आराकानच्या राजांनीं बुद्धाचे अनुक्रमें केस, दांत व एक बरगडी ठेवण्याकरितां बांधलीं. कांहीं शिलालेख संदोवे नदीजवळ सांपडले आहेत. लो. सं. सु. दीड लक्ष. मुख्य पिकें तांदूळ, तंबाखू, ऊंस, केळीं, नारळ हीं होत. सुती व रेशमी विणकरीचें काम हातमागाच्या साहाय्यानें खेड्यांतून होत असतें. चिनी लोक या भागांत पुष्कळ आहेत.

**सॅदुसी पंथ**—येशू खिस्ताच्या काळांत ज्यू लोकांमध्यें दोन मुख्य धार्मिक पंथ होते. त्यांपैकीं हा एक होय. खि. पू. २०० च्या सुमारास हा पंथ अस्तित्वांत आला. याचें तत्त्वज्ञान फॅरिसी ( पाहा ) पंथाच्या उलट होतें. या पंथाचे अनुयायी आत्मा अमर आहे, असें मानीत नसत आणि माणसाचें दैव सर्वस्वीं त्यानें केलेल्या कृत्यावर अवलंबून असतें, असें मत ते प्रतिपादन करीत असत. शिवाय 'तोंडी कायदा' अमान्य करीत व देवदूत, संचार, वगैरेंचें अस्तित्व नाहीं, असें ते मानीत असत. जेरुसलेम पडल्यानंतर हा पंथ नामशेष झाला.

**संद्वीप**—बंगाल, नौखाली जिल्ह्याच्या किनाऱ्यापासून जरा दूर असलेलें एक बेट. क्षे. फ. २५८ चौ. मैल. यांत असलेल्या ५९ खेड्यांची एकंदर लोकसंख्या सु. दीड लक्ष आहे. सिसॅरी फेडरिसी यानें १५६५ त लिहिलें आहे कीं, "या बेटांत जहाजें बांधण्याची फारच मुबलक सामुग्री आहे व येथून २०० जहाजें मीठ रवाना होतें." १६६५ सालीं शाहिस्तेखानानें हें हस्तगत केलें. दिलाल हा तेथील चांचांचा शेवटला राजा होय. सध्यां या बेटाचा समावेश नौखालींत होतो. याला चक्री वाऱ्यांचा फारच त्रास पोहोंचतो. १८७६ सालच्या चक्रवाताच्या तडाख्यांत सांपडून ४० हजार लोक मृत्युमुखीं पडले.

**संधिगसन्निपातारिरस**—एक रसायन. पारा व गंधक यांची कज्जली, अभ्रक भस्म एक भाग, मिरीं एक भाग, जवखार एक भाग, सज्जीखार एक भाग, टांकणखार एक भाग, शहाजिरें एक भाग, त्रिकटु ( सुंठ, मिरें व पिंपळी ),

आणि सैंधव एकेक भाग, हीं सर्व एकत्र करून त्याला चित्रकाच्या मुळांच्या काढ्याची भावना एक दिवस देऊन हें रसायन तयार करतात. पांच गुंजांप्रमाण गोळ्या करून एकेक गोळी मध व पिंपळी यांत अथवा उष्णोदकांत देतात.

**संधि निशाण**—( फ्लॅग ऑफ ट्रूस ). युद्ध चालू असतांना रणक्षेत्रावरील एक युध्यमान राष्ट्र आपला वकील कांहीं संदेश नेण्याकरितां विरुद्ध युध्यमान राष्ट्राकडे बरोबर पांढरें निशाण देऊन पाठवितें. त्याला तहाचें निशाण म्हणतात. असा संदेश एका सैन्याचा कमांडर विरुद्ध बाजूच्या सैन्याच्या कमांडरकडे पाठवूं शकतो. या वकील अधिकाऱ्याबरोबर कमांडरनें आपली सही केलेलें लेखी अधिकारपत्र दिलेलें असतें आणि सदर वकिला-बरोबर दुसरे इसम तीनपेक्षां अधिक नसतात. ते इसम म्हणजे (१) बिगुल वाजविणारा, (२) निशाण घेणारा, आणि (३) दुभाषा हे असतात. या सर्व इसमांना पांढरें निशाण बरोबर असल्यावर विरुद्ध पक्षाकडून संरक्षण मिळण्याचा हक्क असतो. मात्र विरुद्ध पक्षाच्या कमांडरनें तो संदेश घेण्याचें नाकारलें तर सदर सर्व इसमांना आपल्या छावणींत तावडतोब परत जावें लागतें.

**संधिप्रकाश**—सूर्योदयाच्या पूर्वी जो संधिप्रकाश पडतो त्याला उषा (पाहा) म्हणतात. सूर्यास्तानंतर जो कांहीं काळ प्रकाश असतो तो येथें अभिप्रेत आहे. हा प्रकाश प्रत्यक्ष सूर्याचा नसतो. कारण सूर्य क्षितिजाखालीं गेलेला असतो. तर आकाशांत ज्या अत्युच्च भागांवर सूर्यप्रकाश असतो त्याच्या परावर्तनामुळें हा संधिप्रकाश पडतो. सूर्य क्षितिजाखालीं १८° जाईपर्यंत तो टिकतो. भूमध्यरेषे-जवळील प्रदेशांत हा संधिप्रकाश फार वेळ टिकत नाहीं.

**संधिप्रकाश-निद्रा**—सूतिकाशास्त्रांतील हा एक इलाज आहे. प्रसूतिवेदनांमुळें जी शारीरिक आणि मानसिक क्षीणता येते ती संधिप्रकाशामुळें कमी होते. व तसेंच वेदनाहि कळून येत नाहींत.

**संधिवात**—या रोगामध्यें शरीराच्या सांध्यांमध्यें दुखत असतें. हा बहुधा स्त्रियांना होतो व यानें लहान अवयव (उदा., बोटें) धरतात. मज्जाभोंवतालच्या स्नायूंवर या रोगाचा परिणाम होत असतो. हा रोग तीव्र अथवा जीर्ण अशा दोन्ही स्वरूपांचा असतो. तीव्र स्वरूपाच्या रोगांत ताप येतो, सांधे दुखूं लागतात व ते सुजून लाल आणि नरम होतात. आणि त्यांतून घाम येऊं लागतो. एकामागून एक सांधे दुखूं लागतात. या रोगाचा प्रादुर्भाव झाल्या-पासून जर कांहीं उपचार केला नाहीं तर २ ते ६ पासून दहा आठवडेपर्यंत तो राहतो व नंतर त्याचा हृदयावर परिणाम होऊं लागतो. याच्या जीर्ण अवस्थेमध्यें सांधे ताठ होऊन दुखूं लागतात. या वेदना एकसारख्या असतात किंवा मधून मधून निरनिराळ्या भागीं होऊं लागतात. ताप येतोच असें नाहीं. यावर सॅलीसिलेट ऑफ सोडा आणि पायरॅमीडन ( पॅरॅसिट्य आयो-डाइड ) हीं औषधें देण्यांत येतात. या रोगाचें कारण स्थानिक्रमाण अवरोध होणें, अंगावर ओले कपडे राहणें, दांत कुजणें, वगैरे असूं शकतात. यांवर युक्तियुक्त केंद्रभाग काढून टाकणें, रोग्याच्या शरीरांतील जंतूंपासून तयार केलेली लस टोंचणें, प्रोटीन द्रव्यांचें अंतर्क्षेपन ( इन्जेक्शन ) करणें, दुखण्याच्या जागीं पोल्टिस लावणें, वगैरे उपचार आहेत. कांहीं औषधी पाण्यांत स्नान केल्यानेंहि बरें वाटतें.

**संधिविकार**—( गाउट ). हा एक संधिवाताचाच प्रकार आहे. हा स्त्रियांपेक्षां पुरुषांस अधिक होतो. यामध्यें तीव्र वेदना होतात व एक प्रकारची आग होते. हा बहुधा अंगठ्याच्या पहिल्या सांध्यांत होतो आणि तेथून हळूहळू अधिकाधिक तीव्र वेदना होऊं लागतात व त्या रात्रीं फार तीव्र होतात. यावरोबर पचनक्रिया व इतर शरीराचे व्यापार मंद होऊं लागतात. हा रोग साधारणतः वयाच्या २५ वर्षांपर्यंत होत नाहीं. परंतु आनुवंशिक असल्यास पूर्ववयांतहि होतो. याच्या कारणांमध्यें रक्तामध्यें मूत्राम्ल ( युरिक ॲसिड ) विशेष प्रमाणांत असणें हें एक कारण असतें व ही गोष्ट बहुधा फारशी शारीरिक हालचाल न केल्यानें, विशेष मद्यपान केल्यानें व अनियत मसालेदार आणि पचावयास जड अन्न खाल्ल्यानें घडून येते. तेव्हां ज्या अन्नांत मूत्राम्ल तयार होतें तें न खाणें, चहा, कॉफी, कोको, मादक पेयें व दारू वर्ज्य करणें हा उपाय साधा आहे. थोडा आहार घेऊन व्यायाम करणें आरोग्यदायक होतें. सिंकोफेन हें औषध गुणकारी आहे. पण डॉक्टरच्या सल्ल्यानें त्याचें प्रमाण ठरवावें लागतें.

**संध्या**—प्रातःसंध्या, मध्याह्नसंध्या व सायंसंध्या या तीन संध्या द्विजानें प्रत्यहीं करावयाच्या असतात. पहाटेस तारकांचा लोप होण्यापूर्वीचा काल प्रातःसंध्येला उत्तम. सूर्योदयानंतर केलेली संध्या अधम संध्या मानली आहे. सायंकाळीं सूर्याचा अस्त होण्याच्या आधीं संध्या करणें प्रशस्त. तारकांचा उदय झाल्या-नंतरचा काळ सायंसंध्येला कनिष्ठ मानला आहे. सूर्योदयानंतर अठरा घटकांच्या पुढें व वीस घटकांच्या आंत मध्याह्नसंध्या करावी. गांवाबाहेर नदीवर संध्या करणें प्रशस्त, असा शास्त्रार्थ आहे.

संध्या ही वैष्णव संप्रदायाची आहे. कारण त्यांतील सर्व चोवीस नावें विष्णूचीं आहेत. सूर्याला अर्घ्यप्रदान व उपस्थान, तसेंच गायत्री जप हीं संध्येचीं प्रमुख अंगें होत. शिवाय मन्त्राचमनामध्यें दोन संध्याकाळांच्या दरम्यान केलेले पाप नाहींसें व्हावें म्हणून प्रार्थना करावयाची असते तीहि महत्त्वाची आहे. मन, वाणी, हस्त, पाद, उदर व शिश्न हीं पापाचीं द्वारें होत. हा द्वारांचा अथवा साधनांचा क्रम शास्त्रशुद्ध आहे. मनानें पाप पार होतें; त्याच्या पाठोपाठ वाणीनें; असेंच पुढें समजावें. साधना-

हून पुढल्या साधनाकडून कमी कमी पाप होत जातें. ह्या पापाच्या उच्चारानें चित्तशुद्धि होते. संध्याकर्मांतील गायत्री मंत्र ( पाहा ) महत्त्वाचा आहे.

**सनई**—एक वाद्य. चंदन, शिसू ह्या किंवा ह्यासारख्या एखाद्या लांकडाचा सुमारे एक हातभर लांबीचा तुकडा घेऊन तो गोल करतात व एका अंगाकडे सुमारें तसूभर व्यासाचें असें तोंड ठेवितात; नंतर कांहींसें नरसाळ्याच्या अगर धोतऱ्याच्या फुलाप्रमाणें दुसऱ्या टोंकाकडे सुमारें दीड तसू व्यासाचें तोंड करतात. नंतर हा लांकडाचा तुकडा आंतून भोंक पाडून पोकळ करतात, म्हणजे वस्तुतः ती एक प्रकारची नळीच होते. ह्या नळीस अरुंद तोंडापासून चार बोटें अंतरावर, भोकें पाडण्यास आरंभ केलेला असतो. भोकांचें प्रमाण वाटाण्याएवढें असतें. अशीं आठ भोकें सुमारें बोट दीड बोट अंतरानें पाडलेलीं असतात. पहिल्या भोंकाच्या विरुद्ध अंगास दोन भोंकांच्या मध्यावर एक भोंक ठेवितात. रुंद तोंडाशीं पितळेची, पेल्याच्या आकाराची मायणी बसविलेली असते. अरुंद तोंडाभोंवतीं एक पितळेची वाटोळी पट्टी बसविलेली असते, त्यामुळें ती नळी पिचण्याची भीति नसते. ह्या अरुंद तोंडांत बुचाप्रमाणें एक देवनळाची काडी सुमारें चार बोटें लांबीची काढती-घालती असते. तिजवर हस्तिदंती अगर शिंपीची रुपयाएवढ्या आकाराची गोल चकती बसविलेली असते. ह्या देवनळाच्या तोंडांत ताडपत्राची पिपाणी बसविलेली असते. ती तोंडांत धरून तिच्या योगें लांकडी पोकळी नळी फुंकतात आणि भोकांवर बोटें ठेवून सा, रि, ग, म, इत्यादि स्वर काढतात. ह्या प्रकारे हवीं तीं गीतें वाजवितात. ह्याच वाद्यास शार्ङ्गदेवानें आपल्या ग्रंथांत 'मधुकरी' हें नांव दिलें आहे.

**सॅन फ्रॅन्सिस्को**—अमेरिकन संयुक्त संस्थानें, कॅलिफोर्नियांतील एक प्रमुख बंदर-शहर. पॅसिफिक समुद्रावरचें अमेरिकेचें हें सर्वांत मोठें व महत्त्वाचें बंदर आहे. या ठिकाणीं चांगल्या गोद्याहि आहेत. किनाऱ्यालगतचा व परदेशी व्यापार फार भरभराटीचा असून लांकूड, धान्यें, फळें व धातू मुख्यत्वेंकरून येथून निर्गत होतात. येथे एक नाविक विद्यालय आहे. हें शहर अनेकदां जळलें आहे व १९०६ सालीं जोराचा भूकंपाचा धक्काहि बसला आहे. लो. सं. ( १९४० ) ६,३४,६३६.

**सन्निपात**—विषम पाहा.

**सन्निपातगजांकुश**—एक आयुर्वेदीय रसायन. पाऱ्याचें भस्म एक भाग, ताम्रभस्म एक भाग, हरताळ भस्म एक भाग, सुवर्णमाक्षिक एक भाग, यांच्या समान हिंग म्हणजे चारभाग घेऊन या सर्वांचा आल्याच्या रसांत खल करावा. नंतर वांझ कर्टोली, कडू पडवळी, निर्गुंडी, रास्ना, कडू निंब, चित्रक, धोत्रा, कळलावी, पहाडमूळ, भांग, जंबीरनिंबू यांच्या रसांत तीन दिवस खल करून त्यांत सज्जीखार एक भाग, टांकणखार एक भाग, जवखार एक भाग, सैंधवखार एक भाग, रक्तचित्रक एक भाग, बचनाग एक भाग, आणि जेष्ठीमध एक भाग, यांचें चूर्ण त्यांत मेळवून खलून ठेवावें म्हणजे मात्रा तयार होते. ही मात्रा मापमात्र मधांत किंवा आल्याच्या रसांत द्यावी; म्हणजे चित्तविभ्रम दूर होतो.

**सन्निपातचिंतामणि**—एक आयुर्वेदीय रसायन. पारा १ भाग, अभ्रकभस्म १, ताम्रभस्म १, सुंठ १, मिरें १ व पिंपळी १, या पदार्थांना त्रिफळेच्या काढ्याची भावना द्यावी. नंतर जायफळाच्या काढ्याची दुसरी भावना देऊन द्रोणपुष्पीच्या रसाची तिसरी भावना द्यावी, आणि चांगला खल करून तयार करावा. याच्या गुंजाप्रमाण मात्रा कराव्या. हें रसायन अष्टविधज्वर, शूळ, अजीर्ण, हलीमक ( कावीळ रोगाचा एक भेद ), इत्यादि रोगांवर अनुपानपरत्वें योजावें.

**सन्निपातभैरव**—एक आयुर्वेदीय रसायन. हरताळ एक भाग, गंधक एक भाग, पारा एक भाग, बचनाग तीन भाग, मनशीळ चार भाग, टांकणखार चार भाग आणि हिंगुळ चौदा भाग, या सर्वांचा निंबाच्या रसांत तीन दिवस आणि आल्याच्या रसांत तीन दिवस खल करून तयार करतात. ही मात्रा सन्निपातज्वर, अतिसार, कफ, पांडुरोग, अरोचक, कुक्षिरोग, उदावर्त, इत्यादिकांवर अनुपान योजून देतात.

**सन्-यत्-सेन** (१८६७-१९२५)—प्रख्यात चिनी क्रांतिकारक व सुधारणावादी मुत्सद्दी. हा क्वान्टुंग प्रांतांतील हॉग-सन येथें जन्मला. याचा बाप ख्रिस्ती झालेला होता. १८९३ मध्यें यानें क्रांतिकारकांचा पक्ष स्थापन केला व अनेक झटापटींनंतर चीनचें मांचू राजघराणें उलथून पाडलें. हे राजघराणें तीनशें वर्षांचें जुनें होतें. लोकराज्य स्थापन झालें तेव्हां हा त्याचा पहिला अध्यक्ष म्हणून निवडला गेला ( १९११ ). पण आपला कुओमिंटंग हा नवा सुधारणावादी पक्ष स्थापन करतांना त्याला आपल्या पूर्वीच्या क्रांतिकारक सहकाऱ्यांच्या विरुद्ध जावें लागलें. नव्या चीन लोकराज्याचा पाया आर्थिक दृष्ट्या चांगला सुस्थिर राहावा म्हणून तो फार झटला; पण यादवी माजून सन्-यत्-सेनच्या पक्षाचा पराभव झाला. साम्यवादाला त्याचा पाठिंबा असे.

**संन्याल शचीन्द्रनाथ**—एक हिंदी क्रांतिकारक. याने एकदा अंदमानांत जन्मठेप काळ्या पाण्याची शिक्षा भोगून परत आल्यावर पुन्हां क्रांतिकारकांच्या कटांत सामील होऊन पुन्हां अंदमानची काळ्या पाण्याची शिक्षा आपल्या अंगावर ओढवून घेतली; ही गोष्ट याच्या आयुष्यांत अद्वितीय होय. क्रांतिकारक लोकांमध्यें याच्याबद्दल फार आदर असे. तो प्रथम १९१५ सालीं लाहोरच्या कटाच्या खटल्यांत सांपडला त्या वेळीं त्यास काळ्या पाण्याची शिक्षा झाली. १९२० मध्यें सार्वत्रिक माफीमुळें तेथून त्याची सुटका झाली, पण तीन वर्षांनंतर पं. रामप्रसाद बिस्मिल व योगेशचंद्र चतर्जी यांच्याबरोबर त्यानें 'हिंदुस्थान रिपब्लिकन संस्था' स्थापन केली. १९२५ मध्यें त्याला दोन वर्षांची शिक्षा झाली. नंतर काकोरी खटल्यांत त्यास जन्मठेप काळ्या पाण्याची शिक्षा झाली. १९३७ सालीं पुन्हां त्याची विनशर्त सुटका झाली. याच्या तीन भावांसहि निरनिराळ्या कटांच्या खटल्यांत शिक्षा झाल्या आहेत.

**संन्यास**—आध्यात्मिक उन्नति होण्यासाठीं, सद्गति मिळण्यासाठीं देहदंड करून घेणें, सुखाचा त्याग करणें, शारीरिक वासना मारणें, यांसारख्या गोष्टी संन्यासधर्मांत येतात. हिंदु धर्म आणि बौद्ध धर्म यांत यतिधर्माची महती वर्णिली असून हा धर्म आचरणारे असंख्य मुनी होऊन गेले व अद्यापिहि कित्येक हा आचरतात. चातुर्वर्ण्यांतील वानप्रस्थाश्रम हा यासाठींच विहित आहे.

'ख्रिस्ती धर्म सुरू होण्यापूर्वी ग्रीक लोकांत स्टोइक पंथ असाच प्रकारचा होता. ज्यू लोकांतहि यती असत. पहिले ख्रिस्ती संत संन्यासधर्म फार कडक रीतीनें पाळीत. प्युरिटन पंथ देखील संन्यस्त वृत्तीचा मोठा पुरस्कर्ता आहे. शाकाहार, ब्रह्मचर्य, करमणुकींचा त्याग, इ. गोष्टींची त्याची सात्त्विक शिकवण आहे. मठसंस्था ही संन्यस्त धर्माची व्यवस्थित सुधारलेली पायरी होय.

हिंदु धर्मांत संन्यास हा चौथा व शेवटचा आश्रम आहे. समुच्चयवाद्यांच्या मतें पहिले तीन आश्रम पुरे करून मग संन्यासाश्रमाचा स्वीकार करावा. उलट विकल्पवाद्यांचें म्हणणें कोणत्याहि आश्रमांतून संन्यासाश्रमांत उडी मारतां येईल. विरक्ति हेंच संन्यासाचें कारण. सर्वदुःखनिवृत्ति व निरतिशयानन्दप्राप्ति हे संन्यासग्रहणाचे हेतु. कुटीचक, बहूदक, हंस आणि परमहंस असा चार प्रकारचा संन्यास आहे. व त्यांत उत्तरोत्तर श्रेष्ठत्व आहे. घरामध्यें अगर बहिःकुटींत राहणारा, शिखायज्ञोपवीत धारण करणारा, त्रिदंडी, घरांत किंवा बंधुजनांकडे भोजन करणारा आत्मनिष्ठ हा कुटीचक. कुटीचक पुत्रादि सात सोडून सात घरें भिक्षा मागून चरितार्थ करूं लागला म्हणजे त्याला बहूदक म्हणतात. हंसाला ह्या सर्व गोष्टी असतात; पण त्रिदंडाच्या ऐवजीं एकदंड असतो. परमहंस शिखा व यज्ञोपवीत यांचाहि त्याग करतो; आणि विद्वत्संन्यास दंडाचाहि उपाधि त्याला नसते. वैराग्यावांचून संन्यासग्रहण नरकाला कारणीभूत होतें. आतुर संन्यास कोणत्याहि वेळीं घेतला जातो तरी पण्हां उत्तरायणाचा काळ संन्यासग्रहणाला प्रशस्त मानला आहे. आश्रित्स्मृतींमध्ये संन्याशानें म्लेंच्छाकडूनहि भिक्षा घ्यावी असें सांगितलें आहे ("चरेन्माधुकरीं वृत्तिं अपि म्लेच्छकुलादपि। एकान्नं नैव भोक्तव्यं बृहस्पतिसमो यदि॥"—३·१५१). संन्यासाश्रमांत चिंतन, मनन करणें हाच धर्म सांगितला आहे.

**संप**—जेव्हां अनेक कामकरी लोक आपल्या वेतनांत किंवा नोकरींत कांहीं बदल करून घेण्यासाठीं संगनमतानें काम थांबवितात त्यास संप असें म्हणतात. कांहीं वेळां मालक आपण होऊन काम थांबवितात त्याला टाळेबंदी (लॉक आउट) असें नांव आहे. मजूरसंघ अस्तित्वांत आल्यापासून अशा संपांना व्यवस्थित स्वरूप आलें आहे. संपाच्या कालावधींत संघांकडून पैशाची मदत मजुरांना होत असते. आपल्या मागण्या कोणत्या व कशा प्रकारें पुरविल्या जाव्यात, संप केव्हां मागें घ्यावा, या व इतर गोष्टी संघ ठरवितात. आगगाडीवरच्या, टपालखात्यांतील, कोळशाच्या खाणींतील कामगारांचे संप फार जागवतात. या संपाच्या काळांत दंगेधोपेहि होतात. एका धंद्यांतील किंवा खात्यांतील संपाला सहानुभूति म्हणून इतर उद्योगधंद्यांतील कामगारहि संप करतात. अशा वेळीं सार्वत्रिक संपाची मोठी बिकट परिस्थिति उत्पन्न होते. १९२६ सालीं ग्रेट ब्रिटनमध्यें असा सार्वत्रिक संप घडून आला होता. पुढील सालीं सरकारनें कायदा करून असे संप करणें बेकायदेशीर ठरविलें. आपल्याकडे लवाद कोर्टें ठेविलीं आहेत; व त्यांचे निर्णय न मानल्यास संप बेकायदेशीर ठरविण्यांत येतो.

**संपत्ति**—संपत्तीमध्यें पैसा आणि इतर अनेक जिन्नस यांचा समावेश होतो. संपत्तींत बसण्यासाठीं वस्तूंना कांहीं विशिष्ट गुणधर्म लागतात. सर्वच मनुष्योपयोगी वस्तू संपत्तींत येणार नाहींत (उदा., हवा, प्रकाश, इ.). उपयुक्तता, दुर्मिळता किंवा परिमितता, मालकी हक्क या प्रकारच्या गोष्टी संपत्तींत पडणाऱ्या जिनसांत अवश्य पाहिजेत. बुद्धिमत्ता, कौशल्य या मनुष्यामधील गुणांना संपत्ति म्हणावें, असें कांहीं अर्थशास्त्रज्ञ म्हणतात. हा पत्नी (गुडविल) प्रमाणे अमूर्त संपत्तीच्या बाबी आहेत. संपत्ति वैयक्तिक, राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय अशा तीन प्रकारची असते. राष्ट्रीय संपत्तींत देशांतील लोकांची संपत्ति येतेच, शिवाय देशांतील प्राणी, प्रदेश, आगगाड्या, डोंगर-पर्वत, नद्या, व्यापारपेठे, पाणी, शास्त्रीय शोध, इ. अनेक गोष्टी येतात. आंतरराष्ट्रीय संपत्तींत सर्व जगाची संपत्ति, समुद्र, निर्जन भूप्रदेश, इ. येतात.

संपत्तीचें उत्पादन आणि विभजन हेच अर्थशास्त्राचे प्रमुख विषय असतात व त्यावर पहिलें महत्त्वाचें पुस्तक ॲडम स्मिथनें

'वेल्थ ऑफ नेशन्स' (राष्ट्रांची संपत्ति) हें १७७६ मधलें आहे. प्राप्तीवरील करांवरून राष्ट्राची संपति अजमावण्यांत येत असते.

आतां राष्ट्रीय संपत्तीचा विचार करतां पुढीलप्रमाणें आंकडे मिळतात:—

| देश | राष्ट्रीय संपत्ति | दरमाणशीं सरासरी रुपये |
|---|---|---|
| अमेरिका | १,१२,३१५ (कोटी रुपये) | ९,३६५ |
| कॅनडा | ८,३४४ | ८,०३३ |
| इंग्लंड | २९,४३२ | ६,३७१ |
| फ्रान्स | १८,८५७ | ४,५८१ |
| जपान | १३,६४५ | २,३०८ |
| भारत | १२,००० | ४४१ |

पण प्रत्यक्ष माणशीं उत्पन्नाची सरासरी काढल्यास खालीलप्रमाणें येते:—

| देश | माणशीं उत्पन्न रुपये |
|---|---|
| अमेरिका | १२७१-७-३ ते १४०६ |
| इंग्लंड | ९८० ते १०४९-६-५ |
| ऑस्ट्रेलिया | ७९२ |
| जपान | २१८ |
| भारत | २२ रुपयांपासून ११६ |

राष्ट्रीय संपत्तींत शेतीमाली व उद्योगधंदे येतात. तेव्हां या बाबतींत काय दिसतें तें पाहा:—

| देश | शेतीचें दर एकरीं उत्पन्न | औद्योगिक दर माणशीं उत्पन्न |
|---|---|---|
| अमेरिका | २१९ | ८३० |
| इंग्लंड | २२५ | ४१२ |
| कॅनडा | २७८ | ४७० |
| भारत | ५६ | १२ |

पेढ्यांतून लोकांनीं ठेवलेले पैसे या संपत्तींत धरावे लागतात. बँकेंतील ठेवी दर माणशीं:—अमेरिका १,३१७ रुपये; इंग्लंड १,१६४; पण भारत १५ रुपये.

वरील कोष्टकांवरून संपत्तीच्या बाबतींत आपला देश किती खालावलेला आहे, हें स्पष्ट दिसून येतें. शेवटीं आंतरराष्ट्रीय प्रमाणा(युनिट)नें पाहिल्यासहि हेंच आढळेल. इंटरनॅशनल युनिट दर माणशीं पुढीलप्रमाणें आहे:—अमेरिका १,३८१; इंग्लंड १,०६९; जपान ३५३; रशिया ३२०; व भारत २००.

गेल्या महायुद्धानंतर जपान परतंत्र झाल्याकारणानें त्याची संपत्ति भारताप्रमाणेंच कमी होणार आहे. जगांत सर्वश्रेष्ठ संपत्तिमान् देश आजकाल कोणता असेल तर अमेरिका होय. तो एकटा सावकार व इतर देश त्याचीं कुळें अशी स्थिति आली आहे.

**सपाट कृमिवर्ग**—(प्लेनारिअन्स). हे एक मृदु शरीराचे व सपाट आकाराचे कृमी असून त्यांचा आकार लांबट किंवा दीर्घवर्तुळाकृती असतो. यांपैकीं कांहीं पाण्यांत राहतात. परंतु कांहीं उष्ण प्रदेशांत जमिनीवरहि आढळतात. व त्यांचा आकार सहा ते नऊ इंचांपर्यंत असतो.

**सपाट मासे**—(प्लुरोनेक्टिडी). हा एक सपाट माशांचा वर्ग आहे. यामध्यें ग्रिल, टर्बोट, हॅलिबट, वगैरे अनेक जातींचे मासे येतात. हे लहान असतांना पाण्यामध्यें उभे पोहतात. परंतु नंतर एका बाजूवर वळतात. जी बाजू वरच्या बाजूस असते ती काळी पडते व तळाच्या बाजूस असते ती फिकट दिसूं लागते. व खालच्या बाजूचा डोळा वरच्या बाजूकडे जातो.

**संपातबिंदू**—(इक्विनॉक्टिकल पॉइन्ट्स). खगोलमध्यवृत्त व क्रान्तिवृत्त एकमेकांस छेदतात ते बिंदू. एक बिंदु मेषाचें आरंभस्थान व दुसरा तूळाचें आरंभस्थान; पहिला वसंत संपात व दुसरा शरद् संपात होय. हे बिंदू मागें पश्चिमेकडे सरकत असतात. दर वर्षी हें चलन ५० मिनिटें आहे. अयनगति-चलन पाहा.

**संपूर्णानन्द** (१८९१– )—एक हिंदी समाजवादी पुढारी व मंत्री. यांचें शिक्षण अलाहाबाद युनिव्हर्सिटीमध्यें झालें. प्रारंभीं बनारसमध्यें हे कांहीं वर्षे शिक्षक होते. नंतर इंदूर येथील डाली कॉलेजमध्यें शिक्षक होते. नंतर बिकानेर येथील डुंगर कॉलेजमध्यें मुख्याध्यापक होते. १९२१ सालीं सत्याग्रहामध्यें यांनीं नोकरी सोडून दिली. 'मर्यादा' या हिंदी मासिकाचे व 'डे' या इंग्रजी दैनिकाचे कांहीं काल संपादक होते. यांस काँग्रेसच्या चळवळींत ४ वेळां तुरुंगवासाची शिक्षा झाली. १९२६ ते १९२८ मध्यें हे संयुक्तप्रांत काँग्रेस कमिटीचे प्रधानमंत्री होते. हे संयुक्तप्रांत कायदे मंडळाचे सभासद असून त्यांतील काँग्रेस पक्षाचे मंत्री होते. पं. मोतीलाल नेहरू हे स्कीन कमिटीचे सभासद असतांना हे त्यांचे चिटणीस होते. १९२३ ते १९२५ मध्यें हे बनारस म्युनिसिपल बोर्डाचे सभासद होते. १९२२ ते १९२९ व १९३० ते १९३६ या काळांत हे अखिल भारतीय काँग्रेस कमिटीचे सभासद होते. १९२३ पासून हे काशी विद्यापीठांत तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक होते. अखिल भारतीय काँग्रेस सोशालिस्ट पक्षाचे हे कार्यकारी मंडळाचे सभासद होते. या पक्षाची १९३४ सालीं जी मुंबईस परिषद् झाली तिचे ते अध्यक्ष होते. १९४० सालीं पुण्यास भरलेल्या हिंदी साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते. हर्षवर्धन, महादजी शिंदे, ईजिप्त व चीन यांच्या स्वातंत्र्याचा इतिहास, वगैरे पुस्तकें यांनीं लिहिलीं आहेत. १९३८–३९ मध्यें संयुक्त प्रांताचे शिक्षणमंत्री आणि नंतर पुन्हां १९४७ पासून शिक्षणमंत्री आहेत.

**सपृष्ठवंश प्राणी**—( व्हर्टेब्राटा ). प्राणिकोटींत अपृष्ठवंश व सपृष्ठवंश असे दोन भेद आहेत. सपृष्ठवंशाच्या प्राण्यांना पाठीला कणा असतो. प्रथम गोल तंतूंच्याप्रमाणें भाग अगोदर तयार होतो त्याला आदिवंश म्हणतात; नंतर त्या ठिकाणीं कणा उत्पन्न होतो. सपृष्ठवंशाचे (१) पूर्णवंश, (२) पुच्छवंश, व (३) निगूढवंश असे तीन पोटभेद आहेत. पूर्णवंशाचे आणखी (अ) निःशीर्ष व (आ) सशीर्ष असे दोन भेद असून, सशीर्षांचे पुन्हां (अ) हनुरहित अथवा वर्तुलमुखी, (आ) मीन अथवा मासे, (इ) द्विधागतिक किंवा स्थलजलचर, (ई) उरोगामी अथवा सरपटणारे प्राणी, (उ) पक्षी किंवा विहंग, व (ऊ) स्तन्य, असे सहा वर्ग केले जातात.

पशु-पक्षी, सरपटणारे प्राणी, मासे, इ. सपृष्ठवंश प्राण्यांत मोडतात. सपृष्ठवंशीय प्राण्यांची सर्वसाधारण लक्षणें पुढीलप्रमाणें असतात: सर्वांना पाठीकडे मणक्यांचा कणा असतो. डोक्यांत कवटी असते. सर्वांचे मेंदू कमीजास्त प्रमाणानें प्रगल्भ झालेले असतात. सर्व प्राण्यांचें हृदय पोटाकडील बाजूस असून तें तीन किंवा चार कप्प्यांचें केलेलें असतें. रक्तांत ताम्रपेशी ( रेड कॉर्प्युस्कल्स ) असतात. अंगाला लांबट असून शरीर दोन्ही बाजूंनी सारखें असतें. श्वासोच्छ्वास फुप्फुसाद्वारें अथवा कल्ल्यांच्या साहाय्यानें होऊन रक्तशुद्धि होते. बहुतेक प्राण्यात चेतृद असतें. बहुतेकांस चार अवयव असतात. प्रत्येकाच्या शरीरावर त्वचेचें आच्छादन असतें. सर्व शरीरभर नसांचें जाळें असून त्यांच्यामार्फत ज्ञान मेंदूस पोंचविलें जातें.

**सप्तऋषि**—नांवांत पाठभेद आहेत: (अ) कश्यप, अत्रि, भरद्वाज, विश्वामित्र, गौतम, जमदग्नि व वसिष्ठ: (आ) मरीचि, अत्रि, अंगिरस, पुलस्त्य, पुलह, क्रतु व वसिष्ठ.

**सप्तकुलाचल**—(अ) महेंद्र, मलय, सह्य, शुक्तिमान्, गंधमादन, विंध्य व पारियात्र. (आ) हिमवान्, गंधमादन, निषध, विंध्य, माल्यवान्, पारियात्रिक व हेमकूट.

**सप्तचिरंजीव**—अश्वत्थामा, बलि, व्यास, हनुमान्, बिभीषण, कृप व परशुराम.

**सप्तताल**—सरला, तरला, स्वयंभा, बाला, हृद्या, भामिना व लंबा.

**सप्तद्वीप**—(अ) जंबु, शाक, शाल्मल, कुश, क्रौंच, गोमेदक आणि पुष्कर हे पृथ्वीवरील सप्तमहाद्वीप. या सप्तद्वीपांपैकीं पहिलें जंबु हें फार मोठें आहे. कारण क्षीरसमुद्राच्या उत्तरेकडील जें पृथ्वीचें अर्धे तें जंबुद्वीप, आणि पृथ्वीच्या दुसऱ्या अर्धावर शाकशाल्मलादिक सहा द्वीपांची स्थिति आहे.

(आ) जंबु, कुश, प्लक्ष, शाल्मली, क्रौंच, शाक व पुष्कर असा पाठभेद आहे.



**सप्तधातु**—१. शरीरांतील—(अ) रस, रक्त, मांस, मेद, अस्थि, मज्जा व शुक्र. (आ) अस्थि, नाडी, स्नायु, मांस, त्वचा, रक्त व नख.

२. (अ) सोनें, रुपें, तांबें, कथिल, नाग (शिसें), तीक्ष्ण (पोलाद) व कांसें. (आ) सोनें, रुपें, तांबें, शिसें, जस्त, कथिल व लोखंड.

**सप्तधान्यें**—(अ) साळ, गहूं, माळ, तीळ, राळे, सातू व हरभरे. (आ) साळी, यव, तीळ, उडीद, राळे, गहूं व मसुरा.

**सप्तपदी**—विवाहसंबंधीं लाजाहोमोत्तर वधूवरांनीं अग्नीभोंवतीं प्रदक्षिणा करावयाच्या व नंतर अग्नीच्या उत्तरेस सात तांदुळाचे पुंज ठेवून वरानें वधूचा हात धरून तिच्याकडून प्रत्येकावर मंत्रपूर्वक चरण ठेववून आपल्याजवळ आणणें, या विधीला म्हणतात. या सप्तपदीशिवाय आर्यविवाह सपाक होत नसतो.

**सप्तपाताल**—अतल, वितल, सुतल, तलातल, महातल, रसातल व पाताल.

**सप्तपुऱ्या**—अयोध्या, मथुरा, माया (हरद्वार), काशी, कांची, अवंतिका (उज्जयिनी), व पुरी द्वारावती.

**सप्तमातृका**—ब्राह्मी, माहेश्वरी, कौमारी, वैष्णवी, वाराही, इंद्राणी व चामुंडा.

**सप्तमृत्तिका**—(अ) वास्तुशांति इत्यादि कर्मांत गजमृत्तिका (हत्तीखालची), अश्वमृत्तिका (घोड्याखालची), चतुष्पथमृत्तिका (चवाठ्यावरची), द्वारमृत्तिका (दोहांतली किंवा मंगलस्थानची), रथमृत्तिका (रथाखालची), वल्मीकमृत्तिका (वारुळाची) आणि गोष्ठमृत्तिका (गोठ्यांतली), अशा सात मृत्तिका लागतात. किंवा (आ) गोठा, वेदिका, शिवस्थान, ह्रद, वारिसंगम आणि चतुष्पथ या ठिकाणच्या मृत्तिका व कारागृहें स्नानांतलीहि घेतात.

**सप्तर्षि तारे**—( बेअर, ग्रेट अँड लिटल ). सप्तर्षी पाहा. बृहदृक्ष ( उर्सा मेजर ) व लघुऋक्ष ( उर्सा मायनॉर ) असे दोन नक्षत्रपुंज जे युरोपियन ज्योतिषी धरतात त्यांना भारतीय ज्योतिषी अनुक्रमें सप्तर्षि व ध्रुवमत्स्य म्हणतात. सप्तर्षि तारे ध्रुवाभोंवतीं असतात तर ध्रुवमत्स्यांतच ध्रुवतारा असतो. सप्तर्षींतील पुलह व क्रतु यांना 'दर्शक' म्हणतात. कारण या दोहोंना जोडणारी सरळ रेषा ध्रुवावरून जाते.

**सप्तर्षि संवत्**—या संवताचा आरंभ कलियुगारंभापासून होत असून हल्लीं त्याचा प्रचार काश्मीर व त्याच्या आसपासच्या डोंगरी मुलुखांतच आहे, शिवाय ज्योतिषी लोकांत तें आहे. प्राचीन काळीं तो पंजाबांतहि प्रचलित होता तरी अलीकडे त्या प्रांतांत त्याचा प्रचार राहिला नाहीं. याचे महिने पूर्णिमान्त असून वर्ष चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून सुरु होतें. हल्लीं वर्तमान वर्षाची चाल आहे. तथापि कित्येक प्रसंगीं

गतवर्ष लिहिलेलेहि लेख आढळून येतात. या संवतांत शतकाचे आंकडे सोडून केवळ वरील वर्षेच लिहिण्याची साधारणतः वहिवाट असल्यामुळें त्यास कचा संवत् असें एक नांव आहे. या-शिवाय तो काश्मीर वगैरे भागांत प्रचलित आहे. म्हणून लौकिक काल किंवा लौकिक संवत्, डोंगरी मुलुखांत त्याचा प्रचार असल्यामुळें पहाडी संवत् आणि पंचांगांत व शास्त्रीय विषयावरील ग्रंथांत तो वापरीत असल्यामुळें शास्त्रसंवत् अशीं त्यास आणखीहि नांवें पडलीं आहेत.

**सप्तलोक**—भूलोक ( पृथ्वी ), भूवर्लोक ( पृथ्वी आणि सूर्य यांमधील ), स्वर्लोक ( सूर्य आणि ध्रुव यांमधील इंद्रादि देवतांचा ), महर्लोक ( सूर्य व नक्षत्रें यांचा ), जनलोक ( ब्रह्मदेवाच्या मानसपुत्रांचा ), तपोलोक ( तपस्वी लोकांचा ) व सत्यलोक ( ब्रह्मदेवाचा ).

**सप्तशृंगी**—मुंबई, नाशिक जिल्हा. समुद्रसपाटीपासून ४,६५९ फूट उंचीवर असलेलें चांदोर पहाडाचें शिखर. दिंडोरीपासून हें १५ मैलांवर आहे. दक्षिणेकडील ३५० पायऱ्या असलेला मार्ग यात्रेकरूंच्या विशेष सोईचा आहे. येथें मधून मधून दिसणारे, एक संस्कृत व बाकीचे मराठी असे ५ शिलालेख आहेत. वर आणखी ४७२ पायऱ्या चढून गेलें म्हणजे सप्तशृंग स्वामिनीचें मंदिर लागतें. तेथें चैत्र शुद्ध १५ व नवरात्र या दिवसांत मोठी यात्रा भरते. मूर्ति खडकात कोरलेली आहे. हात अठरा नाहेत. उंची साधारण दहा फूट भरेल. सप्तशती ग्रंथांत या देवीची कथा आहे. वणीस जें देऊळ आहे तें देवीचें खालचें ठाणें म्हणतात.

**सप्तसिंधु**—' सप्त सिंधव ' हा शब्द एकदांच ऋग्वेदामध्यें एका विशिष्ट देशाचें नांव म्हणून आलेला आहे. इतरत्र मात्र तो सात नद्या अशाच अर्थानें आलेला आहे. मॅक्समुल्लरच्या मतानें त्या पंजाबमधल्या पांच नद्या, सिंधु व सरस्वती अशा या सात नद्या असाव्यात. सायणाचार्यांच्या मताप्रमाणें गंगा, यमुना, सरस्वती, शुतुद्री, पुरुष्णी, असिक्नि आणि वितस्ता या त्या सात नद्या होत. ह्या सात नद्या ' इमं मे गंगे यमुने ' ( १०. ७५,५ ) या ऋचेप्रमाणें घेतल्या आहेत. परंतु सिंधूला मिळणाऱ्याहि सात नद्या असूं शकतील. कांहीं सरस्वतीऐवजीं कुभा घेतात. ' सप्तसिंधु ' शब्दाचा विचार करतांना एक गोष्ट केव्हांहि विसरून चालणार नाहीं व ती ही कीं, सध्यां जो पंजाब शब्दानें ओळखला जाणारा प्रांत आहे त्यांत सातच मोठमोठाल्या नद्या आहेत. म्हणूनच पंजाबला पूर्वी सप्तसिंधु म्हणत असावेत.

**संप्रति मौर्य** ( ख्रि. पू. २२६–२०७ )—अशोकाच्या वेळीं युवराजपदावर असलेला कुणालाचा पुत्र. ज्याप्रमाणें बौद्ध धर्मप्रसारासाठीं अशोकानें प्रयत्न केले त्याचप्रमाणें यानें जैन धर्मप्रसारासाठीं आपले श्रम खर्ची घातले. जैन धर्मप्रचारासाठीं यानें अनेक देशांत आपले प्रचारक पाठवले. इतकेंच काय, पण सैनिकांनाहि यानें साधूंचा वेष देऊन जैन धर्मप्रसाराची कामगिरी सांगितली. आपला वडील भाऊ दशरथ ( पाहा ) याच्यानंतर हा गादीवर आला. दुसरा चंद्रगुप्त म्हणून हा प्रसिद्ध आहे. याच्या वेळीं बारा वर्षांचा एक भयंकर दुष्काळ पडला होता. त्या वेळीं श्रुतिकेवली भद्रबाहूबरोबर हा दक्षिणेंत आला. यानंतर यानें चंद्रगिरीवर आपला देह ठेवला. शालिशुक हा याच्यानंतर गादीवर बसला.

**सप्रू, सर तेजबहादूर** ( १८७५–१९४९ )—एक हिंदी कायदेपंडित व घटनाशास्त्रज्ञ. यांचें शिक्षण आग्रा कॉलेजमध्यें झालें. १८९६ ते १९२६ पर्यंत हे अलाहाबाद हायकोर्टाचे ॲड्व्होकेट होते. १९१३ ते १९१६ मध्यें हे संयुक्तप्रांत कायदेमंडळाचे सभासद होते. १९११ ते १९१९ मध्यें हे साउथ बरो कमिटीचे सभासद होते. १९०६ ते १९१७ मध्यें हे अखिल भारतीय काँग्रेस कमिटीचे सभासद होते. १९१४ मध्यें हे संयुक्त प्रांतीय राजकीय परिषदेचे अध्यक्ष होते. १९१३ सालीं सामाजिक परिषदेचे अध्यक्ष होते. १९१८ ते १९२० मध्यें लिबरल लीगचे अध्यक्ष होते. बनारस हिंदु युनिव्हर्सिटीच्या कोर्टाचे हे सभासद होते. हिंदुस्थान सरकारचे हे कायदेमंत्री होते. १९२२ मध्यें ते निवृत्त झाले. १९२३ सालीं लंडन येथें भरलेल्या साम्राज्य परिषदेचे ते सभासद होते. १९२३ सालीं पुणें येथें भरलेल्या अखिल भारतीय लिबरल फेडरेशनचे ते अध्यक्ष होते. १९२४ मध्यें सुधारणा चौकशी समितीचे ते सभासद होते. १९३०, १९३१ व १९३२ मध्यें ते गोलमेज परिषदेचे सभासद होते. १९३३ मध्यें जॉइंट पार्लमेंटरी कमिटीचे सभासद होते. १९३४ मध्यें जॉइंट पार्लमेंटरी कमिटीस पाठविलेल्या खलित्याचे हे व डॉ. जयकर सहकारी लेखक होते. यांनीं अपक्ष-परिषद व सर्वपक्षीय परिषद भरविण्याच्या कामांत पुढाकार घेतला होता. काँग्रेस व सरकार यांच्यामध्यें समेट व्हावा म्हणून हे खटपट करीत असत. यांचें कायद्याचें ज्ञान उत्कृष्ट असे व हे सर्व राजकीय पक्षांना पूज्य वाटत.

**संप्लवन**—( सब्लिमेशन ). उष्णता लावली असतां एखाद्या घन पदार्थाचें एकदम वायूमध्यें रूपांतर जें होतें त्याला ही रासायनिक संज्ञा आहे. या कृतींत मधली द्रव अवस्था मुळींच होत नाहीं. पदार्थ शुद्ध करण्यासाठीं या ऊर्ध्वपातनक्रियेचा उपयोग करतात. उदा., कापूर, नवसागर, रसकापूर, इ. मिश्रणें याप्रमाणें शुद्ध करण्यांत येतात. असा शुद्ध पदार्थ जर चांगला बारीक असेल तर त्याला ' फूल ' म्हणतात; उदा., ओव्यांचें-जस्ताचें फूल, इ.

**सफदरजंग** ( राज्य. १७३९–५४ )—अयोध्येचा एक नबाब. याचें पूर्ण नांव मिर्झा मुकीम मनसूर अली खान असें होतें. हा अयोध्येच्या सादतखानाचा पुतण्या व जांवई असून

त्यानंतर अयोध्येचा कारभार पाहूं लागला. आपल्या कारकीर्दीत यास रोहिले, अब्दाली व फरूखाबादचा नवाब यांच्याशीं युद्धें करावीं लागलीं. फैजाबादेस याची राजधानी होती. यानें आपल्या प्रजेच्या हितासाठीं बऱ्याच सुखसोयी निर्माण करून लोकांकडून वाहवा मिळवली. याचें शौर्य वाखाणण्याजोगें होतें. शेवटल्या सहा वर्षें यास दिल्लीच्या बादशहाच्या वजिराची जागा मिळाली होती. याची सुंदर कबर दिल्लीस आहे.

**सफरचंद**—[वर्ग–रोझासी. इं. ॲपल]. समशीतोष्ण प्रदेशांत होणारें हें झाड सर्वपरिचित आहे. याच्या झाडास व फळासहि सफरचंद म्हणतात. रानसफरचंदाचें फळ आंबट असतें व तें युरोपमध्यें सर्वत्र आढळतें. या झाडांची लागवड आज चार हजार वर्षें होत आली आहे. पण गेल्या शंभर वर्षांत याच्या अनेक जाती तयार करण्यांत आल्या आहेत. याची लागवड बिया, फांटे, दाब कलम, डोळे कलम, किंवा भेट कलम, वगैरे प्रकारांनीं करतां येते. पण शेवटची भेट कलम करण्याची पद्धति सार्वत्रिक असून त्या पद्धतीनेंच याच्या आज सुमारें २,००० निरनिराळ्या जाती बनविण्यांत आल्या आहेत. हें झाड उघड्या जागेंत व थंड वारा लागणार नाहीं अशा ठिकाणीं चांगलें वाढतें. विशेषतः हिंवाळ्यांत जेव्हां फुलें येतात त्या वेळीं थंड वाऱ्यापासून याचें संरक्षण करावें लागतें. हिंदुस्थानांत हिमालयांत कुलू वगैरे ठिकाणीं उत्तम सफरचंदें तयार होतात.

**सफेत रोगण**—(पिने व्हार्निश). दक्षिण हिंदुस्थान व सिलोन यांमध्यें आढळणाऱ्या दोन झाडांपासून निघणाऱ्या राळेसारख्या पदार्थास हें नांव आहे. याचा व्हार्निश किंवा रोगण म्हणून उपयोग करण्यांत येतो. वरील झाडांचीं नांवें व्हॅटेरिया इंडिका व व्हॅटेरिया अक्युमिनाटा अशीं आहेत.

**सबजा**—हीं सुगंधी झाडें रानतुळशीसारखीं वाढतात. यांची उंची दोनतीन हात असते. झाडास मोठाले तुरे येतात. आंत बीं (तुकुमराई) काळसर असतें. मुसलमान लोकांस हें झाड फार प्रिय आहे. सबजाच्या दर्पामुळें साप जवळ येत नाहीं असें म्हणतात. हा औषधी आहे. विंचवाच्या दंशावर पाल्याचा रस लावतात. कान फुटल्यास कानांत घालतात. गर्मीवर याचें बीं रात्रीं भिजत घालून सकाळीं दूधसाखरेबरोबर देतात. मरवा पाहा.

**सबक्तगीन गझनवी** (राज्य. ९७७–९७)—गझनीच्या यामिनी घराण्याचा संस्थापक व अलप्तगीनाचा जांवई. पिराईस पदच्युत करून व सुलतानाच्या दुसऱ्या नूहाची आपल्या राज्यारोहणास संमति घेऊन हा गझनीच्या गादीवर आला. अवघ्या चार वर्षांत यानें उत्तरेकडील ऑक्सस नदीपर्यंत व पश्चिमेस अफगाणिस्तान व इराण यांपर्यंत आपली राज्यमर्यादा भिडवली. सन ९७९ मध्यें गझनीवर चाल करून येणाऱ्या पंजाबच्या जयपाल राजास याच्याशीं तह करूनच माघारीं फिरावें लागलें. यानें सन ९८६ मध्यें जयपालावर स्वारी करून बरीच लूट मिळवली व काबूलचाहि ताबा घेतला. यानंतर यानें नूह राजाकडून खुरासान प्रांत बळकावला व या प्रांतावर यानें महमूदाची नेमणूक केली. याच्या कामगिरीचा उपयोग पुढें महमूदाला साम्राज्यवृद्धीसाठीं झाला.

**संबळ**—एक वाद्य. तबल्याप्रमाणेंच यास डावा व उजव्या हातानें वाजविण्याचे स्वतंत्र भाग असतात. पण संबळांतील दोनहि भाग एकमेकांशीं बांधलेले असतात. बुडापेक्षा या भागांच्या तोंडांत अंतर अधिक पडलेलें असतें. डाव्या हातानें वाजविण्याच्या भागाचें तोंड उजव्या हातानें वाजविण्याच्या तोंडापेक्षां सुमारें दीड पटीनें रुंद असतें. लहान तोंडाचा व्यास वीतभर असतो. हीं दोनहि तोंडें कातड्यानें मढविलेलीं असतात, व प्रत्येक तोंडावर वेताचें कडें असतें. त्यांतून सुताची दोरी बुडाशीं घातलेल्या लोखंडी कड्यांतून ओढून आवळून टाकतात, म्हणजे तोंडाशीं मढविलेल्या कातड्यास ताण देण्याची सोय होते. उजव्या हाताकडील भाग मध्यांतील षड्ज व डाव्या हाताचा भाग खरज बोलतो. हें वाद्य एका टोंकाशीं वळवून लहानशा वाटीएवढीं वर्तुळें बनविलेलीं अशा तरवडाच्या अगर वेताच्या बारीक छड्यांनीं वाजवितात. या छड्या हातांत नीट राहाव्या म्हणून याच्या दुसऱ्या टोंकाशीं चिंध्या बांधून जाड केलेल्या असतात. या छड्यांची लांबी दीड वीत असते. डाव्या हातानें वाजविण्याचा भाग लांकडाचा न करतां तांब्याचाहि केलेला आढळतो. या वाद्याचा उपयोग सनईशीं साथ करतांना होतो. अलगुजाशीं साथ करते वेळीं हें हातांनीं वाजवितात. गोंधळ घालते वेळीं गोंधळी या वाद्याचा उपयोग करतांना दृष्टीस पडतात. या वाद्यांतील खरज स्वर निघणाऱ्या भागास 'बंब' किंवा 'धम' म्हणतात व दुसऱ्या भागास 'झील' म्हणतात.

**संबळपूर**—ओरिसा प्रांतांतील एक जिल्हा. क्षे. फ. ५४१९ चौ. मैल. या जिल्ह्याच्या तिन्ही बाजूंस पहाड व जंगलें आहेत. याचे खालसा व जमीनदारी असे मुख्य विभाग आहेत. महानदी ४० मैलपर्यंत वाहत गेली आहे. बारघाटी या पहाडाची जास्तींत जास्त उंची ३,००० फूट आहे. या जिल्ह्यांत जिकडे तिकडे तलावच तलाव दृष्टीस पडतात. झाडाच्या मुख्य जाती म्हणजे साग, बिजासाल व शिमू या होत. जिल्ह्याची हवा सर्द व रोगट आहे. पाऊस नियमित असतो. जिल्ह्याची लो. सं. (१९४१) ११,८२,६२२. या जिल्ह्यांतून आसामांत मजूर पाठविले जातात. जिल्ह्यांत फक्त एकच शहर असून खेडीं मात्र ३,९३८ आहेत. येथें राहणाऱ्या मुख्य जाती येणेंप्रमाणें—गोंड (शें. ८), कोष्टा (शें. ११), सावर (शें. ९), गहा किंवा अहीर (शें. ११),

व गांद (शें. १३). जिल्ह्यांतील मुख्य पीक तांदूळ; तीळ, उडीद, कोद्रु, थोडा कापूस आणि ऊंस हीं इतर पिकें होतात. रामपूर येथें दगडी कोळशाची एक खाण आहे. पहाडी भागांत बहुतेक लोखंड सांपडतें. महानदींतील हिराकुड नांवाच्या बेटांत पूर्वी हिरे सांपडत होते. इब नदींत अल्प प्रमाणांत सोनें सांपडतें. अभ्रक सर्वत्र आहे. जिल्ह्यांत टसर जातीचें कापड तयार करणें हा एक महत्त्वाचा धंदा आहे. शिक्षणाच्या बाबतींत हा जिल्हा फारच मागासलेला आहे.

संबळपूर शहर—जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे व तें महानदीकांठीं वसलेलें आहे. येथील लो. सं. सुमारें पंधरा हजार. या शहरीं सोमलई देवी नांवाची एक ग्रामदेवता आहे. तिच्या नांवावरूनच या शहरास संबळपूर हें नांव मिळालें असलें पाहिजे. येथील मुख्य धंदा म्हणजे टसर जातीच्या रेशमाचे व सुती कापडाचे हातमाग होत. एक जुना किल्ला व बरींच देवळें आहेत.

**संभाजी आंगरे** (मृ. १७४१)—हा कान्होजी आंगऱ्यास मथुराबाईच्या पोटीं झालेला धाकटा मुलगा. संभाजी तिरसट, उतावळा व तऱ्हेवाईक होता. भावाशीं व पेशव्यांशीं त्याचें बरें नव्हतें. मानाजीनें कपट करून फिरंगी लोक कुलाब्यांत आणले. संभाजी व मानाजी यांच्या तंट्यामुळें जंजिरा जिंकण्याचें काम मागें पडलें. या दोघां भावांची झटापट बरेच दिवस चालू होती. शाहूच्या दरबारांतील नारो राम शेणवी वगैरे मंडळी संभाजीला अनुकूल होती आणि मानाजीला पेशव्यांचा पाठिंबा होता. मानाजीनें कुलाब्यास राहावें आणि संभाजीनें सुवर्णदुर्गास राहावें असें बाजीरावानें ठरवून देऊन या भावांचा तंटा तात्पुरता मिटवला; पण संभाजीनें उघडपणें पेशव्यांच्या विरुद्ध पक्षांत सामील होऊन नाना प्रकारचीं कारस्थानें चालू केलीं. पण मानाजीनें पेशवे व इंग्रज या दोघांची मदत मिळविल्यामुळें संभाजीचा जोर चालेना. नंतर लवकरच १७४१ सालीं संभाजी मरण पावला.

**संभाजी भोसले**—१. (मृत्यु सन १६५५)—शिवाजीचा थोरला भाऊ. वेरूळ येथें याचा जन्म झाला. याच्या बारशाच्या समारंभास मूर्तिजा निजामशहा हा हजर होता. सन १६३६ मध्यें पुणें प्रांत सोडून हा कर्नाटकांत गेला. शहाजीनें आपणांस मिळालेल्या जहागिरीपैकीं बंगळूर व कोलार यांवर सन १६४७ पासून यास अधिकारी नेमलें. कोलारलाच हा राहत असे. सन १६५५ मध्यें आदिलशाही अमलाखालीं कनकगिरीच्या संस्थानांत बंडाळी माजली असतां ती मोडण्याचें काम अफजलखान व हा यांच्यावर सोंपवण्यांत आलें होतें. परंतु अफजलखानानें या वेळीं स्वतः मागें राहून यात योग्य वेळीं मदत न केल्यानें हा बंडखोरांच्या तोफेच्या गोळ्यास बळी पडला. याचें लग्न शिवनेरी किल्ल्याचा गडकरी विजयराय याची कन्या जयंती हिजबरोबर झालें होतें. जयंतीखेरीज यास गौरीबाई व पार्वतीबाई अशा दोन स्त्रिया होत्या. यास उमाजीराजे नांवाचा पुत्र होता. शिवाय मलकोजी व सुरतसिंग असे आणखी दोन पुत्र होते.

२. (१६५७-१६८९)—हा शिवाजी व सईबाई यांचा मुलगा. याची आई हा दोन वर्षांचा असतांना वारली. १६६५ मध्यें पुरंदरच्या तहानें संभाजीस मोंगलांच्या सैन्यांत ५,००० ची मनसब मिळाली. १६६६ मध्यें हा बापाबरोबर दिल्लीस गेला. तेथें औरंगजेबानें या बापलेकांस अटक केली तेव्हां शिवाजी संभाजीसह गुप्तपणें पेटाऱ्यांतून दिल्लीबाहेर आला व दोघेहि एका घोड्यावर बसून मथुरेस आले.

तेथें संभाजीस मोरो त्रिमल पिंगळ्याच्या एका नातेवाइकाजवळ ठेवून शिवाजी स्वतः गोसाव्याच्या वेषांत दक्षिणेंत गेला. संभाजी मथुरेस कांहीं महिने राहिल्यावर त्यासहि सुखरूपपणें दक्षिणेंत पोंचविण्यांत आलें. संभाजीनें एका ब्राह्मणाच्या बायकोवर बलात्कार करण्याचा प्रयत्न केल्यामुळें शिवाजीनें त्यास पन्हाळ्यास अटकेंत ठेवलें. पण हा तेथून निसटून दिलेरखानास जाऊन मिळाला. पण त्यास परत यावें लागलें व पुन्हां कैद झाली. १६८० त शिवाजी निवर्तल्यावर सोयराबाईच्या बाजूच्या मंडळींनीं राजारामास गादीवर बसवण्याचा गुप्त कट केला. पण संभाजीला या कटाची बातमी कळतांच त्यानें रायगडावर चाल करून राजसत्ता हातीं घेतली. राजारामास अटकेंत ठेवलें आणि सोयराबाईस आणि तिच्या पक्षाच्या कित्येक मुत्सद्यांस ठार मारलें. नंतर जंजिऱ्याच्या हबशांबरोबर लढण्यास संभाजी गेला असतां राजारामास गादीवर बसवण्याचा दुसरा कट झाला. त्याची बातमी कळतांच संभाजीनें बाळाजी आवजी, अण्णाजी दत्तो, हिरोजी फर्जन्द, शिर्के घराण्यांतील मंडळी, वगैरे कटांतील इसमांस हत्तीच्या पायीं देऊन ठार मारलें. या वेळीं रामदासस्वामी, रघुनाथपंथ हणमंते, वगैरेंनीं संभाजीस योग्य उपदेश केला, पण त्याचा परिणाम फार वेळ टिकला नाहीं.

कलुषा नांवाच्या कनोजी ब्राह्मणानें संभाजीच्या मनावर आपला पूर्ण पगडा बसवला होता व त्या परदेशी अनुभवी माणसाच्या सल्ल्यानें आतां सर्व राज्यकारभार चालू लागला. १६८२ सालीं मोठ्या सैन्यासह औरंगजेबानें दक्षिणेंत स्वारी केली तेव्हां मोंगल

सैन्यानें मराठ्यांचा मुलूख उध्वस्त करण्यास सुरवात केली. १६८३ साली गोव्याच्या व्हाइसरॉयनें संभाजीच्या मुलुखांत स्वारी केली व जाळपोळ करून देवळें पाडण्यास व कैद्यांना बळजबरीनें बाटवण्यास सुरवात केली. संभाजीनें उलट पोर्तुगीजांच्या दमण व वसई यांच्या दरम्यान कित्येक स्थळांवर हल्ला करून कित्येक स्थळांचा नाश केला. तथापि संभाजीचा काळ आळशीपणांत व व्यसनांत अधिक वेळ जाऊं लागला, त्यामुळें मराठे सैन्यांत शिस्त राहिली नाहीं. सैन्याला पगार वेळच्या वेळीं मिळेना. त्यामुळें मराठी सैन्य परस्पर लढाया करून पगाराऐवजीं लुटीवर पगार मागवूं लागलें. सुलतान मुअज्जम या मोंगल सुभेदारानें सर्व कोंकण प्रांत जाळून लुटून फस्त केला. इकडे संभाजीचें पोर्तुगीजांबरोबरहि युद्ध चालूच होतें. तिकडे औरंगजेब स्वतः मोठ्या सैन्यासह मराठ्यांचे किल्ले काबीज करूं लागला. तथापि संभाजी पन्हाळा, विशाळगड किंवा संगमेश्वर, वगैरे ठिकाणीं व्यसनामध्यें नेहमीं गुंतलेला असे. अखेर १६८९ सालीं मोंगलांचा सरदार तकरीबखान यानें अचानक हल्ला करून संगमेश्वर येथें संभाजी, कलुशा व आणखी २४ इसम यांना कैद करून त्यांना तुळापूर येथें औरंगजेबाच्या छावणींत नेलें. तेथें संभाजीचा बराच छळ व अपमान करण्यांत आला. "तूं मुसलमान होशील तर मी तुला जीवदान देईन" असा औरंगजेबानें संभाजीस तुरुंगांत निरोप पाठविला, तेव्हां "तूं मला आपली मुलगी देशील तर मी मुसलमान होईन" असा संभाजीनें त्याला जबाब देऊन महंमद पैगंबरावर शिव्यांची लाखोली वाहिली. औरंगजेबास एवढा अक्षम्य अपराध कोठून सहन होणार? त्यानें तापलेल्या सळईनें प्रथम त्याचे डोळे फोडले, व नंतर त्याची जीभ कापून मग शिरच्छेद करण्याचा हुकूम केला. औरंगजेबाच्या हुकमाप्रमाणें तुळापूर येथील छावणीच्या बाजारांत संभाजी व कलुशा यांचा शिरच्छेद करण्यांत आला (११ मार्च १६८९). संभाजीची समाधि पुण्याजवळच वढू येथें आहे. संभाजी हा आपल्या बापाप्रमाणेंच शूर असून त्याच्या अंगीं कर्तृत्वशक्तिहि होती. परंतु बदफैलीपणा, अविचारीपणा व निर्दयपणा या दुर्गुणांमुळें त्याच्या ठिकाणीं असलेले थोडेसे गुणहि अगदीं झांकून गेले होते. त्याला धाकटो येसूबाई हिच्यापासून शिवाजी नांवाचा एक मुलगा होता. तोच पुढे शाहू या नांवानें प्रसिद्धीस आला.

३. (१६९३–१७६०)—हा कोल्हापूरच्या गादीवरील दुसरा छत्रपति. छत्रपति राजाराम व राजसबाईपासून झालेला हा पुत्र. हा जिंजी स जन्मला. आपली सावत्र आई ताराबाई व सावत्र भाऊ शिवाजी यांना कैद करून हा कोल्हापूरच्या गादीवर आला (सन १७१४). कृष्णा व तुंगभद्रा या दोन नद्यांमधील प्रदेशावर हा आपला हक्क सांगत असे. शाहूचा होत असलेला उत्कर्ष यास सहन न होऊन यानें दमाजी थोरातांच्या साहाय्यानें शाहूवर आक्रमण केलें. तेव्हां सन १७१८ मध्यें शाहूनें बाळाजी विश्वनाथाच्या मदतीनें याचा वडगांव येथें पराभव केला. पुढें यानें निजाम व चंद्रसेन यांच्याशीं दोस्ती करून शाहूस त्रास देण्यास सुरवात केली. तेव्हां शाहूनें सन १७३१ मध्यें याजवर चाल करून याचा पराभव केला. नंतर वारणेचा तह होऊन दोघांमधील भांडणांचा निकाल झाला. हा स्वारीवर असतांना राज्यकारभार याची आई राजसबाई हीच पाहत असे. यानंतर शाहूशीं याचीं विशेष मोठीं अशीं भांडणें झालीं नाहींत. शाहू व हा सलोख्यानेंच राहिले. पेशव्यांकडून यास कांहीं त्रास झाल्यास शाहूच पेशव्यांना दम भरून याचा कैवार घेत असे. इतकेंच काय पण पुढें साताऱ्याची गादी आपल्यानंतर यालाच देण्याचा शाहूचा विचार होता व त्यास पेशव्यांची मान्यताहि होती. परंतु पुढें ताराबाईच्या सल्ल्यानें रामराजालाच गादीवर बसवण्याचें शाहूनें ठरवलें. संभाजीस सात बायका होत्या. त्यांपैकीं तोरगळच्या शिंद्यांच्या घराण्यापैकीं जिजाबाई (पाहा) ही कर्तृत्ववान् होती. हा गादीवर आल्यावर रामचंद्रपंत अमात्यानें राजनीतीवरील आपला 'आज्ञापत्र' हा ग्रंथ लिहिला. संभाजी वडगांवजवळच्या टापेनजीक माळावर मरण पावला (२० डिसेंबर, १७६०). तेथेंच संभापूर नांवाचें गांव वसवण्यांत आलें आहे.

**संभाव्यता**—(प्रॉबॅबिलिटी). पुढील गोष्टीविषयीं संभाव्यता म्हणजे ती गोष्ट घडून येईल कीं नाहीं याविषयींचा संभव होय. एखाद्या विधानाबद्दल संभाव्यता म्हणजे तें सत्य असण्याचा संभव होय. गणितशास्त्रांतील संभाव्यतेची उपपत्ति प्रथम १६५५ मध्यें मांडण्यांत आली. त्या वेळीं शेव्हालिए द मेरे यानें खेळांतील संभाव्यतेबद्दल कांहीं प्रश्न पास्कलला विचारल्यामुळें त्यानें या गोष्टीचा अभ्यास केला. यानंतर संभाव्यतेवर पास्कलबरोबर फरमॅट, हायगेन्स द मॉव्र आणि बर्नूली यांनीं १७ व्या व १८ व्या शतकामध्यें बराचसा अभ्यास केलेला आढळतो. परंतु या विषयावर अधिकृत ग्रंथ लाप्लास यानें १८१२ सालीं प्रसिद्ध केला. यानें असा सिद्धान्त मांडला कीं, जर एखादी गोष्ट अ मार्गांनीं संभाव्य असेल आणि ब मार्गांनीं नसेल, तर तिचें संभाव्यमान अ : अ + ब या प्रमाणांत राहील. जेव्हां संभाव्यतामान पूर्ण असेल तेव्हां या अपूर्णांकाची किंमत १ येईल. तसेंच प या संख्येनें जर एखादी गोष्ट घडून येण्याची अथवा एखादें विधान सत्य असण्याची संभाव्यता दाखविण्यांत येत असेल तर १ – प या संख्येनें ती गोष्ट न घडण्याचें किंवा तें विधान असत्य असण्याचें प्रमाण दाखविलें जाईल. या पहिल्या नियमावरून पास्कल यानें कांहीं संकीर्ण गोष्टींची संभाव्यता दाखविण्यासंबंधीं नियम शोधून काढले. (१) जर दोन निरनिराळ्या गोष्टींची संभाव्यता प आणि फ या संख्यांनीं दाखविण्यांत येत असेल व त्या गोष्टी परस्परविरुद्ध

असतील तर प + क ही त्या दोहोंपैकीं कोणती तरी एक गोष्ट घडून येण्याची संभाव्यता असेल. ( २ ) जर प आणि क या दोन स्वतंत्र गोष्टींची स्वतंत्रपणें संभाव्यता दाखविणाऱ्या संख्या असतील तर प × क ही त्या दोन्ही गोष्टी मिळून घडून येणारी संभाव्यता होय. जेव्हां एखाद्या गोष्टीची संभाव्यता प असून तिचा संबंध दुसऱ्या एखाद्या व संख्येशीं असेल तेव्हां प × व ही संभाव्यता त्या दोहोंचें एकत्र अस्तित्व असण्याची असूं शकते. उदा., एका भांड्यांत पांढऱ्या गोळ्यांची संख्या अ आणि काळ्या गोळ्यांची संख्या व असेल आणि पांढरी गोळी काढणाऱ्यास क रुपये बक्षीस मिळावयाचे असतील तर पांढरी गोळी निघण्याची संभाव्यता अक रुपये इतकी असूं शकते. गणितशास्त्रांतील 'संभाव्यतेच्या अ + ब उपपत्तीचा उपयोग एकाच तऱ्हेच्या स्वतंत्रपणे केलेल्या निरीक्षणावरून काढावयाच्या अनुमानामध्ये व त्यांत चूक होण्याचा संभव किती असतो हे काढण्यामध्ये करण्यांत येतो. तसेच निरनिराळ्या तऱ्हेच्या आंकड्यांवरून काढावयाच्या अनुमानामध्ये व विशेषतः विम्याच्या कामांत या उपपत्तीचा उपयोग बराच होतो. के. पियर्सन याने जीवशास्त्रामध्येंहि या उपपत्तीचा उपयोग केला आहे. तसेच पदार्थविज्ञानशास्त्राच्या उपपत्तीमध्येहि याचा उपयोग करण्यांत आला आहे.

**संभाव्यतावाद्**—( प्रॉबॅबिलिझम ). या सिद्धान्ताचा अर्थ असा कीं, मनुष्याला आपलें वर्तन ठरवतांना इतरांच्या संभाव्य मताचा मार्गदर्शक म्हणून उपयोग होईल, पण अधिकारी इसमांच्या मतांत ऐक्य नसेल तर सामान्य माणसानें आपल्या इच्छेला वाटेल त्या मतानुसार वर्तन करावें. या मताचा पुरस्कार प्रथम १६ व्या शतकांत डॉमिनिकन बार्थोलोमो डी मेडीना यानें स्पष्टपणें केला, आणि नंतर जेसुइट पंथीयांनीं त्याचा अंगीकार केला. पण पास्कलनें या मताचा अनिष्टपणा स्पष्टपणे पुढे मांडला.

**संभाव्य शक्ति**—( पोटेन्शिअल ). पदार्थविज्ञानशास्त्र व विद्युद्यंत्रशास्त्र यांमध्ये या संभाव्य शक्तीचे फार महत्त्व असते. जेव्हां एखादे द्रव्य किंवा एखादा विद्युद्भार किंवा एखादा चुंबकीय ध्रुव इत्यादीमध्यें गति उत्पन्न होण्याचा संभव असतो, तेव्हां ही गति उत्पन्न होण्याची जी प्रवृत्ति असते त्या प्रवृत्तीचे निरनिराळ्या बिंदूंशी जे प्रमाण असते त्यांतील बदलाचे जे प्रमाण असते त्यास संभाव्य शक्ति असें म्हणतात. या संभाव्य शक्तीची तुलना उष्णतावहनामधील उष्णमान किंवा तरल पदार्थामध्यें गति उत्पन्न झाली असतां त्यामुळे उत्पन्न होणारा दाब यांच्याशीं करतां येईल. संभाव्य शक्तीचे गुणधर्म आणि ती मोजण्याची रीति 'विद्युत्' या लेखामध्ये आढळेल.

**समंतभद्र**—एक जैन धर्मोपदेशक. हा दिगंबरपंथी जैन असून मूळ कर्नाटकांतील असावा. कर्नाटकांतील मणुवकहळ्ळी येथें याने तपश्चर्या केली, असें देवचंद्राच्या राजावली कथेंत म्हटले आहे. पाटलिपुत्र, माळवा, सिंध व पंजाब या देशांतील लोकांत जैन धर्माचा प्रसार केल्यानंतर हा दक्षिणेंत कांची येथें आला. व तेथून पुढे कर्नाटकांत गेला. कांचीपूरच्या शिवकोटी महाराजांना यानेच जैन धर्माची दीक्षा दिली होती. 'आप्तमीमांसा,' 'रत्नकरंडक' किंवा 'उपासकाध्ययन,' स्वयंभूस्तोत्र', 'चतुर्विंशतिजिनस्तुति' व 'युक्त्यनुशासन' हे याचे ग्रंथ होत. हा सातव्या शतकांत होऊन गेला.

**समतलीकरण**—( लेव्हलिंग ). एखाद्या जागेमध्यें जे उंचवटे वगैरे असतील त्यांची समपातळीपासून नक्की उंची मोजणें हें या क्रियेचे उद्दिष्ट आहे. या यंत्रास साधणी अथवा लेव्हल म्हणतात. या मोजणीच्या साधनांत एक दुर्बीण व एक पाणसळ ( लेव्हल बाटली ) एकमेकांत जोडून बसविलेल्या असतात. पण त्या पाहिजे तशा फिरविण्याची योजना केलेली असते. ज्या दोन ठिकाणची उंची मोजून पाहावयाची असेल त्या ठिकाणीं एक खुणा केलेली काठी उंचावर उभी करण्यांत येते व तीवर पाहणारा यंत्रांतून एका समपातळीवर पाहून समपातळींत येणाऱ्या बिंदूचा त्या ठिकाणचा आंकडा पाहतो व या दोन आंकड्यांमध्ये जें अंतर असेल ते त्या दोन ठिकाणच्या आंकड्यातील पातळींतील अंतर होय.

**समतावाद**—( कम्यूनिझम ). साम्यवाद. ही एक क्रांतिकारक चळवळ आहे. तिचा हेतु भांडवलशाही समाजव्यवस्था नष्ट करून, त्या जागीं कामगारांची व शेतकऱ्यांची हुकूमशाही सत्ता प्रस्थापित करणें हा आहे. खाजगी मालकीच्या विरुद्ध हा पक्ष आहे. अनेक वन्य जाती, धार्मिक संस्था, आणि सहकारी पद्धतीनें चालणारे संघ यांमध्ये या पक्षाचींच तत्त्वे अमलांत असतात. पण राजकीय चळवळ म्हणून मार्क्स आणि एंजल्स यांनीं १८४८ त या तत्त्वांचा जाहीरनामा काढला. यामुळे नवीन वारे उद्योगधंद्यांतून वाहूं लागले. या रीतीनें समाजाची घडी बसविण्याचें सारखे प्रतिपादन होऊं लागले. समाजसत्तावादाचा अनेक देशांत प्रसार झाल्यावर आंतरराष्ट्रीय समाजसत्तावादी पक्षामध्यें एक मवाळ व दुसरा आमूलाग्र क्रांतिकारक जहाल असे दोन उपपक्ष निर्माण झाले. या दुसऱ्या जहाल पक्षाने समतावादाचा पुरस्कार केला. १९०३ सालीं रशियांतील सोशॅलिस्ट पक्षांत बहुमतवाला जहाल पक्ष—बोल्शेव्हिक आणि दुसरा अल्पमतवाला मवाळ पक्ष—मेन्शेव्हिक असे दोन पक्ष निर्माण झाले. १९१७ सालीं रशियांत बोल्शेव्हिक पक्षानें राज्यसत्ता बळकावली. त्यांचा पुढारी लेनिन होता. बोल्शेव्हिक पक्षानें मेन्शेव्हिक व इतर अनेक विरोधी पक्षांबरोबर बराच काळ यादवी युद्ध करून ते पक्ष नामशेष केले. बोल्शेव्हिक सरकारनें सर्व कारखाने राष्ट्राच्या मालकीचे केले आणि देशांतील सर्व शेतजमीन गांवोगांवच्या

शेतकऱ्यांना समायिक हक्कानें वांटून दिली. लेनिननें आपल्या पक्षाचें बोल्शेव्हिक हें नांव बदलून 'कम्यूनिस्ट' हें नांव धारण केलें (बोल्शेव्हिझम पाहा). १९२० सालीं कम्यूनिस्ट अर्थात् थर्ड इंटरनॅशनल ही संस्था मॉस्को येथें स्थापन करण्यांत आली. कम्यूनिस्ट पक्षाचें ध्येय व धोरण मार्क्सच्या तत्त्वांची जरूर तितकी अवश्यावत् सुधारणा करून ठरवण्यांत आलें. कम्यूनिस्ट पक्षानें लोकशाही समाजसत्तावाद (डेमोक्रॅटिक सोशॅलिझम) या पक्षाला विरोध केला. कारण, समाजसत्तावादी लोकशाही ही वस्तुतः भांडवलवाल्यांचीच हुकूमशाही आहे, असें कम्यूनिस्ट पक्ष प्रतिपादन करूं लागला आणि भांडवलशाही नष्ट करण्याकरितां अत्याचारी मार्गांनीं आमूलाग्र क्रांति केली पाहिजे, असें कम्यूनिस्ट पक्षाचें मत असल्यामुळें यादवी युद्ध आणि अखेर कामगार वर्गाची हुकूमशाही राजसत्ता रशियांत प्रस्थापित झाली. रशियन राज्यक्रांति व सोव्हिएट युनियन हे दोन नमुने कम्यूनिस्ट लोकांनीं जगांतील सर्व देशांत क्रांति घडवून आणण्याकरितां आपल्यापुढें ठेवले.

रशियांत कम्यूनिझमच्या अमदानीचे पांच कालखंड पडतात: पहिल्या कालखंडांत (१९१७ ते १९२३) लेनिनच्या नेतृत्वाखालीं कम्यूनिस्ट पक्षानें रशियांतील राजसत्ता आपल्या हातीं घेतली. चार वर्षे यादवी युद्ध चालू ठेवून सर्व विरोधी पक्ष नामशेष केले आणि इतर देशांत कम्यूनिस्ट क्रांति घडवून आणण्याचे प्रयत्न केले.

लेनिन १९२४ सालीं निधन पावल्यावर स्टॅलिनच्या नेतृत्वाखालीं कम्यूनिस्ट सत्तेचा दुसरा कालखंड (१९२४ ते १९२७) चालू झाला. स्टॅलिननें फक्त रशियांत समतावादी क्रांति व तदनुसार रशियाची सर्वांगीण सुधारणा एवढाच मर्यादित कार्यक्रम अंगीकारला. उलटपक्षीं, स्टॅलिनचा प्रतिस्पर्धी ट्रॉट्स्की यानें जगांतील इतर देशांतहि कम्यूनिस्ट क्रांति घडवून आणण्याच्या कार्याचा पुरस्कार केला. या दोघां पुढाऱ्यांच्या स्पर्धेंत अखेर स्टॅलिनचीं मतें रशियांत ग्राह्य होऊन ट्रॉट्स्कीला हद्दपार करण्यांत आलें. त्यामुळें इतर देशांतील कम्यूनिस्ट पक्षहि कमजोर झाले.

याप्रमाणें स्टॅलिन एकमेव सत्ताधारी बनल्यावर तिसऱ्या कालखंडांत (१९२७ ते १९३५) स्टॅलिननें आपलें सर्व लक्ष रशियाची सर्वांगीण सुधारणा करण्याकडे लावलें. त्यानें एक पंचवार्षिक योजना आंखली आणि रशियांतील सर्व पडीक जमीन लागवडींत आणली आणि पक्का माल बनवणाऱ्या कारखान्यांची पुष्कळ वाढ केली. इतर देशांतील कम्यूनिस्ट पक्षाकडे स्टॅलिननें दुर्लक्ष केल्यामुळें रशियाखेरीज इतर कोणत्याहि देशांत कम्यूनिस्ट क्रांति झाली नाहीं. इतर अनेक देशांत कम्यूनिस्ट पक्ष मवाळ सोशॅलिस्टांना फॅसिस्ट मताचे व आपले कट्टर शत्रु असे संबोधूं लागले व त्यांना विरोध करण्याचें कार्य यावच्छक्य करीत राहिले. स्टॅलिनची पंचवार्षिक योजना अत्यंत यशस्वी झाल्यामुळें रशियांत व इतर देशांतहि स्टॅलिनचा लौकिक फार वाढला. पण याच सुमारास जर्मनीमध्यें नाझिझमचा पुढारी हिटलर आणि इटलीमध्यें फॅसिझमचा पुढारी मुसोलिनी हे सर्वाधिकारी बनले आणि त्यांनीं आपापल्या देशांत कम्यूनिस्ट पक्ष चिरडून टाकला.

चौथ्या कालखंडांत (१९३५ ते १९३८) नाझिझम व फॅसिझम यांना तोंड देण्याकरितां स्टॅलिननें 'पॉप्युलर फ्रंट' (लोकांची आघाडी) या नांवाचें नवें धोरण स्वीकारलें आणि सोशॅलिस्ट पक्ष व इतर लोकशाही पक्ष यांच्याशीं सहकारिता करून नाझी पक्षाच्या आणि फॅसिस्ट पक्षाच्या सत्तेला विरोध सुरू केला. फ्रान्समध्यें १९३६ सालीं पॉप्युलर फ्रंट पक्षाचें सरकार म्हणजे संयुक्त मंत्रिमंडळ अधिकारारूढ झालें; आणि लवकरच स्पेनमध्यें तशाच प्रकारचें सरकार प्रस्थापित झालें. रशियांतहि लोकशाही राज्यपद्धतींतील पार्लमेंटरी राज्यघटना सोव्हिएट राज्यपद्धतीऐवजीं स्थापन करण्यांत आली. स्टॅलिनला या कामीं ज्यांनीं विरोध केला त्यांच्यावर राजद्रोहाचे आरोप ठेवून त्यांना फांशीची शिक्षा देण्यांत आली. हे खटले 'मॉस्को ट्रायल्स' या नांवानें प्रसिद्ध आहेत. पॉप्युलर फ्रंट योजनेचें संयुक्त मंत्रिमंडळ फ्रान्स व स्पेन या दोन्ही देशांत अयशस्वी होऊन तें १९३८ सालीं रद्द करण्यांत आलें.

कम्यूनिझमच्या पांचव्या कालखंडाला आरंभ दुसरें महायुद्ध सुरू झालें तेव्हांपासून होतो (१९३९ ते १९४५). या काळांत महायुद्धाच्या आरंभीं सोव्हिएट रशियानें नाझी जर्मनीबरोबर दोस्तीचा तह केला, त्यामुळें राजकारणांत मोठी चमत्कारिक स्थिति निर्माण झाली. दोस्त राष्ट्रांतले कम्यूनिस्ट पक्ष त्या त्या सरकारनें दडपून टाकले. फक्त चीनमध्यें कम्यूनिस्ट पक्षानें चंग-कै-शेक याच्याबरोबर सहकार्य करून जपानविरुद्ध भाग घेतला. इंग्लंडांत कम्यूनिस्ट पक्ष संख्येनें फारच अल्प होता व त्या पक्षाचा फक्त एकच सभासद ओ. डी. गॅलाचेर हा पार्लमेंटांत निवडून आला होता.

स्टॅलिननें जर्मनीशीं दोस्ती केल्यामुळें ट्रॉट्स्कीच्या पक्षाला पुन्हां जोर चढला आणि त्यानें लेनिनचीं तत्त्वें पुन्हां अमलांत आणण्याचा प्रयत्न सुरू केला आणि स्टॅलिनवर फितुरीचा आरोप केला; पण स्टॅलिन हा सर्वांना पुरून उरला. व त्यानें दुसरें महायुद्ध जिंकल्यामुळें तर कम्यूनिझमला जोर चढला. पूर्व युरोप खंडांत त्याचा मोठा पगडा बसला आहे.

आज समतावाद महायुद्धानंतर पूर्व युरोप आणि पूर्व आशिया यांत पसरलेला दिसेल. चीन तर पूर्ण साम्यवादी बनलें. इंडोचीन त्याच मार्गावर आहे. हिंदुस्थानांत कम्यूनिस्ट लोकांचीं गुप्त घातपाती कृत्यें चाललेलीं दिसतात. सरकार त्यांना दडपीत आहे खरें, पण त्यांच्यांतहि विशेष समाजहितैषी तत्त्वनिष्ठा दिसत नाहीं.

**समन्याय**—( इक्विटी ). या संज्ञेचा अर्थ कायदेशीर नव्हे, पण निसर्गप्रमाणें असणारा नैतिक हक्क किंवा न्याय असा आहे. 'इक्विटी' न्यायदान-पद्धति आणि इक्विटी कोर्टें हें इंग्लंडांतील न्यायदानपद्धतींतलें एक वैशिष्ट्य आहे. इंग्लंडमध्यें मिळकतीचा ट्रस्ट करण्याची पद्धति सुरू झाली आणि ट्रस्ट स्वरूपाच्या दस्त-ऐवजांतील मजकुरांतून अनेक कायद्याचे प्रश्न उपस्थित होऊं लागले. परंतु ट्रस्ट स्वरूपाचे हे व्यवहार जुन्या 'कॉमन लॉ' कायद्याला अज्ञात असल्यामुळें 'कॉमन लॉ' कोर्टांत ट्रस्टविषयक दावे लावतां येत नसत. पण हा अन्याय आहे, हें जाणून अशा प्रकारचे दावे इंग्लंडच्या राजाचा मंत्री–चॅन्सेलर हा अधिकारी चालवूं लागला. आणि नंतर 'कोर्ट ऑफ चॅन्सरी' असें स्वतंत्र कोर्ट स्थापण्यांत आलें. पुढें १८७३ सालीं एकंदर इंग्लिश न्यायदानपद्धतींत आमूलाग्र सुधारणा करणारा 'ज्युडीकेचर ॲक्ट' तयार झाला, आणि इंग्लंडांतील 'हायकोर्ट ऑफ जस्टिस' या मुख्य न्यायालयाचा 'चॅन्सरी डिव्हिजन' हा एक विभाग बनविण्यांत आला.

**समन्स**—न्यायालयाचें पाचारण. कायद्यांत या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, दिवाणी कोर्टांत दाव्यांतील प्रतिवादीला त्या दाव्यांत हजर होऊन काम चालविण्याबद्दल जो लेखी हुकूम बजावतात तो. फौजदारी खटल्यांतहि कांहीं हलक्या गुन्ह्यांतील आरोपींना कोर्टांत हजर होण्याबद्दल प्रथम समन्स बजावतात, आणि समन्स न मानलें तर पकड वॉरंट काढतात. दिवाणी कोर्टांतील प्रतिवादीच्या समन्सांत सर्व प्रतिवादींचीं नांवें आणि तें समन्स ज्याला लागू करावयाचें त्या प्रतिवादीचें पूर्ण नांव व पत्ता, कोर्टांत हजर होण्याची तारीख, आणि वादीनें जो दावा केला असेल त्याची अस्सल बरहुकूम नक्कल असावी लागते. हें समन्स प्रतिवादीवर प्रत्यक्ष बजावावें लागतें. परंतु प्रतिवादी जाणूनसवरून समन्स घेण्याची टाळाटाळ करीत असेल तर इतर रीतीनें समन्साची बजावणी करावी असा हुकूम कोर्ट देतें.

**समभाररेषा**—( आयसोबार्स ). विशिष्ट वेळीं किंवा विशिष्ट काळांत ज्या स्थळीं हवेचा दाब सारखा आहे, त्या स्थळांना जोडणाऱ्या रेषा. अशा रेषा हवामान-नकाशांत दाखविलेल्या असतात. समोष्णरेषांशीं समभाररेषा साधारणपणें समांतर असतात असें दिसून येतें. हवेच्या दाबाचा चढउतार या रेषांचें निकटवर्तित्व किंवा दूरवर्तित्व यावरून कळून येतो. समभाररेषा जवळ जवळ असतील तर चक्रवात किंवा आवर्त वारे व रेषा दूर असल्यावर प्रतिचक्रवात किंवा व्यावर्त वारे वाहताहेत, असें समजावें.

**समरकंद**—मध्य आशिया, तुर्कोमन सोशियालिस्ट सोव्हिएट प्रजासत्ताक राज्यांतील एक शहर. हें झेराफशान दरींत असून येथून पश्चिमेस बुखारा १५६ मैलांवर आहे. हें शहर फार प्राचीन आहे. खि. पू. ३२९ मध्यें अलेक्झांडरनें याचा विध्वंस केला. नंतर पुन्हां इ. स. ७११–१२ मध्यें विध्वंस झाला. सामानिद राज्यांच्या अमदानींत हें पुन्हां भरभराटीस आलें. पण १२२१ त चेंगीझखानानें हें जाळलें. तैमूरलंगाचें येथें वास्तव्य असे. त्याचें हें राजधानीचें शहर असून याला फार महत्त्व होतें. १८६८ मध्यें हें रशियाच्या सत्तेखालीं आल्यानंतर यांत अन्याच सुधारणा झाल्या; पाटबंधाऱ्यांचें पाणी खेळूं लागलें व ट्रॅन्सकास्पियन रेल्वेचें स्टेशन बनलें. येथें १६ व्या शतकापासूनचीं विद्यालयें आहेत. लो. सं. ( १९३९ ) १,३४,३४६.

**समरसिंह गुहिलोत** ( राज्य. १२७३–१३०१ )—मेवाडचा एक राणा. मेवाडच्या तेजसिंहानंतर त्याचा हा पुत्र त्याच्या गादीवर आला. अबूच्या शिलालेखांवरून असें दिसतें कीं, यानें मुसलमानी आक्रमणापासून गुजरायचें संरक्षण केलें. दिल्लीच्या घियासुद्दिन बल्बन या सुलतानच्या सेनापतीनें सन १२६६ ते १२८७ या मुदतींत गुजराथवर केलेली स्वारी ती हीच असावी. यानंतर सन १२९९ मध्यें कर्णदेवाचा मंत्री माधव याच्या प्रेरणेनें अल्लाउद्दिनाचा धाकटा भाऊ उलुखान ( उलगखान ) यानें गुजराथवर आक्रमण झालें. त्या वेळींहि यानें दंड भरून मेवाडचें संरक्षण केलें. अंचलगच्छाचे आचार्य अमितसिंहसूरि यांच्या आदेशानुसार यानें आपल्या राज्यांत जीवहिंसेला मनाई केली होती. याची आई जयतल्लदेवी हिची जैन धर्मावर श्रद्धा होती. नेपाळच्या राजघराण्याचा मूळ पुरुष म्हणजे याचा दुसरा पुत्र कुंभकर्ण हा असावा.

**समशेरबहादर**—१. ( १७३४–१७६१ )—हा पहिल्या बाजीरावापासून मस्तानीस झालेला मुलगा. त्याचें लग्न ता. १८ ऑक्टोबर स. १७५३ रोजीं झालें. निंबगिरीकराची मेहेरबाई ही बायको केली. समशेरबहादर हा पुढें पेशव्यांच्या फौजेंत खासा सरदार असे, आणि शौर्याबद्दल त्याचा लौकिक होता. मेहेरबाईच्या पोटीं त्यास अलीबहादर नांवाचा एक पुत्र झाला होता. समशेरबहादरला पेशव्यांबद्दल मोठी निष्ठा असे. तो मुसलमान असतांनाहि पत्रांवर 'पांडुरंग' असें हातानें लिही. 'बलाळचरणीं तत्पर समशेर बाहादर निरंतर' हीं त्याच्या मुद्रेवर अक्षरें असत. हा शूर असून मोहिमांवर जात असे. प्रसिद्ध पानपतच्या मोहिमेंत हा होता व त्यांतच गारद झाला.

२. अलीबहादरचा मुलगा व पहिल्या समशेरबहादरचा नातू. यास इंग्रज सरकारनें दरसाल चार लाखांचा तनखा करून देऊन त्याचें बांद्याचें राज्य स. १८०४ त खालसा केलें. हा समशेरबहादर स. १८२३ त मरण पावला. याच्या मृत्यूनंतर याचा भाऊ झुल्फिकारअल्ली बांद्याचा नबाब झाला, पण तोहि त्याच सालीं वारला. त्याचा मुलगा अलीबहादर नबाबगिरीवर असतां सत्तावन सालचें

चंड झालें. त्या गडबडींत बांधाचा उत्कृष्ट शृंगारलेला वाडा व जडजवाहिर सगळें जळून गेलें. त्यानंतर इंग्रजांनीं बांदा शहर आपल्या कबजांत घेऊन नबाबास ३९,००० रुपयांची नेमणूक देऊन आपल्या नजरेखालीं इंदूरास ठेविलें. बांदा येथें जी नबाबाची मशीद आहे ती या नबाबांच्या वैभवाची साक्ष देते. अलीबहादूर स. १८७३ च्या ऑगस्टांत मरण पावला. तेव्हां त्याच्या कुटुंबास बारा हजार रुपयांची नेमणूक देण्यांत आली. बांदा पाहा.

**समस्तरत्व**—(आयसोस्टसी). हा एक भूस्तरशास्त्रीय सिद्धान्त आहे. लंबकाच्या साहाय्यानें गुरुत्वाकर्षणाचें मापन करीत असतां असें आढळून येतें कीं, समुद्राच्या तळाशीं गुरुत्वाकर्षणशक्ति अधिक असते. व उंच पर्वताच्या खालीं गुरुत्वाकर्षणाची शक्ति कमी असते. यावरून पर्वतांचे पाये अथवा मुळें हीं हलक्या पदार्थांचीं बनलेलीं असावींत व समुद्राच्या तळाशीं अधिक जड अथवा घनपदार्थ असावेत, असें अनुमान काढण्यांत आलें. यामुळेंच भूखंडाच्या जमिनीखालील बाजूवर जो दाब पडतो त्यामुळें भूखंड हे समुद्रसपाटीच्या वरच्या पातळींत तोलून धरले जातात असें सिद्ध होतें. परंतु उंच पृष्ठभागावर पाणी पडून तो भाग झिजून समुद्रामध्यें वाहत जातो त्यामुळें भूखंडाचें वजन कमी होऊन तें वर उचललें जातें व याप्रमाणें समुद्र व पर्वत किंवा जमीन यांमधील हा तोल संभाळला जातो व यामुळें जमिनीचा पृष्ठभाग नेहमीं वर तोलून धरला जाऊन उंचावर राहतो.

**समस्थानीय द्रव्य**—(आयसोटोप्स). कांहीं मूलद्रव्यांचे परमाणुभारांक निरनिराळे असतात. परंतु परमाणुसंख्या एकच असून त्यांचें आवृत्तिक्रमाच्या कोष्टकांत एकच स्थान असतें. सर ई. रुदरफोर्ड यानें परिणत केलेल्या अर्वाचीन उपपत्तिप्रमाणें प्रत्येक परमाणु हा कांहीं धनविद्युद्भारयुक्त प्रोताणू (प्रोटॉन्स) आणि तितकेच ऋणविद्युद्भारयुक्त विद्युत्कण (इलेक्ट्रॉन्स) यांचा मिळून बनलेला असतो. या परमाणूंतील बहुतेक सर्व द्रव्य धनविद्युद्भारयुक्त असून तें अत्यंत सूक्ष्म अशा आकाराच्या एका केंद्रामध्यें जमलेलें असतें व त्याचा ऋणविद्युद्भाराशीं निकट संबंध होत असतो. फक्त जे विद्युत्कण या केंद्राच्या बाहेर असतात तेच फक्त रासायनिक क्रियेंत भाग घेतात. असे जे बाहेर असणारे विद्युत्कण किंवा केंद्रामध्यें असणारे धनविद्युद्भार-कण असतात त्यांवरून परमाणुसंख्या निश्चित होते. यावरून एकच परमाणुसंख्या असलेलीं मूलद्रव्यें रासायनिक दृष्ट्या सारखींच असलीं पाहिजेत व ज्या मूलद्रव्यांमध्यें असलेल्या प्रोताणूंची संख्या सारखी असेल त्या मूलद्रव्यांचा परमाणुभारांक एकच असला पाहिजे, असें सिद्ध होतें. जर एखाद्या मूलद्रव्यांतील एक प्रोताणु आणि एक विद्युत्कण कमी झाला तर त्याचा परमाणुभारांक एक या संख्येनें कमी होईल; परंतु त्यांतील परमाणूंची संख्या आणि त्याचे रासायनिक गुणधर्म बदलणार नाहींत. हें नवीन बनलेलें मूलद्रव्य जुन्या मूलद्रव्याचेंच समस्थानीय मूलद्रव्य होईल. ही उपपत्ति दुसऱ्या दोन मार्गांनीं मुख्यतः सिद्ध करण्यांत आली आहे.

पहिली पद्धत म्हणजे किरणविसर्जक पदार्थांच्या गुणधर्मांवरून सिद्ध करण्याची पद्धत होय. उदा., प्रयोग करून असें पूर्णपणें सिद्ध करण्यांत आलें आहे कीं, युरेनियम मालिकेच्या अखेरचा पदार्थ हा रासायनिक दृष्ट्या शिशाशीं पूर्णपणें एकरूप असतो. परंतु त्याचा परमाणुभारांक २०६ असतो. दुसऱ्या पद्धतीमध्यें एफ्. डब्ल्यू. ॲस्टन यानें एका विद्युच्चुंबकीय वर्णपटलेखकासारख्या एका उपकरणाच्या साहाय्यानें प्रयोग करून हीच गोष्ट सिद्ध केली आहे. ॲस्टन यानें अनेक मूलद्रव्यांचें विशेषतः अधातु मूलद्रव्यांचे या प्रोताणूंच्या उपपत्तीस अनुसरून संशोधन केलें आहे. त्यानें केलेल्या प्रयोगांत त्याला असें दिसून आलें कीं, मूलद्रव्यास अंगतः परमाणुभार असतो किंवा तें मूलद्रव्य अंगतः परमाणुभार असलेल्या दोन किंवा अधिक मूलद्रव्यांपासून बनलेलें असतें. अर्थात् या दुसऱ्या प्रकारामध्यें रासायनिक परमाणुभार हा केवळ त्याच्या श्रेणींतील स्थानावरून ठरलेला सरासरी भार असतो. क्लोरिनच्या वर्णपटामध्यें ३५-३६-३७-३८ या स्थानीं असलेल्या मूलद्रव्यांच्या वर्णपटास अनुसरून रेषा दिसून येतात. त्यांतील ३५ आणि ३७ या स्थानच्या रेषा वास्तविक क्लोरिनच्या असतात. ३५.४६ या ठिकाणीं मुळींच रेषेचें चिन्ह आढळत नाहीं. ॲस्टन यास असें आढळून आलें आहे कीं, कांहीं मूलद्रव्यें एकाकीच असतात व कांहीं मूलद्रव्यांस ७ पासून ८ पर्यंत देखील समस्थानीय मूलद्रव्यगण असतात. बर्लिन येथील मायथे या शास्त्रज्ञानें १९२४ मध्यें पाऱ्याचें परिवर्तन फार सूक्ष्म अंशानें का होईना पण सोन्यामध्यें केल्याबद्दल जी माहिती दिली आहे ती गोष्ट या उपपत्तीवरून शक्य दिसते. पाऱ्याच्या केंद्रामध्यें (परमाणुसंख्या ८०) जर एक विद्युत्कण घातला तर त्याचें रूपांतर एखाद्या सोन्याच्या समस्थानीय मूलद्रव्यामध्यें (परमाणुसंख्या ७९) होऊं शकेल. परंतु प्रत्यक्ष असें रूपांतर झालें असावें ही गोष्ट जवळजवळ अशक्य वाटते.

**समाकलन**—(टायट्रेशन). रासायनिक परीक्षणांतील एक रीत. ज्ञात विद्रावाच्या साहाय्यानें अज्ञात विद्रावाचें ज्ञान या पद्धतीमुळें होतें. अज्ञात विद्राव कांचेच्या पेल्यांत घेऊन त्यांत ज्ञात विद्राव वरून नळीनें सोडतात. त्या दोन विद्रावांच्या क्रियेचा शेवट, रंगाच्या बदलण्यावरून समजतो.

**समाकृतिकत्व**—(आयसोमॉर्फिझम). समान रासायनिक सारिणीच्या पदार्थांचें एकरूप स्फटिकरूप असणें. एक सारिणी असलेल्या पदार्थांपैकीं एकाचे स्फटिक दुसऱ्याच्या विद्रावांत

घातले असतांहि आकारानें वाढूं लागतात. उदा., तुरटीचे स्फटिक लोहिक स्फटिका(फेरिक ॲलम )च्या विद्रावांत सोडले तर त्यांवर त्याचा थर बसून ते आकारानें वाढूं लागतात.

**समाज-लोकसत्तावादी**—( सोशल डेमोक्रॅट ). युरोपांतील अनेक देशांत '.सोशल डेमोक्रॅट ' या शब्दाचा अर्थ समाजसत्तावादी राजकीय कार्यकर्ते असा आहे. हा पक्ष प्रथम १८६९ सालीं स्थापन झाला. त्या वेळीं तो क्रांतिवादाचा पुरस्कर्ता होता. परंतु १८९० पासून बहुतेक देशांतले समाजसत्तावादी पुढारी राजकीय सुधारणावादी ( रिफॉर्मिस्ट ) बनले. म्हणजे समाजसत्तावादाप्रमाणें सुधारणा सनदशीर मार्गानेंच पण लोकशाही सरकारमार्फत कायदे करून घडवून आणाव्या, या मताचा पुरस्कार करूं लागले. या मताचे अनेक देशांतले पुढारी १८८९ सालीं 'सेकंड इंटरनॅशनल ' या संस्थेंत एकत्र झाले. तथापि लवकरच त्या पुढाऱ्यांत दोन गट निर्माण होऊन सुधारणावादी पुढारी 'सेकंड इंटर-नॅशनल ' या संस्थेस चिकटून राहिले; आणि क्रांतिवादी पुढाऱ्यांनीं आपली 'थर्ड इंटर-नॅशनल ' ही स्वतंत्र संस्था १९१९ सालीं काढली.

इंग्लंडांत १८८० सालीं स्थापन झालेली 'डेमोक्रॅटिक फेडरेशन ' ही संस्था १८८३ सालीं 'सोशल डेमोक्रॅटिक फेडरेशन ' या नांवानें काम करूं लागली. १८८४ सालीं विल्यम मॉरिस व एच्. एम्. हिंडमन हे दोघे फेडरेशनमधून फुटून निघाले; पण हिंडमन पुन्हां त्यामध्यें सामील झाला. १८९३ सालीं केर हार्डी व आणखी कांहीं पुढारी फेडरेशन संस्था सोडून 'इंडिपेंडंट लेबर पार्टी ' ( स्वतंत्र मजूरपक्ष ) या नांवाची नवी संस्था स्थापून स्वतंत्र बनले. सोशल डेमोक्रॅटिक फेडरेशननें १९१२ सालीं कित्येक लहान लहान संस्था आपल्यांत सामील करून 'ब्रिटिश सोशॅलिस्ट पार्टी ' हें नांव धारण केले व या संस्थेने १९१४ च्या महायुद्धांत इंग्लंडनें सामील होऊं नये, असे प्रतिपादन सुरू केलें; म्हणून हिंडमन व आणखी थोडे पुढारी फुटून निघून त्यांनीं 'नॅशनल सोशॅलिस्ट पार्टी ' स्थापली. अलीकडे ब्रिटिश सोशॅलिस्ट पार्टी ही संस्था ग्रेट ब्रिटनची कम्यूनिस्ट पार्टी या संस्थेंत विलीन झाली आहे.

**समाजशास्त्र**—( सोशॉलॉजी ). समाजासंबंधींच्या सर्वांगीण अभ्यासाला हा शब्द लावतात. अर्वाचीन समाजाचा इतिहास व आजच्या सामाजिक घटनांचा वृत्तान्त आणि वर्गीकरण यांवर आधारलेलें हें शास्त्र असल्याने, इतिहास, अर्थशास्त्र, न्यायशास्त्र आणि राज्यशास्त्र हीं मिळून होणारी जी मानवी संस्कृति तिची सामान्य प्रगति या अभ्यासाचा विषय होऊन बसतो. समाजांतील घटकांच्या ऐतिहासिक आणि मानसशास्त्रीय अभ्यासावरून आंकडेशास्त्राच्या साहाय्यानें निष्कर्ष काढावे लागतात. व ते इतर समाजाशीं पडताळून पाहावे लागतात.

प्राचीन ग्रीक पंडितांनीं इतर शास्त्रांप्रमाणें याहि शास्त्रास हात घातला होता, पण तो राज्यशासनाच्या दृष्टीनेंच होय. हर्बर्ट स्पेन्सरनें व्यक्ति आणि समाज यांचे संबंध व त्यांचें सरकारशीं नातें या विषयाचा उत्कृष्ट ऊहापोह केला. तथापि बेंजामिन किड यानेंच प्रथम या शास्त्राचा पद्धतशीर पाया घातला असें म्हणावें लागेल. समाजशास्त्र हें सर्व सामाजिक शास्त्रांच्या गुरुस्थानीं आहे. त्यांच्या निष्कर्षांचे परस्पर संबंध समजण्यास समाजशास्त्राच्या सिद्धान्तांचें साहाय्य घ्यावें लागतें. आज या शास्त्रावर बरेंच वाङ्मय उपलब्ध आहे.

मानवानें आपल्या ज्ञानांतील उन्नतीच्या दृष्टीनें जुन्या गोष्टींचा अभ्यास करण्यासाठीं जे एक नवीन शास्त्र तयार केलें, जीवनक्रमाचा शास्त्रशुद्ध अभ्यास होण्यासाठीं समाजरचनाशास्त्र म्हणून जें शास्त्र बनवलें तेंच हें समाजशास्त्र होय.

*समाज ही खरीखुरी अस्तित्वांत असलेली गोष्ट असून मानवी* जीवनक्रमांत या संस्थेला फार महत्त्वाचें स्थान आहे. हें स्थान प्रत्यक्ष जड वस्तूंच्या स्वरूपांत दाखवतां आलें नाहीं तरी त्याचा संबंध आणि त्याचा जोर फार विलक्षण आहे. गुरुत्वाकर्षण जसें दाखवतां येत नाहीं, परंतु त्याशिवाय जड वस्तू नियमबद्ध रीतीनें बांधल्याच गेलेल्या नाहींत, तीच स्थिति समाजशास्त्राची आहे.

( १ ) एकत्र वास्तव्य करण्याची मानवी प्रवृत्ति, ( २ ) एकच आवडीनिवडी म्हणून आणि विशिष्ट प्रकारच्या फायद्यासाठीं एकत्र आलेले लोक, व ( ३ ) सामुदायिक पद्धतींत एकमेकांत चाललेली देवाण-घेवाण, या तीन मूलभूत तत्त्वांवर समाज उभा राहिलेला आहे. यांपैकीं पहिल्या दोहोंचें स्वरूप कदाचित् फारसें शाश्वत असूं शकणार नाहीं, परंतु तिसऱ्याचें स्वरूप मात्र शाश्वत आहे. आणि तिसऱ्याचे स्वरूप म्हणजेच अर्थशास्त्र असून त्या अर्थशास्त्राची उभारणी भूगोलावर मानवी प्राणी भूगोलाची सत्यकथा बनवीत असतांना झाली आहे. मूळचा रानटी मानव, टोळ्यांनीं राहणारा मानव, कुटुंब करून राहणारा मानव, खेड्यांच्या स्वरूपांत कुटुंबाची वसाहत करून राहणारा मानव, खेड्यांचीं शहरांत रूपांतरें करून त्यांत राहिलेला मानव, या सर्व स्वरूपांत रानटी अवस्थेंतून प्रगतीला पोंचलेला मानवप्राणी समाजशास्त्राच्या नियमांनीं बद्ध झालेला आहे.

मानवी प्राण्याला समूहात्मक जीवन ( ग्रूप लाइफ ) बनविण्यासाठीं मूलभूत गोष्टी कोणत्या लागतात, तसेच त्या कशा बनवल्या आहेत, त्यांत कसा बदल होतो, कांहीं समाज संपूर्ण कसे बनतात, वगैरे गोष्टींचा समावेश समाजशास्त्रांत होतो. समाज काय करतो, त्याच्या चालीरीती काय आहेत, धर्म कोणचा आहे, राहणी कशी आहे, वगैरे सर्व प्रश्नांचा विचार या शास्त्राच्या अभ्यासांत करावा लागतो. त्याचप्रमाणें कांहीं जुन्या चालीरीती

टाकून देऊन नवीन चालीरीती कां अमलांत आणल्या, यांचींहि कारणें शोधावीं लागतात. ऑस्ट्रेलियांत रानटी अवस्थेंत असलेले लोक अगदीं लहान मुलांचे दांत कानशीनें थापून काढतात. आफ्रिकेंतील लोकांची सौंदर्याची कल्पना म्हणजे ओठांना भोंक पाडून त्यांत लांकडाच्या मोठमोठ्या कांब्यांचे तुकडे अडकवून तीं भोंकें रुंदावणें आणि ओठ लोंबते करणें ही प्रथा आहे. बोर्निओ-मधील रानटी टोळ्या माणसाला ठार मारण्यांत आनंद मानतात. तर कांहीं ठिकाणीं नरमांसभक्षक रानटी टोळ्याहि आहेत.

या निरनिराळ्या टोळ्यांतून म्हणजेच या निरनिराळ्या समाजां-तून या चाली कां आहेत, तसेंच जादूटोणा, शकुन, वगैरे गोष्टींवरहि कांहीं समाजांचा विश्वास कसा असतो, वगैरे प्रश्नांचा समाजशास्त्रानें अभ्यास करावयाचा आहे. त्याचप्रमाणें आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे समाजांतील घटकांची अंधानुकरणाची प्रवृत्ति. आणि हें अंधानुकरण विशेषतः पुढाऱ्यांची नक्कल करण्याच्या बाबतींतच जास्त दिसून येतें. मग तो पुढारी राष्ट्राचा असला तर सर्व राष्ट्रभर त्याची नक्कल होऊं लागते. एखाद्या लहान समाजांतला असला तर तो समाज त्याची नक्कल करतो, आणि टोळींतला असला तर ती टोळी त्याची नक्कल करते; आणि ही अनुकरणाची प्रवृत्ति हा एक समाजशास्त्रांतील महत्त्वाचा मूलभूत घटक आहे.

या शास्त्राचा आणखी एक प्रश्न म्हणजे निरनिराळ्या समाजां-तून मतभेदानें तेढी निर्माण होतात. आणि त्यांतून कित्येक वेळां यादवी युद्धें अगर कित्येक वेळां गोड संमीलनेंहि झालेलीं दृष्टीस पडतात. उदाहरणार्थ, हिंदुस्थानांत द्रविड आणि आर्य एकमेकांत पूर्ण मिसळले गेले. पण हिंदू आणि मुसलमान वेगवेगळे राहिले. लढाई, अत्याचार, गुलामगिरी आणि जातीयतेची जाणीव हे सर्व प्रश्न समाजशास्त्राचा अभ्यास करण्याचे प्रश्न होत.

मानवाच्या विवक्षित समाजाच्या हालचालींचें वैशिष्ट्य आणि समाजरचनेनें बंदिस्त असलेलें जीवन हीच मानवाची संस्कृति होय. आणि एकदां शास्त्राचे नियम ठरवले गेल्यानंतर तेच नियम या विषयाला लावणें जरूर आहे. हिंदू, चिनी, वगैरे लोकांची संस्कृति विकासतत्त्वावर अधिष्ठित झालेली आहे. मानव रानटी राहणीपासून आजच्या राहणीपर्यंत येऊन पोहोंचला आहे. आणि तो तसा येत असतांना संक्रमणावस्थेंत ठिकठिकाणच्या नैसर्गिक परिस्थितीशीं त्याला झगडा करावा लागला आणि त्या झगड्यांत त्यानें आपलें अन्न, घरें, राहणी, वगैरे गोष्टी त्या त्या कटिबंधांतील हवामानाप्रमाणें केल्या, हें भूगोलाचें मूलभूत तत्त्व विसरून चालणार नाहीं. आणि संस्कृतींतील फरक म्हणजे इतका कीं, सुधारत जातांना त्यानें जीं साधनें मिळवलीं, वापरलीं आणि निर्माण केलीं त्यांतील फरक होय.

मुंग्या, मधमाश्या आणि अशाच तऱ्हेच्या कीटकवर्गांतसुद्धां विशिष्ट प्रकारची समाजरचना आढळते आणि त्यांमध्यें आणि मानवामध्यें फरक एवढाच कीं, त्या ठराविक रचनेंत सामील होण्याचे गुण त्यांच्या उत्पत्तीबरोबरच येतात आणि मानवाच्या पाठीमागें प्रचंड इतिहास भरलेला आहे. मानवांचे समाज हे एकाच इतिहासाचे वारसदार आहेत. आणि त्यांची संस्कृति हजारों वर्षें चालत आलेली आहे. आणि पुढेंहि संगोपन, भौतिकशास्त्रांची मानवी सुखासाठीं वाढ, वगैरे गोष्टींनीं करून घेऊन पुढील पिढीची तरतूद मानवांचे समाज करीत आहेत. बाह्य परिस्थितींत वरचेवर बदल करणें ही एक मानवाची नैसर्गिक प्रवृत्ति आहे. त्याला वरचेवर रुचिवैचित्र्य अथवा रुचिपालट लागतो आणि त्याची आवड बदलत जाते तसा समाज बदलल्या-शिवाय राहत नाहीं. रानटी अवस्थेंत राहणारा मानव, आणि आजचा मानव यांमधील फरक त्याच्या बदलणाऱ्या आवडीचें प्रतीक आहे. समाजांत बदल होतो, परंतु तो बदल एका विवक्षित दिशेनेंच होतो. तसेंच तो होत असतांना भूगोलाचीं मूलतत्त्वें सोडून तो कधींहि होत नाहीं आणि हा बदल जितक्या जास्त प्रमाणांत होत जातो तितका तो समाज प्रगति-पथावर असतो. जशा प्रत्येक मनुष्याच्या कांहीं विशिष्ट सवयी अस-तात तशाच प्रत्येक समाजाच्या कांहीं विवक्षित पद्धती असतात. आणि तीच त्याची संस्कृति म्हणून संबोधिली जाते. जेव्हां एकत्रित-पणानें समाजांतील लहान लहान समूह जमून कार्य करतात, तेव्हां त्या समूहांना संस्था असें नांव दिलें जातें. समाजरचनेंत संस्था हा कायम टिकणारा भाग होय. या संस्था पुष्कळशा प्रयोगांनंतर शांतता, सुख आणि सुव्यवस्था राखण्यासाठीं वरचेवर प्रयोग करून त्या प्रयोगांनंतर बनलेल्या असतात. परंतु आधुनिक युगांत जसजसे बदल होऊं लागले, तसतसा कित्येक संस्थांचा पाया अस्थिर होऊं लागला आणि त्यांची जागा दुसऱ्या नवीन संस्थांना द्यावी लागली.

मनुष्यप्राणी पृथ्वीवर राहतो आणि त्याचें जीवन सर्वस्वी पृथ्वींतून उत्पन्न होणाऱ्या पदार्थांवरच अवलंबून आहे. म्हणजे मनुष्यप्राणी आणि पृथ्वी यांचा निकटचा संबंध असून मानव, त्याचे संघ, त्याचा समाज, त्याचीं राष्ट्रें या सर्वांवर योग्यरीतीनें म्हणजेच निसर्गाचें वर्चस्व चालू आहे.

**समाजसत्तावाद**—(सोशॅलिझम) खासगी मालकीचें तत्त्व नष्ट करून सर्व मिळून सामुदायिक मालकीची करणें आणि विशिष्ट योजनांनुसार आर्थिक व्यवस्था करणें हें सोशॅलिझमचें ध्येय असून तें साध्य करण्याकरितां राजकीय चळवळ हें साधन आहे. आधुनिक समाजसत्तावाद १९ व्या शतकाच्या पूर्वार्धांत 'युटोपियन' हें नांव असलेल्या विद्वानांनीं सुरू केला; म्हणजे

घातले असतांहि आकारानें वाढूं लागतात. उदा., तुरटीचे स्फटिक लोहिक स्फटिका(फेरिक ॲलम )च्या विद्रावांत सोडले तर त्यांवर त्याचा थर बसून ते आकारानें वाढूं लागतात.

**समाज-लोकसत्तावादी**—( सोशल डेमोक्रॅट ). युरोपांतील अनेक देशांत 'सोशल डेमोक्रॅट' या शब्दाचा अर्थ समाजसत्तावादी राजकीय कार्यकर्ते असा आहे. हा पक्ष प्रथम १८६९ सालीं स्थापन झाला. त्या वेळीं तो क्रांतिवादाचा पुरस्कर्ता होता. परंतु १८९० पासून बहुतेक देशांतले समाजसत्तावादी पुढारी राजकीय सुधारणावादी ( रिफॉर्मिस्ट ) बनले. म्हणजे समाजसत्तावादाप्रमाणें सुधारणा सनदशीर मार्गानेंच पण लोकशाही सरकारमार्फत कायदे करून घडवून आणाव्या, या मताचा पुरस्कार करूं लागले. या मताचे अनेक देशांतले पुढारी १८८९ सालीं 'सेकंड इंटरनॅशनल' या संस्थेंत एकत्र झाले. तथापि लवकरच त्या पुढाऱ्यांत दोन गट निर्माण होऊन सुधारणावादी पुढारी 'सेकंड इंटर-नॅशनल' या संस्थेस चिकटून राहिले; आणि क्रांतिवादी पुढाऱ्यांनीं आपली 'थर्ड इंटर-नॅशनल' ही स्वतंत्र संस्था १९१९ सालीं काढली.

इंग्लंडांत १८८० साली स्थापन झालेली 'डेमोक्रॅटिक फेडरेशन' ही संस्था १८८३ सालीं 'सोशल डेमोक्रॅटिक फेडरेशन' या नांवानें काम करूं लागली. १८८४ सालीं विल्यम मॉरिस व एच्. एम्. हिंडमन हे दोघे फेडरेशनमधून फुटून निघाले; पण हिंडमन पुन्हां त्यामध्यें सामील झाला. १८९३ सालीं केर हार्डी व आणखी कांहीं पुढारी फेडरेशन संस्था सोडून 'इंडिपेंडंट लेबर पार्टी' ( स्वतंत्र मजूरपक्ष ) या नांवाची नवी संस्था स्थापून स्वतंत्र बनले. सोशल डेमोक्रॅटिक फेडरेशननें १९१२ सालीं कित्येक लहान लहान संस्था आपल्यांत सामील करून 'ब्रिटिश सोशॅलिस्ट पार्टी' हें नांव धारण केले व या संस्थेने १९१४ च्या महायुद्धांत इंग्लंडने सामील होऊं नये, असें प्रतिपादन सुरू केलें; म्हणून हिंडमन व आणखी थोडे पुढारी फुटून निघून त्यांनीं 'नॅशनल सोशॅलिस्ट पार्टी' स्थापली. अलीकडे ब्रिटिश सोशॅलिस्ट पार्टी ही संस्था ग्रेट ब्रिटनची कम्यूनिस्ट पार्टी या संस्थेंत विलीन झाली आहे.

**समाजशास्त्र**—( सोशॅलॉजी ). समाजासंबंधींच्या सर्वांगीण अभ्यासाला हा शब्द लावतात. अर्वाचीन समाजाचा इतिहास व आजच्या सामाजिक घटनांचा वृत्तान्त आणि वर्गीकरण यांवर आधारलेलें हें शास्त्र असल्यानें, इतिहास, अर्थशास्त्र, न्यायशास्त्र आणि राज्यशास्त्र हीं मिळून होणारी जी मानवी संस्कृति तिची सामान्य प्रगति या अभ्यासाचा विषय होऊन बसतो. समाजांतील घटकांच्या ऐतिहासिक आणि मानसशास्त्रीय अभ्यासावरून आंकडेशास्त्राच्या साहाय्यानें निष्कर्ष काढावे लागतात. व ते इतर समाजाशीं पडताळून पाहावे लागतात.

प्राचीन ग्रीक पंडितांनीं इतर शास्त्रांप्रमाणें याहि शास्त्रास हात घातला होता, पण तो राज्यशासनाच्या दृष्टीनेंच होय. हर्बर्ट स्पेन्सरनें व्यक्ति आणि समाज यांचे संबंध व त्यांचें सरकारशीं नातें या विषयाचा उत्कृष्ट ऊहापोह केला. तथापि बेंजामिन किड यानेंच प्रथम या शास्त्राचा पद्धतशीर पाया घातला असें म्हणावें लागेल. समाजशास्त्र हें सर्व सामाजिक शास्त्रांच्या गुरुस्थानीं आहे. त्यांच्या निष्कर्षांचे परस्पर संबंध समजण्यास समाजशास्त्राच्या सिद्धान्तांचें साहाय्य घ्यावें लागतें. आज या शास्त्रावर बरेंच वाङ्मय उपलब्ध आहे.

मानवानें आपल्या ज्ञानांतील उन्नतीच्या दृष्टीनें जुन्या गोष्टींचा अभ्यास करण्यासाठीं जें एक नवीन शास्त्र तयार केलें, जीवनक्रमाचा शास्त्रशुद्ध अभ्यास होण्यासाठीं समाजरचनाशास्त्र म्हणून जें शास्त्र बनवलें तेंच हे समाजशास्त्र होय.

समाज ही खरीखुरी अस्तित्वांत असलेली गोष्ट असून मानवी जीवनक्रमांत या संस्थेला फार महत्त्वाचें स्थान आहे. हें स्थान प्रत्यक्ष जड वस्तूच्या स्वरूपांत दाखवतां आलें नाहीं तरी त्याचा संबंध आणि त्याचा जोर फार विलक्षण आहे. गुरुत्वाकर्षण जसें दाखवतां येत नाहीं, परंतु त्याशिवाय जड वस्तू नियमबद्ध रीतीनें बांधल्याच गेलेल्या नाहींत, तीच स्थिति समाजशास्त्राची आहे.

( १ ) एकत्र वास्तव्य करण्याची मानवी प्रवृत्ति, ( २ ) एकच आवडीनिवडी म्हणून आणि विशिष्ट प्रकारच्या फायद्यासाठीं एकत्र आलेले लोक, व ( ३ ) सामुदायिक पद्धतींत एकमेकांत चाललेली देवाण-घेवाण, या तीन मूलभूत तत्त्वांवर समाज उभा राहिलेला आहे. यांपैकीं पहिल्या दोहोंचें स्वरूप कदाचित् फारसें शाश्वत असूं शकणार नाहीं, परंतु तिसऱ्याचें स्वरूप मात्र शाश्वत आहे. आणि तिसऱ्याचे स्वरूप म्हणजेच अर्थशास्त्र असून त्या अर्थशास्त्राची उभारणी भूगोलावर मानवी प्राणी भूगोलाची सत्यकथा बनवीत असतांना झाली आहे. मूळचा रानटी मानव, टोळ्यांनीं राहणारा मानव, कुटुंब करून राहणारा मानव, खेड्यांच्या स्वरूपांत कुटुंबाची वसाहत करून राहणारा मानव, खेड्यांचीं शहरांत रूपांतरें करून त्यांत राहिलेला मानव, या सर्व स्वरूपांत रानटी अवस्थेंतून प्रगतीला पोंचलेला मानवप्राणी समाजशास्त्राच्या नियमांनीं बद्ध झालेला आहे.

मानवी प्राण्याला समूहात्मक जीवन ( ग्रूप लाइफ ) बनविण्यासाठीं मूलभूत गोष्टी कोणत्या लागतात, तसेच त्या कशा बनवल्या आहेत, त्यांत कसा बदल होतो, कांहीं समाज सत्तेनें कसे बनतात, वगैरे गोष्टींचा समावेश समाजशास्त्रांत होतो. समाज काय करतो, त्याच्या चालीरीती काय आहेत, धर्म कोणचा आहे, राहणी कशी आहे, वगैरे सर्व प्रश्नांचा विचार या शास्त्राच्या अभ्यासांत करावा लागतो. त्याचप्रमाणें कांहीं जुन्या चालीरीती

बदलून देऊन नवीन चालीरीती कां अमलांत आणल्या, याचींहि कारणें शोधावीं लागतात. ऑस्ट्रेलियांत रानटी अवस्थेत असलेले लोक अगदीं लहान मुलांचे दांत कानशीनें घांसून काढतात. आफ्रिकेंतील लोकांची सौंदर्याची कल्पना म्हणजे ओठांना भोक पाडून त्यांत लांकडाच्या मोठमोठ्या काड्यांचे तुकडे अडकवून तीं भोकें रुंदावणें आणि ओठ लांबवणें अशी ही प्रथा आहे. चोनिओ-मधील रानटी टोळ्या माणसाला ठार मारण्यांत आनंद मानतात. तर कांहीं ठिकाणीं नरमांसभक्षक रानटी टोळ्याहि आहेत.

या निरनिराळ्या टोळ्यांतून म्हणजेच या निरनिराळ्या समाजांतून या चाली कां आहेत, तसेंच जादूटोणा, शकुन, वगैरे गोष्टींवरहि कांहीं समाजांचा विश्वास कसा असतो, वगैरे प्रश्नांचा समाजशास्त्रानें अभ्यास करावयाचा आहे. त्याचप्रमाणें आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे समाजांतील घटकांची अंधानुकरणाची प्रवृत्ति. आणि हें अंधानुकरण विशेषतः पुढाऱ्यांची नक्कल करण्याच्या बाबतींतच जास्त दिसून येतें. मग तो पुढारी राष्ट्राचा असला तर सर्व राष्ट्रभर त्याची नक्कल होऊं लागते. एखाद्या लहान समाजांतला असला तर तो समाज त्याची नक्कल करतो, आणि टोळींतला असला तर ती टोळी त्याची नक्कल करते; आणि ही अनुकरणाची प्रवृत्ति हा एक समाजशास्त्रांतील महत्त्वाचा मूलभूत घटक आहे.

*या शास्त्राचा आणखी एक प्रश्न म्हणजे निरनिराळ्या समाजां-*तून मतभेदानें तेढी निर्माण होतात. आणि त्यांतून कित्येक वेळां यादवी युद्धें अगर कित्येक वेळां गोड संमीलनेंहि झालेलीं दृष्टीस पडतात. उदाहरणार्थ, हिंदुस्थानांत द्रविड आणि आर्य एकमेकांत पूर्ण मिसळले गेले. पण हिंदू आणि मुसलमान वेगवेगळे राहिले. लढाई, अत्याचार, गुलामगिरी आणि जातीयतेची जाणीव हे सर्व प्रश्न समाजशास्त्राच्या अभ्यास करण्याचे प्रश्न होत.

मानवाच्या विवक्षित समाजाच्या हालचालींचें वैशिष्ट्य आणि समाजरचनेनें बंदिस्त असलेलें जीवन हीच मानवाची संस्कृति होय. आणि एकदां शास्त्राचे नियम ठरले गेल्यानंतर तेच नियम या विषयाला लावणें जरूर आहे. हिंदु, चिनी, वगैरे लोकांची संस्कृति विकासतत्त्वावर अविच्छिन्न झालेली आहे. मानव रानटी राहणीपासून आजच्या राहणीपर्यंत येऊन पोहोंचला आहे. आणि तो तसा येत असतांना संकलणावस्थेंत ठिकठिकाणच्या नैसर्गिक परिस्थितीशीं त्याला झगडा करावा लागला आणि त्या झगड्यांत त्यानें आपलें अन्न, वस्त्र, राहणी, वगैरे गोष्टी त्या त्या कटिबंधांतील हवामानाप्रमाणें केल्या, हें भूगोलाचें मूलभूत तत्त्व विसरून चालणार नाहीं. आणि संस्कृतींतील फरक म्हणजे इतका कीं, सुधारत जातांना त्यानें जीं साधनें निळवलीं, वापरलीं आणि निर्माण केलीं त्यांतील फरक होय.

सुंध्या, मदनाच्या आणि अज्ञात तन्हेच्या व्यक्तिमत्त्वांमुळें विशिष्ट प्रकारची समाजरचना आढळते आणि त्यामध्यें कांही मानवांमध्यें फरक एवढाच कीं, त्या व्यावहारिक रचनेत मानवांत होणारे गुण त्यांच्या उत्क्रांतीबरोबर येतात आणि मानवाच्या पाठीमागें प्रचंड इतिहास असलेला आहे. मानवाचे समाज हे एकाच इतिहासाचे वारसदार आहेत. आणि त्यांची संस्कृति हजारों वर्षे चालत आलेली आहे. आणि बुद्धि संशोधन, भौतिकशास्त्रांची मानवी सुखासाठीं वाढ, वगैरे गोष्टींनी प्रगत होऊन पुढील पिढींची तरतूद मानवांचे समाज करीत आहेत. बाह्य परिस्थितींत वरचेवर बदल करणें ही एक मानवाची नैसर्गिक प्रवृत्ति आहे. त्याला वरचेवर वाचिवैचित्र्य अथवा कंटाळा लागतो आणि त्याची आवड बदलत जाते तसा समाज बदलल्या-शिवाय राहत नाहीं. रानटी अवस्थेत राहणारा मानव, आणि आजचा मानव यांमधील फरक त्याच्या बदलण्याच्या आवडीचें प्रतीक आहे. समाजांत बदल होतो; परंतु तो बदल एका विवक्षित दिशेनेंच होतो. तसेंच तो होत असतांना भूगोलाचीं मूलतत्त्वें सोडून तो कधींहि होत नाहीं आणि हा बदल जितक्या जास्त प्रमाणांत होत जातो तितका तो समाज प्रगति-पथावर असतो. जसा प्रत्येक मनुष्याच्या कांहीं विशिष्ट सवयी असतात तशाच प्रत्येक समाजाच्या कांहीं विवक्षित पद्धती असतात. आणि तीच त्याची संस्कृति म्हणून संबोधिली जाते. जेव्हां एकनिष्ठ-पणानें समाजांतील लहान लहान समूह मिळून कार्य करतात, तेव्हां त्या समूहांना संस्था असें नांव दिलें जातें. समाजरचनेंत संस्था हा कायम टिकणारा भाग होय. या संस्था पुष्कळ प्रयोगांनंतर शांतता, सुख आणि सुव्यवस्था राखण्यासाठीं बनलेले प्रयोग करून त्या प्रयोगांनंतर बनलेल्या असतात. परंतु आधुनिक युगांत जसजसे बदल होऊं लागले, तसतसा कित्येक संस्थांचा पाया अस्थिर होऊं लागला आणि त्यांची जागा दुसऱ्या नवीन संस्थांना घ्यावी लागली.

मनुष्यप्राणी पृथ्वीवर राहतो आणि त्याचें जीवन सर्वस्वी पृथ्वींतून उत्पन्न होणाऱ्या पदार्थांवरच अवलंबून आहे. म्हणजे मनुष्यप्राणी आणि पृथ्वी यांचा निकटचा संबंध असून मानव, त्याचे संघ, त्याचा समाज, त्याचीं राष्ट्रें या सर्वांवर थोडक्यांत म्हणजेच निसर्गाचें वर्चस्व चालू आहे.

**समाजसत्तावाद**—(सोशॅलिझम) व्यक्तिगत मालकीचें तत्त्व नष्ट करून सर्व मिळून सामुदायिक मालकीची करणें आणि विशिष्ट योजनेनुसार आर्थिक व्यवस्था करणें हें सोशॅलिझमचें ध्येय असून तें साध्य करण्याकरितां राजकीय चळवळ हें साधन आहे. आधुनिक समाजसत्तावाद १९ व्या शतकांतील पूर्वार्धांत 'युटोपियन' हें नांव अनेकदा विद्वानांनीं सुरू केलें; म्हणजे

या विद्वानांनीं मानवी समाजाची अगदीं आदर्शभूत रचना कशी असावी तें वर्णन करणारीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं. सर थॉमस मूर (१४७८-१५३५) यानें 'युटोपिया' या नांवाच्या आपल्या ग्रंथांत समाजसत्ताक पद्धतीच्या संस्थांचें वर्णन करून एका नमुनेदार समाजाचें चित्रहि त्यांत रेखाटलें आहे. आणि या युटोपिया ग्रंथाला मानणाऱ्या विद्वानांना 'युटोपियन' हें नांव पडलें. या युटोपियन विद्वानांनीं आपले हेतू साध्य करण्याकरितां आपल्या मतांचा प्रचार करीत राहणें हा मार्ग अवलंबिला व अत्याचारी क्रांतीचा मार्ग त्याज्य मानला. दुसरा फ्रेंच विद्वान् एफ्. सी. फोरियर (१७७२-१८३७) यानें अशी सूचना केली कीं, एका समाजाच्या स्वयंपूर्ण अशा अनेक जमाती कराव्या आणि एकेक जमातीने एकेक महत्त्वाचा धंदा पत्करावा आणि या सर्व जमातींनीं परस्परांशीं सहकार्य करावें. रॉबर्ट ओवेन (१७७१-१८५८) हा लानार्क येथील विणकामाचा धंदा करणारा असून त्यानें तेथें एक नमुनेदार कारखाना चालवला आणि आपली सर्व संपत्ति इंग्लंडांत आणि अमेरिकेंत नमुनेदार समाजसत्ताक जमाती स्थापन करण्याच्या कामीं खर्च केली. पण हे त्याचे प्रयोग अयशस्वी झाले. परंतु ओवेनच्या या प्रयोगांचा परिणाम को-ऑपरेटिव्ह सोसायट्या, ट्रेड युनियन आणि चार्टिझम यांच्या चळवळीवर फार झाला.

समाजसत्तावादाला राजकारणी स्वरूप १८४८ सालीं प्रथम आलें. फ्रान्समध्यें प्राउधन या विद्वानानें को-ऑपरेटिव्ह संस्था आणि एक्सचेंज बँका यांचा पुरस्कार केला आणि लुई ब्लँक यानें राष्ट्रीय मालकीचे उद्योगधंदे करण्याचा आरंभ म्हणून राष्ट्रीय कारखाने (वर्कशॉप्स) काढले. वरील दोन्ही विद्वानांचा कार्ल मार्क्स व फ्रेडरिक एन्जल्स या दोघां जर्मन समाजसत्तावाद्यांना विरोध होता. कारण सदर जर्मन विद्वानांनीं कम्यूनिस्ट लीग नुकतीच स्थापन केली होती आणि एक नवी समाजसत्ताक पद्धतीची योजना कम्यूनिस्ट मॅनिफेस्टोच्या द्वारें जाहीर केली होती. समाजसत्ताक पद्धति, भूतदया आणि नीतितत्त्वें यांच्या आधारें अमलांत आणतां येईल हें मत सदर जर्मन विद्वानांना मान्य नव्हतें. उलट पक्षीं समाजसत्ताक पद्धति मालकवर्ग आणि कामगारवर्ग यांचा आपसांत लढा होऊन अखेर स्थापन होईल असें त्यांनीं जाहीर केलें. म्हणून कामगारवर्गाची संघटना करून क्रांतीच्या मार्गानें समाजसत्ताक पद्धति स्थापन करणें हा एकच मार्ग मार्क्सनें सुचवला व संघटित सोशॅलिस्ट पक्षांनीं पूर्वीचे सिद्धान्त (युटोपियन प्रयोग) हळूहळू त्याज्य ठरवून 'सायन्टिफिक सोशॅलिझम' (शास्त्रीय समाजसत्तावाद) हा एकच मार्ग पुरस्कृत केला.

पुढें सोशॅलिझमचें केंद्र जर्मन देश बनला. फार्डिनांड लासेल (१८२५-१८६४) यानें जर्मन सोशॅलिस्ट पार्टी स्थापन केली. आणि 'सोशल मॉनर्की' (सामाजिक राजतंत्र) स्थापण्याची सूचना केली. मार्क्सनें लासेलच्या सूचनांना विरोध केला, परंतु १८६८ सालीं मार्क्स पक्ष आणि लासेल पक्ष एकत्र होऊन त्यांनीं मुख्यतः मार्क्सचा कार्यक्रमच स्वीकारला. या नव्या पक्षाचें नांव सोशल डेमोक्रॅटिक पार्टी (समाज-लोकसत्तावादी) हें असून ऑगस्ट बेबेल आणि विल्महेल्म लीबनेट या दोन पुढाऱ्यांनीं सदर पक्षाला जोरदार बनवला; मार्क्स व एन्जल्स हे दोघे लंडनमध्यें राहून सदर पक्षाचें मार्गदर्शन करीत होते. १८८०-१९०० या काळांत सोशॅलिस्ट पक्ष ब्रिटन, फ्रान्स, ऑस्ट्रिया, रशिया व इतर बहुतेक देश यांत उदयास आला.

१८६५ सालीं मार्क्सनें इंटरनॅशनल वर्केर्स असोसिएशन (आंतराष्ट्रीय कामगार संघ) ही संस्था स्थापली व तिलाच पुढें 'फर्स्ट इंटरनॅशनल' हें नांव देण्यांत आलें. या संस्थेचे सभासद चारदोन हजारच होते आणि या संस्थेचें कार्य 'अनार्किझम'ला म्हणजे दहशतवादी पक्षाला विरोध करणें, हेंच मुख्यतः होतें. या विरोधामुळें सदर संस्थेंत १८७२ सालीं उपपक्ष निर्माण झाले. १८८३ सालीं मार्क्स निधन पावला, पण एन्जल्सनें मरेपर्यंत (१८९४) या संस्थेचें कार्य चालू ठेवलें. १८८९ सालीं 'फर्स्ट इंटरनॅशनल' चें पुनरुज्जीवन करण्यांत आलें आणि जगांतील सर्व सोशॅलिस्ट पक्ष या संस्थेंत सामील झाले. 'सेकंड इंटरनॅशनल' ही संस्था सर्व जगांत सोशॅलिस्ट क्रांति घडवून आणणारी केंद्रवर्ती संस्था बनली. तथापि या संस्थेंत दुफळी होऊन सुधारणावादी पक्ष आणि क्रांतिवादी पक्ष यांच्यामध्यें कायम स्वरूपाचा लढा सुरू झाला. सुधारणावादी पक्षानें मार्क्सच्या सिद्धान्ताची दुरुस्ती करून सोशॅलिझम हळूहळू शांततेच्या मार्गानें सुधारणा करून अमलांत आणावा असा प्रचार सुरू केला; उलटपक्षीं जहाल पक्षानें अत्याचारी क्रांतीच्या मार्गाचा आग्रह धरला. १९१२ सालीं या इंटरनॅशनल संस्थेनें युद्धाचा निषेध करण्यास सुरवात केली; आणि भांडवलशाही सरकारांनीं युद्ध सुरू केल्यास कामगार संघ संपद्वारें बंड करतील अशी धमकी दिली. तथापि १९१४ सालीं युद्ध सुरू झाल्यावर सदर प्रकारचें बंड वगैरे कांहीं झालें नाहीं. उलट बहुतेक सर्व देशांतील सोशॅलिस्ट पक्ष देशाभिमानानें प्रेरित होऊन आपआपल्या सरकारला युद्ध नेटानें चालवण्यास मदत करूं लागले. जहाल सोशॅलिस्टांनीं मात्र युद्धाचा निषेध केला आणि एक निराळी स्वतंत्र चळवळ सुरू केली. या जहाल पक्षाचा पुढारी लेनिन होता व त्यानें १९१७ सालीं रशियांत क्रांति घडवून आणली. जर्मनींत लीबनेट ज्युनिअर या पुढाऱ्याच्या नेतृत्वाखालीं या जहाल सोशॅलिस्ट पक्षानें स्पार्टेकस लीग नांवाची संस्था स्थापली आणि १९१८ सालीं जर्मनींत जी क्रांति झाली तिची बरीचशी

पूर्वतयारी या संस्थेनें केली. जर्मनींत राज्यक्रांतीनंतर मवाळ सोशॅलिस्ट अधिकारारूढ होऊन क्रांतिकारक कम्यूनिस्ट पक्ष सरकारनें चिरडून टाकला. या क्रांतिकारक पक्षानें मॉस्को येथें १९२० सालीं 'थर्ड इंटरनॅशनल' ऊर्फ कम्यूनिस्ट ही संस्था स्थापन केली. युरोपांतील बहुतेक देशांतले क्रांतिकारक म्हणजे कम्यूनिस्टांचे पक्ष सोशॅलिस्ट संस्थांतून फुटून बाहेर पडले आणि मवाळ सोशॅलिस्टांनीं अनेक देशांतल्या राज्यकारभारांत अधिकाराच्या जागा स्वीकारल्या. अशा सोशॅलिस्ट सरकारांनीं सामाजिक समानता प्रस्थापित करणारे कायदे केले, उदारमतवादी व लोकशाहीला अनुकूल धोरण स्वीकारलें आणि आर्थिक बाबतींत सरकारी नियंत्रण जरूर तेथें घातलें; परंतु समाजसत्ताक पद्धतीला राष्ट्रांतील बहुमत अनुकूल झाल्याशिवाय ती पद्धत अमलांत आणावयाची नाहीं असें निश्चित धोरण स्वीकारलें. मवाळ सोशॅलिस्ट आणि कम्यूनिस्ट या दोन पक्षांखेरीज स्वतंत्र सोशॅलिस्ट असा एक तिसरा पक्ष १९२२ सालीं निर्माण झाला; पण तो पक्ष लवकरच अस्त पावला आणि ते स्वतंत्र सोशॅलिस्ट मवाळ सोशॅलिस्ट पक्षांत मिसळून गेले.

सेकंड इंटरनॅशनल आणि थर्ड इंटरनॅशनल यांचा समेट करण्याचे अनेक प्रयत्न झाले, परंतु ते निष्फळ होऊन या दोन संस्थांमधील तीव्र लढा १९२२–१९३३ पर्यंत चालू राहिला. दरम्यान 'पॉप्युलर फ्रंट' नांवाची चळवळ फ्रान्स व स्पेन या देशांमध्यें उद्भवली आणि जर्मनी, इटली व स्पेन यांमध्यें हुकूमशाही राजवट सुरू झाली. त्यामुळें इतर लोकशाहीच्या देशांत हुकूमशाही स्थापन होऊं नये म्हणून लोकशाही सरकारांनीं कांहीं कांहीं कायदे सोशॅलिझमच्या तत्त्वांना अनुकूल असे केले आणि कांहीं प्रतिकूल असे कायदे केले. दुसरें महायुद्ध सुरू झाल्यावर 'हिटलरिझम'ला विरोध करण्याकरितां ग्रेट ब्रिटनमधील आणि इतर दोस्त राष्ट्रांतील सोशॅलिस्टांनीं आपापल्या सरकारला युद्धकार्यांत मदत करण्याचें धोरण स्वीकारलें.

सोशॅलिझममध्यें 'डेमोक्रॅटिक सोशॅलिझम' व 'कम्यूनिझम' हे दोन प्रमुख पक्ष असून शिवाय 'अनार्किझम', 'सिंडिकॅलिझम,' 'को-ऑपरेटिव्हिझम' आणि 'ख्रिश्चन सोशॅलिझम' असे उपपंथ आहेत. ब्रिटनमध्यें कम्यूनिस्ट पक्ष अगदीं कमकुवत आहे. बहुतेक देशांत सोशॅलिस्ट पक्षाला शें. ३० ते ४० पर्यंत मतें मिळतात. सोशॅलिस्ट पद्धतीचा पूर्ण अमल रशियांतील सोव्हिएट यूनियनच्या राज्यांत आहे. इतर देशांत उद्योगधंद्यांवर सरकारी नियंत्रण आणि सरकारमार्फत नव्या नव्या आर्थिक योजनांचा पुरस्कार केला जात आहे. या धोरणाला 'स्टेट कॅपिटॅलिझम' हें नांव देण्यांत येतें. या धोरणांतूनच अखेर संपूर्ण सोशॅलिझम पद्धति अमलांत येईल, असा मवाळ सोशॅलिस्टांना भरंवसा वाटत आहे.

समाजवाद हा समाजाची विशिष्ट रचना करणारांपैकींचा आर्थिक आणि राजकीय विचार आहे. शासनकर्त्यांनींच देशांतील सर्व आर्थिक–औद्योगिक गोष्टी स्वतःच्या प्राधान्यात म्हणजे कामकऱ्यांना स्वास्थ्य मिळेल, स्पर्धा आणि विषमता राहणार नाहीं, या उद्देशानें समाजवाद पुरस्कारिला जातो. या वादाचें अंतिम टोंक साम्यवाद (कम्यूनिझम) आहे, असें कांहीं टीकाकार म्हणतात; तर दुसरे कांहीं उच्च उदारमतवाद याला विकटवितान. प्लेटो आणि सर थॉमस मूर यांच्या आदर्श राज्यव्यवस्थेंत समाजवादाचीं बीजें असलीं तरी औद्योगिक क्रांतीपासूनच आधुनिक समाजवादाला सुरुवात झाली असें म्हणावें लागेल. १८४८ त कार्ल मार्क्सचा समाजसत्तावादी फतवा जेव्हां बाहेर पडला तेव्हांपासून या राजकीय तत्त्वज्ञानाची वाढ वसत चालली असें यथार्थतेनें म्हणतां येईल. या वादाचा बौद्धिक पुरस्कार इंग्लंडांत रिकार्डोनें आपल्या भाड्यासंबंधींच्या आर्थिक सिद्धान्ताच्या द्वारें केला. पुढें जगांत सर्व सुधारलेल्या राष्ट्रांतून हा वाद मूळ धरूं लागला. विसाव्या शतकांत तर याचीं तत्त्वें अमलांत येऊं लागलीं. उदा., मजुरांवर सरकारी देखरेख, दुखणें आणि वृद्धपण या काळांत सरकारी मदत, सार्वजनिक उपयोगाच्या धंद्यांची सरकारी मालकी, व व्यापारव्यवहारांत चालणाऱ्या अनेक अनियंत्रित स्पर्धाविषयक बाबींत सरकारचा धाक, इ.. ग्रेट ब्रिटनमधील फेबियन संस्था याच विचारांची होती व आस्ते आस्ते या गोष्टी कराव्यात, असें मत चळावत चाललें होतें. विसाव्या शतकांत ग्रेट ब्रिटन आणि ऑस्ट्रेलिया या देशांत राज्यकारभारांत मजुरांचें वर्चस्व येत चाललें. पुढें मजूर पक्षाच्या हातींच मुळीं राज्यकारभार गेला. जर्मनी आणि फ्रान्स या राष्ट्रांतहि हें वारें शिरलें. गेल्या महायुद्धानंतर नवीन झालेलीं लोकसत्ताक राष्ट्रें तर समाजवादीच बनलीं. उदा., स्पेन, चिली, आयरिश फ्री स्टेट, फिनलंड. रशिया तर वोरून चालून समाजवादाच्या प्रमुख स्थानीं होता. पण राजकारणांत याला विरोधी पक्ष उत्पन्न झाले. इटलींतील फॅसिझम व जर्मनींतील नाझिझम यांना समाजवादाचें अर्थशास्त्र मान्य असलें तरी राष्ट्रसंघटनेला निराळें शासनतंत्र त्यांनीं पत्करलें.

हिंदुस्थानांत समाजसत्तावादी पक्ष आहे व कांहीं काळ त्यानें काँग्रेसमध्यें राहून चांगलें कामहि केलें. पण पुढें काँग्रेस राज्यकर्त्यांचें धोरण न पटून हा पक्ष स्वतंत्र झाला. पण अद्यापि याला स्वतःचें विशेष कार्य करतां आलें नाहीं, कीं पक्षाचें सामर्थ्य वाढविणें जमलें नाहीं.

**समाधिलेख**—(एपिटाफ). ज्या राष्ट्रांत मृतांना पुरण्याची चाल आहे, त्या राष्ट्रांत थोर मृतांना पुरलेल्या जागांवर समाधी बांधून त्यांवर लेख कोरून ठेवण्याची चाल दिसून येते. ग्रीक लोक फक्त श्रेष्ठ स्वर्गीयांच्या समाधींवर लेख लिहीत; पण रोमन

लोकांत कुटुंबांतील व्यक्तींचें असें स्मारक ठेवण्याची पद्धत सुरू होऊन ती सरसकट झाली व पुढें स्मशानभूमींतून असे अनेक लेख दिसूं लागले. अशा लेखांत मृत माणसाचें छोटेंसें पण चांगल्या शब्दांत सुंदर चरित्र देण्यांत येई. प्रथम लॅटिन भाषेंत असे लेख असत (उदा., ख्रिस्तोफर रेनचा समाधिलेख); पण पुढें मातृभाषा वापरण्यांत येऊं लागली. कांहीं समाधिलेख फार गमतीदार, विनोदी व व्याजोक्तिपर असतात. अशा समाधिलेखांचें एक वाङ्मयच तयार झालें आहे.

आपल्याकडे सामान्यतः मृतांना जाळण्याची चाल असल्यानें असे लेख नसतात. क्वचित् थोर मृतांना जाळलेल्या जागांवर वृंदावनें बांधून त्यांवर नांव व जन्ममृत्यूची मितिच फक्त लिहिण्यांत येते.

**समावयवत्व**—(आयसोमेरिझम). एकाच सारणीनें दर्शित केलेल्या रासायनिक पदार्थांचें रासायनिक आणि भौतिक गुणभिन्नत्व (उदा., एथिल अल्कोहोल आणि डायमिथिल ईथर). गुणधर्मांप्रमाणें ह्या संयुक्तांची अंतर्रचना भिन्न असते.

**संमिश्रक**—(फ्लक्स). धातुशोधनाच्या वेळीं इतर अशुद्धें द्रवरूपांत आणण्यासाठीं भट्टींत उपयोगांत आणावयाचा पदार्थ. हीं अशुद्धें सामान्यतः अम्लधर्मी–गार वगैरे जातीचीं, अगर क्षारधर्मी असतात. अम्लधर्मी असल्यास चुनखडी किंवा सुधास्म (लाइमस्टोन) किंवा लोखंडाची खनिज धातु वापरतात; क्षारधर्मी असल्यास गार–गारेची वाळू वापरतात. चिनी मातीचें काम करतांनाहि 'फ्लक्स' चा उपयोग करावा लागतो. त्या वेळीं शेंदूर (रेडलेड), टांकणखार (बोरॅक्स), यवखार (पोटॅशियम कार्बोनेट), पापडखार (सोडियम कार्बोनेट) आणि गार वापरतात. झाळकाम (सोल्डर) करतांना वापरण्याच्या संमिश्रकांत चरबी (टॅलो), राळ आणि जशदहरिद (झिंक क्लोराइड) येतात.

**समीकरण**—(इक्वेशन). दोन बैजिक पदसमुच्चयांची किंमत आंकड्यामध्यें सारखी होते, असें सांगणें म्हणजे समीकरण होय. उदा., क्ष + ६ क्ष = ७ व $क्ष^३ - ६ क्ष^२ + ११ क्ष - ६ = ०$. क्षचा उच्चतर वर्ग (पॉवर) समीकरणाचा घात (डिग्री) दर्शवितो. वरील उदाहरणें दुसऱ्या व तिसऱ्या घातांचीं आहेत. पहिल्या समीकरणांत क्ष = १ व क्ष = – ७ एवढ्याच क्षच्या किंमती दोन्ही बाजूंस सारख्या करतात. दुसऱ्या समीकरणांत क्ष = १, २, ३ ह्या किंमती दोन्ही बाजू सारख्या करतात. ह्या क्षच्या किंमती समीकरणांचीं मूळें (रूट) होत. 'न' घाताच्या समीकरणाबरोबर 'न' मूळें असतात. ह्या मूळांपैकीं दोन अथवा अधिकांची तीच किंमत असूं शकेल. समीकरण सोडविणें म्हणजे त्याचीं मूळें काढणें. सामान्य समीकरणाच्या मूळाचें सूत्र 'न' ची किंमत ४ पेक्षां अधिक नसेल तरच मांडतां येतें. 'न' ची ३ ही किंमत असणारें समीकरण प्रथम टारटाग्लिया ह्या इटालियन गणितज्ञानें सोडविलें आणि ही रीत गुप्त ठेव, असें त्रागावून कार्डन यास कळविली. परंतु कार्डननें १५४६ मध्यें आपल्या नर्तनगणें येथें प्रकाशित केलेल्या बीजगणितांत ती छापली! 'न' ची किंमत ५ किंवा अधिक असेल तर समीकरणांतील अव्यक्ताची किंमत जरूर तितकी बरोबर आणतां येते. व्यवहारोपयोगी (अप्लाइड) गणितांत समीकरणाचें फार महत्त्व असतें. एखाद्या संशोधनांत येणाऱ्या चार्लीच्यासंबंधीं समीकरणें येतात. यांपैकीं कांहीं ज्ञात असतात व कांहीं अज्ञात असतात. समीकरणें सोडवून अज्ञातांची किंमत काढावयाची असते.

**समीरपन्नग**—एक आयुर्वेदीय औषध. यांत पारागंधक कज्जली, सोमल, हरताळ व मनशीळ हीं मुख्य औषधें असतात. हें औषध अतिशय कडक आहे म्हणून जपून वापरावें. सन्निपात, चडचड, बेशुद्धि, छातींत कफ दाटणें, इत्यादि विकारांवर हें औषध चांगलें उपयोगी पडतें. सन्निपात ज्वरांतील कोरडा खोकला, छातींत दुखणें, बरगड्यांतून चमका मारणें, कंबर अतिशय दुखणें, पक्षाघात, अपतानक, जिह्वास्तंभ, धनुर्वात, इत्यादि विकारांत, जीर्ण अवस्थेंत या औषधाचा चांगला उपयोग होतो. ते १ गुंज आर्द्रकावलेह, आल्याचा रस, तूप, मध, दाडिमावलेह, इत्यादींतून चाटण करून देतात.

**समुद्र**—समुद्र (सम्–उद्र) ह्याचा यौगिकार्थ 'जलांनीं मीलन' असा आहे. नंतर समुद्र (जलाशय) असा अर्थ होऊन हा शब्द ऋग्वेद व मागाहून झालेले ग्रंथ यांमध्यें वारंवार आलेला आहे. या शब्दाचें हेंच महत्त्व आहे कीं, त्यावरून वैदिक काळच्या लोकांना समुद्र ही चीज काय आहे हें ठाऊक होतें असें सिद्ध होतें. समुद्रांतील संचयाबद्दल म्हणजे मोतीं, वगैरेंबद्दल व समुद्रापासून होणारे फायदे ह्यांबद्दल उल्लेख आलेले आहेत. भुज्यूच्या गोष्टीवरून त्या लोकांना समुद्रपर्यटनाची कल्पना होती, असेंहि अनुमान निघतें. शंभर वल्हीं वगैरेचे उल्लेख समुद्रासंबंधीं असलेल्या ज्ञानाच्या दृष्टीनें महत्त्वाचे आहेत.

समुद्र हा महासागरापेक्षां लहान असतो, पण बहुधा महासागराशीं संबद्ध असतो. समुद्राचें पाणी खारें असतें; तेव्हां कांहीं खाऱ्या पाण्याच्या मोठ्या सरोवरांनाहि समुद्रच म्हणतात (उदा., मृतसमुद्र). महासागर पांच आहेत (महासागर पाहा). बाकीचे खाऱ्या पाण्याचे मोठे सांठे समुद्र म्हणून मानण्यांत येतात.

समुद्राचें पाणी खारें असतें हें माहीतच आहे. त्यांत हरिदें (क्लोराइड्स) आणि सिंधुगंधितें (सल्फेट ऑफ सोडिअम), मग (मॅग्नेशिअम) आणि पालाश (पोटॅशिअम) हीं प्रमुख द्रव्यें असतात. या पाण्यांत विरले गेलेले क्षार (वजनाला घेतलेल्या) पाण्याच्या

वजनांत शेंकडा ३·५ भरतात. या क्षारांत सिंधुहरिदाचेंच प्रमाण फार मोठें असतें.

### कांहीं मोठे समुद्र

| | क्षेत्रफळ ( चौ. मै. ) | सर्वांत जास्त खोली ( फूट ) |
|---|---|---|
| मलायाचा समुद्र | ३१,३७,००० | २१,३२४ |
| मध्य अमेरिकन | १७,७०,१७० | २०,५८६ |
| भूमध्य | ११,४५,००० | १२,२७६ |
| बेहरिंगचा | ८,७८,००० | १३,४२२ |
| ओखोटस्कचा | ५,८२,००० | १०,५५४ |
| पूर्वचिनी | ४,८०,००० | सुमारें १०,५०० |
| हडसनचा उपसागर | ४,७२,००० | १,५०० |
| जपानचा | ४,०५,००० | १०,२०० |
| अंदमानचा | ३,०५,००० | ११,००० |
| उत्तर | २,२१,००० | ५,९९८ |
| तांबडा | १,७८,००० | ७,२५४ |
| कॅस्पियन | १,६९,००० | |
| काळा | १,६५,००० | ७,२०० |
| बाल्टिक | १,५८,००० | सुमारें ७,००० |

**समुद्रतलसंशोधन**—समुद्रामध्यें जमिनीप्रमाणेंच वनस्पती, प्राणी व चढ-उतार असतात ही गोष्ट जरी दीर्घकालापासून माहीत असली तरी समुद्राच्या अंतर्भागाचें संशोधन अलीकडेच पद्धतशीरपणें सुरू करण्यांत आलें. एकोणिसाव्या शतकामध्यें प्रथम 'चॅलेंजर' या नांवाच्या जहाजावर कांहीं संशोधकांस या कामगिरीवर पाठविण्यांत आलें. त्यांनीं समुद्रांत आढळणाऱ्या अनेक प्राण्यांचे नमुने आणले. परंतु समुद्राच्या पोटांत असणाऱ्या जिवंत प्राण्यांसंबंधीं फारशी माहिती उपलब्ध झाली नाहीं.

इंग्लंड व त्याच्या आसपासचे देश यांचें उपजीविकेचें एक मुख्य साधन म्हणजे मासे हे होत. मच्छीमारीचा धंदा या बेटांतील व आसपासच्या देशांतील लोक मोठ्या प्रमाणावर आज अनेक वर्षें करीत आहेत. या मच्छीमारीमुळें समुद्र-किनाऱ्याजवळचे मासे हळूहळू कमी कमी होऊं लागले व अधिकाधिक खोल पाण्यांत जाऊन मच्छीमारी करावी लागली तसतसे समुद्राच्या एकंदर पाण्यांत कोणत्या प्रकारचे, किती प्रमाणांत व कोणत्या भागांत मासे किंवा निरनिराळे प्राणी असतात या गोष्टींचा पद्धतशीर अभ्यास केला पाहिजे, असें विद्वान् लोकांस वाटूं लागलें.

अशा प्रकारें प्रमाणबद्ध व पद्धतशीर अभ्यासास प्रथम सुरवात १८८९ सालीं जर्मन शास्त्रज्ञांनीं केली. त्यांपैकीं प्रमुख म्हटले म्हणजे कील शाळेंतील हेन्सन, ॲप्स्टीन, लोहमन, इत्यादि होते. त्यांनीं 'नॅशनल' नांवाच्या जहाजामध्यें पहिली 'प्लँक्टन' सफर केली व ठराविक प्रमाणशीर जाळीं वापरून कोणत्या ठिकाणीं व किती पाण्यांत किती प्रमाणांत मासे सांपडतात हें निश्चित करण्याचा प्रयत्न केला. अशा तऱ्हेचें संशोधन करण्यास प्रयोगशाळांची आवश्यकता वाटूं लागली. अशा तऱ्हेची पहिली जीवशास्त्र संशोधन-प्रयोगशाळा जर्मन जीवशास्त्री अँटन डोन्हे यानें १८७२ मध्यें नेपल्स येथें स्थापन केली. तिला जर्मन व इटालियन सरकारांचा आश्रय असे. या ठिकाणीं मोठमोठे शास्त्रज्ञ संशोधन करण्याकरितां येऊं लागले व येथील 'मत्स्य-जलाशया'-(अँकेरियम)मध्यें अनेक प्रकारचे जिवंत जलवासी प्राणी ठेवण्यांत येऊं लागले.

ब्रिटनमधील फर्थ ऑफ फोर्थमध्यें सर जॉन मरे यानें ग्रँटन येथें अशी एक प्रयोगशाळा १८८४ मध्यें स्थापन केली. या प्रयोगशाळेची वाढ होऊन १८९७ मध्यें 'मिलपोर्ट मरीन बायॉलॉजिकल स्टेशन' स्थापन झालें.

वर सांगितल्याप्रमाणें माशांचा पुरवठा कमी कमी होऊं लागल्यामुळें या प्रश्नाकडे अनेक लोकांचें लक्ष जाऊन १८८३ मध्यें एक आंतरराष्ट्रीय मत्स्यप्रदर्शन भरविण्यांत आलें. परंतु या वेळचे अध्यक्ष टी. एच्. हक्स्ले यांनीं तर, माशांचा संहार या प्रमाणांतच जरी पुढें चालू राहिला तरी मासे खलास होतील अशी भीति बाळगण्याचें कारण नाहीं, असें सांगितलें. परंतु मासळीचे व्यापारी व तरुण शास्त्रज्ञ यांस या बाबतींत कांहीं तरी योजना करणें व धोरण ठरविणें अवश्य आहे असें वाटूं लागलें. याच वेळीं स्कॉटलंडमध्यें एक 'रॉयल कमिशन' डब्ल्यू. सी. मॅकिंटॉश यांच्या अध्यक्षतेखालीं मच्छीमारीबद्दल विचार करीत होतें व त्यांनीं सेंट ॲंड्रूज येथें एक प्रयोगशाळा स्थापन केली होती. १८८४ मध्यें इंग्लंडमध्यें प्रथम 'मरीन बायॉलॉजिकल असोसिएशन' स्थापन करण्यांत आली होती.

या संस्थेनें प्लिमथ येथें एक प्रयोगशाळा व 'मत्स्य-जलागार' हीं स्थापन केलीं. यानंतर ऑइल ऑफ मॅन या बेटांत व मिलपोर्ट, कलरकोट्स्, लोएस्टॉफ्ट व ॲबर्डीन या ठिकाणींहि प्रयोगशाळा स्थापन करण्यांत आल्या. या प्रयोगशाळांत समुद्रांतील जिवंत प्राण्यांचा अभ्यास करण्यांत येऊं लागला. तसेंच समुद्राच्या निरनिराळ्या ठिकाणच्या पाण्याचा रासायनिक व पदार्थविज्ञानात्मक अभ्यास व पृथक्करण करण्यांत येऊं लागलें. तसेंच समुद्रामध्यें हवामानाप्रमाणें होणाऱ्या फरकांचाहि अभ्यास सुरू झाला.

तथापि सर्व युरोप खंड व विशेषतः युरोपच्या उत्तरेकडील देश मच्छीमारीच्या धंद्यावर विशेष अवलंबून असल्यामुळें युरोप खंडाच्या उत्तर भागांतील समुद्रांचा अभ्यास करणें हा प्रश्न एकट्या-दुकट्या राष्ट्राचा नसून सर्वच राष्ट्रांचा होता. ही गोष्ट ओळखून स्वीडिश

सरकारनें पुढाकार घेऊन कोपेनहेगेन येथें एक 'सार्वराष्ट्रीय समुद्रसंशोधनसंस्था ', १९०२ मध्यें स्थापन केली. या संस्थेंत ब्रिटन, जर्मनी, स्कँडिनेव्हिया व हॉलंड इतकीं राष्ट्रें सामील झालीं व आपआपल्या समुद्रामध्यें संशोधन करण्याचें त्यांनीं मान्य केलें. या संस्थेच्या बैठकी नियमितपणें १९३९ पर्यंत भरत असत व त्यांत संशोधनाच्या योजना व कार्य परस्पर-सहकार्यानें पार पाडण्यांत येत असे. मध्यंतरींच्या दोन युद्धांत या संस्थेचें कार्य स्थगित झालें होतें, परंतु आतां तें चालू होण्याच्या मार्गांत आहे. या कार्यांत प्रिन्स मोनॅको यांनीं स्वतःच आपला खर्च सोसून फार मोठें कार्य केलें व एक सर्वोत्तम संग्रहालय स्थापन केलें व स्पर्म व्हेल या माशांची शिकार करण्याचीहि योजना केली. यांच्या 'हिरोन्डेल' व 'प्रिन्सेस आलाइस' या दोन नांवांनीं भूमध्यसमुद्रापासून स्पिट्सबर्जेनपर्यंत अनेक सफरी केल्या व यांनीं अनेक प्रयोगहि केले. नॉर्वेजियन सरकारनें तद्देशस्थ एक शास्त्रज्ञ मायकेल सार्स याच्या नांवाचें एक जहाज १९०० या सालामध्यें बांधून उत्तर ॲटलांटिक महासागरांत बरेंच संशोधन केलें. या शास्त्रज्ञाचा मुलगा ऑसिअन सार्स यानेंहि नॉर्वेच्या किनाऱ्यालगतच्या समुद्रांत मच्छीमारीबद्दल बरेंच संशोधन केलें. वरील जहाजानें डॉ. जोहान हजॉर्ट याच्या नेतृत्वाखालीं उत्तर ॲटलांटिक महासागरासंबंधीं पुष्कळ नकाशे तयार केले. सर जॉन मरे यानेंहि या जहाजावर जाऊन उत्तर अटलांटिकची पाहणी केली. याच जहाजावरील पदार्थविज्ञानी डॉ. हॉलंड हॅन्सेन यानें प्रकाशमापकाच्या साहाय्यानें समुद्रामध्यें पृष्ठभागाखालीं किती खोलपर्यंत प्रकाश पोंचूं शकतो याचें गणन केलें. त्यावरून सारगॅसो समुद्रामध्यें ५०० वावपर्यंत प्रकाश पोंचूं शकतो व तेथें प्रकाशलेखककांचांवर परिणाम होतो, परंतु ८०० ते ९०० वावांवर प्रकाशाचा परिणाम होत नाहीं, असें त्यानें दाखवून दिलें.

ब्रिटिश लोकांनीं दोन युद्धांच्या दरम्यानच्या काळांत ॲन्टार्क्टिक महासागरांत व्हेल माशांच्या शिकारीच्या बाबतींत बरीच प्रगति केली; कारण या वेळीं उत्तरेकडील समुद्रांत व्हेल मासे सांपडत नाहींसे झाले होते. कारण हार्पून गन-बंदुकीच्या शोधापासून नॉर्वेजिअन लोकांनीं व्हेल माशांचा संहार भयंकर प्रमाणांत चालू ठेवला होता. याकरितां दक्षिणेकडच्या समुद्राकडे वळणें भाग होतें. सेंट जॉर्जिआ या बेटावर १९०२ सालींच एक व्हेल शिकारीचें ठाणें स्थापन करण्यांत आलें होतें, त्या वेळीं मोठीं गलबतें बंदरांत नांगरून ठेवून होड्यांवरून व्हेल माशांची शिकार करण्यांत येत असे. परंतु नंतर नव्या पद्धतीनें मोठ्या बोटीहि शिकारीकरितां वापरण्यांत येऊं लागल्या. १९३८ मध्यें सुमारें तीस ते चाळीस मोठीं गलबतें या धंद्यांत असून एका हंगामांत ४०,००० व्हेल माशांचा संहार करीत असत. १९२६ सालीं सेंट जॉर्जिया बेटामध्यें समुद्राचें संशोधन करण्याकरितां 'डिस्कव्हरी' या नांवाचें जहाज पाठविण्यांत आलें. तें त्या ठिकाणीं दोन वर्षें होतें. त्या गलबतास कॅप्टन स्कॉट यानें बरेंच संशोधन केलें व तेंच पुढें १९२९ सालीं 'डिस्कव्हरी नं. २' या गलबतानें पुढें चालविलें. या सर्व संशोधनाचें कार्य 'डिस्कव्हरी' च्या अहवालामध्यें प्रसिद्ध झालें आहे. याच वेळीं ओस्लो येथें नॉर्वेजिअन शास्त्रज्ञांनीं निळे व फिन व्हेल या माशांच्या बाबतींत बरेंच संशोधन केलें. या कार्याकरितां दरवर्षी एक 'सार्वराष्ट्रीय व्हेल परिषद्' भरविण्यांत येत असते व तिच्या मार्फत या धंद्यासंबंधीं योजना व नियमन करण्यांत येतें.

दोन महायुद्धांच्या दरम्यानच्या काळांत जर्मनीनेंहि 'मीटिऑर' या नांवाचें एक जहाज संशोधनाकरितां पाठविलें होतें. त्यानें पूर्व-पश्चिम व दक्षिणोत्तर ऑर्क्टिकपासून ॲन्टार्क्टिकपर्यंत अनेक उभ्या आडव्या सफरी केल्या व समुद्राच्या पाण्याची रासायनिक व पदार्थवैज्ञानिक परीक्षा करून भरती, प्रवाह आणि हवामान यांबद्दल पुष्कळच माहिती मिळविली.

सध्यां या शास्त्रामध्यें विशेषतः ज्यास 'पदार्थवैज्ञानिक समुद्रलेखन' म्हणतां येईल त्या शास्त्राच्या दृष्टीनें पुष्कळच अभ्यास चालू आहे. याशिवाय भरतीचा वेग, समुद्रप्रवाह, आणि जलसंघातविचलन (movement of water masses) यांसंबंधीं माहिती मिळविण्याचा उपक्रम सुरू आहे. १९३९ सालीं या अभ्यासाचीं अनेक ठिकाणीं केन्द्रें होतीं. युरोपमध्यें बर्लिन येथें 'इन्स्टिट्यूट फुर मेरेस्कुंडे', बर्जेनमध्यें 'जिऑग्राफिकल इन्स्टिट्यूट', अमेरिकेंत 'यू. एस्. कोस्ट अँड जिओडेटिक सर्व्हे', ब्रिटनमध्यें प्लिमथ येथील 'मरीन बायॉलॉजिकल असोसिएशन', व लिव्हरपूल येथील युनिव्हर्सिटीचें 'डिपार्टमेंट ऑफ ओशनोग्राफी' या संस्था या शाखेमध्यें संशोधन करीत आहेत.

या शास्त्रामध्यें आतांपर्यंत झालेलें कार्य म्हणजे मुख्यतः समुद्रांतील वनस्पती व प्राणी यांचा संग्रह, वर्गीकरण व सूचीकरण व त्यांचा जीवशास्त्रानुसार अभ्यास हें होय. तथापि अद्यापि समुद्रामध्यें तरंगणारे (प्लँक्टॉनिक), तळाशीं राहणारे (बेन्थॉनिक) आणि पोहणारे (नेक्टोनिक) जे असंख्य जीव आहेत त्यांचा पद्धतशीर अभ्यास व्हावयाचाच आहे. समुद्राच्या तळाशीं असे कांहीं अजस्र प्राणी आहेत कीं, जे अद्यापि कोणत्याच प्रकारच्या जाळ्यांत पकडण्यांत आलेले नाहींत. त्यांची माहिती केवळ त्यांच्या स्पर्म व्हेलच्या पोटांत आढळणाऱ्या अवशेषांवरून झालेली आहे. यापुढें खोल समुद्रांत अनेक नवीन नवीन प्राणी सांपडणें शक्य आहे.

परंतु या प्राण्यांच्या बाबतींत मुख्य अभ्यास करावयाचा म्हणजे त्यांचा आयुष्यक्रम, त्यांचा अंडीं घालण्याचा हंगाम व

त्यांची खाद्यें, त्यांची शर्व करून राहण्याची संवय व त्यांचे परस्पर संबंध हे विषय होत.

**समुद्रकाकडी**—( सीकुकुंबर, हॉलोथुरिआ ). चक्रमत्स्य, समुद्रांड ( सी अर्चिन ), समुद्रलिली यांसारख्या प्राण्यांच्या शाखेंतील हा एक समुद्रप्राणिवर्ग आहे. यांचें कातडें जाड चामड्यासारखें असून त्याला भोंकें असतात; व त्यांतून पाद-संवेदकें ( फूट-टेन्टॅकल्स ) बाहेर आलेलीं असतात. या प्राण्यांना वाटेल तेव्हां आपलें शरीर लांबवितां किंवा आंखडतां येतें व आपलीं गात्रें, तीं जेव्हां नष्ट होतात तेव्हां पुन्हां उत्पन्न करतां येतात. यांतील कांहीं जाती खाण्यायोग्य असतात. हे प्राणी आशिया खंडाच्या पूर्व किनाऱ्यावर फार आढळतात.

**समुद्रकासव**—( टर्टल ). ही एक सरपटणाऱ्या प्राण्यांची, कासवांची जात आहे. यांना वल्ह्यांसारखे अवयव असतात. परंतु इतर बाबतींत यांचें साध्या कासवांशीं फार साम्य आहे. हे उष्ण प्रदेशांतील सर्व समुद्रांत आढळतात. यांची एक हिरव्या रंगाची जात आहे. या जातीचे कासव ७ फूटपर्यंत लांब असून वजनाला ७०० ते ८०० पौंड भरतें. याचें मांस खाण्याच्या कामीं फार मौल्यवान मानतात. यांची एक ठोकळ्यासारख्या डोक्याची मांसाहारी जात आहे तिच्यापासून तेल निघतें. दुसरी एक मांसाहारी जात आहे तिला ससाण्यासारखी चोंच असते. या कासवांच्या पाठींचा मोठा व्यापार चालतो.

**समुद्रगुप्त**( राज्य. इ. स. ३३०–३७९ )—यास आशियाचा नेपोलियन म्हणतात. गुप्त घराण्यांतील पहिल्या चंद्रगुप्ताचा हा पुत्र. याच्या आईचें नांव कुमारदेवी. प्रयागला अशोकाचा शिलालेख असलेल्या विशाल स्तंभावर याचाहि एक लेख आहे. त्यावरून असें दिसतें कीं, हा स्वतः विद्वान् व कवि असून गुणी जनांचा चहाता होता. विद्वानांना हा आश्रय देत असे. हा शूर असून यानें आपल्या बाहुबलानें अच्युत व नागसेन यांना पराभूत केलें होतें. तसेंच कोसलाधिपति महेंद्र, व्याघ्रराज, मद्रासचा राजा स्वामिदत्त, कांचीचा विष्णुगोप, पालक( बालाघाट )चा उग्रसेन, इत्यादि राजांना यानें कैद केलें होतें. अच्युत, नंदी, नागसेन, इत्यादि राजांना यानें ठार केलें होतें. पण पूर्वी ज्या राजांना आपल्या राज्यास मुकावें लागलें होतें अशांना यानें त्यांचीं राज्यें परत मिळवून दिलीं. उत्तरेस हिमालय व दक्षिणेस नर्मदा, पूर्वेस भागिरथी व पश्चिमेस यमुना ही त्याच्या प्रत्यक्ष अमलाखालील राज्याची मर्यादा होती. पण त्यानें बहुतेक हिंदुस्थान पादाक्रांत केला होता. व अश्वमेधहि केला. त्याच्याइतका ठिकठिकाणीं मोहिमा नेणारा १४ व्या शतकापर्यंत दुसरा कोणी सम्राट् झाला नाहीं. हा गरिबांचा सखा व अनाथांचा वाली होता. कलांचा हा भोक्ता असून स्वतः संगीतकलेंत प्रवीण होता. याच्या वेळच्या सोन्याच्या नाण्यांवर अनेक गोष्टींचा निर्देश करणारे छंदोबद्ध लेख आढळतात. याला याच्या दत्तदेवी नामक राणीपासून झालेला पुत्र दुसरा चंद्रगुप्त (शाहा ) हा याच्यानंतर गादीवर आला.

**समुद्रगोगलगाय**—( गॅस्टरोपॉड ). हा एक मृदुकाय प्राण्यांचा वर्ग असून हे एक पटदा असलेल्या शिंपल्यांत राहतात. तथापि या वर्गांतील कांहीं जातींचे प्राणी शिंपल्याविरहित राहतात. यांचे मुख्यतः चार प्रकार आढळतात : ( १ ) ॲम्फिन्युरा–चिटॉनसारखे प्राथमिक अवस्थेंतील प्राणी. ( २ ) प्रोझोब्रॅंचिया–कल्ले असणाऱ्या समुद्रगोगलगायी, पेरिविंक्ल, कवडी, शिंपा, इ. ( ३ ) ओपिस्थोब्रॅंचिया–समुद्रगोगलगायी, समुद्रससा, समुद्रफुलपांखरें. ( ४ ) पल्मोनाटा–जमिनीवर व गोड्या पाण्यांत आढळणाऱ्या गोगलगायी.

**समुद्रपट**—नौकानयनाला उपयुक्त असा हा समुद्राचा नकाशा काढलेला असतो. यांत समुद्रावरून दिसणारे जमिनीचे भाग, समुद्राची ठिकठिकाणची खोली, खडक, बंदरें, नद्या, खाड्या, इ. सर्व जें जें समुद्रप्रवासाच्या कामीं सुखाचें आणि सोयीचें होईल तें तें दिलेलें असतें. सामान्य समुद्रांचा, किनाऱ्यांचा, बंदरांचा, प्राकृतिक वाऱ्यांचा, वगैरे या नकाशांचे प्रकार असतात. ब्रिटिश ॲडमिऱ्यालिटीचें जें समुद्रपटखातें ( हायड्रोग्रॅफिक डिपार्टमेंट ) आहे तें असे सर्व समुद्रांचे सर्व प्रकारचे नकाशे तयार करून ठेवतें. प्रत्येक महिन्याला फार दळणवळणाच्या व्यापारी मार्गाचे कांहीं नकाशे प्रसिद्ध करण्यांत येतात. त्यांत जें हवामानाचें शास्त्रीय भविष्य दिलेलें असतें तें नाविकाला फार उपयुक्त असतें.

**समुद्रपाकोळी**—( टर्न ). हे बदकाप्रमाणें ज्यांचीं पायाचीं बोटें कातड्यानें जोडलेलीं असतात असे पक्षी आहेत. यांची चोंच लांब, चिंचोळी व सरळ असून, यांचे पंख लांब व निमुळते होत गेलेले असतात व शेपटी द्विखंड असते. हा पक्षी सामान्यतः १५ इंच लांब असून याची पाठ राखी करड्या रंगाची असते. पोटाकडील भाग पांढरा असतो व डोकें, पाय व चोंच तांबडी असते.

**समुद्रपुष्प**—( सी-ॲनीमोन्स ). हें एक सिलन्टरेट ( कोलेन्टेराटा ) वर्गांतील नरकिन ( ॲन्थोझोआ ) नांवाच्या पोटवर्गांतील कांहीं जातींस नांव देण्यांत येतें. हे प्राणी समुद्रावर

आढळतात. त्यांचा आकार एखाद्या मांसल वाटोळ्या देंठासारखा असून तो एखाद्या खडकाला किंवा दगडाला चिकटलेला असतो व त्याच्या दुसऱ्या मोकळ्या बाजूस मांसल शिंगांचे वाटोळे घेर असतात. हीं मांसल शिंगें दोनशेंपेक्षांहि जास्त असून त्यांच्या योगानें हे प्राणी आपलें भक्ष्य मिळवितात. त्यांस किंचितहि स्पर्श झाला असतां हीं सर्व शिंगें ते आपल्या तोंडांत घेऊन तोंड मिटून टाकतात. हे शरीरांतील द्रव पदार्थ तोंडावाटेंच बाहेर टाकतात. हे प्राणी कधीं पूर्ण फुललेल्या फुलाप्रमाणें दिसतात, तर कांहीं वेळां एखाद्या निमुळत्या मांसल गोळ्याप्रमाणें दिसूं लागतात. त्यांच्यामध्यें नर व मादी हे स्वतंत्र वर्ग असतात. शंख, शिंपा, खेकडे, वगैरेंवर हे निर्वाह करतात.

**समुद्रप्रवाह**—या प्रवाहाचे सामान्यतः तीन भाग पडतात. तळचे प्रवाह; पृष्ठभागावरचे प्रवाह व वाहते प्रवाह. हे भाग स्थानांवरून पडलेले आहेत. उष्णतामानावरून उष्ण आणि शीत असे दोन भाग पुन्हां पडतात. पाण्याचें उष्णमान, वारे, भरती, पृथ्वीचें स्वतःभोंवतीं फिरणें व किनाऱ्यांचा वेडेवांकडेपणा या गोष्टी प्रवाह उत्पन्न करून त्यांचें स्वरूप ठरवितात. पाणी थंड होत जातांना आकुंचन पावतें यामुळें ध्रुवप्रदेशाकडील पाणी विषुववृत्तापेक्षां जड असतें. हें जड पाणी तळाशीं वसतांना खालील पाण्याला गति देतें व तें विषुववृत्ताच्या दिशेनें वाहूं लागतें. उष्ण कटिबंधांत हें पाणी पृष्ठभागावर येऊन पुन्हां ध्रुवप्रदेशाकडे वाहूं लागतें. हे पृष्ठभागाचे प्रवाह उष्ण पाण्याचे असतात. उत्तर ॲटलांटिक महासागरांतील 'गल्फ स्ट्रीम' प्रवाह व उत्तर पॅसिफिक महासागरांतील 'जपानी प्रवाह' (कुरो सिवो) हे उष्ण प्रवाह आहेत.

पृथ्वी आपल्याभोंवतीं पश्चिमेकडून पूर्वेस फिरत असल्यानें विषुववृत्तापासून ध्रुव प्रदेशाकडे वाहणारे प्रवाह पूर्वेकडे झुकतात. यामुळें उष्ण प्रवाह बहुधा खंडांच्या पश्चिम किनाऱ्यांवर व शीत प्रवाह पूर्व किनाऱ्यांवर आपटतात. या प्रवाहांचा देशांच्या हवामानावर बराच परिणाम होतो. एकाच अक्षांशावरील ब्रिटिश बेटें आणि लाब्राडोर यांचें हवामान अनुक्रमें सरद गरम आणि अत्यंत थंड असें आहे. कारण ब्रिटनला गल्फस्ट्रीमची ऊब मिळते तर लाब्राडोरवर उत्तरेकडून शीतप्रवाह आदळतात.

खुल्या समुद्रावर एका दिशेनें हळूहळू वाहणारे जे मोठे प्रवाह ते 'वाहते प्रवाह' (ड्रिफ्ट) होत. हिंदी महासागरांत दक्षिणेकडे व ॲन्टार्क्टिक महासागरांत उत्तरेकडे वाहणारे असे हे प्रवाह आहेत.

**समुद्रफळ**—या झाडाचीं पानें बदामाच्या पानांसारखीं पण थोडीं लहान असतात. झाडें समुद्रकिनाऱ्यावर होतात. फळें जायफळाएवढीं पण काळीं असतात. वर सुरकुत्या असतात. फळ फार औषधी आहे. नेत्ररोग, कृमी, कफ, वगैरे रोगांवर हें उपयुक्त आहे. कावीळ, डोळ्याचें पटल यांवर याचें अंजन घालतात.

**समुद्रफुलपांखरें**—(टेरोपोडा). हा एक समुद्रगोगलगायींचा वर्ग आहे. यांना पक्ष्यांच्या पंखासारखे डोक्याच्या व मानेच्या दोन्ही बाजूंस लहान लहान पंख असतात. हे प्राणी समुद्राच्या पृष्ठभागावर तरंगतांना आढळतात.

**समुद्रलेखण्या**—(पेनाट्युला). मध्यरिक्त (कोलेन्टराटा) प्राणिवर्गांतील हे प्राणी असून यांस सामान्य भाषेंत समुद्रलेखण्या किंवा कोंबड्याचे कल्ले म्हणतात. यांच्या शरीरास मांसल मुळ्यासारखे अवयव असून समुद्राच्या तळाशीं असलेल्या चिखलामध्यें ते अवयव रोवून राहतात. यांच्यांतील कांहीं प्राणी काजव्यासारखा प्रकाश पाडतात.

**समुद्रविकार**—(सी-सिकनेस). बोट लागणें. अंतःकरणामध्यें ज्या अर्धवर्तुळाकृती वाहिनी असतात त्यांस अनियमित चेतना मिळाल्यामुळें त्याची प्रतिक्रिया म्हणून मळमळ, ओकारी, विमनस्कता, वगैरे उत्पन्न होतात; त्यांस समुद्रविकार असें म्हणतात. समुद्रप्रवासास निघण्यापूर्वी जें अन्न खाल्लें असेल त्याच्या योगानें किंवा थंडीमुळेंहि हा विकार होण्याचा संभव असतो. याचा प्रतिकार हलकें व नियमित अन्न घेतल्यानें, बद्धकोष्ठता होऊं न देण्यानें, शेक घेतल्यानें, किंवा निजून राहून, विशेषतः डोळे मिटून काळोखांत पडल्यानें करतां येतो. हा विकार झाला असतां निरनिराळ्या प्रकारचे अनेक पदार्थ खाल्ल्यानें या विकाराचा उपशम होतो असेंहि आढळण्यांत येतें.

जाळीच्या फितीनें कान अगदीं घट्ट बांधणें; खाण्यांत बार्ली-साखर वगैरेचाशी वापरणें; उजव्या कुशीवर पाय पोटाशीं घेऊन निजून राहणें, वगैरे कांहीं उपाय सुचविले जातात.

**समुद्रविद्या**—(हायड्रोग्राफी). पृथ्वीवरील जलाशयांचा अभ्यास करण्याचें हें शास्त्र असून महासागर, समुद्र, सरोवरें, नद्या व जमिनीखालील पाणथळें यांसंबंधींचा सर्व बाजूंनीं विचार यांत होतो. पाण्यानें व्यापलेला भाग, पाण्यांतील घटकद्रव्यें, गुणधर्म, समुद्राची भरती-ओहटी, नद्यांचे प्रवाह, पाणीपुरवठ्याचे प्रश्न, जलयानाचे मार्ग, इ. गोष्टींची माहिती अनेक ठिकाणांहून मिळविण्यांत येते. समुद्रपट (चार्ट) तयार करतात व त्यांत समुद्राची ठिकठिकाणची खोली, उष्णतामान, विशिष्ट गुरुत्व, पाण्याचा निरनिराळ्या खोलींतील खारटपणा, प्रवाहांच्या दिशा यांच्या नोंदी असतात. जलचरांचें खाणेंपिणें देखील विचारांत घेतलें जातें. यासाठीं जीवशास्त्रीय प्रयोगालयें असतात. ज्या समुद्रांचा ज्या राष्ट्रांना उपयोग असतो त्या समुद्रांची तीं तीं राष्ट्रें एकत्र पाहणी व संशोधन करतात. या समुद्रविद्येचें एक

स्वतंत्र स्वरीतच असतें. यर्जेन, प्लायमाउथ, मोनॅको, वगैरे ठिकाणीं समुद्रसंशोधनाच्या संस्था आहेत.

**समूहवाद**—(कलेक्टिव्हिझम). हा समाजसत्तावादांतीलच एक सिद्धान्त (सोशॅलिस्टिक थियरी) किंवा पद्धति असून त्यांतील मुख्य तत्त्व असें आहे कीं, राज्यांतील किंवा समाजांतील उत्पादनाचीं सर्व साधनें तथा राज्यांतील किंवा समाजांतील सर्व इसमांच्या सामुदायिक मालकीचीं असलीं पाहिजेत. सर्व प्रकारच्या उद्योगधंद्यांत प्रजाजनांना कामावर नेमण्याची सत्ता सरकारच्याच हातीं फक्त असली पाहिजे आणि सदर सरकार भांडवलवाल्या वर्गाचें असतां कामा नये. प्रत्येक कामकऱ्याला तो जितकें उत्पादन करील त्याच्या किंमतीइतका भरपूर पगार मिळाला पाहिजे. हा पगार ठरवितांना प्रत्येकानें किती तास काम केलें तें पाहिलें पाहिजे. 'कलेक्टिव्हिझम' ही संज्ञा नवीन असली तरी तींत वर दिलेलें मुख्य तत्त्व समाजसत्तावादाच्या प्रत्येक पंथांत आढळून येतें.

**समोदयकालिक चंद्र**—(हार्व्हेस्ट मून). शरदसंपातांत (२३ सप्टेंबर रोजीं उत्तर गोलार्धांत) सूर्य जेव्हां विषुववृत्त ओलांडतो तेव्हांचा पौर्णिमेचा चंद्र. हा मीन राशीचा पूर्ण चंद्र असतो. या पौर्णिमेच्या पूर्वी आणि नंतर कांहीं दिवस चंद्र अगदीं त्याच वेळीं उगवतो. या शरच्चंद्राचें तेज आणि आल्हादकता अतिशय असते. कलनांतील त्याची उत्तरेकडील गति आणि विषुवांशांतील पूर्वेकडील गति समचल असल्यामुळें चंद्र मेष संपातांत स्थिर असल्याप्रमाणें वाटतो व क्रांतिवृत्ताला समांतर असल्यानें त्याचें तेजहि वाढलेलें असतें.

**समोष्ण रेषा**—(आयसो-थर्मल लाइन). ज्यांचें साधारण वार्षिक उष्णतामान सारखें आहे, अशा स्थळांवरून नकाशांत काढलेली रेषा. यांचे दोन प्रकार समतापरेषा व समहिमरेषा असे आहेत. वर्षाच्या अत्यंत उष्ण महिन्यांतील साधारण उष्णतामान ज्यांचें एकसारखें आहे, अशीं स्थळें समतापरेषेवर दाखविलेलीं असतात; व याउलट अत्यंत शीत महिन्यांतील साधारण उष्णतामानाचीं एकसारखीं स्थळें समहिमरेषेवर असतात.

**सम्राट्**—राजांना देण्यांत येणारी ही सर्वांत उच्च पदवी होय. अनेक राजांवर वर्चस्व गाजविणारा सर्वश्रेष्ठ राजा तो सम्राट्. या सम्राटानें राजसूय यज्ञ केलेला असतो. "येनेष्टं राजसूयेन मंडलेश्वरश्च यः। शास्ति यश्चाज्ञया राज्ञः स सम्राट्" अशी अमरकोशांत व्याख्या आहे. वैदिक वाङ्मयांत सम्राट् शब्द येतो. ऐतरेय ब्राह्मणांत पूर्वेकडील राजांना ही पदवी लाविलेली आहे. विदेहाच्या जनकाला ही पदवी होती. ऐतिहासिक काळांतील अशोक, समुद्रगुप्त, हर्ष, अकबर, वगैरेंना सम्राट् असें उपपद लावण्यांत येतें. इंग्रजींतील 'एम्परर' हा शब्द 'इंपेरेटर' या शब्दापासून बनला असून त्यांत मूळ शब्द इंपेरे, म्हणजे आज्ञा, हुकूम करणें (कमांड) हा असून त्याचा अगदीं सामान्य अर्थ सैन्याचा कमांडर असा आहे. रोमन लोकशाही नष्ट झाल्यावर रोमन साम्राज्याच्या राज्यकर्त्यांना इंपेरेटर ही पदवी देण्यांत आली, व तिचा अर्थ सर्वोच्चसत्ताधीश असा आहे. रोम शहराचा पाडाव झाल्यावर ही पदवी पूर्व अर्थ बायझन्टाइन साम्राज्यांत सुमारें दहा शतकें चालू राहिली. ८०० सालीं पश्चिम युरोपांत शार्लमान यानें 'एम्परर' ही पदवी पुन्हां धारण केली. पूर्व युरोपांत १४५३ सालीं ही पदवी नष्ट झाली, परंतु पुढें १७२१ सालीं रशियाच्या पहिल्या पीटर या राजानें एम्परर ही पदवी धारण केली. फ्रान्समध्यें पहिला नेपोलियन आणि त्याचा पुतण्या तिसरा नेपोलियन ह्या दोघांना एम्परर पदवी देण्यांत आली होती. १८७० सालीं दुसरें जर्मन साम्राज्य (एम्पायर) स्थापण्यांत आलें तें १९१८ सालीं नष्ट झालें. इंग्लंडांत व्हिक्टोरिया राणीनें १८७६ सालीं 'एम्प्रेस ऑफ इंडिया' (हिंदुस्थानची सम्राज्ञी) ही पदवी धारण केली. पुढील इंग्लंडच्या राजांना 'एम्परर ऑफ इंडिया' (हिंदुस्थानचे सम्राट् किंवा बादशहा) असें म्हणत. आज जगांत या पदवीचा पात्र असे कोणी राजे नाहींत.

**सयाम**—आशियामधला एक देश. हा इंडोचीन आणि ब्रह्मदेश यांच्या मध्यें आहे. याला थायलंड असेंहि म्हणतात. क्षेत्रफळ २,००,१४८ चौ. मैल. लो. सं. १,५७,१८,०००. मेनाम नदीच्या कांठीं बँकॉक ही याची राजधानी आहे. मेनाम व मेकाँग नद्यांच्या कांठच्या दऱ्यांतून सपाट जमीन आहे. उत्तर सयाम डोंगराळ आहे. मोगाडाकची उंची सर्वांत जास्त म्हणजे ५,००० फूट आहे. तांदूळ व सागवानी लांकूड हे निर्गत पदार्थांत मुख्य आहेत. रत्नें व माणकें यांच्या खाणी आहेत. टिन (जस्त) याच्याहि खाणी असून तोहि निर्गत होतो. यांत १८,००० बौद्ध देवळें आहेत. आगगाड्यांचे फाटे १०,००० मैल भरतील. १८ ते २० वयापर्यंत लष्करी नोकरी सक्तीची आहे. १९१७ सालीं बँकॉक येथें चुलालंकरण विद्यापीठ स्थापन झालें. चीनच्या समुद्रांतूनच सयामचें आखात निघालेलें आहे. तें ६०० मैल लांब व २५० मैल रुंद असून फार उथळ आहे. जास्तीत जास्त खोली ३०० फुटांहून कोठेंहि अधिक नाहीं.

प्राचीन काळीं इ. स. ५७५ नंतर लाओस ही सयामची पहिली लाओ राजधानी झाल्यावर चिनी आणि सयामी लोकांचें मिश्रण झालें. तेराव्या शतकांत सयामांतील सर्व बाजूंच्या लोकांना सयामी थई असें म्हणूं लागले. राजधानी सुखोथई येथून अन्यत्र ठिकाणीं हालविली व शेवटीं सुवर्णभूमीस नेली. १३८४ च्या सुमारास लेखांत राम कामहेंग राजाचा सुरेख शिलालेख सापडला [illegible] असल्याचा उल्लेख आहे. १४ व्या शतकांत

सयामी लोकांनीं कांबोडियावर स्वारी केली. पुढें कांबोडियाशीं ४०० वर्षेपर्यंत लढाया चालू होत्या. शेवटीं त्यावर सयामचें वर्चस्व झालें. सयाममध्यें प्रवेश (१५११ सालीं) करणारे पहिले युरोपियन पोर्तुगीज होत. नंतर डच, इंग्रज व फ्रेंच आले. ब्रह्मदेशानें १५५५ सालीं स्वारी करून अयुध्या घेतलें व पुन्हां १६९०–१७५९ सालांत सयाम हस्तगत ठेवला; पण ब्रह्मी लोकांचा प्येऱ्या–तक सेनानीनें पराभव करून तो राजा बनला. फ्रान्सचा सयामशीं कांहीं काळ संबंध होता. चीनचें आपणांवर वर्चस्व सयाम कबूल करी व तिकडून शिक्केमोर्तब आणवी; पण पुढें हा संबंध सयामनें टाकून दिला. पहिल्या महायुद्धांत सयाम दोस्त राष्ट्रांच्या बाजूचा होता. पुढें राष्ट्रसंघाचा सभासद बनला. जपाननें दिलेले मुलूख ब्रिटनला परत द्यावे लागले.

१९३९ सालीं थायलंड म्हणून सयाम ओळखलें जाऊं लागलें व तीन वर्षांनीं तेथें मर्यादित राजसत्ता नव्या घटनेप्रमाणें चालू झाली. दुसऱ्या महायुद्धांत सयाम जपानच्या छायाखालीं असल्यानें त्याला दोस्तांविरुद्ध युद्ध पुकारावें लागलें. १९३५ सालीं प्रजादीपक राजाला गादी सोडावी लागली, तेव्हां त्याचा पुतण्या आनंद महिडोल हा गादीवर बसला. १९४६ मध्यें सयामच्या राजाला आकस्मिक व चमत्कारिक मरण आलें. नंतर १९५० पर्यंत गादी रिकामीच होती. आतां नवीन राजाचें विधिपूर्वक सिंहासनारोहण झालें आहे.

सयामचे थई लोक बौद्ध धर्मी आहेत. राजाचा दरारा पूर्वी फार असे व लोक फारसे लढवय्ये नव्हते. हल्लीं पाश्चात्य पद्धतीप्रमाणें राज्यकारभार ठेवला आहे. राज्यांत एक लोकप्रतिनिधि-मंडळ आहे.

सयामी भाषा–वाङ्मय—थई भाषा ही सुखोथई राज्याच्या आरंभापासून म्हणजे १३ व्या शतकापासून सुरू झाली असें दिसतें. राम कामहेंग राजानें राज्य स्थापल्याबरोबर थई वर्णमालेचीहि स्थापना केली. ही वर्णमाला भारतीय व ख्मेर वर्णमालांवर आधारलेली होती. त्या वेळचे थई भाषेंतील शिलालेख उपलब्ध आहेत. पुढें शेजारच्या ख्मेर भाषेचा मोठा पगडा थई भाषेवर पडला असला तरी पाली आणि संस्कृत भाषांचाहि परिणाम दिसून येतो. थई काव्यांत यमकें व प्रास फार शिरल्याचें १४ व्या शतकांत आढळतें. तसेंच शब्दांवर आघात आले. थई कवितांत क्लोंग, चांटा, गपया व क्लोन असे चार मुख्य वर्ग पडतात. वृत्तांवरून हे पडले आहेत.

थई वाङ्मयाचे दोन भरभराटीचे काल पडतात: एक १७ वें शतक व १८ व्या शतकाचा आरंभ म्हणजे जुन्या आयुथिया राजधानीचा काल. व दुसरा म्हणजे विद्यमान चक्री घराण्याचीं पहिलीं शंभर वर्षे. पहिल्या कालखंडांत कवितांना अतिशय ऊत आला. राजनौकागीतें हें यांचें वैशिष्ट्य म्हणतां येईल. कांहीं पौराणिक नाटकेंहि या काळांतील उपलब्ध आहेत. दुसरा कालखंड सु. १७८३ पासून सुरू होतो. आयुथियाच्या नाशानंतर जनतेंत वीरवृत्ति जागृत झाली व ती साहित्यांतून प्रतीत होऊं लागली. भारतीय रामायणाचाहि या कामीं चांगला उपयोग झाला. नंतर अद्‌भुतरम्यता वाङ्मयांत शिरली. प्रेमकथा लिहिल्या जाऊं लागल्या. दुसरा राम (१८०९–२४) याच्या कारकीर्दींत छंदोबद्ध प्रणयपत्रें सर्रहा सुरू झालीं. आपुल्या-मायुकांना उद्देशून लहान लहान संबोधक काव्यें (ओड्स) तयार झालीं. नाटकेंहि लिहिलीं जात होतीं. राम राजाहि चांगला कवि होता.

याप्रमाणें थई काव्य जरी समृद्ध व गुणान्वित होतें तरी त्याची कीर्ति देशाबाहेर जाऊं शकली नाहीं; कारण भाषांतराला थई छंदोबद्ध भाषा फार अवघड आहे. श्रीप्रज, सुंतोर्नपू व नरेंद्र हे प्रथम श्रेणीचे कवी होत.

विसाव्या शतकाच्या प्रारंभीं राजा वज्रायुध किंवा ६ वा राम (१९११–२५) हा इंग्लंडमध्यें शिकून येऊन शेक्सपियरच्या नाटकांचें सुंदर रूपांतर करूं लागला. त्याला संस्कृत आणि पाली या भाषाहि अवगत असल्यानें त्या भाषांतील बऱ्याचशा कथा त्यानें थई भाषेंत उतरल्या. त्याचें स्वतंत्र वाङ्मयहि आहे. त्यानें रचलेलीं गीतें लहान मुलांच्या तोंडीं आहेत. त्याचे समकालीन कांहीं लेखक असून त्यांनीं कथावाङ्मयाला सुरवात केली. या कथांतून विशेष वाङ्मयगुण प्रगट झाले नसले तरी नवीन प्रकार म्हणून त्यांना महत्त्व आहे.

**संयुक्तप्रांत (आग्रा–अयोध्या)**—आजचा उत्तर प्रदेश. भारतांतील या प्रांताच्या उत्तरेला नेपाळ, पश्चिमेस पंजाब आणि राजपुताना, दक्षिणेस मध्य भारत व पूर्वेस बिहार असे प्रदेश आहेत. क्षे. फ. १,०६,२४७ चौ. मै. व लो. सं. (१९४१) ५,५०,२०,६१७ आहे. हवामान कोरडें पण अतिशय थंडी आणि उन्हाळा असतो. पाऊस साधारणच पडतो, पण पाटबंधारे असंख्य असून पुष्कळच जमीन त्यांनीं भिजली जाते. पिकांमध्यें प्रमुख म्हणजे ऊंस आणि बाजरी (मिलेट). त्यांखालोखाल गहूं, चाली व डाळी पिकतात. हिंदुस्थानांत अफू फक्त याच प्रांतांत होते. १९३९–४० सालीं ८३ साखरेच्या, ३ लोकरीच्या व २५ कापडाच्या गिरण्या होत्या. या प्रांतांतून आगगाड्यांचे फाटे इतर प्रांतांतल्यापेक्षां जास्त आहेत. लोकवस्ती बहुसंख्येनें हिंदु आहे. शें. ७५ लोक शेतकीवर अवलंबून आहेत. बहुतेक लोक खेड्यांतून आहेत पण या प्रांतांत मध्यम शहरें इतर प्रांतांतल्यापेक्षां अधिक आहेत. लखनौ, कानपूर, आग्रा, बनारस व अलाहाबाद हीं शहरें फार मोठीं आहेत. कानपूर सोडून वरील चार शहरीं व अलीगड येथें विद्यापीठें आहेत.

ब्रिटिशांनीं प्रथम याचें नांव 'नॉर्थ वेस्टर्न' म्हणजे वायव्य प्रांत असें ठेविलें होतें. कारण त्यांच्या राज्याच्या वायव्येस हा भाग होता (१८७७). नंतर आग्रा आणि अयोध्या यांचा संयुक्त प्रांत असें नांव १९०२ सालीं मिळालें व पुढें नुसतेंच संयुक्त किंवा युक्त-प्रांत हें नांव १९३७ पासून रुढ झालें. १९२० पर्यंत या प्रांतावर एक लेफ्टनंट गव्हर्नर असे. नवीन सुधारणा-कायद्यान्वयें हा गव्हर्नरचा प्रांत बनला व इतर मोठ्या प्रांताप्रमाणें याला अधिकार मिळाले. या प्रांतावर १९४७ सालीं प्रथम हिंदी गव्हर्नर म्हणून श्रीमती सरोजिनी नायडू या होत्या. त्या १९४९ सालीं वारल्यावर सर होमी मोदी हे गव्हर्नर झाले. पंतप्रधान श्री. गोविंदवल्लभ पंत हे प्रथमपासून आहेत. या प्रांताची राजधानी लखनौ आहे. उत्पन्न सुमारें ४५ कोटी रुपये आहे.

या प्रांतांत गंगा आणि यमुना या नद्या फार मोठ्या व महत्त्वाच्या आहेत. पानपत येथें तीन मोठे सुप्रसिद्ध संग्राम झाले. यांतील आग्रा शहर हें राजकीय महत्त्वाचें तर बनारस हें धार्मिक महत्त्वाचें आहे. मुसलमान व मराठे यांच्या स्वाऱ्या व अमल या प्रदेशांत पाठोपाठ झाले व नंतर ब्रिटिश सरकारलाहि या भागांत आपली सत्ता दृढमूल करावी लागली. अयोध्या राज्याचा इतिहास तर मोठा धामधुमीचा वाटेल. १८५७ च्या शिपायांच्या बंडाची झळ याच प्रांताला विशेष लागली. नंतर कॉंग्रेसची चळवळहि येथें बहुसंख्येमुळें परिणामकारक झाली.

ऐतिहासिक अवशेष काशी, अलाहाबाद, कासिया, वगैरे ठिकाणीं सांपडले आहेत. वास्तूंच्या अवशेषांखेरीज ताम्रपट व नाणीं बरींच उपलब्ध झालीं. मथुरा व ललितपूर या ठिकाणीं जैन देवळें आहेत. कनोज हें प्राचीन पौराणिक नगर आहे व मुसलमानांच्या मशिदी आग्रा, दिल्ली, बदौन, वगैरे ठिकाणीं प्रेक्षणीय आहेत. ताजमहाल तर जगप्रसिद्ध आहे. फत्तेपूर-शिक्री पाहून मोंगल वैभवाची साक्ष पटते. हिंदुस्थानचा मोठा इतिहास याच उत्तर प्रदेशांत घडून आला आहे.

**संयुक्त भांडवली संस्था**—(जॉइंट स्टॉक कंपनी). कांहीं व्यक्ती एकत्र जमून नफ्यासाठीं ठराविक भांडवल योजून तें आपआपसांत कमीअधिक हिस्स्यांनीं उभें करतात तेव्हां त्या संघाला हें नांव आहे. अशी संस्था मर्यादित जबाबदारीची असेल तेव्हां ती 'इंडियन कंपनीज् ॲक्ट' या कायद्यांतील नियमाप्रमाणें व्यवहार करते. भांडवलाचे भाग पाडून ते विकण्यांत येतात. संस्थेला जो नफा होईल तो भागीदारांमध्यें हिस्सेरशीनें वांटतात. 'मर्यादित जबाबदारी संघ' पाहा.

**संयुक्त राष्ट्रसंघ**—'युनायटेड नेशन्स ऑर्गानिझेशन' (युनो). ही राजकीय संस्था १९४५ च्या जून महिन्यांत दुसऱ्या महायुद्धानंतर स्थापन करण्यांत आली. ज्या सनदेवरून ही संस्था निर्माण झाली त्या सनदेवर पन्नास राष्ट्रांच्या प्रतिनिधींच्या सह्या आहेत. संघाची पहिली सभा १९४६ च्या जानेवारींत लंडन येथें भरली. जुन्या राष्ट्रसंघाप्रमाणेंच याची व्यवस्था आहे. (राष्ट्रसंघ पाहा). संघाचे पांच मुख्य विभाग केले आहेत: (१) संरक्षक मंडळ (सेक्युरिटी कौन्सिल); हें ११ जणांचें असतें. (२) साधारण सभा (जनरल असेंब्ली); जगाची आर्थिक स्थिति ताब्यांत ठेवून राष्ट्राराष्ट्रांतील वैमनस्यें दूर करण्याचे उपाय शोधण्याचा उद्देश सभेचा आहे. (३) आर्थिक आणि सामाजिक मंडळ; यांत १८ जण असतात. (४) आंतरराष्ट्रीय न्यायसभा; सभासद-राष्ट्रांच्या तक्रारींचा निकाल देण्यासाठीं यांत पंधरा न्यायाधीश असतात. व (५) चिटणीस मंडळ.

एखाद्या राष्ट्रानें दुसऱ्यावर जुलूम चालविला तर त्याची खोड मोडण्यासाठीं या राष्ट्रसंघाची तयारी पाहिजे व त्यासाठीं जीं पांच मोठीं राष्ट्रें आहेत त्यांच्यांत एकी असली पाहिजे. आज युनोंत साठ राष्ट्रें सामील आहेत. उत्तर कोरियानें दक्षिण कोरियावर आक्रमण केलें तेव्हां युनोनें सैन्य पाठवून उ. कोरियाला मागें हटविलें व सबंध कोरिया ताब्यांत घेतला. पण पुन्हां उ. कोरियानें चीनच्या मदतीनें युनोशीं लढा चालविला आहे.

**संयोजन**—(व्हल्कनायझेशन). गंधकीकरण. रबरावर कोणत्याहि प्रकारें गंधकाची क्रिया करून त्याचा टिकाऊपणा, स्थितिस्थापकता, इत्यादि गुण वाढवून त्याचा कला-उद्योगधंद्यांमध्यें उपयोग करण्याच्या क्रियेस हें नांव देण्यांत येतें. ही क्रिया प्रथम वितळलेल्या गंधकामध्यें रबर बुडवून त्यास २०० अंशांपर्यंत उष्णता देऊन करण्यांत येत असे. अलीकडे नवीन पद्धती निघाल्या आहेत. या क्रियेनें बनविलेला रबर कोणत्याहि उष्णमानांत अधिक स्थितिस्थापक होतो; व कोणत्याहि द्रावकामध्यें विद्रुत होत नाहीं, व त्यावर बऱ्याच तीव्र उष्णमानाचाहि परिणाम होत नाहीं. अशा तऱ्हेच्या रबराचा उपयोग कापड जलाभेद्य करण्याच्या कामीं, तसेंच बूट, जोडे, चटया, खेळणीं, पट्टे, चाकाच्या धांवा, वॉशर, पडदे, नळ्या, आग विझविण्याच्या पाण्याच्या नळ्या, वैद्यकीं व शस्त्रक्रियेचीं उपकरणें, इत्यादि कामीं करण्यांत येतो.

**सय्यद**—ही एक मुसलमानांची प्रसिद्ध जात सर्व प्रांतांत आढळते. मुसलमानांत सय्यद ही सर्वांत पवित्र जात असून तिच्यांतील लोक महंमद पैगंबराची मुलगी फातिमा व जांवई अली यांचे वंशज आहेत असें मानण्यांत येतें. नव्या मुसलमान झालेल्या हिंदूंशीं विवाह केल्यामुळें व नीच जातीच्या लोकांस श्रेष्ठ जातींत घेण्याची नेहमीं हाव असल्यामुळें सय्यद जातींत बरीच भेसळ झाली आहे. सय्यद लोक आपल्या मुली सय्यद किंवा कुरेशी यांखेरीज दुसऱ्या कोणासहि देत नाहींत; परंतु ते

सयामी लोकांनीं कॉंबोडियावर स्वारी केली. पुढे कॉंबोडियाशीं ४०० वर्षेपर्यंत लढाया चालू होत्या. शेवटीं त्यावर सयामचें वर्चस्व झालें. सयाममध्यें प्रवेश (१५११ सालीं) करणारे पहिले युरोपियन पोर्तुगीज होत. नंतर डच, इंग्रज व फ्रेंच आले. ब्रह्मदेशानें १५५५ सालीं स्वारी करून अयुध्या घेतलें व पुन्हां १६९०-१७५९ सालांत सयाम हस्तगत ठेवला; पण ब्रह्मी लोकांचा प्ये-या-तक सेनानीनें पराभव करून तो राजा बनला. फ्रान्सचा सयामशीं कांहीं काळ संबंध होता. चीननें आपणांवर वर्चस्व सयाम कबूल करी व तिकडून शिक्केमोर्तब आणवी; पण पुढें हा संबंध सयामनें टाकून दिला. पहिल्या महायुद्धांत सयाम दोस्त राष्ट्रांच्या बाजूचा होता. पुढें राष्ट्रसंघाचा सभासद बनला. जपाननें दिलेले मुलूख ब्रिटनला परत द्यावे लागले.

१९३९ सालीं थायलंड म्हणून सयाम ओळखलें जाऊं लागलें व तीन वर्षांनीं तेथें मर्यादित राजसत्ता नव्या घटनेप्रमाणें चालू झाली. दुसऱ्या महायुद्धांत सयाम जपानच्या छापाखालीं असल्यानें त्याला दोस्तांविरुद्ध युद्ध पुकारावें लागलें. १९३५ सालीं प्रजादीपक राजाला गादी सोडावी लागली, तेव्हां त्याचा पुतण्या आनंद महिडोल हा गादीवर बसला. १९४६ मध्यें सयामच्या राजाला आकस्मिक व चमत्कारिक मरण आलें. नंतर १९५० पर्यंत गादी रिकामीच होती. आतां नवीन राजाचें विधिपूर्वक सिंहासनारोहण झालें आहे.

सयामचे थई लोक बौद्ध धर्मी आहेत. राजाचा दरारा पूर्वी फार असे व लोक फारसे लढवय्ये नव्हते. हल्लीं पाश्चात्य पद्धतीप्रमाणें राज्यकारभार ठेवला आहे. राज्यांत एक लोकप्रतिनिधि-मंडळ आहे.

सयामी भाषा-वाङ्मय—थई भाषा ही सुखोथई राज्याच्या आरंभापासून म्हणजे १२ व्या शतकापासून सुरू झाली असें दिसतें. राम कामहेंग राजानें राज्य स्थापल्याबरोबर थई वर्णमालेचीहि स्थापना केली. ही वर्णमाला भारतीय व ख्मेर वर्णमालांवर आधारलेली होती. त्या वेळचे थई भाषेंतील शिलालेख उपलब्ध आहेत. पुढें शेजारच्या ख्मेर भाषेचा मोठा पगडा थई भाषेवर पडला असला तरी पाली आणि संस्कृत भाषांचाहि परिणाम दिसून येतो. थई काव्यांत यमकें व प्रास फार शिरल्याचें १४ व्या शतकांत आढळतें. तसेंच शब्दांवर आघात आले. थई कवितांत क्लोंग, चांटा, गपया व क्लोन असे चार मुख्य वर्ग पडतात. वृत्तांवरून हे पटले आहेत.

थई वाङ्मयाचे दोन भरभराटीचे काल पडतात: एक १७ वें शतक व १८ व्या शतकाचा आरंभ म्हणजे जुन्या आयुथिया राजधानीचा काल. व दुसरा म्हणजे विद्यमान चक्री घराण्याचीं पहिलीं शंभर वर्षे. पहिल्या कालखंडांत कवितांना अतिशय ऊत आला. राजनौकागीतें हें याचें वैशिष्ट्य म्हणतां येईल. कांहीं पौराणिक नाटकेंहि या काळांतील उपलब्ध आहेत. दुसरा कालखंड सु. १७८३ पासून सुरू होतो. आयुथियाच्या नाशानंतर जनतेंत वीरवृत्ति जागृत झाली व ती साहित्यांतून प्रतीत होऊं लागली. भारतीय रामायणाचाहि या कामीं चांगला उपयोग झाला. नंतर अद्भुतरम्यता वाङ्मयांत शिरली. प्रेमकथा लिहिल्या जाऊं लागल्या. दुसरा राम (१८०९-२४) याच्या कारकीर्दींत छंदोबद्ध प्रणयपत्रें सर्रास सुरू झालीं. आपुक-मापुकांना उद्देशून लहान लहान संबोधक काव्यें (ओड्स) तयार झालीं. नाटकेंहि लिहिलीं जात होतीं. राम राजाहि चांगला कवि होता.

याप्रमाणें थई काव्य जरी समृद्ध व गुणान्वित होतें तरी त्याची कीर्ति देशाबाहेर जाऊं शकली नाहीं; कारण भाषांतराला थई छंदोबद्ध भाषा फार अवघड आहे. श्रीप्रज, सुंतोर्नपू व नरींद्र हे प्रथम श्रेणीचे कवी होत.

विसाव्या शतकाच्या प्रारंभीं राजा वज्रायुध किंवा ६ वा राम (१९११-२५) हा इंग्लंडमध्यें शिकून येऊन शेक्सपियरच्या नाटकांचें सुंदर रूपांतर करूं लागला. त्याला संस्कृत आणि पाली या भाषाहि अवगत असल्यानें त्या भाषांतील बऱ्याचशा कथा त्यानें थई भाषेंत उतरल्या. त्याचें स्वतंत्र वाङ्मयहि आहे. त्यानें रचलेलीं गीतें लहान मुलांच्या तोंडीं आहेत. त्याचे समकालीन कांहीं लेखक असून त्यांनीं कथावाङ्मयाला सुरुवात केली. या कथांतून विशेष वाङ्मयगुण प्रगट झाले नसले तरी नवीन प्रकार म्हणून त्यांना महत्त्व आहे.

**संयुक्तप्रांत (आग्रा-अयोध्या)**—आजचा उत्तर प्रदेश. भारतांतील या प्रांताच्या उत्तरेला नेपाळ, पश्चिमेस पंजाब आणि राजपुताना, दक्षिणेस मध्य भारत व पूर्वेस बिहार असे प्रदेश आहेत. क्षे. फ. १,०६,२४७ चौ. मै. व लो. सं. (१९४१) ५,५०,२०,६१७ आहे. हवामान कोरडें पण अतिशय थंडी आणि उन्हाळा असतो. पाऊस साधारणच पडतो, पण पाटबंधारे असंख्य असून पुष्कळच जमीन त्यांनीं भिजली जाते. पिकांमध्यें प्रमुख म्हणजे ऊंस आणि बाजरी (मिलेट). त्यांखालोखाल गहूं, बार्ली व डाळी पिकतात. हिंदुस्थानांत अफू फक्त याच प्रांतांत होते. १९३९-४० सालीं ८३ साखरेच्या, ३ लोंकरीच्या व २५ कापडाच्या गिरण्या होत्या. या प्रांतांतून आगगाड्यांचे फांटे इतर प्रांतांतल्यापेक्षां जास्त आहेत. लोकवस्ती बहुसंख्येनें हिंदु आहे. शें. ७५ लोक शेतकीवर अवलंबून आहेत. बहुतेक लोक खेड्यांतून आहेत पण या प्रांतांत मध्यम शहरें इतर प्रांतांतल्यापेक्षां अधिक आहेत. लखनौ, कानपूर, आग्रा, बनारस व अलाहाबाद हीं शहरें फार मोठीं आहेत. कानपूर सोडून वरील चार शहरीं व अलीगड येथें विद्यापीठें आहेत.

ब्रिटिशांनीं प्रथम याचें नांव 'नॉर्थ वेस्टर्न' म्हणजे वायव्य प्रांत असें ठेविलें होतें. कारण त्यांच्या राज्याच्या वायव्येस हा भाग होता (१८७७). नंतर आग्रा आणि अयोध्या यांचा संयुक्त प्रांत असें नांव १९०२ सालीं मिळालें व पुढें नुसतेंच संयुक्त किंवा युक्त-प्रांत हें नांव १९३७ पासून रूढ झालें. १९२० पर्यंत या प्रांतावर एक लेफ्टनंट गव्हर्नर असे. नवीन सुधारणा-कायद्यान्वयें हा गव्हर्नरच्या प्रांत बनला व इतर मोठ्या प्रांताप्रमाणें याला अधिकार मिळाले. या प्रांतावर १९४७ सालीं प्रथम हिंदी गव्हर्नर म्हणून श्रीमती सरोजिनी नायडू या होत्या. त्या १९४९ सालीं वारल्यावर सर होमी मोदी हे गव्हर्नर झाले. पंतप्रधान श्री. गोविंदवल्लभ पंत हे प्रथमपासून आहेत. या प्रांताची राजधानी लखनौ आहे. उत्पन्न सुमारें ४९ कोटी रुपये आहे.

या प्रांतांत गंगा आणि यमुना या नद्या फार मोठ्या व महत्त्वाच्या आहेत. पानपत येथें तीन मोठे सुप्रसिद्ध संग्राम झाले. यांतील आग्रा शहर हें राजकीय महत्त्वाचें तर बनारस हें धार्मिक महत्त्वाचें आहे. मुसलमान व मराठे यांच्या स्वाऱ्या व अमल या प्रदेशांत पाठोपाठ झाले व नंतर ब्रिटिश सरकारलाहि या भागांत आपली सत्ता दृढमूल करावी लागली. अयोध्या राज्याचा इतिहास तर मोठा धामधुमीचा वाटेल. १८५७ च्या शिपायांच्या बंडाची झळ याच प्रांताला विशेष लागली. नंतर काँग्रेसची चळवळहि येथें बहुसंख्येमुळें परिणामकारक झाली.

ऐतिहासिक अवशेष काशी, अलाहाबाद, कासिया, वगैरे ठिकाणीं सांपडले आहेत. वास्तूंच्या अवशेषांखेरीज ताम्रपट व नाणीं बरींच उपलब्ध झालीं. मथुरा व ललितपूर या ठिकाणीं जैन देवळें आहेत. कनोज हें प्राचीन पौराणिक नगर आहे व मुसलमानांच्या मशिदी आग्रा, दिल्ली, बदौन, वगैरे ठिकाणीं प्रेक्षणीय आहेत. ताजमहाल तर जगप्रसिद्ध आहे. फत्तेपूर-शिक्री पाहून मोंगल वैभवाची साक्ष पटते. हिंदुस्थानचा मोठा इतिहास याच उत्तर प्रदेशांत घडून आला आहे.

**संयुक्त भांडवली संस्था**—(जॉइंट स्टॉक कंपनी). कांहीं व्यक्ती एकत्र जमून नफ्यासाठीं ठराविक भांडवल योजून तें आपआपसांत कमीअधिक हिस्स्यांनीं उभें करतात तेव्हां त्या संघाला हें नांव आहे. अशी संस्था मर्यादित जबाबदारीची असेल तेव्हां ती 'इंडियन कंपनीज् ॲक्ट' या कायद्यांतील नियमाप्रमाणें व्यवहार करते. भांडवलाचे भाग पाडून ते विकण्यांत येतात. संस्थेला जो नफा होईल तो भागीदारांमध्यें हिस्सेशीनें वांटतात. 'मर्यादित जबाबदारी संघ' पाहा.

**संयुक्त राष्ट्रसंघ**—'युनायटेड नेशन्स ऑर्गनिझेशन' (युनो). ही राजकीय संस्था १९४५ च्या जून महिन्यांत दुसऱ्या महायुद्धानंतर स्थापन करण्यांत आली. ज्या सनदेवरून ही संस्था निर्माण झाली त्या सनदेवर पन्नास राष्ट्रांच्या प्रतिनिधींच्या सह्या आहेत. संघाची पहिली सभा १९४६ च्या जानेवारींत लंडन येथें भरली. जुन्या राष्ट्रसंघाप्रमाणेंच याची व्यवस्था आहे. (राष्ट्रसंघ पाहा). संघाचे पांच मुख्य विभाग केले आहेत: (१) संरक्षक मंडळ (सेक्युरिटी कौन्सिल); हें ११ जणांचें असतें. (२) साधारण सभा (जनरल असेंब्ली); जगाची आर्थिक स्थिति ताब्यांत ठेवून राष्ट्राराष्ट्रांतील वैमनस्यें दूर करण्याचे उपाय शोधण्याचा उद्देश सभेचा आहे. (३) आर्थिक आणि सामाजिक मंडळ; यांत १८ जण असतात. (४) आंतरराष्ट्रीय न्यायसभा; सभासद-राष्ट्रांच्या तक्रारींचा निकाल देण्यासाठीं यांत पंधरा न्यायाधीश असतात. व (५) चिटणीस मंडळ.

एखाद्या राष्ट्रानें दुसऱ्यावर जुलूम चालविला तर त्याची खोड मोडण्यासाठीं या राष्ट्रसंघाची तयारी पाहिजे व त्यासाठीं जीं पांच मोठीं राष्ट्रें आहेत त्यांच्यांत एकी असली पाहिजे. आज युनोंत साठ राष्ट्रें सामील आहेत. उत्तर कोरियानें दक्षिण कोरियावर आक्रमण केलें तेव्हां युनोनें सैन्य पाठवून उ. कोरियाला मागें हटविलें व सबंध कोरिया ताब्यांत घेतला. पण पुन्हां उ. कोरियानें चीनच्या मदतीनें युनोशीं लढा चालविला आहे.

**संयोजन**—(व्हल्कनायझेशन). गंधकीकरण. रबरावर कोणत्याहि प्रकारें गंधकाची क्रिया करून त्याचा टिकाऊपणा, स्थितिस्थापकता, इत्यादि गुण वाढवून त्याचा कला-उद्योग-धंद्यांमध्यें उपयोग करण्याच्या क्रियेस हें नांव देण्यांत येतें. ही क्रिया प्रथम वितळलेल्या गंधकामध्यें रबर बुडवून त्यास ३०० अंशांपर्यंत उष्णता देऊन करण्यांत येत असे. अलीकडे नवीन पद्धती निघाल्या आहेत. या क्रियेनें बनविलेला रबर कोणत्याहि उष्णमानांत अधिक स्थितिस्थापक होतो; व कोणत्याहि द्रावणामध्यें विद्रुत होत नाहीं, व त्यावर बऱ्याच तीव्र उष्णमानाचाहि परिणाम होत नाहीं. अशा तऱ्हेच्या रबराचा उपयोग कापड जलाभेद्य करण्याच्या कामीं, तसेंच बूट, जोडे, चटया, खेळणीं, पट्टे, चाकाच्या धांवा, वॉशर, पेटे, नळ्या, आग विझविण्याच्या पाण्याच्या नळ्या, वैद्याचीं व शस्त्रक्रियेचीं उपकरणें, इत्यादि कामीं करण्यांत येतो.

**सय्यद**—ही एक मुसलमानांची प्रसिद्ध जात सर्व प्रांतांत आढळते. मुसलमानांत सय्यद ही सर्वांत पवित्र जात असून तिच्यांतील लोक महंमद पैगंबराची मुलगी फातिमा व जांवई अली यांचे वंशज आहेत असें मानण्यांत येतें. नव्या मुसलमान झालेल्या हिंदूशीं विवाह केल्यामुळें व नीच जातीच्या लोकांत श्रेष्ठ जातींत येण्याची नेहमीं हाव असल्यामुळें सय्यद जातींत बरीच भेसळ झाली आहे. सय्यद लोक आपल्या मुली सय्यद किंवा कुरेशी यांखेरीज दुसऱ्या कोणासहि देत नाहींत; परंतु ते

दुसऱ्या जातींच्या मुलींशीं लग्नें लावतात. त्यांच्यांत बहुतेक सर्व लोक शिया पंथाचे आहेत. हे लोक आळशी शेतकरी असून बहुतकरून शिष्यवर्गाच्या देणग्यांवर अवलंबून असतात.

**सय्यद अहमदखान, सर** (१८१७–१८९८)—एक हिंदी मुसलमान पुढारी. अलीगड मुस्लिम युनिव्हर्सिटीच्या कल्पनेचे जनक, मुसलमान समाजांतील एक समाजसुधारक, उर्दू लेखक, वक्ते व सध्यांच्या हिंदु-मुसलमान प्रश्नाचे निर्माते म्हणून यांना मान आहे. दिल्ली हें यांचें जन्मठिकाण. प्राथमिक शिक्षण झाल्यावर यांनीं निजनूर, गाझीपूर, अलीगड, वगैरे ठिकाणीं शिरस्तेदार व मुन्सफ म्हणून कामें केलीं व १८७६ मध्यें सेवानिवृत्त झाले.

१८५७ सालच्या बंडास इंग्रज व हिंदी लोक यांमधील गैरसमजच कारण झाले आहेत असें विचारांतीं यांना आढळून आलें व यावर उपाय म्हणून यांनीं हिंदी लोकांना सुसंस्कृत करण्याचा मार्ग शोधून काढला. या दृष्टीनें यांनीं प्रथम मुरादाबाद येथें पहिल्या अर्वाचीन इतिहासाचें शिक्षण देणाऱ्या शाळेची स्थापना केली. पाश्चात्य शिक्षण व धार्मिक शिक्षण देणाऱ्या संस्थेची जरूरी वाटूं लागल्यानें यांनीं १८७२ सालीं 'मॉहमेडन् अँग्लो-ओरिएंटल कॉलेज' फंडाला सुरुवात करून सर विल्यम मूर यांच्या हस्तें या संस्थेची प्रथम शाळा व नंतर कॉलेजहि उघडलें (सन १८७७). याच संस्थेस पुढें व्यापक स्वरूप येऊन 'मॉहमेडन् एज्युकेशनल कॉन्फरन्स'च्या स्थापनेनंतर १९२० सालीं तेथेंच अलीगड युनिव्हर्सिटीची स्थापना करण्यांत आली.

राष्ट्रसभेच्या विरोधकांपैकीं हे एक होते. मुसलमानांनीं राष्ट्रसभेंत सामील होण्यास यांचा विरोध होता. ब्रिटिशांवर असलेला यांचा विश्वासहि नंतर उडाला. यांचे उर्दू ग्रंथ अत्यंत लोकप्रिय असून त्यांचीं अनेक युरोपीय भाषांत भाषांतरें झालीं आहेत. यांनीं लिहिलेलीं पत्रें 'तहझीबुल अखलाक' या नांवानें सुप्रसिद्ध आहेत.

**सय्यद महंमद बहादूर, नबाब** (१८६९–१९१६)—एक कॉंग्रेसचे मुसलमान पुढारी. १९१४ सालपासून, मद्रास अधिवेशनापासून कॉंग्रेसचा एक सेक्रेटरी हिंदु व दुसरा मुसलमान अशी प्रथा सुरू झाली होती. त्या वेळीं नबाब सय्यद महंमद बहादूर व एन्. सुब्बराव पंतलू यांस सेक्रेटरी नेमण्यांत आलें होतें. परंतु यापूर्वींच १९१३ सालीं ते कॉंग्रेसचे कराची येथें अध्यक्ष झाले होते. हे आपणांस प्रथम कॉंग्रेसभक्त व नंतर मुसलमान धर्माचे असें मानीत. १९०१ सालच्या आरंभीं इंडियन कॉंग्रेस कमिटीवर त्यांची नेमणूक झाली होती. १९०३ सालच्या मद्रास येथील कॉंग्रेसच्या वेळीं ते स्वागताध्यक्ष होते. १९०४ मध्यें कॉंग्रेसची घटना तयार करण्याकरितां एक समिति नेमली होती, तिचे हे सभासद होते. १९०६ सालीं यांची कॉंग्रेसच्या स्टँडिंग कमिटीवर नेमणूक झाली होती. यांची देशभक्ति शुद्ध स्वरूपाची असून तीस जातीयतेचा वारा लागला नव्हता. सर्व जातींनीं एकजुटीनें प्रयत्न करणें सर्वांस हितकर आहे, असें ते म्हणत. यांनीं कराची येथें हिंदु-मुसलमानांनीं एकत्र येऊन सर्वमान्य कार्यक्रम आखावा अशी सूचना केली होती व तिचेंच फळ १९१६ मध्यें लखनौ येथें ऐक्य प्रस्थापित करण्यांत मिळालें.

**सय्यद महमूद, डॉ.** (१८८९– )—एक मुसलमान देशभक्त व मंत्री. यांचें शिक्षण बनारस व अलीगड येथें झालें. यांनीं हिंदू-मुस्लिम ऐक्याकरितां पुष्कळ खटपट केली व मिंटो सुधारणांच्या वेळीं हे संयुक्त मतदार संघास अनुकूल होते. १९१२ मध्यें यांनीं पीएच्. डी. पदवी घेतली व त्याच वर्षी वकील झाले व सर अली इमाम यांच्या विनंतीवरून पाटणा येथें वकिली करावयास गेले. हे सेंट्रल खिलाफत कमिटीचे जनरल सेक्रेटरी होते म्हणून यांस मुंबईस १९२२ मध्यें अटक होऊन शिक्षा झाली. १९२८ मध्यें हे अ. भा. कॉंग्रेस कमिटीचे जनरल सेक्रेटरी होते व पुन्हां १९३० व १९३६ मध्यें होते. या कालांत त्यांस दोनदां शिक्षा झाली. १९३७ मध्यें हे बिहारच्या असेंब्लीमध्यें निवडून आले व कॉंग्रेस मंत्रिमंडळांत शिक्षणमंत्री होते. नंतर पुन्हां १९४६ त मंत्री झाले. यांनीं बरेच ग्रंथ लिहिले आहेत.

**सय्यद रेझा अली, सर** (१८८२– )—एक हिंदी मुसलमान कार्यकर्ते. यांचें शिक्षण अलीगड येथें झालें. १९०८ मध्यें यांनीं मुरादाबाद येथें वकिली सुरू केली. १९१२ मध्यें हे संयुक्त प्रांत कायदेमंडळांत गेले. हे अलीगड कॉलेजचे एक विश्वस्त आहेत. यांनीं इस्लिंग्टन कमिशन व साउथ बरो कमिटी यांपुढें साक्षी दिल्या. १९१६ ते १९२५ पर्यंत हे मध्यवर्ती असेंब्लीचे सभासद होते. १९१६ मध्यें हे अलाहाबाद येथें येऊन राहिले. १९२१ ते १९२६ मध्यें हे कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें होते. हे दिल्ली युनिव्हर्सिटी कोर्ट, वायव्य प्रांत चौकशी समिति, वगैरेंचे सभासद होते. १९२२ व १९२३ या सालीं व्हाइसरॉय यांच्याकडे गेलेल्या तुर्कस्तानबाबतच्या मुसलमानांच्या शिष्टमंडळांत हे सभासद होते. हे अखिल भारतीय मुस्लिम लीगच्या १९२४ सालामधील मुंबई अधिवेशनाचे अध्यक्ष होते. १९२६ मध्यें हिंदुस्थान सरकारनें दक्षिण आफ्रिकेंत पाठविलेल्या शिष्टमंडळाचे हे सभासद होते. १९२९ मध्यें हे लीग ऑफ नेशन्सच्या असेंब्लीचे बदली प्रतिनिधि होते. हे १९३५ मध्यें दक्षिण आफ्रिकेंत हिंदुस्थान सरकारचे प्रतिनिधि म्हणून नेमले गेले होते. तेथें असतांना किंबर्ले येथील पुन्नु व्ही. स्वामी नांवाच्या एका हिंदी मुलीशीं यांनीं विवाह केला.

**सरकार, (सर) जदुनाथ** (१८७०– )—सुप्रसिद्ध बंगाली इतिहाससंशोधक व लेखक. एम्. ए. होतांच बनारस हिंदु विश्वविद्यालयांत हिंदुस्थानच्या अर्वाचीन इतिहासाच्या प्राध्यापकाच्या जागीं कांहीं काळ काम केल्यानंतर यांनीं इंडियन एज्युकेशनल सर्व्हिस, पाटणा विद्यापीठ, कलकत्ता

विद्यापीठ, इत्यादि अनेक ठिकाणीं महत्त्वाची बौद्धिक कामगिरी बजावली व नंतर सेवानिवृत्त झाले. १९२६–२८ मध्यें हे कलकत्ता विद्यापीठाचे कुलगुरु होते. इतिहास-संशोधन कार्याच्या कामीं मदत व्हावी म्हणून यांनीं फारसी, संस्कृत, लॅटिन, इत्यादि भाषांचेंहि अध्ययन केलें. शिवाजी, औरंगजेब व मोंगल इतिहास यांवरील यांचा अभ्यास विशेष खोल असून त्यासाठीं हे मराठी भाषाहि शिकले. औरंगजेबाचें चरित्र यांनीं पांच खंडांत प्रसिद्ध केलें आहे. पुण्यांतील पेशवे दप्तरांचें संशोधन करण्याच्या कामीं रियासतकार रा. ब. सरदेसाई यांना यांचा फार उपयोग झाला. 'पूना रेसिडेन्सी रेकॉर्ड्स' चे संपादक हेच होते. इंग्लंडच्या रॉयल एशियाटिक सोसायटीचे फेलो व सभासद होण्याचा अपूर्व मान यांना लाभला. तसेंच एकदां वंगीय साहित्य परिषदेच्या अध्यक्षपदावर यांची निवड झाली होती. शिवाजी, मोंगल, औरंगजेब यांखेरीज यांनीं ब्रिटिश इंडियाचें अर्थशास्त्र, चैतन्यचरित्र, इ. ग्रंथ आणि अनेक ऐतिहासिक संशोधनात्मक लेख लिहिले आहेत.

हिंदुस्थानांतील गाढा इतिहासलेखक म्हणून यांची मोठी कीर्ति आहे व ती योग्य आहे. महाराष्ट्राचे इतिहासकार रा. ब. गो. स. सरदेसाई हे सरकारना गुरुस्थानीं मानतात.

**सरकार, नलिनीरंजन** (१८८८– )—एक बंगाली पुढारी व औद्योगिक संस्थांचे नेते. हे हिंदुस्थान को-ऑपरेटिव्ह इन्शुअरन्स सोसायटी, लि. (कलकत्ता) चे जनरल मॅनेजर, व बंगाल नॅशनल चेंबर ऑफ कॉमर्सचे अध्यक्ष असून, कलकत्ता पोर्ट ट्रस्टवर त्यातर्फे प्रतिनिधि आहेत. १९३४–३५ मध्यें हे कलकत्ता कॉर्पोरेशनचे मेयर होते. कलकत्ता युनिव्हर्सिटीचे हे फेलो आहेत. १९३३–३४ मध्यें हे इंडियन लाइफ ऑफिसेस असोसिएशनचे अध्यक्ष होते. त्याच वर्षी हे दिल्ली येथील फेडरेशन ऑफ इंडियन चेम्बर्स ऑफ कॉमर्स अँड इंडस्ट्रीजचे अध्यक्ष होते. १९३२ पासून हे त्याच्या कार्यकारी मंडळावर आहेत. चित्तरंजन सेवासदनचे हे ट्रस्टी आहेत. बंगालमधील आर्थिक चौकशी समितीचे हे सभासद आहेत व औद्योगिक समितीचेहि सभासद होते. १९३३ पासून एम्प्लॉयर्स फेडरेशन ऑफ इंडियाच्या कार्यकारी मंडळाचे हे सभासद आहेत. तसेंच इंडियन लाइफ असोसिएशनच्या कार्यकारी मंडळाचेहि ते सभासद आहेत. १९३४–३५ मध्यें ते इंडियन इन्शुअरन्स इन्स्टिट्यूटचे अध्यक्ष होते. सेंट्रल बँकिंग इन्कायरी कमिटीचे हे सभासद होते. तसेंच रेल्वे काटकसर समितीचे सभासद होते. १९२५ मध्यें कंपनीच्या कायद्यांत दुरुस्ती सुचविण्याकरितां हिंदुस्थान सरकारनें एक समिति नेमली होती तिचे हे सभासद होते. १९३३ च्या सप्टेंबर-ऑक्टोबरमध्यें एक इंडो-जपानीज ट्रेड कॉन्फरन्स सरकारतर्फे भरविण्यांत आली होती; तिचे हे बिनसरकारी सभासद होते. बंगाल कायदे-मंडळाचे हे अनेक वर्षे सभासद आहेत. पूर्वी स्वराज्यपक्षाचे हे चिटणीस व मुख्य प्रतोद होते. अखिल भारतीय काँग्रेस कमिटीचे हे सभासद आहेत. कलकत्ता येथें भरलेल्या काँग्रेस प्रदर्शनाचे हे चिटणीस होते. यांस हिंदुस्थान सरकारनें कार्यकारी मंडळाचे सभासद नेमलें होतें; परंतु गांधींच्या उपोषणाचे वेळीं (१९४३) त्यांनीं राजीनामा दिला. आज ते प. बंगालचे अर्थमंत्री आहेत.

**सरकार, भूपेंद्रनाथ** (सु. १८९०– )—एक हिंदी चित्रपटतज्ज्ञ. हिंदी चित्रपटसृष्टींत पाश्चात्य धर्तीवर सामुदायिक योजना सुरू करणारे कलकत्त्याच्या 'न्यू थिएटर्स' या सुविख्यात सिनेमा कंपनीचे हे चालक आहेत. चित्रपटाच्या निरनिराळ्या अंगांची जबाबदारी त्या त्या क्षेत्रांतील तंत्रविशारदांवर सोंपविल्यास चित्रपट ही एक अत्युत्कृष्ट कलाकृति कशी निर्माण होते, हें स्वतःच्या उदाहरणांवरून यांनीं सर्वांच्या नजरेस आणून दिलें आहे. या कार्यासाठीं देवकी बोस, नितिन बोस, बारुआ व हेमचंद्र यांसारखे प्रतिभावान् दिग्दर्शक; रायचंद्र बोराल व पंकज मल्लिक यांसारखे संगीत-कलावंत; मुकुल बोस, तिमिर बरन, युसुफ मूळजी यांसारखे तंत्रविशारद; व शरच्चंद्र चतर्जी, आर्‍झु लखनवी यांसारखे कुशल लेखक, इत्यादि त्या त्या क्षेत्रांतील अनुभवी व्यक्तींची निवड यांनीं केली व आपल्या क्षेत्रांत स्वतंत्र रीतीनें कार्य करण्याची संधि त्यांना दिली. न्यू थिएटर्सतर्फे यांनीं 'पूरणभक्त', 'चंडीदास', 'देवदास', 'धूपछांव', 'प्रेसिडेंट', 'विद्यापति', 'डॉक्टर' यांसारखे एकापेक्षां एक सरस बोलपट निर्माण करून सैगल, काननबाला, उमाशशी, पृथ्वीराज, जमुना यांसारख्या कलावंतांना पुढें आणलें आहे.

नवे विचार, नव्या कल्पना घेऊन पहिल्या दर्जाचे जे कलाकार त्यांच्या साहाय्यानें आदर्श बोलपट निर्माण करून हिंदी चित्रपटसृष्टींत यांनीं क्रांति घडवून आणली यांत शंका नाहीं.

**सरकार, (डॉ.) महेंद्रलाल** (१८३३–१९०४)—एक होमिओपाथीचे पुरस्कर्ते. सरकारांचें वैद्यकीय शिक्षण कलकत्ता मेडिकल कॉलेजांत झालें. प्रथम हे होमिओपाथीचे कट्टे विरोधक होते. मॉर्गनचें 'फिलॉसॉफी ऑफ होमिओपाथी' हें पुस्तक वाचण्यांत आल्यावर समचिकित्सेची सत्यता व उपयुक्तता पाहण्याकरितां कांहीं काळ श्री. दत्तांच्या धर्मार्थ दवाखान्यांत ते जाऊं लागले व खात्री झाल्यावर होमिओपाथीकडे वळले. त्यांचा त्या वेळीं ॲलोपाथिक व्यवसाय अत्युच्च शिखरास पोहोंचला होता. त्यांनीं ब्रिटिश मेडिकल असोसिएशनच्या कलकत्ता शाखेपुढें होमिओपाथीवर अनुकूल असा निबंध वाचला. पण याचें प्रायश्चित्त म्हणून त्यांना त्या संस्थेंतून बाहेर पडावें लागलें! यामुळे त्यांच्या व्यवसायावर परिणाम होऊन ६ महिन्यांमध्यें तो जवळजवळ बंद पडला. परंतु त्यांनीं होमिओपाथीला अंतर दिलें नाहीं. या नव्या

शास्त्राच्या दृष्टीनें त्यांचा हा मोठा त्याग होय. 'कलकत्ता जर्नल ऑफ मेडिसिन' ह्या नांवाचें मासिक काढून त्यांत त्यांनीं होमिओपाथीचें श्रेष्ठत्व वाचकांच्या निदर्शनास आणलें. त्यांची बुद्धि हानेमानांप्रमाणें उच्च प्रतीची होती. कलकत्ता युनिव्हर्सिटीचे ते व्हाइस चॅन्सेलर होते. जोपर्यंत अद्ययावत् सोयींनीं युक्त असें होमिओपाथिक कॉलेज काढणें शक्य होणार नाहीं तोंपर्यंत ह्या शास्त्राचें शिक्षण पदव्युत्तर व्याख्यानांच्या द्वारें देण्यांत यावें असें त्यांचें स्पष्ट मत होतें. त्यांनीं आपल्या देशांत होमिओपाथीला मानाचें स्थान मिळवून दिलें.

**सरकारी गुप्त गोष्टींचा कायदा**—(दि ऑफिशियल सिक्रेट्स ॲक्ट). हा कायदा मूळ १८८९ सालीं मंजूर झाला, व त्यांत १९०४, १९११, १९२०, १९२३ व १९२७ सालीं दुरुस्त्या झाल्या. कायद्यांत 'सरकारी प्रतिबंध असलेली जागा' याचा अर्थ पुढीलप्रमाणें आहे—(अ) बचावाची तटबंदी, युद्धसामुग्री तयार करण्याची व सांठवण्याची जागा (आर्सेनल), आरमारी व लष्करी व वैमानिक ठाणें, सुरुंग, व सुरुंगतळ, लष्करी तळ, सरकारी जहाज किंवा विमान, लष्करी तारा व टेलीफोन, बिनतारी संदेशवाहक ठाणें, सरकारी कारखाना किंवा गोदी, आणि युद्धसामुग्री तयार करण्याचें किंवा सांठवण्याचें व युद्धाचे नकाशे व कागदपत्र ठेवण्याचें सरकारच्या मालकीचें किंवा ताब्यांतलें ठिकाण, युद्धकालांत उपयोगी पडणाऱ्या धातू, तेल व इतर खनिज द्रव्यें मिळण्याच्या जागा; (ब) वरील युद्धसाहित्य असलेल्या सरकारी मालकीच्या नसलेल्या पण सरकारी कॉन्ट्रॅक्टरच्या ताब्यांत असलेल्या जागा; (क) ज्या ठिकाणांची माहिती किंवा ज्या ठिकाणांची मोडतोड (डॅमेज) शत्रूला उपयोगी होईल अशीं सरकारी गॅझेटांत जाहीर केलेलीं ठिकाणें; (ड) रेल्वे, सडका, कालवे, वाहतुकीचे जलस्थलमार्ग, गॅस, वीज व पाणी यांचे कारखाने, युद्धसाहित्य तयार करण्याचीं व सांठवण्याचीं ठिकाणें—ज्या ठिकाणांची माहिती शत्रूला उपयोगी पडेल अशीं गॅझेटांत जाहीर केलेलीं सर्व ठिकाणें (कलम २). जो इसम सरकारी संरक्षणाच्या कार्याला किंवा हितसंबंधाला अपाय करण्याच्या हेतूनें सरकारी प्रतिबंध असलेल्या ठिकाणांचें (अ) निरीक्षण करतो किंवा अशा ठिकाणीं प्रवेश करतो: (ब) अशा ठिकाणाचा नकाशा, आराखडा, किंवा माहितीचें टिपण शत्रूला उपयोग व्हावा या हेतूनें तयार करतो; (क) कोणत्याहि सीक्रेट ऑफिशियल कोडची किंवा परवल्या(पास-वर्ड)ची, कागदपत्र-नकाशे-योजना यांची माहिती शत्रूला उपयोगी व्हावी या हेतूनें जमवितो किंवा प्रसिद्ध करतो किंवा दुसऱ्या कोणा इसमाला कळवितो, त्या इसमाला ती माहिती लष्करी-आरमारी-वैमानिक ठाण्यासंबंधीं किंवा युद्धसाहित्यासंबंधीं असेल तर चौदा वर्षे कैद, आणि इतर गुन्ह्यांना तीन वर्षे कैद ही शिक्षा आहे (कलम ३). ज्या इसमाच्या ताब्यांत किंवा त्याच्या नियंत्रणाखालीं सीक्रेट-ऑफिशियल-कोड किंवा पासवर्ड, नकाशे, वगैरे किंवा प्रतिबंध असलेलीं सरकारी ठाणीं व ठिकाणें आहेत तो इसम (अ) सदरबद्दलची माहिती ज्या इसमाला कळवण्याचा अधिकार नाहीं अशा इसमाला कळवील; (ब) कोणत्याहि परकी सत्तेला फायदा होईल किंवा आपल्या राज्याला धोका येईल अशा रीतीनें सदर माहितीचा उपयोग करील; (क) वरील प्रकारचें साहित्य अधिकार नसतांहि आपल्या ताब्यांत ठेवील; (ड) सदर साहित्याची योग्य काळजी घेण्यास चुकेल किंवा त्याला धोका उत्पन्न करील, तर त्याला या कलमांतील गुन्ह्याबद्दल दोन वर्षे कैद, किंवा दंड, किंवा दोन्ही शिक्षा होतील (कलम ५). जो इसम सरकारी प्रतिबंध असलेल्या ठिकाणीं देशसंरक्षणाला विघातक होण्याच्या हेतूनें प्रवेश मिळवण्याकरितां (अ) सरकारी नोकराचा ठराविक पोशाख करील, (ब) लेखी अर्जांत किंवा तोंडी खोटी माहिती देईल, (क) खोटा पासपोर्ट, दाखला किंवा परवाना तयार करील, त्याला दोन वर्षे कैद किंवा दंड किंवा दोन्ही शिक्षा होतील (कलम ७).

**सरकारी वहिवाटदार**—(रिसीव्हर). इंग्लंडांत ज्या मिळकतीबद्दल कोर्टांत दावा चालू आहे त्या मिळकतीचें उत्पन्न किंवा त्या जमिनीचा खंड वसूल करणें, या कामाकरितां हायकोर्ट जो इसम नेमतें, त्याला 'रिसीव्हर' म्हणतात. तसेंच अज्ञानांच्या इस्टेटीची व्यवस्था पाहण्याकरितां कोर्ट ज्या इसमाला नेमतें, त्याला किंवा इतर कांहीं परिस्थितींत याच कामाकरितां कोर्ट इसम नेमतें, त्याला रिसीव्हर म्हणतात. हिंदुस्थानांतहि अशाच स्वरूपाचा कायदा आहे (सिव्हिल प्रोसीजर कोड पाहा).

**सरकारी हुंडी**—(ट्रेझरी बिल). उसने घेतलेल्या पैशाबद्दल ब्रिटिश सरकार दस्तऐवज देतें त्यास म्हणतात. या हुंड्या टेंडर मागवून सरकार बँका किंवा सराफ यांना विकतें. जे कमी व्याजानें रकमा देऊं करतात त्यांनाच साहजिक या हुंड्या विकण्यांत येतात. या हुंड्यांचे पैसे तीन ते नऊ महिन्यांच्या मुदतींत फेडण्यांत येत असतात. थोड्या मुदतीसाठीं जेव्हां कर्ज लागतें तेव्हां सरकार अशा हुंड्या काढतें.

**सरकी**—कापसाचें बीं. सरकीचा उपयोग तेल काढण्याकरितां व जनावरांना खावयास घालण्याकरितां होतो. सरकींत शें. २० ते २५ पर्यंत तेलाचा भाग असतो. तेल काढल्यानंतर ढेप गुरांना खाण्यास चांगली उपयोगी पडावी म्हणून प्रथम सरकीवरचें फोलपट काढतात. तेल ऑलिव्ह तेलांत मिसळतात. किंवा ऑलिव्ह तेल म्हणूनहि विकतात. तळण्यासाठींहि तेल वापरतात. सरकीचा चांगला कागदहि होतो.

इ. स. १८०१ पर्यंत हिंदुस्थानच्या सरकीला फार मागणी नसे, पण त्या सालापासून तिची परदेशीं मोठ्या प्रमाणावर निर्यात होऊं लागली. कापसाची सरकी काढण्याचीं यंत्रें व सरकीचें टरफल काढण्याचीं यंत्रें यांचा शोध लागल्यावर तर सरकीला फार भाव आला. जगाला जितकी सरकी लागते तिच्या ⅓ हिंदुस्थान पुरवितें.

सरकीचें सरासरी वार्षिक उत्पादन
[ आंकडे हजार मणांत ]

| देश | उत्पादन |
|---|---|
| युनायटेड स्टेट्स ऑफ अमेरिका | १,३१,४०० |
| चीन | २५,३०० |
| हिंदुस्थान-पाकिस्तान | ४७,७०० |
| रशिया | ४१,८०० |
| ईजिप्त | १९,००० |
| ब्राझील | २१,८०० |
| पेरू | ४,८०० |
| मेक्सिको | ३,४०० |
| अर्जेंटिना | ३,६०० |
| युगांडा | २,८०० |
| सुदान | २,६०० |
| इतर देश | १६,२०० |

यावरून अमेरिकेच्या खालोखाल हिंदुस्थान येतो हें दिसेल.

**सरकेशिया**—आशिया, एक प्राचीन देश. हा कॉकेशसच्या वायव्य भागास असे. येथील लोक (सरकेशियन) कॉकेशस जातीहून अगदीं निराळे आहेत. ते युद्धप्रिय, देशाभिमानी व आतिथ्यशील आहेत. वरच्या वर्गातले लोक मुसलमान धर्माचे तर बहुजनसमाज खुद्रवस्तुपूजक आहे. यांची भाषा प्रगल्भ झालेली आहे. यांच्यांतील विवाहविधि राक्षसपद्धतीसारखा आहे.

**सरंजाम**—इंग्रजी 'फीफ' शब्दाचा अर्थ वंशपरंपरा दिलेली जमीन असा आहे. देशांतील सर्व जमिनीचा मुख्य मालक राजा असून नंतर त्यानें सर्व जमीन अनेक जमीनदारांना राजाला लष्करी मदत व इतर प्रकारची मदत करण्याच्या शर्तीवर दिली. ही जमीन वारसा हक्कानें वंशपरंपरा त्या जमीनदाराच्या कुटुंबाकडे कायम राहत असे. पण जमीनदार मालकाला मृत्युपत्र करून सदर जमीन वाटेल त्याला देण्याचा हक्क असे. हल्लीं 'फ्यूडल-सिस्टिम' नष्ट झाल्यामुळें जमीनदार आपल्या जमिनीचा बिनशर्त संपूर्ण मालक झालेला आहे.

ज्या काळांत शेतकी हा मुख्य धंदा होता आणि मोठमोठ्या कारखान्यांची अलीकडील यांत्रिक युगाप्रमाणें वाढ झाली नव्हती त्या काळांत जमिनीची मालकी सरंजामपद्धतीच्या मोठमोठ्या जमीनदारांकडे होती. १७८९ सालीं फ्रेंच राज्यक्रांति होईपर्यंत युरोपांतील देशांत ही सरंजाम पद्धति अमलांत होती. इंग्लंडमधील सरंजाम पद्धति क्रॉम्वेलच्या कारकीर्दीत नष्ट झाली आणि १९ व्या शतकांत युरोपांत मोठमोठ्या यांत्रिक कारखान्यांची वाढ झाल्यावर ही सरंजाम पद्धति नाहींशीच झाली. आणि नवीन नागरिकांचा वर्ग अस्तित्वांत आला. तथापि अद्यापहि कांहीं देशांत मोठ्या जमीनदारांचा वर्ग अस्तित्वांत आहे.

मराठेशाहींत सैन्य, किल्ल्यांचा बंदोबस्त, वगैरे राखण्यासाठीं इनामी जमीन देत असत त्यास सरंजाम म्हणत. तसेंच सरकारांतून पालखी वगैरे मानमरातब दिला गेल्यास त्याच्या खर्चासाठीं सरंजाम इनाम देत. सरंजामाचे चौथ, जात व फौज असे तीन प्रकार असत.

शिवाजीच्या काळीं ही सरंजाम पद्धति नव्हती. ती शाहूच्या काळीं साम्राज्यवाढीसाठीं व मध्यवर्ती सत्तेच्या आर्थिक-राजकीय सोयीसाठीं अवलंबिली गेली. या पद्धतीमुळेंच मराठी साम्राज्याचा नाश झाला, असें कांहीं टीकाकार म्हणतात. "सरदारांचें लक्ष सरकारी कामावरून उडून आपापल्या सरंजामाकडे वेधलें गेलें; सरंजामदार मगरूर होऊन धन्यास उलट्या गोष्टी सांगूं लागले आणि स्वतंत्र होण्याची इच्छा करूं लागले, त्यामुळें राज्यांतलें ऐक्य नाहींसें होऊन राज्य बुडालें, असें कांहीं लेखकांचें म्हणणें आहे तें सर्वांशीं खरें नाहीं," असें चिकित्सक इतिहासकार वासुदेवशास्त्री खरे हे पुराव्यानिशीं पटवून देतात. शिवाय सरंजामी पद्धतीचा दोष एकट्या शाहूवर किंवा पेशव्यांवर लादणें योग्य नाहीं. शिवाजीनेंहि वतनें दिलीं होतीं व त्या वतनांबद्दल सरदारांस लष्करी चाकरी करावी लागे. त्या वेळचे सर्व संस्थानिक दिल्लीच्या बादशहाचे सरंजामदारच असत. मध्यवर्ती सत्ता दुर्बळ झाल्यामुळें या पद्धतींतील दोष दिसूं लागले इतकेंच.

**सरडा**—हा पालीच्या जातीचा एक सरपटणारा प्राणी आहे. आशिया, आफ्रिका व दक्षिण युरोप यांमध्यें कामेलिऑन जातीचा

[ जीभ बाहेर आलेली असे सरड्याचें तोंड ]

सरडा आढळतो. हा सामान्यतः ६ ते ७ इंच लांब असतो. याची शेपटी वळणारी व एखाद्या वस्तूस गुंडाळून धरून ठेवण्यासारखी असून सुमारें ५ इंच लांब असते; तसेंच याचे पाय [illegible] फांदीस धरून ठेवण्यास सोयीचे असतात. याची [illegible]

गुजराथेंत सिद्धपूर येथें जी सरस्वती आहे ती फार पवित्र मानली आहे. हें मातृगया म्हणून प्रसिद्ध ठिकाण आहे.

**सरस्वती गंगाधर** ( पंधरावें शतक–उत्तरार्ध )—'गुरुचरित्र' या नृसिंहसरस्वतीच्या मराठींतील चरित्रग्रंथाचा कर्ता. हा आपस्तंब शाखेचा असून याचें कौंडिण्य गोत्र होतें. आडनांव साखरे. आपल्या ग्रंथांत यानें ब्राह्मणांचे धर्मविषयक आचारविचार सांगितले असून समाजास योग्य वळण देण्याचा प्रयत्न केला आहे. हा ग्रंथ बावन्न अध्यायांचा असून तो दत्तोपासक ब्राह्मणांच्या नित्यपठणांत असतो. या ग्रंथाच्या पठणानें भूतबाधा नाहींशी होते, अशी समजूत आहे. 'गुरुचरित्र' या ग्रंथाचें संस्कृतमध्येंहि भाषांतर झालें आहे.

**सरहिंद**—पंजाब, पतियाळा संस्थान, फत्तेगड तहशिलीमधील एक गांव. हे गांव मोंगल साम्राज्यांतील भरभराटीच्या गांवांपैकीं एक होतें. स. १७०४ मध्यें वाजीदखानानें गुरु गोविंदाच्या फत्तेसिंग व झोरावरसिंग या दोन मुलांस येथें भिंतींत चिणून मारिलें, म्हणून तेव्हांपासून शीख लोक या गांवाला अपवित्र मानतात.

**संरक्षक जकात**—खुल्या व्यापाराच्या तत्त्वाविरुद्ध ते तत्त्व आहे. देशांतील उद्योगधंद्यांवर बाहेरचा माल येऊन अनिष्ट परिणाम होऊं नयेत व ते धंदे वाढावेत म्हणून आयात मालावर कांहीं कर बसवितात. एका देशानें अशी संरक्षक जकात बसविली म्हणजे उलट दुसरा देश असेंच करतो; त्यामुळें निर्यात मालाचा चांगला उठाव होत नाहीं, असा एक तोटा या पद्धतींत आहे. 'खुला व्यापार' पाहा.

**संरक्षण नौका**—( लाइफ बोट ). संरक्षण नौका दोन प्रकारच्या असतात : एक जहाजांवर ठेवलेल्या व दुसऱ्या किनाऱ्यावरील कायमच्या. प्रत्येक जहाजावर आणीबाणीच्या व धोक्याच्या प्रसंगीं उपयोगांत आणण्याकरितां अशा तऱ्हेच्या होड्या ठेवल्या पाहिजेत, असे कायदे असतात. पाणबुड्या बोटी वगैरेमध्ये जागा थोडी असते. याकरितां त्यांत कापडाच्या घडी करण्यासारख्या संरक्षण होड्या असतात. प्रत्येक जहाजावरील या होड्या सफरीवर निघण्यापूर्वी तपासण्यांत येतात. तसेंच या रक्षक होड्यांमध्ये बसावयाची कवाईत सर्व उतारूंकडून [illegible] करुन घेण्यांत येते. प्रत्येक होडीमध्यें कोणत्या उतारूंनीं व खलाशांनीं बसावयाचें याची यादी प्रमुख ठिकाणीं लावण्यांत आलेली असते. या होड्या पाण्यांत उतरण्याकरितां कांहीं जहाजांत विशेष सोय केलेली असते. या होड्या वल्ह्यांनीं चालविण्याऐवजीं नुसत्या दांड्यांनीं ( उच्चालक ) चालविण्याची सोय अलीकडे करण्यांत आल्यामुळें ( फ्लेमिंग ओअरलेस लाइफ बोट ) नवख्या मनुष्यासहि ती चालविणें सुलभ झालें आहे. ज्यां जहाजांवर अशा १५ पेक्षां अधिक संरक्षक होड्या असतील त्यावर एक बिनतारी संदेशयंत्र असलेली मोटार बोट व २० पेक्षां अधिक असतील त्यावर अशा दोन बोटी ठेवणें सक्तीचें करण्यांत आलें आहे.

किनाऱ्यावरील कायमच्या संरक्षक होड्या एका खाजगी संस्थेच्या ( रॉयल नॅशनल लाइफ बोट इन्स्टिट्यूशन ) ताब्यांत असून त्या वादळांत जावयाच्या असल्यामुळें अधिक बळकट, तरण्यात उत्तम आणि घमत लवकर काढण्याची तजवीज केलेली अशा असतात.

**संरक्षित अन्न**—( प्रिझर्व्हड फूड ). फ्रान्सॉय अप्पर्ट यानें मोठ्या प्रमाणावर प्रथम अन्न सुरक्षित पद्धतीनें ठेवण्याची रीत शोधून काढली ( १८४० ). या पद्धतींत अलीकडे कांहीं सुधारणा झाली आहे; पण मूलतत्त्वें तींच आहेत. मांस संरक्षित ठेवावयाचें असल्यास तें टिनच्या डब्यांत भरुन डबे बंद करून तें उष्णता दिलेल्या भट्टीमध्यें शिजविण्यांत येतें. या टिनच्या डब्यांत असलेली हवा बाहेर जाण्याकरितां एक बारीक छिद्र ठेवण्यांत येतें आणि तें शिजवण्याची व जंतुरहित करण्याची क्रिया झाली म्हणजे बंद करण्यांत येतें. पूर्वी हें छिद्र बंद करण्याची क्रिया झाळून करीत असत. परंतु अलीकडे निर्वात ( हर्मेटिक सीलिंग ) पद्धतीनें करण्यांत येतें. तीमध्यें या छिद्राच्या कडा वितळून तें आपोआप बंद होतें.

या पद्धतीनें मांसाप्रमाणेंच टोमॅटो, अननस, जरदाळू हीं फळें पूर्वी कधीं दृष्टीस न पडणाऱ्या लोकांसहि आतां मिळूं लागलीं आहेत. आटविलेले दूध प्रथम १८३५ मध्ये मिळूं लागलें व तें अलीकडे स्वित्झर्लंड, कानडा, हॉलंड, ऑस्ट्रेलिया व अमेरिका यांमध्यें मोठ्या प्रमाणावर तयार होऊं लागलें आहे. हे थोडी साखर घालून आंतील पाण्याच्या अंशाची वाफ करुन बनविण्यांत येतें.

अन्न संरक्षित करुन ठेवण्याच्या पद्धतीमुळें प्रवासी संशोधकास आपल्याबरोबर पाहिजे तेवढा अन्नाचा सांठा नेतां येणें शक्य झालें आहे. तसेंच गलबतावरील लोकांस पूर्वी भाज्या, फळें, वगैरे न मिळाल्यामुळे जो रक्तपित्ताचा विकार होत असे तो टळला आहे. व गरीब लोकांस पथ्यकर व स्वस्त तयार अन्न मिळण्याची सोय झाली आहे.

**सराटे**—यांचे वेल असतात. पानें बारीक असून त्यांची भाजी होते. पावसाळ्यांत हे वेल पुष्कळ दिसतात व यांचे सराटे वाळले म्हणजे चालणारांस टोंचतात. गोखरूंप्रमाणे सराटे औषधी आहेत. काढ्यांत सराटे घालतात. मूत्ररोगावर व उपदंशादि विकारांवर सराटे उपयोगी पडतात. गोखरूं पाहा.

**सराफा, सराफकट्टा**—(स्टॉक एक्स्चेंज). ज्या ठिकाणीं रोखे, कंपन्यांचे भाग (शेअर) विकले व खरीदले जातात असें ठिकाण. लंडनमधील सराफकट्ट्यावर जगांतल्या इतर कोणत्याहि ठिकाणापेक्षां जास्त व्यवहार चालतो. रोख्यांचे व्यापारी (जॉबर) आपल्याजवळच्या रोख्यांच्या खरेदी-विक्रीच्या किंमती जाहीर करतात. यांमधील तफावत हाच त्यांचा नफा होय. दलाल जे असतात ते गिऱ्हाइकांसाठीं यांच्यापासून रोखे घेतात व विकतात. पुढें भाव कमी होईल म्हणून आपले भाग विकणारे ते मंदीवाले (बेअर) व पुढें भाव चढेल म्हणून नवीन भाग विकत घेणारे ते तेजीवाले (बुल) होत.

**सरासरी**—सामान्य अर्थानें सरासरी म्हणजे अनेक आंकड्यांचें मध्यप्रमाण. अनेक सजातीय संख्यांच्या बेरजेस त्यांच्या संख्येनें भागून जें प्रमाण येतें ती सरासरी होय. उदा., जर एखाद्यानें पांच दिवस ४, ६, ८, १०, १२ याप्रमाणें फळें खाल्लीं तर तीं एकूण ४० होतात. या बेरजेला ५ नें भागल्यास ८ सरासरी निघते. म्हणजे त्यानें सरासरी रोज ८ फळें खाल्लीं असें धरतात. अर्थशास्त्रांतील आंकडेवारी, विम्याच्या हिशेबांतील वयोमान, अंदाज, वगैरे बाबींत सरासरी उपयोगी आहे. रोखे विकण्याच्या बाजारांत सरासरी काढणें म्हणजे पूर्वी घेतलेल्या किंमतीपेक्षां कमी किंमतीनें आणखी कांहीं रोखे (शेअर) विकत घेणें होय.

**सरोगृहें**—(लेक-ड्वेलिंग्ज). सरोवरांतून मुद्दाम बेटें तयार करून किंवा किनाऱ्याजवळच पाण्यांत मांडव घालून त्यावर फार प्राचीन काळापासून कांहीं ठिकाणीं माणसें राहत. या माणसांची प्राचीन संस्कृति त्यांच्या राहणीवरून कळून येते. अशीं सरोगृहें प्रथम आयर्लंडमध्यें व स्वित्झर्लंडमध्यें गेल्या शतकाच्या पूर्वार्धात आढळून आलीं. त्यानंतर रशिया, मलाया द्वीपकल्प, न्यू झीलंड, मध्य आफ्रिका यांसारख्या भागांतूनहि अद्याप अशीं सरोगृहें नांदतीं असलेलीं पाहण्यांत आलीं. यावरून संशोधकांना अशी कल्पना करतां आली कीं, नवपाषाणयुगांत दोनतीनशें झोपड्यांचीं अशीं जलग्रामें असत व शेतकी आणि मच्छीमारी करण्यापर्यंत त्यांतील अनेकांची सुधारणा झाली होती.

**सरोद**—या वाद्याचे कोठा आणि खोका असे दोन भाग असतात. कोठा लांकडाचा कोरून तयार केला असतो. त्याचा आकार बाहेरच्या अंगानें पोट आलेल्या असा असतो व ती रेघा पाडून खरबुजी केलेला असतो. हा कोठा कातड्यानें मढविलेला असतो. याच्या बुडाशीं तारदान असतें व मध्यभागीं घोडी असते. तिला कातड्याखालीं पोकळींत पिरा दिलेला असतो; व घोडीचे पाय पातळ हस्तिदंती तुकड्यावर ठेविलेले असतात व या तुकड्याला तर्फेच्या तारा बसविण्याकरितां खांचे असतात. या वाद्याचा खोका मागील बाजूनें बंद केलेला असतो. खुंट्यांची वगैरे व्यवस्था सारंगीप्रमाणेंच असते. हें वाद्य सारंगीहून अधिक उंचीचें असतें व कोठ्याचा घेरहि सामान्य सारंगीच्या कोठ्याच्या घेरापेक्षां अधिक असतो. ज्या ठिकाणीं तारांवर बोटें ठेवावयाचीं असतात तो सर्व भाग पातळ पोलादी पत्र्यानें मढविलेला असतो, त्यामुळें बोटें सरकविण्यास सुलभ जातें. हें वाद्य कांहींसें तिरपें धरून जव्यानें (हस्तिदंती काडीनें) आघात करून व नखांनीं तारा दाबून व तारांखालीं दिलेल्या धातूच्या पत्र्यावरून बोटें फिरवून वाजवितात. याच्या तारा सुरसिंगाराच्या तारांप्रमाणेंच मिळवितात. हें वाद्य स्वतंत्रपणें वाजवितात. याचा आवाज मधुर व गंभीर आहे.

**सरोवर**—भोंवताली जमिनीनें वेढलेला पाण्याचा मोठा सांठा जो असतो त्यास म्हणतात. याचा प्रत्यक्ष समुद्राशीं संबंध नसतो. क्वचित् एखादी नदी या दोहोंचें मीलन घडविते. सरोवरांचे चार वर्ग पाडण्यांत येतात : (१) ज्यांना बाहेर पडण्याला कांहीं मार्ग नाहीं व ज्यांना बाहेरून पाणी मुळींच मिळत नाहीं (अशीं सरोवरें बहुधा थोडीं). (२) ज्यांना बाहेर जाण्याचा मार्ग आहे पण बाहेरून पाणी मुळींच मिळत नाहीं व म्हणून झऱ्यावर जगावें लागतें. (३) ज्यांना ओढे येऊन मिळतात व ज्यांतून ओढे बाहेर वाहतात (अशीं सरोवरें बरींच आहेत). व (४) ज्यांना ओढे येऊन मिळतात पण पाण्याला बाहेर जाण्याला मार्ग नसतो (हीं सरोवरें खाऱ्या पाण्याचीं असतात; उदा. कॅस्पियन समुद्र, अरल समुद्र, मृत समुद्र, इ.).

मोठ्या सरोवरांचा समुद्राप्रमाणेंच भोंवतालच्या प्रदेशांवर हवामानासंबंधीं परिणाम घडतो. म्हणजे तीं थंडी आणि उन्हाळा यांचा त्रास कमी करतात.

**मोठीं सरोवरें व जमिनीच्या अंतर्भागांतील समुद्र**

| नांव | क्षेत्रफळ (चौरस मैलांत) |
|---|---|
| कॅस्पियन समुद्र | १,७०,००० |
| सुपीरियर सरोवर (कानडा) | ३१,२०० |
| व्हिक्टोरिया (आफ्रिका) | २६,२०० |
| अरल समुद्र (रशिया) | २४,४०० |
| ह्यूरॉन (कानडा) | २३,८०० |
| मिचिगॉन (अमेरिका) | २२,४५० |
| न्यासा (आफ्रिका) | १४,२०० |
| टांगानिका (आफ्रिका) | १२,७०० |
| बैकल (रशिया) | १२,५८० |
| ग्रेट स्लेव्ह (कानडा) | १०,७१९ |
| ग्रेट बेअर (कानडा) | १०,२५३ |
| एरि (कानडा) | ९,९६० |

गुजराथेंत सिद्धपूर येथें जी सरस्वती आहे ती फार पवित्र मानली आहे. हें मातृगया म्हणून प्रसिद्ध ठिकाण आहे.

**सरस्वती गंगाधर** (पंधरावें शतक—उत्तरार्ध)—'गुरुचरित्र' या नृसिंहसरस्वतीच्या मराठींतील चरित्रग्रंथाचा कर्ता. हा आपस्तंब शाखेचा असून याचें कौंडिण्य गोत्र होतें. आडनांव साखरे. आपल्या ग्रंथांत यानें ब्राह्मणांचे धर्मविषयक आचारविचार सांगितले असून समाजास योग्य वळण देण्याचा प्रयत्न केला आहे. हा ग्रंथ बावन अध्यायांचा असून तो दत्तोपासक ब्राह्मणांच्या नित्यपठणांत असतो. या ग्रंथाच्या पठणानें भूतबाधा नाहींशी होते, अशी समजूत आहे. 'गुरुचरित्र' या ग्रंथाचें संस्कृतमध्येंहि भाषांतर झालें आहे.

**सरहिंद**—पंजाब, पतियाळा संस्थान, फत्तेगड तहशिलीमधील एक गांव. हे गाव मोंगल साम्राज्यांतील भरभराटीच्या गांवांपैकीं एक होतें. स. १७०४ मध्यें वाजीदखानानें गुरु गोविंदाच्या फत्तेसिंग व जोरावरसिंग या दोन मुलांस येथें भिंतींत चिणून मारिलें, म्हणून तेव्हांपासून शीख लोक या गांवाला अपवित्र मानतात.

**संरक्षक जकात**—खुल्या व्यापाराच्या तत्त्वाविरुद्ध तें तत्त्व आहे. देशांतील उद्योगधंद्यांवर बाहेरचा माल येऊन अनिष्ट परिणाम होऊं नयेत व ते धंदे वाढावेत म्हणून आयात मालावर कांहीं कर बसविनात. एका देशानें अशी संरक्षक जकात बसविली म्हणजे उलट दुसरा देश असेंच करतो; त्यामुळें निर्गत मालाचा चांगला उठाव होत नाहीं, असा एक तोटा या पद्धतींत आहे. 'खुला व्यापार' पाहा.

**संरक्षण नौका**—(लाइफ बोट). संरक्षण नौका दोन प्रकारच्या असतात: एक जहाजांवर ठेवलेल्या व दुसऱ्या किनाऱ्यावरील कायमच्या. प्रत्येक जहाजावर आणीबाणीच्या व धोक्याच्या प्रसंगीं उपयोगांत आणण्याकरितां अशा तऱ्हेच्या होड्या ठेवल्या पाहिजेत, असे कायदे असतात. पाणबुड्या बोटी वगैरेंमध्यें जागा थोडी असते. याकरितां त्यांत कापडाच्या घडी करण्यासारख्या संरक्षण होड्या असतात. प्रत्येक जहाजावरील या होड्या सफरीवर निघण्यापूर्वी तपासण्यांत येतात. तसेंच या संरक्षक होड्यांमध्यें बसावयाची कवाईत सर्व उतारूंकडून सक्तीनें करून घेण्यांत येते. प्रत्येक होडीमध्यें कोणत्या उतारूंनीं व खलाशांनीं बसावयाचें याची यादी प्रमुख ठिकाणीं लावण्यांत आलेली असते. या होड्या पाण्यांत उतरण्याकरितां कांहीं जहाजांत विशेष सोय केलेली असते. या होड्या वल्ह्यांनीं चालविण्याऐवजीं नुसत्या दांड्यांनीं (उच्चालक) चालविण्याची सोय अलीकडे करण्यांत आल्यामुळें (फ्लेमिंग ओअरलेस लाइफ बोट) नवख्या मनुष्यासहि ती चालविणें सुलभ झालें आहे. ज्या जहाजावर अशा १५ पेक्षां अधिक संरक्षक होड्या असतील त्यावर एक बिनतारी संदेशयंत्र असलेली मोटार बोट व २० पेक्षां अधिक असतील त्यावर अशा दोन बोटी ठेवणें सक्तीचें करण्यांत आलें आहे.

किनाऱ्यावरील कायमच्या संरक्षक होड्या एका खाजगी संस्थेच्या (रॉयल नॅशनल लाइफ बोट इन्स्टिट्यूशन) ताब्यांत असून त्या वादळांत जावयाच्या असल्यामुळें अधिक बळकट, तरण्यांत उत्तम आणि घमत लवकर काढण्याची तजवीज केलेली अशा असतात.

**संरक्षित अन्न**—(प्रिझर्व्हड् फूड). फ्रान्सॉय आपर्टे यानें मोठ्या प्रमाणावर प्रथम अन्न सुरक्षित पद्धतीनें ठेवण्याची रीत शोधून काढली (१८४०). या पद्धतींत अलीकडे कांहीं सुधारणा झाली आहे; पण मूलतत्त्वें तींच आहेत. मांस संरक्षित ठेवावयाचें असल्यास तें टिनच्या डब्यांत भरून डबे बंद करून तें उष्णता दिलेल्या भट्टीमध्यें शिजविण्यांत येतें. या टिनच्या डब्यांत असलेली हवा बाहेर जाण्याकरितां एक बारीक छिद्र ठेवण्यांत येतें आणि तें शिजवण्याची व जंतुरहित करण्याची क्रिया झाली म्हणजे बंद करण्यांत येतें. पूर्वी हें छिद्र बंद करण्याची क्रिया झाळून करीत असत. परंतु अलीकडे निर्वात (हर्मेटिक सीलिंग) पद्धतीनें करण्यांत येतें. तीमध्यें या छिद्राच्या कडा वितळून तें आपोआप बंद होतें.

या पद्धतीनें मांसाप्रमाणेंच टोमॅटो, अननस, जरदाळू हीं फळें पूर्वी कधीं दृष्टीस न पडणाऱ्या लोकांसहि आतां मिळूं लागलीं आहेत. आटविलेलें दूध प्रथम १८३५ मध्यें मिळूं लागलें व तें अलीकडे स्वित्झर्लंड, कानडा, हॉलंड, ऑस्ट्रेलिया व अमेरिका यांमध्यें मोठ्या प्रमाणावर तयार होऊं लागलें आहे. हे थोडी साखर घालून आंतील पाण्याच्या अंशाची वाफ करून बनविण्यांत येतें.

अन्न संरक्षित करून ठेवण्याच्या पद्धतीमुळें प्रवासी संशोधकास आपल्याबरोबर पाहिजे तेवढा अन्नाचा सांठा नेतां येणें शक्य झालें आहे. तसेंच गलबतावरील लोकांस पूर्वी भाज्या, फळें, वगैरे न मिळाल्यामुळे जो रक्तपित्ताचा विकार होत असे तो टळला आहे. व गरीब लोकास पथ्यकर व स्वस्त तयार अन्न मिळण्याची सोय झाली आहे.

**सराटे**—यांचे वेल असतात. पानें बारीक असून त्यांची भाजी होते. पावसाळ्यांत हे वेल पुष्कळ दिसतात व यांचे सराटे वाळले म्हणजे चालणारांस टोंचतात. गोखरूंप्रमाणें सराटे औषधी आहेत. काढ्यांत सराटे घालतात. मूत्ररोगावर व उपदंशादि विकारांवर सराटे उपयोगी पडतात. गोखरूं पाहा.

**सराफा, सराफकट्टा**—( स्टॉक एक्स्चेंज ). ज्या ठिकाणीं रोखे, कंपन्यांचे भाग ( शेअर ) विकले व खरीदले जातात असें ठिकाण. लंडनमधील सराफकट्ट्यावर जगांतल्या इतर कोणत्याहि ठिकाणापेक्षां जास्त व्यवहार चालतो. रोख्यांचे व्यापारी ( जॉबर ) आपल्याजवळच्या रोख्यांच्या खरेदी-विक्रीच्या किंमती जाहीर करतात. यांमधील तफावत हाच त्यांचा नफा होय. दलाल जे असतात ते गिन्हाइकांसाठीं यांच्यापासून रोखे घेतात व विकतात. पुढें भाव कमी होईल म्हणून आपले भाग विकणारे ते मंदीवाले ( बेअर ) व पुढें भाव चढेल म्हणून नवीन भाग विकत घेणारे ते तेजीवाले ( बुल ) होत.

**सरासरी**—सामान्य अर्थानें सरासरी म्हणजे अनेक आंकड्यांचें मध्यप्रमाण. अनेक सजातीय संख्यांच्या बेरजेस त्यांच्या संख्येनें भागून जें प्रमाण येतें ती सरासरी होय. उदा., जर एखाद्यानें पांच दिवस ४, ६, ८, १०, १२ याप्रमाणें फळें खाल्लीं तर तीं एकूण ४० होतात. या बेरजेला ५ नें भागल्यास ८ सरासरी निघते. म्हणजे त्यानें सरासरी रोज ८ फळें खाल्लीं असें धरतात. अर्थशास्त्रांतील आंकडेवारी, विम्याच्या हिशेबांतील वयोमान, अंदाज, वगैरे बाबींत सरासरी उपयोगी आहे. रोखे विकण्याच्या बाजारांत सरासरी काढणें म्हणजे पूर्वी घेतलेल्या किंमतीपेक्षां कमी किंमतीनें आणखी कांहीं रोखे ( शेअर ) विकत घेणें होय.

**सरोगृहें**—( लेक-ड्वेलिंग्ज ). सरोवरांतून मुद्दाम बेटें तयार करून किंवा किनाऱ्याजवळच पाण्यांत मांडव घालून त्यावर फार प्राचीन काळापासून कांहीं ठिकाणीं माणसें राहत. या माणसांची प्राचीन संस्कृति त्यांच्या राहणीवरून कळून येते. अशीं सरोगृहें प्रथम आयर्लंडमध्यें व स्वित्झर्लंडमध्यें गेल्या शतकाच्या पूर्वार्धांत आढळून आलीं. त्यानंतर रशिया, मलाया द्वीपकल्प, न्यू झीलंड, मध्य आफ्रिका यांसारख्या भागांतूनहि अद्याप अशीं सरोगृहें नांदतीं असलेलीं पाहण्यांत आलीं. यावरून संशोधकांना अशी कल्पना करतां आली कीं, नवपाषाणयुगांत दोनतीनशें झोपड्यांचीं अशीं जल्ग्रामें असत व शेतकी आणि मच्छीमारी करण्यापर्यंत त्यांतील अनेकांची सुधारणा झाली होती.

**सरोद**—या वाद्याचे कोठा आणि खोका असे दोन भाग असतात. कोठा लांकडाचा कोरून तयार केला असतो. त्याचा आकार बाहेरच्या अंगानें पोट आलेला असा असतो व तो रेघा पाडून खरखुजी केलेला असतो. हा कोठा कातड्यानें मढविलेला असतो. याच्या पुढाशीं तारदान असतें व मध्यभागीं घोडी असते. तिला कातड्याखालीं पोकळींत चिरा दिलेल्या असतो; व घोडीचे पाय पातळ हस्तिदंती तुकड्यावर ठेविलेले असतात व या तुकड्याला तर्फीच्या तारा बसविण्याकरितां खांचे असतात. या वाद्याचा खोका मागील बाजूनें बंद केलेला असतो. खुंट्यांची वगैरे व्यवस्था सारंगीप्रमाणेंच असते. हें वाद्य सारंगीपेक्षां अधिक उंचीचें असतें व कोठ्याचा घेरहि सामान्य सारंगीच्या कोठ्याच्या घेरापेक्षां अधिक असतो. ज्या ठिकाणीं तारांवर बोटें खेळवावयाचीं असतात तो सर्व भाग पातळ पोलादी पत्र्यानें मढविलेला असतो, त्यामुळें बोटें सरकविण्यास सुलभ जातें. हें वाद्य कांहींसें तिरपें धरून जव्यानें ( हस्तिदंती काडीनें ) आघात करून व नखांनीं तारा दाबून व तारांखालीं दिलेल्या धातूच्या पत्र्यावरून बोटें फिरवून वाजवितात. याच्या तारा सुरसिंगारच्या तारांप्रमाणेंच मिळवितात. हें वाद्य स्वतंत्रपणें वाजवितात. याचा आवाज मधुर व गंभीर आहे.

**सरोवर**—भोंवताली जमिनीनें वेढलेला पाण्याचा मोठा सांठा जो असतो त्यास म्हणतात. याचा प्रत्यक्ष समुद्राशीं संबंध नसतो. क्वचित् एखादी नदी या दोहोंचें मीलन घडविते. सरोवरांचे चार वर्ग पाडण्यांत येतात : ( १ ) ज्यांना बाहेर पडण्याला कांहीं मार्ग नाहीं व ज्यांना बाहेरून पाणी मुळींच मिळत नाहीं ( अशीं सरोवरें बहुधा थोडीं ). ( २ ) ज्यांना बाहेर जाण्याचा मार्ग आहे पण बाहेरून पाणी मुळींच मिळत नाहीं व म्हणून अन्यांवर जगावें लागतें. ( ३ ) ज्यांना ओढे येऊन मिळतात व ज्यांतून ओढे बाहेर वाहतात ( अशीं सरोवरें बरींच आहेत ). व ( ४ ) ज्यांना ओढे येऊन मिळतात पण पाण्याला बाहेर जाण्याला मार्ग नसतो ( हीं सरोवरें खाऱ्या पाण्याचीं असतात; उदा. कॅस्पियन समुद्र, अरल समुद्र, मृत समुद्र, इ. ).

मोठ्या सरोवरांचा समुद्राप्रमाणेंच भोंवतालच्या प्रदेशांवर हवामानासंबंधीं परिणाम घडतो. म्हणजे तीं थंडी आणि उन्हाळा यांचा त्रास कमी करतात.

**मोठीं सरोवरें व जमिनीच्या अंतर्भागांतील समुद्र**

| नांव | क्षेत्रफळ ( चौरस मैलांत ) |
|---|---|
| कॅस्पियन समुद्र | १,७०,००० |
| सुपीरियर सरोवर ( कानडा ) | ३१,२०० |
| व्हिक्टोरिया ( आफ्रिका ) | २६,२०० |
| अरल समुद्र ( रशिया ) | २४,४०० |
| ह्यूरॉन ( कानडा ) | २३,८०० |
| मिचिगॉन ( अमेरिका ) | २२,४०० |
| न्यासा ( आफ्रिका ) | १४,२०० |
| टांगानिका ( आफ्रिका ) | १२,७०० |
| बैकल ( रशिया ) | १२,५८० |
| ग्रेट स्लेव्ह ( कानडा ) | १०,७१९ |
| ग्रेट बेअर ( कानडा ) | १०,२५९ |
| ईरी ( कानडा ) | ९,९६० |

| | |
|---|---|
| विनिपेग ( कानडा ) | ९,४५९ |
| अंटारियो ( कानडा ) | ७,२४० |
| बालकश ( रशिया ) | ७,०५० |
| लाडोगा ( रशिया ) | ७,००० |
| चाड ( आफ्रिका ) | ६,३०० |
| ओनेगा ( रशिया ) | ३,८०० |
| टिटिकाका ( द. अमेरिका ) | ३,२०० |
| निकारागुआ ( मध्य अमेरिका ) | ३,००० |
| व्हेनेर ( स्वीडन ) | २,५०० |
| बॅगवेलु ( आफ्रिका ) | २,००० |

**सर्कस**—रोमन लोकांत वर्तुळाकार क्रीडागृहे असत. व त्यांतून कुस्त्या, शर्यती, जनावरांच्या झुंजी, इ. खेळ होत. रोममध्ये एवढें मोठें क्रीडागृह होतें कीं, त्यांत सुमारें अडीच लाख प्रेक्षक बसत. इंग्लंडांत १८ व्या शतकात अश्वारोहणकौशल्याचे प्रयोग सुरू झाले. व पुढे त्याच्या जोडीला इतर कसरतीचे खेळ आले. या खेळांत विदूषकहि लागूं लागला. हा सर्कशीचा संच पुढे गांवोगांव खेळ दाखवीत नाटक कंपन्यांप्रमाणे फिरूं लागला. आज दरसाल लंडन येथे ऑलिंपियांत कॅ. बरट्रम मिल्स जी सर्कस दाखवितात ती पाहण्यासारखी असते. हिंदुस्थानांत १८८३ सालीं विष्णुपंत छत्रे यांनी पहिली देशी सर्कस काढली. पुढें त्यांचे शिष्य देवल, नंतर पटवर्धन, वगैरेंनीं परदेशांतहि नाव मिळविलें. आज सर्कशीची आवड लोकांत कमी झाली आहे. व तिचा अवाढव्य खर्चहि कंपन्यांना झेपत नाहीं.

**सर्जीभवन**—( सॅपोनिफिकेशन ). कॉस्टिक सोड्याच्या साहाय्यानें तेलापासून साबण करण्याची क्रिया. त्या क्रियेत साबणाबरोबर ग्लिसरीनहि तयार होतें. पाण्याच्या साहाय्यानें संयुक्ताचे विघटन करण्याच्या ( हायड्रोलिसिस ) क्रियेसहि हे नांव देतात.

**सर्जेराव घाटगे** ( मृ. १८०९ )—पेशवाईतील एक अत्यंत क्रूर सरदार. मूळचा हा कागलचा असून यास सखाराम किंवा तुळोजी असेंहि म्हणत. सन १७७६ मध्यें हा परशरामभाऊ पटवर्धनाकडून नाना फडणिसाकडे आला. पुढें नाना अडचणींत असतांनाच त्यास सोडून हा दौलतराव शिंद्याकडे गेला व त्याचा दिवाण झाला. आपल्या बायजाबाई नामक अत्यंत सौंदर्यसंपन्न मुलीचें लग्न बाजीरावाच्या मध्यस्थीनें यानें शिंद्याशीं करून दिलें. नाना व बाजीराव यांना केलेल्या मदतीबद्दल त्यांनीं आपल्यास ठरलेलें द्रव्य दिलें नाहीं म्हणून यानें अनन्वित प्रकार करण्यास कमी केले नाहीं. *पैसा उकळण्यासाठी यानें पुण्यांतील नामांकित सरदार-मुत्सद्यांना* छळलें. महादजी शिंद्याच्या बायकांना यानें फटके दिल्याकारणानें लढाईस सुरुवात झाली व त्यांत हा कैद झाला. पण बायजाबाईमुळें हा सुटला. यानें पुन्हां शिंद्याच्या बायकांना मारण्याचें कारस्थान केलें व शेणवी सरदारांचीं मुंडकीं उडवलीं. इंग्रजांहि यानें अशाच कारवाया केल्या. इंग्रजांनीं यास दूर ठेवण्याबद्दल दौलतरावास सूचना दिली. परंतु ती निष्फळ ठरली. पुढें आनंदराव नामक मानाजी फाकड्याच्या मुलानें भररस्त्यांत याचे तुकडे करून याच्या पापांचें यास योग्य प्रायश्चित्त दिलें. सर्जेराव ही व्यक्ति दिसायला जाड, ठेंगू, गोरी, चटवटीत व क्रूर दिसे.

**सर्पधातु**—( सर्पन्टाइन ). या धातूंत मग्नसिकित ( मॅग्नेशियम सिलिकेट ) असून हा अग्न्युत्पन्न खडकांच्या विच्छेदतापासून तयार झाला असें मानतात. हा कठिण नसल्यामुळें चाकूनें कापतां येतो. हा हिरवा किंवा तांबड्या-काळ्या पट्ट्यांचा असतो. याचे मोठमोठे दगड असून त्यांना झिलई चढवून बांधणीच्या शोभेसाठीं वापरतात.

**सर्पर्दा बिलावल**—हा राग बिलावल थाटांतून निघतो. याच्या आरोहावरोहास सातहि स्वर लागतात, म्हणून याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी स्वर षड्ज व संवादी पंचम आहे, गानसमय सकाळचा पहिला प्रहर मानितात. यांत बिहाग रागाचा भास होण्याचा बराच संभव आहे, परंतु ऋषभ दीर्घ ठेविल्यानें तो भास दूर होतो. यमन, अलैय्या व गौड या तीन रागांचें मिश्रण या रागांत होत असतें. हा एक बिलावलप्रकार आहे. हा यावनिक राग आहे.

**सर्पविद्या**—शतपथब्राह्मण आणि छांदोग्य-उपनिषद् यांत या विद्येचा उल्लेख आहे. काश्यपीय व इतर तंत्र ग्रंथ हे सर्पविद्येसंबंधीं आहेत. पूर्वी ही विद्या फार प्रगत झालेली असावी. यांतील एक पर्व तोंडपाठ म्हणावयाचें असे. गोपथब्राह्मणाचें स्वरूप सर्पवेदासारखें आहे. या विद्येला गारुडविद्या असेंहि म्हटले आहे. बनारसमध्यें एक वैद्यघराणे असून त्यांतील मंडळींना सर्पविष उतरवितां येत असे. सापाकडूनच दंशाची जागा चोखवून विषावर उतारा देत, असें जातकग्रंथांत वर्णन आहे. सापाचें विष नाहींसें करणारे व सापांना कह्यांत ठेवणारे बरेच मांत्रिक आजहि आढळतात.

**सर्पिलकवच प्राणी**—( नॉटिलस ). ही एक शीर्षपाद प्राण्यांची जात आहे. या प्राण्यांच्या कवचांत अनेक भाग असतात. चतुःशाखीय पोटवर्गांतील ही एकच जात शिल्लक आहे. यापैकीं एका जातीच्या प्राण्यांचे शिंपले मोत्यासारखे चमकदार व गुळगुळीत असून सर्पिलाकृति असतात. हे प्राणी उष्ण कटिबंधांत राहतात. यांच्या फक्त तीनचार जाती अस्तित्वात आढळतात. *यांस मृदुकाय प्राण्यांमध्येंहि कधीं कधीं घालण्यांत येतें.*

**सर्बिया**—हें पूर्वी पूर्व युरोपांतील एका स्वतंत्र राज्याचें नांव असे. आतां पहिल्या महायुद्धानंतर हें युगोस्लाव्हियांत समाविष्ट झालें. व त्या राज्याचा पूर्वभाग बनलें. याचे क्षे. फ. ३६,९३७

चौ. मै. आहे. लो. सं. ४१,२९,६३८. याची राजधानी बेलग्रेड होती. डॅन्यूब, मोरान्हा, सान्हा, इ. नद्या आहेत. ओखिडा व प्रेस्पा सरोवरें नाशांविषयीं प्रसिद्ध आहेत. हवा चांगली असली तरी मलेरिया आणि विषम हे रोग होतात. शें. ९० लोकांना स्वतःच्या जमिनी आहेत. द्विदल धान्यें, बीट, अंबाडी, तंबाखू, अफू, मलबेरी हीं पिकें होतात व द्राक्षांचे मळे डोंगरांवर अनेक आहेत. प्लम फळ हें फार लोकप्रिय असून त्याचें एक राष्ट्रीय पेय तयार होतें. एकतृतीयांश जमीन जंगलाखालीं आहे. उत्तर भागांत बहुतेक धातूंच्या खाणी आहेत; पण वाहतुकीच्या अडचणींमुळें त्या उत्पादक नाहींत.

पूर्वी या देशांत थ्रेसियन जाती होत्या. पुढें रोमन, हूण, लोंबार्ड, वगैरे जाती शिरल्या. इ. स. ६१० च्या सुमारास सर्बियन लोक आले. स्टीफन दुशनच्या कारकीर्दीत (१३३१-१३५५) सर्व मॅसेडोनिया, आल्बेनिया, थेसली, उत्तर ग्रीस व बल्गेरिया हे प्रदेश सर्बियाच्या राज्यांत मोडत. १३८९ त सर्बिया हें तुर्कस्तानचें मांडलिक बनलें. व १४५९ त त्याचें स्वातंत्र्य लोपलें. पण तें १८१५ त मिळालें. १९१३ त बुखारेस्टच्या तहानें राज्याचा विस्तार झाला. पण ऑस्ट्रिया-हंगेरीशीं वितुष्ट वाढत जाऊन १९१४ त ऑस्ट्रियानें याविरुद्ध युद्ध पुकारलें व हें पहिलें जागतिक महायुद्ध ठरलें. नंतर सर्ब, क्रोट व स्लोव्हन यांचा एकत्र गट करण्यांत आला.

भाषा-वाङ्मय—सर्बियन भाषा ही स्लाव्हॉनिक भाषावर्गांतील आहे. पहिली खरी वाङ्मयीन भाषा डोसिटे (१७३९-१८११) या लेखकाची म्हणतां येईल. अर्वाचीन सर्बियन भाषा-वाङ्मयाचा जनक कारा डिश (१७८७-१८६४) होय. जोव्हानोविक (१८३३-१९०४) हा कवि फार प्रसिद्ध आहे. त्यानें महाकाव्यें, भावगीतें व बालगीतेंहि रचिलीं. जॅक्सिक् (१८३२-७८) हा कवि असून लघुकथालेखक होता. सर्ब आणि क्रोट यांचें जुनें नातें आपुलकीचें नसल्यानें नवीन संघटनेंत या दोन जाती एकरूप होणें कठिण आहे. आज या सर्वांचें साहित्य युगोस्लाव्हियाच्या साहित्यांत समाविष्ट केलें जात असल्यानें सर्बियन वाङ्मय स्वतंत्र राहूं शकत नाहीं.

**सर्वज्ञ**—एक वीरशैव कानडी कवि. याचा त्रिपदी छंदांतील 'सर्वज्ञवचन' हा ग्रंथ कर्नाटकांत लोकप्रिय असून यांत प्रत्येक वचनाच्या शेवटीं सर्वज्ञ असें पद आहे. आपल्याकडील तुकारामाच्या वचनांप्रमाणें याचींहि वचनें कर्नाटकांत सर्वतोमुखीं झालीं आहेत. हा सन १७०० च्या सुमारास होऊन गेला.

**सर्वातीतवाद**—(ट्रॅन्सेंडेंटॅलिझम). शारीर व जागतिक आयुष्यक्रमांत आढळणाऱ्या सत्यापेक्षां अधिक उच्च व अधिक महत्त्वाचीं अशीं कांहीं सत्तत्त्वें सहजस्फूर्ती (इन्ट्यूइशन) मध्यें वसत असतात, असें मानणारा हा एक तत्त्वज्ञानी पंथ आहे. परंतु कांट या तत्त्वज्ञानें या शब्दास निश्चित अर्थ दिला आहे व अमेरिकेमध्येंहि इमर्सन आणि ब्रॉन्सन अल्कॉट यांच्या ग्रंथांमध्यें दृष्टीस पडणारा असा एक अमेरिकन तत्त्वज्ञानी पंथ अस्तित्वांत आहे. तसेंच केबल आणि न्यूमन यांनीं पुरस्कार केलेला ॲंग्लो-कॅथॉलिक अथवा ऑक्सफर्ड पंथहि अशाच एका तत्त्वाचा पुरस्कार करतांना आढळतो.

**सर्वाधिकारी**—(डिक्टेटर). प्राचीन रोमन लोकशाही (रिपब्लिक) मध्यें ख्रि. पू. ५०१ पासून एक अमर्याद अधिकार असलेला मॅजिस्ट्रेट नेमण्यांत येऊं लागला, त्याला 'डिक्टेटर' म्हणत. या अधिकाऱ्याची मुदत सहा महिन्यांची असे; व त्या मुदतींत या डिक्टेटर इसमानें इटली देशाबाहेर जाऊं नये, असा निर्बंध असे. फांशीची शिक्षा देणें, किंवा जीवदान देणें, हीहि सत्ता त्याला असे; आणि त्याच्या हुकमावर अपील सीनेटकडे किंवा लोकांकडे करतां येत नसे. बाकीचे सर्व मॅजिस्ट्रेट त्याच्या हाताखालीं असत.

डिक्टेटरचा दुसरा प्रकार म्हणजे ग्रीक 'टायरंट' हा होय. त्यानंतर जुलमी व सर्व सत्ता बळकावून चलणाऱ्यांना हें नामाभिधान देण्यांत येऊं लागलें. पॅराग्वे आणि दक्षिण अमेरिकेंतील इतर कांहीं देश यांतील अनेक राज्यकर्त्यांना ही पदवी असे. अगदीं अलीकडे जर्मनीचा हिटलर, इटलीचा मुसोलिनी, स्पेनचा फ्रॅंको हे यथार्थतेनें सर्वाधिकारीच म्हणतां येतात.

**सर्वाधिकारी शासनपद्धति**—(टॉटॅलिटेरिआनिझम). सर्व राष्ट्र मिळून एकच राजकीय पक्ष व त्या पक्षानें राष्ट्रीय सरकार, आणि त्या सरकारला नागरिकांच्या सार्वजनिक व खासगी दोन्ही प्रकारच्या जीवनावर सत्ता चालविण्याचा अधिकार, अशा प्रकारच्या राज्यकारभारपद्धतीला 'सर्वाधिकारशाही' (टॉटॅलिटेरिअन स्टेट) हा शब्दप्रयोग अलीकडे रूढ झाला आहे. पूर्वीच्या एकसत्ताक ऊर्फ अनियंत्रित राज्यपद्धतीचा हा एक नवा नमुना आहे. पूर्वीची राज्यपद्धति किंवा शासनशास्त्रानें तत्त्व असें आहे कीं, प्रत्येक नागरिक हा मूलतः सर्वस्वी स्वतंत्र असून राष्ट्राच्या संरक्षणाला व सुव्यवस्थेला जरूर तेवढेच अधिकार सरकारनें आपल्या हातीं घ्यावयाचे. 'राज्य' (स्टेट) या संस्थेसंबंधीं उदार मतवादी विद्वानांचा हा 'शासनशास्त्र' विषयक मूलभूत सिद्धान्त होय. पण अलीकडे नॅशनल सोशॅलिस्ट जर्मनी आणि फॅसिस्ट इटली हे सर्वाधिकारशाहीचे नवे नमुने तयार झाले होते.

**सर्वेश्वरवाद**—(पॅन्थीइझम). हा धर्म व तत्त्वज्ञान या दोन्ही विषयांतला एक सिद्धान्त आहे. त्याचा अर्थ असा कीं, ईश्वर आणि जग हीं दोन्ही एकरूप आहेत, म्हणजे जगांत जें सत्तत्त्व (बीइंग) सर्वत्र भरलेलें आहे, तेंच ईश्वर होय. आणि

जग हें त्या सतत्तत्त्वाच्या परिवर्तनांचें बनलेलें आहे, 'पॅन्थी-इझम' या शब्दाचा व्युत्पत्त्यर्थ हा आहे कीं, ईश्वर सर्वत्र भरलेला आहे, आणि सर्व विश्व ईश्वरमय आहे. या ईश्वराला मानवी गुणधर्म मुळींच नाहींत, आणि ईश्वर व जग हीं एकच आहेत. हा सिद्धान्त धर्मशास्त्रांतहि आहे आणि तत्त्वज्ञानांतहि आहे. या सिद्धान्ताचे कांहीं पुरस्कर्ते ईश्वरवादी आहेत, आणि कांहीं पुरस्कर्ते निरीश्वरवादी आहेत. उदाहरणार्थ, हिंदु धर्मांत हा सिद्धान्त आहे तो ईश्वरास्तित्ववादी आहे. युरोपांतील तत्त्ववेत्ता स्पिनोझा हाहि ईश्वरवादी आहे; पण याच सिद्धान्ताचा पुरस्कर्ता हेगेल हा जर्मन तत्त्ववेत्ता निरीश्वरवादी आहे.

'पॅन्थीइझम' हा शब्द प्रथम १७०५ सालीं टोलंड या तत्त्ववेत्त्यानें उपयोगांत आणला, तथापि सर्वेश्वरवादी पंथ फार पूर्वीपासून अस्तित्वात आहेत. ग्रीक तत्त्ववेत्त्यांचा जो अगदीं आरंभींचा आयोनियन पंथ तो सर्वेश्वरमयत्ववादी होता. एपिक्युरस व व ल्युक्रेटियस हे प्राचीन तत्त्ववेत्ते, आणि जी. ब्रूनो हा आधुनिक तत्त्ववेत्ता हे सर्व या मताचे पुरस्कर्ते होत. उपनिषदें आणि वेदान्त ग्रंथ यांत सर्वेश्वरमयत्वच प्रतिपादिलें आहे. व्हर्जिल कवीनें आपल्या 'एनिएड' या महाकाव्यांत हेच मत पुरस्कारलें आहे. या मताचा विशेष विस्तार स्पिनोझा या तत्त्ववेत्त्यानें केल्यामुळें त्याला या सिद्धान्ताचा जनक मानतात.

**'सर्वोदय' योजना**—अहिंसेवर पूर्ण श्रद्धा ठेवून शांततेच्या मार्गानें देशांत आर्थिक आणि सामाजिक क्रांति घडवून आणण्याच्या निश्चयानें म. गांधींनीं 'सर्वोदय' योजनेचा पुरस्कार केला होता. या योजनेचें मूळ म्हणजे सत्तेचें विकेंद्रीकरण हें होय. आज आपल्या देशांतील मोठमोठीं शहरें सत्तेचीं केंद्रस्थानें बनलीं असून खेड्यापाड्यांच्या उन्नतीला फारच कमी वाव मिळत असतो. गांधीजींच्या 'सर्वोदय' योजनेप्रमाणें शहराच्या सत्तेचें विकेंद्रीकरण करून सर्वच खेडीं स्वयंपूर्ण बनवावयाचीं आहेत. त्यांना शहराचा दर्जा प्राप्त करून द्यावयाचा आहे. अर्थातच या योजनेप्रमाणें व्हावयाचें सर्व कार्य मुख्यतः खेड्यापाड्यांतूनच होणार आहे. सर्व खेडीं स्वयंपूर्ण झालीं म्हणजे तेथील जनतेचा सांस्कृतिक विकास होणार आहे. आणि गांधीजींच्या आयुष्यांतील एक फार मोठें उद्दिष्ट सिद्धीला जाणार आहे.

युद्धोत्तर पुनर्रचनेचें एक अंग म्हणून मुंबई सरकारनें एक सर्वंकष योजना आंखली असून ती प्रत्यक्षपणें अमलांत आणण्याचे प्रयत्न चालू आहेत. व युद्धोत्तर पुनर्रचनेच्या कामीं जे एक कोटी रुपये खर्च करविण्याचें ठरविलें आहे, त्यांतच या 'सर्वोदय' योजनेचा अंतर्भाव आहे.

सरकारने सर्वोदय कार्याचे पांच भाग पाडले आहेत. त्याप्रमाणें करावयाच्या कार्याचा तपशील पुढीलप्रमाणें आहे :—

(१) शेतकी आणि संलग्न गोष्टी—(अ) अधिक धान्य पिकविण्यासाठीं सुधारलेलीं आणि योग्य बियाणें पुरविणें; स्वस्त खत पुरविणें; पुरवणी पिकांचीं बियाणें पुरविणें; लागवडीच्या जमिनींचा पूर्ण उपयोग करणे; आणि पडीत जमिनी लागवडीस आणणें.

(आ) गुराढोरांची सुधारणा करण्यासाठीं चांगल्या गुरांचा पुरवठा करणें; वळू तयार करणें; गुरांसाठीं चांगल्या चाऱ्याचा पुरवठा आणि सांठा यांची व्यवस्था करणें. हल्लीं ठाणे भागांत गीर गायींची जोपासना करण्यांत येत असते त्याऐवजीं डांगी गाई, बैल पाळण्याचा निर्णय घेण्यांत आला आहे.

(इ) नैसर्गिक संपत्तीच्या साधनांचा पूर्ण उपयोग करून घेण्यासाठीं विहिरी खोदणें, जुनीं तळीं दुरुस्त करणे; हिवाळी पिकांची व्यवस्था करणे; बागाईत तयार करणे; नाल्यांना बांध घालून उन्हाळ्यासाठीं पाण्याचा सांठा करून ठेवणें.

(ई) वृक्षारोपण व वृक्षसंवर्धन या कामासाठीं उपयुक्त व लवकर वाढणारीं नानाविध झाडें लावणें.

(२) ग्रामोद्योग व सहकारी संघटना—सूतकाम, मधमाशा पाळणें, कोंबड्या पाळणें, सुतारकाम व लोहारकाम, मातीचीं भांडीं बनविणें, जंगलाच्या पदार्थांचा उपयोग व विक्री करणें, इत्यादि कामें हातीं घेण्यांत यावयाचीं आहेत.

ज्या जिल्ह्यांत जीं झाडें असतील त्यांपासून उपयुक्त वस्तू बनविण्यांत येतील. उदा., ठाणे भागांत खैराचीं झाडें विपुल प्रमाणांत असून त्यांपासून खाण्याचा व रंगविण्याचा कात काढण्यांत येतो. या कात काढण्याच्या धंद्यावरूनच कात काढणारे ते कातकरी किंवा कातोडी असा जातिवाचक शब्द प्रचारांत आला आहे. खुरासणीचें (तीळ) पीकहि या भागांत मोठ्या प्रमाणावर येतें. त्यांचें तेल व पेंड काढणें, एरंडीचें तेल काढणें, हीं कामें केलीं जाणार आहेत. येथील जंगलांत बांबूचें उत्पन्नहि विपुल प्रमाणांत असल्यानें बुरूडकामाचीहि सोय होणार आहे. याखेरीज लहान लहान जोडधंदे म्हणून पळसाच्या पानांच्या पत्रावळी करणें, डिंक काढून विकणे व औषधी वनस्पती शोधून काढून विकणे, हीं कामें करण्यांत येणार आहेत. हे सर्व लहानमोठे धंदे करण्यासाठीं आदिवासींचीच एक त्रिविध सहकारी संस्था काढण्यांत आली असून तिच्या मार्फतच सर्व व्यवहार व्हावयाचे आहेत. त्यामुळें आदिवासींना या कामाचीहि माहिती होणार आहे.

(३) आरोग्य—पिण्यासाठीं, स्नानासाठीं व इतर उपयोगासाठीं पाणीपुरवठा; भरपूर हवा व उजेड असणारीं नवीन धर्तीचीं घरें; स्वच्छतेचें शिक्षण; स्त्री-आरोग्यविषयक सल्ला; लहान मुलांच्या

संगोपनाची माहिती देणें; हीं या विभागांतील महत्त्वाचीं कामें राहावयाचीं आहेत.

(४) शिक्षण—प्राथमिक शिक्षणासाठीं शाळा चालविण्यास शिक्षणखात्याला मदत करणें; व्याख्यानांचे कार्यक्रम; उपयोगी वस्तूंचें प्रदर्शन; वाचनालयें चालविणें; अभ्यासवर्ग घेणें, इत्यादि प्रकारांनीं आदिवासींमध्यें शिक्षणाचा प्रचार व प्रसार करण्यांत यावयाचा आहे.

(५) सांस्कृतिक विकास—या विषयावर विशेष भर देण्यांत येणार आहे. स्वातंत्र्योत्सव, पोळ्याचा सण, दिवाळींतील वसुबारस आणि पितृपंधरवड्यांतील द्वादशीला पितृबारस हे सण साजरे करून आदिवासींमध्यें संस्कृति निर्माण करण्याचा प्रयत्न करण्यांत येणार आहे.

याप्रमाणेंच प्रत्येक प्रांतिक सरकारनें सर्वोदयाच्या योजना आपापल्या सोयी-साधनांप्रमाणें चालू केल्या आहेत.

**सलगम**—(टर्निप; तांबडा मुळा). हें एक कोबीच्या वर्गांतील द्विवार्षिक रोप आहे. याची लागवड भारी व मोकळ्या जमिनींत दमट व अभ्रमय हवेंत उत्तम होते. याच्या अनेक जाती आहेत व त्या बहुतेक लागवडीनें बनविण्यांत आल्या आहेत. स्वीडनमधील सलगम शेतांत करतात व ती बहुतेक वेगळीच जात असावी. याच्या एका जातीपासून (ब्रासिकानॅपस) मोहरीसारखें बीं तयार होतें, त्याचें तेल निघतें.

**सलादीन** (११३७–११९३)—ईजिप्त व सीरिया या दोन देशांचा सुलतान. नुरेद्दीन सुलतान मरण पावल्यावर (११७३) सलादीनच्या ताब्यांत दमास्कस आणि दक्षिण सीरिया हा प्रदेश आला. नंतर त्यानें बाकीचा सीरिया आणि त्याच्या शेजारचे देश जिंकून घेतले; आणि त्यामुळें ३ ऱ्या धर्मयुद्धांत लढत असलेल्या ख्रिस्ती क्रुसेडर सैन्याबरोबर त्याला सामना द्यावा लागला. ११८७ सालीं टायबेरियसच्या लढाईंत त्याला मोठा विजय मिळाला आणि लवकरच जेरुशलेम शहरांतील ख्रिस्ती सैन्य त्याला शरण गेलें. पण ११९१ सालीं एकर शहराचा पाडाव झाल्यामुळें आणि इंग्लंडचा राजा १ ला रिचर्ड यानें सलादीनचा अनेक ठिकाणीं पराभव केल्यामुळें त्याला तह करणें भाग पडलें (११९२). त्यानंतर १ वर्षानें सलादीन दमास्कस येथें मरण पावला.

**सलाबतजंग** (राज्य. १७५१–६१)—हैद्राबादच्या निजाम उल्मुल्काचा तिसरा मुलगा व निजामअलीचा भाऊ. यास सलाबतजंग असेंहि म्हणत. याजकडे कृष्णेच्या मुखाच्या दक्षिणेकडे असलेल्या गुंटूरची जहागीर होती. अदोनीस यानें वास्तव्य असे. पुतण्या मुजफ्फरजंग याचा खून झाल्यानंतर फ्रेंचांच्या मदतीनें हा गादीवर बसला. यानें आपल्या पदरीं फ्रेंच सैन्य ठेवलें होतें. परंतु हैदरचीं स्वारी झाली त्या वेळीं या सैन्याचा यास कांहींच उपयोग न झाल्यानें इंग्रजांची मदत घ्यावी लागली. या साहाय्या-बद्दल यानें इंग्रजांना गुंटूर प्रांत तोडून दिला. त्यामुळें निजाम-अलीचा यावर रोष झाला. याच्यामधील कलहाचा फायदा उदगीरच्या लढाईच्या वेळीं पेशव्यांना झाला. क्लाइव्हच्या हातांत मच्छलीपट्टण पडल्यावर सन १७५९ मध्यें यानें इंग्रजांशीं तह केला. झालेल्या तहांत यानें फ्रेंच सैन्य पदरीं ठेवूं नये व इंग्रजांना उत्तर सरकार प्रांत द्यावा असें ठरलें. शेवटीं याचा भाऊ निजामअली याजकडून हा कैद झाला (१७६१) व नंतर याचा खून झाला.

**सॅलिसिन**—लव्हाळ्याच्या (विलो-पोप्लर) सालीपासून निघणारें हें एक कडू स्फटिकमय द्रव्य आहे. हें कर्ब, उज्ज आणि प्राण यांचें संयुक्त आहे. याचा संधिवात वगैरे विकारांमध्यें औषध म्हणून उपयोग करतात. हें ऊन पाण्यांत विरघळतें.

**सॅलोनिका**—ग्रीस, एक प्रमुख शहर व मॅसेडोनियाचें बंदर. मोठाल्या बोटी बंदरांत राहूं शकतात. येथें लोकरी व सुती कापडाच्या गिरण्या, दारूच्या भट्ट्या, पिठाच्या गिरण्या, कातडीं कमावण्याचे कारखाने, इ. धंदे चालतात. शहराजवळ दगडी कोळसा सांपडतो. पहिल्या महायुद्धांत बल्गेरिया आणि मध्यराष्ट्रें यांच्याशीं युद्ध करण्यासाठीं दोस्तांच्या सैन्यानें येथें तळ टाकला होता. १९२५ सालापासून या शहराला आर्थिक स्वतंत्रता लाभली आहे. १९३७ सालीं याचें मूळचें ग्रीक नांव थेसॅलोनिकि हें पुन्हां ठेवण्यांत आलें. लो. सं. (१९३८) २,३६,५२४. बहुतेक वस्ती ज्यू लोकांची आहे.

**सलोह संधानक**—(रीइन्फोर्स्ड काँक्रीट). सन १८६१ मध्यें एम्. जोसेफ मोनीयर यानें काँक्रीटमध्यें तारा घालून कांहीं लहान टाक्या तयार केल्या, व या रीतीनें या सलोह संधानकाचा शोध लागला. या पद्धतींत जर्मन व ऑस्ट्रियन लोकांनीं कांहीं काळ थोडीशी प्रगति केली. परंतु आज सर्वत्र या बाबतींतील प्रगति फ्रान्स देशांत बहुत झाली. यामध्यें पोलादाचे गज काँक्रीट-मध्यें घालण्यांत येतात. पोलाद हें पुष्कळसा ताण सहन करूं शकते. पोलादाची शक्ति काँक्रीटच्या तीनशें पटीनें अधिक आहे. याच्याउलट काँक्रिट वाटेल तितका दाब सहन करूं शकते, पण ताण सहन करूं शकत नाहीं. पोलाद न घातलेली काँक्रीटची तुळई तिच्यावर भार ठेवला असतां तिच्यावरील दाबावर दाब सहन करणारी, पूर्ण शक्ति देण्याच्या आधींच खालच्या ठिकाणचा ताण सहन करण्यास असमर्थ होऊन मोडूं लागते. याकरितां या तुळईमध्यें ताण सहन करणारी शक्ति येण्याकरितां पोलादाचे गज तळाशीं घालावे लागतात. व ते इतका मानानें काँक्रीटच्या तुळईचा दाब सहन करण्याची शक्ति असेल त्या प्रमाणांत

जाड असावे लागतात. याप्रमाणें कॉंक्रीट दाब सहन करूं शकतें व पोलाद ताण सहन करूं शकतें व ह्या दोहोंच्या शक्तीचा बांध-कामांत उपयोग करून घेण्यांत येतो. कॉंक्रीट पाहा.

**सल्फोनल**—या औषधाचा झोंप आणण्याच्या कामीं उपयोग करतात. हें औषध जसद हरिदा( झिंक क्लोराइड )च्या सान्निध्यामध्यें ॲसिटोन आणि एथिल पारदवेधन (मेर कॅप्टन) यास घनरूप देऊन आणि त्यापासून तयार झालेल्या मेर कॅप्टोल याचें पालाशपरमॅंगनेत( पोटॅशिअम परमॅंगनेट )च्या साहाय्यानें प्राणिदीकरण करून तयार करतात. हें द्रव्य निर्वर्ण, निर्गंध आणि बहुतेक बेचव असा त्रिपार्श्व स्फटिकांच्या आकारांत किंवा स्फटिकमय पांढऱ्या भुकटीच्या रूपांत आढळतें.

**संवत्सर**—हा शब्द ऋग्वेदांत व तदुत्तर ग्रंथांत वारंवार आलेला आहे. एका वर्षाचे ३६० दिवस असतात व त्या वर्षांत १२ महिने असतात, असें संहिता व ब्राह्मणग्रंथ यांचें एक मत आहे. हें वर्ष म्हणजे चांद्रवर्ष होय व या वर्षामध्यें सहा दिवस अधिक येतात. सौरवर्ष या अर्थी हा शब्द फक्त सामवेदाच्या निदानसूत्रांत आलेला आहे. साध्या वत्सर शब्दाचीं जुन्या संवत्सर व परिवत्सर या शब्दांवर आधारलेलीं पर्यायनामें यज्ञपुरोहितांनीं उपयोगांत आणिलीं होतीं. हीं जीं नवीन नांवें शोधून काढिलीं त्यांचें मूळ पंचविंश ब्राह्मणांतल्यासारख्या उल्लेखांत सांपडतें.

आपल्या पंचांगांत शालिवाहन शकाबरोबर जें संवत्सर देण्यांत येतें तें साठ वर्षांचें एक चक्र आहे (साठ संवत्सरें पाहा). दरवर्षी चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून नवीन संवत्सराचा आरंभ धरला जातो. हिंदुस्थानांत निरनिराळ्या संवत्सर पद्धती दृष्टीस पडतात (बार्हस्पत्य संवत्सर व ग्रहपरिवृत्ति संवत्सर पाहा).

**संवेदनावाद**—(सेन्सेशनॅलिझम). तत्त्वज्ञानांतील हा एक सिद्धान्त आहे. त्याचा अर्थ असा कीं, आपल्या सर्व कल्पना आपल्याला आपल्या इंद्रियांच्या द्वारें होणाऱ्या ज्ञानापासून किंवा संवेदनांपासून बनलेल्या असतात. सोफिस्ट पंथी तत्त्ववेत्ते ह्यूम, कॉंडिलॅक आणि लॉक, तसेंच मिल, स्पेन्सर व जेम्स हे सर्व संवेदनावादाचे पुरस्कर्ते होत. अनुभवजन्य ज्ञानवाद पाहा.

**संवेदी ज्वाला**—(सेन्सिटिव्ह फ्लेम्स). भोंवतालच्या आवाजामुळें चलन पावणाऱ्या या गॅसच्या ज्वाला आहेत. अशी ज्योत गॅसच्या बत्तीपासून करतां येते. एक कांचेच्या नळीचा तुकडा घेऊन त्याला अरुंद फट पाडावी, व तो तुकडा गॅसच्या नळीस जोडावा म्हणजे एक लांब अशी पातळ ज्योत पेटलेली दिसेल. ही ज्योत तिच्याजवळ किल्ल्यांचा जुडगा वाजविला असतां, कांहीं नाणीं हातांत घेऊन खुळखुळ वाजविलीं असतां, शीळ घातली असतां किंवा आवाज केला असतां खालींवर होते; व तीपासून मोठा आवाज उत्पन्न होतो. बाजूचा आवाज बंद केल्याबरोबर ती पुन्हां पूर्वीसारखी जळूं लागते.

**संशयवाद**—(स्केप्टिसिझम). तत्त्वज्ञानांतील ज्या पंथांमध्यें संशय घेणें ही प्रमुख प्रवृत्ति असते, त्या सर्व पंथांना संशयवादी पंथ म्हणतात. ज्ञान प्राप्त होणें शक्य आहे किंवा मनुष्याला ज्ञान प्राप्त करून घेण्याची शक्ति आहे, यावर सदर संशयवादी पंथाचा विश्वास नाहीं. सोफिस्ट-उदाहरणार्थ, जॉर्जियस व प्रोटॅगोरस—हे संशयवादी होते; परंतु एलिसचा रहिवासी पिर्हो (खि. पू. ३६०-२७०) ह्यानें प्रथम संशयवादी तत्त्वज्ञानाचा स्वतंत्र पंथ स्थापला. खिस्ती शकाच्या आरंभीं संशयवादाला पुन्हां चालना मिळाली, आणि सेक्सटस एम्पिरिकस यानें या वादाचें प्रतिपादन केलें (इ. स. १८० ते २१०). आधुनिक काळांत ह्यूम हा या संशयवादी पंथाचा मोठा प्रभावी पुरस्कर्ता होय.

**संसक्ति**—(कोहीशन). एकाच द्रव्याच्या कणांची त्या पदार्थांची एकरूपता न बिघडवितां एकमेकांना चिकटून राहण्याची शक्ति. दोन कण एकमेकांना चिकटलेले असतील किंवा त्यांच्यांतील अंतर अगदीं सूक्ष्म असेल त्याच वेळीं ही शक्ति उपयोगांत येते; व ह्यामुळेंच गुरुत्वाकर्षणापासून हिचें भिन्नत्व समजून येतें. ह्या शक्तीमुळें निरनिराळे कण एकत्र झाले असले तरी त्यामुळें पदार्थांचा एकजिनसीपणा किंवा त्याचे गुणधर्म ह्यांत फरक पडत नाहीं, ह्यामुळें हिच्यांत दोन निरनिराळ्या पदार्थांतील पृष्ठाकर्षणा(ॲढीझन)मध्यें किंवा रसायनक्रियेतील दोन पदार्थांचें संयोगाकर्षणा(ॲफिनिटी)मध्यें फरक आहे, हें दिसून येतें.

**संसर्गजन्य रोग**—संसर्गानें रोगजंतू शरीरांत शिरून तेथें रक्तांत किंवा धातूंत (टिश्यूमध्यें) रोगाचें विष उत्पन्न करतात. हा शोध अलीकडला असला तरी फार महत्त्वाचा आहे. चांगलीं धडधाकट दिसणारीं माणसेंहि रोगवाहक असतात. साथींचे रोग पसरण्याचीं कारणेंहि संसर्गजन्य असतात. ग्रेट ब्रिटनमध्यें देवी आणि लोहितांगज्वर (स्कार्लेट फीव्हर) हे रोग फार संसर्गजन्य समजतात व त्यांची माहिती अधिकाऱ्यांकडे न दिल्यास शिक्षा होते. तसेंच घटसर्प, आंत्रिकज्वर, नवज्वर (विषम), डांग्या खोकला, क्षय, वगैरे रोग संसर्गजन्य ठरविले आहेत व त्यांबद्दल फार दक्षता बाळगण्यांत येते.

**ससा**—हा प्राणी दिसण्यास चांगला असतो पण भित्रा फार. हा बहुधा खाणें शोधण्यासाठीं संध्याकाळीं बाहेर पडतो. एरवीं गवतांत, झुडपांत किंवा बिळांतून राहतो. याचे दांत पटाशीसारखे असतात. पुढील पाय लहान पण मागील लांब व बळकट असतात. यामुळें याची उडी लांब पडते. सशाचें मांस आवडीनें खाण्यांत येतें. याच्या रानटी व पाळीव अशा दोन जाती आहेत.

रानटी ससा—(हेअर). ही तीक्ष्णदंती सस्तन प्राण्यांची एक जात आहे. याचे कान लांब असून शरीराचा मागचा भागहि लांब असतो. याची शेपटी आंखूड असून तीवर मऊ केस

असतात. याचा वरचा ओठ खंडित असतो. हे ससे उड्या उड्या पळतात. यांची मादी वर्षांतून चार वेळां प्रसूत होऊन प्रत्येक वेळीं तीन ते सहा पिलें देते. पिलांचे डोळे जन्मतःच उघडे असतात. हे ससे सर्वत्र आढळतात व यांच्या निरनिराळ्या प्रदेशांत निरनिराळ्या जाती आहेत. यांची दृष्टि व श्रवणेंद्रियें फार तीक्ष्ण असतात व ते फार जलद पळतात म्हणून त्यांचें शत्रूंपासून रक्षण होतें. सशांपासून पिकांस फार उपद्रव होतो.

पाळीव ससा—(रॅबिट). हा एक सस्तन मूषकवर्गांतील प्राणी आहे. जंगली सशांचा रंग पिंगट असतो. पण त्याला पाळला म्हणजे त्याचा रंग बदलतो. सशाची मादी वर्षांतून सहा-सात वेळां पिलें देते आणि एका वेळेस पांचपासून सातआठ-पर्यंत पिलें घालते. हा प्राणी कोंवळें गवत व पाला यांवर उप-जीविका करतो व कधीं कधीं कोंवळ्या रोपांची साल कुरतडून मोठें नुकसान करतो. याच्या कातडीचा सरस व खळ करण्याच्या कामीं उपयोग करतात व तीस रंग देऊन निरनिराळे उपयोग करतात. पाळीव ससे कळपाकळपानें राहतात. हे कोणी हौसेनें पाळतात.

**ससानिद किंवा ससानियन घराणें**— इराणमधील हें राष्ट्रीय राजघराणें इ. स. २२६ ते ६५१ पर्यंत होतें. याच्यापूर्वी आर्सासिडी घराणें होऊन गेलें. मुसलमानांनीं इराण जिंकून घेतल्यावर ससानिद घराणें नष्ट पावलें. आर्दशरनें ससानियन राज्य स्थापलें. ससानियन राजे उगाचच ॲकिमेनिट राजांप्रमाणेंच आपणांस सर्वसत्ताधीश व सर्वगुणसंपन्न म्हणवून घेत. यांच्या अमदानींत झरथुष्ट्र संप्रदाय वाढला व ख्रिस्ती पंथहि फैलावत गेला. रोमन लोकांशीं ससानियनांच्या लढाया होत. पहिला व दुसरा खुश्रु (पाहा) हे या घराण्यांत मोठे राजे होऊन गेले.

संस्कार—संस्कार शब्दाची व्याख्या कोणीं केली नाहीं. तसेंच संस्कार किती व कोणते यासंबंधानेंहि एकमत नाहीं. निरनिराळ्या सूत्रकारांनीं व स्मृतिकारांनीं निरनिराळे संस्कार मानले आहेत. संस्कारांचा मूळ हेतु न समजल्यानें श्राद्ध, उपाकर्म, आत्मगुण यज्ञयागादिकांची गणना संस्कारांत करण्यांत आली. वेदांत संस्कार नाहींत. समावर्तनानंतर होणारें प्राकृत कर्म उन्नत केलें जातें तेव्हां त्या क्रियेला संस्कार म्हणतात. स्त्रीपुरुषसंमीलन ही स्वाभाविक घडणारी गोष्ट आहे. विवाहकर्मानें तिचें उन्नतीकरण होतें. तिचें अंगचें वैयक्तिक स्वरूप पालटून त्याच क्रियेला सामाजिक स्वरूप प्राप्त होतें. संस्कारानें व्यक्तिगत क्रियेला लोकोपयोगी वळण लागतें. अशा दृष्टीनें उपनयन, विवाह, गर्भाधान हे मुख्य व महत्त्वाचे संस्कार मानणें योग्य होईल. अन्त्यविधि इष्ट आहे, तथापि त्याला संस्कार म्हणणें फारसें अन्वर्थक दिसत नाहीं. गोवर्गांत मैथुनकर्म विकारप्रेरित असतें. मनुष्यांत तें विचारप्रेरित होतें, व त्याला गौणत्व येतें. सुप्रजा निर्माण करण्याकरितां स्त्रीपुरुषसमागम होतो, विषयोपभोगाकरितां नाहीं, ही गोष्ट संस्कारानें स्त्रीपुरुषांच्या मनावर बिंबवावयाची असते. या कसोटीला उतरतील तेवढेच संस्कार राखावे. चालू काळांत परिस्थितीमुळें बरेच संस्कार लुप्त झाले आहेत. उपनयन, विवाह व और्ध्वदेहिक इतकेच आचरणांत येतात. व हेच प्राचीन वैदिक दिसतात. उपनयन संस्काराच्या विरुद्ध लोकमत होत आहे. पण तो सहाव्या वर्षीं अवश्य करावा; त्याचप्रमाणें गर्भाधान संस्कार कोणींहि टाळूं नये, असें सुधारक विद्वानांचेंहि मत आहे. त्यांत सुधारणा करण्याची आवश्यकता आहे, एवढें मात्र खरें. संस्कार हे वैचारिक प्रगतीचे द्योतक आहेत.

हिंदु लोकांत मुख्य सोळा संस्कार (पाहा) आहेत. संस्कारांचा अधिकार त्रैवर्णिकांना आहे. संस्कारांचे नित्य, नैमित्तिक, मासिक व वार्षिक असेहि भेद आहेत. पंचमहायज्ञ हा नित्य तर गर्भाधान हा नैमित्तिक आहे. दर्शश्राद्ध हा मासिक संस्कार आहे. तर उत्सर्जन, उपाकर्म हे वार्षिक संस्कार आहेत.

ख्रिस्ती संस्कार—(सॅक्रॅमेंट्स). संस्कार म्हणजे येशू ख्रिस्तानें आपल्या मंडळींतील सभासदांकरितां जे विधी घालून दिले ते होत. ख्रिस्ताचें कार्य म्हणजे मनुष्यजातीस केवळ उपदेश करण्याचेंच नव्हतें तर मनुष्यांस आपल्या जीवनदायी कृपेच्या योगानें पवित्र करून घेण्याचेंहि होतें. येशू ख्रिस्ताचें हें पवित्र करण्याचें कार्य पुढील सात संस्कारांच्या साहाय्यानें होतें: (१) बाप्तिस्मा. (२) दृढीकरण. (३) सहभोजन. (४) तप. (५) अन्तकालीन अभ्यंग (तैलधारण) व (७) विवाह. या सर्व संस्कारांतील प्रत्येक संस्काराची स्थापना येशू ख्रिस्तानें केली आहे. यांतर्यं एक बाह्यतः विधि करावयाचा असतो व त्याच्या योगानें या विधीमुळें उत्पन्न होणारी कृपा अन्तर्यामीं मनानें प्राप्त होत असते.

ही संस्कारानें अन्तर्यामीं प्राप्त होणारी कृपा संस्कारकर्त्याच्या किंवा संस्कार करून घेणाऱ्याच्या पात्रतेमुळें होते असें नसून निरा

जाड असावे लागतात. याप्रमाणें काँक्रीट दाब सहन करूं शकतें व पोलाद ताण सहन करूं शकतें व ह्या दोहोंच्या शक्तीचा बांधकामांत उपयोग करून घेण्यांत येतो. काँक्रीट पाहा.

**सल्फोनल**—या औषधाचा झोंप आणण्याच्या कामीं उपयोग करतात. हें औषध जसद हरिदा( झिंक क्लोराइड )च्या सान्निध्यामध्यें ॲसिटोन आणि एथिल पारदवेधन (मेर कॅप्टन) यास घनरूप देऊन आणि त्यापासून तयार झालेल्या मेर कॅप्टोल याचें पालाशपरमंगनेत( पोटॅशिअम परमँगनेट )च्या साहाय्यानें प्राणिदीकरण करून तयार करतात. हें द्रव्य निर्वर्ण, निर्वंध आणि बहुतेक बेचव अशा त्रिपार्श्व स्फटिकांच्या आकारांत किंवा स्फटिकमय पांढऱ्या कुडीच्या रूपांत आढळतें.

**संवत्सर**—हा शब्द ऋग्वेदांत व तदुत्तर ग्रंथांत वारंवार आलेला आहे. एका वर्षाचे ३६० दिवस असतात व त्या वर्षांत १२ महिने असतात, असें संहिता व ब्राह्मणग्रंथ यांचें एक मत आहे. हें वर्ष म्हणजे चांद्रवर्ष होय व या वर्षामध्यें सहा दिवस अधिक येतात. सौरवर्ष या अर्थी हा शब्द फक्त सामवेदाच्या निदानसूत्रांत आलेला आहे. साध्या वत्सर शब्दाची जुन्या संवत्सर व परिवत्सर या शब्दांवर आधारलेलीं पर्यायनामें यज्ञपुरोहितांनीं उपयोगांत आणिलीं होतीं. हीं जीं नवीन नावें शोधून काढिलीं त्यांचें मूळ पंचविंश ब्राह्मणांतल्यासारख्या उल्लेखांत सांपडतें.

आपल्या पंचांगांत शालिवाहन शकाबरोबर जें संवत्सर देण्यांत येतें तें साठ वर्षांचें एक चक्र आहे ( साठ संवत्सरें पाहा ). दरवर्षी चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून नवीन संवत्सराचा आरंभ धरला जातो. हिंदुस्थानांत निरनिराळ्या संवत्सर पद्धती दृष्टीस पडतात ( बार्हस्पत्य संवत्सर व ग्रहपरिवृत्ति संवत्सर पाहा ).

**संवेदनावाद**—( सेन्सेशनॅलिझम ). तत्त्वज्ञानांतील हा एक सिद्धान्त आहे. त्याचा अर्थ असा कीं, आपल्या सर्व कल्पना आपल्याला आपल्या इंद्रियांच्या द्वारें होणाऱ्या ज्ञानापासून किंवा संवेदनांपासून बनलेल्या असतात. सोफिस्ट पंथी तत्त्ववेत्ते ह्यूम, काँडिलॅक आणि लॉक, तसेंच मिल्ल, स्पेन्सर व जेम्स हे सर्व संवेदनावादाचे पुरस्कर्ते होत. अनुभवजन्य ज्ञानवाद पाहा.

**संवेदी ज्वाला**—( सेन्सिटिव्ह फ्लेम्स ). भोंवतालच्या आवाजामुळें चलन पावणाऱ्या या गॅसच्या ज्वाला आहेत. अशी ज्योत गॅसच्या बत्तीपासून करतां येते. एक कांचेच्या नळीचा तुकडा घेऊन त्याला अरुंद फट पाडावी, व तो तुकडा गॅसच्या नळीस जोडावा म्हणजे एक लांब अशी पातळ ज्योत पेटलेली दिसेल. ही ज्योत तिच्याजवळ किल्ल्यांचा जुडगा वाजविला असतां, कांहीं नाणीं हातांत घेऊन खुळखुळ वाजविलीं असतां, शील घातली असतां किंवा आवाज केला असतां खालींवर होते; व तीपासून मोठा आवाज उत्पन्न होतो. बाजूचा आवाज बंद केल्याबरोबर ती पुन्हां पूर्वीसारखी जळूं लागते.

**संशयवाद**—( स्केप्टिसिझम ). तत्त्वज्ञानांतील ज्या पंथांमध्यें संशय घेणें ही प्रमुख प्रवृत्ति असते, त्या सर्व पंथांना संशयवादी पंथ म्हणतात. ज्ञान प्राप्त होणें शक्य आहे किंवा मनुष्याला ज्ञान प्राप्त करून घेण्याची शक्ति आहे, यावर सदर संशयवादी पंथाचा विश्वास नाहीं. सोफिस्ट-उदाहरणार्थ, जॉर्जियस व प्रोटॅगोरस—हे संशयवादी होते; परंतु एलिसचा रहिवासी पिऱ्हो ( ख्रि. पू. ३६०-२७० ) ह्यानें प्रथम संशयवादी तत्त्वज्ञानाचा स्वतंत्र पंथ स्थापला. ख्रिस्ती शकाच्या आरंभीं संशयवादाला पुन्हां चालना मिळाली, आणि सेक्सटस एम्पिरिकस यानें या वादाचें प्रतिपादन केलें ( इ. स. १८० ते २१० ). आधुनिक काळांत ह्यूम हा या संशयवादी पंथाचा मोठा प्रभावी पुरस्कर्ता होय.

**संसक्ति**—( कोहीझन ). एकाच द्रव्याच्या कणांची त्या पदार्थाची एकरूपता न बिघडवितां एकमेकांना चिकटून राहण्याची शक्ति. दोन कण एकमेकांना चिकटले असतील किंवा त्यांच्यांतील अंतर अगदीं सूक्ष्म असेल त्याच वेळीं ही शक्ति उपयोगांत येते; व ह्यामुळेंच गुरुत्वाकर्षणापासून याचें भिन्नत्व समजून येतें. ह्या शक्तीमुळें निरनिराळे कण एकत्र झाले असले तरी त्यामुळें पदार्थाच्या एकजिनसीपणा किंवा त्याचे गुणधर्म ह्यांत फरक पडत नाहीं, ह्यामुळें हिच्यांत दोन निरनिराळ्या पदार्थांतील पृष्ठाकर्षणा( ॲढीझन )मध्यें किंवा रसायनक्रियेंतील दोन पदार्थांचें संयोगाकर्षणा( ॲफिनिटी )मध्यें फरक आहे, हें दिसून येतें.

**संसर्गजन्य रोग**—संसर्गानें रोगजंतू शरीरांत शिरून तेथें रक्तांत किंवा धातूंत ( टिश्यूमध्यें ) रोगाचें विष उत्पन्न करतात, हा शोध अलीकडला असला तरी फार महत्त्वाचा आहे. चांगलीं धडधाकट दिसणारीं माणसेंहि रोगवाहक असतात. सांथीचे रोग पसरण्याचीं कारणेंहि संसर्गजन्य असतात. ग्रेट ब्रिटनमध्यें देवी आणि लोहितांगज्वर ( स्कार्लेट फीव्हर ) हे रोग फार संसर्गजन्य समजतात व त्यांची माहिती अधिकाऱ्यांकडे न दिल्यास शिक्षा होते. तसेंच घटसर्प, आंत्रिकज्वर, नवज्वर ( विषम ), डांग्या खोकला, क्षय, वगैरे रोग संसर्गजन्य ठरविले आहेत व त्यांबद्दल फार दक्षता बाळगण्यांत येते.

**ससा**—हा प्राणी दिसण्यास चांगला असतो पण भित्रा फार. हा बहुधा खाणें शोधण्यासाठीं संध्याकाळीं बाहेर पडतो. एरवीं गवतांत, झुडपांत किंवा बिळांतून राहतो. याचे दांत पटाशीसारखे असतात. पुढील पाय लहान पण मागील लांब व बळकट असतात; यामुळें याची उडी लांब पडते. सशाचें मांस आवडीनें खाण्यांत येतें. याच्या रानटी व पाळीव अशा दोन जाती आहेत.

रानटी ससा—( हेअर ). ही तीक्ष्णदंती सस्तन प्राण्यांची एक जात आहे. याचे कान लांब असून शरीराचा मागचा भागहि लांब असतो. याची शेपटी आंखूड असून तीवर मऊ केस

असतात. याचा वरचा ओठ खंडित असतो. हे ससे उडत उडत पळतात. यांची मादी वर्षांतून चार वेळां प्रसूत होऊन प्रत्येक वेळीं तीन तें सहा पिलें देते. पिलांचे डोळे जन्मतःच उघडे असतात. हे ससे सर्वत्र आढळतात व यांच्या निरनिराळ्या प्रदेशांत निरनिराळ्या जाती आहेत. यांची दृष्टि व श्रवणेंद्रियें फार तीक्ष्ण असतात व ते फार जलद पळतात म्हणून त्यांचें शत्रूंपासून रक्षण होतें. सशांपासून पिकांस फार उपद्रव होतो.

पाळीव ससा—( रॅबिट ). हा एक सस्तन मूषकवर्गांतील प्राणी आहे. जंगली सशांचा रंग पिंगट असतो. पण त्याला पाळला म्हणजे त्याचा रंग बदलतो. सशाची मादी वर्षांतून सहा-सात वेळां पिलें देते आणि एका वेळेस पांचपासून सातआठ-पर्यंत पिलें घालते. हा प्राणी कोंवळें गवत व पाला यांवर उप-जीविका करतो व कधीं कधीं कोंवळ्या रोपांची साल कुरतडून मोठें नुकसान करतो. याच्या कातडीचा सरस व खळ करण्याच्या कामीं उपयोग करतात व तीस रंग देऊन निरनिराळे उपयोग करतात. पाळीव ससे कळपाकळपानें राहतात. हे कोणी हौसेनें पाळतात.

**ससानिद किंवा ससानियन घराणें**— इराणमधील हे राष्ट्रीय राजघराणें इ. स. २२६ ते ६५१ पर्यंत होतें. याच्यापूर्वी आर्सासिडी घराणें होऊन गेलें. मुसलमानांनीं इराण जिंकून घेतल्यावर ससानिद घराणें नष्ट पावलें. आर्देसरनें ससानियन राज्य स्थापलें. ससानियन राजे उगाचच ॲकिमेनिड राजां-प्रमाणेंच आपणांस सर्वसत्ताधीश व सर्वगुणसंपन्न म्हणवून घेत. यांच्या अमदानींत झरथुष्ट्र संप्रदाय वाढला व ख्रिस्ती पंथहि चाला-वत गेला. रोमन लोकांशीं ससानियनांच्या लढाया होत. पहिला व दुसरा खुश्रु ( पाहा ) हे या घराण्यांत मोठे राजे होऊन गेले.

**संस्कार**—संस्कार शब्दाची व्याख्या कोणीं केली नाहीं. तसेंच संस्कार किती व कोणते यासंबंधानेंहि एकमत नाहीं. निर-निराळ्या सूत्रकारांनीं व स्मृतिकारांनीं निरनिराळे संस्कार मानले आहेत. संस्कारांचा मूळ हेतु न समजल्यानें श्राद्ध, उपाकर्म, आत्मगुण अशासारख्यांची गणना संस्कारांत करण्यांत आली. वेदांत संस्कार नाहींत. स्वभावतःच होणारें प्राकृत कर्म उन्नत केलें जातें तेव्हां त्या क्रियेस संस्कार म्हणतात. स्त्रीपुरुषमीलन ही स्वाभाविक घडणारी गोष्ट आहे. विवाहकर्मानें तिचें उन्नतीकरण होतें. तिचें अंगचें वैयक्तिक स्वरूप पालटून त्याच क्रियेला सामा-जिक स्वरूप प्राप्त होतें. संस्कारानें व्यक्तिगत क्रियेला लोकोपयोगी वळण लागतें. अशा दृष्टीनें उपनयन, विवाह, गर्भाधान हे मुख्य व महत्त्वाचे संस्कार मानणें योग्य होईल. अन्त्यविधि इष्ट आहे. तथापि त्याला संस्कार म्हणणें फारसें अन्वर्थक दिसत नाहीं. गोधर्मांत मैथुनकर्म विकारप्रेरित असतें. मनुष्यांत तें विचार-प्रेरित होतें, व त्याला गौणत्व येतें. सुप्रजा निर्माण करण्याकरितां स्त्रीपुरुषसमागम होतो, विषयोपभोगाकरितां नाहीं, ही गोष्ट संस्कारानें स्त्रीपुरुषांच्या मनावर बिंबवावयाची असते. या कसोटीला उतरतील तेवढेच संस्कार राखावे. चालू काळांत परि-स्थितीमुळें बरेच संस्कार लुप्त झाले आहेत. उपनयन, विवाह व और्ध्वदेहिक इतकेच आचरणांत येतात. व हेच प्राचीन वैदिक दिसतात. उपनयन संस्काराच्या विरुद्ध लोकमत होत आहे. पण तो सहाव्या वर्षी अवश्य करावा; त्याचप्रमाणें गर्भाधान संस्कार कोणींहि टाळूं नये, असें सुधारक विद्वानांचेंहि मत आहे. त्यांत सुधारणा करण्याची आवश्यकता आहे, एवढें मात्र खरें. संस्कार हे वैचारिक प्रगतीचे द्योतक आहेत.

हिंदु लोकांत मुख्य सोळा संस्कार ( पाहा ) आहेत. संस्कारांचा अधिकार त्रैवर्णिकांना आहे. संस्कारांचे नित्य, नैमित्तिक, मासिक व वार्षिक असेहि भेद आहेत. पंचमहायज्ञ हा नित्य तर गर्भाधान हा नैमित्तिक आहे. दर्शश्राद्ध हा मासिक संस्कार आहे, तर उत्सर्जन, उपाकर्म हे वार्षिक संस्कार आहेत.

ख्रिस्ती संस्कार—(सॅक्रॅमेंट्स ). संस्कार म्हणजे येशू ख्रिस्तानें आपल्या मंडळींतील सभासदांकरितां जे विधी घालून दिले ते होत. ख्रिस्ताचें कार्य म्हणजे मनुष्यजातीस केवळ उपदेश कर-ण्याचेंच नव्हतें तर मनुष्यांस आपल्या ईश्वरदत्त कृपेच्या योगानें पवित्र करून घेण्याचेंहि होतें. येशू ख्रिस्तानें हें पवित्र करण्याचें कार्य पुढील सात संस्कारांच्या साहाय्यानें होतें : ( १ ) बाप्तिस्मा. ( २ ) दृढीकरण. ( ३ ) सहभोजन. ( ४ ) तप. ( ५ ) अन्तकालीन अभ्यंग ( व्रतधारण ) व ( ७ ) विवाह. या सर्व संस्का-रांतील प्रत्येक संस्काराची स्थापना येशू ख्रिस्तानें केली आहे. यामध्यें एक बाह्यतः विधि करावयाचा असतो व त्याच्या योगानें या विधीमुळें व्यक्त होणारी कृपा अन्तःस्थ रीतीनें प्राप्त होत असते.

ही संस्कारानें अन्तःस्थ प्राप्त होणारी कृपा संस्कारकर्त्यांच्या किंवा संस्कार करून घेणाऱ्याच्या प्रार्थनेमुळें होते असें नसून निरा

संबंध त्या संस्काराशीं येशू ख्रिस्तानें जोडून दिलेला आहे. उदाहरणार्थ, एखाद्या कागदावर केलेल्या सहीचा अर्थ ती करणाऱ्याची मान्यता एवढाच नसून तीमध्यें कायदेशीर अधिकारहि व्यक्त होत असतो. संस्कारामुळें सर्व मनुष्याचें जीवित पवित्र होतें, त्याचा आरंभ बाप्तिस्मा या संस्कारानें होऊन त्यामुळें मनुष्याचें अन्तःकरण पुनरुज्जीवित होतें व अखेरीस अन्त्यसंस्काराच्या वेळच्या अभ्यंगामुळें त्याची अखेरच्या स्वर्गीय वैभवामध्यें प्रवेश करण्याची तयारी होते.

**संस्कृत भाषा व वाङ्मय**— भारतीय लोकांची संस्कृत भाषा ही युरो-भारतीय (इंडो-युरोपियन) भाषावंशांतील असून हिचे (अ) प्राचीन, (आ) रामायण-महाभारत या महाकाव्यांतील, व (इ) पाणिनीय, असे मुख्य तीन वर्ग पाडण्यांत येतात. प्राचीन संस्कृतांत वैदिक ग्रंथ लिहिले आहेत.

प्राचीन संस्कृत किंवा वेदभाषा—वेदग्रंथांतील स्तोत्रें, प्रार्थना, मंत्रतंत्र, वगैरे जे प्राचीनतम भारतीय वाङ्मयाचे अवशेष आज उपलब्ध आहेत, त्यांत वापरलेली भाषा ही या पहिल्या सदरांत येते. हिला वेदभाषा असेंहि म्हणतात. ही वेदभाषा जरी एका काळीं आपल्या बोलण्याच्या भाषेचेंच उच्च स्वरूप होतें तरी हिचा हा दर्जा पूर्वीच नाहींसा झाला असून अलीकडे केवळ शास्त्री-पंडित लोकांत वंशपरंपरेनें वेदमंत्र वगैरे म्हणण्याच्या कामींच हिचा उपयोग होत आलेला आहे. या भाषेची जुनाट रचना अद्यापिहि बुद्धिपुरस्सर कायम ठेवण्यांत आलेली आहे.

वेदभाषा व पर्शुभारतीय मूलभाषा—वेदभाषा एका काळीं सामान्य लोकभाषा होती आणि ती भरतखंडाच्या वायव्येकडील प्रदेशांत आलेल्या 'आर्य' म्हणविणाऱ्या लोकांत चालत होती. ही भाषा प्राचीन इराणी व बॅक्ट्री या भाषांशीं अगदीं सदृश असून वेदभाषा व प्राचीन अवेस्ती भाषा यांच्या तुलनेनें भाषाशास्त्रवेत्त्यांनीं कल्पिलेली जी 'पर्शुभारतीय' (इंडो-इराणियन) भाषा त्या मूलभाषेहून फारशी वेगळी नसावी. संस्कृत व पाली या भाषांत जितका फरक आहे तितका वेदभाषा व पर्शुभारतीय मूलभाषा यांमध्यें असेल असें दिसत नाहीं.

संस्कृत व वेदभाषा—या दोहोंतील वर्णोच्चार बहुधा सारखेच आहेत. यांमध्यें जो फरक आहे तो वेदभाषा संस्कृतपेक्षां फार जुनी असून तींत संस्कृतपेक्षां पुष्कळच अधिक रूपें, प्रयोग, वगैरे आहेत यामुळे आहे. उदाहरणार्थ, या जुन्या वेदभाषेंत संकेतार्थ आहे तो संस्कृतांत नाहीं; जुन्या भाषेंत तुमन्ताचें रूप दहाबारा प्रकारांनीं सा ित असत, सध्यां एकच प्रकार आहे; इत्यादि. वेदभाषेचें जें स्वरूप ऋग्वेदाच्या प्रथम नऊ मंडळांत प्रामुख्यानें सांपडतें ते ऋग्वेदाचें दहावें मण्डल व अथर्ववेदांतील आणि यजुर्वेदांतील कांहीं भाग यांमध्यें दृष्टीस पडत नाहीं.

ब्राह्मणें, आरण्यकें व उपनिषदें हे जे वैदिक गद्य ग्रंथ आहेत त्यांत जुनी वेदभाषा अगदींच थोडी असून ते बहुधा संस्कृत भाषेंतच आहेत असें म्हणतां येईल. वेदांगांतील सूत्रें कांहीं ठिकाणीं वैदिक स्वरूपाचीं दिसतात. तरी मुख्यतः तीं शुद्ध संस्कृतांत आहेत.

आरण्यकें व उपनिषदें हे जे उत्तर वेदकालांतील गद्यप्रचुर ग्रंथ त्यांची संस्कृत भाषा व पाणिनीनें उपदेशिलेली संस्कृत भाषा या दोहोंत फारसा फरक नाहीं. उपर्युक्त ग्रंथांच्या भाषेला 'प्राचीन संस्कृत' असें म्हणणें सोईचें होईल. या ग्रंथांच्या रचनाकाळीं व तत्पूर्वी कांहीं काल विद्वान् लोक व पुरोहितवर्गांतील लोक बहुधा ही भाषा वापरीत असावेत. पाणिनि खि. पू. ७५० या वर्षाच्या सुमारास किंवा त्याहूनहि पूर्वी होऊन गेला असावा. पतंजलीच्या काळींहि ही प्राचीन संस्कृत भाषा शिष्ट लोकांत रूढ होती.

महाकाव्यांतील संस्कृत—याच काळीं हिचें एक स्वरूप सामान्य लोकांत प्रचलित होतें ते आपणास तत्कालीन आर्ष महाकाव्यांतून आढळते. हे रामायण-महाभारतांतील संस्कृत व अभियुक्त (क्लासिकल) संस्कृत यांत फरक आहे तो एवढाच कीं, अभियुक्त संस्कृतांत नियमबद्धता अधिक असून लोकभाषेहून तें बरेंच निराळें आहे व त्यांत रामायण-भारताच्या संस्कृताइतके जुने प्रयोग नाहींत. गद्यग्रांथिक संस्कृत भाषा व आर्षकाव्यभाषा हीं समाजांतील निरनिराळ्या वर्गांच्या भाषांचीं स्वरूपें होत. यांचेंच पर्यवसान संस्कृत व प्राकृत या भेदांत झालें. संस्कृत व प्राकृत या भाषा एकाच काळीं समाजांतील निरनिराळे वर्ग वापरीत होते. राजा, ब्राह्मण, सरदार लोक व कांहीं सुशिक्षित स्त्रिया यांच्या तोंडीं संस्कृत व इतरांच्या तोंडीं प्राकृत अशी जी व्यवस्था नाटकांतून आढळून येते, तीवरून नाटकें लिहिलीं गेलीं त्या काळाच्या पूर्वी म्हणजे खिस्त शकापूर्वी कित्येक शतकें सामान्य लोकांना संस्कृत बोलतां येत नसले तरी बोललेलें समजत असे, असा सिद्धांत काढण्यांत आला आहे.

मृतभाषा कीं बद्धभाषा—पाश्चात्य ग्रंथकारांस संस्कृत भाषेस मृत किंवा जिवंत यांपैकीं कोणता शब्द लावावा याचीच मोठी फिकिर पडलेली दिसते. जिवंत शब्द लावण्यासाठीं किंवा निदान मृत शब्द न लावावा या हेतूनें जर्मन पंडित विंटरनिट्झ म्हणतो— "संस्कृत भाषा मृत आहे असें म्हणणे चुकीचें ठरेल. तिला फार तर बद्ध भाषा असें म्हणतां येईल. कारण, या भाषेला पाणिनीसारख्या व्याकरणकारांनीं व्याकरणनियमांनीं गच्च आवळून टाकल्यामुळें कांहीं दिवसांनीं हिची वाढ खुंटली. पाणिनीय व्याकरणाप्रमाणे जें शुद्ध संस्कृत त्यासच अभियुक्त संस्कृत ही संज्ञा आहे. पाणिनीनंतर हजार एक वर्षेपर्यंत या भाषेंत अनेक नवीन काव्यें व शास्त्रग्रंथ

निर्माण झाले व अद्यापहि अशीं काव्यें व ग्रंथ होत आहेत. आजच्या घटकेला हिंदुस्थानांत अनेक संस्कृत पंडित अनेक नियतकालिकें व ग्रंथ संस्कृतांत लिहून प्रसिद्ध करीत आहेत. महाभारत, रामायण, वगैरे पुराणांचें अद्यापि श्रवण व वाचन चाललेलें आहे. संस्कृत काव्यें व लेख अजूनहि निर्माण होत आहेत. व पुष्कळ विद्वान् लोक संस्कृत भाषेमध्यें शास्त्रीय विषयांवर अस्खलित भाषण करतांना दृष्टीस पडतात. तेव्हां या सर्व गोष्टी समोर दिसत असून संस्कृत भाषा ही मृत भाषा आहे असें कसें म्हणतां येईल?” येणेंप्रमाणें विंटरनिट्झची विचारसरणी आहे. असो. लॅटिन भाषेचा युरोपच्या इतिहासांतील मध्ययुगांत जितका प्रचार होता अगर हीब्रू भाषेचा यहुदी लोकांत आज जितका प्रचार आहे, तितकाच संस्कृत भाषेचा प्रचार आज भरतखंडांत आहे, एवढें लक्षांत ठेविलें म्हणजे झालें.

अध्ययनाचे प्रांतपरत्वें भेद—हिंदुस्थानांतील सर्वच ठिकाणीं सर्वच शास्त्रांचा सारखा अभ्यास होतो असें नाहीं. मुख्य व गौण असा भाव त्यात आहेच. बंगालकडे न्यायशास्त्राला प्राधान्य आहे. महाराष्ट्रांत व्याकरण व अद्वैत वेदान्त यांना प्राधान्य आहे. कर्नाटकांत न्याय व द्वैत वेदान्त यांना प्राधान्य आहे. न्यायांतहि दक्षिणेकडे (कर्नाटकांत) गादाधारी व काशीकडे जागदीशी पढण्याचा विशेष प्रघात आहे. मद्रासकडे श्रौत व अद्वैत, आणि तेलंगणांत श्रौत आणि मीमांसा यांना प्राधान्य आहे. मीमांसेचें अध्ययन सर्वच ठिकाणीं होतें. तथापि सध्यां व्हावें तसें मीमांसेवर परिश्रम होत नाहींत. याचें कारण श्रौत धर्म जो याज्ञिककर्म त्याचा लोप झाला हेंच आहे. मीमांसा ही वेदार्थप्रतिपादक असल्यामुळें व वेदांचा यज्ञाकडे उपयोग असल्यामुळें यज्ञकर्माच्या अभावीं तत्प्रतिपादक अर्थाची जरूरच शिल्लक राहत नाहीं. व्याकरण वगैरे संपल्यावर सहा दर्शनांचें अध्ययन करावें लागतें. तीं सहा दर्शनें १ न्याय, २ वैशेषिक, ३ योग, ४ सांख्य, ५ पूर्वमीमांसा व ६ उत्तरमीमांसा हीं होत. उत्तरमीमांसा म्हणजे ब्रह्मसूत्रें व गीता आणि उपनिषदें ही प्रस्थानत्रयी. यावर शंकराचार्यप्रभृति चारहि आचार्यांचीं भाष्यें आहेत.

न्याय, व्याकरण व मीमांसा या तिन्हींचें अध्ययन झालें तरी विद्येच्या अंतिम फलाच्या दृष्टीनें वेदान्ताचें व त्यावरील भाष्यांचें अध्ययन अवश्य आहे. व म्हणून न्याय-व्याकरणादि अध्ययन करणारांनीं त्यांचा वेदान्ताकडे उपयोग करणें जरूर आहे. त्याप्रमाणें विद्येचें अंतिम फल जें मोक्ष (निःश्रेयस्) त्या दृष्टीनें वेदान्ताची जरूरी, तसेंच ऐहिक सदाचारांचें ज्ञान या दृष्टीनें स्मृत्यादि धर्मशास्त्राचा फार उपयोग आहे. निर्णयसिंधुकारां-सारखे निबंधकार दिवंगत झाल्यापासून या स्मृत्यादि ग्रंथांचें अध्ययन होईनासें झालें आहे. अलीकडचे लोक धर्मशास्त्र याचा अर्थ अशौचादि प्रसंगीं उपयोगी पडणारी धर्मसिंधूसारख्या सामान्यग्रंथांतील कांहीं प्रकरणें, इतकेंच समजतात; परंतु त्यायोगें समाजाचे तत्कालीन प्रश्न सुटत नाहींत; त्याकरितां स्मृतींचें सांगोपांग अध्ययन करण्याकडे न्याय वगैरे शिकविणारांनीं विशेष लक्ष देणें आवश्यक व प्रासंगिक आहे.

नामांकित संस्कृत पंडित—१८ व्या व १९ व्या शतकांत जे मोठमोठे नामांकित विद्वान् होऊन गेले ते पुढील होत: बाळसरस्वती बाळशास्त्री रानडे हे अत्यंत उज्ज्वल बुद्धीचे व प्रकाण्डपण्डित होते. यांच्या शिष्यांपैकीं अत्यंत नामांकित म्हणजे दामोदरशास्त्री भारद्वाज व त्यांचे बंधु गोविंदशास्त्री भारद्वाज, गंगाधरशास्त्री तेलंग, तात्याशास्त्री पटवर्धन व शिवकुमारशास्त्री हे होत. गंगाधरशास्त्री यांनीं साहित्यावर फारच परिश्रम करून ग्रंथ लिहिले आहेत. याच वेळीं कैलासचंद्र भट्टाचार्य, सीतारामशास्त्री व बापुदेवशास्त्री हे विद्वानहि होऊन गेले. महाराष्ट्रांतील विद्वान् म्हणजे विठ्ठोपाध्याय, मोडक, गर्गे, वाटे, सदाशिवशास्त्री घुले, मोरशास्त्री साठे, राघवाचार्य गजेंद्रगडकर, कृष्णशास्त्री चिपळूणकर, भास्करशास्त्री अभ्यंकर, रघुनाथशास्त्री पर्वते, वगैरे. इंदूर-ग्वाल्हेरकडे विष्णुशास्त्री भट्ट, गोपाळाचार्य कऱ्हाडकर हे होऊन गेले. वरील सर्व शास्त्री चांगले पढिक असून उत्तम अध्यापकहि होते.

बाह्य भाषांवर संस्कृतची छाप—भारतीय संस्कृतीचा संस्कृत भाषा व संस्कृत वाङ्मय यांच्या द्वारां इतर देशांवर झालेला परिणाम फार महत्त्वाचा आहे. संस्कृत भाषेशीं निकट नात्याच्या भाषा भरतखंडाबाहेर ज्या देशांत आढळतात असे देश सिंहलद्वीप आणि माल्दीव बेटें हे होत. या भाषाप्रचारावरून भारतीय जनतेचें मोठ्या प्रमाणावर प्रयाण सिद्ध होतें. ज्या आर्यभाषाकुलाबाहेरील भाषांवर संस्कृत भाषेंतील शब्दांचें त्यांत मिश्रण होऊन परिणाम झालेला आहे, अशा भाषा अनेक असून त्या अनेक भाषाकुलांतील आहेत. ब्रह्मदेशांत चालणाऱ्या ब्रह्मी, कुकिचिन, लोलो, सिंग्फो (करेण), थइ, इत्यादि संघांतील सुमारें ७३ पोटभाषा या मूळ तिबेटी-चिनी कुलांतील असून त्यांत अनेक संस्कृत शब्द शिरले आहेत. मलायी-पॉलिनेशियन कुलांतील मलयु भाषा, ऑस्ट्रो-एशियाटिक कुलांतील मोन-ख्मेर व ख्मेर संघांतील सुमारें १० भाषा व इंडो-चिनी संघांतील थिम, बरमा, ताघाल, लाव, इत्यादि भाषा व द्राविड कुलांतील तुळू, कोडगु, गोंडी व कोरकु या भाषा, जावा बेटांतील कविभाषा आणि फिलिपाइन व सुमात्रा बेटांतील भाषा या सर्व भाषांमध्यें संस्कृत शब्दांचें मिश्रण झालें आहे. म्हणजे संस्कृत भाषेचा पगडा तिबेटो-चिनी, ऑस्ट्रो-एशियाटिक, द्राविड, इंडो-चिनी, इत्यादि कुलांतील जवळजवळ १०० परकीय भाषांवर बसला आहे.

संस्कृत भाषेचा यापेक्षां महत्त्वाचा परिणाम म्हणजे संस्कृत ग्रंथांचा प्रवेश ज्या भाषांत झाला आहे अशा भाषा मलयु आणि जावानी या होत. ज्या भाषांवर संस्कृत भाषेचा परिणाम झाल्याचें स्पष्ट दिसत नाहीं पण तसा संशय घेण्यास सबळ कारणें आहेत, अशा भाषांमध्यें सेंटिचिसमधील भाषा मोडते. चिनी भाषेत संस्कृत वाङ्मयाचा प्रवेश झाला; पण त्या भाषेवरील परिणाम अद्यापि मोजला गेला नाहीं. तिबेटी व जपानी भाषांवर परिणाम झाल्याचीं चिन्हें दिसत आहेत.

व्याकरण—हल्लीं उपलब्ध असलेलें सर्वांत जुनें संस्कृत व्याकरण पाणिनीची 'अष्टाध्यायी' हें आहे. कोणत्याहि भाषेंतल्या व्याकरणग्रंथांत याच्याइतका सर्वांगपूर्ण ग्रंथ नाहीं. त्यांत आठ अध्याय व सुमारें ४,००० सूत्रें आहेत. पाणिनीनंतर भाषेची जशी परिणति होत गेली तशी पाणिनीच्या अष्टाध्यायीस पुरवणी व्याकरण तयार करण्याची जरुरी भासूं लागली. यांतील कात्यायनाचीं वार्तिकें मात्र हल्लीं उपलब्ध आहेत. पतंजलीचें 'महाभाष्य' (ख्रिस्तपूर्व ४००) ही पाणिनीवरील सर्वोत्कृष्ट टीका आहे. पतंजलीचें लेखन अत्यंत दोषरहित व प्रमाणभूत आहे. त्याची भाषा सोपी पण फार तेजस्वी आहे. पांचव्या शतकांत चंद्रगोमिन् या बुद्ध पंडितानें 'चंद्र-व्याकरण' लिहिलें. त्यांत बौद्धवाङ्मयांत जे भाषेचे नवे प्रकार शिरले त्यांचीहि चिकित्सा केली आहे. भर्तृहरि (सुमारें इ. स. ६००) हा मोठा तत्त्वज्ञानी व वैयाकरणी होता. त्यानें आपल्या 'वाक्यप्रदीप' या ग्रंथांत व्याकरणाच्या तात्त्विक बाजूची चर्चा केली आहे. त्याने महाभाष्याच्या कांहीं भागावरहि टीका लिहिली आहे. वामन व जयादित्य यांनीं लिहिलेली 'काशिका वृत्ति' ही सबंध अष्टाध्यायीवरील पहिली टीका आहे. काशिकेवर 'न्यास' आणि 'पदमंजरी' अशा दोन टीका आहेत. कैय्यट (सु. १०००) यानें पतंजलीच्या महाभाष्यावर 'उद्योत' नांवाची टीका लिहिली आहे.

'अष्टाध्यायी'चें अध्ययन सोपें करण्याच्या हेतूनें अनेक लोकांनीं तिची पुनर्रचना केली आहे. विमल सरस्वतीची 'रूपमाला' (१३५०) हा अशा प्रकारचा पहिला ग्रंथ होय. दुसरा ग्रंथ रामचंद्राची 'प्रक्रिया-कौमुदी' (१४ वे शतक) हा होय. या प्रक्रिया-कौमुदीवर विठ्ठलाची 'प्रसाद' (सु. १५००) व शेषकृष्णाची 'प्रक्रिया-प्रकाश' या दोन टीका झाल्या. नारायणभट्टाचें 'प्रकाश-सर्वस्व' (सु. १६००) व भट्टोजी दीक्षिताची 'सिद्धान्तकौमुदी' (सु. १६००) हे दोन ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहेत. सिद्धान्तकौमुदी अजून अतिशय लोकप्रिय आहे. भट्टोजी दीक्षितानें आपल्याच कौमुदीवर 'प्रौढ-मनोरमा' नांवाची एक टीका लिहिली व मूळ अष्टाध्यायीवर 'शब्द-कौस्तुभ' नांवाची विस्तृत टीका लिहिली. तसेंच व्याकरणतत्त्वावर ७४ कारिकाहि लिहिल्या. नागेश (सु. १७००) यानें कैय्यटाच्या 'प्रदीपावर' 'उद्योत' नांवाची एक चिकित्सक टीका, व व्याकरणाच्या तत्त्वज्ञानावर 'लघुसिद्धान्तमंजूषा' नांवाचा एक प्रचंड ग्रंथ लिहिला. पाणिनीय संप्रदायांतला हाच शेवटचा ग्रंथकार होय.

वैदिक वाङ्मय—वैदिक हिंदूंचें आध्यात्मिक जीवन व विचार यांचें स्वरूप जाणण्याची ज्यांना इच्छा आहे त्यांना वैदिक वाङ्मयाचा अभ्यास करणें अवश्य आहे. गौतम बुद्ध आणि महावीर यांनीं जरी वैदिक धर्माविरुद्ध बंड करून नवीन धर्म स्थापन केले, तरी त्यांना आपल्या आचारांत व विचारांत वैदिक धर्माचा पुष्कळच भाग सामील करावा लागला. वेद याचा अर्थ 'ज्ञान' व त्यानंतर 'धर्मज्ञान'. वेदांस 'श्रुती'हि म्हणतात. या शब्दाचा अर्थ 'परमात्म्यानें प्रकट केलेलें ज्ञान.' वेद हे मानवांनीं रचलेले नव्हेत, ते ऋषींना दिसले, त्यांच्या बुद्धींत प्रकट झाले, अशी मूळपासून दृढ समजूत आहे. श्रुतींच्या मागून अनेक स्मृती झाल्या, त्या मात्र ऋषींनीं श्रुतींचें ज्ञान 'आठवून' लिहिलेल्या आहेत. त्या जेथवर श्रुतींस म्हणजे वेदांस अनुसरून आहेत तेथपर्यंतच त्यांचें प्रामाण्य मानतात. सूत्रवाङ्मय हें मानवनिर्मित आहे तरी वैदिक आचारच त्यांत सांगितला असल्यामुळें त्याचा समावेश वैदिक वाङ्मयांतच होतो. वैदिक वाङ्मय अनेक हजार वर्षें निर्माण होत होतें. तें लिपिनिविष्ट न होतां शब्दशः 'वाङ्मय' होतें, म्हणजे वाणीनेच शिकविण्यांत व ग्रहण करण्यांत येत होतें.

वेदांचे दोन मुख्य भाग आहेत : संहिता व ब्राह्मणग्रंथ. संहिता हा स्तोत्रें, प्रार्थना, यज्ञनियम, मंत्रतंत्र व आशीर्वाद-मंत्र यांचा एकत्र केलेला संग्रह आहे. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद अशा चार संहिता आहेत. (या प्रत्येकावर कोशांत स्वतंत्र लेख आहेत ते पाहावे.) व प्रत्येक वेद-संहितेचे अनेक पाठ म्हणजे शाखा आहेत. ऋग्वेद सगळ्यांत जुना व जास्त महत्त्वाचा. यज्ञविधीकरितां एकंदर वेदमंत्रांच्या चार संहिता करणें अवश्य झालें. कारण प्रत्येक लहानमोठ्या यज्ञांत चार ऋत्विक् लागत व प्रत्येकाकडे वेगवेगळीं कामें असत व त्यांस लागणारे भिन्न मंत्रहि त्यांस यावे लागत. 'होता' ऋग्वेदांतील मंत्र म्हणून आहुति देतो. उद्गाता हवनाच्या वेळीं सामवेदांतील मंत्रांचें गायन करतो. 'अध्वर्यु' यजुर्वेदांत सांगितलेल्या पद्धतीनें सर्व यज्ञकर्म करीत असतो. 'ब्रह्मा' चारी वेदांत प्रवीण असून सर्वांवर देखरेख करीत असतो. अथर्ववेदाला कांहीं काळानें मागाहून इतर वेदत्रयीच्या बरोबरीनें मान मिळूं लागला. सामवेदांतील फक्त ७५ सूक्तें स्वतंत्र आहेत. बाकी सर्व ऋग्वेदांतूनच घेतलीं आहेत. अथर्ववेदाचाहि बराच भाग ऋग्वेदांतून घेतला आहे.

ऋग्वेद—ऋग्वेदाची फक्त एकच वेगळी शाखा आज अस्तित्वांत आहे. ऋग्वेदांत एकंदर १,०२८ सूक्तें असून त्यांचे मंत्र म्हणजे ऋचा १०,६०० आहेत. ऋग्वेदाची रचना बराच काळपर्यंत चालू असावी. त्यामुळें कांहीं भागांत समाजरचनेच्या अगदीं प्राथमिक काळास शोभणारे असे आचार व विचार वर्णन केले आहेत. त्याच्या उलट कांहीं भागांत परिणत आध्यात्मिक विचार व सूक्ष्म याज्ञिक विधी आहेत. ऋग्वेदांतील कांहीं सूक्तांचा यज्ञविधीशीं कांहीं संबंध नाहीं. त्यांत उत्तम प्राचीन धर्मकाव्य भरलेलें आहे.

ऋग्वेदांतील धर्म हा निसर्गपूजनावर आधारलेला आहे. त्यामुळें स्वर्ग, अंतरिक्ष व पृथ्वी यांतील अग्नि, जल, वायु, सूर्य, इ. नैसर्गिक शक्तींनाच देवांचें स्थान मिळालें. वेगवेगळ्या देवतांची स्तुति असलेलीं गीतें म्हणजेच हीं सूक्तें आहेत व त्यांचा उपयोग सोम किंवा घृत यांची अर्थात आहुति देतांना करावयाचा असतो. वेदांत मुख्य देवता ३३ आहेत. इंद्र व अग्नि यांस मानवासारखें रूप कल्पिलेलें आहे. या अनेक देवता एकाच सर्वव्यापी परमेश्वराचीं रूपें आहेत, ही भावना वेदकाळाच्या अखेरीस प्रादुर्भूत झाली. स्वर्गांतील मुख्य देव द्यौस्, मित्र, वरुण, सूर्य, सवितृ, पूषन् व अश्विन् हे होत. व देवता उषस् व रात्रि या होत्या. अंतरिक्षांतील देव इंद्र, अपांनपात्, रुद्र, मरुत्, वायु, पर्जन्य व आपभूलोकींच्या देवता पृथ्वी, अग्नि व सोम या होत. गौण देवतांत मित्र व मातरिश्वन् या आहेत. या मातरिश्वन्नें अग्नि स्वर्गांतून पृथ्वीवर आणला. मन्यु या भावनात्मक नामालाहि देव केलें आहे. आदित्याची माता अदिति ही एक देवताच आहे. कांहीं सूक्तांत संवादहि आहेत. पुरूरवस्–उर्वशी मधील संवाद हा यापैकींच आहे. कांहीं सूक्तांत रूपकात्मक भाषेंत कळण्यास फार कठिण अशीं कूटें आहेत. संहितेंत एकहि चूक शिरूं नये म्हणून, पद, क्रम, जटा, घन, वगैरे अतिशय कठिण असे पाठ रचण्यांत आले आहेत. ( वेदांवर लेख पाहा ).

ऋग्वेदांतील सर्व मंत्र पद्यमय आहेत. प्रत्येक मंत्रास बहुधा ४ चरण असतात व प्रत्येक चरणांत ८, ११ किंवा १२ अक्षरें असतात. सुमारें १५ छंदांपैकीं त्रिष्टुप् ( ४ × ११ मात्रा ), गायत्री ( ३ × ८ ) व जगती ( ४ × १२ ) हे प्रमुख आहेत. ऋग्वेदांतील छंद हे कांहीं भाग मात्राबद्ध व कांहीं भाग गणबद्ध असे आहेत. अवेस्तामधील पद्य निवळ मात्राबद्ध आहे व उत्तरकालीन संस्कृत पद्य गणबद्ध आहे. ऋग्वेदीय छंद यांमधली पायरी आहे.

ऋग्वेदसंहितेची भाषा साधी व स्वाभाविक म्हणजे अकृत्रिम आहे. उषसूच्या सूक्तांत खरें काव्य आढळतें. इंद्राच्या सूक्तांत वर्णनशक्तीचा विकास आहे. मरुत् सूक्तांत कल्पनाविलास आहे. वरुणसूक्तांत उच्च प्रकारचें काव्यगायन आहे. संवादसूक्तांत भाषासौंदर्य आहे. फासे खेळणाऱ्याच्या शोकसूक्तांत करुणकाव्य आहे. नासदीय सूक्तांत आध्यात्मिक चर्चा आहे.

सामवेद—सामवेदांतील मंत्र ऋग्वेदाच्या ८ व्या व ९ व्या मंडलांतून घेतले आहेत. सामवेदाचे पूर्वार्चिक व उत्तरार्चिक असे दोन भाग आहेत. पूर्वार्चिकांत ५८५ ऋग्वेदमंत्रें घेऊन त्यांपासून १,५४९ सामें बनविलीं आहेत. त्यांत ६ प्रपाठक असून प्रत्येक प्रपाठकामध्यें लहान दशकें आहेत. अग्नि, इंद्र व सोम पवमान यांची स्तुति या आर्चिकांत आहे. उत्तरार्चिकांत ४०० सामें आहेत. यज्ञांत म्हटलीं जाणारीं स्तोत्रें या सामांचीं बनविलीं आहेत. सामवेदाच्या जुन्या संहितांपैकीं फक्त राणायणीय, जैमिनीय व कौथुम या शाखा अद्यापपर्यंत सांपडतात.

यजुर्वेद—शुक्ल यजुर्वेदांत मंत्र-संहिता व विवरणात्मक भाग म्हणजे ब्राह्मणें हीं स्वतंत्र आहेत. कृष्ण यजुर्वेदांत यज्ञविधानाचा गद्य भाग, प्रार्थनामय पद्य भाग व विवरणात्मक गद्य भाग, हे सर्व एकत्र मिसळले आहेत.

अथर्ववेद—अथर्ववेदांत जादू, रोगहरण, इ. कामांत उपयोगी पडणारा असा बराच भाग आहे. त्यांत २० कांडें व ७३३ सूक्तें आहेत. या वेदाची फक्त शौनकीय संहिताच हल्लीं संपूर्ण उपलब्ध आहे. पैप्पलाद संहिता स्वररहित व विस्कळित आहे. रोगहरण, पिशाचबाधानाश, कलहशांति, पापनिष्कृति, इ. अनेक विषयांवर या वेदांतील मंत्रांचा विनियोग सांगितला आहे. कांड ४, सूक्त १६ याची देवता वरुण असून वैदिक वाङ्मयांत इतर कोठेंहि न दिसणाऱ्या अशा सुंदर भाषेंत परमात्म्याचें सर्वज्ञत्व त्यांत वर्णन केलें आहे. कांड १२ व सूक्त १ हें भूमिसूक्त आहे. हें प्राचीन वाङ्मयांतील अतीव सुंदर सूक्त गणलेलें आहे.

ऋग्वेदांतील सूक्तांपेक्षां अथर्ववेदांतील रचना अर्वाचीन आहे. ऋग्वेदांत पंचनद्यांचा उल्लेख सांपडतो. अथर्ववेदांत आर्य गंगेच्या कडेस आल्याच्या खुणा आहेत. बंगाल्यांतल्या वाघ ऋग्वेदांत नाहीं. अथर्ववेदांत पशूंमध्यें अत्यंत बलवान् असा त्याचा उल्लेख आहे. या वेदांत वर्णभेद व देवतांचे निसर्गशक्तींपासूनचें भिन्नत्व हीं अधिक स्पष्ट झालीं आहेत.

ब्राह्मणें—ब्राह्मणग्रंथ म्हणजे यज्ञविधींतील अनेक कर्मांविषयीं विवरण व निर्णय सांगणारे गद्य ग्रंथ. या ग्रंथांत वैदिक मंत्रांच्या अर्थाविषयीं चर्चा, त्या मंत्रांचा विनियोग, या विनियोगांची व्युत्पत्ति. व यज्ञकर्मांचें आध्यात्मिक महत्त्व या विषयांचें विवरण असतें. या ग्रंथांत यज्ञकर्मासंबंधीं अनेक कथा व आध्यात्मिक वादविवाद ( उपनिषदें ) यांचा समावेश होतो. ब्राह्मणग्रंथ बहुधा गद्य असून मधून मधून छंदोमय मंत्रहि विखुरलेले आहेत. वेदांच्या प्रत्येक शाखेला जोडलेले असे वेगवेगळे ब्राह्मणग्रंथ आहेत. १ ऐतरेय,

२ तैत्तिरीय, ३ ऐतरेय, ४ जैमिनीय, ५ कौशीतकी, ६ शतपथ व ७ गोपथ हे सर्वात जुने ब्राह्मणग्रंथ आहेत. ब्राह्मणग्रंथांतील देवतांस यज्ञामुळेंच देवत्व येतें. प्रजापति ही सर्वोच्च देवता मानली आहे. यज्ञविधींचें संपूर्ण ज्ञान ब्राह्मणांसच असल्यानें त्यांचें महत्त्व विशेष वाढलें.

ब्राह्मणग्रंथांत मुख्यत्वें तीन भाग आहेत : (१) यज्ञांतील कर्मांचे नियम. (२) अर्थवाद म्हणजे या नियमांचें विवरण. व (३) उपनिषदें म्हणजे अनेक विषयांवर आध्यात्मिक चर्चा.

आरण्यकें व उपनिषदें—आरण्यकें हीं ब्राह्मणग्रंथाचाच एक भाग होत. त्यांत पुष्कळ गूढ गोष्टींचा ऊहापोह असल्यानें तीं अरण्यांतच म्हटलीं जात. यज्ञविधीविषयीं गूढ विचार त्यांत सांगितले आहेत. आरण्यक ग्रंथांचीच परिणति उपनिषदांत झाली. आरंभींचीं कांहीं उपनिषदें ब्राह्मणग्रंथांतच समाविष्ट झालीं आहेत. आरण्यकें व उपनिषदें यांसच आरंभीं वेदान्त हें नांव होतें. ज्ञानोपदेशाकरितां गुरूच्याजवळ (उप) बसणें (निषद्) असा उपनिषद् याचा मूळ अर्थ. त्यावरून 'आध्यात्मिक ज्ञानाचा ग्रंथ' असा अर्थ पुढे रूढ झाला. वेगवेगळ्या वेदांस चिकटविलेलीं किंवा स्वतंत्र अशीं सुमारें २०० उपनिषदें सध्यां उपलब्ध आहेत. कांहींत आध्यात्मिक चर्चा, कांहींत यज्ञविधींचें वर्णन, रोगहरणाचे व शत्रुनाशाचे मंत्र, असे अनेक विषय या उपनिषदांत आहेत.

ऋग्वेद, अथर्ववेद व यजुर्वेद यांत सुद्धां यज्ञकर्मांच्या सफलतेविषयीं शंका व विरोध दर्शविणारे कांहीं विचार मधून मधून डोकावतात. राजे व क्षत्रिय लोक त्या वेळीं तत्त्वज्ञानाचा खोल विचार करीत असत व ब्राह्मणहि राजांच्याकडे अध्यात्मज्ञान शिकण्यास जात असत. ब्राह्मणांच्या यज्ञमार्गास विरोध करणारांमधूनच अरण्यांत जाऊन एकान्तांत आत्मचिंतन करणारे वैराग्यशील लोक यांनीं ज्ञानमार्गाचा प्रसार केला. या यज्ञकर्माच्या म्हणजे कर्ममार्गाच्या विरोधकांतूनच पुढे बौद्ध धर्माचा उदय झाला.

सर्व उपनिषदांचें सार थोडक्यांत असें आहे कीं, सर्व जगत् हें ब्रह्म आहे व ब्रह्म म्हणजे परमात्मा. परमात्म्यानें मायेच्या योगानें चराचर सृष्टि निर्माण केली व शेवटीं सर्व सृष्टि परमात्म्यांतच लीन होणार. मनुष्याच्या शुभाशुभ कर्मांनींच त्याचें सुखदुःख तयार होतें, ही उपनिषदांची मुख्य शिकवण आहे. पुढच्या पुढच्या उपनिषदांत संपूर्ण विषय-वैराग्य सांगितलें आहे. हेच विचार बौद्धधर्मांत प्रबळ झालेले दिसतात. उपनिषदांतील तत्त्वज्ञान काव्यमय भाषेंत सांगितलें आहे. त्यामुळें चिकित्सक व भावनामय अशा दोन्ही प्रकारच्या लोकांस तें मोहिनी घालतें. उपनिषदांतूनच भारतांतील अनेक दर्शनें व धर्मपंथ निघाले. इराणांतील सूफी तत्त्वज्ञान, प्राचीन व अर्वाचीन ग्रीक तत्त्वज्ञान व जर्मनींतील शोपेनहार वगैरेंचें अर्वाचीन तत्त्वज्ञान या सर्वांवर उपनिषदांची छाप पडलेली दिसते.

वेदांगें—हीं श्रुतींमध्यें मोडत नाहींत. पण त्यांना श्रुतींइतकाच मान आहे. वेदांचें अंतरंग व बहिरंग स्थिर ठेवण्याकरितां जीं शास्त्रें निर्माण झालीं त्यांस वेदांग अशी संज्ञा आहे. १ शिक्षा, २ कल्प, ३ व्याकरण, ४ निरुक्त, ५ छंद, व ६ ज्योतिष हीं ६ वेदांगें आहेत. पाठ करण्यास सोपीं जावीं म्हणून हीं शास्त्रें अत्यंत सुटसुटीत पण अगदीं बिनचूक भाषेंत 'सूत्र' या लेखनप्रकारांत रचलेलीं आहेत. या 'सूत्र'रूपानें गहन शास्त्रें रचण्याची भारतीय प्राचीन कला सर्व जगांत अद्वितीय आहे. ब्राह्मणग्रंथात लहान लहान वाक्यें आहेत. व्याकरणाचीं साधीं रूपें आहेत व गुरूनें तोंडी सांगण्यासारखी माहिती गाळली आहे. कल्पसूत्रांत (यज्ञांचे व आचारांचे नियम सांगणाऱ्या ग्रंथात) ब्राह्मण-ग्रंथांचीच पद्धति जास्त तीव्रतेनें उपयोजिली आहे. त्यामुळें शब्दांची अतिशयच काटकसर करण्यांत यश आलें आहे. यज्ञांतील कर्मांची बारीकसारीक माहिती देणारीं कल्पसूत्रें ब्राह्मणकालांतच तयार झालीं. 'श्रौतसूत्रां'मध्यें अग्न्याधान, दर्शपूर्ण मास, सोमयाग, पशुयाग, चयन, इ. यज्ञांचे संपूर्ण नियम दिले आहेत. गृहस्थास पवित्र जीवन जगण्यास जे अनेक 'संस्कार' करावे लागतात त्यांचे नियम 'गृह्यसूत्रां'त दिले आहेत. जातकर्म, उपनयन, विवाह, वगैरे १६ संस्कार करण्याची पद्धति या गृह्यसूत्रांत दिली आहे. 'धर्मसूत्रां'मध्यें मनुष्याचे खासगी, सामाजिक व धार्मिक व्यवहार कसे चालावे, याचे सविस्तर नियम दिले आहेत.

यज्ञमंडप व यज्ञकुंडें कशीं बांधावींत व मापावींत, याची माहिती देणारें शास्त्र म्हणजे 'शुल्बसूत्रें' होत. श्रौतसूत्रांना पुरवणी म्हणून शुल्बसूत्रें तयार करण्यांत आलीं. ४,००० वर्षांपूर्वी भारतांत गणितानें व भूमितीचें ज्ञान किती सूक्ष्म पद्धतीनें परिणत झाले होतें, याची साक्ष शुल्बसूत्रें उत्तम तऱ्हेनें देतात.

वीरमहाकाव्यें—संस्कृतांत मुख्य अशीं महाकाव्यें दोन आहेत : १. महाभारत, २. रामायण. इतर महाकाव्यें पुष्कळच आहेत; उदा., रघुवंश, किरात, शिशुपालवध, नैषध, इ.. परंतु प्रत्येक राष्ट्रांत कांहीं वीरमहाकाव्यें असतात. त्यांमध्यें त्या राष्ट्राची संस्कृति, वैभव, परंपरा, धर्म, वीर्य, इ. गुणांचा उत्कटत्वानें समावेश झालेला असतो. त्या राष्ट्रावर अशा ग्रंथांचा अतिशय परिणाम झालेला असतो. ग्रीक लोकांची ईलियड व ओडीसी हीं दोन काव्यें म्हणजे वीरमहाकाव्येंच होत. इंग्लंडचें 'पॅरॅडाइज लॉस्ट' (स्वर्गापहार) हें असेंच वीरमहाकाव्य आहे. महाभारतास पहिलें स्वरूप प्राप्त होऊन ५,००० वर्षें होऊन गेलीं. त्या वेळीं वैदिक देवता, वैदिक धर्माचार यांचें महत्त्व पुष्कळ कमी झालें होतें व एक वेगळ्याच प्रकारचें जीवन परिणत

झालें होतें. महाभारताच्या आरंभापासून आजपर्यंत देशाच्या प्रत्येक भागांत, शहरांत व खेड्यांत, बाल-तरुण-वृद्ध या सर्वांवर महाभारताचा दैनंदिन परिणाम चालू आहे. पांच हजार वर्षांत देशांतील सर्व कवींना आपल्या काव्यास आधार म्हणून महाभारताचा उपयोग झाला आहे. धर्म (धर्म व नीति), अर्थ (व्यावहारिक शास्त्रें), काम (सुखोपभोग) व मोक्ष (आध्यात्मिक उन्नति) या चारहि पुरुषार्थांस साधनीभूत असे एकूण एक सर्व विषय महाभारतांत विस्तृतपणें सांगितले आहेत. इतर सर्व वाङ्मयांत जे जे विषय आहेत ते सर्व महाभारतांत आहेत. पण महाभारतांत जो विषय नाहीं तो इतर कोठेंहि सांपडणार नाहीं, असें या ग्रंथाचें यथार्थ वर्णन केलेलें आहे. "व्यासोच्छिष्टं जगत् सर्वम्" ही म्हण खरी आहे. या ग्रंथास पंचमवेद म्हटलें आहे. याची श्लोकसंख्या एक लक्ष आहे. म्हणजे दोन ग्रीक महाकाव्यें मिळून जेवढें काव्य होईल त्याच्या आठ पटींनीं एकटें महाभारत मोठें आहे.

महाभारत एकाच ऋषीचें नाहीं व एकाच पिढींतहि सबंध रचलें गेलें नाहीं. पहिलें जय नांवाचें भारत सुमारें ८,८०० श्लोकांचें असावें. सूत्रांचा रचनाकाळ व बुद्धधर्माचा प्रारंभींचा काळ यांमध्यें या जय भारताची रचना झाली असावी. पुढें या लहान ग्रंथांतील प्रसंग, भावना, विचार यांस अनेक विद्वानांनीं अधिक भव्य व तीव्र स्वरूप देऊन ग्रंथांत पुष्कळ भर घातली. श्रीकृष्ण हे आरंभीं एक शूर व चारित्र्यवान् पुरुष मानले जात. त्यांस पुढें देवाचा पूर्णावतार म्हणूं लागले. पांडवांचें महत्त्व जरी पूर्वीपासून कायम होतें तरी त्यांस स्फूर्ति व साहाय्य देणारा श्रीकृष्ण होता, असें प्रतिपादन करणारें 'भारत' हें स्वरूप नंतरचें होतें व त्याचा विस्तार सुमारें २४,००० श्लोकांचा असावा. यांत क्षात्र धर्मास भागवत धर्माचें स्वरूप आलें.

यानंतरचें स्वरूप खिस्तपूर्व २०० च्या सुमारास प्राप्त झालें. त्यांत पुष्कळ लहानमोठीं उपाख्यानें घालण्यांत आलीं. मुख्य मुख्य व्यक्तींना हीं कथानकें वेळीं-अवेळीं सांगण्यांत आलीं. पांडवांच्या कथानकाशीं त्यांचा मुळींच संबंध नसे. काव्यदृष्ट्याहि पुष्कळ अलंकार मूळ ग्रंथावर चढविण्यांत आले. हरिवंश नांवाचें कृष्णचरित्रहि त्यास जोडण्यांत आलें. याप्रमाणें एक लक्ष श्लोकांचा ग्रंथ इ. सनाच्या दुसऱ्या शतकांत सिद्ध झाला. हा ग्रंथ गेल्या १५० वर्षांत अनेक ठिकाणीं अनेक वेळां छापण्यांत आला. परंतु सगळ्यांत मोठा प्रयत्न म्हणजे पुणें येथें भांडारकर प्राच्यविद्या-संशोधन-मंदिरानें शेंकडों हस्तलिखित प्रती जमवून अनेक पाठभेदांसह शुद्ध आवृत्ति छापण्याचा गेलीं ३० वर्षे मोठा उद्योग चालविला आहे तो होय. त्यास खर्च २६ लाखांच्यावर येणार आहे व सर्व काम संपण्यास अजून १०-१२ वर्षे तरी लागतील.

रामायण—हें दुसरें वीरमहाकाव्य होय. याचें कथानक सर्व आबालवृद्धांस सुपरिचित आहे. रामचंद्राचें दक्षिणेंत आगमन हें आर्यांच्या दक्षिण भारतावरील आक्रमणाचें रूपक आहे. अगस्ति ऋषींनें दक्षिणेंत वसाहत करण्याचा प्रयत्न केला होता. पण शस्त्रसज्ज सैन्याच्या अभावीं तो व्यर्थ झाला. रामानें दक्षिणेंतील असंख्य राक्षस मारले व रावणानें सीतेला चोरून नेल्यावर सबंध राक्षसकुळाचा संहार केला. या महायुद्धाचें विस्तृत वर्णन रामायणांत आहेच. ऋग्वेदांत इंद्र हा सूर्य व वरुण या दोन देवतांचा प्रतिनिधि आहे. सीता या शब्दाचा अर्थ नांगरलेली जमीन. लव म्हणजे धान्य व कुश म्हणजे दर्भ किंवा गवत. रामाचा प्रमुख सेवक मारुति म्हणजे वायुपुत्र. रामाचा एक मोठा शत्रु इंद्रजित् म्हणजे इंद्रास जिंकणारा. सीता ही भूमीची मुलगी. याप्रमाणें या ग्रंथांतील सर्व पात्रांचा संबंध निसर्गाशीं जोडलेला दिसतो. मूळच्या कथानकांत मुख्य भाग राम-रावण युद्धाचाच असावा. परंतु मागाहून नीति, धर्म, तत्त्वज्ञान, राजघराण्यांतील भानगडी, इत्यादि विषय त्यांत घालण्यांत आले असावे. अनेक लहान लहान राज्यांतून एक मोठें साम्राज्य स्थापन झाल्याचें वर्णन महाभारतांत आहे. रामायणांत मानवी संसारांत अनेक सद्गुणांचा विकास कसा होतो तें दाखविलें आहे. महाभारत हें अनेक लोकांनीं वाढवून पुरें केलें असें दिसतें; तर रामायण हें आदिकवि वाल्मीकि याचीच एकट्याची कृति आहे. रामायणांत धर्म, तत्त्वज्ञान, इतिहास, इत्यादि विषयांवर लांबलचक संवाद फारसे नाहींत. मुख्य कथानक वाल्मीकीच्या उदात्त व गंभीर काव्यप्रतिभेनें सर्वत्र अलंकृत झालें आहे. संस्कृतांतील अभिजात वाङ्मयाचा आरंभ रामायणानें केला. महाभारत हा मुख्यतः इतिहास आहे. रामायण हें ऐतिहासिक काव्य आहे. व त्यांच्या मागाहून रचलेलीं पुराणें यांत रूपकात्मक कथा भरलेल्या आहेत. (महाभारत, रामायण पाहा.)

वेद, वेदांगें, उपनिषदें, सूत्र-वाङ्मय, यांचा वैदिक वाङ्मयांत समावेश होतो. सांख्य, योग, मीमांसा, वगैरे दर्शनांचें प्रारंभींचें सूत्रवाङ्मय, तसेंच बौद्ध व जैन यांचें प्रारंभींचें वाङ्मय यांस आर्षवाङ्मय म्हणतां येईल. भारत, रामायण, इ. इतिहासग्रंथहि आर्षवाङ्मयामध्येंच जातील. खिस्तपूर्व २०० पासून इ. स. १६०० पर्यंतचें जें काव्यनाटकादि संस्कृत वाङ्मय त्यास आपण 'मध्ययुगीन अभिजात वाङ्मय' म्हणूं या.

अभिजात वाङ्मय—वैदिक ऋषींनीं अग्नि, इंद्र, वगैरे निसर्गदेवतांचीं स्तोत्रें केलीं; उपनिषदांनीं जीव, जगत् व परमात्मा यांचें एकत्व वर्णन केलें; स्मृतिकारांनीं समावेशक मानवी संस्कृति निर्माण केली; सूत्रें व षड्दर्शनें यांनीं धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांसंबंधीं अत्यंत सूक्ष्म विचारांनीं, नीति, संपत्ति, शिल्पशास्त्र व

अध्यात्म यांची मोठी परिणति निर्माण केली. मानवाच्या सुखाकरिता वैदिक देवतांचें यजन करण्यांत येत असे. या देवतांचे पुष्कळ गुण ज्यांमध्यें दिसून येत अशा राजांना महानुभाव, धीरोदात्त, राजर्षि, इ. अभिधानें प्राप्त होत असत. असे राजर्षी व त्यांचे गुरू ब्रह्मर्षी यांच्या सहकार्यानें ब्रह्म-क्षत्र, ज्ञान व पराक्रम यांचा जगदभ्युदयकारक योग निर्माण झाला. असे धीरोदात्त राजे व त्यांचे ब्राह्मण गुरु यांचें वर्णन करण्याकरितां काव्याचा व अभिजात वाङ्मयाचा अवतार सुरू झाला. राम व वसिष्ठ यांचे दैवी गुण वर्णन करणारें पहिलें म्हणजे आदिकाव्य रामायण रचलें गेलें. या आदिकाव्यांत अभिजात वाङ्मयाचे सर्व गुण सांठविलेले आहेत. युरोपला संस्कृत वाङ्मयाचें पहिलें दर्शन इ. १७८९ मध्यें छापलेल्या सर विल्यम जोन्सच्या 'अभिज्ञान शाकुंतला'च्या इंग्रजी भाषांतरानें झालें. हें नाटक ग्रीक व लॅटिन यांमधील कोणत्याहि नाटकापेक्षां सरस आहे, असें सर्व लोकांचें मत पडलें. कालिदास हा शुंग राजा अग्निमित्र याचा समकालीन होता. भाष्यकार पतंजलि (खि. पूर्व १५०) अग्निमित्राचा बाप पुष्यमित्र याचा समकालीन होता. भास, सौमिल्ल व कविपुत्र या पूर्वकवींचा कालिदासानें आपल्या 'मालविकाग्निमित्र' नाटकांत उल्लेख केला आहे. पतंजलीच्या महाकाव्यांत पूर्वीचीं काव्यें, कथा व नाटकें यांचा उल्लेख आहे. यवक्रीत, प्रियंगु, ययाति, वासवदत्ता, सुमनोत्तरा व भीमरथ यांच्या आख्यानांचा पतंजलीनें उल्लेख केला आहे. वररुचीच्या एका काव्याचा उल्लेख महाभाष्यांत आला आहे. चंद्रगुप्त व बिंदुसार यांचा प्रधान सुबंधु (खि. पू. चौथें व तिसरें शतक) यानें 'वासवदत्ता नाट्यधारा' नांवाचें अनेक नाटकांची गुंफण करून एक प्रचंड नाटक लिहिलें. त्याचे उतारे वामन व अभिनवगुप्त यांच्या ग्रंथांत आहेत. या नाटकांत उदयन व बिंदुसार यांच्या कथा आहेत. त्याच्या पूर्वी उदयनराज्यकालांत भास हा थोर नाटककार होऊन गेला. त्यानें 'स्वप्नवासवदत्त' इ. १२–१४ नाटकें लिहिलीं. या उदयनाचा इतिहास सुबंधूनें आपल्या नाटकांमध्यें सांगितला व गुणाढ्यानें आपल्या बृहत्कथेमध्यें उदयनकथाच आरंभीं सांगितली आहे. कालिदासाच्या काळींहि उज्जयिनीच्या आसमंतात् उदयनकथा लोक गात असत. नाट्यप्रसंग व भावना यांचें चित्रण भासानें फार कौशल्यानें केलें आहे. त्याची भाषाहि सोपी व साधी आहे. पाणिनि वररुचि या थोर व्याकरणकारांनींहि काव्यें रचल्याचा उल्लेख राजशेखराच्या ग्रंथांत आहे. कात्यायनाचा एक श्लोक भोजानें आपल्या शृंगार–प्रकाशांत दिला आहे. क्षेमेंद्रानें आपल्या ग्रंथांत पाणिनीच्या उपजाति वृत्ताविषयीं कौतुक केलें. पाणिनीच्या 'जांबवती-विजय' काव्याचा राजशेखरानें उल्लेख केला आहे. राजशेखरानें म्हटलें आहे कीं, सोमिल व रामिल या दोघांनीं मिळून एक शूद्रक कथा म्हणून नाटक लिहिलें आहे. शूद्रकाचें 'मृच्छकटिक' नाटक कालिदासापूर्वीचें असावें.

कालिदासाचीं तीन काव्यें व तीन नाटकें यांनीं त्याच्या पूर्वीचे बहुतेक सर्व कवी लुप्त केले व मागाहून येणाऱ्या कवींवर कालिदासाची दाट छाया पडली. त्याच्या 'रघुवंश' काव्यांत रघूच्या वंशांतील अनेक राजांचें रम्य वर्णन आहे. 'कुमारसंभवा'मध्यें शिव-पार्वती-विवाहाचें वर्णन आहे. 'मेघदूता'मध्यें विरही यक्षाचा आपल्या पत्नीस संदेश आहे. 'मालविकाग्निमित्र' नाटकांत विदिशेचा अग्निमित्र शुंग व विदर्भ राजकन्या मालविका यांच्या प्रेमकथेचें वर्णन आहे. पुरूरवा व देवलोकांतील अप्सरा ऊर्वशी यांची प्रेमकथा 'विक्रमोर्वशीय' नाटकांत आहे. 'शाकुंतलां'त दुष्यंत व शकुंतला यांचा विवाह, वियोग व पुनर्मीलन यांचा वृत्तान्त आहे. 'ऋतुसंहार' हें कालिदासाचेंच असल्यास तें अगदीं बालवयांत रचलेलें असावें. त्याची भाषा कालिदासासारखीच आहे. रघुवंशामध्यें कालिदासाच्या जीवनाविषयींच्या उदात्त कल्पना जागोजाग विखुरलेल्या आहेत. कुमारसंभवाचे पहिले ८ सर्गच कालिदासाचे असावे. पुढील सर्ग इतर कोणाचे तरी असावेत, असें दिसतें. मेघदूताची भाषा व कल्पना अतीव रमणीय आहेत व दोन हजार वर्षांत मेघदूताच्या धर्तीवर संस्कृतमध्यें शेंकडों काव्यें झालेलीं उपलब्ध आहेत. पत्नी व बालक यांवरील विशुद्ध प्रेमाचें वर्णन कालिदासाच्या सर्व ग्रंथांत सर्वत्र भरलें आहे. भाषेच्या वैदर्भी रीतीचा कालिदासांत परमोत्कर्ष झालेला दिसतो. त्याची भाषा मधुर, सोपी, भडकपणा व अतिशयोक्ति यांपासून अलिप्त व रेखीव आहे. उपमा हा तर कालिदासाचा पदोपदीं आढळणारा अलंकार आहे. 'उपमा कालिदासस्य' ही उक्ति सर्वमान्य आहे.

ब्राह्मण राजा शूद्रक याचें 'मृच्छकटिक' नाटक १० अंकांचें असून कांहीं बाबतींत शाकुंतलाहूनहि श्रेष्ठ आहे. शाकुंतलांत धीरोदात्त राजाचें वर्णन आहे. मृच्छकटिकांत समाजांतील मध्यम स्थितींतील मनुष्याच्या उदात्त चरित्राचा कळस आहे. चारुदत्त, वसंतसेना, शर्विलक, रेभिल, शकार, वगैरे पात्रांच्या वर्णनांत समाजचित्र फार सुंदर वठविलें आहे. सर्व संस्कृत नाटकांत रंगभूमीवर हें नाटक फारच परिणामकारक होतें. त्याचीं युरोपियन भाषांतहि अनेक भाषांतरें झालीं आहेत.

शूद्रकापूर्वी मूलदेव म्हणून एक ब्राह्मण महापुरुष होऊन गेला. त्याच्याविषयीं अनेक कथा प्रचलित होत्या. त्यानें अर्थ व काम या शास्त्रांवर पुष्कळ रचना केली होती. दंडीनें आपल्या अवंति–सुंदरीच्या कथेमध्यें मूलदेवाच्या ग्रंथांचा उल्लेख केला आहे. इ. सनाच्या पहिल्या शतकांत अश्वघोष नांवाचा ब्राह्मण बौद्ध झाला. तो फार मोठा कवि व पंडित होता. त्यानें बुद्धाच्या चरित्रावर 'बुद्धचरितम्' व 'सौंदरानंद' हीं दोन

संस्कृत महाकाव्यें केलीं. कालिदासानें आपल्या काव्यांत प्रवृत्ति व निवृत्ति यांच्या समतोलपणाचें ब्राह्मणी ध्येयाचें महत्त्व वर्णन केलें आहे, व इंद्रियनिग्रहाच्या योगानें अर्थ व काम हे दोन पुरुषार्थ धर्म व मोक्ष यांस कसे साहाय्य करतात, याचें स्पष्ट विवरण केलें आहे. विषयांपासून सर्वस्वीं अलिप्त राहावयाचें हें बौद्धधर्माचें ध्येय; त्याचा अश्वघोषानें आपल्या दोन्ही काव्यांत सतत उच्चार व उपदेश केला आहे. बुद्धाचा भाऊ नंद व सुंदरी यांच्या जीवनावर 'सौंदरानंद' काव्य त्यानें रचिलें. त्यांतहि विषयत्यागाचीच महती सांगितली आहे. त्याचीं काव्यें नित्युपदेशांनीं कांठोकांठ भरलीं आहेत. त्याचेंच अनुकरण करून जैनांनींहि आपल्या तीर्थंकरांच्या चरित्रावर उपदेशपूर्ण महाकाव्यें केलीं आहेत. अश्वघोषानें लिहिलेलीं बौद्धधर्मप्रचारक कांहीं नाटकेंहि अलीकडे सांपडलीं आहेत. तीं मृच्छकटिकासारखीं प्रकरणनाटकें आहेत. सूत्रालंकार, अवदानशतक, दिव्यावदान व जातकमाला हीं काव्यें बौद्धधर्मप्रसारक आहेत. रुद्रदामन् याच्या गिरनार शिलालेखांत (इ. स. १५०) एक काव्य कोरलेलें आहे.

'जातकमाला' आर्यशूर याची असून ती चौथ्या शतकांतील असावी. या शिलालेखी काव्याचीं दोन गुप्तकालीन ठळक उदाहरणें म्हणजे हरिषेणाची 'समुद्रगुप्त-प्रशस्ति'. ही प्रयागच्या एका स्तंभावर इ. स. ३४५ मध्यें कोरली आहे. वत्सभट्टीच्या मंदसोरच्या सूर्यमंदिरांतील शिलालेखांत (इ. स. ४७३-७४) समुद्रगुप्ताच्या कवित्वाची प्रशस्ति आहे. राजशेखराच्या 'सूक्ति-मुक्तावलीं'त म्हटलें आहे कीं, साहसांक म्हणजे दुसरा चंद्रगुप्त यानें 'गंधमादन' नांवाचें एक काव्य केलें होतें. भर्तृमेंठ याचें 'हयग्रीववध' महाकाव्य बहुतेक लुप्त झालें आहे. भर्तृमेंठ व त्याचा आश्रयदाता काश्मीरचा महाराज मातृगुप्त हे चौथ्या शतकांत होऊन गेले. भर्तृमेंठ यानें दुसरें एक रामचरित्रावर काव्य केलें होतें, असें राजशेखर म्हणतो. कल्हणाच्या 'राजतरंगिणी'मध्यें काश्मीरचा विस्तृत इतिहास दिला आहे. त्यांत काश्मीरांत संस्कृत वाङ्मय किती तयार झालें याची माहिती दिली आहे. मेंठाच्या पूर्वी काश्मीरांतील चंद्रक कवीनें महाभारतांतील कथानकावर एक काव्य लिहिलें, त्यामुळें त्यास व्यासाचा अवतार मानण्यांत येई. अश्वघोषकृत 'पद्य-चूडामणि' नांवाचें एक काव्य मद्रासला अलीकडे प्रसिद्ध झालें आहे. सहाव्या शतकांत लंकेमध्यें कुमारदास महाराज यानें 'जानकी-हरण' नांवाचें एक काव्य रचिलें होतें. रामशर्मनूचें 'अच्युतोत्तर', शकवर्धनाचें 'राजमित्र', 'रत्नाहरण', आणि 'अश्मकवंश' हीं सर्व काव्यें हल्लीं नष्ट झालीं आहेत. दंडीनें आपल्या 'अवंतिसुंदरी' मध्यें नारायणाच्या तीन लुप्त काव्यांचा उल्लेख केला आहे. कालिदासाचें 'रघुवंश' आणि 'कुमारसंभव', भारवीचें 'किरातार्जुनीय', माघकवीचा 'शिशुपालवध', व श्रीहर्षाचें 'नैषधीय चरित' या काव्यांस 'पंचमहाकाव्यें' असें नांव आहे. दुसरा पुलकेशी याच्या ऐहोळ येथील शिलालेखामध्यें (इ. स. ६३४) कालिदास व भारवी यांचा एकत्र उल्लेख आहे. दंडीच्या 'अवंतिसुंदरी' या गद्यकथेंत भारवीच्या जीवनावर थोडा प्रकाश पाडला आहे. वेंगीच्या पूर्वचालुक्य वंशाचा संस्थापक कुब्ज विष्णुवर्धन (इ. स. ६०८) याचा भारवि हा मित्र होता. दंडीचा आजा दामोदर यानें प्राकृतात पुष्कळ ग्रंथरचना केली व साहित्यशास्त्रावर एक ग्रंथ लिहिला. गंग वंशांतील राजा दुर्विनीत यानें भारवीच्या काव्यावर टीका लिहिली आहे. किरातार्जुनीयांत अर्जुनाच्या तपस्येचें वर्णन विस्तृतपणें केलें आहे. त्याची छाप पल्लवराजांनीं कोरलेल्या मामल्लपुरम् येथील लेण्यांत दृष्टीस पडते. त्याच्या १८ सर्गांच्या या काव्यांत निसर्गाचीं वर्णनें, पांडवांचे परस्परसंवाद, इ. विषय फार भव्य व मनोरम रीतीनें मांडले आहेत. त्याची भाषा सोपी नाहीं, पण भारदस्त व गंभीर आहे. हिमालयाच्या वर्णनांत तर त्याची वाणी अतिशय उच्च कोटीला पोंचली आहे. माघाचा 'शिशुपालवध' भारवीहून किंचित् कमी योग्यतेचा पण तें एकंदरींत उत्कृष्ट काव्य आहे. काव्यांतील कृत्रिमपणाला माघापासून सुरवात झाली. तथापि निसर्ग व प्रेम यांचें वर्णन करण्यांत त्याची शक्ति फार मोठी आहे. "पदे पदे यन्नवतामुपैति, तदेव रूपं रमणीयतायाः" ही त्याची सौंदर्याची व्याख्या फार समर्पक आहे. याच्या वेळेपासून चित्रकाव्य करण्याची कवींची काव्यशक्ति स्पष्ट निदर्शित करण्याकरितां काव्याचा उपयोग होऊं लागला. व्याकरणाचीं अप्रसिद्ध रूपें वापरांत येऊं लागलीं.

नवव्या शतकांत अवंतिवर्मा या काश्मीराधिपाच्या सभेंत ४ महाकवी होते: १ मुक्ताकण, २ शिवस्वामी, ३ आनंदवर्धन, व ४ रत्नाकर. मुक्ताकणाचें काव्य उपलब्ध नाहीं. शिवस्वामी आणि रत्नाकर यांनीं एकाच स्वरूपाचीं दोन काव्यें रचिलीं. शिवस्वामीनें सात महाकाव्यें, अकरा लाख शिवस्तुतिपर श्लोक व अनेक नाटकें, नाटिका व प्रकरणें लिहिलीं. या सर्व काव्यसमुद्रांतील फक्त एक 'कप्फिणाभ्युदय' नांवाचें काव्य मात्र शिल्लक राहिलें आहे. त्यांत कप्फिणानें सर्वसंगपरित्याग करून बौद्धधर्म स्वीकारल्याचें वर्णन आहे. रत्नाकरानें 'हरविजय' नांवाचें ५० सर्गांचें एक शैव महाकाव्य केलें आहे. साहित्यशास्त्रलेखक आनंदवर्धन यानें संस्कृत व प्राकृत काव्यें केलीं आहेत. त्याचें 'अर्जुनचरित' काव्य आतां नष्ट झालें आहे. 'देवीशतक' या स्तोत्रांत त्याचें चित्रकाव्य-पाटव दिसून येतें.

या काळानंतर आपल्या तीर्थंकरांचीं चरित्रें वर्णन करण्याकरितां जैन पंडितांनीं महाकाव्यपद्धतीचा बराच उपयोग केला. यांत पांडित्यप्रदर्शन पुष्कळ आहे. तथापि काव्यगुणांमध्यें तीं

पंचमहाकाव्यांपेक्षां फारशीं कमी नाहींत. जिनसेन व त्याचा शिष्य गुणभद्र यांचीं 'हरिवंश' आणि 'आदिपुराण' हीं जैन काव्यांत प्रमुख आहेत (सु. इ. स. ८५०). जयसिंह नंदीचें 'वरांगचरित्र'; वादिराज आणि माणिक्यसूरि यांचीं यशोधरचरित्रें; हरिचंद्राचें 'धर्मशर्माभ्युदय'; अमरचंदाचें 'पद्मानंद' काव्य, हीं अशाच प्रकारचीं काव्यें आहेत.

पालराजा हाववर्ष याचा आश्रित अभिनंद (नववें शतक) यानें 'रामचरित्र' नांवाचें महाकाव्य रचलें. त्याचा थोडा भागच सांपडला आहे. त्याची काव्यशक्ति फार प्रौढ होती. त्याच्यांत कल्पना व वर्णनचातुर्य फार आहे. पण पाल्हाळहि बराच आहे. याच सुमारास कनोज राजसभेमध्यें जो कवि राजशेखर होता, त्याचें 'हरविलास' महाकाव्य नष्ट झालें आहे. त्याच्या आरंभीं पुराणकवींचीं पुष्कळ माहिती होती, असें म्हणतात. अकराव्या शतकांत श्रीहर्ष हा कनोजच्या राजसभेंत राजपंडित असे. बावीस सर्गांच्या आपल्या 'नैषधीय चरित' या महाकाव्यांत त्यानें आपल्या अनेक काव्यांचीं नांवें दिलीं आहेत. त्याची काव्यपद्धति सरळ, सोपी व सुंदर आहे. पण सर्वशास्त्रपांडित्यामुळें त्याचें काव्य वाचण्यास व समजण्यास त्रास पडतो. वाणी लघु पण अर्थपूर्ण असावी, असें तो म्हणतो. पण त्याला स्वतःला हें साधत नाहीं. त्याचा वाचकहि स्वतः पंडित असावा लागतो. तरच त्याला व्याकरणाचीं दुर्मिळ रूपें व सर्व शास्त्रांतील संदर्भ कळतात. या काव्यास पंडितांचा निकष म्हणतात.

सातव्या शतकांत कनोज येथें हर्षवर्धन राज्य करीत होता. त्याच्या सभेंत पुष्कळच पंडित व कवी असत. तो स्वतः कवि होता. बाण कवि हें त्याच्या कविमंडळांतील एक रत्न होतें. बाणाचा सासरा मयूर यानें 'सूर्यशतक' नांवाचें लघुकाव्य केलें आहे. बाणानें 'हर्षचरित' व 'कादंबरी' हीं दोन गद्य कथानकें लिहिलीं व 'चंडीशतक' नांवाचें भक्तिकाव्य व 'मुकुटताडिता' नांवाचें एक नाटकहि लिहिलें.

हर्षानें स्वतः 'रत्नावली' व 'प्रियदर्शिका' नांवाच्या दोन नाटिका लिहिल्या व 'नागानंद' हें नाटक लिहिलें. रत्नावलीमध्यें नाट्यशास्त्रांतील सर्व नियम कांटेकोरपणें पाळले आहेत. त्यांतील पद्यें फार सरस असून शृंगाररस उत्तम साधला आहे. नागानंदामध्यें प्रेम आणि वैराग्य या दोन्हींचा परिपोष झाला आहे.

याच कान्यकुब्ज नगरांत आठव्या शतकांत यशोवर्मन् भूपतीनें 'रामाभ्युदय' नांवाचें एक रमणीय नाटक रचलें. त्यांतील कांहीं थोड्या ओळीच सध्यां ज्ञात आहेत. या वेळीं रामकथेवर 'कृत्यारावण,' 'चलितराम,' 'उदात्तराघव,' इ. अनेक नाटकें लिहिलीं गेलीं. मायुराज याचें 'तापसवत्सराज' हें शृंगारप्रधान नाटक उपलब्ध आहे. कालिदासाच्या आगमनानें त्याच्या पूर्वींचे कवी जसे लुप्त झाले तसेंच भवभूतीच्या 'उत्तररामचरिता'मुळें पूर्वींचीं रामचरितविषयक सर्व नाटकें लुप्त झालीं. त्याच्या 'महावीरचरितां'त रामायणकथाच वर्णिली आहे. उत्तररामचरितांत सीतावनवासापासून पुढची कथा आली आहे. भवभूतीच्या तिन्ही नाटकांत भाषेचा भव्यपणा व नादमधुरता फार आहे. समासयुक्त शब्दरचनाहि पुष्कळ आहे. करुणरस व शांतरस यांच्या चित्रणांत भवभूतीस जोड नाहीं. त्याचेंच 'मालती-माधव' हें प्रकरणनाटक फार सुंदर व परिणामकारक आहे. एका संन्यासिनीच्या प्रेमळ प्रयत्नामुळें अनेक भयंकर संकटांतून दोन वियोगी जीवांचें मीलन झालेलें यांत दिसतें. पांचव्या अंकांतील स्मशानांतील घडामोडीचें वर्णन रौद्ररसाचा उत्तम नमुना आहे. याच वेळीं विशाखदत्ताचें 'मुद्राराक्षस' नाटक रचलें गेलें. नाटकांत शृंगार नाहीं, पण खोल राजकारण आहे. त्यामुळें सगळ्या संस्कृत नाटकांहून हें अगदीं वेगळें आहे. या नाटकाचें कथानक चट्‌कन् लक्षांत येत नाहीं. प्रतिकूल दैवामुळें राक्षसाची पदोपदीं झालेली निराशा, भोळ्या मलयकेतूचा गोंधळ, चंदनदासाचें अचल मित्रप्रेम, आणि सर्वज्ञ व नित्ययशस्वी चाणक्याचा यथार्थ अभिमान, हें सर्व रेखीव भाषेंत वर्णन केलें आहे. 'प्रतिज्ञाचाणक्य' म्हणून याच कथानकावर दुसरें एक नाटक आहे. राजकारणी विषयावर विशाखदत्तानें दुसरें एक दहा अंकाचें नाटक 'देवी चंद्रगुप्त' नांवाचें लिहिलें, त्यांत दुसरा चंद्रगुप्त–विक्रमादित्य याच्या जीवनांतील कांहीं अज्ञात भागाचा उपयोग केला आहे. याचे उतारे मात्र साहित्यग्रंथांतून मिळतात. त्यानें 'अभिसारिका वंचितका' नांवाचें एक प्रेमकथेचें नाटक लिहिलें होतें; पण आतां तें मिळत नाहीं.

बाणाचें 'मुकुटताडिता' नाटक, आणि 'पार्थविजय', 'पांडवानंद', इ. भारतकथेच्या आधारानें लिहिलेलीं चांगलीं नाटकें भट्टनारायणाच्या 'वेणीसंहारा'मुळें नामशेष झालीं. पार्थविजयाचा कर्ता त्रिलोचन याची रचना व भाषा फार ओजस्वी होती, असें त्यांतील अवतरणांवरून दिसतें. सबंध 'वेणीसंहार' ओजस्वी घटना व भाषा, यांनीं परिपूर्ण आहे. तिसऱ्या अंकांतील कर्ण व अश्वत्थामा यांच्या कलहाचें वर्णन फार बहारीचें आहे. कालंजरभूपति भीमट यानें पांच नाटकें केलीं. त्यांपैकीं 'स्वप्नदशानन' हें फार लोकप्रिय झालें. दुसरें 'मनोरमा–वत्सराज' हें उदयनचरित्रावर आधारलेलें आहे. या काळचीं दुसरीं अनेक नाटकें आतां नष्ट झालीं आहेत. साहित्यग्रंथांमध्यें त्यांचीं अवतरणें मात्र मिळतात. 'पुष्पदूषितक', 'कुमुद्वतीप्रकरण', 'चित्रोत्पलावलंबितक', 'प्रयोगाभ्युदय', इ. त्यांचीं नांवें आहेत.

मुरारि व राजशेखर यांच्यापासून नाट्यकलेला नवीन वळण लागलें. कथानकाचे नवीन प्रकार, शृंगाराची नवी मांडणी व सुंदर पद्यें यांमुळें यांचीं नाटकें मोलाचीं वाटतात. मुरारीचें 'अनर्घराघव', राजशेखराचीं 'बालरामायण', 'बालभारत', 'विद्धशालभंजिका' व 'कर्पूरमंजरी' हीं सर्वं वाचनीय आहेत. त्रिपुरीचे कलचुरी राजे व कनोजचे प्रतिहार राजे यांचा राजशेखराला आश्रय होता. नाटकांच्या खालोखाल प्रहसन आणि भाण यांना महत्त्व आहे. प्रहसन (पाहा) हें एक किंवा दोन अंकांचें विनोदी नाटक असे. भाण (पाहा) म्हणजे एक अंकी शृंगाररसयुक्त भाषण होय. प्रहसनामध्यें फक्त हास्यरस असतो. भाणामध्यें शहरी माणसाच्या अनियंत्रित प्रेमविलासासच वाव असतो. कांची भूप महेंद्रविक्रम पल्लव (७ वें शतक) यानें लिहिलेलीं 'मत्तविलास' व 'भगवदज्जुकीय' हीं दोन प्रहसनें फार जुनीं आहेत. पहिल्यामध्यें कापालिक व बौद्ध यांची थट्टा केली आहे. दुसऱ्यामध्यें परकायाप्रवेशामुळें उडालेली धांदल वर्णिली आहे. वररुचीचा 'उभयाभिसारिका,' ईश्वरदत्ताचा 'धूर्तविटसंवाद', श्यामिलकाचा 'पादताडितक' व शूद्रकाचा 'पद्मप्राभृतक' हे प्रमुख भाण आहेत.

बाण हा संस्कृतांतला प्रमुख गद्यकवि होय. त्याच्या 'कादंबरी' या गद्यप्रबंधामुळें त्याच्यापूर्वीच्या गद्यकथा लुप्त झाल्या. सातव्या शतकांतील कनोजच्या हर्षवर्धन राजाच्या सभेंत बाण हा राजपंडित होता. 'कादंबरी' या दीर्घ प्रबंधांत दोन प्रेमी जोड्यांचा अनेक जन्मांतील जीवनाचा इतिहास आहे. आत्म्याचें अमरत्व व शुद्ध प्रेमाचें स्वर्गीयत्व यांचा या गद्यकाव्यांत उत्कृष्ट विलास आहे. उच्च प्रतिभा, अनेक देशांची बारीकसारीक माहिती, जीवनाचा दीर्घकालीन अनुभव व निसर्गाचें व मानवी जीवनाचें सखोल ज्ञान हीं त्याच्या कथेंत प्रतिबिंबित झालीं आहेत. भाषा अत्यंत ओजस्वी व अलंकारयुक्त आहे. नद्यांचीं, अरण्यांचीं, ऋतूंचीं वर्णनें फार सूक्ष्म व मनोहर आहेत. हर्षचरित व कादंबरी हे त्याचे दोन्ही प्रबंध अर्धवट राहून गेले. मात्र कादंबरी त्याचा मुलगा भूषणभट्ट यानें पुरी केली. बाणाचें अनुकरण करणारी सुबंधूची 'वासवदत्ता' बाणासारखी पदोपदीं श्लेषमय आहे. दहाव्या शतकांतील धनपालाची 'तिलकमंजरी' हा प्रबंध वासवदत्तेपेक्षांहि चांगला आहे. 'तरंगवती', 'त्रैलोक्यसुंदरी', 'त्रिभुवन माणिक्यचरित', 'नर्मदासुंदरी', 'विलासवती', वगैरे गद्यप्रबंध आतां नामशेष झाले आहेत. त्यांचा उल्लेख इतर ग्रंथांतूनच येतो. वादिभसिंह या जैन कवीचा 'गद्यचिंतामणि' याच प्रकारचा एक गद्यप्रबंध आहे. दंडीचा 'दशकुमारचरित' म्हणून एक गद्य प्रबंध आहे. अलीकडे 'अवंतिसुंदरी' म्हणून दुसरा एक दंडीचा प्रबंध सांपडला आहे. त्यांत दंडीनें स्वतःविषयीं पुष्कळ माहिती दिली आहे. दंडीची भाषा साधी पण ओजस्वी, कथानकानुकूल व अनेक घटनांनीं भरलेली असते. सूक्ष्म स्वभावरेखन व विविध घटना यांमुळें अर्वाचीन वाचकांत बाणापेक्षां दंडीचे प्रबंध अधिक वाचनीय वाटतात. अशीं विविध व मनोरंजक समाजचित्रें रेखाटण्याचा पुढें कोणीं फारसा प्रयत्न केल्याचें दिसत नाहीं.

चंपू—यानंतर चंपूकाव्यास म्हणजे गद्यपद्यमिश्रित प्रबंधास सुरवात झाली. त्रिविक्रमाच्या 'नलचंपू'मध्यें सुबंधूप्रमाणें श्लेषाची खूप गर्दी आहे. त्याचाच 'मदालसाचंपू' सध्यां नष्ट झाला आहे. दहाव्या शतकांत जैन साधु सोमदेव सूरि यानें 'यशस्तिलक चंपू' रचला. त्यांत समास, पाल्हाळिक वर्णनें, जुने संदर्भ यांची गर्दी आहे. जैन हरिचंद्र याचा एक 'जीवंधरचंपू' आहे. धारानगरीचा राजा भोज (११ वें शतक) याचा 'रामायणचंपू' फार वाचण्यांत येतो. कोंकणांतील सोड्ढल याचा 'उदयसुंदरी कथा' हा चंपू बाणाचें अनुकरण करणारा आहे.

वाक्पतिराजाचें 'गौड वहो' हें ऐतिहासिक प्राकृत काव्य आहे. नवव्या शतकांतील काश्मीरांतील महायुद्धासंबंधीं 'भुवनाभ्युदय' हें शंकुकाचें इतिहासकाव्य आतां मिळत नाहीं. पद्मगुप्ताचें 'नवसाहसांकचरित' यांत मालवभूपति सिंधुराज नवसाहसांक (१० वें शतक) याचें चरित्र आहे. नैषधीय चरित कर्ता श्रीहर्ष यानें तीन ऐतिहासिक काव्यें लिहिलीं पण तीं काळाच्या उदरांत गडप झालीं. कल्याणचा चालुक्य विक्रमादित्य (१२ वें शतक) याच्या चरित्रावर काश्मीरकवि बिल्हण यानें 'विक्रमांकदेवचरित' लिहिलें आहे. बिल्हणाच्या 'कर्णसुंदरी' नाटकांत बराच ऐतिहासिक भाग आहे. काश्मीरकवि क्षेमेंद्र (११ वें शतक) यानें ५० वर ग्रंथ लिहिले आहेत. त्यांत महाकाव्यें, लघुकाव्यें, नीतिग्रंथ, नाटकें, भारतरामायणाचे संक्षेप, कथासंग्रह व काव्यचर्चा असे अनेक विषय आहेत. काश्मीरच्या राजांचा इतिहास सांगणारी त्याची 'राजावली' आतां मिळत नाहीं. कल्हणाची 'राजतरंगिणी' हा एक अपूर्व ऐतिहासिक ग्रंथ आहे. त्यांत काश्मीरांतील राजवंश, राज्यशासन, सामाजिक स्थिति, कला व वाङ्मय यांचें तर्कशुद्ध वर्णन आहे. 'पृथ्वीराजविजय' (१२ वें शतक) व मुसल्मानी काळापर्यंतचा इतिहास सांगणाऱ्या राजतरंगिणीचा उत्तर भाग यांत पुष्कळ ऐतिहासिक माहिती आहे. तंजावरच्या विरूपाक्ष कवीनें चोलराजांच्या इतिहासावर 'चोल चंपू' लिहिला आहे.

रूपकें—अकराव्या शतकांतील चंदेलवंशी राजा कीर्तिवर्मा याच्या दरबारीं असलेल्या कवि कृष्णमिश्र यानें रूपकात्मक आध्यात्मिक नाटकांचा पायंडा घातला. आध्यात्मिक व धार्मिक तत्त्वांना मूर्त स्वरूप देण्याची प्रथा वेद व पुराणें यांच्या काळापासून चालत होती. अश्वघोषानें आपल्या नाटकांत कांहीं रूपकात्मक पात्रें घातलीं

होतीं. काश्मीरी नैयायिक जयंतभट्ट यानें 'सन्मत नाटक' नांवाचें एक आध्यात्मिक नाटक लिहिलें आहे. कृष्णमिश्रानें याच प्रथेचा अद्वैत संप्रदायाकडे उपयोग केला. याच्या नाटकांत आत्मा, ज्ञान, विवेक, अध्यात्म, भक्ति, माया, मद, श्रद्धा, षड्दर्शनें, इ. पात्रांच्या स्वरूपांत वावरतात. कृष्णमिश्राची ही कल्पना फार पसंत पडली व पुढें सर्व संप्रदायांनीं व धर्मांनीं तिचा उपयोग केला. वंगभूपाल लक्ष्मणसेन (११७५-१२००) याच्या दरबारचा जयदेव कवि, याचें 'गीतगोविंद' हें एक अलौकिक रूपक काव्य आहे. त्यांत प्रत्येकीं ८ अष्टपद्यांच्या १२ सर्गांमध्यें कृष्ण व राधा यांचें प्रेम, वियोग व पुनर्मीलन यांचें वर्णन आहे. या काव्याची माधुरी अलौकिक आहे.

इतर कोठल्याहि भाषेंत न सांपडणारे कांहीं काव्यप्रकार संस्कृतमध्यें आहेत. भट्टीचें 'रावणवधकाव्य' म्हणजेच 'भट्टीकाव्य' सातव्या शतकांत वलभीच्या श्रीधरसेन भूपतीच्या राज्यकालांत रचण्यांत आलें. त्यांत कथानुसंधान न सोडतां हजारों व्याकरणाचे नियम व रूपें बिनचूक उपयोग करून दाखविलीं आहेत. यानंतर द्व्याश्रय काव्यें बरींच झालीं. काव्य आणि व्याकरण या दोन कार्यार्थ केलेलीं काव्यें तीं द्व्याश्रय काव्यें. भौमकानें याच स्वरूपाचें 'रावणार्जुनीय' काव्य केलें. त्यांत रावण व कार्तवीर्यार्जुन यांमधील युद्ध हा विषय असून व्याकरणाचीं अप्रसिद्ध व प्रसिद्ध रूपें पुष्कळच घातलीं आहेत. राष्ट्रकूट भूपति तिसरा कृष्ण याच्या चरित्रावर हलायुधानें 'कविरहस्य' काव्य लिहिलें व व्याकरणाचीं रूपें वापरलीं. हेमचंद्र (१०८८-११७२) यानें 'द्व्याश्रयकाव्य' किंवा 'कुमारपालप्रतिबोध' रचला. त्यांत काव्य, इतिहास व संस्कृत व प्राकृत व्याकरणशास्त्र यांचा संयोग आहे.

अनेक-संधान काव्यें— इतरत्र न सांपडणारा संस्कृतांतील दुसरा वाङ्मयप्रकार म्हणजे एकाच काव्यांत दोन कथानकांचा प्रवाह सारखा चालू ठेवणें हा होय. संस्कृत भाषेंत श्लेष म्हणजे एका शब्दाचे अनेकार्थी उपयोग यास फार मोठा वाव आहे. बाण, सुबंधु यांनीं श्लेषाचा उपयोग मोठ्या प्रमाणांत केला. श्लेषामुळें कवीला आपल्या भाषाप्रभुत्वाचें प्रदर्शन करण्यास मिळतें व वाचकास त्याचा बरोबर अर्थ कळला म्हणजे त्यालाहि आनंद होतो. यामुळें 'अनेक-संधान' काव्यें निर्माण झालीं. भारवि व माघ यांनीं काव्यांच्या कांहीं सर्गांत तीन तीन अर्थ असणारे अनेक श्लोक घातले आहेत. दंडीनें रामायण व भारत यांतील कथांवर एक द्विसंधान काव्य केलें होतें. त्याचें फक्त एकश्लोकी अवतरण भोजाच्या 'शृंगारप्रकाशा'त सांपडतें. धनंजयाचें एक द्विसंधान काव्य आहे. १२ व्या शतकांतल्या कविराजाचें 'राघवपांडवीय' हें द्विसंधान काव्य प्रसिद्ध आहे. अकराव्या शतकांतील संध्याकरनंदी यानें प्रभु रामचंद्र आणि वंगभूपति रामपाल या दोघांत अनुलक्षून 'रामचरित' हें काव्य लिहिलें. एकाच काव्यांत दोन कथानकें गोंवण्याचा प्रकार सर्वसाधारण झाल्यावर कवींनीं त्याहून अवघड रचना करण्याचें मनांत आणलें. निदान ३२ काव्यें तरी अशीं आहेत कीं, त्यांत दोहोंहून अधिक कथानकें साधलीं आहेत. जैन-कवि हेमचंद्र यानें एक 'सप्तसंधान काव्य' केलें आहे. दोन जैन साधू सोमप्रभ आणि समयसुंदर यांनीं प्रत्येकीं एक श्लोक केला व त्याचे १०० अर्थ करून दाखविले.

कांहीं कवींनीं 'विलोम' किंवा 'गतप्रत्यागत' काव्य केलें. त्यांत सुलट वाचलें म्हणजे एक अर्थ होतो व उलट वाचलें म्हणजे दुसरा अर्थ होतो. सोळाव्या शतकांतील ज्योतिषशास्त्रलेखक सूर्य पंडित याचें 'रामकृष्णविलोम' काव्य प्रसिद्ध आहे. भारवि व माघ यांनीं असे कांहीं श्लोक केले आहेत. पण आमूलाग्र सबंध विलोमकाव्यें पांचसहा तरी आहेत. काव्यबंध म्हणून एक चित्रकाव्याचा प्रकार आहे. यांत श्लोकांचीं अक्षरें कमळ, खड्ग, मुरज, चक्र, अश्व अशा आकृतींमध्यें लिहितां येतात. असे बंध भारवि व माघ यांच्या काव्यांत बरेच आहेत. धर्मदास याचें (दहावें शतक) 'विदग्धमुखमंडण' काव्य सबंध कूट म्हणजे कोड्यांनीं भरलें आहे.

शतकें—संसारांतील अनुभव, विचार व विकार यांसंबंधीं स्फुट काव्यें करण्याचा संस्कृत भाषेमध्यें प्रघात आहे. असे शंभर श्लोक एकत्र करून त्यांस 'शतक' हें नांव देण्यांत येतें. भर्तृहरीचीं शृंगार, नीति व वैराग्य हीं शतकें फार प्रसिद्ध आहेत. काश्मीरकवि अमरुक याचें 'अमरुशतक' आहे. यांत प्रेमाच्या अतिसूक्ष्म छटा सुंदर रीतीनें वर्णन केल्या आहेत. त्यांतील श्लोकांचा उपयोग नाट्यप्रयोगांत चांगला होतो. बिल्हणाच्या 'चौरपंचाशिके'त आनंद आणि सौंदर्य यांच्या ५० लहरींचें वर्णन आहे. जयदेवाचा समकालीन गोवर्धन याच्या 'आर्यासप्तशती'त सूक्ष्म भावनांचें आविष्करण करणाऱ्या ७०० आर्या आहेत. महाभारतांत नीतिपर श्लोक हजारों आहेत. भर्तृहरीचें 'नीतिशतक' आणि सुंदर पांड्य याची 'नीतिद्विषष्टिका' यांत एकाच कवीचे उपदेशपर श्लोक आहेत. घटकर्पराचें 'नीतिसार', वररुचीचें 'नीतिरत्न' व वेताळ भट्टाचें 'नीतिप्रदीप' यांतहि उपदेश भरला आहे.

अन्यापदेश म्हणजे अन्योक्ति हा एक वेगळाच काव्यप्रकार आहे. यांत पशु, पक्षी व वृक्ष यांची स्तुति व निंदा करून मानवी गुणदोषांचें स्वरूप उघडें केलेलें असतें. काश्मीर कवि बल्लट (नववें शतक) व दक्षिणेंतील नीलकंठ दीक्षित यांचे अन्यापदेश फार सुंदर आहेत. स्वतंत्र अन्यापदेश-शतकें थोडीं आहेत. परंतु अनेक कवींच्या अन्योक्ति एकत्र करून तयार केलेले संग्रह पुष्कळ

आहेत. काश्मीर कवि क्षेमेंद्र यानें पुष्कळ उपदेशपर स्फुट श्लोकसंग्रह केले आहेत. 'दर्पदलन' (अहंकारनिषेध), 'चतुर्वर्गोपदेश' (चार पुरुषार्थ साधण्यासंबंधीं), 'सेव्यसेवकोपदेश' (मालक-नोकर संबंध), 'चारुचर्या' (आरोग्याचे नियम) व इतर असेच श्लोकसंग्रह आहेत. क्षेमेंद्राचे उपहास करणारे ग्रंथ पुष्कळ आहेत. 'कलाविलास' यांत वैद्य, गायक व वेश्या यांचा उपहास आहे. 'देशोपदेश' व 'नर्ममाला' यांत कारकून, करवसूल करणारे व खजिनदार यांची निंदा आहे. दामोदरदासाचें 'कुट्टनीमत' व क्षेमेंद्राची 'समयमातृका' यांत वेश्याव्यवसायाची निंदा आहे. 'मुग्धोपदेशां'त जल्हणानें वेश्यादोषदर्शन केलें आहे. नीलकंठ दीक्षित यानें आपलें 'कलिविडंबन' व 'सभारंजन' या काव्यांत ढोंगी पंडित, शिक्षक, वैद्य आणि ज्योतिषी यांची खरड काढली आहे. तंजावरचा वांछेश्वर यज्वा ऊर्फ कुट्टिकवि यानें आपल्या 'महिषशतकां'त तंजावरच्या अवनत मराठी राज्याची निंदा केली आहे.

सुभाषितसंग्रह—संस्कृत भाषेंत सुभाषितसंग्रहांचा मोठा वर्ग आहे. तामिळमधील संगम वाङ्मय व हालाची प्राकृत सतशती हेहि सुभाषितसंग्रहच आहेत. 'कवींद्रवचनसमुच्चय' हा सगळ्यांत जुना संग्रह आहे. त्यांत कवींच्या नांवांसह विषयवार सुभाषितें दिलीं आहेत. काश्मीरांतील वल्लभदेवाची 'सुभाषितावली' उपलब्ध आहे. बंगालचा श्रीधरदास (इ. स. १२०५) याचें 'सदुक्तिकर्णामृत' आहे. इ. स. १२५७ मध्यें वैद्य भानुपंडितानें केलेली 'सूक्तिमुक्तावली' हिच्यांत प्रत्येक श्लोकाचे कवी व त्यांचे ग्रंथ यांचीं नांवें दिलीं असल्यानें ती फार उपयुक्त झाली आहे. शारङ्गधराची 'पद्धति' आणि दाक्षिणात्य कलिंगराय सूर्य याचा 'सूक्तिरत्नहार' हे चौदाव्या शतकांतील आहेत. मुसलमानी अमलांत असे शेंकडों सुभाषितसंग्रह तयार झाले. अगदीं अलीकडे तयार झालेलें 'सुभाषित-रत्न-भांडागार' सर्वांच्या माहितीचें आहे.

सुभाषित-संग्रहांवरून सुमारें ४० संस्कृत कवयित्रींचीं नांवें कळलीं आहेत. कर्नाटकभूपाल चंद्रादित्य याची राणी विजयांका (७ वें शतक) ही श्रेष्ठ कवयित्री होती. तिच्या पुष्कळ कविता अद्याप उपलब्ध आहेत; त्यावरून तिची वैदर्भी रीतींतील काव्यरचना श्रेष्ठ प्रतीची होती असें दिसतें. शीला भट्टारिका हिची भाषाप्रभुत्वाबद्दल बाणभट्टाशीं तुलना करण्यांत येते. मारुला, मोरिका, प्रभुदेवी, सुभद्रा, जघनचपला, इंदुलेखा, कुंती, नागम्मा, पद्मावती, मदालसा, इ. नांवें सुभाषितसंग्रहांवरूनच कळतात. विजयानगरच्या कंपरायाची राणी गंगादेवी (चौदावें शतक) हिनें आपल्या पतीचे विजय 'मधुराविजय' काव्यांत वर्णिले आहेत. महाराज अच्युतराय याचा वरदांबिकेशीं झालेला विवाह तिरुमलांबा या कवयित्रीनें एका चंपूकाव्यांत वर्णन केला आहे. तंजावरचा राजा रघुनाथ याच्या चरित्रावर रामभद्रांबा हिनें एक संस्कृत महाकाव्य रचलें आहे (१७ वें शतक). तंजावरच्या मधुरवाणीनें एक रामायण काव्य केलें आहे.

स्तोत्रें—संस्कृतांत भक्तिकाव्य श्रेष्ठ प्रतीचें व विपुल आहे. त्याचा आरंभ ऋग्वेदांत झाला. भारत-रामायण व पुराणें यांत तें वाढीस लागलें. अनेक आचार्य आणि संत यांच्यामुळें तें कळसाला पोंचलें. बौद्धकाळामध्यें मातृचेताचें 'शतपंचाशतिक' झालें. स्थानेश्वरच्या प्रभाकरवर्धनाच्या सभेंतील कवि मयूर यानें 'सूर्यशतक' केलें. त्यामुळें बाणास 'चंडीशतक' लिहावें असें वाटलें. 'शिवमहिम्नस्तोत्र' (पुष्पदंतकृत) हें जुनें प्रसिद्ध शिवस्तोत्र आहे. दंडी, हलायुध, बिल्हण, मल्हण व मलयराज यांनीं रचलेलीं पांच शिवस्तोत्रें आहेत. त्यांत 'शिवपंचस्तवी' असें नांव आहे. अद्वैतवादी शंकराचार्यांनींहि पुष्कळ स्तोत्रें केलीं आहेत. काश्मीरांतील शिवभक्तांनीं पुष्कळ गोड शिवस्तोत्रें केलीं आहेत. भट्टनारायणाचा 'स्तवचिंतामणि' आहे. उत्पलदेवाची 'शिवस्तोत्रावलि' (१० वें शतक) फार भव्य आहे. विष्णुस्तोत्रांत कुलशेखराची 'मुकुंदमाला', यामुनाचार्यांचें 'स्तोत्ररत्न', वेदान्तदेशिकाचीं अनेक स्तोत्रें, व श्रीवत्सांकाची 'पंचस्तवी' हीं विशेष प्रसिद्ध आहेत. देवी स्तोत्रांमध्यें, शंकराचार्यांची 'सौंदर्यलहरी', 'श्री देवी पंचस्तवी', दुर्वासाची 'आर्या द्विशती', कांचीच्या कामाक्षीस उद्देशून रचलेली 'मूकपंचशती', व कालिदासाचें 'श्यामला दंडक' हीं प्रमुख आहेत. दहाव्या शतकांतला लीलाशुक यानें केलेलें 'कृष्णकर्णामृत' अतीव मधुर आहे. स्तोत्रें भारतीय स्त्री-पुरुषांच्या आनंदाचें निधान आहेत व संस्कृत न समजणारे लोकहि तीं फार प्रेमानें म्हणतात.

कथाग्रंथ—व्यवहार आणि राजनीति यांचें कथारूपानें उत्तम शिक्षण देणारे तीन ग्रंथ भारतांत तयार झाले. ते 'पंचतंत्र', 'हितोपदेश' व 'तंत्राख्यायिका' हे होत. येथून ते सर्व जगभर पसरले. यांत उपदेश व जनस्वभावाचें चित्र सोप्या पण परिणामकारक भाषेंत दिलें आहे. सगळ्यांत मोठा जुना कथासंग्रह गुणाढ्य याचा (२ रें शतक) 'बृहत्कथा' हा आहे. मूळ पैशाची भाषेंत लिहिलेल्या या कथा आतां नष्ट झाल्या आहेत. गांग राजा दुर्विनीत यानें पहिल्यानें त्याचें सातव्या शतकांत संस्कृत रूपांतर केलें. काश्मीरभूपति अनंत याची राणी सूर्यमती हिच्या शिक्षणाकरितां (इ. १०८० च्या सुमारास) सोमदेवानें 'कथासरित्सागर' नांवाचें उत्तम संस्कृत भाषांतर केलें. उदयनचरित्रावरील सर्व नाटकें, कादंबरी, मालती-माधव, नागानंद यांचीं कथानकें मूळ बृहत्कथेंत सांपडतात. यांत संसारांतील सर्व जाती, धंदे, व्यवसाय यांसंबंधीं कथा आहेत. समुद्रप्रवास व परदेशांशीं व्यापार त्या वेळीं पुष्कळच चालत असे असें दिसतें. 'शुकसप्तति',

'सिंहासनद्वात्रिंशिका', 'कथार्णव', राजशेखराचा 'प्रबंधकोश', मेरुतुंगाचा 'प्रबंधचिंतामणि', विद्यापतींची (१४ वें शतक) 'पुरुषपरीक्षा' हे महत्त्वाचे कथाग्रंथ आहेत.

बाराव्या शतकानंतरच्या महाकाव्यांत कांहीं ऐतिहासिक काव्यें आहेत. त्यांवरून इतिहासांतील अज्ञात घटनांवर प्रकाश पडतो. त्यांत विजयानगरच्या व तंजावरच्या राजवंशासंबंधीं काव्यें, शिवाजीसंबंधीं 'शिवभारत', व केशवाचें 'राजारामचरित' हीं प्रमुख आहेत. कालिदासाच्या 'मेघदूता'ची नक्कल करणारीं संदेशकाव्यें तर पुष्कळच झालीं. यांत स्थलांची माहिती पुष्कळच मिळते. जैनांचे 'इंदुदूत' आणि 'चेतोदूत', 'हंस संदेश' आणि 'मनोदूत' यांत आध्यात्मिक कथासूत्र आहे. आध्यात्मिक नाटक 'प्रबोध चंद्रोदय' याचें अनुकरण पुष्कळ कवींनी केलें. विशिष्टाद्वैती वेदांतदेशिक (१३ वें शतक) यानें 'संकल्प सूर्योदय' लिहिलें. जैन यशपालानें (१३ वें शतक) 'मोहराज पराजय' नाटक लिहिलें. जैन वादिचंद्रानें 'ज्ञानसूर्योदय' नाटक लिहिलें. अद्वैतमताच्या प्रसारार्थ श्रीनिवास दीक्षितानें (शतक १६ वें) 'भावना पुरुषोत्तम' लिहिलें.

नल्लादीक्षित यानें (१७ वें शतक) 'जीवन्मुक्तिकल्याण' व 'चित्तवृत्तिकल्याण' नाटकें लिहिलीं. भक्तिनाटकांमध्यें पुरीच्या जीवदेवाचें 'भक्तिवैभव नाटक', अनंतदेवाचें 'कृष्णभक्तिचंद्रिका' गोकुळनाथाचें 'अमृतोदय', कवि कर्णपूराचें 'चैतन्यचंद्रोदय', शुक्लभूदेवाचें 'धर्मविजय', धर्मदेवाचें 'धर्मोदय काव्य' आणि 'धर्मोदय नाटक' (१७ वें शतक), वैजनाथाचें 'सत्संगविजय' हीं उल्लेखनीय आहेत. तंजावरच्या अद्वैती आनंदरायानें 'विद्यापरिणय' (अद्वैत मताचें) व 'जीवानंद' म्हणून एक आयुर्वेद प्रचारक नाटक लिहिलें. मद्रासच्या नृसिंह कवीनें 'अनुमितिपरिणय' नांवाचें तर्कशास्त्रावर नाटक लिहिलें. तंजावरच्या घनश्यामानें 'प्रचंड राहूदय' नांवाचें एक आध्यात्मिक नाटक व 'नवग्रहचरित' नांवाचें नवग्रहांची माहिती देणारें नाटक लिहिलें. अशीं रूपात्मक नाटकें ४० हून जास्त आहेत. थोर पुरुषांच्या चरित्राविषयीं अनेक नाटकें झालीं आहेत. हरिहराचें 'भर्तृहरिनिर्वेद नाटक' आणि कृष्णबलदेवाचें 'भर्तृहरि राज्यत्यागनाटक', शंकराचार्यांच्या जीवनावर अनेक शंकरविजयनाटकें, रामानुजचरित्रावर वरदाचार्यांचें 'यतिराजविजय नाटक,' हीं चरित्रनाटकाचीं उदाहरणें आहेत. अकबरकालीन नृसिंहाश्रमिन् आणि शहाजहानकालीन कवींद्राचार्य यानें आपल्या प्रयत्नानें हिंदूंवरील कांहीं जुलमी कर कमी करविले होते. म्हणून 'नृसिंहसर्वस्व' आणि 'कवींद्रचंद्रोदय' हे दोन ग्रंथ त्याला मानपत्राच्या स्वरूपांत कृतज्ञपणानें लिहून अर्पण केले आहेत. 'शेषवंशावली' सारख्या ग्रंथांत ब्राह्मण पंडितांच्या वंशांचें वर्णन आहे. समरपुंगव दीक्षिताचा 'यात्राप्रबंध' आणि वादिराजाचा 'तीर्थप्रबंध' हे स्थलवर्णनाच्या दृष्टीनें महत्त्वाचे आहेत. अलीकडील गद्यग्रंथांत विद्याचक्रवर्तीचा 'गद्यकर्णामृत' नांवाचा ग्रंथ आहे. हा ग्रंथकार म्हैसुरांतील द्वारसमुद्राच्या होयसाळ राजांचा आश्रित होता. दुसरा नरसिंह होयसाळ आणि पांड्य व काडव यांचें सैन्य यांमध्यें १२९० च्या सुमारास श्रीरंगम येथें झालेल्या ९० दिवसांच्या युद्धाचें वर्णन या ग्रंथांत आहे.

चंपू वाङ्मयामध्यें कांचीजवळचा व्यंकटाध्वरी (१८ वें शतक) यानें एक नवीन प्रकार सुरू केला. याच्या 'विश्वगुणादर्शचंपू' मध्यें दोन पात्रें आहेत. एक सर्व गोष्टींतले दोष मात्र पाहतो. दुसरा गुण मात्र पाहतो. त्या दोघांच्या संवादांत संसारांतील शेकडों माणसांची व स्थळांची उत्तम गुण-दोष मीमांसा केली आहे. ईस्ट इंडिया कंपनीचीहि त्यांत चिकित्सा केली आहे. पुढें पुढें तंजावरांत भाणांची उत्पत्ति पुष्कळ झाली. पण सर्वोत्कृष्ट भाण 'मुकुंदानंद भाण' हा काशीपतीनें म्हैसुरांत रचला. प्रहसनांत अश्लीलता फारच असे. बिकानेरमध्यें हरिगोविंद इ. कवींनीं पुष्कळ प्रहसनें केलीं.

सतराव्या शतकांत मदुरेस नायक राजाच्या दरबारीं नीलकंठ दीक्षित म्हणून एक महापंडित होता. त्यानें दोन महाकाव्यें व अनेक काव्यें केलीं आहेत. बोजड भाषेंत अवघड काव्यें करण्याचा ज्या काळीं परिपाठ पडला होता, त्या वेळीं नीलकंठानें सहजसुंदर व सुलभ भाषेंत स्वतंत्र कल्पनांनीं युक्त काव्यरचना केली. चोल भाषेंतील खुमारी त्यानें काव्यांत उतरविली. वर्णनें, स्तोत्रें आणि उपहासगर्भ लेखन यांत त्याची प्रतिभा अप्रतिहतपणें चाले.

दक्षिणेमध्यें कांहीं तामिळ ग्रंथांवरून संस्कृतांत संतचरित्रें व क्षेत्रमाहात्म्यें रचण्यांत आलीं. तसेंच रामराजभूषण याच्या तेलंगी ग्रंथावरून संस्कृतमध्यें 'वसुचरित्र' चंपूकाव्य रचण्यांत आलें.

मुसलमानी आणि इंग्रजी अमलांत संस्कृत अभिजात वाङ्मयाची वाढ थांबली नाहीं. दिल्ली दरबारांत संस्कृत पंडितांस मान मिळे. फारशी संस्कृत कोश व वाचन-पुस्तकें तयार झालीं होतीं. श्रीधराच्या 'कथाकौतुका' सारखीं कांहीं फारसी ग्रंथांचीं संस्कृतांत भाषांतरें पंधराव्या शतकांत झालीं. त्यांत युसुफ आणि झुलीखा यांची गोष्ट आहे. 'अकबरनाम्या'चें 'सर्व देश वृत्तान्त संग्रह' नांवाचें संस्कृत भाषांतर झालें. अबदुल रहमान या मुसलमान कवीनें 'अपभ्रंश दूत काव्य' केलें आहे. सतराव्या शतकांत गुलबर्गा येथील अकबरशहा नांवाच्या माणसानें 'शृंगार मंजरी' नांवाचा संस्कृत ग्रंथ लिहिला. लक्ष्मीपतीनें 'अबदुल्लाचरित' संस्कृतांत लिहिलें. एकोणिसाव्या शतकांत बायबल व ख्रिश्चन स्तोत्रें यांचीं संस्कृत भाषांतरें झालीं. कल्याणमल्लानें 'सुलेमानचरित' नांवाचें सालोमनचें संस्कृत चरित्र लिहिलें.

सध्यां पुष्कळ संस्कृत मासिकें चालू आहेत. कित्येक पंडित राष्ट्रसभा, सत्याग्रह, असले विषय घेऊन संस्कृतांत वादविवाद करतात. अशा रीतीनें संस्कृतचें अमर-भारती, म्हणजे न मरणारी भाषा हें नांव सार्थ होत आहे. (श्री. बा. जो.)

संस्कृत भाषेंतील विविध शास्त्रांवरच्या वाङ्मयाचें विवेचन त्या त्या शास्त्रांच्या लेखांतून केलेलें आढळेल.

**संस्कृति**—संस्कृति ही संज्ञा इंग्रजी 'सिव्हिलिझेशन' याचा प्रतिशब्द म्हणून योजतात. कांहीं कोशांतून 'सिव्हिलिझेशन' व 'कल्चर' या दोन्ही इंग्रजी शब्दांचा एकच अर्थ दिला आहे, तर कांहींत 'कल्चर' म्हणजे बौद्धिक सुधारणा असा अर्थ देऊन 'सिव्हिलिझेशन' याचा धार्मिक, नैतिक, सामाजिक, वगैरे सुधारणा असा अर्थ दिला आहे. 'संस्कृति' या संस्कृत शब्दाचा अर्थ 'चांगलें केलेलें' असा व्यापकच आहे. संस्कृती (सिव्हिलिझेशन) चा अखिल मानवजातीची प्रगति अशा दृष्टीनें अर्थ करून शिवाय निरनिराळ्या मानवसमाजांची प्रगति या मर्यादित अर्थानेंहि या शब्दाची योजना होते. तेव्हां संस्कृतीचें लक्षण 'जातिराष्ट्रादिसंघानां साकल्यं चरितस्य यत् । व्यक्तं संस्कृतिशब्देन भाषाशास्त्रात्मकं ननु ॥' थोडक्यांत असें सांगतां येईल. मूलगृहकालीन आर्यसंस्कृति, असुरी-बाबिलोनी संस्कृति व मिसरी संस्कृति आज मृत आहेत. पण पर्शुभारतीय संस्कृति पारशी समाजामार्फत, प्राचीन ग्रीकरोमन संस्कृति सांप्रतच्या पाश्चात्य संस्कृतिरूपानें, प्राचीन चिनी संस्कृति सांप्रतच्या चिनी समाजामार्फत, आणि भारतीय आर्यसंस्कृति आजच्या हिंदु समाजामार्फत हयात असून खिस्तोत्तर काळांत महंमद पैगंबरनिर्मित इस्लामी संस्कृतीचा उदय होऊन सांप्रत हिंदु, इस्लामी, खिस्ती आणि पारशी इतक्या संस्कृतींचा संग्राम चालू आहे. पण १९ व्या व २० व्या शतकांत दळणवळणाचीं साधनें कल्पनातीत वाढल्यामुळें यापुढें वरील अनेक संस्कृतींचें वैशिष्ट्य फारसें शिल्लक न राहतां शें-दोनशें वर्षांत अखिल मानवजात समान संस्कृतीची बनेल असा बराच संभव आहे. या सर्व संस्कृतींचा इतिहास सुलभ विश्वकोशाच्या प्रस्तावनांतून सविस्तर दिलेला आढळेल.

**सस्तन प्राणिवर्ग**—(मॅमालिआ). पृष्ठवंश प्राण्यांचा सर्वांत उच्च दर्जाचा हा वर्ग असून यामध्यें ज्यांचें रक्त उष्ण असतें असे प्राणी, तसेंच चतुष्पाद प्राणी, व्हेल वगैरे मोठे मासे, आणि स्वतः मनुष्य हा प्राणी येतो. असा हा एक अत्यंत महत्त्वाचा प्राणिवर्ग आहे. या वर्गाचा मोठा विशेष हा आहे कीं, या प्राण्यांची मादी आपल्या पिलास एका विशिष्ट ग्रंथीपासून स्रवणारा रस ज्यास आपण दूध म्हणतों तो पाजून त्याचें पोषण करते. या वर्गांतील एकगुह्येंद्रिय प्राण्याखेरीज सर्व प्राणी पिलें घालतात. परंतु हीं पिलें होण्याच्या पूर्वीच्या अवस्थेंत निरनिराळ्या जातींच्या प्राण्यांत फार भेद आढळतो. सर्व सस्तन प्राण्यांस स्तन अथवा दुग्धग्रंथी असतात. परंतु निरनिराळ्या प्राण्यांमध्यें या स्तनांची संख्या व स्थान यांमध्यें फरक आढळून येतो. या महत्त्वाच्या वर्गाचें साधारणतः पुढें दिल्याप्रमाणें वर्गीकरण करण्यांत येतें : मनुष्य, मर्कट, लेमूर, वाघूळ, कीटकभक्षक, मांसाहारी, व्हेल, सखुरधेनु, सखुर सस्तन प्राणी, तीक्ष्ण जंतू प्राणी, दंतविहीन प्राणी, पोटास पिशवी असलेले प्राणी आणि एक गुह्येंद्रिय प्राणी.

प्राणिवर्गांत हा वर्गच फार महत्त्वाचा आहे. या वर्गांतील प्राण्यांच्या अंगावर केंस असतात. सांगाडा सामान्यतः सगळा असतो. कवटी हाडांची व स्वतंत्र भाग म्हणून असते. या कवटीच्याखालीं पृष्ठवंश असतो व त्याला अवयव (हातपाय) जोडलेले असतात. बहुतेकांना दांत असतात. स्नायू चांगले बळकट असतात. उदरपेटिका हें या वर्गाचें वैशिष्ट्य असतें व तीमुळें शरीरकोटराचे दोन भाग पडतात. श्वासोच्छ्वासानें फुफ्फुसांत हवा घेण्यांत येते. हृदयांतून उष्ण रक्त सर्व शरीरभर रक्तवाहिन्यांतून खेळत असतें. व तें परत येऊन शुद्ध होत असतें. अन्न आणि भोंवतालची परिस्थिति यांवर बहुधा या वर्गांतील प्राण्यांचे गुणधर्म अवलंबून असतात. दुसऱ्या प्राण्यांवर जगत असलेले प्राणी हिंस्र, चपळ, अतिबुद्धिमान पण एकलकोंडे असतात. शाकाहारी प्राणी त्या मानानें मित्रे व कळप करून राहणारे असतात. कांहीं प्राणी दोन्ही प्रकारचें अन्न घेतात व त्याप्रमाणें त्यांचे स्वभावधर्म बदलतात.

[ सस्तन प्राण्यांचें वर्गीकरण-तक्ता पुढील पानावर पाहा. ]

**संस्था नोंदणी कायदा**—(दि सोसायटीज रजिस्ट्रेशन ॲक्ट १८६०). या कायद्याचा उद्देश वाङ्मयीन, शास्त्रीय, संगीतचित्रकलादि कलाविषयक, किंवा उपयुक्त ज्ञानाचा प्रसार करणाऱ्या, किंवा राजकीय ज्ञानाचा प्रसार करणाऱ्या, किंवा धर्मार्थ अगर मोफत लोकोपयोगी कामें करणाऱ्या संस्थांचा दर्जा सुधारावा, असा आहे. अशा संस्था सात किंवा अधिक इसमांनीं एकच काम करण्याचें ठरवून स्थापन कराव्यात व सदर संस्था चालविण्याचे नियम तयार करावे, आणि ती संस्था जॉइंट स्टॉक कंपन्यांच्या रजिस्ट्रारकडे नोंदवावी. सदर संस्थेच्या (मेमोरँडम) नियमांत (अ) संस्थेचें नांव, (ब) संस्थेचे उद्देश, आणि सदर संस्थेचें जबाबदार चालक म्हणजे गव्हर्नर, कौन्सिलचे सभासद, डायरेक्टर, कमिटीचे सभासद किंवा गव्हर्निंग बॉडीचे सभासद, यांपैकीं कोणतेंहि नांव स्वीकारून त्या इसमांचें पूर्ण नांव, पत्ता व धंदा ही माहिती मेमोरँडममध्यें नमूद करावी; शिवाय संस्थेचें कामकाज चालविण्याची स्वतंत्र घटना व नियम तयार करून त्यांची एक प्रत मेमोरँडमबरोबर रजिस्ट्रारकडे पाठवावी

[ पुढील पृष्ठावर पाहा. ]

## सस्तन प्राण्यांचें वर्गीकरण

[ मागील पृष्ठावरून चालू ]

(कलम २). या नोंदणीची फी रु. ५० आहे. अशा संस्थेतर्फे किंवा संस्थेविरुद्ध कोर्टांत दावे संस्थेचा प्रेसिडेंट, किंवा चेअरमन, किंवा सेक्रेटरी, किंवा ट्रस्टी यांच्या नांवानें चालवावे (कलम ६). या कायद्याप्रमाणे ग्रंथसंग्रहालयें, वाचनालये, वस्तुसंग्रहालयें (म्यूझियम), चित्रसंग्रहालयें, तसेच सृष्टिशास्त्रविषयक, यांत्रिक, किंवा तत्त्वज्ञानात्मक संशोधन, शोध, नवीन शोधविषयक यंत्रे, वगैरे कामे करणाऱ्या संस्था नोंदतां येतात (कलम २०).

**सहकार**—(को-ऑपरेशन). सहकारी चळवळीचे मुख्य दोन प्रकार आहेत : (१) उत्पादन सहकार्य; व (२) पुरवठासहकार्य. उत्पादन सहकार्यांत भांडवल व मजूर यांचे असें एकत्र सहकार्य करण्यांत येतें कीं, मजूर अथवा कामकरी यांचेच कारखान्यावर नियंत्रण असतें, त्यांच्याकडेच सर्व साधनांची मालकी असते आणि धंद्यांत होणारा फायदाहि कामगारांतच वांटला जातो. परंतु आतांपर्यंत असें उत्पादन–सहकार्य फारसें प्रगति पावूं शकलें नाहीं. पुरवठ्याच्या बाबतींत सहकार्य कांहींसें प्रगति पावलें आहे. या पद्धतीमध्यें ग्राहक हाच धंद्याचा मालक व कामगारांची नेमणूक करणारा असतो व त्यामुळें तो मध्यस्थाला फांटा देऊं शकतो व सर्व फायदा भागीदारांमध्ये वांटला जातो व तो त्यांनीं घेतलेल्या मालाच्या प्रमाणांत असतो.

१८ व्या शतकांत कांहीं सहकारी मंडळ्या अस्तित्वांत होत्या, तथापि या शतकाच्या अखेरीस व एकोणिसाव्या शतकांत विशेषतः रॉबर्ट ओवेन याच्या प्रचारामुळें सहकारी मंडळ्या विशेष स्थापन होऊं लागल्या. १८४४ मध्यें रॉचडेल पायोनिअर सोसायटी

ही स्थापन झाल्यापासून या चळवळीस विशेष मूर्त स्वरूप आलें. ही सोसायटी २८ विणकरानीं २८ पौंड भांडवल जमवून स्थापन केली व त्यांनीं लोणी, कणीक, साखर, वगैरे मालाचें सहकारी दुकान काढलें. त्यांनीं भागावरील व्याज ५ टक्क्यांप्रमाणें द्यावयाचें ठरविलें व बाकीचा नफा मालखरेदीच्या प्रमाणांत वाटावयाचें ठरविलें. या उदाहरणाचें बऱ्याच ठिकाणीं अनुकरण करण्यांत आलें व या चळवळीचा प्रसार झाला. यानंतर किरकोळ विक्री करणाऱ्या सहकारी संस्थांस माल पुरविण्याकरितां दोन ठोक व्यवहार करणाऱ्या संस्था मँचेस्टर ( १८६४ मध्यें ) व ग्लासगो ( १८६९ ) येथें स्थापन करण्यांत आल्या. त्यांनीं आपलीं खरेदी केंद्रें सर्वत्र अनेक देशांत स्थापन केलीं. तसेंच त्यांनीं कांहीं उत्पादन शाखाहि सुरू केल्या. या पद्धतीनें कोणत्याहि प्रकारचें व जातीचें उत्पादन करतां येतें असें दिसून आलें आहे. यानंतर कच्च्या मालाचा पुरवठाहि आपल्या नियंत्रणाखालीं आणावा लागतो असें दिसून आल्यावरून त्या दिशेनेंहि प्रयत्न चालू आहेत.

कृषि सहकार्य—कृषिकर्म अथवा शेतकीच्या बाबतींत अनेक तऱ्हेच्या सहकारी संस्था असूं शकतात. तसेंच या संस्थांसंबंधीं सर्व देशांत सारखीच परिस्थिति व नियम असतात असें नाहीं. ब्रिटनमध्यें पहिली शेतकी सहकारी संस्था १९०१ मध्यें निघाली व तिचें कार्य आणि उद्देश विविध स्वरूपांचे होते. ही चळवळ जर्मनी, स्वित्झर्लंड, डेन्मार्क, फ्रान्स, वगैरे सर्व देशांत पसरली आहे. हिंदुस्थानांत १९०४ सालीं सहकारी संस्थांबाबत एक कायदा करण्यांत आला व त्या वेळेपासून सहकारी चळवळीला प्रारंभ झाला. तथापि १९१२ सालीं दुरुस्त कायदा होईपावेतों फारशी प्रगति झाली नाहीं. नंतर पतपेढ्या निघण्यास सुरुवात झाली. सहकारी पेढ्यांचा उगम यांतूनच झाला ( पेढ्या पाहा ). तथापि या पेढ्यांमुळें फक्त पतीचा प्रश्न सुटतो; पण प्रत्यक्ष विक्री, बाजार व इतर आर्थिक सुधारणेच्या गोष्टी अद्यापि या सहकारांत आल्या नाहींत. सहकारी पतपेढ्यांखेरीज इतर सहकार्यासाठीं निघालेल्या संस्था फारशा नाहींत. कृषिप्रधान भरतखंडांत तशा असंख्य पाहिजेत. तसेंच लांब मुदतीचें कर्ज शेतकऱ्यांना किंवा व्यापाऱ्यांना मिळत नाहीं. अशा व्यापक व दीर्घकालीन मदतीखेरीज शेतकऱ्यांची स्थिति सुधारणार नाहीं व उत्पादन वाढणार नाहीं. सरकारनें एक सहकार-योजना समिति नेमिली होती. तिचा १९४६ सालीं अहवाल बाहेर पडला आहे. पण त्यांतील शिफारशींची बजावणी होण्यास कालावधि लागेल.

मुंबई राज्यांतील सहकारी चळवळ— निरनिराळ्या प्रकारच्या सहकारी संस्था विशेषतः ग्रामीण भागांत स्थापन करण्यास उत्तेजन देण्याचें धोरण मुंबई सरकारनें अमलांत आणल्यापासून या बाबतींत बरीच प्रगति झाली आहे. १९५० सालच्या जून महिन्याच्या अखेरीस मुंबई राज्यांत सर्व प्रकारच्या मिळून एकूण १४,८१९ सहकारी संस्था होत्या. यामागच्या वर्षी जून अखेरीस हाच आंकडा ११,७१२ होता. म्हणजे १९४९–५० या सहकारी सालांत ३,१०७ संस्था नोंदविण्यांत आल्या.

सहकारी संस्थांचा जो प्रसार झाला आहे, त्यांत बॉम्बे प्रॉव्हिन्शिअल इन्स्टिट्यूट, बॉम्बे प्रॉव्हिन्शियल क्रेडिट बँक ( पतपेढी ) आणि बॉम्बे प्रॉव्हिन्शिअल लँड मॉर्टगेज बँक यांचा समावेश होतो. याशिवाय ३० सेंट्रल को-ऑपरेटिव्ह बँका, व बँकिंग युनिअन आहेत. सहकारी संस्थांना दीर्घ मुदतीचीं कर्जें व अल्प मुदतीची आर्थिक मदत देऊन या बँका मदत करतात.

शहर भागांत एकूण १,३९० अर्बन बँका व संस्था आहेत. सहकारी ग्राहक संस्थां( को-ऑपरेटिव्ह कंझ्यूमर्स सोसायट्यां )ची संख्या १,२५८ आहे. तसेंच ७१९ घर–बांधकाम संस्था आणि २७ स्त्रियांच्या सहकारी संस्थाहि आहेत.

सहकारी शेती संस्था—पांच वर्षांत एकूण ११२ सहकारी शेती संस्था स्थापन करण्याचें ध्येय डोळ्यांपुढें ठेवून सरकारनें एक योजना मंजूर केली आहे. अशा संस्थांना जंगल जमिनी किंवा महसुलाच्या जमिनी देणें, पंप वगैरेसारखीं मोठीं यंत्रें खरेदी करण्यासाठीं आर्थिक मदत देणें, तसेंच इतरहि आर्थिक साहाय्य व तांत्रिक साहाय्य करणें, इत्यादि रूपानें अनेक प्रकारच्या सवलती देण्यांत येतात. सध्यां मुंबई राज्यांत एकूण ८९ बेटर फार्मिंग ( सहकारी शेती सुधारणा ) संस्था आहेत. ग्रामीण प्राथमिक संस्थांच्या खेळत्या भांडवलाच्या एक टक्का या प्रमाणांत अंदाजें एकूण ४,१७,००० रुपये खर्च येतो. या संस्थांना ३० जून १९५० नंतर ग्रँट देण्यांत आल्या.

ग्रामीण भागांत ॲग्रिकल्चरल क्रेडिट सोसायट्या ( शेतकी पतपेढ्या ), थ्रिफ्ट सोसायट्या ( काटकसर संस्था ) व मल्टिपर्पज सोसायट्या ( विविध कार्य संस्था ) मिळून एकूण ८,९०२ सहकारी संस्था आहेत. १९ प्रायमरी लँड मॉर्टगेज बँका आहेत बिगरपरवाना अशा ६५० सहकारी शेती संस्था आहेत. १७८ शेती सुधारणा व पीक संरक्षण संस्था आहेत. आणि १२८ सुपरवायझिंग युनियन व तालुका सुधारणा मंडळें आहेत. म्हणजे ग्रामीण भागांत एकूण १०,३०१ सहकारी संस्था असून शहरभागांत ३,३९४ आहेत.

त्याचप्रमाणें विणकरी लोकांच्या आणि इतर औद्योगिक सहकारी संस्था आहेत. त्यांची एकूण संख्या ८३९ आहे. याशिवाय विमा, वाहतूक, शैक्षणिक, चांगली राहणी आणि इतर संकीर्ण प्रकारच्या एकूण २४९ सहकारी संस्था आहेत. अशा भिन्न स्वरूपाच्या सहकारी संस्थांची एकूण संख्या १,०८९ भरते.

'लिफ्ट इरिगेशन'साठीं स्थापन झालेल्या सहकारी संस्थांना लिफ्ट इरिगेशनची यंत्रसामुग्री विकत घेऊन ती बसविण्यासाठीं येणाऱ्या खर्चाच्या ५० टक्क्यांइतकी रक्कम आर्थिक मदत म्हणून देण्यांत येते. तसेंच या संस्थांचा सेक्रेटरी व ड्रायव्हर म्हणून काम करणाऱ्या इसमासाठीं आर्थिक मदत आणि कामें सुरू करण्यासाठीं कर्जहि देण्यांत येतें.

कर्जाबाबतच्या अर्जाची त्वरित विल्हेवाट लावण्यासंबंधींची आणि तत्परतेनें पैसे मिळण्याबाबतची शेतकऱ्यांची मागणी पुरविण्याच्या हेतूनें मुंबई सरकारनें बॉम्बे प्रॉव्हिन्शियल को-ऑपरेटिव्ह बँक किंवा सेंट्रल बँका अथवा बँकिंग युनियन यांना जादा शाखा अथवा पे-ऑफिसें उघडण्यासाठीं तीन वर्षे आर्थिक मदत देण्याचे अधिकार रजिस्ट्रार, को-ऑपरेटिव्ह सोसायटीज् व डायरेक्टर ऑफ ॲग्रिकल्चरल, मार्केटिंग ॲण्ड रूरल फायनान्स यांना दिले आहेत.

**सहजप्रवृत्ति**—(इन्स्टिक्ट). ही शक्ति सर्व प्राणिमात्रांत दिसून येते. हिचें कार्य स्वसंगोपन आणि स्वजातिसंवर्धन आहे. कोणत्याहि प्रकारचा पूर्व अनुभव किंवा शिकवण नसली तरी आणि कांहींहि विचार न करतां सर्व प्राणी स्वतः जिवंत राहण्याकरितां अन्नपाणी मिळवण्याला, तसेंच आपल्या जातीची वाढ ऊर्फ अपत्योत्पादन करण्याला प्रवृत्त होतो. या क्रिया करण्याला जी आपोआप नैसर्गिक चालना शरीरावयवांना मिळते, त्याला सहजप्रवृत्ति म्हणतात. ही सहजप्रवृत्ति कशी निर्माण होते याबद्दल शास्त्रज्ञांत अद्याप जोराचा विवाद चालू आहे. सामान्यपणें असें मानतात कीं, या प्रवृत्ती आनुवंशिक संस्कारांनीं प्राप्त झालेल्या असतात. म्हणजे हल्लींच्या जिवंत प्राण्याचे पूर्वज पिढ्यान् पिढ्या या क्रिया करीत असत, म्हणून त्यांच्या अपत्यांत या क्रिया करण्याची प्रवृत्ति जन्मजात असते.

**सहदेव**—पुरुकुलोत्पन्न पंडुराजा याला माद्रीपासून झालेल्या दोन पुत्रांतील दुसरा. याचा वडील भाऊ नकुल. सहदेवाची ख्याति खड्गयुद्धांत विशेष असे. यास द्रौपदीशिवाय केकयदेशीय राजाची कन्या विजया नांवाची स्त्री होती. द्रौपदीला श्रुतकर्मा आणि विजयेला सुहोत्र असे मिळून याला दोन पुत्र होते. युधिष्ठिरानें राजसूय यज्ञ केला, त्यांत हा दक्षिण दिशेला जाऊन मोठा दिग्विजय करून आला. इतर पांडवांबरोबर हाहि १२ वर्षे वनांत होता. पुढें हा तंतिपाल नांव धारण करून विराटाच्या अश्वशालेवर राहिला; कारण अश्वचिकित्सा इत्यादि शास्त्रांत हा चांगला निपुण होता. याच्या रथाचे अश्व तित्तिर पक्ष्याच्या रंगाचे असत, व ध्वजावर हंसाचें चिन्ह असे. युद्धकाळीं वाजविण्याचा जो याचा शंख असे, तो मणिपुष्पक नांवानें प्रसिद्ध होता. हा रूपानें फार सुंदर असून याला शस्त्रविद्या, सारथ्य व पशुपरीक्षा हीं अवगत होतीं.

**सहदेव-भाडळी**—हीं दोन व्यक्तींचीं नांवें आहेत कीं एकाच व्यक्तीचें जोडनांव आहे याविषयीं शंका आहे. इतिहासाचार्य राजवाडे हे 'सहदेव भाडळी' एक व्यक्ति समजतात (संशोधक ४. ३. पृ. १३६), पण सहदेवाची स्त्री भाडळी होती असें कित्येक मानतात व त्याला पुरावेहि देतात. 'भाडळी पुसे व सहदेव सांगे' या अर्थाचीं मराठी व हिंदी वचनें आहेत. पाऊसपाणी, पाली, इ. चे शकुन, तिथि-वार-नक्षत्रें-संवत्सर, इ. चीं फलें, मुहूर्त यांसारखी शेतकरी, व्यापारी, वगैरे प्राकृत जनांना जी ज्योतिषविषयक माहिती लागते ती सहदेव भाडळीच्या प्राकृत ज्योतिषग्रंथांत आहे.

**सहस्रार्जुन**—कार्तवीर्य पाहा.

**सहा, मेघनाद** (१८९३- )—एक जगप्रसिद्ध हिंदी विज्ञानाचार्य व संशोधक. जगदीशचंद्र बोस व प्रफुल्लचंद्र रॉय यांच्या हाताखालीं हे तयार झाले. बंगालमधील डाक्का जिल्ह्यांतील सिओराताली या गांवीं यांचा जन्म झाला. प्रथमपासूनच स्वतःच्या अभ्यासू वृत्तीनें शिष्यवृत्त्या मिळवून यांनीं एम्. एस्सी. पर्यंतचें शिक्षण पुरें केलें. पुढें 'सापेक्षतेच्या द्वारां विद्युत्प्रक्रिया सिद्धांताची मांडणी' व 'विकिरणदाबाचें मापन' हे प्रबंध लिहून यांनीं डॉक्टर पदवी मिळवली व सन १९२१ च्या सप्टेंबरमध्यें दहा हजार रुपयांचें प्रेमचंद रायचंद पारितोषिक व शिष्यवृत्ति मिळवून हे इंग्लंडला गेले. तेथें फाउलरच्या संस्थेंत संशोधन करून यांनीं नाक्षत्र भौतिकांत नवीन शोध लावले. सन १९२२ च्या जानेवारीमध्यें 'तारकांच्या किरणचित्रांचा वास्तव सिद्धान्त' हा लेख लिहून यांनीं भौतिक शास्त्रांत क्रांति घडवून आणली. या संशोधन कार्यामुळें बर्लिन, म्यूनिक व केंब्रिज येथील विद्वान् शास्त्रज्ञांनीं यांची फार प्रशंसा केली. इंग्लंडच्या रॉयल सोसायटीच्या सभासदत्वाचा मान मिळवणारे हे हिंदुस्थानांतील चौथे गृहस्थ होत. हिंदुस्थानांत येतांच यांनीं कलकत्ता व अलाहाबाद विश्वविद्यालयांत कांहीं काल अध्यापनकार्य केलें. पुढें सन १९३१ मध्यें शास्त्रीय ज्ञानप्रसारार्थ यांनीं 'यु. पी. ॲकॅडेमी ऑफ सायन्स' या संस्थेची स्थापना केली.

विद्युत्सिद्धान्ताबाबत व प्रकाशदोपांबाबत संशोधनकार्य करून १९१८ सालीं यांनीं 'थर्मल आयोनायझेशन ऑफ स्टार्स' (ताऱ्यांचें औष्णिक अयनीभवन) हा महत्त्वाचा शोध लावला आहे. तसेंच परमाणूंची रचना, किरणोत्सर्गी विघटन यांवरील यांचा शोध 'लवणांचे भिन्न रंग व त्यांची उपपत्ति' या नांवानें सुप्रसिद्ध आहे. १९४४ सालीं इंग्लंड, वगैरे देशांत ज्या हिंदी शास्त्रज्ञांना पाठविण्यांत आलें होतें त्यांपैकीं हे एक होते.

**सहानी, बिरबल रुचिराम** (१८९१-१९४९)—एक सुप्रसिद्ध हिंदी वनस्पतिशास्त्रज्ञ. मूळचे हे पंजाबांतील होत. यांचें

सर्व शिक्षण लाहोरचें गव्हर्मेंट कॉलेज व केंब्रिज येथें झालें. त्यानंतर लखनौ युनिव्हर्सिटींत वनस्पतिशास्त्राचे प्राध्यापक म्हणून यांची नेमणूक झाली. त्या विद्यापीठाच्या विज्ञानशाखेचे हे कित्येक वर्षें डीन होते. पॅरिस येथें १९३५ सालीं नॅचरल हिस्ट्री सोसायटीचा जो तिसरा दशवार्षिक समारंभ झाला त्या वेळीं हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून यांनाच पाठविण्यांत आलें होतें. १९३६ सालीं लंडनच्या रॉयल सोसायटीचे फेलो होण्याचा मान यांना लाभला. सन १९३७–३८ मध्यें नॅशनल ॲकेडेमी ऑफ सायन्सचे हे अध्यक्ष होते. प्रस्तरीभूत वनस्पतिशास्त्रां(फॉसिल बॉटनी)तील तज्ज्ञ म्हणून हे विशेष ओळखले जात. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या भागांत असलेल्या विविध वनस्पतींवर व दक्षिण प्रदेशांतील खडकांवर यांनीं अपूर्व संशोधनकार्य केलें आहे. यांनीं कांहीं ग्रंथहि लिहिले आहेत.

**सह्याद्रि**—पश्चिम घाट. दक्षिण हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यानें मुंबई इलाखा, म्हैसूर, कुर्ग व मद्रास इलाखा यांतून थेट कन्याकुमारीपर्यंत ही पर्वतश्रेणी गेली आहे. सह्याद्रीला सुरवात खानदेश जिल्ह्यांतील कोंडाईबारी घाटापासून होते. ४,००० फुटांपेक्षां याची उंची क्वचितच जास्त असेल. हा व समुद्र यांच्यामध्यें २० पासून ६५ मैलपर्यंत रुंदीची कोंकणपट्टी आहे. या भागांत मुख्य पर्वत व त्याच्या शाखा यांच्यावर मिळून शंभरावर किल्ले आहेत, व ते बहुतेक इतिहासप्रसिद्ध आहेत. उत्तरेकडून दक्षिणेकडे कोंडाईबारी घाट, त्र्यंबकेश्वर, थळघाट, पिंपरीघाट, हरिश्चंद्रगड, शिवनेरी किल्ला, चाकण, सिंहगड, पुरंदर, रायगड, महाबळेश्वर, कुंभारलीघाट, आंबेघाट, पन्हाळा, विशाळगड, कॅसलरॉक, गिरसप्पाचा धबधबा, वगैरे घाट, किल्ले व ठिकाणें प्रेक्षणीय व महत्त्वाचीं आहेत. कूर्ग ओलांडल्यावर याला पूर्वघाट मिळतो. या दोहोंच्या सांधीवर नीलगिरीचें पठार आहे. नीलगिरीचें पठार व मलबार-कोईमतूरकडे गेलेला पश्चिम घाट यांच्यामध्यें १६ मैलांचें एक खिंडार आहे. याला पालघाट म्हणतात. सह्याद्रि नेहमीं हिरव्या जंगलानें आच्छादित असतो. यांत वाघ, हत्ती व सर्व प्रकारचीं हिंस्र जनावरें आहेत. या पर्वताच्या मद्रास इलाख्यांतील भागांत चहा, कॉफी, सिंकोना (क्विनाइन), वेलदोडे, वगैरेंची बरीच लागवट आहे. कावेरी व ताम्रपर्णी या मुख्य नद्या आहेत. पेरियार नदीचा उपयोग कालव्याकडे केला आहे. किनाऱ्यावरील पट्टी आंतील मुलुखाशीं जोडली नसल्यानें तिकडचे लोक सर्वतः निराळेच आहेत. त्यांच्या रीतीभाती व शरीराची ठेवण, वगैरे मुद्दां भिन्न आहेत. मध्यंतरीं डोंगरांवर रानटी लोक आहेत. सह्याद्रि हें महाराष्ट्राचें वैशिष्ट्य असून भरतखंडाला जसें हिमालयाचें तसें महाराष्ट्राला सह्याद्रीचें महत्त्व आहे.

**सखुर प्राणी**—(अंग्युलाटा). खूर असलेल्या प्राण्यांचा हा वर्ग आहे. यांचे दहा पोटविभाग पाडण्यांत येतात. त्यांपैकीं कांहीं आज नष्ट झाले आहेत. (१) कॉन्डिलार्थ्रा–हे प्राणी एओसीन कालांत अमेरिकेंत व युरोप खंडांत होते. यांपैकीं फेनॅकोडस ही जात दलदलीच्या प्रदेशांत राहत असून बहुधा ती घोडे वगैरे प्राण्यांची पूर्व जात असावी. हे आज नष्ट झाले आहेत. (२) ॲम्ब्लीपोड–हेहि एओसीन कालांतील मोठे प्राणी होते. हे अर्धवट तळव्यावर चालणारे मांसाहारी प्राणी असावेत. यांचा नमुना डिनोसेरस या प्राण्यांत पाहावयास सांपडतो. हेहि नष्ट आहेत. (३) अॅस्ट्रो-लोपोडा–हे प्राणी फार मोठे असून मायोसीन व प्लिओसिन युगांत सर्वत्र आढळत असत. हेहि नष्ट आहेत. (४) टायसोथेरिया—हे दक्षिण अमेरिकेंतील तृतीय युगामध्यें अस्तित्वांत होते. हे आकारानें लहान असून यास संपूर्ण शीवाल्यों असत. हेहि नष्ट आहेत. (५) टॉक्सोडॉन्शिया–हे दक्षिण अमेरिकेंतील मायोसिन व प्लीस्टोसिन काळांत अस्तित्वांत होते. यांच्या पायास तीन बोटें असत. हेहि नष्ट आहेत. (६) प्रोबोसिडीया (सोंडेचे प्राणी)–हत्ती व इतर अनेक नष्ट झालेले प्राणी या वर्गांत मोडतात. (७) हायराकोइडिया—या वर्गांतील प्राणी आफ्रिका, अरबस्तान व पॅलेस्टाइन यांमध्यें एका जातीच्या सशाच्या स्वरूपांत आढळतात. (८) पेरिसोडॅक्टिला (विषम खुरी)— या जातीच्या प्राण्यांत तिसऱ्या बोटाची पूर्ण वाढ झालेली असते व मागल्या पायावरील बोटांची संख्या विषम असते. टेपीर, गेंडा व घोडा हे प्राणी या वर्गांत मोडतात. (९) लिटोप्टेर्ना— हे प्राणी वरील वर्गासारखेच असून दक्षिण अमेरिकेमध्यें मधल्या तृतीय युगांत आणि प्लीस्टोसिन युगांत असावे. आतां हे आढळत नाहींत. (१०) आर्टियोडॅक्टिला (समखुरी)— या प्राण्यांचीं बोटें आकारांनीं सारखीं असून तिसरें व चौथें बोट प्रमुख असतें. यांचे दोन पोटवर्ग पडतात : (अ) रवंथ न करणारे—यांत हिपोपोटॅमस व डुकरें हीं येतात. व (आ) रवंथ करणारे–यांमध्यें उंट, लामा, हरण, जिराफ, ओकापी, बैल, मेंढ्या, बकऱ्या, वगैरे येतात.

**संक्षेप चिन्हें**—इंग्रजींत ज्याप्रमाणें बऱ्याच शब्दांस किंवा नांवांस संक्षेप रूढ आहेत त्याप्रमाणें आपल्या मोडींतहि पूर्वीपासूनच हे संक्षेप आढळतात. मोडी लिपींत अक्षरास दोन काने किंवा मात्रा किंवा नुसते कानेच देऊन अगर अक्षरापुढें पूज्य देऊन संक्षिप्तशब्द लिहिण्याचा प्रघात आहे. कांहीं संक्षेप असे :—

आ = १ अधिक. २ अथवा.
३ अश्विन. ४ ॲडमिरल.
५ असामी. ६ अव्वल.
७ आजम.

इं = १ इसम. २ इसवी.
३ [illegible].
४ इलाखा.
इं० = इन्स्पेक्टर.

ई० = इंचार्ज.
को = १ कसबे. २ कलेक्टर.
का = १ कमावीस. २ कर्यात.
खा = १ खासगत. २ खासगी.
खुा = १ खुद. २ खुर्द. ३ खुदावंद.
खो = १ खातें. २ खरेदी.
गंा = गंगाभागिरथी.
गुा = १ गुजारत. २ गुदस्त. ३ गुमास्ते.
चाा = चांदवड.
चींा = चिरंजीव.
छं = चंद्र.
जा = जमादिलावल.
जार = जमादिलाखर.
जिा = जिल्हा.
ताा = १ तागाईत. २ ताजा कलम. ३ तारीख. ४ तपशील. ५ तर्फ. ६ ताहा.
तीा = १ तर्थिरूप. २ तीर्थस्वरूप.
तो = तालुके.
दा = दकार.
दा = १ दस्तक. २ दस्तुर.
दिंा = दिंमत.
दुो = दुमाले.
नाा = नाईक.
निा = १ निशाणी. २ निसबत.
पा = १ पाटील. २ पान. ३ पासून. ४ पाठवून–पाठविला–ली.
पो = १ पैकीं. २ पैवस्ती.
पो = १ पावेतों. २ पोष्य. ३ परगणें. ४ पावलें. ५ पाहिजे. ६ पाठवावें–पाठविणें–पाठविलें.
प्रा = १ प्रती. २ प्रविष्ट. ३ प्रत..
प्रो = १ प्रमाणें. परगणे.
प्रो = १ प्रसन्न. २ प्रमाणें.
प्रां = प्रांत
प्रादी = प्रतिवादी.
बा = १ बदल. २ बरहुकूम.
बिा = १ बिन्न. २ बिकलम. ३ बितपशील.
बुा = बुद्रुक.
बो = बेगमी.
भा = भाद्रपद.
मा = मशुल.
मार = १ मजकूर. २ मशार.
मुा = १ मुकाम. २ मुदाम. ३ मुताची. ४ मुदल.
मो = माहे.
मोा = मोकदम.
मिा = मिती.
यो = येकूण.
रा, रो = राजश्री.
रा = १ राजमान्य. २ रवाना–रवानगी. ३ रकम.
रुो, रुये = रुपये.
रुा = रुजु.
रार = रविलाखर.
री = रविलावल.
रार = राहगार.
लिा = १ लिहून–लिहिला–लिहिणें.
वा = १ वलद. २ वस्ती. ३ वजन. ४ वध. ५ वादी.
विों = १ विशेष. २ विद्यमान. ३ विषयी.
विा = विनंति.
वो = १ वेदमूर्ति. २ वेदशास्त्र.
शुा = शुद्ध.
शा = शास्त्री.
श्रो = स्नेहांकित.
संा = संवत्.
सा = १ साष्टांग. २ सात्र. ३ सही. ४ सबब.
सुा = १ सुखरूप. २ सुद्धां.
सुो = सुभे.
सौ = सौभाग्यवती.
सो = साहेब.
सुा = सुरसन.
हुा = १ हुकुम. २ हुजूर.
हुंा = हुंडी.
हो = १ हस्ते. २ हेच पर्वी.

**सज्ञानता**—कोणतीहि गोष्ट कायदेशीर रीतीनें करण्यास पात्र होण्यास कायद्यानें कांहीं विशिष्ट वयाच्या मर्यादा घातलेल्या आहेत. त्या वयापूर्वी व्यक्ति ती गोष्ट त्याच्या ज्ञानाच्या व समजुतीच्या दृष्टीनें अज्ञान व म्हणून अपात्र समजली जाते. बाराव्या वर्षी मनुष्य राजनिष्ठेची शपथ घेण्यास पात्र समजण्यांत येतो. चौदाव्या वर्षी त्यास समजूत येते. या वयांत त्याला आपला पालक नेमून घेतां येतो किंवा मृत्युपत्राप्रमाणें व्यवस्था करतां येते. परंतु प्रत्यक्ष त्यास एकवीस वर्षांपर्यंत व्यवहार करतां येत नाहीं. एकवीस वर्षे पूर्ण झालीं म्हणजे त्यास जमीन, माल किंवा गुरें–ढोरें वगैरेंची खरेदी–विक्री करण्याची पात्रता येते. विवाहाकरितां मुलींच्या वयाची मर्यादा चौदा व मुलांची सोळा ठरविण्यांत आली आहे. परंतु या वयांतहि मुलांस पित्याची किंवा पालकाची संमति लागते. मुलीला १४ वर्षे पूर्ण झालीं म्हणजे तिला समजूं लागतें व ती आपला पालक निवडूं शकते व एकवीस वर्षे पूर्ण झाल्यावर ती पूर्णपणें स्वतंत्र बनते. एकवीस वर्षे पूर्ण होईपर्यंत व्यक्तीस मताधिकार नसतो. अज्ञान पाहा.

**साउदी अरबस्तान**—अरबस्तानांतील हें नवें राज्य इब्न साऊद (पाहा) याच्या आधिपत्याखालीं आहे. याचें क्षे. फ. ८,००,००० चौ. मै. आहे. यांत नेज्द आणि हेजाज हे दोन प्रांत येतात. त्यांची माहिती स्वतंत्र दिली आहे. पूर्वी या भागांत रस्ते चांगले नव्हते. हेजाज आगगाडीचा फांटा साउदी अरबस्तानांतून जातो. आतां ईजिप्तच्या सहकार्यानें जेद्दापासून मक्का–आराफत-पर्यंत चांगला खडीचा रस्ता केला आहे. मक्का येथें वीज आणि पाणी यांचीहि तरतूद केली आहे. अमेरिकन कंपन्यांनीं तेलाच्या खाणी काढल्याने संस्थानला उत्पन्न बरेंच मिळूं लागलें आहे. संयुक्त राष्ट्रसंघाचा सा. अरबस्तान एक प्रतिनिधि आहे.

**साउदे, रॉबर्ट** (१७७४–१८४३)—एक इंग्रज कवि, गद्य-लेखक आणि इतिहासकार. याचें शिक्षण ऑक्सफर्ड येथें झालें. त्याचा कोलेरिज याच्याबरोबर फार स्नेह जमून कोलेरिजच्या बायकोची बहीण एडीथ फ्रिकर हिच्याबरोबर त्यानें १७९५ सालीं विवाह केला. त्याने वाङ्मयलेखन हा धंदा पत्करला आणि प्रथम कांहीं वर्षे प्रवासांत घालवून १८०३ सालीं तो केसविक येथें जाऊन कायमचा राहिला. तो व कोलेरिज एकाच घरांत राहत असत. साउदेने सतत अतिशय अभ्यास व लेखन करून स्वतःचा निर्वाह केला, व कोलेरिजच्या कुटुंबालाहि मदत

केली. त्याचें ग्रंथलेखन पुष्कळच आहे. त्यांपैकीं मुख्य ग्रंथ आहेत ते—'जोन ऑफ आर्क', 'थालाबा', 'मॅडॉक', 'दि कर्स ऑफ केहामा (त्याच्या काव्यांपैकीं हें उत्तम काव्य आहे.), 'रॉडरिक', 'हिस्ट्री ऑफ ब्राझील,', 'लाइफ ऑफ नेल्सन', 'लाइफ ऑफ वेस्ले', 'ए व्हिजन ऑफ जजमेंट', 'हिस्ट्री ऑफ दि पेनिनशुलर वॉर' आणि 'दि डॉक्टर'. साउदे हा १८१३ सालीं 'पोएट लॉरिट' (राजकवि) झाला. त्याच्या कविता चांगल्या असून उपेक्षिल्या गेल्या आहेत. त्याचें गद्यलेखनहि उत्कृष्ट आहे. त्यानें लिहिलेलें सर्वांत उत्तम चरित्र नेल्सनचें मानलें जातें.

**सायमेन्स, सर विल्यम** (१८२३–१८८३)—एक इंग्रज संशोधक व इंजिनिअर. त्याचा जन्म हॅनोव्हर येथें झाला. परंतु १८४३ सालीं ब्रिटनमध्यें येऊन तेथें तो कायमचा रहिवासी झाला. त्यानें १८५६ सालीं 'रिजनरेटिव्ह फर्नेस' (पुनरुत्पादक भट्टी) या यंत्राचें पेटंट घेतलें. त्या भट्टीचा उपयोग कांहीं वर्षांनंतर पोलादाच्या कारखान्यांत करण्यांत येऊं लागला. या कामाकरितां सायमेन्स–मर्टिन ही फर्म स्थापन करण्यांत आली आणि त्या फर्मनें डायरेक्ट ॲटलांटिक केबल बसवण्याचें काम १८७४ सालीं केलें. तसेंच या कंपनीनें डायनॅमो आणि विजेचे दिवे यांचा उपयोग व प्रसार करण्याच्या कामीं प्रमुख भाग घेतला.

**सांकशी**—मुंबई, कुलाबा जिल्हा, पेणच्या ईशान्येस ५ मैलांवर निदिवली नांवाच्या खेड्यांत हा किल्ला आहे. यास बद्रुदिन किंवा दर्ग्याचा किल्ला म्हणतात. वाटेंत गाजीशहा नांवाच्या मुसलमानाची कबर आहे. वाटेंत आठ पाण्याच्या टांकीं लागतात. एका टांक्याजवळ वज्राई किंवा जगमाता हिची मूर्ति बसवलेली आहे. ही सांक या राजाची कन्या असून त्यानें हा किल्ला बांधला असें सांगतात. एक चोरटांक नांवाची गुहा असून तींतून चोरवाट आहे, असें सांगतात. सन १५४० मध्यें या किल्ल्या-बद्दल अहमदनगरचा निझामशहा व पोर्तुगीज यांच्यामध्यें बराच संघर्ष झाला, पण पुढें पोर्तुगीजांनीं सांकशी व कर्नाळा हे किल्ले १७,५०० रुपयांत विकत घेतले. पेणच्यापूर्वी येथें तालुक्याचें ठाणें होतें. १८२७ मध्यें येथें इंग्रज व रामोशी यांमध्यें तंटा झाला होता.

**सॉक्रेटीस** (इ. स. पू. ४६९–३९९)—विख्यात ग्रीक तत्त्वज्ञानी. त्याचा बाप शिल्पकार होता व सॉक्रेटिसानेंहि कांहीं काळ हा धंदा केला. तो कांहीं वर्षें सैन्यांत नोकरीस असून लढायांतून त्यानें भागहि घेतला होता. पण नंतर 'आंतल्या आवाजा'चें कारण देऊन तो सरकारी कामांतून निवृत्त झाला. मात्र समाजांत मोकळेपणानें हिंडून–फिरून लोकांना कित-पत खरें ज्ञान आहे याची तो निर्भीडपणें परीक्षा करी. त्याची तपासणी–उलट तपासणी यांपुढें पुष्कळांचें ढोंग व अज्ञान बाहेर पडे. त्यामुळें त्याचे पुष्कळ शत्रू झाले; पण तसेंच प्लेटो, झेनोफोन, युक्लिड, अँटिस्थिनीज, इ. सारखे विद्वान् मित्रहि लाभले. सॉक्रे-टिसानें कांहींहि लिहिलें नाहीं किंवा एखादी शाळा उघडली नाहीं; नीतिशास्त्राची एखादी औपचारिक पद्धत सुरू केली नाहीं, किंवा तर्कशास्त्राची बुद्धिनिर्णित पद्धत पुढें आणली नाहीं. पण या शास्त्रांचा अभ्यास करण्यास त्यानें इतर तत्त्वज्ञान्यांना शिकविलें, हें मात्र खोटें नाहीं. प्लेटो आणि ॲरिस्टॉटल यांच्या संप्रदायांच्या मार्गें सॉक्रेटिसाचीच ही शिकवण आहे असें आढळून येईल.

त्याच्या शत्रूंनीं त्याच्यावर अनेक आरोप केले. तो नास्तिक-वादी पाखंडी आहे व तरुणांना आपल्या शिकविण्यानें बिघडवितो, अशा तऱ्हेचे त्याच्यावर आरोप न्यायालयांत चौकशीस आले. तेथें सॉक्रेटिसानें आपली कैफियत फार धीटपणानें व स्पष्ट पुढें मांडली (ती प्लेटोनें जशीच्या तशी प्रसिद्ध केली आहे—'दि अपॉलॉजी ऑफ सॉक्रेटीस'). नागरिक पंचांनीं बहुमतानें त्याला दोषी ठर-वून देहान्त शिक्षा सांगितली. सॉक्रेटिसानें पळून जाऊन शिक्षा चुकवावी असा त्याच्या मित्रांनीं प्रयत्नहि केला; पण सॉक्रे-टिसानें तें न मानतां शांतपणानें विषाचा पेला तोंडास लाविला. त्याच्या या मृत्युकालची हकीकत प्लेटोनें 'फीडो' प्रकरणांत दिली आहे. प्लेटोचे 'संवाद' आणि झेनोफोनची 'स्मरणी' यांवरूनच कायतीं सॉक्रेटीसचीं मतें कळतात. त्यानें आपलीं मतें स्वतःच्या आचरणांत उतरविलीं असल्यानें त्याची लोकांवर छाप पडे. सद्वर्तन आणि सदसद्विवेक यांचा तो आदर्श असे. त्यामुळें आध्यात्मिक आणि बौद्धिक क्षेत्रांत जगांत त्याला अग्रस्थान लाभलें आहे.

**साखर**—वनस्पतींपासून तयार होणाऱ्या एक प्रकारच्या गोड पदार्थास साखर असें म्हणतात. रसायनशास्त्रदृष्ट्या या सर्व पदार्थांची घटना एक असून त्यांस कर्बोदितें (कार्बोहायड्रेट्स) म्हणतात. यामध्यें पाण्याच्या प्रमाणांत उज्ज व प्राण हे वायु संयुक्त झालेले असतात. साखरेचे मुख्यतः दोन वर्ग पडतात: एका वर्गास एकशर्करा (मोनो सॅकरोसिस) व दुसऱ्यास द्विशर्करा (डायसॅकरोसिस) वर्ग असें म्हणतात. द्राक्ष शर्करा (ग्लुकोज), फलशर्करा (लॅव्ह्युलोज), वगैरे शर्करा पहिल्या वर्गांत मोडतात. आणि इक्षुशर्करा (सुक्रोज), धान्य शर्करा (माल्टोज) व दुग्ध-शर्करा (लॅक्टोज) या दुसऱ्या वर्गांत मोडतात. सामान्यतः साखर हा शब्द उंसाच्या साखरेस लावण्यांत येतो. ही साखर उंसाप्रमाणेंच बीट रूट, माल्ट, संत्रम यांसारख्या दोहांपासून मिळते. परंतु बहुतेक साखर ऊंस व बीट यांपासून काढण्यांत येते. ऊंस हा प्रथमतः हिंदुस्थानांत तयार होत असे. आ. तो युरोपमध्यें अलेक्झांडर दि ग्रेट यानें नेला. [illegible]

याची लागवड पश्चिमेकडील हिंदी द्वीपसमूहांत करण्यांत आली. सध्यां हा सर्व उष्ण प्रदेशांत व त्याजवळच्या प्रदेशांत होतो.

उंसाचा प्रथम रस काढण्यांत येतो. नंतर त्या रसावर तो कुजूं किंवा फसफसूं नये म्हणून गंधक द्विप्राणिद वायूची (सल्फर डाया-क्साइड गॅस) क्रिया करण्यांत येते. नंतर तो उकळून त्याची काकवी तयार करण्यांत येते. नंतर त्यावरची साय काढून घेण्यांत येऊन तो घट्ट होऊन त्याचे स्फटिक बनेपर्यंत तो आटविण्यात येतो. या घट्ट झालेल्या रसास गूळ म्हणतात व त्यापासून राब (मोलॅसिस) वेगळा काढण्यांत येऊन गुळाचे खडे विकण्यांत येतात किंवा अधिक शुद्ध करून त्याची साखर बनविण्यांत येते.

बीटची साखर बनविण्याकरितां बीटचीं मुळें धुऊन त्यांचे यंत्रानें पातळ काप करण्यांत येतात. हे काप एका वर्तुळाकार रचना असलेल्या बंद भांड्यांच्या माळेंत घालण्यांत येतात. एका माळेंत किंवा चक्रांत घेरांत दहा ते सोळा भांडीं असतात. नंतर त्यांतून ६० ते ७० सेंटिग्रेडपर्यंत उष्णता असलेलें पाणी खेळविलें जातें. या पाण्यांत साखरेचा अंश प्रत्येक भांड्यांतून ते जसजसें एकामागून एकांत जातें तसा नव्या कापापासून अधिकाधिक मिसळत जातो. जसजसा हा अंश क्रमाक्रमानें एकेका भांड्यांतील कमी कमी होत जातो तसें तसें एकेक भांडें पुन्हां नव्या कापांनीं भरलें जातें. दुसऱ्या एका पद्धतींत बीट मुळाचे तुकडे एका पंचपात्रांतून हळू-हळू दाबून दुसऱ्या बाजूला ऊष्ण पाण्यांत नेऊन टाकण्यांत येतात. म्हणजे भांड्यांच्या चक्राचें काम पडत नाहीं. साखरेचा अंश काढलेले काप गुरांस खावयास घालतात. या दाबून काढलेल्या किंवा पाण्यांत मिसळलेल्या रसांत साखरेशिवाय कांहीं लवणें, रंग-द्रव्ये, चिकट पदार्थ व इतर अशुद्ध पदार्थ असतात. त्यामुळें त्याचे स्फटिक बनत नाहींत. याकरितां निरनिराळ्या पद्धतींनीं हे सर्व पदार्थ काढून टाकण्यांत येतात. नंतर हा रस गाळून त्यांतील माती वगैरेचा अंश काढून टाकण्यांत येतो. नंतर तो आटवून त्याची साखर बनविण्यांत येते.

गुळापासून किंवा काकवीपासून शुद्ध करून साखर बन-विण्याच्या दोन पद्धती आहेत. एका पद्धतींत काकवीवर शुद्ध साखरेचें द्रावण घालतात. या द्रावणामुळें त्यास लागून असलेल्या काकवींतील साखर द्रवरूप होऊन (विरघळून) तिचे स्फटिक बनतात. ते एका केन्द्रापसारी यंत्रांत घालून वेगळे काढण्यांत येतात व सुकविण्यांत येतात.

दुसऱ्या पद्धतीमध्यें गूळ किंवा कच्ची साखर गरम पाण्यांत विरघळविण्यांत येते. नंतर हें पाणी आंतील घाण काढण्याकरितां गाळून घेण्यांत येतें. नंतर तें वाफेनें उष्ण केलेल्या व हाडांच्या कोळशानें भरलेल्या लोखंडाच्या पंचपात्रांतून आरपार नेण्यांत येतें. या ठिकाणीं तें अगदीं शुभ्र होतें. हें शुद्ध पाणी नंतर वाफेनें उष्ण केलेल्या निर्वात पात्रांत ८२° शतमान उष्णमानांत आटविण्यांत येतें, म्हणजे त्याचे स्फटिक बनतात. स्फटिक बनून राहिलेला अंश केन्द्रापसारी यंत्रांतून बाहेर काढण्यांत येतो. आंत राहिलेली साखर पाण्याच्या फवाऱ्यानें धुऊन काढण्यांत येते. अखेरीस ही वाळवून बारदानांत भरण्यांत येते.

राहिलेला एक पाक पुन्हां आटवून त्यापासून कमी दर्जाची साखर तयार करण्यांत येते.

हिंदुस्थानला पिढ्यान् पिढ्या साखर परदेशांतून आयात करावी लागे. परदेशांतून आपल्याला लागणाऱ्या साखरेची किंमत वर्षाला थोडीथोडकी नव्हे तर जवळजवळ पंधरा कोटी रुपये द्यावे लागत असे. परंतु साखरेच्या धंद्याला १९३२ सालापासून सरकारी संरक्षण दिलें गेलें. त्यामुळें हिंदुस्थान स्वयंसिद्ध बनला आणि जास्तींत जास्त साखरेचें उत्पादन करणाऱ्या देशांत मोडूं लागला. साखर आणि गूळ यांचें उत्पादन एकत्रितपणें जर विचारांत घेतले तर या उत्पादनाबाबतींत हिंदुस्थानशीं इतर कोणी देश बहुधा बरोबरी करूं शकणार नाहीं. जगांतील एकूण राष्ट्रांपैकीं, फक्त क्युबाचें साखर-उत्पादन १९४५-४६ सालीं ४४,५०,००० टनांच्या आसपास होतें. गूळ जमेस न धरतां, केवळ साखर-उत्पादनाच्या दृष्टीनें पाहिल्यास हिंदुस्थानचा क्रम पांचवा लागेल. पहिले चार अनुक्रमें क्यूबा, ब्राझील, रशिया व अमेरिका हे होत.

१९३२ सालीं साखरेच्या धंद्याला संरक्षण देण्यापूर्वी हिंदुस्थान-मध्यें बत्तीस कारखाने होते आणि उत्पादन ४,७८,१२० टन होत होतें. पण १९४४-४५ सालीं हिंदुस्थानांत (पाकिस्तान-सह) दीडशें कारखाने झाले व त्यांतून सुमारें ९०,००० कामगार काम करीत होते. साखरेच्या धंद्याला संरक्षण मिळण्यापूर्वी साखरेचें उत्पादन (गुळासकट) साधारणपणें जगांतल्या साखरेच्या उत्पा-दनापैकीं अवघें पंधरा टक्के होत होतें. पण १९४५-४६ सालांत हेंच प्रमाण साधारणपणें २३ टक्केपर्यंत गेलें. याप्रमाणे हिंदुस्थानें हा देश जरी साखरेच्या (गुळासह) उत्पादनाच्या बाबतींत जगांत पहिल्या प्रतीचा देश ठरूं शकला तरी पण दर माणशीं लागणाऱ्या साखरेचें प्रमाण मात्र अत्यंत कमी आहे.

हिंदुस्थानची विशेषतः महाराष्ट्राची व मद्रासची जमीन भौगो-लिक दृष्ट्या उंसाच्या लागवडीस अतिशय लायक आहे. मद्रास व मुंबई यांकडील उंस तर उंची दर्जाचा असतोच. पण मुंबई इला-ख्याच्या उंसांत असलेल्या साखरेचें प्रमाण सबंध देशांत अधिक आहे.

हिंदुस्थानच्या एकंदर १६६ साखर-कारखान्यांपैकीं १३३ कारखाने प्रामुख्यानें बिहार व संयुक्त प्रांत यात निघाले आहेत. या

दोन प्रांतांत उंसाची निपज स्वल्प खर्चात होते. पण तेथें उंसाची दर एकरीं निपज कमी असते. मुंबई इलाख्यांत दर एकरीं गुळाची निपज अनुक्रमें ५,७०० रत्तल असूं शकते तर बिहार व संयुक्त प्रांत यांत अनुक्रमें ती २,३०० व २,५०० रत्तलांपेक्षां अधिक निघूं शकत नाहीं. बिहार व संयुक्त प्रांतांत हवी तेवढी मोठी व लांबलचक जमीन ऊंस-लागवडीसाठीं मिळूं शकते. तेव्हां साहजिकच साखर-कारखान्यांची संख्या वाढली आहे.

सर्व हिंदुस्थानांत उंसाचें एकरीं जास्त उत्पन्न व प्रत्येक टनामागें साखरेचा उतारा या दोन्ही बाबतींत महाराष्ट्रांतील साखर-कारखान्यांचा पहिला क्रम लागतो. सर व्यंकट रामन् यांनीं उंसावर प्रयोग करून उतारा वाढविण्याच्या दृष्टीनें जी प्रगति घडवून आणली त्या संशोधनाचा जास्तींत जास्त उपयोग महाराष्ट्रांतील साखर-कारखान्यांनीं करून घेतला. 'डेक्कन शुगर टेक्नॉलॉजिस्ट्स् असोसिएशन' नांवाची महाराष्ट्रांतील कारखानदारांची स्वतःचीच एक संस्था दोन-तीन वर्षांपूर्वीच निघाली असून उंसाच्या व अवपिकाच्या चढाओढी जाहीर करून स्वतंत्रपणें वरील प्रकारें उद्योग करण्यास उत्तेजन देत आहे.

'लिफ्ट एरिगेशन' (उचालित जलसिंचन) पद्धतीच्या पाण्यावर ऊंस पिकवून साखर तयार करणारी कोल्हापूर शुगर मिल्स ही महाराष्ट्रांतील एकमेव साखर-गिरणी होय.

साखरेच्या धंद्यापासून आपाततः उत्पन्न होणारे काकवी (मोलॅसस) व चिपाडें यांपासून आर्थिक दृष्ट्या फलदायी असे काय काय जोडधंदे करतां येतील याबद्दल सध्यां प्रयोग चालू असून, काकवीपासून पॉवर अल्कोहोल, स्पिरिट व चिपाडींपासून पुठे वगैरे करण्याची योजना कांहीं कांहीं कारखान्यांत सुरुहि झाली आहे.

### महाराष्ट्रांतील प्रमुख साखर-कारखाने

(१) सासवड माळी शुगर फॅक्टरी, लि.,
माळीनगर, अकलूज, जिल्हा सोलापूर.

(२) बृहन् महाराष्ट्र शुगर सिंडिकेट, लि.,
श्रीपूर, जिल्हा सोलापूर.

(३) वालचंद नगर इंडस्ट्रीज्, लि.,
वालचंदनगर, जिल्हा पुणें.

(४) दि रावळगांव शुगर फार्म, लि.,
रावळगांव, जिल्हा नाशिक.

(५) दि बेलापूर कं. लि.,
हरिगांव, जिल्हा अहमदनगर.

(६) दि महाराष्ट्र शुगर मिल्स, लि.,
टिळकनगर, जिल्हा अहमदनगर.



(७) बेलवंडी शुगर मिल्स,
बेलवंडी, जिल्हा अहमदनगर.

(८) गोदावरी शुगर मिल्स, लि.,
साखरवाडी, अहमदनगर.

(९) श्री चांगदेव शुगर मिल्स, लि.,
पुणतांबें, जिल्हा अहमदनगर.

(१०) दि कोल्हापूर शुगर मिल्स, लि.,
कोल्हापूर.

(११) दि फलटण शुगर वर्क्स, लि.,
साखरवाडी, फलटण संस्थान.

(१२) कृष्णा शुगर मिल्स, लि.,
किचूर, मिरज (थोरली पाती).

(१३) दि उगार शुगर वर्क्स, लि.,
उगार खुर्द, सांगली.

**साखालिन**—हें बेट उत्तर पॅसिफिक महासागरांत सायबेरिया देशाच्या किनाऱ्यालगत आहे. या बेटाचा उत्तर भाग रशियाच्या मालकीचा आहे. दक्षिण भाग म्हणजे ५०° उत्तर अक्षांशाच्या दक्षिणेकडील प्रदेश जपानच्या मालकीचा असून त्याला काराफूटो म्हणतात. रशियन साखालीनचें क्षे. फ. १५,००० चौ. मैल आणि लो. सं. १४,००० असून ती हळूहळू कमी होत आहे. काराफूटोचें क्षे. फ. १३,९३५ चौ. मैल आणि लो. सं. (१९३८) ३,३९,३५७ असून तींपैकीं बहुतेक लोक जपानी आहेत. येथें पर्वतांच्या रांगा तीन आहेत आणि मध्यभाग सपाट आहे. येथली हवा अत्यंत थंड असून, स्कर्व्ही व मलेरिया या दोन रोगांच्या सांथी येथें कायमच्या आहेत. अलेक्सांड्रोव्हस्क हें शहर रशियन कारभाराचें केंद्र असून टोयोहारा हें शहर जपानी प्रदेशाची राजधानी आहे. ओटोमारी हें 'ट्रीटी पोर्ट' (तह-बंदर) आहे आणि दुसरें बंदर माऊका हें आहे. या बेटांत सर्वत्र दाट जंगल आहे. येथें मच्छीमारीचा धंदा आहे. या बेटाच्या दोन्ही भागांत दगडी कोळसा सांपडतो.

**सांख्य दर्शन**—सांख्य दर्शनाचा प्रवर्तक कपिल मुनि आहे. सांख्य दर्शनाचा उगम दुःखवादांत झाला आहे. संसार दुःखमय आहे. पुरुषार्थद्वारां दुःखाचें निरसन होतें आणि ज्ञान हा परम पुरुषार्थ असून त्यामुळेंच मुक्ति प्राप्त होते (ज्ञानान्मुक्तिः-सांख्य सू. ३–२३). सांख्यांच्या मतें ईश्वर असिद्ध आहे. म्हणजे ईश्वराचें अस्तित्व ते मानीत नाहींत (ईश्वरासिद्धेः—सां. सू. १.९२). कपिल मुनींनीं प्रकृति आणि पुरुष असे दोन नित्य पदार्थ असल्याचें सांगितलें आहे. प्रकृति अचेतन अर्थात् जड आहे. तिच्यांत विकार उत्पन्न झाल्यामुळेंच चराचराची उत्पत्ति झाली आहे. म्हणून प्रकृतीच आदिकारण आहे. (हिं. प. दी.)

**साग**—[ वर्ग-व्हर्बिनासी. टेक्टोना ग्रँडिस ]. हें झाड हिंदुस्थान, सिलोन, ब्रह्मदेश व मोलक्का यांमध्यें आढळतें. हें बरेंच मोठें वाढतें. याचीं पानें फार मोठीं असतात. याचें लांकूड चळकट व टिकाऊ असतें. हें फारसें आकसत नाहीं. याचा उपयोग घरें आणि गलबतें बांधण्याच्या कामीं फार करण्यांत येतो.

हा वृक्ष मूळचा हिंदुस्थानांतील आहे व मलबार त्यासाठीं प्रसिद्ध आहे. सागाचें लांकूड हेंच सर्वत्र मुख्य इमारती लांकूड असून मुख्यतः त्याचीच हिंदुस्थानांतून सर्व देशांत निर्गत होते. सागाचीं मोठमोठीं जंगलें मध्यप्रांत, उत्तर कर्नाटक, वायनाड, अन्नमलै डोंगर व त्रावणकोर येथे आहेत. याशिवाय मुंबई, कर्नूळ आणि कडाप्पामधील नलमलै डोंगर, दक्षिण अर्काट व म्हैसूर आणि हिंदुस्थानच्या दुसऱ्याहि भागांत सागाचीं झाडें आढळतात. सागाच्या लांकडाची विशेष मातबरी असण्याला त्याचा टिकाऊपणा कारण आहे. या टिकाऊपणाचें कारण म्हणजे लांकडाच्या रंध्रांत असणारें एक राळेसारखें पातळ द्रव्य होय. त्यायोगानें लांकडावर पाण्याचा परिणाम होत नाहीं. कार्ल्यांच्या प्रसिद्ध लेण्यांतील छत सागाच्या लांकडाचें असून तें कमींत कमी २००० वर्षांचें जुनें आहे. सागाच्या लांकडाचें वजन दर घनफुटास २२½ शेर म्हणजे अर्ध्या मणापेक्षां जास्त असतें. अंगच्या तेलामुळें त्यांत पाणी जाण्याची भीति नसते व त्याच तेलामुळें लांकूड खाणाऱ्या कीटकांपासून त्याचें संरक्षण होतें. याचा विशेष गुण म्हणजे याजमध्यें ठोकलेलें लोखंड गंजत नाहीं. जहाजांचे मजले (डेक) बांधण्याकरितां आणि आगगाड्यांचे डबे, घरगुती सुतारसामान, वगैरे तयार करण्याकरितां सागाचें पुष्कळ लांकूड परदेशीं जातें. सागावर खोदकाम फारच सहज व सुंदर होतें.

हें झाड औषधीहि आहे. मूतखड्यावर बीं उगाळून देतात. सर्पदंशावर मूळ उगाळून पोटांत देतात.

**सागर, रामानंद** (१९१७-          )—एक हिंदी साहित्यिक. यांचें शिक्षण लाहोर आणि श्रीनगर या ठिकाणीं झालें. लहानपणींच त्यांना हालअपेष्टा काढून कसेबसें शिक्षण करावें लागलें. ते अनेक भाषा शिकले. नंतर अनेक प्रकारच्या हलक्या नोकऱ्या त्यांनीं केल्या. नंतर ते संपादक, नट व चित्रपट-दिग्दर्शक या योग्यतेस चढले. त्यांनीं जीवनांतील अनेक अंगांचा प्रत्यक्ष अनुभव घेतला आहे. १९४० सालीं ते क्षयरोगानें पछाडले गेले व रुग्णालयांत असतांना 'एका क्षयी माणसाची डायरी' त्यांनीं लिहिली. त्यामुळें बरें झाल्यावर उत्कृष्ट लेखक म्हणून प्रसिद्धि पावले. १९४२ सालीं 'ज्वारभाटा' हा त्यांचा पहिला लेखसंग्रह निघाला. 'और इन्सान मर गया' ही त्यांची पहिली कादंबरी पंजाबच्या फाळणीनंतर झालेल्या हत्याकांडावर आहे. हिचें मराठींत भाषांतर झालें आहे (१९५०). त्यांची 'बरसात' ही चित्रपटकथा लोकप्रिय झाली आहे.

**सागरगड**—मुंबईच्या दक्षिणेस १९ मैल, अलीबागच्या पूर्वेस सहा मैल व धरमतरीच्या पश्चिमेस ६ मैल या ठिकाणीं १,३५७ फूट उंच टेकडीवर हा किल्ला बांधलेला आहे. किल्ल्याची बाहेरची भिंत व आंतील भिंत यांत २३० यार्ड अंतर आहे. बालेकिल्ला २४० फूट लांब व १२० फूट रुंद आहे. येथें कांहीं शिकारहि मिळते. १७१३ मध्यें शाहूमहाराजांनीं हा आंग्र्यास दिला. १७४० त हा संभाजी आंग्र्यानें घेतला. येथें वानरटोक म्हणून एक जागा आहे तेथून कडेलोट करीत असत.

**सागरगोटा**—गजगा, गजरा. हें काटेरी झाड आहे. लहान शेंगा येतात, त्यांत सागरगोटे असतात. हे सागरगोटे मुली खेळण्यास घेतात. सागरगोटा भाजून पोटदुखी, ज्वर व वायगोळा यांवर देतात. उपदंशावर पाल्याचा रस तुपांत देतात.

**सागरभूमि संपादन**—(रिक्लेमेशन). समुद्रांत गेलेली जमीन परत मिळविणें व समुद्रापासून आहे त्या किनाऱ्यावरील जमिनीचें रक्षण करणें या दोन गोष्टी यांत येतात. समुद्राच्या किनाऱ्याजवळील उथळ जागेंत बंधारे घालून समुद्रापासून जमीन मिळवितात. समुद्रकिनारा जो सारखा धुपत असतो व जमीन पाण्यांत जात असते त्याला आडकाठी म्हणून दगडी व लांकडी बंधारे बांधतात. युरोपच्या किनाऱ्यावरील बरीच जमीन समुद्रापासून घेतलेली आढळेल. हॉलंड देशाचें मोठें उदाहरण आहे. मुंबईस बॅकबेची जमीन अशीच मोठा खर्च करून मिळविली.

**सागरस्वातंत्र्य**—(फ्रीडम ऑफ सीज). समुद्रावर किनाऱ्यापासून तीन मैल (किंवा चार मैल) पर्यंत सत्ता शेजारच्या देशाची असावी, हें तत्त्व आतां सर्व राष्ट्रांना मान्य झालें आहे. त्या मर्यादेपलीकडील समुद्रावर उपयोग शांततेच्या काळांत कोणत्याहि राष्ट्रानें करावा, असा संकेत वरील तत्त्वानुसार प्रस्थापित झाला आहे. त्यामुळें 'सागरस्वातंत्र्य' या प्रश्नाला महत्त्व युद्धकाळांत प्राप्त होतें, कारण युद्ध चालू असतांना युध्यमान देश आपल्या सरहद्दीवर समुद्रांत शत्रूला येण्याला प्रतिबंध करतोच व शिवाय तटस्थ राष्ट्रांनाहि कांहीं विशिष्ट हेतूंनीं प्रतिबंध करतो. कोणत्याहि युध्यमान देशानें शत्रूच्या लढाऊ बोटी, प्रवासी बोटी व मालाच्या बोटी आपल्या देशानजीकच्या समुद्रांत आल्या त्या नष्ट कराव्या किंवा पकडून ताब्यांत घ्याव्या, ही आंतरराष्ट्रीय रूढिच पडली आहे. पण तटस्थ राष्ट्रांच्या बोटींची झडती घेण्याचा, शत्रूला उपयोगी पडण्यासारखा युद्धोपयोगी माल सरकारजमा करण्याचा, शत्रुपक्षाला मदत करीत आहेत अशा बोटीसुद्धां सरकारजमा करण्याचा हक्क युध्यमान राष्ट्रांना असावा असें युध्यमान राष्ट्रांचें म्हणणें आहे. मात्र तटस्थ देशाच्या बोटींवरील खलाशी व प्रवासी

यांच्या जीवाला धोका नसावा हें तत्त्व युध्यमान राष्ट्रांनाहि मान्य आहे. ग्रेट ब्रिटनची समुद्रावरील सत्ता फार मोठी असल्यामुळें वरील तत्त्वांना कायद्याची मान्यता मिळावी असा आग्रह ग्रेट ब्रिटननें वेळोवेळीं धरलेला आहे. व त्यामुळें कांहीं तटस्थ राष्ट्रें ग्रेट ब्रिटनचीं शत्रु बनलीं आहेत. याच कारणांवरून १७८० सालीं रशिया, डेन्मार्क, स्वीडन, प्रशिया व ऑस्ट्रिया या राष्ट्रांनीं ग्रेट ब्रिटनला विरोध केला. पुढें इंग्लंड व फ्रान्स यांचें युद्ध चालू असतांना १८०० सालीं पुन्हां या प्रश्नाला महत्त्व येऊन रशिया, स्वीडन, डेन्मार्क व प्रशिया यांनीं ग्रेट ब्रिटनकडे सागरस्वातंत्र्याची मागणी केली. १९ व्या शतकांत तटस्थ राष्ट्रांच्या बोटींची झडती घेण्याचा आणि मनाई केलेला माल जप्त करण्याचा हक्क आंतरराष्ट्रीय कायद्यानें मान्य केला. १९१४ ते १९१८ सालच्या पहिल्या महायुद्धांत जर्मनांनीं सागरस्वातंत्र्याची पुन्हां जोरानें मागणी केली. परंतु वरील तत्त्वाविरुद्ध खुद्द जर्मनींनेंच वर्तन केलें. आणि शत्रूच्या व्यापारी बोटी त्यावरील खलाशांच्या व प्रवाशांच्या संरक्षणाची तजवीज न करतां नष्ट केल्या आणि कित्येक तटस्थ राष्ट्रांच्या बोटींवरहि हल्ले केले. नंतर राष्ट्रसंघानें या बाबतींत कांहीं नियम ठरविले. पण दुसऱ्या महायुद्धांत या नियमांचा विशेष उपयोग झाला नाहीं.

**सांगली संस्थान**—मुंबई इलाखा, दक्षिण महाराष्ट्रांतील एक संस्थान. सांगली संस्थानांत सहा तालुके असून मुंबई इलाख्याच्या चार जिल्ह्यांत उत्तरेस भीमेपासून दक्षिणेस तुंगभद्रेपर्यंत तें पसरलेलें होतें. संस्थानचें एकंदर क्षे. फ. ११३६ चौ. मैल असून लो. सं. (१९४१) २,९३,४९८ होती. सरासरी वार्षिक उत्पन्न १९ लाख रुपये असे. संस्थान इंग्रज सरकारला वार्षिक खंडणी १,३५,००० रुपये देई. सांगली स्टेट रेल्वे झाल्यापासून स्थायिक व्यापारांत बरीच सुधारणा झाली. सांगली येथील तांब्या-पितळेचीं भांडीं फार प्रसिद्ध आहेत. तेथील सोन्या-चांदीचे दागिने व इतर वस्तुहि प्रख्यात आहेत. तेरदळ व हनगंडी येथें घरगुती कामाकरितां लागणारीं तांब्या-पितळेचीं मोठीं भांडीं होतात. शिरहट्टी व त्याच्या आजूबाजूच्या गांवांत देशी कांबळीं विणतात. कवठे-महांकाळ येथें बुरणूस व गालिचे होतात. शहापूर तालुक्यांत मरिहळ व बाळेकुंद्री, आणि शिरहट्टी तालुक्यांत बण्णिकोप येथें कांचेच्या बांगड्यांचे लहान कारखाने आहेत व शिरहट्टी तालुक्यांत बेळहट्टी येथें मऊ दगडांच्या निरनिराळ्या वस्तू तयार करतात.

या पटवर्धन घराण्याची मागील माहिती मिरज संस्थानच्या इतिहासांत सांपडेल. त्यांतील चिंतामणराव हाच सांगलीचा संस्थापक होय. चिंतामणरावाच्या कारकीर्दीतील पहिली महत्त्वाची गोष्ट म्हणजे मराठे, निजाम व इंग्रज या तिघांनीं मिळून टिपूवर केलेली मोहीम ही होय. खर्ड्याची लढाई (१७९५) ही चिंतामणरावाच्या कारकीर्दीतील दुसरी महत्त्वाची गोष्ट होय. धोंडजी वाघाचा पुरा मोड करण्याच्या कामीं पेशवे व इंग्रज यांस चिंतामणरावानें पुढेंहि अप्रत्यक्षपणें फार मदत केली. पटवर्धन घराण्यांत अंतःकलह सुरू होऊन अखेर सांगली व मिरज हीं संस्थानें निराळीं झालीं. दुसरा बाजीराव व पटवर्धन घराणें यांच्यामध्यें सख्य नव्हतें. इंग्रजांच्या मध्यस्थीमुळेंच १८१२ सालीं पंढरपूर येथें पेशवे व पटवर्धन यांच्या दरम्यान तह झाला. पेशवाई बुडून माउंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन हा मुंबईचा गव्हर्नर झाल्यावर चिंतामणरावानें त्याचा स्नेह संपादन केला होता. सर्व गव्हर्नरांशींहि चिंतामणरावाचें असेंच सख्य होतें. ब्रिटिशांच्या छत्राखालीं चिंतामणरावानें सांगली संस्थानचा कारभार स. १८१८ पासून १८५१ पर्यंत चालविला. तो उत्साही, मोकळ्या मनाचा व अत्यंत निःपक्षपाती असून क्षात्रवृत्तीच्या राजाच्या अंगीं लागणारे सर्व गुण त्याजमध्यें वसत होते. खाणी खोदण्याच्या धंद्याकडे त्याचें विशेष लक्ष असे; विशेषतः कलमगड डोंगरांतील सोन्याच्या खाणी खणण्याला त्यानें बरेंच उत्तेजन दिलें. रेशमाचा धंदा संस्थानांत सुरू करण्याचा त्यानें यशस्वी प्रयत्न केला. ठग लोकांचा नायनाट करण्यांत इंग्रजांस मदत केली. त्याच्याच आश्रयाखालीं प्रसिद्ध मूर्तिकार भिवा सुनार यानें सांगली येथील गणपतीची सुंदर संगमरवरी मूर्ति तयार केली. चिंतामणरावाचा दत्तक मुलगा जो विनायकराव याचा पणतू विनायकराव भाऊसाहेब यांस चिंतामणराव आप्पासाहेब असें नांव देऊन १९१० सालीं राज्यकारभाराचीं सर्व सूत्रें यथाविधि त्यांच्या हवालीं केलीं. हेच हल्लीं सांगलीचे संस्थानिक आहेत. आतां हें संस्थान दक्षिण महाराष्ट्रांतील इतर संस्थानांबरोबर मुंबई राज्यांत समाविष्ट झालें आहे व सांगली संस्थानचा मुख्य दक्षिण सातारा या नव्या जिल्ह्यांत मोडतो.

संस्थानांत चार मुलांचीं व एक मुलींचें हायस्कूल आहे. प्रौढ बायकांसाठीं एक शिक्षण-संस्था आहे. सांगली शहरापासून जवळच एक आर्ट्स कॉलेज व एक इंजिनियरिंग कॉलेज आहे. संस्थानांत ९७ सहकारी संस्था व ४ सहकारी पेढ्या आहेत. एक मोठी कापडाची गिरणी आहे.

सांगली शहर दक्षिण महाराष्ट्रांत कोल्हापूरच्या खालोखाल व्यापार आणि शिक्षण यांसाठीं प्रसिद्ध आहे. गांव कृष्णेच्या कांठीं आहे. स्टेशनाजवळ नवीन वस्ती बरीच झाली आहे. सरकारी हायस्कूल, बँक, वाचनालय, गणपतीचें देऊळ, राजवाडा, इ. चांगल्या इमारती आहेत. लो. सं. सुमारें ४०,०

**सांगलीचा किल्ला**—जुनें सांगली शहर व खण यांच्यामध्यें हा किल्ला आहे. हा अष्टकोनाकृति असून यास वाटोळे बुरूज आहेत व भोंवतीं खंदक आहे. तट १७ फूट उंच व १५ फूट रुंद आहे. भोंवती रेखणी म्हणून भिंत होती. तिचा आतां मागमूस नाहीं. १८५० मध्यें हा किल्ला पाडून टाकण्यांत आला. आंत दिवाणखाना म्हणून एक भव्य इमारत आहे. तींत सांगलीकर राहत असत व खजिना वगैरे तेथेंच असे.

**सागा**—ही पाश्चात्य वाङ्मयाची एक शाखा असून या प्रकारचें वाङ्मय आइसलंड या बेटांत निर्माण झालें. सागा याचा शब्दार्थ 'सांगणें' असा आहे. सागाचें स्वरूप गद्य महाकाव्य किंवा ऐतिहासिक कादंबरी अशा प्रकारचें आहे. वाङ्मयदृष्ट्या फार मोठ्या दर्जाचे सागा ग्रंथ ११ व्या व १२ शतकांत लिहिले गेले. या ग्रंथाचे दोन प्रकार 'सागाज् ऑफ आइसलंडर्स' आणि 'सागाज् ऑफ किंग्ज' असे असून, पहिल्या प्रकारच्या वाङ्मयांत सुप्रसिद्ध आइसलंडर इसमांचीं चरित्रें, आणि दुसऱ्या प्रकारांत नॉर्वेजियन राजांचीं चरित्रें दिलेलीं आहेत. यांपैकीं 'एजिल्स-सागा' हा सर्वोत्कृष्ट ग्रंथ असून त्यांत एजिल व त्याचें कुटुंब यांची हकीगत दिली आहे. यांची भाषा साधी पण उच्च दर्जाची आहे. 'नजल्स-सागा' हा ग्रंथ जगांत अतिशय लोकप्रिय असून त्यांत एका स्त्रीचा द्वेष यावर सर्व कथानक लिहिलेलें आहे व त्या सागांतील नजल व गनर हीं पात्रें सर्वोत्कृष्ट आहेत. 'व्होल्सुंगा-सागा' ही ऐतिहासिक कादंबरी नसून, पौराणिक कथा आहे व त्यांत सीगफ्रीडची हकीगत दिलेली आहे.

**सांगाडा**—पृष्ठवंश प्राण्यामध्यें शरीराचा जो अस्थिमय व कठिण असा शरीरांतील भाग असून ज्याचा इतर मृदु अवयवांस मुख्य आधार असतो त्यास शरीराचा सांगाडा म्हणतात. सांगाड्याचे मुख्यतः दोन प्रकारचे अवयव असतात. एक प्रकार अक्षासंबंधी अथवा पृष्ठवंशासंबंधीं मुख्य प्रकार होय व दुसरा आनुषंगिक अथवा परिशिष्टमय प्रकार होय. पहिल्या प्रकारामध्यें डोकें व धड यांचा समावेश होतो आणि दुसऱ्यामध्यें इतर अवयवांचा समावेश होतो. पृष्ठवंशीय सांगाड्यामध्यें कवटी, पृष्ठवंश व त्याचे निरनिराळे मणके, वक्ष आणि कटिर यांचा अंतर्भाव करण्यांत येतो. स्कंधास्थि, कंठास्थि यांच्या आश्रयानें शरीराचीं वरचीं गात्रें उभीं राहतात आणि खालचीं गात्रें कटिरात जोडलेलीं असतात.

**सांगाड्यांतील भाग**

१. शिरोस्थि. २. कशेरु; मणका. ३. बरगड्या. ४. स्कंधास्थि; अंसफलक. ५. जत्रुअस्थि; सरीचें हाड. ६. श्रोणिकास्थि; कमरेचें हाड. ७. गुदास्थि. ८. भगास्थि. ९. त्रिकोणास्थि. १०. जंघास्थि; मांडीचें हाड. ११. जान्वस्थि; गुडघ्याची वाटी. १२. अंतर्जंघास्थि; नलास्थि. १३. बहिर्जंघास्थि; नडास्थि. १४. प्रपदास्थि; चवड्याचें हाड. १५. अंगुल्यस्थि. १६. उरोस्थि. १७. भुजास्थि. १८. कूर्परास्थि. १९. मणिबंधास्थि; बहिःकूर्परास्थि. २०. अंगुल्यस्थि. २१. करभास्थि. २२. अंगुलिसंधि.

**सांची**—मध्य हिंदुस्थानांतील भोपाळ संस्थानांतील हें एक प्राचीन ठिकाण आहे. सांची व भेलसा यांच्या दरम्यानच्या प्रदेशांत बऱ्याच प्राचीन वस्तू दिसून येतात. यांपैकीं एक मोठा स्तूप, एक लहान स्तूप, एक चैत्यगृह, कांहीं भंगलेल्या मूर्ती, वगैरे महत्त्वाच्या आहेत. मोठ्या स्तूपाचा व्यास १०३ फूट व उंची ४२ फूट आहे. हा खिस्तपूर्व २५० या वर्षी अशोकानें बांधला असावा. एवढा मोठा व चांगल्या स्थितींत असणारा दुसरा स्तूप पाहण्यांत नाहीं. स्तूपाभोंवतीं नक्षीदार कठडे आहेत

व त्यांना चार द्वारें (तोरणें) सुंदर रीतीनें बसविलेलीं दिसतील. त्यावरील शिल्प प्रेक्षणीय आहे.

**साजगिरी**—हा राग मारवा थाटांतून निघतो. याचे आरोह व अवरोह सातहि स्वरांनीं होतात, म्हणून याची जाति संपूर्ण—संपूर्ण आहे. वादीस्वर गांधार व संवादी निषाद आहे. गानसमय सायंकाळ उचित आहे. यांत दोन धैवत व दोन मध्यम आहेत. शुद्ध मध्यमाचें प्रमाण फार अल्प आहे. पूरिया व पूर्वी यांचें मिश्रण या रागांत दृष्टीस पडतें. मंद्र व मध्यम सप्तकांत याचें गायन विशेष खुलतें. हा एक दुर्मिळ रागांपैकीं असून आधुनिक आहे.

**सांटियागो**—हें शहर चिली देशांतील सांटिआगो प्रांताची राजधानी मापोको नदीच्या कांठीं आहे. हें लॅटिन अमेरिकेंतील एक अतिशय सुंदर शहर आहे. येथें धरणीकंपाचे धक्के वारंवार बसतात. लोखंडी सामानाचे कारखाने, पिठाच्या गिरण्या, टिकाऊ फळांच्या रसांचे कारखाने व इतर कारखाने आहेत. लो. सं. ६,३९,५४० आहे.

**सांटो डॉमिंगो**—किंवा डॉमिनिकन रिपब्लिक. हें लोकराज्य हायटी या वेस्ट इंडियन बेटाच्या पूर्व भागाचें बनलेलें आहे. याचें क्षे. फ. १९,३३२ चौ. मैल आणि लो. सं. ८,९७,४०५ आहे. येथील बहुतेक लोक युरोपियन, आफ्रिकन व इंडियन या तिघांच्या मिश्र जातीचे आहेत. याची राजधानी सांटो डॉमिंगो हें शहर असून, पूर्टोप्लाटा, सानपेड्रो डी मॅकॉरीस, सॅन्चेझ हीं तीन बंदरें आणि सॉंटिआगो, टी लॉस काबालेरॉस आणि लाव्हेगा हीं प्रमुख शहरें आहेत. येथें शेती हा मुख्य धंदा असून, तमाखू, कोको, ऊंस, कॉफी हीं मुख्य पिकें आहेत. येथें ९५ लक्ष एकर जंगल आहे. येथें पुढील खनिज द्रव्यें विपुल सांपडतात: सोनें, तांबें, चर्प, लोखंड, पेट्रोलियम, दगडी कोळसा आणि मीठ. येथें स्पॅनिश ही मुख्य भाषा आहे; पण व्यापारी लोक इंग्रजी भाषाहि बोलतात. येथील लोक रोमन कॅथॉलिक धर्मपंथाचे आहेत. येथें शिक्षण मोफत व सक्तीचें आहे. राज्यांत एक युनिव्हर्सिटी आणि अनेक दुय्यम शाळा आहेत. हें लोकराज्य १८४४ सालीं स्थापन झालें. येथील राज्यकारभार एक प्रेसिडेंट, सेनेट व चेंबर या दोन लोकनियुक्त सभासदांच्या मतानुसार चालवतो. संस्थानचा धर्म रोमन कॅथॉलिक आहे. कोलंबसानें हें बेट १४९२ सालीं शोधून काढलें व चार वर्षांनीं त्याच्या भावानें सांटो डॉमिंगो शहराची स्थापना केली. हें प्रथम स्पेनकडे व नंतर फ्रान्सकडे गेलें. १९३६ सालीं सांटो डॉमिंगो शहराचें नांव सिउदाद युजिलो असें ठेविलें.

**साठवलीचा किल्ला**—मुंबई, रत्नागिरी जिल्हा. साठवली हा गांव मुचकुंदी नदीच्या किंवा पूर्णगडची खाडी हिच्या कांठीं मुखापासून १२ मैलांवर असून या नदीकांठीं लहानसा किल्ला आहे. तटास सध्या बुरुज आहेत. या गांवांत मुसलमानांची वस्ती असून पूर्वी येथें मोठा व्यापार चालत असे. १७१३ त हा शाहूनें आंग्र्यांस दिला.

**सॉडी, फ्रेडरिक** (१८७७-    )—एक ब्रिटिश पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ व रसायनशास्त्रज्ञ. तो ऑक्सफर्ड येथें १९१९ सालीं निरिंद्रिय आणि प्राकृतिक रसायनशास्त्र या विषयाचा प्रोफेसर झाला. त्याचें बहुतेक संशोधनकार्य 'रेडिओ ॲक्टिव्हिटी' बद्दलचें आहे व त्या विषयावर त्याचे अनेक ग्रंथ आहेत. त्याला १९२२ सालीं रसायनशास्त्र विषयाचें नोबेल पारितोषिक देण्यांत आलें.

**साडेतीन पीठें**—हीं आदिमाया देवीचीं प्रसिद्ध स्थानें आहेत. यांच्या नांवांत पाठभेद आहेत.

(अ) १. तुळजापूरची भवानी; २. मातापूरची रेणुका; ३. जोगाईचें आंब्याची योगेश्वरी; व ३॥. कोल्हापूरची महालक्ष्मी.

(आ) १. तुळजापूरची भवानी; २. कोल्हापूरची अंबाबाई; ३. माहूरची रेणुका; व ३॥. सप्तशृंगीची देवी.

**साडेतीन पोशाख**—पूर्वी राजदरबारांत किंवा आहेरासाठीं मानकऱ्यांना पुढील ३॥ पोशाख देत: १. निंवट (पागोटें); २. शेला (शालजोडी); ३. पायजामा करण्यासाठीं उंची वस्त्राचा तुकडा. व ३॥. पट्ट्यासाठीं किनखापीचा अर्धा तुकडा (अर्धे ठाण).

**साडेतीन मुहूर्त**—१. बलिप्रतिपदा; २. वर्षप्रतिपदा; ३. दसरा; व ३॥. अक्षय्य तृतीया किंवा नागपंचमी. या मुहूर्तांवर कोणतेंहि शुभ कार्य करण्यास हरकत नाहीं.

**साडेतीन राव**—पेशवाईत पुढील साडेतीन राव होऊन गेले: १. मुरारराव घोरपडे; २. भवानराव प्रतिनिधि; ३. गोपाळराव पटवर्धन; व ३॥. थोरले माधवराव पेशवे.

**साडेतीन शहाणे**—पेशवाईतील हे शहाणे प्रसिद्ध आहेत. १. सखारामबापू बोकील; २. देवाजीपंत चोरघडे; ३. विठ्ठल सुंदर परशुरामी; व ३॥. नाना फडणीस.

**सात आश्चर्यें**—जगांतील सात आश्चर्यें कोणतीं याविषयीं एकवाक्यता दिसत नाहीं.

(अ) प्राचीन—१ ईजिप्तमधील पिरॅमिड. २ बाबिलोनमधील भिंती (३३५ फूट उंच व ८५ फूट जाड) व त्यांवरील लटकत्या बागा (ख्रि. पू. ३७००). ३ एफेसस येथील डायनाचें देवालय. ४ अथेन्स येथील ज्युपिटरचा पुतळा. ५ हॅलिकारनॅसस येथील मोसोलस राजाचें थडगें-मकबरा (ख्रि. पू. ३५०). ६ ऱ्होड्सचा कांशाचा सूर्यदेवतेचा पुतळा (१२० फूट उंच. ख्रि. पू. ४५०). ७ अलेक्झांड्रिया येथील फारोस दीपगृह (४०० फूट उंच. ख्रि. पू. ३००).

(आ) मध्ययुगीन—१ रोम येथील कोलोसिअम ॲम्फिथिएटर (इ. स. ८२). २ रोम येथील शववाटिका. ३ चीनमधील

मोठी भिंत (१५०० मैल लांब. इ. स. तिसरें शतक). ४ इंग्लंड-मधील स्टोनहेंज (पाषाणवलय). ५ पिसा येथील झुकता मनोरा. ६ नॅन्किंग येथील चिनीमातीचा मनोरा. ७ कॉन्स्टॅन्टिनोपल येथील सेंट सोफियाचें देऊळ.

(इ) अर्वाचीन—१ बिनतारी आणि दूरध्वनि यंत्र. २ स्वयं-चलित गाडी. ३ विमान. ४ रेडियमचा शोध. ५ असाउन धरण (ईजिप्त). ६ विच्छिन्न किरणद्वारां पृथक्करण (स्पेक्ट्रम ॲनालिसिस). ७ क्ष किरण आणि अतिनील किरण यांचा शोध.

दुसरी यादी—१ एंपायर स्टेट बिल्डिंग (न्यू यॉर्क). २ पनामा कालवा. ३ लंडनमधील तळघरें. ४ गोल्डनगेट ब्रिज (सॅन फ्रान्सिस्को). ५ असाउन धरण (ईजिप्त). ६ वॉशिंग्टनचें स्मारक व ७ सिंधूनदावरील लाइड बराज.

सात वाङ्मयीन आश्चर्ये पुढील सांगण्यांत येतात :

१. आकाशाला खांब नाहीं. २. तळहाताला केंस नाहीं. ३. समुद्राला झांकण नाहीं. ४. घोड्याला स्तन नाहीं. ५. देवाला आईबाप नाहींत. ६. जिभेला हाड नाहीं. व ७. केंसाला रक्त नाहीं.

**सात शहाणे**—ग्रीसमधील सात साधुपुरुष. या सात शहाण्या इसमांचीं नांवें सर्वसाधारणपणें पुढीलप्रमाणें दिलेलीं आढळतात : कॉरिन्थचा पेरिॲंडर; मिटिलेनचा पिटॅकस; मिलेट-सचा थेलीज; अथेन्सचा सोलोन; प्रीनोचा बिआस; स्पार्टाचा चिलो आणि लिंडसचा क्लेओब्युलस.

**सातपुडा पर्वत**—अमरकंटकाच्या उंच पठारापासून थेट पश्चिम किनाऱ्यापावेतों पसरलेल्या ह्या पर्वतश्रेणी आहेत. सात निरनिराळे डोंगराचे पुडे म्हणून सातपुडा हें नांव. अमरकंटका-पासून नैर्ऋत्य बाजूस बालाघाट जिल्ह्यांत एक पर्वतकडा १०० मैल लांबपर्यंत पसरला आहे. सातपुडा पर्वताचा हा एक फांटाच असून याला 'साले टेंकडी' पर्वत असें म्हणतात. पश्चिमेकडे पर्वतश्रेणी निमुळत्या होत जाऊन पुढें पुढें आशिरगडाच्या किल्ल्या-पर्यंत पर्वताच्या दोन ओळी समांतर रेषेंत अशा आढळून येतात. तापी नदीची दरी यांमध्यें आहे. या पर्वताची उंची अंदाजें २,५०० फूट आहे. मंडाला जिल्ह्याच्या पूर्वेस असलेले 'अमर-कंटक' व 'चौरादादर' नांवाचे दोन पठार ३,५०० फूट उंचीवर आहेत. बैतुल जिल्ह्यांतील खामला पर्वतरांग व त्याच-प्रमाणें चिखलदरा पर्वतरांग यांची उंची ३,७०० फूट आहे. पंचमढी पर्वताची उंची मात्र सर्वांत जास्त म्हणजे ४,५०० फूट आहे. पंचमढी व चिखलदरा हीं हवा खाण्याचीं ठिकाणें आहेत. एकंदर पर्वत ६०० मैल लांब पसरलेला आहे.

**सातवीण**—या झाडाच्या देंठास सात पानें असतात. पानांचा आकार सांवरीच्या पानांप्रमाणें असतो. साल अतिशय कडू असते. ज्वरावर सालीचा काढा देतात. व्रण भरून येण्यास साल दुधांत वाटून लेप करतात.

**सातारा**—मुंबई, मध्यविभाग, एक जिल्हा (संस्थानें विलीन होण्यापूर्वीचा). याची दक्षिणोत्तर लांबी १०० मैल व पूर्वपश्चिम रुंदी ८० मैल आहे. ह्या जिल्ह्यांत सह्याद्रीचे कमळगड, वैराटगड, भैरवगड, शंभु महादेवाचा व दातेगड फांटा असे ५ फांटे आहेत. सज्जनगड, अजिमतारा, पन्हाळा, मच्छिंद्रगड, सदाशिवगड, वासोटा, इ. किल्ले आहेत. लहानमोठ्या नद्या एकंदर ११ आहेत. कृष्णा ही सर्वांत मोठी नदी आहे. याशिवाय कोयना, वारणा, वेण्णा, नीरा, माणगंगा, उरमोडी, वगैरे नद्या आहेत. येथील हवापाणी चांगलें आहे. लो. सं. १३,२७,२४९.

ह्या जिल्ह्यांत पिकें विविध येतात. भात, राळा, वरी, नाचणी, वाल, वाटाणा, वगैरे कोंकणी पिकें पुष्कळ पाऊस पडणाऱ्या भागांत होतात. काळ्या जमिनींत शाळू, गहूं, हरभरा, तूर, बाजरी, उडीद, मुईमूग, मूग, चवळी, वगैरे धान्यें पिकतात. माळरानांत अरगडी, डुकरी, काळा, करडी, ताग, बाजरी, तूर, इत्यादि धान्यें पिकतात. बागाईत जमिनींत ऊंस, हळद, विड्याचीं पानें व भाजीपाला होतो.

खिस्ती शकापूर्वी २०० वर्षे येथें बौद्धांच्या वसाहती होत्या. खि. पू. ९० पासून खिस्तोत्तर ३०० पर्यंत आंध्रभृत्यांच्या ताब्यांत सातारा जिल्हा होता. कांहीं ताम्रपटांवरून चालुक्य व राष्ट्रकूट घराण्यांच्या अमलाखालीं सातारा असावा. १२०० ते १३०० पर्यंत देवगिरीच्या यादवांच्या ताब्यांत सातारा होता. पुढें सन १४८९–१६८६ पर्यंत यावर विजापूरकरांची सत्ता असे. स. १७२० त हा मराठ्यांच्या ताब्यांत गेला व मराठेशाहीची प्रथम राजधानी तेथेंच स्थापन झाली. १८४८ सालच्यापुढें सातारा इंग्रजांच्या ताब्यांत गेला.

सातारा शहर जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून अजिमतारा किल्ल्याच्या पायथ्याशीं वसलें आहे. येथील हवा उत्तम असते. यवतेश्वर डोंगरावरील पाणी गांवांत आणलें आहे. शहरांत म्युनिसि-पालिटी (स्थापना १८५३) आहे. गांवाची लोकसंख्या (१९४१) ३०,६९१ असून उपनगरांत २,८५७ इतकी वस्ती आहे. वारांच्या नांवांवरून पडलेल्या सात पेठांखेरीज करून रामभाऊचा गोट, यादव गोपाळ पेठ, व्यंकटपुरा, चिमणपुरा, इ. स्थल-व्यक्तिविशिष्ट नांवें असलेल्या नऊ-दहा पेठा आहेत. शहरांत पेशवाई काळांत बांधलेले ऐतिहासिक प्रेक्षणीय वाडे आहेत. तीन-चार हायस्कुलें व एक कॉलेज आहे.

सातारा शहराचें शाहूनगर हें पूर्वीचें नांव होय. हें शहर शाहूनें वसविलें (१७२२). त्याला जुन्या कागदपत्रांतून सप्तर्षिपुर असें म्हटलेलें आढळतें. पेशव्यांचे व इतर कांहीं

सरदारांचे वाडे १७५२ साली होळीच्या रात्री आग लागून जळाले. येथील किल्ला पन्हाळ्याच्या दुसऱ्या भोजराजानें स. ११९० त बांधलेला आहे. दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानें विलीन झाल्यापासून उत्तर आणि दक्षिण असे दोन सातारा जिल्हे पाडलेले आहेत.

**सात्यकि**—युयुधान. हा सत्यकाचा पुत्र. अर्जुनापासून धनुर्विद्या शिकला. पुढें हा पांडवांचा हितकर्ता व मित्र बनला. हा शूर अतिरथी होता. भारतीय युद्धांत याचें शौर्य चांगलेंच दिसून आलें. यानें भूरिश्रवास ठार करून जुना सूड उगविला. भारतीय युद्धानंतर यादवांच्या कलहांत याला मृत्यु आला. हा कृष्णाचा अर्जुनाप्रमाणेंच परम स्नेही होता. सत्यप्रिय स्वभाव असल्यानें हा अन्याय झाल्यास रागानें उठे. याला सात्वत असेंहि म्हटलें आहे.

**सात्वत लोक**—वासुदेव, कृतवर्मा, सात्यकि जनार्दन, या सर्वांस महाभारतांत सात्वत म्हटलें आहे. आदिपर्वांत वृष्णींना उद्देशून वासुदेव म्हणतो कीं, जे सात्वत आहेत ते लोभी आहेत असें पार्थ कधींहि समजत नाहीं. विष्णुपुराणाच्या तिसऱ्या खण्डाच्या १२ व्या अध्यायांत यादव व वृष्णि या कुलांची वंशावळ दिली आहे. तींत अंशाचा मुलगा सत्वत व त्याचे वंशज ते सात्वत असें सांगितलें आहे. परब्रह्मास भगवत् व वासुदेव म्हणणारे व त्याची विशिष्ट रीतीनें पूजा करणारे ते सात्वत असें भागवतांत म्हटलें आहे. तेथें अंधक व वृष्णि या यादव कुलांबरोबरच सात्वत कुलाचा उल्लेख केला आहे व वासुदेवास सात्वतर्षभ म्हटलें आहे.

या सर्व विवेचनावरून असें दिसून येईल कीं, सात्वत हें वृष्णिकुळाचें दुसरें नांव असून वासुदेव, संकर्षण, अनिरुद्ध हे त्या कुळांतील पुरुष होत व वासुदेवासच परब्रह्म समजून त्याची उपासना ज्यांत सांगितली आहे, असा सात्वतांचा स्वतंत्र उपासनामार्ग होता.

**सांथीचा रोग**—(एपिडेमिक डिसीज़). जेव्हां एखादा रोग अनेक लोकांस होऊन सर्वत्र प्रसार पावतो व कांहीं काल सर्वत्र पसरून पुढें बंद होतो तेव्हां त्या रोगाची सांथ आली असें म्हणतात. उदा., मलेरिया, विषम, इन्फ्ल्युएंझा, घटसर्प, कॉलरा, देवी, प्लेग, इ.. अशा सांथीच्या रोगांचा प्रसार बहुधा मनुष्यांचे जे दळणवळणाचे मार्ग असतात त्या मार्गानेंच होतो. सामान्यतः हा रोग एखाद्या गोष्टीच्या संसर्गामुळें एका मनुष्यापासून दुसऱ्या मनुष्यास व त्यामुळें एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं प्रसार पावतो. हिंदुस्थानांत उन्हाळ्यांत देवीची सांथ, पावसाळ्यांत पटकीची सांथ, व मधून मधून प्लेगाची सांथ, वगैरे वरचेवर येतांना आपल्या दृष्टीस पडतात. लहान मुलांमध्यें गोवर, कांजिण्या, डांग्या खोकला, वगैरे सांथी वरचेवर येत असलेल्या आपण पाहतों. स्वच्छतेच्या राहणीमुळें आतां पूर्वीइतके सांथीचे रोग नाहींत हें खरें. या रोगांच्या पद्धतशीर अभ्यासासाठीं पाश्चात्य वैद्यकशास्त्रांत संचारीव्याधिशास्त्र (एपिडेमिऑलॉजी) नांवाची एक स्वतंत्र शाखाच आहे.

**सांद, जॉर्ज मादाम** (१८०४–१८७६)—एक फ्रेंच कादंबरीकर्ती. जॉर्ज सान्द हें टोपण नांव आहे. हिनें एक तरुण वकील ज्यूल्स सान्द याच्या सहकार्यानें Rose et Blanche या नांवाची कादंबरी १८३१ साली ज्यूल्स सान्द या टोपणनांवानें प्रसिद्ध केली. ही कादंबरी लोकप्रिय झाल्यामुळें तिनें स्वतः एकटीनें लिहिलेली दुसरी कादंबरी 'इंडियाना' या नांवाची जॉर्ज सान्द या टोपणनांवानें प्रसिद्ध केली व पुढें तिनें हेंच नांव चालू ठेवलें. तिनें बऱ्याच कादंबऱ्या लिहिल्या. १८५४ साली तिनें आपलें मानसशास्त्रदृष्ट्या लिहिलेलें आत्मचरित्र प्रसिद्ध केलें. तिच्या ग्रामीणविषयक कादंबऱ्या उत्कृष्ट आहेत. 'लेलिआ आणि जाकीज' यांत बंडखोरवृत्ति दिसते.

**सादी** (११८४–१२९२)—एक प्रसिद्ध इराणी कवि व लेखक. याचें मूळ नांव मुस्लिहुद्दिन अथवा मुशरिफ-उद्दीन असें होतें. सादी हें नांव त्यानें आपला आश्रयदाता साद झंगी याच्यावरून घेतलें. हा इराणांतील नांवाजलेला लेखक ११८४ च्या सुमारास शिराज येथें जन्मला. सादी बगदाद येथें शिक्षणाकरितां सुमारें ३० वर्षें होता. सुमारें १२१० पासून त्याची वाङ्मयविषयक कीर्ति दूरवर पसरत चालली. पुढें तो दमास्कस येथें राहिला. तेथें तो धर्मोपदेशक म्हणून पुष्कळ प्रसिद्धीस आला. नंतर तो जेरुसलेमच्या जवळच्या अरण्यांत राहूं लागला. परंतु तेथेंहि त्याच्या एकांताचा व शांततेचा भंग झाला. कांहीं फ्रेंच सैनिकांनीं त्याला कैद केलें व कावाडकष्ट करावयास लाविलें. तेथून त्याची सुटका झाल्यानंतर त्यानें उत्तर आफ्रिका, आशिया मायनर, वगैरे ठिकाणीं प्रवास केला. वयाला ७० वर्षें होईपर्यंत तो पुन्हां शिराज येथें आला नाहीं. इ. स. १२९२ त वयाच्या १०८ व्या वर्षी सादी मरण पावला. त्याचे ग्रंथ बुस्तान (फलोद्यान) व गुलिस्तान (गुलाबाचा बाग) हे होत. सादीनें भावगीतात्मक काव्यहि लिहिलें आहे. त्याच्या काव्यांत जरी भाषासौष्ठव व माधुर्य इतकें नसलें तरी तें काव्य करुणरसानें व सत्याबद्दलच्या निर्भीड प्रेमानें ओतप्रोत भरलेलें आहे.

**सांदीपनी**—हा उज्जनीस राहणारा काश्यप कुलांतील ब्राह्मण कृष्ण-बलरामाचा गुरु होता. उपनयन झाल्यानंतर हे दोघे सांदीपनीकडे विद्याभ्यासासाठीं होते. सर्व प्रकारची विद्या शिकविल्यानंतर त्याला गुरुदक्षिणा म्हणून कृष्णानें त्याचा समुद्रांत बुडालेला मुलगा परत आणून दिला.

**सांधन्स**—एक औषधी झाड. यांचीं पानें कुळ्याच्या पानांसारखीं व वीतभर लांब असतात. यांतील चांगल्या जातीचा

'लवंगी सांधरूल' म्हणतात. यांच्या पानांच्या अंगीं सांधे (हाडें) जोडण्याचा मोठा गुण आहे. याचें पान चिरल्यावर कांहीं वेळानें तें आपोआप सांधलें जातें. अस्थिभंगावर साल ठेंचून मोडलेल्या हाडाच्या जागीं तीन–चार दिवस बांधून ठेवतात.

**सांधा**—(जॉइंट). वाफेच्या नळीचे सांधे बहुधा तेलकट कागदाच्या एका लुकणाचे तयार केलेले असतात. जेव्हां वाफ प्रसरण पावते तेव्हां हे सांधे मोडून जाऊं नयेत म्हणून प्रसारक (एक्सपॅन्शन) सांधे किंवा वाकणे आवश्यक असतात. हूकचा सांधा किंवा सर्वत्र लागू पडणारा (युनिव्हर्सल) सांधा हा दोन नळयांस जोडणारा एक जोड असतो व तो दोन्ही नळयांपेक्षां थोडा कमजास्त प्रमाणाचा असतो. उखळीचा सांधा, बिजागरी सांधा व खिळीचा सांधा या सांध्यांस विशिष्ट दिशेमध्यें हालचाल करण्याची शक्ति असते. लोखंडी पत्र्याचें छप्पर तयार करतांना किंवा वासे जोडतांना किंवा कैच्यांचे तुकडे जोडतांना ते रिबीटांनीं सांधण्यांत येतात. आगगाडीचे रूळ जेथें जोडतात तेथे सांधपट्टा (फिशप्लेट) जोड वापरण्यांत येतात. त्यामुळें रूळ उष्णतेनें प्रसरण पावले तरी हे सांधे निखळत नाहींत. यांच्या बोल्टांचीं भोंकें लांबट ठेवण्यांत आलेलीं असतात. वसल्याचा (स्कार्फ) सांधा जो असतो त्यांत टोंकें खिळयांनीं किंवा पट्टयांनीं एकमेकांत बसविलेलीं असतात. दोन लांकडें एकत्र सांधावयाचीं असतां एकाचें टोंक दुसऱ्यांत परस्पर जाण्याची व्यवस्था करून सांधण्यांत येतात. याला कळाशीचा (मॉर्टाइज अँड टेनॉन) सांधा म्हणतात. घरांतील सामान करण्याच्या कामांत कबुतराच्या शेपटीसारखा (डोव्हटेल) सांधा करण्यांत येतो.

**साने, पांडुरंग सदाशिव** (१८९९–१९५०)—एक मराठी साहित्यिक व समाजसेवक. जन्म रत्नागिरी जिल्ह्यांत पालगड येथे. घरची परिस्थिति फार बिकट होती तरी तिला तोंड देत ते एम्. ए. झाले. त्यांचे वाचन दांडगें असून प्राचीन भारतीय सांस्कृतिक आणि धार्मिक ग्रंथांचें त्यांनीं चांगलें अध्ययन केलें होतें. १९२४–३० पर्यंत ते शिक्षक होते. नंतर १९३० सालीं ते राजकीय चळवळींत पडले. व अनेकदां त्यांना कारावास घडला. १९४२ च्या आंदोलनांत ते भूमिगत होते. पुढे त्यांनीं मजुरांचें दुःख निवारण्याचें कार्य हातीं घेतलें व अस्पृश्योद्धाराचा बराच प्रयत्न केला. पंढरपूरचे विठोबाचें मंदिर अस्पृश्यांना खुलें असावें म्हणून त्यांनीं उपोषण आरंभिलें होतें. पुढें मंदिर खुले झालें.

त्यांची साहित्यसेवाहि भरीव आहे. त्यांची 'श्यामची आई' नवीन धर्तीची व उद्बोधक गोष्ट आहे. 'स्त्रीजीवनां'त त्यांनीं चायकांचीं घरगुती गाणीं गोळा करून दिलीं आहेत. लहान मुलांसाठीं त्यांनीं कित्येक पुस्तकें स्वतंत्र व भाषांतरित–रूपांतरित अशीं लिहिलीं. त्यांच्या कांहीं ग्रंथांचा इतर भाषांत अनुवादहि झाला आहे. मरण्यापूर्वीं कांहीं काळ त्यांनीं 'साधना' पत्र चालविलें होतें. त्यांचें लेखन अत्यंत भावनापूर्ण व कारुण्यानें भरलेलें असे. लोकसेवेचें शुद्ध व्रत त्यांनीं मोठ्या निष्ठेने पाळलें व आपल्या हातून अधिक कांहीं होत नाहीं हें पाहून आत्महत्या केली.

**सॉनेट**—(सुनीत). चौदा दशाक्षरी ओळींचा एक इंग्रजी कविताप्रकार. यांतील यमकें ठराविक ओळींत येतात. शेक्सपिरियन आणि पेट्रार्कन असे दोन भेद सॉनेटमध्यें आहेत. मराठींत प्रथम केशवसुतांनीं १८९२ च्या सुमारास या तऱ्हेची मराठींत रचना केली. पुढें तांबे, गडकरी, माधवानुज, बालकवि, रेंदाळकर आणि रविकिरण मंडळांतील कवी यांनीं या सुनीताला उचलून धरलें. 'सुनीत' हा सॉनेटला प्रतिशब्द रविकिरण मंडळाचा आहे. 'सुनीतिका' व 'सुनीतसंग्रह' हे कुमुदबांधवांचे, 'सुनीतावली' हा अधिकाऱ्यांचा, 'सुनीतमाला' मरालांचा व 'सुनीतगंगा' नातूंचा इत्यादि मराठींत सुनीतांचे संग्रह प्रसिद्ध झाले आहेत.

**साप**—हे एका जातीचे सरपटणारे प्राणी आहेत. यांचे शरीर गोल व लांबट असून त्यावर शृंगमय खवले असतात, पण अस्थिमय कवच नसतें. यांच्या शरीरांत वक्षास्थि किंवा वक्षास्थितोरण

नसतें; तसेंच शरीराचीं पुढील गात्रें नसतात. त्याचप्रमाणें मागील गात्रांचाहि मागमूस नसतो. तथापि अजगरासारख्या कांहीं प्राण्यांत मागील गात्रांच्या अवशेषाच्या खुणा आढळतात. याच्या शरीरांतील बरगड्या व खवले यांच्या साहाय्यानें यास गति मिळते. याच्या मणक्यांची अशी रचना केलेली असते कीं, यास आपल्या शरीराचा बराच भाग वर उचलतां येतो. सापाचें तोंड चपटें व तिकोनी असतें. तें दिसण्यांत लहान असलें तरी त्यास आपला जबडा फार रुंदावतां येतो; इतका कीं, मोठा उंदीर किंवा बेडूक तो तसाच गिळतो. जीभ दुभंगलेली असते. त्याला कान नसतात तरी लांबची चाहूल ऐकूं येते. तो वरचेवर कात टाकतो. कात लांब खोळीप्रमाणें बाहेर पडते. साप आपल्या दांतांनीं आपले भक्ष्य पकडतात. यांच्या विषारी जातींत वरील जबड्यांत फक्त दोन विषारी दांत असतात. हे अंडीं घालतात व यांच्या बऱ्याच जाती आपलें भक्ष्य गिळून आवळून दाबून मारतात व याकरितां यांच्या घशाची रचना अशी असते कीं, हे आपल्यापेक्षां आकारानें मोठ्या असलेल्या प्राण्यांसहि गिळूं शकतात. यांच्या नऊ मुख्य जाती आहेत. त्यांपैकीं कांहीं निर्विष व कांहीं सविष असतात.

आपल्याकडे सापांच्या अनेक वेगवेगळ्या जाती आहेत. उदा., साप, नाग, विरोळा, खञ्यानाग, काळा-पिवळा-शुभ्र नाग, धामण, घोणस, आर, फरड, चुंडल, जानेठा, मणियार, दुतोंड्या, फुरसें, आधेले, अजगर, चिंतळा, नाणेटी, वीस खोपरा, हरणवाळा, कांडर, धो, वगैरे. यांतील कांहीं निर्विष आहेत व कांहीं सविष आहेत. पैकीं निर्विष साप फार आहेत, म्हणून गांवोगांवीं बहिरोबा, देवी आणि मांत्रिक यांचे गुण येतात. सविष सर्पदंशावर कधींच कोणताहि उपाय चालत नाहीं. (अजगर, घोणस, धामण, नाग, फुरसें, मण्यार पाहा).

ऋग्वेद आणि तदुत्तर ग्रंथ यांत अहि शब्द साप या अर्थी योजिला आहे. सर्पांचा कात टाकण्याबद्दलचाहि उल्लेख आला आहे (ऋ. ९,८६,४४). सर्पांच्या चमत्कारिक चालीवरून त्याला 'दत्वतीरध्रुः' असें नामाभिधान मिळालें आहे. सर्पांचा विषारी दंश आणि जमिनीवर सरपटत जात असतांना हिंवाळ्यांतील त्याची सुस्ती यांचाहि उल्लेख केला आहे. चोर-प्रतिबंधक तोडगा म्हणून सर्पांच्या कातींचा उपयोग करीत असत (अथर्व १.२७). सर्पांपासून रक्षण करण्याकरितां आणि त्याचा नाश करण्याकरितां अश्विन् यांनीं पेदूला पैद्व नांवाचा घोडा दिला होता असा ऋग्वेदांत उल्लेख आहे. नकुल हा त्याचा कट्टा शत्रु असून विषघ्न झाडाच्या उपयोगामुळें त्याला विषाची मुळींच भीति नाहीं. मनुष्य त्याला काठीनें किंवा त्याचें डोकें ठेचून मारतो. वैदिक ग्रंथांतून सर्पांच्या पुष्कळ जाती दिल्या आहेत :—अघाश्व, अजगर, असित, कंकपर्वन्, कश्किल, कल्माषग्रीव, कसर्णील, कुम्भीनस, तिरश्चराजि, तैमात, दर्वि दशोनसि, पुष्करसाद, पृदाकु, लोहिताहि, शर्कोट, श्वित्र, सर्प, इत्यादि.

**सापसन्दवर्ग**—[वर्ग-ॲरिस्टोलोकियासी]. या वर्गामध्यें द्विदली व एकाच्छादनयुक्त रोपांचा समावेश होतो. यांत सहा जाती व २५० उपजाती असून या तऱ्हेच्या वनस्पती सर्वत्र आढळतात.

**सापेक्षतावाद**—(रिलेटिव्हिटी). सापेक्षसिद्धान्ताचें प्रतिपादन ए. आइनस्टिन यानें दोन वेळां निरनिराळ्या रूपांत केलें. प्रथम १९०५ मध्यें त्यानें विशिष्ट बाबतींतील सापेक्षसिद्धान्त मांडला; नंतर १९१५ मध्यें सर्वसामान्य सापेक्षसिद्धान्त प्रस्थापित केला. हा सिद्धान्त असा आहे कीं, जर एकाच भौतिक चमत्काराचें दोन निरीक्षकांनीं निरीक्षण केलें तर त्या दोघांसहि तो भौतिक चमत्कार एकाच तऱ्हेच्या भौतिक नियमाप्रमाणें घडून आलेला दिसून येईल. मग सापेक्षतः त्यांची गति कशीहि असली तरी हरकत नाहीं. वास्तविक हा सिद्धान्त किंवा या सिद्धान्ताचें तत्त्व कांहीं बाबतींत पूर्वीपासूनच सर्वत्र माहीत होतें, परंतु आइनस्टिन यानें त्या तत्त्वाचा प्रत्यक्ष व्यवहारांत उपयोग करून दाखवून इतर शास्त्रज्ञांच्यापुढें आघाडी मारली. उदा., त्यानें या तत्त्वावरून असें अनुमान काढलें कीं, प्रकाशाची गति सर्व निरीक्षकांस एकच दिसली पाहिजे. यावरून त्यास असें दुसरें अनुमान काढावें लागलें व तें या सापेक्षतावादाचेंच मुख्य अंग होतें; तें म्हणजे कालाबद्दलची सर्वविश्वव्यापक कल्पना ही सर्व ठिकाणीं एकाच प्रकारची मानणें चूक आहे. जर आपणांस एखाद्या गोष्टीचें पूर्ण वर्णन करावयाचें असेल तर ती कोठें घडली व केव्हां घडली हें सांगणें अवश्य आहे व याकरितां चार प्रमाणें अथवा संख्या सांगणें अवश्य आहे. तीन प्रमाणें अथवा संख्या त्या वस्तूचें वर्णन देण्याकरितां (लांबी-रुंदी-उंची) आणि एक त्या गोष्टीचा काल देण्याकरितां. आइनस्टिनच्या पूर्वी प्रत्येकाची अशी समजूत होती कीं, अवकाशाकरितां लागणारी तीन प्रमाणें किंवा संख्या यांचा आणि वेळाच्या संख्येचा कांहीं संबंध नसून तीं स्वतंत्र आहेत. व अवकाशांचीं तीन प्रमाणें निरनिराळ्या प्रकारांनीं घेतां येतात. आइनस्टिन यानें असें दाखवून दिलें कीं, स्थल आणि काल किंवा अवकाश आणि काल हीं या दृष्टीनें परस्परांपासून स्वतंत्र नाहींत. याकरितां आपण अवकाशांतील मापनाचें एक उदाहरण देऊं. पृथ्वीवरील निरनिराळ्या ठिकाणचे ज्योतिषशास्त्रज्ञ विशिष्ट ठिकाणचे अक्षांश आणि रेखांश एकच मानितात. रेखांश मोजतांना ते निरनिराळ्या प्रारंभबिंदूंची योजना करीत असले तरी त्याचा परिणाम अक्षांशावर होत नाहीं. परंतु प्रत्येक ज्योतिषशास्त्रज्ञानें जर पृथ्वीचें विषुववृत्त निरनिराळें मानलें तर निरनिराळ्या निरीक्षकांचे अक्षांश भिन्न भिन्न येऊन त्यांचा घोंटाळा उडेल. व हीच गोष्ट स्थल आणि काल यांच्या बाबतींत होते असें आइनस्टिननें म्हणणें आहे. अवकाश सिद्धान्तामध्यें लॉरेंझचें परिवर्तन म्हणून कांहीं विशिष्ट सारण्या दिलेल्या आहेत व त्यांच्या योगानें दोन निरनिराळ्या निरीक्षकांनीं घेतलेल्या व त्या दोन निरीक्षकांस परस्परांपासून भिन्न गति मिळत असतांना घेतलेल्या मापनांचा संबंध जोडण्यांत येतो. या सारण्यांवरून सर्व निरीक्षकांकरितां सामान्य अशी प्रकाशाची केवलगति मिळूं शकते. आणि तिच्यामुळें मायकेलसन मोर्ले या प्रसिद्ध शास्त्रज्ञांनीं उपस्थित केलेली अडचण दूर होते. या शास्त्रज्ञांनीं पृथ्वीची ईथरशीं सापेक्षगति दाखविण्याचा प्रयत्न केला होता. परंतु त्यांचा प्रयोग पूर्णपणें अपयशी झाला. या आइनस्टिनच्या सिद्धान्ताप्रमाणें स्थल आणि काल यांसंबंधीं मापें स्वतंत्र घेण्याऐवजीं स्थलकालात्मक अशीं मापें घेणें अवश्य झाल्यामुळें पूर्वीच्या पदार्थविज्ञानशास्त्रांतील अनेक मूलभूत कल्पना बदलाव्या लागल्या. पूर्वीचीं शक्तिगतत्वाचीं तत्त्वें आतां या नवीन तत्त्वाचा त्यांत अंतर्भाव केला नाहीं तर चुकीचीं ठरून त्यांपासून चुकीचीं व

मिळण्याचा संभव आहे. याप्रमाणें आइनस्टिननें असें दाखविलें कीं, कोणत्याहि पदार्थांतील द्रव्य गॅलीलीच्या काळापासून ज्याप्रमाणे त्याच्या गतीशीं निरपेक्षपणें सांगण्यांत येते तसें यापुढें सांगतां येणार नाहीं. तर तें द्रव्य त्या पदार्थाच्या गतीबरोबर वाढत जात असते व त्याची सारणी अशी असते : $मक^{२} \div \sqrt{(१ - व^{२}/क^{२})}$. या ठिकाणीं **म** हा स्थिर अंक आहे. **व** आणि **क** या पदार्थ आणि प्रकाश यांच्या गति आहेत. जेव्हां $\frac{व}{क}$ हा लहान असेल तेव्हां वरील समीकरणाची किंमत $मक^{२} + \frac{१}{२} मव^{२}$ अशी जवळजवळ होते. यांतील दुसऱ्या पदानें **म** द्रव्य असलेल्या पदार्थाची गतिशक्ति तो पदार्थ **व** या गतीनें जात असतां दाखविली जाते. आणि $मक^{२}$ हा एक अंतर्गत संभाव्य शक्तीचा स्थिर अंक समजण्यांत येतो. यावरून शक्ति आणि द्रव्य ही दोन एकाच वास्तवतेचीं निरनिराळीं स्वरूपें आहेत असें दिसून येतें.

सापेक्षतेच्या सर्वसामान्य सिद्धान्तामध्यें आइनस्टिन यानें गतिशास्त्राचे नियम व गुरुत्वाकर्षणाचा नियम यास सर्व निरीक्षकांकरितां सर्वसामान्य असें स्वरूप दिलें. व हें स्वरूप ते पदार्थ परस्परांशीं कोणत्याहि सापेक्षगतीमध्यें फिरत असले तरी बदलत नाहींत. तन्यक (टेन्सॉर) सिद्धांत हा एक अतिशय क्लिष्ट असा सिद्धान्त असून त्यामध्यें गणितांतील कलन (कॅल्क्युलस) अथवा सूक्ष्मसंचयनशास्त्राचा उपयोग करण्यांत येतो. हे सूक्ष्मसंचयनशास्त्र आइनस्टिन यानें शोधून काढलें नव्हते. तें शास्त्र अगोदरच रिएमन क्रिस्टोफेल, रिसी, लेव्हिसिव्हिटा यांनीं शोधून आणि सिद्ध करून ठेवलें होतें. आइनस्टिन यानें आपल्या सापेक्षतासिद्धान्ताच्या योगानें न्यूटनच्या गुरुत्वाकर्षण सिद्धान्तामध्यें सुधारणा केली व या सुधारणेमुळें बुध या ग्रहाच्या गतीमध्यें जो गणितामध्यें आणि प्रत्यक्ष निरीक्षणामध्ये फरक दिसून येतो त्याचें स्पष्टीकरण केलें. आइनस्टिन यानें आपल्या सिद्धान्ताच्या परीक्षेकरितां दोन गमके घालून दिलीं आहेत. तीं अशी : (१) सापेक्षतासिद्धान्ताप्रमाणें सूर्याजवळून जाणारे प्रकाशकिरण आंतल्या बाजूस वळले पाहिजेत ही गोष्ट मे १९१९ आणि त्यानंतर झालेल्या सूर्यग्रहणांच्या वेळीं स्पष्टपणे निदर्शनास आली. (२) सूर्याच्या विच्छिन्नकिरणपटामध्यें दिसणाऱ्या रेषा पृथ्वीवरील सूर्यकिरणांच्या विच्छिन्नकिरणपटापेक्षां तांबड्या रंगाकडे अधिक झुकलेल्या दिसल्या पाहिजेत. ही दुसरी गोष्ट अद्यापि निश्चितपणें सिद्ध झालेली आढळून येत नाहीं. परंतु तीबद्दलचा पुरावा अधिकाधिक दृढ होत आहे. आतां सापेक्षतासिद्धान्त हा सर्वत्र सर्वमान्य झाला आहे. अर्थात् हा सिद्धान्त विशेष गणितशास्त्रज्ञ आणि पदार्थविज्ञानशास्त्राची उपपत्ति जाणणारे यांसच अधिक पटतो. या सिद्धान्ताचा पुरस्कार इंग्लं[illegible]
ग्टन यानें आणि जर्मनीमध्यें एच्. एस[illegible]
आढळतो. १९ व्या शतकांतील [illegible]
विश्वाची रचना डोळयांनीं पा[illegible]
नमुना तयार करण्याचा प्र[illegible]
अशा तऱ्हेच्या नमुन[illegible]
करतां येईल तो [illegible]
मोठ्या प्रम[illegible]

**सा[illegible]**
चरित्राची इ[illegible]
ती मुख्य अथ्यापि[illegible]
त्याप्रमाणें साफो हिच[illegible]
नाश इतर सर्वांहून अधिक[illegible]
प्राचीन काळांत अतिशयच हो[illegible]
सर्वश्रेष्ठ कवि होय. त्याचप्रमाणें साफ[illegible]
तिचें काव्यलेखन अतिशय उच्च दर्जाचें [illegible]
तिची 'ओड टु ॲनाक्टोरिया' ही कविता ल[illegible]
केली आहे. तिचें जें थोडें लिखाण उपलब्ध आहे त्याव[illegible]
सर्वश्रेष्ठत्व व्यक्त होतें. ती कॅटूलस व शेले या दोन स[illegible]
भावगीतें लिहिणाऱ्या कवींच्याइतक्या योग्यतेची आहे. तिच्या स[illegible] भावगीतां(ओड्स)मधील प्रत्येक ओळींत अर्थ व ध्वनि यांना परस्पर अनुरूप अशी शब्दयोजना सर्वत्र असून प्रत्येक भावगीत अत्यंत निर्दोष व काव्यगुणान्वित आहे. तिच्या काव्याचें वर्णन एकाच विशेषणाने करतां येतें व ते विशेषण म्हणजे 'निर्दोष' हे होय.

**सांब**—जांबवतीला कृष्णापासून झालेला पुत्र. हा शिवोपासक होता. यानें दुर्योधनाची कन्या लक्ष्मणा हिला स्वयंवरांत हरण केली तेव्हां यादव आणि कौरव यांमध्ये युद्ध जुंपलें, पण कौरवांचा पराभव होऊन सांबाचें लक्ष्मणेशीं लग्न लागलें. सांब फार सुंदर असल्याने त्याच्या कांहीं सावत्र आयांचें त्याकडे फार लक्ष गेलें. तेव्हां कृष्णाने याला कुष्ठरोगी होशील असा शाप दिला. पुढे सूर्याराधनेनें याचें कुष्ठ बरें झालें. कांहीं यादवांनीं गरोदर स्त्रीचा याला वेष देऊन दुर्वासाकडे नेले व काय होईल असें विचारलें; तेव्हां दुर्वासाला ही थट्टा न खपून त्यानें मुसळ होईल व तें यदुकुळाचा नाश करील, असा शाप दिला. व त्याप्रमाणें झालें.

**साबण**—साबण हे सामान्यतः पामिटीक स्टिअरिक, अथवा ओलीइक अम्ल याच्या लवणास नांव दिलें जातें. या अम्लाचे ग्लिसरिनयुक्त पदार्थ म्हणजें खनिज व प्राणिज तेलें आणि चरबी होत. सामान्यतः साबणामध्यें सिंधु (सोडियम) आणि पालाश (पोटॅशियम) यांचीं लवणें असतात. पहिल्या प्रकारच्या

साबणास जड साबण म्हणतात व दुसऱ्यास हलका साबण म्हणतात. साबण हा सामान्यतः उकळत्या तेलांत किंवा चरबींत कॉस्टिक अल्कली हा क्षार मिसळून तयार करण्यांत येतो. याकरितां अनेक प्रकारचीं तेलें किंवा चरबी वापरण्यांत येतात. जड साबण सामान्यतः प्राण्यांच्या घट्ट चरबीपासून किंवा घट्ट तेलापासून कॉस्टिक सोडा मिसळून तयार करण्यांत येतो. साबणामध्यें त्याचा पारदर्शकपणा व फेंसाळपणा वाढविण्याकरितां थोडी राळ मिसळण्यांत येते. सामान्यतः चरबी व कॉस्टिक सोडा यांचें प्रमाण १०० : १४ असें असतें. साबणामध्यें थोडा रंग व सुगंध घालून अंगास लावावयाचे साबण तयार करण्यांत येतात. खोबरेल तेलापासून केलेल्या साबणांत त्याचा जडपणा कायम ठेवूनहि शेंकडा ७० पर्यंत पाण्याचा अंश असूं शकतो. हलके साबण सरकी, अळशी, तीळ, वगैरे तेल किंवा शील, व्हेल, कॉड, वगैरे माशांची चरबी यांमध्यें कॉस्टिक पोटॅश मिसळून तयार करतात. यांमध्यें मूळ तेलांतील सर्व द्रव्यें व ग्लिसरिन वगैरे कायम असतात. मद्यार्कामध्यें साबण विरघळवून त्यांतील अशुद्ध अंश तळाशीं बसूं दिला म्हणजे पारदर्शक साबण तयार होतो.

**साबमूर्ती, वल्लरु**—आंध्र प्रांतांतील एक प्रसिद्ध काँग्रेस पुढारी. १९२१ मध्यें यांनीं चांगली प्राप्ति होत असलेली वकिली सोडली. १९२५ मध्यें हे कोकोनाडा येथें भरलेल्या काँग्रेसच्या वेळीं स्वागतसभेचे मुख्य मंत्री होते. राष्ट्रीय निशाणाबद्दल सरकारशीं लढा यांनींच सर्वांत प्रथम सुरू केला. १९२१ पासून यांनीं राष्ट्रीय सभेचें ध्येय संपूर्ण स्वातंत्र्य हें असावें याकरितां प्रचार केला व स्वातंत्र्य संघ स्थापन केला. नागपूर येथील झेंडा-सत्याग्रह, मद्रास येथील नील पुतळा सत्याग्रह, सायमन-कमिशन सत्याग्रह, वगैरेंमध्यें त्यांनीं पुढाकार घेतला व प्रत्येक ठिकाणीं राष्ट्रीय लढा असेल तेथें हे सर्वांच्या पुढें असतात. यांस अनेक वेळां तुरुंगवासाची शिक्षा झाली आहे. हिंदुस्थानी सेवादलाचे अध्यक्ष असून यांनीं अनेक ठिकाणीं शिबिरें चालविलीं आहेत. बंगालमधील स्वयंसेवक-परिषदेचे हे अध्यक्ष होते. १९२९ मध्यें काँग्रेस वर्किंग कमिटीचे हे सभासद होते. १९३६ मध्यें मद्रास कायदेमंडळाचे हे अध्यक्ष होते.

**सांबर**—हा मृगवर्गांतील एक प्राणी आहे. हा युरोप व आफ्रिका यांच्या उत्तर भागांत फार आढळतो. याला वाटोळीं, बांकदार, व शाखायुक्त शिंगें असतात व तीं नर व मादी या दोघांचींहि दर वर्षीं गळून पडून पुन्हां येतात. याचें शरीर सुदृढ असून पाय आंखूड असतात. याची सरासरी उंची साडेचार फूट असते. याची दृष्टि तीक्ष्ण असून याची पळावयाची शक्ति अचाट असते.

हिंदुस्थानांत नरासच फक्त शाखायुक्त शिंगें असतात. या शिंगांची लांबी तीन फुटांपेक्षांहि कधीं जास्त आढळते व जाडी नऊ इंच व्यासाची असते. शिंगें हेंगामांत गळून पडतात व पुन्हां दुसरीं येतात. सांबर एकटा बहुधा नसतो. सहासात तरी कळप करून असतात. या कळपांत एकदोनच नर असतात. मादी दरसाल विते. एका वेळीं एकच पोर होतें. सांबरशिंग फार औषधी आहे. डोकें वगैरे दुखण्यावर तें उगाळून लावतात. (एल्क, काळवीट पाहा.)

**साबरमती**—मुंबई, गुजराथेंतील एक नदी. ही मेवाडांत उगम पावून खंबायतच्या आखातास मिळते. साबर आणि हाथमती यांच्या संगमानंतर नदीला हें नांव पडलें. साबरमतीच्या कांठीं महात्मा गांधींनीं एक आश्रम काढून तेथें ते राहत. तेव्हांपासून साबरमतीची प्रसिद्धि झाली. या ठिकाणीं आतां म. गांधींचें स्मारक म्हणून एक सार्वजनिक व शैक्षणिक कार्यासाठीं मोठी संस्था निघत आहे.

**साबाथ**—ज्यू धर्मांतील हा पूर्ण विश्रांतीचा दिवस आहे. ईश्वरानें सहा दिवस जग निर्माण करण्याचे श्रम घेतल्यानंतर सातव्या दिवशीं त्यानें सुट्टी घेतली, या कल्पनेवरून ज्यू स्मृतिकारांनीं हा दिवस ठरविला. या दिवशीं पूर्ण विसावा व परमेश्वराची सेवा यात्र गोष्टी फक्त करतात. शुक्रवारच्या सूर्यास्तापासून शनिवारच्या सूर्यास्तापर्यंत साबाथ पाळतात. ख्रिस्ताच्या अनुयायांनीं साबाथबद्दल आठवड्याचा पहिला दिवस रविवार हा काढला (इ. स. ३२१) व ज्यूंचा साबाथ पाळण्याचें बंधन तोडून टाकलें.

**साबूदाणा**—सागू, सागूस या ताडासारख्या झाडापासून हा पिष्ट पदार्थ काढतात. झाड चांगलें मोठें झाल्यावर कापतात व त्याचा मज्जायुक्त भाग बाहेर काढून त्याची पूड करतात. नंतर ती धुऊन गाळतात. म्हणजे सागूचें पीठ तयार होतें. सागूचे दाणे (साबूदाणा) तयार करण्याच्या कृती वेगळ्या आहेत. सागूचीं झाडें मलाया व त्याखालचे जुने डच प्रदेश (डच ईस्ट इंडीज) यांतून पुष्कळ होतात. साबूदाणा आपणाकडे उपवासासाठीं फार वापरतात. हा पाचक व पौष्टिकहि आहे.

**सांभर सरोवर**—हें एक राजपुतान्यांतील प्रसिद्ध खारें सरोवर असून जयपूर व जोधपूर ह्या संस्थानांच्या सरहद्दीवर आहे. हें समुद्रसपाटीपासून १,२०० फूट उंच आहे. एकंदर क्षे. फ. ९० चौ. मै. आहे. ह्या सरोवरासंबंधीं असें सांगतात कीं, पूर्वी शाकंभरी देवीनें ह्या ठिकाणीं जें अरण्य होतें त्याचा रजताच्छादित असा एक जमिनीचा सपाट भाग बनविला, पण तेथील लोकांनीं त्यामुळें होणाऱ्या लोभमूलक अनेक अनर्थोपत्तींचा विचार करून त्या विभागाचें एक क्षार-सरोवर बनविण्याची देवीस विनंती केली. देवीनें ती मान्य केली. व त्या या सरोवरास सांभर असें नांव पडलें. अकबराच्या अमलापासून तों आजतागाईत ह्यांतून मीठ काढण्याचें काम सारखें चालू आहे. १८७० त त्याचा संपूर्ण ताबा ब्रिटिश सरकारकडे येऊन त्याबद्दल ब्रिटिश सरकारनें ७ लक्ष रु. (जोधपूर ४॥ लक्ष व जयपूर २॥। लक्ष) द्यावे असें ठरलें. या सरोवरापासून बरेंच मीठ तयार होतें.

**सामंत सारंग**—हा राग काफी थाटांतून निघतो. याच्या आरोहांत गांधार व धैवत हे स्वर वर्ज्य आहेत व अवरोहांत गांधार वर्ज्य आहे, म्हणून याची जाति औडुव षाडव आहे. वादी स्वर ऋषभ आहे व संवादी पंचम आहे. गानसमय मध्यान्ह सर्व-संमत आहे. या रागांत दोन्ही निषादांचा प्रयोग होतो. हा एक सारंगप्रकार आहे.

**सामता**—लांकडामध्यें भोंक पाडण्याच्या या हत्याराचे बरेच प्रकार असतात (उदा., ब्राडाल, गिमलेट). सामत्याचें पातें एका धनुष्याकार पकडींत बसवितात. पात्याला आणखी टोंकें नाजूक

व बारीक काम करावयाचें असल्यास बसवितात. पात्याला केव्हां एक काढतां-घालतां चाकूहि असतो. सामत्याला बहुधा मूठ असते व ती फिरवितां येते.

**सामन मासा**—हा एक प्रसिद्ध मासा आहे. हा गोड्या व

खाऱ्या पाण्यांतहि राहतो. याची सरासरी लांबी तीन ते चार फूट असते आणि सरासरी वजन १२ ते ३० पौंड असतें. याच्या पाठीचा रंग लोखंडासारखा असून पोटाकडे फिकट असतो. यास दांत असतात. हा लहान लहान प्राणी खातो. पावसाळ्यांत हे खाऱ्या पाण्यांतून गोड्या पाण्यांत अंडीं घालण्याकरितां जातात व नंतर परत येतात. दोन वर्षेपर्यंत लहान मासे गोड्या पाण्यांत राहतात. त्यांचा रंग रुपेरी असून त्यांची लांबी सहा इंच व वजन दोन औंस असतें. नंतर ते समुद्रांत जातात. यांची उत्पत्ति फार मोठ्या प्रमाणांत होते. हे मासे पकडण्याचीं महत्त्वाचीं ठिकाणें इंग्लंड, युरोप व अमेरिका यांमध्यें आहेत.

**सामवेद**—मुख्य चार वेदांपैकीं एक. याच्या अनेक संहितां-पैकीं आज एकच उपलब्ध आहे. यांत १,८१० ऋचा आहेत. त्यांपैकीं ७५ सोडून बाकीच्या ऋग्वेद संहितेंतीलच आहेत. साम-वेदाच्या आर्चिक व उत्तरार्चिक या दोन्ही भागांतील शब्द हे केवळ साधनभूत आहेत. मुख्य साध्य म्हणजे गाण्याचे राग. आर्चिकाला प्रत्येक पद्याची पहिली ऋचा त्या त्या रागाची आठवण होण्याकरितां ज्यांत दिलेली आहे असें एक गाण्याचें पुस्तक म्हणतां येईल. उत्तरार्चिकेमधून मुख्य यज्ञाच्या वेळीं गाव-याचीं जीं स्तोत्रें तीं तयार केलेलीं असतात. आर्चिकानंतर

उत्तरार्चिक झाले असावे. उत्तरार्चिकांत शब्दांतील अक्षरें गातांना जशीं लांबवून व पुनरुक्ति करून म्हणतात तशीं तीं निरनिराळ्या सुरासह लिहिलीं आहेत. यज्ञकर्म, अभिचार व भारतीय संगीत-शास्त्राचा इतिहास जाणण्यास सामवेद संहिता फार उपयुक्त आहे (संगीतशास्त्र पाहा).

आर्षेय, तांड्य किंवा पंचविंश, षड्विंश, सामविधान, जैमिनीय-उपनिषद्, इ. सामवेदाचीं ब्राह्मणें आहेत.

**सामवेदी भाषा**—सामवेदी ब्राह्मणांची वस्ती ठाणें जिल्ह्यांत वसई व माहीम तालुक्यांत विशेष आहे. हे लोक शेतकी करतात. यांची भाषा मराठी व गुजराथी यांचें मिश्रण होऊन बनली आहे. 'च 'बद्दल हे 'स' किंवा 'ह' योजतात. उदा., चाकरबद्दल साकर म्हणतील. 'स 'बद्दल 'ह' हा येतो. उदा., दिसात (दिवसांत) ऐवजीं 'दिहात.' छोकरा न म्हणतां 'होकरो' म्हणतील. पुल्लिंगी रूप ओकारान्त असतें. खानदेशी भाषेप्रमाणेंच ही सामवेदी भाषा बनली आहे.

**सामळदास, (सर) लल्लूभाई** (१८६३–१९३६)—एक हिंदी अर्थशास्त्रज्ञ व उद्योगपति. यांचा जन्म ऑक्टोबर १८६३ मध्यें झाला. यांचें शिक्षण भावनगर हायस्कूल व एलफिन्स्टन कॉलेज यांमध्यें झालें. हे प्रथम भावनगरच्या महाराजांचे दुय्यम चिटणीस व रेव्हेन्यू कमिशनर होते. १८९९ मध्यें यांनीं नोकरीचा राजीनामा दिला व व्यापारी बँका व संस्था यांमधून डायरेक्टर वगैरे झाले. १९१०, १९१३ व १९१६ या वर्षी हे मुंबई कायदेमंडळाचे सरकारनियुक्त सभासद होते. १९१३ सालीं कराची येथें भरलेल्या अ. भा. औद्योगिक परिषदेचे अध्यक्ष होते. १९१५ मध्यें म्हैसूर येथील सहकारी परिषदेचे अध्यक्ष होते. १९१७–१८ सालीं मुंबई युनिव्हर्सिटीचे फेलो झाले. १९१८ ते १९२२ पर्यंत इंडियन मर्चन्ट्स चेंबर व ब्यूरो यांचे अध्यक्ष होते. १९२० मध्यें कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें निवडून गेले. १९२३–२४ मध्यें मर्कंटाइल मरीन कमिटीचे सभासद होते. १९२५ सालीं बनारस येथें भरलेल्या हिंदी आर्थिक परिषदेचे अध्यक्ष होते. नंतर १९२६–१९२८ व १९२९ मध्यें अनुक्रमें मद्रास, बिहार-ओरिसा व संयुक्त प्रांतीय सहकारी परिषद यांचे अध्यक्ष होते. १९२५ मध्यें मुंबई सरकारच्या कार्यकारी मंडळाचे कांहीं काळ सभासद होते. यांचे चिरंजीव ना. वैकुंठलाल मेहता हे आज मुंबई राज्याचे फडणीस आहेत.

**सामळभट** (जन्म १६४०)—एक गुजराथी साहित्यिक. 'रावण-मंदोदरी संवाद', 'मदनमोहना', 'रखीदासनी चरित्र', वगैरे २६ काव्यांचा हा कर्ता जातीनें श्रीगौड माळवी ब्राह्मण असून अहमदाबादजवळ गोमतीपूर येथें याचें वास्तव्य असे. प्रसिद्ध गुजराथी कवि प्रेमानंद व हा समकालीन होत. रखीदास पाटील व गमानजी भाट यांची यास काव्यरचनेच्या कामीं मदत झाली. वरील काव्यांखेरीज यानें रणछोड देवावर कांहीं श्लोक, शिव-पुराण व सिंहासनबत्तिशी, वेताळपंचविशी, शुकबाहात्तरी, खेरखंड व नंदबत्तिशी यांचीं गुजराथींत भाषांतरें केलीं आहेत. यास संस्कृत, हिंदी व फार्सी या भाषाहि अवगत होत्या.

**सामानगड**—दक्षिण महाराष्ट्र. हा किल्ला गडहिंग्लजच्या दक्षिणेस ३॥ मैलांवर एका डोंगराच्या माथ्यावर बांधलेला आहे. उंची २,६०० फूट. तटाची उंची ८ फूट असून आंत वरील टांकीं आहेत. १६७६ हा शिवाजीनें घेतला. हा फार बळकट आहे. १८४४ मधील गडकऱ्यांच्या बंडास येथेंच आरंभ झाला. त्याचें कारण असें कीं, कोल्हापूरचा दिवाण दाजी पंडित यानें गड-कऱ्यांच्या पूर्वापार चालत आलेल्या जमिनी मामलेदाराच्या देख-रेखीखालीं दिल्या. हें बंड द ला मोटी यानें मोडलें व किल्ल्यांच्या भिंती पाडून टाकल्या व मामलेदाराचें ठाणें गडहिंग्लज येथें नेलें.

**सामारिटन लोक**—पॅलेस्टाइनमधील नेब्लूस (प्राचीन शेचेम) येथें राहणारी सामारिटन या नांवाच्या लोकांची एक लहान जात असून, ती प्राचीन ज्यू धर्माच्या लोकांची अवशेष जात आहे. खि. पू. ३३२–३३१ च्या सुमारास सामारिटन जातीचे लोक एक स्वतंत्र धार्मिक जमात असें स्वरूप पावली, आणि या लोकांनीं नेब्लूसनजीक माउंट गेरीझीम येथें आपलें एक धर्ममंदिर बांधलें. हल्लीं या जातीच्या लोकांची संख्या सुमारें १४० आहे. हे लोक इतर कोणत्याहि जातीशीं बेटीव्यवहार करीत नाहींत; तर ते आपल्या जातींतल्या लोकांनीच विवाह करतात. या कारणामुळें थोड्याशार काळानंतर ही जात अजीबात नष्ट होईल हें निश्चित आहे. या सामारिटन लोकांची भाषा आरे-मार्इक भाषांपैकींच एक पोटभाषा आहे आणि तिचा संबंध गॅलीली येथील ज्यू लोकांच्या भाषेशीं आहे. सामारिटन लोकांचें कांहीं वाङ्मय आहे.

**सामुद्रांड**—(सी-अर्चिन). हे कंटकित तनुवर्गांतील सामुद्रिक प्राणी आहेत. यांच्या अनेक जाती आहेत व हें नांव अनेक निरनिराळ्या प्रकारच्या प्राण्यांना लावतात. हे समुद्राच्या तळाशीं निरनिराळ्या खोलीवर किंवा खडकांत राहतात. कांहीं वाळूंत राहतात तर कांहीं खडकांत भोंकें पाडून त्यांत राहतात.

**सामुराई**— हें नांव जपानांतील योद्ध्यांच्या विशिष्ट जातीचें जपानच्या इतिहासांतील सरंजामी अमदानीच्या काळांत देण्यांत आलें. हे सामुराई वीर मोठे शूर आणि मोठे देशभक्त म्हणून विख्यात होते; आणि त्यांच्या वागणुकीचे नीतिनियम कांहीं विशिष्ट प्रकारचे होते. ही सरंजामी पद्धति १८७१ सालीं नष्ट करण्यांत आली. नंतर कांहीं काळ एकादे शिलेदारासमान

लोक सनातनी व देशभक्त म्हणून मिरवीत. आतां त्यांनीं उद्योगधंद्यांकडे सारें लक्ष पुरविलें आहे.

**सामोआ**—हा १४ बेटांचा द्वीपसमूह पॅसिफिक महासागरांत फिजी बेटांच्या ईशान्येस असून यांपैकीं कांहीं बेटें अमेरिकन सं. संस्थानांच्या मालकीचीं आणि कांहीं बेटें न्यू झीलंडच्या मालकीचीं आहेत. १९०० सालीं येथील ब्रिटिश सत्ता नष्ट होऊन तेथें पश्चिम भागांत जर्मनीची व इतरत्र सं. संस्थानांची सत्ता सुरू झाली. पण १९२० सालीं राष्ट्रसंघाच्या (मॅंडेट) हुकमानें यांपैकीं पूर्वी जर्मनीकडे असलेलीं मुख्य ९ बेटें (साव्हाई, उपोलो, आपोलिमा, मानूप, इत्यादि) ब्रि. सरकारच्या ताब्यांत देण्यांत आलीं. त्यांना पश्चिम सामोआ किंवा नॅव्हिगेटर बेटें म्हणतात. येथील लोक खिस्ती असून पॉलिनीशियन वंशाचे आहेत. येथें नारळ हें मुख्य पीक असून खोबरें, साखर, रबर, कोको हा माल परदेशीं जातो. आपीया हें शहर राजधानी असून पागो हें बंदर आहे, व तें सं. संस्थानांचें आरमारी ठाणें आहे.

१७२२ मध्यें एका डच इसमानें यांचा शोध लावला. यांपैकीं नऊ बेटें जर्मनीच्या ताब्यांत होतीं तीं पहिल्या महायुद्धानंतर न्यू झीलंडकडे राष्ट्रसंघाकडून मॅंडेट–अधिकाराप्रमाणें कारभाराकरितां देण्यांत आलीं. बाकीचीं ५ यु. एस्. ए. चीं आहेत व त्यांना अमेरिकन सामोआ बेटें म्हणतात. न्यू झीलंड सामोआचें क्षेत्रफळ ११३३ चौ. मै. आहे व यु. एस्. ए. सामोआचें ७६ चौ. मै. आहे. प्रसिद्ध स्कॉट कादंबरीकार स्टीव्हनसन हा १८९४ मध्यें उपोलो बेटावर मरण पावला.

**साम्राज्यशाही**—(इंपीरिॲलिझम). या शब्दाचे दोन अर्थ आहेत ते—(अ) मर्यादित अर्थानें ब्रिटिश साम्राज्यवादी हा शब्द वापरतात तेव्हां त्याचा अर्थ असा असतो कीं, ब्रिटिश कॉमनवेल्थमधील निरनिराळ्या घटकांचे परस्पर स्नेहसंबंध दृढ करण्याची वृत्ति आणि सर्व साम्राज्याचे घटक राजकारणांत एकमतानें चालावे ही इच्छा. १९१८ पर्यंत मात्र ब्रिटिश मुत्सद्यांच्या मनांत नवे प्रदेश साम्राज्यास जोडून साम्राज्याची वाढ करावी अशी इच्छा असे.

(आ) साम्राज्यशाही या शब्दाचा व्यापक अर्थ असा आहे कीं, युद्धामध्यें प्रदेश जिंकून साम्राज्याची वाढ करण्याची प्रवृत्ति. या व्यापक अर्थानें साम्राज्यवाढीची प्रवृत्ति १८८० सालापासून सुरू झाली असून, त्यामुळें निरनिराळ्या साम्राज्यवादी राष्ट्रांत स्पर्धा उत्पन्न होऊन महायुद्धाचें संकट अनेक राष्ट्रांवर कोसळलें. १९१४ ते १९१८ चें पहिलें महायुद्ध याच घातकी वृत्तींतून उद्भवलें. ही प्रवृत्ति जर्मनी, इटली व जपान या तीन नवोदित राष्ट्रांत फार जोरदार बनली. ब्रिटन, फ्रान्स, स्पेन, चीन, इत्यादि जुन्या साम्राज्यांचा या नव्या राष्ट्रांना फार हेवा वाटूं लागला. साम्राज्यवाढीच्या लालसेनें सदरहू तीन राष्ट्रांनीं जुन्या साम्राज्यांच्या भागावर हल्ले चढवण्यास सुरुवात केली. जपाननें १९३२ सालापासून चीनवर चढाई सुरू केली; आणि इटलीनें १९३५ सालीं अबिसिनीयावर स्वारी करून तो देश जिंकून इटलीच्या साम्राज्यास जोडला. जर्मनीनें आपल्या शेजारचे पूर्व युरोपांतील लहान लहान देशावर आक्रमण करण्यास सुरुवात केली. साम्राज्यवाढीची इच्छा व्यापार वाढावा आणि राष्ट्र आर्थिक दृष्ट्या संपन्न व्हावें या हेतूनें उद्भवते, म्हणून साम्राज्याची वाढ करण्यास बडे बडे कारखानदार, व्यापारी व भांडवलदार राष्ट्राच्या सरकारला व मुत्सद्यांना प्रवृत्त करतात, अशी कारणमीमांसा लेनिननें मार्क्सवादाच्या आधारानें १९१५ सालीं पुढें मांडली. आज कम्यूनिस्ट राष्ट्रें देखील याच कारणांसाठीं आपलें वर्चस्व इतर दुर्बल राष्ट्रांवर गाजवूं पाहतात. साम्राज्यशाहीच्या मागील हेतु आर्थिक सुसंपन्नता प्राप्त करून घेणें हा असतो हें अगदीं उघड आहे; पण या आर्थिक कारणामुळेंच केवळ युद्धें उद्भवतात किंवा काय, याबद्दल राजकारणी विद्वानांत मतभेद आहे. दुसऱ्या पक्षाचें म्हणणें असें आहे कीं, राष्ट्रीय वाद बळावल्यामुळेंहि युद्धें होतात. तसेंच कांहीं सामाजिक व राजकीय तत्त्वांचा पुरस्कार व प्रसार करण्याकरितांहि युद्धें होतात; आणि कांहीं थोर राजकारणी पुढाऱ्यांच्या वैयक्तिक महत्त्वाकांक्षेमुळेंहि युद्धें होतात. आज कोरियन युद्ध हें कशामुळें उद्भवलें हें या दृष्टीनीं विचार करतां नक्की सांगणें कठिण जाईल.

**सायणाचार्य**—प्रख्यात वेदभाष्यकार व विद्यारण्य माधवाचार्यांचा बंधु. विजयानगरचा दुसरा संगम व त्याचा चुलत भाऊ दुसरा हरिहर यांचा हा मंत्री होता. इ. स. १३३१ व १३८६ च्या दरम्यान सायण शृंगेरी मठावरील आचार्य होता. सायण-माधवांनीं बहुतेक वैदिक ग्रंथांवर भाष्यें लिहिलीं आहेत. सायणाचार्य १३८७ सालीं मरण पावला. (माधव पाहा).

**सायप्रस**—भूमध्य समुद्रांतील एक बेट. हें आशिया मायनरच्या दक्षिणेस किनाऱ्यापासून ४४ मैलांवर आहे. याच्या पूर्वेस ६० मैलांवर सिरियाचा किनारा आहे. याचें क्षेत्रफळ ३,५७२ चौ. मै. आहे. निकोशिया हें कारभाराचें मुख्य ठिकाण आहे. फळें व भाजीपाला यांची निर्यात बरीच आहे. कापूस व तंबाखू हीं पिकें महत्त्वाचीं आहेत. ॲस्बेस्टॉस व तांबें यांच्या खाणी आहेत. मेंढ्या व बकऱ्या यांची पैदास बरीच होते. ३,७५,००० या लोकसंख्येंत

६०,००० तुर्क आहेत. बाकीचे स्थानिक मूळ रहिवासी सायप्रस ख्रिश्चन आहेत. प्राचीन काळीं येथें ग्रीक व फोनिशियन यांची सत्ता व वसाहत होती. पुढें तें इराणी लोकांच्या ताब्यांत गेलें. व त्यानंतर रोमन व बायझंटाइन साम्राज्यांतहि तें गेलें होतें. नंतर तें व्हेनेशियन (व्हेनिसच्या) राज्यांत दाखल झालें. १५७१ ते १८७८ या काळांत तुर्कांच्या सत्तेखालीं होतें. नंतर तें ब्रिटिशांकडे आलें आहे. १९२५ सालीं ब्रिटिश सरकारनें याला वसाहतीचा दर्जा दिला. एक गव्हर्नर, कार्यकारी मंडळ व विधिमंडळें यांच्यामार्फत कारभार चालतो.

**सायबेरिया**—हा अफाट रशियन प्रदेश आशिया खंडाच्या उत्तर भागांत आहे. त्याचें क्षे. फ. ४८,१४,२२० चौ. मैल, आणि लो. सं. १,१०,६९,५५० आहे. या प्रदेशांत आलताई, सायान व याब्लोनॉय हे पर्वत असून तेथून आर्क्टिक महासागरपर्यंत उत्तरेस पठार आहे. न्यू सायबेरियन ग्रुप हा द्वीपसमूह, रँगेल बेट आणि साखालिन बेटाचा उत्तरार्ध यांचा सायबेरियांत समावेश होतो. ओब,

**सायबेरियन उपाध्याय** येनीसी व लेना या मुख्य नद्या आर्क्टिक महासागराला मिळतात. मुख्य शहरें तोबोलास्क, ओम्स्क, तोम्स्क, इर्कुत्स्क, याकुतस्क, व व्लाडिव्होस्टॉक हीं आहेत. मॉस्को ते व्लाडिव्होस्टॉकपर्यंत ५,४१२ मैलांची 'दि ट्रान्स–सायबेरियन रेल्वे' आहे. सायबेरियांत ८० टक्के रशियन लोक, व बाकीचे तुर्को–तातार, बुरियत, याकूत, तुंगू, किर्गीझ व सामोयेड या जातींचे लोक आहेत. हा उत्तम कृषिप्रधान देश असून येथें गहूं, राय, ओट, बटाटे हीं मुख्य पिकें होतात. परंतु या देशाचा बराचसा प्रदेश शेतीला अयोग्य आहे. तेथें गुरें पाळणें व मधमाशा पाळणें हे धंदे मोठ्या प्रमाणांत चालतात. येथें जंगलें अफाट व मौल्यवान् आहेत. सोनें, रुपें, तांबें, शिसें, लोखंड, प्लॅटिनम व दगडी कोळसा हीं खनिज द्रव्यें सांपडतात.

यांतील नद्या बहुतेक बर्फानें गोठलेल्या असतात. पर्वतांच्या एकामागून एक अशा अनेक रांगा असून त्यांच्यामध्यें सपाट जमिनीचीं मैदानें आहेत. अरण्यें पुष्कळ आहेत. तळीं व सरोवरें सर्वत्र आढळतात. बैकल हें जगप्रसिद्ध गोड्या पाण्याचें सरोवर यांतच आहे. ट्रान्स–सायबेरियन रेल्वे एवढाच या प्रदेशांतील दळणवळणाचा मार्ग आहे. पूर्वी रशियांतून हद्दपार केलेले लोक व त्यांच्याच पिढ्या यांत राहत. पुढें दुसऱ्या महायुद्धाच्या वेळीं रशियन सरकारनें या प्रदेशांत औद्योगिक कारखाने काढले. तेव्हां आतां सायबेरिया फार सुधारला आहे. याचे पूर्व आणि पश्चिम असे दोन भाग पडले आहेत. पूर्वेची राजधानी इर्कुटस्क व पश्चिमेची नोव्हो–सिबिर्स्क आहे.

**सायमोनाइडीज** (खि. पू. ५५६–४६७)—प्राचीन ग्रीक भावगीतें लिहिणारा कीऑसचा कवि. तो आपलें जन्मठिकाण कीऑस बेट सोडून अथेन्स शहरीं राहावयास गेला आणि तेथून अखेरीस सिसिली बेटांत जाऊन राहिला. आणि तेथेंच फार वयातीत होऊन मरण पावला. त्यानें शोकगीतें, भावगीतें, सुभाषितें, इ. अनेक प्रकारची कविता लिहिली. परंतु त्यानें लिहिलेल्या समाधिलेखा(एपिटॅफ)मुळें त्याची अतिशय प्रसिद्धि झाली. त्यांपैकीं थर्मापिली येथें लढलेल्या स्पार्टन वीरांबद्दल त्यानें लिहिलेला समाधिलेख सर्वोत्कृष्ट आहे. त्यानें लिहिलेली 'लॅमेन्ट ऑफ डानी' (डानीचा शोक) ही कविता अतिशय सुंदर आहे.

**सायाळ**—हा उंदराच्या जातीचा एक सस्तन प्राणी आहे.

याच्या सर्व अंगावर विशेषतः पाठीवर अणकुचीदार पिसें असतात व मधून मधून राठ केंस असतात. याचें तोंड आखूड आणि निमुळतें असतें. व कान बारीक असून वाटोळे असतात. याची लांबी दोन फुटांपर्यंत असते व याचीं पिसें क्वचित् १ फूटभरहि लांब असतात. याचा रंग सामान्यतः काळसर करडा असतो. हा रताळीं, बटाटे, वगैरे पदार्थ व झाडांच्या मुळ्या खातो. हा सहसा सांपडत नाहीं. धरूं गेल्यास काटे पिंजारून डुकरासारखा आवाज काढतो.

**सार प्रदेश**—जर्मनी. सार नदी फ्रान्समध्यें व्होसगेस पर्वतांत उगम पावून जर्मनींतून वाहत जाऊन मोसेल नदीला मिळते. या नदीची लांबी १५० मैल आहे. या नदीकांठच्या सारमधील प्रदेश दगडी कोळशाच्या खाणींनीं समृद्ध आहे. या प्रदेशाचें क्षे. फ. ७५० चौ. मैल व लो. सं. ६,५७,८७० आहे. व्हर्सायच्या तहानें (१९१९) या सार प्रदेशांतील कोळशाच्या खाणी नुकसानभरपाई म्हणून १५ वर्षें मुदतीनें फ्रान्सच्या ताब्यांत देण्यात आला होता.

या प्रदेशाचा राज्यकारभार राष्ट्रसंघानें नेमलेल्या पांच सभासदांच्या कमिशनच्या हातीं देण्यांत आला होता. १९२६ सालीं जर्मनी राष्ट्रसंघाचा सभासद झाल्यावर जर्मनीनें हा प्रांत परत मिळण्याबद्दल मागणी केली. नंतर युद्ध करून तो मिळविला. पण १९४५ सालीं जर्मनीचा पूर्ण पराभव झाल्यावर हा प्रांत पुन्हां फ्रेंच झोनमध्यें सामील करण्यांत आला आहे.

**सारंगगड संस्थान**—मध्यप्रांतांतील एक मांडलिक संस्थान. क्षे. फ. ५४० चौ. मै.. लो. सं. १,४०,७८९. याची राजधानी सारंगगड ही बंगाल-नागपूर रेल्वेवरील रायगड स्टेशनपासून ३२ मैलांवर आहे. येथील राजे राजगोंड वंशांतील असून ते पूर्वी भंडाऱ्याहून आले असें म्हणतात. संस्थानांत एक शहर व ४५५ खेडीं आहेत. सरासरी ⅞ लोक छत्तिसगडी भाषा बोलतात. रानटी जाती फारशा नाहींत. येथील जमीन हलकी व रेताड आहे. तथापि ही उणीव शेतकऱ्यांची उद्योगशीलता, खत व कालवे यांनीं भरून निघते. सारंगगड-रायगड याच रस्त्यानें निर्गत व्यापार चालतो. संस्थानांत २० वर शाळा आहेत. सारंगगड शहरीं एक दवाखाना आहे. संस्थानचें उत्पन्न सु. साडेपांच लाख रु. असे. आतां हें संस्थान मध्यप्रांत राज्यांत विलीन झालें आहे.

**सारंगपूर**—मध्य हिंदुस्थानांत देवास संस्थानांतील एक जुनें शहर. शहर फार पुरातन असलें तरी सांप्रतचें शहर माळव्याच्या मुसलमानी राजांच्या अमदानींत (१५ व्या शतकांत) वसलें गेलें असावें. सारंगसिंग खीचीच्या वेळेपासून याचें महत्त्व वाढल्यामुळें त्याचेंच नांव या शहरास मिळालें. हें १५२६ सालीं माळव्याच्या दुसऱ्या महमूद खिलजीपासून राणा संग यानें हस्तगत केलें. पुढें तें शेरशहानें घेतलें. नंतर तें बाझबहादुर याच्या ताब्यांत गेलें. बाझबहादुरामागून या शहराचा माळवा सुभ्यांत समावेश होऊं लागला. पुढें १७३४ सालीं तें मराठ्यांच्या ताब्यांत जाऊन त्यावर देवास, इंदूर, ग्वाल्हेर व पेंढारी करीमखान यांचा निरनिराळ्या वेळीं अमल असे. पुढें १८१८ सालीं झालेल्या तहान्वयें तें अखेरीस देवास संस्थानच्या वांट्यास आलें. हें शहर उत्कृष्ट मलमलीविषयीं पूर्वी फार प्रसिद्ध होतें, पण तो धंदा सांप्रत बसला आहे. मोडकळीस आलेल्या जुन्या इमारतींपैकीं 'रूपमती का गुंबझ' ही प्रमुख होय.

**सारंगी**—एक प्रसिद्ध वाद्य. एक फूट रुंद व एक फूट जाड आणि लांबी सुमारें दोन सव्वादोन फूट असा लांकडाचा ओंडा घेऊन तो आंतून कोरून काढितात. कोठा एक फूट उंचीचा तयार झाल्यावर त्याची रुंदी सुमारें आठपासून दहा इंचांपर्यंत ठेवितात. तयार कोठा व त्यावरील भाग मिळून दोन सव्वादोन फूट उंचीचें हें वाद्य असतें. कोठ्यावरील खोका मागल्या अंगानें मोकळा असतो व वरील बाजू पातळ फळीनें आच्छादिलेली असते. कोठा कातड्यानें मढविलेला असतो. तारदानास भोकें ठेविलेलीं असतात. ह्या भोकांतून तारा व तांती मुदणीनें ताणून हुकास अडकवितात. कोठ्याच्या मध्यावर हस्तिदंती घोडी असते. माथ्याच्या दोनहि अंगांस दोन दोन जाड व लांब अशा खुंट्या बसवितात. वाद्याच्या उजव्या बाजूस खोक्यास ओळीनें भोकें पाडून बारीक खुंट्या दोन अगर तीन ओळींत लाविलेल्या असतात. ह्यांना बारीक पोलादी तारा लाविलेल्या असतात. त्यांना तर्फा म्हणतात. त्यांची संख्या छत्तीसपासून चव्वेचाळीसांपर्यंत असते. हें वाद्य घोड्याचे केंस लावून तयार केलेल्या गजानें वाजवितात. हें वाद्य जितकें मधुर तितकेंच वाजविण्यास कठिण आहे. कारण ह्यांत स्वरांच्या जागा दाखविणाऱ्या सोई नाहींत. ह्यांत सर्व प्रकारचे गमक काढतां येतात. ह्याचा उपयोग प्रायः साथ करण्यासच असतो. स्वतंत्रपणेंहि हें वाद्य वाजवितात.

**सारडा, हरबिलास** (१८६७-     )—एक सार्वजनिक कार्यकर्ते. यांचें शिक्षण अजमेर येथें झालें. प्रथम हे अजमेर येथील गव्हर्नमेंट कॉलेजमध्यें मास्तर होते. १८९२ मध्यें यांची न्यायखात्यांत बदली झाली. १८९४ मध्यें यांस जेसलमीर येथील महाराजांचे पालक नेमण्यांत आलें. १९०२ मध्यें हे पुन्हां ब्रिटिश सरकारच्या नोकरींत आले. १९२१ पर्यंत हे बिआवर येथें सबजज्ज व स्मॉलकॉज जज्ज होते. १९२१ ते १९२३ पर्यंत हे अजमेर येथें स्मालकॉज कोर्टाचे जज्ज होते. नंतर ते अडि. डिस्ट्रिक्ट अँड सेशन्सजज्ज होते. १९२३ मध्यें हे सेवानिवृत्त झाले. नंतर ते जोधपूर येथील चीफ कोर्टाचे सीनिअर जज्ज होते. १९२४ ते १९३३ मध्यें ते मध्यवर्ती असेंब्लीचे सभासद होते. १९२९ सालीं लाहोर येथें भरलेल्या सामाजिक परिषदेचे ते अध्यक्ष होते. १९३० मध्यें बरेली येथें भरलेल्या अखिल भारतीय वैश्य परिषदेचे ते अध्यक्ष होते. भारतीय परोपकारी सभेचे हे चिटणीस आहेत. यांनीं बालविवाह-प्रतिबन्धक कायदा तयार करून मंजूर करून घेतला. बी. बी. सी. आय. रेलवे सल्लागार समिति, हिचे ते सभासद होते. आर. एम्. एस्. पोस्टल परिषद, मध्यभाग, हिचे ते अध्यक्ष होते. १९३६ मध्यें राजपुताना प्रांतिक हिंदु परिषदेचे ते अध्यक्ष होते.

**सारण**,—बिहार, तिरहुत विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. २,६६९ चौ. मै.. लो. सं. २८,८०,५३७. सारण हा शब्द संस्कृतमधील 'शरण' या शब्दापासून आला आहे. हा जिल्हा गंगा व गंडकी या नद्यांच्या दुआबांत वसलेला आहे. येथें पाऊस ४५ इंच पडतो. हा जिल्हा कोसल राज्याची पूर्व सरहद्द होती. यांत चार शहरें (चपरा, सिवान, रेवेलगंज व मीरगंज) आहेत.

लहान लहान खेडीं वरीच आहेत. लोकांची भाषा भोजपुरी हिंदी आहे. पण मुसलमान व कायस्थ लोक अवधी भाषा बोलतात. सुमारें ⅘ लोक हिंदु असून बाकीचे मुसलमान आहेत. या जिल्ह्यांत तांदूळ, तीळ, जव, गहूं, ऊंस, कडधान्यें व गळिताचीं धान्यें पिकतात. सुमारें शेंकडा सहा लोक साक्षर आहेत.

**सारणी-आलेखन**—(नोमोग्राफी). समीकरणांचीं उत्तरें व सूत्रां (फॉर्म्युला)च्या किंमती आलेखा(ग्राफ)च्या साहाय्यानें काढण्याची पद्धत. आलेखावरून क्ष + अक्ष + ब = ० ह्या समीकरणाचीं उत्तरें ०-पासून १० पर्यंत मोजतां येतात. स्थापत्यशास्त्रांतील नेहमीं लागणाऱ्या सूत्रांची किंमत काढण्याकरितां ही पद्धत मोठ्या प्रमाणावर वापरतात.

**सारनाथ**—संयुक्तप्रांत, बनारस जिल्हा, बनारसपासून उत्तरेस ३॥ मैलांवर असलेला एक मोठा बौद्धावशेषसमूह. वास्तविक सारनाथ हें नांव प्रसिद्ध धमेख स्तूपाच्या आग्नेयेकडे असलेल्या एका शैव देवालयाचें आहे. गौतम बुद्धापूर्वीहि हें स्थान पवित्र मानलें जाई. हिंदूंप्रमाणें जैनांनाहि हें ठिकाण क्षेत्राप्रमाणें वाटे. कारण येथें हिंदु अवशेषांप्रमाणें जैन देवालयांचेहि अवशेष आढळतात. पण सारनाथ हें स्थान आज केवळ बौद्ध अवशेषांसाठीं व बौद्ध पौराणिक कथांतून उल्लेखिलेलें म्हणून प्रसिद्ध आहे. कपिलवस्तु, बुद्धगया व कुशिनगर या तिन्हींबरोबर चवथें सारनाथहि सर्वश्रेष्ठ व सर्वपूज्य असें बौद्ध क्षेत्र आहे. या ठिकाणीं खि. पू. ५२८ च्या सुमारास बुद्धानें आपल्या पहिल्या पांच शिष्यांस उपदेश केला, अशी कथा आहे. या ठिकाणीं एक अशोकस्तंभ सांपडला आहे. आग्नेयभागांतील धमेख (धर्मेक्षा) स्तूप पांचव्या-सहाव्या शतकांतील (गुप्त कालांतील) असावा. यावर उत्कृष्ट शिल्पकाम आहे. शिल्पकलेच्या दृष्टीनें सारनाथ येथें बरेंच भांडार सांपडतें. तसेंच बौद्धसंप्रदायाच्या अभ्यासकांसहि या ठिकाणीं अतिशय महत्त्वाच्या गोष्टी आढळतील. ह्युएनत्संगनें या ठिकाणीं १,५०० भिक्षू असलेला मोठा विहार पाहिला होता. तसेंच ७० फूट उंच अशोक-स्तंभ व ३०० फूट उंचीचा स्तूप त्यानें वर्णिला आहे. कुतबुद्दीननें ११९४ सालीं सारनाथाचा नाश केला. आतां या ठिकाणीं अवशेषांचें एक संग्रहालय ठेवलें आहे. मूलगंधकुटि विहार ही नवी इमारत फार सुंदर आहे. येथें महाबोधी संस्थेनें एक ग्रंथालयहि ठेवलें आहे.

**सारमंडळ**—'स्वरमंडळ' ह्या शब्दाचें हें अपभ्रष्ट रूप आहे. हें वाद्य फार प्राचीन आहे. सुमारें दोन-अडीच फूट लांब आणि फूट सव्वाफूट रुंद व सुमारें सहा इंच उंच, अशी एक लांकडी पेटी असते व तिला चार पाय असतात. उजव्या अंगास तिरप्या रेषेंत ह्या वाद्यांत छत्तीस खुंट्या बसविलेल्या असतात. ह्या खुंट्यांत तारा गुंडाळून त्या त्या बाजूच्या समोरील बाजूकडे एक घोडी बसविलेली असते, तिजवरून खालीं तारदानांत तारा अडकवितात. घोडीची लांबी पेटीच्या रुंदीइतकीच सुमारें असते. तिरप्या रेषेंत खुंट्या बसविण्याचें कारण हेंच कीं, ह्या वाद्यांत मंद्र, मध्य व तार अशीं तीन सप्तकें वाजलीं जावींत. ह्या कार्याकरितां तारांची लांबी क्रमानें कमी कमी होत गेलेली पाहिजे. डाव्या हातांत एक पितळी कांडे घेऊन तें तारेवरून दाबून कंप, मींड, इत्यादि प्रकार काढितात. पूर्वी कड्यांच्याऐवजीं शिंपला घेत असत. हें वाद्य हल्लींच्या पियानोचें जनक होय, असें कांहीं आंग्ल ग्रंथकार समजतात. ह्यांत रागदारीचें काम फार चांगलें वठतें. हें वाद्य स्वतंत्रपणें वाजवितात. व क्वचित् प्रसंगीं साथीसहि ह्याचा उपयोग होतो.

**सारस्वत**—पंचगौड ब्राह्मणांपैकीं एक वर्ग. सरस्वती नदीच्या कांठीं राहणारे म्हणून यांना सारस्वत असें नांव पडलें असावें. हे मूळचे पंजाबमधील राहणारे होत. तथापि उपजीविकेसाठीं म्हणा अगर अन्य कारणामुळें हे हल्लीं सर्व हिंदुस्थानभर पसरलेले आढळतात. हल्लीं यांची वस्ती मुख्यतः काश्मीर, पंजाब, संयुक्तप्रांत, महाराष्ट्र, कर्नाटक, मद्रास, त्रावणकोर, कोचीन व मलबार, इत्यादि प्रांतांत आढळते. पंजाबमध्यें सुमारें २५०।३०० घराणीं आहेत व ह्यांच्यांतहि उच्चवर्णी व नीचवर्णी सारस्वत असे भेद आहेत. पंजाबमधील सारस्वत, शुक्ल यजुर्वेदाच्या माध्यंदिन शाखेचे आहेत. हे सारस्वत बहुतेक पौरोहित्य करून उपजीविका करतात. सिंधमधील सारस्वत शुक्ल यजुर्वेदी आहेत. हे लोहाणादि व्यापारी वर्गाचें पौरोहित्य करतात. काश्मीर पंडितहि सारस्वत होत. काठेवाडांत सोरठिया सारस्वत जात प्रमुख आहे. गोव्यांतील सारस्वत शैव आहेत. तर कारवारकडील वैष्णव आहेत. यांचा एकमेकांशीं संबंध नाहीं.

सारस्वतांत बऱ्याच पोटजाती आहेत. त्या मुख्यतः प्रादेशिक विभागांवरून बनलेल्या आहेत. अशा पोटजातींत बेटीव्यवहार होत नाहीं. अलीकडे अखिल-भारतीय सारस्वत सभेनें एकंदर सारस्वतांचें संघटन करण्याचे प्रयत्न चालविले आहेत.

**सारा**—(ग्लोकोमा). हा एक नेत्ररोग आहे. यामध्यें डोळ्यांत एक द्रव जमून बुबुळ दगडासारखें घट्ट होतें, व त्यामुळें दिसत नाहींसें होतें. डोळा लाल होऊन सुजणें, जबर डोकेंदुखी, मंददृष्टि व दिव्याच्या प्रकाशाभोंवतीं वलयें दिसणें हीं या रोगाचीं लक्षणें होत. हा रोग बहुतेक असाध्य आहे; पण तात्पुरतोच शस्त्रक्रिया केली तर उपयोग होतो.

**सारावाक**—हें वायव्य बोर्निओ बेटांत एक ब्रिटिश संरक्षित संस्थान आहे. याचें क्षे. फ. ५०,००० चौ. मैल आणि लो. सं. ५,००,००० आहे. येथील लोक मलायी, डायक, वगैरे जातींचे आहेत. येथें मुख्य शहरें आहेत तीं : कुचिंग (राजधानी

बंदर), सीबू (बंदर) आणि मीरी (तेलाचें केंद्र). येथें पर्वतांच्या रांगा (उंची १०,००० फूट) असून बाराम, बिंटुलू, ओया आणि रेजांग या नद्या आहेत. येथें मुख्य उत्पन्नाचे जिन्नस म्हणजे तेल, सागू, पीठ, रबर, गटापर्चा, वगैरे. येथें मुख्य अधिकारी युरोपियन आहेत. १८४२ सालीं सर जेम्स ब्रूक यानें ब्रूनीच्या सुलतानापासून सारावाकचा कांहीं भाग मिळविला आणि त्यांत पुढें अनेक वेळां आणखी प्रदेश सामील करण्यांत आला. १८८८ सालीं ब्रिटिशसंरक्षणाखालचें एक स्वतंत्र संस्थान असा दर्जा सारावाकला प्राप्त झाला. दुसऱ्या महायुद्धांत हें जपाननें जिंकून घेतलें होतें. १९४५ सालीं येथील राजानें आपलें राज्य ब्रिटनला देऊन टाकलें.

**सारासेनिक शिल्प**—सारासेन ही संज्ञा प्रथम अरबांना लावीत. नंतर सामान्यपणें मुसलमानांना लावूं लागले. क्रूसेडरशीं टक्कर देणाऱ्या थोर कुळातील मुसलमानासच प्रथम सारासेन म्हणत. महंमदाच्या अनुयायांनीं आपल्या मशिदी, राजवाडे व कबरी बांधण्याकरितां जी शिल्पपद्धति उपयोगांत आणली तिला सारासेनी शिल्पपद्धति असें म्हणतात. प्रारंभीं अरब लोकांची अशी स्वतंत्र शिल्पपद्धति प्रचारांत नव्हतीच व त्यांनीं ज्या पद्धतीचा अवलंब केला तीहि त्यांनीं ज्या प्रदेशामध्यें आक्रमण केलें तेथील कारागिरांनींच परिणतीस आणली. या पद्धतीच्या इमारती मुख्यतः ईजिप्त, इराण, स्पेन, तुर्कस्तान व हिंदुस्थान या देशांत आढळतात. स्पेनमधील या पद्धतीच्या इमारतींस मूरीश पद्धतीच्या म्हणून संबोधण्यांत येतें. या पद्धतीचे विशेष म्हणजे घुमट, मनोरे आणि टोंकदार कमानी होत.

**सारिका**—हें नांव अनेक प्रकारच्या वृक्षांवर बसणाऱ्या पक्ष्यांना लावण्यांत येतें. यांच्या चोंचीमध्यें दांतासारखा भाग असतो. यांच्या कांहीं जाती गाणाऱ्या असून कृष्णपक्षी (ब्लॅक बर्ड) हाहि यांच्याच वर्गांत मोडतो. हे पक्षी झाडांचीं फळें, किडे, वगैरे खातात. हे बहुतेक एकाकी राहतात. परंतु कांहीं जाती हिवाळ्यांत कळप करून राहतात. हे पक्षी गाणारे म्हणून प्रसिद्ध आहेत. यांची लांबी नऊ-दहा इंचांपर्यंत असते. हे वसंतऋतूच्या प्रारंभीं गावयास लागतात व थंडी पडेपर्यंत साधारणतः गात राहतात. यांचा रंग पिंगट पण निरनिराळ्या तऱ्हेचा असतो.

**सारूप्य**—वैयक्तिक अभेदत्व किंवा अभिन्नत्व (आयडेन्टिटी) हा तत्त्वज्ञानांतील पारिभाषिक शब्द असून त्याचा अर्थ असा कीं, प्रत्येक व्यक्ति आयुष्याच्या आरंभापासून अखेरपर्यंत एकाच स्वरूपांत कायम राहते तो गुण. या अभिन्नत्वाच्या गुणाच्या आधारें डेकार्टनें व तत्सम तत्त्ववेत्त्यांनीं शरीर व आत्मा यांच्या भिन्नत्वाबाबतचा द्वैतवादी सिद्धान्त प्रस्थापित केला, व आत्म्याचें जडशरीराहून भिन्नत्व सिद्ध केलें. त्यांचें म्हणणें असें कीं, मनुष्याचें शरीर सतत बदलत असतें, पण त्याचा आत्मा कांहींहि फरक न होतां जशाचा तसा कायम असतो. तर्कशास्त्रांतहि 'लॉ ऑफ आयडेन्टिटी' हा महत्त्वाचा सिद्धान्त असून तो अ = अ असा मांडतात. त्या सिद्धान्ताचा निष्कर्ष असा कीं, कोणतीहि वस्तु एकाच वेळीं तत्स्वरूपी आणि भिन्नस्वरूपी असूं शकत नाहीं. शेलिंग या तत्त्ववेत्त्यानें आपल्या तत्त्वज्ञानाला 'अभेदवादी तत्त्वज्ञान' असें नांव दिलें याचें कारण विचार आणि सत् (थॉट अँन्ड बीइंग) यांचें अभेदत्व आहे.

**सार्टो, आंद्रिआडेल** (१४८६–१५३१)—एक इटालियन चित्रकार. यानें फ्लॉरेन्स येथें पुष्कळ चांगलीं ओल्या गिलाव्यावरचीं चित्रें काढून कीर्ति मिळविली. ख्रिस्त माता मेरी हिच्या आयुष्यांतील प्रसंग ॲनुन्झिआता चर्चमध्यें यानें काढलेले पाहावयास मिळतात. 'आब्राहामचा यज्ञ', 'सेंट कॅथेरीनचें लग्न', 'कुमारी मेरी आणि मूल', वगैरे याचीं फलकचित्रेंहि प्रसिद्ध आहेत.

**सार्डिनिया**—हें इटालियन बेट भूमध्य समुद्रांत कॉर्सिका बेटानजीक आहे. हें बेट हा इटलीचा एक प्रांत आहे. त्याचें क्षे. फ. ९,३०१ चौ. मैल आणि लो. सं. ११,५३,३८४ आहे. येथें मुख्य शहरें आहेत तीं : कॅग्लिआरी (राजधानी), सासारी, आणि इग्लेलिआस. या तिन्ही शहरांत महत्त्वाच्या खाणी आहेत व तेथें जस्त, शिसें, रुपें, तांबें, मॅगॅनीझ, दगडी कोळसा, इत्यादि खनिज द्रव्यें सांपडतात. या बेटाचा प्रदेश बहुतेक डोंगराळ मैदान आहे (सर्वांत अधिक उंची ६,२०० फूट). येथील मुख्य पिकें गहूं, दारू, ऑलिव्ह तेल व इमारती लांकूड हीं आहेत. येथें गुरें पाळण्याचाहि धंदा चालतो व सार्डीन व टनी या दोन जातींच्या माशांच्या मच्छीमारीचा धंदा चांगला चालतो. हें बेट ख्रि. पू. ६ व्या शतकापासून ३ ऱ्या शतकापर्यंत कार्थेजच्या अमलाखालीं होतें. नंतर तेथें रोमन लोकांची सत्ता चालू होती आणि अखेर तें बेट व्हॅन्डॉल लोक, ऑस्ट्रोगॉथ लोक व बायझंटाइन लोक यांनीं एकामागोमाग जिंकून घेतलें (इ. स. ६ वें शतक). नंतर सारासेन लोकांनीं आणि १३२६ सालीं ॲरेगॉनीझ लोकांनीं तें जिंकलें. १७१३ सालीं ऑस्ट्रियाच्या ताब्यांत आणि १७२० सालीं सॅव्हॉयच्या ड्यूकच्या ताब्यांत हें बेट गेलें आणि १८६१ सालीं सार्डिनियाचा राजा व्हिक्टर इमॅन्युअल हा इटालीचा राजा झाला.

**सार्वजनिक कर्जरोखा**—(डिबेंचर). एखाद्या सार्वजनिक संस्थेनें घेतलेल्या कर्जाबद्दल दिलेला रोखा. अशा रीतीनें अनेक व्यक्तींकडून काढलेल्या कर्जाच्या एकवट रकमेला संस्था आपली मिळकत तारण लावून देत असते. ठराविक वेळीं द्यावयाच्या व्याजाचें हें कर्ज असतें. हे कर्जरोखे नोंदलेल्या व्यक्तींच्या नांवचे

(शाहजोग) किंवा नुसते धारण करणारांचे (धनीजोग) अशा दोन प्रकारचे, हुंडी (चेक) प्रमाणें असतात. ब्रिटिश कंपन्यांचे कर्जरोखे धनीजोग चलनाप्रमाणें देतां-घेतां येतात. शेअरप्रमाणें हे रोखे कंपनीला पुन्हां पुन्हां काढतां येतात व शेअरप्रमाणें त्यांचा व्यवहार चालतो. पण रोखेदार हे कंपनीचे सभासद नसून धनको असतात.

**सार्वजनिक वाहनांचा कायदा**—हा यांचे पब्लिक कन्व्हेयन्स ॲक्ट १९२० सालीं मंजूर झाला. वाहन याचा अर्थ चाकें असलेलें व माणसांची किंवा सामानाची ने-आण करण्याचें कोणतेंहि वाहन असा आहे. मुंबई शहरांत पोलिस कमिशनर व इतर ठिकाणीं सरकार नेमील तो अधिकारी याच्याकडून लायसेन्स मिळविल्याशिवाय कोणालाहि भाड्यासाठीं वाहन ठेवतां येणार नाहीं. हें लायसेन्स एक वर्षपर्यंत किंवा अधिकारी ठरवील त्या मुदतीपर्यंत अमलांत राहील. वाहन, घोडा किंवा इतर जनावर, आणि हांकणारा ड्रायव्हर या तिघांची तपासणी करून योग्य व लायक वाटल्यास लायसेन्स दिलें जाईल; त्याकरितां सरकार ठरवील ती फी द्यावी लागेल, व लायसेन्स पूर्वीचें पुन्हां पुढें चालविण्यासाठीं पूर्वीच्या निम्मी आकारणी पडेल. वाहन वापरण्याची हद्द, उतारूंची संख्या, व भाड्याचे दर सरकारी अधिकारी ठरवील. भाड्याच्या दरांची छापील यादी व लायसेन्स वाहन हांकतांना ड्रायव्हरनें नेहमीं आपल्याजवळ बाळगलें पाहिजे आणि पोलिसानें किंवा उतारूनें मागितल्यास त्याला दाखविलें पाहिजे. जास्त उतारू वाहनांत बसविणें, भाड्याचा तक्ता न दाखविणें, वाहन हांकीत असतां दारू पिऊन धुंद असणें, शिवीगाळ किंवा अश्लील हावभाव करणें, भाड्याचे पैसे आगाऊ मागणें, वाहन भाड्यानें मागणारास नाकारणें, जास्त भाडें मागणें, वगैरे गुन्ह्यांबद्दल ड्रायव्हरला दंड पन्नास रुपयेपर्यंत होईल (कलम २६). वाहनांत कोणाची कांहीं वस्तु चुकून राहिल्यास ती ड्रायव्हरनें पोलिसस्टेशनवर दिली पाहिजे (कलम ३४). या बाबतींत हिंदुस्थान सरकारनें 'दि हॅकनी कॅरेज' ॲक्ट (हॅकनी कॅरेज म्हणजे जनावरांनीं ओढण्याचें वाहन) हा कायदा १८७९ सालीं आणि 'दि स्टेज कॅरेजेस ॲक्ट' (स्टेज कॅरेज म्हणजे एक किंवा अधिक घोड्यांनीं ओढण्याचें वाहन) हा कायदा १८६१ सालीं करून या बाबतींत कायदे करण्याचा अधिकार प्रांतिक सरकारांना दिला आहे.

**सार्वमत संमति**—(रेफरॅन्डम). राज्यशास्त्रांत या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, जेव्हां राज्यघटनेंत एखादा फार महत्त्वाचा बदल करावयाचा असेल तेव्हां त्या प्रश्नाबद्दल केवळ प्रतिनिधि सभेचें मत घेण्याऐवजीं देशांतील सर्व मतदारांचें मत घेण्यांत येतें. या पद्धतीला 'रेफरॅन्डम' म्हणतात. याप्रमाणें सार्वमत घेण्याचें कलम स्वित्झर्लंडच्या राज्यघटनेंत आहे; ऑस्ट्रेलियन कॉमनवेल्थच्या घटनेंतहि आहे; तसेंच अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांच्या राज्यघटनेंत आहे. पण ग्रेट ब्रिटनच्या राज्यघटनेंत नाहीं.

**सार्सापरिला**—[जाति–स्मिलॅक्स]. सार्सापरिला हीं कांहीं झाडांचीं देठमुळें होत. सार्सापरिलाचा उपयोग औषधींमध्यें होतो व याच्या कांहीं जातींचा मोठा व्यापार चालतो. याचा अर्क व काढा देतात. यांत मूत्रजनक व भेदक गुण आहेत.

**साल**—झाडाच्या खोडांवरचें व मुळांवरचें आवरण. ही काष्ठमय असून झाडाच्याच मृत पेशींची बनलेली असते व साल आणि झाडाच्या जिवंत पेशी यांमध्यें बुचासारखा एक जलाभेद्य पडदा असतो. सालींमध्यें टॅनिन, गोंद, वगैरे पदार्थ असतात. कातडें कमावण्याकरितां ओक, बाभूळ, तरवड, वगैरे झाडांची साल वापरण्यांत येते. दालचिनी ही एक झाडाची सालच आहे. कांहीं झाडांच्या साली औषधी असतात व कांहींचे दोर निघतात.

**सालनकालम**—(सालिसिलिक ॲसिड). हें तीव्र विषम असून औषधांत आणि आसो रंग तयार करण्यासाठीं ह्याचा उपयोग होतो. ह्यामुळें ह्याचें मोठ्या प्रमाणांत उत्पादन होतें.

**सालबाई**—ग्वाल्हेर संस्थान, ग्वाल्हेरच्या दक्षिणेस ३० मैलांवर हा किल्ला आहे. हें ठिकाण मूळ भदोरिया रजपुतांचें होतें. १७५१ त मराठ्यांनीं हें राजा बदनसिंह यांजपासून जिंकून घेतलें. इंग्रज-मराठे युद्धाचा शेवट सालबाईच्या तहानें झाला (१७८२). हा तह महादजी शिंदे यांच्या मध्यस्थीनें या ठिकाणीं झाला.

**सालंमिश्री**—हें झाड हळदीच्या झाडासारखें असतें. तुर्कस्तान, इराण, अरबस्तान या बाजूस हीं फार होतात व याच्या औषधाचा फार खप आहे. याच्या मुळ्या काढून वरची साल सोलतात व तव्यावर आंच देतात. म्हणजे बाजारांतली सालंमिश्री होते. ही फार पौष्टिक आहे. क्षयरोग्यांना रक्तातिसारावर फार उपयोगी आहे. प्रदर, धातुविकार, संग्रहणी, इ. रोगांवर सालंमिश्री देतात.

**सालरजंग, सर** (१८२९–१८८३)—हैद्राबाद संस्थानचे एक प्रसिद्ध दिवाण. यांचें नांव मीर तुरब अलीखान असें असून आपले चुलते सिराजउल्मुल्क यांच्यानंतर हे हैद्राबाद संस्थानचे दिवाण झाले. १८५७ सालच्या बंडापासून हैद्राबाद संस्थान अलिप्त राखण्यासाठीं यांनीं केलेल्या पद्धतशीर प्रयत्नामुळें यांचा खून करण्याचेहि प्रयत्न झाले. या काळांत जरी हे लोकांच्या मनांतून उतरले असले तरी नंतर हैद्राबाद संस्थानांत जमाबंदीची व्यवस्था, पोलिस खात्याची पुनर्घटना, शिक्षणखात्याची सुधारणा, हैद्राबाद–वाडी रेल्वेची स्थापना, सेंट्रल ट्रेझरीची स्थापना

यांसारख्या अनेक उपयुक्त योजना पूर्ण करून यांनीं लोकांमधील असंतोष दूर केला. पुढें मेहबूब अलीखान निझाम हे तीन वर्षे वयाचे असताना १८६९ सालीं हैद्राबाद संस्थानचे 'रीजंट' म्हणून सर सालरजंग यांची निवड करण्यांत आली.

निजामनें खंडणीसाठीं इंग्रजांना वऱ्हाड प्रांत दिल्यानंतर दोनच दिवसांनीं सर सालरजंग यांची त्या संस्थानच्या दिवाणपदावर नेमणूक झाली. यांनीं बारा कोटी रुपयांची रक्कम सरकारच्या स्वाधीन करून इंग्रजांकडे वऱ्हाडची मागणी केली, परंतु निझाम हा अल्पवयीन असल्यानें हा प्रांत देण्याचें त्या वेळीं इंग्रज सरकारनें नाकारलें. पुढें यांच्या मृत्यूनंतर हा प्रांत निझामला देण्यात आला. आपल्या पद्धतशीर व नीटनीटकेपणाच्या वर्तणुकीनें यांनीं स्वदेशांत, तसेच युरोपसारख्या परकीय देशांतहि सर्वांकडून वाहवा मिळवली. पण शेवटीं कॉलरा होऊन हे मरण पावले. यांना विषप्रयोग करण्यांत आला होता असेंहि म्हणतात.

**सालवण**—( सं. शालिपर्णी ). यास रानगांजा असेंहि म्हणतात. झाडे जास्वंदीप्रमाणें असून पानें कात्रीदार असतात. दशमूळांत सालवणीचें मूळ एक आहे. अर्धशिशीवर सालवणीचा काढा नाकांत घालतात. तेलानें भाजल्यावर रावेचा लेप देतात. दशमूळांचा काढा आयुर्वेदकांत फार करून येतो. दशमूलारिष्ट पाहा.

**सालवीन**—खालच्या ब्रह्मदेशाच्या तेनासरीम विभागाच्या उत्तरेस असलेला डोंगराळ जिल्हा. क्षे. फ. २,६६६ चौ. मै.. लो. सं. ५४,०००. मुख्य नद्या सालवीन, युनझालीन व बिलिन या असून या तीनहि नद्यांतून नावा चालतात. सर्व जिल्हा खडकाळ असल्यामुळें पुष्कळ प्रकारचे खडक या जिल्ह्यांत आहेत. त्यांतल्या त्यांत गारगोटी व चुनखडी फार सांपडते. जंगलांतून साग, अंजीर, बांबू व ताड हीं झाडें पुष्कळ आहेत. हवा एकंदरींत दमट, उष्ण व रोगट आहे. पावसाचें मान ११४ इंच आहे.

पूर्वी येथे युनशान लोक राहत होते. नंतर येथें करेण लोक आले. या लोकांस छिंगपाईच्या राजानें आपल्या अमलाखालीं आणलें. दुसऱ्या ब्रह्मी युद्धानंतर हा प्रदेश इंग्रजांच्या अमलाखालीं आला. नंतर स. १८७२ त हा प्रदेश श्वेगिन जिल्ह्यापासून वेगळा करून याला सालवीन जिल्हा हें नांव दिलें. शेंकडा ८५ लोक शेतकीवर उपजीविका करतात. बिलिन व युनझालीन दऱ्याशिवाय बाकीचा प्रदेश शेतकीच्या उपयोगाचा बिलकुल नाहीं. पाऊस पुष्कळ व वेळींच पडतो व त्यामुळें तांदूळ पुष्कळ पिकतो. तीळ व सुपारी यांचें पीक फार असून हा माल बाहेरहि पुष्कळ पाठविला जातो. खनिजद्रव्यांपैकीं शिसें व लोखंड यांच्या खाणी पुष्कळ ठिकाणीं आहेत. सेवाग नदीच्या जवळ थोडें थोडें सोनें सांपडतें.

**सालवृक्ष**—हिंदुस्थानांतील अतिशय महत्त्वाचें इमारती लांकडाचें झाड. हें शंभर फुटांपर्यंत उंच वाढतें. याला संस्कृतांत अश्वकर्ण नांव आहे. कारण याचीं पानें घोड्याच्या कानासारखीं असतात. झाडापासून राळ निघते.

**सालाझार, डॉ. आंटोनियो डी ऑलिव्हीरा** (१८८८– )—पोर्तुगालचा पंतप्रधान. हा एका लहान जमीनदाराचा मुलगा. कोइंब्रा युनिव्हर्सिटींत अर्थशास्त्राचा प्रोफेसर झाला. १९२६ सालीं त्याला पोर्तुगाल सरकारांत अर्थमंत्री नेमण्यांत आलें, पण थोड्याच दिवसांत त्यानें त्या जागेचा राजीनामा दिला. १९२८ सालीं त्याला पुन्हां अर्थमंत्री नेमलें, व त्यानें पोर्तुगीज सरकारचें बजेट नीट सुधारून दिलें. १९३२ सालीं त्याला मुख्य प्रधान नेमण्यांत आलें व १९४० पर्यंत तो त्या जागेवर होता. या दीर्घकाळांत त्याच्या हातीं हुकूमशाहीसारखीच सत्ता होती. पण इतर युरोपीय हुकूमशहांप्रमाणें तो जबरदस्तीनें सर्वाधिकारी बनला नव्हता, तर लोकमतानें तो त्या श्रेष्ठ पदावर अधिष्ठित झाला होता. त्यानें पोर्तुगाल देशाला आमूलाग्र नवें राष्ट्र बनविण्याचा कार्यक्रम हातीं घेतला; त्यानें नवी राज्यघटना बनविली; आणि सामाजिक, आर्थिक, शैक्षणिक व इतर हरएक लोकोपयोगी बाबतींत सुधारणा करण्याचा कार्यक्रम आंखून तो अमलांत आणण्याकडे सर्व लक्ष दिलें. त्यानें आपला एक राष्ट्रीय पक्ष बनविला, व त्याला पोर्तुगीज लष्करी दलाची जोड दिली; शिवाय पोर्तुगीज नवजवान संघ या संस्थेची संघटना केली. त्याचें धोरण फॅसिस्ट–हुकूमशाही पद्धतीचें आहे, पण युरोपांतील इतर सर्व हुकूमशहांपेक्षां सालाझारचा अमल फार सौम्यपणाचा आहे. त्याच्या पुढील तीन घोषवाक्यांवरून त्याची मवाळ पण व्यावहारिक दृष्टि स्पष्ट दिसते—(१) "सरकारचें जमाखर्ची ऊर्फ हिशोबी खातें नेहमीं बरोबर असतें"; (२) "रोगापेक्षांहि त्या रोगावरील उपायाबद्दल अधिक भीति बाळगली पाहिजे" (३) "सरकार किंवा राज्यकारभार या शब्दाच्या व्याख्येंतच सत्य व न्याय दोन्ही निगडित झालेलीं आहेत."

**सालामांडर**— बेडकासारखा भूजलचर प्राणिवर्गांतील हा आहे. युरोप आणि पश्चिम आशिया या खंडांत हा आढळतो. याला चार बोटें व

पांच अंगठे असतात. ठिपक्याचा सालामांडर ६ इंच लांब असतो व त्याला जेव्हां भीति वाटते तेव्हां त्याच्या अंगांतून पांढरें विष बाहेर पडतें. कॉकेशियन सालामांडरला शेपटीच्या बुंध्याशीं एक पुढें आलेलें गात्र असतें. या प्राण्याच्या बऱ्याच जाती आहेत.

सारनाथ — सिंहस्तंभशीर्ष (पृ. २५६१)

सीकिम — सिनिओल्चु शिखर (पृ. २५६९)

सांची — स्तूप (पृ. २५४६)

**सॉलिसिटर**—इंग्लंडांत वकिलीचा धंदा करणारे म्हणजे कोर्टांत आपल्या पक्षकारातर्फे काम चालविणारे जे इसम त्यांना सॉलिसिटर म्हणतात. सॉलिसिटर या वकिलीच्या कामाशिवाय गहाण, फरोक्त, वगैरे व्यवहारांचे दस्तऐवज तयार करण्याचें, आणि इतर अनेक विवादास्पद बाबतींत कायद्याचा सल्ला देण्याचें काम करतात. खालच्या दर्जाच्या कोर्टांत सॉलिसिटर स्वतः आपल्या पक्षकारातर्फे वकिलीचें काम करतात. परंतु वरिष्ठ कोर्टांत वकिलीचें काम सॉलिसिटरतर्फे बॅरिस्टर करतात. सॉलिसिटरना आपल्या फीच्या पैशाबद्दल पक्षकारावर दावा लावतां येतो, किंवा पक्षकाराचें कागदपत्र फीची रक्कम मिळेपर्यंत अडकवून ठेवतां येतात. हिंदुस्थानांत याचप्रमाणें सॉलिसिटर आहेत.

**सालेम**—(शैल्यम्). मद्रास, मध्यभागांतील जिल्हा. क्षे. फ. ७,०७३ चौ. मै.. बालाघाट, बारामहाल व तलघाट हे तीन प्रदेश मिळून सालेम जिल्हा बनला आहे. ह्या जिल्ह्यांत मुख्य कावेरी, वेलार, पोनियर व पालार या चार नद्या आहेत. ह्या जिल्ह्यांत एकंदर ३२ इंच पाऊस पडतो. पूर्वी ह्या प्रदेशाच्या उत्तरेकडील भागावर पल्लव राजे राज्य करीत असत. १४ व्या शतकांत हा जिल्हा विजयानगरच्या राजांनीं जिंकला. पण १७ व्या शतकाच्या प्रारंभीं हा मदुरेच्या नायक राजांच्या ताब्यांत होता. १६८८–९० मध्यें तो म्हैसूरच्या राज्यांत समाविष्ट झाला. नंतर सन १७९१ त टिपूशीं लढून तो इंग्रजांनीं आपल्या सत्तेखालीं आणला. ह्या जिल्ह्यांत १० तालुके आहेत. सालेम, तिरुपत्तूर व वाणियंबडी हीं तीन शहरें आहेत. शेंकडा ७१ लोक तेलगू भाषा बोलतात. येथील लोकांचा उदरनिर्वाह शेतकीवर चालतो. ह्या जिल्ह्यांत खनिज द्रव्यहि पुष्कळ सांपडतें; उदा., सोनें, लोखंड, माणिक, पोलाद, वगैरे. सालेम येथील लोखंड प्रसिद्ध आहे. येथें मुख्य कारखाना कापड विणण्याचा आहे. सालेम, तिरुपत्तूर व वाणियंबडी येथें म्युनिसिपालिट्या आहेत. शिक्षणाच्या बाबतींत हा जिल्हा मागासलेला आहे. लो. सं. २८,६९,२२६.

सालेम हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. येथें एक कॉलेज आहे. येथें सुती व रेशमाचें चांगलें विणकाम होतें.

**सॉलोमन**—इस्रायल लोकांचा राजा. डेव्हिड व त्याची पत्नी बाथशेबा ह्यांचा हा मुलगा होय. त्याच्या शहाणपणाबद्दल व त्याच्या संपत्तीबद्दल त्याची फार कीर्ति होती, आणि ज्यू धर्मी देवालयाची इमारत बांधून त्यानें सर्व इस्रायल राष्ट्र राजनिष्ठ बनविलें. त्यानें बायबल धर्मग्रंथांतील पुढील पुस्तकें लिहिलीं आहेत, असें मानतात : 'दि बुक ऑफ प्राव्हर्ब्ज', 'इक्लिझीॲस्टस्' आणि 'दि सॉंग ऑफ सॉलोमन'. परंतु अलीकडील टीकाकारांचें असें मत आहे कीं, सॉलोमननें 'दि बुक ऑफ प्राव्हर्बज्' यामधील फक्त कांहीं भाग लिहिला आहे.

**सॉलोमन बेटें**—पॅसिफिक महासागरांतील ब्रिटिश संरक्षित बेटें. यांत ग्वाडालकानार, मालैटा, सॅनक्रिस्टोव्हल, न्यू जार्जिया, लॉर्ड हो, सान्टाक्रूझ, इ. बेटें येतात. क्षे. फ. ११,००० चौ. मै. व लो. सं. सुमारें दीड लाख. रताळीं, केळीं, रबर, नारळ, इ. फळें फार होतात, व त्यांचें चांगलें उत्पन्न येतें. पूर्वी यांतील कांहीं बेटें जर्मनीची होतीं. पहिल्या महायुद्धानंतर कांहीं ब्रिटिशांकडे व कांहीं ऑस्ट्रेलियाकडे राष्ट्रसंघाच्या आदेशा(मॅन्डेट)मुळें आलीं.

बेटांतील देशी शिक्षक

**साल्व्हर्सन**—याला '६०६' असेंहि नांव आहे. गरमी रोगावर हें रामबाण औषध आहे. हें सेंद्रिय रासायनिक औषध असून यांत सोमल असतें. याचा शोध डॉ. एरलिच यांना १९०९ सालीं चमत्कारिक रीतीनें लागला. डॉ. मजकूर मलेरियावर औषध शोधून काढीत होते. उंदीर, ससे, इ. प्राण्यांना त्यांनीं ६०५ वेळां आलटून-पालटून अनेक निरनिराळीं औषधें देऊन पाहिलीं. शेवटीं ६०६ व्या वेळीं त्यांना गरमी रोगाच्या जंतूवर परिणामकारक अशा या विषाचा शोध लागला. म्हणून या औषधास '६०६' असें म्हणतात.

**साल्व्हाडोर**—मध्य अमेरिकेंतील एक लोकराज्य. हें पॅसिफिक महासागराच्या कांठीं आहे. हॉंडुरास आणि ग्वाटेमाला यांच्या सरहद्दी याला लागून आहेत. हा बहुतेक डोंगराळ मुलूख आहे. यांत ज्वालामुखी बरेच आहेत व वारंवार भूकंपांचा उपद्रव होतो. मध्य अमेरिकेंतील लहानांत लहान अशा या संस्थानांत शेतीची विशेष जोपासना व वाढ झाली असून कॉफी, साखर, मका, तीळ, तांदूळ, वगैरे मालाची मोठी निर्यात होते. सान साल्वाडोर हें राजधानीचें शहर असून ला युनियन हें निर्यात व्यापाराचें मोठें बंदर आहे. संस्थानचें क्षेत्रफळ १३,१७६ चौ. मै. व लो. सं. १८,२९,८१६ आहे. १५२६ मध्यें स्पॅनिश लोकांनीं याचा शोध लावला. १८२१ पावेतों तें स्पेनच्या ताब्यांत होतें. १८२१ मध्यें तें मध्य अमेरिकन संयुक्त संस्थानांत सामील झालें व १८४० मध्यें स्वतंत्र झालें. पूर्वी हा प्रदेश इंडियनांचाच होता. आतां लोकसंख्येंत शें. २० इंडियन आहेत. दुसऱ्या महायुद्धाच्या वेळीं हें राष्ट्र दोस्तांच्या बाजूस होतें.

**सावकारी कायदा**—इंग्लंडांत १९००, १९११, व १९२७ सालीं 'मनी लेंडर्स ॲक्ट' हा कायदा झाला. त्यांत मा-

कारीच्या धंद्यावर जीं नियंत्रणें घातलीं आहेत तीं पुढीलप्रमाणें आहेत : (१) प्रत्येक सावकारानें या धंद्याचें लायसेन्स काढलें पाहिजे, आणि लायसेन्स मिळविण्याकरितां 'पेटी सेशनल कोर्टो' कडून लायकीचा दाखला घेतला पाहिजे; (२) आपल्या धंद्याच्या प्रसाराकरितां जाहीर पत्रकें, किंवा प्रचारक यांचा उपयोग करतां कामा नये; (३) कर्जाचा व्यवहार ऊर्फ करार याबद्दल लेखी दस्तऐवज केला पाहिजे; (४) व्याजाचा दर शेंकडा ४८ पेक्षां अधिक असतां कामा नये; (५) कर्ज-व्यवहाराकरितां आगाऊ खर्च, वगैरे कर्जदाराकडून घेतां कामा नये; (६) कर्जवसुलीकरितां दावा लावणें झाल्यास दस्तऐवजांत ठरलेल्या मुदतीनंतर बारा महिन्यांच्या आंत दावा लावला पाहिजे.

हिंदुस्थानांतहि या प्रकारचा कायदा कांहीं प्रांतांतून केला आहे.

**सावंतवाडी संस्थान**—मुंबई, जुन्या बेळगांव एजन्सींतील एक संस्थान. सांप्रत आपण ज्याला सावंतवाडी संस्थान म्हणतों, तो प्रदेश प्राचीन काळी हल्लीं असलेल्या नांवानें प्रसिद्ध नव्हता. कोंकण सुभ्याच्या पोटीं कुडाळ व भीमगड या नांवाचे दोन परगणे होते, त्यांत सावंतवाडी प्रदेशाचा समावेश होत असे. इ. स. १६९७ मध्यें सावंत भोसले यांनीं कुडाळदेशस्थ प्रभूस जिंकून ते वरील दोन्ही परगण्यांवर स्वतंत्रपणें सत्ता चालवूं लागले. पुढें या सावंताकडील मुलुखांपैकीं थोडथोडा मुलुख शेजारच्या राजांनीं हस्तगत केला. कुडाळ परगण्यापैकीं तीन तर्फा, एक बंदर व दोन तर्फांपैकीं कांहीं गावें इंग्रजांनीं घेतलीं. एक कर्यात कोल्हापूर संस्थानकडे गेली व भीमगड परगण्यापैकीं तीन महाल पोर्तुगीज सरकारच्या ताब्यांत गेले. शेवटीं नऊ तर्फा, एक कर्यात व दोन महाल सावंत भोंसले यांच्या सत्तेखालीं राहिले. हा मुलूख व चंदिगडे तर्फेपैकीं मिळालेले आंबोली, चौकूळ व गेळें हीं तीन गांवें मिळून सध्यांचें सावंतवाडी संस्थान झालेलें आहे. संस्थानचें क्षे. फ. ९३० चौ. मै. असून लो. सं. २,५२,१७० आहे, व उत्पन्न सुमारें दहा लक्ष रु. आहे.

तांदूळ, नाचणी, वरी व नारळ हीं संस्थानचीं मुख्य पिकें होत. अफू, जरतार, शिंगाचें काम, खेळणीं व लाखेचे जिन्नस तयार होतात. संस्थानांत सुमारें १५० शाळा आहेत.

इतिहास—या संस्थानच्या राजघराण्याच्या मूळ पुरुषाचें नांव मांग सावंत होतें. तो उदेपूर येथील प्रसिद्ध शिसोदिया घराण्यापैकीं असून त्याचें उपनांव भोसले होतें. मांग सावंत यानें या प्रांतीं आल्यावर कांहीं प्रांत मिळविला व होडावडें येथें आपलें राहण्याचें ठिकाण केलें. या वेळीं या प्रांतीं विजयानगरच्या हिंदु राजांचा अमल होता. विजयानगरचा पाडाव झाल्यावर हा प्रांत आदिलशाहीकडे गेला. या मांग सावंताचा नातू खेम सावंत हाच सावंतवाडीचा राज्यसंस्थापक होय. यानें १६२७ सालीं विजापूरकरांकडून देशमुखी मिळवून तिचा चौदा वर्षें उपभोग घेतला. याच्यामागून याचा वडील मुलगा सोम सावंत व त्याच्यामागून धाकटा मुलगा फोंड सावंत गादीवर आला. स. १६५१ त फोंड सावंत मरण पावल्यावर त्याचा धाकटा भाऊ लखम सावंत या प्रांताचा सत्ताधीश झाला. हा १६७५ सालीं वारला. याच्यानंतर याचा पुतण्या खेम सावंत (दुसरा) गादीवर आला. यानें पोर्तुगीजांना नामोहरम केलें व आपल्या राज्याचा विस्तार केला. खेम सावंत १७०९ त निवर्तला. याच्यामागून फोंड सावंत गादीवर आला. फोंडानंतर त्याचा नातू रामचंद्र सावंत राजा झाला. त्याचा कारभार त्याचा पराक्रमी व कर्तबगार चुलता जयराम पाहत असे. रामचंद्रानंतर त्याचा पुत्र गादीवर आला (१७५५). हा खेम सावंत १८०३ मध्यें निपुत्रिक वारल्यानंतर गादीविषयीं भांडणें लागलीं. शेवटीं रामचंद्र ऊर्फ भाऊसाहेब सावंत हा खेम सावंताची पत्नी लक्ष्मीबाई हिच्या मांडीवर दत्तक जाऊन राज्याधिकारी झाला. स. १८०८ त भाऊसाहेबाचा खून झाला व लक्ष्मीबाई वारली; तेव्हां (तिसरा) खेम सावंताची दुसरी पत्नी दुर्गाबाई हिला दुसरा एक मुलगा दत्तक दिला. हा फोंड सावंत १८१२ त वारला; तेव्हां अज्ञान मुलगा (चौथा) खेम सावंत गादीवर आला. हा सावंत सज्ञान होऊनहि राज्यकारभार नीट चालवीना. संस्थानांत बंडाळ्या होऊं लागल्या, तेव्हां इंग्रज सरकारनें स. १८३८ त राजघराण्यांत लायक पुरुष होईपर्यंत राज्यकारभार पोलिटिकल सुपरिंटेंडेंटमार्फत स्वतः पाहण्याचें ठरविलें. स. १८६७ त खेम सावंत निवर्तला व त्याचा मुलगा फोंड सावंत गादीवर आला. हा दीड वर्षांतच वारल्यावर त्याचा मुलगा रघुनाथ ऊर्फ बाबासाहेब गादीवर आला. १८९९ त बाबासाहेब मृत्यु पावला. व त्याचा चुलतभाऊ श्रीराम गादीवर आला. हा १९२३ मध्यें वारला. त्या वेळीं वारस राजे बापूसाहेब अल्पवयस्क होते. पुढें त्यांचें शिक्षण इंग्लंडांत झालें व पहिल्या महायुद्धांत त्यांनीं मेसापोटेमियांत चांगली मर्दुमकी गाजविली. सध्यांचे राजे शिवराम सावंत हे अल्पवयी असतांना १९३७ त गादीवर आले; नंतर १० वर्षांनीं यांना अधिकार मिळाले. यांना लष्करी शिक्षण लाभलें आहे व हे चांगले खेळाडूहि आहेत. पण आतां हें संस्थान मुंबई राज्यांत विलीन झालें आहे.

सावंतवाडी गांव—संस्थानची राजधानी असून तिला सुंदरवाडी म्हणतात. १६७० सालीं फोंड सावंतानें हें शहर वसविलें असें सांगतात. गांवाजवळच मोतीतलाव आहे. १९०४ सालीं येथें म्युनिसिपालिटी आली. येथून जवळच गोंव्याची हद्द लागते. वेंगुर्लें बंदर जवळच आहे.

सावंतवाडीचा किल्ला—सांवतवाडी येथें मोती तलावाच्या पूर्वेकडे वाडीचा किल्ला बांधलेला आहे. हा दगड-चिखलांत

बांधलेला आहे. याच्या आग्नेयेस व दक्षिणेस खंदक आहे. लांबी ३५० यार्ड व रुंदी १५० यार्ड आहे. तलावाच्या बाजूस दरवाजा आहे, त्याला मूस दरवाजा असें म्हणतात. बालेकिल्ला उंच दरडीवर बांधलेला आहे. आंत एक वाडा व इतर कचेऱ्या आहेत.

**सांवता माळी** ( मृ. १२९५ )—एक विठ्ठलभक्त संतकवि. हा पंढरपूरजवळील अरण भेंडी गांवीं राहत असे. हा ज्ञानेश्वराच्या तीर्थयात्रेंत होता. याचे कांहीं अभंग प्रसिद्ध आहेत. यानें शके १२१७ आश्विन वद्य १४ रोजीं समाधि घेतली.

**सावनी कल्याण**—हा राग कल्याण थाटांतून निघतो. याच्या आरोहावरोहांत मध्यम स्वर वर्ज्य होतो, म्हणून याची जाति षाडव-षाडव आहे. वादी स्वर षड्ज व संवादी पंचम आहे. गानसमय रात्रीचा पहिला प्रहर मानितात. या रागांत निषाद स्वर दुर्बल ठेवण्यांत येतो. मंद्र व मध्य सप्तकांत विलंबित लयीनें हा राग गाण्याचा प्रचार आहे. याची प्रकृति गंभीर आहे. हा यावनिक राग आहे. व एक कल्याणप्रकार आहे.

**सांवर**—[ लॅ.–साल्मालिआ मलबारिका. इं.–सिल्क कॉटन. सं. शाल्मलि ]. हें एका रेशमी कापडाच्या झाडाचें नांव आहे. याचें फळ विषारी आहे असें ऋग्वेदांत म्हटलें आहे. पण ज्या गाडी-मधून नवऱ्यामुलीची मिरवणूक निघत असे ती गाडी या वृक्षाच्या लांकडाची बनवीत असत. हें झाड सर्व वृक्षांत उंच आहे. असें याचें वर्णन आलेलें आहे. सांवरीचा वृक्ष मोठा होतो. यास 'कांटे सांवर' असेंहि म्हणतात. हा दोनतीनशें वर्षें टिकतो. पांढरी व तांबडी अशा याच्या दोन जाती आहेत. फळांतून कापूस काढतात. हा फार मऊ असतो.

याची कपोक नांवाची दुसरी जात आहे. हें मध्यम आकाराचें झाड असतें. खेड्यांच्या व देवळांच्या सभोंवतीं हीं झाडें बरींच लावलेलीं आढळतात. कांटेसांवरीहून हें झाड निराळ्या जातीचें आहे. हीं झाडें मलबारमध्यें सर्व ठिकाणीं आढळतात. या झाडाच्या सालींतून निघणारा गोंद ( मोचरस ) औषधी असतो. सांवरीच्या कापसाचा उपयोग गिरद्या, कोच, वगैरे भरण्याकडे करतात. या झाडाच्या लांकडाचा रंग नामर्दें रंगविण्यास उपयोगी पडतो. या झाडाच्या सालीचे तांबूस रंगाचे हलक्या प्रतीचे तंतु काढतात. कपोकाचें लांकूड पोंखरून होडगीहि करतात. सांवरीचा कांदा, गोंद, साल, कापूस, वगैरे सर्व औषधी आहेत.

**सावरकर, गणेश दामोदर** (१८८०–१९४५)—एक महाराष्ट्रीय क्रांतिवीर. यांचें शिक्षण मॅट्रिकपर्यंत झालें होतें. हे प्रारंभापासून राजकारणांत प्रत्यक्ष भाग घेऊं लागले. १९०६ मध्यें हे मित्रमेळ्याचे कार्यवाह होते म्हणून यांस बेकायदा सभा भरविल्या-बद्दल अटक करून दंडाची शिक्षा देण्यांत आली; पण ती हाय-कोर्टांत माफ झाली. पुढील वर्षीं नाशिक येथें वन्दे मातरम् खट-ल्यांत यांस अटक होऊन दंड व एक महिन्याची शिक्षा झाली. १९०९ मध्यें १२४ अ व १२१ अ कलमांखालीं यांच्यावर खटला होऊन यांस जन्मठेप काळ्या पाण्याची शिक्षा झाली व यांची मालमत्ता जप्त करण्यांत आली. यांनीं एकूण १४ वर्षें तुरुंगांत काढलीं. त्यांपैकीं ११ वर्षें अंदमानांत गेलीं. अखेरीस मरणोन्मुख अवस्थेंत यांस १९२२ सालच्या ऑक्टोबरमध्यें सोडून देण्यांत आलें. पांच वर्षांनंतर हे बरे झाले व पुन्हां सार्वजनिक चळवळींत पडले. यांनीं हिंदुसंघटनेचें कार्य चालविलें. त्यांत पुन्हां यांच्या डॉक्टर बंधूसमवेत १९३२ मध्यें पकडून १५ दिवस अटकेंत ठेवून सोडून देण्यांत आलें. १९३३ मध्यें पुन्हां संशयावरून अटक करण्यांत येऊन पुराव्याच्या अभावीं सोडून देण्यांत आलें. पुन्हां ऑर्डिनन्सअन्वयें अटक करून दोन महिने तुरुंगांत ठेवण्यांत आलें व त्यानंतर नाशिक येथें स्थानबद्ध करून ठेवण्यांत आलें. वीर बैरागी, नेपाळी आंदोलनाचा इतिहास, वगैरे ग्रंथ त्यांनीं रचिले आहेत. यांचे दोघे धाकटे बंधु विनायकराव व नारायणराव प्रसिद्धच आहेत.

**सावरकर, नारायण दामोदर** ( १८८९–१९४९ )—एक महाराष्ट्रीय देशभक्त. यांचें शिक्षण बडोदें येथें व फर्ग्युसन कॉलेजांत झालें. नंतर ते कलकत्ता येथील मेडिकल कॉलेजांत गेले. १९०९ मध्यें अहमदाबाद येथें लॉर्ड मिंटो यांच्यावरील बाँबफेक प्रकरणामध्यें यांस दोन महिने अटकेंत ठेवून सोडून देण्यांत आलें. जॅक्सनच्या खुनाच्या प्रकरणांत यांस पुन्हां अटक करून तीन महिन्यांनंतर सोडून देण्यांत आलें. पुन्हां नाशिक–कटाच्या खट-ल्यांत यांस पकडण्यांत येऊन ६ महिन्यांची सक्तमजुरीची शिक्षा १९१० मध्यें देण्यांत आली. जून १९११ मध्यें सुटका झाल्यावर ते १९१२ मध्यें कलकत्ता येथील मेडिकल कॉलेजांत गेले. कॉले-जची फी भरण्याकरितां यांनीं कांहीं कादंबऱ्या लिहिल्या. १९१६ मध्यें हे एल्. सी. पी. एस्. व एल्. एम्. एस्. ( होमिओ. ) या परीक्षा उत्तीर्ण झाले व दंतवैद्य म्हणून धंदा करूं लागले. १९२०–२१ मध्यें यांनीं होमरूल चळवळींत प्रत्यक्ष जोमानें भाग घेतला. १९२६ ते १९२९ मध्यें हे मुंबई कॉर्पोरेशनमध्यें निवडून आले होते. नंतर त्यांनीं सत्याग्रहाच्या चळवळींत भाग घेतला व ठाणें जिल्हा सत्याग्रहाचे हे तिसरे सर्वाधिकारी होते. यांस १९३० मध्यें शिक्षा झाली व पुन्हां १९३३ मध्यें ऑर्डिनन्स अन्वयें पकडण्यांत येऊन एक महिन्यानें सोडून देण्यांत आलें. हे 'श्रद्धानंद' या पत्राचे सात वर्षें संपादक होते. यांनीं होमरूल चळवळीच्या काळांत बहुतेक सर्व महाराष्ट्र, वऱ्हाड, वगैरे भागांत स्वराज्य प्रचारार्थ प्रवास केला. अस्पृश्योद्धारक परिषदेचे ते मुंबई येथें अध्यक्ष होते. तसेंच अकोला येथील अखिल भारतीय हिंदु युवक परिषदेचे ते अध्यक्ष होते. कोंकण डेमोक्रेटिक स्वराज्य पक्षा

चिटणीस व मुंबई प्रांतिक काँग्रेस कमिटीचे ते उपाध्यक्ष होते. नंतर शेवटपर्यंत ते हिंदुसभेचें कार्य पाहत.

**सावरकर, विनायक दामोदर** (१८८३- )—सुप्रसिद्ध हिंदी क्रांतिवीर व प्रभावी वक्ते. यांचा जन्म नाशिक जिल्ह्यांत भगूर येथें झाला. हे वयाच्या दहाव्या वर्षापासूनच कविता करूं लागले व त्या 'जगद्धितेच्छु' व 'काळ' या पुण्याच्या वर्तमानपत्रांत छापून येऊं लागल्या. यांस चाफेकर बंधूंचा खटला व लोकमान्यांचा तुरुंगवास या घटनांपासून स्फूर्ति मिळाली. १९०० मध्यें यांनीं मित्रमेळा या नांवाची एक राजकीय संस्था नाशिक येथें स्थापन केली. हे १९०१ मध्यें मॅट्रिक झाले. कॉलेजमध्यें असतांनाच यांनीं विद्यार्थ्यांमध्यें राजकीय विचारांचा प्रसार करण्यास सुरुवात केली. यांनीं परकीय मालावरील बहिष्काराची चळवळ जोरांत सुरू करून सर्व भरतखंडामध्यें प्रथम पुणें येथें १९०५ मध्यें विलायती मालाची मोठी होळी केली; यामुळें त्यांस फर्ग्युसन कॉलेजच्या वसतिगृहांतून काढून टाकण्यांत आलें. १९०५ मध्यें हे बी. ए. झाले व नंतर त्यांनीं मुंबईमध्यें 'विहारी' या नांवाचें पत्र सुरू केलें व १९०६ मध्यें अभिनव भारत समाजाची स्थापना केली.

नंतर त्यांनीं पं. श्यामजी कृष्णवर्मा (पाहा) यांची शिवाजी शिष्यवृत्ति मिळवून ते इंग्लंडमध्यें बॅरिस्टर होण्यास गेले. तेथें इंडिया हाउस व फ्री इंडिया सोसायटी लंडनमध्यें स्थापन केली. हे बॅरिस्टरीची परीक्षा उत्तीर्ण झाले, पण त्यांस राजकीय कारणांकरितां सनद देण्यांत आली नाहीं. नंतर त्यांनीं 'तलवार' हें पत्र काढून अभिनव भारत राजकीय समाजाची स्थापना केली व श्यामजी कृष्णवर्मा आणि मादाम कामा यांच्याबरोबर पॅरिसमध्यें १९०९ मध्यें त्याच्या कार्यास सुरुवात केली. १९१० मध्यें ते इंग्लंडला परत गेले तेव्हां त्यांस १२१ अ कलमाखालीं अटक करण्यांत आली. तेथून त्यांस हिंदुस्थानांत आणीत असतां गलबतावरून उडी मारून ते फ्रान्सच्या किनाऱ्यावर गेले. पण तेथें त्यांस अटक झाली. पुढें त्यांच्या ताब्याकरितां फ्रान्स व ब्रिटिश सरकार यांच्यामध्यें बरीच चर्चा झाली व हें प्रकरण हेग येथील सार्वराष्ट्रीय न्यायसभेकडे पाठविण्यांत आलें. तथापि अखेरीस ब्रिटिश सरकारनें त्यांस दुप्पट जन्मठेप हद्दपारीची शिक्षा दिली. १९११ ते १९२४ पर्यंत ते अंदमान येथील तुरुंगांत होते. पुढें हिंदुस्थानांत त्यांच्या सुटकेकरितां वर्तमानपत्रांतून व इतर प्रकारें मोठी चळवळ झाल्यानंतर त्यांची सुटका करण्यांत आली; परंतु रत्नागिरी येथें त्यांना स्थानबद्ध करून ठेवण्यांत आलें.

रत्नागिरीस असतांना यांनीं अस्पृश्योद्धाराची मोठी चळवळ केली व हिंदुसंघटनेस प्रारंभ केला. मुंबई सरकारच्या कूपर-मंत्रिमंडळानें स्थानबद्धतेंतून त्यांची मुक्तता केली व तेव्हांपासून ते मुंबईस राहून हिंदुमहासभेचें जोमानें कार्य करूं लागले. महासभेच्या अधिवेशनाचे अध्यक्ष होते. १९३८ सालीं मुंबई येथें भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे अध्यक्ष होते. यांनीं नागरी लिपि सुधारणा, भाषाशुद्धि, वगैरे गोष्टींत बरेंच लक्ष घातलें आहे. 'वैनायक' नांवाचा नवा छंदस् प्रकार काढून रूढ केला. 'गोमान्तक' व 'कमला' हीं यांचीं काव्यें असून 'माझी जन्मठेप' नांवाचें आत्मचरित्रहि आहे. 'संन्यस्तखड्ग', 'उःशाप' व 'उत्तरक्रिया' हीं नाटकें व मोपल्यांच्या बंडावर 'मला काय त्याचें' ही कादंबरी यांनीं लिहिली आहे. सत्तावन सालच्या बंडाचा इतिहास त्यांनीं विलायतेंत लिहिला होता तो आतां प्रसिद्ध झाला आहे.

म. गांधींच्या खुनाच्या खटल्यांत यांस सरकारनें एक आरोपी केलें होतें, पण त्यांतून हे सुटले व आतां राजकीय चळवळ न करण्याच्या अटीवर हे बंधमुक्त आहेत.

**सांवा**—या धान्याचें रोप फार तर मांडीएवढें वाढतें. धान्य वरीप्रमाणें दिसतें; परंतु वरीपेक्षां थोडें मोठें असतें. याच्यांत काळा व पांढरा अशा दोन जाती आहेत. गरीब लोक साव्याचा तांदुळासारखा उपयोग करतात. दुखणेकऱ्यांस हा हलका म्हणून देतात. याची खीर अन्नद्रवशूलावर गुणकारी असते.

**सावित्री**—मद्रदेशाधिपति अश्वपति राजाची मुलगी. हिनें सत्यवानास तो एकसंवत्सरायु आहे, असें माहीत असतांहि पति म्हणून वरिलें व पतिव्रताधर्मानें त्याच्याबरोबर गरिबींत दिवस कंठूं लागली. पतीस मृत्यु येण्याच्या दिवशीं ती मुद्दाम त्याच्याबरोबर अरण्यांत लांकडें आणण्यासाठीं गेली असतां त्याच्या मस्तकांत शूळ उत्पन्न झाला, व यमधर्म येऊन त्याचा सूक्ष्म देह हरण करून दक्षिणेकडे चालला. सावित्रीहि त्याच्यापाठोपाठ निघाली. यमानें तिला आग्रहानें मागें जाण्यास सांगून पाहिलें, पण ती पतीला सोडीना. तेव्हां पातिव्रत्यप्रभावानें दिपून यमानें तिला तीन वर दिले. या वरांच्या पूर्ततेसाठीं तिच्या श्वशुरास डोळस करून, त्यास राज्यपद दिलें व सावित्रीला 'शतपुत्र होतील' असा आशीर्वाद दिला. नंतर त्यानें सत्यवानाचा सूक्ष्म देह सोडून दिला. सती सावित्रीची पूजा हिंदु सुवासिनी स्त्रिया वटपौर्णिमेला (ज्येष्ठ शु ॥ १५) करतात.

**सावेरी**—हा भैरव थाटाचा जन्यराग आहे. याच्या आरोहात गांधार व निषाद हे स्वर वर्ज्य आहेत. अवरोह सात स्वरांनीं होतो, म्हणून याची जाति औडुव-संपूर्ण आहे. वादी स्वर पंचम व संवादी षड्ज आहे. गानसमय प्रातःकाल मानितात. गुणकली व जोगिया हे राग या रागाच्या जवळ येतात, परंतु याचा अवरोह संपूर्ण असल्यानें ते यापासून दूर राहूं शकतात. हा राग आपल्याकडे फारसा गाइलेला ऐकूं येत नाहीं.

**सान्हरिन**—एक सोन्याचें इंग्लिश नाणें. आठव्या हेन्री राजाच्या कारकीर्दीपासून हें चाललें आहे तरी १८१७ सालापासूनच त्याला प्रमाणभूत नाण्याचें महत्त्व प्राप्त झालें. सान्हरिनचें वजन १२३·२७४ ग्रेन असून त्यांतील सोनें २२ कॅरट कसाचें असतें. यांत थोडें तांबें मिसळलेलें असतें. १९३१ सालीं सोन्याचा भाव वाढला व सरकारनें नाण्यांशीं सोन्याचें प्रमाण सोडून दिलें, तेव्हां सॉव्हरिन वीस शिलिंगाला विकला जाण्याऐवजीं ३१ शि. ३ पे. ला विकला जाऊं लागला.

**साष्टी**—मुंबई, ठाणें जिल्हा, एक तालुका. साष्टी नांवाचें इतिहासप्रसिद्ध बेट याच तालुक्यांत आहे. क्षे. फ. २४६ चौ. मै. व लो. सं. १,११,०००. यांत १४० गांवें आहेत. ठाणें हें तालुक्याचें ठिकाण आहे. ठाणें, वांद्रें, कुर्लें हीं मोठीं गांवें असून त्या ठिकाणीं म्यु. कमिट्या आहेत. दक्षिण साष्टी ठाणें जिल्ह्यांत व उत्तर मुंबई उपनगरांत मोडत असे. आतां ठाणें सोडून सर्व भाग बृहन्मुंबईंत समाविष्ट झाला आहे. कान्हेरी लेणीं याच तालुक्यांत आहेत. या भागांत मिठागरें असून मिठाचें उत्पन्न बरेंच होतें. भात सर्व ठिकाणीं पिकतें. जी. आय्. पी. आणि बी. बी. सी. आय्. रेल्वे यांतून जातात. पूर्वी साष्टीचें नांव सासष्ट होतें. म्हणजे सहासष्ट गांवें मिळून साष्टी झाली. साष्टी बेटांत फिरंग्यांनीं हिंदूंचा भयंकर छळ केला तेव्हां मराठ्यांनीं पोर्तुगीज लोकांकडून स. १७३९ त तें घेतलें. १७७४त इंग्रजांनीं मराठ्यांपासून घेतलें, व १७८२ त सालबाईच्या तहानें हें ईस्ट इंडिया कंपनीच्या प्रदेशास कायमचें जोडलें गेलें. साष्टी हें मुंबईशीं एका लांब पुलानें जोडलेलें आहे. गोव्यांतहि एक साष्टी (सासष्टी) महाल आहे.

**सासवड**—मुंबई, पुणें जिल्हा, पुरंदर तालुक्याचें मुख्य ठिकाण. पुण्याच्या आग्नेयीस १६ मैलांवर कऱ्हेच्या डाव्या तीरावर हा गांव आहे. लो. सं. ५,७४५. सासवड हें चांबदेव व दिवे घाटांतून जाणाऱ्या जुन्या पुणें-सातारा रस्त्यावर आहे. येथें धान्याचा मोठा व्यापार चालतो. १८७९ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. सासवड हें सरदार पुरंदरे यांचें गांव व भट-पेशव्यांचें मूळ राहण्याचें ठिकाण होय. येथें १८४० मध्यें सिंधच्या अमीरास आणून बंदींत ठेवलें होतें.

गांवांतील प्रसिद्ध स्थळें म्हणजे—(१) सोपानदेवाची समाधि; (२) वटेश्वराचें देऊळ; (३) बाजी पासलकराची समाधि (सासवड वेशींत); (४) हैमाडपंती खांचाची मशीद; (५) पुरंदरे, बाळाजी विश्वनाथ, पेताजी वोकील, भेंहेंदळे, कानडे, इ. चे वाडे; (६) बाळाजी विश्वनाथाची समाधि; (७) निळकंठ महादेवाचें संगमेश्वर देऊळ. गांवांत एक हायस्कूल आहे.

**सासोलीन**—निसर्गांत सांपडणारें बोरिक अम्ल. प्रथम हें सॉसोजवळ आढळून आल्यामुळें त्याला हें नांव मिळालें आहे. आतां हें टस्कनींत उष्ण झऱ्याजवळ सांपडतें. सासोलीन पाण्यांत विरघळण्यासारखें असल्यामुळें यापासून बोरिक भस्म तयार करण्याचा धंदा झाला आहे.

**साहरा वाळवंट**—आफ्रिका. क्षे. फ. ३५,००,००० चौ. मै.. तेव्हां हें वाळवंट म्हणजे सुमारें पर्शास लाख चौरस मैलांचा वाळूचा समुद्रच होय. पूर्वेकडे नाईल नदीपासून पश्चिमेला ॲटलांटिक महासागरापर्यंत हा वाळूचा समुद्र पसरला आहे. यांत एकहि नदी नाहीं. मधून मधून क्वचितच ओलवणें (ओॲसिस) दृष्टीस पडतात. त्यांवर कांहीं लोक स्थायिक वस्ती करून राहतात व तेथें उष्ण प्रदेशांतील धान्यें पिकवतात. दिवसां कडक उष्णता व रात्रीं अतिशय थंडी या विषम हवामानामुळें त्यांचीं घरें मातीचीं असतात. खजूर, धान्य, कलिंगडें, वगैरे उत्पन्न काढून ते त्यांवर उपजीविका करतात. या सर्व वाळवंटांतून फक्त उंट हा एकच प्राणी वाहतूक चालवतो. एका ओलवणाच्या जागेपासून दुसऱ्या जागेपर्यंतच्या वाटेवर म्हणजेच लमाण मार्गावर मधूनच वाट चुकलेल्या व पाण्यावांचून तडफडून मेलेल्या माणसांचे व जनावरांचे सांगाडे दृष्टीस पडतात. मधूनच सारखा रखरखीत कोरडा सिरक्को अगर सिमूम वारा वाहत असतो. याच वाऱ्याचा जोर कधीं भयंकर होतो. कारण दुपारीं सारेंच वाळवंट तापतें आणि त्या वेळीं वाळूचीं प्रचंड वादळें उठतात. या वादळांत जर प्रवासी अगर लमाणांचा तांडा सांपडला तर एकदम मृत्युच. या वेळीं प्रवासी आपलें डोकें कपड्यांनीं झांकून वाळवंटांत उंटाच्या पाठीशीं दडतात व उंट आपले डोळे व नाकपुड्या मिटून तोंड वाळूंत खुपसतो. वाळवंटांतले कायमचे रहिवासी म्हणजे कांहीं कोळ्ये व लमाणी व्यापारावर धाड घालून लुटालूट करणारे अरब लोक. जर वाट चुकली नाहीं आणि पाण्याच्या जागा नेमक्या सांपडत प्रवासी सुखरूप गेला तरच तो जिवंत पोंचतो. आफ्रिकेच्या उत्तरेकडून दक्षिणेकडे येतांना हें साहाऱ्याचें वाळवंट ओलांडल्यावर आपणाला हिरवळ दृष्टीस पडते. आणि येथूनच आफ्रिकेतला खरा मूळ रहिवाशांच्या प्रदेशाला सुरुवात होते. साहरांत मिश्र लोकवस्ती आहे. पश्चिमेस बर्बर, मध्यभागांत त्वारेग व पूर्वेस निग्रो आणि बेदूइन लोक आहेत.

**साहा, गोपीमोहन**—एक बंगाली क्रांतिकारक. सन १९२० मध्यें महात्मा गांधींनीं असहकारितेची चळवळ सुरू केली खरी, परंतु ती विशेष फलदायक नाहीं असें वाटून १९२२ मध्यें बंगाल-मध्यें कांहीं तरुणांनीं क्रांतिकारक चळवळ सुरू करण्याचें ठरविलें. त्या वेळीं बंगाल प्रांतांत सरकारनें बंगाल ऑर्डिनन्सप्रमाणें अनेक कार्यकर्त्यांस विनाचौकशी अटकेंत ठेवलें होतें. या गोष्टीमुळें चिडून जाऊन व या घटनेस बंगालचे पोलिस कमिशनर टेगार्ट हे जबाबदार आहे असें समजून कांहीं क्रांतिकारक तरुणांनीं त्यास नाहींसा करण्याचा निश्चय केला, व त्याप्रमाणें कलकत्त्याच्या चौरंगी रस्त्यावरील टेगार्टच्या बंगल्याजवळ गोपीमोहन साहा हा टेहळणी करीत असतांना त्या बंगल्यांतून बाहेर पडणाऱ्या एका युरोपियन गृहस्थासच टेगार्ट समजून त्यानें त्यावर गोळी झाडली. तेव्हां सरकारनें त्यास पकडून त्याच्यावर खटला भरला. त्या वेळीं आपण टेगार्ट समजून भलत्याच मनुष्यास गतप्राण केलें याबद्दल त्यानें दुःख व्यक्त केलें व केलेल्या अपकृत्याबद्दल मोठ्या संतोषानें तो फांशीं गेला.

**साहाण दगड**—(होन). पाटीसारखा एक प्रकारचा दगड. चाकू, वस्तरे, वगैरेस धार लावण्याकरितां याच्या साहाणा तयार करण्यांत येतात. याची उत्तम जात स्कॉटलंडमध्यें अयर नदींत आढळते म्हणून तीस अयर म्हणतात. हा लीस्टरशायर, जर्मनी, कानडा (तेल-दगड), तुर्कस्तान (तेल-दगड), इत्यादि ठिकाणीं आढळतो.

**साहाय्यक** (गुन्हेगार)— कायद्यामध्यें 'ॲक्सेसरी' या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, जो इसम एखादा गुन्हा घडण्या-पूर्वी किंवा तो गुन्हा घडल्यानंतर तो गुन्हा करणाऱ्या मुख्य गुन्हेगाराला आज्ञा किंवा उपदेश करून तो गुन्हा करण्यास प्रवृत्त करतो, किंवा त्या गुन्ह्याकडे दुर्लक्ष करून तो गुन्हा घडूं देतो, किंवा तो गुन्हा घडल्यानंतर तो गुन्हा किंवा गुन्हेगार छपविण्याच्या प्रयत्न करतो त्याला साहाय्यक गुन्हेगार असे म्हणतात. सदर गुन्हेगार गुन्हा घडण्याच्या वेळीं हजर नसला तरी सदर गुन्हेगाराला मुख्य गुन्हेगाराप्रमाणें चौकशी होऊन कायद्यानें शिक्षा होते. हिंदुस्थानांत अशाच स्वरूपाचा कायदा 'गुन्ह्यास मदत करणें' (अबेटमेंट, इं. पीनल कोड कलमें १०७ ते ११७) आहे. शिवाय, 'गुन्हेगारीचा गुतकट' (क्रिमिनल कॉन्स्पिरसी इं. पी. कोड १२० अ) हाहि गुन्हा आहे. दोन किंवा जास्त इसम कोणी एखादी गैरकायदा किंवा गैरकायदा नाहीं अशी गोष्ट गैरकायदेशीर रीतीनें किंवा साधनांनीं करण्याचें संगनमत करतात, तेव्हां अशा संगनमताला 'क्रिमिनल कॉन्स्पिरसी' म्हणतात.

**साळी**—सामान्यपणें विणकर जातींना साळी हें नांव दिलें जातें. यांची संख्या सुमारें ५० हजार असून ते महाराष्ट्र, वऱ्हाड, नागपूर व कर्नाटक या भागांत राहतात. स्वकुळसाळ्यांत (१) अहेरे (अहेर), (२) शुद्ध (सूत), (३) टिकले, (४) बांगड, (५) गुजर, व (६) पद्मसाळी अशा पोटजाती आहेत. या जातींत परस्पर लग्नव्यवहार होत नाहींत. बहुधा देशस्थ ब्राह्मण यांची भिक्षुकी करतात. या जातीसंबंधीं आधारग्रंथ 'साळी-माहात्म्यपुराण' होय. या पुराणांत साळ्यांची उत्पत्ति-कथा सांगितली आहे. कांहीं साळी जानवीं घालतात. कांहीं वीरभद्राची पूजा करतात. सोयरिकी फार लहानपणीं होतात. या जातींत पंचायत आहे. पण तिचें फारसें महत्त्व राहिलेलें नाहीं. शिक्षणाच्या बाबतींत इतर ब्राह्मणेतरांप्रमाणेंच हेहि मागासलेले आहेत. तथापि मागील कांहीं वर्षांपासून आपली उन्नति करून घेण्याचे यांच्यांत प्रयत्न सुरू आहेत. याचें द्योतक म्हणजे स्वकुळसाळी-हितचिंतक मंडळ (अहमदनगर), स्वकुळसाळीविजय (मासिक, कऱ्हाड), यांसारख्या संस्था होत.

**साळुंकी**—(मैना पाहा). हा काकवर्गातील एक लहानसा झाडावर आढळणारा पक्षी आहे. हा सर्वत्र आढळतो. हा कबूतराहून थोडा लहान असतो. याची लांबी आठपासून नऊ इंचांपर्यंत असते. याचा रंग सामान्यतः काळा असतो, पण चोंच, डोळ्या-भोंवतीं थोडी जागा व पाय हे पिवळे असतात. हे किडे, फळें वगैरेवर उपजीविका करतात. आपलीं घरटीं जुन्या भिंताडामध्यें किंवा झाडांच्या पोकळींत बांधतात आणि निळसर रंगाचीं सुमारें पांच अंडीं घालतात. साळुंक्या कळप करून हिंडतात, व एकत्र असल्या म्हणजे फार किलबिल करतात व भांडतात.

**साळुव** (सोळाव्या शतकाचा मध्य)— एक कानडी जैन कवि. हा धर्मचंद्राचा पुत्र व श्रुतकीर्तीचा शिष्य असून यास तैलपाचा समकालीन जो कोंकणचा महामंडलेश्वर साळुवमल्ल त्याचा आश्रय होता. साळुवमल्ल राजा हा स्वतः कवि असून त्याच्या व त्याच्या बहिणीचा पुत्र साळुवदेव यांच्या आग्रहावरूनच या साळुव कवीनें भारत लिहिलें. हें भारत 'नेमीश्वरचरित्र' या नांवानें प्रसिद्ध आहे. या ग्रंथाखेरीज यानें शृंगारादि रस व नायकनायिका वगैरे भेद सांगणारा 'रसरत्नाकर' हा ग्रंथ, व वैद्यकशास्त्रावर 'वैद्यसांगत्य' हा ग्रंथ लिहिला. 'शारदा-विलास' हा ग्रंथहि याचाच असावा. पण तो अर्धवट उपलब्ध आहे.

**साळुव घराणें**—विजयानगरचें हें घराणें फार दिवस गादी-वर राहिलें नाहीं. तथापि या घराण्याचा संस्थापक नरसिंह साळुव हा मोठा शूर पुरुष होता. त्यानें दाक्षिणेकडील तामिळ मुलखांत

आपल्या राज्याचा विस्तार करून जिकडे तिकडे आपल्या नांवाचा दरारा बसविला. याच्या कारकीर्दीत बहामनी राज्याचीं शकलें होऊन इ. स. १४९० च्या सुमारास विजापूरचा सुलतान स्वतंत्र झाला व त्यानें पुढाकार घेऊन बहामनी राज्याचा विजयानगरशीं चाललेला झगडा पुढें चालू ठेविला. नरसिंहाच्या मागून त्याचा वडील मुलगा गादीवर बसला. पण लवकरच त्याचा खून होऊन त्याचा धाकटा भाऊ इम्मदि नृसिंह ऊर्फ धर्मराव हा राजा झाला. याच्या कारकीर्दींत सर्व सत्ता त्याचा सेनापति नरस नायक याच्या हातांत असून तोच पुढें १५०५ त आपल्या धन्याचा वध करून सिंहासनारूढ झाला.

**साळू**—(हेज-हॉग). हा एक कीटकभक्षी सस्तन प्राणी आहे. याच्या अंगावर अणकुचीदार पिसें असतात. हा आपलें अंग आपल्याभोंवतीं गुंडाळून गोळ्यासारखा होतो व अशा रीतीनें आपलें संरक्षण करतो. याची लांबी ११ इंच असते. याचें तोंड लांबट व कान आंखूड असतात. याच्या शरीराच्या कांहीं भागांवर राठ केंस असतात. हा रानांत राहतो आणि फळें, मुळें व किडे खातो. याला घरांत ठेवल्यास झुरळें खातो. हा हिंवाळ्यांत स्वस्थ पडून असतो. याच्या मादीला एका वेळीं चार ते सहा पिलें होतात. हा युरोपमध्यें सर्वत्र आढळतो. सायाळ (पॉर्क्युपाइन) प्राणी याहून वेगळा असतो.

**साक्षी-समन्स**—(सब्-पीना). कायद्यामध्यें याचा अर्थ असा आहे कीं, न्यायकोर्टांत हजर होण्याबद्दल साक्षीदाराला जो लेखी हुकूम करतात, आणि जो हुकूम न मानल्यास दंड होतो त्या प्रकारच्या समन्सला हें नांव आहे. इंग्लंडमध्यें असें समन्स मानलें नाहीं तर दंड होतो, किंवा कोर्टाचा अपमान झाला म्हणून या गुन्ह्याबद्दल शिक्षा होते. तसेंच साक्षीदाराच्या गैरहजेरीमुळें झालेल्या नुकसानभरपाईबद्दल दावा लावतां येतो. साक्षीदाराला कोर्टांत हजर राहण्याकरितां झालेला खर्च देण्यांत येत असतो.

**सिएनकिएविझ, हेन्रिक** (१८४६-१९१६)—एक पोलिश कादंबरीकार. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते—'विथ फायर अँन्ड सोवर्ड'; 'दि डेल्यूज;' आणि 'पॅन मायकेल'. शिवाय त्यानें 'को व्हाडिस' ही नीरो या प्राचीन रोमन बादशहाच्या काळाला अनुलक्षून लिहिली समाजासंबंधीं अद्भुतरम्य कादंबरी लिहिली आणि तिची कीर्ति सर्व जगभर झाली. त्याला वाङ्मयाचें नोबेल पारितोषिक १९०५ सालीं देण्यांत आलें.

**सिकेडा**—हें सामान्यतः ढेकूण, ढवा, वगैरेसारख्या एका प्रकारच्या कीटकांस सामान्य नांव आहे. या किड्यांतील नराच्या शरीराच्या दोहों बाजूंस ढोलक्यासारखे दोन अवयव असतात. त्यांच्यापासून ते मोठा आवाज करूं शकतात. त्यांचा आवाज एक मैलावर सुद्धां ऐकूं जातो. याची एक जात अमेरिकेंत आढळते.

**सिंकोना**—[वर्ग-रुबिआसी]. एका जातीचीं झाडें. यांची उंची ४० ते ५० फूटपर्यंत असते. यांचीं पानें साधीं एकासमोर एक व देंठ वगैरे नसलेलीं अशीं असतात. या झाडांस लहान फुलें येतात. हीं मूळ दक्षिण अमेरिकेमध्यें आढळण्यांत आलीं, पण आतां त्यांची लागवड हिंदुस्थान, जावा, सिलोन, वगैरे देशांत करण्यांत आली आहे. याच्या सालीचा (क्विनाईन) कोयनेलासारखा उपयोग करण्यांत येतो.

**सिक्कीम**—पूर्व हिमालयांतील एक भारतसंरक्षित संस्थान. दक्षिणेस तिस्ता नदी, व पश्चिमेस आणि उत्तरेस हिमालयाच्या रांगा आहेत व त्यांपलीकडे नेपाळ व भूतान आहे. संस्थानच्या भूप्रदेशविस्तार जरी लहान असला तथापि या संस्थानांतील ठिकठिकाणच्या हवामानामध्यें बराच फरक आढळून येतो, व बहुतेक सर्व प्रकारच्या हवेचे नमुने येथें पाहावयास मिळतात. त्याचप्रमाणें सृष्टींतील सर्व प्रकारचे नैसर्गिक चमत्कार येथें पाहावयास मिळतात. संस्थानचें क्षे. फ. २८१८ चौ. मै. असून लो. सं. १,२१,५२० आहे. यांत नेपाळी लोकांचा विशेष भरणा आहे. याखेरीज भुतिये व लेपचा लोक आहेत. बहुतेक लोक शेतकरी आहेत. बौद्धधर्म विशेष प्रचारांत आहे. संस्थानचें सरासरी उत्पन्न पांच लाख रुपये आहे. संस्थानच्या राजाच्या ताब्यांतच सर्व व्यवस्था असते. सध्यांचा राजा हिज हायनेस, महाराजा सर तशीनम्ग्यल, के. सी. आय. ई. हा १९१४ सालीं गादीवर बसला. १९१८ सालीं याच्या हातांत सर्व अधिकार देण्यांत आले. तिबेटला जाणारा रस्ता संस्थानच्या हद्दींतूनच गेला आहे. वाहतूक जनावरांच्या पाठीवरूनच होते. संस्थानांतून इमारती लांकूड, कापडी, फळें या जिनसा हिंदुस्थानांत येतात. राजधानी गंगटोक आहे.

या प्रदेशांत मूळ लेपचा लोक होते. त्यांना १६४१ सालीं पेनची नामिजी यानें जिंकून राज्य स्थापन केलें. त्याच्या कुळानें तें वाढविलें. १८३९ त हें संस्थान ब्रिटिशांचें मांडलिक बनलें. नंतर बऱ्याच कटकटी संस्थान आणि ब्रिटिश सरकार यांमध्यें होऊन १८९० सालीं संस्थानची सरहद्द ठरविण्यांत आली. १९०६ सालापासून संस्थान प्रत्यक्ष हिंदुस्थान सरकारच्या देखरेखीखालीं आहे. १९५० सालीं भारत सरकारनें संस्थानचा अंतर्गत कारभार सोडून बाकी सत्ता आपल्याकडे घेतली आहे.

**सिंक्लेअर, अप्टन** (१८७८- )—एक अमेरिकन समाजवादी कादंबरीकार. वयाच्या चोविसाव्या वर्षी त्यानें 'जर्नल ऑफ आर्थर स्टार्लिंग' ही कविजीवनावरची कादंबरी लिहून तो प्रसिद्धीस आला. याला 'सामाजिक न्यायाचा प्रेषित' असें सार्थ नांव आहे. समाजांतील प्रतिगामी वृत्ति व जुलमशाही यांवर तो प्रभावी हल्ला चढवितो. भांडवलशाहीविरुद्ध प्रचार करून त्यानें स्वतःचें बरेंच नुकसानहि करून घेतलें. 'जंगल', 'रॉकेल', 'बोस्टन', 'मॅमॅनाट', 'ब्रासचेक', इ. त्याच्या कादंबऱ्यांतून सत्याविष्करण व खोल अभ्यास आहे. त्यानें साटांवर ग्रंथ लिहिले आहेत. 'राक्षसाच्या दाढा' ही त्याची अलीकडील कादंबरी आहे. त्याच्या ग्रंथांचीं अनेक भाषांतून भाषांतरें झालेलीं आहेत. 'नो पासारान्' (त्यांना रोखून धरा!) यासारख्या फॅसिझम्‌विरुद्ध लिहिलेल्या कादंबऱ्यांमुळें तो हिटलर-मुसोलिनीसारख्या हुकूमशाही राजवटींचा शत्रु गणला गेला.

सिंक्लेअर हा प्रथमश्रेणीचा वाङ्मयकलावंत आहे. व्हॉल्टेअर, झोला, टॉल्स्टॉय, गॉर्की यासारख्यांच्या पंक्तीला तो बसेल. खऱ्या प्रगतिशील साहित्याचा निर्माता म्हणून सिंक्लेअरला मान द्यावा लागतो. मराठींत त्याच्या कांहीं ग्रंथांचीं भाषांतरें झालेलीं आहेत.

**सिंग, राजा रामपाल** (१८६७- )—एक हिंदु समाजसेवक. यांचें शिक्षण अलीगड येथें झालें. १९०८ मध्यें हे संयुक्त प्रांतांतील दुसऱ्या सामाजिक परिषदेचे अध्यक्ष होते. १९१० मध्यें अखिल भारतीय सामाजिक परिषदेचे अध्यक्ष होते. पांचव्या अखिल भारतीय हिंदुमहासभेचे हे अध्यक्ष होते. हे संयुक्त प्रांतीय कायदेमंडळ, मध्यवर्ती कायदेमंडळ, कौन्सिल ऑफ स्टेट, वगैरेचे अनेक वर्षे सभासद होते. १९०९ पर्यंत अलाहाबाद युनिव्हर्सिटीचे फेलो होते. लखनौ येथील क्षत्रिय कॉलेजचे चिटणीस होते. बनारस हिंदु युनिव्हर्सिटीच्या कोर्टाचे सभासद होते. अलाहाबाद बँकेचे हे डायरेक्टर होते. अयोध्या प्रांतीय तालुकदारांच्या ब्रिटिश इंडिया असोसिएशनचे हे अध्यक्ष आहेत. अनेक संयुक्त प्रांतीय हिंदु धार्मिक व धर्मादाय संस्थांचे अध्यक्ष आहेत.

**सिंग, राजा सर महाराज** (१८७८- )—मुंबई प्रांताचे गव्हर्नर. हे धर्मानें ख्रिस्ती आहेत. शिक्षण विलायतेंत हॅरो, ऑक्सफर्ड व लंडन येथें झाल्यावर हिंदुस्थान सरकारच्या नोकरींत १९०४ सालीं शिरले. १९११ त हे मध्यवर्ती सरकारचे एक दुय्यम चिटणीस होते व पुढें १९१९ सालीं संयुक्त प्रांताचे चिटणीस झाले. १९३१ सालीं जोधपूर संस्थानांत मुख्य मंत्री म्हणून राहिले. नंतर दक्षिण आफ्रिकेंत एजंट जनरल म्हणून गेले, पुढें १९३५-३७ या काळांत संयुक्त प्रांताचे गृहमंत्री होते. १९४१ सालीं लखनौ विद्यापीठाचे कुलगुरु व १९४६ सालीं 'युनो'कडे पाठविलेल्या शिष्टमंडळांत होते. हिंदुस्थान स्वतंत्र झाल्यावर यांना मुंबईचे पहिले गव्हर्नर नेमण्यांत आलें.

**सिंग, सरदार बलदेव**—भारत सरकारचे संरक्षण-मंत्री. खालसा कॉलेजांत शिक्षण झाल्यानंतर हे १९४२ त पंजाबच्या संयुक्त मंत्रिमंडळांत एक मंत्री झाले. त्या वेळीं पंजाब विधिमंडळाच्या पंथिक अकाली पक्षाचे हे नेते होते. १९४६ सालीं पंजाब प्रांताचे विकासमंत्री झाले. नंतर त्याच सालीं हिंदुस्थान सरकारचे संरक्षणमंत्री झाले व तेव्हांपासून या जागेवर आहेतच. हे शिखांचे एक पुढारी आहेत.

**सिंग, संट निहाल** (१८८४- )—एक देशाभिमानी हिंदी लेखक. यांनीं १९०२ पासून आपल्या विविध लेखनास जी सुरुवात केली ती आजतागायत चालू आहे. अनेक प्राच्य आणि पाश्चात्य वृत्तपत्र-नियतकालिकांतून यांचें लेखन प्रसिद्ध होत असतें. तसेंच हे जगभर हिंडले आहेत व कानडा, बेल्जिअम, सिलोन, हिंदुस्थान, वगैरे सरकारांच्या सांगण्यावरून यांनीं कांहीं ग्रंथ लिहिले आहेत. 'इंडियाज् फायटर्स'; 'इंडियाज् फायटिंग ट्रुप्स'; 'दि किंग्ज इंडियन अलाइज्'; 'दि राजाज् अँन्ड देअर इंडिया'; 'अप्लिफ्ट ऑफ इंडिया'; 'ड्राय अमेरिका', वगैरे त्यांचीं पुस्तकें प्रसिद्ध आहेत. ते डेहराडूनला असतात.

**सिंगर, आयझॅक मेरिट** (१८११-१८७५)—शिवण्याच्या यंत्राचा संशोधक. हा अमेरिकन असून यानें अनेक प्रयोग आणि परिश्रम केल्यानंतर १८५१ त एका दोऱ्याचें, सांखळी टाक्याचें शिवण्याचें यंत्र तयार केलें; तें पांच वर्षांपूर्वी एलिआस होनें तयार केलेल्या यंत्रापेक्षां पुष्कळच सरस उतरलें. नंतर सिंगरनें एलिझाबेथ (न्यू. ज.) येथें एक कारखाना उघडला. त्याचे आज निरनिराळ्या देशांतून ९ कारखाने सिंगरकंपनीच्या मालकीचे झाले. सिंगरला या शोधांत पुष्कळ पैसा मिळाला हें सांगणें नकोच. (शिवण्याचीं यंत्रें पाहा).

**सिंगरार्य** (सतरावें शतक अखेर)—एक कौशिक गोत्री कानडी कवि व 'मित्रविन्दागोविंद' या नाटकाचा लेखक. 'मित्राविन्दागोविंद' हें नाटक कानडींत उपलब्ध असलेल्या नाटकांत पहिलें असून तें हर्षाच्या रत्नावलीचें भाषांतर आहे. 'राघवाभ्युदय' व 'गीतगंगेश्वर' हेहि ग्रंथ याचेच असावेत. सिंगरार्य हा सौम्यनृसिंहसूरि ऊर्फ अल सिंगरार्य व सिंगम्मा यांचा पुत्र असून म्हैसूरच्या चिक्कदेवरायाचा मंत्री व प्रसिद्ध कवि जो तिरुमल आर्य त्याचा भाऊ होता. हाहि चिक्कदेवरायाच्या पदरीं त्याचा बाप जो दोड्डदेवराय त्याचा पुराणिक म्हणून राहिला होता.

**सिंगापूर**—हें शहर व बेट मलाया द्वीपकल्पाच्या दक्षिण भागांत स्ट्रेट सेटलमेंटमध्यें आहे. चीन व हिंदुस्थान यांच्यामध्यें हे असल्यामुळें पूर्वेकडील व्यापाराच्या रस्त्यावरील, हा एक मुख्य

टप्पा आहे. व्यापारी केंद्र म्हणून याला आशियाच्या भागांत दुसरें प्रतिस्पर्धी ठिकाण नाहीं. हें तटबंदी ठिकाण असून उत्तम बंदरहि आहे. हें बेट २७ मैल लांब व १४ मैल रुंद आहे; व व एका सामुद्रधुनीमुळें हें जोहोर संस्थानापासून विभक्त झालेलें आहे. लो. सं. ७,६९,२१६. ह्यांत चिनी लोकांची संख्या सर्वांत जास्त (६ लाख) आहे. स्ट्रेट सेटल्मेंट वसाहतीच्या राज्यकारभाराचें सिंगापूर हें केंद्र आहे. व तेथील गव्हर्नर संयुक्त मलाया संस्थान, ब्रिटिश नॉर्थ बोर्निओ वगैरेंचा हायकमिशनर असतो.

हें बंदर व्यापाराला खुलें असून फक्त अफू, दारू व स्पिरिट यांच्यावरच जकात बसते. असें म्हणतात कीं, या बेटावर १२५२ मध्यें जावानीज लोकांनीं स्वारी केली; १८१९ मध्यें जेव्हां सिंगापुर 'ईस्ट इंडिया' कंपनीकडे आलें तेव्हां येथें किनाऱ्यावरील कोळ्यांखेरीज लोकवस्ती नव्हती. पहिल्यानें हें शहर बेंकुलेनच्या ताब्यांत होतें. परंतु १८२३ सालीं तें बंगाल सरकारच्या ताब्यांत गेलें. १८२६ मध्यें स्ट्रेट सेटलमेंट ही वसाहत जेव्हां झाली तेव्हां हें त्या वसाहतीला जोडलें गेलें. आज आरमारी दृष्टीनें सिंगापुरचें महत्त्व आहे. १९२९ सालीं येथें रॅफल्स कॉलेज स्थापण्यांत येऊन त्याचीच पुढें मलायाच्या विद्यापीठांत परिणति करण्याचा विचार होता. दुसऱ्या महायुद्धांत १९४२ सालीं जपाननें सिंगापुर घेतलें होतें.

**सिंघण यादव** (१२१०-१२४७)—यादव घराण्यांतील एक महापराक्रमी राजा. हा पहिल्या जैत्रपाळाचा पुत्र. यानें आपला मुख्य प्रधान सोढ्ढलचा पुत्र संगीतरत्नाकराचा कर्ता शार्ङ्गधर व सेनापति खोलेश्वर यांच्या साहाय्यानें यादवांची सत्ता अतोनात वाढवली. हा आपणास पृथ्वीवल्लभ, विष्णुवंशोद्भव, इत्यादि विशेषणें लावीत असे. याच्या ध्वजावर सुवर्णगरुडाचें चिन्ह असे. यानें माळवा, गुजराथ, चेदि देशांतील छत्तिसगड, तुर्क, आंध्र, इत्यादि राजांना आपल्या वर्चस्वाखालीं आणलें. तसेंच बल्लाळ होयसळांवरहि यानें मात केली. कुंतलदेश तर याच्या अमलाखालीं होताच. परंतु पन्हाळ्याच्या शिलाहार भोजाचें राज्यहि यानें आपल्या राज्यांत सामील करून घेतलें. हा बरेच दिवस मोठ्या सैन्यानिशीं साताऱ्यास तळ देऊन होता. त्याच वेळीं यानें माणगंगेचा संगमेश्वर (तालुका खटाव) व भूषणगड हे बांधले व शिखर शिंगणापूर वसवलें, असें सांगतात. यादवांच्या मुख्य मंत्र्यास श्रीकरणाधिप असें म्हणत. चांगदेव नामक भास्कराचार्यांचा नातू याच्या दरबारीं ज्योतिषी होता. यास जैत्रपाळ नांवाचा एक मुलगा होता. पण तो आपल्या बापाच्या हयातींतच मृत्युमुखीं पडला. त्यामुळें सिंघणाच्या पश्चात् कृष्णदेव हा याचा नातू गादीवर आला.

**सिंघभूम**—बिहार, छोटा नागपूर विभागाच्या आग्नेय भागांतील जिल्हा. क्षे. फ. ३,९०५ चौ. मै., सुवर्णरेखा नदी दालभूमसधून वाहत गेली आहे. याशिवाय दुसऱ्या बऱ्याच नद्या आहेत. फुलझर व वैतरणी या नद्यांमध्यें पुष्कळ डोह असून ते फार पवित्र मानले जातात. वार्षिक पाऊस ५३ इंच होतो, पण सर्वत्र सारखा पडत नाहीं.

या जिल्ह्याच्या अलगपणामुळें यावर मोंगलांची किंवा मराठ्यांची स्वारी केव्हांच झाली नाहीं. १८२० सालीं सिंघभूमच्या राजानें ब्रिटिशांचें मांडलिकत्व पत्करून त्यांना कांहीं खंडणी देण्याचें कबूल केलें. व हो लोकांना आपल्या ताब्यांत आणण्याच्या कामांत त्यांची मदत मागितली व ती त्यांनीं दिली. बऱ्याच वर्षांच्या झगड्यानंतर ब्रिटिशांनीं सर्व बंडवाल्यांना शरण यावयास लाविलें; व पोरहात, सरेखेला, खरसावान संस्थानांतील २३ परगणे, मयूरभंजमधील आणखी चार परगणे मिळून होणाऱ्या प्रदेशाला कोल्हान असें नांव देऊन तो प्रदेश प्रत्यक्ष आपल्या अमलाखालीं घेतला. पुढें ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं या रानटी (हो) लोकांना केवळ सामर्थ्याच्या जोरावर ताब्यांत न ठेवतां शिक्षण देऊन चांगल्या रीतीनें वागवून त्यांच्यामध्यें सुधारणा घडवून आणलेली आहे.

जिल्ह्याची लो. सं. ११,४४,७१७ आहे. येथील हवा चांगली असल्यामुळें लोकसंख्येची वाढ होत आहे. बंगाल नागपूर रेल्वे सुरू झाल्यामुळें ह्या भागांत बरीच सुधारणा झाली आहे. ह्या जिल्ह्यांत ३,१९० खेडीं असून त्यांपैकीं २,९७३ खेड्यांची लोकवस्ती ५०० पेक्षां कमी आहे. शेंकडा ३८ हो, शेंकडा १८ बंगाली, शें. १६ उडिया भाषा बोलतात. संताळी व मुंडारी ह्या भाषाहि बऱ्याच बोलतात. शेंकडा ५५ वन्य हिंदू, शेंकडा ४३ हिंदू, शें. १ ख्रिस्ती व सुमारें शें. १ मुसलमान आहेत. शें. ७७ लोकांचा शेतकीवर आणि शें. ८ लोकांचा उद्योगधंद्यावर उदरनिर्वाह चालतो. तांदूळ हें मुख्य पीक असून ¾ जमिनींत त्याचीच लागवड होते. जिल्ह्याचा निम्म्यापेक्षां जास्त भाग जंगलानें आच्छादिलेला आहे. सालाचें लांकूड, भात, कडधान्यें, गळिताचीं धान्यें, लाख, लोखंड, रेशमाचे कोश, कातडीं, व सबई गवत हे मुख्य निर्गत जिन्नस; व मीठ, सूत, कापड, तंबाखू, पितळेचीं भांडीं, साखर, रॉकेल व दगडी कोळसा हे मुख्य आयात जिन्नस होत. जिल्ह्यांत शिक्षण फारच मागासलेलें आहे.

**सिडने**—हें शहर ऑस्ट्रेलियांतील न्यू साउथ वेल्स या प्रांताची राजधानी आहे व ऑस्ट्रेलियांतील सर्वांत मोठें शहर आहे. हें पोर्ट जॅक्सनच्या दक्षिण किनाऱ्यावर वसलेलें आहे. येथील बंदर जगांतील उत्तम बंदरांपैकीं असून सर्वांत मोठ्याच्या आगबोटी येण्याच्या सर्व सोयी आहेत. येथील फार महत्त्वाच्या सार्वजनिक इमारतींपैकीं मुख्य इमारती आहेत त्या म्हणजे सरकारी कचेऱ्या, टाऊन हॉल, स्टेट गव्हर्नर्स हाउस, युनिव्हर्सिटी, सेंट अँड्रयूज कॅथेड्रल आणि सेन्ट मेरीज कॅथेड्रल या होत. येथील बागा व प्राणि-

संग्रहालय चांगलें आहे. येथून मुख्य माल परदेशीं जातो तो म्हणजे लोंकर, कच्चीं कातडीं, मांस, कथील, तांबें, वगैरे. येथें मुख्य कारखाने म्हणजे कपड्यांचे, भांड्याचे, तंबाखूचे, वगैरे होत. लोकसंख्या १३,९८,१८०. त्यांपैकीं प्रत्यक्ष शहराची वस्ती दीड लाख असून बाकीची वस्ती उपनगरांत आहे. सिडने शहर १७८८ सालीं वसविण्यात आलें.

**सिडने, सर फिलिप** (१५५४–१५८६)—एक इंग्रज सेनानी व कवि. तो इंग्लंडच्या एलिझाबेथ राणीच्या दरबारांतला प्रख्यात मुत्सद्दी होता. त्याला एलिझाबेथ राणीनें १५७७ सालीं जर्मनीमध्यें वकिलातीच्या कामावर पाठविलें. १५८५ सालीं तो नेदर्लंडमध्यें गेला आणि तेथें स्पॅनियर्ड सैन्याविरुद्ध लढणाऱ्या डच सैन्याला मदत करण्याकरितां पाठविलेल्या इंग्रज फौजेचा तो अधिपति होता. परंतु झटफेन येथें १५८६ सालीं तो जखमी झाला व त्यांतच त्याचा अंत झाला. त्यानें फारसें वाङ्मय लिहिलें नाहीं. परंतु त्यानें जें गद्य व पद्य वाङ्मय लिहिलें तें फार महत्त्वाचें आहे. त्याचे ग्रंथ आहेत ते—'आर्केडिया' (अद्भुतरसात्मक कादंबरी); 'आस्ट्रोफेल अॅन्ड स्टेला' (सुनीतें); आणि 'अॅपोलजी फॉर पोएट्री'.

**सिडॉन्स, सारा**—एक सुप्रसिद्ध ब्रिटिश नटी. तिनें १७८२ पासून १८१२ पर्यंत नाटकांत कामें केलीं आणि इंग्लिश रंगभूमीवरील दुःखान्त नाटकांतील अगदीं पहिल्या दर्जाची नायिका असा तिचा लौकिक आहे. तिच्या सर्वोत्कृष्ट भूमिका होत असत त्या ८ वा हेन्री या नाटकांतील क्वीन कॅथराईन, आणि लेडी मॅकबेथ या होत. सर जोशुआ रेनॉल्डस्नें हिची प्रतिमा 'ट्रॅजिक म्यूझ' (शोक-संगीत) या नांवानें काढली आहे.

**सितोपलादि चूर्ण**—एक आयुर्वेदीय औषध. यांत खडीसाखर, वंशलोचन, पिंपळी, वेलदोडे, दालचिनी, हीं मुख्य औषधें असतात. आयुर्वेदांतील औषधांत हें अतिशय चांगल्यापैकीं औषध आहे. हातापायांची जळजळ, डोळ्याची आग, खोकला, अशक्तपणा, छातींतून व बरगड्यांतून कळा निघणें, डोकें दुखणें, जीर्णज्वर, अग्निमांद्य, तोंडाला चव नसणें, नाकांतून रक्त पडणें, तापांत सर्वांगाचा दाह होणें, इत्यादि विकारांवर या चूर्णानें उत्कृष्ट गुण येतो. ३ ते ६ मासे तूप, मध, दूधसाखर यांतून देतात.

**सिथारा**—अत्यंत प्राचीन काळीं (सु. खि. पू. १७००) ईजिप्त, असुरिया, ग्रीस व रोमन साम्राज्य यांत प्रचलित असलेलें एक तिकोणी चारपासून वीसपर्यंत तारा असलेलें हें वाद्य होतें.

**सिथिया**—याचा मूळ अर्थ सिथी लोकांचा देश असा आहे. कार्पेथियन पर्वतापासून डॉनपर्यंत पसरलेलें विस्तीर्ण माळरान म्हणजेच हा प्रदेश होय. अभिजात (क्लासिकल) वाङ्मयांत सिथिआ म्हणजे काळ्या समुद्राच्या उत्तरेकडील अथवा वायव्येकडील प्रदेश अशी साधारण समजूत दृष्टीस पडते. सिथियन म्हणजे शक किंवा सोक (चिनी रूप) लोक होत. खिस्तपूर्व सुमारें ५१२ त दरायसनें सिथियावर स्वारी केली. त्यानें व्होल्गा नदी ओलांडून जालोनस हें शहर जाळलें. दरायस परत फिरल्यावर सिथियनांनीं स्पार्टाचा राजा तिसरा क्लीओमेनीज याजकडे वकील पाठवून इराणी साम्राज्याविरुद्ध युद्ध करण्याचा सल्ला दिला. याचा परिणाम असा झाला कीं, सिथियनाचा संसर्ग पोंचतांच क्लीओमेनीजला दारूचें वेड लागलें. येथून सिथियनांच्या ऱ्हासाला प्रारंभ झाला. खि. पू. ३३९ त मॅसिडोनच्या दुसऱ्या फिलिपनें सिथियन राजा एटिअस याचा पराभव करून त्याला ठार मारलें. यापुढें सिथियन राजांची सत्ता फक्त सिथियाच्या पश्चिम भागांत राहिली. सिलुरस या सिथियन राजाच्या पराभवामुळें तीहि ढांसळली.

**सिंदगड**—ठाणें जिल्हा. मुरबाडच्या आग्नेयेस १० मैलांवर हा किल्ला बांधलेला आहे. याचे आंतला व बाहेरचा असे दोन भाग आहेत. खालचा किल्ला माग्यघरा घाटाच्या वर ९०० फूट आहे. समुद्रसपाटीपासून याची उंची २,४०० फूट आहे. वरच्या किल्ल्याची उंची ३,२३६ फूट आहे. चढण फार अवघड आहे. लांबी २४५ फूट व रुंदी ७५ फूट आहे. याच्या सर्व बाजूंस तुटलेले कडे आहेत. १८६७ च्या सुमारास भिवाजी नाईक नांवाच्या पुंडानें याचा आश्रय घेतला होता.

**सिंदूरभूषणरस**—एक आयुर्वेदीय रसायन. अभ्रक, रससिंदूर, गंधक व टाकणखार हीं समभाग घेऊन घोण्याच्या रसात खल करून उडदाएवढ्या गोळ्या करतात. ही गोळी मधाबरोबर सेवन केली असतां सर्व प्रकारची कुष्टें, वातरोग, शूलप्रमेह, आणि महाव्याधि हे रोग दूर होतात. हें रसायन गर्भिणीसहि फार प्रशस्त आहे.

**सिद्दी जोहार** (मृत्यु १६६१)—कर्नूल प्रांताचा आदिलशाही सरदार जो मलिक अबदुल त्याचा हा गुलाम. मलिकनंतर त्याच्या मुलांस कैद करून हा अधिकारी झाला. शिवाजीनें अफझलखानाचा वध केल्यावर व रुस्तुमजाननें शिवाजीपुढें माघार घेतल्यावर अली आदिलशहानें यास शिवाजीवर पाठविलें. यानें शिवाजीस पन्हाळ्यास पकडण्याचा केलेला प्रयत्न निष्फळ ठरला. या वेळीं जोहारच्या मदतीस शिवाजीचा सावत्र भाऊ व्यंकोजी हा होता, असें पर्णाल पर्वताख्यानावरून कळतें. शिवाजी मोठ्या युक्तीनें विशाळगडाला निसटून गेला (१६६०). तेव्हां साहाजिकच हा फितुर असल्याचा बादशहास संशय आला व त्यानें याचें सेनापतिपद काढून घेतलं. तेव्हां यानें बंडाळीस सुरुवात केली. अलीनें याजवर सैन्य पाठवलें, तेव्हां हा केळेशीला पळाला व तिकडेच हा मरण पावला. सिद्दी अबदुल अजीज हा याचा पुत्र. याच्या जांवयाचें नांव मसूद असें होतें.

**सिद्धगणेश्वररस**—एक आयुर्वेदीय रसायन. पारा, गंधक व अभ्रक हीं द्रव्यें खलून काळा धोत्रा, भांग व त्रिकटु (सुंठ, मिरे व पिंपळी) या प्रत्येकाच्या सात सात भावना देतात व चांगला खल करून वालप्रमाण मात्रा करतात. ही मात्रा मध व पिंपळी यांबरोबर घेतली असतां नवज्वर, एकाहिकज्वर, द्याहिकज्वर व वांति हे रोग दूर होतात.

**सिद्धटेक**—मुंबई; पुणें जिल्हा, महाराष्ट्रांतील अष्टविनायकांपैकीं एक देवस्थान. हें दौंडाजवळ आहे. हें गणपतीचें क्षेत्र भीमेच्या कांठीं एका टेंकडीवर आहे. देऊळ चांगलें दगडी असून तें अहल्याबाईनें बांधलें व नदीचा घाट हरिपंत फडके यानें बांधला. हरिपंत फडके या गणपतीचें प्रथम दर्शन घेऊन मोहिमेस निघे. त्याचा मृत्युहि येथेंच झाला (१७९४). विष्णूनें मधु-कैटभ दैत्यांना गणपतीच्या प्रसादानें या ठिकाणीं मारलें, अशी पौराणिक कथा आहे.

**सिद्धपूर**—बडोदें संस्थान, म्हैसाण्याजवळचें राजपुताना-माळवा रेल्वेवर एक स्टेशन. हें ठिकाण मातृगया म्हणून प्रसिद्ध आहे. या ठिकाणाहून सरस्वती पूर्वाभिमुखी वाहते येथील तिमजली रुद्रमाळा नांवाच्या भव्य व सुंदर देवस्थानाचें धरणीकंपानें बरेंच नुकसान झालें आहे. शिल्पशास्त्रदृष्ट्या या स्थानाचें बरेंच महत्त्व आहे. नदीपलीकडे इंदूरच्या अहल्याबाईनें बांधलेली एक धर्मशाळा आहे. येथील देवळांत महादेव सिद्धेश्वर, महादेव गोविंद, रणछोडजी, सहस्रकालमाता, गोवर्धननाथजी, वगैरे देवळें मुख्य असून बिंदुसरोवर, अल्पासरोवर व ज्ञानवापी हीं कुंडें पवित्र तीर्थें मानिलीं जातात. हिंदुस्थानांतील एकंदर चार पवित्र सरोवरांपैकीं बिंदुसरोवर येथें असल्यामुळें गुजराथच्या पवित्र स्थळांत हें दुसऱ्या क्रमांकाचें ठरतें.

अफूच्या व्यापाराचें हें केंद्र आहे. येथें अफूच्या वखारी आहेत. कपडे रंगविणें, चिटें तयार करणें व साचण तयार करणें हे येथील लोकांचे मुख्य धंदे आहेत. सिद्धपूर हें तालुक्याचें मुख्य ठिकाण असल्यानें येथें वहिवाटदाराची कचेरी, प्रवाशांकरितां बंगला, धर्मशाळा, पोस्ट, शाळा वगैरे सरकारी इमारती आहेत.

**सिद्धसंघ**—पृथ्वीवर मोक्षप्राप्ति करून घेतलेल्या पुरुषांची हल्लीं एक सुसंघटित संस्था आहे व पृथ्वीवरील सर्व जीवांची उत्क्रान्ति त्या संस्थेच्या हातीं आहे, असें थिऑसफीचें म्हणणें आहे. या संस्थेस सिद्धसंघ, ऋषिसंघ, वगैरे नांवें आहेत. या संघांतील सर्व माणसें जरी मुक्त असलीं तरी त्यांत सर्वांची योग्यता एकसारखीच असते असें नाहीं. त्यांत श्रेष्ठतेच्या अनेक पायऱ्या असतात. तसेंच या संस्थेंतील निरनिराळीं कामें निरनिराळ्या अधिकाऱ्यांकडे सोंपविलेलीं असतात. या संघाचे मुख्याधिकार 'सनत्कुमार' या नांवानें हिंदुधर्मांत संबोधिलेल्या एका महापुरुषाकडे आहेत. हे सध्यां गोबीच्या अरण्यांत वास्तव्य करून आहेत. या संघांत 'मनु' नांवाचा एक अधिकारी आहे. पृथ्वीवर एक नवा मानववंश स्थापणें, त्याच्या शाखा अस्तित्वांत आणणें, त्यांना क्रमशः निरनिराळ्या देशांत नेऊन विविध संस्कृतींची जोपासना करणें, हें काम या अधिकाऱ्याचें असतें. सध्यां या संघांत 'वैवस्वत' व 'चाक्षुष' असे दोन मनू अधिकारारूढ असून आर्यवंश व मंगोलियन वंश यांची जोपासना त्यांच्या हातीं आहे. या संस्थेत 'व्यास' (अथवा बोधिसत्त्व) नांवाचा आणखी एक अधिकार आहे. तो अधिकार हल्लीं 'मैत्रेय' नामक ऋषीकडे आहे. जगांत निरनिराळे धर्म स्थापणें, व शिक्षणाचा परोपरीनें प्रसार करणें हें काम त्याच्या अधिकारात येत असतें. महाचोहन (पाहा) नांवाचा आणखी एक अधिकारी या संघांत आहे व त्याच्याकडेहि कांहीं कामें सोंपविलेली आहेत. वैवस्वत मनु व मैत्रेय सध्यां हिमालयांत राहत असतात. हिंदुधर्मानें सांगितलेले सप्तऋषी हेहि या संघांतील अधिकारी आहेत. या संघांतील पुरुष जरी नाना देशांत वास्तव्य करून राहत असले तरी त्यांस योगसिद्धी प्राप्त झालेल्या असल्यामुळें ते एकमेकांस हवे तेव्हां भेटून आपल्या संघाचें कार्य यशस्वीपणानें करूं शकतात. याप्रमाणें थिऑसफी पंथाचे लोक मानतात.

**सिद्धान्त** (ख्रिस्ती)—(डॉग्मा). परमेश्वरानें प्रकट केलेल्या व श्रद्धावान् लोकांनीं विश्वास ठेवावा म्हणून ख्रिस्ती मंडळीनें सूचित केलेल्या सत्यास 'सिद्धान्त' असें म्हणतात. नव्या करारांचें स्पष्टीकरण पवित्रशास्त्र व परंपरागत कथा यांमध्यें ग्रथित केलेलें आहे. परमेश्वराशीं ऐक्य हें जें मानवाचें अंतिम ध्येय तें साध्य करण्याकरितां आवश्यक असलेलें सत्य त्यांत सांगितलें आहे. परंतु या सत्याला परमेश्वरानें जर त्याचें संरक्षण केलें नाहीं तर असत्यामुळें बाध येण्याचा संभव आहे. याकरितां येशू ख्रिस्तानें प्रेषित व त्यांचे उत्तराधिकारी यांची योजना केली, व पोप व बिशप यांस आपल्या प्रकटीकरणाची शिकवण देण्याचा अधिकार दिला व त्या कामांत त्यांस साहाय्य करण्याचें वचन दिलें. याप्रमाणें त्यानें आपल्या मंडळीचें प्रमादराहित्य आपल्या संप्रदायाविषयीं व आज्ञापालनाविषयीं सुरक्षित केलें.

याकरितां ख्रिस्ती मंडळीचें हें कर्तव्य आहे कीं, त्यांनीं ख्रिस्ताचें प्रकटीकरण पुढें करावें आणि त्याचा श्रद्धावान् लोकांच्या बदलत्या गरजांकरितां उपयोग करावा व त्याकरितां प्रामादिक तत्त्वांविरुद्ध त्याचें रक्षण करावें किंवा श्रद्धावान् लोकांस ख्रिस्ती संप्रदायास अनुसरून योग्य मार्गानें जाण्यास मार्गदर्शन करावें. जेव्हां अशा तऱ्हेनें एखादें तत्त्व मंडळीकडून आपल्या पूर्ण अधिकारासह ख्रिस्ती लोकांनीं मान्य करावें म्हणून पुढें करण्यांत येतें तेव्हां त्या सत्यास 'सिद्धान्त' असें म्हणतात. यामुळें सिद्धान्त

म्हणजे एखादें नवीन सत्य असें मानणें चूक आहे. हीं सत्यें प्रकटीकरणांत असतातच. जर एखाद्या ख्रिस्ती मनुष्यानें अशा सिद्धान्तास मान्य करण्याचें नाकारलें तर त्यास बहिष्कृत करण्यांत येतें.

**सिंद्रक**—(डेक्सट्राइन). गोंदासारख्या चिकट, पाण्यांत विरघळणाऱ्या पदार्थांचें जातिविषयक नांव. ह्या पदार्थांचें स्थान पिष्टसत्त्व (स्टार्च) आणि द्राक्षशर्करा (ग्लूकोज) ह्यांच्यामध्यें आहे. पिष्टसत्त्वावर खनिज अम्लें किंवा एन्झाइम ह्यांची क्रिया केली म्हणजे सिंद्रक तयार होतें व आयोडिनबरोबर तें जो रंग देतें त्याप्रमाणें त्यास नांव देतात. कमजोर अम्लाबरोबर सिंद्रक तापवलें म्हणजे द्राक्षशर्करा (ग्लूकोज) तयार होते. सिंद्रकाचा रंग पांढरा असून त्याला वास येत नाहीं. डिंकाच्याऐवजीं ह्याचा चांगला उपयोग होतो. कपड्यावर रंगकाम करतांना रंग घट्ट करण्यासाठीं, गोंद तयार करण्यासाठीं किंवा कापडाला कडकडीत-पणा आणण्यासाठीं ह्याचा उपयोग करतात.

**सिंध**—पाकिस्तान, एक प्रांत. या प्रांताचें क्षे. फ. ४८,१३६ चौ. मै. असून, यांत कराची, हैद्राबाद, थर आणि पारकर, लारखाना, सक्कर, नवाबशहा व उत्तर सिंध सरहद्द हे जिल्हे आहेत. लो. सं. ४५,३५,००८. यांत बारा लाखांवर हिंदू १९४१ सालीं होते. पण १९४७ च्या फाळणीनंतर आतां पाव हिश्यानेंहि उरले नसतील. येथील रहिवासी मूळचे हिंदू पण पुढें मुसलमान झालेले असे आहेत. १९४७ च्या पूर्वी शीखहि बरेच होते. येथील मुख्य भाषा सिंधी आहे. येथें पाऊस फार थोडा (४ इंच) पडतो. येथील शेती मुख्यतः कालव्यांच्या पाण्यावरच होते. गहूं, बाजरी, मुइमूग, जोंधळा हीं धान्यें पिकतात. सक्कर येथें सिंधु नदीला धरण बांधून त्या पाण्यावर इजिप्शियन धर्तीचा लांब धाग्याचा कापूस काढण्याची योजना केलेली आहे. कलाकौशल्याचें काम सिंधमध्यें विशेष होतें. पूर्वी हैद्राबाद शहर सोनें, रुपें व रेशीम यांचें कला-कुसरीचें काम करण्याबद्दल प्रसिद्ध होतें. व्यापार पूर्वी बहुतेक हिंदूंच्या हातीं असे. कराची हें सिंधमधलें व्यापारी बंदर आहे. परदेशाहून हिंदुस्थानांत येणारा सर्व प्रकारचा माल कराचीस उतरतो. फाळणीपूर्वी मध्य हिंदुस्थान, पंजाब व संयुक्तप्रांत वगैरे-कडील माल कराची बंदरांतूनच परदेशीं जात असे. १९४७ सालीं सिंधमध्यें १० कॉलेजें व २३५ हायस्कूलें होतीं. आतां एक विद्यापीठ काढण्यांत आलें आहे.

याच प्रांतांतून प्रथमतः मुसलमानांनीं हिंदुस्थानांत प्रवेश केला (इ. स. ७११). पुढें तीन शतकेंपर्यंत बगदादचे खलीफ यावर प्रतिनिधीमार्फत अमल चालवीत. तैमुरलंगाच्या स्वारीमुळें दिल्लीचें साम्राज्य ढिलें होऊन सिंध स्वतंत्र झालें. यानंतर सिंधचे राजे सुम्र घराण्यांतील होते. त्यांनीं १३३८–१३५७ पर्यंत राज्य केलें. नंतर सम्म राजांचा अमल १५१९ पर्यंत चालला. नंतर बाबरचा अमल सुरू झाला. औरंगजेबाच्या वेळीं स्थानिक लोकांनीं बंड करून मोंगली सत्ता विस्कळीत केली. पुढें मीर नांवाचा एक बलुची मुख्य झाला व इंग्रजांनीं हा प्रांत जिंकीपर्यंत तो या मीर बलुची घराण्याकडेच होता. ई. इं. कंपनीनें १७५८ सालीं ठठ्ठा येथें आपली एक वखार स्थापिली. परंतु इंग्रजांचें व या मीरांचें नीट जुळत नसे. त्याचा परिणाम म्हणजे १७७५ त इंग्रजांना ती वखार बंद करावी लागली. १८३२ त मीरांशीं व्यापारी तह झाला. इंग्रजांनीं सैन्याच्या जोरावर मीरांना हा तह करावयास लाविलें. व सिंध नदींतून निर्वेधपणें व्यापार करण्याची परवानगी मिळविली. पुढें चार्लस नेपीयरनें हा प्रांत अन्यायानें खालसा केला (१८४३) व तो मुंबई प्रांताला जोडण्यांत आला. १९३६ पर्यंत सिंध हा मुंबई इलाख्यांत होता. नंतर स्वतंत्र प्रांत केला गेला. १९४७ सालीं पाकिस्तान राज्य झाल्यावर हा प्रांत पाकिस्तानांत गेला.

इतर हिंदुस्थानांतील प्रांतांबरोबर सिंधची भरभराट होत गेली. एरवीं हा प्रांत रुक्ष आहे. दुसऱ्या महायुद्धाचा फार फायदा मिळून प्रांताची शिल्लक वाढली. १९४७–४८ सालीं उत्पन्न ८ कोटी ५ लक्ष होतें. सिंधचे पहिले मुसलमान गव्हर्नर सर गुलाम हिदायतुल्ला हे होते. कराची ही प्रथम सिंधची राजधानी होती तीच पुढें पाकिस्तान सरकारचीहि राजधानी बनली.

मोहेंजोडारो (पाहा) येथील अत्यंत प्राचीन अवशेषांमुळें सिंधचा तीन चार हजार वर्षांपूर्वीचा इतिहास व हिंदुस्थानांतील आद्य संस्कृति यांवर बराच प्रकाश पडला आहे.

सिंधी भाषा व वाङ्मय—सिंधी म्हणजे सिंधमध्यें हिंदुस्थानच्या फाळणीपूर्वी बोलली जाणारी भाषा. प्रत्येक सिंधी शब्द स्वरान्त असतो. शेवटीं उ आणि ओ स्वर असतील तर शब्द पुलिंगी; अ आणि इ असतील तर स्त्रीलिंगी. याप्रमाणें लिंगभेद समजतो. नपुंसकलिंग नाहीं. नामाला षष्ठीचा प्रत्यय लागून विशेषण होतें. नामाला वारो प्रत्यय लावूनहि विशेषण होतें. सर्व क्रियापदाचे अनियमितार्थ (इन्फिनिटिव्ह मूड) धातुनामें म्हणून वापरले जातात. धातुशब्दांत ज घालून कर्मकर्तरि प्रयोग होतो; उदा., मारणु (मारणें)-मारिजणु किंवा मार्जणु. हिंदुस्थानी भाषेप्रमाणेंच सिंधीनें अरबी, फारसी व संस्कृत या भाषांतून शब्द उचलले आहेत. मूळ सिंधी एका प्राकृत भाषेपासून झालेली आहे.

या भाषेंतील आज माहीत असलेला पहिला कवि काजी कधन हा होय. पण त्याचीं फक्त ७च पद्यें आज शिल्लक आहेत. मकदुम नू, शहा अबदुल करीम, जमान, गिरोरी, इनायत, वगैरे इतर ग्रंथकार त्याच वेळीं होऊन गेले. सिंधी भाषेंतील फार मोठा लेखक शहा अबदुल लतीफ (सुमारें १६८९ ते १७५२) या

नांवचा होऊन गेला. त्यानें 'रिसालो' नांवाचा एक फार मोठा ग्रंथ लिहिला आहे. त्यांत भावगीतें, इतिहास, प्रेमकथा, निसर्ग-वर्णनें, युद्धनीति, वगैरे अनेक विषयांवरील काव्यांचा भरणा आहे. आपलीं सुंदर गीतें व नादमधुर काव्यें यांच्या योगानें शहा लतीफनें सिंधच्या वाळुकामय ओसाड भूमीस नंदनवन बनविलें अशी त्याची ख्याति आहे. सिंधमधील प्राचीन व अर्वाचीन अनेक कवींनीं सूफी तत्त्वज्ञानाची महती गाइली आहे. *त्यांत शेख लतीफ हा अग्रगण्य आहे.* सामी, साचल, दलपत, बेदिल, बेकास व आसू यांनींहि सूफी तत्त्वज्ञानाचा आपल्या ग्रंथांतून प्रसार केला. सन १७०० च्या सुमारास लिहिलेले मौलवींचे महमदी धर्मासंबंधीं गद्य ग्रंथ अद्याप उपलब्ध आहेत. अशा लेखकांत मखदुम हशीम, मखदुम अबदुल्ला व अबुल हसन हे प्रमुख आहेत.

केवलराम सलामतराय अडवानी यांनीं इ. स. १८६० च्या सुमारास 'सुखरी', 'गूल,' व 'गूलशकर' नांवाचे नीतिशास्त्रावर तीन ग्रंथ लिहिले. त्यांची भाषा अत्यंत शुद्ध अशी सिंधी आहे. त्यांचीं रूपकें, दृष्टांत, ऐतिहासिक संदर्भ, इ. शुद्ध सिंधी असून भाषा सहजसुंदर आहे.

एकोणिसाव्या शतकांत फारशी, संस्कृत व इंग्रजी यांतून सिंधींत अनेक भाषांतरें करण्यांत आलीं. फारशींतून मुनशी नंदीराम यांनीं १८६१ मध्यें केलेलें 'तरीख-ई-मासुम' हें भाषांतर फार उत्तम वठलें आहे. नवलराय व उधाराम यांनीं 'रासेलस' चें भाषांतर केलें आहे. तें अजूनसुद्धां वाचनीय असें वाटतें. उधारामच्या ईसापच्या गोष्टी सोप्या व मोहक भाषेंत रचल्या आहेत. नवलरामनें लिहिलेलीं हिंदु व मुस्लिम कायद्यावरील पुस्तकें त्याच्या गाढ विद्वत्तेची साक्ष पटवतात. दिरानंद, दयाराम गिद्दू-मल व मूलचंद कोडूमल यांनीं सामाजिक विषयांवर अनेक गद्य-ग्रंथ लिहिले. त्यांनीं साध्या जीवनांतील विषयांवर खरगुती गोष्टी लिहून त्यांत सुंदर विचार, विनोद व बोध पेरला आहे. त्यांच्या *लेखनांत समाजास स्फूर्ति देणारा ध्येयवाद आहे. कौरोमल* चंदनमल यांनीं अनेक विषयांवर ग्रंथ लिहून सिंधी गद्यरचना भारदस्त केली आहे. मिर्झा कलिच बेग यांनीं शेक्सपियरच्या नाटकांस सिंधी रूप दिलें आहे व कांहीं स्वतंत्र नाटकेंहि लिहिलीं आहेत. लीलाराम सिंग यांचीं दोन नाटकें 'मोहन तारका' व 'सुमेन राधा' सोप्या व सुंदर भाषेंत लिहिलेलीं आहेत. 'हरिश्चंद्र', 'रामायण' व 'द्रुपदी', हीं त्यांचींच नाटकें आहेत. परमानंद मेवाराम हे लिक्ती होते. त्यांनीं सिंधी भाषेंत पुष्कळ बोधपर व धार्मिक गोष्टी लिहिल्या आहेत. त्यांची भाषा सोपी, मधुर व ठसकेदार आहे.

अगदीं अलीकडे लिहिलें जाणारें वाङ्मय युरोपियन भाषांचें अनुकरण करणारें आहे. पाश्चात्य राष्ट्रांचे ग्रंथ वाचून त्यांच्या अनुरोगानें भारतीय प्रश्नांचा विचार करण्याची प्रथा पडणें अगदीं साहजिक आहे.

सु. वि. भा. ६-३४

**सिंधगड**—मुंबई, रत्नागिरी जिल्हा. मालवण तालुक्यांत ईशान्येस १६ मैलांवर एका डोंगरावर हा बांधला आहे. क्षेत्रफळ २॥ एकर आहे. १८१८ इन्स्पेक्टर यानें विरोध मदन चोथाहून हा किल्ला घेतला.

**सिंधभैरवी**—हा राग आसावरी थाटांतून निघतो. याचे आरोह आणि अवरोह सातहि स्वरांनीं होतात. म्हणून याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर मानितात. याच्या अवरोहांत कोमल ऋषभ घेतात. पंचम स्वराला षड्ज कल्पून भैरवी राग गाइला असतां हा राग उत्पन्न होतो. हा क्षुद्रगीताई राग आहे.

**सिंधसरहद्द**—सिंधप्रांताच्या वरील भागाचा बनलेला जिल्हा. याचें क्षे. फ. २,६६१ चौ. मै.. येथील हवा अतिशय उष्ण असून पाऊस फार थोडा पडतो. पावसाचें मान सरासरी ३ इंच असतें. या संबंध जिल्ह्यांत जाकोबाबाद नांवाचें एकच शहर असून २७१ खेडीं आहेत. लो. सं. ३,०४,०३४. मुख्य भाषा सिंधी असून बलुची व सिराली या पोटभाषा होत. एकंदर लोकसंख्येंत श. ९१ मुसलमान असून श. ९ हिंदू आहेत. बलुची, बर्डी व खोसस या जातींच्या लोकांचें राहणें तंबूमध्यें असून ते उंटांचा व्यापार करतात. हिंवाळ्यांत पुष्कळ आगाग लोक या देशांत येऊन नाना प्रकारचे व्यापारधंदे करतात. एकंदर लोकसंख्येपैकीं श. ७४ शेतकी करणारे असून उद्योगधंदा करणारे श. १८ आहेत. या भागांत तांदूळ व मका हीं पिकें उत्तम पिकतात. येथें पाटबंधाऱ्यांवर बरीच शेती होते. पूर्वी येथें मिठाचा व्यापार बराच असे, व तें तयार करीत असत.

**सिंधु**—हिंदुस्थानांतील एक महानदी. हिला सिंधुनद म्हणतात. ऋग्वेद व अथर्ववेद यांमध्यें याचा अर्थ नुसता ओढा किंवा नदी असा असून सर्वांत श्रेष्ठ नदी सिंधु असाहि अर्थ या शब्दाचा आहे. हा शब्द सिंधुनदी असा अर्थानें संहिता ग्रंथानंतर क्वचित् येतो. व जेव्हां येतो तेव्हां त्याचा अर्थ अंतर असा आहे. सिंधु-नदीकांठचे घोडे (सैंधव) प्रसिद्ध होते.

प्राचीन सिंधु संस्कृतीचे अवशेष सिंधुनदाच्या खोऱ्यांत मोहें-जोदारो व हरप्पा येथें सांपडले असून आणखीहि स्थळें सांपड-ण्याचा संभव आहे. ही संस्कृति ख्रि. पू. तिसऱ्या सहस्रकापासून आढळून येते. ऐतिहासिक दृष्टीनें पाहतां या संस्कृतीस फार महत्त्व आहे.

ही इतिहासप्रसिद्ध महानदी तिबेटमधून निघते व काश्मीर, वायव्य सरहद्दप्रांत, पंजाब व सिंध ह्या भागांतून वाहत शेवटीं अरबी महासागरास मिळते. हिची लांबी १,८०० मैल आहे. ही नदी कैलास पर्वताच्या उत्तरेकडील बाजूनें निघते. तिच्या उगमाजवळच प्रसिद्ध मानस सरोवर आहे. तेथून १६० मैल गेल्यावर तिला सिंग-का-बाब हें नांव मिळतें. ह्या नदीच्या उगमाचें ठिकाण समुद्राच्या पृष्ठभागापासून १७,००० फूट उंच आहे. अटकपर्यंत सिंधु नदीचा प्रवास ८६० मैल होतो. या ठिकाणीं हिला काबूल नदी मिळते. नंतर येथून ती हिंदुस्थानांतील मुलुखांतून वाहावयास लागते.

मिथकोटच्या वरच्या बाजूस ह्या नदीस झेलम, चिनाब, रावी बिआस व सतलज ह्या पांच नद्यांचे प्रवाह येऊन मिळतात. ह्यामुळें ह्या नदीचा एवढा विस्तार होतो कीं, संगमापूर्वी जी नदी ६०० यार्ड रुंद, १५ फूट खोल व ताशीं ५ मैल वेगानें जाणारी असते, तीच नदी या संगमाच्या पुढें पूर आल्यावर ५ मैल रुंद होते. हिच्या प्रवाहाचा मार्ग नेहमीं बदलत असतो, यामुळें प्रदेशाचें नुकसान फार झालें आहे. पंजाब व सिंध हे प्रांत पावसाच्या बाबतींत अभागी असल्यामुळें त्या प्रांतांचें जीवित ह्या नदीवर अवलंबून आहे. म्हणून नदीस येणाऱ्या पुराचा फायदा पूर्वीच्या राजांनीं व इंग्रज सरकारनें सतत वर्षभर पाणी टिकणारे कालवे बांधून घेतलेला आहे. सक्करचें धरण फार मोठ्या प्रदेशाला पाणी मिळवून देतें.

**सिंधु**—(सोडियम). एक रासायनिक मूलद्रव्य. परमाणुभारांक २,३००. निसर्गांत ह्याचीं संयुक्तें सर्वत्र पसरलीं आहेत. १८०७ सालीं सर हंफ्रे डेव्हीनें या मूलद्रव्याचा शोध लावला. सध्यां विजेच्या साहाय्यानें सिंधु-उज्ज-प्राणिदा(सोडियम हायड्रॉक्साइड)पासून सिंधु तयार करतात. हें रुप्यासारखें पांढरें चकचकीत असून हलकें आणि नरम आहे. त्याचें विशिष्टगुरुत्व ०.९७१ आहे. ९७° शत. या उष्णतेनें हे वितळतें. प्राणवायूबरोबर ह्याचा अतिशय लवकर संयोग होतो. आणि पाण्यांत टाकलें असतां पाण्याचें विघटन होऊन उज्ज (हायड्रोजन) आणि सिंधु-उज्जप्राणिद होतात. त्यामुळें सिंधूला नेहमीं रॉकेल तेलांत ठेवतात. सिंधूचें अतिशय विपुल आणि नेहमीं उपयोगांत येणारें संयुक्त म्हणजे मीठ—सिंधु हरित (सोडियम क्लोराइड), सिंधुकर्बनित (सोडियम कार्बोनेट), सिंधु द्विकर्बनित (सोडिअम बायकार्बोनेट), सिंधु उज्ज-प्राणिद, बेरॅक्स, ग्लोबर सॉल्ट (सोडियम सल्फेट), वगैरे अनेक सिंधूचीं उपयुक्त संयुक्तें आहेत.

**सिंधु उज्जप्राणिद**—(सोडियम हायड्रॉक्साइड). समुद्रक्षार. हा एक पांढरा घन पदार्थ असून, पाण्यांत आणि अल्कोहोलमध्यें सहज विरघळतो. हा तीव्र क्षारधर्मी असून प्राण्यांचें चामडें त्यामुळें भाजतें. साबण, कागद, रंग, वगैरेंच्या कारखान्यांत सिंधु-उज्ज-प्राणिदाचा उपयोग होतो. विजेच्या साहाय्यानें हें मिठापासून तयार करतात.

**सिंधु कर्बनित**—(सोडियम कार्बोनेट) सिंधुहरित (सोडियम क्लोराइड), अमोनिया व कर्बद्विप्राणिद (कार्बन डायाक्साइड) यांपासून हा तयार होतो. सिंधुक्षार, साबण आणि कांच तयार करण्यासाठीं याचा उपयोग करतात.

**सिंधुदुर्ग**—मुंबई, रत्नागिरी जिल्हा, मालवण तालुका. मालवणनजीक समुद्रांत एका बेटावर हा किल्ला आहे. शिवाजीनें हा १६६४ सालीं बांधला. या दुर्गास ३२ बुरूज असून आंतील क्षेत्र ४१ एकरांचें व घेरा २ मैल आहे. किल्ल्यांत शिवाजीची मूर्ति बसविलेली आहे.

**सिंधु द्विकर्बनित**—(सोडियम बायकार्बोनेट). मिठापासून अमोनियासोडापद्धतीनें हा तयार करतात. तापवल्यावर त्यांतून पाणी आणि कर्बद्विप्राणिद (कार्बन डायाक्साइड) निघून जातात व सिंधु कर्बनित (सोडियम कार्बोनेट) तयार होतो. सिंधु द्विकर्बनिताचा औषधांत आणि बिस्किटें तयार करण्याच्या कामीं उपयोग होतो.

**सिंधु नत्र**—(सोडियम नायटर). क्यूबिक नायटर; चिली साल्टपीटर. उत्तर चिलीमध्यें सांपडणारें हें खनिज अशुद्धावस्थेंत असतें व ह्याला कॅलिची म्हणतात. शेताच्या खतासाठीं त्याचा उपयोग होतो. शिवाय ह्यापासून पालाश नत्रित (पोटॅशियम नायट्रेट) आणि नत्राम्ल (नायट्रिक अम्ल) तयार करतां येतात.

**सिंधुरा**—हा राग काफी थाटांतून निघतो. याच्या आरोहांत गांधार व निषाद स्वर वर्ज्य आहेत व अवरोह सात स्वरांनीं होतो. म्हणून याची जाति औडुव-संपूर्ण आहे. वादी स्वर षड्ज व संवादी पंचम आहे. हा राग सार्वकालिक मानितात. या रागांत गायक काफी रागाचें मिश्रण करतात. आरोहांत गांधार व निषाद हे स्वर वर्ज्य असल्यानें आसावरी रागाचा भास होण्याचा संभव आहे. पण या रागांत लागणारा धैवत तीव्र व आसावरींत तो कोमल असल्यामुळें रागभेद स्पष्ट होत असतो. या रागाच्या आरोहांत निषाद स्वर लावणें अथवा न लावणें यांबद्दल मतभेद दृष्टीस पडतो.

**सिध्वा, आर. के.**—भारत सरकारचे वाहतूक मंत्री. हे सिंध प्रांतांतील एक पुढारी असून हे अ. भा. कॉंग्रेस कमिटीचे सभासद आहेत, तसेंच हे कराची जिल्हा कॉंग्रेस कमिटीचे अध्यक्ष व कराची म्युनिसिपालटीचे मेयर होते. नॉ. वे. रेल्वे ॲडव्हायसरी बोर्डाचे सभासद, कराची पोर्ट ट्रस्टचे ट्रस्टी, सिंध-बलुचिस्तान पोस्टमेन व लोअर ग्रेड स्टाफ युनियनचे हे अध्यक्ष व हिंदुस्थान-ब्रह्मदेश तारखात्यांतील लोकांच्या युनिअनचे अध्यक्ष असून आणखी अनेक

सभा व संस्था यांच्याशीं यांचा संबंध असे. फाळणीनंतर हे भारतात राहिले व आतां हे भारत सरकारांत एक मंत्री आहेत.

**सिनेगॉग**—ज्यू लोकांमधील सार्वजनिक देवपूजा करण्याच्या स्थानाला हें नांव आहे. या ठिकाणीं अगदीं पूर्व टोंकाला पवित्र कमान असते व तेथें पेंटाटक (जुनें बायबल) याच्या प्रती ठेवलेल्या असतात त्याच्यापुढें एक उंच ओटा असतो व तेथें पूर्वी धर्मप्रवचन करणारा (प्रीचर) बसत असे. सिनेगॉगच्या एका बाजूला पुरुष आणि दुसऱ्या बाजूला स्त्रिया बसत असत. त्यांच्या दरम्यान ५।६ फूट उंचीचा आडपडदा असे. अलीकडचे सिनेगॉग प्राचीन सिनेगॉगपेक्षां थोडेसे भिन्न असतात. पूर्वीच्या 'एल्डर्स'च्या ऐवजीं हल्लीं व्यवस्था समिति नेमलेली असते आणि स्त्रियांना बसण्याकरितां सज्जा केलेला असतो.

**सिनेमा**—(चित्रपट पाहा). हिंदी चित्रपट व्यवसाय हा पहिल्या पांच प्रमुख धंद्यांत आज गणला जातो. ह्या धंद्यांची वार्षिक आर्थिक घडामोड ही फार मोठ्या प्रमाणांत होते. चित्रपट-उत्पादनाच्या दृष्टीनें पाहतां, जागतिक उत्पादनांत हिंदुस्थानचा दुसरा क्रम लागतो. अमेरिकेंत दरसाल ४५० ते ५०० चित्रपट होतात. हिंदुस्थानांत आज दरसाल २५० ते २८० चित्रपट तयार होतात; तर इंग्लंड ५०, जपान आणि जर्मनी हीं राष्ट्रें सुमारें २०० व रशिया २०० चित्रपट युद्धपूर्वकालीं काढीत असत. हॉलीवुडचीं २२ चित्रगृहें (स्टूडिओ) असून १६० रंगभूमी (स्टेज) आहेत. तर इंग्लंडमध्यें २४ चित्रगृहें असून ७२ रंगभूमी आहेत. हिंदुस्थानांत आज ६० वर चित्रगृहें असून १२५ वर रंगभूमी आहेत. हिंदुस्थानमध्यें एका मध्यम प्रतीच्या चांगल्या सामाजिक बोलपटास २ ते २॥ लाख रुपये खर्च येतो व पौराणिक किंवा ऐतिहासिक बोलपटास ३ ते ५ लाख रुपये खर्च येतो. अमेरिकेमध्यें याच बोलपटांना प्रत्येकीं ३०–४० लाख रुपये खर्च येतो.

चित्रपट-निर्मितीचा खर्च

| | |
|---|---|
| कच्चा माल (फिल्म) | रु. २२,००० |
| स्टूडिओ भाडें | " ३८,००० |
| विज्ञान शाळा | " ५,००० |
| कपडे | " ३,५०० |
| सजावट | " २,५०० |
| निर्मिति खातें | " १२,००० |
| कलाकार | " ७०,००० |
| संगीत | " १५,००० |
| कथा, पटकथा, संवाद | " १०,००० |
| दिग्दर्शन | " १२,००० |
| प्रसिद्धि | " १०,००० |
| एकूण खर्च | २,००,००० |

चित्रकथा कशी तयार होते.—चित्रपटाच्या कथेची निवड चित्रपटाच्या लांबीशीं सुसंगत पाहिजे. देशी चित्रपट सुमारें १२ ते १४ हजार फूट लांब असतात आणि विदेशी ७ ते ९ हजार असतात. हिंदी बोलपटांतून गाणीं अजीबात काढून टाकणें आज तरी शक्य नाहीं; पण दोन हजार फूट लांबी केवळ गाण्याकरितां दिली तरी एकंदर चित्रपट १० ते ११ हजार फुटांत बसेल. समुद्र, आगबोटी, आग्रा-दिल्लीसारखीं लांबचीं स्थळें, यांची आवश्यकता चित्रपटांत असेल, तर तो फारच खर्चाचा होईल. या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन कथा निवडावयाची असते. कथा, मग ती कोणत्याहि प्रकारची असो, तिला स्वतःचें वैशिष्ट्य असें कांहीं तरी लागतेंच. लोक नावीन्यप्रिय असतात. एखादी गोष्ट कितीहि लहान असो, पण तिच्या नावीन्यानें ती वाचकांची, श्रोत्यांची नजर खेंचून घेते. पण अशी कथा पडद्यावर निवडली तरी ती पडद्यावर जशी दिसणार आहे आणि त्यापूर्वी ज्या ज्या स्थित्यंतरांतून ती जाणार आहे, त्या सर्वांची स्पष्ट प्रतिमा कागदावर आणि निर्मात्यांच्या मनःपटलावर अशा दोन्ही ठिकाणीं पाहिजे. देशी चित्रपटनिर्माते या गोष्टीकडे फारसें लक्ष देत नाहींत. चित्रकथा, चित्रलेखन आणि संकलन, यांपैकीं मधली स्थिति ही सर्वांत कमी महत्त्वाची. दिग्दर्शकानें उत्कृष्टपणें दिग्दर्शिलेलें, कसलेल्या नटांनीं वठवलेलें आणि छाया व ध्वनिलेखकांच्या पसंतीस उतरलेलें दृश्य देखील, कधीं कधीं रुपेरी पडद्यावर प्रेक्षकांच्या दृष्टीनें वाईट ठरतें. याला कारण रसपरिपोषाचा अभाव होय. यासाठीं प्रथमच कथेचें पडद्यावरील अंतिम स्वरूप काय होणार, तें ठरलें पाहिजे.

कथेची निवड झाल्यावरोबर ती दिग्दर्शक आणि चित्रकथा-लेखक यांच्या स्वाधीन केली जाते. मग दिग्दर्शकानें सांगावयाचें आणि चित्रकथा-लेखकानें लिहावयाचें. या वेळीं प्रथमतः साध्या कथेचें दृश्यकथेंत रूपांतर होतें. दृश्यकथा म्हणजे मूळ कथेचें, ती पडद्यावर येऊं शकेल अशा रीतीनें केलेलें, विस्तृत रूपांतर. अर्थातच हें मूळ कथेपेक्षां बरेंच मोठें, पण चित्रकथेपेक्षां फारच लहान असतें. दृश्यकथेंत प्रसंगांचीं वर्णनें, त्यांचा क्रम आणि साधारणपणें कथेचा ओघ कसा वाहत जाणार याचें विवरण असतें, पण हें विवरण साध्या भाषेंत असतें. साध्या कथेंतें कोणतें सूत्र कोठें तोडावयाचें आणि कोणतें हातीं घ्यावयाचें, कथासूत्रें विणावयाचीं कशीं आणि उकल कोठें करावयाचा, हें या दृश्यकथेंत ठरवावयाचें असतें.

कथेचीं सूत्रें (सीक्वेन्सेस) किती हा अर्थातच पहिला प्रश्न असतो. सूत्रबद्धता न तुटतां जोड सांधला गेला पाहिजे. प्रत्येक कथेंत कधीं तरी एखाद्या कालखंडाच्या खंडकावर पूल घालावा लागतोच. त्या वेळीं एखादा मूक शीर्षकाचा उपयोग करतात. 'त्यान

रात्रीं', 'बारा वर्षांनंतर', 'मुंबई' असलीं उभयान्वयी शीर्षकें तर नेहमींच पाहण्यांत येतात. आणखी मार्ग म्हणजे घड्याळाचे कांटे सरकविलेले दाखविणें, कॅलेंडरचीं पानें उलटणें, वगैरे आहेत. विशेष प्रसंगीं शामदानांतील पेटती मेणबत्ती पूर्णपणें जळून गेली आहे, असें दाखविणें; किंवा देवापुढील जळत्या समईतील तेल हळूहळू संपून जात आहे, असलेहि उपाय अवलंबतात. क्वचित् प्रसंगीं फिल्म खूप लांब करण्यापेक्षां मूकशीर्षक परवडतें, पण तें शक्य तेवढें लहान आणि अर्थगर्भ असावें लागतें.

कालखंड साधून तयार झालेली दृश्यकथा चित्रलेखक, ध्वनिलेखक, कलादिग्दर्शक, संकलन करणारा, स्टूडिओचा व्यवस्थापक आणि संगीतदिग्दर्शक यांच्या समेपुढें वाचली जाते. मग तीवर सर्व जण मनमुराद चर्चा करतात. सर्व सूचना आणि टीका यांचा संग्रह करून, आवश्यक ते फेरफार ताबडतोब करून चित्रकथालेखक दृश्यकथेचा शेवटला मसुदा तयार करतो.

कथेला सुरवात, मध्य आणि शेवट असावीं लागतात. सुरवात आकर्षक, नाट्यमय किंवा अचानक पकड घेणारी असली, तर पहिला जोर शेवटपर्यंत कायम राहणें जरूर आहे. नाहीं तर संथपणें सुरवात करून, हळूहळू पात्रांची माहिती पुरवीत, पुढें जसजसे भावनोत्कट प्रसंग येतील तसतशी माहिती वाढविणें, हा श्रेयस्कर मार्ग. प्रथमपासून संथ ठेवून पुढें जलद जाणें चांगलें. मध्य हा नेहमींच कठिण असतो. या वेळीं झालेली लहानशी चूकहि प्रेक्षक सहन करीत नाहीं. प्रेक्षकाचें मन याच वेळीं खेंचून ताणून धरावें लागतें; त्याला गुंगवून ठेवावें लागतें. सुरवात चांगली नसली तरी, पुढें काय होणार या उत्सुकतेनें प्रेक्षक मध्यापर्यंत थांबतो, आणि शेवट हा शेवटच असला पाहिजे. पुढें काय हा प्रश्न पुनः येतां कामा नये. उत्तम शेवट साधण्याचा मार्ग म्हणजे क्रमाक्रमानें मध्यानंतर उत्तर भाग जलद करणें हाच होय. ही जलदी पुढें पुढें सपाटून जोरांत वाढती केली कीं शेवट उत्तम होतो. सर्व हालचाली आणि बोललेलीं भाषणें, गाणीं, शिवाय ठिकठिकाणीं रसपरिपोषासाठीं पार्श्वसंगीत आणि इतर हालचालींचे द्योतक ध्वनी, अशा तऱ्हेचा शंभर टक्के बोलपट आधुनिक प्रगतीचें शेवटलें टोंक होय.

पडद्यावर व्यंगचित्रें दाखवायाचीं कीं प्रत्यक्ष माणसें, हेंहि पाहावयास पाहिजे. व्यंगचित्रें अमेरिकेंत बरींच यशस्वी ठरलीं आहेत. 'स्नो व्हाइट अँड दि सेव्हन ड्वार्फ' (हिमगौरी आणि सात बुटकें) हें तर अमेरिकेचें उच्चांक पटकाविणारें चित्र ठरलें आहे. तरी पण अशासाठीं लागणारे श्रम, पैसा आणि काल यांचा व्यय करणें आपल्याकडे किफायतशीर नाहीं, हें प्रभातच्या 'जंबूकाका' वरून दिसून आलेंच आहे, तेव्हां शंभर टक्के बोलका चित्रपट काढणें आणि पडद्यावर माणसें दाखविणें हाच मार्ग सर्व पसंत करतात.

दृश्यकथा तयार होईपर्यंतचें कार्य तंत्र नसलेलें असें (नॉन-टेक्निकल) होतें. पण नंतर बोलपट-तंत्राचा अवलंब करण्यांत येतो. त्यासाठीं ठिकठिकाणीं तांत्रिक शब्द आणि त्यांची परिभाषा अवगत व्हावी लागते. कित्येक शब्दांचा अर्थ करण्यासाठीं पडद्यावर पाहून तो अनुभवावा लागतो.

चित्रकथा (सिनेरिओ) म्हणजे दृश्यकथेचें चित्रांत रूपांतर करतांना, कोणकोणत्या गोष्टी कशा चित्रित करावयाच्या आहेत याची संपूर्ण नोंद जितकी विस्तृत आणि खुलासेवार असेल तितकें जास्त चांगलें. कधीं कधीं ऐनवेळीं सोयीसाठीं, किंवा चित्रीकरणस्थानीं एकदम कांहीं सुचलें, तर चित्रकथेंत बदल करावा लागतो; पण तसें फार वेळ न होऊं देण्याची खबरदारी घेतली जाते.

दृश्यकथा समोर ठेवूनच चित्रकथा लिहिली जाते. पण तिचें केवळ रूपांतर करणें हें ध्येय नसतें. निरनिराळ्या तंत्रशास्त्राच्या दृष्टीनें असलेल्या महत्त्वाच्या गोष्टींची नोंद, प्रत्येक पात्राच्या हावभावांचें योग्य वर्णन, तींत असतें. सर्वांत मुख्य गोष्ट म्हणजे बोलपटाचा 'टेम्पो' (लय, गति) शेवटपर्यंत कायम टिकविलेला असतो. चित्रकथेनें रसपरिपोष साधावयाचा असतो. आतां रसपरिपोष कोठें संथ पाहिजे आणि कोठें जलद पाहिजे हा प्रश्न पुढें उभा राहतो. जेथें प्रेक्षक अधीर झाले असतील तेथें त्यांना अधिक अधीर बनविण्याकरितां काय केलें पाहिजे, हें येथेंच सूचित केलें जातें. कॅमेरा, कॅमेराक्षेत्रांतील प्रत्येक पात्र, त्याचे हावभाव, त्याचे आवाज, या सर्वांमिळून असा परिणाम झाला पाहिजे कीं, प्रेक्षक आतां पुढें काय होणार, याची अधीरतेनें वाट पाहूं लागेल. सारांश, इष्ट परिणामासाठीं कोणकोणते मार्ग अवलंबिले पाहिजेत, या गोष्टींची नोंद चित्रकथेंत असते. [ महाराष्ट्र साहित्य पत्रिका, १९४० ].

अमेरिका व इंग्लंड या देशांत अनुक्रमें १५० व ७० निर्माते (प्रोड्यूसर) आहेत. तर हिंदुस्थानांत हीच निर्मात्यांची संख्या ३५० वर आहे. निर्मात्यांच्या बाबतींत हिंदचा क्रम पहिला लागतो. आपल्या चित्रपट-व्यवसायास २० कोटींहून अधिक फूट फिल्म दर वर्षी लागते. व या धंद्यावर सुमारें ५ लाख लोक उपजीविका करतात. २० कोटी रु. हून अधिक भांडवल या धंद्यांत गुंतलेलें आहे. सिनेमा-बोलपटगृहें यांचा अभाव ही या धंद्यांतील मोठी अडचण आहे. त्यामुळें गृहांच्या चालकांकडून या धंद्याची फार कुचंबणा होते. आपल्या देशांत ३००० सिनेमा-गृहें आहेत. म्हणजे १० लक्ष लोकसंख्येला फक्त ९ चित्रमंदिरें तर अमेरिकेंत हें प्रमाण १२५ आहे.

सिडने — एककमानी पोलादी पूल. दोन खांबां-
मधील अंतर १६५० फूट आहे (पृ. २५७१)

सज्जनगड — रामदासांच्या वस्तू (पृ. २४७५)

सिंध — सक्कर धरण (पृ. २५७४)

सिमला (पृ. २५८०)

आपल्या देशांत एकंदर ३,००० चित्रपटगृहें आहेत. त्यांचें वर्गीकरण खालीलप्रमाणें करतां येईल—

मुंबई ६००; बंगाल ४००; दक्षिण हिंदुस्थान १,०००; संयुक्त प्रांत ४००; मध्यप्रांत व मध्य भारत ३००; व पंजाब ३००. हीं चित्रपटगृहें उत्तम रीतीनें बांधलेलीं व सुसज्ज अशीं आहेत. परंतु गेल्या कांहीं वर्षांत पुष्कळशीं केवळ विटा, लांकूड व पत्रे यांचीं बनविलेलीं पटगृहें उभारण्यांत आलीं आहेत. अशीं गृहें वरील संख्येंत धरलीं नाहींत.

या वरील प्रमाणावरून आपल्या राष्ट्रामध्यें चित्रपट–मंदिरांची संख्या किती कमी आहे, हें स्पष्ट करून येईल. शहरी वस्तींतील ६० टक्के व ग्रामीण विभागांतील १० टक्के लोक चित्रपटशोकीन आहेत. हिंदी चित्रपट आफ्रिका, इराण, तुर्कस्तान, अफगाणिस्तान, इ. देशांतहि आज दाखविले जातात. परंतु भाषेच्या परकेपणामुळें हिंदी चित्रपटांना वरील देशांत उत्पन्न फार अपुरें मिळतें.

हिंदुस्थानांत एवढ्या मोठ्या प्रमाणांत जरी चित्रपट तयार होत असले तरी प्रेक्षक परदेशी चित्रपट सरासरी ३४० पाहतात. १९४६–४७ मध्यें झालेल्या दंग्यामुळें हा धंदा जवळजवळ मृत झाला होता. पण अगदीं थोड्या अवधींतच परत त्याला ऊर्जितावस्था प्राप्त होऊं लागली. १९४८ साल हें धंद्याच्या दृष्टीनें भरभराटीचें गेलें. आपल्या देशांत चित्रपट-निर्मिति जरी पुष्कळ असले तरी हे सर्व धंदे व्यक्तिगत स्वरूपाचेच आहेत. भांडवल, निर्मिति, प्रकाशन आणि प्रसार (डिस्ट्रिब्यूशन) या चार प्रमुख शाखांमधील मतभेद, चढाओढ व सहकार्याचा संपूर्ण अभाव असल्यामुळें साहजिकच चित्रपटांतील कलात्मक, वाङ्मयीन, शैक्षणिक व सांस्कृतिक हीं जीं प्रमुख अंगें आहेत त्यांचा पराभव आचाळ होतो, आणि केवळ 'गल्ला' भरतीचे चित्रपट काढण्याकडेच निर्मात्यांची प्रवृत्ति जास्त वळते. आपल्याकडील चलत्चित्रपटाच्या धंद्यांत अशी एकहि संस्था नाहीं कीं, जीमध्यें एक मध्यवर्ती समिति असून संस्थेची भांडवल, निर्मिति, प्रकाशन आणि प्रसार या चार प्रमुख शाखांची व्यवस्था एका संस्थेंत केंद्रित केलेली आहे. याच्या उलट अमेरिकेमध्यें ५१६ तरी अशा कंपन्या आहेत कीं, ज्यांचा व्यवहार वरील प्रकारच्या मध्यवर्ती समितीकडून नियंत्रित केला गेला आहे. आपल्याकडे स्वतंत्र प्रतिभेचे व प्रज्ञेचे कलावंत व साहित्यिक कमी असल्यामुळें केवळ यशस्वी झालेल्या एखाद्या चोखपटाचें अंधानुकरण केलेलें असतें. व अनेक बोलपटांत सत्यरेखा नकलीपणाच जास्त असतो. म्हणून एखाद्या उच्च किंवा उदात्त भूमिकेनें लोकरंजन व लोकशिक्षण हें या धंद्याकडून जेवढ्या प्रमाणांत व्हावयास पाहिजे तेवढें होऊं शकत नाहीं. तेव्हां भांडवलदार व कामगार, कारागीर व कलाकार आणि संयोजक या सर्वांच्याच दृष्टिकोनांत आमूलाग्र बदल व्हावयास पाहिजे. आतां हिंद सरकारनें चित्रपटव्यवसायाबद्दल आपली सहानुभूति व गुणग्राहकता दाखविण्यास सुरवात केली आहे. राजकीय पुढाऱ्यांपैकीं लेनिन ही पहिली व्यक्ति होय कीं, जिनें ह्या धंद्याचें महत्त्व ओळखून त्याला बरेंच सहकार्य व प्रोत्साहन राष्ट्रीय सरकाराकडून देवविलें. तसेंच गेल्या महायुद्धापर्यंत जर्मनी, इटली व जपान या राष्ट्रांमध्यें त्यांच्या राष्ट्रीय सरकारकडून बरेंच सहकार्य व मदत मिळत असे. या धंद्याचा जर योग्य मार्गानें संपूर्ण विकास झाला तर लोकशिक्षण आणि लोकरंजन या महत्त्वाच्या कार्यांमुळें मानवी जीवनामध्यें या धंद्याला अत्यंत महत्त्वाचें स्थान प्राप्त होणार आहे.

चित्रपट व्यवसायी व भारत सरकार यांच्यामध्यें सेन्सारचावतींतला कडवटपणा व करमणुकीच्या कराबाबत तीव्र मतभेद आहेत व यांत थोडीशी कटुताहि आहे असें म्हटलें तरी अतिशयोक्तीचें होणार नाहीं. भारत सरकारनें नुकतीच हिंदी चित्रपटव्यवसायाची चौकशी करण्यासाठीं एक समिति नेमली आहे.

**सिन् कियांग**—चीनमधील एक नवें स्वायत्त संस्थान. चिनी तुर्कस्तान, कुल्डजा (निंगयुआंग) आणि काशगर (शुफु) इतक्यांचा यांत समावेश होतो, आणि मंगोलिया ते तिबेट यांच्या दरम्यानच्या सर्व चिनी मांडलिक राज्यांचा अंतर्भाव होतो. क्षे. फ. ५,५०,३४० चौ. मैल आणि लोकसंख्या १२,००,००० आहे. उरुमची (राजधानी), कुल्डजा, काशगर, यारकंद, खोतान (होटीन) आणि आकसु हीं मुख्य शहरें आहेत. काशगर आणि यारकंद हे प्रदेश सुपीक आहेत. तेथें अन्नधान्यें व फळें होतात. शिवाय लोंकर, कापूस व रेशीम येथें तयार करतात. जेड व सोनें येथें सांपडतें. येथील लोक मुख्यतः तुर्की (काशगरी, कालमुख, खिरगीज, इत्यादि) आहेत. परंतु चिनी लोकांची संख्या वाढत आहे.

**सिन्नर**—मुंबई, नाशिक जिल्हा, एक तालुका. याचें क्षे. फ. ५१४ चौ. मै. असून लो. सं. ८५,१४० आहे. या तालुक्यांत एकच शहर (सिन्नर) व १०० खेडीं आहेत. सिन्नर हें तालुक्याचें मुख्य ठिकाण असून येथें १८६० सालीं म्युनिसिपालिटी स्थापन झाली. या गांवांत व भोंवतालच्या बऱ्याच जमिनीस पाटाचें पाणी मिळतें. तीन ऊंस, केळीं, विड्याचीं पानें व तांदूळ पिकतात. येथें हातमागावरील कापडाशिवाय कोणताहि व्यापार नाहीं. हा गांव ७०० वर्षांपूर्वी एका गौळी राजानें वसविला असें म्हणतात. या राजाचा मुलगा रावगोविंद यानें दोन लक्ष रु. खर्च करून गांवाच्या बाहेर गोंदेश्वर देवाचें एक सुंदर देऊळ बांधलें. हें दक्षिणेमध्यें सर्वांत मोठें व उत्तम स्थितींत असलेलें असें हेमाडपंती देऊळ आहे. वास्तुशिल्पाच्या दृष्टीनें देवालय प्रेक्षणीय आहे. येथें तालुका-कचेऱ्या व शाळा आहेत. येथें साड्या व विड्या तयार

होतात. लो. सं. सुमारें १३,०००. महानुभावांच्या स्थानपोथींत सिन्नरचें वर्णन आहे. येथें कृष्णदास कवीनें रुक्मिणीस्वयंवर लिहिलें.

**सिनूफेन**—आयर्लंडला स्वातंत्र्य मिळवून देणाऱ्या लोकपक्षास आश्रय देणाऱ्या संस्थेस हें नांव दिलेलें आढळतें. पहिल्या महायुद्धांत या संस्थेनें पुष्कळ एकामागून एक बंडें उभारलीं व ब्रिटिशांविरुद्ध अनेक प्रकारचीं निदर्शनें घडवून आणलीं. यांची चळवळ इतकी तीव्र स्वरूप पावली कीं, अखेरीस इंग्लंडला आपली सत्ता आयर्लंडवरून काढून घ्यावी लागली, आणि १९२२ मध्यें आयरचें स्वतंत्र राज्य स्थापन झालें.

**सिन्सिनॅटी**—अमेरिका, ओहिओ संस्थान, एक मोठें शहर. लो. सं. ४,५५,६१०. या ठिकाणीं जर्मन लोकांची संख्या बरीच आहे. शहरांत बऱ्याच प्रेक्षणीय इमारती आहेत. यांपैकीं चेंबर ऑफ कॉमर्स, युनायटेड स्टेट्स बिल्डिंग, काउंटी कोर्ट, सेंट पीटरचें कॅथेड्रल (२२४ फूट उंच), सिटी हॉल, सेंटपॉलचें प्रॉटेस्टंट चर्च या मुख्य होत. येथील बगीचात 'एडन पार्क' हा फार सुंदर आहे. या बगीचांत वस्तुसंग्रह असून त्यासंबंधीं एक शिक्षणसंस्थाहि आहे. बरनेट वुडपार्क नांवाच्या दुसऱ्या बगीचांत सिन्सिनॅटी विश्वविद्यालय (स्था. १८७४) आहे.

हें शहर शिक्षणाचें महत्त्वाचें केंद्रस्थान आहे. सिन्सिनॅटी हॉस्पिटल, नीग्रोकरितां वेड्यांचें इस्पितळ, अशा धर्मार्थ सहकारी व सार्वजनिक संस्था येथें बऱ्याच आहेत. गाड्या, खोगिरें, कमावलेलें कातडें, लांकडी सामान, यंत्रें व त्यांचें सामान, छापण्याची शाई, कपडे, सिगारेट, पियानो, यांसारखे जिन्नस येथें तयार होतात.

**सिंपसन, सर जेम्स यंग** (१८११–१८७०)—एक स्कॉटिश वैद्यकशास्त्रज्ञ. त्याला एडिंबरो येथें १८४० सालीं वैद्यकशास्त्राचा व सूतिकाशास्त्राचा प्राध्यापक नेमण्यांत आलें. त्यानें क्लोरोफॉर्मचे निःसंवेदक (ॲनीस्थेटिक) गुणधर्म शोधून काढले, आणि त्यासंबंधींचा आपला निबंध एडिंबरो येथील मेडिको चिरुर्गिकल सोसायटीपुढें १८४७ सालीं वाचून दाखविला.

**सिंपसनचा नियम**—हा नियम प्रथम टॉमस सिंपसन यानें शोधून काढला. या नियमाच्या योगानें आपणांस विशिष्ट क्षेत्राचें क्षेत्रफळ जवळजवळ बरोबर असें काढतां येतें. उदा., एक सपाट पृष्ठभागाची आकृति असून तिला एक पायाची रेषा आहे व दोन रेषा पायाच्या रेषेच्या दोन्ही बाजूंस लंबरूप आहेत, आणि एक वक्र रेषा या दोन लंबरेषांपैकीं एकीस फक्त एका बिंदूंत छेदून जात आहे; अशा आकृतीचें अंदाजानें क्षेत्रफळ काढावयाचें झाल्यास पायाचे समप्रमाणांत भाग पाडण्यांत यावेत. व या प्रत्येक भागाच्या बिंदूंतून पायापासून वक्र रेषेपर्यंत लंबरूप रेषा काढण्यांत याव्यात. याप्रमाणें एकंदर. या लंबरेषांची संख्या विषम असेल अशा वेळीं या आकृतीचें क्षेत्रफळ हें बाजूच्या लंबरेषांची बेरीज करून तिला या दोन विभाग बिंदूंतील अंतराच्या $\frac{1}{3}$ नें गुणावयाचें व त्यांत विषम लंबांच्या संख्येची दुप्पट मिळवावयाची व तींत सम लंबाची बेरीज करून तिच्या चौपट आंकडा मिळवावयाचा; म्हणजे इष्ट क्षेत्रफळ येतें.

**सिमला**—हें शहर पूर्व पंजाब प्रांतांत असून, तें पूर्वी युरोपियन लोकांचें आरोग्यनिवासस्थान आणि व्हाइसरॉयचें उन्हाळ्यांत राहण्याचें ठिकाण असे. हिंदुस्थानांतील एकंदर हवेच्या ठिकाणांत सिमला हें सर्वोत्कृष्ट आहे. हें शहर समुद्रसपाटीपासून ७,०८४ फूट उंचीवर व पायथ्याच्या पठारापासून ६० मैल वर हिमालय पर्वताच्या मध्य भागांत वसलेलें आहे. येथील कायमची वस्ती सुमारें १५,००० असून उन्हाळ्यांत येथील वस्ती दुपटीहून अधिक असते. दिल्ली-अंबाला फांट्यावरील काल्का स्टेशनवरून सिमल्याला आगगाडीनें जातां येतें. मोटारीचाहि चांगला रस्ता आहे. येथें बऱ्याच चांगल्या शिक्षणसंस्था आहेत.

**सिमला डोंगरी संस्थानें**—सिमला शहराच्या भोंवतालीं असलेलीं हीं हिंदी संस्थानें एकंदर तेवीस आहेत. त्या सर्वांचें क्षे. फ. ५,१३७ चौ. मैल असून या प्रदेशांतून वाहणारी मुख्य नदी सतलज ही आहे. एकंदर लो. सं. ४,०५,००० आहे. हीं संस्थानें आतां हिमाचल प्रदेश संघांत सामील झालीं आहेत.

**सिरकाम्ल**—(ॲसेटिक ॲसिड). अल्कोहोलच्या आणि इतर कांहीं सेंद्रिय पदार्थांच्या प्राणिदीकरणा(ऑक्सिडेशन)नें तयार झालेलें अम्ल. शुद्ध स्वरूपांत ह्या अम्लाची चव अतिशय आंबट असून तें विषारी आहे. कातडीवर पडलें असतांना तीं जळतें. १७° शत. ला घनरूप पावतें. गोठवून शुद्ध केलेल्या अम्लाला ग्लेसियल ॲसेटिक अम्ल असें म्हणतात. नेहमींचें व्हिनिगर किंवा सिरका या अम्लाचें सौम्य स्वरूप असून पाण्याचें प्रमाण त्यांत अतिशय असतें. सिरकाम्ल आणि सिरकेत (ॲसिटेट) म्हणजे त्याचीं लवणें ह्यांचा वैद्यकींत, घरगुती पदार्थांत पुष्कळ उपयोग होतो.

**सिरमूर**—पंजाबांतील एक संस्थान. क्षे. फ. १,१४१ चौ. मै. व लो. सं. १,५६,०५४. यांत डोंगर आणि पठारें दोन्हीहि आहेत. गहूं, मका, तांदूळ, ऊंस, अफू, सुंठ, बटाटे, हळद, मिरची, इ. चें पीक होतें. साग, देवदार व पाइन यांचीं जंगलें पुष्कळ आहेत. चहाचे मळेहि कोवलागड व चोहरपूर या ठिकाणीं आहेत. लोखंडाचा मोठा कारखाना असून त्यांतून चांगले चरक तयार होतात. खनिज द्रव्यें संस्थानांत पुष्कळ सांपडण्यासारखीं आहेत.

जेसलमीर संस्थानच्या राजघराण्याची धाकटी शाखा यावर राज्य करते. आजचे महाराज राजेंद्र प्रकाशबहादूर १९३३ सालीं गादीवर आले. संस्थानचें उत्पन्न सुमारें पन्नास लाख रु. आहे.

संस्थानांत एक विधिमंडळ व न्यायसभा आहे. हें संस्थान आतां हिमाचल प्रदेश संघांत सामील झालें आहे.

**सिरसी**—मुंबई, उत्तर कानडा जिल्ह्यांतील तालुका. या तालुक्यांत पिण्याकरितां व शेतीकरितां पाणी पुष्कळ आहे. येथील मुख्य धान्य म्हणजे तांदूळ, ऊंस, हरभरा, मूग, कुळिथ, उडीद, नारळ आणि काळीं मिरीं. येथें सुपारीचा मोठा व्यापार चालतो. येथें दरसाल १०० इंच पाऊस पडतो. तालुक्याची लो. सं. ४३,२७४. सिरसी हें तालुक्याचें मुख्य ठिकाण असून येथें म्युनिसिपालिटी आहे. लो. सं. १०,४५१.

**सिराक्यूज**—हें सिसिली बेटांत एक बंदर आणि सिराक्यूज प्रांताची राजधानी आहे. प्राचीन काळीं सर्व सिसिली बेटाची राजधानी होती. येथून दारू, ऑलिव्ह–तेल, नारिंगें, लिंबें आणि इतर अनेक जातींचीं फळें, ट्नी नांवाचे मासे, वगैरे माल परदेशीं जातो. येथील बंदरांत अगदीं मोठाल्या आगबोटी येऊं शकतात. सिराक्यूज शहर कॉरिन्थियन लोकांची वसाहत म्हणून ख्रिस्तपूर्व ७३४ सालीं स्थापन करण्यांत आलें. येथील प्राचीन ग्रीक राज्यकर्त्यांपैकीं प्रसिद्ध राज्यकर्ते होते ते—गेलोन, डायॉनिसस् थोरला व धाकटा, आणि हिरो पहिला व दुसरा. हें शहर खि. पू. २१२ सालीं रोमन लोकांनीं हस्तगत केलें. आणि पुढें इ. स. ८७८ मध्यें सॅरेसन लोकांनीं तें नष्ट केलें. त्यानंतर तें पूर्णपणें अद्यापहि बांधलें गेलें नाहीं. लोकसंख्या ५०,०००.

**सिराज–उद्दौला** (मृ. १७५७)— हा बंगालचा शेवटचा स्वतंत्र नबाब असून याच्याच अमदानींत 'ब्लॅक होल' नांवाची कत्तल घडली. (ब्लॅक होल ऑफ कलकत्ता पाहा.) हा आपला आजा अलीवर्दीखान याच्यानंतर १७५६ सालीं गादीवर आला. आपल्या एका गुन्हेगार प्रजाजनाला इंग्रजांनीं संरक्षण दिल्यामुळें यानें कलकत्त्यावर स्वारी केली व १४६ इंग्रज लोक धरून नेले. हे लोक एका लहानशा कोठडींत ठेवल्यामुळें त्यांतील १२३ मेले म्हणतात. अशी 'ब्लॅक होल' ची कहाणी आहे. पण या गोष्टीमुळें चिडून जाऊन क्लाइव्हनें नबाबाशीं लढाई दिली. प्रसिद्ध प्लासीच्या लढाईंत त्याचा पूर्ण पराभव करण्यांत आला (१७५७). नबाबाचा सेनापति मिरजाफर इंग्रजांनीं फितविल्यामुळें नबाबाला हार खावी लागली व तो पळून गेला. पण लवकरच सांपडल्यावर त्याचा खून करण्यांत आला. तो अवघा २० वर्षांचा होता व त्यानें १६ महिनेच काय तें राज्य केलें.

**सिराजगंज**—बंगाल, पबना जिल्ह्याचा एक पोटविभाग. क्षे. फ. ९५७ चौ. मै.. लो. सं. ३३,०००. मुख्य ठिकाण सिराजगंज व क्षेत्र २,३९३. येथील हवामान आरोग्यदायक आहे. व्यापाराचीं मुख्य ठिकाणें सिराजगंज व बेरा हीं होत. सिराजगंज हें पोटविभागाचेंहि मुख्य ठिकाण आहे. हा गांव उत्तर बंगालमध्यें सर्वांत मोठा असून येथें तागाचा मोठा व्यापार चालतो. युरोपियन लोकांच्या व्यापाराच्या पुष्कळ पेढ्या असून त्यांनीं येथें बऱ्याच गिरण्या चालविल्या आहेत.

**सिरालिऑन**—आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावरील एक ब्रिटिश वसाहत आणि संरक्षित संस्थान. इंग्रज वसाहतवाल्यांनीं हा प्रदेश देश्य राजापासून स. १७८८ मध्यें खरेदीनें व कांहीं तसाच मिळविला. या वसाहतीचें क्षे. फ. २७,६९९ चौ. मै. आहे. लो. सं. १,२१,१००. समुद्रकिनाऱ्यावरील प्रदेश रोगट आहे. म्हणून त्याला 'रोगी लोकांचें थडगें' म्हणतात. दरसाल पाऊस १५० ते १८० इंच पडतो. ब्रिटिश वसाहतींतलें मुख्य शहर फ्री टाउन हें आहे. फ्री टाउन हें पश्चिम आफ्रिकेंतील सर्वांत मोठें बंदर आहे. वसाहत व संरक्षित राज्य (प्रोटेक्टरेट) यांचा राज्यकारभार पाहणारा मुख्य गव्हर्नर असून त्याच्या मदतीला एक कार्यकारी मंडळ व एक विधिमंडळ असतें. मताधिकार फक्त पुरुषांनाच आहे. मिशनरी सोसायट्यांनीं चालविलेल्या व सरकारची मदत असलेल्या बऱ्याच शाळा आहेत. वसाहतीमध्यें फोराचे नांवाचें कॉलेज असून तें डरहॅम युनिव्हर्सिटीला जोडलेलें आहे. आयात व्यापारांतील मुख्य जिन्नस सुती कापड, कोळसा, दारू, तंबाखू, केरोसिन असून निर्गत व्यापाराचे मुख्य जिन्नस ताडगोळे, ताडाचें तेल, वगैरे आहेत. या वसाहतीस सिरालिऑन हें नांव पिड्रो डी सिंट्रा या पोर्तुगीज शोधकाकडून मिळालें.

**सिरिया**—पश्चिम आशियांतलें भूमध्य समुद्रालगतचें एक स्वतंत्र संस्थान. १९१९–१९४३ पर्यंत हें फ्रान्सकडे मँडेटनें आलेलें होतें. याच्याभोंवतीं तुर्कस्तान, पॅलेस्टाइन, इराक व ट्रान्सजॉर्डेनिया यांच्या सरहद्दी आहेत. व एका बाजूस भूमध्य-समुद्र आहे. यांत लहान लहान ४१५ स्वतंत्र पोटसंस्थानें आहेत. मँडेटखालीं (लेबानॉन धरून) एकूण क्षेत्रफळ ५७,९०० चौरस मैल आहे. कारभाराचें मुख्य ठिकाण सिरियाचें दमास्कस व लेबानॉनचें बैरूट आहे. वरील पोटसंस्थानांत खुद्द सिरिया हें मोठें आहे. त्याचें स्वतंत्र क्षेत्रफळ ४०,१०० चौरस मैल आहे. हेंहि ५१६ लहान लहान परगणेवजा संस्थानें एकत्र येऊन झालेलें आहे. १९२५ मध्यें यांनी घटना झाली. धान्यें, फळें, तंबाखू हें मुख्य कृषिविषयक उत्पादन आहे. मेंढ्यांनाहि लागवड ह. आणि रेशमाचे किडे पाळणें व रेशीम काढणें हा एक धंदा

आहे. रेशीम, लोंकर, जनावरें, मेंढ्या, बकरी, फळें, तंबाखू हे निर्यातीचे मुख्य जिन्नस आहेत.

फार प्राचीन काळीं या भागांत सेमिटिक, विशेषतः हिटाइट लोक होते. मागील इतिहास पाहतां सिरियामध्यें वेळोवेळीं निरनिराळा मुलूख समाविष्ट झालेला आढळतो. प्राचीन सिरिया भूमध्य समुद्राच्या कांठानें ईजिप्तपासून टॉरसपर्यंत पसरला होता. प्रथम तो ईजिप्तच्या अमलाखालीं होता; नंतर तो क्रमानें असिरिया, इराण व रोम यांच्याकडे गेला. खि. पू. ६४ ते इ. स. ६३४ पावेतों तो रोमकडे राहिला. इ. स. ६३४ मध्यें उमर खलिफानें दमास्कस जिंकून सिरियावर मुसलमानी अमल आणला. नंतर सारासेन, सेल्जुक व तुर्क यांच्याकडे सिरिया गेला. १५१६ ते १९१८ हा काळ तो तुर्कांच्या वर्चस्वाखालीं होता. १९१८ मध्यें महायुद्धाच्या अखेरीस इंग्रजांनीं तो घेतला आणि त्यांत फ्रेंच हितसंबंध अधिक असल्यानें फ्रेंचांकडे तो मँडेटनें दिला गेला. नंतर १९४३ सालीं लेबानॉनसह सिरिया स्वतंत्र झाला.

सिरियन भाषा व वाङ्मय—एडेसा आणि पश्चिम मेसापोटेमिया येथील आरेमाईक भाषेला हें नांव आहे, आणि ही भाषा सेमिटिक भाषावंशापैकीं एक आहे. ही भाषा इ. स. १० व्या शतकाच्या सुमारास मृतभाषा बनली. या भाषेंतील सर्वांत जुना ग्रंथ आज उपलब्ध आहे तो म्हणजे बायबलचें अपूर्ण भाषांतर हा असून त्याला पेशीता म्हणतात. दुसरें भाषांतर सायरोफिलॉग्झेनियन या नांवाचें हीरापोलीसचा बिशप फिलोग्झेनस यानें तयार केलेलें (४८८ ते ६१८) आहे. या भाषांतराचा कांहीं भाग आज उपलब्ध आहे. जुन्या पुराणमताभिमानी सिरियन चर्चचा अत्यंत विद्वान् प्रतिनिधि एफ्रेम सायरस हा होय. तो चौथ्या शतकांत होऊन गेला.

**सिरोखाल्डी**—इराणमधील खिस्ती लोकांना नेस्टोरियन असें म्हणतात. (नेस्टोरियन पंथ पाहा). हे नेस्टोरियन लोक ससेनियन राजांच्या कारकीर्दींत जी लिपि वापरीत असत तिलाच नेस्टोरियन किंवा सिरोखाल्डी असें नांव आहे. इ. स. १६०० मधील नेस्टोरियन लोकांचा लेख उपलब्ध आहे. परंतु त्याची लिपि एस्ट्रांघेलो लिपीहून विशेष भिन्न नाहीं, पण इ. स. ८९९ मधील हारान येथील लेखांत मात्र नेस्टोरियन लिपीचें वैशिष्ट्य प्रथम दिसून येतें. अझरबैजन या इराणी प्रांतांतील सिरोखाल्डी धर्मपंथाचे लोक अद्यापि ही लिपि वापरतात. मलबारांतील कार्शुनी लिपीचा उद्भव हिच्यापासूनच झाला आहे.

**सिरोही**—राजपुतान्याच्या नैर्ऋत्य भागांतील संस्थान. क्षे. फ. १९६४ चौ. मै.. हा प्रदेश डोंगर व खडक यांच्या रांगांमुळें बराच तुटलेला आहे. या संस्थानांत पश्चिम बनास ही एकच महत्त्वाची नदी आहे; परंतु तिलाहि सर्व वर्षभर पाणी राहत नाहीं. संस्थानची हवा एकंदरींत कोरडी व आरोग्यकारक आहे. दक्षिण व पूर्व भागांतील जिल्ह्यांत पाऊस बराच पडतो; परंतु संस्थानच्या इतर भागांत केव्हां केव्हां पावसाची कमताई भासते. सिरोही येथें २१ इंच पाऊस पडतो. अबूचा पहाड या संस्थानांत आहे.

सिरोहीचे संस्थानिक चव्हाण घराण्यापैकीं देवरा शाखेचे रजपूत असून दहाव्या शतकाच्या अखेर जोधपूर संस्थानांतील नाडोल येथें राज्य करणाऱ्या लछमन राजाचे वंशज आहेत. १४०५ मध्यें रावसोभा यानें जुनें सिरोही गांव वसविलें; परंतु ती जागा आरोग्याच्या दृष्टीनें चांगली नसल्यामुळें ह्याचा मुलगा ससमल यानें पश्चिमेस थोड्या अंतरावर १४२५ त हल्लींचें गांव वसविलें. अकबर व जहांगीर यांच्या वेळीं येथें राव सुर्थान (सुरत्राण?) नांवाचा राजा गादीवर होता. मोंगल सैन्यानें त्याचा वारंवार पराभव केला; तरी त्यानें त्यांचें वर्चस्व कबूल केलें नाहीं. अठराव्या शतकांत जोधपुरशीं झालेल्या युद्धामुळें व मीना टोळ्यांच्या हल्ल्यामुळें शिरोहीचें पुष्कळ नुकसान झालें. १९ व्या शतकाच्या आरंभीं जोधपूरच्या राजानें संस्थानावर स्वारी केली असतां राजानें इंग्रजांची मदत मागितली. तेव्हांपासून या राज्यांत इंग्रजांचा पोलिटिकल एजंट राहूं लागला. मागचे राजे सरूपरामसिंग ह्यांना वंशपरंपरागत महाराजाधिराज महाराव अशी पदवी (१८८९) व जी. सी. आय. ई. आणि के. सी. एस्. आय्. हे किताब होते. यांच्या कारकीर्दींत संस्थानांत बऱ्याच सुधारणा झाल्या असून संस्थानचें उत्पन्न दुप्पट झालें. हे १९४६ सालीं वारल्यावर यांचा तीन वर्षांचा मुलगा तेजसिंग हा गादीवर आला. संस्थानचें उत्पन्न सु. १२ लक्ष रु. आहे.

संस्थानांतील अबू, चंद्रावती, वसंतगड, नांदिया व वास हीं ठिकाणें पुराणवस्तुसंशोधकांच्या दृष्टीनें महत्त्वाचीं आहेत.

संस्थानांत लहानमोठीं ४१३ गांवें असून लो. सं. २,३४,००० आहे. शें. ७२ पेक्षां जास्त हिंदू, शें. ११ वन्य हिंदू, व शें. ११ जैन आहेत. येथें मुख्यतः मारवाडी भाषा चालते. शें. ६० लोक शेतकीवर पोट भरतात.

सिरोही संस्थानांतील जमीन एकंदरींत सुपीक आहे. तींत मका, बाजरी, मूग, कुळीथ व तीळ हीं खरिपाचीं पिकें आणि बाजरी, गहूं, हरभरा हीं रब्बीचीं पिकें होतात. संस्थानांतील मुख्य कारखाने म्हणजे राजधानींत असलेले तरवारी, खंजीर, भाले, चाकू, धनुष्यें, वगैरे जिन्नस तयार करण्याचे होत. तीळ, मोहरी, कच्चीं व कमावलेलीं कातडीं व तूप हे निर्गत जिन्नस, आणि धान्य, कापड, मीठ, साखर, धातूचें काम, तंबाखू व अफू हे आयात जिन्नस होत. अबूरोड, पिंदवार, रोहेर, हीं व्यापाराचीं मुख्य ठाणीं आहेत. राजपुतान्यांतील संस्थानांत साक्षरतेच्या

बाबतींत सिरोही संस्थानचा अनुक्रम पहिला आहे. आतां हें संस्थान मुंबई राज्यांत विलीन झालें आहे.

**सिलहट**—आसामच्या नैर्ऋत्य सरहद्दीवरील जिल्हा. क्षे. फ. ५,४७८ चौ. मै.. जिल्ह्याचा बहुतेक भाग सपाट असून त्यांत नद्या व कालवे यांचें जाळें पसरलेलें आहे. बराक ही या जिल्ह्यांतील मुख्य नदी आहे. येथें उन्हाळा मुळींच नाहीं. पाऊस बराच पडत असल्यामुळें हवा बहुधा थंड असते. खासी व जैंटिया या डोंगरांच्या योगानें पावसाचे ढग आकर्षिले जातात. यामुळें उत्तरेकडे वार्षिक पाऊस २०० ते २५० इंच होतो. परंतु दक्षिणेकडे पावसाचें मान कमी असून वार्षिक पाऊस सरासरी १०० इंच होतो. सिलहटमध्यें केव्हां केव्हां धरणीकंप होतात. नुकतेच धरणीकंपाचे मोठे तडाखे बसले.

एके काळीं या जिल्ह्यांत गौर किंवा सिलहट, लौर व जैंटिया अशीं तीन लहान राज्यें होतीं; व कुशियारा नदीच्या दक्षिणेचा मुलूख डोंगरी टिप्पेराच्या राजाच्या ताब्यांत होता. १३८४ त फकीर शहाजलाल यानें जादुविद्येनें शेवटचा हिंदु राजा गौरगोविंद याचा पराभव केल्यामुळें गौर मुसलमानांच्या ताब्यांत गेलें. १७६५ त बंगाल प्रांताची दिवाणगिरी इंग्रजांस मिळाली त्या वेळीं हीं राज्येंहि त्यांच्याकडे गेलीं.

या जिल्ह्यांत पांच मोठीं व ८,३३० लहान गांवें असून लो. सं. ३१,१६,६०२ आहे. शें. ५३ मुसलमान व शें. ३७ हिंदू आहेत. जिल्ह्यांत मुख्यतः बंगाली भाषा बोलतात. शें. ८२ लोकांचा उदरनिर्वाह शेतीवर होतो. तांदूळ हें या जिल्ह्यांतील मुख्य पीक असून त्याखेरीज गळिताचीं धान्यें, मोहरी, कापूस, ऊंस, वगैरे पिकेंहि होतात. कांहीं ठिकाणीं चहाची लागवड केली जाते. या जिल्ह्याच्या बहुतेक भागांत कायमधाऱ्याची पद्धत सुरू आहे.

सिलहट हें जिल्ह्याचे मुख्य ठिकाण सुरमा नदीच्या उजव्या तीराला आहे. येथें पाऊस १५७ इंच पडतो. सिलहटची म्युनिसिपालिटी १८७६ त स्थापन झाली. गांवांत पानाच्या छत्र्या, शिंपांच्या बांगड्या, शीतलपाटी चटया, सुती कापड, वगैरे जिन्नस तयार होतात. येथें दोन हायस्कुलें, राजा गिरीशचंद्र रॉय यानें स्थापन केलेलें एक दुय्यम प्रतीचें आर्ट्स कॉलेज व चार लहान छापखाने आहेत. लो. सं. २२,०००

**सिलिकॉन**—एक अधातु मूलद्रव्य. परमाणुभारांक २८.१. प्राणवायूच्या खालोखाल याची अत्यंत विपुलता आहे. हा धातु सुटा आढळत नसून प्राणवायूशीं संयुक्त होऊन वाळू (सिलिका) किंवा गारगोटी या रूपांत किंवा धातव प्राणिदांशीं संयुक्त होऊन सिकित (सिलिकेट) या रसायनरूपांत दृष्टीस पडतो. फ्लुराम्ला (हायड्रोफ्लुओरिक ॲसिड) खेरीज कोणत्याहि खनिजाम्लाचा यावर कांहीं परिणाम होत नाहीं. सिलिका किंवा वाळू याचा पुष्कळसा उपयोग कांच, चिनीमाती करण्याकडे होतो.

**सिलोन**—हिंदुस्थानच्या दक्षिणेस असणारें हिंदी महासागरांतील बेट व राष्ट्र. १७९६ पासून १९४८ पर्यंत ही ब्रिटिश राजवसाहत (क्राउन कॉलनी) होती. त्याच्यापूर्वी डच व त्याहिपूर्वी पोर्तुगीज यांच्याकडे हें होतें. क्षेत्रफळ २५,३८० चौरस मैलांहून जास्त आहे. जास्तींत जास्त लांबी २७० मैल आहे. कोलंबो हें राजधानीचें ठिकाण आहे. सिलोन देश बहुतेक सपाट आहे. परंतु दक्षिण भागीं कांहीं डोंगर आहेत. सर्वांत उंच शिखर ८,३२६ फूट आहे. चहा, दालचिनी, रबर, खोबरें, नारळ, यांची पैदास मोठी आहे. खनिज संपत्तींत रत्नांचा निर्देश प्रामुख्यानें केला पाहिजे.

लोकवस्ती बहुतेक सिंहली असून त्यांची संख्या सुमारें पन्नास लाख आहे. तामिळ लोकसंख्या पंधरा लाख आहे. चार लाख मुसलमान असून ते आठव्या शतकांत आलेल्या अरब व्यापाऱ्यांचे वंशज आहेत. सिलोनमधील स्त्रियांशीं लग्न केलेल्या डच लोकांचे वंशज ते बर्घर लोक होत; त्यांची संख्या ३०,००० आहे. यांखेरीज १०,००० युरोपियन सिंहलद्वीपांत आहेत. येथें सिंहली, तामिळ व इंग्रजी अशा तीन मुख्य भाषा चालतात. बौद्ध धर्मीयांची वस्ती शें. ६५ आहे. हिंदु, मुसलमान व ख्रिस्ती या इतर तीन धर्मांचे लोक येथें आहेत. यांच्यांत धार्मिक तेढ बिलकुल नाहीं. राज्यकारभारांत सर्वच धर्मांचे लोक आहेत. अल्पसंख्याकांना कसलीहि धास्ती वाटत नाहीं. युरोपियनांची स्पष्ट आर्थिक वर्चस्व गाजविण्याची साहजिक असते. त्यांच्या हातीं सिलोनचा आयात-निर्यातीचा मोठा व्यापार आहे. परकीय भांडवल ८५ टक्के यांत गुंतलेलें आहे. निर्यात व्यापारांत ९० टक्के व्यापार चहा, रबर व नारळ यांचा आहे. रासायनिक रबराच्या अमेरिकन शोधामुळें येथील रबराचा व्यापार मंदावणार आहे, व त्यामुळें त्या धंद्यांत बेकारी वाढेल.

संरक्षणासाठीं लष्करावर सिलोनला खर्च करावा लागत नाहीं ही मोठ्या फायद्याची गोष्ट आहे. उत्पन्नाच्या मानानें शिक्षणासाठीं ४० टक्के, आरोग्यासाठीं ३० टक्के व सामाजिक व्यवस्थेसाठीं १५ टक्के खर्च होतो.

सिंहलद्वीपास भारतीय संस्कृतीचा अवशेष म्हणण्यापेक्षां विभाग म्हटलें तर अधिक शोभेल. तेथें बौद्ध संप्रदायाचें जगांतील एक अत्यंत महत्त्वाचें केंद्र आहे. हीनयान पंथाचें शुद्ध स्वरूप सिलोनमध्यें जसें पाहावयास सांपडतें तसें तें इतरत्र सांपडत नाहीं. पालिग्रंथांचें आगर आज सिंहलद्वीपच आहे आणि भारतीय संस्कृतीच्या इतिहासास थोडीबहुत मदत करणारे महावंश, दीपवंश यांसारखे इतिहासग्रंथ सिंहलद्वीपांतच सांपडतात. आज अनुराधपूर येथें गेलें असतां प्राचीन सुसंस्कृत हिंदु कलेचें स्वरूप अवशे-

पाच्या रूपांत पाहावयास मिळतें. खुद्द सिंहली लोक बौद्ध आहेत, पण ते वेदभाषाजन्य वाणी बोलत असल्यानें आपली पितृपरंपरा व्यक्त करतात. सिंहलद्वीपांतील दुसरा मोठा वर्ग म्हणजे तामिळ लोकांचा. हे लोक वेदभाषाजन्य भाषा बोलत नसले तरी ते आपणांला ब्राह्मणधर्मानुयायी हिंदू म्हणवितात. याप्रमाणें एका लोकसमूहाचें आपणाशीं जवळचें नातें एका कारणामुळें आहे तर दुसऱ्याचें दुसऱ्या कारणामुळें आहे. यासाठींच वर म्हटलें आहे कीं, सिंहलद्वीपास हिंदु संस्कृतीचा अवशेष म्हणण्यापेक्षा विभाग म्हटलेलेंच अधिक शोभेल.

सिंहली लोकांची संस्कृति पूर्णपणें हिंदुच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. आपल्या एखाद्या प्रांतातील ब्राह्मण काढून टाकले व ब्राह्मणाचें ज्ञान ब्राह्मणेतरांस शिकवलें आणि त्या प्रांतावर युरोपियन संस्कृति आणून लादली तर त्या प्रांतास जें स्वरूप येईल तें स्वरूप आज सिंहली समाजास आलें आहे.

सिंहली लोकांमध्यें आपले पूर्वज ओरिसांतून आले अशी समजूत प्रचलित आहे आणि त्या समजुतीस 'महावंसो' नांवाच्या लंकेच्या इतिहासांत नमूद केलेली दंतकथा कारण आहे. त्या दंतकथेंत एका वंगदेशीय राजकन्येस एका सिंहापासून मुलगा झाला आणि लोक त्याला सिंहल म्हणूं लागले; तो पुढें आपल्या अनुचरांसह लंकेंत आला आणि त्यानें लंका वसविली, असें सांगितलें आहे. सिंहली लोकांची भाषा संस्कृतजन्य आहे. त्यांच्या संस्कृतीचें साधारणपणें वर्णन करावयाचें म्हटलें म्हणजे येणेंप्रमाणें : त्यांची नित्य व्यवहाराची भाषा सिंहली आहे. पारमार्थिक ग्रंथांची भाषा पाली आहे; आणि शास्त्रग्रंथांची भाषा संस्कृत आहे. सिंहली लोक बौद्ध आहेत, असें पाहून आपणांस असें वाटण्याचा संभव आहे कीं, यांच्या ग्रंथांत संस्कृतपेक्षां पालीचें मिश्रण अधिक असेल, पण तसें मुळींच नाहीं. कोणत्याहि चांगल्या प्रौढ भाषेंत लिहिलेला सिंहली उतारा घेतला तर त्यांत पालीपेक्षां संस्कृत शब्दांचाच भरणा अधिक आढळतो. ते जे नवीन शब्द तयार करतात ते संस्कृत शब्द जोडून तयार करतात. तेव्हां पाली भाषा जरी त्यांची पारमार्थिक ज्ञान मिळविण्याची भाषा असली तरी ती त्यांच्या संस्कृतीची भाषा खास नाहीं.

सिलोनमधील मूळचे रहिवासी म्हणजे पूर्वेकडील अरण्यांत राहणाऱ्या आजच्या वेद्द (पाहा) नांवाच्या वन्य लोकांचे पूर्वज असावे; आणि येथील गुहांमध्यें सांपडलेल्या कित्येक प्राचीन दगडी हत्यारांवरून असें दिसतें कीं, या जातीचे हे लोक या बेटांत फार प्राचीन कालापासून राहत असावे. यानंतर या बेटांत जाऊन राहिलेल्या लोकांबद्दल आपलें महाकाव्य जें रामायण त्यांत माहिती मिळते ती अशी कीं, रावण नांवाच्या तेथील राजाची राजधानी राम नांवाच्या भारतीय वीरानें आपल्या अनुयायांच्या मदतीनें जिंकून घेतली. सिलोनच्या अर्वाचीन इतिहासाला आरंभ खि. पू. ५४३ पासून होतो, असें पाश्चात्य इतिहासकार समजतात. त्या सालीं विजय नांवाचा सिंहली राजघराण्याचा मूळपुरुष आपल्या आर्य भाषा बोलणाऱ्या अनुयायांसह हिंदुस्थानांतून निघून सिलोनांत जाऊन उतरला. तेथें विजयानें एका तद्देशीय पुढाऱ्याच्या मुलीबरोबर विवाह करून त्याच्या मदतीनें त्यानें सर्व बेट जिंकून घेतलें व तें आपल्या अनुयायांत वांटून तेथें लहान लहान राज्यें बनविलीं. यानंतर हिंदुस्थानांतील शेतकी वगैरे बरीच सुधारणा सिंहली लोकांनीं आपल्या बेटांत आणली. विजयाच्यानंतरच्या राजानें खि. पू. ५०४ च्या सुमारास अनुराधपुरानजीक एक मोठा तलाव बांधून कालवे काढले; व त्याच सुमारास हल्लीं बऱ्याच भागांत प्रचलित असलेली ग्रामसंस्था पद्धति सुरू केली.

खि. पू. ३ ऱ्या शतकाच्या आरंभीं बौद्धधर्मी सार्वभौम अशोक राजा याचा मुलगा महिंद याच्या उपदेशानें सिलोनमधील लोक बौद्धधर्मी बनले; व त्यानंतर तेथें दागोबा नांवाच्या चमत्कारिक घंटेच्या आकाराच्या कठिण दगडाच्या अस्थिपेटिका व बौद्ध मठ असंख्य निर्माण झाले. बाकी राहिलेला सिलोनच्या प्राचीन इतिहासाचा भाग मलबारी अथवा तामिळ लोकांच्या स्वाऱ्या, त्यांनीं जिंकलेले प्रांत व अन्यायानें बळकावलेलीं राज्यें यांच्या लांबलचक हकिगतींनीं भरलेला आहे.

१० व्या शतकाच्या अखेरीस चोल राजा राजराज यानें सिलोनवर स्वारी केली, आणि बऱ्याच लढायांनंतर सिलोन बेट १००५ मध्यें आपल्या साम्राज्यास जोडून टाकलें. तथापि या तामिळ सत्तेखालीं सिलोन फार दिवस टिकलें नाहीं. १०७१ मध्यें विजयबाहूनें सिंहली घराण्याचें राज्य पुन्हां प्रस्थापित केलें. यानंतर कांहीं काळ सिलोनला परकीयांपासून त्रास झाला नाहीं. विजयबाहूच्या वंशजांपैकीं व एकंदर सिंहली राजांमध्येंहि अत्यंत श्रेष्ठ असा पहिला पराक्रमबाहू नांवाचा राजा (११५५–११८०) होऊन गेला; त्याचा एक भव्य पुतळा पोलोनरुव येथें आहे. सिलोनमध्यें अपूर्व शांतता नांदत होती, तिचा फायदा घेऊन त्यानें कालवे, तलाव, मठ, वगैरे बांधले, इतकेंच नव्हे तर, त्या वेळीं मदुरा येथील पांड्य घराण्यामध्यें गादीबद्दल चाललेल्या एका तंट्याची संधि साधून आपल्या तामिळ शत्रूचें मागील उट्टें काढण्याकरितां त्यानें हिंदुस्थानांत स्वारी केली. पण पराक्रमबाहूच्या मरणोत्तर तीस वर्षांतच त्यानें बसविलेली घडी सर्व विसकटली, आणि मलबारी लोकांनीं पुन्हां सिलोनांत पाय रोवला व त्यामुळें राजधानी दक्षिणेकडे जातां जातां शेवटीं १४१० मध्यें कोलंबोच्या कोट्टो नांवाच्या उपान्त भागांत ती स्थापन झाली. १४०८ मध्यें सिंहली घराण्यावर आणखी एक संकट ओढवलें,

एका चिनी वकिलाचा तेथें अपमान झाल्याच्या निमित्तानें चिनी सैन्यानें या बेटावर स्वारी करून ४ थ्या पराक्रमबाहू राजाला कैद करून नेलें. यानंतर तीस वर्षें सिंहली राजे चीनचे मांडलिक बनलेले होते.

इ. स. १५०५ मध्यें फ्रान्सिस्को डी आल्मीडा हा पोर्तुगीज इसम सिलोनांत उतरला तेव्हां त्याला त्या बेटांत सात निरनिराळीं राज्यें असल्याचें आढळलें. नंतर बारा वर्षांनीं गोव्याच्या व्हाइसरायानें कोलंबो येथें एक किल्ला बांधण्याचा हुकूम दिला व त्याकरितां कोट्टेच्या राजाकडून परवानगी मिळविण्यांत आली. या काळापासून पुढें १७ व्या शतकांत डच लोक तेथें पाय ठेवीपर्यंत पोर्तुगीज लोकांनीं तद्देशीय राजे व युरोपियन व्यापारी यांच्या चढाओढीमुळें चिडून जाऊन त्या राजाना मदत करणारे जे अरब लोक त्यांच्याबरोबर लढाया चालू ठेवून आपली सत्ता त्या बेटांत प्रस्थापित करण्याचा दीर्घ प्रयत्न चालविला होता. या प्रयत्नानें किनाऱ्यांवर शेवटीं त्यांची सत्ता स्थापित झाली, परंतु बेटाच्या अंतर्भागांत त्यांचा अमल बसला नाहीं.

पोर्तुगीज लोकांच्या धर्मप्रसाराच्या वेडामुळें व तद्देशीय राजांबरोबर वागण्याच्या त्यांच्या मोठ्या अरेरावीच्या धोरणामुळें तेथील राजांशीं त्यांचें नेहमीं वांकडे असे; पुढें १६०२ मध्यें ॲडमिरल् स्पिलबर्गच्या नेतृत्वाखालीं डच लोक त्या बेटांत येऊन उतरले. १६५६ मध्यें त्यांनीं कोलंबो हस्तगत केलें; आणि शेवटीं १६५८ मध्यें सिलोनमधील पोर्तुगीज लोकांचें ठाणें जें जाफना तें घेऊन त्यांना समूळ हांकून दिलें.

डच लोकांनीं आपल्या पूर्वीच्या पोर्तुगीज लोकांपेक्षां अधिक शहाणपणाचें धोरण स्वीकारून आपल्या वर्चस्वाखालच्या मुलखांत सुधारणा करण्याची व अंतर्भागाबरोबर व्यापार सुरू करण्याची संधि बिलकुल दवडली नाहीं. १६५८ मध्यें एवढ्या अप्रतिहत शौर्यानें व चिकाटीनें जो मुलूख त्यांनीं जिंकला होता तोच मुलूख १७९६ मध्यें त्यांच्यांतील कमकुवतपणामुळें व भ्याडपणामुळें त्यांच्या हातून भराभर नाहींसा झाला. इंग्लिशांचा सिलोनशीं संबंध १७६३ मध्यें प्रथम आला; त्या सालीं मद्रासेहून क्यांडीच्या राजाकडे एक वकीलमंडळ पाठविण्यांत आलें होतें, पण त्या वेळीं त्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं. पुढें १७९५ मध्यें ग्रेट ब्रिटन व हॉलंड यांच्यामध्यें खटका उडाला तेव्हां सिलोनांतील डच मुलखावर सैन्य पाठवण्यांत आलें. त्या वेळीं डच लोकांनीं इतका क्षुल्लक प्रतिकार केला कीं, एका वर्षांतच डचांचे सर्व किल्ले इंग्लिश सेनापतीच्या हातीं पडले.

ज्या ब्रिटिश फौजेनें सिलोन बेट प्रथम जिंकून घेतलें ती फौज ईस्ट इंडिया कंपनीची होती व म्हणूनच सिलोनचा कारभार प्रथम कंपनीकडे असून तो मद्रासहून चालत असे. १८०२ मध्यें आमीन्सच्या तहानें या बेटांतील डच मुलखाचा कायदेशीर ताबा ग्रेट ब्रिटनला देऊन आंतरराष्ट्रीय कायद्याच्या दृष्टीनें ग्रेट ब्रिटनच्या सिलोनमधील अधिकारांत जें वैगुण्य होतें तें दूर केलें. कांहीं काळपावेतों ब्रिटिश सत्ता फक्त किनाऱ्याच्या प्रदेशांतच चालत होती. मध्य भागांतला डोंगराळ प्रदेश दुर्गम अरण्यांनीं व उभ्या पर्वताच्या रांगांनीं व्याप्त होता व तो सिंहली घराण्यांतला शेवटचा राजा श्रीविक्रमराजसिंह यांच्या ताब्यांत होता. हा आपल्या प्रजेला युरोपीय शेजाऱ्यांशीं दळणवळण ठेवण्याला मुळींच उत्तेजन देत नसे. १८१५ मध्यें आहिगार व इतर तद्देशीय सरदारांच्या बोलावण्यावरून ब्रिटिश फौजेनें या राजावर चालून जाऊन कँडीनजीक त्याला कैद केलें. पुढें हा राजा हद्दपार होऊन तो हद्दपारींतच मरण पावला. याप्रमाणें सिंहली राजघराण्यांतल्या शेवटल्या राजाचा अंत झाला. हें घराणें दोन हजार वर्षांवर सिलोनमध्यें राज्य करीत होतें. १८१५ सालच्या २ मार्च रोजीं कँडियन सरदारांशीं एक तह करण्यांत आला. त्याअन्वयें त्या बेटाची संपूर्ण सत्ता ब्रिटिशांच्या हातांत आली.

सिलोनचा कारभार एका ब्रिटिश गव्हर्नराकडे असे. त्याच्या मदतीला स्टेट कौन्सिल असे. या कौन्सिलमध्यें ५० सभासद असत व ते बहुतेक लोकनियुक्त असत. हें कौन्सिल आपणांतून सात मंत्री निवडत असे. १९४५ सालीं ब्रिटिश शासन पद्धतीवर बनविलेली एक नवीन घटना सिलोनला देण्यांत आली. नंतर हिंदुस्थान आणि ब्रह्मदेश यांना वसाहती स्वराज्य मिळालें तसें तें सिलोनलाहि देण्यांत आलें. याप्रमाणें सिलोनमध्यें स्वातंत्र्याची चळवळ न होतांनाच त्याला स्वातंत्र्य लाभलें.

सिंहली भाषा—ही भाषा आर्यन आहे कीं नाहीं याविषयीं विद्वानांत मतभेद आहे. 'एळू' या शब्दाला दोन अर्थ आहेत. एक अर्थ, प्राचीन काळची सिंहलाची राष्ट्रीय भाषा. ही भाषा इ. सनापूर्वी ५०० च्या सुमारास झालेल्या आर्य लोकांच्या सिंहलप्रवेशापासून सिंहलभूमीवर हळूहळू तयार होत गेली. 'एळू' शब्दाचा दुसरा अर्थ, सिंहली लोकांच्या काव्यग्रंथांची भाषा असा आहे. वर्तमानकाळीं मुद्दां कविता रचणारे एळू भाषेचाच उपयोग करतात. प्राचीन राष्ट्रीय एळू भाषा सध्यांच्या सिंहलीहून बरीच भिन्न आहे. सध्यांच्या सिंहलींत आढळत नाहींत अशीं पुष्कळ प्राचीन व्याकरणरूपें एळू भाषेंत येतात. हीं रूपें प्रचारांतील सिंहलींत फार क्वचित् येतात, व येतात तेव्हां कांहीं विशिष्ट संबंध अथवा कथानक दर्शविण्याकरितां येतात.

काव्यग्रंथांची एळू भाषा ही परिभाषेच्या स्वरूपाची आहे. संस्कृत आणि पाली भाषांचा हिजवर पुष्कळ परिणाम झालेला दिसून येतो. हा परिणाम लेखनशैलींत विशेष नजरेस येतो. संस्कृत आणि पाली शब्द सिंहली काव्यग्रंथांत वारंवार

शिरतांना दिसून येतात. अशा पुष्कळ शब्दांचें पूर्णपणें सिंहलीभवन झालेलें आहे. कित्येकांचे सिंहलीभवन अर्धवट झालेलें आहे. या प्रकारचे संस्कृत-पाली शब्द व मूळ एळू शब्द हें आजच्या कवींचें मुख्य भांडवल असतें. या भांडवलाचा उपयोग करून आपली कृति करतांना कवि नवीं रूपें व नवे शब्दहि निर्माण करीत असतो व अशा रीतीनें आपल्या भांडवलांत भर टाकीत असतो.

भाषापंडित डॉ. गैजर यांच्या मतें सिंहली ही शुद्ध आर्य भाषा आहे व इतर इंडो-आर्यन लोकभाषांचा जो दर्जा आहे तोच हिचाहि दर्जा आहे. सिंहलींतील वर्णशास्त्र प्राकृताच्या वर्णशास्त्रावर आधारलेले आहे; स्वरविकाराचे जे विशेष सिंहलींत आहेत तत्समान विकारविशेष मालदिवी वगैरे संलग्न भाषांत आहेत, वगैरे गोष्टी ज्यांना स्पष्ट झाल्या आहेत त्यांना हें मत ग्राह्य वाटेल. सिंहलींत महाप्राणोच्चार ख, झ, ढ, घ, भ हे वर्ण नाहींत ही अडचण त्यांना भासते खरी; पण हे वर्ण पूर्वी सिंहलींत होते व पुढें तिच्या विशिष्ट विकासाच्या पहिल्या कालखंडांत ते नाहींसे झाले ही गोष्ट सिद्ध करतां येण्यासारखी असल्यानें सिंहली ही आर्य भाषा आहे या सिद्धान्ताला सदर अडचणीनें बाध येत नाहीं.

इसवी सनाच्या बाराव्या शतकांपर्यंतचा काळ :-सिलोनमध्यें बौद्धमताच्या प्रसाराबरोबरच तेथील वाङ्मयाचाहि प्रसार झाला. सिलोनांतील बौद्धधर्माचा आद्य प्रचारक जो महिंद त्यानें पाली हा ग्रंथ त्या वेळच्या सिंहली भाषेंत आणला. अठ्ठकथा हा ग्रंथ त्यापैकीं असावा. दन्तकथांवरून प्राचीन सिंहली वाङ्मयाची माहिती मिळते. पहिला ग्रंथरचनाकाल इ. स. चौथ्या शतकापर्यंत आहे. पांचव्या शतकांतील ग्रंथांत बुद्धघोषाचे पाली ग्रंथ पडतात. सहाव्या शतकांतील सिंहली काव्यांवर कालिदासाची चरीच छाप दिसून येते. कुमारदासानें आपले ग्रंथ कालिदासास अनुसरून लिहिलेले असावेत. सहाव्या शतकांत लंकेंत काव्याची अभिवृद्धि दिसून येते. नवव्या शतकांत सिंहली कायदेग्रंथ रचले गेले. प्राचीन सिंहली वाङ्मय हल्लीं उपलब्ध नाहीं.

बाराव्या शतकापासून चौदाव्या शतकापर्यंतचा काळ :-बाराव्या शतकांत सिंहली राज्याबरोबर वाङ्मयाचाहि उत्कर्ष झाला. धर्मविषयक गद्यग्रंथ म्हणजे अमावतुर (अमृतप्रवाह) व धर्मप्रदीपिका; चौदाव्या शतकांतील मेधंकराचा विनयार्थसमुच्चय व दहंगात मालव. ऐतिहासिक व कथानकात्मक गद्यग्रंथ-पराक्रम पंडिताचा थूपवंश; मयूरपादाचा पूजावलिय; धम्मकित्तिथेराचा दाठावंसय; उम्मनग्ग जातकाचें भाषांतर; एळूबोधिवंसय; अत्तनगलुवंसय; सासनावतार; धम्मसेन थेर याचे सद्धर्मालंकारय व सद्धर्मरत्नावलीव हे दोन ग्रंथ; पन्सियपनसजातक नामक जातक ग्रंथाचें भाषांतर. शास्त्रीय ग्रंथ-सिदत्-संगराव (सिंहली व्याकरण); शियाबसलकर हा सिंहली अलंकारशास्त्रावरील ग्रंथ; व योगार्णव नांवाचा वैद्यक ग्रंथ.

१३ व्या व १४ व्या शतकांतील सिंहली काव्यग्रंथ :—पहिलें काव्य म्हणजे ससदावत. दुसरें कुसदावत. नंतर मुवदेवदावत. सिंहली काव्यभाषा कृत्रिम व अतिशयोक्तिपूर्ण आहे. या वर्गांत लोकोपकारय व दळदासिरित हीं दोन काव्यें पडतात. या वाङ्मयकालाच्या अखेरीचें काव्य मयूरसंदेशय होय. हें पहिलें सिंहली 'दूत' काव्य होय. या सिंहली काव्यांवर कालिदासी छाप पडलेली दिसेल.

१५ व्या शतकापासून १७ व्या शतकापर्यंतचे काव्यग्रंथ :—श्री राहुलथेर ह्याला तोटगमुव असेंहि नांव आहे; यानें उत्कृष्ट काव्यें लिहिलीं. याचें 'साळलिहिणि-संदेशय' हें काव्य; दुसरें एक 'परवी-संदेशय' (पारावतदूत) आहे. काव्यशेखरयमध्यें सेनक पंडिताच्या (बोधिसत्वाच्या) पद्यरूप कथा आहेत. तोटगमुवाचे समकालीन कवी विदागमथेर व वात्ताव हे होत. पहिल्याचें बुधगुणालंकारय, दुसऱ्याचें गुत्तिला काव्य आहे. या काळांतील आणखी काव्यें-लोवाडसंगराव; तिसर-संदेशय (हंस दूत); गीरसंदेशय (कीर-दूत); कोकिल-संदेशय (कोकिल-दूत).

गद्यवाङ्मय :—पहिला ग्रंथ सद्धर्मरत्नाकर, तीन एळु शब्दकोश (पिदुम्मल, रुवनमल आणि नामावलिय), मोग्गलायनपञ्चिकाप्रदीपय (व्याकरण ग्रंथ), बुतसरणय आणि दहम्सरणय. १६ व्या शतकाच्या अखेरीस पहिल्या राजसिंहानें पुष्कळ बौद्धग्रंथ जाळले. यामुळें ते ग्रंथ उपलब्ध नाहींत. मुक्वेहि कवींचे ग्रंथ :—कुस-जातक, सुभाषित काव्य, साबुल-संदेशय (कुक्कुट-दूत), दहम्सोंड-जातक, मुनिगुणरत्नमालय व दुरसीलवत. परंगि-हटन, महा-हटन, कोस्तंतीनु-हटन हे खिस्ती ग्रंथ दिसतात. अर्वाचीन गद्य ग्रंथ :—सद्धर्मदास, व राजवलिय आणि राजरत्नाकरय हे दोन ऐतिहासिक ग्रंथ.

१८ वें व १९ वें शतक :—मुनिचार-जातकय (१८१४), असदिस जातक, कवमिणि-कोंडल, कवमिणि मल्दम, कवमुतुहरय (१७८४), कवसिळुमिण (१८२६), कवमिणिरंदम, तलपत्त-जातकय (१८५६). या कालांतील संदेश काव्यें :—नीलकोबो-संदेशय व सुव-संदेशय. वियोवगरत्नमालय, रतिरत्नालंकारय हीं शृंगारकाव्यें आहेत. तिरतनमालाव, बौद्धधर्मांतील 'तीन रत्नें' (बुद्ध, धम्म व संघ) व वालिगल दाठागोत् पदिपय हे धर्मविचार ग्रंथ आहेत.

सिंहली शिलालेख —इ. स. च्या पांचव्या शतकापासून ९ व्या शतकापर्यंतच्या शिलालेखांची लिपि अशोक लिपीहून निराळी आहे. १२ व्या व तेराव्या शतकांतील पहिल्या पराक्रमबाहूचे दोन प्रमुख शिलालेख आहेत. निःशंकमल्लाचे शिलालेखांवरून

कालनिर्णयास मदत होते. तिसऱ्या विक्रमबाहूच्या शिलालेख (१३६०) व इतर शिलालेख यावरून दानपद्धति व तिचा उगम कळतो. दानकृत्य निवेदन करणारे लेख 'सन्नस' होत. अतिशय जुना सन्नस १३१७ चा आहे. अगदीं अलीकडचा सन्नस १८१२ चा आहे. सिंहली ग्रंथवाङ्मयांत श्रौतधर्मविषयक वाङ्मयाचा अभाव आहे. ब्राह्मणविकासापूर्वी आर्यांचें सिंहलांत प्रयाण झालें असावें असें यावरून दिसतें.

**सिल्यूकिडी शक**—ग्रालाच मॅसिडोनी शक असेंहि नांव आहे. ख्रि. पू. ३२३ मध्यें शिकंदर बादशहा मरण पावल्यावर त्याचें राज्य वांटून घेण्याकरितां त्याच्या सेनापतींमध्यें लढाया होऊन शेवटीं मॅसिडोनिया, मिसर व सिरिया (बाबिलोन) हीं तीन राज्यें उत्पन्न झालीं व सिल्यूकस निकेटार हा त्यांतील सिरिया देश बळकावून ख्रि. पू. ३१२ मध्यें ऑक्टोबर महिन्याच्या पहिल्या तारखेस गादीवर बसला. त्याच्या राज्यारोहणापासून हा शक सुरू झाला असल्यामुळें त्यास सिल्यूसिकिडी शक असें नांव मिळालें.

**सिल्यूरियन**—कॅंब्रिअन आणि डेव्होनियन या दोन कालांमधील कालास व थरांस मर्किसन यानें सिल्यूरियन हें नांव योजिलें आहे. सध्यां या थरांमध्यें लँडोव्हे, वेनलॉक व लडलो या थरांचा अथवा रांगांचा समावेश होतो. या थरांत प्राथमिक अवस्थेंतील कांहीं मत्स्य आणि मोठमोठे यूरिप्टेडा (सपक्षमत्स्य) विशेषतः स्कॉटलंडमध्यें आढळतात. या कालांतील वनस्पती अद्यापि अज्ञात आहेत.

**सिसिरो, मार्कस टलियस** (ख्रि. पू. १०६–४३)—प्रसिद्ध रोमन वक्ता व राजकारणी पुरुष. लहानपणींच त्यानें विवादशास्त्र, साहित्यशास्त्र व कायदा यांचा अभ्यास केला होता. रोमनपद्धतीप्रमाणें लष्करी शिक्षणहि त्यानें घेतलें होतें. १७ व्या वर्षी स्ट्रॅबो व सुला यांच्या हाताखालीं सिसिरोनें युद्धांत भाग घेतला होता. पुढें त्यानें अथेन्स येथें अँटिओकसजवळ वक्तृत्वकलेचा अभ्यास केला. ख्रि. पू. ६३ मध्यें तो कॉन्सल झाला. राज्यकारभाराचीं कामें व भाषणें यांत तो नेहमीं गुंतलेला असे. त्या वेळीं सिसिरो नव्या पिढींतला तरुण असल्यामुळें रोम येथील वयोवृद्ध सरदार त्याचा मत्सर करूं लागले. सीझरनें सिसिरोला आपल्या पक्षाला वळविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला; पण व्यर्थ. तेव्हां त्यावर त्यानें टीकाशस्त्र धरलें तेव्हां सिसिरोची मान्यता नाहींशी होऊन अखेर रक्तपात टाळण्याकरितां त्याला हद्दपारी पत्करावी लागली. ५८ सालीं त्याला पुनः रोमला परत बोलाविण्यांत आलें. त्या वेळीं पाँपे व सीझर यांच्यामधील भांडण मिटून आलें होतें. ख्रि. पू. ५२ सालीं पाँपे हा सर्व रोमन साम्राज्याचा एकटा पूर्ण सत्ताधारी कॉन्सल झाला व नंतर जे राजद्रोहाचे खटले करण्यांत आले, त्यांत मिलो व त्याचे अनुयायी यांच्या तर्फे बचावाचें काम सिसिरोनें केलें. पुढें पाँपेनें त्याला सिलीशियाचा गव्हर्नर नेमलें. तिकडे असतां कॅपॅडोशियामध्यें झालेलें बंड त्यानें मोडलें. ख्रि. पू. ४७ मध्यें रोमनध्यें पुनः यादवी माजली, तेव्हां तो परत गेला.

सीझरच्या कारकीर्दींत तो राजकारणांत बिलकुल पडला नाहीं. या सुमारास त्याची बायको टेरेन्शिया हिचा त्रास अनिवार्य होऊन शेवटीं त्यानें तिच्याशीं काडीमोड केली व पुब्लिलिया नांवाच्या तरुण व श्रीमंत स्त्रीशीं लग्न केलें. पुढें पुब्लिलियाच्या निष्ठुर वागणुकीमुळें तिलाहि त्यानें सोडून दिलें व आपला सर्व वेळ तो वाङ्मयव्यवसायांत घालवूं लागला. त्यानें साहित्यशास्त्रावरील व तत्त्वज्ञानावरील पुष्कळ ग्रंथ लिहिले. ख्रि. पू. ४४ मध्यें सीझरचा खून झाला. पुढील काळांत तो रोमच्या रिपब्लिक पक्षाचा पुढारी होऊन राहिला. पुढें ऑक्टेव्हियस बादशहा झाला तेव्हां कांहीं दिवस सिसिरो पूर्ण राजनिष्ठ होता; पण पुढें त्यानें कारस्थानें सुरू केलीं तेव्हां त्याला ठार मारण्यांत आलें.

**सिसिली**—भूमध्य समुद्रांतील सर्वांत मोठें बेट. हें इटलीच्या नैर्ऋत्य भागापासून मेसिना सामुद्रधुनीमुळें वेगळें पडलें आहे. तथापि हा इटलीचाच एक प्रांत आहे. क्षे. फ. ९,९३५ चौ. मै. व लो. सं. सु. ४०,००,०००. या बेटाचा आकार त्रिकोणी असून बहुतेक प्रदेश पठाराचा आहे. उंच भागीं ओक व चेस्टनट या झाडांचीं जंगलें आहेत तर खालच्या उतारावर ऑलिव्ह, नारिंगें, मलबेरी, द्राक्षें, वगैरेंच्या बागा आहेत. बेटाच्या पूर्व भागांत प्रसिद्ध एटना ज्वालामुखी आहे. सिसिलीमध्यें फळें पुष्कळ होतात व तीं बाहेर जातात. गंधक फार सांपडतें व त्यांत जगांत यावाच क्रमांक लागतो आहे. मच्छीमारीचा धंदा फार किफायतशीर आहे. पालेर्मो, मेसिना व कॅटेनिआ या तीन शहरांतून परदेशाशीं मोठा व्यापार चालतो.

प्राचीन काळीं फोनिशियन आणि ग्रीक यांचा सिसिलीशीं मोठा व्यापार असे. ख्रि. पू. ८ व्या शतकांत ग्रीकांनीं आपलें वसाहत या बेटावर वसविलें. त्यांच्यानंतर निरनिराळ्या कालांत कार्थेजिअन, रोमन, गॉथ, बायझान्टियन, सारसेन व नॉर्मन यांनीं आपली सत्ता यावर गाजविली. यापुढील इतिहास नेहमींप्रमाणें निगडित आहे.

**सिंह**—हा मांजराच्या जातीचा एक मांसाहारी प्राणी आहे. याची अधिकांत अधिक लांबी आठ फूट व उंची चार फूट असते. सहा वर्षांत याची वाढ पूर्ण होते. हा मूळ आफ्रिका व पश्चिम आणि मध्य आशिया यांत आढळतो. सामान्यतः हा रात्रीचा संचार करतो व इतर प्राण्यांस मारून खातो. अगदीं उघाम

पळल्याशिवाय हा मृत प्राण्याचें मांस खात नाहीं. आफ्रिकेमध्यें याच्या अनेक जाती आहेत. आशियांतील याची जात थोडी लहान असून तिला आयाळ कमी असते किंवा गुजराथसारख्या प्रांतांत तर ती मुळींच नसते. अमेरिकेंतील सिंहाला प्युमा (पाहा) म्हणतात.

सिंह

सिंह दिसण्यांत वाघापेक्षां भव्य व उमदा दिसतो. त्याचा चेहरा वाटोळा व कपाळ मोठें असतें. शेंपूट लांब असून शेवटीं झुपका असतो. मानेवर लांब केंसांची आयाळ नरास असते. हा वनराज दिवसां स्वस्थ पडून असतो व रात्रीस गर्जना करीत बाहेर भटकतो. पण हा उपाशीपोटीं ओरडत नसतो तर पोट भरल्यावर त्याची गर्जना चालू होते. सिंहिणीला दरसाल तीनचार पोरें होतात. पोरांवर ती फार माया करते. सिंहाची आयुर्मर्यादा तीसचाळीस वर्षांची आहे.

सिंहीण

ऋग्वेदांत व तदुत्तर ग्रंथांत हा प्राणी आढळतो. सिंहाच्या गर्जनेचा (नद्) नेहमीं उल्लेख आलेला आहे; व या गर्जनेला 'तस्थान' असें नांव आहे. हा नेहमीं भटकत असतो (कुचर), डोंगरांत राहतो (गिरिस्थ); व हा ठार मारणारा भयंकर वनपशु आहे (मृगो भीम उपहन्तुः). कोल्ह्यानें सिंहाचा पराभव करावा हें चमत्कारिक आहे, असेंहि वर्णन आलेलें आहे. मनुष्यांना सुद्धां त्याची भयंकर भीति वाटल्यामुळें ते त्याला पिंजऱ्यांत ठेवीत; त्याला पकडण्याकरितां लोक दबा धरून बसत व शिकारी लोक शिकार करीत; अशींहि वर्णनें आलेलीं आहेत. कुत्र्यांना सिंहाचें भय वाटे. सिंहीण ही सुद्धां तिच्या शौर्याबद्दल प्रसिद्ध आहे. अभिजात वाङ्मयांत प्रतिष्ठा, वैभव, पराक्रम या गुणांसाठीं सिंहाची उपमा व प्रतीकें आढळतात. राजसत्तादर्शक आसन तें सिंहासन होय. वास्तु-शिल्पकलांतून सिंहप्रतिमा विविध प्रकारें वापरलेल्या दिसतील.

**सिंह, कुमार गंगानंद** (१८९८- )—एक बंगाली पंडित व सार्वजनिक कार्यकर्ते. यांचें शिक्षण मोंघीर व पूर्णिया येथें व नंतर कलकत्ता येथें प्रेसिडेन्सी व संस्कृत कॉलेज यांमध्यें झालें. १९२१ ते १९२४ पर्यंत यांनीं कलकत्ता युनिव्हर्सिटीमध्यें संशोधन-कार्य केलें. १९२३, १९२६ व १९२९ या वर्षी प्रत्येक वेळीं ते मध्यवर्ती असेंब्लीमध्यें निवडून आले. तेथील कॉंग्रेस पक्षाचे ते प्रमुख सभासद होते. १९२४ ते १९२७ पर्यंत ते पूर्णिया जिल्हा बोर्डाचे व १९२५ ते १९२९ पर्यन्त पूर्णिया कॉंग्रेस कमिटीचे अध्यक्ष होते. १९२८ मध्यें ते असेंब्लीमध्यें कॉंग्रेस पक्षाचे चिटणीस झाले. इंडियन रोड कमिटीचे ते सभासद होते. हिंदुमहासभेचे ते एक प्रमुख सभासद असून तिच्या कार्यकारी मंडळाचे सभासद आहेत. बिहार प्रांतिक हिंदुमहासभेचे ते अनेक वर्षें अध्यक्ष आहेत. सत्याग्रहाच्या चळवळींत यांनीं कॉंग्रेसचा व आपल्या असेंब्लींतील जागेचा राजीनामा दिला. गोलमेज परिषद चालू असतां हे इंग्लंडमध्यें गेले व दरभंग्याच्या महाराजांचे खासगी चिटणीस म्हणून यांनीं काम केलें. डॉ. बी. एम्. बरुआ यांच्यासह यांनीं भरहुत शिलालेखांचें संपादन केलें. बिहार भूकंप व दरभंगा राज या नांवाचा एक ग्रंथ यांनीं लिहिला.

**सिंह, श्रीकृष्ण** (१८८८-१९५०)—बिहारचे एक पुढारी व मंत्री. यांचा जन्म मोंघीर जिल्ह्यांत माऊर येथें झाला. १९१६ मध्यें यांनीं मोंघीर येथें वकिली सुरू केली. १९२० मध्यें यांनीं असहकारितेच्या चळवळींत भाग घेण्यास सुरुवात केली व तेव्हांपासून मृत्यूपर्यंत कॉंग्रेसचें कार्य करीत होते. १९२१ मध्यें कॉंग्रेस स्वयंसेवक दलांत असल्याबद्दल यांस शिक्षा झाली होती. १९२६ मध्यें हे बिहार कायदेमंडळाचे सभासद म्हणून निवडून आले. ते कायदेमंडळातील स्वराज्य पक्षाचे पुढारी होते. १९३० मध्यें यांनीं कायदेमंडळांतील सभासदत्वाचा राजीनामा दिला. त्यानंतर त्यांस एप्रिल १९३० मध्यें दुसऱ्यांदां मीठ-सत्याग्रहांत शिक्षा झाली व पुन्हां नोव्हेंबरमध्यें शिक्षा झाली. १९३२ मधील

सत्याग्रहांत त्यांना पुन्हां चौथ्यांदां शिक्षा झाली. विहार भूकंप दुःखनिवारणाच्या कार्यांत यांनीं पुष्कळ खटपट केली. १९२६ ते १९३१ पर्यंत हे मोंघीर जिल्हा बोर्डाचे उपाध्यक्ष होते व १९३४ ते १९३७ पर्यंत अध्यक्ष होते. १९३७ मध्यें हे विहार असेंब्लीमध्यें निवडून आले व त्या प्रांताचे प्रधानमंत्री झाले. नंतर पुन्हां १९४६ सालीं प्रधानमंत्री झाले.

**सिंह, डॉ. सच्चिदानंद** (१८७१-१९५०).—एक हिंदी विद्वान् पुढारी. यांचें शिक्षण पाटणा कॉलेज व कलकत्ता येथील सिटी कॉलेज यांमध्यें झालें. १८९३ मध्यें हे बॅरिस्टर झाले व कलकत्ता हायकोर्टामध्यें त्याच वर्षी वकिली करूं लागले. १८९६ मध्यें अलाहाबाद हायकोर्टांत व १९१६ मध्यें पाटणा हायकोर्टांत हे अॅड्व्होकेट झाले. १८९९ ते १९२१ पर्यंत यांनीं 'हिंदुस्थान रिव्ह्यू' हें पत्र स्थापन करून चालविलें. हे इंपीरियल कायदे कौन्सिलाचे दोन वेळां सभासद निवडून आले. १९२० मध्यें हे मध्यवर्ती असेंब्लीमध्यें निवडून आले व १९२१ मध्यें तिचे पहिले डेप्युटी प्रेसिडेंट निवडले गेले. १९२४ मध्यें यांनीं पाटणा येथें (आपल्या पत्नीच्या स्मरणार्थ) राधिका इन्स्टिट्यूट स्थापन केली. तीमध्यें एक मोठा सार्वजनिक दिवाणखाना व सार्वजनिक ग्रंथालय आहे. १९२७ मध्यें यांनीं इंग्लंडमध्यें जाऊन नवीन सुधारणांबद्दल बरेच लेख लिहिले व भाषणें केलीं. पुन्हां हे 'हिंदुस्थान रिव्ह्यू'चे संपादक झाले. १९३१ मध्यें हे 'इंडियन नेशन' या पत्राचे मॅनेजिंग डायरेक्टर झाले. १९३३ मध्यें हे इंग्लंडमध्यें असतांना यांस मुद्दाम पार्लमेंटरी कमिटीपुढें साक्ष देण्याकरितां बोलावण्यांत आलें व त्यांनीं राष्ट्रीय घटनेच्या दृष्टीनें महत्त्वाची लेखी साक्ष सादर केली. यांनीं राजकीय विषयांवर बरेंच लिखाण केलें आहे. मध्यवर्ती कायदेमंडळाचे हे पहिले लोकनियुक्त उपाध्यक्ष होते व हिंदी घटना परिषदेचे पहिले अध्यक्ष होते. तसेंच पहिले हिंदी फडणीस म्हणूनहि होते. १९३६-४४ या काळांत पाटणा विद्यापीठाचे कुलगुरु होते. यांनीं अनेक ग्रंथ लिहिले आहेत.

**सिंह, लॉर्ड सत्येंद्रप्रसन्न** (१८६४-१९२८)—पहिले हिंदी लॉर्ड, उपभारतमंत्री व गव्हर्नर. यांचें शिक्षण कलकत्ता येथें झालें. १८८६ सालीं बॅरिस्टर झाले. कांहीं दिवस कलकत्ता हायकोर्टांत बॅरिस्टर होते. १९०३ सालीं हिंदुस्थान सरकारचे सल्लागार व १९०७-१७ त बंगाल सरकाचे अॅडव्होकेट जनरल होते. १९१५ सालीं मुंबईस भरलेल्या कॉंग्रेसचे हे अध्यक्ष होते. १९१७ व १९१८ सालीं साम्राज्य परिषदेस हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून हे गेले होते. महायुद्धानंतरच्या तहाच्या वेळीं हे हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून उपस्थित होते. १९१९-२० सालीं उपभारतमंत्री होते. लॉर्ड झालेले हे पहिलेच हिंदी गृहस्थ होत. हे रायपूरचे लॉर्ड होते. हे विहार-ओरिसाचे कांहीं दिवस गव्हर्नर होते. ब्रिटिश सरकारांत हिंदी माणसाला म्हणून सर्वोच्च मानमरातब यांना प्रथम लाभले.

**सिंहगड**—हा किल्ला पुण्याच्या नैर्ऋत्येस १५ मैलांवर सह्याद्रीच्या पूर्व बाजूला, जेथून पुरंदरच्या डोंगराच्या रांगेस आरंभ होऊन ती दक्षिणेंत आली आहे, त्या ठिकाणाजवळ बांधलेला आहे. याची उंची समुद्रसपाटीपासून ४,३२२ फूट आहे. हा किल्ला त्रिकोणाकृति असून त्याचें क्षे. फ. सुमारें दोन चौ. मैल आहे. दीड मैलाच्या उंचीवर चाळिसाहूनहि अधिक फूट उंचीचा एक काळाकभिन्न आकाळविक्राळ कडा असून त्यावर बुरुज असलेला मजबूत दगडी कोट आहे; व ह्यामुळें किल्ल्याच्या दरवाजाशिवाय इतर मार्गांनीं आंत प्रवेश करणें अगदीं अशक्य वाटतें.

मुसलमानी अमदानींत या किल्ल्याचें नांव कोंढाणें असें होतें. औरंगजेबानें हस्तगत केल्यावर 'बक्षिंदाबक्ष' असें नांव दिलें. सिंहगड हेंहि नांव जुनेंच आहे. इ. स. १६४७ त शिवाजीनें कोंढाण्याच्या मुसल्मान किल्लेदारास बरीच मोठी लांच देऊन तो किल्ला आपल्या ताब्यांत घेतला. इ. स. १६६५ त शिवाजी व मोंगल यांच्यांत पुरंदर येथें जो तह झाला त्या तहान्वयें हा किल्ला मोंगलांस देण्यांत आला. पण इ. स. १६७० च्या ४ फेब्रुवारीस तानाजी मालुसऱ्यानें आपला प्राण खर्ची घालून हा किल्ला शिवाजीस घेऊन दिला. राजाराम छत्रपति इ. स. १७०० त याच गडावर मृत्यु पावला.

औरंगजेबाच्या दक्षिण हिंदुस्थानांतील स्वारींत इ. स. १७०१ व १७०६ यांच्या दरम्यान हा किल्ला दोन वेळां मोंगलांच्या हातीं पडून मराठ्यांनीं तो पुन्हां काबीज करून घेतला होता. १८१८ त पेशवाईबरोबरच हा किल्ला इंग्रजांकडे आला. गडावर सध्यां तानाजीची पुण्यतिथि साजरी करण्यांत येते. पुण्यापासून हा जवळ असल्यानें व पायथ्यापर्यंत मोटारी जात असल्यानें उन्हाळ्यांत बरेच लोक या ठिकाणीं येतात.

**सिंहशक**—या शकाचा आरंभ (अमान्त) आषाढ शुद्ध प्रतिपदेपासून होत असल्यामुळें, त्याच्या वर्षांत आषाढारंभापासून डिसेंबर अखेरपर्यंत १११३ व जानेवारीच्या आरंभापासून ज्येष्ठ-अखेरपर्यंत १११४ मिळविले म्हणजे इसवी सनाचें माप निघेल. ह्या शकाचा उपलब्ध असलेला सर्वांत अलीकडचा लेख सिंहशक १५१ मधील आहे. सिंहशकाचे जे काय थोडेबहुत लेख आज उपलब्ध आहेत ते सर्व काठेवाडांत मिळालेले आहेत. हा शक कोणीं सुरू केला याविषयीं खात्रीलायक कांहींच माहिती आज उपलब्ध नाहीं. कर्नल जेम्स टॉड यानें ह्या शकाचें नांव 'शिवसिंह संवत्' असें दिलें असून तो काठेवाडच्या दक्षिणेस असलेल्या दीव बेटांतील गोहिल लोकांनीं सुरू केला होता असें त्यानें म्हटलें आहे. त्या अर्थी काठेवाडव्यतिरिक्त इतर कोणत्याहि

ठिकाणीं ह्या शकाचे लेख अद्याप सांपडले नाहीत, त्या अर्थी काठेवाडचाच कोणी तरी सिंह नामक राजा त्या शकाचा प्रवर्तक असावा, हें विजयशंकर ओझा यांचें अनुमानच अधिक सयुक्तिक दिसतें.

**सीॲटल**—हें अमेरिकन सं. संस्थानांतील वॉशिंग्टन संस्थानांतलें समुद्रकिन्यावरचें बंदर, तसेंच सदर संस्थानची राजधानी व सर्वांत मोठें शहर आहे. हें बंदर फार मोठें आणि सुरक्षित असून येथें मोठमोठ्या बोटी येण्याच्या सर्व सोयी केलेल्या आहेत. येथें सुगंधी द्रव्यें, जहाजांचें बांधकाम, खिळे, स्क्रू, वगैरे लोखंडी सामान, मांस व मासे यांचे पॅकबंद डबे, इत्यादिकांचे कारखाने आहेत. लो. सं. ३,६८,३०२ आहे.

**सीझर, गायस ज्युलियस** (खि. पू. १००-४४)—विख्यात रोमन योद्धा, मुत्सद्दी व इतिहासकार. सतराव्या वर्षी यानें केलेल्या लग्नामुळें त्या वेळचा रोमन डिक्टेटर सुल्ला याच्यागीं सीझरचें वांकडें आलें. तेव्हां सीझर रोम सोडून आशियाला गेला. सुल्लाच्या मरणानंतर परत रोमला आला व वक्ता म्हणून गाजला. चढत चढत तो खि. पू. ६१ त स्पेनचा गव्हर्नर झाला. नंतर पॉंपे आणि क्रॅसस यांच्यासह तो कॉन्सल-पदाधिष्ठित झाला. त्याच्या वर्चस्वाखालीं गॉल प्रदेश आला तेव्हां त्यानें अधिकच पराक्रम गाजविला. दोनदां ऱ्हाइन नदी ओलांडली व दोनदां ब्रिटनला जाऊन आला. क्रॅससच्या मृत्यूनंतर पॉंपेशीं त्याचे बिनसलें. इटली, स्पेन, वगैरे देश पादाक्रांत करून सीझरनें पॉंपेचा ग्रीसमध्ये पाठलाग केला. तेव्हां पॉंपे पळून ईजिप्तला गेला, पण तेथें त्याचा खून झाला.

नंतर पांच वर्षे कॉन्सल, एक वर्ष डिक्टेटर व आजीव ट्रायब्यून याप्रमाणें सीझरला मान मिळत गेले. पुढें तर त्याला कायम डिक्टेटर निवडण्यांत आलें व सर्व सम्राट्सत्ता 'इंपेरेटर' या किताबासह त्याला प्राप्त झाली. पण त्याच्याविरुद्ध कॅसियसनें कारस्थान रचून सीझरचा स्नेही ब्रूटस यालाहि त्यांत ओढलें. लवकरच सीनेटच्या एका सभेंत त्याचा खून पाडण्यांत आला.

सीझरनें आपल्या युद्धांचा लिहिलेला इतिहास उपलब्ध आहे. जगांतील थोर पुरुषांमध्ये सीझरला स्थान देण्यांत येतें.

**सीता**—रामायण महाकाव्यांतील नायिका. सीता म्हणजे नांगरलेली जमीन या अर्थानें ऋग्वेदांत (४.५७, ६-७) व पुढील वैदिक वाङ्मयांत (अथर्व. ११.३, १२; तै. सं. ५.२,५, ४-५; ५.६,२,५; काठक सं. २०.३) हा शब्द येतो. तेव्हां प्रथम ही एक कृषिदेवता असून पुढें तिचेंच माहात्म्य पुराणांतून प्रामुख्यानें आणलेलें दिसतें. रामायणांतील सीतेची कथा अशी—ही विदेहवंशीय जनकास जमीन नागरत असतां सांपडलेली मुलगी असून हिचा स्वयंवर-पद्धतीनें दाशरथी रामाशीं विवाह झाला. राम वनवासास गेला तेव्हां त्याच्याबरोबर सीताहि गेली होती. पंचवटी येथें सीतालक्ष्मणासह राम राहत असतां, रावणानें सीतेचें हरण केलें व तिला लंकेंत नेऊन ठेविलें. सीतेनें आपल्याशीं विवाह करावा म्हणून रावणानें बहुत प्रयत्न केले, परंतु ती रावणास मुळींच वश होईना. सीता परत मिळविण्यासाठीं रामानें रावणाबरोबर युद्ध केलें व त्याचा नाश करून सीतेस अयोध्येस घेऊन आला. सीतेच्या पावित्र्याबद्दल एका रजकानें शंका काढून रामास दोष दिल्याबद्दल रामानें सीतेला गरोदर असतांहि वाल्मीकि-आश्रमांत पाठविली. तेथें तिला लव व कुश हे पुत्र झाले. पुढें सीतेनें आपलें पावित्र्य सिद्ध करून वैतागानें मातेच्या पोटांत—पृथ्वींत प्रवेश केला. सीता ही आर्य पतिव्रतेचा एक उज्ज्वल आदर्श गणला जातो. अहल्या, द्रौपदी, इ. पंच पतिव्रतांत सीतेचें चारित्र्य विशेष शुद्ध व अनुकरणीय समजतात.

**सीतापूर**—संयुक्त प्रांतांत, लखनौ विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. २,२०७ चौ. मै.. या जिल्ह्यांत पुष्कळ नद्या असून त्या सामान्यपणें उत्तरेकडून दक्षिणेकडे वाहत जातात. पश्चिम व पूर्व सरहद्दीवरून अनुक्रमें वाहणाऱ्या गोमती, गोग्रा या नद्यांतून होड्या चालतात. पूर्वेकडील मलेरिया असलेला भाग सोडला तर बाकीच्या जिल्ह्यांतील हवा थंड व आरोग्यकारक आहे. वार्षिक पाऊस सरासरी ३८ इंच पडतो.

मूळच्या पासी लोकांना घालवून देऊन रजपुतांनीं या जिल्ह्यांत वसाहत केली. दिल्ली येथील आरंभींच्या मुसलमान राजांच्या अमदानींत येथें नांवाला बहेरचच्या सुभेदाराचा अमल होता. पंधराव्या शतकांत ह्या जिल्ह्याचा जौनपूरच्या राज्यांत समावेश झाला. अकबराच्या वेळीं अयोध्येच्या सुभ्यापैकीं खैराबाद, बहरैच, अयोध्या व लखनौ या चार सुभ्यांत हल्लींच्या जिल्ह्याचा समावेश झाला होता. १९ व्या शतकाच्या आरंभींच्या वर्षात, नासिरउद्दीन हैदरचा मंत्री हकीम महदी अलीखान याच्या ताब्यांत हा जिल्हा होता. १८५७ सालीं येथील सैन्यानें बंड उभारून कामगारांना ठार केलें; परंतु १८५८ सालांत एप्रिलच्या १३ तारखेला सर होप ग्रांट यानें बंडवाल्यांचा पराभव केला व लवकरच सर्वत्र शांतता स्थापन झाली.

सीतापूर जिल्ह्यांत ९ गांवें व २,३०२ खेडीं आहेत. लो. सं. १२,९३,५५४. पैकीं सुमारें शें ८५ हिंदू व शें. १५ मुसलमान आहेत. येथें मुख्यतः पूर्व हिंदीची अवधी नांवाची पोटभाषा चालते. शें. ७५ लोक शेतीवर पोट भरतात.

गहूं हें मुख्य पीक असून त्याच्या खालोखाल कडधान्यें, तांदूळ, हरभरा, कोदोन, बाजरी, बार्ली व मका वगैरे पिकें होतात. या जिल्ह्यांत लांकडी काम सुंदर होतें, व बिस्वात येथें थोडीबहुत मातीचीं भांडीं तयार होतात. धान्य, गूळ व अफू हे निर्गत

जिन्नस व कापड, सूत, धातूचें काम, मीठ हे मुख्य आयात जिन्नस होत. सीतापूर हें व्यापाराचें मुख्य ठिकाण असून निमखार व खैराबाद येथें जत्रा भरत असतात.

या जिल्ह्यांत, सीतापूर, बिस्वान, सिधौली व मिश्रिक, अशा चार तहशिली असून प्रत्येकीवर तहशिलदार आहेत. जिल्ह्याचा मुख्य अधिकारी सीतापूर येथें राहतो. सीतापूर व खैराबाद येथें म्युनिसिपालिट्या आहेत. जिल्ह्यांत शिक्षण फार मागासलेलें आहे.

**सीतामऊ संस्थान**—मध्य हिंदुस्थान, जुन्या सेंट्रल इंडिया एजन्सीपैकीं एक संस्थान. क्षे. फ. २६२ चौ. मै.. संस्थानच्या सरहद्दीवरून चंबळा नदी वाहते. याशिवाय संस्थानांत दुसरी महत्त्वाची नदी नाहीं. ज्या गांवावरून संस्थानचें नांव पडलें आहे तें गांव, मीना सरदार सातजी यानें वसविलें; सातामौ म्हणजे सातचें गांव; याचाच अपभ्रंश सीतामऊ असा झाला आहे.

येथील संस्थानिक जोधपूर घराण्यांतील राठोड रजपूत असून रतलाम व सैलाना यांच्या राजांशीं त्याचें अगदीं जवळचें नातें आहे. रतलामच्या रतनसिंगाचा नातू केशवदेव यानें या संस्थानाची स्थापना केली. त्याला १६९५ त औरंगजेबाकडून तिरोड, नाहरगड व अलोट या परगण्यांची जहागिरी मिळाली. पैकीं मराठ्यांच्या स्वारीच्या वेळीं ग्वाल्हेर व देवास येथील राजांनीं अनुक्रमें नाहरगड व अलोट हे परगणे बळकाविले. पेंढारी युद्धानंतर मध्य हिंदुस्थानची व्यवस्था लावतांना सर जॉन मालकम यानें दौलतराव शिंद्याजवळ मध्यस्थी करून सीतामऊचा राजा राजसिंग याजकडे त्याचें राज्य टेविलें. बंडाच्या वेळीं इंग्रजांस केलेल्या मदतीबद्दल राजाला २,००० रु. ची खिलात मिळाली. तो निपुत्रिक वारल्यामुळें, इंग्रज सरकारनें घराण्याच्या दुसऱ्या शाखेतील बहादुरसिंगाला गादीवर बसविलें. बहादुरसिंग १८९९ त मरण पावल्यावर शार्दूलसिंग गादीवर बसला. त्यानें फक्त १० महिने कारभार चालविला. हल्लींचे राजे सर रामसिंग यांची निवड ब्रिटिश सरकारनें १९०० सालीं केली. हे काछी बडोदा येथील राठोड घराण्यांतील असून त्यांचें शिक्षण इंदूर येथील डॅली कॉलेजांत झालेलें आहे. व हे स्वतः चांगले विद्वान् आहेत.

लो. सं. ३३,०००. शें. ९०. हिंदू आहेत. संस्थानांत ९० खेडीं व सीतामऊ हें एक मोठें गांव (राजधानी) आहे. येथें रांगडी भाषा चालते. शें. ४८ लोक शेतीवर व शें. १२ सामान्य मोलमजुरीवर पोट भरतात. राजपुताना माळवा रेल्वे व मंदोसर स्टेशनपासून सीतामऊपर्यंत पक्की सडक झाल्यापासून संस्थानचा व्यापार बराच वाढला आहे. मुल्की, दिवाणी, व राज्यकारभाराच्या सर्वसामान्य बाबतींत राजाला पूर्ण अधिकार आहेत. संस्थानचें वार्षिक उत्पन्न सु. ३ लक्षांचें आहे. हें संस्थान आतां मध्यभारत-संघांत सामील झालें आहे.

**सीमेंट (संधानक)**—दोन पदार्थांना, पृष्ठभागांना, किंवा वस्तूंना जोडण्याकरितां ज्या द्रव्याचा उपयोग करण्यांत येतो त्यास सीमेंट किंवा संधानक म्हणण्यांत येतें. याचे मुख्यतः तीन प्रकार असतात: १) इमारती सीमेंट (पोर्टलंड सीमेंट पाहा). २) डांबरी सीमेंट; हें नैसर्गिक डांबर व असाल्ट यांपासून बनविलेलें असतें. ३) लुकणें; यांमध्यें राळेचें लुकण, लाख, अळशीचें तेल, गोंद, सरस, वगैरे पदार्थ येतात. सीमेंट हें विशिष्ट उष्णमानांत किंवा ओलींत कांहींहि आकार देण्याजोगें असतें; पण नंतर अगदीं घट्ट दगडासारखें होतें.

**सील प्राणी**—हा एक सस्तन मांसाहारी प्राणी असून याच्या शरीराची रचना अशी असते कीं, हातापायांच्या ठिकाणीं असणाऱ्या अवयवांचा आकार वल्ह्यासारखा असतो. यांचे मुख्यतः दोन वर्ग आहेत. त्यापैकीं एकास साधे सील मासे म्हणतात व दुसऱ्यास समुद्रसिंह म्हणतात. साध्या सील प्राण्यांचा आकार माशासारखा असून त्यांच्या अंगावर केंस असतात व त्यांचा शेपटीकडील भाग नेहमीं पसरलेला असतो. यांस बाहेर दिसणारे कान नसतात व यांच्या पायांचीं बोटें कातड्यानें सांधलेलीं असतात व शेवटीं नखें असतात. यांच्या अंगावर बाहेरील बाजूस रांठ व लांब केंस असतात व आंतील

बाजूस नरम दाट लोंकर असते. सामान्यतः हे जोडीनें राहतात व एका वेळीं बहुधा एकच व क्वचित् दोन पिल्लांस जन्म देतात. हे बहुतेक उष्ण कटिबंध सोडल्या असतां चोहींकडच्या समुद्रांत आढळतात व त्यांच्या केसांकरितां व चरबीकरितां त्याची शिकार करण्यांत येते. यांच्या अनेक जाती आहेत. त्यांत एक हत्ती सील नांवाची मोठी जात आहे.

समुद्रसिंह नांवाच्या जातीस बाहेर दिसणारे कान असतात व ते आखलीसारखे दिसतात. यांची सर्वांत उत्तम जात आलास्काजवळ व बेहरिंग समुद्रांत आढळते व यांचे केंस फार मौल्यवान् असतात. हे मासे धरण्याच्या मुख्य जागा म्हणजे न्यू फाउंडलंड व कास्पिअन समुद्र या होत.

**सील, सर जॉन रॉबर्ट** (१८३४-१८९५)— एक ब्रिटिश इतिहासकार. तो १८६९ सालीं केंब्रिज येथें अर्वाचीन इतिहास या विषयाचा प्राध्यापक झाला. त्यानें १८६५ सालीं प्रसिद्ध केलेल्या 'दि लाइफ अॅन्ड वर्क ऑफ जीझस ख्राइस्ट' (जीझसचें चरित्र) या ग्रंथानें लोकांमध्यें फार खळबळ उडवून दिली. त्यानें लिहिलेले मुख्य ग्रंथ आहेत ते म्हणजे 'दि एक्सपॅन्शन ऑफ इंग्लंड' (इंग्लंडचा विस्तार) आणि 'दि ग्रोथ ऑफ ब्रिटिश पॉलिसी' (ब्रिटिश धोरणाची वाढ) हे होत.

**सुई**—सुई हें एक लहान पोलादी हत्यार आहे. हिचें एक टोंक अणकुचीदार असून दुसऱ्यांत नाक, डोळा किंवा नेडें म्हणजे दोरा ओंवण्यास भोंक असतें. सुई बनविण्याचा शोध १४ व्या शतकांतला आहे. त्यापूर्वी हाडें, हस्तिदंत, लांकूड किंवा पितळ याच्या जाड सुया असत. यंत्राच्या साहाय्यानें सुया करण्यांत येऊं लागल्या त्या गेल्या शतकांत. त्यापूर्वी हातानें बनवीत. सुया करण्यांत इंग्लंडचा पहिला क्रम लागतो. अमेरिकेलाहि तेथून सुया जातात.

तारेच्या गुंडाळ्यांतून दोन दोन सुयांच्या लांबीइतकी तार कापून घेऊन ती सरळ करतात. नंतर जोड सुईचीं टोंकें यंत्रावर घासून निमुळतीं करतात. पुढें या तारेच्या मध्यभागीं चापटपणा आणणारें एक यंत्र असतें; तें डोळ्यांच्या खुणाहि या चपट्या भागावर करून ठेवतें. दुसरें यंत्र या खुणांवर भोंकें पाडतें. अशा रीतीनें दोन सुया एकदम तयार होतात. त्या मध्यभागीं तोडून वेगळ्या करतात व साफसुफी आणि झिलई दिल्यानंतर विकण्यास पाठवितात. पक्की सुई तयार होईपर्यंत ती सत्तर कामकऱ्यांच्या हातांतून जात असते.

**सुएझ**—हें तांबड्या समुद्रावरील व सुएझ कालव्याच्या दक्षिण टोंकावरील एक बंदर असून सुएझ आखाताच्या मुखाशीं वसलें आहे. लो. सं. सुमारें अर्धा लाख. शहरापासून सुमारें दोन मैल दक्षिणेकडे सुएझ कालव्याच्या पश्चिमेकडच्या बाजूस बंदर व धक्के बांधले आहेत. शहर व बंदर यांतील दळणवळण लोहमार्ग व नौका यांच्या योगानें होतें.

सातव्या शतकांत या स्थलाजवळ कोल्झम नांवाचें शहर होतें. कालवा बंद केल्यानंतरदेखील १३ व्या शतकापावेतों ईजिप्तचा अरबस्तानशीं व पूर्वेकडील देशांशीं येथूनच व्यापार चालत असे. १८३७ मध्यें विलायतेपासून हिंदुस्थानपावेतों सुएझच्या मार्गानें खुष्कीचा रहदारीचा रस्ता सुरू करण्यांत आला. कांहीं वर्षांनंतर 'पेनिन्शुलर अँड ओरिएन्टल स्टीमर सर्व्हिस' निघाली. १८५७ मध्यें कैरोपासून वालुकामय प्रदेशामधून रेल्वे काढली होती, पण ती पुढें बंद पडली.

कालवा—सुएझचा कालवा आशिया आणि आफ्रिका यांना जोडणाऱ्या सुएझ संयोगभूमीला छेदतो. या कालव्याची लांबी १०० मैल असून तो २०० फूट रुंद व ४३ फूट खोल आहे. भूमध्यसमुद्रावरील पोर्ट सय्यदपासून सुएझच्या आखातावरील सुएझपर्यंत हा कालवा गेला आहे. या कालव्यांतून दरसाल सुमारें पांच हजार गलबतें जातात-येतात. हा कालवा होण्यापूर्वी आफ्रिकेच्या दक्षिण टोंकाला वळसा घालून जावें लागे. हा कालवा काढण्याची अचाट कल्पना काढणाऱ्या डोलेसेप्स नांवाच्या फ्रेंच इसमाचा पुतळा या कालव्याच्या उत्तरेच्या तोंडाशीं उभा केलेला आहे. १८६९ सालीं सुएझचा कालवा पूर्ण होऊन तो रहदारीला खुला झाला. याला १४,८५,००,००० डॉलर इतका खर्च आला.

**सुकी रोग**—(ड्राय-रॉट). इमारती लांकडास होणारा हा रोग आहे. हा अनेक प्रकारच्या परोपजीवी वनस्पतींपासून उत्पन्न होतो. यांचे सूक्ष्म भाग लांकडांत शिरून त्यांचा नाश करतात. इंग्लंडमध्यें सर्पणामध्यें सामान्यतः मेरूलियस लॅक्रीमॅन्स हा विनाशक शत्रु आढळतो. हा रोग होऊं नये म्हणून अनेक पद्धती उपयोगांत आणण्यांत येतात. त्यांपैकीं विशेष प्रचारांतील पद्धत म्हणजे लांकूड 'क्रेओसोट'नें चांगलें संपृक्त करणें. या पातितकाष्ठ तेलाच्या योगानें लांकडावर कोणत्याहि वनस्पतीचें संवर्धन होऊं शकत नाहीं. परंतु लांकडास भरपूर हवेचा पुरवठा होऊं देणें, हीच रोगाचा प्रतिबंध करण्याची मुख्य युक्ति आहे.

**सुकेत संस्थान**—पंजाब, जालंदर विभाग. क्षे. फ. ३९२ व लो. सं. ७१,०९२. संस्थानचें उत्पन्न सु. तीन लक्ष रु. आहे. १८४६ सालीं राजा उग्रसेन याला हें संस्थान मिळालें. सध्यां राजे लक्ष्मणसेन गादीवर आहेत. हें संस्थान आतां हिमाचलप्रदेश संस्थानी संघांत सामील आहे.

**सुखटणकर, महेश्वरभट्ट रामचंद्रभट्ट** (१७१८-१८१६)—एक विद्वान् टीकाकार. हे सारस्वत ब्राह्मण गोमंतकांतील कुंभारजुव्यानजीकच्या माशेल गांवचे राहणारे होत. यांनीं वेदान्तग्रंथापैकीं स्वात्मनिरूपण या ग्रंथावर स्वात्मदीपिका नांवाची टीका, मोरोपंताच्या मंत्रभागवतावर संतोषिणी नांवाची संस्कृत टीका, धर्मशास्त्रावर त्रिंशत्श्लोकी, चतुर्दशश्लोकी, निर्णयसिंधूंतील सापिंड्यकन्यकानिर्णयावरील पद्यपंचकावर टीका, ज्योतिषापैकीं मुहूर्तमालेवर सौंदर्यबोधिनी नांवाची टीका, वाक्य-

सुबेवर पानपात्र नांवाची समश्लोकी टीका व नसेंच न्याय वगैरे शास्त्रग्रंथांवरहि यांनीं अनेक टीकाग्रंथ लिहिले. गीतगोविंदाचा पद्यात्मक मराठींत अनुवाद करून अनेक संस्कृत ग्रंथांचें मराठींत भाषांतर केलें.

**सुखदेव** (मृ. १९३१)—पंजाबांतील एक क्रांतिकारक. हा फार बुद्धिमान् होता. यावरून यास 'कटवाल्यांचा मेंदू' म्हणत असत. कटासंबंधींच्या अनेक कल्पना प्रथम याच्याच डोक्यांतून निघत असत. यानें प्रत्यक्ष अत्याचाराचीं कृत्यें केलीं नसलीं तरी बहुतेक कृत्यांच्या मागें याचा हात असे व याची बुद्धिमत्ता व संघटनाचातुर्य यांच्या योगानेंच तीं बहुधा घडून येत असत. आपल्या अनेक कटांकरितां नवीन नवीन सभासद मिळविणें व संघटना करणें या कामांत तो फार निष्णात होता. १९२६ सालापासून हा कटवाल्यांमध्यें एक महत्त्वाचा घटक समजण्यांत येऊं लागला. व १९२८ सालीं पंजाबांतील कटवाल्यांचा हा पुढारी बनला. भगतसिंग, राजगुरु, वगैरे अनेक लोकांच्या बरोबर तो निरनिराळ्या अनेक कटांमध्यें सामील होता. त्यानें लाहोर येथें काश्मीर बिल्डिंगमध्यें एक बाँब तयार करण्याचा कारखाना चालविला होता. त्याला अखेरीस भगतसिंग व राजगुरु यांच्या बरोबरच लाहोर येथें २३ मार्च १९३१ रोजीं फांशीं देण्यांत आलें.

**सुखदेव मिश्र**—एक हिंदी पंडित कवि. हा औरंगजेबाचा मंत्री फाजिलअली शाह याचा कारभारी होता. जातीनें हा कान्यकुब्ज ब्राह्मण असून याचा जन्म कंपिला येथें १६३३ त झाला. वृत्तविचार, रसार्णव, शृंगारलता, अध्यात्मप्रकाशन, दशरथराय, फाजिलअली-प्रकाश व नखशी हे याचे आठ ग्रंथ सध्यां उपलब्ध झाले आहेत. कांहीं दिवस हा मुरारमऊच्या देवीसिंह राजाच्या पदरीं होता. याच्या उत्कृष्ट काव्यामुळें यास कविराज अशी पदवी देण्यांत आली होती.

**सुखवाद**—(हेडॉनिझम). सुख हेंच मानवाचें सर्वोच्च हित (गुड) असून स्वतःचें सुख व आनंद हेंच मनुष्यमात्राचें ध्येय होय. सिरेनाइक पंथीय तत्त्ववेत्ते, एपिक्युरस, आणि हॉब्स व लॉक हे सुद्धां सुखवादी पंथाचे पुरस्कर्ते असून या सर्वांनीं सुख हेंच व्यक्तिमात्राचें अंतिम साध्य होय, असें मत प्रकट केलें आहे. उपयुक्ततावाद पाहा.

**सुगंधी तेलें-पदार्थ**—हीं नैसर्गिक व कृत्रिम अशीं दोन प्रकारचीं असतात. नैसर्गिक तेलें किंवा अत्तरें प्राणी किंवा वनस्पती यांपासून मिळतात. वनस्पतीपासून तेल काढणें हा फार महत्त्वाचा धंदा आहे. असें तेल काढण्याच्या पांच पद्धती आहेत: (१) ऊर्ध्वपातन; (२) भिजवणें अथवा आर्द्रीकरण; (३) दाबून काढणें; (४) शोषण; व (५) पिळून काढणें. ऊर्ध्वपातन ही सर्वसामान्य क्रिया आहे. वनस्पतींपासून तेल फार थोड्या प्रमाणांत निघतें व तें निरनिराळ्या वनस्पतींपासून निरनिराळ्या प्रमाणांत निघतें; उदाहरणार्थ, लव्हेंडरच्या १ हंड्रेडवेट फुलांपासून ३२ औंस तेल निघतें. पण १ हंड्रेडवेट गुलाबाच्या फुलांपासून ३/४ औंस तेल निघतें.

सुवासिक प्राणिज पदार्थांमध्यें कस्तूरी, जवादी कस्तूरी, अंबर हीं येतात. हीं फार तीव्र असून त्यांचा उपयोग करण्यापूर्वी तीं कोणत्या तरी द्रव्यांत मिसळून त्यांची तीव्रता कमी करावी लागते. सुगंधी द्रव सामान्यतः एखादा सुगंधी अर्क किंवा सुगंधी तेलांचें मिश्रण मद्यार्का(अल्कोहोल)मध्यें विरघळवून तयार करण्यांत येतें. डांबरापासून सुगंधी पदार्थ काढण्याचा शोध लागल्यापासून कृत्रिम सुगंधी द्रव्यांचा प्रसार फार झाला आहे. इंग्लंडमध्यें पर्किन यानें अशा प्रकारचें कौमरिन हें सुगंधी द्रव्य सन १८६८ मध्यें प्रथम तयार केलें. कांहीं नैसर्गिक सुवासिक द्रव्यांचे वास कृत्रिम रीतीनें देण्यांत येतात; उदाहरणार्थ, कडू बदामाच्या तेलाऐवजीं बेंझाल्डिहाइडचा वास. तसेंच साबणाला कडू बदामाच्या तेलाचा वास द्यावयाचा असल्यास त्या तेलाऐवजीं नायट्रोबेंझिन वापरण्यांत येतें. याप्रमाणें अनेक पदार्थांचे वास कृत्रिम रीतीनें देतां येतात. (अगरबत्ती, अत्तर, उदबत्ती इ. पाहा).

**सुगरण पक्षी**—(वीव्हर बर्ड). चिमणी पक्ष्यांच्या वर्गांतच हा पक्षी असतो व घरटें बांधण्याच्या कुशलतेवरूनच याला हें नांव पडलें आहे. हे पक्षी आपलीं घरटीं लांब गांवाबाहेर शेतांतून किंवा विहिरी-तळ्यांच्या कांठीं बांधतात. त्यामुळें उंदीर, साप, वगैरे पासून धोका नसतो. हा पक्षी पिवळसर असतो. घरटीं नर आणि मादी दोघेहि बांधतात. हे थवे खात असल्यानें शेतकऱ्यांना उपद्रवी वाटतात; तसेंच यांचा किलकिलाट फार असतो.

**सुगरिणी**—या झाडाला 'थोरला मालकांगणी' असेंहि म्हणतात. याचीं पानें फार चिकट व कुड्याच्या पानासारखीं व झाड असतात. फुलें पिवळीं असतात. हें झाड औषधी आहे. हाडमोडीवर याच्या सालीचा लेप देतात. देवी हलक्या येण्यास माळ गळ्यांत बांधतात.

**सुग्रीव**—ऋक्षरजस् नामक वानराचा पुत्र व वालीचा धाकटा भाऊ. वालीशीं याचें भांडण होतें. सुग्रीवानें रामाची मदत घेऊन वालीस कपटानें मारलें व आपण किष्किंधेचा राजा झाला. युवराजपदावर वालीचा पुत्र अंगद याची स्थापना केली. सीताशोधार्थ आपल्या वानरसैन्यास धाडून व पुढें सैन्यानें यानें रामास बरीच मदत केली. याची पत्नी तारा नांवानें प्रसिद्ध आहे. रामाबरोबर हा निजधामास गेला.

**सुडरमन, हरमान** (१८५७–१९२८)—एक जर्मन कादंबरीकार आणि नाटककार. त्याचें पहिलें नाटक 'डाय एहरे'

आणि त्याची कादंबरी 'प्लो सोर्ज' (चिंताबाई) यामुळें त्याची प्रसिद्धि झाली, आणि त्याची कीर्ति सर्व युरोपभर पसरली (१८८८). त्याच्या महत्त्वाच्या कादंबऱ्यांचीं इंग्रजींत भाषांतरें झालीं आहेत. १८५० पासून त्यानें अनेक वास्तववादी नाटकें व कादंबऱ्या लिहिल्या. त्याच्या 'मागोशा'सारख्या नाटकांत बर्नहार्टसारख्या सुप्रसिद्ध नटींनीं कामें केलीं आहेत.

**सुंडा बेटें**—हा जुन्या डच ईस्ट इंडियन बेटाचा समूह जावा व टिमोर या दोन बेटांमध्यें सुमारें ७०० मैल पसरलेला आहे. या बेटांपैकीं मोठालीं बेटें आहेत तीं जावा, सुमात्रा, बोर्निओ व सेलेबीज; आणि मध्यम आकाराचीं बेटें आहेत तीं बाली, लॅांबोक, सुंबावा, फ्लॉवर्स, सोलोर, आड्नारा, लोंब्लेन, पँटर, आलोर, सुंबा, सँडिलवुड, साबु व रोट्टी हीं होत. आणि बाकीचीं बेटें लहान आहेत. हीं सर्व बेटें डोंगराळ आहेत. फक्त किनाऱ्यानजीकच्या भागांत सपाट मैदानें आहेत. आतां हीं बेटें स्वतंत्र इंडोनेशिआ राज्यांतलीं झालीं आहेत.

**सुंता**—पुरुषजननेंद्रियावरील पुढील कातडें कापण्याचा हा विधि पुष्कळ असंस्कृत जातींतून व इस्लामी आणि ज्यू धर्मीयांत आढळतो. गोंदण्याप्रमाणें धर्म-जातिवाचक खूण म्हणून, किंवा पुरुष म्हणून समाजांत प्रवेश होण्याचा विधि म्हणून सुंता करण्याची चाल पडली असावी. कदाचित् आरोग्यासाठीं किंवा शुद्धतेसाठीं हा होत असेल. ज्यू लोकांत अगदीं लवकर हा उरकून घेण्यांत येतो. येशू ख्रिस्ताची सुंता जन्मल्यापासून आठव्या दिवशीं झाली. म्हणून जानेवारी १ ली हा सुंतेचा सण म्हणून पाळतात. आफ्रिका आणि ऑस्ट्रेलिया या खंडांतील वन्यधर्मीय लोकांत सुंता विधि आहे. एथिओपियाचे नीग्रो ख्रिस्तीहि सुंता करतात.

**सुतार**—ही सुतारकीचा धंदा करणारी जात आहे. यांना सूत्रधर, चुतार, बडिगा यांसारखीं निरनिराळ्या प्रांतांत नांवें आहेत. एकंदर हिंदुस्थानांत या जातीची लो. सं. सुमारें ६॥ लाख आहे. बंगाल्यांत पावणेदोन लाख व मध्य हिंदुस्थानांत एक लाखापर्यंत आहे. मराठी जिल्ह्यांत व गुजराथेंत यांना सुतार म्हणतात. कानडी जिल्ह्यांत यांना बडिगा म्हणतात. मराठी व गुजराथी सुतार या दोन अगदीं भिन्न जाती आहेत. ते पिढीजात सुतार असून गाड्या, नांगर व दुसरीं शेतकीचीं हत्यारें नवीं करतात, व जुनीं असल्यास तीं दुरुस्त करतात. त्याबद्दल त्यांना दरसाल हंगामाच्या वेळीं धान्याच्या रूपानें कांहीं बलुतें म्हणून वेतन मिळतें. शहरांतील सुतार इमारती बांधतात व कांहीं गलबतें व लांकडी सामान वगैरे जिन्नस तयार करतात.

मराठे सुतार आपणांस पांचाल म्हणवीत असून देवांचा शिल्पी जो त्वष्टा तो आपला मूळ पुरुष होय असें मानतात. या सुतारांचे पांच वर्ग आहेत : (१) देशी, (२) कोंकणी, (३) पांचाल, (४) आर्यक्षत्री, व (५) विदुर अथवा कडू. गुजराथ-सुतारांतहि गुजर, मेवाड, पांचोळी, मारवाडी व वैश्य असे पांच वर्ग आहेत. पांचोळी गलबतें बांधतात. पण म्हणून ते कनिष्ठ प्रतीचे समजले जातात. पेशवाईत मोठमोठे वाडे बांधण्यासाठीं गुजराथी सुतार आणवीत.

**सुतार पक्षी**—(वुड-पेकर). हे झाडावर चढणाऱ्या जातीचे एक पक्षी आहेत. हे सर्वत्र पसरलेले आढळतात. यांची चोंच लांब, सरळ व कोनाकृति असते. यांची जीभ बारीक असते व शेंपटी ताठ असते. हे झाडावर एक प्रकारचा टक् टक् असा आवाज करीत असतात. हे झाडांवरचे किडे खातात. आपल्याकडे सुतार पक्ष्याची पाठ सोनेरी असून डोक्यावर किरमिजी रंगाचा तुरा असतो. हा कावळ्याएवढा मोठा असतो. याचें घर झाडाच्या बुंध्यांत असतें. (हूपी पाहा).

**सुतार माशी**—(कॉर्पेंटर बी). ही माशी झाडांत पोंखरून घर करतें. या घरांत निरनिराळे कप्पे असतात. त्यांतून ही माशी आपलीं अंडीं निरनिराळीं ठेवतें व तेथेंच त्यांच्या खाण्याची सोय करते.

**सुंदरदास** (१५९६-१६८०)—एक हिंदी कवि. या कवीचा जन्म जयपूर राज्यांतील द्यौसा येथें झाला. हा परमानंद व सती यांचा मुलगा असून दादू दयाळाचा शिष्य होता. हा रूपानें देखणा असून ब्रह्मचर्य मताचें पालन करणारा होता. संस्कृत व फार्सी या भाषाहि यास अवगत होत्या. हा शांकर-मतानुयायी दिसतो. यानें 'सुंदरविलास', 'ज्ञानविलास', 'ज्ञानसमुद्र' वगैरे लहानमोठे चाळीस ग्रंथ रचले.

**सुंदरवन**—बंगालच्या उपसागराच्या किनाऱ्याला, हुगळीच्या मुखापासून मेघना नदीच्या मुखापर्यंत पसरलेला १७० मैल लांबीचा व ६० ते ८० मैल रुंदीचा विस्तीर्ण, जंगली व दलदलीचा प्रदेश. ह्या वनांत असणाऱ्या सुंदरी झाडांच्या नांवावरून याला सुंदरवन-असें नांव पडलेलें असावें. ह्याचें क्षे. फ. ६५२६ चौ. मै. आहे. सुंदरवन हे गंगा नदीच्या बेचक्या(डेल्टा)मध्यें, खालच्या भागांत असून त्यांतून उत्तरेकडून दक्षिणेकडे वाहणाऱ्या कित्येक खाड्या(नदीमुखें)उत्पन्न झाल्या आहेत. पैकीं पश्चिमेकडून पूर्वेकडे गेलें असतां लागणारीं मुख्य नदीमुखें म्हणजे हुगळी, माटला, रैमंगल, मालंचा, हरिणघाट, रवनाबाद व मेघना हीं होत. जंगलांत मुख्यतः सुंदरी नावाचीं मसाल्याचीं झाडें पुष्कळ असून

जेथें पाण्यांत खारेपणा कमी असेल तेथें तीं जोरांत वाढतात. सुंदरबनांतील हल्लींचे रहिवासी उत्तरेकडील लगतच्या जिल्ह्यांतून आलेले असून त्यांत खालच्या वर्गाचे हिंदू व मुसलमान यांचा भरणा जास्त आहे. बकरगंजमध्यें, आराकानच्या किनाऱ्यावरून आलेले सुमारें ७,००० मघ लोक आहेत. सुंदरबनांत गांवें मुळींच नाहींत. खुलना जिल्ह्यांत मोरेलगंज हें व्यापाराचें मुख्य ठिकाण आहे. उत्तरेकडे नवीन तयार केलेल्या बहुतेक जमिनींत भाताची लागवड होते. खुलना व बकरगंज जिल्ह्यांत ऊंस व सुपारीचीं झाडें होतात. जंगलांत इमारतीचें व जळाऊ लांकूड पुष्कळ मिळतें; त्याचप्रमाणें मध, मेण, शिंपा, वगैरे जिन्नसहि सांपडतात. खुलना जिल्ह्यांत, कालीगंज येथें देशी चाकू, शिंगाच्या फण्या, व काळ्या मातीचीं भांडीं होतात. तांदूळ, सुपारी व इमारती लांकूड हे जिन्नस कलकत्त्यास पाठविले जातात. पोर्ट कॅनिंग (माटला नदीच्या कांठचें) पासून कलकत्त्यापर्यंत रेल्वे झाली आहे. आतां फाळणी-मुळें सुंदरबनाचा बहुतेक भाग पाकिस्तानांत गेला आहे.

**सुंदरी**—लहान सनईस सुंदरी म्हणतात. तिची लांबी वीतभर असते. ह्यामुळें सनईच्या दुप्पट स्वरांत बहुधा ती वाजते. ह्याहून 'सनई' व 'सुंदरी' ह्यांत अधिक फरक नाहीं.

**सुदर्शन चूर्ण**—एक आयुर्वेदीय औषध. दारुहळद, रिंगणी, मोठरिंगणी, कचोरा, सुंठ, मिरें, पिंपळी, पिंपळमूळ, मोरवेल, गुळ-वेल, धमासा, कडुकी, पित्तपापडा, नागरमोथा, त्रायमाण, नेत्रवाळा, कडूनिंब, पुष्करमूळ, ज्येष्ठीमध, कुड्याचें मूळ, अजमोदा, इंद्रजव, भारंगमूळ, शेवग्याचें बीं, सोरटीमाती (गोपीचंदन) अथवा लाही केलेली तुरटी, वेखंड, दालचिनी, पद्मकाठ, वाळा, पांढरा-चंदन, अतिविष, चिकणामूळ, रानगांजा, रानमाल, वावडिंग, तगर, चित्रक, देवदार, चवक, पटोलपुत्र, जीवक व ऋषभक (हे दोन मिळत नसल्यास यांच्या अभावीं मुसळीचा कांदा), लवंग, वंशलोचन, पांढरें कमल, काकोळी (मिळत नसली तर तिच्याबद्दल ज्येष्ठीमध), तमालपत्र, जायपत्री आणि तालीसपत्र, हीं बावन औषधें सममाग घ्यावीं व सगळ्या औषधांचे निम्मे किराईत घेऊन सर्वांचें चूर्ण करावें. हें चूर्ण थंड पाण्यांत घ्यावें. याच्या सेवनानें, कफ, वात, व सारे ज्वर दूर होतात. तसेंच मोह, डोळ्यांवर झांपड पडते ती, भ्रम, तृषा, श्वास, कास, पांडुरोग, हृद्रोग आणि कावीळ हे रोग, आणि पाठीचा माज, व पाठ, कंबर, गुडघे आणि कुशी यांचा शूळ हे सर्व प्रकारचे रोग दूर होतात.

**सुदान**—उत्तर आफ्रिकेंतला एक प्रदेश. याचा एक भाग फ्रेंच सुदान म्हणून आहे (फ्रेंच सुदान पाहा). दुसरा भाग अँग्लो इजिप्शियन सुदान. पूर्वी हा ईजिप्तच्या अमलाखालीं होता. परंतु महादींच्या बंडानें १८८२ पासून याच्या कारभारास अडथळे होऊं लागले व पुढें तो महादी लोकांकडे गेला; पण १८९८ च्या खार्टुम-च्या युद्धानें तो परत मिळाला. परंतु त्या वेळीं झालेल्या तहाच्या शर्तीप्रमाणें तो अँग्लो-इजिप्शियन संयुक्त सत्तेखालीं ठेवण्यांत आला. यांत ईजिप्तची सत्ता ही नाममात्र कागदावरच राहिली असून सर्व कारभार वस्तुतः पूर्णपणें इंग्रजांकडून त्यांच्याच धोरणानें व सत्तेनें चालतो. क्षेत्रफळ १०,१४,००० चौरस मैल. लो. सं. ६३,४२,४७७. प्रान्ताचे १५ विभाग केलेले आहेत व ते ईजिप्तच्या सैन्यांतील ब्रिटिश अधिकारी यांच्या सत्तेखालीं आहेत. अरब, नीग्रो व नुबियन हे तीन जातीचे लोक अधिक आहेत. खार्टुम राजधानी आहे. मुख्य नदी नाइल व तिचे फांटे असून हा शेतकीचा प्रदेश आहे. कापूस, हस्तिदंत, शिंपा, महोगनी हे व्यापारी जिन्नस आहेत. सोनें आणि मीठ हे खनिज पदार्थ मुख्य आहेत.

**सुदास**—वैदिक कालांतील एक प्रसिद्ध व पराक्रमी राजा. दाशराज्ञ युद्धांतील हा नायक असून याचा ऋग्वेदांत बऱ्याच सूक्तांतून उल्लेख येतो. हा दिवोदासाचा मुलगा किंवा नातू असावा. याला पैजवन असेंहि संबोधण्यांत येतें. वसिष्ठ व विश्वा-मित्र याचे पुरोहित होते. विश्वामित्रानें याच्याकडून अश्वमेध करविला होता. याच्या पत्नीचें नांव सुदेवी होतें.

**सुदेष्णा**—मत्स्याधिप विराट राजा याची स्त्री. हिला उत्तर व उत्तरा अशीं दोन मुलें होतीं. अज्ञातवासांत द्रौपदी हिची दासी म्हणून राहिली होती व त्याच काळांत कीचकाचें द्रौपदीवर लक्ष गेलें. (कीचक पाहा).

**सुंदोपसुंद**—हिरण्यकशिपूच्या वंशांतील निकुंभ नामक दैत्याचे पुत्र सुंद आणि उपसुंद. या उभयतांनीं विंध्याचल पर्वतावर मोठें उग्र तप केलें. त्याच्या योगानें ब्रह्मदेवापासून यांस असा वर मिळाला कीं, तुम्ही एकमेकांस न माराल तोंपर्यंत अमर राहाल. पुढें हे फार बलिष्ठ होऊन त्रैलोक्याला त्रास देऊं लागले. तथापि यांचें परस्परांवर अत्यंत प्रेम असल्यानें हे अमर होते. तेव्हां या उभयतांमध्यें कलह उत्पन्न करण्याकरितां इंद्रानें तिलोत्तमा अप्सरा पाठविली. तेव्हां उभयतांत तिच्याकरितां कलह होऊन ते एकमेकांस मारून मेले.

**सुघराई**—हा राग काफी थाटांतून निघतो. याच्या आरोहांत धैवत स्वर वर्ज्य आहे व अवरोह सात स्वरांनीं होतो; म्हणून याची जाति षाडव-संपूर्ण आहे. वादी स्वर पंचम व संवादी षड्ज आहे. गानसमय दोनप्रहर मानितात. हा राग मारवा रागाच्या अंगानें गाण्यांत येतो. मध्यरात्रीं गाविला जाणारा जो शहाणा नांवाचा राग त्याचा हा राग दिवसाचा जवाब आहे, असें तज्ज्ञांचें मत आहे. हा एक कानड्याचा प्रकार आहे.

**सुधाकर द्विवेदी** (जन्म शक १७८२)—काशी येथील संस्कृत पाठशाळेंतील एक ज्योतिर्विद् अध्यापक. ग्रंथ—'दीर्घवृत्त-लक्षण', 'विचित्रप्रश्नसभंग', 'वास्तवचंद्रशृंगोन्नतिसाधन', 'द्युचरचार', 'पिंडप्रभाकर', 'भाभ्रमरेखानिरूपण', 'धराभ्रम', 'ग्रहणकरण', 'गोलीय रेखागणित', युक्लिडच्या पुस्तकांचा संस्कृत श्लोकबद्ध अनुवाद, 'गणकतरंगिणी'. टीकाग्रंथ—'प्रतिमाबोधक', 'यंत्रराजटीका', 'वासनाविभूषण', 'करण-कुतूहलटीका', व 'पंचसिद्धांतिकाप्रकाश'. यांशिवाय भास्करकृत लीलावती, भास्करीय बीज, कृष्णकृत छादकनिर्णय, कमलाकरकृत सिद्धान्ततत्त्वविवेक, व लल्लकृत धीवृद्धितंत्र हे ग्रंथ यांनीं शोधून छापविले आहेत.

**सुनी पंथ**—हा इस्लामधर्मांतील पुराणमताभिमानी पंथ आहे, आणि त्या धर्मांतील दुसरा मोठा शियापंथ त्याला सुनीपंथाचा विरोध आहे. या दोन पंथांमध्यें महत्त्वाचा फरक असा आहे कीं, सुनी लोक सुन्ना आणि कुराण मानतात. आणि शिया लोक मानीत नाहींत. सुन्ना हें नांव महंमद पैगंबर याच्या वचनांच्या त्याच्या पश्चात् केलेल्या संग्रहाला दिलेलें आहे. व त्यांत महंमद पैगंबर याच्या कामगिरीची कांहीं माहिती दिली आहे. पण हा सर्व संग्रह दंतकथात्मक आहे. मुसलमानी धर्मांत हे दोन मोठे पंथ महंमद पैगंबर याच्या मरणानंतर उत्पन्न झाले. यांपैकीं सुनी पंथानें प्रारंभींच्या खलीफांचा अधिकार मान्य केला; आणि शिया पंथानें असें प्रतिपादन केलें कीं, महंमद पैगंबर याचें दैवी सामर्थ्य त्याची मुलगी फतीमा हिच्यामार्फत फक्त अलीला व त्याच्या वंशजांना प्राप्त झालें. खलीफतच्या बाबतींत जे तंटे उत्पन्न झाले त्यांत या दोन पंथांमधील मतभेद अधिक स्पष्ट दिसूं लागले. खलीफाचा अधिकार मुख्यतः राजकीय स्वरूपाचा आहे, असें ऑटोमन लोक मानीत असत. आणि याविरुद्ध शिया लोकांचें मत असें आहे कीं, खलीफाचा संबंध राजकारणाशीं नसून त्याचा अधिकार अगदीं शुद्ध धार्मिक स्वरूपाचा आहे.

**सुपारी**—एक झाड व त्याचें फळ. हिंदु लोकांत कोणतेंहि धर्मकृत्य करते वेळीं सुपारी अवश्य पाहिजे. गणपतिपूजनाच्या वेळीं गणपतीची स्थापना सुपारी ठेवून करतात. यावरून सुपारी फार प्राचीन काळापासून हिंदु लोकांस माहीत आहे असें दिसतें. पूगीफल-पूगफळ या शब्दापासून पोफळ हा शब्द आला आहे. सुपारी हा शब्द कानडी सोप्पु = पान + अरिके = झाड या शब्दापासून आला असावा. सुपारीची लागवड चीन, मलाया, ब्रह्मदेश, बंगाल, सिलोन, मलबार, म्हैसूर या ठिकाणीं फार आहे. मुंबई इलाख्यांत याची लागवड गोंवें, कारवार, रत्नागिरी, कुलाबा, ठाणें या जिल्ह्यांत आहे. विशेषतः कारवार जिल्ह्यांतील शिरसी-सिद्धापूर येथील सुपारी फार प्रसिद्ध आहे. कुलाबा जिल्ह्यांतील श्रीवर्धन येथील सुपारीचा रोठा फार नामांकित आहे.

सुपारीला उष्ण दमट हवा लागते. शिवाय समुद्रकिनाऱ्यापासून फार लांब अंतरावर ती होत नाहीं. डोंगरी बागाइती जमिनींत तिची लागवड करतात. सुपारी पिकण्यापूर्वींच झाडावरून उतरतात. उतरल्याबरोबर सुपाऱ्या सोलून त्या पाण्यांत शिजवितात. सुपारीचा डोळा बाहेर आल्याबरोबर ती तयार झाली असें समजतात; नंतर तीनचार दिवस उन्हांत वाळवितात.

सुपारीच्या जाती—(१) पांढऱ्या सुपारीच्या जाती गोंवा, मंगळूरी, रूपसई, कलकत्ता, आनिग्री, शिरसी व श्रीवर्धनी. (२) लाल सुपारीच्या जाती—मलबारी, कुमठा, मुरारकडी, गोंवा, वसई, सपाळी, मालवणी, वेंगुर्ला व कलकत्ता.

हिंदुस्थानांत होणाऱ्या सुपारीखेरीज सिलोन, स्ट्रेट सेटलमेंट, सुमात्रा व चीन या देशांतील सुपारी इकडे येऊन खपते. सुपारीचा खप आपल्या देशांत फार असल्यामुळें ह्या मालाचा व्यापारहि फार मोठ्या प्रमाणांत चालतो. आपल्या देशांत सुपारीची पैदास होत असून सुद्धां सुमारें ८० लाख रु. ची सुपारी बाहेर देशांतून येते.

**सुपीरियर सरोवर**—हें उत्तर अमेरिकेंतील एक फार मोठें सरोवर आहे. या सरोवरांत गोड्या पाण्याचा जगांतील अत्यंत मोठा सांठा आहे. अमेरिकेंत जी मोठाल्या सरोवरांची मालिका आहे, त्यांत हें सरोवर अगदीं पश्चिमेकडे आणि सर्वांत अधिक उंचीवर आहे. याची सर्वांत अधिक लांबी ३५३ मैल असून परिघ सुमारें १,७५० मैल आहे, आणि क्षे. फ. सुमारें ३२,००० चौ. मैल आहे. या सरोवराला अनेक लहान लहान प्रवाह येऊन मिळतात. आणि या सरोवरांतून सेंट मेरी रिव्हर उगम पावते. या सरोवरांत नाविक वाहतूक वर्षभर चालू असते.

**सुपें**—मुंबई, पुणें जिल्हा, भीमथडी तालुका. पुण्याच्या आग्नेयेस ३५ मैलांवर अहमदनगर-सातारा रस्त्यावर हें गाव आहे. येथील लोकवस्ती सुमारें ५,००० आहे. येथें एक औरंगजेबानें बांधलेली मशीद व अण्णाजीराव मराठ्यानें बांधलेलें एक तुकोबाचें देवालय आहे. दुसऱ्या मूर्तिजा निजामशहानें शिवाजीचा आजा मालोजी ह्यास १६०४ मध्यें सुपें व पुणे इनाम दिला होता. १७९० मध्यें सुपें हें जुन्नर सरकारांतील एका परगण्याचें मुख्य गांव होतें. लो. सं. ५,८१४.

**सुप्रजाजननशास्त्र**—(युजेनिक्स). भविष्यकालीन पिढीमध्यें शारीरिक किंवा मानसिक गुणांमध्यें स्थित्यंतर घडवून आणून त्यांत कांहीं गुणांची वाढ करणें व कांहीं विशिष्ट बाबी कमी करणें यांकरितां सामाजिक निर्बंधांचा अभ्यास करणाऱ्या शास्त्रास सुप्रजाजननशास्त्र असें म्हणतात. या शास्त्रामध्यें मनुष्यजातीच्या

शारीरिक, मानसिक व नैतिक प्रवृत्तींचा आनुवंशिक दृष्टीनें योग्य गुणांचा विकास करण्याच्या हेतूनें अभ्यास करण्यांत येतो. या शास्त्राचा अभ्यास करण्यामध्यें सर फ्रान्सिस गाल्टन यानें आपलें सर्व आयुष्य खर्च केलें, व लंडन येथील विद्यापीठांत या विषयाच्या अभ्यासाची स्थापना केली. या शास्त्राचे अभ्यासक आनुवंशिकतेवर फराच भर देतात, आणि क्षय, अपस्मार वगैरे कांहीं रोग व कांहीं मानसिक विकार हे आनुवंशिक प्रवृत्तीमुळें उत्पन्न होतात असें मानतात. मद्यासक्ति हीहि आनुवंशिकतेमुळें उत्पन्न होते असेंहि त्यांचें मत आहे. यामुळें ते सामाजिक परिस्थिति, शिक्षण, वगैरे बाबींस तितकेंसें महत्त्व देत नाहींत. या शास्त्रामध्यें जरी कांहीं वैगुण्यें असलीं तरी तें एक महत्त्वाचें शास्त्र असून त्याच्या सिद्धान्तांचा नीट उपयोग करण्यांत आला तर सामाजिक परिस्थितीवर त्याचे फार दूरवर पोंचणारे परिणाम होतील, यांत शंका नाहीं. आनुवंशिकता व मेंडेल सिद्धान्त पाहा.

**सुफी पंथ**—हा गूढवादी मुसलमानांचा पंथ आहे. इस्लामी धर्मांत गूढवादाचा आरंभ ७ व्या शतकांत झाला, व हा गूढवाद ख्रिस्ती धर्माच्या परिणामामुळें फकिरी वृत्तीनें राहण्याची प्रवृत्ति मुसलमानांमध्यें जी उत्पन्न झाली, त्या प्रवृत्तीच्या लोकांनीं उत्पन्न केला; कारण सुफी पंथ हा मुख्यतः पुराणमतवादी होता. मूळच्या फकिरी वृत्तीच्या सुफी पंथी इसमांच्या विचारांना व मतांना ३ ऱ्या इस्लामी शतकांत नवें वळण लागलें. सुफी पंथीय विद्वानांनीं सर्वेश्वरवाद (पॅन्थीइझम) प्रस्थापित केला. गूढार्थसूचक अशीं वाक्यें कुराणांत थोडींफार असून स्वतः महंमद पैगंबर गूढवादी (मिस्टिक) होता असें स्पष्ट दिसतें. पण सुफी पंथीयांनीं कुराणाच्या प्रत्येक वाक्यांत व शब्दांत गूढार्थ अभिप्रेत आहे असें प्रतिपादन सुरू केलें. त्यामुळें कुराणांतील एकाच वाक्याचे अनेक व परस्पर-विरोधी अर्थहि सुफी लोक करूं लागले. म्हणून सुफी लोक म्हणजे एक विशिष्ट मतवादी पंथ आहे असें म्हणतां येत नाहीं. तरी पण कुराणाचा खरा अर्थ आम्हांलाच समजतो असें सुफी लोक मानतात व तदनुसार कुराण स्वतःच्या शिष्यवर्गाला शिकवितात. पुढें गूढार्थपर कविताहि पुष्कळ होऊं लागून फारशी वाङ्मयात अबू सय्यद, फरीदुद्दीन अत्तार, जलालुद्दीन रूमी व जामी, महमूद शबिस्तरी, इब्न अल फरीद, इब्न अल् अरबी, नेमिसी वगैरे कवी ललामभूत आहेत. हफीज आणि सादी हे प्रख्यातच आहेत.

या मुसलमान संप्रदायाचा हिंदुस्थानांत प्रवेश १२ व्या शतकाच्या उत्तरार्धांत झाला. व त्याच्या शिकवणीचा परिणाम मुसलमानांप्रमाणेंच हिंदूंवरहि झाला. ब्राह्मणसुद्धां या धर्माची दीक्षा घेऊं लागले. या पंथाचें अंतरंग हिंदु तत्त्वज्ञानाशीं कांहीं मिळतें होतें. ईश्वराचा साक्षात्कार हें संप्रदायाचें अंतिम ध्येय असून ईश्वरप्राप्तींत कांहीं एकावर एक पायऱ्या भक्ताला चढून जावें लागे. धर्मांतील रूढाचारांवर सुफी संत सडकून कोरडे ओढीत. हिंदु आणि इस्लामी या दोन्ही समाजांतील परमार्थीयांना सुफी संतांची शिकवण यामुळें आवडे व ते त्यांचे अनुयायी बनत.

अजमीरचा ख्वाजा मुइनुद्दीन चिस्ती (मृ. १२३६) हा या पंथांतील श्रेष्ठ साधुपुरुष गणला जातो. स्वतःला अथर्ववेदी म्हणविणारे हुसेनी ब्राह्मण चिस्तीचे भक्त आहेत. सुफींतील शहादुल्ला शाखा अथर्ववेदाला आपला धर्मग्रंथ समजते. चिस्तीनंतर बाबा फरिदुद्दीन (मृ. १२६५), त्याचा शिष्य निजामुद्दीन, मुलतानचा बहाउद्दीन झकरिया (मृ. १२६६), त्याचा शिष्य जलालुद्दीन सुर्खपोष (मृ. १२९१), वगैरे सुफी संत हिंदुस्थानांत होऊन गेले.

प्रथम सुफी पंथाचा प्रसार पंजाब प्रांतांत झाला. नंतर पूर्वेकडे बिहारपर्यंत पसरला. बुऱ्हाणुद्दीन (मृत्यु १४५३) यानें गुजराथेंत याचा महिमा वाढविला. सुफींच्या स्वतंत्र विचारामुळें मुसलमानी राजसत्तेच्या रोषास ते बळी पडत. पण त्यांनीं हिंदु-मुसलमानांत सलोखा उत्पन्न करण्यास मदत केली, यांत शंका नाहीं. पुढें हिंदु संतांची समाजावर छाप पडूं लागली तशी १५ व्या शतका-नंतर सुफी पंथाचें तेज पडेनासें झालें. आपल्या भक्तिमार्गाच्या उठावांत या पंथाचा हातभार होता, हें लक्षांत वागविलें पाहिजे.

**सुबुची शोयो** (१८५९-१९३५)—एक प्रसिद्ध जपानी नाटककार. जपानांत तो इंग्रजी वाङ्मयाचा तज्ज्ञ समजला जाई. त्यानें जुन्या 'काबुकी' नाटकांतील अद्भुत प्रकार नाहींसे करून जपानी नाटकाला वास्तववादी बनविलें. शेक्सपियरच्या नाटकांच्या धर्तीवर जपानी नाटकें बनविण्याची त्यानें खटपट केली. शेक्स-पियरच्या नाटकांचीं भाषांतरें त्यानें केलीं असून निबंधहि लिहिले आहेत.

**सुब्बाराव, डॉ. येल प्रगदा** (१८९६-१९४८)—एक हिंदी शास्त्रसंशोधक. मद्रास विद्यापीठांतून उच्च वैद्यकाच्या पदव्या मिळ-विल्यानंतर ते इंग्लंडला गेले व तेथें लंडन विद्यापीठाची 'डॉक्टर ऑफ ट्रॉपिकल मेडिसिन' ही पदवी मिळविली. १९२३ सालीं ते अमेरिकेस गेले. हार्वर्ड विद्यापीठांत ते प्राध्यापक झाले व 'फॉलिक ॲसिड' संबंधीं त्यांनीं नवीन संशोधन केलें. या ॲसिडमुळें व्रण, प्रदर, इ. रोगांवर गुणकारी उपाय निघाले आहेत. उष्ण कटि-बंधांतील रोगांसंबंधीं संशोधन करून त्यांनीं कांहीं जीवनसत्त्वें (व्हिटॅमिन) हि काढलीं आहेत. त्यांचे शोध हे फार उपयुक्त असून पाश्चात्य देशांत वैद्यकशास्त्रांत त्यांचें नांव चिरकाल राहील. ते न्यू यॉर्क येथें ता. ९ ऑगस्ट १९४८ रोजीं वारले.

**सुब्रह्मण्य अय्यर, डॉ. सर एस्.** (१८४२-१९२४)— एक मद्रासी पुढारी. वयाच्या १४ व्या वर्षी मॅट्रिक्युलेशनची परीक्षा दिल्यावर त्यांनीं कारकुनाची नोकरी धरली. परंतु त्यांत समाधान न वाटल्यामुळें त्यांनीं डिस्ट्रिक्ट जज्जाकडे वकिलीची सनद मिळावी म्हणून अर्ज केला. पण तो अर्ज नाकारला गेला म्हणून त्यांनीं खाजगी रीतीनें अभ्यास करून १८६८ सालीं बी. एल्. ची परीक्षा दिली. कांहीं दिवस तहशीलदाराची नोकरी केल्यावर त्यांनीं वकिली सुरू केली. वकिलींत त्यांची भरभराट होऊं लागली. हा सर्व काळ त्यांचा मदुरेस गेला. १८८४ सालीं त्यांना कायदेकौन्सिलचे सभासद निवडल्यामुळें ते मद्रासेस येऊन वकिली करूं लागले. मद्रासमध्यें हे पहिल्या प्रतीचे वकील झाले. १८९५ मध्यें यांना न्यायाधीशाची जागा मिळाली. तीन वेळां यांनीं मुख्य न्यायाधीशाचेंहि काम केलें. हे मद्रास युनिव्हर्सिटीचे कुलगुरु (व्हाइस चॅन्सेलर) होते. त्यांना एल्एल्. डी. ची पदवी व सर हा किताब मिळाला. १९१४ सालीं हे मद्रास शहरीं भरलेल्या काँग्रेसच्या स्वागतमंडळाचे अध्यक्ष होते. हे नॅशनल होमरूल लीगचे आमरण अध्यक्ष होते. १९१८ सालीं यांच्यासंबंधीं स्टेट सेक्रेटरी मॉंटेग्यु यांनीं अनुदारपणाचे उद्गार काढल्यामुळें यांनीं आपल्या किताबाचा त्याग केला. ते थिऑसॉफिस्ट होते.

**सुभद्रा**—वासुदेव कृष्णाची कनिष्ठ भगिनी. ही उपवर झाली असतां बलरामानें दुर्योधनास देण्याचें ठरविलें होतें. पण अर्जुनानें तापस वेष धारण करून तिचें हरण केलें. ही सुभद्रा-हरणाची कथा सुपरिचित आहे. सुभद्रेचा पुत्र अभिमन्यु होय.

**सुभेदार मनु** (१८९०-        )—एक हिंदी अर्थशास्त्रज्ञ. मुंबईस न्यू हायस्कूल व एल्फिन्स्टन कॉलेज येथील आपला शिक्षणक्रम पुरा करून पुढील शिक्षणासाठीं हे इंग्लंडला गेले. तिकडून १९१४ सालीं बॅरिस्टर व लंडन स्कूल ऑफ इकॉनॉमिक्समधून बी. एस्सी. या परीक्षेंत यशस्वी होऊन हे स्वदेशीं परत आले. हिंदुस्थानांत यांनीं मुंबई युनिव्हर्सिटी व कलकत्ता युनिव्हर्सिटी यांतून अर्थशास्त्राचें अध्यापन-कार्य केलें आहे. इंग्लंडमधील बिबिंग्टन-स्मिथ कमेटीपुढें साक्ष देण्याकरितां हिंदी व्यापारी वर्गाचे प्रतिनिधि म्हणून यांचीच निवड झाली होती. इंडियन मर्चंट्स् चेंबरचे प्रतिनिधि या नात्यानें यांनीं बॉंबे इंप्रुव्हमेंट् ट्रस्ट कमेटी, डेव्हलमेंट खात्याचे सल्लागार मंडळ, इत्यादींतून यशस्वी कामगिरी केली आहे. म्हैसूर, जुनागड, जोधपूर, इत्यादि संस्थानांचे हे आर्थिक सल्लागार होते. हे गुजराथी असले तरी मराठींतील संतवाङ्मयाकडे यांचा ओढा विशेष आहे. यांनीं ज्ञानेश्वरीचें इंग्रजींत भाषांतर केलें आहे. व कांहीं अर्थशास्त्रीय ग्रंथ लिहिले आहेत. १९३७ सालीं हे मध्यवर्ती कायदेमंडळाचे सभासद होते.

**सुमाक**—[जाति आम्रकुल, ॲनाकार्डिआसी]. ऱ्हस. या झुडपाचीं पानें पिसांसारखीं असून, लहान फुलें येतात. याचा थोडा बाहेर येणारा रस तिखट किंवा जहाल असतो. याच्या अंगीं कातडीं कमावण्याचा गुणधर्म असतो. प्रख्यात जपानी रोगण याच्या एका जातीपासून बनतें. अमेरिकेंत होणाऱ्या

मृदुपर्णी सुमाकाचीं पानें आंबट असून त्याचीं तांबडीं वाटोळीं फळें फार सुरेख दिसतात. यापासून रंग निघतो. सुमाकाच्या कांहीं विषारी वेली असतात.

**सुमात्रा**— इंडोनेशिया, जुन्या डच ईस्ट इंडीज मलाया द्वीप-समूहांतील एक बेट. याचें क्षे. फ. सभोंवतालचीं बेटें (बॉंका व बिलिटन खेरीज करून) मिळून १,७८,३३८ चौ. मै. आहे. मलाया द्वीपसमूहांतील इतर बेटांप्रमाणें हें बेट भूमध्यरेषेवर असल्यामुळें हवा फार उष्ण असते. येथें पाऊसहि बराच पडतो. लो. सं. ७६,६१,०००. येथून काळीं व पांढरीं मिरीं, वांबू, डिंक, खोबरें, जायफळ, जायपत्री, कात व रबर हा माल निर्गत होतो. पश्चिम भागांतून पालेम्पॉंगची काफी व डेलीची तंबाखू देखील बाहेरगांवीं पाठवितात. सोनें, कोळसा व तांबें हीं येथील खनिज द्रव्यें आहेत.

पादांगच्या उंचवट्यावर सांपडलेल्या शिलालेखावरून ७ व्या शतकांत टा नाह धातार येथें एक बलिष्ठ हिंदु राज्य असावें. या शिलालेखांत सुमात्रास 'आद्य जावा' असें म्हटलें आहे. या काळचे भारतीय अवशेष बरेच सांपडतात. पालेम्पॉंगामध्यें लाहाटच्या वरच्या भागांत व आणखी बऱ्याच ठिकाणीं पडकीं हिंदु देवालयें आहेत. पागर रूजुंग येथें संस्कृत भाषेंत लिहिलेले बरेच शिलालेख आहेत. हिंदूंप्रमाणें बत्ता लोक देखील औदुंबरास पूज्य मानतात. १३ व्या शतकांत हळूहळू मुसलमानी धर्माचा प्रसार होऊन कांहीं संस्थानांत तर या धर्माचा जबरदस्त पगडा बसला.

१५०८ मध्यें युरोपियन लोकांस डिओगा लॉपिस नांवाच्या एका पोर्तुगीजाकडून सुमात्रा बेटाबद्दल माहिती लागली. येथें प्रथम पोर्तुगीज लोकांनीं वखारी घातल्या. परंतु या शतकाच्या शेवटीं डच लोकांनीं त्यांस हांकून लावलें. हळूहळू इतर भागांत डच-वर्चस्व स्थापन झालें. तसेंच १६८५ मध्यें बेंकुलेन येथें इंग्रज लोकांचा शिरकाव झाला होता. यांत व डच लोकांत लढा लागला. शेवटीं १८२४ मध्ये तह होऊन इंग्रज लोकांस सुमात्रा सोडून द्यावें लागलें. व याबद्दल त्यांस मलाक्का मिळालें. नंतर या

सर्व भागावर डच सत्ता कायम झाली, पण ती त्यांना दोन वर्षांपूर्वी सोडावी लागली. सुमात्राची जुनी संस्कृति जावाप्रमाणेंच आहे.

**सुमारगड**—मुंबई, रत्नागिरी जिल्हा. खेड तालुक्यांत महिपतगड ज्या डोंगरावर बांधलेला आहे त्याच डोंगराच्या एका फांट्यावर हा बांधलेला आहे. हा त्यापेक्षां खालीं असून त्याच्या दक्षिणेस चार मैलांवर आहे. क्षेत्रफळ सुमारें पाऊण एकर आहे. तटाची उंची १५ पासून २२ फुटांपर्यंत आहे. शिड्या लावल्याशिवाय किल्ल्यांत जातां येत नाहीं.

**सुमेर**— पश्चिम आशियांतील एक प्राचीन राष्ट्र. सुमेर हें नांव अक्कडबरोबर शिलालेखांत आढळतें. सुमेर म्हणजे दक्षिण बाबिलोनिया व अक्कड म्हणजे उत्तर बाबिलोनिया असा समज होता. नंतर सुमेर व अक्कड म्हणजे सर्व बाबिलोनिया असा अर्थ होऊं लागला. बाबिलोनियाची प्राचीन संस्कृति सुमेरियन असावी. बाबिलोनियांतील प्राचीन केंगी, उर, वगैरे राज्यें सुमेरियन होतीं. सुमेरियन हे द्राविड महावंशांतील होते असें कांहीं भाषापंडितांचें म्हणणें आहे. तथापि या प्राचीन राष्ट्रासंबंधीं अद्याप निश्चित असा इतिहास नाहीं. या सुमेरियनांबद्दल अधिक माहिती सुलभ विश्वकोश, वि. ३, प्रस्तावना पृ. १९–२१ पाहा.

सुमेरियन वाङ्मय—हें वाङ्मय ख्रि. पू. दुसऱ्या सहस्रकाच्या प्रारंभापासून उपलब्ध झालें आहे व तें ३,००० हून जास्त विटांवर खोदलेलें आहे. अद्भुत व लांबलचक आख्यानकथा, दंतकथा, स्तोत्रें, शोकगीतें, सुभाषितें यांसारखे प्रकार या वाङ्मयांत आहेत. यांचा बराचसा अभ्यास करण्यांत आलेला आहे. दहा महाकथांचें नीट वाचन झालें आहे. यांपैकीं सातांत ख्रि. पू. तिसऱ्या सहस्रकांत होऊन गेलेल्या सुमेरियन वीरांचे पराक्रम वर्णिले आहेत. तीन कथांचा विषय अतिशय विख्यात असलेला गिलगामेश योद्धा आहे. बहुतेक दंतकथांतून विश्वाची रचना व वाढ दिलेली असते. प्रलयकथाहि आपल्या इकडल्याप्रमाणेंच आहे. स्तोत्रांमध्यें राजस्तोत्रें आणि देवता–स्तोत्रें आढळतील. एन्‌लिल (वायुदेवता), एन्की (जलदेवता आणि बुद्धिदेवता), नन्ना (चंद्र), उतु (सूर्य), निमर्त (दक्षिण मारुत), इनना (प्रेम आणि युद्ध यांची देवी), बाउ (आन या स्वर्देवाची कन्या), मर्तु (हवेची देवता), वगैरे देवतांची स्तुति या स्तोत्रांतून असते. राजांपैकीं उरच्या तिसऱ्या घराण्यांतील दुसरा राजा शुलगी (काळ ख्रि. पू. तिसऱ्या सहस्रकाचा शेवट), उर–नम्मू, शु-सिन आणि इबि–सिन हे त्याच घराण्यांतील दुसरे राजे, व इसिन घराण्यांतील राजे (ख्रि. पू. २ रें सहस्रक, प्रथम चरण) यांच्यावर प्रशस्तिकवनें आहेत.

शोकगीतांतून, रानटी लोकांनीं सुमेरियन शहरांचा अनेकदां नाश केला त्याची हळहळ दिसून येते. उर शहरावर ४०० हून अधिक ओळी आहेत. सुभाषितें व म्हणी आपल्या इकडच्याप्रमाणेंच आढळतील. उदा., एखाद्या गरिबाची दुःस्थिति कशी असते तें पाहा—

"गरिबाच्या संकटांना सीमा नसते,
जर त्याच्याजवळ भाकरी असेल, तर मीठ नसते,
मीठ असेल, तर भाकरी नसते.
जर त्याचें कोंकरूं असेल तर त्याला कोंडवाडा नसतो,
कोंडवाडा असेल तर कोंकरूं नसतें."

दुसरें एक सुभाषित असें—

"अतिशय उंच माणूस स्वर्गापर्यंत पोंचूं शकत नाहीं,
अतिशय शहाणा माणूस पृथ्वी आच्छादूं शकत नाहीं."

यांखेरीज उपदेशपर वचनेंहि आहेत. अनेक वर्षांच्या अभ्यासानंतर उच्च प्रतीच्या अनुभवानें आणि बुद्धीनें तयार झालेलें इतक्या मागील काळांतलें हें वाङ्मय असून जगाच्या वाङ्मयांत यानें चांगली भर टाकलेली आहे. तसेंच पश्चिम आशियांतील प्राचीन विद्वानांमध्यें हें वाङ्मय वाणलेलें असलें पाहिजे व पाश्चात्य जगांतील वाङ्मयांवरहि याचा कमी परिणाम झाला नसेल.

**सुमेरसिंग गारदी** (मृत्यु १७७४)— पेशवाईतील एक गारदी. हा प्रसिद्ध रघुनाथरावाचा हस्तक असून यानेंच नारायणराव पेशव्यास ठार मारलें. त्यासाठीं राघोबानें यास सरदारकी दिली. पण पुढें बारभाईंनीं याची सर्व मालमत्ता जप्त केली व याच्या बायकामुलांस पकडून मरेपर्यंत कैदेची शिक्षा दिली. हा दंडूरला मरण पावला.

**सुरगड**—मुंबई, रत्नागिरी जिल्हा. रोह्यापासून आठ मैलांवर एका लांब पण अरुंद टेंकडीवर हा किल्ला आहे. उत्तरेकडे व पूर्वेकडे उंच कडा असल्यामुळें तट नाहीं. दक्षिणेकडून रस्ता आहे. वाटेंत आणसाई भवानीचें देऊळ लागतें. आंत चालेकिल्ला आहे. त्यास बुरुज म्हणतात. आग्नेयेकडील बुरुजावर एक दगड असून त्यावर देवनागरी व अरबी लिपींत खोदलेला लेख आहे. त्यावरून हा किल्ला शिद्दीच्या आज्ञेनें सूर्याजीनें बांधला व किल्लेदार तुकोजी हैबत होता. १८१८ त हा प्रॉथरनें घेतला.

**सुरगाण**—मुंबई, नाशिक जिल्हा, बाक्रेकंठीचें एक लहान कोळी संस्थान. क्षे. फ. ३६४ चौ. मै. व लो. सं. १८,२९२. उत्पन्न सु. ८५ हजार आहे. संस्थानांत लहान डोंगर पुष्कळ आहेत. हवा रोगट असून पाण्याचें दुर्भिक्ष आहे. तरी पाऊस ७० इंच पडतो. येथील भाषा म्हणजे मराठीची एक बोली चालते. संस्थानिक पवार घराण्यांतील देशमुख आहेत. त्यांचे देशमुख धैर्यशीलराव यशवंतराव असून ते १९३६ सालीं गादीवर आले. हें आतां मुंबई प्रांतांत विलीन झालें आहे.

**सुरंगी**—हें झाड उंडणीच्या झाडाप्रमाणें असतें व विशेषें-करून कोंकणांत होतें. कोंकणांत याला 'गोडी उंडण' म्हणतात. याच्या फुलांना फार वास असतो. त्याचें अत्तर काढतात. लांकूड इमारतकामास उपयोगी पडतें. कळ्यांचा रंग तयार होतो.

**सुरगुजा**—मध्यप्रांतांतील एक मांडलिक संस्थान. क्षे. फ. ६,०६७ चौ. मै. १९०५ पर्यंत बंगाल्यांतील छोटा नागपूर संस्थानांत याचा समावेश होत असे. संस्थानच्या तिन्ही बाजूंना नैसर्गिक डोंगरी तट असून पश्चिमेस कोरिआचा जंगली भाग आहे. हल्लींचें येथील राजघराणें पलामोच्या अरकसेल् राजाच्या वंशांतील आहे अशी दंतकथा आहे. १७५८ त गंगेकडे जाणाऱ्या मराठी सैन्यानें संस्थानवर स्वारी करून त्याला भोंसल्याचें मांडलिकत्व कबूल करावयास लाविलें. १८१८ त वऱ्हाडच्या मुधोजी भोंसल्याशीं झालेल्या तहान्वयें हें संस्थान ब्रिटिशांकडे आलें. संस्थानिकाला महाराजा असा किताब असून तो ब्रिटिश सरकारला वार्षिक २,५०० रु. खंडणीदाखल देत असे. रामगडच्या डोंगरांतील गुहा व जुनाचा ओसाड किल्ला व कोरीव लेणीं या संस्थानांतील महत्त्वाच्या पुराणवास्तू आहेत.

लो. सं. ५,५१,७५२. येथील बहुतेक रहिवासी द्रविड वंशाचे असून, बहुतेकांचा उदरनिर्वाह शेतीवर होतो. तांदूळ, गहूं, बार्ली, ओट, मका, गोंडली, हरभरा, कापूस व ताग हे येथें होणारे मुख्य शेतीचे जिन्नस होत. संस्थानचें उत्पन्न सुमारें सतरा लाख आहे. राजधानी अंबिकापूर आहे. सध्यांचे महाराज रामानुज सरण सिंग देव नांवाचे आहेत. हें संस्थान आतां मध्य प्रांतांत विलीन झालें आहे.

**सुरजमल्ल** (मृ. १७६३)—भरतपूरचा एक जाट राजा. हा स. १७५० मध्यें गादीवर आला. हा चांगला मुत्सद्दी व शूर होता. १७५१ सालीं सुरजमल्लनें अयोध्येचा नवाब, वजीर सफदरजंग यास रोहिले लोकांचें पारिपत्य करण्यास व १७५३–५४ त मोंगल बादशहाविरुद्ध मदत केली. या कृत्याबद्दल जाटांचें पारिपत्य करण्यासाठीं बादशहानें मल्हारराव होळकर व शिंदे यांना आपल्यां मदतीस बोलाविलें होतें (१७५४). १७५४ त राघोबानें कुंभेरीला वेढा घातला. वेढ्यांत मल्हारराव होळकराचा मुलगा खंडेराव गोळी लागून पडल्यामुळें मल्हाररावानें जाटाचा शिरच्छेद करण्याची प्रतिज्ञा केली. जाट जयाप्पा शिंद्याच्या आड दडला; तेव्हां नाइलाजानें होळकरानें जाटाशीं सलोखा केला; नंतर मराठ्यांचा जाटाशीं तह झाला.

इ. स. १७६० त अबदालीस अटकेपार घालविण्याकरितां सदाशिवरावभाऊ उत्तर हिंदुस्थानांत आला तेव्हां तीस हजार फौज घेऊन सुरजमल्ल त्यास येऊन मिळाला. पायदळ, तोफखाना, काबिले, बुणगे यांना मागें कोठें तरी किल्ल्यांत ठेवून मराठ्यांनीं अफगाणांशीं गनिमी काव्यानें लढावें अशी सुरजमल्लाची भाऊस सल्ला होती. परंतु ती भाऊनें ऐकली नाहीं. शिवाय भाऊनें पेशव्यातर्फे दिल्लीचें छत तोडलेलें जाटास आवडलें नाहीं. म्हणून तो मराठ्यांस सोडून निघून गेला (१७६०). तथापि त्यानें मराठे पानपत येथें अडचणींत सांपडले असतां त्यांना पैशाची मदत केली व पुढें पानपतच्या युद्धांत मराठ्यांचा मोड होऊन त्यांच्या सैन्याची दुर्दशा झाली तेव्हां पळपुट्या लोकांचा त्यानें चांगला परामर्ष घेतला (१७६१). पानपतानंतर अबदाली कंदाहारास परत गेलासें पाहून सुरजमल्लानें बादशाही मुलूख घेण्यास आरंभ केला व आग्रा शहर घेतलें. १७६३ सालीं नजीबखान रोहिल्याशीं लढतांना तो कामास आला. याची छत्री गोवर्धन येथें कुसुम सरोवरावर आहे. याचा कारभारी रूपराम कटारी होता.

**सुरण**—हा एक कंद आहे. यास प्रथम कोंब फुटतो. तो हातभर वाढल्यावर त्यास फांटे फुटतात व त्यांस पानें येतात. सुरणाची लागवड गुजराथेंत विशेष आहे. व ठाणें जिल्ह्यांत वसई वगैरे समुद्रकिनारी पट्ट्यांत, कोंकणांत आणि जबलपूर, नरसिंगपूर, वगैरे जिल्ह्यांत याची थोडीशी लागवड करतात. सुरणांत गोडा व खाजरा अशा दोन जाती आहेत. खाजऱ्या सुरणाचा कोंब जरा तांबूस व गोड्याचा स्वच्छ पांढरा असतो. सुरणाची लागवड चाळीच्या जमिनींत व गोराड जमिनींत करतात. देशावर मध्यम काळ्या जमिनींत सुरण बरा पोसतो. गुजराथेंत सुरण बागाईत पिकाशीं फेरपालटीनें करतात. सुरणाची पुरी वाढ होण्यास चार वर्षे लागतात. सुरणास आलें–हळदीप्रमाणें जमीन तयार करून वाफे तयार करतात. सुरणाची उत्तम तऱ्हेची भाजी होते. सुरण पुष्कळ दिवस टिकतो. दोनतीन वर्षे सुरण जमिनींत ठेविला तरी तो नासत नाहीं. सुरणाच्या पानांची व दांड्यांचीहि कोणी भाजी करतात. याच्या चकत्या तळून मूळव्याधीवर देतात.

**सुरत**—मुंबई, गुजराथेंतील एक जिल्हा. क्षे. फ. १,६९५ चौ. मै. व लो. सं. ८,८१,०५८. जिल्ह्याच्या वायव्य आणि आग्नेय भागांत वडोदें संस्थान आहे. जिल्ह्याचा प्रदेश समुद्रसपाटीपासून १५० फुटांपेक्षां जास्त वर नाहीं. तापी व कीम या मोठ्या नद्या वाहतात. दक्षिण भागांत खाड्या असल्यानें त्यांतून मालाची वाहतूक होते. खजुरीचीं झाडें सर्वत्र आहेत. येथील आंबा हापूस-पायरीप्रमाणें गोडीला चांगला असतो. जंगलांत हिंस्र पशू आहेत. पाऊस ३५ ते ७२ इंचपर्यंत निरनिराळ्या ठिकाणीं पडतो.

इ. स. च्या दुसऱ्या शतकांत टॉलेमी या बंदराचा उल्लेख करतो. १३ व्या शतकापासून मुसलमानी अमल यावर आहे. भिल्लांपासून संरक्षण मिळावें म्हणून १३७३ त फिरोझ तुघलखानें सुरत येथें किल्ला बांधला. १६ व्या शतकाच्या पूर्वार्धांत पोर्तुगीजांनीं दोनतीनदां शहर जाळलें. १५७३ त अकबरानें हें

जिंकून घेतलें. १६१२ त गुजराथच्या सुभेदारानें इंग्रजांना व्यापारास परवानगी दिली. तेव्हां त्यांनीं येथें पहिली वखार स्थापिली. डच लोकांनाहि वखारीची परवानगी मिळाली होती. सुरतेवर शिवाजीचा पहिला हल्ला १६६४ त झाला. तीन दिवस शहर लुटून त्यानें एक कोटी रुपये नेले म्हणतात. यानंतरहि मराठ्यांनीं कित्येकदां सुरतेवर हल्ले केले; व सुरत आपल्या वर्चस्वाखालीं ठेवली. पुढें इंग्रजांची सत्ता सुरतेवर १८०० पर्यंत होती. नंतर ते इंग्रजांकडेच पूर्णपणें आलें.

जिल्ह्याची जमीन साधारणच आहे. तांदूळ व ज्वारी हीं मुख्य पिकें आहेत. कापसाची थोडी लागवड तयार होते. सुरतेस कापड चांगलें निघतें. किनखाब प्रसिद्धच आहे. आफ्रिकेंतील गेंड्याच्या कातड्याच्या ढाली सुरतेस होत. या ठिकाणीं जहाजें बांधण्याचा उद्योग पारशी करीत. सुरतेहून खानदेशकडे एक आगगाडीचा फांटा गेला आहे. खानदेश लागूनच असल्यानें गुजराथी व मराठी यांचा सर्व बाबतींत संबंध दृष्टीस पडतो. बलसाड हें सुरतेखेरीज व्यापारी शहर आहे. बडोदें संस्थानचें बिलिमोरा बंदरहि व्यापारासाठीं उपयोगी पडतें.

शहर—हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण बी. बी. सी. आय्. रेल्वेचें मोठें स्टेशन असून येथून तापी खोऱ्यांतील रेल्वेनें जळगांवाला जातां येतें. हें मुंबईहून १६७ मैल दूर आहे. हें शहर तापी नदीच्या दक्षिण तीरावर वसलें आहे. १६ व्या शतकाच्या प्रारंभीं ह्या शहराचा अर्वाचीन भाग गोपीनाथ नांवाच्या एका हिंदु व्यापाऱ्यानें वसविला असें म्हणतात. पूर्वी या शहराची गणना मोठमोठ्या शहरांत होत असे. १८ व्या शतकांत येथील लोकवस्ती आठ लक्षांच्या घरांत असावी. पश्चिम किनाऱ्यावरील या शहरांत डच, पोर्तुगीज व इंग्रज यांनीं आपआपल्या वखारी घातल्या होत्या. पूर्वीपासूनच कलाकौशल्य व व्यापार यांबद्दल सुरतेची प्रसिद्धि होती. त्यामुळें या नगरावर शिवाजीनें लुटीसाठीं तीन वेळ स्वाऱ्या केल्या. गांवांत एक भुईकोट किल्ला असून सध्यां त्यांत सरकारी कचेऱ्या आहेत. हा किल्ला १५४० त गुजराथच्या राजाच्या पदरीं असलेल्या खुदावंतखान नांवाच्या शिपायानें बांधला. लष्करीदृष्ट्या याचें महत्त्व १८६२ पावेतों होतें. येथून १८३७ त इंग्रजांनीं आपलें व्यापारी ठाणें मुंबईस नेलें. आग, पूर व स्वाऱ्या या कारणांनीं शहराचें फार नुकसान झालें आहे. अद्यापिहि तापीला पूर येऊन नुकसानी पोंचते. १८५२ त म्युनिसिपालिटीची स्थापना झाली. सध्यां शहरांतील वस्ती दाट असून रस्ते अरुंद पण स्वच्छ आहेत. या ठिकाणचें नगरसभेचें पदार्थसंग्रहालय, गोसावी महाराज व हनुमान यांचीं देवालयें, पारशांच्या अग्याऱ्या, खिस्ती मंदिरें व कांहीं मशिदी पाहण्यासारख्या आहेत. या ठिकाणीं एकदोन कॉलेजेंहि आहेत.

अलीकडे या शहराची वाढ उत्तम तऱ्हेनें होऊं लागली असून सुरतेचें तेथील नांव कॅांग्रेस अधिवेशनामुळें लोकांच्या चांगल्या परिचयाचें झालें आहे. येथें १९०७ ला जी कॅांग्रेस भरली होती तींत मवाळ व जहाल यांच्यांतील मतभेद तीव्र स्वरूपाला गेले होते. शिवाय या कॅांग्रेसनंतर निर्वी सूत्रें काबमची जहाल पक्षाच्या हातीं गेलीं. लो. सं. १,७१,४४३.

**सुरपारंबी**—हा खेळ जुना पण आज फारसा ऐकण्यांत नाहीं. एका झाडाखालीं एक वर्तुळ काढतात. एक 'चोर' झालेला मुलगा व खेळणाऱ्यांपैकीं एक हातांत काठी घेऊन या वर्तुळाजवळ असतात. बाकी खेळाडू झाडावर असतात. खालच्या गड्यानें आपल्या पायाखालून काठी दूर भिरकावयाची व चोर ती आणून वर्तुळांत ठेवीपर्यंत झाडावर चढावयाचें. झाडावरच्या मुलांनीं खालीं येऊन काठीला शिवावयाचें असतें. असें शिवण्यापूर्वी जर चोरानें एखाद्यास पकडलें तर तो चोर होतो व खेळ पुन्हां सुरू होतो.

**सुरसिंगार**—ह्या वाद्यास दोन भोपळे असतात. लखनौचे नवाब वाजिद अलीशहा ह्यांचे उस्ताद प्यारेखां ह्यांनीं हें वाद्य निर्माण केलें. रबाब वाद्यापेक्षां हें लांब असतें. सतारीस जशा घोडीवरून तारा चढवून तारदानांत पक्क्या बसविल्या असतात तशाच ह्यांतहि असतात. तर्फांच्या तारा घोडीखालीं असलेल्या पातळ घोडीवरून बसविलेल्या असतात. सरोदाचा जो बोटें तारेवर ठेवून वाजविण्याचा भाग असतो तोच ह्या वाद्यांतील मुख्य वाजता भाग होय. माथ्याची सात खुंट्या असतात. त्यांस लाविलेल्या तारांपैकीं खरज व पंचम ह्या पितळी असतात. ह्या वाद्यांत तर्फा लाविलेल्या असतात; त्यांची संख्या सामान्यतः सातपासून अकरापर्यंत असते. म, सा, प ह्या तारांवर कामगत करावयाची असते. तर्जनी व मधलें बोट ह्यांच्या नखांनीं तार दाबून उजव्या हातांतील बोटांत घातलेल्या नखांनीं आघात करून हें वाद्य वाजवितात. तारांखालीं पोलादी पातळ पत्रा बसविलेला असतो, त्यामुळें बोटें सरकविण्यास सोपें जातें. ह्या वाद्याचा आवाज मधुर व भरदार असतो. हें वाद्य स्वतंत्रपणें वाजवितां येतें.

**सुराबाया**—जावांतील एक बंदर. हें मदुरा सामुद्रधुनीवर आहे. बंदर उत्तम असून १४,००० टनी बोटींना राहण्याजोगी तरती गोदीहि आहे. हें डच ईस्ट इंडीजचें सैन्य आणि आरमार यांचें मुख्य ठिकाण असे. येथें व्यापारहि मोठा आहे. लो. सं. १,६०,०००.

**सुरुंगच्छेदक**—(पॅराव्हेन). गेल्या महायुद्धांत, समुद्रामध्यें पाण्याखालीं नांगरून ठेवलेल्या सुरुंगापासून जहाजानें रक्षण करण्याकरितां या साधनाचा उपयोग करण्यांत येत असे. याचा आकार टॉर्पेडोसारखा असून त्यामध्यें तें पाण्याखालीं जात

असतांना सरळ खालीं जाईल अशा तऱ्हेची रचना केलेली असते, आणि एका बाजूस एक तरंगणारा फुगा व दुसऱ्या बाजूस वजन जोडलेलें असतें. अशा तऱ्हेच्या साधनांची जोडी पाणसुरुंगाच्या प्रदेशांतून जाणाऱ्या प्रत्येक गलबतास जोडलेली असे. त्यामुळें सुरुंग लावलेल्या नांगराची सांखळी पॅरॉव्हेनच्या दोरीच्या आड आली म्हणजे तो सुरुंग गलबताच्या मार्गांतून बाजूला होऊन पॅराव्हेनच्या मार्गाच्या पलीकडे जाऊं लागे. असें होत असतांना पॅरॅव्हेनच्या तोंडाशीं जोडलेल्या एका सुरीच्या योगानें सुरुंगाची सांखळी तोडली जाऊन तो सुरुंग वर येत असे. असा तो वर आला म्हणजे त्यावर तोफ डागून त्याचा नाश करण्यांत येतो. (पाणसुरुंग पाहा).

**सुरुंग लावणें**—खाणी खोदण्याकरितां किंवा बोगदे बांधण्याकरितां स्फोटक द्रव्यांच्या साहाय्यानें दगड अथवा खडक फोडण्याच्या क्रियेस म्हणतात. सामान्यतः १ ते ३ इंच व्यासाची गिरमिटाच्या साहाय्यानें खडकांत भोंकें पाडण्यांत येतात. हीं पहारीनें किंवा दबलेल्या हवेच्या साहाय्यानेंहि पडतात. पुरेसें खोल छिद्र पडल्यावर त्यांत दारू भरण्यांत येते व त्यावर चिखल किंवा बारीक दगडाचा चुरा टाकून तें बंद करण्यांत येतें. आणि वत्तीच्या साहाय्यानें पेटविण्यांत येतें. मोठमोठ्या कामामध्यें या छिद्रांच्या ऐवजीं मोठे बोगदे किंवा खड्डे खोदण्यांत येतात व केव्हां केव्हां असे खड्डे साठ फूटपर्यंत खोल खोदण्यांत येतात व मुख्य खड्ड्यास आंवून शाखाहि काढण्यांत येतात. व त्यांत मधून मधून खोल्यासारखे भाग ठेवून त्यांत दारू भरण्यांत येते. अशा एका मोठ्या सुरुंगाकरितां वीस टन दारू वापरण्यांत येते. अलीकडे या सुरुंग लावण्याच्या विषयंत पुष्कळच सुधारणा झाली असून हाताच्या ऐवजीं यंत्राचा उपयोग करण्यांत येत आहे. खनिखोदनशास्त्राची वाढ झाल्यापासून सुरुंगाकरितां वापरावयाच्या स्फोटक द्रव्यांतहि पुष्कळ सुधारणा झाली आहे. अलीकडे बहुधा नायट्रोग्लिसरिन वर्गाचीं स्फोटक द्रव्यें वापरण्यांत येतात आणि विस्फोटक पारदा(फुलमिनेट ऑफ मर्क्युरी)च्या साहाय्यानें तीं उडविण्यांत येतात व वत्ती बहुधा विजेनें देण्यांत येते. तसेंच निरनिराळे सुरुंग एकामागून एक उडावे याकरितां निरनिराळ्या वेळीं व योग्य अवकाशानंतर उडणाऱ्या वत्त्या वापरण्यांत येतात. अलीकडे ज्वाला न निघणारीं स्फोटक द्रव्यें वापरण्यांत येऊं लागलीं आहेत. यासंबंधीं निरनिराळे कायदेहि करण्यांत आले आहेत.

**सुरू**—१. (सायप्रेस). [जाति–क्युप्रेसस सेंपरव्हिरेन्स]. सूचीपर्ण वृक्षांची एक जात. याचा रंग काळा असून पानें नेहमीं हिरवींगार असतात. तीं आकारानें लहान असून फांद्यांना आच्छादून टाकतात. याचा प्रथम बहुधा चौकोनी व पुढें फांद्या आंखूड होत गेल्या म्हणजे मनोऱ्यासारखा आकार असतो. याचें लांकूड कठिण, घट्ट व टिकाऊ असतें. याचा रंग तांबडा असून त्यास एक प्रकारचा चांगला वास येतो. हिंदुस्थान, चीन, जपान, वगैरे देशांमध्यें याच्या निरनिराळ्या जाती आहेत. व्हर्जिनियामधील सुरूचें लांकूड फार मौल्यवान् असून पाण्यांत असल्यास तें कधींहि नाश पावत नाहीं. अमेरिकेमध्यें याचीं शेंकडों मैल पसरलेलीं जंगलें आहेत. केंस येण्यास सुरूचा पाला पाण्यांत वांटून त्याचा लेप करतात.

२. (ज्यूनिपर). [वर्ग–कोर्नाफेरी. जाति–ज्यूनिपेरस]. हीं एका जातीचीं कठिण व वर्षभर पानें धारण करणाऱ्या जातीचीं झाडें आहेत. हीं बहुतेक उत्तरेकडील प्रदेशांत होतात. यांच्या सुमारें वीस जाती आढळतात. सामान्य जातीचीं झाडें सखल जमिनींत झुडुपांसारखीं वाढतात. याचीं फळें हॉलंडमध्यें दारू करण्याच्या कामीं उपयोगांत आणतात. याच्या एका जातीपासून एक तीव्र मूत्ररेचन औषध तयार करतात व त्याचें तेल लावलें असतां आग होते. याचा चीक जो निघतो त्यास 'गिरोजा' म्हणतात. तो तंतुवाद्याच्या तारांस लावण्यासाठीं उपयोगी पडतो. हा विस्तवावर टाकल्यास त्यास धूपासारखा वास सुटतो.

**सुरेश्वराचार्य** (१० वें शतक, पूर्वार्ध)—मंडनमिश्र. एक संस्कृत पंडित व वार्तिककार. 'नैष्कर्म्यसिद्धि' या ग्रंथाशिवाय यानें आद्य शंकराचार्यांच्या बृहदारण्यक भाष्यांवर व तैत्तिरीय उपनिषदावरील भाष्यांवर वार्तिक केलें आहे. दक्षिणामूर्तिस्तोत्रावरील याचें 'मानसोल्लास' नांवाचें वार्तिक प्रसिद्ध आहे. शंकराचार्यांच्या यतिसंध्याविधीवरहि यानें वार्तिक केलें आहे.

'शंकरदिग्विजय' ग्रंथावरून असें दिसतें कीं, हा पंचगौडापैकीं कान्यकुब्ज जातीचा ब्राह्मण असून माहिष्मती ऊर्फ महेश्वर येथें राहत असे. हा कर्ममीमांसामार्गी व कुमारिलभट्टाचा अनुयायी होता. आद्य शंकराचार्यांच्या काळांत कर्ममीमांसामार्गाचा मंडनमिश्र प्रमुख प्रवर्तक असल्यामुळें शंकराचार्यांना आपल्या संन्यासमार्गाचा प्रसार करण्यापूर्वी याच्याशीं जो वादविवाद करावा लागला, त्याची अत्यंत मनोरंजक हकीकत शंकरदिग्विजयांत दिली आहे. शेवटीं शंकराचार्यांनीं मंडनमिश्राचा वादांत पराभव केला, व मंडनमिश्र संन्यासमार्गाचा अनुयायी बनला. यालाच सुरेश्वराचार्य हें दुसरें नांव आहे. पुढें त्याची शृंगेरीच्या पीठावर शंकराचार्यांनीं स्थापना केली.

**सुलतानपूर**—संयुक्त प्रांतांत, फैजाबाद विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. १,६९९ चौ. मै.. हा जिल्हा बहुतेक सपाट परंतु वायव्येकडून आग्नेयेकडे किंचित् उतरता होत गेलेला असून यांतून गोमती ही मोठी नदी व पुष्कळ लहान लहान प्रवाह वाहत जातात. येथील हवा विशेष कडक नसून आरोग्यकारक आहे. पाऊस सरासरी ४३ इंच पडतो.

रामचंद्राचा पुत्र कुश यानें जुनें सुल्तानपूर स्थापन केलें असून त्याला ‘कुश-भवनपुर’ असें नांव होतें. मुसलमानांनीं हा जिल्हा जिंकण्यापूर्वी येथें भर लोकांचा अमल होता. पंधराव्या शतकांत हा जिल्हा जोनपूरच्या राज्यांत असून, लोदी घराण्याच्या ऱ्हासानंतर तो दिल्लीच्या साम्राज्यांत गेला. अकबरानें केलेल्या वांटणींत हा जिल्हा अयोध्येच्या सुभ्यांत व अंशतः अलाहाबादच्या सुभ्यांत मोडत असे; परंतु पुढें २५० वर्षांनीं सर्व जिल्हा अयोध्येच्या नबाबाच्या ताब्यांत गेला. १८५६ त इंग्रजांनीं अयोध्या प्रांत आपल्या राज्यास जोडला, त्या वेळीं हा जिल्हाहि त्यांच्या ताब्यांत गेला. १८५७ च्या बंडाच्या वेळीं सुल्तानपूर येथील शिपायांनीं बंड केलें होतें.

ह्या जिल्ह्यांत एक मोठें गांव व २,४५८ खेडीं आहेत. लो. सं. ११,००,६६८. पैकीं शें. ८९ हिंदू व शें. ११ मुसलमान आहेत. येथें अवधी भाषा चालते. शें. ८१ लोकांचा उदरनिर्वाह शेतीवर होतो. तांदूळ हें या जिल्ह्यांतील महत्त्वाचें पीक असून त्याशिवाय हरभरा, गहूं, बार्ली, वाटाणे, मसूर, ऊंस व खसखस हीं पिकें होतात. बंधुआ येथील धातूचीं भांडीं प्रसिद्ध आहेत. धान्य हा मुख्य निर्गत माल असून कापड, मीठ व धातूचीं भांडीं हे मुख्य आयात जिन्नस होत. गोमती नदींतून पूर्वी बराच व्यापार चालत असे. परंतु रस्ते व आगगाड्या झाल्यापासून तो कमी झाला आहे. सुलतानपूर, गौरीगंज, रायपूर व बाजार सुकुल येथील बाजार मोठे आहेत. सुलतानपूर येथें वार्षिक जत्रा व शेतकीप्रदर्शन हीं भरतात. शिक्षणाच्या बाबतींत हा जिल्हा मागासलेला आहे.

**सुला, लुसिअस कॉर्नेलिअस** (ख्रि. पू. १३८–७८)—एक प्राचीन रोमन सर्वाधिकारी राज्यकर्ता. त्यानें यादवी युद्धामध्यें (९०–८८) जी कामगिरी केली त्याबद्दल त्याला कॉन्सल नेमण्यांत आलें (ख्रि. पू. ८८). आणि आशियाच्या प्रदेशांत जाऊन तेथें मिथ्रिडेट लोकांविरुद्ध युद्ध करण्याची कामगिरी त्याला करावी लागली. त्यानें मिथ्रिडेट सैन्याला युरोपांतून पिटाळून लावलें (८६); व आशियामध्यें प्रवेश केला (८४), आणि सर्वत्र विजय मिळवून मिथ्रिडेट लोकांना तह करणें भाग पाडलें. नंतर तो इटलींत परत आला आणि ब्रुंडुसियम येथें आपल्या ४० हजार सैन्यासह दाखल झाला (ख्रि. पू. ८३). तेथें त्याला त्याचे अनेक मित्र येऊन सामील झाले. कारण या मित्रांना सुलाचा प्रतिस्पर्धी मारियस यानें रोममधून हद्दपार केलें होतें. त्यानें रोमन सैन्याविरुद्ध चार लढायांत विजय मिळविला, आणि टेलेसिनस याच्या आधिपत्याखालील सॅम्नाईट सैन्याचा पराभव केला. याप्रमाणें विजय मिळवून त्यानें रोम शहरांत ८२ सालीं प्रवेश केला. आणि तावडतोब सुमारें ६।७ हजार युद्धकैद्यांना ठार मारलें. तो ८२–७९ पर्यंत रोमन साम्राज्याचा सर्वाधिकारी (डिक्टेटर) होता.

**सुलिव्हान, लुई हेन्री** (१८५६–१९२४)—एक अमेरिकन शिल्पज्ञ. आपल्या वयाच्या १६ व्या वर्षी हा मॅसाच्युसेट्स येथील शिल्पसंस्थेंत विद्यार्थी होता, व १७ व्या वर्षी यानें शिकागो शहरांत झालेल्या अग्निप्रलयानंतर जीं घरें बांधण्याची योजना निघाली तींत नकाशे काढण्याचें काम केलें. नंतर यानें फ्रान्समध्यें जाऊन पॅरिस येथें शिक्षण घेतलें, व तेथून परत आल्यावर इमारती बांधण्यास सुरुवात केली. यानें बांधलेली शिकागो शहरांतील पहिली इमारत म्हणजे ऑडिटोरियम ही होय. तरत्या पायावर बांधलेली एवढी मोठी भव्य इमारत ही पहिलीच होय. यानें उंच उंच घरें बांधण्यांत विशेष प्रावीण्य दाखविलें. यानें एकच ग्रंथ लिहिला असून त्याचें नांव ‘एका कल्पनेची आत्मकथा’ या अर्थाचें आहे.

**सुलेमान** (दुसरा) (१४९५–१५६६)—तुर्कस्तानचा एक सुल्तान. हा पहिला सेलीम याचा एकुलता एक मुलगा असून सेलीमनंतर १५२० सालीं गादीवर बसला. त्यानें १५२२ सालीं ऱ्होड्स बेट जिंकलें. नंतर त्यानें आपल्या सैन्यासह हंगेरीवर हल्ला केला आणि मोहॅक्स येथील लढाईंत जय मिळविला. आणि बुडा व पेस्ट हीं शहरें काबीज केलीं. नंतर त्याच्या सैन्यानें इराणचा बराच मुलूख जिंकून घेतला. १५४१ सालीं त्यानें हंगेरीपैकीं बराच मोठा भाग पुन्हां पादाक्रांत केला.

**सुलेमान पर्वत**—हिंदुस्थानच्या वायव्येकडील प्रांतांत डेरा इस्माईलखानाच्या सरहद्दीवरील ह्या पर्वतश्रेणी असून सिंधु नदी व अफगाणिस्तान या दोहोंच्यामधील ही एक भरभक्कम सरहद्दीची भिंतच आहे. पर्वताच्या मुख्य भागाला ‘तख्त–ई–सुलेमान’ असें म्हणतात. १८८३ सालीं या तख्ताची पाहणी करण्याकरितां एक मोहीम निघाली होती. ह्या पर्वतश्रेणी समान्तर रेषेनें दक्षिणोत्तर पसरलेल्या आहेत. ‘तख्त’ नांवाचें प्रसिद्ध शिखर (उंची ११,०७० फूट) पूर्व रांगेंतील दक्षिण बाजूस असून पश्चिम रांगेंतील उत्तर टोंकावर कैसरगड नांवाचें दुसरें उंच शिखर (उंची ११,३०० फूट) आहे. शिखरावर पाणी आढळून येत नाहीं.

**सुवर्णदुर्ग**—मुंबई, रत्नागिरी जिल्हा. हरणईच्या कांहींना उत्तरेस किनाऱ्यापासून पाव मैलावर समुद्रांत खडकावर हा किल्ला बांधलेला आहे. किल्ल्याचा तट अतिशय उंच असून मजबूत आहे. ओहोटीच्या वेळीं तटाबाहेर फिरतां येतें. हा किल्ला विजापूरकरांनीं बांधला असावा. १६६० च्या सुमारास तो शिवाजीनें घेतला व त्यानें आरमार तेथें ठेवलें. १६९८ त कान्होजी आंग्रे तेथें राहूं लागला. १७१३ त शाहूनें तो आंग्र्यास दिला. पुढें तुळाजीच्या प्रकरणामध्यें कमोडोर जेम्स यानें हा १७५५ मध्ये

घेतला व पेशव्यांच्या हवालीं केला. १८०२ मध्यें दुसऱ्या बाजीरावानें आपले कुटुंब येथें ठेवलें होतें. परंतु तें होळकराच्या हातीं लागलें. १८०३ मध्यें पेशव्याकरितां इंग्रजांनीं हा सर केला. १८१८ त केनेडीनें हा घेतला.

**सुवर्णभस्म**—एक आयुर्वेदीय औषध. हें भस्म अतिशय शक्तिवर्धक आहे. आयुर्वेदांत क्षयरोगामध्यें सुवर्णाचे अनेक कल्प दिले आहेत. कोरडा खोकला, अंगाची जळजळ, संध्याकाळीं ताप येणें, डोकें अतिशय दुखणें, सन्निपात ज्वरानंतर येणारा अतिशय अशक्तपणा, मैथुनामुळे झालेला धातुक्षय, इत्यादि विकारांवर या औषधाचा उत्कृष्ट प्रभाव दिसतो. ॥· ते १ गुंज मध, च्यवनप्राश, लोणी-खडीसाखर, किंवा दूधसाखर यांबरोबर घेतात.

**सुवर्णमालिनीवसंत**—एक आयुर्वेदीय औषध. यांत सुवर्णभस्म, मौक्तिक भस्म, मिरे व कलखापरी, हीं औषधें मुख्य असून प्रथम गायीच्या लोण्यांत नंतर लिंबाच्या रसांत खल करतात. जीर्णज्वर, कमालीचा अशक्तपणा, इत्यादि लक्षणांवर हें एक अप्रतिम औषध आहे. धातुवर्धक व कामोत्तेजक म्हणूनहि वापरण्याचा फार प्रघात आहे. अतिसार, सांधे दुखणें, जीर्णव्रण, नेत्ररोग, सर्वसामान्य अशक्तपणा, प्रदर, स्वप्नावस्था, धातुक्षय, इत्यादि लक्षणांवर या औषधाचा हटकून उपयोग होतो. 'सर्वरोगे वसन्तः' असें शास्त्रवचन आहे. १ ते २ गुंजा लोणी-खडीसाखर यांबरोबर घेतात.

**सुवर्णमाक्षिक**—अनेक धातूंच्या गंधकिदास धातुशास्त्रामध्यें माक्षिक (पायराइट) हें नांव देण्यांत येतें; उदा., सुवर्ण-रौप्य-लोह-कास्य माक्षिक. विशेषतः ताम्र आणि लोह यांच्या गंधकिदास ही संज्ञा वापरतात. सुवर्णमाक्षिक भस्म हें अतिशय वृष्य रसायन आहे. मूळव्याध, सूज, नेत्ररोग, पांडुरोग, प्रमेह, इत्यादि विकारांवर या औषधाचा चांगला उपयोग होतो. डोळे लाल होणें, पित्त अतिशय वाढणें, सर्वांगाचा दाह होणें, अशक्तपणा फार वाटणें, मूळव्याधींतून रक्त अतिशय जाणें, धातुक्षय, इत्यादि विकारांवर हे रामबाण आहे. १ ते २ गुंजा लोणी-खडीसाखर, मध, तूप, दूधखडीसाखर यांबरोबर देतात.

**सुवर्णराजवंगेश्वर**—एक आयुर्वेदीय औषध. यांत वंगभस्म, पारागंधक कज्जली व नवसागर हीं मुख्य औषधें आहेत. जुनाट परम्यावर हें अतिशय नांवाजलेलें औषध आहे. उपदंश, नपुंसकत्व, उपदंशामुळे अंगावर उठणारे पुरळ, फोड, इत्यादि विकारांवर या औषधाचा चांगला उपयोग होतो. सांधे दुखणें, शरीराच्या कोणत्याहि भागांत पू होणें, बारीक ताप येणें, मूत्रेंद्रियाचा अशक्तपणा, धातुक्षय, इत्यादि विकारांवर हें प्रभावशाली औषध आहे. १ ते २ गुंजा मध, आर्द्रकावलेह, मोरावळा यांत देतात.

**सुश्रुत**—एक आयुर्वेदकीय ग्रंथ व ग्रंथकार. हा विश्वामित्राचा मुलगा. यानें बापाच्या आज्ञेवरून लोककल्याणाकरितां काशीस जाऊन धन्वतरि याच्याजवळ अभ्यास केला व अभ्यास पूर्ण झाल्यावर त्यानें आपल्या नांवाचा एक ग्रंथ केला. या ग्रंथांत शारीर आणि शस्त्रक्रिया या सांगितल्या आहेत व दुसऱ्या ग्रंथांपेक्षां यांत वैद्यकाचीं तत्त्वें जास्ती चांगलीं आहेत. या ग्रंथाचीं पांच स्थानें असून एकंदर एकशें-वीस अध्याय आहेत. या ग्रंथाचा 'उत्तर तंत्र' म्हणून जो भाग आहे तो या सुश्रुताचार्यानें लिहिलेला नसावा असें कित्येकांस वाटतें.

इंग्रजी ग्रंथकारांच्या मतांप्रमाणें, चरक आणि सुश्रुत हे दोन्ही ग्रंथकार सुमारे इसवी सन सुरू होण्याच्या पूर्वी दहाव्या किंवा नवव्या शतकांत होऊन गेले असावे असे आहे.

**सुषोमा**—ऋग्वेदामध्यें (१०.७५,५) नदीस्तुतींत एका नदीचें हें नांव आहे. ही नदी कोणची हें निश्चित नाहीं, पण मेगॅस्थिनीजच्या वेळची सोॲनॉस किंवा अर्वाचीन सुवान् नदी ही असावी असें कांहींचें मत आहे.

**सुसर**—मगर पाहा.

**सुसा**—सुशान. हें इराणांतील प्राचीन शहर सुशियाना-(एलाम)ची राजधानी होय. हें शहर केर्खा आणि डिझ्फूल यांच्या मधील मैदानांत वसलेलें होतें. या ठिकाणीं दरायस (पहिला) व त्याच्यामागून आलेले राजे राहत असत. १४ व्या शतकापर्यंत हें भरभराटलेलें असून रेशीम, ऊंस, नारिंगें यांविषयीं प्रसिद्ध असे. या भागांत केलेल्या उत्खननांत इतर अवशेषांबरोबर एक महत्त्वाचें म्हणजे खमुरब्बीचें कोड सांपडलें.

**सुस्ती**—(डॉर्मंट स्टेट). वर्षांतील कांहीं काळ कांहीं प्राणी सुस्त स्थितींत घालवितात त्यास सुस्तीचा काल म्हणतात. शीत आणि समशीतोष्ण कटिबंधामध्यें हिंवाळ्यांत कांहीं प्राणी निद्रितावस्थेंत असतात व या कालास सुप्तावस्था (हायबर्नेशन) असें म्हणतात. पाकोळ्या, अस्वलें व कांहीं तीक्ष्णदंती जातीचे खारीसारखे प्राणी, तसेंच भूजलचर प्राणी व कांसवे, पाली, सर्प, बेडूक, वगैरे जातींचे प्राणी, तसेंच गोगलगाईच्या कांहीं जाती व इतर कीटक पूर्णपणें निद्रितावस्थेंत कांहीं काल घालवीत असतात. या अवस्थेमध्यें या प्राण्यांच्या शरीरांतील उष्णमान बरेंच खालीं जातें व तें केव्हां केव्हां ४०° ते २०° फारेन-पर्यंत खालीं जातें. बहुधा तें सभोंवतालच्या वातावरणाच्या उष्णमानापेक्षां किंचित् वर असतें. बेडूक वगैरेसारख्या जमीन व पाणी या दोन्ही ठिकाणीं राहणाऱ्या प्राण्यांमध्यें ही निद्रितावस्था अगदीं सामान्य असते. याच्या उलट उष्ण कटिबंधामध्यें कांहीं सुसरी व सर्प सुस्तीमध्यें कांहीं काल घालवितात. यास ग्रीष्मातपमूर्च्छा (ईस्टिव्हेशन) असें म्हणतात. कांहीं वनस्पतींमध्येंसुद्धां अशी सुस्त अवस्था प्रतिकूल

परिस्थितीमध्यें कांहीं कालपर्यंत आढळून येते व अनुकूल परिस्थितींत त्या आपल्या क्रिया योग्य प्रकारें करूं लागतात. उदा., बीमध्यें अंकुर उत्पन्न होण्याची जी शक्ति असते तो विशिष्ट योग्य उष्णमानाइतकें उष्णमान होईपर्यंत सुप्त स्थितींत राहते व योग्य उष्णमान व आर्द्रता मिळाल्यावरोबर अंकुर फुटतो. कांहीं सूक्ष्म जंतू आपल्याभोंवतीं एक प्रकारचें आवरण तयार करून योग्य परिस्थिति येईपर्यंत सुप्तावस्थेंत पडून राहतात.

**सुहा**—हा राग काफी थाटांतून निघतो. या रागांत धैवत स्वर वर्ज्य आहे म्हणून याची जाति षाडव-षाडव आहे. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय दोन प्रहर मानितात. या रागांत मेघ व कानडा या रागांचें मिश्रण आहे. मध्यरात्रीं गायिला जाणारा जो नायकी कानडा नांवाचा राग त्याचा हा राग दिवसाचा जबाब आहे, असें तज्ज्ञांचें मत आहे. हा एक कानड्याचा प्रकार आहे.

**सूचिकटाहन्याय**—अगदीं लहान आणि अति मोठें अशीं दोन कामें एका काळीं प्राप्त झालीं असतां लहान काम अगोदर करावें. याविषयीं दृष्टांत घेतात तो असा—सुई व कढई हीं दोन घडवावयाचीं असतां लोकव्यवहारांत सुई आधीं घडवतात.

**सूचिक्रमांक**—( इंडेक्स नंबर्स ). अनेक जिनसांच्या भावांत पडणाऱ्या फरकांचें मान दाखविण्याची ही एक पद्धति आहे. कांहीं मालांचे भाव पाहून हा सूचिक्रमांक गणितानें काढण्यांत येतो. यावरून कांहीं विशिष्ट कालांतील भावांचे चढउतार कळून येतात. मजूर खातें हे क्रमांक तयार करून देत असतें. यावरून प्रपंचाला लागणाऱ्या खर्चाचें मान समजून येतें व नोकरांना जादा पगार किंवा भत्तावणी द्यावी कीं नाहीं हें ठरवितां येतें.

गेल्या महायुद्धांत जिनसांचे भाव हिंदुस्थान व इतर सर्व देशांतून फार वाढले. १९१३ मध्यें १०० क्रमांक धरला तर १९१७ मध्यें तो १४५ पर्यंत चढला. १९२० मध्यें युद्ध संपल्या-नंतर तर त्यानें उच्चांक गांठला. नंतर १९३०–३१ च्या पुढें मंदाई सुरू झाली. पण दुसरें महायुद्ध १९३९ सालीं सुरू झाल्यानें क्रमांक चढूं लागला. १९४४ सालीं सरसकट भावांचा क्रमांक २११ होता. युरोपांतल्या कोठल्याहि राष्ट्रांत इतका क्रमांक नव्हता. जर्मनींत तर सुमारें ८६ होता. १९४५ सालीं उतार पडतो न पडतो तोंच त्या वर्षाअखेरपासून पुन्हां चढूं लागला.

**सूचिपतन**—( डिपिंग नीडल ). पृथ्वीच्या चुंबकीय बलाची दिशा दाखविणारें यंत्र. एका आडव्या आंसावर एक हलका चुंबकमय केलेला पोलादी दांडा बसविलेला असतो. त्याच्या आंस बहुधा या दांड्याच्या जड केंद्रांतून जाणारा असतो. ज्या वेळीं ही सूचि चुंबकीय विषुववृत्तावर नसलेल्या कोणत्याहि ठिकाणीं ठेव-ण्यांत येते तेव्हां ती खालीं वांकते व चुंबकीय शक्तीची दिशा दाखविते. या सूचीचा चुंबकीय आंस आणि क्षितिज यांमधील कोनाला नति म्हणतात. हा कोन चुंबकीय ध्रुवांशीं ९०° व चुंबकीय विषुववृत्ताशीं ०° असतो.

**सूचीकरण**—( इंडेक्सिंग ). ग्रंथांतील विषय पाहण्यास सोयें जावें म्हणून ग्रंथाला शेवटीं एक सूचि जोडीत असतात. ही अकारविल्हानें लाविलेली असते व नांवापुढें मूळ ग्रंथांतील पृष्ठांक दिलेला असतो. अशी सूचि करण्यास उच्च दर्जाचें ज्ञान व चारकावा लागतो. सूचीचे ग्रंथसूचि व पत्रसूचि असे दोन प्रकार आहेत. पत्रसूचींत नोंदी पत्रांवर उतरलेल्या असतात. या पत्रसूचींत जास्त सोय अशी होते कीं, नवीन नोंदी त्या त्या जागीं घाल्तां येतात. ग्रंथनामें, व्यक्तिनामें, विषयनामें, वगैरेंच्या नोंदी सूचींत घेण्यांत येतात; व ज्या प्रकारच्या नोंदी पाहिजेत त्या प्रकारच्या अशा सूचिपद्धतीप्रमाणें व्यवस्थेशीर ठेवतां येतात. व्यापारी लोक ग्राहकांची सूचि ठेवतात. ग्रंथालयांतून ग्रंथांच्या सूचि असतात. ( ग्रंथालयशास्त्र पाहा ).

**सूचौ**—हें चीनमधील क्रिआंगसु प्रांतांत मोठें शहर असून तें ग्रँड कॅनॉलच्या कांठीं शांघायपासून ५० मैलांवर आहे. या शहरांतून पुष्कळ कालवे गेलेले आहेत. या शहराच्या भोंवतालच्या भिंतीच्या-बाहेर बरींच उपनगरें वसलेलीं आहेत. रेशमाच्या धंद्याचें हें महत्त्वाचें केंद्र आहे. परकी व्यापाऱ्यांना हें शहर १८९६ सालीं खुलें करण्यांत आलें. लोकसंख्या ५ लक्ष आहे.

**सूत**—१. यजुर्वेद संहितेंत व पुढील श्रौत ग्रंथांत ग्रामणीबरोबर उल्लेख असलेल्या एका राजदरबारांतील नोकराचें हें नांव आहे. महाभारतकालांत सूत म्हणजे राजाचा बंदिजन किंवा भाट असा अर्थ आहे. यजुर्वेदाच्या निरनिराळ्या संहितांतील शतरुद्रीय प्रकरणांत सूत याला अहन्ति, अहन्त्य, अहन्त्व असे शब्द लाविले आहेत. यावरून सूत हा भाट व वादन करणारा असा दोन्ही प्रकारचा मनुष्य होता असें दिसतें. भाटपणा व वादन हे दोन्ही गुण एकत्र असलेले अन्यत्र कोठेंहि आढळत नाहींत. सूतांचा देश अनूप होय.

२. ब्राह्मण आणि क्षत्रिय यांच्या संबंधापासून झालेली एक जात. यांना रथकार म्हणतात. यांचा दर्जा क्षत्रिय आणि वैश्य यांमधला असतो. कीचक या जातींतील होता. सूतांना वेदाधिकार असतो, पण मागधांना नसतो.

**सूतशेखर**—एक आयुर्वेदीय औषध. यांत पारागंधक कज्जली, सुवर्णभस्म, टांकणखारलाही, बचनाग, सुंठ, मिरें, पिंपळी, धोत्रा बी, ताम्रभस्म, दालचिनी, तमालपत्र, वेलदोडे, नागकेशर, शंख-भस्म, बेलफळांतील गर व कचोरा, हीं मुख्य औषधें असून माक्याच्या रसांत खल करतात. पित्ताची मात्रा म्हणून हें औषध सर्वांच्या परिचयाचें आहे. चक्कर येणें, आम्लपित्त, भूक न लागणें, दाहा-

पायाला गोळे येणें, विटाळशेपणीं पोटांत दुखणें, पित्त होणें, डोकें दुखणें, हातापायांची व डोळ्यांची आग होणें, इत्यादि विकारांवर हें औषध अतिशय उपयुक्त आहे. १ ते २ गुंजा आल्याचा रस, खडीसाखर, दाडिमावलेह, दूधखडीसाखर यांबरोबर देतात.

**सूतसंस्कृति-वाङ्मय**—रामायण, महाभारत व पौराणिक वाङ्मय यांच्या पाठीशीं 'सूतसंस्कृति' आहे. सूतसंस्कृति ही आर्यन् संस्कृति असून हिचा विस्तार पूर्वेस बिहारपर्यंत, दक्षिणेस दंडकारण्यापर्यंत होता व बहुतकरून सिंहलद्वीपांतहि हीच नांदत होती. या संस्कृतींत शिव व विष्णु हीं दैवतें होतीं व विद्याधर, गंधर्व, अप्सरा, यक्ष, राक्षस, किन्नर, पिशाच, इत्यादि देवयोनींवर विश्वास होता. हींत अग्निधर्म संपुष्टांत आलेला, पण थोडाबहुत शिल्लक होता. या संस्कृतीचें वाङ्मय वीरकथा, दृष्टांतादाखल उपदेशपर कथा वगैरे होतें. या संस्कृतींत मुनि व यति हे दोन परमार्थात वाहिलेले वर्ग असावेत, पण ऋषी असतील कीं नाहीं ही शंका आहे. सूतसंस्कृतीचा ऐतिहासिक काल म्हणजे दाशराज्ञ-युद्धपूर्व हजारों वर्षांचा काल होय. या कालांतच दाशरथी रामाचा काल येतो.

मंत्र संस्कृतीच्या लोकांचा व सूतसंस्कृतीच्या लोकांचा संबंध आल्यावर दोहोंची मिळून एक संस्कृति गंगेच्या कांठीं निर्माण झाली. हे एकीकरण यज्ञविकासकालीं म्हणजे यजुर्वेदकालीं झालें. त्या दोन संस्कृतींच्या मिलाफामुळें एकमेकांवर झालेले परिणाम पुढें दिल्याप्रमाणें आहेत.

( १ ) सूतसंस्कृतीशीं संबंध जोडण्यासाठीं पौराणिक ग्रंथांतील प्राचीन राजांचीं नांवें यज्ञविधीशीं जोडण्यांत आलीं. ( २ ) इतिहासपुराणादि वाङ्मयांस व नाग, गंधर्व पिशाच्चादि वर्गांस यज्ञविधींतील दिवस वांटले गेले. ( ३ ) शिव-विष्णूंची अर्वाचीन काळीं परिचित स्वरूपें त्यांच्या तत्कालीन कथांसह वेदग्रंथांत व यज्ञमंत्रांत शिरलीं. ( ४ ) या दोघांच्या संपर्कानें यज्ञकर्म तात्पुरतें विस्तीर्ण झालें, व पुढें देवांची उचल होऊन यज्ञकर्म संपुष्टांत आलें आणि भारतीय संस्कृतीस पुन्हां सूतसंस्कृतीचें वळण मिळालें आणि वैदिक संस्कृति केवळ अंगास चाटून गेल्यासारखें झालें. फरक एवढाच कीं, यज्ञकर्तेपणामुळें उत्पन्न झालेली ब्राह्मण-ज्ञाति पुढें जातिस्वरूप पावून हिंदुस्थानच्या एकंदर वाङ्मयास आणि आयुष्यक्रमास विशिष्ट वळण लावती झाली. तिनें स्थानिक संस्कृति जशी असेल तशीच घेऊन तिचे विधिनिषेध, उत्सव, वाङ्मय, सणवार यांच्यामध्यें व्यवस्थितपणा आणण्यास सुरवात केली. त्यामुळें सर्व सूतसंस्कृतीचें स्वरूप जरी बदललें नाहीं तरी तिच्यावर वेदांस मानणाऱ्या ब्राह्मण जातीचें दडपण पडलें व सर्व संस्कृतीस लोक वैदिक संस्कृतिच म्हणूं लागले.

सूतसंस्कृतीचें जें वाङ्मय आहे तें ब्राह्मणी, बौद्ध व जैन आवृत्तिकारांनीं विकृत केलेलें असें आहे आणि त्यामुळें सूत-संस्कृतींतील एखाद्या कथेचें खरें स्वरूप काय असावें हें आज केवळ अनुमानानेंच काढावयाचें आहे. महाभारत हें त्या प्रकारच्या कथांचें मुख्य संग्रहस्थान आहे. कांहीं सूतकथा रामायण व इतर पुराणें यांत ग्रथित झाल्या आहेत तर कांहीं जातकांत व कथासरित्सागरादि ग्रंथांत आहेत.

**सूतिकाज्वर**—(प्युएरपेरल फीव्हर). हा एक तीव्र स्वरूपाचा सांसर्गिक व पूयजन्य ताप असून तो स्त्रियांस प्रसूतीनंतर प्रसूति-मार्गात कांहीं संसर्ग झाल्यास उत्पन्न होतो. हा संसर्ग प्रसूतीपूर्वींहि प्रसूतिमार्गामध्यें कांहीं प्राणिज द्रव्यें गेल्यास उत्पन्न होतो. परंतु सामान्यतः हा संसर्ग बाहेरून होत असल्याचें आढळून येतें. याचें प्रथम दिसणारें व नेहमीं आढळणारें लक्षण म्हणजे ताप येणें हें होय. तापाबरोबर नाडीचे ठोके जलद पडूं लागतात, तोंडाची रुचि नाहींशी होते, पोटांत दुखूं लागतें, व सामान्यतः अस्वस्थता उत्पन्न होते. कधीं अशा रोग्यास आपण बरें नाहीं अशी चुकीची भावना उत्पन्न होते व त्यानंतर अंगावर सांसर्गिक पुरळ उठूं लागतो. व इतर सांसर्गिक रोगांचीं चिन्हें दिसूं लागतात. या रोगाचा प्रतिबंध करतां येतो. परंतु अलीकडे जरी या रोगापासून होणारी मृत्युसंख्या कमी असली तथापि तिचें प्रमाण बरेंच आहे.

**सूत्र कृमी**—(जंत). हे आंतड्यामध्यें होतात व यांचा आकार सुतासारखा असतो. जंत हे परोपजीवी कृमी असून यांची वाढ प्राण्यांच्या शरीरांत होते; व ती लहान आंतड्यांत होते. यांचा आकार दोरीच्या तुकड्यासारखा गोल लांबट असतो. यांच्यांत नर आणि मादी निरनिराळीं असून त्यांपासून अंडीं तयार होतात व तीं मलाबरोबर बाहेर पडतात. यांच्या लहान लहान सुतासारख्या जातीहि असतात. जंतांवर सॅन्टोनाइन हें उत्तम औषध आहे.

**सूत्र ग्रंथ**—शिक्षण देण्यास व ध्यानांत ठेवण्यास सुलभ जावें म्हणून निरनिराळ्या वैदिक शास्त्रांवर सूत्रग्रंथ रचण्यांत आले. ब्राह्मणांतील गद्यानुसार लिहिलेली ही विशिष्ट तऱ्हेची सूत्रपद्धति दिसते. यज्ञयागादि नियमांचे मंत्र ध्यानांत ठेवण्यासाठीं जे सूत्रग्रंथ लिहिले गेले त्यांस कल्पसूत्रें म्हणतात. यांपैकीं ज्यांत श्रौतसंस्कार आले आहेत, त्यांस श्रौतसूत्रें; व गृह्यसंस्कार आले आहेत त्यांस गृह्यसूत्रें म्हणतात. धर्मसूत्रें कल्पसूत्राचाच एक भाग असून गृह्यसूत्र व श्रौतसूत्र याप्रमाणें यांचाहि उगम वेदशाखेंतच झाला. धर्म या शब्दांत न्यायतत्त्वें, कर्में, स्मृति, विधि, चारहि वर्णांचे अधिकार, वगैरेंचा समावेश होतो. शुल्ब-सूत्रेंहि कल्पसूत्रांचाच भाग आहेत. त्यांचा श्रौतसूत्रांशीं संबंध असून ते भारतीय भूमितिवरील अतिप्राचीन ग्रंथ होत.

सूत्रांत यजुःशाखेंतील मंत्र देतांना घेतलेल्या मंत्रांचीं फक्त आद्याक्षरें व त्यांच्या स्पष्टीकरणार्थ अथर्ववेद किंवा ऋग्वेद यांतील

पूर्ण मंत्र जोडलेले आहेत. बौधायन व आपस्तंब शाखांचीं जशीं श्रौत, गृह्य, धर्म व शुल्ब अशीं चार सूत्रें आहेत, तशीं सूत्रें प्रत्येक वैदिक शाखेला आहेत असें नाहीं. श्रौत व गृह्य सूत्रांनंतर लिहिल्या गेलेल्या परिशिष्टांत सूत्र ग्रंथांत थोडक्यांत दिलेल्या मंत्रांचें स्पष्ट विवरण आहे. यानंतर प्रयोगपद्धति व कारिका लिहिल्या गेल्या. शिक्षेसंबंधाचीं सूत्रें कल्पसूत्राइतकीं तरी जुनीं असावीं.

**सूर**—एक वाद्य. हा आकारानें सनईच्या दीड पट असतो. रचना सर्व सनईसारखीच असते. पण ह्यास चार भोकें असतात. सनईवादकांस हा सूर म्हणजे गायकास जसा तंबोरा तसा साहाय्यकारी आहे. ह्यायोगें अस्खलित षड्ज स्वराचा पुरवठा होतो.

**सूरकाठी**—एक देशी खेळ. आरंभीं सर्व गड्यांनीं आपआपल्या काठ्या समोर फेंकाव्या. ज्याची काठी सर्वांत अलीकडे पडेल तो चोर. त्यानें आपली काठी डोक्यावर धरून बसावें. नंतर एकानें आपल्या काठीनें त्याची काठी लांब उडवावी व बाकीच्यांनीं ती काठी लांबवीत न्यावी. इकडे चोरानें काठी लांबविणाऱ्यांना शिवण्याचा प्रयत्न करावा; पण ज्यानें धरण्यापूर्वीं आपली काठी एखाद्या दगडावर ठेविली असेल त्याला शिवून चालावयाचें नाहीं. पण दगडावर ठेवण्यापूर्वीं जर चोर त्याला शिवला तर त्याच्यावर राज्य आलें. पहिल्या चोरानें लंगडी घालीत मूळ जागेपर्यंत यावें म्हणजे एक डाव संपला.

**सूर घराणें** (१५४०-१५५५)—दिल्लीच्या तख्तावरील एक राजघराणें. सूर म्हणून घोर प्रांतांतील लोकांची एक जात आहे. या जातींत सूर घराण्याचा संस्थापक शेरखान याचा जन्म झाला. त्याचा आजा इब्राहिमखान जोनपूरच्या जमालखान नामक सरदाराच्या पदरीं नोकरीस होता. इब्राहिमचा पुत्र हसनखान हा जोनपूरच्या राज्यांत पांचशें स्वारांचा असामदार होता. हसनखानाचा वडील पुत्र फरीदखान याजकडे बापाचा सर्व कारभार आला. एके प्रसंगीं शिकारींत फरीदखानानें तरवारीनें वाघ मारिला; यावरून त्याचें शेरखान असें नांव पडलें. त्याच्या भावांत तंटे लागल्यामुळें, त्यानें जोनपूरचें राज्य सोडून आग्र्यास दौलतखान लोदीच्या पदरीं नोकरी धरली. पुढें महमदशहा लोहानी नांवाच्या सरदारानें त्याला बिहार प्रांतांत नोकरी दिली. परंतु मोंगलांनीं बादशाहीपद बळकाविलेलें ह्यास आवडलें नाहीं. मोंगलांस घालवून देऊन अफगाण वंशाकडे बादशाही चालू करावी अशी त्याची इच्छा होती. पुढें बिहार प्रांत त्याच्या ताब्यांत आला. त्यानें चुनारगड आपल्याकडे घेऊन त्याचा बंदोबस्त उत्तम ठेविला. पुढें हुमायूननें त्यावर स्वारी केल्यामुळें तो त्यास शरण गेला. परंतु लवकरच तो किल्ला पुनः मिळवून बंगाल व बिहार प्रांतहि जिंकले व अखेरीस हुमायूनचा पराभव करून बादशाही पद मिळविलें (१५४०). त्यानें ५ वर्षे राज्य केलें. तो १५४५ त मरण पावला. त्याच्यानंतर त्याचा मुलगा जलालखान गादीवर आला. त्यानें ठयाल-घरें बांधून रस्त्यांवरून पोलिस-बंदोबस्त नीट ठेविला. तो १५५३ त मरण पावला.

नंतर सलीमशहाचा पुतण्या मुबारिझखान यानें सलीमशहाच्या फिरोझ नामक मुलास ठार मारून महंमदशहा सूर आदिली या नांवानें तो राज्य करूं लागला. तो अत्यंत दुर्व्यसनी होता. हिमू नांवाच्या एका हिंदूस त्यानें आपला मुख्य प्रधान नेमिलें. ह्यामुळें अफगाण लोकांस आपला अपमान झाला असें वाटून ते आपल्या धन्यावर उठले. महंमदशहानें आपली सर्व संपत्ति हलक्ट व्यसनांत उधळून टाकिली. राज्यांत दंगे सुरू झाले. इब्राहीमखान सूर या नांवाच्या महंमदशहाच्या मेहुण्यानें दिल्लीचें तख्त बळकाविलें. परंतु पुढें अहंमदखान नामक दुसऱ्या एका त्याच्या मेहुण्यानें इब्राहीमचा पराभव करून सिकंदरशहा हें नांव धारण करून दिल्लीचें राज्य मिळविलें.

सिकंदरशहा सूर (१५५४-१५६५) स्वतः शूर होता, पण राज्य करण्याचें चातुर्य त्याच्या अंगीं नव्हतें. हुमायुनास अडविण्यासाठीं त्यानें फौज पाठविली; परंतु बहराम व अकबर ह्यांनीं त्याचा पूर्ण पराभव केल्यामुळें तो डोंगराळ प्रदेशांत पळून गेला व तो अज्ञातवासांत मरण पावला. अशा प्रकारें सूर घराण्याचा शेवट झाला.

**सूरदास** (१४८३-१५६०)—एक हिंदी संतकवि. हा जन्मांध होता. हा वृंदावनामध्यें राहत असे व कवितादि करीत असे. 'सूर-सागर' म्हणून जो ग्रंथ आहे तो याचाच आहे. हा वल्लभाचार्यांचा शिष्य असून त्याच्या आज्ञेनें भागवताचीं जीं अनेक पदें यानें केलीं तीं 'सूरसागर' मध्यें ग्रथित केलीं आहेत. सूरसागर ग्रंथाची सूचि ती 'सूरसारावली'. 'साहित्य लहरी' त दृष्टकूट पदांचा संग्रह आहे. मीराबाईच्या पदांप्रमाणें सूरदासाचीं पदें फार लोकप्रिय आहेत. याची समाधि काशीजवळ शिवपुरीस आहे.

**सूरदासी मल्हार**—हा राग काफी थाटांतून निघतो. या रागांत गांधार व धैवत हे स्वर वर्ज्य आहेत. म्हणून याची जाति औडुव-औडुव आहे. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर मानितात. यांत मध्यम स्वर मुद्दा सोडितात. हा राग मधुमाद व शुद्ध मल्हार यांच्या मिश्रणानें झालेला आहे. अकबर बादशहाच्या वेळीं बाबा सूरदास यानें हा राग प्रचलित केला अशी आख्यायिका आहे. हा एक मल्हार प्रकार आहे.

**सूर सन**—शुहूर किंवा अरबी सन. फसली सन आणि सूर सन यांत नऊ वर्षांचें अंतर आहे. मराठ्यांच्या अमदानींत हा सूर सन फार प्रचलित होता. याच्या वर्षाचा आरंभ मौर म्हणजे सूर्य मृगनक्षत्रीं जातो तेव्हांपासून होतो; पण मोहिने मोहरमादि च

आहेत. सूर सनांत मृगापूर्वी ६०० व मृगानंतर ५९९ वर्षे मिळवून इसवी सन काढतात. जुन्या मोडी कागदपत्रांत 'सु' काढून पुढे दोन रेघा (सु॥) या सनासाठीं देतात. मोडी लकबेमुळें हें चिन्ह 'सुमा' प्रमाणें दिसून चुकीनें तसें वाचण्यांत-लिहिण्यांत येतें.

**सूरसोटा**—हें वाद्य तंबोऱ्यासारखेंच असून फरक एवढाच कीं, ह्यास भोपळा नसतो; परंतु दांडीचें लांकूड एका बाजूस दुसऱ्या बाजूपेक्षां थोडें रुंदट ठेवितात. वस्तुतः हें वाद्य म्हणजे सलग कोरलेली एक दांडीच असते, म्हणूनच त्याला 'सूरसोटा' म्हणतात. त्यावर तारदान, घोडी, अटी व खुंट्या ह्या सर्व तंबोऱ्याप्रमाणें असून ताराहि चारच असतात व त्या तंबोऱ्याच्या तारांप्रमाणेंच स्वरांत मिळवितात. गायक जसा सांथीला तंबोरा घेतो त्याप्रमाणें जंगम, हरिदास तसेंच दारोदार पदें म्हणत भिक्षा मागणारे ह्या सूरसोट्यावर गातांना आढळतात.

**सूर्य**—वैदिक कथांमध्ये सूर्याचें फारच महत्त्व वर्णिलें आहे. (सूर्य आत्मा जगतः तस्थुषश्च, इ.). हें वर्णन हिंदुस्थानांतील निसर्गस्थितींत सूर्याचें जें महत्त्व आहे त्याला अनुरूप असेंच आहे. ऋग्वेदामध्ये सूर्याचें वर्णन तो परोपकारी आहे असें आलेलें आहे. हिमालयाच्या थंड भागांतून जे आर्य लोक आले त्यांना सूर्य असा वाटणें ह्यांत अस्वाभाविक असें कांहींच नाहीं. ऋग्वेदामध्ये ग्रहणाबद्दल अनेक उल्लेख आलेले आहेत. सूर्य हा कालकर्ता असून त्याच्या गतीनें ३६० दिवसांचें वर्ष ठरतें. वैदिक वाङ्मयांत हेंच सौरवर्ष (संवत्सर) व्यवहारांत प्रमाण गणलें आहे. या सौर वर्षाचे दोन भाग कल्पिले आहेत : एक उत्तरायण व दुसरा दाक्षिणायन.

पुराणांतून आदित्य, मित्र, पूषन्, सविता, वगैरे नांवांनीं सूर्याविषयीं उल्लेख आलेले आहेत. सूर्याचा रथ सात घोड्यांचा असून त्याचा सारथी पांगळा अरुण आहे. शनि हा सूर्यपुत्र म्हटला आहे. भारतयोद्धा कर्ण हाहि सूर्यपुत्र होता.

आपणाला आपलें शहर फार मोठें वाटतें. या शहराच्या मानानें आपला देश किती तरी पटीनें मोठा आहे. आणि हा देश खंडाचा एक भाग आहे. हे एक खंड जगांतल्या सात खंडांपैकीं असून हाहि पृथ्वीचा एक विभाग आहे. आपल्या एकट्या पृथ्वीचें क्षेत्रफळ जर इतकें मोठें आहे तर त्या मानानें इतर ग्रहांचें किती असेल याची नुसती कल्पनाच केलेली बरी. पृथ्वीचा व्यास सात हजार नऊशें वीस मैल आहे. परंतु सूर्याचा व्यास या व्यासाच्या शंभर पटींपेक्षांहि जास्त आहे. आपल्या पृथ्वीसारख्या एकशें-दहा पृथ्व्या एकत्र आणल्या म्हणजे जवळजवळ सर्व सूर्य झांकण्याला पुरतील.

अशी कल्पना करा कीं, सूर्याएवढी एक प्रचंड इमारत अगर दुसरा सूर्यच आपणाला तयार करावयाचा आहे, तर ठेकेदाराला चोवीस तास काम करून प्रत्येक तासाला पृथ्वीवर असलेले दगड, धोंडे, माती, इतके सामान घालून एक सूर्य तयार करावयास दीडशेपेक्षां जास्त वर्षें लागतील. गणितशास्त्रज्ञांच्या मतानें सूर्यांतील द्रव्यमान (मास) पृथ्वीच्या ३,३२,००० इतक्या पटीनें असून त्याची दृढता पृथ्वीच्या एक-चतुर्थांश आहे. सूर्याचें वजन दोन-आंकड्यावर सत्तावीस शून्यें इतके टन आहे. पृथ्वीच्या मानानें सूर्य अद्यापि वायुमय अवस्थेंतच आहे.

**सूर्यकिरणांची तीव्रता**—आतांपर्यंत पृथ्वीवर माहीत असलेल्या प्रकाशापेक्षां सूर्याचा प्रकाश जास्त तेजस्वी असून दिव्याच्या उजेडापेक्षां तो दीडशें पटीनें जास्त प्रखर व विजेच्या लखलखाटापेक्षां चौपट प्रखर आहे. तसेंच सूर्याची उष्णताहि अतिशय आहे. आणि ती इतकी आहे कीं, जर ही सर्व उष्णता एकत्र केली तर सव्वा-दोन मैल व्यासाचा आणि ९,३०,००,००० मैल दूरचा एक बर्फाचा गोळा एका सेकंदांत वितळून जाईल, त्याचें पाणी होईल, आणि त्याची वाफ होण्यास आठ सेकंद लागतील. तसेंच सूर्यानें पृष्ठभागावरील उष्णतामान बारा हजार फॅरनहीट असून त्याचें उष्मविसर्जन (रेडिएशन) एका मिनिटाला एक चौरस मीटरमागें दहा लक्ष कॅलरी आहे. लॉर्ड केल्व्हिन म्हणतो कीं, जर सूर्य दगडी कोळशाचा असता तर ज्वलनक्रिये (कंबस्चन) ची जी उष्णता तयार होते ती सहा हजार वर्षें सारखी धुमसत राहील. हीच गोष्ट आपणांस जरा निराळ्या तऱ्हेनें मांडतां येईल. समजा सूर्याची वार्षिक उष्णता १८,००,००,००,००० इतके रुपये किंमतीची वर्षाला आहे; तर पृथ्वीच्या वांटणीला वर सांगितलेल्या रकमेपैकीं वर्षाला अवघ्या नऊ रुपये किंमतीची उष्णता येईल.

आतांपर्यंत सूर्याचा उजेड आणि उष्णता कशी टिकविली जाते याबद्दल शतकानुशतकें वादविवाद झालेला आहे. परंतु त्यापैकीं हेल्महोल्झ या जर्मन शास्त्रज्ञाचें मतच विचार करण्यासारखें आहे.

**हेल्महोल्झचा सिद्धान्त**—दिवसानुदिवस सूर्य आकुंचन होत असल्यामुळें त्या आकुंचनाचा परिणाम म्हणजेच सूर्याची उष्णता होय. हें आकुंचन वर्षाला दोनशेंपन्नास फूट होतें; म्हणजे एक मैल आकुंचन होण्यास २१ वर्षें लागतात. या पद्धतीनें हिशेब केल्यास दहा हजार वर्षांत पृथ्वीवरील उष्णतामान पांच अंशानें कमी व्हावयास पाहिजे. आणि या सिद्धान्ताप्रमाणें दहा हजार वर्षांत पृथ्वीचें उष्णतामान पांच अंशानें कमी झालेलें आहे.

**सूर्याचा पृष्ठभाग**—सूर्याचा पृष्ठभाग वायुमय असून त्याच्या कडा तो वाटोळा दिसेल अशा तऱ्हेनें बनलेल्या आहेत. सूर्याचा पृष्ठभाग सर्वत्र सारखाच चकाकत असतो आणि कडेजवळ जो काळसरपणा दिसतो त्याचें कारण म्हणजे सूर्याभोंवतीं जें वायुमय

आवरण आहे, तें आवरण उघडें खेचून घेतें. तसेंच सूर्यावर कांहीं डाग दिसतात आणि ते सूर्याच्या पृष्ठभागापेक्षां लाल चकाकत असतात. हे सूर्यावरचे डाग म्हणजे एकत्र झालेली वायूंची उष्णता बाहेर सोडणाऱ्या झटक्याच होत. सूर्यांतील वायु दाबांतून सुटून बाहेर पडतो आणि तो बाहेर येतांच एकदम थंड होऊं लागतो. हेंच सूर्यावरील डाग होत. हे डाग सूर्यतेजाच्या मानानें किंचित् काळसर दिसतात इतकेंच.

जरी सूर्यावर डाग दिसतात तरी ते सारखे दिसत नाहींत; तर दर अकरा वर्षांनीं ते जास्त प्रमाणांत दिसतात. हा शोध प्रथमतः १८५२ मध्यें श्वाबे या जर्मन रसायनशास्त्रज्ञानें लावला.

या काळ्या डागांचा पृथ्वीवर परिणाम होतो. त्यांच्या येण्यानें विद्युत् चालून लोहचुंबकत्व निर्माण होतें. हीं लोहचुंबकत्वाचीं वादळें निर्माण होऊं लागलीं म्हणजे उत्तर गोलार्ध आणि दक्षिण गोलार्ध यांमध्यें उषेचा रम्य प्रकाश दिसूं लागतो. आकाशांत रंगीत प्रकाशाचे पडदे सोडल्याचा भास होतो आणि आकाशाला अवर्णनीय शोभा दिसते. हा संधिप्रकाश म्हणजे सूर्यापासून पृथ्वीकडे येणारे अतिसूक्ष्म विद्युत्कण यांचा उजेड असावा.

जर एखाद्या झाडाचें खोड कापलें तर मध्यापासून कडेपर्यंत वाटोळीं वर्तुळें त्यांत दिसतात. परंतु हीं सर्व सारखीं नसतात. पावसाळ्यापेक्षां अगर हिंवाळ्यापेक्षां उन्हाळ्यांत झाडाची वाढ कमी होते, त्यामुळें हा फरक दिसतो. याचाच अर्थ असा कीं, हीं झाडाचीं वर्तुळें म्हणजे उगवतेवेळीं तें झाड जिवंत असलेल्या काळांतील वेळापत्रकच होय. या वेळापत्रकावरून अभ्यास केल्यानंतर असें दिसून आलें कीं, अकरा वर्षांनीं या वर्तुळांच्या वाढींत फरक पडतो. आणि सूर्यावरील काळे डाग दर अकरा वर्षांनीं जास्त येतात. हे डाग ज्या वेळीं जास्त येतात त्या वेळीं उन्हाळ्यांत दमटपणा आणि ओलावा जास्त निर्माण होतो. झाडें जास्त गतीनें फोफावतात, आणि खोडांतील वर्तुळें जास्त दाट होतात.

सूर्याचें स्वतःभोंवतीं भ्रमण—जर या काळ्या डागांकडे बारीक निरखून पाहत गेलों तर आपणांस असें दिसून येईल कीं, हे डाग एके ठिकाणीं न राहतां सारखे सरकत जातात. यावरून आपणांस असें दिसेल कीं, सूर्य इतर ग्रहांप्रमाणें स्वतःभोंवतीं फिरतो.

वास्तविक पाहतां सूर्याची स्वतःभोंवतीची फेरी २५$\frac{1}{2}$ दिवसांत होते. परंतु पृथ्वी ही स्वतःभोंवती व सूर्याभोंवतीं फिरत असल्याकारणानें पृथ्वीवरून ही फेरी २७$\frac{1}{4}$ दिवसांत होते असें दिसतें. अर्थात् हें आवर्तमान सूर्यावरील विषुववृत्ताचें आहे. या फेरीमुळें चौदा दिवस सूर्यावरील डाग दिसतात. सूर्य एका मोठ्या प्रचंड ग्रहमालिकेंतील एक ग्रह असल्यामुळें तो आपल्याभोंवतीं ही सूर्यमाला घेऊन फिरतो त्या मालेंतील ग्रह आपणाला ठाऊक आहेत.

कित्येक वेळां चंद्र मध्यंतरीं आल्याकारणानें सूर्याचा प्रकाश पृथ्वीवर पोहोंचूं शकत नाहीं. त्यामुळें ग्रहणें लागतात. तसेंच दुसरें ग्रहण लागण्याचें आणखी एक कारण म्हणजे सूर्य, चंद्र, आणि पृथ्वी एकाच पातळीवर येतात. इतर वेळीं त्यांची पातळी वेगवेगळी असते. चंद्रग्रहणाच्या वेळीं सूर्य आणि चंद्र यांच्या पातळीवर पृथ्वी येते, आणि चंद्रग्रहण लागतें. ( ग्रहणें पाहा ).

पृथ्वीपासून सूर्याचें अंतर, काढण्याचा खटाटोप पुष्कळ दिवस चालू होता. कासीनि या शास्त्रज्ञानें सूर्याचें अंतर ८,७०,००,००० मैल इतकें ठरवलें. परंतु १८९८ सालीं इरॉस या अगदीं छोट्या ग्रहाचा शोध लागला. आणि सूर्याचें अंतर काढणें गणितशास्त्रज्ञांना सोपें गेलें. आणि त्यावरून पृथ्वीपासून सूर्य अंदाजें ९,३०,००,००० मैल आहे असें शास्त्रज्ञांनीं ठरविलें.

सूर्यमाला—तेजोमेघापासून सूर्यमाला निघाली. या सूर्यमालेंत सूर्यानंतर बुध, शुक्र, पृथ्वी, मंगळ, गुरु, शनि, प्रजापति व वरुण असे ग्रह एकापुढें एक आहेत. या ग्रहांखेरीज लघुग्रह व धूमकेतूहि आहेत. कांहीं ग्रहांच्याभोंवतीं पुन्हां उपग्रह फिरत आहेत. प्रजापति ( युरेनस ) व वरुण ( नेप्च्यून ) हे ग्रह प्राचीन लोकांस माहीत नव्हते. त्यांचा शोध अलीकडला आहे. सूर्यकेंद्रीय ग्रहमालेचा सिद्धान्त ख्रि. पू. ३ ऱ्या शतकांत आरिस्टार्कसनें प्रथम मांडला. १५ व्या शतकापर्यंत तो लुप्त झाला होता असें दिसतें. कोपर्निकसनें हा शोध पुन्हां उजेडांत आणला. सूर्यमालेंतील ग्रहांच्या कक्षांसंबंधीं नियम केप्लरनें काढलेले सर्वमान्य झाले व न्यूटनच्या गुरुत्वाकर्षणाच्या सिद्धान्ताची जोड मिळून सूर्यमालेची स्थिरता सिद्ध झाली.

सूर्यमालेंतील ग्रह—

| ग्रह | सूर्यापासून दशलक्ष मैलांत अंतर | प्रदक्षिणेचा काळ ( वर्षे ) | व्यास ( मैलांत ) | गुरुत्व ( पृथ्वी=१ ) |
|---|---|---|---|---|
| सूर्य | — | — | ८६४,१०० | ०.२६ |
| बुध | ३५.९५ | ०.२४१ | २,९७६ | १.०० |
| शुक्र | ६७.२६ | ०.६१५ | ७,६२१ | ०.९५ |
| पृथ्वी | ९२.९० | १.००० | ७,९१३ | १.०० |
| मंगळ | १४१.५० | १.८८१ | ४,२१६ | ०.७२ |
| गुरु | ४८३.३० | ११.८६२ | ८८,७०० | ०.२४ |
| शनि | ८८६.१० | २९.४५८ | ७५,१०० | ०.१२ |
| युरेनस (हर्शल) | १,७८२.८० | ८४.०१५ | ३०,९०० | ०.२५ |
| नेप्च्यून (वरुण) | २,७९३.५० | १६४.७८८ | ३३,००० | ०.२४ |
| प्लूटो | ३,६६२.०० | २४९.७ | ३,६००? | [illegible] |

सूर्यमार्गावरील नक्षत्रें—पुढील सत्तावीस नक्षत्रांपैकीं क्र. १ ते १२, १५, २२, २३, व २५ ते २७ विषुववृत्ताच्या उत्तरेस, क्र. २४ विषुववृत्तरेषेवर आणि बाकी क्र. १३, १४ व १६ ते २१ हीं विषुववृत्ताच्या दक्षिणेस आहेत. यांचे साधारणपणें दिसणारे आकार पुढीलप्रमाणें आहेत—

(१) **अश्विनी**—एक ठळक व दोन बारीक ताऱ्यांचा विशालकोन त्रिकोण (२) **भरणी**—तीन बारीक ताऱ्यांचा समभुज त्रिकोण (३) **कृत्तिका**—एक ठळक व चार बारीक अशा पांच ताऱ्यांचा वस्तऱ्यासारखा झुबका. (४) **रोहिणी**—एक मोठा व चार लहान अशा पांच ताऱ्यांचा समद्विभुज त्रिकोण. (५) **मृग**—एक मोठा व तीन लहान अशा ताऱ्यांची चौकट. मध्यें तीन ताऱ्यांचा शर व तीन ताऱ्यांचा त्रिकोण. (६) **आर्द्रा**—मृगांतील तांबडी ठळक चांदणी. (७) **पुनर्वसु**—चार ठळक ताऱ्यांचा समांतरभुज चौकोन. सर्व ग्रह यामधून जातात. (८) **पुष्य**—बारीक ताऱ्यांचा झुबका व दोन्हीकडे दोन तारे. (९) **आश्लेषा**—एक मोठा व चार लहान अशा पांच ताऱ्यांचा गुच्छ. (१०) **मघा**—चार लहान व मध्यें एक मोठा अशा पांच ताऱ्यांचा तंबूचा आकार. (१२) **उत्तरा**—एक मोठा व एक लहान अशा ताऱ्यांची जोडी (पूर्वेकडील). (१३) **हस्त**—पांच ताऱ्यांचा पांच बोटें उघडलेल्या पंजासारखा गुच्छ (दक्षिणेस). (१४) **चित्रा**—एकच मोठा सुटा तारा (हस्ताच्या पूर्वेस). (१५) **स्वाती**—एकच ठळक सुटा तारा (चित्राच्या उत्तरेस). (१६) **विशाखा**—(तोरण) दोन मोठे व दोन लहान अशा ताऱ्यांचा चौकोन. (१७) **अनुराधा**—तीन मोठे व एक लहान अशा चार ताऱ्यांची रेषा (दक्षिणोत्तर). (१८) **ज्येष्ठा**—एक ठळक व दोन लहान अशा तीन ताऱ्यांची रेषा (पूर्व-पश्चिम). (१९) **मूळ**—एक मोठा व आठ लहान अशा नऊ ताऱ्यांची नागमोडी नथेसारखी आकृति (अनुराधा ज्येष्ठा व मूळ मिळून नांगी असलेल्या मोठ्या विंचवाचा आकार होतो). (२०) **पूर्वाषाढा**—(पूर्वेस) दोन ठळक तारे. (२१) **उत्तराषाढा**—(पश्चिमेस) दोन ठळक तारे. (२२) **श्रवण**—एक मोठा व दोन बाजूंस दोन अशा तीन ताऱ्यांची दक्षिणोत्तर तिरपी रेघ. (२३) **धनिष्ठा**—पांच ताऱ्यांची पंचपाळी आकृति. (२४) **शततारका**—एक ठळक व भोंवतालीं पांच-सहा लहान तारे असा झुबका. (२५) **पूर्वा-भाद्रपदा**—दक्षिणोत्तर दोन ठळक तारा (पश्चिमेस). (२६) **उत्तरा-भाद्रपदा**—दक्षिणोत्तर दोन ठळक तारा (पूर्वेस). हीं दोन्ही नक्षत्रें मिळून चार ताऱ्यांचा मोठा आयत चौकोन होतो. त्याला 'उच्चैःश्रवा' म्हणतात. (२७) **रेवती**—दक्षिणोत्तर एका ताऱ्याभोंवतीं पुष्कळ लहान तारे. (नक्षत्रें पाहा).

**सूर्यकमळ**—१. (सन् फ्लॉवर). [वर्ग—कंपोझिटी हेलिआन्थस]. या झाडास मोठीं पिवळीं फुलें येतात. हें मूळ पेरु देशांतून आलें. हें ६ ते १५ फूट उंच वाढतें. याच्या बिया पांखरें खातात. तसेंच या बियांचें तेल काढतात तें खाण्यांत येतें. यांचीं झाडें तीनचार हात उंच वाढतात. पानें लांबट व कातरीदार असतात. फूल तळहाताएवढें राखडीसारखें येतें व त्याचें तोंड सूर्याच्या बाजूकडे नेहमीं फिरत राहतें. हीं झाडें रोगजनक वायु शोषून घेतात. तेव्हां ओल येत असेल त्या जागीं लाविल्यास आरोग्यकारक होतें.

२ (हेलिओट्रोप). [वर्ग—बोराजिनासी. जाति-हेलिओट्रोपिअम]. हीं झाडें मूळ दक्षिण व पश्चिम युरोपमध्यें आढळतात. यांना लहान पांढरीं किंवा फिकट तांबडीं फुलें येतात. यांच्या फळामध्यें चार आठोळीं असतात. व त्यांवर एक पातळ गराचें वेष्टण असतें.

**सूर्यतापमापक**—(पायरो हेलिओमीटर). सूर्यापासून मिळणाऱ्या उष्णतेची तीव्रता मोजण्याचें हें यंत्र आहे. याचे निरनिराळे प्रकार प्रचारांत आहेत. त्यांतील सर्वांत अर्वाचीन म्हटला म्हणजे ॲवट आणि फाउले यांचें चांदीच्या तबकडीचें यंत्र होय. सूर्याच्या उष्णतेची तीव्रता अथवा सौरस्थिरांक हा सामान्यतः १.९४५ ग्रॅम कॅलरी इतका दर मिनिटास दर चौ. सेंटिमीटरवर असतो.

**सूर्यदर्पण**—(हेलिओस्टाट). या यंत्रांत दुर्बीण एके जागीं स्थिर ठेवून, सूर्य पूर्वेकडून पश्चिमेकडे जातांना त्याचा प्रकाश आंत घेण्यासाठीं एका फिरत्या उपकरणाची तरतूद केलेली असते. ग्रहणांचे वेध घेण्यासाठीं किंवा वर्णपटशास्त्रीय कामांत किंवा मोठाल्या आडव्या दुर्बिणींतून या यंत्राचा उपयोग करतात.

**सूर्यनमस्कार**—व्यायामाचा एक प्रकार. निरोगी माणसानें वयाच्या मानानें किती नमस्कार घालावे त्याचें प्रमाण असें—

| वय | नमस्कारांची संख्या |
|---|---|
| ८ ते १२ | २५ ते ५० |
| १२ ते १६ | ५० ते १०० |
| १६ ते ६० | १०० ते ३०० |

साठ वर्षांपुढे शक्तीप्रमाणें नमस्कार चालू ठेवावे. प्रत्येक नमस्काराच्या वेळीं (१) मस्तक, (२) छाती, (३) दोन हात, (४) दोन गुडघे, (५) दोन पाय, (६) दृष्टि, (७) वाणी, व (८) मन ह्या आठांनीं जो नमस्कार करावयाचा त्यास साष्टांग नमस्कार म्हणावें. नमस्कार घालावयास सात फूट लांब व अडीच फूट रुंद अशी जागा पुरे आहे. स्नान करून सूर्योदयापूर्वी, अनशी पोटीं नमस्कार घालणें उत्तम. सूर्याचीं किरणें अंगावर घेतां आलीं तर उत्तमच. पचनेंद्रियें, हृदय व फुप्फुसें व मज्जातंतु

प्रदेश ह्या मुख्य अवयवांवर मनुष्याचें आरोग्य अवलंबून असतें. पद्धतशीर नमस्कारांनीं ह्या अवयवांस उत्तम व्यायाम होतो. एका सूर्यनमस्कारांत सात प्रकारचीं निरनिराळीं आसनें होतात, व हे नमस्कार सतंतक घातल्यानें फायदे होतात. हे नमस्कार कुंभक करून घालावयाचे असतात.

सूर्यनमस्कार किंवा साष्टांग नमस्कार हा व्यायाम औंधचे राजे बाळासाहेब पंत यांनीं विशेष प्रचारांत आणला.

**सूर्यपक्षी**—हे लहान पक्षी प्रत्येक फुलांत जाऊं शकतात व पुष्कळ वेळां उडत उडत फुलांतील मध आपल्या चोंचीनें शोषून घेतात. या वेळीं हे पक्षी मोठ्या पतंगासारखे दिसतात. एखाद्या फुलांतील मध खाणें सोपें नसेल त्या वेळीं फुलांना खालच्या बाजूला भोंक पाडून आंतील मध खातात. या मध खाण्याच्या कामीं त्यांचा लहान आकार व लांब चोंच यांचा त्यांस फार उपयोग होतो. यांची चोंच लांब कमानदार व सुईसारखी अणकुचीदार असते. यांची जीभ लांब असून बारीक नळीसारखी असते. त्यामुळें त्यांना मध शोषून घेणें सोपें पडतें. हे पक्षी शोषून घेतलेला मध मधमाशाप्रमाणें सांठवून न ठेवतां खाऊन टाकतात.

सूर्यपक्ष्यांच्या दोनतीन जाती आहेत. त्यांपैकीं एक जातीचा नरपक्षी काळसर असून त्याला खालच्या बाजूस पिवळसर पट्टा असतो. या पक्षाचें घरटें 'गवळणी'च्या घरट्याप्रमाणें फार कलाकुसरीनें बांधलेलें असतें.

**सूर्यपूजा**—सूर्य हा जगाचा आत्मा आहे. त्याच्यापासून प्राणिमात्राला चैतन्य मिळतें. त्याच्या प्रकाशामुळें धनधान्यसमृद्धि होते व आरोग्य प्राप्त होतें. तेव्हां या आद्य देवतेची उपासना प्राचीन मानव करीत असला पाहिजे यांत आश्चर्य काय? आर्य लोकांनीं वैदिक वाङ्मयांत सूर्याचीं स्तोत्रें गायिलीं आहेत. गायत्री मंत्र हा सूर्योपासनेचाच मंत्र आहे. (गायत्री पाहा). इराणांतून मग लोक येथें येऊन ब्राह्मण जातींत मिसळून गेले. गुजराथ-काठेवाडांत भोजक जात आढळते. इराणांत मिथ्र या नांवानें, मिसर देशांत रा या नांवानें व ग्रीस देशांत अपोलो या नांवानें सूर्य ही प्रमुख उपास्यदेवता असे. जपानमध्यें राष्ट्रदेवता सूर्यच आहे. हिंदु लोकांत संध्यावंदन आहे तसेंच पारशी लोकांतहि आहे. शेतकी व्यवसायांतले लोक सूर्याच्या उपासनेचे संक्रांती-प्रमाणें दिवस पाळतात. (सूर्य, मग पाहा).

उत्तर अमेरिकेंतील रेड इंडियनांमध्यें सूर्यनामाचा एक मोठा धार्मिक व सांवत्सरिक विधिच असतो. हा विधि एक आठवडा चालतो. लोक कांहीं न खातां सारखे सूर्यचिन्हांभोंवतीं नाचत राहतात.

**सूर्यप्रकाशाची बचत**—वर्षामध्यें कांहीं दिवस लहान असतात व कांहीं मोठे असतात. उन्हाळ्यांत दिवस मोठे मोठे होत जातात व हिंवाळ्यांत लहान लहान होत जातात. परंतु घड्याळा-प्रमाणें काम करणाऱ्या लोकांचे तास घड्याळाप्रमाणें मर्यादित होत असतात. पूर्वी सूर्याप्रमाणें कामाचे तास ठरविण्याची पद्धति होती. तेव्हां सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत दिवस धरण्यांत येऊन मोठ्या दिवसांत अधिक काम होत असे, व लहान दिवसांत कमी काम होत असे. परंतु घड्याळाप्रमाणें काम करावयाचें म्हणजे लहान दिवस असतांना सायंकाळीं सूर्यप्रकाश कमी होऊन दिवे लावून काम करावें लागत असे व त्यामुळें दिव्याचा खर्च पडत असे. याकरितां सूर्यप्रकाशाचा अधिक उपयोग करून घेण्याकरितां घड्याळाचे कांटे लहान दिवस असतांना पुढें करावयाचे व मोठा दिवस झाल्यावर मागें करावयाचे, ही योजना प्रथम विल्यम विलेट यानें सुचविली. यामुळें लहान दिवस असतांना मनुष्य एक तास अगोदर आपला व्यवहार सुरु करून सायंकाळच्या सूर्यप्रकाशाचा अधिक उपयोग करून घेऊं शकतो. यासंबंधीं कायदा करण्याचे प्रयत्न इंग्लंडमध्यें १९०७, १९०९ व १९११ मध्यें करण्यांत आले, पण त्यांस यश आलें नाहीं. अखेरीस १९१६ मध्यें युद्धकालीन योजना म्हणून ती मान्य करण्यांत आली व २१ मे रोजीं १ तास घड्याळें पुढें करण्यांत आलीं. १९२५ मध्यें एप्रिलमधील तिसऱ्या शनिवारीं घड्याळें पुढें करण्याचा कायदा कायम करण्यांत आला. हीं पुढें केलेलीं घड्याळें ऑक्टोबरच्या पहिल्या शनिवारीं मागें करण्यांत येतात. दुसऱ्या महायुद्धांत हिंदुस्थानांतहि एक तास घड्याळें पुढें करण्यांत आलीं होतीं.

**सूर्यमासा**—हा एक अस्थिमय वर्गांतील मासा आहे. हा एखाद्या मोठ्या माशाच्या वेगळ्या केलेल्या डोक्याप्रमाणें दिसतो.

याची रुंदी चार फूट असते. हा दक्षिण ध्रुवापासून उत्तर ध्रुवा-पर्यंतच्या सर्व समुद्रांत आढळतो. हा कित्येक फूट लांब असतो पण खाण्यास निरुपयोगी असतो. याच्या यकृतापासून एक प्रकारचें तेल निघतें. उत्तर अमेरिकेंतील गोड्या पाण्यांतील सूर्य-मासा दहा इंचांपेक्षां जास्त लांब नसतो व त्याचें अंग चकाकित रंगाचें असतें. सामान्यतः कानडा ते फ्लोरिडा प्रदेशांत ओढे आणि तळीं यांतून आढळणारे सूर्यमासे नारिंगी रंगाचे असतात; व सुमारें सात इंच लांब भरतात.

**सूर्य-संज्ञापक**—(हेलिओग्राफ). दूर अंतरावरच्या मनुष्या-कडे सूर्याच्या प्रकाशाचा झोत सतत किंवा कांहीं वेळ एकसारखा पाठविण्याच्या योजनेस म्हणतात. या योजनेंत सूर्याने

आरशाच्या साहाय्यानें परावर्तित करून ते एकाच दिशेनें जातील अशी योजना करावयाची असते. अशा तऱ्हेनें एकसारखा सूर्यप्रकाश निरीक्षकास एकाच दिशेंत पुरविण्यांत येतो. अशा तऱ्हेचे सूर्य-संज्ञापक ८० मैल अंतरावरूनहि दिसूं शकतात. यांच्या साहाय्यानें युद्धामध्यें खुणा करतां येतात व संदेश पाठवितां येतात. साधा आरसा हालवून संदेश देण्याची क्रिया या प्रकारचीच होय.

**सूर्याजी पिसाळ**—मराठेशाहींतील एक घरभेद्या. स्वतःच्या स्वार्थासाठीं यानें फितुरी करून रायगड औरंगजेबाच्या ताब्यांत दिला व वांई प्रांताची देशमुखी मिळवली. याच वेळीं यानें हिंदुधर्म सोडून यवनी धर्म स्वीकारला. हा मूळचा ओझर्डे गांवचा. औरंगजेबाच्या कैदेंतून शाहू सुटून आल्यावर त्यानें यास पकडून हाल हाल करून ठार मारलें. पण याच्या वंशजांना व भाऊबंदांना शाहूकडून इनामेंहि मिळालीं आहेत.

**सूक्ष्म कालमापक**—(क्रोनोमीटर). वेळेची मोजणी करून विशिष्ट कालीं किती वाजले हें सांगणाऱ्या साधनास कालमापक म्हणतात. सूक्ष्म कालमापक घड्याळें बहुधा गलबतांवर बसविण्यांत येतात व तीं ग्रीनिच कालमान दाखवितात व त्यामुळें खलाशास आपलें गलबत किती रेखांशावर आहे तें नक्की कळतें. हीं घड्याळें समतोल राहण्याची यांच्यामध्यें विशेष व्यवस्था केलेली असते व उष्णमानाप्रमाणें लंबकामध्यें आपोआप फरक होण्याचें साधनहि केलेलें असतें. या घड्याळांत अर्ध सेकंदहि दाखविले जातात. हें घड्याळ एका स्वतंत्र रचना केलेल्या पात्रांत (गिंबॉल) ठेवण्यात येतें. त्यामुळें गलबत कसेंहि हललें तरी तें नेहमीं समपातळींत राहतें. खलाशी निरीक्षण करून स्थानिक वेळ पाहतो व या सूक्ष्म घड्याळावरून त्यास ग्रीनिच वेळ कळते व त्यांतील अंतरावरून (१५° स १ तास याप्रमाणें) आपण कितव्या रेखांशावर आहों हें त्यास कळून येतें. (काललेखक पाहा).

**सूक्ष्म जंतू**—(बॅक्टेरिआ). अत्यंत खालच्या दर्जाच्या दृश्य अशा लहान प्राण्यांस सूक्ष्म जंतू असें सर्वसाधारण नांव देण्यांत येतें. यांसच जंतू (जर्म्स) किंवा अतिसूक्ष्म जंतू (मायक्रोप्स) असें म्हणतात. यांचे तीन वर्ग करण्यांत येतात: (१) कॉकी—हे वाटोळे सूक्ष्म जंतू असून $\frac{1}{25000}$ इंच व्यासाचे असतात. हे सांखळीसारखे किंवा पुंजक्यामध्यें आढळतात. (२) बॅसिली—यष्टिजंतू. हे सरळ काठीसारखे असून कॉकी इतकेच रुंद पण त्यांपेक्षां दुपटीपासून चौपटीपर्यंत लांब असतात. (३) स्पिरिला—यांचे पुन्हां दोन प्रकार असतात: (अ) एक यष्टिजंतूसारखा असून वांकडा असतो; व (आ) दुसरा सुतासारखा बारीक पण मळसूत्राच्या आकाराचा असतो. दुसऱ्या वर्गांतील जंतू पहिल्या वर्गाइतकेच जाड परंतु त्यापेक्षां सहा पट लांब असतात. हे सूक्ष्म जंतू म्हणजे जीवनरसाचा एक अल्पांश व त्याभोंवतीं अंतस्त्वचेचें आवरण अशा स्वरूपाचे असतात. यांपैकीं कांहीं जंतूंस चलनशक्ति असते. त्यांची पुनरुत्पत्ति शरीरविभजनानें इंद्रियसंयोगविरहित होते व ती इतकी विपुल व जलद होते कीं, एका जंतूपासून २४ तासांत १ कोटी ७० लक्षपर्यंत जंतू तयार होतात. या जंतूंचें निसर्गामध्यें मुख्य कार्य कुजण्याची क्रिया उत्पन्न करण्याचें असतें. हे सूक्ष्म जंतू सर्व प्रकारच्या सेंद्रिय द्रव्यांवर आणि सर्वत्र आढळतात. सर्व तऱ्हेचे सूक्ष्म जंतू, रोगोत्पादक जंतूंसुद्धां कांहीं मिनिटें उकळले असतां मरून जातात. परंतु कांहीं जंतू बराच काल दम धरतात, व ते मारण्यास दीड तासपर्यंत उकळावे लागतात. रासायनिक क्रियेनेंहि या जंतूंचा नाश करतां येतो.

**सूक्ष्मजंतुशास्त्र**—(बॅक्टेरिआलॉजी). सूक्ष्मजंतूंची रचना व त्यांचे गुणधर्म यांचा अभ्यास करणाऱ्या शास्त्रास सूक्ष्मजंतुशास्त्र म्हणतात. या शास्त्राचा उगम पाश्चर या शास्त्रज्ञापासून झाला. पाश्चर यास प्रथम असा शोध लागला कीं, शर्करेचें मद्यामध्यें रूपांतर होण्याचें कारण, तसेंच मद्यार्काचें व्हिनिगरमध्यें रूपांतर होणें व दुधाचें दहीं होणें, इत्यादि क्रियांचें कारण किण्व किंवा एका जातीचे सूक्ष्म जंतू होत. त्यानें असेंहि सिद्ध केलें कीं, रेशमाच्या किड्यास रोग होण्याचें कारणहि एक तऱ्हेचे सूक्ष्म जंतू होत, आणि अचेतन द्रव्यापासून सचेतन असे सूक्ष्म जंतूंसारखे जीव उत्पन्न होत नाहींत हेंहि तत्त्व सिद्ध करण्यास मदत केली. सूक्ष्मजंतुशास्त्राची वास्तविक उत्पत्ति १८७७ सालीं जेव्हां कोच यानें गुरांस होणारा काळपुळी (ॲन्थ्रॅक्स) हा रोग एका सूक्ष्म जंतूपासून उत्पन्न होतो असें दाखविलें तेव्हांच वास्तविकपणें झाली. कोचनें या बाबतींत पुढील गोष्टी निश्चित केल्या: (१) सूक्ष्म जंतू ज्या उष्णमानांत नाश पावतात त्या उष्णमानाची निश्चिति. (२) एखाद्या नळीच्या किंवा बाटलीच्या गळ्यांत कापसाचा बोळा उकळण्यापूर्वी घातला तरी तेवढ्यानें हवेंतील जंतू तिच्या आंतील भागांत शिरूं शकत नाहींत हा शोध. (३) सामान्यतः आढळणाऱ्या निरनिराळ्या प्रकारच्या सूक्ष्म जंतूंचें अन्न अथवा खाद्यमाध्यम यांच्या मालिकेचें विवरण. (४) एका शेजारीं एक परंतु निराळ्या जातींचे सूक्ष्म जंतू वाढत असतां त्यांच्या निरनिराळ्या जाती ओळखून वेगळ्या करण्याची साधी पद्धति शोधून काढणें, ही गोष्ट त्यांचें खाद्य थोड्या उष्णमानांत वितळेल अशा तऱ्हेचा त्याचा बलक तयार करणें या गोष्टीनें साध्य होतें. अशा बलकामध्यें सूक्ष्म जंतू असलेला पदार्थ मिसळून त्याचा एक थर जंतुरहित केलेल्या कांचेवर पाडून तो घट्ट होऊं देण्यांत येतो. अशा रीतीनें निरनिराळ्या जंतूंची वाढ परस्परांत मिसळत स्वतंत्रपणें होऊं लागते व कांहीं तासांत ती आपल्या डोळ्यांनींहि पाहतां

येण्यासारख्या स्वरूपांत येते. अशा तऱ्हेच्या जंतूंचा थोडासा थर एका तापविलेल्या सुईवर घेऊन जंतुविरहित अशा खाद्य-पदार्थांत घालविण्यांत येतो व अशा रीतीनें त्या विशिष्ट जंतूंची स्वतंत्र वाढ करण्यांत येते, व अशा रीतीनें मूळ पदार्थांतील सर्व निरनिराळे जंतू वेगवेगळे वाढवितां येतात.

सूक्ष्मजंतुशास्त्राचा मनुष्यप्राण्याच्या अनेक गोष्टींशीं संबंध येतो. उदा., दूध न नासतां टिकविणें किंवा मलन ठेवणें, वगैरे धंद्यांमध्यें जंतुशास्त्राचें ज्ञान आवश्यक असतें. तसेंच दूध नासून त्याचें दहीं होऊन त्यांतून लोणी निघण्याकरितां या शास्त्राचें ज्ञान आवश्यक असतें. याकरितां शुद्ध स्वरूपाचें विरजण रसायन शाळामार्फत पुरविण्यांत येतें. चीज व लोणची करण्याकरितां, तसेंच मुरंबे तयार करण्याकरितां व गवत वाळविण्याकरितां आणि धान्याच्या गंजी रचण्याकरितांहि सूक्ष्मजंतुशास्त्राचा अभ्यास आवश्यक आहे. जमीन सुपीक करण्याच्या कामींहि सूक्ष्मजंतुशास्त्र फार महत्त्वाचें आहे. उदा., वाटाण्याच्या जातीच्या झाडांच्या मुळांवर ज्या बारीक ग्रंथी उत्पन्न होतात, त्यांचें कारण विशिष्ट सूक्ष्म जंतू होत, असें आढळून आलें आहे. कोणताहि उद्योगधंदा असा नाहीं कीं, ज्यामध्यें विशिष्ट पदार्थाची कुजण्याची क्रिया विशिष्ट मर्यादेपर्यंत होऊं देणें किंवा तिला समूळ प्रतिबंध करणें या गोष्टीच्या ज्ञानाची कोणत्या ना कोणत्या अवस्थेंत आवश्यकता आढळून येत नाहीं; व हें ज्ञान सूक्ष्मजंतुशास्त्रच पुरवूं शकतें.

**सूक्ष्मदर्शक**—(मायक्रोस्कोप). सूक्ष्म पदार्थांच्या प्रतिमा तयार करण्याकरितां व त्यांचें निरीक्षण करण्याकरितां सूक्ष्मदर्शक यंत्राच्या साहाय्यानें त्या मोठ्या प्रमाणावर दाखविण्यांत येतात. याचा अगदीं साधा प्रकार म्हटला म्हणजे एक बाह्यगोल भिंग घेऊन त्याच्याजवळ ती सूक्ष्म वस्तु ठेवणें हा होय. (बाह्यगोल भिंग पाहा). एकच भिंग घेतलें तर त्यामध्यें गोलाकृति प्रकाशापेरण (ॲबेरेशन) व वर्णापेरण (क्रोमॅटिक ॲबेरेशन) किंवा प्रकाश-च्युति होण्याचा संभव असतो. व त्यामुळें त्या वस्तूचा आकार व रंग प्रतिमेमध्यें बदललेला दिसण्याचा संभव असतो. संयुक्त सूक्ष्म-दर्शकामध्यें दोन किंवा दोहोंपेक्षां अधिक भिंगें वापरण्यांत येत असतात : एक वस्तुभिंग (ऑब्जेक्टिव्ह) व दुसरें नेत्रभिंग (आयपीस). जी वस्तु पाहावयाची ती एका ठाणवईवर वस्तुभिंगाच्या केन्द्रान्तरापेक्षां दूर अन्तरावर ठेवण्यांत येते. वर्णापेरण दूर करण्याकरितां एक गारेचें प्रकाशोत्सारक (डायव्हर्जिंग) भिंग व एक प्रकाशान्तःसारक (कॉन्व्हर्जिंग) मुकुट-कांचेचें (क्राउन ग्लास) भिंग जोडून बसविण्यांत येतात. गोलापेरण योग्य अंतरावर वस्तु ठेवून दूर करण्यांत येतें. यानंतर या यंत्रांत वापरावयाच्या कांचेंत पुष्कळ प्रकारच्या सुधारणा करण्यांत आल्या. सूक्ष्मदर्शक यंत्रांत वापरण्यांत येणारें वस्तुभिंग बहुधा हायगेनियन पद्धतीच्या कांचेचें बनविलेलें असतें. जेव्हां प्रतिमेचें मापन करावयाचें असतें तेव्हां राम्सडेन पद्धतीचें वस्तुभिंग व त्याला जोडून प्रमाणपट्टी बसवि-ण्यांत येते. सेडर तेलाचा बिन्दु वापरला असतां मोठ्या शक्तीच्या सूक्ष्मदर्शकामध्यें प्रतिमा अधिक स्पष्ट दिसते.

**सूक्ष्मध्वनिवर्धक**—(मायक्रोफोन). हें यंत्र ह्यूजेस यानें सन १८७८ मध्यें विजेच्या साहाय्यानें दूरध्वनिक्षेपणाच्या कार्या-करितां शोधून काढलें. (दूरध्वनिशास्त्र, बिनतारी तारायंत्र पाहा). याचे तीन मुख्य प्रकार आहेत. कर्ब किंवा संघर्ष ध्वनिवर्धक दूरध्वनियंत्रांत वापरतात. दुसरा ध्वनिवर्धक प्रकार विद्युद्गत्यात्मक किंवा मॅग्नेटोफोन असून, तिसरा विद्युत्स्थितिक किंवा संचायक (कॉन्डेन्सर) ध्वनिवर्धक होय.

**सूक्ष्मपिंडरचनाशास्त्र**—(हिस्टोलॉजी). जीवशास्त्रामध्यें पिंड पुंजकांचा अथवा पेशींचा, विशेषतः उच्च कोटींतील प्राण्यांच्या पेशींचा, निरनिराळ्या इंद्रियांच्या द्वारें त्या प्राण्यांचे जे निरनिराळे व्यापार होतात त्यांचें वर्गीकरण व त्यांच्या निर-निराळ्या क्रिया यांच्या साहाय्यानें जो अभ्यास करण्यांत येतो, त्यास ही संज्ञा देण्यांत येते. अगदीं खालच्या कोटींतील प्राणी अथवा वनस्पती एकपेशीमय असतात. त्यांची रचना कधीं कधीं संकीर्ण स्वरूपाची असते. परंतु वरील वर्गाच्या अनेक-पेशीयुक्त प्राण्यांच्या शरीरामध्यें आपणांस हळूहळू निरनिराळ्या पेशीपुंजामध्यें फरक आढळून येऊं लागतो. व हा फरक आपणांस विशेषत्वानें बीजयुक्त वनस्पती व सपृष्ठवंश प्राणी यांच्यामध्यें दृष्टीस पडतो.

वनस्पतिपिंडरचना—वनस्पतींच्या शरीरांतील पेशींच्या सभोंवतीं अंतस्त्वचास्वरूपी पेशीभित्ती असतात. यांची जाडी व रासायनिक घटना निरनिराळ्या पेशींच्या बाबतींत निरनिराळी असते. कांहीं पेशींच्या बाबतींमध्यें या जाड पेशीभित्ती बनण्याच्या कामीं सर्व जीवनरस उपयोजिला गेल्याचें आढळून येतें, व या पेशीभित्तींचा वनस्पतिजीवनामध्यें काटकसर करण्याच्या दृष्टीनें अप्रत्यक्ष उपयोग होत असतो. विशेषतः वनस्पतींच्या पेशींमध्यें पुढील पेशी फार महत्त्वाच्या असतात : (१) भाजक कला (मेरिस्टेम)—या प्रत्यक्ष विभाजक पेशी असून त्यामध्यें बारीक सूक्ष्मपिंड व त्यासभोंवतीं अतिशय पातळ काष्ठसत्त्वाची भिंत व पुष्कळसा जीवनरस असतो. यांच्या दोन जाती असतात—प्राथमिक व दुय्यम. संवर्धक-स्तर (कॅम्बिअम) आणि विधानक पेशीजाल (फेलोजेन) या दोन्ही प्रकारच्या दुय्यम प्रकारच्या पेशी असतात. (२) स्थिर पेशी—यांचे अनेक वर्ग करण्यांत येतात. (पेशी पाहा).

प्राणिपिंडरचना—बहुसंख्य प्राण्यांच्या शरीरामध्यें बाहेरील पेशीभित्ती आढळत नाहींत व जेथें आढळतात तेथें त्या काष्ठ-सत्त्वाच्या बनलेल्या नसतात. संयुक्त पेशींच्यामध्यें जो एक अंतर्गत

पदार्थ असतो त्यास मूस ( मॅट्रिक्स ) असें म्हणतात. कांहीं पेशीमध्यें सूक्ष्म पिंड तंतुमय किंवा इतर पिंड द्रव्यांचे बनलेले असतात. पेशींचे गर्भपेशी आणि स्थिरपेशी असे दोन वर्ग करण्यांत येतात. ( १ ) गर्भपेशी–सपुष्पवंश प्राण्याचा गर्भ हा तीन जीवाणुमय जिवंत थरांचा बनलेला असतो. त्यांतील ( अ ) बाह्यथर ( एपिब्लास्ट किंवा एक्टोडर्म ); ( आ ) अंतर्गत थर ( हिपोब्लास्ट किंवा एन्डोडर्म ); ( इ ) मध्यस्थ थर ( मेसोब्लास्ट किंवा मेसोडर्म ). या थरांपासून शरीराचे सर्व निरनिराळे अवयव निर्माण होतात. हे थर उच्च कोटींतील वनस्पतींतील प्राथमिक मेरिस्टेमसारखेच असतात. ( २ ) स्थिरपेशी–( अ ) रक्त व लस पाहा. ( आ ) बाह्यपटल ( एपिथेलियम् )—यामध्यें शरीराच्या बाह्य भागावर असलेल्या निरनिराळ्या सूक्ष्म पिंडांच्या थरांचा आणि शरीराच्या आंतील पोकळींतील निरनिराळ्या आस्तरणांच्या पिंडांचा समावेश होतो. शरीरांतील कांहीं नलिकांमध्ये या सूक्ष्म पिंडाभोंवतीं बारीक लव असते. ( इ ) आधारपेशीमध्यें पुढील प्रकार असतात : ( १ ) जोडणाऱ्या पेशी–ह्या शाखायुक्त पिंडांच्या आणि नाजूक तंतूंच्या बनलेल्या असून त्यांचे बंद सामान्यतः पांढरे परंतु जेथें मोठे व लवचिक असतील तेथें पिवळ्या रंगाचे व चामडीच्या आंतील बाजूस पांढऱ्या व पिवळ्या असे दोन्ही रंगांचे असतात. ( २ ) कूर्चा–ही एक अर्धपारदर्शक घट्ट द्रव्यामध्यें असलेल्या सूक्ष्मपिंडांच्या थरांची बनलेली असते व तिच्यावर आडवे तंतू पसरलेले असतात. ( ३ ) अस्थि–याच्यामध्ये सेंद्रिय द्रव्यामध्यें बसविलेले शाखायुक्त पिंडांचे थर असतात, व यास चुन्याच्या लवणांच्या थरानें बळकटी आणलेली असते. अस्थि हा घट्ट किंवा स्पंजासारखा लवचिकहि असतो. ( ४ ) दंतद्रव्य–हा एक कांचसण्यासारखा कठिण पदार्थ असून याच्या योगानें बहुतेक दांत बनलेले असतात. यास हस्तिदंत असे म्हणतात. ( ई ) स्नायु–हा तीन प्रकारचा असतो : प्रणाली ( स्ट्रेटेड ) स्नायु, अप्रणाली स्नायु व हृत्स्नायू ( कार्डिॲक ). ( उ ) मज्जातंतू–हे मज्जा द्रव्याचे बनलेले असतात. ( मज्जातंतू पाहा ).

**सूक्ष्ममापक**—( मायक्रोमीटर ). सूक्ष्मकोण व सूक्ष्म लांबीचीं परिमाणें मोजण्याकरितां तयार केलेलें यंत्र. याचे अनेक प्रकार आहेत. अगदीं नेहेमींच्या उपयोगांतला जो असतो त्यांत एका वर्तुळांत सूक्ष्म जंतूंनीं अनेक चौकटी पाडलेल्या असतात. एखादी वस्तु किती चौकटी व्यापते तें पाहून त्याचा आकार ठरवितां येतो. निरीक्षकाच्या यंत्रांतील सूक्ष्ममापकांत एक मळसूत्र असतें. या मळसूत्राच्या फेऱ्यावरून अंतर काढतां येतें.

**सेक्सारिया, गोविंदराम** ( १८८६–१९४६ )—एक उदार हिंदी व्यापारी. जयपूर संस्थानांतील नवलगढ या गांवीं यांचा जन्म झाला. वयाच्या १६ व्या वर्षी अक्षरशः एक लोटा घेऊन यांनीं मुंबईत प्रवेश केला व आपल्या उद्योगास सुरवात केली. पुढें हे सोनें, चांदी, कापूस, शेंगदाणा, इत्यादि वस्तूंचा व्यापार करून अगदीं थोडक्याच अवधींत कोट्यधीश झाले. इंडियन कॉटन असोसिएशन, बुलियन एक्स्चेंज, मारवाडी चेंबर ऑफ कॉमर्स, न्यू यॉर्क कॉटन असोसिएशन यांसारख्या देशी व विदेशी व्यापारी कंपन्यांत यांचें मोठें वजन असे.

जसे एक यशस्वी व्यापारी म्हणून हे प्रसिद्ध आहेत त्याचप्रमाणें औदार्याबद्दलहि यांची ख्याति आहे. शिक्षण व रोगोपचार या कार्यासाठीं यांनीं एक कोटी रुपयांचा विश्वस्त निधि ( ट्रस्ट ) केला. याच कार्यासाठीं आपल्या मृत्यूपूर्वी यांनीं असाच एक पन्नास लाखांचा विश्वस्त निधि ( ट्रस्ट ) करून ठेवला आहे. वर्धा येथील कॉमर्स कॉलेज व सावंतवाडीचें महाराणी कॉलेज या संस्थांना यांनीं प्रत्येकीं पंधरा लाखांच्या देणग्या दिल्या आहेत. यांच्या स्मरणार्थ हरिद्वार येथें सेक्सारिया धर्मशाळा व अन्नछत्र उघडण्यांत आलें आहे.

**सेखोजी आंगरे** ( मृ. १७३३ )— मराठ्यांचा एक नावाध्यक्ष. हा कान्होजीचा वडील मुलगा. १७२९ त कान्होजी मरण पावल्यावर सेखोजी सरखेलीचा कारभार पाहूं लागला. तो राजनिष्ठ व इमानी सेवक असून हबशांचें प्राबल्य मोडून मराठी राज्याच्या अभिवृद्धीसाठीं मनापासून झटणारा होता. शौर्य, कर्तृत्वाची आवड, भारदस्तपणा व शालीनता हे गुण सेखोजीच्या अंगीं विशेष होते.

कान्होजीच्या पश्चात् हबशांनीं कोंकणांत बराच उपसर्ग मांडिला. तथापि सेखोजीच्या शहाणपणानें हबशांचें विशेष कांहीं चाललें नाहीं. १७३३ च्या जंजिऱ्यावरील मोहिमेंत जूनच्या अखेरीपावेतों मुंबईजवळचा थळचा मोठा किल्ला व पेण नदीमधील रावळीचा किल्ला सेखोजीनें सिद्दीपासून सर केला. त्यामुळें मुंबईस इंग्रजांना मोठी धास्ती पडली. पोर्तुगीज हबशांस मदत करीत, सबब त्यांचा चौल शहराचा भाग हस्तगत करण्याचा प्रयत्न सेखोजीनें चालविला. इंग्रजांचें 'रोझ' नांवाचें जहाज त्यानें पाडाव केलें होतें, तें ७६०३ रु. दंड घेऊन आंगऱ्यानें इंग्रजांस परत दिलें.

हबशी नाहींसा झाल्यास आंगऱ्यांचा जोर वाढून आपला निभाव लागणार नाहीं अशी इंग्रजांस धास्ती पडल्यामुळें ते हबशास फौज, दारूगोळा, अन्नसामुग्री, वगैरेचा पुरवठा करीत होते. तें पाहून सेखोजीनें मुंबईवर स्वारी करण्याची तयारी केली. परंतु पर्जन्यकाळ असल्यामुळें त्याचा इलाज चालला नाहीं; पण पुढें इंग्रजांचा समाचार घेण्यास सेखोजी फार दिवस जगला नाहीं. याचें पेशव्यांशीं सख्य असे.

**सेंगर (सेंगर) कुल**—क्षत्रियांच्या ३६ कुलांतील गौतम व शांडिल्य गोत्री कुल. कांहींच्या मतें हा शातकर्णी (शालिवाहन) वंश होय व कांहींच्या मतें हा चंद्रवंशी अनु या राजाचा वंश होय. ऋष्यशृंग–शांता यांचा पुत्र चतुरंग हा या घराण्याचा मूळ पुरुष व भागलपुरच्या आसपास असलेल्या अंग देशाचा हा राजा होता. याच वंशांत कौंतेय कर्ण झाला होता. त्याच्या पूर्वी कांहीं काल या राजवंशाच्या दोन शाखा झाल्या होत्या. त्यांतहि एक कर्ण झाला होता, व त्याचा नातू शातकर्ण म्हणून होता. त्याच्या वंशास पुढें शातकर्णी म्हणूं लागले. अंग देशाचें राज्य नामशेष झाल्यावर या वंशानें चेदि, राट (कर्णसुवर्ण), पैठण (आंध्रभृत्य), सुराष्ट्र, माळवा, डाहल, वगैरे देशांवर राज्य केलें. शालिवाहन (पौराणिक) राजा हा पैठणच्या सेंगर उर्फ शातकर्णी राजवंशांत प्रमुख होऊन गेला (इ. स. ७८). माळव्यांतील जसराज (यशोधर्म इ. स. ५२९) व गुजराथेंतील गुहिल (मैत्रक ५६८) हे सेंगरवंशी होते. प्राचीन शुंग व काठेवाडी आधुनिक संघड हे सेंगर होत असें म्हणतात. बुद्धाच्या पूर्वी डहारदेव म्हणून एका सेंगरराजावरून पश्चिम चेदि देशाला डहारदेश नांव पडलें. व तत्रस्थ सेंगरांना डहारिया म्हणूं लागले. चंदेल, हैहय या राजांच्या ताब्यांत चेदि देश गेल्यावर सेंगर वंश दुसरीकडे गेला व त्यांतील कर्णदेवानें यमुना–चर्मण्वती संगमाजवळ कर्णावती (कनार) शहर स्थापिलें. कर्णदेवाचे वंशज सांप्रतचे रीवा राज्यांतील बीछरहटा, नयागड येथील ठाकूर होत. कनारचा राजा विशोकदेव हा कनोजच्या जयचंदाचा जांवई असून त्यानें बर्सिंद नांवाच्या एका नदीला सेंगर हें नांव दिलें होतें. संयुक्त प्रांतांत जालौन व इटावा या भागांत सेंगरवंशीय लहान जमीनदार बरेच आहेत. पंधराव्या शतकांत लखनेसर येथें या वंशाचें एक राज्य होतें. हल्लीं या जहागिरींत १०० गांवें आहेत. सिरोंज (माळवा) येथें या वंशाचें राज्य होतें. त्यांतील राजानें हुमायून यास शेरशहाविरुद्ध मदत केली होती. पुढें औरंगजेब यानें ही जहागीर भगवंतसिंह हाडा यास दिली. सांप्रत या वंशाची लो. सं. ८०।९० हजार असून ती संयुक्तप्रांत, रजपुताना, बिहार, मध्यप्रांत इकडे आहे.

**सेगवाह किल्ला**—मुंबई, ठाणें जिल्हा. डहाणूच्या पूर्वेस १६ मैलांवर एका टेंकडीवर हा किल्ला होता. आतां त्याचा जवळजवळ मागमूसहि राहिलेला नाहीं.

**सेचेली बेटें**—हा द्वीपसमूह हिंदी महासागरांत मादागास्कर बेटानजीक असून, या समूहांत ९२ बेटें आहेत. मसाल्याच्या झाडांची लागवड करण्याच्या दृष्टीनें १८ व्या शतकाच्या मध्यांत फ्रेंचांनीं येथें वसाहत केली. पुढें हीं बेटें १७९४ सालीं ब्रिटिश लोकांनीं फ्रेंचांपासून जिंकून घेतलीं, आणि १९०३ सालीं हा द्वीपसमूह ब्रिटिश साम्राज्यांतील एक राजवसाहत (क्राउन कॉलनी) बनली. या बेटांचें एकंदर क्षे. फ. १५६ चौ. मैल असून त्यांच्यापैकीं माहे हें बेट सर्वांत मोठें आहे. येथें नारळ, कापूस, कॉफी, कोको, तमाखू, मका, भात, आणि दालचिनीचीं झाडें हीं पिकें होतात. फॉस्फेट द्रव्यें येथें तयार करतात. राजधानी व्हिक्टोरिया हें शहर चांगलें बंदर असून आगबोटींना कोळसा घेण्याचें ठिकाण आहे. लो. सं. (१९४३) ३३,६२१.

**सेजविक, अॅडॅम** (१७८५–१८७३)—एक ब्रिटिश भूगर्भशास्त्रज्ञ. या शास्त्रांत त्यानें मुख्य कामगिरी केली ती अशी कीं, इंग्लंडमधील डेव्हन व कॉर्नवॉल या परगण्यांतला पूर्वजीवक (पॅलिओझोइक) थर याचा भूगर्भशास्त्रविषयक संबंध इंग्लंडमधील ईशान्य आणि वायव्य या दिशांकडील प्रदेशांतल्या प्राचीन जीवान्त (पर्मिअन) थराशीं कशा प्रकारचा आहे तें त्यानें निश्चित केलें.

**सेंट अँड्र्यूज**—स्कॉटलंड, फाइफशायर परगण्यांतील प्राचीन शहर. ११४० सालीं पहिल्या डेव्हिड या राजानें या शहराला रॉयल बर्ग बनविलें. बराच काळपर्यंत हें शहर स्कॉटलंडमधील धार्मिक केंद्र होतें. येथील कॅथेड्रलची इमारत ११६० सालीं बांधण्यास सुरवात केली होती. ती इमारत आणि १२०० सालीं बांधलेला किल्ला हीं दोन्हीं हल्लीं कोसळून पडलेलीं आहेत. येथें व्यापार किंवा कारखाने महत्त्वाचे नाहींत, पण हें एक लहान बंदर असून लोकांचें आवडतें आरोग्यस्थान आहे. तसेंच गोल्फ या खेळाचें मुख्य ठिकाण असून येथें 'दि रॉयल अॅन्ड एन्शन्ट क्लब' ही १७५४ सालीं स्थापन झालेली संस्था गोल्फ या खेळाच्या बाबतींत अंतिम निर्णय देणारी असें मानण्यांत येतें. लो. सं. ९,००० आहे. सेंट अँड्र्यूज युनिव्हर्सिटी १४११ सालीं स्थापन झाली. हें स्कॉटलंडमधील सर्वांत जुनें विद्यापीठ असून तेथें ललितवाङ्मय, वैद्यक, ईश्वरविज्ञान (थिऑलजी) या विषयांचीं कॉलेजें आहेत. आणि येथील ग्रंथालय फार उत्तम आहे.

**सेंट जॉन**—जॉन (संत) पाहा.

**सेंट पॉल**—पॉल (संत) पाहा.

**सेंट पॉल कॅथेड्रल**—हें ख्रिस्ती देवालय लंडन शहरांत थेम्स नदीच्या कांठीं आहे. या जागेवर आरंभीं केंटचा राजा एथलबर्ट यानें ६१० सालीं बांधलेलें चर्च होतें. तें चर्च १०८७ सालीं आगीनें जळून गेलें; व नंतर लवकरच तेथें ओल्ड सेंट पॉल चर्च ही इमारत बांधण्यांत आली. ती इमारतहि १६६६ च्या मोठ्या अग्निप्रलयांत जळून गेली. सांप्रतची इमारत सर ख्रिस्टोफर रेन यानें तयार केलेल्या योजना–नकाशानुसार १६७५ सालीं बांधण्यास सुरवात होऊन १७१० सालीं पुरी झाली. ही इमारत पोर्टलंड जातीच्या दगडाची व क्रॉसच्या आकाराची आहे. तिची लांबी ५१० फूट, रुंदी २८२ फूट, व सर्वसाधारण उंची १०

फूट आहे. सर्वांच्या वर आठ शिखरें व एक मोठा घुमट (डोम) आहे; व अगदीं वरच्या टोंकाची उंची ४०४ फूट आहे. येथें अनेक सुप्रसिद्ध पुरुषांच्या कबरी आहेत.

**सेंट पीटर**—पीटर (संत) पाहा.

**सेंट ब्व्ह, चार्लस ऑगस्टिन** (१८०४-१८६९)—हा एक प्रसिद्ध फ्रेंच टीकालेखक असून याचा जन्म बोलोन येथें झाला. यानें पॅरिसमध्यें प्रथम वैद्यकाचा अभ्यास केला. परंतु तो सोडून देऊन वाङ्मयाकडे त्यानें आपलें लक्ष वळविलें. 'रेव्ह्यू दे ध्यु मोंद' या फ्रेंच नियतकालिकांत त्यानें जे टीकात्मक लेख लिहिले आहेत त्यांच्या योगानें त्या मासिकास त्या कालीं बरेंच महत्त्व मिळालें होतें. १८५२ मध्यें त्यास फ्रान्सच्या कॉलेजमध्यें लॅटिन काव्याचा प्राध्यापक नेमण्यांत आलें. परंतु तिसरा नेपोलियन व साम्राज्यवाद यांसंबंधीं त्याचीं मते अनुकूल असल्यामुळें तो विद्यार्थ्यांस अप्रिय झाला व त्यानें आपल्या जागेचा राजीनामा दिला. कांहीं काल यानें एकोल नॉर्मल सुपीरिग्रर या संस्थेंत फ्रेंच वाङ्मयावर व्याख्यानें दिलीं. याचे टीकालेख मार्मिक आहेत.

**सेंट मॅथ्यू**—मॅथ्यू (संत) पाहा.

**सेंट मार्क**—चार 'शुभवर्तमान'कारांपैकीं हा एक होय. हा येशू ख्रिस्ताचा शिष्य होता. परंतु तो अनेक वर्षें ख्रिस्ताचा मुख्य प्रेषित सेंट पीटर (पाहा) याचा बरेंच दिवस सहवासी होता; आणि त्या काळांत त्यानें सेंट पीटरनें ख्रिस्तासंबंधीं केलेलीं प्रवचनें व उपदेश लिहून काढण्याचें काम केलें. याच्या शुभवर्तमानामध्यें सेंट पीटरबद्दलच्या प्रत्यक्ष स्मृती विशेषपणानें जागृत झाल्याचें आढळून येतें.

**सेंट लॉरेन्स**—ही उत्तर अमेरिकेंतील मोठी नदी असून ती पांच मोठाल्या सरोवरांतून वाहत जाऊन समुद्राला मिळते. समुद्रापासून ऑंटारिओ सरोवरापर्यंत या नदीला सेंट लॉरेन्स, नंतर एरी सरोवरापर्यंत नायगरा नदी, सेंट क्लेअर सरोवरापर्यंत डेट्रॉईट नदी, ह्यूरन सरोवरापर्यंत सेंट क्लेअर नदी, सुपीरियर सरोवरापर्यंत सेंट मेरी नदी, आणि तेथून उगमापर्यंत याच नदीला सेंट लुई नदी, अशीं निरनिराळीं नांवें आहेत. २,१०० मैल इतकी या नदींतून वाहतूक चालते, व त्यापैकीं ६०० मैल मोठाल्या आगबोटी जाऊं शकतात. तथापि डिसेंबर ते एप्रिलच्या मध्यापर्यंत बर्फामुळें ही वाहतूक बंद असते. हिला ओटावा, सेंट मॉरिस, साग्ने व इतर अनेक लहान नद्या मिळतात.

**सेंट लुई**—हें शहर व बंदर अमेरिकन सं. संस्थानांत मिसिसिपी नदीच्या कांठीं आहे. हें शहर अमेरिकेंतील तमाखूच्या कारखान्यांचें सर्वांत मोठें केंद्र आहे. शिवाय येथें रासायनिक द्रव्यें, रंग, लोखंडी सामान यांचे कारखाने व पिठाच्या गिरण्या आणि कापडाच्या गिरण्या आहेत. लो. सं. ८,१६,०४८ आहे. या शहरांत दोन विद्यापीठें आहेत.

**सेंट लुसिया**—वेस्ट इंडीज, ब्रिटिश विंडवर्ड बेटांपैकीं सर्वांत मोठें बेट. क्षे. फ. २३३ चौ. मै.. याची लांबी ४२ मैल व जास्तींत जास्त रुंदी १२ मैल आहे. वेस्ट इंडीजमधील सर्वांत सुंदर बेटांत याची गणना होते. हें ज्वालामुखी बेट आहे. ह्या बेटांत साखर, कोको, पतंगाचें लांकूड, कॉफी, जायफळ, जायपत्री, वगैरे पदार्थ होतात. शिक्षण सरकारच्या मदतीनें चालतें. ह्या बेटांचा एक शासनाधिकारी (विंडवर्ड बेटाच्या गव्हर्नरच्या हुकमतीखालीं असणारा) असून त्याच्या मदतीस एक कार्यकारी व कायदेमंडळ असतें. राजधानी कॅस्ट्रीज वायव्य किनाऱ्यावर आहे. मूळच्या कॅरिब लोकांचा अगदींच नायनाट झाला असून, नीग्रो लोकांचा भरणा जास्त आहे. हे एका तऱ्हेची अशुद्ध फ्रेंच भाषा बोलतात. लो. सं. (१९४२) ७३,७७०.

**सेंट व्हिन्सेंट**—हें ब्रिटिश वेस्ट इंडियन बेट विंडवर्ड बेटांच्या द्वीपसमूहांत मध्यवर्ती आहे. याचें क्षे. फ. १५० चौ. मैल आणि लो. सं. ५०,००० आहे. याची राजधानी किंग्जटाउन आहे. वायव्य भागांत सौफ्रियर या नांवाचा जिवंत ज्वालामुखी पर्वत सुमारें ३,००० फूट उंच आहे. येथें कापूस पिकतो, व तो उत्कृष्ट जातीचा असतो; शिवाय आरारूट, साखर, कोको, मसाल्याचें सामान, रम दारू, वगैरे येथें होतात. हें बेट कोलंबसानें १४९८ सालीं शोधून काढलें; तेथें १७६३ सालीं प्रथम ब्रिटिश वसाहत स्थापन झाली; पुढें १७७९ ते १७८३ पर्यंत हें बेट फ्रेंचांच्या ताब्यात होतें; व नंतर ब्रिटिशांच्या ताब्यांत आलें.

**सेंट सायमन, क्लॉड हेन्री कोम्ट द** (१७६०-१८२५)—एक फ्रेंच अर्थशास्त्रज्ञ व समाजसत्तावादी पंथाचा उत्पादक. १८०२ पासून त्यानें लेख लिहून प्रसिद्ध करण्यास सुरुवात केली. व १८१९ पासून एक नियतकालिक सुरू केलें. पण त्यास फारसे वर्गणीदार मिळाले नाहींत. समाजसत्ताक पंथाचा प्रसार फ्रान्समध्यें करणारा हाच मूळ पुरुष असल्यामुळें व कोम्ट पंथी मतांतील बऱ्याच मूळ कल्पना याच्याच असल्यामुळें आधुनिक विचारांच्या इतिहासांत याला बरेंच महत्त्व आहे. सरंजामी पद्धतीची रचना मोडून टाकून त्याऐवजीं औद्योगिक प्रगतीला योग्य अशी समाजरचना त्यानें सुचविली. समाजांतील गरीब वर्गाचा प्रश्न कसा सोडवावा याबद्दलचीं मतें त्यानें 'दि न्यू ख्रिश्चिॲनिटी' (नवा ख्रिस्ती धर्म) ह्या पुस्तकांत प्रसिद्ध केलीं. सेंट सायमनचीं तत्त्वें उपदेशिणारे अनुयायी त्याच्या मरणसमयीं थोडे होते. त्यांत बार्थेलेमी प्रॉस्पर एन्फान्टिन हा प्रमुख होता. त्याच्या प्रयत्नांनीं या पंथाची पुढें वाढ झाली.

**सेंट हेलेना**—हें दक्षिण ॲटलांटिक महासागरांतलें बेट ब्रिटिशांच्या मालकीचें असून आफ्रिकेच्या किनाऱ्यापासून १,२०० मैल अंतरावर आहे. क्षे. फ. ४७ चौ. मै. व लो. सं. ३,७५० आहे. येथील सर्व प्रदेश ज्वालामुखीपासून बनलेला आहे. व त्यापैकीं बहुतेक प्रदेश १,५०० फूट उंचीवरचा आहे. येथील सर्वोच्च शिखर डयानाज पीक याची उंची २,६९७ फूट आहे. येथें गुरें पाळणें हा मुख्य धंदा असून जवस हें मुख्य पीक येथें होतें. व येथें तीन जवसाच्या गिरण्या आहेत. येथें कलाबतूहि तयार होते. सेंट हेलेना हे आगबोटींना कोळसे घेण्याचें ठिकाण आहे. येथील लोक युरोपियन व आफ्रिकन ईस्ट इंडियन यांच्या मिश्रजातीचे आहेत. जेम्स टाउन हें या बेटाची राजधानी आणि बंदर आहे. हें बेट १९०१ सालीं जो आडीनोव्हा यानें शोधून काढलें, व येथें पोर्तुगीजांनीं वसाहत केली. येथें कांहीं काळ डच लोकांचा आणि ईस्ट इंडिया कंपनीचा अमल होता, आणि १६७३ पासून तें ब्रिटिशांच्या ताब्यांत आहे. १८१५ पासून १८२१ पर्यंत नेपोलियन बादशाहाला या बेटांत कैदी म्हणून ठेवलें होतें. व १९०० सालीं येथें बोअर युद्धांतील कैदी ठेवले होते. या बेटाची व्यवस्था एक गव्हर्नर पाहतो.

**सेटलवाड, सर चिमणलाल हरिलाल** (१८६६– ). मुंबई हायकोर्टाचे अड्व्होकेट व प्रमुख प्रागतिक पुढारी. यांचें शिक्षण एल्फिन्स्टन कॉलेज व लॉ स्कूल यांमध्यें मुंबईस झालें. १९१८ मध्यें हे साउथबरो कमिटीचे व १९१९ मध्यें हंटर कमिटीचे सभासद होते. १९२१ ते १९२३ मध्यें हे मुंबई सरकारच्या कार्यकारी मंडळाचे सभासद होते. १९१७ ते १९२९ पर्यंत मुंबई युनिव्हर्सिटीचे व्हाइस चान्सेलर होते. सर फेरोजशाह मेथा यांचे हे अगदीं उजवे हात होते. तसेंच सर नारायण चंदावरकर यांचे हे सहकारी होते. हे एक जुने प्रागतिक पुढारी आहेत. ऑल इंडिया लिबरल फेडरेशनचे हे अनेकदां अध्यक्ष होते. मुंबई म्युनिसिपल कॉर्पोरेशनचे हे अनेक वर्षे सभासद असून स्कूल कमिटीचेहि बरींच वर्षे चेअरमन होते. मुंबईमध्यें सायमन कमिशनवरील बहिष्कारामध्यें यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला. इंडियन इन्शुअरन्सच्या बाबतींतहि हे बरेंच लक्ष घालतात. यांनीं 'इंडस्ट्रिअल ॲंड प्रुडेन्शिअल' व 'व्हल्कन' या विमा कंपन्या स्थापन केल्या आहेत. ते १९३५ मध्यें ऑल इंडिया इन्शुअरन्स कंपनीज असोसिएशनचे अध्यक्ष होते.

**सेंट्सबरी, जॉर्ज एडवर्ड बेटमन** (१८४५–१९३३)— एक इंग्रज टीकाकार. हा एडिंबर्ग विद्यापीठांत १८९५ ते १९१५ पर्यंत वक्तृत्व आणि इंग्रजी वाङ्मय या विषयांचा प्राध्यापक होता. यानें अनेक वाङ्मयीन लेख व टीकाविषयक ग्रंथ लिहिले असून त्यांत त्याचें प्रावीण्य दिसून येतें.

**सेडन खुर्ची**—ही एक प्रकारची खुर्ची असून हिला दोन दांडे बसविलेले असतात; व ही दोन माणसें उचलून नेतात. हिच्यावर आच्छादान असतें. ही आपल्याकडील डुल्या काळच्या मेण्याप्रमाणें असते. ही खुर्ची इंग्लंडमध्यें सन १६३४ मध्यें उपयोगांत आली. परंतु घोड्याच्या गाड्या प्रचारांत आल्यापासून ही मुळींच दिसत नाहीं.

**सेंद्रक राजघराणें**—पश्चिमेकडील चालुक्य घराण्यांतील दुसऱ्या पुलकेशीचा (इ. स. ६०९–६४२) मामा श्रीवल्लभसेनानंद-राज हा सेंद्रक घराण्यांतील होता. नवसरी जिल्ह्यांत बगुम्रा येथील दानपत्रांत सेंद्रक राजांची लहानशी वंशावळ आहे. तीन भानुशक्ति, त्याचा मुलगा आदित्यशक्ति व त्याचा दुसरा मुलगा पृथ्वीवल्लभ-निकुंभशक्ति यांचीं नांवें आहेत; व कल्चुरी किंवा चेदि शकाचें ४०६ वें वर्ष (म्हणजे इ. स. ६५५) त्यावर दिलें आहे. सेंद्रक महाराज पोगिल्ली हा पश्चिम चालुक्य घराण्यांतील विजया-दित्याचा (इ. स. ६८०–६९७) मांडलिक होता, व त्याच्या राज्यांत बनवासी प्रांतांत नागरखंड जिल्हा व लेड्डुर नांवाचें खेडें होतें, असा म्हैसूरमधील बळ्ळावें येथील एका शिलालेखांत उल्लेख आहे. या राजांना भुजगेंद्र अथवा नागवंशाचे राजे असें एका शिलालेखांत म्हटलें आहे.

**सेन (राजे)**—बंगालमधील एक राजघराणें. १२ व्या शतकाच्या आरंभीं सेन घराण्यांतील विजयसेन राजानें पाल राजास हांकून दिलें. ११ व्या शतकाच्या शेवटीं पूर्वेस सेनांची सत्ता वाढली होती व पश्चिमेस महानंदा व भागीरथी यांपासून करतोयापर्यंत व पूर्वेस ब्रह्मपुत्रेपर्यंत बंगाल प्रांताचा बहुतेक भाग त्यांच्या ताब्यांत होता. सेन हिंदु होते, तेव्हां साहजिकच त्यांच्या अमदानींत बौद्ध धर्म कमी होत गेला. या घराण्यांतील प्रसिद्ध राजा बल्लाळ सेन (पाहा) हा विजयसेनाचा पुत्र होय. यानें चातुर्वर्ण्याची पुनर्घटना केली. यानेंच बंगालचे चार भाग केले असें म्हणतात. यानें मिथिला जिंकून ती आपल्या राज्यास जोडून घेतली. त्याचा मुलगा लक्ष्मणसेन हा गादीवर बसला (सुमारें ११७०) त्या वेळेस सुरू झालेला शक अद्याप तेथें चालू आहे (लक्ष्मणसेन शक पाहा). लक्ष्मणसेनानें संस्कृत विद्येस बरेंच उत्तेजन दिलें. तथापि लष्करी सत्ता अगदींच राखण्याकडे त्यानें अगदीं दुर्लक्ष केलें होतें. त्यामुळें केवळ १८ मुसलमान घोडेस्वारांनीं त्याच्या राजवाड्यांत शिरून थोड्या वेळांत सर्व राज्य काबीज केलें. लक्ष्मणसेन विक्रमपुरास पळून गेला (१२०३). तथापि पुढें मुसलमानांच्या साम्राज्याखालीं लक्ष्मणसेनाच्या वंशजांनीं पूर्व-बंगालांत बरीच सत्ता स्थापन केली व पुढें १२० वर्षें राज्य केलें. त्याची राजधानी ढाका जिल्ह्यांत विक्रमपूर होती. सेन राजांचा पूर्वज दक्षिणेंतील कोणी ब्राह्मण असून पुढें त्यानें बंगाल राज्यास

कारकीर्दींत सुरू झाली. वास्तविक ईजिप्शियन लोकांनीं सेरापिस देवतेला आपली स्वतःची देवता असें कधींच मानलें नाहीं. परंतु ईजिप्त देशांतील ग्रीक लोकांच्या आणि रोमन लोकांच्या शहरांत ही मुख्य देवता मानली जात असे. या देवतेचीं एकंदर ४२ मंदिरें ईजिप्त देशांत टॉलेमी राजांच्या आणि रोमन लोकांच्या कारकीर्दींत बांधलीं गेलीं. शिवाय या देवतेची पूजा आशिया मायनरमध्यें होऊं लागली; आणि इ. स. १४६ मध्यें रोम शहरांत या देवतेची स्थापना अॅन्टोनिअस पायस यानें केली.

**सेरा मठ**—हा ल्हासापासून चार मैलांवर आहे. ह्या मठांत तिबेटांतील सर्व ज्ञान सांठविलें आहे. या मठांत बौद्धधर्मीय ज्ञान दिलें जातें. विद्यार्थी बहुतकरून तीन जातींचे असतात. त्या जाती म्हटल्या म्हणजे मोंगल, तिबेटी व खाम ह्या होत. विद्यार्थ्यांपुढील ध्येय पारमार्थिक नसून केवळ ऐहिक असतें. आचार्य परीक्षा उत्तीर्ण होऊन पदवी मिळण्यास सुमारें वीस वर्षें लागतात. पदवी मिळवितेवेळीं विद्यार्थ्यास आपल्या सर्व गुरूंस एक जेवणावळ द्यावी लागते व त्या जेवणावळीस सात-आठशें रु. खर्च येतो. हा खर्च विद्यार्थी कर्ज काढून करतो. आचार्यपरीक्षा उत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यास हें कर्ज मिळणें शक्य होतें; कारण विद्यार्थी एकदां आचार्य होऊन लामा झाला म्हणजे त्यास लोकाश्रयावर सुखानें राहतां येतें, आणि मोठमोठ्या देवळांचेंहि आधिपत्य मिळणें सुलभ होतें.

**सेलेबेझ**—इंडोनेशिया. हें सुंडा बेटांतील एक बेट आहे. सेलेबेझ बेटाचें क्षे. फ. ७२,०७० चौ. मै. व लो. सं. ४२,२७,००० आहे. भारतीय संस्कृतीनें हा देश स्पृष्ट आहे. येथें गंधकयुक्त पाण्याचे झरे आहेत. बेटाच्या पूर्व भागाच्या मध्यांत कोरुवे पर्वत (१०,००० फूट) असून हा या बेटांत अत्युच्च पर्वत आहे असें म्हणतात. किनाऱ्यावरील प्रदेश सुपीक व दाट लोकवस्तीचा आहे. पण स्वाभाविक बंदरें फार थोडीं आहेत. उत्तरेकडच्या द्वीपकल्पांत वर्षांतून १०२ इंच व खालच्या भागांत १५७ इंच पाऊस पडतो. येथील घोड्यांची फार ख्याति आहे. येथें तांदूळ, मका, नाचणी, कॉफी, कोबी (देशी बटाटा) यांची लागवड फार आहे. येथें गोरॉन्टालो जिल्ह्यांत युरोपियनांच्या देखरेखीखालीं सोनें काढण्यांत येत असे. जस्त, लोखंड व तांबें पूर्व द्वीपकल्पांत व इतर भागांत निघतें. सेलेबेझचा पोर्तुगीज लोकांना १६ व्या शतकाच्या आरंभीं शोध लागला. या शहराचें नांव सेलेबेसी किंवा क्लाबाट अथवा कालाबाट पर्वतावरून पडलें असावें. १६०९ मध्यें इंग्रजांनीं येथें शिरकाव करून घेण्याचा प्रयत्न केला होता. डच लोक येथें १६ व्या शतकाच्या शेवटीं किंवा १७ व्या शतकाच्या आरंभीं आले. या डच लोकांचें वर्चस्व १९४८ पर्यंत होतें. आतां इंडोनेशिया या स्वतंत्र राज्यांत सेलेबेझ येतें.

**सेल्युकस निकेटर** (मृत्यु ख्रि. पू. ३०१)—अलेक्झांडरचा एक प्रसिद्ध सेनापति. याचा प्रतिस्पर्धी अलेक्झांडरचा दुसरा सेनापति अँटीगोनस (पाहा) हा होता. अलेक्झांडरच्या मृत्यूनंतर साम्राज्यवांटणीबाबत या दोघांत तंटे लागले. शेवटीं सेल्युकसचा जय होऊन तो पूर्व आशियाचा सत्ताधीश बनला. व त्यानें ख्रि. पू. ३०६ मध्यें स्वतःला राज्याभिषेक करून घेतला व 'निकेटर' म्हणजे विजेता ही पदवी धारण केली. सिंध आणि पंजाब जिंकण्यासाठीं हिंदुस्थानकडे तो वळला तेव्हां चंद्रगुप्त मौर्य याच्याशीं त्यानें तह केला व आपली मुलगी चंद्रगुप्ताला दिली असें म्हणतात. नंतर तो परत आपला जुना शत्रु अँटीगोनस याचा पूर्णपणें कांटा काढण्यासाठीं गेला. पण त्याचा पराजय होऊन तो युद्धांत मारला गेला. मेग्यास्थेनीज (पाहा) हा सेल्युकसचा पाटलिपुत्र येथें चंद्रगुप्ताच्या दरबारीं वकील होता.

**सेल्युशिया**—आशिया खंडांत या नांवाचीं बरींच ठिकाणें आहेत; व तीं सेल्युकस निकेटरनेंच स्थापिलेलीं आहेत. टायग्रीस नदीच्या कांठचें सेल्युशिया सर्वांत प्रसिद्ध आहे. बाबिलोनपासून तें ३० मैल दूर आहे.

**सेल्युसीड**—हें सिरिया देशांतील राजघराण्याचें नांव आहे. १ ला सेल्युकस (ख्रि. पू. ३५८-२८०) हा या राजघराण्याचा मूळ संस्थापक असून तो प्रथम अलेक्झांडर दि ग्रेट याचा सेनापति होता. अलेक्झांडरच्या मरणानंतर (३२३) त्यानें बाबिलोनची सत्रपी (सुभेदारी) मिळविली. आणि नंतर त्यानें या संस्थानांत अधिकाधिक प्रदेश सामील करून युफ्राटीस नदीपासून सिंधु नदीपर्यंतचा प्रदेश आपल्या अमलाखालीं आणला; आणि ३०६ सालीं स्वतःला राजा ही पदवी धारण केली. नंतर त्यानें सिरिया आणि आशिया मायनर हा सर्व प्रदेश आपल्या सत्तेखालीं आणला. या राजघराण्याची सत्ता दुसरा सेल्युकस राजा (ख्रि. पू. २४६-२२६) याच्या कारकीर्दींत ऱ्हास पावूं लागली. आणि या राजांची बॅक्ट्रिया, पार्थिया, आर्मेनिया, ज्यूडिया, इत्यादि प्रदेशांवरील सत्ता तेथें बंडें झाल्यामुळें व इतर कारणांनीं नष्ट झाली. राज्याचा उरलेला प्रदेश ख्रि. पू. ६५ मध्यें रोमन लोकांनीं आपल्या साम्राज्यांत सामील केला.

**सेवाग्राम**—मध्यप्रांत, वर्ध्यापासून थोड्या अंतरावर महात्मा गांधी यांनीं वसविलेलें गांव. येथें महात्मा गांधी एका झोंपडींत राहत असत. पण त्यांना भेटण्यासाठीं अनेक आंतरराष्ट्रीय कीर्तीचे थोर पुरुष येथें येऊन जात. शहरच्या कृत्रिम सुखसोयी या ठिकाणीं बिलकुल नाहींत. सर्व वातावरण ग्रामीण व ग्रामोद्धाराचें ठेविलें आहे. म. गांधींच्या वधानंतर १९४८ च्या मार्च मध्यें येथें सर्व हिंदी पुढारी जमले व 'सर्वोदय समाजा'ची स्थापना गांधींचें समाजसेवेचें कार्य चालविण्यासाठीं केली. (सर्वोदय योजना पाहा).

**सेवुल**—दक्षिण कोरियाची राजधानी. तद्देशीय नांव कीजो–कु असें आहे. येथील लो. सं. ९,३५,४६४ आहे. हें शहर ग्रॅनाइट टेकड्यांमध्यें वसलें आहे. शहराभोंवतीं दगडी कोट असून तो सुमारें २० ते ३० फूट उंचीचा व ११ मैल परिघाचा आहे. त्याला ८ दरवाजे आहेत. एक रोमन कॅथॉलिक देवालय, मोठालीं राज-समागृहें व रशियन आणि फ्रेंच वकिलातींच्या इमारती येथें आहेत. येथें जें एक संगमरवरी देवालय आहे त्याच्यावरचें खोदकाम ७ व्या शतकाद्दतर्फे जुनें आहे. पण हें उत्कृष्ट शिल्पकाम कोरियन नाहीं. हें शहर बरेंच स्वच्छ आहे. रेल्वे, टेलेफोन, वगैरे आधुनिक सोयी आहेत. दुसऱ्या महायुद्धापूर्वी हें सबंध कोरियाची राजधानी असे. पण नंतर दक्षिण आणि उत्तर असे कोरियाचे विभाग पडले. १९५० सालीं उत्तर कोरियानें दक्षिण कोरियावर आक्रमण केलें, तेव्हां संयुक्त राष्ट्रसंघानें उत्तर कोरियावर स्वारी केली व सेवुल राजधानी मुक्त केली. या युद्धांत सेवुल शहराचा फार नाश झाला. आतां याचें पूर्वीचें वैभव किती उरलें असेल याची शंका आहे.

**सेव्हन्थ–डे ॲडव्हेंटिस्ट**—हा एक प्रॉटेस्टंट लोकांतील पंथ आहे. हे आठवड्यांतील सातवा दिवस विश्रांतीचा दिवस मानतात. ते ख्रिस्ताच्या पुनरुत्थानावर विश्वास ठेवतात. सर्व पृथ्वीवर मिळून या पंथाचीं आठ हजार देवालयें आहेत. व या पंथांतील लोकांची संख्या सुमारें पांच लाख आहे.

**सेव्हॅस्टोपोल**—रशिया. हें क्रिमियाच्या नैर्ऋत्य किनाऱ्यावर काळ्या समुद्रावरील रशियाचें महत्त्वाचें आरमाराचें ठाणें आहे. हें मास्कोशीं आगगाडीनें जोडलेलें आहे. लो. सं. सुमारें ७५,०००. क्रिमियन युद्धापूर्वी हें शहर चांगलें वसविलें होतें. परंतु वेढ्यानंतर चांगल्या अशा चौदा सुद्धां इमारती येथें राहिल्या नाहींत. नंतर हल्लींचें शहर उत्तम वसविलें आहे. १६ व्या शतकांत तार्तर लोकांनीं येथें वसाहत करून तिला अख्तयार असें नांव दिलें. १७८३ तील रशियन विजयानंतर हें खेडें रशियन आरमाराच्या ठिकाणाकरितां निवडलें गेलें. १८५४ मध्यें इंग्लिश, फ्रेंच व तुर्क लोकांनीं मिळून याला वेढा दिला. तो ११ महिने चालू राहून येथील बळकट तटबंदी उडविण्यांत आली. १८७० मध्यें फ्रँको–जर्मन युद्धाच्या वेळीं रशियन सरकारनें पुनः हें शहर आरमाराचें ठिकाण केलें.

**सेव्हील**—हें शहर दक्षिण स्पेनमधील सेव्हील प्रांताची राजधानी आहे. येथील फार महत्त्वाची इमारत गॉथिक कॅथेड्रल ही होय. हिचें बांधकाम १४०२ सालीं सुरू झालें. येथें प्राचीन रोमन लोकांनीं तयार केलेला एक मोठा पाण्याचा नहर (ॲक्वेडक्ट) आहे व एक विद्यापीठ आहे. येथें मुख्य कारखाने आहेत ते म्हणजे रेशमी कापड, तागाचें कापड, चिनी मातीचीं भांडीं, साबण, बुचें, चॉकोलेट, कमावलेलें कातडें, तमाखू, सिगार यांचे होत. सेव्हील हें स्पेनमधील अत्यंत प्राचीन शहरांपैकीं एक शहर आहे. गॉथिक राजे येथें प्रथम राहत असत. नंतर ६ व्या शतकात ते राजे टोलेडो येथें राहण्यास गेले. हें शहर इ. स. ७१२ ते १२४८ पर्यंत मूर लोकांच्या ताब्यांत होतें. नंतर कॅस्टाइलचा राजा तिसरा फर्डिनांड यानें तें हस्तगत केलें. अमेरिकेचा शोध लागल्यानंतर त्या नव्या जगाबरोबरच्या व्यापाराचें हें शहर केंद्र बनलें. पण पुढें केडीझ बंदराला महत्त्व प्राप्त झाल्यामुळें हें शहर मागें पडलें. १८१० सालीं हें शहर नेपोलियनचा सेनापति साउल्ट याला शरण गेलें. पण १८१२ सालीं तें ब्रिटिश सैन्यानें पुन्हां जिंकून घेतलें. लो. सं. २,२८,६६८.

**सैगल, केदारनाथ**—पंजाबांतील एक राजकीय कार्यकर्ते. सन १९०८ मध्यें पंजाबमध्यें अगदीं प्रथम स्थापन झालेल्या भारतमाता या राजकीय संस्थेस हे मिळाले. पंजाबमधील कर-बंदीच्या चळवळींत यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला. १९११ सालीं यांस हत्यारांच्या कायद्याखालीं अटक झाली होती व १९१२ मध्यें सुटका झाली. १९१५ मध्यें गदर कटामध्यें पुन्हां अटक झाली होती. त्यांतून एक वर्ष खटला चालल्यानंतर त्यांची सुटका करण्यांत आली. परंतु भारत संरक्षण कायद्याखालीं पुन्हां अटक होऊन ४½ वर्षें त्यांस मुलतानमधील एका दाट जंगलांत बंदिस्त करून ठेवण्यांत आलें. तेथून त्यांची १९२० मध्यें सुटका झाली. १९२१ मध्यें हे काँग्रेस चळवळीत येऊन मिळाले. १९२२ मध्यें हे लाहोर काँग्रेस कमिटीचे जनरल सेक्रेटरी होते. त्याच वर्षी त्यांस सहा महिन्यांची शिक्षा झाली. अखबार खबरदार व उर्दू अखबार या नांवाचीं दोन पत्रें यांनीं काढलीं. १९२२ मध्यें या पत्रांची जामिनकीची रक्कम जप्त करण्यांत आली. १९२३ मध्यें यांस पुन्हां अटक झाली. १९३५ पर्यंत हे अखिल भारतीय काँग्रेस कमिटीचे सभासद होते. १९२५ सालीं भरलेल्या पंजाब पोलिटिकल सफरर्स कॉन्फरन्स(राजकीय बंदी परिषद)चे हे पहिलेच अध्यक्ष होते व नवजीवन भारत सभेच्या संस्थापकांपैकीं हे एक होते. १९२८ मध्यें स्थापन झालेल्या कंप्लीट इंडिपेंडन्स लीग (पूर्ण स्वातंत्र्य संघ) याचे हे एक प्रवर्तक होते. पहिल्या पंजाब नवजीवन सभेच्या अधिवेशनाचे अध्यक्ष होते. ही सभा जालियनवाला बागेमध्यें भरली होती (१९२८). पंजाबमध्यें १९२८ मार्चीं स्थापन झालेल्या कामगार किसान पक्षाचे हे एक संस्थापक होते. सायमन कमिशनवर बहिष्कार टाकण्याच्या चळवळींत हे सामील होते व त्या चळवळींत एका दंग्याच्या खटल्यात यांस पकडण्यांत आलें होतें व लगेच सॉंडर्सच्या खुनाच्या खटल्यांतहि यांस अटक झाली होती (१९२८). पुन्हां तीन वर्षांची सजा देण्यांत आली व त्याच सुमारास प्रसिद्ध भारत कटाच्या खटल्यांत यांस आरोपी करण्यांत आलें. त्या खटल्यामध्यें हे ४ वर्षें अटकेंत होते व यांस ४ वर्षांची पुन्हां शिक्षा देण्यांत आली होती; परंतु अलाहाबाद हायकोर्टानें यांस १९३३

मध्यें सोडून दिलें. १९३३ ते १९३६ सालांत हे पंजाब प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचे जनरल सेक्रेटरी होते.

**सैतान**—हीब्रू धर्मवाङ्मयांत 'डेव्हिल' ही वाइटाची एक शक्ति कल्पिली आहे. तसेंच ही अंधकाराची सर्वाधिष्ठात्री आहे. परमेश्वराशीं सैतानाचें वैर असून माणसाला हा कुमार्गाला नेतो अशी कल्पना आहे. पारशी धर्मांत अहरिमन व इस्लामी धर्मांत इब्लिस हे सैतानच आहेत. ख्रिस्त्यांच्या नव्या करारांतदेखील सैतानाची देवाविरुद्ध भूमिका रंगविली असून त्याचा अधःपात दाखविला आहे. मणिसंप्रदायांतहि सैतानाला महत्त्व आहे. आज वाईट कृत्यांचें उगमस्थान म्हणून याचें नांव घेण्यांत येते.

**सैंधव घराणें**—पश्चिम काठेवाडचें एक मांडलिक राजघराणें. मुसलमानांच्या सिंधवरील स्वाऱ्यानंतर हे काठेवाडांत आलेलें दिसतें. मूळ पुरुष पुष्यदेव यानें ७३४ ते ७५४ पर्यंत राज्य केलें. दहाव्या शतकापर्यंत या घराण्यांतील पुरुषांची माहिती मिळते. या घराण्याची आरमारी शक्ति फार मोठी असे. याच्या प्रजेपैकीं मेहे लोक चांगले दर्यावर्दी होते. सैंधव राजांना 'अपर समुद्राधिपति' असें बिरुद सार्थ लावतात. सैंधव हे प्रतिहारांचे मांडलिक होते. यांची राजधानी भूमली (भूमिल्लिका) गांवीं होती व तेथें लेख सांपडलेले आहेत. भूमलीचा पाडाव १३१३ सालीं मुसलमानांच्या स्वारीनें झाला असावा. पोरबंदरचे जेठवा राजपूत पूर्वी भूमिल्लिका येथें राज्य करीत होते तेव्हां जेठवा राजघराणें सैंधवांपैकीं असेल.

**सैन्य**—प्राचीन काळीं प्रत्येक मनुष्याला स्वतःचें व स्वतःच्या मालमत्तेचें संरक्षण करण्याकरितां बहुतेक हत्यार बाळगावें लागत असे व युद्धहि करावें लागत असे. गांवाचें संरक्षण करण्याकरितां सर्व गांवकऱ्यांस एकत्र येऊन शत्रूशीं सामना करावा लागत असे आणि राज्याचें संरक्षण करण्याकरितां वेळोवेळीं राजा पाचारण करील त्या वेळीं त्या सैन्यांत दाखल व्हावें लागे. पूर्वी सामान्यतः सर्वत्र सरंजामी पद्धतीसारखी सैन्याची पद्धति असे; कांहीं राजांचें खास सैन्य असे व वेळोवेळीं इतर नागरिकांस प्रसंगानुसार सैन्यांत घेतले जात असे. कौटिल्याच्या अर्थशास्त्रादि ग्रंथांत व पुराणग्रंथांत तत्कालीन सैन्यासंबंधीं व व्यूहरचनेसंबंधीं माहिती दिलेली आढळते. मोंगल सैन्यांतहि बादशाही सैन्य व सरदारांचें सरंजामी सैन्य अशीच पद्धति होती. मराठा सैन्यांतहि हुजरात व पागे, पथकें, सरंजामदार, सरदार, वगैरेंचें सैन्य असे. (युद्ध पाहा).

अर्वाचीन सैन्याची कल्पना म्हणजे एका लहान संघावर एक नायक व अशा लहान लहान संघांचे क्रमाक्रमानें मोठे संघ होत जाऊन प्रत्येक संघाच्या नायकामार्फत मुख्य सैन्याधिकाऱ्याचा सर्व सैन्यावर ताबा असून सर्वांनीं एका पद्धतीनें व एका शिस्तीत वागणें या गोष्टी होत. या दृष्टीनें ब्रिटिश सैन्याची जी आज पद्धति आहे तीवरून सैन्यासंबंधीं आधुनिक कल्पनांची चांगली माहिती होईल.

सध्यांच्या ब्रिटिश सैन्यावर आर्मी कौन्सिल या समितीची सत्ता असते. हिचा अध्यक्ष युद्धमंत्री हा असतो. या समितींत पांच लष्करी व पांच बिनलष्करी सभासद असतात. यांचें कार्य युद्ध खात्यामार्फत चालते व प्रत्येक समितीच्या सभासदाकडे खात्याची एक एक शाखा असते.

सैन्यामध्यें पुढील मुख्य विभाग असतात: (१) कायमचें सैन्य; (२) प्रादेशिक सैन्य; व (३) राखीव सैन्य. कायम सैन्यांत (अ) घोडदळ, (आ) तोफखाना, (इ) इंजिनिअर खातें, (ई) गार्ड, व (उ) पायदळ इतकीं येतात. यांखेरीज नोकर खातें, वैद्यक खातें, दाई खातें, टॅंक खातें, दारूगोळा खातें, वगैरेंचा अंतर्भाव होतो. प्रत्यक्ष युद्ध चालू नसतांना या सैन्यांत भरती खुषीची ठेवलेली आहे. नोकरीची मुदत १२ वर्षे असते. त्यांपैकीं ७ प्रत्यक्ष सैन्यांत व ५ राखीव सैन्यांत अशी विभागलेली असते. १९१९ मध्यें या सैन्याचा पगार बराच वाढविण्यांत आला होता.

घोडदळामध्यें राजरक्षक हें पथक स्वतंत्र व जुन्या पद्धतीवर उभारलेलें असतें. इतर घोडदळामध्यें ड्रागून, हूस्सार व लान्सर हे अनुक्रमें एकपासून एकवीसपर्यंत असतात. घोडदळाच्या पथकावर (रेजिमेंट) लेफ्टनंट कर्नल असतो. व त्यांत २५ अधिकारी व ४९७ सैनिक असतात. एका रेजिमेंटचे तीन विभाग असून त्या प्रत्येक स्क्वॉड्रनवर एक मेजर असतो. एका स्क्वॉड्रनचे चार ट्रुप्स म्हणून विभाग असतात. त्या प्रत्येकावर एक सबाल्टर्न असतो. यांच्या पुन्हां लहान तुकड्या असून त्यावर बिगर सनदी अधिकारी असतात.

तोफखान्यामध्यें घोडदळाचा तोफखाना, फील्ड युद्ध तोफखाना, आर्टिलरी व गॅरिसन आर्टिलरी संरक्षक तोफखाना असे विभाग असतात. एका बॅटरीमध्यें ६ तोफा असतात. घोडदळाचा तोफखाना घोडदळाबरोबर असतो व त्याच्याजवळ हलक्या तोफा असतात. फील्ड आर्टिलरी पायदळाबरोबर असते. बॅटरीवर मेजर नांवाचा अधिकारी असतो. त्याखालीं कॅप्टन असतो. त्याच्या हाताखालीं सबाल्टर्न असून प्रत्येकाकडे दोन तोफा असतात व प्रत्येक तोफेवर सार्जंट नांवाचा अधिकारी असतो.

पहिल्या महायुद्धांत जड तोफखाना व वेढ्याचा तोफखाना प्रचारांत आला. त्यामध्यें सर्व व्यवस्था वरीलप्रमाणेंच असे. मात्र तोफा तेवढ्या जड असत. डोंगरी तोफखान्यामध्यें २९५ इंची तोफा असून त्याचे भाग सुटे करून नेतां येतात.

एंजिनिअर खात्याकडे बराकी, किल्ले व इतर बांधकामाची बांधणी-दुरुस्ती हीं कामें असतात. यांच खात्याकडे सर्व

प्रकाश (लाइट), विजेचा पुरवठा, किनाऱ्यावरील कामांचें संरक्षण व विमान विध्वंसक व संरक्षक खातें हीं असतात.

यामध्यें तज्ज्ञ लोकांची भरती करण्यांत येते व यात्र खात्याकडून मोठमोठे पूल बांधणें, रेल्वे तयार करणें, सर्व्हे (पाहणी) करणें, सुरुंग लावणें, वगैरे कामें करून घेण्यांत येतात. पायदळाचे प्रादेशिक विभाग रेजिमेंट या नांवानें असतात. परंतु व्यवस्थेच्या दृष्टीनें बटालियन हा सर्वांत मोठा विभाग होय. बटालियनवर लेफ्टनंट कर्नल हा अधिकारी असतो. रेजिमेंटचा कर्नल हा नामधारी असतो. बटालियनमध्यें ३२ अधिकारी व १,००० सैनिक असतात. यांचे युद्धकाळीं किंवा शांततेच्या वेळींहि हेड-क्वार्टर्स व चार कंपन्या असे भाग असतात. प्रत्येक कंपनींत सहा अधिकारी असतात. यांमध्यें एक कंपनी-कमांडर असतो. हा बहुधा मेजर किंवा सीनियर कॅप्टन असतो. कंपनीचे प्लॅटून म्हणून विभाग असतात. त्यांवर सब्-आल्टर्न असतात. प्रत्येक बटालियनचा मुख्य अधिकारी हा त्या विभागाचें स्वास्थ्य, शिक्षण, शिस्त, सामानसुमान व तयारी यांबद्दल जबाबदार असतो. हा आपलें काम कंपनी-कमांडर व रेजिमेंटचे अधिकारी यांच्या मदतीनें करतो.

अशा बटालियन एकत्र करून जे सैन्याचे मोठाले विभाग बनविण्यांत येतात त्यांत पहिला ब्रिगेड हा असतो. यांत तीन बटालियन असतात व त्यांखेरीज एक खंदकी तोफखान्याची तुकडी (बॅटरी) असते. या ब्रिगेडवर कर्नल कमांडंट नांवाचा अधिकारी असतो व त्याचे ब्रिगेड-मेजर व स्टाफ-कॅप्टन हे दुय्यम अधिकारी असतात. ब्रिगेडमध्यें ३,००० वर सैनिक असतात. यानंतर यापेक्षां मोठा विभाग म्हणजे सेनाविभाग (डिव्हिजन) हा होय. यावर मेजर जनरल नांवाचा अधिकारी असतो व त्याच्या हाताखालीं तीन स्टाफ अधिकारी, तीन ॲडज्युटंट जनरल, व क्वार्टर मास्टर जनरल शाखेचे अधिकारी असतात. या विभागांत घोडदळाशिवाय बाकीचे म्हणजे तोफखान्यावरचे एंजिनिअर व इतर अधिकारी असतात. दोन किंवा अधिक सेनाविभाग व घोडदळ व इतर कांहीं सैन्य मिळून सेनासंघ (आर्मी कोर) होतो. व असे दोन किंवा अधिक सेनासंघ मिळून सैन्य (आर्मी) तयार होतें.

वर उल्लेखिलेल्या नोकर सैन्या (आर्मी सर्व्हिस कोर) कडे अन्न व वाहतूक यांची तरतूद करण्याचें काम असतें. वैद्यक खात्याकडे सैन्याचें आरोग्य व औषधें वगैरेची तजवीज असते. यावर एक लेफ्टनंट जनरल हुद्याचा अधिकारी असतो. तो ॲडज्युटंट जनरलच्या शाखेंत मोडतो. याखेरीज दारूगोळा खातें (ऑर्डनन्स कोर); या खात्याकडे दारूगोळा पुरविण्याची व्यवस्था असते. पगारखातें, धर्मखातें, पशुवैद्यक खातें, वगैरे खातींहि याशिवाय जोडलेलीं असतात व दारूगोळ्याचे कारखानेहि सैन्य खात्याच्याच देखरेखीखालीं चालू असतात.

राखीव खात्यामध्यें ज्या लोकांनीं आपली नोकरीची मुदत पुरी केली असेल व जे सामान्य नागरिक बनले असतील अशांस दाखल करण्यांत येतें. यांची संख्या पायदळाच्या एका रेजिमेंट-बरोबर एक बटालियन इतकी असते.

आरमाराचा समावेश सैन्यांत होत नाहीं. परंतु तें जेव्हां किनाऱ्यावर असेल तेव्हां आरमारी लोकांसहि सैन्याचा कायदा लागू असतो.

यांखेरीज प्रादेशिक 'टेरिटोरियल' सैन्य त्या त्या प्रदेशांत पूर्वीच्या सरंजामी सैन्याच्या ऐवजी उभारण्यात येतें व त्यांकरितां स्वतंत्र कायदे आहेत.

सैन्यांतील मुख्य अधिकाऱ्यांचें शिक्षण स्टाफ कॉलेजमध्यें व दुय्यम अधिकाऱ्यांचें शिक्षण सँढर्स्ट येथें होतें व वुलविच येथें तोफखान्याचें व एंजिनिअरिंगचें शिक्षण मिळतें.

ऑस्ट्रेलियामध्यें लष्करी शिक्षण १२ ते २६ वर्षांपर्यंत सक्तीचें आहे. कॅनडामध्यें सक्ति नाहीं. पण कांहीं सैन्य ठेवण्यांत येतें. दक्षिण आफ्रिकेमध्यें कांहीं खडें सैन्य व नागरिक सैन्य असे दोन प्रकार आहेत.

हिंदी सैन्य—ब्रिटिशांनीं हिंदुस्थानांत आल्यापासून येथील लोकांस आपल्या सैन्यांत दाखल करून घेण्याचें धोरण अमलांत आणलें होतें. १८५७ च्या बंडापर्यंत ब्रिटिश व देशी सैन्यांत फारसा फरक नव्हता. परंतु बंडानंतर हिंदी सैन्याची जुनी ब्रिटिश सैन्यासारखीच असलेली रचना मोडून जरा कमी दर्जाची अनियंत्रित म्हणून करण्यांत आली. या नवीन पद्धतीमध्यें प्रत्येक रेजिमेंटमधील ब्रिटिश अधिकाऱ्यांची संख्या कमी करण्यांत आली; व कंपनीवर देशी अधिकाऱ्यांची नेमणूक करण्यांत येऊं लागली. ब्रिटिश अधिकारी फक्त स्क्वाड्रन किंवा तुकडी यावर नेमण्यांत येऊं लागले. देशी सैन्यांतील तोफखाना बंद करण्यांत आला. फक्त कांहीं डोंगरी तोफा ठेवण्यांत आल्या. घोडदळाची रचना शिलेदार पद्धतीनें म्हणजे ज्यानें त्यानें आपला घोडा पदरखर्चानें आणावा अशा पद्धतीनें करण्यांत आली. ही पद्धति बरेच दिवस अमलांत होती. परंतु तींत हळूहळू फरक करण्यांत आला आहे. गेल्या महायुद्धापासून बरेच महत्त्वाचे फरक हिंदी सैन्यांत करण्यांत आले आहेत व ब्रिटिश सैन्याच्या धर्तीवर देशी अधिकाऱ्यांच्या हाताखालीं देशी सैन्य तयार करण्याचे प्रयत्न चालू आहेत. *सैन्याला विमानविभाग अलीकडे जोडण्यांत आला आहे.*

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर हिंदी सैन्यांतील बहुतेक ब्रिटिश अधिकारी कमी करण्यांत आले व ले. जनरल करिआप्पा यांना पहिले हिंदी कमांडर-इन्-चीफ नेमण्यांत आलें. शासन आणि लष्करी

विचारांची सांगड घालण्यासाठीं शास्त्रज्ञांचें एक मंडळ तयार करण्याची योजना आहे. सैन्याची पुनर्रचना व वाढ करण्याबद्दल प्रयत्न चालले आहेत. नॅशनल कॅडेट कोअर, स्टाफ कॉलेज (वेलिंग्टन), आर्मर्ड कोअर स्कूल (अहमदनगर), रुरकी येथील यांत्रिक व वैद्युतिक स्थापत्य-शाला व परदेशांत युद्ध साहित्य खरेदीसाठीं प्रतिनिधींची नेमणूक, यांसारख्या या योजना आहेत.

**सैन्यरचना व डावपेंच**—एखाद्या मोहिमेमध्यें सैन्याची हालचाल करण्याच्या कामीं एखादा सेनापति जें कौशल्य दाखवितो अथवा जी पद्धति वापरतो तिला लष्करी डावपेंच (स्ट्रॅटेजी) असें म्हणतां येईल. सामान्यतः सैन्याच्या योग्य तऱ्हेनें हालचाली करणें हा या कलेचा हेतु असतो. मुख्य मोहिमेच्या धोरणास अनुसरून प्रत्यक्ष शत्रूसमोर अथवा रणांगणावर जी सैन्याची रचना किंवा हालचाल करावयाची तिला सैन्यरचना किंवा व्यूहरचना असें म्हणतां येईल. हे दोन्ही शब्द परस्परांस पूरक असे आहेत. यामुळें डावपेंचाचा मुख्य उद्देश यशस्वी होण्याकरितां सैन्याची रचना अथवा व्यूहरचना यांचें महत्त्व आहे. मोहिमेचा मुख्य उद्देश शत्रूच्या सैन्याचा नाश करणें हा असतो व त्या दृष्टीनें सैन्याची हालचाल करावयाची असते. पहिल्या डावपेंचाच्या भागांत वस्तुस्थिति व तत्त्वें आणि पद्धति यांचा समावेश होतो. व्यूहरचना किंवा सेनारचना यांमध्यें फक्त वस्तुस्थितीस महत्त्व असतें. पहिल्या प्रकारच्या वस्तुस्थितीमध्यें पुढील गोष्टींचा अंतर्भाव होतो: (१) दोन्ही बाजूंच्या सैन्याची संख्या; (२) प्रत्यक्ष व सुसाध्य अशीं साधनें—यामध्यें द्रव्य व सामानसुमान हीं दोन्ही येतात; (३) दळणवळणाचीं साधनें व मार्ग; व (४) रणांगणाचें स्वरूप. तत्त्वें अथवा पद्धति यामध्यें पुढील गोष्टी अंतर्भूत होतात: (१) शत्रुपक्षाचें लढाईंतील उद्दिष्ट; (२) दोन्ही पक्षांकडील युद्धांत नाश पावणाऱ्या मनुष्यांची व सामानाची पुन्हां भरपाई करण्याची शक्ति; (३) इतर राष्ट्रें एखाद्या पक्षास मिळण्याची शक्यता; (४) शत्रुपक्षाच्या सैन्याची निरनिराळ्या क्षेत्रांत होणारी वांटणी; इत्यादि.

**सोडत**—(लॉटरी). नशिबानें किंवा योगायोगानें मिळणाऱ्या बक्षिसाची ही पद्धत आहे. पाश्चात्य देशांत प्रथम इटलींत या पद्धतीचा उगम झाला. इंग्लंडमध्यें इ. स. १५६९ त जाहीर लॉटरी निघाली व पुढें १८ व्या शतकांत तर सरकारी आणि खाजगी सोडतींची व त्यांबरोबरच्या लांड्यालबाडींची परमावधि झाली. तेव्हां सरकारनें हळूहळू प्रतिबंधक कायदे केले व चांगल्या उपयुक्त कार्यांना मदत होणाऱ्या सोडतींना फक्त परवानगी ठेविली. चढाओढींच्या सामन्यांत जर बक्षिसें नशिबावरच अवलंबून ठेवल्यास त्यांना सोडतीचें स्वरूप येतें; तथापि बुद्धिकौशल्याला त्यांत वाव असेल तर त्या तितक्याशा वाईट समजत नाहींत.

**सोडा**—(सिंधुप्राणिद). सिंधू (सोडियम)च्या कांहीं संयुक्तांचें सामान्य नांव. उदा., कॉस्टिक सोडा म्हणजे सिंधुउज्ज्प्राणिद-समुद्रक्षार (सोडियम हायड्रॉक्साइड). सिंधुकर्बनित (सोडियम कार्बोनेट) याला वॉशिंग सोडा किंवा सज्जीखार, आणि द्विकर्बनित (बायकार्बोनेट)ला खाण्याचा सोडा म्हणतात.

**सोडा वॉटर**—या वायुमिश्रित जलांत सोडा बहुधा नसतोच. साध्या पाण्यांत दाबाखालीं कर्बद्विप्राणिद वायु मिसळतात व यंत्रानें बाटल्यांत हें पाणी भरतात.

**सोंडूर संस्थान**—पूर्वी मद्रास सरकारच्या देखरेखीखालीं असलेल्या पांच संस्थानांपैकीं हें एक अतिशय कमी लोकवस्तीचें संस्थान आहे. हें बल्लारी जिल्ह्यानें वेष्टित असून तेथील कलेक्टरच या संस्थानचा पोलिटिकल एजंट असे. संस्थानचें क्षे. फ. १६७ चौ. मैल असून त्यांत २० खेडीं आहेत. लो. सं. १६,०००. बल्लारी जिल्ह्यापेक्षां येथील हवा थंड असून पाऊसहि जास्त पडतो. पावसाचें सरासरी वार्षिक मान ३० इंच आहे. येथील राजघराणें मुधोळकर घोरपड्यांची एक शाखा आहे. मूळ पुरुष शिदोजीराव घोरपडे ह्यानें हें सन १७२८ त जिंकलें. त्याच्या पश्चात् त्याचा वडील मुलगा गुत्तीचा मुरारराव हा राजा झाला. १७७५–७६ सालीं हें हैदरनें जिंकलें व त्या ठिकाणीं त्यानें एक किल्ला बांधला. टिपूच्या मरणानंतर मुराररावाचा पणतू शिवराव हा सोंडूर येथें जहागीरदार ह्या नात्यानें राहूं लागला. पेशवाई बुडाल्यावर १८२६ सालीं मद्रास सरकारकडून शिवरावाला नवी सनद मिळाली. शिवराव स. १८४० त वारला. त्याच्यामागून वेंकटराव गादीवर आला (सन १८६१). त्याला १८७६ सालीं राजा हा किताब मिळाला. पुढें दोन वर्षांनीं हा वारला व रामचंद्र विठ्ठल नांवाचा त्याचा पुतण्या वारस झाला. सध्यांचे राजे यशवंतराव हिंदुराव मामलकतमदार, सेनापति घोरपडे हे आहेत. हे १९२८ सालीं गादीवर आले. संस्थानचें उत्पन्न सु. सात लाख रुपये आहे.

प्राचीन अशीं मुख्य बांधीव कामें म्हटलीं म्हणजे कृष्णनगरचा किल्ला, रामनदुर्गचा जुना किल्ला, व सोंडूर शहरापासून ७ मैलांवर असलेलें प्रख्यात कार्तिकस्वामीचें मंदिर हीं होत. मुख्य पिकें म्हणजे चोलम, कोरा व सज्जा हीं होत. गळिताचीं धान्यें, विड्याचीं पानें व तंबाखू हींहि होतात. संस्थानांतील खनिज संपत्ति तिकडे विशेष लक्ष द्यावें अशी आहे. तींतील हेमेटाइट (तांबडे चरे असलेली लोखंडाची मौल्यवान धातु) ही हिंदुस्थानांत सर्वांत जास्त मौल्यवान आहे. मॅंगेनीजच्या खाणीहि ३ ठिकाणीं लागल्या आहेत. येथें एक दुय्यम शाळा, व कांहीं प्राथमिक शाळा आहेत. हें संस्थान अद्यापि मद्रास प्रांतांत पूर्णपणें विलीन करण्यांत आलेलें नाहीं.

**सोडोम**—हें एक पॅलेस्टाईन प्रांतांतील पांच शहरांपैकीं (सोडोम, गोमोराह, आडमाह, झेबोइम् व झोहार) मुख्य शहर

आहे. या पांच शहरांचा उल्लेख बायबल ग्रंथांतील उत्पत्ति (जेनेसिस्) या नांवाच्या पुस्तकांत आहे. हीं शहरें तेथील रहिवाशांच्या दुष्टपणामुळें उध्वस्त करण्यांत आलीं. पण त्यांपैकीं झोहार हें शहर लोट यानें प्रार्थना केल्यामुळें सुरक्षित ठेवण्यांत आलें.

**सोनगिरी**—मुंबई, कुलाबा जिल्हा. पेणच्या आग्नेयेस ८ मैलांवर मिऱ्या डोंगराच्या दक्षिण बाजूस १,००० फूट उंच टेंकडीवर बांधलेला हा किल्ला आहे. लांबी अर्धा मैल व रुंदी ८० फूट आहे. नैर्ऋत्य बाजूस कडा तुटलेला आहे. रस्ता कोंडवी गांवावरून आहे. हा बापूराव पासलकर यानें बांधला असें सांगतात.

**सोनचांफा**—हें फुलझाड फार मोठें होतें व वर्षांतून दोनदां (उन्हाळ्यांत व पावसाळ्यांत) हें फुलतें. फुलें सुंदर पिवळीं सोनेरी व सुवासिक असतात. लांकूड चांगलें वळणदार असतें. विषमज्वरावर मुळांचा काढा देतात व क्षुपणीवर सालीचा रस किंवा काढा देतात.

**सोनजीराव भापकर** (मृ. १७६१)—मराठेशाहींतील एक वीर पुरुष. हा लोणीचा पाटील असून थोरले बाजीराव व नानासाहेब पेशवे यांच्या कारकीर्दींत चमकला. पानपतच्या लढाईंत याच्या हाताखालीं दहा हजार घोडदळ असून होळकरांसह सैन्याची एक बगल संभाळण्याचें काम याच्यावर सोंपवण्यांत आलें होतें; तेव्हां यानें एकदां सुजाउद्दौल्यास माघार घ्यावयास लावलें होतें. पानपतावरच याला मरण आलें.

**सोनपत**—पंजाब, दिल्ली जिल्ह्याची एक उत्तरेकडील तहशील. क्षे. फ. ४६० चौ. मै.. ही यमुनेच्या पश्चिमेकडे आहे. मुख्य गांव सोनपत व खेडीं २२४. सोनपत गांवीं एक गिरणी व इंग्रजी शाळा आहे. धर्मराजानें दुर्योधनाजवळ मागितलेल्या ५ गांवांपैकीं हें एक आहे. याजवळच सुप्रसिद्ध पानपत गांव आहे.

**सोनपूर संस्थान**—ओरिसा प्रांतांतील एक मांडलिक संस्थान. क्षे. फ. ९०६ चौ. मै.. सोनपुरांत हिंदूंची वस्ती बऱ्याच प्राचीन काळीं झाली असावी असें आसपासच्या गांवांत सांपडलेल्या ताम्रपटांवरून दिसून येतें. सोनपूरचे हल्लींचे संस्थानिक चव्हाण रजपूत असून संबळपूरच्या मधुकर शहाचे वंशज आहेत. संबळपूर येथील बंडाच्या वेळीं नीलाधरसिंग देवानें ब्रिटिशांना मदत केल्याबद्दल त्याला राजबहादूर असा किताब मिळाला आहे. त्याचा नातू राजा बीरमित्रोदयसिंग देव हा स. १९०२ मध्यें गादीवर बसला. संस्थानशीं असलेल्या हितसंबंधांचें रक्षण करण्याकरितां ब्रिटिश सरकारनें येथें पोलिटिकल एजंट नेमला होता. लो. सं. सु. तीन लाख. सोनपूरखेरीज संस्थानांत ८९९ खेडीं आहेत. येथील रहिवासी उडिया जातीचे असून उडिया भाषा बोलतात. संस्थानचें उत्पन्न सुमारें ४ लाख रु. आहे. संस्थानांत चाळीस शाळा व दोन इस्पितळें आहेत. हें संस्थान आतां ओरिसा प्रांतांत विलीन झालें आहे.

**सोनमासा**—चीन व जपान देशांमध्यें गोड्या पाण्यांत

आढळणारे हे एका जातीचे मासे आहेत. हे स्वाभाविकतः हिरव्या रंगाचे असतात व त्यांची निवड करून निपज केली म्हणजे त्यांस सोनेरी रंग येतो. चिनी लोक यांची पैदास करून शोभेकरितां ठेवतात. त्यांच्या अनेक चमत्कारिक जाती तयार करतात. मोठ्या तळ्यांत सोडल्यास त्यांचा रंग पुन्हां नैसर्गिक रंगासारखा होतो.

**सोनवेल**—आकाशवेल. ही दामणाएवढी जाड असणारी वेल झाडावर वाढते. हिचें मूळ झाडावरच कोठेंतरी असतें. पण तें दिसत नाहीं. या वेलीचे सोन्यासारखे पिवळ्या रंगाचे बारीक दोर असतात. आपल्याकडे ही बोराच्या झाडावर दिसते. ज्वरावर वेलीचा रस मधांत देतात.

**सोनामुखी**—(सेन्ना). हिचा उपयोग औषधांत रेचक म्हणून करण्यांत येतो. सोनामुखी ही बाभूळ वर्गांतील कांहीं झाडांचा पाला असून खऱ्या सोनामुखींत त्या पाल्यासारखी दुसऱ्याहि जातींच्या अनेक पाल्यांची भेसळ करण्यांत येते. अलेक्झांड्रिया येथून येणारी सोनामुखी ही कॅसिया अक्युटिफोलिया किंवा कॅसिया ओबोव्हाटा या झाडांचीं पानें असतात.

**सोनार**—भूपृष्ठावर रडारचें जें कार्य चालतें तेंच कार्य पाण्यांत करणारें यंत्र. रडारमध्यें रेडिओच्या कंपनें दिसून येतात तर या यंत्रांत ध्वनिलहरींचा उपयोग करण्यांत येतो. लहरी अथवा कंपनें इच्छित वस्तु अथवा स्थळ यावर्तन जाऊन परावर्तित होऊन परत येतात. या तत्त्वाचा उपयोग करून हें यंत्र बनवलें आहे. पाणबुड्या, बु. बोटी, सुरुंग, बुडलेले जहाज, इ. दूरवरून ओळखतां येण्यासाठीं हें एक प्रभावी साधन आहे.

**सोनार**—सोनार हें नांव धंदेवाचक असल्यामुळें या नांवाखालीं विविध वर्णांचे व धर्मांचे लोक येतात. उदा., यांत दैवज्ञांसारखे ब्राह्मण व लाडसोनारांसारखे क्षत्रिय येतात. कांहीं मुसलमान, जैन व शीखहि आपल्यास सोनार जातीचे म्हणवितात. एकंदर हिंदुस्थानांत १२॥ लाखांवर सोनार जातीचे लोक आहेत. पैकीं १२ लक्ष हिंदू आहेत, ४० हजार मुसलमान आहेत व बाकीचे शीख आहेत. जैन सोनार शंभराच्या आंतच आहेत. सोनारांची सर्वांत जास्त संख्या संयुक्त प्रांतांत सांपडते (२॥ लाख) व त्या खालोखाल बिहार–ओरिसांत (२ लाख), नंतर मुंबई इलाख्यांत (१३⁄४ लाख) व यापेक्षां कमी पंजाबांत आहे. मुंबई प्रांतांत सोनारांची व्याप्ति दक्षिण, कोंकण व कर्नाटक या सर्व प्रांतभर आहे. कानडा जिल्ह्यांत त्यांना अक्साळी म्हणतात. दुसऱ्या (सुतार, लोहार वगैरे) कारागिरांप्रमाणें हेहि आपली उत्पत्ति विश्वकर्म्यापासून सांगतात. हे स्वतःला पांचाळ म्हणवितात. *सोनार समाजांत उच्च दर्जाचे म्हणजे दक्षिणेंतले कानडे सोनार व* विश्वकर्मामुखोद्भूत पांचाल समजतात. परंतु देवांग व कोंकणी सोनार हेहि आपणास ब्राह्मणांसारख्या श्रेष्ठ दर्जाचे समजत असून आपणांस दैवज्ञ सोनार व पांचाल सोनार म्हणवून घेतात. वैश्य सोनारांचा एक चौथा वर्ग दिसतो आहे. पूर्वीं नाण्यांची पारख करण्याकरितां सोनारांची आवश्यकता असे. त्या सोनारांना पोतदार ही संज्ञा असून बलुतेदारांत त्यांचा समावेश केला जाई. सोनारांत पुढील १३ वर्ग आहेत—

(१) अहीर किंवा खानदेशी; (२) अग्नर; (३) देवांग, दैवज्ञ अथवा पांचाल सोनार; (४) देशी अथवा मराठे सोनार; (५) कड्ड, दासीपुत्र अथवा विदुर; (६) कन्नड; (७) कोंकणी अथवा दैवज्ञ; (८) लाड; (९) माळवी; (१०) परदेशी; (११) साड; (१२) शीलवंत; व (१३) वैश्य अथवा जैन. यांपैकीं कांहींत परस्पर रोटी-बेटी व्यवहार होत नाहीं.

सोनारांपैकीं जे आपणांस ब्राह्मण म्हणवतात, त्यांच्यांत गोत्रें आहेत. इतर सोनारांच्या जाती त्यांच्या आडनांवावरून प्रचारांत आल्या. यांच्यात पंचायती आहेत.

**सोनार वेल**—हिचीं पानें पिंपळाच्या पानांसारखीं व लांब रुंद असतात. जून पानांवर तांबडे चट्टे उठलेले दिसतात. पटकी किंवा विषबाधा यावर पानाचा रस किंवा मुळीच उगाळून देतात. गर्मीच्या आजारावर सुकी मुळी उगाळून गाईच्या निरशा दुधांत देतात.

**सोनें**—एक मौल्यवान् धातु. परमाणुभारांक १९७.२. विशिष्ट गुरुत्व १९.३२ व द्रवणांक १०६१° शतमान. ऋग्वेद व मागाहूनच्या ग्रंथांत हिरण्य याचा अर्थ सोनें असा आहे. वैदिक काळच्या लोकांनींहि सोन्याला अतिशय महत्त्व दिले होतें. ही धातु नदीच्या पात्रांत सांपडत असे. सिंधु नदीला सुवर्णयुक्ता व सुवर्णजलयुक्ता अशीं नांवें ऋग्वेदांत दिलेलीं आहेत. पृथ्वीपासून सोनें काढण्याची तऱ्हा व सोनें शुद्ध करण्याची तऱ्हा लोकांस माहीत होती हें ऋग्वेद व तैत्तिरीय संहिता यांवरून दिसतें. सोन्याचा उपयोग कानांतील, गळ्यांतील व छातीवरील दागिने, व भांडीं करण्याकडे होत असे असा तैत्तिरीय संहितेंत उल्लेख आहे. सोन्याच्या वजनाचा ज्या अर्थीं उल्लेख आहे त्या अर्थीं त्या काळीं लोकांना सोन्याचीं नाणीं ठाऊक होतीं हें स्पष्ट होतें. पुराणांतून तर सोन्याचे अलंकार व नाणीं यांचे अनेक उल्लेख आढळतात.

माणसाला प्रथम ज्या धातूचा तिच्या गुणामुळें मोह पडला असेल ती धातु सोनें असली पाहिजे. तेज, वर्धनीयता, मृदुता, विद्राव्यता व दुर्भिळता यांमुळें सोनें सर्व धातूंत श्रेष्ठ होऊन बसलें आहे. सोनें जगांत सर्व ठिकाणीं पण थोडथोडें सांपडतें. खडक आणि नदींतील वाळू यांतून देखील ही धातु बाहेर काढतात. खडकांत सोनें असेल तेव्हां मोठ्या खाणी खणून दगड बाहेर काढतात, कुटतात व पाण्यांत टाकतात. पारा सोनें शोषून घेतो. नंतर तो पारा वायुरूपानें उडवितात व उरतें तें सोनें. वाळूंत मिसळलेलें सोनें धुवून काढतात. जगांत दरसाल सुमारें ९ कोटी पौंड किंमतीचें सोनें निघतें; यापैकीं निम्मे ट्रान्सवालच्या खाणींत निघतें. बाकीचें संयुक्त संस्थानें (अमेरिका), कानडा, रशिया, ऑस्ट्रेलिया, ऱ्होडेशिया व हिंदुस्थान या देशांत निघतें. या सोन्यापैकीं तीन चतुर्थांश अलंकारासाठीं जातें. सोनें मऊ असून लवकर झिजतें. म्हणून त्यांत दुसरा धातु थोडा मिसळतात. सोन्याची निर्भेळता कॅरटवर मोजतात. २४ कॅरट सोनें अगदीं शुद्ध असतें व त्यावरून प्रती लावतात.

व्यक्तीप्रमाणें राष्ट्राची पतहि त्याच्याजवळच्या सोन्यावरून अर्थशास्त्रज्ञ मोजतात. पदार्थांच्या किंमतीचा चढउतार सोन्यावर अवलंबून असतो. सर्व मोठ्या राष्ट्रांतून सोन्याचीं श्रेष्ठ नाणीं असतात. सुवर्णचलन हा अर्थशास्त्रांत मोठा महत्त्वाचा प्रश्न आहे. हिंदुस्थानांतहि ब्रिटिश अमलापूर्वीं मोहोरा होत असत. पेशवाईत सोन्याच्या मोहरांचीं नांवें आढळतात. तीं म्हणजे पंचमेल, औरंगाबादी, गंजीकोट, वज्रजोगणी, लातुरी, आजमेर, आमदाबादी, हाली, सिक्का, महमदशाही, अहमदशाही, शेटशाही, दरसानी, दिल्ली शिक्का, इ.. यांशिवाय होन व पुतळी हीं सोन्याचीं नाणीं होतीं. नाणकशास्त्र, द्विधातुवाद पाहा.

सोनें-चांदीच्या मालावरील शिक्के—(हाल–मार्क). सोनें-चांदीच्या चिपा आणि सोनें-चांदीच्या जिनसा यांवर मारलेल्या सरकारी शिक्क्यांना हाल–मार्क म्हणतात. या शिक्क्यामध्यें तीन गोष्टी नमूद केलेल्या असतात त्या—सोनें-चांदीचा कस; व्यापाऱ्याचें नांव; आणि तो जिन्नस तयार केल्याची तारीख. तेराव्या

उत्कृष्ट असून त्यांत विविधता भरपूर आहे; थोडक्या ओळींत पुष्कळ अर्थ व्यक्त करण्याची कला त्याला उत्तम साधलेली आहे; व सर्व नाटकें त्यानें मनाच्या समतोल वृत्तीनें लिहिलीं आहेत; आणि त्याच्या कोणत्याहि नाटकांत निरर्थक असा मजकूर मुळींच नाहीं.

**सोम**—ही एक प्रसिद्ध वल्ली असून तिच्यापासून वैदिक कालीं सोमरस काढीत असत. या सोमरसाचें इतकें महत्त्व आहे कीं, ऋग्वेदाचें एक सबंध मंडळ (९ वें) व इतर मंडळांतील सहा सूक्तें या सोमवल्लीवर लिहिलीं आहेत. तथापि या सोमवल्लीबद्दल प्रत्यक्ष माहिती फारच थोडी उपलब्ध आहे. या वल्लीच्या फांद्या पिंगट (बभ्रु), तांबड्या वर्णाच्या (अरुण) किंवा पिवळट (हरित) अशा आहेत. ही वल्ली डोंगरावर होत असे. मूजवत् पर्वताची या सोमवल्लीबद्दल विशेष ख्याति होती. या सर्व उल्लेखांवरून ही वल्ली कोणती हें निश्चयानें सांगता येत नाहीं. कांहीं लोकांच्या मतानें हिला लॅटिनमध्यें सारकोस्तेमा व्हिमिनेल किंवा अस्क्लेपिअस ॲसिडा असें म्हणतां येईल. *ही वल्ली प्रथम* दगडांनीं किंवा उखळांत कुटून (उखळाचा उल्लेख फक्त ऋग्वेदांतच आढळतो) मग तिचा रस काढीत असत. दगडांनीं कुटण्याची चाल ऋग्वेदकालीं नेहमींची म्हणून वर्णिलेली आहे. या दगडांना ग्रावन् किंवा अद्रि अशीं नांवें होतीं व ते दगड हातांत धरीत. देवाला ज्या भांड्यांतून सोमरस अर्पण करीत त्याला चमू हें नांव असे. ज्या भांड्यांतून पुरोहित सोमरस पीत त्यांना कला व चमस अशीं नांवें होतीं. ऋग्वेदकालीं ही सोमवल्ली कोणत्या प्रकारानें दाबून तिचा रस कसा काढीत याविषयीं सविस्तर माहिती उपलब्ध नाहीं. गाळण्यांतून (पवित्र) गाळून तो रस शुद्ध करीत असत. या सर्व रसांत इतर रसांची भेसळ न करतां इंद्राला व वायूला तो अर्पण करीत. पण कण्व लोकांनीं हा प्रघात टाकून दिला होता. दिवसांतून तीन वेळां सोमाचा रस काढीत. अवेस्तामध्यें दोन वेळ रस काढण्याची चाल होती असें दिसतें. सायंकाळीं रम्भूकरितां, मध्याह्नीं इंद्राकरितां व सकाळीं अग्नीकरितां सोमसेवन करीत. पण इतर देवतांनाहि या प्रसंगीं सोमाच्या आहुती देत. सोमरस पिणारे व तो न पिणारे यांच्यातील सूक्ष्म भेद संहिता ग्रंथांत दाखविले आहेत. ज्या ठिकाणीं सोमवल्लीचा खप होत असे तीं ठिकाणें म्हणजे आर्जीक, पस्त्यावत्, शर्यणावत्, सुषोमा, पंचजनांचा देश, वगैरे होत. सोमरसपान केल्यावर अंगांत जी तरतरी येई तिचे उल्लेख अनेक वेळां आलेले आहेत. सोमदेवतेशीं आकाशांतील चंद्राचें सादृश्य संहितोत्तर ब्राह्मणग्रंथांतून लाविल्याचें आढळतें [ऐ. ब्रा. ७.११].

**सोमक**—(सेलेनियम). रसायनशास्त्रांतील एक मूलद्रव्य. याचा परमाणुभारांक ७९.२ असून हें बहुतेक सर्वत्र आढळतें; पण थोड्या प्रमाणांत मिळतें. हें मुख्यतः लोहसंयुक्त (पायराइट) धातूंमध्यें आढळतें. रासायनिक गुणांमध्यें याचें गंधकाशीं साम्य आहे व तें बहुतेक त्याबरोबरच आढळतें. लोहसंयुक्त (पायराइट) पासून गंधकद्विप्राणिद (सल्फर डायॉक्साइड) काढावयाचें असलें म्हणजे त्या कृतीमध्यें सोम धातूचें सोमद्विप्राणिद होतें. तेथून तें गंधकाम्ल तयार करण्याच्या शिशाच्या पेट्यांमध्यें नेण्यांत येतें. व तेथें त्यावर गंधकद्विप्राणिदाची क्रिया केली म्हणजे त्यांतून ही धातु निघते. याच्या करड्या स्फटिकमय स्वरूपांतून विद्युद्वहन चांगलें होतें. यास धातवीय सोम (मेटॅलिक सेलेनियम) म्हणतात. या धातूचा हा विद्युद्वहनाचा गुणधर्म ती प्रकाशांत ठेवली असतां अधिक वाढतो. या गुणधर्माचा उपयोग प्रकाशाचें ध्वनींत रूपान्तर करणाऱ्या यंत्राच्या कामीं व विद्युत्संदेशानें चित्रें पाठविण्याच्या कामीं करण्यांत येतो.

**सोमकांत**—१. (फेल्साइट). हा कठिण, घट्ट, अग्निजन्य खडक असून दिसावयास गारेसारखा दिसतो व त्याचे स्फटिक दोन बाजूंस चतुरस्र असतात व त्यांमध्यें बहुधा स्फट, सिंधु, पालाश, वगैरेंचें सिकतित असून त्यांत गारेचाहि अंश असतो. परंतु कांहींमध्यें सिकतेचें प्रमाण कमी असतें.

२. (फेल्स्पार). हे स्फट, पालाश, सिंधु, खट, वगैरेंचे सिकतित संयुक्त असून त्यांचे निरनिराळे प्रकार आहेत व त्यांत सिकतेचें प्रमाण निरनिराळें असतें. हे प्रस्तर म्हणजे रासायनिक संयोग, विशिष्ट गुरुत्व, स्फटिकमयत्व व दृक्शास्त्रीय स्वरूप या गोष्टींचे उत्कृष्ट नमुने आहेत. तसेंच यापैकीं पालाश सिकतित यांचींच चतुरस्र कोणात्मक व अल्पकोणात्मक स्वरूपें भिन्न असलीं तरी पहिल्या प्रकारच्या स्फटिकांचा अक्ष तिरपा असतो व दुसऱ्या प्रकारच्या स्फटिकांचें स्वरूप त्रिपार्श्वात्मक असतें. *या पद्धतीच्या प्रस्तरांचें स्वरूप सामान्यतः सदृश असतें* व त्यांचें काठिण्यहि सारखेंच असतें व ते गारेपेक्षां थोडें कमी असतें. बहुतेक अग्निजन्य खडकांमध्यें हा घटक असतो. उदाहरणार्थ, वालुकामय प्रस्तर, हरित्पाषाण किंवा लोहपाषाण, इ., यांतील क्षारयुक्त प्रस्तरांपासून पांढरी माती (केओलीन) मिळते व तीपासून चिनी माती बनते.

**सोमण, रामचंद्र गणेश** (१८७६-        )—महाराष्ट्रांतील एक सार्वजनिक कार्यकर्ते. यांचें शिक्षण सातारा येथें झालें. व १८९४ मध्यें यांनीं सातारा न्यू इंग्लिश स्कूलमध्यें प्रथम शिक्षक म्हणून नोकरी केली. १९०० मध्यें वकिलीची परीक्षा उत्तीर्ण होऊन यांनीं वकिलीस प्रारंभ केला. १९०६ ते १९२० पर्यंत यांनीं 'प्रकाश' या नांवाच्या एका पत्राचें संपादन केलें. लोकमान्य टिळकांच्या नेतृत्वाखालीं होमरूल लीग चळवळीमध्यें यांनीं प्रथम पुढाकार घेतला. १९१४ सालीं सातारा येथें भरलेल्या

प्रांतिक परिषदेचे हे चिटणीस होते. १९२३ सालीं भरलेल्या प्रांतिक परिषदेचे स्वागताध्यक्ष होते. १९२३ मध्यें हे मुंबई कायदे-मंडळांत स्वराज्य पक्षातर्फे निवडून आले. महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमिटीचे हे उपाध्यक्ष होते व अ. भा. काँग्रेस कमिटीचे सभासद होते. यांनीं १९३० व १९३२ सालीं सत्याग्रह चळवळींमध्यें भाग घेतला व त्यांस दोनदां तुरुंगवासाची शिक्षा झाली होती. तुरुंगांतून सुटल्यावर हे पुन्हां कायदे-मंडळांत काँग्रेस पक्षीय उमेद-वार म्हणून गेले. हे वेस्टर्न इंडिया लाइफ ॲशुअरन्स कंपनीच्या संस्थापकांपैकीं एक असून तिच्या डायरेक्टर बोर्डाचे कांहीं दिवस अध्यक्ष होते. यांनीं पीपल्स सोसायटी नांवाच्या संस्थेची स्थापना करून तिचें कार्य सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीच्या धर्तीवर चालविलें होतें. नवीन सुधारणांनंतर हे मुंबईच्या वरिष्ठ कायदे-मंडळांत निवडून आले. दुसऱ्या निवडणुकीनंतर हे वरिष्ठ गृहाचे अध्यक्ष झाले.

**सोमदेव**—कथासरित्सागराचा कर्ता. हा काश्मिरी कवि असून गुणाढ्याच्या बृहत्कथानुरोधानें त्यानें इ. स. १०६३–१०८३ या दरम्यान आपला लोकप्रिय कथाग्रंथ रचिला. सोम-देवाची भाषा प्रौढ असून कथालेखनांत त्याचें उत्कट कौशल्य दिसून येतें.

**सोमनाथ**—एक तेलगू संगीतज्ञ व कवि. याचा 'राग-विबोध' हा भारतीय संगीतशास्त्रावरील महत्त्वाचा ग्रंथ (इ. स. १६०९) आहे. सोमनाथ हा पूर्वकिनाऱ्यावरील राजमहेंद्री येथील ब्राह्मण पंडित असून स्वतः गाणारा, संगीतज्ञ आणि कविहि होता. याचा ग्रंथ आर्यावृत्तामध्यें लिहिलेला आहे. या ग्रंथांत स्वरांच्या उत्पत्तीपासून आरंभ करून, पुढें अस्तित्वांत असलेल्या निरनि-राळ्या वीणांचें वर्णन देऊन त्यांचा उपयोग कसा करावा हें सांगितलें आहे. तसेंच बावीस श्रुतींचीं नांवें व त्यांचीं स्थानेंहि त्यांत दिलेलीं आहेत. सोमनाथ हा दक्षिण संगीत पद्धतींतला असून त्यानें रागांचे जनक आणि जन्य असे दोन प्रकार केले आहेत. हल्लीं दक्षिण हिंदुस्थानांतील संगीतांत असेच प्रकार करतात. रागांपासून निघालेल्या अनेक रागिण्याहि या ग्रंथांत दिलेल्या आहेत.

**सोमनाथ**—मुंबई, काठेवाड, जुनागड संस्थानांतील एक अतिशय धनाढ्य असलेलें जुनें गांव. आज याची लोकवस्ती सुमारें ८ हजार आहे. सौराष्ट्र सोमनाथाचा अपभ्रंश सोरटी सोमनाथ असा झाला. पुरातन कालापासून प्रसिद्ध असलेलें सोमनाथाचें देऊळ येथें आहे. या देवळाची कीर्ति ऐकून गझनीचा महंमद यावर मोठ्या फौजेनिशीं चालून आला (१०२४) व त्यानें रजपुत राजांना पराभव करून सोमनाथाची मूर्ति फोडली व अपार संपत्ति गोळा करून गझनीला नेली. या देवळाच्या मागें भास्कुंड या नांवाचें एक कुंड असून येथेंच श्रीकृष्णानें देहविसर्जन केलें असें म्हणतात. या गांवाच्या दक्षिणेकडील बाजूला एक किल्ला असून बाकी राहिलेल्या सर्व बाजूंकडे दगडाच्या भिंती आहेत. सोमनाथ हें गांव हल्लीं मुख्यत्वेंकरून लांकडाचीं व लोखंडाचीं कुलुपें करण्याबद्दल प्रसिद्ध आहे.

सोरटी सोमनाथ हें बारा ज्योतिर्लिंगांपैकीं एक आहे. येथून जवळच प्रभास (पाहा) क्षेत्र आहे. आजचें देऊळ अगदीं लहान आहे. पण मोठ्या प्राचीन देवळाचे अवशेष जवळच दिसतात. या सोमनाथाच्या देवळाचें वर्णन करणाऱ्या अनेक श्लोकांचा ग्रंथ अलीकडे उपलब्ध झाला आहे. सत्ययुगांतील सोम या नांवाच्या राजाची स्मृति आणि त्यानें केलेले विजय यांची स्मृति जागृत ठेवण्याकरितां या देवळाची मूळ कल्पना निघाली, अशी आख्या-यिका आहे. त्रेतायुगांत रावणानें हें चांदीचें देऊळ बांधलें असें म्हणतात आणि भगवान् श्रीकृष्णानें द्वापारयुगांत चंदनी लांकडांनीं हें मंदिर बांधलें अशी आख्यायिका आहे. या चंदनी मंदिराला दीर्घकालाचा बराच उपसर्ग झाल्यामुळें वल्लभी वंशां-तील शैव राजांनीं या देवळाचा जीर्णोद्धार केला. त्यासाठीं त्यांनीं बौद्धधर्मीयांचीहि मदत घ्यावयास कमी केलें नाहीं.

अलीकडे सांपडलेल्या शिलालेखांत मूळची (प्रोटो) नागरी लिपि आढळते. इ. स. ११४३ ते ११७६ या काळांतील गुज-राथचा राजा कुमारपाल याच्या कारकीर्दीतील शिवालिंगाचें मोठें सिंहासन सांपडलें आहे. या राजानें जुन्या लांकडी देवळाच्या जागीं दगडी देवालय बांधलें, असें 'प्रबंध-चिंतामणी' काव्य-प्रबंधाचा कर्ता मेरुतुंग यानें आपल्या या काव्यांत वर्णन केलें आहे. त्यांत मोठमोठ्या अवजड लांकडांची इमारत काढून त्या ठिकाणीं दगडी इमारत बांधण्याचा सल्ला हेमचंद्राचार्यांचे गुरु देसुरी यानें कुमारपाल राजाला, आपली स्मृति पुढील पिढ्यांत कायम राहावी यासाठीं दिला असें म्हणतात. राजा कुमारपाल (पाहा) हा सुधारणावादी राजा होता. त्याला जरी जैन पंथ अधिक प्रिय होता तरी त्यानें हिंदूंच्या अनेक देवळांचा जीर्णोद्धार केला आहे.

कुमारपाल राजानें जीर्णोद्धार केलेल्या या सोमनाथाच्या मंदिराचा विध्वंस अल्फखान यानें इ. स. १३०० त, मुजाफरशहा यानें इ. स. १३९० त, महंमद बेगडा यानें इ. स. १४९० त आणि दुसरा मुझफरशहा यानें इ. स. १५३० त केला, असें इतिहासांत नमूद आहे. या प्रत्येक विध्वंसनानंतर या देवळाचा हिंदु राजांकडून पुन्हां पुन्हां जीर्णोद्धार झालेला आहे. जुना-गडचा राजा चौथा खुंगारराव खेंगार (इ. स. १२९७ ते १३३३) यानें संपूर्ण मंदिराचा जीर्णोद्धार केल्याचा दाखला आहे. एक इतिहासकार असें म्हणतो कीं, सोमनाथ मंदिराची मशीद बनविण्याकरितां तिसरा मुजफरशहा यानें इ. स. १५९० त

केलेले प्रयत्न व्यर्थ गेले आणि त्या मंदिराचें अत्यंत पवित्र स्वरूप मध्यकालीन हिंदुस्थानांत जसें होतें तसेंच कायम राहिलें. व्हाइसरॉय लॉर्ड कर्झन यांनीं १९०१ सालीं जुनागडला भेट दिली, त्यावेळीं हें प्राचीन स्मारक जसेंच्या तसें राखून ठेवण्याविषयीं आणि अशोकाच्या शिलास्तंभावर आच्छादनार्थ इमारत बांधण्याविषयीं आदेश दिला म्हणून हीं स्मारकें आजवर शिल्लक राहिलीं आहेत.

गझनीच्या महमदानें सोमनाथाच्या देवळाचे जे चंदनी दरवाजे गझनीला नेऊन मशिदीला लाविले ते परत आणण्याविषयीं लॉर्ड एलेनबरोनें अफगाण मोहिमेचा सेनापति जनरल नॉट याला सांगितलें होतें. ते दरवाजे हिंदुस्थानांत आल्यावर मोठ्या समारंभानें सोमनाथाला नेण्याची योजनाहि या लाटसाहेबांनीं केली होती. पण विलायतेंतील वरिष्ठांस न आवडल्यानें ती बारगळली व दरवाजे कित्येक वर्षे आग्र्यास धूळ खात पडले होते. आतां सोमनाथ मंदिराच्या जीर्णोद्धारासाठीं एक विश्वस्त समिति स्थापन झाली आहे व कोट्यवधि रुपये खर्चून पुन्हां सोमनाथाचें मंदिर उभारण्याची योजना आहे.

**सोमल**—(अर्सेनिक). परमाणुभारांक ७४·९६ व विशिष्ट गुरुत्व ५·७. गंधक आणि लोहादि इतर धातू यांच्या संयोगानें हा निसर्गांत सांपडतो. उदा., आर्सेनिकल पायराइट्स किंवा मिस्पिकेल. सोमलाचा रंग पोलादासारखा असून त्याला इतर धातूप्रमाणे चमकहि असते. पण ती हवेमुळें मंद होत जाऊन प्रथम त्यावर पिवळा रंग येतो, व हळूहळू तो बदलत जाऊन शेवटीं काळा होतो. हे कठिणपणांत तांब्याच्या बरोबरीचें आहे; पण ठिसूळ आहे. कापराप्रमाणें उडून जाण्याचा गुण ह्याचा अंगीं असल्यामुळे त्याला उष्णता दिली म्हणजे द्रवरूप होण्यापूर्वीच हा वायुरूप होतो. हें जळूं लागलें म्हणजे निळी ज्योत तयार होते. बऱ्याच धातूंबरोबर ह्याचा संयोग होतो. गंधकाबरोबर ह्याचें पिवळा आणि तांबडा असे दोन संयुक्त पदार्थ तयार होतात. प्राणवायूशीं ह्याचा दोन तऱ्हेनें संयोग होतो. त्यापैकीं आर्सेनियस ऑक्साइड हा विशेष महत्त्वाचा आहे. व तो निसर्गांत सांपडणाऱ्या आर्सेनिकल पायराइट्स पासून तयार करतां येतो. वैद्यकांत ह्याचा त्वचारोग, मलेरिया, ॲनिमिया, वगैरेंच्या औषधांत पुष्कळ उपयोग होतो. हें अत्यंत विषारी असल्यामुळें ज्या रासायनिक किंवा इतर उद्योगधंद्यांत ह्याचा उपयोग करावा लागतो त्या ठिकाणीं कामगारांच्या रक्षणासाठीं विशेष दक्षता घ्यावी लागते. सोमलाच्या विषावर ताजें तयार केलेलें लोहप्राणिद (फेरिक हायड्रॉक्साइड) देतात, नंतर कोठा धुवून काढतात; कांहीं उत्तेजक औषध देणेंहि जरूर असतें, व शरीरांतील उष्णता कायम ठेवण्यासाठीं इतर उपचारहि करावे लागतात.

**सोमसिंह परमार** (राज्य. १२३०-३६)—अबूच्या परमारांपैकीं धारावर्षाचा पुत्र व गुजराथच्या दुसऱ्या भीमदेवाचा सामंत. आपला युवराज कृष्णराज (कान्हडदेव) याच्या हातखर्चासाठीं यानें जोधपूर जिल्ह्यांतील गोडवाड इलाख्यांतील नाणागांव हें गांव नेमून दिलें होतें. हा शस्त्रविद्येंत पारंगत असून ही विद्या यानें आपल्या बापापासून मिळविली होती. तसेंच आपल्या चुलत्याप्रमाणें अनेक शास्त्रांचाहि अभ्यास यानें केला होता. अबूवरील देलवाडा गांवचें लूणवसही नावाचें मंदिर याच्याच कारकीर्दींत याच्या वेळचा मंत्री वस्तुपालाचा भाऊ तेजपाल यानें सन १२३० मध्यें बांधलें. या देवालयांतील देवाच्या पूजाअर्चेसाठीं यानें बारठ परगण्यांतील डबाणी हें गांव नेमून दिलें होतें. सौंदर्याच्या दृष्टीनें हें मंदिर नांव घेण्याजोगें आहे.

**सोमालीलँड**—पूर्व आफ्रिकेंतला एक प्रदेश. ब्रिटिश सोमालीलॅंड, फ्रेंच सोमालीलॅंड व इटालियन सोमालीलँड असे तीन भाग आहेत व ते एकमेकांस लागूनच आहेत.

१. इटालियन—इटलीची एक वसाहत व संरक्षित मुलूख. क्षे. फ. १,९४,००० चौ. मै.. याचे उत्तर व दक्षिण सोमालिया म्हणून दोन भाग आहेत. दक्षिण भागाला पूर्वीं बिनादीर म्हणत. त्यांतच आतां १९२५ सालीं केनियामधून घेतलेला जुबालँड समाविष्ट केला आहे. हें १९३६ मध्यें इथिओपियामध्यें कारभाराच्या सोईसाठीं सामील केलें. हस्तिदंत, धूप, गोंद व कापूस हे जिन्नस निर्यात होतात १९४० सालीं ब्रिटिशांनीं हें ताब्यांत घेतलें. राजधानी मोगाडिसिओ.

२. फ्रेंच—तांबड्या समुद्राच्या तोंडाशीं इरिट्रिया व ब्रिटिश सोमालीलॅंड, यांच्यामध्यें असलेली फ्रेंच वसाहत. क्षेत्रफळ ८,४९२ चौ. मै.. अरबस्तानांतील शेख सय्यद, हा एक चौरस मैलाचा फ्रेंच भाग यांतच समाविष्ट झालेला आहे. लो. सं. ४४,२४०. जिबुटी ही राजधानी आहे. कातडीं, हस्तिदंत व कॉफी यांची निर्यात होते.

३. ब्रिटिश—क्षेत्रफळ ६८,००० चौ. मै.. हा भाग प्रत्यक्ष वसाहत खात्याच्या कारभारांत आहे. कातडीं, चामडीं, हस्तिदंत, कॉफी, गोंद, जनावरें, मीठ, वगैरे मालाची निर्यात होते. लो. सं. ३,४५,०००. बार्बोरा ही राजधानी आहे.

**सोमेश्वर पहिला** (मृ. १०६९)—हा पश्चिम चालुक्य घराण्यांतील बलाढ्य राजा असून शके ९४२ (इ. स. १०२०) मध्यें जयसिंहानंतर गादीवर आला. याला आहवमल्ल व त्रैलोक्यमल्ल अशीं बिरुदें होतीं. यानें प्रथम चोळ राजा कोपरकेसरीवर्मा राजेंद्र देव यावर स्वारी केली. नंतर धारा नगरांतील भोज राजावर स्वारी करून तें शहर हस्तगत केलें. नंतर सोमेश्वरानें चेदि अथवा डाहल या देशावर स्वारी करून तेथील कलचूरी राजा कर्ण यास पदच्युत

केलें असावें. नंतर पश्चिम समुद्रकिनाऱ्यावरील देशांवर स्वारी केली व ते जिंकून तेथें एक जयस्तंभ उभारला. नंतर तो समुद्रकिनाऱ्यानें भरतखंडाच्या दक्षिण टोंकापर्यंत गेला. मार्गांत त्याला द्रविड देशच्या चोल राजानें प्रतिबंध केला, पण त्याचा पराभव झाला. आहवमल्लानें कल्याण शहराची स्थापना करून तेथें आपली राजधानी केली, असें बिल्हणानें वर्णन केलें आहे. सोमेश्वरानें तुंगभद्रेंत जलसमाधि घेतली (इ. स. १०६९). त्यानें पुष्कळ यज्ञ केले. तो मोठा उदार व विद्वत्तेचा चाहता होता, असें बिल्हणानें वर्णन केलें आहे.

**सोरट**—हा राग खमाज थाटांतून उत्पन्न होतो. याच्या आरोहांत गांधार व धैवत हे स्वर वर्ज्य आहेत व अवरोह सात स्वरांचा आहे, म्हणून याची जाति औडुव-संपूर्ण आहे. वादी स्वर ऋषभ व संवादी धैवत आहे. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर मानितात. मध्यम व ऋषभ या स्वरांची संगति रागवाचक आहे. मध्यमावरून ऋषभावर येतेवेळीं गांधार स्वर घर्षणानें घेण्यांत येतो. या रागांत दोनहि निषादांचा प्रयोग दृष्टीस पडतो. याची प्रकृति गंभीर आहे.

**सोरा**—(नायटर). पोटॅशियम नायट्रेट. चिली सॉल्ट पीटरपासून पोटॅशियम क्लोराइडच्या साहाय्यानें हा तयार करतात. तोफेच्या दारूंत हा प्रामुख्यानें असतो. मांस खराब होऊं नये म्हणून ह्याचा उपयोग करतात. त्याचप्रमाणें ताप कमी करण्यासाठीं आणि लघवीला फार होण्यासाठीं ह्याचा औषधांत उपयोग करतात. धातुशोधनांतहि ह्याचा द्रावक (फ्लक्स) म्हणून उपयोग होतो.

**सोर्बोन**—ही सुप्रसिद्ध फ्रेंच शिक्षणसंस्था १२५२ सालीं नववा लुई या राजाचा चॅप्लेन रॉबर्ट द सोर्बोन यानें स्थापन केली. या कॉलेजांत गरीब विद्यार्थ्यांना राहण्याची सोय करावी असा मूळ संस्थापकाचा हेतु होता. सोर्बोन ही शिक्षण-संस्था धार्मिक बाबतींत अधिकारयुक्त मत देणारी मानली जात असे. फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळीं ही संस्था नष्ट करण्यांत आली. आणि संस्थेची सर्व मालमत्ता १७९२ सालीं सरकारजमा करण्यांत आली. पुढें नेपोलियन बादशहानें १८०८ सालीं धार्मिक विषयांचें शिक्षण देणारी (थिऑलॉजिकल फॅकल्टी) युनिव्हर्सिटी म्हणून तिची पुन्हां स्थापना केली. १८९६ पासून सोर्बोन ही पॅरिसची युनिव्हर्सिटी झाली असून तेथें वाङ्मयीन व शास्त्रीय आणि इतर अनेक प्रकारचें शिक्षण दिलें जातें.

**सोलापूर**—मुंबई इलाखा, मध्यविभाग, एक जिल्हा. क्षे. फ. ४,५२१ चौ. मै. व लो. सं. १०,१४,६७०. ह्या जिल्ह्याचा मुलूख बहुतेक सर्व सपाट आहे. जमीन काळी असून सुपीक आहे. ह्या जिल्ह्यांत मोठी नदी भीमा ही आहे. याशिवाय नीरा, माण, सीना, भोगावती या नद्या आहेत. ह्या जिल्ह्याची हवा एकंदरींत आरोग्यकारक असते. साधारण उष्णमान ७० ते ८० दर्जे असतें. ज्वारी, बाजरी, गहूं, हरभरे, तूर, करडी व जवस हे मुख्य पिकांचे जिन्नस आहेत. यांशिवाय मका, भुईमूग, ऊंस, तांदूळ, तंबाखू व मिरची हे जिन्नसहि पिकतात. करकंब, बेगमपूर, वळसंग येथें सूत रंगविण्याचे मोठमोठे कारखाने आहेत.

खिस्ती शकाच्या सुरुवातीस आंध्रभृत्यांच्या ताब्यांत सोलापूर होतें. इ. स. ५५० ते ११८४ पर्यंत चालुक्यांचा अमल त्या प्रांतावर होता. ११८४–१३०० पर्यंत देवगिरीच्या यादवांच्या ताब्यांत तो प्रांत होता. १४ व्या शतकाच्या मध्यांत बहामनी राज्याची स्थापना झाली तेव्हां त्या राज्यांत सोलापूर होतें. पुढें बहामनी राज्याचे तुकडे पडले. त्यांत गुलबर्ग्याच्या राज्याच्या अमलाखालीं सोलापूर आलें. दिल्लीहून शाहू सुटून आल्यानंतर थोड्याच दिवसांत सोलापूर मराठ्यांच्या ताब्यांत आलें. अष्ट्याच्या लढाईनंतर स. १८१८ त एक लहानसें युद्ध होऊन हा प्रांत इंग्रजांकडे आला.

शहर—सोलापूर जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. सोलापूर याचा अर्थ सोळा गांवें असा होतो. शहर समुद्रसपाटीपासून १,८०० फूट उंच असून सीना नदीच्या उत्तरेकडील काठावर वसलें आहे. येथें एक जुनाट किल्ला आहे. शहराभोंवतीं २॥ मैल लांबीचा कोट आहे. येथें मुख्य व्यापार कापसाचा आहे. येथें गिरण्याहि बऱ्याच आहेत. १८५३ त म्युनिसिपालिटी स्थापन झाली. स. १८७९–८१ या अवधींत २ लक्ष रु. खर्चून एकरुक तलावाचें पाणी गांवास पुरविण्याची व्यवस्था केली आहे. सिद्धेश्वर तलावांतील सिद्धेश्वराचें देऊळच फक्त प्रेक्षणीय व जुनें आहे. शिवाय दत्तात्रेय, पांडुरंग, मल्लिकार्जुन, इ. दुसरीं देवळेंहि आहेत. येथें एक कॉलेज, सरकारी व खाजगी हायस्कुलें व म्यु. च्या बऱ्याच प्राथमिक शाळा आहेत. लो. सं. २,०३,६९१.

**सोहनी**—हा मारवा थाटाचा जन्यराग आहे. यांत पंचम स्वर वर्ज्य आहे म्हणून याची जाति षाडव-षाडव आहे. वादी स्वर धैवत व संवादी गांधार आहे. गानसमय रात्रीचा चौथा प्रहर सर्वसंमत आहे. यांत तार षड्ज चांगला चमकत असतो. पूरिया नांवाच्या सायंगेय रागासारखें या रागाचें स्वरूप दिसतें, परंतु पूरिया पूर्वांगवादी व हा उत्तरांगवादी आहे. शिवाय पूरियाचें गायन मंद्र व मध्य सप्तकांत फार सुरेल व याचें मध्य व तार सप्तकांत फार मधुर लागतें. त्याची प्रकृति गंभीर व याची चंचल आहे. असा या दोन रागांत ठळक फरक आहे.

**सोहिरोबा आंबिये** (१७१४–९२)—एक मराठी संत कवि. हा सावंतवाडी संस्थानांतील बांदें गांवचा कुलकर्णी असून तेथेंच राहत असे. त्या वेळच्या सावंतवाडी संस्थानचा [illegible] खेमसावंत याचा जो पालक [illegible] त्यानें सोहिरोबास [illegible]

खोलींत कोंडून घालून 'देव दाखवा' अशी आज्ञा केली; तेव्हां त्या सुलत्याला एक दिव्य अशी ज्वाला दिसली व त्यामुळें त्याचे डोळे दिपले; यानंतर सोहिरोबाला मुक्त करण्यांत आलें, असें सांगतात. याच्या बऱ्याच कविता याच्या बहिणीच्या हातच्या दिसतात. गहिनीनाथ किंवा गैबनाथ यांच्याकडून अनुग्रह घेईपर्यंत यानें आपलें काव्यलेखन केलें. 'सिद्धान्त संहिता' व 'महदनुभवेश्वरी' हे याचे मोठे व प्रसिद्ध ग्रंथ आहेत. पुढें वयाच्या साठाव्या वर्षी हा उत्तर हिंदुस्थानांत यात्रेस गेला असतां तिकडे सन १७७९ मध्यें याची व महादजी शिंद्याची भेट झाली. यानंतर हा दहा वर्षे उज्जनीस राहिल्यावर एके दिवशीं मठांतून जो बाहेर पडला तो परत दिसला नाहीं.

**सोळा कन्या**—या दक्षाच्या कन्यांचीं नावें अशीं :—स्वाहा, स्वधा, उमा, मूर्ति, उन्नति, ऱ्ही, क्रिया, तितिक्षा, पुष्टि, तुष्टि, शांति, मेधा, दया, मैत्री, बुद्धि व श्रद्धा.

**सोळा कला**—(चंद्राच्या). (अ) शंखिनी, पद्मिनी, लक्ष्मणी, कामिनी, पोत्रिणी, पुष्टिवर्धिनी, आल्हादिनी, अश्वपादिनी व्यापिनी, प्रमोदिनी, मोहिनी, प्रभा, क्षीरवर्धनी, विकासिनी, व सौमिनी.

(आ) अमृता मानदा पूषा तुष्टिः पुष्टिः रतिर्धृतिः। शशिनी चंद्रिका कांतिर्ज्योत्स्ना श्रीः प्रीतिरेवच। अंगदा च तथा पूर्णामृता पोडश वै कलाः॥

**सोळा मातृका**—या पुण्याहवाचनांत असतात. गौरी, पद्मा, शची, मेधा, सावित्री, विजया, जया, देवसेना, स्वधा, स्वाहा, माता, लोकमाता, धृति, पुष्टि व कुलदेवता.

**सोळा शृंगार**—तैलाभ्यंगस्नान, चीर, कंचुकी, कुंकुम, काजळ, कुंडलें, हार, मोतीं, केश, नूपुरें, चंदन, कंबरपट्टा, तोडे, तांबूल, बांगड्या व चतुरता.

**सोळा संस्कार**—(१) गर्भाधान (विवाहानंतर पतिपत्नींचा पवित्र समागम); (२) पुंसवन आणि (३) सीमन्तोन्नयन हे दोन संस्कार स्त्री गरोदर असतांना गर्भाच्या आरोग्यासाठीं योजिले आहेत. याप्रमाणें हे प्रथमचे तीन संस्कार बालकाच्या जन्माविषयींचे आहेत. जन्मानंतर (४) जातकर्म (जन्मोत्सव); (५) नामकरण (बालकाचा नामकरण विधि, बारशाच्या दिवशींचा); (६) निष्क्रमण (बालकास चौथ्या महिन्यास सूर्य दर्शनासाठीं घराबाहेर नेणें); कांहीं ग्रंथांत विष्णुबलि असा ६ वा संस्कार सांगितला आहे; (७) अन्नप्राशन (बालकास सहाव्या महिन्यास मातेच्या दुधाखेरीज दहीं व तूपमिश्रित अन्न देण्यास प्रारंभ करण्याचा विधि; (८) चौल किंवा चूडाकर्म (बालकाच्या जन्माच्या वेळेचे केंस कापणें. याखेरीज कान टोंचण्याचा कर्णवेध नांवाचा संस्कार कांहीं ठिकाणीं महत्त्वाचा गणला आहे. प्रत्येक हिंदूनें कान टोंचलेच पाहिजेत असा निर्बंध आहे). याप्रमाणें ४ थ्या पासून ८ व्यापर्यंत संस्कार मुलाच्या बाल्यावस्थेंत व्हावयाचे. मुलास ८ वे वर्ष प्राप्त झाल्यावर (९) उपनयन संस्कार (विद्याभ्यासाचा आरंभ) केला जातो. या संस्कारास संबंधून असलेलीं पुढील ४ कर्में विद्याविषयक म्हणून आहेत: (१०) मेधाजनन; (११) महानाम्नी; (१२) महाव्रत; व (१३) उपनिषद्व्रत. संस्कारपूर्वक प्रत्येक कर्मास उचित विद्याभ्यासासाठीं या पायऱ्या आहेत. या संपल्यावर मुलगा (१४) समावर्तन संस्कारास पात्र होतो. तेव्हां त्याला स्नातक म्हणतात. पुढें आश्रमांतून घरीं गेल्यावर योग्य वेळीं (१५) विवाह-विधि हा व्हावयाचा आणि गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास या आश्रमांचा उपभोग घेतल्यावर वृद्धापकाळीं मृत्यु प्राप्त झाल्यावर, मृतदेह व त्यांतून निघून गेलेला आत्मा यांविषयीं त्याच्या वंशजांनीं करावयाचा तो (१६) अंत्येष्टि संस्कार. यास *और्ध्वदेहिक कर्म असेंहि म्हणतात* (*हिं. ध. दी.*). *संस्कार पाहा.*

**सौंदत्ती**—मुंबई, बेळगांव जिल्हा. बेळगांवच्या आग्नेयेस सुमारें ४० मैलांवर हा गांव आहे. लो. सं. ८,७२०. इ. स. १८७६ मध्यें येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. येथें अंकुशेश्वर, पुरंदरेश्वर, शंकरलिंगदेव व जैनांचें एक मंदिर अशीं चार देवळें आहेत. येथें सुमारें इ. स. ८७५–१२२९ या दरम्यानचे सहा शिलालेख आहेत. गांवाच्या पश्चिमेस एका लहानशा टेंकडीवर एक किल्ला आहे.

नवव्या शतकापासून तें तेराव्या शतकापर्यंत जे शिलालेख येथें सांपडले आहेत त्यांत या गांवाचा उल्लेख सुगंधवर्ती, सवंधवट्टी आणि सवधवट्टी असा केलेला आढळतो. त्या वेळीं हें एका पेट्याचें मुख्य ठिकाण होतें. इ. स. १२१० पर्यंत तें सौंदत्ती व बेळगांव येथील रट्ट राजे (इ. स. ८५०–१२५०) यांच्या राजधानीचें शहर होतें. १७३० सालीं सावनूरच्या नवाबानें नवलगुंदच्या देसायाला सौंदत्ती दिलें; व १७३४ सालीं या देसायानें सौंदत्तीचा किल्ला बांधला.

**सौदॅम्पटन**—इंग्लंडमधील एक काउंटी व बंदर. 'सौदॅम्प्टन वॉटर' च्या हें मुखाशीं वसलेलें आहे. येथें नॉर्मन काळातील शहराच्या कोटाचे अवशेष अद्यापि दृष्टीस पडतात. कांहीं प्राचीन अवशिष्ट इमारतींपैकीं किंग जॉनचा राजवाडा हा विशेष प्रसिद्ध आहे. येथील म्युनिसिपालिटीच्या कचेरींत प्राचीन राजचिन्हें व दप्तर ठेविलें आहे. येथील नैसर्गिक बंदर सर्व राज्यांत अतिशय चांगलें म्हणून समजतात. येथें बऱ्याच गोद्या आहेत. येथें कोको, कॉफी, धान्य, दारू, साखर, लोकर, वगैरे पदार्थांची आयात होते. येथील पार्लमेंटरी बरो दोन सभासद निवडते. येथील गोदी जगांतील मोठ्यांपैकीं एक आहे. लो. सं. १,७६,०२५.

**सौंदर्यशास्त्र**—(एस्थेटिक्स). हें एक आदर्शवादी (नॉर्मेटिव्ह) शास्त्र आहे. सौंदर्याचें प्रमाण किंवा लक्षण ठरवणें; तसेंच, चित्रकला, वास्तुकला, खोदकला, इत्यादि कलावस्तूंच्या सौंदर्याची परीक्षा करण्याचीं तत्त्वें व नियम ठरवणें, हें सौंदर्यशास्त्राचें उद्दिष्ट होय. सौंदर्ययुक्त वस्तू, देखावे व इतर हरएक बाबींसंबंधीं चिकित्सा फार प्राचीन काळापासून झालेली आहे. उदाहरणार्थ, सॉक्रेटिसानें, सौंदर्य आणि शोभन (दि गुड) हीं एकच असून त्या दोहोंचें अखेर पर्यवसान उपयुक्ततेंत होत असतें, असें प्रतिपादिलें आहे. प्लेटोनें सौंदर्यतत्त्वाचें पृथक् अस्तित्व मानलें आहे व त्याचा शोभन आणि सत्य या दोन तत्त्वांशीं निकट संबंध आहे असें मत दिलें आहे. आरिस्टॉटलच्या मतें मात्र सौंदर्य, शोभन व उपयुक्तता या तीन बाबी अगदीं पृथक् आहेत, आणि सौंदर्याचे घटक अनेक आहेत; उदा., प्रमाणबद्धता (सिमेट्री), व्यवस्था (ऑर्डर), स्पष्टता (डेफिनाइटनेस) इत्यादि. सौंदर्याचा उपयुक्ततेशीं कांहीं संबंध नाहीं. सौंदर्यकलेचा हेतु मनाला आनंद देणें हा आहे, असें आरिस्टॉटलचें स्पष्ट मत आहे.

'एस्थेटिक्स' हा शब्द प्रथम बोमगार्टन (१७१४–१७६२) या जर्मनानें उपयोगांत आणला. त्याच्या मतानें सौंदर्य हें इंद्रियग्राह्य असल्यानें बौद्धिक व्यापारांत त्याला खालचें स्थान आहे. कांटचें म्हणणें सौंदर्य हें असाक्षेपी कल्पनेंत येत नाहीं. त्याचा विचार विषयनिष्ठ जाणूनच केला पाहिजे. आकार, गुण, संबंध व प्रकार या चार वर्गांवरून तो सौंदर्याची व्याख्या करतो. अमूर्त कल्पनेची सिद्धि म्हणजेच सौंदर्य अशी व्याख्या हेगेलची आहे. तेव्हां त्याच्या मतें काव्याशिवाय कोणतीच कलानिर्मिति सौंदर्याप्रत पोंचूं शकत नाहीं. बर्क, रेनॉल्ड्स, ॲलिसन, हॅमिल्टन, बेन, स्टुअर्ट, हर्बर्ट स्पेन्सर प्रभृति ब्रिटिश तत्त्वज्ञान्यांनीं या विषयावर लिहिलें आहे. पण ते सर्व बहुधा सौंदर्यभावनेकडेच वळलेले दिसतात. एक तर सौंदर्यगुण हा अविच्छेद्य असावा किंवा सामान्य साधनांनीं तयार झालेली ती संकुल रचना असावी, असा त्यांचा ग्रह झालेला आढळेल. तथापि जर्मन तत्त्ववेत्त्यांची कल्पनेची उंच भरारी त्यांना क्वचितच साधते. बेनेडेट्टो क्रोचे यानें या शास्त्रावर बरेंच लिखाण केलें आहे व तें विचारार्ह आहे यांत शंका नाहीं. सौंदर्याची कल्पना निश्चित अशी ठरलेली नसून ती व्यक्तीप्रमाणें बदलत जाणार व म्हणूनच कलात्मक प्रयत्नांचे विविध व असंख्य नमुने दिसून येतात. जरी सौंदर्याचा एक निकष ठरला नसला तरी प्रत्येक कलाकुसरीच्या कामांत सौंदर्यासंबंधींचे कांहीं रूढ नियम पाळावे लागतात. कलावंत निसर्गवादी असो किंवा नसो पण त्याला आपली कलावस्तु लोकमान्य करावयाची असल्यास त्यानें प्रस्थापित नियमांकडे दुर्लक्ष करून चालत नाहीं.

**सौदे, रॉबर्ट** (१७७४–१८४३)—एक इंग्रज लेखक. साउदे पाहा.

**सौभाग्यसुंठीपाक**—एक आयुर्वेदीय औषध. बाळंत स्त्रियांसाठीं हें एक अग्निवर्धक व शक्तिदायक औषध आहे. बाळंतपणानंतर पंधरा दिवसांनीं द्यावें. पाचक म्हणून या पाकाचा फार चांगला उपयोग होतो. डोकें दुखणें, जीर्ण ज्वर, खोकला, पोटांत दुखणें, भूक न लागणें, इत्यादि बाळंत स्त्रियांच्या विकारांवर अतिशय उपयुक्त. ।। ते १ तोळ्यापर्यंत दूध-साखरेबरोबर सकाळ-संध्याकाळ देतात.

**सौर चिकित्सा**—(हेलिओथेरेपी). ईजिप्त व ग्रीस देशांतील लोकांमध्यें सूर्याच्या किरणांचा उपयोग वैद्यकीय उपायासाठीं करण्याची पद्धति प्रचलित होती, असें प्राचीन लेखांवरून व कागद-पत्रांवरून दिसून येतें. मध्यंतरीं ही पद्धति मागें पडली होती; परंतु १९ व्या शतकांत तिचें पुनरुज्जीवन करण्यांत आलें. सांप्रत या पद्धतीचा उपयोग क्षयरोगामध्यें, त्वग्रोगामध्यें आणि युद्धांतील जखमा बऱ्या करण्याच्या कामीं करण्यांत येतो. याच हेतूनें कृत्रिम सूर्यप्रकाशाचाहि उपयोग होतो. विजेचे कमानी दिवे व पारदवायू भरलेले दिवे अशा तऱ्हेची प्रकाशचिकित्सा करण्याकरितां अनेक दवाखान्यांत चलविलेले आढळतात.

**सौरपंथ**—सूर्यपूजा पाहा.

**सौरवर्ष**—सूर्यास मेषापासून मीनपावेतोंच्या बारा राशींचा उपभोग घेण्यास म्हणजे त्यांतून परिभ्रमण करण्यास जेवढा वेळ लागतो त्यास सौरवर्ष असें म्हणतात. सूर्याचें एका राशींतून दुसऱ्या राशींत जें संक्रमण होतें त्यास संक्रांति असें म्हणतात. ज्या राशींत सूर्य प्रवेश करतो त्या राशीचें नांव संक्रांतीस देण्यांत येत असतें. उत्तरेस, बंगाल्यांत व पंजाबांत, आणि दक्षिणेस मलबारपासून कन्याकुमारीपर्यंत व तिनवेल्ली जिल्ह्यांत व्यवहारांत सौरवर्षाचा उपयोग करण्यांत येतो. त्याचे महिनेहि सौरच असतात. म्हणजे एका संक्रांतीपासून दुसऱ्या संक्रांतीपर्यंत एक महिना समजला जातो. महिन्यांत बहुधा ज्या राशींत सूर्य असतो त्या राशीचेंच नांव दिलेलें असतें. बंगाल्यांतील लोक संक्रांतीच्या दुसऱ्या दिवसास महिन्याचा पहिला दिवस धरतात; परंतु पंजाब, वगैरे उत्तरेकडील डोंगराळ मुलुखांत संक्रमण दिवसां झाल्यास तोच दिवस, व रात्रीं झाल्यास दुसरा दिवस, नवीन महिन्याचा प्रथम दिवस समजतात. सामान्यतः हिंदु लोकांच्या पंचांगांत मासगणना चांद्र व वर्षगणना सौर असते. चांद्र मासाची व सौर वर्षाची सांगड घालून देण्याकरितां ज्या चांद्रमासांत मेष-संक्रांति होईल तो चैत्र, वृषभ-संक्रांति होईल तो वैशाख अशा रीतीनें चांद्रमासास नांवें देऊन ज्या महिन्यांत संक्रांति येणार नाहीं त्यास न झालेल्या संक्रांतीच्या नांवाचा

अधिक मास किंवा मलमास धरतात; व एखाद्या महिन्यांत दोन संक्रांती आल्यास एका महिन्याचा क्षय झाला असें मानतात.

**सौरवायु**—(हेलिअम). एक वर्णहीन वायु. परमाणुभारांक ३.९९. सूर्याच्या वर्णमंडला(क्रोमोस्फीयर)ची रंगकिरणपरीक्षा (स्पेक्ट्रोस्कोप) करीत असतांना रेले आणि रॅमसे ह्यांना ह्याचा प्रथम शोध लागला. हा उज्जा(हायड्रोजन)च्या खालोखाल हलका वायु असून त्याच्याप्रमाणें हा ज्वालाग्राही नाहीं. त्यामुळें आकाशयानासाठीं ह्याचा उपयोग होतो. पहिल्या महायुद्धाच्या पूर्वी ह्याची किंमत एका घनफुटास ३५० पौंड होती. पण आतां ती बरीच कमी झाली आहे. अमेरिकेंत नैसर्गिक वायूंत हा सांपडत असून सध्यां त्यापासून ह्या वायूचें मोठ्या प्रमाणावर उत्पादन होतें.

**सौराष्ट्र**—एक प्राचीन राष्ट्र व आजचा काठेवाड. महाभारतांत सुराष्ट्र देश येतो. ह्युएनत्संगाच्या वर्णनांत सुराष्ट्रचें राज्य वलभींच्या ताब्यांत होतें व त्याची राजधानी उज्जंत किंवा उज्जयंत पर्वताजवळ होती असें आहे. उज्जयंत ही गिरनारची टेंकडी दिसते. तेव्हां जुनागड ही सुराष्ट्राची राजधानी असावी. मुसलमानी अमदानींत द्वीपकल्पाच्या दक्षिण भागास सुराष्ट्र हें नांव असे. अद्यापिहि सुराट हें नांव काठेवाडास लाविलें जातें.

सौराष्ट्र राज्यसंघ—काठेवाडांतील लहानमोठ्या संस्थानांचें हें संघराज्य १९४८ सालीं बनविण्यांत आलें. यांत नवानगर, भावनगर, गोंडल, वगैरे ३० मोठीं संस्थानें आहेत, व लहान लहान किती तरी आहेत. या संघाचें क्षे. फ. ३१,८८५ चौ. मै. असून लो. सं. पस्तीस लाखांवर आहे. राज्याचें उत्पन्न सुमारें आठ कोटी रुपये येतें. नवानगरचे महाराज हे पहिले राजप्रमुख होते.

**सौराष्ट्र भैरव**—हा राग भैरव थाटांतून निघतो. याचा आरोहावरोह सात स्वरांचा आहे म्हणून याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय प्रातःकाळ मानितात. याच्या आरोहांत तीव्र धैवत व अवरोहांत कोमल धैवत लागतो. यांत निषाद स्वर दुर्बल असतो. उत्तरांगांतील मध्यम आणि धैवत या स्वरांच्या संगतीमुळें भटियार रागाचा भास होतो. कालिंगडा, बंगाल व पंचम या रागांच्या मिश्रणानें हा राग झाला आहे. हा एक भैरवप्रकार आहे.

**सौरोष्ण इंजिन**—(सोलर एन्जिन). सूर्याच्या उष्णतेचा उपयोग करून त्या उष्णतेपासून पाण्याची वाफ करून तिच्या योगानें जें इंजिन चालविण्यांत येतें त्यास सौरोष्ण इंजिन असें म्हणतात. याकरितां वाफ तयार करण्याचें जें यंत्र असतें तें म्हणजे कांहीं उष्णता-दुर्वाहकाच्या साधनानें अलग केलेलीं (इन्सुलेटेड) पोलादी पात्रें असतात. या पात्रांतील पाण्यावर परवलयाकार कांचेच्या आरशाच्या परावर्तकांतून सूर्याचे किरण परावर्तित करून केंद्रित केले जातात. या आरशांचा दर्शनी भाग नेहमीं सूर्याकडे केलेला असतो. या पात्रांतून अगदीं उथळ पाणी ठेवलेलें असतें व त्याची होणारी वाफ एका कमी दाबाच्या व कार्यक्षम संचायक (कॉन्डेन्सर) जोडलेल्या वाफेच्या इंजिनामध्यें नेण्यांत येऊन तिच्यापासून कार्य करून घेण्यांत येतें.

**स्कंदगुप्त** (राज्य सन ४५५-८०)—गुप्त घराण्यांतील एक राजा. हा कुमारगुप्त व अनंतदेवी यांचा पुत्र असून कुमारगुप्त हूणांशीं झालेल्या लढाईंत मारला गेला असतां यानें तीन महिनेपर्यंत हूणांशीं निकरानें लढून विजय मिळवला व आपल्या राज्याचें रक्षण केलें. क्रमादित्य, विक्रमादित्य, राजाधिराज, महाराजाधिराज, वगैरे बिरुदें यानें धारण केलीं होतीं. याचे अनेक शिलालेख व सोन्या-चांदीचीं नाणीं उपलब्ध झालीं आहेत. याच्या कारकीर्दींतील शेवटच्या दहा वर्षांत यास श्वेतहूणांशीं लढाया द्याव्या लागल्या. याच्यानंतर याच्या गादीवर येणारा पुरगुप्त हा होय.

**स्कंद पुराण**—अठरा पुराणांपैकीं एक. या पुराणांत अनेक ठिकाणच्या क्षेत्रांचें, देवतांचें, लोकांचें व ज्ञातिसमूहांचें वर्णन आहे. शिवपुत्र षडानन किंवा स्कंद यानें तत्पुरुषकल्पांत घडलेल्या गोष्टी या पुराणाच्या द्वारें सांगितल्या आहेत. भारताच्या निरनिराळ्या भागांत संहिता, खंड, माहात्म्य, वगैरे जे पौराणिक लेख सांपडतात ते सर्व याच पुराणाचे भाग आहेत असें मानतात. उदाहरणार्थ, काशीखंड, उत्कलखंड, रेवाखंड, सह्याद्रिखंड, शिवरहस्यखंड, हिमवतखंड, सूतसंहिता, सनत्कुमारसंहिता, सौरसंहिता, कपिल-संहिता, वगैरे. हें पुराण म्हणजे सध्यांच्या प्रवासवर्णनाप्रमाणें असून यांत ऐतिहासिक व भौगोलिक, त्याचप्रमाणें लोकांच्या चालीरीतींची माहिती फार मनोरंजक रीतीनें दिली आहे. जुन्या काळच्या समाजांत रूढ असलेल्या आख्यायिकाहि यांत सांपडतात. या पुराणाची एकंदर श्लोकसंख्या पांच लक्ष असावी.

**स्कंधशाखाधारी**—(क्रिनॉइडी). हा एक कंटकित त्वचायुक्त (एकिनोडर्माटा) प्राण्यांचा वर्ग आहे. हे प्राणी आपल्या आयुष्याचा बहुतेक काळ खोल समुद्राच्या तळाशीं एखाद्दुसऱ्या वस्तूशीं खडूसारख्या द्रव्याच्या देंठानें जोडलेल्या स्थितींत राहातात. अलीकडे यांची संख्या कमी झाली आहे. तथापि पूर्वीच्या युगांत यांची संख्या अतिशय मोठी होती. बरेंचसे कर्बयुक्त चुनखडीचे दगड या प्राण्यांच्या शरीरापासून बनलेले आहेत. या वर्गांतच पिच्छतारका (फेदर स्टार) नांवाचे प्राणी मोडतात.

**स्कॉट, रॉबर्ट फॉकन** (१८६८-१९१२)—एक ब्रिटिश भूप्रदेशसंशोधक. १९०१-१९०४ सालीं गेलेल्या नॅशनल ॲन्टार्क्टिक एक्सपीडिशन् या संशोधन-सफरींतील 'दि डिस्कव्हरी' या जहाजाचा तो कमांडर होता. १९१० सालीं पुन्हां त्यानें 'टेरानोव्हा' या जहाजांतून ॲन्टार्क्टिक प्रदेशांत संशोधनसफर केली, आणि त्या वेळीं तो मोठ्या यशस्वी रीतीनें दक्षिण

ध्रुवापर्यंत गेला. परंतु तेथें गेल्यावर त्याला असें आढळून आलें कीं, सदरहू प्रदेशाचा शोध अमुंडसेन (पाहा) या नॉर्वेजियन संशोधकानें अगोदरच लावलेला होता. स्कॉट तिकडून परत येत असतांना एका वावटळींत सांपडून मरण पावला.

**स्कॉट, वॉल्टर विल्यम** (१८३५–१९१२)—एक इंग्रज भाषाशास्त्रज्ञ. त्याला केंब्रिज येथें अँग्लो-सॅक्सन भाषेचा प्रोफेसर १८७८ सालीं नेमण्यांत आलें. त्यानें 'दि व्हिजन ऑफ विल्यम कन्सर्निंग पिअर्स दि प्लोमन,' 'दि ले ऑफ हॅवलॉक दि डेन,' इत्यादि ग्रंथ संपादित केले. परंतु त्याचा मुख्य ग्रंथ म्हणजे लघु व्युत्पत्तिकोश होय.

**स्कॉट, सर वॉल्टर** (१७७१–१८३२)—एक स्कॉटिश कवि व कादंबरीकार. याचा बाप एडिंबर्ग येथें नाणावलेला वकील होता. स्कॉटच्या लहानपणींच वाताच्या झटक्यानें त्याचा उजवा पाय लुळा झाला होता. त्यानें कायद्याचा अभ्यास करून १७९२ सालीं वकिलीची सनद घेतली. पण लवकर त्यानें वाङ्मय संशोधनकार्य सुरू करून पुढें सात वर्षें स्कॉटलंडच्या वायव्य प्रदेशांतील कानाकोपऱ्यांतून पोवाडे (बॅलड्स) वाङ्मय जमविलें. त्यानें एका फ्रेंच राजपक्षीयाच्या इंग्लंडांत येऊन राहिलेल्या चार्लोटी मेरी कार्पेंटर या नांवाच्या मुलीशीं १७९७ सालीं विवाह केला. १८०२ सालीं स्कॉटनें 'बॉर्डर मिन्स्ट्रल्सी' हा आपला पोवाडे–संग्रह प्रसिद्ध केला. तो फार लोकप्रिय झाला. नंतर त्यानें 'दि ले ऑफ दि लास्ट मिन्स्ट्रल' (१८०५), 'मार्मियन' (१८०८), आणि 'दि लेडी ऑफ दि लेक' (१८१०) हीं आपलीं अद्भुतरम्य काव्यें प्रसिद्ध केलीं. तीं लोकांना इतकीं आवडलीं कीं, 'लेडी ऑफ दि लेक' याच्या २०,००० प्रति एका वर्षांत खपल्या. याशिवाय त्याचीं काव्यें व कविता अनेक आहेत.

स्कॉट हा जसा श्रेष्ठ कवि आहे, त्याप्रमाणें श्रेष्ठ कादंबरीकारहि आहे. त्याच्या कादंबऱ्या आहेत त्या: 'गाय मॅनरिंग' (१८१५); 'दि अँटिक्वेरी' (१८१५); 'दि ब्लॅक ड्वार्फ' (१८१६); 'ओल्ड मॉरॅलिटी' (१८१६); 'रॉब रॉय' (१८१७); 'दि हार्ट ऑफ मिडलोथियन' (१८१८); 'दि ब्राइड ऑफ लामरमूर' (१८१९); 'दि लीजंड ऑफ मॉन्ट्रोज' (१८१९); 'आयव्हॅनो' (१८१९); 'दि मोनॅस्टरी' (१८२०); 'दि ॲबट' (१८२०); 'केनिलवर्थ' (१८२१); 'दि पायरेट' (१८२१); 'दि फॉर्च्यून्स ऑफ निगेल' (१८२२); 'पेव्हेरिल ऑफ दि पीक' (१८२३); 'क्वेन्टिन डुरवॉर्ड' (१८२३); 'सेंट रोनन्स वेल' (१८२३); 'दि टॅलिसमन' (१८२५); 'दि सर्जन्स डॉटर' (१८२७); वगैरे. शिवाय स्कॉटनें १८१४ सालीं स्विफ्टचें चरित्र आणि त्याचे समग्र ग्रंथ १९ भागांत प्रसिद्ध केले. १८२४ सालीं स्कॉटच्या ग्रंथांचे प्रकाशक कॉन्स्टेबल ॲन्ड कॅडेल आणि बॅलंटाइन ॲन्ड कंपनी या प्रकाशकांचें धंद्यांत अतिशय नुकसान झालें; आणि स्कॉट सदर प्रकाशनसंस्थेचा मुख्याधिकारी असल्यामुळें त्याची आर्थिक स्थिति अत्यंत बिकट झाली. तथापि त्यानें नादारीचा अर्ज देण्याचें नाकारलें; आणि आपल्या लेखन प्रकाशन उद्योगांत होणारा सर्व नफा कर्जदारांचें देणें फेडण्याकडे लावण्याचा निश्चय करून, १८२५ ते १८२८ पर्यंतच्या ग्रंथांच्या प्रकाशनाचा हक्क (कॉपीराइट) विकून सुमारें ४०,००० पौंड सावकारांचें देणें दिलें. याच काळांत स्कॉटनें नेपोलियनचें चरित्र ९ भागांत प्रसिद्ध करून (१८२७) त्याच्या प्रकाशनाचा हक्क १८,००० पौंडांत विकला. याप्रमाणें लेखन–प्रकाशन कामाचा त्याच्या शरीरावर अतिशय ताण पडून १८३० पासून त्याला अर्धांगवायूचे झटके तीन वेळां येऊन १८३२ सालीं त्याचा अन्त झाला. डिकन्स व थॅकरे यांच्याइतक्या थोर योग्यतेचा कादंबरीकार स्कॉट होता; पण त्यानें आपल्या कादंबऱ्यांत प्रत्यक्ष बोधपर मजकूर मुळींच न लिहितां निरनिराळ्या पात्रांचें जीवन रंगवून त्यापासून अप्रत्यक्षपणें वाचकांना बोध करण्याची पद्धति अवलंबिली आहे. स्कॉट हा स्कॉटलंडमधील सर्वांत श्रेष्ठ ग्रंथकार असून जगांतल्या उत्तमोत्तम ग्रंथकारांपैकीं तो एक आहे यांत शंका नाहीं.

**स्कॉटलंड**—युरोपांत इंग्लंड व स्कॉटलंड मिळून एक मोठें बेट आहे. स्कॉटलंड इंग्लंडच्या उत्तरेस आहे. या दोन देशांमध्यें ट्वीड नदी आहे. क्षेत्रफळ ३०,४०५ चौ. मै., लो. सं. ४८,४२,९८०. देशाचे ३३ परगणे (काउंटी) पाडले आहेत. किनारा फारच वेडावांकडा आहे, त्यांत पश्चिम किनारा विशेष तसा आहे. किनाऱ्यापासून फार दूर नाहींत अशीं पुष्कळ (सु. १८०) बेटें आहेत. त्यांत ऑर्कनी बेटें, शेटलंड बेटें व हेब्राइड्स बेटें मुख्य आहेत. एडिंबर्ग हें मोठें शहर कारभाराचें मुख्य ठिकाण आहे. डंडी, ॲबर्डीन, वगैरे इतर मोठीं शहरें त्याच्या खालोखाल येतात. बहुतेक लोक प्रेस्बिटेरिअन पंथाचे आहेत. तथापि रोमन कॅथॉलिकहि बरेच आहेत. मुख्य व्यवसाय शेती. मेंढ्यांचे कळप पाळणें व लोंकर काढणें हाहि एक स्वतंत्र व महत्त्वाचा व्यवसाय आहे. कारखाने बरेच आहेत. त्यांतून कापड, कागद, दारू, वगैरे अनेक जिन्नस निघतात. खाणी मुख्यतः लोखंड आणि कोळसा यांच्या आहेत.

स्कॉटलंड हा डोंगराळ मुलूख आहे. बरीचशी जमीन दलदली आहे. ग्राम्पियन पर्वतानें याचे हायलंड (उच्च प्रदेश) व लोलंड (नीच प्रदेश) असे दोन भाग झाले आहेत. दोन्ही भागांतील

लोकांमध्यें राहणी, चालीरीती, वगैरेबाबत पुष्कळ फरक आहेत. दक्षिण भागांत खोरीं पुष्कळ व जमीन अतिशय सुपीक. वनश्री व विशेषतः तळीं, सरोवरें व नद्या यांनीं बनलेले सृष्टिसौंदर्य बघण्याजोगें आहे. इंग्लंड व स्कॉटलंड या दोहोंमध्यें सर्व बाबतींत भिन्नता आहे. त्याचे कायदेहि पुष्कळ निरनिराळे असून न्यायदानपद्धतहि अगदीं स्वतंत्र आहे.

अगदीं पूर्वींपासून वर सांगितल्याप्रमाणें या देशाचे उत्तर व दक्षिण असे दोन भाग झालेले आहेत. हायलंडमध्ये गॅलिक लोक राहत व लोलंडमध्यें निराळेच लोक राहत. ते इंग्लंड-मधल्या लोकांहून भिन्नच होते. इ. स. ९०० च्या सुमारास दक्षिण स्कॉटलंडमध्यें एक राजा उदयास आला. त्यानें प्रथम फारच लहान मुलूख आपल्या अमलाखालीं घेतला होता. पण क्रमाक्रमानें त्यानें आपला व्याप वाढविला. कधीं कधीं सोयीप्रमाणें तो इंग्लंडच्या राजाशीं नमतें घेऊन त्याचा मांडलिक बने. पुढें त्यानें सर्व स्कॉटलंड आपल्या हुकमतीखालीं आणला. इंग्लंडचा राजा पहिला एडवर्ड यानें पुढे स्कॉटलंड जिंकलें व तेथील राजास आपला मांडलिक बनवले. परंतु बॅनॉकबर्नच्या लढाईत तें पुन्हा स्वतंत्र झालें. १६०३ मध्यें स्कॉटलंडचा राजा ६ वा जेम्स हाच इंग्लंडच्या राज्यावर पहिला जेम्स म्हणून आला तेव्हा दोन्ही देश एक झाले. पुढें १७०७ मध्यें दोन्ही देशांचें मिळून एकच पार्लमेंट करण्यांत आलें व या दोन्हो देशांचें ऐक्य दृढतर झालें.

सेंट अॅन्ड्रयूज (१४११), ग्लासगो (१४५०), अॅबरडीन (१४९४) व एडिंबर्ग (१५८२) अशीं चार जुनीं विद्यापीठें आहेत. व त्यांतून दहा हजारांवर विद्यार्थी शिकतात. प्रौढ शिक्षणाचे वर्ग सुमारें शंभर असून त्यांतील विद्यार्थ्यांची संख्या आठ हजारावर जाईल.

**स्कॉटिश भाषा व वाङ्मय**—१५ व्या शतकापर्यंत स्कॉटिश भाषा ही संज्ञा गेलिक किंवा केल्टिक बोलीला लावावी लागते व दक्षिण स्कॉटलंडची भाषा इंग्लिश म्हणूनच समजली जाई. ही उत्तर इंग्लिश भाषा होय. या भाषेचे तीन काळ धरण्यांत येतात. १५ व्या शतकापर्यंतच्या 'आदि काळां'त स्कॉटलंड आणि हंबर नदीच्या उत्तरेकडील इंग्लंड यांच्या भाषेमध्यें फार थोडा फरक होता. एकीकरणाच्या काळापर्यंतच्या 'मध्ययुगीन काळां'त गेलिकचा थोडा व फ्रेंच आणि लॅटिन यांचा बराचसा परिणाम झाला. 'अर्वाचीन काळां'त आधुनिक वाङ्मयीन इंग्लिश भाषेची स्कॉटिश भाषेवर फार मोठी छाप दिसून येते.

स्कॉटिश वाङ्मयाचें स्थूल मानाने अवलोकन केल्यास असें आढळून येतें कीं, स्कॉटिश वाङ्मयाची वाढ दोन दिशांनीं झालेली आहे. एक दिशा म्हणजे ज्यांतील वाङ्मय शालेय पद्धतीनें झालें आहे ती व दुसरी म्हणजे ज्यांतील वाङ्मय बोलीभाषेंत आहे ती होय.

(१) पंधराव्या शतकापर्यंतचें वाङ्मय—या कालांतील वाङ्मयांत मुख्यतः अद्भुत काव्यें व इतिहास यांचा भरणा आहे. अद्भुत काव्यें लिहिणाऱ्यांमध्यें थॉमस, हचोन यांचीं काव्यें प्रसिद्ध आहेत. ऐतिहासिक काव्यें लिहिणाऱ्यांमध्यें जॉन बारबोर, अँड्र्यू विंटोन व हॅरी यांचीं नावें प्रसिद्ध आहेत. जुन्या स्कॉटिश काव्याचा जनक या नात्यानें बारबोरचें नांव महशूर आहे.

(२) मध्ययुगीन वाङ्मय—मध्ययुगीन वाङ्मयावर इंग्लंडचा तत्कालीन प्रसिद्ध कवि चॉसर याची छाप पडलेली आढळते. या काळचें वाङ्मय 'मिड्ल् स्कॉट' म्हणून प्रसिद्ध असणाऱ्या भाषेंत असलेलें आढळतें. या कालांत चांगल्या प्रकारची कविता पुष्कळच निर्माण झाली व त्यामुळें काळाला 'स्कॉटिश कवितांचा सुवर्णकाल' असेंहि संबोधण्यांत येतें. या काळांतील प्रसिद्ध राजकवि पहिला जेम्स राजा होय. त्याचें 'किंगिस क्केयर' हें काव्य चॉसरच्या 'ट्रॉयलस' काव्याच्या छंदांत असून या काव्यावर चॉसरची छाप दिसून येते. डनबार, डग्लस व डेव्हिड लिंडसे यांचीहि कविता स्वतंत्र असली तरी ती प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष रीतीनें चॉसरी वळणावर गेलेली आहे यांत शंका नाहीं. या काळातील काव्याचें व वाङ्मयाचें दुसरें लक्षण म्हणजे तें राजदरबारांतील कवींचें असून राजदरबारच्या लोकांच्या चाली-रीतींसंबंधीं आहे. या काळांतला प्रख्यात कवि हेन्रीसन याचे 'फेबलस', 'टेस्टामेंट ऑफ क्रेसीड', व 'रोबेन अँन्ड मेकिन' हे ग्रंथ नावाजलेले आहेत ज्यांच्या काव्यांवर चॉसरची छाप पडली नाहीं अशांमध्यें हॉलंड कवीची गणना होते; बिनचॉसरी वळणाच्या कवितेचे 'अद्भुत' व 'ग्रामिक' असे भाग पडतात. या कवितांतील विषय, सर्वसामान्य लोकांसंबंधींची कथानकें असून त्यांमध्यें कौटुंबिक जीवितक्रम, निसर्ग, स्त्री, इत्यादिकांचें वर्णन असतें. रूक्ष विनोदहि यांच्या काव्यांत आढळून येतो. अशा प्रकारच्या कवितांत पांचव्या जेम्सच्या 'पोलिस टु दि प्ले', 'ख्रिस्तिस कर्क ऑन दि ग्रीन', तसेंच 'सिम अॅन्ड हिज ब्रदर', 'दि वुइंग ऑफ जॅक अॅन्ड जिनी', 'बॅलड ऑफ काइंड किप्तुक', 'गायरकार्लिंग', 'किंग बॅर्डोक', इत्यादि कवितांचा समावेश होतो.

(३) गद्य वाङ्मय—स्कॉटिश भाषेंत गद्य ग्रंथ लिहिण्याला फार उशीरा सुरुवात झाली. १५ व्या शतकापर्यंत जें थोडेंफार गद्य निर्माण झालें तें लॅटिनमधील भाषांतरें, कायदे अगर कांहीं पत्रें एवढेंच होय. १६ व्या शतकांत ऐतिहासिक व चर्चात्मक विषय गद्यभाषेंत लिहिण्यास सुरुवात झाली. १६ व्या शतकाच्या अखेरीस बायबलचें स्कॉटिश भाषेंत भाषांतर झालें.

(४) अर्वाचीन काल—अर्वाचीन काळास १७ व्या शतकापासून सुरुवात होते. या शतकांतील प्रसिद्ध ग्रंथकार रॉबर्ट केर ('सॉनेट इन प्रेज ऑफ सॉलिटरी लाइफ'चा कर्ता), डेव्हिड मरे ('दि ट्रॅजिकल डेथ ऑफ सोफानिस्बा'चा कर्ता), सर विल्यम अलेक्झांडर, विल्यम ड्रमंड, सर रॉबर्ट ऐटून, जेम्स ग्रॅहाम, पॉट्रिकहने, थॉमन उर्कुहर्ट, स्पॉटस्वुड, केल्डरवुड, इत्यादि मुख्य कवी गद्यग्रंथलेखक व इतिहासकार झाले. १८ व्या शतकांत उत्तर स्कॉटलंडची व दक्षिण स्कॉटलंडची वाङ्मयदृष्ट्या एकी झाली व त्यानंतरचे सर्व ग्रंथकार इंग्लिश भाषेंत आपले ग्रंथ प्रसिद्ध करूं लागले. त्यामुळें जेम्स थॉम्सन्, ॲडॅम स्मिथ, ह्यूम, बॉसवेल, वॉल्टर स्कॉट, रॅम्से, फर्ग्युसन, बर्न्स, इत्यादि स्कॉटिश ग्रंथकारांची इंग्लंडच्या वाङ्मयेतिहासांतच गणना होऊं लागली आहे. तेव्हां त्यांच्या ग्रंथांचा विचार इंग्लिश वाङ्मय या सदराखालीं करण्यांत आला आहे.

**स्कॉटलंड यार्ड**—इंग्लंडमधील लंडन येथील पोलिसांची प्रसिद्ध मुख्य कचेरी. या ठिकाणाहून सर्व पोलिसास हुकूम दिले जातात. मूळ स्कॉटलंड यार्ड हे ट्राफलगार चौकाजवळील एका रस्त्यास नाव होतें. कारण दहाव्या शतकांत एडवर्ड राजानें स्कॉटलंडचा राजा दुसरा केनेथ यास बक्षीस दिलेला वाडा या रस्त्यावर होता. सध्यांचें स्कॉटलंड यार्ड थेम्स नदीच्या तीरावर आहे, व गुन्ह्यांची चौकशी करणाऱ्या खात्याची मुख्य कचेरी तेथें असतें.

**स्कील, कार्ल विल्हेल्म** (१७४२–१७८६)—एक स्वीडिश रसायनशास्त्रज्ञ. रसायनशास्त्राच्या इतिहासांत स्कील हा एक अत्यंत थोर विद्वान् म्हणून नमूद आहे. त्यानें प्राणवायूचा शोध लावला. याच सुमारास प्रीस्टले या शास्त्रज्ञानें तोच शोध लावला. शिवाय स्कीलनें हर (क्लोरीन), भार (बेरीटा), बेन्झॉइक ॲसिड, तालसंयुक्त उज्ज (ॲर्सेनिउरेटेड हायड्रोजन), उज्ज गंधिद (सल्फ्युरेटेड हायड्रोजन), दुग्धाम्ल (लॅक्टिक ॲसिड), प्रुसिक ॲसिड, निंबाम्ल (सायट्रिक ॲसिड), काष्ठाम्ल (ऑक्झॅलिक ॲसिड), मायाफलिकाम्ल (गॅलिक ॲसिड), इत्यादि अनेक शोध लावले.

**स्कीलाइट**—हा एक निर्वर्ण अर्धपारदर्शक खनिज पदार्थ असून याचें विशिष्ट गुरुत्व ६ आहे. याचे घटक खट (कॅल्शियम) व तुंगस्त (टुंगस्टेन) असून हा वुल्फ्राम या धातूबरोबर टुंगस्टेनच्या अशोधित धातूमध्यें आढळतो.

**स्कुटारी**—१. अल्बानिया, एक मुख्य शहर. याला स्कोड्रा असेंहि नांव आहे. हें स्कुटारी सरोवराच्या आग्नेय किनाऱ्यावर असून याची लो. सं. सुमारें २२,००० आहे. येथील बाजार व मशिदी, यांच्यावरून हें पौरस्त्य शहर असावें अशी कल्पना येते. येथील इटालियन इमारती फार सुंदर आहेत. धान्य, लोंकर, कातडीं, तंबाखू, वगैरे पदार्थांची येथून निर्गत होते. कापड, धातू, खाण्याचे पदार्थ, लोखंडी सामान, वगैरे माल परदेशांतून येतो. येथें शस्त्रें व कापड तयार होतें.

२. हें शहर आशियांतील तुर्कस्तानांत, बासरसच्या पूर्वकिनाऱ्यावर कॉन्स्टांटिनोपलच्या समोर आहे. याला उस्कुदर असेंहि म्हणतात. या शहरांतील आठ मशिदींपैकीं वालिदे जामी नांवाची मशीद इ. स. १५४७ त बांधलेली असून ती फार सुंदर आहे. दुसऱ्या इमारती म्हणजे तिसऱ्या सेलिमच्या वेळची एक मोठी बरॅक व क्रिमियन युद्धाच्या वेळचें एक रुग्णालय या होत. येथील मुख्य उद्योगधंदा रेशमाचें कापड, कापसाचें कापड व मलमल विणण्याचा आहे. लो. सं. सुमारें एक लाख असून दोनतृतीयांश मुसुलमान आहेत. सर्वांत ध्यानांत राहण्याजोगा असा स्कुटारी येथील भाग म्हटला म्हणजे येथील अवाढव्य कबरस्तान होय. हें सर्वांत मोठें व सुंदर असून तीन मैल लांब पसरलेलें आहे. स्कुटारी क्रायसोपोलिस अथवा सुवर्णनगर असें जुनें नांव होतें. इराणी लोकांना धावयाची खंडणी या ठिकाणीं जमा होत असे म्हणून कदाचित् याचें नांव सुवर्णनगर असें पडलें असावें.

**स्कूलमेनचें तत्त्वज्ञान**—(स्कोलॅस्टिसिझम). मध्ययुगातील तत्त्ववेत्त्यांनीं प्रवर्तित केलेला हा एक तत्त्वज्ञानविषयक पंथ आहे. या पंथाचे दोन काल विभाग पडतात: पहिला कालविभाग ८ व्या ते १३ व्या शतकापर्यंतचा होय. या काळात 'स्कूलमेन' नामक तत्त्ववेत्त्यांनीं ॲरिस्टॉटलचें तर्कशास्त्र आणि नवप्लेटो पंथाचीं मतें यांचा ख्रिस्ती धर्मातील सिद्धान्तांशीं मेळ घालण्याचा प्रयत्न केला. या पंथाचा मूळ संस्थापक जॉन स्कोटस एरिजेना हा होय. या काळांत नॉमिनॅलिस्ट (नाममात्रवादी पाहा) आणि रिॲलिस्ट (वास्तववाद पाहा) या दोन पंथांमध्यें कडाक्याचे वादविवाद झाले व त्यांत अखेरीस रिॲलिस्ट पंथाचा विजय झाला. दुसरा कालविभाग १३ व्या ते १५ व्या शतकापर्यंतचा होय. या वेळीं प्राचीन ग्रीक व रोमन भाषेचें व वाङ्मयाचें पुनरुज्जीवन सर्व युरोपीय देशांत चालू होतें. या काळांत पुन्हां स्कूलमेन पंथाच्या तत्त्वज्ञानाचा प्रसार व वाढ झाली, पण अखेरीस हा पंथ असंगत झाला. या काळांत ॲरिस्टॉटलच्या तत्त्वज्ञानाचा खोल अभ्यास झाला. व त्याच्या मतांचा परिणाम अतिशय झाला. या काळांतले या पंथाचे फार विद्वान् थॉमस ॲक्विनस आणि डन्स स्कोटस हे होत, व त्यांशिवाय कॅन्टरबरीचा अनसेल्म ॲबेलार्ड, पीटर लॉंबार्ड, आल्बर्टस मॅग्नस, आणि विल्यम् ऑकम हे होत. पुढें ख्रिस्ती धर्मांत प्रॉटेस्टंट पंथ उदयास आल्यावर स्कूलमेनचा पंथ ऱ्हासमार्गास लागला.

**स्केटिंग**—बर्फावरून घसरत जाण्याचा हा खेळ आहे व फार प्राचीन काळापासून नॉर्वे देशांतील लोकांत रूढ आहे. बर्फाच्या जागेवरून जलद जाण्यास पूर्वी जोड्याच्या तळांना हाडें बसवीत. आतां हा खेळ म्हणून झाल्यावर लांकडी किंवा पोलादी पट्टया वापरतात. पटाईत खेळाडू या जोड्यांच्या योगानें तासीं वीस मैल जाऊं शकतो. या खेळाचे राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय सामनेहि होतात.

**स्केल्ड**—ही पश्चिम युरोपांतील अत्यंत महत्त्वाची नदी फ्रान्समध्यें उगम पावून बेल्जिअम व हॉलंड यांमधून वाहत जाते. तिला घेंट शहरानजीक लीज ही नदी मिळते. पुढें अँन्टवर्प शहरानजीक या नदीची रुंदी १,६०० फूट आहे. ही नदी हॉलंडमध्यें शिरल्यावर या नदीचे पूर्व स्केल्ड आणि पश्चिम स्केल्ड असे दोन फांटे होतात. या नदीची एकंदर लांबी २५० मैल असून त्यापैकीं २०७ मैल पर्यंत नाविक वाहतूक चालते. अँटवर्प बंदराचें महत्त्व पश्चिम स्केल्ड नदींतून होणाऱ्या नाविक वाहतुकीवर अवलंबून असल्यामुळें आणि ही नदी बेल्जिअम व हॉलंड या देशांतून वाहत असल्यामुळें राजकारणांत स्केल्ड नदीचा प्रश्न नेहमीं फार महत्त्वाचा झाला आहे. १८६३ सालीं बेल्जिअमनें हॉलंडचा या नदींतील वाहतुकीवर जकाती बसवण्याचा हक्क विकत घेतला. आणि हल्लीं या नदींतून वाहतूक करण्याची सर्वांना मोकळीक आहे.

**स्टट्गार्ट**—जर्मनींतील वुर्टेंबर्ग राज्याच्या राजधानीचें शहर. हें म्युनिकच्या वायव्येस ११५ मैलांवर आहे. लो. सं. ४,१६,५००. हें शहर द्राक्षवेली व वृक्षराजी यांनीं आच्छादित अशा टेंकड्यांमध्यें समुद्रसपाटीपासून ९०० फूट उंचीवर वसलें आहे. येथील हवा निरोगी आहे. शहराचें स्वरूप आधुनिक असून १९ व्या शतकापूर्वीच्या अशा फारच थोड्या इमारती येथें आहेत. १६ व्या शतकांतील जुना राजवाडा, नवीन न्यायमंदिर, अश्वशाळा, राजघराण्यांतील मंडळींसाठीं बांधलेलें नाटकगृह, वगैरे प्रेक्षणीय इमारती येथें आहेत. या ठिकाणीं उत्तम उत्तम शिक्षणसंस्था आहेत. येथील संगीतशाळा फार नामांकित आहे. या ठिकाणीं यंत्रें, पिआनो व इतर वाद्यें, सुती कपडा, सिगार, कमावलेलें कातडें, रंग, रासायनिक द्रव्यें, इत्यादिकांचे कारखाने आहेत. दक्षिण जर्मनींतील पुस्तकें प्रसिद्ध करण्याच्या व्यापाराचें स्टट्गार्ट हें केंद्र आहे. कागदाच्या गिरण्या, खिळे पाडण्याच्या मुशी, छापखाने व शिलामुद्रणाचे कारखाने हीं प्रकाशसाधनें येथें विपुल आहेत.

**स्टॅनले, आर्थर पेन्‌र्‍हिन (१८१५–१८८१)**—एक ब्रिटिश आफ्रिकन प्रदेशसंशोधक. अमेरिकन यादवी युद्धामध्यें भाग घेतल्यानंतर तो तुर्कस्तानमध्यें वृत्तपत्राचा बातमीदार म्हणून गेला आणि अॅबिसीनियावर झालेल्या स्वारींत (१८६७–६८) 'न्यू यॉर्क हेरल्ड 'चा युद्धविषयक बातमीदार म्हणून तो तिकडे गेला होता. 'न्यू यॉर्क हेरल्ड 'च्या मालकानें १८६९ त त्याला लिव्हिंगस्टनचा शोध काढण्यासाठीं पाठविलें. तदनुसार तो १८७१ सालीं झांजीबार येथें गेला आणि तेथून लिव्हिंगस्टनच्या शोधार्थ त्यानें आफ्रिकेंत प्रवास केला. त्याची व लिव्हिंगस्टनची भेट टँगानिका सरोवरानजीक त्याच वर्षाच्या नोव्हेंबर महिन्यांत झाली. अॅशँटी युद्धाच्या वेळींहि (१८७३–७४) त्यानें हेरल्डचा बातमीदार म्हणून काम केलें. पुढें १८७४ सालीं त्यानें 'डेली टेलेग्राफ' व 'न्यू यॉर्क हेरल्ड' यांचा बातमीदार म्हणून आफ्रिकेंत प्रवास करण्याचें ठरविलें, आणि तिकडे जाऊन त्यानें भूमध्य-रेषेच्या नजीकच्या सरोवरमय प्रदेशाचा शोध लावला, आणि कॉंगो नदीच्या उगमाकडून मुखापर्यंतची माहिती प्रथमच मिळविली. १८८७ सालीं त्यानें एमिनपाशा याला मदत करण्याकरितां तिकडे सफर काढली आणि अतिशय त्रासाचा प्रवास करून त्यानें तो पाशा आणि त्याचे अनुयायी यांना बागामोयो येथें आणलें (१८९० जानेवारी). त्यानें 'मी लिव्हिंगस्टनला कसा शोधला', हा ग्रंथ आणि आत्मचरित्र लिहिलें. 'अज्ञात आफ्रिके 'वरहि त्याचें एक पुस्तक आहे.

**स्टँप फी**—जे कायदेशीर दस्तऐवज करण्यांत येतात त्याबद्दल सरकार शुल्क (फी) घेते. याची रक्कम दस्तऐवजाच्या प्रकाराप्रमाणें निरनिराळी असते. आणि ही फी छापील स्टँप कागद किंवा चिकटविण्याचे स्टँप सरकारमार्फत विकून वसूल करण्यांत येते. दस्तऐवजाला प्रथम स्टँप लावलेला नसेल तर सामान्यतः मागाहून ३० दिवसांच्या आंत जरूर तो स्टँप दंड न भरतां जोडतां येतो. सदर मुदतीनंतरहि दंड भरून स्टँप जोडता येतो. प्रॉमिसरी नोट, बिल ऑफ लेंडिग, मरीन पॉलिसी आणि प्रॉक्झी मतपत्रिका यांना मागाहून स्टँप जोडतां येत नाहीं. कांहीं दस्तऐवजांना स्टँप मुळींच लावावा लागत नाहीं; उदा., गव्हर्नमेंट स्टॉक्स, मृत्युपत्रें.

हिंदुस्थानांत स्टँपचा कायदा १८९९ चा आहे व पुढें दुरुस्त्या झाल्या. या कायद्याच्या शेडयूलमध्यें कोणत्या दस्तऐवजाला किती किंमतीचा स्टँप लावला पाहिजे हें सांगितलें असतें. प्रॉमिसरी नोटा, मताधिकार पत्रें (प्रॉक्झी), वीस रुपयांवरील पावत्या, मुखत्यारपत्रें, कर्जरोखे, भागीपत्रें, वांटपपत्रें, गहाणखतें, भाडेपट्टे, खंडचिठ्ठ्या, करारपत्रें, शपथपत्रें (अफिडेव्हिट), साटेखतें, लवादनिवाडे, विश्वस्तपत्रें, वगैरेसाठीं ठराविक रकमेचा स्टँप लावावा लागतो.

**स्टर्जन मासा**—चकचकीत खवले असलेल्या माशांचा हा एक वर्ग आहे. हे लांबट व बारीक असतात. यांचें मांस पथ्यकर व रुचिकर असतें. यांच्या अंड्यांच्या बलकाचें लोणच्यासारखें तोंडीं लावणें करतात आणि यांच्या फुफ्फुसांपासून इसिंग्लास

तयार होतो. हा मासा रंगानें पिंवळसर असून पांचपासून आठ

फुटांपर्यंत लांब असतो. याची एक जात व्होल्गा व डॅन्यूब या नद्यांमध्यें आढळते. काळ्या व कास्पियन समुद्रास मिळणाऱ्या नद्यांत या जातीचा पांढरा मासा आढळतो. त्याच्यापासून अति उत्तम इर्सिंग्लास मिळतो.

**स्टर्न, लॉरेन्स** (१७१३–१७६८)—एक विनोदी इंग्रज लेखक. त्याचें शिक्षण केंब्रिज येथें जीझस कॉलेजमध्यें झालें. नंतर त्याला १७३६ सालीं डीकन करण्यांत आलें. आणि १७३८ सालीं यॉर्कजवळील सटन–इन्–दि फॉरेस्ट या गांवीं प्रीस्ट नेमण्यांत आलें. १७५९ सालीं स्टर्न एकदम प्रसिद्धीस आला. त्याचें कारण त्यानें 'दि लाइफ अँड ओपिनियन्स ऑफ ट्रीस्ट्रॅम शँडी' या नांवाचें पुस्तक दोन भागांत प्रसिद्ध केलें. याप्रमाणें यश मिळाल्यामुळें त्यानें आपल्या धार्मिक प्रवचनांचा संग्रह सात भागांत प्रसिद्ध केला. त्याचा एक मित्र लॉर्ड फॉकनबर्ग यानें त्याला कॉक्सवोल्डची क्युरेटची जागा कायमची देऊं केली. पण त्याची प्रकृति बिघडूं लागली म्हणून त्यानें फ्रान्समध्यें १७६२ ते १७६४ पर्यंत प्रवास केला. नंतर तो युरोपांतील इतर देशांत हिंडला. आणि तिकडे जी माहिती मिळाली त्या आधारें त्यानें आपलें 'सेंटिमेंटल जर्नी थ्रू फ्रान्स अँड इटली' (फ्रान्स आणि इटली यांमधील भावनात्मक प्रवास, १७६८) हें पुस्तक प्रसिद्ध केलें. यानंतर तो लंडन येथें लवकरच मरण पावला. स्टर्नच्या लेखनांतला मोठा गुण म्हणजे त्याची सोपी व शुद्ध इंग्लिश भाषा लिहिण्याची हातोटी हा होय. त्यानें जीं स्वभाव–चित्रें रेखाटलीं त्यांत वॉल्टर शँडी, कॉर्पोरल ट्रिम, अंकल टॉबी हीं सर्व उत्कृष्ट आहेत. त्याच्या विनोदांत साधेपणाबरोबरच अतिशयित कारुण्याची भावना भरलेली दिसेल.

**स्टर्लिंग, जेम्स** (१६९२–१७७०)—एक स्कॉटिश गणितशास्त्रज्ञ. त्याचा अतिशय महत्त्वाचा ग्रंथ आहे तो 'मेथोडस डिफरन्शिॲलिस' हा होय. स्टर्लिंग सिद्धान्ताचा उपयोग उच्च गणितशास्त्रांत फार होतो.

**स्टर्लिंग, जेम्स हचिन्सन** (१८२०–१९०९)—एक स्कॉटिश तत्त्ववेत्ता. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते–'दि सीक्रेट ऑफ हेगेल बीज रिगार्डेड प्रोटोप्लॅझम' (जीवद्रव्यासंबंधीं हेगेलचें रहस्य), 'दि फिलॉसफी ऑफ लॉ' (कायद्याचें तत्त्वज्ञान), 'फिलॉसफी अँड थिऑलजी' (तत्त्वज्ञान आणि ईश्वरज्ञान), गिफर्ड व्याख्यानें आणि स्वेग्लरच्या 'हिस्टरी ऑफ फिलॉसफी' (तत्त्वज्ञानाचा इतिहास) या ग्रंथाचें आणि कँटच्या 'क्रिटिक ऑफ प्युअर रीझन' (प्रतिभेचा टीकाकार) या ग्रंथाचें भाषांतर हे होत.

**स्टॅलॅक्टाइट**—धातवीय द्रव्यपुंज. लेण्यांच्या छपरांतून पाणी सारखें पडत राहिल्यानें चुनखडीचे उभे वाटोळे किंवा निमुळते आकार बनतात. कांहीं वरून खालीं चित्रविचित्र लोंबत असतात (स्टॅलॅक्टाइट); तर कांहीं खालून वर उभे राहतात (स्टॅलग्माइट). इंग्लंडमध्यें चेड्डरच्या लेण्यांत आणि डर्बीशायरमधील पीक गुहेत अशीं दृश्यें दिसतील. न्यू साउथ वेल्समध्यें जेनोलन येथें तर यांच्या सुंदर आकृती पाहण्यास मिळतात.

**स्टाइन, सर मार्क ऑरेल** (१८६२–१९४३)—एक प्रसिद्ध पुराणवस्तुसंशोधक व लेखक. मूळ हंगेरियन. पण यांचें सर्व शिक्षण बुडापेस्ट, व्हिएन्ना, लायप्झीक, ऑक्सफर्ड व लंडन येथें झालें. याच कालांत यांनीं संस्कृत भाषा व क्षेत्रमापन (सर्व्हे) यांचें शिक्षण घेतलें. यानंतर लाहोर ओरिएंटल कॉलेजचे याच कालांत प्रिन्सिपॉल व नंतर पंजाब युनिव्हर्सिटीचे रजिस्ट्रार असतांना यांनीं राजतरंगिणीची सटीप व भाषांतरित आवृत्ति प्रसिद्ध केली.

सन १८९८ ते १९१६ या कालांत यांनीं आशिया खंडांत अनेक सफरी काढल्या. या वेळीं यांना फाहियान, सुंगयुंग, बोनिन, स्वेन हेडिन, इत्यादि प्रवाशांनीं लिहिलेल्या संशोधनात्मक प्रवासवृत्तांचा अत्यंत उपयोग झाला. तुर्फान, तुनहुआंग येथून महत्प्रयासानें यांनीं अनेक प्राचीन अवशेष, हस्तलिखितें व चित्रें मिळविलीं; तीं दिल्लींतील सेंट्रल एशियन ॲन्टिक्विटीज म्यूझिअममध्यें संग्रहित करण्यांत आलीं आहेत. बिकानेर, जेसलमीर या भागांतूनहि यांनीं महत्त्वाचे अवशेष शोधून काढले आहेत. याच कार्याकरितां सिंधु नदीचें खोरें व लासबेला संस्थान या भागांत १९४१ सालीं यांनीं दौरा काढला व नंतर अफगाणिस्तानांत गेले. तिकडेच हे मृत्यु पावले. 'प्राचीन खोतान', 'आशियाच्या अगदीं अंतर्भागांत', 'पश्चिम इराणांतील जुने रस्ते' यांसारखे अनेक ग्रंथ यांनीं लिहिले आहेत. याशिवाय हातिमच्या गोष्टी व संस्कृत-इंग्रजी कोश हे ग्रंथ संपादिले आहेत.

**स्टॉकहोम**—युरोप, स्वीडनची राजधानी. सौंदर्यासाठीं हें शहर प्रसिद्ध आहे. येथील लहान लहान बेटांचा समूह, यांत वाहणारे झरे व दाट वनश्री यांनीं या शहराला अपूर्व शोभा आणिली आहे. येथें जुनीं घरें फारशीं नाहींत; कारण आगीमुळें हें शहर कित्येकदां खाक झालें आहे. येथील नवा राजवाडा फार सुंदर असून येथील चित्रलतांचा वस्तुसंग्रह फारच मोठा आहे. येथें सरकारी विश्व-विद्यालय मुळींच नव्हतें; पण लोकांनीं स्थापिलेलें एक विश्वविद्यालय सरकारनें आतां आपणाकडे घेतलें आहे. स्टॉकहोममध्यें जे अनेक

उद्योगधंदे आहेत, त्यांत लोखंडाचे व पोलादाचे कारखाने, जहाजें बांधणें, वगैरे अनेक गोष्टींचा समावेश होतो. लो. सं. ६,५४,८६०.

**स्टार ऑफ इंडिया**— ही पदवी १८६१ सालीं प्रथम सुरू करण्यांत आली. हिंदुस्थानच्या व्हाइसरॉयला ग्रँड मास्टर (G. M.), अनेकांना नाइट्स ग्रँड कमांडर्स (G. C. S. I.), नाइट्स कमांडर्स (K. C. S. I.), आणि कंपॅनिअन्स (C. S. I.) या पदव्या देण्यांत येऊं लागल्या. या पदवीच्या फितीचा रंग आकाशी-निळा असून दोन्ही कडांना पांढऱ्या पट्ट्या असतात. आता या पदव्या बंद आहेत.

**स्टालीन, जोसेफ** (१८७९- )—हा सोव्हिएट रशियाचा सर्वाधिकारी (डिक्टेटर) टिफलिसनजीक एका खेडेगांवांत जन्मला. त्याचा बाप फेरीवाला (कॉब्लर) होता. स्टालीनचें शिक्षण टिफलिस येथील चर्च कॉलेजमध्यें झालें. कारण पुढें प्रीस्ट होण्याचा त्याचा विचार होता; परंतु नंतर बेत बदलून स्टालीन सोशालिस्ट क्रांतिकारकांच्या चळवळींत सामील झाला. आणि १९०३ सालीं बोल्शेव्हिस्ट पक्षाचा सभासद झाला. त्याचें मूळ नांव ज्यूगाश व्हिली होतें. तें बदलून स्टालीन म्हणजे 'पोलादी माणूस' हें नांव त्यानें धारण केलें. तो बोल्शेव्हिक बनल्यावर त्याला तत्कालीन सरकारनें सायबेरियांत हद्दपार केलें. १९१७ सालीं रशियन राज्यक्रांति झाल्यावर स्टालीन पीटर्सबर्ग येथें गेला आणि लेनिनच्या कम्यूनिस्ट पक्षाचा सभासद आणि सोव्हिएट सरकारचा कॉमिसर नांवाचा अधिकारी आणि १९१९ सालीं मध्यवर्ती पक्षाचा सर चिटणीस झाला. १९२४ सालीं लेनिन वारल्यावर स्टालीन व ट्रॉट्स्की यांच्यामध्यें स्पर्धा सुरू होऊन त्यांत अखेर स्टालीनचा विजय झाला. ट्रॉट्स्कीच्या पक्षाला जगांतील सर्व देशांत क्रांति करून कम्यूनिझम स्थापावी असें वाटत होतें. आणि स्टालीनच्या पक्षाचें मत फक्त रशियांत समाजसत्तावाद अमलांत आणून रशियाची सर्वांगीण उन्नति करावी असें होतें. स्टालीन सर्वाधिकारी झाल्यावर त्यानें रशियाच्या सुधारणेची पंचवार्षिक योजना सुरू करून पांच वर्षांत ती पूर्ण यशस्वी केली. या योजनेनुसार सर्व कारखाने सरकारी मालकीचे बनवण्यात आले आणि शेत-जमिनींवरील खाजगी मालकी नष्ट करून सर्व शेती सामुदायिक पद्धतीनें गांवकरी करूं लागले. स्टालीनच्या या योजनेला ज्यांनीं विरोध केला त्यांच्यावर खटले करून त्यांना देहान्ताची शिक्षा दिली. हे खटले 'मॉस्को ट्रायल्स' या नांवानें प्रसिद्ध आहेत.

नाझी पक्षाचा कट्टा शत्रु म्हणून पुढें स्टालीनची सर्व जगांत प्रसिद्धि झाली आणि १९३९ च्या मार्च महिन्यांत स्टालीननें नाझी जर्मनी हें अन्याय्य रीतीनें आक्रमण करणारें राष्ट्र आहे, आणि ब्रिटन व फ्रान्स हीं राष्ट्रें तशीं नाहींत असें जाहीर केलें. पण नंतर १९३९ च्या ऑगस्ट महिन्यांतच स्टालीननें हिटलरबरोबर परस्पर अनाक्रमणाचा करार (नॉन-ॲग्रेसिव्ह पॅक्ट) केला आणि जर्मनीनें पोलंडविरुद्ध युद्ध सुरू केल्यावर स्टालीन व हिटलर यांनीं पोलंड देशाची फाळणी करून एकेक भाग आपल्या ताब्यांत घेतले.

स्टालीननें कम्यूनिस्ट पक्षाचीं उच्च तत्त्वें बाजूला ठेवून वस्तुस्थिति व व्यावहारिक शक्याशक्यता लक्षांत घेऊन आपल्या राज्यकारभाराचें धोरण ठेवलें; त्यामुळें स्टालीननें रशियन कम्यूनिस्ट क्रांतीविरुद्ध फितुरी केली आहे, असा ट्रॉट्स्कीनें जरी त्याच्यावर आरोप केला तरीहि जगांतील सर्व ठिकाणचे कम्यूनिस्ट स्टालीनलाच एकनिष्ठेनें आपला पुढारी मानूं लागले. कारण स्टालीनच्या कारकीर्दींत रशियाची एकसारखी सर्वांगीण उन्नति होत जाऊन रशिया हें जगांतील एक मोठें बलाढ्य राष्ट्र बनलें; व स्टालीन हा रशियाचा राजा पीटर दि ग्रेट याच्या योग्यतेचा थोर राज्यकर्ता आहे अशी स्तुति सर्व लोक करूं लागले.

सोव्हिएट यूनियन सरकारमध्यें कोणतीहि अधिकाराची जागा स्टालीनकडे नाहीं. तो फक्त कम्यूनिस्ट पक्षाचा जनरल सेक्रेटरी आहे. त्याची पहिली बायको १९३४ सालीं वारल्यावर त्यानें दुसरें लग्न केलें. स्टालीनला पहिल्या बायकोचीं एक मुलगा व एक मुलगी अशीं दोन अपत्यें आहेत.

दुसऱ्या महायुद्धात स्टालीननें आपणाकडे युद्धाचें सर्वाधिपत्य घेऊन दोस्तराष्ट्रांना हिटलरचा पाडाव करण्यास मदत केली. स्टालीन हा हिटलरला फार मोठा प्रतिस्पर्धी भेटल्यानें त्याला शेवटीं माघार घ्यावी लागली. पराभूत जर्मनीचा पूर्व बाजूला ताबा स्टालीननें आपल्याकडे ठेवला. युरोपची पूर्वेकडील बाजू व आशिया खंडांतील चीन, कोरिया, आदि प्रदेश स्टालीनच्या छापाखालीं आहेत. आज स्टालीनच्या कर्तबगारीमुळेंच अमेरिकेसारख्या जगांतील पहिल्या प्रतीच्या राष्ट्राला रशियाच्या वर्चस्वाची भीति वाटत आहे. जागतिक राजकारणावर रशिया निश्चित परिणाम करूं शकतो एवढें रशियाचें सामर्थ्य स्टालीनच्या अमदानींत वाढलें आहे.

**स्टिफेन, सर लेस्ली** (१८३२-१९०४)—एक ब्रिटिश साहित्यिक. तो कॉर्नहिल मॅगझिनचा १८७१ ते १८८२ पर्यंत संपादक होता. आणि त्याच काळांत त्यानें 'डिक्शनरी ऑफ नॅशनल बायॉग्रफी' (राष्ट्रीय चरित्र कोश) हा ग्रंथ संपादन करण्याचें कार्य हातीं घेतलें. पण १८९१ सालीं त्यानें या संपादकत्वाचा राजीनामा दिला. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते—'अवर्स इन् ए लायब्ररी', 'सॅम्यूअल जॉनसन्', 'ॲलेक्झांडर पोप', 'लिफ्ट ऑन ॲग्नॉस्टिक्स', 'अॅपॉलजी' आणि 'दि इंग्लिश युटिलिटेरिअन्स' हे होत.

**स्टिफेनसन, जॉर्ज** (१७८१-१८४८)—एक ब्रिटिश इंजिनियर. त्यानें आपल्या यांत्रिक विषयाचें शिक्षण कोठल्याहि शिक्षण-संस्थेंत घेतलें नव्हतें. त्यानें १८१४ सालीं किलिंगवर्थ कोळशाच्या खाणींत ट्रॅम्वेकरितां एक फिरतें इंजिन तयार केलें. १८२२ सालीं स्टॉक्टन अँन्ड डार्लिंगटन रेल्वेच्या मालकांनीं त्यानें तयार केलेलें सुधारलेलें आगगाडीचें इंजिन उपयोगांत आणण्याच्या कामीं यश मिळविलें. नंतर लिव्हरपूल अँड मँचेस्टर रेल्वे तयार करण्याच्या कामीं त्याची नेमणूक झाली. आणि त्या रेल्वेच्या चालकांनीं स्टिफेनसननें तयार केलेलें रॉकेट नांवाचें इंजिन पसंत केलें. या इंजिनच्या परीक्षेकरितां पहिला प्रवास १८३० सालीं करण्यांत आला. त्या वेळीं त्या इंजिनची गति ताशीं २९ मैल होती.

**स्टिव्हेन्सन, रॉबर्ट लुई** (१८५०-१८९४)—एक ब्रिटिश कादंबरीकार, निबंधकार, कवि व प्रवासी. तो लहानपणीं आजारी व अशक्त असे. त्याचें शिक्षण एडिंबर्ग युनिव्हर्सिटींत होऊन १८७५ सालीं त्याला वकिलीची सनद मिळाली; पण तो धंदा कधींच न करतां तो वाङ्मयाचा कट्टा अभ्यासी बनला. त्यानें १८७८ सालीं 'अॅन इनलंड व्हॉएज' हें बेल्जिअम व फ्रान्स यांमधील लहान बोटींतील प्रवास-वर्णनात्मक पुस्तक प्रसिद्ध केलें. व १८७९ सालीं त्याचें 'ट्रॅव्हल्स विथ ए डाँकी इन दि केव्हेनेस' हें पुस्तक प्रसिद्ध झालें. त्यानें कार्नहिल व टेंपलबार या मासिकांत बरेच लेख लिहिले. व त्यांपैकीं कांहीं लेख पुढें पुस्तकरूपांत प्रसिद्ध झाले. नंतर त्यानें 'दि न्यू अरेबियन नाइट्स' हा आधुनिक व फारच चमत्कारिक कथांचा संग्रह प्रसिद्ध केला; पण तो फारसा लोकप्रिय झाला नाहीं. पण १८८२ सालचें त्याचें 'ट्रेझर आयलंड' पुस्तक अतिशय लोकप्रिय झालें. याशिवाय त्याचे ग्रंथ आहेत ते—(१) स्ट्रेंज केस ऑफ डॉक्टर जेकिल अँड मिस्टर हाइड', (२) 'किडनॅप्ड' (ही ऐतिहासिक अद्भुतरसात्मक कादंबरी), (३) 'दि रॉंग बॉक्स', (४) दि मास्टर ऑफ बॅलँट्रे (ऐतिहासिक अद्भुतरसात्मक चांगली कादंबरी). याशिवाय त्यानें पुष्कळ कविता व कित्येक

नाटकें लिहिलीं, व असंख्य पत्रें लिहिलीं. शिवाय त्याच्या कित्येक अद्भुतरसात्मक कादंबऱ्या अपूर्ण आहेत.

**स्टीअरिन**—ट्रिस्टिअरिन. चरबींतील कठिण भाग. चरबींतून ईथरमध्यें विरघळवून हें निराळें काढतात, किंवा चरबी प्रथम दाबून तिच्यांतील नरम भाग तालिन (पाल्मिटीन) आणि तैलिन (ओलीन) काढून टाकल्यावर स्टीअरिन ईथरमध्यें विरघळवून शुद्ध करतात. कोणत्याहि पद्धतीनें तयार केलें तरी स्टीअरिनमध्यें तालिन वगैरे अशुद्धि राहतातच. मेणबत्त्या व इतर व्यापारी जिन्नस करण्यासाठीं स्टीअरिन वापरतात.

**स्टीनॅच, यूजेन** (१८६२- )—एक ऑस्ट्रियन इंद्रियविज्ञानशास्त्रज्ञ. जर्मन भाषाप्रदेशामध्यें तौलनिक इंद्रियविज्ञानशास्त्राच्या अभ्यासाकरितां यानें पहिली प्रयोगशाला स्थापन केली व उंदरांवर प्रयोग करून अनेक असाधारण शोध लावले. वृद्ध मनुष्यास तारुण्य प्राप्त करून देण्याकरितां लैंगिक ग्रंथी प्रतिस्थापन करण्याच्या शोधामध्यें व्हिएन्ना येथील कांहीं शस्त्रवैद्यांशीं सहकार्य करून अनेक प्रयोग केले.

**स्टीनमेट्झ, चार्लस प्रोटियस** (१८६५-१९२३)—या अमेरिकन विद्युत्‌शिल्पज्ञाचा जन्म जर्मनींत झाला होता. हा वयाच्या २४ व्या वर्षी अमेरिकन संयुक्त संस्थानांत आला. १८९३ पासून मृत्यूपर्यंत हा जनरल इलेक्ट्रिक कंपनीमध्यें सल्लागार तज्ज्ञ म्हणून होता. १९०२ ते १९१३ या वर्षांत त्यानें युनियन विद्यापीठांत विद्युत्‌शिल्पाच्या प्राध्यापकाचें काम केलें. हा समाजसत्तावादी होता. यानें विद्युत्‌विज्ञानामध्यें बरेच शोध लाविले. १९२१ मध्यें यानें कृत्रिम विद्युल्लता उत्पन्न करणारा एक विद्युज्जनक शोधून काढला. यानें बरेच ग्रंथ लिहिले आहेत.

**स्टील, सर रिचर्ड** (१६७२-१७२९)—एक इंग्रज निबंधकार. तो बाराव्या वर्षी चार्टरहाउसला असतां त्याची अॅडिसनशीं गांठ पडली. आणि पुढें हे दोघे मोठे मित्र आणि सहकारी बनले. तो १६७१ सालीं ऑक्सफर्ड येथें क्राइस्ट चर्च कॉलेजमध्यें गेला आणि नंतर मर्टन येथें जाऊन राहिला. त्याचीं पहिलीं पुस्तकें एक धार्मिक स्वरूपाचा निबंध ('दि ख्रिश्चन हीरो') आणि एक सुखान्त नाटक ('दि फ्युनेरल: ऑर, ग्रीफ आला मोड') हीं होत. त्याचीं आगली नाटकें आहेत तीं—'दि लाइंग लव्हर', 'दि टेंडर हजबंड' आणि 'दि कॉन्शस लव्हर्स'. नंतर त्यानें हलक्या धातूपासून सोनें बनविण्याचा दगड (परीस) शोधून काढण्याचा प्रयत्न केला, पण तो निष्फळ झाला. नंतर त्यानें उदरनिर्वाहाचा अधिक खात्रीचा मार्ग म्हणून वृत्तपत्रव्यवसाय पत्करला. त्याचें 'टॅटलर' हें पत्र ता. १२ एप्रिल १७०९ रोजीं प्रथम प्रसिद्ध झालें आणि ता. २ जानेवारी १७११ पर्यंत दर आठवड्यास तीन वेळां नियमानें प्रसिद्ध होत गेलें.

याप्रमाणें 'दि टॅटलर' पत्राचे जे २७१ अंक निघाले त्यांपैकीं स्टीलनें १८८ लिहिले. नंतर त्यापेक्षां अधिक सुप्रसिद्ध 'स्पेक्टॅटर' हें दैनिक वृत्तपत्र १ मार्च १७११ पासून ६ डिसेंबर १७१२ पर्यंत प्रसिद्ध झालें. या कालांत 'स्पेक्टॅटर' पत्राचे ५५५ अंक निघाले त्यांपैकीं २३६ अंक स्टीलनें लिहिले. स्पेक्टॅटरनंतर 'दि गार्डियन', 'दि इंग्लिशमन', 'दि लव्हर', 'दि रीडर' वगैरे वृत्तपत्रें त्यानें चालविलीं. (राज्यपद)पुनःस्थापनेनंतरच्या काळांत इंग्लंडचा नैतिक दर्जा वाढविण्याचा ॲडिसन आणि स्टील यांनीं प्रयत्न केला. तेव्हां त्याचें श्रेय त्यांनाच द्यावें लागेल.

**स्टेड, विल्यम थॉमस** (१८४९–१९१२)—एक प्रख्यात इंग्रज संपादक. नऊ वर्षे जार्लिंगटनच्या 'नॉर्दर्न एको' याचें संपादकत्व त्याच्याकडे होतें. नंतर हा मोर्लेच्या 'पाल माल गॅझेट'चा दुय्यम संपादक झाला. मोर्लेनंतर हाच त्याचा मुख्य संपादक होता. यानें वृत्तपत्रसंपादनांत मुलाखती वगैरे नवीन प्रकार सुरू करून इंग्लंडच्या वृत्तपत्रांना वेगळें वळण लाविलें. १८९० त त्यानें पुढें फार प्रसिद्धीस पावलेलें 'रिव्ह्यू ऑफ रिव्ह्यूज' हें मासिक सुरू केलें व शेवटपर्यंत तें चांगलें चालविलें. युद्धाच्या विरुद्ध त्यानें जोराची मोहीम काढली. बोअरयुद्धाला विरोध केल्यामुळें सेसिल ऱ्होड्सची मैत्री त्याला गमवावी लागली. स्टेडनें अनेक पुस्तकें व लेख लिहिले आहेत. अध्यात्मावर त्याचा भर असे. 'टिटॅनिक' बोटींतून अमेरिकेला जात असतांना त्या बोटीबरोबर यालाहि जलसमाधि मिळाली.

**स्टेडियम**—प्राचीन ग्रीस देशांत पळण्याच्या शर्यती (फूट रेसेस) आणि इतर शारीरिक सामर्थ्यांचे सामने करण्याकरितां तयार केलेल्या आखाड्याचें हें नांव होतें. विशेषतः एलिसमधील ऑलेंपिया येथील अशा जागेला हें नांव होतें. अशा स्टेडियमची लांबी ६३१ फूट असे.

आज अशीं क्रीडाप्रेक्षागृहें लंडनमध्यें व युरोपांतल्या इतर अनेक शहरीं बांधलेलीं आहेत. कांहींमध्यें एक लाख माणसें बसण्याची तरतूद असते. १९३२ सालीं लॉस एंजेलेस येथें ऑलिंपिक सामन्यासाठीं असेंच मोठें स्टेडियम बांधण्यांत आलें. मुंबईस ब्रेबर्न स्टेडियम आहे. पुण्यास क्लब ऑफ महाराष्ट्र या संस्थेनेंहि एक तयार केलें आहे.

**स्टेन**—हें जर्मनींत एक शहर व बंदर ओडर नदीच्या कांठीं असून पोमेरॅनिया या प्रांताची राजधानी आहे. या शहराचीं उपनगरें ओडर नदीच्या तीरावर असल्यामुळें दळणवळणाकरितां ओडर नदीवर कित्येक पूल बांधलेले आहेत. लोखंडाचें ओतीव काम, आगबोटींचें बांधकाम, यंत्रें तयार करणें, रासायनिक द्रव्यांचे कारखाने, सीमेंट, साखर, वगैरेंचे मोठे कारखाने येथें आहेत. येथील बंदराची खोली २३ फूट असून ६,००० टनी आगबोटी येथें येऊं शकतात आणि आगबोटींच्या दुरुस्तीची सर्व व्यवस्था येथें आहे. हिंवाळ्यांत बर्फ फोडून या बंदरांतील वाहतूक चालू ठेवण्यांत येते. लोकसंख्या २,६९,५६०.

**स्टेन्सिल**—एखाद्या मेण-कागदावर किंवा धातूच्या पत्र्यावर विशिष्ट आकृति किंवा अक्षरें कोरलेलीं असतात. असे कोरलेले सांचे कागदावर ठेवून त्यांवरून शाईनें किंवा रंगानें कोरलेल्याप्रमाणें आकृती काढतां येतात. अलीकडे पुष्कळ धंद्यांत अशा आकृति-लेखकांचा उपयोग करण्यांत येतो. मेण-कागदावर टंकलेखकानें अक्षरें उठवून त्यावरून एखाद्या मजकुराच्या अनेक प्रती काढतां येतात.

**स्टेप्स**—हें नांव रशियांतील एका अतिशय विस्तृत मैदानाला दिलेलें आहे. या मैदानाचा आरंभ नीपर नदीपासून होतो आणि पुढें हें मैदान कास्पियन समुद्र आणि आरल समुद्र यांच्या भोंवतालच्या प्रदेशांतून आणि अल्ताई व उरल या दोन पर्वतांच्यामधून सायबेरियाच्या बऱ्याच भागांत पसरलें आहे. वसंत ऋतूंत हें मैदान हिरवळीनें भरलेलें असतें. परंतु वर्षाच्या बहुतेक काळांत हें मैदान अगदीं सुकें व ओसाड असतें.

**स्टोइक पंथ**—हा प्राचीन ग्रीसमधील तत्त्ववेत्त्यांचा एक पंथ होता. या पंथाचा उद्देश चांगला स्तुत्य असे. मनुष्यानें आपला जीवनक्रम योग्य मार्गानें घालविला पाहिजे म्हणून प्रत्येक मनुष्यानें सद्‌गुणी व सद्वर्तनी बनलें पाहिजे, अशी या पंथाची शिकवण होती. स्टोइक पंथाचा आदर्श नैतिक वर्तनक्रम, म्हणजे जो शहाणा मनुष्य आपले मनोविकार, रागलोभादि षड्रिपु, आपल्या ताब्यांत ठेवतो आणि मानवी स्वातंत्र्याच्या या शत्रूंवर विजय मिळवतो, त्याचा वर्तनक्रम होय. हा पंथ प्रथम ग्रीस देशांत उत्कर्ष पावला, आणि नंतर रोम शहरांत या पंथाला मानमान्यता मिळाली. या पंथाला हें नांव पडण्याचें कारण असें कीं, अथेन्स शहरांत एक रंगविलेलें दालन होतें, त्याचें नांव स्टोआ प्वाकाइल होतें, आणि या दालनामध्यें स्टोइक पंथाचे तत्त्ववेत्ते आपलीं व्याख्यानें देत असत. या पंथाची स्थापना झेनो (जन्म खि. पू. ३३६) यानें केली. नंतरचे या पंथाचे सुप्रसिद्ध ग्रीक तत्त्ववेत्ते क्लीनथेस, खिसिपस आणि डायोजेनीस हे होत; आणि रोमन विद्वान् सिसिरो, सेनेका, एपिक्टेटस, केटो, ब्रूटस, हे होत. खिस्तीधर्मस्थापनेनंतर त्या धर्माच्या तत्त्वांशीं या पंथाच्या सिद्धान्तांचा समन्वय करण्याचें काम रोमन विद्वानांनींच केलें.

**स्टोक्स, सर जॉर्ज गाब्रिएल** (१८१९–१९०३)—एक ब्रिटिश गणितशास्त्रज्ञ व पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. १८४१ सालीं तो सीनियर रँगलर झाला आणि त्यानें पहिलें स्मिथ्स पारितोषिक मिळविलें. नंतर तो पेम्ब्रोक कॉलेजचा फेलो निवडला गेला. १८४९ सालीं तो गणित विषयाचा लुकेशियन प्रोफेसर झाला. केंब्रिज युनिव्हर्सिटीतर्फे तो पार्लमेंटचा सभासद १८८७ ते

१८९२ पर्यंत होता आणि १८८५ ते १८९० पर्यंत तो रॉयल सोसायटीचा अध्यक्ष होता. १८८९ साली त्याला बॅरोनेट ही पदवी देण्यांत आली. त्यानें गणिती पदार्थ-विज्ञानाच्या बहुतेक शाखांवर पुष्कळ लेख लिहिले आहेत. विशेषतः प्रकाशलहरी-मीमांसा या विषयावर त्याचें लिखाण बरेंच आहे.

**स्टोनहेंज**—इंग्लंडमध्यें विल्टशायर परगण्यांत सॅलिसबरीच्या उत्तरेस सुमारें सात मैलांवर उभ्या दगडांचा हा एक विस्तीर्ण समूह आहे. या समूहांत दोन वर्तुळें आणि दोन दीर्घ वर्तुळें आहेत. बाहेरल्या वर्तुळाचा परिघ सुमारें तीनशें फूट असून त्या वर्तुळांत एकंदर ६० दगड आहेत आणि त्या दगडांची उंची सुमारें १५ फूट आणि रुंदी ७ फूट आहे. आंतल्या बाजूचें वर्तुळ बाहेरल्या वर्तुळापासून ८ फूट अंतरावर आहे. आणि त्यांत ६ फूट उंचीचे सुमारें ३० दगड आहेत. १९१८ साली हें स्टोनहेंज राष्ट्राला देणगी दाखल देण्यांत आलें.

या पाषाणवर्तुळांची उपपत्ति निश्चित नाहीं. खि. पू. १७०० मध्यें पेंब्रोकशायरमधून हे दगड आणले असावेत अशी एक आख्यायिका आहे. सूर्यपूजेशीं याचा कांहीं संबंध असावा असें वाटतें. २१ जूनला येथें सूर्य एका दगडाच्यावर उगवतो हें पाहण्या-साठीं कांहीं मंडळी जमतात.

**स्टोव, हॅरिएट एलिझाबेथ** (१८११-१८९६)—एक अमेरिकन कादंबरीलेखिका. हिची 'अंकल टॉम्स केबिन' ही कादंबरी १८५२ साली पुस्तकरूपांत प्रसिद्ध झाली, आणि ती अमेरिकन संयुक्त संस्थानांत आणि युरोपमध्यें अतिशय लोकप्रिय झाली. हींत नीग्रो गुलामांची दुःस्थिति फार परिणामकारक रीतीनें रंगविली आहे. अनेक भाषांतून या पुस्तकाचीं भाषांतरें झालीं व एक नाटकहि या कथानकावरून रचलें गेलें. स्टोवनें लिखाण पुष्कळ लिहिलें, त्यांत प्रमुख पुस्तकें आहेत तीं—'सनी मेमरीज् ऑफ फॉरिन लँड्स', 'ड्रेड', 'ए टेल ऑफ दि डिस्मल स्वॉम्प', आणि 'लेडी बायरन् व्हिंडिकेटेड.'

**स्टोव्ह**—याचा मूळ अर्थ कोक, गॅस, तेल, वीज, इ. निरनिराळ्या प्रकारचें जळण ज्यांत जळतें असा निरनिराळ्या आकारांचा चुला असा आहे. याचा उपयोग उष्णता देण्याकडे व स्वयंपाकाकडे होतो. आपल्याकडे बहुधा रॉकेलच्या जळणाचे स्टोव्ह असतात; तेव्हां त्याचीच माहिती येथें दिली आहे.

पंपामुळें टाकींत हवा भरली जाते व तिच्या दाबानें तेल वर 'निपल' च्या तोंडाशीं येतें. 'बर्नर' तापविल्यामुळें या तेलाचा गॅस बनतो व तो जळूं लागतो. अशी या यंत्राची साधारण रचना आहे. ज्वलनक्रिया चांगली होत असली म्हणजे ज्वाला निळ्या निघतात व भांडें काळें होत नाहीं. रॉकेल स्वच्छ पाहिजे व बर्नर नीट तापविला गेला पाहिजे. निपलमध्यें कांहीं अडकल्यास त्यांत 'पिन' सुई घालतात. स्टोव्ह नीट वापरल्यास अपघात होत नाहींत.

कांचेचा स्टोव्ह—बिनधास्ती चूल म्हणून प्रायमस अगर ऑप्टिमस् स्टोव्ह आपल्या स्वयंपाकगृहांत गेलीं ३०-४० वर्षे वापरण्यांत आहे. आपल्या स्त्रीसमाजांत शिक्षणाचा व शास्त्रीय ज्ञानाचा प्रसार अत्यल्प असल्यामुळें या स्टोव्हमुळें रोजचे अपघात ऐकूं येतात. हे शक्य तर टाळावेत म्हणून स्टोव्हच्या अंतरंगांतील क्रिया कशा चालतात हें दिसावें म्हणून पुणें येथील शास्त्रीय उपकरणांचे कारखानदार श्री. दि. रा. जोगळेकर यांनीं एक कांचेच्या स्टोव्हची रचना केली व त्याचें पेटंट १९२५ सालीं घेतलें. त्यांत तेलाची टांकी कांचेची, निपल नळी कांचेची व पंप म्हणजे सायकलची व्हाल्व्ह-ट्यूब व पंप, हीं साधनें उपयोगांत आणल्यामुळें तेल कोठें असतें, पंपानें भरलेली हवा कोठें राहते, तेल निपल नळींत कसें चढतें व त्याची वाफ कोठें होते, निपलमधून बाहेर वाफ पडते कीं तेल पडतें, वगैरे गोष्टी कांचेच्या पारदर्शकपणामुळें सहज दिसतात. यामुळें खालील गोष्टी अशिक्षित माणसासहि सहज-पणें पटवून देतां येतात : (१) पंप केलेल्या हवेचा दाब टांकींतील तेलावर पडतो व त्यामुळें तेल निपल नळींत चढतें. ह्या हवेचा उपयोग ज्वलनासाठीं लागणाऱ्या प्राणवायूसाठीं होत नाहीं. (२) ज्योतीच्या उष्णतेनें निपल नळी तापते व तेलाची वाफ होते. कांचेच्या निपल नळींत वरच्या भागांत तेलाची वाफ व खालीं तापलेल्या तेलाची पातळी (लेव्हल) दिसते. (३) दर सेकंदास जितकें तेल जळतें तितकीच तेलाची वाफ होते; ह्याच प्रमाणांत निपलचें भोंक ठेवावें लागतें. (४) बरेच दिवस स्टोव्ह वापरल्यानें निपलचें भोंक मोठें होत जातें व त्यामुळें वरील समीकरण बिघडतें व तेलाची कची वाफ बाहेर येते व म्हणून निळी ज्योत दिसण्या-ऐवजीं अपूर्ण ज्वलनाची तांबूस ज्योत दिसते. (५) निपल फार बारीक असल्यानें त्यांत तेलांतील घाण अटकते व त्यामुळें वरील भोंक चोंदतें व स्टोव्ह नीट पेटत नाहीं. हा अडथळा दूर करण्यासाठीं त्यांत पिन घालावी लागते. पिन वेळेवारी नसल्यास, जास्त पंप करून जादा दाबानें घाण काढून टाकण्याचा मनुष्य प्रयत्न करतो. पण पंप फार केल्यानें टाकींतील जादा दाबानें टाकी फुटण्याचा संभव असतो. (६) स्टोव्हची ज्योत उघडी असल्यामुळें निष्काळजीपणें आजूबाजूस वावरणाऱ्या सैल व मोठ लुगडी नेसणाऱ्या स्त्रियांनें अगर ओच्यानें भांडीं उतरण्याची खटपट करणाऱ्या बायकांचें नेसणें पेटतें व अपघात होतात. हे अपघात टाळण्यास आंत स्टोव्ह बसेल असें एक ९ ते १० इंच उंचीचें पत्र्यानें बांधलेलें चुलाणें नेहमीं स्टोव्हभोंवतीं ठेवावें.

**स्ट्रॅबो** (खि. पू. ५४-इ. स. २१)—एक ग्रीक भूगोल ग्रंथकार. भूगोलाविषयीं त्याचा फार महत्त्वाचा ग्रंथ १७ [illegible]

असून तो संपूर्ण उपलब्ध आहे. फक्त सातवें पुस्तक गहाळ झालेलें आहे. या ग्रंथांत त्यानें महत्त्वाच्या राजकीय घडामोडींची माहिती, तत्कालीन प्रमुख शहरांची माहिती आणि त्या शहरांतील थोर थोर पुरुषांची माहिती दिलेली आहे. या ग्रंथाचें इंग्रजी भाषांतर एच्. एल्. जोन्स यानें केलें आहे.

**स्ट्रॉबेरी**—[ वर्ग—रोझासी; जाति—फ्रेगारिआ ]. हीं झाडें युरोप, अमेरिका आणि आशिया यांमध्यें समशीतोष्ण व थंड हवेच्या प्रदेशात सर्वत्र आढळतात. यांचीं फळें प्रसिद्ध आहेत. यांच्या बऱ्याच जाती आहेत व ज्या निरनिराळ्या प्रदेशांत हीं झाडें होतात त्यावरून निरनिराळीं नांवें पडलीं आहेत. एक रान स्ट्रॉबेरी आहे; तिचीं झाडें रानांत उगवतात. एका जातीला मोठमोठीं फुलें येतात. एका जातीची लागवड बागेंत करतात.

हिंदुस्थानांत याची लागवड निरनिराळ्या पर्वतांवरील हवा खाण्याच्या ठिकाणीं व विशेषतः कुमाऊन ( हिमालय ), काश्मीर, नेपाळ, ब्रह्मदेश, सहाराणपूर, सीलोन, बंगलोर, वगैरे ठिकाणीं होते. मुंबई इलाख्यांत याची लागवड मुख्यतः महाबळेश्वर येथेंच होते. पावसाळ्याच्याअखेर पुराचें पाणी ओसरल्यावर जमीन नांगरून किंवा खणून वाफे व पाट बांधून घेतात. फूल आल्यापासून पाऊण महिन्यानें फळ तयार होतें. एकदां फुलांचा व फळांचा हंगाम सुरू झाला म्हणजे तो पाऊस पडेपर्यंत राहतो.

**स्ट्रासबर्ग**—फ्रान्स, आल्सेस–लोरेन नांवाच्या प्रांताचें राजधानीचें शहर. लो. सं. १,९३,११९. येथें नवीन व सुंदर सार्वजनिक इमारती आहेत. जुन्या इमारतींत कॅथेड्रल ही फारच उत्कृष्ट इमारत आहे. हिच्यांत नामांकित असें ज्योतिषशास्त्रोपयोगी एक घड्याळ आहे. याशिवाय राजवाडा, दहा लक्ष पुस्तकें असलेलें विश्वविद्यालयाचें ग्रंथसंग्रहालय, संगीतशाला, यहुदी लोकांचें प्रार्थनामंदिर, न्यायकचेऱ्या, इ. अनेक प्रेक्षणीय स्थळें या ठिकाणीं आहेत. विश्वविद्यालय १५६७ सालीं स्थापन झालेलें आहे. कातडें कमावणें, दारू गाळणें, छापणें, वाद्यें, पोलादी सामान, कागद, साबू, हातमोजे, इ. बनविणें हे येथील उद्योगधंदे आहेत. लष्करी दृष्टीनें स्ट्रासबर्ग हें महत्त्वाचें ठिकाण असल्यामुळें याला चांगली तटबंदी केलेली आहे. गरज पडल्यास शहराभोंवतालचा बराच भाग पाण्यांत बुडवितां येतो.

पांचव्या शतकाच्या शेवटीं हें शहर फ्रेंच लोकांकडे आल्यावर त्यांनीं त्याला स्ट्रासबर्ग हें नांव दिलें. पुढें हें जर्मन साम्राज्यांतील एक स्वतंत्र शहर झालें. स. १६८१ त चौदाव्या लुईनें हें अचानक हल्ला करून घेतलें. स. १८७०–७१ च्या फ्रँको-जर्मन युद्धांत हें आल्सेस लोरेनबरोबर जर्मनीकडे आलें; पण पहिल्या महायुद्धानंतर हें फ्रान्सला परत मिळालें.

**स्ट्रासर, डॉ. ऑटो**—एक जर्मन राजकारणी व 'ब्लॅक फ्रंट' नामक हिटलरविरोधी पक्षाचा पुढारी. १९३० पर्यंत डॉ. स्ट्रासर हिटलरचा अनुयायी व नाझी पक्षांतल्या समाजसत्तावादी गटाचा पुढारी होता. त्याचा जोडीदार पुढारी त्याचाच भाऊ ग्रेगर नांवाचा होता, पण त्याचा खून १९३४ सालीं करण्यांत आला. १९३० सालीं हिटलरच्या भांडवलदारांबद्दलच्या पक्षपाती धोरणामुळें स्ट्रासरनें नाझी पक्ष सोडून देऊन 'क्रांतिकारक नॅशनल-सोशालिस्ट पक्ष' स्थापन केला; या पक्षालाच पुढें "ब्लॅक फ्रंट" हें नांव देण्यांत आलें. या पक्षाचा कार्यक्रम नाझी तत्त्वें व समाजसत्तावादी तत्त्वें यांच्या संमिश्रणानें तयार केलेला होता. १९३३ सालीं हिटलर सत्ताधारी झाल्यावर स्ट्रासरला हद्दपार करण्यांत आलें; तेव्हां तो झेकोस्लोव्हाकियांत व स्वित्झर्लंडांत राहून हिटलरला विरोध करूं लागला. त्याच्या 'ब्लॅक फ्रंट' नामक पक्षाचे अनुयायी ( त्यांची निशाणी तलवार व हातोडा असे ) जर्मनींत भूमिगत होऊन नाझी राज्यकारभाराला विरोध करूं लागले. त्याच्या अनुयायांमध्यें नाझी पक्षांतले निराश होऊन पक्ष सोडलेले इसम आणि सैन्यांतले तरुण होते. त्या पक्षाचा कार्यक्रम राष्ट्रीय स्वरूपाचा पण हिटलरविरोधी होता; मार्क्सवाद व भांडवलशाही या दोघांना विरोधी असा हा कार्यक्रम 'नॅशनलाइझ्ड एकॉनमी' या नावानें संबोधिला जात होता. या पक्षाचें धोरण, कारखाने 'इंडस्ट्रियल लीन्स' ( Liens ) या पद्धतीनें सरकारमार्फत मालकांच्या ताब्यांत द्यावयाचे, असें होतें. युरोपातील सर्व राष्ट्रांनीं सहकारी तत्त्वानें वागावें, अल्पसंख्याक जमातींवर जुलूम करूं नये, अशी या पक्षाचीं मतें आहेत.

**स्ट्रिंडबर्ग, ऑगस्ट** ( १८४९–१९१२ )—एक विख्यात स्वीडिश साहित्यिक. नाटकें, कादंबऱ्या, व्याख्यानें व इतर विविध साहित्यप्रकार यांत स्ट्रिंडबर्गनें आपलें लेखनकौशल्य दाखविलें आहे. त्याचें लिखाण अद्भुतरम्य, वास्तववादी, गूढ व संशयात्मक असून स्त्री ही सर्व दृष्टींनीं पुरुषापेक्षां कमी दर्जाची आहे, असा त्याचा ठाम सिद्धान्त होता. त्यानें तीनदां लग्न करून तीनदां घटस्फोट घेतला. 'मास्टर ओलोफ' हें त्याचें पहिलें महत्त्वाचें नाटक १८७८ त लिहिलें गेलें. ग्रामीण जीवन, समाजसत्तावाद, आत्मचरित्र, वगैरे विषय त्याच्या ग्रंथांतून चांगले रंगविलेले आहेत.

**स्ट्रेट्स सेटलमेंट्स**—मलाया द्वीपकल्पाजवळची ब्रिटिश वसाहत. सिंगापूर, कोको बेटें, ख्रिसमस बेटें, पीनांग, वेलस्ले, डिंडिंग्ज्, मलाक्का व लाबुआन् यांचा समावेश या वसाहतींत होतो. सिंगापूर हें मुख्य ठिकाण. क्षेत्रफळ १३५६चौ. मैल. लो. सं. चौदा लाख रबर, खोबरें, मसाल्याचे पदार्थ, साबूदाणा, अननस, फॉस्फेट्स, वगैरे मालाचा व्यापार चालतो. मलाया द्वीपकल्प पाहा.

**स्ट्रेप्टोमायसिन**—एक औषध. पेनिसिलीन कांहीं रोग दूर करतें; पण क्षय, कॅन्सर यांसारखे जे आणखी असाध्य रोग त्यां-संबंधीं आणखी शोध करून स्ट्रेप्टोमायसिन औषध शोधून काढलें. तरी कांहीं रोग उरलेच; तेव्हां ओरिओमायसिन निघालें. हीं तिन्ही औषधें बुरशीपासून तयार करतात. स्ट्रेप्टोमायसिन व ओरिओमायसिन एका प्रकारच्या बुरशीपासून तर पेनिसिलीन निराळ्याच प्रकारच्या बुरशीपासून तयार करतात. ओरिओमाय-सिन हें बारीक ताप, आंतड्यांचे, मूत्राशयाचे व स्नायूंचे विकार, रिकेट्स, निमोनिया, क्षय, इ. विकार यांवर प्रभावी आहे. स्ट्रेप्टो-मायसिनचा दुरुपयोग केल्यानें गुण न आलेला दिसतो. पण शस्त्रक्रिया झालेल्या किंवा न्हावयाच्या रोग्यासाठीं याचा उपयोग फायदेशीर होतो.

**स्तनग्रंथी**—(मॅमरी ग्लँड्स्). सस्तन प्राण्यांमध्यें दूध तयार करणाऱ्या ग्रंथींस दुग्धग्रंथी अथवा स्तनग्रंथी म्हणतात. मनुष्या-मध्यें त्यांचा आकार पिशवीसारखा असतो, व ते स्नायूंच्या रज्जूंचे व पेशींचे बनलेले असतात.

**स्तंभ**—(ब्रोमीन). एक अधातु मूलद्रव्य. परमाणु-भारांक ७९.९२. १८२६ सालीं ह्याचा शोध लागला. हा गर्द तांबड्या रंगाचा द्रवरूप पदार्थ असून यास अतिशय उग्र आणि असह्य दर्प असतो. नेहमींच्या उष्णतामानात ह्यांतून लाल रंगाच्या वाफा येतात. त्या नाकांत गेल्या असतां मनुष्याला गुदमरल्या-सारखें होतें. हर(क्लोरीन)प्रमाणें ह्याच्या अंगींहि रंग घाल-विण्याची शक्ति आहे. हें अतिशय विषारी आहे. सेंद्रिय संयुक्त (ऑर्गेनिक काम्पाउन्ड) तयार करण्याच्या कामीं ह्याचा अतिशय उपयोग होतो. उज्जाबरोबर त्याचा संयोग होऊन उदस्तंभिकाम्ल (हायड्रो-ब्रोमिक ॲसिड) तयार होतें. धातूंच्याबरोबर संयोग होऊन स्तंभिदें (ब्रोमाइड) तयार होतात. स्तंभ (ब्रोमिन) शुद्ध स्वरूपांत सापडत नाहीं. निसर्गजन्य स्तंभिदा(ब्रोमाइड)पासून (उदा., मॅग्नेशियम किंवा सोडियम ब्रोमाइड) स्तंभ तयार करावें लागतें.

**स्तंभिदें**—(ब्रोमाइड्स). उज्जस्तंभिद (हायड्रोजन ब्रोमाइड) किंवा उदस्तंभिकाम्ल(हायड्रोब्रोमिक ॲसिड) याच्या लवणांना स्तंभिदें म्हणतात. समुद्राच्या पाण्यांत सिंधु (सोडियम), पालाश (पोटॅशियम) व मग्न (मॅग्नेशियम) स्तंभिदें सांपडतात. स्टास-फर्टच्या कार्नेलाइटमध्यें व अमेरिकन सं. संस्थानामधील सैंधवांत मग्नस्तंभिद आढळतें. फोटोग्राफिक कांचा, कागद, फिल्मस, वगैरे तयार करण्यासाठीं रजतस्तंभिदा(सिल्व्हर ब्रोमाइड)चा उपयोग करतात. पालाशस्तंभिदा(पोटॅशियम ब्रोमाइड)चा औषधांत आणि फोटोग्राफींतहि उपयोग होतो.

**स्तरच्युति**—भूस्तरांमध्यें जेव्हां एखाद्या ठिकाणीं एखादा थर फाटून त्याचा एक भाग फटीच्या एका बाजूला पुष्कळच खालीं गेलेला व दुसऱ्या बाजूस वर असलेला आढळतो, अशा प्रकारास स्तरच्युति म्हणतात. अशा तऱ्हेची स्तरच्युति विशेषतः दगडी कोळशांच्या थरांत आढळते.

**स्तापल, मादाम** (१७६६–१८१७)—फ्रान्समधील एक सुप्रसिद्ध विदुषी. सोळाव्या लुईचा फडणीस मंत्री जॅकीजनेकर याची ही मुलगी फार शिकलेली व हुषार होती. फ्रेंच दरबारांतील स्वीडिश वकील बॅरन द स्तापल–होल्स्तीन याच्याबरोबर १७८६ त तिचें लग्न झालें, पण पुढें न पटून तीं दोघें वेगळीं राहूं लागलीं. राजदरबारांत व विद्वानांच्या बैठकींतून मादाम स्तापलची फारच चहा होत असे. १७८८ मध्यें रूसोसंबंधीं पत्रें तिनें प्रसिद्ध केलीं. डेल्फीन आणि कोरीन या तिच्या कादंबऱ्याहि आहेत. राज्य-क्रांतिच्या सुरवातीस तिचें सर्वांवर फार वजन असे. पण दहशतीचें साम्राज्य सुरू झालें तेव्हां ती नाइलाजानें स्वित्सर्लंडला पळून गेली. स्थिरस्थावर झाल्यावर ती परत आली व पुन्हां राजकारणांत तिचें वजन पडूं लागलें. पण तिच्या फाजील उदार मतांमुळें नेपोलियननें तिला हद्दपार केलें. १८११ त नवरा वारल्यावर तिनें चोरून दुसरें लग्न केलें. 'फ्रेंच राज्यक्रांति', 'दहा वर्षांची हद्दपारी' व 'जर्मनी' यांवर तिचे आणखी ग्रंथ आहेत.

**स्त्रांत**—(स्ट्रॉन्शिअम). क्षार मृत्तिके(अल्कलाइन अर्थ)-मधील एक धातु. परमाणुभारांक ८७.६३. ह्याच्या प्राणिदा-(ऑक्साइड)ला स्ट्रॉन्शिया असें नांव आहे. हा धातु मिळण्याचें मुख्य खनिज स्ट्रॉन्शियनाइट म्हणजे स्त्रांत कर्बनित (स्ट्रॉन्शियम कार्बोनेट) होय. हें प्रथम अर्गिल्शायरमधील स्ट्रॉन्शियन या ठिकाणीं सांपडलें. स्त्रांत उदप्राणिद (स्ट्रॉन्शियम हायड्रॉक्साइड) साखर शुद्ध करण्यासाठीं वापरतात. शोभेच्या दारूंत स्त्रांतनत्रित (स्ट्रॉन्शियम नायट्रेट) वापरतात.

**स्त्री**—हा सामान्य स्त्रीवाचक शब्द वैदिक वाङ्मयात नेहमीं येतो. वैदिक कालीं स्त्रीच्या आयुष्यांतील बराच मोठा भाग तिचें लग्न व नवऱ्याशीं असलेले इतर संबंध, यांत जात असे. त्या कालीं स्त्रियांना पडदा बिलकुल नव्हता, पण महाभारतकालाच्या उत्तरा-र्धांत तो पूर्णपणें सुरू झाला. कुमारी आपल्या बापाच्या घरीं वाढत असे. खेडेगांवांतील पुरुषांशीं तिला मोकळेपणानें बोलतां चालतां येत असे व ती घरांतल्या कामकाजांत लक्ष घाली. तिला शिक्षण देतां येत असे. निदान कांहीं बायका तरी शिकलेल्या असत; कारण उपनिषद् ग्रंथांत स्त्रियांनीं तत्त्वज्ञानासंबंधाच्या वादविवादांत फार महत्त्वाचा भाग घेतल्याचें नमूद आहे. शिवाय पुत्रांपेक्षां स्त्रियांना योग्य अशा नर्तनादि कला शिकविल्या जात. समाजांत बापाच्या दृष्टीनें मुलीचा दर्जा काय होता ह्याविषयीं फार थोडे व अपुरे

उल्लेख आहेत. ऋग्वेदावरून असें दिसतें कीं, बाप नसल्यास त्याच्या ठिकाणीं भावाला समजून बहीण त्याच्यापासून मदतीची अपेक्षा करी. भ्रातृविरहित कुमारींवर संकटें ओढवण्याची फार भीति असे. तरी पण अशा निराश्रित कुमारीला उपद्रव देणाऱ्यास भयंकर पाप सांगितले आहे. स्त्रियांना, मग त्या विवाहित असोत वा नसोत, वडिलोपार्जित मिळकतीवर हक्क सांगतां येत नसे, व कायद्याच्या दृष्टीनें त्या कधींहि स्वतंत्र नव्हत्या. लग्नापूर्वी त्या आपल्या बापावर अगर भावावर अवलंबून राहत, व लग्नानंतर त्या नवऱ्यावर अवलंबून राहत. वैधव्यावस्थेंत त्यांचे आप्त त्यांच्या नवऱ्याची मिळकत घेत पण त्यांना सांभाळण्याचें काम करीत. केव्हां केव्हां अविवाहित स्त्रिया, उदाहरणार्थ, वारांगना जें द्रव्य मिळवीत, त्यावरहि त्यांचे बाप किंवा भाऊ हक्क सांगत.

स्त्रीची मिळकत व तिचा दर्जा :—लग्नानंतर कायद्याच्या दृष्टीनें नवरा-बायकोचे परस्पर संबंध कसे होते याबद्दल विशेष माहिती उपलब्ध नाहीं. वधूच्या पित्याकडून वरास जी वरदक्षिणा किंवा हुंडा मिळे त्यावर व वधूची जी इतर कांहीं मिळकत असे तीवर सुद्धां तिच्या नवऱ्याचाच हक्क असे, असें मानण्यास हरकत नाहीं. महाभारतांत सुद्धां स्त्रीधनाचा हक्क हळूहळू कबूल होऊं लागला होता. आपल्या नवऱ्याच्या घरीं आल्यावर स्त्रीला महत्त्व प्राप्त होई, तिचा अधिकार तिच्या सासऱ्यावर, दिरावर व तिच्या नवऱ्याच्या अविवाहित बहिणीवर चालत असे. कदाचित् वरील वर्णन कुटुंबांतील फक्त थोरल्या बायकोस लागू पडण्यासारखें असेल. ब्राह्मणग्रंथांत, स्त्रियांचा दर्जा कमी होत चालला होता, अशाबद्दल इतर पुरावा सांपडतो. हा दर्जा कमी होण्याचें कारण बहुतकरून व्रतांच्या प्रसंगीं अप्रमानाच्या महत्त्वाची वाढती जाणीव हें असावें. उलटपक्षीं स्त्रियांची स्तुति केलेलीहि पुष्कळ ग्रंथांतून आढळते. स्त्रीला नवऱ्याची अर्धांगी म्हटलें असून तिच्यामुळेच नवऱ्याला पूर्णत्व प्राप्त होतें, असेंहि म्हटलें आहे. ऋग्वेदांत स्त्रियांवर जी टीका आलेली आहे, तिजबरोबर त्यांच्या सद्गुणांचेंहि वर्णन आलेलें आहे. तरीपण आपण जर ब्राह्मणग्रंथ काळजीपूर्वक वाचले तर आपणांस एवढें कळून येईल कीं, स्त्रियांचा दर्जा पुरुषांपेक्षां हळूहळू कमी होत चालला होता. कारण त्यांत एक असा नियम आढळतो कीं, स्त्रियांनीं पुरुषांच्या (आपल्या नवऱ्याच्या) मागाहून जेवावें. एखादे वेळीं नवरा रागानें बायकोस शिव्या देत असे व नवऱ्याला उलट उत्तर न देणाऱ्या (अप्रतिवादिनी) स्त्रीची स्तुतिहि केलेली आहे. स्त्रियांना राजकारणांत पडण्याची परवानगी नव्हती. सभेला पुरुषच जात, स्त्रिया जात नसत, अशाबद्दल मैत्रायणी संहितेंत स्पष्ट उल्लेख आहे. उलटपक्षीं शिक्षणप्रसार जसजसा जास्त होऊं लागला तसतशी स्त्रियांची शिक्षणविषयक गोष्टींत प्रगति होऊं लागली. उदाहरणार्थ, याज्ञवल्क्याच्या दोन स्त्रियाच घ्या. यांपैकीं एकीनें तत्त्वज्ञानविषयांत बरीच प्रगति करून घेतली होती. उपनिषद् ग्रंथांत बऱ्याच स्त्रियांचा गुरु म्हणून उल्लेख आला आहे. स्त्रीचा जो विवाह व्हावयाचा त्याचा मुख्य हेतु म्हटला म्हणजे प्रजोत्पादन हा होय. या हेतूचा उल्लेख ऋग्वेद व तदुत्तर ग्रंथ यांतून वारंवार केलेला आढळतो. एखाद्याला मुलगी झाली तर त्याबद्दल कोणी कौतुक करीत नसे; परंतु मुलगा होण्याबद्दल अथर्ववेदांतील एका सूक्तांत देवाची प्रार्थना केली आहे आणि मुलगी झाल्याबद्दल दुःख प्रगट केलें आहे.

पुरुषांच्या बरोबरीनें स्त्रियांचा दर्जा पाहिजे अशी चळवळ १९ व्या शतकांत पाश्चात्य देशांत सुरू झाली. स्त्रियांना राजकीय हक्क पाहिजेत हा त्या चळवळींतील एक भाग झाला. व्यापार-उद्योगधंद्यांत राजकारणापेक्षां स्त्रियांना लवकर स्थान मिळालेलें दिसतें. पाश्चात्य देशांत कुशल कारागिरीच्या सर्व खात्यांतून व कारकुनी पेशांतून स्त्रिया नेमल्या जाऊं लागल्या व त्यांची कार्यक्षमताहि पुरुषांइतकीच दिसून आली. आतां बहुतेक सर्व राष्ट्रांतून स्त्रियांना मतदानाचे हक्क लाभले आहेत. हिंदुस्थानच्या नव्या घटनेंतहि स्त्रियांचा दर्जा पुरुषांबरोबर मानला गेला आहे. महायुद्धामुळेंच तर लढायांवर गेलेल्या पुरुषांच्या जागीं कामें बजावून स्त्रियांनीं आपली पात्रता सिद्ध केली आहे. तथापि अपत्योत्पादन हें नेहमीं स्त्रीजीवनाचें केंद्रवर्ती उद्दिष्ट राहील. या मूलभूत कारणामुळेंच स्त्रियांना विशेष शारीरिक कष्ट होत नाहींत; त्यांना पुरुषांवर अवलंबून राहावें लागतें; त्यांच्या मुलांविषयीं फार कोमल भावना असतात; व आहे तीच समाजघटना कायम राहून जगांत सर्वत्र शांतता नांदावी अशी त्यांची तीव्र इच्छा असते.

**स्त्रीधन**—जी मिळकत विकण्यास, गहाण टाकण्यास अगर अन्य रीतीनें उपयोग करण्यास स्त्रीस कोणाच्याहि परवानगीची जरूरी नसते व जी मिळकत स्त्रीच्या संपूर्ण मालकीची असून ती स्त्रीवारसांकडेच जाते ती स्त्रीधन होय. वारसा व वांटणी यांखेरीज इतर मिळकत ती स्त्रीधन होय; कारण वारसा मिळकत व वांटणीचा हिस्सा ही स्त्रीची 'नियत मिळकत' (लिमिटेड इस्टेट) आहे. कुमारिकेस वारसानें आलेली मिळकत फक्त मुंबई प्रांतांत स्त्रीधन ठरते. स्थावर व जंगम या दोन्ही तऱ्हेच्या वारसा मिळकतीवर स्त्रीला संपूर्ण अधिकार नसतो. ती त्यांना कोणी मृत्युपत्रानें किंवा बक्षीसपत्रानें दिली तर मात्र स्त्रियांस संपूर्ण स्वामित्व (ॲब्सोल्यूट ओनरशिप) कायदेशीरपणें प्राप्त होतें. कायद्यानें सांगितलेलें किंवा लेखी दस्तऐवजानें किंवा करारानें केलेले अपवाद वगळतां, स्त्रीच्या हातीं कायदेशीर रीतीनें आलेली सर्व प्रकारची मिळकत स्त्रीधन होय. हिंदूंखेरीज इतर धर्मीयांत स्त्रियांना मिळकतींत ठराविक वारसा हक्क आहेत.

स्त्रीधनाचा प्रश्न कायद्याप्रमाणें जसा बिकट तसा महत्त्वाचा आहे. या बाबतींत वेगवेगळ्या वरिष्ठ न्यायालयांनी वेगवेगळे निर्णय आहेत व प्रांतवार त्यासंबंधीं भिन्न भिन्न कायदे आहेत.

स्त्रीशिक्षण—वैदिक कालांत (सुमारें ख्रि. पू. २५०० ते १०००) स्त्रीशिक्षण बरेंच चांगलें असावें. स्त्रियांचें उपनयन होई व पुष्कळदां त्या प्रत्यक्ष यज्ञकर्में करीत. लोपामुद्रा, विश्ववारा, घोषा, इ. सूक्तकार स्त्रिया आहेत. ब्रह्मयज्ञांत सुलभा, वडवा, गार्गी या विदुषींचा आदरपूर्वक उल्लेख आहे. वैदिक कालानंतर बौद्ध-कालांत आल्यास मुलींचे विवाह १६–१७ वर्षांच्या वयांत आल्यावर होत, असें दिसतें. कांहीं ब्रह्मवादिनी जन्मभर अविवाहित राहत. मोठमोठ्या पंडित-सभांतून स्त्रिया पूर्व-उत्तर पक्ष करीत हें गार्गीच्या चरित्रावरून कळतें. सामान्य घरगुती स्त्रिया घरचें आह्निक उरकीत, असें रामायणावरून दाखवून देतां येतें (५.१५.४८; २.२०.१५). स्त्रिया स्वतंत्रपणें अध्यापनाचाहि धंदा करीत, हें 'आचार्या' आणि 'आचार्याणी' या दोन संज्ञांवरून स्पष्ट आहे. आत्रेयी, कामंदकी यांसारख्या मुली परगांवीं विशिष्ट शिक्षणासाठीं राहून मुलांच्या बरोबरीनें शिकत.

पण ख्रि. पू. ३०० च्या सुमारास भोंवतालची परिस्थिति पाहून कांहीं समाजनेत्यांना स्त्रियांना वेदाधिकार असूं नये असें वाटूं लागलें व त्यामुळें उपनयनादि चाल मागें पडूं लागली. याचा परिणाम म्हणून विवाह-वयाची मर्यादा कमी होऊं लागली. ती इतकी कीं, आठव्या वर्षीच विवाह करावा, असें स्मृतिकार प्रतिपादूं लागले. तथापि वरच्या वर्गाच्या कांहीं घराण्यांतून स्त्रीशिक्षण उच्च दर्जाचें असलें पाहिजे, असें संस्कृत काव्यांतील नायिकांच्या उदाहरणांवरून दिसतें. इ. स. ६०० ते ९०० या तीनशें वर्षांत अनेक भाषांच्या कवयित्री होऊन गेल्या आहेत. रेवा, रोहा, माधवी, अनुलक्ष्मी यांचीं प्राकृत काव्यें, देवी आणि विजयांका यांचीं अनुक्रमें गुजराथी आणि कानडी काव्यें, व कित्येक संस्कृत कवयित्रींनीं केलेलीं विविध काव्यें वरील विधानाला साक्षीभूत आहेत. कांहीं स्त्रिया वैद्यकी करीत, इतकेंच नव्हे तर त्या विषयावर ग्रंथरचनाहि करीत. तथापि ही गोष्ट विसरून चालणार नाहीं कीं, मुसलमानी अमलापूर्वी ८ व्या व ९ व्या शतकांत सामान्य जनतेंत स्त्रीशिक्षण म्हणण्यासारखें नव्हतेंच व पुढें तर तें अजीचात बंद पडलें.

या मुसलमानी अमदानींत व त्यानंतरहि पूर्वी वैदिक काळा-पासून वरिष्ठ वर्गांतील स्त्रियामध्यें गायन, वादन, नृत्य, चित्रलेखन, इ. कलांचें जें शिक्षण चालू होतें तेंहि बंद पडलें. प्राचीन काळीं स्त्रियांना सूत कातता व कापड विणतां येत असे. त्यामुळें विधवा स्त्रियांना पोट भरण्याची कांहीं तरी सोय असे, असें दिसतें (अंगुत्तरनिकाय ३. पृ. २९३). राजघराण्यांत युद्धानें व राज्यकारभाराचेंहि स्त्रियांना शिक्षण मिळे, असें प्रभावती गुप्ता, विजयभट्टारिका, इ. च्या उदाहरणांवरून दिसतें. कर्नाटकांतील कांहीं वीरगळ-शिलालेखांवरून परचक्र, चोरदरोडेखोर, इ. बरोबर लढतांना धारातीर्थी पतन पावलेल्या स्त्रिया आढळून येतात. रजपूत स्त्रियांची तर याबद्दल ख्यातिच आहे. मराठा स्त्रियांत योद्धा-पुरुषी ताराबाई, इचलकरंजीची अनूबाई, झांशीची लक्ष्मीबाई, इ. शूर स्त्रिया चमकून गेल्या.

इंग्रजी अमदानींत बंगाल्यांत ईश्वरचंद्र विद्यासागर व ब्राह्मो समाजाची मंडळी यांनीं स्त्रीशिक्षणाच्या बाबतींत चांगलें कार्य केलें व स्त्रियांची आत्मिक स्थिति थोडीफार तरी नाहींशी करण्याचे आटोकाट प्रयत्न केले. महाराष्ट्रांत रावसाहेब मंडलीक, न्या. म. रानडे, ज्योतिबा फुले, पंडिता रमाबाई, वगैरे मंडळींनीं पुढाकार घेतला होता. पुनर्विवाहाची चळवळहि सुरू होती. प्रा. धों. के. कर्वे यांनीं अनाथ विधवांच्या शिक्षणाची प्रथम सोय केली व नंतर महिला विद्यापीठापर्यंत स्त्रीशिक्षणाची मजल नेली. स्त्रियांना आर्थिक दृष्टीनें कार्यक्षम करण्यासाठीं श्री. गो. कृ. देवधर हे आमरण झटले. त्यांनीं पुढें आणलेली सेवासदन संस्था फार उपयुक्त आहे. स्त्रियांचीं हायस्कुलें आतां अनेक ठिकाणीं आहेत व कॉलेजांतून विद्यार्थ्यांच्या जोडीनें शेंकडों विद्यार्थिनी शिकत आहेत. घरांत प्रथमपासूनच मुलांबरोबर मुलींना वाढवून पाठविण्यांत येतें; व कित्येक शहरांतून शिक्षण सक्तीचें आहे. त्यामुळें आतां स्त्री-शिक्षण असावें कीं नाहीं हा वाद उरला नाहीं. पण स्त्रियांना कशा प्रकारचें शिक्षण द्यावें हा मोठा वादग्रस्त विषय होऊन बसला आहे. पुरुषांसारखें शिक्षण देण्यानें संसारांत अडचण येते व एकंदर समाजाची घडी विघटते.

स्तोत्रें—परमेश्वराला, देवदेवतांना आळविण्यासाठीं जीं धार्मिक भावगीतें रचलेलीं असतात त्यांना स्तोत्रें किंवा गीतें म्हणतात. वेदांत, बायबलांत, कुराणांत अशीं अनेक गीतें आहेत व त्यांतील उदात्त भावना व करुणाजनक विनवण्या देखील एकसारख्याच वाटतील. आपल्याकडे अनेक संस्कृत स्तोत्रें असून त्यांपैकीं रामरक्षा, महिम्नस्तोत्र, व्यंकटेशस्तोत्र, इत्यादि फार परिचित आहेत. मराठींतील देवदासाचें संकटस्तोत्र व रामदासाचें मारुतिस्तोत्र अनेच सुप्रसिद्ध आहे.

इंग्रजी वाङ्मयांत अठराव्या शतकाअखेरीं 'हिम्' किंवा 'साम' अशा स्तोत्रांचा उत्कर्षकाळ आलेला दिसतो. आयझॅक वॉट हा अशा स्तोत्रकारांचा अग्रणी म्हणतां येईल. त्याच्यानंतर चार्लस वेस्ले आला. त्यानें ६,००० स्तोत्रें रचिलीं व त्यांपैकीं ५०० तरी लोकांच्या तोंडी आहेत. विल्यम कौपर या कवीनेंहि कांहीं स्तोत्रें केलीं आहेत. कार्डिनल न्यूमनचें 'लीड काइंडली लाइट' हें स्तोत्र प्रसिद्धच आहे.

**स्थाणु**—(थॅल्स). वनस्पतिशास्त्रामध्यें ज्या वनस्पतींच्या शरीरांत देंठ व पानें असा भेद दिसत नाहीं त्यांस स्थाणु म्हणतात. अशा तऱ्हेच्या वनस्पती खालच्या थरांच्या वनस्पतींत आढळतात व त्यांस स्थाणुवर्ग म्हणतात. कांहीं बेच्या शैवाला-(लिव्हरवोर्ट)मध्यें, नेच्यांपैकीं संभोगभवधारी(गॅमेटोफाइट) मध्येंहि त्या आढळतात.

**स्थाणुवर्ग**—(थॅलोफायटा). वनस्पति वर्गांतील खालच्या थरातील अलंबी, किण्व, वगैरे वर्गांतील वनस्पती. यांमध्येंच सूक्ष्म जीवाणु (बॅक्टेरिया) व नील पाणकेश अथवा निळीं शेवाळें येतात.

**स्थानच्युति**—(डिस्प्लेसमेंट). जलस्थितिशास्त्रामध्यें असें आढळून येतें कीं, एखादी वस्तु जर एखाद्या द्रवामध्यें बुडविली तर त्या वस्तूमुळें त्या द्रवपदार्थाच्या कांहीं भागाचें स्थानांतर अथवा निःसारण होतें. आणि आर्किमेडीजच्या सिद्धान्ताप्रमाणें त्या पदार्थास द्रवपदार्थापासून मिळणारा अधोदाब म्हणजे वस्तूस खालच्या बाजूनें मिळणारा धक्का त्या द्रवपदार्थाच्या निःसारित भागाच्या वजनाइतका असतो. यावरून असें अनुमान निघतें कीं, एखादें गलबत जेव्हां समुद्रामध्यें तरत असतें तेव्हां त्या गलबताचें वजन त्यानें निःसारित केलेल्या पाण्याच्या वजनाइतकें असतें. या वजनास गलबताचें निःसारित वजन असें म्हणतात व तें टनामध्यें मोजण्यांत येतें.

**स्थानिक स्वराज्य**—प्रत्येक देशांत एक मुख्य वरिष्ठ सरकार असतें, आणि त्याशिवाय देशाचे जे लहान लहान भाग असतात, त्यांची व्यवस्था किंवा कारभार पाहण्याकरितां निराळ्या संस्था असतात, त्यांना स्थानिक सरकार म्हणतात. या स्थानिक संस्थांचें मुख्य काम अमलबजावणीचें व न्यायदानाचें असतें, आणि हीं कामें लहान गावांमध्यें आणि म्युनिसिपल शहरांमध्यें व अन्यत्र पृथक् पृथक् संस्थांमार्फत चालतात. इंग्लंड व वेल्स यांमध्यें स्थानिक राज्यकारभाराची सार्वत्रिक पद्धति १८८८ च्या 'लोकल गव्हर्मेंट ॲक्ट' या कायद्यानें सुरू केली, व स्थानिक रहिवाशांना प्रत्यक्ष प्रतिनिधित्वाचा (डायरेक्ट रिप्रेझेंटेशन) हक्क देण्यांत आला. या कायद्यानें प्रत्येक कौंटीकौन्सिलमध्यें त्या कौंटीचे अनेक मतदार-संघ स्थापन करून प्रत्येक संघातर्फे एकेक समासद घेण्यांत आला. प्रत्येक कौंटीकौन्सिलचे ३-४ सभासद लोकनियुक्त असून ¼ सभासद कौन्सिलनें निवडलेले अल्डरमेन असत. या कौन्सिलचीं कामें येणेंप्रमाणें—(१) स्थानिक आरोग्य राखणें. (२) सडका व पूल दुरुस्त ठेवणें. (३) बालगुन्हेगारांच्या शाळा चालवणें (रेफर्मेटरी स्कूल्स). (४) गरीब वेड्यांचीं इस्पितळें चालवणें; कारोनर, मेडिकल ऑफिसर, व रासायनिक संशोधक (पब्लिक ॲनॅलिस्ट) नेमणें. (५) संगीत-नृत्य-नाट्यप्रयोगगृहें बांधणें. (६) शर्यतीच्या मैदानें (रेस-कोर्सेस) वाल्यांना लायसेन्स देणें. (७) उत्पन्न व खर्च यांची व्यवस्था करणें. (८) जरूर तर कमाल ३० वर्षे मुदतीचें कर्ज काढणें. (९) वजनामापांच्या कायद्यांची अमलबजावणी करणें. (१०) जनावरांच्या सांथीच्या रोगांचें निवारण करणें. (११) स्फोटक द्रव्यें, नदीच्या पाण्याची स्वच्छता, यांसंबंधीं कायद्यांची अमलबजावणी करणें; इत्यादि. उत्पन्नाच्या बाबी स्थानिक कर, परवाने फी, जकाती, मालमत्ता कर, ग्रँट, वगैरे असतात.

हिंदुस्थान—ब्रिटिश अमदानीपूर्वी फार प्राचीन काळापासून गांवें व खेडीं यांची व्यवस्था ग्रामपंचायती व नगरनगरींची व्यवस्था महाजनसभा पाहत असत. त्यांचा कारभार परंपरागत चालीरीती, रूढी व धर्मशास्त्र यांवरून चाले. याहून अधिक मोठ्या भूप्रदेशाच्या निश्चित मर्यादा हल्लींचे तालुके-जिल्हे याप्रमाणें ठरलेल्या नसल्यामुळें जिल्हाबोर्डासारख्या स्थानिक स्वराज्यसंस्था पूर्वी नव्हत्या. ब्रिटिश अमदानींत इंग्लंडांतील नमुन्याप्रमाणें (कौंटी-कौन्सिल, बरोम्युनिसिपालटी व पॅरिश-कौन्सिल) जिल्हा-बोर्डें व म्युनिसिपालट्या स्थापण्यांत आल्या. १८४२ पूर्वी फक्त कलकत्ता, मद्रास व मुंबई अशा प्रांतिक राजधान्यांतून फक्त म्युनिसिपालट्यांची सुरुवात झाली. १८५० सालीं हिंदुस्थान सरकारनें व नंतर प्रांतिक सरकारांनीं कायदे करून सर्व प्रांतांत पुष्कळ म्युनिसिपालट्या स्थापन केल्या. लॉर्ड मेयोच्या कारकीर्दीत (१८७१ ते १८७४) नवे म्युनिसिपल कायदे मंजूर झाले, व निवडणुकीचा हक्क लोकांना देण्यांत आला. लॉर्ड रिपनच्या कारकीर्दीत १८८४ सालीं 'लोकल सेल्फ गव्हर्मेंट ॲक्ट' मंजूर होऊन म्युनिसिपालट्या व लोकलबोर्डें यांना निवडणुकीचा व्यापक हक्क देऊन या संस्थांचे अधिकार वाढवण्यांत आले. आरोग्य, सडका, पाणीपुरवठा, शिक्षण, दवाखाने, वगैरे महत्त्वाचीं व जबाबदारीचीं कामें या संस्थांकडे देण्यांत आलीं. प्रांतिक सरकारांत व मध्यवर्ती सरकारांत लोकांना अधिकाधिक राजकीय हक्क १९०८ व १९२१ या सालीं मिळाले, व वेळोवेळीं या स्थानिक स्वराज्य संस्थांचे हक्क वाढवून त्या संपूर्ण लोकनियुक्त करण्यांत आल्या; पण मताधिकार विस्तृत केल्यामुळें व साक्षरतेचें प्रमाण अल्प असल्यामुळें या संस्थांत सर्वत्र अशिक्षित व अल्पशिक्षित सभासदांचें बहुमत होऊन या संस्थांची कार्यक्षमता वाढण्याऐवजीं कमी झाली. काँग्रेस पक्ष अधिकारारूढ झाल्यावर १९३९ सालीं प्रो. बा. गो. काळे यांच्या अध्यक्षतेखालीं मुंबई सरकारनें लोकल सेल्फ-गव्हर्मेंट कमिटी नेमली. तिनें चांगल्या सूचना केल्या होत्या; पण दुसऱ्या महायुद्धाच्या काळांत त्या सर्व स्थगित राहिल्या.

पूर्वी ग्रामपंचायती व्यवस्थित चालल्या होत्या (ग्रामपंचायती पाहा) पण त्यांचें इंग्रजी अमदानींत पुनरुज्जीवन मात्र झालें नाहीं.

कारण दिवाणी व फौजदारी कोर्टें, पोलिसबंदोबस्त व जमाबंदी हीं कामें सरकारच्या न्यायखातें, रेव्हेन्यूखातें, पोलिसखातें यांच्याकडे गेल्यामुळें आणि आरोग्य, सडका, पाणीपुरवठा, शिक्षण, वगैरे कामें जिल्हाबोर्डें करूं लागल्यामुळें ग्रामपंचायतींची आवश्यकता वाटेना. १९०८ सालीं नेमलेल्या डिसेंट्रलायझेशन कमिशननें ग्रामपंचायती स्थापाव्या अशी शिफारस केली, तरीहि १९४२ पर्यंत सरकारनें ग्रामपंचायती स्थापण्याचा उपक्रम केला नव्हता. नगरपालिका पाहा.

**स्थानीय मापक**—(पोटेन्शिओ मीटर). विजेचा प्रवाह, दाब, किंवा इतर शक्ति यांचें चिनचूक मापन करण्याकरितां या यंत्राचा उपयोग करण्यांत येतो. हें यंत्र संशोधन-शाळेमध्यें किंवा निरनिराळ्या यंत्रांची परीक्षा करण्याच्या कामीं अत्यंत आवश्यक असतें. अशा तऱ्हेचीं प्रमाणयंत्रें उपकरणें तयार करणाऱ्या कारखान्यांतून तयार करण्यांत येतात.

**स्थापत्य**—निसर्गांत ज्या शक्ती आहेत त्यांची मनुष्याच्या उपयोगाकरितां योजना करणें या विद्येस स्थापत्य म्हणतात. याचे मुख्य दोन वर्ग पाडण्यांत येतात. एक स्वास्थ्यपर व दुसरा संरक्षणात्मक. सैन्यांतील स्थापत्य-शास्त्रज्ञांना रॉयल इंजिनियर असें म्हणतात. स्वास्थ्य-स्थापत्यामध्यें बंदरें, गोद्या, रेल्वे, इमारती, पूल, वगैरे कामें येतात. दुसरा एक स्थापत्यविशारदांचा वर्ग म्हणजे यंत्र-स्थापत्यविशारदांचा होय. त्या वर्गामध्यें यंत्रज्ञ, विद्युत्-यंत्रज्ञ, मोटार-यंत्रज्ञ, विद्युत्संदेश-यंत्रज्ञ, नभोवाणी-यंत्रज्ञ, खनि-यंत्रज्ञ, विमान-यंत्रज्ञ, वगैरे येतात. खनि-यंत्रज्ञांशिवाय बाकीच्या यंत्रज्ञांचें शिक्षण बहुधा सारखेंच असतें.

जगाच्या सुधारणेंत आणि स्वास्थ्यांत स्थापत्य-विशारदांनीं कल्पनातीत भर घातली आहे. डोंगरावरून करंगळीएवढी पडणारी पाण्याची धार खाचखळग्यांतून, दऱ्याखोऱ्यांतून पुढें जी वाहत जाते, तिचा उपयोग लक्षावधि एकर जमीन भिजविण्याकडे जो करून ठेवतो तो 'नागर-शिल्पज्ञ' (सिव्हिल इंजिनियर) व जो विद्युद्गृहें बांधून शहरांतून व कारखान्यांतून वीज खेळवितो तो 'विद्युत्शिल्पज्ञ' (एलेक्ट्रिकल इंजिनियर) होय. दोन नळकांडी (सिलिंडर) इंजिनापासून बारा नळकांडी इंजिनापर्यंत यंत्रशास्त्रांत प्रगति दाखविणाऱ्या 'यंत्रशिल्पज्ञ'(मेकॅनिकल इंजिनियर)ची महति काय वर्णावी? चालू यंत्रयुग त्यानेंच घडविलें आहे. स्थापत्यविशारदांनीं जगांत पाव-अर्धामैल लांबीचे प्रचंड पूल बांधले आहेत. शेंकडों फूट खोल पाये खणून आकाशचुंबी इमारती उठविल्या आहेत. समुद्रांतून हजारों मैल तारा घातल्या आहेत. व तारांशिवायहि हजारों मैलांवरच्या माणसांचें बोलणें स्पष्ट ऐकूं येईल अशी जादू केली आहे. याप्रमाणें स्थापत्यशास्त्रानें अनेक चमत्कार करून दाखविलेले आपण पाहतों.

या शास्त्राच्या विविध शाखा वर सांगितल्यान. एकेका शाखेंत तज्ज्ञ असे विद्यार्थी तयार करण्यांत येतात. यंत्रशास्त्राची आवड व उच्च गणिताचें ज्ञान हीं विशारद परीक्षेंत उत्तीर्ण होण्यास अवश्य लागतात. स्थापत्यविशारदांना पैसाहि चांगला मिळवितां येतो व समाजसेवाहि करतां येते. या शास्त्रांतील निरनिराळ्या विषयांवर स्वतंत्र लेख या कोशांत सांपडतील.

स्थापत्यविषयक ज्ञान प्राचीन काळापासून दिसतें. ईजिप्तमधील पिरॅमिड; ग्रीस, रोम, इराण वगैरे देशांतील इमारती; हिंदुस्थानांतील देवळें आणि मशिदी; यांवरून प्राचीन काळच्या उच्च आणि सूक्ष्म स्थापत्य ज्ञानाची कल्पना येईल. रोमन लोकांना दोन नळकांड्यांचें चलक्षेपण यंत्र (फोर्स पंप) माहीत होतें. आजचें नागरस्थापत्य १७ व्या शतकांत निघालें. पुढें वाफेची शक्ति माहीत झाल्यापासून यंत्रस्थापत्यांत प्रगति झाली.

**स्थितिशास्त्र**—(स्टॅटिक्स). गतिशास्त्र(डायनॅमिक्स)चा हा एक भाग आहे. शक्तींचें समतोलन (ईक्विलिब्रिअम) व शक्तिश्रेणींची सममूल्यता (ईक्विव्हॅलन्स) यांचा विचार या शास्त्रामध्यें येतो. आर्किमिडीजला हीं तत्त्वें अवगत होतीं व त्यानें तीं घन व द्रव पदार्थांस लाविलीं. द्रव्य (मॅटर) हें शक्तींचें वाहक आहे. कांहीं व्याख्या व गृहीत तत्त्वें (पोस्टुलेट्स) यांवर हें शास्त्र बसविलेलें आहे.

समतोलनाचें स्थैर्य—एखादा समतोल स्थितींत असलेला पदार्थ जर थोडासा हालवला तर तो पूर्वस्थितीवर येईल अथवा जास्तच पुढें जाईल; किंवा चळलेल्या स्थितींत पुनः स्थिर राहील. एखाद्या गोलाकार पात्राच्या तळाशीं स्थिर असलेला गोळा थोडा हालविल्यास पूर्वस्थितीवर येईल. एखाद्या गोळ्याच्या टोकावर दुसरा गोळा प्रयत्नानें स्थिर करतां येईल; परंतु थोडा हालविल्यास पूर्वस्थितीवर येणार नाहीं. समतटावर गोळा नेहमींच स्थिर राहील. पदार्थ एखाद्या बिंदूशीं स्थिर केल्यास तो बिंदु पदार्थाच्या गुरुत्वमध्याच्या खालीं किंवा वर असेल त्याप्रमाणें तो स्थिर समतोल अथवा अस्थिर समतोल होईल.

शिल्पज्ञ आणि स्थापत्यविशारद यांना महत्त्वाचे वाटणारे भर (स्ट्रेन) आणि भार (स्ट्रेस) यांचा विषय स्थितिशास्त्रांतच पडतो.

**स्थितिस्थापकता**—(इलॅस्टिसिटी). निरनिराळ्या पदार्थांमध्यें, आपलें घनफळ किंवा आकार बदलण्याच्या क्रियेस प्रतिबंध करण्याची जी एक शक्ति असते तीस स्थितिस्थापकता असें म्हणतात. बाह्य शक्तीमुळें अथवा गुरुत्वामुळें कोणताहि पदार्थ त्याचा आकार बदलणाऱ्या शक्तीचा जोर कमी झाला किंवा ती शक्ति काढून घेतली गेली कीं तात्काळ आपला पूर्वीचा आकार धारण करतो. घनपदार्थामध्यें आपलें घनफळ व आकार कायम ठेवणारी स्थितिस्थापकता असते. द्रवपदार्थ व वायुरूप प०९

यांमध्यें फक्त आपलें घनफळ कायम ठेवण्याची स्थितिस्थापकता असते. त्यांवर दाब पडून त्यांचें घनफळ कमी व्हावयास लागलें असतां ते त्या प्रेरणेस प्रतिबंध करतात. परंतु त्यांचा आकार बदलण्याच्या क्रियेस त्यांच्याकडून फारच थोडा प्रतिबंध होऊं शकतो. एखाद्या वायूची स्थितिस्थापकता त्याचें उष्णमान न वाढतां त्याच्यावर किती दाब घातला असतां तो सहन करूं शकतो यावरून मोजतात. जेव्हां एखाद्या वायूत एकदम दाब- ण्यांत येतें तेव्हां त्याच्यामध्यें त्याचें उष्णमान वाढल्यामुळें अधिक स्थितिस्थापकता उत्पन्न होते. द्रवपदार्थ हे वायुरूप पदार्थापेक्षां दाबण्यास अधिक कठिण असतात. पाण्यावर एक वातावरणाचा दाब अधिक वाढविला असतां तें वीस हजार भागांपैकीं एक भाग इतकें दाबलें जातें. यंत्रविद्येच्या व्यावहारिक उपयोगामध्यें घनपदार्थांची स्थितिस्थापकता माहीत असणें फार महत्त्वाचें असतें. जे घनपदार्थ एकरूपी असतात त्यांस दाबण्याच्या, वळविण्याच्या, ताणण्याच्या किंवा वांकविण्याच्या कामीं ते नेहमीं निश्चित प्रमाणामध्यें प्रतिबंध करीत असतात. आणि या प्रतिबंधाचें मापन करतां येतें व त्याचें मूलमान मानांक (मोडयुलस) हें आहे. जेव्हां विशिष्ट क्षेत्र- फळावर विशिष्ट प्रमाणांत दापन शक्ति अथवा दुसरी एखादी विकारक शक्ति लावण्यांत येते, उदा., एका चौरस इंचावर अमुक टन भार घालण्यात येतो, तेव्हां त्या शक्तीस दाब किंवा भार (स्ट्रेस) असें म्हणतात. व या भारामुळें होणाऱ्या विकृ- तीस प्रेर (स्ट्रेन) किंवा ताण असें म्हणतात. उदा., या ताणास विशिष्ट घनफळाच्या मूलमानावर इतका दाब पडेल असें मानण्यांत येतें. दाबास ताणानें भागलें म्हणजे मानांक (मोडयुलस) निघतो. जेव्हां लावलेल्या शक्तीमुळें घनफळ न बदलतां आकार बदलतो तेव्हां दाब आणि ताण यांच्या प्रमाणावरून आकाराचा मानांक किंवा त्या पदार्थाचें काठिण्य समजून येतें. जेव्हां यांत्रिक शक्ति फिरणाऱ्या दांड्या (शॅफ्टिंग) च्या साहाय्यानें एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं न्यावयाची असते त्या वेळीं काठिण्य या गुणधर्माचें ज्ञान आवश्यक असतें. ताणण्याच्या आणि वांकविण्याच्या क्रियेमध्यें यंग याचा मानांक विचारांत घेण्यांत येतो. हा ताणणाऱ्या शक्तीचें क्षेत्रीय मूलमान व ताणलेल्या लांबीचें मूलमान यांच्या प्रमाणावरून काढण्यांत येतो. सन १६७८ मध्यें हूक यानें असा सिद्धान्त मांडला कीं, दाबाचें प्रमाण त्यानें उत्पन्न केलेल्या ताणाच्या प्रमाणांत असतें. हा सिद्धान्त धातूंच्या बाबतींत त्यांच्या स्थितिस्थापकत्वाच्या मर्यादेच्या आंत खरा असल्याचें आढळून आलें आहे. परंतु जर या स्थितिस्थापकतेच्या मर्यादेबाहेर दाब लावला तर तो पदार्थ तुटून जातो, व याप्रमाणें आकार किंवा घनफळ यामध्यें कायमचा फरक पडतो. रिवेट ठोकण्याच्या आणि तार काढण्याच्या क्रियेमध्यें पदार्थावर मुद्दामच स्थितिस्थापक मर्यादेच्या पलीकडे ताण देण्यांत येतो. ताणाच्या तराजूमध्यें कमानीवर कधींहि स्थितिस्थापक मर्यादेच्या पलीकडे ताण पडतां कामा नये हें एक तत्त्व आहे. जेव्हां धातूवर वरचेवर दाब घालण्यांत येतो तेव्हां त्यास क्षीणता येते आणि त्या दमल्या असें म्हणतात. व अशा स्थितींत त्यांच्यावर दाब घातला गेल्यास सामान्य स्थितींत ज्या दाबामुळें त्या भंग पावत नाहींत, तेवढ्या दाबानेंहि त्या भंग पावण्याचा संभव असतो. एखाद्या पदार्थांतून ध्वनिलहरी जाण्याचा वेग त्याच्या स्थितिस्थापकतेवर अवलंबून असतो. अशा तऱ्हेनें दाब दिलेल्या ध्वनिलहरींचा उपयोग कॉन्स्टॅ- टिनेस्को या रुमेनियन इंजिनियरनें पाण्याच्या नळ्यांतून शक्तीचें स्थानांतर करण्याच्या कामीं केलेला आहे.

**स्थिरवस्तू**—(फिक्स्चर्स). एखादा भाडेकरी किंवा जमि- नीचें कूळ त्याच्या ताब्यांत असलेल्या जागेंत किंवा जमिनींत स्वतःच्या उपयोगाकरितां किंवा फायद्याकरितां ज्या सुधारणा, दुरुस्त्या, वगैरे करतो त्यांचे दोन प्रकार असतात : (१) सदरहू भाड्याची जागा किंवा खंडाची जमीन सोडून जातांना काढून नेतां येणार नाहींत अशा सुधारणा किंवा दुरुस्त्या; यांवर मूळ मालकाला मालकी हक्क प्राप्त होतो असा कायदा आहे. (२) परंतु ज्या सुधारणा किंवा दुरुस्त्या मालकाच्या मूळ इमारतीला किंवा जमिनीला नुकसानी न होतां काढून नेण्यासारख्या अस- तात त्या काढून नेण्याचा हक्क भाडेकऱ्याला व कुळाला असतो. हिंदुस्थानांत 'ट्रॅन्स्फर ऑफ प्रापर्टी ॲक्ट' मध्यें अशा कायद्याचे नियम दिलेले आहेत.

**स्नान**—शरीर स्वच्छ करण्याकरितां पाण्यामध्यें शरीर बुडविणें किंवा शरीरावर पाणी घेणें या क्रियेस स्नान म्हणतात. नदीमध्यें किंवा समुद्रामध्यें अबून मधून शिरून पाण्यांत क्रीडा करणें या गोष्टीखेरीज स्नान म्हणून एक विधि किंवा क्रिया फार प्राचीन कालापासून लोकांत रुढ होती.

पाश्चात्य देशांत होमरनें आपल्या काव्यांत पाहुणा आला कीं त्याला प्रथम स्नान घालण्यांत येत असे, असे उल्लेख केलेले आहेत. उदाहरणार्थ, यूलिसिस हा जेव्हां सिर्सीकडे जातो तेव्हां प्रथम त्याच्या स्नानाची तयारी करण्यांत येते. परंतु ग्रीक लोकांचीं जीं भांडीं सांपडलीं आहेत त्यांवर स्नानविधीचें अथवा स्नानपात्राचें चित्र आढळत नाहीं. परंतु स्नान करणारे लोक अंगावर पाणी ओतून स्नान करतांना आढळतात. उत्तरकालामध्यें सार्वजनिक व खाजगी स्नानगृहें बांधण्याची प्रथा मोडलेली दिसते. ग्रीक लोकांतील सार्वजनिक स्नानगृहें बहुधा आखाड्यांजवळ असत. रोमन लोकांत स्नानगृहांची प्रथा वरीच वाढलेली दिसते. त्यांच्या स्नानगृहांत मुख्यतः चार भाग असत : (१) कपडे

उतरविण्याची जागा; (२) अभ्यंगाची अथवा तैलमर्दनाची जागा; (३) शीतस्नानाची जागा; व (४) घर्मगृह अथवा घाम येण्याकरितां उष्णता उत्पन्न केलेली जागा. या जागेंत कमी किंवा तीव्र उष्णतामान ठेवण्याची सोय असे व एका बाजूस बाष्प स्नानाची व दुसऱ्या बाजूस उष्णोदक स्नानाची व्यवस्था असे.

पूर्वीच्या उष्णवात स्नानाचीच परिणत अवस्था म्हणजे अर्वाचीन काळीं ज्यास 'टर्किश बाथ' म्हणतात ती होय. या स्नानविधीमध्यें स्नान करणाऱ्याच्या अंगांतून वरीलप्रमाणें घाम येऊन गेल्यावर त्याचें शरीर मालिश करण्याची एक पद्धति असते.

ज्या ठिकाणीं उष्णोदकाचे झरे असतात अशा ठिकाणीं स्नानगृहें बांधण्याची पाश्चात्य देशांत पद्धति आहे. अशीं ठिकाणें इंग्लंडमध्यें सॉमरसेट व डर्बीशायर यांमध्यें आहेत. अशीं ठिकाणें म्हणजे बाथ, हॅरोगेट, इ. होत. यांशिवाय युरोपमध्यें एलाशापेल, बेडन, टोप्लिट्झ, बारेजिस, स्पा, हीं होत.

याखेरीज औषधियुक्त स्नानगृहें, दुग्ध, तैल, मद्य, माती, वाळू, चिखल, वायु, धूम्र व विद्युत् स्नानगृहेंहि अनेक ठिकाणीं उभारण्यांत आलीं आहेत. यांचा उपयोग वैद्याच्या सल्ल्यानें करण्यांत येतो.

प्राचीन काळीं बहुतेक सर्व राष्ट्रांमध्यें स्नान हा एक धार्मिक विधीपैकीं भाग असे. विशेषतः ईजिप्त व हीब्रू लोकांत स्नानास महत्त्व असे. महंमदी धर्मामध्यें प्रत्येक दिवशीं पांच वेळां तोंड, हात व पाय धुण्यास सांगितलें आहे. जेथें वाळवंटांत पाणी मिळत नाहीं अशा ठिकाणीं मुसलमान लोक वाळूनें हातपाय धुतात.

प्राचीन काळीं सार्वजनिक स्नानगृहें अथवा हमामखाने असत. रोमन काळांतील अशीं स्नानगृहें फार भव्य व सुंदर असत. डायोक्लेटीयन या बादशहानें बांधलेल्या स्नानगृहांत एका वेळीं १८ हजार लोकांस स्नान करतां येईल इतकें तें मोठें होतें. कॅराकेला या बादशहानें बांधलेलें स्नानगृह पाव चौरस मैल होतें. यामध्यें गरम व थंड पाणी, गरम हवा किंवा वाफारा मिळण्याची सोय असून पोहण्याच्या टांक्या, विश्रांति घेण्यास जागा, तसेंच कपडे बदलण्यासहि खोल्या असत. त्याचप्रमाणेंच क्रीडांगणें व व्यायाम घेण्याच्या जागाहि असत. या जागांमध्यें रंगीत तुकड्यांची किंवा संगमरवरी दगडांची फरशी असे. भिंतींवर चित्रें काढलेलीं असत. स्नान करण्याचे प्रकारहि निरनिराळे असत.

आपल्याकडे ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचा असा इमारतींचा नमुना म्हणजे बाष्पस्नानाकरितां बांधलेल्या इमारतींचा होय. यांचीं वर्णनें विनयपिटकांत सांपडतात (३·१०५–११० व २९७). या इमारती उंच जोत्यांवर बांधलेल्या असत. या जोत्यांचा दर्शनी भाग विटांचा व दगडांचा असे; या इमारतींत जाण्याकरितां दगडी जिने असत, व यांत एक लहानशी खोली व स्नानाकरितां एक हौद असे. उष्णवातस्नानाच्या खोलीमध्यें मध्यभागीं एक आगटी पेटविलेली असून तिच्या सभोंवार बसण्याची व्यवस्था केलेली असे. घाम लवकर यावा म्हणून हें स्नान करतांना स्नान करणाऱ्या इसमाच्या अंगावर कढत पाणी ओतीत. त्याच्या तोंडाला एक प्रकारची सुवासिक चुन्याची फक्की लावलेली असे. हें स्नान आटोपल्यानंतर संवाहनविधि व्हावयाचा व नंतर हौदांत स्नान करावयाचें अशी रीत असे. गंगा नदीच्या स्रोतापासून इतक्या पुरातन काळीं तुर्की स्नानगृहांसारखीच हमामखान्यांची व्यवस्था आढळून येते. तेव्हां तुर्क लोकांनीं ही पद्धत हिंदूंच्यापासून तर उचलली नसेल ना, असाहि प्रश्न उपस्थित करण्यांत आला आहे. दीघनिकाय नांवाच्या ग्रंथांत अशाच उघड्यावर बांधलेल्या हौदांचें वर्णन आहे. यांत आंत उतरण्यासाठीं पायऱ्या केलेल्या असत. यांचा दर्शनी भाग दगडाचा असे व यांजवर कांतकाम आणि नक्षी कोरलेली असे. अशा या स्नानाच्या जागांपैकीं कित्येक अनुराधपूर येथें अद्यापहि शाबूत आहेत. मोहेंजोदारो येथील उत्खननांत स्नानगृहें आढळलीं असून तीं वरीलप्रमाणेंच आहेत.

स्नानाची जास्त जरूरी उष्णप्रदेशांत, जेथें अंगाला घाम फार येतो तेथें असतेंच. रोजच्या एक वेळ किंवा त्रिकाळ स्नानाची प्रथा हिंदुस्थानांत सर्रहा दृष्टीस पडेल. जेवणाप्रमाणें प्रत्येकाला स्नान हें लागतेंच. थंड प्रदेशांत स्नान हें नित्यकृत्य नसून सोयीप्रमाणें केव्हां तरी करण्यांत येतें. तिबेटसारख्या अति थंड प्रदेशांत स्नान माहीत नाहीं. जन्म आणि मृत्यु या दोन प्रसंगींच फक्त स्नान घालण्यांत येतें.

तुर्की स्नान—अरब लोक उष्ण हवेनें स्नान करीत असत. तोच प्रकार रोमन लोकांनीं रूढ केला. यामध्यें स्नान करणारा मनुष्य एका गरम हवा असलेल्या खोलींत जात असे, व तेथें त्याला घाम येऊं लागला म्हणजे त्यापेक्षां अधिक गरम असलेल्या खोलींत जात असे. या ठिकाणीं साधारणतः २०° शिलेस इतकी उष्णता असे. यानंतर त्याला भरपूर घाम आला म्हणजे तो स्नानगृहांत जात असे. तेथें त्याचें शरीर साबणानें व पाण्यानें धुतल्यानंतर त्यास थंड पाण्याच्या फवाऱ्याखालीं उभे करून थंड करण्यांत येत असे. यानंतर एका पोहण्याच्या टांकीमध्यें थंड पाण्यांत स्नान घातल्यावर त्याचें अंग पुसून कोरडें करण्यांत येई व त्यास त्याचें अंग अगदीं कोरडें होईपर्यंत निजवून ठेवण्यांत येत असे. नंतर शरीराचें उष्णमान सरासरी उष्णमानाइतकें आल्यानंतर मागून बाहेर पडत असे.

रशियन स्नान—हा प्रकार बराच तुर्की स्नानाप्रमाणेंच असून गरम हवेऐवजीं वाफेचा उपयोग करण्यांत येतो. तुर्की स्नानपद्धतीपेक्षां रशियन स्नानपद्धतींत अधिक उष्णमान सहन करतां येतें. योग्य काळजी घेऊन अशा प्रकारचें स्नान केल्यास तें आरोग्यकारक

असतें. परंतु फार उष्णमानांत स्नान केल्यास रक्त तापून इजा होण्याचा संभव असतो.

शीतस्नान—थंड पाण्यामध्यें प्रवेश केला असतां मनुष्यास प्रथम एकदम थंडी लागते. परंतु लवकरच शरीरास ऊब लागून मनुष्यास उत्साह येतो. यानंतर अंग स्वच्छ पुसलें असतां मनुष्याला हलकें वाटून तरतरी येते. परंतु यापेक्षां जास्त वेळ थंड पाण्यांत राहिलें तर पुनः थंडी लागून मनुष्यास अशक्तता येते. याकरितां योग्य काळ शीतस्नान केलें तर तें हितावह व आरोग्य-दायक असतें. परंतु अधिक वेळ घेतल्यास अनारोग्यकारक होण्याचा संभव असतो. सशक्त व निरोगी माणसांनींच शीतस्नान करावें व तेंहि थकलें असतां किंवा व्यायाम केल्यानंतर घेऊं नये.

किंचिदुष्णस्नान—कोमट पाण्यानें स्नान करणें आनंददायक असून त्यामुळें स्नान करणाऱ्यास धसका बसत नाहीं. या स्नानामुळें सर्व शरीरावर तरतरी येऊन मज्जातंतू शांत होतात व रुधिराभिसरण जलद होतें. परंतु शीतस्नानाप्रमाणें याच्या योगानें शक्ति वाढत नाहीं. तसेंच वरचेवर स्नान केलें असतां स्नान करणाऱ्यावर कमीअधिक उष्णमानाचा परिणाम होतो. तथापि एकंदरींत कोमट पाण्याचें स्नान हितावह असतें.

उष्णस्नान—गरम पाण्यानें स्नान केलें असतां रक्त शरीराच्या पृष्ठभागावर येतें, कातडी लाल होते व किंचित् सुजते. तसेंच नाडी भराभर चालूं लागते, आणि डोक्यावर ओझें असल्यासारखें वाटतें. यामुळें थकवा येतो व अशक्तता वाटूं लागते. निरोगी लोकांनीं नेहमीं फार गरम पाण्यानें स्नान करूं नये. प्रथम कोमट पाण्यानें सुरुवात करून अधिकाधिक गरम पाणी घेत जावें. नंतर थकवा येण्यापूर्वी गरम पाणी बंद करून थंड पाण्याच्या फवाऱ्याखालीं उभें राहावें. व नंतर शरीर एखाद्या खरखरीत रुमालानें पुसून साफ करावें.

समुद्रस्नान—योग्य ऋतूमध्यें समुद्रस्नान हितावह असतें. कारण मीठ हें चामडीला चांगलें असून शरीर सुदृढ करतें. परंतु पाण्यामध्यें फार वेळ राहूं नये. नाहीं तर प्रतिक्रियात्मक शक्ति कमी होऊन थंडी होण्याचा संभव असतो. पाण्यांतून बाहेर आल्याबरोबर शरीर घट्ट पुसून लागलेंच कपडे घालावे. जेवण झाल्यानंतर दोन तें तीन तासांच्या आंत स्नान करूं नये.

**स्नायू**—शरीराच्या कोणत्याहि अवयवांची अथवा सर्व शरीराची हालचाल ज्या शरीरघटकांच्या द्वारां करण्यांत येते त्यांस स्नायू म्हणतात. हे मांसमय आणि तंतुमय असतात. व या दोहोंचें कांहीं ठिकाणीं मिश्रण झालेलें असतें. तंतुमय भाग सामान्यतः स्नायूच्या अखेरीस अधिक असतो, आणि मांसल भाग पोटांत किंवा मध्यभागीं असतो. स्नायूंचे स्वयंप्रेरक व अस्वयंप्रेरक असे दोन वर्ग पाडण्यांत येतात. पहिल्या वर्गातील स्नायूंचें चलनवलन इच्छामात्रेंकरून होतें; उदा., आपणांस वाटलें तर आपण आपला हात वर किंवा खालीं करतों; किंवा गुडघा वांकवितों;

### स्नायूंचे प्रकार

१. मस्तकस्नायु.
२. कर्णप्रांतस्थ-शंखक स्नायु.
३. डोळा मिटविणारा स्नायु.
४. चर्वण स्नायु.
५. पृष्ठविस्तीर्णक स्नायु.
६. अंसप्रच्छद स्नायु.
७. द्विशिरस्स्नायु; बाहुसंकोचक स्नायु.
८. त्रिशिरस्स्नायु; बाहुविस्तारक स्नायु.
९. अंगुष्ठविस्तारक स्नायु.
१०. मणिबंधविस्तारक स्नायु.
११. पाठीचा रुंद स्नायु.
१२. उदराचा तिरका स्नायु.
१३. नितंब स्नायु. १४. पादसंकोचक स्नायु. १५. नडग्याचा स्नायु. १६. पादांगुष्ठविस्तारक स्नायु. १७. घोडशीर.

किंवा जीभ हालवितो. परंतु दुसऱ्या प्रकारच्या स्नायूंचें, उदा., आपल्या हृदयाचें किंवा रक्तवाहिन्यांचें, शिरांचें आकुंचन किंवा प्रसरण आपल्या इच्छामात्रेंकरून होत नाहीं. स्नायूंतील मुख्य गुणधर्म म्हणजे त्यांस उत्तेजित केलें असतां त्यांमध्यें दिसून येणारी प्रतिक्रिया हा होय. सर्व स्नायू अस्थींशीं प्रत्यक्ष किंवा स्नायुरज्जुद्वारां जोडलेले असतात. मनुष्याच्या शरीरांत शेंकडों स्नायू असतात.

**स्पंज**—आद्यजीव (प्रोटोझोआ) आणि रिक्तमध्य (कोलेन टेराटा) या दोन जीवकोटींच्या दरम्यानच्या अवस्थेंत असलेला एक सच्छिद्र (पोरिफेरा) जातीचा प्राणिवर्ग. याचें अंग शृंगमय जाळीदार, लवचिक पदार्थाचें, व प्रत्येक बाजूला

गुंतागुंत होत गेलेलें असून त्यास चुनखडीयुक्त किंवा वालुकायुक्त टोकें असतात व त्यामुळें त्याला थोडीशी मजबुती येत असते. या सर्व रचनेला बाजारी स्पंज असें म्हणतात. यांचें पुनरुत्पादन गर्भाशयापासून किंवा पेशीविभक्तीनें अशा दोन्ही पद्धतींनीं होत असते. यांचे मुख्यतः तीन वर्ग पडतात : (१) मायक्सो-स्पांजिई-

( श्लेष्मल ). हे संख्येनें थोडे असतात. यांमध्यें कोणत्याच तऱ्हेचा शरीराचा सांगाडा आढळत नाहीं. ( २ ) कॅलसी-स्पांजिई—यामध्यें शृंगमय सांगाडा नसतो, परंतु चुनखडीसारखे अणकुचीदार अवयव असतात. ( ३ ) फायब्रो स्पांजिई—यामध्यें तंतुमय सांगाडा असून त्याला गारेसारख्या अणकुचीदार कणांनीं मजबुती आलेली असते. समुद्रांतून काढलेले स्पंज प्रथम बडवून काढण्यांत येतात आणि नंतर विरल लवणाम्ला( म्युरिॲटिक ॲसिड )च्या द्रावणामध्यें भिजवून शुभ्र करण्यांत येतात व त्यांतील चुनयाचें कवचित विरघळून टाकण्यात येतें.

उत्तम स्पंज भूमध्यसमुद्र आणि तांबडा समुद्र यांत सांपडतात. हे १५० ते २०० फुटांखालीं असतात. हे स्पंज काढल्यानंतर उन्हांत ठेवतात म्हणजे त्यांतील मांस निघून जातें. नंतर चांगले स्वच्छ धुऊन वडवितात. म्हणजे आंतील इतर घाण निघून जाते. मग कोरडे झाल्यावर बाजारांत पाठवितात. अमेरिकेंत स्पंज फ्लोरिडा व बाहामा बेटांतून जातो. उत्तम स्पंज म्हणजे ज्याला 'मेंढीची लोकर' म्हणतात तो दोन ते पांच डॉलरला एक पौंड या भावानें विकला जातो. स्पंजाची निर्मिति वाढविण्याकरितां शास्त्रज्ञांचे प्रयोग चालले आहेत.

**स्पॅनिश अमेरिका**—अमेरिकेच्या विशेषतः मध्य व दक्षिण अमेरिकेच्या ज्या ज्या भागांत स्पॅनिश लोकांनीं प्रथम वसाहती केल्या व ज्यांत आतां प्राधान्यानें स्पॅनिश वसाहतवाल्यांचेच वंशज राहतात त्या सर्वांस स्पॅनिश अमेरिका असें म्हणतात. पोर्तुगीज वस्ती असलेला ब्राझील देश व ब्रिटिश, फ्रेंच, आणि डच सोडून सर्व दक्षिण अमेरिका, ब्रिटिश हॉंडुरास सोडून सर्व मध्य अमेरिका, क्यूबा, पोर्टोरिको, डोमिनिकन रिपब्लिक व मेक्सिको हीं सर्व स्पॅनिश अमेरिकेंत मोडतात. तसेंच वेस्ट इंडीज मधल्या कांहीं बेटांचाहि समावेश यांतच केला जातो.

**स्पर्शरेषा**—भूमितिशास्त्रामध्यें कोणत्याहि वक्रास स्पर्श करून जाणाऱ्या सरळ रेषेस स्पर्शरेषा असें म्हणतात. जर हा वक्र वर्तुळ अगर एखादा शंकुच्छेद असेल तर युक्लिडनें केलेली स्पर्शरेषेची जी व्याख्या म्हणजे एखाद्या वक्रास स्पर्श करणारी परंतु कितीहि वाढविली तरी त्यास न छेदणारी सरळ रेषा, ही बरोबर लागू पडते. यावरून असें म्हणतां येईल कीं, या रेषेची दिशा वक्राच्याच दिशेसारखी विशिष्ट बिंदूजवळ असते.

**स्पर्शास्पर्श**—स्पर्शास्पर्श विचार म्हणजे अस्पर्शाचाच विचार होय. अस्पर्श नाहीं तें स्पर्श. म्हणून शास्त्रांत अस्पर्शांचीच माहिती दिलेली असते. ज्याला स्पर्श करावयाचा नाहीं तो अस्पर्श. अस्पर्श हें कारण नाहीं, कार्य आहे. जी वस्तु अमंगल, अशुचि असेल ती स्पर्श करण्यास पात्र नसलेली म्हणजे अस्पर्श होते. अशुचित्वांत आरोग्याची, पवित्रतेची व स्वच्छतेची अशी त्रिविध दृष्टि असते. कित्येक पदार्थांचें अशुचित्व चिरकालीन असतें तर कित्येकांचें अल्पकालीन असतें. विष्ठा नेहमींचीच अशुचि तर रजस्वला स्त्री रज आहे तावत्काल अशुचि. अशुचित्वाची कल्पना यज्ञावरून प्रथम निघाली असावी. यज्ञाला जी वस्तु चालत नाहीं ती अमेध्य. ह्यांत पावित्र्याची कल्पना प्रतीत होते. सोंवळा मनुष्य स्वतःला पवित्र समजून सोंवळ्यांत न मोडणारी प्रत्येक वस्तु अशुचि समजतो. सोयरसुतकाच्या कल्पनेला वेगळेंच कारण असावें. हें अस्पर्शत्व कौटुंबिक असतें हेंहि विशेष आहे. अमंगल किंवा घाणेरड्या वस्तूला टाळण्याकरितां आपण दूर राहिलों म्हणजे ती वस्तु अस्पर्श झालीच. घाणेरड्या पदार्थाचा संपर्क घडलाच तर त्याचें परिमार्जन करणें भाग आहे. तात्पर्य, अपवित्र पदार्थ, त्याचा संपर्क आणि त्या संपर्काचें परिमार्जन या तीन अवस्थांपैकीं, स्पर्शदोष ही मधली अवस्था आहे. अस्पर्शाचा स्पर्श झाला असतां तो दोष स्नानानें दूर होतो.

अस्पृश्य हा जातिवाचक शब्द नाहीं. ज्या जातींना आज आपण अस्पृश्य मानतों त्यांना शास्त्रकार अन्त्यज किंवा बाह्य म्हणतात. अस्पृश्यत्व जन्मतः नसतें. तें कारणमूलक असल्यानें कारण दूर झालें कीं अस्पृश्यत्व गेलेंच. विटाळ गेल्यावर स्त्री अस्पर्श राहत नाहीं. तेव्हां भलताच शब्द वापरला गेल्यानें समाजांत अनर्थ माजला. वर्णाश्रम धर्मांत कांहीं लोक न आल्यामुळें ते बाह्य राहिले. तथापि ह्या पूर्वीच वर्णाश्रम धर्माची दीक्षा त्यांना मिळण्यास सुरवात झाल्यामुळें त्या सर्व जातींचा समावेश शूद्रांत तरी निदान झाला पाहिजे. आजपर्यंत मानलेल्या कांहीं प्रमुख अंत्यज जाती पुढील होत.

( आंकडे १९३१ च्या खानेसुमारीवरून )

| जात | वसतिस्थान | एकूण संख्या |
|---|---|---|
| १ चांभार | बहुतेक हिंदुस्थान | १,११,३७,३६२ |
| २ मोची | ,, ,, | १०,०७,८१२ |
| ३ डोंब | बंगाल, आसाम, पंजाब | ९,७७,०२६ |
| ४ भंगी | मुंबई, संयुक्तप्रांत, राजपुताना | ६,५६,५८६ |
| ५ ढाणूक | बंगाल, पंजाब, बडोदें | ८,७०,५५७ |
| ६ बागडी | बंगाल, आसाम | १०,४३,५५० |
| ७ बलई | माळवा, मध्यप्रांत | ५,८४,३३४ |
| ८ चूरा | उत्तर हिंदुस्थान | १३,९०,४२८ |
| ९ नामशूद्र (चंडाल) | ,, ,, बंगाल | २०,९१,७२१ |
| १० राजवंशी | ,, ,, | १८,०८,५५४ |
| ११ महार | मुंबई, वऱ्हाड-मध्यप्रांत | ३९,५१,६६६ |
| १२ मांग | ,, ,, ,, | ६,६२,३०६ |
| १३ होलिया (महार) | कर्नाटक, मद्रास | ५,३०,६९९ |

| जात | वसतिस्थान | एकूण संख्या |
|---|---|---|
| १४ मादिगा (मांग) | कर्नाटक, मद्रास | १२,८१,२५२ |
| १५ परिया | मद्रास, ब्रह्मदेश | २२,५८,६११ |
| १६ चिक्किया | ,, ,, | ४,७८,४९६ |
| १७ माल | ,, बंगाल | १८,६३,९०८ |
| १८ इतर | सर्व भागांतील | २,०९,९९,४७० |
| | | एकूण ५,३२,०६,६३२ |

माणसांमाणसांमधील अस्पृश्यता ही केवळ हिंदुस्थानांतील आर्यांतच आहे असें नाहीं. प्राचीन इराणी पारशी समाजांत व जपानी लोकांत ती आढळून येते. वर्णाश्रमक्रियेंत शूद्रांनंतर इतर लोकांना स्थान न मिळाल्याने ते हिंदुसमाजाबाहेर राहिले व अंत्यज गणले जाऊं लागले. बौद्ध आणि जैन या संप्रदायांना अस्पृश्यता काढतां आली नाहीं. पतित व त्यांची संतति ही या अस्पृश्य वर्गांत घालण्यांत येऊं लागली. इंग्रजी अमदानी आल्यावर मिशनरी व राज्यकर्ते यांनीं स्पृश्यास्पृश्यांत भेद न करण्याचें धोरण ठेवलें; व हिंदी सुधारकांनीं या धोरणाचा पुढें अवलंब केला. बंगालमध्ये शशिपाद बंदोपाध्याय व महाराष्ट्रांत ज्योतीबा फुले याचे प्रयत्न अगदीं प्रथमचे म्हणतां येतील. ज्योतीबांच्या महार-मांगांच्या शिक्षणसंस्थेंतून पुढे 'भारत निराश्रित साह्यकारी मंडळी' निघाली व तिचें कार्य विठ्ठल रामजी शिंदे यांनीं अनेक वर्षे चांगल्या प्रकारें केलें. बडोद्यास सयाजीराव गायकवाड या राजर्षीनें आपल्या राज्यांतून अस्पृश्यतेचें उच्चाटन करण्याचा चंग बांधला. अस्पृश्यांच्या शिक्षणासाठीं अनेक सोई केल्या. भारत सरकारचे सध्याचे कायदे-मंत्री डॉ. अंबेडकर हे त्यांच्याच मदतीनें विलायतेंतून शिकून आले. अस्पृश्यता-निवारणासाठीं असे चोहों-कडून प्रयत्न होत होते. तथापि म. गांधींसारखा अव्वल दर्जाचा राजकारणी व सर्वमान्य समाजनेता मिळेपर्यंत या प्रश्नाला चांगलें तोंड लागलें नव्हते. म. गांधींनीं अस्पृश्यांना 'हरिजन' ही प्रतिष्ठित संज्ञा देऊन या हरिजनांसाठीं सार्वजनिक देवळें, शाळा, पाणवठे, वगैरे खुले करण्याविषयीं कॉंग्रेसला आदेश दिला. हरिजनांना स्वतंत्र मतदारसंघ मान्य केल्यास हिंदुसमाजापासून ते कायमचे विभक्त होतील म्हणून आपला प्राण पणाला लावून त्यांनीं तसें करूं दिलें नाहीं. 'अखिल भारतीय हरिजन सेवक संघ' स्थापून त्यासाठीं ते पैसे मागत. यामुळें कॉंग्रेसचा अनुयायी हा अस्पृश्यतेचा कट्टा वैरी असें मानण्यांत येऊं लागलें व आचरणहि सुरू झालें. कॉंग्रेस मंत्रिमंडळें जेव्हां १९३७ सालीं अस्तित्वांत आलीं तेव्हांपासून प्रांतिक व मध्यवर्ती मंत्रिमंडळांतून एखादा तरी हरिजन मंत्रि असतोच. हरिजनांच्या उन्नतीसाठीं या मंत्रिमंडळानीं अनेक कायदे केले व मोठाल्या रकमा मंजूर केल्या. त्यांच्या मार्गांतील सामाजिक अडचणी कायद्यांनीं दूर केल्या. तथापि सनातनी वृत्तीच्या बहुजन हिंदुसमाजांत हरिजनांविषयीं आत्मीयतेची भावना फारशी आली नाहीं. याला अनेक कारणें आहेत. हरिजन हळूहळू सर्व प्रकारें सुधारतील तेव्हां खालच्या थराच्या समाजांत तरी हा अन्त्यजभाव राहणार नाहीं.

**स्पार्टा**—ग्रीसमधील लेकोनिआ प्रांताच्या राजधानीचें शहर. शत्रूपासून रक्षण करतां येईल अशा स्थलीं स्पार्टा शहर वसविलें आहे. झ्यूसचा मुलगा लासिडेमन हा या शहराचा संस्थापक होय. दंतकथेप्रमाणें ट्रोजन युद्धानंतर येथें डोरिअन लोकांची टोळी शिरून त्यांनीं स्पार्टा घेतलें. या वेळीं स्पार्टा हें अन्तःकलहानें असमर्थ व असहाय होऊन गेलें होतें. परंतु लायकरगस यानें निरनिराळ्या घटकांचें एकीकरण घडवून आणवून स्पार्टाच्या कीर्तीस व वैभवास कारणीभूत होईल अशी शिक्षणपद्धति सुरू केली. स्पार्टाच्या स्पृहणीय वैभवाचें कारण लायकरगसनें सुरू केलेली ही शिक्षणपद्धतीच होय. स्पार्टामधील राज्यपद्धतीविषयीं फारशी माहिती मिळत नाहीं. राज्यशकटाचा चालक असा एक राजा नसून एकाच वेळीं दोन राजे राज्यकारभार पाहत असत. म्हणजे स्पार्टा येथें द्विसत्ताक राज्यपद्धति होती. या राजांचीं कर्तव्यें म्हणजे लष्करी, धार्मिक व शासनविषयक अशा प्रकारचीं होतीं. लष्करी बाबतींत राजाची सत्ता अप्रतिहत असे. परंतु दिवसेंदिवस ती कमी होत जाऊन 'मुलकी अमलदार मंडळ' हेंच अधिकारारूढ होऊन बसलें, कारण हें मंडळ लोकनियुक्त होतें. स्पार्टा येथील नागरिक शिक्षणपद्धति वाखाणण्यासारखी होती. सशक्त व निर्दोष अशा मुलांनाच शिक्षण देण्यांत येत असे. अशक्त किंवा दोषी मुलाची व्यवस्था निराळ्या प्रकारची केली जात असे. स्पार्टन लोकांना व्यापार करण्याची किंवा कारखाने चालविण्याची मनाई असे. कोणींहि सोनें किंवा चांदी जवळ बाळगूं नये असा नियम असे. ख्रि. पू. ४०५ मध्यें अथेन्स हें स्पार्टानें घेतलें व सबंध ग्रीसमध्यें पहिल्या प्रतीचें राष्ट्र असा त्याचा लौकिक झाला. स्वतःचें वर्चस्व न ढळूं देण्याकरितां त्यानें ख्रि. पू. ३८७ त इराणबरोबर अपमानकारक तह केला. या तहांत अशी एक अट होती कीं, बाकीच्या सर्व ग्रीक शहरांना स्वातंत्र्य मिळावें. यामुळें थीबीसशीं वैर उत्पन्न होऊन स्पार्टाचा ल्युक्ट्रा येथें पराभव झाला. या पराभवानें स्पार्टाचें प्रभुत्व थीबीसकडे जाऊन स्पार्टाच्या विनाशकालाला आरंभ झाला. मेसिनिआ व आरकेडिआ स्वतंत्र झाले. स्पार्टाला मॅसिडोनच्या फिलिपपुढे मान वांकवावी लागली. मॅसिडोनियाचा ताबा झुगारून देण्याची स्पार्टानें बरीच खटपट केली. स्पार्टन स्त्रियांनीं देखील या कामीं बरेंच शौर्य प्रगट केलें, परंतु यश आलें नाहीं. यानंतर स्पार्टा येथें जुलमी व दुष्ट लोकांची सत्ता प्रस्थापित झाली, व

स्पार्टाचा विनाशकाळ जवळ आला. नंतर रोमनें आपलें सैन्य स्पार्टावर पाठविलें व स्पार्टाला आपलें सर्वस्व त्याच्या स्वाधीन करावें लागलें. इ. स. ३९६ त अलारिकनें या शहराचा विध्वंस केला. यानंतर या शहरावर स्लाव्ह, फ्रँक व तुर्क यांनीं स्वाऱ्या केल्या. अर्वाचीन स्पार्टा हें १८३४ त वसलें आहे. त्याची लो. सं. १८३४ आहे. येथील लोक रेशीम विणण्याचा धंदा करतात.

**स्पिट्सबर्गेन**—हा आर्क्टिक महासागरांत सहा मोठ्या आणि कित्येक लहान बेटांचा समूह आहे. त्याचें एकंदर क्षेत्रफळ २५ हजार चौरस मैल आहे. लो. सं. सुमारें तीन हजार आहे. सर्वांत मोठीं बेटें आहेत तीं—पश्चिम स्पिट्सबर्गेन, नॉर्थ-ईस्ट लँड, बेअर बेट, बॅरेंट्स लँड, एज आयलंड व होप आयलंड. येथील हवामान ध्रुव प्रदेशाकडील असल्यामुळें येथें भाजीपाला आणि फळफळावळ फारच थोडी होते. येथें कोल्हे, आस्वलें, रेनडियर आणि समुद्र पक्षी ( सी फाऊल ) हे प्राणी पुष्कळ आहेत. बेअर आयलंड व पश्चिम स्पिट्सबर्गेन येथें दगडी कोळसा सांपडतो. १९२४ सालीं ४,४०,००० टन दगडी कोळसा येथून परदेशीं पाठविण्यांत आला. स्पिट्सबर्गेन हें कांहीं काळ व्हेल आणि सील या जातींचे मासे पकडण्याचें मोठें केंद्र होतें.

हा द्वीपसमूह ११९४ सालीं नॉर्वेजियन लोकांनीं शोधून काढला असावा. पण १५५३ सालीं विलोबी यानें या बेटांचा पुन्हां शोध लावला. १५९६ सालीं बॅरेंट्स यानें या प्रदेशाचें पुन्हां संशोधन केलें. या प्रदेशाचे अलीकडील संशोधक लीज स्मिथ, नॉर्डेन स्किओल्ड, सर मार्टिन कॉनवे व प्रोफेसर ग्रेगरी हे होत. १९२१ व १९२४ सालीं या प्रदेशाच्या संशोधनार्थ ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटीतर्फे सफरी करण्यांत आल्या. उत्तर ध्रुव प्रदेशांत जाणाऱ्या सफरींचा मुख्यतः मुक्काम या बेटांत असतो. स्पिट्स-बर्गेन या बेटावर १९२० पासून नॉर्वेची सत्ता मान्य करण्यांत आली आहे.

**स्पिनोझा** ( १६३२–१६७७ )—हा डच तत्त्ववेत्ता आमस्टर-डॅम येथें ज्यू कुटुंबांत जन्मला. त्याचें शिक्षण प्रथम ज्यू शिक्षकां-पाशीं होऊन ज्यू धर्म व तत्त्वज्ञान यांची माहिती त्यास झाली. पण त्या काळीं लॅटिनचें महत्त्व असल्यामुळें लॅटिनचाहि अभ्यास त्यानें केला. लॅटिनच्या अध्ययनामुळें सर्व अर्वाचीन शास्त्र व तत्त्व-ज्ञान यांच्या अध्ययनास स्पिनोझास मार्ग मोकळा झाला आणि डेकार्ट या नास्तिक तत्त्वज्ञान्याच्या ग्रंथांचा अभ्यास त्यानें केला. त्यामुळें तो नास्तिक व भौतिकवादी बनून ज्यू धर्मावरील त्याची श्रद्धा नष्ट झाली. त्याचीं मतें कळतांच त्याला धर्मबहिष्कृत करण्यांत आलें. त्याच्यावर मारेकरी घालण्यांत आले होते; त्यामुळें आमस्टरडॅम सोडून तो हेग येथें राहावयास गेला. चष्म्याच्या कांचा घासून त्यावर तो आपला उदरनिर्वाह करी. हेग येथें त्यानें एक तत्त्वज्ञान-विवेचक ग्रंथ बनविला. स्पिनोझानें दोन तीन ठिकाणीं स्थलांतर केलें, तरी त्याचा ग्रंथ चालू होता. त्यानें आपला धर्मशास्त्रमीमांसा हा ग्रंथ निनांवी प्रसिद्ध केला. व त्यांत धर्मशास्त्र व तत्त्वज्ञान या दोहोंचें मुद्देसूद पृथक्करण त्यानें केलें. नंतर त्यानें राजनीतिशास्त्रावर ग्रंथ लिहून त्यांमध्यें कायदे व राज्यकारभार या विषयांवरील आपलीं मतें मांडलीं. स्पिनोझाचा स्वभाव अत्यंत शांत व राहणी अत्यंत साधी व काटकसरीची असे. त्याचें बहुतेक आयुष्य एकलकोंडें असून विचारांत व लेखनांत चाललें होतें. त्यामुळें त्याला लवकर क्षय जडला. आणि १६७७ च्या फेब्रुवारींत तो मरण पावला. त्याचीं मतें पूर्ण ईश्वरवादी असून त्यांत कांहीं गोष्टी सृष्टिनियामक व कांहीं गूढार्थक आहेत. त्याच्या तत्त्वज्ञानाच्या पंथाचा पाया म्हणजे एक अनंत मूलद्रव्य होय. विश्वोत्पत्तीचें आदिकरण अर्थात् ईश्वर; पण ईश्वर म्हणजे निसर्ग असा त्यानें सर्वत्र अर्थ मानिला आहे. त्याच्या मुख्य ग्रंथांचीं नांवें—'एथिक्स' ( नीतिशास्त्र ), 'ट्रॅक्टेटस थिओलॉजिको पॉलिटिकस', 'ट्रॅक्टेटस पॉलिटिकस'. स्पिनोझाच्या तत्त्वज्ञानानें गोएटे, लेसिंग, शेले यांसारख्या युरोपांतील अत्यंत थोर पुरुषांवर फार परिणाम केलेला दिसून येतो.

**स्पिरिट**—मद्य पाहा.

स्पिरिट, मेथिलेटेड—शें. १० काष्ठ नफतैल ( वुडनाफ्था ) घालून तयार केलेलें विशुद्ध मद्यसार ( रेक्टिफाइड स्पिरिट ) ( एथिल अल्कोहोल ). काष्ठ नफतैलामध्यें पुष्कळसा मिथिल अल्कोहोल असल्यामुळें त्याच्या मिश्रणानें स्पिरिट पिण्याच्या निरुपयोगी होतें. मद्यार्क पाहा.

**स्पेक, जॉन हॅनिंग** ( १८२७–१८६४ )—एक ब्रिटिश भूगोलसंशोधक. त्यानें १८६२ सालीं कॅप्टन ग्रँट याच्याबरोबर आफ्रिकेंतील टँगानिका सरोवराच्या पश्चिम व उत्तर काठच्या प्रदेशाचें संशोधन केलें. आणि त्या सरोवरांतून निघणाऱ्या एका नदीचा शोध लावला. तीच श्वेत( व्हाईट ) नाईल ही नदी होय. त्यानें आपल्या ह्या धाडसी प्रवासाची आणि प्रदेशसंशोधनाची माहिती पुढील पुस्तकांत दिली आहे: 'जर्नल ऑफ दि डिस्कव्हरी ऑफ दि सोर्सेस ऑफ दि नाईल' ( नाइल उगमाच्या संशोधनाचें इतिवृत्त ) आणि 'व्हॉट लेड टु दि डिस्कव्हरी ऑफ दि सोर्सेस ऑफ दि नाईल' ( नाईलच्या शोधाला काय कारण घडलें ).

**स्पेन**—युरोपच्या नैर्ऋत्य टोंकाचें एक लोकसत्ताक राज्य. क्षेत्रफळ १,९०,५०० चौरस मैल. याचा मोठा समुद्रकिनारा फक्त भूमध्यसमुद्रावर आहे व थोडासा उत्तरेस बिस्केच्या उपसागरावर आहे. आणि कांहीं अॅटलांटिक महासागरावर आहे. पिरिनीज पर्वतांची रांग फ्रान्स व स्पेन यांच्यामधून गेली आहे. कॅनरी व बॅलरिक बेटांचा समावेश स्पेनमध्येंच होतो. आफ्रिकेंतील

स्पेनच्या वसाहती ८,००,००० चौ. मै. क्षेत्रफळाच्या आहेत. यापैकीं मोरोक्को आणि गिनी या दोन महत्त्वाच्या आहेत. स्पेनच्या उत्तरेस व दक्षिणेस पर्वतश्रेणी असून देशाचा मध्यभाग बहुतेक मोठें मैदानच आहे. सहा नद्या व त्यांना मिळणाऱ्या उपनद्या यांनीं सर्वत्र पाणी खेळलें आहे. स्पेन हा प्राधान्येंकरून शेतीचाच देश आहे. गहूं, बार्ली, राय, ओट हीं महत्त्वाचीं व मोठीं पिकें आहेत. द्राक्षांचे मळे, नारिंगें, लिंबें, बदाम, ऑलिव्ह आणि इतर फळांची लागवड होते. मासेमारीचा उद्योग महत्त्वाचा आहे. लोखंड, तांबें कोळसा व शिसें यांच्या खाणी आहेत. देशांत ११ विद्यापीठें आहेत व त्यांत मॅड्रिड सर्वांत मोठें आहे.

स्पेनमध्यें अगदीं प्राचीन काळीं मनुष्यवस्ती असल्याचें पुष्कळ अवशेषांवरून दिसून येतें; तथापि त्याबद्दल विशेष संशोधन होऊन इतिहास-लेखन झालेलें नाहीं. फोनिशिअन लोकांनीं याच्या किनाऱ्यावर वसाहत केली तेव्हांपासूनचा इतिहास नीट सांपडतो. मागाहून ग्रीक व कार्थेजिनिअन लोक आले; त्यांचाहि रोमन लोकांनीं नायनाट केला व स्पेन हा आपल्या साम्राज्याचा एक भाग केला. इ. स. ५२० ते ७२० या २०० वर्षांच्या काळांत व्हिजिगॉथ लोकांचें राज्य नांदलें. त्यांच्यामागून मूर लोकांची विशेष महत्त्वाची कारकीर्द झाली. दक्षिणेकडील भाग मूर लोकांनीं कबजांत आणला; परंतु उत्तरेकडे सुमारें १,००० ख्रिश्चन संस्थानांचा उदय झाला. त्यांतून कांहीं कांहीं संस्थानें वेळोवेळीं एकमेकांत विलीन होत गेलीं व १४७९ मध्यें या क्रियेनें उच्चांक गांठला. अरगॉन संस्थानाचा फर्डिनांड यानें कास्टिल संस्थानाच्या इसाबेलाशीं लग्न लावल्यानें त्यावेळच्या दोन प्रमुख गटांचें ऐक्य झालें आणि मूर सत्तेचा नायनाट झाला. लवकरच कोलंबसानें अमेरिकेचा शोध लावल्यानें अमेरिकन वसाहतीकरितां बाहेर जाण्यास स्पॅनिश लोकांस वाव मिळाला.

सोळाव्या शतकांत दक्षिण अमेरिकेंतून प्राप्त होणाऱ्या संपत्तीनें स्पेन हा युरोपमध्यें एक मोठा (धनाढ्य) देश झाला होता. या वेळीं (१५१६ ते १५६५) पांचवा चार्लस् राज्यावर होता. त्याच्यामागून दुसरा फिलिप गादीवर आला. त्याच्या कारकीर्दींत स्पेनचें वैभव उतरूं लागलें. तथापि त्याची जाणीव फारशी झाली नाहीं. १५८० मध्यें स्पेन व पोर्तुगाल या दोन देशांचें एकीकरण झालें व त्यामुळें पोर्तुगीज अमेरिकन वसाहतीहि स्पेनकडे आल्या. १७०० मध्यें हॅप्सबर्ग घराण्यांतील शेवटचा राजा मयत झाल्यावर गादीवर कोणीं बसावें यावरून मोठें दीर्घकालीन युद्ध झालें. तें 'स्पॅनिश वॉर ऑफ सक्सेशन' (स्पेन वारसा युद्ध) म्हणून प्रसिद्ध आहे. १७१४ मध्यें त्याचा शेवट झाला व बुरबॉन घराण्यांतील पांचवा फिलिप यास राजा म्हणून मान्य करण्यांत आलें. स्पेनला आतां मागचें सोळाव्या शतकांतलें महत्त्व राहिलें नव्हतें, तरी नेपोलियननें तें पादाक्रांत करून तेथें आपल्या जोसेफ नांवाच्या भावाला राज्य देईपर्यंत स्पेननें युरोपियन राजकारणांत आपला हात चांगलाच ठेवला होता. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभास दक्षिण अमेरिकेंतील स्पॅनिश वसाहतींपैकीं बहुतेकांनीं आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें होतें व त्यांचा स्पेनचा संबंध तुटला होता. त्याच शतकाच्या अखेरीस क्युबन व फिलिपाईन बेटें स्पॅनिश-अमेरिकन युद्धामध्यें स्पेनच्या हातचीं गेलीं. १८३३ व १८६८ सालीं गादीवर राणी असावी कीं राजा असावा यावरूनच यादवी युद्धें झालीं. शेवटीं सातव्या फर्डिनाडची कन्या इसाबेला हिला राज्यपद मिळालें. १८८६ ते १९३१ या काळांत तेरावा अल्फॉन्सो गादीवर होता. त्याच्या राज्यांत विशेषतः महायुद्धानंतरच्या काळांत विशेष असंतोष माजला होता. कॅटॅलोनियामध्यें बार्सिलोना येथें असंतोषाचें उगमस्थान व कार्यकेन्द्र होतें. सन १९२३ ते १९३० या काळांत डिक्टेटरच्या तंत्रानें कारभार चालला होता. १९३१ मध्यें राजानें राज्यत्याग व देशत्याग केला. मधल्या काळांत मिश्रसमाजसत्तावादी सरकार आणि धर्मसत्ताधिकारी चर्च यांचें जमेना. त्यामुळें १९३३ मध्यें कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षाचें सरकार अधिकारावर आलें. १९३४ मध्यें कॅटॅलोनिया स्वतंत्र झाला. १९३५ मध्यें लिबरल पक्षाला बहुमत प्राप्त झालें परंतु त्याला तें राखतां आलें नाहीं. १९३६ मध्यें फॅसिस्ट, राजसत्तावादी, कॉन्झर्व्हेटिव्ह, वगैरे पक्षापक्षांचा गलबला होऊन देशांत भयंकर यादवी युद्ध झालें. शेवटीं जनरल फ्रँको (पाहा) याच्या हातीं सर्व सत्ता केन्द्रीभूत झाली व तो अद्यापि सर्वाधिकारी आहे. दुसऱ्या महायुद्धांत त्यानें पूर्ण तटस्थता ठेविली होती.

स्पॅनिश भाषा व वाङ्मय—स्पॅनिश भाषा ही रोमान्स किंवा रोमानिक भाषावर्गांतील आहे. ही मेक्सिको व बहुतेक दक्षिण अमेरिका यांतून चालते. प्राचीन काळीं स्पॅनिशच्या अनेक बोली (उदा., गॅलिशिअन, कॅटालन, आस्टोरियन, इ.) होत्या, पण त्यांतून कॅस्टिलिअन बोलीची प्रगति होऊन ती अधिकृत स्पॅनिश भाषा बनली.

स्पेनचें राष्ट्रीय वाङ्मय १२ व्या शतकापासूनचें उपलब्ध आहे. याच काळचें 'पोएमा देल सिद्' हें महाकाव्य असून त्यांत एका राष्ट्रवीराचे पराक्रम वर्णिले आहेत. अलेक्झांडर दि ग्रेट व टायरचा अपोलोनिअस यांवर रचिलेलीं काव्यें याच काळांतील होत. १४ व्या शतकांतील श्रेष्ठ कवि म्हणून जुआन रुइझ (१३००-१३५१) याचें नांव घेतां येईल. स्त्रीदाक्षिण्यमय, वीरवृत्ती (शिव्हलरी) चें पहिलें काव्य 'आमादिस् द गोला' हें १६ व्या शतकांतलें होय. फर्डिनांड आणि इसाबेला याच्या कारकीर्दींतच प्रथम स्पॅनिश वाङ्मयाला विशेष दर्जा प्राप्त झाला. या वेळचे प्रमुख लेखक म्हणजे जुआन बोस्कन-आल्मो गार्व्हेर,

दीगो द मेंदोझा, गार्सिलासो द व्हेगा, फर्नांदो द हेरारा व हेरांदो द आक्यूना हे होत. या पेट्रार्कियन संप्रदायाच्या पुरस्कर्त्याविरुद्ध क्रिस्तोवाळ द कास्टिलेजो हा होता.

या काळांत कादंबरी-प्रकाराची मोठी प्रगति झाली. दाक्षिण्य-वृत्तीचें विडंबन 'डॉन क्विझोट' या मिग्वेल सर्व्हान्टेसच्या कृतींत दिसून येतें. लोपे द व्हेगा (१५६२-१६३५) हा नाट्यकार होईपर्यंत नाटकें हीं अर्वचट धार्मिक व अगदीं बाष्कळ अशीं असत. लोपेनंतर व्हेलेझ द ग्वेव्हारा, गाब्रिएल तेलेझ व जुआन रुइझ द आलार्कोन हे त्याच्या वळणांतील नाटककार होत. या नाट्य-वाङ्मयाला अगदीं सुसंस्कृत पूर्णता आलेली जी दिसते ती पेड्रो काल्देरोन द ला बार्सा (१६००-१६८१) याच्या काव्य-मय व तत्त्वज्ञानपर नाटकांत होय. पेड्रोचेंहि अनुकरण बरेंच झालें. मोरेटो, द सोलिस व रोक्सास द कास्रो हे यांपैकींच सांगतां येतील.

राष्ट्राला अवकळा आल्याबरोबर साहित्यालाहि ती प्राप्त होणें स्वाभाविक होतें. पण बुर्बोन राजे गादीवर आल्यावर फ्रान्सच्या अनुषंगानें स्पॅनिश वाङ्मयाला नवी कळा आली. इग्नासिओ द लुझान याचा 'पोएटिका,' ग्रेगोरिओ द मायान्स याचा 'रेटोरिका' व बेनितो फेजू याचा 'तीत्रो क्रितिको' हे ग्रंथ नवचैतन्याचे द्योतक म्हणतां येतील. १८ व्या शतकाचा उत्तरार्ध आणि १९ व्या शतकाचा प्रारंभ या काळांत स्पॅनिश काव्यावरहि फ्रेंच छाप दृग्गोचर पडते. वाल्देज, सिएनफ्युएगोज, इरिआर्त, गोन्झालेझ, मोरातिन, इ. या वेळच्या प्रमुख कवींचीं नांवें घेतां येतील. फ्रान्समधील अद्भुतरम्य (रोमॅन्टिक) चळवळीचाहि संसर्ग इकडे लागलेला दिसतो. झोरिला, एस्प्रोन्सेदा, दिआझ, एस्कोसुरा व पाचेको हे कवी या संप्रदायांतील आहेत. अभिजात कवींमध्यें क्विन्ताना, रीनोसो, काल्डेरोन व कार्व्हाजाल हे येतात. जोसे द लारा हा व्याजोक्तिपर लेखन करणारा तर मानुएल ब्रेतोन द हेरेरोस हा नाटककार होता. नांव घेण्यासारखा इतिहासकार म्हणजे क्वाव्हिगेरो होय.

आधुनिक साहित्यिकांत रामोन द काम्पोआमोर (१८१७-१९०१) व न्युनेझ द आरेक (१८३४-१९०३) हे कवी; व्हिसेन्त ब्लास्को इबानेझ, लुइ कोलोमा (१८५१-१९१५), रिकार्दो ले ऑन (१८७७), साल्व्हादोर न्युएदा (१८५७) व जुआन मेनेदेझ पिदाळ (१८६१-१९१५) हे लेखक; व नोबेल पारितोषिक मिळविणारा नाटककार जासिन्तो बेनाव्हेंन्ते हे ठळक साहित्यिक होत.

गेल्या कित्येक वर्षांपासून युरोपांत युद्धजन्य अशांतता असल्या-मुळें सर्व टिकाऊ वाङ्मय इतर देशांतल्याप्रमाणेंच स्पेनमध्येंहि निर्माण होत नाहीं. प्रासंगिक व राजकारणीच ग्रंथ फार दिसतात.

**स्पेन्सर, एडमंड** (१५५२-१५९९)—एक इंग्रज कवि. याचें शिक्षण मर्चंट्स टेलर स्कूल व केंब्रिजचें पेंब्रोक कॉलेज यांत झालें. त्याचा पहिला कवितासंग्रह 'दि शेपर्ड्स कॅलेंडर' हा निनांवी असून तो सिडनेला अर्पण केलेला आहे. या कवितांत स्पेन्सरच्या प्राचीन ग्रीक व लॅटिन, इटालियन, फ्रेंच, व इंग्लिश काव्यांच्या अभ्यासाचें आणि त्याच्या राजकीय प्रॉटेस्टंट मतांचें प्रतिबिंब पडलें आहे. नंतर त्यानें 'दि फेअरी क्वीन' हें महाकाव्य लिहिण्यास सुरुवात केली व त्याचीं पहिलीं तीन पुस्तकें १५९० सालीं प्रसिद्ध झालीं. हें अद्भुतरसात्मक काव्य त्वरित लोकप्रिय झालें. त्याच्या शोकगीतांपैकीं 'दि रुइन्स ऑफ टाइम', 'मदर ह्युबर्ड्स टेल', 'व्हर्जिल्स नॅट' व 'म्युओ पॉट मॉस' हीं गीतें उत्तम आहेत. 'दि फेअरी क्वीन' या काव्याचीं पुढील तीन पुस्तकें १५९६ सालांत प्रसिद्ध झालीं. त्याचा गद्यग्रंथ 'व्ह्यू ऑफ दि प्रेझेंट स्टेट ऑफ आयर्लंड' (आयर्लंडची सद्यःस्थिति) त्याच्या मृत्यूनंतर १६३३ सालीं प्रसिद्ध झाला. स्पेन्सरच्या काव्यांत सर्वत्र सारखेच गुण दिसून येतात. ते गुण म्हणजे थोर ध्येयवाद, चोंचक विनोद, शिष्टसंमत व नाजूक शृंगाररसात्मक वर्णनें, आणि सुरेख व गोड पद्यरचना हे आहेत.

**स्पेन्सर, हर्बर्ट** (१८२०-१९०३)—हा प्रसिद्ध इंग्रज तत्त्ववेत्ता डर्बी येथें जन्मला. त्याचें उच्च शिक्षण स्वसंपादित होतें. १८३७ ते १८४६ पर्यंत लंडन-बर्मिंगहॅम रेल्वेमध्यें इंजिनिअरच्या कामावर तो होता. आणि १८४८ ते १८५३ पर्यंत 'एकॉनॉमिस्ट' (अर्थशास्त्रज्ञ) या मासिकाचा तो उपसंपादक होता. १८५० त प्रसिद्ध केलेल्या 'सोशल स्टॅटिक्स' या ग्रंथांत योग्यतमातिजीवन (सर्व्हायव्हल ऑफ दि फिटेस्ट) या सिद्धान्ताची त्यानें मांडणी केली. १८५५ मध्यें 'मानसशास्त्राचे मूलसिद्धान्त' हें त्याचें पुस्तक बाहेर पडलें होतें. १८६० सालीं त्यानें आपल्या 'संयोजक तत्त्वज्ञान' (सिन्थेटिक फिलॉसफी) या ग्रंथाची योजना प्रसिद्ध करून शारीरस्वास्थ्याकडेहि लक्ष न देतां त्यानें त्या ग्रंथाचा तिसरा व शेवटचा 'समाजशास्त्राचे मूलसिद्धान्त' हा भाग १८९६ मध्यें प्रसिद्ध केला; डार्विन, हक्सले यांच्यासारखे प्रसिद्ध शास्त्रज्ञ स्पेन्सरला मान देत असत. यावरून इंग्रजी वैचारिक इतिहासांत स्पेन्सरचें महत्त्व किती आहे हें उघड होतें. सर्व विश्व उत्क्रांतीच्या तत्त्वानुसार चाललें आहे, व प्रगति ही परिस्थितीशी एकसारखी अनुगत असते, अशासारखीं व्यापक मतें स्पेन्सरनें पुढें मांडलीं आहेत.

**स्फट लोह**—(बॉक्साइट). हा एक खनिज घटक असून तो स्फट प्राणिदा (ॲल्युमिनम ऑक्साइड) पासून पाण्याच्या क्रियेनें बनलेला असतो. यापासून ॲल्युमिनम ही धातु काढतात. तसें याचा फार उष्णता देणाऱ्या भट्ट्यांच्या विटा तयार

उपयोग करतात. तसेंच यापासून तुरटी निघते. आयर्लंड व आर्कन्सस (अमेरिका) या देशांत फार मोठ्या प्रमाणांत हा धातु सांपडतो. हिंदुस्थानांतहि विशेषतः दक्षिण महाराष्ट्रांत असे खडक आहेत. पण अद्यापि त्यांचा कोणी उपयोग करून घेतला नाहीं.

**स्फटिकजलहीनता**—(एफ्लोरेसेन्स). कांहीं पदार्थ उघड्या हवेवर ठेवले तर त्यांच्यांतील पाणी उडून जातें व त्यांचें स्फटिकमय स्वरूप नाहींसें होऊन त्यांची पूड तयार होते. उदा., वॉशिंग सोड्याचे खडे हवेंत उघडे ठेवले तर प्रथम त्यांचें पारदर्शकत्व नाहींसें होतें; व कालांतरानें त्यांतील पाणी नाहींसें होऊन त्यांची पूड बनते. पाणी घालविण्याच्या या गुणधर्मास स्फटिकजलहीनता म्हणतात.

**स्फटिक, स्फटिकशास्त्र**—(क्रिस्टल, क्रिस्टलॉग्रफी). रसायनशास्त्रांत आणि खनिजशास्त्रामध्यें ज्या पदार्थांच्या कणांच्या अंगीं असलेल्या परस्पर-आकर्षणशक्तीमुळें त्यांचा आकार समरूपी होतो व त्यांचे पृष्ठभाग समतल बनतात अशा पदार्थास स्फटिक म्हणतात. सामान्यतः द्रवरूपांत असलेल्या एखाद्या द्रव्यास घन-स्वरूप दिल्यामुळें स्फटिक बनत असतें. किंवा एखाद्या द्रवणाचें ऊर्ध्वपातन केल्यानेंहि स्फटिक बनतें. स्फटिकाचा मुख्य गुणधर्म म्हटला म्हणजे त्याच्या आकाराचा सारखेपणा हा होय. बहुतेक स्फटिक एखादा बिंदु, पृष्ठभाग किंवा अक्ष याच्याशीं संबद्ध असे समस्वरूपी बनलेले असतात. निरनिराळ्या स्फटिकांचें वर्णन करण्याच्या शास्त्राचा पाया प्रथम पॅरिसमध्यें रोमे द लील आणि रेने जुस्त होई यांनीं १७७२ मध्यें घालून त्याची १८२२ पर्यंत वाढ केली. स्फटिकांचे कोन मोजण्याकरितां नवीन नवीन यंत्रें व उपकरणें बनवावीं लागलीं व त्यांच्या आधारावर या शास्त्राची उभारणी करण्यांत आली. या कोनांच्या सारखेपणामुळें स्फटिकाच्या मध्यबिंदूंतून जाणारे व परस्परांस छेदणारे अक्ष असतात या गोष्टींचें ज्ञान झालें. होई यानें या स्फटिकासंबंधीं एक नियम असा शोधून काढला कीं, जर आपण कोणत्याहि स्फटिकामध्यें तीन अक्ष सोईस्कर असे कल्पिले व त्यांपासून त्यांच्या निरनिराळ्या पृष्ठ-भागांचें या अक्षांच्या छेदनबिंदूपासून परस्पर अंतर निश्चित केलें तर त्याच जातीच्या द्रव्याचा दुसरा कोणताहि स्फटिक या अंतराच्या विशिष्ट पटीनें लहान किंवा मोठा असतो. अशा तऱ्हेनें आपण ठरविलेल्या एखाद्या शंक्वात्मक समपृष्ठावर मूलमानांचीं अंतरें आपण ठरवून खुणा केल्या व त्या अंतरांमध्यें जरी परस्पर फरक असला तरी याच प्रकारच्या दुसऱ्या स्फटिकांतील शंक्वाकृती पृष्ठभागामध्यें या अक्षास छेदणाऱ्या रेषेचें प्रमाण आपल्या मूल-मानांच्या विशिष्ट पटींमध्यें असतें. या नियमाप्रमाणें आतापर्यंत सर्वच स्फटिकांच्या निरनिराळ्या फक्त ३२ जाती असतात असें आढळून आलें आहे. व या सर्व जाती निसर्गामध्यें नैसर्गिक स्वरूपांत सांपडलेल्या आहेत. या सर्व जाती पूर्वींच्या सहा पद्धती-मध्यें विभागून देतां येतात. परंतु अलीकडे षट्कोनाकृति पद्धतीचे दोन वर्ग केल्यामुळें सात पद्धती मानण्यांत येतातः (१) घना-कृति अथवा समपद्धति—या पद्धतीच्या स्फटिकामध्यें सारख्याच लांबीचे तीन अक्ष असून ते परस्परांस काटकोनांत छेदतात. हे स्फटिक सामान्यतः घनाकृति असतात. मीठ, तुरटी व फ्लुअरस्पार (शिरगोळा) यांचे स्फटिक या पद्धतीचे असतात. (२) चतुष्कोनी पद्धति—या पद्धतीमध्यें दोन अक्ष सारख्याच लांबीचे असून तिसरा अक्ष त्यापेक्षां लांब किंवा आंखूड असतो आणि हे सर्व अक्ष परस्परांशीं काटकोनांत असतात. अशा प्रकारचे स्फटिक वंगाश्म (टिनस्टोन) आणि ताम्रसुवर्णमाक्षिक (कॉपर-पायराइट) यांचे आढळतात. (३) समभुज चतुष्कोनपद्धति—यांतील तिन्ही अक्ष असमान असतात पण परस्परांस काटकोनांत छेदतात. अशा तऱ्हेचें स्फटिक पालाशनत्रित (पोटॅशियमन्नायट्रेट) आणि मग्नगंधकित (मॅग्नेशियम सल्फेट) यांचे असतात. (४) षट्कोनपद्धति—यामध्यें चार सारख्याच लांबीचे अक्ष असून त्यांतील तीन एकाच समपृष्ठा-मध्यें परस्परांस १२०° कोनांत छेदतात. चौथा अक्ष या सम-पृष्ठाशीं काटकोनांत असतो. अशा तऱ्हेचे स्फटिक बर्फ, गार व सफेत सुरमा (कॅल्सस्पार) यांचे असतात. (५) एकप्रवर्त(मोनो-क्लिनिक) पद्धति—यामध्यें तिन्ही अक्षांची लांबी भिन्न असते व त्यांपैकीं दोन परस्परांशीं काटकोन करीत नसून तिसरा या दोन अक्षांच्या समपृष्ठाशीं काटकोन करीत असतो. या पद्धतीचें स्फटिक हिराकस (फेरस सल्फेट) आणि जिप्सम यांमध्यें आढळतात. (६) त्रिप्रवर्तपद्धति—या पद्धतीमध्यें तिन्ही अक्षांची लांबी भिन्न असून ते तिन्ही परस्परांशीं काटकोन करीत नाहींत. या पद्धतीचे स्फटिक उज्जेत ताम्रगंधकित(हायड्रेटेड कॉपर सल्फेट) आणि मंगलकांत (मँगानिज-स्पार) यांमध्यें आढळतात.

स्फटिकामध्यें असलेल्या परमाणूंच्या रचनेचें व व्यवस्थेचें ज्ञान अलीकडे 'क्ष' किरणांच्या साहाय्यानें केलेल्या प्रयोगामुळें आणि संशोधनामुळें पुष्कळच वाढलें आहे. ही कल्पना प्रथम १९१२ मध्यें लाऊए या जर्मन पदार्थविज्ञानशास्त्रज्ञानें काढली. परंतु यांतील बरेच सिद्धान्त सर डब्ल्यू. एच्. ब्रॅग आणि त्याचा मुलगा डब्ल्यू. एल्. ब्रॅग यांनीं शोधून काढले. स्फटिकावर 'क्ष' किरण पाडून ज्याप्रमाणें प्रकाशशलाकेंतील प्रकाशलहरींचें प्रकाश-अपेरणा-वरून पृथक्करण करण्यांत येतें, त्याप्रमाणेंच स्फटिकामध्यें असलेल्या परमाणूंमधील रचनेचें व अंतराचें ज्ञान करून घेण्यांत येतें. या प्रयोगावरून असें सिद्ध झालें आहे कीं, मिठासारख्या पदार्थांच्या स्फटिकांमध्यें रचनेचा मूळ घटक परमाणु नसून अणु हा आहे. सिंधू (सोडियम)चा अणु आणि हरा(क्लोरीन)चा अणु या दोहोंचें अयोनीकरण (अयोनाइझ्ड) होतें आणि दोहोंचेंहि स्थान निश्चित

होतें. आणि त्यांचा अंतर्गत आकार किंवा अंतर्गत जाळीदार रचना निश्चित असते. आणि प्रत्येक सिंधूच्या परमाणूभोंवतीं सहा हराचे परमाणू असतात. व प्रत्येक हराच्या परमाणूभोंवतीं सहा सिंधूचे परमाणू असतात.

**स्फिंक्स**—हा ग्रीक व ईजिप्शियन पौराणिक कथांतील एक अवाढव्य प्राणी आहे. ग्रीक पौराणिक कथांत याचें वर्णन असें आहे कीं, त्याचें शरीर सिंह प्राण्याचें असून त्याला पंख आहेत; आणि छाती व त्याच्या वरचा सर्व भाग स्त्री-शरीराचा आहे. हीरानें थेबन लोकांना शिक्षा करण्याकरितां स्फिंक्सला पाठविलें. स्फिंक्सनें थेबन लोकांना एक कोडें घातलें आणि तें सोडविण्याचा प्रयत्न करून त्यांत ज्या थेबनला यश देणार नाहीं त्याला तो खाऊन टाकी. तें कोडें असें—"असा कोणता प्राणी आहे कीं, जो सकाळीं चार पायांनीं चालतो, दुपारीं दोन पायांनीं चालतो, आणि संध्याकाळीं तीन पायांनीं चालतो!" या कोड्याचें बरोबर उत्तर (मनुष्य) ईडिपस यानें दिलें. ईजिप्तमधील स्फिंक्सचा सर्वांत मोठा पुतळा गिझेह येथील पिरॅमिडजवळ असून त्याची लांबी सुमारें १५० फूट आहे, आणि उंची ६३ फूट आहे. आणि हें सर्व त्याचें शरीर एका प्रचंड दगडांत खोदून काढलेलें आहे. त्याचे पंजे पुढल्या बाजूला ५० फूट लांबीचे असून ते निराळ्या दगडाचे केलेले आहेत. ह्या ईजिप्शियन स्फिंक्सचा ग्रीक पौराणिक कथेशीं कांहीं एक ऐतिहासिक संबंध नाहीं.

**स्फुर**—(फॉस्फरस). एक अधातु मूलद्रव्य. याचा परमाणुभारांक ३१.०४ आहे. ह्याचें प्रमुख संयुक्त खटस्फुरित (कॅल्शियम फॉस्फेट) असून तें जल (आपटाइट), स्फुरकाश्म (फॉस्फोराइट), अश्मीभूतविष्ठा (कॅप्रोलाइट) वगैरे खनिजांत, प्राण्यांच्या हाडांत आणि कांहीं झाडांत आणि जमिनींत सांपडतें. स्फुरित (फॉस्फेट), सिकता (सिलिका) आणि कर्ब (कार्बन) ह्यांच्या मिश्रणाला विजेच्या भट्टींत चांगली उष्णता देऊन स्फुर तयार करतात. हा प्रथम उष्णतेमुळें वायुरूपांत प्रगट होतो व नंतर पाण्यांत गार केल्यावर घट्ट होतो. स्फुराचे पिवळा आणि तांबडा असे दोन प्रकार आहेत. पिवळा स्फुर अत्यंत ज्वालाग्राही असल्यामुळें हवेवर उघडा राहिला तर सहज पेट घेतो, त्यामुळें त्याला नेहमीं पाण्याखालीं ठेवावें लागतें. पूर्वी काड्याच्या पेट्या तयार करण्यासाठीं पिवळ्या स्फुराचा उपयोग करीत असत. पण कामगारांवर त्याचा अनिष्ट परिणाम होतो असें दिसून येऊं लागल्यावर त्याच्याऐवजीं त्याचें गंधित (सल्फाइड) वापरूं लागले. पिवळा स्फुर पुष्कळ वेळ हवेचा संपर्क न होतां तापवला म्हणजे तांबडा स्फुर तयार होतो. पिवळा स्फुर अतिशय विषारी आहे. पण तांबडा नाहीं. तांबडा स्फुर आतां काड्यांच्या पेट्या तयार करण्यासाठीं विशेष उपयोगांत आहे.

**स्फुरप्रकाश**—(फॉस्फोरेसेन्स) ज्वलन न होतां प्रकाशमय होण्याची पदार्थांची क्रिया. काजव्यांचा प्रकाश हा या प्रकारचाच प्रकाश होय. समुद्राच्या तळाशीं गाढ अंधारांत वावरणारे कांहीं मासे अनेच स्वयंप्रकाशी असतात. कांहीं पदार्थ दुसरीकडून प्रकाशकिरण मिळत असतांनाच प्रकाश देतात. त्याला फ्लुओरेसेन्स म्हणतात. कित्येक पदार्थ मूळचा प्रकाश दूर केला तरी प्रकाश देत राहतात. त्यावेळीं त्यांना फॉस्फोरेसेन्स म्हणतात. बेरियम सल्फाइड व कॅल्शियम हे अतिशय स्वयंप्रकाशी आहेत, तर हिरे उन्हांत ठेवल्यावर कांहीं काळ प्रकाश देतात. कांहीं खनिजांत हा स्वयंप्रकाशी गुण फारच थोडा असतो. स्वयंप्रकाश पाहा.

**स्फुरप्रकाशदर्शक**—(फॉस्फोरोस्कोप). स्फुर प्रकाशित वस्तूंची परीक्षा करण्याकरितां बॅकेरेल या शास्त्रज्ञानें हें उपकरण शोधून काढलें. या नांवाचें एक खेळणेंहि असतें. त्यायोगें अंधारांत चकाकणाऱ्या वस्तू दाखविण्यांत येतात.

**स्फुराम्ल**—(फॉस्फॉरिक ॲसिड). एक त्रिक्षाराम्ल (ट्रायबेसिक ॲसिड). हाडें आणि गंधकाम्ल (सल्फ्युरिक ॲसिड) ह्यांपासून हें तयार करतात. औषधांत ह्याचा सौम्य स्वरूपांत उपयोग तहान मारण्यासाठीं व जठराग्निवर्धक म्हणून करतात.

**स्फुरित**—(फॉस्फेट). स्फुराम्लाचें लवण. ह्यांचा खतासाठीं विशेष उपयोग होतो. स्फुरितांपैकीं सिंधु (सोडियम), खट (कॅल्शियम) आणि मग्न (मॅग्नेशियम) स्फुरितें महत्त्वाचीं आहेत.

**स्फोटकें**—(एक्स्प्लोझिव्हज्.) आघात केला असतां किंवा आंच दिली असतां सुलभतेनें आणि एकदम स्फोट होऊन पुष्कळशी उष्णता आणि त्याबरोबर स्थायी (स्टेबल) पदार्थ (बहुधा वायुरूप पदार्थ) तयार होतात. स्फोटक द्रव्यांच्या उपयोगाप्रमाणें त्याचें वर्गीकरण करतात. पण हें वर्गीकरण पुष्कळसें सामान्य स्वरूपाचें असतें. नीच (लो) स्फोटकांना आंच दिली म्हणजे स्फोट होतो, आणि आसपासच्या वस्तू दूरवर फेंकल्या जातात. उच्च (हाय) स्फोटकाचा आघातानें स्फोट होतो; व एका क्षणांत सर्व द्रव्य जळून मर्यादित ठिकाणींच त्याचा जोराचा धक्का बसतो. नाविक आणि सैनिक दलासाठीं लागणारीं स्फोटकद्रव्यें उच्च असतात, किंवा प्रेरक (प्रॉपेलंट) हि असतात. शिकारीसाठीं लागणारीं स्फोटक द्रव्यें प्रेरकांच्याच वर्गांतील असतात.

नीच स्फोटक वर्गांतील उत्तम उदाहरण म्हणजे बंदुकीची दारू. हिच्यांतील प्रत्येक पदार्थ स्वतः स्फोटक नाहीं. पण त्यांचें मिश्रण मात्र स्फोटक होतें. या मिश्रणांत सोरा (सॉल्टपीटर) ७४–७५ भाग, गंधक ९ ते १२ भाग, कोळसा १२ ते १६ भाग असतो. सुरुंगाच्या दारूंत सोऱ्याचें प्रमाण कमी असून कोळसा जास्त असतो.

प्रेरक स्फोटक—नत्रकाष्ठोज (नायट्रो-सेल्युलोज) किंवा गन कॉटन, आणि नत्रमधुक (नायट्रो-ग्लिसरीन) हे दोन प्रमुख प्रेरक आहेत. नत्रकाष्ठोज कापसापासून करतात. कापूस प्रथम स्वच्छ धुऊन व वाळवून घेताल; नंतर त्यावर नत्राम्ल (१६ भाग) आणि गंधकाम्ल (७५ भाग) ह्यांच्या मिश्रणाची क्रिया १५° ते २५° शत. ला करतात. शेवटीं अम्लांचें मिश्रण बाजूला काढून नत्रकाष्ठोज पाण्यांत उकळून स्थिर (स्टॅबिलाइझ) करतात. सर्द नत्रकाष्ठोजचा स्फोट करणें शक्य असलें तरी त्याची फारशी भीति नसते. वाळल्यानंतर तो भयंकर होतो. त्याला काळजीपूर्वक वापरलें पाहिजे. नत्रमधुक नत्राम्ल (४१) आणि गंधकाम्ल (५७) ह्यांच्या मिश्रणांत ग्लिसरीन हळूहळू सोडतात. ही क्रिया होत असतांना मिश्रणाचें उष्णतामान १५° ते २२° शत. यांमध्यें ठेवावयास पाहिजे. सगळें ग्लिसरीन घालून झाल्यावर मिश्रण कांहीं वेळ तसेंच ठेवतात, त्यामुळे तयार झालेलें सर्व नत्रमधुक वर येतें. नंतर तें निराळें करून त्यांत राहिलेला अम्लांश धुऊन टाकतात. ही सर्व क्रिया धोक्याची असून प्रत्येक वेळीं काळजी घ्यावयास पाहिजे. 'किसलगुर' मध्यें नत्रमधुक शोषून घेतला म्हणजे सुरुंगाची दारू, डायनामाइट तयार होतो. कार्डाइटमध्यें नत्रकाष्ठोज (कोरडा) आणि नत्रमधुक ह्यांचें मिश्रण असून ईथर आणि अल्कोहोल ह्यांत त्याचा कणकीसारखा गोळा तयार करतात. ह्या स्फोटकांना स्थिर (स्टेबल) करण्यासाठीं त्यांच्या मिश्रणांत व्हॅसेलीन घालतात. जसा उपयोग असेल त्याप्रमाणें त्या मिश्रणाच्या जाड दोऱ्या, दोरे, किंवा फिती तयार करतात.

उच्च स्फोटक—पिक्रिक अम्ल. पहिल्या महायुद्धांत दोस्त राष्ट्रांच्याजवळ हेंच एक ह्या जातीचें प्रमुख स्फोटक होतें. हें तयार करण्याची रीत तितकीशी सोपी नसल्यामुळें आतां ह्याच्या जागीं त्रिनत्रटोलुइन (ट्रायनाट्रोटुईन–टी. एन्. टी.) वापरतात. हा पिवळट रंगाचा घनरूप पदार्थ असून विरघळत नाहीं. हा हवेंत जलद जळतो. व शांतवृत्तीचा असल्यामुळें वापरण्यालाहि फारशी भीति नाहीं.

आघातक (डेटोनेटिंग) पदार्थ—सध्यां उपयोगांत असलेल्या स्फोटकांना ठराविक जोराचा आघात केल्याशिवाय त्यांचा स्फोट होत नाहीं. त्यापेक्षां कमी जोराचा किंवा निराळ्या तऱ्हेचा आघात झाला तर, त्याचा कांहीं परिणाम होत नाहीं. त्यामुळें गोळ्यांत असे आघातक (डेटोनेटर) ठेवावे लागतात; व ते प्रायः दोन असतात. त्यांतील एक 'प्रेरका' वर आघात करतो व त्यामुळें गोळ्यांतील प्रक्षेप्य भाग (प्रोजेक्टाइल) फेंकला जातो, व दुसरा गोळ्याच्या पुढच्या 'नाकां'त असून तोफा सुटल्याबरोबर तो पेट घेतो आणि ठराविक वेळीं आंतील 'उच्च' स्फोटकावर आघात करतो. त्यामुळें गोळा त्या वेळेच्या आत जमिनीवर आला नाहीं तर वाटेंत हवेंतच तो फुटतो. आघातक तयार करण्याचें काम अतिशय नाजुक आणि भयंकर आहे. कांहीं आघातकांना, उदा., ताम्रसिरकिलीद (कॉपर ॲसिटलाइड) ओरखाडले म्हणजे कांहींना, उदा., नत्रनीलित (नायट्रोजन आयोडाइड), पिसाचा स्पर्श झाला असतां किंवा माशी चालली तरी तेवढें निमित्त पुरतें. पारद विस्फोटक (मर्क्युरी फुलमिनेट) हा नेहमींचा आघातक होय. पण तो महाग असल्यामुळें आतां लेड आक्झाईड व स्टिफनिक अम्लाचीं लवणें ह्यांचा उपयोग होऊं लागला आहे.

स्फोटकें हीं विनाशाचीं साधनें असून त्यांचा युद्धांत फार उपयोग होतो व त्यामुळेंच त्यांच्या सामर्थ्यांत फार भर पडत चालली आहे. गनकॉटन, कॉरडाइट, टी. एन्. टी. यांच्या जोडीला 'रॉकेट' (दारूचे बाण) आले आहेत. माणसाच्या सांसारिक जीवनांतहि स्फोटकांचा उपयोग होतो. खाणींतून धातू व खनिजें काढण्यास यांमुळें फार सोपें जातें. एखादी मोठी धोंड दूर करण्यासाठीं व पाण्याचे पाट काढून नेण्यासाठीं सुरुंग लावतात.

स्फोटक द्रव्यांचा कायदा—(दि एक्स्प्लोझिव्ह सब्स्टन्सेस ॲक्ट). हा कायदा १८८४ सालीं मूळ मंजूर होऊन त्यांत १९०८ सालीं दुरुस्त्या झाल्या. 'स्फोटक द्रव्य' या शब्दांत बंदुकीची दारू, नत्रमधुक (नायट्रो–ग्लिसरीन), गतिप्रेरक (डायनामिट), स्फोटक कापूस (गनकॉटन), सुरुंगाची दारू, फल्मनेट ऑफ मर्क्युरी किंवा ज्या कोणत्याहि पदार्थानें शोभेच्या दारूप्रमाणें परिणाम होतो असें कोणतेंहि द्रव्य; तसेंच धुक्याचीं निशाणें (फॉग-सिग्नल्स), आतषबाजी दारू, केपें, काडतुसें, हरप्रकारचा दारूगोळा म्हणजे बंदुकींत किंवा तोफेंत वापरण्याचें सामान, किंवा कोणत्याहि स्फोटक द्रव्याचें कोणतेंहि रूपांतर किंवा स्फोटक द्रव्यापासून तयार केलेला माल, यांचा समावेश होतो. स्फोटक द्रव्यांची आयात, निर्गत, ने–आण, विक्री, उपयोग, कबजा, किंवा स्फोटक द्रव्यांचीं तयार करण्याचीं कृत्यें व साधनें यांच्यावर नियंत्रण घालण्यासाठीं किंवा अजीबात बंदी करण्यासाठीं, आणि वरील कृत्यें करण्यास परवाने देण्यासाठीं वरिष्ठ सरकार व प्रांतिक सरकार यांनीं नियम करावे. सदर नियम किंवा लायसेन्समधील शर्ती मोडणारास शिक्षा आहेत. स्फोटक द्रव्याचा स्फोट जीविताला किंवा मालमत्तेला धोका होईल अशा रीतीनें जो इसम स्फोट करील त्याला जन्मठेप काळेपाणी, किंवा १० वर्षें कैद व दंड अशी शिक्षा आहे (कलम ३). (अ) जो इसम वरील प्रकारें कृत्य करण्याच्या हेतूनें एखादें कृत्य करील, किंवा असें कृत्य करण्याचें संगनमत करील; (ब) जो इसम वरील हेतूनें असें स्फोटक द्रव्य तयार करील, आपल्याजवळ ठेवील, त्याला स्फोट झाला नाहीं किंवा

झाला, व कोणा इसमाला किंवा मालमत्तेच्या अपायहानि झाली किंवा झाली नाहीं तरी वरीलप्रमाणें शिक्षा होईल. (कलम ४).

**स्मट्स, जॅन ख्रिश्चन** (१८७०–१९५०)—एक दक्षिण आफ्रिकेंतील लढवय्या व थोर मुत्सद्दी. त्याचें शिक्षण स्टेलेनबॉक व केंब्रिज येथें झालें आणि नंतर त्यानें दक्षिण आफ्रिकन युद्धांत (१८९९–१९०२) भाग घेतला, व तो जनरलच्या हुद्यापर्यंत चढला. तो जनरल बोथाच्या ट्रान्सव्हालचा आणि साउथ आफ्रिकन यूनियनचा राज्यकारभार चालविण्याच्या बाबतींत फार विश्वासांतला इसम होता. पहिलें महायुद्ध सुरू झाल्यावर त्यानें यूनियन सरकारचें लष्कर सुव्यवस्थित तयार केलें. १९१४ सालचें बंड मोडलें. आणि जर्मन ईस्ट आफ्रिका या रणक्षेत्रावर तो स्मिथडोरिन नंतर कमांडर झाला (फेब्रुवारी १९१६). त्या वर्षाच्या अखेरीपर्यंत त्यानें जर्मन सैन्याचा पूर्ण पराभव केला आणि तेथील जर्मन लष्करी सामर्थ्य नष्ट करून टाकलें. पुढें इंपीरिअल वॉर कॅबिनेटमध्यें तो दक्षिण आफ्रिकेतर्फे प्रतिनिधि होता, पॅरिस येथील तहपरिषदेमध्यें (चौथामह) वकील होता, आणि दक्षिण आफ्रिकन यूनियनचा १९१९ ते १९२४ पर्यंत मुख्य प्रधान होता. पुन्हां १९३२ ते १९३९ पर्यंत मुख्य प्रधान होता. दुसऱ्या महायुद्धांत संरक्षक सैन्याचा तो प्रमुख (फील्ड मार्शल) होता. १९४३ च्या निवडणुकींत त्याचा पक्ष विजयी झाला. राष्ट्रसंघांतील दक्षिण आफ्रिकन सरकारची बाजू तो फार जोरानें मांडीत असे. त्याचा पक्ष अधिकारावर अलीकडे नव्हता तरी स्मट्सचें वजन इंग्लंडांतल्या चर्चिलप्रमाणें शासनसंस्थेला जाणवत असे.

**स्मर्ना**—तुर्कस्तान, आशियामायनर मधील एक बंदर आणि प्रमुख व्यापारी शहर. हें प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहे. होमरचा जन्म येथें झाला व ख्रिस्ती धर्माला प्रथम वाव या ठिकाणींच मिळाला. बायझॅन्शियन साम्राज्याच्या वडामोडींत याचाहि समावेश असे. या शहरांतील ख्रिस्ती लोकांचें तुर्कीपासून रक्षण करण्यासाठीं १९१९ सालीं ग्रीसनें हें आपल्या ताब्यांत घेतलें, पण केमाल पाशानें तें परत मिळविलें.

या ठिकाणीं कांहींहि कारखाने नाहींत पण व्यापार मोठा आहे. येथून फळें, धान्य, तंबाखू, अफू, लोकर, कापूस, कातडीं, वगैरे माल बाहेर रवाना होतो. बहुतेक व्यापारी संस्था ब्रिटिश आहेत. लो. सं. दोन लाखावर आहे.

**स्माईल्स, सॅम्युएल** (१८१२–१९०४)—एक ब्रिटिश ग्रंथकार. हा वैद्यकी शिकला असून वाङ्मयाकडे वळला. त्याचे ग्रंथ मुख्यतः शीलसंवर्धन, सुखी समृद्ध जीवन, यांबद्दलचे आहेत; ते म्हणजे 'सेल्फ–हेल्प' (स्वावलंबन), 'लाइव्हज ऑफ दि इंजिनीयर्स' (इंजिनियरांचीं चरित्रें), 'इंडस्ट्रिअल बायॉग्रफी' (औद्योगिक चरित्रकोश), 'लाइव्हज ऑफ बोल्टन अँड वॅट', 'कॅरॅक्टर' (शील) आणि 'थ्रिफ्ट' (मितव्यय) हे होत.

**स्मॉलेट, टोबियस जॉर्ज** (१७२१–१७७१)—एक ब्रिटिश कादंबरीकार. त्याचें शिक्षण डम्बार्टन स्कूल व ग्लासगो युनिव्हर्सिटी यांत झालें. त्यानें १८ व्या वर्षी 'दि रेजिसाइड' (राजहत्या) हें दुःखान्त नाटक स्कॉटलंडचा पहिला जेम्स राजा याच्या मृत्यूबद्दलचें लिहिलें. पण तें यशस्वी झालें नाहीं. तो १७३९ सालीं लंडनला गेला, व तेथें आरमारामध्यें त्यानें २ वर्षे एका शस्त्रक्रिया करणाऱ्या डॉक्टरच्या हाताखालीं नोकरी केली; आणि पुढें लंडनमध्यें शस्त्रक्रियेचा डॉक्टर म्हणून धंदा सुरू केला, परंतु त्याचा धंदा चालेना. नंतर १७४८ सालीं त्यानें आपली 'दि ॲडव्हेन्चर्स ऑफ रॉडरिक रँडम' ही मोठी कादंबरी बरीचशी आत्मचरित्रवर अशी प्रसिद्ध केली. त्यांत ब्रिटिश खलाशाचें अतिशय उत्कृष्ट वर्णन आहे. या कादंबरीला चांगलें यश लाभल्यामुळें त्यानें 'दि ॲडव्हेन्चर्स ऑफ पेरेग्रिन पिकल' ही दुःखान्त कादंबरी १७५१ सालीं प्रसिद्ध केली. तिची रचना शिथिल असली, तरी ती चांगली कादंबरी आहे. आणि त्यांत कमांडर ट्रुनीयन याच्या मरणाच्या वेळची हकीगत फारच उत्तम वर्णिली आहे. यांशिवाय त्यानें आणखी कांहीं कादंबऱ्या लिहिल्या. त्यानें 'दि क्रिटिकल रिव्ह्यू', 'दि ब्रिटिश मॅगझीन' व 'दि ब्रिटन' हीं साप्ताहिकें चालविलीं. १७५८ सालीं त्यानें 'कंप्लीट हिस्टरी ऑफ इंग्लंड फ्रॉम दि डीसेंट ऑफ ज्यूलियस सीझर टु दि ट्रीटी ऑफ एक्स–ला–शापेल' (ज्यूलियस सीझरपासून एला शापेलच्या तहापर्यंतचा इंग्लंडचा संपूर्ण इतिहास) हा इतिहासग्रंथ प्रसिद्ध केला. त्याचे इतरहि ग्रंथ आहेत. त्यानें व्हॉल्टेअरच्या ग्रंथाचें भाषांतर ३९ भागांत प्रसिद्ध केलें.

**स्मिथ, ॲडॅम** (१७२३–१७९०)—एक इंग्रज अर्थशास्त्रज्ञ. ॲडॅमचें प्राथमिक शिक्षण कर्कोल्डी येथें झालें. १७३७ मध्यें तो ग्लासगो युनिव्हर्सिटींत आणि १७४० मध्यें तो ऑक्सफोर्ड येथील बेलियल कॉलेजमध्यें गेला. १७४८ मध्यें तो एडिंबरो येथें अलंकारशास्त्र व अभिजात वाङ्मय या विषयावर व्याख्यानें देऊं लागला. त्याला १७५१ मध्यें ग्लासगो येथें तर्कशास्त्राचा आणि १७५२ मध्यें नीतिशास्त्राचा प्राध्यापक नेमण्यांत आलें. या जागेवर त्यानें सुमारें बारा वर्षे काम केलें. १७५९ मध्यें त्यानें आपला 'थिअरी ऑफ मॉरल सेंटिमेंट्स' (नैतिक भावनासिद्धान्त) हा ग्रंथ आणि त्याच्या दुसऱ्या आवृत्तींत पुरवणी जोडून त्यांत 'निरनिराळ्या भाषांच्या उत्पत्तीसंबंधींचे विचार' हा आपला लेख त्यानें प्रसिद्ध केला. १७६२ मध्यें ग्लासगो युनिव्हर्सिटीनें त्याला डॉक्टर ही बहुमानाची पदवी दिली. १७६३ मध्यें ड्यूकर्बायच्या तरुण ड्यूकबरोबर युरोपांत १७६६ त तो राहिला.

१७६६ मध्यें स्वदेशीं परत येऊन पुढें १० वर्षें कर्कोल्डी येथें आपलें अर्थशास्त्रावरील सुप्रसिद्ध पुस्तक 'इन्कायरी इन्टु दि नेचर अँड कॉझेस ऑफ दि वेल्थ ऑफ नेशन्स' (राष्ट्राच्या संपत्तीच्या स्वरूपाचें व कारणांचें विवेचन) हें प्रसिद्ध केलें. १७७८ मध्यें स्कॉटलंडमधील कस्टम्स कमिशनरच्या जागीं नेमणूक झाल्यामुळें तो एडिंबर्ग येथें राहूं लागला. १७८७ मध्यें त्याला ग्लासगो युनिव्हर्सिटीचा रेक्टर नेमण्यांत आलें. तेथेंच त्याचा अंत झाला. स्मिथची कीर्ति 'राष्ट्राची संपत्ति' या ग्रंथामुळें आहे. याच्या ग्रंथांत हा विषय फारच विस्तारपूर्वक व सांगोपांग मांडला असल्यामुळें तत्पूर्वीचे सर्व लेखक मागें पडून स्मिथ हा या शास्त्राचा उत्पादक म्हणून गणला जाऊं लागला.

**स्मिथ, गोल्ड्विन** (१८२३–१९१०). एक ब्रिटिश इतिहास-लेखक. तो ऑक्सफर्ड येथें १८५८ ते १८६६ पर्यंत आणि न्यू यॉर्क येथें कॉर्नेल युनिव्हर्सिटींत १८६८ ते १८७१ पर्यंत इतिहास विषयाचा प्राध्यापक होता. नंतर तो टॉरँटो येथें कायमचा राहिला. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते–'लेक्चर्स ऑन मॉडर्न हिस्टरी' (अर्वाचीन इतिहासावर व्याख्यानें), 'दि एम्पायर' (साम्राज्य. ही एक पत्रमालिका आहे), 'स्पीचेस् अँड लेटर्स ऑन् दि रिबेलियन' (बंडासंबंधीं भाषणें आणि पत्रें), 'दि युनायटेड स्टेट्स' आणि 'दि युनायटेड किंगडम्'.

**स्मिथ, फ्रॅन्सिस हॉपूकिन्सन** (१८३८-१९१५)—एक अमेरिकन चित्रकार, लेखक आणि इंजिनियर. हा वास्तविक यंत्रशास्त्रज्ञ होता; यानें गव्हर्नर्स आयलंडभोंवतीं बांधलेली भिंत, न्यू लंडनमधील रेस रॉक दीपगृह, न्यू यॉर्क बंदरांतील स्वातंत्र्य पुतळ्याचा पाया, इत्यादि कामें केलीं. हा जलरंगांतील चित्रकार म्हणूनहि प्रसिद्ध असून त्यानें चित्रकलेवर कांहीं व्याख्यानें दिलीं आहेत. त्यानें कांहीं ग्रंथरचना केली असून त्यांत 'बुक् ऑफ दि टाइल क्लब', 'कर्नल कॉर्टर', 'ए जंटलमन व्हॅगाबाँड', वगैरे प्रसिद्ध आहेत.

**स्मिथ, हेन्री जॉन स्टीफन** (१८२६–१८८३)—एक ब्रिटिश गणितशास्त्रज्ञ. त्याला ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटींत १८६० सालीं भूमिति विषयाचा प्राध्यापक नेमण्यांत आलें. त्यानें भूमिति आणि दैर्घ्यफल (एलिप्टिक फंक्शन्स) ह्या विषयावर बरेच लेख लिहिले. परंतु त्याची मुख्य कीर्ति 'दि थिअरी ऑफ नंबर्स' (संख्यासिद्धान्त) या विषयासंबंधीं केलेल्या संशोधनामुळें झालेली आहे. त्यानें या विषयावर ब्रिटिश असोसिएशनकडे १८५९ ते १८६५ पर्यंत जे वृत्तान्त पाठविले ते उत्कृष्ट निबंध मानले जातात. स्मिथचे गणितविषयक निबंध दोन भागांत प्रसिद्ध झाले आहेत.

**स्मिथसोनियन इन्स्टिट्यूटशन**—जेम्स स्मिथसन् या नांवाच्या गृहस्थाच्या मृत्युपत्रान्वयें अमेरिकन कॉंग्रेसनें १८४६ सालीं मान्य केलेल्या एका कायद्यास धरून ही एक शास्त्रीय संस्था वॉशिंग्टन येथें स्थापन करण्यांत आलेली आहे. या संस्थेचा उद्देश ज्ञानाचा जगभर फैलाव करण्याचा आहे. संस्थेचा कारभार संयुक्त संस्थानांच्या सरकारनें नेमलेल्या चालकांकडून चालतो. या संस्थेंत मोठमोठाल्या इमारती असून त्यांत पदार्थ-संग्रहालय, ग्रंथसंग्रहालय, निसर्गेतिहास-दर्शन व प्रयोगालय व इतर व्याख्यानांचीं सभागृहें आहेत. या संस्थेच्या उत्पन्नांतील कांहीं भाग शास्त्रीय संशोधनाकरितां खर्च करण्यांत येतो व कांहीं भाग वैयक्तिक रीतीनें प्रसिद्ध होण्यास अशक्य अशीं खर्चाचीं ग्रंथ-प्रकाशनें करण्याकरितां खर्च होतो. या संस्थेच्या देखरेखीखालीं संयुक्त संस्थानांचें राष्ट्रीय पदार्थसंग्रहालय, आंतरराष्ट्रीय विनिमय खातें, अमेरिकन मानवशास्त्र संस्था, ज्योतिष-पदार्थवैज्ञानिक वेधशाळा, राष्ट्रीय प्राणिसंग्रहालय, राष्ट्रीय कलाप्रदर्शन व किरण-विसर्जन आणि प्राणिरचनाशास्त्र-संग्रहालय हीं आहेत. या संस्थेनें चालविलेल्या तीन प्रकाशनमाला आहेत व त्यांतील ग्रंथ जगांतील सार्वजनिक ग्रंथालयें व संस्था यांना व विद्वानांना मोफत वांटले जातात.

**स्मृती**—हे प्राचीन ऋषींनीं केलेले धर्मशास्त्रविवेचक ग्रंथ आहेत. कायद्यांतून यांचा आधार घेतला जातो. मुख्य स्मृती वीस आहेत त्या पुढील होत: १ मनु, २ याज्ञवल्क्य, ३ पराशर, ४ व्यास, ५ विष्णु, ६ अत्रि, ७ वसिष्ठ, ८ गौतम, ९ दक्ष, १० कात्यायन, ११ उशना, १२ हारीत, १३ शंख, १४ लिखित, १५ बृहस्पति, १६ आपस्तंब, १७ यम, १८ शातातप, १९ संवर्त, आणि २० अंगिरा. यांशिवाय पुष्कळ स्मृती आढळतात. त्यांस उपस्मृती म्हणतात; उदा., १ देवल, २ कोकिल, ३ बुध, ४ बौधायन, ५ आश्वलायन, ६ जाबाल, ७ लौगाक्षी, इ.. यांत लघु, वृद्ध, सात्त्विक, राजस, तामस असे भेदहि आहेत. मनु, याज्ञवल्क्य इ. पाहा.

**स्राव**—(सिक्रेशन). प्राणिविषयक इंद्रियविज्ञान शास्त्रामध्यें रक्तांतील कांहीं विशिष्ट द्रव्यें पृथक् होऊन त्यांचे निरनिराळ्या प्रकारचे विशिष्ट द्रव रक्तापेक्षां निराळ्या प्रकारचे (उदा., पित्त, लाळ, लेष्मा, मूत्र, वगैरे) तयार होणें या क्रियेस स्राव असें म्हणतात. ही क्रिया शरीरांतील कित्येक प्रकारच्या इंद्रियांपासून घडत असते. परंतु मुख्यत: हें कार्य शरीरांतील ग्रंथी करीत असतात. यांचे दोन प्रकार असतात: एक बाह्य व दुसरा आंतर. बाह्य प्रकारामध्यें विशिष्ट स्राव नलिकांच्या अथवा वाहिन्यांच्या द्वारें एकदम शरीराच्या बाहेर नेऊन टाकण्यांत येतो. उदा., घाम, वगैरे; किंवा एखाद्या शरीरांतील इंद्रियामध्येंच त्याचा

संचय करण्यांत येतो; उदा., लाळ, मूत्र, पित्तरस, वगैरे जे स्राव निरुपयोगी असून बाहेर टाकून देण्यांत येतात त्यास बहिःस्राव (एक्सक्रीशन) म्हणतात. अंतःस्राव सामान्यतः निरनिराळ्या ग्रंथींमधून असून ते रक्तद्वारां शरीराच्या निरनिराळ्या भागांत पोंचविले जातात.

वनस्पतींच्या इंद्रियविज्ञानामध्यें वनस्पतींच्या शरीरांत राहणाऱ्या रसांपासून कांहीं द्रव्यें संयुक्त स्वरूपांत वेगळीं करण्यांत येतात, आणि त्यांपासून वनस्पतींतील वनस्वरूपाचे अवयव तयार होतात; या क्रियेस स्राव असें म्हणतात. याचे सामान्य अथवा पोषक आणि विशेष अथवा असात्मीकर असे दोन वर्ग करण्यांत येतात. पहिल्या वर्गामध्यें गोंद, शर्करा, पिष्टसत्त्व, काष्ठसत्त्व, वल्क, वगैरे येतात. दुसऱ्या प्रकारामध्यें अम्लें, क्षार, उदासीन तत्त्वें, राळेसारखीं द्रव्यें, रंजकद्रव्यें, दुग्धरस, तेलें, वगैरे पदार्थ येतात. मांसभक्षक वनस्पतींतून एक प्रकारचा पाचकरस स्रवत असतो. त्याचें कार्य त्यांचें भक्ष्य पचविण्याचें असतें.

**स्लाव्ह**—१. लोक—पूर्वेकडील युरोपांतील आर्यन लोक. हे आल्पाईन ऊर्फ मध्यवर्ती मानववंश याची एक शाखा असून त्यांच्या भाषेचा निकट संबंध लिथुएनियन भाषांशीं आहे. आणि फार दूरचा संबंध जर्मानिक भाषांशीं आहे. इसवी सनाच्या चौथ्या शतकांत स्लाव्ह लोक मुख्यतः कार्पेथियन पर्वताच्या नजीकच्या प्रदेशांत राहत असत, आणि नंतर हे लोक उत्तरेकडे बाल्टिक समुद्रापर्यंत आणि दक्षिणेकडे आड्रिआटिक समुद्रापर्यंत पसरत गेले. स्लाव्ह लोकांचे मुख्य दोन समूह आहेत ते : आग्नेय स्लाव्ह आणि पश्चिम स्लाव्ह. पहिल्या समूहांत पुढील लोकांचा अंतर्भाव होतो : (१) रशियन, (२) सर्बियन, (३) क्रोट, व (४) स्लाव्हेन; आणि दुसऱ्या समूहांत पुढील लोकांचा समावेश होतो : (१) झेक (यांत झेक, मोरेव्हियन व स्लोव्हाक यांचा अंतर्भाव होतो), (२) सोर्ब (लुसेटियन)—यांचे वरचे सोर्ब व खालचे सोर्ब असे पोटविभाग आहेत, व (३) पोल. स्लाव्ह लोकांची एकंदर लोकसंख्या १८,००,००,००० आहे, व त्यांपैकीं ५/८ लोक रशियन आहेत.

२. भाषा—स्लाव्हानिक भाषा ह्या इंडोयुरोपियन भाषावंशापैकीं आहेत, आणि त्यांचा बाल्टिक भाषासमूहांशीं निकटचा संबंध आहे. या स्लाव्हॉनिक भाषा निरनिराळ्या अकरा प्रकारच्या आहेत :—(१) जुनी बल्गेरियन (चर्च स्लाव्हानिक), (२) न्यू बल्गेरियन, (३) सर्बियन (इलीरियन, खुसन्, क्रोटिअन), (४) स्लाव्हेनियन, (५) रशियन, (६) (रुथेनियन) लघु रशियन, (७) श्वेत रशियन, (८) झेक ऊर्फ बोहेमियन, (९) स्लाव्हेकियन, (१०) पोलिश, व (११) सर्बियन (वरचे आणि खालचे लुसेटियन). ज्या भाषेंत जुनें बल्गेरियन वाङ्मय झालेलें आहे ती भाषा हल्लीं मृत आहे. तथापि ती भाषा अद्यापि ग्रीक चर्च या धार्मिक पंथाच्या धार्मिक विधींमध्यें वापरतात व धार्मिक ग्रंथहि त्याच भाषेमध्यें आहेत. आणि तिचा उपयोग विशेषतः रशियन, बल्गेरियन व सर्बियन लोक अद्यापहि करतात.

**स्लीमन, हीनरिश** (१८२२–१८९०)—एक जर्मन पुराणवास्तुशास्त्रज्ञ. त्यानें हिसार्लिकच्या पठारावर उत्खननाचें कार्य केलें. कारण या पठारावर प्राचीन ट्रॉय शहर होतें, असें मानण्यांत येतें. या आपल्या उत्खननकार्याबद्दलची माहिती त्यानें ग्रंथ लिहून दिली आहे. या ग्रंथांत १८७५ सालीं त्यानें अथेन्स आणि मायसेनी येथें उत्खनन कार्य सुरू केलें आणि तेथें १८७७ सालीं त्यानें ५ राजांच्या थडग्यांचा शोध लावला, व तीं थडगीं आगेमेम्नॉन आणि त्याचे जोडीदार यांची आहेत असें सिद्ध केलें.

**स्लोव्हाक लोक**—झेकोस्लोव्हाकिया, मोरेव्हिया आणि त्यांच्या आसपासच्या संस्थानांत राहणाऱ्या लोकांचें हें नांव आहे. मूळ जे स्लाव्ह लोक कार्पेथियन पर्वताच्या दक्षिणेकडील प्रदेशांत डॅन्यूब व टिसा नदी यांच्या दरम्यान राहत असत त्या लोकांचे हे वंशज आहेत. कित्येक शतकें ते याच प्रदेशात राहत असत. त्यांची लोकसंख्या सुमारें २५,००,००० आहे.

झेक वाङ्मयाचा पगडा स्लोव्हाकवर १८ व्या शतकाच्या अखेरपर्यंत असल्यानें स्लोव्हाक वाङ्मयाचें भिन्नत्व फारसें दिसलें नाहीं. नंतर झेकहून आपली स्वतंत्र भाषा (पश्चिम स्लोव्हाक) प्रस्थापित करण्याकडे कल सुरू झाला. अँन्टोनिन बर्नोलाक (१७६२–१८१३) या भाषापंडितानें नवीन स्वतंत्र भाषा तयार करण्यासाठीं ग्रंथ लिहिले पण त्याचा हा फुटीरपणा कित्येकांना आवडला नाहीं. सर्व स्लाव्ह लोकांनीं एकत्र असलें पाहिजे असें सर्वसाधारण मत असे. स्लोव्हाक साहित्यावर झेकप्रमाणेंच हंगेरीचीहि छाप असे. ती झेकोस्लोव्हाकिया स्वतंत्र झाल्यावरहि कमी झाली नाहीं. नाझी वर्चस्व आल्यावर तर पुन्हां स्वतंत्र साहित्यनिर्मितीवर दडपण बसलें.

**स्वच्छंदभैरवरस**—एक आयुर्वेदीय रसायन. १ पारा, १ बचनाग, १ गंधक व $\frac{1}{2}$ जायफळ हीं एकत्र करून सर्व औषधांच्या निम्में पिंपळीचें चूर्ण घालावें आणि खल करून सिद्ध करावा. हा अनुपान योजून सेवन केल्या असतां शीतज्वर, सन्निपातज्वर, विषूचिका, विषमज्वर, जीर्णज्वर, मंदाग्नि, शिरोरोग, इत्यादि रोग दूर होतात.

**स्वप्न**—झोंप लागली असतां मनुष्याच्या मनामध्यें कल्पनांच्या मालिका निर्माण होतात त्यांना स्वप्न म्हणतात. मनुष्याच्या मनांतल्या आशा-आकांक्षा किंवा भयानक गोष्टी जागृतावस्थेंत मनुष्यास बावरलेल्या असतात, त्याचसंबंधीं त्याला स्वप्नें पडतात, आणि

त्या स्वप्नांत त्या मनुष्याच्या बालवयांत किंवा तदनंतरच्या काळांत ज्या उत्कट भावनोत्पादक घडामोडी झाल्या असतील, त्या गोष्टींचें मिश्रण झालेलें असतें. मनुष्याला जे दुःखाचे अनुभव आलेले असतात, उदाहरणार्थ, जे खंदकांतील भयानक युद्धप्रसंग अनुभवलेले असतात व ज्यांच्यावर जागृतावस्थेंत नियंत्रण असतें, ते भयानक प्रसंग स्वप्नामध्यें येतात व त्यामुळें झोंपमोड होते, आणि निद्रानाशाचा रोगहि जडतो. अशा भयानक स्वप्नांवर इलाज असा करावा कीं, त्या रोग्याला जागृतावस्थेंत त्या भयानक प्रसंगांची आठवण करून देऊन त्यांना निर्भयपणें तोंड देण्याची तयारी रोग्याच्या मनांत उत्पन्न करावी. 'ते प्रसंग विसर!' या सांगण्याचा कांहीं उपयोग होत नाहीं. अलीकडे एस्. फ्राउड या मानसशास्त्रज्ञानें शास्त्रीय रीत्या स्वप्नांचा अभ्यास केला आहे. तो असें प्रतिपादन करतो कीं, मानवाच्या अतृप्त इच्छा स्वप्नामध्यें सफल झालेल्या दिसतात; म्हणजे अतृप्त इच्छांची तृप्ति, हें स्वप्नें पडण्याचें कारण होय.

ऋग्वेदांत व उत्तरकालीन ग्रंथांत स्वप्नाचा उल्लेख आलेला आहे. दुष्ट स्वप्नांचाहि उल्लेख आहे. ऐतरेय आरण्यकामध्यें स्वप्नें व त्याचे अर्थ आणि प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलेल्या गोष्टी (प्रत्यक्ष दर्शन) यांची यादीच दिलेली आहे. स्वप्नांचे शकुन व शुभाशुभ फलें सांगणारे ग्रंथहि संस्कृत आणि देशी भाषांतून अनेक आहेत. स्वप्नांतील गोष्टींवर विश्वास ठेवणारे थोडेथोडके नाहींत. स्वप्नांतील कांहीं ठोकताळे जमत असल्यानें स्वप्नांना महत्त्व देण्यांत येतें. स्वप्नांचे कांहीं बौद्धिक चमत्कारहि दिसतात. इंग्रज कवि कोलरिज यानें आपलें सुंदर 'कुब्लाखान' हें काव्य झोंपेंत रचलें अशी आख्यायिका आहे. कांहींना स्वप्नांत जे इशारे मिळतात ते सत्य-सृष्टींत खरे ठरतातहि; यावरून स्वप्न-मीमांसा वाटते इतकी सोपी नाहीं हें दिसून येतें.

बरींच स्वप्नें आगंतुक कारणांनीं पडत असतात. झोंपलेल्या माणसास थंडी भासत असली म्हणजे स्वप्नांत त्याला बर्फाची वृष्टि झालेली दिसते; त्याच्यावर प्रकाशकिरण पडला असेल तर स्वप्नांत आग भडकलेली तो पाहतो. तसेंच अपचन झालें असल्यास त्याला भयंकर स्वप्नें पडतात. दुखणेकऱ्यांना स्वप्नें नेहमींच पडतात. तेव्हां सत्यसृष्टीचा पडताळा स्वप्नांत व उलटहि मिळत असतो यांत शंका नाहीं. तथापि स्वप्नें हा एक अभ्यसनीय विषय आहे खास.

**स्वयंपाक**—अन्न शिजवून किंवा इतर रीतींनें तयार करून ठेवणें ही क्रिया स्वयंपाकांत येते. पाकसिद्धीचें विवेचन 'पाकशास्त्र' या लेखांत स्वतंत्रपणें केलेलेंच आहे. जेथें पाकसिद्धि व्हावयाची तें स्वयंपाकघर कसें पाहिजे व त्यांतील चुलीसारखीं साधनें कशीं कार्यक्षम पाहिजेत-यासंबंधीं येथें थोडक्यांत विचार केला आहे.

अन्नाची स्वच्छता राहणें; वर्दळीपासून ते दूर असणें; धूर, वास, वगैरे बाहेर पसरण्याच्या जागीं न येणें; ज्यांचा स्वयंपाकाशीं संबंध असतो त्या क्रियांच्या जागेच्या जवळ असणें, यांसारख्या गोष्टी स्वयंपाकघर बांधतांना किंवा ठरवितांना पाहाव्या लागतात. उजेड, धूर जाण्यास वाट, पाण्याचा सांठा, मोरी, कोठीची खोली, दूधदुभतें यांसाठीं कपाट, इ. सोयीहि स्वयंपाकघरांत पाहिजेत.

स्वयंपाकघरांतील मुख्य गोष्ट म्हणजे चूल होय. ही चूल ज्या-प्रमाणें नीट बांधलेली व सोयीची असेल त्याप्रमाणें वेळ आणि खर्च यांत बरीच बचत होणार हें सांगणें नकोच. पाश्चात्य देशांत स्टोव्ह व विजेच्या शेगड्या-चुली यांमुळें स्वयंपाक फार लवकर होऊन बराच त्रास वांचतो व स्वच्छता राहते. आपली चूल मात्र पूर्वापार आहे तशीच आहे. जाळ वायां जातोच आहे, धूर होतच आहे, किंवा भांडीं आणि घर घाणेरडें दिसतच आहे. तरी सुशिक्षित म्हण-विणाऱ्या बायकांचें यांकडे लक्ष नाहीं. आपल्या जुन्या पद्धतीच्या चुलीमध्यें जळणाची उष्णता फार वायां जाते. त्यामुळें जळणाचा पुरेपूर फायदा न होऊन खर्च मात्र वाढतो. एका लांब बोगद्या-सारख्या चुलीला वर तीनचार तोंडें भांडीं ठेवण्यासाठीं व एका कडेला जळण घालण्याचें तोंड आणि दुसऱ्या कडेला धूर जाण्या-साठीं चिमणी किंवा नळी अशी रचना केल्यास वेळ आणि जळण यांची बचत होते. कांहीं बंबासारख्या चुलींत गरम पाणी स्नानासाठीं मिळण्याची तरतूद असते. चूल शास्त्रीय सिद्धान्तांना अनुसरून घातल्यास फायदेशीर होते.

आनंदी चपाती यंत्र—आपल्या स्वयंपाकघरांतील पूर्वापार चालत आलेल्या चुली व शेगड्या यांत सरपणाची केवढी मोठी उधळपट्टी होत असते! कारण वरच्या बाजूस जाणाऱ्या जाळानें अगर आंचेनेंच फक्त आपला सर्व स्वयंपाक होत असतो. परंतु शेगडीसभोंवतीं व खालीं फारच मोठ्या प्रमाणांत उष्णता वायां जात असते. अशी उष्णता वायां जाऊनदेखील स्वयंपाकांतील नवख्या माणसास अत्यंत अवघड अगर नाठाळ असा जो भाकरी अगर चपाती भाजण्याचा प्रकार त्यांतहि मुळींच सुलभता येत नाहीं. ही अडचण ओळखून व या वायां जाणाऱ्या उष्णतेचा विशेषतः उपयोग करून पुण्यांतील शास्त्रीय उपकरणांचे संशोधक श्री. दिनकर रामचंद्र जोगळेकर व त्यांची पत्नी सौ. लक्ष्मीबाई यांनीं शिजविण्याबरोबरच स्नानाचें पाणी तापवितां येईल व भाकरी अगर चपाती भाजण्याचें काम त्याचबरोबर होऊन त्यांतील भाकरी उलटणें, ती प्रत्यक्ष निखाऱ्यांत टाकून शेकणें, वगैरे हातास चटका देणारीं कामें टाकून भाकरी वगैरे उत्तम भाजतां येणाऱ्या

एका यंत्राची रचना केली व त्याचेंच नांव 'पूर्ण चूल' अगर 'आनंदी चपाती यंत्र' असें ठेविलें.

आनंदी चपाती यंत्र

[क्र. १ व क्र. ३ या दोन शेगड्यांत जर चपातीसह क्र. २ तवा ठेवला तर क्र. ३ शेगडीच्या जाळीच्या खालील उष्णतेनें चपातीचा वरचा भाग व क्र. १ शेगडीच्या वर जाणाऱ्या उष्णतेनें चपातीचा तव्याच्या सान्निध्यांतील भाग भाजतो. वेळ निम्मा, सरपण निम्में व त्यामुळें सरपणाची बचत होते. क्र. ३ व क्र. १ या शेगड्यांत कोळसे घालतां यावेत म्हणून ते व क्र. २ म्हणजे तवा हे सर्व टेबलाच्या ड्रॉवरसारखे सरकते केले आहेत. या सरकत्या शेगड्यांभोंवतीं तीन बाजूंस व तळास मातीच्या भिंतीऐवजीं क्र. ४ ही पाण्याची टांकी आहे. क्र. ३ शेगडीच्या वरच्या बाजूस दार असलेली कोठडी करून त्यांत क्र. ५ हा कुकर शिजविण्याची सोय केली आहे. याच्यावर धुराडें लाविल्यानें धुराचा त्रास होत नाहीं. क्र. ६ हें टांकींत पाणी ओतण्याचें तोंड आहे.]

यांतील तत्त्व फारच सोपें आहे. चपाती खालून व वरून एकाच वेळीं भाजली असतां उलटण्याची जरूर काय? म्हणून सदर यंत्रांत 'शेगडीवर शेगडी' मजल्याप्रमाणें ठेवण्याची कल्पना अमलांत आणली आहे. या दोन शेगड्यांमध्यें जर चपातीसह तवा ठेवला तर वरच्या शेगडीच्या जाळीच्या खालील उष्णतेनें चपातीचा वरचा भाग भाजतो व तळच्या शेगडींतल्या वर जाणाऱ्या उष्णतेनें चपातीचा तव्याच्या सान्निध्यांतील भाग भाजतो. शेगड्यांत कोळसे घालतां यावेत म्हणून त्या टेबलाच्या खणासारख्या सरकत्या केल्या, तवाहि खणासारखा सरकताच ठेवला आहे. या सरकत्या शेगड्यांच्याभोंवतीं पाण्याची टांकी मातीच्या भिंतीऐवजीं घातली; व शेगड्यांच्या वरच्या बाजूस एक काढती-घालती पत्र्याची दार असलेली देवघराप्रमाणें कोठडी करून त्यांत 'कुकर' (डाळ, भात, भाजी शिजविण्यास) शिजविण्याची सोय केली. या कोठडीच्या वरच्या बाजूस धुराडें लावून दिलें म्हणजे धुराचा त्रास होत नाहीं. ही कोठडी काढली असतां या चुलाणावर मोठी कढई ठेवून त्यांत जिलब्या, बुंदी, शेव, वगैरे पदार्थ तळतां येतात. दोन शेगड्यांत पोळ्या, धिरडी, थालपिठें, वगैरे भाजतां येतात, व वायां जाणाऱ्या उष्णतेमुळें टांकींतील पाणी सारखें तापत राहतें.

सरासरीनें माणशीं, दरमहा एक मण लांकूड अगर ½ मण कोळसा लागतो; परंतु या 'आनंदी' यंत्रांत ½ मण लांकूड अगर ¼ मण कोळसा सहज पुरतो. 'आनंदी' यंत्रांत लांकूड, कोळसा, गॅस, वगैरे कोणत्याहि तऱ्हेचें सरपण चालतें. सरकत्या व मजले पद्धतीच्या शेगटीच्या योजनेमुळें, एक शेगडी वापरल्यास २ कप चहा करण्याच्या नित्याच्या लहान कामापासून ते एकावर एक चार शेगड्या वापरल्यामुळें दांतच नैमित्तिक समाराधनासाठीं बुंदीचा अगर जिलब्यांचा घाणा तळतां येतो. स्नानाच्या यंत्रांत फक्त पाणी तापतें व मोदक (कुकर) पात्रांत फक्त (अन्न) शिजण्याचें काम होतें, पण भाकरी होत नाहीत; परंतु 'आनंदी' यंत्रांत तापविणें व शिजविणें यांबरोबरच विशेषतः सुलभतेनें भाकरी भाजण्याचें काम होतें. सदर यंत्राचा उपयोग ओल्या भाज्या, मिरच्या, केळीं, अंजीरासारखीं फळें, बटाट्याचा कीस, वगैरे कौटुंबिक अन्नपदार्थ वाळविण्याकडेहि होऊं शकतो.

चुलीखेरीज स्वयंपाकाची भांडीं व उपकरणीं यांकडेहि कार्यक्षमतेच्या दृष्टीनें पाहावें लागतें. कुकरप्रमाणें अन्नपदार्थ शिजविण्याचें भांडें वापरल्यास (उंच डबा, मोदकपात्र यांचा उपयोग कुकरप्रमाणेंच होतो) पदार्थ एकदम, चांगले व लवकर शिजून कोणाला चुलीजवळ फार बसावें लागत नाहीं. तसेंच विळ्या, सुऱ्या, चमचे, गाळण्या, झांकण्या, तवे, परात, पातेलीं, कढया, वगैरे जिन्नस कशा प्रकारचे असावेत हें सुरदर्शीनें विचार करून ठरवावयाचें असतें; कारण त्यांच्या निवडीवरून श्रम, वेळ आणि पैसा यांची बचत होऊन स्वास्थ्य मिळत असतें. सोलण्याचीं, चिरण्याचीं, काप काढण्याचीं यंत्रें असतात. त्यांचाहि तारतम्यानें उपयोग केला पाहिजे. विजेचीं उपकरणीं जरी निघालीं आहेत; पण तीं नीट वापरतां आल्यास व परवडत असल्यास जरूर घ्यावीत. शास्त्रीय योजनेनें स्वयंपाकघर मज-

विन्यास पाश्चात्य देशांतल्याप्रमाणें आपलाहि स्वयंपाक सुंदर दिसेल व रुचकर होईल. आपल्याकडे स्वयंपाक हा आधुनिक महिलांनीं दुर्लक्षिलेला विषय असल्यानें त्यांत सुधारणा फारशी दिसत नाहीं.

**स्वयं-प्रतिप्रकाश**— (फ्लुओरेसेन्स). जेव्हां कांहीं पदार्थ सूर्यप्रकाशामध्यें ठेवले असतां किंवा त्यांवर दुसऱ्या एखाद्या पदार्थापासून निघालेले किरण पाडले असतां ते चकाकूं लागतात, तेव्हां त्या दृश्य दीप्तीस स्वयंप्रतिप्रकाश म्हणतात. हा पदार्थ एखाद्या काळोख्या खोलींत ठेवून त्यावर अदृश्य अतिनील किरण पाडले तर त्याची दीप्ति फारच अधिक दिसते. अशा पदार्थामध्यें लघु अदृश्य प्रकाशलहरींचें शोषण करून त्यांऐवजीं दीर्घ व डोळ्यांना जाणवणाऱ्या प्रकाश-लहरी बाहेर टाकण्याचा गुणधर्म असतो. हा दीप्तिमान प्रकाश जोंपर्यंत त्या पदार्थावर दुसऱ्या पदार्थांपासून किरण पडत असतात तोंपर्यंतच दिसत असतो. अशा तऱ्हेनें पॅराफिन तेलापासून निघणारा प्रकाश निळा असतो व युरेनियमाच्या कांचेपासून निघणारा प्रकाश हिरवा असतो. हरित् रंजकद्रव्य (क्लोरोफिल) च्या द्रावणापासून निघणारा प्रकाश काळसर तांबड्या रंगाचा असतो. हा दीप्तिमान प्रकाश रेडियम किंवा क्ष-किरणांच्या साहाय्यानेंहि पाडतां येतो.

**स्वयंप्रवर्तन**—(इंडक्टन्स). एखाद्या विद्युन्मंडलांतील स्वयंप्रवर्तन अथवा स्वयंप्रवर्तनाचा गुणक याची व्याख्या अशी करतां येईल कीं, त्या विद्युन्मंडलांतून एक या प्रमाणाचा विद्युत्प्रवाह सुरू केला असतां त्या विद्युन्मंडलांत जो चुंबकीय प्रवाह उत्पन्न होतो तो. किंवा एखाद्या विद्युन्मंडलांतील विद्युत् प्रवाहांत एक या प्रमाणांत बदल केला असतां जी विद्युत्गति-शक्ति विरुद्ध दिशेनें उत्पन्न होते ती. सामान्यतः वरील चुंबकीय प्रवाह हा स्वयंप्रवर्तन आणि प्रवाह यांच्या गुणाकाराबरोबर असतो. आणि विरुद्ध विद्युत्गतिशक्ति ही स्वयंप्रवर्तन आणि विद्युत्-प्रवाहांतील वाढीच्या गतीचा काल यांच्या गुणाकाराबरोबर असते. सामान्यतः व्यवहारामध्यें स्वयंप्रवर्तनाच्या मूलमानाला ऑंरी (Henry) असें म्हणतात, व तें ज्या विद्युन्मंडलामध्यें विद्युत्गतिशक्ति एक व्होल्ट असते व विद्युत्प्रवाहांतील बदल दर सेकंदास एक ॲम्पीयर या वेगानें होत असतो तेव्हां जे स्वयं-प्रवर्तन होतें त्याबरोबर असतें. जेव्हां विद्युन्मंडलांतील प्रवाह उलटसुलट असतो तेव्हां विद्युन्मंडलाच्या प्रवर्तनशक्तीचें महत्त्व वरेंच असतें.

**स्वर**—१. उपनिषदामध्यें स्वरोच्चार असा याचा अर्थ आहे. ह्या स्वरांचीं घोषवंत व बलवंत अशीं वर्णनें आहेत. मूक व्यंजनाला शब्द स्पर्श असा आहे व ऊष्मन् म्हणजे श, ष, वगैरे होत. ऊष्मवर्ण व स्वर हे शब्द ऐतरेय व शांखायन आरण्यक ह्यांमध्यें आलेले आहेत. अर्धस्वरांचा उल्लेख अंतष्ट किंवा अक्षर असा त्याच ग्रंथांत आलेला आहे. ऐतरेय आरण्यकांत दुसरी जी विभागणी आली आहे ती घोष, ऊष्मन् व व्यंजन अशी आहे. त्याच आरण्यकांत घोष ह्या शब्दांचा इतर ठिकाणीं अर्थ वर्ण असा सामान्यपणें आहे. तैत्तिरीय उपनिषदामध्यें मात्रा, बल व वर्ण ह्यांचा उल्लेख आलेला आहे. व हीं तिन्ही ओम् (अ + उ + म) ह्या शब्दांत सांपडतात असें इतरत्र म्हटलेलें आढळतें. ऐतरेय आरण्यकांत व शांखायन आरण्यकांत मूर्धन्य व दंत्य नकार आणि सकार ह्यांमधील फरक महत्त्वाचा आहे असें म्हटलें आहे. शिवाय संधिनियमांचाहि विचार त्यांत आलेला आहे. निरनिराळ्या संहिता-ग्रंथांतल्या प्रातिशाख्यामध्यें व्याकरणाच्या परिभाषेची वाढ झालेली आहे. यास्काच्या निरुक्तामध्यें व्याकरणविषयक माहिती बरीच उपलब्ध आहे. शतपथ ब्राह्मणांत लिंगभेदाचें विवरण आहे व पंचविंश ब्राह्मणांत सामपाठांतला शब्दविचार आलेला आहे.

आतां व्याकरणशास्त्राप्रमाणें पाहतां, ज्या वर्णांचा उच्चार स्वतंत्रपणें म्हणजे दुसऱ्या वर्णांच्या साहाय्यावांचून होतो त्यांस स्वर म्हणतात. अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ॠ, ऌ, ए, ऐ, ओ, औ, असे संस्कृतांत स्वर आहेत. व्यंजनांत स्वर मिळून पूर्ण अक्षर तयार होतें. स्वरांत कांहीं ऱ्हस्व व दीर्घ आहेत (उदा., अ, आ, ए, ऐ, इत्यादि). कोणी दीर्घ ॡ स्वर मानतात पण तो कोठेंहि येत नाहीं. तसेंच स्वरांच्या बाराखडींत अं, अः हे अनुस्वार–विसर्ग उगीच घुसडले आहेत. स्वरांचा अधिक विचार भाषाशास्त्र आणि व्याकरण यांमध्यें येतो.

२. संगीतांत स्वरांची आवश्यकता आहे. राग हा गायनांतील अत्यंत महत्त्वाचा व रंजनकारी भाग जो आहे, तो समजण्यास स्वरांची अत्यंत जरूरी आहे. श्रुतींची संख्या बावीस व शुद्ध स्वरांची संख्या सात ह्याबद्दल आतां कोणत्याहि ग्रंथांत व ग्रंथ-कारांत दुमत नाहीं. ऐकूं येण्याजोगा, एकापेक्षां दुसरा भिन्न व रंजनकारी असा जो गायनोपयोगी नाद त्याचें नांव श्रुति. असे गायनोपयोगी नाद अथवा श्रुती गायनांत बावीस मानितात. नाद अथवा श्रुति व स्वर यांमध्यें अंतर आहे. ह्या बावीस नादां-पैकीं जितक्या नादांची योजना एखाद्या रागांत केली असेल तितक्या नादांस त्या वेळेपुरती स्वर ही संज्ञा प्राप्त होते. रागांत श्रुती लागल्या म्हणजे त्यांस स्वर ही संज्ञा प्राप्त होते. नादास जेव्हां स्वरत्व ही संज्ञा प्राप्त होते त्या वेळीं यासंबंधीं त्याचें नादत्वहि कायम असतें. रागाच्या दृष्टीनें त्याला हें नवें नांव प्राप्त होतें इतकेंच.

**स्वरपद्धति**—(स्केल). स्वरांच्या उंचीप्रमाणें त्यांची जी रचना केलेली असते व एखाद्या गीतास अनुसरून अशा स्वराची जी स्वरमालिका बनविलेली असते ती ज्या मूळ स्वरास अनुसरून बनविलेल्या स्वर-सप्तकांत बसविलेली असेल तीस स्वर-पद्धति

असें म्हणतात. अशा स्वर-पद्धतींत कांहीं शुद्ध स्वर व कांहीं कोमल व तीव्र स्वर यांची योजना केलेली असते. सामान्य स्वरपद्धतीमध्यें हार्मोनियम वाद्यांत एकंदर बारा स्वर असतात. (स्वरशास्त्र पाहा).

**स्वरमान**—(पिच्). कोणत्याहि ध्वनीचा स्वर त्या ध्वनीमुळें दर सेकंदास उत्पन्न होणाऱ्या दुहेरी कंप-संख्येवरून सांगतां येतो. पियानोमध्यें मध्य-सप्तकांतील 'सा' या स्वराची कंपसंख्या २५६ ही धरण्यांत येते. हा स्वर जवळजवळ अभिजात मूलस्वर म्हणून बॅच, हॅन्डेल आणि बीटोव्हेन यांनीं धरला होता. पुढें या मूल-स्वरामध्यें हळूहळू थोडीशी वाढ करण्यांत आली होती. १९ व्या शतकाच्या अखेरीस फ्रेंच संगीतामध्यें या मध्यम 'सा' स्वराची २६१ कंपसंख्या धरण्यांत येऊं लागली.

**स्वरमेळ**—(सिंफोनी). फार मोठ्या प्रमाणावरच्या किंवा संपूर्ण वृन्द-संगीताला आवश्यक असणाऱ्या वाद्य-स्वरमालिकेस स्वरमेळ असें म्हणतां येईल. या पद्धतीचा प्रचार अठराव्या शतकांत पडलेला दिसतो. हेडन यानें सुमारें १२५ स्वरमेळांची रचना केली व मोझार्ट यानें सुमारें ४१ स्वरमेळांची रचना केली. त्यांपैकीं ज्युपिटर व इतर कांहीं फार प्रसिद्ध आहेत. बीटोव्हेन यानें फक्त नऊ स्वरमेळ लिहिले. जरी संख्येनें हे थोडे दिसत असले तरी ते अत्यंत महत्त्वाचे असून त्यांचें स्वरूप व विस्तार यांमध्यें संगीताची पुष्कळच प्रगति झालेली दृष्टीस पडते. या तऱ्हेची रचना करणारा एक कलावान् शुबार्ट या नांवाचा होता. त्याच्या कांहीं स्वरमेळांनीं बीटोव्हेशीं बरोबरी केल्यासारखें दिसतें. शुमन यानें चार सुंदर स्वरमेळ लिहिले आहेत.

**स्वरशास्त्र**—(हार्मोनिक्स). एखाद्या कंप पावणाऱ्या वस्तू-पासून जे साधे स्वर निघतात त्या स्वरांच्या पद्धतीस स्वरपद्धति असें म्हणतात. अथवा कांहीं उच्च स्वर सोडून दिले असता ज्या स्वरांस मूलस्वर असें म्हणतात त्यांच्या पद्धतीस स्वरपद्धति असें म्हणतां येईल. कंप पावणारा पदार्थ कोणताहि लवचिक, घन अथवा तरल पदार्थ असला तरी चालतो. परंतु गानोपयुक्त स्वर निघावयास पाहिजे असेल तर एखादी विण्याची किंवा सतारीची ताणलेली तार किंवा एखाद्या ऑर्गनसारख्या वाद्यांत भरून राहिलेली हवा हिचा उपयोग करण्यांत येतो. जेव्हां दोन्ही टोंकांशीं बद्ध किंवा स्थिर केलेली तार कंप पावत असते तेव्हां तींतून निघणाऱ्या साध्या किंवा शुद्ध स्वराच्या दरम्यान एखादा स्थिर बिंदु किंवा दोन्ही टोंकांमध्यें अचलस्थान (नोड) नसतें. ध्वनिपद्धतीमध्यें तारेंतील कांहीं बिंदू कंप पावत नाहींत असें आपणांस आढळून येतें. उदा., प्रथम स्वर-पद्धतीमध्यें या तारेचा मध्यबिंदू स्थिर असलेला आढळून येतो. द्वितीय स्वरपद्धतीमध्यें त्या तारेचे जर तीन भाग केले तर प्रत्येक तृतीयांशाशीं असलेले दोन बिंदू स्थिर असतात. याप्रमाणेंच पुढें होत जातें. आतां प्रथम स्वराचा काल जर एक धरला तर त्यास अनुसरून पुढील स्वर पद्धतींतील स्वरांचे काल $\frac{1}{2}$, $\frac{1}{3}$, $\frac{1}{4}$, इत्यादि असे येतात. या-प्रमाणेंच जर एखाद्या उभ्या दांड्यामध्यें किंवा किल्लेल्या दांड्या-मध्यें कंप उत्पन्न केले तर त्यांचेंहि स्वरप्रमाण हेंच आढळून येतें. ऑर्गनच्या नळींतील स्वरप्रमाणहि हेंच असतें; परंतु या दोन गोष्टींमध्यें थोडासा निराळ्या पद्धतीनें विचार करावा लागतो. जेव्हां कंप पावणाऱ्या पदार्थाचीं दोन्ही टोंकें मोकळीं असतात तेव्हां कंपांची अथवा स्वरांची लहरी-संख्या तारेच्या बाबतींत १।२।३।४ इत्यादि नैसर्गिक अंकांच्या प्रमाणांत असते. परंतु जेव्हां एकच तोंड मोकळें असतें तेव्हां या कंपन-संख्यांचें प्रमाण १।३। ५।७ अशा विषम संख्यांच्या प्रमाणांत बदलत जातें. उत्तम रीतीनें तयार केलेल्या घंटांतून तीन प्रकारचे स्वर बाहेर पडत असतात. ते म्हणजे मध्य, तीव्र आणि मंद्र होत. याप्रमाणें, दोन शुद्ध स्वरांचा स्वरमेळ त्यांच्या कंपन-संख्यांचें प्रमाण जर त्यापेक्षां लहान अशा दोन पूर्ण संख्याइतकें असेल तरच होऊं शकतें. ज्या दोन स्वरांमध्यें एका सप्तकाइतकें अंतर असतें त्यांच्या कंपन संख्यांचें प्रमाण २ : १ हें असतें. जर ५ स्वरांचें अंतर असेल तर ३ : २ हें असतें. चार स्वरांस ४ : ३ हें असतें. कंप पावणाऱ्या तारेमध्यें खालचे स्वर हे अधिक तीव्र असून ते स्वरमेळास योग्य असतात.

**स्वरश्रेढी**—(हार्मॉनिकल प्रोग्रेशन). बीजगणितांत अशी एक श्रेढी (माला) आहे कीं, तीमधील पदांचे व्यस्तांक (रेसिप्रोकल) गणित-श्रेढींत असतात. क्रमानें येणारे पूर्णांक १, २, ३, ४, ... हे गणित-श्रेढींत आहेत. पण त्यांचे व्यस्तांक १, $\frac{1}{2}$, $\frac{1}{3}$, $\frac{1}{4}$, हे स्वर-श्रेढींत आहेत.

**स्वरसप्तक**— संगीतशास्त्रामध्यें आठ स्वरांच्या समूहास म्हणजे सा, रे, ग, म, प, ध, नि, सा या स्वरांस किंवा कोणत्याहि एका स्वरापासून दुसऱ्या त्याच स्वरापर्यंत मधील स्वरांस स्वर-सप्तक असें म्हणतात. जेव्हां दोन सप्तकांतील एकच स्वर वाजविण्यांत येतो तेव्हां त्याचा कानावर एकच परिणाम होतो व त्या दोन स्वरांचा मिलाफ होतो.

**स्वर्ग**—स्वर्गलोक वर आकाशांत आहे व तेथें देव व पुण्य-वान् प्राणी राहतात अशी सर्व धर्मांत जुनी समजूत आहे. मृत्यूनंतर प्राणी स्वर्गाला जातो, अशा समजुतीनें आपण तो स्वर्गवासी झाला असें म्हणतों. पण नरकाचीहि कल्पना असल्यामुळें (नरक पाहा) फक्त केवळ पुण्यसंचय केलेले प्राणीच स्वर्गांत राहूं शकतात असें झालें. आमच्या पुराणांतून स्वर्गा-संबंधीं कितो तरी उल्लेख आहेत व स्वर्ग आणि मृत्युलोक यांत फार दळणवळण असे असेंहि दिसून येतें. मुसलमानांची कल्पना म्हणजे जेथें वैषयिक सुखाची चंगळ तें स्थान स्वर्ग अशी

आहे. पृथ्वीवर पुण्य केल्याचें फळ म्हणून स्वर्ग लाभतो ही ज्यू लोकांची भावना ख्रिस्ती संप्रदायानें सुधारून दृढ केली.

स्वर्ग ही चिरंतन सुखाची अवस्था आहे. स्वर्गांतील मुख्य आनंद परमेश्वराचें पूर्ण स्वरूपात प्रत्यक्ष दर्शनरूपी जे धन्यतात्मक दृश्य दिसतें त्यामध्यें असतो. या धन्यतेमध्यें इतर आशीर्वादित व्यक्ती व देवदूत यांचा सहवास आणि शरीरास व आत्म्यास मिळणारा आनंद यांची भर पडते. पूर्वी केलेल्या सर्व पातकांबद्दल मिळणाऱ्या शिक्षांपासून मुक्तता आणि कृपेची प्राप्ति यांमुळेंच स्वर्गप्राप्ति होते, असें ख्रिस्ती धर्म सांगतो.

**स्वरित गति**—( हार्मॉनिक मोशन ). कोणत्याहि आंदोलक किंवा व्युत्क्रम गतीला ही संज्ञा आहे. एखादा बिंदु जेव्हां ठराविक वेगानें वर्तुळाच्या परिघामोंवतीं फिरतो तेव्हां त्या वर्तुळाच्या स्थिर व्यासावरील त्याच्या प्रलंबा( प्रोजेक्शन )ची जी गति तिला स्वरित किंवा हरात्मक गति म्हणतात.

**स्वाझिलँड**—दक्षिण आफ्रिकेंतील एक ब्रिटिश संरक्षित राज्य (प्रोटेक्टोरेट). क्षे. फ. ६,६७८ चौ. मै. व लो. सं. १,४६,०१९. याच्या सभोंवतीं ट्रान्सवाल, नाताळ, व पोर्तुगीज पूर्व आफ्रिका हीं आहेत. पश्चिम भाग उंच आणि आरोग्यप्रद आहे; परंतु खालचा दक्षिणेकडील भाग श्वेतवर्णीयांस त्रासदायक आहे. तेथील हवामान व उष्णता त्यांस असह्य होते. लोक जनावरें व मेंढ्या पाळतात. येथें गहूं व मका पिकतो. कथील व सोनें यांच्या खाणी आहेत. हा मुलूख १९०० सालीं ब्रिटिशांकडे आला.

**स्वात संस्थान**—हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवरील प्रांतांतील जुन्या दीर, स्वात व चित्रळ एजन्सींपैकीं एक भाग. हा भाग म्हणजे स्वात नदीचें खोरें होय. या संस्थानचे स्वात कोहिस्तान ( डोंगराळ प्रदेश ) व स्वात खुद्द असे दोन भाग आहेत. स्वातचें क्षे. फ. दीरएवढेंच म्हणजे ४,००० चौ. मै. आहे, परंतु खोऱ्याची लांबी १३० मैलांपेक्षां जास्त नसून रुंदी सरासरी १२० मैल आहे. स्वात व पंजकोर नद्यांच्या संगमाजवळ खोऱ्याची उंची समुद्रसपाटीच्या वर दोन हजार फूट आहे. खालच्या खोऱ्यांतील हवा मलेरियाची व रोगट आहे. या देशासंबंधींचा पहिला उल्लेख ॲरियन यानें केला असून कुनर, बाजौर, स्वात यांमधून ख्रि. पू. ३२६ या वर्षी अलेक्झांडर यानें आपलें सैन्य नेलें होतें. बष्कर व स्वात कोहिस्तानमध्यें हल्लीं राहणाऱ्या गुजर, तोरवाल, गढवाल, वगैरे लोकांचे बौद्धधर्मी पूर्वज १५ व्या शतकापर्यंत तेथेंच राहत होते. पठाण टोळ्यांच्या आगमनानंतर सर्व भागांत मुसलमानी धर्म सुरू झाला. या सुमारास बाबरानें मोठ्या चातुर्यानें युसुफझै टोळीच्या मुख्य मलिकशहा मनसूर याच्या मुलीशीं विवाह करून त्याच्या मुलखांत आपली सत्ता प्रस्थापित केली. परंतु हुमायूनच्या कारकीर्दीत युसुफझै लोकांनीं त्याची सत्ता झुगारून दिली व १५८४ त अकबरहि त्यांना पूर्णपणें आपल्या ताब्यांत आणूं शकला नाहीं. पण पुढें त्यांच्यामध्यें धार्मिक बाबतींत भांडणें सुरू झालीं, व त्यामुळें अकबरास तो मुलूख आपल्या ताब्यांत घेतां आला; तथापि १६५८ त औरंगजेबाच्या कारकीर्दीत स्वातनें आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें. नादिरशहाच्या वेळेपर्यंत त्याचें स्वातंत्र्य कायम होतें. पण अहमदशहा दुराणी व तैमूरशहा यांनीं हा प्रदेश आपल्या ताब्यांत ठेविला होता. १८२३ सालीं अझीमखाननें शीख लोकांवर हल्ला केला त्या वेळीं युसुफझै टोळीनें त्याला पुष्कळ मदत केली. १८४९ त पेशावरचें खोरें ब्रिटिशांच्या ताब्यांत आलें. अखुंद हा १८७७ त मरण पावल्यावर ह्याच्या गादीसंबंधीं त्याचा मुलगा व दीरचा खान यांच्यामध्यें तंटा उत्पन्न झाला. त्या वेळच्या भांडणांत बाजौरच्या घराण्यांतील उमराखान नांवाचा पुरुष पुढें आला. त्यानें अखुंदचा मुलगा मियानगुल याशीं दोस्ती करून दीरच्या खानाचा अर्धा मुलूख काबीज केला. परंतु पुढें त्याचें व मियानगुलचें न पटून त्यानें बरेच लोक उमराखानाच्या विरुद्ध जमा केले. परंतु उमराखानानें त्यांचा पराभव करून (१८९०) दीरचा सर्व मुलूख आपल्या ताब्यांत घेतला. १८९४ त उमराखान व ब्रिटिश यांच्यांत वितुष्ट आलें; व ब्रिटिशांकडून पराभव पावल्यामुळें त्याला १८९६ त काबुलास पळून जाणें भाग पडलें. दीरच्या खानानें लगेच आपली सत्ता परत मिळवून इंग्रजांशीं तह केला. नौशहरपासून मलकंद घाटाच्या पायथ्याशीं दरगैपर्यंत रेल्वे रस्ता झालेला आहे. कोहिस्तानखेरीज इतर ठिकाणीं शुद्ध युसुफझै पुश्तु भाषा बोलतात. येथील लोक सुनी पंथाचे मुसलमान आहेत. मुख्य ठिकाण सैदू शरीफ हें मलकंदपासून ३८ मैलांवर आहे. हें संस्थान आतां पाकिस्तानचें मांडलिक आहे.

**स्वादुपिंड**—( पॅंक्रिअस ). मनुष्याच्या शरीरामध्यें स्वादुपिंड या नांवाची एक सुमारें आठ इंच लांबीची लांबट ग्रंथि आमाशयाच्या मागील बाजूस असते. या ग्रंथींतून होणारा स्राव स्वादुपिंडनलिकेच्या द्वारें आंतड्यांत जातो. हा रस अन्नपचनाच्या कामीं उपयोगी पडतो.

**स्वान, सर जोसेफ विल्सन**—एक इंग्रज संशोधक. त्याचे मुख्य शोध प्रकाशलेखना( फोटोग्राफी )मधील आहेत. त्यानें लवकर वाळणारी काच ( रॅपिड ड्राय प्लेट ), ब्रोमाइड कागद, कार्बन कागद, स्वयंटंक पद्धति ( ऑटोटाइप प्रोसेस ), इ. शोधून काढलीं. खाणींत काम करणाऱ्यासाठीं संरक्षित दिवे ( मायनर्स इलेक्ट्रिक सेफ्टी लॅम्प ) आणि प्रकाशलेखनाचें यांत्रिक मुद्रण ( फोटो मेकॅनिकल प्रिंटिंग ) आणि विद्युद्धातुविद्या ( इलेक्ट्रो-मेटॅलर्जी ) यांत अनेक सुधारणा घडवून आणल्या. त्यानें विजेच्या प्रकाशाबाबतींतहि लक्ष घालून प्रज्वलित (इनकॅंडेसेंट) दिवे शोधून काढले.

**स्वानसी**— वेल्स, ग्लॅमोर्गनशायर परगण्यांतील बंदर. येथील हवा सौम्य व चांगली असून पाऊस सुमारें ४० इंच पडतो. दक्षिण वेल्सच्या रॉयल इन्स्टिट्यूटमध्यें भूस्तर, खनिज, वनस्पती व प्राचीन वस्तू यांचा संग्रह केलेला आहे. येथील ग्रंथालयांत वेल्ससंबंधीं ऐतिहासिक व शास्त्रीय पुस्तकांचा चांगला संग्रह आहे. येथें ल्वेलिन नांवाची मोठी रमणबाग आहे. स्वानसी हें नैसर्गिक बंदर असल्यामुळें याची फार भरभराट झाली. त्याचप्रमाणें हें बंदर दक्षिण वेल्सच्या कोळशाच्या प्रांतांत चांगल्या ठिकाणीं वसलेलें आहे. या शहरांत तांबें, जस्त, लांकूडकाम यांचे उद्योगधंदे आहेत. लो. सं. १,६४,८२५.

**स्वाभाविक संवरण**—(नॅचरल सिलेक्शन). स्वाभाविक संवरण अथवा नैसर्गिक निवड करण्याची शक्ति ही डार्विनच्या सिद्धान्तांतील अगदीं प्राथमिक व महत्त्वाची कल्पना आहे. १८५८ सालीं जुलैच्या पहिल्या तारखेस डार्विन आणि आल्फ्रेड वालेस या दोघांनीं लंडनच्या लिनियन सोसायटीकडे जातींची नवीन नवीन जाती निर्माण करण्याची प्रवृत्ति आणि स्वाभाविक संवरण पद्धतीनें निरनिराळ्या जाती व पोटजाती सतत राहण्याकडे प्रवृत्ति या विषयांवर निबंध पाठविले. या निबंधांत डार्विननें प्रथम स्वाभाविक निवड आणि वालेस यानें जीवनार्थ धडपड या गोष्टी प्रथम पुढें मांडल्या. यानंतर १८५९ सालीं २४ नोव्हेंबरला डार्विनचा 'जातींची उत्पत्ति' हा ग्रंथ बाहेर पडला. या ग्रंथांत त्यानें असें म्हटलें आहे कीं, स्वाभाविक निवडीमुळें जातीजातींत बदल होत जातो. परंतु वास्तविक अशी स्थिति आहे कीं, स्वाभाविक निवडीमुळें जातींचें अस्तित्व कायम राहतें व प्रत्येक जातींत होणारे बदल कायम टेवण्याकडे प्रवृत्ति असते. अशी प्रवृत्ति असल्याशिवाय स्वाभाविक निवडीनें कांहींच कार्य होणार नाहीं. या प्रश्नावर पुष्कळच वाङ्मय अलीकडे तयार झालें आहे.

**स्वामीनारायण पंथ**—या संप्रदायाचे संस्थापक स्वामी सहजानंद (१७८१-१८३०) हे होत. हे कच्छमधील रामानंद नांवाच्या संन्याशाचे शिष्य असून रामानंदामागून यांनीं ती गादी घेतली. पुष्टिमार्गांत या वेळीं जे प्रकार शिरले होते ते नाहींसे करण्यासाठीं सहजानंदांनीं बरेच उपाय योजिले. काठेवाडांत यांच्या धर्माची छाप बसली. सर्व जातींस या पंथांत दाखल होण्याची मोकळीक होती. सहजानंदांच्या शिष्यांनीं धर्मप्रसाराचें काम विशेष केलें. कांहीं इस्लामी धर्मांतील खोजा लोकांनींहि या मताचा स्वीकार केला. या धर्ममताचा मुख्य ग्रंथ 'शिक्षापत्री' हा आहे. या पंथांत प्रापंचिक साधु म्हणजे विरक्त वृत्तीचे वाणी, राजपूत, पाटीदार, वगैरे लोक आहेत. पंथाचे मठ गढडा, अहमदाबाद व वडताल येथें आहेत. याच्यांत हरिकृष्ण, मल्लराम व पुरुषोत्तम हे तीन आचार्य झाले. त्याच्यामुळें तीन निरनिराळ्या शाखा उत्पन्न झाल्या. सहजानंदासच स्वामी नारायण असें दुसरें नांव आहे. हा एक भक्तिपंथ असल्यामुळें उद्धवपंथ असेंहि त्यास म्हणतात. या पंथाचे लोक आपणांस 'सत्संगी' व इतरांस 'कुसंगी' म्हणतात. या पंथाचें मुख्य दैवत श्रीकृष्ण आहे. या पंथांतील लोकांची संख्या सुमारें दहा लाखांपर्यंत असावी. गुजराथ-काठेवाड या बाजूसच यांची मोठी वस्ती आहे. महाराष्ट्रांतील वारकरी संप्रदायाप्रमाणें स्वामीनारायण पंथ गुजराथेंत मोठा प्रभावी आहे.

**स्वाम्या**—एक कुलाचार. हा खानदेशांत कांहीं देशस्थ घराण्यांत पाळतात. ह्या कुलाचारांत सर्व कुटुंबाची मंडळी एका ठिकाणीं जमावी लागते. गोत्रजांपैकीं कोणीहि परके ठिकाणीं असल्यास हा कुलाचार पूर्ण होऊं शकत नसे. सदरहू कुलाचार बहुधा माघ महिन्यांत करतात. कुटुंबांत एखादें लग्नासारखें मंगलकार्य झालें म्हणजे हा कुलाचार करणें अगदीं अवश्य असे. एखादा जुनाट रोग कुटुंबांतील मुख्य माणसास झाल्यास तत्परिहारार्थहि हा कुलाचार करण्याचा नवस करतात व तो केला असतां असा रोग बरा होतो, अशी बरीच रूढ समजूत आहे.

**स्वाहिली**—'किनारा' या अर्थी अरबी शब्दावरून हें नांव पडलें. पूर्व आफ्रिकेच्या किनाऱ्यावर बऱ्याच मोठ्या प्रदेशांत आणि नजीकच्या बेटांत राहणाऱ्या लोकांचें हें नांव आहे. हे लोक अरब आणि आफ्रिकेंतील बांटूभाषी आदिवासी यांची बनलेली मिश्र जात आहेत. यांची स्वाहिली भाषा पूर्व व मध्य आफ्रिकेंत बरीच प्रचारांत आहे.

**स्वाक्षरी-संग्रह**—एखाद्या थोर माणसानें स्वतः आपली केलेली सही ही त्याच्या हस्ताक्षरावरून निराळी असते व अशा थोरामोठ्यांच्या सह्या गोळा करण्याचा उद्योग आपल्या देशांत अलीकडे सुरू झालेला दिसत असला तरी त्याचा उगम जर्मनी, हॉलंडसारख्या पाश्चात्य राष्ट्रांत निदान सोळाव्या शतकापासून सांपडेल. ब्रिटिश म्यूझियममधील सर आर. कॉटन यानें जमविलेला असा स्वाक्षऱ्यांचा संग्रह सर्वांत जुना म्हणतां येईल. बिब्लिओथेक नाशिओनालमध्यें अनेक कांहीं जुने संग्रह ठेवलेले आहेत. अलीकडे तयार केलेला आल्फ्रेड मॉरिसनचा संग्रह सुप्रसिद्ध आहे.

सध्यां विद्यार्थिवर्गांत थोरांच्या स्वाक्षऱ्या व संदेश जमविण्याची अहमहमिकाच लागून राहिलेली दिसते. त्यांचा काम सुरू करण्यासाठीं म्हणा किंवा एखाद्या महत्कार्याला मदत म्हणून म्हणा कांहीं पुढारी स्वाक्षरीचा द्रव्यिक दैसे मागतात व ते मिळवितातहि. पण अशा स्वाक्षरीसंग्रहाची कोठें नोंद ठेवल्याचा केलेली आढळत नाहीं.

स्वित्झर्लंड—युरोपांतील एक लोकसत्ताक राज्य. ऑस्ट्रिया, फ्रान्स, जर्मनी व इटली यांच्या सरहद्दी याला लागून आहेत. क्षेत्रफळ अवघें १५,७३७ चौ. मै.. लो. सं. ४२,६५,७०३. यांतून आल्प्स पर्वत गेला आहे, त्यामुळें प्रदेश डोंगराळ आहे. उत्तरेस ऱ्हाइन व दक्षिणेस ऱ्होन नदी वाहते. सरोवरें अनेक आहेत. त्यांपैकीं जिनेव्हा, कान्स्टन्स व न्यू चॅटेल हीं मोठीं आहेत. हें एवढें लहान राज्य असूनहि त्यांत २२ लहान लहान चिमुकलीं स्वतंत्र संस्थानें आहेत व स्वित्झर्लंड हें त्यांचें संयुक्त संस्थान बनलें आहे. या बावीस पोट-संस्थानांपैकीं १६ मध्यें जर्मन, २ मध्यें फ्रेंच व एकांत इटालियन भाषा प्रचलित आहे. तीन संस्थानांत जर्मन व फ्रेंच दोन्ही भाषा आहेत. बर्न हें राजधानीचें ठिकाण असून झूरिच हें प्रख्यात व मोठें शहर आहे. आरोग्यप्राप्तीसाठीं हवा-पालट करण्याला, सृष्टिसौंदर्य पाहण्याला, क्षय-निवारणाला वगैरे कारणांकरितां या देशांत बाहेरच्या प्रवाशांची नेहमीं मोठी गर्दी असते. हिंवाळ्यांत क्रीडांगणें हीं बाहेरच्या खेळाडूंनीं भरलेलीं असतात. यामुळें येथें हॉटेलें व खानावळी हा एक मोठा उत्पन्नाचा धंदाच होऊन बसला आहे. शेती व दुभेऱ्या (डेअरी) हे प्रमुख धंदे आहेत. घड्याळें बनविणें हें या देशाचें वैशिष्ट्य आहे. कंडेन्स मिल्क, चॉकोलेट व इतर जिनसा तयार करण्याचे धंदे बरेच आहेत.

बेसल येथें १४६० मध्यें स्थापन झालेलें विद्यापीठ आहे. १८ ते ६० वयापर्यंत लष्करी नोकरी सक्तीची आहे.

प्राचीन काळीं स्वित्झर्लंडमध्यें हेल्व्हेशियन व ऱ्हीटियन लोक राहत. त्यांना ख्रि. पू. १ ल्या शतकांत रोमन लोकांनीं जिंकलें. पुढें चार शतकें रोमन वर्चस्व होतें. नंतर फ्रँक लोकांनीं स्वामित्व गाजविलें. फ्रँकिश राज्य बुडाल्यानंतर आलेमानियाच्या डचीमध्यें याचा समावेश झाला (९ वें शतक). ११ व्या शतकांत पवित्र रोमन (जर्मन) साम्राज्यांत स्वित्झर्लंडला घालण्यांत आलें. १६४८ त वेस्टफालियाचा तह झाला तेव्हां स्वित्झर्लंड स्वतंत्र झालें. त्यानंतर फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळीं त्यावर गदा आली होती पण निभावलें. १८१५ त स्वित्झर्लंडची निरंतरची तटस्थवृत्ति व्हिएन्नाच्या कॉंग्रेसनें जाहीर केली. त्याप्रमाणें पहिल्या व दुसऱ्या महायुद्धांत स्वित्झर्लंड तटस्थ राहिलें.

लोक—स्विस लोक मोठे उद्योगी, काटक व कुशल कारागीर आहेत. ते केल्टिक आणि ट्युटॉनिक मानव-वंशांतील आहेत; पण त्यांच्यांत ट्युटॉनिक रक्त दुप्पट प्रमाणांत आहे. गॉलिक, इटालियन व रोमानिश या तीन जातींचे लोक यांत दिसतात. गॉलिक फ्रेंच बोलतात व रोमानिश लोकांची लॅटिन बोली आहे. शें. ६० लोक जर्मन बोलणारे आहेत. शें. २० फ्रेंच बोलणारे आढळतील. भाषा व वंश यांचें मिश्रत्व असूनहि स्विस लोक अगदीं एकजुटीचे आहेत. सर्वांत राष्ट्रीय वृत्ति पूर्ण बाणली आहे. सर्वांना स्वातंत्र्याची तीव्र लालसा आहे. त्यामुळें राष्ट्र भंगलेलें नाहीं. जमीन लोकांच्या मालकीची असल्यानें पुरुष-स्त्रिया दोघेंहि सारखेंच खपून होईल तसा उदरनिर्वाह करतात. धंदे कुटुंबांतून वंशपरंपरागत अव्याहत चाललेले आहेत. मर्यादित साधनांमुळें लोकांत मितव्यय व काटकसर चांगली बाणली आहे.

वाङ्मय—भाषावैविध्यामुळें स्वित्झर्लंडला राष्ट्रीय वाङ्मय असें नाहीं. धर्मसुधारणेच्या काळापूर्वी लोक लॅटिन किंवा जर्मन भाषेंत लिहीत. वर्थहोल्ड स्टीनमर व हॅन्स हॅडलौच (१२५०–१३२५) हे प्रख्यात भाटकवी होऊन गेल्यानंतर पंधराव्या शतकांत 'सारनेनचा श्वेत ग्रंथ' बाहेर पडला. स्विस-धर्म-सुधारणा-काळांतला नांवाजलेला कवि म्हणजे निकोलस मॅन्यूएल (१४८४–१५६०) हा होय. १९ व्या शतकांत जर्मन-स्वित्झर्लंडच्या भागांत वाङ्मयाचा स्विस संप्रदाय निघाला; बोडमेर (१६९८–१७८३) व ब्रीटिंजर हे त्याचे अध्वर्यु म्हणतां येतील. अल्बर्ट फॉन हालर (१७०८–१७७७) या बर्नीज कवीनें निसर्गाकडे फिरण्याचा आदेश दिला. आइस्लिन (१७२८–१७८२) हा तत्त्वज्ञानी होता. याच काळांत युलर (१७४६–१८२७) व बर्नोली यांसारखे गणितज्ञ व पेस्टालोझीसारखे शिक्षणतज्ज्ञ व स्वित्झर्लंडमध्यें निघाले. १९ व्या शतकांतील प्रमुख जर्मन-स्विस लेखकांत आल्बर्ट बिट्झियस (१७९७–१८५४), गोट्फ्रीड केलर (१८१९–१८९०), कोनराड मेयर (१८२५–१८९८) यांचीं नांवें ध्यावीं लागतील.

पहिल्या फ्रेंच-स्विस लेखकांत धर्माचार्य व उपदेशक हेच आढळतात. पण यांत बोनिव्हार्ड हा इतिहासकार व ब्लेझ होरी हा कवि होता. 'एडिक्ट ऑफ नॅन्टीज्' रद्द झाल्यावर बरेच सुसंस्कृत फ्रेंच लोक स्वित्झर्लंडमध्यें आले. लुई बुर्ग्वे यानें 'मक्यूर स्विस' स्थापन केलें व त्यांतील महत्त्वाचे लेख ब्रिडेल (१७५७–१८४५) याचे आहेत. फ्रेंच भाषेंत लिहिणारे इतर स्विस लेखक म्हणजे तत्त्वज्ञानी बॉन-स्टेटेन; राष्ट्रीय कवि ए. रिचर्ड (१८०१–१८८१); पेतित-सेन (१७९२–१८७०); हेन्री आमिएल (१८२१–१८८८) हा नीतिशास्त्रज्ञ; अलेक्झांडर व्हिने (१७९७–१८४७) हा वाङ्मयीन इतिहासकार; ज्युस्त ऑलिव्हिएर (१८०७–१८७६) हा कवि; व युजेन रॉबर्ट (१८३०–१८८६) हे होत. नंतर अगदीं अलीकडले म्हणजे एडूअर्द रोद (१८५७–१९१०); इसाबेल काइझर; फिलिप मोनिएर; व विडमन (१८४२–१९११) हा कवि, नाटककार व कादंबरीकार, हे होत. सृष्टिसौंदर्याच्या पार्श्वभूमीवर आधुनिक जीवनाची छटा बठवून वास्तववादाशीं मेळ घालणारे हीनरिश फेडेरर (१८६६–१९२८); जोहानीज जेगेर्लेहनर (१८७१–१९४४); अर्न्स्ट झाहन (जन्म १८६७) यांसारखे लेखकहि स्विस साहित्यांत दिसतील.

**स्विन्बर्न, आल्जेर्नान चार्लस** (१८३७–१९०९)—एक इंग्रज कवि व टीकाकार. त्याचें शिक्षण ऑक्सफर्ड येथें झालें. त्याचीं पहिलीं काव्यें म्हणजे 'दि क्वीन मदर व रोझॅमंड' (१८६०); 'अॅटलँटा इन् कॅलिडन्' (१८६५); 'पोएम्स अँड बॅलड्स' (या कविता-संग्रहानें त्याची कीर्ति झाली, पण थोडी कुप्रसिद्धिहि झाली. कारण त्यांतील कांहीं कविता अयोग्य आहेत); 'साँग्ज बिफोर सनराइज' (हें फार शृंगारिक आहे. पण त्यांत रचना-कौशल्याची बहार दिसते); इ.. त्यानें वाङ्मयावर टीकापर पुष्कळ लेख लिहिले व ते सर्व उपयुक्त आणि आकर्षक आहेत. स्विन्बर्न हा इंग्रज कवींत थोर दर्जाचा आहे. त्यानें काव्यरचनेंत फार महत्त्वाचे फरक घडवून आणले. आणि विशेषतः सुरेल व गेय कविता लिहिल्या. त्यानें आयांबिक या वृत्ताऐवजीं डॅक्टिलिक व अॅनॅपेस्टिक या वृत्तांत आपल्या कविता लिहिल्या. त्याचें लक्ष नेहमीं काव्यगायनाकडे असे.

**स्विफ्ट, जोनाथन** (१६६७–१७४५)—एक ब्रिटिश उपरोधिक लेखक. त्यानें शिक्षण डब्लिन येथें ट्रिनिटी कॉलेज-मध्यें झालें, व त्याला आयर्लंडमध्यें उपाध्याय करण्यांत आलें. त्याचा 'हेस्टर जॉनसन्' ऊर्फ 'स्टेला' आणि तिची मैत्रीण 'रेबेका डिंगल' यांच्याशीं परिचय होऊन त्या दोघी आयर्लंडमध्यें राहण्यास गेल्या, व स्विफ्ट त्यांना नेहमीं भेटत असे. १७०४ पासून त्यानें लेखनास आरंभ केला. पण त्याचें बहुतेक लिखाण निनांवी प्रसिद्ध झालें. १७१० मध्यें तो लंडन येथें येऊन टोरी पक्षाला मिळाला, व त्या पक्षाच्या वतीनें त्यानें पुष्कळ राजकीय निबंध लिहिले. त्याला १७१३ सालीं सेंट पॅट्रिक्सचा डीन नेमण्यांत आलें. त्यानें 'प्रपोझल फॉर दि युनिव्हर्सल यूस ऑफ आयरिश मॅन्युफॅक्चर्स' (१७२०), आणि 'दि लेटर्स ऑफ एम्. बी. ड्रेपीयर' (१७२३) हीं पुस्तकें लिहिलीं; व त्यामुळें तो आय-रिश लोकांना अतिशय पूज्य वाटूं लागला. १७२८ सालीं स्टेला वारल्यानंतर तो प्रसिद्ध व अखेरच्या दिवसांत वेडाहि झाला. त्यानें पुष्कळ पुस्तकें व असंख्य निबंध लिहिले, त्यांपैकीं महत्त्वाचीं पुस्तकें आहेत तीं—'दि टेल ऑफ ए टब' (स्विफ्टचें सर्वांत उत्तम पुस्तक १७०४); 'दि बॅटल ऑफ बुक्स' (यांत पॅट्रले-बॉईल वाद वर्णिला आहे.); 'गलिव्हर्स ट्रॅव्हल्स' (ही अतिशय लोकप्रिय आणि इंग्रजी वाङ्मयांतील उत्तम कादंबरी; १७२६); 'ए लेटर टु ए यंग जन्टलमन लेटली एन्टर्ड इन्टु होली ऑर्डर्स' (यांत स्विफ्टचीं धार्मिक मतें आहेत); 'प्रेडि-क्शन्स फॉर दि इयर (१७०८) बाय आयझॅक बिकर्स्टाफ' (यांत त्यानें फलज्योतिषावर हल्ला केला आहे.); 'दि कॉन्डक्ट ऑफ दि अलाइज' आणि 'दि बॅरियर ट्रीटी' (यांत टोरी पक्षाचें समर्थन आहे.); 'ए मॉडेस्ट प्रपोझल' (हें स्विफ्टचें सर्वांत अधिक उपरोधी लिखाण आहे); इ.. त्यानें कवितादि लिहिल्या आहेत. त्यांपैकीं 'कॅडेनूस अँड व्हॅनेसा' आणि स्टेलाला उद्देशून लिहिलेल्या कविता अतिशय आकर्षक आहेत. 'ऑन पोएट्रीः ए ऱ्हॅप्सोडी' हा फार परिणामकारक लेख आहे. 'ऑन दि डेथ ऑफ डॉक्टर स्विफ्ट' ही विनोदी व करुणाजनक कविता आहे. बाल-वाङ्मयांत गलिव्हरच्या प्रवासवृत्ताला फार महत्त्व आहे.



**स्वीडन**—युरोपमधील एक राज्य. उत्तर युरोपचा पश्चिम भाग ज्यास स्कँडिनेव्हिया म्हणतात त्यांतलाच हा एक देश आहे. क्षेत्रफळ १,७३,३४७ चौ. मैल व लो. सं. ६४,५८,२२१. बाल्टिक समुद्रावर मोठा समुद्रकिनारा आहे. नॉर्वे आणि फिनलंड मिळून १०००।१२०० मैलांची सरहद्द आहे. कांहीं कांहीं भागांत टेंकड्या आहेत. परंतु एकंदरींत प्रदेश डोंगराळ नव्हे. जमीन सुपीक आहे. त्यांत कित्येक मोठमोठीं तळीं व सरोवरें आहेत. हेनर्न सरोवर लहानसा समुद्रच आहे. त्याचें क्षेत्रफळ २,००० चौरस मैलांवर आहे. स्टॉकहोम हें सर्वांत मोठें व राजधानीचें शहर आहे. उपसाला विद्यापीठ १४७७ त स्थापन झालेलें आहे. देशांतील २० ते ४७ वयापर्यंत सर्व पुरुषांना लष्करी नोकरी सक्तीची आहे.

स्वीडन हा प्राधान्यानें शेतीचा प्रदेश आहे. जनावरें व मेंढ्या पाळणें आणि मच्छीमारी हे दोन महत्त्वाचे उद्योगधंदे आहेत. खनिजांच्या बाबतींतहि विपुलता आहे. मुख्यतः लोखंडाची निर्गत फार मोठी आहे. जंगलांतून लांकूड व कागदाकरितां लागणारा लगदा (पल्प) वगैरेंचें उत्पादन होतें व बराच कागद होतो. यांत्रिक कारखान्यांत विणकाम यंत्रें, आगपेट्या, वगैरे करण्याचे प्रमुख कारखाने आहेत. विद्युदुत्पादन व उपयोग यांची वाढ व प्रगति विशेष आहे. राष्ट्राचा धर्म (स्टेट चर्च) ल्युथेरियन पंथ आहे. क्रोनन या नांवाचें मुख्य ठाणें असून बर्जर्न-सॉर्न हीं दरम्यान पद्धतीचीं आहेत.

दहाव्या शतकाच्या सुमारास येथें प्रथम राजसत्ता अस्तित्वांत आली. लवकरच येथील लोकांनीं ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केला. स्वीडिश व गॉथ असे दोन मानववंश येथें होते. कालांतरानें ते एक झाले. येथील जुन्या राजांत सेंट एरिक हा प्रख्यात होऊन गेला. कांहीं काळ स्वीडन व नॉर्वे यांचें एकच संयुक्त राज्य होतें. १३९७ मध्यें स्वीडन, नॉर्वे व डेन्मार्क हीं तिन्ही एकत्र झालीं. पुढें सुमारें शंभराहून अधिक वर्षें स्वीडिश लोकांचा त्यांच्या-वर असलेल्या डेन्मार्कच्या अधिसत्तेशीं झगडा चालू होता. १५२३ मध्यें गुस्टाव्हस वासा यानें डेन्स लोकांचा कायमचा पराभव करून देण्यांत यश संपादन केलें आणि त्याला लोकांनीं आ. नवीन राजा म्हणून मान्य केलें. इतिहासांत स्वीडनचा खरा प्र. येथूनच होतो.

सतराव्या शतकांत गुस्टाव्हस अडोल्फस आणि पुढें बारावा चार्लस यांच्या अमदानींत स्वीडनचें लष्करी बळ चांगलेंच होतें व त्यामुळें युरोपमध्यें कांहीं काल स्वीडनला प्रतिष्ठेचें स्थान होतें. स्वीडननें पुष्कळ मुलुखगिरी केली, परंतु जिंकून घेतलेले प्रदेश त्याला राखतां आले नाहींत. पुढें रशिया प्रगतिपर झाल्यामुळें बाल्टिक संस्थानावरचें स्वीडनचें वजन नाहींसें झालें. १८१० मध्यें नेपोलिअननें आपला मार्शल बर्नोदोते याची वर्णी स्वीडनच्या युवराजपदावर लावली; कारण त्या वेळचा राजा तेरावा चार्लस हा निपुत्रिक होता. १८१८ मध्यें हे युवराज चौदावा चार्लस म्हणून राजे झाले. १८१४ ते १९०५ या कालांत स्वीडनचाच नॉर्वेवरहि अमल होता. १९०७ मध्यें पांचवा गुस्टाव्हस, वरील बर्नोदोतेचा वंशज दुसऱ्या ओस्कारचा मुलगा गादीवर आला. स्वीडनमध्यें अद्यापहि राजसत्ताच नांदत आहे. तथापि देशांत उद्भवणारे सर्व राजकीय आणि आर्थिक प्रश्न व वाद लोकशाहीच्या धोरणानें सोडवण्याबाबत स्वीडननें ख्याति मिळवली आहे. गेल्या दोन्ही महायुद्धांत स्वीडन तटस्थ होतें.

भाषा आणि वाङ्मय—स्वीडिश भाषा ही प्राचीन नोर्सेच्या वंशांतील असल्यानें डॅनिश आणि नॉर्वेजियन भाषांना जवळची आहे. प्राचीन उपलब्ध वाङ्मय १३ व्या शतकांतील असून तें प्रांतिक कायदे व भाटगीतें यांसंबंधींच आहे. १४ व्या शतकांत दक्षिण युरोपांतील वीररसकाव्यें व धार्मिक कथा यांचीं भाषांतरें करण्याकडे प्रवृत्ति दिसते. १४७८ त उपसाला विद्यापीठ स्थापन झालें व १६८३ मध्यें स्टॉकहोम येथें मुद्रण सुरू झालें. १६ व्या शतकांतील वाङ्मयावर धर्मसुधारणेचा पगडा असल्यानें तें वादविवादात्मक आहे. पुढील शतकांत मेसेनियसचीं नाटकें व स्वीडिश काव्याचा जनक जो स्टर्नहेल्म (१५९८-१६७२) याच्या कविता हीं वैशिष्ट्यें सांगतां येतात. १८ व्या शतकांत फ्रेंच आणि इंग्लिश वाङ्मयाची स्वीडिश वाङ्मयावर बरीच छाप दिसून येते. या काळांत ओलोफ फॉन डालिन (१७०८-१७६३) हा गद्यपद्य-लेखक, कार्ल मायकेल बेल्मन (१७४०-१७९५) हा उच्च दर्जाचा गीतकार, व टेग्नेर (१७८२-१८४६) हे प्रसिद्ध साहित्यिक होऊन गेले. नंतरच्या लेखकांत फ्रेडरिकाब्रेमेर ही फिनिश कवयित्री; रुनेबर्ग, झकिस टोपेलियस व काउंट स्नोइल्स्की हे कवी; रायड्बर्ग हा इतिहासकार व कादंबरीकार; हाल्स्ट्रॉम हा कवि व नाटककार; व स्ट्रिंडबर्ग हा नाटककार व कादंबरीकार यांचीं नांवें सांगतां येतील.

पहिल्या महायुद्धानंतर लेखकांची परिस्थिति बरीच सुधारली. प्रौढ शिक्षणाचा उपयोग होऊन साक्षरता वाढली व वाङ्मयाला उत्तेजन मिळूं लागलें. १९४० सालीं स्वीडनमध्यें १,४०० ग्रंथालयें व ४,००० अभ्यास-मंडळें होतीं. कामकरी वर्गाच्या जीवनाचें चित्रण साहित्यात जास्त दिसूं लागलें व उच्च शिक्षण न घेतलेलेहि चांगले लेखक होऊं लागले. तसेंच मनोविश्लेषणाची फार आवड या लेखकांत उत्पन्न झाली. ॲग्नेस फॉन क्रुसेनस्टर्ना या अशा प्रकारच्या लेखिकेच्या जोडीला आयव्हिड जॉनसन (जन्म १९००) याला धरतां येईल. यांच्या कादंबऱ्या गुंतागुंतीच्या प्रश्नांच्या व मनोविश्लेषणात्मक आहेत. रुडोल्फ व्हानेलुंड, विल्हेल्म मोबर्ग, लो जोहानसन प्रभृति लेखकांनीं ग्रामीण जीवन हाताळलें आहे.

**स्वीडनबोर्ग, एमॅन्युएल** (१६८८-१७७२)—एक स्वीडिश शास्त्रज्ञ आणि गूढविद्यावादी तत्त्वज्ञ. त्याचा आध्यात्मिक जगाशीं प्रथम तपशीलवार परिचय लंडन येथें १७४३ सालीं करून देण्यांत आला. त्या वेळीं तो आपली अंतर्दृष्टि स्वर्ग, नरक, आणि भुतांखेतांचें जग पाहण्यास समर्थ बनली आहे आणि त्यामुळें आपणाला आपल्या परिचयाच्या मृत माणसांशीं आणि प्राचीन काळच्या अनेक सुप्रसिद्ध व्यक्तींशीं संभाषण करता येऊं लागलें आहे, असें ठाम सांगत असे. यानंतर तो इंग्लंडमध्यें आणि हॉलंडमध्यें पुष्कळ काळ राहिला. त्यानें धार्मिक विषयावर १७४७ ते १७७१ पर्यंत लॅटिन भाषेंत ग्रंथ लिहिले. परंतु ते फारसे वाचले गेले नाहींत. मात्र त्या ग्रंथांबद्दल त्याच्या कांहीं थोड्या अनुयायांना फार पूज्य बुद्धि वाटत असे.

यानें 'न्यू जेरुसलेम चर्च' किंवा 'स्वीडनबोर्जियन' हा नवा पंथ काढला. या पंथाचे अनुयायी नुसत्या अमेरिकेंत दहा हजारांपर्यंत भरतील.

---

# ह

ह—या वर्णाच्या पांच अवस्था आढळतात. पहिली अशोकाच्या गिरनार येथील शिलालेखांत; दुसरी, महाक्षत्रप शोडास याच्या वेळच्या (ख्रिस्तपूर्व पहिलें शतक) मथुरा येथील जैन लेखांत; तिसरी क्षत्रपवंशी राजा रुद्रदामा (इ. स. २ रें शतक) याच्या गिरनारच्या शिलालेखांत; चौथी अप्सदच्या लेखांत; व शेवटची ११ व्या शतकातील उज्जयिनीच्या लेखांत दिसून येते.

**हँकौ**—चीनमधील एक शहर व नदीवरील बंदर. हें हुपेह प्रांतांत हॅन व यांगत्सिकियांग या नद्यांच्या संगमावर वसलेलें आहे. हॅन नदीच्या दुसऱ्या कांठावर हॅनियांग हें शहर आणि यांगत्सी नदीच्या दुसऱ्या कांठावर वुचँग हें शहर वसलेलें आहे. हें बंदर १८६२ सालीं परदेशी व्यापाराला खुलें करण्यांत आलें. आणि चीनमधील मध्यवर्ती प्रांतांतील जिल्ह्यांत होणाऱ्या चहाच्या व्यापाराचें मुख्य ठिकाण बनलें. येथें अफू, कापूस, रेशीम, वगैरे मालाचा मोठा व्यापार चालतो. समुद्रांतल्या बोटी

या शहरापर्यंत उन्हाळ्यांत येऊं शकतात. हँकौ, हॅनियांग व वुचँग या तीन शहरांना मिळून वूहन हें नांव असून तें दक्षिण चीनची राजधानी आहे. लोकसंख्या सु. आठ लाख आहे.

**हक, मझरुल** (१८६६–१९३०)—एक मुसलमान देशभक्त व कायदेपंडित. हे बॅरिस्टर असून पाटण्यास राहत. यांनी १९०६ सालीं राष्ट्रीय चाण्याची मुस्लिम लीग काढली होती व ते मुसलमानांच्या स्वतंत्र मतदार संघाला विरोध करीत. १९१५ सालीं मुंबईच्या प्रांतिक काँग्रेसच्या अधिवेशनाचे ते अध्यक्ष होते. हे मध्यवर्ती कायदेमंडळांतहि दोनदां निवडून गेले होते. चंपारण्य-सत्याग्रहांत यांनीं म. गांधींना फार मदत केली. नंतर ते वकिली पेशा सोडून असहकारी बनले; व यांनीं शिक्षाहि भोगली होती.

**हॅक्ल्युइट, रिचर्ड** (१५५३–१६१६)—एक ब्रिटिश भूगोलशास्त्रज्ञ. याचें शिक्षण ऑक्सफर्ड येथें ख्राइस्ट चर्च कॉलेज-मध्यें झालें व नंतर तो विश्ववर्णन (कॉस्मॉग्राफी) या विषयाचा व्याख्याता नेमला गेला. १८८४ च्या सुमारास तो पॅरिस येथें इंग्लिश वकिलाचा चॅप्लेन म्हणून गेला आणि तेथें पांच वर्षे राहिला. तेथून इंग्लंडला परत आल्यावर त्यानें 'गेल्या १५०० वर्षांतील जल-प्रवास व संशोधन' या विषयावरील आपला लेख-संग्रह छापण्याकरितां तयार केला. त्याचा पहिला भाग १५८९ सालीं प्रसिद्ध झाला. या ग्रंथांत त्यानें सुमारें २२० जलपर्यटनांची हकीगत दिली आहे. शिवाय या प्रवासासंबंधीं पुष्कळ उपयुक्त माहिती व सूचना दिल्या आहेत. अशा प्रकारची तत्कालीन माहिती इतरत्र कोठें फारशी सांपडत नाहीं.

**हक्सले, अल्डाउस लिओनार्ड** (१८९४–        )—एक इंग्रज कादंबरीकार. थॉमस हेन्रीचा हा नातू होय. याचा बाप 'कॉर्नवाल मॅगॅझीन'चा संपादक होता. १९१६ पासून हक्सले कादंबरी-लेखन करूं लागला. 'दि डिफीट ऑफ यूथ' (यौवन-पराभव); 'क्रोमयलो'; व 'लिटिल मेक्सिकन' या त्याच्या कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत. त्यानें कांहीं निबंधहि लिहिले आहेत.

याचा थोरला भाऊ ज्युलियन (जन्म १८८७) हा प्राणिशास्त्रज्ञ म्हणून प्रसिद्ध आहे. झूऑलॉजिकल सोसायटीचा सर चामर्स मिचेलनंतर हा कार्यवाह झाला. जीवशास्त्रांत याची कामगिरी फार महत्त्वाची मानतात.

**हक्सले, थॉमस हेन्री** (१८२५–१८९५)—एक इंग्रज जीवशास्त्रज्ञ. हा वैद्यकी शिकल्यावर एका बोटीवर शस्त्रवैद्य म्हणून राहिला. ऑस्ट्रेलियाच्या सफरींत त्यानें समुद्रांतील जीवांचा अभ्यास करून एक ग्रंथ प्रसिद्ध केला. १८५१ त त्याला एफ्. आर्. एस्. चा मान मिळाला. पुढें त्याला प्रिव्हि कौन्सिलरहि करण्यांत आलें. त्यानें अनेक शास्त्रीय ग्रंथ लिहिले. तो रॉयल इन्स्टिट्यूटमध्यें इंद्रियविज्ञानशास्त्राचा प्रोफेसर होता. शरीरविज्ञान, जलजीव, सपृष्ठ व अपृष्ठवंशी प्राणी, प्राण्यांचें वर्गीकरण, भूपृष्ठवर्णन, इ. विषयांवर याचे महत्त्वाचे ग्रंथ आहेत. विकासवादाचा हा मोठा पुरस्कर्ता होता. १९ व्या शतकांतील प्रमुख शास्त्रज्ञांमध्यें याची गणना होते.

**हँगचौ**—हें चीनमधील खुलें बंदर (ट्रीटीपोर्ट) व चेकियांग प्रांताची राजधानी असून सिन–टँग–किअँग या नदीच्या मुखाशीं वसलेलें आहे. येथें रेशीम, लांकर, सोनें व रुपें यांचे दागिने, बुट्टीदार कापड, पंखे, इत्यादींचे मोठाले कारखाने आहेत, व येथून मोठा व्यापार चालतो. शिवाय वाङ्मयीन व धार्मिक चळवळींचें हें मोठें केंद्र आहे. लोकसंख्या पांच लाखांवर आहे.

**हॅगार्ड, सर हेन्री रायडर** (१८५६–१९२६)—एक इंग्रज कादंबरीकार. याचें पहिलें पुस्तक 'सेटावायो अँड हिज व्हाइट नेबर्स' (सेटावायो व त्याचे श्वेतवर्णी शेजारी) हें होय, परंतु त्याची प्रसिद्धि 'किंग सॉलोमन्स माइन्स' या कादंबरीनें झाली. आणि त्याच्या अद्भुतरसात्मक 'शी' (ती) या कादंबरीनें त्याला अधिकच प्रसिद्धि मिळवून दिली. त्यानंतर त्याच्या बऱ्याच कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या : उदा., 'क्लिओपाट्रा'; 'आयेशा' ('शी'चा पुढचा भाग); 'रेड ईव्ह'; 'स्वालो'; इ.. त्याच्या कादंबऱ्यांचीं कथानकें धाडशी कृत्यांनीं भरलेलीं आणि जोरदार असतात, पण स्वभावरेखन मात्र कमकुवत असतें. त्यानें कृषि-संवर्धन विषयांतहि 'रूरल इंग्लंड', 'रूरल डेन्मार्क' या सारखींहि पुस्तकें लिहिलीं आहेत.

**हंगेरी**—युरोपमधला एक देश. १९१९ पूर्वी हा ऑस्ट्रियाचा भाग होता; १९१९ पासून स्वतंत्र विभाग करण्यात आला. क्षेत्रफळ ३५,८७५ चौरस मैल. लो. सं. ८६,८०,०००. यांत डॅन्यूब ही मुख्य नदी आहे. राजधानीचें ठिकाण बुडापेस्ट. या प्रदेशांतील जमीन बहुतेक सपाट व शेतकामाची आहे. लोकांचा शेती हाच मुख्य व्यवसाय आहे. दारू करण्याचाहि मोठा धंदा आहे. गहूं, मका, बार्ली, बटाटे हीं मोठ्या प्रमाणावर निघणारीं पिकें आहेत. कोळशाच्या खाणी आहेत. जंगलहि बरेंच मोठें आहे.

हंगेरियन नांगर

पूर्वी या भागांत रोमन लोक असत. नंतर जर्मन जाती व हूण लोक आले. ९ व्या शतकांत रानटी मग्यार लोकांनीं हा देश जिंकला,

पण त्यांना ९३३ मध्यें जर्मनांनीं हांकललें. इ. स. १००० च्या सुमारास हंगेरीचें राज्य अस्तित्वांत आलें. स्टीफन हा मग्यार राजा त्याचा संरक्षक (पेट्रन) संत (सेंट) व अधिपति होता. सुमारें ५०० वर्षेपर्यंत या देशाचे तुर्कांपाशीं झगडे व लढाया चालूच असत. १५२६ मध्यें त्या वेळचा राजा लुई हा मरण पावला व त्याच्यामागें त्याचा मेव्हणा (बहिणीचा नवरा) ऑस्ट्रियाचा आर्चड्यूक फर्डिनांड हा हंगेरीचा राजा झाला व ऑस्ट्रिया-हंगेरी हीं एक झालीं. १८६७ पासून १९१८ पर्यंत ऑस्ट्रियाशीं हा देश निगडित होता. नंतर एक स्वतंत्र लोकराज्य निर्माण झालें. पण १९२० सालीं पुन्हां राज्यसत्ताक बनलें. दुसऱ्या महायुद्धांत हें जर्मनीच्या बाजूस होतें. १९४५ त हें दोस्तांना शरण गेलें.

**हचेसन, फ्रॅन्सिस** (१६९४-१७४६)—एक ब्रिटिश तत्त्वज्ञानविषयक लेखक. त्याचे ग्रंथ 'इन्क्वायरी इन् टु दि आयडियाज ऑफ ब्यूटी अँड व्हर्च्यू' (सौंदर्य आणि शील यांच्या कल्पनांची चौकशी) १७२५ सालीं आणि 'ट्रिटाइज् ऑन दि पॅशन्स' (विकार-प्रबंध) १७२८ सालीं प्रसिद्ध झाले. १७२९ सालीं त्याला ग्लासगो येथें नीतिशास्त्राचा प्रोफेसर नेमण्यांत आलें. त्याची नीतिशास्त्रविषयक मतें लॉकच्या 'एम्पिरीसिझम' (अनुभववाद) या सिद्धान्ताच्या अगदीं विरुद्ध होतीं, व या दृष्टीनें तो रीड आणि स्कॉटिश तत्त्वज्ञानीय पंथ यांचा अग्रगामी म्हणतां येईल. त्याचा ग्रंथ 'सिस्टिम ऑफ मॉरल फिलॉसफी' (नीतितत्त्वज्ञानपद्धति) त्याच्या हयातीनंतर प्रसिद्ध झाला.

**हॅझलिट्, विल्यम** (१७७८-१८३०)—एक इंग्रज टीकाकार व निबंधलेखक. एकेश्वरवादी आचार्य होण्यासाठीं याला शिक्षण मिळालें होतें, पण तो प्रथम चित्रकलेच्या धंद्यांत शिरला. पुढें कोलेरिजचीं व्याख्यानें ऐकून तो तत्त्वज्ञानांत गढला. १८०५ सालीं 'मानवी क्रियेच्या तत्त्वां'वर याचा निबंध प्रसिद्ध झाला. १८०८ मध्यें हॅझलिटचें लग्न झालें. परंतु पुढें १४ वर्षांनीं घटस्फोट होईपर्यंत त्याला गृहसौख्य मुळींच मिळालें नाहीं. या १४ वर्षांत त्यानें आपले उत्तम ग्रंथ लिहिले आहेत. १८१२ सालापासून तत्त्वज्ञानाचा अभ्यास कमी करून तो बातमीदाराचें व लेख लिहिण्याचें काम करूं लागला. ली हंटच्या मदतीनें त्यानें वाङ्मय, मनुष्यें व रीतीभाती यांवर एक निबंधमाला सुरू केली. ही निबंधमाला 'राउंड टेबल' या नांवानें प्रसिद्ध आहे. शेक्स्पियरच्या नाटकांतील पात्रांचें विवेचन करून यानें शेक्स्पिअरबद्दल अभिरुचि वाढविली. त्यानें नेपोलिअनचें चरित्र ४ विभागांत प्रसिद्ध केलें (१८२८-३०). 'दि स्पिरिट ऑफ दि एज' हा त्याचा आणखी एक उत्कृष्ट ग्रंथ आहे.

**हझारा**—हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवर सिंधूच्या पूर्वेस हा जिल्हा आहे. क्षे. फ. ३,००० चौ. मै. आहे. येथील वनश्री नितांतसुंदर आहे. डोंगरावर तयार केलेल्या जमिनींत येथें पिकें होतात. पाणी विपुल आहे. ह्या जिल्ह्यांतल्या दक्षिण भागांत उन्हाळा तीव्र रूपानें असतो. १,५०० फूट उंचीवर जो भाग आहे तो सदैव हिमाच्छादित असतो. अभिसार नांवावरून हझारा शब्द बनला असावा. तैमूरलंगानें हिंदुस्थान सोडल्यावर मागें जी सैन्याची तुकडी ठेवली त्या तुकडीचें नांव हझारा-इ-कार लुग असें होतें. तेव्हां त्या शब्दापासून हझारा शब्द झाला असावा. हझारा हें नांव ऐने-इ-अकबरीमध्येंहि आहे. ह्या गोष्टीवरून एवढें सिद्ध होतें कीं, हझारा मैदान पूर्वी अटकच्या सुभेदाराच्या ताब्यांत होतें व इतर भाग गखर लोकांच्या ताब्यांत होता. पण कांहीं काळानें अफगाण लोकांची सत्ता ह्या मुलुखावर प्रस्थापित झाली. पुढें अफगाण लोकांची सत्ता जशी कमी होऊं लागली तसा हझारा मुलूख रणजितसिंगाच्या अमलाखालीं गेला; १८४५ पर्यंत शीख लोकांची सत्ता तेथें होती. पुढें पहिलें शीख युद्ध सुरू झालें व व त्यांत लाहोर दरबारला इंग्रज सरकारशीं तह करावा लागला व इंग्रज सरकारच्या ताब्यांत हा मुलूख गेला.

ह्या जिल्ह्यांत ४ शहरें व ९१४ खेडीं आहेत. लो. सं. ७,९६,२३०. त्यापैकीं मुसलमान शें. ९७ होते. येथें हिंदकी नांवाच्या भाषेचा प्रचार आहे. इतर भाषा म्हणजे पुश्तु व गुजरी ह्या होत. येथील मुख्य पिकें म्हणजे मका, गहूं, व जवस हीं होत. बटाट्याचें पीकहि आतां चांगलें होऊं लागलें आहे. ह्या जिल्ह्यांत शिक्षण बरेंच मागासलेलें आहे. शें. ३ लोकांना लिहितां वाचतां येतें. शिक्षणाचा प्रसार विशेषतः हिंदु व शीख लोक यांच्यामध्येंच आहे, पण ते लोक आतां अगदीं कमी आहेत.

**हझारीबाग**—बिहार, छोटा नागपूर भागांत हा जिल्हा आहे. क्षे. फ. ७,०१६ चौ. मै.. येथें डोंगर बरेच आहेत. त्यांपैकीं मुख्य डोंगर पारसनाथाचा आहे व त्याची उंची समुद्रपृष्ठापासून ४,४८० फूट आहे. येथील मुख्य नदी दामोदर ही आहे. येथील हवा सामान्यतः समशीतोष्ण आहे. दरवर्षी पाऊस सुमारें ५३ इंच पडतो.

प्राचीन इतिहासांत या छोटा नागपूर पठाराला झारकंद नांव होतें. हा मुलूख मुसलमानांनीं कधींहि पूर्णपणें जिंकला नाहीं.

या जिल्ह्यांत मुसलमानांच्या वारंवार स्वाऱ्या होण्याचें कारण या जिल्ह्यांतल्या नद्यांमध्यें हिरे पुष्कळ सांपडत, हें होय. या जिल्ह्याशीं इंग्रज सरकारचा संबंध १७७१ सालापासून आला. रामगडचा राजा मुकुंदसिंग व त्याचा नातलग तेजसिंग ह्यांच्यामध्यें इस्टेटीबद्दल तंटा सुरू झाला. तेजसिंगानें कंपनी सरकारास

आपली बाजू घेण्याची विनंति केली. त्याप्रमाणें सरकारनें मुकुंदसिंगाचा पराभव करून तेजसिंगाला रामगडची इस्टेट देवविली. पुढें १७८० सालीं रामदुर्ग व खरकादिह हे ब्रिटिश सरकारचे मुलूख झाले व रामगडचा जिल्हा म्हणून या भागाची राज्यव्यवस्था सुरू झाली. पुढें १८३१–३२ सालीं हा जिल्हा मोडून नवीन हझारीबाग नांवाचा जिल्हा तयार झाला. लो. सं. १७,५१,३३९. तीन मुख्य शहरें–हझारीबाग, चत्रा, व गिरिदिह आहेत. येथें कोळशाच्या व लाल अभ्रकाच्या खाणी बऱ्याच आहेत. मुख्य भाषा मगई ही होय व त्याच्या खालोखाल संताळी भाषा आहे. तांदूळ चांगला तयार होतो. तादुळाच्या खालोखाल पिकें म्हणजे मका, उडीद, कुळीथ, हरबरा, गहूं, जवस, ऊंस हीं होत. ह्या जिल्ह्यांत लहान लहान जहागिरी आहेत. येथील शिक्षण फारच मागासलेलें आहे.

हझारीबाग हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून लहान खेडीं मिळून झालेलें आहे. हें पूर्वी लष्करी ठाणें होतें. येथें १८६९ सालीं म्युनिसिपालिटी स्थापन झाली.

**हंट, जेम्स हेन्री ली** (१७८४–१८५९)—एक इंग्रज कवि व निबंधकार. त्यानें १८०८ सालीं आपला भाऊ जॉन याच्या मदतीनें 'दि एक्झॅमिनर' हें वृत्तपत्र सुरू केलें. पण त्यांत प्रिन्स रीजंटबद्दल बदनामी करणारा मजकूर आल्यामुळें त्या दोघा भावांना १८१३ सालीं २ वर्षे कैदेची शिक्षा भोगावी लागली. या तुरुंगवासाच्या काळांत हंटनें कांहीं पुस्तकें लिहिलीं. त्यांतील महत्त्वाचीं आहेत तीं—'दि फीस्ट ऑफ दि पोएट्स' (कवींची मेजवानी); 'दि डीसेंट ऑफ लिबर्टी' (स्वातंत्र्यावतरण) व 'दि स्टोरी ऑफ रिमिनी'. १८१९ सालीं त्यानें 'इंडिकेटर' हें साप्ताहिक सुरू केलें, व त्यांत त्याचे कांहीं उत्तम निबंध प्रसिद्ध झाले. १८२८ सालीं त्यानें लॉर्ड बायरन आणि त्याचे कांहीं समकालीन यांच्या आठवणी प्रसिद्ध केल्या. त्याचें आत्मचरित्र तीन भागांत आहे. इतरहि बरेच ग्रंथ त्यानें लिहिले आहेत.

**हंट, विल्यम होलमन** (१८२७–१९१०)—एक इंग्रज चित्रकार. त्यानें १८५३ सालीं काढलेल्या 'क्लॉडियो अॅन्ड इसाबेला' या चित्रानें त्याची प्रसिद्धि झाली. पुढील वर्षी त्यानें 'दि लाइट ऑफ दि वर्ल्ड' हें चित्र काढलें. १८५४ सालीं त्यानें पूर्वेकडील प्रदेशांत प्रवास केला. आणि तिकडील धार्मिक स्वरूपाचीं अनेक चित्रें काढलीं. त्यांपैकीं महत्त्वाचीं आहेत तीं—'दि स्केपगोट', 'दि फाइंडिंग ऑफ दि सेव्हियर इन् दि टेंपल' आणि 'दि शॅडो ऑफ दि क्रॉस.' याशिवाय त्याचीं अनेक चित्रें आहेत. त्याला 'ऑर्डर ऑफ मेरिट'चें पदक देण्यात आलें होतें.

**हंटर, जॉन** (१७२८-१७९३)—एक स्कॉटिश शस्त्रक्रियातज्ज्ञ आणि इंद्रिय-विज्ञानशास्त्रज्ञ. १७६८ सालीं त्याला सेंट जॉर्जेस हॉस्पिटलमध्यें शस्त्रवैद्य (सर्जन) नेमण्यांत आलें. १७९० सालीं सैन्याचा सर्जन जनरल, आणि दवाखान्यांचा इन्स्पेक्टर जनरल नेमण्यांत आलें. इंग्लिश शस्त्रक्रिया पद्धतींत त्यानें फार महत्त्वाच्या सुधारणा केल्या, आणि शारीरशास्त्र व इंद्रियविज्ञानशास्त्र यांत भर घातली. त्याच्या मुख्य ग्रंथांपैकीं एक ग्रंथ 'ट्रीटाइज ऑन दि ब्लड' (रक्तावर निबंध), 'इन्फ्लेमेशन अँड गन्-शॉट वुंड्स' (दारूगोळ्याच्या जखमा व सूज) हा आहे.

**हंटर, विल्यम** (१७१८–१७८३)—एक स्कॉटिश वैद्यकशास्त्रज्ञ व शारीरशास्त्रज्ञ. हा जॉन हंटरचा थोरला भाऊ. १७४१ सालीं तो लंडनला जाऊन कॉलेज ऑफ सर्जन्स या संस्थेचा सभासद झाला. आणि १७६४ सालीं राणीचा विशेष वैद्य या जागीं त्याला नेमण्यांत आलें. त्याचे कांहीं महत्त्वाचे ग्रंथ आहेत त्यांपैकीं 'अॅनॉटमी ऑफ दि ह्यूमन ग्रॅव्हिड युटेरस' (मानवी गर्भवती गर्भाशयाचें रचनाशास्त्र) हा १७७४ सालीं प्रसिद्ध झाला. त्यानें आपला उत्तम वस्तुसंग्रह सुमारें १,५०,००० पौंड किंमतीचा ग्लासगो युनिव्हर्सिटीला देणगीदाखल दिला.

**हॅडले, जॉन** (१६८२–१७४४)—एक इंग्रज ज्योतिषशास्त्रज्ञ. त्यानें तुरीययंत्रा(क्वॉड्रंट)चा शोध लावला, म्हणून त्या यंत्राला त्याचें नांव देण्यांत आलें आहे; परंतु हा मान न्यूटनकडे जातो असें एक मत आहे; कारण न्यूटनपासून हॅडलेनें या यंत्राचें वर्णन १७२७ मध्यें मिळविलें, असें याच्या विरुद्ध पक्षाचें म्हणणें आहे. शिवाय फिलाडेल्फियाचा थॉमस ग्रॉड्फ्रे यानेंच १७३१ सालीं हेंच यंत्र तयार केलें होतें; त्यामुळें तो मान त्याचाहि आहे असा दुसरा पक्ष उत्पन्न झाला. या वादांत रॉयल सोसायटीनें असा निर्णय दिला कीं, हा मान ग्रॉड्फ्रे व हॅडले या दोघांनाहि आहे. याशिवाय हॅडलेनें षष्ठ्यंश (सेक्स्टंट) ह्या यंत्राचा शोध लावला.

**हडसन उपसागर**—हा उपसागर कॅनडा देशानजीक आहे. त्याची लांबी ८०० मैल व रुंदी ६०० मैल आहे. त्याला नेलसन, चर्चिल, आल्बनी, वगैरे अनेक नद्या मिळतात. या उपसागरांत बेटें पुष्कळ आहेत. त्यांपैकीं बेल्चर द्वीपसमूह फार महत्त्वाचा आहे. या उपसागरांत जूनपासून ऑक्टोबरपर्यंत बोटी जाऊं शकतात व त्या वेळीं व्हेल व इतर मासे मारण्याचा धंदा येथें चालतो. येथें हडसन्स बे कंपनीचे पुष्कळ कारखाने आहेत.

**हडसन, हेन्री** (१५५०–१६११)—एक इंग्रज जलप्रवासी. त्यानें १६०९ सालीं उत्तर अमेरिकेकडे प्रवास केला आणि हडसन नदी शोधून काढली, व निम्या कांठानें तो सुमारें ५०

लीग गेला. १६१० सालीं त्यानें 'डिस्कव्हरी' या नांवाच्या इंग्रज जहाजांतून प्रवास करून हडसन सामुद्रधुनी व हडसन उपसागर हा प्रदेश शोधून काढला. व हिंवाळ्यांत तो तिकडेच राहिला. पण तेथें फार हाल झाल्यामुळें त्याच्या खलाशांनीं त्याच्याविरुद्ध बंड केलें, आणि त्याला एका लहान बोटींत घालून समुद्रावर सोडून दिलें; त्यामुळें पुढें त्याचें काय झालें याची माहिती मिळाली नाहीं. यानें आपल्या प्रवासाचीं वर्णनें लिहून ठेविलीं आहेत.

**हडसर किल्ला**—मुंबई, पुणें जिल्हा. जुन्नरच्या वायव्येस ८ मैलांवर व पुण्याच्या उत्तरेस ६० मैलांवर नाणें घाटाजवळील एका उंच डोंगरावर हा किल्ला आहे. हडसर खेडें पायथ्याशीं आहे. टेंकडीचा घेर सुमारें ३,२०० यार्ड आहे. पायथ्यापासून ही टेंकडी सुमारें १,००० फूट उंच आहे. १६३७ मध्यें शहाजीनें मोंगलांस दिलेल्या किल्ल्यांत हा होता. १८१८ त इंग्रजांनीं किल्ला घेऊन किल्लेदार अण्णा रत्तीकर यास कैद केलें.

**हंथरूण**—रानटी अवस्थेंतील लोक सामान्यतः झाडांचीं पानें किंवा बारीक डहाळ्या टाकून त्यांवर निजत व आजहि निजतात. पूर्वेकडील लोक गाद्यांवर निजतात व सकाळीं त्या गुंडाळून ठेवतात. 'तल्प' हा बिछाना या अर्थी वैदिक शब्द आहे. बिछान्यावर घालण्याचें वस्त्र तें 'उपस्तरण' किंवा 'अस्तरणी'. 'उपबर्हण' किंवा 'उपधान' म्हणजे उशी. 'निड्वला' हा शब्द वेताच्या बिछान्यासाठीं येतो. नवारीचेहि पलंग वेदकाळीं असावेत. पौराणिक काळांत हंथरूणें चांगलीं व भारी होतीं व तींच आज राजवाड्यांतून दिसतात. जपानी लोक चटयांवर निजतात व उशाला लांकडाचे ठोकळे घेतात. चिनी लोक ठेंगण्या खाटांवर निजतात. युरोपांतील बहुतेक लोक उंच खाटा किंवा पलंग यांवर झोंपतात. जर्मन देशांतील पलंग इतरांपेक्षां आंखूड असून त्यांवर चादरीऐवजीं गादीवर ब्लँकेट घालतात व त्यावर पुनः मऊ परांची गादी घालतात. गाद्यांमध्यें निरनिराळे पदार्थ भरण्यांत येतात. त्यांमध्ये केंस, लोंकर, कापूस, पिसें, शेवाळ, काथ्या, लांकडाचा भुसा, कागदांचें कात्रण, वगैरे अनेक पदार्थ येतात. या सर्वांत घोड्याचे केंस चांगले. पराच्या गाद्या वापरण्याची पद्धति सर्वत्र आढळते, पण ती केंसाच्या गाद्यांइतकी आरोग्यकारक नाहीं. उशांमध्यें बहुधा केंस किंवा पिसें भरण्यात येतात. बिछाने दररोज उलगडून साफ केले पाहिजेत म्हणजे घाम वगैरेंनीं भिजलेले कपडे वाळून स्वच्छ होतात.

**हत्ती**—हे एक सस्तन, शुंडायुक्त पंचपादांगुलिक जातीचे प्राणी आहेत. यांच्या आशियांतील व आफ्रिकेंतील अशा दोन जाती आहेत. आफ्रिकेंतील हत्ती अधिक उंच असून त्याचे कान मोठे असतात, त्याचें डोकें कमी उंच असतें आणि कपाळ फुगीर असतें. याच्या सुळ्यांचीं मुळें जास्त जवळ आलेलीं असतात व हाडें अधिक घट्ट असतात. याच्या मागील पायास बाहेरील बाजूस तीनच खूर असतात; पण आशियांतील हत्तीला चार असतात. सर्व हत्तींचें शरीर विशाल, जड पण आंखूड असून कवटी उंच असते; जबडा आंखूड असतो. यांचा वरील ओठ व

नाक यांची वाढ होऊन त्याची सोंड बनलेली असते. ती तीन ते पांच फूट लांब असते. ही सर्व स्नायुमय असते. ही बळकट पण अत्यंत संवेदनाक्षम असून तिचा त्यास श्वासोच्छ्वास करणें, वास घेणें, चव घेणें, पाणी शोषून घेणें, स्पर्श करणें, वगैरे सर्व कामीं उपयोग होतो. त्यांचे सुळे हे त्यांचे सुळेदातच वाढून पुढें आलेले असतात व ते ७।८ फुटांपर्यंत वाढतात. हत्ती ९।१० फुटांपर्यंत उंच वाढतात व त्यांचें वजन चार हजारापासून नऊ हजार पौंडांपर्यंत असतें. त्यांचें आयुष्य दीर्घ असून १५० वर्षांपर्यंतहि ते जगतात. हे वनस्पत्याहारी आहेत. हे एका पुढाऱ्याच्या हुकुमांत मोठमोठे कळप करून राहतात. हत्ती पाळला असतां त्याची फार काळजी घ्यावी लागते. त्यास अन्न फार लागतें. त्याला रोग होण्याचा संभवहि फार असतो.

रानांतील हत्ती पाळलेल्या हत्तिणीच्या साहाय्यानें पकडण्यात येतात. जंगलांतील इमारतीचीं मोठमोठीं लांकडें वाहून नेण्यास मलबार, रंगून वगैरे ठिकाणीं हत्तींचा उपयोग करतात. सैन्यांत सामानासाठीं व तोफा ओढून नेण्यास हत्ती लागत. आज सर्कशींत हत्तींचीं कामें आपण पाहतों; यांवरून तो बुद्धिमान् आहे हें पटतें.

हस्तिन् म्हणजे हात असलेला असा याचा मूळचा अर्थ असून मृग म्हणजे जनावर या शब्दानें युक्त हत्ती, अशा अर्थानें हा शब्द ऋग्वेद, अथर्ववेद आणि यजुर्वेद यांमध्यें आलेला आहे. पुढें पुढें नुसत्या हस्तिन् या विशेषणाचाच हत्ती असा अर्थ होऊं लागला.

या प्राण्याची त्याच्या सामर्थ्याबद्दल व जननशक्तीबद्दल प्रसिद्धि होती. या जनावराचा उल्लेख मुखानें जिन्नस उचलणाऱ्या प्राण्यांच्या उलट माणूस व माकड या हातानें उचलणाऱ्या प्राण्यांबरोबर आलेला आहे. हस्तिप या शब्दावरून तो माणसाळलेला होता हें स्पष्ट आहे. असे माणसाळलेले हत्ती दुसरे हत्ती पकडण्याच्या कामीं उपयोगी पडत. पण या हत्तींचा लढाईच्या कामीं उपयोग होत असल्याबद्दल वैदिक वाङ्मयांत उल्लेख नाहीं. तरी पण क्तेसियस व मेगॅस्थिनीझ यांनीं हे हत्ती त्यांच्या वेळीं उपयोगांत आणले जात, असें म्हटलें आहे. हत्तींना डांसापासून उपद्रव होई असें अथर्ववेदांत म्हटलें आहे.

आशियाई हत्तीचें डोकें — आफ्रिकन हत्तीचें डोकें

हत्ती सर्वश्रेष्ठ ऐश्वर्याचें प्रमुख लक्षण असल्यानें सकल ऐश्वर्यांचा भोक्ता जो इंद्र त्याच्याजवळहि ऐरावतासारखा देवदैत्यांनीं समुद्रमंथनांतून काढलेल्या चौदा रत्नांपैकीं एक असा गजराज आहे. देवेंद्र भगवंताच्या आज्ञेवरून ऐरावताच्या चवरडोलांत बसण्यापूर्वी त्याची प्रार्थना करून नमन करतो असें जुन्या ग्रंथांतून सांगितलेलें आढळतें. चतुरंग सेनेच्या अग्रभागीं अलंकार आणि उंची वस्त्रें यांनीं सुशोभित असणारा सुलक्षणी हत्ती ध्वजा, भेरी, वगैरे राजचिन्हें धारण करून डुलत चाले; महशूर हत्तीवरची ध्वजा धरून बसे व त्याच्या रक्षणार्थ अनेक महावीर मागून चालत अशीं वर्णनें आहेत. आजदेखील राज्यारोहण, दसरा व इतर मोठे प्रसंग संस्थानांतून हत्तीशिवाय साजरे होत नाहींत. 'गजान्तलक्ष्मी', 'दारांत हत्ती झुलणें', यांसारखे वाक्प्रयोगहि हत्तीचें अतिशयित महत्त्व पटवून देतात.

सर्व सजीव-निर्जीव वस्तूंप्रमाणें हत्तींमध्येंहि ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र अशा चार प्रमुख जाती कल्पितात. पुन्हां या प्रत्येक जातीच्या अठरा पोटजाती आहेत. ही पाण्यावर पोहणारी वसुंधरा स्थिर करण्यासाठीं परमेश्वरानें अष्टदिग्गज सूर्यापासून निर्माण केले अशी कथा आहे. हे आठ दिशांचे आठ हत्ती व त्यांच्या बायका यांचीं नांवें पुराणांत आढळतात.

हत्ती ५।६ रंगांचे असतात. ऐरावताखेरीज पृथ्वीवर पांढरा हत्ती नाहीं असें पुराण सांगतें. पण सयामांत पांढरे हत्ती आहेत. भुरा, श्यामवर्ण, काळा, ठिपक्यांचा असे हत्ती असतात. ठिपके (कवडे) पांढरे, गुलाबी, कबरे (भुरे) व काळे क्वचित् सांपडतात. दांतांचे रंग पिवळट, खटक्या, चिकणा, पांढरा, दुध्या पांढरा, तांबूस अशा प्रकारचे असतात.

**हत्ती रोग**—(एलेफंटियासिस). या रोगापासून शरीरांतील एखादें गात्र किंवा भाग विशेषतः पाय हळूहळू फुगत जातात. याचा प्रादुर्भाव हळूहळू होतो व त्यापासून कळ किंवा आग वगैरे कांहीं होत नाहीं; एखाद्या वेळीं ताप येऊन एकदम सूज येते. याचें स्वरूप तीव्र असल्यास रोग्यास पूर्ण विश्रांति द्यावी. पातळ अन्न खाऊं घालावें, रेचक देण्यांत यावें, व पाय वगैरे घट्ट बांधून ठेवण्यांत यावेत.

**हत्यारें**—हत्यारें अथवा शस्त्रें हीं शत्रूवर हल्ला करण्याकरितां व विलक्षतें हीं स्वतःचें संरक्षण करण्याकरितां वापरण्यांत येतात. (चिलखत पाहा). हत्यारांचे दोन मुख्य वर्ग आहेत. बंदुकीची दारू ज्यामध्यें वापरण्यांत येते तो व दुसरा बिनदारूचा. दुसऱ्या प्रकारांत प्रथम लांकडी गदेसारखीं हत्यारें असावीं; त्यानंतर तीं हाडें, धातू, वगैरेंच्या साहाय्यानें अधिक बळकट करण्यांत आलीं असावीं. दगडांच्या कुऱ्हाडी, गोफण, धनुष्य, बाण, वगैरे हत्यारें त्यानंतर प्रचारांत आलीं असावीं. प्रथम बाणाच्या टोंकास गार किंवा हाडूक बसवीत. यानंतर धातूंचीं हत्यारें प्रचारांत आलीं. यापुढें लोखंड व पोलाद यांचीं अनेक प्रकारचीं हत्यारें तयार होऊं लागलीं. यांमध्यें तरवार, भाला, बरची, परशु, गदा, चिलखत, वगैरे हत्यारें येतात. प्राचीन इजिप्री लोकांत धनुष्यबाण आढळतो; पण ग्रीक लोकांत भालेच निरनिराळ्या आकाराचे आढळतात. असुरी लोकांत धनुष्यबाण आढळतो; पण भाले विशेष प्रचारांत दिसतात. ग्रीक लोकांची तरवार लहान असे. रोमन लोकांची अधिक लांब असे. परंतु ते सहा फूट लांब भालाच विशेष वापरीत. प्राचीन जर्मन लोकांचीं हत्यारें परशु, भाला व तरवार हीं असत. नॉर्मन लोक भाले व तरवारी वापरीत पण बाणांचा व घोड्यांचाहि उपयोग करीत. त्यांनीं 'क्रॉसबो' हा धनुष्याचा प्रकार प्रचारांत आणला. चौदाव्या शतकापर्यंत युरोपमध्यें दारूचा उपयोग करण्यांत येत नसे. तोफांचा इंग्लंडमध्यें प्रथम उल्लेख १३३८ साली आढळतो व बंदुका पंधराव्या शतकांत प्रचारांत आल्या.

बंदुकीची दारू प्रचारात आल्यानंतर नवीन प्रचारांत आलेलें साधें हत्यार म्हणजे संगीन होय. शस्त्रास्त्रापासून संरक्षण करण्याकरितां अंगावर कांहीं तरी आवरण घालण्याची प्रथा फार प्राचीन कालापासून आढळण्यांत येते. अशा तऱ्हेचीं पाहिलीं आवरणें म्हणजे ढाल, शिरस्त्राण व कवच अथवा चिलखत हीं होत. अशा तऱ्हेच्या शिरस्त्राण, हस्तत्राण, कवच, वगैरेंचा उल्लेख फार प्राचीन कालापासून (वैदिक काळापासून) भारतीय वाङ्मयांत आढळतो.

प्राचीन ग्रीक लोक फार मोठी ढाल वापरीत पण तिचा आकार पुढें लहान होत गेला. रोमन लोकांत 'लीजन' मधील लोक मोठी लांबट चौकोनी ढाल वापरीत पण घोडदळांतील व इतर लोक लहान वाटोळी किंवा लांबट ढाल वापरीत असत (ढालाईत पाहा). असुरी, ग्रीक, इट्रुस्कन व रोमन या सर्व लोकांत शिरस्त्राण वापरण्यांत असे. तसेच रोमन व ग्रीक लोकांत चिलखतहि वापरण्याची प्रथा असे. हीं प्रथम कांशाचीं व पुढें लवचीक पदार्थांचीं केलेलीं असत. ॲंग्लो-सॅक्सन लोकांत वाटोळ्या कातड्यानें मढविलेल्या लांकडी ढाली असत. ते कड्यांचीं चिलखतें घालीत. नॉर्मन लोकांच्या ढाली त्रिकोनी असत व टोप निमुळते असत. युरोपमध्यें दहाव्या शतकापासून चौदाव्या शतकापर्यंत चिलखत घालण्याचा प्रघात होता.

सोळाव्या शतकांत प्रथम पायावरील आवरणें टाकून देण्यांत आलें. सतराव्या शतकांत फक्त टोप व छातीवर उरस्त्राण तेवढें शिल्लक राहिले. अठराव्या शतकांत चिलखत अजीबात प्रचारांतून गेलें. पण पहिल्या महायुद्धांत डोक्यावरील शिरस्त्राणें पुन्हां प्रचारांत आलीं व तीं आजहि कायम आहेत. (चिलखत, शिरस्त्राण पाहा).

भारतीय—शस्त्र शब्दांत क्षत्रियाच्या युद्धसामुग्रीचाहि अंतर्भाव होतो. ऐतरेय ब्राह्मणांत ही युद्धसामुग्री अश्वरथ, इषुधन्व व कवच अशी एकत्रित दिली आहे. ऋग्वेदांत लिहिल्याप्रमाणें वेदकालीन योद्ध्याला जरूर असलेल्या इषु व धन्वन् ह्यांचा शस्त्र या अर्थानें आलेल्या आयुध शब्दांत अंतर्भाव होत असला पाहिजे. ऋग्वेदांतील युद्धसूक्तावरूनहि हेंच मत सिद्ध होतें. कारण त्यात योद्ध्याचें वर्णन धनुष्यबाण घेऊन रथारूढ झालेला, अंगांत चिलखत घातलेला. धनुष्याची दोरी घासूं नये म्हणून डाव्या हातावर हस्तघ्न (हाताचें संरक्षण) असलेला असें केलें आहे. उरस्त्राण हें धातूच्या एका तुकड्याचें केलेलें नसून पुष्कळसे तुकडे एकत्रित (स्यूत) करून तयार केलेलें असे. तें धातूच्या तुकड्याचें किंवा बहुतेक धातूनें मढविलेल्या कसल्या तरी कडकडीत पदार्थाचें बनविलेलें असावें. योद्धे शिरस्त्राणहि (शिप्रा) वापरीत असत. ढाल वापरण्याबद्दल अगर पादत्राणाच्या उपयोगाबद्दल कोठेंहि उल्लेख सांपडत नाहीं. शस्त्रें उपयोगात आणण्याच्या कौशल्याबद्दल ऋग्वेदांत उल्लेख आहे. गोफणगुंड्यांचा (अद्रि, अशनि) उपयोग नेहमीं करीत कीं काय याबद्दल निश्चिति नाहीं. अंकुश-हें दैवी अस्त्र समजलें जात असून कुऱ्हाड (स्वधिति, वाशी, परशु) ही देखील मानवी द्वंद्वांत आढळून येत नाहीं. लढाईंत शस्त्रांचा सामान्य उपयोग अगर वस्त्राचा उपयोग होत नसे.

महाभारतकाळीं पदातीजवळ ढाल व तलवार हीं आयुधें असत. यांशिवाय प्रास (भाला), परशु, भिंडीपाल, तोमर, ऋष्टी, शूल हीं आयुधें सांगितलीं आहेत. धनुष्यबाण हें हत्यार तर सर्वसामान्य होतें. रथी धनुष्यबाणानेंच युद्ध करी. बाणांवर कांहीं मंत्रांचा प्रयोग करून हीं अस्त्रें शत्रूंवर सोडीत. अस्त्रविद्या ही दैवी असे व धनुर्विद्या ही मानवी असे. अस्त्रांचा उपयोग अगदीं आणीबाणीच्या प्रसंगींच करण्यांत येई.

मराठे अमदानींत तरवार, ढाल, बंदूक, हीं हत्यारें लोकांच्या वापरण्यांत असत. ह्याशिवाय कमान व तीर ह्यांचाहि उपयोग करीत. बंदुका लोहार करीत. तरवारीची किंमत १० रुपयांच्या सुमारास असावी. कमान व तीर २।।= रुपयांस विकत मिळूं शकत. अनेक ठिकाणीं तोफा बनविण्याचे कारखाने काढले होते. (तोफखाना पाहा). मराठे हे हत्यारें तयार करण्याच्या कामांत मागासलेले होते यांत शंका नाहीं. शिवाजीचें बलिष्ठ आरमार तोफांच्या अभावीं कार्यक्षम होऊं शकलें नाहीं. तीच गोष्ट तरवारी आणि बंदुकी याची. पोर्तुगीज आणि फिरंगी यांकडून बंदुका घ्याव्या लागत. उत्कृष्ट तरवारी पोर्तुगीज पुरवीत. अग्न्यस्त्रें आल्याबरोबर जुनीं तलवारी-भाले-खंजीर-परशु, इ. शस्त्रें कुचकामाचीं ठरलीं. बंदुका-तोफा यांना महत्त्व चढलें.

शस्त्रागार—सैन्यास लागणारीं शस्त्रास्त्रें, दारूगोळा, वगैरे तयार करणें, सुरक्षित ठेवणें, दुरुस्ती करणें व त्यांचा पुरवठा करणें याकरितां जें कोठार व कारखाना लागतो त्यास शस्त्रागार म्हणतां येईल. इंग्लंडमधील वूलिच येथील शस्त्रागार १७२० मध्यें स्थापन झालें. हिंदुस्थानांतील सर्वांत मोठें शस्त्रागार पुण्याजवळ खडकी येथें आहे. याखेरीज क्वेटा, रावळपिंडी, कलकत्ता, जबलपूर, वगैरे ठिकाणींहि शस्त्रास्त्रांचे कारखाने आहेत.

इंग्लंडचीं दारूगोळ्यांचीं कोठारें चॅटहॅम, पोर्टस्मथ, प्लिमथ व पेंब्रोक येथें आहेत. फ्रान्सचीं ब्रेस्ट व ट्यूलॉन येथें व इटालीचें ट्यूरिन येथें आहे.

हंथवड्डी—दक्षिण ब्रह्मदेशांत पेगू भागांत हा जिल्हा आहे. याचें क्षे. फ. ३,०२३ चौ. मै. आहे. जिल्ह्यांत मुख्य नदी लाइंग ही आहे. येथील हवा कोंदट व निरुत्साह उत्पन्न करणारी आहे. पण एकंदरींत प्रकृतीस अपायकारक नाहीं. ह्या जिल्ह्यांत पाऊस सरासरी ९० इंच पडतो. हंथवड्डी हें नांव हंथ व वाडी ह्या दोन

शब्दांपासून बनलेलें आहे, व त्याचा अर्थ हंस पक्ष्याची नदी असा आहे. प्राचीन काळीं हा भाग तलैंग राज्याचा होता. पुढें तलैंग राजाचा पराभव ब्रह्मी लोकांनीं केला व तंगू राज्य स्थापन झालें. १६ व्या शतकाच्या अखेरीस युरोपियन वसाहती येथें होऊं लागल्या. दुसरें ब्रह्मी युद्ध संपल्यावर हा सगळा जिल्हा इंग्रजांच्या ताब्यांत आला.

लो. सं. सुमारें पांच लाख. येथील लोक मुख्यतः बौद्ध आहेत, पण हिंदूहि येथें आहेत व ते कुली वर्गांतले आहेत. लोकांची मुख्य भाषा ब्रह्मी आहे. पण करेण, शान व तलैंग ह्या दुसऱ्या लोकांच्या भाषाहि थोड्याबहुत प्रमाणांत प्रचारांत आहेत. या जिल्ह्यांत तांदूळ बराच व चांगल्या जातीचा पिकतो. दर वर्षी पाऊस सरासरीनें १०० इंच पडतो. आसपासचें लाकूड विकण्याचा धंदा येथें अल्प प्रमाणांत चालतो. समुद्राच्या खाऱ्या पाण्यापासून मीठ तयार करण्याचा उद्योग जोरानें चालू असतो. ह्या जिल्ह्याच्या व्यापाराचें मुख्य ठिकाण म्हणजे रंगून शहर होय. मुख्य निर्गत माल म्हणजे तांदूळ, इमारतीचें लांकूड व इतर जंगलांतला माल होय. ह्या जिल्ह्यांतला आयात माल म्हणजे कापड, मीठ, तेल, साखर, सोनें, दोर, वगैरे जिनसा होत. ह्या जिल्ह्यांतून रंगून-प्रोम रेल्वे व रंगून-मंडाले रेल्वे जात आहेत. येथें आतां शिक्षणाचा प्रसार बराच होत आहे. शिक्षितांचें प्रमाण पुरुषांत शें. ५० व बायकांत शें. १५ आहे.

हद्दपारी—गुन्हेगाराला गुन्ह्याबद्दल समुद्रापलीकडे गुन्हेगारांच्या वसाहतींत नेऊन ठेवणें, या शिक्षापद्धतीला 'हद्दपारी' म्हणतात. १७१८ पासून अमेरिकन स्वातंत्र्य-युद्धापर्यंत (१७८५) गुन्हेगारांना अमेरिकन वसाहतींत शेतीच्या कामावर गुलामाप्रमाणें मजूर म्हणून ठेवीत असत. अमेरिका स्वतंत्र झाल्यावर १७८७ पासून न्यू साउथ वेल्स येथील बॉटनी बे येथें अशा गुन्हेगारांची वसाहत स्थापण्यांत आली. १८४० सालीं ही वसाहत टास्मानियांत नेण्यांत आली. पुढें १८५३ च्या व १८५७ च्या कायद्यांनीं (पीनल सर्व्हिट्यूड ॲक्ट्स) ही हद्दपारीची शिक्षापद्धति बंद करण्यांत आली.

हिंदुस्थान—इंडियन पीनल कोडमध्यें ५९ वें कलम असें आहे कीं, ज्या गुन्ह्यांना सात वर्षे किंवा अधिक कैदेची शिक्षा पीनल कोडांत आहे, असे गुन्हे करणारांना कोर्टानें कैदेऐवजीं काळ्यापाण्या (ट्रॅनस्पोर्टेशन)ची म्हणजे अंदमान बेटांत कैदेंत ठेवण्याची शिक्षा द्यावी. पीनल कोड १८६० सालीं अमलांत आल्यापासून या कलमाअन्वयें शेंकडों गुन्हेगार अंदमान बेटांत पाठविण्यांत आले व तेथें त्यांची मोठी वसाहत झाली. हे गुन्हेगार निरनिराळ्या जातींतले असल्यामुळें अंदमानांतील कैद्यांची स्थिति फार वाईट असे. १९०७ पासून हिंदुस्थानांत राजद्रोहाच्या गुन्ह्यांची संख्या वाढूं लागली, व बॅरिस्टर सावरकर व इतर अनेक सुशिक्षित हिंदी गुन्हेगार अंदमानांत ठेवण्यांत आले. या सुशिक्षित राजकीय कैद्यांनीं अंदमान बेटाची रोगट हवा व पाणी, व ब्रिटिश अधिकाऱ्यांचें कैद्यांशीं असलेलें वर्तन व छळ, यांची माहिती हिंदुस्थानांत पसरविली. बॅरिस्टर सावरकरांनीं अंदमानच्या कैद्यांबद्दल तक्रारी करण्याच्या कामीं पुढाकार घेतला; आणि अखेर हिंदी जनमताचें दडपण ब्रिटिश सरकारवर पडून ही अंदमानची काळ्यापाण्याची शिक्षा सरकारनें सन १९२६ पासून बंद केली. फक्त स्वखुशीनें कोणी गुन्हेगार कैदी अंदमानांत कायमची वसाहत करण्यास आल्यास तर त्याला त्याच्या कुटुंबासह तेथें राहण्यास सरकारनें सर्व प्रकारच्या सवलती देण्याचें ठरविलें.

हनगळ—मुंबई, धारवाड जिल्हा, एक तालुका. क्षे. फ. ३०० चौ. मै., लो. सं. ७०,७९६. या तालुक्यांत एक शहर व १५६ खेडीं आहेत. या तालुक्यांत ठिकठिकाणीं लहान लहान डोंगर वृक्षाच्छादित आहेत. हवा आरोग्यावह आहे. तालुक्यांत हनगळ मुख्य शहर असून हें धारवाडहून ५० मैलांवर आहे. लो. सं. सुमारें ७,०००. या शहरांतील सर्वांत प्रेक्षणीय अशी इमारत म्हणजे तारकेश्वराचें देवालय होय. हनगळ शहराला पूर्वी विराटनगरी किंवा विराटकोट असें म्हणत असून या ठिकाणीं पांडव वनवासांत असतां राहत असत असें समजतात. १२ व्या शतकाच्या सुमारास दुसरा बल्लाळ या नांवाच्या होयसळ राजानें हें शहर जिंकेपर्यंत पश्चिम चालुक्यांचें अंकित कदंब या ठिकाणीं राज्य करीत होते. येथें बरेच शिलालेख व ताम्रपट सांपडले आहेत.

हनमकोंडा—दक्षिण हैद्राबाद संस्थानांतील वरंगळ जिल्ह्यांतील मोठें शहर. वरंगळच्या संस्थानापूर्वी गणपति राजवंशाच्या सुरुवातीची ही राजधानी होती असें म्हणतात. तेलगू भाषेत 'प्रतापचरित्र' नांवाचा एक ग्रंथ आहे. त्यामध्यें हनमकोंडा येथील राजांची माहिती आहे. या ठिकाणीं सुंदर इमारती आहेत. त्यांपैकीं सहस्रस्तंभी देऊळ महत्त्वाचें आहे. हें सहस्रस्तंभी देऊळ ११६२ त बांधलेलें आहे. चालुक्य शिल्पकलेचा हा एक उत्कृष्ट नमुना म्हणता येईल. जवळ हनुमानगिरि या डोंगरावर अनेक जैन मूर्ती खोदीव दिसतात. हनमकोंडा हें पूर्वी लोखंडाविषयीं प्रसिद्ध असे.

हॅनिबॉल (ख्रि. पू. २४७-१८३)—कार्थेजियन लोकांचा प्रसिद्ध सेनापति आणि मुत्सद्दी. हा २५ व्या वर्षी सैन्याचा मुख्य झाला. कार्थेज व रोम या दोन साम्राज्यांमध्यें मोठी चुरस असल्यामुळें हॅनिबॉलनें स्पेनवर स्वारी करण्याचें ठरविलें आणि सॅगुन्टम हें रोमच्या दोस्तांचें शहर हस्तगत केलें. त्यामुळें रोमन लोकांनीं युद्ध जाहीर केलें. रोमचा पराभव करून इटलीत जाऊन

केला पाहिजे, असें ठरवून त्यानें आपल्या मोठ्या सैन्यासह आल्प्स पर्वत ओलांडून इटलींत प्रवेश केला, आणि लागोपाठ, एकदां टीसीनो नदीच्या कांठावर, नंतर ट्रीबिया नदीच्या कांठावर व शेवटीं ट्रॅसिमेनस सरोवरानजीक, असा रोमन सैन्याचा तीनदां मोठा पराभव केला. नंतर तो आपुलीयावर चाल्न गेला व त्यामुळें रोममधील लोक अत्यंत भयभीत झाले. त्या सालचा रोमन डिक्टेटर फेबियस मॅक्झिमस यानें हॅनिबॉलशीं समोरासमोर लढण्याचें टाळलें. परंतु पुढील सालचा (२१६) डिक्टेटर टेरॅन्शियस व्हॅरो यानें हॅनिबॉलशीं कॅनी येथें लढाई केली, पण तींत रोमन सैन्याचा पुन्हां पूर्ण पराभव झाला. नंतर हॅनिबॉल सैन्यासह कॅप्यूआ प्रांतांत राहिला; पण तेथें चैनबाजीमुळें त्याचें सैन्य कमकुवत बनलें. पुढें २१५।२१४।२१३ या सालांच्या लढाया महत्त्वाच्या नव्हत्या. २१२ सालीं हॅनिबॉल रोमवर चालून गेला. तरीपण कॅप्यूआ रोमन लोकांनीं हस्तगत केलें. २०७ सालीं हॅनिबॉलला त्याचा भाऊ हॅजड्रुबल हा सैन्याची कुमक घेऊन इटलीकडे येऊं लागला, पण रोमन लोकांनीं तें सैन्य मध्येंच गांठून पूर्ण नष्ट केलें. तरीहि हॅनिबॉल २०३ पर्यंत इटलीच्या दक्षिण भागांत राहिला. पण कार्थेज व रोमन लोकांनीं हल्ला केल्यामुळें त्याला आफ्रिकेंत परत जावें लागलें. तेथेंहि झामाच्या लढाईंत (खि. पू. २०२) रोमन लोकांनीं त्याचा पूर्ण पराभव केला आणि अतिशय अपमानकारक अटींवर तह करणें त्याला भाग पाडलें. रोमन लोकांनीं हॅनिबॉलचा ताबा मागितला, त्यामुळें विष प्राशन करून त्यानें प्राणत्याग केला.

**हनुमंतस्वामी** (१७८३-१८१८)—रामदासाच्या चरित्र-पर बखरीचा कर्ता. ही बखर लिहिण्याच्या कामीं त्या वेळचे जुने कागदपत्र व टिपणें यांचा आधार घेण्यांत आला असून हनुमंत-स्वामीच्या आज्ञेवरून चाफळ संस्थानचा कारभारी रंगो लक्ष्मण मेढे यानें ही बखर शके १७१५ प्रमादीनाम संवत्सरीं लिहून पुरी केली. यानंतर शके १७४० च्या आश्विन शुद्ध १० मीस याच प्रतीवरून मल्हार रामराव चिटणीस व रंगो लक्ष्मण यांनी सध्यांची प्रत तयार केली आहे. हनुमंतस्वामी हा समर्थांचे वडील बंधु जे ज्येष्ठ त्यांच्या नातवाचा नातू होय.

**हनुमान्**—मारुति. याचा जन्मपिता केसरी व माता अंजना होय. याच्या जन्माच्या विविध कथा आहेत. दशरथाच्या पुत्रकामेष्टि यज्ञांतील हविर्भाग अंजनेला मिळून असा वीर्यवान् पुत्र झाला. बालपणींच सूर्यास फल समजून खाण्यास निघाला; तेव्हां हनूवर वज्राघात झाला. पण त्यानंतर सर्व देवांकडून त्याला बलपोषक वर मिळाले. हा सुग्रीवाचा मित्र, म्हणून याला सुग्रीवानें सीताशुद्धीचें अवघड कार्य सांगितलें. तेव्हां हा रामभक्तहि बनला. यानें सीतेचा शोध लाविला व रामरावणयुद्धांत रामाला फार मदत केली. लक्ष्मण मूर्च्छित पडला असतां औषधीसाठीं सबंध द्रोणागिरिच उचलून आणला. रामानें याला रामचरित्र ऐकत व गात पृथ्वीवर राहण्या-विषयीं आज्ञा केली. हा चिरंजीव व ब्रह्मचारी आहे. याची आराधना बलाची इच्छा करणारे करतात. मारुतीवर बरींच स्तोत्रें आहेत. रामदासस्वामींनीं मारुति-उपासना फार वाढविली. महाराष्ट्रापेक्षां द्राविड प्रांतांत मारुतीचीं फार देवळें आहेत. प्रत्येक रामाच्या देवळांत रामासमोर हात जोडलेली मारुतीची मूर्ति बसवितात. बहुधा गांवाच्या तोंडाशीं मारुतीचें देऊळ किंवा मूर्ति तरी असते.

**हॅनोव्हर**—हें जर्मनीच्या वायव्य भागांत पूर्वी स्वतंत्र राज्य होतें. पण हल्लीं तो प्राशियाचा एक प्रांत आहे. क्षेत्रफळ १४,८९६ चौरस मैल असून दक्षिण भाग हार्झ पर्वतानें व्यापलेला आहे. परंतु बाकीचा भाग सपाट आहे. या प्रांतांतून एम्स, वेसर, व एल्ब या नद्या वाहत असल्यामुळें तो प्रदेश फार सुपीक आहे; व तेथें मका व जवस हीं पिकें होतात. डोंगराळ भागांत खनिज द्रव्यें विपुल सांपडतात. अर्नेस्ट ऑगस्टस हा ब्रुन्स्विक-ल्यूनेबर्क या घराण्यांतला राजपुत्र १६९२ सालीं हॅनोव्हरचा पहिला 'इलेक्टर' झाला, आणि त्यानें इंग्लंडचा राजा पहिला जेम्स याच्या नातीशीं विवाह केला. नंतर १६९८ सालीं त्याचा मुलगा जॉर्ज लुई हॅनोव्हरचा 'इलेक्टर' झाला. आणि तोच पुढें १७१४ सालीं इंग्लंडचा पहिला जॉर्ज राजा झाला. एलिझाबेथ राणी इंग्लंडच्या गादीवर आल्यावर 'सॅलिक ला' प्रमाणें हॅनोव्हरचें राजपद अर्नेस्ट ऑगस्टस, ड्यूक ऑफ कंबरलंड याच्याकडे गेलें, आणि त्याच्यानंतर १८५१ सालीं तें राजपद इंग्लंडचा ५ वा जॉर्ज राजा याला मिळालें. १८६६ सालीं हॅनोव्हर प्राशियांत सामील करण्यांत आला. लोकसंख्या ४,३४,०००.

शहर लीने नदीच्या कांठीं वसलेलें आहे. या शहराच्या उत्तरेस व पूर्वेस अरण्य आहे. या अरण्याचा सार्वजनिक उद्यानासारखा उपयोग केला जातो. शहराच्या दक्षिणेस १५४ फूट उंचीचा एक वाटर्लूचा जयस्तंभ आहे. येथें शाळा व कॉलेजें पुष्कळ आहेत. येथील लष्करी शिक्षणाची शाळा नांवाजलेली आहे. व्यापार व उद्योगधंदे यांमुळें ऊर्जितावस्थेस आलेलें हें एक प्रमुख शहर आहे. कापड, लोखंडी सामान, रासायनिक द्रव्यें, यंत्रें, तंबाखू, पिआनो करणें, वगैरे येथें बहुतेक सर्व प्रकारचे उद्योगधंदे आहेत. येथील व्यापाराच्या मुख्य जिनसा म्हटल्या म्हणजे घोडे, कोळसा, धान्य, लांकडें, दारू व कातडी या होत. प्रसिद्ध ज्योतिर्विद् विल्यम हर्शेल याचा जन्म येथेंच झाला.

**हॅन्सर्ड**—पार्लमेंटच्या कामकाजाच्या सरकारी अहवालांना हें नांव आहे. हॅन्सर्ड ही लंडनमध्यें छपाईचें काम करणारी एक संस्था आहे, व तिच्याकडे पार्लमेंटमधील वादविवाद आणि

कागदपत्रें छापण्याचें काम घरींच वर्षें होतें. या संस्थेचा मूळ संस्थापक ल्यूक हॅन्सर्ड (१७५२–१८२८) हा होय. आणि त्याला १८०० सालीं पार्लमेंटचें छपाईचें काम मिळालें. १८९५ ते १९०८ पर्यंत जरी हे अहवाल (रिपोर्ट) 'दि टाइम्स' तयार करीत असे, आणि तेव्हांपासून अलीकडे सरकारी नोकर हें छपाईचें काम करतात, तरीहि हें नांव, कायम ठेवण्यांत आलें आहे.

हॅंपडेन, जॉन (१५९४–१६४३)—एक इंग्रज मुत्सद्दी. व लोकपक्षाचा पुढारी. हा पहिल्या चार्लस राजाच्या कारकीर्दींत 'शिप्-मनी' या कराविरुद्ध झगडण्यांत प्रसिद्धीस आला (१६३६). त्यापूर्वी तो सरकारविरोधी पक्षांत राहून टीका करीत असे. तो फार लोकप्रिय पुढारी असून १६४२ त राजानें भर कॉमन्स सभेंत ज्या पांच सभासदांना पकडण्याचा प्रयत्न केला त्यांत हॅंपडेन एक होता. जेव्हां लोकपक्षाचें सैन्य तयार झालें तेव्हां हा त्या सैन्यांतहि दाखल झाला. चालग्रोव्ह फील्डच्या लढाईत तो वराच जखमी झाला.

हंपी—मद्रास, बल्लारी जिल्हा, होसपेट तालुका, एक लहान गांव. विजयानगरच्या अवशेषांमुळें हें प्रसिद्धीस आलें. कारण या नष्ट साम्राज्याच्या अवशेषांना हंपीचा 'पडित भाग' (रुइन्स) असें नांव रूढ आहे. हे अवशेष सुमारें नऊ मैल पसरलेले आहेत. हा सर्व भाग खडकाळ आहे. उत्तरेच्या बाजूनें तुंगभद्रा जोरानें वाहते. वनश्री फारशी कोठें आढळत नाहीं. जिकडे तिकडे मोठमोठे अवाढव्य दगड एकावर एक उभेआडवे भयानक स्थितींत राहिलेले दिसतात. मधून मधून जुन्या शहराचा कोट नजरेस पडतो. यांतच पडकीं देवळें व राजवाडे पाहावे लागतात. (विजयानगर पाहा).

हंपीविरूपाक्ष हें एक तीर्थक्षेत्र आहे. होसपेट स्टेशनापासून हें स्थान १० मैलांवर आहे. विरूपाक्ष हें प्राचीन स्वयंभूलिंग आहे. येथें विद्यारण्यस्वामींचा मठहि आहे. विरूपाक्षाचें देऊळ चांगलें मोठें असून दोन उंच गोपुरें प्रेक्षणीय आहेत. येथें मोठा रथोत्सव होत असतो. हंपीपासून अनागोंदी ३/४ मैलांवर आहे. विजयानगरच्या अवशेषांतील विठ्ठलेश्वराचें मंदिर कलाकौशल्यानें परिपूर्ण म्हणून प्रेक्षणीय आहे. पण आंत मूर्ति नाहीं. येथून नदी ओलांडून किष्किंधेकडे जातां येतें.

हॅंबर्ग—हें जर्मनींतील बंदर आणि स्वतंत्र शहर उत्तर समुद्रा- (नॉर्थ सी)पासून सुमारें ८० मैलांवर एल्ब नदीच्या उत्तर शाखेवर वसलेलें आहे, व तेथपर्यंत मोठाल्या बोटी जाऊं शकतात; त्यामुळें हें युरोपांतील सर्वांत मोठें व्यापारी बंदर झालें आहे. एल्ब नदीमधून या शहरांत सर्व बाजूंना कालवे काढलेले आहेत. हॅम्बर्ग फार महत्त्वाचें आहे याचें कारण तेथून मोठा नाविक व्यापार चालतो. आणि त्यामुळें बॅंकिंग एक्सचेंज व मरीन ॲशुअरन्स यांचा धंदाहि मोठा चालतो. येथें जहाजें बांधणें, यंत्रें तयार करणें, वाफेचीं इंजिनें आणि धातूंचे अनेक प्रकारचे जिन्नस, तसेंच तमाखू व सिगार, साखर, स्पिरिट, दारू, इत्यादि अनेक प्रकारचे कारखाने व उद्योगधंदे आहेत. बंदराच्या सोयी अगदीं परिपूर्ण आहेत. आणि येथें सर्व आकाराच्या बोटी येऊं शकतात. हें स्वतंत्र बंदर आहे. या स्वतंत्र शहराचें स्वतन्त्रें लोकराज्य–सरकार आहे; व त्याच्या ताब्यांत १६० चौ. मैल क्षेत्र आहे. याचे हॅम्बर्ग शहर आणि भोंवतालची उपनगरें असे दोन भाग आहेत. एकंदर लोकसंख्या १६,८२,२२० आहे. या लोकराज्याचा कारभार १९२१ च्या घटनेप्रमाणें सीनेट व प्रतिनिधी सभागृह ह्यांच्यामार्फत चालतो. हें शहर बादशहा शार्लमेगन यानें वसविलें. बाराव्या शतकांतच त्याला व्यापारी शहर म्हणून मोठें महत्त्व प्राप्त झालें. १६१८ सालीं हें स्वतंत्र शहर म्हणून मान्य करण्यांत आलें. १८१० सालीं जर्मनीच्या वायव्य भागाबरोबर हें शहर फ्रेंच साम्राज्यांत सामील करण्यांत आलें, पण १८१५ सालीं तें स्वतंत्र शहर म्हणून जर्म्यानिक कॉन्फेडरेशनला जोडलें गेलें. येथें एक विद्यापीठ आहे.

हंबीरराव मोहिते—शिवाजीचा अष्टप्रधानांतील सेनापति. याचें मूळ नांव हंसाजी मोहिते. हा स. १६७४ पावेतों शिवाजीच्या सैन्यांत पांच हजार फौजेवरील एक सरदार होता. परंतु त्या वर्षी विजापूरच्या सैन्यावर शिवाजीचा मुख्य सेनापति प्रतापराव गुजर तुटून पडला असतां तो प्राणास मुकून त्याची फौज फुटली. तेव्हां हंसाजीनें पाठलाग करणाऱ्या शत्रूच्या सैन्यावर हल्ला करून मुसलमानांचा पराभव केला. म्हणून शिवाजीनें त्यावर खुष होऊन त्यास 'हंबीरराव' असा किताब दिला; व प्रतापरावाच्या जागीं त्यास सेनापति नेमलें. शिवाजीच्या राज्याभिषेकाच्या वेळीं जे अष्टप्रधान नेमले त्यांत सेनापति किंवा सरनोबत हंबीरराव होता. १६७५ सालीं हंबीररावानें बऱ्हाणपुरावरून थेट माहूरपर्यंत मोंगलांचा मुलूख लुटला, व भडोच जिल्ह्यांतून खंडणी गोळा करून सर्व पैका रायगडास सुरक्षित आणला. इ. स. १६७८ त शिवाजी कर्नाटकांतून महाराष्ट्रांत परत आला तेव्हां त्यानें हंबीररावास व्यंकोजीजवळ ठेविलें होतें. शिवाजी व व्यंकोजी यांच्यामध्यें तहनामा झाल्यावर हंबीरराव

मोठ्या त्वरेनें महाराष्ट्रांत यावयास निघाला. मार्गांत त्यानें कृष्णा व तुंगभद्रा यांच्या दुआबांत विजापूरच्या सैन्याचा पराभव केला, व सर्व दुआब प्रांत आक्रमण करून कित्येक बंडखोर देशमुखांस वठणीस आणलें (१६७८). इ. स. १६७९ त शिवाजीनें मोंगलांकडे गेलेल्या संभाजीचा पाठलाग करण्याकरितां याची रवानगी केली. परंतु संभाजी दिलेरखानाच्या छावणींत पोंचल्याचें कळल्यावर यास विजापुराकडे मोंगलांविरुद्ध आदिलशहाच्या कुमकेस पाठविलें. हंबीरराव विजापुरास आला, व वेढा देऊन बसलेल्या दिलेरखानाच्या सैन्यामोंवती विरल्या घालून त्यानें मोंगलांच्या सैन्यांत अन्नाची इतकी टंचाई पाडली कीं, पावसाळा संपल्याबरोबर दिलेरखानानें विजापूरचा वेढा उठविला (१६७९). शिवाजीच्या पश्चात् हा संभाजीच्या पक्षास येऊन मिळाला. आणि त्याच्यामुळेंच संभाजीस तावडतोब गादी मिळाली. यानेंच मोरोपंत व अण्णाजी या सोयराबाईच्या बाजूच्या प्रमुख कटवाल्यांस संभाजीच्या स्वाधीन केलें. इ. स. १६८४ मध्यें औरंगजेबानें आपली छावणी अहमदनगरास आणल्यामुळें खानदेश प्रांत मोकळा पडला आहे असे पाहून हंबीरराव अचानक बऱ्हाणपुरास गेला, व त्या शहरीं कित्येक दिवसपर्यंत खंडणी गोळा करून खंडणीसह त्वरेनें परत येत असतां वाटेंत त्यानें बऱ्हाणपुरापासून नाशिकपर्यंत मार्गांतील सर्व प्रांतांत चौथाई-सरदेशमुखी वसूल केली. इ. स. १६८७ मध्यें हंबीरराव व मोंगलांचा सरदार सरजाखान यांची वांईजवळ लढाई होऊन तींत मोंगलांचा पराभव झाला. पण या लढाईंत हंबीरराव घायाळ होऊन मरण पावला.

**हँबोल्ट, फ्रीडरिश हीनरिश अलेक्झांडर** (१७६९-१८५९)—एक जर्मन प्रवासी व सृष्टिशास्त्रज्ञ. त्याचा पहिला ग्रंथ 'ऱ्हाइनच्या कांठच्या दगडासंबंधीं विचार' १७९० सालीं प्रसिद्ध झाला. १७९७ सालीं उष्ण कटिबंधांतील प्रदेशांची सृष्टिशास्त्रदृष्ट्या पाहणी करण्याकरितां तो दक्षिण अमेरिकेंत गेला आणि तेथें ओरीनोको रायोनेग्रोचा वरचा भाग किटो

व लिमा यांच्यामधला प्रदेश, मेक्सिको शहर आणि त्याच्या भोंवतालचा प्रदेश आणि क्यूबा बेट इतक्या प्रदेशाची पाहणी त्यानें तेथें पांच वर्षें राहून केली. १८०७ सालीं यासंबंधींच्या, त्याच्या मोठ्या ग्रंथाचा पहिला भाग आणि १८२७ सालीं शेवटचा ३० वा भाग प्रसिद्ध झाला. नंतर तो बर्लिन येथें स्थायिक झाला. १८४५ सालीं त्यानें आपला मुख्य ग्रंथ 'कॉसमॉस' याचा पहिला भाग प्रसिद्ध केला. या ग्रंथांत त्यानें सृष्टींतील देखावे व चमत्कार यांची विस्तृत माहिती दिली आहे.

**हमदान**—इराण, हमदान प्रांताचें मुख्य ठिकाण. हें तेहरानपासून १८८ मैलांवर आहे. हें फार भरभराटीचें व्यापारी ठिकाण असून येथील लो. सं. सुमारें ४०,००० आहे. येथील बाजारपेठ विस्तृत असून त्यांत पुष्कळ प्रकारचा माल असतो. मुख्य धंदे चामडें कमाविणें, जीन, लगाम, पेट्या व इतर चामड्याचे जिन्नस बनविणें, व तांब्याचीं भांडीं करणें हे आहेत. या शहराच्या मध्यभागीं एका साधारण घुमट असलेल्या इमारतींत इस्थर व मोर्देकाई यांचीं थडगीं आहेत. सर्व बाजूंनीं हीब्रू भाषेंत लिहिलेले लेख वर खोदलेले अशा दोन लांकडी पेट्या येथें आहेत. प्रख्यात वैद्य व तत्त्ववेत्ता अबुअली इब्न सिना अथवा अव्हिसेना याची कबर येथें आहे.

**हॅमिल्टन, सर विल्यम** (१७८८-१८५६)—एक स्कॉटिश अध्यात्मविद्याविशारद. तो १८३६ सालीं एडिंबर्ग युनिव्हर्सिटींत तर्कशास्त्र व अध्यात्मविद्या (मेटॅफिजिक्स) यांचा प्राध्यापक नेमला गेला. तेथें त्यानें एक उत्साही शिष्यमंडळ बनविलें. आणि अध्यात्मज्ञान्यांच्या स्कॉटिश पंथाची कीर्ति पुन्हां प्रस्थापित केली. १८४६ सालीं त्यानें थॉमस रीड ह्याचे ग्रंथ टिपांसह प्रसिद्ध केले, आणि १८५४ सालीं डुगल्ड स्टुअर्ट याच्या ग्रंथाचा अशाच प्रकारचा पहिला भाग प्रसिद्ध केला. तर्कशास्त्र व अध्यात्मविद्या यांवरील त्याच्या व्याख्यानाचा संग्रह डीन मॅनसेल व प्रोफेसर वीच यांनीं प्रसिद्ध केला. तत्त्वज्ञानांत हॅमिल्टनची महत्त्वाची भर म्हणजे त्याच्या तर्कशास्त्र पद्धतींतील विधेय परिच्छेद (क्वान्टिफिकेशन ऑफ प्रेडिकेट) होय. त्याचप्रमाणें ज्ञानसापेक्षत्व व अनंतत्वाची व्याख्या या बाबतींत त्याचीं मतें स्वतंत्र आहेत.

**हमी**—कायद्यामध्यें एक मनुष्य दुसऱ्या मनुष्याच्या चुकीच्या भरपाईसाठीं जबाबदार राहतो तेव्हां म्हणतात. उदा., एखादी पेढी जेव्हां एखाद्याला जास्त उचल करूं देते तेव्हां कोणाची तरी हमी घेत असते. उचल करणारानें पैसे दिले नाहींत तर हा हमीदार ते देण्यास बांधला असतो. सार्वजनिक किंवा खासगी व्यवहारांतहि अशी हमी घेण्याची पद्धत आहे. तसेंच खजिनदार, मोठ्या रकमांचा देवघेव करणारा नोकर, यांपासूनहि हमी मागण्यांत येते. या नोकराकडून पैशाची कांहीं अफरातफर किंवा गैरशिस्तपणा झाला तर हमीदार भरपाई करतो.

**हमीर**—हा राग कल्याण थाटांतून उत्पन्न होतो. याचा आरोहावरोह सात स्वरांनीं होतो. म्हणून याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी स्वर धैवत व संवादी गांधार आहे. गानसमय रात्रीचा पहिला प्रहर आहे. या रागांत दोन्ही मध्यमांचा प्रयोग होतो,

परंतु तीव्र मध्यम आरोहांतच घेतला जातो, व शुद्ध मध्यम आरोहावरोहांत येतो. याच्या आरोहांत निषाद वक्र व अवरोहांत गांधार वक्र होतो. याच्या अवरोहांत केव्हां केव्हां कोमल निषाद विवादी या नात्यानें घेतला जातो. याचें चलन वक्र स्वरूपाचें आहे.

हमीरपूर—संयुक्त प्रांत, झांशी विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. २,४४३ चौ. मै. येथील कृत्रिम सरोवरें रमणीय आहेत. हीं सरोवरें मुसुल्मानी स्वाऱ्या होण्यापूर्वी गढवाल व चंदेल या राजांनीं मुद्दाम बांधलेलीं आहेत. या जिल्ह्यांत मुख्य नदी बेटवा व तिला मिळणारी नदी धसान ही आहे. या जिल्ह्यांतील बहुतेक जमीन गंगा नदीच्या पुळणीनें बनलेली आहे. या जिल्ह्यांत झाडें फार कमी आहेत व त्यामुळें हवा कोरडी व उष्ण आहे. दरवर्षी सरासरी पाऊस ३५ इंच पडतो.

या जिल्ह्यावर पूर्वी गढवाल रजपुत राजांचें राज्य होतें. त्यांच्यानंतर परिहार राजे व त्यांच्या मागून चंदेल राजे राज्य करूं लागले. १६८० सालीं हा जिल्हा बुंदेलखंडाचा राजा छत्रसाल याच्या ताब्यांत गेला व याच ठिकाणीं या छत्रसाल राजाचीं दिल्लीच्या बादशहाचा सरदार महमदखान बंगश याच्या सैन्याशीं घनघोर युद्धें झालीं. शेवटीं पहिला बाजीराव पेशवे याच्या मदतीनें छत्रसालानें महमदखानाच्या सैन्याचा पुरा धुव्वा उडविला व मोड केला व छत्रसालानें आपल्या राज्याचा तिसरा भाग बाजीरावास दिला. त्यांत महोबा शहर पेशव्यांकडे आलें. हल्लींच्या जिल्ह्याचा बराचसा भाग छत्रसालाचा पुत्र जगत्‌राज याजकडे गेला. पुढें या राजाच्या वंशजांमध्यें तंटेबखेडे सुरू झाले व राज्याची धुळधाण झाली. स. १८०२ पासून छत्रसाल राजाचा मुलूख इंग्रज सरकारच्या ताब्यांत गेला. व १८४९ सालीं इंग्रज सरकारचा हल्लींच्या हमीरपूर जिल्ह्यावर पूर्णपणें अमल बसला. लो. सं. ५,७५,५२८. या जिल्ह्यांत ७ शहरें व ७५६ खेडीं आहेत. या संस्थानांत चांभार बरेच आहेत. त्यांच्या खालोखाल लोधे (शेतकरी), नंतर ब्राह्मण, अहिर, रजपुत, वगैरे लोक आहेत. शेतकीवर शें. ६४ लोक उदरनिर्वाह करतात. ब्राह्मण, लोधे व रजपुत लोक जमीनदार आहेत.

या जिल्ह्यांत हरबरा व ज्वारी हीं दोन पिकें मुख्य आहेत. बाकीचीं पिकें म्हणजे चिंचोणी, कापूस, ज्वारी, गहूं, साबू, कंस, वगैरे होत. निर्गत माल महत्त्वाचा म्हणजे ज्वारी, बाजरी, कापूस, तूप व विड्याचीं पानें व चिंचोणी हे पदार्थ होत. व आयात माल साखर, तंबाखू, मसाला, तांदूळ, मीठ, कापड, वगैरे जिन्नस होत. राथ हें मुख्य व्यापाराचें ठिकाण आहे.

हमीरपूर हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण बेटवा व यमुना या दोन नद्यांच्या संगमावर वसलें आहे. हें शहर ११ व्या शतकांत हमीरदेव यानें वसविलें. अकबर बादशहा राज्य करीत असतांना या शहराचें महालाचें मुख्य ठिकाण म्हणून महत्त्व होतें. हल्लीं या ठिकाणीं हमीरच्या किल्ल्याचा अवशिष्ट भाग व कांहीं मुसलमानी थडगीं आहेत.

हम्मीर गुहिलोत (मृत्यु १३६४)—मेवाडच्या सिसोदिया राणा घराण्यापैकीं अरिसिंहाचा पुत्र. अल्लाउद्दिन खिलजीनें मेवाडवर स्वारी केली असतां याचा बाप अरिसिंह, आजा लक्ष्मणसिंह व सात चुलते यांनीं त्यास तोंड दिलें. झालेल्या युद्धांत याचा एक चुलता अजयसिंह हाच एकटा जखमी स्थितींत सिसोदे येथें परत आला व तेथील जहागिरीचा कारभार पाहूं लागला. बाकी सर्व रणांगणावरच मरण पावले. अरिसिंहानें आपल्या बापाच्या नकळत चंदाणे रजपुत जातीच्या एका गरीब स्त्रीशीं विवाह केला होता. तिच्यापासूनच अरिसिंहास हम्मीर हा पुत्र झाला. अरिसिंह युद्धांत मरण पावल्याची बातमी कळल्यावर अजयसिंहानें हम्मीरला आजोळाहून आपणाकडे आणलें. जोधपूर भागांतील गोडवाड जिल्ह्यांत मुंजा नांवाच्या 'बालेचा' रजपुतानें चालविलेल्या लूटमारीस आळा घालण्यासाठीं अजयसिंहानें आपले पुत्र सज्जनसिंह व क्षेमसिंह यांना पाठविलें होतें. परंतु त्या कामीं त्यांना अपयश घेऊनच परतावें लागलें. तेव्हां मुंजाच्या बंदोबस्तासाठीं हम्मीरची योजना करण्यांत आली. तेव्हां हम्मीरनें मोठ्या शिताफीनें मुंजास पकडून त्याचें शिर कापून आणून आपल्या चुलत्यापुढें ठेवलें. या याच्या पराक्रमावर खुष होऊन अजयसिंहानें आपला उत्तराधिकारी म्हणून याच्या कपाळावर रक्ताचा टिळा लावला. शिवाय अरिसिंहाचा पुत्र म्हणूनहि याचा राज्यावर हक्क होता तो वेगळाच. अजयसिंहानें हम्मीरलाच उत्तराधिकारी ठरवल्यानें त्याचे पुत्र सज्जनसिंह व क्षेमसिंह हे दोघे मेवाडचा त्याग करून दक्षिणेंत गेले. अजयसिंहाच्या मृत्यूनंतर याच्याकडे राज्याचे सर्वाधिकार आले. अल्लाउद्दिन खिलजीच्या मृत्यूमुळें दिल्ली दरबारांत माजलेल्या बेबंदशाहीचा फायदा घेऊन यानें मेवाडचें गेलेलें राज्य परत मिळविण्याचें ठरवलें. त्याप्रमाणें यानें चितोडच्या गादीवर असलेला जेसा ऊर्फ जयसिंग या मालदेवाच्या मुलास राज्यावरून पदच्युत करून गुहिल वंशाची सत्ता मेवाडवर स्थापिली. तेव्हां जयसिंगानें दिल्लीचा बादशहा सुलतान मुहंमद तुघलक याच्या साहाय्यानें आपली गादी परत मिळवण्याचें कारस्थान आरंभलें. मुहंमद तुघलकानें मेवाडचा कबजा मिळवण्यासाठीं हम्मीरवर स्वारी केली. परंतु सिंगोली येथें झालेल्या लढाईंत त्यासच याच्या कैदेंत तीन महिने दिवस पडावें लागलें. शेवटीं पन्नास लाख रुपये, शंभर हत्ती व कांहीं मुलूख हम्मीरास देऊन त्यानें आपली सुटका करून घेतली. यानें जीलवाडा (नेनाकपूर) च्या यादव राजास जिंकून त्याचा मुलूख आपल्या राज्यास जोडला. ईडरचा राजा जैतकर्ण व डोंगरांतील भिल्ल शत्रु यांना यानें ठार केलें. सन १३४१ मध्यें यांच्या द्वारा देवसिंहाच्या बुंदी

मिळवण्याच्या कामीं याचें साहाय्य झालें. चितोडला यानें अन्नपूर्णेचें मंदिर व कुंड बांधलें आहे. खेता (क्षेत्रसिंह), लूणा, खंगार व बैरसल (वैरीसाल) हे याचे चार पुत्र होत. लूणावत सिसोदिये हे लूणाचे वंशज होत.

**हम्मुरबी** (सु. खि. पू. २२५०)— बाबिलोनियाचा एक राजा. यानें आपल्या राज्यांत अनेक हितप्रद गोष्टी केल्या. पाटबंधाऱ्यांनीं शेतकी व व्यापार सुधारण्याला मदत केली व आयव्ययावर नियंत्रण ठेवलें. त्यानें देवळेंहि बांधलीं. त्याची विशेष ख्याति त्याच्या कायद्यांच्या कोडाबद्दल आहे. हें कोड १९०१ सालीं सुसा येथें मिळालें. एका दगडावर हें कोरलेलें असून याचे २८२ परिच्छेद आहेत. जगांतील अगदीं जुना कायद्यांचा ग्रंथ हाच म्हणावा लागेल.

**हॅम्स्टर**—हे उंदरासारखे तीक्ष्णदंत असलेले एका जातीचे प्राणी आहेत. यांची शेपूट आंखूड व केसाळ असून यांच्या गालांत पिशव्या असतात. यांची लांबी शेपटीसुद्धां सुमारें १४ इंच असते. हे आशिया व युरोप खंडामध्यें आढळतात व शेतांची फार नासाडी करतात. हे मांसाहारी आहेत. गवतहि खातात व कडक हिंवाळ्यांत स्वस्थ पडून राहतात.

**हयग्रीव**—हा एक विष्णूचा अवतार आहे. हयग्रीव राक्षसास यानें मारलें. या अवतारांत विष्णूचें तोंड घोड्याचें आहे. हयग्रीवविष्णूनें मधुकैटभांना मारून वेद परत आणले अशीहि महाभारतांत कथा आहे. हयग्रीव विष्णूच्या मूर्ती पूजेंत असतात. 'हयवदन', 'तुरगग्रीव' यांसारखीं विष्णुनामें आहेत.

**हयग्रीव व्यास** (सन १२७५–१३२४)—एक महानुभाव ग्रंथकार. हा गोदावरीच्या कांठच्या राक्षसभुवन या गांवचा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. हा काशीयात्रेस निघाला असतां याची व कवीश्वराचार्य (भास्कर) याची वाटेंत भेट झाली; तेव्हांपासून यानें त्याला आपला गुरु केलें. हयग्रीवाचार्य या नांवानें हा प्रसिद्ध आहे. हयग्रीवानें 'गजराजस्तोत्र' या नांवाचा २८० निर्यमक कवितांचा ग्रंथ रचला. हा पैठणास वारला.

**हयातखान, सर शिकंदर** (१८९२–१९४३)—एक मुसलमान पुढारी. शिक्षण अलीगड येथें व लंडनमध्यें झालें. हे गेल्या युद्धांत प्रथम रिक्रूटिंग ऑफिसर होते. पुढें प्रत्यक्ष लढाईंत सैन्यतुकडी नेणारे हे पहिले हिंदी कमांडर होते. हे पंजाब कायदे मंडळाचे सभासद होते. १९२६ सालीं नेमलेल्या पोलिस चौकशी कमिटीचे हे सभासद होते. प्रिन्स ऑफ वेल्स यांच्या भेटीच्या प्रसंगीं हे उत्सवाधिकाऱ्याचे पर्सनल असिस्टंट होते. प्रांतिक सायमन कमिटीचे हे अध्यक्ष होते; हे अनेक कंपन्यांचे डायरेक्टर होते. १९२९ मध्यें हे प्रथम तात्पुरते महसूल मंत्री होते. पुढें १९३० मध्यें कायम झाले. कांहीं काळ हे पंजाबचे गव्हर्नरहि होते (१९३२–३४). नवीन सुधारणांनंतर पंजाब लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे हे सभासद असून, मरणापर्यंत पंजाबचे प्रधान मंत्री होते.

**हरकिसनलाल, लाला** (१८६६– )—पंजाबांतील एक पुढारी. यांचें शिक्षण लाहोर येथें व नंतर केंब्रिज येथें झालें. यांनीं प्रथम कांहीं दिवस वकिली करून १८९९ मध्यें नोकरी सोडून दिली व उद्योगधंदे व व्यापार या क्षेत्रांत पदार्पण केलें. यांनीं लाहोर येथील इलेक्ट्रिक सप्लाय कंपनी व इतर अनेक कंपन्या स्थापन केल्या. १९१० सालीं भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या स्वागत सभेचे ते अध्यक्ष होते. १९१२ सालीं बांकीपूर येथें भरलेल्या औद्योगिक परिषदेचे ते अध्यक्ष होते. १९१६ सालीं इंडियन इंडस्ट्रिअल कमिशनपुढें यांची जी साक्ष झाली तींत त्यांच्या सडेतोड व माहितीनें भरलेल्या साक्षीमुळें सरकार पक्षांत मोठी खळबळ उडून गेली होती. हे पंजाब युनिव्हर्सिटीचे फेलो होते व पंजाब कायदेमंडळाचे सभासद होते. १९१९ मध्यें लष्करी अमदानींत यांच्यावर खटला भरण्यांत आला होता व जन्मठेप हद्दपारीची शिक्षाहि देण्यांत आली होती. परंतु लवकरच डिसेंबर महिन्यांत त्यांस सोडून देण्यांत आलें. १९२० ते १९२३ पर्यंत हे पंजाब सरकारचे कृषिमंत्री होते. दिल्ली येथें १९२७ सालीं भरलेल्या व्यापारी परिषदेचे ते अध्यक्ष होते. लाहोर येथें १९३४ सालीं भरलेल्या अखिल भारतीय विमा परिषदेचे ते स्वागताध्यक्ष होते.

**हरकूबाई**—इंदूरच्या पहिल्या मल्हारराव होळकराची एक बायको. ही दत्तात्रेय व कृष्ण या देवतांची उपासक होती व हिनें महानुभावी पंथाचा उपदेश घेतला होता. हिनें गोदावरी कांठीं कांहीं महानुभावी मंदिरें बांधलीं आहेत (उदा., अकोळनेरचें, डोमेग्रामचें मंदिर). राजमहालाशेजारील 'श्रीबांकेविहारी मंदिर' महानुभावी असून त्याला होळकर सरकारकडून इनामें आहेत. ही मल्हाररावानंतर निवर्तली.

**हरक्युलस**—हेरॅक्लीज पाहा.

**हरगुलाल** (शके १७५०)—हा महानुभावी धर्मतत्त्वाप्रमाणें वागणारा असून जम्मुराज्यांत प्रधानपदावर होता. त्या वेळीं सर्वेशाच्या आशेवरून शस्त्र न धरणारे बरेच लोक होते. त्यांत हरगुलाल एक प्रधान होता. हा म्यानांत पोलादी तरवार न ठेवतां लांकडी नकली तरवार ठेवीत असे. याच्या एका द्वेष्ट्यानें राजाच्या कानीं ही गोष्ट घातली. तेव्हां राजानें एके दिवशीं शस्त्रपरीक्षा अकस्मात् घेतां, तरवार उपसून सलामी देण्याच्या वेळीं प्रधानाच्या काष्ठ तरवारीची झळाळी पोलादी तरवारीहून निराळी विजेप्रमाणें राजाच्या दृष्टीस पडली. तेव्हां राजानें चुगलखोराला फांशीचा हुकूम फर्माविला. त्यावर हरगुलालनें प्रार्थना करून हा हुकूम रद्द करविला, अशी कथा आहे. त्या प्रदेशांत हरगुलालनें महानुभावी पंथाचा प्रचार

केला व मठ स्थापन केले. त्याच्या गजनगू गांवच्या मठांत मराठी पोथ्यांचा मोठा संग्रह आहे.

**हरजी राजे महाडिक** (१६६८–१६९४)—एक मराठा सरदार. हा परसोजीचा पुत्र. (महाडिक पाहा). याचें लग्न सन १६६८ मध्यें थोरल्या शिवाजीच्या मुलीशीं झालें. रघुनाथ नारायण हणमंते यास शिवाजीनें कर्नाटकचा कारभार पाहण्याच्या कामगिरीवर नेमलें होतें. संभाजीच्या राज्याभिषेकाच्या वेळीं हणमंते हा विरोधी पक्षास सामील आहे असा संशय आल्यावरून त्यास पकडून त्याच्या जागीं कर्नाटकच्या कारभारावर हरजी राजे महाडिक व शामजी नाईक पुंडे यांना पाठवण्यांत आलें. मध्यंतरीं हणमंते यानें संभाजीचा आपल्याबद्दलचा संशय दूर केला व त्यास संभाजीनें परत राज्यकारभारांत घेतलें होतें. परंतु संभाजीशीं त्याचें फार काळ जमलें नाहीं. तो परत जात असतां मरण पावला. यानंतर मात्र हरजी राजे महाडिक व श्यामजी नाईक पुंडे यांच्याकडे कर्नाटकचा कारभार पुन्हां सोंपविण्यांत आला. पुढें श्यामजी नाईक पुंडे यास संभाजीनें कैद केल्यानें हरजीवरच कर्नाटकचा सर्व भार पडला. सन १६८२ मध्यें यानें श्रीरंगपट्टणच्या राजाविरुद्ध त्रिचनापल्लीच्या राजास मदत करून श्रीरंगपट्टणचा सरदार कुमार याचा पराभव केला. एकोजी वारल्यानंतर त्याचा पुत्र शहाजी व पत्नी दीपाबाई यांच्याशीं एकदिलानें वागून यानें कर्नाटक म्हणजे एक स्वतंत्र असें राज्यच निर्माण केलें. विजापूर व गोवळकोंडें येथील राज्यें बुडवणाऱ्या औरंगजेबालाहि या नवीन राज्यानें दहशत निर्माण केली. हा वसूल पाठवीत नाहीं असा संशय आल्यावरून संभाजीनें याच्या जागीं केसो त्रिमल पिंगळे यास पाठवलें. तेव्हां याचा पिंगळे यांच्याशीं विरोध सुरू झाला. परंतु याच वेळीं औरंगजेबाची कर्नाटकवर स्वारी आली. तेव्हां यानें आपलें सैन्य पिंगळे यांकडे देऊन आपलें योग्य तें कर्तव्य बजावलें. तसेंच यानें व संताजीनें अर्काटचें ठाणें याच वेळीं जिंकलें. तारीख ८ मार्च १६८८ रोजीं मोंगल व मराठे यांमध्यें वांदिवाश येथें घनघोर रण माजलें, परंतु त्यांत कोणीच हरलें नाहीं; यानंतर संभाजी मरण पावला. तेव्हां ही संधि साधून हरजीनें पिंगळे यास कैद केलें. राजारामासहि याचा चांगला उपयोग झाला. मराठी राज्याकरितां शेवटपर्यंत यानें आपली काया झिजवली. सन १६९४ मध्यें जिंजीच्या वेढ्यांत यास मरण आलें.

**हरडोग, फ्रान्सिस** (१८६३– )—एक हंगेरियन कथालेखक. त्याला हंगेरियन मोपासां असें म्हटलें जातें. तो जर्मन वंशीय असल्यानें हंगेरीसंबंधीं त्याचा दृष्टिकोन पक्षपाती नाहीं. त्याच्या कथांतील पात्रें नागरी जीवनांतील व सुखलोलुप असतात. समाजांतील दुर्गुणांना तो नीट पोशीत नाहीं कीं त्यावर टीका करीत नाहीं. 'बाल्झाल्विन्', 'दि किंग' यांसारख्या नाटकांखेरीज-यांतून मात्र नवें दिसत नाहीं. याचीं 'दि न्यू फॉरेस्ट', 'दि ग्रुकोव्हिल गर्ल', इ. आनंदपर्यवसायी नाटकें व मजेदार गोष्टी सामान्य लोकांना फार आवडतात.

**हरणई**—मुंबई, रत्नागिरी जिल्हा, दापोली तालुक्यांतील एक बंदर. हें खुद्द रत्नागिरी शहरापासून ५६ मैलांवर आहे. लो. सं. ६,०००. सप्टेंबर ते जून या महिन्यांत येथें मासे विकण्याचा धंदा जोरांत चालतो. या बंदराच्या उत्तरेस समुद्रांत सुवर्णदुर्ग किल्ला आहे.

**हरताळ**—सोमल (आर्सेनिक) आणि गंधक मिळून हा भडक पिवळा खनिज तयार झालेला असतो. विशिष्टगुरुत्व ३·५, जुन्या पोथ्यांतून लिहिलेलें पुसण्यासाठीं वर हरताळ लावीत. यावरून 'हरताळ फासणें' हा वाक्प्रचार तयार झाला. हरताळ विषारी आहे.

**हरताळ भस्म**—एक आयुर्वेदीय औषध. सर्व तऱ्हेचे कुष्ट विकार, उपदंश व प्रमेह यांमुळें उत्पन्न झालेले त्वचाविकार, इत्यादि विकारांवर हें औषध अक्सीर आहे. खरूज, इसब, गजकर्ण, नायटा, विस्फोटक, इत्यादि क्षुद्र विकार तर यानें बरे होतातच, पण पाळीचे ताप पुष्कळ दिवस येत असल्यास त्यांवर याचा उपयोग चांगला होतो. हें औषध घेणाऱ्यानें आंबट व खारट पदार्थ अजीबात खाऊं नयेत. उन्हांत फिरूं नये. अग्निबळ पाहून मात्रा ·।· ते १ गुंज खदिरारिष्ट, महामंजिष्ठादि काढा, तूपसाखर यांबरोबर देतात.

**हरदत्त मिश्र**—एक विद्वान भाष्यकार व मार्मिक टीकाकार. यानें आपस्तंबधर्मसूत्रावर किंवा एकाग्निकांड यावर भाष्य लिहिलें आहे. तसेंच आपस्तंबगृह्यसूत्रावर 'अनाकुला', आश्वलायनगृह्यसूत्रांवर 'अनाविला,' गौतमधर्मसूत्रावर 'मिताक्षरा' व आपस्तंबधर्मसूत्रावर 'उज्ज्वला' या याच्या टीका सुप्रसिद्ध आहेत. सायणाच्या माधवीय धातुवृत्तीवरून व देवराजाच्या निघण्टूभाष्यावरून याचा काळ तेराव्या शतकाच्या पूर्वींचा असावा असें दिसतें. पद्मकुमाराचा हा पुत्र असून याचें मूळ नांव सुदर्शन असें होतें. यास अग्निकुमार नांवाचा वडील भाऊ होता. याचा गुरु अपराजित. यानें 'हरिहरतारतम्य' व 'चतुर्वेदतात्पर्यसंग्रह' हे दोन ग्रंथ लिहिले असून वामन व जयादित्य यांच्या काशिकावृत्तीवरील 'पदमंजरी' नांवाची टीकाहि याचीच होय. आज या ग्रंथांत तामिळ शब्द योजल्याकडे याचा कल दिसतो.

**हरदोई**—संयुक्त प्रांतांत लखनौ विभागांतील एक जिल्हा. जिल्ह्यांतील मुख्य नदी म्हणजे गंगा. जिल्ह्याचें हवा सामान्यतः आरोग्यावह आहे. येथें पाऊस सरासरीनें ३३ इंच पडतो. या जिल्ह्याला दक्षिण महागंगा व रामगंगा या नद्या-

काव्यांत सांपडतो. या जिल्ह्यांत मुसलमानांचा प्रवेश प्रथम १०१९ सालीं झाला व आल्तमशच्या अमदानींत हा जिल्हा पूर्णपणें त्यांच्या ताब्यांत गेला; १५ व्या शतकांत हा जोनपूरच्या नव्या राज्यछत्राखालीं होता, व पुढें तेथें १५० वर्षे रणसंग्राम चालला होता. अकबराच्या वेळीं हा जिल्हा व अफगाण लोक पूर्णपणें जिंकले गेले व पुढें हा जिल्हा अयोध्येच्या नबाबाच्या ताब्यांत होता; व कांहीं वेळ तो रोहिले लोकांचा मुलूख व सुजाउद्दौला यांचें राज्य ह्यांच्या सरहद्दीवर होता. पुढें ज्या वेळीं १८५६ सालीं अयोध्या संस्थान खालसा झालें त्या वेळीं हा जिल्हा निर्माण झाला व १८५७ सालच्या बंडानंतर या जिल्ह्याचें मुख्य ठिकाण हरदोई शहर झालें.

क्षे. फ. २,३२० चौ. मै. व लो. सं. १२,३९,२७९. या जिल्ह्यांत १० शहरें व १,८८८ खेडीं आहेत. शें. ८९ लोक हिंदू व शें. ११ लोक मुसलमान होते. येथल्या लोकांची जन्म-भाषा पश्चिम हिंदी होय. शेंकडा ३१ एकर जमिनींत गव्हाची लागवड होते. बाकीच्या भागांत बाजरी, हरभरा, तूर वगैरे डाळी, ज्वारी, तांदूळ, मका हीं धान्यें होतात.

या जिल्ह्यांतून बाहेर जाणारा माल म्हणजे धान्य, गूळ, तंबाखू, कातडीं, गुरें, वगैरे होत, व बाहेरून आंत येणारा माल म्हणजे यंत्रावरचें कापड, तांबें, पितळ, मीठ, कापूस व साखर हे जिन्नस होत. या जिल्ह्यांत रेल्वे सुरू झाल्यामुळें पूर्वीच्या व्यापारामुळें प्रसिद्ध असलेल्या शहरांचें महत्त्व कमी होऊन सांडिला, माधव-गंज व सांडी हरदोई यांसारख्या शहरांचें महत्त्व वाढत चाललें आहे. शिक्षणाच्या बाबतींत हा जिल्हा फारच मागासलेला आहे.

हरदोई जिल्ह्यांत हें शहर आहे. शहराचे दोन भाग आहेत: जुनें हरदोई व नवें हरदोई. शहरांत सार्वजनिक इमारती पुष्कळ आहेत. व एक प्रेक्षणीय दिवाणखाना आहे. येथें लांकडी काम प्रेक्षणीय होतें.

**हरद्वार**—संयुक्त प्रांतांत सहराणपूर जिल्ह्यांत हें स्थान आहे. बद्रीनाथास व केदारनाथास जाणारे यात्रेकरू प्रथम येथें उतरतात. ह्या शहराला आजपर्यंत अनेक नांवें पडलीं आहेत. प्राचीन काळीं (कपिल महामुनीच्या स्मरणार्थ) कपिलस्थान हें नांव होतें. ७ व्या शतकांत ह्युएनत्संग यानें मो यु-लो हें नांव दिलें व हें मथुरा किंवा मायापुर याचें रूपांतर असावें. हरद्वार किंवा हरिद्वार हें नांव अर्वाचीन आहे. प्राचीन नांव गंगा द्वार होतें. ह्या स्थानाबद्दल हिंदु लोकांना अतिशय आदर वाटतो. हिमालयाच्या पायथ्यापाशीं गंगेच्या उजव्या तीरावर गंगा नदी जेथून मोठ्या जोरानें खालीं पडते त्या खिंडाराजवळ हें शहर वसलेलें आहे. गंगेच्या डाव्या बाजूस चंदी पहाड नांवाचा डोंगर आहे. व त्या डोंगरावर देऊळ आहे. ह्याच ठिकाणीं गंगा त्रिपथगा, पंच-पथगा, अशी बनते. या शहराचा मुख्य प्रेक्षणीय भाग म्हणजे 'हरीकी पायरी' नांवाचा घाट होय. या घाटाजवळ गंगाद्वार नांवाचें देऊळ आहे. तसेंच कुशावर्त, बिल्वकेश्वर, नील पर्वत, कनखल हीं सर्व त्र्यंबकेश्वरांतल्याप्रमाणेंच येथें दाखविण्यांत येतात. या घाटाच्यावर एक विष्णूचें पाऊल उठलेलें आहे असें मानून लोक त्याची पूजा करितात. कुंभ राशीस गुरु येतो त्या वेळीं म्हणजे दर १२ व्या वर्षी हरिद्वारास कुंभमेळा भरत असतो व लाखों लोक येथें स्नानास येत असतात. व्यापार महत्त्वाचा नाहीं. म्युनिसिपालिटी आहे. जवळच कांगडी गुरुकुल आहे.

**हरपनहळ्ळी**—मद्रास, बल्लारी जिल्ह्यांतील एक तालुका. हा म्हैसूर पठाराला लागून आहे. व याचें क्षे. फ. ६११ चौ. मै. आहे. या तालुक्यांत एकच शहर हरपनहळ्ळी व ८१ खेडी आहेत. चिगातेरी गांवीं पाण्याच्या प्रवाहांत सोनें सांपडतें. एके काळीं हरपनहळ्ळी शहर एका पाळेगार किल्लेदाराचें मुख्य ठिकाण होतें. हे पाळेगार विजयानगरच्या हिंदु राजाच्या पराभवानंतर उदयास आले व हैदराच्या कारकीर्दींतहि यांचें महत्त्व कायम होतें. टिपूचा पराभव झाल्यावर हें शहर तेथल्याच दिवाणाच्या ताब्यांत गेलें व त्यानें त्या शहराची व्यवस्था मूळच्या पाळेगार घराण्यांतल्या एका लहान मुलाकरितां पाहण्याचें ठरविलें. जनरल हॅरिस त्या प्रांतातून कूच करूं लागला तेव्हां तो दिवाण त्याला मुकाट्यानें शरण गेला. ह्या त्याच्या नम्र वर्तुणुकीबद्दल त्या दिवाणाला व पाळेगार घराण्यांतील मुलाला मोठ्या जहागिरी सरकारनें बक्षीस दिल्या. पण हल्लीं दोन्ही वंश नामशेष झालेले आहेत. हल्लीं येथें जाडेंभरडें कापड, लोंकरी ब्लँकेट, वगैरे वस्तूंचा व्यापार चालतो.

**हरपाळ देव** (मृत्यु १३१८)—देवगिरीच्या रामदेवराव यादवाचा जांवई. अल्लाउद्दिनानें देवगिरी घेतल्यानंतर तेथें त्यानें एका मुसलमान किल्लेदारास नेमलें. तेव्हां यानें त्या किल्लेदारास हांकलून देऊन तेथें स्वतंत्रपणें राज्य करण्यास सुरुवात केली. हें पाहून मुबारक खल्जीनें सन १३१८ मध्यें यास पकडून व जिवंत सोलून अति अमानुष रीतीनें याचा वध केला.

**हरबार्ट, जोहान फ्रेडरिश** (१७७६-१८४१)—एक विख्यात जर्मन तत्त्वज्ञानी व अर्वाचीन अध्यापनशास्त्राचा जनक. याचे शिक्षणविषयक सिद्धान्त युरोप आणि अमेरिका यांत मान्यता पावले. त्याच्या मतें सर्व शिक्षणविषय परस्परसंबद्ध असून एकाच्या ज्ञानाची इतरांच्या ज्ञानांत भर पडते. अगोदरच असलेल्या ज्ञानाच्या द्वारें नव्या ज्ञानाचें विवरण करणें हा त्याचा अनुबोध (ऑपरसेप्शन) सिद्धान्त होय. शिक्षणाचा हेतु व्यक्तीचा विकास करणें हाच असावा. शिक्षणांत आवड उत्पन्न करण्यास फार महत्त्व आहे. याप्रमाणें त्याचीं मतें होतीं. कोनिग्जबर्ग येथें त्यानें एक

अध्यापनशाला चालविली होती. त्यानें कांहीं शिक्षणशास्त्रावर पुस्तकेंहि लिहिलीं आहेत.

**हरभट पटवर्धन** (मृत्यु १७५०)—पटवर्धन घराण्याचा मूळ पुरुष. याला हरभटबावा कोतवडेकर असें म्हणत. मृत्यूपूर्वी यानें संन्यास घेतला होता. मार्गशीर्ष व. १, सोमवार, शके १६७२ रोजीं याचा मृत्यु झाला. याची समाधि पुणें येथें ओंकारेश्वराजवळ आहे. याला गोविंद हरि पटवर्धन नांवाचा पुत्र होता. (पटवर्धन संस्थानिक घराणीं पाहा.)

**हरभरा**—एक धान्य. हरभऱ्याचें झाड दोन फूट उंच वाढतें. हरभऱ्याचा दाणा एका कडक वेष्टणांत असतो. त्याला घांटा असें म्हणतात. दर एक घांट्यांत बहुतकरून दोन दाणे सांपडतात. हरभऱ्यांत ४ जाती आढळतात: (१) काळा—याची लागवड फार करून गोंवें प्रांतांत व कर्नाटकांत आढळते. (२) हळवा किंवा पिवळा—याची लागवड सर्वत्र होते. याचा दाणा साधारण मोठा असून तो गुजराथेंत जास्त पिकतो. (३) पांढरा—काबुली, पर्वत्या मध्यप्रांतात पिकतो. या जातींत दाणा रंगाला पांढरा असून खाण्याला नरम, गोड व स्वादिष्ट असतो. (४) याची लागवड जबलपूर-हुशंगाबादकडे विशेष होते. सर्व कडदण धान्यांत हरभरा श्रेष्ठ मानला जातो. हरभरा रब्बी हंगामांत पेरतात, तो पिकण्यास चिक्कण काळी, उत्तम प्रकारची जमीन लागते. हरभरा बागाइतांत होतो. हरभऱ्याला जमीन उघाडीच्या दिवसात व पावसाळ्यांत वरचेवर पाळ्या घालून नांगरून, कुळवून, चांगली तयार करावी लागते. हरभरा शाळू, जोंधळा, बाजरी, गहूं, जवस, तीळ, मका व भात यांच्याशीं फेरपालटीनें करतात.

हरभऱ्याला फांद्या फुटूं लागल्या म्हणजे त्याचे शेंडे खुडतात व त्यांची भाजी करतात. या खुडण्यानें जास्त फूट होऊन जास्त घांटे येतात. हरभरा पेरल्यापासून साडेतीन-चार महिन्यांत तयार होतो. सरासरी दर एकरीं उत्पन्न-धान्य ५००-६०० पौंड जिराईत, ८००-१००० पौंड बागाईत; व भुसा ५००-६०० पौंड. हरभरा फार कसदार व पौष्टिक आहे. हरभरा घोड्यांस व बैलांस भरडून व भिजवून घालितात. पंजाबकडे हें धान्य जास्त पिकत असल्यामुळे दुभत्या गुरांनाहि तो रोज भरडून घालितात. ओल्या हरभऱ्याच्या पेंढ्या, हंगामांत गुरांस व घोड्यांना चारतात. हरभरा ओला किंवा भाजून खातात. ओल्या व वाळलेल्या पाल्याची भाजी करतात. व हरभऱ्याचे फुटाणे करून खातात. हरभऱ्याचे कित्येक खाण्याचे पदार्थ करतात. डाळें-फुटाणे याचेच होतात. रोजच्या स्वयंपाकांत डाळीचा उपयोग पुष्कळ होतो. हरभऱ्याची आंब धरतात. मोडशी व अपचन झालें असतां पोटांत आंब देतात. हिंदुस्थानांत बहुतेक ठिकाणीं हरभरा होतो.

**हरल**—(क्लोरल). कोरडा हर (क्लोरीन) अतिशय शुद्ध अल्कोहोलमध्यें सोडून लिबिगनें हा पदार्थ प्रथम तयार केला. त्याची ही रीत अजूनहि चालू आहे. हा पाण्याबरोबर मिसळला असता हर-उज्जेत (क्लोरल हायड्रेट) ह्या नांवाचा पांढरा स्फटिकमय पदार्थ तयार होतो. हर-उज्जेतावर अल्कलीची क्रिया केली म्हणजे क्लोरोफॉर्म आणि फॉर्मिक अम्ल तयार होतात. हरलचा औषधांत पुष्कळ उपयोग होतो. झोंप येण्यासाठीं हें लहान प्रमाणांत रोग्यांना देतात. मज्जातंतुविकार झालेल्या रोग्यांना ह्याचा चांगला उपयोग होतो. स्ट्रिक्नीनच्या विषावरहि हें देतात. हृदयाच्या क्रियेला ह्याचा अनिष्ट परिणाम होत असल्यामुळें हें देतांना अतिशय काळजी घ्यावी आणि वैद्याच्या सल्ल्यानें ह्याचा उपयोग करावा.

**हराम्ल**—(हायड्रोक्लोरिक ॲसिड). हें उज्ज (हायड्रोजन) आणि हर (क्लोरीन) ह्यांच्या 'ज्वलना'नें तयार होतें. पण व्यवहारांत हा लब्लांकच्या सोडापद्धतींत मीठ आणि गंधकाम्ल (सल्फ्यूरिक ॲसिड) ह्यांच्यापासून आयता मिळतो. हराम्ल वायुरूप असून पाण्यांत तें सहज विरघळतें; व बाह्य येण्याइतकें त्याचें तीव्र अम्लजल बनवतां येतें. ह्या अम्लाची धातूंवर क्रिया होऊन त्या धातूंचीं हरिदें (क्लोराइड्स) व उज्ज (हायड्रोजन) हीं निघतात. 'ऑक्सिडाइझिंग' पदार्थांच्या साहाय्यानें (उदा., नत्राम्ल, मॅंगलद्विप्राणिद (मॅंगनीज डाय ऑक्साइड), वगैरे,) हर तयार होतो. ह्या अम्लाचीं लवणें निसर्गांत पुष्कळ आहेत. त्यांतील महत्त्वाचें नेहमींचें मीठ असून त्यापासूनच हर आणि त्याचीं संयुक्तें तयार करतात.

**हरायित**—(क्लोराइट). एका विशिष्ट खनिज द्रव्याच्या वर्गाला (उदा., पेनीन, क्लिनोक्लोर, इत्यादि) हें नांव आहे. हिरव्या अभ्रकासारखीं हीं असतात. पण त्यांच्याप्रमाणें त्यांच्या पापुद्र्यांत लवचीकपणा नसतो. हरायितामध्यें मग्न (मॅग्नेशियम), लोखंड आणि ॲल्युमिनियम यांचीं मिश्रणें (सिलिकेट) असून पाण्याचें प्रमाणहि पुष्कळ (१३ टक्के) असतें. अभ्रकाहून हें नरम असून साध्या नखानेंहि त्याला रेघा पडतात (उदा., मंदिरें).

**हरि, औध-अयोध्यासिंह उपाध्याय** (१८६५- )—हिंदी वाङ्मयांतील सुप्रसिद्ध कवि व लेखक. हे मूळचे आझमगड-जवळील निजामाबाद येथील शुक्ल यजुर्वेदी ब्राह्मण होत. बनारसच्या क्वीन्स कॉलेजमध्यें यांचें इंग्रजीचें शिक्षण झालें. पुढें प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें यांना कॉलेज सोडावें लागलें. तेव्हां यांनीं उर्दू, फारसी, संस्कृत, इत्यादि भाषांचें अध्ययन घरींच केलें व बनारस हिंदु विश्वविद्यालयांत हिंदीचे प्राध्यापक झाले. अध्य-

गडची संस्कृत पाठशाळा व सनातन धर्मसभा यांच्या चालकांपैकी हे एक होत. याशिवाय विधवाविवाह, पतितोद्धार व हिंदुधर्मप्रसार यांसारख्या कार्यासाठींहि यांनीं बरीच खटपट केली आहे.

यांचें लिखाण प्रथम व्रजभाषेंत असे. परंतु अलीकडे हे खड्या बोलींतच लिहितात. 'प्रियप्रवास', 'चुभते चौपदे' व 'चोखे चौपदे' हीं यांचीं काव्यें अतिशय लोकप्रिय आहेत. केव्हां केव्हां यांनीं संस्कृतप्रचुर रचनाहि केलेली दिसून येते. अवघड व सुलभ अशा दोन्ही प्रकारची काव्यरचना करण्यांत हे कुशल आहेत. यांचे 'ठेठ हिन्दीका ठाठ' हें पुस्तक सिव्हिल सर्व्हिसच्या परीक्षेच्या अभ्यासक्रमासाठीं निवडलेलें असे.

**हरिकवि**—(भानुभट्ट). सतराव्या शतकांतील एक संस्कृत कवि. याचें वास्तव्य सुरतेस असे. नारायण सूरि व अन्नपूर्णा यांचा हा पुत्र. यास चक्रपाणि नांवाचा एक धाकटा भाऊ होता. याच्या आजाचें नांव रंगनाथ. छत्रपति थोरल्या शिवाजीचा पुत्र संभाजी याचा हा आश्रित असून 'हैहयेंद्रचरित', 'हैहयेंद्रचरित-टीका' किंवा 'शंभूविलासिका', 'सुभाषितहारावली' व 'शंभुराजचरित' (संभाजी-चरित्र) हे ग्रंथ याचे आहेत. यानें आपला 'शंभुराजचरित' हा ग्रंथ सन १६८५ मध्यें संभाजीचा गुरु कविकलश ऊर्फ कृष्णपंडित याच्या आज्ञेनुसार लिहिला असून या ग्रंथांत यानें संभाजीचें सुरतेच्या तापीकांताच्या मुलीशीं झालेल्या लग्नाचें वर्णन केलें आहे. 'शंभुविलासिका' हा ग्रंथ यानें संभाजीच्या सांगण्यावरून लिहिला.

**हरिण**—हा खूर असलेला रवंथ करणाऱ्या प्राण्यांचा एक वर्ग आहे. यांचीं शिंगें भरीव असून त्यांस शाखा फुटतात व तीं

रोयक हरिण

दरवर्षी नवीन येतात. यांच्या खालच्या जबड्यात आठ दांत असून वरच्या जबड्यांत मुळींच नसतात. रेनडियर जातीच्या हरणांस नर व मादी या दोहोंसहि शिंगें असून तीं मारण्याकरितां व संरक्षणाकरितां अशा दोन्ही दृष्टीनें उपयोगांत आणतां येतात.

भुंकणारें हरिण

यांच्या अनेक जाती आहेत. हे प्राणी सर्व जगभर आढळतात, पण आफ्रिका व ऑस्ट्रेलिया यांत मात्र दिसत नाहींत. (काळवीट, सांबर पाहा).

गॅझेल हरिण

हरिण कळप करून पाण्याच्या आसपास असतात. दाट जंगलांत ते कधीं राहत नाहींत. कळपांत फक्त एकदोन नर

तांबडें गॅझेल हरिण

असतात; बाकी सर्व माया. नरास काळवीट म्हणतात. त्याला शिंगें असल्यास तो कळपाचें रक्षण करण्यास समर्थ असतो. सांबर, नीलगाय, चित्तळ, भेकर, वगैरे हरिणाच्या जाती आहेत. कस्तूरीमृग (पाहा) हिमालयांत आढळतो.

ऋग्वेद व तदुत्तर ग्रंथ यांमध्यें हरिण याचा अर्थ एक प्रकारचा काळवीट असा आहे. हा फार जलद चालणारा व भय उत्पन्न करणारा म्हणून प्रसिद्ध आहे. याच्या शिंगाचा मंतरलेल्या तोडग्याप्रमाणें उपयोग होतो. याला यव खाण्याचा फार नाद आहे. मैत्रायणी संहितेमध्यें तो स्वज म्हणजे सर्पांना ठार मारतो असें याचें वर्णन आलेलें आहे. या शब्दाचें स्त्रीलिंगी रूप हरिणी असें आहे.

हरिणाची शिकार करणें (मृगया) हा राजे लोकांच्या करमणुकीचा प्रकार पुराणांतून आढळतो. (शिकार पाहा).

**हरिणखुरी**—हरिणदोडी. हें झाड लहान असतें. फक्त जमिनीवर पसरतें. पानें कात्रीदार व बारीक असतात. हीं झाडें हरिणांस आवडतात म्हणून नांव पडलें आहे. हरिणखुरी पौष्टिक आहे. धातुक्षयावर चूर्ण देतात.

**हरिणवेल**—हा वेल फार वाढतो. पानें रताळयाच्या पानांसारखीं असतात. याच्या कळयांतून कापूस निघतो. पानांची भाजीहि करतात. धातुपुष्टतेसाठीं दुधांत वाटून देतात.

**हरित**—(क्लोरेट्स). हरिकाम्ला(क्लोरिक ॲसिड)चीं लवणें. नत्रेता(नायट्रेट)शीं त्यांचें बरेंच साम्य आहे. अतिशय तापविलीं म्हणजे हीं विघटित (डीकंपोझ्ड) होतात आणि चहुतेकांपासून हरिदें (क्लोराइड्स) आणि प्राणवायु (ऑक्सिजन) तयार होतात. पालाशहरित (पोटॅशियम क्लोरेट) याचा घशाच्या विकारासाठीं गुळण्या करण्यासाटीं (४० भागांत १ भाग) उपयोग करतात. मोठ्या प्रमाणांत घेतलें म्हणजे ह्याचा विषासारखा परिणाम होतो. आगपेट्या तयार करतांनाहि ह्याचा उपयोग होतो.

**हरित किरीट**—(कोरोनिअम). सूर्याच्या तेजोवलयांत दीप्तिमान रेषा असतात. त्यांत एक लखलखीत अशी हिरवी रेषा असते, तिला हें नांव आहे. भूवर्णपटशास्त्रांत ही वर्णरेषा नाहीं. ज्या मूलद्रव्यामुळें हें दृश्य उत्पन्न होतें त्यांत कोणत्याहि ज्ञात रासायनिक द्रव्यापेक्षां जास्त साध्या रचनेचा असा एक अणु असावा असें मानलें जात होतें.

**हरित द्रव्य**—(क्लोरोफिल). हिरवा रंजितजीवनपिंड (क्रोमॅटोफोर) किंवा हरित जीवनपिंड (क्लोरोप्लास्ट) यामधील प्रमुख रंग द्रव्य. अल्कोहोलच्या साहाय्यानें हें पानांतून काढलें असतां गर्द हिरव्या रंगाचा विद्राव मिळतो. या विद्रावांत लाल रंगाची दीप्ति असते. त्याच्या वर्णपटां(स्पेक्ट्रम)त तांबड्या आणि नारिंगी रंगांतील कित्येक किरणपट्ट लुप्त असतात. सूर्यप्रकाशांतील हीं किरणें आत्मसात् करून त्यांचें रासायनिक क्रियेंत परिवर्तन करणें हें हरितजीवना(क्लोरोप्लास्ट)मध्यें हरित द्रव्याचें कार्य असतें. रक्तांतील कणरंजका(होमोग्लोबीन)शीं याचें साम्य असून याची घटनात्मक रचना गुंतागुंतीची आहे. कर्ब, उज्ज, प्राण, नत्र, स्फुर (फॉस्फरस) आणि मग्न (मॅग्नेशियम) हे याचे घटक आहेत.

**हरित शैवालवर्ग**—(आर्केफायटा). हा कॉर्मोफायटिस अथवा उच्च वर्गाच्या वनस्पतींतील अगदीं खालच्या पायरीचा वर्ग आहे. यामध्यें लिव्हरवोर्ट (हेपॅटिसी) व मॉसेस (मुस्सी) अशा दोन जाती आहेत. दुसऱ्या जातीला पर्णमय अंकुर असतात. पहिल्या जातीला तसे असतातच असें नाहीं. या वनस्पतींस खरीं मुळें फुटतच नाहींत. मुळांचें कार्य विशिष्ट वर्णहीन तंतूंकडून केलें जातें.

या वनस्पती जरी जमिनीवर उगवतात तरी त्या पाण्यावर विशेष अवलंबून असतात व तें त्या आपल्या सर्व पृष्ठभागामार्फत शोषून घेतात व दमट जागांत विशेष वाढतात. हिरव्या वनस्पतींपैकीं या वर्गाच्या वनस्पतींमध्येंच प्रथम स्त्रीजननेंद्रिय अथवा आर्केगोनियम तयार होतें. याचा आकार कुपीसारखा असून त्यामध्यें अंडपेशी असते व हा अवयव या जातीच्या सर्व वनस्पतींमध्यें आढळतो. यासारखा हिरव्या शेवाळा(ग्रीन अल्गी)मध्यें आढळत नाहीं व तो कसा उत्पन्न होतो तें समजत नाहीं. यामुळें पाणकेस (अल्गी) व हरितशैवाल (आर्केफायटा) यांमध्यें असणारा हा फरक म्हणजे निसर्गांतील एक अज्ञात भाग आहे. तसेंच हरितशैवाल व त्याच्या वरच्या वर्गांतील वनस्पती यांच्यामध्येंहि फार अंतर आहे. परंतु अलीकडे कांहीं डेव्होनियन प्टेरिडोफायटिसमध्यें कांहीं जाती मूळ व पर्ण-विरहित अवस्थेंत आढळल्या आहेत. त्यामुळें यांचा संबंध जवळजवळ आलेला आहे.

तथापि लिव्हरवोर्ट व मॉसेस यांमध्यें अधिक प्राथमिक कोण हें संशयितच आहे.

**हरिदास**—एक विद्वान् हिंदी कवि व टट्टी संप्रदायाचा संस्थापक. यानें 'सिद्धांतके एकोणीस पद' व 'केलिमा' हे दोन ग्रंथ लिहिले असून याचीं कांहीं पदें व बानी प्रसिद्ध आहेत. याच्या कवितांचा काल सन १५४३ ते १५६० हा येतो. याच्या शिष्यवर्गांत मोठे महात्मे व कवी निर्माण झाले. हा स्वतः मोठा गवई होता. सुप्रसिद्ध गवई तानसेन यास गुरुस्थानीं मानीत असे.

**हरिन्, हर**—(क्लोरिन). एक वायुरूप मूलद्रव्य. याचें परमाणुभारांक ३५·४६ आहे. इ. स. १७७४ त शीलनें हें शोधून काढलें. हें स्वतंत्र स्वरूपांत आढळत नाहीं; पण सोडियम संयोगानें हें निसर्गांत पुष्कळ पसरलें आहे. नेहमींच्या मिठांत याचा सोडियमबरोबर संयोग झालेला आहे. मिठांतून हरिन्‌च्या

साहाय्यानें सोडियम किंवा कॉस्टिक सोडा तयार करतांना हा वायु तयार होतो. हा हिरव्या रंगाचा असून हवेपेक्षां अडीच पट जड आहे. हा जळत नाहीं. याला अतिशय तिखट वास येतो, व हा घशांत गेला असतां गुदमरल्यासारखें होतें, व पुष्कळ प्रमाणांत हा पोटांत गेल्यास त्यामुळें मृत्युहि येतो. हर हें अतिशय क्रियाप्रवण मूलद्रव्य आहे; व पुष्कळशा दुसऱ्या मूलद्रव्याबरोबर हें सहज संयोग पावतें. हर प्रबल जंतुनाशक आणि रंगहारक (ब्लीचिंग एजंट) आहे; व हेच त्याचे मुख्य उपयोग आहेत. हर प्रायः विजेच्या साहाय्यानें तयार करतात, व द्रवरूपात किंवा अतिशय दाबात पोलादी नळकांड्यांत भरून गिऱ्हाइकांना देतात.

**हरिनारायण** (मृ. १७२५)—एक ब्राह्मण कवि व सुल्तानजी निंबाळकराचा गुरु. यानें लिहिलेलीं पदें, अभंग व नामामृतलहरी सुप्रसिद्ध आहेत. याच्या संप्रदायांत 'अन्नपूर्णापते हरिनारायण' अशी गर्जना करण्याची पद्धत आहे. नगर जिल्ह्यांतील कर्जत तालुक्यांतील चेनहाडी गांवीं याची समाधि आहे. शाहूनें हा व याची पत्नी यांच्या मूर्ती करवल्या होत्या.

**हरिपंत फडके** (स. १७२९–९४)— मराठ्यांचा एक सेनापति. बाळंभट नांवाच्या नाना फडणिसाच्या घरच्या भिक्षुकाचा हा पुत्र. याचा भाऊ बापू हा पानपतच्या लढाईंत मेला. माधवराव पेशव्याने हरिपंताची कारकुनाच्या जागीं नेमणूक केली (स. १७६२). केळशी महालाची देशमुखी याला देण्यांत आली होती. नारायणरावाच्या वधानंतर हा बारभाईंना मिळाला. यानेंच मोरोबाचें कारस्थान उघडकीस आणलें (स. १७७४). राघोबाचा पाठलाग करून महीतीरीं त्याची फौज याने उधळून लाविली (स. १७७५). होळकर व शिंदे माळव्यांत गेले तरी गुजराथेंत राघोबाशीं याच्या लढाया चालू होत्या. कर्नल कीटिंग राघोबासह पुण्यावर चालून येत असतां यानें त्याशीं लढाई दिली. पहिलीस आनंदमोगरीची व दुसऱ्या लढाईस आरासची लढाई म्हणतात.

हैदरावरच्या मोहिमेकडे याची नेमणूक झाली तेव्हां यानें यशवंतराव माने यासारख्या फितुर लोकांस तोफेच्या तोंडीं देऊन फितुरीचा बंदोबस्त केला (स. १७७७). हैदरापासून खंडणी घेतली (स. १७७८). हा पहिल्या इंग्रज-मराठे युद्धात होता (स. १७८१). हा पहिल्या व दुसऱ्या टिपूवरील स्वारींत प्रमुख होता (स. १७८७, १७९२). त्या वेळीं याची कर्तबगारी विशेष दिसली. पुढें महादजी शिंदे पुण्यास आल्यामुळें नानालाहि आपल्या विश्वासांतील सेनापति सैन्यासह जवळ पाहिजे होता म्हणून हा पुण्यास गेला (स. १७९३). पुढें हा सिद्धटेक येथें पोटदुखीनें वारला. हा नानाच्या पूर्ण विश्वासांतील होता. हा गेल्यामुळें नाना फडणिसाचें सामर्थ्य लंगडें पडलें. याचा मुलगा रामचंद्रबाबा हा खर्ड्यांच्या लढाईंत जरिपटक्याचा अधिकारी होता. हरिपंत फडक्याचे वंशज पुण्यास आहेत. रविवार पेठेंत फडक्यांचा मोठा वाडा होता.

**हरिपूर**—सरहद्दप्रांत, अबट्टाबाद जिल्हा, एक गांव. येथें रणजितसिंगाचा प्रधान हरिसिंग नलुवा यानें बांधलेला किल्ला आहे. येथें महानुभावांचा मठ, ग्रंथसंग्रहालय व संस्कृत विद्यालय होतें. ग्रंथालयांत महानुभावी तत्त्वज्ञान व धर्म यांवरच्या पोथ्यांचा मोठा (मराठी) संग्रह, मोठ्या मूर्ती, साहित्य ह्या ज्या सर्व वस्तु होत्या त्या १९४७ सालीं फाळणी झाल्यानंतर महंतांना भारतांत आणतां आल्या नाहींत. त्यांचा नाश झाला असावा. हरिपूर येथील साणी घराण्यांत फार मोठ्या व्यक्ती होऊन गल्या.

**हरिबुवा भोंडवे** (१७०७–७७)—एक मराठी संतकवि. मूळचा पारनेरचा शिंपी. केरेश्वर व बचाई याचा हा पुत्र. याच्या पत्नीचें नांव गोडाई. रखमा व तारा अशा यांना दोन मुली होत्या. हा प्रथम लावण्या करी. परंतु नंतर अभंग रचण्यास यानें सुरुवात केली. 'ज्ञानसागर' (मोक्षसिद्धिविवरण), 'पंचीकरण', 'हरिबोध', 'स्वरोदय', 'संसारतोडा' हे याचेच ग्रंथ होत. हा रामदासी व वारकरी या दोन्ही पंथांचा होता. शिवरामस्वामी हा याचा रामदासी पंथांचा गुरु. जुन्नरजवळच्या नारायणगांवीं याची समाधि आहे. याची पालखी पंढरीस जाते व तिचा उजव्या बाजूला मान आहे.

**हरियाणा**—पंजाब प्रांतांत हा प्रदेश आहे. या भागांत हिस्सार जिल्ह्याचा भाग व झिंद आणि पत्याळा संस्थानांचा थोडासा भाग इतके भाग समाविष्ट झालेले आहेत. आठव्या शतकाच्या अखेरीस या भागावर कोणाचेंच राज्य नव्हतें. या भागाची अशी रचना होती कीं, या भागाभोंवतीं शीख, भट्टी व मराठे या तीन लोकांचें राज्य होतें, त्यामुळें खुद्द ३,००० चौ. मै. क्षे. फ. च्या जागेंत एकहि मनुष्य राहत नव्हता. याचा परिणाम असा झाला कीं, जॉर्ज थॉमस (जहाज फिरंगी पाहा) नांवाच्या एका धाडसी इंग्रजानें या मुलखाचा ताबा घेतला व यावर आपली सत्ता पूर्णपणें प्रस्थापित केली. पण शिंदे सरकारच्या तैनातीस असलेल्या पेरॉन नांवाच्या सेनापतीशीं झगडण्यांत त्याचें सर्व बळ खर्च होऊन त्याचा पाडाव झाला, व १८१० सालीं मराठ्यांनीं कांहीं दिवस येथें राज्य केल्यावर इंग्रजी राज्य झालें.

**हरिराज**—महानुभाव पंथांतील एक थोर धर्मज्ञ. अम्नायाची (प्रमुख) जी बिडकर गादी तीवर बरींच वर्षे होते. यांना पालखी, नालखी, अब्दागिरी, मोरचेल, वगैरे राजवैभवाचा मान असे. हे गीतेचे एकनिष्ठ भक्त आणि प्रवचनकार असून, महानुभावी वाङ्मय प्रकाशनाविषयीं कळकळ बाळगणारे होते. यांच्या संग्रहांत शेंकडों पोथ्या फार महत्त्वाच्या होत्या. यांच्याजवळ महानुभावी तत्त्वज्ञानाचा अभ्यास करणारी थोर थोर मंडळी असत. यांचा एक

हळेबीड — हॉयसळेश्वर देवालय-भिंतीवरील शिल्प (पृ. २७०१)

हैद्राबाद — चारमिनार (पृ. २७७१)

हरद्वार — हरीकी पायरी (पृ. २६८६)

शिष्य गणपत मोतीवाला सातारा करंजे येथें मठ स्थापून महानुभावी तत्त्वाचा प्रचार बरींच वर्षे करीत होता.

**हरिराज गोपीराज** (१८८०- )—एक महानुभावी महंत व वाङ्मयसेवक. यांचा जन्म पंजाबांत कर्साल गांवीं झाला. यांना महानुभावी पंथाची दीक्षा १८९४ त मिळाली. नंतर यांनीं मराठीचा चांगला अभ्यास केला व महाराष्ट्रांतहि पंथाचा प्रचार करूं लागले. १९२६ सालीं ऋद्धिपूर येथील श्रीगोपीराज मठाच्या महंताच्या जागीं यांची स्थापना झाली. हे पंजाबांत प्रचारासाठीं वारंवार जात. तिकडील मठांतून यांनीं महानुभावी पोथ्यांचा बराच संग्रह करविला होता. पण पंजाबची फाळणी झाल्यानंतर बरींच महानुभाव मंदिरें व ग्रंथालयें नष्ट झालीं. ऋद्धिपूर येथें यांनीं एक चांगलें ग्रंथालय व वाचनालय श्रीगोपीराजमंदिरांत चालविलें आहे. यांचा महाराष्ट्रांतील अनेक विद्वानांशीं स्नेह असून यांनीं मराठींतील महाराष्ट्र सारस्वत, शब्दकोश, वाक्संप्रदायकोश, वगैरे ग्रंथांस चांगली माहिती पुरविली आहे. महानुभावी वाङ्मयसंशोधकांत यांची प्रामुख्यानें गणना होते. हे महंत गोपीराज या नांवानें ओळखले जातात.

**हरिश्चंद्र**—इक्ष्वाकुवंशीय एक राजा. हा त्रिशंकूचा ज्येष्ठ पुत्र असून वसिष्ठानें याची इंद्रसभेंत स्तुति केली तेव्हां विश्वामित्रानें त्याचें सत्त्व पाहण्याकरितां अनेक यत्न केले. ब्राह्मणाचें रूप घेऊन दक्षिणेनिमित्त सर्व राज्य व अडीच भार सोनें मागितलें. हरिश्चंद्रानें त्याला राज्य देऊन सोन्याच्या भरतीकरितां स्त्री तारामती व पुत्र रोहित यांस विकलें, व स्वतःसहि एका चांडाळास विकून घेतलें. या चांडाळानें स्मशानभूमींतील प्रेतांचीं वस्त्रें व द्रव्य आणण्याकडे हरिश्चंद्राची योजना केली. इकडे विश्वामित्रानें रोहितास सापाकडून मारविलें व तारामती आपलींच पोरें खाणारी राक्षसी, असें लोकांना भासवून तिला मारण्याला चांडाळाकडे नेलें. तेथें चांडाळानें तिला मारण्याची हरिश्चंद्राला आज्ञा केली, तेव्हां तिनें जन्मोजन्मीं हेच पति, पुत्र, गुरु मिळोत व विश्वामित्रासारखा याचक मिळो! अशी शेवटची इच्छा दर्शविली. तेव्हां विश्वामित्र सद्गदित झाला व त्यानें हरिश्चंद्रास पत्नीपुत्रासह संकटांतून सोडवून पुनः राज्यावर बसविलें. अशी कथा महाभारतांत आहे. या आख्यानावर अनेक नाटकें व बोलपट झाले आहेत.

**हरिश्चंद्र** (१८५०-१८८५)—एक हिंदी कवि. हा अर्वाचीन कवींमध्यें अत्यंत प्रख्यात असून हिंदी वाङ्मय लोकप्रिय करण्याकरितां याच्याइतकी खटपट दुसऱ्या कोणींहि केली नाहीं. निरनिराळ्या भाषांमध्यें लिहिण्यांत त्याचा हातखंडा असे. 'हरिश्चंद्रिका' नांवाच्या एका उत्कृष्ट मासिकाचा तो अनेक वर्षे संपादक होता. हरिश्चंद्राचें शिक्षण काशी येथील क्वीन्स कॉलेजमध्यें झालें, व हा लहान असतांनाच लेखक बनला. १८८० सालीं त्याची इतकी कीर्ति वाढली कीं, त्याला सर्व हिंदी वर्तमानपत्रकारांच्या संमतीनें 'भारतेन्दु' ही पदवी देण्यांत आली. 'सुंदरीतिलक' या ग्रंथाबद्दल त्याची फार प्रसिद्धि आहे. याचें सर्वांत प्रसिद्ध पुस्तक म्हणजे 'प्रसिद्ध महात्म्यांचीं चरित्रें' होय. हा कुशाग्र टीकाकारहि होता. याचें आणखी एक अतिशय लोकप्रिय पुस्तक म्हणजे 'कविवचनसुधा' हें होय. यांत वर्षाकालसंबंधींच्या सर्व काव्यांचा संग्रह केलेला आहे.

**हरिहर**—म्हैसूर संस्थानांतील दावणगिरी तालुक्यांतील हें सुमारें सहा हजार वस्तीचें शहर तुंगभद्रेच्या कांठीं आहे. ह्या ठिकाणीं गुहासुर नांवाचा राक्षस राहत असे. त्यानें तपश्चर्या करून ब्रह्मदेवापासून असा वर मिळविला कीं, आपणांस हरि किंवा हर ह्या दोन्ही देवांपासून मृत्यूचें भय नसावें. हा वर मिळाल्यावर त्यानें सर्व देवांस व मनुष्यांस पीडा देण्यास सुरवात केली. ही पीडा असह्य होऊन देवादिक विष्णूस शरण गेले व त्यास राक्षसाचा नाश करण्याची विनंति केली. तेव्हां विष्णु व शंकर ह्यांनीं हरिहराचें एक जोडरूप धारण करून ह्या गुहासुराचा नाश केला. ह्या अवतारावरून हरिहर हें नाव ह्या शहरास पडलें.

१२ व्या शतकांत ह्या शहराचा समावेश नोळंब वाडीमध्यें झाला होता व त्यावर पांड्य राजांची सत्ता होती. हरिहरेश्वराचें प्रसिद्ध देवालय होयसळ राजांचा सरदार पोलाल्व यानें १२२३ सालीं बांधलें. पुढें सोळाव्या शतकापर्यंत हे देऊळ विजयानगराच्या राजांच्या ताब्यांत होतें. पुढें विजयानगरचें हिंदु राज्य नष्ट झाल्यावर मुसुलमानांचें राज्य सुरू झालें; व हें देऊळ त्यांच्या ताब्यांत गेलें. हरिहर शहर कांहीं दिवस मुसुलमानांच्या ताब्यांत तर कांहीं दिवस मराठ्यांच्या ताब्यांत होतें. १८६८ सालीं तुंगभद्रा नदीवर एक मोठा पूल बांधण्यांत आला. १८७१ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. आतां हें मोठें व्यापारी व उद्योगधंद्यांचें शहर बनलें आहे.

**हरिहर संगम** (राज्य. १३३६-५५)—विजयानगर राज्याच्या संस्थापक. यदुकुळांतील संगमास हरिहर, कंप, बुक्क, मारप व मुद्दप असे पांच पुत्र होते. या पांच भावांनीं सन १३३६ मध्यें विजयानगरच्या राज्याची स्थापना केली. या पांच भावांपैकीं सर्वांत वडील भाऊ हरिहर हा प्रथम तिसऱ्या बल्लाळ होयसळाचा मंत्री व सेनापति होता. याच वेळीं यास मुसलमानी राजकारणाची माहिती झाली. यानंतर हा अनेगुंदीच्या राज्यांत प्रमुख झाला. त्या वेळीं याचा विद्यारण्यस्वामींशीं परिचय झाला. विद्यारण्यामुळेंच याला व्यापक धार्मिक व राजकीय दृष्टि आली. विद्यारण्याच्या नांवावर यानें तुंगभद्रेच्या तीरावर विद्यानगर नांवानें शहर वसवलें. प्रथम सन १३४० मध्यें जरी यानें मुहंमद तुघलकाच्या सरदारांस साहाय्य दिलें तरी त्यानंतर मात्र यानें

मुसलमानांना नेस्तनाबूद करण्याचेंच धोरण ठेवलें. बल्लाळ होयसळानें अनेक मुलूख पादाक्रांत केल्यावर तो मदुरेचा राजा घियासुद्दिन दामनीकडून त्रिचनापल्लीजवळ कोप्पम येथें झालेल्या लढाईत सन १३४२ मध्यें मारला गेला. तेव्हां या संधीचा फायदा घेऊन यानें सन १३४६ मध्यें होयसळांना नेस्तनाबूद करून त्यांचा प्रदेश बळकावला. यानंतर शृंगेरीस जाऊन यानें बराच मोठा दानधर्म केला. दक्षिणेंतील मुसलमान सरदारांनीं हसन कांगो बहामनीच्या नेतृत्वाखालीं गुलबर्ग्यास राज्य स्थापन केल्यावर त्यांनीं हरिहरवर स्वारी केली. सन १३५१ मध्यें सागर मुसलमानांच्या हातात पडलें. यानंतर आपणांस शत्रूस तोंड देणें अशक्य आहे आहे असें वाटल्यानें यानें कृष्णेच्या उत्तरेकडील बराचसा मुलूख व कांहीं रक्कम शत्रूस देऊन तह केला. पांच भावांत हा व बुक्क यांचें कर्तृत्व वाखाणण्याजोगें होतें. राज्याचीं सूत्रें हा अनेगुंदीस राहून हालवीत असे. आपल्या वृद्धावस्थेंत यानें राज्याचा भार बुक्कावर सोंपवला.

**हरीक**—एक हलकें धान्य. याला कोद्रू असेंहि म्हणतात. कोद्रू पाहा.

**हरेंद्र जितेंद्र**—एक महानुभावी महंत. पट्टाधिष्ठित महादाचार्य श्रीमाधेराज महानुभाव यांचे हे शिष्य. हे दीक्षित संन्यासी असून फार धाडसी निर्भय वक्ते व प्रचारक होते. यांनीं महानुभाव तत्त्वज्ञानापैकीं सूत्र-प्रकरण छापून प्रसिद्ध केलें. सिंगापूर येथून मदत आणून वाङ्मयाचा उद्धार केला. नागपूर येथें चक्रेश्वर मंदिराचा तंटा जिंकला. हे १९१५ सालीं ब्रह्मदेशाकडे प्रचारार्थ गेले होते. हे हुर्मुजी मज्जित वस्त्रें परिधान करीत असत; पण पाकिस्तान झाल्यामुळें महानुभाव मठांचा जो पश्चिम पंजाबांत नाश झाला त्यामुळें शोक होऊन यांनीं भगवें वस्त्र टाकून काळें वस्त्र शोकचिन्ह म्हणून धारण केलें. यांच्या गुरुपरंपरेनें पंजाबांत हजारा प्रांतांत महानुभाव धर्माचा व मराठी वाङ्मयाचा प्रचार तीनशें वर्षांपासून होता.

**हॅरो**—हें इंग्लंडमधलें शहर मिडलसेक्स परगण्यांत एका टेंकडीवर वसलेलें आहे. येथें एक विद्यालय (ग्रामरस्कूल) आहे व तें शिक्षणाच्या बाबतींत ईटन विद्यालयाच्या तोडीचें आहे. हें विद्यालय जॉन लि ऑन यानें १५७१ सालीं गरीब विद्यार्थ्यांच्या शिक्षणाकरितां प्रथम स्थापन केलें. परंतु हल्लीं पूर्णपणें श्रीमंत विद्यार्थ्यांचें विद्यालय बनलें आहे. येथें सुमारें ६०० विद्यार्थी असतात. लो. सं. सुमारें वीस हजार.

**हर्ट्झ, हीनरिश रुडोल्फ** (१७९८–१८७०)—एक जर्मन पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. गतिशास्त्रांतील त्याचें कार्य महत्त्वाचें आहे; पण त्याची मोठी कामगिरी त्यानें 'हर्ट्झियन वेव्ह्ज' या लहरींचा शोध लावला ही होय.

हर्ट्झच्या लहरी—या विद्युच्चुंबकीय आकाशलहरी हर्ट्झनें १८८८ मध्यें सिद्ध केल्या. या लहरी धातवीय पृष्ठभागावर परावर्तन पावतात व डामराच्या विपार्श्वांच्या योगानें मार्गच्युत होतात. या लहरी दगडी भिंती आणि लांकडी तक्तपोशी यांमधून पार जाऊं शकतात. यांच्या लहरींची लांबी प्रकाशलहरींपेक्षां जास्त असते. यांची कंपसंख्या दर सेकंदाला शून्यापासून दहा हजार दशलक्ष आवर्तांइतकी असते.

**हर्ट्झोग, जेम्स बॅरी म्यूनिक** (१८६६–१९४२)—हा दक्षिण आफ्रिकेंतील डच मुत्सद्दी प्रथम बोअर युद्धांत बोअर सैन्याचा जनरल होता (१८९९–१९०२); आणि नंतर स्मट्स व बोथा यांच्या नेमस्त पक्षाचा विरोधी होता. तो १९०७ सालीं ऑरेंज रिव्हर कॉलनींत ॲटोर्नी जनरल व शिक्षणमंत्री होता; व साउथ आफ्रिकन यूनियन सरकारांत न्यायमंत्री होता (१९१०–१९१२). नंतर तो राष्ट्रीय पक्षाचा पुढारी झाला, व पहिल्या महायुद्धांत साउथ आफ्रिकेनें सामील होण्याला त्यानें विरोध केला; आणि १९२४ सालीं राष्ट्रीय पक्ष व मजूर पक्ष यांच्या संमिश्र मंत्रिमंडळाचा मुख्य प्रधान झाला. १९२९ ते १९३९ या दहा वर्षांत तो परराष्ट्रमंत्री होता.

**हर्डर, जोहान गॉटफ्रीड फॉं** (१७४४–१८०३)—एक जर्मन ग्रंथकार. 'फ्रॅगमेंट्स ऑन जर्मन लिटरेचर' (जर्मन वाङ्मयाचे तुकडे), 'क्रिटिकल वुड्स' व इतर पुस्तकें यांमुळें त्याची बरीच प्रसिद्धि झाली; आणि त्याला ब्यूकबर्ग येथें १७७१ सालीं दरबारचा धर्मप्रवचनकार (कोर्ट प्रीचर), सुपरिंटेंडेंट, आणि धार्मिक कोर्टातला सल्लागार नेमण्यांत आलें; आणि १७७६ सालीं त्याला वीमर येथें त्याच हुद्यावर नेमण्यांत आलें. पुढें हर्डरनें उत्तरेकडील काव्यवाङ्मयाचें आणि शेक्सपियरच्या ग्रंथांचें वाचन केलें, व त्यामुळें त्याला जुना ग्रीक–लॅटिन वाङ्मय संप्रदाय (क्लासिसिझम) नापसंत होऊन तो स्टूर्म उंड्ड्रांग या वाङ्मय संप्रदायाचा एक पुढारी झाला. पण तो मुख्यतः धर्मप्रवचनकार असल्यामुळें त्यानें बायबलमधील 'जुन्या करारा'मधल्या ऐतिहासिक व अनैतिहासिक (अँक्रिफेरियन) हकीगतींचा समन्वय करण्यांत बरेंच यश मिळवलें. तसेंच प्राचीन ग्रीक व लॅटिन ग्रंथकारांची योग्यता त्यानें अधिक पटवून दिली. त्याचा सर्वांत उत्तम ग्रंथ 'आयडिआज् ऑन दि फिलॉसफी ऑफ दि हिस्टरी ऑफ मॅन' (मानवी इतिहास तत्त्वज्ञानावर विचार) हा होय (१७८५).

**हर्डीकर, डॉ. नारायण सुब्बराव**—कर्नाटकांतील एक सार्वजनिक कार्यकर्ते. यांचें शिक्षण हुबळी व कलकत्ता येथें व पुढें अमेरिकेमध्यें झालें. अमेरिकेंत ते ८ वर्षें होते. लाला लजपतराय हे १९१६ मध्यें अमेरिकेंत गेले असतां हे आपला

पीएच्. डी. चा अभ्यास सोडून त्यांच्याबरोबर राहिले. १९०५ पासून यांनी स्वदेशी व बहिष्कार या चळवळींत भाग घेण्यास सुरुवात केली होती. १९०८ मध्यें 'कन्नड केसरी' नांवाच्या साप्ताहिकाच्या संपादक-वर्गांत हे होते. १९१७ ते १९२१ मध्यें हे अमेरिकेंतील होमरूल लीगचे सेक्रेटरी होते. तसेंच लाला लजपतराय यांनीं सुरू केलेल्या 'यंग इंडिया' पत्राचे हे संपादकीय व्यवस्थापक होते. १९२१ मध्यें हिंदुस्थानांत आल्या-बरोबर यांनीं असहकारितेच्या चळवळींत भाग घेतला. कर्नाटक प्रांतिक काँग्रेस कमिटीचे ते जनरल सेक्रेटरी होते. कर्नाटक प्रांतीय काँग्रेस सेवादलाचे हे चालक होते. यांनीं कर्नाटक वार्ताप्रसारक संघ स्थापन केला होता. तसेंच भगिनी मंडळ, टिळक ग्रंथसंग्रह, वगैरे संस्था स्थापन केल्या. १९२३ मध्यें हिंदुस्थानी सेवादलाची यांनीं स्थापना केली व त्याचे सेक्रेटरी जनरल म्हणून १९३१ पर्यंत काम केलें व नंतर काँग्रेस वर्किंग कमिटीच्या अनुरोधानें प्रचारक मंत्री म्हणून काम केलें. 'व्हालंटियर' या नियतकालिकाचे ते संपादक होते. १९२३ मध्यें नागपूर सत्याग्रहामध्यें त्यांस एक वर्षाची शिक्षा झाली. १९३० सालीं पहिल्या सत्याग्रहाच्या वेळीं हे काँग्रेस वर्किंग कमिटीचे सेक्रेटरी होते. मिठाच्या सत्याग्रहांत यांस दोनदां शिक्षा झाली. १९३२ मध्यें यांस स्थान-बद्ध करून ठेवण्यांत आलें व पुढें सत्याग्रहांत दीड वर्षांची शिक्षा झाली. 'इंडियन मेसेंजर सिर्व्हिस' (भारतीय वार्तासंघ)ची यांनीं स्थापना केली (१९३२). 'भारतीय राष्ट्रध्वज' हा ग्रंथ यांनीं ४ भाषांत लिहिला आहे. यांची षष्ठ्यब्दपूर्ति सर्वत्र साजरी झाली होती.

**हर्दा**—मध्यप्रांत, हुशंगाबाद जिल्हा, एक तहशील. क्षे. फ. १,१२५ चौ. मै. व लो. सं. सुमारें दीड लाख. मुख्य शहर हर्दा व ४०० खेडीं आहेत. हर्दा शहर रेल्वेमुळें महत्त्वास चढलें आहे. येथून बाहेर पुष्कळ धान्य जातें. पितळेचीं भांडीं व जाड कापड या ठिकाणीं होतें. लो. सं. ८,०००.

**हर्शेल, सर विल्यम** (१७३८–१८२२)—एक इंग्रज ज्योतिषशास्त्रज्ञ. त्यानें ७ फूट रिफ्लेक्टरच्या साहाय्यानें आकाशां-तील प्रत्येक ताऱ्याची व्यवस्थित पाहणी केली; आणि ता. १३ मार्च १७८१ रोजीं एक नवा ग्रह (प्रायमरी प्लॅनेट) शोधून काढला, व त्यानें त्याला 'जॉर्जियम सिडस' हें नांव दिलें; पण तो हल्लीं यूरेनस या नांवानें प्रसिद्ध आहे. त्यानें शनिग्रहाच्या कंकणांचें मापन केलें, व शनीचे दोन उपग्रह शोधून काढले; तसेंच शनी-भोंवतालच्या कड्यांच्या परिस्थितीचें निरीक्षण केलें. विंडसरजवळ स्लौ येथें त्यानें ४० फूट लांबीची दुर्बीण उभी केली. त्यानें शोधून काढलेल्या ५,००० ताऱ्यांचे पुंज व तेजोमेघ (नेब्युली) यांची तयार केलेली जंत्री १८०२ सालीं रॉयल सोसायटीपुढें मांडली.

**हर्ष** (६०६–६४७)—ठाणेश्वरच्या वर्धन घराण्यांतील एक प्रसिद्ध राजा व चक्रवर्ती. प्रभाकरवर्धनाचा हा दुसरा मुलगा होय. वयाच्या १६ व्या वर्षी याला राज्यपद प्राप्त झालें. पण त्याच वेळीं धाकट्या बहिणीचा नवरा मारला गेल्यावर ती जंगलांत पळून गेली व वडील भावाचा विश्वासघातानें खून करण्यांत आला. तसेंच त्याची आई सती गेली. याप्रमाणें या तरुण राजावर बहुती संकटें ओढवून तो एकटा पडला. तथापि त्यानें धीर धरून आपल्या बहिणीला शोधून आणलें (राज्यवर्धन पाहा). आपल्या नांवाचा शक सुरू केला. व भरतखंड पादाक्रांत करण्याच्या निमित्तानें दिग्विजय आरंभला. अवघ्या सहा वर्षांच्या आंत त्यानें उत्तर हिंदुस्थानांतील बहुतेक मुलूख जिंकला व बहुतेक हिंदुस्थान एका छत्राखालीं आणला. परंतु दक्षिणेस चालुक्य सम्राट् पुलकेशीबरोबर झालेल्या युद्धांत त्याचा पराभव झाल्यामुळें दक्षिण हिंदुस्थान जिंकण्याच्या कामीं त्याला यश आलें नाहीं. तथापि त्यानें गुजराथेंतील वल्लभीच्या ध्रुवसेनाचा पराभव करून तेथपर्यंत आपली सत्ता स्थापन केली. ६४३ सालीं त्यानें बंगालच्या उपसागरावरील गंजमच्या राजावर स्वारी करून विजय संपादन केला. हर्ष हा केवळ राजा म्हणून प्रसिद्ध नसून विद्वत्तेबद्दलहि त्याची प्रसिद्धि आहे. त्यानें 'रत्नावली', 'प्रियदर्शिका' व 'नागानंद' हीं नाटकें लिहिलीं. त्याच्या पदरीं बाण, मयूर, दिवाकर, मातंग, असे प्रसिद्ध पंडित होते. सर्व धर्मांच्या अनुयायांना त्यानें चांगल्या रीतीनें वागविलें. तो अत्यंत उदार राजा होता. दर पांच वर्षांनीं अखिल हिंदुस्थानां-तील पंडितांची धर्मपरिषद् बोलावून तो आपल्या खजिन्यांतील सर्व द्रव्य वांटून टाकीत असे. चीनच्या साम्राज्याबरोबर त्यानें स्नेहसंबंध ठेवले. याच्या वेळीं ह्युएनत्संग हा प्रसिद्ध चिनी प्रवासी इकडे आला होता. त्यानें हर्षाच्या राज्याचें वर्णन चांगलें केलें आहे. बाणभट्टाचें 'हर्षचरित' आहेच. हर्षानंतर दुसरा एवढा मोठा सम्राट् हिंदुस्थानांत झाला नाहीं. त्यानें बौद्ध आणि हिंदु प्रजा यांना सारखेंच वागविलें.

**हर्ष लोहर** (राज्य. १०८९–११०१)—काश्मीरच्या लोहर घराण्यांतील कलशाचा पुत्र. कलशानें आपला पिता अनंतदेव याची सर्व संपत्ति याच्या नांवानी करून ठेवली होती. यानें कांहीं लोकांच्या फुसलावणीमुळें कलशाविरुद्ध (कलश पाहा) आपल्या बापाविरुद्धहि बंड करण्यास कमी केलें नाहीं. त्यामुळें यास तुरुंगवास भोगावा लागला. विषप्रयोगांतूनहि हा एकदां सुदैवानें बचावला. इतकें झालें तरी, यासच राज्य मिळावें अशी कलशाची इच्छा होती. परंतु मंत्री वगैरे यांनीं उत्कर्ष नांवाच्या याच्या दुसऱ्या भावास गादीवर बसविलें. परंतु विजयमल्ल नांवाच्या याच्या तिसऱ्या भावानें अनेक खटपटी करून यास बंदींतून

मुक्त केलें व गादी मिळवून दिली. हर्ष हा विद्वानांचा चहाता असून संगीत, नृत्य, साहित्य, इत्यादि कलांचा भोक्ता होता. अनेक विद्वानांना यानें आपल्या पदरीं आश्रय दिला होता. कांहीं वर्षे यांचा कारभार सुरळीत चालला होता; परंतु नंतर याचा भाऊ विजयमल्ल व त्यानंतर याचा पुत्र भोज यांनीं राज्यप्राप्तीसाठीं याजविरुद्ध बंडें केलीं. त्या वेळीं यानें त्यांना पळवून लावलें. परंतु यानंतर याच्याच घराण्यांतील उच्छल नांवाच्या याच्या एका आप्तानें याजविरुद्ध राज्यप्राप्तीप्रीत्यर्थ चढाई केली. त्यांत यास पराभूत व्हावें लागल्यानें जीवरक्षणार्थ याला एका मठाचा आश्रय घ्यावा लागला. परंतु तेथेंहि शत्रूकडून याचा पाठलाग झाला. अनेक आपत्तींमुळें हा निराश झाला व शत्रूवर निकरानें तुटून पडला. झालेल्या लढाईंत यास धारातीर्थी मरण आलें. शेवटीं याची अशी स्थिति झाली कीं, याचें प्रेत दहन करण्याससुद्धा मोठ्या मुष्किलीनें परवानगी मिळाली. याच्या पश्चात् काश्मीरच्या गादीवर उच्छलाच्या सातवाहन घराण्याची स्थापना झाली.

हल—इंग्लंडमधील यार्कशायर परगण्यांतील एक शहर व नदीकांठचें बंदर. येथें अनेक प्रकारचे उद्योगधंदे आहेत. ते म्हणजे कापसाच्या कापडाच्या गिरण्या, जहाजें बांधणें, दोरखंड व शिडें तयार करणें, लोखंडाचें ओतीव काम, यंत्रें, रंग, वगैरे. परंतु या शहराचें महत्त्व व्यापारामुळें विशेष आहे. येथील बंदर सात मैल लांबीचें आहे आणि अनेक रेल्वे या बंदराला जोडलेल्या आहेत. १९२५ सालीं येथें एक युनिव्हर्सिटी कॉलेज सुरू झालें आहे. लोकसंख्या तीन लाखावर आहे.

हॅलॅम, हेन्री (१७७७–१८५९)—एक इंग्रज इतिहासकार. त्याने 'एडिंबर्ग रिव्ह्यू' या मासिकांत लेख लिहिले, त्यामुळें तो प्रसिद्धीस आला, आणि त्याचा ग्रंथ 'व्ह्यू ऑफ दि स्टेट ऑफ युरोप ड्यूरिंग दि मिडल एजेस' (मध्ययुगांतील युरोपच्या स्थितीची पाहणी) यानें त्याला चांगली कीर्ति मिळवून दिली. नंतर त्यानें 'कॉन्स्टिट्यूशनल हिस्टरी ऑफ इंग्लंड' (इंग्लंडचा घटनात्मक इतिहास) व 'इंट्रोडक्शन टु दि लिटरेचर ऑफ युरोप' (युरोपच्या वाङ्मयाचा प्रस्ताव) हे ग्रंथ लिहिले. याचा मुलगा आर्थर हेन्री हा २२ व्या वर्षी एकाएकीं मरण पावला. त्याला उद्देशून टेनिसननें आपलें काव्य 'इन् मेमोरियम्' हें लिहिलें आहे.

हलवाई—ही केवळ एकच जात नसून, मिठाई तयार करणें व विकणें हा व्यवसाय करणाऱ्या या नांवाच्या अनेक जाती आहेत. अहीर, जैन, लिंगायत, मराठे, मारवाडी, परदेशी, शिंपी, तेली, यांसारखे हलवायांचे प्रकार आहेत. यांना हिंदुस्थानांत मिठाइया किंवा मुरिया म्हणतात. तसेंच कनौजिया, जौनपुरिया अशींहि यांचीं वरीच स्थानिक नांवें आहेत. हलवाई जातींना हिंदु समाजांत मान आहे. त्यांच्या हातची मिठाई सर्व खातात.

हलायुध—या नांवाचे, तीनचार ग्रंथकार होऊन गेले. 'कविरहस्य' किंवा 'कविगुह्य' ग्रंथाचा कर्ता हलायुध याचा काल इ. स. ८१० होता, असें डॉ. भांडारकर म्हणतात. 'कविरहस्या'च्या गुजराथ येथील प्रतीप्रमाणें पाहिलें तर राष्ट्रकूट वंशांतील कृष्णांपैकीं एक कृष्ण–कदाचित् पहिलाच असावा (इ. स. ७६०–८०)—त्या ग्रंथांतील नायक होता. 'अभिधान रत्नमाला' लिहिणारा कोशकार हलायुध व कविरहस्याचा कर्ता हे एकच होते असें भांडारकरांचें मत आहे.

'विवादरत्नाकर', 'विवादचिंतामणि', वर्धमानाचा 'दंडविवेक,' तसेंच रघुनंदन आणि कमलाकर यांचे ग्रंथ यांतून या हलायुधाचे उल्लेख वारंवार सांपडतात. पण वरील सर्व हलायुधांत अभिधानरत्नमालेचा कर्ताच जास्त प्रसिद्ध आहे. कारण 'हलायुधकोश' हा अमरकोशाखालोखाल प्राचीन संस्कृत टीकाकारांकडून उल्लेखिला जात असतो.

या हलायुधाच्या खालोखाल कविरहस्याचा कर्ता विशेष परिचित आहे. कविरहस्य किंवा कविगुह्य हा एक धातुकोश असून सौरेंद्रमोहन टागोर यांनीं १८७९ त कलकत्त्यास हा सटीक व इंग्रजी आणि संस्कृत प्रस्तावनेसह प्रसिद्ध केला.

हॅलिफॅक्स—हें शहर व आरमारी ठाणें कानडांतील नोव्हास्कोशिया या प्रांताची राजधानी आहे, आणि तें एक उत्तम आणि अत्यंत विस्तृत बंदर आहे, व तेथें अगदीं मोठाल्या जहाजांना सर्व वर्षभर जातां येतें. या बंदराची लांबी सुमारें ६ मैल आहे. हें शहर व बंदर यांच्या भोंवतालीं मजबूत तटबंदी आहे. अनेक रेल्वेंचे ॲटलांटिक महासागरावरील तें शेवटचें स्टेशन आहे; त्यामुळें येथून मोठा व्यापार चालतो. कोळसा घेण्याचेंहि तें महत्त्वाचें ठिकाण आहे. येथें मुख्य कारखाने आहेत ते म्हणजे कापूस, साखर, लोखंड, रंग, यांत्रिक सामान, मोटारी, कागद, इ. चे होत. मच्छीमारीसंबंधींचे महत्त्वाचे धंदे येथें चालतात. लो. सं. सुमारें साठ हजार.

हॅले—हें महत्त्वाचें शहर जर्मनींत सॅक्सनी प्रांतांत लाइपझिगच्या वायव्येस सुमारें २० मैलांवर साले नदीवर आहे. येथें मुख्य इमारती आहेत त्या म्हणजे रेड टॉवर (क्लॉक टॉवर) व मध्ययुगीन टाउन हाउस. येथे १६९४ सालीं स्थापन झालेली सुप्रसिद्ध युनिव्हर्सिटी आहे. या युनिव्हर्सिटीमध्यें विटेनबर्ग युनिव्हर्सिटी १८१७ त सामील करण्यांत आली. येथें व्यापार आणि उद्योगधंदे विपुल आहेत. रासायनिक द्रव्यें, तेलें, रंग, कृषिविषयक व इतर यंत्रें हे येथील मुख्य कारखाने असून शिवाय येथला फार जुना आणि प्रसिद्ध मिठाचा धंदा आहे. लो. सं. सुमारें दोन लाख.

**हॅले, एडमंड** (१६५६–१७४२)—एक इंग्रज गणितशास्त्रज्ञ व ज्योतिषशास्त्रज्ञ. त्यानें १८८२ सालीं एक धूमकेतु शोधून काढला. त्याला त्याचें नांव देण्यांत आलें आहे. हाच धूमकेतु पुन्हा १७५९ सालीं दिसेल असें भविष्य त्यानें वर्तविलें आणि तें बरोबर ठरलें. यानें डाल्मेशियाच्या किनाऱ्याचें संशोधन जर्मन बादशहाच्या सांगण्यावरून केलें. नंतर इंग्लंडमध्यें परत आल्यावर त्याला ऑक्सफर्ड येथें भूमितिशास्त्राचा सॅव्हीलियन प्रोफेसर नेमण्यांत आलें. (१७०३). १७१३ सालीं त्याला रॉयल सोसायटीचा चिटणीस आणि १७१९ सालीं राजज्योतिषी नेमण्यांत आलें. त्याच्या वेळच्या शास्त्रज्ञांमध्यें सर आयझॅक न्यूटनच्या खालोखाल हॅलेचा क्रम लागतो. न्यूटनबरोबर त्याचा फार स्नेह होता.

**हल्याळ**—मुंबई, उत्तर कानड्यांतील एक तालुका. क्षे. फ. १,०५७ चौ. मै.. लो. सं. २८,२०४. ह्या तालुक्यांत दोन मुख्य शहरें आहेत व त्यांपैकीं एक हल्याळ हें आहे. ह्या तालुक्यांत लोकसंख्या फारच थोडी आहे. तालुक्यांतून काळी नदी व इतर नद्या वाहतात. पूर्वेस व उत्तरेस खुलें मैदान आहे. येथें पावसाचें मान सरासरी ४७ इंच आहे. येथील मुख्य पिकें म्हणजे तांदूळ व ऊंस हीं होत. हल्याळ शहर तालुक्याचें मुख्य ठिकाण असून मद्रास सदर्न मराठा रेल्वेनें वरच्या अळणावराहून हल्याळास जातां येतें. ह्या शहराचें महत्त्व सरहद्दीवरचें माऱ्याचें ठिकाण ह्या दृष्टीनें डयूक ऑफ वेलिंग्टन याच्या मतानें फार होतें. लो. सं. ६,४४८.

**हल्याळकर, दत्तात्रेय वैकुंठ** (१८७५–१९१६)—एक सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय संगीत नट. यांचें आडनांव देशपांडे असे. हे गाऊं लागले कीं जुन्या लोकांना भाऊराव कोल्हटकरांची आठवण होत असे. यांच्याच अभिजात गानकौशल्यामुळें श्रीमहालक्ष्मीप्रासादिक नाटक मंडळी पुढें आली. स्त्री व पुरुष अशा दोन्ही भूमिकांत हे कामें करीत. स्पष्ट शब्दोच्चार, सहज अभिनय व गोड गळा यांमुळें रसिकांना हे फार प्रिय असत.

**हवाई जहाज**—(एअर शिप). हवाई जहाज किंवा वातनौका ही हवेपेक्षां हलकी असून तिला गति देण्याचें व ती गति वाटेल तशी फिरविण्याचें एक साधन असतें. विमानाप्रमाणें वातनौका उडण्याच्या बाबतींत इंजिनाच्या गतीवर अवलंबून नसते; तर तीमध्यें जो वायु भरलेला असतो त्यामुळें ती हवेंत तरंगत राहूं शकते. सर्व वायूंमध्यें उज्ज (हायड्रोजन) हा सर्वांत हलका वायु असतो; व याचें वजन हवेपेक्षां १४·४७ इतक्या पटीनें हलकें असतें. शुद्ध स्थितीमध्यें या वायूची शक्ति एक हजार घनफुटांस ७१·१५५ पौंड उचलण्याइतकी असते. परंतु प्रत्यक्ष व्यवहारांत सामान्यतः १,००० घनफुटांस ६८ पौंड हें प्रमाण धरतात. उज्ज वायु हा हवेंत मिसळला असतां अतिशय ज्वालाग्राही व स्फोटक असतो; म्हणून अलीकडे या वायूच्याऐवजीं हेलियम वायु वापरण्यांत येतो. जेव्हां वातनौका आकाशांत उंच उडते तेव्हां हा वायु प्रसरण पावतो. याकरितां एक पडदा ठेवलेला असून त्यांतून कांहीं वायूस बाहेर पडण्याची योजना केलेली असते. नाहीं तर वातनौका फुटून गेली असती. हा वायु ज्या प्रमाणांत बाहेर पडून जातो त्या प्रमाणांत त्याची घनता कमी होत जाते; त्यामुळें त्याच्या वजन उचलण्याच्या शक्तींत फरक पडत नाहीं.

साधी वातनौका म्हणजे एक रबरानें मढविलेली कापसाच्या कापडाची मोठी पिशवी असते. तिला खालीं एक गाडी जोडलेली असते. तीमध्यें वातनौका चालविणारे लोक, इंजिन, वगैरे बसविलेलीं असून ती पोलादी तारेच्या दोऱ्यांनीं वरील रबरी पिशवीस जोडण्यांत येते. या भारानें वरील रबरी पिशवी वाकूं नये म्हणून तीमधील वायु खूप दाबून भरलेला असतो. जेव्हां ही वातनौका खालीं येते तेव्हां या पिशवींत कांहीं लहान लहान पिशव्या बसविलेल्या असतात त्यांत हवा भरण्यांत येते. आणि त्यामुळें बाहेरील हवेचा दाब वाढला तरी या पिशवींचा आकार कायम राहतो. पहिल्या महायुद्धांत ७० हजार घनफुटांपासून २६० हजार घनफूट या पद्धतीच्या वातनौका बांधण्यांत येत असत. यापेक्षां मोठ्या वातनौका बांधावयाच्या असल्यास अर्धघन अशी दुसरी एक पद्धति वापरण्यांत येते. या पद्धतींतहि रबराची पिशवी अथवा खोळ वरीलप्रमाणेंच असते. परंतु तिच्या तळाशीं एक मोठा तुळईसारखा दांडा बसविण्यांत येतो. आणि त्या दांड्याला खालची गाडी टांगण्यांत येते. त्यामुळें तिचें वजन अधिक वांटलें जातें. यापेक्षांहि अधिक मोठी म्हणजे १० लाख घनफुटांच्या वातनौका बांधावयाच्या असल्यास 'दृढ' (रिजिड) पद्धतीचा अवलंब करण्यांत येतो. त्यामध्यें या खोळीचा तळ अधिक मजबूत केलेला असतो, व त्यांत कांहीं उभे दांडे बसविण्यांत येतात. हे बहुधा ॲल्युमिनमच्या एखाद्या मिश्र धातूचे बनविलेले असतात. ह्या उभ्या दांड्यांवर पुन्हां आडव्या चौकटी बसविण्यांत येऊन त्यांच्या सांध्यास तारा बांधून त्या एका मध्यमार्गी असलेल्या तारेच्या चाकास जोडलेल्या असतात. या दोन चौकटींमध्यें वायूच्या पिशव्या असतात. ह्या पिशव्या वरीलप्रमाणेंच रबरी कापडाच्या केलेल्या असतात. व त्यावर पुन्हां बैलाच्या आंतड्याचें आवरण असतें. यामुळें यांतील वायु बाहेर पडून जात नाहीं. या वातनौकेच्या खालच्या भागांत एक त्रिकोणी पाया किंवा पठाण (कील) असते. याचा भार दोन उभ्या दांड्यांवर तोलून धरलेला असतो. या पायानें काम सर्व भार आडव्या चौकटीवर वांटून देणें हें असतें. याच पायाच्या पेट्रोलची टांकी, तोल सांभाळण्याकरितां पाण्याची टांकी, बाँब, वगैरे टांगलेली असतात. व यांतच यावरील कामगारांना राहण्याची सो

केलेली असते. या वातनौकेच्या तळाशीं एक चालत जाण्यासारखा मार्ग असतो. त्यावरून वातनौकेच्या निरनिराळ्या भागांत व खालीं गाडींत जातां येतें. जर्मन झेपेलिन व ब्रिटिश 'आर' नांवाच्या वातनौका या प्रकारच्या असत.

या वातनौकांची गति विमानाप्रमाणेंच सुकाणूच्या साहाय्यानें हवी तशी बदलतां येते. यांची गति दरताशीं ८४ मैलांपर्यंत असते आणि त्या २४ हजार फुटांपर्यंत उंच जाऊं शकतात. एका जर्मन वातनौकेनें ८१ तासांत ५ हजार मैल न थांबतां प्रवास केला होता.

**हवाई बंदूक**—(एअर गन्). ज्या एका प्रकारच्या बंदुकीमध्यें दाबलेल्या हवेच्या साहाय्यानें गोळी उडविण्यांत येते तिला हवाई बंदूक असें म्हणतात. १९ व्या शतकाच्या मध्यापर्यंत अशा बंदुकांच्या दस्त्यामध्यें हवा भरलेली असे. ही हवा पंपाच्या साहाय्यानें भरण्यांत येत असे. व अशा रीतीनें जरी एका वेळीं ५।६ वारांची हवा भरतां येत असे तरी ही पद्धत मोठी बोजड व श्रमाची असे. यानंतर जेम नांवाची एक हवाई बंदूक तयार करण्यांत आली. तीमध्यें एका कमानीच्या अथवा कळीच्या साहाय्यानें हवा दाबली जाऊं लागली. या दाबलेल्या हवेच्या योगानें पुढील गोळी उडत असे. या बंदुकींतील मुख्य दोष हा होता कीं, तिच्या पुढील नळींत हवा दाबण्याकरितां ती प्रत्येक वेळीं वांकवावी लागत असे. त्यामुळें ती पुढें वांकून नेम बरोबर लागत नसे. बी. एस्. ए. नावाच्या हवाई बंदुकीमध्यें या सर्व रचनेच्या अडचणी दूर करण्यांत आल्या आहेत. तिची नळी पक्की केलेली असून हवा दाबण्याकरितां दुसऱ्या दांडीची योजना केलेली असते, आणि ती मोडण्याकरितां एक फिरकी बसविलेली असते. हिच्या तोंडातून निघणाऱ्या १६ ग्रेन वजनाच्या गोळीची गति दर सेकंदास ६०० फूट असते. त्या मानानें बंदुकीच्या २२ इंच व्यासाच्या व ४० ग्रेन वजनाच्या गोळीची गति दर सेकंदास १,००० फूट असते. म्हणजे हवाई बंदुकीची गोळी तिच्या मानानें चांगल्याच गतीनें जाते.

**हवाई बेटें**—हवाई द्वीपसमूहांत आठ बेटांवर लोकवस्ती आहे. क्षे. फ. ६,४४९. लो. सं. २,८४,५३८ असून तींत १,२०,००० जपानीच आहेत. हवाईखेरीज इतर मोठीं बेटें म्हणजे माउइ व ओआहू हीं होत. १८९३ पर्यंत यांवर स्वतंत्र राजसत्ता होती. नंतर लोकसत्ता आली. १८९८ त अमेरिकन संयुक्त संस्थानांना हवाई बेटें जोडण्यांत आलीं. १९४१ सालीं यांच्या पर्ल हार्बरवर जपाननें बॉंबवर्षाव केल्यामुळें अमेरिका युद्धांत पडली.

हवाई बेट—हें हवाई अथवा सँडविच द्वीपसमूहांतलें सर्वांत मोठें बेट आहे. क्षेत्रफळ ४,०१६ चौरस मैल. सर्व प्रदेश डोंगराळ आहे. तीन ज्वालामुखी आहेत. साखर, पाइन ॲपल व सर्व प्रकारचीं फळें, तांदूळ, तंबाखू व कॉफी हीं येथें होतात.

होनोलुलु ही राजधानी व मोठें बंदर आहे. हिलो हें दुसरें मोठें शहर आहे. होनोलुलूला हवाई विद्यापीठ आहे.

हीं बेटें १७७८ सालीं जेम्स कुक यानें शोधून काढलीं. १८४० सालीं एक घटनायुक्त राजसत्ता यावर प्रस्थापित केली गेली.

**हवाई युद्ध**—विमानातून निश्चित कालपर्यंत व निश्चित दिशेनें जातां येऊं लागल्याबरोबर त्यांचा उपयोग युद्धाच्या व जलपर्यटनाच्या कामीं करतां येण्याची शक्यता लवकरच लक्षांत आल्यावांचून राहिली नाहीं. प्रथम विमानांचा उपयोग निरीक्षण करण्याकरितां होऊं लागला. अशा विमानांत रेडिओ, टेलेफोन, कॅमेरा व एक मशीनगन ठेवण्यांत येऊं लागली. त्यांच्या साहाय्यानें शत्रूंचें सैन्य, त्यांची सामुग्री, त्यांचे तोफखाने, खंदक, वगैरे गोष्टींचें ज्ञान करून घेतां येऊं लागलें. यानंतर बॉंब फेंकणारीं विमानें प्रचारांत आलीं. त्यांमध्यें कांहीं लहान, जलद, खालींवर उड्डाण करणारीं व अर्धा टन वजनाचे बॉंब नेणारीं विमानें असतात व कांहीं दूर अंतरावर जाणारीं व चार टन बॉंब नेणारीं विमानेंहि असतात. या विमानावर दुर्बिणी व बॉंब सोडणाऱ्या नळ्या व त्या वायूच्या गतीप्रमाणें फिरविण्याच्या योजना केलेल्या असतात. तसेंच रेडिओ, टेलेफोन, कॅमेरा व मशीनगन, वगैरेहि असतात. युद्ध करणाऱ्या विमानांत बहुतेक एकच मनुष्य असतो व तीं अतिशय जलद चालणारीं अथवा खालीं झेप घेणारीं व जलद वळणारीं असतात. यावर जलद उडणाऱ्या तोफा बसविलेल्या असतात. यांतून शत्रूच्या औद्योगिक क्षेत्रावर रस्ते, सैन्य, दारूगोळ्याचीं कोठारें, धान्याचीं कोठारें, पूल, वगैरेंवर बॉंब टाकण्यांत येतात. शत्रूच्या सैन्यावर बॉंबचा वर्षाव करण्याकरितांहि यांचा उपयोग करण्यांत येतो किंवा आपल्या सैन्याचें शत्रूपासून रक्षणहि करतां येतें. शत्रूच्या युद्धनौकांवरहि बॉंब टाकण्याकरिता यांचा उपयोग करतां येतो. तसेंच धुराचा पडदा तयार करणें, वगैरे कामींहि यांचा उपयोग होतो. केवळ विमानवाहक गलबतेंहि तयार करण्यांत येतात.

**हवादाबी रोग**—(केसन डिसीझ). जेव्हां मनुष्याच्या शरीरावर सामान्य वातावरणाच्या दाबापेक्षां अधिक दाब पडतो तेव्हां त्यास हवादाबीचा रोग होतो. या रोगात श्वासोच्छ्वास करणें अतिशय कठिण होतें. स्नायूंतून कळा येऊं लागतात. डोकें दुखतें, उलट्या होऊं लागतात, आणि नाकांतून रक्त वाहूं लागतें. जर पुरेशी काळजी पूर्वींच घेतली तर हा रोग टाळतां येतो.

**हॅवाना**—वेस्ट इंडीजमधील क्यूबा बेटाच्या वायव्य भागांत हें शहर वसलेलें असून तें राजधानी व बंदर आहे. ३० फूट

खोलीच्या बोटी येथें येऊं शकतात. येथें एक विद्यापीठ व एक देवस्थान आहे. सिगार तयार करणें हा येथला प्रसिद्ध धंदा आहे. शिवाय चॉकोलेट, गवताच्या टोप्या, लोंकर हे धंदे येथें चालतात. येथून जो पुष्कळ माल परदेशीं जातो तो म्हणजे साखर, तंबाखू, सिगार व सिगारेट, कॉफी, लाख, मद्य व रम् दारू. लोकसंख्या ५,६८,९१३ आहे.

**हवामान**—उष्णतामान, दमटपणा, पाऊस व वारा यांमुळें वातावरणाची जी स्थिति बनते तिला म्हणतात. स्थळाचा अक्षांश, उंची, पृथ्वीच्या आंसाचा त्याच्या कक्षेच्या पातळीवर होणारा झुकाव, समुद्रापासून अंतर व तत्कालीन वारे यांवर हवामान अवलंबून असतें. या सर्वांत अक्षांश हें हवामान बनविणारें प्रधान कारण आहे. त्यावर प्रदेशाचें उष्णतामान अवलंबून असतें. पाणी हें उष्णमान समान ठेवणारें मोठें साधन आहे. तेव्हा समुद्राजवळचीं स्थळें समान (इक्वेबल) उष्णमानाचीं असतात. समुद्रावरून वाहणाऱ्या वाऱ्याचें उष्णमान पाण्याएवढेंच असतें. तेव्हां खंडांच्या पश्चिम किनाऱ्यांवरील समशीतोष्ण कटिबंधांतील प्रदेशांत पूर्व किनाऱ्यापेक्षां हवा जास्त उबदार असते. डोंगराळ प्रदेशांत पाऊस व वारे जास्त असतात. त्यामुळें हवा वेगळी बनते.

सूर्यउष्णता व हवामान—या दोहोंचा संबंध अगदीं जवळचा असून पृथ्वीची गति त्याला व्यवस्थित स्वरूप आणते. सूर्याच्या उष्णतेचा उपयोग चार प्रकारांनीं होतो. पहिला उपयोग म्हणजे वातावरणांत या उष्णतेनें ऊब निर्माण होते. दुसरा उपयोग म्हणजे या उष्णतेनें पृथ्वीवरील पाण्याचें ढगांत रूपांतर होऊन पाऊस पडण्यास मदत होते. तिसरा उपयोग म्हणजे उष्णतेमुळें वातावरणांत कमीजास्त दाब निर्माण होतो त्यामुळें उष्ण अगर थंड वारे वाहतात. आणि चौथा उपयोग म्हणजे सूर्याची उष्णता व वारे समुद्रांतील प्रवाह उत्पन्न करतात आणि त्यांचा परिणाम थंड प्रदेशांत उबदारपणा आणि उष्ण प्रदेशांत थंडपणा आणण्याकडे होतो. पृथ्वीचा पृष्ठभाग वाटोळा असल्यानें विषुववृत्तावर सूर्याचे लंबरूप किरण पडतात आणि ध्रुव प्रदेशाकडे ते तिरकस होत जातात. यामुळें लंबरूप किरण पडणाऱ्या प्रदेशापेक्षां समशीतोष्ण कटिबंध व शीत कटिबंध यांमध्यें हवा जास्त थंड असते. हवेमध्यें उष्णता सामावण्याची शक्ति असल्यामुळें समशीतोष्ण कटिबंध आणि शीत कटिबंध यांत उष्णता कमी कमी होत जाते. तसेंच सूर्यापासून कोणत्याहि कटिबंधाला मिळणारें उष्णतेचें प्रमाण त्या कटिबंधाचें विषुववृत्तापासून अंतर आणि पृथ्वीच्या वार्षिक गतीमुळें तयार होणारे ऋतू यांवर अवलंबून असतें.

नैसर्गिक जीवन आणि चालीरीती यावर हवामानानें आपला विजय मिळविलेला आहे. प्रत्येक कटिबंधांतील वनस्पतिजीवन व प्राण्यांचें जीवन यांवर तर हवामानाचा परिणाम झालेला आहेच. परंतु मानवाचें अन्न, वस्त्र आणि घरें यांवरहि तो झालेला दिसतो. कोणत्याहि देशाचा ज्या वेळीं आपण विचार करतों, त्या वेळीं तेथील हवामानाचा विचार प्रामुख्यानें आपल्यापुढें येतो.

मानवांना राहण्यासाठीं सर्वांत उत्कृष्ट हवामान म्हणजे मोसमी वाऱ्यांचा (मान्सूनचा) प्रदेश; तसेंच भूमध्यसामुद्रिक हवामानाचा प्रदेश आणि शीतकटिबंधांतील प्रदेश, हेहि अनुकूल आहेत. या प्रदेशांतून मानवानें आपला व्यापार मोठ्या प्रमाणावर चालवलेला आहे.

**ह्वुइ-ता**—एक चिनी बौद्ध प्रवासी. क्वांगनिंग प्रांतांतील केंगचाउचा भिक्षु ह्वुइता हा मोठ्या कुळांतील होता. तो एका इराणी जहाजांतून दक्षिण समुद्राकडे कोणा तरी वकिलाबरोबर गेला असावा. नंतर तो फोशाय (श्रीभोज) येथें येऊन शब्दविद्येचा अभ्यास करीत सहा महिने राहिला. तेथील राजा फार चांगला होता. त्यानें पाठविलेल्या नजराण्याबरोबर ह्वुइता हा मोल्यु (मलाया) देशास जाऊन तेथें दोन महिने राहिला. पुढें तो केदाहला जाऊन राजाच्या जहाजांतून हिंवाळ्याच्या शेवटीं पूर्व हिंदुस्थानांत आला. येथून पुढें वायव्येस पंधराएक दिवस प्रवास केल्यावर पूर्व हिंदुस्थानचा दक्षिणेकडील प्रांत ताम्रलिप्ती लागला. हें स्थान नालन्दा किंवा बोधिवृक्ष येथून ६० टप्पे होतें. तेथें संस्कृत शिकत व शब्दशास्त्राचा अभ्यास करीत तो एक वर्ष राहिला. नंतर सुमारें शंभर व्यापारी मध्यप्रदेशाकडे जात होते. त्यांच्या सोबतीनें तो निघाला व महाबोधिवृक्षापासून अजमासें दहा दिवसांच्या रस्त्यावर तो येऊन पोंचला. यानंतर ह्वुइता हा उत्तरेस नालंदास जाऊन, आसपासच्या ठिकाणांचें दर्शन घेऊन पुन्हां ताम्रलिप्तीस येऊन केदाहला गेला; आणि सर्व पुस्तकें आणि भाषांतरें वगैरे मिळून जवळजवळ पांच लक्ष श्लोक म्हणजे अजमासें एक हजार पुस्तकें त्यानें लिहिलेलीं होतीं तीं घेऊन तो श्रीभोजास जाऊन राहिला.

**हवेचें इंजिन**—ज्या इंजिनामध्यें हवा उष्ण करून तिचा प्रसार करण्यांत येतो किंवा दाबलेल्या हवेचा गति उत्पन्न करण्याकरितां उपयोग करण्यांत येतो त्या इंजिनास हवेचें इंजिन असें म्हणतात. उष्ण हवेचें इंजिन हें वाफेच्या इंजिनासारखेंच असतें व जेव्हां विशेष प्रमाणांत शक्तीची आवश्यकता नसते तेव्हां या तऱ्हेचें इंजिन उपयोगांत आणतां येतें. दाबलेल्या हवेच्या इंजिनाची माहिती 'दाबलेली हवा' या लेखांत दिली आहे.

**हवेला रुळणें**—(ॲक्लायमटायझेशन). एखादी वनस्पति अथवा प्राणी त्याच्या मूळच्या प्रदेशांतून दुसऱ्या प्रदेशांत नेण्यांत आला असतां त्यास त्या हवामानांत राहण्यास योग्य अशी परिस्थिति निर्माण करणें किंवा नवीन परिस्थितीशीं समरस होण्याकरितां त्या वनस्पतीच्या अथवा प्राण्याच्या घटनेमध्यें जो बदल

होतो त्यास परिस्थिति-परिणाम असें म्हणतात. अशा तऱ्हेचा योग्य परिणाम घडवून आणण्याच्या क्रियेचा अभ्यास करण्याकरितां फ्रान्समध्यें एक संस्था पॅरिसमध्यें १८६० मध्यें स्थापन झाली असून त्या संस्थेनें तेथें एक बगीचा बनविला आहे. कृषिशास्त्रामध्यें वनस्पतींबरोबरच विशेषतः हा शब्द मेंढ्यांच्या बाबतींत लावण्यांत येतो, व मेंढ्या एका हवामानांतून दुसऱ्या हवामानांत नेल्यास त्याकरितां कांहीं खर्च करण्यांत येतो.

**हवेली**—मुंबई, पुणे जिल्ह्यांतील मुख्य तालुका. यातून पश्चिमेकडील भाग काढून त्याला मुळशी पेटा म्हटलें आहे. ह्याचें क्षे. फ. ८२३ चौ. मै. असून त्यात पुणें व खडकी हीं दोन शहरें आहेत. ह्या तालुक्याच्या दक्षिणेस पश्चिम घाटाची एक शाखा आली आहे. त्या शाखेचा मुख्य भाग म्हणजे सिंहगड पर्वत होय. यांत मुळामुठा ही मुख्य नदी आहे. मुळशी पेट्यांत मुळा नदी मुख्य आहे. पेट्याचें मुख्य ठाणें पौड. हवेली तालुक्याला पुण्यामुळे फार महत्त्व आलें आहे. तालुक्यांतील बहुतेक जमीन लागवडीस चांगली आहे. बागाईत पुष्कळ असून ऊंस, भुइमूग, बटाटे, फळफळावळ यांचे पीक चांगले होतें. पाऊस ३२ इंच पडतो. पुण्याखेरीज चिंचवट, देहू, मुंढवें, लोणी-काळभोर, वाघोली, उरळी-कांचन, चऱ्होली, खेड, शिवापूर, फुलगांव, हडपसर, वगैरे मोठीं गांवें आहेत. हवेली तालुक्याची लो. सं. १,२६,९३८ व मुळशी पेट्याची ३६,७१२ आहे.

**हव्यक ब्राह्मण**—यांची वस्ती विशेषतः दक्षिण व उत्तर कानडा जिल्हा, शिमोगा जिल्हा (म्हैसूर), कुर्ग, वगैरे ठिकाणीं असून संख्या सुमारे एक लाख आहे. याचे मूळ गांव अहिक्षेत्र असून गोराष्ट्राचा राजा मयूरवर्मा यानें यज्ञाकरितां ३०० हव्यक कुटुंबांना गोकर्णाला बोलावून नेलें असें सांगतात. हव्यक नांवाचा उलगडा पुढील श्लोकावरून होईल—"हव्यानि यैः प्रदीयन्ते देवताभ्यो विशेषतः। ते हव्यका इति ख्याता देशे गोराष्ट्रनामनि॥" गोराष्ट्र प्रदेश गोकर्णापासून होनावर तालुक्यांतील शरावती नदीतीरापर्यंत पसरला आहे. हव्यक् किंवा हविक् ब्राह्मण इतर दाक्षिणी ब्राह्मणांप्रमाणेच असतात. यांचीं सात गोत्रें असतात. कांहीं ऋग्वेदी, कांहीं यजुर्वेदी तर कांहीं सामवेदीहि आहेत. त्यांचीं सूत्रें अनुक्रमें आश्वलायन, बौधायन व सामक होत. समाहित, माजी, अवभृत, भागवत, जोशी, हेगडे, वगैरे यांचीं आडनांवें आहेत. शिमोगा जिल्ह्यांतील रामचंद्रपूर मठाचे शंकराचार्य यांचे गुरु होत. गोकर्ण महाबळेश्वराचे मुख्य पुजारी हव्यक ब्राह्मणच आहेत.

**हॅव्हलॉक, सर हेन्री** (१७९५-१८५७)—एक ब्रिटिश सेनानी. त्यानें अफगाण युद्धांत भाग घेऊन गझनी आणि काबूल हीं हस्तगत करण्यांत शौर्य गाजविलें. नंतर जलालाबाद येथें जाऊन त्या शहराच्या संरक्षणास मदत केली आणि महमद अकबर याचा १८४३ सालीं पराभव केला. १८४६ च्या शीख युद्धांतहि मूडकी, फेरोजशहा, व सोब्राओन या लढायांत त्यानें शौर्य गाजविलें. १८५७ सालच्या (शिपायांच्या) बंडांत फत्तेपूर, आओंग, पंडूनाडी व महाराजपूर येथें बंडवाल्यांचा पुरा मोड केला. कानपूर येथें आल्यावर त्याला कळून आलें कीं, नानासाहेब पेशव्यानें इंग्रज कैद्यांची कत्तल केली. तेव्हां बंडखोरांचा पाठलाग करून तो लखनौपर्यंत गेला आणि, बिठूर येथें बंडवाल्यांचा त्यानें पराभव केला. नंतर औट्रॅमच्या मदतीनें आलमबाग येथें बंडवाल्यांचा अखेरचा पराभव केला. लखनौ इंग्रजांनीं हस्तगत केलें, पण हॅव्हलॉक व औट्रॅम दोघेहि त्या शहरांत बंडवाल्यांकडून कोंडले गेले. त्यांची सुटका सर कॉलिन कॅंबेल यानें ता. १७ नोव्हेंबर १८५७ रोजीं केली. त्यानंतर एक आठवड्यानें हॅव्हलॉक हगवणीच्या रोगानें मरण पावला.

**हस्, जॉन** (१३७३-१४१५)—एक बोहेमियन धर्मसुधारणावादी. त्यानें प्राग युनिव्हर्सिटीची एम्. ए. पदवी १३९६ सालीं घेतली, व १४०९ सालीं तो त्या युनिव्हर्सिटीचा रेक्टर झाला. १३९१ सालपासून वायक्लिफचे लेख तो वाचूं लागला, आणि त्यानें केलेला पोपच्या 'इंडल्जन्सेस' (पापविमोचन पत्रें) यांचा निषेध, मृताकरितां म्हणण्यांत येणाऱ्या मासेस (प्रार्थना) यांचा निषेध, आणि 'ऑरीक्यूलर कन्फेशन' (धर्मगुरूजवळ दिलेली पापांची कबुली) यांचा निषेध, यांमुळें प्रागचा आर्चबिशप भयभीत झाला. आणि त्यानें १४१० सालीं वायक्लिफच्या लेखाच्या २०० प्रती जाळून टाकल्या, आणि बोहेमियामध्यें वरील मतांचा प्रचार करण्यास मनाई केली. हसला दोन वेळां समाजबहिष्कृत करण्यांत आलें. त्यानें लिहिलेल्या ग्रंथांत 'ट्रॅन्सबस्टॅन्सिएशन' (द्रव्यपरिवर्तन), पोप व खिस्ती साधू यांवरील विश्वास, दुर्वर्तनी उपाध्ये, पवित्र वस्तू विकणें किंवा विकत घेणें (सायमनी), वगैरे अनेक धार्मिक गोष्टींवर जोराची टीका केली होती. तेव्हां शेवटीं त्याला कॉन्स्टन्सी येथें जिवंत जाळण्यांत आलें. हसचे बरेच अनुयायी होते; व त्यांचा हसाइट नांवाचा पंथच तयार झाला होता.

**हंस**—(इं. गूज्). छातीच्या वरचें उंच हाड (कील) असणाऱ्या पक्षिवर्गांत हंसाची गणना होते. याच्या पंखांचे स्नायू फार बळकट असतात. कीलपक्ष्यांपैकीं हंस हा पाण्यांत पोहतो. याची दुसरी एक जात राजहंस (पाहा) म्हणून आहे. हंस पक्षी काळ्या रंगाचाहि आढळतो. हंस पोहणारा जबर व शक्तिमान असल्याने याच्या साहाय्यानें माणूसहि तरून जाऊं शकतो. युरोपांत राजहंस, हिमहंस, वगैरे जाती आहेत.

सोमाली लँड — जिबूटी बंदर (पृ. २६३०)

हवाई — भूकंपानें पडलेली मोठी भेग (पृ. २६१६)

हैटी — ग्रामीण दृश्य (पृ. २७६१)

ऋग्वेद व तदुत्तर ग्रंथ यांमध्यें हंस शब्द आलेला आहे. हे पक्षी नीलकंठ आहेत, ते जमावानें राहतात, पाण्यांत पोहतात,

मोठा आवाज काढतात व रात्रीं जागत असतात असें त्यांचें वर्णन आलेलें आहे. हंस पक्ष्याला सोमनीरविवेक( पुढें नीरक्षीर विवेक अशी त्याची ख्याति झाली आहे ) असें यजुर्वेदांत म्हटलें आहे. अश्वमेघाच्या वेळीं तो बळी दिल्या जाणाऱ्यांपैकीं एक आहे असेंहि त्याच्याबद्दल म्हटलें आहे.

**हंसक**—(फ्लेमिंगो). हा हंस आणि बगळा यांच्या दरम्यानच्या स्वरूपाचा एक पक्षी आहे. याचें शरीर बगळ्यापेक्षां लहान असतें; परंतु याचे पाय व मान फार लांब असल्यामुळें याची उंची ६ फुटांपर्यंत भरते. याची चोंच अगदीं उघडी असून तिच्या दोन्ही कडांस अस्थिस्तर असतो आणि ती मोडल्याप्रमाणें खालीं वांकलेली असते. याच्या पायास तळवे असतात व शेवटीं चार बोटें असतात. हे मध्य युरोपापासून सीलोनपर्यंतच्या प्रदेशांत आढळतात. यांची जीभ मांसल असते. हे कळप करून राहतात व दूरदूरच्या प्रदेशांत कळपानें प्रवास करतात. हे फार सावध व लाजाळू असतात. हे खाण्याच्या वेळीं एकत्र येतात व कांहींस पहारा करण्याकरितां राखून ठेवतात. हे दलदलीच्या प्रदेशांत अंडीं घालतात आणि आपलीं घरटीं उंचवट्यावर बांधतात.

**हंसकंकणी**—हा राग काफी थाटांतून उत्पन्न होतो. याच्या आरोहांत ऋषभ, धैवत हे स्वर वर्ज्य आहेत व अवरोह सातहि स्वरांनीं होतो; म्हणून याची जाति औडुव–संपूर्ण आहे. वादीस्वर पंचम व संवादी षड्ज आहे. गानसमय दिवसाचा तिसरा प्रहर आहे. बिलावल व कानडा रागांचें मिश्रण यांत झालें आहे. यांत धनाश्री रागाचें अंग प्रधानत्वें दिसून येतें. हा अप्रसिद्ध रागांपैकीं एक आहे.

**हंसदास( -राज )**—एक मराठी संतकवि. मूळ नांव नारायण. हा परभणी येथील ऋग्वेदी ब्राह्मण. परमहंस दीक्षा घेतल्यावर यास हंसराज हें नांव मिळालें. हा रामदासी होता. पहिले हंस आदिनारायण, त्यांच्यापासून सातवे हंस श्रीसमर्थ, व त्यांच्यापासून सातवे हंस हे नारायण हंस ऊर्फ हंसराज होते असें मानण्यांत येतें. याचा समाधिकाल शक १७७७ आहे. ग्रंथ—वेदेश्वरी ( शिवगीत–टीका ), कथाकल्पलता, आगमसार, सदाचारटीका, लघुवाक्यवृत्ति टीका, चूडालाख्यान, संकेत, कुचडी, इ.

**हंसध्वनि**—हा राग बिलावल थाटांतून उत्पन्न होतो. या रागांत मध्यम व धैवत हे स्वर वर्ज्य आहेत म्हणून याची जाति औडुव-औडुव आहे. वादी स्वर षड्ज व संवादी पंचम आहे. गानसमय रात्रीचा पहिला प्रहर मानितात. या रागांत शंकरा रागाची छाया उत्पन्न होते. आपल्याकडे हा राग फारसा गाइला जात नाहीं, पण दक्षिणेकडे ह्याचा बराच प्रचार आहे.

**हसन**—म्हैसूर संस्थान, हसन जिल्ह्याचें मुख्य शहर. म्हैसूर रेल्वेच्या म्हैसूर आर्सिकेरे फांट्यावर हें स्टेशन आहे. लो. सं. सुमारें ८,०००. मूळचें हसन शहर चेन्नापट्टण येथें ११ व्या शतकांत चोल राजाच्या एका अधिकाऱ्यानें वसविलें व त्या वंशजांच्या ताब्यांत तें बाराव्या शतकाच्या अखेरपर्यंत होतें. पण हें घराणें नामशेष झाल्यामुळें होयसळ राजांनीं दुसऱ्या एका सरदारास तें दिलें व त्या सरदारानें हल्लींचें शहर व किल्ला हीं बांधिलीं. पुढें विजयानगरच्या राजछत्राखालीं हें बेदूर राज्याचा भाग होतें. व १६९७ सालीं तें म्हैसूरच्या राज्यांत समाविष्ट झालें.

**हसन कांगो ( गंगू ) बहामनी** ( राज्य १३४७–५८ )—दक्षिणेंतील गुलबर्ग्याच्या बहामनी राज्याचा संस्थापक. प्रथम हा दिल्लीस गंगू नांवाच्या ब्राह्मणाच्या घरीं गुलाम म्हणून होता. आपल्या चांगल्या वर्तणुकीनें व इमानइतबारें राहून यानें आपल्या धन्याची मर्जी संपादन केली. याची पत्रिका पाहून यास राजयोग आहे असें गंगू ब्राह्मणानें केलेलें भविष्य खरें ठरलें. पुढें आपल्या कर्तबगारीवर हा राजा झाला. गादीवर येतांच यानें आपणास अल्लाउद्दिन अशी पदवी धारण केली. बंडखोरांचा पुढारी इस्माइल यानें यास अल्लाउद्दिन हसनशहा कांगो बहामनी अशी पदवी दिली होती. 'गंगू' हें आपल्या उपकारकर्त्याचें नांव आपल्या नांवापूर्वी लावून यानें त्याच्यासंबंधीं आपला आदर व्यक्त केला आहे. ( बहामनी राज्य पाहा ).

**हंसराज, लाला** ( १८६४–१९३८ )—आर्य समाजाचे निष्ठावंत कार्यकर्ते, पंजाबमधील दयानंद अँग्लो–वैदिक सोसायटीचे आधारस्तंभ व तिच्या शिक्षणसंस्थांचे चालक. बी. ए. होतांच यांनीं स्वामी दयानंदांच्या स्मरणार्थ निघणाऱ्या शिक्षणसंस्थांच्या कार्यास स्वतःस वाहून घेतलें. यानंतर या शिक्षणसंस्थांचे अध्यापक, मुख्याध्यापक व प्रिन्सिपॉल या नात्यानें यांनीं बहुतेक कामगिरी केली व नंतर हे सेवानिवृत्त होऊन आर्यसमाजाच्या प्रचारकार्यांत लक्ष घालूं लागले. या प्रचारकार्याशिवाय दुष्काळ, पूर, भूकंप व

दंगे यांसारख्या अनेक अडीअडीचणींच्या काळीं हे लोकांच्या फार उपयोगी पडत. अनाथ, विधवा व अस्पृश्य यांसारख्या असहाय्य जीवांना यांचा आधार वाटे. आपत्ती आल्या असतां समाजाच्या उपयोगी पडण्याचें वळण यांनीं लोकांना घालून दिलें व अशा लोकांची एक संघटना बनविण्याचे प्रयत्न यांनीं केले. यांच्या त्यागमय जीवितामुळें लोक यांना 'महात्मा' असें म्हणत. यांच्या स्मरणार्थ काढलेल्या संस्थांत 'महात्मा हंसराज वेदप्रचारनिधि' ही संस्था सर्वांत महत्त्वाची आहे.

**हस्तलिखितें**—मुद्रणाचा संस्कार न झालेले जुने जे लेख किंवा नुसतें हातानें लिहिलेलें (छापील नसलेलें) त्यास हस्तलिखित म्हणतात. प्राचीन ग्रंथ, पोथ्या, टांचणें, कागदपत्रें, इ. यांत येतात. लिहिण्याची प्रथा सुरू झाल्यापासून प्रथमच जीं हस्तलिखितें उपलब्ध आहेत तीं म्हणजे थडग्यांतून सांपडलेलीं पापीरस जातीच्या कागदावरचीं मिसरी हस्तलिखितें होत. खि. पू. २५०० या काळापासूनचीं हीं आहेत. खि. पू. ३०० च्या सुमारचे ग्रीक ग्रंथहि संशोधिले गेले असून, हर्क्युलानियममध्यें लॅटिन हस्तलिखितें मिळालीं आहेत. ख्रिस्ती मठांतून हस्तलिखितें पद्धतशीर तयार होत. त्यासाठीं एक स्वतंत्र खातेंच मोठाल्या मठांतून असे. हस्तलिखितें जपून ठेवण्याच्या व हस्तलिखितांचे कागद पुन्हां स्वच्छ करून त्यावर लिहिण्याच्या क्लृप्त्या निघाल्या होत्या.

हिंदुस्थानांत ताडपत्रावर लिहिलेलीं हस्तलिखितें (पोथ्या) असंख्य आहेत. तसेंच पोथ्या व कागदपत्रेंहि अनेक ठिकाणीं विशेषतः जुन्या घराण्यांतून आढळतात. सरकारी दप्तरखाना, ऐतिहासिक व शिक्षणसंस्था, विद्यापीठें यांतून अशीं हस्तलिखितें जपून ठेवलेलीं असतात. महत्त्वाचीं हस्तलिखितें अभ्यासून प्रसिद्धहि करण्यांत येतात.

**हस्तसामुद्रिक**—हातांवरील रेषांवरून माणसाचा स्वभाव व भूतभविष्य सांगण्याची विद्या. हिचा उगम फार प्राचीन असावा. हिंदुस्थानांतल्याप्रमाणेंच ग्रीसमध्ये ही विद्या माहीत होती. प्लिनी आणि आरिस्टॉटल हिचा उल्लेख करतात. आतां या विद्येसंबंधीं बरेच ग्रंथ पाश्चात्य देशांत झाले असून फलज्योतिषाप्रमाणेंच या सामुद्रिकावर विश्वास ठेवणारे पुष्कळ आहेत.

हातांवर ग्रहांचे सात उंचवटे मानतात व त्यांवरून स्वभावपरीक्षा करतात. हृदय, मन, आयुष्य, भाग्य, विवाह, प्रवास, इ. चा विशिष्ट रेषांशीं संबंध जोडण्यात आला आहे. आपल्याकडील हस्तसामुद्रिक याप्रमाणेंच असलें तरी रेषांचे व चिन्हांचे अर्थ वेगळे असतात. हाताच्या आणि बोटांच्या ठेवणीवरूनहि स्वभावाचें ज्ञान होतें असें मानणारे आहेत. या विद्येंत नांवाजलेला चीरो (पाहा) याचीं यासंबंधीं बरींच पुस्तकें आहेत.

**हस्तिदंत**—हत्तीचे सुळे, दांत, हिपोपोटेमस अथवा पाणघोड्याचे सुळे व दांत, वालरसचे सुळे, वगैरेस सामान्यतः हस्तिदंत ही संज्ञा बाजारांत लावली जाते. आफ्रिकेंतील हस्तिदंत अधिक घट्ट व पांढरा असल्यामुळें तो मौल्यवान् समजला जातो. याचे चाकूच्या मुठी, वाद्यांच्या पट्ट्या, बिलियर्डचे चेंडू, वगैरे तयार करण्यांत येतात. हिंदुस्थानांत याच्या फण्या, फांसे, गुंड्या, वगैरे तयार करण्यांत येतात. दंतवैद्य हिपोपोटेमसचे सुळे दातासाठीं विशेष पसंत करतात. हस्तिदंताचा चुरा व भुगा जाळून त्याचा हस्तिदंती काळा रंग तयार करण्यांत येतो. हत्तीच्या दांतांचें सरासरी वजन ६० पौंड असतें; पण कांहीं कांहीं १७० पौंड पर्यंत वजनांत भरतात. म्हैसूर व त्रावणकोर संस्थानांत हस्तिदंताचें कोरीव काम फार सुंदर होतें. ब्रह्मदेशांत मोलमीन यासाठीं प्रसिद्ध आहे.

प्राचीन मिसरी देशांत एथिओपियांतून हस्तिदंत आणून त्याचे जिन्नस करीत. हिंदुस्थानांतहि हस्तिदंत फार प्राचीन काळापासून वापरलें जाई. शस्त्रांच्या मुठी याच्या करीत. दिल्ली, आग्रा, अलवार, बिकानेर, जोधपूर, वगैरे ठिकाणीं पूर्वींपासूनच हस्तिदंती कातकाम होत असतें. हस्तिदंती सिंहासनें व हत्तीवरील हौदे अद्यापि पाहावयास मिळतात.

**हस्तिनापूर**—संयुक्तप्रांत, मीरत जिल्ह्यांतील प्राचीन शहर. ही कौरवांची प्रख्यात राजधानी असून येथील गादीकरितांच भारतीय युद्ध झालें. दिल्लीच्या ईशान्येस ५७ मैलावर, गंगेच्या जुन्या प्रवाहाजवळ या नगराचे कांहीं अवशेष दाखविण्यांत येतात. हें शहर गंगेच्या प्रवाहामुळें वाहून गेलें असावें. सोमवंशीय पुरुकुलोत्पन्न जो हस्ती राजा, त्यानें स्थापिलेलें नगर म्हणून याला हस्तिनापूर हें नांव पडलें, असें कांहीं म्हणतात; पण महाभारत व विष्णुपुराण यांत याला हत्तीचें नगर म्हटलेलें आहे. यास नागपूर, गजपूर, इत्यादि अनेक नांवें आहेत. दिल्ली पाहा.

**हळद**—[वर्ग झिंगिबेरासी कुर्कुमालोंगा]. हळद आल्याप्रमाणेंच जमिनींत होते. हळदीचें झाड कमरेइतकेंच उंच वाढतें. त्याला कर्दळीसारखीं पानें येतात. या पिकाची लागवड सर्व हिंदुस्थानांत होते. मद्रास इलाख्यात व बंगाल्यांत हें पीक विशेष होतें. मुंबई इलाख्यात—मुख्यत्वेंकरून सातारा, सोलापूर, सांगली, मिरज, वगैरे ठिकाणीं हळदीची लागवड बरीच होते. एकंदर हिंदुस्थानांत या पिकाखालीं सुमारें एक लक्ष एकर जमीन असते, व मुंबई इलाख्यांत दरवर्षी सुमारें पांच—सहा हजार एकरांत या पिकाची लागवड होते. रंगाकरितां हळद परदेशीं रवाना होते. हळदीच्या तीन जाती आहेत: एक आंबेहळद; ही औषधाकरितां लावितात. दुसरी कठिण कुड्याची (लोखंडी); ही रंगासाठीं उपयोगी पडते. व तिसरी नरम जातीची; हिची पूड स्वयंपाकांत व औषधांत

वापरतात. हळदीला आल्याप्रमाणेंच जमीन लागते. हळद मध्यम काळ्या जमिनींत चांगली पोसते. हळदीचा फेरपालट ऊंस, मिरच्या, मुईमूग, कांदे, वगैरे पिकांशीं करतात. हळदीची लागवड पावसापूर्वी आल्याप्रमाणेंच करतात. बियाणें दर एकरीं सुमारें एक हजार पौंडपर्यंत लागतें. बाकी सर्व लागवड आल्याप्रमाणेंच असते. हळद आठ महिन्यांत तयार होते. ती तयार झाल्यावर पानें वाळून जमिनीवर पडतात व लोळूं लागतात. हळद कुदळीनें खणतात व ज्यांस कोंब फुटलेले असतात ते पुढील सालच्या बियाकरितां तयार ठेवतात.

हळदीच्या पाण्यांत भिजविलेल्या खळ न लावलेल्या कागदाचा उपयोग अल्कली ओळखण्याकरितां करण्यांत येतो. कारण अल्कलीच्या योगानें अशा कागदाचा रंग तांबडा होतो. आपल्या स्वयंपाकांत हळदीवांचून चालतच नाहीं. रंग व वास यांसाठीं ती वापरतात. शिवाय रक्तशुद्धीचा गुण हळदीच्या अंगीं आहे. दुखापत झालेल्या भागावर हळद उगाळून लावतात. हळदीपासून गंधाचे रवे करतात. मूळव्याधीवर हळद भाजून तिची पूड कोरफडीच्या गिरांत ७ दिवस देतात. पडसें खोकल्यावर तापलेल्या दुधांत हळदीचें चूर्ण घालून तें पितात. काविळीवर हळदीचें चूर्ण १ तोळा व ४ तोळे दहीं हीं मिसळून सकाळीं देतात.

हळ्या—या जातीची मुख्य वस्ती मध्यप्रांतांतील रायपूर जिल्ह्याचा दक्षिण भाग, कांकेर व बस्तर संस्थानें, भंडारा जिल्ह्याचा कांहीं भाग व वऱ्हाडचा थोडा भाग या ठिकाणीं आहे. एकंदर लो. सं. सुमारें १,००,००० आहे. हे लोक उडिया राजाबरोबर सिहान अरण्यांत आले असें सांगतात. यांची भाषा हळबी. नागपुरास हे आपणांस हळबी कुणबी म्हणवितात. हळबा शब्द हरकहा शब्दापासून झाला असें ज्ञातिसंशोधक रसेल म्हणतो. यांची भाषा उडिया, छत्तीसगडी व मराठी यांच्या मिश्रणानें बनली आहे. रतनपूरच्या राज्यांत हे लोक शिपाईगिरीचें काम करीत. त्यामुळें त्यांची योग्यता वाढली. पुढें यांनीं बस्तर राज्यांत जमिनी मिळविल्या. तेथून चांद्याच्या गोंड राजांच्या हाताखालीं नोकरी पत्करून यांनीं जमिनी मिळविल्या व भंडाऱ्यांत जमीनदार बनले. हळबा शक्यतोंपर्यंत आपली मुलगी तिच्या आते भावासच देतात व प्रत्येक हळबा आपल्या मामास फार मान देतो व त्याचे पाय धरतो. मरतांना मामास एक दोन म्हशी तो देतो. यांच्या जातींतील पंचायतीच्या सरपंचास कुर्शा म्हणतात. त्याची निवड कोटवार, चपन (चन्नपा) किंवा नाईक या कुलांतून होते.

हळबी बोली—ही मराठीचीच एक बोली मानली जाते; कारण यांतील प्रत्यय मराठी आहेत. शुद्ध हिंदी शब्दांनाहि मराठी प्रत्यय लावले जातात; उदा., मी देखलों नाहीं. यांतील उच्चार हे हिंदी आणि मराठी यांच्या मिश्रणानें बनले आहेत. 'ण' चा 'न'; 'ल' चा 'र'; 'व' चा 'ब', असे उच्चार आढळतात. लिंगें दोनच (पुल्लिंग आणि स्त्रीलिंग) आहेत. एकवचनापुढें 'मन' शब्द लावून अनेकवचन होतें. क्रियापदांचीं रूपें लिंगाप्रमाणें बदलत नाहींत. भूतकाळासाठीं 'ल' व कधीं 'ब' हें विकरण लागतें. भविष्यकालचा प्रत्यय 'दे' किंवा 'ते' आहे.

हळ्ळेबीड—म्हैसूर संस्थानांतील हसन जिल्ह्यांत हें खेडेगाव आहे. बेलूरच्या ईशान्येस हें दहा मैलांवर आहे. याचें मूळचें नांव हळ्ळेबिडु (जुनी राजधानी) असें होतें. व याच ठिकाणीं होयसळ राजांची राजधानी द्वारावतीपुर किंवा द्वारसमुद्र (पाहा) होती. येथील 'दोरासमुद्र' नांवाचें मोठें तळें ९ व्या शतकांत राष्ट्रकूटांनीं बांधलें. १२ व्या शतकांत येथें होयसळांनीं आपली राजधानी केल्यापासून गांवाला महत्त्व आलें.

हें शहर प्रथम १३११ सालीं मलिक काफरनें जिंकून तेथील अपार संपत्ति हरण केली. मुसलमानांची दुसरी स्वारी १३२६ सालीं होऊन या शहराचा पूर्ण नायनाट झाला. तरी देखील तेथील इमारती अजून प्राचीन वैभवाची साक्ष देतात. होयसळेश्वर व केदारेश्वर या देवळांच्या इमारती अजूनहि प्रेक्षकांचें मन वेधतात.

होयसळेश्वर देवालयाची रचना दोन देवळें एकमेकांना जोडल्यासारखी अशी दिसते. हें देवालय इ. स. ११२१ च्या सुमारास बांधलेलें दिसतें. याला अनेक देणग्या मिळाल्याचे लेख आहेत. भिंतीवर असंख्य चित्रें फार कौशल्यानें काढलीं आहेत. चालुक्य शिल्पाचा इतका उत्कृष्ट नमुना इतरत्र नाहीं.

केदारेश्वराचें देवालय दुसऱ्या वीरबल्लाळानें १२१९ च्या सुमारास बांधलें. या लहानशा देवळांतहि वरच्या देवळाप्रमाणेंच अप्रतिम शिल्प दृष्टीस पडतें.

हाइड, डग्लस् (१८६०-      )—हा आयर्लंड देशाचा अध्यक्ष असून एक मोठा इतिहासकार, कवि व लोकगीतांचा अभ्यासक आहे. यानें एक गॅलिक वाङ्मयाचा पद्धतशीर व सर्वांगीण इतिहास लिहिला आहे. १८९३ मध्यें स्थापन झालेल्या गॅलिक संघाचा तो अध्यक्ष होता. तसाच इतरहि राष्ट्रीय साहित्य संघ वगैरे संस्थांचा अध्यक्ष होता. यानें गॅलिक भाषेंत बरीच ग्रंथरचना केली असून इंग्रजी भाषेंतहि कांहीं नाटकें, काव्यें व इतिहास लिहिले आहेत. १९०९ ते १९३२ या वर्षांत तो आयर्लंडमधील राष्ट्रीय विद्यापीठांत अर्वाचीन आयरिश भाषेचा प्राध्यापक होता. १९३८ मध्यें तो आयरिश अध्यक्ष निवडला गेला.

हाकन (सातवा) (१८७२-      )—नॉर्वेचा एक राजा. हा डेन्मार्कच्या आठव्या फ्रेडरिक राजाचा पुत्र असून १९०५ मध्यें स्वीडन देशापासून नॉर्वे देश स्वतंत्र झाला त्या वेळीं त्याला नॉर्वेचा राजा म्हणून निवडण्यांत आलें.

**हॉकी**—फुटबॉलसारखा एक विलायती खेळ. यांत चेंडू काठीनें मारावयाचा असतो. ज्या बाजूनें चेंडू मारावयाचा ती काठीची बाजू जरा वांकविलेली असते. या खेळाचें रंगण व खेळण्याची रीत साधारणपणे फुटबॉलप्रमाणेच असते. एका बाजूच्या गड्यांनीं काठीच्या साहाय्यानें चेंडू दुसऱ्या बाजूच्या 'गोल' मधून बाहेर घालविण्याचा प्रयत्न करावयाचा हा खेळाचा उद्देश. या खेळाचे आंतरविद्यापीठ सामने होतात. स्त्रिया हा खेळ जास्त पसंत करतात. 'आईस-हॉकी'–बर्फावरील हॉकी म्हणून एक प्रकार आहे. पण यांत स्केटिंग चांगलें यावें लागतें.

**हाकोडाटे**—हें शहर जपानमध्यें होकैडो बेटाच्या दक्षिण टोंकानजीक समुद्रकिनाऱ्यावर वसलेलें आहे. आणि तें जगातील एक उत्तम बंदर आहे. हें बंदर १८५८ सालीं लॉर्ड एलीननें जपानी सरकाराबरोबर केलेल्या तहानें ब्रिटिश व्यापाराला खुलें करण्यांत आलें. येथून कडधान्यें, गंधक, लोंकर आणि आगपेट्या हा मुख्य माल परदेशीं जातो. येथें मच्छीमारीचा धंदा फार मोठ्या प्रमाणांत चालतो आणि तो अतिशय फायद्याचा आहे. या बंदरांत २८ फूट खोलीच्या आणि २० हजार टन वजनाच्या बोटी येऊं शकतात. व येथें ५३१ फूट लांबीची एक सुकी गोदी आहे. लोकसंख्या सु. दोन लाख आहे.

**हॉग, जेम्स** (१७७०–१८३५)—एक स्कॉटिश कवि. हा एट्रिक शेपर्ड या नांवानें अधिक प्रसिद्ध आहे. त्याने आरंभीं 'डोनॉल्ड मॅक्डोनल्ड' आणि 'स्कॉटिश पॅस्टोरल्स' (स्कॉटिक गोपगीतें) या कविता लिहिल्या आणि त्यामुळें सर वॉल्टर स्कॉटचें लक्ष या कवीकडे गेलें. आणि स्कॉटच्या सल्लयावरून त्यानें आपला 'दि माउंटन बार्ड' (गिरि भाट) हा आपला पोवाड्यांचा संग्रह काढला. नंतर १८१३ सालीं 'दि क्वीन्स वेक' हा कवितासंग्रह प्रसिद्ध होऊन हॉगची कीर्ति प्रस्थापित झाली. १८१५ सालीं त्याने 'पिल्ग्रिम्स ऑफ दि सन्' हा संग्रह प्रसिद्ध केला, व नंतर 'मॅडोर ऑफ दि मूर', 'दि पोएटिक मिरर', 'क्वीन हाउंड', 'ड्रॅमॅटिक टेल्स', 'दि ब्राऊनि ऑफ बॉडस्बेक' हे कविता-संग्रह व कथासंग्रह प्रसिद्ध केले.

**हॉंगकॉंग**—चीन, ब्रिटिशांच्या ताब्यांतील एक बेट व वसाहत. कॅंटन नदीच्या मुखाशीं हॉंगकॉंग हें एक लहानसें बेट आहे. क्षेत्रफळ ३२ चौरस मैल. परंतु हॉंगकॉंग या संज्ञेत लगतचा चीनमधील ब्रिटिश वसाहतीचा प्रदेशहि येतो; त्याचें निराळें क्षेत्रफळ ३९० चौरस मैल आहे. हॉंगकॉंगमध्यें ब्रिटिशांचें लष्करी व आरमारी ठाणें आहे. लो. सं. सुमारें अकरा लाख आहे.

१८४१ सालीं चीननें ही वसाहत ब्रिटिशांना दिली. पूर्वेकडील चीन आणि इतर देश यांच्या व्यापाराचें हें केंद्रस्थान असल्यामुळें याला फार महत्त्व आहे. १९४१ सालीं हें जपाननें घेतलें होतें. या राजवसाहतीचा कारभार एक गव्हर्नर मंत्रिमंडळाच्या सल्लयानें करतो. १९४० सालीं येथें एक विद्यापीठ स्थापण्यांत आलें. राजधानी व्हिक्टोरिया आहे.

**हाज**—मुसलमानांत मक्केच्या यात्रेस म्हणतात. मक्का येथे महंमद पैगंबराचा जन्म झाल्याने तें क्षेत्र बनलें आहे. प्रत्येक मुसलमानानें आपल्या आयुष्यांत एकदां तरी मक्केला जाऊन यावें असें आहे. मक्केची यात्रा करून येणाऱ्यास हाजी ही पदवी लावतात. या यात्रेचा महिना शेवटचा म्हणजे जिल्हेज आहे.

**हाट्टा, डॉ. महंमद** (१९०२– )—इंडोनेशिया लोकराज्याचे पहिले पंतप्रधान. हे मूळचे सुमात्राचे. पुढें हॉलंडमधील रॉटरडॅम येथें शिकून अर्थशास्त्रांत डॉक्टोरेट पदवी मिळविली. त्यांना १९३५ सालीं न्यू गिनींत हद्दपार करण्यांत आलें होतें. १९४२ त जपाननें त्यांची मुक्तता केली. डॉ. शिवकर्ण-सोकोर्नो (पाहा) यांच्याबरोबर त्यांनीं स्वातंत्र्यासाठीं जोराचा लढा करून १९४९ त देशाला स्वातंत्र्य मिळविलें व ते पहिले पंतप्रधान झाले.

**हॉटेंटाट**—पश्चिम केप कॉलनी व त्यालगतचा नैर्ऋत्य आफ्रिकेचा ब्रिटिश मॅंडेटखालीं असलेला जो मुलूख त्यांत राहणारे हे आफ्रिकन लोक आहेत. पूर्वी सर्व दक्षिण आफ्रिकेत यांचा वस्ती होती. त्यांच्या भाषेंत 'खटखट' शब्दाप्रमाणें येणाऱ्या आवाजावरून डच वसाहतवाल्यांनीं त्यांना हॉटेंटाट असें नांव दिलें. हे लोक इतर आफ्रिकन लोकांपेक्षां अगदीं भिन्न आहेत असा पूर्वी समज होता; परंतु फार प्राचीन काळीं बांटू, नीग्रो, व बुशमेन या जातींत शरीरसंबंध होऊन त्यांपासून हॉटेंटाट हे लोक झाले असले पाहिजेत, असें हल्लीं दाखविण्यांत आलें आहे. हॉटेंटाट लोकांच्या मूळच्या चालीरीतींसंबंधाची उत्तम माहिती जुन्या पुस्तकांतून मिळते. त्यावरून असें समजतें कीं, हे गरीब, आदरशील व ममताळू लोक आहेत. ते शारीरिक व मानसिक कामांत आळशी असतात, तरी आपल्या गुरांढोरांची चांगली काळजी घेतात. त्यांची उंची मध्यम, अंग सडपातळ व हातपाय लहान असतात. त्यांच्या कातडीचा रंग काळसर, चेहरा उभट व गालाचीं हाडें वर आलेलीं असून, डोळे काळसर किंवा काळे असतात; नाक रुंद व वरच्या बाजूला जाड व चपटें, तोंड मोठें, ओंठ जाड व बाहेर आलेले असतात. त्याचे केंस लोंकरीसारखे,

आंखूड, राठ व कुरळे असून दाढी फार थोडी असते. ते कातड्याचे कपडे वापरतात. त्यांचा मुख्य धंदा म्हणजे गुरें चारणें होय. बोअर लोकांनीं यांची शिकार करून यांना हांकलून दिल्यानें आपल्या मूळच्या देशांतच हे फार थोडे उरले आहेत.

**हाड**—अस्थि पाहा.

**हाडमोड**—(फ्रॅक्चर–अस्थिभंग). हाड मोडलें असतां शस्त्रवैद्यकांत त्यास अस्थिभंग असें म्हणतात. अस्थिभंगाचे निरनिराळे प्रकार 'अस्थि' या लेखांत दाखविले आहेत.

बाहेरच्या आघातामुळें बहुधा हाडमोड होते; तथापि कधीं कधीं एकदम जोराचें स्नायूंचें आकुंचन होऊन हाड मोडतें. हाडमोडीचे सामान्यतः तीन प्रकार असतात. साध्या हाडमोडींत हाड मोडलें असलें तरी बाहेर त्या जागीं कांहीं जखम झालेली नसते. मिश्र (कॉंपाउंड) हाडमोडीमध्यें कातडी चिरली गेल्यामुळें मोडलेल्या हाडाचा बाहेरच्या हवेशीं संबंध पोंचलेला असतो. विच्छिन्न (कॉमिन्युटेड) हाडमोडींत हाडाचे दोहोंपेक्षां जास्त तुकडे झालेले असतात. कोणत्याहि प्रकारची हाडमोड असली तरी तज्ज्ञ वैद्याच्या देखरेखीखालींच उपचार केले पाहिजेत. नाहीं तर साधी हाडमोडहि मिश्र, वगैरे होऊन बसते. रोग्याची हालवाहालव करणें जरूरच असेल तर दुखावलेल्या हाडाला धक्का लागूं नये म्हणून त्याला फळी किंवा दुसरा चांगला आधार द्यावा.

**हाडमोडी**—ही वेल वृक्षावर होते. शेराप्रमाणें कांडीं असतात. तीं चपटीं असतात. हिला मिऱ्याएवढीं गोल मोत्याप्रमाणें फळें येतात. हीं मुलें खातातहि. कोंकणांत या वेली फार होतात. हाड मोडलें असल्यास ही वेल ठेंचून मोडल्या जागीं तीन दिवस बांधून ठेवतात. गुरांसहि हाच उपचार करतात व खाण्यासहि देतात. नारूवरहि हिची पेंड बांधतात.

**हाडसंधी**—हीस संस्कृतांत ग्रंथिमान्, अस्थिसंहारी, वज्रांगी, वगैरे बरींच नांवें आहेत. या वेलीचा एक फांटा कुंडींत घालून ही वेल एखाद्या झाडावर सोडतात. ही त्रिधारी कांडवेली आहे. हाडमोडीवर वेल ठेंचून बांधतात. त्रिधारी न मिळाल्यास चौधारीहि वापरतात.

**हाडांचें खत**—हाडांमध्यें स्फुरयुक्त (फॉस्फेट) व नत्रयुक्त (नायट्रेट) पदार्थ असल्यामुळें हाडांचें खत हें फार मौल्यवान् समजण्यांत येतें. हें खत अधिक परिणामकारक होण्याकरितां हाडांवर अनेक क्रिया करण्यांत येतात. उदाहरणार्थ, त्यांतील चरबी व जिलेटिन हीं उकळून काढून टाकण्यांत येतात. यामुळें हाडें लवकर कुजून तीं मातींत मिसळतात. तसेंच त्यांची पूड करण्यांत येते किंवा तीं गंधकाम्लांत (सल्फ्यूरिक ॲसिड)मध्यें विरघळविण्यांत येतात. यामुळें त्यांच्यांतील स्फुरितें (फॉस्फेट्स) पाण्यांत द्रव पावूं शकतात. हाडांचें खत करण्यापूर्वी तीं उकळून त्यांतील जी चरबी निघते ती साबण व वंगण यांकरितां उपयोगांत आणण्यांत येते.

१०० भाग हाडांमध्यें चरबी १२॥ भाग, जिलेटिन ६ भाग, सरस १५॥ भाग, फॉस्फेट ४८, क्षार इ. ५॥ भाग, व पाणी १२॥ भाग असतें. हाडांच्या भागांचें बहुमोल वस्तूंत कसें रूपांतर होऊं शकतें हें त्या वस्तूंच्या खालीं दिलेल्या उपयोगांवरून ध्यानांत येईल.

(१) चरबीचे उपयोग : साबण, लुब्रिकेटिंग तेलें, कृत्रिम लोणी (मार्गारिनसारखें), इ०.

(२) जिलेटिनचे उपयोग : रोलर कांपोझिशन, डुप्लिकेटर्स, फोटोलिथोग्राफी व फोटो एन्ग्रेव्हिंग, बॉटल सीलिंग कॅप, कृत्रिम रेशीम, कागद व कापड या धंद्यांत साइझिंगकरितां. फोटोच्या कांचा, कागद, साध्या व सिनेमाच्या फिल्म, ट्रान्स्फरचे कागद, वगैरे उद्योगधंदे जिलेटिनच्या मदतीशिवाय होणेंच शक्य नाहीं.

(३) सरसाचे उपयोग : अनेक प्रकारच्या गोंदांकरितां, छापखान्याच्या रूळांकरितां, तसेंच पुस्तकबांधणी, लांकडी सामान, पॉलिशें, फ्रेम-मोल्डिंग, पेंटर्स कॅनव्हास, घरगुती रंगसफेती, व विशेषतः प्लायवुड, आगकाडी, सँड व एमरी कागद, प्लॅस्टिक पुट, कागद व कापड या धंद्यांतून फार खप आहे.

(४) स्फुरित (फॉस्फेटिक्) खतें : यांच्या साह्यानें पिकांना नत्र (नायट्रोजन) लवकर मिळूं शकतो व झाडांच्या मुळ्यांची व फळांची वाढ फार जलद होऊं शकते.

(५) स्फुरिकाम्ल (फॉस्फोरिक ॲसिड) व स्फुरितें (फॉस्फेट्स):— औषधांत, रसायनशास्त्रांत व उद्योगधंद्यांत फॉस्फरसचें मूळ द्रव्य.

हाडांची निर्यात—१९३९ सालीं दुसरें महायुद्ध सुरू होण्यापूर्वीच्या ५ वर्षांत, मुंबई बंदरांतून दरवर्षी सरासरीनें ७,००० टन हाडें बाहेर पाठविण्यांत आलीं व कलकत्ता, मद्रास व कराची या इतर बंदरांतून मिळून या पांच वर्षांत दरवर्षी सरासरीनें एकूण ७० लाख रुपये किंमत घेऊन लाख दीड लाख टन हाडें परदेशीं पाठविलीं व हाडांपासून तयार होणाऱ्या तयार पदार्थांची त्याहून जास्त किंमतीची आयात केली.

अगदीं अलीकडे १९४८ च्या आरंभीं हिंदुस्थान सरकारकडून, हाडांच्या निर्यातीवर कडक बंधन घालण्यांत आलें; तेव्हां युरोपमधील बेल्जिअम, फ्रान्स, इंग्लंड व अमेरिका यांतून इशारेवजा धाक आल्या कीं, युरोपची पुनर्रचना हिंदुस्थानांतून पुरेशीं हाडें न आल्यास फार धोक्यांत येणार आहे. येथील हाडें मिळविण्याकरितां या देशांनीं त्यांच्या हिताचे मोर्चेहि पाठविले. यावरून उद्योगधंद्यांत व पुनर्रचना योजनांत हाडांचें महत्त्व किती आहे हें लागलें ध्यानांत येतें.

परदेशांतील गिन्हाईक खताच्या अंतिम खऱ्या फायद्याविषयीं जास्त जागरूक म्हणून ⅛ इंचापेक्षां कमी छिद्रांच्या चाळणींतून खालीं पडणारा माल ते घेत नाहींत; तेव्हां ⅛ इंचाच्या खालील पूड किंवा भुकटी परदेशीं जात नसल्यामुळें ती येथें चोनमाल खतें म्हणून विकली जाते. ही भुकटी म्हणजे हाडाच्या वरच्या पापुद्र्यांचाच भाग प्रामुख्यानें असल्यामुळें, जास्त उपयुक्त पदार्थांचा हाडाचा कठिण झालेला असा अंतर्भागच तेवढा परदेशीं जातो. म्हणजे आपल्या कच्च्या मालाचा मुख्य भाग आपण दुसऱ्यांना देऊन आपल्या जमिनीची फॉस्फेटसची खरी गरज आपण आज कित्येक वर्षे भागवूं शकत नाहीं व त्यामुळें जमिनीचें पीक सकसपणांत व वजनांतहि हळूहळू कमी होत जाऊन वाढत्या प्रजेला पुरेसें अन्नधान्य मिळेनासें झालें आहे.

रासायनिक खतें—१८४७ च्या सुमारास रासायनिक खतांचा उपयोग अमेरिकेंत प्रथम सुरू झाला व तेव्हांपासून १९४७ पर्यंतच्या १०० वर्षांत, ज्या प्रमाणांत या रासायनिक खतांचा उपयोग वाढला त्याच प्रमाणांत तेथील आयुष्याची मर्यादाहि वाढली. १०० वर्षांपूर्वी ही मर्यादा ४० वर्षांची होती, ती १९४७ मध्यें ६६ झाली. आपल्या देशांत सरासरीचें आयुर्मान अवघें २३ वर्षांचेंच आहे. जास्त काळ जगावयाचें असेल तर आपण काय केलें पाहिजे तें आपण वरील १०० वर्षांच्या प्रात्यक्षिकाच्या अनुभवावरून शिकलें पाहिजे.

स्फुरयुक्त खतें—टेनेसी नदीच्या खोऱ्यात जेथें नदीच्या पुरांनीं जमीन नापीक व निरुपयोगी झाली होती तेथें नदीला योग्य ठिकाणीं बंधारे घालून पाण्याचा पुरवठा नियमित करून केवळ सुपर फॉस्फेट खतांनीं जमिनीचें उत्पन्न व धान्याचा कसहि अनेक पटींनीं अमेरिकेनें वाढविला. येथील शेतीचीं प्रात्यक्षिकें ज्या केंद्रीभूत मुख्य गोष्टीवर अवलंबून आहेत, ती गोष्ट म्हणजे फॉस्फेट खतें होत. फॉस्फेट खतांनीं जमिनीचा पिकें देण्याचा मगदूर विलक्षण वाढतो, इतकेंच नव्हे तर त्यांच्यामुळें नदीनाल्यांचें चांगलें संरक्षण होऊन लोकांची जीवनशक्तिहि वाढीला लागते. फॉस्फेट खतामुळें पिकांची व सर्व जीवनाची वाढ होते. झाडांच्या मुळांचा विस्तार लवकर होतो व त्यामुळें येथील जमीन भुसभुशीत होते, मुळांना हवेंतील प्राणवायु जास्त मिळतो व वाढ लवकर होते. जनावरांच्या वैरणींत, भाजीपाल्यांत व विशेषतः फळांत फॉस्फरसचा अंश जास्त प्रमाणांत येऊं शकतो.

फॉस्फेट खतांनीं उत्पन्न होणारीं धान्यें, फळें किंवा भाजीपाला आहारांत आला तर सर्व सजीव प्राणी रोगांचा प्रतिकार जास्त प्रमाणांत करूं शकतात.

हाडांचें उपयुक्त पदार्थांत रूपांतर करण्याच्या प्रक्रिया पुढील आहेत :—

(१) कारखान्यांत हाडें आलीं म्हणजे त्यांतील लहानमोठीं (शरीराच्या वेगवेगळ्या भागांचीं) निवडून काढावयाचीं. वजनाकरितां लोखंडाचे किंवा दगडांचे तुकडे घालण्यांत येतात, तेहि निवडून बाजूला काढणें अवश्य असतें.

(२) निवडून काढलेलीं हाडें कांहीं दिवस चुन्याच्या निवळींत ठेविलीं म्हणजे त्यांना लागलेली रक्त, मांस, वगैरे वाळलेली घाण निघून जाते. नंतर चांगल्या पाण्यानें धुऊन तीं वाळवितात.

(३) नंतर यंत्राच्या साह्यानें ½ ते २ इंच लांबीचे त्यांचे तुकडे करण्यांत येतात. मोठीं व नळीचीं हाडें पिंजण्यांत येतात. हे तुकडे हवाबंद केलेल्या भांड्यांत घालून चरबीचा भाग योग्य द्रावकाच्या साह्यानें निराळा करण्यांत येतो व ही चरबी शुद्ध करून इतर धंद्यांकरितां विकण्यांत येते.

(४) चरबी काढलेलीं हाडें उज्जहरिका (हैड्रोक्लोरिक)-सारख्या अम्लामध्यें भिजत ठेवल्यामुळें त्यांतील स्फुरित (फॉस्फेट) अम्लाच्या पाण्यांत विरघळून येतो. व मूळचीं कठिण हाडें लवचिक आणि अर्धवट पारदर्शक होतात. तीं पुनः धुऊन वाळवितात. अम्लाच्या पाण्यांतून स्फुरिताचा भाग चुन्याच्या निवळीनें निराळा काढण्यांत येतो. अशा रीतीनें काढलेलें स्फुरित पाण्यात विरघळणारें असतें, म्हणून पिकांच्या मुळ्यांत तें लवकरच शोषलें जातें. तसें हाडांचें नुसतें पीठ शोषलें जाऊं शकत नाहीं. यामुळेंच स्फुरिताचें महत्त्व विशेष आहे.

(५) चरबी व स्फुरित काढून घेतलेलीं हाडें पाण्यांत उकळतां पहिल्या १–२ कढणांत जिलेटिनचा भाग पाण्यांत उतरतो व पुढील २–३ कढणांत सरसाचा भाग पाण्यांत येतो. हें पाणी वाफेच्या रूपानें काढून टाकण्यांत येतें व ३० तें ४० भाग असलेला जिलेटिनचा किंवा सरसाचा रस तयार होतो.

(६) हा रस बर्फाच्या पाण्यासारखें थंड पाणी किंवा हवा यांच्या साह्यानें थिजवितात. थिजलेल्या रसाचे योग्य जाडीचे काप काढून ते ठराविक वेळांत वाळविण्यांत येतात. याप्रमाणें जिलेटिनच्या किंवा सरसाच्या वड्या तशाच विकल्या जातात किंवा दळून साखरेसारखी त्यांची पूड करून ती विकण्याचीहि पद्धत आहे.

शरीरांतील निरनिराळ्या ठिकाणच्या कामांप्रमाणें त्या त्या भागांतील हाडांत रासायनिक मूलद्रव्यांचें कमीअधिक मिश्रण असतें. उदाहरणार्थ, नळीचीं पोकळ हाडें, खांदे, बरगड्या, टाळू, खूर, इ.. या प्रत्येकापासून जर निराळा असा सरस किंवा जिलेटिन काढलें तर त्या प्रत्येकांत एखादा गुणधर्म (रासायनिक किंवा भौतिक) विशेष उत्कटत्वानें दृष्टीस पडतो. याकरितां कच्च्या

मांलाची निवड फार कसोशीनें करावी लागते. [ हिंदुस्थानांतील एक उपेक्षित धंदा—पत्रक ].

**हात**—मनुष्याच्या हाताच्या सांगाड्यात एकंदर २७ अस्थी असतातं. त्यांपैकीं आठ मनगटाच्या, पांच तळव्याच्या, आणि चौदा बोटांच्या असतात. हाताचें चलनवलन करणारे मुख्य स्नायू पोटापासून निघालेले असतात व त्यास आकुंचक (फ्लेक्सॉर) असें म्हणतात. बोटें ताठ करावयास लागणाऱ्या स्नायूस प्रसारक (एक्सटेन्सॉर) असें म्हणतात. हाताच्या स्नायूंचे तंतू एकमेकांत गुंतविलेले असतात, आणि ते पट्टे व तंतू यांच्या साहाय्यानें बांधलेले असतात, आणि त्यामुळें हाताच्या क्रियेमध्यें एकवाक्यता येते. मनुष्याच्या हातामध्यें विशेष गोष्ट म्हणजे त्याच्या हातांतील चार बोटें आणि अंगठा यांची परस्परांसमोर असलेली ठेवण ही होय. स्पर्श करण्याचें इंद्रिय म्हणून व त्यामुळें कोणत्याहि वस्तूचा आकार, स्वरूप आणि वजन यांचें ज्ञान करून घेण्याच्या बाबतींत हाताची विशिष्ट रचना ही एक त्याच्या बौद्धिक सामर्थ्याची व वर्चस्वाची महत्त्वाची बाब आहे. वानराप्रमाणें हात हे मनुष्याच्या गतीचें साधन नाहीं. तें एक स्पर्श करण्याचें व वस्तु धरण्याचें अथवा पकडण्याचें साधन आहे. हातांमध्यें स्पर्शज्ञान विशेषतः तळव्याच्या भागांत असतें, व स्पर्शज्ञानाचे मज्जातंतू बोटांच्या अग्रभागीं विशेष असतात. त्यांवर दुसऱ्या तंतूंचें संरक्षणात्मक आवरण असूनहि या मज्जातंतूंची शक्ति व नाजूकपणा तसाच कायम राखलेला असतो व बोटांच्या अग्रभागीं स्नायू पेशी व मज्जातंतू यांचें एक सूक्ष्म जाळें असतें.

**हातमोजे**—हातमोजे रेशीम, ताग, सूत, चामडें, कापड, वगैरेचे करतात. याकरितां कातडीं वापरावयाचीं असल्यास हरिण, बकरें किंवा वासरें यांचीं वापरतात. तसेंच कुत्रा, घूस किंवा कांगारू यांचें चामडेंहि उपयोगांत आणतात. चामड्याचे हातमोजे करावयाचे असतां चामडें ठशानें कापून नंतर शिवतात. कापडाचे वगैरे हातमोजे करावयाचे असल्यास त्याचे तुकडे कापून शिवतात; परंतु अलीकडे बहुतेक हातमोजे विणून तयार करतात.

हातमोजे वापरण्याची रीत ही प्रागैतिहासकालीनहि असावी. ग्रीक लोक हे शरीरसंरक्षणासाठीं तर रोमन लोक अलंकार म्हणून हातमोजे वापरीत. मध्ययुगांत न्यायालयांत किंवा द्वंद्वयुद्धास आव्हान म्हणून हे पुढें केले जात. नंतर १५ व्या शतकापासून युरोपांत हे सर्रहा वापरण्यांत येऊं लागले.

**हातोडा**—लोखंडाचा शोध लावण्यापूर्वी हातोडा दगडाचा असे. कधीं त्यास मूठहि लावीत. ही मूठ झाडाची फांदी पिळून करीत. हल्लीं प्रत्येक कारागिराचा वेगळ्या प्रकारचा हातोडा असतो व तो त्याच्या कामाला चांगला उपयोगी पडतो. हातानें मारावयाचा जसा हातोडा असतो तसा यांत्रिक साहाय्यानें मारावयाचाहि असतो. जेथें यंत्रें बनवावयाचीं असतात तेथें असे अवाढव्य हातोडे वीज, वाफ किंवा इतर शक्ति वापरून चालवितात. क्रप कारखान्यांतील घण मारणाऱ्या हातोड्याची किंमत लाखों

हातोड्याचे प्रकार

१. प्राचीन दगडी हातोडा. २. सुतारी हातोडा. ३. घिसाडी हातोडा. ४. यांत्रिक कागाचा हातोडा. ५. इंजिनियरचा हातोडा. ६. 'टिल्ट' हातोडा. ७. 'कोच-ट्रिमर' चा हातोडा. ८. फॅरिएरचा हातोडा. ९. कूपरचा हातोडा. १०. चांभारी हातोडा. ११. प्लंबरचा हातोडा.

रुपयांवर असे. याच्या डोक्याचें वजन पन्नास टनावर असे व पाया १०० फूट खोल घेतला होता. 'टिल्ट' हातोडा कल्या वगैरे करण्याच्या साध्या कामाला वापरतात. यांतील चाकाच्या फेऱ्यानें हातोडा मारला जातो. सोबत चित्रांत हातोड्याचे प्रकार दिसतील.

**हार्थोर्न**—[ वर्ग-रोझानी. उपवर्ग-पोमी, क्राटेगस ऑक्सि-आकांथा ]. हीं दाटें युरोपांत आढळतात. हीं लहान असून २० ते २५ फुटांपर्यंत उंच वाढतात. यास कांटे असतात. याच्या पन्नास जाती आहेत. त्यांपैकीं कांहीं अमेरिकेंत आढळतात. यांच्या प्रत्य

हें जोरानें वाढतें, परंतु पुढें याची वाढ हळूहळू होत जाते. याचें लांकूड कठिण व टिकाऊ असतें. याच्या फुलास मे म्हणतात.

**हार्थॉर्न, नॅथेनील** (१८०४-१८६४)—एक अमेरिकन कादंबरीकार व लेखक. हार्थॉर्ननें प्रथम कांहीं नियतकालिकांत लेख लिहिण्यास सुरवात केली. पुढील आयुष्यांतहि हार्थॉर्न केवळ लेखनव्यवसाय पत्करून असे. त्याच्या लेखनशैलींत कल्पनावैचित्र्य, पृथक्करणपद्धति व मनोहारिता दिसून येते. यांशिवाय त्याच्या लेखांतून स्वभावपरिपोष उत्तम प्रकारें झाला असून गूढ मनोविकारांची मांडणी करण्याचा त्याला नाद होता. 'दि स्नो इमेज', 'दि स्कार्लेट लेटर', 'दि हाउस ऑफ सेव्हन गेबल्स', 'दि टॅंगलवुड टेल्स', 'दि ट्रॅन्स्फॉरमेशन', वगैरे त्याच्या कादंबऱ्या आहेत. आजतागाईत होऊन गेलेल्या अमेरिकेंतील अत्यंत श्रेष्ठ अशा कल्पक लेखकांत हार्थॉर्नची गणना करतात.

**हानेमान, डॉ. सॅम्युएल** (१७५५-१८४३)—होमिओपथी या वैद्यकपद्धतीचा संशोधक. जर्मनींत मायसेन ह्या गांवीं याचा जन्म झाला. कौटुंबिक स्थिति गरिबीची होती. धर्म, शास्त्र, तत्त्वज्ञान, इ. च्या क्रांतीच्या काळांत हा जन्मला. हा तैलबुद्धीचा होता. वयाच्या १२ व्या वर्षी त्याला अनेक युरोपियन भाषा अवगत झाल्या. दिवसां शिक्षण व रात्रीं द्रव्यार्जन असा याच्या आयुष्याचा कांहीं काळ गेला. १७७९ मध्यें हा एम्. डी. झाला. वनस्पतिशास्त्र, खनिजशास्त्र, रसायनशास्त्र व मानसशास्त्र ह्यांचा अभ्यास त्यानें उत्कृष्ट केला होता. कांहीं काळ मानसिक रोगांचें एक रुग्णालय याच्या ताब्यांत होतें. त्याचा १७८४ मध्यें 'बद्धमूल व्रणांवरच्या उपचारा'चा एक मौलिक ग्रंथ प्रसिद्ध झाला. १७८६ मध्यें 'सोमल(अर्सेनिक)ची विषबाधा' आणि १७८९ मध्यें 'उपदंशादि विकारांसंबंधीं शस्त्रवैद्यांस सूचना' हीं त्याचीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं. वाचन, लेखन व प्रयोग यांचा जणुं कांहीं एक अखंड यज्ञ त्यानें चालू ठेवला होता. अधिक अभ्यासाकरितां १७९० मध्यें तो लाइपझिगला गेला. तेथें त्यानें वैद्यकशास्त्रांत निरोगी माणसांवर औषधांचे प्रयोग करण्याच्या एका नवीन प्रथेची भर घातली. तिला 'औषधीप्रत्ययन' (ड्रग-प्रूव्हिंग) म्हणतात. १८१० मध्यें 'ऑर्गॅनॉन ऑफ दि रॅशनल आर्ट ऑफ हीलिंग' (रोगनिवारणाचें तर्कशुद्ध तंत्र) हा त्याचा क्रांतिकारक ग्रंथ प्रसिद्ध झाला. सध्यां तो 'ऑर्गॅनॉन ऑफ मेडिसिन' ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. पुढें थोड्याच वर्षांमध्यें त्याच्या 'मटीरिआ मेडिका प्युरा' (औषधि-गुणधर्मशास्त्र) याचे सहा खंड प्रसिद्ध झाले. त्याच्या समचिकित्सापद्धतीस मिळूं लागलेलें अपूर्व यश जुन्या पुरस्कर्त्यांच्या डोळ्यांत सलूं लागलें. त्यांनीं हानेमानच्या विरुद्ध हलकल्लोळ माजविला व लाइपझिगमध्यें वैद्यकीय व्यवसाय करण्याचा त्याचा ह[illegible] आला. त्याचीं पुस्तकें जाळण्यांत आलीं व [illegible] नाश करण्यांत आला. शिवाय त्याचा तऱ्हेतऱ्हेनें अखेर त्याला लाइपझिग सोडावें लागलें. देशोदेशीं हिं[illegible] त्याला फ्रान्समध्यें कोथेन ह्या गांवीं वैद्यकव्यवसाय परवानगी मिळाली. या वेळीं त्याचें वय ६६ वर्षांचें होतें. [illegible] १३।१४ वर्षांच्या त्याच्या वास्तव्यांत कोथेन हें होमिओपाथीचें काशीक्षेत्र बनलें. वयाच्या ७९ व्या वर्षी त्याचा 'क्रॉनिक डिसीझेस' (बद्धमूलरोग) हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. त्याचा उत्साह ह्या वयांतहि तरुणास मान खालीं घालावयास लावणारा होता. १८३५ मध्यें तो पॅरिस शहरीं राहावयास गेला. व नंतरच्या काळांत जगांतील सर्व प्रमुख देशांमध्यें त्याची नवचिकित्सापद्धति पसरली होती. आपण जन्मास आणलेल्या शास्त्राची प्रस्थापना जगभर झालेली पाहण्याचा आनंद त्याला लाभला. वैद्यकशास्त्राप्रमाणें रसायनशास्त्रावरहि त्यानें मौलिक ग्रंथ लिहिले. त्याची बुद्धि अनेक विषयांमध्यें प्रवेश करणारी व प्रखर होती. त्याची स्मृति उत्कृष्ट असून प्रतिपक्षावर मात करण्याची हातोटी दांडगी होती. कोट्या व विनोद करण्यांतहि तो चतुर होता. ल्यूथरप्रमाणें तो धार्मिक क्षेत्रांत सुधारकी मताचा होता. देव व प्रयत्न यांवर त्याचा दृढ विश्वास होता. त्यानें कष्टाची व अवहेलनेची कधीं पर्वा केली नाहीं. शेवटपर्यंत त्याच्या मानसिक शक्ती उत्कृष्ट होत्या.

**हानोई**—टांकिन व फ्रेंच इंडो-चीन यांची राजधानी. सॉंगकोई (तांबडी नदी) हिच्या उजव्या तीरावर, टांकिनच्या आखातांतील तिच्या मुखापासून सुमारें ८० मैलांवर हें शहर आहे. लो. सं. १,३५,०००. या शहरांत रुंद फरसबंदीचे रस्ते, विजेचे दिवे, ड्रेनेज व चांगला पाणीपुरवठा असून हें शहर युरोपियन शहरासारखें दिसतें. सार्वजनिक इमारतींमध्यें, गव्हर्नर-जनरलचा राजवाडा, मोठें लष्करी इस्पितळ, सेंट जोसेफचें कॅथेड्रल, पॉल बर्ट कॉलेज व नाटकगृह हीं आहेत. हें इंडो-चीनच्या राज्यकारभाराचें ठिकाण असून येथें टांकिनचा वरिष्ठ रेसिडेंट व बिशप असतो. कापसाचें सूत काढणें, दारू गाळणें, दारू शुद्ध करणें, व तंबाखू, मातीचीं भांडीं, व आगपेट्या तयार करणें, वगैरे धंदे येथें चालतात; एतद्देशीय लोक खोदीव जडावाचें काम, ब्रॉंझ व नकशीकाम, धातूचें काम, रेशमाचें नकशीकाम, इ. धंदे करतात.

**हॉप**—[वर्ग—मोराशी-ह्युमुलस ह्युपुलस]. हें झाड युरोप व अमेरिका यांमध्यें आढळतें. याचें मूळ बहुवर्षायु असून त्यापासून अनेक वानस्पातिक खरचरीत वेलांसारखे दांडे निघतात. याचीं पानें दुहेरी, मध्यें चीर असलेलीं, मोठीं व वाटोळीं असतात. वांझ नसलेलीं फुलें हिरवीं असतात. याच्या फळांस कॅटकीन म्हणतात. तीं झुबकेदार असून त्यांस बाहेरून लव असते. यांना उपयोग बिअर

HOYSALESVARA TEMPLE, HALEBID. GROUND PLAN
*(with index to its sculptured walls)*

हळेबीड—होयसळेश्वर देवळाचा नकाशा (पृ. २७०१)

मद्यास कडवट सुगंधी स्वाद आणण्याकरितां करतात. याचे कोंवळे कोंब शिजवून खातात. जुन्या खोडांचे दोर चांगले निवतात व त्यांचे दोर वळतात. यांच्या फळांतील कडवटपणा त्यांतील लुपुलिन नांवाच्या कडु द्रव्यापासून उत्पन्न होतो.

**हाफीज** (मृत्यु १३९१)—इराणमधील एक लोकप्रिय फार्सी कवि. हा शिया-पंथी असून मूळचा शिराज येथील राहणारा. याचें खरें नांव शमसुद्दीन महंमद होतें. यानें लिहिलेले गझल अत्यंत लोकप्रिय आहेत. त्या वेळीं हा पाखंडी मताचा समजला जात असे. मुसलमानी धर्माप्रमाणें याच्या मृत्यूनंतर यास पुरण्यासहि त्याचे जातभाई तयार होईनात. शिराज येथील यांचें कबरस्थान 'खाके मुसल्ला' या नांवानें प्रसिद्ध आहे. हिंदुस्थानांत येण्यास हा मुहंमद बहामनीच्या आमंत्रणावरून निघाला होता. परंतु समुद्रांतील अफाट लाटांना भिऊन यानें आपला बेत रद्द केला.

त्याच्या कविता छोटीं भावगीतें म्हणतां येतील. त्यांत सुफी पंथाचें तत्त्वज्ञान दिसून येतें. 'दीवान' या नांवानें त्याचा कवितासंग्रह प्रसिद्ध आहे. त्याचें इंग्रजी भाषांतर १८९१ मध्यें एच्. डब्ल्यू. क्लार्क यानें केलें.

**हॉफ्मान** (१८१८–१८९२)—एक जर्मन रसायनशास्त्रज्ञ. गॉटिंजन येथें त्यानें प्रथम कायदे व भाषाशास्त्र शिकून लाइपझिग येथें रसायनशास्त्र शिकण्यास राहिला. १८४५ त तो लंडन येथील रसायनप्रयोग-शाळेचा डायरेक्टर झाला. याच वेळेस त्यास जर्मनींत बॉन येथें जादा प्रोफेसर म्हणून नेमलें होतें. पुढें परदेशांत राहणें त्यास पसंत न पडून तो १८६४ त स्वदेशीं परत गेला, व बॉन विद्यापीठांत अध्यापक व बर्लिन विद्यापीठांत प्रयोगशाळेचा व्यवस्थापक झाला. त्यानें जातीनें देशाची औद्योगिक उन्नति करण्याकरितां फार श्रम केले. याचा सेंद्रिय रसायनशास्त्रावर फार भर असे. डांबराचें निरीक्षण प्रथम यानें केलें व अनिलीन शोध यानेंच लावला. रोझनिलीनचा शोध १८५८ त त्यानें लावला. त्यापासून निरनिराळे रंग करण्याचे प्रयोग १८८५ पर्यंत चालू होते. हॉफ्मान उत्तम वक्ता होता. बर्लिन शहरांत त्यानें जी जर्मन रासायनिक शास्त्रसंस्था स्थापन केली त्याच संस्थेच्या इमारतींत त्याचा पुतळा आहे व त्याच्या खालीं कृत्रिम नीळ करण्याच्या कृतीचा उल्लेख आहे. त्याला इंग्लिश, फ्रेंच व इटालियन या भाषांचेंहि चांगलें ज्ञान होतें.

**हॉफ्मान, अर्नेस्ट थिओडोर** (१७७६–१८२२)—एक जर्मन लेखक. तो वकील असून त्याला वाद्यस आणि ललितकला यांची आवड होती. त्याने लिहिलेल्या पऱ्यां(पैशरी)च्या कथा फार लोकप्रिय असून त्यांचें इंग्रजींत भाषांतर झालें आहे. त्याच्या कादंबऱ्या व लघुकथाहि आहेत.

**हॉफ्मान, ऑगस्ट हीनरिच्** (१७९८–१८७४)—एक जर्मन कवि. हा ब्रेस्लो विद्यापीठांत प्राध्यापक होता; पण 'अराजकीय गीतें' लिहिल्याबद्दल तो नोकरीला मुकला (१८४२). एक उच्च दर्जाचा राष्ट्रीय कवि म्हणून याला मान आहे.

**हॉब्ज, थॉमस** (१५८८–१६७९)—हा एक शासनशास्त्रीय तत्त्वज्ञानाचा लेखक म्हणून प्रसिद्ध आहे. इंग्लंडांतील प्रख्यात शासनशास्त्रीय लेखकांत हा प्रमुख होता. नीतिशास्त्र, राजनीतिशास्त्र व मानसशास्त्र यांमध्यें त्याचीं मतें पुढील तत्त्वज्ञान्यांस उत्तम मार्गदर्शक झालीं.

बेकन, बेन जॉन्सन व इतर नामांकित विद्वान् यांच्याशीं त्याचा चांगला स्नेह असून कांहीं काळ तो चार्लस राजपुत्र (पुढें दुसरा चार्लस) याचा शिक्षक होता. गणितशास्त्र आणि तत्त्वज्ञान यांचा त्यानें विशेष अभ्यास केला होता. 'लेव्हिआथन' या १६५१ त प्रसिद्ध झालेल्या पुस्तकामुळें त्याची कीर्ति वाढली. देशांत पूर्ण राजसत्ता पाहिजे असें ठाम व सयुक्तिक प्रतिपादणारा हा राजकीय तत्त्वज्ञानाचा ग्रंथ आहे.

**हायलंड्स**—स्कॉटलंडमधील उत्तरेकडील पर्वतमय भागाला हें नांव आहे. दक्षिणेकडील सखल भागाला लोलंड्स म्हणतात. या हायलंड्सचे पश्चिम व उत्तर असे दोन भाग आहेत. पश्चिम भागांत आर्गाइल व ब्यूट, दक्षिण हेब्रिडीज, पर्थ आणि डनबार्टनचा कांहीं भाग या परगण्यांचा समावेश होतो. आणि उत्तर भागांत इन्व्हरनेस, रॉस, सदरलंड, कैथनेस, लेव्हिस, वगैरे परगण्यांचा समावेश होतो. बॅम्फ, मोरे, ॲबर्डीन व किंग कार्डीन यांच्या पर्वतमय प्रदेशाचा समावेशहि हायलंड्समध्यें होतो. येथील लोक केल्टिक भाषा बोलतात. या भागांत भव्य आणि मनोहर नैसर्गिक देखावे आहेत. लोलँड्सपासून हा भाग अगदीं पृथक् असल्यामुळें पूर्वी बराच काळ हा भाग राजकीय बाबतींत स्वतंत्र असे. तसेंच सामाजिक रीतिरिवाजहि भिन्न असून त्यांपैकीं विशिष्ट चालीरीती अद्यापहि त्या लोकांत दिसून येतात. पोशाख व खेळ यांचे प्रकार वेगळे आहेत. ब्रिटिश लष्करांत यांची तुकडी वेगळीच असते; व पोशाखावरून ती ओळखली जाते. गुरांची निपज या भागांत चांगली होते.

**हायोसियामाइन**—हा एक ॲल्कलॉइड्समधील गरलरूप व त्याचेशीं सम आढळणारा एक क्षार आहे. हा धुत्तूरिणी (नाइटशेड), कांटेरी धोतरा व खुरासनी ओवा (हेन्बेन) या वनस्पतींत आढळतो. हा भयंकर विषारी आहे. याचीं लवणें औषधासाठीं वापरतात. हीं पोटांत देतात किंवा अंगांत टोंचून घालतात. या औषधानें डोळ्याचें बुबुळ प्रसरण पावतें आणि याकरितां डॉक्टर त्याचा ॲट्रोपिनप्रमाणें उपयोग करतात.

**हाराकिरी**—आत्महत्येचा हा एक जपानी प्रकार आहे. तेथें सरदार आणि वडे लोक आपली अब्रू बचावण्यासाठीं किंवा गुन्ह्याचें प्रायश्चित्त म्हणून आपलें पोट फाडून आंतडीं बाहेर काढतात. सरकारची या गोष्टीला परवानगी आहे. दरसाल सुमारें १,५०० हाराकिरी कित्येक शतकांपासून 'चालल्या 'आहेत. सक्तीचीं हाराकिरी इ. स. १८६८ पासून बंद झाली. पण खुशीची अव्याहत चालली आहेच. इ. स. १९१२ मध्यें जेव्हां जपानचा मिकॅडो वारला तेव्हां प्रसिद्ध जनरल नोगी यानें याप्रकारें आत्महत्या केली.

**हारून अल् रशिद** (७६३–८०९)—बगदादचा एक खलीफ. बायझान्शियावरची त्याची यशस्वी मोहीम इतिहास-प्रसिद्ध आहे. ह्या खलीफाची प्रसिद्धि 'अरेबियन नाइट्स' या कथासंग्रहामुळें झाली आहे. कारण त्यांत हारुन, त्याची बायको झोबिदे, त्याचा वजीर गायफर आणि त्याचा प्रसिद्ध खोजा मेसरूर हीं मुख्य पात्रें आहेत; व त्याच्या दरबारचें वैभव त्यांत उठून दिसतें. हा खलीफा ८ व्या शतकांत सर्वत्र प्रसिद्ध होता. तो जुलमी दिसतो तथापि चांगला हुशार व सुविद्य होता. साहित्यांतून अतिशय नावाजला गेल्यामुळें त्याचें खरें व्यक्तिमत्त्व झाकोळलें गेलें आहे.

**हार्ग्रीव्हज, जेम्स** (१७२०–१७७८)—एक इंग्रज संशोधक. त्यानें १७६० सालीं कापूस कांतकामा (कार्डिंग)चें यंत्र तयार केलें. नंतर कांहीं वर्षांनीं त्यानें सूत काढण्याचें यंत्र (स्पिनिंग जेनी) बनविलें. त्यामुळें कित्येक चात्या सुतानें एकदम भरता येऊं लागल्या. १८७० सालीं या शोधाचें त्यानें पेटंट मिळविलें, परंतु हें पेटंट पुढें बेकायदेशीर ठरविण्यांत आलें. कारण पेटंट मिळविण्यापूर्वीच हीं कित्येक यंत्रें त्यानें विकलीं होतीं.

**हार्टले, डेव्हिड** (१७०५–१७५७)—एक इंग्रज अध्यात्म-विद्याविशारद. त्यानें आपला 'ऑब्झर्व्हेशन ऑन मॅन' (मानुष-विचार) हा ग्रंथ १७४९ सालीं दोन भागांत प्रसिद्ध केला. या ग्रंथांत त्यानें मज्जातंतुविषयक कंपनें (नर्व्हस व्हायब्रेशन) आणि कल्पनासंगति (ॲसोसिएशन ऑफ आयडियाज्) यांसंबंधींची आपली उपपत्ति सविस्तर वर्णिली आहे.

**हार्डी, जेम्स केअर** (१८५६–१९१५)—एक ब्रिटिश राजकारणी पुरुष व मजूर पक्षाचा पुढारी. त्याला १८८० सालीं लॅनार्कशायर मायनर्स यूनियन या संस्थेचा चिटणीस निवडण्यांत आलें. १८९२ सालीं तो पार्लमेंटचा सभासद झाला. केअर हार्डी हा स्वतंत्र मजूर पक्षाच्या आद्य संस्थापकांपैकीं (१८९३) एक होता. त्याचे मुख्य ग्रंथ—'लेबर पॉलिटिक्स' (मजूर राजकारण), 'इंडिया,' 'आफ्टर ट्वेंटी ईयर्स' (वीस वर्षांनंतर), इ. होत.

**हार्डी, थॉमस** (१८४०–१९२८)—एक इंग्रज कादंबरीकार व कवि. त्यानें आपली पहिली कादंबरी 'डेस्परेट रेमिडीज्' १८७२ सालीं प्रसिद्ध केली, व नंतर अनेक सुप्रसिद्ध कादंबऱ्या लिहिल्या. तो मेल्यावर त्याचें हृदय डॉर्चेस्टर येथें पुरून ठेवण्यांत आलें आणि बाकीचें शरीर जाळून त्याची राख वेस्ट मिन्स्टर ॲबे येथें ठेवण्यांत आली आहे. त्याचे बरेच ग्रंथ लोकप्रिय

आहेत. तो कविहि होता. त्याचा शेवटचा महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे नेपोलियानिक युद्धासंबंधीं नाट्यमय काव्य. त्याच्या पत्नीनें त्याचें चरित्र लिहिलें आहे व १९३१ सालीं डॉर्चेस्टर येथें त्याचा पुतळा बसविला आहे. हार्डी हा वास्तववादी मानसशास्त्रज्ञ होता. त्याच्या आत्यंतिक वास्तववादावर टीका होऊं लागल्यावर तो काव्याकडे वळला. आपल्या गांवाला त्याविषयीं लिहून त्यानें फार प्रसिद्धीस आणलें.

**हॉर्डिंज, लॉर्ड चार्लस** (१८५८–१९४४)—हिंदुस्थानचा एक गव्हर्नर-जनरल. १८८० पासून हा राजकारणांत पडला. १९०३–०६ पर्यंत रशियांत वकील म्हणून होता, व पुढें दुय्यम परराष्ट्रमंत्री होता. हा हिंदुस्थानचा १९१० ते १९१६ पर्यंत असलेला गव्हर्नर-जनरल हेन्री हार्डिंजचा नातू होता. याच्या कारकीर्दींत बादशहा पांचवे जॉर्ज व राणी मेरी हे हिंदुस्थानांत आले. त्यांचा दिल्लीस राज्यारोहणाचा मोठा उत्सव झाला. तेव्हांच बंगालची फाळणी रद्द झाली व राजधानी दिल्लीस नेण्यांत आली. १९१४ त महायुद्ध सुरू झाल्यावर हार्डिंजनें हिंदुस्थानच्या वतीनें युद्धास बरीच मदत दिली. १९२०–२२ पर्यंत फ्रान्समध्यें तो वकील म्हणून होता.

**हार्डिंज, हेन्री** (१७८५–१८५६)—एक ब्रिटिश लढवय्या व मुत्सद्दी. तो डरहॅमतर्फे १८२० सालीं पार्लमेंटचा सभासद झाला, आणि त्याला सेक्रेटरी-ॲट-वॉर, सेक्रेटरी फॉर आयर्लंड, आणि १८४४ सालीं लॉर्ड एलेनबरोनंतर हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल नेमण्यांत आलें. हिंदुस्थानांत शीख लोकांबरोबर युद्ध करणें भाग पडल्यामुळें त्यानें त्या युद्धांत स्वतः भाग घेतला, आणि मुडकी, फेरोजशहा व सोब्राओन येथें शीखांचा पराभव करून लाहोर येथें शीखांना तह करणें भाग पाडलें. १८५२ सालीं वेलिंग्टन मरण पावल्यावर तो मुख्य सेनापति झाला.

**हॉर्निमन, बेंजामिन गाय** (१८७३–१९४८)—हिंदुस्थानांतील एक युरोपियन वृत्तपत्रकार. यांचें शिक्षण प्रथम यांच्या मातोश्रीच्या हाताखालीं झालें, त्या वेळीं त्यांनीं यांस अनेक भाषा, गणित व संगीत शिकविलें. पुढें यांचें सैनिकी शिक्षणहि झालें. १८९४ मध्यें यांनीं 'सदर्न डेली मेल' या पत्राचे वार्ताहर म्हणून पोर्टस्मथ येथें काम करण्यास सुरुवात केली. पुढें १८९७ मध्यें त्या पत्राचे संपादक झाले. १९०० मध्यें लंडनमधील 'मॉर्निंग लीडर' या वर्तमानपत्राचे दुय्यम संपादक म्हणून राहिले. नंतर लंडन येथील 'डेली एक्स्प्रेस', 'डेली क्रॉनिकल' व 'मँचेस्टर गार्डियन' या पत्रांचें त्यांनीं संपादकीय काम केलें.

१९०६ मध्यें ते कलकत्ता येथील 'स्टेट्समन' पत्राचे दुय्यम संपादक व वार्तासंपादक म्हणून हिंदुस्थानांत आले व पूर्व बंगालमध्यें (कोमिल्ला व मैमनसिंग येथें) झालेल्या हिंदु-मुसलमानांच्या दंग्यासंबंधीं चौकशीबद्दल लेख लिहून, त्यांत सरकारी अमलदार जातीय पक्षपात करतात व तेच दंग्यास जबाबदार असतात, अशी टीका केल्यामुळें ते सर्व बंगालमध्यें एकदम प्रसिद्धीस आले. सर फेरोजशाह मेथा यांनीं आमंत्रण केल्यावरून १९१३ च्या जानेवारी मध्यें जें मुंबईस 'बाँबे क्रॉनिकल' हें वर्तमानपत्र स्थापन करण्याकरितां आलें त्याचे संपादक झाले. एप्रिल १९१९ पर्यंत त्यांनीं हें पत्र चालविलें. त्या वेळीं लॉर्ड लॉइड हे गव्हर्नर असतां त्यांस डिफेन्स ऑफ इंडिया कायद्यान्वयें एकदम हद्दपार करण्यांत आलें. पुढें १७ जानेवारी १९२६ रोजीं ते पुन्हां मुंबईस येऊन लागलीच त्यांनीं 'बाँबे क्रॉनिकल'चें संपादकत्व पत्करलें, परंतु मार्च १९२६ मध्यें राजीनामा दिला. ते मुंबई कॉर्पोरेशनमध्यें निवडून आले. ऑक्टोबर १९२६ मध्यें त्यांनीं 'इंडियन नॅशनल हेरल्ड' नांवाचें नवीन दैनिक सुरू केलें. १९३० मध्यें 'वीकली हेरल्ड' हें पत्र काढलें व तें पहिल्या सत्याग्रहाच्या चळवळींत मोठ्या जोमानें चालविलें व प्रत्येक आठवड्यास सरकारनें चालविलेल्या दडपशाहीवर त्यांचे जोरदार टीकात्मक लेख त्यांत येत असत. जुलै १९३१ ते ऑक्टोबर १९३१ पर्यंत ते लाहोर येथील 'डेली हेरल्ड' या पत्राचे संपादक म्हणून गेले. १९३२ च्या जानेवारींत मुंबईस परत येऊन पुन्हां 'बाँबे क्रॉनिकल'चे ते संपादक झाले. पण १९३३ च्या डिसेंबर महिन्यांत यांनीं राजीनामा दिला व सत्याग्रहाची चळवळ अयशस्वी झाल्यामुळें ती सोडून देण्याचा उपदेश चालविला व लागलीच एम्. एन्. कामा यांनीं स्थापन केलेल्या बाँबे असोसिएटेड न्यूज-पेपर कंपनी, लि.-मार्फत निघणाऱ्या 'दि बाँबे सेंटिनेल' या पत्राचे संपादक झाले. हें पत्र त्यांतील स्पष्ट व सडेतोड लेख, आतल्या व परकीय राजकारणावरील सूचक टीका यांमुळें फार प्रसिद्ध व लोकप्रिय होतें.

अमृतसर दंगलीबद्दल यांनीं दोन ग्रंथ व इतर अनेक पत्रकें लिहिलीं आहेत.

**हार्प**—हें एक तंतुवाद्य आहे. हें फार प्राचीन काळापासून प्रचारांत आहे. हें असुरी, ईजिप्ती, हीब्रू, ग्रीक, आयरिश, वेल्स, वगैरे लोकांमध्यें प्रचलित होतें. याचे प्रकारहि अनेक होते. अलीकडे हें वाद्य सर्वपरिचित आहे. हें त्रिकोणी असून याच्या तारा वरच्या बाजूपासून निघून एका बाजूला जोडलेल्या असतात. हें उभें ठेवून दोन्ही हातांच्या बोटांनीं वाजविण्यांत येतें. १८१० मध्यें सेबास्टिअन एरार्ड यानें एका असल्या वाद्याचें पेटंट घेतलें. त्यांत ४३ तारा असतात. यांतील प्रत्येक आठव्या तारेंत तोच स्वर निराळ्या सप्तकांतील असतो.

**हार्मोनियम**—(बाजाची पेटी). हें एक वायुवाद्य आहे. यामध्यें विशिष्ट धातूच्या पट्यांतून हवा दाबून सोडली म्हणजे पाहिजे ते स्वर काढतां येतात. यामध्यें पायांनीं किंवा हातांनीं भाता दाबून विशिष्ट धातूच्या जिभांतून किंवा पट्यांतून हवा सोडतां येते आणि त्या कंप पावल्या म्हणजे इष्ट ते स्वर निघतात. या पट्या एका बाजूस पक्क्या व एका बाजूस मोकळ्या असतात. त्यामुळें कंप पावूं शकतात. तसेंच त्या एका पोकळ पेटीस जोडलेल्या असल्यामुळें स्वरभरणा होतो. या वाद्यास पट्यांची रांग असते; तींतील कोणतीहि एक पट्टी दाबली म्हणजे एक विशिष्ट पडदा उघडतो आणि हवा भात्यांतून पेटींत शिरते आणि विशिष्ट धातूची पट्टी कंप पावूं लागते. या वाद्यास कांहीं किल्ल्या असतात. त्यामुळें वादकास भात्यांतून बाहेर पडणाऱ्या हवेस विशिष्ट भागांत घालवितां येते व त्याप्रमाणें विशिष्ट प्रकारचे स्वर निघूं शकतात.

**हार्वर्ड युनिव्हर्सिटी**—ही अमेरिकन संयुक्त संस्थानांतील सर्वांत जुनी युनिव्हर्सिटी मॅसाच्युसेट्स संस्थानांत केंब्रिज येथें आहे. या संस्थेचा आरंभ १६३६ सालीं मॅसाच्युसेट्सच्या जनरल कोर्टानें ४०० पौंड मदत देऊन केला. पुढें १६३८ सालीं रेव्हरंड जॉन हार्वर्ड यानें आपल्या मिळकतीपैकीं निम्मी मिळकत आणि आपला सर्व ग्रंथसंग्रह या संस्थेला दिला. त्यामुळें लगेच कॉलेज सुरू झालें. आणि त्याला या देणगी देणाराचें नांव देण्यांत आलें. या कॉलेजांतून पहिले पदवीधर १६४२ सालीं बाहेर पडले. येथें कॉलेजच्या २५ इमारती असून त्यांत युनिव्हर्सिटी हॉल, हार्वर्ड हॉल, वगैरे अनेक हॉल आहेत. येथल्या लायब्ररींत २० लक्षांहून अधिक ग्रंथ आहेत. अध्यापक-वर्ग सुमारें २,००० असून विद्यार्थी ७,००० वर आहेत.

**हार्वे, विल्यम** (१५७८–१६५७)—एक इंग्रज वैद्यकशास्त्रज्ञ. त्यानें आपलीं रक्ताभिसरणाबद्दलचीं मतें एक ग्रंथ लिहून जगापुढें मांडलीं. १६२३ सालीं त्याला पहिल्या जेम्स राजानें

राजवैद्य नेमिलें व नंतर १६३२ सालीं पहिल्या चार्लस राजानें त्याला राजवैद्य नेमिलें. त्याचा दुसरा महत्त्वाचा ग्रंथ प्राण्यांच्या उत्पत्तीबद्दलचा आहे.

**हॉर्सले, सर व्हिक्टर अलेक्झांडर हेडन** (१८५७–१९१६)—एक ब्रिटिश शस्त्रवैद्य व मज्जातंतुशास्त्रज्ञ. पहिल्या महायुद्धाच्या वेळीं तो मेसॉपोटेमियांत १९१६ सालीं गेला, व त्यानें ब्रिटिश सैन्याला वैद्यकीय मदत दिली. अल्कोहलविरुद्ध जी चळवळ झाली तींत तो एक पुढारी होता. त्यानें मेंदूची शस्त्रक्रिया, जलसंत्रास (हायड्रोफोबिया), अल्कोहल यावर व इतर पुष्कळ ग्रंथ लिहिले आहेत.

**हाल**—एक आंध्र राजा. प्राचीन महाराष्ट्रीय भाषेंत लिहिलेलें 'गाथासप्तशती' नांवाचें एक महत्त्वाचें पुस्तक याच्या नांवावर प्रसिद्ध आहे. परंतु तें एखाद्या कवीनें याला अर्पण केलेलें असावें असें वाटतें. हा इ. स. च्या पहिल्या शतकाच्या अखेरीस होऊन गेलेला दिसतो.

**हाल, ग्रॅन्व्हिल स्टॅन्ले** (१८४५–१९२४)—एक अमेरिकन शिक्षणतज्ज्ञ व मानसशास्त्रज्ञ. हा अनेक विद्यापीठांतून मानसशास्त्राचा प्राध्यापक होता व अध्यापनक्षेत्रांत त्याला फार मान असे. नवमानसशास्त्राचे धडे देण्याची त्याची विशिष्ट पद्धति असे. बालसंवर्धनाच्या बाबतींतहि तो तज्ज्ञ समजला जाई. 'इतिहासाध्यापनाची पद्धति', 'बालमनांतील गोष्टी', 'शैक्षणिक प्रश्न', 'अर्वाचीन मानसशास्त्राचे संस्थापक', इत्यादि त्याचीं पुस्तकें आहेत.

**हॉलंड**—नेदर्लॅंड्सचा एक विभाग. त्याच्याप्रमाणेंच हॉलंड याचाहि अर्थ 'सखल प्रदेश' असा आहे. १५ व्या शतकांत पांचवा चार्लस याच्या साम्राज्यांत बर्गंडीच्या ड्यूचा हा एक भाग होता. पुढें हॉलंडनें बंड करून स्वातंत्र्य प्राप्त करून घेतलें व डच लोकराज्याची स्थापना झाली. उत्तर हॉलंड, यांत ॲमस्टरडॅम शहर आहे व दक्षिण हॉलंड यांत हेग हें मुख्य ठिकाण आहे. हालंडच्या पूर्वेस जर्मनी, दक्षिणेस बेल्जिअम व उत्तरेस आणि पश्चिमेस समुद्र (नॉर्थ सी) आहे. जमीन बहुतेक सखल असून समुद्राच्या पाण्यास प्रतिबंध करण्याकरितां धक्के (डाइक्स) बांधण्यांत आले आहेत. कांहीं नद्या आहेत, त्यांचे कालवे काढून पाणी सगळीकडे खेळवलें आहे. क्षेत्रफळ १२,७६१ चौ. मै. पैकीं सुमारें अर्धा भाग समुद्रसपाटीहून सखल आहे व म्हणूनच वरील 'डाइक्स' ची योजना करावी लागली. वीरिंजेन बेटापासून पूर्व किनाऱ्यापावेतों १७½ मैल लांबीचें धरण आहे.

धान्यें, साखरेचें बीट, बटाटे, दूधदुभतें, फुलें, वगैरे शेतकीचें उत्पन्न आहे. कापड, रसायनें, चिनी भांडीं, जहाजें बांधणें, दारू करणें, वगैरेंचे कारखाने आहेत. मच्छीमारी हा प्रमुख धंदा आहे. दोन विद्यापीठें ॲमस्टरडॅम येथें आहेत. लो. सं. ८० लक्ष आहे. लोक मानववंशाच्या ट्यूटॉनिक शाखेंतील आहेत व पुष्कळ बाबतींत त्यांचें जर्मन लोकांशीं साम्य आहे. लोक धार्मिक बुद्धीचे असून देशांत पूर्ण धर्म-स्वातंत्र्य आहे. लोकसंख्येंतील ⅗ प्रॉटेस्टंट आहेत व उरलेले बहुतेक रोमन कॅथॉलिक आहेत.

प्रथम या भागांत जर्मानिक जातीचे लोक वस्ती करून होते. त्यांच्यावर इ. स. ४०० पर्यंत रोमन लोकांचें वर्चस्व होतें. नंतर दक्षिण भाग फ्रँक लोकांनीं जिंकून घेतला. ८ व्या शतकानंतर जर्मनीनें हा प्रदेश ताब्यांत घेऊन त्याचीं लहान लहान सरंजामी राज्यें केलीं. हीं सर्व पुढें १३८४ ते १४४३ पर्यंत बर्गंडीच्या ड्यूकांच्या सार्वभौमत्वाखालीं होतीं. १४७७ सालीं ऑस्ट्रियानें नेदर्लॅंड्स घेऊन पुढें १५१६ त स्पेनला जोडला. नंतर १६४८ त डचांनीं विल्यम (ऑरेंजचा) याच्या नेतृत्वाखालीं स्पेनशीं लढा करून स्वातंत्र्य मिळविलें. १७९४–९६ मध्यें फ्रेंचांनीं नेदर्लॅंड्स जिंकून घेतलें. पण १८१३ सालीं फ्रेंचांना हांकलून देऊन फ्रान्सला प्रतिरोध करण्यासाठीं नेदर्लॅंडचें राज्य स्थापन झालें. त्यातून १८३१ मध्यें बेल्जिअम स्वतंत्र होऊन निघालें (नेदर्लॅंड पाहा). यानंतर युरोपियन राजकारणात हॉलंडला महत्त्व राहिलें नाहीं. मागील महायुद्धांत तें तटस्थ होतें.

सर्व देश कृषिप्रधान आहे. जनावरें पाळणें, बागबगीचे वाढवणें, वगैरे उद्योग शेतीबरोबरच करतात. तागाचें व कापसाचें कापड होतें. जहाजें बांधलीं जातात. ॲमस्टरडॅम येथें हिऱ्यास पैलू पाडण्याचें काम उत्कृष्ट होतें. त्या कामाचें तें एक प्रसिद्ध केंद्र आहे. ईस्ट व वेस्ट इंडीजमध्यें डच लोकांच्या पुष्कळ वसाहती आहेत. पण आतां कांहीं स्वतंत्र झाल्या आहेत. हिंदुस्थानांतहि डच लोकांच्या साम्राज्यांत मोडणारा कांहीं प्रदेश आहे.

हॉलंडची लोकभाषा डच आहे. हिचा 'लो जर्मन'शीं जवळचा संबंध असून अनेक बोली निर्माण झाल्या आहेत. फ्लेमिश भाषा डच भाषेसारखीच आहे. (फ्लेमिश भाषा व वाङ्मय पाहा).

**वाङ्मय**—सर्वांत जुनें डच वाङ्मय म्हणजे अर्थरियन दंतकथा, रोलंड-गीतें व फ्रेंच अद्‌भुतकथा होत. यांचा काळ १३ व्या शतकाचा प्रारंभ हा येईल. 'रेनार्ड दि फॉक्स' (१२५०) हा पहिला ग्रंथ म्हणतां येईल. नंतर 'जुना करार' याचें भाषांतर व जीझसचें चरित्र हे ग्रंथ धर्मसुधारणाकालापूर्वी निघून त्यांचा डच वाङ्मयावर फार परिणाम झाला. १६ व्या शतकांत स्पेनशीं लढा सुरू असतांना अनेक युद्धगीतें व स्वातंत्र्यस्तोत्रें रचिलीं गेलीं. १७ व्या शतकांत काव्य आणि नाट्य या वाङ्मयप्रकारांची चांगली निर्मिति होऊन पुढील शतकांत फ्रेंच वाङ्मयांतील राष्ट्रीय वैशिष्ट्याचा कांहीं अंश त्यांत उतरल्याशिवाय राहिला नाहीं. १९ व्या शतकांतील प्रमुख डच लेखक म्हणजे लेनेप, डेकर व माआर्टीन्स हे कादंबरीकार;

हासिव्रोएक हा निबंधकार; जेनेस्टेट, डा कॉस्टा व टेनकेट हे कवी; व टेनब्रिंक हा टीकाकार हे सांगतां येतील.

**हॉलबर्ग, लुडविग बॅरन** (१६८४–१७५४)—एक नॉर्वेजियन–डॅनिश कादंबरीकार, कवि, नाटककार आणि इतिहासकार. त्याचे ग्रंथ चार प्रकारचे आहेत: कविता, नाटकें, तत्त्वज्ञानविषयक निबंध आणि ऐतिहासिक ग्रंथ. त्याच्या कविता उपरोधात्मक स्वरूपाच्या आहेत. त्यांपैकीं फार प्रसिद्ध काव्य 'पेडेर पार्स' हें आहे. तें एक विनोदी वीररसात्मक काव्य आहे. तसेंच त्याचा 'निकोलस क्लिम्स सप्टरेनियस ट्रॅव्हल्स' हा गद्यग्रंथ उपरोधिक अद्‌भुतरसात्मक आहे. त्याच्या तत्त्वज्ञानविषयक लिखाणापैकीं सर्वांत महत्त्वाचा ग्रंथ 'नैतिक विचारा' चा होय. त्याच्या ऐतिहासिक ग्रंथांत डॅनिश राजसत्तेचा सर्वांगीण इतिहास व प्रसिद्ध व्यक्तींचीं चरित्रें येतात. हॉलबर्गनें डॅनिश भाषा वाङ्मयीन केली व पुढील दोन शतकें त्याची छाप टिकून होती.

**हॉली**—[ वर्ग–ॲक्विफोलिआसी ]. इलेक्स ही एक वनस्पतींची जाति आहे. तींत कांहीं झाडें व कांहीं झुडपें असतात. सामान्यतः आढळणारें हॉलिया नांवाचें झाड (आय. ॲक्विफोलियम) हें ब्रिटन व युरोप यांमध्यें होतें. हें झाड दिसावयास सुंदर असून याचीं पानें नेहमीं हिरवीगार असतात व याचा आकार वरती निमुळता होत गेलेला असतो. याची उंची २० ते ३० फूट असते. याचीं पानें काळसर हिरव्या रंगाचीं गुळगुळीत चामड्यासारखीं असतात. या झाडाच्या खालच्या खांद्यांस काटे असतात पण वरच्या खांद्यांस किंवा जुन्या झाडांस बहुतेक काटे नसतात. या झाडांस मे महिन्यांत पांढरीं फुलें येतात. फळें तांबडीं असून तीं सप्टेंबरमध्यें पिकतात व तीं सर्व हिंवाळाभर झाडांवर असतात. याचें लांकूड कठिण व पांढरें असतें आणि त्याचा उपयोग चाकूच्या मुठी वगैरे करण्याच्या कामीं किंवा कांतकामांत होतो. अमेरिकेंत हीं झाडें ८० फूट उंच व ४ फूट व्यासाचीं आढळतात. पाराग्वे देशांतील चहाचें झाड (येरबामाटे) हें या जातीचें आहे.

**हॉल्डेन, रिचर्ड बुर्डोन** (१८५६–१९२८)—एक ब्रिटिश तत्त्वज्ञानविषयक लेखक आणि राजकारणी. तो १८८५ सालीं हॅडिंग्टनशायरतर्फे पार्लमेंटचा लिबरल पक्षीय सभासद झाला आणि त्याच मतदार संघातर्फे १९११ पर्यंत तो पार्लमेंटचा सभासद होता. १८९० सालीं त्याला क्वीन्स कौन्सेल व १९०२ सालीं प्रिव्हि कौन्सिलर नेमण्यांत आलें. आणि १९११ सालीं त्याला उमराव करण्यांत आलें. १९०५ ते १९११ पर्यंत तो युद्धखात्याचा चिटणीस होता. आणि त्या वेळीं त्यानें लष्कराची पुनर्घटना करण्याची आपली नवी योजना अमलांत आणली. १९१२ ते १५ पर्यंत तो ग्रेट ब्रिटनचा लॉर्ड हाय चॅन्सेलर होता. हाच हुद्दा त्याला पुन्हां १९२४ मध्यें मिळाला. पहिल्या महायुद्धानंतर तो मजूर पक्षाला मिळाला व उमरावसभागृहांत त्या पक्षाचा पुढारी बनला. राजकारणाखेरीज त्याचा ओढा साहित्याकडे असे. तो १९०२ ते १९०४ पर्यंत सेंट अँड्र्यूज युनिव्हर्सिटींत गिफोर्ड लेक्चरर होता. त्यानें 'ॲडॅम स्मिथचें चरित्र', 'साम्राज्य आणि शिक्षण'; 'वास्तवाची मळलेली वाट', 'मानव्यानें तत्त्वज्ञान,' वगैरे ग्रंथ लिहिले आहेत. त्याच्या मृत्यूनंतर त्याचें आत्मचरित्र प्रसिद्ध झालें.



**हॉल्बीन, हॅन्स** (१४९७–१५४३)—एक जर्मन चित्रकार. त्यानें या कलेचें शिक्षण आपल्या बापाजवळ घेतलें व बेसल येथें तो स्थायिक झाला. नंतर तो इंग्लंडला गेला. व तेथें त्यानें पुष्कळ व्यक्ति-चित्रें काढलीं; त्यांत मूर आणि त्याचे मित्र यांचीं चित्रें मुख्यतः आहेत. १५२८ सालीं तो बेसलला परत आला. पण पुन्हां १५३१ सालीं इंग्लंडांत परत जाऊन तेथेंच कायम राहिला. आठव्या हेन्रीनें त्याला आपल्या दरबारचा चित्रकार नेमिलें. आणि त्यानें तत्कालीन सर्व थोर इंग्रजांचीं चित्रें काढलीं आहेत. त्याच्या सर्वोत्कृष्ट चित्रांमध्यें डार्मस्टॅड आणि सोलोथर्न येथील मॅडोना व मृत्यूचा नाच हीं आहेत.

**हावर**—'ल हाव्र' हें बंदर फ्रान्समधील सीन इन्फेरिअर प्रांतांत सीन नदीच्या एका शाखेच्या उत्तर कांठावर वसलेलें आहे. हें बंदर फार सुरेख असून तेथें २४ हजार टनी बोटी येऊं शकतात. येथें साखर, दारू, जहाजें बांधणें, वगैरे उद्योगधंदे आहेत. तथापि हावर याला महत्त्व प्राप्त झालें आहे तें फ्रान्समधील मार्सेयेच्या खालोखाल येथून फार मोठा व्यापार चालतो त्यामुळें होय. व तो विशेषतः ब्रिटन, जर्मनी आणि अमेरिका या देशांबरोबर चालतो. हें बंदर १६ व्या शतकापासून महत्त्व पावलेलें आहे. लोकसंख्या १,६५,०७६ आहे.

**हॉवर्ड, जॉन** (१७२६–१७९०)—एक इंग्रज भूतदयावादी. त्यानें १७७३ सालीं कैदखान्यांची व्यवस्था व तेथील तक्रारी या बाबतींत सुधारणा करण्याकरितां उपाययोजना करण्याकडे लक्ष दिलें, व त्यानें जी माहिती मिळविली तीसंबंधीं १७७७ सालीं त्या माहितीचें पुस्तक प्रसिद्ध केलें. त्यानें युरोपांतील संसर्गजन्य रोग्यांच्या इस्पितळांतल्या माहितीचेंहि एक पुस्तक प्रसिद्ध केलें. व त्यांत युरोपमधील व ब्रिटनमधील तुरुंग व दवाखाने यांसंबंधीं महत्त्वाच्या टीपा दिल्या आहेत.

**हावेरी**—मुंबई, धारवाड जिल्हा, करजगी तालुका, एक गांव. लो. सं. ११,३९९. येथें कापूस व वेलदोडे यांचा विशेष व्यापार चालतो. या शहरीं चार देवळें व एक मठ आहे.

**हास्यनाटक**—(कॉमेडि). सुखान्तिका. हा एक नाट्याचा प्रकार असून त्यांतील विषय सामान्य स्वरूपाचा आणि मनोरंजक

असतो व या नाटकाचा बहुतेक शेवट सुखान्त केलेला असतो. या नाट्यप्रकाराचा दुःखान्त नाट्यप्रकाराशीं विरुद्ध भाव दाखविण्यांत येत असून सामान्यतः नाट्याचे हे दोन महत्त्वाचे व परस्परविरुद्ध प्रकार मानण्यांत येतात. परंतु सुखान्त नाटक आणि प्रहसन यांमध्येंहि वास्तविक फरक करण्यांत आला पाहिजे. प्रहसन हा एक सुखान्त नाटकाचाच प्रकार असतो पण त्यामध्यें नाटकांतील उद्दिष्ट योग्य प्रकारें मांडण्यांत आलेलें नसतें. सामान्यतः प्रहसनामध्यें जें उद्दिष्ट अथवा तात्पर्य पुढें ठेवण्यांत आलेलें असतें तें वास्तविक श्रोत्यांस सर्वस्वीं मान्यच किंवा पूर्णसंमतच असतें. परंतु तें स्वभावतःच असंभाव्य किंवा अशक्य असें असतें. याखेरीज नक्कल (चर्लेस्क) म्हणून एक नाट्याचा प्रकार निराळा मानतां येईल. यामध्यें केवळ विडंबन केलेलें असतें. प्रत्यक्ष पाहूं जातां कांहीं नाट्यप्रकारास सुखान्त किंवा प्रहसन या दोन्ही प्रकारांत निश्चित स्थान देणें कठिण असतें व तें या दोहोंच्या दरम्यान कोठें तरी वसतें असें आढळून येतें. (नाटकें, प्रहसन पाहा).

**हास्यवायु**—(लाफिंग गॅस). हा वायु म्हणजे नत्रसप्राणिद (नायट्रस ऑक्साइड) किंवा नत्र-एक-प्राणिद (नायट्रोजन मोनाक्साइड) हा होय. हा श्वासाबरोबर आंत घेतल्यास हास्याच्या उकळ्या येऊं लागतात. यावरून त्यास हास्यवायु असें म्हणतात. हा वायु निरंग असून त्याला गोड असा वास येतो. हा अम्रनत्रित (अमोनियम नायट्रेट) उष्ण केलें असतां मिळूं शकतो. नत्रप्राणिद हा वायु जेव्हां दंतवैद्य बेशुद्धीकरितां वापरतात तेव्हां त्यांत क्वचित् प्राणवायूचें मिश्रण करतात.

**हाळेपाईक**—हे लोक मुंबई इलाख्यांत फक्त कानडा जिल्ह्यांत आहेत. लो. सं. (१९११) ४८,४९३. ब्रिटिश सत्तेच्या आरंभीं हे लोक कोमारपाइकांप्रमाणें लुटारू म्हणून प्रसिद्ध होते. हे आतां ताडी काढण्याचा धंदा करतात. दंतकथांवरून व त्यांच्या स्वामीच्या वसतिस्थानावरून ते विजयानगरच्या राजांचे नोकर असावेत. यांच्या कांहीं चालीरीतींवरून हे मूळचे द्रविड लोकांपैकीं असावेत असा अंदाज आहे. यांचा परंपरागत धंदा ताडी काढण्याचा आहे. तरं कांहीं शेतकरी, पाथरवट, सुतार, कारागीर व व्यापारीहि आहेत. मद्रास इलाख्यांतहि सुमारें सहा हजार हाळेपाईक आढळतात.

**हिक्स, सर सेमूर (१८७१–१९४९)**—एक ब्रिटिश नट. १६ व्या वर्षी यानें नटाचा धंदा पत्करून प्रसिद्ध विनोदी नट म्हणून कीर्ति मिळविली. यानें ६४ नाटकेंहि लिहिलीं आहेत. अलीकडे तो सिनेमांत कामें करीत असे पण तो पेशा त्याला साजेसा नव्हता व त्याच्या लौकिकाला कमीपणा आणणारा होता. रेडिओवरहि त्याचीं कामें होत. व्हिक्टोरियन काळांतील एक जुना नट म्हणून त्याला मोठा मान असे.

**हिंग**—हा एक झाडाचा चीक असतो. याला अतिशय उग्र वास येतो व तो कडू असतो. हा हिंदुस्थान व इराण या देशांत होतो. याच्या झाडाच्या मुळ्यांस खांचा पाडून ठेवतात व त्यांमध्यें जमलेला चीक वाळविला म्हणजे हिंग तयार होतो. याचा रंग तांबडा, गुलाबी किंवा पांढरा असतो. याचा दमा वगैरेकरितां व पाचक म्हणून औषधांतहि उपयोग करण्यांत येतो. आपल्याकडे स्वयंपाकांत फार वापरतात. कांहीं ठिकाणीं याचा लांकूड कमावण्याकरितां उपयोग करण्यांत येतो. अर्धशिशीवर हिंगाचें पाणी नाकांत घालतात. अफूवर उतारा म्हणून हिंग पाण्यांत किंवा ताकांत कालवून तें पाजतात. अजीर्णावर थोडा तुपाशीं खातात.

**हिंगणघाट**—मध्यप्रांतांत वर्धा जिल्ह्यांत ही तहशील आहे. क्षे. फ. ७२९ चौ. मै. व लो. सं. सुमारें दीड लाख. ह्या तहशिलींत हिंगणघाट शहर व २९४ गांवें आहेत. ह्या ठिकाणीं गहूं, तीळ, वगैरे धान्यें व कापूस हे जिन्नस पिकतात. ह्या तहशिलींत हिंगणघाटी कापूस उत्तम प्रकारचा होतो व शें. ९० एकर जमीन लागवडीस आलेली आहे. शहर वुन्नर नदीवर असून ह्या शहरास जाण्यास वर्धा स्टेशनपासून वरोरा गांवीं जाण्यास जो आगगाडीचा फांटा आहे त्यानें जावें लागतें. येथील लो. सं. सुमारें २५,००० आहे. पूर्वीचें जुनें शहर अव्यवस्थित रीतीनें वसलें होतें. व त्याला वुन्नर नदीच्या पुराची फार भीति होती. पण हल्लींचें शहर त्या नदीपासून एका मैलावर वसलेलें आहे. हें शहर कापसाच्या व्यापाराकरितां प्रसिद्ध आहे. ह्या ठिकाणीं हायस्कूल व दवाखाना आहे. येथें १८६७ सालीं म्युनिसिपालिटी स्थापन झाली.

**हिंगण बेट**—एक मुलींचा खेळ. दोन मुलींनीं एकमेकींसमोर पावलांस पावलें लावून बसावें व एकमेकींचे हात घट्ट धरावे. नंतर एकीनें दुसरीस आपल्याकडे ओढावें. दुसरीनेंहि तसेंच करावें. याप्रमाणें दोघी डुलत ' हिंगण बेटकं। दह्याचं लोटकं ॥ ' असें तोंडानें गाणें म्हणतात.

**हिंगणबेट**—हिंगण, हिंगणी. हें कांटेरी झाड बरेंच उंच वाढतें. याचीं फळें दुष्काळांत खातात. फळ कोरून त्यांत दारू भरून उडवितात. हें औषधी आहे. तोंडावरच्या मुरमाच्या पुळ्यांवर मगज उगाळून लावतात. नेत्रस्रावावर अंजन करतात. खोकल्यावर मगजाची गोळी घेतात.

**हिंगाष्टक चूर्ण**—एक आयुर्वेदीय औषध. हिंग, सुंठ, मिरें, पिंपळी, जिरें, शहाजिरें, अजमोदा व सैंधव हीं आठ औषधें यांत असतात. तीं समभाग घेऊन चूर्ण करतात. हें अतिशय रुचकर आहे. पोटांत वात धरणें, भूक न लागणें, तोंडाला चव नसणें, पोटांत गुबारा धरणें, शौचाला साफ न होणें, ढेकरा येणें, इत्यादि विकारांवर हें रामबाण आहे. ३ ते ६ मासे तूप, गरम पाणी, लिंबाचा रस किंवा ताक यावरोबर घेतात.

**हिंगूळ**—(सीनाबार). एक धातु. रक्तपारद. हा पाऱ्याचें गंधकिद (मर्क्यूरी सल्फाइट) होय. याच्या खड्याच्या कण्यांतून केव्हां केव्हां पारा आढळतो. याचें विशिष्ट गुरुत्व ८.०९ इतकें मोठें आहे. कार्निओलामध्यें इड्रिया येथें व स्पेनमध्यें आल्मेडन येथें याच्या खाणी आहेत व त्या फार प्राचीन काळापासून चालू आहेत.

**हिंग्लज**—बलुचिस्तानांत हें यात्रेचें प्रसिद्ध ठिकाण आहे. हिंगोल नदीच्या तीरावर हें आहे. या ठिकाणच्या मूर्तीला मुसलमान लोक बीबी नानी म्हणून व हिंदु लोक कालीमाता किंवा पार्वतीमाता समजून भजतात. हिंग्लज देवीची भक्ति हिंदुस्थानांत सर्वत्र दिसून येते. चेऊल येथेंहि या देवीचें एक स्थान आहे. पश्चिम हिंदुस्थानांत बऱ्याच जातींची ही कुलदेवता आहे.

**हिजरी सन**—हिजरी याचा अर्थ पळणें असा होतो. महंमद पैगंबर हा ता. १५ जुलै, सन ६२२ (शुक्रवार), विक्रम संवत् ६७९, श्रावण शुद्ध २, या दिवशीं रात्रीं मक्केहून मदिनेस पळून गेला त्या क्षणापासून या सनाचा आरंभ धरला आहे. या सनांत मोहरम वगैरे महिने येतात व यांतील वर्षाचे दिवस ३५४ किंवा ३५५ येतात. मात्र या सनांत अधिक मास नाहीं. महिन्याची सुरुवात शुक्र प्रतिपदा किंवा द्वितीया या तिथीस चंद्रदर्शन झालें म्हणजे होतें. दिवस किंवा तारखा यांना 'चंद्र' (छ) असें म्हणतात. जसें पहिला दिवस म्हणजे पहिला चंद्र, दुसरा दिवस म्हणजे दुसरा चंद्र, याप्रमाणें. महिना २९ किंवा ३० दिवसांचा म्हणजे चंद्रांचा होतो. सूर्य मावळण्याच्या वेळेपासून दिवसाचा किंवा तारखेचा आरंभ धरतात. या सनाप्रमाणें वर्षाचे दिवस ३५४ किंवा ३५५ येत असल्यानें दर ३२ किंवा ३३ सौर वर्षांत या सनाच्या वर्षाचा अंक कोणत्याहि सौर कालाच्या वर्षांच्या अंकापेक्षां १ नें वाढलेला असतो. अरबस्तानांतील हा सन मुसलमानी अमलामुळें आपणांकडे आला.

**हिजेज**—हा राग भैरव थाटाचा जन्य आहे. याचे आरोहावरोह सात स्वरांनीं होतात म्हणून याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय प्रातःकाळचा पहिला प्रहर मानितात. ह्या रागांत तीव्र निषाद न लागतां कोमल निषाद लागतो. पूर्वांगांत भैरव व उत्तरांगांत भैरवी हे राग ह्याच्या गायनांत दृष्टीस पडतात. हा आधुनिक व यावनिक राग आहे. हा एक भैरवप्रकार आहे.

**हिटलर, ॲडॉल्फ** (१८८९-१९४५)—हा जर्मन हुकूमशहा (डिक्टेटर) ऑस्ट्रियांतील ब्रुनो गांवीं जन्मला. त्याचा बाप कस्टम खात्यांत अधिकारी होता. त्याचें दुय्यम शिक्षण ऑस्ट्रियामधील लिन्झ या गांवीं झालें. सदर ठिकाण पॅन जर्मानिझमचें केंद्र होतें; त्यामुळें हिटलरच्या मनावर लहानपणापासून सदर तत्त्वाचा फार परिणाम झाला. व हिटलरच्या पुढील आयुष्यक्रमावरहि परिणाम झाला. नंतर हिटलर चित्रकलेचें शिक्षण घेण्याकरितां व्हिएन्ना येथें गेला. परंतु तेथल्या ॲकॅडमी ऑफ आर्ट्स या संस्थेच्या प्रवेशपरीक्षेंत उत्तीर्ण झाला नाहीं. नंतर त्यानें कांहीं काळ गवंडीकाम केलें व रंगीत पोस्टकार्डें तयार

करूनहि द्रव्यार्जन केलें. त्याच्या बापाचें मूळ नांव शिक्लग्रुबर असें होतें. पण नंतर बापानें हिटलर हें नाव १८४२ च्या सुमारास धारण केलें.

तरुण हिटलरला राजकारणाची चर्चा करण्याची आवड असे व त्याची मतें पॅनजर्मन तत्त्वाला अनुकूल व हॅप्सबर्ग राजघराण्याला प्रतिकूल व समाजसत्तावादालाहि प्रतिकूल असत. १९११ सालीं तो बव्हेरियांतील म्यूनिक शहरीं राहण्यास गेला व तेथें लहान लहान रंगीत चित्रें विकून तो आपला उदरनिर्वाह करीत असे. १९१४ सालीं महायुद्ध सुरू झाल्यावर त्यानें जर्मन सैन्यांत स्वयंसेवक म्हणून नांव दाखल केलें आणि पश्चिम आघाडीवर तें महायुद्ध संपेपर्यंत प्रथम साधा ऑर्डरली या जागेवर नोकरी केली. आणि शेवटीं लान्स कार्पोरल येवढ्याच हुद्यावर चढला. महायुद्धाच्या अखेरीस त्याला मुस्टार्ड गॅसनें इजा झाली व त्यामुळें कांहीं काळ त्याच्या दृष्टीला अंधत्व आलें. पहिलें महायुद्ध संपल्यानंतर त्यानें युद्धोत्तर जर्मन सैन्यांत गुप्तहेराची नोकरी धरून, राजकीय सभांवर देखरेख करण्याचें काम केलें. हें काम करीत असतांना म्यूनिक येथील जर्मन मजूर पक्षाच्या सभासदांशीं त्याचा परिचय झाला. या पक्षाचा आद्य संस्थापक व पुढारी ड्रेक्सलर या नांवाचा इसम होता. हिटलर या पक्षाचा सभासद झाला आणि सदर पक्षाचे सभासद वाढवण्याचें कार्य त्यानें चालू केलें. त्यामुळें हा पक्ष प्रबल झाला आणि ड्रेक्सलरऐवजीं हिटलर सदर पक्षाचा पुढारी बनला. नंतर या पक्षानें मूळ नांव बदलून राष्ट्रीय समाजवादी जर्मन मजूर पक्ष (नॅशनल सोशॅलिस्ट जर्मन लेबर पार्टी) असें नांव देण्यांत आलें. १९२३ सालीं या पक्षानें सरकारविरुद्ध बंड पुकारलें परंतु तें अयशस्वी झालें, कारण बव्हेरियन स्टेट कमिशनर हर फॉन केह्र आणि म्यूनिक येथील लष्करानें सेनापति यांच्या मदतीवर तो अवलंबून होता. पण आयत्या वेळीं सदर इसमांनीं त्याला दगा दिला; त्यामुळें हिटलर पकडला गेला व त्याला ५ वर्षें कैदेची शिक्षा झाली. या कैदेच्या कैदखान्यांत त्यानें आपल्या 'मीन कॅम्फ' (माझा लढा)

ग्रंथाचा पहिला भाग लिहिला व त्यांत त्यानें आपल्या राजकारणाच्या कार्यक्रमाची तपशीलवार योजना मांडली. हिटलरची सदर कैदेंतून ८ महिन्यांनीं सुटका झाली. नंतर त्यानें आपल्या पक्षाची पुनर्घटना केली आणि आपल्या 'मीन कॉम्फ' या ग्रंथाचा दुसरा भाग १९२५–२७ च्या काळांत लिहून प्रसिद्ध केला.

'मीन कॉम्फ' या पुस्तकांत हिटलरनें पुढीलप्रमाणें प्रतिपादन केलें आहे—मानवी जीवनांत वंश आणि वंशशुद्धि यांना फार महत्त्व असून आर्यन हा जगांत सर्वश्रेष्ठ मानववंश आहे. याला नॉर्डिक वंश असेंहि नांव आहे. या वंशानें एक फार मोठी चूक केली ती म्हणजे इतर वंशांबरोबर संमिश्र विवाह करण्याची. या मिश्रविवाहसंबंधामुळें आर्यन वंशाचा फार ऱ्हास झाला. या आर्यन् वंशाचा मुख्य शत्रु ज्यू लोक असून फ्रान्स देश हा त्यांचा बालेकिल्ला आहे. पहिलें महायुद्ध (१९१४–१९१८) ज्यू लोकांनींच घडवून आणलें. जर्मन राष्ट्राचा पूर्ण नाश करून सर्व जगावर ज्यू लोकांचें वर्चस्व स्थापणें हा त्यांचा अंतिम हेतु आहे. म्हणून जर्मन राष्ट्रानें प्रबल बनून ज्यू लोकांचा नायनाट केला पाहिजे. फ्रान्स व रशिया या दोन्ही देशांचें राजकारण ज्यू लोकांच्या हातीं असल्यामुळें जर्मनीनें इंग्लंड व इटली या दोन देशांबरोबर मैत्रीचे संबंध जोडून मध्य युरोपांत सर्व जर्मन लोकांना एकत्र करून मोठें प्रबल राष्ट्र बनवलें पाहिजे. इतर खंडांत वसाहती वाढवण्याचें धोरण जर्मनीनें सोडून दिलें म्हणजे इंग्लंडचें सख्य संपादन करतां येईल आणि जर्मन साउथ टिरोल यावरील जर्मन सत्ता सोडल्यानें इटली जर्मनीचा मित्र होईल. इंग्लंड व इटली यांच्या मदतीनें फ्रान्स व रशिया यांचा निःपात करून जर्मनी पहिल्या दर्जाचें राष्ट्र एका शतकांत बनूं शकेल. समुद्रापलीकडे जर्मन वसाहती स्थापण्याचा प्रश्न तोंपर्यंत तहकूब केला पाहिजे. याप्रमाणें हिटलरनें कार्यक्रम आंखून शेवटीं असें बजावलें आहे कीं, "एक तर जर्मनी जगांत सर्व सामर्थ्यवान् होईल किंवा अजीबात नष्ट होईल."

१९२८ सालीं जर्मन रीशस्टॅगमध्यें नॅशनल सोशॅलिस्ट पक्षाचे १२ सभासद निवडून आले. १९३० सालीं जर्मनीची आर्थिक स्थिति अत्यंत बिघडली त्या वेळीं हिटलरनें बड्या कारखानदारांना कम्यूनिझमपासून रक्षण करण्याचें आश्वासन देऊन, १९३० च्या निवडणुकींत स्वतःच्या पक्षाचे १०६ सभासद निवडून आणले. हिटलरच्या मुख्य योजना व्हर्सायचा तह रद्द करणें आणि ज्यू जातीचा व मार्क्सवादाचा नायनाट करणें या होत्या. वयोवृद्ध जर्मन राष्ट्राध्यक्ष हिंडेनबुर्ग याला जर्मनीची अधिकाधिक खालावत चाललेली आर्थिक स्थिति सुधारतां येईना. त्यामुळें हिटलरच्या पक्षाचें बल वाढत गेलें आणि हर श्रूडर या बँकरच्या व फॉन पेपेन या माजी चॅन्सेलरच्या मदतीनें हिटलर १९३३ सालीं चॅन्सेलर झाला आणि त्यानें नाझी व नॅशनॅलिस्ट यांचें संमिश्र प्रधानमंडळ बनवलें.

हिटलर मुख्य प्रधान झाल्यावर लवकरच रीशस्टॅग इमारतीला आग लागली. आग लावल्याचा आरोप कम्यूनिस्ट पक्षावर ठेवून हिटलरनें अनेक कम्यूनिस्ट पुढाऱ्यांना कैदेंत टाकलें आणि अनेक विरोधी पुढाऱ्यांना फांशीची शिक्षा देण्यांत आली. १९३४ सालीं हिंडेनबुर्ग वारल्यावर हिटलरकडे अध्यक्षपद व फडणिशी हे दोन्ही अधिकार आले. आणि पुढील निवडणुकींत हिटलरला शें. ९५.५ मतें मिळालीं. १९३५ सालीं सक्तीच्या लष्करभरतीचा कायदा आणि ज्यूविरोधी अनेक कायदे करण्यांत आले. १९३६ सालीं लोकार्नोचा तह मोडून ऱ्हाइनलँडचा कबजा जर्मनीनें घेतला. हिटलरनें सर्व प्रकारांनीं लष्कराची वाढ सुरू केल्यामुळें जर्मनींतील बेकारी अजीबात नाहींशी झाली. सर्वांना काम व उद्योगधंदा मिळूं लागला. १९३८ सालीं हिटलरनें ऑस्ट्रियावर आक्रमण करून तो देश आपल्या राज्यास जोडला. आणि नंतर झेकोस्लोव्हाकियांत जर्मन सैन्य धाडून तो देशहि हस्तगत केला. मात्र प्रत्येक वेळीं जर्मनीला अधिक प्रदेश मिळविण्याची इच्छा नाहीं, असें हिटलर जाहीर करीत असे. झेकोस्लोव्हाकियानंतर १९३९ सालीं हिटलरनें पोलंडकडे आपली नजर वळवली. डॅन्झिग बंदर व त्या बंदरापर्यंत जाण्यास प्रादेशिक मार्ग (कॉरिडोर) या दोन मागण्या हिटलरनें पोलंडकडे केल्या. पोलंडला इंग्लंड व फ्रान्स यांच्याकडून संरक्षण मिळण्याचें आश्वासन मिळालेलें असल्यामुळें पोलंडनें वरील दोन्ही मागण्या अमान्य केल्या. तेव्हां हिटलरनें १९३९ च्या ऑगस्टांत नाझी फौज पाठवून डॅन्झिगचा ताबा घेतला. त्याच ऑगस्ट महिन्यांत हिटलरनें सोव्हियट रशियाबरोबर दोस्तीचा तह केला. या बातमीमुळें सर्व जग अत्यंत आश्चर्यचकित झालें. १९३९ सालच्या सप्टेंबर ता. १ रोजीं हिटलरनें डॅन्झिग बंदर आपल्या राज्यास जोडलें आणि पोलंडवर स्वारी केली, त्यामुळें फ्रान्स व इंग्लंड यांनीं ता. ३ सप्टेंबर रोजीं जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारलें. १९४० च्या एप्रिल व मे महिन्यांत हिटलरनें नॉर्वे, डेन्मार्क, हॉलंड, बेल्जिअम, लक्झेंबर्ग आणि फ्रान्स इतक्या देशांवर स्वारी केली. बेल्जिअम लगेच शरण आला. यानंतर इटलीनें फ्रान्स आणि इंग्लंड यांविरुद्ध युद्ध पुकारलें. फ्रान्सनें जर्मनीशीं तह केला तेव्हां इंग्लंड एकाकी पडलें. हिटलरनें इंग्लंडवर बॉबहल्ले सुरू केले व युरोपच्या पूर्वेकडील सर्व राष्ट्रें आपल्या ताब्यांत ठेविलीं. रशियावरहि त्यानें हल्ला चढविण्यास सुरवात केली व कीव्ह घेतलें. नंतर जपान जेव्हां हिटलरच्या बाजूनें लढूं लागलें तेव्हां खऱ्या जागतिक युद्धाला तोंड लागलें. पण नंतर इटली खालावत जाऊन जर्मनीच्या विरुद्ध बाजूस मिळाला तेव्हां हिटलरला एकाकी सर्व जगाशीं टक्कर द्यावी

लागली. स्टालिनग्राड त्याला जिंकतां आलें नाहीं. त्याच्या सेनानींचा दम उखडला गेला. तेव्हां १९४५ च्या मे महिन्यांत जर्मन सैन्य दोस्तांना शरण गेलें. पण हिटलर हातीं लागला नाहीं. त्यानें आत्महत्या केली असावी असें म्हणतात.

हिटलरइतका प्रभावी मुत्सद्दी, योद्धा व ज्वलज्ज्वल देशाभिमानी नेपोलियननंतर कोणी झाला नाहीं. नेपोलियनहि त्याच्यापुढें थोडा फिका पडतो. हिटलरनें आपलें राष्ट्र सर्वश्रेष्ठ करण्यासाठीं जिवाचा कोण आटापिटा केला व शेवटीं जीवहि दिला. त्याला यश कां आलें नाहीं याचीं कारणें वेगळीं आहेत. पण तो जगांतील एक अत्यंत थोर देशभक्त व वीरपुरुष खरा.

**हिटाइट राष्ट्र**—हिटाइट हें बायबलमध्यें येणारें एका जातीचें नांव आहे. या लोकांना प्राचीन ईजिप्तमध्यें खेटा आणि असीरियन लोकांत हट्टी असें नांव होतें. या लोकांचें प्रबल साम्राज्य उत्तर आशियामायनरपासून सीरियांतील हॅमॉथ शहरापर्यंत पसरलेलें होतें. खिस्तपूर्व १७१७ मध्यें असीरियन लोकांनीं हिटाइट लोकांची दक्षिणेकडील राजधानी कार्चेमिस हस्तगत केल्यावर हें साम्राज्य नष्ट झालें. अलीकडे कार्चेमिस आणि बोघाझ-कुई येथें झालेल्या उत्खननावरून असें उघडकीस आलें आहे कीं, हिटाइट लोकांनीं संस्कृतीच्या प्राचीन इतिहासांत मोठी महत्त्वाची कामगिरी केलेली आहे. हे लोक आद्यकालीन युरो-भारतीय मानववंशाचे समकालीन असावेत असा कांहीं संशोधकांचा समज आहे. व जगांतील पहिलें राष्ट्र हेंच असावें असाहि तर्क आहे. या सुलभ विश्वकोशाच्या तिसऱ्या विभागाच्या प्रस्तावनेंत (पृ. २६–२८) या राष्ट्राची सविस्तर माहिती दिलेली आहे.

**हिंडमन, हेन्री मेयर्स** (१८४२–१९२१)—एक ब्रिटिश अर्थशास्त्रज्ञ व समाजसत्तावादी पुढारी. तो मार्क्सच्या समाजसत्तावादी सिद्धान्ताचा अनुयायी होऊन त्यानें १८८१ सालीं सोशल डेमोक्रॅटिक फेडरेशन ही संस्था स्थापन केली. त्याचे प्रमुख ग्रंथ आहेत तें—'एकॉनमिक्स ॲंड सोशॅलिझम' (अर्थशास्त्र आणि समाजवाद), 'दि फ्यूचर ऑफ डेमॉक्रसी' (लोकराज्याचें भवितव्य), 'दि अवेकनिंग ऑफ एशिया' (आशियाची जागृति) आणि 'दि इव्होल्यूशन ऑफ रेव्होल्यूशन' (क्रांतीचा विकास).

**हिंडेन्बुर्ग, पॉल फॉन** (१८४७–१९३४)—एक जर्मन योद्धा व राष्ट्राध्यक्ष. तो १८६५ सालीं प्रशियन सैन्यांत दाखल झाला. आणि त्यानें ऑस्ट्रो-प्रशियन व फ्रॅंको-प्रशियन युद्धांत भाग घेतला. तो १९०० सालीं मेजर जनरल झाला. नंतर पायदळाचा जनरल झाला. आणि १९११ सालीं त्यानें लष्करी नोकरी सोडली. पहिलें महायुद्ध सुरू झाल्यावर हिंडेनबुर्गला पूर्व प्रशियांतील जर्मन सैन्याचा कमांडर नेमण्यांत आलें. त्यानें रशियनांचा टॅनेनबर्गच्या लढाईंत पराभव केला. नंतर पूर्व सरहद्दीवरील ऑस्ट्रो-जर्मन सैन्याचा तो १९१५ व १९१६ सालीं मुख्य सेनापति होता, आणि १९१६ च्या ऑगस्ट महिन्यांत सैन्याच्या जनरल स्टॉफचा तो मुख्य झाला, आणि या जागीं तो तात्पुरता तह होईपर्यंत कायम होता. जर्मन लोकांचा तो अगदीं आदर्श पुरुष बनला होता. त्याचा ग्रंथ 'आउट ऑफ माय लाइफ' (माझ्या आयुष्यांतून) १९२० सालीं प्रसिद्ध झाला. १९२५–१९३४ पर्यंत तो जर्मन लोकराज्याचा अध्यक्ष होता व हिटलरला त्यानेंच पुढें आणलें.

**हिदायतुल्ला, सर गुलाम हुसेन** (१८७९–१९४९)—एक हिंदी मुसलमान पुढारी व सिंधचा गव्हर्नर. शालेय शिक्षण शिकारपूर हायस्कूल व विश्वविद्यालयीन शिक्षण सिंध कॉलेज व सरकारी लॉ कॉलेज (मुंबई) यांमध्यें झालें. मुंबई विश्वविद्यालयाची वाङ्मय व कायदा यांत पदवी घेतल्यावर बरेच दिवस वकिली करीत होते. १९०४ पासून सार्वजनिक कामांत भाग घेत. सिंध-हैदराबाद नगरपालिकेचे सरकारनें नेमलेले अध्यक्ष व नंतर निवडलेले उपाध्यक्ष होते. १९१२ सालीं मुंबई कायदेमंडळांत शिरले व १९२० सालापर्यंत सदर मंडळाचे बिनसरकारी सभासद होते. जानेवारी १९२१ पासून जून १९२८ पर्यंत मुंबई सरकारचे मंत्री होते आणि १९२८ ते १९३४ या काळांत लागोपाठ तीनदां मुंबई सरकारच्या कार्यकारी मंडळाचे सभासद होते. हे मुंबई कायदेमंडळाचे नेते होते व कार्यकारी मंडळाचे उपाध्यक्ष होते. हिंदुस्थान सरकारकडून यांना दोनदां गोलमेज परिषदेकरितां पाठविण्यांत आलें होतें. सहा महिने कौन्सिल ऑफ स्टेटचे सभासद होते, परंतु लगेच लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत निवडून आले. सिंधविभक्तीकरण कौन्सिलचे अध्यक्ष होते (१९३६). १९३५ च्या पार्लमेंटरी कायद्याप्रमाणें १९३७ सालीं सिंध असेंब्लींत निवडून आले व प्रथमच यांनीं आपलें प्रधान मंडळ बनविलें होतें. परंतु पुढें अल्लाबक्ष मंत्रिमंडळ आल्यावर हे नुसते सभासदच राहिले. हे मुस्लिम लीगचे अनुयायी असून यांनीं सिंधमध्यें आपलें मंत्रिमंडळ तयार केलें (१९४३). हिंदुस्थानची फाळणी झाल्यावर पाकिस्तानांत हे सिंधचे गव्हर्नर झाले.

**हिंदी भाषा व वाङ्मय**—हल्लींच्या भारतीय-आर्य (इंडो-आर्यन) भाषांच्या वाढीपूर्वीच्या प्राकृत भाषेच्या शेवटल्या स्थितींत या प्राकृत भाषा अपभ्रंश या नांवानें संबोधिल्या जात असत व या अपभ्रंश भाषांपासूनच पुढें हिंदी, पंजाबी, मराठी, इ. भाषा उदयास आल्या. हा उदयास येण्याचा काल स्थूलमानानें १००० वर्षे म्हणजे दहावें अगर अकरावें शतक होय.

आपणाला 'हिंदी' या शब्दाचा अर्थ नीटपणें समजला पाहिजे. कारण पुष्कळ वेळां याचा अर्थ निरनिराळ्या तऱ्हेनें केला जातो. उदाहरणार्थ, कांहीं वेळां पश्चिमेला पंजाब आणि

सिंध, व पूर्वेला बंगाल यांमधील टापूला 'हिंदी' हा शब्द उपयोजिला जातो. कांहीं वेळां हिंदी या पदानें विदग्ध हिंदीचा निर्देश केला जातो. या वरील टापूला कोणी हिंदुस्थानी असें म्हणतात. सर जॉर्ज ग्रियरसनप्रभृति विद्वानांनीं परिश्रमान्तीं असें ठरविलें आहे कीं, या टापूंत, राजस्तानी, पूर्व हिंदी, पश्चिम हिंदी आणि बिहारी या चार प्रमुख भाषा प्रचलित असून त्यांचा उगमहि स्वतंत्र आहे. या ठिकाणीं खरोखर जेवढ्या टापूला हिंदुस्थानी अशी संज्ञा देतां येईल तेवढ्याच भागांतील वाङ्मयाच्या इतिहासाचा येथें उल्लेख करण्यांत येणार आहे. गंगायमुनांच्या खोऱ्यापासून तों पूर्वेकडे कोशी नदीपर्यंत, राजपुताना, मध्य हिंदुस्थान आणि नर्मदेच्या दऱ्यांपासून तों पश्चिमेकडे खांडवा व मध्यप्रांताच्या उत्तरभागापर्यंतचा टापू हिंदुस्थानी या नांवांत घेतलेला आहे. जरी पंजाबमध्यें हिंदुस्थानी भाषा बोलतात तरी तो देश अगर खालचा बंगाल यांत समाविष्ट केलेला नाहीं.

या टापूमध्यें अनेक भाषा प्रचलित आहेत. नागरिक लोक बहुधा ऊर्दू भाषा वापरतात. पण सर्वसाधारण लोक अनेक प्रकारच्या हिंदी भाषा वापरतात. यांतील शब्द बहुतेक प्राकृत आणि संस्कृत भाषापासून आलेले आहेत व ह्या भाषा देवनागरी अगर कैथी लिपींत लिहिल्या जातात. यांपैकीं प्रमुख भाषा म्हणजे मारवाडी, जयपुरी, व्रजभाषा, कनोजी, अवधी, बैखरी आणि बिहारी होत. ज्याला आपण विदग्ध हिंदी म्हणतों ती वाङ्मयाच्याच उपयोगी आहे. दिल्लीच्या आसपास व उत्तरेस हिमालयापर्यंत वापरल्या जाणाऱ्या भाषेचा पाया असणाऱ्या पश्चिम हिंदी भाषेचेंच विदग्ध हिंदी हें विकसन आहे.

इतर प्राचीन वाङ्मयाप्रमाणेंच प्राचीन हिंदुस्थानी वाङ्मय हें बहुतेक पद्यांतच आहे, व गद्य वाङ्मय हें अगदीं अलीकडील आहे. संस्कृत व फारसी भाषांबरोबर स्पर्धा करणाऱ्या दोन भाषा म्हणजे अनुक्रमें हिंदी व ऊर्दू या होत. पण या दोहोंमध्यें अंतर हें कीं, हिंदी भाषेनें ब्राह्मणांचीच होऊन बसलेल्या संस्कृत भाषेला प्रतिकार करण्याच्या निमित्तानें, आपली उन्नति साधून घेतली तर ऊर्दू भाषेनें आपली आई जी फारसी भाषा तिच्याशीं गोडीगुलाबीनें वागूनच आपला शिरकाव करून घेतला. संस्कृत व फारसी भाषा हल्लीं फक्त लेखनाच्या दृष्टीनेंच महत्त्वाच्या आहेत. त्यांचा व्यवहारांत कांहींच उपयोग होत नाहीं.

भारतामध्ये हिंदी ही सर्वगामी भाषा आहे. हिंदीचीं अनेक रूपें आहेत. हिंदीचा कोणता तरी प्रकार बोलणारी लोकसंख्या एकूण १६–१७ कोटी आहे.

जुनें वाङ्मय:—हिंदीचा पहिला उल्लेखनीय महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे बाराव्या शतकांतील चंद बरदाईचा 'पृथ्वीराज रासो' हा होय. त्याच्या पूर्वीच्या ३५–४० कवींचीहि माहिती लागली आहे. ज्यांची कृति आज उपलब्ध आहे अशांतला प्राचीनतम कवि म्हणजे 'सरहपा' (इ. ७४३) हा होय. हिंदी वाङ्मयाचा सर्वांत जुना इतिहास 'शिवासिंग–सरोज' नांवाचा आहे. हे प्राचीन कवी पुष्कळसे 'अपभ्रंश प्राकृत' भाषेंत कवनें करीत. तथापि त्यांतील बराच भाग तत्कालीन प्रचलित बोली जी हिंदी तिच्यांत रचलेला असे. पंडित हेमचंद्रानें अकराव्या शतकांत अपभ्रंश प्राकृत भाषेवर एक ग्रंथ लिहिला. त्यांत पुष्कळ जागीं हिंदींतील दोहा छंदांतील कवनें आलीं आहेत.

त्या काळीं नाथसंप्रदाय भरभराटींत होता. जुन्या ४० कवींपैकीं बरेच लोक या संप्रदायाचे अनुयायी होते. जुने वैदिक धर्मसंप्रदाय क्षीण झाल्यावर नाथसंप्रदाय भरभराटीस आला. त्यानंतर अद्वैत, विशिष्टाद्वैत, द्वैत, वगैरे संप्रदाय उत्पन्न झाले. नालंदाच्या प्रचंड विश्वविद्यालयात जुन्या काळचे पुष्कळ हिंदी कवी प्रसिद्धीस आले. इ. ११४३ पासून १३८७ पर्यंत होऊन गेलेले १८ हिंदी ग्रंथकार आज ज्ञात आहेत. त्यांची भाषा अगदीं साधी आहे. त्यांत नरपति नाल्ह, चंद बरदाई, त्याचा मुलगा जल्हण, व जग्निक हे प्रमुख आहेत. त्यांची भाषा 'अपभ्रंश प्राकृत' च्या छापांतून पुष्कळ मुक्त झालेली आहे व त्यामुळें हल्लींच्या सामान्य वाचकासहि ती कळूं शकते. नरपति नाल्ह यानें ११५५ मध्यें 'बीसलदेव रासो' नांवाचें काव्य रचलें. त्यांत बीसलदेवाचे पराक्रम सुंदर भाषेंत वर्णिले आहेत. जग्निक यानें 'अल्हाखंड' नांवाचें एक वीररसयुक्त काव्य केलें आहे. तें अजून राजपुताना व उत्तर प्रदेश या भागांत पावसाळ्यांत पुष्कळ वेळां म्हणण्यांत येतें. परंतु भाषा मात्र आधुनिक स्वरूपांत परिणत झाली आहे.

चंद बरदाई व त्याचा मुलगा जल्हण यांनीं सुप्रसिद्ध 'पृथ्वीराज रासो' काव्य रचलें. त्यांत १६ व्या शतकांत इतरांनीं भर घातली. इतर कवींनींहि मुसल्मानी आक्रमणास न जुमानतां राष्ट्रप्रेम व उत्कट भक्ति यांनीं रसरसलेलीं काव्यें निर्माण केलीं.

इ. १२९० पासून १३८७ पर्यंतचे २१ कवी सध्यां ज्ञात आहेत. या वेळीं गद्य ग्रंथरचनेलाहि आरंभ झाला. गोरखनाथ या प्रसिद्ध धर्म–प्रचारकानें बौद्धांचा 'सहजिया' व आपला शैवसंप्रदाय यांचा मेळ घालून एक महत्त्वाचा गद्य ग्रंथ लिहिला. त्यांत शंकराचार्यांचीं मतें सामान्य जनसमूहास कळतील व रुचतील अशा स्वरूपांत मांडलीं. ज्योतिरीश्वर ठाकूर यांनीं मैथिली हिंदीमध्यें इ. स. १३०० मध्यें उत्कृष्ट गद्यांत एक ग्रंथ लिहिला. कवींमध्यें अंबदेव जैन, जज्जल (१३००), नल्लसिंह (१३०३), शार्ङ्गधर (१३०३) आणि अमीन खुसरो (१२५३–१३२५) हे प्रसिद्ध होते. अमीन खुसरो हा तर हिंदीच्या सर्वश्रेष्ठ कवींपैकीं एक आहे. त्याचा बाप तुर्क होता व आई रावळ राजपूत होती.

तो म्हणे की, हिंदी भाषा ही अरबी व फारसी या भाषांपेक्षां मुळींच कमी योग्यतेची नाहीं. त्याचें हिंदी काव्य अतिशय मधुर, अर्थपूर्ण व सहजसुंदर आहे.

अल्लाउद्दिनानें रणथंभोरवर हल्ला केला त्या वेळीं हम्मीरदेवानें जो अपूर्व पराक्रम केला त्याचें वर्णन करणारीं पुष्कळ जोरदार राष्ट्रप्रेमी काव्यें रचण्यांत आलीं. चितोडचा १३०३ मध्यें पाडाव झाला; त्या प्रसंगावरहि पुष्कळ कवनें झालीं आहेत. या वेळीं धार्मिक विषयावर काव्यरचना पुष्कळ होऊं लागली होती. त्याची भाषा प्रचलित भाषेस अनुसरून आहे. संस्कृत व प्राकृत भाषांचें दडपण जाऊन सर्वसामान्य जनसमूहास सहज समजेल असें स्वरूप हिंदी भाषेनें या वेळीं स्वीकारलें. व्रजभाषा या हिंदी भाषेच्या प्रकारास फार महत्त्व आलें. गोरखनाथ या पूर्वकडील लेखकानें व्रजभाषाच वापरली आहे.

मध्यकालीन हिंदी (१३८८–१५७३):—या कालखंडांत गद्य ग्रंथ फार थोडे झाले. या काळच्या कवींमध्यें सूफी पंथाचे अनुयायी, धार्मिक व भक्तिमार्गी संत, मैथिल, जैन, यांचा भरणा विशेष आहे. विद्यापति ठाकूर (१३६८–१४७५) हा श्रेष्ठ प्रतीचा मैथिल कवि होता. याचें ओजस्वी काव्य अद्यापि मैथिल व बंगाली समाजाचें प्राणप्रिय धन मानलें जातें. तो हिंदींतला पहिला प्रेम-कवि होय. त्यानें राधा-कृष्ण व शिव-पार्वती यांचा प्रेमसंबंध वर्णिला आहे. राधाकृष्णावरील कवनांत बराच उत्तान शृंगार आहे. त्याची कल्पनाशक्ति फार मोठी असून, त्याच्या भाषेंत प्रसाद, माधुर्य आणि ओज आहे. चितोडचा महाराणा कुंभ कर्ण (१३६२–१४१२) यानें जयदेवाच्या संस्कृत गीतगोविंद काव्यावर हिंदी टीका लिहिली आहे. दामो नांवाचा एक चांगला कथालेखक होता. नामदेव नांवाच्या संताच्या भाषेंत खडी बोली, बिहारी, अवधी व व्रजभाषा या हिंदीच्या पोटभाषांचें मिश्रण आहे. हिंदु-मुस्लिम ऐक्याचा पहिला प्रचारक नामदेव मानावा लागेल. प्रसिद्ध संत रामानंद (इ. १४०१) याच काळांत होऊन गेला. त्याच्या शिष्यांमध्यें कबीरदास, सदन, सेना न्हावी, भवानंद, पिपा, अनगढ, धनन, व रोहिदास चांभार हे होते. हा सर्वश्रेष्ठ संत व उत्तम कवि होता. रामानंदानें हिंदींमध्यें थोडीच ग्रंथरचना केली. कबीर हा मुसलमान विणकर होता (इ. १३९८–१५१८). त्याच्यामध्यें मुसलमानी धर्म-कल्पनांची पुसट छटा होती. तो बहुतांशीं हिंदूच होता. सध्यां कबीरपंथाचे मुस्लिम अनुयायी निदान १० लाख तरी आहेत. कबिराचे पुष्कळ ग्रंथ सध्यां उपलब्ध आहेत. त्यांत 'बीजक' आणि 'बानी' हे प्रमुख आहेत. त्यांतील धर्मतत्त्वें फार श्रेष्ठ आहेत. कबिराची भाषा प्रसादयुक्त व ओजस्वी आहे. याच काळांत कुतुबन शेख (इ. १५०१) हा सूफी कवि होऊन गेला. हिंदु कथा व हिंदु समाज यांचें वर्णन यानें हिंदी भाषेमध्यें सहानुभूतिपूर्वक केलें. पण त्यामुळें त्यास मुसलमान लोक तुच्छ मानूं लागले. सूफी संप्रदायाचा अंतस्थ हेतु मुसलमानी धर्म आणि संस्कृति यांचा सौम्य भाषेनें प्रसार करणें हा होता. त्यामुळें हिंदूंनाहि सूफी कवी अप्रिय असत. सूफी ग्रंथ हल्लीं वाङ्मयप्रेमी लोक मात्र कौतुकानें वाचतात. पण यांशिवाय इतर लोक त्यांना महत्त्व देत नाहींत. बाबा नानक (१४६९–१५३९) व त्याच्या मागून झालेले ९ शीख गुरु हे हिंदी भाषाच वापरीत असत. यामुळें भारतांतील एका प्रचंड धार्मिक व राजकीय चळवळीला जन्म दिल्याचें श्रेय हिंदी भाषेस लाभलें. हिंदीची पोटभाषा जी पंजाबी त्या भाषेचा नानकानें आपल्या 'ग्रंथसाहेब' मध्यें उपयोग केला आहे. वल्लभाचार्य (इ. १४७९–१५३१) मूळचा राहणारा दक्षिणेंतला. पण त्याचें जीवनकार्य गुजराथ व उत्तर भारत यांत झालें. त्यानें संस्कृतमध्यें पुष्कळ ग्रंथ लिहिले व हिंदीमध्यें एकच 'वन यात्रा' नांवाचा ग्रंथ लिहिला. हिंदी भाषेच्या मध्यकालामध्यें पुष्कळ धर्म-संप्रदाय उदयास आले. त्यांपैकीं रामानंद, चैतन्य व वल्लभ हे तीनच टिकून राहिले. या मध्यकालामध्यें हिंदी काव्याचें स्वरूप ओजस्वी व माधुर्ययुक्त बनलें.

सूरदास (इ. १४८२–१५६०) हा हिंदीमधील अत्यंत श्रेष्ठ कवींपैकीं एक होता. त्यानें प्रचंड वाङ्मय बहुतेक पदांमध्येंच आहे. त्यानें मुख्यतः कृष्णपरमात्म्यासंबंधींच पद्यरचना केली आहे. त्यानें कृष्णाच्या बाललीला दीर्घकाव्यांत वर्णन केल्या आहेत. त्याचें काव्य जगांतील कोणच्याहि उत्कृष्ट वाङ्मयाच्या बरोबरीस बसण्याच्या योग्यतेचें आहे. व्रजभाषेचा सर्वोत्तम अलंकार अशी त्याच्या काव्याची महती गाण्यांत येते. त्याचीं पदें संगीतज्ञांमध्येंहि फार प्रिय आहेत. वल्लभ संप्रदायाचे आठ मोठे कवी होऊन गेले; त्यांस 'अष्टछाप' असें सामुदायिक नांव आहे. ते पुढील होत: १ सूरदास, २ कृष्णदास, ३ परमानंददास, ४ नंददास, ५ छीतस्वामी, ६ गोविंदस्वामी, ७ कुंभनदास व ८ चतुर्भुजदास. या सर्वांनीं कृष्णलीलाच वर्णिल्या आहेत. नंददासाची 'रास पंचाध्यायी' ही फार मोहक आहे. या वल्लभ-संप्रदायी कवींपासून हिंदी म्हणजे व्रजभाषेंतल्या सर्वोत्कृष्ट काव्य-रचनेस सुरवात झाली.

या ओजस्वी कालखंडांत इतर अनेक संतकवींनीं उत्तम काव्य केलें आहे. पण त्यांना कवींपेक्षां संतपदवीच अधिक प्रिय होती. गोस्वामी, हितहरिवंश, हरिदास, मिराबाई, नरोत्तमदास, निपट निरंजन, दादू दयाळ, हे तत्कालीन संतकवींत श्रेष्ठ होते. नरोत्तमदासाचें 'सुदाम चरित्र' हें चरित्रकाव्यांत अप्रतिम आहे. हितहरिवंशानें फक्त ८४ पदें लिहिलीं. पण तीं सूरदासाच्या उत्तम पदांची बरोबरी करतात. मिराबाईचें अलौकिक चरित्र व

तिची भक्तिपूर्ण पदें यानीं आमच्या समाजावर चिरकाल टिकणारा परिणाम केला आहे. निपट निरंजन व दादू दयाल हेहि श्रेष्ठ संतकवी होते. पण त्यांचा कृष्णभक्तीशीं संबंध नव्हता. मोगल बादशाहींत स्वतः अकबर बादशहा बऱ्यापैकीं हिंदी कविता करीत असे. राजा बिरबल व टोडरमलहि हिंदींत चांगलें काव्य लिहीत असत. जायसीनें 'पद्मावत' नांवाचा एक उत्कृष्ट सूफी कथासंग्रह लिहिला आहे. हिंदी भाषेच्या उत्कर्षाच्या काळांत जे अनेक प्रसिद्ध लेखक होऊन गेले, त्यांमध्यें अग्रदास, तानसेन, श्रीभट्ट व विठ्ठलनाथ गोस्वामी हे प्रमुख होते. अकबराच्या शांततेच्या राजवटीमध्यें फारसी भाषेंत शेंकडों शब्द आणि कल्पना हिंदीमध्यें शिरून बसल्या. अकबराचा सरसेनापति खानखानान अबदुल रहीम हिंदींतील उत्कृष्ट कवींत गणला गेला आहे. त्याचे दोहे व इतर कविता खरोखरच सुंदर आहेत. अकबरानें राजा बिरबलला 'कविराज' ही पदवी दिली होती. या काळच्या वैष्णव कवींच्या काव्यांत शृंगाररस अतिरिक्त असल्यामुळें कामुक विचाराच्या लोंढ्यांपुढें भक्तिरसाचा सूक्ष्म प्रवाह अदृश्य होत असे. याच काळांत सूफी कथालेखक, इतर गद्यलेखक, साहित्यशास्त्राची सूक्ष्म चर्चा करणारे लेखक आणि अनेक धर्मपंथांचे संस्थापक यांनीं उच्च कल्पना व विचार, व सफाईदार भाषा यांच्या योगानें हिंदी भाषेस अत्यंत समृद्ध केलें. मुसलमान लेखकांच्या मूर्तिपूजानिंदेस तोंड देण्याकरितां स्वामी हरिदास यांनीं ब्रह्मचर्य आणि सगुणोपासना यांचें महत्त्व वाढविलें. जायसी हा कुरूप आणि एकाक्ष होता. पण त्याचें काव्य श्रेष्ठ दर्जाचें आहे. तो सुन्नी मुसलमान होता. त्यानें अल्लाउद्दीन व मेवाडचा महाराणा यांच्या युद्धाचें सोप्या पण ओजस्वी भाषेंत वर्णन केलें आहे. त्यानें इतिहास व कल्पनासृष्टि यांचें सुंदर मिश्रण केलें आहे. महाराष्ट्रकवि तुकाराम यानेंहि कांहीं हिंदी कविता केल्या आहेत. त्यांत धर्मश्रद्धा व व्यवहारहि आहे. राजा बिरबल याच्या मनोरम काव्यांत उपमांची रेलचेल आहे. बिकानेरचा पृथ्वीराज अकबराच्या दरबारीं असूनसुद्धां त्यानें अकबराचा शत्रु महाराणा प्रताप याचे विजय स्वाभिमानपूर्ण दोहा वृत्तामध्यें वर्णन केले आहेत. एकनौरचा गंगाभट्ट हा अकबराच्या आश्रितांतील उत्तम कवि होता.

तुलसीदासाचा काळ (इ. स. १५७२ ते १६२३):—तुलसीदास हा हिंदीचा श्रेष्ठतम कवि होय. पांचशें पानांचा त्याचा 'रामचरित-मानस' हा ग्रंथ छोट्या दोहा व चौपाई या छंदांत लिहिला आहे. पण त्याची वर्णनशैली अप्रतिम आहे. अनेक वृत्तांतील त्याचे दुसरे बारा ग्रंथ त्याच्या अप्रतिम काव्यशक्तीची साक्ष देतात. त्याच्या काव्यांत सूक्ष्म व सर्वव्यापी निरीक्षणशक्ति, बुद्धीची भव्यता, मानवी स्वभावाचें सूक्ष्म निरीक्षण, भाषेवरील उत्कृष्ट प्रभुत्व, भाषेचें माधुर्य व ओज, कोमल विनोद, परमावधीची भक्ति, इ. गुणांचा अवर्णनीय समुच्चय प्रतीत होतो. त्याच्या उपमा, दृष्टान्त, रूपकें, निसर्गाचीं वर्णनें (विशेषतः अयोध्याकांडांत) यांस दुसरीकडे कोठेंहि जोड मिळणार नाहीं. त्याच्या ग्रंथांत प्रसाद आहे, परमोच्च भक्ति आहे व जीवनांतील सर्व प्रकारच्या संवेदना आहेत. त्याच्या शेंकडों हजारों चौपाया व इतर वृत्तें हीं हिंदूंच्या नित्याच्या जीवनांत एकरूप झालीं आहेत. ख्रिश्चनांस जसें बायबल, मुस्लिमांस जसें कुराण, तसें हिंदूंस त्याचें रामायण आहे. लाखों लोक त्याचें रामायण, विनयपत्रिका, कवितावलि व हनुमानबाहुक वाचीत असतात. तुलसीदास प्रथम श्रेणीचा नुसता कविच नाहीं, तर तो महान् धर्मोपदेष्टा आहे. अर्वाचीन बहुजन समाजाच्या हिंदुत्वाच्या कल्पना त्याच्याच उपदेशावर आधारलेल्या आहेत. या तुलसीकालखंडांत कृष्णभक्त कवी आठनऊ झाले. रामोपासनेच्या विशुद्ध स्वरूपामुळें कृष्णोपासना कांहींशी मागें पडली. या कालखंडाच्या पूर्व भागांत अग्रदास, गदाधर, बलभद्र, रहीम, रसखानी, इ. थोर कवी होऊन गेले. कामेश (१५७४), होलराय व रामोपासक अग्रदास हे चांगले कवी होते. बलभद्र मिश्र (१५८३) हा प्रसिद्ध कवि केशवदास याचा वडील भाऊ. बलभद्र मिश्राचें 'नख-शिख' हें काव्य श्रेष्ठ प्रतीचें आहे. त्यांत कथानायिकेच्या अंगप्रत्यंगांचें वर्णन आहे. रसखानी (१५८८) हा अत्यंत प्रेमळ विष्णुभक्त मुसलमान होता. याचें प्रेमरसाचें वर्णन फार उच्च प्रतीचें आहे. केशवदास हा तुलसीदासाच्या खालोखाल या काळचा महाकवि होता. त्यानें 'रामचंद्रिका' आणि तीन मौल्यवान् ग्रंथ लिहिले आहेत. बाबा वेणी माधवदास यानें एक मोठें तुलसीचरित्र लिहिलें आहे. नाभादास यानें 'भक्तमाला' ग्रंथ लिहून सुमारें २०० हिंदी कवी आणि संत यांचीं चरित्रें चिरंजीव केलीं आहेत. सुंदरदास दादूपंथी हाहि या काळचा एक महत्त्वाचा कवि होता. कबीर मुबारक आणि उस्मान हे हिंदींतील चांगले कवी होते. घासीरामनें अन्योक्तीविषयीं एक ग्रंथ लिहिला आहे. या काळांत गद्यरचना फार थोडी झाली. वल्लभाचार्यांचा नातू गोकुळनाथ यानें चालू ब्रजभाषेंत ८४ आणि २५२ वैष्णवसंतांचीं चरित्रें लिहिलीं व नाभादासानेंहि कांहीं गद्यरचना केली आहे.

कला-काल (१६२३-१८३२)—यालाच वीरगाथाकाल म्हणतात. कारण याच काळांत भारतांत पुष्कळ वीर जन्माला आले व त्यांच्या कथा ओजस्वी काव्यामध्यें अनेक कवींनीं गायिल्या. दुसऱ्या कोणत्याहि कालखंडांत इतके प्रथम श्रेणीचे कवी झाले नाहींत. गुरु गोविंदसिंग जसा थोर धर्मप्रचारक होता तसाच रणशूरहि होता व त्यानें शीख समाजांत कडक धर्माभिमान व रणोत्साह उत्पन्न केला. गुरु गोविंदसिंग, नागरीदास, जसवंतसिंग, छत्रसाल व स्वतः अकबर बादशहा व एक विजापुरी सुलतान यांनीं हिंदीमध्यें कवनें केलीं आहेत. जसवंतसिंग तर श्रेष्ठ कवि होता.

वीर आणि शृंगार या रसांनीं अलंकृत अशा काव्यांना या काळांत भर आला होता. काव्यशास्त्रचर्चा हिंदी कवितेमध्यें पुष्कळ आहे. काव्यचर्चेला आरंभ तुलसीकालामध्यें केशवदासानें केला, परंतु या 'अलंकृत' कालामध्यें तें शास्त्र फार वाढलें. काव्य किंवा साहित्य-शास्त्रावर ग्रंथरचना करणारांस आचार्य म्हणत. हें काव्य-विवेचन बहुतेक संस्कृत अलंकारशास्त्राच्या वळणावरच होत असे. सेनापति, सुंदर कवींद्राचार्य, हरिनाथ, पुहकर, जायसी, बेनी, बनवारी, तोष व नीलकंठ हे चांगले कवी होते. ताज ही मुसलमान स्त्री असून हिंदी काव्य चांगलें करीत असे. या काळांत सूफी संप्रदायाचे ग्रंथ होणें बंद झालें व वैष्णव कवी कमी झाले. भक्तिमार्गी नसलेले कवी राधाकृष्णाच्या नांवाखालीं अतिशय शृंगारिक काव्यें करीत असत, तेव्हां तीं अश्लील होत असत. चिंतामणि आणि जसवंतसिंग हे मोठे आचार्य म्हणजे काव्यचर्चाकार होऊन गेले. बिहारीनें फक्त ७०० च दोहे केले. पण त्यांत कल्पनाशक्ति आणि भाषासौंदर्य भरपूर भरलें आहे. मतिराम याची भाषामाधुरी विशेष प्रकारची होती. बिहारी कालखंडांतील (इ. स. १६४९–६३) इतर प्रसिद्ध कवी मरमी, जयराम, आणि मणिमंडन हे होत. भूषणकवीनें शिवाजीस आपला चरित्रनायक केलें आहे खरें. परंतु सर्व हिंदु समाज हा त्याचा वर्ण्यविषय होता. कारण हिंदु समाजाचा खरा अभिमानी पहिला कवि भूषण होता. नेनसी मुता (१७३२) यानें राजपुतान्याचा स्वतंत्र इतिहास लिहिला; तो आजहि फार उपयुक्त वाटतो. लालदास आणि रणछोड यांनीं ऐतिहासिक ग्रंथ लिहिले. भूषणाच्या कालखंडांत (इ. स. १६६३–१६९३) कुलपति मिश्र, सुखदेव मिश्र, रामजी, कालिदास, घनश्याम आणि नेवाज हे चन्यांतले कवी होते.

देवदत्त हा तुलसीदास व सूरदास यांच्या खालोखाल हिंदींतला उत्कृष्ट कवि होता. त्यानें अनेक विषयांवर ग्रंथरचना केली आहे. त्याचें पांडित्य, प्रतिभा व निरीक्षण फार विशाल होतीं. लाल कवीनें पन्नाच्या छत्रसाल राजावर वीरश्रीयुक्त काव्य केलें आहे. सुरति मिश्र यानें चांगलें काव्य व टीकाग्रंथ केले आहेत (१६९३–१७१३). घन आनंद याचीं शृंगारिक कवनें अजून फार लोकप्रिय आहेत. आपली प्रिया सुजन हिचीं त्यानें काढलेलीं शब्दचित्रें असून पुष्कळांस मोहित करतात. १७१३–१७३३ या कालखंडात शीतलदास, कृष्णनाथ, महाराजा नागरीदास, भूधरदास जैन, गंजन, महबूब, प्रीतम, अली मुहिबखान, हरिकेश, बक्षी हंसराज, श्रीपति, जयकृष्ण हे चांगले कवी झाले. शीतलदासाच्या मधुर कवनांमुळें 'खडी बोली'चें महत्त्व विशेष वाढलें. १७३३ ते १७५३ मध्यें गुरुदत्तसिंग, सोमनाथ, रसलीन, चाचा वृंदावन, गिरधर कविराय, नूरमहमद (सूफी), ठाकूर, शिव, शंभुनाथ मिश्र, सुला, भूधर, इ. कवी होऊन गेले.

इ. १७५३ ते १७७३ या काळांत सूदन, बैरीसाल, किशोर, बोधा व पुखी हे कवी पुढें आले. सुदन यानें भरतपूरच्या सुजनसिंहाच्या चरित्रांत, ओजस्वी काव्यांत त्या काळचा इतिहास दिला आहे. गोकुळनाथ, गोपीनाथ व मणिदेव यांचें 'महाभारत' व ब्रजवासिदासाचा 'व्रजविलास' हीं पौराणिक काव्यें लोकप्रिय आहेत. पहिल्या ग्रंथांत जुन्या ऐतिहासिक व पौराणिक कथांचा फार मोठा संग्रह आहे.

१७७३ ते १७९८ या कालास रामचंद्र–काल म्हणतात. या काळांत रामचंद्र, चंदन, ग्वालगोपाळ, मंचित, देवकीनंदन, मणियारसिंग, हाथी, ठाकूर, बेणी बंदिजन व मदन हे कवी होऊन गेले. मंचित व मधुसूदनदास यांनीं कथा सुंदर सांगितल्या आहेत. मिथिलेचा लाल झा यानें कित्येक वाचनीय नाटकें लिहिलीं आहेत. या रामचंद्र–कालांत गद्यलेखनांत बरीच प्रगति झाली. इ. १७५७ मध्यें ब्रिटिश राज्य सुरू होऊन कलकत्त्याच्या आसपास शाळा सुरू झाल्या. त्यांकरितां शालेय हिंदी पुस्तकांची जरूर पडली. सदासुखलाल, लल्लूजी लाल व सदल मिश्र यांनीं बरेंच गद्यलेखन केलें.

इ. १७९८ ते १८१८ या काळांत शुद्ध हिंदीमध्यें मिशनऱ्यांनीं पुष्कळ धार्मिक पुस्तकें लिहिलीं. त्यांमध्यें विल्यम केरी हा प्रमुख होता. बेनी प्रवीन, गुरदीन, करन, गणेश, मंडन, मून, अयोध्येचा राजा मानसिंग व रेवाचा राजा जयसिंग हे या काळांतले चांगले कवी होते.

पद्माकर (लेखनकाल १८१८–१८३२) याची भाषा सुंदर व विचार गंभीर होते. याचे समकालीन चांगले लेखक प्रतापसाहा, महाराज, रामसहायदास, ग्वाल, चंद्रशेखर, दीनदयाळ गिरी, व सूरजमल हे होत. सूरजमल यानें आपल्या 'वंशभास्कर' या ग्रंथांत पुष्कळ ऐतिहासिक माहिती दिली आहे.

इ. १८३२ ते १८६८ हा संधिकाल मानला जातो. मागील दोन कालखंडांत काव्यरचनेंत पुष्कळ प्रगति झाली होती. पण इतर उपयुक्त विषय व गद्य ग्रंथरचना यांच्याकडे लक्ष नव्हतें. इंग्रजी राज्याच्या स्थिरस्थावरतेमुळें गद्यरचना व भौतिकशास्त्रें यांकडे आतां जास्त लक्ष देण्यांत आलें व काव्यांतील शृंगारिक महत्त्व कमी झालें. ललित किशोरी व ललित माधुरी (लखनौ) यांनीं जुन्या कृष्णसंप्रदायी काव्याचें पुनरुज्जीवन करण्यास आरंभ केला. परंतु त्यांना विशेष अनुयायी मिळाले नाहींत. द्विजदेव, गणेशप्रसाद, सेवक आणि लेखराज हे चांगले कवी होते. सरदार हा कवि व टीकाकार होता. गुलाबचें काव्य तेजस्वी आहे. रामसनेहीदास याचा 'विश्रामसागर' हा ग्रंथ धर्मविचारपूर्ण आहे. गिरिधरदास (इ. १८४३) यानें कवितांचीं लहान लहान पुस्तकें व एक नाटक लिहिलें. गद्यलेखकांमध्यें राजा शिवप्रसाद आणि

राजा लक्ष्मणसिंग हे प्रमुख होते. शिवप्रसादांची भाषा ऊर्दूमिश्रित हिंदी होती व लक्ष्मणसिंगांची शुद्ध हिंदी होती. ओंकारभट्ट, बद्रीलाल शर्मा आणि बन्सी गोपाळ हेहि चांगले गद्यलेखक होते.

शंकर दर्यावादी, फेरन, औघ, लच्छीराम, बलदेव, गंगाधर व्यास आणि व्रज यांनी जुन्या वळणाचीच कविता लिहिली. दयानंद सरस्वती यानें नवीन धर्मसंप्रदाय काढला व त्याचें गद्यलेखनहि फार प्रभावी होतें. त्यानेंच या काळात टिकाऊ गद्यवाङ्मय लिहिलें. डॉ. रुडॉल्फ हार्नेल हे उत्तम वाङ्मय-निरीक्षक होते. श्रद्धानंद, नवीनचंद्र राय, व्रजचंद जैन, बाळकृष्ण भट्ट आणि सरूपचंद जैन हेहि प्रभावी गद्यलेखक होते. दयानंद सरस्वती व त्यांचे शिष्य यांनी धार्मिक विषयांवर वादविवादात्मक पुष्कळ गद्यवाङ्मय लिहून समाजातील अनिष्ट चालींना आळा घातला.

भारतेंदु-काल ( १८६९–१८८८ )—हा अर्वाचीन वाङ्मयाचा प्रारंभकाळ होय. हरिश्चंद्र हे हिंदींतील श्रेष्ठ कवि आहेत. त्यांनी देशाभिमानानें व विनोदानें भरलेलीं अनेक नाटकें लिहिलीं. कालाकंकरचे रामपालसिंग, श्रीनिवासदास, गोविंद गिल्लाभेडी, ललित, सहजराम, हनुमान व गोविंद हे या काळांतले महत्त्वाचे ग्रंथकार होत. या काळांत देशाभिमानी गद्यवाङ्मयाची पुष्कळच वाढ झाली. कादंबरी-वाङ्मय, वृत्तपत्रें व मासिकें यांना पुष्कळ भरती आली. यामुळें हिंदी लेखकात मोठी जागृति झाली. राजकीय व सामाजिक दृष्टि अगदीं बदलली. अलीकडे शेंकडों वृत्तपत्रें आणि मासिकें निघत आहेत. पण त्यांचें लक्ष वाङ्मयापेक्षां राजकारणाकडे जास्त आहे. रेडिओवरील हिंदी १९४७ पर्यंत फारसी आणि ऊर्दू शब्दांनीं भरलेले असल्यामुळें तें लोकांस आवडत नसे व समजतहि नसे.

नाट्यसृष्टि विशेषतः मुस्लिम संस्कृतीचीच निदर्शक होती. सिनेमामध्यें मात्र हिंदु आचार-विचारांचेंच प्राबल्य आहे. दोन्ही धंद्यांमध्यें अनेक हिंदी लेखक कामें करीत आहेत. प्रतापनारायण मिश्र, अंबिकादत्त व्यास, बद्रीनारायण चौधरी, शिवनंदन सहाय आणि व्रजनंदन सहाय, यांनीं नाटकें आणि चरित्रें लिहिलीं आहेत. महावीरप्रसाद द्विवेदी यांनीं व्याकरणशुद्ध संस्कृत वळणाचें हिंदी प्रचारांत आणण्याचा प्रयत्न केला. पण इतर लेखकांनीं हीं बंधनें झुगारून दिलीं. गोपालराम गहार यांनीं गुप्तपोलिसांसंबंधीं अनेक कादंबऱ्या लिहिल्या. ज्वालाप्रसाद मिश्र आणि इतर लेखक यांनीं सनातन धर्माचा प्रचार केला. राम गुलाम द्विवेदी आणि वंदनपाठक यांनीं तुलसीदासाविषयीं पुष्कळ संशोधन केलें. पुष्कळ प्रभावी वक्त्यांनीं हिंदी भाषेला अगदीं अर्वाचीन स्वरूप आणून दिलें. श्रीधर पाठक व नथूराम शंकर हे चांगले कवी होते. भैरवप्रसाद वाजपेय ( विशाल ) हे कवि आणि विनोदी लेखक होते. त्यांच्या लेखनांत थोडी अश्लीलता आहे. परंतु विनोदी लेखनांत हिंदी वाङ्मयांत त्यांस जोड नाहीं. हिंदी भाषेचे माहीत असलेले लेखक निदान ५,००० तरी होतील.

सद्यःकालीन हिंदी हे मुख्यतः राजकारणामध्येंच गुंग आहे. हिंदीच्या प्रारंभींच्या काळांत तिच्यांत अपभ्रंश प्राकृत भाषेचें पुष्कळ मिश्रण होतें. परंतु सूरदासाच्या पूर्वीपासून एकोणिसाव्या शतकापर्यंत व्रजभाषाच सर्वत्र वापरली जात असे. हिंदी भाषेच्या प्रादेशिक पोटभाषांत मैथिली, अवधी, बुंदेलखंडी, राजपुतानी व पंजाबी यांचा समावेश होतो. खडी बोली हें जें हिंदीचें सद्यःकालीन स्वरूप आहे तें सतराव्या शतकापासूनच वापरण्यांत येऊं लागलें व व्रजभाषा व इतर पोटभाषा यांचें स्थान तिनें घेतलें आहे.

विसावें शतक—आतां विसाव्या शतकांतील हिंदी वाङ्मयाचा आढावा घेऊं. या भाषेचे दोन प्रवाह जोडीनें पुष्कळ काळ चालू होते. तुलसीदास, सूरदास, बिहारी, सेनापति, पद्माकर, इ. सर्वश्रेष्ठ कवींनीं अनेक शतकें वापरलेली व्रजभाषा ही एक. पश्चिमेकडील प्रांतांत म्हणजे दिल्ली, आग्रा, मथुरा, वगैरे भागांत विशेष प्रचलित असलेली हिंदीची 'खडी बोली' ही दुसरी. विसाव्या शतकाच्या आरंभीं व्रजभाषा आणि 'खडी बोली' या दोन्ही भाषांत वाङ्मय झपाट्यानें लिहिलें जात होतें. व्रजभाषेचें प्राचीन वैभव पाहून लोक तिलाहि मान देत. पण खरें आवडीचें वाङ्मय 'खडी बोली' मध्येंच लिहिलें जाई. पण अद्यापहि पुष्कळ लोक व्रजभाषेंतील वाङ्मयावर आदरपूर्वक प्रेम करणारे आहेत. सोळावें व सतरावें या शतकांत काव्यलेखन मुख्यतः व्रजभाषेंतच होत असे. व्रजभाषेंतील शब्दरचना अत्यंत मधुर व मोहक असे. तिच्यांत कठोर व कर्णकटु शब्द मिळणें अशक्य. कृष्णसंप्रदायांतील कवींनीं कृष्णाच्या अनंत लीला या भाषेंतच कथन केल्यामुळें या भाषेच्या माधुरीमध्यें भरच पडली. या गोडपणामुळें १८ व्या आणि १९ व्या शतकांमध्येंहि काव्यरचना याच भाषेंत झाली. परंतु पुढें पुढें कृष्णभक्तीचें स्वरूप पालटलें. आध्यात्मिक शुद्धतेची जागा निवळ मानवोचित शृंगारानें घेतली. व्रजभाषा अतिशय मृदु करण्याच्या प्रयत्नांत अर्थवाहकतेपेक्षां शब्दमार्दवाकडेच सर्व कवींचें लक्ष लागलें. नायक-नायिकांच्या बारीकसारीक शृंगारिक वर्णनानेंच सर्व काव्य भरून जात असे. त्या भाषेचें जुनें वैभव लुप्त झालें व तेंच तेंच शृंगारिक विषय प्रत्येक कवि वेगवेगळ्या शब्दांत पाल्हाळानें मांडूं लागला. देवीप्रसाद पूर्ण, सत्यनारायण कविरत्न व जगन्नाथदास रत्नाकर हे व्रजभाषेचे शेवटचे लेखक होत. विसाव्या शतकाच्या प्रारंभींच व्रजभाषेची जुनी इमारत कोसळून पडली.

विसाव्या शतकाच्या आरंभीं 'खडी बोली' या भाषेस चार कारणांनीं महत्त्व आलें : १. फोर्ट विल्यम कॉलेजची स्थापना व

खडी बोली हेंच शिक्षणाचें माध्यम असावें असा सरकारी ठराव झाला. २. भारतेंदु हरिश्चंद्र यांनीं आपल्या नाटकांमध्यें खडी बोलीला नीटनेटकें स्वरूप दिलें. ३. मासिकें व साप्ताहिकें खडी बोलीच वापरूं लागलीं. ४. नागरी प्रचारिणी सभेनें 'सरस्वती' मासिक आणि 'मनोरंजन पुस्तकमाला' सुरू करून त्यांतून 'खडी बोली'चाच प्रसार केला. इंग्लिश वाङ्मयाचा घरोघर अभ्यास, पाश्चात्य वाङ्मय व विचार यांचा आधुनिक शिक्षितांमध्यें प्रसार, नागरी प्रचारिणी सभा व हिंदी साहित्य संमेलन यांचें अविरत कार्य यांमुळें हिंदी भाषा विसाव्या शतकांत फारच फोफावली.

या शतकाच्या प्रारंभीं महावीरप्रसाद द्विवेदी यांच्या 'सरस्वती' मासिकानें खडी बोलींत काव्य, निबंध व साहित्यचर्चा यांचें अमाप उत्पादन केलें. काव्यास खडी बोलीचें अधिष्ठान महावीरप्रसादांनीं मिळवून दिलें. गद्य आणि पद्य लोकांच्या व्यवहाराच्या भाषेमध्येंच लिहिलें पाहिजे असा त्यांचा आग्रह त्यांनीं सिद्धीस नेला व इ. स. १९०९ मध्यें मैथिलीशरण गुप्त, नथूराम शंकर शर्मा, देवीप्रसाद पूर्ण, कामताप्रसाद गुरु व स्वतः द्विवेदी या पांच प्रख्यात कवींच्या काव्यांचा 'कविता-कलाप' नांवाचा एक संग्रह प्रसिद्ध केला. त्यांत विषय जरी जुने असले तरी खडी बोलीमध्यें उत्तम काव्य होऊं शकतें हें सर्वांना कळून चुकलें. लवकरच अयोध्यासिंह उपाध्याय यांनीं 'प्रिय-प्रवास' नांवाचें उत्कृष्ट काव्य खडी बोलीमध्यें प्रसिद्ध केलें. तीमध्यें श्रीकृष्णाचें मथुरेस प्रयाण हा विषय आध्यात्मिक व भावनामय पद्धतीनें आणि भव्य दृष्टीनें मांडला व कृष्णाचें देवतारूप जीवन वर्णन न करितां निवळ मानवी पातळीवर राहून उच्च प्रतीचें काव्य निर्माण केलें. कृष्ण हा लोककल्याणार्थ झटणारा महापुरुष होता, अवतारी नव्हता, अशा भूमिकेवरून सर्व काव्य लिहिलें आहे. स्वदेश-प्रेमी पहिलें महाकाव्य मैथिलीशरण गुप्तांचें 'भारत-भारती' हें होय. तें काव्य या दृष्टीनें फारसें महत्त्वाचें नाहीं, पण खडीबोलीमधील पहिलें स्वदेश-प्रेमी काव्य म्हणून त्याचा फार बोलबाला झाला. गोल्डस्मिथच्या 'डेझर्टेड व्हिलेज'चें 'उजाड-ग्राम' नांवाचें भाषांतर श्रीधर पाठक यांनीं केलें. इ. स. १९१९ पर्यंत हिंदी वाङ्मयाची वाढ बेताचीच होती, त्या वर्षी काँग्रेसनें नागपूरच्या अधिवेशनांत असहकारितेचा ठराव केल्यानंतर हिंदी वाङ्मयांत देशाभिमानाची प्रचंड लाट उसळली. दोन प्रकारच्या काव्यांना मोठा भर आला. प्रभातफेऱ्या व इतर समारंभांत म्हणण्याचीं लहान लहान पदें, व गांधीजी, लजपतराय, सरोजिनी नायडू, वगैरे देशभक्तांचीं चरित्रें व स्तुतिस्तोत्रें यांची खूप गर्दी झाली. देशाभिमानी कादंबऱ्या आणि लघुकथा शेंकडों प्रसिद्ध होऊं लागल्या. मुनशी प्रेमचंदांनीं आजपर्यंत उर्दू वाङ्मयच पुष्कळ लिहिलें होतें, पण आतां त्यांनीं हिंदीमध्यें उत्कृष्ट कादंबऱ्या लिहून फार कीर्ति संपादन केली. त्यांनीं आपल्या लेखनांत सत्याग्रह व अहिंसा यांची चिकित्सा केलीच, पण शिवाय तत्कालीन सामाजिक व आर्थिक प्रश्नांवरहि पुष्कळच खोल विचार केला. अशा रीतीनें हिंदी कथालेखकांत त्यांनीं सर्वोच्च स्थान मिळविलें.

या शतकांतील हिंदी काव्याचे तीन प्रकार आहेत. त्यांचे विषय १. कथानक व वर्णनें; २. गूढवाद आणि अध्यात्मविद्या व ३. नवमतवाद, हे होत. कथा-काव्याचे विषय धार्मिक, पौराणिक व ऐतिहासिक असतात. मुकुटधर पांडे हे कथाप्रधान काव्याचे प्रमुख कवी आहेत. धर्म, गूढवाद आणि अध्यात्म या विषयांवरील कवींस स्फूर्ति मुख्यतः उपनिषदें, कबीर, जायसी, मीरा, इत्यादि जुने कवी व रवींद्रनाथ यांजकडून मिळत असे. तसेंच आंग्ल कवी शेले, कीट्स, वर्ड्स्वर्थ यांच्या काव्यांचाहि फार परिणाम होत असे. गूढवादी हिंदी काव्य अलीकडे पुष्कळच झालें आहे. जयशंकरप्रसाद हे या काव्यसंप्रदायाचे सर्वोच्च कवी आहेत. त्यांचें पहिलें काव्य 'झरना' आहे. त्यांचें 'कामायनी' हें काव्य विसाव्या शतकांतलें अत्युत्तम काव्य म्हणून सर्वतोमुखीं मान्यता पावलें आहे. भौतिक ज्ञान आणि आध्यात्मिक ज्ञान यांच्या संयोगानेंच मानवी जीवनाचें कोडें सुटणार आहे असा या काव्याचा निष्कर्ष आहे. दुसऱ्या क्रमांकाचे कवि निराला यांचें 'गीतिका' काव्य निवळ तत्त्वज्ञानानें भरलें आहे. याच्या उलट 'शक्तिपूजा' आणि 'शिवाजीचें औरंगजेबास पत्र' इत्यादि विषय पेलतांना त्यांच्या विचारात अतिशय खळबळ दिसून येते. तिसरे कवि सुमित्रानंदन पंत यांनीं खडी बोलीला ब्रजभाषेची मधुमाधुरी आणली आहे. निसर्गवर्णन, गूढगुंजन आणि समकालीन विचारांची सूक्ष्म चिकित्सा यांमध्यें इतर सर्व कवींपेक्षां यांचें काव्य फार वरच्या प्रतीचें आहे. यांच्या 'पल्लव' काव्यांत मानवी मनाची अति सूक्ष्म चिकित्सा केलेली आहे. 'युगवाणी' आणि 'ग्राम्य' या काव्यांत आपल्या देशबांधवांच्या सुखदुःखांचें यथातथ्य वर्णन आहे. महादेवी वर्मा या कवयित्रीमध्यें मिराबाईच्या बरोबरीनें करुणरस आणि भावनांचें प्रभुत्व भरलें आहे. 'यम' आणि 'दीपशिखा' या काव्यांत हिंदी वाङ्मयांतील अध्यात्मविचारांची उच्चतम अभिव्यक्ति झाली आहे. अर्वाचीन काव्याचा तिसरा प्रकार म्हणजे सध्यांच्या भारतीय जीवनाची वास्तव दृष्टीनें केलेली चिकित्सा होय. कामकरी, शेतकरी व भिकारी यांचें करुणरसपूर्ण वर्णन भडक रंगांत वर्णन करणें हें या काव्यप्रकाराचें मुख्य काम. यांत जुन्या काव्यांचे सर्व नियम मोडून निरंकुश भाषेंत गरीब लोकांचें जीवन चित्रित केलेलें असतें; त्यांच्या भाषेंत माधुर्य मुळींच

नसतें. निराला, भगवतीचरण वर्मा, रामविलास शर्मा आणि समशेरजंग हे या संप्रदायाचे मुख्य प्रतिनिधी आहेत.

नाट्य—हिंदी नाट्यकलेचा पाया गेल्या शतकांत भारतेंदु हरिश्चंद्र यांनीं घातला. परंतु नाटक कंपन्यांनीं नाट्य-वाङ्मयाची धुळधाण उडविली. नाट्यवाङ्मय वैभवशाली करण्याकरितां माधव शुक्ल, बद्रिनाथ भट्ट, गोविंदवल्लभ पंत, माखनलाल चतुर्वेदी आणि बलदेवप्रसाद चतुर्वेदी यांनीं प्रयत्न केले. परंतु जयशंकरप्रसाद यांनींच नाट्यवाङ्मय अलौकिक सौंदर्यानें नटविलें. त्यांनीं अनेक ऐतिहासिक नाटकें लिहिलीं. चंद्रगुप्त मौर्यापासून हर्षवर्धनापर्यंतच्या काळांतील सांस्कृतिक इतिहास, राजकारण, समाजस्थिति आणि तत्त्वज्ञान यांचें आपल्या नाटकांत त्यांनीं स्वरूपदर्शन घडविलें आहे. ते खरे नाट्याचार्य होते व नाट्य-वाङ्मयास त्यांनीं नवजीवन आणून दिलें. लक्ष्मीनारायण मिश्र, उदयशंकर भट्ट, हरिकृष्ण प्रेमी आणि गोविंददास हे प्रसादसंप्रदायाचे इतर नाटककार होते. एक अंकी नाटिकांचाहि या काळांत पुष्कळच प्रसार झाला आहे. सामाजिक विषमतेवर उपाय शोधण्याचे प्रयत्न या एकांकिकांत केले आहेत. उपेंद्रनाथ अश्क, गणेशप्रसाद द्विवेदी, भोगनेश्वर, इ. लेखक या नाट्यप्रकारांत फार यशस्वी झाले आहेत. सुमित्रानंदन पंत यांचें 'ज्योत्स्ना' नांवाचें रूपक हिंदी भाषेंतला एक उत्कृष्ट नाट्यग्रंथ आहे.

कादंबरी आणि लघुकथा :—मुन्शी प्रेमचंद यांनीं कादंबरीचें जुनें खानदानी वळण मोडून ग्रामीण जीवनांतील आचार, विचार, भावना आणि सुखदुःखें यांचें हुबेहुब चित्र आपल्या ग्रंथांतून मांडलें. सेवासदन, प्रेमाश्रम, रंगभूमि, गबन व कर्मभूमि या कादंबऱ्यांतून आपल्या अलौकिक लेखनचातुर्यानें श्रीमंत, सावकार, नोकरशाही व सरकार यांच्याशीं पदोपदीं लढा देण्यांत गरीब ग्रामीण जनतेचे कसे हाल होतात याचें चित्रण अत्यंत कौशल्यानें केलेलें आहे. त्यांचा शेवटला ग्रंथ 'गोदान' हा हिंदीमधील अत्युत्कृष्ट कादंबऱ्यांत प्रथमश्रेणींत बसतो. प्रेमचंद नुसते कादंबरीकारच नाहींत तर मोठे तत्त्वचिंतक आहेत. त्यांच्या ग्रंथांचीं रूपांतरें हिंदी व इतर परदेशी भाषांतहि झालीं आहेत. प्रेमचंदांचे अनुयायी सुदर्शन, चतुर्सेन शास्त्री, जैनेंद्रकुमार, विसंबरनाथ शर्मा कौशिक, भगवतीचरण वर्मा, वगैरे लेखकांनीं आपल्या कादंबऱ्यांतून पुष्कळ सामाजिक आणि मानसशास्त्रीय प्रश्नांचा खल केला आहे. वृंदावनलाल वर्मा हे सध्यांच्या ऐतिहासिक कादंबरीकारांत अग्रणी आहेत.

निबंध आणि वाङ्मय-परीक्षण—या विषयांत हिंदीच्या लेखकांनीं पुष्कळच आघाडी मारली आहे. महावीरप्रसाद द्विवेदी हे हिंदीचे पहिले निबंधकार होत. 'सरस्वती' मासिकांत माधवप्रसाद, पूरणसिंह आणि श्यामसुंदरदास यांचें पुष्कळच निबंधवाङ्मय प्रसिद्ध झालें आहे. पंडित रामचंद्र शुक्ल हे विसाव्या शतकांतील सर्वोच्च निबंधकार आहेत. त्यांचा निबंधसंग्रह 'चिंतामणि' या नांवानें प्रसिद्ध झाला आहे. त्यांनीं तंत्र व विषयगांभीर्य या दृष्टीनें निबंधलेखनाचा उत्कृष्ट नमुना घालून दिला आहे. पन्नालाल बक्षी, हजारीप्रसाद द्विवेदी आणि धीरेंद्र वर्मा हे इतर चांगले निबंधकार आहेत. वाङ्मयपरीक्षणाचे दोन प्रकार आहेत. वेगवेगळे ग्रंथकार आणि वाङ्मयांतील विशिष्ट विचारप्रवाह यांच्या परीक्षणाचा एक प्रकार आणि सबंध वाङ्मयाचें इतिहास-समालोचन हा दुसरा प्रकार. पहिल्या प्रकारचें वाङ्मयपरीक्षण मासिकांतून पहिल्यानें प्रसिद्ध होऊन नंतर पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्यांत येतें. माताप्रसाद गुप्त यांचा तुलसीदासावरील प्रबंध पहिल्या प्रकारचा उत्तम नमुना आहे. डॉ. वार्ष्णेय व डॉ. लाल यांचे परीक्षणात्मक लेखहि उल्लेखनीय आहेत. मिश्रबंधु विनोद यांचा हिंदी वाङ्मयाचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास हा दुसऱ्या प्रकारचा उत्तम नमुना आहे. 'हिंदी नवरत्न' नांवाचा नऊ युगप्रवर्तक हिंदी कवींचा इतिहास फार लोकप्रिय झाला आहे. रामचंद्र शुक्ल आणि श्यामसुंदरदास यांनींहि हिंदी वाङ्मयाचा एक व्यापक व वाचनीय इतिहास लिहिला आहे. हिंदी भाषाशास्त्रावर डॉ. धीरेंद्र वर्मा व डॉ. बाबूराम सक्सेना यांचे ग्रंथ अभ्यसनीय आहेत.

जीवनोपयोगी वाङ्मय :—प्रकार पहिला—तत्त्वज्ञान, न्यायशास्त्र, अध्यात्मविद्या व धर्मशास्त्र हीं शास्त्रें भारतांत प्राचीन काळापासून वाढत आलीं आहेत. त्यांसंबंधीं लेखन बलदेव उपाध्याय, रामदास गौड व संपूर्णानंद यांनीं केलें आहे. पाश्चात्यांकडून आलेलीं शास्त्रें म्हणजे वास्तवशास्त्र, रसायनशास्त्र, इ. संबंधीं ग्रंथ हा दुसरा प्रकार. या भौतिकशास्त्र-ग्रंथलेखकांत डॉ. सत्यप्रकाश, डॉ. गोरखप्रकाश, श्री. महावीरप्रसाद, श्री. श्रीवास्तव आणि श्री. श्रीचरण यांचे ग्रंथ प्रमुख आहेत. समाजशास्त्रावर संपूर्णानंद, दयाशंकर दुबे, गुलाबराय व डॉ. भगवानदास यांचे ग्रंथ प्रमाणभूत आहेत. अलीकडेच महत्त्व पावलेल्या राज्यशास्त्र, इतिहास, प्रवास, परदेशी हुंडणावळ, इत्यादि विषयांवरील ग्रंथ यांचा तिसरा प्रकार. या वाङ्मयाचे प्रमुख लेखक म्हणजे राहुल सांकृत्यायन, जयचंद विद्यालंकार, डॉ. बेनीप्रसाद आणि डॉ. लक्ष्मीचंद जैन होत. डॉ. रघुवीर यांनीं शास्त्रीय परिभाषा संस्कृत शब्दांवरून तयार करण्याचा मोठा प्रयत्न केला आहे.

चरित्र आणि आत्मचरित्र :—भारतीय तत्त्वज्ञानांत मनुष्याच्या ऐहिक जीवनास मुळींच महत्त्व नसल्यानें हिंदी भाषेंत चरित्रग्रंथ मुळापासूनच फार कमी. बनारसीदास चतुर्वेदी यांनीं सत्यनारायण कविरत्न यांचें एक लहानसें चरित्र लिहिलें. पण त्यास लोकप्रियता लाभली नाहीं. रामनारायण त्रिपाठी यांनीं

'मालवीयांच्या सहवासांत तीस दिवस' म्हणून कांहीं आठवणी लिहिल्या आहेत. गांधीजी आणि महावीरप्रसाद द्विवेदी यांना अर्पण केलेल्या गौरव-ग्रंथांत कांहीं चरित्रपर निबंध आले आहेत. शिवराणी प्रेमचंद यांनीं 'प्रेमचंद घरमें' या पुस्तकांत प्रेमचंदांच्या जीवनाचें उत्तम चित्र दिलें आहे. हिंदीमध्यें आत्मचरित्रें तर फारच थोडीं आहेत. श्यामसुंदर दास आणि अयोध्यासिंह उपाध्याय यांनीं आपलीं आत्मचरित्रें लिहिलीं आहेत. गांधीजी आणि नेहरू यांच्या इंग्रजी आत्मचरित्रांचीं हिंदीमध्यें भाषांतरें झालीं आहेत.

छंदःशास्त्र–इतर कोणत्याहि भाषेपेक्षां हिंदी भाषेंतील छंदःशास्त्राची वाढ कमी नाहीं. संस्कृतमधील छंदःशास्त्रापासूनच या भाषेंतील छंदःशास्त्राचा उगम झालेला आहे. सर्व भाषांतील कवितांप्रमाणेंच यांतहि यमक साधलेला असतो. पण हिंदी भाषेमध्यें प्रत्येक चरणांत नुसत्या एका शेवटच्या अक्षराचा यमक साधल्यानें भागत नाहीं. तर निदान दोन अक्षरांचा तरी यमक साधला पाहिजे. हिंदींत शुद्धलेखन व व्याकरण या बाबतींत कदाचित् दुर्लक्ष केलेलें आढळेल, पण छंदःशास्त्रांतील गुंतागुंतीचे नियम पाळण्यांत तसें नाहीं. कुशल कवींच्या कौशल्यामुळें जो यमक साधला जातो तो फारच मनोहर वाटतो. हिंदी छंदःशास्त्रामधील वृत्तांची संख्या पुष्कळच आहे. त्यांतील अगदीं थोड्या प्रमुख वृत्तांचा येथें उल्लेख केला पाहिजे. दोहा किंवा दोहरा नांवाचें एक वृत्त असून त्याचे दोन चरण असतात व प्रत्येक चरणांत २४ मात्रा असतात व या मात्रा ठराविक रीतीनें विभागिल्या जातात. दोहऱ्याचा उपयोग हिंदी पद्य वाङ्मयांत फारच केला जातो. दोहरा उलट केला असतां सोरठा होतो. चौपाई देखील दोहऱ्याप्रमाणेंच लोकप्रिय आहे. चौपाईचे चार चरण असून प्रत्येक चरणांत १६ मात्रा असतात. याशिवाय इतर वृत्तें म्हणजे कुण्डलीय, छप्पाई, काव्य, सनह्य आणि कविता हीं होत. कांहीं गाण्यांचीं वृत्तेंहि आहेत व त्यांचाहि पुष्कळ वेळां उपयोग केला जातो.

अनेक शतकांत झाली नव्हती इतकी प्रगति हिंदी वाङ्मयांत गेल्या ५० वर्षांत झाली आहे. नव्या वाङ्मयास महावीरप्रसाद द्विवेदींनीं आरंभ केला. सध्यां रामचंद्र शुक्ल, जयशंकरप्रसाद, सुमित्रानंदन पंत व हजारीप्रसाद द्विवेदी हे गद्य-पद्य वाङ्मयांत मानवी मनाचे सर्व विचार व विकार कुशलतेनें प्रतिबिंबित करीत आहेत. मृदुमधुर भाषेंत लिहिलेलें काव्य मानवी विकारांचें सूक्ष्म विश्लेषण करीत आहे. प्रेमचंद आणि यशपाल हे रोमाँ रोलांद आणि डी. एच. लॉरेन्स यांच्याशीं स्पर्धा करीत आहेत. हिंदी नाट्य इब्सेन आणि शॉ यांच्या अनुकरणांतच समाधान न मानतां त्यांच्याहून अधिक उच्च विचाराच्या शोधांत आहे. अलीकडे अगदीं घरगुती भाषेंत भारतीय संस्कृतीचें दर्शन करून देणाऱ्या लोकगीतांचेहि संग्रह प्रसिद्ध होत आहेत. रामनरेश त्रिपाठी यांनीं या कामीं पुष्कळ परिश्रम केले आहेत. सरस्वती, माधुरी, हंस, विशाल भारत, इत्यादि मासिकें वाङ्मय-संवर्धनांत फार मदत करीत आहेत.

हिंदी आज राष्ट्रभाषा म्हणून स्वीकारण्यांत आली आहे. तिची रचना सोपी व शास्त्रशुद्ध आहे. कालानुसार तिच्यांत फेरबदल करणें सुलभ आहे. तिच्यांतील कांहीं दोष नाहींसे करण्याचा प्रयत्न महात्मा गांधी आणि पुरुषोत्तमदास टंडन यांनीं केला आहे. तिचा भविष्यकाल निःसंशय उज्ज्वल आहे.

प्रथमतः आपल्याला ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे इतर वाङ्मयांप्रमाणेंच हिंदी वाङ्मयापुढें कांहीं विघ्नें आहेत. आज जिकडे तिकडे इंग्रजी भाषेचें वर्चस्व असल्याकारणानें देशी भाषांना जितका उपयोग व्हावा तितका होत नाहीं; व मोठमोठे ग्रंथकार आपले विचार इंग्रजींतून मांडतात, अशी स्थिति आहे. त्याचप्रमाणें हिंदी गद्यवाङ्मयाचे नियम अद्यापि ठरलेले नाहींत हीहि एक मोठी अडचण आहे. हिंदी गद्यवाङ्मय अगदीं अलीकडे निर्माण झालें व तन्निमित्त उपयोगांत आणली जाणारी भाषा देखील नुकतीच बनत चालली आहे. मागील आदर्शभूत असे गद्यग्रंथहि नाहींत. व हल्लींच्या वाङ्मयाची स्थिति दररोज पालटत आहे. कांहीं ग्रंथकार संस्कृतप्रचुर नवीन हिंदी भाषा वापरतात तर दुसरे ग्रंथकार अरबी अगर फारसीशब्दप्रचुर भाषा वापरतात; कांहीं ग्रंथकार आंग्ल भाषेंतून भाषांतरिलेले शब्द वाङ्मयांत गोंवतात. अशी बेशिस्त स्थिति असल्याकारणानें कांहीं तरी नियम असणें जरूरीचें झालें आहे.

अशा रीतीनें हल्लींच्या हिंदी गद्यवाङ्मयाची कृत्रिम भाषा असल्यानें काव्यासाठीं तिचा उपयोग केला जात नाहीं. तेव्हां अशा प्रकारें गद्यवाङ्मयाच्या व पद्यवाङ्मयाच्या भाषेंत अंतर असणें हें हानिकारक आहे. पण आजकालच्या कवींमध्यें या कृत्रिम भाषेचा काव्यामध्यें उपयोग करण्याची प्रवृत्ति दिसून येत आहे.

अशा प्रकारच्या अडचणी हिंदी वाङ्मयापुढें असल्या तरी कांहीं फायदेहि हिंदी वाङ्मयाला होत आहेत. सक्तीचें शिक्षण झाल्यामुळें वाङ्मयाचा व ज्ञानाचा प्रसार झपाट्यानें होण्याचा चांगला संभव आहे. तसेंच मतदानाचे हक्क पुष्कळांना देण्यांत येणार असल्यामुळें त्या मतदारांना सर्व तऱ्हेची सामाजिक, राजकीय व औद्योगिक विषयांसंबंधाची माहिती असणें जरूर झालें आहे. आणि यामुळें अर्वाचीन नूतन वाङ्मयाचा झपाट्यानें विकास होईल यांत शंका नाहीं.

हिंदी वाङ्मयाच्या प्रसारार्थ ज्या संस्था निघालेल्या आहेत त्यांचाहि या वाङ्मयाच्या वाढीच्या कामीं फार उपयोग होणारसा आहे. काशी येथील नागरी प्रचारिणी सभा या कामीं फार मेहनत घेत आहे. हिन्दी हस्तलिखित ग्रंथ शोधून काढण्याकरितां

ही संस्था जारीनें प्रयत्न करीत आहे.. शिवाय उत्तम प्रकारचे नवीन ग्रंथ तिच्यामार्फत बाहेर पडत आहेत. सुंदर आंग्ल ग्रंथांचें भाषांतर या संस्थेमार्फत होत असतें. तसेंच या सभेमार्फत मोठा हिंदी कोश तयार झाला आहे. अशाच प्रकारच्या इतर संस्थांमार्फतहि चांगले चांगले इतर ग्रंथ बाहेर पडत आहेत. पाश्चात्य ज्ञानाचा फायदा हिंदी लोकांना मिळण्यासाठीं निरनिराळ्या विषयावरील ग्रंथ निघत आहेत. हिंदी साहित्य संमेलन ही मध्यवर्ती संस्था हिंदी वाङ्मयांतील परीक्षा घेऊन विद्यार्थ्यांना पदव्या देत असते व तिचा उद्देश हिंदुस्थानांत सर्वत्र हिंदीचा अभ्यास सुरू करण्याचा आहे.

**हिंदु कायदा**—प्रचलित कायद्यांत 'हिंदू' याची व्याख्या—(१) जन्मानें व धर्मानें हिंदू असलेले इसम; (२) असवर्ण विवाहाची किंवा विनविवाहाची संतति; (३) जैन, शीख, बौद्ध, ब्राह्मोपंथी, आर्यसमाजी, प्रार्थनासमाजी, इत्यादि स्वतःला हिंदू म्हणवणारे लोक; (४) मूळचे हिंदू नंतर ख्रिस्ती किंवा मुसलमान झाल्यानंतर पुन्हां 'शुद्धीकरण' विधीनें हिंदू झालेले इसम; (५) हिंदु स्त्रीला ख्रिस्ती किंवा मुसलमान इसमापासून झालेली पण जन्मापासून हिंदूप्रमाणें वाढलेली संतति. या सर्वांना हिंदु कायदा 'हिंदू' मानतो. 'हिंदु कायदा' हें नांव हिंदुधर्मशास्त्र किंवा 'हिंदुव्यवहारधर्मशास्त्र' या दोन नावांहून अतिशय मर्यादित अर्थानें रूढ झालें आहे. इंग्रजांच्या अमदानींत प्रथम पाश्चात्य 'कायदेशास्त्र' (ज्यूरिसप्रुडन्स) याचा अभ्यास हिंदुस्थानांत सुरू झाला, व ब्रिटिश सरकारचे पाश्चात्य पद्धतीचे म्हणजे विशेषतः इंग्लंडांतील कायद्यांसारखे कायदे १८६० पासून वरिष्ठ कायदे-कौन्सिलमध्यें मंजूर होऊन सर्व ब्रिटिश प्रांतांत दिवाणी व फौजदारी ह्या मुख्यतः दोन प्रकारच्या कोर्टांमार्फत या कायद्यांची अमलबजावणी काटेकोरपणानें होऊं लागली. तथापि १८५७ सालच्या बंडानंतर हिंदु, मुसलमान, वगैरे जमातींच्या कायद्यांच्या बाबतींत ढवळाढवळ न करण्याचें तटस्थपणाचें धोरण ब्रिटिश सरकारनें स्वीकारल्यामुळें हिंदु समाजाला लागू असलेला संपूर्ण हिंदु कायदा कायदे कौन्सिलनें मंजूर केलेला नाहीं; आणि दिवाणी कोर्टांत 'हिंदुधर्मशास्त्र' या व्यापक नांवानें 'मनुस्मृति', 'याज्ञवल्क्यस्मृति', 'नारदस्मृति', 'पाराशरस्मृति', इत्यादि स्मृतिग्रंथ, आणि सुप्रसिद्ध टीकाग्रंथ विज्ञानेश्वरकृत याज्ञवल्क्यस्मृतीवरील 'मिताक्षरा', जीमूतवाहनकृत 'दायभाग', नीलकंठकृत 'व्यवहारमयूख', माधवाचार्यकृत पाराशरस्मृतीवरील 'पराशर–माधव', नंदपंडितकृत 'दत्तक–मीमांसा',—या ग्रंथांच्या आधारें निकाल देण्यांत येऊं लागले; हायकोर्टांतील व प्रिव्हि कौन्सिलमधील इंग्रज न्यायाधीश याच संस्कृत स्मृतिग्रंथांचा व टीकाग्रंथांचा पाश्चात्य न्यायदृष्टीनें अर्थ लावून निर्णय करूं लागले, व ते त्यांचे निकाल 'केस–लॉ' म्हणून हिंदुस्थानांतील सर्व दिवाणी कोर्टांत प्रमाण मानणें भाग झालें. या पद्धतीनें ब्रिटिश सरकारचीं दिवाणी कोर्टें विवाह, वारसा, हिंदु एकत्र-कुटुंब, वांटणी, स्त्रीधन, दत्तक, अज्ञान व अज्ञानपालक, या बाबतींतील कायदा अमलांत आणूं लागलीं. पण स्मृतिग्रंथांत जगदुत्पत्तीपासून, चातुर्वर्ण्य, आश्रमधर्म, राजधर्म, प्रायश्चित्तें, वगैरे भाग 'धार्मिक कायदा' (रिलिजस लॉ) व 'सामाजिक कायदा' (सोशिअल लॉ) या स्वरूपाचा असल्यामुळें 'हिंदुधर्मशास्त्र' व 'हिंदु कायदा' हीं दोन कायद्याचीं क्षेत्रें अलग झालीं.

'हिंदु लॉ' चे आधार—कायद्याच्या पारिभाषिक अर्थानें 'हिंदु कायदा' हा सरकारनें किंवा कायदे मंडळानें मंजूर केलेला नसल्यामुळें तो 'आलिखित कायदा' (अनरिटन लॉ) आहे; व त्याला आधार आहेत ते–(१) मनु-याज्ञवल्क्यादिकांचे स्मृतिग्रंथ, (२) मिताक्षरादायभागादि टीकाग्रंथ, (३) सदाचार ऊर्फ रूढि (कस्टम अँड यूसेज), व (४) हायकोर्टें प्रिव्हि कौन्सिलचे निर्णय (केस लॉ) हे चार आधार आहेत. स्मृतिग्रंथांनीं आधार मानले आहेत ते—

श्रुति–स्मृति–सदाचारा यस्य च प्रियमात्मनः॥
"शास्त्रात् रूढिर्बलीयसी॥"

श्रुति म्हणजे वेद यांत हिंदु कायद्याविषयीं उपयुक्त असे फार थोडे उल्लेख सांपडतात, कारण 'वेद' हे 'धर्मशास्त्र' नव्हे. वेद हे जगांतील अत्यंत प्राचीन ५।६ हजार वर्षांपूर्वींचे ग्रंथ होत. त्यांत चौर्य, द्यूत, गुप्तजनन, वारसा, इत्यादिकांचे उल्लेख इतस्ततः आले आहेत, तेवढ्याच अर्थानें आजच्या 'हिंदु कायद्या'ला श्रुतीचा आधार आहे.

धर्मसूत्रें व स्मृतिग्रंथ—वेदांनंतर 'वेदांगें', शिक्षा–कल्प व्याकरणादि आठ 'वेदांगें' या नांवाचे ग्रंथ निर्माण झाले; त्यांपैकीं 'कल्प' ग्रंथांचें श्रौत, गृह्य व धर्मसूत्रें असे तीन भाग आहेत. त्यांपैकीं धर्मसूत्रांत कायद्याचें विवेचन आहे. 'धर्मसूत्रें' हे अठरा ग्रंथ असल्याचा उल्लेख आहे, पण त्यांपैकीं फक्त ऋग्वेदाचे वसिष्ठधर्मसूत्र, कृष्णयजुर्वेदाचें बौधायनधर्मसूत्र, आपस्तंबसूत्र, व सत्याषाढसूत्र, व सामवेदाचें गौतमधर्मसूत्र हीं पांचच धर्मसूत्रें सध्यां अस्तित्वांत आहेत. धर्मसूत्रांत स्मृतिग्रंथांप्रमाणें वर्णाश्रमधर्माचा विचार आहे. व त्यांत विवाहविधि, दाय, साहस, स्त्रीधन, पितृधन, दत्तक, नियोग, असवर्णविवाह, ज्येष्ठांशपद्धति, वगैरे प्रचलित 'हिंदु–कायद्यां'तील अनेक विषय आलेले असल्यामुळें 'धर्मसूत्रें' यांना आजच्या हिंदु कायद्याचे आधारग्रंथ मानणें योग्यच होय. नंतरचे स्मृतिग्रंथ व त्यांवरील टीकाग्रंथ हे प्रचलित हिंदु कायद्याचे आधारग्रंथ म्हणून हायकोर्टें व प्रिव्हि कौन्सिल मानीत असल्याचें वर लिहिलेंच आहे.

सदाचार उर्फ रूढि—शास्त्रापेक्षां रूढि बलवान् होय, असें कायदेशास्त्राचें तत्त्व असल्यामुळें पाश्चात्य कोर्टें व ब्रिटिश सरकारची न्यायकोर्टें 'रूढि' हा कायद्याचा आधार सर्वत्र मानतात, आणि 'रूढि' या शब्दाची कायदेशास्त्रदृष्ट्या निश्चित व्याख्या करण्यांत आली आहे, ती अशी कीं, रूढि ही प्राचीन परंपरागत सदसद्विवेकबुद्धीला पटणारी, अखंडित, आणि नीतिव्यवहाराला अविरोधी, अशी असली पाहिजे. सदर व्याख्येप्रमाणें अनेक रूढी ब्रिटिश कोर्टांनीं मान्य केल्या आहेत.

न्यायनिवाडे (केस लॉ)—ब्रिटिश राज्यांत दिवाणी फौजदारी कोर्टांची अव्वल व अपील अशी श्रेणी प्रिव्हि कौन्सिलपर्यंत निर्माण होऊन हिंदु धर्मशास्त्राचे स्मृतिग्रंथ, टीकाग्रंथ, रूढी, वगैरेंची अत्यंत सूक्ष्म चिकित्सा करून निकाल हायकोर्टें व प्रिव्हि कौन्सिल देऊं लागले, व ह्या उच्च अपील कोर्टांत विद्वान् हिंदु न्यायाधीश नेमण्यांत येऊं लागले, त्यामुळें या वरिष्ठ कोर्टांचे निकाल कनिष्ठ कोर्टांना तर बंधनकारक असतच, पण पाश्चात्यविद्याविभूषित अशा सुशिक्षित समाजाला मान्य होऊं लागले. या न्यायनिवाड्यांमध्यें हिंदु कायद्यांत आधुनिक कालानुसार व पाश्चात्य कायद्यानुसार कांहीं कांहीं सुधारणा होण्याची आवश्यकता सूचित केली गेल्यामुळें अलीकडे हिंदूंना विस्तृत मताधिकार व लोकनियुक्त सभासदांचें बहुमत कायदे कौन्सिलांत मिळाल्यापासून जुन्या हिंदु कायद्यांत इतस्ततः एखाद्दुसऱ्या बाबीची सुधारणा करणारे निरनिराळे कायदे मंजूर होऊं लागले. अलीकडे १९३० पासून सुधारणावादी स्त्रीपुरुष-मत इतकें सबल झालें कीं, वरिष्ठ सरकारनें 'हिंदुकायद्याचें कोड' नवीन तयार करण्याकरितां 'राव-कमिटी' कडून मसुदा तयार करून घेतला, आणि तदनुसार 'हिंदु-कायदा' बिल वरिष्ठ कायदे कौन्सिलमध्यें सरकारतर्फें दाखल झालें आहे. हिंदु-कायद्यांतील विवाह, घटस्फोट, विधवाविवाह, मिताक्षरा-हिंदु कायदा, अन्नवस्त्र, दायभाग-हिंदु कायदा, हिंदुविद्याधनाचा कायदा, वारसा, दत्तक, स्त्रीधन, इत्यादि स्वतंत्र लेख या कोशांत आहेत, ते पाहा.

हिंदुकुश—एक पर्वत. हिंदुकुश याचा अर्थ चंद्राचे पर्वत असा आहे. या विशाल पर्वताचा आरंभ ज्या ठिकाणीं हिमालय पर्वत वायव्यभागीं संपतो त्या ठिकाणीं होतो. हा पर्वत प्रथम पश्चिमेकडच्या बाजूस निघून उत्तरेकडे वळसा घेतो व पुनः पश्चिमेकडे जातो. खावकपिंडीच्या पूर्वेस दुसरी एक पर्वतांची रांग सुरु होते व ती ईशान्य व वायव्य या दोन बाजूंकडे जाते व तिलाच कोकचा हें नांव आहे. खावकपिंडीपासून एक शाखा वायव्य दिशेनें कटाघान किंवा कुंडुस याकडे जाते. अशा तऱ्हेच्या चार श्रेणी हिंदुकुशाच्या आहेत. या पर्वताची उंची सरासरीनें १८,००० फूट असून कांहीं ठिकाणीं शिखरें २०,००० फुटांपासून २५,००० फूट उंच आहेत. येथें झाडी फारच थोडी आहे. व १५,००० फुटांवर चिरंतन हिमरेषा आहे. येथील हवा जरी चांगली नसली तरी वनश्री चांगली आहे. येथील लोक मिश्रवर्णानें, धर्मानें व मिश्र भाषा बोलणारे असून त्यांच्या घरगुती चाली व राजकीय संस्थाहि भिन्न भिन्न प्रकारच्या आहेत. या पर्वतावरील दऱ्या व खिंडी चांगल्या सुपीक असून तेथील लोक अगदीं स्वतंत्र बाण्याचे आहेत. येथें मूळचे लोक हल्लीं सांपडत नाहींत, पण हल्लीं राहणारे सर्व लोक मुसलमान आहेत.

हिंदुधर्म—हिंदुधर्म हा शब्द सध्यां प्रचारांत रूढ झाला आहे. पण आपल्या कोणत्याहि धर्मशास्त्रांत हिंदुधर्म हा शब्द आढळावयाचा नाहीं. हिंदुधर्म म्हणजे हिंदूंचा धर्म; हिंदु म्हणजे वर्णाश्रमी जन; व त्यांचा धर्म म्हणजे त्यांचीं कर्तव्यें. आपले स्मृतिकार वर्णाश्रमधर्म सांगतात. निरनिराळ्या वर्णांना त्यांच्या आश्रमपरत्वें वेगवेगळे धर्म (कर्तव्यें) आदेशिले आहेत. [धर्मशब्दः कर्तव्यतावचनः इत्युक्तम्-मेधातिथि]. सर्व मानवजात चार वर्णांत विभागली असून ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र ह्या चार वर्णांपैकीं कोणत्या तरी एका वर्णांत जगांतील प्रत्येक मनुष्य समाविष्ट झाला पाहिजे. ह्या कारणानें आपल्या स्मृतिकारांचा मानवधर्म असल्याचें विद्वान् समजतात. एका सूत्राचें नांवहि मानवधर्मसूत्र असें आहे. गृह्यसूत्रें व स्मृती हे हिंदूंचे धर्मग्रंथ; श्रुति हें धर्मशास्त्र नव्हे. यमस्मृतींत हा भेद स्पष्टपणें केलेला दिसतो. [क्रियाः श्रुतौ वा शास्त्रे वा प्रव्रज्या न विधीयते।]. शास्त्र म्हणजे धर्मशास्त्र. जातिधर्म, कुलधर्म, वर्णधर्म आणि आश्रमधर्म असे भिन्न भिन्न धर्म (आचार) ग्रंथांतून उल्लेखलेले आहेत. सांप्रत वर्णव्यवस्था विस्कळीत झाली; आश्रमपालन बंद पडलें; जाती कोलमडू पाहत आहेत; आणि कुल विस्मृतिपथांत जात आहे; म्हणून हिंदु व हिंदुधर्म हेच शब्द पुढें टिकणार ह्यांत शंका नाहीं. तेव्हां हिंदु शब्दाचा अर्थ निश्चित करणें अपरिहार्य आहे. तेव्हां पूर्वीच्या वर्णाश्रम धर्मीयांचे वंशज ते हिंदु, असें म्हणावयास हरकत नाहीं. मात्र त्यांचा वर्णाश्रमधर्माविषयीं अनादर नसावा. आजचा हिंदु समाज म्हणजे असंख्य धर्मपंथांची खिचडी असून जातीच्या स्वरूपांत त्याचें अस्तित्व आज सिद्ध करतां येतें. अशा ह्या संमिश्र समाजाला एका समान धर्माची आवश्यकता तीव्रतेनें भासत आहे. ही उणीव हळूहळू भरून निघेल. सध्यां 'धर्मनिर्णयमंडळा' कडून तसा प्रयत्न होत आहे.

धर्माचीं दोन अंगें असतात: एक तात्त्विक व दुसरें व्यावहारिक. ईश्वरविषयक कल्पना; सृष्टि निर्माण कशी झाली; जगत् व ईश्वर ह्यांचा परस्पर संबंध आणि मानवी प्राण्याचें अंतिम ध्येय, ह्यांचा विचार ज्यांत आहे ती एक बाजू; व दुसरी बाजू म्हणजे, मनुष्यानें स्वतःशीं व इतरांबरोबर वागतांना कोणतीं कर्तव्यें

पाळावीं ह्याचा विचार. ह्या दुसऱ्या प्रकाराला आचारधर्म ही संज्ञा आहे. सर्व धर्मांत आचारधर्माला प्राधान्य देतात. ख्रिस्ती व मुसलमानी धर्मांत ईश्वरविषयक तात्त्विक विवेचन फारसें नाहीं. आर्यांच्या धर्मांत तें भरपूर आहे. हा प्रश्न कांहींसा तर्काधिष्ठित असल्यानें तत्संबंधीं मतान्तरें संभवतात. तशीं तीं आर्यांच्या धर्मांत आहेत. कोणत्याहि मताचा आग्रह हिंदुधर्मांत नाहीं. नास्तिक, आस्तिक, एकदेव, अनेकदेव प्रतिपादणारे, सर्वांचा समावेश हिंदूंत होऊं शकतो. आचारभेद तर उघड उघड आहे. तात्पर्य, विचारभेद व आचारभेद हें हिंदुधर्माचें वैशिष्ट्य मानलें जातें.

आचारविचारभेद हा व्यापक दृष्टीचा परिणाम आहे. त्यामुळें असमंजसपणा अथवा अव्यवस्थितपणा मात्र प्रत्ययास येतो असें मानणें योग्य नाहीं. ज्यांचा प्रभव एका व्यक्तीपासून झालेला आहे त्या ख्रिस्ती-मुसलमानी धर्मांत एकसूत्रीपणा असतो. आमचा धर्म अपौरुषेय आहे; शिवाय तो अखिल मानवांकरितां आहे. तेव्हां त्यांत एकसारखेपणाची अपेक्षा करणें चुकीचें आहे. आमच्या धर्मकल्पनांचा (आचारविषयक, तसेंच विचारविषयक) विकास होत आला आहे. तो धर्म विकासक्षम आहे. पुरुषप्रणीत धर्म विकासक्षम नसतो. मुसलमानी व ख्रिस्ती धर्म मूळ संस्थापकानें सुरू केले तसेच आज आहेत. त्यांत बदल करणें शक्य नाहीं. कारण त्यांच्या स्थापकाला अनुक्रमें ईश्वराचा दूत व देवपुत्र मानण्यात येतें.

आपला धर्म अपौरुषेय आहे ह्याचा अर्थ तो कृतक नाहीं; नैसर्गिक आहे. म्हणून त्याचा कोणी एक कर्ता नाहीं; ईश्वरप्रणीत असा कोणता धर्मग्रंथ नाहीं. आपल्या धर्मांत ईश्वराचा हात नाहीं. स्मृतिग्रंथ हे मनुष्यकृत आहेत. त्याचप्रमाणें अशी एकहि गोष्ट नाहीं कीं, ती हिंदू म्हणवून घेणाऱ्या प्रत्येकानें मानलीच पाहिजे. हिंदुधर्माइतकें स्वातंत्र्य दुसऱ्या कोणत्याहि धर्मांत नाहीं. इतर धर्मांशीं तुलना करतांना आर्यधर्माचें (ह्यालाच सांप्रत हिंदुधर्म समजतात) हें स्वरूप ध्यानांत ठेविलें पाहिजे.

हिंदुमात्राला श्रुती वंदनीय; तरीसुद्धां त्या अपौरुषेय आहेत म्हणजे ईश्वरप्रणीत नाहींत असें मीमांसक अट्टाहासानें प्रतिपादितात. इतकेंच नव्हे तर आमचें तत्त्वज्ञान ह्या अत्यंत पूज्य असलेल्या श्रुतींना-वेदांना मागें टाकून त्यांच्या पलीकडे जाण्याचा उपदेश आम्हांला करतें. वेद त्रैगुण्यांचा विषय आणि मनुष्याचें ध्येय गुणातीत होणें हें होय. गीतेंत श्रीकृष्ण अर्जुनाला निस्त्रैगुण्य होण्यास सांगतात महंमदी धर्म व ख्रिस्ती धर्म यांनीं आपल्या अनुयायांना कुराणातीत व बायबलातीत व्हा असें सांगणें अशक्य आहे. पौरुषेय व अपौरुषेय धर्म ह्यांतील ही विलक्षणता फार महत्त्वाची आहे.

हिंदुधर्माचा पाया शास्त्रशुद्ध आहे. परमेश्वर एक आहे व सर्व चराचर सृष्टि हें त्या एकाच परमेश्वराचें कार्य असल्याकारणानें जगांत तत्त्वतः एकच धर्म असावयास पाहिजे. ह्या प्रमेयानुसार हिंदू धर्माधर्मांत भेद मानीत नाहींत. धर्म म्हणजे आचार व उपासनापद्धति. कोणत्याहि उपासनापद्धतीचा अवलंब केला तरी त्या उपासनेचें फल उपासकाला मिळतें अशी हिंदुधर्माची शिकवण आहे [येऽप्यन्यदेवताभक्ता यजन्ते श्रद्धयान्विताः। तेऽपि मामेव कौन्तेय यजन्त्यविधिपूर्वकम्॥]. श्रद्धा हें उपासनेचें सार आहे; उपासनेची रीत महत्त्वाची नाहीं. ह्यास्तव हिंदुधर्मांत धर्मांतराची कल्पना नाहीं. श्रद्धान्वित मुसलमान अगर ख्रिस्ती ह्यांना सद्गति प्राप्त होणार नाहीं असें हिंदुधर्म म्हणत नाहीं. महंमदी व ख्रिस्ती धर्म व्यक्तिजन्य असल्यामुळें त्यांच्यांत इतकी व्यापक दृष्टि नाहीं. मुसलमानी व ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेणार नाहीं त्याला सद्गति नाहीं असा त्यांचा कटाक्ष आहे. गांधी हा भला माणूस होता हें मौलवी व पाद्री दोघांनाहि मान्य. तथापि त्यांच्या कळपांत गांधी न गेल्यामुळें तो नरकांत जाणार ही त्यांची निश्चिति. ह्याचा अर्थ असा कीं, चांगलेपणा माणसाला तारक होत नाहीं. ही पराकाष्ठेची अशास्त्रीय दृष्टि होय. व्यक्तिजन्य धर्म व देश हीं ह्या बाबतींत समान भूमिकेवर येतात. देशाभिमान तसाच धर्माभिमान. हिंदूंत ह्या दोन्ही अभिमानांचा अभाव आहे. तो कां, तें वरील विवेचनावरून समजेल.

हिंदुधर्माला आर्यधर्म, वैदिकधर्म, ब्राह्मणीधर्म, इत्यादि संज्ञा लावण्यांत येतात. ह्या सर्वांपेक्षां सनातनधर्म हा दुसरा पर्याय अधिक प्रशस्त होय. हिंदूंच्या धर्माचीं तत्त्वें सनातन म्हणजे चिरंतन अशीं आहेत. तीं काळाच्या ओघांत गडप होणारीं नाहींत.

हिंदूंच्या धर्माला मोठेपणा त्याच्या तत्त्वज्ञानामुळें आला आहे. जीव अमर असून तो देहापासून अलग आहे, ह्या मौलिक कल्पनेनें कर्मसिद्धान्ताला जन्म दिला. दुसऱ्या कोणत्याहि धर्मानें कर्मसिद्धान्ताचा स्वीकार केलेला नाहीं. आपल्या तत्त्ववेत्त्यांनीं जीवपरमात्म्याचें ऐक्य मानलें आहे. त्यामुळें आमच्या जीवनांत अहिंसेला प्राधान्य प्राप्त झालें. सर्व जीव परमात्मरूप असल्यावर कोण कोणाची हत्या करणार व कां म्हणून करणार? ह्याच कारणानें पशुपक्ष्यांवर, फार काय वृक्षादिकांवर सुद्धां आपण प्रेम करावयास शिकलों. मनोनिग्रह व कर्तव्योपदेश हीं ह्याच तत्त्वज्ञानाचीं फलें होत. हक्कांचा विचार आम्हांला पारखा आहे. कायद्याचें प्रस्थ आपल्याकडे माजलें नाहीं ह्याचें कारणहि हेंच. कायदा हक्कांचा विचार प्रथम करतो. आपण मात्र माझ्या हक्कावर आक्रमण केलें म्हणून मीं त्या आक्रमकास दोषी ठरवीत नाहीं तर तो स्वतःच्या कर्तव्यापासून भ्रष्ट झाला म्हणून, असें मानतों.

(कलम २). मात्र पुढें जन्माला येणाऱ्या व्यक्तीला देणगी द्यावयाची तर ती केवळ तहहयात देऊन भागत नाहीं, ती देणगी त्याला पूर्ण हक्कानें द्यावी लागते.

**हिंदु वारसाक्रम सुधारणेचा कायदा**—(दि हिंदु लॉ ऑफ इन्हेरिटन्स ॲक्ट, १९२८). या कायद्याचा उद्देश जुन्या हिंदुधर्मशास्त्रांतील वारसाच्या क्रमांत सुधारणा करणें हा आहे. त्याचें मुख्य कलम येणेंप्रमाणें आहे—वारसाक्रमांत आजा (बापाचा बाप) याच्यानंतर मुलाची मुलगी, मुलीची मुलगी, आणि बहिणीचा मुलगा हे वारसाहक्काला पात्र समजावे; यांच्यानंतरचा वारसाहक्क बापाच्या भावाकडे जावा (कलम २). जुन्या हिंदुधर्म-शास्त्राचा उद्देश विशेषतः 'मिताक्षरा' कायद्याचा उद्देश वडिलार्जित मिळकत त्याच घराण्यात राहावी, परघराण्यांत जाऊं नये, तसेंच मूळ इस्टेट मिळवणाराचा उद्देश, आपल्या घराण्यांतील मुलांबाळांनीं वंशपरंपरेनें इस्टेटीचा उपभोग घ्यावा, घराण्याचें नांव व धार्मिक आचार सतत चालवावे, असा असल्यामुळें स्त्रीवारसाऐवजीं पुरुषवारसांना म्हणजे त्याच घराण्यांतील इसमाला वडिलार्जित मिळकत मिळावी, असा आहे. नजीकच्या स्त्रीवारसांना वारसाहक्क दिल्यानें इस्टेट परघराण्यांत जाते, आणि मूळ इस्टेट मिळवणाराचें व त्याच्या घराण्याचें नांवसुद्धां नष्ट होतें. आपण मिळविलेल्या इस्टेटीचा व आपल्या नांवाचासुद्धां असा नायनाट व्हावा, अशी इच्छा मूळ इस्टेट मिळविणाराची असणें अशक्य आहे, म्हणून जुन्या हिंदुधर्मशास्त्रांतले नियमच न्याय्य व योग्य वाटतात.

**हिंदु वारसा-प्रतिबंध-निवारणाचा कायदा**—(दि हिंदु इन्हेरिटन्स रिमूव्हल ऑफ डिसॅबिलिटीज् ॲक्ट, १९२८). हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें (१) अंधळे, मुके व बहिरे जन्मापासून व बरे न होण्यासारखे इसम; (२) जन्मापासून वेडा किंवा उन्मत्त असलेला किंवा वांटपाच्या वेळीं वेडा असलेला इसम; (३) सर्वस्वीं बुद्धिहीन इसम (ईडियट); (४) महारोगी; (५) रक्तपिती असलेला इसम; (६) इतर गलिच्छ किंवा असाध्य रोगानें पीडिलेला, व्याधिग्रस्त इसम; व (७) संन्यास घेऊन सर्वसंगपरित्याग केलेला परिव्राजक, यांना वाटणी करतांना हिस्सा देऊं नये, असा नियम आहे. हे इसम वांटणींतून वगळणें हा अन्याय आहे, असें ब्रिटिश अमदानींतील विद्वान् सुधारकाना वाटल्यामुळें सदर कायदा करण्यांत आला. त्याचें महत्त्वाचें कलम येणेंप्रमाणें:—जन्मतः वेडा असेल त्या इसमाखेरीज इतर कोणीहि इसम एकत्र मिळकतींतील हिश्श्यांतून वगळला जाऊं नये (शारीरिक किंवा बौद्धिक कोणतेंहि व्यंग किंवा रोग असला तरी त्याचा हिस्सा त्याला मिळावा), असें या कायद्याचें कलम (२) आहे. जुन्या कायद्यांत अशा इसमांना अन्नवस्त्राचा हक्क असे; कारण अंधळा-मुका-महारोगी-वेडा असे इसम वाटणींत हिस्सा मिळाला तर त्या पृथक् मिळकतीची वहिवाट करण्यास असमर्थ असल्यामुळें हिश्श्याऐवजीं अन्नवस्त्र म्हणजे आयतें उत्पन्न त्याला मिळे. शिवाय स्वतंत्र मालकीची इस्टेट नसल्यामुळें व्यंग किंवा रोगी इसमाचा विवाह व तज्जन्य संतति होणें, ही आपत्ति टळे. व्यावहारिक व सामाजिक दृष्ट्या जुना हिंदु कायदाच अधिक सयुक्तिक वाटतो. शिवाय अशा कोणा इसमाचा विवाह झाल्यास त्याच्या मुलाना इस्टेटींत वारसाहक्कानें हिस्सा मिळावा, असा नियम जुन्या हिंदु धर्मशास्त्रांत आहे.

**हिंदु विद्या-धनाचा कायदा**—(दि हिंदु गेन्स ऑफ लार्निंग ॲक्ट, १९३०). हिंदु कायद्यात मिळकतीचे (१) वडिलार्जित, व (२) स्वसंपादित, असे फार महत्त्वाचे दोन प्रकार असून त्या प्रत्येकावरील स्वामित्वाचे हक्क व वारसाहक्क निरनिराळ्या प्रकारचे आहेत. 'स्वसंपादित' इस्टेटीची याज्ञवल्क्य-स्मृतिग्रंथांतील व्याख्या येणेंप्रमाणें—

> "पितृद्रव्याविरोधेन यदन्यत्स्वयमर्जितम्।
> मैत्रमौद्वाहिकं चैव दायादानां न तद्भवेत्॥
> क्रमादभ्यागतं द्रव्यं हृतमभ्युद्धरेत्तु यः।
> दायादेभ्यो न तद्दद्याद्विद्यया लब्धमेवच॥"

याचा अर्थ असा कीं, "पितृद्रव्याच्या मदतीवांचून जें कांहीं कष्टार्जित असेल तें धन, तसेंच मित्राकडून मिळालेलें धन, विवाहांत देणग्या मिळालेलें धन, ही दायाद बांधवांची समाईक मिळकत होत नाहीं; तसेंच वारसाक्रमानें मिळालेलें धन, पूर्वीचें नष्ट झालेलें पण पुन्हां मिळविलेलें धन, तसेंच विद्येच्या योगानें मिळविलेलें धन, दायादाना देण्याचें कारण नाहीं." याप्रमाणें वरील सहा प्रकारचें धन पितृद्रव्याच्या म्हणजे समाईक मिळकतीच्या मदतीवांचून मिळालेलें असेल तर ती स्वसंपादित मिळकत होय. या व्याख्येमुळें ब्रिटिश अमदानींत उच्च पदव्या मिळवून मोठाल्या पगाराच्या नोकऱ्या मिळालेल्या एकत्र कुटुंबांतील भावाची फार नुकसानी होऊं लागली; कारण उच्च शिक्षण महाग असल्यामुळें फी-पुस्तकादिकाचा खर्च एकत्र मिळकतींतून करावा लागे, व त्यामुळें पुढें उच्च विद्या झाल्यावर मिळालेला शेंकडों-हजारों रुपये पगार किंवा डॉक्टरी-वकिलीसारख्या धंद्यातील प्राप्ति एकत्र-कुटुंबाची मिळकत म्हणून वरील व्याख्येप्रमाणें ठरूं लागली; आणि मिळवता भाऊ मरेपर्यंत एकत्र कुटुंबच असल्यास त्याचें हें विद्याधन उरलेल्या सर्व भावाना वांटून मिळे; खुद्द त्या मिळवत्या मृत भावाची विधवा पत्नी, मुलगा नसल्यास, केवळ अन्नवस्त्राची हक्कदारीण ठरे. हयातींत वांटणी केली तरी विद्याधनांत इतर सर्व भाऊ हिस्सेदार होत. हा अन्याय वकील-वर्गाच्या लक्षांत लवकर आल्यामुळें बॅरिस्टर जयकर यांनीं पुढाकार घेऊन वरिष्ठ कायदे-मंडळांत सदर 'विद्याधनाचा कायदा' मंजूर करून घेतला;

त्यातलें महत्त्वाचें कलम येणेंप्रमाणें—"एखाद्या इसमाची विद्या जरी (अ) सर्वस्वीं किंवा कांहीं अंशीं त्याच्या एकत्र कुटुंबांतील एखाद्या सहभागीदाराच्या मदतीनें किंवा एकत्र कुटुंबाच्या उत्पन्नाच्या मदतीनें किंवा एखाद्या सहभागीदाराच्या उत्पन्नाच्या मदतीनें झालेली असली, किंवा (ब) एखाद्या इसमाची विद्या चालू असतांना त्याचें किंवा त्याच्या कुटुंबाचें पोषण सर्वस्वीं किंवा कांहीं अंशीं एकत्र मिळकतीच्या उत्पन्नांतून किंवा एखाद्या सहभागीदाराच्या उत्पन्नांतून झालेलें असलें तरी, तसेंच तें शिक्षण सामान्य प्रतीचें असलें, किंवा विशेष प्रकारचें (टेक्निकल) असलें, किंवा प्रोफेसर-डॉक्टर-वकील-न्यायाधीश-इंजीनियर वगैरे उच्च प्रकारच्या उद्योगधंद्यांचें असलें, तरी त्या विद्येमुळें मिळालेलें धन मिळविणाराच्या स्वतंत्र मालकीचें स्वसंपादित समजण्यांत येईल (कलम ३). या कायद्यांत 'पितृद्रव्याविरोधेन' म्हणजे एकत्र कुटुंबाच्या मदतीबद्दलचा मुळींच विचार न करतां सर्व विद्याधन स्वसंपादित मिळकत ठरविली, हा अन्याय आहे. यामुळें भाऊभाऊ एकमेकांना उच्च किंवा दुय्यम शिक्षणाला किमान सर्वांचा शिक्षणखर्च मिळतो त्याहून अधिक खर्च करणार नाहींत; आणि एक भाऊ वयांत येतांच एकत्र कुटुंब मोडून विभक्त होण्याची प्रवृत्ति वाढेल; वडील नसल्यास, अज्ञान भावांची काळजी घेतली जाणार नाहीं.

**हिंदुसमाज**—हिंदुसमाजाचा वंशविषयक विचार करणें अवश्य आहे. कारण पाठीमागच्या एकंदर इतिहासाचें स्पष्टीकरण त्यामुळें होतें. आज हिंदुस्थानच्या लोकसमाजाचें वर्गीकरण करावयाचें झाल्यास तें हिंदु व अहिंदु असेंच करावें लागेल. हिंदूंमध्यें नागरिक हिंदु व वन्य असें वर्गीकरण करावें लागेल व अहिंदूंचें मुसुलमान, ख्रिस्ती, पारशी व यहुदी असें वर्गीकरण करावें लागेल. जगांतील सर्व धर्म व सर्व प्रकारच्या जाती यांचे समुच्चय हिंदुस्थानांत आहेत. तथापि अशा बाह्यांची संख्या फार थोडी आहे. लोकसमाजाचें वर्णन करावयाचें म्हणजे हिंदुसमाज आणि त्याचे इतरांशीं संबंध असेंच वर्णन करावें लागेल.

हिंदुसमाजाचा थोडक्यांत इतिहास पुढीलप्रमाणें देतां येईल: वेदकालीं साधारणपणें विदर्भ देशापर्यंत आर्यन संस्कृतीचे लोक असावेत. दख्खनचा बराचसा भाग अरण्यमय असावा आणि महाराष्ट्राच्या दक्षिणेस द्राविड वंशाचे लोक असावेत, आणि सिंहलद्वीपांत आर्यन वंशाचे लोक असावेत. अशी वांशिक परिस्थिति चोहोंकडे असतां वायव्येकडून दिवोदास आणि सुदास यांच्या म्हणजे भरतांच्या नेतृत्वाखालीं नवीन आर्यन लोक आले व त्यांची व स्थानिक आर्यन लोकांची संस्कृति एक होऊन हिंदुसंस्कृति निर्माण झाली. हे दोन समाज एक होण्याची क्रिया चालू असतां ब्राह्मण जात तयार झाली. ती जात यज्ञ करणारे धंदेवाईक ऋषी आणि ऋत्विज यांच्यापासून झाली. या जातीनें शास्त्र आणि वाङ्मय यांचा अभ्यास वाढला. आणि तिनें आपली संस्कृति आसेतुहिमाचल पसरविली. त्यामुळें अनेक निरनिराळ्या वंशांतील लोक सदृश झाले. व हे जे लोक सदृश झाले तोच हिंदुसमाज होय. यानें प्रत्येक ठिकाणचीं स्थानिक दैवतें हीं शिव-विष्णु-दुर्गा इत्यादींचीं रूपें किंवा अवतार आहेत अशी कल्पना प्रत्येक स्थानिक समुच्चयाच्या मनांत भरवून समाज एकरूप केला व त्या समाजाचें पौरोहित्य आपल्याकडेसच ठेविलें. हा संस्कृतिप्रसार कांहीं समुच्चयांत पूर्णपणें पोसला नाहीं. आणि म्हणून त्या वर्गाला आजचे सेन्ससकार व युरोपियन शास्त्रज्ञ हिंदूंपासून वगळून पाहतात. अशा प्रकारच्या जाती म्हटल्या म्हणजे गोंड, भिल्ल या होत. ज्या अनेक जाती ब्राह्मणान्वयी बनल्या त्या हिंदु होत. तथापि हिंदूंमध्येंच पुढें, त्यांची ब्राह्मणी विचारपद्धति बहुतेक अंगीकारावयाची पण ब्राह्मणाचें महत्त्व तेवढें नाकारावयाचें अशा तऱ्हेचे संप्रदाय उत्पन्न झाले; ते बौद्ध व जैन होत. बौद्धांची संख्या हिंदुस्थानांत थोडी आहे. पण जैनांची बरीच आहे.

हिंदुसंस्कृतीचा प्रसार जसा ब्राह्मणांनीं केला तसाच तो हिंदुसंस्कृतींत उत्पन्न झालेल्या दुसऱ्या एका संप्रदायानें केला. त्या संस्कृतीचा परिणाम फार मोठा होऊन तो जपानपासून ट्रान्सकॉकेशियापर्यंत हिंदुस्थानच्या उत्तरेस स्पष्ट दिसत आहे. हा परिणाम करणारा संप्रदाय बौद्धांचा होय. मणिपूरपासून सयामपर्यंत जे लोकसमूह आहेत ते हिंदु व चिनी या दोन्ही संस्कृतींच्या आवरणाखालीं आहेत. हिंदुसंस्कृतींत संकोच उत्पन्न करणारी संस्कृति मुसलमानांची होय. तिनें देशांत नवीन समाजघटना, उपासनापद्धति, कायदेपद्धति, लिपि व बाह्यशब्दसमुच्चय हीं ओतलीं, व तीच देश्य संस्कृतीशीं स्पर्धा करीत आहेत. व एकाच रक्ताचे लोक निरनिराळ्या संस्कृतींच्या अभिमानानें एकमेकांविरुद्ध गडबड करीत आहेत. हिंदुसंस्कृति व मुसलमान-संस्कृति यांचें एकीकरण करण्याचा प्रयत्न शीखांकडून झाला. हा हिंदूंमध्यें मुसल्मानी तत्त्वें घरांत घेणारा पंथ होता. त्याचप्रमाणें हिंदु तत्त्वें घरांत घेणारे पंथ मुसल्मानांत उत्पन्न झाले.

हिंदूंमध्यें सामाजिक अंतर्घटनेचें रूपांतर करूं इच्छिणाऱ्या अनेक चळवळी निघाल्या. त्यांत बसवाची चळवळ जातिभेद मोडण्यासाठीं खटपट करणारी होती, तशीच महानुभावांचीहि होती. बौद्धांची वृत्ति चातुर्वर्ण्यास कबुली देऊन क्षत्रियांचें महत्त्व ब्राह्मणांपेक्षां जास्त वाढविण्याची होती. आणि ब्राह्मण-क्षत्रियांखेरीज सामान्य कारागिरांचा वर्ग आहे त्या कारागिरांची चळवळ कारागीर-वर्गाचें महत्त्व ब्राह्मणांइतकें स्थापन करण्याची होती.

अस्पृश्यांकडून आपलें महत्त्व संस्थापित करण्याची चळवळ फारशी झाली नाहीं. सामान्य ब्राह्मणेतर वर्गांत जागृति उत्पन्न करून त्या वर्गाचें सामाजिक महत्त्व स्थापन करण्याकरितां ज्या

अलीकडे चळवळी झाल्या त्यांत सत्यशोधकांच्या चळवळीस प्राधान्य दिले पाहिजे.

समाजांतील जातिभेद—हिंदुस्थानांतील लोक जातींवरून ओळखण्यांत येतात; उदा.— हा ब्राह्मण, हा सोनार, हा चांभार, इत्यादि. त्यामुळें एकंदर लोकसमाजांत भेदाभेद दृढमूल झाल्यासारखे होऊन एकोप्यानें व एकविचारानें कार्य करणें अवघड होऊन बसलें आहे. जेथें तेथें जातिभेद प्रामुख्यानें मनांत घोळत असतो व स्वजातीयांकडे प्रत्येकाचा साहजिकच ओढा दृष्टीस पडतो. शिवाय हिंदु लोकांतील जातीजातींमधला उच्चनीचपणा कसा ठरवावा हें अलीकडे कठिण होऊं लागलें आहे. धंद्यावरून ठरविणें झाल्यास अलीकडे धंद्यांच्या बाबतींत फेरफार पुष्कळ झाले असून वाटेल त्या जातीच्या इसमाने वाटेल तो धंदा करावा हें स्वातंत्र्य प्रस्थापित होत चाललें आहे. बालविवाह, बहुभार्यापद्धति, विधवाविवाहप्रतिबंध, मांसाशन यांवरूनहि जातींचा उच्चनीचभाव ठरवितां येत नाहीं; कारण शिक्षणप्रसाराबरोबर या रूढींतहि बदल होत चालला आहे. त्यामुळें साधारणतः आज हिंदुसमाजाचे फक्त तीनच पोटभाग करतां येतात्, ते म्हणजे (१) ब्राह्मण, (२) ब्राह्मणेतर, व (३) अस्पृश्य.

हिंदुस्थानांतील सर्व लोकांवर आपल्या संस्कृतीचें आवरण टाकणारी संस्कृति म्हटली म्हणजे युरोपियन संस्कृति होय. या संस्कृतीबरोबर अर्वाचीन सुधारणा बरीच आपणांकडे आली. देशांतील बहुसंख्याक असलेल्या लोकांची संस्कृति म्हणजे हिंदूंची संस्कृति इतर समाज आपल्या पचनीं पाडून अखिल भारतीय राष्ट्रीयत्व उत्पन्न करील कीं दुसऱ्या संस्कृतीमध्यें विलीन होईल याविषयीं सध्या कांहींच भविष्य सांगतां येत नाहीं.

**हिंदुस्थान**—या खंडसदृश विशाल देशास प्राचीन काळीं आर्यावर्त, भरतखंड अशीं नांवें असलीं तरी १९४७ त देशाची फाळणी होईपर्यंत हिंदुस्थान म्हणजे हिंदु लोकांचा वसतिप्रदेश असेंच नांव रूढ होतें. आज पाकिस्तान निराळा काढल्यामुळें पुन्हां उरलेल्या भागास 'भारत' हें नांव मिळालें आहे. या राष्ट्रांत काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत उत्तर–दक्षिण आणि कराचीपासून कलकत्त्यापर्यंत पश्चिम–पूर्व इतका भूमिभाग मोडतो.

हा देश विषुववृत्ताच्या उत्तरेस अजमासें ८° ते ३७° अक्षांश आणि ६२° ते ९७° पूर्वरेखांश यांच्या दरम्यान वसला आहे. उत्तरेस पर्वतांनीं हा परिवेष्टिला आहे. हिंदुस्थानचा किनारा फारसा दंतुर नाहीं; त्यामुळें आखातें व बेटें कमींच आहेत. किनारा उथळ असल्यानें चांगलीं बंदरेंहि फार नाहींत. आजच्या हिंदी साम्राज्याचें एकंदर क्षे. फ. ११,२९,००० चौ. मै. आहे. याचे पर्वतमय प्रदेश, मैदानाचा प्रदेश, पठाराचा प्रदेश आणि पूर्व–पश्चिम किनाऱ्यांवरील सखल प्रदेश, असे चार स्वाभाविक विभाग पडतात. पर्वतमय प्रदेशांत हिमालय व पश्चिम आणि पूर्व सरहद्दीवरील पर्वत येतात. मैदानाच्या प्रदेशांत सिंधु–गंगथडीचें मैदान येतें. पठारांत मध्य हिंदुस्थानचें व दख्खनचें पठार यांचा समावेश होतो. व किनाऱ्यावरील प्रदेशांत पूर्व व पश्चिम घाट म्हणजे कारोमंडल व मलबार किनारा येतो.

पौराणिक माहिती—हिंदुस्थानच्या बाहेरच्या देशांची महाभारतकाळीं बरीच माहिती येथील लोकांस होती तेव्हां हिंदुस्थानची माहिती महाभारतकाळीं संपूर्ण विस्तृत रीतीची त्यांस होती यांत बिलकुल आश्चर्य नाहीं. वेदकाळीं आर्यांना पंजाब व मध्य देश यांची माहिती होती ती पुढें हळूहळू सर्व देशाची माहिती होऊन महाभारतकाळीं संपूर्ण माहिती असली पाहिजे, असें महाभारतावरून दिसतें. पाणिनीच्या काळीं दक्षिणेंतील देशांची माहिती विशेष नव्हती असा कित्येकांनीं जो तर्क केलेला आहे, तो संभवनीय दिसतो. पाणिनीचा काल ख्रि. पू. ८००–९०० मानण्यास हरकत नाहीं. या काळानंतर बुद्धाच्या काळापर्यंत दक्षिणेस थेट कन्याकुमारीपर्यंत भारतीय आर्यांचा प्रसार झाला होता. त्यांचीं राज्येंहि स्थापित झालीं होतीं. विशेषतः चंद्रवंशी आर्य भोज व यादव यांनीं दक्षिणेस वसति केली व दक्षिणेमध्यें वैदिक धर्म पूर्णपणें प्रस्थापित झाला होता. बौद्ध धर्माच्या पूर्वी वैदिक धर्माचा दक्षिणेंत पूर्ण अमल बसला होता, ही गोष्ट निर्विवाद आहे.

अलेक्झांडरच्या पूर्वीपासून दक्षिणची माहिती भारतीय आर्यांस होती याचा अस्तिपक्षी पुरावा सबळ आहे. कारण त्याच्याबरोबर आलेले इरॅटॉस्थेनीज वगैरे भूगोल-ग्रंथकार असें लिहून ठेवतात कीं, हिंदुस्थानची कच्ची माहिती लांबीरुंदीच्या परिमाणांसह अलेक्झांडरला पंजाबांत मिळाली होती. ती माहिती इरॅटॉस्थेनीजनें आपल्या ग्रंथांत लिहून ठेविली आहे. कन्याकुमारीपासून सिंधुनदीच्या मुखापर्यंत लांबी त्यानें जी दिली आहे, ती हल्लींच्या प्रत्यक्ष स्थितीशीं बहुतेक तंतोतंत जुळते, हें पाहून जनरल कनिंगहॅम यांस मोठें आश्चर्य वाटलें व शिकंदर-काळींहि भारतीय लोकांस आपल्या देशाच्या आकाराची व लांबीरुंदीची संपूर्ण माहिती होती असें त्यानें लिहून ठेविलें आहे. तेव्हां ख्रि. पू. ८०० च्या नंतर म्हणजे पाणिनीनंतर व शिकंदराच्या पूर्वी दक्षिणेंत आर्यांचा प्रसार होऊन पांड्य वगैरे आर्य राज्यें दक्षिणेंत स्थापित झालीं होतीं. महाभारताच्या भीष्मपर्वांतील भारतवर्षाच्या वर्णनांत हिंदुस्थानांतील कन्याकुमारीपर्यंतचीं राज्यें सर्व दिलेलीं असून हा भाग भूगोलवर्णनाचाच आहे. या भागांत एखाद्या देशाचें नांव जर न आलें तर मात्र असें अनुमान करण्यास जागा आहे कीं, तो देश महाभारतकाळीं ख्रि. पू. २५० च्या सुमारास अस्तित्वांत नव्हता. महाभारतांतील भीष्मपर्व अध्याय ९, यांत भरतखंडाच्या वर्णनांत संपूर्ण देशांतील

नद्या, पर्वत व देश यांच्या याद्या दिल्या आहेत. त्यांचा मोठा उपयोग होतो. दुर्दैवानें ती यादी संगतवार दिशाच्या क्रमानें दिलेली नसल्यामुळें तींत ते देश किंवा नद्या कोणत्या व कोठें आहेत किंवा होत्या हें निश्चयानें ठरवितां येत नाहीं. तथापि महाभारतांत इतर शेंकडों ठिकाणीं भौगोलिक उल्लेख आहेत. विद्वान ज्योतिर्विद् पंडित शं. बा. दीक्षित यांनीं अनेक प्राचीन ग्रंथांवरून 'प्राचीन भारतवर्षीय भूवर्णन' लिहून ठेवलें आहे तें हिंदुस्थानच्या प्राचीन भूगोलाच्या माहितीसाठीं उपयुक्त वाटेल.

हवामान—हिंदुस्थानची निश्चित अशी हवा नाहीं. जगांतील सर्वांत उष्ण व सर्वांत थंड प्रदेश या देशांत सांपडतील. देशाचा बराचसा भाग उष्ण कटिबंधांत असल्यामुळें हवामान उष्ण म्हणतां येईल. सखल प्रदेशांत जास्त व उंच प्रदेशांत कमी उष्णता भासते. पावसाचें मान मोसमी (मॉन्सून) वाऱ्यावर अवलंबून असतें. त्याप्रमाणेंच या वाऱ्यांवर दुष्काळ व सुबत्ता हीं अवलंबून असतात. एकंदर पावसापैकीं शें. ९० नैर्ऋत्य मोसमी वाऱ्यांपासून मिळतो. हे अरबी समुद्र व बंगालच्या उपसागर या बाजूंनीं येतात. ईशान्य मोसमी वाऱ्यांमुळें मद्रास आणि पंजाब या भागांत हिंवाळ्यांत पाऊस पडतो.

जमीन—हिंदुस्थानची जमीन (१) पुळणाची, (२) काळी, (३) तांबडी व (४) जांभी (लॅटेराइट) अशा चार प्रकारची आहे. पुळणाची जमीन फार सुपीक असते. उत्तर हिंदुस्थानांत बऱ्याच भागांत अशी जमीन आहे. विंध्य पर्वताचा उत्तरेकडील उतार व समुद्रकिनाऱ्याकडचे चिंचोळे भाग हे असेच आहेत. मद्रास, म्हैसूर व आग्नेय मुंबई यांत तांबडी माती आहे. तशीच पूर्व हैद्राबाद, मध्यप्रांत व ओरिसा यांतून आढळते. उत्तरेकडे संथळ परगणे, बीरभूम, मिर्झापूर, झांशी व हमीरपूर हे जिल्हे, बाघेलखंड व राजपुतान्याचा पूर्व भाग हे तांबड्या मातीचे प्रदेश आहेत. काळी माती कापसाला फार चांगली. बराचसा मुंबई प्रांत, काठेवाड, वऱ्हाड, मध्यप्रांताचा पश्चिम भाग, मध्यभारत, हैद्राबाद व मद्रास प्रांतांतील चार जिल्हे असेच काळ्या मातीचे आहेत. जांभी जमीन डोंगरपठारावर आढळते. पूर्व आणि पश्चिम घाट, आसाम व मध्यभारताचीं पठारें यांतून जांभे दगड व माती आहे.

नद्या—उत्तरेकडील नद्या पर्वतांत उगम पावतात. त्यांना आणखी बर्फ वितळल्यावरचें पाणी मिळतें. सिंधु, गंगा व ब्रह्मपुत्रा या अशा मोठ्या व पवित्र नद्या भारतांत आहेत. त्यांना मिळणाऱ्या असंख्य उपनद्या आहेत. द्वीपकल्पभागांतील नद्या पावसाच्या पाण्यावरच अवलंबून असतात. पश्चिम घाटांत उगम पावणाऱ्या मोठ्या नद्या बंगालच्या उपसागराला मिळतात. महानदी, गोदावरी, कृष्णा व कावेरी या इकडील महत्त्वाच्या नद्या होत. नर्मदा व तापी या उत्तर पठारावरून पश्चिमेकडे वाहतात.

सरहद्दी—हिंदुस्थानच्या सरहद्दींसंबंधीं सांगावयाचें म्हणजे उत्तरेकडे हिमालयाची रांग हीच काय ती अभेद्य म्हणतां येईल. ईशान्येकडून चीनची भीति तर वायव्येकडून रशियाची भीति आहेच. जुनी ब्रिटिशांना फार काळजीनें व खर्चानें सांभाळावी लागणारी वायव्य सरहद्द आतां पाकिस्तानाकडे आहे. ईशान्येचा कांहीं भागहि त्याकडेच आहे. पूर्व आणि पश्चिम सरहद्दींवर पाकिस्तानचा मुलूख असल्यामुळें नैसर्गिक आडकाठी किंवा संरक्षणसाधन काहींच नाहीं. द्वीपकल्प विभाग चांगल्या बलिष्ठ आरमारानें सुरक्षित राखावा लागेल. तेव्हां स्वातंत्र्य आणि फाळणी यांमुळें हिंदुस्थानच्या सरहद्दी सांभाळणें फार जड जाणार आहे, यांत शंका नाहीं.

पिकें—हिंदुस्थान हा शेतकीप्रधान देश आहे. तरी त्याची शेती मोठीशी व्यवस्थित आणि फायदेशीर नाहीं. शेतकाम बारमास चालत नाहीं. खरीप आणि रबी हे दोन मोसम आहेत. तांदूळ, गहूं, द्विदल धान्यें, ऊंस, तंबाखू हीं सामान्य पिकें होत. मुंबई व मध्यप्रांत या बाजूस कापूस होतो. गंगथडींत गहूं पिकतो. पूर्व बंगाल्यांत ताग, बिहारमध्यें नीळ आणि आसामच्या बाजूस चहा–कॉफी होते. (शेतकी पाहा). जंगल, गवताळ जमीन, माळरान व ओसाट–रेताड प्रदेश हे सारे प्रकार या खंडकल्प देशांत आहेत.

उद्योग-धंदे—हिंदुस्थानांत औद्योगिक उत्पादनांत शें. ८ लोक गुंतलेले आहेत. शेतकीखालोखाल मोठा महत्त्वाचा उद्योगधंदा म्हणजे कापड विणण्याचा होय. चहाच्या मळ्यांतून सु. १½ लक्ष लोक कामाला आहेत. चहाचा व्यापार मोठा आहे. गिरण्यांशिवाय लोखंडी ओतकाम, कौलविटांचे कारखाने, कातडीं कमावणें, व साखर, तंबाखू, कागद, इ. बनविण्याचे कारखाने अनेक आहेत. यांत्रिक कारखाने, गोद्या व खाणी यांतूनहि असंख्य मजूर काम करतात. व्यापार वाढता नाहीं. मुख्यतः ताग, चहा, कापूस, कातडीं व धान्य हा माल बाहेर जातो. आयात मालांत येथून गेलेल्या कच्च्या जिनसांचा पक्का होऊन आलेला माल शें. ७५ इतका असतो. वाहतुकीसाठीं सु. ३८,००० मैलांचा रेल्वेरस्ता आहे. टपाल, तारायंत्र व टेलिफोन बहुतेक सर्वत्र आहेत. चलन-प्रमाण रुपया आहे.

गंगा व गोदावरी यांमधील प्रदेशांत कोळशाच्या खाणी आहेत. जगांत अतिशय महत्त्वाच्या मिठाच्या खाणी पंजाबांत आहेत. लोखंड बहुतेक ठिकाणीं आढळतें, पण तें शुद्ध करून लोकांना जिनसा बनविण्यास उपयोगी पडेल असें व स्वस्त तयार करतां येण्याजोगें नाहीं. विदेशी यंत्र-साहाय्यानें कापड तयार करण्याचा धंदाच फक्त देशांत चालतो. बहुतेक लोक शेतकरी व मजूर म्हणून उपजीविका करतात.

लोक व भाषा—प्रांतपरत्वें भिन्न लोक आढळतात. पंजाब, काश्मीर, व राजपुताना या भागांत आर्यवंशीय लोक राहतात. संयुक्त प्रांतांत आर्य व द्रविड यांचें संकर दिसून येतें. नेपाळ, आसाम व ब्रह्मदेश यांत मंगोली वंशाचे, तर बंगाली लोक मंगोली व द्राविडी यांच्या मिश्रणाचे आहेत. दक्षिणेंत सिथियन व द्रविड यांचें मिश्रण तर अगदीं दक्षिणेस शुद्ध द्रविड आढळतात. दुसऱ्या कोणत्याहि देशांत न आढळणारा जातिभेद, अनेक जाती व पोटजाती असल्यानें तीव्रतेनें आढळतो. (हिंदुसमाज पाहा). भाषाहि अनेक आहेत. ह्यांपैकीं तामिळ, तेलगू, मलयालम् व कानडी या मुख्य द्राविड, व मराठी, हिंदी, गुजराथी व बंगाली या मुख्य आर्यभाषा आहेत. (भाषा पाहा).

१९४१ सालीं त्या वेळच्या अखंड हिंदुस्थानची लो. सं. ३८,८९,९७,९५५ होती. पैकीं २०,१०,२५,७२६ पुरुष होते. सुमारें ३४ कोटी लोक खेड्यांतून राहत होते. लोकसंख्येचें दाट्य एका चौ. मैलाला ३४१ इतके होतें. साक्षरतेचें प्रमाण शें. १२ आहे. सर्वांत जास्त त्रावणकोर संस्थानांत (४७·८) आहे. हिंदुस्थानांत हिंदु, बौद्ध, जैन, इस्लामी, पारशी, शीख व खिस्ती हे प्रमुख धर्मपंथ आहेत. इंग्रजी जाणणारे सु. २६ लक्ष होते. १९५१ च्या खानेसुमारीप्रमाणें भारताची लो. सं. ३५,६८,९१,६२४ इतकी आहे. मागच्या खानेसुमारीपेक्षां वाढ १३·४ ने झाली आहे. क्षे. फ. ११,२८,८१४ चौ. मै. आहे.

शिक्षण सरकारी विद्यालयें, विद्यापीठें, इतर सरकारी व निमसरकारी संस्था यांमार्फत देण्यांत येत असतें. खाजगी शिक्षणाच्या संस्थाहि अनेक आहेत. औद्योगिक, यांत्रिक व व्यावसायिक शिक्षण देणाऱ्या शाळा-कॉलेजेंहि प्रांताप्रांतांतून आहेत. लष्करी शिक्षण लष्करांत नोकरीसाठीं निवडलेल्या उमेदवारांना मिळतें.

ब्रिटिश अमदानीच्या प्रारंभापासून कलकत्ता ही राजधानी होती. ती १९१२ त दिल्लीस ठेवण्यांत आली व अद्यापि तेथेंच आहे. या दोन शहरांखेरीज मुंबई, मद्रास, अलाहाबाद, आग्रा, अहमदाबाद, कानपूर, बनारस, पुणें, सोलापूर, नागपूर, इ. मोठीं शहरें आहेत.

१९४७ सालापूर्वी हिंदुस्थानचा कारभार चालविण्यास एक व्हाइसराय किंवा गव्हर्नर-जनरल ब्रिटिश सरकारनें नेमला असे, व त्याला कौन्सिल ऑफ स्टेट व लेजिस्लेटिव्ह असेंब्ली अशा दोन प्रातिनिधिक मंडळांचे कायदे करण्याच्या कामीं साहाय्य असे. एक कार्यकारी मंडळ असून त्यात सातआठ मंत्री असत. मद्रास, मुंबई, बंगाल, संयुक्तप्रांत, पंजाब, बिहार, ओरिसा, मध्यप्रांत, आसाम व ब्रह्मदेश या प्रांतांवर एक एक गव्हर्नर असून त्यांना कार्यकारी व कायदेमंडळ दिलेलें असे.

हिंदुस्थानविषयक महत्त्वाचे आंकडे

| | |
|---|---|
| **आगगाड्यांचे रस्ते—** | |
| एकंदर फाट्यांचे मैल | ३३,९८५ |
| दरसाल किती टन माल जातो | ९,०४,७२,००० |
| **साधे रस्ते—** | |
| आजचे मैल | २,५८,००० |
| योजलेली वाढ | ३,११,००० |
| **बिनलष्करी विमानोड्डाण—** | |
| एकंदर मैल | २०,००० |
| दरसालचें उड्डाण मैल | १,३७,७८,००० |
| **नौकानयन—** | |
| आजचें टनेज | १,८५,००० |
| नियोजित वाढ | २०,००,००० |
| **विद्युच्छक्ति—** | |
| दरसाल उत्पादन | १·४ दशलक्ष किलोवॅट |
| नियोजिता वाढ | ८·५ दशलक्ष किलोवॅट |
| **पाटबंधारे—** | |
| पाण्याखालची जमीन | ४,७०,००,००० एकर |
| नियोजित वाढ | ३,१०,००,००० एकर |
| **परदेशचा व्यापार—** | |
| आयात | ५,३४,६०,३९,००० रु. |
| निर्यात | ४,००,००,८८,००० रु. |

परदेशांतील हिंदी—मजुरी, नोकरी, व्यापार, वगैरे कारणांमुळें हिंदुस्थानाबाहेर अनेक देशांतून हिंदी लोक राहिले आहेत. कांहीं तर पिढ्यान् पिढ्या आहेत. ऑस्ट्रेलियांत ४,५४४ हिंदी आहेत. यांपैकीं कायम जाऊन राहिलेल्यांना सर्व हक्क आहेत. पश्चिम ऑस्ट्रेलियांत हिंदी लोकांवर मालमत्तेच्या बाबतींत बरींच बंधनें आहेत. दक्षिण ऑफ्रिकेंत हिंदी लोकांच्या हक्कासंबंधींचा तंटा फार जुना आहे. म. गांधींनीं १९१४ सालीं कांहीं तडजोडी केल्या व पुढें आफ्रिकेंत हिंदुस्थान सरकारचे राजप्रतिनिधीहि हिंदी लोकांच्या सुखसोयींवर देखरेख ठेवण्यासाठीं नेमण्यांत आले. पण तेथील युरोपियनांच्या वृत्तींत अद्यापि फारसा बदल नाहीं. संयुक्त राष्ट्रसंघाकडे तक्रार नेली. पण उपयोग झाला नाहीं. द. आफ्रिकेंत २,८२,५२५ हिंदी लोक आहेत. सिलोन हा तर प्राचीन काळापासून भारतीय संस्कृतीचा वारसा म्हणून गणला जातो. पण तेथें कांहीं वर्षांपासून हिंदी लोकांना अडचणी उत्पन्न करून बाहेर काढण्याचे पद्धतशीर प्रयत्न चालले आहेत. तेथें ७,३२,२५८ हिंदी आहेत. तीच कहाणी ब्रह्मदेशाबाबत सांगतां येईल. १९३१ सालीं तेथें १०,१७,८२५ लोक होते. आतां तर त्याला स्वातंत्र्य लाभल्यानें ब्रिटिश सरकारकडेहि दाद

लागणार नाहीं. फिजीमध्यें १,२०,००० लोक असून त्यांच्या मुलांच्या शिक्षणाची नीट सोय नाहीं. व युरोपियनांचे क्लब, हॉटेलें व क्रीडांगणें यांतूनहि हिंदी लोकांना मज्जाव आहे. एडन, माल्टा, ग्रेनाडा, ब्रिटिश सोमालिलंड व बोर्निओ, ब्रि. कोलंबिया अशा देशांतून मात्र हिंदी लोकांना बराच समान दर्जा आहे.

यालेरीज ज्या बाहेरच्या प्रदेशांत हिंदी लोक जास्त म्हणजे २५,००० वर आहेत ते म्हणजे डच ग्वायना (४०,७७७), ब्रि. मलाया (७,०७,८८५), ब्रि. ग्वायना (१,६८,९२१), त्रिनिदाद (१,९२,४४५), इंडोनेशिया (२७,६३८), केनिया (८४,५८१–इतर आशियाटिक धरून), टँगानिका (३८,५००–आशियाटिक), युगांडा (२८,५१२–आशि.), व जमैका (२६,५०७) हे होत. ब्रिटिश कॉमनवेल्थमध्यें २६,९३,४१७ व इतर देशांत १,५६,६६५ मिळून एकंदर हिंदुस्थानाबाहेर असलेले हिंदी २८,५०,०८२ इतके भरतात.

प्रांत—इंग्रजांनीं हिंदुस्थानचा मुलूख जसजसा जिंकला तसतसे प्रांत तयार केले. १७७३ च्या रेग्युलेटिंग ॲक्टप्रमाणें मुंबई, मद्रास व बंगाल हे तीन प्रांत होते. नंतर निरनिराळे प्रदेश तयार झाले. १९१९ च्या सुधारणाकायद्यान्वयें १५ प्रांत करण्यांत आले. यांत ९ मोठे गव्हर्नरचे प्रांत व ६ लहान चीफकमिशनरचे प्रांत होते. नव्या १९५० च्या राज्यघटनेप्रमाणें आतां पहिलीं ९ मोठीं राज्यें झालीं आहेत. १९५१ च्या खानेसुमारीप्रमाणें यांचें क्षे. फ. व लो. सं. पुढीलप्रमाणें आहेत.

| प्रांत | क्षेत्रफळ (चौरस मैल) | लोकसंख्या (लक्ष) |
|---|---|---|
| मद्रास | १,२७,७६८ | ५६९ |
| मुंबई | १,१५,५७० | ३५९ |
| पश्चिम बंगाल | ३०,४७६ | २४७ |
| उत्तरप्रदेश- (संयुक्तप्रांत) | १,१२,५२३ | ६३२ |
| पूर्व पंजाब | ३७,४२८ | १२६ |
| बिहार | ७०,३६८ | ४०२ |
| मध्यप्रदेश | १,३०,३२३ | २१३ |
| आसाम | ५४,०८४ | ९१ |
| ओरिसा | ५९,८६९ | १४६ |
| अजमीर मेरवाडा | २,४२५ | ७ |
| कुर्ग | १,५९३ | २ |
| दिल्ली | ५७४ | १७ |
| अंदमान निकोबार | ३,१४३ | १/२ |
| सिक्कीम | २,७४५ | १ |

यांची माहिती त्या त्या नांवाखालीं दिलेली आहे.

संस्थानें—हिंदुस्थानचा बराचसा भाग शुद्ध ब्रिटिश अमलाखालीं नव्हता. ब्रिटिश सार्वभौम सरकारचे मांडलिक या नात्यानें हिंदी संस्थानिकांच्या सत्तेखालीं जो मुलूख होता त्याचें क्षेत्रफळ ७,१५,९६४ चौरस मैल असून त्यांतील लोकसंख्या सुमारें ७ कोटी होती. या हिंदी संस्थानांचें स्वरूप व प्रकार फार निरनिराळे होते. त्यांचे आकारमान इतकें भिन्न भिन्न असे कीं, राजपुतान्यांतील लावा नांवाच्या संस्थानाचें क्षेत्रफळ अवघें १९ चौरस मैल असून सिमला हिल स्टेट्स (हिमालयांतील डोंगरी संस्थानें) तर केवळ लहान लहान जहागिरीवजा आहेत. उलटपक्षीं कांहीं संस्थानें फार मोठीं असून त्यांपैकीं निजाम-हैद्राबाद हें संस्थान युरोपांतल्या इटली देशाइतकें मोठें आहे व त्याची लोकसंख्या १ कोटी ८६ लक्ष आहे. भौगोलिक दृष्ट्याहि पश्चिम राजपुतान्यांतील राहण्याला अगदीं त्याज्य असा संस्थानी भाग, हिंदुस्थानचा बाग म्हणून नांवाजलेल्या मुलुखापैकीं बडोदें संस्थान, कृषिविषयक संपत्तीनें श्रीमंत असें म्हैसूर संस्थान आणि भूगोलावरील एकंदर प्रदेशांपैकीं सर्वांत अधिक निसर्ग-शोभायुक्त भूभागांतील काश्मीर संस्थान असे अनेकविध प्रकार संस्थानी मुलुखांत आहेत.

संस्थानांचा साम्राज्य-सरकारशीं संबंध—ज्या परिस्थितींत हिंदी संस्थानें अस्तित्वांत आलीं आणि त्यांचा ब्रिटिश सत्तेशीं संबंध जडला ती अतिशय विविध आहे. तत्संबंधीं विशेष माहिती त्या त्या संस्थानच्या नांवाखालीं दिली आहे. ठोकळ मानानें एवढें म्हणतां येईल कीं, जसजशी ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनीची सत्ता वाढत चालली तसतशी हिंदी राज्यें तिच्या सत्तेखालीं आलीं आणि तेथील राजांना संस्थानिक ऊर्फ मांडलिक राजे म्हणून गादीवर कायम ठेवण्यांत आलें. या सर्वसामान्य धोरणाला कांहीं काळ एक महत्त्वाचा अपवाद झाला. लॉर्ड डलहौसी हा गव्हर्नर-जनरल असतांना ईस्ट इंडिया कंपनी सरकारनें औरस वारसांना अभावीं संस्थानें खालसा करण्याचा उपक्रम केला. हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें औरस संतति नसल्यास दत्तकपुत्र घेण्याची परवानगी असते. पण अशा दत्तक पुत्रांना संस्थानिक बनविल्यानें प्रजेचें कल्याण साधेल कीं नाहीं, असा विचार पडल्यामुळें वरील धोरण स्वीकारण्यांत येऊन तदनुसार सातारा व नागपूर हीं संस्थानें ब्रिटिश कंपनीच्या मुलुखात सामील करण्यात आलीं व लखोबेचें राज्य तेथील राजांचा कारभार फार वाईट असल्याच्या कारणावरून खालसा करण्यांत आलें. या नव्या धोरणानंतर हिंदुस्थानांत १८५७ सालचें बंड झालें. तें मोडल्यावर ब्रिटिश हिंदुस्थानचा राज्यकारभार कंपनीच्या हातून काढून ब्रिटिश साम्राज्य सरकारनें आपल्या हातीं घेतला व त्या वेळीं हिंदी संस्थानांच्या धोरणाविषयीं कायम स्वरूपाचा एक जाहीरनामा प्रसिद्ध करण्यांत आला. हा जाहीरनामा प्रसिद्ध झाल्यापासून देशी संस्थानिकांच्या मुलुखाचा

यत्किंचितहि अपहार करण्यांत आला नाहीं. उलटपक्षीं उलट्या दिशेनेंच गोष्टी घडून आल्या. उदाहरणार्थ, म्हैसूर संस्थान बरींच वर्षे ब्रिटिश अमलाखालीं होतें तें १८८१ सालीं पुन्हां जुन्या हिंदु राजघराण्याकडे परत देण्यांत आलें; आणि १९२१ सालीं अयोध्या प्रांतांतील एक मोठा जमीनदार बनारसचा महाराज याला राज्यकारभाराचे हक्क देण्यात आले. पुष्कळ वेळां संस्थानचा राज्यकारभार फार वाईट चालल्यामुळें किंवा संस्थानिक अल्पवयी असल्यामुळें संस्थानचा कारभार ब्रिटिश सरकारला स्वतःच्या हातीं घ्यावा लागे. परंतु अशी जरूरी संपतांच संस्थानी मुलूख योग्य वारसाच्या हातीं परत देण्याचा नियम ब्रिटिश सरकारनें कोठें मोडलेला दिसत नाहीं. औरस संतति नसल्यास दत्तकपुत्र घेण्याचा हक्क बहुतेक सर्व संस्थानिकांस आहे.

ब्रिटिश सरकारनें हिंदी संस्थानिकांचें एकहि अपवाद होऊं न देतां बाहेरच्या संकटांपासून संरक्षण केलेलें आहे. तसेंच संस्थानिकांचे संस्थानी राज्यकारभाराचे हक्क कायम राहतील अशी हमी पाळली गेली आहे. संस्थानिकांचा परराज्यें किंवा इतर संस्थानिक यांच्याशीं येणारा संबंध संस्थानांतर्फे ब्रिटिश सरकार पाहत असे. संस्थानातील प्रजाजन पूर्णपणे संस्थानिकांच्याच सत्तेखालीं होते. संस्थानिकांना किंवा त्यांच्या प्रजाजनांना ब्रिटिश सरकारचे कोणतेहि कायदे बंधनकारक नसत. संस्थानी मुलुखांत पळून गेलेले गुन्हेगार मात्र ब्रिटिश सरकाच्या ताब्यात परत द्यावे लागत; परंतु ब्रिटिश सरकारी पोलिसाना संस्थानिकांच्या परवानगीशिवाय संस्थानी हद्दींत शिरून असले गुन्हेगार कैद करतां येत नसत. येणेंप्रमाणें परराष्ट्रीय कारभार संस्थानिकांतर्फे साम्राज्य सरकार पाहत असे आणि संस्थानिकांच्या अंतर्गत कारभार पाहण्याच्या संपूर्ण आधिकाराला पूर्ण मान देई. शिवाय संस्थानिकांच्या मुलुखांत—विशेषतः शांततामंग होण्याचा प्रसंग असेल अशा वेळीं संस्थानी कारभारांत साम्राज्य सरकार हात घाली. संस्थानिकांना ब्रिटिश मुलुखांतील व्यापार, रेल्वे, बंदरें व बाजार यांचा योग्य तो उपयोग करतां येई. संस्थानांना ब्रिटिश मुलुखाशीं खुला व्यापार करण्याची पूर्ण परवानगी असे. तसेंच संस्थानी प्रजेला बहुतेक सर्व प्रकारच्या ब्रिटिश मुलुखांतील सरकारी नोकऱ्यांमध्ये प्रवेश मिळूं शकत असे.

हिंदी संस्थानिकांवरील जबाबदाऱ्या—उलटपक्षीं कोणत्याहि हिंदी संस्थानानें परराष्ट्राशीं किंवा दुसऱ्या हिंदी संस्थानांशीं संबंध ठेवतां कामा नये अशी जबाबदारी असे. तसेंच संस्थानिकाचा राजेपणाचा आधिकार त्या त्या संस्थानी मुलुखाच्या बाहेर कोठेंहि चालत नसे. संस्थानी हद्दींतून बाहेर ब्रिटिश मुलुखांत गेलेले संस्थानी प्रजाजन वस्तुतः ब्रिटिश प्रजाजन बनत. जेथें जेथें परराष्ट्राशीं संबंध येतो तेथें तेथें साम्राज्य सरकारच कारभार पाही. संस्थानिकांचा परस्परांशीं कांहीं वादग्रस्त प्रश्न उद्भवल्यास तोहि त्यांनीं ब्रिटिश सरकारकडे सोंपविला पाहिजे अशी जबाबदारी त्यांच्यावर असे. पोलिस खातें, दिखाऊ लष्कर किंवा ब्रिटिश सरकारला मदत म्हणून ठेवावयाचें लष्कर, यांखेरीज इतर कोणत्याहि प्रकारचें लष्कर ठेवण्याची जबाबदारी संस्थानिकांस नसल्यामुळें संस्थानिकांनीं लष्कर किती ठेवावें यासंबंधीं नियम साम्राज्य सरकार ठरवून देई. एखाद्या संस्थान-सरकारनें केलेलें मोठ्या अन्यायाचें किंवा जुलमाचें वर्तन देशांत अस्वस्थता किंवा बंड उत्पन्न करील अशी स्थिति उत्पन्न झाल्यास संस्थानी कारभारांत हात घालण्यास ब्रिटिश सरकारला कोणतीहि हरकत नसे. संस्थानी मुलुखांत राहणाऱ्या ब्रिटिश प्रजाजनांवर किंवा इतर कांहीं विशिष्ट इसमांवर न्यायाधिकार चालविण्याचा हक्क ब्रिटिश कायद्यानें मिळाला असल्यास अशा इसमाची चौकशी करण्याचा अधिकार त्या त्या ब्रिटिश न्यायकोर्टांना असे. संस्थानी मुलुखांत जेथें ब्रिटिश कॅन्टोन्मेंटचा प्रदेश असे त्या मुलुखावरहि ब्रिटिश सरकारचाच न्यायाधिकार चाले.

संस्थानावरचे ब्रिटिश अधिकारी—हिंदी संस्थानिकांशीं व्यवहार करणारे ब्रिटिश सरकारचे जे अधिकारी असत, ते संस्थानी मुलुखांतच राहत. मोठाल्या संस्थानात रेसिडेंट हा ब्रिटिश सरकारचा प्रतिनिधि म्हणून राही, आणि लहान लहान संस्थानांच्या समुच्चयाकरितां गव्हर्नर-जनरलचा एजंट आणि त्याच्या मदतीला रेसिडेंट किंवा पोलिटिकल एजंट हे अधिकारी असत. हिंदी संस्थानिक व ब्रिटिश सरकार यांच्यामध्यें येणारा सर्व राजकीय संबंध या अधिकाऱ्यामार्फत चाले. शिवाय हे अधिकारी संस्थानिकांना राज्यकारभाराच्या व इतर बाबतींत सल्लामसलत देत व मदत करीत. प्रांतिक सरकारच्या ताब्यांतील मोठाल्या संस्थानांत वरील प्रकारचेच पोलिटिकल एजंट नेमलेले असत. पण लहान लहान संस्थानांसंबंधींचा पोलिटिकल एजंट या नात्याचा अधिकार त्या त्या जिल्ह्याच्या कलेक्टरला किंवा कमिशनरला दिलेला असे.

संस्थानांवरील ब्रिटिश नियंत्रण—नियंत्रणाच्या सोईकरितां संस्थानांचे प्रकार केले असत: (अ) प्रत्यक्ष हिंदुस्थान सरकारशीं संबंध असलेलीं मोठालीं चार संस्थानें; (आ) एजंटमार्फत हिंदुस्थान सरकारशीं संबंध असलेले संस्थानसमुच्चय (एजन्सी); आणि (इ) एजंटमार्फत प्रांतिक सरकारशीं संबंध असलेले संस्थानसमुच्चय.

(अ) मोठीं संस्थानें:—निजाम हैद्राबाद, म्हैसूर, बडोदें, काश्मीर.

(आ) हिंदुस्थान सरकारच्या एजन्सी:—बलुचिस्तान एजन्सी (३); राजपुताना एजन्सी (२०); मध्यहिंदुस्थान एजन्सी

(७०३); वायव्य सरहद्द संस्थानें (४); मद्रास इलाखा संस्थानें (५); पश्चिम हिंदुस्थान संस्थानें (२०९).

(इ) प्रांतिक सरकार एजन्सी :—मुंबई प्रांतिक संस्थानें (३६१); बंगाल प्रांतिक संस्थानें (२); पंजाब प्रांतिक संस्थानें (१३); ब्रह्मदेश प्रांतिक संस्थानें (५१); आसाम प्रांतिक संस्थानें (२६); संयुक्तप्रांत प्रांतिक संस्थानें (१५). येणेंप्रमाणें एकूण जुनीं संस्थानें ८८५ आहेत. त्यांची माहिती त्या त्या नांवाखालीं दिली आहे.

हिंदी संस्थानिकांना खंडणी द्यावी लागे. ही खंडणी कित्येक संस्थानांच्या बाबतींत मुलखाच्या अदलाबदलीबद्दल म्हणून, आणि मुख्यतः संस्थानच्या संरक्षणासाठीं ठेवलेल्या ब्रिटिश सैन्याच्या खर्चासाठीं म्हणून ठेवण्यांत आली. याशिवाय काटेवाडांतील व गुजराथेंतील पुष्कळशीं संस्थानें बडोदें संस्थानला, आणि मध्यहिंदुस्थानांतील कांहीं लहान संस्थानें ग्वाल्हेर संस्थानला खंडणी देत. शिवाय नवीन वारस गादीवर येण्याच्या वेळीं साम्राज्य सरकारकडे नजराणा द्यावा लागत असे; तो रिवाज बंद केल्याचें १९११ सालीं भरलेल्या दिल्ली दरबारांत बादशहांनीं जाहीर केलें.

१९४७ सालीं हिंदी स्वातंत्र्याचा कायदा ब्रिटिश सरकारनें मंजूर केल्यावर बादशहाचा संस्थानांवरील हक्क उडाला व त्याबरोबरच संस्थानिकांशीं ब्रिटिश सरकारनें वेळोवेळीं केलेले करारहि बुडाले. तेव्हां भारत सरकारनें लगेच संस्थानी मंत्रिखातें (स्टेट्स मिनिस्ट्री) निर्माण करून सर्व संस्थानिकांशीं सार्वभौमत्वाचा संबंध जोडला. सरदार पटेलांकडे या खात्याचा कारभार गेल्यावर त्यांनीं संस्थानिकांना विश्वासांत घेऊन, आपल्या संस्थानांत प्रजासत्ताक राज्यकारभार सुरू करण्याविषयीं त्यांचें मन वळविलें, तेव्हां सर्व संस्थानांनीं (काश्मीर, जुनागड व हैद्राबाद वगळून) ' इन्स्ट्रुमेंट ऑफ ॲक्सेशन 'वर सह्या केल्या.

संस्थानी मुलूख ५,८७,८८८ चौ. मै. म्हणजे भारताच्या शें. ४८ क्षेत्रफळाइतका फाळणीनंतर उरला. संस्थानांचें नवें लोकतंत्रात्मक रूपांतर तीन प्रकारांनीं करण्यांत आलें : (१) शेजारच्या प्रांतांत विलीन करून; (२) अनेक संस्थानांचा एक संघ करून त्यांत सामील होऊन; व (३) मध्यवर्ती सरकारच्या शासनव्यवस्थेखालीं जाऊन. या प्रकारांनीं संस्थानांचा मोठा अवघड प्रश्न फार मुत्सद्देगिरीनें सोडविण्यांत आला.

(१) प्रांतांत विलीन झालेलीं संस्थानें—(अ) ओरिसांतील २४ संस्थानें. (आ) बिहारमधील सेरैकेला व खारस्वान. (इ) मध्यप्रांतांत १४ छत्तिसगड संस्थानें व मकाइ संस्थान. (ई) मद्रास प्रांतांत बगनपल्ली व पदुकोट्टा. (उ) पूर्व पंजाब प्रांतांत लहरू, पतौडी व दुजन हीं तीन संस्थानें. (ऊ) मुंबई प्रांतांत १६ दक्षिणी संस्थानें व १८ गुजराथेंतील संस्थानें व अनेक लहान जहागिऱ्या; सिरोही, बडोदें व कोल्हापूर.

(२) संस्थानी संघ—(अ) सौराष्ट्र संघ—यांत ४५० लहानमोठीं संस्थानें आहेत. राजप्रमुख नवानगरचे जामसाहेब आहेत. (आ) मत्स्य संघ—अलवार, भरतपूर, धोलपूर व करौली हीं ४ संस्थानें. राजप्रमुख धोलपूरचे महाराज. (इ) बृहत् राजस्थान संघ—जयपूर, जोधपूर, बिकानेर, जसलमीर, कोटा, बांसवाडा, बुंदी, वगैरे संस्थानें. राजप्रमुख उदयपूरचे महाराज. (ई) विंध्य प्रदेश संघ—बुंदेलखंड आणि बाघेल खंड यांमधील ४५ संस्थानें. राजप्रमुख रेवाचे महाराज. (उ) मध्यभारत संघ—ग्वाल्हेर, इंदूर, धार, वगैरे माळव्यांतील २० संस्थानें यांत आहेत व हा सर्वांत मोठा संस्थानी संघ आहे. राजप्रमुख ग्वाल्हेरचे महाराज. (ऊ) पत्याळा व पूर्व पंजाब संघ—यांत आठ संस्थानें आहेत. राजप्रमुख पत्याळचे महाराज आहेत.

या संस्थानी संघांवर स्वतंत्र लेख या कोशांत सांपडतील.

(३) मध्यवर्ती सरकारकडून शासनव्यवस्था असणारीं संस्थानें—(अ) हिमाचल प्रदेश; यांत २४ डोंगरी संस्थानें आहेत. (आ) बिलासपूर. (इ) कच्छ.

(४) स्वतंत्रपणें राहिलेलीं संस्थानें—हैद्राबाद, काश्मीर, म्हैसूर, भोपाळ, त्रावणकोर-कोचीन संघ. संरक्षण, परराष्ट्रीय संबंध व दळणवळण या बाबी फक्त मध्यवर्ती सरकारकडे दिलेल्या आहेत.

जुनागड आणि हैद्राबाद यांनीं फक्त आढेवेढे घेऊन भेदाची कारवाई केल्यामुळें त्यांच्यावर भारत सरकारला लष्करी इलाज करावा लागला. काश्मीर संस्थानाबाबत पाकिस्तानशीं स्वामित्वाबद्दल गेलीं तीन वर्षें मोठाच झगडा चालू आहे.

परराष्ट्रीय मुलूख—हिंदुस्थानात फ्रेंच आणि पोर्तुगीज यांचीं कांहीं ठाणीं आहेत. फ्रेंचांच्या मुलखाचें क्षे. फ. २०३ चौ. मै. व पोर्तुगीज मुलखाचें क्षे. फ. १६३८ चौ. मै. आहे. (गोंवें व फ्रेंच इंडिया पाहा).

इतिहास—वैदिक काळीं युरो-भारतीय (इंडो-युरोपियन) लोक हिंदुस्थानांत येऊन राहिले व स्थानिक लोक त्यांच्यांत मिसळले. ख्रि. पू. ३२७ मध्यें अलेक्झांडरनें स्वारी करून वायव्येकडे एक ग्रीक राज्य स्थापलें. बाराव्या शतकापर्यंत हिंदुस्थान हिंदूंचा होता. त्या प्राचीन काळीं मौर्य व गुप्त राजे इतिहासांत संस्मरणीय म्हणून ठरतात. १२ व्या शतकापासून १८ व्या शतकापर्यंत मुसलमानांनीं बहुतेक देश पादाक्रांत केला होता. सतराव्या व अठराव्या शतकांत मराठ्यांनीं मुसुल्मानांपासून कांहीं मुलूख सोडवून आपलें साम्राज्य स्थापिलें होतें. पंजाबांत शीखांनीं आपलें स्वराज्य केलें. १५ व्या शतकापासून युरोपियनांचा हिंदुस्थानांत शिरकाव होऊं लागला. १९ व्या शतकापासून ब्रिटिश सत्ता जागजागीं लागून त्यांनी

सिलोन—भारतांत या बेटाचीं जुनीं नांवें लंका, सिंहल, ताम्रपर्णी, व आम्रद्वीप अशीं आहेत. सिलोनला बौद्ध धर्म, पाली भाषा आणि कलाकौशल्य हीं भारतापासून मिळालीं असून याउलट बौद्ध संप्रदायाचें सर्व पाली वाङ्मय जतन करून ठेवण्याचें मोठें महत्त्वाचें कार्य भारतासाठीं सिलोननें केलें यांत शंका नाहीं. अशोकाच्या दुसऱ्या शिलाशासनांत (ख्रि. पू. ३ रें शतक), अशोकानें ज्या अनेक देशांना नीतिधर्माचे आदेश दिले त्यांत ताम्रपर्णीचा उल्लेख आढळतो. अशोकाचा मुलगा महेंद्र व मुलगी संघमित्रा यांनीं लंकेंत बौद्ध धर्म प्रसृत केला असे सिंहली ग्रंथांवरून दिसतें. पुढें सहाशें वर्षांनीं सिलोनच्या राजानें समुद्रगुप्ताच्या परवानगीनें बुद्धगयेस सिंहली यात्रेकरूंसाठीं एक विहार बांधला. बुद्धगयेच्या बुद्धघोषानें सिलोनांत जाऊन पाली धर्मग्रंथांवर मोठमोठ्या टीका लिहिल्या व या बेटांत आणि हिंदुस्थानच्या *पूर्वेकडील देशांतून बौद्धमताला निश्चित स्वरूप* आणलें. अनुराधपूर येथें बौद्ध स्तूप आहेत व त्यांतील शिल्प भारतीय शिल्पाचें अनुकरणच होय अशी खात्री पटते.

अफगाणिस्तान—हा हिंदुस्थानच्या अगदीं शेजारीं असल्यामुळें या दोन देशांच्या सरहद्दी पूर्वी व आतांहि निश्चित नाहींतच. यामुळें परस्परांतील सांस्कृतिक आणि राजकीय संबंध अत्यंत निकटचे आहेत. पश्चिमेकडून हिंदुस्थानांत येण्याचा हा मार्ग आहे. सिकंदर बादशहा असाच आला व पुढें वायव्य प्रांतांत ग्रीक राज्य स्थापन झालें. याच्या उलट चंद्रगुप्त मौर्यानें आपल्या साम्राज्याचा पसारा अफगाणिस्तानापर्यंत नेला. इ. स. च्या दुसऱ्या शतकांत व नंतर कुशान राजांनींहि या देशाचा बराचसा भाग आपल्या वर्चस्वाखालीं आणून वायव्य प्रांत आणि अफगाणिस्तान यांत फारशी भिन्नता ठेविलीच नाहीं. बौद्ध धर्माचे अवशेष या भागांत अनेक दृष्टीस पडतात. तसेंच मथुरेंतील हस्तिदंती कलेचे नमुने काबूलच्या उत्तरेस बेग्राम येथें सांपडले असून कुशान राजवाड्यांतील लूट येथपर्यंत आली असें स्पष्ट दिसतें. कुशानांच्या ऱ्हासानंतर या दोन राष्ट्रांचा प्रत्यक्ष संबंध तुटला; तथापि संस्कृतींची देवघेव चालूच होती. गझनीच्या महमदाच्या स्वाऱ्यांनंतर मोंगल बादशहा १५२६ त येईपर्यंत हिंदुस्थान हा अफगाण-वर्चस्वाखालीं होता असें म्हणण्यास हरकत नाहीं.

इराण—सिंध संस्कृति आणि सुमेरी संस्कृति यांमधील दुवा म्हणून इराणला महत्त्व आहे. युफ्रेटस आणि सिंधु या नद्यांच्या खोऱ्यांतून ज्या संस्कृतीच्या लाटा वाहिल्या, त्यांचा उगम या प्राचीनतम पर्शुराष्ट्रांत दिसेल. आर्यांचा धर्म आणि भाषा इराणमार्गानेंच भारतांत पोंचल्या आहेत. दरायसच्या इराणी साम्राज्यांत हिंदुस्थानचा वायव्यप्रांत मोडत होता व त्यांतील प्राकृत वाङ्मयाची लिपि अरेमाईक असे. तथापि शिकंदरच्या स्वारीपर्यंत हिंदुस्थानावर इराणचा पगडा फारसा नव्हता. नंतर चांदीसोन्याचे दागिने, नाणीं, शिक्के, वास्तुशिल्प आणि शिलाशासनें या चार क्षेत्रांतून हा पाश्चात्य प्रभाव जाणवूं लागला. पण अशोकानंतर प्रत्यक्ष हा इराणी संबंध कांहीं शतकें तुटला. इ. स. आठव्या शतकांत पारशी धर्माचा व धर्मानुयायांचा प्रवेश हिंदुस्थानांत झाला. यानंतर मुसलमानी स्वाऱ्या इराणांतून आल्या व इस्लामी संस्कृतीची हिंदुस्थानावर कायमची छाप कशी बसली याचा इतिहास ताजा आहे.

इराक—पंजाबमधील हरप्पा आणि सिंधमधील मोहेंजो-दारो येथील उत्खननांवरून हिंदुस्थानचा आणि या देशाचा ख्रि. पू. २३०० पासून संबंध असल्याचें आढळून येतें. मोहेंजो-दारो आणि उर हीं दोन्ही शहरें अतिशय सुधारलेलीं असून यांमध्यें व्यापारी देवघेव असे. तथापि सिंध संस्कृति आणि सुमेरी संस्कृति अगदीं भिन्न *होत्या, तरीपण उपास्थाय वर्गांची दोहोंवरहि छाप दिसून येते.*

मध्य आशिया—हा प्रदेश म्हणजे चिनी तुर्कस्तान म्हणतां येईल. चीनमधून इकडे येण्याचे दोन मार्ग होते: एक उत्तरेकडचा [कुचा, कारा शहर (प्राचीन अग्निदेश) व तुर्फान यांवरून] व दुसरा दक्षिणेकडचा [यार्कंद, खोतान, निया, मिरानवरून]. या 'रेशमी' मार्गापासून हिंदुस्थाननें अफगाण-तुर्कस्तानमधील बल्ख व काश्मीरच्या उत्तरेकडे फाटे फोडून चीनशीं हजार वर्षेंपर्यंत दळणवळण ठेविलें. ह्युएनत्संग (युवान श्वान) याच उत्तरमार्गानें हिंदुस्थानांत येऊन दक्षिणमार्गानें परत गेला. या रस्त्यावर कित्येक गांवें अशीं होतीं कीं, ज्यांना विविध मानवजाती, भाषा आणि कला यांचें संगमस्थान असें यथार्थतेनें म्हणतां येईल. या प्रदेशांत संस्कृत, चिनी, सिरिआक, सोग्डी, तुर्की, खोतानी, वगैरे अनेक ज्ञाताज्ञात भाषांतील हस्तलिखितें आणि बौद्धकला-वस्तू अपरंपार सांपडतात. हिंदुस्थान सरकारनें सर ऑरेल स्टीन यांना मुद्दाम येथील संशोधनाच्या मोहिमेवर पाठविलें होतें व त्यांनीं अनेक गोष्टींचे शोध लाविले व आपले महत्त्वाचे अहवाल 'सेरिंडिया' नांवानें प्रसिद्ध केले. त्यांच्याप्रमाणेंच फ्रेंच, रशियन व जर्मन पुराणवस्तुसंशोधकांनीं मध्य आशियांत संशोधन केलें आहे. व पश्चिम आणि पूर्वेतर देश यांमधील सांधा म्हणून पूर्वी असणारा जो हा प्रदेश त्याच्या संस्कृतीवर चांगला प्रकाश पाडला आहे. बौद्ध संप्रदायाच्या द्वारें हिंदुस्थाननें तर या संस्कृतीच्या इतिहासांत मोठा भाग घेतल्याचें दृष्टोत्पत्तीस आलें आहे. खरोष्ठी आणि ब्राह्मी लिपींतून प्राकृत ग्रंथ लिहिलेले सांपडलेले आहेत (उदा., भूर्जपत्रावर खरोष्ठींत लिहिलेलें प्राकृत 'धम्मपद'). लांकडी लेखहि पुष्कळ उपलब्ध झाले असून, तुर्कस्तानच्या आग्नेय भागांत इ. स. ४ थ्या शतकापर्यंत प्राकृत ही राज्यव्यवहाराची भाषा असावी असें सिद्ध होतें. नाटकें,

वैद्यकग्रंथ, काव्यें यांसारखे वाङ्मय-प्रकार अशा हस्तलिखितांतून लेखनिविष्ट केले असून त्यांवरून हिंदुस्थान आणि मध्य आशिया यांचा निकट संबंध सहज प्रतीत होतो.

हिंदुस्थान आणि पश्चिमेकडील ग्रीक आणि रोमन राष्ट्रें यांचा संबंध दोन प्रकारचा होता : सांस्कृतिक आणि व्यापारी. पहिला संबंध वायव्य सरहद्द प्रांतांत दिसेल व दुसरा मध्य आणि दक्षिण हिंदुस्थानांत आढळेल. व्यापारी संबंध खुष्कीच्या मार्गानें तर होताच पण जलमार्गानेंहि बराच होता. किनारी व्यापाराचें केंद्र कराचीजवळ असून व्यापाऱ्यांना मोसमी वाऱ्यांची चांगली माहिती होतीसें दिसतें. इ. स. च्या पहिल्या शतकांत तांबड्या समुद्राच्या मुखापासून निघून हिंदी महासागर ओलांडण्याला साधारणपणें चाळीस दिवस लागत. ऑगस्टस बादशहाच्या अमदानींत (खि. पू. २३ ते इ. स. १४) हा जलव्यापार वाढलेला पांडिचरीजवळच्या उत्खननांवरून दिसून येईल.

हिंदुस्थानचा निर्गत माल म्हणजे मिरीं, मोतीं, रत्नें, मलमल, हस्तिदंत, रेशीम, इ. असून या पश्चिम राष्ट्रांकडून पोवळीं, शिसें, तांबें, जस्त, कांच, दिवे, दारू, नाणीं हीं हिंदुस्थानांत येत. पुढल्या काळांतील युरोपियन व्यापारी कंपन्यांप्रमाणेंच हिंदुस्थानांत पुष्कळ बंदरांतून रोमन वखारी असत. कोचीन संस्थानांतील अर्वाचीन क्रँगानोर बंदर प्राचीन मुझिरिस असावें. त्या ठिकाणीं ऑगस्टसचें देवालय आहे. कोईमतूर जिल्ह्यांत पुष्कळ रोमन नाणीं सांपडतातच पण आरिकामेडु (पाँडिचेरीच्या दक्षिणेस दोन मैलांवर) गांवीं अशा वखारींचे अवशेष संशोधिले गेले आहेत. कोल्हापुराजवळ ब्रह्मपुरीच्या उत्खननांतहि अशीं रोमन दळणवळणाचीं चिन्हें नुकतींच उघडकीस आलीं आहेत. तथापि या किनारी व्यापारानें भारतीय संस्कृतीवर फारसा परिणाम झालेला दिसत नाहीं. तो वायव्य प्रांतांत स्पष्ट दिसतो.

तिकडे बौद्ध कलांतून ग्रीको-रोमन ठसा चांगलाच उमटला आहे. पेशावरच्या बाजूस गांधार शिल्पांत आणि जलालाबादच्या माती आणि चुना (स्टक्को) यांतील शिल्पांत ही गोष्ट पाहतां येते. पाश्चात्य कलेचा या काळच्या भारतीय कलेवर मोठा परिणाम झालेला होता याचें लहानसें प्रत्यंतर म्हणजे अपोलो-प्रमाणें केसांचें वळण, टोगासारखा झगा, तोरण-पत्रीप्रमाणें नक्षीकाम या गोष्टींत आढळेल. तथापि भारतीयांनीं त्यांना आध्यात्मिक विचारांखालीं दडपून ठेवलेलेंहि दिसून आनंद वाटेल.

हिंदुस्थानची शास्त्रीय पाहणी—सर्व्हे ऑफ इंडिया ह्या हिंदुस्थानच्या पाहणी-खात्याला अनेक प्रकारचीं कामें करावीं लागतात. ट्रिग्नॉमेट्रिकल (त्रिकोणमितीय भूमापन) पाहणी, टोपोग्रॅफिकल (स्थलवर्णनविषयक) पाहणी, जंगल-पाहणी, आणि इतर विशिष्ट प्रकारच्या पाहण्या करणें आणि संशोधन व नकाशे तयार करणें यांसारखीं कामें करावीं लागतात. कॅडॅस्ट्रल (जमीनजुमल्याच्या आणि इतर इस्टेटीच्या सरकारी नोंदीसंबंधीं) पाहणी प्रांतिक सरकारचीं 'लॅंड रेकॉर्ड्स अँड सेटलमेंट' हीं खातीं करतात. १९१४ सालीं टोपोग्रॅफिकल सर्व्हेचे नकाशे सदोष असल्याचें आढळून आलें. तेव्हां आजतागाईतची बरोबर माहिती असलेला नकाशा तयार करण्याकरितां आणि वेळोवेळीं नव्या दुरुस्त्या करून नकाशे तयार करण्याकरितां दरसाल २,१०,००० रुपये अधिक खर्च करण्याचें आणि नकाशांच्या आकारांत आणि गुणांत सुधारणा करण्याचें ठरलें. सामान्यतः एक मैलास एक इंच, संरक्षित जंगल (रिझर्व्हड्‌ फॉरेस्ट) आणि इतर विशेष प्रकारचीं क्षेत्रें यांकरितां एक मैलास दोन इंच, आणि ओसाड नापीक जमिनीला एक मैलास अर्धा इंच हें माप (स्केल) वापरण्याचें ठरलें. अलीकडील काटकसरीच्या धोरणामुळें या खात्याच्या कामालाहि बराच अडथळा आला आहे. डेहराडून आणि कलकत्ता येथें नकाशे छापण्याच्या कचेऱ्या आहेत. दुसऱ्या महायुद्धांत या पाहणी-खात्याचा उपयोग लष्करासाठीं करण्यांत आला. आतां कोठें नेहमींचीं कामें करण्यांत येऊं लागलीं आहेत.

देशाची सर्वांगीण उन्नति, विशेषतः औद्योगिक, व्हावी म्हणून सुशिक्षित सरकार निरनिराळ्या दृष्टींनीं देशाची शास्त्रीय पाहणी करीत असतें. या पद्धतीला अनुसरून हिंदुस्थान सरकारनेंहि पुढील पाहणी केलेली आहे.

१. वनस्पति-विषयक पाहणी—(बोटॅनिकल सर्व्हे). हिंदुस्थान सरकारचें हें पाहणी-खातें एका डायरेक्टरच्या नियंत्रणाखालीं असून त्याच्या मदतीला दुसरे तीन अधिकारी आहेत. ते वनस्पतींची तपासणी करून सारूप्य ठरविण्याचें काम करीत असतात. या डायरेक्टरच्या मर्यादेंत मागें ब्रह्मदेशांतील सिंकोना झाडाचे मळेहि असत. महायुद्धानंतरचें औद्योगिक धोरण ठरवितांना हिंदुस्थान सरकारनें १९१६ सालींच असें ठरविलें कीं, हिंदुस्थानांत सिंकोना झाडाची लागवड वाढविण्यास शक्य ते सर्व प्रयत्न केले पाहिजेत. म्हणून हिंदुस्थानच्या बोटॅनिकल सर्व्हेचा माजी डायरेक्टर कर्नल ए. टी. गेट यास सिंकोनाच्या लागवडीकरितां योग्य जमिनी शोधण्यासाठीं नेमलें. त्यानें १९१८ मध्यें केलेल्या शिफारशीनुसार ब्रह्मदेशांतील तवोई जिल्हा या लागवडीकरितां राखून ठेवून १९२० सालीं लागवडीच्या कामास सुरुवात करण्यांत आली. दरसाल ५०० एकर जमिनीवर लागवड करण्याचें ठरून १९२८ सालापासून दरसाल १० हजार पौंड उत्पन्न होईल असा अजमास केला. पण १९२१–२२ सालच्या अतिवृष्टीनें ही सर्व लागवड वाहून गेली आणि या जिल्ह्यांतील योजना बंद करण्यांत येऊन ब्रह्मदेशांतील मेर्गुई जिल्ह्यांत १९२२ सालीं लागवड सुरू

करण्यांत आली. या सिंकोना लागवडींची वाढ समाधानकारक असल्याचें प्रसिद्ध झालें आहे.

पुढें काटकसर कमिटीनें सांगितल्यावरून पहिलीं चार वर्षे दरसाल २५० एकरच लागवड करण्याचें ठरलें. त्यायोगें १९३० पासून ४५ हजार पौंड उत्पन्न होईल असा अंदाज होता. शिवाय हिंदुस्थान सरकारच्या सांगण्यावरून बंगाल व मद्रास सरकारनें वाढ करण्याचें काम चालविलें; व बंगाल्यांत २०० एकर, मद्रासेंत २३० एकर व हिंदुस्थान सरकारची दरसाल २५० एकर याप्रमाणें वाढ सुरू होणार होती. या एकंदर लागवडीपासून दरसाल उत्पन्न एक लक्ष वीस हजार पौंड होईल असा अंदाज असून त्या काळीं हिंदुस्थानांत दरसाल एकंदर खप एक लक्ष सोळा हजार पौंडांचा होता.

हिंदुस्थानांत या औषधाला मागणी किती आहे याचा अंदाज करणें कठिण आहे. मलेरिया तापाचे ऐशीं लक्ष रोगी दवाखाने व रुग्णालयें यांमध्यें दरसाल औषधाकरितां जातात. व प्रत्येक रोग्याला कमींत कमी ११० ग्रेन क्विनाइन लागतें, या हिशोबानें या औषधाचा एकंदर खप दरसाल एक लक्ष पंचवीस हजार पौंड आहे. तथापि प्रत्येक रोग्याला वास्तविक जरूर तितकें क्विनाइन मिळत नाहीं, कारण त्याची किंमत फार असते. दवाखान्यांत न जाणाऱ्या मलेरियाच्या रोग्यांची संख्या दहा कोटी आहे. म्हणून क्विनाइनचा खप पंधरा लक्ष पौंडांपर्यंत वाढण्याचा संभव आहे. इटलीमध्यें १९०३ सालीं सिंकोनाच्या लागवडीचा धंदा जेव्हां सरकारनें आपल्या हातीं घेतला तेव्हां क्विनाइनची किंमत उतरून खप पुष्कळ वाढला आणि मलेरियापासून होणाऱ्या दरसाल मृत्यूंची संख्या पंधरा हजारांवरून तीन हजारांवर आली. हिंदुस्थान सरकारच्या पब्लिक कमिशनरनें आपल्या वार्षिक रिपोर्टांत असें म्हटलें आहे कीं, क्विनाइनचा खप पांच लक्ष पौंड होऊं लागेपर्यंत रोगाच्या प्रतिकाराचा प्रश्न बरोबर सुटला असें म्हणतां येणार नाहीं.

२. भूस्तरशास्त्रीय पाहणी—हिंदुस्थानांतील भूस्तरशास्त्रीय पाहणीचा अंतिम हेतु हिंदुस्थानचा भूस्तरशास्त्रीय नकाशा तयार करणें हा आहे. कारण अशा प्रकारचा बिनचूक नकाशा तयार करण्यावर भूस्तरशास्त्रविषयक बऱ्याच प्रश्नांचा निकाल लागणें अवलंबून आहे. या खात्याकडून जी माहिती प्रसिद्ध होते तिला नकाशे जोडलेले असतात. या नकाशांच्या मदतीनें खाणी खणण्याचा धंदा करणाऱ्या मालकांना व इंजीनियरांना सर्व प्राथमिक माहिती मिळते. देशाची सामान्य पाहणी आणि भूस्तरविषयक नकाशा करण्याचें काम चालू असतांना महत्त्वाचीं खनिज द्रव्यें बऱ्याच वेळां आढळून येतात आणि कंपन्यांना शोध लागलेल्या ठिकाणीं खाणी खणण्याचें काम हातीं घेण्यास प्रवृत्त करण्यांत येतें. खनिज द्रव्यें, खडक आणि प्रस्तरावशेष (फॉसिल्स) ह्यांचा संग्रह करून तीं हिंदुस्थानांतील पदार्थसंग्रहालयांत प्रदर्शनाकरितां ठेवतात. कोणीं खासगी संशोधकानें खनिज द्रव्यें, दगड आणि प्रस्तरावशेष या खात्याकडे पाठविल्यास त्यांची तपासणी करून त्यांची जात ठरविण्याचें काम हें खातें करतें. या खात्याकडून प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांत मेमॉयर्स, रेकॉर्ड्स व पॅलेऑन्टॉलॉजिया इंडिका यांचा समावेश होतो. गेल्या महायुद्धांत खनिजांच्या उपयोगावर भर देण्यासाठीं एक नवीन शाखा निघाली. भूस्तरपाहणी-खात्याचा उपयोग खनिज संपत्ति वाढविण्यासाठीं करण्याचा मुख्य उद्देश जो आहे तो कसा साध्य होईल याकडे सरकारची दृष्टि आहे. हवेंतून पाहणी करणें फार उपयुक्त ठरलें आहे. त्यामुळें वेळ व पैसा वाचतो. नगरविस्तार व पाटबंधारे यांच्या कामांना या पाहणीचा चांगला उपयोग होऊं लागला आहे.

३. प्राणिशास्त्रविषयक पाहणी—या प्रकारची पाहणी करण्याची योजना १९१६ सालीं अमलांत आली. हिंदुस्थानच्या स्टेट सेक्रेटरीनें पुढील सूचना मंजूर केल्या होत्या:—या खात्याचें मुख्य ठिकाण इंडियन म्यूझियम हें राहील. इंडियन म्यूझियममधील प्राणिविषयक आणि मानवविज्ञानविषयक (अँथ्रॉपॉलॉजिकल) पाहणी हें खातें हिंदुस्थान सरकार आपल्या हातीं घेणार आणि त्यामार्फत प्राणिशास्त्रविषयक संशोधन चालू ठेवणार. मानवविज्ञान शाखा इंडियन म्यूझियमच्या विश्वस्तांच्या ताब्यांत राहणार. हें खातें हिंदुस्थानांत प्राणिशास्त्रविषयक जो संग्रह आहे त्याचें संरक्षक बनणार. त्याच्याकडे येणाऱ्या प्राणिविषयक नमुन्यांची तपासणी करून त्यांची जात ठरविण्याचें काम शक्य तितकें हिंदुस्थानांतील तज्ज्ञांकडून करविणार व ज्या विषयाचे तज्ज्ञ येथें नसतील त्या प्रकारचें काम परदेशच्या तज्ज्ञांकडून करवून घेण्याची व्यवस्था करणार. या खात्याचा डॉ. ॲनन्डेल हा पहिला डायरेक्टर होता. तो वारल्यानंतर त्याच्या जागीं कांहीं दिवस डॉ. बेनीप्रसाद हा हंगामी अध्यक्ष होता; नंतर मेजर आर्. बी. सेमूरसेवल यांस नेमण्यांत आलें (१९२४). त्यांनीं या खात्याची वाढ कशी करतां येईल याबद्दलचा एक मोठा अहवाल सादर केला आहे. या खात्याचीं वृत्तांत-पुस्तकें प्रसिद्ध होत असतात. १९४५ सालीं मानवविज्ञानशाखेचें एक स्वतंत्र पाहणी-खातें करण्यांत आलें. विद्यापीठांतून प्राणिशास्त्रविषयाचा अभ्यास नीट होत नाहीं. त्यामुळें या खात्यांत काम करण्यासाठीं चांगली तज्ज्ञ माणसें मिळूं शकत नाहींत.

सस्तन-प्राणिविषयक पाहणी—हिंदुस्थान, ब्रह्मदेश व सिलोन यांमध्यें सस्तनप्राणी प्राणी कोठें कोठें आढळतात, त्यासंबंधीं शक्य तितकी पूर्ण माहिती मिळविण्याच्या उद्देशानें हें खातें १९१२ सालीं स्थापन करण्यांत आलें. तसेंच बॉंबे नॅचरल हिस्टरी सोसायटीचें म्यूझियम, ब्रिटिश म्यूझियम आणि हिंदुस्थानांतील इतर

नॅचरल हिस्टरी म्यूझियम यांमधील संग्रहांत हिंदुस्थानांतील सस्तन प्राण्यांची अधिक भर घालणें हाहि एक आणखी उद्देश होता. १८९१ पर्यंत हिंदुस्थानांतील सदरहू शास्त्रज्ञांना (नॅचरॅलिस्ट) डॉ. जेर्डनकृत 'मॅमल्स ऑफ इंडिया' या १८७४ मध्यें प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांतील माहितीवर अवलंबून राहावें लागत असे. १८८४ मध्यें आर्. ए. स्टर्नडेल यानें 'नॅचरल हिस्टरी ऑफ इंडियन मॅमल्स' हें पुस्तक प्रसिद्ध केलें. पण त्यांत डॉ. जेर्डनच्या पुस्तकांतल्यापेक्षां अधिक माहिती फारशी नव्हती. १८८१ मध्यें झूऑलॉजिकल सोसायटीचा ऑनररी सेक्रेटरी डॉ. स्लेटर यानें तयार केलेले आणि डार्विन, हूकर, हक्सले व इतर सुप्रसिद्ध शास्त्रज्ञ यांच्या सह्या असलेलें एक विनंतिपत्र हिंदुस्थानच्या स्टेट सेक्रेटरीकडे पाठविण्यांत आलें. हिंदुस्थानांतील प्राणिविषयक माहिती देणारी एक पुस्तकमाला तयार करावी व त्या कामावर डॉ. ब्लेनफोर्ड याला संपादक नेमावें अशी शिफारस त्या विनंतिपत्रांत केली होती. १८८०–९० सालीं 'फॉना ऑफ ब्रिटिश इंडिया' या पुस्तकमालेंतील सस्तन प्राणिविषयक ग्रंथ प्रसिद्ध करण्यांत आला. त्यानंतर या विषयांत अधिक संशोधन होऊन नवे प्राणी जे सांपडले त्यांचें पृथक्करण व वर्गीकरण होऊन एतद्विषयक ज्ञानांत भर पडल्यामुळें ब्लॅनफोर्डचा ग्रंथ निरुपयोगी ठरला आहे. ही उणीव दूर करण्याकरितां ब्रिटिश म्यूझियमच्या अधिकाऱ्यांच्या सूचनेवरून बॉंबे नॅचरल हिस्टरी सोसायटीनें हिंदुस्थानांतील सस्तनप्राणिविषयक पाहणी (मॅमल सर्व्हे) करण्याचें ठरवून त्याकरितां द्रव्यसाहाय्य देण्याबद्दल विनंतिपत्र काढलें. तदनुसार १९११ पासून १९२० पर्यंत एक लाखाहून अधिक रुपये फंड जमला. त्यांत हिंदी संस्थानिक, हिंदुस्थान सरकार, प्रांतिक सरकारें व इतर इंग्लंड-अमेरिकेमधील कांहीं संस्था यांनीं वर्गण्या दिल्या. पहिलें महायुद्ध सुरू होण्याच्या सालापर्यंत सिंधचा कांहीं भाग, गुजराथ, कच्छ, काठेवाड, दक्षिण महाराष्ट्र, कानडा, मध्यप्रांतांतील कांहीं भाग आणि बंगाल-बिहारमधील कांहीं जिल्हे, याशिवाय कुमाऊन, दार्जिलिंग, सिकीम, भूतानमधील कांहीं भाग, चिंदवीन नदीकांठचा प्रदेश आणि सर्व सिलोन इतक्या मुलुखांची पद्धतशीर पाहणी पुरी झाली होती. या पाहणीमध्यें सुमारें १७,००० नमुने जमा झाले होते. ते म्यूझियमकडे पाठविण्यात आले. त्यांची प्राणिशास्त्रज्ञांनीं तपासणी करून तत्संबंधीं संशोधनविषयक माहिती बॉंबे नॅचरल हिस्टरी सोसायटीच्या मासिकांत प्रसिद्ध करण्यांत आली. हे जे नवीन शोध लागले तत्संबंधीं पुस्तक लिहून तयार करण्याचें काम एम्. सी. हिंटन हे करीत होते. पहिलें महायुद्ध संपल्यानंतर सदरहू पाहणीचें काम करण्याकरितां सी. शिमरोज यास आसाम व मेर्गुई द्वीपसमूह या भागांत पाठविण्यांत आलें. व नंतर ग्वाल्हेर संस्थानांत पाठविण्यांत आलें. त्याशिवाय पूर्व घाट, कांग्रा-जिल्हा, पंजाब सॉल्ट रेंज, दक्षिण हिंदुस्थान व नेपाळ या भागांची पाहणी करण्यात आली. नंतर हिमालयाच्या पायथ्याच्या टेंकड्या आणि पिंडारी दरी येथील पाहणीचें काम त्यांनीं हातीं घेतलें.

हिंदुस्थान सरकारनें १९४७ सालीं अशा शास्त्रीय संशोधनासाठीं एक नवीन खातेंच उघडलें. आतां शास्त्रीय आणि औद्योगिक संशोधनासाठीं प्रयोगालयें निर्माण करण्यांत आलीं आहेत; तज्ञसमित्या निरनिराळ्या धंद्यासाठीं स्थापल्या असून त्यांनीं सुचविल्याप्रमाणें संशोधनकार्यें चालली आहेत. खालील ठिकाणीं संशोधनकार्यालयें चालू केलीं आहेत. व आणखी पांचसहा काढण्यानें योजिलें आहे.

| | | |
|---|---|---|
| १ नॅशनल फिजिकल लॅबोरेटरी, | | दिल्ली |
| १ ,, केमिकल ,, | | पुणें |
| ३ ,, मेटॅलर्जिकल ,, | | जमशेदपूर |
| ४ सेंट्रल ग्लास अँड सेरॅमिक रीसर्च इन्स्टिट्यूट | | कलकत्ता |
| ५ फ्युएल रीसर्च इन्स्टिट्यूट | | धनाबाद |
| ६ सेंट्रल लेदर रीसर्च इन्स्टिट्यूट | | मद्रास |
| ७ सेंट्रल एलेक्ट्रो केमिकल रीसर्च इन्स्टिट्यूट | | करइकुडी |

बोर्ड ऑफ रीसर्च ऑन ॲटमिक एनर्जी नुकतेंच स्थापन करण्यांत आलें आहे.

हिंदुस्थानची राज्यघटना—हिंदुस्थानांत प्राचीन काळीं राज्यव्यवस्था कशी होती याविषयीं माहिती 'शासनशास्त्र' या लेखांत दिली आहे. या ठिकाणीं फक्त इंग्रज अमदानीपासूनचा आढावा घेतला आहे. ईस्ट इंडिया कंपनीनें बंगाल व कर्नाटक हे मोठे प्रांत आपल्या ताब्यांत घेतल्यावर त्याच्या सुव्यवस्थित राज्यकारभाराचा प्रश्न उपस्थित झाला. तेव्हां ब्रिटिश पार्लमेंटनें १७७३ सालीं 'रेग्युलेटिंग ॲक्ट' नांवाचा कायदा मंजूर करून त्याअन्वयें चालण्यास कंपनीस सांगितलें. बंगालचा गव्हर्नर हा गव्हर्नर-जनरल असून त्याला एक सल्लागार मंडळ दिलें होतें. पण सल्लागार आणि गव्हर्नर-जनरल यांच्यांत तंटे होऊं लागले असतां त्यांच्यावर १७८४ सालीं एक नियामक मंडळ (बोर्ड ऑफ कंट्रोल) पिट-कायद्यान्वयें स्थापण्यांत आलें. दर वीस वर्षांनीं कंपनीस नवी सनद देतांना पार्लमेंट फेरविचारणा करून कांहीं नवे अधिकार देई, पण आपलें वर्चस्व जास्त जास्त ठेवी. १८१३, १८३३ व १८५३ या सालीं कंपनीच्या कारभारात सुधारणा करण्यांत आल्या. तिचा व्यापारी पेशा १८३३ सालीं नाहींसा केला व गव्हर्नर-जनरलला कायदे करण्याचा अधिकार दिला. आग्रा आणि अयोध्या मिळून एक स्वतंत्र (संयुक्त) प्रांत करण्यांत आला. १८५७ च्या बंडानंतर हिंदुस्थानचा राज्यकारभार कंपनीकडून काढून घेऊन

आला व त्या वेळेपासून हिंदुस्थान हा ब्रिटिश साम्राज्याचा एक घटक बनला.

१८५८ त व्हिक्टोरिया राणीचा प्रसिद्ध जाहिरनामा निघाला. सर्व लोकांस समतेनें व न्यायानें वागविण्यांत येईल असे ब्रिटिश सरकारनें आश्वासन दिलें. १८६१ सालीं मुंबई, मद्रास व बंगाल या तीन प्रांतांना कायदे मंडळें स्थापण्याचा अधिकार मिळाला. या कायदे मंडळांत कांहीं सभासद बिनसरकारी असत. १८९२ सालीं सभासदांची संख्या वाढविण्यांत आली व बिनसरकारी सभासदांना अंदाजपत्रकावर चर्चा करण्याचा व माहितीसाठीं प्रश्न विचारण्याचा अधिकार मिळाला. १९०९ च्या मोर्ले-मिंटो सुधारणा कायद्यानें कायदे मंडळें अधिक विस्तृत करण्यांत आलीं व त्यांना जास्त प्रातिनिधिक स्वरूप देण्यांत आलें. कार्यकारी मंडळांतहि बिनसरकारी सभासद घेण्यांत येऊं लागले.

पहिल्या महायुद्धांत हिंदुस्थानचा बराच पैसा व रक्त सांडल्यामुळें ब्रिटिश सरकारला जास्त जबाबदारीचे शासन-विषयक अधिकार हिंदुस्थानला देणें प्राप्तच होतें. कॉंग्रेस आणि मुस्लिम-लीग यांच्या मागण्या सारख्या चालू होत्याच. तेव्हां भारतमंत्री मॉटेग्यू यांनीं जबाबदारीचें स्वराज्य हळूहळू देण्याविषयीं घोषणा केली व तीप्रमाणें १९१९ चा मॉटेग्यू-चेम्स-फोर्ड सुधारणा कायदा पार्लमेंटनें केला व तो अमलांत आणला. या कायद्यामुळें पुढील नवीन गोष्टी झाल्या : हिंदुस्थान सरकारच्या कार्यकारी मंडळांत तीन हिंदी सभासद आले. कौन्सिल ऑफ स्टेट व लेजिस्लेटिव्ह असेंब्ली अशीं दोन कायदे-मंडळें स्थापण्यांत आलीं. प्रांतिक सरकारांत द्विदल राज्यपद्धति—म्हणजे कांहीं खातीं (सोपीव) लोकनियुक्त सभासदांतून निवडलेल्या हिंदी दिवाणांकडे व कांहीं (राखीव) सरकारी कार्यकारी मंत्र्यांकडे—सुरू करण्यांत आली. कायदे मंडळांतील लोकनियुक्त सभासदांचे प्रमाण शे. ७० करण्यांत आलें. मंडळानेंच अध्यक्ष निवडावयाचा असे.

याप्रमाणें अंशतः तरी जबाबदार राज्यपद्धति सुरू झाली. पण या सुधारणांमुळें कॉंग्रेसप्रभृति लोकपक्षांचें मुळींच समाधान झालें नाहीं. खरें स्वराज्य हें नव्हे अशी चोहोंकडून ओरड सुरू झाली. तेव्हां पार्लमेंटनें १९१९ च्या कायद्यांत एक कलम घातल्याप्रमाणें एक रॉयल कमिशन सर जॉन सायमन यांच्या अध्यक्षतेखालीं नेमलें. पण या कमिशनमध्यें एकहि हिंदी सभासद नसल्यानें सर्व राजकीय पक्षांनीं त्याच्यावर बहिष्कार घातला व एक सर्व-पक्षीय परिषद् भरून राजकीय ध्येय वसाहतींचें स्वराज्य (डोमीनियन स्टेटस) असें ठरविण्यांत आलें. व तें सरकारनेंहि पुढे १९२९ सालीं जाहीर केलें. या ध्येयाप्रमाणें कशी राज्यव्यवस्था करावयाची हें सर्वांनीं मिळून ठरविण्यासाठीं १९३० सालीं लंडनला एक गोलमेज परिषद् घेण्यांत आली. यानंतर अशाच आणखी दोन परिषदा भरल्या. व त्यांवरून १९३३ सालीं एक सरकारी खलिता ('श्वेतपत्रिका') काढण्यांत आला. व त्यांतील सूचनांचा विचार करण्यासाठीं पार्लमेंटची जोडकमिटी बसली. नंतर या कमिटीच्या शिफारशींवरून १९३५ चा शासनविषयक कायदा करण्यांत आला. हाच कायदा १९५० पर्यंत अमलांत होता.

या कायद्यान्वयें ज्या सुधारणा झाल्या त्या अशा :—भारतमंत्र्याचें इंडिया कौन्सिल बंद झालें; व एक लहान सल्लागार मंडळ ठेवण्यांत आलें. इंग्लंडांत हिंदुस्थानचा एक हायकमिशनर नेमला गेला. हिंदुस्थानचा राज्यकारभार बादशहाच्या नांवानें चालविण्यांत येऊं लागला. मध्यवर्ती सरकारांत संस्थानें व खालसा मुलूख यांच्या संयुक्त प्रतिनिधींची दोन कायदे-मंडळें निर्माण झालीं. मध्यवर्ती सरकारांत द्विदल राज्यपद्धति आली. फेडरल कोर्टाची स्थापना झाली. प्रांतिक कारभारांत लोकांना स्वायत्तता देण्यांत आली. मात्र गव्हर्नरला कांहीं जास्त अधिकार देण्यांत आले. ब्रह्मदेश हिंदुस्थानपासून अलग करण्यांत आला. व हिंदुस्थानांत सिंध व ओरिसा हे दोन स्वतंत्र प्रांत केले. प्रांतिक मंत्रिमंडळे कायदेमंडळांना जबाबदार ठेविलीं. मुंबई, मद्रास, बंगाल, संयुक्तप्रांत, आसाम व बिहार या सहा प्रांतांत दोन दोन व इतर प्रांतांतून एकेकच कायदे मंडळ स्थापण्यांत आलें.

आम्ही आपली राज्यघटना करूं अशी कॉंग्रेसची फार दिवसांची मागणी होती. ती फार आढेवेढे घेऊन नंतर सरकारनें मान्य केली व १९४६ सालीं डॉ. राजेंद्रप्रसाद यांच्या अध्यक्षतेखालीं घटना परिषद् नेमण्यांत आली. तिचें काम १९५० पर्यंत चालून २६ जानेवारी १९५० रोजीं परिषदेनें तयार केलेली नवी स्वराज्याची घटना अमलांत आली.

आतां भारत हें एक संघराज्य असून त्याच्या घटकराज्यांत पूर्वींचे प्रांत, विलीन, सामील व उरलेलीं संस्थानें, व चीफ कमिशनरचे प्रांत यांचा समावेश आहे. सामाजिक, आर्थिक व राजकीय न्याय; विचार, उच्चार, समजुती, श्रद्धा आणि उपासना यांचें स्वातंत्र्य; दर्जा आणि लाभसंधि यांची समानता, हीं सर्व भारतीय नागरिकाला सारखींच आहेत; त्यांत भेदभाव नाहीं. प्रत्येक व्यक्तीला कांहीं मूलभूत हक्क दिले आहेत. अस्पृश्यता कायद्यानें नष्ट केली आहे. पदव्या बंद केल्या आहेत. हिंदूंमध्यें शीख, जैन आणि बौद्ध यांचा अंतर्भाव केला आहे. धर्माची कोणावर सक्ती नाहीं, किंवा सरकारचा विशिष्ट धर्म नाहीं. स्त्रीपुरुषांना सारखेच हक्क राहतील.

भारताचा एक राष्ट्रपति ठेवला असून त्याच्याकडे सर्व अधिकार सोंपविलेले आहेत. तो सर्व कायदेमंडळांकडून निवडला जाईल. राष्ट्रपतीच्या अधिकाराची मुदत ५ वर्षें आहे. त्याला

दरमहा पगार १०,००० रु. मिळावयाचा आहे. एक उपराष्ट्रपति असेल. तो वरिष्ठ सभागृहाचा पदसिद्ध अध्यक्ष असेल. प्रधान मंत्र्याच्या नेतृत्वाखालीं एक मंत्रिमंडळ राष्ट्रपतीला राज्यकारभाराच्या बाबतींत सल्ला देईल व मदत करील. हें मंत्रिमंडळ सामुदायिक रीत्या लोक-सभागृहांना जबाबदार राहील.

भारत राज्यसंघाचें एक पार्लमेंट असून त्याचीं दोन सभागृहें (राज्यपरिषद् व लोक-सभागृह) असतील. राज्यपरिषदेचे ⅓ सभासद दर दोन वर्षांनीं निवृत्त होतील. लोकसभांची निवडणूक ५ वर्षांनीं होत जाईल. लोक-सभागृह आपला अध्यक्ष व उपाध्यक्ष निवडील. या दोन्ही सभागृहांनीं मान्य केल्याशिवाय कोणताहि कायदा अमलांत येणार नाहीं.

भारताला एक उच्चतम न्यायालय असेल. त्यांत एक मुख्य व इतर ७ न्यायाधीश असतील. एक प्रमुख हिशेबतपासनीस राष्ट्रपति नेमील; तो संघ, राज्यें व इतर संस्था यांचे हिशेब तपासील. भारताचा एक प्रमुख कायदेसल्लागार असेल.

प्रत्येक राज्यावर (पूर्वीच्या प्रांतांत) एक राज्यपाल (गव्हर्नर) असेल. त्याची नेमणूक राष्ट्रपति करील. त्याला सल्ला व मदत देण्यासाठीं मुख्य मंत्र्याच्या नेतृत्वाखालीं एक मंत्रिमंडळ राहील. हें मंडळ विधानसभेला जबाबदार असेल. राज्यांत एक किंवा दोन कायदेमंडळें (विधान परिषद् व विधान सभा) असतील. विधानपरिषदेंतील ⅓ सभासद दर दोन वर्षांनीं निवृत्त होतील. विधानसभेची मुदत ५ वर्षें आहे. अध्यक्ष व उपाध्यक्ष हीं सभागृहें निवडतील.

प्रत्येक राज्यांतील कायदेमंडळांत अनुसूचित जाती व जन-जाती यांसाठीं कांहीं राखीव जागा ठेवल्या जातील. अल्पसंख्याकांचे कांहीं हक्क नोकऱ्या-नेमणुका यांसाठीं राहतील.

भारत संघाची सरकारी भाषा देवनागरी लिपींतील हिंदी असेल व आंकडे आंतरराष्ट्रीय असतील. पंधरा वर्षांनीं इंग्रजी ही राज्यभाषा अजीबात जाऊन तिच्या जागीं हिंदी येईल. राष्ट्रपति पांच-दहा वर्षांनीं या भाषेबाबत एक चौकशी समिति नेमील. संघाची सरकारी भाषा हीच संघ आणि इतर राज्यें यांच्यांतील व्यवहाराची म्हणून राहील. राज्याच्या कायदेमंडळाला आपली सरकारी कामकाजाची भाषा ठरवितां येईल.

याप्रमाणें सामान्यतः नवीन घटना आहे. अर्थात् घटनेंत बदल करण्याचा पार्लमेंटला अधिकार आहे. भारत हा ब्रिटिश राष्ट्रकुटुंब संघांतील एक घटक अद्यापि आहे. पण बादशाही वर्चस्वाचा या अवस्थेंत बिलकूल जाच नाहीं. उलट इतर घटकबंधूंचें व ब्रिटनचें या नव्या संघराज्याला साहाय्यच होणार आहे.

हिंदी राष्ट्रीय सभा (इंडियन नॅशनल कॉंग्रेस)—ही हिंदुस्थानला गुलामगिरींतून मुक्त करून स्वराज्य संपादन देणारी संस्था म्हणतां येईल. ही १८८५ सालीं एका सरकारी नोकरींत असणाऱ्या इंग्रज गृहस्थानें सुरू केली हें कळून आश्चर्य वाटेल. हे गृहस्थ म्हणजे ए. ओ. ह्यूम होत. त्याच सालीं नाताळांत मुंबईस राष्ट्रीय सभेचें पहिलें अधिवेशन भरलें. अध्यक्ष कलकत्त्याचे प्रसिद्ध वकील उमेशचंद्र बानर्जी हे होते. नंतर १९०५ पर्यंत जीं अधिवेशनें निरनिराळ्या ठिकाणीं भरलीं तीं निरुपद्रवी व बैठें राजकारण करणाऱ्या मंडळींचीं होतीं व त्यांत लोकाग्रणींपेक्षां चटे बडे हुद्देदार व आंग्ल संस्कृतीनें भारलेले अधिकारी व त्यांचे अनुयायीच जास्त असत. तेव्हां मामुली ठराव करण्याखेरीज त्यांना भरीव असें विशेष कांहीं करतां आलें नसल्यास नवल नाहीं. १९०६ सालीं दादाभाई नौरोजी यांच्या अध्यक्षतेखालीं कलकत्त्यास जी सभा झाली ती मात्र फार गाजली. कॉंग्रेसचें ध्येय स्वराज्य आहे असें अध्यक्षांनीं ठासून सांगितलें. बहिष्कार, स्वदेशी व राष्ट्रीय शिक्षण या गोष्टी साधनभूत म्हणून पुढें देशभक्तांनीं उचलल्या. कॉंग्रेस जहाल गटाच्या हातीं जाऊं नये म्हणून फेरोजशहाच्या पक्षाच्या मवाळांनीं प्रयत्न केला व सुरत येथें पुढील सालीं कॉंग्रेसमध्यें दुफळी झाली. नंतर १९१६ पर्यंत कॉंग्रेस मवाळ किंवा प्रागतिक यांच्या हातीं राहिली. लो. टिळक सुटून आल्यावर त्यांनीं होमरूल ऊर्फ हिंदी स्वराज्याची मागणी कॉंग्रेसकडून करविण्यास सुरुवात केली. सर्व पक्षांचें एकीकरण केलें. हिंदु-मुसलमानांमधील प्रसिद्ध 'लखनौ-करार' घडवून आणला. पण १९१९ सालीं प्रागतिक पक्ष कायमचा कॉंग्रेसमधून निघाला. १९२० सालीं म. गांधी कॉंग्रेसमध्यें धडाडीनें शिरल्यापासून नवाच कालखंड सुरू झाला. सरकारशीं सर्व बाबतींत असहकारिता करण्याचा ठराव या अधिवेशनांत मंजूर होऊन देशांत मोठी खळबळ माजली. कॉंग्रेसची सभासद-वर्गणी चार आणे ठेवून लाखों लोकांना आंत ओढण्यांत आलें. नंतर कायदेमंडळांत जाऊन काम करणारा स्वराज्य पक्ष राष्ट्रीय सभेंत निर्माण होऊन त्यानें प्रांतिक व मध्यवर्ती कायदेमंडळांत बहुमत केलें व सरकारला राज्यकारभार करणें अशक्य करून सोडलें. नंतर वसाहतीच्या स्वराज्यावरून पूर्ण स्वराज्याच्या ध्येयाची घोषणा करून २६ जानेवारी १९३० हा दिवस स्वातंत्र्यदिन म्हणून पाळला.

१९३० ते १९४५ पर्यंत कॉंग्रेसनें स्वराज्यप्राप्तीसाठीं सत्याग्रहाचें शस्त्र सरकारवर उगारलें. १९३० सालीं सुरू केलेला सनदशीर प्रतिकार १९३१ त गांधी-आयर्विन समझोता होऊन बंद करण्यांत आला व म. गांधी गोलमेज परिषदेला कॉंग्रेसचे एकमेव प्रतिनिधि म्हणून गेले. पण नंतर सरकारची दडपशाही सुरू झाली तेव्हां पुन्हां मोठा प्रतिकार व सत्याग्रह झाला, व हजारों लोक तुरुंगांत गेले. १९३७ त कॉंग्रेसनें निवडणुकी लढविण्याचें ठरवून बहुतेक (११ पैकीं ७) प्रांतांतून आपलें बहुमत केलें व

काँग्रेस मंत्रिमंडळे बनविलीं. या खादीधारी मंत्र्यांनीं थोडा पगार घेऊनहि राज्यकारभार चांगला हांकला.

याच सालीं फैजपूर (खानदेश) नांवाच्या खेड्यांत काँग्रेसचें अधिवेशन पं. नेहरूंच्या अध्यक्षतेखालीं भरलें. दुसरें महायुद्ध सुरू झाल्यावर सरकारनें युद्धाला साहाय्य मागितलें. पण काँग्रेसनें या बाबतींत असहकार पुकारून मंत्र्यांना जागा सोडण्यास सांगितलें; तेव्हां पुन्हां या प्रांतांतून सरकारतर्फे कारभार सुरू झाला. नंतर ब्रिटिश सरकारनें युद्धाची अनिष्ट परिस्थिति जाणून हिंदुस्थानला बरेच स्वराज्याचे हक्क देऊं केले. बोलणीं करण्यासाठीं इंग्लंडहून शिष्टमंडळें आलीं. पण एकमत होईना. तेव्हा वैयक्तिक सत्याग्रहाचा काँग्रेसनें आदेश दिला व १९४२ सालीं क्रिप्सची वसाहती स्वराज्याची योजना फेटाळून 'छोडो हिंद' (क्विट् इंडिया)चा ठराव केला. तेव्हां सरकारनें सर्व काँग्रेस पुढाऱ्यांना एकदम पकडून कैदेंत ठेवलें; व काँग्रेस संस्था बेकायदेशीर ठरविली. पण पुढें दोन वर्षांनीं हळूहळू सर्वांना मुक्त केलें व पुन्हां समेटाचीं बोलणीं चालू केलीं. १९४५ सालीं लॉर्ड वेव्हेलच्या हंगामी मंत्रिमंडळांत काँग्रेस-पुढारी मंत्री झाले पण मुस्लिम लीगशीं न जमल्यानें हें मंत्रिमंडळ फुटलें. पण पुढल्या वर्षी हिंदी स्वातंत्र्याची योजना ब्रिटिश मंत्रि-शिष्टमंडळानें पुढें केली तेव्हां निवळ काँग्रेस पक्षाचेंच मंत्रिमंडळ तयार झालें. १९४७ सालीं १५ ऑगस्ट रोजीं ब्रिटिश सरकारच्या हातून स्वराज्याचें दान काँग्रेसच्या पदरांत पडलें, भारत स्वतंत्र झाला व तेव्हांपासून काँग्रेस पक्षच अधिकारारूढ आहे.

**हिंदूराव घाटगे**—जयसिंगराव घाटगे. हा दौलतराव शिंदे याची बायको बायजाबाई हिचा भाऊ असून, भाचा जनकोजी शिंदे याच्याशीं न पटल्यानें ब्रिटिश सरकारच्या संरक्षणाखालीं दिल्लीस जाऊन राहिला (१८३४). त्याला दरमहा दहा हजार रुपयांचें पेन्शन असे. त्यानें दिल्लीस एक इस्टेट विकत घेतली, पण तिच्या मालकी हक्काबद्दल फार वर्षे बांधा पडला होता. आजहि दिल्लीस हिंदूरावाचा वाडा म्हणून ओळखला जातो. त्यांत एक इस्पितळ आहे.

**हिंदोल**—हा राग कल्याण थाटांतून उत्पन्न होतो. या रागांत ऋषभ व पंचम हे स्वर वर्ज्य आहेत. म्हणून याची जाति औडुव-औडुव आहे. वादी स्वर धैवत व संवादी गांधार आहे. गानसमय रात्रीचा चौथा प्रहर आहे. हा राग उत्तरांगप्रधान आहे. त्याच्या आरोहांत निषाद वक्र होतो. याची प्रकृति गंभीर आहे व ह्यांत गमकांचा प्रयोग चांगला शोभतो.

**हिपार्कस** (मृत्यु ख्रि. पू. १२६)—एक प्राचीन ग्रीक गणितशास्त्रज्ञ व शास्त्रीय ज्योतिषाचा जनक. त्याचा 'ए कॉमेंटरी ऑन दि फिनॉमिना ऑफ आरेटस' हा एकच ग्रंथ हल्लीं उपलब्ध आहे. त्यानें एक वर्ष म्हणजे नक्की किती काळ हें प्रथम बरोबर ठरविलें. तसेंच अयनचलनाचा शोध लावला. ग्रहांचे सूर्याभोंवतीं फेरे व मध्यमगती यांचा काळ नक्की ठरविला; आणि स्थिर ताऱ्यांची एक जंत्री केली. म्हणजे साधारणपणें त्यानें साधी व गोलीय त्रिकोणमितिविद्या निर्माण केली.

**हिपोक्रेटीस** (ख्रि. पू. ४६०–३५७)—एक ग्रीक वैद्यकशास्त्रज्ञ. याचे ग्रंथ लवकरच सुप्रसिद्ध झाले असें प्लेटोनें त्यांतील उतारे दिले आहेत यावरून दिसतें. त्यानें वैद्यकावरील ग्रंथ लिहिल्यानंतर अनेक ठिकाणच्या व अनेक काळांतील तज्ज्ञांनीं वैद्यकशास्त्रावर आपले निबंध लिहिले. पण ते सर्व याचेच आहेत असें पुष्कळ काळ मानलें जात असे, आणि अद्यापहि या लिखाणावर याचेंच नांव आहे. हे ग्रंथ एकंदर ७२ असून त्यांत त्याचे मुलगे थेसेलस व ड्रॅको यांचेहि निबंध आहेत. तसेंच पॉलिबस व इतर अनेक लेखक यांचे निबंध आहेत. या ग्रंथांची भाषांतरासह आवृत्ति डब्ल्यू. एच्. एस्. जोन्स यानें १९२४ सालीं प्रसिद्ध केली.

**हिपोपोटॅमस**—पाणघोडा पाहा.

**हिम**—(स्नो). बर्फ पाहा. उष्णतामान ३२ फारेनहाइटवर उतरलें म्हणजे पाण्याचें द्रवरूप जाऊन बर्फ बनतें. शून्याखालीं १० फा. उष्णता झाली कीं बर्फाचे विविध आकाराचे सुंदर षट्कोणी तुकडे बनतात. ज्या काल्पनिक रेषेच्या वर पृथ्वीचा भाग नेहमीं हिमाच्छादित असतो तिला हिमरेषा म्हणतात. हिची उंची वेगवेगळ्या ठिकाणीं वेगवेगळी असते. उत्तर ध्रुवावर समुद्रसपाटीला, तर हिमालयावर सुमारें १६,००० फूट उंचीवर ही असते. साधारणपणें बर्फाची एक फूट खोली म्हणजे एक इंचाचा पाऊस असें मानण्यांत येतें. अतिशय कडक थंडींतदेखील वनस्पतींवर जर हिमाच्छादन असेल तर त्या जगतात; कारण बर्फ हें उष्णता-दुर्वाहक आहे.

**हिंमतबहादर गोसावी** (मृ. १८०४)—मराठेशाहींतील एक सरदार. याचें दुसरें नांव अनुपगीर असें होतें. हा अंतर्वेदींतील अनुप शहरचा राहणारा. यानें गोसाव्यांचें एक छोटें सैन्य तयार केलें. हा त्यांचा गुरु व सरदारहि होता. प्रथम अनुपगीरनें अयोध्येचा नबाब सुजा याची चाकरी पत्करली. पुढें सुजाच्या मृत्यूनंतर हा स्वतंत्र राहूं लागला. मराठे, मोंगल, रजपूत, वगैरे-पैकीं ज्यांना मिळालें असतां आपला फायदा होईल त्यांना हा मदत करी. याचा वडील भाऊ उमरावगीर हाहि शूर होता. तो बहुतेक अयोध्येच्या नबाबाच्या बाजूस असे.

नानासाहेब पेशव्याच्या सांगण्यावरून दत्ताजी शिंदे यानें नजीबखानाचा धुव्वा उडविला. शेवटीं नजीबानें सुजाची मदत मागितली. सुजानें अनुपगीरास दहा–बारा हजार सैन्य देऊन

दत्ताजीवर रवाना केलें. अंताजी माणकेश्वर व बुंदेले यांच्याशीं अनुपगीरचा सामना झाला (१७५७ मे). इतक्यांत अबदाली चालून येत असल्याची बातमी आली, तेव्हां दत्ताजीनें अनुपगीरच्या मध्यस्थीनें सुजाशीं कारस्थान चालविलें. पण दत्ताजी अनुपगीरच्या थापेबाजीस फसला व मागें अबदाली व पुढें रोहिले अशा कैचींत सांपडून बदाउन घाटावर त्याचा नाश झाला. बक्सारच्या लढाईंत अनुपगीर सुजातर्फे हजर होता (स. १७६३). सुजानें अनुपगीरास अंतर्वेदी प्रांत इनाम्यानें दिला (स. १७७५). सुजानंतर नजीबखानानें याला सरदारी दिली. महादजी शिंद्यानें आपलें वर्चस्व दिल्लींत स्थापलें, तेव्हां हा दिल्लीत कारस्थानांत गुंतला होता. शहाआलमनें याला 'राजा हिंमतबहादर' ही पदवी दिली. याच्यामार्फत पाटीलबावानें नजीब व दिल्ली दरबार यांना इंग्रजांविरुद्ध वळविण्याचा निष्फळ प्रयत्न केला. पुढें नजीब व अनुपगीर यांचें पटेनासें झालें, तेव्हां हा जयपुरास गेला. हा अनेक मानगडी करी. हा होळकर व अलीबहाद्दर यांच्या म्हणजे नाना फडणिसाच्या बाजूचा आहे असा महादजीस संशय होता. महादजी एकदां आजारी असतां यानेंच जादूटोणा व अनुष्ठान करून, त्याची प्रकृति बिघडेल अशीं कृत्यें केलीं म्हणून पाटीलबावानें यास मथुरेस पकडलें. परंतु हा पळून जाऊन जरिपटक्याचा आश्रय घेऊन, "श्रीमंतांच्या जरिपटक्याजवळ आलों, आतां माझे अंगीं मुद्दा शाबीद करावा व जें करणें तें करावें," असें म्हणूं लागला.

नंतर यानें अलीबहाद्दरास सांगून सर्व बुंदेलखंड स्वाऱ्या करून ताब्यांत घेतलें. अलीबहाद्दर बुंदेलखंडाचा मुख्य झाल्यावर अनुपगीरचें महत्त्व जास्त वाढलें. पुढें हा आपल्या जहागिरींत राहून अनेक भानगडी करूं लागला व स. १७८७ त मराठ्यांविरुद्ध बंड उभारून खंडणी देण्याचें यानें नाकारलें. पुढें हा राणेखानामार्फत पाटीलबावास पुनः शरण आला. नंतर हा समशेरबहाद्दराचा दिवाण झाला. पण इंग्रजांस मिळून हा आपल्या धन्यावर उलटला. कर्नल पॉवेल याला हा ससैन्य जाऊन मिळाला (१६ सप्टें. १८०३). या दोघांनीं बुंदेलखंड हस्तगत करून समशेरबहाद्दराचा पराभव बेटवा नदीवर केला (१३ ऑक्टोबर). याबद्दल इंग्रजांनीं याची जुनी जहागीर कायम करून थोडी नवीहि दिली. परंतु या मिळालेल्या जहागिरींचा उपभोग घेण्यास हा फार दिवस जगला नाहीं. लवकरच काल्पी येथें मरण पावला.

**हिमनग**—(आइसबर्ग). ज्या वेळीं हिमनद्या समुद्रांत येऊन पडतात त्या वेळीं त्यांच्या किनाऱ्यावरील बर्फाचे मोठे मोठे खडक इतस्ततः वाहत राहतात. ध्रुवप्रदेशांत असे बर्फाचे डोंगर (उदा., सेंट लॉरेन्स नदीच्या मुखाच्याकडे वाहणारे) जहाजांना काळासारखे असतात. १९१२ सालीं टिटॅनिक नांवाचीं प्रचंड बोट याच्या धक्क्यानेंच बुडाली. या हिमनगाचा पाण्यावरील भाग ⅛ व बाकीचा पाण्यांत बुडालेला असतो. दक्षिण ध्रुवाकडे तर सर्व जमीन व समुद्र बर्फमयच असतो. त्यांत कांहीं वेळां आटाळलें बर्फाचे डोंगरच्या डोंग तयार होतात.

**हिमनद्या**—(ग्लेशर्स). हिमरेषेच्यावरील भागांत जें बर्फ सांचलें असतें तें खालीं वाहत येऊन दऱ्यांतून पठारें व सपाटीवर पसरत जातें. या हिमनद्यांची वाहती गति एका दिवसाला १२ ते २४ इंचांपावेतों असते. यांचा मध्यभाग कडांपेक्षां जास्त गतिमान असतो. यांच्या तळांतून हुबाहारखे बर्फांच्या पाण्याचे लोट वाहत असतात, पण वरचा भाग मात्र अचल वाटतो. या नद्यांच्या तोंडाशीं गाळ सांचत जातो व तो वाहत न जातां सर्व किंवा कडेला बसतो. शेवटच्या हिमयुगांतील अशा हिमनद्यांचे अवशेष आज युरोपच्या समशीतोष्ण कटिबंधांत अनेक ठिकाणीं आढळून येतील. हिमनद्यांच्या अधोगतिसंबंधानें शास्त्रज्ञांनीं कांहीं शोध लावलेले आहेत.

**हिमबाधा**—(फ्रॉस्ट-बाइट). शरीराच्या पृष्ठभागावरील बाह्यपेशी थिजून गेल्या असतां त्यास हिमबाधा असें म्हणतात. अशा पेशी थिजत असतांना अतिशय वेदना होतात; त्या हळूहळू थांबून खाज सुटते व आंतून टोंचल्यासारखें वाटतें. गेल्या महायुद्धांत युरोपमधील थंडीमध्यें अनेक सैनिकांस पायामध्यें हा रोग झाला होता. अशा पायास पुढें 'खंदकी पाद' (ट्रेंचफूट) म्हणत. वास्तविक हा खंदकी पायाचा प्रकार म्हणजे खरी हिमबाधा नसून दलदल जागीं पुष्कळ काळ राहिल्यामुळें पायामध्यें रक्ताचा पुरेसा पुरवठा होऊं शकत नसे, व त्यामुळें पायास बधिरता येत असे.

**हिमयुग**—पृथ्वीच्या प्राचीनतम इतिहासांत मधून मधून पृथ्वीवर पावसाऐवजीं मोठी बर्फवृष्टि होऊन मोठाल्या हिमनद्या वाहत. असें शेवटचें हिमयुग खि. पू. ७००० च्या सुमारास युरोपांत होऊन गेलें. ब्रिटन आणि युरोपचा वायव्य प्रदेश यांवर बर्फाचा थर पडून मधून हिमनद्या वाहत होत्या. युरोपचा दक्षिण भाग आणि उत्तर अमेरिकेचा उत्तर भाग हेहि या गर्तांत सांपडले होते. हिमाच्या क्रियेनें गुळगुळीत झालेले गोटे किंवा गुंडे दगड हे या काळचे अवशेष म्हणून दाखवितां येतील. याच हिमयुगाच्या अखेरीला मानवोत्पत्ति झाली असावी. हीं हिमयुगें कां झालीं याबद्दल शास्त्रज्ञांचे तर्क चालू आहेत. या हिमयुगासंबंधीं बरेंच वाङ्मयहि तयार झालें आहे.

**हिमलर, हीनरिच** (मृ. १९४५)—जर्मन नाझी पक्षाचा एक पुढारी व एस्. एस्. नाझी ब्लॅक गार्डसचा प्रमुख आणि हिटलरच्या कारकीर्दींतल्या गुप्त-पोलिस खात्याचा सर्वाधिकारी. जर्मनींतील विरोधी पक्षांपासून व सर्व प्रकारच्या विरोधकांपासून नाझी पक्षाचें संरक्षण करणें, ही त्याच्यावर जबाबदारी होती. हा नेहमीं हिटलरबरोबर नसून निराळ्या देशांत असे; त्याप्रमाणें

फ्रान्स देशांत हिटलरबरोबर तेथील नाझी पक्षाच्या विरोधकांचा नायनाट करण्याकरितां हिमलर गेला होता. 'बडे सहा' म्हणून जे जर्मन युद्ध मंडळाचे सभासद होते, त्यांपैकीं हा एक होता. दोस्तांच्या हातीं लागला असतां यानें आत्महत्या केली.

**हिमालय पर्वत**—हिंदुस्थानच्या उत्तरेस असलेल्या प्रचंड पर्वतश्रेणीस हें नांव आहे. सर्व पृथ्वीवर ह्या पर्वताचीं जितकीं उंच शिखरें आहेत तितकीं कोठल्याहि पर्वताचीं नाहींत. पूर्वीचे भूगोलवेत्ते ह्या पर्वतास हमॉस, हिमॉस किंवा हिमोदास म्हणून संबोधीत. ह्या पर्वताची वायव्य मर्यादा सिंधु नदी समजली जाते. काश्मीरमधल्या नंगा पर्वताच्या शिखरापासून हिमालय पर्वत पूर्वेकडे वीस रेखांशांपर्यंत पसरलेला आहे. हा पर्वत इतका प्रचंड आहे कीं, ह्याच्या एक-तृतीयांश भागाचाच शोध आजपर्यंत लागलेला आहे. अगदीं वायव्येकडील बाजूस काश्मीर व जम्मू ह्या दोन देशांचा अर्धाअधिक भाग हिमालय पर्वतांत आहे. दुसरा भाग म्हणजे पंजाबांतील होय. व ह्या भागांत कांग्रा जिल्हा व सिमला पर्वतांतील संस्थानें समाविष्ट झालीं आहेत. ५,००० मैलपर्यंत ह्या हिमालय पर्वतांत नेपाळ संस्थान गडप झालें आहे. हल्लीं जी माहिती मिळाली आहे तीवरून असें दिसतें कीं, हिमालयाच्या पश्चिम भागाचे तीन भाग होतात व मधल्या भागांत अत्यंत उत्तुंग शिखरें आहेत; तरी ह्या पर्वतश्रेणीपासून नद्या उगम पावत नाहींत. ह्या श्रेणीच्या उत्तरेस दुसरी श्रेणी आहे. ती श्रेणी हिंदुस्थान व तिबेट ह्या दोन देशांची मर्यादा गणली जाते व हीच जलविभाजक आहे. ह्या पर्वतावरील चिरकाल हिमरेषा १५,०००–१६,००० फूट असते. हिंवाळ्यांत पश्चिमेकडील बाजूला ५,००० फूट उंचीवर बर्फ पडतें. हिमनद्या या मर्यादेच्या खालीं १२,००० फुटांवरून वाहूं लागतात. व ह्या हिमनद्यांवरच उत्तर हिंदुस्थानचें जीवित अवलंबून आहे. उत्तर हिंदुस्थानांतील सर्व नद्यांची जन्मभूमि म्हणजे हिमालय पर्वत होय. ह्या पर्वताचीं मुख्य शृंगें म्हणजे नंगा पर्वत (२६,१८२ फूट उंच), नंदादेवी (२५,६६० फूट), त्रिशूल (२३,३८२ फूट), पंचचुल्ही (२३,२७२ फूट), नंदकोट (२२,५३८ फूट), गौरीशंकर (२९,००२ फूट), धवलागिरी (२६,८२६ फूट), गोसइस्थान (२६,३०५ फूट), कांचनगंगा (२८,१४६ फूट), वगैरे होत.

लोक—येथें सामान्यतः दोन प्रकारचीं माणसें दृष्टोत्पत्तीस येतात. काश्मीरमधील लडाखपासून भूतानपर्यंत दिसून येणारीं माणसें इंडो–चिनी वंशाचीं आहेत. त्यांची भाषा जवळजवळ तिबेटी व धर्म बौद्ध आहे. मुसलमान लोकांनीं ह्या भागांत येऊन येथें सत्ता प्रस्थापित केली. १४ व्या शतकांत सुलतान शिकंदर नांवाच्या बादशहानें आपला धर्म लोकांवर बळजबरीनें लादल्यामुळें आज काश्मीरचे हल्लींचे लोक शें. ९० मुसलमान आहेत. पण काश्मीर सुटल्यावर जम्मू वगैरे ठिकाणीं हिंदु धर्मच जोरांत आहे. ज्या ज्या ठिकाणीं हिंदु धर्माचे लोक आहेत त्या त्या ठिकाणीं लोकांची भाषा पहाडी आहे.

येथील मुख्य धान्यें म्हणजे तांदूळ, गहूं, जवस, मरुआ, अमरंथ हीं होत. ज्या दरींत हवा उष्ण असून दमट आहे त्या ठिकाणीं मिरच्या, हळद, आलें, वगैरे पदार्थ होतात; पण एकंदरींत हा भाग शेतकीला फारसा उपयुक्त नाहीं.

हिमालयांत अनेक मोठ्या हिमनद्या आहेत. त्यांतील झामू १८ मैल लांब आहे. ज्वालामुखी कोठें दिसत नाहींत, पण भूकंप मात्र होतात. १४,००० फुटांपावेतों वनस्पतींची उत्पत्ति होते. वाघ व इतर हिंस्र पशू १०,००० फुटांपावेतों आढळतात. व १२,००० फुटांपावेतों पक्षी दिसतात. मोठीं वानरें पुष्कळ आहेत.

या सर्वोत्तुंग गिरिराजाचें संशोधन करण्यासाठीं ८२ वर्षांपासून संशोधकांच्या सफरी निघत आहेत. १८५५ सालीं श्लॅगिन्ट्वीट बंधू २२,२२९ फुटांपावेतों वर गेले होते. सर्व्हे ऑफ इंडिया खात्यांतील कांहीं पंडितांनींहि हिमालय–संशोधनाचें काम केलेलें आहे. यांपैकीं बाबू शरद्चंद्र दास यांचें नांव विशेषत्वानें घेतां येईल. कांचनगंगा, नंगा पर्वत, गौरीशंकर (पाहा) यांवर जाण्यासाठीं अद्यापि मोहिमा निघतात. या कामांत कित्येक संशोधक गारद झालेले आहेत. संशोधकांच्या मदतीसाठीं दिल्ली येथें एक 'हिमालय क्लब' आहे.

हिंदूंचीं बद्रीनाथ, केदारेश्वर, पशुपति यांसारखीं प्रसिद्ध देवस्थानें हिमालयांत असल्यानें यात्रेकरू नेहमीं हिमालयाचा प्रवास करतात.

**हियासिंथ**— लिली पुष्पवर्गांतील ही वनस्पति आहे. हिला सुवासिक फुलें येत असल्यामुळें १६ व्या शतकापासून विशेषतः हॉलंड देशांत हीं झाडें फार लावतात. फुलाचे अनेक रंग असतात. व स्पॅनिश आणि रोमन जातीहि आढळतात. ग्रीक पुराणांत अशी कथा आहे कीं, आमिक्लस या स्पार्टन राजाला हियासिंथस नांवाचा फार सुंदर मुलगा होता. त्याच्या रक्तापासून हें उत्पन्न झालें.

**हिरडा**—हें झाड पूर्वेकडील देश, हिंदुस्थान व ब्रह्मदेशाचा सर्व भाग यांत आढळतें. दऱ्यांत, व उंच उंच वृक्षांच्या जंगलांत हें झाड मोठें होतें. व यापासून काळसर रंगाचें व कठिण असें इमारतीचें लांकूड मिळतें. या झाडापासून डिंक निघतो. वऱ्हाडांत गोंड लोक तो इतर डिंकांबरोबर गोळा करून औषधाकरितां अथवा रंगाबरोबर मिसळण्याकरितां विकतात. फळ कमीअधिक पक्व असेल त्याप्रमाणें त्याला बाळहिरडा, सुरवारी हिरडा, वगैरे निरनिराळीं नांवें आहेत. हिरड्यांचा औषधांत फार उपयोग होतो. एके वेळीं औषधाकरितां हिरड्याला युरोपांत बरीच मागणी असे.

हिंदुस्थानांत जीं रांपट (कातडीं कमावण्याचीं) द्रव्यें आहेत. त्यांत हिरडा हें बरेंच महत्त्वाचें आहे. हिरड्याची नुसती पूड पाण्यांत टाकली असतांहि रंग तयार होतो. त्यांत तुरटी टाकल्यास चांगला पक्का रंग तयार होतो म्हणतात. परंतु सामान्यतः त्यांत लोखंड टाकून काळा रंग अथवा शाई करण्यांत येते. तथापि हिरड्याला बाजारांत जी एवढी किंमत आली आहे ती रंगामुळें नसून त्यांतील रांपट द्रव्यामुळें आली आहे. शिवाय हिरड्याच्या पाण्यानें कातडें चांगलें कमावलें जातें, एवढेंच नव्हे तर कातड्यावर झगझगीत रंगहि चढतो, व याच कारणामुळें इतर रांपट द्रव्याबरोबर हिरड्याची पूड मिसळतात.

मध्यप्रांत, वऱ्हाड, मुंबई, राजपुताना, मध्य हिंदुस्थान, बंगाल, व मद्रास या प्रदेशांतून हिरड्याची निर्गत होते. परदेशांशीं व्यापार बराच मोठा असून महत्त्वाचा आहे. हिरडे खरेदी करणारे मुख्य देश त्यांच्या खरेदीच्या प्रमाणाच्या अनुक्रमानें पुढील होत : ब्रिटिश संयुक्त राज्य, बेल्जिअम, जर्मनी, ऑस्ट्रिया, हंगेरी व फ्रान्स.

हिरडा मोठा औषधी आहे. अनेक आयुर्वेदीय औषधांत हिरडा असतो. त्रिफळ्यांत हिरडा मुख्य असतो. कफ, रक्तपित्त, शूळ, बद्धकोष्ठ, नेत्ररोग, वगैरेंवर हिरडा देतात.

**हिरण्यकशिपु**—कश्यप ऋषीपासून झालेला दितीचा पुत्र. यानें दीर्घकालपर्यंत तप करून ब्रह्मदेवापासून आपणास घराच्या आंत व बाहेर, दिवसास व रात्रीस, नर आणि पशु, शस्त्र व अस्त्र, तसेंच सजीव आणि निर्जीव पदार्थ, इत्यादिकांपासून मृत्यु नसावा असा वर मागून घेतला. पुढें यानें त्रैलोक्य जिंकलें, देवादिकांस अनेक प्रकारें पीडा देऊन, ऋषी व राजे लोक यांचे यज्ञयाग मोडून बहुत कालपर्यंत राज्य केलें. याला जंभासुराची कन्या कयाधू हिच्यापासून प्रल्हाद, अनुऱ्हाद, संऱ्हाद, ऱ्हाद, शिबी, बाष्कल, इ. पुत्र झाले. हा चालू मन्वंतराच्या चौथ्या पर्यायांतील सत्ययुगांत विष्णूच्या नृसिंह नामक अवताराच्या हातून मरण पावला. (प्रल्हाद पाहा.)

**हिरण्यकेशी**—कृष्ण यजुर्वेदाच्या तैत्तिरीय शाखेंतील एक सूत्र व सूत्रकार. सूत्रकाराचें नांव सत्यषाढ असेंहि आहे. सत्यषाढ श्रौत सूत्र आहे. हिरण्यकेशी सूत्राचे अनुयायी चित्पावन ब्राह्मण आहेत. हिरण्यकेशी ही लोकवाचक संज्ञाहि असून हे लोक चिपळूण भागांत राहतात असें कांहीं भाष्यकार सांगतात. परशुराम क्षेत्रांत हरणकाशि नांवाची एक नदीहि उल्लेखिली जाते. कौंगाणी राजाच्या ५ व्या शतकांतील ताम्रपटांत हिरण्यकेशी ब्राह्मणांना जमीन दिल्याचा उल्लेख आहे. हिरण्यकेशी सूत्राचें साम्य आपस्तंब सूत्राशीं आहे.

**हिरण्यगर्भरस**—एक आयुर्वेदीय रसायन. सुवर्णभस्म, रौप्यभस्म, ताम्रभस्म, प्रवालभस्म, पारदभस्म, गंधक, मनशीळ, हरताळ व कटुकी हीं औषधें सममाग घेऊन शेळीच्या दुधांत खलावीं आणि मुशींत घालून गजपुट द्यावें. स्वांगशीत झाल्यावर बारीक करून ठेवावें.

**हिरण्याक्ष**—एक असुर. हा कश्यप आणि दिति यांचा पुत्र. हा देवांना भारी होता. पण विष्णूनें याचा पराभव केला, तेव्हां हा पृथ्वी घेऊन पळाला. विष्णूनें वराहरूप घेऊन याला ठार केलें. हाच विष्णूचा वराह अवतार होय.

**हिरवा चांफा**—याचें झाड फार मोठें नसतें. झाडास गळाप्रमाणें आंकडे असतात. झाडास हिरव्या रंगाचें वासाचें फूल येतें. झाड लावल्यापासून २-३ वर्षांनीं फुलें येऊं लागतात. (चांफा पाहा.)

**हिरवें शेवाळ**—(क्लोरोफायसी). हा शैवालांचा एक मोठा उपवर्ग आहे. यामध्यें गोड्या पाण्यांत उत्पन्न होणाऱ्या शेवाळांचे बहुतेक प्रकार, तसेंच समुद्रावर व जमिनीवर उत्पन्न होणाऱ्या शेवाळांचेहि बरेच प्रकार येतात. यांचा विशेष हा आहे कीं, यांचे रंजितजीवनपिंड (क्रोमाटोफोअर्स) शुद्ध हिरव्या रंगाचे असतात आणि त्यांचे स्थाणुवृन्त (थालस) लहान असून त्यांची रचना अगदीं साधी असते (तांबड्या किंवा पिंगट शेवाळामध्यें तशी नसते). हा स्थाणुवृन्त बहुतेक तंतुमय असतो; परंतु कांहीं जातींत एकपेशीमयहि आढळतो (उदा., क्लामिडोमोनास, प्रोटोकॉकस). उलट हिरव्या खाद्यशेवाळ (लॅव्हर अथवा उल्व्हा) याला एक चपटा पर्णासारखा वानस्पतिक शरीरभाग असून तो जरा आकारानें मोठा असतो. यांमध्यें पुनरुत्पादनपद्धती भिन्न भिन्न आढळतात. चल अलिंगी (मोटाइल असेक्शुअल) एकपेशी बऱ्याच जातींत आढळतात. हा प्रकार संयुक्त पेशीमय (कॉंजुगेटी) शेवाळांत आढळत नाहीं. समान जाती (आयसोगॅमस) एंद्रिय उत्पादन हा सामान्य नियम आहे. तथापि विषमबिंदी (ऊगॅमस) उत्पादन होणाऱ्या जातींहि आढळतात. हिरव्या शेवाळांत अवस्थान्तरानें पुनरुत्पादन होण्याची पद्धति आढळत नाहीं. याच्या अनेक जाती आहेत. (शेवाळ पहा.)

**हिरा**—हे एक सर्वांत कठिण व मौल्यवान् असें रत्न असून यामध्यें कर्ब हें मूल द्रव्य शुद्ध स्वरूपांत सांपडतें. याचे स्फटिक घनस्वरूपी असतात. चांगले हिरे वर्णरहित असतात, व ते स्वच्छ आणि चकाकित असतात. उत्तम हिऱ्यास सुंदर पाणी असतें असें म्हणतात. तथापि कांहीं हिरे निळे, गुलाबी, हिरवे किंवा पिवळे असतात व त्यांचा रंग जर सर्वत्र एकरंगी असेल तर ते फार मौल्यवान् समजले जातात. हिरे इतके कठिण असतात कीं, त्यांच्यावर दुसऱ्या कोणत्याहि पदार्थानें ओरखडा उठत नाहीं, किंवा ते हिऱ्याशिवाय दुसऱ्या कोणत्याहि पदार्थानें कापले जात नाहींत. हिऱ्यास पैलू पाडले असतां त्याची किंमत अधिक वाढते. हिऱ्यांचे महत्त्व अनेक दृष्टींनीं व अनेक कामांत असतें. त्यांची पूड इतर पदार्थ घांसण्याकरितां वापरतात. तसेंच त्यांचा उपयोग घड्याळामध्यें करतात. शिवाय कांचा कापण्याच्या कामीं त्यांचा उपयोग करतात, मात्र या कामीं वापरावयाची हिरकणी कापलेली असतां कामा नये. हलक्या प्रतीचे हिरे इंजिनियर लोक खडक कोरण्याच्या कामीं किंवा तांब्याचे पत्रे वगैरे खोदण्याच्या कामीं वापरतात. हिरे अनेक ठिकाणीं सांपडतात. तथापि गाळामध्यें ते विशेष आढळतात. हिंदुस्थान, बोर्निओ, उत्तर अमेरिका व ऑस्ट्रेलिया यांमध्यें हिरे आढळतात. ब्राझीलमध्येंहि कांहीं हिरे सांपडले आहेत, परंतु सध्यां हिऱ्यांच्या मुख्य खाणी दक्षिण आफ्रिकेंत किंबर्लेच्या आसपास आहेत. जगांतील सर्वांत मोठा हिरा 'कुलिनन' नांवाचा असून त्याचें वजन ३०२५ कॅरट आहे. 'कोहिनूर'चें वजन सध्यां १०६ कॅरट आहे. रशियाच्या राजघराण्यांतील 'ऑर्लोव्ह' या हिऱ्याचें वजन १९४ कॅरट आहे, व फ्रेंच हिरा 'पिट' याचें वजन १३६॥ कॅरट आहे.

हिऱ्यांना पैलू पाडण्याचा जगांतील मोठा धंदा बेल्जिअमचा आहे. याचे लहानमोठे २,००० वर कारखाने त्या देशांत असून त्यांतून १४,००० वर कारागीर काम करतात.

कोहिनूर (कोह-इ-नूर = प्रकाशगिरि) हा हिरा टॅव्हर्नियरने औरंगजेबाजवळ पाहिला होता. तो पुढे नादिरशहानें इराणास नेला. नंतर अहमदशहा अब्दालीकडे तो आला. अफगाणच्या अमीर शहासुजा यानें तो रणजितसिंगास १८१३ त दिला. शेवटीं रणजितसिंगाचा मुलगा धुलीपसिंग याच्याकडून सर लॉरेन्स यानें घेऊन व्हिक्टोरिया राणीस नजर केला. तेव्हां आतां तो इंग्लंडच्या राजाकडे आहे. इतर कांहीं ऐतिहासिक हिऱ्यांच्या अशाच कथा आहेत.

हिंदुस्थानांत परब, बिलंदी, मुवलसी, चादर, पलचा व विलियन हे हिऱ्यांचे प्रकार तयार होतात. हिऱ्याची माहिती वेदकालापासूनची आहे. शुक्रनीति, बृहत्संहिता यांत हिऱ्याचे गुण, किंमती, वगैरे सांगितल्या आहेत. हिऱ्याचा भाव आपल्याकडे रतीवर तर पाश्चात्य देशांत कॅरटवर असतो. (कॅरट पाहा). आज जगांत दक्षिण आफ्रिकेंतील खाणींतून ९५ टक्के हिरे निघतात.

**निरनिराळे हिरे**

१ ली ओळ (डावीकडून उजवीकडे)— दक्षिण तारा (वरचा भाग). कोहिनूर (दुसरी कापणी-वरचा भाग). ओर्लोव्ह हिरा (कडेचा भाग).

२ री ओळ— ब्रिलियंट कापणीचा हिरा (कडेचा भाग). कोहिनूर (दुसरी कापणी-कडेचा भाग). दक्षिण तारा (आढळला तसा).

३ री ओळ— कोहिनूर (पहिली कापणी-कडेचा भाग). कोहिनूर (पहिली कापणी-वरचा भाग). ब्रिलियंट हिरा (कडेचा भाग). (खालीं) टेबल-कट् हिरा (वरचा भाग.). रोझ-कट् हिरा (कडेचा भाग).

**हिरात**— अफगाणिस्तानांतील पश्चिमेकडील प्रांत. या प्रांतांतले अत्यंत सुपीक व अतिशय दाट लोकवस्ती असलेले भाग म्हणजे हिरात, धोरिवाल, ओबे व कराख हे होत. या प्रांताचे राज्यकारभाराच्या सोयीकरितां ५ भाग केलेले आहेत. प्रत्येक भागावर एक पोट सुभेदार असून तो हिरातच्या सुभेदाराच्या हाताखालीं असतो. लो. सं. सुमारे ५,००,००० आहे. व बहुतेक लोक हिराती म्हणजे इराणी भाषा बोलणारे आहेत.

शहर—प्रांताचें व जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. हें शहर चतुष्कोणाकृति असून याला पांच महाद्वारें आहेत. व येथें चार ठिकाणीं बाजार असतो. या शहरांतील प्रसिद्ध इमारती म्हणजे जुम्मामशीद (ही शहा हुसेननें १५ व्या शतकांत बांधली) व अर्कीनाव (ही इमारत अलेकझान्डरच्या काळांतील आहे) या होत. हें व्यापाराचें मुख्य ठिकाण आहे. येथून निर्गत माल म्हणजे रेशीम, लोंकर, अफू, बकऱ्यांचीं कातडीं, वगैरे जिन्नस होत. व आयात माल म्हणजे नीळ, चहा, साखर, कापड, कापूस वगैरे. येथें चांगले गालिचे, तलवारींच्या पाती, पादत्राणें, झगे, टोप्या, इ. होतात.

हिरात शहर वसविण्याचा मान अलेक्झांडर दि ग्रेटला आहे. याच्याची जागा या दृष्टीनें व ऐतिहासिक दृष्टीनें या शहराला महत्त्व फार आलें आहे. या शहराला 'हिंदुस्थानची किल्ली' असें म्हणतात. अरब लोकांच्या ताब्यांत असतांना या शहराची चांगलीच भरभराट झाली. पुढें हें शहर इराणच्या सफाविद राजांनीं घेतलें व त्यांच्यामागून दुराणी लोक सत्ताधीश बनले. नंतर अहमदशहाचा नातू कामरान याच्या अमलाखालीं तें स्वतंत्र झालें. यानंतर अफगाणिस्तान व इराण या राष्ट्रांनीं हिरात घेण्याचा प्रयत्न चालविला. १८६१ सालीं येथील सुलतान व अफगाणिस्तानचा दोस्त महंमद यांत तंटा सुरू होऊन हिरात दोस्त महमदाच्या ताब्यांत गेलें व त्या वेळेपासून तें शहर अफगाणिस्तानचा भाग आहे.

**हिरोडोटस** (सुमारें खि. पू. ४८४–४२५)—हा एक प्राचीन ग्रीक इतिहासकार असून त्याला 'आद्य इतिहासकार' असें म्हणतात. त्याचा जन्म आशिया मायनरमध्यें हॅलिकार्नेस येथें झाला. तो इराणी राज्यांत राहत होता पण पुढें त्याच्या घराण्यावर सरकारची अवकृपा झाल्यामुळें तो देश सोडून निघाला असावा. त्याचें सर्व शिक्षण ग्रीक भाषेमध्येंच झालें असून व्याकरणविषयक, शारीरिक व संगीत शिक्षणहि त्याला मिळालें होतें. वयाच्या २० ते ३७ च्या दरम्यान त्याचा सर्व प्रवास झाला. पश्चिम आशिया आणि उत्तर आफ्रिका या भागांत हिंडून त्यानें प्रत्येक ठिकाणच्या चालीरीती, धर्म, इतिहास, वगैरे माहिती गोळा करून ती आपल्या इतिहासांत दिली आहे. या इतिहासाचीं ९ पुस्तकें आहेत. तत्कालीन जगाची माहिती या ग्रंथावरून मिळते. त्याच्या इतिहासाला सर्व जगाचा इतिहास असें जें नांव मिळालें तें अगदीं यथार्थ होय. हिरोडोटसची भाषा चांगली असून तींत अकृत्रिमता व नावीन्य दिसून येतें.

**हिरोशिमा**—हें जपानमधील शहर होनशू बेटाच्या दक्षिण भागांत कोबे शहरापासून १७५ मैल अंतरावर आहे. येथें ब्रॉन्झ व चिनी मातीचीं भांडीं यांचे कारखाने असून या मालाचा येथून मोठा व्यापार चाले. येथें जुनीं देवळें चांगलीं होतीं व लोकसंख्या सुमारें दोन लाखापर्यंत असे. पण दुसऱ्या महायुद्धाचा एकदम शेवट करण्यासाठीं अमेरिकेनें यावर अॅटमबॉंब टाकून शहर अक्षरशः बेचिराख केलें. (१९४५).

**हिल-टिप्पेरा संस्थान**—पूर्व बंगाल, पाकिस्तान, एक संस्थान. क्षे. फ. ४११६ चौ. मै.. संस्थानांतील गोमती नदीच्या मुखाजवळ एक डुंबुरा नांवाचा धबधबा आहे. हवा आरोग्यकारक असून उष्णतेचें मान बेताचें आहे. येथें पाऊस ७५ इंच पडतो. (टिप्पेरा पाहा).

'राजमाला' नांवाच्या बंगाली काव्यांत या संस्थानाबद्दल एक पौराणिक कथा आहे. तींत म्हटलें आहे कीं, चंद्रवंशी ययाति राजापासून हें टिप्पेरा राजघराणें सुरू झालें. या संस्थानावर मुसुलमानांची स्वारी प्रथम १२७९ सालीं झाली. १७६५ सालीं ईस्ट इंडिया कंपनीला बंगाल प्रांताची दिवाणी मिळाली तेव्हां कंपनी सरकारनें टिप्पेरा संस्थानच्या गादीवर एक राजा बसविला. १८०८ सालापासून प्रत्येक राजा गादीवर बसण्यापूर्वी इंग्रज सरकारकडून परवानगी काढावी लागत असे. या संस्थानचा हल्लींचा राजा वीरविक्रम किशोरदेव हा आहे. हा १९२३ सालीं गादीवर आला. बर्मनमाणिक्य बहादूर ही पदवी या संस्थानच्या राजांना १२७९ सालीं गौरच्या राजानें प्रथम दिली.

संस्थानची लो. सं. सुमारें चार लक्ष आहे. संस्थानांत आगरतला नांवाचें एक शहर व १४६३ खेडीं आहेत. येथें शें. ४४ लोक टिप्पेरा किंवा मृंग भाषा बोलतात; व शें. ४० लोक बंगाली भाषा बोलतात. येथें हिंदू शें. ६९. व मुसुलमान शें. २६ व बौद्ध लोक शें. ३ आहेत. टिप्पेरा येथील मूळचे लोक मोंगोलियन वंशाचे आहेत. या लोकांचा धर्म निकृष्ट प्रतीचा हिंदु धर्म आहे. पूर्वी येथें नरमेधाची चाल होती. येथें तांदूळ, ताग, तंबाखू, ऊंस, मिरच्या, कांदे, वगैरे पिकें होतात. येथील निर्गत माल कापूस, लांकूड, तीळ व बांबू हा असून आयात माल मीठ, रॉकेल, तंबाखू व विलायती माल होय. या संस्थानचें उत्पन्न सुमारें २० लाख रु. आहे. येथें शिक्षण फारसें नाहीं. शें. ४२ लोक साक्षर आहेत. संस्थानांत एक कॉलेज, एक हायस्कूल, बऱ्याच प्राथमिक शाळा, एक धंदेशिक्षणाची शाळा अशा शिक्षणसंस्था आहेत. शिक्षण मोफत आहे.

**हिंवताप**—(मलेरिया). हा एक सूक्ष्म जीवाणूंपासून उत्पन्न होणारा रोग असून त्याचा प्रसार एका जातीच्या (अॅनोफेलाइन) डांसांमुळें होतो. याचीं लक्षणें म्हणजे ठराविक मुदतीनें ताप येणें, प्लीहा वाढणें हीं होत. हा रोग सामान्यतः उष्ण कटिबंधांत व त्याच्या जवळच्या भागांत विशेष होतो व समशीतोष्ण भागांतहि आढळून येतो. याचा रोगोद्भवकाल सामान्यतः आठ ते दहा दिवस असतो. परंतु त्यांत केव्हांकेव्हां फरक आढळून येतो. हा ताप येण्याच्या पूर्वी दहा ते पंधरा मिनिटें थंडी वाजूं लागते ? नंतर

४ ते ५ तास ताप येतो. यानंतर खूप घाम येतो आणि ग्लानि येते. या तापावर क्विनाइनचा चांगला परिणाम होतो. मात्र क्विनाइन घ्यावयाचें त्याचें प्रमाण थोडें थोडें कमी करून ताप गेल्यावरहि तें तीन महिनेपर्यंत दिलें पाहिजे. या रोगास प्रतिबंधक उपाय म्हणजे मच्छरदाणी वापरणें, डांसांचा प्रतिबंध करणें आणि क्विनाइन घेत राहणें, हे होत. प्लॅस्मोकिन नांवाचें औषध क्विनाइनपेक्षां जास्त गुणकारी असतें. प्रतिबंधक म्हणून हें रोज थोडें थोडें घेण्यास हरकत नाहीं. वस्तीच्या आसपास असलेल्या सर्व डबक्यांतील पाण्यावर रॉकेल टाकलें असतां मलेरियाचे जीवाणू मरतात.

हिंदुस्थानांत मलेरिया हा मोठा हानिकारक रोग आहे. सुमारें दहा लाख लोक या रोगानें पछाडलेले असतात व मृत्युसंख्येपैकीं निदान ¼ यामुळें असते. शेतकी आणि अनेक उद्योग यांतील कामकऱ्यांना हिंवताप फार जडतो व त्यामुळें मालाच्या उत्पादनावर फार परिणाम होतो. खेड्यांतून पाण्याचीं तळीं-डबकीं यांतून मच्छरांची उत्पत्ति अतिशय मोठ्या प्रमाणांत होत असल्यानें नव्वद टक्के लोकांना हा रोग होण्याचा संभव असतो. शहरांतून मलेरियावर इलाज थोड्या खर्चांत होतात; पण खेड्यांत याचा प्रतिबंध करण्यास अतिशय खर्च येतो. हा खर्च कमी करण्यासाठीं दिल्ली आणि मुंबई येथें प्रयोग चालले आहेत. डी. डी. टी., गॅमेक्सेन, पॅलुड्राइन, वगैरे नवीं जंतुघ्न औषधें निघालीं आहेत.

रॉकफेलर निधींतून चीन, मलाया, हिंदुस्थान, वगैरे मलेरियानें पछाडलेल्या देशांना औषधें, साधनें व द्रव्य हीं पुरविलीं जातात.

**हिंवर**—१. (पोलर). हें झाड कठिण असून याचीं पानें दरवर्षी गळून पडतात. तीं एकाआड एक असून लांब असतात. त्यांचा मधील देंठ अथवा दांडा बारीक व वरच्या बाजूनें थबकट असा असतो. हीं पानें नेहमीं हालत असतात. हीं झाडें दमट हवेंत चांगलीं होतात. यांच्यापैकीं कांहीं जातींची वाढ फार झपाट्यानें होते. याचें लांकूड पांढरें, हलकें व नरम असतें. त्याला फारसें महत्त्व नसतें.

२. शेण्याखैर. झाड मोठें होतें व त्याला कांटे असतात. लांकूड इमारतीच्या कामीं उपयोगी असतें. पोटदुखीवर सालीचा रस देतात.

**हिवरें**—मुंबई, पुणें जिल्हा, पुरंदर तालुका, एक गांव. अफझलखानाकडचा शिवाजीचा वकील पंताजी गोपीनाथ बोकील याला शिवाजीनें हा गांव इनाम दिला. पेशवाईतील प्रसिद्ध मुत्सद्दी सखारामबापू याच्या पणजानें शाहूकडून वंशपरंपरा हा गांव मिळविला. येथें एक मुंजाबाचें स्थान आहे.

**हिशेब पद्धति**—जमाखर्चात एखाद्या उद्योगधंद्याचें देणें-घेणें कळतें तर या पद्धतीमुळें त्यांत झालेला नफातोटा कळतो. एखादा धंदा कां चालत नाहीं हें कळण्यास त्याच्या हिशोबाची नीट पाहणी तज्ज्ञ हिशेबनिसाकडून करून घ्यावी लागते. बहुतेक कारखानदारांना आपला माल आपल्याला केवढ्या किंमतींत पडतो हें कळत नसतें. आज एकाच कारखान्यांत अनेक मुख्य आणि गौण मालांचें उत्पादन होत असल्यानें कोणते जिन्नस नफ्यांत पडतात व कोणते पडत नाहींत याची अचूक माहिती मिळाल्यावांचून धंदा करणें शहाणपणाचें ठरत नाहीं. कांहीं खर्चाच्या बाबी धंद्याच्या कायम सुधारणेसाठीं असतात. तेव्हां त्या एका वर्षावर धरून चालत नाहीं. धंद्यांतील प्रत्येक क्रिया व तीवर लागणारा खर्च हिशेबनिसा(ऑडिटर)नें काढावयाचा असतो. (१) भांडवल आणि उत्पन्न, (२) घसारा, (३) ताळेबंद, (४) मालाची जागेवरची किंमत, (५) सरकारी पद्धतीचे हिशेब, (६) हिशेबी दप्तरें तपासणें, इ. बाबी त्यांच्या कामांत येतात.

या हिशेबी विद्येची एक परीक्षा असून ती उत्तीर्ण झालेले व सरकारनें मान्य केलेले असेच तपासनीस संयुक्त भागीदारीच्या संघांना, पेढ्यांना व इतर निमसरकारी संस्थांना नेमावे लागतात. प्रत्येक नोंदलेल्या संस्थेस दरसाल आपल्या साधारण सभेंत असे हिशेब-तपासनीस नेमून घ्यावे लागतात व अशा तपासनिसांनीं तपासलेले जमाखर्चाचे कागद साधारणसभेकडून मंजूर करून घ्यावे लागतात. हिशेबतपासनिसानें संस्थेची दरसालची जमा आणि खर्च पावत्यांवरून नीट आहेत कीं नाहींत हें तपासून आपले शेरे लिहावयाचे असतात.

धंद्यांतील जमाखर्च ठेवण्याची पद्धति (बुक-कीपिंग) धंद्याच्या प्रकाराप्रमाणें बदलेल. तथापि एक रोजकीर्द (कॅश-बुक), एक रोकडवही व एक खतावणी (लेजर) या तीन मुख्य हिशेबी वह्यांवर काम भागतें. हिशेब ठेवण्याची एकचेरजी (सिंगल एन्ट्री) व दुबेरजी अशा दोन पद्धती आहेत. एकचेरजी हिशेब फक्त लहानसान व्यवहारासाठीं असतात. त्यांत व्यापाराचें देणें रोजकीर्दीत टिपतांना ज्याच्याकडे असतें त्याच्या नांवें दाखविलें जातें. तसेंच एका व्यापाऱ्याचें देणें तें दुसऱ्याचें येणें अशा पद्धतीचा हा हिशेब असतो. या रोजकीर्दीवरून खतावणींत रकमा ओढून घेतात व प्रत्येकाच्या खात्याला येणें व नांवें दाखविलें असतें. दुबेरजी पद्धतींत प्रत्येक व्यवहार एकदां येणें व एकदां नांवें अशा दोन वेळां टिपला जातो. उदाहरणार्थ, दौतींची विक्री दौतखात्यांत जमेला मांडली जाईल व गिऱ्हाइकाच्या खात्यांत त्याच्या नांवें टाकली जाईल. जेव्हां त्याचे पैसे मिळतील तेव्हां ते पैसे गिऱ्हाइकाच्या खातीं जमा होतील व रोकडीच्या हिशेबांत नांवें टाकले जातील. याप्रमाणें येणें आणि नांवें नेहमीं सारखीं असावीं

लागतात. या पद्धतींत एखादी नोंद राहून गेल्यास ती चूक लागलीच कळून येते.

प्राचीन इतिहास—व्यापार, देवघेव हीं आलीं म्हणजे हिशेब आलाच. तेव्हां एखाद्या राष्ट्राची संस्कृति अजमावताना तिच्यांतील व्यापार-उद्योग पाहावे लागतात; तेव्हांच त्या राष्ट्राच्या हिशेब-पद्धतीची माहिती होत असते. प्रथम संख्या कशा आल्या हें पाहणें आवश्यक आहे. हिशेबाचें मूळ त्यांतच आहे. जगांत पहिलें उपलब्ध नाणें ख्रि. पू. ९०० मधील आहे. हिशेबांत गणित येत असल्यानें गणिताच्या इतिहासांत हिशेबपद्धतीची परंपरा आढळ-ल्यास नवल नाहीं. ईजिप्त आणि बाबिलोनिया यांत उपाध्याय वर्गाकडे हिशेब ठेवण्याचें काम असलेलें आढळलें. या हिशेबाची पद्धति चांगली पूर्णतेस गेल्याचेंहि दिसून येतें. ख्रि. पू. १००० इतक्या मागील काळांत बाबिलोन येथें एक सावकारी पेढी ('एजिबी पुत्र' नांवाची) होती, असें इष्टिकालेखावरून समजतें. ही पेढी फार मोठी असून अर्वाचीन रॉथसचाइल्ड्सप्रमाणें अत्यंत धनाढ्य होती व तिची उलाढालहि अपरंपार असे.

ग्रीक लोक आपल्या मागच्या लोकांकडूनच शिकले. अथेन्सच्या राज्यकारभारात एक सरकारी हिशेबतपासनीस (ऑडिटर) असे. तेथील सावकारी पेढ्या फार वजनदार असत. रोमन राज्यांत ग्रीकांप्रमाणेंच सारा कारभार होता. हिशेब ठेवण्याची पद्धति अगदीं आजच्यासारखी असे. इंग्लंडांत १२ व्या शतकापासूनची अशा हिशेबाची माहिती संशोधकांना कळते. 'डूम्स् डे बुक' याची मांडणी हिशेबावर अवलंबून आहे. १४९४ सालीं 'सुम्मा-द-अर्थमेटिका' या पासिओलोच्या पुस्तकांत जी माहिती आहे तीवरून युरोपांतील शास्त्रीय हिशेब पद्धतीची कल्पना येते. इटलीमध्यें व्हेनिस येथें १५८१ सालीं हिशेबनविसांचें महाविद्या-लय निघालें. १७३९ सालीं मिलन येथें असेंच दुसरें निघालें. स्कॉटलंडमध्यें १८५३ सालीं एडिंबर्ग येथें 'इन्स्टिट्यूट ऑफ अकाउंटंट्स' ही संस्था स्थापन झाली. १८५० सालीं लंडन येथें २६४ हिशेबनविसांची नोंद आढळते. १९११ सालीं १,६६६ इतकी संख्या पोस्ट-ऑफिस डिरेक्टरीमध्यें सांपडते. १९०० मध्यें अमेरिकेंतील न्यू यॉर्क विद्यापीठांत हिशेबपद्धतीचा अंतर्भाव महाविद्यालयीन शिक्षणक्रमांत करण्यांत आला.

**हिस्सार**—पंजाब, अंबाला विभागांतील एक जिल्हा. या जिल्ह्यांत माळरान बरेंच आहे. ठिकठिकाणीं अरवली पर्वताचे तुटलेले भाग आहेत. या जिल्ह्यांत हवा अतिशय कोरडी असल्यामुळें निरोगी आहे. येथें उन्हाळा व हिंवाळा दोन्ही कडक असतात. पाऊस १४ इंच पडतो.

जिल्ह्याच्या बऱ्याच मोठ्या भागास पूर्वी हरियाणा हें नांव होतें. हा भाग पूर्वी सुपीक होता व या भागाची राजधानी हांसी हें शहर होतें. १८ व्या शतकापर्यंत हा भाग मुसुल्मानी अम-दानींत भरभराटीस आला होता. १८०२ सालीं हा मुलूख शिंदे सरकारच्या ताब्यांत गेला. परंतु १८०३ सालीं शिंद्यानें कंपनी सरकारबरोबर तह केल्यामुळें हिस्सार व सिरसा हे मुलूख इंग्रजांकडे गेले व एकदोन लढाया झाल्यावर १८१८ सालीं मट्टी सरदार अगदीं शरण आले, व इंग्रजांची सत्ता पूर्णपणें प्रस्थापित झाली. १८४४, १८४७ व १८५५ सालीं नवीन मुलूख या जिल्ह्यांत समाविष्ट केले. पुढें १८५७ च्या बंडानंतर या जिल्ह्यांत बरेच फेरफार झाले. क्षे. फ. ५,२१३ चौ. मै. व लो. सं. १०,०६,७०९. हिस्सार जिल्ह्यांत चार शहरें व ९६१ खेडीं आहेत. या जिल्ह्यांत हिंदु लोक शें. ७६; त्यांच्या खालोखाल मुसुल्मान व त्यानंतर शीख लोक आहेत. येथें हरियानी, बांग्रु किंवा देसवाली, पंजाबी व बाग्री या भाषा प्रचारात आहेत. जिल्ह्यांतील जमीनदार लोक जाट असून एकंदर लोकसंख्येपैकीं ⅓ लोक हे आहेत. येथील मुख्य पिकें म्हणजे कापूस, गहूं, हरभरा, जवस, ऊंस, मका व कांहीं भागांत तांदूळ हीं होत. गुरांच्या उत्तम निपजेबद्दल या जिल्ह्याची ख्याति आहे.

हिस्सार हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. हें राजपुताना-माळवा रेल्वेच्या रेवारी-भटिंडा शाखेवर आहे. हें शहर फिरोजशहा तुघलख यानें १३५६ सालीं स्थापिलें व हल्लीं पश्चिम यमुना कालवा या नांवानें प्रसिद्ध असलेल्या कालव्याच्या योगानें या शहरास पाण्याचें सुख आहे. हें शहर बाबरच्या स्वारीच्या वेळेस शिबंदीचें ठाणें होतें. व पुढें मोंगल अमदानींत सरकारचें मुख्य ठिकाण म्हणून प्रसिद्ध होतें. या शहरास शीख लोकांनीं वारंवार त्रास दिला. पुढें १८०३ सालीं हें शहर इंग्रजांच्या ताब्यांत गेलें. तेव्हांपासून या शहराची भरभराट होऊं लागली. येथें ऐतिहासिक दृष्ट्या फिरोज-शहानें बांधलेला किल्ला महत्त्वाचा आहे. याशिवाय गुजराथच्या लढाईंत हुमायुनचे जे सरदार पडले त्यांचीं थडगीं येथें आहेत.

**हीडेनस्टॅम, व्हर्नर फॉन** (१८५९–१९४०)—एक स्वीडिश साहित्यिक. त्यानें प्रथम काव्यापासून आरंभ करून पुढें तो कादंबरीकार झाला. तो ध्येयवादात्मक सुखवादी मताचा असून सौंदर्याचा भोक्ता होता. त्याच्या कादंबऱ्या कांहीं रूपकात्मक तर कांहीं राष्ट्रभक्तिपर असतात. त्याच्या कवितादि देशभक्तीनें ओथंब-लेल्या असतात. १९१६ सालीं त्याला 'नोबेल' पारितोषिक मिळालें.

**हीन, हीनरिश** (१७९७–१८५६)—एक विख्यात जर्मन कवि व लेखक. जर्मन वाङ्मयांत गटेनंतर याचेंच नांव घ्यावें लागतें. त्याच्या भावगीतांतील माधुर्य आणि कोमलता, लेखनांत हळुवार विवेचन व विनोद या बाबतींत तो समकालीनांना मागें टाकी. तो धन्यानें ज्यू होता पण वकिली करण्यासाठीं त्यानें धर्म

सोडला. त्याचे क्रांतिकारक विचार व उघडपणें नेपोलियनविषयीं आदर यामुळें जर्मनींत राहणें त्याला अशक्य झालें. तेव्हां तो पॅरिसला जाऊन शेवटपर्यंत राहिला.

त्याचें बहुतेक लिखाण भावगीतात्मक असलें तरी त्यांत वृत्तपत्रीय किंवा चरित्रात्मक भाग आहेतच. त्याचीं कांहीं गीतें गवयी गात असत. 'हार्झचा प्रवास' हा प्रवासवर्णनाचा ग्रंथ आहे. 'प्रवासचित्रमाले'तील हें पाहिलें पुष्प आहे.

**हीना**—[ वर्ग–लिथ्रासी. लॉझोनिआ इनर्मिस ]. हें एक क्षुद्रुप असून अनेक ठिकाणीं आढळतें. यास पांढरीं फुलें येतात. हें बहुधा ओलसर जागीं होतें. याच्या पानांचा उपयोग बोटांचीं नखें रंगविण्याकरिता करतात. युरोपमध्यें याचा केंस रंगविण्याकरितां उपयोग करतात. याच्या रंगाचा कपडे वगैरे रंगविण्याकडेहि उपयोग होतो. याच्या फुलांपासून हीना हें तेल व अत्तर निघतें. मेंदी पाहा.

**हीब्रू भाषा आणि वाङ्मय**—(ज्यू लोक, ज्यू राष्ट्रवाद पाहा). हीब्रू वर्णमालेंत बावीस व्यंजनें आहेत. या वर्णांच्या खालीं किंवा वर कांहीं चिन्हें काढून स्वर दर्शविण्यांत येतात. लिंगांमध्यें नपुंसकलिंग नाहीं. लिहिणें फारसीप्रमाणें उजवीकडून डावीकडे असतें.

अगदीं प्राचीन वाङ्मय म्हणजे 'जुना करार' (ओल्ड टेस्टॅमेंट) होय. हा निदान खि. पू. १२०० पासून खि. पू. २०० पर्यंतच्या हजार वर्षांच्या काळांतला असला पाहिजे. आपल्या ऋक्संहितेंतील मंडलांप्रमाणें निरनिराळे अध्याय निरनिराळ्या काळचे दिसतात. या एक हजार वर्षांच्या अवधींत भाषेंत मात्र फारसा बदल झालेला दिसत नाहीं, हें आश्चर्य होय. मात्र आरेमाइक किंवा खाल्डी भाषेच्या संपर्कानें हीब्रू भाषा अपभ्रष्ट झाली. पुढें आरेमाइक ही बोलींतील भाषा बनून हीब्रू ही संस्कृतप्रमाणें ग्रंथांतच राहिली व पंडितांच्या अभ्यासाचा विषय होऊन बसली.

ज्यू समाज बंदिवासांतून परत आल्यानंतर ज्यू वाङ्मयांत सुधारणा होत गेली. एझ्राच्या नेतृत्वाखालीं ज्यू लोकांच्या धर्मग्रंथांचे संहितीकरण होऊन सूत्ररूप पावलें. 'पेंटाटश' हा भाग लोकांच्या उघड वाचण्यांत व शाळांतून शिकविण्यांत येऊं लागला. त्याचें आरेमाइकमध्यें भाषांतरहि झालें. मोझेसच्या कायद्याला पूरक असलेली धार्मिक आख्यानें किंवा वचनें एकत्र करण्यांत येऊन तो तोंडी कायदा म्हणून धरण्यांत येऊं लागला. याप्रमाणें जुन्या करारांचें 'मिद्राश' हें भाष्य बनलें. व हिलेल, शमाय, गामालिएल यांना स्मृतिकाराचा दर्जा प्राप्त झाला.

रोमन लोकांनीं ज्यूंना त्यांच्या राजधानींतून हांकलल्यानंतर त्यांनीं अनेक विद्यापीठें स्थापून त्यांतून आपली भाषा व वाङ्मय शिकविण्यास सुरुवात केली. या शाळांपैकीं बाबिलोन आणि टायबेरिआस येथील फार प्रसिद्ध आहेत. धर्मग्रंथांचें विवरण व दंतकथा ज्यांत आहेत तो 'मिश्ना' नांवाचा ग्रंथ दुसऱ्या शतकाच्या अखेरीस किंवा तिसऱ्या शतकाच्या प्रारंभीं रचला गेला असावा. बाबिलोन आणि टायबेरिआस येथील राब्यींनीं यावर अनेक टीका लिहिल्या (राबी पाहा) व या टीकांचे दोन 'तालमुद' (पाहा) झाले व या 'तालमुद'ला ज्यूंमध्यें धर्मशास्त्राचें महत्त्व व पावित्र्य प्राप्त झालें. हे चौथ्या-पांचव्या शतकांतील आहेत. 'तारगुम' हें जुन्या करारांतील कांहीं भागांचें आरेमाइक भाषांतर आहे.

नंतर ज्यू लोक जेव्हां पॅलेस्टाइनमधून कायमचे बाहेर पडून निरनिराळ्या देशांत जाऊन राहिले तेव्हां त्यांनीं त्या त्या देशांची भाषा स्वीकारली. तथापि लेखन हीब्रू भाषेतच चालू ठेवलें. धार्मिक संस्कारांतून हीब्रू भाषाच वापरली जाते. परस्पर पत्रव्यवहारहि हीब्रू भाषेंतच होतो. जुन्या बायबली हीब्रू भाषेपेक्षां साहजिकच हिचें अर्वाचीनीकरण झालेलें आहे. जेव्हां मूर लोकांचें स्पेनवर वर्चस्व होतें तेव्हां हीब्रू वाङ्मयाचा अत्यंत उत्कर्षाचा काळ होता. पुढें महत्त्व राहिलें नाहीं.

पहिल्या महायुद्धानंतर जेरुसलेम येथें हीब्रू विद्यापीठ सुरू झालें व हीब्रू वाङ्मयाला पुन्हां चांगले दिवस येऊं लागले. आतां तर स्वतंत्र ज्यू राष्ट्रच तेथें निर्माण झाल्यानें हीब्रू भाषा आणि वाङ्मय यांना राष्ट्रीय दर्जा प्राप्त झाला आहे.

**हीमन्स, फेलिसिआ डोरोथिआ** (१७९३–१८३५)—एक इंग्रज कवयित्री. तिनें १८०८ सालीं आपला ग्रंथ 'अर्ली ब्लॉसम्स' आणि १८१२ सालीं आपला त्याहून अधिक लोकप्रिय ग्रंथ 'दि डोमेस्टिक अॅफेक्शन्स' प्रसिद्ध केला. तिचे इतर अनेक ग्रंथ आहेत. 'दि बेटर लँड' ही कविता फार प्रसिद्ध आहे. तिचें काव्य भावगीतात्मक व वर्णनात्मक असून मधुर वाटतें.

**हीरविजय सूरि** (मृत्यु १५९२)—गुजराथेंतील पालनपूर येथील एक जैन आचार्य. याची विद्वत्ता व लोकप्रियता ऐकून अकबर बादशहानें यास आपल्या दरबारीं येण्याबद्दल आग्रहाचें आमंत्रण केलें. तेव्हा हा फत्तेपूर-शिक्री येथें पायीं गेला. यानंतर अकबरानें आपल्या दरबारीं याच्या गुणांचा योग्य तो गौरव केला. याच्या सांगण्यावरूनच अकबरानें पर्युषणपर्वाचे बारा दिवस, नवरोज, रविवार व आपला जन्ममास या कालांत हिंसेला बंदी केली. हा निरपेक्ष निःस्वार्थी असून यानें अकबराकडे फक्त जीवदयेचीच भिक्षा मागितली.

**हुइनिए**—एक चिनी प्रवासी. इ. स. ६३८ मध्यें एक कोरियन कायदेपंडित हुइनिए हा पश्चिमेकडील बोधि. देवळांत येऊन राहिला होता. पुढें तो पवित्र वस्तूंचीं दर्शनें घेऊन नालंदाला गेला आणि तेथें धार्मिक ग्रंथांचा अभ्यास करीत राहिला.

इत्सिंग हा कांहीं पुस्तकें चाळीत असतांना एक पुस्तक हुइनिएनें लिहिल्याबद्दल त्याला उल्लेख आढळला. तेथें चौकशी करतां तो ६० वर्षांचा होऊन त्याच वर्षी वारल्याचें त्याला समजलें. त्यानें लिहिलेलीं संस्कृत पुस्तकें नालंदास जपून ठेविलीं होतीं.

**हुएनत्संग** (६०६–६६४)—युआन श्वांग. एक प्रसिद्ध चिनी प्रवासी. हा चीनमध्यें क्यूशी जिल्ह्यांत होनन फू गावाजवळ जन्मला. तो लहान वयांत बौद्ध भिक्षु झाला. बौद्ध धर्माचें मूलस्थान जो हिंदुस्थान तो पाहण्याची त्याची फार इच्छा होती, म्हणून तो ६२९ सालीं हिंदुस्थानाकडे यावयास निघाला. चीनची सरहद्द कोणाहि माणसाला न ओलांडूं देण्याविषयीं चीन सरकारची आज्ञा होती. तथापि युक्तिप्रयुक्ति करून त्यानें चीनची सरहद्द ओलांडली व अनेक संकटें सहन करून तो हिंदुस्थानांत आला. काश्मीरच्या दऱ्याखोऱ्यांतील मठांत दोन वर्षें अध्ययनांत घालवून तो मथुरेस गेला. नंतर बौद्ध व हिंदु धर्मक्षेत्रें व प्रसिद्ध शहरें त्यानें पाहिलीं. नालंदा येथें त्यानें दोन वर्षें संस्कृतच्या अध्ययनात घालविलीं. या ठिकाणीं त्यानें बौद्ध तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला. नंतर जवळजवळ सर्व हिंदुस्थानभर प्रवास करून काबूल मार्गानें १५ वर्षांनीं परत चीनला गेला. त्यानें बरोबर हिंदुस्थानांतून मोठा ग्रंथसंग्रह, मूर्ती व इतर अवशेष चीनला नेले. चीनचा बादशहा ताइसुंग यानें त्याचा मोठा सन्मान करून त्याला आपलें प्रवासवृत्त लिहिण्यास सांगितलें. ६४८ सालीं त्यानें आपलें प्रवासवृत्त लिहून पुरें केलें. मरणापूर्वी कांहीं दिवस त्यानें आपल्या शिष्यांकडून आपण केलेल्या चांगल्या कृत्यांची यादी व भाषांतरलेल्या पुस्तकांची यादी करविली. त्यानें जें प्रवासवृत्त लिहून ठेविलें तें हिंदुस्थानाचा प्राचीन इतिहास लिहिण्याच्या कामीं फार उपयुक्त आहे.

**हुकूमनामा**—(डिक्री). दिवाणी कोर्टांत न्यायाधीश दाव्याचा जो लेखी निर्णय देतो त्याचे निकाल (जजमेंट) आणि हुकूमनामा (डिक्री) असे दोन भाग असतात. जजमेंटमध्यें न्यायाधीशानें दिलेल्या निर्णयाची कारणें सविस्तर लिहिलेलीं असतात; आणि डिक्रीमध्यें प्रत्यक्ष अमलबजावणीच्या दृष्टीनें जरूर ते हुकूम लिहिलेले असतात.

**हुकूमशाही**—(डिक्टेटरशिप). हा शब्द लॅटिन डिक्टेटर या शब्दापासून बनला असून त्याचा अर्थ एका व्यक्तीची किंवा एका वर्गाची अनियंत्रित राजसत्ता असा आहे. या पद्धतींत राज्यकारभाराला लोकांच्या संमतीची आवश्यकता नसते. हा शब्द मूळ प्राचीन रोमन रिपब्लिकमध्यें सुरू झाला. त्या प्राचीन रोमन राज्यांत मोठें संकट उत्पन्न झाल्यास, रोमन सीनेट एका व्यक्तीच्या हातीं सात वर्षें अनियंत्रित सत्ता देत असे. या सर्वाधिकारी व्यक्तीला 'डिक्टेटर' म्हणत असत. सात वर्षांनंतर सदर डिक्टेटर आपल्या अधिकाराचा राजीनामा देत असे आणि नंतर सनदशीर लोकशाही राज्यकारभार चालू होत असे. आधुनिक काळांत हुकूमशाही राज्यकारभार एका व्यक्तीच्या हातांत किंवा एका वर्गाच्या हातांत (उदा., लष्कर किंवा मजूर वर्ग) असतो. पण एका वर्गाच्या हातीं सर्वाधिकार असला तरी प्रत्यक्ष व्यवहारांत सर्व सत्ता त्या वर्गाचा जो पुढारी असेल त्याच्या हातांत असते.

**हुकेरी**—मुंबई, बेळगांव जिल्हा, चिकोडी तालुक्यांतील एक गांव. लो. सं. ७,७०३. गांवाबाहेर १६ व्या शतकांतील मुसलमानी इमारती, स्मारकें व मोठमोठीं थडगीं आहेत. विजापूर बादशाहीचा अंत झाल्यावर बेळगांव जिल्ह्याचा एवढाच भाग मराठ्यांच्या ताब्यांत होता. हुकेरी गाव १७६३ सालीं माधवराव पेशव्यानें कोल्हापूरच्या महाराजास दिला होता पण तो त्याकडे फार दिवस राहिला नाहीं. येथें हातमागावर विणकाम होतें.

**हुक्का**—तंबाखू ओढण्याची नळी. इराण व मुसलमानी राष्ट्रें, व हिंदुस्थान यांतून हुक्क्याचा प्रचार आहे. उत्तर हिंदुस्थानांत मुसलमानी अमदानींत अमीर-उमराव व थोर लोक यांच्याकडे सर्रहा हुक्का असेच व आजहि आहे. गुजराथ-काठेवाडांतहि साध्या प्रकारचा हुक्का गरीब लोकहि ओढतात. हुक्क्यांत वर एक तंबाखू निखाऱ्यावर टाकण्याचें भांडें असतें. या भांड्याच्या खालीं जें काचेचें, चिनीमातीचें, लांकडाचें किंवा एखाद्या धातूचें दुसरें पाण्याचें भांडें असतें त्यांत वरचा धूर येऊन तो या भांड्याला जोडलेल्या लवचिक लांब नळींतून ओढून घेतात. पाण्यांतून जात असल्याकारणानें धुराला गारवा येतो व निराळीच चव लागते. अमीर-उमरावांच्या बायका देखील शोकासाठीं हुक्का ओढीत; व पानदानाप्रमाणें हुक्काहि मोठाल्या घरांतून असे.

**हुगळी**—बंगाल, बरद्वान भागांतील जिल्हा. हावरा जिल्हा वगळला तर या जिल्ह्याचें क्षे. फ. ११९१ चौ. मै. आहे. या जिल्ह्यांत मुख्य नद्या तीन आहेत: हुगळी, दामोदर व रूपनारायण. येथील हवा कोंदट, सर्द आहे. दर वर्षी अदमासें पाऊस ५० इंच पडतो.

इतिहास—या जिल्ह्यांत इतिहाससंस्मरणीय अशीं पुष्कळ स्थळें आहेत. सुलभ नौकानयनामुळें हुगळी शहराला महत्त्व येऊन पोर्तुगीज येथें येऊन राहिले. पुढें इंग्लिशांनीं आपली व्यापाराची पेढी येथेंच स्थापन केली व याच ठिकाणीं त्यांचा व मुसुलमान लोकांचा प्रथम तंटा सुरू झाला. म्हणून इंग्रजांनीं हुगळी शहर सोडून देऊन कलकत्ता शहर हें १६९० सालीं आपलें मुख्य ठिकाण केलें. पुढें फ्रेंचांनीं चंद्रनगर येथें, डच लोकांनीं चिनसुरा येथें व डॅनिश लोकांनीं श्रीरामपूर येथें आपल्या वखारी स्थापिल्या. १७६० सालीं बरद्वान, मिदनापूर व चितागांग हीं मीर कासीमनें ईस्ट इंडिया कंपनीला सैन्याच्या खर्चाकरितां म्हणून दिलीं. १८१९ सालीं

हुगळी हा एक निराळा जिल्हा झाला. लो. सं. सुमारें बारा लक्ष. येथें नेहमीं बाहेरून लोक येतात. लोक बाहेरून येण्याचें कारण तेथें गिरण्या फार आहेत. व इतर उद्योगधंद्यांचें हें माहेरघर आहे. या जिल्ह्यांतील मुख्य शहरें हुगळी, चिनसुरा, श्रीरामपूर, भद्रेश्वर, उत्तरपाडा, वैघबारी, बांसबारीया हीं होत. येथील देशी भाषा म्हणजे मध्य बंगाली होय. एकंदर लोकांपैकीं हिंदु लोक शें. ८५ आहेत. लोकसंख्येपैकीं शें. ५४ शेतकीवर उपजीविका करतात.

येथील जमीन पुळणीची असल्यामुळें सुपीक आहे व येथें तांदूळ चांगला पिकतो. या जिल्ह्यांत मुख्य पिकें तांदूळ, ऊंस, ताग, विड्याचीं पानें, बटाटे, कोबी, इ. भाजीपाला हीं होत. येथील निर्यात माल म्हणजे उत्तम तांदूळ, कडधान्य, रेशीम, नीळ, ताग, अंबाडीचा दोर, कापसाचें कापड, गोणपाटाचीं पोतीं, विटा, कौलें व भाजीपाला या जिनसा होत व आयात माल म्हणजे मध्यम प्रतीचा तांदूळ, विलायती माल, कापसाचे पेळू व सूत, मीठ, तंबाखू, कोळसा, रॉकेल, तूप, मसाला, इमारतीचें लांकूड, वगैरे माल होय. या जिल्ह्यांत शिक्षितांचें प्रमाण शें. १५ आहे. पण जिल्ह्यांत इतर जिल्ह्यांच्या मानानें सुशिक्षित स्त्रियांचें प्रमाण जास्त आहे. सार्वजनिक व खाजगी शिक्षणसंस्था बऱ्याच आहेत.

हुगळी शहर जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून नदीच्या डाव्या तीरावर आहे. सातगांव बंदर खालावल्यावर पोर्तुगीज लोकांनीं १५३७ सालीं हें स्थापन केलें. हुगळी तुरुंगाजवळ जुन्या किल्ल्याचे अवशेष आढळतात. पोर्तुगीज लोक चांचेगिरीच्या योगानें फार त्रास देऊं लागल्यामुळें शहाजहान बादशहानें एक मोंगल सैन्याची तुकडी पोर्तुगीजांविरुद्ध पाठविली व हुगळी शहर बादशाही बंदर केलें. हें शहर बरद्वान जिल्ह्याचें कांहीं दिवस मुख्य ठिकाण होतें. पण हल्लीं येथील लोकवस्ती कमी होत चालली आहे. येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली आहे. लो. सं. ५०,०००.

हुगळी नदी—ही व्यापारीदृष्ट्या अत्यंत महत्त्वाची असून गंगेचें पाणी हिच्या मुखानें बंगालच्या उपसागरात मिळतें. ह्या नदीला तीन नद्यांचें पाणी मिळतें व त्या नद्या म्हणजे भागीरथी, जालंगी व माताभांग या होत. ह्या हुगळी नदीचा उगम ज्या ठिकाणीं होतो तें ठिकाण महत्त्वाचें आहे. कारण तें ठिकाण अंतर्गत व्यापारास फार सोयीचें आहे. या नदीच्या तीरावर कलकत्ता, नैहाती, हौरा, शांतीपूर, वगैरे बरींच शहरें वसलीं आहेत.

**हुंडणावळ**—नाण्यांची अदलाबदल करतांना बट्टयाचा प्रश्न येतो. निजामी रुपयांचे कलदार किंवा हिंदी राज्यांतील रुपये करून घ्यावयाचे म्हणजे शेंकडा कांहीं बट्टा पडतो. देशपरिस्थिति व बाजारभाव यांप्रमाणें हा बट्टा कमीजास्त होत असतो. नुकताच डॉलरचा भाव (पौंडामध्यें) वाढला आहे. मराठे राज्यांत नाणीं अनेक टांकसाळींचीं असत. तेव्हां बट्टयाचें प्रमाण निरनिराळें असे. त्या वेळच्या जमाखर्चांतून हें पाहावयास मिळतें. लोकांचा नाणीं पाडण्याचा हक्क सरकारनें मान्य केल्याकारणानें सरकारला देखरेख, नियमन व शासन करण्यापलीकडे कांहींच उरलें नसे. कितीहि नियमन केलें तरी लबाडी व्हावयाचीच. शिवाय स्वतंत्र लोकपती अनेक असल्यामुळें चलनाच्या धातूचें प्रमाण एक असणेंहि शक्य नव्हतें. त्यामुळें निरनिराळ्या नाण्यांच्या किंमतींत फरक पडे. हा फरक काढून टाकणें म्हणजेच बट्टा देणें किंवा घेणें होय. ह्याशिवाय पूर्वीच्या नाण्यांत हीणकस धातू घालीत नसत. सर्व नाणीं शुद्ध धातूचें असे. एक रुपया सव्वा-अकरा मासे रुप्याचा असे. त्यामुळे रुपयाची झीज होण्याचा संभव फार. तसेंच नाणीं पाडणें खाजगी लोकांच्या हातीं असल्यानें नाण्यांच्या खरेपणाविषयीं लोक स्वाभाविकपणें साशंक असत. याकारणानें प्रत्येक वेळेला नाणें तावून सुलाखून घेण्याचा प्रसंग येत असे. अशा वेळीं नाणें छापील झाल्यास आश्चर्य नाहीं. जुने मळके रुपये कोरे करण्याचा व्यवहार सारखा चालू असे. अशा कामास जी मजुरी द्यावी लागे तिलाहि बट्टाच म्हणत. नाणकशास्त्र पाहा.

जगांतील हुंडणावळीचे भाव—दोन वर्षांपूर्वी इंग्लंडनें आपल्या पौंडाचा भाव कमी केल्याबरोबर सबंध जगांत हुंडणावळीच्या दरात क्रांति झाली. पौंड व डॉलर यांच्याशीं संलग्न असलेल्या देशांनीं खालीलप्रमाणें आपल्या चलनांत बदल केला. आजचे हे भाव आहेत :—

इंग्लंड—१ पौंड = २ डॉलर ८० सेंट [पूर्वीचें प्रमाण ४ डॉलर ३ सेंट.]

हिंदुस्थान—१ रु. = २१ सेंट = १८ पेन्स. ४·७६ रु. = १ डॉलर. [पूर्वीचा भाव ३·३२ रु.]

पाकिस्तान—१ रु. = २६ पेन्स [पूर्वीचा भाव १८ पेन्स]. १०० पाकिस्तानी रु. = १४४ हिंदी रु.

ब्रह्मदेश—४·७६ रु. = १ डॉलर.

दक्षिण आफ्रिका—१ पौंड = २ डॉलर ८० सेंट.

ऑस्ट्रेलिया—१ पौंड = २ डॉलर २४ सेंट

आयर—१ पौंड = २ डॉलर ८० सेंट

ईजिप्त—१ पौंड = २ डॉलर ८७ सेंट

न्यू झीलंड—१ पौंड = २ डॉलर ८० सेंट

डेन्मार्क—६·८२ क्रोनर = १ डॉलर

स्वित्झर्लंड— १२·१२ स्विस फ्रँक = १ पौंड

कॅनडा—कॅनेडियन डॉलर ८ सेंट = १ पौंड

नॉर्वे—७·१४ क्रोनर = १ डॉलर

झेकोस्लोव्हाकिया—१३९·५ क्राउन = १ पौंड

स्ट्रेट्स सेटलमेंट—३२·५ सेंट = १ डॉलर

जपान—३६० येन = १ डॉलर
१००८ येन = १ पौंड
स्वीडन—५.७८ क्राउन = १ डॉलर
१४.५० क्राउन = १ पौंड
फ्रान्स—३५० फ्रँक = १ डॉलर
९८० फ्रँक = १ पौंड
हॉलंड—३.८० गिल्डर्स = १ डॉलर
इटली—६५० लिरा = १ डॉलर
१००० लिरा = १ पौंड

**हुंडी**—(चेक पाहा). आज चेकचा बँकांतून व्यवहार आहे तरी सावकारी वर्गांत हुंड्या चालू आहेतच. पूर्वी नाग्यालेखीन हुंड्यांचाहि उपयोग फार होई. व्यापारी परस्परांवर हुंड्या लिहीत. आपल्याकडे या हुंड्यांबद्दल अनेक जुने उल्लेख सांपडतात. पण व्याजाचे दर काय असत याबद्दलची माहिती सांपडत नाही. तथापि व्याजाच्या कल्पनेचा प्रादुर्भाव बऱ्याच जुनाट काळीं झाला असावा. कारण, व्याज या शब्दाला अन्वर्थक असे शब्द बऱ्याच पुरातन काळीं वापरले गेले आहेत. तारणाशिवाय काढलेल्या कर्जावर दरसाल १८ टक्के व्याज घेत, असा उल्लेख पुढच्या पुढच्या धर्मशास्त्राच्या ग्रंथांतून आढळतो. (व्याज पाहा).

पेशवाईत सरकारच्या वराता व लोकांच्या हुंड्या यांचा व्यवहार जारीनें सुरू होता. पैशाची युद्धाकरिता गरज व पैसे पाठविण्याचा अन्य साधनांचा अभाव हें हुंड्यांच्या व्यवहाराच्या प्रसाराचें मुख्य कारण होय. या हुंड्या अर्थात् जासूदांबरोबर पाठवीत. पैसे तावडतोब पाहिजे असले म्हणजे पुण्यात हुंडी विकीत. हुंडींत रुपये देण्याची मुदत लिहिलेली असते. हुंडी याद्या(व्यापारी)नांग आहे म्हणजे कोणत्याहि व्यापाऱ्यानें हुंडी हजर केल्यास त्याला हुंडीचे रुपये मिळाले पाहिजेत. हुंडीवाल्या व्यापाऱ्याशीं कुळाचे पैसे नसल्यास कुळ व्यापाऱ्याकडे दुसऱ्या हुंड्या अगर रोख रक्कम किंवा अन्य रीतीचा मोबदला पाठवितें त्यास लहणें म्हणतात. जागा हुंडीचाहि उल्लेख आहे. हुंडणावळीचा दर शेंकडा १,२॥ रुपया पडे. रक्कम लहान असली व नुसती चिठी दिली तर शेंकडा दोन रुपयेहि आकारीत.

ज्या ठिकाणची हुंडी कुळाला पाहिजे असेल तेथें व्यापाऱ्याची अडत नसल्यास तो आपला दुसऱ्या ठिकाणच्या अडत्यावर हुंडी देऊन त्यास कुळाला पाहिजे त्या ठिकाणीं हुंडी पाठविण्यास लिही. उदाहरणार्थ, "हुंडी औरंगाबादची येथून उज्जनची हुंडी करून द्यावी." कोणत्या चलनांत हुंडीची रक्कम द्यावयाची तें चलन हुंडींत निर्दिष्ट करीत. आणि व्यापाऱ्याकडे भरलेलें चलन व त्यानें द्यावयाचें चलन हीं भिन्न असल्यास बाजारभावाप्रमाणें बट्टा आकारीत. हुंडीची मुदत भरून गेली असल्यास त्या हुंडीस पक्क्या मितीची हुंडी म्हणत.

पैठण, सातारा, श्रीरंगपट्टण, बुंदेलखंड, पुणें शहर, मुंबई, काशी, कोंकण, औरंगाबाद, उज्जनी, इत्यादि ठिकाणांचा उल्लेख हुंड्यांच्या व्यवहारांत आला आहे. [ पेशवाईच्या सावलींत ]

**हुतुतु**—एक देशी खेळ. हा लहानमोठ्यांनीं खेळावयाचा एक जुना खेळ आहे. खो खो, आट्यापाट्या, यांप्रमाणेंच हल्लीं या खेळाचे नियम केले असून मोठमोठे सामने होतात. प्रथम गडी निमेनीम वांटून घेऊन मधल्या किंवा रानेच्या दोहों बाजूंस हे दोन पक्ष उभे राहतात. मग पक्षांतील एक गडी तोंडानें 'हुतुतु' म्हणत विरुद्ध पक्षाच्या हद्दींतील गडी मारावयास जातो. ते त्याला पकडून त्याचा दम मोडेपर्यंत धरून ठेवण्याचा प्रयत्न करतात. दम मोडण्यापूर्वी तो परत आपल्या हद्दींत आला तर त्यानें शिवलेले सर्व गडी 'मेले' असें धरतात. उलट त्याचा दम मोडला तर तो मेला. एकदां एक पक्षाचा गडी 'पाणी घालून' गेल्यावर विरुद्ध पक्षाच्या गड्याची पाळी येते. याप्रमाणें एका पक्षाचे सर्व गडी मरेपर्यंत खेळतात. कोंकणांत या खेळास 'मूं मूं' किंवा 'सुरसुर' असें नांव आहे.

**हुबळी**—मुंबई, धारवाड जिल्ह्यांतील एक तालुका. क्षे. फ. ३११ चौ. मै.. यांत हुबळी शहर व ७४ खेडीं आहेत. लो. सं. १,६१,६१६. येथें पाऊस २९ इंच पडतो. हुबळी शहर तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. लो. सं. सुमारें दहा हजार. विजापूर अमदानींत हें शहर शिवाजीनें एकदां लुटलें होतें. येथें १८५५ सालीं म्युनिसिपालिटी स्थापन झाली. हें शहर हरिहर, कुमटा व कारवार या शहरांनजीक असल्यामुळें हें दक्षिण महाराष्ट्रांत व्यापाराचें—विशेषतः कापसाच्या व्यापाराचें मुख्य ठिकाण झालें आहे. या ठिकाणीं बऱ्याच सरकी काढण्याच्या व कापूस दाबण्याच्या गिरण्या आहेत. येथें मोठा आगगाड्या दुरुस्त करण्याचा कारखाना आहे. दोन कॉलेजें व हायस्कूलें आहेत.

**हुमायून** (१५०८–१५५६)—एक मोंगल बादशहा. याचें नाव नासिरुद्दीन महंमद असें होतें. हा बाबराचा वडील मुलगा. त्याला तीन भाऊ होते. त्यांना यानें निरनिराळ्या प्रांतांचे अधिकारी नेमलें होतें. गुजराथ व माळवा येथील बंदोबस्त नीट न राहिल्यानें ते प्रांत याच्या हातचे गेले. पुढें शेरखानानें बंड करून बंगाल व बिहार प्रांत घेतले, व याचा मोड करून पलायन लाविलें. स. १५५५ पर्यंत दिल्लीच्या तख्तावर शेरशहा व त्याचे वंशज राज्य करीत होते. या १५ वर्षांत हुमायूनाचे अतोनात हाल होऊन तो आश्रयार्थ भटकत होता. पुढें इराणांतून सैन्य आणून यानें आपलें तख्त मिळविलें, व तो पुन्हां बादशहा बनला. पण याला त्याचा उपभोग घेण्यास पुढें तो फार जगला नाहीं.

कारण एकदां जिन्यावरून पडून दिल्लीस मृत्यु पावला. याच्यांत हिकमत नसून जबाबदारी ओळखण्याचीहि पात्रता नव्हती. उलट आळशी व बेफिकीर वृत्तीचा होता. तथापि तो उदार व ममताळू होता. तो विद्वानांचा आश्रयदाता असून स्वतः गणिती व ज्योतिषी होता.

**हुरा**—याचीं झाडें मोठीं होतात. कोंकणांत हीं फार आहेत. याचा रस सर्पदंशावर देतात. चीक विषारी व अपायकारक आहे. तो विंचवाच्या दंशावर लावतात. रेचक म्हणून थोडा गुंजभर हरभऱ्याच्या पिठांत देतात.

**हुविष्क कुशान**—एक कुशान राजा. कनिष्काचा हा पुत्र त्याच्यानंतर गादीवर आला (सुमारें इ. स. १५३). काबूल, काश्मीर व मथुरा येथपर्यंतचा प्रदेश याच्या राज्यांत मोडत असे. बौद्ध धर्मावर याची भक्ति असून यानें बौद्ध धर्मीयांकरितां मथुरेस आपल्या नांवाचा एक मठ बांधला होता. काश्मिरांतील हुशकपूर किंवा 'पश्चिमेकडील दरवाजा' हें शहर यानेंच वसवलें. हेंच शहर याची राजधानी होती. या शहरास सध्यां उशकूर असें म्हणतात. येथें एक जुना स्तूप आहे. सन ६३१ मध्यें ह्युएनत्संगानें या शहरास भेट दिली होती. हुविष्काचीं नाणीं सोन्याचीं असत.

**हुशंगाबाद**—मध्यप्रांत, नर्मदा भागांतील एक जिल्हा. या जिल्ह्यातला नर्मदेच्या बाजूस असलेला मुलूख काळीभोर व सुपीक अशा जमिनीचा आहे. हुशंगाबाद शहरीं दरवर्षी पाऊस ५० इंच पडतो. व इतकाच पाऊस सपाट जमिनीवर पडतो. ह्या जिल्ह्यांत दुष्काळ फारसा ठाऊक नाहीं. उन्हाळ्यांत हवा कडक असून कोरडी असते. क्षे. फ. ५,७०७ चौ. मै. व लो. सं. ८,२३,५८५.

इतिहास—हुशंगाबाद शहरास हें नांव माळव्याचा सुलतान होशंगशहा घोरी (१४०५-१४३४) याच्या नावावरून पडलें. ह्या जिल्ह्याचा पूर्वभाग मुसलमानांच्या हातीं कधींहि गेला नाहीं, कारण याचें महत्त्व त्या लोकांना कधींहि वाटलें नाहीं. सुमारें १७२० मध्यें भोपाळच्या मुसलमानी घराण्याचा मूळपुरुष दोस्त महंमद यानें या प्रांतावर स्वारी केली व पुढें १७४२ सालीं बाळाजी बाजीराव पेशवा मंडलावर हल्ला करण्याकरितां जात असतांना त्यानें हंडिया परगणा घेतला. नंतर रघोजी भोंसले ह्यानें ह्या मुलुखावर स्वारी करून भोपाळच्या राज्याचा भाग सोडून बाकीचा मुलूख पादाक्रांत केला. लवकरच भोंसले व भोपाळचे नबाब यांत तंटे सुरू झाले. १८१७ सालीं नागपूरच्या राज्यापैकीं हर्दीच्या जिल्ह्याचा भाग व १८४४ सालीं हर्दा-हंडिया भाग शिंदे सरकारकडून मिळून हा जिल्हा बनला. या जिल्ह्यांत हर्दा, हुशंगाबाद, सिवनी, माळव, सोहागपूर, इटारसी व पचमढी अशीं सहा शहरें आहेत. येथले बहुतेक लोक पश्चिम हिंदीची एक शाखा जी बुंदेली भाषा ती बोलतात. या जिल्ह्यांत गोंड, कोरकू, रजपूत, गुजर, रघुवंशी जाट, ब्राह्मण, वगैरे बऱ्याच जाती आहेत. शें. ६१ लोक शेतीवर निर्वाह करतात.

येथील मुख्य पीक गव्हाचें आहे. कपाशीची लागवड येथें जोरानें सुरू झाली आहे. जिल्ह्यांत खनिज संपत्ति फारशी नाहीं. चांगला तांबडा व पांढरा इमारतीचा दगड हुशंगाबाद शहरीं सांपडतो. या जिल्ह्यांतून गहूं, तीळ, लिंबोणी व कापूस हे जिन्नस बाहेर पाठविले जातात. व येथील राजबोरारी व बोरी येथील सागवानी लांकूड फार प्रसिद्ध असल्यामुळें तें येथून बाहेर जातें. शिक्षणाच्या बाबतींत हा जिल्हा सर्व मध्यप्रांतांत ५ वा आहे. शें. ७ लोक साक्षर आहेत.

शहर नर्मदा नदीच्या दक्षिण तीरावर फार सुरेख रीतीनें वसलें आहे. १८०९ सालीं मराठे लोकांनीं हें शहर घेतलें. येथें १८६९ सालीं म्युनिसिपालिटी स्थापन झाली. येथें हायस्कुलें, दवाखाने वगैरे सरकारी व सार्वजनिक संस्था बऱ्याच आहेत.

**हुश्यारपूर**—पंजाब, जालंदर विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. २,१९५ चौ. मै. भूगर्भशास्त्रदृष्ट्या या जिल्ह्याचे दोन भाग होतात. व त्यांपैकीं एका भागांत पुळण आहे व दुसऱ्या भागांत शिवालिक व अर्धवट हिमालय पर्वताच्या श्रेणी आहेत व या श्रेणी सतलज नदीच्या वायव्येस पसरलेल्या आहेत. या जिल्ह्यांतील उष्णता कधींहि कडक नसते. पाऊस सुमारें ३१ इंचांपर्यंत पडतो.

या जिल्ह्यांतील कांहीं ठिकाणांचा संबंध महाभारताशीं येतो. मुसुलमानांच्या स्वाऱ्यांपूर्वी हा जिल्हा त्रिगर्तांच्या कटोच राज्याचा भाग होता. १०८८ सालीं मैदानांतील मुलूख मुसुलमान लोकांच्या ताब्यांत गेला. पण डोंगरी मुलूख हिंदु राजांच्या ताब्यांत होता. अकबर बादशहाच्या कारकीर्दींत हा जिल्हा मोंगल साम्राज्याचा एक घटकावयव होऊन बसला. पुढें मोंगल बादशाही नष्ट होण्याच्या सुमारास शीख लोकांचा उदय झाला व त्या वेळीं त्यांनीं सर्व जिल्हा आपल्या ताब्यांत घेतला. पुढें शीख युद्ध संपल्यावर हा जिल्हा इंग्रज सरकारच्या ताब्यांत आला. लो. सं. (१९४१) ११,७०,३२३. जिल्ह्यांत ३० शहरें व २,११८ खेडीं आहेत. या भागांतील मुख्य जाती म्हणजे रजपूत, हिंदू, शीख व मुसुलमान या होत. या जिल्ह्यांतील मुख्य पिकें म्हणजे गहूं, चणे, जव, मका, व तुरी, वगैरे कडधान्यें, ऊंस व कापूस हीं होत. येथील खनिजें म्हणजे शोहन नदींतील सोनें व चुनखडीचे दगड हीं होत. या जिल्ह्यांतील आयात माल म्हणजे सुती कापड, ज्वारी, बाजरी, वगैरे धान्यें व गुरें होत; व निर्गत माल म्हणजे कच्चा माल होय. या मालांत तांदूळ, चणे, जवस, साखर, अंबाडी, तंबाखू, वगैरेंचा अंतर्भाव होतो. जिल्ह्यांत आगगाडी नाहीं. साक्षरांचें प्रमाण शें. ६ आहे.

शहर जालंदरपासून ३५ मैलांवर असून शिवालिक पर्वतांच्या पायथ्याशीं आहे. लो. सं. २६,०००. हें शहर १८०९ सालीं रणजितसिंगानें घेतलें होतें. जालंदर दुआबाच्या सुभेदाराचें हें मुख्य ठिकाण होतें. येथें लाखेचीं, हस्तिदंती, नटावाचीं व लांकडी नक्षीकामें उत्तम होतात. १८६७ सालीं म्युनिसिपालिटी स्थापन झाली. येथें तीन-चार हायस्कुलें आहेत.

**हुसेनी कानडा**—हा राग काफी थाटांतून निघतो. ह्याचा आरोहावरोह सात स्वरांनीं होतो म्हणून याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी स्वर तारषड्ज व संवादी पंचम आहे. गानसमय मध्यरात्र मानितात. या रागांत धैवत स्वर कोमल आहे. या रागाचें वैचित्र्य तार स्थानांत दिसतें. या रागाचें मंडन सारंगांगानें होतें. हा यावनिक व आधुनिक राग आहे. हा एक कानड्याचा प्रकार आहे.

**हूक, रॉबर्ट** (१६३५–१७०३)—एक इंग्रज गणितशास्त्रज्ञ आणि सृष्टिविज्ञान-शास्त्रज्ञ. त्याची मुख्य कीर्ति 'हूक्स लॉ' या सिद्धान्ताचा संशोधक म्हणून आहे. हा सिद्धान्त असा कीं, स्थितिस्थापक पदार्थांत तन्यता (स्ट्रेस) हा प्रेरा (स्ट्रेन) च्या प्रमाणांत असतो. हूक हा रॉयल सोसायटीचा एक प्रमुख सभासद होता.

**हूकर, सर जोसेफ डाल्टन** (१८१७–१९११)—एक ब्रिटिश सृष्टिशास्त्रज्ञ. तो १८३९ सालीं सर जेम्स रॉस याच्या अॅन्टार्क्टिक प्रदेशांतील सफरीबरोबर गेला, आणि त्यानें सब् अॅन्टार्क्टिक प्रदेश आणि तिकडील समशीतोष्ण प्रदेश यांतील वनस्पतींची माहिती प्रसिद्ध केली. नंतर त्यानें १८४८ सालीं उत्तर हिंदुस्थानांतील वनस्पतींविषयीं माहिती मिळविण्याकरितां प्रवास केला. त्याला १८५५ सालीं 'क्यू गार्डन्स'चा अॅसिस्टंट डायरेक्टर नेमण्यांत आलें, आणि १८५८ सालीं आपल्या बापानंतर तो तेथला डायरेक्टर झाला. त्यानें ब्रिटनमधील वनस्पती, हिमालयन जर्नल, वगैरे ग्रंथ लिहिले आहेत.

**हूड, थॉमस** (१७९९–१८४५)—एक ब्रिटिश कवि व विनोदी लेखक. तो १८२१ सालीं 'दि लंडन मॅगझिन्' याचा उपसंपादक झाला, आणि १८२६ सालीं त्यानें आपलें 'व्हिम्स अॅन्ड ऑडिटीज्' हें पुस्तक प्रसिद्ध केलें. त्यानें 'दि कॉमिक अॅन्यूअल' (विनोदी वार्षिक) १८२९ पासून १८३७ पर्यंत चालविलें व तें बंद पडल्यावर 'हुड्स ओन' या नांवाचें मासिक सुरू केलें. या सुमारास त्याची प्रकृति बिघडली म्हणून तो सुधारण्याकरितां तो बाहेर युरोपांत गेला. तिकडे असतांना १८३९ सालीं त्यानें आपलें 'अप् दि -ऱ्हाइन' हें पुस्तक प्रसिद्ध केलें. नंतर इंग्लंडांत परत येऊन तो 'दि न्यू मंथ्ली मॅगॅझिन'चा संपादक झाला. तें मासिक १८४३ पर्यंत चाललें. त्याचें शेवटचें मासिक 'हूड्स मॅगॅझिन' १८४४ सालीं सुरू झालें. पण नंतर त्याची प्रकृति लवकरच अगदीं खालावली; तरीहि त्यानें आजारी असतां 'दि सॉंग ऑफ ए शर्ट', 'दि ब्रिज ऑफ साइज' आणि 'दि ले ऑफ ए लेबरर', इत्यादि लिखाण केलें. त्याच्या लिखाणांत विनोद आणि करुणरस एकत्र आणण्याची विशेष कला दिसून येते.

**हूड, रॉबिन**—हा राजद्रोही ठरलेला दंतकथेंतील एक इंग्रज वीर आहे. अनेक जुन्या पोवाड्यांत रॉबिन हूडची हकीकत वर्णिली आहे, आणि हे बहुतेक पोवाडे १५ व्या शतकापासूनचे आहेत. रॉबिन हूड या व्यक्तीच्या अस्तित्वाबद्दल मतभेद आहे. इंग्लंडमधील शेरवुड फॉरेस्ट व नॉटिंगहॅमशायर या भागांत तो राहत असे, असें वर्णन आहे, व त्याच्या टोळींत लिट्ल् जॉन, विल्यम स्कॅथलॉक व इतर कित्येक इसम होते. १६ व्या शतकाच्या आरंभीं फ्रायर टक या टोळीला मिळाला. आणि मेड मेरीयन या तरुणीची प्रेमकथाहि ह्या हूडच्या हकीकतींत दिलेली आहे. रॉबिन हूड हा धनुष्यबाण व निशाणबाजी करणाऱ्या वर्गांपैकीं मोठा शूर होता. मध्यमवर्गीय इंग्रजांना तो एक विशेष आदर्श होता, व धनुष्य-बाणानें नेम मारण्यांत अगदीं निष्णात होता. त्या काळांत जंगलांतील शिकारीबद्दलचे कायदे फार कडक होते, व ते मध्यमवर्गीय इंग्रजांना जाचक असल्यामुळें ते कायदे मोडण्याची प्रवृत्ति त्या वर्गांत उत्पन्न झाली होती. आणि रॉबिन हूडनें याच बाबतींत मुख्यतः बंड उभारलें होतें.

**हूण**—एक लोकराष्ट्र. या लोकांचे चार वर्ग पडतात: (१) इ. स. ३७२–४५३ च्या सुमारास ज्यांनीं पूर्व रोमन साम्राज्यावर स्वारी केली ते; (२) हंगेरियन किंवा मग्यार; (३) श्वेत हूण किंवा एफ्थालाइट व (४) हिंदुस्थानावर स्वारी करणारे हूण. हूणांचा खरा इतिहास इ. स. ३७२ पासूनचा आहे, असें हल्लीं मानण्यांत येतें. हिंदुस्थानांत स्कंदगुप्ताच्या कारकीर्दीत (४५५–४८०) हूण लोक मध्य आशियांतून इकडे आले. व त्यांनीं गुप्त साम्राज्य मोडून आपलें स्थापलें. पण याची संस्कृति अत्यंत हीन असल्यानें यांच्याविषयीं देशांत कोणाला आपलेपणा वाटला नाहीं. तोरमाण (शाहा) नांवाच्या हूण राजानें माळव्यांत राज्य स्थापिलें (५००–५१०). याचा पुत्र मिहिरगुल (शाहा). मिहिरगुलाचा पुष्कळ ठिकाणीं इतिहासांत उल्लेख आढळतो. हे दोघे आपणांस 'शाही' नांवें म्हणवीत. या

हूणांचें अस्तित्व २,००० वर्षापासूनच्या ग्रंथांतरीं दृग्गोचर होतें. ते उत्तर चीन व तार्तरी यांत राहत. यांच्यांत खि. पू. २०० पासून बरींच मोठमोठीं राज्यें, राजे, मंत्री, वगैरे होऊन गेले, असें कांहीं इतिहासकारांचें म्हणणें आहे. या म्हणण्यास दुजोरा अवेस्ता ग्रंथांतून आढळतो.

'हूण' हें भटक्या दरवडेखोरांचें राष्ट्र होतें असा अवेस्तावरून समज होतो. या प्राचीन हूणांचा व प्राचीन इराणी लोकांचा एक उपासनाप्रकार होता व पुढें इराण्यांनीं झरथुष्ट्र धर्म स्वीकारला व त्यामुळें या दोघांत कलह सुरू झाले. हिंदुस्थानच्या इतिहासांतील मिहिरगुल हाहि इराणी होता असें त्याच्या नांवावरून व त्यानें स्थापलेल्या शहरांवरून व देवळांवरून दिसतें.

हे हूण, मोंगल मानवकुळांतील असून रुंद खांदे, चपटें नाक, खोल गेलेले लहान काळेभोर डोळे व दाढीमिशांचा अभाव हे ह्यांचे विशेष होत. इ. स. च्या चौथ्या शतकांत हे लोक युरोपांत शिरले व ॲलन लोकांना जिंकून गॉथ लोकांना डेसियाच्या बाहेर काढलें. ॲटिला (पाहा) हा यांच्यांत फार पराक्रमी राजा होऊन गेला. त्याच्या मृत्यूनंतर (इ. स. ४५३) हूणांचें साम्राज्य ऱ्हास पावलें.

इकडे मिहिरगुलाच्या मृत्यूनंतर आशियांतील हूणांची अवनति होऊन इ. स. ५६३ ते ५६७ या काळांत इराणी आणि तुर्की लोकांनीं अमूदारियाच्या किनाऱ्यावर हूणांच्या मोठ्या संघाचा नाश केला. त्यामुळें हिंदुस्थानांतील हूणांनाहि कोणाचाच पाठिंबा न राहून लहान लहान राजांनीं एकवटून त्यांचा निःपात केला.

**हूपी**—हा पक्षी शृंगचंचू (हॉर्नबिल) पक्षिवर्गाशीं सदृश

असणाऱ्या उपुपिडी वर्गांतील आहे. आपल्याकडील सुतार पक्ष्यासारखा हा दिसतो. आवाजांतील द्विरुक्तीमुळें याला हूपी हें नांव पडलें. युरोपांतील हूपीचे विविध रंग असून डोक्यावर टोकाशीं काळा रंग असणारा तुरा असतो. याचें खाणें म्हणजे किडे होत.

**हूव्हर, हर्बर्ट क्लार्क** (१८७४- )—एक अमेरिकन मुत्सद्दी व माजी अध्यक्ष. तो आयोवा संस्थानांत वेस्ट ब्रँच येथें जन्मला. तो एका लोहाराचा मुलगा असून त्याचे आईबाप लहानपणींच वारल्यामुळें तो पोरका झाला. त्याचें संगोपन त्याच्या नातेवाइकांनीं केलें. १८९५ सालीं तो मायनिंग इंजिनियर (खनिशिल्पज्ञ) झाला, आणि १९१४ पर्यंत त्यानें सर्व पांची खंडांत आपल्या व्यवसायाचें काम केलें. पहिल्या महायुद्धाच्या सुरुवातीस हूव्हर युरोपांत होता. तो लंडन येथील अमेरिकन रिलीफ कमिटीचा अध्यक्ष झाला; नंतर बेल्जिअममधील रिलीफ कमिशनचा प्रमुख झाला; १९१७–१९१९ सालीं अमेरिकन अन्नखात्याचा व्यवस्थापक आणि युद्धमंडळाचा सभासद या हुद्यावर त्यानें काम केलें. महायुद्धसमाप्तीनंतर नाकेबंदी उठविलेल्या देशांना मध्य युरोपकरितां स्थापन झालेल्या अमेरिकन रिलीफ कमिटीचा प्रमुख या नात्यानें त्यानें गरजेच्या वस्तूंचा पुरवठा केला. १९२१–२८ पर्यंत हूव्हर हा व्यापार खात्याचा चिटणीस होता, आणि १९२५–२९ या भरभराटीच्या कालमानाचें व तत्कालीन व्यापारी धोरणाचें श्रेय हूव्हरला आहे. १९२९ सालीं रिपब्लिकन पक्षाचा उमेदवार म्हणून तो अमेरिकेचा अध्यक्ष निवडून आला. परंतु पुढें लवकरच मोठी आर्थिक मंदी सर्वत्र झाल्यामुळें हूव्हरचें कार्य विफल होऊन १९३३ सालीं डेमोक्रॅट पक्षाचा रूझव्हेल्ट हा अध्यक्ष झाला. नंतर हूव्हरनें युरोपांतील जर्मनव्याप्त प्रदेशांना अन्नधान्यांचा पुरवठा आपखुषीनें करण्याच्या योजना तयार केल्या.

**हृत्कोषदाह**—(पेरिकार्डिटिस). ज्या अंतस्त्वचामय आवरणा(पेरिकार्डियम)मध्यें हृदय असतें त्याचा दाह झाला असतां त्यास म्हणतात. हा विकार झाला असता हृदयाच्या ठिकाणीं थोड्याफार तीव्र वेदना होऊं लागतात, ताप येतो, अरुचि उत्पन्न होते आणि जीभ कोरडी पडते. श्वासोच्छ्वासक्रिया जड वाटूं लागते, आणि हृदय दाटून आल्यासारखें होऊन मनुष्य वरचेवर उसासे टाकूं लागतो. व त्यामुळें त्यास हलकें वाटतें. या रोगांत रेच झाले किंवा ताप वाढला तर हीच लक्षणें अधिक तीव्र स्वरूपाची होतात.

**हृत्पोषक**—(डिजिटॅलिन). ही एक पिवळट पांढरी वासरहित कडू पूड विषौषधि (डिजिटॅलिस पर्प्यूरिया) या झाडाच्या पानांपासून तयार करण्यांत येते. तिचा औषधांत बराच उपयोग करण्यांत येतो. हिचा उपयोग हृदयाची क्रिया व रक्तदाब वाढविण्याकडे होतो. (विषौषधि पाहा).

हृदय—हें एक स्नायूंचें पोकळ इंद्रिय असून त्याचें मुख्य कार्य रुधिराभिसरण करण्याचें आहे. या रुधिराभिसरण क्रियेंत हृदय, शुद्ध रक्तवाहिन्या, अशुद्ध रक्तवाहिन्या अथवा शिरा, व केशाकर्षक रक्तपेशी यांचें मुख्य कार्य असतें. हृदयामध्यें चार पोकळी असतात. त्यांत दोन कर्णिका (ऑरिकल) व दोन महाहृत्पुटें (व्हेंट्रिकल) असतात. या हृदयावर एका अंतस्त्वचेचें आवरण असतें. त्यास हृत्कोश अथवा हृदयावरण (पेरिकार्डियम) म्हणतात. ही एक तंतुमय व रक्तजलमय पिशवी असते. हिच्यामध्यें दोन थर असतात. बाहेरचा तंतुमय असतो व आंतला रक्तजलमय असतो. उजव्या हृत्कर्णिकेमध्यें शरीरांतून फिरून आलेलें रक्त येतें. हें

मुख्य शिरेमार्फत डोकें, हात व छाती यांमधून येतें; व दुसऱ्या खालच्या शिरेमधून पाय व जठर यांपासून येतें. तसेंच हृदयांतील शिरेपासून येतें. नंतर तें उजव्या महाहृत्पुटांत जातें. या दोहोंमध्यें एक पडद्याचें द्वार असतें तें महाहृत्पुट संकोच पावलें असतां बंद होतें. या उजव्या महाहृत्पुटापासून रक्त फुप्फुसवाहिनींच्या द्वारा फुप्फुसामध्यें जातें, व तेथें त्या रक्तांत प्राणवायु मिसळून कर्बाम्लवायु बाहेर पडतो. यानंतर फुप्फुसांतून हें रक्त फुप्फुस-शिरांच्या द्वारा बाहेर पडून डाव्या हृत्कर्णिकेमध्यें जातें. या हृत्कर्णिकेचे एका पडद्याच्या मार्फत तें डाव्या महाहृत्पुटामध्यें जातें. त्या हृत्पुटांतून हें शुद्ध रक्त मुख्य रक्तवाहिनीच्या द्वारा सर्व शरीरांत प्रसरण पावतें. एका बाजूची हृत्कर्णिका व महाहृत्पुट व दुसऱ्या बाजूची हृत्कर्णिका व महाहृत्पुट यांमध्यें एक स्नायूंचा पडदा असतो. त्यामुळें तीं परस्परांपासून विभागलीं असतात.

हृदय हें मजबूत, जाड स्नायूंच्या पेशींचें बनविलेलें असून तें तंतूंची जाळ्यासारखी रचना करून बनविलेलें असतें. मुख्य रक्तवाहिनीपासून अनेक शाखा फुटून त्या हृदयापासून निघालेलें रक्त सर्व शरीरभर पोंचविण्याचें कार्य करतात. या रक्तवाहिन्यांच्या अखेरीस केंसासारख्या सूक्ष्म रक्तपेशी असतात. त्या अगदीं सूक्ष्म नलिकांसारख्या असून त्यांचा शेवट शिरामध्यें होतो. शिरांच्या मार्फत शरीरांतील रक्त पुन्हां हृदयांतील उजव्या हृत्कर्णिकेमध्यें येतें. शिरांतून येणारें रक्त त्यामध्यें कर्बाम्ल वायूचें प्रमाण अधिक असल्यामुळें व प्राणवायूचें कमी असल्यामुळें निळसर रंगाचें असतें. हेंच पुन्हां शुद्ध होऊन डाव्या महाहृत्पुटामधून बाहेर पडतें तेव्हां तें लालभडक असतें. शिरांतील रक्त आपल्यांतील कर्बाम्लाचा अंश टाकून देऊन फुप्फुसामध्यें प्राणवायु ग्रहण करतें. व फुप्फुसाच्या शिरांमध्यें जातें व तेथून हृदयाच्या डाव्या भागांत प्रवेश करतें. व तेथून मुख्य रक्तवाहिनीमध्यें जाऊन पुन्हां शरीरांत सर्वत्र प्रसरण पावतें. (अभिसरण पाहा). ही रुधिराभिसरणाची क्रिया पंपासारखी असते. दोन्ही हृत्कर्णिका एकाच वेळीं आकुंचन व प्रसरण पावतात. त्याप्रमाणें महाहृत्पुटांचें आकुंचन व विस्तरण होतें. आकुंचनाला हृत्संकोच (सिस्टोल) व विस्तरणाला हृद्विकास (डायस्टोल) म्हणतात. प्रत्येक आकुंचनाबरोबर ६ औंस रक्त बाहेर पडतें. हृदयाला होणारे विकार म्हटले म्हणजे हृदावरणदाह, आंत्रावरणदाह, वगैरे होत. हृदयास होणारे सामान्य दोन विकार म्हणजे हृदयशूल (अंजायना पेक्टोरिस) व धडधड (पॅल्पिटेशन) हे होत. हे विकार हृदयांतील कांहीं इंद्रियांत बिघाड झाल्यामुळें होतात. परंतु पुष्कळदां अपचनापासून उद्भवतात. कांहीं भावनावश लोकांमध्यें कांहीं भावनांचा उद्रेक झाल्यामुळेंहि विकार उद्भवतात. हृत्पोषक विषौषधी (डिजिटॅलिस) चा उपयोग हृदयाचें बल वाढविणें, किंवा त्याचें प्रशमन करणें यासाठीं असतो.

नाडी—हृदयाच्या आकुंचनाबरोबर शुद्ध रक्तवाहिन्यांतून रक्त जोरानें वाहिल्यामुळें त्याहि विस्तृत होतात व आकुंचन पावतात. या रक्तवाहिन्या ज्या ठिकाणीं त्वचेच्या जवळ येतात त्या ठिकाणीं त्याचें उडणें आपणांस बाहेरून समजण्यासारखें असतें. या ठिकाणीं त्यांस नाडी असें म्हणतात. नाडीच्या ठोक्यांचा जोर व जलदपणा हृदयाच्या आकुंचनावर अवलंबून असतो. अशा नाडीनीं ठिकाणें मनगटावर अंगठ्याच्या बाजूस, मानेंत, आंखावर, वगैरे जागीं असतात.

वयाप्रमाणें हृदयाच्या आकुंचनाचा म्हणजे नाडीचा तक्ता—

| वय | दर मिनिटास हृदयाचें आकुंचन (नाडी). |
|---|---|
| गर्भाशयांत असतांना | १२०–१६० |
| जन्म झाल्याबरोबर | १३०–१४० |
| पहिल्या वर्षी | ११६–१३० |
| दुसऱ्या वर्षी | १००–११६ |
| तिसऱ्या वर्षी | ९६–१०६ |
| ७–१४ वर्षे पर्यंत | ८०–९० |
| १४–२१ ,, ,, | ७६–८६ |
| २१–६० ,, ,, | ७०–८० |
| ६० वर्षांच्या पुढें | ७६–८६ |

हृदयशूल—(अन्जायना पेक्टोरिस). छातीच्या खालच्या बाजूस एक प्रकारचा जोराचा एकदम दाब पडल्यासारखें वाटून तो दाब हळूहळू छातीच्या सर्व भागांत व बाहूंमध्यें पसरत जाऊन एक प्रकारची श्वास कोंडल्यासारखी मूर्च्छा येऊन प्रत्यक्ष मरण येतें कीं काय अशी भीति उत्पन्न होण्याची अवस्था ज्या रोगामध्यें उत्पन्न होते त्यास म्हणतात. हा रोग सामान्यतः मध्यम वयाच्या पूर्वी होत नाहीं. व स्त्रियांपेक्षां पुरुषांत विशेष आढळतो. कित्येकदां या रोगाच्या पहिल्याच झटक्यांत मृत्यु येतो. परंतु बहुतकरून अनेक झटके येऊन गेल्यानंतर मरण येतें. अमील नायट्राइट या औषधापासून बहुतेक हटकून बरें वाटतें.

हेकाटीयस (ख्रि. पू. ५५०–४७६)—एक ग्रीक इतिहासकार व भूगोलज्ञ. त्यानें ईजिप्त, थ्रेस, ग्रीस, इटली, स्पेन, आफ्रिका इतक्या ठिकाणीं प्रवास केला. त्याचे दोन मोठाले ग्रंथ 'जगाचा प्रवास' व 'इतिहास' किंवा 'वंशावळी' हे आहेत. पण त्याच्या लिखाणापैकीं कांहीं त्रोटक भागच उपलब्ध आहेत.

हेकेल, अर्न्स्ट (१८३४–१९१९)—एक जर्मन सृष्टिशास्त्रज्ञ. वैद्यकी आणि भौतिक शास्त्रें यांचें शिक्षण घेतल्यानंतर तो इटली आणि नॉर्वे या देशांत हिंडून आला. नंतर जेना येथें प्राणिशास्त्राचा प्राध्यापक झाला. डॉर्विनच्या विकाससिद्धान्ताचा हा जर्मनींत मोठा पुरस्कर्ता होता. मानवशास्त्र, मनुष्याच्या विकासाचा इतिहास, उत्पत्तीचा इतिहास, विश्वाचें कोडें, वगैरे त्याचे ग्रंथ आहेत.

हेग—दक्षिण हॉलंड प्रांताचें मुख्य शहर. दक्षिण हॉलंड प्रांताचें सरकार या ठिकाणीं राहत असून निरनिराळीं राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय कारभारमंडळें याच ठिकाणीं आहेत. हेग शहरांतील इमारती व रस्ते फार सुंदर असून रम्य बगीच्यांनीं व वृक्षराजींनीं शहराला शोभा आणिली आहे. या ठिकाणीं बरींच पाहण्याजोगीं वस्तुसंग्रहालयें आहेत. या शहराला शोभा आणणारें सर्वांत मुख्य स्थळ म्हणजे हेग येथील वन होय. या वनांत एक विहारस्थान आहे. तसेंच 'ऑरेंज सलून' म्हणून एक इमारत आहे. तींत १८९९ ची आंतरराष्ट्रीय शांतता परिषद् भरली होती. तेव्हांपासून राष्ट्राराष्ट्रांतील तंट्याचें हें लवादकोर्ट झालें आहे. पांचवा काउंट येथें येऊन राहूं लागल्यापासून व स्टेट्स जनरल सभा येथें भरूं लागल्यापासून हेगला राजकीय महत्त्व आलें. १७ व्या शतकाच्या अखेरीस व १८ व्या शतकाच्या प्रारंभीं हेग हें युरोपियन राजकारणाचें केंद्रस्थान होतें. लांकडी सामान, चिनी मातीचीं व चांदी–सोन्याचीं भांडीं, टोप्या इ. चे कारखाने आहेत. लो. सं. ४,५०,०००.

हेग, डग्लस (१८६१–१९२८)—एक ब्रिटिश योद्धा. त्याचें शिक्षण क्लिफ्टन येथें व ऑक्सफर्ड येथील ब्रेझेनोज कॉलेजमध्यें झालें. १८८५ सालीं त्याला सैन्यांत नोकरी मिळाली. तेथें तो कॅप्टन, मेजर व लेफ्टनंट–कर्नल या हुद्यांवर चढत गेला. १८९८ सालीं तो सुदानमध्यें ईजिप्शियन सैन्यांत कॅप्टन होता. आणि दक्षिण आफ्रिकेंत बोअर युद्धामध्यें डेप्युटी ॲसिस्टंट ॲड्ज्युटंट–जनरल या हुद्यावर तो होता. तें युद्ध संपल्यावर त्यानें हिंदुस्थानांत घोडदळाचा इन्स्पेक्टर जनरल या जागीं १९०३–१९०६ पर्यंत नोकरी केली. नंतर इंग्लंडमध्यें युद्धकचेरींत त्याला लष्करी शिक्षणाचा डायरेक्टर, आणि नंतर स्टाफ ड्यूटीजचा डायरेक्टर नेमण्यांत आलें. १९०९ सालीं त्याला हिंदुस्थानात आर्मी हेड क्वार्टर्स चीफ ऑफ दि स्टाफ नेमण्यांत आलें, व तेथें तो १९१२ पर्यंत होता. पुन्हां इंग्लंडमध्यें तो मुख्य सेनापति झाला. पहिलें महायुद्ध सुरू झाल्यावर तो ब्रिटिश एक्स्पिडिशनरी फोर्सच्या पहिल्या लष्करी तुकडीचा कमांडर झाला. व त्याच सालीं तो जनरलच्या हुद्यावर चढला. आणि १९१५ च्या डिसेंबरमध्ये सर जे. फ्रेंच यानें राजीनामा दिल्यावर हेग आपल्या वयाच्या ५७ व्या वर्षीं फ्रान्समधील ब्रिटिश सैन्याचा मुख्य कमांडर झाला. तें युद्ध संपल्यावर लष्करी नोकरींतून निवृत्त झालेल्या लोकांची योग्य व्यवस्था लागावी म्हणून त्यानें फार परिश्रम केले.

हेगेल, जॉर्ज विल्हेल्म फ्रिडरिश (१७७०–१८३१)—एक जर्मन तत्त्ववेत्ता. १७९३ सालीं त्यानें पीएच्. डी. पदवी मिळविली. कॉलेज सोडल्यानंतर तो बर्न येथें (खाजगी) शिक्षकाचा धंदा करून राहूं लागला. १७९७ सालीं तो फ्रांकफुर्ट येथें गेला. त्यानें अर्थशास्त्र व राजकारण यांचा अभ्यास सुरू केला आणि दोन निबंध लिहून त्यांत त्यानें परदेशांतील राजकीय सुधारणाचा पुरस्कार करून, भावी जर्मन साम्राज्याचें कल्पनाचित्र रेखाटलें. १८०२ पासून त्यानें तर्कशास्त्र, अध्यात्मशास्त्र, गणित, इ. विषयांवर आपलीं व्याख्यानें सुरू केलीं. १८०८ ते १८१६ पर्यंत नुरेंबर्ग येथें त्यानें रेक्टरच्या जागेवर काम केलें; व नीतिशास्त्र, मानसशास्त्र, तर्कशास्त्र, यांवर शालोपयोगी पुस्तकें लिहिलीं. त्याचा थोरला मुलगा कार्ल हा पुढें प्रसिद्ध इतिहासकार झाला. १८१६–१८१८ पर्यंत तो हीडेलबर्ग येथें व नंतर अखेरपर्यंत बर्लिन येथें प्रोफेसर होता. १८२४ पासून ललितकलांकडे हेगेलचें विशेष लक्ष गेलें व प्रसिद्ध चित्रें व नाटकें पाहण्याकरितां त्यानें इटली, फ्रान्स वगैरे देशांत प्रवास केला व त्यामुळें त्याचीं सौंदर्यविज्ञान-शास्त्रावरील व्याख्यानें फार सरस वठूं लागलीं. अखेर हेगेल-मत म्हणून स्वतंत्र पंथ स्थापित झाला. तिसऱ्या फ्रेडरिक विल्यमनें त्याचा मोठा गौरव केला. ध्येयवादाचा तो मोठा पुरस्कर्ता होता. जगांतील वस्तूचा नुसता बुद्धीशीं संबंध आहे, एवढेंच नव्हे तर त्या बुद्धीचेंच तें प्रकटीकरण किंवा प्रत्यक्ष दर्शन म्हणतां येईल. भौतिक किंवा जड असें जग नाहींच. द्रव्य

हें चित्‌चा एक भाग किंवा अवतार आहे. ईश्वर म्हणजे केवलाचाच आत्मविस्तार होय; यासारखीं त्याचीं तात्त्विक मतें होतीं व तीं इंग्रज तत्त्वज्ञान्यांनीं उचललीं आहेत.

**हेजाझ**—हें अरबस्तानांत एक स्वतंत्र राज्य असून त्याच्या उत्तरेस सिरिया व पूर्वेस अरबस्तानांतील वाळूचें मैदान आहे. त्याचें क्षेत्रफळ १,७०,००० चौरस मैल व लोकसंख्या ९ लक्ष आहे. हा बहुतेक प्रदेश नापीक आहे. फक्त दक्षिण भागांत गहूं, बार्ली व खजूर होतो. खजूर हेंच येथील मुख्य पीक असून तें सर्व तेथल्याच लोकांना लागतें. येथून चामडीं, लोकर आणि डिंक हा माल परदेशीं जातो. या राज्यांत इस्लामधर्मीयांचीं पवित्र स्थळें मक्का व मदिना हीं असल्यामुळें या प्रदेशाला फार महत्त्व आहे. या राज्याची राजधानी मक्का व उन्हाळ्यांतील राजधानी तैफा असून जिद्दा हें मुख्य बंदर आहे. हेजाझ रेल्वेनें आलेप्पो व दमास्कस मदिनाला जोडण्यांत आलें आहे. त्यामुळें तुर्कांना या सर्व प्रदेशांत सैन्य ठेवतां येतें. मक्केचा अमीर उर्फ ग्रँड शेरीफ याचें वजन सर्व मुस्लिम प्रदेशांवर आहे. पहिलें महायुद्ध सुरू झाल्यावर तुर्क लोक जर्मनीला मिळाले. म्हणून ब्रिटननें मक्केचा शेरीफ हुसेन इब्न अली याला स्वतंत्र राजा मान्य करण्याचें कबूल करून १९१६ सालीं त्याच्या देशाचें स्वातंत्र्य मान्य केलें, आणि त्याला हेजाझचा राजा असें जाहीर करण्यांत आलें. लासेनच्या तहानें या राज्याचें स्वातंत्र्य मान्य करण्यांत आलें. पुष्कळ वर्षें ब्रिटननें हुसेनला मासिक तनखाहि दिला. नंतर तो बंद केला. १९२४ सालीं वाहाबी लोकांनीं या राज्यावर स्वारी केली आणि हुसेनला संरक्षण करितां येईना म्हणून त्यानें राजपद सोडलें, व त्याचा मुलगा अमीर झाला. तथापि वाहाबी लोकांनीं त्यालाहि राजपद सोडून बगदादला पळून जाणें भाग पाडलें, आणि वाहाबी लोकांचा पुढारी इब्न साऊद या देशाचा राजा झाला. (इब्न साऊद पाहा)

**हेंझाडा**—खालच्या ब्रह्मदेशामध्यें इरावती भागांत हा जिल्हा आहे. क्षे. फ. २,८४३ चौ. मै.. या जिल्ह्यांतील सरोवरें म्हणजे न्यीची, दुया व इग्येट हीं होत. या जिल्ह्यांतील जमीन बहुतेक पुळणीच्या थरांनीं बनलेली आहे. येथें हिंवाळा सौम्य असून थोडे दिवस राहतो. पण त्या मानानें उन्हाळा तितका कडक नसतो. पाऊस पुष्कळ पडतो.

हेंझाडा किंवा हिंथाडा हें नांव ब्राह्मणी राजहंसाला ब्रह्मी भाषेंत जें हिंथा नांव आहे त्यापासून आलेलें आहे. हा भाग पूर्वी पेगू राजाच्या तॅलंग राज्याचा भाग होता व तो १७५५ सालीं आलोंपऱ्या यानें आपल्या मुलखास जोडला. दुसऱ्या ब्रह्मी युद्धांत ब्रह्मी लोकांना हा मुलूख सोडून द्यावा लागला व या भागावर तेव्हांपासून इंग्रजांची सत्ता स्थापित झाली. लो. सं. ६,१३,०००, या जिल्ह्यांत ५ शहरें व ६२९ खेडीं आहेत. येथचे ब्रह्मी (सुमारें ४॥ लक्ष) व त्या खालोखाल करेन (सु. ५०,०००) लोकसंख्येंत भरतात. बहुतेक लोकांचा धर्म बौद्ध आहे. अन्यधर्मीय म्हणजे मुसलमान व हिंदू हे होत. या जिल्ह्यांत शेतकीवर उपजीविका करणारे लोक शें. ७० आहेत.

येथील मुख्य पीक म्हणजे तांदूळ होय. या जिल्ह्यांतील निर्गत माल म्हणजे तांदूळ, विड्याचीं पानें, केळीं, कांत व कानडीं हा होय. मुख्य आयात माल म्हणजे सुती व रेशमी कापड, छत्र्या, चिनी मातीचीं भांडीं व इतर युरोपियन माल हे जिन्नस होत. या जिल्ह्यांतून इरावती नदी वाहत आहे व ती दळणवळण व व्यापार यांस फारच सोयीची आहे. मुख्य शहर हेंझाडा असून तेथें व्यापार मोठा आहे.

**हेडगेवार, डॉ. केशव बळिराम** (१८८९–१९४०)—'राष्ट्रीय स्वयंसेवक संघ' याचे संस्थापक. यांचा जन्म नागपूर येथील एका जुन्या वैदिक घराण्यांत झाला. यांची वृत्ति लहानपणापासून राष्ट्रीय होती. १९१४ मध्यें वैद्यकीची पदवी घेतल्यापासून तो धंदा न करतां यांनीं निरनिराळ्या राष्ट्रीय प्रश्नांकडे लक्ष देण्यास सुरवात केली. १९२५ मध्यें त्यांस असें आढळून आलें कीं, या

प्राचीन हिंदु राष्ट्रामध्यें जर नवचैतन्य उत्पन्न करावयाचें असेल तर सर्व हिंदूंची एक जबरदस्त संघटना होणें अवश्य आहे. याकरितां त्यांनीं 'राष्ट्रीय स्वयंसेवक संघा' ची स्थापना केली. तेव्हांपासून त्यांनीं आपलें सर्व आयुष्य या संघाच्या सर्व हिंदुस्थानभर शाखा स्थापन करण्याच्या कार्यांत घालविलें. मध्यंतरीं राष्ट्रीय चळवळींत त्यांस तुरुंगवासाची शिक्षाहि झाली होती. त्यांनीं सत्याग्रहामध्येंहि भाग घेतला होता. यांच्या नेतृत्वाखालीं संघाचें कार्य पद्धतशीर सुरू होऊन त्याची एकदां जी घडी बसली ती अद्यापि तशीच आहे. (राष्ट्रीय स्वयंसेवक संघ पाहा).

**हेंडरसन, अर्थर** (१८६३–१९३५)—ब्रिटनच्या एक मजूर पक्षाचा पुढारी. तो १९०३ सालीं पार्लमेंटचा सभासद झाला. तो पार्लमेंटरी मजूर पक्षाचा अध्यक्ष १९०८-१९१० व १९१४-१९१७ या काळांत होता, व १९११ सालीं चिटणीस नेमला गेला. तो शिक्षणखात्याचा अध्यक्ष (संमिश्र सरकारांत, १९१५), मुख्य

हृदयशूल—(अन्जायना पेक्टोरिस). छातीच्या खालच्या बाजूस एक प्रकारचा जोराचा एकदम दाब पडल्यासारखें वाटून तो दाब हळूहळू छातीच्या सर्व भागांत व बाहूंमध्यें पसरत जाऊन एक प्रकारची श्वास कोंडल्यासारखी मूर्च्छा येऊन प्रत्यक्ष मरण येतें कीं काय अशी भीति उत्पन्न होण्याची अवस्था ज्या रोगामध्यें उत्पन्न होते त्यास म्हणतात. हा रोग सामान्यतः मध्यम वयाच्या पूर्वी होत नाहीं. व स्त्रियांपेक्षां पुरुषांत विशेष आढळतो. कित्येकदां या रोगाच्या पहिल्याच झटक्यांत मृत्यु येतो. परंतु बहुतकरून अनेक झटके येऊन गेल्यानंतर मरण येतें. अमील नायट्राइट या औषधापासून बहुतेक इटकून वरें वाटतें.

हेकाटीयस (खि. पू. ५५०–४७६)—एक ग्रीक इतिहासकार व भूगोलज्ञ. त्यानें ईजिप्त, थ्रेस, ग्रीस, इटली, स्पेन, आफ्रिका इतक्या ठिकाणीं प्रवास केला. त्याचे दोन मोठाले ग्रंथ 'जगाचा प्रवास' व 'इतिहास' किंवा 'वंशावळी' हे आहेत. पण त्याच्या लिखाणापैकीं कांहीं त्रोटक भागच उपलब्ध आहेत.

हेकेल, अर्न्स्ट (१८३४–१९१९)—एक जर्मन सृष्टिशास्त्रज्ञ. वैद्यकी आणि भौतिक शास्त्रें यांचें शिक्षण घेतल्यानंतर तो इटली आणि नॉर्वे या देशांत हिंडून आला. नंतर जेना येथें प्राणिशास्त्राचा प्राध्यापक झाला. डॉर्विनच्या विकाससिद्धान्ताचा हा जर्मनींत मोठा पुरस्कर्ता होता. मानवशास्त्र, मनुष्याच्या विकासाचा इतिहास, उत्पत्तीचा इतिहास, विश्वाचें कोडें, वगैरे त्याचे ग्रंथ आहेत.

हेग—दक्षिण हॉलंट प्रांताचें मुख्य शहर. दक्षिण हॉलंड प्रांताचें सरकार या ठिकाणीं राहत असून निरनिराळीं राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय कारभारमंडळें याच ठिकाणीं आहेत. हेग शहरांतील इमारती व रस्ते फार सुंदर असून रम्य बगीच्यांनीं व वृक्षराजींनीं शहराला शोभा आणिली आहे. या ठिकाणीं बरींच पाहण्याजोगीं वस्तुसंग्रहालयें आहेत. या शहराला शोभा आणणारें सर्वांत मुख्य स्थळ म्हणजे हेग येथील वन होय. या वनांत एक विहारस्थान आहे. तसेंच 'ऑरेंज सल्लून' म्हणून एक इमारत आहे. तींत १८९९ ची आंतरराष्ट्रीय शांतता परिषद भरली होती. तेव्हांपासून राष्ट्राराष्ट्रांतील तंट्याचें हें लवादकोर्ट झालें आहे. पांचवा काउंट येथें येऊन राहूं लागल्यापासून व स्टेट्स जनरल सभा येथें भरूं लागल्यापासून हेगला राजकीय महत्त्व आलें. १७ व्या शतकाच्या अखेरीस व १८ व्या शतकाच्या प्रारंभीं हेग हें युरोपियन राजकारणाचें केंद्रस्थान होतें. लांकडी सामान, चिनी मातीचीं व चांदी–सोन्याचीं भांडीं, टोप्या इ. चे कारखाने आहेत. लो. सं. ४,५०,०००.

हेग, डग्लस (१८६१–१९२८)—एक ब्रिटिश योद्धा. त्याचें शिक्षण क्लिफ्टन येथें व ऑक्सफर्ड येथील ब्रेझेनोज कॉलेजमध्यें झालें. १८८५ सालीं त्याला सैन्यांत नोकरी मिळाली. तेथें तो कॅप्टन, मेजर व लेफ्टनंट–कर्नल या हुद्यांवर चढत गेला. १८९८ सालीं तो सुदानमध्यें ईजिप्शियन सैन्यांत कॅप्टन होता. आणि दक्षिण आफ्रिकेंत बोअर युद्धामध्यें डेप्युटी ॲसिस्टंट ॲडज्यूटंट–जनरल या हुद्यावर तो होता. तें युद्ध संपल्यावर त्यानें हिंदुस्थानांत घोडदळाचा इन्स्पेक्टर जनरल या जागीं १९०३–१९०६ पर्यंत नोकरी केली. नंतर इंग्लंडमध्यें युद्धकचेरींत त्याला लष्करी शिक्षणाचा डायरेक्टर, आणि नंतर स्टाफ ड्यूटीजचा डायरेक्टर नेमण्यांत आलें. १९०९ सालीं त्याला हिंदुस्थानात आर्मी हेड क्वार्टर्स चीफ ऑफ दि स्टाफ नेमण्यांत आलें, व तेथें तो १९१२ पर्यंत होता. पुन्हां इंग्लंडमध्यें तो मुख्य सेनापति झाला. पहिलें महायुद्ध सुरू झाल्यावर तो ब्रिटिश एक्स्पिडिशनरी फोर्सच्या पहिल्या लष्करी तुकडीचा कमांडर झाला. व त्याच सालीं तो जनरलच्या हुद्यावर चढला. आणि १९१५ च्या डिसेंबरमध्यें सर जे. फ्रेंच यानें राजीनामा दिल्यावर हेग आपल्या वयाच्या ५७ व्या वर्षी फ्रान्समधील ब्रिटिश सैन्याचा मुख्य कमांडर झाला. तें युद्ध संपल्यावर लष्करी नोकरींतून निवृत्त झालेल्या लोकांची योग्य व्यवस्था लागावी म्हणून त्यानें फार परिश्रम केले.

हेगेल, जॉर्ज विल्हेल्म फ्रिडरिश (१७७०–१८३१)—एक जर्मन तत्त्ववेत्ता. १७९३ सालीं त्यानें पीएच्. डी. पदवी मिळविली. कॉलेज सोडल्यानंतर तो बर्न येथें (खाजगी) शिक्षकाचा धंदा करून राहूं लागला. १७९७ सालीं तो फ्रांकफुर्ट येथें गेला. त्यानें अर्थशास्त्र व राजकारण यांचा अभ्यास सुरू केला आणि दोन निबंध लिहून त्यांत त्यानें परदेशांतील राजकीय सुधारणाचा पुरस्कार करून, भावी जर्मन साम्राज्याचें कल्पनाचित्र रेखाटलें. १८०२ पासून त्यानें तर्कशास्त्र, अध्यात्मशास्त्र, गणित, इ. विषयांवर आपलीं व्याख्यानें सुरू केलीं. १८०८ ते १८१६ पर्यंत नुरेंबर्ग येथें त्यानें रेक्टरच्या जागेवर काम केलें; व नीतिशास्त्र, मानसशास्त्र, तर्कशास्त्र, यांवर शालोपयोगी पुस्तकें लिहिलीं. त्याचा थोरला मुलगा कार्ल हा पुढें प्रसिद्ध इतिहासकार झाला. १८१६–१८१८ पर्यंत तो हीडेलबर्ग येथें व नंतर अखेरपर्यंत बर्लिन येथें प्रोफेसर होता. १८२४ पासून ललितकलांकडे हेगेलचें विशेष लक्ष गेलें व प्रसिद्ध चित्रें व नाटकें पाहण्याकरितां त्यानें इटली, फ्रान्स वगैरे देशांत प्रवास केला व त्यामुळें त्याचीं सौंदर्यविज्ञान-शास्त्रावरील व्याख्यानें फार सरस वटूं लागलीं. अखेर हेगेल-मत म्हणून स्वतंत्र पंथ स्थापित झाला. तिसऱ्या फ्रेडरिक विल्यमनें त्याचा मोठा गौरव केला. ध्येयवादाचा तो मोठा पुरस्कर्ता होता. जगांतील वस्तूंचा नुसता बुद्धीशीं संबंध आहे, एवढेंच नव्हे तर त्या बुद्धीचेंच तें प्रकटीकरण किंवा प्रत्यक्ष दर्शन म्हणतां येईल. भौतिक किंवा जड असें जग नाहींच. द्रव्य

हें चित्‌चा एक भाग किंवा अवतार आहे. ईश्वर म्हणजे केवलाचाच आत्मविस्तार होय; यासारखीं त्याचीं तात्त्विक मतें होतीं व तीं इंग्रज तत्त्वशास्त्र्यांनीं उचललीं आहेत.

**हेजाझ**—हें अरबस्तानांत एक स्वतंत्र राज्य असून त्याच्या उत्तरेस सिरिया व पूर्वेस अरबस्तानांतील वाळूचें मैदान आहे. त्याचें क्षेत्रफळ १,७०,००० चौरस मैल व लोकसंख्या ९ लक्ष आहे. हा बहुतेक प्रदेश नापीक आहे. फक्त दक्षिण भागांत गहूं, बार्ली व खजूर होतो. खजूर हेंच येथील मुख्य पीक असून तें सर्व तेथल्याच लोकांना लागतें. येथून चामडीं, लोकर आणि डिंक हा माल परदेशीं जातो. या राज्यांत इस्लामधर्माचीं पवित्र स्थळें मक्का व मदिना हीं असल्यामुळें या प्रदेशाला फार महत्त्व आहे. या राज्याची राजधानी मक्का व उन्हाळ्यांतील राजधानी तैफा असून जिद्दा हें मुख्य बंदर आहे. हेजाझ रेल्वेनें आलेप्पो व दमास्कस मदिनाला जोडण्यांत आलें आहे. त्यामुळें तुर्कांना या सर्व प्रदेशांत सैन्य ठेवतां येतें. मक्केचा अमीर उर्फ ग्रँड शेरीफ याचें वजन सर्व मुस्लिम प्रदेशांवर आहे. पहिलें महायुद्ध सुरू झाल्यावर तुर्क लोक जर्मनीला मिळाले. म्हणून ब्रिटननें मक्केचा शेरीफ हुसेन इब्न अली याला स्वतंत्र राजा मान्य करण्याचें कबूल करून १९१६ सालीं त्याच्या देशाचें स्वातंत्र्य मान्य केलें, आणि त्याला हेजाझचा राजा असें जाहीर करण्यांत आलें. लासेनच्या तहानें या राज्याचें स्वातंत्र्य मान्य करण्यांत आलें. पुष्कळ वर्षे ब्रिटननें हुसेनला मासिक तनखाहि दिला. नंतर तो बंद केला. १९२४ सालीं वाहाबी लोकांनीं या राज्यावर स्वारी केली आणि हुसेनला संरक्षण करितां येईना म्हणून त्यानें राजपद सोडलें, व त्याचा मुलगा अमीर झाला. तथापि वाहाबी लोकांनीं त्यालाहि राजपद सोडून बगदादला पळून जाणें भाग पाडलें, आणि वाहाबी लोकांचा पुढारी इब्न साऊद या देशाचा राजा झाला. ( इब्न साऊद पाहा )

**हेंझाडा**—खालच्या ब्रह्मदेशामध्यें इरावती भागांत हा जिल्हा आहे. क्षे. फ. २,८४३ चौ. मै.. या जिल्ह्यांतील सरोवरें म्हणजे न्यीची, दुथा व इम्येट हीं होत. या जिल्ह्यांतील जमीन बहुतेक पुळणीच्या थरांनीं बनलेली आहे. येथें हिंवाळा सौम्य असून थोडे दिवस राहतो. पण त्या मानानें उन्हाळा तितका कडक नसतो. पाऊस पुष्कळ पडतो.

हेंझाडा किंवा हिंथाडा हें नांव ब्राह्मणी राजहंसाला ब्रह्मी भाषेंत जें जेंहिया नांव आहे त्यापासून आलेलें आहे. हा भाग पूर्वी पेगू राजाच्या तेंग राज्याचा भाग होता व तो १७५५ सालीं आलंगप्र्या यानें आपल्या मुलुखास जोडला. दुसऱ्या ब्रह्मी युद्धांत ब्रह्मी लोकांना हा मुलुख सोडून द्यावा लागला व या भागावर तेव्हांपासून इंग्रजांची सत्ता स्थापित झाली. लो. सं. ६,१३,०००. या जिल्ह्यांत ५ शहरें व ६२९ खेडीं आहेत. बरेचसे ब्रह्मी ( सुमारें ४॥ लक्ष ) व त्या खालोखाल करेण ( सु. ५०,००० ) लोकसंख्येंत भरतात. बहुतेक लोकांचा धर्म बौद्ध आहे. अन्यधर्मीय म्हणजे मुसलमान व हिंदू हे होत. या जिल्ह्यांत शेतकीवर उपजीविका करणारे लोक शें. ७० आहेत.

येथील मुख्य पीक म्हणजे तांदूळ होय. या जिल्ह्यांतील निर्गत माल म्हणजे तांदूळ, विड्याचीं पानें, केळीं, ऊंस व कातडीं हा होय. मुख्य आयात माल म्हणजे सुती व रेशमी कापड, छत्र्या, चिनी मातीचीं भांडीं व इतर युरोपियन माल हे जिन्नस होत. या जिल्ह्यांतून इरावती नदी वाहत आहे व ती दळणवळण व व्यापार यांस फारच सोयीची आहे. मुख्य शहर हेंझाडा असून तेथें व्यापार मोठा आहे.

**हेडगेवार, डॉ. केशव बळिराम** ( १८९०–१९४० )—'राष्ट्रीय स्वयंसेवक संघ' याचे संस्थापक. यांचा जन्म नागपूर येथील एका जुन्या वैदिक घराण्यांत झाला. यांची वृत्ति लहानपणापासून राष्ट्रीय होती. १९१४ मध्यें वैद्यकीची पदवी घेतल्यापासून तो धंदा न करतां यांनीं निरनिराळ्या राष्ट्रीय प्रश्नांकडे लक्ष देण्यास सुरवात केली. १९२५ मध्यें त्यांस असें आढळून आलें कीं, या

प्राचीन हिंदु राष्ट्रामध्यें जर नवचैतन्य उत्पन्न करावयाचें असेल तर सर्व हिंदूंची एक जबरदस्त संघटना होणें अवश्य आहे. याकरितां त्यांनीं 'राष्ट्रीय स्वयंसेवक संघा' ची स्थापना केली. तेव्हांपासून त्यांनीं आपलें सर्व आयुष्य या संघाच्या सर्व हिंदुस्थानभर शाखा स्थापन करण्याच्या कार्यांत घालविलें. मध्यंतरीं राष्ट्रीय चळवळींत त्यांस तुरुंगवासाची शिक्षाहि झाली होती. त्यांनीं सत्याग्रहामध्येंहि भाग घेतला होता. यांच्या नेतृत्वाखालीं संघाचें कार्य पद्धतशीर सुरू होऊन त्याची एकदां जी घडी बसली ती अद्यापि तशीच आहे. ( राष्ट्रीय स्वयंसेवक संघ पाहा ).

**हेंडरसन, अर्थर** ( १८६३–१९३५ )—ब्रिटनच्या एक मजूर पक्षाचा पुढारी. तो १९०३ सालीं पार्लमेंटचा सभासद झाला. तो पार्लमेंटरी मजूर पक्षाचा अध्यक्ष १९०८–१९१० व १९१४–१९१७ या काळांत होता, व १९११ सालीं ब्रिटनीन ... शिक्षणखात्याचा अध्यक्ष ( मंत्रिमंडळ सरकारांत, १९

पगारकामगार व सरकारी मजूर प्रश्नांसंबंधींचा सल्लागार (१९१६), खात्याविना मंत्री (लॉइड जॉर्जचें युद्धमंडळ; १९१७ सालीं राजीनामा), आणि गृहखात्याचा चिटणीस (मजूर सरकारांत, १९२४) होता. रशियाला १९१७ सालीं गेलेल्या सरकारी शिष्टमंडळाबरोबर तो होता. जागतिक निःशस्त्रीकरण परिषदेचा तो १९३२–३५ पर्यंत अध्यक्ष असून त्याच्या शांतता आणि निःशस्त्रीकरण या बाबतच्या कामगिरीबद्दल त्याला कार्नेजी संस्थेचें २,२०० पौंडांचें बक्षीस व नोबेल पारितोषिक मिळालें.

**हेडिन, डॉ. स्वेन ॲन्डर्स** (१८६५– )—एक स्वीडीश प्रवासी व भूप्रदेश-संशोधक. त्यानें राजा ऑस्कार याच्या मदतीनें १८९३ सालीं मध्य व पूर्व आशियांत संशोधनार्थ अनेक वेळां प्रवास केला. त्यांत पामीर-पठार, लॉपनॉर सरोवराच्या भोंवतालचा प्रदेश व उत्तर तिबेट यांत प्रवास करून व त्यांत अनेक आपत्ती सोसून शेवटीं तो पेकिंगला पोंचला. आणि नंतर उत्तर चीन व सायबेरिया यामधून प्रवास करीत करीत युरोपला परत आला (१८९७). १८९९ सालीं याच प्रदेशांत त्यानें पुन्हां प्रवास करून लॉपनॉर प्रदेश व त्याच्या भोंवतालचीं वाळुकामय मैदानें यांची माहिती मिळवून यात्रेकरूंच्या वेषानें ल्हासा येथें जाण्याचा प्रयत्न केला, परंतु तिबेटी लोकांनीं त्याला परत फिरविलें. १९०८ सालीं त्यानें हिमालयाच्या उत्तर भागांत महत्त्वाचे शोध लावले, व हिमालयपार पर्वतराजी शोधून काढली. मानस सरोवर व गंगा-ब्रह्मपुत्रादि नद्यांचीं उगमस्थानें त्यानें पाहिलीं. त्यानें आपले हे प्रवास-वर्णन करणारे अनेक ग्रंथ लिहिले. व त्यांपैकीं कांहींचें कित्येक भाषांत भाषांतर झालेलें आहे. आशिया, तिबेट वगैरेवरचे त्याचे प्रवास-ग्रंथ आहेत. आपलें संशोधकीय जीवनहि त्यानें एका ग्रंथांत रेखाटलें आहे.

**हेत्वाभासवादी**—(सोफिस्ट). हा तत्त्ववेत्त्यांचा पंथ प्राचीन ग्रीस देशात क्रि. पू. ५ व्या शतकांत उदयास आला. या पंथाचे कांहीं तत्त्ववेत्ते उत्तम वक्ते, कांहीं उत्तम व्याकरणकार, आणि इतर मोठे शास्त्रज्ञ होते. या पंथाचा अगदीं आरंभींचा व एक अत्यंत महत्त्वाचा तत्त्ववेत्ता आबडेरा येथील प्रोटॅगोरस हा होय. त्यानें हेराक्लिटसचा सर्व बाह्य वस्तूंबद्दलचा सार्वत्रिक विप्लववाद (युनिव्हर्सल फ्लक्स) मानवी मनालाहि लागू करून असें प्रतिपादन केलें कीं, देवतांचें अस्तित्व अनिश्चित आहे, आणि सर्व सत्य गोष्टी सापेक्षतया खऱ्या आहेत. नंतरचा सोफिस्ट जॉर्जियस हा क्रि. पू. ४२७ सालीं अथेन्स शहरांत आला, आणि त्यानें संशयवादाच्या बाबतींत प्रोटॅगोरसपेक्षांहि अधिक जोराचा पुरस्कार केला. आणखी विद्वान् सोफिस्ट हिपियस, थ्रेसीमेकस, क्रिटियस आणि प्रोडिकस हे होत. हिपियसनें असें प्रतिपादिलें कीं, मनुष्याच्या नैसर्गिक प्रवृत्तींना विरोध करणारे कायदे करून त्याप्रमाणें माणसाना वागावयास लावणें हा निव्वळ जुलूम आहे. क्रिटियस हा तीस 'टायरंट'पैकीं एक होता, व तो असें म्हणत असे कीं, देवतांवर विश्वास ठेवण्यास सांगणें ही राजकारणी पुढाऱ्यांची प्रजेला झुलवण्याची एक युक्ति आहे.

**हेद**—साहेडा; सांगसांदडा. याचें झाड मोठें होतें. पानें वाटोळीं व टोंकदार असतात. लांकूड इमारतीच्या उपयोगी आहे. यावर लाखी रंग चांगला बसतो. पाल्याचा रस औषधी आहे. त्यानें धुलाच होतात. नारुवर तुवऱ्या लावतात.

**हेन्री, ओ** (१८६२–१९१०)—एक अमेरिकन लघुकथालेखक. याचें वास्तविक नांव विल्यम सिडने पोर्टर असें असून ओ हेन्री हें नांव त्यानें टोपण नांव म्हणून घेतलें होतें. प्रथमतः तो टेक्सस संस्थानांत एका बँकेमध्यें नोकरी करीत असून हाउस्टन येथील एका वर्तमानपत्राचा संपादक होता. १८९६ मध्यें शिलकींत कांहीं तूट आल्यामुळें त्याजवर खटला होऊन त्यास शिक्षा झाली. कैदेंत असतांनाच त्यानें लेखनास सुरुवात केली. कैदेंतून सुटून आल्यावर त्यानें कांहीं दिवस हाँडुरासमध्यें केळ्यांची लागवड करून पाहिली व अखेरीस टेक्सस संस्थानांत परत येऊन त्यानें एका औषधाच्या दुकानांत नोकरी धरली. १९०१ मध्यें तो न्यू यॉर्क येथें गेला. तेथें त्याची लघुकथालेखक म्हणून फार प्रसिद्धी झाली. त्यानें आपल्या लघुकथांत न्यू यॉर्क शहरांतील व पश्चिम अमेरिकेंतील लोकांचा आयुष्यक्रम चित्रित केला आहे. एका लघुकथेंत त्यानें हाँडुरासमधील आयुष्यक्रम वर्णिला आहे. याच्या लघुकथांचें वैशिष्ट्य म्हणजे अकल्पित शेवट अथवा कलाटणी हें असून त्याचें अनुकरण अनेक लेखकांनीं केलें आहे.

**हेन्री राजे**—या नांवाचे सात जर्मन बादशहा, चार फ्रान्सचे राजे व आठ इंग्लंडचे राजे होऊन गेले. जर्मनीच्या पहिल्या (सु. ८७६–९३६) हेन्रीनें जर्मन साम्राज्याचा पाया घातला. त्याचा पणतू दुसरा हेन्री (९७२–१०२४) हा फार पराक्रमी असून त्याला 'संत' (सेंट) अशी पदवी होती. तिसरा हेन्री (१०१७–१०५५) देखील मोठा शूर असून त्यानें पोपना देखील नमावयास लाविलें होतें. याचा मुलगा चौथा हेन्री (१०५०–११०६) याचें पोपशीं फार वितुष्ट आलें व शेवटीं मुलानेंच याला पदच्युत केलें. या मुलाचें, पांचव्या (१०८१–११२५) हेन्रीचेंहि पोपशीं भांडण झालें. याची बायको मॅटिल्डा ही इंग्लंडच्या पहिल्या राजाची मुलगी होय. सहावा हेन्री (११६६–११९७) विशेष प्रसिद्ध नाहीं. सातवा हेन्री (१२६२–

१३१३ ) हा १३०८ मध्यें बादशहा निवडला गेला. यानें रोमचा बादशाहा म्हणून अभिषेक करून घेतला.

फ्रान्सचा दुसरा हेन्री (१५१९–१५५९) हा डायाना नांवाच्या आपल्या रखेलीच्या कह्यांत असे. राज्यहि तीच चालवी. इंग्लंड आणि पोप यांच्याशीं याचें वितुष्ट आलें होतें. तिसऱ्या (१५५१–१५८९) हेन्रीच्या कारकीर्दींत धर्मासंबंधीं यादवी युद्धें झालीं व त्यांत त्याचा खून पडला. चवथा हेन्री (१५५३–१६१०) हा प्रॉटेस्टंटपंथी असून धर्मयुद्धांतला पुढारी होता. गादीवर बसल्यानंतर तो कॅथॉलिक बनला व या धर्मांतरानें राज्यकारभार नीट करणें सुलभ झालें. पण यानें प्रॉटेस्टंट लोकांना धर्मस्वातंत्र्य दिल्यामुळें एका धर्मवेड्यानें याचा खून केला.

इंग्लंडचा पहिला हेन्री (१०६८–११३५) हा विल्यम दि कॉंकररचा धाकटा मुलगा इ. स. ११०० त गादीवर आला. याचा थोरला भाऊ रॉबर्ट धर्मयुद्ध (क्रुसेड) संपवून परत आला तेव्हां गादीविषयीं भांडणें सुरू झालीं. हेन्रीनें रॉबर्टला तुरुंगांत डांबून टाकलें पण राज्यकारभार चांगला हांकला. दुसऱ्या (११३३–११८९) हेन्रीचा थॉमस बेकेट या धर्माचार्याशीं तंटा होऊन बेकेट मारला गेला. यानें आयर्लंड जिंकून घेतलें व राज्यांत चांगले कायदे केले. इंग्लंडच्या थोर राजांपैकीं हा गणला जातो. तिसऱ्या (१२०७–१२७२) हेन्रीबद्दल लोकांत फार असंतोष होता. तो परकीयांना जवळ करी. शेवटीं सरदारांनीं बंड करून त्याला कैद केला. याच वेळीं राज्यकारभाराचे कांहीं अधिकार लोकांना मिळाले व पहिली पार्लमेंटची सभा १२६५ त घेण्यांत आली. चौथा हेन्री (१३६६–१४१३) हा लँकेस्टर घराण्यांतील पहिला राजा होय. याला १३९९ त गादी मिळाली. याची निवड पार्लमेंटनें केली होती. याच्या कारकीर्दींत अनेक बंड उद्भवलीं. याचा मुलगा पांचवा हेन्री (१३८७–१४२२) यानें गादीवर आल्यानंतर फ्रेंच गादीवर हक्क प्रस्थापित करण्यासाठीं फ्रान्सशीं युद्ध आरंभलें. कॅथेराइन राजकन्येशीं लग्न लावून त्यावेळच्या फ्रेंच राजानंतर आपला वारसा कबूल करून घेतला. पण हा लवकरच वारला. याचा मुलगा सहावा हेन्री (१४२१–१४७१) या वेळीं सारा नऊ महिन्यांचा होता. तेव्हां त्याचा चुलता राज्यकारभार पाहूं लागला. लवकरच हेन्रीचा फ्रेंच राजा वारल्यामुळें फ्रान्सची गादीहि वारसाहक्कानें मिळावयाची होती; पण फ्रेंच लोकांनीं इंग्लंडविरुद्ध पुन्हां युद्ध पुकारलें. याच वेळीं जोन ऑफ आर्क ही वीरस्त्री पुढें आली. युद्धानंतर कॅले वगळून इंग्लंडला फ्रान्समधील सर्व प्रदेश सोडावे लागले. नंतर या दुर्दैवी राजाला वेडहि लागलें व देशांत यादवी सुरू झाली व शेवटीं राजाला गादीला मुकावें लागलें. नंतर राजाचा मृत्यु (किंवा खून) झाला.

आठवा हेन्री

ट्यूडर घराण्याचा पहिला राजा सातवा हेन्री (१४५६–१५०९) यानें फ्रान्समधून येऊन इंग्लंडच्या तिसऱ्या रिचर्ड राजाशीं युद्ध केलें व गादी मिळविली. याच्याहि अमदानींत अनेक बंडें झालीं. यानें स्कॉटलंडच्या चौथ्या जेम्स राजाच्या मुलीशीं लग्न लावून त्या देशाच्या गादीवर वारसा करून ठेवला. याचा मुलगा आठवा हेन्री (१४९१–१५४७) हा फार कुप्रसिद्ध राजा होऊन गेला. पोपशीं त्याचें भांडण व त्याचा इंग्लंडवर धर्मांतराचा परिणाम, त्यानें केलेलीं अनेक लग्नें व घटस्फोट यांमुळें त्याची कारकीर्द फार खळबळीची झाली.

**हेबर, रेजिनाल्ड** (१७८३–१८२६)—एक धार्मिक गीतें लिहिणारा इंग्रज बिशप. त्याला १८२३ सालीं कलकत्त्याचा बिशप नेमण्यांत आलें व तो त्या जागीं मरेपर्यंत होता. व तेथें रक्तजमूर्च्छाविकारा( ॲपोप्लेक्सी )नें मरण पावला. त्यानें धार्मिक गीतांशिवाय स्वतःच्या कविता व कांहीं भाषांतरें प्रसिद्ध केलीं. त्याचा प्रवासवृत्तांत त्या वेळच्या हिंदुस्थानच्या इतिहासाला उपयुक्त आहे. तो महाराष्ट्रांतहि आला होता.

**हेबिअस कॉर्पस**—[ 'हेबिअस कार्पस' या लॅटिन शब्दाचा अर्थ–हा देह तुमच्या हवालीं आहे. ]. इंग्लंडांतील कायद्यांतला हा एक फार जुना व सुप्रसिद्ध असा हायकोर्टानें करावयाचा हुकूम आहे. त्या हुकूमाचा अर्थ असा आहे कीं, जो कोणी इसम कैदी म्हणून कोणाच्या ताब्यांत असेल त्यानें त्या कैदेंतल्या इसमाला अन्यायानें अधिक काळ आपल्या ताब्यात न ठेवतां त्या कैदी इसमाला ताबडतोब हायकोर्टांतील न्यायाधिशापुढें हजर केला पाहिजे. असा हुकूम हायकोर्ट त्या कैदेंतील इसमानें स्वतः किंवा त्याच्याकरितां इतर कोणत्याहि इसमानें अर्ज केला तर करतें. व्यक्तीचें स्वातंत्र्य हा प्रत्येक नागरिकाचा मूलभूत व कायदेशीर हक्क आहे, व तो हक्क मॅग्नाचार्टा या सुप्रसिद्ध सनदेंत इंग्लंडचा जुलमी राजा जॉन यानें १२१५ त मान्य केला. पण स्टुअर्ट राजांनीं या हक्काचें वरचेवर उल्लंघन केलें. त्यामुळें १६७९ सालीं 'हेबियस कॉर्पस ॲक्ट' मंजूर करण्यांत आला. हिंदुस्थानांतहि प्रत्येक नागरिकाला अशा प्रकारचा हक्क हल्लीं कायद्यानें दिलेला आहे (क्रिमिनल प्रोसीजर कोड, कलम ४९१ पाहा). या कायद्याप्रमाणें सरकारी तुरुंगांत असलेल्या इसमांबद्दल अर्ज करतां येतो; तसेंच खासगी किंवा सार्वजनिक स्वरूपाच्या अटकेंत असलेल्या इसमाबद्दल अर्ज हायकोर्टाकडे करतां येतो.

**हेब्रिडीज बेटें**—हा लहान-मोठ्या बेटांचा समूह स्कॉटलंडच्या पश्चिम किनाऱ्यानजीक आहे. त्याचे दोन विभाग आहेत : पहिला, बाहेरचीं हेब्रिडीज बेटें (लॉग आयलंड)-या विभागांत लेविस व हॅरिस, उत्तर युयिस्ट, बेन्बेक्युला, दक्षिण युयिस्ट व बारा यांचा समावेश होतो; आणि दुसरा विभाग आंतला हेब्रिडीज यांत स्काये, मल, इस्ले, ज्युरा, कॉल, रम्, टिरो, कोलोनसे, इत्यादि बेटें आहेत. बाहेरच्या विभागांत सेंट किल्डा व फ्लॅनॉन हीं लहान बेटें आहेत. हीं एकंदर बेटे सुमारें ५२० असून त्यांपैकी सुमारें १२० बेटांवर वस्ती आहे. क्षेत्रफळ २,८०० चौ. मै. व लोकसंख्या ८०,००० आहे. हीं बहुतेक बेटें डोंगराळ आहेत. हवा सौम्य आहे. जमीन बहुतेक नापीक आहे, त्यामुळें शेती इस्ले व इतर कांहीं ठिकाणें यांतल्या खेरीज सर्वत्र अगदीं मागासलेली आहे. येथील मुख्य धंदे गुरें व मेंढ्या पाळणें आणि मच्छीमारी हे आहेत. स्काये, मल व इस्ले येथें व्हिस्की दारू तयार करतात. रासे बेटात लोखंड सांपडतें, आणि लुईंग बेटांत पाटीचा दगड सांपडतो. येथें सर्वत्र गॅलिक भाषा बोलली जाते. पण हल्लीं इंग्रजी भाषा बरेच लोक जाणतात. बाह्य हेब्रिडीजमध्यें बहुतेक लोक रोमन कॅथॉलिक पंथाचे आहेत आणि केल्टिक कथा व गीतें यांनीं त्यांचें वाङ्मय समृद्ध आहे. या बेटांवर प्रथम वस्ती नॉर्वेजियन लोकांनी केली, आणि ९ व्या ते १३ व्या शतकापर्यंत हीं बेटें नॉर्वेच्या मालकीचीं होतीं. नंतर १२६५ मध्यें तीं स्कॉटलंडला जोडण्यांत आलीं. मॅक्डोनल्ड वंशाच्या एका प्रमुखानें १३४६ सालीं या बेटांचा लॉर्ड अशी पदवी धारण केली व त्यानें व त्याच्या वंशजांनीं येथें स्वतंत्र राज्य केलें, पण १५४० मध्यें पांचव्या जेम्सनें हीं बेटें आपल्या राज्यास जोडलीं. पहिल्या महायुद्धानंतर येथील बरेच लोक कॅनडामध्ये गेले.

**हेम**—हा राग बिलावल थाटांतून उत्पन्न होतो. याच्या आरोहांत धैवत स्वर वर्ज्य आहे व अवरोह सातहि स्वरांनीं होतो, म्हणून याची जाति षाडव-संपूर्ण आहे. वादी स्वर षड्ज व संवादी पंचम आहे. गानसमय रात्रीचा पहिला प्रहर मानितात. निषाद स्वर यांत असत्प्राय आहे. तीव्र मध्यमाचा प्रयोग यांत हानिकारक होत नाहीं, कारण यात शुद्ध कल्याण व कामोद यांचें मिश्रण दृष्टीस पडतें. मंद्र व मध्य स्थानांत हा राग चांगला खुलतो. याची प्रकृति गंभीर आहे म्हणून विलंबित लयीनें गायिल्यानेंच हा फार खुलतो. हा एक कल्याण रागाचा प्रकार आहे.

**हेमगर्भ**—एक आयुर्वेदीय रसायन-मात्रा. यांत मुख्य औषधें म्हणजे पारागंधक कज्जली, सुवर्ण, ताम्र हीं होत. हें औषध हृदयाला शक्ति देणारें आहे. सन्निपात ज्वर, क्षयरोग, अतिसार, संग्रहणी, इत्यादि महान् व्याधींनंतर रोग्याचें हृदय अतिशय दुर्बल होतें त्या वेळीं मधून मधून हें औषध दिल्याने रोग्याची शक्ति टिकून राहते. शक्तीचा अतिशय ऱ्हास असतांना हेमगर्भाचें चाटण देण्याची परंपरा आहे. ½ ते १ गुंज आल्याच्या रसांत मध टाकून देतात.

**हेमचंद्र** (सन १०८८–११७२)—एक जैन पंडित व ग्रंथकार. हा धुंधुका गांवचा राहणारा. मोडवंशी वाणी चाचिग व त्याची स्त्री चाहिणी किंवा पाहिणी यांच्यापासून हा वि. सं. ११४५ च्या कार्तिकी पौर्णिमेच्या रात्रीं जन्मला. प्रथम याचें नाव चांगदेव असें ठेवण्यांत आलें होतें. 'कालिकालसर्वज्ञ' या नांवानेंहि हा प्रसिद्ध आहे. हा लहानपणीं एकदां धुंधुका येथील जैन मंदिरांत खेळत असतां देवचंद्राचार्यांच्या दृष्टीला पडला. त्या वेळची त्याची हुशारी व चापल्य पाहून देवचंद्राचार्यानें यास आपल्या स्वाधीन करण्याबद्दल याच्या आईकडे मागणी केली. याच्या आईनेंहि संमति दिल्यावर देवचंद्राचार्यानें यास कर्णावतीच्या उदयनमंत्र्याकडे शिक्षणासाठीं पाठवून दिलें. या सर्व गोष्टी याचा बाप चाचिग हा परगांवीं गेला असतां झाल्या; परंतु ता परत आल्यावर त्यास ही हकीगत कळली तेव्हां तो ताबडतोब देवचंद्राचार्यांकडे आपल्या मुलाच्या मागणीसाठीं गेला. या वेळीं देवचंद्राचार्य व उदयन यांनीं त्याची मोठ्या युक्तीनें समजूत घालून मुलास परत नेण्याच्या विचारापासून त्यास परावृत्त केलें व मुलास दीक्षा देण्याची त्याजपासून परवानगी घेतली. त्याप्रमाणें वि. सं. ११५४ माघ शुद्ध चतुर्दशीच्या दिवशीं शनिवारीं स्तंभतीर्थावर पार्श्वनाथाच्या मंदिरांत यास दीक्षा देण्याचा विधि पार पडला.

यानंतर आपल्या गुरूच्या सान्निध्यांत यानें तर्क, लक्षण, साहित्य, वगैरे शास्त्रांचें अध्ययन केलें. पुढें वि. सं. ११६६ मध्यें यास नागपूरच्या आचार्यपदाचा मान प्राप्त झाला. त्या प्रसंगीं तेथील धनदशेटीनें मोठा उत्सव साजरा केला. या वेळेपासून यास 'हेमचंद्राचार्य' असे म्हणूं लागले. यानंतर वैदिक धर्मीय सिद्धराज जयसिंह चालुक्य याच्या सहवासांत राहून यानें आपली छाप त्याजवर बसवली. सिद्धराजाबरोबर हा सोमनाथाच्या यात्रेलाहि गेला होता. तिकडून परत आल्यावर सिद्धराजानें जो विजयोत्सव साजरा केला त्या प्रसंगीं यानें एका सुंदर श्लोकांत सिद्धराजाला आशीर्वाद दिला. त्यामुळें खुश होऊन सिद्धराजानें याजवर एक नवें व्याकरण तयार करण्याची कामगिरी सोंपवली. हेमचंद्राच्या या ग्रंथाचे नांव 'सिद्धहेम' असें ठेवण्यांत आलें होतें. यानंतरच्या कालांत दिगंबर जैन व श्वेतांबर जैन या दोन पंथांत वाद माजले. त्यामुळें सिद्धराज व हेमचंद्र यांच्या आतांपर्यंतच्या एकोप्यांत खंड पडला व दोघात मतभेद माजले. सिद्धराजानें जैन मंदिरावर ध्वज लावण्याला मनाई केल्याचाहि उल्लेख आढळतो. यानंतर वि. सं. ११९९ मध्ये

सिद्धराज मरण पावला असतां त्याच्या गादीवर कुमारपाल हा आला. हेमचंद्रानें आधींच हें भविष्य केलें होतें. तेव्हां कुमारपालाचा गुरु म्हणून हेमचंद्राचा दरबारांत प्रवेश झाला. व तेथें त्यानें जैन धर्माच्या प्रसारासाठीं अनेक प्रयत्न केले व ते यशस्वी झाले. कुमारपालानें याच्या उपदेशानें मद्यमांस वर्ज्य करून हिंसेला बंदी घातली. ज्या ठिकाणीं हेमचंद्राचें दहन झालें त्या ठिकाणची रक्षा लोक अद्यापि भक्तिभावानें कपाळाला लावतात. त्या ठिकाणीं मोठा खड्डा खणला असून त्यास हेमखाड असें म्हणतात. हेमचंद्रानें आपल्या लेखनकार्यासाठीं सातशें लेखक नेमलेले होते असें म्हणतात. अनेकार्थकोश, अनेकार्थशेष, उणादिसूत्रवृत्ति, काव्यानुशासन (स्वकृत टीकेसह), देशीनाममाला, धातुमाला, शेषसंग्रहसारोद्धर, निघंटुशेष, बालभाषा, धातुपाठ, द्याश्रयकाव्य, इत्यादि अनेक ग्रंथ हेमचंद्राच्या नांवावर आहेत. प्राकृत भाषांच्या अभ्यासाला हेमचंद्राचे कोश फार उपयोगी पडतात.

हेमलॉक—[ वर्ग-उंबेलिफेरी. कोनियम मॅक्युलॅटम ]. हें एक विषारी रोप आहे. हें सरळ उंच वाढतें व त्यास खांद्या फुटतात. हें द्विवर्षायु आहे. त्याचा देंठ गुळगुळीत, तकतकीत व पोकळ असतो व त्यावर बहुधा जांभळसर ठिपके असतात. याचीं पानें डौलदार व फाटे असलेलीं असतात. व तीं चुरगळलीं असतां एक प्रकारचा नाकांत भरणारा दुर्गंध येतो. याचीं फुलें पांढरीं असून तीं दहाबारा दांड्यांवर छत्रीसारख्या गुच्छांचीं बनलेलीं असतात व त्यांतभोंवतीं एक तीन ते सात पाकळ्यांचें वेष्टण असतें. ही वनस्पति दुःखशामक आहे आणि त्यामुळें तिचा औषधांत उपयोग करतात. या वनस्पतींत एक क्षारयुक्त कोनीन नांवाचें द्रव्य असतें त्यांत हे गुणधर्म असतात.

हेमाद्रि, हेमाडपंत (तेरावें शतक, उत्तरार्ध)—देवगिरीच्या महादेव व रामदेव राजांच्या कारकीर्दींत होऊन गेलेला प्रख्यात ग्रंथकर्ता. याच्या धर्मशास्त्रावरील ग्रंथाच्या उपोद्घातांत त्याला महादेवाचा 'श्रीकरणाधिप' म्हटलें आहे. राजाच्या तर्फे सर्व हुकूम सोडण्याचें व दरबारचे कागदपत्र ठेवण्याचें काम त्याच्याकडे होतें. हेमाद्रि हा यजुर्वेदी, वत्स गोत्री ब्राह्मण होता. त्याच्या बापाचें नांव कामदेव, आजाचें वासुदेव व पणजाचें वामन होतें. हेमाद्रि हा उदार, विद्येचा भोक्ता व स्वतः विद्वान् असल्यामुळें विद्वान लोकांना त्याच्याकडे आश्रय मिळत असे. तो धार्मिक, सुशील व शूर होता. त्याच्या नांवानें प्रसिद्ध असलेले सर्व ग्रंथ त्यानेंच लिहिले असतील कीं नाहीं हा प्रश्न आहे. 'चतुर्वर्गचिंतामणि' हा हेमाद्रीचा मोठा ग्रंथ होय. या ग्रंथांत पुष्कळ माहिती व निरनिराळ्या ग्रंथांतील अनेक उतारे आहेत. वाग्भटाच्या वैद्यकग्रंथावर आयुर्वेद सायण नावाची टीका व बोपदेवाच्या 'मुक्ताफळ' नामक ग्रंथावरहि टीका त्यानें लिहिली आहे. महाराष्ट्रांत हेमाद्रि हा हेमाडपंत या नांवानें प्रसिद्ध असून विशिष्ट प्रकारच्या देवळांना हेमाडपंती देवळें असें नांव आहे. हीं चालुक्य पद्धतीचीं देवळें असून तींत चुना न भरतां दगड लावलेले असतात. अर्वाचीन मोडी लिपि हेमाडपंतानें प्रचारांत आणली असें म्हणतात. इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यांनीं कित्येक जुनीं हेमाडपंती मेसकें प्रसिद्ध केलीं आहेत. त्यांतून जमाखर्चाच्या व हिशेबाच्या पद्धती, कारभाराच्या अनेक शाखांची व्यवस्था, व्यवहारांतील शिरस्ते, वगैरे विषय आहेत. महानुभाव पंथाचा द्वेष करून पंथसंस्थापक चक्रधर यास मारविल्याबद्दल रामदेवराजानें याचा हाल हाल करून मारलें, अशा आशयाच्या कथा महानुभावी ग्रंथांत आहेत.

हेर्‍क्लीज—प्राचीन ग्रीक पौराणिक कथांतील एक सुप्रसिद्ध वीर. रोमन लोक यालाच हर्क्युलस म्हणतात. तो झ्यूस (ज्युपिटर) व त्याची बायको आल्कमेना यांचा मुलगा होय. त्याला बापाच्या आज्ञेवरून पूर्ववयांत बारा वर्षे युरिस्थिअसच्या नियंत्रणाखालीं राहावें लागलें, आणि तें कर्तव्य त्यानें योग्य रीतीनें बजाविलें तर त्याची देवांत गणना होईल असें त्याला आश्वासन देण्यांत आलें. म्हणून तो युरिस्थिअसजवळ राहिला, व त्याच्या सांगण्यावरून हेर्‍क्लीजनें अत्यंत शौर्याचीं बारा कृत्यें केलीं. तीं येणेंप्रमाणें—१. मायसेना शहरानजीकच्या प्रदेशांत अत्यंत त्रास देणाऱ्या एका सिंहाला ठार मारलें. २. लर्नियन महासर्पा (हायड्रॉ)चा नाश केला. ३. सोनेरी शिंगें व पितळी पाय असलेल्या एका अत्यंत चपल काळविटाला पकडलें. ४. एरिमँथस नजीकच्या भागांत अतिशय त्रास देणाऱ्या भयंकर श्वापदाला पकडलें. ५. ज्यांत तीन हजार बैल अनेक वर्षे बांधून ठेवलेले होते ते ऑगियसचे तबेले स्वच्छ केले. ६. स्टिम्फेलस सरोवरानजीक माणसाचें मांस खाणाऱ्या पक्ष्यांना ठार मारलें. ७. क्रीट बेट उध्वस्त केलेल्या एका अवाढव्य व भयंकर बैलाला जिवंत पकडून आणलें. ८. मनुष्याचें मांस खाणाऱ्या घोड्या पकडून आणल्या. ९ ॲमेझॉनच्या राणीला एरस् (मार्स) कडून मिळालेला कमरपट्टा आणला. १०. जेद्रुतचा राजा गेरीऑन या राक्षसाला ठार मारलें, व त्याचे बैलांचे पुष्कळ कळप ऑगीसला आणले. ११. हेस्पेरिडस देवींच्या बागेंतून ॲपल फळें आणिलीं. १२. सर्वांत अन्त्य धोक्याचें कृत्य म्हणजे पाताळांतून तीन डोकीं असलेला सर्बेरस नांवाचा कुत्रा आणला. हर्क्युलसला त्याच्या बायकोनें त्यांची प्रीति कायम राहावी म्हणून एक शर्ट घालण्यास दिला, पण तो सेंटॉर नेससच्या

रक्तानें विषारी बनलेला असल्यामुळें, तो शर्ट वापरल्यामुळें हरक्युलस मरण पावला.

**हेरॅक्लिअस** (इ. स. ५७५-६४२)—एक रोमन बादशहा. कार्थेजकडून आलेल्या आरमाराचा मुख्याधिकारी होऊन त्यानें बादशहा मॉरिअस याचा खून करून गादीवर आलेल्या फोकसला पदच्युत करण्यात मदत केली, आणि स्वतः बादशहा झाला. खोसरोजच्या इराणी सैन्याविरुद्ध अनेक मोठाले विजय मिळवून त्या सैन्याचा त्यानें धुव्वा उडवला. परंतु महंमद पैगंबराच्या विजयी आक्रमणाला त्यानें विरोध करण्याचा प्रयत्न केला नाहीं. त्यामुळें त्याच्या मरणापूर्वी सिरिया, पॅलेस्टाइन, मेसापोटेमिया व ईजिप्त हे देश खलीफांच्या अमलाखालीं गेले.

**हेरगिरी**—परराष्ट्रासंबंधीं सरळ उघड रीतीनें जी माहिती मिळते तीखेरीज गुप्तरीतीनें अधिक माहिती मिळविण्याकरितां हेरखातें ठेवण्यांत येतें व त्यामार्फत गुप्तहेराची योजना करण्यांत येते. असे गुप्तहेर नेमणें नियमबाह्य नाहीं असें हेग-कराराच्या २४ व्या कलमांत नमूद आहे. तथापि शांततेच्या काळांतहि जे हेर गुप्तपणानें परराष्ट्रांतील माहिती मिळविण्याचें काम करतात ते त्या कामीं धरले गेले असतां त्यांचें संरक्षण त्यांच्या राष्ट्रास करतां येत नाहीं. असें असूनहि सांपडल्यास कैदेची शिक्षा भोगण्याची तयारी करूनहि कांहीं लोक ठराविक रकमेस विशिष्ट काम मिळवून देण्याचें पत्करतात. युद्ध चालू असलें म्हणजे तर कोणीहि मनुष्य हेराचें काम करीत असतांना व माहिती पाठवीत असतां सांपडला तर त्यास चौकशी करून देहान्ताची शिक्षा देण्यांत येते. पण एखादा मनुष्य पूर्वी हेराचें काम करीत असे एवढ्याच कारणाकरितां त्याला युद्धाच्या दिवसांत पकडलें असतांहि प्रत्यक्ष तो बातमी मिळवीत होता असें सिद्ध झाल्याशिवाय फांशीं देतां येत नाहीं; तर त्यास युद्धकैदी म्हणूनच समजण्यात आलें पाहिजे.

हेरगिरी ही फार प्राचीन विद्या आहे. चाणक्याच्या अर्थशास्त्रांत याविषयीं माहिती आहे. शिवाजीच्या पदरचा बहिरजी नाईक (पाहा) प्रसिद्धच आहे. हेरगिरीच्या युक्त्या व पराक्रम हे गुप्तपोलिसांच्या हिकमतीहूनहि फार धाडशी व धोक्याचे असतात.

**हेरॉड** (ख्रि. पू. ७४-४)—ज्यू लोकांचा एक प्रसिद्ध राजा. याचा बाप ॲंटिपेटर याला ज्यूलियस सीझरनें जूडियाचा प्रोक्युरेटर नेमलें होतें. हेरॉड प्रथम ब्रूटस व कॅशियस यांच्या पक्षाला मिळाला, परंतु त्यांच्या मृत्यूनंतर त्यानें ॲंटनीशीं सलोखा केला, व ॲंटनीनें त्याला प्रथम जूडियाचा टेट्रार्क व नंतर राजा केलें. ॲक्टियमच्या लढाईनंतर ऑगस्टसशीं तो राजनिष्ठ राहिला, म्हणून हेरॉडला राजपदावर कायम ठेवण्यांत आलें. त्यानें जेरुशलेमचें देवालय पुन्हां फार शोभिवंत व भव्य बांधलें; व जूडियांत पुष्कळ मजबूत किल्ले बांधले. याच्या नांवापुढें 'दि ग्रेट' असें उपपद लावण्यांत येतें. हेरॉडच्या कारकीर्दीच्या शेवटच्या वर्षी जीझस ख्राइस्ट जन्मला, असें म्हणतात.

**हेरिक, रॉबर्ट** (१५९१-१६७४)—एक इंग्रज कवि. त्याचें शिक्षण केंब्रिज येथें होऊन १६२० सालीं तो एम्. ए. झाला. १६४८ सालीं त्याचा एकमेव कवितासंग्रह 'हेस्पेराइड्स' प्रसिद्ध झाला. त्याच्याइतकी आल्हादकारक कविता फारच थोड्या कवींची आहे. तो प्राचीन ग्रीक व रोमन काव्याचा मोठा चहाता होता, व त्या प्राचीन काव्याची पद्धति व विषय यांचें अनुकरण त्यानें केलें आहे. तथापि त्याच्या काव्यांत सर्वत्र नावीन्य दिसून येतें. तो जॉन्सन कवीचा सर्वोत्तम शिष्य मानला जातो. पण जॉन्सनपेक्षां हेरिकचें काव्य फार कल्पनांनीं भरलेलें आहे. निरनिराळ्या वृत्तांत कविता लिहिणें त्याला उत्तम साधलें आहे; इतकेंच नव्हे, तर त्यानें वृत्तांचे पुष्कळ नवे नमुने बनविले आहेत. त्यानें प्रेमगीतें लिहिलीं, त्याचप्रमाणें सद्वर्तनी जीवनक्रमाबद्दलहि गीतें लिहिलीं आहेत.

**हेरिंग मासा**—हे एका जातीचे मासे असून उत्तर अटलांटिक महासागरांत ४५° अक्षांशाच्या वरच्या बाजूस सर्वत्र आढळतात. हे दहा ते बारा इंच लांब असून यांची पाठ निळसर

हिरवी असते व पोटाकडील भाग रुपेरी असतो. यांच्या दोन्ही जबड्यांत बारीक दांत असतात. हे समुद्राच्या पृष्ठभागाजवळच असतात, त्यामुळें जाळें टाकून सहज धरतां येतात. यांच्या उन्हाळी व हिंवाळी अशा दोन जाती आहेत. या दिवसांत त्यांची उत्पत्ति होते. यांचें लोणचें घालतात. हे मासे धरण्याचा स्कॉटलंड वगैरे देशांत मोठा धंदा चालतो व हजारों होड्या या कामीं गुंतलेल्या असतात. एक कोट रुपयांपर्यंत यांची वार्षिक पैदास होते.

**हेलिओडोरस** (इ. स. ३ रें शतक)—एक ग्रीक लेखक. हा सिरियामधील एमेसा येथील रहिवासी होता. त्याची कादंबरी 'एथिओपिका' ही १० भागांत व गद्यपद्यात्मक लिहिली आहे. प्राचीन काल्पनिक ग्रीक वाङ्मयापैकीं ही एकच कादंबरी चांगली उपलब्ध आहे. यातील कथानक चांगलें रचलेलें असून त्यातील पात्रांचें स्वभावरेखन सुरेख आहे. शिवाय त्यांत सृष्टिविषयक देखाव्याचीं सुंदर वर्णनें पुष्कळ आहेत, आणि तत्कालीन चालीरीतींचें स्पष्ट वर्णन केलें आहे. हिचें इंग्रजी भाषांतर लोकप्रिय झालेलें आहे, व तें टी. अंडरडाउन यानें १५८७ सालीं प्रसिद्ध केलें.

**हेलिओपोलिस**—प्राचीन आफ्रिका. हें ईजिप्तमधील अति प्राचीन शहरांपैकीं एक असून बायबलांत हें 'ओन' या नांवानें प्रसिद्ध आहे. हें नाइल नदीवर आहे. हें सूर्यपूजेचें मुख्य स्थान असून क्षेत्र म्हणून पूर्वी याची प्रसिद्धि होती. प्लेटो व इतर ग्रीक तत्त्ववेत्ते येथील तत्त्वज्ञान व ज्योतिष यांच्या शिक्षणसंस्थेंत होते. परंतु स्ट्रॅबोच्या वेळेस या शहराचा नाश झाला. या शहराचा बराच भाग आज शेतकीच्या कामीं आला असून प्राचीन मंदिराच्या ठिकाणीं निमुळता स्तंभ (क्लिओपाट्राची सुई) अद्यापि दिसत आहे.

**हेलेन**—ही ग्रीक पौराणिक वाङ्मयांतील एक नितान्त सुंदर स्त्री झ्यूस व त्याची पत्नी लेडा यांची कन्या होय. युलीसिसच्या सांगण्याला मान देऊन तिला वरण्याकरितां आलेल्या सर्वांनीं अशी शपथ घेतली कीं, हेलेननें आपला पति निवडावा, व त्या तिच्या निवडीला कोणींहि प्रतिकार करावयाचा नाहीं. हेलेननें मेनेलॉसला वरलें; पण नंतर पारिसनें हेलेनला ट्रॉय येथें पळवून नेली; व त्यामुळें मेनेलॉसनें, इतरांनीं आपली शपथ पाळली पाहिजे, अशी जबाबदारी त्यांच्यावर टाकल्यामुळें ट्रोजन युद्ध सुरू झालें.

**हेल्महोल्ट्झ, हर्मन** (१८२१–१८९४)—एक जर्मन तत्त्ववेत्ता आणि शास्त्रज्ञ. अल्पवयांतच त्यानें आपली बुद्धि गणितांत प्रावीण्य संपादण्याकडे लाविली. पण गरिबीमुळें त्याला शास्त्रीय शिक्षणक्रम घेतां आला नाहीं. तेव्हां तो प्रशियन सैन्यांत शस्त्रवैद्य झाला. १८४२ सालीं त्यानें एक शास्त्रीय निबंध लिहिला. या निबंधांत त्यानें असें सिद्ध केलें कीं, एका जातीच्या मज्जातंतूंच्या पेशी असतात. हा त्याचा पहिला शोध होय. या वर्षापासून तों १८९४ सालापर्यंत त्याचें असें एकहि वर्ष गेलें नाहीं कीं, ज्या सालांत त्यानें कसला तरी एखादा शोध लावला नाहीं. या शोधांपैकीं कित्येक शोधांनीं शास्त्रज्ञमंडळांत मोठी विचारक्रांति घडवून आणली आहे. इ. स. १८४२–१८४९ पर्यंत तो बर्लिन येथें राहिला. नंतर त्याला कोनिंग्जबर्ग येथील इंद्रियविज्ञानशास्त्राच्या प्रोफेसराची जागा मिळाल्यामुळें तो तिकडे गेला; तेथें तो सुमारें सहा वर्षें राहिला. नंतर त्यानें बॉन येथील अध्यापकाची जागा स्वीकारली. यानंतर तो एकदोन ठिकाणीं प्रोफेसराचें काम करीत होता. इ. स. १८७१मध्यें त्याला बर्लिन येथील पदार्थविज्ञानशास्त्राच्या प्रोफेसराची जागा मिळाली. पुढें १८८७ सालीं वरील जागेशिवाय चार्लोटनबर्ग येथील पदार्थविज्ञानविषयक कलाभुवनाच्या डायरेक्टरची जागा त्याला दिली. पुढें शेवटपर्यंत तो या दोन्ही जागांवर काम करीत होता. इंद्रियविज्ञानशास्त्र, इंद्रियविज्ञानविषयक दर्शनशास्त्र, इंद्रियविज्ञानविषयक श्रवणशास्त्र, रसायनशास्त्र, गणितशास्त्र, विद्युच्छास्त्र, लोहचुंबकशास्त्र, ध्वनिशास्त्र; आणि सिद्धान्तविषयक यंत्रशास्त्र इतक्या शास्त्रांत हेल्महोल्ट्झ यानें शोध लाविले आहेत. 'शक्तिसंस्थिति', 'दृक्शास्त्रीय सारांश', 'शास्त्रीय विषयांवरचीं सोपीं व्याख्यानें', 'संगीत सिद्धान्ताची इंद्रियविषयक भूमिका म्हणजेच स्वरसंवेदना' यांसारख्या नांवांनीं त्याचीं कांहीं महत्त्वाचीं पुस्तकें आहेत.



**हेल्मॉंट, जीन बॅप्टिस्ट फॉन** (१५७७–१६४४)—एक बेल्जिअन वैद्यकशास्त्रज्ञ व रसायनशास्त्रज्ञ. आपण प्रदीर्घ आयुष्य लाभण्याचे उपाय शोधून काढले असें तो अभिमानानें म्हणत असे. मनुष्यशरीराची रचना आणि त्याला होणारे रोग यांच्या कांहीं काल्पनिक उपपत्त्या त्यानें वर्णन केल्या आहेत. तसेंच त्यानें रसायनशास्त्रांत कांहीं चांगले शोध लावले आहेत. शास्त्रांत 'गॅस' (वायु) हा शब्द त्यानें प्रथम वापरण्यास सुरुवात केली. तसेंच त्यानें जठररसाची (गॅस्ट्रिक ज्यूसची) जी अम्लमय प्रतिक्रिया (ॲसिड रिॲक्शन) तिचा प्रथम शोध लावला.

**हेल्सिंगफोर्स**—हें बंदर फिनलंडच्या लोकराज्याची राजधानी आहे. तेथें एक विद्यापीठ असून तें ॲबो येथून १८२७ सालीं तेथें नेलेलें आहे. येथें मुख्य कारखाने आहेत ते तागाचें कापड, जहाजाच्या शिडांचें कापड, आणि तंबाखू यांचे होत. येथून महत्त्वाचा व्यापार इमारती लांकूड, धान्य, आणि मासे यांचा चालतो. बाल्टिक समुद्रावरील हें एक उत्तम बंदर आहे, व तेथें अगदीं मोठाल्या बोटी येऊं शकतात. लोकसंख्या ३,२७,६२०.

**हेवर्ड, ड्यू बोस** (१८८५–१९४०)—एक अमेरिकन ग्रंथकार व नाटककार. याला गरिबीमुळें फारसें शिक्षण घेतां आलें नाहीं. म्हणून त्यानें एका कापसाच्या वखारीमध्यें नोकरी धरली. तेथें जे नीग्रो लोक कामावर असत त्यांच्या आयुष्यक्रमाचें त्यानें निरीक्षण केलें व नंतर पहिलें महायुद्ध संपल्यावर १९२२ मध्यें 'कॅरोलिना चॅन्सन्स' या नांवानें एक मोठा ग्रंथ हॅरवे ॲलन याच्या सहकार्यानें प्रसिद्ध केला. यानंतर 'पोर्गी' या नांवाचा एक ग्रंथ त्यानें १९२५ मध्यें प्रसिद्ध केला. व तो फारच यशस्वी झाला. या कथानकावर त्यानें एक नाटक रचलें. त्याचा प्रयोग १९२७ मध्यें न्यू यॉर्कमध्यें होऊन त्यास 'पुलिट्झर' पारितोषिक मिळालें. यानंतरहि त्यानें दोन ग्रंथ लिहिले.

**हेस, रुडॉल्फ**—जर्मन नाझी पक्षाचा डेप्युटी लीडर व जर्मन मंत्रिमंडळाचा एक सभासद. त्याचा जन्म ईजिप्तमध्यें अलेक्झांड्रिया येथें झाला. दुसरें महायुद्ध सुरू झाल्यावर हिटलरनें गोअरिंगनंतरचा आपला वारस म्हणून हेसचें नांव जाहीर केलें होतें. १९४१ त तो चमत्कारिक रीतीनें स्कॉटलंडला गेला. त्याला

उद्देश इंग्लंडला हिटलरचा गुप्त संदेश पोंचविण्याचा किंवा तहाची भूमिका तयार करण्याचा असावा. पण तो तेथें कैद झाला. युद्धानंतर नाझी पुढाऱ्यांची चौकशी होऊन त्यांना शिक्षा दिल्या गेल्या त्यांत हेसला जन्मठेप कैदेची शिक्षा झाली.

**हेसिअन माशी**—ही एक दोन पंख असलेल्या जातीची माशी आहे. या माशांच्या अंड्यांतून निघणाऱ्या किड्यांपासून गहूं वगैरे धान्यास फार उपद्रव होतो. यांपैकीं मादी एक-अष्टमांश इंच लांब असते व पंख पसरल्यास पाव इंच भरते. यांचें शरीर पिंगट व पंख करड्या रंगाचे असतात. नर मादीपेक्षां लहान असून त्याचे स्पर्शतंतू लांब असतात. माद्या वर्षांतून दोनदां झाडांच्या पानांवर अंडीं घालतात. त्यांतून चार ते चौदा दिवसांत किडी बाहेर पडतात. पुढें यांचे कोश होऊन त्यांतून दहा दिवसांत माशा बाहेर पडतात.

**हेसियड** (खि. पू. ८ वें शतक)—बोधपर ग्रीक काव्याचा आद्य जनक. त्याच्या चरित्राविषयीं फारच थोडी माहिती मिळते. बोशियन पंथाचा तो कवि होता. हा पंथ होमरला अंशतः विरोधी होता, तरी हेसियडच्या काव्यावर होमरचा परिणाम झालेला दिसतो. होमरनें कल्पनारम्य काव्य लिहिलें आणि हेसियडनें बोधपर काव्य लिहिलें. त्याच्या लेखनांत सर्वत्र उपयुक्ततावाद दिसून येतो. त्याचें अत्यंत महत्त्वाचें काव्य 'काम आणि दिवस' हें होय. या काव्यांत अनेक सुप्रसिद्ध भाग आहेत. उदाहरणार्थ, पॅंडोरा व तिचें मृण्मय पात्र यांची कथा; जगाच्या पांच युगांची हकीगत; हॉक व नाइटिंगेल यांची कल्पित कथा आणि हिंवाळा आणि उन्हाळा यांचीं वर्णनें. 'दि थिऑगनी' हें त्याचें दुसरें काव्य आहे. पण तें बरेंच कमी आकर्षक आहे. त्यांत पौराणिक कथा पद्धतशीर सांगण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांत जगदुत्पत्तीची हकीगत, झ्यूस व क्रोनोस ह्यांचा इतिहास आणि ज्यांनीं देवांशीं लग्नें लाविलीं अशा स्त्रियाची यादी दिली आहे. या काव्यांत जेथें देव व टिटन यांच्यामधील युद्धाची हकीगत दिली आहे तो भाग उत्तम आहे. हेसियड हा मोठा कवि नव्हता. त्याच्या काव्यांत उच्च विचार (सब्लिमिटी) कोठेंच आढळून येत नाहीं. तथापि प्राचीन ग्रीक वाङ्मयीन इतिहासांतील ती एक महत्त्वाची व आकर्षक व्यक्ति आहे. त्याच्या काव्यांत प्राचीन म्हणींत गोवलेलें तत्त्वज्ञान पुष्कळ आलेलें आहे. हेसियडचें लिखाण खि. पू. ८ व्या शतकांतील चालीरीतींच्या अभ्यासकांना अत्यंत उपयुक्त आहे. त्याच्या काव्यानें व्हर्जिलला जॉर्जिक्स लिहिण्याची स्फूर्ति दिली.

**हेस्टिंग्ज, मॉर्किस ऑफ** (१७५४–१८२६)—हिंदुस्थानचा एक गव्हर्नर जनरल. हा १८१४ त हिंदुस्थानात येण्यापूर्वी वेलस्लीच्या धोरणाविरुद्ध असे. पण गव्हर्नर झाल्यावर यानें चढाऊ धोरण स्वीकारून कंपनीचें राज्य वाढविलें. रजपूत राजांना मांडलिक केलें व पेंढाऱ्यांचा बंदोबस्त केला. नेपाळलाहि दोस्त बनविलें. डचांचें सिंगापूर बंदर घेऊन तिकडला व्यापार वाढविला. हिंदुस्थानांत ब्रिटिश मुलखांतील जमीनधाऱ्याच्या पद्धतीला व्यवस्थित स्वरूप दिलें. याच्या अमदानींत देशी शिक्षणाच्या शाळा निघाल्या व वृत्तपत्रांना उत्तेजन मिळालें. १८२२ त तो राजीनामा देऊन गेला. हा चांगला लढवय्याहि होता. मृत्यूपूर्वी तो माल्टाचा गव्हर्नर होता.

**हेस्टिंग्ज, वॉरन** (१७३२–१८१८)—एक इंग्रज मुत्सद्दी व हिंदुस्थानचा पहिला गव्हर्नर-जनरल. तो १७५० सालीं ईस्ट इंडिया कंपनीच्या नोकरींत कारकून म्हणून दाखल होण्याकरितां इंग्लंडहून बंगाल प्रांताकडे जाण्याकरितां निघाला. तो १७५८ ते १७६१ पर्यंत मुर्शिदाबाद येथें कंपनीचा प्रतिनिधि होता. नंतर तो कलकत्त्याला परत आला. व

त्याला बंगाल कौन्सिलमध्यें जागा मिळाली. नंतर इंग्लंडला जाऊन परत आल्यावर (इ. स. १७६४–६९) तो कंपनीच्या अमलाखालीं बंगाल प्रांत आणण्याच्या प्रयत्नांतला मुख्य हस्तक होता. १७७२ सालीं तो कलकत्त्याच्या सुप्रीम कौन्सिलचा अध्यक्ष झाला. १७७३ सालीं पार्लमेंटच्या कायद्यानें कंपनीची सत्ता बरीच मर्यादित करण्यांत आली, आणि हेस्टिंग्जला हिंदुस्थानचा गव्हर्नर-जनरल नेमण्यांत आलें. १७७६ सालीं कौन्सिलमधून त्याला काढावा, असा अर्ज कंपनीच्या डायरेक्टरांनीं सरकारकडे केला. त्यामुळें हेस्टिंग्जनें राजीनामा दिला आणि त्याच्या जागीं दुसरा इसम नेमण्यांत आला. १७७७ सालीं त्या कौन्सिलचा एक सभासद वारला, त्यामुळें कौन्सिलमध्यें हेस्टिंग्ज पक्षाचें बहुमत होऊन त्यानें आपला राजीनामा परत घेतला. आणि तो पुन्हां अधिकारावर आला. या सुमारास हिंदुस्थानांत

मराठे, निजाम व म्हैसूरचा हैदरअली यांनीं कंपनीच्या राज्याविरुद्ध मोठीं कारस्थानें रचलीं होतीं. तीं कारस्थानें हाणून पाडण्याकरितां पैशाची फार जरूर होती. म्हणून हेस्टिंग्जनें सूक्तासूक्ताचा विचार न करतां बनारसचे राज्यकर्ते आणि अयोध्येचे राज्यकर्ते यांच्याकडून द्रव्य मिळविलें. पण या कृत्यांमुळें त्यानें आपल्यावर दोषारोप होण्यास चांगलीं कारणें निर्माण केलीं, आणि हेस्टिंग्जला परत बोलावावा असा ठराव कॉमन्स सभेनें केला. १७८४ सालीं पिटचें इंडिया बिल मंजूर झाल्यावर हेस्टिंग्जनें आपल्या जागेचा राजीनामा दिला. तो इंग्लंडांत परत आल्यावर १७८६ सालीं बर्कनें त्याच्याविरुद्ध खटला (इंपीचमेंट) भरला, आणि त्यांत अन्याय आणि जुलूम यांचीं कृत्यें करणें व वाईट राज्यकारभार चालविणें, लांच-लुचपत घेणें, वगैरे अनेक आरोप ठेवले. हा सुप्रसिद्ध खटला १७८८ सालीं सुरू होऊन बर्क, फॉक्स व शेरिडन यांनीं हेस्टिंग्जच्या कृत्यांवर भडिमार केला. तरीहि १७९५ सालीं या खटल्याचा निकाल होऊन त्याला निर्दोषी सोडून देण्यांत आलें. कारण हिंदुस्थानांत ब्रिटिश सत्ता दृढमूल करण्याच्या कामीं हेस्टिंग्जचे प्रयत्न तिकडे सर्वमान्य होते.

हेळू—अळू. हें एक रानझाड आहे. यास पेरूएवढीं फळें (अळवें) येतात. फळांची भाजीहि करतात. माकडलोकल्यावर हीं फळें खाण्यास देतात. गळूं पिकण्यास पानांचें पोटिस करतात.

**हैड्रोजन बॉंब**—एका मजबूत पोलादी गोळ्यांत ॲटम बॉंबच्या सभोंवार बराचसा उज्ज (हैड्रोजन) वायु घालून हा बॉंब तयार करण्यांत येतो. सूर्याच्या केंद्रस्थानीं लक्षावधि अंश उष्णमानाचा व प्रचंड दाबाखालीं असलेला उज्ज वायूचा मोठा सांठा आहे. या अणूंची औष्णिक शक्ति (थर्मल एनर्जी) फारच मोठी असून ते एकमेकांवर प्रचंड वेगानें आदळतात व त्यांतून हेलियमची निर्मिति होते. याप्रमाणें उज्जचें विभाजन होऊन निर्माण झालेल्या हेलियमच्या योगानें अधिक घनभाराच्या कांहीं भागाचें शक्तींत रूपांतर होतें. उज्जवायूचें हेलियममध्यें विभाजन होण्याची शक्यता साध्या उज्जाऐवजीं जड उज्ज वापरून वाढवितां येते. जड उज्जाचा अणुगर्भ एक धनविद्युत्कण आणि एक विद्युद्रहित कण यांचा बनलेला असतो. म्हणजे एक हेलियम अणु तयार होण्यास उज्जचे दोन अणू लागतात.

ॲटम बॉंबचा स्फोट होतो तेव्हां बरेंच उष्णतामान व दाब निर्माण होतो आणि त्यामध्यें उज्जचें विभाजन होऊन हेलियम निर्माण होतो व त्यानेंच प्रचंड शक्तींत रूपांतर होतें. हें विभाजन एकाच वेळीं अणूंच्या लक्षावधि जोड्यांत होत असतें. यामुळें निर्माण होणारी शक्ति एकाच वेळीं निर्माण होते व त्या प्रमाणांत ती अधिक विनाशक असते.

युरेनियम विभाजनानें निर्माण होणाऱ्या अणुशक्तीचा उपयोग औद्योगिक प्रगतीसाठीं करून घेण्याची शक्यता असते; पण हैड्रोजन-बॉंबचें उत्पादन मात्र केवळ विनाशासाठींच आहे यांत शंका नाहीं.

हैटी—सॅन्टो डॉमिंगो. वेस्ट इंडीज् बेटांपैकीं क्यूबाच्या खालोखाल हें मोठें बेट आहे. त्याची लांबी ४०० मैल व क्षेत्रफळ २९५३६ चौ. मैल आहे. या बेटाचा पूर्व व पश्चिम भाग डोंगराळ आहे. येथें मोठालीं जंगलें आहेत. येथें लहान लहान नद्या पुष्कळ आहेत. येथील हवा युरोपियन लोकांना मानवत नाहीं.

या बेटाचा शोध कोलंबसानें १४९२ सालीं लावला. त्या वेळीं तेथें वीस लक्ष तद्देशीय लोक राहत होते. पण स्पॅनिअर्ड लोकांनीं त्यांचा पूर्ण नाश करून तेथें नीग्रो गुलाम आणले. १६३० सालीं पश्चिम भागांत फ्रेंचांनीं वसाहत केली व तो भाग १८०३ पर्यंत त्यांच्या ताब्यांत होता. नंतर फ्रेंच व स्पॅनिश यांच्यामध्यें लढा चालू राहिला, पण १८४४ सालीं सॅन्टो डॉमिंगो हें स्वतंत्र रिपब्लिक स्थापन करण्यांत आलें व १८६५ सालीं स्पॅनिश लोक हें बेट सोडून गेले.

हैटी लोकराज्य—हें बेटाच्या पश्चिमेकडील भागांत आहे. त्याचें क्षेत्रफळ १०,२०४ चौ. मैल व लोकसंख्या तीन लाख आहे. येथील लोक नीग्रो व मुलाटो या जातींचे आहेत. येथला धर्म रोमन कॅथॉलिक आहे. शिक्षण मोफत व सक्तीचें आहे. पोर्ट-ओ-प्रिन्स हें राजधानी व मुख्य बंदर आहे. तेथें एक विद्यापीठ आहे. शिवाय केप हैटी, ऑक्स केयेस व जॅकमेल हीं महत्त्वाचीं शहरें आहेत. येथें शेती हा मुख्य धंदा असून कॉफी, कोको, कापूस, तमाखू व ऊंस हीं मुख्य पिकें होतात. येथला मुख्य व्यापार ग्रेट ब्रिटनशीं चालतो. हैटी हें १८०४ सालीं स्वतंत्र झालें. व एका राज्यघटनेनुसार सिनेट व प्रतिनिधि-सभा येथील राज्यकारभार चालवतात. १९१५ सालीं संयुक्त संस्थानांशीं तह करून हें बेट अमेरिकेच्या संरक्षणाखालीं गेलें. अमेरिकेचा अध्यक्ष यावर एक हायकमिशनर नेमतो. त्यामुळें पूर्वीच्या भांडाळ्या नाहींशा होऊन येथें शांतता प्रस्थापित झाली आहे व उद्योगधंदे व व्यापार यांची वाढ झाली आहे.

हैदरअली (सु. १७२२-१७८२)—म्हैसूरचा मुसलमान राजा. हा १७४० च्या सुमारास म्हैसूर लष्करांत चांगलाच उदयास आला. त्यानें म्हैसूरचा राजा व दिवाण यांना आपल्या ताब्यांत ठेवलें होतें. १७६१ त हैदरानें म्हैसूरचें राज्य आपल्या स्वतःच्या ताब्यांत घेऊन तें वाढविण्यास सुरवात केली. पेशवे आपल्या घराण्यांतील भांडणें सोडविण्यांत व निजामअलीशीं लढण्यांत गुंतले आहेत, असें पाहून हैदरअलीनें इ. स. १७६१-१७६४ पर्यंत तुंगभद्रेच्या दक्षिणेकडील मराठ्यांचा बहुतेक मुलूख पादाक्रांत

करून उत्तरेस कृष्णा नदीपर्यंत आपली ठाणीं घसविलीं. तेव्हां स. १७६४ त पेशव्यांनीं त्याच्यावर स्वारी करून वर्धा नदीच्या उत्तरेकडील सर्व मुलूख त्याच्यापासून सोडविला, व त्याचा कित्येक लढायांत पराभव करून त्यास दांतीं तृण धरावयास लाविलें (१७६५). तेव्हां हैदर मराठ्यांस शरण आला, व त्यानें बत्तीस लाख रु. खंडणी देऊन त्यांना परतवून लाविलें. पण मलबार पादाक्रांत करून त्यानें हें नुकसान तावडतोब भरून काढलें. याच्यावर पेशव्यांनीं वेगवेगळ्या वेळीं २-४ स्वाऱ्या केल्या. इ. स. १७६७ त थोरल्या माधवराव पेशव्यानें याच्यावर दुसरी स्वारी केली व शिरें, होसकोटें व मद्दगिरी हीं स्थळें हस्तगत करून त्याच्याकडून तीस लाख रु. खंडणी घेतली. मराठ्यांची मोहीम संपते न संपते तोंच हैदराला निजामअल्ली व इंग्रज यांच्या संयुक्त सैन्याशीं युद्ध करण्याचा प्रसंग आला. प्रथम प्रथम ब्रिटिश सैन्याचा जय होत गेला व हैदरहि तह करण्यास विनंति करूं लागला. पण त्याची मागणी नाकारल्याबरोबर त्यानें सर्व यत्न एकत्र करून मद्रासेवर जाऊन तेथील गव्हर्नरास आपण सांगूं त्या अटींवर आपल्याशीं तह करावयास लाविलें (३ एप्रिल १७६९). या तहांत परस्परांनीं परस्परांचा घेतलेला मुलूख परत करून पुढें दोस्तीनें एकमेकांच्या मदतीनें असावें असें ठरलें. या तहामुळें त्यास जोर येऊन तो मराठ्यांची थकलेली खंडणी देण्याची टाळाटाळ करूं लागला व मराठ्यांच्या अंकित असलेल्या पाळेगारापासून यानें खंडण्या वसूल करण्यास आरंभ केला. तेव्हां माधवरावानें त्यावर तिसऱ्यांदां (१७७०) स्वारी करून त्याजपासून शहाजी राजाची सर्व जहागीर परत घेतली. मागील खंडणीबद्दल व स्वारी-खर्चाबद्दल छत्तीस लाख रुपये आणि पुढें दरसाल खंडणीप्रीत्यर्थ चौदा लाख रु. देण्याचें कबूल करावयास लाविलें (१७७२). या युद्धांत हैदरास इंग्रजांनीं मुळींच मदत केली नाहीं, म्हणून हैदर त्यांचा सूड घेण्यासाठीं चडफडत होता. नारायणरावाच्या खुनामुळें पुणें दरबारीं घोंटाळा उडालेला पाहून यानें गेल्या स्वारींत मराठ्यांनीं घेतलेला मुलूख परत घेण्यास सुरवात केली. हे पाहून राघोबा यावर स्वारी करून गेला. पण त्या वेळीं त्यास इतकी अडचण होती कीं, हैदरानें पंचवीस लाख रु. देण्याचें कबूल केल्याबरोबर त्यानें तीन जिल्ह्यांतील आपला हक्क सोडला. पेशव्याच्या घरांत कलह सुरू झाल्यामुळें हैदराचा फायदा झाला. यानें अनेक मराठे सरदारांचा पराभव केला. पण हरिपंत फडक्यानें यास चांगलाच जेरीस आणून पुष्कळ पैसा याच्याकडून वसूल करून घेतला. चित्तूर येथें इंग्रजांशीं लढतांना १७८२ मध्यें हा मरण पावला.

याचें धोरण दडपेगिरीचें असून विरुद्ध पक्ष जोरदार वाटला कीं पड घ्यावी असेंहि होतें. हैदरला दया, धर्म, नीति हीं कांहीं नव्हतीं. हा निरक्षर व उलट्या काळजाचा होता. याला पांच भाषा चांगल्या येत. हा सर्व कामें झटपट उरकी. याची स्मरणशक्तिहि तीव्र होती. तसेंच हा अवघड आंकडेमोडींतहि कुशल होता. लोकांचा स्वभाव व गुण ओळखण्याचें ज्ञान यास उत्कृष्ट असल्यामुळें याला आपल्या भोंवती कार्यक्षम माणसें गोळा करता आलीं. स्वतः काम पाहणें व कडक अमल ठेवणें या गुणांची जोड मिळाल्यामुळें त्यास १८ व्या शतकांत दक्षिणेकडे राज्य स्थापतां आलें. याचा मुलगा टिपू (पाहा) याच्यानंतर गादीवर बसला.

**हैदराबाद (सिंध)**—पाकिस्तान, सिंध प्रांतांतील एक जिल्हा. क्षे. फ. ४,४७६ चौ. मै.. ह्या जिल्ह्यांत उंच प्रदेशापासून प्रवाहाबरोबर वाहणाऱ्या खळमळीनें तयार झालेली जमीन फार आहे. या जिल्ह्याच्या सिंधु नदीच्या तीराजवळचा मुलूख फार सुपीक आहे. ह्या जिल्ह्याच्या कांठांवरून सिंधु नदी १५० मैलपर्यंत जाते. एकंदरींत या जिल्ह्याची हवा आरोग्यावह आहे. दर वर्षी पाऊस ५-७ इंच पडतो.

सिंध देशाचा इतिहास म्हणजेच या जिल्ह्याचा इतिहास होय. हैदराबाद हें शहर अकराशें वर्षांपासून प्रसिद्ध आहे. कारण महमद कासीमनें ह्याच शहरावर ८ व्या शतकांत स्वारी केली होती. १८ व्या शतकांत पुनः गुलामशहानें हें शहर जिंकून येथें आपली गादी स्थापन केली. त्या वेळेपासून सिंध प्रांतांत या शहराचें महत्त्व कायम टिकलें आहे.

लो. सं. ७,५८,७४८. फाळणीपूर्वी हिंदू शें. २४ तर मुसलमान शें. ७४ होते. या जिल्ह्यांतील लोकांचें वर्गीकरण केलें तर शें. ६४ लोक शेतकीवर उपजीविका करणारे आहेत; मजुरी करून पोट भरणारे शें. ६, उद्योगधंदे करून राहणारे शें. १५ व व्यापार करून राहणारे शें. १ आहेत, असें दिसेल.

या जिल्ह्यांतील मुख्य पिकें म्हटलीं म्हणजे ज्वारी, बाजरी, तांदूळ, गहूं, कापूस व तीळ. ह्या जिल्ह्यांतील शेतकी सर्वस्वीं कृत्रिम कालव्यांच्या पाण्यावर अवलंबून आहे. हे कालवे २८१ आहेत व ते सरकारच्या ताब्यांत आहेत. ह्या जिल्ह्यांतील लाखेच्या कामाची अजून प्रसिद्धि आहे. ह्या जिल्ह्यांत शिक्षण फारच मागासलेलें आहे. शें. ५ लोक (पुरुष व स्त्रिया मिळून) साक्षर आहेत.

हैदराबाद शहर जिल्ह्याची राजधानी असून लो. सं. सुमारें सवा लाख आहे. हें शहर १७६८ सालीं गुलामशहा काल्होरा यानें वसविलें. १८४३ पर्यंत तें सिंध प्रांतांत मुख्य शहर होतें पण ब्रिटिश राज्य प्रस्थापित झाल्यापासून कराची हें राजधानीचें शहर बनलें. ह्या शहराला एक किल्ला आहे व त्यांत शस्त्रागार आहे. हें शहर इतिहासदृष्ट्या सिंध प्रांतांत मुख्य आहे. ह्यांत कारागिरी फार आहे.

शहरांत एक कॉलेज व ५० वर शिक्षणसंस्था आहेत. हें शहर लष्करी ठिकाण म्हणून प्रसिद्ध आहे.

**हैदराबाद संस्थान**—हिंदुस्थानांतलें सर्वांत मोठें संस्थान. हें निजाम सरकारच्या अमलाखालीं आहे. याचें क्षे. फ. ८२,३१३ चौ. मै. व लो. सं. (१९५१) १,८६,५२,९६४ आहे. हें संस्थान बहुकोनाकृति असून तें दख्खनच्या पठाराचें केंद्र आहे. हें एक विस्तृत पठारच आहे. व समुद्रसपाटीपासून १,२५० फूट उंच आहे. ह्याचे भूगर्भशास्त्रदृष्ट्या व मानववंशशास्त्रदृष्ट्या दोन भाग होतात. पश्चिमोत्तर भागांत कापूस पैदा करण्यास योग्य अशी काळी जमीन असून मराठी व कानडी भाषा बोलणारे लोक आढळतात. दुसरा भाग पूर्वदक्षिणाभिमुख आहे. या भागांत जमीन तांदुळास विशेष योग्य अशी आहे. येथील लोक मुख्यत्वेंकरून तेलगू भाषा बोलणारे आहेत. ह्या संस्थानांत मुख्य पर्वत म्हटले म्हणजे बालाघाट, उत्तरेस सह्यपर्वत व कांडिकल गुहा हे होत. या संस्थानांतून वाहणाऱ्या मुख्य नद्या गोदावरी व कृष्णा या व यांना मिळणाऱ्या तुंगभद्रा, पूर्णा, पैनगंगा, मांजरा, भीमा, वगैरे नद्या होत. सर्व संस्थानांत औरंगाबाद जिल्हा फारच सुंदर आहे. कारण त्यांत अजंठा व वेरूळ लेण्यासारखीं लेणीं व वनश्री विपुल आहे. या संस्थानांतील खनिज संपत्ति मुख्यत्वें-करून सोनें, कोळसा व हिरे ही होय. यांपैकीं सोनें धारवाडी पद्धतीनें लिंगसुगुर येथें सांपडतें. हिरे कर्नूल येथें मिळतात व कोळसा शिंगरेणी येथें विपुल निघतो. संस्थानातील हवा जरी सर्वोत्कृष्ट नसली तरी एकंदर प्रकृतीस मानवणारी आहे. ह्या प्रांतात उष्णतेचें मान सरासरीनें ८१ अंशांपर्यंत जातें. दर वर्षी पाऊस ३०–३२ इंच पडतो.

इतिहास—प्रागैतिहासकालामध्यें या संस्थानच्या पूर्व-दक्षिण भागांमध्यें द्राविडी लोक राहत असत. परंतु राजा अशोकानें सर्व वऱ्हाड प्रांत व हल्लींच्या संस्थानाच्या वायव्य व पूर्व या दोन दिशांकडील भाग पादाक्रांत केला होता. अशोकानंतर आंध्र राजे आले व त्यांनीं १०० वर्षें राज्य केलें. त्यांच्यामागून चालुक्य आले. त्यांनीं इ. स. ५५०–११९० पर्यंत राज्य केलें. या ६५० वर्षांमध्यें त्यांना पल्लव, राष्ट्रकूट, चोळ व होयसळ यांच्याशीं झगडावें लागलें. यानंतर यादव राजे राज्य करूं लागले. १३ व्या शतकाच्या अखेरीस मुसलमानांच्या स्वाऱ्या दक्षिणेंत सुरू झाल्या. अल्लाउद्दिनाची पहिली स्वारी १२९४ सालीं झाली. व तींत देवगिरीच्या यादव राजाचा पराभव झाला. परंतु दक्षिणेंत पूर्ण सत्ता प्रस्थापित करणारा मुसुलमानी राजा महंमद तुघलख होय. पुढें बहामनी राज्य स्थापन झालें. बहामनी राजानंतर मोंगलांनीं दक्षिणेंत स्वाऱ्या सुरू केल्या. हल्लीं जे निजाम हैद्राबादेस राज्य करीत आहेत त्यांचा मूळ पुरुष असफझा हा होय. हा मोठा पराक्रमी व कावेबाज होता. यानेंच दिल्लीच्या बादशहाविरुद्ध बंड करून व खानदेशचा सुभेदार मुबारिझखान याचा साखरखेडें (वऱ्हाड प्रांत) या ठिकाणीं पराभव करून हैद्राबाद येथें गादी स्थापिली. त्याचा वंश आजतागाईत गादीवर आहे. दक्षिणेंत निजाम आणि मराठे यांचे संबंध १९ व्या शतकाच्या प्रारंभापर्यंत सारखे कसकसे येत गेले त्यांची हकीगत पुढें दिली आहे.

हैद्राबादचा पहिला निजाम व गादीचा संस्थापक मीर कम्र-उद्दीन याचें घराणें महंमद पैगंबराच्या घराण्याशीं नात्यानें जोडण्यांत येतें. बोखाऱ्याचा काझी आबिद कुलीखान हा प्रथम हिंदुस्थानांत येऊन शहाजहानच्या पदरीं राहिला. १६८१ सालीं त्याला औरंगजेबानें मुख्य प्रधान केलें व पुढील सालीं राजपुत्र अझमबरोबर दक्षिणेंत पाठविलें. गोवळकोंड्याच्या वेढ्यांत हा कामास आला. याचा मुलगा मीर शहाबउद्-दीन हाहि बापाप्रमाणें शूर होता. त्याची व संभाजी छत्रपतीची छत्रीनिजामपुरावर लढाई झाली होती (१६८५). तींत त्यानें मोठा पराक्रम दाखविल्यामुळें औरंगजेबानें त्याला गाजीउद्दीन हा किताब दिला. याची पुन्हां मराठ्यांशीं वऱ्हाडात गांठ पडली व चकमकी उडाल्या. याला बादशहानें वऱ्हाडचा व नंतर गुजराथचा सुभेदार केले होतें. हा १७१० त मरण पावल्यावर त्याचा मुलगा मीर कम्र–उद्-दीन हा मोंगली राजकारणांत प्रामुख्यानें भाग घेऊं लागला. पुढें १७१३ त याला दख्खनचा सुभेदार करून निजाम–उल्–मुल्क ही पदवी फरुकसियर बादशहानें दिली. अशा रीतीनें निजाम बनल्यावर यानें मराठे सरदारांत फूट पाडण्यास सुरुवात केली. चंद्रसेन जाधव, सर्जेराव घाटगे, रंभाजीराव निंबाळकर, इत्यादींना आपल्याकडे ओढून कोल्हापूरच्या संभाजी छत्रपतीची शाहूविरुद्ध बाजू घेऊन सातारकरांशीं तंटा सुरू केला. मराठ्यांना दक्षिणेंत चौथाई घेऊं द्यावयाची नाहीं ही त्याची तीव्र इच्छा शेवटपर्यंत कायम होती. निजामानें पुण्यावर अमल बसविला होता तो बाळाजी विश्वनाथानें उठवून लावला. इतक्यांत निजामची दक्षिणेंतून बादशहानें उचलबांगडी केली व उत्तरेकडे निरनिराळ्या सुभ्यांवर पाठविलें. दिल्ली-दरबारांत बादशहा आणि सैय्यद बंधू यांच्यामध्यें संघर्ष चालू असतां निजामानें बाहेरून आपण सैय्यद पक्षाचे असें दाखविलें व साताऱ्चा पेशवा (बाळाजी विश्वनाथ) सय्यदबंधूंच्या मदतीला आला असतां त्याला भाईचाऱ्याचा सन्मान करून भावाचे नातेंहि जोडलें. सय्यदबंधूंनीं पेशव्याच्या पदरांत स्वराज्य, चौथाई व सरदेशमुखी यांच्या बादशाही शिक्क्याच्या सनदा टाकल्या हें निजामास बिल्कुल आवडलें नाहीं. तो दक्षिणेकडे आपलें स्वतंत्र राज्य स्थापण्याच्या विचारानें दिल्लीहून निघाला.

निजामानें बंड उभारलेले पाहून सय्यदांनीं आपले सरदार त्याच्यावर पाठविले व मराठ्यांची मदत मागितली. निजामानें त्यांना दाद दिली नाहीं व सय्यदबंधूंचे खून होऊन बादशहा महंमदशहा स्वतंत्र झाल्यावर त्यानें निजामास बक्षिसी म्हणून माळवा आणि दख्खन यांच्या सुभेदारीवर नेमलें व लवकरच त्याला आपला वझीर बनवून असफजाह हा किताब अर्पण केला. तोच पुढें चालला.

महंमदशहानें मराठ्यांचा गंगथडींत जोर पाहून नवीन फर्मान चौथाई-सरदेशमुखीनें मराठ्यांना देऊन निजामाचा बेत फिसकटविला. त्यानेहि बाजीरावाची चिखलठाण येथें भेट घेऊन सलोखा केला व दिल्लीसहि आपलें वर्चस्व राहावें म्हणून १७२२ त तिकडे गेला; पण बादशहा त्याच्या मनाप्रमाणें वागेना म्हणून वझीरी सोडून तो बादशहाची परवानगी न घेतां दक्षिणेकडे वळला. तेव्हां बादशहानें त्याच्यावर दुसरा सरदार पाठविला. या वेळीं मराठ्यांची मदत घेऊन साखरखेड्याच्या लढाईत या सरदाराला ठार करून हैद्राबाद, गोवळकोंडा, वगैरे ठाणीं ताब्यांत घेतलीं. त्याला हैदराबाद येथें राजधानी करावयाची असल्यानें मराठ्यांनीं कांहीं मोबदला घेऊन चौथाई-सरदेशमुखीचे या प्रदेशावरील हक्क सोडून द्यावे असें प्रतिनिधीमार्फत शाहूशीं बोलणें लावलें. पण याला बाजीराव कबूल झाला नाहीं. तेव्हां निजामानें मराठे मंडळांत फितुरी सुरू केली. कोल्हापूरच्या संभाजीला वश करून घेतलें व दोन छत्रपतींपैकीं हे हक्क कोणाला मिळावे याचा प्रथम निकाल करा असें शिरजोरपणानें सांगूं लागला. तेव्हां बाजीरावानें त्याच्यावर स्वारी करून पालखेड येथें १७२८ त त्याला नामोहरम करून, मी यापुढें तुमच्या चौथाई-सरदेशमुखीच्या हक्कांस बाध आणणार नाहीं, असें मुंगीशेवगांवच्या तहांत कबूल करून घेतलें.

तरी पण आंतून त्यानें त्र्यंबकराव दाभाड्यास बाजीरावाविरुद्ध मदत दिली व बंगषाला उठविलें. पण बाजीरावानें डभईच्या लढाईत त्रिंबकरावाचा कांटा काढला हें पाहून निजामाला बाजीरावाची भीति वाटूं लागली व तो त्याच्याशीं गोडीनें वागूं लागला. इतक्यांत बादशहाचें त्याला दिल्लीहून बोलावणें आलें. तो जाण्यास काचकूच करतो आहे असें पाहून मराठ्यांना दख्खनच्या सर्व सुभ्यांत आम्ही सरदेशपांडेपण बहाल करूं असा त्यास धाक घातला. तेव्हां तो दिल्लीस गेला. गुजराथ आणि माळवा यांची सुभेदारी मागें काढून घेतलेली पुन्हां बादशहानें त्याला देण्याचें आमिष दाखविलें. अट एवढीच कीं, त्या प्रांतांतून मराठ्यांना त्यानें हुसकून लावावें. ही गोष्ट सोपी नव्हती. तथापि निजामानें आपणाकडे सर्वाधिकार घेऊन पेशव्याला कसेंहि करून गारद करण्यासाठीं मोठ्या तयारीनिशीं दक्षिणेकडे निघाला. पण बाजीरावानें त्याला मध्येंच भोपाळ येथें कोंडून, त्याचें पाणी तोडून, त्याला तह करण्यास भाग पाडलें (१७३८). यानंतर निजाम दिल्लीला जाऊन बसला व या तहाच्या अटी पाळीना; तेव्हां बाजीरावानें दक्षिणेंत त्याच्या मुलुखावर स्वारी करून त्याचा मुलगा नासीरजंग याला शरण आणलें व मुंगीपैठण येथें तह करून घेतला.

या नासीरजंगानें बापाविरुद्ध बंड उभारलें असतां निजामानें दिल्लीहून येऊन मराठ्यांच्या साहाय्यानेंच तें मोडलें व मुलाला कैदेंत ठेवलें. आतां निजामानें कर्नाटकांत मुलुखगिरी करण्याची योजना करून मुरारराव घोरपड्याला आपणाकडे वळविलें व पेशव्याला गप्प करण्यासाठीं बादशहाकडून त्याला माळव्याच्या सनदा मिळवून दिल्या. कारण नानासाहेब पेशवा व बाबूजी नाईक त्याच्या कर्नाटकाच्या योजनेंत अडथळे आणीत होते. पण सुरतेकडे तो हालचाल करतो आहे, असें पाहून पेशव्यानें त्याला गांठून आसुंबरी येथें त्याचा पराभव केला. यानंतर हा महाकपटी व थोर मुत्सद्दी पुरुष लवकरच १७४८ त बऱ्हाणपूर येथें मृत्यु पावला व एक मोठा अंक समाप्त झाला. औरंगजेबाप्रमाणेंच हा मराठ्यांच्या मागें एकसारखा लागला होता; पण औरंगजेबाला जसा शिवाजी भेटला तसाच याला बाजीराव भेटला.

औरंगजेबाच्या मृत्यूनंतर ज्याप्रमाणें त्याच्या मुलांत गादीबद्दल तंटे लागले त्याप्रमाणेंच निजाम-उल्मुल्क याच्या मृत्यूनंतर त्याच्या चौघां मुलांत यादवी सुरू झाली. मराठ्यांनीं याचा बराच फायदा करून घेण्याचा केलेला बेत साताऱ्यास रामराजा-ताराबाई प्रकरणामुळें नानासाहेब पेशव्यास पुरा करतां आला नाहीं. तथापि त्यानें दिल्लीहून निजामाचा वडील मुलगा गाझीउद्दीन यास आणविलें; पण त्याला विषप्रयोग झाला. तेव्हां पेशव्यानें लगेच वेळप्रसंग पाहून दुसरा मुलगा सलाबतजंग याशीं भालकी येथें १७५२ त तह केला. त्याचा धाकटा भाऊ निजामअल्ली व नागपूरकर भोंसले यांच्यांत वऱ्हाडच्या मालकीसंबंधीं लढाया चालूच होत्या. सलाबतजंगाच्या दरबारीं फ्रेंचांचें फार वजन होतें. तें नाहींसें करण्याची खटपट त्याचा भाऊ निजामअल्ली व पेशवे करीत होते. भालकी येथें १७५२ त केलेल्या तहांत तापी-गोदा दुआब मराठ्यांनीं मिळविला व निजामाच्या दरबारापर्यंत हात पोंचविले. या वेळीं फ्रेंच गव्हर्नर डुप्ले व बुसी यांच्याशीं संगनमत करून निजामशाही बुडविण्याचा पेशव्यानें घाट घातला होता. पण फ्रेंच राजकारणाला फ्रान्समध्यें निराळेंच वळण लागून डुप्ले परत गेला व फ्रेंचांचा सर्व डाव उधळला व इंग्रजांचा निजामाशीं जो या वेळेपासून संबंध आला तो कायमचा ठरला.

यानंतर पेशव्यानें निजामाच्या राज्यांत धुमाकूळ घातला. अहमदनगर घेतलें. शिवाजीचें जन्मस्थान शिवनेरी किल्ला फार

दिवसांपासून निजामापासून घेण्याचें मनांत होतें तो या वेळीं सर केला. औरंगाबाद, दौलताबाद, विजापूर, इत्यादि परगणे मिळून ६२ लाखांचा मुलूख गेल्यानें निजामला फार हळहळ वाटली. तो कबूल केलेली खंडणी देण्यास खळखळ करूं लागला. पण पेशव्याचें धोरण दक्षिण मोकळी करण्याचें होतें. तेव्हां सिंदखेड आणि उद्गीर येथें लढाया देऊन निजामला पुरा लोळविला. कायमचा नेस्तनाबूद केला असता, पण त्याच वेळीं उत्तरेकडे अहमदशहा अब्दालीनें मराठ्यांची सत्ता उखडून टाकण्याची मोहीम सुरू केली व तींत पेशव्याचा अव्वल दर्जाचा सरदार दत्ताजी शिंदा कामास आला. तेव्हां उद्गीरचे विजयी पराक्रमी सेनानी भाऊसाहेब आणि विश्वासराव तेथूनच १४ मार्च १७६० ला *उत्तरेकडे आपले मोर्चे वळविते झाले. यापूर्वी बरींच वर्षे निजाम* सलाबतजंग व त्याचा भाऊ निजामअल्ली यांमध्यें गादीसंबंधीं मोठी चुरस होती. निजामअल्ली बापाप्रमाणें अत्यंत हुशार व मुत्सद्दी असल्यानें त्यानें हळूहळू भावास दूर सारून व गुप्तपणें त्याचा खून करून, १७६२ त खरा निजाम बनला. यानें चाळीस वर्षें हैद्राबादची निजामशाही इंग्रज, मराठे आणि हैदर-टिपू यांच्याशीं कधीं सलोखा तर कधीं भांडण करून तगविली. तो गादीवर होता म्हणूनच संस्थान वांचलें व आजला हिंदुस्थानांत ठळक दिसतें आहे.

पानपतावर मराठ्यांचा फार मोठा नाश झाला याचा फायदा निजामानें लगेच घेऊन तो पुण्यावर चालून आला. तेव्हां माधवरावानें मराठ्यांची एकजूट करून उलट हैदराबादेवर मोहीम नेली. परस्परांनीं परस्परांच्या मुलखांत दंगेधोपे-जाळपोळ केली. या वेळीं "पुणेची कांहीं बाकी राहिली नाहीं. पर्वतीच्या वगैरे सेहरांतील देवाच्या मुर्ती झाडून फोडल्या." इतकेंच नव्हे तर "पुण्यामध्यें कोणी एकानें काडीची मत्ता ठेवली नाहीं. घरें रक्षावयास मात्र खडे राहिले...घरें मात्र राहिलीं. दरवाजे देखील ज्याचे सोई आहे तो काढून नेतच आहे. कोठें नेऊन लावणार आहेत तें ईश्वर जाणे!" असें तत्कालीन वर्णन आहे; पण लवकरच चुलता-पुतण्या यांच्यांत वितुष्ट येऊन राघोबानें निजामला उद्गीरच्या लढाईंत जिंकून घेतलेला मुलूख परत देऊन त्याचा माधवरावाविरुद्ध पाठिंबा मिळविला. मराठ्यांच्या गृहकलहांत बापाप्रमाणें निजामअल्लीनें शेवटपर्यंत शिरकाव करून घेऊन स्वार्थ साधला यांत शंका नाहीं. आपसांतील भांडणाचा असाच परिणाम होत असतो. माधवरावानें नमतें घेऊन राघोबाला वाटेल तसा राज्यकारभार हांकूं दिला हें पाहून गोपाळराव पटवर्धन, जानोजी भोंसले यांसारखे नामवंत एकनिष्ठ शूर सरदार चिडले व निजामाला पेशव्याविरुद्ध मिळाले व त्यांनीं नाशिक आणि पुणें जिल्ह्यांतच जाळपोळ सुरू केली! हें पाहून माधवरावानें पुन्हां कडक होऊन निजामाचा पाठलाग केला व राक्षसभुवन येथें १० ऑगस्ट १७६३ रोजीं मोठा पराभव केला व त्यावर जबर अटी लादल्या. पण राघोबानें पुन्हां त्या सैल केल्या. यानंतर नागपूरकर भोंसल्याविरुद्ध निजामानें पेशव्यास मदत करून गेलेला आणखी मुलूख परत मिळविला. पण इकडे तो मराठ्यांच्या भयानें कांहीं मुलूख इंग्रजांना देतच होता.

नारायणराव पेशव्याच्या वधानंतर एकीकडे राघोबा व दुसरीकडे बारभाई निजामाला आपल्याकडे ओढीत होते व लालूच दाखवीत होते. यामुळें निजामाचा बराच फायदा होऊन त्याचें वजन वाढलें. इंग्रजांना दक्षिणेंतून हांकून देण्याचें कारस्थान निजामानें गुप्त रीतीनें करून बारभाईंना त्यांत ओढलें व पुढें आपण अंग काढून घेऊन त्यांना तोंडघशीं मात्र पाडलें. इंग्रज आणि टिपू या शत्रूंशीं टकरा घेतांना निजामाला दुखवूं नये हें धोरण नाना फडणिसानें ठेवून निजामाकडे चौथसरदेशमुखीची मोठी बाकी थकली होती तिच्याबद्दल फार नेट लावला नाहीं. उलट १७८४ त टिपूविरुद्ध बाजू बळकट करण्यासाठीं यादगिरीचा तह करून आपलें पिढीजाद वैर तात्पुरतें झांकून टाकलें. १७९२ मध्यें टिपूचा त्रिवर्ग (इंग्रज–मराठे–निजाम) दोस्तांनीं जंगी पराभव करून त्याचा मुलूख वांटून घेऊन पुन्हां पूर्ववत् ते एकमेकांविरुद्ध डाव खेळूं लागले.

नंतर नाना फडणिसानें थकबाकीबद्दल निजामाकडे जोरानें नेट लावला असतां निजामानें इंग्रजांना मध्यस्थी करण्यास विनविलें. निजामाचा त्या वेळचा दिवाण अझीम–उल्–उमारा [ऊर्फ मशीर उन्–मुल्क] हा अत्यंत हुशार व कावेबाज होता. त्याला इंग्रजांप्रमाणें सर्व मुत्सद्देगिरीचे डावपेंच अवगत होते. त्यानें लॉर्ड कॉर्नवॉलिस याच्या गळ्यांत पडून दोस्तीचा तह या बाबतींत लागू करून मराठ्यांविरुद्ध संरक्षण देण्याची निकड लावली. लाटसाहेबांनीं निजामाबरोबर जिम्मेदारीचा तह (Treaty of Guarantee) करून पेशव्यास तसाच करण्याविषयीं कळविलें. पण आतां पेशवे सरकार महादजी शिंद्यांच्या बळावर सामर्थ्यवान् होते. नानानें इंग्रजांचा साम्राज्यशाहीचा खेळ ओळखून आम्ही व निजाम यांच्यामध्यें तुमची लुडबूड आम्हांला नको आहे, आपली दोस्ती फक्त टिपूविरुद्ध होती, असें स्पष्ट कळविलें. मशीरनें महादजी शिंद्यास फोडण्याचा प्रयत्न केला. पुण्याच्या कारभाऱ्यांस हाणून पाडण्यासाठीं मी तुमच्या मदतीला येतों, असें शिंद्याला कळवून पुण्याच्या रोखानें तो निघाला देखील! पण शिंदे आणि कॉर्नवॉलीस या दोघांनींहि त्याला चपराक लगावून चूप बसविलें. पण लवकरच महादजी वारला व कॉर्नवॉलीस बदलून गेला. त्याच्या जागीं सर जॉन शोअर हा कचखाऊ

धोरणाचा गव्हर्नर-जनरल आला. पेशव्यांनीं आम्हांवर काढलेली वीस वर्षांची चौथसरदेशमुखीची बाकी निव्वळ आम्हांला बुडविण्याची एक सबब आहे; तुम्ही दोस्तीच्या व जिम्मेदारीच्या तहानें आम्हांला संरक्षण देण्यास बांधील आहां, तेव्हां तसें तावडतोब करावें, असें तांतडीचें बोलणें मशीरनें इंग्रजांशीं लावलें. शोअरनें पुणें दरबाचा वकील मॅलेट याचा सल्ला घेऊन, मराठ्यांशीं या वेळीं वैर करणें तोट्याचें आहे हें ओळखून तटस्थ राहण्याचें ठरविलें. पण मशीरला मराठ्यांशीं सलोखासमेट करण्याचा शहाणपणा नको होता. तो मराठ्यांवर, विशेषतः नाना फडणिसांवर सारखा दांतओठ खात होता. मराठ्यांचा निजामाच्या दरबारीं असलेला शांत स्वभावाचा वकील गोविंदराव काळे याच्या तोंडावर तो पेशवे व फडणीस यांच्याबद्दल अनादरानें बोले. त्यांचा पाणउतारा होईल असे चाळे मुद्दाम चालू देई. आपण मराठ्यांना पुरून उरूं अशा दर्पोक्ती तोंडावाटें काढी; आंतून मराठ्यांची खोडकी मोडावी म्हणून युद्धाची तयारीहि त्यानें चालविलीच होती. पण कालहरणासाठीं तो मधून मधून पेशव्यांकडे शिष्टमंडळेंहि पाठवी. (निजामअल्ली पाहा).

इंग्रज निजामाला मदत करीत नाहींत हें पक्के कळल्यावर नानानें निजामावर स्वारी करण्याची जंगी तयारी केली. सर्व सरदाराना चिठ्या गेल्या. शिंदे, होळकर, भोंसले, पटवर्धन, वगैरे बावनपागे सरदार एकत्र येऊन सवा लाखावर मराठ्यांची फौज जथली. एवढी जूट पानपतानंतर केव्हांहि नव्हती व ती शेवटचीच होती. निजामाकडेहि लाखावर सैन्य खडें होतें. खर्ड्याच्या मैदानावर प्रत्यक्ष या दोन जंगी सैन्यांची झोंबाझोंबी न होतांच निजामाच्या घाबरटपणानें त्याला शरणागति पत्करावी लागली. त्यानें खर्ड्याच्या किल्ल्यांत आपणांस कोंडून घेतल्यानें उपासमारी झाली व शेवटीं गोविंदराव काळे यास मध्यस्थी घालून नामोष्कीचा तह करावा लागला. मशीरला प्रथम ताब्यांत दिल्याखेरीज नाना वाटाघाटीला कबूल होईना; तेव्हां नाइलाजानें निजामानें मशीरला मराठ्यांकडे ओलीस पाठविल्यावर १० एप्रिल १७९५ रोजीं तह झाला. तहाच्या बाबतींत मराठे नेहमीं फार उदार व सैलमंगळ असत, हा इतिहासकारांचा आरोप या वेळीं पण खोटा ठरला नाहीं. "दक्षिणेंत गोवध बिलकूल न करावा......हिंदुमुसलमान ईश्वराचे घरची. दोन्ही धर्म चालत असतां मुसलमानानें हिंदूचे जाग्यास उपद्रव करावा, हें बेमुनसफी व हिंदूनें आज तागाईत मुसलमानांचे जागे पीर पैगंबर यांसी दुसरी गोष्ट समजण्यांत आणिली नाहीं. तेव्हां मुसलमानानें हिंदूचे धर्मास खलश करूं नये. आपले चालीनें धर्मावरी कायम असावें. परस्परें मुजाहीम नसावें..." या प्रकारच्या धर्मस्वातंत्र्याच्या अटी त्यांत असल्या तरी प्रत्यक्ष साम्राज्यवाढीला किंवा आर्थिक बाजूकडे विशेषसा मराठ्यांना फायदा झाला नाहीं. मात्र निजाम आणि त्याचे दोस्त इंग्रज यांच्या नाकांवर नानानें मिरे वाटले खरे!

पण दैवदुर्विलसित असें कीं, खर्ड्याच्या तहाची शाई वाळते न वाळते तोंच पुण्यास सवाई माधवरावाला आकस्मिक अपघातानें मृत्यु आला व पेशवापदाविषयीं मुत्सद्दी आणि सरदार यांमध्यें लढा सुरू झाला. अशा प्रसंगीं मशीरला सोडून निजामाची थकबाकी उगवून घेण्याची स्फूर्ति निघाली. मशीरला राजाप्रमाणें पुण्यास खजिन्याच्या विहिरीजवळ बंगला-बागेंत (बहुधा आजच्या टिळक स्मारक मंदिराच्या जागेंत) इतमामानें ठेविलें होतें. तो पाताळयंत्री पुरुष तेथून बसल्या बसल्या राजकारण खेळत होता. नाना फडणिसानें खर्ड्याच्या तहाच्या बाबींची सूट देण्याचें कबूल करून त्याला आपल्या बाजूस ओढण्याचा डाव टाकला. शिंद्याचे कारभारी व परशुरामभाऊ पटवर्धन यांनीं त्याला खर्ड्याच्या लढाईचे करार पुरे करण्याच्या अटीवर १७९६ च्या जूनमध्यें मुक्त केलें. पण त्यानें उलट हा करार रद्द करून घेण्याच्या अटीवर नानासाठीं पुण्यास फौज उभारली! मराठ्यांच्या यादवींत निजामाचा शक्य तो फायदा करून देण्याचें त्याचें धोरण होतें व तें त्यानें पुरेंहि केलें. बाजीरावासाठीं नानानें निजामास जी सूट कबूल केली ती बाजीराव गादीवर आल्यावर मान्य करीना. मशीर रागावून चालूं लागला. तेव्हां निजामाचें आणि त्यामार्फत इंग्रजांचें साहाय्य संपादण्यासाठीं नाइलाजानें बाजीरावानें तहांतील बाबींत पाऊण हिस्सा सूट दिली. याप्रमाणें खर्ड्याच्या विजयावर बोळा फिरला! मशीरची सुटका झाल्यावरहि तो पुण्यास एक वर्ष होता व तेवढ्यांत मराठ्यांची लंगडी बाजू कोणती ती व त्यांच्यांतील कलहाचीं इंगितें समजावून घेतलीं. हैदराबादेस परत गेल्यावर त्याने इंग्रजांशीं जास्त मिळतें घेऊन १८०० सालीं तैनाती फौज ठेवण्याच्या पद्धतीस प्रथम कबुली दिली. ही पद्धति पुढें वसईच्या तहांत बाजीरावास स्वीकारावी लागली. ज्या दिवशीं शिंदे आणि इंग्रज यांची लढाई झुंपली त्याच दिवशीं बरींच वर्षें अपंग झालेला निजामअल्ली वारला. व मशीरनें निजामी तैनाती सैन्य मराठ्यांविरुद्ध लढविलें. पुढें भोसले आणि होळकर यांचा पाडाव करण्यास त्यानें इंग्रजांस साहाय्य दिलें. निजामच्या दरबारीं मशीरविरुद्ध वातावरण तयार झालें होतें. पण इंग्रजांनीं तें मशीरलाच हाताशीं धरून पार नाहींसें केलें, भोसल्यांचा वऱ्हाड निजामास दिला व पुढें परत घेतलाहि. याप्रमाणें निजाम कायमचा ब्रिटिशांच्या हातांतील बाहुलें होऊन राहिला. व आजवर त्यानें राज्य टिकविलें.

हल्लींचे निजाम मीर उस्मान अली हे १९११ सालीं गादीवर आले. यांचे वडील फार नांवाजलेले व उदार राजपुरुष होते. नबाब उस्मान अली हे चांगले सुविद्य व मुत्सद्दी राज्यकर्ते आहेत. त्यांनीं प्रजेला राज्यकारभारांत कांहीं हक्कहि दिले होते. मंत्रिमंडळ,

एक कायदेमंडळ, न्यायालयें, हायकोर्ट, विद्यापीठ, वगैरे सुधारणेच्या बाबी असल्या तरी त्यांत हिंदु प्रजेला फारसें प्रतिनिधित्व नव्हतें. बहुसंख्य प्रजा हिंदु असून बहुतेक वरिष्ठ अधिकारी मुसलमान असत. उर्दू ही अल्पसंख्याक लोकांची भाषा राजभाषा ठरवून तिचें शिक्षण राज्यांत सक्तीचें केलें. फाळणीनंतर तर उघड भारत सरकारशीं बेपर्वाईचें वर्तन त्यांच्या मंत्रिमंडळानें सुरू ठेवलें. रझाकार नांवाची इस्लामी स्वयंसेवकांची संस्था हिंदूंवर फार जुलूम करूं लागली होती तरी सरकारांत दाद लागत नसे. फाळणीनंतर हैद्राबाद हें स्वतंत्र राज्य आहे अशा घोषणा सुरू होऊन स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं सूत्रासूत्र कारस्थानें सरकार आणि मुसल्मानी संस्था यांची सुरू झालीं. भारत सरकारनें अनेक वेळां इशारे दिले असतांनाहि कांहीं उपयोग होईना; तेव्हां १९४८ च्या सप्टेंबर महिन्यांत चोहोंकडून हैद्राबाद संस्थान वेढून निजामास शरण आणला व राज्यकारभार आपल्या ताब्यांत घेतला व सुव्यवस्था ठेवली. नंतर दोन वर्षांनीं लोकनियुक्त प्रतिनिधींच्या सल्ल्यानें निजामानें तूर्त कारभार करावा व लवकरच घटना परिषद् भरवून पुढचें धोरण ठरवावें अशा अटींवर भारत सरकारनें आपला लष्करी अमल काढून घेतला. आतां संस्थानचे प्रतिनिधी भारताच्या पार्लमेंटमध्यें घेतले आहेत. निजाम हा हैद्राबाद संस्थानचा राजप्रमुख म्हणून आहे.

संस्थानांत तेलगू भाषा बोलणारे शें. ४६, मराठी बोलणारे शें. २६, कानडी बोलणारे शें. १४ व उर्दू बोलणारे शें. १० आहेत. संस्थानांत अनेक धर्मांचे लोक आहेत पण हिंदु व मुसलमान लोकांचाच विशेष भरणा आहे. शें. ८८.६ हिंदू व १०.४ मुसलमान आहेत. एकंदर लोकसंख्येपैकीं शें. ४६ लोक शेतकीवर उपजीविका करतात. ह्या संस्थानांतील मुख्य पिकें म्हटलीं म्हणजे ज्वारी, बाजरी, तीळ, कापूस, तूर व इतर कडधान्यें हीं होत. उस्मानसागर व हिमायतसागर हीं दोन मोठालीं धरणें पाणीपुरवठा करतात.

औरंगाबाद व पैठण हीं दोन शहरें पुरातन काळापासून नकशीचें काम व सोनेरी व रुपेरी कलाबतूचें काम ह्यांबद्दल प्रसिद्ध आहेत. ह्या संस्थानांतून बाहेर जाणारा माल म्हणजे धान्यें, कापूस, जवस, तीळ, भुईमूग, एरंडी, नीळ, तेलें, इमारतीचें लांकूड, कापड, कातडीं, गुरें व कोळसा, हे होत. आयात माल म्हटला म्हणजे गिरणीचें कापड, लोंकरीचें सूत, कचें रेशीम, मीठ, शुद्ध केलेली साखर, सुपारी, घोडे, गुरें, सोनें, रुपें, तांबें, पितळ व पितळेचीं भांडीं, लोखंड, इमारतीचें लांकूड, रॉकेल, अफू इ. होय. संस्थानची स्वतःची रेल्वे व टांकसाळ आहे.

हैद्राबादेस उस्मानिया विद्यापीठ असून उर्दू माध्यमांतून सर्व विषयांचें उच्च शिक्षण दिलें जात असे. स्त्रियांसाठीं एक कॉलेज आहे. तसेंच दार-उल्-उमल् नांवाचें पौरस्त्य विद्येचें कॉलेज आहे. संस्थानचें उत्पन्न सु. १६ कोटी रु. आहे.

हैद्राबाद—हें राजधानी शहर कृष्णेस मिळणाऱ्या मुसा नदीच्या उजव्या तीरावर आहे. हिंदुस्थानांत हें चौथें मोठें शहर आहे. लो. सं. (१९४१) ७,२८,४००. हें शहर १५८९ सालीं महमद कुली नांवाच्या पांचव्या कुतुबशाही राजानें स्थापिलें. ह्याचें पहिलें नांव भागानगर होतें. पण मागाहून त्याचें नांव हैद्राबाद असें ठेविलें. १६८७ त मोंगलांनीं हें प्रथम काबीज केलें व नंतर निजामानें तें राजधानीचें शहर केलें. ह्या शहरांत उत्तम इमारती बऱ्याच आहेत. त्या सर्वांत चारमिनार नांवाची इमारत अत्यंत प्रेक्षणीय आहे. त्याचप्रमाणें इतर इमारती म्हटल्या म्हणजे चारकमान, चारसुका हौज, दार-उस्‌शिफा, गोषा महाल, जान मशीद, मक्का मशीद, वगैरे आहेत. यांपैकीं बहुतेक इमारती सुल्तान महमद कुली कुतुबशहा यानें बांधिलेल्या आहेत. अलीकडील नवीन इमारतींत निजाम सरकारचे राजवाडे व कॉलेजें प्रेक्षणीय आहेत. ह्या शहरांत दोन मोठीं तळीं आहेत. हुसेनसागर व मीरआलम ह्या तळ्यांच्या योगानें सर्व शहर व आसपासची जमीन यांना मुबलक पाणी मिळतें. ह्या शहरांत एक विश्वविद्यालय, तीन कॉलेजें, अनेक इंग्रजी व देशी शाळा, रोमन कॅथॉलिक चर्च, सार्वजनिक उद्यानें, हायकोर्ट, कोठी, वगैरे संस्था आहेत.

**हैदरी, सर अकबर** (१८६९–१९४०)—एक हिंदी मुसलमान मुत्सद्दी. यांचें शिक्षण मुंबईस सेंट झेवियर कॉलेजमध्यें झालें. १८८८ मध्यें यांनीं फायनान्स खात्यांत नोकरी धरली. १८९० मध्यें ते संयुक्तप्रांतांत असिस्टंट अकौंटंट-जनरल होते. १८९७ मध्यें मुंबईस डेप्युटी अकौंटंट-जनरल होते. १९०१ मध्यें ते गव्हर्नमेंट प्रेस अकौंट्सचे परीक्षक नेमले गेले. १९०३ मध्यें कंट्रोलर ऑफ इंडियन ट्रेझरीज् या हुद्यावर होते. पुढें अनेक हुद्यांवर कामें केल्यानंतर १९२१ मध्यें हैद्राबाद संस्थानच्या कार्यकारी मंडळावर सभासद म्हणून नेमले गेले. तेथें याशिवाय त्यांच्याकडे अनेक हुद्दे असत. ते १९२५ मध्यें इंटर युनिव्हर्सिटी बोर्डाचे अध्यक्ष होते. १९१७ सालीं अखिल भारतीय मुसलमान शिक्षण परिषदेचे ते अध्यक्ष होते. ते गोलमेज परिषदेस हैद्राबाद संस्थानतर्फे गेले होते. यांनीं संस्थानांत अनेक सुधारणा केल्या व वऱ्हाडवर निजामाचें सार्वभौमत्व यांनींच ब्रिटिश सरकारकडून परत मिळविलें.

**हैनान बेट**—चीनच्या अगदीं दक्षिणेस व इंडोचीनमधील टांगकिंगच्या समोर हें बेट आहे. लो. सं. पंचवीस लक्ष. येथें उष्ण कटिबंधांतील भरपूर झाडी असून सर्व पर्वत अरण्यांनीं आच्छादलेले असतात. या जंगलांमुळेंच जंगलप्रदेशांतील युद्धकौशल्याचे धडे या ठिकाणीं जपानी सैन्यानें घेतले. १९३९ सालीं जपाननें हें बेट व्यापून देऊन मलाया आणि फिलिपाइन्स यांवर हल्ले

चढविण्याची तयारी केली. लष्करी दृष्टीनें या बेटाचें फार महत्त्व आहे. तिगस्तां चीनचा किनारा व्यापल्यावर कम्यूनिस्ट लोकांनीं याचाहि ताबा घेतला. ख्रि. पू. १११ मध्यें हन घराण्याच्या अमदानींत हें चीनच्या ताब्यांत आलें. तथापि त्या वेळेपासून बेटाची कांहींच सुधारणा केली गेली नाहीं, एवढेंच नव्हे तर पुढें पुढें काळ्यापाण्याच्या शिक्षेचे लोक येथें ठेवण्यांत येऊं लागले व परागंदा लोकहि याचा आश्रय घेत. राजधानी क्विंग-चांग बंदर.

**हैबतबुवा** (मृत्यु १८३६)—एक सुप्रसिद्ध वारकरी. हा उत्तर हिंदुस्थानांत गेला असतां तिकडून इकडे दक्षिण हिंदुस्थानांत परत येत असतांना, आपण इकडे सुरक्षित पोहोंचल्यास ज्ञानेश्वरांच्या समाधीपुढें सतत वीणा धरूं, असा यानें नवस केला होता. हा नवस अद्यापि याच्या घराण्याकडून पाळला जातो. 'ज्ञानदेव तुकाराम' हें भजन यानेंच सुरू केलें असें म्हणतात. वारकरी लोकांनीं भजन सुरू करतांना "रूप पाहतां लोचनीं।" हा अभंग प्रथम म्हणावा व भजनाच्या शेवटीं तुकारामें-ज्ञानेश्वराच्या आरत्या म्हणाव्यात असा परिपाठ यानें पाडला. आळंदीस याची समाधि आहे. सातारा जिल्ह्यांतील आर्फळ येथें याचे वंशज आहेत.

**हैहय राजे**—दक्षिण कोसलवर यांचें राज्य होतें. हे आपणास सहस्रार्जुनाचे वंशज म्हणवीत. यांना कांहीं इतिहासकार हय नांवाचे बाह्य शक समजतात. यांचीं दोन मोठीं राज्यें होतीं; एक मणिपूरचें (महाकोसल) हैहय व दुसरें त्रिपूरचें (कलचुरी) हैहय. रत्नपूरच्या (मणिपूरच्या) हैहयांचें राज्य छत्तीसगडावर इ. स. १४४ पासून १७४१ त भास्करराम कोल्हटकर त्यावर चालून जाईतोंपर्यंत अस्तित्वांत होतें. हे राजे आरंभीं बौद्ध धर्मी होते. ८ व्या शतकांत या राज्यांतील बौद्ध धर्माचें उच्चाटण झालें. हैहयांची एक शाखा कलचुरी (पाहा) नांवानें पुढें प्रसिद्धीस आली.

**होअर-बेलिशा, लेस्ली** (१८९५- )—एक ब्रिटिश राजकारणी पुरुष. हा लंडनमधील एका स्टॉक-ब्रोकरचा मुलगा. त्याचें शिक्षण क्लिफ्टन कॉलेज, ऑक्सफोर्ड येथील सेंट जॉन्स कॉलेज आणि इतर युरोपांतील प्रदेश या ठिकाणीं झालें. पहिल्या महायुद्धांत लष्करांत नोकरी करून तो मेजर झाला. १९२३ सालीं लिबरल पक्षातर्फे तो प्लिमाउथपैकीं डेव्हनपोर्ट विभागांतून पार्लमेंटांत निवडून आला, व पुढेंहि त्याच विभागाचा सभासद कायम राहिला. १९३१ सालीं तो नॅशनल लिबरल पक्षाला मिळाला. त्याच सालीं तो ट्रेड बोर्डाचा पार्लमेंटरी सेक्रेटरी झाला. १९३२ सालीं फडणिशी खात्याचा चिटणीस व नंतर १९३४ ते १९३७ पर्यंत वाहतूक मंत्री होता. त्या काळांत त्यानें फार महत्त्वाच्या सुधारणा केल्या. १९३५ त तो प्रिव्हि कौन्सिलचा सभासद झाला, आणि १९३७ सालीं युद्धखात्याचा चिटणीस या जागीं त्याची नेमणूक झाली. युद्धखात्यांत त्याची कर्तबगारी विशेष दिसून आली. त्यानें सैन्यभरतीच्या अधिक परिणामकारक योजना सुरू केल्या, व ब्रिटिश लष्कराला यांत्रिक शस्त्रधारी बनवलें. हें लष्कर १९३९ सालीं रणांगणावर गेलें होतें. त्यानें लष्करांतल्या अधिकारी-वर्गांतहि आमूलाग्र बदल केले, आणि सक्तीच्या लष्कर-भरतीची योजना अधिक परिणामकारक केली. १९४० सालीं चेंबरलेननें त्याला युद्धखातें सोडून ट्रेड-बोर्डाचें काम पत्करण्यास सांगितलें. तेव्हां होअर-बेलिशानें राजीनामा दिला व युद्धखात्याव्यतिरिक्त इतर ठिकाणीं काम करण्याचें नाकारलें.

**होआंग-हो**—हॉंग-हो; पीतनदी. चीनमधील एक मोठी नदी. तिबेटच्या पर्वतांतून उगम पावून अनेक वेडींवांकडीं वळणें घेत ही पूर्वेकडे पेचिली आखातास मिळते. हिची लांबी २६,००० मैल आहे. मुखापासून थोडें आंतपर्यंत ही नौकानयनाला योग्य आहे. हिला नेहमीं पूर येऊन फार नुकसान होतें.

**होकायंत्र**—(कॉंपस). दिशा दाखविण्यासाठीं याचा उपयोग फार असतो. कोठेंहि दिशेची कल्पना येऊं शकणार नाहीं अशा प्रवासांत याचा उपयोग केला जातो. विशेषतः सर्व बोटींवर होकायंत्र असतेंच. हें लोहचुंबकाचें केलेलें असतें. लोहचुंबक मध्यें टांगला

असतांना तो उत्तर-दक्षिण असा राहतो. बहुधा एखाद्या ॲल्युमीनियमच्या तबकडीवर हें यंत्र बसविलेलें असतें व तें सहज फिरावें अशी व्यवस्था केलेली असते. याच तबकडीवर पूर्व, पश्चिम, दक्षिण आणि उत्तर, तसेंच त्यांच्यामधील भाग आणि अंश (डिग्री) असे छापलेले असतात. ही तबकडी सहज फिरावी म्हणून एका खिळ्यावर बसविलेली असते. लोहचुंबक हा नेहमीं उत्तर-दक्षिण दिशा दाखवीत असल्यामुळें जसजशी बोट फिरेल त्याप्रमाणें हा फिरत राहतो. कोणत्या दिशेस बोट वळते आहे हें या होकायंत्राच्या साहाय्यानें समजतें.

या नाविक होकायंत्रांत एकमेकांना समांतर अशा अनेक चुंबकीय सुया असतात व त्या एका तबकडीवर बसविलेल्या असतात. ही खिळ्यावर मध्यभागीं बसविलेली तबकडी एका पितळी डबींत ठेवतात व नंतर ही लांकडी पेटींत बसविलेली डबी भिंतीला अशी टांगलेली असते कीं, बोट कशीहि फिरली तरी

तबकडी क्षितिजसमांतर ( हॉरिझांटल ) राहते. या तबकडीवर ३२ विभाग पाडलेले असतात व ते सर्व दिशा व उपदिशा यांचे होत.

निरीक्षका( सर्व्हेयर )चें होकायंत्र जरा निराळें असतें. एका वाटोळ्या पेटींत चुंबकीय सुई बसविलेली असून ती अंश, मिनिटें व सेकंद यांत विभागलेल्या एका तबकडीवर फिरते. या यंत्रांत व्यासाच्या दोन टोंकांशीं दोन उभीं लक्ष्यचिन्हें किंवा मखली (साइट्स) असतात. तीं अचूक पाहणी करतां यावी म्हणून असतात. होकायंत्र दाखवितो त्या रेषेची दिशा, सुईचा उत्तर ध्रुव आणि दृग्रेषा यांमधील अंशांचा आंकडा पाहून ठरवितां येते. या निरीक्षकाच्या होकायंत्रास एक तिपायी व साधनी ( लेव्हल ) अवश्य लागते.

**होगार्थ, विल्यम** ( १६९७–१७६४ )—एक इंग्रज विनोदी चित्रकार. त्याचा सुप्रसिद्ध चित्र-संग्रह 'दि हॅरलॉट्स प्रोग्रेस' यामुळें त्याला बरीच प्रसिद्धि मिळाली. नंतर त्यानें 'दि रेक्स प्रोग्रेस' आणि 'मॅरेज आ ला मोद' हे दोन चित्र-संग्रह प्रसिद्ध केले. तसेंच त्यानें अनेक खोदचित्रें तयार केलीं. या चित्रात त्यांची कल्पकता, विनोद व उपरोध हे गुण उत्तम दृष्टीस पडतात. त्यानें कित्येक पुतळेहि तयार केले. त्यांपैकीं गॅरिक, लोव्हॅट, विल्कीज् व तो स्वतः यांचे पुतळे फारच सुरेख आहेत. १७५३ सालीं त्याचा 'ॲनॅलिसिस ऑफ ब्यूटी' ( सौंदर्यचिकित्सा ) हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. इंग्रज चित्रकारांपैकीं लेखनाची आवड असलेला हा पहिला व थोर चित्रकार होय. त्याचीं चित्रें वास्तववादी आहेत, व तीं नॅशनल गॅलरी, स्टेट गॅलरी व सर जॉन सोअन्स म्यूझियम येथें ठेवलेलीं आहेत.

**हो चि मिन्ह** ( १८९०– )—व्हिएतनाम लोकराज्याचा पहिला अध्यक्ष. वयाच्या आठव्या वर्षापासून तो व्हिएतनाम क्रांतिकारक चळवळीच्या कार्यांत असे. तो प्रथम क्रांतिकारकांचा निरोप्या जासूद असे. १९११ सालीं त्याच्या सर्व कुटुंबियांना जन्मटेप कैदेची शिक्षा झाली. पण हो-चि-मिन्ह हा कांहीं युक्तीनें खलाशी म्हणून फ्रान्सला गेला. पॅरिसला त्याची कार्लमार्क्सच्या

नातवाशीं ओळख होऊन तो 'ल पॉप्युलेर' पत्रांत लिहूं लागला. १९२० त्यानें स्वतःच आंतर-वसाहत-संघ स्थापून 'दि पारिया' हें पत्र तो चालवूं लागला. नंतर फ्रेंच समाजवादी पक्षाचा तो सभासद झाला; व पुढें कम्यूनिस्ट पक्षांत शिरला. पण फ्रेंच पोलिसांचा जाच असह्य होऊन तो रशियाला गेला व तेथून कॅन्टनला जाऊन डॉ. सन्-यत्-सेनबरोबर कार्य करूं लागला. या ठिकाणीं त्यानें क्रांतिकारक व्हिएतनाम तरुणांचा एक संघ स्थापला व आशिया खंडांतील परतंत्र अशा चिनी, कोरियन, इंडोनेशियन, वगैरे लोकांमध्यें परस्पर-सहकार्य सुरू केलें.

१९३० सालीं तो इंडो-चीनला परत आला. पण पुढील सालीं पकडला गेला; पण लोकांच्या निषेधामुळें फ्रेंच सरकारनें त्याला सोडलें. नंतर १९३७ पर्यंत त्यानें व्हिएतनाम-स्वातंत्र्याचा लढा जोरानें चालविला. जपानच्या आक्रमणामुळें जपान हा व्हिएतनाम-सकट सर्व आशियाटिक राष्ट्रांचा शत्रु होता तरी चीननें होला थारा न देतां उलट कैदेंत टाकलें. पुढें जपानचा दुसऱ्या महा-युद्धांत पराभव झाल्यावर व्हिएतनामनें लोकराज्य जाहीर केलें ( १९४५ ), व होला पहिला अध्यक्ष निवडलें. हें लोकराज्य मजूर आणि शेतकरी यांचे होतें व त्याला सर्व लोकशाही पक्षांचा पाठिंबा होता. पण फ्रेंच सरकारला त्याला मान्यता द्यावयाची नव्हती; तेव्हां त्यानें या लोकराज्याला नेस्तनाबूद करण्याची तयारी केली. तेव्हां होच्या नेतृत्वाखालीं व्हिएतनाम सैन्य व फ्रेंचांचें सैन्य यांमध्यें सत्तेसाठीं लढा अद्यापि चालू आहे. अमेरिकेची फ्रेंचाना मदत आहे. तथापि हो-चि-मिन्हची सारखी सरशी होत असलेली दिसते.

**होंडुरास**—मध्य अमेरिकेंतील एक लोकसत्ताक संस्थान. बराच मुलूख डोंगराळ आहे. कांहीं मोठ्या नद्याहि आहेत. क्षेत्रफळ ४४,२७५ चौरस मैल. याच्या दोन्ही बाजूंस दोन महासागर आहेत. कॉफी, नारळ, तंबाखू, केळी, वगैरेंची चांगली पैदास आहे. कांहीं खाणी व कारखानेहि आहेत. लो. सं. ११,०५,५०४. वायव्येच्या भागांत प्राचीन मयसंस्कृतीचे अवशेष आहेत. राजधानी टेगुसिगाल्पा येथें एक विद्यापीठ आहे. २१ ते ४० वयापर्यंतच्या पुरुषांना सक्तीचें लष्करी शिक्षण असतें.

ब्रिटिश होंडुरास—ही मध्य अमेरिकेंतच एक ब्रिटिश राज-वसाहत ( क्राउन-कॉलनी ) आहे. कॅरेबिअन समुद्रावर याची किनारपट्टी आहे. याचें क्षेत्रफळ ८,५९८ चौ. मै. आहे. महोगनी वगैरे इमारती लांकूड बरेंच निघतें. कॉफीचें पीक महत्त्वाचें आहे. लो. सं. ६१,०६८. राजधानी बेलाइझ.

१५०२ सालीं कोलंबस येथें येण्यापूर्वी या भागांत मय इंडियन लोक राहत होते. १५३०, ते १८२१ पर्यंत हा देश ग्वाटेमालाला जोडलेला असे. नंतर स्वतंत्र लोकराज्य स्थापन झालें.

**होनाजी बाळ**—एक मराठी शाहीर. हा जातीनें गवळी असून पेशवाईच्या अखेरीस उदयास आला. याचा आजा सात शिलारखाने हा व सुलता बाळा पहिले हे नांवाजलेले लावणी

होते. याच्या घराण्यांतच कवित्वाचा गुण असे. त्रिंबकजी डेंगळ्याशीं याचा घरोबा असून त्याच्या वाड्यांतच याची बैठक चाले. रागदारीच्या लावण्या लोकप्रिय करण्याचें श्रेय यासच द्यावें लागेल. याच्या भैरवींतील लावण्या सुप्रसिद्ध आहेत. यानें रंगाच्या व खर्ड्याच्या लढाईचा पोवाडा रचला आहे. यांशिवाय स्वराज्य नष्ट होण्याच्या प्रसंगावरहि याचे दोन पोवाडे आहेत. याची 'घनश्याम सुंदरा' ही भूपाळी प्रसिद्धच आहे. अनंतफंदीचा हा समकालीन. बाजीरावाचा हा आवडता असे व यानेंहि बाजीरावावर अनेक कवनें रचिलीं. कंपनी सरकार व बडोदें सरकार यांच्याकडून होनाजीला वर्षासन असे. कांहीं खासगी भांडणावरून याच्या प्रतिस्पर्ध्यानें याचा खून केला.

**होनावर**—मुंबई, उत्तर कानडा जिल्हा, दक्षिणेकडील तालुका. क्षे. फ. ४२६ चौ. मै.. या तालुक्यांत होनावर व भटकळ अशीं दोन शहरें व १५२ खेडीं आहेत. या तालुक्यांत सतत वाहणाऱ्या नदीमुळें पाणी मुबलक आहे. होनावर शहरापासून ३८ मैलांवर गिरसप्पाचा (जोग) धबधबा आहे. येथें पाऊस १४० इंच पडतो. हवा चांगली आहे. होनावर शहर कारवारपासून ५० मैलांवर आहे. १६ व्या शतकाच्या आरंभीं येथून तांदूळ फार बाहेर जात असे. येथें १५०५ सालीं पोर्तुगीज लोकांनीं एक किल्ला बांधला, पण विजयानगरच्या राजांशीं या लोकांचा तंटा झाल्यामुळें हें शहर त्यांनीं जाळून टाकलें. पोर्तुगीज सत्तेचा ऱ्हास झाल्यावर बेदनूरच्या राजांनीं होनावर शहर घेतलें व नंतर हैदरानें त्यांचा पराभव करून शहर आपल्या ताब्यांत घेतलें. पुढें इंग्रजांचा व टिपूचा तंटा झाल्यावर तें कायमचें इंग्रजांच्या ताब्यांत गेलें. या शहराच्या उत्तरेस रामतीर्थ असून तेथें रामलिंगाचें देऊळ आहे. येथें म्युनिसिपालिटी आहे. चंदनी काम फार चांगलें होतें. लो. सं. ९,०००.

**होनोलुलु**—ही हवाई द्वीपसमूहाची राजधानी ओआहू बेटावर आहे. येथील बंदर सुरेख असून अगदीं मोठाल्या बोटी येथें येऊं शकतात. येथून साखर, कॉफी व फळें हा माल परदेशीं जातो. येथील हवा फार आल्हादकारक असल्यामुळें येथें पुष्कळ प्रवासी येऊन राहतात. लोकसंख्या १,३८,००० आहे.

**होन्नम्मा** (सतरावें शतक अखेर)—एक कानडी कवयित्री. ही अळसिंगरायाची शिष्या असून म्हैसूरच्या चिक्कदेवरायाकडे दासीचें काम करीत असे. चिक्कदेवराय व त्याची पट्टराणी यळंदूर-देवाजम्माणी यांच्या आग्रहावरून हिनें 'हदिबदेयधर्म' हा काव्यग्रंथ लिहिला. आपल्या ग्रंथांत हिनें व्यवहारांत मनुष्यानें कसें वागावें याबद्दल आपले विचार मांडले आहेत. हिचें पहिलें नांव संची होन्नी असें होतें.

**होन्शिउ**—होंडो, निप्पॉन. जपानी बेटांपैकीं हें सर्वांत मोठें असून त्याचें क्षेत्रफळ ८८,९१९ चौरस मैल आहे. त्याची लांबी सुमारें ८०० मैल आहे. याचा मधला भाग डोंगराळ आहे व तेथें फुजीयामा नांवाचा ज्वालामुखी आहे. दुसरा ओशीमा हाहि जिवंत ज्वालामुखी आहे. येथें लहान लहान नद्या आणि बरींच सरोवरें आहेत. त्यांपैकीं बिवा सरोवर पवित्र मानतात. येथें पाऊस फार पडतो, आणि धरणीकंप वरच्यावर होतात. येथें ओक, बीच, मॅपल, पाइन, सेडार, वगैरे झाडांचीं पुष्कळ जंगलें आहेत. येथें फळझाडांची लागवड पुष्कळ आहे. त्यांत प्लम् व चेरीब्लॉसम या फळांबद्दल या बेटांची प्रसिद्धि आहे. येथें सोनें, रुपें, तांबें, जस्त आणि लोखंड हीं खनिज द्रव्यें सांपडतात. मच्छीमारीचा धंदा महत्त्वाचा आहे. येथून तांदूळ, रेशीम, चहा, आणि अनेक प्रकारचे चैनीचे जिन्नस हा माल परदेशीं जातो. राजधानी टोकियो असून इतर मोठालीं शहरें व बंदरें आहेत तीं—याकोहामा, कीओटो, हिरोशिमा, कोबे, ओसाका, शीमोनेसेकी. लोकसंख्या पांच कोटींवर आहे.

**होप, ॲन्थनी** (१८६३–१९३३)—(सर ॲन्थनी होप हॉकिन्स याचें संक्षिप्त नांव). एक ब्रिटिश कादंबरीकार. त्यानें 'डॉली डायलॉग्ज' हें आपलें पुस्तक प्रसिद्ध केल्यावर तो प्रथम लोकांना माहीत झाला. त्याची पहिली अद्भुतरसात्मक कादंबरी 'दि प्रिझनर ऑफ झेंडा' ही तावडतोब खपली (१८९४). त्याचे इतर बरेच ग्रंथ आहेत. 'डॉली डायलॉग्ज' मध्यें नर्म विनोद भरलेला आहे. त्यानें नाटकेंहि लिहिलीं आहेत. १९१८ त त्याला उमराव करण्यांत आलें.

**होबर्ट**—ही टास्मानियाची राजधानी डर्वेंट नदीवर तिच्या मुखापासून १२ मैलांवर आहे. येथें एक विद्यापीठ आहे. येथें दारू, पिठाच्या गिरण्या, चामड्याचें काम, लोंकर, वगैरेचे कारखाने आहेत. हें बंदर मोठें व चांगलें सुरक्षित आहे. व येथें अगदीं मोठालीं जहाजेंहि येऊं शकतात. येथून लोंकर, इमारती लांकूड, फळें, जस्त, वगैरे माल परदेशीं जातो. लोकसंख्या ५८,२७०.

**होमर**—एक प्राचीन सुप्रसिद्ध ग्रीक कवि. 'ईलियड' व 'ओडिसी' हीं महाकाव्यें त्यानें रचिलीं आहेत अशी आख्यायिका आहे. होमर नांवाची व्यक्ति खरोखरीच होऊन गेली किंवा काय याविषयीं शंका व्यक्त करण्यांत येते. होमरच्या जीवनाविषयीं विश्वसनीय माहिती सांपडतच नसल्यामुळें पुष्कळ शहरें होमरचें जन्मस्थान म्हणून आपला हक्क सांगूं लागलीं. यांत स्मर्ना व किऑस हीं

हैद्राबाद (सिंध)—वातायनें (पृ. २७७०)

हॉलंड—हेग येथील कालव्याकांठचा रस्ता (पृ. २७१०)

मुख्य होत. होमर अंध होता असा सार्वत्रिक समज आहे. तो ख्रि. पू. १२ व्या शतकाच्या प्रारंभापासून तों ७ व्या शतकाच्या प्रारंभापर्यंत केव्हां तरी होऊन गेला असावा, असा संशोधकांचा कयास आहे. कांहींचें म्हणणें असें आहे कीं, होमर हें त्याचें खरें नांव नसून त्यानें धारण केलेलें नांव होतें. होमर म्हणजे एकत्र करणारा. यावरून असें दिसतें कीं, होमर हा मूळ कवि नसून प्रचलित कवितांचा संग्राहक अथवा संकलनकार होता. (ईलियड व ओडिसस पाहा).

**होमिओपाथी**—वैद्यकांतील हें नवें शास्त्र १४० वर्षांपूर्वी जन्मास आलें. त्याचा प्रस्थापक जर्मनींतील डॉ. सॅम्यूएल हानेमान (पाहा) होय. होमिओपाथीच्या तत्त्वज्ञानांत देह व मन यांच्या मागें असणाऱ्या जीवनतत्त्वाला प्राधान्य दिलेलें आहे. आरोग्य म्हणजे केवळ देह व मन यांचें सहकार्य व स्वास्थ्य नसून देह, मन व जीवनतत्त्व यांचें सहकार्य व स्वास्थ्य होय. ह्या त्रिविध सहकार्यापासून व स्वास्थ्यापासून विचलित होणें म्हणजे विकृति होय, असें हें नवें शास्त्र शिकवितें.

प्राणिमात्रांतच नव्हे तर पदार्थमात्रांत वरील जीवनतत्त्व अथवा आंतरिक शक्ति असते. आणि म्हणून विकृतिनिवारणार्थ योजावयाच्या औषधिद्रव्यांतील केवळ बाह्य गुणधर्मांवर विसंबून न राहता त्यांतील आंतरिक शक्तीचाहि उपयोग करून घेतला पाहिजे असें हें शास्त्र सांगतें. औषधींतील ही शक्ति विभजना-(पोटेन्टायझेशन)नें कार्यकारी होते.

डॉ. हानेमान हा पाश्चात्य वैद्यकातहि पारंगत होता. त्यानें त्या वैद्यकाच्या विकृतिविज्ञानांत व चिकित्सापद्धतींत क्रांति करून नवीन समचिकित्सापद्धति जन्मास आणली. या चिकित्सेचें रहस्य 'समः समं शमयति' ह्या वाक्यांत आहे. ह्या शास्त्राची प्रारंभीं सांगितलेली तात्त्विक भूमिका आणि ही समचिकित्सा हानेमानाच्या 'आर्ग्यानॉन ऑफ मेडिसिन' ह्या ग्रंथांत विशद झालेली आहे. हा ग्रंथ होमिओपाथीचा वेदग्रंथ होय. नवचिकित्सापद्धतीसह हें शास्त्र एक संपूर्ण वैद्यक आहे.

पाश्चात्य वैद्यक व होमिओपाथिक वैद्यक यांमध्यें फरक आहे तो फक्त चिकित्सा-पद्धतींत व तिला पायाभूत असणाऱ्या उपरोक्त तत्त्वज्ञानांत आहे. शारीर, इंद्रियविज्ञान, वैद्यकतत्त्व, विकृति-विज्ञान, सौतिक शल्यकर्म, इ. वैद्यकांत अंतर्भूत होणारीं सर्व शास्त्रें दोन्हीकडे सारखींच आहेत. परंतु नवचिकित्सा पद्धतीमुळें औषधी गुणधर्मशास्त्रांत व विकृति-विज्ञानाच्या भाष्यांत (इंटरप्रिटेशन ऑफ पॅथॉलॉजी) फरक पडतो. पूर्वीच्या औषधी गुणधर्मशास्त्रांत, मनावर व आंतरिक शक्ती(डायनॅमिक फोर्स)वर होणाऱ्या औषधी क्रिया नमूद केलेल्या नसत. तसेंच विकृति-विज्ञानांतहि आंतरिक शक्तीचा पूर्वी विचार होत नसे. होमिओपाथीनें ह्या दोन्ही क्षेत्रांत नवीन दृष्टि निर्माण केली.

समचिकित्सा तत्त्व समजण्यास उपशमनियम (लॉ ऑफ क्युअर) समजला पाहिजे. कोणताहि नियम सत्य ठरल्यास तो विश्वनियमांमध्यें बसला पाहिजे. जीवन हा विश्वांतील एक भाग होय. ज्या नियमांनीं विश्व चालतें तेच नियम जीवनासहि लागू असणार. आकर्षण हा विश्वाचा मध्यवर्ती नियम होय. म्हणून खरा उपशम व्हावयाचा तो ह्या नियमास अनुसरूनच होणार असें होमिओपाथीचें म्हणणें आहे. ह्याचा थोडक्यांत खुलासा खालीं दिल्याप्रमाणें आहे. सर्व वैद्यकांमार्फत होणाऱ्या उपशम क्रिया डोळ्यांपुढें आणल्यास त्यांचे सामान्यतः चार वर्ग पडतात: निरोधन (लिमिटेशन), निःसत्त्वीकरण (न्यूट्रालिझेशन), उन्मूलन (एक्सटर्मिनेशन) आणि अपनयन (एलिमिनेशन) हे ते होत. ह्या सर्व क्रियांमध्यें अपनयनाची क्रिया श्रेष्ठ होय. तिच्यामुळें रोगाचें कारण शरीराबाहेर संपूर्णतः काढलें जातें आणि ही क्रिया आकर्षणाच्या नियमानें घडून येते असें पदार्थविज्ञानशास्त्र, रसायनशास्त्र व प्राणिशास्त्र यांवरून सिद्ध होतें. 'सारखें सारख्यास आकर्षितें', हें ह्या नियमाचें रहस्य होय. समचिकित्सेचें मर्महि तेंच आहे.

चिकित्सेचें साधन अथवा औषधी द्रव्य रोगकारणास मारक व्हावें म्हणून जरी द्यावयाचें असतें तरी रोग्यास तें आधिकांत आधिक निरुपद्रवी ठरावें म्हणून तें रोग्याच्या शरीरात जरूर तितकाच काळ व जरूर तितक्याच प्रमाणांत राहूं देण्याचा प्रयत्न कोणत्याहि चिकित्सेनें केला पाहिजे हें निर्विवाद होय. म्हणूनहि होमिओपाथींत तें विभजनपद्धतीनें सूक्ष्म सूक्ष्म बनविलें जातें व फार थोड्या वेळां देण्यांत येतें.

होमिओपाथींत रोग्याच्या अथवा रोगलक्षणांच्या वैयक्तीकरणा-(इन्डिव्हिज्युअॅलिझेशन)वर अतिशय भर असतो. देह, मन व आंतरिक शक्ति यांबाबत प्रत्येक मानवाचें कांहीं वैशिष्ट्य असतें. त्यामुळें प्रत्येकाच्या रोगोद्भूत लक्षणसमुच्चयाचेंहि वैशिष्ट्य असतें. असें असल्यामुळें उपचार करतांना प्रत्येक रोग्याचें वैयक्तिक चित्र डोळ्यांपुढें उभें केलें पाहिजे, असा ह्या शास्त्राचा आग्रह आहे.

त्याचप्रमाणें एका वेळेस एकच औषध दिलें जावें असा ह्या शास्त्राचा एक सिद्धांत आहे. सर्व लक्षणांशीं जमूं शकणारीं एक एक औषधें सृष्टींत आहेत. निरोगी माणसांना तीं देऊन त्यांच्या देह, मन व आंतरिक शक्ति ह्या त्रिविध रचनेवर होणारे त्या त्या औषधांचे परिणाम हानेमाननें नोंदून आपलें शुद्ध औषधी-गुणधर्मशास्त्र (मटीरिआ मेडिका प्युरा) तयार करून ठेवलें आहे.

होमिओपाथीचें सार पुढें दिल्याप्रमाणें आहे: जीवनक्रियेचा आधार व औषधी द्रव्यांत अंतर्भूत असणारें जें चैतन्य अथवा

आंतरिक शक्ति तिच्याकडे ह्या शास्त्रानें वैद्यकाचें लक्ष वेधलें आणि रोगोपशमाकरितां रोग्यांचें वैयक्तीकरण, औषधांचें सूक्ष्मीकरण, एकाकी औषधाची योजना आणि समचिकित्सेचा अवलंब हीं वैद्यकास शिकविलीं.

सर्व विलंबी रोगांचें मूळ शरीरांत कमीअधिक प्रमाणांत मुरून राहणारे उपदंश, परम्यासारखा एक विकार आणि खरूज ह्या तीन रोगांमध्यें असतें, असा हानेमानाचा एक सिद्धान्त आहे. आणि तो त्यानें आपल्या 'क्रॉनिक डिसीझेस' ह्या पुस्तकांत मांडला, हें येथें नमूद करणें जरूर वाटतें. [डॉ. अलेन, डॉ. केंट, डॉ. क्लोज, डॉ. गुणे, डॉ. पळसुले, डॉ. फॅरिंग्टन, डॉ. भोरकर, डॉ. लिलिएन्थल, डॉ. महेंद्रलाल सरकार व डॉ. हानेमान या दिवंगत होमिओपाथिक तज्ञांचीं चरित्रें इतरत्र दिलींच आहेत.]

**होयसळ (बल्लाळ) राजे**—होयसळ हे इतर प्रसिद्ध घराण्यांप्रमाणें सोमवंशी यदुकुलांतील होते. पोयसळ, चोयसळ, होयसळ, होयसण, वगैरे त्यांचीं निरनिराळीं नांवें आहेत. ह्या घराण्याची पौराणिक वंशावळ प्रथम इ. स. १११७ च्या एका ताम्रपटांत (म्हणजे बहुधा हें घराणें उदयास आणणारा विष्णुवर्धन याच्या वेळच्या) दिलेली आढळते. ऐतिहासिक वंशावळ विनयादित्यापासून (इ. स. १०४८) सुरू होते. या घराण्यातील राजे पुढीलप्रमाणें—(१) विनयादित्य; यास त्रिभुवनमल्ल १ ला देखील म्हणत. हा पश्चिमेकडील चालुक्य विक्रमादित्य ६ वा, याचा मांडलिक. याचा मुलगा (२) एरेयंग किंवा एरेगंग. याचा एक मुलगा (३) बल्लाळ १ ला; व दुसरा (४) विष्णुवर्धन; ह्याला उदयादित्य, बिट्टिदेव, बिट्टिग, त्रिभुवनमल्ल २ रा, भुजबलगंग, वीरगंग आणि विक्रमगंग देखील म्हणत. (५) एरेयंगचा तिसरा एक मुलगा उदयादित्य नांवाचा होता. विष्णुवर्धनाचा मुलगा (६) नरसिंह १ ला; याला वीरनरसिंह किंवा विजयनरसिंह असें देखील म्हणतात. मुलगा (७) बल्लाळ २ रा किंवा वीर बल्लाळ. मुलगा (८) नरसिंह २ रा किंवा वीरनरसिंह; याला देवगिरीच्या यादवांनीं जिंकलें. मुलगा (९) सोमेश्वर; हा चोळ देशांत विक्रमपूर येथें राज्य स्थापन करून राहिला. मुलगा (१०) नरसिंह ३ रा; यानें द्वारसमुद्र येथें राज्य केलें. मुलगा (११) बल्लाळ ३ रा किंवा वीरबल्लाळदेव; यानें इ. स. १३१० च्या मुसुलमानांच्या आक्रमणापर्यंत राज्य केलें (बल्लाळ होयसळ पाहा). द्वारसमुद्र ही होयसळांची राजधानी होती. हळेबीड येथें होयसळांच्या कारकीर्दींत बांधलेलीं अप्रतिम शिल्पाचीं देवळें यांच्या वैभवाची साक्ष देतात.

**होरेस** (खिस्तपूर्व ६५–८)—एक रोमन कवि. रोम येथें साधारण व्याकरण व वाङ्मय यांचा अभ्यास केल्यावर पुढील शिक्षणाकरितां तो अथेन्सला गेला. पण याच वेळीं देशांत यादवी सुरू झाल्यामुळें आपलें शिक्षण सोडून तो ब्रूटसच्या पक्षास मिळाला. फिलिप्पीच्या लढाईंत तो लष्करी ट्रायब्यून होता. लढाईनंतर तो रोमला परत आला. व त्यानें क्वेस्टरच्या कचेरींत कारकुनाची नोकरी मिळविली. येथें असतांना व्हर्जिल व व्हेरियन यांनीं त्याची मेसिनास याजबरोबर ओळख करून दिली. होरेसनें लॅटिन भाषेंत कविता लिहिली. त्यानें उपहासात्मक काव्यांचे दोन ग्रंथ व 'इपोडस' (निंदात्मक लेख) असे ग्रंथ प्रसिद्ध केले. यांशिवाय निरनिराळ्या विषयांवर लिहिलेल्या स्तोत्रां(ओड्स)चीं चार पुस्तकें व पत्रें त्यानें लिहिलीं. नैतिक विषयांत किंवा काव्याच्या बाबतींत कल्पना व उत्साह हीं सद्विचार व विवेकयुक्त निर्णय यांपेक्षां गौण आहेत असें त्याचें मत होतें. साधा विनोद, छंदांवर प्रभुत्व, उत्कृष्ट भाषाशैली हे त्याचे गुण त्याच्या काळींच त्याला मान्यता मिळवून देणारे ठरले, इतकेंच नव्हे तर ते त्याला सार्वकालिक मान्यता देणारेहि आहेत यांत शंका नाहीं.

**होलिया, होलार**—म्हैसूर संस्थानांतील एक जात. एकंदर लो. सं. (१९११) ६,१३,२४८. या लोकांचा वडिलोपार्जित धंदा खेड्यांतील राखणीचा किंवा शेतीचा आहे. पण हल्लीं सुमारें ½ लोकच हा धंदा करतात. बाकीचे सर्व लोक खाणींत अगर इतर ठिकाणीं मजुरी करतात. 'होलिया' या शब्दाचा अर्थ 'देशाचा मनुष्य (देसूर)' असा होतो. यावरून हे लोक येथील मूळचे रहिवासी असावे असें अनुमान निघतें. हे लोक तामिळ, तेलगू, कानडी आणि मराठी या भाषा बोलतात. मुलीस योग्य वर न मिळाल्यास तिचें झाडाबरोबर लग्न लावतात; मग तिनें आपल्या जातीच्या कोणत्याहि पुरुषाबरोबर राहावें. हिला होणारी संतति औरस म्हणून समजली जाते. त्याचप्रमाणें एखादा नवस केला असल्यास त्या नवसाप्रमाणें मुलीस देवतेस अर्पण करतात. यांच्यांत घटस्फोटाची चाल रूढ आहे. हे लोक श्राद्ध करीत नाहींत. यांची वस्ती गांवाबाहेर असते. कारण हे गांवांत अस्पृश्य समजले जातात. हे बहुधा रुधिरप्रिय क्षुद्र देवतांचे भक्त आहेत. दास, जोगी, वगैरे यांच्यांतील भिक्षुक होत.

**होल्म्स, ऑलिव्हर वेंडेल** (१८०९–१८९४)—या अमेरिकन ग्रंथकाराचा जन्म मॅसाच्युसेट्स संस्थानांत केंब्रिज येथें झाला. १८४७ मध्यें तो हार्वर्ड विद्यापीठांत शारीरशास्त्राचा प्राध्यापक होता. यानें बरेच गद्यग्रंथ लिहिले आहेत; त्यांमध्यें 'न्याहारीच्या वेळचा प्रोफेसर', व 'कवि व हुकूमशहा' हे प्रसिद्ध आहेत. यानें 'एलसी व्हेनेर', 'संरक्षक दूत' व 'आमरण द्वेष' या तीन कादंबऱ्याहि लिहिल्या आहेत. याचीं कांहीं काव्येंहि प्रसिद्ध आहेत.

**होस्पेट**—मद्रास, बल्लारी जिल्ह्यांत हा तालुका आहे. क्षे. फ. ५३७ चौ. मै.. ह्या तालुक्यांत होस्पेट व कांपली हीं दोन

शहरें असून १२१ खेडीं आहेत. ह्या खेड्यांपैकीं अतिशय प्रसिद्ध म्हणजे हंपी (पाहा) हें होय. कारण येथें विजयानगर ह्या इतिहासप्रसिद्ध शहराचे जुने अवशेष सांपडतात. बल्लारी जिल्ह्यांतील हा एकच असा तालुका आहे कीं, ज्या ठिकाणीं दुष्काळाचें भय नाहीं. कारण तुंगभद्रा नदीचें पाणी ह्या तालुक्यांतल्या कांहीं भागाला चांगलें मिळतें. येथील मुख्य पिकें म्हणजे ऊंस व तांदूळ हीं होत.

हें शहर विजयानगरच्या कृष्णदेवरायानें इ. स. १५०९–१५२० या दरम्यान वसविलें. व हें त्यानें नागलादेवी नांवाच्या कलावंतिणीशीं लग्न झाल्यावर तिच्या स्मरणार्थ वसविल्यामुळें ह्या शहराचें नांव त्यानें नागलपूर ठेविलें. कृष्णदेव ह्यानें ह्या शहराच्या दक्षिणेस मोठा तट बांधविला. होस्पेट शहरच्या दक्षिणेस शंकूसारखा निमुळता असा एक डोंगर आहे. ह्या डोंगराचें नांव जलदराशी आहे. ह्याशिवाय जंबूनाथ कोंडा नांवाचें उंच शिखर व अत्यंत सुंदर दरीमध्यें बांधलेलें जंबूनाथाचें देवालय हीं दोन प्रेक्षणीय स्थळें आहेत.

**हौप्टमन, गरहार्ट** (१८६२–१९४६)—एक जर्मन नाटककार. याचा बाप खाणावळवाला होता. पण यानें बरेंच शिक्षण घेऊन बराच प्रवासहि केला. १८८९ सालीं त्याचें पहिलें नाटक 'सूर्यास्तापूर्वी' हें प्रसिद्ध झालें व फार गाजलें. यानंतर त्यानें अनेक नाटकें लिहिलीं. याच्या कादंबऱ्याहि आहेत. याच्या ग्रंथांचे इतर भाषांत अनुवाद झाले आहेत. हौप्टमनला १९१२ सालीं वाङ्मयाबद्दलचें नोबेल पारितोषिक मिळालें. गरीब लोकांचें कष्टप्रद जीवन रंगविण्यांत तो फार प्रवीण होता. 'विणकरी' मध्यें सायलेशियन कोष्ट्यांची उपासमार; 'हॅनेल्सचें परलोकगमन' यांत निर्घृण बापाच्या तडाख्यांतून सुटण्यासाठीं एका गरीब मुलीचा आत्महत्येचा प्रयत्न; 'फुर्मान हेनल्शेल'मधील विषयी पत्नीमुळें सज्जन खटारेवाल्याचा झालेला नाश; 'रोझ बर्न्ड' यांतील निंदेमुळेंच कुमार्गाला लागलेली तरुणी; इत्यादि त्यानें रंगविलेले प्रसंग हृदयस्पर्शी आहेत. त्यानें समाजदोषांचें चांगलें विदारण केलें आहे.

**हौरा**—बंगाल, बरद्वान भागांत हा लहान जिल्हा आहे. क्षे. फ. ५१० चौ. मै. या जिल्ह्यांतून दामोदर नदी दक्षिणोत्तर जाते व ती हुगळी नदीस मिळते. या जिल्ह्यांत पाऊस ५७ इंच पडतो. येथली हवा कलकत्त्यासारखी आहे. या जिल्ह्यांत वारंवार महापूर येतात. हा जिल्हा बंगाली हिंदु राज्यांपैकीं होता. हौरा शहराच्या आसपासचा भाग बऱ्याच दिवसांपासून विलायती व्यापारी वर्गाचें महत्त्वाचें ठिकाण होतें. पण १६ व्या शतकाच्या अखेरीस या शहराचें महत्त्व कमी झालें. १८१९ सालापासून हुगळी व हौरा हीं बरद्वानपासून वेगळीं केलीं गेलीं व १८४३ सालीं हौरा जिल्ह्याला निराळा मॅजिस्ट्रेट मिळाला.

लो. सं. सुमारें सव्वादोन लाख. येथील मुख्य पीक म्हणजे तांदूळ होय. याशिवाय इतर पिकें म्हणजे गहूं, जवस, मका, मोहरी, ताग व अंबाडी हीं होत. तागाच्या मालाची ही मोठी पेठ आहे. येथून निर्गत माल म्हणजे तांदूळ, हुक्का, कच्चीं कातडीं, सुती कापड, कापूस, रेशीम, विटा व दोर या जिनसा होत. व आयात माल म्हणजे तांदूळ, गहूं, कडधान्यें, तीळ, विलायती कापड, रॉकेल, तागाचें कापड, अंबाडी, तूप, साखर, मसाला, विलायती दारू, वगैरे जिनसा होत. या जिल्ह्यांतील साक्षरांचें प्रमाण शें. १४ आहे. मुख्य शिक्षणसंस्था म्हणजे सिव्हिल इंजिनिअरिंग कॉलेज (सिबपूर) ही होय.

**ह्यूगो, व्हिक्टर** (१८०२–१८८५)—१९ व्या शतकांतील पहिल्या प्रतीचा फ्रेंच कवि, नाटककार, निबंधकार व कादंबरीकार. 'ले मिझराब्ल' या प्रख्यात कादंबरीचा जनक म्हणून जग त्याला ओळखतें. ही कादंबरी १८६२ सालीं निरनिराळ्या दहा भाषांत एकाच वेळीं प्रसिद्ध करण्यांत आली. यांत पाप व अधोगति यांच्या गर्तेत पडलेल्या जीन व्हॅलजीन नामक नायकानें आत्मोद्धार कसा करून घेतला ही कथा रेखाटली आहे.

व्हिक्टर ह्यूगो हा एका सुप्रसिद्ध सेनापतीचा मुलगा. मॅड्रिड व पॅरिस येथें त्याचें शिक्षण झालें. आयुष्याच्या पूर्वार्धांत जरी त्याचा ओढा राजपक्षाकडे होता, तरी उत्तरार्धांत तो लोकशाहीचा कट्टा कैवारी झाला. १८२२ सालीं त्याच्या कवितांचा एक संग्रह प्रसिद्ध झाला. १८२३ व १८२५ या वर्षी अनुक्रमें 'हन्स ऑफ आयलंड' व 'बग गरगल' या कादंबऱ्या प्रकाशित झाल्या. ह्यूगो हा रोमँटिक संप्रदायाचा पुढारी होता. क्रॉमवेल, हेरनी, मेरियन् डेलोर्म, ल ऱ्वा साम्यूज, ऱ्यु ब्लास, इ. त्याचीं नाटकें होत. तो १८४१ सालीं फ्रेंच ॲकॅडेमीचा सभासद झाला. १८४५ सालीं लुई फिलिप यानें त्याला फ्रान्सचा सरदार केलें. १८४८ च्या राज्यक्रांतीच्या वेळीं तो राजकारणाच्या जंजाळांत सांपडला. प्रथम तो नेपोलिअनचा पक्षपाती होता पण पुढें लोकपक्षाचा पुढारी झाला. नेपोलिअन सत्तारूढ झाल्यावर त्याजविरुद्ध झगडा चालू ठेवल्यामुळें याला परागंदा व्हावें लागलें. ब्रुसेल्समध्यें निर्वासित म्हणून असतांना त्यानें 'नेपोलिअन दि लिटल' (क्षुद्र नेपोलिअन) ही उपहासात्मक कविता लिहिली. 'नाइन्टीथ्री' (त्र्याण्णव) कादंबरी त्यानें आपल्या वयाच्या सत्तरी ओलांडल्यावर प्रसिद्ध केली.

**ह्यूजिन्स, सर विल्यम** (१८२४–१९१०)—एक इंग्रज ज्योतिषशास्त्रज्ञ. खगोलाची माहिती मिळविण्याकरितां वर्णपटदर्शका (स्पेक्ट्रॉस्कोप)चा उपयोग कसा करावा, व त्याच्या साहाय्यानें

तारे, धूमकेतु, तेजोमेघ, वगैरेंची रचना पदार्थविज्ञान व रसायनशास्त्र या शास्त्रांच्या दृष्टीनें कशी आहे, यासंबंधीं त्यानें पुष्कळसें संशोधनकार्य केलें आहे. तसेंच त्यांच्या गती कशा व किती वेगाच्या आहेत, यासंबंधीं त्याचें संशोधन आहे. तारे व त्यांचे वर्णपट( स्पेक्ट्रा ) यांची माहिती मिळविण्याकरितां फोटोग्राफीचा उपयोग करण्यांतहि त्याला फार यश आलें आहे.

**ह्यूजेस, डेव्हिड एडवर्ड** ( १८३१–१९०० )—एक ॲंग्लो-अमेरिकन विद्युतशास्त्रज्ञ. १८५५ सालीं त्यानें मुद्रक तारायंत्र ( प्रिंटिंग टेलिग्राफ ) या आपल्या यंत्राचें पेटंट मिळविलें, आणि संयुक्त संस्थानांत त्या यंत्राचा उपयोग लगेच करण्यांत येऊं लागला; आणि १८७६ सालपर्यंत त्याचा उपयोग युरोपांतील प्रत्येक देशांत सुरू झाला. ध्वनिवर्धक ( मायक्रोफोन ) व प्रेषणतुला ( इंडक्शन बॅलन्स ) हीं यंत्रें त्यानें नवीन शोधून काढलीं.

**ह्यूजेस, थॉमस** ( १८२२–१८९६ )—एक इंग्रज ग्रंथकार. 'टॉम ब्राउन्स स्कूलडेज' या कादंबरीनें त्याची फार प्रसिद्धि झाली. या कादंबरींत रुग्बी येथील विद्यालयीन जीवन वर्णिलें आहे. नंतर त्याचीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं तीं—'टॉम ब्राउन ॲट ऑक्सफर्ड', 'ए लेमन्स फेथ', 'आलफ्रेड दि ग्रेट', 'मॅन्‌लिनेस ऑफ खाइस्ट' ( ख्रिस्ताचें पौरुष ) हीं होत.

**ह्यूम, ॲलन ऑक्टेव्हियन** ( १८२९–१९१२ )—हिंदी राष्ट्रीय सभेचे जनक. सन १८४९ मध्यें हे बंगालमध्यें सिव्हिल सर्व्हिसमध्यें दाखल झाले. १८४९–१८६७ पर्यंत हे सध्यांच्या युक्त प्रांतातील इटावा जिल्ह्याचे कलेक्टर होते. त्या वेळीं १८५७ सालच्या स्वातंत्र्ययुद्धांत यांनीं फार महत्त्वाची कामगिरी करून आपल्या जिल्ह्यांतील लढ्यामध्यें सरकारास यश मिळवून दिलें. यांनीं इटावा जिल्ह्यांत मोफत शाळांची योजना करून त्यांचा खर्च जमीनदारांकडून कराच्या रूपानें घेण्याची पद्धति पाडली. तीस पल्काबंदी पद्धति म्हणत. अशा तऱ्हेच्या १८१ शाळा स्थापन करण्यांत आल्या. परंतु २८ जानेवारी १८५९ रोजीं निघालेल्या सरकारी पत्रकानें सरकारी अधिकाऱ्यांस शिक्षणास उत्तेजन देण्याच्या कामीं बंदी करण्यांत आली. याविरुद्ध त्यांनीं तक्रार केली पण तिचा उपयोग झाला नाहीं. कलेक्टर व मॅजिस्ट्रेट निराळे असावे असें त्यांचें तेव्हांपासून म्हणणें होतें. तसेंच अबकारी उत्पन्न वाढविण्याच्याहि ते विरुद्ध होते. त्यांनीं 'जनमित्र' ( पीपल्स फ्रेंड ) नांवाचें एक देशी भाषेंत वर्तमानपत्र कुंवर लछमनसिंग यांच्या साहाय्यानें सुरू केलें. याच्या ६०० प्रती सरकार विकत घेत असे व त्याच्या कांहीं अंकांचें भाषांतर करून महाराणीकडे पाठविण्यांत आलें होतें. यांनीं तुरुंगांची, विशेषतः मुलांच्या तुरुंगांची, स्वतंत्र व्यवस्था केली. १८६७ मध्यें हे जकात खात्याचे मुख्य झाले. १८७१ मध्यें यांनीं 'शेतकी सुधारणा' हें पुस्तक लिहिलें. १८७०–१८७९ पर्यंत हिंदुस्थान सरकारमध्यें जमाबंदी, शेतकी व व्यापार खात्याचे चिटणीस होते. परंतु त्यांचें धोरण सरकारास न पटल्यामुळें त्यांस तेथून बदलण्यांत आलें. त्यांस ले. गव्हर्नरची जागा देऊं करण्यांत आली होती पण ती नाकारून त्यांनीं गृहमंत्र्याची जागा पत्करली. १८८२ मध्यें ते सेवानिवृत्त झाले. १८८३ मध्यें त्यांनीं कलकत्त्याच्या पदवीधरांस आवाहन करून हिंदी राष्ट्रीय संघ ( इंडियन नॅशनल लीग ) स्थापन करून पुणें येथें एक परिषद् भरविण्याचें ठरविलें. हीच आजच्या राष्ट्रीय सभेची जनक संस्था होय. हे स्वतः राष्ट्रीय सभेचे प्रमुख कार्यवाह झाले. १८८५ मध्यें मुंबई येथें राष्ट्रीय सभेचें पहिलें अधिवेशन झालें. या सभेस प्रथम सरकारची सहानुभूति होती. परंतु मद्रास येथील तिसऱ्या अधिवेशनानंतर सरकारची वृत्ति बदलली. याचें कारण राष्ट्रीय सभेचें तोंड सुशिक्षितांबरोबरच सामान्य जनतेकडेहि वळलें. हिंदुस्थानला स्वातंत्र्य पार्लमेंटच्या सभासदांचें मन वळविल्याशिवाय किंवा ब्रिटिश जनतेस जागृत केल्याशिवाय मिळावयाचें नाहीं, ही गोष्ट लक्षांत घेऊन त्यांनीं इंग्लंडमध्यें राष्ट्रीय सभेची ब्रिटिश कमिटी स्थापन करून तिच्यामार्फत तेथें चळवळ सुरू केली. व प्रत्यक्ष पार्लमेंटांत इंडियन पार्लमेंटरी कमिटी नांवाची पार्लमेंटच्या सभासदांची एक कमिटी स्थापन केली व तेथें 'इंडिया' नांवाचें तिचें मुखपत्र सुरू केलें. याखेरीज हिंदुस्थानांतील पुढारी जेव्हां जेव्हां इंग्लंडमध्यें येत तेव्हां तेव्हां त्यांचीं व्याख्यानें, सभा, चर्चा, वगैरे करण्याचा प्रघात ठेवला. १८९४ मध्यें त्यांनीं हिंदुस्थान देश सोडला, त्या वेळीं त्यांस मुंबई प्रेसिडेन्सी असोसिएशननें मानपत्र दिलें व ॲलन ह्यूम स्मारकनिधि स्थापन करून त्याचा विनियोग त्यांचे कार्य पुढें चालू ठेवण्याकडे करावा असें ठरविलें. ह्यूम यांनीं सामाजिक सुधारणांच्या बाबतींतहि पुष्कळ खटपट केली. यांस पक्षी जमविण्याचा मोठा नाद होता. व यांनीं आपला अत्यंत मोठा पक्षिसंग्रह ब्रिटिश म्यूझियम या संस्थेस दिला. 'हिंदुस्थानांतील शिकारी पक्षी' या नांवाचें त्यांनीं एक पुस्तकहि लिहिलें आहे.

**ह्यूम, डेव्हिड** ( १७११–१७७६ )—सुप्रसिद्ध इंग्रज इतिहासकार व तत्त्वज्ञानी. याचें शिक्षण एडिंबर्ग युनिव्हर्सिटींत झालें. यानें आपलें चरित्र स्वतःच लिहिलें आहे. तत्त्वज्ञान व काव्य या दोहोंची त्यास आवड होती. प्रथम त्यानें 'मनुष्यस्वभाव' या विषयावरील ग्रंथ प्रसिद्ध केला; पण तो मुळींच लोकप्रिय झाला नाहीं. त्यानंतर त्यानें लिहिलेलें नैतिक, राजकीय व वाङ्मयीन निबंधाचा संग्रह हें पुस्तक मात्र विशेष लोकप्रिय झालें. १७५१ सालापासून दहाबारा वर्षे ह्यूम एडिंबर्ग येथें येऊन राहिला. व लवकरच त्यानें आपलीं 'राजनीतिविषयक व्याख्यानें' प्रसिद्ध केलीं. तें पुस्तकहि फार लोकप्रिय झालें. पुढें त्यानें इंग्लंडचा

इतिहास लिहिला. या ग्रंथानें त्याला कीर्ति मिळवून दिली. या इतिहासाबरोबर ह्यूमचे इतर लेखनहि चालूच होतें. 'धर्माचा इतिहास' त्यानें लिहून प्रसिद्ध केला. कांहीं दिवस फ्रान्समधील वकिलातीच्या चिटणिसाच्या जागेवर असतां, पॅरिसमध्यें त्याला फार बहुमान मिळाला होता.

---

## ळ

ळ—या वर्णाच्या प्रारंभींच्या तीन अवस्था दिसतात. पहिली व दुसरी इ. स. दुसऱ्या शतकांतील शक उपवदात किंवा त्याची स्त्री दक्षमित्रा याच्या नाशिक येथील लेखांत दिसून येते. तिसरी अवस्था दुसरीचें रूपांतर होऊन झालेली दिसते; ती काकतीय-वंशी राजा गणपतीच्या कालांतील चेबोलू लेखांत (इ. स. १२१३) आढळून येईल.

---

## क्ष

क्ष— या वर्णाच्या पांच अवस्था आढळून येतात: पहिली इ. स. २ ऱ्या शतकांतील शक उपवदात किंवा त्याची स्त्री दक्षमित्रा यांच्या नाशिक येथील लेखांत; दुसरी त्याच शतकांतील क्षत्रपवंशी राजा रुद्रदामाच्या गिरनार येथील शिलालेखांत; तिसरी, इ. स. ४ थ्या शतकाच्या मध्यांतील गुप्तवंशी राजा समुद्र-गुप्त याच्या अलाहाबाद स्तंभावरील लेखांत; चौथी, इ. स. ६ व्या शतकांतील 'उष्णीषविजयधारिणी' या ताडपत्री पुस्तकांत; व पांचवी, मेवाडच्या गुहिलवंशी रावळ समरसिंह याच्या वेळच्या (इ. स. १२७३) चीरवा लेखांत.

क्षत्रप—देशाचा संरक्षक या अर्थाचा प्राचीन इराणी पदवीचा हा अपभ्रंश किंवा संक्षेप आहे, असें डॉ. भांडारकरांचें मत आहे. प्राचीन काळीं हें इराणी सुभेदारांचें (क्षत्रप) अधिकारवाचक नांव असे. पुढें तें सर्व राजांनीं उचललें. हे हिंदुस्थानांत शक राजांचे अधिकारी होते. हे क्षत्रप तक्षशिला, मथुरा, काठेवाड, उज्जनी, वगैरे भागांवर राज्य करीत होते. महाराष्ट्रावर इ. सन पहिल्या शतकापासून यांचा अमल होता.

क्षत्रिय—अनेक वैदिक जाती, इराणी जाती व ग्रीक जाती यांच्यामध्यें चातुर्वर्ण्य होतें; म्हणजे प्रत्येक जातींत उच्चवर्ग, मध्यम वर्ग, व कनिष्ठ वर्ग असे जे निरनिराळे वर्ग असतात त्या प्रकारचेच हे चातुर्वर्ण्याचे वर्ग होते. त्या वेळेस उच्च, मध्यम हीं नांवें न देतां क्रियासूचक नांवें वापरण्यांत आलीं. कांहीं क्रियांचें महत्त्व इतर क्रियांपेक्षां अधिक धरलें गेलें असल्यामुळें ते वर्ण कर्मावरून संबो-धण्यांत येऊं लागले. अर्थात् क्षत्रिय ही जात नव्हतीच. प्रत्येक जातींत कांहीं घराणीं क्षत्रियवर्गांत मोडलीं जात असत. एकाच जातींत कांहीं कुलें क्षत्रिय म्हणविलीं जात असतील तर उरलेले सामान्य लोक 'विश्' म्हणविले जात असत. कधीं कधीं असें होई कीं, एखादी जातच्या जात आपल्या जातीचा वरचष्मा दुसऱ्या जातीवर लादूं शके. असला वरचष्मा स्थापन करणाऱ्या जाती स्वतःस क्षत्रिय म्हणवूं लागल्या. लढणारे ते क्षत्रिय असा नियम धरला तर जगांतल्या सगळ्या जाती क्षत्रिय होतील. कारण ज्या वेळेस लोक भटक्या स्थितींत होते व जमीन मिळविण्याची पद्धति म्हणजे बसलेल्या लोकांचें उच्चाटन करून नवीन आलेल्या लोकांनीं ती काबीज करणें अशी क्रिया जेव्हां चालू होती तेव्हां प्रत्येक मनुष्य लढणाराच होणार.

जेव्हां कांहीं जातीच्या जाती न लढणाऱ्या बनणार तेव्हां त्या जातींनाच क्षत्रियांच्या खालची पदवी प्राप्त व्हावयाची. ही सामाजिक स्थिति जेव्हां लढणाऱ्या जातीचा हेतु देशांतील विशिष्ट प्रदेशांतील लोकांचें निर्मूलन करून जमीन आपल्या ताब्यांत घ्यावयाची हा नसून केवळ राज्यकारभार तेवढा हातीं घ्यावयाचा हा असणार, तेव्हां राज्यकारभार करणारी जात क्षत्रिय व इतर जाती वैश्य-शूद्र अशी स्थिति उत्पन्न होणार. प्राचीन इतिहासांत या दोन्ही प्रकारच्या क्रिया वारंवार झाल्या आहेत.

अर्वाचीन काळीं क्षत्रिय ही पदवी धारण करणाऱ्या अनेक जाती आहेत. उत्तरेस रजपूत हे आपणाला क्षत्रिय म्हणवितात. त्याप्रमाणेंच अरोरा, जाट, वगैरे पंजाबी जाती देखील क्षत्रिय म्हणवितात. तसेंच कायस्थ व खत्री हे क्षत्रिय म्हणवितात. महाराष्ट्रांत मराठे, पांचकळशी, जिनगर, तांबट, इत्यादि जाती क्षत्रिय म्हणवितात. महार देखील आपणास सोमवंशी क्षत्रिय म्हणवितात. तेव्हां महाराष्ट्रांत आज तर अशी स्थिति आहे कीं, ब्राह्मण व वाणी या दोन जाती वगळून बाकीच्या सर्व जाती आपणांस क्षत्रिय म्हणवितात. शिवाय क्षत्रियांचे कर्नाटकांतील क्षत्रिय, ब्रह्मक्षत्रिय, सूर्यवंशी क्षत्रिय, सोमवंशी क्षत्रिय, इ. भेद आहेत.

क्षय—या रोगाला वेदांत यक्ष्मा असें नांव आहे. सामान्यतः शरीराला कृश करणारा रोग या अर्थी हा शब्द ऋग्वेदांत आणि अथर्ववेदांत आलेला आहे. वाजसनेयि संहितेंत शंभर प्रकारच्या यक्ष्मांचा उल्लेख केला गेला आहे आणि काठक संहितेंत अयक्ष्म म्हणजे रोगविरहित असा अर्थ दिलेला आहे. यजुर्वेदसंहितेंत यक्ष्माच्या उत्पत्तीविषयीं माहिती दिलेली आहे. यक्ष्म तीन प्रकार-चे सांगितले आहेत: राजयक्ष्म, पापयक्ष्म, आणि जायेन्य.

इंग्रजींत याला ट्यूबरक्युलासिस (टी. बी.) म्हणतात. क्षय हा एक संसर्गजन्य रोग असून तो एका जंतू( बॅसिलस ट्यूबर क्युलॉसिस )पासून उत्पन्न होतो. हे जंतू एका मिलिमीटरच्या तीन हजाराव्या अंशाइतके लांब असतात. हे जंतू कोच यानें १८८२ मध्यें निदर्शनास आणले. या जंतूंची क्रिया शरीरावर होऊन एक प्रकारचा जीर्ण दाह उत्पन्न होतो, व त्यामध्यें लहान लहान वाटोळीं गळवें अथवा गांधी शरीरावर उठतात. याचा संसर्ग आनुवंशिक असतो. परंतु तो पुरुषामध्यें क्वचित् दृष्टीस पडतो. किंवा हे जंतू शरीरांत टोंचून घातले गेल्यामुळें उत्पन्न होतो. अशा तऱ्हेचा संसर्ग वैद्यकी करणाऱ्यांत किंवा खाटीक वगैरे जातींत होतो. श्वासामुळेंहि हा संसर्ग बऱ्याच प्रमाणांत आढळून येतो. किंवा अन्नापासून होतो. मुलामध्यें हा क्षय गाईच्या दुधापासून वगैरे होण्याचा बराच संभव असतो. सामान्यतः पांच वर्षांच्या आंतील रोगी मुलांच्या संख्येपैकीं ⅓ रोग्यांस गाईच्या दुधाच्या संसर्गानें क्षय झालेला आढळून येतो. हा संसर्ग शरीरांतील कोणत्याहि पेशीस होऊं शकतो. या रोगाचा प्रसार व मृत्यूचें प्रमाण फार असतें. ग्रेट ब्रिटनमध्यें सुद्धां एकंदर मृत्युसंख्येपैकीं शें. दहा क्षयापासून होतात.

क्षयरोग्यासाठीं निराळीं आरोग्यालयें व इस्पितळें ठेविलीं असतात. रोगाच्या प्राथमिक अवस्थेंत जर नीट तपासून उपचार केले व रोग्यास आरोग्यालयांत ठेविलें तर तो बरा होण्याचा बराच संभव असतो. कफक्षयाची माहिती त्या लेखांत दिली आहे.

हिंदुस्थानांत सुमारें एक कोटी क्षयरोगी असावेत. जगांत दरसाल दोन कोटी मृत्यु क्षयानें होतात. त्यांपैकीं हिंदुस्थानांत दहा लक्ष लोक क्षयानें मरण पावतात. हिंदुस्थानांत क्षयरोग्यांची नीट तरतूद करण्यासाठीं ५ लाख खाटा (कॉट्स) व ४ हजार उपकेंद्रें ठेवावीं लागतील. तसेंच, १५,००० डॉक्टर व ५०,००० परिचारिका पाहिजेत. सध्यां ८,००० खाटा, १२० उपकेंद्रें, २०० डॉक्टर व थोड्याशा परिचारिका आहेत.

**क्षयमास**—सांप्रत सूर्याची गति कार्तिक, मार्गशीर्ष व पौष या महिन्यांत जलद असते. त्यास वृश्चिक, धन व मकर ह्या राशी क्रमण्यास २९॥ दिवसांहून कमी दिवस लागतात. म्हणून तेव्हां एखाद्या चांद्र महिन्यांत दोन संक्रांती होण्याची संधि कधीं कधीं येते; अशा वेळीं क्षयमास येतो. हा एकदां आल्यापासून प्रायः १४१ किंवा १९ वर्षांनीं पुन्हां येतो. जेव्हां येतो तेव्हां त्याच्याबद्दल अधिक महिना त्याच्या मागें किंवा पुढें ३।४ महिन्यांत येतो. मागें शके १७४४ मध्यें मार्गशीर्ष क्षय झाला होता तेव्हां यापुढें शके १८८५ मध्यें तोच क्षयमास होईल.

**क्षरसिद्धान्त**—(एरॉझन थिअरी)—वारा, पाऊस, हवामान, बर्फ, नद्या व समुद्र यांच्या क्रियेमुळें पृथ्वीचा पृष्ठभाग क्षरत असतो. पर्वत, दऱ्या, कडे, किनारे, वगैरेंचे आकार या क्षरणामुळें लहान होत जातात. नद्यांपासून निघणारे प्रवाह खोल होतात व त्यांच्या संगमाच्या जागीं गाळ सांचतो. सरोवरें या दलदलीच्या जागा किंवा कोरडीं खोरीं बनतात.

अलीकडे भूस्तरशास्त्रज्ञांचें असें मत झालें आहे कीं, पूर्वी ज्याप्रमाणें दऱ्याखोरीं हीं पृथ्वी वर वर येत असतांना तिच्या पृष्ठभागामध्यें फटी पडल्यामुळें उत्पन्न होतात असें मानीत असत तशी वस्तुस्थिति नसून हीं दऱ्याखोरीं नद्या, हिमनद्या वगैरेमुळें माती वगैरे वाहून गेल्यामुळें व झीज झाल्यामुळें उत्पन्न होतात.

**क्षारज**—(हलोजेन्स). रासायनिक दृष्ट्या संबंध असलेल्या प्लविन (फ्ल्युरिन), हरित (क्लोरीन), अरुणिन् (ब्रोमिन) आणि आयोडीन ह्या चार मूलद्रव्यांचें सामान्य नांव. ह्या चारांपैकीं प्लविन हा अतिशय क्रियाशील असून आयोडीन अगदीं कमी क्रियाशील आहे. प्लविन आणि हरित हे हिरव्या रंगाचे वायू आहेत. अरुणिन् गर्द लाल रंगाचें द्रव आहे. व आयोडीन काळसर रंगाचें घन आहे. हे सर्व हलोजेन्स उज्जाबरोबर संयोग पावून त्यापासून महत्त्वाचीं अम्लें तयार होतात; उदा., उज्ज हरिकाम्ल( हायड्रोक्लोरिक ॲसिड). धातूंच्या संयोगापासून लवणें तयार होतात; उदा., नेहमींचें मीठ.

**क्षितिज**—(होरायझन). जेथें पृथ्वी आणि आकाश मिळतात असें दिसतें ती रेषा. एखाद्या बिंदूपासून पाहणाऱ्याला पृथ्वीच्या पृष्ठभागावरचें जें मर्यादावर्तुल दिसतें त्याला हें नांव आहे. हें दृश्य क्षितिज झालें. खरें किंवा खगोल क्षितिज काल्पनिक वर्तुळ असून या दृश्य क्षितिजाला समांतर आहे व त्याची पातळी (प्लेन) पृथ्वीच्या मध्यांतून जाते. या खगोल क्षितिजाचे ध्रुव म्हणजे खस्वस्तिक आणि अधःस्वस्तिक होत. या खगोल क्षितिजामुळें खगोलाचे वरचा आणि खालचा असे दोन गोलार्ध पडतात.

क्षितिज नति—(डिप् ऑफ दि होरायझन). समुद्रावर दृश्य क्षितिजाचा खऱ्या क्षितिजाच्या दिशेखालीं जो अवनत कोन होतो तो. समुद्रसपाटीपासून बघणाराचे डोळे उंचावर असल्यामुळें हा प्रकार घडतो. मिनिटांनीं मोजण्यांत येणारी चापनति साधारणपणें फुटांनीं मोजण्यांत येणाऱ्या उंचीच्या वर्गमुळाइतकी असते.

**क्षिप्रा**—ही नदी मध्य हिंदुस्थानांत असून हिला अवन्ती नदी असेंहि म्हणतात. ही माळव्यांत उज्जनीजवळून निघून पवित्रा नदीला मिळाली आहे, त्यामुळे तिला तीर्थाचें महत्त्व आलें आहे. हिच्या कांठीं पुष्कळ पवित्र व महत्त्वाचीं स्थळें व ऋषींचे आश्रम आहेत. ही नदी विष्णूच्या रक्तापासून निघाली असून वर्षांतून कांहीं दिवस हिचें पाणी दुधासारखें असतें, अशी अबुल फजलच्या काळापासूनची समजूत अद्याप कायम आहे.

**क्षीणता**—(टेबीझ). मनुष्याच्या शरिरांतील मांस हळूहळू एकसारखें कमी होत जाण्याच्या अवस्थेस ही संज्ञा देतात. सामान्यतः दोन प्रकारच्या अवस्थांस ही संज्ञा देण्यांत येते. एकामध्यें लहान मुलास उदरामध्यें क्षयरोग होतो. व दुसऱ्यामध्यें मज्जातंतूस व्यथा होऊन मनुष्याच्या गतीस क्षीणता येते. कधीं क्षीणता (टेबीज डॉर्सॅलिस) हा रोग उपदंशापासून होतो.

**क्षीरस्वामी** (१०५०-११००)—एक संस्कृत ग्रंथकार. हा ईश्वरस्वामीचा पुत्र काश्मीर येथील जयापीड राजाचा गुरु होता असें म्हणतात. यानें 'धातुपाठ', 'निपाताव्ययोपसर्गवृत्ति', 'अव्ययवृत्ति', 'क्षीरतरंगिणी' (धातुपाठ), 'अमृततरंगिणी', 'निघण्टुवृत्ति' इ. ग्रंथ लिहिले. जयापीड शके ७२५ मध्यें होऊन गेला, तेव्हां 'अमरकोशोद्‌घाटन' नांवाची अमरकोशावर ज्यानें टीका लिहिली तो क्षीरस्वामी हाच कीं काय याविषयीं निश्चित मत नाहीं.

**क्षेत्रफलमापक**—(प्लॅनिमीटर). हें कोणत्याहि जागेचें क्षेत्रफळ मोजावयाचें साधन आहे. या यंत्राचे दोन हात असतात. त्यांपैकीं एक दुसऱ्याच्या बिजागिरीनें जोडलेल्या एका गाडींत असतो. एका हाताच्या टोंकाशीं एक सुई बसविलेली असते. त्या सुईच्या अग्राभोंवतीं हें यंत्र फिरवावयाचें असतें. दुसऱ्या हाताच्या टोंकाशीं एक ओरखाडा काढणारा कांटा बसविलेला असतो. हा कांटा ज्या आकृतीचें क्षेत्रफळ मोजावयाचें असेल त्या आकृतीच्या मर्यादारेषेवरून घड्याळाच्या कांट्याच्या दिशेनें फिरविण्यांत येतो. हा फिरत असतां एक मापाच्या खुणा केलेलें चक्र फिरतें, व त्यावरून त्या आकृतीचें क्षेत्रफळ मोजलें जातें.

**क्षेमराज** (सुमारें १०३०)—राजानक. काश्मीर प्रांतांतील एक तत्त्वज्ञानी व अभिनवगुप्ताचा शिष्य. अभिनवगुप्ताच्या 'परमार्थसारा'वर यानें भाष्य लिहिलें आहे. यानें 'स्वच्छंदोद्योत' हा ग्रंथ आणि पुष्कळ वृत्ती लिहिल्या आहेत. 'स्पंदनिर्णय' व 'स्पंदसंदोह' या ग्रंथांचा कर्ता क्षेमेंद्र आणि हा क्षेमराज, हे दोघे एकच असावेत असें डॉ. बुल्हरचें मत आहे. यानें 'प्रत्यभिज्ञाहृदय' व 'शिवसूत्रविमर्शिणी' यांवर टीका लिहिल्या आहेत.

**क्षेमेंद्र** (सुमारें इ. स. १०२०-१०८०)—या संस्कृत कवीनें आपल्या ग्रंथांत जी माहिती दिली आहे तीवरून असें समजतें कीं, हा कवि काश्मीर देशांत होऊन गेला. याचें दुसरें नांव व्यासदास असें होतें. याच्या आजाचें नांव सिंधु व बापाचें नांव प्रकाशेंद्र. काश्मीरचा राजा अनंत याच्या कारकीर्दींत (इ. स. १०२९-६४) यानें ग्रंथरचना केली. याचा गुरु अभिनवगुप्ताचार्य म्हणून होता. सोमेंद्र हा याचा मुलगा असून उदयसिंह आणि राजपुत्र लक्ष्मणादित्य हे याचे शिष्य होते. याचे ग्रंथ अमृततरंगकाव्य, अवसरसार, औचित्यविचारचर्चा, कनकजानकी, कलाविलास, कविकंठाभरण, चतुर्वर्गसंग्रह, चारुचर्या, चित्रभारतनाटक, दर्पदलन, दशावतारचरित्र काव्य, दानपारिजात, वगैरे आहेत.

**क्षोभप्रधान नाटक**—(मेलोड्रामा). हावभाव व त्यांना अनुकूल संगीत अशा प्रकारच्या नाटकाचा खेळ. या अर्थानें एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं 'मेलोड्रामा'चा प्रकार सुरू झाला. पण पुढें खळबळीचे प्रसंग आणि क्षोभकारक भाषणें ज्यांत आहेत अशा नाटकांना हें नांव पडलें व त्यांच्यासाठीं ठराविक नाट्यगृहें असत. 'सिल्व्हर किंग', 'साइन ऑफ दि क्रॉस', इ. नाटकें या सदरांत पडतात.

---

## ज्ञ

ज्ञ—या वर्णाच्या तीन अवस्था : पहिली क्षत्रपवंशी राजा रुद्रदामा याच्या गिरनार शिलालेखांत (इ. स. २ रें शतक); दुसरी, पहिलीचें रूपांतर; व तिसरी, अर्जुना परमार राजा धारावर्ष याच्या वेळच्या (इ. स. १२०८) ओरिआ लेखांत आढळते.

**ज्ञानकोश**—(एन्सायक्लोपीडिया). विश्वकोश; ज्ञानचक्र. ज्या एका मोठ्या ग्रंथांत किंवा ग्रंथमालेंत जगांतील सर्व विषयांची बहुधा अकारविल्ह्यानें माहिती दिलेली असते अशा प्रकारच्या ग्रंथरचनेस पाश्चात्य नांव 'एन्सायक्लोपीडिया' असें आहे. असे सर्वव्यापी ग्रंथरचनेचे प्रयत्न फार प्राचीन काळापासून झालेले आढळतात. प्लिनीचा 'नॅचरल हिस्टरी' हा ग्रंथ किंवा आपल्याकडचे अग्निपुराणादि ग्रंथ एका अर्थानें ज्ञानकोशच म्हणतां येतील. रॉजर बेकनचा 'ओपस मेजस' हा ग्रंथ याच सदरांत पडेल. सायक्लोपीडिया हें नांव प्रथम चेंबर्सनें दिलें (१७२८). या चेंबर्सच्या ज्ञानकोशावरून फ्रान्समध्यें डिडेरोच्या संपादकत्वाखालीं सुप्रसिद्ध फ्रेंच ज्ञानकोशाचें काम सुरू झालें. आजचा विख्यात 'एन्सायक्लोपीडिया ब्रिटानिका' १७८८ सालीं प्रथम निघाला. आज त्याच्या सोळा आवृत्त्या झाल्या आहेत. त्यानंतर बरेच ज्ञानकोश इंग्लंडमध्यें निघाले. जर्मन भाषेंतहि 'कॉन्व्हर्सेशन्स-लेक्सिकॉन' नांवानें अठरा विभाग असलेला ज्ञानकोश आहे. 'एन्सायक्लोपीडिया अमेरिकाना' हा अमेरिकेंतील इंग्रजी भाषेचा ज्ञानकोश आहे. तत्त्वज्ञान, वाङ्मय, इतिहास, धर्म इ. निरनिराळ्या विषयांचेहि ज्ञानकोश असतात. (केतकर पहा.)

चीनमध्येंहि दहाव्या शतकापासून ज्ञानकोशासारखे ग्रंथ होऊं लागले. १७२६ मध्यें १०,००० विभागांचा चिनी ज्ञानकोश निघाला. हिंदुस्थानांत महाभारत-पुराणें हे ज्ञानकोशच होत. सोळाव्या शतकांत सायणमाधवांनीं रचलेले शास्त्रसंग्रह याच सदरांत पडतील.

कोशग्रंथच म्हणतां येतील. इंग्रजी अमदानींत बंगालींत बाबू नगेंद्रनाथ वसु यानीं विश्वकोश रचला; तो पहिला मोठा हिंदी प्रयत्न म्हणतां येईल. याचें हिंदी रूपांतर झालें. 'आंध्रविज्ञानसर्वस्वम्' नांवाचा तेलगू ज्ञानकोश आहे, गुजराथींत जुना 'ज्ञानचक्र' नांवाचा एक कोश आहे, पण तो आज निरुपयोगी वाटेल. ऊर्दूचा प्रयत्न चालू आहे. मराठींत रघुनाथ भास्कर गोडबोले यांनीं चरित्रकोश रचले व त्यांचें आधुनिक अनुकरण चित्रावशास्त्री यांनीं केलें. पण संपूर्ण 'सायक्लोपीडिया' स्वरूपाचा कोश प्रथमच रचण्याचें श्रेय डॉ. श्री. व्यं. केतकर यांस दिलें पाहिजे. त्यांनीं अर्वाचीन कोशयुग सुरू केलें. व त्यांच्या उदाहरणावरून आज निरनिराळे ज्ञानकोश तयार होऊं लागले आहेत. प्रस्तुत 'सुलभ विश्वकोश' हाहि डॉ. केतकर यांच्या परंपरेतील ज्ञानकोशाची सुधारलेली संक्षिप्त आवृत्तिच आहे.

डॉ. श्री. व्यं. केतकर

**ज्ञानप्रामाण्यशास्त्र**—(एपिस्टेमॉलोजी). ज्ञान(नॉलेज) याचें स्वरूप व उत्पत्ति हा या शास्त्राचा विषय आहे. एपिस्टेमॉलोजी हा शब्द अलीकडे जे. इ. फेरीअरनें प्रथम उपयोगांत आणला; हल्लीं या विषयाला फार महत्त्व प्राप्त झालें असून त्यावर अलीकडे पुष्कळ पुस्तकें लिहिलीं गेलीं आहेत. तत्त्वज्ञानांतर्गत अतींद्रीय-विज्ञान (मेटाफिजिक्स), तर्कशास्त्र (लॉजिक) व मानसशास्त्र (सायकॉलॉजी) यांमध्यें विज्ञानशास्त्राचा अंतर्भाव प्राचीन ग्रीक काळापासून करण्यांत येत असे, परंतु आधुनिक काळांत शास्त्रशाखांचें सूक्ष्म वर्गीकरण होऊं लागल्यावर ज्ञानप्रामाण्यशास्त्र हें वरील तिन्ही सदृश शास्त्रांहून निराळें आहे, असें निश्चित ठरलें आहे. तथापि ऐतिहासिक दृष्टया विज्ञानशास्त्राचे प्रश्न मानवी मनापुढें प्रथम आले नसून अतींद्रियविज्ञानासंबंधानेंच प्रथम विचार प्राचीन विद्वानांनीं सुरू केल्याचें दिसतें. विश्वाचा आकार(फॉर्म) काय? त्याची उत्पत्ति कशी झाली? विश्वामध्यें सत् गोष्टी कोणत्या? आत्म्याचें स्वरूप काय? शरीर व आत्मा यांचा परस्पर संबंध कशा प्रकारचा आहे? अशा प्रकारच्या मानवी इंद्रियांना अगोचर अशा प्रश्नांचा प्राचीन तत्त्ववेत्त्यांनीं प्रथम विचार केलेला दिसतो. पण असल्या प्रश्नांचीं जीं उत्तरें दिलीं गेलीं त्यांनीं समाधान न झाल्यामुळें किंवा अशा प्रश्नांचीं उत्तरें अवघड आहेत असें आढळून आल्यामुळें खऱ्या ज्ञानाचें स्वरूप काय व तें मिळण्याची शक्यता कितपत आहे याबद्दल विचार सुरू झाला. असले प्रश्न सोफिस्ट व स्केप्टिक्स, प्लेटो, आरिस्टॉटल, स्टोइक व एपिक्युरियन यांनीं उपस्थित केले होते; पण तत्संबंधीं विशेष विचार लॉक व कॉंट या तत्त्ववेत्त्यांपासून सुरू झाला. प्रामाण्यशास्त्रांत येणाऱ्या विषयांची म्हणजे ज्ञानक्षेत्रविषयक स्थूल कल्पना, सामान्यज्ञान व शास्त्रीय ज्ञान यांतील फरक, शास्त्रांचें वर्गीकरण व रचना, शास्त्र व तत्त्वज्ञान, शास्त्र व प्रत्यक्ष, शास्त्र व शाब्दप्रमाण, शास्त्रांचें भारतीय वर्गीकरण, वर्गीकरण-दोषकारणें, शास्त्रीय परिभाषा, शास्त्रांचा उदय व संवर्धन, शास्त्रीकरण, शास्त्रघटनेंतील तंटे, शास्त्रवृद्धीचे दोन मुख्य घटक, भाषांतरशास्त्र, संज्ञा कशा असाव्या, संज्ञाकोशाची आवश्यकता, वगैरेसंबंधीं माहिती महाराष्ट्रीय ज्ञानकोश, विभाग ५ प्र. १ मध्यें जी दिली आहे ती अवश्य पाहावी.

**ज्ञानसापेक्षता**—(रिलेटिव्हिटी ऑफ नॉलेज). हा तत्त्वज्ञानांतील एक सिद्धान्त आहे. त्याचा अर्थ आपल्याला बाह्य जगाचें जें ज्ञान होतें तें सापेक्ष अर्थानेंच सत्य किंवा खरें असतें. कारण आपल्याला बाह्य जगाचें ज्ञान होतें तें आपल्या इंद्रियद्वारा होणाऱ्या संवेदनां(इंप्रेशन्स)चें बनलेलें असतें आणि हे संस्कार निरनिराळ्या लोकांना निरनिराळे होणें शक्य आहे. म्हणून आत्यंतिक केवल सत्य ज्याला म्हणतां येईल असें सत्य असणें शक्य नाहीं, आणि आपलें सर्व मानवी ज्ञान सापेक्ष असणार. हा सिद्धान्त फार पूर्वी प्रथम प्रोटॅगोरस या ग्रीक तत्त्ववेत्त्यानें (खि. पू. ४८१-४११) प्रतिपादिला, पण त्याचा पुरस्कार अगदीं अलीकडे कांट, सर विल्यम हॅमिल्टन आणि हर्बर्ट स्पेन्सर या तत्त्ववेत्त्यांनीं केला.

**ज्ञानेश्वर** (सु. १२७५-१२९६)—आद्य मराठी तत्त्वज्ञानी ग्रंथकार. वत्सगोत्री शुक्ल यजुर्वेदी ब्राह्मण कुळांत गोकुळाष्टमीस (शके ११९७?) या महान् योग्याचा जन्म झाला. जन्म आपेगांवास कीं आळंदीस याबद्दल निर्णायक पुरावा नाहीं. याच्या वडिलांचें नांव विठोबा असून तो पैठण जवळ गोदावरी नदीतीरीं आपेगांव येथें राहत असे. विठोबा हा यात्रा करीत करीत आळंदीस आला त्या वेळीं सिद्धोपंत नांवाचा तेथें कुलकर्णी होता. त्यानें आपली मुलगी रखमाई हिशीं त्याचें लग्न लावून दिलें. लग्नानंतर थोड्याच दिवसांनीं विठोबा हा काशीयात्रेस गेला व तेथें त्यानें संन्यासदीक्षा घेतली. हें वर्तमान सिद्धोपंताला समजलें तेव्हां त्यानें विठोबास परत बोलाविलें व त्याला पुन्हां गृहस्थाश्रम स्वीकारावयास लाविलें. परंतु गांवांतील इतर ब्राह्मणांस हें अकर्म रुचलें नाहीं. त्यांनीं विठोबास जातीबाहेर टाकलें. तेव्हां विठोबानें बायकोसहित प्रयाग क्षेत्रीं जाऊन आपले देह जलविसर्जन करून प्रायश्चित्त घेतलें. विठोबाचीं चार मुलें (तीन मुलगे—निवृत्तिनाथ,

ज्ञानेश्वर आणि सोपानदेव, व एक कन्या मुक्ताबाई ) आळंदीस ब्राह्मणांच्या छळामुळें राहणें अशक्य झाल्यानें पैठणच्या विद्वान् ब्राह्मणांसमोर आपलें म्हणणें मांडण्याकरितां व न्यायनिवाडा करून घेण्याकरितां तेथें गेलीं. तेथील ब्राह्मणांनीं त्याच्या विरुद्धच निकाल दिला असता; परंतु ज्ञानेश्वरानें दोन दैवी चमत्कार करून आपण विष्णु, शिव, ब्रह्मा आणि लक्ष्मी यांचे अवतार असल्यामुळे लौकिक धर्माचारांनीं बांधले जात नाहीं व आपणांस परत घेण्यास मुळींच आडकाठी पडूं नये, असें म्हटलें. ते दैवी चमत्कार म्हणजे एका रेड्याकडून वेद बोलविणें व एक मनुष्य श्राद्ध करीत असतांना त्याचे सर्व पूर्वज श्राद्धाकरितां समक्ष आणविणें, हे होत. तेव्हां पैठणच्या ब्राह्मणांनीं त्यांना ब्राह्मण जातींत परत घेतलें. नंतर ज्ञानेश्वर आळंदीस येऊन राहिला.

ज्ञानेश्वराचा जन्मशक कोणी शके ११९३, कोणी ११९४, तर कोणी ११९७ धरतात. वयाच्या २८ व्या वर्षी त्यानें आळंदी येथें समाधि घेतली. त्यानें शके १२१२ किंवा इ. स. १२९० मध्यें अहमदनगर जिल्ह्यांतील नेवासें येथें भगवद्गीतेवरील 'ज्ञानदेवी' नामक प्रसिद्ध टीका लिहिली. हीच 'ज्ञानेश्वरी' नांवानें प्रख्यात आहे. यानें वारकरी संप्रदायाचा पाया भक्कम केला.

ज्ञानेश्वराची गुरुपरंपरा आदिनाथ–मच्छेंद्रनाथ–गोरक्षनाथ–गैनिनाथ–निवृत्तिनाथ–ज्ञानदेव, अशी आहे. याचे ग्रंथ—भावार्थदीपिका, अमृतानुभव, योगवासिष्ठ, आत्मानुभव, नमन, उत्तरपत्रिका, पंचमुद्रा, भक्तिराज (?), अन्वयव्यतिरेक, स्वानुभव (?), अद्वैतनिरूपण, योगिनी (?), शुकाष्टक, चांगदेवपासष्टी, गीतासार, इ. होत. या ज्ञानेश्वरानेंच आज त्याच्या नांवावर असलेले अभंग रचले कीं नाहीं याबद्दलहि वाद आहे. पांगारकर-दांडेकर प्रभृति विद्वान् भागवत मंडळी हे अभंग ज्ञानेश्वराचेच आहेत असें निश्चितपणें मानतात. विठ्ठलभक्तांचा मेळा ज्ञानेश्वराभोंवतीं सारखा असे, तेव्हां त्या तत्कालीन संतांप्रमाणेंच ज्ञानेश्वरानें जातां येतां अभंग रचले; या अभंगांना वारकऱ्यांच्या नित्यपाठामुळें आधुनिक भाषेचें वळण आलें असावें, असें त्यांचें प्रतिपादन आहे. ज्ञानेश्वर नामदेवादि संतांसमवेत भरतखंडांतील तीर्थयात्रा करून आला होता अशाबद्दलहि कथा आहेत. भक्तलीलामृत, भक्तविजय, वगैरे ग्रंथांतून या सर्व संतांच्या भगवद्भक्तिपर जविनाचें रसाळ वर्णन आहे.

ज्ञानेश्वरी—मराठी भाषेंतील 'काव्यराचो' म्हणून प्रसिद्ध असलेला हा ग्रंथ ज्ञानदेवानें आपल्या वयाच्या पंधराव्या वर्षी लिहिला. हा ग्रंथ शके १२१२ त यादवकुलांतील रामदेवराव राजा देवगिरीस राज्य करीत होता तेव्हां क्षेत्र नेवासें (जिल्हा अहमदनगर) येथें लिहिला.

मराठी भाषेंतील श्रीमद्भगवद्गीतेवरील पहिली टीका म्हणजे ज्ञानेश्वरीच. तिच्या पाठीमागून मग निरनिराळ्या टीका झाल्या आहेत. व त्यांपैकीं बहुतेकांनीं दृष्टांत वगैरे ज्ञानेश्वराचेच उचलले आहेत. ज्ञानेश्वरीचा विशेष हा आहे कीं, ज्ञानेश्वर शब्दास प्रतिशब्द देऊन टीका करीत नाहीं. गीतेंतील श्लोकांचे अर्थ लक्षांत आणून, किंबहुना अर्थरूप बनून तो अर्थ जगाच्या कल्याणाकरितां जगाला ज्ञानेश्वरीच्या द्वारें ज्ञानेश्वर देत आहे. ज्ञानेश्वरी व गीता हे इतके एकार्थावर आरूढ होऊन लिहिलेले ग्रंथ आहेत कीं,

"मूळ ग्रंथींचिया संस्कृता– । वरी मऱ्हाटी नीट पाहतां ।
अभिप्राय मानलिया चित्ता । कवण भूमि हें न चोजवे ॥"
(१०·४३).

याप्रमाणें ग्रंथ बनला आहे. येथें प्रश्न असा उद्भवतो कीं, ज्ञानेश्वराच्या मतें गीतेंत काय सांगितलें आहे. ज्ञानेश्वरानें सहाव्या अध्यायांत 'अष्टांग' योगास 'पंथराज' म्हटलें येवढ्यावरून ज्ञानेश्वराच्या मतें गीता 'अष्टांगयोगप्रधान' आहे असा कित्येक तर्क काढतात. पण तो चुकीचा आहे. ज्ञानेश्वर गीता ही ज्ञानप्रधान मानतो.

"येथ अविद्याविनाश हें स्थूळ । तेणें मोक्षोपादान फळ ।
या दोहीं केवळ । साधन ज्ञान ॥ हे एतुलेंचि नानापरी ।
निरूपिलें ग्रंथविस्तारीं ।" (१८·१२४३–४४).

गीतेच्या अध्यायांची संगति ही त्यानें स्वतंत्र रीतीनें लावली आहे. 'सर्वधर्मान् परित्यज्य' या गीतेच्या अठराव्या अध्यायांतील ६६ व्या श्लोकावर त्यानें ही अध्यायसंगति दिली आहे.

ज्ञानेश्वर हा (तेराव्या अध्यायांतील अहिंसाप्रकरण सोडून दिल्यास) पूर्वपक्ष-उत्तरपक्ष करतो. त्यास सरळ गीतारहस्य सांगावयाचें होतें व तो त्या रहस्याशीं इतका तन्मय झाला होता कीं, तें अनुभवलेलें देतां देतांच अनावर होत असे. भाषा या दृष्टीनें ज्ञानेश्वरी ग्रंथ तर निरुपम आहे. ज्ञानेश्वराच्या तात्त्विक मताशीं पटो वा न पटो, पण जो जो ग्रंथ वाचतो अथवा वाचील त्यास ज्ञानेश्वरानेंच पुनः ज्ञानेश्वरी लिहिली तर अशी साधणार नाहीं असेंच वाटेल. केवळ वाक्चातुर्य या दृष्टीनें पाहूं गेल्यास निरुपम उपमा अथवा उपमांच्या श्रेणी, बिनतोड दृष्टांत, रूपकें, यांची ग्रंथांत गर्दी झालेली दिसून येते. ज्ञानेश्वरीचा विशेष म्हणजे तींतील मार्दव होय. तींतील बोल टोळ्यामाहि खुपणार नाहींत इतके मृदु आहेत. या ग्रंथाचें श्रेष्ठत्व दाखविण्याकरितां एकच गोष्ट लिहिली असतां पुरी होईल. ज्ञानेश्वरानंतर झालेल्या प्रत्येक संतानें ज्ञानेश्वरीकर्त्यास 'ज्ञानराज' या एकाच पदवीनें संबोधिलें आहे. किती मराठींत भाषांतरें झालीं आहेतच, पण हल्लीं संस्कृत,

गुजराथी, हिंदी, इंग्रजी या भाषांतहि भाषांतरें झालीं आहेत. त्यामुळें तिचा प्रसार मराठी बोलणाऱ्या प्रांताबाहेरहि होऊन ज्ञानेश्वरानें आपल्या ग्रंथांच्या सरतेशेवटीं आपल्या गुरुजीजवळ,

"चंद्रमे जे अलांछन। मार्तंड जे तापहीन।
ते सर्वांहि सदा सज्जन। सोयरे होतु॥
किंबहुना सर्वसुखीं। पूर्ण होऊन तिहीं लोकीं॥
भजिजो आदिपुरुषीं। अखंडित॥"

(१८.१७९९–१८००).

असें मागितल्याप्रमाणें होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत.

ज्ञानेश्वरीसंबंधीं एक (गैर)समज असा आहे कीं, तिची भाषा अवघड आहे. पण थोड्या अभ्यासानें असें वाटेल कीं, ज्ञानेश्वरी-इतकी सोपी व सरळ भाषा दुसऱ्या कोणत्याहि मराठी काव्य-ग्रंथाची नाहीं. दूरान्वय अगर क्लिष्टतेसारखा दोष ज्ञानेश्वरींत मिळणार नाहीं. महाराष्ट्रीयांच्या इतर राष्ट्रीय ग्रंथांपेक्षां ज्ञानेश्वरीचा विशेष हाच कीं, तिचें सौंदर्य अष्टपैलू आहे. भगवद्गीतेवरील टीका-ग्रंथ या दृष्टीनें विचार केला तर ज्ञानेश्वरीसारखी बिनमोल टीका भगवद्गीतेवर दुसरी झाली नाहीं हें जितकें (खरें?) अध्यात्मज्ञानाचें प्रतिपादन करणारा शास्त्रग्रंथ ज्ञाने(श्वरी)(सारखा) बसविण्याजोगा मराठी भाषेंत दुसरा नाहीं हेंहि खरें (आहे.) काव्यग्रंथ या दृष्टीनें पाहिलें तरीहि ज्ञानेश्वरी ही मराठ(ी) ग्रंथांचें शिरोभूषणच आहे.

ज्ञेयवाद—(ग्नॉस्टिसिझम). ईश्वर, विश्व, इ. विषयींचें (ज्ञान) होणें शक्य आहे व त्याप्रमाणें कित्येकांना हें ज्ञान झालें होतें, अ(सें) मानणारा एक पंथ. अशा तत्त्ववेत्त्यांचीं मतें पौरस्त्य धर्मसंप्रदायां-तील विलक्षण कल्पना, प्राचीन ग्रीक तत्त्ववेत्त्यांचीं मतें आणि ख्रिस्ती धर्माचीं तत्त्वें यांच्या मिश्रणानें बनलेलीं आहेत. या सर्वांचीं मतें अशीं आहेत कीं, हें ज्ञान होण्यास कांहीं मंत्रतंत्र व गूढविद्या हीं लागतात; व त्याप्रमाणें ते प्रकार सुरू झाले. पण इ. स. ६ व्या शतकानंतर युरोपांत या तत्त्वज्ञान्यांचा प्रभाव उरला नाहीं.

स्पेन्सरनें ज्ञेय आणि अज्ञेय असे दोन मीमांसाभेद केले (अज्ञेय-वाद पाहा); व ज्ञेयाचें क्षेत्र शास्त्रीय विचारांस दिलें. आपल्याकडेहि सांख्य आणि वैशेषिक या दर्शनांच्या अनुयायांचें मत असेंच होतें.

१७४४३

समाप्त

## : परिशिष्ट :

# सुलभ विश्वकोशांतील शास्त्रीय लेखांची पारिभाषिक सूची

[ जे शास्त्रीय लेख मूळ इंग्रजी नांवानेच दिले आहेत, किंवा त्यांच्या शास्त्रीय पारिभाषिक संज्ञा रूढ आहेत त्यांचीं नांवें या यादींत दिलीं नाहींत. ]

Abduction — अपहरण.
Abeyance — तहकुबी.
Absenteeism — दूरवास.
Absolutism — अनियंत्रित शास्त्रपद्धति.
Accessary — साहाय्यक ( गुन्हेगार ).
Acclimatisation — हवेला रुळणें.
Accountancy — हिशेबपद्धति.
Acetic Acid — सिरकाम्ल.
Acetylene — दारिलीन.
Acid — अम्ल.
Acoustics — ध्वनिविज्ञान.
Acridine — अरुतुंद.
Actinium — अक्तिन.
Adrenalin — अधिवृक्करस.
Aerated Waters — वायुमिश्रित जलें.
Aerial Navigation — वायवीय पर्यटन.
Aerial Photography — वायु-प्रकाशलेखन.
Aerodynamics — वायुगतिशास्त्र.
Aeroplane — विमान.
Æsthetics — सौंदर्यशास्त्र.
Agnosticism — अज्ञेयवाद.
Air-brush—वायुकुंचली.
Air-gun — हवाई बंदूक.
Air-pump — वायुनिष्कासक.
Air-ship — हवाई जहाज.
Albino — वर्णहीन लोक.
Albumin — श्वेतबलक.
Alcohol — मद्यार्क.
Aldehydes — प्रायोज्जिल.
Algæ — शेवाळ.
,, Green — हिरवें शेवाळ.
Algebra — बीजगणित.
Alibi — अनुपस्थिति.
Alien — परकीय.
Alkali — अल्क.
Alkaloid — अल्ककल्प.
Allegory — रूपककथा.
Allotment System — शेती-वांटप पद्धति.
Alto-rilievo — उच्चोन्नत शिल्प.
Altruism — परार्थवाद.
Amalgam — पारदमिश्र.
Amaurosis — दृष्टिक्षीणत्व.
Ambulance — रुग्णवाहक.
Amide, Amine — अमिद, अमिन.
Amil Nitrite — केलिल नत्र.
Ammeter — विद्युत्प्रवाहमापक.
Amoeba — आदिजीववर्ग.
Ampere — विद्युत्प्रवाहमान.
Anæmia — रक्तक्षय.
Anæsthetics — निःसंवेदक.
Anatomy — शारीरशास्त्र.
Aneline — नीलीन.
Anemometer — वायुवेगमापक.
Aneurism — धमनिशोथ.
Angel — देवदूत.
,, Fish — देवदूत मासा.
Angina Pectoris — हृदयशूल.
Angulala — सखुर प्राणी.
Anhydrite — अनार्द्रायित.
Animal Heat — शरीर-उष्णता.
,, Worship — प्राणिपूजा.
Annelida — गोगल्गायवर्ग.

Annuity — वर्षासन.
Anthracene — अंगारिन.
Anthracite — दगडी कोळसा.
Anthropology — मानवशास्त्र.
Antimony — अंज.
Antiseptic — पूतिनाशक.
Aphasia — वाचाभंग.
Apoplexy — रक्तजमूर्च्छा.
Appendicitis — आंत्रपुच्छदाह.
Applied Mechanics — व्यावहारिक यंत्रशास्त्र.
Aquarium — जलचर प्रदर्शन.
Arachnida — अष्टपाद प्राणिवर्ग.
Arbitration — लवाद.
Arch — कमान.
Archæology — पुराणवास्तुशास्त्र.
Architecture — वास्तुशिल्प.
Argon — अचेष्ट ( अर्ग ).
Arsenic — सोमल.
Arteries — रक्तवाहिनी.
Artesian Well — कारंजी विहीर.
Articles of Association — संघनियम.
Assaying — पारख ( धातूची ).
Asset — ऋणमोचनदाय.
Association of Ideas — कल्पनासाहचर्य.
Asteroids — लघुग्रह.
Astigmatism — निर्बिंदुता.
Atheism — निरीश्वरवाद.
Atom — परमाणु.
Atomic Member — परमाण्वंक.
Atrophy — शरीरशोषण.
Attorney — मुखत्यार.
Audiphone — श्रवणयंत्र.
Aurora Borealis — उत्तरारुण प्रकाश.
Azimuth — दिगंशकोटि.
Azo Compounds — अजीव संयुक्तें.
Azomide — नत्रामिद.
Bacteria — सूक्ष्मजंतू.
Bag-pipe — कक्षावाद्य.
Bailment — निक्षेप.
Ball and Roller Bearing — आवण.
Balloon — वायुविमान.
Barium — भारधातु.
Barometer — वायुभारमापकयंत्र.
Barrows — मातीचीं थडगीं.
Barytes — भारित.
Basalt — कारीचा दगड.
Bas-relief — नीचोन्नत शिल्प.
Bauxite — स्फट लोह.
Bibliography — संदर्भग्रंथ.
Bicarbonate — द्विकर्बेत.
Bimetalism — द्विधातुवाद.
Biochemistry — जीवनरसायनशास्त्र.
Biology — जीवशास्त्र.
Bitumen — शिलाजतु.
Bladder ( Urinary ) — मूत्राशय.
Blast Furnace — वातभट्टी.
Bleaching — ओपवणें.
Blind-worm — अंधकृमि.
Blisters — पलिस्तराचे किटे.
Blockade — नाकेबंदी.
Blood-pressure — रक्तदाब.
Blowing-machine — वायुपूरक.
Boaring — भोंक पाडणें.
Boiler — तापक.
Boiling-point — कढणबिंदु.
Bond — कर्जखत.
Bones — अस्थि.
Borax — टांकणखार.
Boric-Boracic Acid — टांकणखार फूल.
Boron — टंक
Botany — वनस्पतिशास्त्र.
Boycotting — बहिष्कार.
Boy Scout — बालवीर.
Breach — कायदेभंग.
Breakwater — जलस्तंभक.
Bromides — स्तंभिदें.
Bronchitis — कास.
Bryophyta — हरित शैवालवर्ग.
Buoy — तरतें.
Butyric Acid — घृताम्ल.

Cabinate — मंत्रिमंडळ.
Cable — विद्युत्संदेश-तार.
Cæsarean Operation — पोट फाडणें.
Cæsium — श्यामधातु.
Caisson Disease — हवादाबी रोग.
Calcite — शिरगोळा.
Calcium — खट.
Calculus — कलन गणित.
Calendar — कालदर्शिका.
Calorimeter — उष्णतामापक.
Calorimetry — उष्णतामापन
Calyx — पुष्पाच्छादन.
Camouflage — मायावरण.
Cancer — अस्थिव्रण.
Candle-power — प्रकाशक शक्ति.
Capillarity — केशाकर्षण.
Capitalism — भांडवलशाही.
Carbamide — कर्बामिद.
Carbides — कर्बिद.
Carbohydrate — कर्बोज्जित.
Carbolic Acid — कर्बाम्ल.
Carbon — कर्ब.
,, Dioxide — कर्बद्विप्राणिद.
,, Disulphide — कर्बद्विगंधकिद.
,, Monoxide — कर्बैकप्राणिद.
,, Tetrachloride — कर्बचतुर्हरिद.
Carbonates — कर्बितें.
Carboniferous System — कर्बयुक्त पद्धति.
Carbuncle — काळपुळी.
Caricature — व्यंगचित्रें.
Carnivora — मांसभक्षक.
Carnivorous Plant — मांसाहारी वनस्पति.
Carpel — गर्भपत्र.
Cartography — मानचित्रलेखन.
Cartoon — प्रतिमापूर्वकृति.
Casein — दधीन.
Catalepsy — अपस्मार.
Catalysis — योगवाही क्रिया.
Caustic — दाहक.
Cell — पेशी.
Celluloid — कचकडी.
Cellulose — कचकड्याचें ( काष्ठ ) द्रव्य.
Census — खानेसुमारी.
Centres — केंद्र.
Centripetal and Centrifugal Force — केंद्राभिगामी व केंद्रोत्सारक प्रेरणा.
Cephalopoda — शीर्षपाद.
Cerebro-spinal Fever — मस्तिष्करज्जु ज्वर.
Cetacea — तिमिंगलवर्ग.
Champarty — कज्जेदलाली.
Chemistry — रसायनशास्त्र.
Chert — गारस्फटिक.
Chitin — शृंगद्रव्य.
Chivalry — शिलेदारी.
Chloral — हरल.
Chlorates — हरित.
Chlorine — हरिन, हर.
Chlorite — हरायित.
Chlorophyll — हरित द्रव्य.
Chlorosis — पांडुरोग.
Cholera — पटकी.
Chorus — वृंदसंगीत.
Chromatin — रंग्यद्रव्य.
Chromatophore — वर्णपेशी.
Chromite — रंजकखनिज.
Chromium — रंजक.
Chromolithography — रंगीत शिलाछाप.
Chromosphere — वर्णावरण.
Chronograph — काललेखक.
Chronometer — सूक्ष्मकालमापक.
Cilia — कंपतंतु.
Circular Note — प्रवासी हुंडी.
Circulation of Blood — अभिसरण.
Citizenship — नागरिकत्व.
Citric Acid — निंबाम्ल.
*Civil Service* — मुल्की नोकरी.
Clearing House — वजावाट घर.
Cleavage — भेग.
Clepsydra — पाणघड्याळ.
Cleptomania — चोरीचें वेड.

Code — कायदेसंग्रह.
Cohesion — संसक्ति.
Coleoptera — पक्षचर्मवर्ग.
Colic — पोटशूळ.
Collectivism — समूहवाद.
Collides — प्रतिस्फटिक.
Combustion — ज्वलन.
Comedy हास्यनाटक.
Common Sense — व्यवहारज्ञान पंथ.
Communism — समतावाद.
Compass — होकायंत्र.
Conchology — शंखशास्त्र.
Concretion — डिखळ.
Concussion of the Brain — मस्तिष्काघात.
Condenser — संचायक.
Confession — पापोच्चार.
Confirmation — दृढीकरण.
Congestion — रक्तसंचय.
Conic Section — शंकुच्छेद.
Coniferales — शंकाकार वृक्ष.
Conjugal Rights — वैवाहिक हक्क.
Conjunction — युति.
Conservative Party — केंद्रसत्तावादी पक्ष.
Consul — राजप्रतिनिधि.
Contour Line — परिधिरेषा.
Contraband — प्रतिबंधित व्यापार.
Cooling Tower — शीतकस्तंभ.
Co-operation — सहकार.
Co-ordinates — दर्शकसंज्ञा.
Coot — पाणकोंबडी.
Copying Ink — कित्ताशाई.
Copyright Act — ग्रंथप्रकाशनाचा मालकी हक्क.
Cordite — निर्धूम स्फोटक.
Corolla — पुष्पमुकुट.
Coroner — मृत्युन्यायाधीश.
Coronium — हरित किरीट.
Corporation — संघसंस्था.
Corundum — कुरुंद.
Corvidæ — काकवर्ग.
Counterpoint — गीतविस्तार.
Court-martial — लष्करी कोर्ट.
Crane — यारी.
Crank — गतिदंड.
Cream of Tartar — द्राक्षक्षीर.
Cream-separator — सलईयंत्र.
Creosote — काष्ठतेल.
Cretaceous System — खडूचे खडक.
Cretinism — भ्रमिष्टपणा.
Crinoidea — स्कंधशाखाधारी.
Crustacea — कर्कवर्ग.
Cryptogamous Plants — अपुष्प वनस्पति.
Crystal — स्फटिक.
Crystallography — स्फटिकशास्त्र.
Cubism — घनाकृति अथवा त्रिपरिमाणात्मक चित्रकला.
Cumulative Vote — संचित मतदान.
Cuneiform Writing — कीलाकृति लिपि.
Cupping — तुंबड्या लावणें.
Cyaniding — नीलिदीकरण.
Cyanogen — नीला.
Cyanosis — नीलपांडु
Cycle — पायगाडी.
Cycloid — चक्राभास.
Cyclone — चक्रवात.
Cynamide — नीलामिद.
Cytology — पेशीशास्त्र.
Death Duties — वारसपट्टी.
Debenture — सार्वजनिक कर्जरोखा.
Decapoda — दशपादवर्ग.
Declination — कलन; नति.
Decorated Style — प्रसाधन शिल्प.
Decree — हुकूमनामा.
Degeneration — र्‍हास.
Degree — अंश.
Deism — केवलेश्वरवाद.
Delirium — भ्रम.
Delta — त्रिभुजप्रदेश.
Democracy — लोकशाही.
Demurrage — धक्काभाडें.
Density — घनता.
Descent — वारसा.

Desertion — परित्याग ; फरारी होणें.
Determination — निर्धारक.
Determinism — नियतिवाद.
Deviation of the Compass—च्युतिकोण.
Dextrine — श्लिष्टक.
Diagonal Scale — कर्णपट्टी.
Diazo Compounds — द्विअझोत संयुक्तें.
Dichogamy — द्वैयुति.
Dichroic Crystals — द्विराग स्फटिक.
Dicotyledon — द्विदल.
Dictator — सर्वाधिकारी.
Dictatorship — हुकूमशाही.
Dictionary — शब्दकोश.
Dictophone — निवेदित-लेखनयंत्र.
Die-sinking — ठसेकाम.
Diffraction — निवर्तन.
Diffusion — अपसरण.
Digitalin — हृत्तीव्रक.
Digitalis — दिरीयघि.
Dinornis — प्रचंड पक्षी.
Dinosauria — प्रचंड सर्प.
Dinotherium — प्रचंड हस्ती.
Diopside — पारदर्शक प्रत्यसिजन्य.
Dipping Needle — सूचिनमन.
Diptera — द्विपक्षी कीटकवर्ग.
Director — चालक.
Disinfection — रोगजंतुनाशन.
Dispersion — विकिरण.
Displacement — स्थानच्युति.
Dispossession — ताबा काढून घेणें.
Disseizin — गैरहक्की कबजा.
Dissociation — विभाजन.
Distemper — १. अस्वस्थता.
२. मिश्ररंग.
Distillation — ऊर्ध्वपातन.
Distilled Water — पातित जल.
Distomum — यकृत कीटक.
Distribution — विभागणी.
Diving Bell — पाणबुडी घंटा.
Divisibility — विभाज्यत्व.

Dock — गोदी.
Dogma — सिद्धान्त.
Dormant State — सुप्ती.
Dragon — पंखाचा साप.
Drain Trap — जलोत्सारक.
Draining — निचरा.
Drawing — रेखाकला.
Drift — ढकला, ढीग.
Drupe — अष्टिफलवर्ग.
Dry-rot — शुष्करोग.
Drying Machine — वाळवण यंत्र.
Ductility — तन्यता.
Dynamics — गतिशास्त्र.
Dynamometer — विद्युद्बलमापक.
Easement — वहिवाटीचा हक्क.
Ebony — आबनूस.
Echinodermata — कंटकत्वक्वर्ग.
Ecliptic — क्रांतिवृत्त.
Economics — अर्थशास्त्र.
Edema — जलशोथ.
Edentata — दंतहीन प्राणी.
Edriophthalmata — स्थिरनेत्र प्राणी.
Effeciency — कार्यक्षमता.
Elain — तैलद्रवतत्त्व.
Elasticity — स्थितिस्थापकता.
Elaterium — विरेचक.
Electric Battery — विद्युद्घटमाला.
,, Fuse — विजेची तार.
,, Heating — विद्युत्तापन.
,, Light — विद्युत्प्रकाश.
,, Motor — विद्युद्गतियंत्र.
,, Power Transmission and Distribution — विद्युच्छक्ति प्रेषण-विभाग.
,, Railway — विद्युल्लोहमार्ग.
,, Rays — विद्युत्किरण.
,, Sorter — विद्युद्विवेचक.
,, Spark — विद्युत्स्फुलिंग.
Electrical Measuring Instrument — विद्युन्मापक यंत्र.
,, Resistance — विद्युत् प्रतिरोध.

Electricity — विद्युत्.
Electrolysis — विद्युद्विश्लेषण.
Electro-magnetism — विद्युच्चुंबकत्व.
Electro-metallurgy — विद्युद्धातुविद्या.
Electro motive Force — विद्युत् प्रेरक.
Electron — अतिपरमाणु( ऋण )विद्युत्कण.
Elephantiasis—हत्तीरोग.
Ellipse — दीर्घवर्तुल.
Ellipsoid — दीर्घवर्तुल गोल.
Elliptic Functions — दीर्घवर्तुल फलें.
Embalming — शवरक्षण.
Embankment — बांध.
Embolism — रक्तस्तंभन, रक्तरोध.
Embroyology — पिंडशास्त्र.
Emetic — वामक.
Emigration — परदेशगमन.
Empiricism — अनुभवजन्य ज्ञानवाद.
Employment Bureau — वृत्तिदात्री संस्था.
Enamel — कांचमिना.
Encaustic Painting — उष्णरंगपद्धति.
Encaustic Tiles — रंगीत फरशी.
Encephalitis Lethargica — मस्तिष्क कुञ्झमांद्य.
Encyclopædia — ज्ञानकोश.
Engineering — स्थापत्य.
Engraving — धातुखोदकाम.
Enteritis — आंत्रशोथ.
Entomology — कीटकशास्त्र.
Entomophaga — कीटकभक्षी.
Entrenchment — खंदक.
Entropy — उष्णतेचें क्षयमान.
Epedemic Disease — सांथीचा रोग.
Ephemera — अल्पायु मत्स्यवर्ग.
Epidermis — बाह्यत्वचा.
Epilepsy — फेंफरें.
Epistemology — न्यायप्रामाण्यशास्त्र.
Epitaph — समाधिलेख.
Epsum Salt — रेचक मीठ.
Equation — समीकरण.
Equation of Time — कालसमीकरण.
Equator — विपुववृत्त.
Equatorial — विपुवयंत्र.
Equidæ — अश्ववर्ग.
Equinoctical Points — संपातबिंदु.
Equity — समन्याय.
Ergot — द्विदलधान्यरोग.
Erosion Theory — क्षरसिद्धान्त.
Erratics — एकाकी गोलशिला.
Erysipelas — धांवरें.
Escapement — कुत्रें ( घड्याळांतील ).
Escheat — बेवारसी मिळकत.
Esophagus — अन्नमार्ग.
Etching — अम्लचित्रलेखन.
Etiolation — श्वेतकरण.
Eudiometer — वायुशुद्धिमापक.
Eugenics — सुप्रजाजननशास्त्र.
Evaporation — बाष्पीभवन.
Evidence — पुराव्याचा कायदा.
Evolution — विकाससिद्धान्त.
Excess Profit Duty — अतिरिक्तलाभ कर.
Exchange — विनिमय.
Expansion — प्रसरण.
Experimental Psychology — प्रायोगिक मानसशास्त्र.
Exploration — उत्खनन.
Explosives — स्फोटकें.
Exponential Theorem — घातसिद्धान्त.
Extradition Act — प्रत्यर्पण कायदा.
Factory Acts — कारखाना कायदे.
Faith-healing — श्रद्धोपचार.
Felidæ — मार्जारवर्ग.
Felsite — सोमकान्त.
Fermentation — विपाक.
Ferns — नेचे.
Feticism — वस्तुपूजा.
Fibrin — तांतव.
Finite Differences — निश्चितांतर.
Fire-clay — अग्निमृत्तिका.
First-aid — प्रथमोपचार.
Fixtures — स्थिरवस्तू.
Flag of Truce — संधिनिशाण.

Flamboyant — ज्वालासदृशशिल्प.
Flavin — पीतरंग.
Flotation of Minerals — धातुप्लावनी.
Fluid — तरल, द्रव.
Fluorescence — स्वयंप्रतिप्रकाश.
Fluorine — प्लव.
Flur-spar — प्लुपस्फटिक.
Flux — संमिश्रक.
Focus — केंद्र.
Font — तीर्थपात्र.
Foraminifera — सच्छिद्रकवचप्राणिवर्ग.
Formalin — पिपीलिन.
Formic Acid — पिपीलिकाम्ल,
Fossils — प्रस्तरीभूत अवशेष.
Foundry — ओतकाम.
Fount — मुद्रासंच.
Fraud — लबाडी
Freedom of Seas — सागरस्वातंत्र्य.
Fresco Painting — गिलावा-चित्रें.
Friction — घर्षण.
Friction Clutch — गतिदायक दंड.
Frigate bird — जहाजपक्षी.
Frost — गोठणथंडी.
Frost-bite — हिमबाधा.
Fructose — फलशर्करा.
Fuller's Earth — खारी माती.
Fumigation — धुरी.
Fungi — अळंबी वर्ग.
Furnace — भट्टी.
Fuse — वात (दारूची).
Fusible metal — द्राव्य.
Fusion — विलीनता.
Futurism — नवयुगकला.
Galena — कच्चें शिसें.
Galvanometer — विद्युत्प्रवाहमापक.
Gangrene — पूतीभवन.
Garnishment — मनाई हुकूम.
Gases — वायू.
Gasoline Engine — धुराचें इंजिन.
Gasteropod — समुद्रगोगलगाय.
Gauge — मापक.
Gaut — संधिविकार.
Gear — गत्यंतरचक्र.
Gearing — गतिचक्रमाला.
Generator — उत्पादक.
Geodesy — भूमापनशास्त्र.
Geography — भूगोलशास्त्र.
Geology — भूस्तरशास्त्र.
Geometry — भूमिति.
Geysers — उन्हाळीं.
Girl Guides — बालिकासमिति.
Glanders — सेंबा.
Glands — गांठी.
Glaucoma — मारा.
Glucose — द्राक्षशर्करा.
Glucosides — शर्करासंयुक्त.
Gnosticism — ज्ञेयवाद.
Goitre — गलगंड, गलग्रंथवृद्धि.
Goniometer — कोणमापक.
Gonorrhœa — परमा.
Goodwill — नेकनामी.
Governor — नियामक.
Grace Days — पर्याप्तिदिन.
Granite — वज्रतुंड.
Gravitation — गुरुत्वाकर्षण.
Grebe — पाणबुड्ये पक्षी.
Guild — व्यापारी संघ.
Guild Socialism — व्यापारी संघसत्तावाद.
Gyro-compass — दिग्दर्शक.
Hallucination — भ्रम.
Halogens — क्षारज.
Harmonic motion — स्वरितगति.
Harmonics — स्वरशास्त्र.
Harvest Moon — समोदयकालिक चंद्र.
Hay Fever — उन्हाळी पडसें.
Heart — हृदय.
Heating — तापन.
Hedonism — सुखवाद.
Heliograph — सूर्यसंज्ञापक.
Heliostat — सूर्यदर्पण.

Heliotherapy — सौरचिकित्सा.
Helium — सौरवायु.
Hermit-crab — वेषधारी.
Hernia — अंतर्गळ.
Herpes — पुरळ.
Heteropoda — विषमपाद.
Heterostyly — भिन्नध्वजा.
Heterotropism — परोपजीवन.
Hippocampus — घोडमासा.
Hippopotamus — पाणघोडा.
Hippuric Acid — अश्वमूत्राम्ल.
Hire-purchase System — भाडेखरेदी पद्धति.
Histology सूक्ष्मपिंडरचनाशास्त्र.
Homicide — मनुष्यवध.
Hone — सहाणदगड.
Horizon — क्षितिज.
Hornblende — शृंगाभासधातु.
Horse-power — अश्वशक्ति.
Hose-pipe — कापडी नळ.
Hybrid — संकरज प्रजा.
Hydra — जलव्याल.
Hydrate — उज्जेत.
Hydraulics — जलशास्त्र.
Hydro-carbon — उत्कर्ब..
Hydrochloric Acid — हराम्ल.
Hydro-dynamics — जलगतिशास्त्र.
Hydro-electric Engineering — जलविद्युद्यंत्रशास्त्र.
Hydro-fluoric Acid — प्लुराम्ल.
Hydrogen — उज्ज.
,, Peroxide — उज्जाद्विप्राणिद.
Hydrography — समुद्रविद्या.
Hydrometer — द्रवगुरुत्वमापक.
Hydropathy — जलोपचार.
Hydrophobia — जलसंत्रास.
Hydrostatics — जलस्थितिशास्त्र.
Hydrozoa — जलव्यालीवर्ग.
Hygienics — आरोग्यशास्त्र.
Hygrometer — आर्द्रतामापक.
Hymenoptera — त्वक्‌पक्ष कीटकवर्ग.
Hyperbola — अतिपरवलय.

Hypnotics — निद्राजनक औषधे.
Hypnotism — मूर्च्छनाशास्त्र.
Hypochondriasis — उद्वेगरोग.
Hypophosphites — उपस्फुरायितें.
Hypophosphorous Acid — उपस्फुराम्ल.
Hyposulphite — उपगंधकायित.
Hypsometer — तुंगतामापक.
Hysteria — उन्माद.
Ichneumon — नकुलवर्ग.
Ichthyology — मत्स्यविज्ञान.
Idealism — कल्पनावाद.
Ignis Fatuous — भूतकोलीत.
Ignition — ज्वलन.
Imbecility — मनोदौर्बल्य.
Immunity — रोगप्रतिबंधकता.
Impedance — विरोध.
,, Coils — विरोधी वलये.
Imperialism — साम्राज्यशाही.
Impetigo — विस्फोटक.
Impressionism — कल्पनावादी कला.
Incandescent — प्रज्वलन.
Incest — गोत्रगमन..
Inclined Plane — उतरण.
Incommensurable — अपरिमेय संख्या.
Indexing — सूचीकरण.
Indicator — दर्शक.
Individualism — व्यक्तिवाद.
Induced Current — प्रवर्तित प्रवाह.
Inductance — स्वयंप्रवर्तन.
Induction — उद्गमन, अनुमानपद्धति.
,, Coil — प्रवर्तन वलय.
,, Generator — प्रवर्तक.
Industrial Schools — औद्योगिक शाळा.
Inertia — जडत्व.
Inflorescence — पुष्पविन्यास.
Injector — जलक्षेपण यंत्र.
Inoculation — टोंचणें.
Insectivora — कीटकभोजी प्राणी.
Insomania — निद्रानाश.
Instinct — सहजप्रवृत्ति.

Insurance — विमा.
Intellect — बुद्धि.
Interference — प्रतिरोध.
Internal Combustion Engine — अंतर्ज्वलन यंत्र.
International Law — आंतरराष्ट्रीय कायदा.
Intuition — अंतःस्फूर्ति.
Invertebrata — अपृष्ठवंश.
Invoice — मालपट्टी.
Ionization — आयनीभवन-करण.
Iritis — कनीनिकादाह.
Iron Bacteria — लोहजीवाणु.
Irrigation — पाणीपुरवठा.
Isobars — सममाररेषा.
Isomerism — समावयवत्व.
Isomorphism — समाकृतित्व.
Isostacy — समास्तरत्व.
Isostopes — समस्थानीय द्रव्य.
Isothermal Lines — समोष्णरेषा.
Jacquard Loom — नक्षीचा माग.
Japaning — लाखाळणें.
Jingoism — चढाऊ देशभक्ति.
Joint — सांधा.
Joint Stock Company — संयुक्त भांडवल संस्था.
Joint Stock Company of Limited Liability — मर्यादित जबाबदारीची संयुक्त भांडवल संस्था.
Joints — प्रस्तरसंधी.
Jointure — विधवाधन.
Judicial Separation — पृथक्निवास.
Jurisprudence — कायदेशास्त्र.
Jury — पंच.
Kaleidoscope — चारुरूपदर्शक.
Kidneys — मूत्रपिंड.
Kieserite — मग्नगंधकित.
Kinematics — गतिगणित.
Lace — किनारी जरकाम.
Lactic Acid — दुग्धाम्ल.
Lactose — दुग्धशर्करा.
Lake-dwellings — सरोगृहें.
Laryngismus — कृकसंकोच.
Laryngitis — कृकदाह.
Larynx — कृक.
Laterite — जांभा दगड.
Lathe-work — कांतकाम.
Latitude — अक्षांश.
Laughing Gas — हास्यवायु.
Lava — ज्वालामुखी रस.
Law of Recapitulation — अनुजीवनावस्था.
Lead-line — बुडीद.
League of Nations — राष्ट्रसंघ.
Legal Tender — कायदेशीर चलन.
Leguminosæ — द्विदल धान्य.
Lepidoptera — खवले किडे.
Letter of Credit — तारणपत्र.
Levelling — समतलीकरण.
Lever — उच्चालक; उटाळी.
Liberal Party — उदार पक्ष.
Library Science — ग्रंथालयशास्त्र.
Licence — परवाना.
Lien — बोजा.
Life-boat — तारक नौका; संरक्षण नौका.
Life-buoy — तारक तुंबी.
Lift — विजेचा पाळणा.
Light — प्रकाश.
Lightening Conductor — विद्युत्संरक्षक (दंड).
Limitation Act — मुदतीचा कायदा.
Liquification of Gases — वायुद्रवीकरण.
Lithography — शिळाछाप.
Liver — यकृत्.
Lock — कोंडी.
Locomotive — गतियंत्र.
Log — नौगतिमापक यंत्र.
Log-book — नोंदवही.
Logarithm — घातगणित.
Logic — तर्कशास्त्र.
Longitude — रेखांश.
Low Temperature Carbonization — नीचोष्ण-कर्बीकरण.
Lupus — वृकविकार.
Lymph — लस.
Machine Gun — यांत्रिक बंदूक.

Magic Lantern — जादूचा कंदील.
Magnate — विद्युच्चुंबक.
Magnesia — मग्नक्षार.
Magnesium — मग्न.
Magnetism — चुंबकशास्त्र.
Magnetomotive Force — चुंबक प्रेरणा.
Magnometer — चुंबकमापक.
Malacopteri — अस्थिमय मत्स्य.
Malaria — हिंवताप.
Mammalia — सस्तन प्राणिवर्ग.
Mammary Glands — स्तनग्रंथी.
Mammoth — प्रचंड हत्ती.
Mandated Territories — शासनादेशित प्रदेश.
Manganese — मंगल.
Manna — वृक्षक्षीर.
Manometer — वैरल्यमापक.
Marl — चिकणमाती.
Mask — नाचाचीं सोंगे.
Mathematics — गणितशास्त्र.
Matter — जडद्रव्य.
Mechanics — यंत्रशास्त्र.
Medicine — वैद्यकशास्त्र.
Melodrama — क्षोभप्रधान नाटक.
Melting-point — द्रवणांक.
Meningitis — मस्तिष्कावरणदाह.
Menstruation — रजोवस्था.
Mensuration — मापनशास्त्र.
Meridian — याम्योत्तर.
Metallography — धातुप्रकृतिविद्या.
Metallurgy — धातुविद्या.
Metamorphosis — रूपांतर.
Metaphysics — अध्यात्मविद्या.
Methane — अनूपवायु.
Metric System — दशमानपद्धति.
Micrometer — सूक्ष्ममापक.
Microphone — सूक्ष्मध्वनिवर्धक.
Milling-machine — दातेयंत्र; दंतुरचक्र.
Mine — पाणसुरुंग.
Mineral Waters — खनिजोदकें.
Minerology — खनिजशास्त्र.
Miniature — लघुप्रतिमा.
Minor — अज्ञान.
Mitosis — अप्रत्यक्ष विभजन.
Mole-cricket — उकीर झुरळ.
Mole-rat — उकीर घूस.
Molecule — अणु.
Mollusca — मृदुकाय प्राणिवर्ग.
Moment of Inertia — भ्रमणप्रेरणा.
Monism — एकतत्त्ववाद.
Monotheism — एकेश्वरवाद.
Moratorium — कर्जतहकुबी.
Morphology — आकारविज्ञान.
Mortmain — अदेय मिळकत.
Mucus — श्लेष्मा.
Mural Painting — भित्तिचित्रें.
Musketry — बंदूक मारणें.
Myelitis — पृष्ठरज्जुदाह.
Myriapoda — अनंतपाद.
Mysticism — गूढविद्यावाद.
National Debt — राष्ट्रीय कर्ज.
Natural Selection — स्वाभाविक संवरण.
Nautilus — सर्पिलकवचप्राणी.
Navicular Disease — नौकास्थिरोग.
Neanderthal Man — पाषाणयुगीन मानव.
Nebula — तेजोमेघ.
Nematelmia — केशकृमी.
Neolithic Age — नवपाषाणयुग.
Nervous System — मज्जातंतुरचना.
Nettle-rash — पित्ताच्या गांधी.
Neuralgia — मज्जातंतुव्यथा.
Neurasthenia — मज्जादौर्बल्य.
Neutrality — तटस्थता.
Nicotine — तंबाखू वीर्य.
Nihilism — शून्यवाद.
Niobium — नायोब.
Nitrate — नत्रेत.
Nitrate of Silver — रजत नत्रित.
Nitre — सोरा.
Nitric Acid — नत्राम्ल.
Nitrification — नत्रीकरण.

Nitrogen — नत्र.
Node — अत्रनस्थान. पात.
Nominalism — नाममात्रतावाद.
Nomography — सारणी-आलेखन.
Non-intervention — तटस्थता.
Nuisance — पीडा.
Numismatics — नाणकशास्त्र.
Nutation — अक्षविचलन.
Obelisk — निमुळता खांब.
Observatory — वेधशाळा.
Obsidian — ज्वालामुखी कांच.
Obstetrics — प्रसूतिविज्ञान.
Oceanography — महासागर-शास्त्र.
Octopus — अष्टपाद.
Ode — उद्बोधगीत; उद्बोधिका.
Old Age Pension — वृद्धपणाचें वेतन
Oligarchy — अल्पजनसत्ताकराज्य.
Orchestra — वृंदसंगीत.
Ore — अशोधित धातु.
Ornithology — पक्षिविद्या.
Orthopædics — बाल्यव्यंगोपचार.
Orthoptera — सरलपक्षवर्ग.
Oscillograph — आंदोलनलेखक.
Osteopathy — अस्थिदोषचिकित्सा.
Otitis — कर्णशोथ.
Ovum — रजोगोल.
Oxalic Acid — आमटी अम्ल.
Oxychloride — प्राणहरिद.
Oxygen — प्राणवायु.
Pacifism — शांततावाद.
Palæolithic Age — पाषाणयुग. पूर्वपाषाणयुग.
Palladium — स्वादुपिंट.
Pancreas — पलाद धातु.
Pantheism — सर्वेश्वरवाद.
Pantograph — आकृतिलेखक.
Parabola — परवलय.
Parallax — लंबन.
Paravane — सुरंगछेदक.
Parhelion — मिथ्यासूर्य.
Parody — विडंबन काव्य.

Parotitis — कर्णमूलशोथ.
Parthenogenesis — निःशुक्रजोत्पत्ति.
Partition Act — वांट्याचा कायदा.
partnership — भागीदारी.
Passover — बन्धोडण सण.
Pass-port — प्रवास परवाना.
Pathology — विकृतिविज्ञान.
Peat — कुजलेलें सर्पण.
Pedometer — पदमापक.
Pelican — पाणकोळी.
Pendulum — लंबक.
Pennatula — समुद्रलेखण्या.
Pepsin — पाचकतत्त्व.
Pericarditis — हृत्कोषदाह.
Perilomitis — आंत्रवेष्टनदाह.
Periscope — पाणबुडी-दुर्बीण
Permanganate — परमांगनेत.
Pernicious Anæmia — जीर्ण रक्तक्षय.
Perpendicular Style — लंबशिल्प.
Perspective — यथादर्शनकला.
Perturbation — मार्गच्युति.
Petition — अर्जी.
Petrol Engine — तैलयंत्र.
Pharmacology — भेषजविज्ञान.
Pharmacopœia — औषधिग्रंथ.
Pharmacy — औषधक्रिया.
Philology — भाषाशास्त्र.
Philosophy — तत्त्वज्ञान.
Phlebitis — सज्जातंतुदाह.
Phlogiston — ज्वलनतत्त्व.
Phonetics — उच्चारशास्त्र.
Phosphorescence — स्फुरप्रकाश.
Phosphoric Acid — स्फुराम्ल.
Phosphoroscope — स्फुरप्रकाशदर्शन.
Phosphorus — स्फुर.
Photo-chemistry — प्रकाशरसायनशास्त्र.
Photo-electric effect — प्रकाशविद्युत्परिणाम.
Photo-grammetry — प्रकाशनिरीक्षण.
Photography — प्रकाशलेखन.
Photometry — प्रकाशमापन.

Photophone — प्रकाशध्वनिवाहक.
Photosphere — प्रकाशक्षेत्र.
Photosynthesis — प्रकाशजन्य संयोग.
Phrenology — मस्तकसामुद्रिक.
Phyllopoda — पर्णपादवर्ग.
Phylloxera — पानउवा.
Physical Dimension — भौतिक परिमाण.
Physics — पदार्थविज्ञानशास्त्र.
Physiocratic System — भूम्यैक सत्तापद्धति.
Physiography — भूप्रकृतिवर्णन.
Physiology — इंद्रियविज्ञान.
Pigmy — ठेंगू.
Pilot — कर्णधार.
Pinion — लघुदंतुरचक्र.
Pisciculture — कृत्रिममत्स्यवृद्धि.
Pitch — स्वरमान.
Pitcher-plant — पात्रपर्ण.
Pituitary Body or Gland — कफस्रावी ग्रंथी.
Placenta — वार.
Planarians — सपाटकृमिवर्ग.
Planimeter — क्षेत्रफलमापक.
Plankton and Nekton — तरणजीवसंघ व प्लवंग.
Plantigrada — पादतलचारी.
Plesiosaurus — प्राचीन जलसर्पवर्ग.
Plethora — रक्ताधिक्य.
Pleurisy — फुप्फुसावरणदाह.
Pleuronectidæ — सपाट मासे.
Pliocene — नवनूतनस्तर.
Plumbaginaceæ — चित्रकवर्ग.
Pluralism — बहुविधत्ववाद.
Pneumatic Dispatch — वायुनलिकाप्रेषण.
Pneumatics — वायुविद्या.
Pneumonia — फुप्फुसदाह.
Polariscope — ध्रुवीभवनदर्शक.
Polarization of Light — प्रकाशध्रुवीभवन.
Poliomyelitis — पृष्ठवंशरज्जुदाह.
Polish Paper — कांचकागद.
Politics — शासनशास्त्र.
Pollen — पराग.
Polyhedron — बहुफलक.
Polymerism — प्रभूतावयवता.
Polyp — अनेकहस्तपाद.
Polyzoa — पेशीसंघप्राणी.
Porphyry — चित्राश्म.
Positivism — प्रत्यक्षज्ञानवाद.
Post-impressionism — उत्तरकल्पनावादी (चित्रपद्धति).
Potash — यवक्षार.
Potassium — पालाश.
Potassium Chlorides — पालाश लवणें.
Potassium Permanganate — पालाश परमंगनेत.
Potential — संभाव्यशक्ति.
Potentiometer — स्थानीय मापक.
Poultry — कुक्कुटसंवर्धन.
Power Transmission — शक्तिप्रेषण.
Practical Chemistry — प्रायोगिक रसायनशास्त्र.
Pragmatism — कृत्यसाधकतावाद.
Predestination — पूर्वसंकेत. ईश्वरी योजना.
Prescription — वहिवाटीचा हक्क.
Preserved Food — संरक्षित अन्न.
Primogeniture — ज्येष्ठवारसा पद्धति.
Prism — त्रिपार्श्व भिंग.
Privy Council — राजन्यायालय.
Probability — संभाव्यता.
Probate — वारसपत्र.
Proboscidea — शुंडाधारी प्राणी.
Process Work — ठसा छपाई.
Producer Gas — उत्पादक वायु.
Progression — श्रेढी. गणितश्रेणी.
Promisory Note — वचनचिठी.
Propionic Acid — प्रतैलिकाम्ल.
Proportional Representation — प्रमाणशीर प्रतिनिधित्व.
Prospectus — योजनापत्रक.
Proteins — ओजोद्रव्यें.
Protocol — अव्वल मसुदा.
Protoplasm — जीवनरस.
Protozoa — एकपेशी प्राणी.
Protozoic — प्रस्तरावशेष काल.
Psoriasis — विसर्पिका.

Psychology — मानसशास्त्र.
Psychotherapy and Psychoanalysis — मानसोपचार व मनोविश्लेषण.
Pteridosperms — बीजधारी नेचे.
Pteropoda — समुद्रफुलपांखरें.
Ptomains — अन्नविष.
Puerperal — सूतिकाज्वर.
Pulley — कप्पी.
Putrification — कुजणें.
Pyrargyrite — श्यामरजन.
Pyro-electricity — उष्मविद्युत्.
Pyrogallic Acid — अग्निजगॅलिकाम्ल.
Pyroheliometer — सूर्यतापमापक.
Pyroligneous Acid — अग्निजकाष्ठाम्ल.
Pyrometer — अग्निमापक. उष्मविद्युन्मापक.
Pyroxenes — लोहमग्नाश्म.
Pyroxyline — अग्निस्फोटक.
Pyrrhotine — माक्षिक (चुंबक).
Quadrant — वर्तुलपाद.
Quadrumna — चतुर्हस्त प्राणी.
Quantum Theory — कणवाद.
Quarantine — निःसंसर्गता.
Quartzite — गारगोटी खडक.
Quaternions — चतुष्क.
Quietism — शांतिवाद.
Quorum — गणसंख्या.
Rack — गतिप्रवर्तक.
Radiation — विसर्जन (उष्णता).
Radio-activity — किरणोत्सर्गशास्त्र.
Radiology — किरणविद्या.
Radiometer — किरणमापक.
Radio Theory — किरणविसर्जन सिद्धान्त.
Ratchet and Pawl — दांति-कुत्रें.
Rationalism — बुद्धिप्रामाण्यवाद.
Realism — वास्तववाद.
Reason — प्रज्ञा.
Receiver — सरकारी वहिवाटदार.
Reciprocity — विनिमय (परस्पर)
Reclaimation — सागरभूमिसंपादन.
Rectification — शोधन.
Reddle — तांबडी माती.
Referendum — सार्वमत संमति.
Reflection — परावर्तन.
Reflector — परावर्तक.
Refraction — वक्रीभवन.
Refractories — दुर्द्राव्यें.
Refrigeration — शीतकरण.
Regulator — नियामक.
Reinforced Concrete — सलोहसंधानक.
Relativity — सापेक्षतावाद.
,, of Knowledge — ज्ञानसापेक्षता.
Remainder — अवशिष्ट हक्क.
Renaissance Architecture — पुनरुज्जीवनकालीन शिल्पकला.
Rennet — विरजणाचें अम्ल.
Representative Government — प्रातिनिधिक सरकार.
Reproduction — प्रजोत्पादन.
Reptiles — सरपटणारे प्राणी.
Reserve — राखीव फौज.
Reservoir — पाण्याचा खजिना.
Resonance — अनुवाद.
Respiration — श्वासोच्छ्वास.
Respirator — नासाच्छादन.
Restraint — निरोधन.
Resurrection — पुनरुत्थान.
Retort — ऊर्ध्वपातनयंत्र.
Revocation — रद्द करणें.
Rheostat — विद्युत्प्रतिबंध नियामक.
Rickets — अस्थिमार्दव.
Right Ascension — विषुवांश.
Right of Sanctuary — निर्भयस्थानाचा हक्क.
Riot — दंगा.
Rocket — दारूचा बाण.
Rodentia — तीक्ष्णदंती.
Rolling Mill — लाटण यंत्र.
Romanticism — अद्भुतवाद.
Rorqual — पर्णमासा.
Rotifera — चक्रभ्रमी (कृमि).
Rotorship — वायुचलित नौका.

Rouge — तांबडी पूड.
Rowing — वल्हवणी.
Rubidium — रूपद.
Saccharimeter — शर्करा( गुरुत्व )मापक.
Safe Deposit Vault — निक्षेपसुरक्षा विवर.
Safety-lamp — रक्षक दीप.
Safety-valve — रक्षक पडदा.
Salicylic Acid — सालनकाम्ल.
Salvage — जलोद्धरण.
Saponification — सर्जीभवन.
Saprophytes — शवोपजीवी वर्ग.
Satire — उपहासात्मक लेखन.
Scale — स्वरपद्धति.
Scarlet Fever — लोहितांगज्वर.
Scepticism — संशयवाद.
Scholasticism — स्कूलमेनचें तत्त्वज्ञान.
Sciatica — जंघाशूल.
Scintillation — चमक.
Screw — मळसूत्र.
Sculpture — मूर्तिशिल्प.
Scurvy — रक्तपित्त.
Sea-anemone — समुद्रपुष्प.
Sea-sickness — समुद्रविकार.
Secondary Cell — दुय्यम विद्युत्घटमाला.
Secretion — स्राव.
Seismograph — भूकंपलेखक.
Sensationalism — संवेदनावाद.
Sensative Flames — संवेदी ज्वाला.
Separation Allowance — वियोगभत्ता.
Septicæmia — पूतिज्वर.
Series — श्रेढीव्यवहार.
Serous Membranes — रक्तजलत्वचा.
Serpentine — सर्पधातु.
Set-off — वजाचाट.
Sex Disqualification Act — लैंगिक अपात्रतेचा कायदा.
Sextant — षष्ठांश यंत्र.
Sexual Selection — लैंगिक संवरण.
Sherardizing — जस्ताळणी.
Short-hand — लघुलेखन.
Signalling — संदेशवाहन. निशाण दाखविणें.
Slide-rule — फिरती पट्टी.
Small Holdings — लघुक्षेत्र.
Social Democrat — समाजलोकसत्तावादी.
Socialism — समाजसत्तावाद.
Sociology — समाजशास्त्र.
Sodium — सिंधु. -Bi-carbonate – सिंधुद्विकर्बनित. -Carbonate – सिंधुकर्बनित. -Hydroxide – सिंधु-उज्जप्राणिद. -Nitre – सिंधुनत्र.
Solar Engine — सौरोष्ण इंजिन.
Solipsism — एकात्मसत्तावाद.
Solution — द्रावण.
Somnambulism — निद्राभ्रमण.
Sonata — वाद्यस्वरमालिका.
Sonics — अनुनादनविद्या.
Sophists — हेत्वाभासवादी.
Special Marriage Act — नोंदणी विवाहाचा कायदा.
Specific Gravity — विशिष्ट गुरुत्व.
Specific Relief Act — विशिष्ट उपायाचा कायदा.
Spectro-heliograph — वर्णप्रकाशलेखन.
Spectroscope — वर्णलेखक.
Spectroscopy — वर्णपटशास्त्र.
Spectrum — वर्णलेख.
Speedometer — गतिमापक.
Spermaceti — व्हेलचरबी.
Sphere — गोल.
Spherical Trigonometry — गोलीय त्रिकोणमिति.
Spherometer — गोलत्रिज्यामापक.
Spinthariscope — अग्निकणदर्शक.
Spleen — प्लीहा.
Sporozoa — रेणुजप्राणी.
Squaring the Circle — वर्तुलचौरस.
Standard Time — प्रमाणकाल.
Starch — पिष्टसत्त्व.
Statics — स्थितिशास्त्र.
Statistics — आंकडेशास्त्र.
Steam-turbine — भ्रामक गतियंत्र.
Stearic Acid — वसाम्ल.
Stereoscope — यथार्दर्शक.

Stereo - chemistry — घनरसायनशास्त्र.
Stock Exchange — सराफा.
Strepsiptera — परिवृत्तपक्षवर्ग.
Streptococcus — शृंखलाकार रोगजंतु.
Strontium — स्रांत.
Strychnine — कुचलीन.
Stucco — संदला.
Sub - consciousness — अर्धजागृति.
Sublimation — संप्लवन.
Submarine — पाणबुडी बोट.
Subpoena — साक्षीसमन्स.
Substance — पदार्थ.
Succinic Acid — अंबराम्ल.
Sulphates — गंधितें.
Sulphonal — गंधकिसल.
Sulphur — गंधक.
,, Dioxide — गंधक द्विप्राणिद.
Sulphurated Hydrogen — गंधकोज्ज.
Sulphuric Acid — गंधकाम्ल.
Sun - stroke — आतपमूर्च्छा.
Superheater — अत्युष्णतायोजना.
Supra - renal Capsules — मूत्रपिंडोपरिस्थिकोप.
Surgery — शस्त्रक्रिया.
Sur - realism — अतियथार्थवाद.
Surveying — निरीक्षण.
Sweating System — मजूरशोषणपद्धति.
Swimming - bladder — वातपेशी.
Switch — विजेची कळ.
Symbiotism — परस्परोपजीवन.
Symphony — स्वरमेळ.
Syncope — झीट.
Syndicalism — श्रमिकसंघवाद; मजूरसंघवाद.
Syphilis — उपदंश.
Tabes — क्षीणता.
Tackle — वेठण.
Tangent — स्पर्शरेषा.
Tanic Acid — खैराम्ल.
Tanks — रणगाडे.
Tantalum — तंतल.
Tape - worm — पट्टकृमि.
Tapestry — जाळीचें कापड.
Tartaric Acid — द्राक्षाम्ल.
Taxidermy — निर्जीवशरीरसंदन.
Telantograph — चित्रलेखक तारायंत्र.
Telegraph — तारायंत्र.
Teleology — प्रयोजनवाद.
Telepathy — दूरविचारवहन.
Telephony — दूरध्वनिशास्त्र.
Telescope — दुर्बीण.
Television — दूरवस्तुदर्शनकला.
Telpherage — शीघ्रवहनपद्धति.
Telurium — भौमद्रव्य.
Tern — समुद्रकोळी.
Terra - cotta — पक्क्या मातीचीं चित्रें.
Terrestrial Magnetism — भूचुंबकत्व.
,, Physics — भूपदार्थविज्ञान.
Territorials — देशवासी सैन्य.
Thallium — थाल.
Thallum — स्थाणु.
Theism — आस्तिक्यवाद.
Theodolite — निरीक्षणयंत्र.
Theology — ईश्वरविज्ञान.
Theory of Projectiles — प्रक्षेपक सिद्धान्त.
Thermo - chemistry — उष्णतारसायनशास्त्र.
Thermo - dynamics — उष्णतागतिशास्त्र.
Thermo - electricity — उष्णमानविद्युत्.
Thermometer — उष्णतामानमापक.
Thorium — थुर.
Thrashing Machine — मळणीचें यंत्र.
Thymol — अजमोदल.
Thymus Gland — शरीरवृद्धिग्रंथि.
Thyroid Gland — मर्कटग्रंथि.
Tiliaceæ — धामणवर्ग.
Tissues — धातुसंस्था.
Titanium — तितन.
Titration — समाकलन.
Torpedo — पाणतीर.
Torsion Balance — पीळकांटा.
Torsion Meters — पीळमापक.
Tort — अपकृत्य.

Totalitarianism — सर्वाधिकारी शासनपद्धति.
Trachetomy — कंठनाडीच्छेदनक्रिया.
Tractor — यांत्रिक नांगर.
Trade Mark — व्यापारचिन्ह.
Trade Union — कामगार संघ.
Transcendentalism — सर्वातीतवाद.
Transformer — रोहित्र.
Trap — काळवथरी.
Treason — राज्यद्रोह.
Treasure Trove Act — गुप्तनिधीचा कायदा.
Treasury Bill — हुंडी.
Trematoda — शोषकरंध्रकृमि.
Trench Mortars — खंदक गरनाळे.
Trespass — अतिक्रमण.
Triassic — त्रिवर्गात्मक.
Trigonometry — त्रिकोणमिति.
Trilobites — त्रिपालिकावर्ग.
Trinity — त्रिमूर्ति.
Trustee — विश्वस्त.
Tubercular Meningitis — कफक्षयीन मज्जावरणदाह.
Tubercular Laryngitis — कफक्षयीन शब्देंद्रियदाह.
Tuberculosis — क्षय.
Tuberculosis Pulmonary — कफक्षय.
Tungsten — तुंगस्थ.
Turbine — जलभ्रामक.
Two-stroke Engine — दुधांवी एंजिन.
Type-writer — टंकयंत्र.
Typhoid — विषमज्वर.
Typhus Fever — प्रलापक संनिपात.
Tyre — बाहेरची धांव.
Ultramicroscope — अतिसूक्ष्मदर्शक.
Ultra-violet Rays — अतिनील किरण.
Unitarianism — एकात्मकेश्वरवाद.
University — विद्यापीठ.
Uredineæ — तांबेरा वर्ग.
Urenium — वरुणधातु.
Urenus — प्रजापति ग्रह.
Uria — मूत्रसत्त्व.
Uric Acid — मूत्राम्ल.
Utilitarianism — उपयुक्ततावाद.
Vacum Tube — निर्वात नळी.
Valency — योजनीयता.
Valve — पडदा.
Vanadium — वनाट.
Ventriloquism — गारुडवाणी.
Verdigris — कळंक.
Vertebrata — सपृष्ठवंशप्राणी.
Vinegar — शिरका.
Viscosity — चिकटपणा.
Vitamins — जीवनसत्त्वें.
Vivisection — प्राणिव्यवच्छेदन.
Vulcanisation — संयोजन.
Warrant — प्रमाणपत्र.
Water-spout — जलस्तंभ.
Wave-theory of Light — प्रकाशलहरीसिद्धान्त.
Welding — जोडणीकाम.
Will — १ मृत्युपत्र. २ इच्छाशक्ति.
Wireless Telegraphy — बिनतारी तारायंत्र.
Xylene — काष्ठिन.
Yaws — उपदंशत्वग्रोग.
Ytterbium — आतीव्र.
Zoology — प्राणिशास्त्र.